विवेक
आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण

# शिल्पकार चरित्रकोश

ही गाथा कर्तृत्वाची! प्रगल्भ नेतृत्वाची!



# ॥ प्राच्यविद्या आणि धर्मपरंपरा ॥

इतिहास । साहित्य । विज्ञान • तंत्रज्ञान • शिक्षण । न्यायपालिका • प्रशासन • संरक्षण । कृषी • पशुसंवर्धन • सहकार । दृश्यकला । चित्रपट • संगीत । नाटक • क्रीडा । समाजकारण • राजकारण । उद्योग • अर्थकारण • पत्रकारिता । आरोग्य ।

विवेक
आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण
शिल्पकार चरित्रकोश
ही गाथा कर्तृत्वाची! प्रगल्भ नेतृत्वाची!

खंड ८

भाग १

# प्राच्यविद्या

संपादक
डॉ. अरुणचंद्र पाठक

खंड सहयोग
ICHR
भारतीय इतिहास अनुसंधान परिषद
(आयसीएचआर), नवी दिल्ली

प्रायोजक
दि सारस्वत को-ऑप. बँक लि.

प्रकाशक
साप्ताहिक विवेक
(हिंदुस्थान प्रकाशन संस्था)

**आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण**
**शिल्पकार चरित्रकोश, खंड ८**
भाग १ : प्राच्यविद्या



**पहिली आवृत्ती :**
माघ शुद्ध नवमी, शके १९३९, २६ जानेवारी २०१८

**प्रकाशक**
साप्ताहिक विवेक (हिंदुस्थान प्रकाशन संस्था)
५/१२, कामत औद्योगिक वसाहत,
सिद्धिविनायक मंदिरासमोर,
३९६, स्वा. सावरकर मार्ग, प्रभादेवी, मुंबई - ४०० ०२५.
दूरध्वनी : (०२२) २४२२ १४४०/५६३९
फॅक्स : (०२२) २४३६ ३७५६
e-mail : charitrakosh@gmail.com
Website : www.maharashtranayak.com

**मुखपृष्ठ व संगणकीय अक्षरजुळणी**
आस्वाद प्रकाशन प्रा. लि., प्रभादेवी, मुंबई.

**पृष्ठरचना**
संजय घुगे, वीणा कुलकर्णी

**मुद्रितशोधन**
वृषाली फडके, मिलिंद वेलिंगकर, सुधांशू नूलकर

**मुद्रक**
सिद्धी ऑफसेट, प्रा. लि., प्रभादेवी, मुंबई - २५.
दूरध्वनी : (०२२) २४२२००६२

**मूल्य :**
१२५०/- रुपये



**भाग १**

# प्राच्यविद्या

**संपादक**
डॉ. अरुणचंद्र पाठक

**कार्यकारी संपादक**
दीपक हनुमंत जेवणे

**संपादकीय सल्लागार समिती**
डॉ. अरविंद प्र. जामखेडकर, डॉ. श्रीकांत बहुतकर,
डॉ. प्रमोद जोगळेकर, डॉ. गौरी माहुलीकर

**संपादकीय साहाय्य**
डॉ. अर्चना कुडतरकर,
सुपर्णा कुलकर्णी,
चित्रा नातू-वझे

**विशेष आभार**
श्री. वा. ल. मंजूळ
भांडारकर प्राच्यविद्या मंदिर, पुणे
भारत इतिहास संशोधन मंदिर, पुणे
पुणे मराठी ग्रंथालय, पुणे
दादर सार्वजनिक वाचनालय, मुंबई
एशियाटिक सोसायटी, मुंबई
डेक्कन महाविद्यालय, पुणे
सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, संस्कृत विभाग

**THE PUBLICATION OF THIS BOOK HAS BEEN FINANCIALLY SUPPORTED BY THE INDIAN COUNCIL OF HISTORICAL RESEARCH. THE RESPONSIBLITY FOR THE FACTS STATED OR OPINIONS EXPRESSED IS ENTIRELY OF THE AUTHOR AND NOT OF THE COUNCIL.**

# भूमिका

‘आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण-शिल्पकार चरित्रकोश प्रकल्पाचा हा आठवा खंड वाचकांच्या हाती देताना आम्हाला आनंद होत आहे. महाराष्ट्राच्या ऐतिहासिक जडणघडणीपासून भविष्यकालीन महाराष्ट्राचा वेध घेण्यापर्यंत या प्रकल्पाची व्याप्ती आहे. इतिहास जरी आपल्याला प्राचीन वैभवाची जाणीव करून देत असला तरी त्यामुळे आपले पूर्णतः समाधान होत नाही. कारण तो लिखित साधनांवर आधारित असतो. लेखनकलेच्या शोधापूर्वी लाखो वर्षे मानव या भूतलावर राहतो. त्यामुळे मानवी संस्कृतीच्या अतिप्राचीन इतिहासाला जाणून घेण्यासाठी पुरातत्त्वविद्येची मदत घ्यावी लागते. मानवी जीवनाचा अभ्यास हे पुरातत्त्वविद्येचे मुख्य उद्दिष्ट म्हणावे लागते. पुरातत्त्वज्ञ निव्वळ खापरे गोळा करणार तंत्रज्ञ नसतो. उत्खननाच्या सहाय्याने मानवी अवशेषांच्या अभ्यासावरून त्याला सांस्कृतिक इतिहास उभा करावा लागतो. यासाठी रसायनशास्त्र, भौतिकशास्त्र, भूगर्भशास्त्र, वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र, मानववंशशास्त्र, संख्याशास्त्र, पुरातन लिपी आणि भाषाशास्त्र या विषयांचेही मोलाचे साहाय्य होते. प्राचीन स्थळांचे अन्वेषण करणे, उत्खनन करणे, अवशेषांचा अभ्यास करून वृत्तान्त प्रकाशित करणे आणि सरतेशेवटी ते अवशेष भावी पिढ्यांसाठी सुरक्षित राहावे म्हणून संग्रहालयात जतन करून ठेवणे अशी अनेक कामे पुरातत्त्वज्ञाला करावी लागतात. प्रस्तुत प्राच्यविद्या खंड हा भारतविद्येची उपासना करणाऱ्या आणि भारताचा प्राचीन इतिहास व संस्कृती जीवित करण्यासाठी झटणाऱ्या अनेक महान चरित्रनायकांचा परिचय करून देणारा आहे.

देशातील धर्मपरंपरा हा विषयसुद्धा इतिहासाशी जोडलेली नाळ सांगतो. मानवसमूहांना जीवन सुसह्य व्हावे आणि सामाजिक संस्कृती साकार व्हावी या हेतूने विविध धार्मिक तत्त्वज्ञाने समाजात विकसित झाली. त्या तत्त्वज्ञानाचा प्रसार करणारे उपासक, अभ्यासक आणि अनुयायीदेखील त्या त्या धार्मिक चिंतनाला लाभले. विविध विचारप्रवाहांमुळे पंथोपपंथ आणि विविध संप्रदाय निर्माण झाले. आस्था, श्रद्धा आणि विश्वास या विषयांवर आधारलेल्या धर्मपरंपरेचा आढावा या खंडातून विविध धर्मज्ञ संत आणि सत्पुरुषांच्या चरित्रांच्या माध्यमातून घेतला गेलेला आहे. परंपरेने चालत आलेले धार्मिक संचित पुढील पिढीकडे सोपविताना त्याच्याशी आधुनिक प्रागतिक विचार यांचा योग्य तो समन्वय घालण्याचे मोठे कार्य या संत आणि सत्पुरुषांनी केले. यामुळे या देशातील धर्मतत्त्वे परिवर्तनशील राहिली आणि तीसुद्धा आपली मूळ चौकट न मोडता आधुनिक विचारांना त्यात सामावत आणि बसवत राहिली. त्यामुळे हे चरित्रनायक त्या-त्या कालखंडातील समाजजीवनाला आकार देतात, असे सिद्ध झाले. प्राच्यविद्या खंड हा मानवी संस्कृतीचे गूढ उकलण्याचा प्रयास करतो तर धर्मपरंपरा खंड धर्मसंकल्पनांच्या गूढतेचे वलय भेदण्याचा आणि त्यातील सत्य जोखण्याचा प्रयास करतो.

खंडासाठी ही सर्व माहिती एकत्रित करणे, त्याचबरोबर हाती आलेल्या माहितीची शहानिशा करणे व तपासून वस्तुनिष्ठ माहिती स्वीकारणे ही प्रक्रिया संपादक मंडळाची कसोटीच पाहणारी होती. प्राच्यविद्या खंडाच्या संपादक मंडळातील डॉ. अरविंद प्र. जामखेडकर, डॉ. श्रीकांत बहुलकर, डॉ. प्रमोद जोगळेकर व डॉ. गौरी माहुलीकर यांनी ते यशस्वीपणे पार पाडले. त्यांचे आणि खंडाचे संपादक डॉ. अरुणचंद्र पाठक यांचे तसेच धर्मपरंपरा खंडाचे संपादक संतसाहित्याचे अभ्यासक विद्याधर ताठे यांचेही आम्ही मनःपूर्वक आभार मानतो. हा प्रकल्प यशस्वी करण्यासाठी विविध विषयांतील तज्ज्ञ, पुरस्कर्ते आणि ग्राहक यांचे सहकार्य लाभले आहे; लाभत आहे; याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहोत. तसेच प्रकल्पाच्या यशस्वीतेसाठी दि सारस्वत को-ऑप. बँक तसेच अन्य प्रायोजकांनीही अर्थपूर्ण सहकार्य केले आहे. त्यामुळे हा प्रकल्प थोडा अधिक काळ घेऊन का होईना, पण निश्चितपणे पूर्ण होईल असा आम्हाला विश्वास वाटतो.

**- दिलीप करंबेळकर**

# कोशरचना

कोणत्याही कोशाचे वाचन कथा अथवा कादंबरीप्रमाणे सलग असे सामान्यपणे केले जात नाही. वाचकास हवा असलेला संदर्भ सुलभपणे आणि शीघ्रतेने उपलब्ध करून देणे, हे कोशाचे प्रमुख प्रयोजन समजले पाहिजे. वाचकांना या कोशाचा उपयोग करणे सोपे आणि सुलभ व्हावे या हेतूने या चरित्रकोशाच्या रचनेबाबत आणि स्वरूपाबाबत माहिती देत आहोत.

**कोशाचे स्वरूप**

कोशाचे दोन मुख्य प्रकार असतात. पहिला प्रकार म्हणजे विशिष्ट विषयाचा व दुसरा प्रकार म्हणजे सर्वविषयसंग्राहक. 'आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण- शिल्पकार चरित्रकोश' हा पहिल्या प्रकारचा म्हणजे विशिष्ट विषयाचा कोश आहे. या प्रकारच्या कोशरचनेचे काही स्वाभाविक फायदे आहेत. भारंभार माहितीतून आपणास हवी असलेली माहिती शोधून काढणे वाचकाला सुलभ आणि सोपे होणे हा सर्वांत मोठा फायदा आहे. प्रस्तुत कोश हा या प्रकल्पातील दृश्यकला खंड आहे. या प्रकल्पाचा आणखी एक विशेष म्हणजे हा व्यक्तिचरित्रकोश आहे. त्यामुळे यात व्यक्तींच्या चरित्रनोंदी दिल्या आहेत.

**संपादकीय भूमिका**

या खंडाच्या संपादक-मंडळाने त्या खंडाची एकंदर पृष्ठसंख्या लक्षात घेऊन चरित्रनायकांच्या नोंदींची विभागणी चरित्रनोंद, टिपण नोंद आणि नामोल्लेख नोंद अशी केलेली आहे. वास्तविक पाहता कोणत्याही चरित्रनायकाच्या एकंदर कार्याचा आवाका हा त्याच्या चरित्रकाराशिवाय अथवा चरित्रअभ्यासकाशिवाय अन्य थोरामोठ्या अभ्यासकांनाही सर्व बारकाव्यांनिशी पूर्णपणे लक्षात घेऊन त्याच्या नोंदींची शब्दसंख्या ठरवून अशी विभागणी करणे, हे जिकिरीचे कार्य होते. कारण अशा विषयाधारित चरित्रकोशात एखाद्या चरित्रनायकाचे सर्वक्षेत्रीय योगदानाचा व कार्यकर्तृत्वाचा सांगोपांग तपशीलवार उल्लेख करण्याचे सूत्र स्वीकारले, तर त्या कार्याला काही अंतच राहत नाही. तसेच प्रत्येक चरित्रनायकाचे सर्वक्षेत्रीय योगदान कथन करणे, हे विषयाधारित कोशाचे उपयोजन नाही व नसते, हे लक्षात घेतले पाहिजे. विषयाधारित कोश त्या व्यक्तीच्या अन्यक्षेत्रीय पैलूंबाबत काही ठरावीक मर्यादेपर्यंतच मार्गदर्शन करू शकतो. चरित्रनायकाचे विशिष्ट क्षेत्रातील कार्यकर्तृत्वाचे नेमके चित्रण करण्याचा एक प्रयत्न, म्हणजे विषयाधारित कोश असतो. तरी संपादक मंडळाने आपले सर्व कौशल्य वापरून या सूचीला अंतिम रूप दिलेले आहे.

**विषयाधारित वर्गीकरण**

चरित्रनायकांचे विषयाधारित वर्गीकरण करताना जाणवणारी अडचण अशी की, एका चरित्रनायकाचे योगदान त्या विशिष्ट कार्यक्षेत्रापुरतेच मर्यादित नसून अन्यही क्षेत्रांत त्याने लक्षणीय अथवा भरीव कामगिरी केलेली आहे असे दिसते. अशा परिस्थितीत एकाच चरित्रनायकाच्या नोंदीची पुनरावृत्ती वेगवेगळ्या खंडांत होऊ नये म्हणून अशा सरमिसळ होऊ शकणाऱ्या चरित्रनोंदींसाठी काही मर्यादा व निकष ठरविण्यात आले. त्यानुसार भिन्न खंडांच्या संपादक मंडळांना तशा सूचना देण्यात आल्या. मात्र अन्य खंडांत या चरित्रनायकांची त्या क्षेत्रातील कामगिरी अधोरेखित करणारी टिपणनोंद घेतली जाईल, याचीही दक्षता घेण्यात आली व अशा सर्व टिपणांच्या सुरुवातीलाच सदर

चरित्रनायकाची मुख्य नोंद ज्या खंडात आहे, त्या खंडाचे नाव देण्याचीही दक्षता घेण्यात आलेली आहे. जेणेकरून वाचकांना ती संपूर्ण नोंद त्या-त्या टिपणासोबत वाचता येईल.

मुख्य चरित्रनोंद ही एकाच खंडात घेण्याचा निर्णय हा मुख्यत्वे सामायिक मुद्द्यांची उदाहरणार्थ जन्म, बालपण, शिक्षण, कौटुंबिक पार्श्वभूमी, मृत्यू यासारख्या माहितीची पुनरावृत्ती टाळण्यासाठीच घेण्यात आलेला आहे. याचबरोबर मुख्य चरित्रनोंद व टिपणनोंद यांच्या ठिकाणी आणखी एक सुविधा देण्यात आलेली आहे, ती म्हणजे चरित्रनायकाचा एका ओळीत परिचय. हा परिचय वाचल्यानंतर त्या व्यक्तीचे बहुआयामी कार्य वाचकांच्या लक्षात येईल व त्या क्षेत्रांच्या अनुषंगाने त्या-त्या विषयांच्या खंडांत चरित्रनायकाच्या टिपणनोंदी त्यांना वाचता येतील.

या टिपणनोंदीत नेमकेपणाने चरित्रनायकाच्या त्या विशिष्ट क्षेत्रातील कार्याची माहिती येईल व व्यक्तीच्या मुख्य नोंदीत त्याचा चरित्रविषयक तपशील व सोबत त्याचे छायाचित्र देण्यात येईल, असा निर्णय खंडाच्या निर्मितीच्या वेळी घेण्यात आला होता, पण काही चरित्रनायकांच्या कार्याला, त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या जडणघडणीला विशिष्ट पार्श्वभूमी असते. त्या विशिष्ट परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर त्या व्यक्तीच्या कार्याचे महत्त्व समजून घेणे आवश्यक असते आणि त्याच्या कार्याचे मूल्यमापन त्या विशिष्ट परिस्थितीच्या संदर्भात करणे उचित असते. अन्यथा अर्धवट माहितीच्या आधारावर चुकीची प्रतिमा वाचकांच्या मनात निर्माण होण्याचा संभव असतो. यावर साधकबाधक विचार करून या खंडात दोन महत्त्वाचे बदल स्वीकारण्यात आले आहेत. पहिला बदल म्हणजे चरित्रनायकाच्या कार्याची पार्श्वभूमी विशद होण्याच्या दृष्टीने काही प्रमाणात पुनरुक्तीचा दोष पत्करून पुरेशी माहिती टिपणनोंदीत समाविष्ट करण्यात आली आहे. तसेच वाचकांच्या सुविधेसाठी या टिपणनोंदीसोबत संबंधित चरित्रनायकांची छायाचित्रेही देण्यात आली आहेत.

**चरित्रनोंदींचे स्थूल स्वरूप**

चरित्रकोशातील नोंदींचे स्थूल स्वरूप पुढीलप्रमाणे आहे. नोंदींच्या पहिल्या ओळीत चरित्रनायकाचे आडनाव प्रथम दिले आहे.

उदाहरणार्थ : **अकलूजकर, अशोक नरहर; उपाध्ये, आदिनाथ नेमिनाथ**

या सर्वसाधारण धोरणास काही अपवाद करावे लागले आहेत. ते पुढीलप्रमाणे आहेत:

काही चरित्रनायकांची पूर्ण नावे अनेक प्रयत्न करूनही मिळू शकली नाहीत. त्यामुळे उपलब्ध असलेली लघुरूप नावे खंडात नाईलाजाने घेण्यात आली आहेत. उदाहरणार्थ : **इंद्रजी भगवानलाल; काजळे, मुकुंद डी., तालीम, मीना व.**

खंडात ज्या नावाने नोंद देण्यात आलेली आहे, ते नाव मोठ्या जाड ठशात पहिल्या ओळीत दिलेले आहे. नंतरच्या दुसऱ्या ओळीत त्या व्यक्तीचे मूळ नाव, उपनाव-टोपणनाव तिरप्या जाड ठशात दिले आहे.

उदाहरणार्थ : **अप्रबुद्ध**

**पालेकर, विष्णू केशव**

यानंतरच्या ओळीत त्या व्यक्तीचे एकंदर योगदान दर्शविणाऱ्या क्षेत्रांचा उल्लेख केलेला आहे. त्यापुढच्या ओळीत चरित्रनायकाच्या जन्म व (दिवंगत असल्यास)मृत्यू ह्या तारखा दिल्या आहेत. जेथे जन्म अथवा मृत्यूच्या तारखा उपलब्ध नाहीत तेथे केवळ साल व शक्य झाल्यास महिनासुद्धा दिलेला आहे. जन्म-मृत्यू तारखा उपलब्ध नसल्यास 'जन्म-मृत्यू दिनांक अनुपलब्ध' असे देण्यात आले आहे. यानंतर चरित्रनोंदीच्या मजकुराची सुरुवात करून त्यात चरित्रनायकाची व्यक्तिगत माहिती, शिक्षण, कार्यक्षेत्राची ठिकाणे व पदे, त्यांचे आपल्या क्षेत्रातील कार्य, त्यांनी गाजवलेले कर्तृत्व, ज्या कार्यासाठी ते प्रसिद्ध आहेत त्याची माहिती, त्यांना मिळालेले मानसन्मान आणि पुरस्कार

 

यांचा उल्लेख केला आहे.

**संदर्भसूची**

चरित्रनोंदीत समाविष्ट माहितीची विश्वसनीयता आणि अधिकृतपणा लक्षात यावा या हेतूने नोंदीच्या शेवटी सदर नोंद लिहिण्यासाठी ज्या संदर्भसाधनांचा वापर केला गेला आहे, त्यांची सूची दिलेली आहे. यामागची भूमिका अशीही आहे की, ज्यांना सदर चरित्रनायकांबाबत अधिक अभ्यास अथवा संशोधक करायचे आहे त्यांना त्याचा उपयोग व्हावा. अशा प्रकारचा खंड प्रथमच सिद्ध होत असल्यामुळे संदर्भसाधनांची त्रुटी जाणवली. तरी या संदर्भलेखनात पुढीलप्रमाणे शिस्त पाळण्यात आली आहे :

*लेखकाचे नाव, संपादक असल्यास तसा उल्लेख; 'साहित्यकृतीचे नाव', साहित्यकृतीचा प्रकार; प्रकाशक, प्रकाशनस्थळ; आवृत्ती, प्रकाशनवर्ष.*

जर नोंद लेखकाने मासिकातील आणि नियतकालिकातील लेखांचा आपल्या लेखनासाठी संदर्भ म्हणून उपयोग केला असेल तर संदर्भलेखनात पुढीलप्रमाणे शिस्त पाळण्यात आलेली आहे:

*'मासिकाचे अथवा नियतकालिकाचे नाव'; प्रकाशन महिना व वर्ष.*

हाती आलेल्या अपुऱ्या माहितीमुळे अपवादाने काही ठिकाणी सदरची शिस्त पाळता आलेली नाही, हे वाचकांनी ध्यानात घ्यावे.

ज्या ठिकाणी नामोल्लेख नोंद घेण्यात आलेली आहे. तेथे दोन प्रकार संभवतातः

१. जर त्या व्यक्तीची अन्य खंडात मुख्य चरित्रनोद दिलेली असेल तर तर्जनी चिन्हाचा उपयोग करून तेथे 'मुख्य चरित्रनोंद समाजकारण खंड, पत्रकारिता खंड आदी नमूद करण्यात आलेले आहे.

२. जर त्या व्यक्तीची नोंद याच खंडात अन्यत्र वेगळ्या नावाने दिलेली असेल, तर तर्जनी चिन्हाचा उपयोग करून ज्या नावाने ती नोंद आढळेल ते नाव देण्यात आले आहे.

**चरित्रनायक वर्गीकरण**

हा विषयाधारित कोश असल्यामुळे यात चरित्रनायकांचा त्यांच्या क्षेत्रातील निकष ठरवून त्यांचा कोशात समावेश करण्यात आलेला आहे. या प्रक्रियेसंबंधीची माहिती प्रत्येक खंडाचे संपादक अथवा समन्वयक यांनी आपल्या संपादकीयात अथवा मनोगतात विस्ताराने दिलेली आहे. तसे पाहता काही व्यक्तींचे कर्तृत्व बहुआयामी असल्यामुळे त्यांची नोंद त्या त्या विशिष्ट खंडात येणे अपरिहार्य असते. उदाहरणार्थ, बाळासाहेब ठाकरे यांची टिपणनोंद या खंडात समाविष्ट केली आहे. त्यांची मुख्य नोंद राजकारण खंडात येणार आहे, पण बाळासाहेब ठाकरे हे व्यंगचित्रकार म्हणून प्रसिद्ध असल्यामुळे हा खंड सिद्ध करताना त्यांची दखल घेणे अत्यावश्यक आहे. अन्य काही चरित्रनायकांचाही अशाच प्रकारे विचार करण्यात आला आहे.

**अकारविल्हे**

चरित्रकोशातील वर्णमाला, सर्व नावांचा अकारविल्हे स्वरानंतर व्यंजने असा पुढीलप्रमाणे असेल:

अ ॲ आ ऑ इ ई उ ऊ ऋ

ए ऐ ओ औ (ं) अनुस्वार (ः) विसर्ग

क ख ग घ ङ

च छ ज झ

ट ठ ड ढ ण

त थ द ध न

प फ ब भ म

य र ल व श

ष स

ह ळ

क्ष ज्ञ

कोशात 'अ-ओ' असा स्वरांचा एक विभाग केलेला आहे व पुढे क, ख, ग... असे व्यंजनानुसार विभाग केलेले आहेत. ज्या अक्षराखाली एकही नोंद नाही, ते अक्षर वगळले आहे. वाचकांच्या सोयीसाठी कोशात अनुक्रमणिकेचाही अंर्तभाव केलेला आहे.

**अनुक्रमणिका**

दोन्ही खंडांची अनुक्रमणिकेची रचना ढोबळमानाने पुढीलप्रमाणे आहे. यात चरित्रनोंदीला अनुक्रमांक न देता पहिल्या स्तंभात चरित्रनायकाचे नाव दिले आहे. या नावाच्या आधी मुख्य चरित्रनोंदीसाठी '●', नामोल्लेख नोंदीसाठी 'O', टिपणनोंदीसाठी '▲' अशा खुणा देण्यात आलेल्या आहेत. चरित्रनायकाच्या नावानंतरच्या स्तंभात या नोंदींचे पृष्ठक्रमांक दिलेले आहेत. या अनुक्रमणिकेतील शेवटचा स्तंभ 'मुख्य नोंद' असा आहे. पृष्ठक्रमांकावर जर नामोल्लेख नोंद असेल व त्या चरित्रनायकाची मुख्य नोंद याच खंडात जेथे असेल तो पृष्ठक्रमांक या स्तंभात दर्शविलेला आहे व त्या चरित्रनायकाची मुख्य नोंद अन्य खंडात असेल तर त्या विशिष्ट खंडाचे नाव या स्तंभात दर्शविले आहे. कोशाबरोबर अनुक्रमणिकेची ही रचनाही वाचकांना उपयोगी ठरेल, असा विश्वास आहे.

**- दीपक हनुमंत जेवणे**

प्रकल्प कार्यकारी संपादक

# मनोगत

आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण - शिल्पकार चरित्रकोश मालिकेतील ‘प्राच्यविद्या’ हे आठवे पुष्प. वास्तविक पाहता या चरित्रकोश मालिकेचा सूत्रपात झाला त्याचवेळेस बहुतेक सर्वच खंडांच्या कामाचा शुभारंभ झाला होता. प्राच्यविद्या खंड ही त्यातील एक होय. या खंडाच्या नियोजनाची प्रारंभिक बैठक पुण्यातील भारत इतिहास संशोधक मंडळात नऊ वर्षांपूर्वी भरली होती. या बैठकीला प्राच्यविद्या क्षेत्रातील एकूण बावीस जाणकार मंडळी उपस्थित होती. प्राच्यविद्या खंडाची भूमिका विशद केल्यानंतर चरित्रनायकांच्या यादीवर विचार करण्यात आला आणि उपस्थित तज्ज्ञांनी भराभर नावे सांगण्यास सुरुवात केली. बघता बघता लांबलचक यादी तयार झाली आणि एकंदर कामाचा मोठा आवाका असल्याचे चित्रच उभे राहिले.

या खंडाचे संपादक म्हणून डॉ. अरुणचंद्र पाठक यांनी जबाबदारी स्वीकारली व डॉ. अरविंद जामखेडकर, डॉ. श्रीकांत बहुलकर, डॉ. प्रमोद जोगळेकर व डॉ. गौरी माहुलीकर या मान्यवरांची संपादकीय सल्लागार समिती तयार झाली. या समितीच्या वारंवार बैठका झाल्या. चर्चेतून या क्षेत्रातील चरित्रनायकांची यादी आकाराला येऊ लागली. या पहिल्या यादीत चारशेहून अधिक नावे होती. चरित्रनायकांची नावे तर मिळाली पण चरित्रनोंद लेखकांचा शोध घेणे हे त्यापेक्षा कठीण होते.

कोशासाठी चरित्रनोंद लिहिताना अनेक मर्यादा येत असतात व शब्दसंख्येचे बंधन पाळावे लागते. प्राच्यविद्येच्या अभ्यासात उत्खननाचे कार्य महत्त्वपूर्ण असते. त्याचप्रमाणे चरित्रनायकांनी केलेले कार्य जरी समोर असले तरी त्यांची चरित्रविषयक माहिती मिळणे दुरापास्त होते व ती माहिती उकरूनच काढावी लागते. सदर चरित्रनायकांचा उत्तम परिचय असलेल्या व्यक्ती आणि त्या क्षेत्रातील तज्ज्ञ व जाणकार मंडळींनीच या चरित्रनोंदींचे लेखन करावे असे धोरण होते. त्याला सुरुवातीच्या कालावधीत काही लेखकांनी अत्यंत उत्तम प्रतिसाद दिला व नोंदीही प्राप्त होऊ लागल्या. मात्र काही लेखकांना वारंवार संपर्क करूनही केवळ अमुक तारखेस नोंद मिळेल असाच प्रतिसाद मिळू लागला. याला दोन कारणे होती. पहिले कारण म्हणजे ज्या व्यक्तींवर नोंदलेखनाची जबाबदारी सोपविण्यात आली होती त्या व्यक्ती अत्यंत कार्यव्यस्त होत्या आणि त्यांच्यावर विविध जबाबदाऱ्याही होत्या. ज्यांना आपल्या कार्यव्यस्ततेतून वेळेचे नियोजन करून लेखन करणे जमले त्यांच्याच नोंदी आम्हाला वेळेवर प्राप्त होऊ शकल्या होत्या. दुसरी गोष्ट म्हणजे लेखनास आवश्यक सामग्री आणि संदर्भसाधने यांची अनुपलब्धता. काहींची लेखनाची इच्छा असूनही संदर्भसाधनांच्या अभावी त्यांना वेळेत लेखन करता आले नाही. आवश्यक ती माहिती जमा होऊ शकली नाही व त्यामुळे लेखन सतत लांबणीवर पडत गेले.

सुरुवातीच्या काळात पुणे येथे मानसी चिंचवणकर या प्राच्यविद्या खंडाच्या समन्वयक म्हणून काम करीत होत्या. त्यांनी कसोशीने पाठपुरावा करून या खंडातील बऱ्यापैकी नोंदी प्राप्त केल्या होत्या. दरम्यानच्या काळात त्या चरित्रकोश प्रकल्प सोडून अन्य कामासाठी बाहेर गेल्या. मग येथे या खंडाला दुसरा समन्वयक शोधण्याऐवजी ते काम मुंबई कार्यालयातून करण्याचे ठरले आणि त्यावेळी ज्या अवस्थेत हा खंड होता तसाच्या तसा तो संपूर्ण साहित्यासकट मुंबई कार्यालयाकडे देण्यात आला. प्रकल्प कार्यकारी संपादक म्हणून मला या खंडाच्या कामाची तशी माहिती होतीच. त्यामुळे हे काम माझ्याकडे आल्यावर मी सर्व साहित्य तपशीलातून नजरेखालून घातले. वेगवेगळ्या याद्यांची तपासणी केली. लेखकांच्या नावपत्त्यांचा धांडोळा घेतला. कोणत्या लेखकांना किती वेळा पाठपुरावा झालेला आहे आणि लेखनाबाबतच्या त्यांच्या अडचणी काय आहेत या गोष्टीही समजून घेतल्या व लवकरात लवकर किती नोंदी मिळू शकतात याबाबत विचार केला. साधारण चार वर्षांपूर्वी पुनः संपादकीय सल्लागार समितीची मुंबई येथील कार्यालयात बैठक झाली व बैठकीत तोपर्यंत झालेल्या कामाचा आढावा घेण्यात आला.

ज्या चरित्रनायकांच्या नोंदी प्राप्त होणे अवघड झालेले होते, त्या नोंदलेखनासाठी अन्य लेखकांचा पर्याय शोधण्यात आला आणि एक प्रकारे पुनश्च हरि ॐ झाला. सर्व लेखकांना पुन्हा नव्याने संपर्क करण्यात आला आणि त्यांना वेळेत नोंदी देऊन सहकार्य करण्याची विनंती करण्यात आली. त्यामुळे नोंदीही मिळू लागल्या. मात्र अडचणी संपुष्टात आल्या नव्हत्या. दरम्यानच्या काळात काही

चरित्रनायकांच्या नोंदी मिळणे अवघडच आहे हे लक्षात आल्याने मुख्य यादीतून काही नावे नाईलाजाने वगळण्यात आली. पुन्हा नवी यादी तयार करून जोमाने पाठपुरावा सुरू झाला. हीच प्रक्रिया एकंदर चार वेळा करावी लागली आणि शेवटी तयार झालेल्या यादीतील बऱ्यापैकी नोंदी कार्यालयास प्राप्त झाल्या. दरम्यान नोंदींवर संपादकीय संस्कार करण्याचे व त्यांचे टंकलेखन करण्याचे काम सुरू झाले होतेच. त्या कामालाही गती मिळाली. नोंदीचे मुद्रितशोधनही करून झाले. नोंदींचे संपादन करताना काही गोष्टी लक्षात आल्या. काही नोंदींत अपूर्ण माहिती होती, ती लेखकांना पुन्हा संपर्क साधून मागविण्यात आली. चरित्रनायकांची नावे पूर्ण नव्हती, त्यांचे जन्ममृत्युदिनांकही नोंदीत उपलब्ध नव्हते. अडचणीचा भाग असा की खंडाच्या कामाला सुरुवात झाल्यावर ज्या नोंदी आल्या होत्या त्यातील चरित्रनायक खंड छपाईसाठी तयार करताना दुर्दैवाने हयात नाहीत असे लक्षात आले; त्यामुळे त्याचीही खातरजमा करून अद्यावत माहिती देण्याचा पूर्ण प्रयत्न करण्यात आला.

खंडाची सर्व पृष्ठे तयार झाल्यानंतर डॉ. श्रीकांत बहुलकर यांनी एक मौलिक सूचना केली. त्यानुसार सर्व हयात चरित्रनायकांना त्यांच्या-त्यांच्या नोंदी पाठवून त्यातील माहितीची अधिकृतता तपासून पाहावे असे ठरले. या सर्व नोंदी मान्यवर जाणकार लेखकांनीच लिहिल्या होत्या, पण मध्यंतरात जो कालावधी लोटला होता, त्यामुळे त्या काळातील घडामोडींचा संदर्भ नोंदीत समाविष्ट होणे आवश्यक होते. मग सर्वच हयात चरित्रनायकांशी संपर्क साधण्याचा प्रयास झाला. त्यालाही बऱ्यापैकी यश आले. काहींनी नवी पूरक माहिती व आपली अलीकडील छायाचित्रे पाठवून चांगले सहकार्य केले. आत्मीयतेने नोंदी तपासून दिल्या. मात्र पृष्ठरचना झालेली असल्यामुळे केवळ अत्यावश्यक सुधारणाच करता येतील, याची कल्पना चरित्रनायकांना देऊन शब्दसंख्येचे बंधन पाळूनच शक्यतो सुधारणा कराव्यात अशीही विनंती केलेली होती. त्यानुसार सुधारणा करून सदर खंड छपाईला सज्ज झाला.

या खंडाच्या सिद्धतेसाठी सर्वच लेखक मंडळींनी अपार मेहनत केलेली आहे. डॉ. प्रमोद जोगळेकर, डॉ. गिरीश मांडके, श्री. वा. ल. मंजूळ यांच्याप्रमाणे अन्य लेखकांनीही अधिकाधिक नोंदी वेळेत पाठवून आम्हाला सहकार्य केले. चरित्रनायकांच्या छायाचित्रांसाठी सर्वच लेखक मंडळींनी मनापासून सहकार्य केले. डॉ. प्रमोद जोगळेकर, डॉ. गिरीश मांडके, श्री. वा. ल. मंजूळ यांच्यासहित अन्य मान्यवरांनाही वेळी-अवेळी संपर्क करण्यात आला, पण त्याबद्दल कोणीही तक्रार केली नाही. उलट आलेली अडचणी निवारण्यासाठी मदतीचा हातच पुढे केला. अशाच प्रकारचा स्वागतार्ह अनुभव अन्य लेखकांच्या संदर्भातही आला. या खंडाचे संपादक डॉ. अरुणचंद्र पाठक आणि संपादकीय सल्लागार समितीचे सदस्यांनाही बरेच परिश्रम आणि दगदग करावी लागली. ती त्यांनी आनंदाने केली. डॉ. पाठक यांच्याशी इतिहास खंडाच्या संपादकीय कामाच्या वेळी चांगलेच सूर जुळले होते. त्यामुळे या खंडाचे संपादकीय काम करताना त्यांनी वेळोवेळी मार्गदर्शन आणि आवश्यक सहकार्य आनंदाने केले. त्याचप्रमाणे डॉ. अरविंद जामखेडकर यांचे सहकार्य घेण्यासाठी त्यांच्याशी वारंवार संपर्क साधण्यात आला. या खंडाला चांगला आकार यावा म्हणून त्यांना बऱ्याचदा विवेक कार्यालयात येऊन बसावे लागले. प्रवासाची दगदग त्यांनी विनातक्रार सहन केली. अगदी भरपावसातही उशीरापर्यंत विवेकच्या कार्यालयात थांबून खंडाचे काम मार्गी लागण्यासाठी सहकार्य केले. या खंडाला अशाच प्रकारची सर्व प्रकारची मदत अनेक मान्यवरांची लाभली आहे. त्या सर्वांचाच येथे नामोल्लेख करणे शक्य नाही, पण त्यांच्या मोलाच्या मदतीमुळेच हा खंड इतक्या चांगल्या प्रकारे तयार करण्यात संपादक मंडळाला यश आले आहे.

कोशाचे काम अवाढव्य या सदरातच मोडत असल्यामुळे त्यात अनेक त्रुटी राहून जातात. तशा प्रकारच्या त्रुटी मान्यवर अभ्यासक आणि वाचकांना यातही आढळतील. संपादक मंडळाच्या नजरेस त्या आणून दिल्यावर पुढच्या आवृत्तीत त्यात सुधारणा करता येतीलच. त्याचप्रमाणे या खंडात समाविष्ट न करता आलेल्या चरित्रनायकांची सूचीही सोबत जोडली आहे. त्यांचीही माहिती कुणाकडे असल्यास त्यांनी अवश्य ती कार्यालयाकडे पाठवावी म्हणजे पुढच्या आवृत्तीत त्यांचा समावेश करणे शक्य होईल.

खंडाबद्दल अभिप्रायांचे स्वागतच आहे. धन्यवाद!

**- दीपक हनुमंत जेवणे**
प्रकल्प कार्यकारी संपादक

# अनुक्रमणिका

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाचे योगदान | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | संशोधक | पुरातत्त्ववेता | अन्य | मुख्य नोंद |
| ▲ कर्वे इरावती दिनकर | ३८ | संशोधक | | मानववंशशास्त्रज्ञ, लेखक | साहित्य खंड |
| ● कलबुर्गी मल्लेराप्पा मडिवाळप्पा | ४० | | | पुराभिलेखविद, संपादक | |
| ● कवीश्वर गजानन वासुदेव | ४२ | संशोधक | | साहित्यतत्त्वविमर्शक, लेखक | |
| ● कवीश्वर दत्तात्रेय धुंडिराज | ४३ | | | संस्कृत पंडित | |
| ● कस्तुरे यज्ञेश्वर माधव | ४४ | | | संस्कृत आचार्य, संपादक, लेखक | |
| ● कहाळेकर भालचंद्र महाराज | ४६ | | | अध्यापक, संघटक, भाषोपासक | |
| ● काजळे मुकुंद डी. | ४९ | संशोधक | | अध्यापक | |
| ● काणे पांडुरंग वामन | ४९ | संशोधक | | धर्मशास्त्र अभ्यासक | |
| ● कानडे मुकुंद श्रीनिवास | ५१ | | | संतसाहित्य अभ्यासक व समीक्षक | |
| ● कानोले विश्वेश्वर अंबादास | ५२ | संशोधक | | इतिहासप्रेमी | |
| ● कामा खर्शेदजी रूस्तमजी | ५३ | | | धर्मपंडित, प्राच्यभाषा अभ्यासक | |
| ● कॉर्निव्हस गुडरून | ५५ | | | प्रागैतिहासिक पुरातत्त्वीय संशोधक | |
| ● कालेलकर नारायण गोविंद | ५५ | | | भाषाशास्त्रज्ञ | |
| ● काशीकर चिंतामणी गणेश | ५६ | | | वेदशास्त्र अभ्यासक, लेखक | |
| ● काळे मोरेश्वर रामचंद्र | ५७ | | | संस्कृत शिक्षक, लेखक, अनुवादक | |
| ● किंकेड चार्लस् ऑगस्टस् | ५८ | | | इतिहासलेखक, अभ्यासक | |
| ● किनले कॅथॉरीना आंद्रिया | ५९ | | | प्राच्यविद्या अभ्यासक | |
| ● कीर्तने नीळकंठ जनार्दन | ६० | | | मराठा इतिहासाचे आद्य टीकाकार | |
| ● कीलहॉर्न फ्रॅन्झ | ६१ | | | प्राच्यविद्या संस्कृत पंडित | |
| ● कुंटे भगवान गणेश | ६२ | | | मध्ययुगीन इतिहासाचे अभ्यासक | |
| ● कुंटे महादेव मोरेश्वर | ६४ | | | कवी, इतिहासकार, षट् दर्शनज्ञ | |
| ● कुंभार आनंद नागप्पा | ६६ | | | पुराभिलेख संशोधक | |
| ● कुरुंदकर नरहर अंबादास | ६८ | | | विचारवंत, समीक्षक | |
| ● कुलकर्णी अनंत रामचंद्र | ७१ | संशोधक | | इतिहासकार | |
| ● कुलकर्णी अंबा | ७३ | | | संगणकीकृत भाषांतर प्रणाली | |
| ● कुलकर्णी वामन महादेव | ७६ | | | सौंदर्यशास्त्र अभ्यासक, समीक्षक | |
| ● कुवलयानंद | ७८ | | | तर्कनिष्ठ योगवैज्ञानिक | |
| ● केतकर गोदावरी वासुदेव | ७९ | | | अध्यापिका, विश्लेषक | |
| ● केतकर श्रीधर व्यंकटेश | ८० | | | समाजशास्त्रज्ञ, ज्ञानकोशकार | |

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाचे योगदान | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | संशोधक | पुरातत्त्ववेता | अन्य | मुख्य नोंद |
| ● केवलानंद सरस्वती | ८४ | संशोधक | | प्राज्ञपाठशाळा संस्थापक | |
| ○ केळकर अशोक रामचंद्र | ८६ | संशोधक | | | साहित्य खंड |
| s केळकर दिनकर गंगाधर | ८६ | | | कवी, संग्रहालयकार | |
| ○ केळकर यशवंत नरसिंह | ८७ | | | कोशकार | साहित्य खंड |
| ● कँडी टॉमस | ८७ | | | कोशकार, भाषांतरकार | |
| ● क्रॅमरिश स्टेला | ८७ | | | इतिहासतज्ज्ञ | |
| ● कोलते विष्णू भिकाजी | ९० | संशोधक | | चिकित्सक संपादक | |
| ● कोल्हटकर केशव कृष्णाजी | ९२ | | | ग्रंथकार | |
| s कोसंबी दामोदर धर्मानंद | ९३ | संशोधक | | नाणकशास्त्र, मानववंशशास्त्र | विज्ञान खंड |
| ● कोसंबी धर्मानंद दामोदर | ९४ | संशोधक | | बौद्धधर्म अभ्यासक | |
| ● कोसंबी मीरा दामोदर | ९७ | संशोधक | | | |
| ● खंदारकर शंकर महाराज | ९९ | | | ग्रंथकार, प्रवचनकार | |
| ● खंडालवाला कार्ल जमशेद | १०० | | | कला समीक्षक, कायदेतज्ज्ञ | |
| ● खरे गणेश हरी | १०१ | संशोधक | | | |
| ● खोबरेकर विठ्ठल गोपाळ | १०३ | | | पुराभिलेख संशोधक, संपादक | |
| ● गजेंद्रगडकर अश्वत्थामा बाळाचार्य | १०६ | | | लेखक, संपादक, भाषांतरकार | |
| ● गर्गे सदाशिव मार्तंड | १०७ | | | कोशकार, पत्रकार | |
| ● गुंथर सोन्थायमार | १०९ | संशोधक | | इतिहास लेखक | |
| ● गुणे पांडुरंग दत्तात्रेय | १११ | | | भांडारकर प्राच्यविद्या संस्थापक | |
| ● गुप्ते रमेश शंकर | ११३ | | | इतिहासवेत्ता | |
| s गुलाबराव महाराज | ११५ | | | | धर्मकारण |
| ● गोखले शोभना लक्ष्मण | ११६ | संशोधक | | पुराभिलेख व नाणकशास्त्र | |
| ● गोखले वासुदेव विश्वनाथ | ११७ | | | बौद्धविद्या पंडित | |
| ● गोगटे विश्वास दत्तात्रेय | ११८ | | | पुरातत्त्व रसायनशास्त्रज्ञ | |
| ● गोडे परशुराम कृष्ण | ११९ | संशोधक | | अभ्यासक, लेखक | |
| ● गोरक्षकर सदाशिव वसंत | १२१ | | | संग्रहालयशास्त्रज्ञ | |
| ● ग्रियर्सन जॉर्ज अब्राहम | १२२ | | | भाषाशास्त्रज्ञ, प्राच्यविद्यापंडित | |
| ● ग्रँट डफ जेम्स कनिंगहॅम | १२३ | | | मराठेशाहीचा आद्य इतिहासकार | |
| ● घाटगे अमृत माधव | १२६ | | | भाषातज्ज्ञ | |

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाचे योगदान | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | संशोधक | पुरातत्त्ववेता | अन्य | मुख्य नोंद |
| ● घुर्ये गोविंद सदाशिव | १२६ | | | मानववंशशास्त्रज्ञ, समाजशास्त्रज्ञ | |
| ● चापेकर नारायण गोविंद | १२९ | संशोधक | | समाजशास्त्रज्ञ | |
| ● चिटणीस विजया | १३० | | | मराठी भाषातज्ज्ञ, लेखक | |
| ● चित्राव सिद्धेश्वरशास्त्री विष्णू | १३२ | | | प्राच्यविद्यापंडित, कोशकार | |
| ● चुट्टिवंश नंदना | १३४ | | | पुरातत्त्वज्ञ, लेखक, संपादक | |
| ● चौहान देवीसिंग व्यंकटसिंग | १३४ | | | प्राच्यविद्यापंडित, स्वातंत्र्यसेनानी | |
| ● जाधव सुरेश वसंत | १३७ | | | पुरातत्त्व छायाचित्र अभिलेखक | |
| ● जामखेडकर अरविंद प्रभाकर | १३८ | | पुरातत्त्वेत्ता | संस्कृततज्ज्ञ | |
| ● जावडेकर शंकर दत्तात्रय | १४० | | | | |
| ● जिनविजय मुनी | १४२ | | पुरातत्त्वेत्ता | | |
| ● जोग केशव पांडुरंग | १४३ | संशोधक | | संस्कृत व्याख्याता | |
| ● जोगळेकर जयवंत दत्तात्रेय | १४४ | | | भारतीय राष्ट-वादाचे अभ्यासक | |
| ● जोगळेकर प्रमोद प्रभाकर | १४७ | | | पुराजीवशास्त्रज्ञ | |
| ● जोगळेकर सदाशिव आत्माराम | १४९ | | | संपादक, लेखक | |
| ● जोशी केशव रामराव | १५० | | | संस्कृत पंडित, तत्त्वचिंतक | |
| ● जोशी गजानन नारायण | १५१ | | | तत्त्वज्ञ, लेखक, स्वातंत्र्यसेनानी | |
| ○ जोशी चिंतामण विनायक | १५३ | | | | साहित्य खंड |
| ● जोशी दत्तात्रेय पंढरीनाथ | १५३ | | | प्राच्यविद्या व इतिहास संशोधक | |
| ● जोशी नीळकंठ पुरुषोत्तम | १५६ | | | मूर्तिशास्त्रतज्ज्ञ, पुरातत्त्वज्ञ | |
| ○ जोशी प्रल्हाद नरहर | १५६ | | | | साहित्य खंड |
| ● जोशी प्रभाकर शंकर | १५६ | | | संस्कृत पंडित | |
| ● जोशी मधुकर रामचंद्र | १५७ | संशोधक | | हस्तलिखितशास्त्र तज्ज्ञ | |
| ● जोशी महादेव मल्हार | १५९ | | | संस्कृत व तत्त्वज्ञान अभ्यासक | |
| ○ जोशी रघुनाथ कृष्ण | १५९ | | | | दृश्यकला |
| ● जोशी रामचंद्र | १५९ | | | पुरातत्त्वीय भूवैज्ञानिक | |
| ● जोशी लक्ष्मणशास्त्री बाळाजी | १६० | | | संस्कृत पंडित, विश्वकोशकार | |
| ● जोशी शिवराम दत्तात्रेय | १६३ | | | भाषाशास्त्रज्ञ, संस्कृत पंडित | |
| ● जोशी सुरेश दामोदर | १६४ | | | लेखक, संग्रहालयतज्ज्ञ | |
| ● झा वसिष्ठ नारायण | १६७ | | | संस्कृत अध्यापक, लेखक | |

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाचे योगदान | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | संशोधक | पुरातत्त्ववेता | अन्य | मुख्य नोंद |
| ● झेलियट एलिनॉर | १६९ | | | दलित चळवळीच्या अभ्यासक | |
| ● ठाकरे केशव सीताराम | १७१ | | | प्रबोधनकार, समाजसुधारक | |
| ● ठोसर हरिहर शाहूराव | १७१ | | | पुराभिलेखविद, इतिहासकार | |
| ● डांगे सदाशिव अंबादास | १७४ | संशोधक | | कोशकार, लेखक | |
| ● डांगे श्रीपाद अमृत | १७६ | | | लेखक, स्वातंत्र्यसैनिक | |
| ● डांगे सिंधू सदाशिव | १७७ | संशोधक | | लेखिका, संपादक | |
| ● डिस्कळकर दत्तात्रेय बाळकृष्ण | १७९ | | | पुराभिलेख तज्ज्ञ | |
| ● ढवळीकर मधुकर केशव | १८१ | | | पुरातत्त्वज्ञ, लेखक | |
| ऽढेरे रामचंद्र चिंतामण | १८१ | | | इतिहास संशोधक, समीक्षक | साहित्य खंड |
| ● तगारे गणेश वासुदेव | १८४ | | | पर्यावरण रक्षक, संस्कृत पंडित | |
| ● तर्खडकर दादोबा पांडुरंग | १८५ | | | मराठी व्याकरणकार | |
| ● तलगेरी श्रीकांत | १८७ | संशोधक | | इतिहास विश्लेषक | |
| ● तारळेकर गणेश हरी | १८८ | | | संस्कृत संगीत पंडित | |
| ● तालीम मीना व. | १८९ | | | पाली भाषा तज्ज्ञ | |
| ● तुळपुळे शंकर गोपाळ | १९० | | | भाषाशास्त्रज्ञ, कोशकार | |
| ● तेलंग काशिनाथ त्र्यंबक | १९२ | | | प्राच्यविद्यापंडित | |
| ● थिटे गणेश उमाकांत | १९५ | | | प्राच्यविद्यापंडित, संस्कृततज्ज्ञ | |
| ● थॉमस पप्पी कुझवेलील | १९७ | | | पुरातत्त्वीय प्राणिविज्ञान शास्त्रज्ञ | |
| ● दप्तरी केशव लक्ष्मण | १९९ | संशोधक | | प्राच्यविद्या चिकित्सक | |
| ● दवे रमेश महिपतराम | २०१ | | | तत्त्वज्ञानाचे अभ्यासक | |
| ● दहेजिया विद्या | २०२ | | | पुरातत्त्व अभ्यासक, अभिरक्षक | |
| ऽदांडेकर शंकर वामन | २०३ | | | तत्त्वज्ञ, संपादक, लेखक | धर्मपरंपरा |
| ● दांडेकर रामचंद्र नारायण | २०६ | | | संस्कृत, भारतविद्या संशोधक | |
| ● दा कुन्हा जोस् गेर्सन | २०७ | | | पुरातत्त्वज्ञ, प्राच्यविद्या संशोधक | |
| ● दाते यशवंत रामकृष्ण | २०८ | | | कोशकार | |
| ● दाते शंकर गणेश | २०९ | संशोधक | | सूचीकार | |
| ● दामले मोरो केशव | २०९ | | | मराठी व्याकरणकार | |
| ● दिवेकर हरी रामचंद्र | २१० | | | संस्कृत लेखक, समाजसुधारक | |
| ● दिवेकर रंगराव रामराव | २११ | | | लेखक, स्वातंत्र्यसेनानी | |

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाचे योगदान | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | संशोधक | पुरातत्त्ववेत्ता | अन्य | मुख्य नोंद |
| ● दीक्षित काशीनाथपंत ना. | २१२ | संशोधक | | लेखक | |
| ● दीक्षित शंकर बाळकृष्ण | २१२ | | | गणित, ज्योतिष्य अभ्यासक | |
| ● देगलूरकर गोरक्ष बंडामहाराज | २१४ | संशोधक | | मूर्तिशास्त्रज्ञ, मंदिरस्थापत्यतज्ज्ञ | |
| ● देव कृष्ण | २१७ | | पुरातत्त्ववेत्ता | प्राच्यविद्याविशारद | |
| ● देवतारे भास्कर | २१८ | | | पुरातत्त्व अभ्यासक | |
| ● देव प्रभाकर रघुनाथ | २१९ | संशोधक | | | |
| s देव शंकर श्रीकृष्ण | २२१ | संशोधक | | स्वातंत्र्यसैनिक | धर्मपरंपरा |
| ● देव शांताराम भालचंद्र | २२२ | | | उत्खनन तज्ज्ञ, पुरातत्त्व अभ्यासक | |
| ● देवस्थळी गोविंद विनायक | २२५ | संशोधक | | संस्कृत प्राध्यापक | |
| ● देवी गणेश नारायणदास | २२६ | | | भाषाशास्त्रज्ञ, लेखक, अभ्यासक | |
| ● देशपांडे गजानन त्र्यंबक | २२८ | संशोधक | | साहित्यशास्त्र चिकित्सक | |
| ● देशपांडे प्रल्हाद नरहर | २३० | संशोधक | | लेखक, संपादक | |
| ● देशपांडे माधव मुरलीधर | २३१ | | | संस्कृत व प्राकृत भाषातज्ज्ञ | |
| ● देशपांडे मधुसूदन नरहर | २३२ | | पुरातत्त्वज्ञ | प्राच्यविद्या अभ्यासक | |
| s देशमुख पंजाबराव श्यामराव | २३६ | | | अभ्यासक, कृषि व शिक्षणतज्ज्ञ | कृषी खंड |
| ● देशपांडे ब्रह्मानंद श्रीकृष्ण | २३७ | संशोधक | | इतिहास अभ्यासक, संपादक | |
| s देशपांडे यशवंत खुशाल | २४१ | संशोधक | | | साहित्य खंड |
| ● दोशी सरयू विनोद | २४४ | | | कलाविषयक तज्ज्ञ | |
| ● द्रविड राजेश्वरशास्त्री | २४५ | | | संस्कृत पंडित | |
| ● द्रविड लक्ष्मणशास्त्री | २४५ | | | संस्कृत पंडित | |
| ● धडफळे मोहन गोविंद | २४६ | | | पाली ग्रंथांचे प्रकांड पंडित | |
| ● धनागरे दत्तात्रेय नारायण | २४८ | | | समाजशास्त्रज्ञ, लेखक | |
| ● धर्माधिकारी त्रिविक्रम नारायण | २४९ | संशोधक | | अध्यापक | |
| ● धारूरकर विठ्ठलशास्त्री दाजीशास्त्री | २५० | | संस्कृत पंडित | | |
| ● नांदापूरकर नारायण गो. | २५१ | संशोधक | | भाषा अभ्यासक | |
| ● नाईक जगन्नाथ विश्राम | २५२ | संशोधक | | अभ्यासक | |
| ● नॉय जेम्स हॅरी | २५४ | | | भाषाशास्त्र तज्ज्ञ व अभ्यासक | |
| ○ नियोगी भवानीशंकर | २५५ | | | | समाजकारण |
| ● पंडित शंकर पांडुरंग | २५६ | | | संस्कृत पंडित अनुवादक | |

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाचे योगदान | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | संशोधक | पुरातत्त्ववेता | अन्य | मुख्य नोंद |
| ● पगडी सेतुमाधवराव श्रीनिवासराव | २५७ | संशोधक | | इतिहासकार | |
| ● पटवर्धन माधव वासुदेव | २६० | | | समीक्षक, अभ्यासक, अनुवादक | |
| ○ पठाण युसुफ महंमद | २६२ | | | | साहित्य खंड |
| ● पणशीकर वासुदेव लक्ष्मण | २६२ | | | संपादक, प्रकांडपंडित | |
| ● पदय्या के. | २६४ | संशोधक | | पुरातत्त्वज्ञ, लेखक | |
| ● पप्पू रघुनाथ सुबराव | २६५ | संशोधक | | पुरातत्त्वज्ञ | |
| ● परांजपे वासुदेव गोपाळ | २६६ | संशोधक | | वेदशास्त्र अभ्यासक | |
| ● पराडकर मोरेश्वर दिनकर | २६७ | संशोधक | | अभ्यासक, प्रकांड पंडित | |
| ● पवार अप्पासाहेब | २६९ | संशोधक | | शिक्षण संचालक | |
| ● पवार जयसिंगराव भाऊसाहेब | २७२ | | | इतिहास संशोधक | |
| ● पळसुले गजानन बाळकृष्ण | २७४ | | | आधुनिक संस्कृत महाकवी | |
| s पांगारकर लक्ष्मण रामचंद्र | २७६ | | | संतचरित्रकार, ग्रंथकार | धर्मपरंपरा |
| ● पाठक अरुणचंद्र शंकरराव | २७७ | | | इतिहास अभ्यासक, लेखक | |
| ● पाठक काशिनाथ बापूजी | २७८ | संशोधक | | शिलालेख तज्ज्ञ | |
| ● पाठक श्रीधरशास्त्री त्र्यंबक | २७९ | | | संस्कृत पंडित | |
| ● पाटील शरद | २८० | | | इतिहास व प्राच्यविद्या अभ्यासक | |
| ● पाध्ये काशिनाथ अनंत | २८१ | | | लेखक, धर्मसिंधुकार | |
| ● पानसे मुरलीधर गजानन | २८२ | | संशोधक | संपादक, लेखक | |
| ● पारसनीस दत्तात्रेय बळवंत | २८३ | संशोधक | | संग्राहक, लेखक | |
| ● पिसुर्लेकर पांडुरंग सखाराम | २८५ | संशोधक | | इतिहास अभ्यासक | |
| ● पीटर्सन पीटर | २८७ | संशोधक | | संस्कृत प्राध्यापक | |
| ● पुसाळकर अच्युतराव दत्तात्रेय | २८७ | | | संस्कृत पंडित, अभ्यासक | |
| s पेंडसे शंकर दामोदर | २८८ | | | संतसाहित्यिक, ग्रंथकार | धर्मपरंपरा |
| ● पोतदार दत्तो वामन | २९१ | संशोधक | | प्राच्यविद्यापंडित | |
| ○ पोहनेरकर नरहर शेषराव | २९२ | संशोधक | | कथाकार, कादंबरीकार | साहित्य खंड |
| ○ प्रियोळकर अनंत काकबा | २९२ | संशोधक | | लेखक | साहित्य खंड |
| ● फडके हरी अनंत | २९३ | संशोधक | | अभ्यासक | |
| ● फादर दलरी | २९४ | संशोधक | | प्राच्यविद्यापंडित | |
| ● फेल्डहौस ॲन | २९५ | संशोधक | | प्राध्यापक, लेखक | |

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाचे योगदान | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | संशोधक | पुरातत्ववेत्ता | अन्य | मुख्य नोंद |
| ● फ्लीट जॉन फेथफूल | २९७ | संशोधक | | शिलालेख-ताम्रपटवाचक | |
| ● बर्कसन कार्मेल | २९९ | संशोधक | | शिल्पकार, छायाचित्रकार | |
| ● बर्जेस जेम्स | ३०० | | पुरातत्ववेत्ता | लिपिशास्त्राचे जनक | |
| ● बहुलकर श्रीकांत शंकर | ३०२ | | | बौद्धविद्या अभ्यासक | |
| ● बाकरे अलका | ३०४ | | | संस्कृत व समाजशास्त्र अभ्यासक | |
| ○ बाबर सरोजिनी कृष्णराव | ३०४ | संशोधक | | लोकसाहित्य अभ्यासक | साहित्य खंड |
| ● बापट धुंडिराज गणेश | ३०४ | | | श्रौतविद्याविशारद, लेखक | |
| ● बापट पुरुषोत्तम विश्वनाथ | ३०५ | संशोधक | | पाली भाषा अभ्यासक | |
| ● बापट विष्णू वामन | ३०६ | | | तत्त्वज्ञ लेखक, अनुवादक | |
| ● बापुदेवशास्त्री नृसिंह सीताराम | ३०८ | | | गणितज्ञ, ग्रंथकार | |
| ● बारलिंगे सुरेंद्र शिवदास | ३०८ | | | तत्त्वचिंतक, लेखक, समीक्षक | |
| ● बाळकृष्ण | ३१० | | | इतिहास अभ्यासक, लेखक | |
| ● ब्यूल्हर योहान गेआर्ग | ३१२ | संशोधक | | प्राध्यापक | |
| ● बेंद्रे वासुदेव सीताराम | ३१५ | संशोधक | | लेखक | |
| ● बेलवलकर श्रीपाद कृष्ण | ३१७ | संशोधक | | लेखक, प्राध्यापक | |
| s भट गोविंद केशव | ३२० | | | संस्कृत नाट्य अभ्यासक | साहित्य खंड |
| ● भट भा.वा. | ३२१ | | | इतिहास अभ्यासक | |
| s भवाळकर तारा चिंतामण | ३२२ | | | लोकसाहित्य अभ्यासक | साहित्य खंड |
| ● भांडारकर देवदत्त रामकृष्ण | ३२३ | संशोधक | | पुरातत्त्वज्ञ | |
| ● भांडारकर रामकृष्ण गोपाळ | ३२५ | | | प्राच्यविद्याविशारद, समाजसुधारक | |
| s भागवत दुर्गा नारायण | ३२९ | | | लोकसाहित्य अभ्यासक | साहित्य खंड |
| ● भागवत राजारामशास्त्री रामकृष्ण | ३३० | संशोधक | | वेदशास्त्रअभ्यासक | |
| ● भागवत वामन बाळकृष्ण | ३३२ | | | लेखक, संस्कृततज्ज्ञ | |
| ● भागवत सखाराम जगन्नाथ | ३३३ | | | लेखक, विचारवंत | |
| ● भाटे सरोजा विद्याधर | ३३४ | | | संस्कृत पंडित, लेखक | |
| ● भावे विनायक लक्ष्मण | ३३५ | संशोधक | | इतिहास अभ्यासक | |
| ● भिडे गणेश रंगो | ३३७ | | | कोशकार, पत्रकार | |
| ● भुसारी रघुनाथ महारुद्र | ३३८ | | पुरातत्त्ववेत्ता | प्राच्यविद्या अभ्यासक, इतिहासकार | |
| ● भोळे भास्कर लक्ष्मण | ३३९ | | | लेखक, विचारवंत | |

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाचे योगदान | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | संशोधक | पुरातत्त्ववेता | अन्य | मुख्य नोंद |
| ● मंगरुळकर अरविंद गंगाधर | ३४१ | | | तत्त्वज्ञ, भाषातज्ज्ञ, लेखक | |
| ● मंजूळ वासुदेव लक्ष्मण | ३४१ | | | ग्रंथपाल, ग्रंथकार | |
| ● मजुमदार रमेशचंद्र हलधर | ३४३ | | | इतिहासकार | |
| ● मलांट-ा जेरी | ३४४ | संशोधक | | प्राध्यापक, लेखक | |
| ● महाजन देविदास लक्ष्मण | ३४५ | | | शिक्षक, भाषातज्ज्ञ, लेखक | |
| ○ मांडवकर भाऊराव मारुती | ३४७ | | | कथा, कादंबरीकार | साहित्य खंड |
| ● मांडे प्रभाकर भानुदास | ३४७ | | | लोकसाहित्य अभ्यासक | |
| ● माईणकर त्र्यंबक गोविंद | ३४९ | | | प्राध्यापक, भाषातज्ज्ञ, लेखक | |
| ● माटे मधुकर श्रीपाद | ३५१ | संशोधक | पुरातत्त्वज्ञ | प्राध्यापक, लेखक, | |
| ● मावजी पुरुषोत्तम विश्राम | ३५२ | | | इतिहास अभ्यासक, संग्राहक | |
| ● माहुलीकर गौरी | ३५३ | संशोधक | | संस्कृत भाषा अभ्यास | |
| ● मिराशी वामन विष्णू | ३५४ | | पुरातत्त्ववेत्ता | नाणकशास्त्रज्ञ | |
| ● मिश्र वीरेंद्रनाथ | ३५६ | संशोधक | | मानवशास्त्रज्ञ | |
| ● मिश्रा शीला | ३५८ | | | अश्मयुगीन पुरातत्त्व संशोधक | |
| ● मुजुमदार गणेश गंगाधर | ३५९ | संशोधक | | | |
| ● मुन्शी कन्हैयालाल माणेकलाल | ३६१ | | | संस्कृत अभ्यासक, साहित्यिक | |
| ● मुसळगावकर गजानन सदाशिव | ३६३ | | | संस्कृत पंडित, लेखक | |
| ● मेडोजटेलर फिलिप | ३६४ | | | इतिहास, पुरातत्त्व अभ्यास | |
| ● मेहेंदळे मधुकर अनंत | ३६५ | | | प्राध्यापक, भाषाशास्त्रज्ञ | |
| ● मॅक्समूलर फ्रेडरिक विल्हेम | ३६७ | | | भाषाशास्त्रज्ञ, संपाद | |
| ● मोरवंचीकर रामचंद्र श्रीनिवास | ३६८ | | | इतिहास संशोध | |
| ● मोरे शेषराव बापुराव | ३७१ | | | लेखक, विचारवंत | |
| ● मोल्सवर्थ जेम्स टी. | ३७३ | | | मराठी शब्दकोशकार | |
| ● यार्दी मधुकर रामराव | ३७५ | संशोधक | | ग्रंथपाल | |
| ● राजगुरु शरद नरहर | ३७७ | | | भूपुरातत्त्वशास्त्रज्ञ | |
| ● राजवाडे विश्वनाथ काशिनाथ | ३७९ | | | इतिहासाचार्य | |
| ● राजवाडे वैजनाथ काशिनाथ | ३८१ | | | निरुक्त अभ्यासक, व्युत्पतिशास्त्रज्ञ | |
| ● रानडे महादेव गोविंद | ३८२ | | | समाजसुधारक, विचारवंत | |
| ● रानडे रामचंद्र दत्तात्रय | ३८५ | | | तत्त्वज्ञ, तत्त्वचिंतक, लेखक | |

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाचे योगदान | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | संशोधक | पुरातत्त्ववेत्ता | अन्य | मुख्य नोंद |
| ● राव एम. एस. नागराज | ३८६ | | | अभिरक्षक, संचालक | |
| ● राव क्षमा | ३८७ | | | संस्कृत भाषातज्ज्ञ | |
| ● राशिवडेकर अप्पा सदाशिव | ३८९ | | | आद्य संस्कृत वृत्तपत्रकार | |
| ● राहुरकर वसंत गजानन | ३९१ | संशोधक | | संस्कृत प्रसारक | |
| ● रित्ती श्रीनिवास हनुमंताचार्य | ३९२ | | | पुराभिलेखतज्ज्ञ, इतिहासकार | |
| ● ऱ्हिस डेव्हिड्स थॉमस विल्यम | ३९४ | संशोधक | | बौद्ध वाङमय अभ्यासक | |
| ● ऱ्हिस डेव्हिड्स कॅरोलिना | ३९५ | संशोधक | | बौद्ध वाङमय अभ्यासक | |
| ● रेगे मेघश्याम पुंडलिक | ३९५ | | | तत्त्वज्ञ, प्राध्यापक | |
| ● लाड पुरुषोत्तम मंगेश | ३९९ | | | अभ्यासक, अर्थशास्त्रज्ञ | |
| ऽलाड भाऊ दाजी | ३९९ | | | प्राच्यविद्यापंडित, समाजसेवक | विज्ञान-तंत्रज्ञान |
| ● लामतुरे रामलिंगप्पा खंडप्पा | ४०१ | संशोधक | | पुरातन वस्तु संग्राहक | |
| ● लाळ्ये प्रमोद गणेश | ४०३ | संशोधक | | अभ्यासक | |
| ● लिमये विष्णू प्रभाकर | ४०४ | | | अभ्यासक, लेखक, संपादक | |
| ● लेले वामन केशव | ४०५ | | | भाषा अभ्यासक, समीक्षक | |
| ● लेवी सिल्व्हन लुईस | ४०७ | संशोधक | | फ्रेंच प्राच्यविद्यापंडित | |
| ● वझे कृष्णाजी विनायक | ४०९ | संशोधक | | स्थापत्यविशारद | |
| ● वर्णेकर श्रीधर भास्कर | ४०९ | | | संस्कृत पंडित, प्रज्ञाभारती | |
| ● वऱ्हाडपांडे नीलकंठ रघुनाथ | ४११ | संशोधक | | पुरातत्त्वीय इतिहासतज्ज्ञ | |
| ● वाकणकर विष्णू श्रीधर | ४१५ | संशोधक | | पुरातत्त्वीय व शैलचित्र अभ्यासक | |
| ● वाकणकर सिद्धार्थ यशवंत | ४१७ | संशोधक | | हस्तलिखित व भाषाशास्त्रज्ञ | |
| ● वाटवे केशव नारायण | ४१८ | | | प्राध्यापक, समीक्षक, अभ्यासक | |
| ● वाडेकर देविदास दत्तात्रय | ४१९ | | | तत्त्वज्ञानाचे अभ्यासक, प्राध्यापक | |
| ● वाडेकर मुकुंद लालजी | ४२० | | | धर्मशास्त्रे व स्मृती अभ्यासक | |
| ● वाडेकर रंगनाथ दत्तात्रय | ४२१ | संशोधक | | भाषातज्ज्ञ, संस्कृत पंडित | |
| ● वाळिंबे रामचंद्र शंकर | ४२२ | | | साहित्यिक, संस्कृत तज्ज्ञ | |
| ● वाळिंबे सुभाष रामचंद्र | ४२४ | संशोधक | | पुरामानवविज्ञान तज्ज्ञ | |
| ● वेलणकर हरी दामोदर | ४२५ | | | संस्कृत पंडित, ग्रंथकार | |
| ● वैद्य उमा चंद्रशेखर | ४२७ | | | प्राध्यापक, संस्कृत तज्ज्ञ | |
| ● वैद्य चिंतामण विनायक | ४२८ | | | इतिहासतज्ज्ञ, अभ्यासक | |

**प्राच्यविद्या खंडासाठी खालील यादीतील चरित्रनायकांची माहिती प्राप्त होऊ शकली नाही.**
**आगामी आवृत्तीत ही माहिती समाविष्ट करण्याचा प्रयत्न राहिल.**

कांगा एम. एफ.

कुन्हा ज. जी.

गुणे व्ही. टी.

गोरेकर एन. एस

ग्रॅहम थॉमस

नाईक ए. व्ही.

पथी टी. व्ही.

पदे जगन्नाथ श्रीधर

भयाणे हरिवल्लभ चुनीलाल

महाजन मालती

मियाजी आकिरा

मुळे सुमती

मेहेंदळे ग.भा.

मोघे शांताराम जी.

मोदी जे.जे.

मोरायस

याझदानी

लीझ मेरेलिन

वऱ्हाडपांडे म.ल.

शर्मा आय.के.

सरकार जदुनाथ

हंटिंग्टन सूझन

# प्रस्तावना

## इतिहास, पुरातत्त्व आणि कलेतिहास

आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण–शिल्पकार चरित्रकोश या प्रकल्पाअंतर्गत आत्तापर्यंत इतिहास, मराठी वाङ्मय, शिल्पकार व चित्रकार, चित्रपट व संगीत असे कोश प्रकाशित झाले आहेत. साहित्य, धर्म व अध्यात्म या प्रस्तुत खंडात पुरातत्त्व, प्राच्यविद्या व कलेतिहास या ज्ञानशाखांद्वारे गेल्या दोन शतकांत संशोधकांनी कुठल्या प्रकारे योगदान केले, हे त्यातील ठळक व्यक्तींच्या चरित्राद्वारे जाणून घेणार आहोत. इतिहास म्हणजे प्राचीन इतिहासाच्या खंडात अधिकारी व्यक्तींनी केलेल्या संशोधनामुळे इतिहास, धर्म, तत्त्वज्ञान या क्षेत्रांत कुठल्या प्रकारचे चित्र उभे राहते याचे चित्र पडताळून पाहिले आहे. प्रस्तुत खंडात या विषयातील अधिकारी व्यक्तींची/संशोधकांची चरित्रे समाविष्ट केली आहेत. ही यादी शक्य तितकी सर्वसमावेशक व परिपूर्ण करण्याचा प्रयत्न संपादक मंडळाने केला आहे. प्रयत्न करूनही काहींची अर्थगर्भ माहिती/संदर्भ प्राप्त न झाल्याने काहींचा त्यात समावेश होऊ शकला नाही. त्यामुळे विषयातील एखाद्या महत्त्वाच्या अधिकारी व्यक्तीचा अथवा संशोधकांचा ग्रंथात समावेश होऊ शकला नाही, असे आढळल्यास त्या संशोधकाचा अवमान न समजता संपादक मंडळाचे प्रयत्न अपुरे पडले एवढेच समजावे. हे काम अनुस्यूतपणे चालणार असल्याचे अभिप्रेत असल्याने चाणाक्ष वाचकांनी त्रुटी लक्षात आणून दिल्यास संपादक मंडळ आभारी असेल.

प्राचीन, मध्ययुगीन आणि आधुनिक या इतिहासातील कालखंडांच्या विभाजन रेषा नेमक्या कुठल्या, या विषयावर अनेक संशोधकांनी चर्चा केल्यानंतरही त्या संबंधीचे वादविवाद अजूनही संपुष्टात आलेले नाहीत. डच, पोर्तुगीज, इंग्रज आणि फ्रेंच या व्यापारी कंपन्यांनी भारतात प्रवेश केलेलाच होता. सर्वांत प्रथम आले ते पोर्तुगीज. इ.स. १४९२मध्ये वास्को-द-गामा भारताच्या किनारपट्टीवर शोध घेत घेत पोहोचलाही. समुद्रमार्गे भारताचा शोध घेण्याचा तो खटाटोप संशोधनाच्या ऊर्मीबरोबरच व्यापार वाढवण्याच्या ईर्ष्येतूनही झाला होता. त्यामुळेच पोर्तुगीजांपाठोपाठ इतर युरोपीय देशही सतराव्या शतकापर्यंत मुघलांच्या दरबारात हजर झाले होते. व्यापार करणाऱ्या कंपन्यांना त्या-त्या राष्ट्रातून राजकीय पाठिंबा होता. या युरोपीय मोहिमांचा परिणाम म्हणून उत्तर व दक्षिण अमेरिका, आफ्रिका, दक्षिण व

आग्नेय आशिया, ऑस्ट्रेलिया व न्यूझीलंड येथे मोठ्या प्रमाणावर युरोपीय वसाहती निर्माण झाल्या. भारतात इंग्रजांच्या वसाहतीवर इ.स. १८१८मध्ये शिक्कामोर्तब झाले आणि एका नव्या युगाची सुरुवात झाली.

मुळात व्यापारी हेतू असलेल्या या मोहिमेचे राजकीय महत्त्वाकांक्षेत रूपांतर व्हावयास वेळ लागला नाही. युरोपच्या विशिष्ट सांस्कृतिक आणि पश्चिम आशियाई धार्मिक दृष्टीकोनामुळे त्यात धर्मांतर हे अभिप्रेतच होते. राजकीय सत्ता प्रस्थापित होण्याबरोबरच सुव्यवस्थेचा भाग म्हणून युरोपीय कायद्याची अंमलबजावणी, शिक्षणपद्धती, पाश्चात्त्य नीतिमत्ता व तत्त्वज्ञान यांचा प्रभाव व त्याचबरोबर एतद्देशीय किंवा वसाहतीतील एतद्देशीय समाजजीवनात त्यांचा शिरकावही झाला.

मराठा संस्थाने (Maratha Confederation) प्रारंभी मोगलांची प्रतिस्पर्धी, पण नंतर त्यांची संरक्षक अशी प्रबळ सत्ता होती. त्यांच्या पुणे येथील केंद्राचा पराभव झाल्यानंतरच ईस्ट इंडिया कंपनी ही संपूर्ण भारतातील प्रबळ राज्यसत्ता म्हणून प्रस्थापित झाली.

युरोपीयांनी संतुलित आर्थिक व्यवहारातील प्रचंड लाभ टिकवण्यासाठीच राजकीय सत्तेचा वापर केला असे नाही, तर अनुषंगाने धर्मप्रसाराचे पवित्र कार्य करण्यासाठीही केला. केवळ दीनदुबळ्यांची सेवा आणि अज्ञान्यांसाठी ज्ञानाची कवाडे उघडण्यासाठी मिशनरी चर्चेस, इस्पितळे आणि शाळा चालवत नव्हते, तर त्या माध्यमातून ख्रिश्चन धर्माचा प्रसार करावा असाही त्यांचा उद्देश होता. टोपीवाल्यांच्या आगमनामुळे व्यापारउदीमात वाढ झाली. ज्याचे लाभ स्पष्ट दिसतात अशा नवीन तंत्रज्ञानाची ओळख झाली. पण आर्थिक आणि राजकीय पारतंत्र्याबरोबरच धार्मिक स्वातंत्र्य गमावून बसू की काय, ही भीती मात्र सर्वसामान्यांच्या मनात घर करून राहिली होती. पश्चिम भारत (म्हणजे जुना मुंबई इलाखा) व विशेषत: महाराष्ट्रापुरता विचार करावयाचा झाल्यास ख्रिश्चन मिशनऱ्यांबरोबरच मुंबईतील समाजधुरीणांनी शाळा काढल्या. सरकारने एल्फिन्स्टन महाविद्यालय, ग्रँट मेडिकल कॉलेज व नंतर मुंबई विद्यापीठ (Mumbai University) यांसारख्या मुंबईत व इतरत्र न्यू पूना कॉलेज (नंतरचे डेक्कन महाविद्यालय) यांसारख्या संस्थांद्वारे उदार पाश्चात्त्य शिक्षणाची दारे नेटिव्हांकरिता उघडून दिली.

या संदर्भात डॉ. भाऊ दाजी लाड यांचे उदाहरण महत्त्वाचे ठरेल. डॉ. भाऊ दाजी लाड यांचा जन्म १८२४चा व त्यांची कारकिर्द १८७४मध्ये संपली. हिंद शिक्षण पुस्तक शाळा या **नेटिव्हांसाठी (स्थानिकांसाठी)** उघडलेल्या शाळेत त्यांचे प्राथमिक शिक्षण झाले. त्यानंतर एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूटमध्ये प्रगत शिक्षण झाल्यानंतर **असिस्टन्ट टीचर** म्हणून त्यांची नेमणूक झाली. ग्रँट मेडिकल कॉलेजची स्थापना झाल्यानंतर तिथून उत्तीर्ण झालेल्या पहिल्या डॉक्टरांपैकी ते एक होते. त्यांनी इतर डॉक्टरांप्रमाणे शासकीय अथवा तत्सम सेवांत सामील न होता स्वतंत्र वैद्यकीय व्यवसायास सुरुवात केली आणि एक उत्तम वैद्य आणि शल्यचिकित्सक म्हणून अल्पावधीतच लौकिक मिळवला. लॅन्सेट या वैद्यकशास्त्रास वाहिलेल्या नियतकालिकात त्यांचा गौरव करणारा लेख प्रसिद्ध झाला. अल्पावधीतच या तरुण वैद्याने इतकी वाहवा मिळविली की, लॅन्सेटसारख्या विदेशस्थ नियतकालिकाला त्याची दखल घ्यावी लागली. एवढेच नाही, तर या वैद्याची प्रॅक्टिस इतकी मोलाची आणि भारदस्त होती की, इंग्लंडमधल्याही एखाद्या नव्या वैद्याला त्यांचा हेवा वाटावा. संपादकांनी पुढे असेही मत व्यक्त केले आहे की, भाऊ दाजींच्या यशाचा व उत्कर्षाचा आढावा घेण्याचा उद्देश असा आहे की, एका ठिकाणाहून दुसऱ्या अगदी कोऱ्या ठिकाणी तंत्रज्ञान नव्याने रुजवल्यावर त्याची वाढ कशी होते, हे पाहणे मनोरंजक ठरते. युरोपात तंत्रज्ञान वाढले ते झालेल्या विकासाचा/उत्क्रांतीचा नैसर्गिक क्रम म्हणून. परंतु वैद्यकशास्त्राचे इंग्रजांनी केलेले हे प्रत्यारोपण यशस्वी झाले, याचे उत्तम उदाहरण म्हणजे डॉ. भाऊ दाजी यांचे यश होय.

डॉ. भाऊ दाजी यांचे अल्प आयुष्य (इ.स. १८२४-१८७४) आणि त्यांनी वनस्पतिशास्त्र व इतर भौतिकशास्त्रे,

आयुर्वेद व ॲलोपॅथी वैद्यकशास्त्र, प्राचीन भारतीय इतिहास व अभिलेख, नाणकशास्त्र यांसारख्या त्याच्या शाखा, प्राचीन भारतीय खगोलशास्त्र, अभिजात संस्कृत साहित्य या विद्याशास्त्रांमध्ये मिळवलेले नैपुण्य आणि मूलगामी संशोधन यांमुळे लॅन्सेट या नियतकालिकाने केलेल्या त्यांच्या मूल्यमापनाचे महत्त्व लक्षात येते. रोमन साम्राज्याच्या विलयानंतर युरोपीय संस्कृती मध्ययुगाच्या अंधारात निमग्न झाली. क्रुसेडच्या काळात अरबी भाषेतील वाङ्मयाच्या परिशीलनाने ग्रीक व रोमन शास्त्रज्ञांनी व तत्त्वज्ञांनी पाठीमागे ठेवलेल्या वैचारिक संचिताचे महत्त्व युरोपमधील विद्वानांच्या लक्षात आले. यातूनच युरोपच्या सांस्कृतिक पुनरुज्जीवनाला (Renaissance ला) सोळाव्या शतकात सुरुवात झाली. युरोपने भौतिक आणि नैसर्गिक विज्ञानाच्या क्षेत्रात आपली ज्ञानाची क्षितिजे अधिक विस्तारली. गणित, खगोलशास्त्र, पदार्थविज्ञान, रसायनशास्त्र, भूगर्भशास्त्र, मानववंशशास्त्र आणि तत्त्वज्ञान या ज्ञानशाखांतील व अभियांत्रिकीतील (techonology) प्रगतीमुळे सैनिकीदृष्ट्या युरोपीय राष्ट्रे अधिक सक्षम झाली आणि त्याचाच परिणाम म्हणून लष्करी बळाच्या जोरावर अमेरिका, आफ्रिका, आशिया या तिन्ही खंडांत युरोपियन वसाहती निर्माण झाल्या.

भारतीय उपखंड आणि सभोवतीचे प्रदेश हे युरोपीयांची आणि विशेषत: इंग्रजांची वसाहत (colony) झाल्याने तेथील प्रजेस आर्थिक आणि राजकीय पारतंत्र्यास सामोरे जावे लागले. हे खरे असले, तरी ईस्ट इंडिया कंपनीचा मुलकी आणि लष्करी अधिकारिवर्ग शप्रशासित करावयाचा भूप्रदेश व मोठ्या संख्येने प्रजा लक्षात घेता, संख्येने तुटपुंजा होता, असेच म्हणावे लागेल. त्यामुळे विशेषत: मुलकी प्रशासनात एतद्देशीयांना सामावून घेणे भाग होते. न्यायसंस्थांनी दिलेल्या निवाड्याच्या अंमलबजावणीत असलेल्या गृहखात्याच्या (Home Department च्या) पोलीस यंत्रणेतच नाही, तर निवाडा करतानासुद्धा परंपरागत न्याययंत्रणेचा इंग्रजांना उपयोग करावा लागला. इंग्रजी मुलकी कायदा जसाच्या तसा हिंदी प्रजेस लागू करणे शक्य नसल्याने व इंग्रजी अधिकारिवर्गाच्या प्रतिष्ठेसाठी ते इष्ट नसल्याने हिंदी प्रजेसाठी दिवाणी आणि फौजदारी कायदे व विधिनियमावली (Civil and Criminal Procedure Code) तयार करावी लागली. निवाडा करताना धर्मशास्त्रात व स्मृतिग्रंथात पारंगत असणाऱ्या विद्वानांची आणि इस्लामच्या संदर्भात मुल्ला-मौलवींची मदत घ्यावी लागली. मुलकी प्रशासनासाठी दुय्यम स्तरावरील अधिकाऱ्यांना व इतर कर्मचाऱ्यांना इंग्लिश भाषेत प्रावीण्य मिळवण्यासाठी अभ्यासक्रम तयार करून शासकीय व अशासकीय शैक्षणिक संस्थांची मदत घ्यावी लागली. प्रत्येक इलाख्यात शैक्षणिक मंडळे निर्माण करून शिक्षण देण्याच्या यंत्रणेत सुसूत्रता आणावी लागली.

बऱ्याच प्रमाणात प्रशासनाच्या गरजेपोटी व काही अंशी माउंट स्टुअर्ट एल्फिन्स्टनसारख्या उदारमतवादी विचारवंतांच्या धोरणामुळे नवीन शिक्षण पद्धती अमलात आली. नवीन भौतिकशास्त्रांची ओळख तर झालीच, त्याचबरोबर निरनिराळ्या विषयांकडे त्यातल्या त्यात अतीताकडे बुद्धिनिष्ठेने पाहण्याची सवय झाली. अतीताकडे, धार्मिक आणि सामाजिक परंपरांकडे अशा दृष्टीने पाहिल्याने काय फरक पडतो, हे भाऊ दाजींच्या प्रत्यक्ष आयुष्याचा विचार केल्यावर सहज लक्षात येते. समाजातील सतीच्या अनिष्ट चालींविरुद्ध तत्कालीन शासनाने सतीबंदीचा कायदा संमत करून अमलात आणला. सतीच्या प्रथेत अनिष्टता स्पष्ट दिसत असतानाही ज्यांच्या मतलबी हितसंबंधांना या कायद्यामुळे धक्का लागला, अशा समाजघटकांकडून तीव्र विरोधही प्रकट होत होता. कायद्याबरोबरच सामाजिक जागृतीही झाली, तर कायदा करण्याचा हेतू खऱ्या अर्थाने सफल होतो, हे लक्षात आल्यामुळे रजपूत समाजातील काही कुळांत प्रचलित असलेली स्त्रीभ्रूणहत्येची प्रथा कशी वाईट आहे, हे दाखवण्यासाठी तत्कालीन गव्हर्नररांनी एक निबंधस्पर्धा आयोजित केली.

जडेजा रजपूतांमध्ये प्रचलित असलेल्या या प्रथेला ख्रिश्चन, इस्लाम अशा इतर धार्मिक परंपरा तर अनुकूल

नाहीतच, पण भारतीय धार्मिक परंपराही प्रतिकूलच आहे, हे लाडांनी दाखवून दिले. त्यासाठी त्यांनी निरनिराळी स्मृतिवचने व पौराणिक धर्मकथा यांचा आधार घेतला. अगदी रानटी समजल्या जाणाऱ्या आदिवासी समाजाच्या आचरणातही अशा प्रथेला आधार नाही हे दाखवत, असे आचरण समाजधारणेस विघातक असून साधारण मनुष्याच्या नैसर्गिक मनोधारणेत त्याला स्थान नाही, हेही त्यांनी दाखवून दिले आणि निसर्गन्यायानुसार पुल्लिंगी भ्रूणाइतकाच स्त्रीभ्रूणांनाही जगण्याचा अधिकार आहे हे स्पष्टपणे बजावले. इंग्लिशमध्ये व गुजरातीत सादर केलेल्या निबंधास सरकारने प्रथम क्रमांकाचे पारितोषिक दिले, यात आश्चर्य नाही. अतीताकडे बुद्धिनिष्ठेने बघण्याचा त्यांचा दृष्टीकोन त्यांच्या भाषणातून वारंवार येणाऱ्या चतुर्युगकल्पनेच्या टीकात्मक उल्लेखावरून स्पष्ट कळतो. कृतयुगानंतर उत्तरोत्तर झालेल्या धर्मऱ्हासाच्या कल्पनेमुळे आत्ताच्या कलियुगात धर्म व नीती यांची अवनती झाल्याने कुठलीही प्रगती होणे नाही, अशा कल्पनांचा समाजावर प्रभाव होता. भाऊ दाजी आपल्या व्याख्यानात भौतिकशास्त्रांच्या व साधनांच्या साहाय्याने केलेल्या प्रगतीचा दाखला देऊन त्यांचे उदाहरण गिरवल्यास अवकळा जाऊन प्रयत्नाच्या साहाय्याने समृद्धावस्था परत प्राप्त होऊ शकेल, हे आवर्जून सांगत. नवीन प्रगती आपलीशी का केली पाहिजे, हे पटवत असत.

इंग्लंडमधील उदारमतवादी विचारवंतांचा प्रभाव व एतद्देशीयांच्या मागण्या या दडपणामुळे निखातनिधीचा १८७८चा कायदा, आर्किलॉजिकल सर्व्हेची १८६२मधील स्थापना, भूगर्भशास्त्रीय सर्वेक्षणे, प्रागैतिहासिक संशोधन (१८५२मधील ब्रूस फूट याचे शोध), भाषासर्वेक्षण (Linguistic Servey of India) इत्यादी प्रकारचे उपक्रम कंपनी सरकारतर्फे हाती घेण्यात आले.

या शासकीय उपक्रमांअगोदरच १७३४मध्ये विल्यम जोन्स यांच्या प्रयत्नांमुळे रॉयल एशियाटिक सोसायटीची स्थापना झाली. त्यानंतर काही वर्षांनी मुंबई येथील शाखेचीही स्थापना झाली. मुंबईच्या शाखेत सुरुवातीस युरोपीयांव्यतिरिक्त इतरांना सदस्यत्व मिळत नसे. भाऊ दाजींसारख्या उच्चशिक्षित, प्रतिष्ठित नेटिव्हांस सदस्यत्व मिळून व्हाइस प्रेसिडेंट होण्यासाठी काही वर्षे जावी लागली. पण आपल्या व्यवसायाशी म्हणजेच वैद्यकशास्त्राशी संबंधित विषयातच (म्हणजे औषधशास्त्र, वनस्पतिशास्त्र, इत्यादी) नव्हे, तर ब्राह्मी लिपीतील शिलालेख, प्राचीन नाणी, कालिदास, हर्ष आदींच्या वाङ्मयावरील अभ्यासावर, खगोलशास्त्रावरील, जैन-बौद्ध-हिंदू धर्मांची प्राचीन हस्तलिखिते यांचे अनुक्रमे ठसे मिळवून आणि गोळा करून त्यांच्या खोल अभ्यासावर आधारित संशोधन विद्वत्सभांतून प्रकट केले व नियतकालिकांतून व ग्रंथरूपाने प्रसिद्ध केले. या संदर्भात भाऊ दाजी लाड यांच्या कामाचे स्वरूप जाणून घेणे इष्ट ठरेल. भारतीयांना इतिहासाचे ज्ञान वा भानच नव्हते, असे म्हणण्याइतपत आपल्या इतिहासातील सनावळी गलथानरितीने स्मरणात ठेवल्या होत्या. पुराणात इक्ष्वाकू (सूर्यवंश) व सोमवंश (चंद्रवंश) या दोन मुख्य वंशांव्यतिरिक्तच्या इतर वंशांच्या वंशावळी (वंशानुचरित) येतात. काही पुराणे तर त्या-त्या राजांनी नेमकी किती वर्षे राज्य केले, याचीही नोंद ठेवतात. कुठल्या वंशानंतर दुसऱ्या कुठल्या वंशाने राज्य केले, हेही नमूद करतात. पण त्या वंशाने अथवा राजाने आजपासून नेमके केव्हा राज्य केले, हे निश्चित जाणणे अशक्यप्रायच आहे. याउलट अशा बाबतीत हिराडोटस व त्यानंतरच्या पाश्चात्त्य इतिहासकारांनी दिलेले काळाचे तपशील निश्चितच इतिहासाच्या कुठल्याही विद्यार्थ्याला प्रभावित करतात याविषयीचे वैषम्य भाऊ दाजी यांच्या मनात विद्यार्थिदशेपासूनच होते. त्या काळात अभिलेखांची प्रांतवार सर्वेक्षणे मोठ्या प्रमाणावर चालली होती. असे अभिलेख समोर ठेवून प्रथम त्यांनी वाकाटक, क्षत्रप, गुप्त, मैत्रक, चालुक्य, यादव, वर्धन या घराण्यांच्या वंशावळींवर लक्ष केंद्रित केले. वाकाटकांच्या कालानुक्रमासाठी अजिंठा येथील शिलालेख, तर क्षत्रपांसाठी त्यांची नाणी, मैत्रकांसाठी त्यांची नाणी आणि ताम्रपट यांचा उपयोग केला. हे सर्व करीत असताना त्यांनी शक आणि विक्रम संवत यांच्यावरसुद्धा लेख लिहिले.

सनावळीच्या अभ्यासासाठी त्यांनी जैन परंपरेत आढळणाऱ्या गुर्वावलींचासुद्धा मोठ्या हुशारीने उपयोग केला. दुसऱ्या काही विद्वानांनी मौर्य आणि प्राचीन राजघराण्यांचा ऐतिहासिक कालक्रम ठरवताना महावंश आणि दीपवंस या सिलोनमधील पुराणसदृश वंशावळींचा उपयोग केला. भाऊ दाजींनी कालिदास, बाणभट्ट आणि हर्ष यांची कालनिश्चिती करताना साहित्यातील इतर स्रोतांबरोबरच राजतरंगिणीचाही उपयोग केला. इतिहासातील एक महत्त्वाचा अध्याय म्हणजे भारतीय खगोलशास्त्र होय. ग्रंथांच्या अरबी भाषांतरावरून पाश्चात्त्यांना अगोदरच भारतीय खगोलशास्त्राची माहिती होती. पण आर्यभट्ट, वराहमिहीर, ब्रह्मभट्ट, भट्टोत्पल, भास्कराचार्य यांच्या निश्चित कालक्रमाची योग्य माहिती नसल्याने व काही नावे पुढील आचार्यांना परत दिली गेली असल्याने अभ्यासकांच्या मनात संभ्रम निर्माण झाला होता. त्यांच्या संग्रहात असलेल्या हस्तलिखितांचा कसून अभ्यास केल्यानंतर भाऊ दाजींना त्याचा कालानुक्रम नीट मांडता आला आणि त्याबद्दल त्यांची वाहवासुद्धा झाली.

इतिहासातील कालक्रमाच्या निश्चितीसाठीचे अभिलेख आणि नाण्यांचे महत्त्व लक्षात घेऊन भारतीय पुरातत्त्व सर्वेक्षणाने (Archological Survey of Indiaने) अभिलेखांवर त्यांचा शोध, त्यांतील महत्त्वाची माहिती संकलित करणारी South Indian Incriptions व एपिग्राफिया इंडिका (Epigraphia Indica) यांसारखी नियतकालिके प्रकाशित करण्यास व ब्रिटिश म्युझिअममध्ये आणि भारतातील प्रमुख संग्रहालयांत संकलित केलेल्या नाण्यांचे कॅटलॉग्स प्रकाशित करण्यास सुरुवात केली. महत्त्वाच्या राजघराण्यांच्या अभिलेखाचे संकलन करून, घराण्याची साद्यंत माहिती देणारे भारतीय अभिलेखांचे निकाय सुद्धा प्रकाशित केले. ब्रिटिशकाळात १. अशोक- मौर्यांचे अभिलेख २. खरोष्ठीतील अभिलेख व ३. गुप्तांचे अभिलेख असे तीन संच प्रकाशित झाले. त्यानंतर डॉ. वा.वि. मिराशी यांनी आणखी तीन संचांची (कलचुरी, वाकाटक आणि शिलाहार) भर घातली. त्यांचा सातवाहन व शक क्षत्रप यांच्यावरील अभिलेख निकाय महाराष्ट्राच्या साहित्य संस्कृती मंडळामार्फत प्रकाशित झाला, तर त्यानंतर परमार व समकालीन कच्छापघात चंदेल्ल यांच्या अभिलेखांचा निकाय (क्र. ७) एच.व्ही. त्रिवेदी यांनी संपादित केला. याव्यतिरिक्त धारवाड विद्यापीठातील प्राध्यापक श्रीनिवास पडिगर यांच्या बदामी चालुक्यांच्या अभिलेखांचा निकाय भारतीय इतिहास अनुसंधान परिषदेने प्रकाशित केला आहे.

वरील निवडक ठळक प्रकाशनांचा उल्लेख करण्यामागील हेतू एवढाच की, अभिलेख संपादनाचे काम बरेच झाले असले तरी अद्याप बरेच व्हावयाचे आहे. त्या कामासाठी गेल्या दोनशे वर्षांत मुंबई इलाख्यापुरते बोलावयाचे झाल्यास पुढील संस्थांनी मोठे योगदान दिले आहे -

१. भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे
२. भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्था, पुणे
३. ओरिएन्टल इन्स्टिट्यूट, बडोदे
४. कन्नड रिसर्च इन्स्टिट्यूट, धारवाड
५. डेक्कन कॉलेज पोस्टग्रॅज्युएट रिसर्च इन्स्टिट्यूट, पुणे
६. राजवाडे संशोधन मंडळ, धुळे
७. समर्थ वाग्देवता मंदिर, धुळे
८. विदर्भ संशोधन मंडळ, नागपूर
९. एकनाथ संशोधन मंडळ, औरंगाबाद
१०. महाराष्ट्र इतिहास परिषद
११. कोकण इतिहास परिषद, मुंबई

१२. खान्देश इतिहास परिषद, साक्री/नंदुरबार

१३. महाराष्ट्र साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई

पारंपरिकदृष्ट्या रामायण आणि महाभारत ही काव्ये म्हणजे इतिहास व्यासरचित अठरा महापुराणांचा विषय हा

'सर्गश्च प्रतिसर्गश्च वंशो मन्वन्तराणि च

वंशानुचरितं चेति पुराणं पञ्चलक्षणम् ॥

रामायणात विष्णूचा अवतार असलेल्या श्रीरामाचे अद्भुत चरित्र आणि त्याच्या अनुषंगाने भारतातील एका महान क्षत्रिय वंशाचा इतिहास सांगण्यात आला आहे. अशा रीतीने हा ग्रंथ इतिहासपर असला, तरी त्यांकडे संस्कृतप्रेमी रसिक महाकाव्यांना आदर्शभूत असलेली काव्यरचना म्हणूनच जास्त पाहतात. अठरा पुराणे व त्याआधीचे महाभारत यांकडेच इतिहास म्हणून पाहिले जाते. महाभारताकडे दोन युगांच्या–म्हणजे तिसरे द्वापार आणि चौथे कलियुग यांच्या–संधिकाळात घडलेली महत्त्वाची घटना वर्णन करणारा ग्रंथ म्हणून, एका युगाचा अंत व दुसऱ्या युगाची सुरुवात अशा संक्रमणाची अवस्था वर्णन करणारा ग्रंथ म्हणून पाहिले जाते. कृतयुगातील परिपूर्ण धर्म हा त्रेतायुगात (जेव्हा रामावतार झाला असे श्रद्धाळू मानतात) निम्माशिम्मा झाला, द्वापारानंतर कलियुगात शिरताना एक चतुर्थांअंशच शिल्लक राहिला. महाभारतातील कुरुकुळातल्या पांडवांचा पणतू जनमेजय याच्यापर्यंत हा इतिहास येऊन ठेपतो, त्या वेळी कलियुगाला सुरुवात झालेली असते. तेव्हापासून युगाब्द (आज ५११६वे वर्ष) सुरू झाला. कलीच्या वाईट प्रभावामुळे अवकळा प्राप्त झाल्याने त्यातल्या त्यात धर्माचे पालन कसे करावयाचे, हे महाभारताच्या शेवटी व खिल पर्वात हरिवंशामध्ये सांगितले आहे. महत्त्वाची गोष्ट म्हणजे श्रुतिप्रणीत धर्म पाळलाच पाहिजे असे नाही - उदाहरणार्थ, क्षत्रियांनी किंवा राजांनी अश्वमेध याग करू नये. महाभारतात व्यासांनीच रचलेल्या पुराणात वंश (ब्रह्मदेवाची प्रजा), निरनिराळे मनू (आज आठव्या मन्वंतरात, मनूच्या काळात आपण आहोत) आणि (मुख्य क्षत्रिय वंशांची चरिते) वंशानुचरिते हा वर्ण्यविषय आहे. विश्वोत्पत्ती आणि प्रलय यांच्या चौकटीत सांगितला आहे. तो पुराण व इतिहास यांचे महत्त्व वर्णन करताना 'इतिहास पुराणाभ्यां वेदं समुपबृंहयेत' म्हणजे महाभारत आणि पुराणांच्या मदतीने वेदास बळकट करावे, असे म्हटले जाते. वैदिक धर्म जाणून घेण्यासाठी आणि पर्यायाने वैदिक धर्माच्या योग्य आचरणासाठी इतिहासाची आणि पुराणांची मदत घ्यावी. अशा प्रकारचे मत वर्तवण्यामागचे कारण समजून घेणे आवश्यक आहे. पुराणातील आख्यान-इतिहासांची उजळणी यज्ञोपासनेच्या विरंगुळ्याच्या वेळी ऋषींच्या विनंतीवरून सूत करीत असत. महाभारतात अठरा दिवसांच्या युद्धाचा वृत्तान्त सूत संजयाने धृतराष्ट्रास सांगितला. दोन प्रकारची कामे सूताकडून अपेक्षित होती. लोमहर्षणासारखे सूत ऋषिमुनींच्या आदरास पात्र होते. त्यांच्याकडूनच पुण्यश्लोक व इतर राजांची चरित्रे व प्राचीन आख्याने ऋषिमुनींना कळत असत. सूत हा योद्ध्याचे सारथ्यकर्म करीत असल्याने त्याचे मनोबल वाढवण्यासाठी त्याच्या पूर्वजांच्या पराक्रमाच्या कथा सूत सांगत असत; आणि वेळप्रसंगी आदर्श धर्माचरणाच्या चार गोष्टीही सांगत. जन्माने सूत नसले, तरी भगवान श्रीकृष्ण हे या अर्थाने आदर्श सूत होते, असे म्हणण्यास हरकत नाही.

इतिहासाची पाश्चात्त्य कल्पना काहीशी वेगळी आहे. झालेल्या घटनांचे इत्थंभूत निवेदन म्हणजे इतिहास अशी एक सोपी व्याख्या करता येईल. निवेदन इत्थंभूत व्हायचे असेल ते लिखित स्वरूपात व समकालीन असले म्हणजे त्याला प्रमाणित म्हणावयास हरकत नाही, असा विचार. प्राचीन काळात राजेशाही ही स्वीकृत पद्धती असल्याने राजे, त्यांचा कार्यकाळ व कालानुक्रम ठळकपणे कळत असल्याने युरोपीय इतिहास परस्परलेखन भारतीय इतिहासाच्या तुलनेत नेमक्या नोंदींमुळे एखाद्या राजाच्या, घराण्याच्या अथवा घराण्यांच्या कार्यकाळात घडलेल्या घटना नेमक्या केव्हा व कुठल्या क्रमाने घडल्या हे कळल्याने त्यांचे पर्याय लक्षात घेऊन घटनांची कार्यकारणमीमांसा, त्यानुसार कालखंड

निश्चित करणे हे इतिहासाचे कार्य आहे. अशा प्रकारची कारणमीमांसा हेही पाश्चात्त्य इतिहासाचे व्यवच्छेदक लक्षण असल्याने सरस वाटते. त्यामुळे सामाजिक शास्त्रांतर्गत इतिहासमीमांसा (Histriography) ही एक स्वतंत्र विद्याशाखा पाश्चात्त्य विद्वत्परंपरेत आहे. भारतीय अध्ययनपद्धतीत तशी ज्ञानशाखा वा परंपरा नाही, हे नोंदवणे आवश्यक आहे.

प्रस्तुत संदर्भात पाश्चात्त्य इतिहासमीमांसेतील विचारप्रवाहांचा विकास कसा झाला, हा मुद्दा महत्त्वाचा नसून तत्कालीन इंग्लिश इतिहासकारांनी भारताच्या इतिहासाकडे कुठल्या दृष्टीकोनातून पाहिले याचा व त्यावर इंग्लिश-विद्याविभूषित भारतीय इतिहासकारांची काय प्रतिक्रिया होती, हे जाणून घेणे आवश्यक आहे.

अठराव्या/एकोणिसाव्या शतकात युरोपीय माणसांत वंशश्रेष्ठत्वाच्या काही गमतीदार कल्पना दृढमूल झाल्या होत्या. त्यात घारे-निळे डोळे, धिप्पाड शरीरयष्टी, दाट केस, धारदार नाक असलेल्या नॉर्डिक वंशाची महती गायिली जात होती. उत्तर गोलार्ध आणि पृथ्वीचा दक्षिण गोलार्ध या दोहोंतील मानववंशाच्या उच्चनीचतेच्या कल्पनांशी ही विचारधारा निगडित होती. या कल्पनांनुसार उत्तर गोलार्धातील मानववंश गोरे आणि दक्षिणेतील कृष्णवर्णीय होते, जो एक योगायोग होता. ते बुद्धीने वरचढ व पौरुषयुक्त असतात, तर दक्षिणेतील कृष्णवर्णीय स्त्रीसंगत गुणांनी युक्त असतात, असा समज होता. त्यामुळे बलिष्ठ व बुद्धिमान गौरवर्णीयांनी इतर कमकुवत वंशांवर राज्य करणे हे साहजिकच नाही तर तो त्यांचा जन्मसिद्ध हक्क होता. दक्षिण गोलार्धातील मानवांना कलाकुसरीच्या वस्तू, हस्तव्यवसाय, शेती व श्रमाच्या कामांत फार हुन्नर असते. त्यांनी अशीच कामे करावीत. अभिजात कला, तत्त्वज्ञान, श्रेष्ठ नीतिमत्ता, उच्च धार्मिक कल्पना व आचरण हा त्यांचा प्रांत नव्हे. गोरे हे सर्वच बाबतींत श्रेष्ठ असल्याने त्यांनी या अप्रगत मानवी समाजाचा उद्धार करणे आवश्यक आहे. हे उद्धाराचे ओझे हलके करण्यासाठी, असंस्कृतांना सुसंस्कृत करण्यासाठी गोऱ्यांनी धर्मांतर घडवून आणणे व राज्य करणे भाग आहे, असाही त्यात आविर्भाव होता.

नीतिमत्ता व शारीरिकदृष्ट्या आणि त्यामुळेच सांस्कृतिकदृष्ट्या व लष्करीदृष्ट्या कमी दर्जाचे असल्याने भारतीय उपखंडातील प्रजेला व राज्यांना हिमालयापलीकडून अनेक आक्रमणे वारंवार सहन करावी लागली. इ.स.पू. सहावे ते चौथे शतक वायव्य सरहद्द प्रांत (गांधार-बाहलीक) सिंध आणि पंजाब यांवर हखामनी सम्राटांची हुकमत होती. त्या पाठोपाठ ग्रीकांनी राज्य केले व ॲलेक्झांडरने हा सर्व भाग पादाक्रांत केला. त्या पाठोपाठ त्यांच्या अनुवंशजांनी (Indo-Baetrians) तेथे राज्य केले, त्या पाठोपाठ शक, कुशाण यांनी अफगणिस्तानवर व वायव्य सरहद्द प्रांतावर व उत्तर भारतावर राज्य केले, तर शक-क्षत्रपांनी पश्चिम भारतावर आपली अधिसत्ता बळकट केली. गुप्त साम्राज्याच्या स्थापनेनंतरही मध्य आशियातील हूणांनी जसे इस्तंबूल येथील रोमन साम्राज्य उलथले, तसाच गुप्त साम्राज्याला मोठा धक्का दिला व पश्चिम भारतात नवीन सत्ता उदयाला आल्या. दहाव्या अकराव्या शतकात तुर्कांच्या आक्रमणानंतर जवळजवळ संपूर्ण उत्तर हिंदुस्थान सुलतानांच्या ताब्यात गेला व सोळाव्या शतकात प्रस्थापित झालेल्या मोगल सत्तेने तर दख्खनच्या पलीकडे मुस्लीम सत्तांचा चंचुप्रवेश करून दिला. युरोपीय इतिहासकारांच्या मते भारताचा इतिहास हा मुळी वेळोवळी झालेल्या अशा पराभवांचा इतिहास होय. सिंधु संस्कृतीचा शोध हे भारतीय इतिहासातले मोठे पर्व होय. संस्कृत भाषेच्या शोधानंतर विद्यापीठीय अभ्यासक्रमामध्ये भारो-युरोपीय भाषा व त्या भाषा बोलणाऱ्या भारो-युरोपीयांचे मूलस्थान यांविषयी चर्चा सुरू झाली. अवेस्ता व वेदांतर्गत पुराणांवरून मॅक्स म्युलरने वेदांचा काळ इसवीसनपूर्व सुमारे १२०० असावा, हे मत व्यक्त केल्यानंतर मार्टिमर व्हीक्टलेर या प्रख्यात पुरतत्त्वज्ञाने व अनेक प्राच्यविद्याविशारदांनी तसेच इतिहासकारांच्या नव्या पिढीने सिंधू संस्कृती ही मुळात द्रविड होती व मध्य आशियातून आलेल्या वैदिक आर्यांनी तिचा नाश केला, असा सिद्धान्त मांडला. त्याच्या मुळाशीही वसाहतवादी इंग्लिश इतिहासमीमांसेचाच पराभववादी विचार कारणीभूत होता.

आंग्लविद्याविभूषित भारतीय इतिहासकारांची पिढी एकोणिसाव्या शतकात आकार घेत होती, हे भाऊ दाजी लाड

यांच्या उदाहरणावरून आपण अगोदर पाहिले आहेच. आंग्लविद्येबरोबरच संस्कृत, तमिळ इत्यादी अभिजात भारतीय भाषांवरही या नव्या इतिहासकारांचे प्रभुत्व होते. नीळकंठ शास्त्री, गुती वेंकट राव, काशी प्रसाद जयस्वाल, रा.गो. भांडारकर, देवदत्त रा. भांडारकर, राधा कुमुद मुखर्जी, दिनेश चंद्र सरकार, रमेशचंद्र मुजुमदार ही या नवइतिहासकारांची प्रातिनिधिक नावे म्हणून सांगता येतील. यांतील काहींनी काहीशी प्रतिवादात्मक भूमिका घेऊन ग्रीक व रोमन साम्राज्यांतील प्रगत राजकीय संस्थांसारख्या संस्था वैदिक काळातसुद्धा कशा अस्तित्वात होत्या, तसेच भारतवर्षाच्या सुवर्णयुगामध्ये आग्नेय आशियात भारतीयांच्या वसाहती कशा होत्या, खगोल, आयुर्वेद इत्यादी शास्त्रांनी समकाळामध्ये युरोपपेक्षाही कशी जास्त प्रगती केली होती, या अंगांनी इतिहासाची मांडणी करण्यास सुरुवात केली. भारताचा गतकाळ पराभवांचा नसून अनेक विक्रमादित्यांनी गाजवलेल्या विजयोत्कर्षाचा होता, या भावनेतूनच वि.दा. सावरकरांनी ‘इतिहासाची सहा सोनेरी पाने’ हा ग्रंथ लिहिला. या विचारप्रवाहाला साहजिकच ‘राष्ट्रवादी’ म्हणून संबोधण्यात आले, काही अंशी त्याची तशी संभावना करण्यात आली.

राष्ट्रवादी म्हणून ज्यांची संभावना केली जाते, असा इतिहासकारांचा दुसराही एक वर्ग आहे. कन्हैयालाल मुन्शी यांच्या नेतृत्वाखाली भारतीय विद्याभवनने ‘भारतीयांचा इतिहास व संस्कृती’ या मालेत इतिहासाचे सोळा खंड प्रकाशित केले. यातील बऱ्याच खंडांना स्वत: मुन्शी यांची प्रस्तावना असून, रमेशचंद्र मुजुमदार यांनी अ.द. पुसाळकर, अशोक मुजुमदार यांच्या साहाय्याने वैदिक युगापासून ब्रिटिशांच्या अधिसत्तेपर्यंतच्या काळाचा इतिहास वर्णिला आहे. या खंडांचे वैशिष्ट्य असे की, इतिहासात संस्कृतीच्या आर्थिक, सामाजिक, धार्मिक व राजकीय प्रमुख अंगांव्यतिरिक्त भाषा व साहित्य, स्थापत्य, शिल्प व चित्रकला आणि बृहद्‌भारत या सांस्कृतिक अंगांचाही विचार केलेला आहे. तो राजकीय सनावळींपुरता मर्यादित न राहता मोठ्या प्रमाणात सांस्कृतिक इतिहास झाला आहे.

डॉ. दामोदर धर्मानंद कोसंबी यांना मात्र वरील प्रकारचे दोन्ही दृष्टीकोन संकुचित राष्ट्रवादी विचारावर आधारलेलेच वाटले. त्यात इतिहासविषयक बुद्धिनिष्ठ चौकटीचा अभाव असल्याने व काही राजकीय घटनांवर वाजवीपेक्षा जास्त भर असल्याने इतिहासाची वास्तव घडण समजावून घेण्यासाठी तो दृष्टीकोन त्यांच्या दृष्टीने पुरेसा सक्षम नव्हता. १९५६ साली प्रकाशित केलेल्या ‘भारतीय इतिहासाच्या सहा पायऱ्या’ (Stages in Indian History) या त्यांच्या लेखात इतिहासातील सामाजिक, आर्थिक संबंधांचे पुरेसे आकलन न झाल्याने कार्ल मार्क्सलाही आशियाई इतिहासाचे आणि पर्यायाने भारतीय इतिहासाचे यथायोग्य मूल्यमापन करता आले नाही, असे नमूद केले आहे. ‘मानवी समाजाने तयार केलेल्या उत्पादनाची साधने व परस्परसंबंध यांतील अर्थपूर्ण पायऱ्यांची/अवस्थांची कालनिष्ठ मांडणी म्हणजे इतिहास होय.’ (History is the development in cronological sequence of essential stages in the means and relations of the social production.)

कार्ल मार्क्सला आशियाई उत्पादनपद्धतीची नीट व्याख्या न करता आल्याने कोसंबींनी ती नव्याने मांडली ती अशी - त्यांच्या मते समाजाच्या प्राथमिक अवस्थेत जात हाच वर्ग (Class) असतो. सामाजिक गटागटांत निर्माण केलेली अस्मितेची (पृथकत्वाची) भावना म्हणजे जात. ती धर्माच्या माध्यमातून अशा रितीने निर्माण केली जाते की, मूळ उत्पादकावर फारसा दबाव न टाकता त्याने निर्माण केलेल्या अतिरिक्त धनापासून त्याला वंचित करता येते.

भारतातील आम जनतेवर धर्माचा पगडा असल्याने आणि वर्गसंघर्षात (class struggle मध्ये) जातिसंस्था ही शोषणाचे साधन बनली. डॉ. दामोदर कोसंबींनी या गृहीतकावर आधारलेल्या भारताच्या इतिहासातील कालनिविष्ट सहा पायऱ्या पुढीलप्रमाणे आहेत.

१) सिंधू संस्कृती नागर असली, तरी तुंबलेली, वाढ खुंटलेली (stagnant) होती, या गतिहीनतेचे दुष्परिणाम भावी तंत्रज्ञान, प्रतिमाविज्ञान आणि सामाजिक संस्था यांवर झालेले दिसतात. (इ.स.पू. ३०००-१५००)

२) उत्तर कांस्ययुगातील व पूर्व लोहयुगातील (Early Iron Age मधील) दोन जातिसंस्थांवर भर असलेली भटक्या जमातींची (इ.स. पूर्व १५००-५००) चातुर्वर्ण्यावर आधारित (इ.स.पू. ८००) आर्यीकरणाची प्रक्रिया.

३) शूद्रांच्या परिश्रमांच्या आधाराने मगध राज्याने घडवून आणलेले गंगेच्या खोऱ्याचे निर्वनीकरण आणि नवीन वसाहती आणि पहिल्या साम्राज्याचा शेवट (इ.स.पू. ५००-१५०)

४) व्यापारासाठी व शेतीसाठी अर्धस्फुट सरंजामशाही आकारास येणे आणि खासगी जमीनजुमल्याच्या संकल्पनेची इ.स. ४००च्या आतच सुरुवात.

५) उत्तर गुप्तकाळात निखळ सरंजामशाहीची सुरुवात आणि मुस्लीम व्यापार व लष्करी आक्रमणे (इ.स. १२०० नंतर) यानं तर तिची जोपासना.

६) आधुनिक भांडवलवाद : वसाहतवादी ब्रिटिश शासनप्रणीत युरोपीय व्यापार, कारखान्यातील उत्पादन व भागभांडवलाच्या माध्यमातून भांडवलवादाचा शतकापूर्वीच शिरकाव. (१८५७)

प्रा. रामशरण शर्मा यांनी दामोदर धर्मानंद कोसंबी यांच्या सरंजामशाहीच्या सिद्धान्तातील चार्तुवर्ण्याचा उद्‌गम, पर्यायाने जातींचा विकास, खासगी जमीनजुमल्याची (Private Property) संकल्पना व त्यातून गुप्तोत्तर काळापासून फोफावलेली सरंजामशाही (Pendalism) या मूळ कल्पनांवर आधारित सिद्धान्तांची मांडणी त्यांच्या निरनिराळ्या ग्रंथांतून केली. 'इंडियन फ्यूडॅलिझम' (१९६५) 'शूद्राज इन एन्शन्ट इंडिया' (१९८०), 'सोशल चेन्जेस इन आर्ली मेडिवल इंडिया' (१९८१), 'पर्स्पेक्टिव्हज इन स्पेशल ॲन्ड इकॉनॉमिक हिस्ट्री ऑफ इंडिया' (१९८३) आणि 'मटेरिअल कल्चर ॲन्ड सोशल फॉर्मेशन इन एन्शन्ट इंडिया' (१९८३) या ग्रंथांच्या शीर्षकातून त्यांच्या विचारप्रवाहाची कल्पना येते.

फाहियान आणि ह्युएन्त्सँग यांच्या प्रवासवर्णनांवरून गुप्तोत्तर काळात होत असलेली बौद्ध धर्माची हानी, साम्राज्याच्या विघटनापाठोपाठ लहान नव्या राज्यांचा उदय, बौद्ध व हिंदू मठांना आणि अग्रहारांना जमिनी व गावांचे दान, नाण्यांचा कमी उपयोग व कमतरता आणि परिणामी 'जजमानी पद्धत' ताम्रपटात उल्लेखलेल्या मुलकी अधिकाऱ्यांच्या साखळीवरून सत्तेचे विकेंद्रीकरण झाल्याचे स्पष्ट दिसते. त्याचबरोबर निर्नाणक अर्थव्यवस्थेमुळे मोठमोठ्या जमिनीतून व गावातील दानात मिळालेल्या जमिनीतून पिकवलेल्या धान्याचाच विनिमय होऊन जजमानी समाजव्यवस्था उत्पन्न झाली. त्यावरून जितकी नाणी कमी आणि ताम्रपट जास्त तितकी सरंजामशाही जास्त, असे स्थूल समीकरण मांडण्यात आले.

रामशरण शर्मांनी शंभराहून अधिक उत्खनित ऐतिहासिक स्थळांचा अभ्यास करून पुरावस्तूंवर आधारित पुराव्यांच्या आधारे आपल्या सिद्धान्ताला बळकटी दिली. त्यांनी असे दाखवून दिले की, कुषाण-सातवाहन काळात ज्या प्रकारच्या घरगुती वस्तू (उदा. किंमती खड्यांचे मणी, उत्तम प्रतीची भांडी, मातीची खेळणी, अगदी रोजच्या वापरातील भांडी) सामान्य माणसाच्या वापरात होत्या, तसेच बांधकामातील पक्क्या विटांचा वापर, तांब्या-रुप्याच्या वा सोन्याच्या नाण्यांचा वापर, परदेशाशी समृद्ध व्यापार, आयात केलेल्या चैनीच्या वस्तू व आयात झालेली नाणी यांवरून त्या काळातील समृद्धीची कल्पना येते. त्यांच्या मते, खरे तर गुप्तकाळाऐवजी कुषाण-सातवाहन काळच भारतातील सुवर्णयुग होय. शर्मा यांच्या अभ्यासामुळे पुरातत्त्वाच्या अभ्यासाला, विशेषतः नवपुरातत्त्वाला अभिप्रेत असलेल्या आर्थिक-सामाजिक विवेचनाला एक नवी दिशा मिळाली.

सरंजामशाहीच्या (इ.स. ४००-१२००) विकासात दोन टप्पे आहेत असे संशोधनाअंती लक्षात आले. पूर्व-मध्ययुगात (इ.स. ६७०-१२००) सरंजामशाही वरून खाली झिरपत गेली, तर उत्तरार्धात तिचे उदंचन झाले. गोव्यातील देसाई हा त्यातला तळाचा घटक. मध्ययुगातील बारा बलुतेदार पद्धतही त्याचाच भाग आहे.

कोसंबी-शर्मा यांच्यानंतरच्या संशोधकांच्या पिढीने सरंजामशाहीच्या सिद्धान्तांची खोलात जाऊन परीक्षा केली. बी.डी. चट्टोपाध्याय यांच्या मते युरोपातील अंधकार युगाशी संबंधित असलेला सरंजामशाहीचा दृष्टान्त (Paradigm) जसाच्या तसा भारतातील समकालीन कालखंडाला लावणे चुकीचे ठरेल. कारण विकेंद्रित सत्ता, शेतीतील दासांची पिळवणूक, व्यापारातील मंदी व नागर जीवनातील अधोगती यांची तुलना केल्यास फरक स्पष्ट दिसतात. मठांना व अग्रहारांना दिलेली भूमिदाने शेतीच्या क्षेत्रातील लक्षणीय विस्तार व नव्या राजघराण्यांच्या मान्यता यांची निदर्शक आहेत. राजपुतान्यातील राजघराण्यांच्या अभ्यासावरून त्यांचे असे मत झाले.

आपला सरंजामशाहीचा सिद्धान्त बळकट करण्यासाठी दा.ध. कोसंबी यांनी मध्ययुगीन संस्कृत वाङ्मय हे समकालीन युरोपीय वाङ्मयापेक्षाही हीन आहे, हे उदाहृत करण्यासाठी भिक्षू विद्याकराच्या सुभाषितरत्न-कोश या काव्यसंग्रहाचा दाखला दिला. त्यास कोशाचे भाषांतरकर्ते डॅनियल इंगील्स यांनी समर्पक उत्तर देऊन संस्कृत काव्यरसग्रहणाचे मर्म कोसंबींना न समजल्याचे दाखवले. या संदर्भात एवढेच म्हणावेसे वाटते की, मध्ययुगीन प्राकृत आणि अपभ्रंश भाषांतील वाङ्मयाबद्दल कोसंबी अनभिज्ञ असल्यानेच त्यांनी अशी विधाने करण्याचे धाडस केले असावे.

सरंजामशाहीचा सिद्धान्त द्राविड भाषिक राज्यांना व दख्खनला लागू पडणार नाही. कारण उत्तरेप्रमाणे दक्षिणेतल्या परदेशी व्यापाराला हूणांचे ग्रहण लागले नव्हते. खुष्कीचा आणि दर्यापार व्यापार व्यवस्थित चालू होता, हे आग्नेय आशियातील भारतापासून स्फूर्ती घेऊन समृद्ध झालेल्या आग्नेय आशियाई (इंडोनेशिया, कंबोडिया, व्हिएतनाम, थायलंड व म्यानमार) देशांच्या उदाहरणावरून, तसेच दक्षिणेतील व्यापारी श्रेणींच्या अभिलेखांवरून आणि इतिहासावरून स्पष्ट होते. डॉ. चंपकलक्ष्मी यांनी पल्लव, चोल यांचे अभिलेख व प्रासाद स्थापत्य यांच्या जोड अभ्यासामुळे राजे आणि राज्यसंस्था यांच्या उगम–विकासाविषयीच्या निरीक्षणामुळे दक्षिणेत सरंजामशाहीला थारा नव्हता हे जसे स्पष्ट झाले, तसेच परदेशी दृष्टान्त उरी बाळगून भारताचा इतिहास उमगणार नाही, हेही स्पष्ट झाले. यापूर्वीच्या दक्षिणेतील विद्वानांनी आफ्रिकेतील राजसंस्था (Fragmentary Segmentary Kngship) शकतलरूप या प्रारूपाप्रमाणेच (Model प्रमाणेच) दक्षिण भारतात नागरीकरणाबरोबर शकलरूप राजसंस्था उदयास आली असावी, असा अभ्युपगम (Hypothesis) मांडला होता. अशा रितीने चंपकलक्ष्मी व ब्रिज दुलाख-चट्टोपाध्याय या दोघांनी मिळून पश्चिम व दक्षिण भारतात सरंजामशाहीचा सिद्धान्त इतिहासाची गूढे उकलताना उपयोगी पडणार नाही, हे सोदाहरण सिद्ध केले.

स.अ. डांगे, दामोदर धर्मानंद कोसंबी इत्यादी भारतातील आद्य मार्क्सवादी विचारवंतांची इतिहासाची उकल आणि मांडणी कालबाह्य झाली असल्याने मार्क्सवादी विचार नव्याने मांडण्याचा सकस प्रयत्न कॉम्रेड शरद पाटील यांसारख्या विचारवंतांनी गेल्या काही दशकात केला आहे. इतिहास संकलन योजनेच्या कार्यकर्त्यांना या नवमार्क्सवादी व इतर अवरवर्णवाद (Subaltern) स्त्रीत्ववाद (Gender studies) (Annulists) या प्रकारच्या इतिहास मीमांसांचाही विचार यथातथ्यरूपाने इतिहासाची मांडणी करताना करावा लागेल.

**पुरातत्त्व**

भारतीय प्रजेच्या दबावामुळे व उदारमतवादी इंग्रजांच्या आग्रहाखातर ईस्ट इंडिया कंपनीने एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीपासूनच कायदेशीर तरतुदी करावयास सुरुवात केली होती. १८७८चा निखात निधी कायदा हा त्यातील पहिला ठळक कायदा म्हणता येईल. १८६२मध्ये भारतीय पुरातत्त्व सर्वेक्षणाची धुरा ॲलेक्झँडर कनिंगहॅमवर सोपवल्यानंतर महत्त्वाचे पाऊल म्हणजे सर्वेक्षण तात्पुरते न राहता कायमस्वरूपी झाले. इलाखा पातळीवर सर बार्टल फ्रिअर यांनी अंबरनाथ व इलाख्यांतील इतर महत्त्वाच्या स्मारकांवर छायाचित्रे, रेखाटने, तलविन्यासांसकट एक

कॅटलॉग प्रसिद्ध केला. लॉर्ड कर्झन यांनी १९०४ साली प्राचीन वास्तू, पुरातत्त्वीय स्थळे व अवशेष (Ancient Monuments sites and Remains Act) यांसंबंधीचा कायदा पारित करून घेतला व भारतीय पुरातत्त्वाचे सर्वेक्षण, संशोधन, वास्तू, वास्तूंचे जतन-परीक्षण यांसाठी सरसंचालक म्हणून (सर) जॉन मार्शल यांच्यासारख्या मेहनती व प्रतिभावान पुरातत्त्वज्ञाची नेमणूक केली. त्यानंतर स्वातंत्र्योत्तर काळातली महत्त्वाची पायरी म्हणजे भारतीय राज्यघटनेच्या तरतुदीनुसार, प्रचलित गरजेनुसार १९५४साल संघराज्य क्रमांक दुरुस्ती केली. त्याचबरोबर संघाच्या (Federal Republic च्या) सदस्य राज्यांनी प्राचीन स्मारके, स्थळे आणि पुरावस्तू यांविषयक राज्याचा कायदाही पारित केला. यामागची भूमिका समजून घेणे अगत्याचे आहे. राज्यघटनेनुसार काही विषय केंद्राच्या अखत्यारीतील (उदा. परराष्ट्र, राष्ट्रीय सुरक्षासंबंधी), काही राज्यांच्या अखत्यारीतील (उदा. ग्रामीण विकास), तर काही उभयतांच्या पटलावर असतात (उदाहरणार्थ शिक्षण, संस्कृती, इत्यादी). या संदर्भात 'कला आणि संस्कृती' या अंदाज-पत्रकातील शीर्षाखाली (budget head खाली) मोडणाऱ्या खात्यांविषयीसुद्धा विचार करणे आवश्यक वाटते. या शीर्षाखाली सात शासकीय खाती मोडतात ती अशी - १) पुरातत्त्व, २) संग्रहालये, ३) पुराभिलेख, ४) दर्शनिका (Gazetteers), ५) अभिजात कला शिक्षण (Teaching of Fine Arts), ६) वाचनालये आणि संस्कृती म्हणजे रंगभूमीवरील प्रायोगिक/ललित कला (Performing Arts). शिक्षणाबरोबरच कला आणि संस्कृती यांमधील खात्यांचा सामायिक विषयांच्या यादीत समावेश करण्यामागील हेतू असा की, शिक्षण देणे या दोहोंचे उद्दिष्ट हेच आहे. नेहमीचे शिक्षण हे शाळा–महाविद्यालयातील अथवा विद्यापीठातील वर्गांतून शिक्षकांमार्फत दिले जाते, तर वरील सात खाती शिक्षक वा वर्ग (Classroom) यांच्या माध्यमाविना वास्तू, प्रदर्शनीय वस्तू, अभिलेख, दर्शनिका, दृग्गम्य कला (Visual Art), ग्रंथ व दृक्श्रुतिगम्य (audio-visual Art) कलांच्या माध्यमातून नागरिकांना शिक्षणच देत असते, पण अधिकारी व्यक्तींच्या व्याख्यानांच्या माध्यमातून नाही. वेगळ्या शब्दांत समाजाला आपल्या संस्कृतीच्या वेगवेगळ्या अंगांचे सम्यक ज्ञान व्हावे, हा ही खाती स्थापण्यामागचा हेतू आहे; आणि तोच इतिहासाच्या अभ्यासाचा आणि लेखनाचाही उद्देश आहे.

याप्रमाणे भारतीय इतिहासलेखनाचा विचार करताना डॉ. भाऊ दाजी लाड यांच्या चरित्राचा आढावा घेऊन त्या विषयाकडे वळलो, त्याचप्रमाणे पुरातत्त्वविषयक संशोधनाच्या प्रगतीचे परीघ तपासताना डॉ. सांकलिया यांच्या पुरातत्त्वविषयक संशोधनाचा आढावा घेणे फलदायी ठरेल. डॉ. हसमुख धीरजलाल सांकलिया हे सेंट झेवियर्सचे विद्यार्थी. घरात संस्कृतचे बाळकडू असल्याने संस्कृत विषय घेऊन त्यांनी स्नातक (बी.ए.) परीक्षा दिली. फादर हेरास यांचे त्यांच्याकडे लक्ष गेले आणि सांकलियांना त्यांनी नालंदा विद्यापीठाच्या संशोधनासाठी प्रवृत्त केले. मुंबई विद्यापीठात संशोधनाच्या माध्यमातून स्नातकोत्तर पदवी मिळण्याची व्यवस्था होती आणि आहे. या वेळी डॉ. सांकलियांचे मन कदाचित द्विधा असावे. त्यांच्या काकांनी त्यांना एलएल.बी. करून घरच्या सॉलिसीटर्स फर्ममध्ये रुजू होण्याचा सल्ला दिला. त्याप्रमाणे ते एलएल.बी. करीतही होते, पण फादर हेरास यांनी आपल्या तरुण विद्यार्थ्याचा कल लक्षात घेऊन लंडन युनिव्हर्सिटीत पुरातत्त्व विषयावर पीएच.डी. करण्याचा सल्ला दिला. १९३८ साली 'अर्किऑलाजी ऑफ गुजरात' या विषयावर पीएच.डी. मिळवून ते परतले. संशोधन संस्था म्हणून नव्याने सुरू झालेल्या डेक्कन महाविद्यालयामध्ये पुरातत्त्वाचे प्राध्यापक म्हणून ते १९३९ साली रुजू झाले.

मोहेंजोदारो संस्कृतीचा शोध लागला असला, तरी त्या निमित्ताने भारतीय संस्कृतीची प्राचीनता इसवीसनापूर्वीच्या तिसऱ्या सहस्रकापर्यंत जात असली, तरी या प्राचीन संस्कृतीचा आणि वेदोद्‌भव हिंदू संस्कृतीचा संबंध कसा लावावा या बाबतीत संशोधक संभ्रमात होते आणि त्यामुळेच बऱ्याच संशोधकांना–सांकलियांचे गुरू फादर हेरास यांचाही त्यात अंतर्भाव होतो – ही संस्कृती ऋग्वेदपूर्व असून ती द्राविड असली पाहिजे, असे ठामपणाने वाटत होते. अगदी

मॉर्टिमर व्हिलरसारख्या निष्णात पुरातत्त्ववेत्यालासुद्धा या संस्कृतीची पाळेमुळे पश्चिम आशियातील समकालीन संस्कृतीत असावीत, असेच वाटत होते. पुरातत्त्वाचे आधुनिक ज्ञान आणि पाश्चात्त्य अनुभव घेतलेल्या सांकलियांना भारतीय पुरातत्त्वाच्या संदर्भात अनेक प्रश्न पडले. प्राचीन मानव भारतात केव्हा प्रकट झाला, सांस्कृतिकदृष्ट्या अश्मयुगातील मानवापासून सिंधू संस्कृती, गंगेच्या खोऱ्यातील नागर संस्कृती, तिचा पूर्ण भारतभर प्रसार यांचे सलग चित्र समोर नव्हते आणि इतिहासाच्या कालक्रमामध्ये अनेक टप्पे पूर्णपणाने अज्ञात होते. त्यामुळे आपले संशोधन ऐतिहासिक कालापुरते मर्यादित न ठेवता, डेक्कन महाविद्यालयामधील इरावती कर्वे यांसारख्या आपल्या सहकाऱ्यांसमवेत आणि कधीकधी परदेशी प्रागैतिहासिक तज्ज्ञांसमवेत त्यांनी साबरमती, नर्मदा, गोदावरी, इत्यादी नद्यांच्या खोऱ्यांचा धांडोळा घेतला. या प्रकारच्या सर्वेक्षणात त्यांना प्रागैतिहासिककालीन मानवी सांगाडे, लांगणस (गुजरात) या ठिकाणी सापडले. या सांगाड्यांची प्राचीनता जोखण्यासाठी म्हणून नंतरही काही उत्खनने त्यांना करावी लागली आणि त्यातून त्या काळच्या संशोधनातील सर्वात प्राचीन अशा प्रागैतिहासिक भारतीय मानवाचा शोध लागला त्याचा काळ आंतरअश्मयुगातला (Mesolithic) असावा. डॉ. सांकलियांनी यापुढे प्रागैतिहासिक काळातले संशोधन स्वत:पुरते मर्यादित न ठेवता आपल्या पीएच.डी.च्या विद्यार्थ्यांमध्ये विभागून दिले. नेवासा येथील उत्खनन करीत असताना त्यांना प्रवरा खोऱ्यातील मध्य पुराश्मयुगीन (Middle Paleolithic हत्यारांचा शोध डॉ. बॅनर्जी आणि लागला.

तरुणचंद्र शर्मा (आसाम), आर.व्ही. जोशी (घटप्रभा, मलप्रभा खोरे), खत्री आणि सुपेकर (नर्मदा खोरे), महापात्र (महानदीचे खोरे), व्ही.एन. मिश्र (बेराक खोरे, राजस्थान), निसार अहमद (सोन नदीचे खोरे) (ललितपूर, मध्य प्रदेश, झाशी, उत्तर प्रदेश) अशा त्यांच्या विद्यार्थ्यांनी पीएच.डी.साठी सादर केलेल्या प्रबंधांतून स्वातंत्र्योत्तर भारताचे जवळजवळ पूर्ण प्रागैतिहासिक चित्र उभे राहिले. या संशोधनानंतर प्रा. सुब्बाराव, डॉ. शंकर अण्णाजी साळी, डॉ. के. पद्दैय्या यांनी केलेल्या सखोल अध्ययनामुळे हे चित्र अधिक स्पष्ट झाले. खोऱ्यांतील सर्वेक्षणातून मिळालेली हत्यारे व जीवाश्म तसेच नदीकाठच्या छेदांच्या (River Vally Sections) आणि सोपानांवरील टप्प्यांच्या (terraces) सीमेत न राहता रसायनशास्त्राच्या मदतीने सांगाड्यांचा शास्त्रीय अभ्यास करून प्रागैतिहासिक संशोधनाला डॉ. ग.गं. मुजुमदार, डॉ. शरद राजगुरू यांच्या साहाय्याने अधिक भक्कमपणा मिळाला. या संशोधनातून पुरापर्यावरणीय पुरातत्त्वशास्त्र (Paleo environmental archeology) या ज्ञानशाखेला त्यांनी आधार दिला. डॉ. सांकलिया यांचे वर उल्लेख केलेले सहकारी आणि त्यांचे शिष्य यांनी दोन-तीन तपांहून अधिक काळ केलेल्या संशोधनाचे फळ म्हणून सांकलियांना ‘Pre and Proto History of India and Pakistan’ यासारखा ग्रंथ १९६०च्या दशकात अभ्यासकांसमोर ठेवता आला.

यानंतरचे सांकलियांचे लक्ष इतिहासपूर्व काळाकडे केंद्रित झाले आणि त्यांनी ताम्रपाषाणयुगीन संस्कृतीच्या स्थळांच्या उत्खननावर भर दिला. त्यांनी व सहकाऱ्यांनी व भारतीय पुरातत्त्व सर्वेक्षणाच्या म.न. देशपांडे, थापर, शंकर अण्णाजी साळी यांनी जोर्वे, नाशिक, नेवासे, महेश्वर, नावडाटोली, सोनगाव, चांडोली यांसारख्या ताम्रपाषाणयुगीन वसाहतींचा शोध घेतला.

या संशोधनातून असे सिद्ध झाले की, इ.स. पूर्व २२००नंतर ताम्रपाषाणयुगीन ग्रामीण संस्कृती मोठ्या प्रमाणावर मध्य प्रदेश आणि महाराष्ट्र या ठिकाणी प्रसारित झाली आणि इतिहासपूर्व काळात जवळजवळ ४००० वर्षांपूर्वी मानवी वस्ती स्थिर झाली आणि त्या ग्रामीण संस्कृतीचा समकालीन हडप्पा संस्कृतीशीसुद्धा व्यापार-उदीमाच्या निमित्ताने संपर्क स्थापित झाला होता. प्रदेशानुरूप या संस्कृतींचा कालखंड पुढीलप्रमाणे सांगता येईल – सावळदा संस्कृती इ.स.पूर्व २२००-२०००, उत्तर-हडप्पा-संस्कृती इ.स.पूर्व २०००-१८००, माळया-संस्कृती इ.स.पूर्व १७००-

१५००, जोर्वे-संस्कृती इ.स.पूर्व १५००-१००० व उत्तर जोर्वेसंस्कृती इ.स.पूर्व १०००-७००. सांकलियांच्या पुढच्या पिढीतील डॉ. म.के. ढवळीकर आणि प्रा. वसंत शिंदे यांनी कायथा (मध्य प्रदेश), कावठे (खानदेश) आणि इनामगाव (जि. पुणे) या ठिकाणी उत्खनन करून महाराष्ट्रातील ताम्रपाषाणयुगीन संस्कृतीच्या आपल्या ज्ञानाला एक वेगळाच आयाम दिला. म.के. ढवळीकर आणि वसंत शिंदे यांनी गुजरातमधील कुंतासी आणि हरियाणामधील फरमाना येथील हरप्पासंस्कृतीचे नवे पैलू व त्या भागातील संस्कृतीची प्राचीनता यांवर नवीन प्रकाश टाकला. कायथा व कुंतासी येथील उत्खननामुळे कायथा, कुंतांसी तसेच दायमाबाद (शंकर अण्णाजी साळी) येथील उत्खननांमुळे महाराष्ट्रातील ताम्रपाषाणयुगीन संस्कृती आणि हरप्पा संस्कृती यांच्या परस्परसंबंधांबद्दल अधिक माहिती उजेडात आली.

नागपूर विद्यापीठातील प्रा. शां.भा. देव यांच्या टाकळघाट-खापा, माहुरझरी येथील उत्खननामुळे बृहद्‌अश्मयुगीन संस्कृतीच्या अभ्यासाकडे महाराष्ट्रातील पुरातत्त्वज्ञांचे लक्ष नव्याने आकर्षित झाले. त्यांनी महाराष्ट्र शासनाच्या पुरातत्त्व खात्याच्या संयुक्त विद्यमाने माहुरझरी, बोरगाव, भागीमहाली येथे मोठ्या प्रमाणावर केलेल्या उत्खननांमुळे विदर्भातील आद्य कृषक म्हणून या लोह आणि तांबे गाळून घरगुती उपयोगाची, नांगरटीची साधने व लोहशस्त्रे निर्माण करणाऱ्या संस्कृतीची ओळख व्यापक प्रमाणात व सखोल रितीने झाली आणि त्यांचा काळ इ.स. पूर्व १०००-५०० असा निश्चित करण्यात यश आले.

सांकलिया यांनी आद्य-ऐतिहासिक (Early Historical) पुरातत्त्वीय स्थळांच्या उत्खननाकडे अगदी सुरुवातीपासून आपले लक्ष दिले होते. कोल्हापूर, नाशिक, नेवासा, महेश्वर या ठिकाणी त्यांनी आद्य इतिहासकालातील सातवाहन संस्कृतीच्या भौतिक अवशेषांचे बारकाईने अध्ययन केले. यातूनच स्फूर्ती घेऊन कौंडिण्यपूर (मो.ग. दीक्षित), तेर (शां.भा. देव आणि पथी), भोकरदन (शां.भा. देव व गुप्ते), पवनी (शां.भा. देव व जगतपती जोशी) इत्यादी उत्खननांतून बौद्ध स्तूप, हस्तिदंती कला, समकालीन सामान्य माणसाचे जीवन यांवर प्रकाश पडला. राज्य शासनाच्या पुरातत्त्व व वस्तुसंग्रहालय खात्याने केलेल्या मांढळ, नागरा, वाशीम, इत्यादी ठिकाणच्या उत्खननांतून वाकाटककालीन स्थापत्य व शिल्पे यांच्या ज्ञानाबाबत मोलाची भर पडली. डेक्कन महाविद्यालयामधील माटे यांच्या संशोधनामुळे मराठा स्थापत्य आणि चित्रकलेची जाण अधिक व्यापक झाली, पण देवगिरी (दौलताबाद) येथील मराठवाडा विद्यापीठाच्या साहाय्याने त्यांनी केलेल्या उत्खननामुळे मध्ययुगीन पुरातत्त्वाची महाराष्ट्रात मुहूर्तमेढ झाली. त्याला आता महाराष्ट्र शासनाच्या पुरातत्त्व विभागाने केलेले थाळनेर (जि. धुळे) येथील उत्खनन व मुंबई विद्यापीठाच्या बहि:शाल शिक्षण केंद्राने हाती घेतलेल्या चांदोरे जि. रत्नागिरी येथील उत्खननामुळे जोड मिळाली आहे.

२०१३च्या विजया दशमीचा मुहूर्त साधून, भारतीय इतिहास संकलन समिती आणि डेक्कन महाविद्यालय पोस्टग्रॅज्युएट रिसर्च इन्स्टिट्यूट, पुणे यांच्या विद्यमाने प्रा. डी.सी. देवतारे. डॉ. पी.एस. जोशी आणि डॉ. चिं.ना. परचुरे यांनी संपादित केलेल्या Glimpses of Ancient Maharashtra Through Archeological Excavation या ग्रंथात महाराष्ट्रातील पुरातत्त्वाचा आढावा आढावा घेतला आहे.

उपसंहारात दिलेल्या एका कोष्टकात त्यांनी Early Acheulian म्हणजे पूर्व पुराश्मयुग ते इतिहासकालीन मध्ययुगापर्यंतच्या कालखंडामधील ताम्रपाषाणयुगीन बृहद्‌श्मयुगीन व आद्यऐतिहासिक कालातील प्रातिनिधीक पुरातत्त्वीय स्थळांची आणि त्यांच्या अनुमानित काळाची व कालानुक्रमाची माहिती दिली आहे. त्यावरून १९३९ साली म्हणजे ७५ वर्षांपूर्वी डॉ. सांकलिया यांनी सुरू केलेल्या पुरातत्त्वीय संशोधनाने किती मोठी भर पडलेली आहे, हे सहज लक्षात येईल.

**प्रतिनिधिक पुरातत्त्वीय स्थळे**

| अ.क्र. | स्थळ | | |
|---|---|---|---|
| १. | बोरी-मोरगाव | - पूर्व अश्युलियन | - पूर्व प्लायस्टोसीन आजपासून सुमारे ८ लाख वर्षांपूर्वी |
| २. | इनामगाव-दायमाबाद | - ताम्रपाषाण युग | - उत्तर होलोसीन आजपासून सुमारे ४२००-२७०० वर्षांपूर्वी |
| ३. | नयकुंड-माहुरझरी भागीमहारी-खैरवाडा | - आदि लोहयुग अश्मयुग | - उत्तर होलोसीन आजपासून सुमारे २०००-२५०० वर्षांपूर्वी |
| ४. | अडम-भोन मनसर-वाशीम | - आद्य इतिहास काळ | - उत्तर होलोसीन इ.स. पू. ६०० ते इ.स. ६०० |
| ५. | पातुर्ज-पंढरपूर दौलताबाद | - मध्ययुग | - उत्तर होलोसीन इ.स. पू. १७००-१८०० |

गेल्या ५० वर्षांत संशोधकांनी चोखंदळपणे निवडलेल्या वाटांविषयीचा विचार केल्याशिवाय पुरातत्त्वीय संशोधनासंबंधीचे विवेचन पूर्ण होणार नाही. एक म्हणजे, नवपुरातत्त्व आणि दुसरे म्हणजे दामोदर धर्मानंद कोसंबी व रामशरण शर्मा यांनी इतिहासकालाला दिलेली नवीन विचारांची चौकट गेल्या शतकाच्या साठीमध्ये बिनफोर्ड (Binford) आणि त्याच्या समविचाराच्या अमेरिकन व युरोपीय पुरातत्त्वज्ञांनी संशोधनात एक नवीन प्रवाह आणला असे म्हणता येईल. त्यांच्या मते, अगदी थोडक्यात सांगावयाचे झाल्यास तेव्हापर्यंतचे पुरातत्त्व एका विशिष्ट दृष्टिकोणामुळे मर्यादित झाले होते. पुरातत्त्वाचा इतिहास पाहिला तर सर्व प्राचीन संस्कृती इजिप्त व पश्चिम आशियामध्ये केंद्रित झाल्यासारख्या दिसतात. आणि त्यामुळे सर्व प्राचीन जमातीतील पुरातत्त्व पश्चिम आशिया आणि युरोपचा काही भाग एवढ्यापुरतेच मर्यादित होते. दुसरे असे की, या तथाकथित प्राचीन संस्कृतींचा लय झाल्यानंतर ख्रिश्चन धर्माचा प्रसार होऊन सर्व युरोपात व त्याही पलीकडे तो पसरला आणि त्याबरोबरच प्राचीन ज्यू आणि इराणी लोकांचा धर्म सोडता, संस्कृतीबरोबर सर्व प्राचीन धर्मही लयाला गेले. या अर्थाने या संस्कृतींचा अभ्यास हा धर्म किंवा भाषादृष्ट्या युरोपिअन पुरातत्त्वज्ञांसाठी आपल्या पूर्वजांचाच इतिहास शोधून काढणे, अशा प्रकारचा होता. एका अर्थाने या संस्कृतींचा धर्म, भाषा इत्यादींचा अभ्यास करताना युरोपिअन पुरातत्त्वज्ञांचे 'स्व' कुठेतरी अडकल्यासारखे होते. आपल्याच संस्कृतीची पाळेमुळे शोधण्याचा तो प्रयत्न होता. त्यासाठी ग्रीक, लॅटिन, हिब्रू भाषा, ज्यू लोकांचा धर्म आणि इतर सेमेटिक भाषा आणि त्यांचा धर्म यांच्या अभ्यासाची पार्श्वभूमी असल्याशिवाय हे संशोधन अशक्य होते. युरोपीय पुरातत्त्वज्ञांनी या सर्व भाषा आणि संस्कृती यांच्या ज्ञानामध्ये पारंगतता प्राप्त करून घेतल्यामुळे त्या संशोधनाची बरीच वाहवासुद्धा झाली. अमेरिकेत मात्र ही परिस्थिती नव्हती. त्या ठिकाणच्या प्राचीन संस्कृती या तथाकथित अमेरिकन-इंडियन लोकांच्या व साहजिकच वेगळे भाषासमूह बोलणाऱ्या जनसमूहांच्या असल्यामुळे त्या प्रदेशात संशोधन करावयाचे झाल्यास वेगळ्या तयारीची आवश्यकता होती. त्यासाठी अमेरिकेतील निरनिराळ्या आदिम जमाती आणि त्यांच्या भाषा यांचे ज्ञान आवश्यक होते. त्यामुळे अमेरिकन पुरातत्त्व हे जास्त मानववंशशास्त्राच्या आणि भाषाशास्त्राच्या दृष्टीकोनातून तटस्थपणे केलेला अभ्यास, अशा स्वरूपाचे होते. पश्चिम आशियातील अभ्यासामध्ये इजिप्त, सुमेर, बॉबिलोन येथील संस्कृती या अपेक्षेपेक्षा कितीतरी प्राचीन असल्यामुळे

कुठला सांस्कृतिक घटक कुठल्या ठिकाणी केव्हा मूळ धरू लागला; म्हणजे पुरातत्त्वज्ञांच्या भाषेत बोलावयाचे झाल्यास, What & When याला फार महत्त्व होते. परंतु अमेरिकन संशोधकास या दोन घटकांपेक्षा Why & How या दोन प्रश्नांची उकल करण्याला जास्त महत्त्व द्यावेसे वाटले. अमेरिकेमध्ये झालेले प्राचीन नागरीकरण हे इसवीसनाच्या सातव्या-आठव्या शतकापर्यंत म्हणजे तुलनेने उशिरापर्यंत का लांबले गेले, हा प्रश्न पुरातत्त्वज्ञांच्या समोर होता. कुठलाही सांस्कृतिक बदल कुठे, केव्हा झाला यापेक्षा तो का झाला आणि कशामुळे झाला, याची कार्यकारणप्रणाली शोधणे आवश्यक ठरले. मानववंशशास्त्राच्या दृष्टीने आता मानवाच्या प्रगतीचे टप्पे केव्हा आणि कुठे घडले यापेक्षा ते का व कसे घडले, हे महत्त्वाचे ठरले. परंपरागत पुरातत्त्वात माणसाची प्रगती ही त्याच्या तांत्रिक कसबावर आणि ज्ञानावर आधारित होती आणि त्यानुसार प्रगतीचे कालखंड हे त्याच्या तांत्रिक प्रगतीचे टप्पे होते. पुरातत्त्वात मान्य केलेला अश्म, कांस्य आणि लोह अशा ढोबळ तीन युगांचा सिद्धान्त व त्यातील नव्याने ओळखून काढलेल्या पुराश्मयुग (Paleolithic Period), आंतर-अश्मयुग (Mesolithic), नवाश्मयुग (Neolithic), ताम्रपाषाणयुग (Chalcolithic) आणि लोहयुग (Iron age) या अवस्थासुद्धा मानवाच्या तांत्रिक प्रगतीच्या आहेत. याउलट मानववंशशास्त्राच्या दृष्टीने जेव्हा मानवी सांस्कृतिक प्रगतीचा आलेख रेखाटण्यात आला, त्या वेळी वन्य-भटके जीवन (Savage-wandering Stage), स्थिर ग्रामीण जीवन (Barbaric Sedentary Stage) आणि नागर अवस्था (Civilised Stage) अशा रितीने कल्पिण्यात आला आणि त्यातून मानवाच्या समूहजीवनात कसे बदल झाले, यांवर भर देण्यात आला. नागर अवस्था आणि राजसंस्थाही उदयाला येते म्हणजे नेमके काय होते? याचा विचार मानववंशशास्त्रज्ञांबरोबर पुरातत्त्वज्ञ करू लागले आणि त्यातूनच नागर अवस्था ठरविण्यासाठी लागणारी दहा निदाने (Traits) कोणती? हे परंपरागत पुरातत्त्वाचा ज्येष्ठ अभ्यासक सर व्ही. गॉर्डन चाइल्ड याने पहिल्यांदा मांडली. या विचारसरणीतला आणखी एक अध्याहृत भाग असा होता की, मानवाची प्रगती आणि तिचा आलेख सारखा उंचावतच जातो. कारण तो आपल्या तंत्रज्ञानाच्या कसबामुळे निसर्गावर उत्तरोत्तर विजयच मिळवत राहणार अशी एकोणिसाव्या शतकातील संशोधकांची धारणा होती. मानववंशशास्त्रातील नव्या दृष्टान्ताचा आणि परिभाषेचा (Pardigm चा) अंगीकार केल्यानंतर मानवाच्या आर्थिक, सामाजिक, राजकीय, धार्मिक संस्थांचे आलेख हे कधी उंच तर कधी अधोगतीने चालतात हे अधोरेखित झाले. पुनश्च पुरातत्त्वाच्या साहाय्याने मानवाच्या संस्कृतीमध्ये झालेले प्रगति-अधोगतीचे आलेख तपासणे हे खरे उद्दिष्ट आहे, हे स्पष्ट झाले.

हा सर्व प्रपंच करण्याचा हेतू सत्तरीनंतरच्या महाराष्ट्राच्या व दख्खनच्या पुरातत्त्व संशोधनात स्पष्टपणे प्रतिबिंबित झालेला दिसतो. नवपुरातत्त्वाचा वापर म.के. ढवळीकर यांनी इनामगाव येथील संशोधनात सर्वप्रथम प्रामुख्याने केला. पुणे जिल्ह्यातील इनामगाव हे ताम्रपाषाणयुगीन संस्कृतीचे एक प्रमुख स्थळ. या ठिकाणी ताम्रपाषाणयुगात मानवाने आपल्या तंत्रज्ञानाच्या साहाय्याने अनुकूल हवामान असता कशी प्रगती केली व तेच प्रतिकूल झाल्यानंतर स्थिर ग्रामीण जीवन सोडून त्याला भटक्या जीवनाचा आश्रय का करावा लागला, याची उकल त्यांनी उत्खननात प्राप्त झालेल्या निरनिराळ्या प्रकारच्या पुराव्यांच्या साहाय्याने केली. इनामगावमधील समकालीन ग्रामीण जीवन हे महाराष्ट्रातील इतर ताम्रपाषाणयुगीन ग्रामस्थांसारखेच होते. त्यांनी नदीवर बांध घालून कालव्याचे पाणी शेतामध्ये पोहोचवल्यानंतर त्यांच्या जीवनात भौतिक समृद्धी आली; परंतु इसवीसनाच्या सातव्या शतकाच्या सुमारास अव्याहत दुष्काळ पडत गेल्यामुळे त्यांना भटके जीवन पत्करावे लागले. या संदर्भात निरनिराळ्या थरांत मिळालेल्या हाडांच्या पुराव्यामुळे वरील अनुमानास बळकटी मिळाली. कालव्याने शेतीला पाणी मिळण्याच्या समृद्धीच्या काळात दुबार पीक घेण्याची आणि मुख्य पिकांमध्येसुद्धा जोडपिके घेतलेली आढळून येतात; आणि त्यामुळेच आहारातील प्राण्यांच्या आहाराच्या संख्येत बरीच घट झालेली दिसते; तर शेवटच्या अवस्थेत विपरीत दुष्काळी परिस्थितीमुळे

मोठ्या प्राण्यांच्या हाडांऐवजी नवजात प्राण्यांची हाडे अधिक आढळतात. इनामगाव येथील या पुरातत्त्वीय संशोधनामुळे नवपुरातत्त्वाच्या सिद्धान्ताला बळकटी तर मिळालीच, तसेच त्यामुळे ताम्रपाषाणयुगीन मानवाच्या संस्कृतीमधील चढउतारही स्पष्टपणे लक्षात आले. नवपुरातत्त्वाचा सिद्धान्त तितक्याच ठळकपणे दख्खनमधील पुराश्मयुग ते नवाश्मयुग या मानवाच्या वाटचालीतील चढउतार दाखवण्यासाठी हुणसगी (जि. गुलबर्गी) येथील सर्वेक्षणे, उत्खनने यांच्या साहाय्याने के. पद्दैय्या यांनी प्रभावीपणे केला.

पुरातत्त्वीय पुराव्याचा सांस्कृतिक जीवनातील चढउतार दाखवण्याचा प्रयत्न, नवपुरातत्त्वाची परिभाषा वापरली नसली तरी मोठ्या प्रभावीपणे डॉ. दामोदर धर्मानंद कोसंबी, प्रा. रामशरण शर्मा व त्यांच्या अनुयायांनी केला. भारतातील सरंजामशाही, तिचा उद्‌गम आणि विकास यासंबंधीचे प्रमेय डॉ. दामोदर धर्मानंद कोसंबींनी १९५६ साली त्यांनी लिहिलेल्या ‘भारतीय इतिहासातील सहा पायऱ्या’ या लेखाद्वारे प्रथमच मांडले. याचा उल्लेख यापूर्वी आलेला आहेच. त्यांनी आणि रामशरण शर्मा यांनी विकसित केलेल्या सरंजामशाहीच्या सिद्धान्ताचा प्रतिवाद ब्रिजदुलाल चट्टोपाध्याय यांनी आपल्या राजपुतान्याच्या इतिहासाच्या माध्यमातून आणि श्रीमती चंपकलक्ष्मी यांनी पल्लव आणि चोल नाणी आणि अभिलेख तसेच तामिळ वाङ्‌मय यांच्या आधारे कसा केला, याचे विवेचन वर आले आहेच. त्यासाठी आणखी खोलात जावयाचे झाल्यास ऐतिहासिक काळातील स्थळांचे गवेषण हे सांकलियांच्या पद्धतीनुसार ऐतिहासिक भूगोल आणि सांस्कृतिक नृकुल विद्या (Cultural Ethnography) यांचा आधार घेऊन मोठ्या प्रमाणावर केल्यास ते अधिक प्रमाणभूत ठरेल. ढवळीकरांनी त्यांच्या ऐतिहासिक पुरातत्त्व (Historical Archeology) यावरच्या ग्रंथात विवेचन केल्याप्रमाणे अधिक सबुरीचा दृष्टीकोन स्वीकारल्यास मध्यकालाचे वर्णन निर्नागरीकरण (Deurbanisation) एवढ्यापुरतेच मर्यादितपणे करावे लागेल. ढवळीकरांच्या मते आर्थिक सुबत्ता घटण्याचे कारण पर्यावरणातील बदलात व भौगोलिक जडणघडणीतसुद्धा आहे. दिलीप चक्रवर्ती यांच्या नवीन ग्रंथातूनसुद्धा भौगोलिक घटकांचा सांस्कृतिक आणि राजकीय परिस्थितीवर काय परिणाम होतो, याच्या विवेचनाबरोबरच समाजातील महत्त्वाकांक्षी पुरुषसुद्धा भौगोलिक घटकांचा फायदा घेऊन आपले वर्चस्व प्रस्थापित करतात असे दाखवून दिले गेले आहे. आमच्या मते सरंजामशाहीचा सिद्धान्त आणि त्यातील ढोबळपणा अधिक जाणवतो तो जातिसंस्था, धार्मिक विचारांमध्ये घडून आलेले बदल आणि साहित्यरचना यांविषयीच्या डॉ. दामोदर धर्मानंद कोसंबींच्या अपरिपक्व अशा प्रकारच्या निष्कर्षांवरून लक्षात येतो. विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे नाण्यांचा अभ्यास. रामशरण शर्मा यांच्या मते नाण्यांचा कमीच नाही तर जवळजवळ दुर्लक्षणीय असा वापर म्हणजेच Money Economyचा अभाव. आणि त्याउलट अग्रहार-दानपत्रांची खैरात. यांतील विरोध झटकन लक्षात येतो. वेगळ्या शब्दांत देणाऱ्याच्या हातात दिडकीही नाही, पण राष्ट्राची संपत्ती असलेली जमीन मात्र जे लोक स्वत: कसत नाहीत अशा निरुत्पादक गैरहजर जमीनमालकांच्या (Absente Landlord) ताब्यात यामुळे बरेचसे व्यवहार, वाणिज्यविनिमय हे जवळजवळ पैशांशिवाय होत असत असे दिसते. बारा बलुत्यांची व्यवस्था लक्षात घेतली तर गावातील या बलुतेदारांना गावाच्या रक्षणाचे, महसुली व्यवस्थेचे, शेतीसाठी लागणाऱ्या नित्यसेवांचे प्रदान गावासाठी करणे अत्यंत आवश्यक होते. परंतु उत्पन्न मात्र पैशांच्या मोबदल्यात न होता, शेती उत्पादनाच्या रूपात होते. प्रत्यक्ष शेती कसणाऱ्या कुळाला उत्पन्नाचा विशिष्ट वाटा धान्याच्या रूपाने मिळायचा. गावासाठी लोहारकाम, सुतारकाम करणाऱ्या कारागिराचीही अवस्था वेगळी नव्हती. जागल्यापासून पोलीसपाटिलाचे काम करणाऱ्या हुद्देदारालासुद्धा मोबदला त्याच स्वरूपात मिळत असे. हे त्याचे काम तो आपले वंशपरंपरागत कर्तव्य म्हणून करीत असे. गावातील तळे खोदणे इत्यादी कामाकरिता जे वेठबिगार होते त्यांच्यापेक्षा यांची परिस्थिती वेगळी नव्हती आणि त्यामुळेच व्यापक दृष्टीने पाहिल्यास समाजाच्या सर्व अंगामध्ये रूढीप्रियता भिनून गेली होती, याचे दुष्परिणाम अर्थात सामाजिक जीवनाच्या निरनिराळ्या व्यवहारांत

जे बहुतांश जातिनिष्ठ होते, धार्मिक आचारविचारांत आणि निष्प्रभ अशा कलाविष्कारात झाले असल्यास नवल नाही. सरंजामशाहीच्या जीवनाचे हे चित्रण अशा रितीने अत्यंत आकर्षक स्वरूपात जरी मांडले गेले असले, तरी प्रत्यक्षात मिळणारा भावाभावात्मक पुरावा हे चित्र जास्त काल्पनिक असल्याचे दाखवतो. उदाहरणार्थ, युरोपप्रमाणे नाणी पाडणे हे भारतामध्ये सार्वभौमत्वाचे लक्षण कधीच नव्हते. मौर्यपूर्वकाळापासून प्रचलित असलेली नाणी ही श्रेणींनी प्रसारित केली होती; आणि त्या आहत नाण्यांवरील श्रेणींच्या खुणा नाण्याचा खरा कस दाखवतात की नाही, एवढेच राजाच्या मुद्राध्यक्षाचे काम होते, हे कौटिल्याच्या अर्थशास्त्रावरून कळते. ही आहत नाणी प्रचारात आल्यापासून कमीतकमी सात-आठशे वर्षे तरी चलन म्हणून वापरली जात होती. दुसरा महत्त्वाचा मुद्दा म्हणजे कमलकुमार माहेश्वरी यांच्या भारोससाणीय (Indo-Sasanian) अथवा सामान्य वाक्प्रचाराप्रमाणे गद्धैया नाण्यांच्या अभ्यासावरून असे लक्षात येते की, रामशरण शर्मा यांना अपेक्षित असलेल्या इ.स. सहाव्या ते तेराव्या शतकापर्यंतच्या तथाकथित सरंजामशाही काळात ही नाणी विपुल प्रमाणावर राजस्थान, आधुनिक हरियाणा, प. उत्तर प्रदेश, मध्य प्रदेश आणि महाराष्ट्र या प्रदेशांत चलन म्हणून वापरली जात होती. ही नाणी गुर्जर-प्रतिहारकालीन निरनिराळ्या राजघराण्यांनी प्रचलित केली; नाण्यांचा बारकाईने अभ्यास करून कुठकुठल्या राजांनी ती प्रचलित केली ते ठरवावे लागते. एखाद्या देशाच्या राजाने नाणे प्रचलित केले म्हणजे दुसऱ्या राज्यात ते चालत नसे असे मुळीच नव्हते, हे भास्कराचार्यांनी (बारावे शतक) दिलेल्या नाण्यांच्या प्रकारावरून व त्यांच्या तुलनेच्या कोष्टकावरून सहज लक्षात येते. भास्कराचार्यांनी दिलेल्या माहितीवरून हेही स्पष्ट होते की, कवडी ही विनिमयाचे एकक (Unit) म्हणून सहज प्रचारात होते. सोन्याची नाणी प्रचलित होती, पण ती फक्त जमीन खरेदी-विक्रीसारख्या मोठ्या व्यवहारातच वापरली जात होती हे स्पष्ट दिसते. राष्ट्रकूटांनी (इ.स. आठवे ते दहावे शतक) नाणी पाडलेली नव्हती. ते सारखे फिरतीवर असत. त्यांच्या राजधानीचे अवशेष शोधूनही सापडत नाहीत. त्यामुळे त्यांचा कारभार सरंजामी पद्धतीचा असावा असा आक्षेप घेतला जातो. त्यांचे जवळजवळ १००० अभिलेख (शिलालेख, ताम्रपत्र इत्यादी) असल्यामुळे व ताम्रपत्रांची व दानपत्रांची प्रचुरता म्हणजे सरंजामशाहीचे ठळक लक्षण असल्याचे मानले जाते. त्यांची नाणी नसली तरी त्यांचे आणि नंतरच्या काळात कल्याणी-चालुक्यांचे (इ.स. दहावे ते बारावे शतक) यांचे मांडलिक असलेल्या कोकणातील शिलाहारांची नाणी मात्र नक्कीच प्रचारात होती. खुद्द राष्ट्रकूट इंद्रतृतीय (इ.स. १५-२६) याच्या राज्यारोहणाच्या निमित्ताने दिलेल्या दानलेखात त्याने २१ लक्ष (द्रम्य = दाम हे तांब्याचे नाणे) इतका महसूल असलेली गावे दान म्हणून दिली, असे मोठ्या अभिमानाने सांगितले आहे. या सर्व पुराव्यांवरून असे सहज लक्षात येते की, पुरातत्त्वातील महत्त्वाच्या भौतिक पुराव्याच्या साहाय्याने इ.स. पाचवे शतक ते तेरावे शतक हा पूर्व मध्ययुगाचा काळ सरंजामशाहीचा होता हे मत सिद्धान्त (Theory) स्वरूपाचे आहे, असे न मानता अधिक तपशिलात जाऊन तपासण्यासारखे, फार तर प्रमेय (hypothesis) आहे असे मानावे.

मानव हा बुद्धिनिष्ठ प्राणी आहे. त्याची बुद्धिनिष्ठा ही इतर प्राण्यांपेक्षा त्याचे वेगळेपण दाखवते. त्याचा सर्व सामाजिक व्यवहार हा तर्कावर आधारलेला असतो, असे मानण्याची पद्धत आहे आणि म्हणूनच पुरातत्त्वाच्या दृष्टीकोनातून जेव्हा मानवी संस्कृतीच्या प्रगतीचा आलेख मांडण्यात आला, तेव्हा त्याची तांत्रिक प्रगती आणि कसब हे त्यातील प्रमुख गमक मानण्यात आले. मानववंशशास्त्र आणि भाषाशास्त्र याची जोड मिळाल्यावर मानवी समाजजीवनाचा आर्थिक पाया महत्त्वाचा मानला गेला. आणि म्हणून उत्खननातील समाजजीवन रेखाटताना, त्यासाठीची अनुमाने बेतताना त्याची जीवनयापन पद्धती (subsistance Pattern) आणि वसतीचा प्रकार (Settlement Pattern) यांचा अभ्यास केल्यानंतर सामाजिक रचना, राजकीय प्रणाली व सरतेशेवटची धार्मिक विश्वास आणि समजुती यांचा विचार केला जातो. अर्थ, समाज, राजकारण आणि धर्म या उत्तरोत्तर अमूर्त होत जाणाऱ्या

संकल्पना आहेत. त्यामुळे भौतिक पुराव्यांच्या आधारे संपूर्ण समाजजीवनाचे चित्रण करावयाचे झाल्यास इतर प्रकारच्या म्हणजे मौखिक परंपरा आणि कलैतिहासिक (Art-Historial) पुराव्याचीसुद्धा त्यास जोड द्यावी या मताप्रत नवपुरातत्त्ववादी आले आहेत.

महाराष्ट्रातील धर्मपरंपरा, प्रागैतिहासिक मानवाच्या धार्मिक समजुती आणि विश्वास यांच्याविषयी भौतिक पुराव्यांच्या आधारे जाणून घ्यायचे झाले, तर काही थोड्या पण निश्चित कल्पनांविषयी आपण अंदाज करू शकतो. साहजिकच दगडी अथवा मातीची शिल्पे, पहाडातील कपारी व निवारे (Rock Shelters) यांतून रंगवलेली चित्रे, त्यांतील विषय आणि सांप्रतच्या आदिवासींचे धार्मिक विधी आणि संबंधित गीते यांवरून करावे हे अनुमान लागते. डेक्कन महाविद्यालयामध्ये नुकत्याच झालेल्या या गुंफाचित्रांच्या अभ्यासावरून असे स्पष्ट झाले आहे की, वऱ्हाडातील काही भिल्ल व इतर जमातींच्या धार्मिक प्रथांचा अभ्यास केला असता ही चित्रे कशासाठी काढली होती, याचे निदान काही प्रमाणात अनुमान करता येते. आजही नववर्षाच्या म्हणजे दिवाळीच्या उत्सवात अशी चित्रे काढून त्या चित्रांसमोर घरातील खिल्लारांची पूजा केली जाते आणि ती गाईगुरे घरच्या गोठ्यात परत आणली जातात. त्या चित्रांमधून गाईगुरांना प्राप्त होणाऱ्या यातुशक्तीमुळे त्यांची रोगराई नष्ट होते आणि घरात सुखसमृद्धी नांदते अशी या आदिवासींची श्रद्धा आहे. डॉ. मल्लादी कृष्णमूर्ती या आंध्र विद्यापीठात प्रागैतिहासिक पुरातत्त्वज्ञ म्हणून काम करणाऱ्या प्रोफेसरांनी केलेली निरीक्षणेसुद्धा या दृष्टीने महत्त्वाची आहेत. त्यांच्या मते ऋतूंच्या बदलाप्रमाणे डोंगराळ भागातील आदिवासी चराऊ कुरणांच्या उपलब्धतेनुसार देशावरून घाटात येणे-जाणे करतात आणि खिल्लाराचा विधिपूर्वक बळी देतात. हा विधी खिल्लाराच्या सुफलीकरणासाठीच (fertility साठी) असतो. अभ्यासकांचे मत असे आहे की, अशा प्रकारच्या विधिपूर्वक बलिदानामुळे खिल्लारे आणि निसर्गात उपलब्ध असलेली त्यांची कुरणे यांचा समतोल साधला जात असे. उत्तर कर्नाटकात आणि पूर्वेस त्यालगत असलेल्या आजच्या आंध्र प्रदेशातील भागात राखेची अनेक टेकाडे सापडली आहेत. बऱ्याच वेळा या ठिकाणांचा उल्लेख 'भूधिहाळ' म्हणजे (विसंभूतिपल्ली) म्हणून केला जातो. याविषयीसुद्धा अभ्यास करणाऱ्या अल्चिन सुब्बाराव पट्टय्या या पुरातत्त्वज्ञांची अशीच समजूत झाली आहे की, वर्षातून नियमितपणे गोळा झालेल्या शेण्या विधिपूर्वक अग्नीत दिल्या जात असाव्यात. हे विधी अर्थातच प्रागैतिहासिक यातुधर्माशी संबंधित असावेत. तुलनेने नवाश्म आणि ताम्राश्म युगातील धार्मिक कल्पना या यातुनिष्ठ धर्मातूनच उद्‌भूत झाल्या असल्या, तरी स्थिर ग्रामीण जीवनामुळे या धर्माला एक वेगळा आयाम मिळतो. जगातील इतर प्रागैतिहासिक जीवन हे शिकारीची सुसाध्यता आणि कुटुंब व समाजातील संतती व समृद्धीसाठी होते हे लक्षात येते. तसेच मातृदेवतांनासुद्धा या धर्मात मोठाच वाटा होता, हेही कळते. डेक्कन महाविद्यालयामधील डॉ. शुभांगना अत्रे यांनी केलेल्या संशोधनातून समृद्ध नागरजीवन असलेल्या हरप्पा संस्कृतीत मातृदेवतांच्या पूजनाला प्राधान्य होते हे लक्षात येते. त्यामुळे समकालीन नवाश्मयुगीन व ताम्रपाषाणयुगीन प्रागैतिहासिक मानवी समूहात अशाच प्रकारचा धर्म असावा असे अनुमान करणे गैर ठरणार नाही. धार्मिक जीवनाचा दुसरा एक महत्त्वाचा भाग म्हणजे मृतात्मे आणि पितर यांविषयीच्या समजुती आणि विधी. अगदी ताम्रपाषाणयुगापर्यंतसुद्धा (म्हणजे सुमारे इ.स. पूर्व १००० या काळापर्यंत) मृतांना घराच्या जमिनीखालीच पुरण्याची पद्धत होती. महाराष्ट्रातील उदाहरण द्यावयाचे झाल्यास जोर्वे संस्कृतीच्या काळात (इ.स. पूर्व १५०० ते १०००) अथवा त्या पूर्वीही मृतांचे दफन घरातच करण्याची पद्धत होती. जोर्वे संस्कृतीची अगदी ठरीव अथवा नेहमीची पद्धत म्हणजे पक्क्या मातीची भांडी मध्यभागी तोंडाशी जोडून मधली बुडाशी फोडून आणि टोकाकडील न फोडता प्रेताचे दफन केले जात असे. त्याचबरोबर अशा प्रसंगी दिले जाणारे अन्न, त्याच्या आवडत्या/वापरातील वस्तू इत्यादी गोष्टी ठेवलेल्या आढळतात. परंतु इनामगाव येथील गावाच्या प्रमुखाच्या घरी सापडलेल्या दोन वेगळ्या प्रकारच्या दफनांचा उल्लेख करावा लागेल. ही भांडी एकमेकांना

जोडून केलेल्या नेहमीच्या दफनापेक्षा वेगळी होती. मध्यावर एका बाजूला जास्त फुगीर केलेल्या उभ्या रांजणात, गर्भाशयात हातपाय मुडपून असलेल्या अवस्थेतील, पुरलेल्या सांगाड्याच्या रूपात प्रेताचे दफन आढळले. मातीचे भांडे आणि पुरण्यासाठी वापरलेली माती, रांजणांना एका बाजूला दिलेला फुगीर आकार ही सर्व प्रतीके प्रेतात्मा हा जमिनीत पुन्हा गर्भरूपाने गेला आहे आणि त्याचा पुनर्जन्म नांगरलेल्या जमिनीत जसे बी पेरावे आणि पावसाळ्यात पिकाच्या रूपाने ते वर यावे अशा प्रकारच्या विश्वासाची द्योतक आहेत. दख्खनमधील ताम्रपाषाणयुगीन लोक हे आर्येतर अथवा आर्य होते, हे सांगणारा ठोस पुरावा आज उपलब्ध नाही, पण समकालात पुनर्जन्माची कल्पना निश्चित होती हे यावरून स्पष्ट होते. मानवी दफनाच्या बाबतीत दुसरी एक लक्षणीय प्रथा आढळते, ती अशी–उघडकीस आलेल्या अनेक दफनांत असे आढळून आले आहे की, ती बऱ्याच वेळा दक्षिणोत्तर ठेवलेली असतात आणि त्याहीपेक्षा महत्त्वाचे म्हणजे अनेक वेळा त्यांचा घोट्यापासून पायाचा खालचा भाग प्रेतावस्थेत असतानाच तोडून बाहेर टाकला असावा, असे अनुमान करावे लागते. आजच्या हिंदूंमध्ये वैदिक काळापासून प्रचलित असलेल्या मृतसंस्कारातील विधींमधील प्रथा तत्सम आहेत, असे दिसून येते. प्रेताला गावाबाहेर स्मशानात नेताना वयाने मोठ्या माणसांनी पुढे असावे, धाकट्यांनी मागे व स्मशानाकडे जाणाऱ्या माणसांची धुळीत उमटलेली जाताना-येतानाची पावले पुसून टाकावीत अशी प्रथा होती आणि आहे (आजही काही प्रमाणात) असे दिसते. त्या पाऊलखुणांवरून प्रेतात्म्याने पुन्हा परत येऊ नये, असा त्यामागील संकेत आहे.

ताम्रपाषाणयुगीन मानवाचा धार्मिक विश्वास आणि आचार यांबद्दल इनामगाव येथील उत्खननातूनच आणखी काही मनोरंजक माहिती उघडकीस आली आहे. नवपुरातत्त्वाच्या संकेतानुसार उत्खननात घराची एखादी वास्तू निश्चित झाल्यानंतर वास्तूबाहेर आणि वास्तूच्या आतमध्ये मिळणाऱ्या वस्तूंची काळजीपूर्वक नोंद घेतली जाते. इनामगावच्या प्राचीन स्थळावर अशाच एका वास्तूमध्ये एक मातीची डबी आढळली. डबीप्रमाणेच आतमध्ये ठेवलेली बैलावर स्वार झालेली मातृदेवतेची मूर्ती कच्च्या मातीतच होती. देवतेचे वैशिष्ट्य असे की, तिला शिर नव्हते. आजूबाजूच्या इतर वस्तूंवरून उत्खनकांनी असा कयास केला की, ही बाळंतिणीची खोली असावी. अशा प्रकारच्या शिरविहीन मातृदेवतेच्या मूर्तीचा नेमका अर्थ काय असावा, याचा विचार करता, वारली जमातीमध्ये प्रचलित असलेल्या विवाहप्रसंगी पुजल्या जाणाऱ्या पालघट या देवतेशी तिचे साम्य लक्षात आले; आणि त्यावरून अशा प्रकारचा करंडा ठेवण्यामागे सुप्रजननाचा हेतू असावा, अशा अनुमानाप्रत उत्खनक आले. अशा प्रकारची जिला 'विशिरा' म्हणता येईल अशी दुसरी देवता म्हणजे 'लज्जागौरी' होय. कॅरोल बोलन आणि रा.चिं. ढेरे यांनी केलेल्या लज्जागौरीच्या सखोल अध्ययनावरून सहज लक्षात येते की, दख्खनमध्ये इसवीसनपूर्वीच्या पहिल्या-दुसऱ्या शतकापासून ते अकराव्या-बाराव्या शतकापर्यंत – म्हणजे सातवाहन कालापासून कल्याणी चालुक्यांच्या काळापर्यंत स्त्रिया पुत्रप्राप्तीसाठी लज्जागौरी या देवतेचे पूजन करीत असत. इनामगाव येथील उत्खननात सापडलेल्या या मातीच्या आगळ्या करंड्यामुळे अशा शिरोविहीन मातृदेवतेच्या पूजनाची प्रथा इसवी सनपूर्व १०००पर्यंत सहज जाऊ शकते, हे लक्षात येते.

जेव्हा उत्खननासारखा माहितीचा स्रोत उपलब्ध नव्हता, तेव्हा भारतीय धर्मपरंपरांचा अभ्यास करण्यासाठी वैदिक व पौराणिक, पाली व अर्धमागधी त्यानंतर अपभ्रंश भाषांमध्ये निरनिराळ्या परंपरांचे समर्थन किंवा विवेचन करणाऱ्या धार्मिक ग्रंथांवर विसंबून राहावे लागत असे. नंतर जरी या परंपरा – मग त्या वैदिक, बौद्ध, जैन, आजीविक, शैव वा वैष्णव असोत, लिखित स्वरूपात आज आपल्याला उपलब्ध असल्या तरी त्या मौखिक परंपरेनेच जपल्या होत्या. भारतातील सर्व धार्मिक परंपरा या रितीने बहुअंशी मौखिक म्हटल्या तरी हरकत नाही. संस्कृतचा शोध अठराव्या शतकात प्रकर्षाने लागल्यानंतर मॅक्सम्युलर या जर्मन प्रकांडपंडिताने 'सेक्रेड बुक्स ऑफ द इस्ट' या ग्रंथमालेमध्ये

जवळजवळ ५० पौर्वात्य धार्मिक ग्रंथांची इंग्लिश भाषांतरे प्रसिद्ध केली. संस्कृतच्या शोधामुळे अशी जाणीव उत्पन्न झाली की, भारतीय आणि इराणी मानवी समूहांचे पूर्वज आणि आजच्या स्लाव्हिक, जर्मनिक, लॅटिन आणि ग्रीक भाषा बोलणाऱ्या युरोपिअन लोकांचे पूर्वज अशा विस्तृत प्रदेशामध्ये एकत्र राहत असत. त्यांची भाषासुद्धा या सर्व भाषांची जननी म्हणता येईल अशी म्हणजे प्रोटो इंडो-युरोपिअन ही असावी आणि कदाचित त्यांच्या धार्मिक समजुती, आचार-विचार हेही सारखेच असावेत. वेद आणि अवेस्ता यांच्याप्रमाणेच जैन आणि त्यांतल्या त्यात बौद्ध धर्माबद्दल युरोपिअन मनाला मोठेच आकर्षण वाटले. इतके की शॉपेनहावर, नीत्शे यांच्यासारखे प्रथितयश तत्त्वज्ञ या धर्मातील तात्त्विक विचाराने प्रभावित झाले होते. त्यामुळे वैदिक बौद्ध व जैन धर्मांचा परस्पर संबंध काय होता? आणि वैदिक धर्म त्यांतल्या त्यात प्राचीन असल्याने (मॅक्सम्युलरच्या मते तो कमीत कमी इ.स. पूर्व १२०० इतका तरी असला पाहिजे) व ज्यांना जुन्या जगातील प्राचीन संस्कृती असे म्हणतात (ओल्ड वर्ल्ड सिव्हिलायझेशन्स) त्यांपैकी अविच्छिन्न परंपरा असलेले दोनच धर्म, म्हणजे इराणी आणि वैदिक धर्म आत्तापर्यंत टिकून असल्याने वैदिक धर्माचा विश्लेषणात्मक अभ्यास केल्यास कुठल्याही धर्माची आणि त्यातील आध्यात्मिक व तत्त्वज्ञानात्मक विचारांची जडणघडण कशी होते व कालानुरूप त्यात कसे बदल होतात, हे सहजपणे लक्षात येईल असे वाटल्यावरून मॅक्सम्युलर यांनी तौलनिक भाषाशास्त्र व दैवतशास्त्र (कम्पॅरेटिव्ह फिलॉलॉजी आणि कम्पॅरेटिव्ह मायथॉलॉजी) यांच्या आधाराने करण्याचे ठरवले. आधुनिक युरोपीय आणि पश्चिम आशियाई धर्मविचारकांच्या दृष्टीने अप्रगतावस्थेमध्ये आदिमानव प्रसंगानुरूप भुते-खेते, झाडे-झुडपे, नद्या-डोंगर यांतील निसर्ग-चमत्काराला भिऊन त्यांची पूजा करत असत. यांनाच युरोपिअन किंवा बायबलच्या परंपरेने पॅगन रिलिजन म्हणजे रानटी किंवा असंस्कृत लोकांचा धर्म असे म्हटले आहे. याउलट जुना व नवा करार आणि मोहम्मद पैगंबरांनी देवाचा प्रेषित म्हणून सांगितलेला धर्म हा एकेश्वरवादी (मोनोथिइस्टिक) असे म्हणतात. मानववंशशास्त्रज्ञांनी जो प्राचीन मानवांच्या धार्मिक परंपरांचा अभ्यास केला, त्यातून असे लक्षात आले की वर वर्णन केल्याप्रमाणे मानवाच्या अप्रगत अवस्थेत, म्हणजे तो वन्य व भटक्या स्वरूपात (सॅव्हेज ॲन्ड वॉन्डरिंग) होता तेव्हा आणि काही अंशी तो स्थिर जीवन जगत असताना परंतु अजून गावातूनच राहत असताना (सेडेन्टरी ॲन्ड बार्बेरिक) तो अशाच प्रकारचा अप्रगत म्हणजे पॅगन धर्म अनुसरत असे. मानवी समाजात नागरीकरणाचा क्रांतिकारक असा बदल झाल्यानंतर नगरदेवता (सिटी गॉडेस) आणि त्याचा प्रतिनिधी म्हणून राजा हासुद्धा पूजेचा आणि आदराचा विषय झाला आणि यातूनच संपूर्ण नागरअवस्था प्राप्त झाल्यानंतर प्राचीन संस्कृतीच्या मध्ये व त्यापाठोपाठ बायबल आणि कुराणप्रणीत धर्मांत एकेश्वरवाद प्रतिष्ठित झाला. वेगळ्या शब्दांत सांगावयाचे झाल्यास पूर्णपणाने सुसंस्कृत नागर समाजच एकेश्वरवादाचे अनुसरण करतो. वरील किंवा तत्सदृश युक्तिवादाचा विचार करून मॅक्सम्युलरने वैदिक आर्यांमध्ये बहुदेवता वादापासून एकेश्वरवादाची प्रस्थापना कशी झाली या विषयाची सांगड घालण्याचे ठरवले.

मॅक्सम्युलरच्या मते ऋग्वेदाचा अभ्यास आणि इतर वेदांचा अभ्यास त्या संदर्भात महत्त्वाचा आहे. त्यातल्या त्यात वेदांमध्ये प्राचीन असलेल्या ऋग्वेदामध्येसुद्धा काही भाग हा जुना असून नव्या भागामध्ये धार्मिक विचारात काही परिवर्तन झाल्याचे दिसते. जुन्या भागात द्यावापृथ्वी ही जोडदेवता, त्यानंतर पर्जन्य, वरुण, उषा, निर्ऋती, अश्विनीकुमार, देवाचे कारागीर असलेले ऋभू, सोम या प्रकारच्या अनेक देवतांचे पूजन केले जात असे. ऋग्वेदानंतरच्या भागामध्ये मात्र वैदिक ऋषींचे मन हळूहळू ‘एकेश्वरवादा’कडे झुकत असल्याचे दिसते. हा एकेश्वरवाद काही वेळा आपल्या इष्टदेवतेवरच ऋषींनी अध्यारोपित केलेला दिसतो. उदाहरणार्थ, विश्वामित्र कुळातील ऋषींना, ज्यांनी ऋग्वेदातील चौथे मंडल रचले, इंद्र या देवतेविषयी विशेष प्रेम होते. तर वसिष्ठ कुळातल्या (ऋग्वेदातील सातवे मंडल) ऋषींना वरुणाविषयी आपुलकीच नव्हे तर तीव्र भक्ती वाटते असे संशोधकांचे असे ठाम मत झाले आहे.

किंबहुना उत्तरकालीन भक्तिमार्गाचा संशोधक जेव्हा मागोवा घेतात, तेव्हा त्यांचा शोध वसिष्ठकुळातील ऋषिंना वरुणाविषयी वाटणारी आत्यंतिक भक्ती इथपर्यंत येऊन पोहोचतो आणि साहजिकच हे ऋषी इंद्र किंवा वरुण यांना सर्वश्रेष्ठ देवता म्हणतात. एखाद्या देवतेच्या मोठेपणाचे दुसरे एक निदर्शन म्हणजे त्यानेच सर्व जग उत्पन्न केले असे मानणे होय. उदाहरणार्थ, सूर्य या देवतेविषयी असे म्हटले आहे की तो आपल्या हाताप्रमाणे वाटणाऱ्या वर आणि खाली जाणाऱ्या किरणांच्या साहाय्याने जगातील मातृपितृस्वरूप असलेल्या पृथ्वीमाता आणि द्यौस् पिता या दोघांना एकमेकांपासून दूर करतो. वैदिक ऋषींची कल्पना अशी की, पूर्वीच्या काळी या दोन देवता एकमेकांना घट्ट बिलगून होत्या त्या जेव्हा एकमेकांपासून दूर झाल्या तेव्हाच पृथ्वीवर आणि मधल्या अवकाशात सृष्टीची रचना झाली. त्यामुळे जो शक्तिशाली देव या दोघांना एकमेकांपासून विलग करू शकतो, तोच खरा सृष्टीचा कर्ता होय. एकदा ही मूळ कल्पना मांडल्यानंतर सूक्तांची रचना करणाऱ्या प्रतिभावंत ऋषींनी रूपकात्मक रितीने आपली इष्टदेवताच हे कार्य खऱ्या अर्थाने पार पाडू शकते, हे आपल्या रचनांतून खुबीने मांडले. अशा रीतीने ज्या वेळी एखादी देवता विधीमध्ये महत्त्वाची असेल, त्या वेळी त्याच्या माहात्म्यानुसार तोच खरा सृष्टिकर्ता आहे, असे मांडण्याची पद्धत रूढ झाली. आजच्या परिभाषेत बोलायचे झाल्यास अध्यक्षाची खुर्ची एकच असली, तरी ज्याप्रमाणे कार्यकारी मंडळाचे सदस्य वेळोवेळी त्या खुर्चीत जरुरीनुसार बसले की त्या वेळेपुरते अध्यक्ष होतात, त्याप्रमाणे पाळीपाळीने प्रमुख देवतांना तो सृष्टीचा निर्माण कर्ता आहे, असे बिरुद देण्यात आले. मॅक्सम्युलरच्या मते हे पाळीपाळीने मोठेपण देण्याची मनाची ठेवण हीच पुढे 'एकेश्वरवादा'मध्ये परिणत झाली. त्यालाच तो पर्यायाने एकेश्वरवाद (हेनॉथीइझम-कॅथेनॉथीइझम) असे नाव देतो. अशा रितीने ब्राह्मणकाळात सर्व देवांचाच नव्हे तर असुरांचासुद्धा पिता म्हणून 'यज्ञ'स्वरूप असलेला प्रजापती हाच एकमेव सृष्टीकर्ता देव आहे आणि अशा रितीने ब्राह्मण ग्रंथांच्या काळापर्यंत ऋग्वेदापासून सुरू असलेला बहुदैवतवाद (पॉलीथीइथम) हा एकेश्वरवादात परिणत झाला, अशा मताप्रत मॅक्सम्युलर पोहोचला.

यापुढील किंवा ऋग्वेदातीलसुद्धा धार्मिक परंपरांचा आणि त्यात अभिप्रेत असलेल्या दैवतशास्त्राचा विकास कसा झाला? याबाबत तौलनिक भाषाशास्त्र आणि तौलनिक दैवतशास्त्र यांतील पुरावा फारसा भक्कम नाही, असे लक्षात आल्याने रामचंद्र नारायण दांडेकर व जर्मनीतील त्यांची गुरुपरंपरा एका वेगळ्याच पॅराडाइमचा (Paradigmचा) उपयोग करतात असे दिसते. उदाहरण द्यायचे झाल्यास त्यांनी केलेल्या इंद्र आणि वरुण यांच्या दैवी व्यक्तिमत्त्वाचे विश्लेषण लक्षात घ्यावे लागेल. त्यांच्या मते 'असु' म्हणजे वैश्विक प्राणशक्तीचा नियंता असुर वरुण हा सर्व देवतांचा राजा होता. सर्व वैश्विक नियमांवर त्याचा काबू असल्यामुळे विश्वातल्या सर्व निसर्गनियमांवर त्याचा अधिकार होता. विश्वाच्या अत्युच्च अशा ठिकाणावर आपल्या साहाय्यक देवतांच्या परिवारात बसून आपल्या हेरांमार्फत तो सर्व सुकृत-दुष्कृतांची नोंद ठेवत असे. अपराध्यांना शासन करत असे आणि सर्व जगाचे नियंत्रण करत असे. जगाचे पालन करणारे सर्व अदितीपुत्र हे त्याचे अनुज म्हणजे लहान भाऊ होते.

जेव्हा दक्षिण रशियाच्या मेरूजवळच्या आपल्या मूळस्थानापासून वैदिक आणि इराणी आर्य दक्षिणेकडे भारताच्या आणि इराणच्या दिशेने निघाले, त्या वेळी त्यांना विरोध करणाऱ्या निरनिराळ्या शक्तींचे – ज्यांचा वेदांत वृत्र म्हणून उल्लेख येतो, त्यांचे उपासक कडेकोट बंदिस्त अशा नगरात राहत. या आपल्या शत्रूंना परास्त करण्यासाठी वरुणासारखी न्यायप्रिय आणि शांतताप्रिय अशा प्रकारची देवता वैदिक आर्यांना स्फूर्ती देईनाशी झाली आणि म्हणूनच पराक्रमी शत्रूंचे कोटपरकोट उद्ध्वस्त करून वृत्राचा पराभव करून दस्यूंना आपल्या वज्राच्या साहाय्याने काबूत आणण्याची शक्ती आहे, अशा प्रकारच्या वृत्रहन इंद्र देवतेची त्यांना अधिक निकड भासली. ऋग्वेदातील सूक्ते ही शांतताप्रिय असुर वरुण आणि आक्रमक इंद्र यांच्यातील स्पर्धा, इंद्राचे वर्चस्व आणि त्यानंतर इंद्र आणि वरुण यांच्यामधला विरोध दूर करून यांच्यात सामंजस्य आणण्याचे त्यांच्या उपासकांचे प्रयत्न अशी दैवत-शास्त्रीय कथा

आपल्याला ऋग्वेदातून आढळते, असे मत दांडेकरांनी मोठ्या आवेशाने मांडले आहे. त्यालाच दैवतांचा ऐतिहासिक विकास समजावून घेणारे दैवतशास्त्र असे दांडेकर म्हणतात. दांडेकरांच्या पाठोपाठ प्रसिद्ध वैदिक दैवतशास्त्रज्ञ सदाशिव अंबादास डांगे यांनी आपल्या दीर्घ संशोधनानंतर वैदिक धर्माच्या आचारविधींमधील सुफलत्व आणि सुजनन यांचा गाभा असलेले धार्मिक आचार हे ऋग्वेद, यजुर्वेद आणि अथर्ववेद यांतील मंत्रांतून ब्राह्मण ग्रंथातील विवेचनातून व श्रौत गृह्य आणि स्मार्त विधींतून कसे ओतप्रोत भरलेले आहेत हे मुख्यत्वे दाखवून दिले.

वैदिक परंपरेतील धार्मिक विचार कसे विकसित झाले, या विषयीची तर्कसुसंगत अशी उकल 'अर्न्स्ट कासिरेर' या जर्मन तत्त्वज्ञाने केली आहे. त्यांच्या मते 'देव दानवा नरे निर्मिले' ही कल्पना खरीच आहे. मानवी समूहाच्या विकासाचा भाग म्हणून कालानुरूप गरजेप्रमाणे समाजात देवांची निर्मिती होते. समाज ज्याप्रमाणे तांत्रिक, बौद्धिक आणि कलात्मक असा स्वत:चा विकास घडवून आणतो, त्याप्रमाणे दैवतांचे स्वरूपही बदलते किंवा अगदी नव्या देवदेवतांची निर्मितीही होते. समाजाच्या धारणेसाठीच देव निर्माण होतात. त्यांच्या समर्थनासाठी आख्याने आणि पुराणे रचली जातात. एका तत्त्वचिंतकाने (सुसान लँगर यांनी) म्हटल्याप्रमाणे आपल्या दैवतांची आख्याने आणि कथा या मानवास ईप्सित असलेल्या अमृतत्त्वाच्या (इमॉर्टलीटीच्या) कथा आहेत. तर धार्मिक विधी (रिच्युअल्स) हे त्यांचे नाट्य रूपांतर आहे.

कासिरेर यांच्या मते काही देव तर क्षणिकच (मोमेन्टरी) असतात. ते उपासकाला क्षणापुरते तारण्यासाठी, त्याच्यावर कृपा करण्यासाठी अचानक अवतीर्ण होतात आणि त्यानंतर गरज न भासल्यास काळाच्या विस्मृतीत लोटले जातात. म्हणजे मोठ्या संकटात सापडलेल्या एखाद्या माणसाची त्यातून अचानक सुटका होते. उदाहरणार्थ, जंगलात नि:शस्त्र अशा आदिवासीला समोरून वाघ येताना अचानक दिसतो, तो आपल्यावर झडप घालणार आणि आपला फडशा पाडणार असे वाटत असतानाच आणि पूर्ण घाबरगुंडी उडाल्यामुळे एखाद्या झाडाआड किंवा धोंड्याच्या पाठीमागे लपण्याचा प्रयत्न करणाऱ्या त्या माणसाकडे लक्ष न देता वाघ निघून जातो. मात्र आदिवासीची श्रद्धा अशीच असते की त्या वृक्षामध्ये किंवा मोठ्या धोंड्यामध्ये असलेल्या 'यातु' शक्तीच्या प्रभावामुळे आपण बचावलो आणि म्हणूनच तो त्याची देव म्हणून पूजा करतो. नंतरच्या काळात तो माणूस कदाचित हे सगळे विसरूनही जातो. त्याला साक्षात्कार झालेल्या देवाचे वर्णन क्षणिक देव (मोमेन्टरी गॉड) म्हणून करता येईल.

'यातु' शक्ती ही आदिवासी मानवाच्या मते सर्व स्थावर–जंगमात ओतप्रोत भरलेली असल्याने तो जे काही काम करतो, त्यावर या निरनिराळ्या यातुशक्तीचे नियंत्रण असते. नांगरण करणाऱ्या शेतकऱ्याला फाळाने पडलेला चर हा पृथ्वीदेवतेचे एक मंगल असे रूप वाटते. अशा पडलेल्या चराला आणि नांगरट झालेल्या शेताला संस्कृतमध्ये 'सीता' असे म्हणतात. ही जमीन शेतकऱ्याला बी पेरल्यानंतर अमाप पीक देते. वैदिक विधीमध्ये त्याचीही पूजा अंतर्भूत आहे. रथाला घोडे जोडताना, त्यातून पहिला प्रवास करताना, प्रवासाला जाताना, अभ्यासाची सुरुवात करताना आणि आयुष्याच्या निरनिराळ्या महत्त्वाच्या प्रसंगी, अनेक प्रकारचे विधी व त्या-त्या कार्यासंबंधीच्या देवतांच्या, त्यांच्या पूजनाचे सविस्तर वर्णन येते. हीच गोष्ट आपल्याला अनेक म्हणजे सोळा ऋत्विजापर्यंत साहाय्य असलेल्या, समारंभपूर्वक केल्या जाणाऱ्या अश्वमेध, सोमयाग इत्यादी यज्ञांत येते. गृह्य सूत्रांमध्ये सांगितलेल्या सोळा संस्कारांत आणि रथारोहणादी प्रसंगोपात विधींमध्ये अनेक देवता, त्यांच्याविषयीचे मंत्र आणि त्यांपासून मिळणारे चांगले फळ यांचे वर्णन आढळून येते. घरातील होमामध्ये आणि अश्वमेध, सोमयाग यांसारख्या मोठ्या यज्ञांमध्ये आढळणारे बरेचसे लहान-मोठे देव हे दुसऱ्या प्रकारात – म्हणजे कार्यनिर्वाहक (फंक्शनल गॉड) या वर्गात मोडतात. या सर्व क्षणिक किंवा प्रासंगिक व कार्यवाहक देवांपलीकडे या सर्वांचे नियंत्रण करणारा असा एक लोकेश्वर असलेला देव असतो. त्याचा उल्लेख 'प्रजापती' आणि त्याच्या पत्नीचा उल्लेख 'अदिती' म्हणून येतो. ब्राह्मण ग्रंथांच्या मते हा

प्रजापती म्हणजे दुसरेतिसरे काही नसून वैश्विक ऋत आणि सत्य यांचे नियमन करणारा यज्ञपुरुष होय.

कासिरेर यांच्या मते वैदिक धार्मिक परंपरांचा आणि विचारांचा विकास हा एकेश्वरवादाच्या पलीकडे गेला. यज्ञपुरुषरूप प्रजापतीच्या पलीकडेही सर्व विश्वाचे सर्जन आणि उपसंहार यांचा नियामक, ज्याचे वर्णन करता येणे अशक्य आहे, वेदशास्त्रांचे अध्ययन करून त्याचे स्वरूप आकलन करता येत नाही. यज्ञयाग करूनही ज्याच्यापर्यंत पोहोचता येत नाही, जो बुद्धीच्या आणि तर्काच्या पलीकडे आहे, त्याला पुरुष किंवा स्त्री अशा प्रकारचे लिंग नाही, असे ते आद्यतत्त्व म्हणजे ब्रह्म होय. सर्व संसाराचा त्याग केलेले ऋषिमुनी तपांची व्यर्थता पटून आध्यात्मिकरित्या योगाच्या साहाय्याने याचा साक्षात्कार पावतात, असे ते तत्त्व आहे. वेगळ्या शब्दांत युरोपीय आणि पश्चिम आशियाई धर्मपरंपरांना अभिप्रेत असलेल्या एकेश्वरवादाच्या पलीकडे एकतत्त्ववादाची घोषणा उपनिषदांतून केलेली आढळते.

एका अर्थाने चारही वेद आणि त्यांतील मंत्रांचा आणि विधींचा सूक्ष्म विचार करणारे आणि यज्ञधर्माचा पुरस्कार करणारे ब्राह्मण ग्रंथ व ऐहिक समृद्धिमय जीवनाचा त्याग करून रानावनांतून आश्रमात राहणाऱ्या ऋषींनी, तपश्चर्या करणाऱ्या मुनींनी आवश्यकता पडल्यास सगळ्याच गोष्टींचा त्याग करून संन्यासव्रत धारण करणाऱ्या परिव्राजकांनी (एके ठिकाणी तीन किंवा पाच रात्रीपेक्षा जास्त राहायचे नाही असा निश्चय करून सतत भटके जीवन स्वीकारणाऱ्या) योग्यांनी पुरस्कारलेला यतिधर्म यांच्यामधला अंतर्विरोध उपनिषनकाळामध्ये स्पष्ट झालेला दिसतो.

ज्यांना समाजजीवनात आणि राजकारणात चातुर्वर्ण्यरूपाने असलेली विषमता बोचत होती आणि ज्यांचा श्रौतयज्ञातील कर्मकांडावर विश्वास नव्हता, अशा ज्ञानाचा पाठपुरावा करणाऱ्या परिव्राजक संतांनी वैदिक विधींचा पूर्ण निषेध करून स्वत:ची अशी आध्यात्मिक परंपरा निर्माण केली. अशा कमीत कमी सहा पंथांचा बौद्ध आणि जैन वाङ्मयात उल्लेख येतो. इतिहासाच्या प्रवाहात काही काळपर्यंत (इ.स. १०००पर्यंत) आजीविक इत्यादी पंथ लुप्त झाले. बौद्ध आणि जैन संप्रदाय मात्र नास्तिक दर्शने म्हणून अजूनही नांदत आहेत. त्यांनी परिव्राजनाच्या भ्रमण धर्माचाच पुरस्कार आणि प्रचार केला. संसाराच्या फेऱ्यातून मोक्ष आणि त्रिविध दु:खांचा अंत यांसाठी त्यांनी आधीच्या काळात संन्यासधर्मावरच भर दिला व तो तसाच अजून कायम आहे. पण नंतर आवश्यकता भासल्याने सर्वांनाच एकदम संन्यास धर्म स्वीकारणे शक्य नसल्याने नाइलाजाने गृहस्थ धर्मात राहून हळूहळू संन्यास घेण्याची तयारी कशी करायची यासाठी उपासनाधर्म सांगितला.

डॉ. दांडेकरांना अभिप्रेत असलेला वैदिक धर्मातला अंतर्विरोध शमवून सामान्य गृहस्थाने किंवा अगदी ब्रह्मचाऱ्याने संन्यास धर्मापर्यंत कसे पोहोचावे, यासाठी चतुराश्रम पद्धती आणि चार पुरुषार्थ हे चातुर्वर्ण्याश्रित समाजाने कसे पाळावेत, याचा विचार कल्पसूत्रामध्ये आणि इतर सूत्रवाङ्मयांत केलेला असून त्यातूनच पुढे धर्मशास्त्रप्रणीत स्मार्त धर्माची बांधणी झाली, असे दांडेकरांनी प्रतिपादित केले आहे. याच विचारसरणीचा व समन्वयाचा भाग म्हणून सहा दर्शने आणि सहा सूत्रकार वैदिक परंपरेत मान्यता पावले. ही सहा दर्शने किंवा शास्त्रे म्हणजे सांख्य व योग, न्याय व वैशेषिक आणि पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा म्हणजे वेदान्त ही होत. यानंतरच्या काळात म्हणजे इ.स. पूर्व तिसऱ्या शतकाच्या काळात, या दर्शनपरंपरेतील निरनिराळ्या सूत्रांवर टीका आणि भाष्य एवढ्यापुरताच हा धर्मविचार मर्यादित राहिला. उपनिषद उत्तर आणि महाभारतरचनेच्या काळात एक वेगळीच परंपरा आगमांच्या रूपाने हिंदूधर्मामध्ये उदयाला आली. या काळात आणखी एक महत्त्वाची गोष्ट घडली ती उपासनेच्या फरकाच्या रूपाने. इ.स.पूर्वीच्या पाचव्या शतकातच किंवा त्यापूर्वीही मूर्तिपूजा प्रचारात होती हे स्पष्ट दिसते. भगवान विष्णू, भगवान रुद्र यांना महाभारत आणि पुराण या ग्रंथांतून नवीन आख्यानांच्या माध्यमांतून माहात्म्य प्राप्त झालेले दिसते. या देवतांच्या अमूर्त स्वरूपाबरोबरच मूर्त स्वरूपामध्येही त्यांची पूजा करण्याचे उल्लेख आढळतात. ऋषिमुनींनी वैदिक परंपरेचा पूर्णपणे त्याग न करता, विष्णू अथवा शिव हे इतके मोठे देव आहेत की ते ब्रह्मस्वरूपच

आहेत असे मानावयास हरकत नाही, असे नव्याने प्रतिपादन केले. महाभारतातील अनेक कथा या दोन देवांच्या माहात्म्याची म्हणजेच त्यांच्या अनुयायांमध्ये असलेल्या स्पर्धेची निदर्शक आणि वेगळ्या उपासनापद्धतीची म्हणजे मूर्तिपूजेचा पुरस्कार करणारी मते आणि कथा महाभारतात हिरिरीने मांडलेले दिसतात. महाभारताच्या मोक्षधर्मपर्वातील अध्यायामध्ये नर आणि नारायण या ऋषींची जोडी, वसिष्ठपुत्र शुक, उपरिचर वसू यांच्या नारायण-वासुदेव या नव्या दैवताचे माहात्म्य वर्णन करणाऱ्या कथा अशा आख्यानातून आल्या आहेत. रुद्राच्या संदर्भात अशाच प्रकारची नवीन परिस्थिती उत्पन्न झाल्याचे मुंड आणि मांडुक्य-उपनिषदातील तत्त्वज्ञान आणि त्याच्या अनुषंगाने सांगितलेल्या कथांतून आढळते, असे डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांनी दाखवून दिले आहे. परतत्त्व जे ब्रह्म ते विष्णुस्वरूप अथवा शिवस्वरूप असून ध्यानयोगाबरोबरच भक्तीच्या साहाय्याने त्याला प्रसन्न करून घेतले पाहिजे, असेही ही दोन महत्त्वाची आणि इतर काही उपनिषदे मांडतात. डॉ. भांडारकर यांना या उपनिषदांना सैश्वर उपनिषदे (थिइस्टक उपनिषद) असे वेगळे नाव देतात.

या नव्या विचारपद्धतीनुसार उपनिषदातील तत्त्वज्ञानाला थोडी मुरड घालून त्याची नव्या पद्धतीने मांडणी करण्यात आली. उपनिषदांतील पारंपरिक विचारानुसार शब्दवर्णनाच्या पलीकडे असलेले ब्रह्म 'एकाकी न रमते' म्हणजे एकटे असताना कुणालाही करमत नाही, या म्हणीनुसार 'मी आता अनेक स्वरूपात प्रकट होईन' (एकोऽहं बहुस्यां प्रजायेय इति) असे म्हणून विश्वाचे सर्जन करते झाले. सामान्यत: इतर दर्शने सांख्यमतानुसार ही त्रिगुणात्मक सृष्टी उत्पन्न कशी झाली, हे सांगतात किंवा आपल्या स्वतंत्र बैठकीनुसार विश्वोत्पत्तीचे वर्णन करतात. त्यामध्ये परब्रह्म म्हणजे आदिपुरुष किंवा महापुरुष असे कल्पून त्याच मायेने ते ब्रह्म शबल झाले म्हणजे विश्वोत्पत्ती होते, असे वेदान्ती मानतात, उदाहरणार्थ, आगमांपैकी वैष्णव आगम असे मानतात की सहस्र सूर्यांची प्रभा असलेला तो परवासुदेव कुणालाही दिसत नाही - क्षोरोदधीमध्ये असलेल्या श्वेतद्वीपावर त्याचा निवास असतो. तिथे वास करणारे आणि चंद्रासारखी प्रभा असलेले परंतु तपामुळे ज्यांची शरीरे अस्थिरूपच झालेली आहेत, अशा सिद्धांनासुद्धा तो दिसत नाही. नर आणि नारायण ऋषी, नारद आणि वसिष्ठपुत्र शुक या परमयोग्यांनाच त्याचा साक्षात्कार झाला. तो व्यूहरूपाने प्रकट होतो. त्याचे व्यूह संकर्षण (जीव), अनिरुद्ध (महत्), प्रद्युम्न (मनस) या रूपांनी प्रकट होतात. तो अहिंसामय यज्ञाचा पुरस्कर्ता असून दैव आणि पैतृक यज्ञात दिलेले हवी त्यालाच पोहोचतात. प्रवृत्तीपर उपासक आणि निवृत्तिधर्म त्यालाच परमदैवत समजून त्याची उपासना करतात. निरनिराळ्या मन्वंतरांत ब्रह्माने सृष्टी उत्पन्न केल्यानंतर त्याच्या एकान्तिक/सात्वतधर्माची प्रतिष्ठापना होते. पृथ्वीवर असुरशक्तींचा प्रभाव झाल्यानंतर तिचा भार नष्ट करण्यासाठी देवांच्या विनंतीवरून तो निरनिराळे अवतार (विभव) घेतो. असे अनेक विभव आपणास माहीत आहेत. परंतु त्यांतल्या त्यात प्रसिद्ध असे मत्स्यापासून कल्कीपर्यंत दहा अवतार आहेत. शैव आगमामध्येसुद्धा परशिव हा परब्रह्मस्वरूप आदितत्त्व समजून तो १) सद्योजात २) वामदेव ३) तत्पुरुष आणि ४) अघोर या चार रूपाने प्रकट होतो.

परब्रह्मस्वरूप असलेला परशिव हा पाच अलौकिक शक्तींनी युक्त असतो. १) इच्छाशक्ती, २) ज्ञान, ३) क्रिया, ४) आवरण, आणि ५) प्रसादशक्ती होत. परशिव हा ज्ञानस्वरूप व सर्वज्ञ असून तो स्वत:च्या इच्छाशक्तीने विश्वसर्जनासारखे कार्य स्वत:च्या बळावर करतो. मूलत: तो निर्गुण निर्विकार असल्यामुळे मनुष्यादिजीवगणांना त्याचे सहजज्ञान होत नाही, ते त्याच्या आवरणशक्तीमुळे, परंतु शैवआगमात सांगितलेल्या उपासना पद्धतीचा अवलंब केल्यास त्याच्या कृपादृष्टीने उपासकाला त्याचा साक्षात्कार होतो, आणि तो परशिवापर्यंत जाऊन पोहोचतो.

अशा रीतीने आगमांच्या तत्त्वज्ञानानुसार शिव किंवा विष्णू या देवता वेदान्त, महाभारत, रामायण या वेदोत्तर

महाकाव्यात, किंवा व्यासप्रणीत अठरा पुराणांत सामान्यतः आख्यानकथांतून ज्यांच्या विवाहादी प्रसंगांचे अथवा असुरदैत्यांच्या निर्दालनांचे जे वर्णन आढळते, त्या देवता नसून वर वर्णिल्याप्रमाणे आगमांच्या मते त्या परब्रह्मस्वरूपच असतात. आगम विचारसरणीचे दुसरे वैशिष्ट्य असे की, शिव किंवा विष्णू यांना परमोच्च स्थान दिल्यानंतर इंद्रादी इतर देवतांचे अस्तित्व नाकारत नाही. परंतु त्यांना गौण स्थान देतो. पुराणांच्या विकासकाळात ही आगमपरंपरा विष्णू किंवा शिव एवढ्यापुरतीच मर्यादित न राहता त्यात सौर, शाक्त, गाणपत्य आणि कुमार यांच्या संप्रदायांतसुद्धा तिला प्रतिष्ठा प्राप्त झाल्यासारखे दिसते. आणि त्यामुळे शाक्त, गाणपत्य, सौर आणि स्कंदकार्तिकेयासंबंधीचे आगमग्रंथ निर्माण झालेले दिसतात. या आगमग्रंथांचे मूळ मात्र जसे शैव आणि वैष्णव यांच्या बाबतीत थेट वेदांपर्यंत जाऊन भिडलेले दिसते, तसे आपाततः वेदापर्यंत दिसत नाही. त्यांची मुळे निरनिराळ्या पुराणांतच आहेत. जसे शक्तीच्या बाबतीत देवीचे काही मंत्र (उदाहरणार्थ, ऋग्वेदातील रात्रीसूक्त) जरी ऋग्वेदापर्यंत पोहोचत असले तरी शाक्त संप्रदायाचा आगमग्रंथ म्हणून मार्कंडेयपुराणातील देवीसप्तशती हा भाग समजला जातो. या सप्तशतीमध्ये आद्याशक्ती - जिला कुमारी भद्रा, काली, चंडिका इत्यादी अनेक नावे आहेत - ती सत्त्वगुणात्मिका महालक्ष्मी होय. महाकाली आणि महासरस्वती - ज्या तमो-रजो गुणात्मिका आहेत - या तिच्या इच्छेने, तिच्यापासून उत्पन्न होतात. या तीनही देवता स्वत:पासून तीन रंगांची (सुवर्ण, श्वेत, कृष्ण) तीन युगुले निर्माण करतात. ती अशी: शिव व सरस्वती, ब्रह्मा व लक्ष्मी, आणि विष्णू व पार्वती (काली) या तीन जुळ्यांतून तीन जोडपी तयार होतात. ती अशी : १) ब्रह्मा आणि सरस्वती, २) विष्णू आणि श्रीलक्ष्मी, ३) रुद्र आणि काली पार्वती तीनही लोकांच्या पालक असलेल्या या देवता विश्वाची सृष्टी, त्याचे पालनपरिपोषण आणि संहार याला कारणीभूत होऊन विश्वाचे नियंत्रण करतात. यांच्याही पलीकडे असलेल्या महाकाली आणि महासरस्वती व त्या दोघींच्या पलीकडे असलेली महालक्ष्मी ही परतत्त्व असलेल्या ब्रह्माप्रमाणे असते. तरीही ती भुक्ति-मुक्ति-प्रदायिनी असल्यामुळे, इहलोकात ऐश्वर्य आणि ज्ञानमार्ग यांच्या रूपाने मोक्षाला कारणीभूत होते. तिच्या नित्य उपासनेमध्ये शरत काळात नदीच्या तीरावर पुरातून आलेल्या मातीने मूर्ती तयार करून मद्यमांसाचा नैवेद्य अर्पण करावा, म्हणजे ती ईप्सित फळ देते. ही जगन्माता इतकी प्रभावी आहे की योगी आणि मुनींनाच संतुष्ट होऊन मोक्ष देत नाही, तर तिच्या हातून मरण पावलेल्या दैत्य-असुरांनासुद्धा सद्‌गती देते.

दक्षिणेमध्ये सुमारे सातव्या शतकापासून आगमांच्या संहिता रचलेल्या आढळतात. पूर्वी पाहिल्याप्रमाणे आगमांची परंपरा यापेक्षा कितीतरी प्राचीन आहे. ती निश्चितपणे महाभारत रचनेच्या काळाइतपत, म्हणजे इ.स.पूर्व सहाव्या शतकाइतकी प्राचीन आहे. वाकाटकांच्या ताम्रपत्रांत सात्वत संहितेनुसार आचरण करणाऱ्या मुनींच्या/आचार्यांच्या मठिका इ.स.च्या पाचव्या शतकात प्राचीन महाराष्ट्रात निश्चित होत्या. काश्मीरमध्येही वैष्णव आगम प्रतिपादन करणारे पांचरात्र उपासक निश्चितच होते. हे सहाव्या-सातव्या शतकातील शिल्पांवरून स्पष्ट दिसते. परंतु त्यांच्यासमोर असलेल्या उत्तरेतील आगमसंहिता आज उपलब्ध नाहीत; आणि त्यामुळे उत्तरेतील वैष्णव आगम संहितेचा अभ्यास करताना सातव्या शतकानंतर दक्षिणेत उपलब्ध झालेल्या संहितांच्या आधारेच त्याची उकल करावी लागते. ही उकल मात्र पूर्णपणे समाधानकारक रितीने होत नाही. तरी त्यांतला काही अंश उकल करण्यासाठी निश्चितच उपयोगी पडतो. याचा अर्थ भारतीय वैष्णव आगम परंपरा ही जरी एकच असली तरी, त्यात प्रादेशिक भेद निश्चितच होते. विंध्यापलीकडल्या कलेच्या आविष्काराचा अभ्यास केल्यानंतर हे जास्तच जाणवते.

दक्षिणेतील संहितांनुसार आगम धर्माचे विवरण चार मथळ्यांमध्ये केल्याचे आढळते. या विभागांना संहितेचे पाद असे म्हणण्याचा प्रघात आहे. त्यांतील पहिल्या पादात ज्ञानविषयक म्हणजे तत्त्वज्ञानविषयक मीमांसा, दुसऱ्या पादांत योगविषयक म्हणजे परतत्त्वाशी साधकाने/उपासकाने संवाद कसा साधायचा – ज्यात पातंजल योगसदृश अशा

अनुष्ठानांचासुद्धा अंतर्भाव असतो- याचे विवेचन आढळते. तिसऱ्या क्रियापादात भगवंताची मूर्ती अथवा चिन्हरूप प्रतिमा याची ज्यात प्रतिष्ठापना होते असे देवालय आणि तत्संबंधी विशेष पूजेसाठी लागणारे मंडप इत्यादींचे बांधकाम कसे करायचे, यासाठी वापरात येणारे विधी व मंत्र यांविषयीचे विवेचन आढळते, तर चौथ्या चर्या पादात नित्य व नैमित्तिक अशा आचारधर्माचा खुलासा केलेला आहे. आगम संहितेच्या रचनेचा भाग असलेले हे चार पाद फक्त वैष्णव संहितांच्या बाबतीत मर्यादित नसून ते इतर आगमांमध्येही त्याच नावांनी व स्वरूपात आढळतात. या संदर्भात हेही नमूद केले पाहिजे की, बौद्ध धर्मातील धार्मिक परंपरांचा आणि विचारांचा विकासक्रम हा वैदिक-हिंदू परंपरेप्रमाणेच असल्याने पाचव्या-सहाव्या शतकात रचल्या गेलेल्या बौद्ध आगमांची किंवा तंत्रग्रंथांची रचनासुद्धा हिंदू आगमांप्रमाणेच आहे आणि त्यातही वर उल्लेखलेले चार पाद (विभाग) थोड्याफार फरकाने त्याच नावाने आहेत.

जरी आगम आणि तंत्र हे बऱ्याच वेळा पर्यायी शब्द म्हणून वापरले जात असले आणि आगमात व तंत्रात वर्णन केलेले धार्मिक आचार एकाच प्रकारच्या तत्त्वज्ञानाच्या पार्श्वभूमीतून निर्माण झालेले असले, तरीही तंत्र म्हटल्यानंतर काही वेगळ्या गोष्टी मन:च क्षूसमोर स्पष्टपणाने उभ्या राहतात. एक तर, तंत्र म्हटल्यानंतर त्यामध्ये यंत्रोपासनेचा भाग अनिवार्यच असतो. सर्व आगममध्ये – मग ते बौद्ध असोत वा हिंदू – मूर्तिपूजा हा अनिवार्य भाग आहे. तंत्रामध्ये मूर्तिपूजेव्यतिरिक्त यंत्राचीसुद्धा उपासना असते. मूर्तिपूजेमध्ये मनुष्याकृतीचे अनुकरण करणाऱ्या देवता-शरीराचा विचार केला असेल, तर यंत्रामध्ये त्या आगमामध्ये वा तंत्रामध्ये अभिप्रेत असलेली विश्वाची सृष्टी, स्थिती आणि उपसंहार या कल्पना भूमितीतील त्रिकोण, चौकोन आणि वर्तुळे या माध्यमांतून चित्रित केलेल्या असतात. या भौमितिक आकृत्यांच्या समुदायाला एखाद्या कमळाचे स्वरूप देऊन त्यातील बाहेरच्या पाकळीपासून कोषापर्यंतच्या भागांची भौमितिक रितीने कल्पना करून त्या-त्या ठिकाणी कोणत्या देवता वास करतात हे सांगून यंत्राचे रेखाटन केलेले असते. ही प्रतीकात्मक पूजेची आत्यंतिक अमूर्त अशी अवस्था म्हणून सांगता येईल. बौद्ध आणि हिंदू धर्मांतील उदाहरण द्यावयाचे झाल्यास विष्णूची शाळिग्रामरूपाने, शंकराची लिंगरूपाने आणि शक्तीची धातूच्या खड्याच्या रूपात, बुद्धाची धम्मचक्र, अश्वत्थ वृक्ष, पादुका, सिंहासन किंवा स्तूप यांच्या रूपांत पूजा ही प्राथमिक अवस्था होय. हिला प्रतीक (aniconic) रूप पूजा असे म्हणता येईल. पूर्वीही आणि आजही आदिवासी आणि आदिम मानव बऱ्याच वेळा या स्वरूपात ईश्वराची पूजा करीत असे आणि हिंदू धर्मात अजूनही वेगळ्या स्वरूपात ती प्रचलित आहे. उदाहरणार्थ, पंचायतन पूजेत त्या-त्या देवतेचे प्रतीक म्हणून उपयोगात आणलेल्या वस्तू अथवा व्यावहारिक पूजेत सुपारी किंवा तांदूळ अथवा तत्सदृश धान्यांचे ढीग. यापुढली अवस्था ही मूर्तिपूजा. ही जवळजवळ एकाच वेळी हिंदू-बौद्ध आणि जैन समाजांत थोड्याफार कालांतराने प्रचारात आली आणि लोकप्रिय झाली. इ.स.च्या पहिल्या-दुसऱ्या शतकापर्यंत या धार्मिक परंपरांतील महत्त्वाच्या देवतांच्या मूर्ती कशा असाव्यात आणि कराव्यात यांसंबंधीचे संकेत आकार घेऊ लागले आणि चौथ्या-पाचव्या शतकात ते पक्के झाले. तिसरी अवस्था तंत्रामधील यंत्रे निर्माण करून त्या तंत्रमार्गात अपेक्षित तत्त्वज्ञान भौमितिक स्वरूपात चित्रित करणे ही होय.

तंत्रामधील अगदी स्पष्टपणाने दिसणाऱ्या या फरकाबरोबरच दुसरी संकल्पना म्हणजे देवता आणि त्यांचे मंत्रस्वरूप याला दिलेले महत्त्व. विधिपूर्वक प्रतिष्ठापना केल्यानंतर त्या मूर्तीमध्ये त्या देवतेचा वास असतो अशी उपासक-साधकाची श्रद्धा असते; त्याचप्रमाणे त्या देवतेसंबंधीचे जे मंत्र असतात तेसुद्धा त्यांचे शरीरच आहे अशी दृढ कल्पना तंत्रामध्ये आढळून येते आणि म्हणून अनेक तंत्रांमध्ये या देवतास्वरूप असलेल्या मंत्रांचे उच्चारण, त्याची अलौकिक शक्ती, या मंत्रांचा जप व त्यावर आधारित अनुष्ठान यांना बरेच महत्त्व दिलेले आढळते. तंत्रमार्गातील तिसरी संकल्पना म्हणजे या सर्व उपासनेमध्ये महत्त्वाची भूमिका बजावणाऱ्या उपासक/साधकाचा गुरू. यंत्र किंवा मंत्र व त्यांतील आशय गूढ असल्यामुळे तो जाणण्यासाठी साधकाला विशिष्ट प्रकारच्या शिस्तीची आणि प्रशिक्षणाची आवश्यकता

असते आणि त्यामुळेच सर्वप्रथम त्याची योग्यता पाहून गुरू त्याला दीक्षा देतो. पुढे त्या मार्गातील तत्त्वज्ञान, योग, क्रिया आणि चर्या यांचे ज्ञान देतो आणि हे सर्व गहन व गूढ असल्यामुळे तंत्रमार्गामध्ये गुरूची भूमिका नुसती अनिवार्यच नाही, तर यंत्र आणि मंत्र यांप्रमाणेच आचार्य किंवा सिद्धावस्थेला पोहोचलेला गुरू हा देवतेइतकाच महत्त्वाचा असतो; किंबहुना हे देवतेचे तिसरे रूप आहे, असे म्हणावयास हरकत नाही.

हिंदू आणि बौद्ध तंत्रांमध्ये अनेक आदिम धर्मकल्पनांचा शिरकाव व प्रभाव झाल्यामुळे बौद्ध तंत्रात मंत्राबरोबरच अग्निउपासना व तत्संबंधीच्या यातुकर्मातील अथर्ववेदामध्ये अभिप्रेत असलेल्या श्रद्धा आणि आचार यांचाही शिरकाव झालेला दिसतो. पातंजल आणि विपस्सना यांच्याशी संबंधित असलेल्या ऋद्धि-सिद्धीच्या कल्पना, निरनिराळ्या प्रकारच्या जारण-मारण-उच्चाटनादी क्रिया व अचाट मंत्रशक्ती आणि सिद्धी यांचा प्रभाव उत्पन्न झाल्याने तसेच यातुविद्येचा एक भाग असलेल्या स्मशानाशी संबंध असलेल्या व मांसविक्रयाशी संबंध असलेल्या कल्पनांमधून पुढे तंत्रातील वामाचार हा भाग विकसित झाला. तंत्रातील आचाराबरोबरच त्याची तात्त्विक भूमिका या पैलूंवर गोपिनाथ कविराज प्रभृती भारतीय विद्वानांनी आणि आर्थर ॲव्हेलॉनसारख्या पाश्चात्त्य विद्वानांनी मोठाच प्रकाश टाकला. बौद्धधर्म हा सामान्य व्यवहारात उत्तरेतील (Northern) आणि दक्षिणेकडील (Southern) अशा रूपाने पाश्चात्त्य विद्वानांच्या लिखाणात उल्लेखिला गेला. त्यातील दक्षिणेकडील बौद्ध धर्म म्हणजे पाली त्रिपिटकांवर आधारित व नंतरच्या काळात श्रीलंका हे केंद्र धरून पसरलेला थेरवादी संप्रदाय होय, तर संस्कृत आगमांवर आधारलेला, वैकुल्यसूत्रे प्रमाण मानणारा मूलत: महायानाचा गाभा असलेला व उत्तर भारत आणि अफगाणिस्तानातून मध्य आशिया, कोरिया, जपान आणि व्हिएतनाममार्गे उत्तरेत आणि अतिपूर्वेत पसरलेला बौद्ध धर्म होय.

सहाव्या-सातव्या शतकानंतर दक्षिणापथात नागपट्टीनम्‌सारखे अपवाद वगळता बौद्ध धर्म हा लुप्तप्राय झाल्याने पुढील काळात श्रीलंका हे थेरवादाचे प्रमुख आश्रयस्थान झाले. तेथून सयाम, आत्ताचे मलेशिया, थायलंड, कंबोडिया, लाओप येथे थेरवादी धर्म पसरला. त्यालाच दक्षिणेकडील बौद्ध धर्म म्हणतात. बौद्ध धर्म आणि त्याच्या परंपरांची अठराव्या एकोणिसाव्या शतकात युरोपात जाण उत्पन्न झाल्यानंतर पाली-त्रिपिटकांचा अभ्यास होऊन त्रिपिटके आणि आगमेतर पाली वाङ्मयाच्या संशोधित आवृत्त्या प्रकाशित करण्यावर भर देण्यात आला. उत्तरेतील बौद्ध धर्माच्या वाङ्मयाचा पसारा मात्र फारच मोठा झाला. मुळात संस्कृत असलेले हे आगम वाङ्मय आणि त्यावरील टीका यांचा चौथ्या-पाचव्या शतकापासून चिनी अनुवाद झाला. कोरियामार्गे जपानमध्ये गेल्यानंतर हा चिनी ठेवा जपानी भाषेत संग्रहित करण्यात आला. दहाव्या-अकराव्या शतकात उत्तरभारतावर नव्याने इस्लाम धर्म स्वीकारलेल्या तुर्कांच्या टोळधाडीचे आक्रमण झाले, तेव्हा बरेचसे बौद्धधर्मी भिक्षू आणि उपासक मोठ्या संख्येने हिमालयाच्या पायथ्याशी आणि उतारावर असलेल्या लडाख, काश्मीर, सिक्कीम या भागांत आश्रयास गेले. त्या अगोदर सहाव्या-सातव्या शतकात नेपाळातून तिबेटमध्ये बौद्ध धर्माचा प्रवेश राजघराण्यामार्फत झाला आणि बौद्ध ग्रंथ मोठ्या प्रमाणावर तिबेटी भाषेमध्ये भाषांतरित झाले. युरोपातील व अमेरिकेतील निरनिराळ्या विद्यापीठांनी चिनी, जपानी आणि तिबेटी वाङ्मयाचा मोठ्या प्रमाणावर अभ्यास करण्यास सुरुवात केली. या अभ्यासातून त्या-त्या भाषेतील बौद्धवाङ्मयाचा चिकित्सक अभ्यास होण्याबरोबरच मूळ संस्कृतातील महायान आगम वाङ्मयाची चिकित्सक आवृत्ती काढण्याचे कामही मोठ्या जोमाने झाले. या प्रकारच्या संशोधनामुळे दक्षिणेत वा उत्तरेकडील ज्या प्रदेशात बौद्ध धर्म पसरला, तेथील प्रादेशिक बौद्ध धर्माची वेगवेगळी वैशिष्ट्येही लक्षात आली. उदाहरणार्थ, चीनमध्ये बौद्ध धर्मातील काही पंथ हे निरनिराळ्या काळात अधिक लोकप्रिय झाले आणि तेथील बुद्धपूर्व काळातील धार्मिक आचारविचारांचा त्या-त्या पंथात अथवा बुद्ध धर्मात शिरकाव झाला. हीच गोष्ट जपान, ब्रह्मदेश, कंबोडिया आणि इंडोनियाशियात घडली. बौद्ध धर्माच्या या प्रादेशिक आविष्कारांचा अभ्यास हाही युरोपीय आणि त्या-त्या देशातील

विद्वानांच्या कुतूहलाचा भाग ठरला. महाराष्ट्रातील बौद्ध धर्माचा चिकित्सक अभ्यास करणाऱ्या विद्वानांमध्ये प.ल. वैद्य, धर्मानंद कोसंबी, पी.व्ही. बापट, व्ही. व्ही. गोखले, डी.डी. वाडेकर, मोहन धडफळे आणि श्रीकांत बहुलकर यांसारख्या विद्वानांचा आवर्जून उल्लेख करावा लागेल. वैदिक हिंदूधर्म आणि त्याहूनही बौद्ध धर्म यांविषयी ज्या प्रकारचे विशेष आकर्षण युरोपमधील विचारवंत, तत्त्वज्ञ व संशोधक यांना वाटले; त्यामानाने थोडे कमीच आकर्षण पाश्चात्त्यांना जेत्रधर्माविषयी वाटले. बौद्ध किंवा हिंदू धर्मांप्रमाणे जैन धर्माचा प्रसार भारताबाहेर जवळजवळ झालाच नाही, हे त्यासाठीच्या अनेक कारणांपैकी एक असू शकेल. बराच काळपर्यंत प्राच्यविद्येच्या संशोधकांतसुद्धा हा बौद्ध धर्माचा एक उपपंथ आहे असा गैरसमज टिकून होता, हे एक दुसरे कारण असावे. परंतु युरोपातील व अमेरिकेतील आणि त्यातही जर्मनीमध्येही याकोबी ग्लासेना, लुडविग अल्डोर्फ यांसारख्या संशोधकांनी जैन धर्म विषयात बरेच मूलभूत संशोधन केले. श्वेतांबरांचा अर्धमागधीतील आगम आणि दिगंबरांचे संस्कृतमधील तत्त्वज्ञान व गणितशास्त्र विषयक ग्रंथ हे मुख्यत्वे विद्वानांच्या संशोधनाचा विषय होते. आगम आणि आकर ग्रंथांवरील टीका व भाष्य यांचे वाङ्मय अपरिमित आहे. परंतु जैनांचे मोठे भांडार म्हणजे संस्कृत, प्राकृत आणि अपभ्रंशमधील जिनचरिते आणि धर्मकथा वाङ्मय होय. गेल्या शतकात अनेक दानशूर श्रेष्ठींनी त्यांच्या ग्रंथमालांतून सर्व प्रकारचे जैन वाङ्मय प्रकाशित केले. त्यांतील प्रातिनिधिक म्हणून आत्मानंद जैन सभा, भावनगर, माणिक्य चंद्र दिगंबर जैन ग्रंथमाला, सिंघी जैन सिरीज यांचा उल्लेख करावा लागेल. मुनी जिनविजय, पं. नाथुराम प्रेमी, आ.ने. उपाध्ये, ह.चु. भायाणी यासारख्या पंडितांचे योगदान महत्त्वाचे ठरले.

**कलेतिहास :**

समकालीन युरोपीय विचारवंतांच्या धारणेनुसार पृथ्वीच्या उत्तर गोलार्धातील मानवी समूहांच्या गोऱ्या वर्णाबरोबरच त्यांची शरीरयष्टी, बौद्धिक पातळी, नीतिमत्ता व आनुषंगिक गुण दक्षिण गोलार्धातील मानवी समूहांच्या काळ्यावर्णाप्रमाणेच इतर गुणही वेगळे होते. त्यांच्या मतानुसार दक्षिण गोलार्धातील माणसे बुद्धिमत्तेत आणि नीतिमत्तेत कमी होती; एवढेच नव्हे, तर त्यांना अभिजात कलांचा (फाइन आर्ट्सचा) स्पर्शच नव्हता. त्यांच्या ठिकाणी असलेली प्रतिभा व कौशल्य हे धंद्यास (सुतारकाम, गवंडीकाम, धातुकाम इ.) उपयुक्त असलेल्या कसबापुरतेच मर्यादित होते. युरोपीयांची ही मनोवृत्ती कंपनी सरकारच्या शासकांमध्येसुद्धा किती भिनलेली होती, याचे प्रत्यंतर मुंबईत इलाख्याच्या शासनाने जे.जे. स्कूल ऑफ आर्ट स्थापन केले, त्या वेळच्या उद्दिष्टांवरून स्पष्ट होते. तांबटकाम, पाथरवटाचे काम इत्यादी कामांत भारतीयांचे कसब उत्तमच आहे, हे लक्षात घेऊन त्यांना उत्तेजन मिळावे म्हणून हे स्कूल प्रस्थापित करण्यात आले होते. या मनोवृत्तीस अनुसरूनच जेव्हा युरोपीय इतिहासकारांनी भारतीय कलेची मीमांसा करण्यास सुरुवात केली, त्या वेळी मोहेंजोदरो संस्कृतीचा शोध लागला नसल्यामुळे भारतीय कलेची सुरुवात ही इराणी साम्राज्यातील कलेच्या प्रभावातूनच झाली, असे मानले. त्याचा दाखला म्हणून अशोक सम्राटाने उभारलेल्या सिंह, हत्ती, घोडा, बैल इत्यादी पशूंच्या चित्रणाचा हरखामनी (Achaemineas) कलेतील नैसर्गिक चित्रणाशी साम्य दाखवून केला. एका रितीने पूर्व इतिहासकाळातील मौर्यकला - जी कला भारतीय नागरकलेचा सर्वांत प्राचीन नमुना समजला जातो, ती अत्यंत उच्च श्रेणीची होती. त्यानंतरच्या काळातील सांची व भारहूत येथील स्तूपांच्या दगडी कठड्यावरील व तोरणावरील शिल्पकामात चांगली कलाकुसर असली, तरी मानवी व पशू आकृतींच्या चित्रणात आढळणारी स्वाभाविकता व नैसर्गिकता आढळून येत नाही; आणि या अर्थाने कलेचा ऱ्हास झालेला आढळून येतो. पण हीच गोष्ट वेगवेगळ्या कालखंडांत प्रत्ययास येते. जेव्हा-जेव्हा भारतीय कलाकारांचा बाहेरील कलासंप्रदायाशी संपर्क आला, उदाहरणार्थ - इंडोग्रीक राजांचा काळ, कुषाणांचा काळ, दक्षिणेत इंडोरोमन काळामध्ये घडलेला रोमन कलेशी संपर्क या व अशा कारणांमुळे एतद्देशीय कलेला नवजीवन प्राप्त झाले.

अशा प्रकारच्या दृष्टीकोनामुळेच सर्वसामान्य युरोपीय माणूस हा भारतीय कलेचे वर्णन रानटी कला (मॉन्स्ट्रर्सआर्ट) करत असे. भारतीय कलेबाबत अशा प्रकारचा शब्दप्रयोग करण्यामागचे कारणही तसेच होते. ख्रिश्चन धर्मसंप्रदायांत परमेश्वराचे चित्रण करण्याची प्रथा नव्हती. त्याचे चित्रण प्रतीकस्वरूपात व्हायचे. चित्रण करावयाचे झाल्यास फार तर ईश्वराचा प्रेषित आणि मानवी पुत्र असलेल्या येशूचे किंवा त्याच्या मेरी मातेचे. पश्चिम आशियाई एकेश्वरी धर्मामध्ये (यहुदी, ख्रिस्ती व मुस्लीम) ईश्वराचे मनुष्यस्वरूपात चित्रण हे अग्राह्यच नव्हते, तर भक्तांना ते असह्यच होते. यामुळे युरोपीय मनाला ग्रीक आणि रोमन कलेमध्ये जरी देवतांचे मानवी स्वरूपात चित्रण आढळले तरी आकृतीच्या दृष्टीने (ठेवण) त्यांची सुंदर या गटातच संभावना होत असल्याने भाविक युरोपीय लोकांनासुद्धा ते देवांचे चित्रण सुसह्य वाटले. याउलट पौराणिक देवदेवता या अनेक शिरे, हात व क्वचित प्रसंगी अनेक पायांच्या असल्यामुळे व भारतीय सौंदर्यकल्पना युरोपीय सौंदर्यकल्पनांपेक्षा सर्वथा भिन्न असल्यामुळे त्यांना भारतीय कलेतील देवताचित्रण रानटी वाटले असल्यास आश्चर्य नाही. पण भारतीय शिल्पे किंवा चित्रे ही अभिजात कलाच नाही, हे म्हणणेही एकेरीपणाचेच ठरेल.

भारतीय कलेला त्यातल्या त्यात स्थापत्याला योग्य ते मानाचे स्थान मिळवून देण्याच्या बाबतीत योगायोगाने एक वेगळीच अशी घटना घडली. जेम्स फर्ग्युसन हा २०-२२ वर्षांचा ब्रिटिश युवक आपल्या नशिबाच्या शोधात, त्याचा भाऊ ईस्ट इंडिया कंपनीत मोठ्या हुद्द्यावर काम करीत असल्यामुळे, बंगालमध्ये आला. तेथे त्याने निळीच्या धंद्यात मोठी कमाई केली. अशा प्रकारे स्थैर्य प्राप्त झाल्यानंतर चौकसपणाने भटकंती करीत असता त्याला भारतातील शैलगृहांचा शोध लागला आणि तो त्यांच्या अभ्यासाकडे आकर्षित झाला. १८४० ते १८८८ या त्याच्या संशोधकीय जीवनात त्याने सर्वप्रथम भारतातील अद्भुत शैलगृहांचा - अर्थातच अजिंठा, वेरुळसारखी शैलगृहेही यात आली - अभ्यास करून शोधनिबंध वाचले. त्यानंतर हळूहळू भारतीय लौकिक व देवालय स्थापत्य, पुढे विश्वाचे स्थापत्य यांसारख्या विषयांवर मोठमोठी पुस्तके लिहिली आणि स्थापत्यशास्त्रातील एक मोठी अधिकारी व्यक्ती म्हणून मान्यता मिळवली. या सर्व संशोधनाच्या पसाऱ्यात तो आपला मूळ विषय विसरला नाही. १८८८मध्ये जवळजवळ त्याच्या आयुष्याच्या अखेरीस **Cave Temples of India** हा ग्रंथ त्याने जेम्स बर्गीस या पश्चिम भारतातील सुपरिंटेंडिंग आर्किऑलॉजिस्ट या हुद्द्यावर काम करीत असलेल्या व नंतर भारतीय पुरातत्त्व सर्वेक्षणाच्या सरसंचालकपदावर बढती मिळालेल्या थोर पुरातत्त्वज्ञाच्या साहाय्याने प्रकाशित केला. फर्ग्युसन आणि बर्गीस यांनी लिहिलेल्या या ग्रंथात बौद्ध, हिंदू व जैन यांच्या भारतभर विखुरलेल्या गुंफांचा अभ्यास केला. हा ग्रंथ या क्षेत्रात इतका अद्वितीय ठरला की जवळजवळ सव्वाशे वर्षांनंतर हा ग्रंथ वारंवार पुनर्मुद्रित होत आहे; आणि कदाचित पुढेही होत राहील. या ग्रंथाच्या लोकप्रियतेचे महत्त्वाचे कारण असे की ज्या गुंफांबद्दल -त्या एक तर पांडवांची किंवा भगवान दाशरथी रामाची वनवासातील आश्रयस्थाने म्हणून किंवा इतर दंतकथांच्या संदर्भात अत्यंत प्राचीन म्हणून ज्ञात होती - त्यांचा कालक्रम निश्चित केला गेला. सव्वाशे वर्षांच्या संशोधनानंतर संशोधन पद्धतीत अनेक प्रकारच्या सुविधा निर्माण झाल्या आहेत. साधेच उदाहरण द्यायचे झाल्यास कार्बन-१४ पद्धतीने गुंफांतील लाकडी साधनसंभाराचा काळ ठरवता येतो. पुरालिपिशास्त्राच्या साहाय्याने लेखाचा काळ निश्चित करता येतो. संबंधित क्षत्रप, सातवाहन, महामेघवाहन, वाकाटक, चालुक्य, पल्लव आणि चौल या प्रसिद्ध राजघराण्यांचा कालक्रमही आता बराचसा सुनिश्चित झाला आहे.

त्यात या व गेल्या पिढीच्या नाणकशास्त्रातील संशोधनामुळेसुद्धा बरीचशी सुनिश्चितता प्राप्त झाली आहे. या सर्व प्रगतीनंतरही फर्ग्युसन आणि बर्गीस यांनी स्थापत्याच्या अंगाचा जो सूक्ष्म अभ्यास केला आणि त्याचे जवळजवळ १५०० वर्षांच्या काळात झालेल्या बदलांचे आणि विकासांचे योग्य निरीक्षण केले, त्यामुळे त्यांच्या अभ्यासातील कालनिश्चितीला व विकासक्रमाला एक शास्त्रीय बैठक प्राप्त झाली. फर्ग्युसन यांच्या मते, जेव्हा आपण शैलगृहांचा शास्त्रीय दृष्टीकोनातून अभ्यास करतो, तेव्हा चार घटक अत्यंत महत्त्वाचे असतात. एक म्हणजे समकालीन राजकीय

इतिहास. बऱ्याच वेळा ही शैलगृहे घडवताना राजघराण्यातील प्रतिष्ठित व्यक्तींचा प्रत्यक्ष आश्रय नसला, तरी अप्रत्यक्षपणे समकालीन राजकीय घटनांचे चढउतार अशा प्रकारच्या उपक्रमांवर बरेवाईट परिणाम घडवू शकतात. यामुळे समकालीन राजघराणी, त्यांची वंशावळ व त्यांतील राजपुरुषांचे वैयक्तिक कार्यकाळ यांचे ज्ञान असणे अत्यंत आवश्यक आहे. दुसरा घटक हा ऐतिहासिक कालक्रम. नुसता राजघराण्यांचा कार्यकाळ वा इतिहासच महत्त्वाचा नाही, तर समकालीन राज्यकर्ते, पूर्वीचे आणि नंतरचे राजवंश व आनुषंगिक काळाच्या चौकटी; उदाहरणार्थ, भारतीय इतिहासातील प्रमुख राजशकांच्या व्यतिरिक्त अनेक संवत् प्रचारात होते. त्यांचीसुद्धा अचूक माहिती असणे या अभ्यासासाठी पूरक ठरते. तिसरा घटक रीतिरिवाज, तत्त्वज्ञान यांबरोबरच भारताच्या संदर्भात बोलावयाचे झाल्यास बौद्ध, जैन आणि हिंदू या धार्मिक परंपरा आणि त्यात घडून आलेले लक्षणीय बदल हेसुद्धा या स्थापत्याच्या अभ्यासासाठी अत्यंत उपयुक्त ठरतात. चौथा घटक म्हणजेच नृकुलगोत्रविद्या (ethnography). मानववंशशास्त्राच्या शाखेच्या अभ्यासामुळे निरनिराळ्या नागर अथवा वन्य जातीजमातींच्या भाषांचा, धार्मिक श्रद्धा आणि विश्वास यांचा, त्यांच्या पेशांचा आणि व्यावसायिक कसबांचा तसेच लोककलांचा अभ्यास करणे अपेक्षित असते. फर्ग्युसन यांच्या मते अशा प्रकारच्या अभ्यासातूनच हे स्थापत्य कुठल्या निरुवंशाशी संलग्न आहे किंवा त्यातून ते प्रेरणा घेते हे लक्षात येते. अशा प्रकारच्या अभ्यासातूनच दक्षिणी मंदिरांच्या शिखरांना ती द्रविडवंशाशी संलग्न आहेत आणि त्यामुळे ती उत्तरेतील मंदिरांच्या शिखरांपेक्षा वेगळी आहेत. उत्तरेतील किंवा नागर मंदिर शिखरांना व्यत्यासाने ते भारतीय आर्य भाषिक वंशाशी संबंधित असल्याने त्यास इंडो-आर्यन असे नाव देतो. जेम्स बर्गीसच्या मते, या इंडो-आर्यन शिखरांना त्यांचे वेगळेपण प्राप्त झाले ते सहाव्या शतकाच्या सुमारास. हूण, गुर्जर इत्यादी जमाती - ज्या मध्य आशियातून येऊन भारतात स्थिरावल्या त्यांच्यामुळे झाले असे तो मानतो. ही किंवा अशा प्रकारची श्रेष्ठ संशोधकांची मते वेगळ्या प्रकारचा पुरावा समोर आल्याने आज संशोधक मानत नाहीत, पण त्यांनी दिलेला कालक्रम स्थूलपणे का होईना स्वीकारला जातो आणि घालून दिलेली संशोधनाची चौकट आजही अनुसरली जाते.

फर्ग्युसनच्या संशोधनाचे महत्त्वाचे फलित असे की, ज्या काळात भारतात अभिजात दृश्यकला आहेत की नाही असा संशय व्यक्त केला जात होता, त्या काळात भारतीय शैलगृहांचे स्थापत्य ही निखळ अभिजात कला आहे असे त्याने धीटपणे मांडले. यामुळेच नंतरच्या काळात हॅवेलसारख्या जन्माने ब्रिटिश परंतु संस्काराने भारतीय असलेल्या संशोधकाने भारतीय कलेची गुणवैशिष्ट्ये तिच्यातील अभिजातपणा आणि तिचे श्रेष्ठत्व मोठ्या हिरिरीने मांडले. भारतीय कलेची कड घेऊन तिचे गुणगान करणाऱ्या या संशोधकांची भूमिका काही वेळा दुसऱ्या टोकास गेली असे वाटते, पण त्यांचे हे प्रयत्न स्तुत्यच नव्हे तर भारतीय कलेच्या अभ्यासाला अधिक व्यापक करण्याच्या दृष्टीने पोषकच ठरले आहेत.

भारतीय कलेच्या अधिक प्रमाणभूत अशा अभ्यासाचा पाया घालण्याचे श्रेय श्रीलंकेत जन्माला आलेल्या आनंद केंटिश कुमारस्वामी या खऱ्या अर्थाने पौर्वात्य असलेल्या प्रतिभावान संशोधकाकडे व हाइनरिइश झिमर या जर्मन संशोधकाकडे जाते. भारतीय कला ही आत्ता-आत्तापर्यंत मुख्यत्वे धार्मिकच होती. या कलापरंपरेत लौकिक स्थापत्य नगण्य होते असे नाही किंवा समकालीन भूमिती, गणित आणि अभियांत्रिकी ज्ञानाला त्यात कुठल्याही प्रकारचा सहभाग नव्हता किंवा पगडा नव्हता असेही नाही, पण धार्मिक कला-परंपरेचा अभ्यास करताना धर्मसंकल्पना व तत्त्वज्ञान तसेच त्यांत घडून येणारा बदल आणि विकास यांचा सूक्ष्म विचार न केल्यास कुठल्याही कलेत अभिप्रेत असलेल्या सौंदर्य-संकल्पना आणि सौंदर्यशास्त्र (aesthetics) याची नीटशी कल्पना येणार नाही. त्यामुळे कुमारस्वामींनी आपल्या Transformation Nature in Indian Art किंवा Basic Principles in Indian Art यांसारख्या ग्रंथांतून बौद्ध, हिंदू किंवा जैन या धर्मपरंपरा वेगळ्या असल्या तरी, या परंपरांतून आविष्कृत झालेली कला

मग ते स्थापत्य अथवा शिल्प असो किंवा चित्रकला असो, ते प्रथम भारतीय आहे आणि भारतीय कला म्हणूनच त्यांच्याकडे पाहिले पाहिजे असे मत मांडले. भारतीय कलेतील काळाची संकल्पना हीसुद्धा आधुनिक इतिहासात अभिप्रेत असलेल्या अनुक्रमनिष्ठतेपेक्षा (linear) वेगळी आहे. ती भारतातील सर्व धर्मांना समान असलेली युगनिष्ठ कालचक्र (सायक्लिक) मांडणारी आहे, असे दाखवून दिले. त्यांनी भारतीय कलेच्या निरनिराळ्या पैलूंचा सखोल अभ्यास करणारे व सगळ्याच भारतीय कलांच्या कालखंडांना स्पर्श करणारे ३५०पेक्षा अधिक शोधलेख आणि अनेक ग्रंथ प्रकाशित केले आणि History of Indian & Indonesian Art, Rajput Paintings इत्यादी यांसारखे मौलिक विचार प्रदर्शित करणारे ग्रंथ लिहिले. तर झिमर यांनी भारतीय कला ही फक्त भरतखंडापुरती मर्यादित राहिलेली नसून दक्षिण आशियाबरोबरच आग्नेय आशियात व मध्य आशियात हिंदू व बौद्ध धर्मांचा प्रसार मोठ्या प्रमाणावर झाल्याने व पाचव्या शतकानंतर बौद्ध धर्म हा पूर्ण आशियात पोहोचल्याने यांना भारतीय कला न म्हणता आशियातील बृहद् भारतीय कला, असे तिचे वर्णन केले पाहिजे असे म्हणतात.

आपल्या दुसऱ्या एका ग्रंथामध्ये ग्रीक, रोमन व रेनेसान्स काळातील सौंदर्यशास्त्राची परिमाणे भारतीय कलेला लावल्याने तिचा आस्वाद घेणे कसे अशक्य आहे हे दाखवून देतात. भारतीय कला जर समजून घ्यायची असेल तर त्या कलेतील प्रयोजने (motives), भारतीय सौंदर्यशास्त्राला अभिप्रेत असलेले निकष त्याचप्रमाणे त्या प्रयोजनांचा आणि एकूणच कलेतील प्रतीकात्मकतेचा (symbolism चा) अभ्यास केल्याशिवाय भारतीय कलेतून मिळणारा लोकोत्तर (transendental) किंवा ब्रह्मानंद सहोदर असा आनंद मिळवणे अशक्यप्राय आहे, असे त्यांचे ठाम मत आहे. स्टेला क्रॅमरिश या ऑस्ट्रेलिअन विदुषीने भारतीय देवालयांच्या अंगांचा फक्त आकृतिनिष्ठ (formal) एवढाच अभ्यास करून न थांबता देवालय संकल्पना समजावून घेऊन त्याची प्रतीकात्मता समजावून घेतली पाहिजे असे मांडले. त्यांच्या या संदर्भातील दोन वाङ्मयीन कृती फार महत्त्वपूर्ण आहेत. १) द हिंदू टेम्पल, (The Hindu Temple) या आधी स्पष्ट केल्याप्रमाणे अगदी वैदिक काळापासूनच्या यज्ञवेदी ते शिखरयुक्त देवालय असा देवालय संकल्पनेचा विकास कसा झाला, याचे विवेचन त्यांनी केले आहे. कुमारस्वामींनी शुंगकाळातील शिल्पांवरून इ.स.पूर्व दुसऱ्या शतकात नगररचना, राजवाडे, घरे, यज्ञकुटी या कशा असत आणि त्यासाठी कोणत्या संज्ञा प्राकृत आणि संस्कृत भाषेत वापरल्या जात असत याचा मूलगामी अभ्यास केला होता. स्टेला क्रॅमरिश यांनी एक पाऊल यापुढे जाऊन भारतीय देवालय ही संकल्पना कशी विकसित झाली आणि स्थापत्यदृष्ट्या वेदिबंध, जंघायुक्त मंडोवर व वरंडिकेच्या भूमि-आमलक, आमलक आणि कलशयुक्त देवालयाच्या आकृतिबंधात काय गुणात्मक बदल झाले, हेही दाखवून दिले. वेदीपासून कलशापर्यंतच्या देवळात, तसेच त्याच्या विन्यासात वास्तुपुरुष कसा दृग्गोचर होतो, हे त्यांनी उलगडून दाखवले.

२) दुसरे म्हणजे प्राचीन भारतीय शिल्प आणि देवतांच्या मूर्ती यांचे चित्रण करताना कलाकाराच्या समोर असलेल्या ध्यानास, दृष्टिगोचर असे रूप देताना तो कलाकार त्या शिल्पात किंवा देवप्रतिमेत योगसंकल्पनेच्या साहाय्याने प्राण कसे फुंकतो, यामागची भारतीय संकल्पना त्यांनी स्पष्ट केली आहे. त्यांच्या मते एखादे भारतीय शिल्प किंवा एखादी देवप्रतिमा ही काही जिमखान्यातून सिद्ध होणाऱ्या शरीरसौष्ठवनिष्ठ अशा सौंदर्यकल्पनांवर आधारित नसते. प्राचीन भारतातील शिल्पसंभाराच्या साहाय्याने हा मुद्दा गांधारशिल्पात आढळून येणाऱ्या बुद्ध किंवा बोधिसत्त्व प्रतिमा आणि त्याच देवतांच्या मथुरा येथील तशाच प्रतिमा या दोहोंमधील दिसणाऱ्या फरकावरून स्पष्ट करता येईल. गांधारशैलीतील शिल्पे ही ग्रीक आणि रोमन शैलीतील देवदेवतांच्या प्रतिमांवरून बेतलेली आढळतात. त्यातील शरीराचे सौष्ठव व अंगप्रत्यंगांचे आदर्श हे ग्रीक-रोमन शैलीतल्या शिल्पाप्रमाणे आहे. तर मथुरेतील भगवान बुद्ध हा धर्मसभेत प्रवचन करणाऱ्या आचार्याप्रमाणे आणि उभ्या ठाकलेल्या बोधिसत्त्वाच्या सारनाथ इत्यादी ठिकाणी

आढळून येणाऱ्या प्रतिमा या राजसभेत संबोधन करणाऱ्या राजासारख्या वाटतात. स्टेला क्रॅमरिशच्या मते भरदार कमावलेली शरीरयष्टी आणि विशिष्ट प्रकारची नाक, डोळे आणि चेहऱ्याची ठेवण यांतील सौंदर्यापेक्षासुद्धा शिल्पातील देवता किंवा आचार्य यांच्या शरीरात ठासून भरलेली योगाची ऊर्जा त्या शिल्पचित्रणातून प्रकट होते किंवा नाही, हे पाहणे महत्त्वाचे आहे. भारताच्या शिल्पचित्रकलेच्या पाच हजार वर्षांहून अधिक काळाच्या इतिहासात भारतीय कलेचे हे वैशिष्ट्य सातत्याने आढळून येते. याचा अर्थ असा नव्हे की निरनिराळ्या कालखंडांत झालेल्या बाहेरच्या संस्कृतिसंपर्कांतून भारतीय शिल्पचित्रकलेत कुठलेच लक्षणीय बदल आढळून आले नाहीत. इ.स.च्या पहिल्या शतकापासून ते सहाव्या शतकापर्यंत वायव्य सरहद्द प्रांतात गांधारशैलीच्या रूपाने इ.स.नाच्या तिसऱ्या–चौथ्या शतकात अमरावती येथील शिल्पांद्वारा व सातवाहन काळातील शाडूच्या मातीच्या बाहुल्यांच्या रूपाने ग्रीक आणि रोमनकलेचा उल्लेखलेल्या शिल्पावर झालेला प्रभाव स्पष्ट जाणवतो. इ.स.च्या चौदाव्या-पंधराव्या शतकापासून उत्तर हिंदुस्थान व पश्चिम भारतातील लघुचित्रावर (Miniature Paintings वर) झालेला पर्शिअन कलेचा प्रभाव स्पष्ट जाणवतो. हे प्रभाव पचवून समकालात अथवा लगतच्या काळात भारतीय कलेने आपले प्रथमपासूनचे असलेले भारतीयत्व कायमच ठेवले. राजकीय माध्यमातून आलेल्या या बाह्य प्रभावाबरोबरच भारतीय अभिजात कलेने भारतातील आदिवासींकडून घेतलेल्या व नंतर सात्मीकरणातून आत्मसात केलेल्या स्वयंभू (autochthonous) कलेच्या प्रभावाचाही उल्लेख केला पाहिजे.

कलेतिहासाच्या अभ्यासाच्या आधुनिक वाटचालीतील एका नव्या वळणाचा आवर्जून उल्लेख करणे आवश्यक आहे. गेल्या दोन-अडीचशे वर्षांमध्ये दक्षिणेतील व उत्तरेतील भारतीय कलेच्या निरनिराळ्या कालखंडांतील व प्रदेशातील कलानमुन्यांची नोंद घेण्यात आली. क्वचितप्रसंगी सखोल अभ्यासही करण्यात आला. परंतु इ.स.पूर्वीच्या तिसऱ्या चौथ्या शतकापासून ते तहत अठराव्या शतकांपर्यंतच्या स्थापत्याचा परिपूर्ण म्हणता येईल असा एकत्रित आढावा यापूर्वी उपलब्ध नव्हता. कुमारस्वामी, हॅवेल, बुर्च्या, सी. शिवराममूर्ती, अगदी अलीकडच्या काळात सुसान हंटिंग्टन व अन्य लेखकांनी भारतीय कलेवर इतिहासग्रंथ लिहिले. परंतु त्यांतील भारतीय स्थापत्यावरील विवेचन हे रसग्रहणात्मकच होते. अमेरिकन इन्स्टिट्यूट ऑफ इंडियन स्टडीज यांनी एन्सायक्लोपिडिया ऑफ इंडियन आर्किटेक्चर या गेल्या शतकातील पन्नाशीत हाती घेतलेल्या व नुकत्याच पूर्ण केलेल्या पंधरा खंडांच्या प्रकल्पामुळे ही उणीव भरून निघाली आहे. कुमारस्वामी, झिमर, स्टेला क्रॅमरिश, वासुदेवशरण अग्रवाल व पी.के. आचार्य यांचा अपवाद वगळता स्थापत्याच्या इतिहासकारांनी भारतीय स्थापत्य-वर्णन करताना युरोपीय परंपरेतील पारिभाषिक शब्दांचाच वापर बहुतकरून केला. गेल्या शतकाच्या तिशीत प्राचीन व इस्लामी भारतीय स्थापत्याचा इतिहास रेखाटणारे दोन खंड पर्सी ब्राउन यांनी लिहिले. त्यातील वर्णनातही युरोपीय स्थापत्य परिभाषाच वापरली आहे.

भारतीय स्थापत्याची रामराज यांनी १८३४ साली ओळख करून देताना प्रत्यक्ष सुतारकाम आणि गवंडीकाम करणारे भारतीय कारागीर आणि शिल्प व आगमग्रंथांद्वारा प्राचीन भारतीय स्थापत्याची मांडणी करणारे स्थपती यांच्या उपयोगात असलेल्या परिभाषेद्वाराच स्थापत्याची ओळख करून घेणे योग्य ठरेल, असा मुद्दा आग्रहाने मांडला होता. परंतु अलेक्झॅन्डर कनिंगहॅम, जेम्स फर्ग्युसन, जेम्स बर्गीस, हेन्री कझिन्स इत्यादी प्रसिद्ध इतिहासकार हे युरोपीय परंपरेत वाढले असल्यामुळे त्यांनी वर्णनात आपलीच परिभाषा वापरली. अमेरिकन इन्स्टिट्यूटच्या उल्लेखलेल्या १५ खंडांच्या प्रकल्पाचा प्रारंभ करताना इन्स्टिट्यूटचे संचालक प्रा. प्रमोदचंद्र, संपादकद्वय कृष्णदेव आणि मधुसूदन ढाकी आणि मायकेल माइस्टर या सर्व मंडळींचा कटाक्ष मात्र आगम शिल्पशास्त्रांत आढळणारे पारिभाषिक शब्दच वास्तूंच्या वर्णनात वापरले जावेत असा होता; आणि त्यामुळे प्राचीन वास्तूंशी संबंधित असलेल्या खण्डांची ठेवण निश्चितपणाने निखळ भारतीयच आहे. भारतीय कलेच्या इतिहास-लेखनातील हा स्थापत्य-विश्वकोष म्हणजे एक महत्त्वाचा टप्पा

आहे, असेच मानावे लागेल. याच धर्तीवर वापी, कूप, दुर्ग इत्यादी लौकिक स्थापत्य, चित्रकला, मूर्तिकलासंबंधी कोशवाङ्मय निर्माण करणे, हे भारतीय कलेतिहासाचे नवीन उद्दिष्ट असेल.

स्टेला क्रॅमरिश आणि मधुसूदन ढाकी यांनी देवालय स्थापत्यातील नागर, द्रविड या पूर्वज्ञात असलेल्या, शिखर पद्धतीव्यतिरिक्त कालौघात दुसऱ्या काही प्रदेशांत- (उदाहरणार्थ दख्खनमध्ये) नवीन शिखरपद्धती कशा निर्माण झाल्या याविषयीचे मूलभूत संशोधन करून स्थापत्यविषयक अभ्यासात मोलाची भर टाकली आहे. नागर म्हटल्यानंतर त्या शिखरपद्धतीची लतिन म्हणून झालेली ओळख शिल्पशास्त्रांच्या माध्यमातून सर्वज्ञातच आहे. असे विधान करण्याचे कारण म्हणजे इ.स.च्या सहाव्या शतकाच्या सुरुवातीला वराहमिहिराने आपल्या बृहज्जातक या ज्योतिषविषयक ग्रंथात प्रासादाचे म्हणजेच देवालयाचे सव्वीस प्रकार सांगितले आहेत. त्यांचे नेमके स्वरूप काय व ते सर्व प्रकार एकमेकांपासून कसे भिन्न आहेत, याविषयी फक्त स्थूल अंदाज वर्तवता येतात. तोपर्यंत नागर आणि द्राविड अशा उत्तर आणि दक्षिण भारतात प्रचलित असणाऱ्या शिखरपद्धतींचा तसा उल्लेख बृहज्जातकातही आढळत नाही, हे नमूद करण्याजोगे आहे. नागर पद्धतीच्या शिखराचे ज्ञात असलेले सर्वांत प्राचीन देवालय अभ्यासकांच्या मते देवगड (मध्य प्रदेश) येथील विष्णुमंदिर होय. त्याचा काळ इ.स.च्या पाचव्या शतकाचा उत्तरार्ध मानला जातो, तर पिरॅमिड्सच्या आकाराची द्राविड शिखर असलेली सर्वांत प्राचीन मंदिरे बदामी चालुक्यांच्या कारकिर्दीत ऐहोळे, बदामी व पट्टदकल आणि पल्लवांची कांची व येथील मंदिरे होत. दक्षिणेतील द्रविड शिखरांच्या आकारात जे फरक होत गेले, ते फरक होण्यास लागलेला काळ लक्षात घेता ते फार हळू झाले, असे म्हणावे लागेल. तुलनेने नागर शिखराचा आकार झपाट्याने आणि प्रदेशानुरूप फार लवकर बदलत गेला असे म्हणावे लागेल. दक्षिणेतील उत्तर चालुक्यकालीन शिलालेखांचे संदर्भ लक्षात घेतल्यास कलिंग प्रदेशातील देवालये एरवी नागर म्हणून ओळखली जात असली, तरी त्यांच्या शिखरांच्या आकारांतील फरक जाणवण्याइतका स्पष्ट असल्यामुळे बाराव्या शतकात कलिंगशिखर- देवालयाचा नागर आणि द्रविड यांच्याबरोबर वेगळा प्रकार म्हणून कानडी शिलालेखात उल्लेख येतो. प्रादेशिक परंपरेप्रमाणे उत्तरेतील नागर देवालये वेगळी दिसत होती हे काश्मीरमधील देवालयातील काही ग्रीको-रोमन स्थापत्याची अंगे त्यात अंतर्भूत झाल्याने मार्तंड इत्यादी ठिकाणच्या उदाहरणांवरून सहज लक्षात येते. हिमाचल प्रदेशातील देवालयांच्या शिखरांच्या वरच्या भागात, खिडकीच्यावर जशी उतरती झापे लावलेली असतात तशी सलग चार झापे (स्लिपिंग रूफ) योजलेली दिसतात. हिमालयाच्या पायथ्यालगत असलेल्या भागात सारखी हिमवृष्टी होत असल्यामुळे देवालयाचा खालचा भाग, यापासून वाचावा हा त्या योजनेमागील उद्देश होता, आहे. हा शिखराच्या स्थापत्यातील फरक हिमालयाच्या पायथ्याच्या भागातील विशिष्ट हवामानामुळे होता, हेही लक्षात येते. दख्खनमध्ये मात्र जे दोन नवीन देवालय शिखर स्थापत्य प्रकार इ.स.च्या दहाव्या शतकापासून दृष्टोत्पत्तीस येतात, ते मात्र काही वेगळ्या कारणामुळे, सांस्कृतिक कारणांमुळे झाले असे म्हणणे प्राप्त आहे.

भारताच्या काही भागांमध्ये नागर आणि द्रविड यांपेक्षा वेगळ्या बांधणीच्या आणि परिणामत: वेगळ्या प्रकारच्या शिखरांची देवालये रचण्याची पद्धत होती, हे काश्यपशिल्प या शिल्पग्रंथावरून आणि याआधी उल्लेखिलेल्या कानडी स्थपतींच्या प्रशस्तिवजा शिलालेखांवरूनही लक्षात येते. या दोन पद्धती म्हणजे 'वेसर' आणि 'भूमिज' होत. वेसर या संस्कृत शब्दाचा अर्थ खेचर असा असून, अशा प्रकारची देवळे नागर आणि द्रविड अशा दोन्ही स्थापत्य अंगांचा मेळ घालून रचण्यात येत असावीत असे अनुमान करता येते. भूमिज देवालये कशी उभारावीत यासंबंधीच्या सूचना सर्वप्रथम समरांगणसूत्रधार (इ.स. अकरावे शतक) या भोजराजाने लिहिलेल्या ग्रंथात आढळतात; व त्यानंतर 'अपराजितपृच्छा' या ग्रंथातही दिसून येतात. या दोन्ही ग्रंथांत भूमिज देवालयाचे निरनिराळे प्रकार वर्णन केले असून त्यांचे गट चौकोनी, आयत, वर्तुळाकार आणि अष्टकोनी विन्यासावरून केलेले आढळतात. अशा वेसर या देवालय

संज्ञेबद्दल मात्र दक्षिणेतील शिल्पग्रंथात ग्रंथकर्त्यांनी निरनिराळ्या भूमिका घेऊन वापर केल्यामुळे अगदी आत्तापर्यंत आधुनिक विद्वानांमध्ये वेसर देवालयाच्या रचना-विन्यास इत्यादी संबंधात तीव्र मतभेद होते आणि काही अंशी अजूनही आहेत.

मात्र स्टेला क्रॅमरिश या प्रतिभावंत विदुषीच्या अथक प्रयत्नामुळे माळवा, मध्य प्रदेश, महाराष्ट्र आणि दक्षिण गुजरात इतक्या विस्तृत प्रदेशावर विखुरलेल्या या देवालय-स्थापत्य प्रकाराची ओळख विद्वानांना नव्याने झाली. या देवालयाचा विन्यास नागर देवालयाप्रमाणेच भद्रादी निर्गमयुक्त असून चारही भद्रांवरील वरंडिकेपासून वर शिखराच्या चारही बाजूंना लतिन नागर शिखराप्रमाणे लता असतात. लता म्हणजे अजिंठा येथील प्रवेशद्वारावर असलेल्या कमानीसारख्या, कमानींच्या रांगांवर उत्तरोत्तर कमी कमानी असलेल्या, कमानींच्या रांगांचा निमुळता होत जाणारा थर किंवा जाळी. या चार लतांमधील मोकळ्या जागेत विन्यासामधील कूटादी विषम संख्येतील निर्गमावर मूळ शिखराच्या एकापेक्षा एक लहान होत जाणाऱ्या प्रतिकृतींच्या शिखराच्या स्कन्धापर्यंत जाणाऱ्या उतरंडी रचलेल्या आढळतात. नागर बांधणीमध्ये प्रत्येक शिखर किती मजल्यांचे (भूमीचे) आहे याची कल्पना केलेली असते, आणि त्याप्रमाणे एखाद्या मजल्याचा शेवट दाखविण्यासाठी मुख्य शिखराच्या शेवटी असल्याप्रमाणे आमलक (भूमि-आमलक) ही कोपऱ्यावर दाखविण्याची पद्धत असते. या भूमि-आमलकांच्या संख्येवरून स्थपतीला ते देऊळ किती मजल्यांचे अभिप्रेत आहे, हे कळते आणि त्यानुसार पंचभूम, सप्तभूम, नवभूम असे प्रासादांचे वर्गीकरण केले जाते. भूमिज शिखरामध्ये लतेच्या दोन्ही किनाऱ्यांना अशी आमलके न दाखविता निर्गमावरील शिखर प्रतिकृतींच्या उतरंडीमधील शिखरांच्या संख्येवरून प्रासादाचे भूमी (मजले) सूचित करण्याचा प्रघात आहे. शिखरांच्या संख्येवरून भूमी सूचित करण्याच्या संकेतामुळेच कदाचित या देवालय रचना प्रकाराला 'भूमिज' असे नाव पडले असावे.

दखखनचा उत्तर भाग आणि त्यालगतचा वरचा प्रदेश यांमध्ये नवव्या शतकात रुजलेला देवालय रचनेचा भूमिज प्रकार जरा जास्त लोकप्रिय असला, तरी त्याखालच्या दक्षिण भागात नागर आणि द्रविड या दोन रचनापद्धतींचे मिश्रण असलेला वेसर देवालयांचा प्रकार त्याच सुमारास रूढ झाला आणि त्याचबरोबर लतिन या नागर प्रकारातून शिखर-शेखरी असा विकसित नागर शिखराचा प्रकार आकारास आला. या प्रकारच्या शिखरात गाभाऱ्यावर असलेल्या मूलमंजरीला अगदी चिकटून निम्म्याहून जास्त उंचीपर्यंत पोहोचणारे, उठावात कोरल्यासारखे दुसरे उपशिखर दाखविले जाते. हे मूलमंजरीच्या छातीवर असल्यामुळे त्याला 'उरशृङ्ग' किंवा गुजरातीत 'छातीया शिखर' असे म्हणतात. मूलमंजरीच्या बेचक्यात आणि कोपरावरील कर्णकूटाच्या रेषेत एक लहान शिखर असून त्याला अंगशिखर म्हणतात, तर उरशृङ्गला समोरून असलेल्या कोनाड्यासारख्या देवळीला 'रथिका' असे म्हणतात आणि शिखरावरच उठाव्यात कोरलेल्या देवळीला 'तिलक' असे म्हणतात. अशा रितीने मूलमंजरीभोवती निरनिराळ्या आकारांतील शिखरांच्या प्रतिकृती निरनिराळ्या ठिकाणी जोडलेल्या दिसतात. त्यामुळे मूलमंजरी हे मूळ शिखर कारंजातील मूळ फवाऱ्याप्रमाणे मानले तर निरनिराळ्या आकारांतील निरनिराळ्या उंचीवर असलेल्या या शिखरांच्या प्रतिकृती या फवाऱ्याच्या भोवती असलेल्या कमीजास्त उंचीच्या धारांप्रमाणे वाटतात. शिखराच्या भोवती असलेली ही शिखरे जणू काही मुकुटावर असलेल्या मोरपिसांप्रमाणे (शेखर) वाटतात. या लहानमोठ्या शिखर प्रतिकृतींना अण्ड, कूट, शृंग, तिलक इत्यादी नावे असून उपशिखरे त्या मंदिरांची संख्या मोजताना गणली जातात. त्यामुळे शिखर-शेखरी प्रासादाचा प्रकार सांगताना पंचाण्डक प्रासादापासून ३६३ उपशिखरे असलेला मेरुप्रासादसुद्धा वर्णनात येतो.

याआधी उल्लेखिलेला वेसरप्रासाद म्हणजे कल्याणी, चालुक्य, होयसळ, गङ्ग इत्यादी कर्नाटकातील राजवंशांनी निर्मिलेली वेगळ्या रचनापद्धतीची देवालये होत, असे सर्वप्रथम ढाकी यांनी त्यांच्या सूक्ष्म निरीक्षणाअंती व गाढ

अभ्यासातून मांडले. कर्नाटकातील कल्याणी चालुक्यांच्या कारकिर्दीत ज्ञात असलेल्या वेसरमंदिरांपैकी सर्वांत प्राचीन नमुने लक्कुण्डी येथे सर्वप्रथम आढळतात. एरवी कर्नाटकात द्रविडपरंपरा ही घट्ट रुजलेली असली, तरी वेसरमंदिरे नागरमंदिरांसारखीच भद्र, रथ व प्रतिरथ अशा प्रकारच्या निर्गमांनी युक्त असतात. होयसळ राजाच्या काळात विन्यासातील निर्गमांचे आकर्षण इतके वाढले की ते काटकोनात न राहता विशालकोनात पुढे येऊन विन्यासाला बहुकोणी तारकेचा (stellate) आकार देतात आणि त्यामुळे या सर्व बाजूंनी टोकावर निमुळत्या होत जाणाऱ्या शिखराला एक मनोहर आकार प्राप्त होतो. बदामी येथील यल्लमगुडी हे वेसरप्रकारचे परिपूर्ण देवालय आहे. वेसरप्रकारच्या देवालयाचे परिपूर्ण उदाहरण म्हणून ढाकी वर्णन करतात. विन्यासांवर हे पंचांगयुक्त असे असून शिखरावर द्रविड विमानाप्रमाणे पाच मजले स्पष्टपणे दिसतात. चारही कोपऱ्यांवर एकावर एक अशी पाच कर्णकूटे, मध्यभागी लांबट भद्रशालेवरील समोरून दिसणारे शिखर हे भूमिज देवालयातील मध्यभागी शूरसेनक असणाऱ्या एकावर एक लहान व निमुळत्या होत जाणाऱ्या पाच शिखरांचे आहे, तर बाजूच्या प्रतिरथावर असलेली शिखरे ही मधल्या शिखरांप्रमाणेच शूरसेनक व वरच्या भागात पंजे उगारलेल्या कीर्तिमुखांनी युक्त आहे. मंडावेरावर द्रविड जंघांप्रमाणे प्रवेश आणि निर्गमावर स्तंभयुक्त तोरण असलेली शिखरे आहेत. यावरून असे लक्षात येईल की नागर देवालयांप्रमाणे प्रवेश निर्गमयुक्त पीठ मंडोवर आणि फालनायुक्त शिखराप्रमाणे प्रवेश आणि निर्गम हे थेट कळसापर्यंत गेलेले असतात तर द्रविड देवालयाप्रमाणे शिखरावरील मजले हे स्पष्टपणाने पिरॅमिडप्रमाणे निमुळते होत गेलेले दिसतात आणि अशा रितीने हे देवालय नागर आणि द्रविड प्रासादांचा एक उत्कृष्ट मिलाफ असल्याचे दिसून येते.

वरील नागर, भूमिज, वेसर या प्रासाद-जातींचा तसेच द्राविड विमानांचा जो आढावा घेतला, त्यावरून गुप्तोत्तर काळात हे प्रासाद-विमानांचे प्रकार त्या-त्या प्रदेशात उत्तरोत्तर काळात विकसित झाले. सर्वसामान्यपणे असे म्हटले जाते, की शुष्कसंधीची दगडात बांधलेली मंदिरे ही मुळात लाकडात किंवा लाकडात आणि विटांत बांधलेल्या देवालयांच्या संस्कारित अशा आवृत्ती होत. त्यातून असेही सुचवायचे असते की, भूमिज आणि वेसर या प्रासाद जातींची प्रारूपे लाकूड आणि विटा या माध्यमांतून देवळे बांधत असताना केलेल्या प्रयोगांतून निष्पन्न झालेली आहेत. त्यावरून असेही म्हणता येईल की बांधलेली देवालये ही तांत्रिकदृष्ट्या अधिकाधिक परिपूर्ण आणि देखाव्याच्या दृष्टीने अधिकाधिक आकर्षक करण्याचा प्रयास प्रत्येक पिढीतील स्थपतींनी केल्यानंतरच त्या-त्या प्रदेशांतील देवालयांना त्यांचे आगळेवेगळे असे रूपडे प्राप्त झालेले असणार. नागरातील लतिन जातींपासून शिखर-शेखरी प्रासाद व त्यांतील श्रेष्ठ असा मेरुमंडोवर प्रासाद कसा झाला असावा, याविषयीचा कयास वर मांडलेला आहेच. त्यात आपण असे बघितले की, जेव्हा लतिन प्रासाद हा अधिकाधिक उत्तुंग कसा होत जाईल, या विचारांबरोबरच त्याला अधिक स्थिर व भक्कम करण्यासाठीच त्रिरथापासून ते नवरथविन्यास करण्यापर्यंत स्थपतींची मजल गेली. शिखर निमुळते होत गेले असल्यामुळे निर्माण झालेल्या रेखा व फालनावर म्हणजेच प्रवेश आणि निर्गमाच्या ठिकाणी शृंङ्गहाराची, रथिका, कूट, तिलक यांची योजना केल्यामुळे अनेक निर्गमांच्या तांत्रिक योजनेचा शिखर अधिक मनोहर करण्यासाठी स्थपतींना उपयोग झाला असावा. अशीच काहीशी प्रक्रिया भूमिज आणि वेसर या प्रकारच्या प्रासादांच्या विकासात झाली असावी असे दिसते. गुप्तोत्तर काळामध्ये विविध प्रादेशिक शैली कशा विकसित झाल्या असाव्यात, याविषयीची ही एक उपपत्ती आहे, असेच म्हणावे लागेल.

गुप्तोत्तर काळात परंपरागत सोमवंशी व इक्ष्वाकू किंवा सूर्यवंशी क्षत्रिय कुळांच्या व्यतिरिक्त अग्निकुळांची परंपरा सांगणारी नवी क्षत्रिय कुळे पश्चिम भारतात उदयाला आली याविषयी शंका नाही. इ.स.च्या सहाव्या शतकानंतर हूण, गुर्जर इत्यादी मध्य आशियातील वीरांच्या आक्रमक टोळ्या भारतात आल्या. त्यांनी क्षत्रिय वर्णात आपले स्थान पक्के केले व पारंपरिक राज्याभिषेकानंतर ते प्रतिष्ठित भारतीय समाजाचा भाग बनले. गुप्तकाळातील समृद्ध जीवनाचा भाग

बनल्यानंतर भारतातील अनेक प्रदेशांत लागवडीखालच्या जमिनीचे क्षेत्र वाढले. या क्षेत्रातील वन्य जमातीतील काही शासक कुळेही राजवंशांत गणली जाऊ लागली. आणि अशा रितीने राज्यांची भौगोलिक समीकरणेही बदलली. भौगोलिक घटकांचा आधुनिक उत्तर भारतीय व दक्षिणेतील भाषांजडणघडणीत प्रभाव पडला असावा यात शंका नाही. या भाषांच्या बरोबरच ब्राह्मी लिपीतून भारतातील प्रादेशिक लिप्यांचाही विकास आणि वेगळी वैशिष्ट्येही निर्माण झाली असावीत. सुप्रसिद्ध संशोधक आणि ऑक्स्फर्ड युनिव्हर्सिटीतील मानद प्राध्यापक दिलीप चक्रवर्ती यांनी भारतीय इतिहासातील भौगोलिक घटकांची नेमकी भूमिका काय, याचा नव्याने आढावा घेतला आहे. त्यांच्या मते भौगोलिक घटकांबरोबरच भारतातील आर्थिक परिस्थिती, तिला बळकट करण्यासाठी आवश्यक असलेले दळणवळणाचे मार्ग आणि इतर घटक यांचाही विचार करणे आवश्यक आहे. त्यांच्या मते गंगा-यमुना दुआबातील प्रमुख सत्ता दुर्बल झाल्यानंतर दक्खनमधील सत्तांनी नेहमीच उचल खाल्ली आहे. आपल्या मताच्या पुष्ट्यर्थ त्यांनी मौर्य सम्राटांची, गुप्तांची व मोगलांची सत्ता दुर्बल झाल्यानंतर उचल खाल्लेल्या सातवाहन, वाकाटक, चालुक्य आणि मराठे यांची उदाहरणे दिली आहेत. त्यांच्या मते भौगोलिक घटकांच्या बरोबरच आर्थिक आणि इतर घटकसुद्धा सत्तांच्या उत्कर्ष-अपकर्षासाठी तितकेच कारणीभूत ठरतात.

कलेतिहासाच्या संदर्भात भौगोलिक घटकांचा कितपत प्रभाव पडतो या मुद्द्यापुरते बोलावयाचे झाल्यास सुब्बाराव यांनी पुरस्कारलेली व पूर्वसूरींनी मांडलेली भारतातील दोन प्रकारच्या भौगोलिक प्रदेशांची कल्पना अजूनही तर्काधिष्ठित व योग्य आहे असे वाटते. या प्रमेयाप्रमाणे दोन प्रकारचे भौगोलिक प्रदेश भारतात आहेत. १) केंद्रोत्सारी (सेंट्रिफ्युगल) व २) केंद्रगामी (सेंट्रिपेटल). पहिल्या प्रकारच्या प्रदेशातून चहूबाजूला सांस्कृतिक प्रेरणा दिल्या जातात तर दुसऱ्या प्रकारच्या म्हणजे केंद्रगामी प्रकारात त्या आजूबाजूच्या प्रदेशातून येतात. महाराष्ट्रापुरते किंवा अधिक व्यापक प्रमाणावर दख्खनपुरते बोलावयाचे झाल्यास हा प्रदेश केंद्रगामी असून त्यांकडे दक्षिणेतून आणि उत्तरेतून अशा दोन्ही प्रदेशांतून सांस्कृतिक प्रेरणा येतात. दख्खनचा अरबी समुद्रापासून बंगालच्या उपसागरापर्यंतचा विस्तार लक्षात घेता, दक्षिणापथाला म्हणजे दक्खनला उत्तर आणि दक्षिणेतील सांस्कृतिक मार्गिका (कॉरिडॉर) असेही म्हणतात. द्राविडभाषिक आणि औदीच्यभाषिक अशा दोन्ही संस्कृति-परंपरांचा संगम झालेला आढळून येतो. कलेतिहासापुरते बोलावयाचे झाल्यास प्रासादजाती आणि शिल्पशैलींचे उदाहरण देता येईल. इ.स. पूर्वीच्या पहिल्या शतकापासून ते तिसऱ्या शतकाच्या सुरुवातीपर्यंतच्या काळात शुंग व गांधार- कुशाण कलेच्या प्रेरणा दख्खनमध्ये आल्या आणि पवनी, भाजे आणि कार्ले येथील शिल्पांच्या माध्यमांतून दख्खनच्या कलेचा वेगळाच आविष्कार दिसून आला. वाकाटक, त्रैकूटक व कलचुरी यांच्या शिल्पांच्या बाबतीत हीच वस्तुस्थिती प्रकर्षाने जाणवते. गुप्त आणि गांधारकला तशीच अमरावती, नागार्जुनकोंडा येथील कला यांच्या प्रभावातून नन्दिवर्धन, अजिंठा व वेरुळ येथील शिल्पे या सर्वांशी साम्य दाखवत असतानासुद्धा स्वत:ची म्हणता येतील अशी वैशिष्ट्येसुद्धा प्रकट करतात.

देवालय स्थापत्याच्या बाबतीत अशाच प्रकारे दक्षिण आणि उत्तर येथील स्थापत्य-परंपरांचा मिलाफ झालेला आढळून येतो. गुप्तोत्तर काळात लतिन आणि शिखर-शेखरी या प्रासाद-जातींचा सहाव्या शतकापासून ते मध्ययुगापर्यंत शैलीदृष्ट्या विकास झालेला आढळून येतो. या सहा-सातशे वर्षांच्या काळात कलिंगामध्ये एक प्रादेशिक अशी वेगळी शैली नागरशैलीचा भाग म्हणूनच उदयास आली. काश्मीर, उत्तरांचल या प्रदेशातसुद्धा नागर प्रासादांचे काही वेगळे बारकावे लक्षात येतात. तर मारु-गुर्जर आणि चंदेल्ल हे आपल्या वेगळेपणाचा ठसा स्पष्टपणाने दाखवून देतात. दक्षिणेत कांची आणि महाबलीपुरम् येथील सहा रथ आणि समुद्राच्या वेलातीरावरील मंदिरे तसेच बदामी चालुक्यांची द्राविड मंदिरे ही त्या त्या शैलीची ठळक उदाहरणे म्हणून सांगता येतील. सहाव्या शतकापासून ते विजयनगर-काळापर्यंत व त्यानंतरही द्राविड मंदिर स्थापत्याचा सलग विकास होत अव्याहतपणे असल्याचे दिसून

येते. इ.स. ८वे ते १२वे शतक हा भारतीय इतिहासातील एक मोठा राजकीय अस्थिरतेचा काळ होता. राष्ट्रकूट व त्यानंतर कल्याणी-चालुक्य आणि देवगिरीचे यादव व वारंगळचे काकतीय आणि द्वारसमुद्रचे होयसळ यांनी आपल्या अधिसत्ता निर्माण केल्या. त्या निर्माण करीत असताना भोवतालच्या प्रदेशांवर आक्रमणे केली, एकमेकांवर कुरघोड्या करण्याचा प्रयत्न केला. त्यातून मोठेच सांस्कृतिक मंथन झालेले असणार. राजकीय संघर्ष होत असला तरी निरनिराळ्या हस्तकला आणि अभिजात कला यांचीही देवाणघेवाण झालेली असणार. गुजरात-राजस्थानमधील बाराव्या-तेराव्या शतकातील मंदिरांची विताने अत्यंत आकर्षक आहेत, असे लक्षात येते. कर्नाटकातील कल्याणी, चालुक्य आणि होयसळ यांच्या अमलाखालील प्रदेशातील मंदिरांत दिसणारी विताने मारु-गुर्जर स्थापत्यातील वितानांशी फार जवळचे साम्य दाखवतात. डेक्कन महाविद्यालयामधील भाषा-विज्ञानाच्या एका अभ्यासकाने मध्ययुगात गुजरातमधून कांचीला स्थलांतरित झालेल्या रेशमी साडी विणणाऱ्या कोष्ट्यांच्या भाषेचा अभ्यास केला आहे. संशोधक रामसुब्रह्मण्यम् यांच्या मते या मिश्रभाषेत गुजराती आणि तमिळ शब्दसंहितेबरोबरच दोन्ही भाषांतील व्याकरणाचा अपूर्व मिलाफ झाला आहे. तसाच काहीसा प्रकार देवालय स्थापत्यात झालेला दिसतो. नागर आणि द्राविड स्थापत्याच्या मिलाफातून भूमिज आणि वेसर जातीचे प्रासाद अनुक्रमे परमार, यादव आणि सोलंकी यांच्या अमलाखालील प्रदेशांत आणि होयसळ, कल्याणी-चालुक्य व देवगिरीचे यादव यांच्या अमलाखालील प्रदेशांत उदयास आले आणि विकसित झाले, हे आपण याआधी पाहिले आहेच.

**- डॉ. ए.पी. जामखेडकर**

# प्रस्तावना

## साहित्य आणि भाषाविज्ञान

आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण कशी झाली हे समजून घ्यायचे असेल, तर महाराष्ट्राचा इतिहास, भूगोल, व्यापारउदीम, प्रशासन, दळणवळण, संरक्षण, साहित्य, स्थापत्य, पुरातत्त्व इत्यादी अनेक विषयांचा सखोल अभ्यास करणे आवश्यक आहे. याच हेतूने प्रेरित होऊन साप्ताहिक विवेकने 'शिल्पकार चरित्रकोश' या व्यापक, उपयुक्त व महत्त्वाकांक्षी प्रकल्पाची जबाबदारी अंगीकारली. यासाठी त्यांनी दोनशे वर्षांचा कालखंड निवडला, हे योग्यच म्हणावे लागेल. विज्ञान व तंत्रज्ञानामुळे झालेली अभूतपूर्व प्रगती, तिच्या रेट्यामुळे उद्भवणारे दुष्परिणाम आणि त्यांना न जुमानता होत असलेला सांस्कृतिक व साहित्यिक उत्कर्ष, त्या उत्कर्षाचे शिल्पकार असणारे अभ्यासक, त्यांचे योगदान या सर्व गोष्टींचा आढावा प्राच्यविद्येच्या प्रस्तावनेत घेण्याचा हा माझा प्रामाणिक प्रयत्न आहे. प्राच्यविद्येची व्याप्ती प्रचंड आहे. त्यामुळे या क्षेत्रास योगदान देणारे हातही अनेक आहेत. यांची एक विस्तृत यादी संपादकांनी केली, तीत कालपरत्वे अनेकांची नावे जोडली गेली तरीही ही यादी परिपूर्ण आहे असा दावा करणे हास्यास्पद ठरेल. अनवधानाने काहींची नावे यात आली नसली तरी त्यांचा अनुल्लेख करणे हा उद्देश नाही, याकरता संपादकांची संसाधने कमी पडली असे समजावे. यांच्यावर एकहाती भाष्य करणे म्हणजे शिवधनुष्य पेलणेच म्हणावे लागेल; तरीही प्राच्यविद्येच्या प्रेमाने मी हे चापल करू धजावत आहे.

**प्राच्यविद्या – व्याख्या, लक्षण व स्पष्टीकरण : –**

प्राचीचा अर्थ पूर्व दिशा. प्राच्य म्हणजे पौर्वात्य, पूर्वेकडील. Oriental Studies हा शब्द सापेक्ष आहे. यात चीन, जपान, इजिप्त, मध्य आशिया, दक्षिण आशिया व भारत यांचा समावेश होतो. विषयाच्या मर्यादेनुसार आपण केवळ भारतीय विद्यांचा - Indology चा विचार येथे करणार आहोत. दुर्दैवाने Indology हा शब्द कोणत्याही शब्दकोशात आढळत नाही. यालाच समानार्थी शब्द Indic Studies हाही शब्दकोशात आढळत नाही. दर सहा महिन्यांनी ज्याची नवी सुधारित आवृत्ती प्रसिद्ध होते त्या Oxford शब्दकोशात हे दोन्ही शब्द नाहीत. समृद्ध भारतीय विद्येविषयी असणारी ही अनास्था म्हणावयाची की बुद्धिपूर्वक केलेले दुर्लक्ष, हे समजण्यास मार्ग नाही. असो. कोशकारांची अनास्था असेल कदाचित, मात्र पाश्चात्त्यांमुळेच

प्राच्यविद्यांचा प्रचार झाला हे निर्विवाद! अठराव्या शतकाच्या अखेरीस १७८४मध्ये कलकत्त्याच्या रॉयल एशियाटिक सोसायटीची स्थापना झाली व आशियाई देशांविषयी जगात विचार सुरू झाला. याच काळात विविध संस्कृत ग्रंथांचे इंग्लिशमध्ये अनुवाद झाले व भगवद्गीता (१७८५), हितोपदेश (१७८७), शाकुंतल (१७८९), ऋतुसंहार (१७९२) आणि मनुस्मृती (१७९४) या ग्रंथांच्या माध्यमातून गूढ व समृद्ध भारतीय संस्कृतीचे दालन अभ्यासकांसाठी खुले झाले. पाश्चात्त्यांसाठी ही अलिबाबाची गुहा होती. ऐश्वर्यसंपन्न व अनाघ्रात; तर एतद्देशीयांसाठी स्वत्वाची नव्याने झालेली जाणीव होती, आत्मगौरवाचा खजिना होता! प्राच्य या शब्दातच 'प्राचीन' शब्दाचा अंश आहे. म्हणून प्राचीन भारतात असणाऱ्या विविध विद्या असाही त्याचा अर्थ होऊ शकतो. Egyptologyच्या व्याख्येनुसार Indology ह्या शब्दाच्या अर्थातमध्ये प्राचीन भारताचा इतिहास, साहित्य, धर्म व भाषा यांचा समावेश होतो. प्राचीन भारतात असणाऱ्या विविध विद्या हा अर्थ स्वीकारल्यास त्यात साहित्य, संस्कृत-प्राकृतादी भाषा, भाषाविज्ञान, पुरातत्त्व, शिलालेख ताम्रपटादी उत्कीर्ण साहित्य, हस्तलिखितशास्त्र, नाणकशास्त्र या सर्वांचा अंतर्भाव होतो. या विषयांची विविधता व व्याप्ती पाहता प्राच्यविद्येचे दोन भाग सहज होतात. पहिला साहित्य तथा भाषाविषयक व दुसरा पुरातत्त्व अभिलेखविषयक.

**भाग पहिला – साहित्य :-**

शब्द व अर्थ यांच्या साहचर्याने सहृदयानंदकारी अर्थाची जाणीव करून देते ते साहित्य. शब्द व अर्थ यांचे ऐक्य, त्यांच्यातील अविनाभाव रघुवंशाच्या प्रथम श्लोकात कालिदासाने वर्णन केला आहे. यालाच वाङ्मय असेही म्हणतात. प्राचीन भारतात साहित्यात किती विविधता होती हे छांदोग्योपनिषदातील नारद, सनत्कुमारसंवादातून स्पष्ट होते. (छां. ७.२) नारदाने चार वेद, इतिहास-पुराणे हा पाचवा वेद, श्राद्ध, गणित (राशी), वाकोवाक्य (Logic, तर्कशास्त्र), देवविद्या, भूतविद्या (Physics), क्षत्रविद्या (युद्धशास्त्र), एकायन (Ethics–Politics) (राज्यशास्त्र व नीतिशास्त्र), नक्षत्रविद्या (खगोलविद्या), सर्पविद्या, देवजनविद्या (गंधर्वाप्सरांची नृत्यगायनादी विद्या) या सर्व विद्यांचे अध्ययन केले असा येथे उल्लेख आहे. मात्र या सर्व भौतिकविद्या असल्याने नारद ब्रह्मविद्या जाणण्याच्या अपेक्षेने आत्मज्ञानी सनत्कुमाराकडे गेले असे उपनिषदात सांगितले आहे. सामान्यपणे वैदिक वाङ्मयाच्या अभ्यासकाला दशग्रंथी म्हणतात. चार वेद व सहा वेदांगे मिळून हे दहा ग्रंथ होतात. उपरोक्त दहा ग्रंथांमध्ये आन्वीक्षिकी (तर्कशास्त्र), वार्ता (व्यापारउदीम), दण्डनीती व इतिहासपुराणे यांचा समावेश केल्यास चौदा विद्या होतात. याखेरीज नृत्य, गीत, वादनादी कला वात्स्यायनाने सांगितल्या आहेत, त्यांचाही अंतर्भाव साहित्यात होतो. कालानुक्रम पाहता यातील प्राचीनतम अशा वैदिक साहित्यापासून या प्रस्तावनेला सुरुवात करणे उचित ठरेल.

**वैदिक साहित्य :-**

अस्तित्व असणे, जाणणे, प्राप्त करणे, विमर्श करणे अशा अनेकार्थी विद् धातूपासून 'वेद' शब्दाची व्युत्पत्ती झाली आहे. वेद म्हणजे परब्रह्माचा नि:श्वास (शतपथ ब्रा. ४.५.४.१०), प्रजापतीच्या मुखावरील केस (तैत्तिरीय ब्रा. ३.३९.१), त्याची उत्पत्ती विश्वयज्ञातून झाली (पुरुषसूक्त ऋ. १०.९०) एका अनादी स्तंभापासून (अथर्व १०.७ .१०), कालापासून (अथर्व १९.५४.३) झाली असे विविध उल्लेख आढळतात. वेदांचे कर्तृत्व नव्हे, तर द्रष्टृत्व अतींद्रिय गोष्टी जाणणाऱ्या ऋषींकडे जाते. इष्टप्राप्ती तसेच अनिष्ट परिहाराचा उपाय सांगणारा तो वेदग्रंथ या सायणाचार्यांच्या व्याख्येनुसार ऐहिक व पारलौकिक सुखाची प्राप्ती करून देणारे ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद हे चार ग्रंथ वेदसंज्ञ ठरतात. परंपरेनुसार वेद अपौरुषेय, नित्य व प्रमाणभूत आहेत. वेदांगांसहित वेदांचे अध्ययन करणे हा ब्राह्मणाचा स्वाभाविक धर्म आहे, स्वाध्याय आहे असे महाभाष्यकार पतंजली म्हणतो. किंबहुना 'ब्रह्म म्हणजे वेद जाणतो तोच ब्राह्मण' अशी ब्राह्मण या शब्दाची जातिवाचक नव्हे, तर क्रियावाचक व्याख्या भारतात प्रचलित होती.

वेदाभ्यासाची विविध अंगे आहेत. उदा. वैदिक दैवतशास्त्र, वैदिक व्याकरण, वैदिक छंद, गणित, ज्योतिष, यज्ञयागादी अंश, वैदिक शब्दांचे निर्वचन, त्या अनुषंगाने होणारा वैदिक भाषेचा अभ्यास, श्रौत, गृह्य, धर्म, शुल्बसूत्रे व त्यांचा अभ्यास, वैदिक वाङ्मयाचे विविध टप्पे, उदा. ब्राह्मणे, आरण्यके व उपनिषदे यांचे अध्ययन या सर्व गोष्टी वेदाध्ययनात समाविष्ट होतात. वेदांचे महत्त्व वादातीत आहे. धर्ममूलम् हे मनुवचन प्रसिद्धच आहे. कृष्ण द्वैपायनांनी मंत्रांप्रमाणे, ऋषींप्रमाणे, देवतांप्रमाणे संपूर्ण वेदराशीची रचना केली तेव्हा चार वेदसंहितांची निर्मिती झाली. 'विव्यास यस्मात् स वेदव्यास इतीरितः। तपसः ब्रह्मचर्येण व्यस्य वेदान् महामतिः' असे महाभारतात म्हटले आहे.

**ऋग्वेद :** चारी वेदांत अग्रगण्य, १० मंडलांत अथवा ८५ अनुवाकांत विभक्त, १०,०००हून अधिक ऋचांचा ऋग्वेद हा ग्रंथ होय! स्तूयन्ते देवा अनया इति ऋक् या व्याख्येनुसार देवताप्रीत्यर्थ म्हटल्या जाणाऱ्या ऋचांचा वेद हा ऋग्वेद आहे. प्राच्यविद्येच्या अभ्यासकांमध्ये, विशेषतः वेदाभ्यासकांमध्ये प्रामुख्याने ऋग्वेदाचा सखोल व सांगोपांग अभ्यास करण्याची प्रवृत्ती दिसून येते. प्रा. ह.दा. वेलणकर, डॉ. रा.ना. दांडेकर, डॉ. स.अं. डांगे, प्रा. सुरेश उपाध्याय यांसारख्या विद्वानांच्या कृतींतून वैदिक सूक्तांच्या अभ्यासाच्या नव्या दिशा वाचकाला मिळतात. वैदिक देवतांचा पुराकथीय (Mythological) दृष्टीकोनातून अभ्यास करणे व इजिप्त, ग्रीस, रोम, असीरिया, पर्शियासारख्या प्राचीन संस्कृतीतील देवतांशी त्यांची तुलना करणे हे नवेच दालन या वेदविद्वानांनी सामान्यांसाठी उघडले व माहितीचा अद्‌भुत खजिना वाचकांसमोर आला. तौलनिक व विश्लेषणात्मक (Comparative and analytical) दृष्टीची ही देणगी नव्या पिढीला समृद्ध करीत आहे यात शंकाच नाही. या विद्वानांमध्ये परंपरानिष्ठ तरीही आधुनिक विचारसरणीचे विद्वान आहेत, तसेच परंपरा न जुमानता टीकात्मक लेखन करणारे वेदाभ्यासकही आहेत. डॉ. त्रि.ना. धर्माधिकारी यांनी वैदिक कर्मकांडाचे सखोल अध्ययन करून वैदिक संशोधन मंडळात (पुणे) भरीव कामगिरी केली. यज्ञीय वस्तू, विविध प्रकारची अग्निकुंडे (चिति) यांच्या प्रतिकृती करवून एक स्थायी स्वरूपाचे प्रदर्शन मांडले, जेणेकरून आधुनिक पिढीला यज्ञायुधांची कल्पना यावी व वैदिक कर्मकांडाविषयी आस्था निर्माण व्हावी. हे प्रदर्शन आजही सर्वांसाठी खुले आहे. पारशी धर्मग्रंथातील विधींचे उल्लेख, साधनसामग्री यांचेही निर्देश येथे आढळतात. भाषाशास्त्रीय, दैवतशास्त्रीय तसेच कर्मकांडविषयक (यज्ञीय) या निकषांवर वेद आणि अवेस्ता यांमधील साम्यस्थळे शोधता येतात. के.आर. कामा, कांगा, फरिबोर्झ नरीमन यांसारख्या पारशी विद्वानांनी परिश्रमपूर्वक ही स्थळे सामान्यांस अवगत करून दिली. मॅक्स म्यूलर, ग्रिफिथ यासारख्या पाश्चात्त्यांनी वेदांवरील त्यांच्या पुस्तकांमध्ये या गोष्टी नमूद केल्या. दोन प्राचीन संस्कृतींचा मिलाफ झाल्याने नवीन माहितीबरोबरच बंधुभावही नव्याने वृद्धिंगत झाला, व अशा प्रकारच्या अध्ययनाला याचे श्रेय जाते. इंग्लिश व इतर युरोपीय भाषांच्या अध्ययनामुळे यासारख्या संशोधनाला एक जागतिक व तौलनिक परिमाण लाभले, ज्याचा लाभ अद्यतनीय विद्वानांनाही मिळतो आहे.

वेदातील देवता बहुतांशी निसर्गदेवता आहेत. याखेरीज यज्ञासंबंधीची द्रव्ये, सोमसवनाशी संबंधित वस्तू यांचाही देवता म्हणून उल्लेख आढळतो. अनेकविध देवतांचा परामर्श घेत घेत, पर्यायाने एकेका देवतेला अनन्यसाधारण महत्त्व देत एक देवतेचा उच्चार ऋग्वेदात आढळतो. उपनिषदात येणारे एकमेवाद्वितीय ब्रह्म अशा प्रकारे विकसित झालेल्या एकदेवतावादातून स्फुरलेले आहे. वैदिकांचा सार्वभौम सम्राट वरुण म्हणजेच अवेस्तामधील अहुर मझ्द. परलोक (पितृलोक) स्थापन करणारा यम व त्याची जुळी बहीण यमी अवेस्तात यिम व यिमेह नावांनी उल्लेखिले आहेत. सोम पवमान देवता व वनस्पती या दोन्हीं रूपांत हओम म्हणून पारशी यज्ञविधीचा अविभाज्य घटक आहे, ऋत ही वैश्विक प्रणाली अश नावाने पारशी लोकांनी स्वीकारली इ. माहिती रंजक आहेच, उद्‌बोधकही आहे. मित्र (मिथ्र), सरस्वती (अनाहिता), वृत्रहा (वेरेथ्रहन), पितर (फ्रवशी), नासत्या, अपां नपात् यासारख्या देवतांची प्राचीनता पाहण्यासाठीही वेद व अवेस्ता या दोन धर्मग्रंथांचा तौलनिक अभ्यास करणे आवश्यक ठरते. म.अ. मेहेंदळे यांनी अवेस्तातील यस्नांचे

मराठी भाषांतर करून झरतुष्ट्राच्या गाथा एतद्देशीयांना सहज उपलब्ध केल्या, हे त्यांचे मोठे योगदान म्हणावे लागेल. या ग्रंथांच्या तुलनेतून निघणाऱ्या निष्कर्षांवर, यातील राजेलोकांच्या नावावरून निघणाऱ्या साधर्म्यावर वेदांचा काळ ठरवण्याचे दुर्घट कार्यही झाले आहे. वेदांत वारंवार उल्लेखिली जाणारी सरस्वती नदी, तिचा आटत जाणारा लुप्तप्राय झालेला प्रवाह, वैदिक सूक्तांमध्ये येणारे ग्रह, तारे, नक्षत्रेचे संदर्भ, त्यांची विवक्षित स्थाने, ग्रहणाचे उल्लेख, काही देवतांची विशेषणे या सर्वांच्या आधाराने लोकमान्य टिळकांनी वेदांचे स्थान व काळ ठरवण्याचा प्रयत्न केला. अलीकडील काळात वैज्ञानिक – विशेषत: आण्विक प्रगतीमुळे उपलब्ध झालेल्या अत्याधुनिक यंत्रसामुग्रीमुळे सरस्वती शोध प्रकल्पासारखा एक प्रचंड महत्त्वाकांक्षी प्रकल्प भारत सरकारने घेतला. लिपिकार वाकणकर हे त्याचे अध्वर्यू होते. चेन्नईस्थित श्रीनिवास कल्याणरामन यांनी तनमनधनाने या प्रकल्पासाठी स्वतःला वाहून घेतले व फलस्वरूप सात खंडांचा ग्रंथराज सरस्वतीवर निर्माण केला. मॅक्स म्यूलर व इतर पाश्चात्त्य विद्वानांनी ‘आर्य हे भारताबाहेरील प्रदेशातून येथे आले व स्थानिक लोकांना पराभूत करून आर्यावर्तात स्थिरावले हा जो निष्कष एकोणिसाव्या शतकात रूढ केला होता, त्याला सरस्वती प्रकल्पामुळे धक्का बसला व सिंधू-सरस्वती हीच आर्यांची संस्कृती व भारतीय संस्कृती यावर शिक्कामोर्तब झाले. हीसुद्धा एक मोठीच उपलब्धी म्हणावी लागेल. कारण NASA व BBC यांनाही याची दाखल घ्यावी लागली. याच पठडीत श्रीकांत तलगेरी या संशोधकाने अविश्रांत परिश्रम घेऊन तीन पुस्तकांची एक शृंखला सादर केली व आर्य-द्रविड, आर्य-आर्येतर यांच्यातील दरी कमी केली. यायोगे भारतीयत्वाचा सन्मानही वाढवला.

वेदार्थनिर्णयासाठी यास्काचार्यांपासून आजपर्यंत अनेक संस्कृततज्ज्ञ, भाषाशास्त्रज्ञ, पुरातत्त्ववेत्ते झटत आहेत. त्यात अलीकडील काळात वैज्ञानिकांचीही भर पडली आहे. भौतिकशास्त्र, चिकित्साशास्त्र, संगणकप्रणाली यातील विज्ञाननिष्ठ अभ्यासक आपापल्या परीने भारतीय परंपरेच्या अध्ययनात आपले योगदान देत आहेत. गतानुगतिक न होता बहुआयामी वेदांचे व अवेस्ताचे साम्य आणि अंतरंग समाजशास्त्रीय व ऐतिहासिक निकषांवर तपासून पाहण्याचा त्यांचा प्रयत्न निश्चितच स्तुत्य आहे. वैदिक साहित्याचा अभ्यास करताना त्यातील दैवतशास्त्र, तत्त्वज्ञान, काव्यसौंदर्य, वेदांचे भाष्यकार इत्यादी विषय अभ्यासकांना खुणावतात. एखाद्या मंडलाचे भाषाशास्त्रीय चिकित्सक अध्ययन, छंदःशास्त्रीय संशोधन, देवतांचा तौलनिक अभ्यास या विषयांवर निबंध व प्रबंध सादर केले जातात. रा.ना. दांडेकरांचे देवतांचे अभिनव दर्शन आणि इतर लेख याबाबतीत पथप्रदर्शक ठरतात. वेदांमध्ये ऋग्वेदावर सर्वाधिक संशोधन झाले आहे. ऋग्वेदाचा पदपाठ, त्याची वैशिष्ट्ये, त्यातील तत्त्वचिंतन, त्याचे प्राचीन तसेच अर्वाचीन टीकाकार, तत्कालीन समाजजीवन, राजनीती, सूक्तांमधून व्यक्त होणारी भक्ती, काव्यसौंदर्य, सूक्तमीमांसा असे अनेकांगी संशोधन आजही विविध विद्यापीठांतून होत आहे. वैदिक ग्रंथसूचीचे प्रसिद्ध झालेले खंड याची साक्ष देतात.

**यजुर्वेद :** ज्ञान, कर्म व उपासना या मनुष्यजीवनाच्या विकासाच्या तीन श्रेणी आहेत. यातील कम हे यजुर्वेदाचे स्थायीरूप आहे. यज्+उस् यापासून तयार झालेला यजुष् हा शब्द यज्ञीय प्रार्थना वा मंत्र या अर्थी वापरला जातो. हा प्रामुख्याने गद्यात्मक आहे. ‘अनियताक्षरावसानो यजुः’ असे म्हटले जाते. वैशंपायन व त्याचा शिष्य याज्ञवल्क्य हे दोघे या वेदाचे प्रणेते! यज्ञप्रधान वेद असल्यामुळे याज्ञिकी परंपरेतील अनेकांनी यावरील संशोधन प्रसिद्ध केले आहे. यात काही तात्त्विक, मौलिक निबंध व पुस्तकांचा जसा समावेश आहे. त्याचप्रमाणे यज्ञविधींबद्दलचे विवेचन, मंत्र म्हणण्याच्या पद्धती, कर्मकांडातील तपशील या बाबींवरील अभ्यासही समाविष्ट आहे. चिं.ग काशीकरांचा श्रौतकोश, त्याचे दांडेकरांनी केलेले इग्लिश भाषांतर (वैदिक संशोधन मंडळ, पुणे) त्रिं. ना. धर्माधिकारींचे या प्रांतातील योगदान जसे प्रमाणभूत आहे, तसेच रवींद्र मुळ्ये, (माध्यंदिन शाखा) सेलूकर महाराज यांची कृतिसत्रेही महत्त्वाची मानली जातात. यजुर्वेदाच्या माध्यंदिन शाखेची वाजसनेय संहिता महाराष्ट्रात प्रचलित आहे.

यज्ञातील ब्रह्म (मंत्र) व त्या अनुषंगाने येणारा अर्थवाद ही श्रौतपरंपरेतील अविभाज्य अंगे आहेत. एखादा यज्ञविधी किंवा मंत्र यांचे महत्त्व प्रतिपादन करण्यासाठी व त्याची पद्धती सांगण्यासाठी निंदापर अथवा प्रशंसापर वर्णन केले असते, त्याला अर्थवाद असे म्हणतात. सामान्य भाषेत आपण याला फलश्रुती असे म्हणतो. यातून पुराकथांचाही उगम झालेला दिसतो. यावर सखोल आणि तुलनात्मक संशोधन करणारे अभ्यासक म्हणजे संस्कृत क्षेत्रातील दिग्गज पंडित दांडेकर, वेलणकर, राहुरकर आणि डांगे पतिपत्नी. महाराष्ट्राला या विद्वानांमुळे तौलनिक पुराकथाशास्त्र/ मिथकशास्त्र या नवीन ज्ञानशाखेची ओळख झाली. यजुर्वेदाचा रुद्राध्याय, त्याच्या विविध संहिता, शाखा, प्रतिशाख्यग्रांथ, उच्चारणवैशिष्ट्ये ज्ञसंस्थेचा झालेला विकास, त्याची अविच्छिन्न परंपरा आणि या ओघात कर्मकांडाला मिळालेले अतिशय महत्त्व या सर्वच गोष्टी अभ्यासकांसाठी संशोधनाची नवी दालने उघडतात यात काही शंका नाही.

**सामवेद :** 'सा च अमश्चेति तत् साम्नः सामत्वम्' अशी सामाची व्याख्या बृहदारण्यकात येते. सा म्हणजे अक्षरसमूहयुक्त ऋग्रूपी वाणी आणि अम् म्हणजे अक्षरव्यतिरिक्त निव्वळ स्वर, या दोहोंचा संगम म्हणजे साम होय. साम याचा याचा अर्थ विधीशी समान अशी लयबद्धता असाही आहे. 'वेदानांसामवेदोऽस्मि' असा या वेदाचा गौरव भगवद्गीतेत केला आहे. हा वेद ऋग्वेदाधारित आहे, परंतु सांगीतिक आहे. यात चार आर्चिक ग्रंथ आहेत – छंद, आरण्यक, महानाम्न आणि उत्तर. शिवाय चार प्रकारची गायने आहेत – गेय, आरण्य, ऊह आणि याव्यतिरिक्त चार परशिष्टे आहेत – महानाम्न, भारुंड, तवश्यावीय आणि गायत्र. याच्या शाखा होत्या असे महाभाष्यात म्हटले आहे. गायन हाच सामवेदाचा गाभा असल्याने, व्यक्तीनुसार शैलीत भिन्नता येणे अनिवार्य ठरते. शस्त्र (शंस–स्तुतीकरण) स्तोम, स्तोभ (लयबद्धगान) असे त्याचे प्रकार आहेत. त्रिष्टुभ्, अनुष्टुभ् ही वैदिक छंदांची नावेही स्तोभापासूनच आली आहेत. उद्गाता आपल्या हातांच्या किंवा बोटांच्या लयबद्ध हालचालींची साथ देत स्तोभात रंग भरीत. पुराणात हाहा हूहू अशी गंधर्वांची नावे येतात त्याचे मूळ हेच असावे. दुर्दैवाने या वेदावर म्हणावे तसे संशोधन झालेले नाही. मात्र या वेदाची ब्राह्मणे व उपनिषदे यांवर अध्ययन झाले आहे.

**अथर्ववेद :** अनेक ग्रंथांत अथर्ववेदाचा अंतर्भाव वेदांत केलेला दिसत नाही. काळी जादू, जारणमारणादी अनिष्ट प्रथा तसेच वशीकरणादी शिष्टसंमत नसलेल्या विषयामुळे अथर्ववेद विद्वन्मान्य नव्हता. आथर्वण, अथर्वांगिरस, आंगिरस, क्षत्रवेद, ब्रह्मवेद, भैषज्यवेद इत्यादी अनेक नावांनी ओळखला जाणारा हा वेद केवळ अलौलिक सुखासाठी नव्हे, तर ऐहिक जीवनाच्या समृद्धीसाठीही उपयुक्त आहे असे सायणाचार्यांचे मत आहे. 'व्याख्याय वेदत्रितयमामुष्मिकफलप्रदम्। ऐहिकामुष्मिकफलं चतुर्थं व्याचिकीर्षति।' (अर्थवभाष्यभूमिका). अभिचार कर्मे यात विपुल मात्रेत असली तरी, विविध रोगनामे, त्यांची लक्षणे, त्यांवरील उपचाराकरिता वापरल्या जाणाऱ्या औषधी वनस्पती, अनेक प्रकारचे गंडे, ताईत, मणिधारण इत्यादी सामान्य जनांस भावणाऱ्या व पटणाऱ्या गोष्टींमुळे हा वेद जनवेद म्हणून नक्कीच अभ्यासनीय व संशोध्य आहे. या वेदाची शौनकसंहिता सर्वत्र प्रचलित आहे. काश्मिरात मिळालेल्या पैप्पलाद संहितेचे संस्करण सध्या अंतिम टप्प्यात आले आहे. आधुनिक काळात हितकर व गुणकारक ठरलेल्या आयुर्वेदाचा मूलस्रोत म्हणून अथर्ववेदाचे महत्त्व असाधारण आहे. रोगनिदान, औषधोपचार, रोगनिवारण, स्वास्थ्यरक्षण, आयुष्यवर्धन आणि रोगप्रतिकार अशा आयुर्विषयक सर्व टप्प्यांचा सखोल विचार या वेदात केला आहे. याशिवाय यातील शान्तिक पौष्टिक सूक्ते त्यातील सामान्य ज्ञानासाठी महत्त्वाची ठरतात. कृषिसूक्तात येणारे शेतीविषयक तपशील अथवा शालानिर्माण, गृहनिर्माणसूक्तातील स्थापत्यविषयक संदर्भ लक्षणीय आहेत. वास्तुशास्त्राचा मूलवेद अशीही या वेदाची ख्याती आहे.

असे असूनही अथर्ववेद थोडा दुर्लक्षित वाटतो. पुण्याच्या भांडारकर प्राच्यविद्या संस्थेने १९५२ साली प्रकाशित

केलेले शेंडे लिखित Religion and Philosophy of the Atharvaveda हे पुस्तक अपवादात्मक म्हणावे लागेल. अथर्ववेदावर अल्प प्रमाणात संशोधन होण्याची दोन कारणे संभवतात. १) यातील ६००० मंत्रांपैकी सुमारे १२०० मंत्र ऋग्वेदाशी साम्य दर्शवितात. २) यातील मंत्र मुख्यत्वे जारणमारण आणि जादूटोणा (अभिचार) याच्याशी संबंधित असल्यामुळे विद्वानांना अप्रिय ठरतात.

**ब्राह्मणग्रंथ आणि आरण्यके :** ज्यात मंत्रांचा विनियोग सांगितला जातो, त्याला ब्राह्मण म्हणतात. शबरस्वामीने याचे दहा विधेय विषय सांगितले आहेत. हेतू, निर्वचन, निंदा, प्रशंसा, संशय, विधी, परक्रिया, पुराकल्प, व्यवधारणकल्पना आणि उपमान हे ते विषय! प्रत्येक वेदाची भिन्न ब्राह्मणे आहेत. यज्ञ व पर्यायाने अग्नी हे ब्राह्मणांच्या केंद्रस्थानी असतात. याशिवाय या ग्रंथांत सृष्टीविषयक आख्याने, मनुष्याच्या अभ्युदयासाठी, उत्कर्षासाठी केलेला उपदेशही आहे. अरण्यात वा एकांतात केलेले ज्ञानविज्ञानाचे चिंतन मनन म्हणजे आरण्यके. यज्ञाचा रहस्यात्मक व प्रतीकात्मक अर्थ सांगणे हा यांचा मुख्य हेतू. आरण्यके म्हणजे उपनिषदांची गर्भावस्था होय. या ग्रंथांवरील अभ्यासपूर्ण संशोधन अत्यल्प आहे. गणेश उमाकांत थिटे या प्रसिद्ध वेदाभ्यासकाचा उल्लेख इथे करावासा वाटतो. कोणताही पूर्वग्राह न ठेवता, केवळ वस्तुनिष्ठ भूमिका घेऊन प्रसंगी सनातनी विचारकांच्या टीकेला अभिमुख होऊन त्यांनी आपले अध्ययन चालू ठेवले आहे. संस्कृतचा अभ्यास करताना, विशेषतः अनुवादित साहित्य वाचताना फ्रेंच व जर्मन या पाश्चात्त्य भाषांचे ज्ञान आवश्यक आहे हे थिट्यांनी स्वानुभवाच्या जोरावर मांडले. इंदू देशपांडे यांचा आरण्यकावरील चिकित्सक अभ्यास (वैदिक संशोधन मंडळ, पुणे २००४ हा ग्रंथ आरण्यकातील तत्त्वज्ञान, पुराकथा आणि आख्यायिका यांच्या अभ्यासाबरोबरच, तत्कालीन सामाजिक जीवन, त्यातील भाषाशास्त्रीय दृष्टीकोनातून आढळणारी वैशिष्ट्ये यांचाही परामर्श घेतो.

**उपनिषदे :** 'उपनिषीदति, सर्वानर्थकरं संसारं विनाशयति संसारकारणभूतामविद्यां च शिथिलयति, ब्रह्म चावगमयतीति उपनिषद्' अशी व्याख्या ईशावास्य उपनिषदाच्या भाष्यात आचार्यांनी केली आहे. भारतीय तत्त्वज्ञान म्हणजे उपनिषदातील तत्त्वचिंतन. चार पुरुषार्थांपैकी मोक्ष हा अंतिम पुरुषार्थ हेच मानवी जीवनाचे लक्ष्य आहे आणि त्याकरिता ज्ञानाची कास धरावयास हवी, हा सर्वसाधारण सिद्धान्त येथे मांडला आहे. याखेरीज विश्वरचनेसंबंधीचे विविध सिद्धान्त, मानव आणि आभ्यंतर सृष्टी, आत्मतत्त्वाचा विकास, माया आणि अविद्या, विविध प्रतीकोपासना, आत्मिक गुणांचा प्रादुर्भाव, आहार, आचार, विचार यातील सात्त्विकता, सभोवताली दिसणाऱ्या पदार्थांची नश्वरता, ध्येयप्राप्तीकरिता आवश्यक असणारी साधनसंपत्ती या गोष्टींचा संवादात्मक, कथनात्मक वा चर्चात्मक शैलीने केलेला सांगोपांग विचार म्हणजे औपनिषद तत्त्वज्ञान. प्राच्यविद्येच्या अभ्यासकांचा हा आवडता विषय आहे.

शंकराचार्य, रामानुजाचार्य, निंबार्काचार्य, मध्वाचार्य, आणि वल्लभाचार्य ह्या भारतीय परंपरेतील पाच आचार्यांच्या भाष्यांचे चिकित्सक, विश्लेषणात्मक, तर कधी सर्वसमावेशक पारंपरिक अध्ययन अनेक पाश्चात्त्य व पौर्वात्य विद्वानांनी केले आहे. पॉल डॉयसन, कीथ, गुरुदेव रानडे, बेलवलकर, दासगुप्ता, डॉ. राधाकृष्णन, घाटे ही त्यापैकी काही प्रातःस्मरणीय नावे. संस्कृत, मराठी, हिंदी, इंग्लिश व अन्य भारतीय भाषांमध्ये याविषयीचे लेखन वैपुल्याने दिसते.

**वेदांगसाहित्य :** शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद व ज्योतिष ही सहा वेदांगे आहेत. 'वेदार्थः अंग्यते, गम्यते अनेनेति वेदांगम्, अशी याची व्याख्या करता येते. 'शिक्षा घ्राणं तु वेदस्य मुखं व्याकरणं स्मृतम् । छन्दः पादौ हि वेदस्य हस्तौ कल्पोऽथ पठ्यते ॥ ज्योतिषामयनं चक्षुर्निरुक्तं श्रोत्रमुच्यते।' यापैकी शिक्षा, निरुक्त आणि व्याकरण यांचा संयुक्त विचार आपण भाषाविज्ञान या विषयांतर्गत करू; कारण हे विषय प्रत्यक्ष–अप्रत्यक्षपणे भाषेशी निगडित आहेत. आता राहिले ते कल्प, छंद व ज्योतिष.

कल्पसूत्रे तीन प्रकारची आहेत – श्रौत, गृह्य आणि धर्म. श्रुतिप्रतिपादित यज्ञांचे प्रतिपादन करणे हा श्रौतसूत्रांचा मुख्य विषय आहे. शुल्बसूत्रांचा अंतर्भाव श्रौतसूत्रांतच होऊ शकतो, कारण ती यज्ञविधींचा अविभाज्य घटक आहेत. श्रौतसूत्रांना पूरक ग्रंथ म्हणजे शुल्बसूत्रे. यज्ञवेदीची निर्मिती निर्दोष असावी लागते, त्यासाठी रेखागणित, बीजगणित व भूमिती यांच्या आधाराने वेदिनिर्माणाची परिमाणे यात दिली आहेत. विविध प्रकारची अग्निकुंडे कशी रचावीत याचे मार्गदर्शन यात आहे. हविर्याग, सोमयाग, पशुयाग, सत्र हे विविध प्रकार, निरनिराळे अग्नी, वेदींचे प्रकार, अग्निचयन या आणि यासारख्या विषयांवर अधिकारवाणीने बोलणारे आणि लिहिणारे काशीकर, किंजवडेकर, धर्माधिकारी यांच्या परंपरेला अनुसरून कार्य करणारी व्यक्ती म्हणजे भाग्यलता पाटस्कर. वैदिक साहित्यातील दुर्लक्षित घटकांवर चर्चासत्रे घेणे, वैदिक संशोधन मंडळाला आदर्श शोध संस्थेचा बहुमान मिळवून देणे, वैदिक साहित्य प्रकाशित करणे आणि स्थायी रूपात मांडलेले प्रदर्शन अत्यंत तळमळीने अभ्यागतांना दाखवणे या सर्व गोष्टी त्या हसतमुखाने करीत असतात. धर्मशास्त्रे, धर्मसूत्रे म्हटले की सर्वप्रथम आठवतात ते महामहोपाध्याय पां.वा. काणे. ‘धर्मशास्त्राचा इतिहास’ हा त्यांचा ग्रंथ त्यांच्या सर्वंकष बुद्धिमत्तेची व दूरदृष्टीची ग्वाही देतो. धर्मसूत्रात मुख्यत्वाने सामयाचारिक (रूढ) धर्माचे व स्मार्तधर्माचे विवेचन आहे. यात संस्कार आहेतच, शिवाय आर्थिक, सामाजिक, राजकीय, धार्मिक तसेच तत्त्वज्ञानात्मक विषयही येतात. शां.ग. मोघे, वाडेकर ह्यांसारख्या विद्वानांनी मीमांसा व स्मृतिग्रंथांवर मौलिक संशोधन केले आहे. गृह्यसूत्रे हा कल्पसूत्रांचा आणखी एक भेद. गृहस्थजीवनाशी निगडित कर्मे, विशेषतः संस्कारांची चर्चा येथे येते.

पिंगलाची छंद सूत्रे हा छंदावरील आद्य ग्रंथ. याशिवाय वेद पांगळा आहे. गायत्र्यादी छंद, पद्य, वेदसंहिता अश्या विविध अशा अर्थांनी छंद हा शब्द वापरला जातो. ‘नाच्छन्दसि वागुच्चरति’ असे दुर्गाचार्यांनी म्हटले आहे. वेदातील छंद अक्षरपरिमाण आहेत. अक्षरांच्या संख्येवर गायत्री, त्रिष्टुभादी छंद ठरतात. ह्या वैदिक छंदांवर आधारित लौकिक छंदांची रचना परवर्ती काळात झाली. यावरही संशोधन अत्यल्प प्रमाणात झाले आहे. ज्योतिषवेदांग वेदपुरुषाचा चक्षू म्हणून ओळखले जाते. यज्ञासाठी विशिष्ट देश, काल, नक्षत्र, ग्रहांची स्थिती आवश्यक असते. लगध ऋषीचे ऋग्वेद ज्योतिष, शेषाचे यजुर्वेदज्योतिष आणि काश्यपकृत अथर्ववेदीय ज्योतिष उपलब्ध आहे. मूलतः खगोलावर व गणितावर आधारित ज्योतिष नंतरच्या काळात केवळ हस्तसामुद्रिकातच अडकले, हे आपले दुर्दैव.

**भाषाविज्ञान :** प्राच्यविद्येतील एक महत्त्वाचा घटक म्हणजे भाषाविज्ञान. या विषयांतर्गत अनेक गोष्टींचा ऊहापोह संभवतो – उदा. भाषांचे वर्गीकरण, ध्वनिविज्ञान, वाक्यविज्ञान, व्युत्पत्तिशास्त्र, अर्थविज्ञान, वेगवेगळ्या लिपींचा उद्गम व विकास इ. इ. भारतात भाषाविज्ञानाच्या इतिहासाचे बीज वैदिक ग्रंथांत आढळते. वैदिक ऋचांचा शाकल्यकृत पदपाठ म्हणजे वैदिक भाषेचे विज्ञाननिष्ठ अध्ययनच होय. वैदिक पदांचे विभाजन करणे, संधि-समासांचा विग्राह करणे व त्याद्वारे स्वरचिन्हांचे ज्ञान करून देणे याप्रकारे पदापाठातून विश्लेषणात्मक पद्धतीने अध्ययन सुरू होते. सहा वेदांगातील शिक्षा नावाचे जे वेदांग गणले जाते, यात उच्चारणविषयक नियम आहेत. स्वर, व्यंजनांबद्दलचे विस्तृत विवेचन आहे. याशिवाय वेदांच्या प्रत्येक शाखेनुसार शब्दांचे वर्गीकरण व शुद्ध उच्चारण पद्धती प्रातिशाख्यांमध्ये आढळतात. ‘वर्णस्वराद्युच्चारण प्रकारे यत्र उपदिश्यते सा शिक्षा’ अशी सायणाचार्यांनी शिक्षेची व्याख्या केली आहे. वर्ण, स्वर, बल, मात्रा, साम आणि संतान ह्या सहा अंगांचा विचार ह्यात केला जातो. वसिष्ठ झा, धर्माधिकारी यांचे या क्षेत्रातील योगदान महत्त्वाचे आहे. या ग्रंथाची प्रासंगिकता अनिवार्य आहे. ध्वनियंत्रात विशिष्ट अवयवास स्पर्श करून वायू बाहेर पडतो तेव्हा उच्चारण होते, ती आठ स्थाने म्हणजे हृदय, कंठ, शिर, जिह्वामूल, दात, नासिका, ओठ आणि टाळू. प्रातिशाख्य म्हणजे शिक्षेचे उदाहरणग्रंथ होत. वैदिक मंत्रांचे शुद्ध उच्चारण, पदाध्ययन, संधिनियम आणि यथार्थस्वररक्षण हे प्रातिशाख्यांचे मुख्य विषय होत. नाम, आख्यात, उपसर्ग

व निपात अशा शब्दांच्या चार जाती सांगून त्याबद्दलची सर्व माहिती या ग्रंथांमध्ये आढळते. ऋग्वेदाच्या शाकलशाखेचे ऋक्प्रातिशाख्य, यजुर्वेदाच्या तैत्तिरीयशाखेचे तैत्तिरीयप्रातिशाख्य, शुक्लयजुर्वेदसंहितेचे वाजसनेयप्रातिशाख्य, सामवेदाचे कौथुमप्रातिशाख्य आणि अथर्ववेदाचे प्रातिशाख्य (चतुरध्यायिका) हे प्रमुख प्रातिशाख्यग्रंथ उपलब्ध आहेत.

वेदातील शब्दांचा संग्रह निघण्टु या ग्रंथात केलेला आहे. याचे मुख्य तीन विभाग आहेत. एका शब्दाचे अनेक पर्यायी शब्द म्हणजे नैघण्टुक कांड, अनेकार्थक शब्दांचा संग्राह नैगम अथवा ऐकपदिक कांड, आणि वैदिक देवतावाचक शब्दांचा संग्रह असणारे दैवतकांड हे ते तीन विभाग. यावर इ.स.पू. आठव्या–सातव्या शतकात यास्काचार्यांनी ‘निरुक्त’ नावाचा टीकात्मक, व्याख्यात्मक ग्रंथ रचला. यात निघण्टुतील शब्दसंग्रहावर अर्थविचारदृष्ट्या व्याख्या केली आहे. अखिल विश्वात ‘तत्रनामानि आख्यातजानि’ (सर्व नामे धातूंपासून निर्माण होतात) ह्या पद्धतीने शब्दांचे मूळ शोधण्यासाठी लिहिलेला हा एकमेव प्राचीन ग्रंथ होय. म्हणून यास्काचार्यांना व्युत्पत्तिशास्त्राचे आद्य प्रवर्तक समजले जाते. व्याकरणशास्त्रात प्रकृति-शब्दसिद्धी होते, तर निरुक्तात ‘संस्कारं नाद्रियेत अर्थनित्यं परीक्षेत’ या न्यायाने प्रसंगी प्रत्ययाची कमतरता भासली, तरी अर्थाच्या दृष्टीने साम्य असेल तर विवक्षित धातूपासून शब्दाची व्युत्पत्ती करावी असे यास्कमुनी सांगतात.

**वर्णागमो वर्णविपर्ययश्च द्वौ चापरौ वर्णविकारनाशौ**
**धातोस्तदर्थातिशयेन योगस्तदुच्यते पञ्चविधं निरुक्तम्**

एखाद्या वर्णाचा नव्याने केलेला अंतर्भाव उदा. इन्द्र–इन्दर, वर्णांची अदलाबदल (वाराणसी–बनारस), वर्णाचा विकार किंवा बदल आणि वर्णलोप आणि धातूच्या अर्थातिशयाशी जोडलेला संबंध ही निरुक्ताची पाच लक्षणे मानली जातात. हे पाच निकष आहेत व यांच्या आधारे ‘अर्थनित्यं परीक्षेत’ या सूत्रानुसार शब्दांची व्युत्पत्ती करावी, व्याकरणविषयक नियमांचा बाऊ करू नये. ‘संस्कारं नाद्रियेत’ असे यास्काचार्यांचे मत आहे. अर्थविज्ञान या भाषाशास्त्राच्या अंगाचा इतक्या प्राचीन काळी शास्त्रशुद्ध विचार करणारे यास्कमुनी खरोखरीच वंद्य आहेत. निरुक्ताच्या संशोधनात अन्य भाषांच्या ज्ञानाचे मोठे योगदान आहे. तौलनिक भाषाशास्त्राचा अभ्यास यायोगे सुकर होतो हे वै. का. राजवाडे मो. गो. धडफळे प्रभृतींनी सप्रमाण सिद्ध केले आहे. भाषाशास्त्राचे एक अनिवार्य अंग म्हणजे विविध प्रकारचे कोश. निघण्टु, अमरकोश हे पर्यायवाची शब्दांचे आद्य कोश समजले जातात. त्यानंतर महाराष्ट्राला कोशकारांची समृद्ध परंपरा लाभली आहे. ज्ञानकोशकार केतकर, वामन शिवराम आपटे, सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, लक्ष्मणशास्त्री जोशी, शं. ग. दाते, हणमंते आदींनी वेगवेगळे कोश संपादित केले आहेत.

यास्काचार्यांनंतर व्याकरण या वेदांगाचा विचार भाषाविज्ञानाच्या दृष्टीकोनातून अपरिहार्य ठरतो. इ.स.पू. सहाव्या–सातव्या शतकात ४००० सूत्रांत बद्ध पाणिनि व्याकरण भाषाशास्त्रविषयक ग्रंथांत मेरुदण्डाप्रमाणे भक्कम आधाराचे कार्य करते. भाषेचे मूळ/एकक शब्द नसून वाक्य आहे, हा सिद्धान्त पाणिनीने मांडला. शब्दांचे सुबन्त (नामे) तिऽन्त (धातुरूपे) व अव्यय असे तीन भेद सांगितले, उच्चारणानुसार प्रत्येक अक्षराचे स्थान (कण्ठ, तालु, दन्त्यादि) व प्रयत्न (बाह्य, आभ्यन्तर) असे सर्वंकष वर्गीकरण केले. स्वराघातांचे अभ्यासपूर्ण विवेचन केले. सूक्ष्मेक्षिकेने अत्यंत संक्षिप्त रूपात बृहदाशय व्यक्त करणारा पाणिनी महान भाषाशास्त्रज्ञ होता, यात काही शंका नाही. पाणिनीनंतर ऐन्द्र संप्रदायाचा आचार्य कात्यायन याने काही सूत्रांवर टिप्पणी करणारी वार्तिके लिहिली व इ.स.पू. दुसऱ्या शतकात पतंजलीने व्याकरणसूत्रांवर महाभाष्य रचले. हे पाणिनी, कात्यायन पतंजली या तीन मुनींनी रचलेले व्याकरण भाषाशास्त्राच्या प्रत्येक अभ्यासकासाठी पायाभूत आहे. या शाखेची स्वत:ची परंपरा आहे व तिच्या विकासात बौद्ध व जैन वैयाकरणांचाही मोलाचा वाटा आहे. संस्कृत भाषेच्या बरोबरीने पाली प्राकृत भाषांचेही व्याकरणग्रंथ निर्माण

झाले व तत्कालीन भारतीय भाषाशास्त्राच्या अध्ययनास त्यामुळे अधिक चालना मिळाली, असे म्हणता येईल.

पहिल्या शतकातील शर्ववर्म्याने लिहिलेले कातंत्र व्याकरण, पाचव्या शतकातील चान्द्रव्याकरण, सातव्या शतकातील देवनन्दीचे जैनेन्द्रव्याकरण, नवव्या शतकातील अभिनवशाकटायनाचे शब्दानुशासन, बाराव्या शतकात हेमचंद्ररचित शब्दानुशासन, तेराव्या शतकात बोपदेवरचित मुग्धबोधव्याकरण हे सर्व ग्रंथ व्याकरणाच्या नियमांच्या जोडीनेच भाषेचाही विचार करतात हे दिसून येते.

प्रमाणभाषेच्या (ग्रांथिक भाषेच्या) अध्ययनासोबतच विभाषा (dialects) आणि उपभाषा (बोलीभाषा) यांचा विचार अपरिहार्य आहे. भाषा परिवर्तनशील असल्याने तिचे स्वरूप एकसारखे राहू शकत नाही. इतर भाषांच्या संपर्कामुळे, प्रभावामुळे नवनवीन शब्दांची भर पडत राहते. भौगोलिक सामीप्यामुळे सीमावर्ती प्रदेशातील दोन भाषांमध्ये नेहमीच उधार–उसनवारी होत असते. सांस्कृतिक व सामाजिक सरमिसळही भाषेच्या बदलत्या स्वरूपास कारणीभूत ठरत असते. त्यामुळे भाषाशास्त्रज्ञांना हे अध्ययन आव्हानात्मक वाटते. भाषांचे वर्गीकरण करताना निकष कोणता असावा या मुद्यावर बराच खल झाला. भाषाशास्त्राध्ययनाच्या प्राथमिक अवस्थेत देश हा आधार मानला गेला. म्हणून इंग्लंडची इंग्लिश, फ्रान्सची फ्रेंच व जर्मनची जर्मन भाषा असे म्हणता आले, तरी भारताची भारतीय म्हणून एक भाषा सांगता आली नाही. तामिळ, मराठी, गुजराथी, पंजाबी, सिंधी, काश्मिरी, बंगाली, उडिया, संस्कृत अशा अनेक भाषा भारतात प्रचलित असल्यामुळे देशाधाराने भाषेचे वर्गीकरण अप्रस्तुत ठरले. धर्माच्या आधारानेही भाषेचे वर्गवारी करता येत नाही. पांडुरंग दामोदर गुणे यांनी भाषेचे आकृतिमूलक चार विभाग सांगितले आहेत (अ)योगात्मक अथवा सावयवा प्रत्ययप्रधान भाषा (Agglutinative) – तुर्की भाषा; (आ) श्लिष्टयोगात्मक (Agglutinative Inflectional) तिबेटी भाषा; (इ) अयोगात्मक अथवा निरवयवा धातुप्रधान भाषा (Isolating) - चिनी भाषा – यात प्रकृतिप्रत्यय संयोग नसतो; (ई) श्लिष्टभाषा (Inflectional) भारोपीय भाषा.

भारोपीय भाषा तीन अवस्थांमधून संक्रमित झाली.

१) प्राचीन ऋग्वेदकालीन अवस्था (OIA), २) वेदोत्तरकालीन, मध्ययुगीन प्राकृतादी भाषा (MIA) आणि ३) विविध प्राकृत व अपभ्रंशापासून संक्रमित झालेल्या अर्वाचीन भारतीय भाषा – उदा. हिंदी, मराठी, बंगाली, गुजराती इत्यादी (NIA). यापैकी प्राचीन संस्कृत भाषेतील विद्यांचा व ज्ञानाचा थोडक्यात आढावा घेऊन झाली आहे. आता पाली प्राकृतादी मध्यकालीन भाषेतील विचारधन पाहू या. प्राकृत हा शब्द 'प्रकृती'पासून व्युत्पन्न झाला आहे. प्रकृतीचे दोन अर्थ होतात. अ) मूळ ब) सामान्य प्रजा. पहिला अर्थ घेतला तर 'प्रकृतिः संस्कृतम्। तत्र भवं तत आगतं वा प्राकृतम्।' असे आचार्य हेमचंद्र (जैन व्याकरणकार व अलंकारशास्त्रकर्ता) यांनी लिहिल्यानुसार संस्कृतोद्भव अपभ्रष्ट भाषा म्हणजे प्राकृत होय. प्रकृती म्हणजे सामान्यजन असा अर्थ घेतला, तर जनसामान्यांची भाषा म्हणजे प्राकृत आणि तिचे संस्कारित, शास्त्रविमर्शासाठी आवश्यक असे विशुद्ध रूप म्हणजे 'संस्कृत' भाषा, असा अर्थ होतो. डॉ. जगदीशचंद्र जैन यांनी याविषयी तपशीलवार विवेचन केले आहे. (पाहावे प्राकृत साहित्य का इतिहास, चौखम्बा प्रकाशन, वाराणसी १९६१ आणि पी.एल. वैद्य 'प्राकृत प्रकाश ऑफ वररूचि', 'ओरिएन्टल बुक एजन्सी, पुणे, १९३१).

भाषेची मौखिक परंपरा ध्यानी घेऊन डॉ. नेमिचंद शास्त्री (प्राकृत भाषा और साहित्य का आलोचनात्मक इतिहास, तारा प्रकाशन, वाराणसी, १९६६) यांनी प्राकृतभाषेचे दोन भेद सांगितले – (अ) कथ्य प्राकृत, लोकबोलींच्या, विभाषांच्या व उपभाषांच्या स्वरूपात असणारी आणि (ब) साहित्यिक प्राकृत. दुसऱ्या प्रकारच्या प्राकृत भाषेत अनेक शिलालेख, जैन धार्मिक ग्रंथांतील अर्धमागधी, बौद्ध ग्रंथांतील धम्मपद, जातक कथा, वंशसाहित्य यातील पाली, संस्कृत नाटकांमध्ये अनेकविध पात्रांच्या तोंडी असणारी मागधी, शौरसेनी, महाराष्ट्री इत्यादी प्राकृत भाषा तसेच

बृहत्कथेतील 'पैशाची' भाषा आणि इ.स. ६०० ते १२००मध्ये भिन्न भौगोलिक प्रदेशांत बोलली जाणारी 'अपभ्रंश' या सर्व भाषांचा समावेश होतो. धार्मिक व लौकिक साहित्य या भाषांमध्ये वैपुल्याने आढळते. भरतमुनींच्या नाट्यशास्त्रात मागधी, अवंतिजा, प्राच्या, शौरसेनी, अर्धमागधी, वाहतिका आणि दाक्षिणात्या या सात प्राकृतभाषांचा उल्लेख आहे. ही नावे भौगोलिक तत्त्वांवर पडली आहेत हे स्पष्ट आहे.

जैन धर्मीयांचे आचारांग (आयारांग), स्थानांग (आजंग) समवायांग, ज्ञातृ-धर्म-कथा, उपासक दशांग (उवासगदसाओ) इत्यादी आगम ग्रंथ व (नायाधम्मकहा) इतर साहित्य अर्धमागधी भाषेत उपलब्ध आहे. विविध जैन साहित्य संस्था, विद्यापीठे व जैन मंदिरे यांमध्ये यावर अध्ययन, संशोधन होत असते. डॉ. उपाध्ये, डॉ. वामन कुलकर्णी यांचे या क्षेत्रातील योगदान बहुमूल्य आहे.

**पाली भाषा व साहित्य :** पाली शब्दाची व्युत्पत्ती अनेक प्रकारे करता येते. (अ) पाली म्हणजे पंक्ती, श्रेणी. बुद्धाच्या वचनपंक्ती या भाषेत आहेत. विशेषत: हीनयानपंथातील धर्मग्रंथ. (ब) पल्ली म्हणजे खेडेगाव. त्याचे संस्कृतरूप पाली. खेडेगावातून सामान्य माणसांकडून केली जाणारी ती पाली भाषा. (क) पाल या संस्कृत धातूचा अर्थ जपणे, रक्षण करणे. बुद्धवचनांचे जतन, संरक्षण करणारी ती पाली भाषा होय. पाली 'मगधदेशोद्भव' आहे असे हीनयानी बौद्ध मानतात; परंतु हिचे मागधी या प्राकृताशी सादृश्य नाही. अशोकाचा राज्यकाळ हा पालीभाषेच्या समृद्धीचा काळ मानला जातो. इ.स.पू. ६०० ते ४०० हा तिचा उत्पत्तीकाळ समजतात. अशोकाचे अनेक शिलालेख पाली भाषेत आढळतात. या व्यतिरिक्त बौद्ध धार्मिक ग्रंथ, विशेषत्वाने त्रिपिटक (तिपिटक) आणि वंशसाहित्य (वंस-महावंस, दीपवंस) पाली भाषेत आहे. शिवाय बुद्धाच्या पूर्वजन्मीच्या अनेक कथा (सिद्धार्थ जातक, खंड १-७, मराठी अनुवाद दुर्गा भागवत, वरदा प्रकाशन, पुणे, १९७५) जातक कथासाहित्यात पाली भाषा वापरली आहे. डॉ. भागवत, डॉ. बहुळकर, डॉ. धडफळे, डॉ. मीना तालीम इत्यादी प्राच्यविद्येच्या अभ्यासकांनी या क्षेत्रात भरीव कामगिरी केली आहे. विविध विद्यापीठांमधील पाली विभागातील अध्यापक तसेच धर्मप्रसारक (भन्ते-भदन्त) पाली भाषेतील साहित्याचे अध्ययन, अध्यापन, संशोधन करीत आहेत. इगतपुरी येथील विपश्यना केंद्र व त्यांचे मुंबईजवळ असणारे ग्लोबल पॅगोडा येथील संशोधन केंद्र या क्षेत्रात संशोधनात्मक कार्य करीत आहे. अनेक पाश्चात्त्य विद्वानांनीही बौद्ध धर्माच्या अध्ययनासाठी आवश्यक म्हणून पाली भाषेचा सखोल अभ्यास केला आहे. व्ही. फॉसबोल यांनी पाली जातके १८५६मध्ये रोमन लिपीत संपादित केली. त्याची दुसरी आवृत्ती १९६३ मध्ये जवळजवळ १०० वर्षांनी बाहेर पडली. दुर्गा भागवतांनी भाषांतरासाठी याच सप्तखंडात्मक ग्रंथाचा आधार घेतला. १८८०मध्ये ऱ्हिस डेव्हिड्स यांनी त्याचे इंग्लिशमध्ये भाषांतर सुरू केले, पण पहिल्या खंडानंतर ते बंद झाले. नंतर १८९५मध्ये कॉवेल या डेव्हिड्सच्या शिष्योत्तमाने चामर्स, राउस, फ्रान्सिस, नाइल यांच्या मदतीने ते अपूर्ण कार्य पूर्णत्वास नेले.

महावंसाचे संपादनाचे काम मुंबई विद्यापीठाच्या पाली विभागाने केले आहे. प्राच्यविद्येच्या अभ्यासकाला संस्कृतबरोबरच पाली आणि प्राकृत भाषांचा अभ्यास करणे लाभदायक ठरते. या भाषाभगिनींनी प्राचीन भारताचा साहित्यिक व सांस्कृतिक वारसा निष्ठेने जपला, म्हणूनच आजपर्यंत तो सुरक्षित राहिला, हे विसरून चालणार नाही. म्हणूनच धार्मिक तेढ न ठेवता व कडवेपणा दूर ठेवून साकल्याने, सामग्र्याने प्राच्यविद्यांचा परामर्श घ्यायला हवा.

व्याकरणाच्या अध्ययन संशोधनाची मोठी परंपरा महाराष्ट्रात आहे. नागेशभट्टापासून सुरू झालेली ही परंपरा काशिनाथशास्त्री अभ्यंकर, वा.बा. भागवतगुरुजी, शि.द. जोशी, ग.वा. पळसुले तसेच माधव देशपांडे, अशोक अकलूजकर, सरोजा भाटे, अंबा कुलकर्णी, मल्हार कुलकर्णी इत्यादी विद्वानांनी जिवंत ठेवलीच, शिवाय वाढवलीही. संगणकीय व्याकरण हा त्यांच्यातील आधुनिक संशोधकांचा जणू परवलीचा शब्द आहे. त्यांनी अत्याधुनिक

तंत्रज्ञानाच्या बळावर पाणिनीचे व्याकरण सातासमुद्रापलीकड नेले. अभियांत्रिकी व औद्योगिकी क्षेत्रात यांच्याद्वारे पाणिनी व पर्यायाने संस्कृत पोहोचले व त्यायोगे भाषेचा प्रसार अधिक जोमाने झाला असे म्हणता येईल.

**दर्शनवाङ्मय :** भारतीय संस्कृतीचा वारसा आत्मसात करावयाचा झाल्यास तत्त्वज्ञानाचा स्थूलमानाने तरी परिचय होणे आवश्यक आहे. भारतीय तत्त्वज्ञान सहा भागांत विभागलेले आहे. त्यास साधारणपणे षड् दर्शने असे म्हणतात. सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा, ही दर्शने जोडीजोडीने येतात.

सांख्य-योग : 'सिद्धानां कपिलो मुनिः' असा ज्यांचा आदराने उल्लेख केला जातो, ते कपिल ऋषी सांख्य दर्शनाचे आद्य प्रवर्तक मानले जातात. परंतु आजमितीस इ.स. १५०च्या सुमारास ईश्वरकृष्णाने लिहिलेल्या सांख्यकारिका प्राचीन समजल्या जातात. या कारिकांवरील गौडपादांची टीका व वाचस्पतिमिश्रांची माठरवृत्ती प्रसिद्ध आहेत. या दर्शनाचे प्रमुख सिद्धान्त असे आहेत – १) चेतन पुरुष (आत्मा) व अचेतन प्रकृती (शरीर व दृश्य जग) मूलतः भिन्न आहेत. २) प्रकृती त्रिगुणात्मिका आहे. जड असूनही चल आहे. ३) पुरुष चेतन असूनही निष्क्रिय आहे. ४) पुरुषाला प्रकृतीपासून भिन्न असल्याची जाणीव होणे म्हणजेच मोक्ष होय. अन्धपंगुन्यायाने सांख्य दर्शनाची उपपत्ती लावता येते. आंधळ्याच्या (प्रकृती) पाठीवर बसून पांगळा (पुरुष) त्यास मार्ग दाखवतो व कार्यसिद्धी होते. सांख्य हा शब्द परिसंख्यान भेद, त्याग या अर्थी किंवा ज्ञान (सांख्ययोग = ज्ञानयोग) किंवा प्रकृतीपासून निर्माण होणारी तत्त्वे या संख्येवर आधारित असावा. योगदर्शन सांख्याला पूरक मानले जाते. प्रकृती व पुरुष यांचे द्वैत आणि पुरुषाचे अनेकत्व योगदर्शनास मान्य आहे; केवळ ईश्वर ही संकल्पना नव्याने येते, म्हणून योगाला सेश्वरसांख्य असेही म्हणतात. म्हणजे युक्ती, जोडणी, असे साधन ज्यायोगे चित्तवृत्ती स्थिर होऊन कैवल्य प्राप्त होते. चित्तवृत्तींचा निरोघ करण्यासाठी अष्टांगमार्ग योगाने अंगीकारलेला आहे. शारीर व मानसिक स्तरावर हा निरोध प्रतिपादिला आहे.

**न्याय-वैशेषिक :** प्रमाण-विचाराचा विस्तार हे याचे बलस्थान आहे. यात विमर्शाची अखंड परंपरा आढळते. गौतम (अक्षपाद) वात्स्यायनकृत भाष्य, उद्योतकाराचे वार्तिक, वाचस्पतिमिश्राची तात्पर्यटीका, उदयनाची परिशुद्धी-न्यायनिबंधप्रकाश, गंगेशाचा तत्त्वचिंतामणि (नव्यन्याय १३वे शतक), तर्कवागीशटीका–गदाधरी हे सर्व ग्रंथ मूळ सिद्धान्तावरील विवेचनात्मक ग्रंथ आहेत; तर अन्नंभट्टाचा तर्कसंग्रह व केशवमिश्राची तर्कभाषा हे प्रकरणग्रंथ म्हणून मान्यताप्राप्त आहेत. यात अनुमानाला विशेष महत्त्व आहे. प्रमाण प्रमेयादी सोळा तत्त्वांच्या यथार्थज्ञानाने निःश्रेयसाची प्राप्ती होते. सर्वदर्शनांच्या मांडणीवर न्यायाचा लक्षणीय प्रभाव आहे. यामुळे निर्णय घेण्याचे सामर्थ्य येते. कणादांची वैशेषिकसूत्रे गौतमाच्या न्यायसूत्रांहून प्राचीन समजली जातात. द्रव्य, गुण, कर्म, सामान्य, विशेष, समवाय व अभाव या सात पदार्थांवर वैशेषिकदर्शन आधारित आहे. परमाणूंपासून, त्यांच्या संयोगामुळे पृथ्वी, आप, तेज व वायू ही चार कार्यद्रव्ये तयार होतात व क्रमशः अनेक परमाणू एकत्र येण्याने सृष्टी निर्माण होते; त्याचप्रमाणे परमाणूंचे विघटन होण्यामुळे प्रलय होतो, हा या दर्शनातील प्रमुख विचार आहे, म्हणून याला परमाणुवाद असेही म्हणतात. तन्तुपटन्याय यात महत्त्वाचा आहे. तन्तूंचा रंग पटात उतरतो, म्हणजेच कारणद्रव्याचे गुण कार्यद्रव्यात येतात. न्यायवैशेषिकदर्शन आधुनिक काळातील पदार्थविज्ञानाशी मिळतेजुळते वाटते.

**पूर्वोत्तरमीमांसा :** वेदवाक्यांचा विचार करून अर्थ लावणारे शास्त्र म्हणजे मीमांसा. मीमांसा वाक्याचा, व्याकरणशास्त्र शब्दाचा विचार करते; न्याय प्रमाणाचा तर मीमांसा वाक्याचा. यज्ञीय कर्मकांडाच्या समर्थनासाठी वैदिक वाक्यांचा पुनर्विचार करताना मीमांसेचा उपयोग होतो. या अर्थाने याला वाक्यार्थशास्त्र असेही म्हणतात. वेदांची रचना विस्तृत काळात व अनेक ऋषींकडून झाल्यामुळे अंतर्विरोध संभवतो. त्यात समन्वयवादी भूमिका घेण्याचे काम हे दर्शन करते. 'उदिते जुहोति, अनुदिते जुहोति' अशी विरोधी वाक्ये वेदांत येतात, त्यांचा अर्थ लावण्याकरिता मीमांसेची मदत घ्यावी लागते. विधि, मन्त्र, नामधेय, निषेध आणि अर्थवाद ही यातील पाच प्रमुख अंगे आहेत.

यातील प्रत्येकाचे पुन्हा काही पोटभेद संभवतात. झा पतिपत्नी व डांगे पतिपत्नी यांचे या सर्व क्षेत्रातील योगदान मोलाचे आहे. अपूर्व किंवा अदृष्टसंकल्पना ही मीमांसेने भारतीयांना दिलेली अमोल देणगी होय. जैमिनींनी रचलेल्या या ग्रंथात एकूण बारा अध्याय आहेत. सूत्रांवर शाबरभाष्य, कुमारिलाचे श्लोकवार्तिक, तन्त्रवार्तिक व टुप्टीका हे ग्रंथ, प्रभाकराचे टीकाग्रंथ, अर्थसंग्राह, मीमांसापरिभाषादी प्रकरणग्रंथ, अनेक प्रकारचे वादग्रंथ अशी समृद्ध परंपरा या दर्शनास लाभली आहे. शि.म. परांजपे, धर्माधिकारी, श्रीपाद भट इत्यादींचे या दर्शनावर विपुल संशोधन आहे. 'धर्मप्रमीयमाणे हि वेदेन करणात्मना। इतिकर्तव्यताभागं मीमांसा पूरयिष्यति' असे याचे प्रयोजन सांगितले जाते. उत्तरमीमांसा वेदान्त या नावाने प्रख्यात आहे. औपनिषद वाक्यांचा समन्वय करून त्यांचे तात्पर्य विशद करण्यासाठी बादरायणाने वेदान्तसूत्रांची रचना केली. त्यांवर शंकराचार्य, रामानुजाचार्य, मध्वाचार्य, नीबार्काचार्य, वल्लभाचार्य यांनी विस्तृत भाष्ये लिहिली. अर्थनिर्धारणात यांची मते भिन्न भिन्न आहेत. 'ब्रह्म सत्यं जगन्मिथा जीवो ब्रह्मैव नापर' असा उद्घोष करणारे शंकराचार्य सुप्रसिद्ध आहेत. यांचा सिद्धान्त केवलाद्वैत, रामानुजांचा विशिष्टाद्वैत, निंबार्कांचा द्वैताद्वैत/भेदाभेद, मध्वांचा द्वैत आणि वल्लभांचा शुद्धाद्वैत या नावांनी परिचित आहेत.

अनादिकाळापासून मानवाला काही प्रश्न पडलेले आहेत, त्यांची उत्तरे शोधणे हे तत्त्वज्ञानाचे एक प्रयोजन म्हणता येते. सैद्धान्तिक पातळीवर जरी या सर्वांमध्ये भिन्नता असली तरी त्यात एकताही आहे. चार पुरुषार्थांतील मोक्ष हा परम पुरुषार्थ मुक्ती, कैवल्य, निःश्रेयस, अपवर्ग, निर्वाण, ब्राह्मी स्थिती या विविध शब्दांत व्यक्त झालेला दिसतो. याखेरीज कर्मसिद्धान्त हा भारतीय ज्ञानचिंतनाचा पाया मानला जातो. हे चिंतन नवनीताच्या रूपात बादरायणांनी सूत्रबद्ध केले, त्यावर अनेक आचार्यांनी टीकात्मक ग्रंथ लिहिले. या टीकाग्रंथांचा, भाष्यांचा अभ्यास करणाऱ्यांची एक मोठी परंपरा महाराष्ट्रात रुजली. आचार्यांच्या भाष्यांवर अधिकाधिक टीका लिहिल्या गेल्या, भिन्न भिन्न वाद निर्माण झाले, चर्चा रंगल्या आणि याद्वारे तत्त्वज्ञानाचा प्रसार होऊ लागला. यातूनच पुनर्जन्मासारखा विचार पुढे येतो. औपनिषद ज्ञान मननाची पराकाष्ठा असे मानून यावर अनेकांनी संशोधन केले आहे. डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन, स्वामी विवेकानंद, रामकृष्ण मठातील अनेक संन्यासी, यांनी संस्कृतेतर भाषांमध्ये लेखन करून उपनिषदातील ज्ञान जगासमोर आणले. महामहोपाध्याय वासुदेवशास्त्री अभ्यंकर, रघुनाथ दामोदर करमरकर, घाटे, दवे इत्यादींनी या क्षेत्रात मोलाचे योगदान दिले आहे. आपले लेखन इंग्लिशमधून केल्यामुळे यातील अनेक विद्वान विश्वमान्य झाले. कुवलयानंदांनी योगशास्त्राची बैठक पक्की करण्याकरिता हे शास्त्र प्रयोगशाळेत नेले व त्याची उपयोगिता जगासमोर आणली. आज जगभर योगाचा जो प्रसार झाला आहे, त्याला कुवलयानंद कारणीभूत ठरले आहेत ह्यात काही शंका नाही. 'इतिहासपुराणे: इतिहासपुराणभ्यां वेदं समुपबृंहयेत। बिभेत्यल्पश्रुताद्वेदो मामयं प्रहरिष्यति' या उक्तीनुसार वेदांचा अर्थ जाणून घ्यावयाचा असेल तर इतिहास व पुराणे यांच्या अध्ययनाला पर्याय नाही. रामायण व महाभारत हे दोन ग्रंथ इतिहास ठरतात, पण त्यांच्यात भेद आहे. रामायण हे एक मधुर महाकाव्य मानले, तर महाभारत हा समाजशास्त्रावरील बृहत् ग्रंथ म्हणावा लागेल. रामायणात राम या एका व्यक्तीभोवती कथानकाचा सर्व पसारा आहे, तर महाभारतात समाजाचे प्रतिबिंब आहे. 'व्यासोच्छिष्टम् जगत्सर्वम्' हे महाभारतात पदोपदी जाणवते. वेदोक्त श्रौत व गृह्य धर्माच्या जोडीने येथे शिष्टाचार हाही धर्म मानला आहे. कर्मकांडाची महती थोडी कमी होऊन मानवतेचा विशाल व व्यापक दृष्टीकोन जनमानसात स्थिरावलेला आढळतो. स्मृतिवाङ्मयात या दोन्ही ग्रंथांना महत्त्व आहे. व्यक्तिगत नीतिमूल्ये व सामाजिक नीतिमूल्ये यांसाठी अनुक्रमे रामायण व महाभारत या ग्रंथांचे परिशीलन करणे आवश्यक ठरते. महाभारतात दीपस्तंभाप्रमाणे मार्गदर्शक असणारी श्रीमद्भगवद्गीता तर भारतीयांचा जणू श्वासच आहे. येथे किंकर्तव्यमूढ झालेला अर्जुन व त्याला व्यावहारिक शहाणपणाचा सल्ला देणारा कृष्ण हे दोघे गुरुशिष्याच्या भूमिकेत दिसतात व निष्क्रिय समाजाला कार्यप्रवण करण्याचा भगवंताचा प्रयत्न हा प्रातिनिधिक स्वरूपाचा वाटतो,

हे या ग्रंथाचे वैशिष्ट्य आहे; म्हणूनच गीता हा कालातीत आणि धर्मातीत ग्रंथराज समजला जातो. यावरील व्याख्याने, प्रवचने, निबंध, प्रबंध चर्चासत्रे, लेखमालाही विपुल प्रमाणात आढळतात. या ग्रंथांच्या चिकित्सक आवृत्त्या भारताची शान आहे. पैकी रामायणाची संशोधित आवृत्ती बडोद्याच्या प्राच्यविद्या संस्थेने काढली, तर महाभारताची पुण्यातील भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंडळाने. भारतभर विखुरलेल्या विविध लिपींमधील हस्तप्रती मिळवून ही संशोधित आवृत्ती तयार करण्यात आली. दिल्लीस्थित मोतीलाल बनारसीदास आणि नाग या प्रकाशन संस्थांनी अनुक्रमे पुराणांचे भाषांतर (एन्शण्ट इन्डियन ट्रॅडिशन ॲण्ड माइथॉलॉजी) व मूळ पुराणे प्रसिद्ध करून इतिहासपुराणांच्या संशोधनाला आवश्यक पुस्तके पुरवली.

ह.दा. वेलणकरांच्या शिष्यवर्गापैकी एक असाधारण संशोधक म्हणजे शांताराम ग. मोघे. श्री.भि. वेलणकरांच्या गीवार्णसुधेसाठी विपुल संस्कृतलेखन. धर्मशास्त्र आणि पूर्वमीमांसा हे त्यांच्या विशेष अभ्यासाचे विषय. महाराष्ट्रातील विविध सरकारी विद्यापीठांमध्ये त्यांनी केले अध्यापन कार्य. 'अ पीप इन इण्डॉलॉजिस', 'प्रो. काणेज कॉन्ट्रिब्युशन टू धर्मशास्त्र लिटरेचर', 'श्राद्धसागर ऑफ कुल्लूकभट्ट', 'स्टडीज इन अप्लाइड पूर्वमीमांसा' ही इंग्लिश भाषेतील ग्रंथसंपदा; वासुदेवानंद सरस्वतींवरील मराठी पुस्तक व देववाणी मंदिराने प्रकाशित केलेले 'शान्त आराम:' हे संस्कृतमध्ये लिहिलेल्या लेखांचे संग्रहात्मक पुस्तक असे विपुल संशोधनात्मक लिखाण त्यांनी केले आहे.

**नास्तिक दर्शने :** या आस्तिक दर्शनांखेरीज बौद्ध, जैन व चार्वाक ही नास्तिक दर्शनेही लोकप्रिय झालेली दिसतात. भारतीय समाज समन्वयवादी असल्यामुळे प्रत्येकाला आपापले मत मांडण्याचा व शास्त्रार्थ करण्याचा पूर्ण अधिकार होता. यापैकी चार्वाक हे बार्हस्पत्यदर्शन म्हणूनही ओळखले जाते. याला लोकायत असेही एक नाव आहे. यात प्रत्यक्षाशिवाय दुसरे प्रमाण मानले जात नाही. 'यावज्जीवेत सुखं जीवेत् ऋणं कृत्वा घृतं पिबेत् । भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुत ।' असा सुखवाद चार्वाकांनी सांगितला. हे खरे असले तरी योग्य मार्गाने उपजीविका करावी, शेती, व्यापारउदीम, गोपालन, शासकीय व्यवस्था यांसारख्या उपायांनी पृथ्वीवरील भोगांचा उपभोग घ्यावा असेही सांगितले. देहभिन्न आत्म्याचे मात्र निराकरण केले. वैदिक परंपराही ब्राह्मणपरंपरा, तर जैन व बौद्ध ही श्रमणपरंपरा म्हणावी लागेल. २४ तीर्थंकरांचा इतिहास जैनांना आहे. २४वे तीर्थंकर आणि धर्मसंस्थापक म्हणून प्रसिद्ध वर्धमान महावीर इ.पू. ५९९मध्ये जन्मले, त्या आधी २३ तीर्थंकर होऊन गेले; याचा अर्थ पहिले तीर्थंकर ऋषभदेव अतिप्राचीन असले पाहिजेत. जैनांचे मूलग्रंथ संस्कृत व अर्धमागधीत आहेत. अनेकान्तवाद/स्याद्वाद हा जैन धर्माचा पाया आहे. या धर्माचा उगम, त्यातील पंथोपपंथ, धार्मिक वाङ्‌म उपासकधर्माचे स्वरूप, ९ तत्त्वे आणि मोक्षमार्ग या सर्व बाबींचा ऊहापोह करणारा सिंधू डांगे यांचा ग्रांथ मौलिक म्हणावा लागेल. त्यांनीच लिहिलेला बौद्ध धर्म आणि तत्त्वज्ञान हा ग्रंथही अत्यंत उपयुक्त आहे. मुळात वैदिक धर्मातील यज्ञाचा व पशुहिंसेचा अतिरेक हेच या श्रमणपरंपरेच्या उगमाचे कारण आहे. वैदिक परंपरेविषयी अश्रद्धा आणि संशय या धर्मांच्या मुळाशी होते, म्हणून अहिंसा व जातिनिरपेक्षता या तत्त्वांचा लोकांनी अंगीकार केला. नैतिकतेच्या पायावर यांची उभारणी झाली. पंचशील, पंचस्कन्ध आणि पंचास्तिकाय समाजमान्य झाले. यांच्यातही नंतर फाटाफूट झाली. जैन धर्मात श्वेतांबर आणि दिगंबर तर बौद्ध धर्मात महायान, हीनयान असे पंथ निर्माण झाले. प्राचीन बौद्ध धार्मिक वाङ्‌म पाली भाषेत आहे. विविध प्राच्य धर्मांचा तौलनिक अभ्यास करणाऱ्यांसाठी संस्कृत, पाली व प्राकृत भाषांचे अध्ययन करणे आवश्यक ठरले. उपाध्ये, धडफळे, बहुलकर यांसारख्या विद्वानांचे भरीव कार्य या क्षेत्रात भाषेच्या अंगाने दिसून येते; तर डांगे पति-पत्नींचे तत्त्वज्ञानाच्या अंगाने. आस्तिक दर्शनाचा अभ्यास करताना ही श्रमणपरंपरा नाकारून वा अव्हेरून चालत नाही हे सत्य त्यामुळे अधोरेखित झाले. सर्वदर्शनसंग्राहातही या सर्व दर्शनांचे परिशीलन केलेले आढळते. पुढील श्लोकात काहींचा थोडक्यात आढावा घेतला आहे. 'आरम्भवाद: कणभक्षपक्षः संघातवादस्तु

भदन्तपक्षः। सांख्यादिपक्षः परिणामवादो वेदान्तपक्षस्तु विवर्तवाद ॥' (संक्षेप शारीरक २.६३)

**हस्तलिखितशास्त्र :-**

हाताने लिहिलेला कोणताही महत्त्वाचा दस्तावेज म्हणजे हस्तलिखित. प्राचीन हस्तलिखितांचा शास्त्रशुद्ध अभ्यास करून त्या पोथ्यांमध्ये दडलेले ज्ञान प्रकाशित करणे हे अतिशय आव्हानात्मक व जिकिरीचे कार्य आहे. प्राच्यविद्येची ही शाखा थोडी दुर्लक्षित राहिली आहे असे खेदाने म्हणावे लागते. हे शास्त्र आंतरविद्याशाखीय (Inter-disciplinary) स्वरूपाचे आहे. याचे चार उपविभाग आहेत – हस्तलिखितातील लिपिज्ञान, लेखनिकाचे दोष आणि चिकित्सक अध्ययन या दोन विभागांच्या अध्ययनासाठी संस्कृत, प्राचीन इतिहास, समाजशास्त्र, पुरातत्त्वशास्त्र यांचे अभ्यासक आवश्यक असतात, तर विस्तृत सूची तयार करणे आणि दुर्मीळ हस्तप्रतींचे जतन करणे या दोन उपविभागांसाठी ग्रंथालयशास्त्र व माहिती व तंत्रज्ञान शास्त्राचे अभ्यासक आवश्यक असतात.

**१) हस्तलिखिताचे प्रकार, लिपी, लेखनिक इ.**

हस्तलिखितांचा अभ्यास करण्यापूर्वी लेखन कलेचा इतिहास कसा, कोणकोणत्या टप्प्यांत झाला हे पाहणे माहितीपूर्ण व रंजक आहे. मानव हा समूहाने राहणारा प्राणी असल्यामुळे संपर्क साधण्यासाठी काहीतरी साधन अथवा माध्यम अत्यंत आवश्यक आहे. आदिमानव कदाचित काही खाणाखुणा व चिन्हांद्वारे संवाद साधत असावा. ध्वनींचे उच्चारण हे प्रत्येक व्यक्तीनुसार, व्यक्तीच्या शरीररचनेनुसार बदलत असल्यामुळे ऐकलेल्या शब्दात संदिग्धता येणे अपरिहार्य होते. यावर उपाय शोधताना काही दृश्य साधने वापरावीत असे वाटून चित्रांच्या माध्यमातून संपर्क साधण्याची कला मानवाने आत्मसात केली असावी. ही लेखनाची प्रथम पायरी मानली जाते. याला चित्रात्मक लिपी (Pictograph) असे म्हणता येईल. याला निश्चितच सांस्कृतिक तसेच सामाजिक संदर्भ आहेत. दोन भुवयांमध्ये रेखलेला लाल कुंकवाचा टिळा हे एवढेसेच चित्र भारतीय उपखंडात विवाहितेचे, देवीचे चिन्ह म्हणून मान्यताप्राप्त आहे. पाश्चात्त्य देशात मात्र एक चित्र यापलीकडे याला संवादमूल्य नाही. काही चित्रांना सार्वत्रिक मान्यता असते. उदा., डोंगराच्या बेचकीत काढलेले अर्धसूर्यबिंब अथवा वक्ररेषांनी सूचित होणारा पाण्याचा प्रवाह, नदी अथवा समुद्र. यानंतरची अवस्था म्हणजे कल्पनालेख (Ideograph) उदा. फुलाचे चित्र. यातून प्रेम, आपुलकी, श्रद्धा या कल्पना/भावना समजतात; तसेच दिव्याचे चित्र केवळ उजेडाचे गमक ठरत नाही, तर ज्ञानाचे, यशाचे, शुचितेचे प्रतीक ठरते. यालाच अक्षरविन्यासाची जोड मिळाली आणि कालांतराने वर्णमाला तयार होत गेली. स्वर व व्यंजने या भेदामुळे आणि त्यांच्या मिश्रणामुळे शब्दरचना सुलभ व सोयीची झाली. अशा प्रकारे चित्रलिपीपासून (Heiroglyph पासून) सुरू झालेला हा लेखनशास्त्राचा प्रवास प्रत्येक वर्णाला मिळालेल्या ध्वनि/उच्चारणमूल्यावर (Phonograph) संपला. आजही रेल्वेस्थानक, विमानतळ इत्यादी ठिकाणी असणारी चित्रे वा चिन्हे भाषानिरपेक्ष असूनही अर्थपूर्ण वाटतात. जळती सिगरेट दाखवून त्या चिन्हावर फुली मारलेली दिसली की 'येथे धूम्रपान करू नये' हा संदेश कोणत्याही भाषेच्या प्रवाशाला समजतो. प्राचीन सिंधू संस्कृतीत ठिकठिकाणी केलेल्या उत्खननात अशी अनेक चित्रचिन्हे सापडली आहेत व त्यांचा अभ्यास करून त्याद्वारे मिळणाऱ्या संदेशांवर संशोधन सुरू आहे.

**लेखनसाधने :-**

दगडावर अथवा धातूवर कोरण्यापूर्वी मातीच्या विटांवर लेख कोरायची पद्धत होती. ३००० वर्षांपूर्वी कोरलेले काही मृत्तिकालेख विसाव्या शतकात तुर्कस्थानात मिळाले. 'काळ्या दगडावरील रेघ' म्हणजे शाश्वतलेखन! चिरंतन काळ टिकून राहावे या उद्देशाने मानवाने दगडांवर लेख कोरण्यास सुरुवात केली. अशोककालीन शिलालेखांवर स्पष्ट कोरलेले आहे, 'इयं धम्मलिपि लेखापिता किंति चिरं तिस्टेय इति' आणि म्हणूनच हजारो वर्षे उलटली, परंतु प्रियदर्शी अशोकाचे भारतभर पसरलेले शिलालेख आजही चांगल्या अवस्थेत पाहावयास मिळतात. दगडांवर कोरण्याकरिता

सोयीची म्हणून रेषात्मक ब्राह्मी लिपीचा या काळात वेगाने प्रसार झाला. अशोककालीन शिलालेख, त्यातील ब्राह्मीची स्थित्यंतरे आणि बौद्ध धर्मासाठी वापरली जाणारी पाली भाषा यांच्यावर अनेक निबंध, प्रबंध लिहिले गेले आहेत. दगडावर कोरण्यासाठी कोरके लागत. सामाजिक दृष्टीकोनातून पाहिले असता असा व्यवसाय करणारी अनेक माणसे या गरजेतून उद्‌भवली. कालांतराने मात्र दगडांच्या वजनामुळे व आकारामुळे त्यांची ने-आण करणे गैरसोईचे ठरू लागले म्हणून धातूवर लेख कोरण्याची पद्धत सुरू झाली. ताम्रपट हे विशेषत्वाने राजाज्ञा, दानपत्र, जहागिरी, इनाम यांच्यासाठी वापरले जाऊ लागले. ने-आण करण्यासाठी सोयीचे म्हणूनही यांचा राजरोस वापर होऊ लागला. अनेक मठामंदिरांना राजेरजवाड्यांनी दिलेल्या जमिनींचे ताम्रपट आजही आढळतात. तांब्याच्या एका पत्र्यावर मजकूर मावला नाही, तर दोन-तीन पत्र्यांवर तो कोरला जात असे व त्यांना जोडणाऱ्या जाडसर कड्यावर दात्याची मुद्रा, राजचिन्ह कोरले जात असे. ख्रि.पू. १४०० सालच्या काही इष्टिकालेखांत तत्कालीन हिट्टाइट व मिट्टानी या दोन कुळात झालेल्या तहाचा मजकूर कोरलेला सापडला आहे. प्राचीन भारतीय संस्कृती, वैदिक देवतांची नावे या लेखांत आढळतात. मृत्तिकालेख हे अल्पजीवी, नश्वर वाटल्यामुळे नंतर दगडावर लेख कोरण्याची पद्धत रूढ झाली असावी.

मध्ययुगीन भारतात मोंगल व मुसलमान राजवटींमध्ये चर्मलेखही सापडतात. हिंदू धर्मग्रंथ मात्र चामड्यावर आढळत नाहीत. हिमालयाच्या परिसरात भूर्जवृक्ष विपुल प्रमाणात असल्यामुळे भूर्जपत्रांवरचे लेख उत्तर भारतात, विशेषत: पर्वतीय प्रदेशात सापडतात. याला तूर्णपत्र अथवा कुंभीपत्र असेही नाव आहे. भूर्जपत्र अतिशय नाजूक असल्यामुळे यावर कोरणे शक्य नाही, म्हणून याच्या पातळ सालीवर ब्रशच्या साहाय्याने लेख लिहिले जात. पुण्यातील भांडारकर प्राच्यविद्यासंस्थेतील महाभारताची प्राचीनतम प्रत भूर्जपत्रावरील आहे. उत्तर भारतात भूर्जपत्रावरील, त्याप्रमाणे दक्षिण भारतात ताडपत्रावरील अनेक प्राचीन ग्रंथांच्या पोथ्या केवळ भारतातच नव्हे, तर श्रीलंका, थायलंड या देशांतही सापडतात. ताडाची लांब पाने पाण्यात भिजवून, सुकवून, दगड ठेवून नीट करून, समप्रमाणात कापून त्यावर शलाकेने (तीक्ष्ण सूचीने) कोरून लेख लिहिले जात. १०१३ साली टी. गणपति शास्त्री यांना केरळ राज्यात 'भासनाटकचक्र' हे महाकवी भासाच्या नाटकांचे एकत्रित बाड सापडले. तोपर्यंत भासाचे केवळ नावच संस्कृतज्ञांना ठाऊक होते; पण त्याच्या साहित्यकृती उपलब्ध नव्हत्या. सहाव्या शतकात ताडपत्रावर लिहिलेली 'प्रज्ञापारमितासूत्र' या ग्रंथांची प्रत–जी सध्या जपानमध्ये आहे, ती ताडपत्रावरील प्राचीनतम पोथी समजली जाते. राज्य शासनासंबंधीच्या सूचना, आज्ञापत्रे अनेकदा कापडावर लिहिलेली आढळतात. शिवकाळातील व पेशवेकाळातील असे खलिते अनेक ग्रंथालयांत उपलब्ध आहेत. हल्ली सत्कार समारंभात अनेकदा मानपत्र अशा रेशमी वस्त्रावर लिहून दिले जाते, हे आपण पाहतो. याशिवाय सांचीपट (अगरुची साल) प्रामुख्याने बंगाल, आसाम या ईशान्य प्रदेशात आढळते. कागदाचा शोध लागण्यापूर्वी विविध झाडांच्या सालींवरच लेखन केले जात असे. या शास्त्राच्या अध्ययनाला चिकाटीची व अविश्रांत कष्टांची जोड आवश्यक भासते. लिपिकार वाकणकर, सुखथनकर, कत्रे, गोडे, बापट, वाडकर, सिद्धार्थ वाकणकर या मराठी संशोधकांनी या क्षेत्रात स्वत:चा अमिट ठसा उमटवला आहे. महाभारताची चिकित्सक आवृत्ती काढण्यासाठी विविध भाषांतील हजारो हस्तलिखिते जमा केली गेली, अनेकांचे हात लागले, अनेक वर्षे हे काम चालले आणि आज विश्वभर ती आवृत्ती प्रमाणभूत मानली जाते. संशोधकांनी हे अत्यंत खडतर कार्य ज्या निष्ठेने केले त्याला तोड नाही.

बौद्ध आणि जैन धर्माच्या अनेक पोथ्यांचे अध्ययन जीवितोद्देश्य म्हणून केले जाते, त्याला धार्मिक जोड देऊन हे कार्य केले जाते हे अत्यंत कौतुकास्पद आहे. बुद्धवचनांचा संग्रह म्हणून त्रिपिटकांचे प्रकाशन करणे हे आद्य कर्तव्य मानून विपश्यना संशोधन केंद्राने ज्या निष्ठेने हे कार्य हाती घेतले त्याला तोड नाही. जैन साधूंनी चतुर्मासात गावोगाव फिरून हस्तलिखिते गोळा केली व त्यांचे जतन, संरक्षण, संवर्धन व्हावे म्हणून व्यापारीवर्गाला आवाहन करून विविध

भांडारांची निर्मिती करवून घेतली आणि आजही ही ग्रंथालये प्राणांपलीकडे दुर्मीळ पोथ्यांचे जतन करतात याचा प्रत्यय येतो. यामुळे केवळ पोथ्यांचेच जतन झाले असे नसून त्यांतील भाषांच्या व लिपींच्या अध्ययनालाही चालना मिळाली. पाली आणि प्राकृत भाषा, त्यामधील विचारधन, त्यातील विविधांगी साहित्य या सर्वांचे अध्ययन व संशोधन करण्याची अहमहमिका सुरू झाली. बापट, ग.वा. तगारे, कांगा, धडफळे आदी विद्वान यात अग्रेसर होते. जातककथांचे अध्ययन हे दुर्गाबाईंचे वैशिष्ट्य मानले जाते.

**पुराकथाशास्त्र :**

दैवतशास्त्र अथवा पुराकथाशास्त्र हे प्राच्यविद्येचे आणखी एक लोकप्रिय अंग आहे. संपूर्ण जगात, नागर तसेच लोकसाहित्यात आणि मौखिक परंपरेत अभिजन व बहुजन पुराकथा प्रचलित आहेत. या कथांमध्ये कमालीचे साधर्म्य आढळते. केंद्रस्थानी एखादी समान कल्पना असते आणि नंतर त्या त्या देशाच्या सांस्कृतिक, सामाजिक, भौगोलिक वातावरणानुसार कथेला निरनिराळे आयाम प्राप्त होतात, हा या शास्त्रातील सार्वत्रिक सिद्धान्त मानला जातो. उदाहरणार्थ विविध देशातील प्रलयकथा, वीरगाथा, परलोकाविषयी असणारे कुतूहल, उत्सुकता, भीती, नद्या व पर्वतांविषयी असणारी आदराची भावना, जगाच्या निर्मितीबद्दल बांधले जाणारे आडाखे, स्वर्ग व नरकाच्या संकल्पना, त्यासाठी कारणीभूत ठरणारी पुण्यकर्मे व पापकर्मे याविषयीच्या वृत्तान्तात विलक्षण साम्य आहे. याचा अभ्यास लिखित ग्रंथांच्या अध्ययनास प्रेरक व पोषक ठरतो असे अनेक प्राच्यविद्याविशारदांनी सांगितले. दांडेकर, वेलणकर, उपाध्याय, डांगे ही यांपैकी काही प्रमुख नावे होत. यामुळे जग खरोखरच अधिक जवळ आले, वसुधैवकुटुम्बकम् हे वेदवचन सत्य झाले असे म्हणावयास प्रत्यवाय नाही. हा मतप्रवाह आधुनिक काळात फारच लोकप्रिय झालेला दिसतो. पुराकथांवर आधारित पौराणिक मालिका, देवादिकांवर बेतलेली पुस्तके, गोष्टी, बालकांसाठी निर्मित चित्रपट, खेळणी इत्यादी या प्रवाहाची साक्ष देतात. या शास्त्रात समूहमनाचा सर्वांगीण विचार केलेला आहे, म्हणून व्यक्तिनिरपेक्ष, परंतु समाजसापेक्ष विचारांना चालना मिळते. प्राचीन इतिहास, मानसशास्त्र, संरचनावाद, प्रतीकात्मकता, राष्ट्रवाद, जातिव्यवस्था, वर्गव्यवस्था, कलाविष्कार असे ह्या शास्त्राचे विविध पैलूही अभ्यासता येतात, हे या शास्त्राच्या अध्ययनाचे आनुषंगिक फळ म्हणावे लागेल.

**अभिजात संस्कृत साहित्य :**

वैदिकोत्तर काळात आर्ष महाकाव्यांची रचना झाल्यानंतर अभिजात संस्कृत साहित्याचे युग अवतरले. अपार काव्यसंसारात प्रतिसृष्टिकर्ता असे स्वरूप असलेला कवी विविध साहित्यप्रकारांच्या माध्यमांतून त्याला विश्‍व जसे भावले तसे शब्दबद्ध करण्याचा प्रयत्न करतो. यात काव्ये, नाटके, गद्य वाङ्‍म, चम्पू, शिलालेख, उत्कीर्ण साहित्य, स्फुट श्‍लोक असे विविधांगी साहित्य अंतर्भूत आहे. साधारण इ.स.पूर्व चौथ्या शतकापासून, म्हणजे महाकवी भासापासून तेराव्या शतकातील जयदेवापर्यंत नाटकांची, पहिल्या शतकातील अश्‍वघोषापासून सतराव्या शतकातील पंडितराज जगन्नाथापर्यंत काव्याची आणि इ.सनाच्या आरंभी रचलेल्या पंचतंत्रापासून बाराव्या शतकात लिहिलेल्या भारतचंपूपर्यंत गद्य व चंपूची परंपरा संस्कृतात अविच्छिन्नपणे चालत आली आहे. महामहोपाध्याय काणे, महामहोपाध्याय मिराशी, पुसाळकर, मोरेश्‍वर काळे, देवधर, गजेंद्रगडकर, तेलंग, माईणकर, कंगले, आनंद साधले, केशवराव वाटवे, डांगे पतिपत्नी, गो.के. भट, साने, वाळिंबे, करमरकर, दुर्गाबाई भागवत प्रभृती लेखकांनी आपल्या विदग्ध व विवेचक शैलीत अभिजात संस्कृत साहित्यिकांचे मूल्यमापन केले आहे. केवळ विषयप्रवेश न करता, त्या साहित्यकृतींचा रसास्वाद, समीक्षा तौलनिक स्तरावर केले आहे. सामान्य वाचकाला या कृतींची गोडी लागावी म्हणून ललितलेखन करून सोप्या मराठी भाषेत हे ज्ञान पोहोचवण्याचे प्रयत्न अनेकांनी केले आहेत. प्रसाद प्रकाशन, पुणे यांनी ‘देवभाषेचे देणे, मायभाषेचे लेणे’ या नावाची अभिजात साहित्यशृंखलाच वाचकांना दिली. प्रा. राम

शेवाळकरांपासून सुरू झालेली ही परंपरा आजही चालू आहे.

साहित्यिक दृष्टीने गुप्तकाळ भारताच्या सुवर्णयुगाची साक्ष देतो असे म्हणावे लागते. विविध शास्त्रे, स्मृतिग्रंथ, आयुर्वेदावरील ग्रंथ, काव्यनाटकादी संस्कृत साहित्य असे अनेकांगी साहित्य या काळात रचले गेले, असे समीक्षकांचे मत आहे. सुरक्षित व सुस्थिर समाजाचे एक लोभस प्रतिबिंब या काळातील कृतींच्या पात्रविशेषांच्या माध्यमातून, त्यांच्या कलासक्त स्वभावातून ठळकपणे दिसते. दामोदर कोसंबीसारखा एखादा विद्वान सरंजामशाही साहित्य म्हणून या साहित्याचा निषेध करताना आढळतो, पण ते अपवादात्मक म्हणावे लागेल. विचारवंतांवर तत्कालीन मार्क्सवादाचा प्रभाव पडला व त्यामुळे ही विचारधारा निर्माण झाली असे म्हणता येईल. स्त्रीत्ववादाच्या अंगाने पाहिले असता रवींद्रनाथ टागोरांनाही काही भाग आक्षेपार्ह वाटला व त्यांनी तशी परखड समीक्षा केली. हा अलीकडील इतिहास आहे. तरीही युरोपीय समाजाला व येथील आंग्लभाषाविशारदांना संस्कृतची मोहिनी पडली आणि अनुवादाच्या माध्यमातून अखिल विश्वात पसरली, हे सत्य आहे. जागतिक स्तरावर जे वाङ्मय अभ्यासले जाते, त्यात रामायण, महाभारताबरोबरच पंचतंत्र, शाकुंतल, भासाची नाटके, बाणाची कादंबरी इत्यादी साहित्याचे अध्ययन होते, ही बाब भारतीयांसाठी खचितच उत्साहवर्धक आहे.

असे असले, तरी प्रथितयश लेखकांच्या कृतीत सामान्य जनतेचे प्रतिबिंब अभावाने येते, ही वस्तुस्थिती नाकारता येत नाही. शूद्रकाचे मृच्छकटिक, दंडीचे दशकुमारचरित, बाणाचे हर्षचरित असे काही अपवाद सोडले, तर सर्व सामान्य प्रजेला कालिदास-भवभूतींनी फारसा न्याय दिला नाही, हे नमूद करावे लागते. अर्थात त्यामुळे त्यांच्या साहित्याची उंची वा खोली रसवत्तेत जराही कमी होत नाही.

**- डॉ. गौरी माहुलीकर**

**संदर्भग्रंथसूची :-**


| अनु. | लेखकाचे नाव | पुस्तकाचे नाव |
|---|---|---|
| १) | कोसंबी दामोदर धर्मानंद | प्राचीन भारतीय संस्कृति व सभ्यता, डायमंड प्रकाशन, पुणे |
| २) | राजपुरोहित भगवतीलाल | भारतीय कला और संस्कृति, शिवालिक प्रकाशन, दिल्ली |
| ३) | रानडे अशोक | इण्डॉलॉजी अँड एथ्नोम्युझिकॉलॉजी, प्रोमिला अँड. कं. दिल्ली |
| ४) | डांगे सदाशिव अंबादास | हिंदू धर्म आणि तत्त्वज्ञान, महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळ, नागपूर १९७३ |
| ५) | दांडेकर रा. ना. | वेदिक रिलिजन अँड माइथॉलॉजी, पुणे |
| ६) | दांडेकर रा. ना. | रिसेण्ट ट्रेंड्स इन इण्डॉलॉजी, बोरी, पुणे |
| ७) | दीक्षित श्रीनिवास | भारतीय तत्त्वज्ञान, फडके प्रकाशन, पुणे, २०१० |
| ८) | शिवगणेश मूर्ती | इंट्रॉडक्शन टू मॅन्युस्क्रिप्टॉलॉजी, शारदा प्रकाशन, दिल्ली, १९९६ |
| ९) | करंबेळकर वि. वा | संस्कृत साहित्याचा सोपपत्तिक इतिहास, श्रीशारदा प्रकाशन, नागपूर, १९५४ |
| १०) | जोशी रघुनाथ | अनोखा परिचय ऋग्वेद आणि उपनिषदांचा, मधुश्री प्रकाशन, पुणे, २०११ |
| ११) | गुणे पांडुरंग दामोदर | तुलनात्मक भाषाविज्ञान, हिंदी रूपांतर भोलानाथ तिवारी, मोतीलाल बनारसीदास, दिल्ली, १९९६ (१९९३) |
| १२) | चतुर्वेदी शारदा | भाषाविज्ञानम् भारतीय विद्या संस्थान, वाराणसी |

| | | |
|---|---|---|
| १३) | रे विद्युत | पाणिनी टू पतंजली - अ ग्रॅमॅटिकल मार्च, डी. के प्रिंटवर्ल्ड, दिल्ली, २००४ |
| १४) | कार्डोना जॉर्ज | पाणिनी – अ सर्व्हे ऑफ रिसर्च, मोतीलाल बनारसीदास, दिल्ली, १९८० |
| १५) | मीमांसक युधिष्ठर | संस्कृत व्याकरणशास्त्रका इतिहास, प्रथम भाग, भारतीय प्राच्यविद्या प्रतिष्ठान, दिल्ली सवंत, २००७ |
| १६) | झाला जी. | अश्विना इन द ऋग्वेद अँड अदर इण्डॉलॉजिकल एस्सेज, मुन्शीराम मनोहरलाल, दिल्ली, १९७८ |
| १७) | शेंडे एन. जे. | रिलीजन अँड फिलॉसॉफी ऑफ द अथर्ववेद, बोरी, पुणे, १९५२ |
| १८) | दयानन्द सरस्वती | सत्यार्थ प्रकाश, आर्ष साहित्य प्रचार ट्रस्ट, दिल्ली, १९८७ |
| १९) | पंडित मनोहर देवकृष्ण | प्राचीन भारतीय भाषाशास्त्र, शुभदा सारस्वत प्रकाशन, पुणे, २००० |
| २०) | मॅकडोनेल ए. | वेदिक माइथॉलॉजी, इण्डॉलॉजिकल बुक हाउस, वाराणसी, १९६३ |
| २१) | मॅकडोनेल ए. | अ हिस्ट्री ऑफ संस्कृत लिटरेचर, मोतीलाल बनारसीदास, दिल्ली, १९७६ |
| २२) | पुसाळकर ए. | स्टडीज् इन द एपिक्स पुराणाज, भारतीय विद्या भवन, मुंबई, १९५३ |
| २३) | विण्टर्निट्ज मॉरित्स | अ हिस्ट्री ऑफ इंडियन लिटरेचर, मोतीलाल बनारसीदास, दिल्ली, १९८८ |
| २४) | डांगे सिंधू | भारतीय साहित्याचा इतिहास भाग - १, मंगल प्रकाशन, नागपूर |
| २५) | मांडे प्रभाकर | वेदप्रभा सविता प्रकाशन, औरंगाबाद |
| २६) | गोखले, माहुलीकर, वैद्य | अभिजात संस्कृत साहित्याचा इतिहास, ऋतायन, मुंबई, २००० |


***

# प्रस्तावना

## भारतीय इतिहासलेखनशास्त्र

प्राच्यविद्येच्या संदर्भामध्ये वेगवेगळ्या पातळ्यांवर सध्या मोठ्या प्रमाणात काम होत आहे. या क्षेत्रातील विद्वानांपैकी रा.ना. दांडेकर यांनी प्राच्यविद्यातील विविध प्रवाहांच्या संदर्भात असे म्हटले की, प्राच्यविद्येस 'भारतविद्या' म्हणूनही संबोधता येईल. कालक्रमाच्या दृष्टीने याचा परीघ व आशयाच्या दृष्टीने विषयाची खोली वाढते आहे. पद्धती शास्त्राच्या (Methodologyच्या) अनुसार पाहतासुद्धा या विषयात आता केवळ प्राचीन भारतीय विद्येचा अभ्यास न होता भारताच्या वर्तमान जीवनाचे अध्ययनही होत आहे.

भारताविषयी असलेल्या कुतूहलापोटी युरोपीय विद्वानांकडून आधुनिक प्राच्यविद्येचा पाया घातला गेला. सन १७८४मध्ये इंग्रज भाषा–पंडित सर विल्यम जोन्स याने कलकत्ता येथे जगातील पहिल्या 'एशियाटिक सोसायटी'ची स्थापना केली. 'एशियाटिक सोसायटी ऑफ बेंगाल' असे त्या संस्थेचे नाव होते. हाच खरे तर या विषयाचा प्रारंभबिंदू होता. युरोपमधील विद्वानांच्या दृष्टीने ही एक उत्तेजक घटना होती, तर भारतीय लोकांना स्वतःची ओळख पटण्याच्या दृष्टीने या घटनेचे महत्त्व होते.

या संदर्भात साप्ताहिक विवेक या संस्थेने 'आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण - शिल्पकार चरित्रकोश' हा एक बृहत प्रकल्प हाती घेतला. एकूण बारा खंडांतून पूर्ण होणाऱ्या या चरित्रकोशाचा 'प्राच्यविद्या' हा एक भाग आहे. या महत्त्वाकांक्षी व दीर्घकाळ परिणाम करणाऱ्या प्रकल्पात त्या त्या विषयातील अनेक विद्वान सहभागी आहेत. प्राच्यविद्येच्या अनुषंगाने अभिजात संस्कृत साहित्य व त्या संदर्भात झालेल्या कामाचा परिचय गौरी माहुलीकर यांनी यथार्थपणे करून दिला आहे. तर वेद, देव, आगम पद्धतीचा विकास तसेच पुरातत्त्व आणि आनुषंगिक सर्वच विषयांच्या अभ्यासासंदर्भात डॉ. अरविंद जामखेडकर यांनी विस्तृत प्रस्तावना लिहिली आहे. या प्रस्तावनेत सहजगत्या लेखनातून अनेक विचारप्रवण सूत्रांची पखरण झाली आहे. याच विषयाच्या अनुषंगाने सन १८००-२००० या दोनशे वर्षांच्या कालखंडाला समोर ठेवून भारताच्या व विशेषतः महाराष्ट्राच्या इतिहास क्षेत्रामध्ये योगदान देणाऱ्या व्यक्ती, अभ्यासक यांची नोंद व्हावी व त्यांनी केलेल्या कामाचा परिचय व्हावा, या दृष्टीने मी हा लेखनप्रपंच करीत आहे.

यातही अठराव्या-एकोणिसाव्या शतकातील अभ्यासकांची नोंद करताना मराठा इतिहासाच्या संदर्भातील अभ्यासक अशी मर्यादा विचारात घेऊन त्यांचा परिचय करून देत आहे.

मध्ययुगीन काळाच्या संदर्भात भारतीय पातळीवर विभागणी करताना प्रामुख्याने इस्लामी आक्रमण व प्राचीन राजवटींचा अंत नवीन सांस्कृतिक संक्रमणाच्या प्रारंभापासून तो मांडला जातो. तर महाराष्ट्राच्या संदर्भामध्ये हीच घटना यादव साम्राजाच्या ऱ्हासानंतर - म्हणजे तेराव्या शतकापासून मांडली जाते. या कालखंडाच्या उत्तरार्धात - म्हणजे मोगल काळाच्या शेवटी सतराव्या शतकात छत्रपती शिवाजी महाराजांनी स्थापन केलेले स्वराज्य आणि त्याचा झालेला विस्तार ही एक अलौकिक घटना मानली गेली. छत्रपती शिवराय हे युगपुरुष होते. यानंतर ब्रिटिशांचे आगमन आणि पेशवाईचा अस्त इथपासून आधुनिक कालखंडाचा प्रारंभ झाला, असे मानणारा एक मोठा वर्ग आहे व काळाच्या दृष्टीने एकोणिसाव्या-विसाव्या शतकात गतकालीन महाराष्ट्र समजून घेण्यासाठी ज्या अभ्यासकांनी काम केले, त्यातून आजच्या महाराष्ट्राच्या प्रेरणा स्पष्ट झाल्या, अशा मान्यवरांची ओळख या चरित्रकोशात करून देण्यात आली आहे. इतिहासलेखनशास्त्राच्या दृष्टीने निर्माण झालेल्या विविध प्रवाहांची ओळख ही प्राच्यविद्येच्या परिघावर फिरणारी बाब ठरते; असे असले, तरी त्यांचा परिचय आनुषंगिक बाब म्हणून पाहता येते.

भारतीय इतिहासलेखनशास्त्राची ओळख करून घेत असताना मुळात इतिहास या विषयाच्या बदलत जाणाऱ्या व्याख्या पाहणे सयुक्तिक ठरते.

**इतिहासाची व्याप्ती**

लॉर्ड ॲक्टन या पाश्चात्त्य विद्वानाला भूतकाळाचा वेगळा संदर्भ गवसला. त्यामध्ये गतकाळातील सर्व धडपड ही मानवी स्वातंत्र्याची गाथा आहे (हिस्टरी इज अनफोल्डिंग स्टोरी ऑफ ह्यूमन फ्रीडम) असे म्हटले, तर इ.एच. कार यांनी भूतकाळाकडे वेगळ्या दृष्टीने पाहिले. भूतकाळ, वर्तमान, भविष्यकाळ या अतूट साखळीतून आपले भौतिक जीवन वाटचाल करत असल्यामुळे भूत, वर्तमान व भविष्य यांच्यातील सतत चालणारा संवाद असतो. एकूण, इतिहास म्हणजे भूतकाळ व वर्तमानकाळ यांच्यातील न संपणारा संवाद ही इतिहासाबद्दलची दृष्टी सर्वमान्य होण्यासारखी आहे. याही पुढे जाऊन फर्नांड ब्रॉडेल या फ्रेंच इतिहासकाराला एकूण मानवी इतिहासाच्या वाटचालीत पर्यावरणाचे व पर्यावरणीय बदलाचे महत्त्व विशेष वाटते. म्हणून नवपुरातत्त्वज्ञ आता 'संस्कृती म्हणजे मानवाने पर्यावरणाशी मिळतेजुळते घेण्यासाठी उपयोगात आणलेले एक साधन' अशी संस्कृतीची व्याख्या करत आहे. मानव नैसर्गिक साधनसंपत्तीचा उपयोग किती प्रभावीपणे करू शकतो, यावर त्याची संस्कृती व इतिहास प्रगत आहे वा अप्रगत हे ठरवता येते. नैसर्गिक साधनसंपत्तीचा उपयोग करून घेण्यासाठी तंत्रज्ञान हे एकमेव साधन आहे व या तंत्रज्ञानाच्या प्रगतीवर संस्कृतीची प्रगती होत असते. इतिहासाच्या अनेक व्याख्यांपैकी कार्लाइल या इतिहास तत्त्ववेत्त्याने इतिहासाविषयी आपले मत व्यक्त केले की, इतिहास म्हणजे श्रेष्ठ व्यक्तींची कामगिरी होय. (हिस्टरी इज नथिंग बट बायोग्राफी ऑफ ग्रेट मेन.) जगातील आद्य इतिहासकर म्हणून 'हिरोडॉटस' याची नोंद केली जाते. त्याने इतिहासाविषयी म्हटले की, गतकालीन घटनांना अनन्यसाधारण महत्त्व असते. गतकालीन अविस्मरणीय घटनांचा शोध म्हणजे इतिहास, तर जॉन सिली हा इतिहासशास्त्रज्ञ 'गतकालीन राजकारण म्हणजे इतिहास' असे मानतो.

**पूर्वपरंपरा**

जागतिक पातळीवर इतिहासलेखनाची परंपरा पाहताना 'हिरोडॉटस' (इ.स.पूर्व ४८४-४२५) हा प्राचीन ग्रीक साम्राज्याचा इतिहासकार, जगातील पहिला इतिहासकार म्हणून मानला जातो. त्याने संपूर्ण आयुष्यभर ग्रीक राज्यवटीच्या इतिहासाचा शोध घेतला व तो त्या काळाचा साक्षीदार होता. त्याचा समकालीन असलेला थ्युसिडाईडीज (इ.स.पूर्व ४६०-३९५) याने इतिहासलेखनाला शास्त्रशुद्ध पद्धतीने आकार देण्याचा प्रयत्न केला.

अशाच प्रकारे स्ट्रॅनो (इ.स.पूर्व ६४-२४) हा पॉलिबियस याचा समकालीन होता. याने इतिहासलेखनाला भूगोलाची जोड देण्याचा प्रयत्न केला. ॲलेक्झांडरच्या स्वारीचे तपशील त्याने नोंदवले. अगोदर होऊन गेलेल्या इतिहासलेखनाचा त्याने आधार घेतला, असे दिसते. प्लुटार्क (इ.स. ५०-१२५) याने ग्रीक व रोमन इतिहासातील ४६ समकालीन व्यक्तिरेखा निवडून तत्कालीन समाजाचे चित्रण केले. 'Lives' (लिव्हज) या ग्रंथात त्याने तत्कालीन चालीरितींची, परंपरांची नोंद केली. यासारख्या जागतिक स्तरावरील इतिहास लेखकांचा परिचय आपणास करून घेता येतो. तथापि, स्थलकालाच्या दृष्टीने इतिहासाचे तत्त्वज्ञान कसे विकसित झाले याची व त्यात सहभागी असणाऱ्या इतिहासकारांची नोंद सारांशाने घ्यायला हवी.

सामान्यतः इतिहास म्हणजे भूतकाळात घडलेल्या घटनांची सविस्तर नोंद. या घटनांकडे कोणत्या दृष्टीने पाहावे, याविषयी होणाऱ्या चिंतनातून इतिहासाविषयीचे तत्त्वज्ञान तयार झाले. कार्लाइलसारखा इतिहासकार केवळ थोर व्यक्तींचे चरित्र व कार्य यालाच इतिहास मानत असे, तर जॉन सिली याच्या दृष्टीने इतिहास म्हणजे भूतकाळातील राजकारण होय. लॉर्ड ॲक्टनच्या मते, इतिहास हा भूतकाळातील मानवी स्वातंत्र्याची धडपड ठरते. अर्नाल्ड टॉयन्बींच्या मते, इतिहास म्हणजे संस्कृतीच्या उदय-अस्ताची गाथा आहे. कार्ल मार्क्स याने द्वंद्वात्मक भौतिकवादाचा सिद्धान्त मांडत इतिहासाची मीमांसा केली. इ.इच. कार यांना इतिहास म्हणजे भूत व वर्तमानकाळ यातील कधीही न संपणारा संवाद वाटतो. अशा विविध भूमिकांमधून इतिहासविषयक तत्त्वज्ञान सिद्ध झाले.

प्रबोधनयुगामुळे विद्येच्या पुनरुज्जीवनामुळे जो शास्त्रशुद्ध दृष्टीकोन विकसित झाला, त्यातून युरोपीय देशांत इतिहासविषयक तत्त्वज्ञानाचा उदय झाला व इतिहासलेखनाला नवीन दिशा मिळाली. त्यातील काही इतिहास समजून घ्यायला हवेत.

**इतिहास, तत्त्वज्ञान**

**गिआम्बानिस्ता विको** (सन १६६८-१७४४)

विको या इटालियन तत्त्ववेत्त्याने भौतिक जगतातील इतिहास एका विशिष्ट वर्तुळातून घडत असतो, असा सिद्धान्त मांडला. 'सायक्लिकल थिअरी' म्हणून तो ओळखला जातो. राज्याचा किंवा राष्ट्राचा उदय-विकास व ऱ्हास या पद्धतीने इतिहासाचे वर्तुळ गतिमान होते. 'देवयुग' (Theocratic), महापुरुषांचे युग (Aristocratic), जनयुग (Democratic) या तीन युगांतून गतकाळाची वाटचाल होत आली, असे तो म्हणतो. (भारतीय परंपरेतसुद्धा 'युग' ही संकल्पना व चक्राकार पद्धतीने होणारी वाटचाल सत्ययुगापासून कलियुगापर्यंत मानली जाते.) आदिम कालखंडामध्ये दैवयुगामध्ये निसर्गाला मानवी भावजीवनात महत्त्वाचे स्थान होते. त्यामुळे समाजरचनेत निसर्गसत्ता व देवसत्ता यांना महत्त्व होते. पुढे त्याचा आत्मविश्वास वाढला, तसा दैवी सत्तेच्या प्रवाहातून तो मानवकेंद्रितत्वाकडे झुकला. ही 'नायकप्रधान समाजरचना, मानली गेली. पुढील टप्प्यात सर्व माणसे समान आहेत, या भूमिकेतून लोककेंद्री जीवनदृष्टीला महत्त्व प्राप्त झाले. मानव मध्यवर्ती मानणे हे या युगाचे वैशिष्ट्य. 'द न्यू सायन्स' (The New Science, १९७५)' या आपल्या ग्रंथात विको याने आपला इतिहासाविषयक चक्राकर गतीचा सिद्धान्त मांडला व त्याचा हा सिद्धान्त किंवा ऐतिहासिक पद्धतीची परंपरा हेगेल व मार्क्स यांनी विकसित स्वरूपात मांडली. ऑगस्ट काँत (१७९८-१८५७) या फ्रेंच तत्त्ववेत्त्याने विकोप्रमाणेच मानवी विकासाचे तीन टप्पे मांडले. धर्मशास्त्रीय, आदिभौतिक आणि प्रत्यक्षार्थवादी असे तीन टप्पे त्याने संबोधले.

ख्रिस्ती इतिहासलेखनावर दैवी योजनेच्या सिद्धान्ताचा प्रभाव होता. सेंट ऑगस्टीन ऑफ हिपो (इ.स.पूर्व ३५४-४३०) याच्या 'कन्फेशेअस अँड सिटी ऑफ गॉड' या ग्रंथामध्ये ख्रिस्ती धर्मशास्त्राच्या दृष्टीने इतिहास आकलनाचा प्रयत्न झाला. सोळाव्या शतकातील पाश्चिमात्य जगतात प्रबोधन घडून आले व दैववादी दृष्टीकोनातून बुद्धिवादाकडे

त्याची वाटचाल सुरू झाली. यातूनच इतिहासाकडे पाहण्याच्या 'रॅशनॅलिस्ट' सिद्धान्ताचे प्रतिपादन झाले.

**इमॅन्युएल कॉंट** (सन १७२४-१८०४)

हा जर्मन इतिहासशास्त्रज्ञ होता. त्याने 'Idea For Universal History' (आयडिया फॉर युनिव्हर्सल हिस्टरी) या ग्रंथात इतिहासाचे तत्त्वज्ञान मांडले. या ग्रंथामुळे इतिहासलेखनाबाबत व्यक्तिसापेक्षतेकडे व वस्तुनिष्ठितेच्या सापेक्षतेकडे कसे पाहावे याचा ज्ञाननिष्ठ आधार तयार झाला. Subjective Universality (सब्जेक्टिव्ह युनिव्हरसॅलिटी) ही संकल्पना इतिहासाच्या तत्त्वज्ञानाला पोषक ठरली.

अठराव्या शतकात हर्डर आणि अँटोनिओ कॉडरसेट हे आणखी दोन प्रमुख इतिहास तत्त्ववेत्ते होऊन गेले. हर्डरने जगात घडणाऱ्या प्रत्येक घटनेमागे एक सूत्र असते, ते सूत्र समजावून घेणे म्हणजे इतिहासातील सत्याचा शोध घेणे असे प्रतिपादन केले आहे. इतिहासाचे विवेचन करताना ब्राह्यप्रवाह आणि अंतःप्रवाह यांच्यातल्या संघर्षांचा विचार आवश्यक असल्याची भूमिका त्याने मांडली. अँटोनिओ कॉडरसेटने इतिहासाचे तत्त्वज्ञान मांडताना जगातील प्रत्येक घटना स्वातंत्र्य, संपत्ती, बुद्धी यांच्या समन्वयातून घडत असते, असे सूत्र मांडले.

**जॉर्ज विल्हेम फ्रेडारिच हेगेल** (सन १७७०-१८३१)

जर्मनीतील या विचारवंतावर कॉंटचा प्रभाव होता. विश्वचैतन्य, द्वंद्वात्मकता, विरोधविकास व ऐतिहासिकता या हेगेलच्या तत्त्वज्ञानातील प्रमुख संकल्पना आहेत. जग हे विश्वचैतन्याचा आविष्कार आहे, हे त्याचे मध्यवर्ती सूत्र आहे. तसेच परिवर्तनाची प्रक्रिया विकासमार्गी असते, असे त्याचे मत आहे. द्वंद्वात्मक विकास सिद्धान्तात विरोध आहे म्हणून गती आहे, गती आहे म्हणून विकास आहे, असे मत नोंदवतो. सिद्धान्त प्रतिसिद्धान्त समन्वयी सिद्धान्त (Thesis Anti thesis Synthesis) मांडतो. या चक्राकार गतीत विकासाची प्रक्रिया सुरू असते. या तत्त्वज्ञानाला हेगेलियन डायलेक्टिक (Dialectic Method) असे म्हटले जाते. मानवी मन हे विश्वचैतन्याचा आविष्कार आहे, असे तो मानतो. ऐतिहासिक अनिवार्यता (Historical Inevitability) ही हेगेलच्या तत्त्वज्ञानातील आणखी एक संकल्पना आहे. अपरिहार्यतेतही विश्वाच्या परमसत्याचाच आविष्कार असतो. इतिहासाला गतिमान करणाऱ्या प्रेरणाच परिवर्तनालाही प्रेरक ठरतात आणि त्यातून समाजात ऐतिहासिक स्थित्यंतरे घडून येतात. इतिहासाच्या प्रेरणेचा शोध घेताना त्याने इतिहासाचे तीन प्रकार मानले. तसेच जगातील मानवी समूहाची चार गटांत विभागणी केली. त्यात इजिप्त, चीन, भारत, आशिया मायनर व पर्शिया या प्राचीन संस्कृतींचा एक गट, ग्रीक संस्कृती, रोमन संस्कृती व जर्मनी संस्कृती अशी तो विभागणी करतो. विरोधाशिवाय विचाराची म्हणजे विश्वाची प्रगती होत नाही, असे तत्त्वज्ञान तो सांगतो. सिद्धान्त, प्रतिसिद्धान्त व समन्वय सिद्धान्त या मार्गाने विकास साधला जातो. असा विरोधविकासवादी सिद्धान्त इतिहासलेखनाला एक मूलभूत अधिष्ठान देऊन गेला. कार्ल मार्क्स याने हा सिद्धान्त पुढे नेऊन इतिहासाच्या तत्त्वज्ञानाची आणखी नवी मांडणी केली.

**लिओपोल्ड रॅन्के** (सन १७९५-१८८६)

एकोणिसाव्या शतकातील आधुनिक इतिहासशास्त्राचा जनक म्हणून लिओपोल्ड रॅन्केची ओळख आहे. इतिहास म्हणजे पुराणकथा किंवा काल्पनिक रंजन न राहता ते एक सामाजिक शास्त्र बनले. इतिहासाला शास्त्र मानणारा हा पहिला इतिहासवेत्ता असल्यामुळे त्याला इतिहासाचा जनक म्हटले जाते. मात्र जेव्हा तर्कबुद्धीला न पटणाऱ्या अतर्क्य गोष्टी इतिहासात दिसू लागतात, तेव्हा त्याचे विज्ञाननिष्ठ स्पष्टीकरण देण्याऐवजी तो दैववादावर अवलंबून राहतो. असे असले, तरी पुराव्याशिवाय इतिहास असूच शकत नाही. No Source No History या त्याच्या भूमिकेमुळे वस्तुनिष्ठ लेखनाविषयी त्याचा आग्रह स्पष्ट होतो.

**कार्ल मार्क्स** (सन १८१८-१८८३)

मार्क्सने लिहिलेला 'दास कॅपिटल' हा ग्रंथ व 'साम्यवादाचा जाहीरनामा' (Communist Manifesto) या दोन संहिता साम्यवादी विचाराच्या आद्य संहिता मानल्या जातात. मार्क्सने मानवी समाजाच्या वाटचालीच्या पाच अवस्था सांगितल्या. साम्यवादी समाजरचना हे मार्क्सचे स्वप्न होते. राज्य ही संस्था नष्ट होईल, लोक इतके नीतिमान असतील, की त्यांचे नियंत्रण करणाऱ्या शासनव्यवस्थेचे काम राहणार नाही, अशा आदर्श समाजरचनेचे चित्र रंगवणारे हे तत्त्वज्ञान होते. अर्थात हेगेलच्या व द्वंद्वात्मक सिद्धान्ताला त्याने आध्यात्मिक संकल्पनेच्या जोखडातून मुक्त करून भौतिक जगाच्या भूमीवर आणले.

**ओसवॉल्ड स्पेंगलर** (सन १८८०-१९३६)

इतिहास अभ्यासात सांस्कृतिक इतिहासाला केंद्रस्थानी मानणारा विचारवंत. भारतीय संस्कृती ही अध्यात्मनिष्ठ असून चंगळवाद हे पाश्चात्त्य संस्कृतीचे वैशिष्ट्य आहे, असे तो मानतो. 'द डिक्लाइन ऑफ द वेस्ट' या ग्रंथातून त्याने महायुद्धातून होणार संस्कृतीतल्या विनाशकारी मानसिकतेचे विश्लेषण केले आहे. तथापि, कोणत्यातरी गूढ नियमानुसार मानवी जीवन नियंत्रित होते असे त्याला वाटायचे.

**अर्नाल्ड टॉयन्बी** (सन १८८९-१९७५)

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात याने बारा खंडांतून इतिहासविषयक लेखन केले. मानवी जीवनाचा अभ्यास म्हणजेच तत्कालीन संस्कृतीच्या विकासाचा अभ्यास हे सूत्र त्याने स्पष्ट केले. विविध संस्कृतींच्या तौलनिक अभ्यासासाठी टॉयन्बीच्या लेखनाला महत्त्व होते. इतिहास म्हणजे संस्कृतीच्या उदय-अस्ताचा आलेख अशी व्याख्या तो करतो. निरनिराळ्या आव्हानांना सामोरे जात संस्कृती विकसित होत असते, हे स्पष्ट करताना निसर्ग व मानव यांच्याकडून निर्माण होणाऱ्या भूकंप, अतिवृष्टी, लढाई व घातपात इत्यादी आव्हानांचा तो उल्लेख करतो. प्रगती आणि अधोगती ही कोणा एका घटकामुळे होत नाही, तर अनेक घटनांचा तो परिपाक असतो, हा त्याचा कारणनामअनेकतेचा दृष्टीकोन इतिहासाकडे वस्तुनिष्ठपणे पाहण्याची नवी नजर देणारा आहे. हीच त्याची महत्त्वाची फलश्रुती म्हटली जाते.

**रॉबिन जॉर्ज कॉलिंगवुड** (सन १८८९-१९४३)

ऑक्स्फर्ड विद्यापीठातून पदवी संपादन केल्यावर गुप्तहेर खात्यात काम करणारा रॉबिन जॉर्ज कॉलिंगवुड आयुष्याच्या उत्तरार्धात इतिहासावर काम करताना, 'आयडियाज ऑफ हिस्टरी' हा ग्रंथ लिहितो. इतिहासात संपूर्ण वस्तुनिष्ठेचा आग्रह धरता येणार नाही, असे मत तो मांडतो. ऑल हिस्टरी इज अ हिस्टरी ऑफ थॉट (All History is a history of thought) ही त्याची इतिहास तत्त्वज्ञानविषयक भूमिका होती. विशिष्ट ज्ञानव्यूहातून ऐतिहासिक घटनांचे वर्णन, विश्लेषण, मूल्यमापन करणे ही इतिहासकाराची भूमिका राहते.

**अंतानिओ ग्रामची** (सन १८९१-१९३७)

या इटालिअन विचारवंताने Subalternism theory नवा विचार मांडून वंचितांच्या इतिहासाकडे पाहण्याची दृष्टी दिली. History from below (हिस्टरी फ्रॉम बिलो) हा विचार इतिहासात ग्रामचीने रुजवला. अभिजनांपेक्षा सर्वसामान्यांचा इतिहास अधोरेखित करण्याचा त्याचा प्रयत्न राहिला. यातूनच लोकइतिहासाचा नवा प्रवाह निर्माण झाला. जागतिक पातळीवर या प्रवाहाचा प्रभाव आधुनिक भारतीय इतिहासलेखनावर पडल्याचे जाणवते. इतिहासलेखनाच्या विविध परंपरांचा विचार करता, ऑक्स्फर्ड व केंब्रिज परंपरा ही साम्राज्यवादी दृष्टीकोनातून इतिहासलेखन करणारी राहिली. या दृष्टीकोनातून जेम्स स्टुअर्स मिलने 'हिस्टरी ऑफ इंडिया' ग्रंथ लिहिला. यात युरोपीयांनी वंशश्रेष्ठत्वाचा अहंकार जपला, पौर्वात्यवादी दृष्टीकोनातून जे इतिहासलेखन झाले, त्यात विल्यम जोन्स

व मॅक्स म्यूलर यांची नोंद करावी लागते. राष्ट्रवादी दृष्टीकोन समोर ठेवून काशी प्रसाद जैसवाल, यू.एन. घोषाल, डॉ. आळतेकर यांसारख्यांनी इतिहासलेखन केले. डॉ. रामकृष्ण भांडारकर, डॉ. श्रीधर व्यंकट केतकर यांनी दख्खनच्या पठाराचा इतिहास याच दृष्टीने लिहिला. खरे तर, साम्राज्यवादी इतिहासलेखनावरील ही प्रतिक्रिया होती. समाजशास्त्रीय दृष्टीकोन समोर ठेवून मॅक्स वेबर याने लेखन केले. इतिहासाचा अभ्यास हा समाजघटकांचा व सामाजिक अंतःक्रियांचा अभ्यास असतो, असे मानून झालेल्या इतिहासलेखनात टॉयन्बीच्या लेखनाची नोंद करावी लागते. इतिहासलेखनातील एक प्रवाह म्हणून आधुनिकोत्तर दृष्टीकोन विचारात घ्यावा लागतो. १९६०नंतर आधुनिकतावादी दृष्टीकोन मागे पडून आधुनिकोत्तर (Post Madern) हा दृष्टीकोन पुढे आला. याशिवाय पर्यावरणवादी दृष्टीने ऐतिहासिक घटनांचे आकलन करण्याचा प्रयत्न होताना दिसतो. या पार्श्वभूमीवर भारतीय विद्याभवन यांच्याकडून झालेले इतिहासलेखन वैशिष्ट्यपूर्ण मानावे लागते.

✻ ✻ ✻

प्राच्यविद्येच्या अनुषंगाने - त्यातही इतिहास विषयाच्या दृष्टीने पाहताना पां.वा. काणे (१८८०-१९७२) यांच्या धर्मशास्त्रावरील इतिहासाच्या कामासाठी (पाच खंडात काम) १९६३मध्ये त्यांना भारतरत्न देऊन सन्मानित करण्यात आले. तसेच रामकृष्ण गोपाळ भांडारकर (१८३७-१९२५) यांचा उल्लेख करावा लागतो. याच मालिकेत व.वि. मिराशी (१८९४-१९८५) यांना पद्मविभूषण देऊन त्यांच्या कामासाठी गौरवण्यात आले. वा.वि. मिराशी यांनी प्राच्यविद्येच्या दृष्टीने केलेले एकूण काम 'संशोधन मुक्तावली' आणि इंग्लिशमधील 'स्टडीज इन इंडॉलॉजी' या मालिकेत प्रकाशित करण्यात आले. त्यांनी कालिदास, भवभूती, बाण, गुणाढ्य, गाथा सप्तशती यांच्यावर केलेले काम प्रेरणादायी आहे. तर त्यांनी गुप्त, वाकाटक, कल्चुरी, चेंदी, शिलाहार, सातवाहन व पश्चिमी क्षत्रप या राजवंशांचा इतिहास, तत्कालीन समाजजीवन, साहित्य, कला, शिल्प यांचा एकहाती वेध घेण्याचा प्रयत्न केला आहे. 'कॉर्पस इन्स्क्रिप्शन्स इंडिकॅरम'चा खंड ४ हा कल्चुरी-चेंदी युगाशी संबंधित आहे. वाकाटक कालखंड व त्यांचे शिलालेख यांच्याशी खंड ५ संबंधित आहे, तर खंड ६ शिलाहार राजवंश व त्यांच्या अभिलेखाशी संबंधित आहे. याशिवाय त्यांनी सातवाहन राजवंश व पश्चिमी क्षत्रप यांचा इतिहास व कोरीव लेख हे काम महाराष्ट्र राज्य सरकारच्या साहित्य संस्कृती मंडळाने इंग्लिश व मराठीत प्रकाशित केले आहे, ही एकच बाब त्यांच्या एकूण कामाचा परिचय देणारी ठरते.

**व्हिस्नेट स्मिथ** (सन १८४८-१९२०)

प्राचीन इतिहासाच्या संदर्भामध्ये ज्यांनी काम केले त्यांत व्हिस्नेट स्मिथ यांचा विशेषत्वाने उल्लेख करावा लागतो. इंग्रजांना भारतीय इतिहासाची रूपरेषा समजावून देणारा हा इतिहासकार होता. त्याचे भारतात वास्तव्य होते. तो सनदी अधिकारी होता. भारतीय इतिहासाची कालक्रमानुसार ओळख करून देणारा इतिहासकार म्हणून त्याची नोंद होती. त्याने लिहिलेला 'ऑक्स्फर्ड हिस्टरी'चा ग्रंथ हा भारतीय इतिहासातील एक महत्त्वाचा टप्पा होता. 'अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया' (१९०४) याच्या १९२४पर्यंत चार आवृत्त्या निघाल्या. 'इंडियन कॉन्स्टिट्यूशनल रिफॉर्म व्ह्यूड इन दी लाईट ऑफ हिस्ट्री' (१९१९), 'कॅटलॉग ऑफ दी कॉईन्स इन इंडियन म्युझिअम', 'अशोका - द बुद्धिस्ट एम्परर इन इंडिया' यासारख्या त्याच्या ग्रंथनिर्मितीमुळे प्राच्यविद्यापंडित भांडारकर, मुखर्जी, मॅक फेल, यदुनाथ सरकार, रमेशचंद्र मुजुमदार आदी ज्येष्ठ संशोधकांवर त्यांचा प्रभाव दिसतो. ऑक्स्फर्ड इतिहासामध्ये त्याने पार्जिटरची पुराणातील वंशावळ स्वीकारली. समकालीन लेखकांनी दिलेले पुरावे तो प्रमाण मानत होता. त्याने मॅगेस्थिनिसची 'इंडिका', ह्युनएनस्तंगचे हर्षदरबाराचे वर्णन जशास तसे स्वीकारले, त्यामुळे काही परस्परविरोधी विधाने त्याच्या

लेखनात दिसतात. गुप्त काळासंदर्भात त्या काळात झालेल्या प्रगतीमुळे तो खूप प्रभावित झालेला दिसतो. सांस्कृतिकदृष्ट्या भारतीयांमध्ये एकात्मिक भावाचे दर्शन घडते, हे मत त्याने नोंदवले. 'हिस्टरी ऑफ फाइन आर्ट इन इंडिया ॲन्ड सिलोन' हाही त्याचा एक महत्त्वाचा ग्रंथ. असे असले, तरी इ.एच. कारने म्हटल्याप्रमाणे इतिहास समजण्यासाठी इतिहासकार समजून घ्यावा लागतो. तो शेवटी ब्रिटिश साम्राज्याचा प्रतिनिधी होता. असे असले, तरी त्याने भारतीय इतिहासाची धर्माच्या आधार नव्हे, तर कालक्रमानुसार मांडणी केली.

**रमेशचंद्र मुजुमदार** (सन १८८८-१९८०)

इतिहासलेखनशास्त्र व त्यातील विविध विषय समजावून घेत असताना यांची नोंद घ्यावी लागते. डॉ. रमेशचंद्र मुजुमदार १९३७-४२ या काळात ढाका विद्यापीठाचे उपकुलगुरू होते. 'हिस्ट्रीरी ऑफ बेंगॉल' हा ग्रंथ अभ्यासल्यावर गुजरातचे साहित्यसम्राट आणि भारतीय विद्याभवनचे जनक डॉ. कन्हैयालाल माणेकलाला मुन्शी यांनी 'द हिस्ट्रीरी अँड कल्चर ऑफ इंडियन पीपल' या योजनेची जबाबदारी त्यांच्यावर सोपवली. ३२ वर्षात त्यांनी एकूण ११ खंडांचे प्रकाशन करून एकूण ९,००० पृष्ठे प्रकाशित केली. त्यांच्या या कामामुळे 'केंब्रिज हिस्ट्री'चा प्रभाव संपुष्टात आला व त्यानंतर भारतीयांचा इतिहास समजावून घेण्यासाठी भारतीय विद्याभवनाचे काम पाहणे आवश्यक वाटू लागले. या मालिकेत डॉ. राजेंद्र प्रसाद, डॉ. सरकार हे प्रमुख संपादक होते. यातील खंड ६वा - 'वाकाटक-गुप्त काळ' याचे संपादन डॉ. रमेशचंद्र मुजुमदार व डॉ. आळतेकर यांनी केले. सत्यनिष्ठा ही इतिहासकारासाठी महत्त्वाची बाब आहे, असे ते मानत. हिंदुस्थानच्या इतिहासाची हिंदू, मुस्लीम, ब्रिटिश अशी विभागणी नाकारून प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन या मार्गाने वर्गवारी करून त्यांनी लेखन केले. भारतीय स्वातंत्र्याचा इतिहास लिहिला जावा, असा त्यांनी दप्तर परिषदेकडे (Record commissionकडे - रेकॉर्ड कमिशनकडे) आग्रह धरला. या समितीचे काही काळ ते संचालक होते. यानंतर त्यांनी भारतीय स्वातंत्र्यचळवळीचे तीन स्वतंत्र खंड प्रकाशित केले. सत्तेच्या जोरावर इतिहासाच्या पुनर्मांडणीचा प्रयत्न झाल्यास त्याला त्यांचा विरोध होत. राष्ट्रवादी इतिहासलेखनाची पार्श्वभूमी त्यांना लाभली होती. वस्तुनिष्ठ व मुद्देसूद लेखन ही त्यांच्या लेखनाची वैशिष्ट्ये होती. जवळपास ३१ ग्रंथांचे लेखन व संपादन त्यांच्या नावावर आहे. 'कॉर्पोरेट लाइफ इन एन्शन्ट इंडिया', 'द आंध्राज ॲन्ड कुषाणाज', 'क्लासिकल अकाऊन्टस ऑफ इंडिया', 'हिस्टीओग्राफी इन मॉडर्न इंडिया', (हेरास संस्थेसाठी व्याख्याने), 'हिस्ट्रीरी ऑफ फ्रीडम मूव्हमेन्ट इन इंडिया' हे ग्रंथ त्यांनी लिहिले त्यांच्या बुद्धिवादी विचारसरणीमुळे 'युनेस्को'ने त्यांना मानव इतिहास प्रकल्पाचे सदस्यत्व दिले. 'आयडियाज ऑफ हिस्ट्रीरी इन संस्कृत लिटरेचर' या आपल्या निबंधात 'कल्हणाचा राजतरंगिणी' हा ग्रंथ एक श्रेष्ठ ग्रंथ असल्याचे सप्रमाण दाखवले. भारतीय इतिहासाकडे पाहण्याचा नवीन दृष्टीकोन त्यांनी सांगितला. इतिहासाची त्यांनी केलेली मांडणी प्रमाण मानली जाते. साधनशुचितेला व सत्यनिष्ठेला त्यांनी प्राधान्य दिले.

**आळतेकर, आनंद सदाशिव** (सन १८९८-१९६०)

प्राचीन भारतीय इतिहास व संस्कृती यांचे शास्त्रशुद्ध पद्धतीने त्यांनी लेखन केले. इतिहासाच्या भौतिक साधनांवर व सांस्कृतिक साधनांवर त्यांचा भर होता. राष्ट्रकूट राजघराण्याचा इतिहास या विषयावर त्यांनी पीएच.डी.चे संशोधन केले व त्यात त्यांना १९२८मध्ये 'डी.लिट.' पदवी मिळाली. बनारस विद्यापीठात प्राध्यापक व पुढे पटना विद्यापीठात प्राचीन भारतीय इतिहास विभागाचे प्रमुख म्हणून त्यांनी काम केले. त्यांच्या नावावर एकूण ३६ ग्रंथांची नोंद आहे. इतिहास व प्राच्यविद्या या विषयातील सर्वमान्य संशोधक म्हणून त्यांनी आपला ठसा उमटवला. 'राष्ट्रकूट साम्राज्याचा इतिहास', 'टाऊन अँड सिटीज इन गुजरात अँड काठेवाड', 'स्टेट अँड गर्व्हरमेंट', 'इन एन्शिअन्ट इंडिया', 'हिस्टरी ऑफ बनारस', 'प्राचीन भारतातील शिक्षण पद्धती', 'दि पोझिशन ऑफ वुमेन इन हिंदू सिविलायझेशन', 'दि

कॅटलॉग ऑफ दी गुप्ता गोल्ड कॉईन्स इन दी बयान होर्ड', 'कॉर्पस ऑफ इंडियन कॉईन' (खंड ४), 'दि सोसायटी इन डेक्कन' (२०० बी.सी.- ५०० ए.डी.), 'रिपोर्ट ऑफ कुम्हारहरा एस्कव्हेशन' (१९५१-५५) यासारखे उल्लेखनीय ग्रंथ त्यांनी निर्मिले आहेत. प्राचीन भारतीय शिक्षण पद्धतीच्या संदर्भात त्यांचे काम उल्लेखनीय आहे. ज्या काळात साम्राज्यवादी दृष्टीकोनाचे अभ्यासक भारतीयांकडे कुतूहलाने व संशयाने पाहत, त्या काळात आळतेकरांनी हा ग्रंथ लिहून भारतीय शिक्षण पद्धती प्रगत व शास्त्रशुद्ध असल्याचे सिद्ध केले. येथील चारित्र्यसंवर्धन, व्यक्तिमत्त्व विकास, संस्कृती संवर्धन हा या शिक्षणाचा उद्देश असल्याचे त्यांनी म्हटले. मौखिक पाठांतर पद्धतीचा परिचय देताना त्यातील उपप्रकारांचा परिचय दिला. अग्रहार व शिक्षण पद्धतीविषयी तपशील उपलब्ध करून दिले. प्राचीन भारतीय प्रशासन पद्धतीवर त्यांनी टाकलेला प्रकाश, तसेच देवलस्मृती यांनी धर्मांतरितांना परत स्वधर्मात घेण्यासाठी केलेला निर्देश या गोष्टी त्यांनी स्पष्टपणे नजरेस आणून दिल्या. 'हिस्ट्रीरी ऑफ व्हिलेज कम्युनिटी इन वेस्टर्न इंडिया' (१९२७) या ग्रंथात त्यांनी समाजजीवनावर प्रकाश टाकला. इतिहासलेखनात वस्तुनिष्ठता, विश्वसनीयता आणण्याचा जाणीवपूर्वक प्रयत्न त्यांनी केल्याचे दिसते.

**दामोदर धर्मानंद कोसंबी** (३१ जुलै १९०७)

दामोदर धर्मानंद कोसंबी हे कार्ल मार्क्सच्या विचाराने प्रभावित असलेले तत्त्वचिंतक. यांच्या विचारपरंपरेचा वारसा डॉ. रोमिला यापर यांनी पुढे नेला. कोसंबी यांच्यावर अर्नाल्ड टॉयन्बींचा प्रभाव दिसतो. इतिहास म्हणजे संस्कृतीच्या उदयास्ताचा आलेख असे मानून त्यांनी इतिहासाकडे पाहिले. मुळात गणितज्ञ असणारे कोसंबी, इतिहासाचा गाढा व्यासंग असणारे होते. कोसंबी यांनी 'ॲन इन्ट्रोडक्शन टू द स्टडी ऑफ हिस्टरी' या ग्रंथात सामाजिक इतिहासातील प्रश्नांचा शोध घेतला. त्यांचे वडील धर्मानंद कोसंबी हे बौद्ध वाङ्मयाचे अभ्यासक होते. त्यांचा 'मिथ अँड रिॲलिटी' हा ग्रंथ दंतकथातील वास्तवाचा शोध घेणारा होता. त्यांनी भारतीय मिथकांचा अभ्यास व विश्लेषण केले. प्राचीन भारताचा इतिहास समजून घेण्यासाठी हा ग्रंथ महत्त्वाचा होता. प्राच्यविद्येतही त्यांचा व्यासंग होता. पंचमार्क नाण्यापासून विविध काळातील नाण्यांचा अभ्यास व प्राचीन भारतीय संस्कृतीतील आर्थिक वर्गकलह, तसेच राज्यघटनातील स्थित्यंतराची नोंद त्यांनी आपल्या संशोधनपर लेखनातून घेतली. त्यांनी अनेक संस्कृत हस्तलिखितांचे संपादन केले. 'जर्नल ऑफ ओरिएंटल रिसर्च' या ग्रंथातून त्यांचे लेखन प्रकाशित झाले. त्यांच्या अन्य ग्रंथांपैकी 'द कल्चर अँड सिव्हिलायझेशन ऑफ ॲन्शिअन्ट इंडिया इन हिस्टोरिकल प्रॉस्पेक्टिव्ह' हा महत्त्वाचा ग्रंथ आहे. कोसंबी यांचे चिंतन, व्यासंग आणि स्वतःच्या वेगळ्या शैलीतून वस्तुनिष्ठपणे केलेले प्रतिपादन ही त्यांच्या लेखनाची वैशिष्ट्ये मानावी लागतात. त्यांना लॅटिन, ग्रीक, जर्मन, इंग्लिश, संस्कृत, पाली, अरेबिक अशा विविध भाषा येत होत्या. त्यांच्या विचाराचा मागोवा घेतल्याशिवाय भारतीय इतिहासाचा अभ्यास पूर्णपणे करता येणार नाही.

आधुनिक काळातील निवडक प्राच्यविद्या व प्राचीन इतिहासाच्या लेखनाचा परिचय झाल्यावर मध्ययुगीन काळातील लेखनाचा आढावा व काही वैशिष्ट्ये अशी :

अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात प्राचीन काळाप्रमाणे मध्ययुगीन काळाकडे इंग्रज संशोधकांचे लक्ष वेधले गेले. रॉबर्ट ओर्मे (१७२८-१८०१), जेम्स टोड (१७८२-१८३५) यांनी राजपूतांचा इतिहास लिहिला. जोसेफ डेव्ही कनिंगहॅम याने शिखांचा इतिहास लिहिला. 'माल्कम' मेमॉयर्स ऑफ सेंट्रल इंडिया (१८८०) ग्रंथ, ज्यात होळकर रियासत व अहिल्याबाई चरित्र आहे. ग्रँट डफ (१७८९-१८५८) 'मराठ्यांचा इतिहास' याशिवाय ए. इलियट आणि डाऊसन 'हिस्ट्रीरी ऑफ इंडिया ॲज टोल्ड बाय इट्स ओन हिस्टोरिअन्स', खंड ७, (१८६७) ही अनेक खंडांची मालिका आहे. मुजुमदार यांनी नोंदवल्याप्रमाणे, या लेखनामुळे भारतीय इतिहासलेखनास गती मिळाली नाही तरीही प्राचीन भारतावरील भांडारकर, आर.सी. दत्त यांच्यासारखा दर्जाही या लेखनास प्राप्त झाला नाही. एकोणिसाव्या

शतकाच्या अखेरपर्यंत असे चित्र होते. मात्र विसाव्या शतकांतील इतिहास अभ्यासकांनी केलेले काम महत्त्वपूर्ण ठरते.

तवारीखांच्या माध्यमातून इस्लामिक जगतात दोन स्वतंत्र परंपरा निर्माण झाल्या. त्या भारतातही रूढ होत्या. पहिली परंपरा ही अरबी इतिहासकारांची होती. तर दुसरी इराणी तवारीखांची होती. तुलनेमध्ये अरबी इतिहासकारांची दृष्टी व्यापक होती. संपूर्ण समाजजीवनाची नोंद घेण्याचा त्यांचा प्रयत्न दिसतो. त्यांनी केलेल्या नोंदी कालक्रमानुसार होत्या. याउलट इराणी इतिहासकारांनी सुलतान व त्यांची प्रभावळ, सुलतानांचे कर्तृत्व व नादानपणा हाच विषय लेखनात मांडला. या परंपरेत झियाउद्दीन बारणी, अमीर खुसरो, इसामी यांसारख्या लेखकांचा समावेश होतो. भारतीय इतिहासलेखनासाठी अरबी लेखनाचा अधिक उपयोग होतो. त्यात महंमद तुघलकाच्या काळात होऊन गेलेले इब्ज बत्तूता आणि इब्न फादुल्ला हे महत्त्वाचे लेखक होते. त्यांच्या लेखनाचे इंग्लिश भाषांतर उपलब्ध आहे.

असे असले, तरी महाराष्ट्राच्या संदर्भामध्ये खऱ्या अर्थाने जे इतिहासलेखन झाले, त्यात जदुनाथ सरकार, महादेव गोविंद रानडे, वि.का. राजवाडे, सेतुमाधवराव पगडी, शेजवळकर यांचा प्रामुख्याने उल्लेख करावा लागतो. विशेषतः रानडे यांनी शिवकालाच्या उदयाची पार्श्वभूमी अत्यंत समर्थपणे अधोरेखित केली, तर शेजवळकरांनी इतिहास हा भौगोलिक पार्श्वभूमीवर घडत असतो, असे सांगून बी. सुब्बाराव यांच्याप्रमाणे इतिहासाची भौगोलिक पार्श्वभूमी स्पष्ट केली. इतिहासलेखनासाठी रानडेंनी घेतलेले परिश्रम सर्वमान्य आहेत. त्यांच्या मतांच्या पलीकडे जाऊन त्यांचे काम सातत्याने प्रेरणा देणारे राहिले आहे.

**रोमिला थापर** (जन्म १९३१)

यांचे इतिहासलेखनातील योगदानसुद्धा साम्यवादी दृष्टीकोनातून झाले असले, तरी ते महत्त्वाचे ठरते. ‘अशोका अँड डिक्लाइन ऑफ दी मौर्याज’ (१९६१) या ग्रंथाचा मराठी अनुवाद साहित्य संस्कृती मंडळाने केला. अशोकाच्या बौद्ध धर्माच्या आकर्षणाची त्यांनी चर्चा करून कारणमीमांसा केली असून मौर्य साम्राज्याच्या ऱ्हासाची कारणे स्पष्ट केली आहेत. याच पद्धतीने ‘इंडियन सोशल हिस्ट्रीरी - सम इन्टरप्रिटेशन’ हा त्यांच्या शोधनिबंधाचा संपादित संग्रह महत्त्वाचा ठरतो. भौतिक साधनांचा नव्याने अन्वयार्थ मांडण्याचा केलेला प्रयत्न, दुसरी बाजू समजून घेण्यासाठी उपयुक्त ठरतो.

❋ ❋ ❋

**न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे** (सन १८४२-१९०१)

‘राइज ऑफ मराठा पॉवर’ हा रानडे यांनी लिहिलेला ग्रंथ म्हणजे स्वराज्य संस्थापक शिवाजी महाराजांबद्दल पाश्चिमात्य इतिहासकारांच्या साम्राज्यवादी भूमिकेचा सखोल आणि अभ्यासपूर्ण ओजस्वी राष्ट्रवादी प्रतिवाद ठरेल. हा ग्रंथ राष्ट्रवादी इतिहास या संज्ञेचा अर्थ अभ्यासपूर्ण तयारीने व्यक्त करणारे उत्तम उदाहरण होय. शिवाय रानडे यांनी ‘एसेज ऑन इंडियन इकॉनॉमिक्स’ हा ग्रंथ अभिजात ब्रिटिश अर्थशास्त्रज्ञांच्या पारंपरिक भूमिकेवर तर्कशुद्ध राष्ट्रीय प्रतिक्रिया होती. यापूर्वी प्रोफेसर सिडनी ओवेन यांनी १८७२मध्ये ‘इंडिया ऑन द ईव्ह ऑफ द ब्रिटिश कॉन्क्वेस्ट’ या ग्रंथात मराठ्यांच्या युद्धतंत्राची मुक्तपणे स्तुती केली होती. तथापि साम्राज्यवादी इतिहासकार हे शिवाजी महाराजांबद्दल व त्यांच्या काळाबद्दल परमादराची भावना पिढ्यानपिढ्या वसावी इतके ते मोठे नव्हते, असा दृष्टीकोन ठेवत. ग्रँट डफ हा मराठेशाहीचा इतिहासकार मानला जात असला, तरी त्याच्या तीन खंडांतील चरित्रग्रंथात महाराष्ट्रातील उच्छृंखल आणि लुटारू प्रवृत्तीचे हिंदू (मराठे) काही काळ (मुस्लीम सत्तेखाली) दडपले गेले तरी, त्यांच्या ठायी असणारी, सुप्तपणे जिवंत असणारी आग त्यांच्यावर राज्य करणाऱ्या मुस्लीम राज्यकर्त्यांच्या परस्परांतील संघर्षाने भडकून सह्याद्रीच्या रानात वाढलेले गवत ज्याप्रमाणे पेट घेते, त्याप्रमाणे ती प्रचंड ज्वालानिशी

भडकून उठली व याचे दूरच्या क्षेत्रात कमालीचे कुतूहल होते. थोडक्यात, मराठ्यांना नीती-आणि अनीतीची चाड नव्हती, तर त्यांची मूळ वृत्ती लुटारूपणाची होती, असे ग्रँट डफ म्हणतो. या पार्श्वभूमीवर रानडे यांचे चिंतन व इतिहासलेखन महत्त्वाचे ठरते. त्यांनी वरील मतास विरोध केला, लुटारू लोक साम्राज्य तयार करू शकत नाहीत, हे स्पष्ट करून शिवाजी आणि त्यांच्या वारसदारांनी सार्वभौमत्वाच्या उंच शिखरावर असणाऱ्या मुघल सत्तेला धूळ चारली व हे एक असामान्य जिद्दीचे व राष्ट्रनीतीचे द्योतक होते, हे स्पष्ट केले. शिवाय मुघलांच्या नंतर ब्रिटिश सत्ता निर्माण झाली नसून मुघलांकडून मराठ्यांनी सत्ता हस्तगत केली आणि मराठ्यांच्या पराभवानंतर ब्रिटिशांकडे सत्ता गेली, असे त्यांनी स्पष्ट केले. ग्रँट डफच्या वणव्याच्या सिद्धान्ताला विरोध करताना महाराष्ट्राची वैशिष्ट्ये सांगितली आहेत. येथील निसर्ग, लोक व संस्कृती यांनी उठावाची प्रदीर्घ (३०० वर्षे) प्रतीक्षा केली व संधी मिळताच स्वातंत्र्य घोषित केले. संतांनी केलेल्या मराठी मनाच्या मशागतीचे स्वरूप त्यांनी स्पष्ट केले. तुकाराम व रामदास यांच्यामुळे महाराष्ट्रात आध्यात्मिक प्रगती झाली व राष्ट्रासाठी आत्मसमर्पणाची वृत्ती निर्माण झाली. स्वराज्य स्थापनेत असलेले शिवाजीचे कर्तृत्व, जिजाई व दादोजी कोंडदेव यांचे संस्कार या बाबी त्यांनी स्पष्ट केल्या. त्यांनी 'काव्येतिहास' संग्रह या विस्तृत निबंधात ग्रँट डफ यांचे अपयश, त्याला महाराष्ट्राच्या इतिहासाची बैठक, लोकस्वभाव, त्यांचे वाङ्मय व तत्त्वज्ञान याचा अभ्यास नव्हता, हे स्पष्ट केले.

रानडे यांच्या लेखनामुळे मराठा इतिहासाकडे बघण्याची दृष्टी बदलून गेली. संतांचे कार्य हे सुधारणावादी चळवळीशी, मार्टिन ल्युथर किंगच्या चळवळीशी नाते सांगणारे होते. युरोपातील सोळाव्या शतकातील सुधारणावादी चळवळींबरोबर भक्ती चळवळीची त्यांनी तुलना केली. रानडे यांच्या निधनानंतर दोन दशकांनी मुंबई उच्च न्यायालयाच्या मुख्य न्यायाधीशपदावर आलेले किन्केड यांनी रानडे यांच्या इतिहासलेखनाविषयी म्हटले - 'मराठी संतांनी सर्वप्रथम मराठी समाजाचे इस्लाम धर्माकडे लागलेले लक्ष दुसरीकडे वळवले. दुसरे म्हणजे, त्यांनी वाङ्मयीन व धार्मिक स्वरूपाच्या केंद्राची निर्मिती केली, त्यामुळे ते एका वंशाचे रूपांतर एका राष्ट्रात करू शकले. मराठी संतांनी तिसरी गोष्ट केली, ती म्हणजे त्यांनी आपल्या तत्त्वज्ञानाने व शिकवणीने मराठी नेत्यांचे मन व्यापक केले, त्यांच्या मनोवृत्तीत सुधारणा घडवून आणली. संतांनी साधलेली चौथी गोष्ट म्हणजे त्यांनी जातपात झिडकारली, साऱ्या महाराष्ट्राला संघटित व एकात्मिक रूप दिले. अशा चतुःसूत्रीने त्यांनी महाराष्ट्राच्या आद्य नायकाच्या आगमनासाठी रस्ता घडवला. त्यांनी आपल्या नायकाला विनयशील व न्यायप्रमाण, विशुद्ध मनाचा आणि मानवतावादी बनवला (किन्केड, १९६१). मुळात न्यायमूर्ती रानडे यांनी आपली विवेकशीलता व चिकित्सक बुद्धी यांच्या आधारे पूर्वग्रहदूषित इंग्रज लोकांपुढे शिवाजीचे योग्य व सम्यक चित्र उभे केले. इतिहास लेखक हा न्यायाधीशासमोर उभ्या असलेल्या वकिलाप्रमाणे असू नये, तर तो न्यायधीशाच्या खुर्चीवर बसून निर्णय करण्याच्या भूमिकेत असावा, असे रानडे यांच्या लेखनावरून स्पष्ट होते.

केवळ महाराष्ट्रातच नव्हे, संपूर्ण देशात आदरणीय नेते म्हणू रानडे सर्वज्ञात होते. नि.ज. कीर्तने यांची प्रेरणा, विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या 'इतिहास' या निबंधाने केलेल्या जागृतीचा पुढचा टप्पा रानडे यांनी गाठला. त्यांनी अर्थशास्त्र, 'इतिहास', कायदा, तत्त्वज्ञान, संस्कृत, भूगोल, साहित्य या सर्व क्षेत्रात केलेली कामगिरी हा स्वतंत्र लेखनाचा विषय ठरावा. केवळ मॅट्रिकच्या वर्गात असताना, त्यांनी 'राइज अँड प्रोग्रेस इन मराठा पॉवर' हा निबंध लिहिला होता. ते साक्षेपी, प्रगल्भ प्रतिभेचे थोर विचारवंत होते.

**काशिनाथ नारायण साने** (सन १८५१-१९२७)

नि.ज. कीर्तने, चिपुळकर, साने हे समकालीन होते. कीर्तने यांनी ग्रँट डफकृत मराठ्यांच्या बखरीवर केलेली टीका ही अनेकांच्या अभ्यासाची प्रेरणा ठरली. विविधज्ञान विस्तारामध्ये चिटणीसकृत शिवाजी चरित्राच्या खंडाचे कीर्तने

यांनी प्रकाशन केले, तर साने यांनी जवळपास २६ ग्रंथांचे संपादन केले. कृष्णाजी विनायक सोहनी विरचित 'पेशव्यांची बखर' (३री आवृत्ती, १८९०), कृष्णाजी शामरावविरचित 'भाऊसाहेबांची बखर' (आवृत्ती ५वी, १९३२), 'खरड्याच्या स्वारीची बखर' (१८८५), 'पानिपतची बखर' (१८८५), मल्हार रामराव चिटणीस विरचित 'थोरले शाहू महाराज चरित्र' (१८९३), 'होळकरांची कैफियत' (१८८६), धावडशी येथील 'ब्रह्मेंद्रस्वामी उर्फ भार्गवबाबा' यांचे चरित्र (१८८२) हे व असे लेखन त्यांच्या नावावर असून बखरी संपादित करून त्या प्रकाशित केल्यामुळे इतिहासाची काही साधने वाचकांस उपलब्ध करून देण्याचे श्रेय साने यांना द्यावे लागते.

**वासुदेवशास्त्री खरे** (सन १८५८-१९२४)

पटवर्धन दप्तरातील कागदपत्रे प्रकाशित करण्यासाठी वासुदेवशास्त्री यांनी खूप परिश्रम घेतले. पटवर्धन, मीरज, सांगली, जमखिंडी या संस्थानिकांची माहिती व तत्कालीन कागदपत्रे प्रकाशात आणली. त्यांनी लिहिलेले 'नानासाहेबांचे चरित्र' (१८९२) उल्लेखनीय आहे. त्यांनी लिहिलेल्या एकूण ऐतिहासिक संग्रहापैकी 'ऐतिहासिक संग्रह' १५ भाग, 'मराठी राज्याचा उत्तरार्ध' खंड १, 'मराठे व इंग्रज' (१९१८), 'इचलकरंजी संस्थानाचा इतिहास' व इचलकरंजी दप्तरातील निवडक पत्रे, यादी याशिवाय 'गुणोत्कर्ष', 'तारामंडल' यासारखी काही नाटके त्यांच्या नावावर आहेत. त्यांच्या परिश्रमांचे फळ म्हणून मराठी इतिहास व संस्थानिकांची पत्रे अभ्यासकांना उपलब्ध झाली.

**वि.का. राजवाडे** (सन १८६४-१९२६)

महाराष्ट्राच्या इतिहासात पाच राजवाडे प्रसिद्ध आहेत. पहिले कृष्णशास्त्री राजवाडे (१८१५-१९०१), हे मोठे संस्कृत पंडित व ग्रंथकार होते. दुसरे रावराजा राजवाडे (१८१९-१८९६) ग्वाल्हेरचे सुप्रसिद्ध दिवाण होते. यांनी १८५७च्या स्वातंत्र्ययुद्धाला मदत केली. तिसरे अहिताग्नी राजवाडे (शंकर रामचंद्र राजवाडे) (१८७९-१९५२) पुण्यातील सनातनी व कर्मठ विद्वान होते. चौथे प्रा. वैजनाथ काशिनाथ राजवाडे, इतिहासाचार्य राजवाड्यांचे ज्येष्ठ बंधू, संस्कृत पंडित होते. इतिहासाचार्य विश्वनाथ काशिनाथ राजवाडे हे इतिहासक्षेत्रातील आपल्या असामान्य कार्यासाठी सर्वज्ञात आहेत. त्यांची प्रतिभा व प्रज्ञा थक्क करणारी होती. राजवाडेंचे इतिहासप्रेम व पूर्वजांचा अभिमान या संदर्भात विचार केल्यास ते सर्व महाराष्ट्राचे गुरू आहेत, असे मत न.र. फाटक यांनी नोंदवले आहे.

हे का.ना. साने, वासुदेवशास्त्री खरे, द.व. पारसनीस यांच्या समकालीन होते. वि.का. राजवाडे यांनी 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने' या मालिकेतील पहिला खंड १८९८मध्ये प्रसिद्ध केला. या मालिकेत त्यांनी एकूण २२ खंड प्रकाशित केले. शेवटचा खंड १९१७मध्ये प्रकाशित केला. या ग्रंथासाठी त्यांनी लिहिलेल्या प्रस्तावना १२७ पृष्ठांची असून मराठी साहित्यातील एक लेणे म्हणून त्याकडे पाहावे लागेल. वि.दा. सावरकरांनी मॅझिनीच्या चरित्रास लिहिलेली प्रस्तावना, न.चि. केळकरांच्या 'मराठे इतिहास' या ग्रंथास खरेशास्त्रींनी लिहिलेली प्रस्तावना व राजवाडे यांची प्रस्तावना विशेष उल्लेखनीय ठरते. यांच्या लेखनापूर्वी इतिहास संशोधनाला इतिहासशास्त्र (Historiography) व ऐतिहासिक पद्धती (Historical Method) यांचे अधिष्ठान फारसे नव्हते, ते निश्चित करण्याचे काम राजवाडे यांनी केले. राजवाडे यांनी बेकन, लॉक, माँतेस्क्यू, व्हॉल्तेअर, डेव्हिड ह्यूम, रॉबर्टसन, रॅन्के, हेगेल, ऑगस्ट कोमन इत्यादी अनेक विचारवंतांच्या इतिहासलेखनशास्त्रावरील व ऐतिहासिक संशोधन पद्धतीबद्दलच्या सूक्ष्म पद्धतींचे निरीक्षण केले होते. त्याचप्रमाणे प्राचीन ग्रीक, रोम व युरोपच्या प्राचीन व मध्ययुगीन इतिहासाचा त्यांचा अभ्यास होता. असे असूनही एतरद्देशीय ऐतिहासिक साधने हाताळताना त्याचा त्यांनी स्वतंत्रपणे विचार केला. आपल्याकडील विविध शके, सनावळी व तारखा या युरोपीय इतिहासापेक्षा भिन्न होत्या. तेव्हा एतरद्देशीय परिस्थितीचा विचार करून आपली संशोधन पद्धती विकसित करून मराठ्यांच्या इतिहासाची साधने संपादित करताना वापरली.

इतिहासलेखन हे सत्यावर आधारित असावे, ही त्यांची निष्ठा होती. इतिहासाची व्यापक व्याख्या समोर ठेवून

इतिहास संशोधनाचे ५ टप्पे त्यांनी विशद केले. (१) इतिहासाची साधने संग्रहित करणे, (२) साधनांचे जतन व देखभाल करणे, (३) साधनांचे परीक्षण व वर्गीकरण करणे, (४) साधनांचे संपादन व प्रकाशन करणे, (५) साधनांचे विश्लेषण व इतिहासलेखन करणे. इतिहास लिहिताना तो केवळ राजकीय इतिहास नसून राज्यकारभार, लष्कर, आर्थिक, सामाजिक व सांस्कृतिक जीवन, तंत्रज्ञानाची वाटचाल असा सर्वव्यापी असावा, असे ते मानत. (वि.का. राजवाडे, ऐतिहासिक प्रस्तावना, राजवाडे लेखसंग्रह, खंड १ पृष्ठ ३०५-३०८, पुणे-१९२८), (मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खंड ६ची प्रस्तावना, ऐ.प्र., धुळे, १९१८, पृष्ठ ३२३-२४) या दृष्टीने महाराष्ट्र इतिहासाच्या लेखनशास्त्राचे व ऐतिहासिक पद्धतीचे 'जनक' अशी त्यांची नोंद घ्यावी लागते. जदुनाथ सरकार यांनी आपल्या 'हाऊस ऑफ शिवाजी' या ग्रंथात राजवाडे यांच्या परिश्रमांची दखल घेतली आहे. राजवाडे यांनी आजपर्यंत सुरू असलेल्या इतिहास संशोधन कार्याला शास्त्रीय अधिष्ठान व गती दिली. त्यांनी ह.चि. मेहेंदळे, प्रा.द.वा. पोतदार यांच्या मदतीने ७ जून १९१० रोजी पुणे येथे 'भारतीय इतिहास संशोधन मंडळाची' स्थापना केली व त्यांच्या प्रेरणेतून पुढे नानासाहेब देव, भा.वा. भट, ग.ह. खरे हे झपाटलेले इतिहास संशोधक निर्माण झाले. राजवाडेंनी जमा केलेल्या साधनसंग्रहाचे जतन व देखभाल (प्रिझर्वेशन आणि मेन्टेनन्स) हे एका मर्यादित केले. त्यांनी राज्यातील प्रत्येक जिल्ह्याच्या व तालुक्यात ठिकाणी इतिहास अभ्यासकांचा गट स्थापन करावा असे सुचवले. तथापि ऐतिहासिक साधने जतन करण्याची शास्त्रीय पद्धत आजइतकी तेव्हा विकसित झाली नव्हती. किंबहुना शास्त्रशुद्ध पद्धतीने साधनांच्या याद्या (कॅटलॉगिंग), वर्गीकरण (क्लासिफिकेशन) व सूची (इन्डेक्स) याकडे ते व्यक्तिशः फारसे लक्ष देऊ शकले नाहीत. राजवाडे समकालीन विश्वसार्ह व्यक्तीने लिहिलेले, सरकारी मूळ कागदपत्रे हीच फक्त प्रथम दर्जाची सामग्री मानत. बाकी साधने दुय्यम दर्जाची मानत. एक अस्सल चिटोरे सर्व बखरीच्या पुराव्यास हाणून पाडण्यास पुरेसे आहे, असे ते ठणकावून सांगत. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस असलेला त्यांचा आग्रह महत्त्वाचा ठरतो. राजवाडे यांचा 'मराठ्यांच्या इतिहासातील साधने', ३रा खंड इ.स. १९०१मध्ये प्रराशित झाला. त्याच्या शीर्षक पृष्ठावर 'ना मूल लिख्यते किंचित्' हे प्रतिज्ञावाक्य म्हणून त्यांनी छापले. तसेच दुसऱ्या एका ठिकाणी 'No document, No History' हे लामार्तिनचे वाक्य उद्धृत केले आहे. त्यांच्या दृष्टीने ऐतिहासिक कागदपत्रांचे परीक्षण दोन प्रकारचे असते - एक बहिरंग व दुसरे अंतरंग परीक्षण. एखादा कागद पुढील बाबी पूर्ण करत असल्यास तो विश्वासनीय व प्रथम दर्जाचा समजावा :-

१) तो समकालीन असावा. २) त्यातील तारीख, तिथी, वार, वर्ष या बाबी जंत्रीशी जुळणाऱ्या असाव्या (खऱ्या). ३) दिलेली नोंद, भाषा, तपशील, या बाबी त्या काळाशी सुसंगत असाव्यात. ४) जर कागद मूळ म्हणजे अस्सल किंवा अधिकृत नक्कल असेल. ५) जर कागदाचा लेखक वर्णलेल्या घटनेशी प्रत्यक्ष संबंधित /समकालीन अस्सल कागदाच्या आधारे आधार देत असेल. ६) जर लेखक पुरेसा प्रामाणिक असेल व घटना जशा घडल्या तशा लिहिण्याचे शिक्षण त्याला मिळाले असेल आणि ७) जर घटनांचा तपशील व तारखा दुसऱ्या विश्वसनीय साधनांशी जुळत असतील. या सात कसोट्यांपैकी पहिल्या सहा कसोट्या बहिरंग परीक्षणाखाली येतात. शेवटची कसोटी अंतरंग परीक्षणाशी निगडित आहे. या सर्व बाबी लक्षात ठेवून राजवाडे यांनी केलेल्या संशोधनातून 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने (२२ खंड), ऐतिहासिक विविध विषय, 'श्री समर्थ रामदास' (१९२६), 'ज्ञानेश्वरीतील भाषेचे व्याकरण' (१९०९), 'संस्कृत भाषेचा उलगडा' (१९२०), 'राधा माधव विलास चंपू' (१९२२), 'दामल्यांचे शास्त्रीय मराठी व्याकरण टीका' (१९१२), हे ग्रंथ व संपादित ग्रंथात 'महिकावतीची बखर' (१९२४), ज्ञानेश्वरीतील ९व्या अध्यायातील मराठी ओव्यांचे 'संस्कृत प्रतिशब्द : भाषांतर' (१९३४), 'ज्ञानेश्वरी' (अध्याय १-१८, १९०९), 'राजवाडे मराठी धातू कोश' (१९३८), (यांचे संपादन कृपा कुलकर्णींनी केले) हे ग्रंथ निर्माण झाले.

अलीकडील काळात राजवाडे यांच्या कार्याचे पुनर्मुद्रण (संपादकीय प्रस्तावनेसह) राजवाडे संशोधन मंडळ, धुळे यांनी उपलब्ध करून दिले आहे. राजवाडे यांनी संशोधकांना केलेले मार्गदर्शन मोलाचे आहे. तथापि, प्रतिभेच्या जोरावर लेखन करताना, राजवाडे यांचे प्रतिपादन सर्वमान्य होणारे नाही. किंबहुना, त्यांची मते आज मान्य होतीलच असे नाही. अर्थात इतिहास संशोधनातील त्यांचे काम सतत वंदनीय व प्रेरणादायी ठरते. राजवाडे युरोपीय तत्त्वज्ञानाशी व इतिहासकारांशी परिचित असल्याने त्यांनी तर्कशास्त्रातील विगम पद्धतीला (इंडक्टिव्ह मेथडला) अतिशय महत्त्व दिल्याचे लक्षात येते. भारतीय दर्शनिकांच्या निगम पद्धतीपेक्षा (डिडक्टिव्ह मेथडपेक्षा) विगम पद्धती शास्त्रीय व तांत्रिक ज्ञानाच्या प्रगतीस पोषक आहे, असे त्यांचे मत होते. त्यांच्या या कार्यपद्धतीमुळे ते ग्रँट डफ, द.ब. पारसनीस यांच्या संशोधनातील त्रुटी दाखवू शकत. तथापि, राजवाडे यांचे 'राधा माधव विलास चंपू' या ग्रंथ प्रस्तावनेतील चतुर्वर्ण संस्थेविषयीची मते मान्य करण्यासारखी नसून ते बऱ्याचदा तर्कावर विसंबून विधान करतात, हे विशेष! ऐतिहासिक साधने संपादित करताना कोणते नियम पाळले पाहिजेत, हे राजवाडे यांनी स्पष्ट केले आहे. १) मूळ साधनातील मजकुरात बदल करू नये. २) कागदपत्र कोणाकडून, कोठे व केव्हा मिळाले याचा तपशील द्यावा. ३) साधन मूळ अस्सल आहे, नक्कल आहे की नकलेची नक्कल आहे याचे स्पष्टीकरण द्यावे. ४) साधनाचे व ज्या अवस्थेत ते आहे त्याचे अचूक वर्णन करावे. ५) साधनातील कठीण शब्दांच्या, वाक्यांच्या आधारे जी अनुमाने निघत असतील त्याची नोंद करावी. ७) अर्थ द्यावा. याद्याच्या व अनुमानांच्या साहाय्याने साधनातील मजकुराचा व घटनेचा अर्थ लावण्याविषयी विवेचन करावे. (ऐ.प्र., म.इ.सा., खंड - ८, प्रस्तावना, पृष्ठ ३७३)

राजवाडे यांचे वैशिष्ट्य म्हणजे वरील नियमांपैकी पाचवा नियम सोडून बाकीचे नियम ते काटेकोरपणे आपल्या संपादनात पाळीत असत. त्यांच्यासारखा संशोधनाच्या मूळ गाभ्याला हात घालणारा संशोधक सापडत नाही. त्यांनी मोडी लिपीवर प्रभुत्व मिळवून 'लेखन प्रशस्ती' या मोडी हस्तलिखिताचा सूक्ष्म अभ्यास केला. समकालीन अभ्यासकांत फक्त वासुदेवशास्त्री खरे त्यांची बरोबरी करू शकत. राजवाडे यांच्या संशोधनात काही त्रुटी होत्या. अचूक भौगोलिक वर्णन, स्थलदर्शक नकाशे, तिथीचे इंग्लिश तारखांत रूपांतर याकडे ते फारसे लक्ष देऊ शकले नाहीत. मुस्लीम तारखांमध्ये राहिलेल्या उणिवा पुढे ग.ह. खरे यांनी दुरुस्त केल्या. राजवाडे यांनी इतिहासलेखनशास्त्र व संशोधन पद्धतीबरोबर लोकसाहित्याचेही महत्त्व लक्षात आणून दिले. त्यांचे चिंतन मूलगामी स्वरूपाचे होते. भाषाशास्त्र, वित्पुत्तीशास्त्र व व्याकरण या विषयांतील त्यांची प्रतिभा, 'महाराष्ट्राच्या वसाहतीचा काळ', 'भारतीय विवाहसंस्थेचा इतिहास' आणि 'राधा माधव विलास चंपू' यांच्या प्रस्तावेत लक्षात येते. राजवाडे यांनी इतिहासलेखन पद्धतीचे तीन टप्पे सांगितले. पहिली पायरी म्हणजे ऐतिहासिक कागदपत्रावर टिपण लिहिणे. दुसरी पायरी अनेक कागदपत्रांच्या आधारे लेख लिहिणे. तिसऱ्या पायरीमध्ये एखादी संस्था, देश, धर्म याविषयी विवेचनात्मक इतिहास लिहिणे. जगाच्या इतिहासाचा व्यासंग, सूक्ष्म चिंतन, प्रतिभा याआधारे या बाबी शक्य होतात. तिसऱ्या टप्प्यावरील त्यांची क्षमता त्यांच्या प्रस्तावनांमधून समजते. यापुढच्या टप्प्यात इतिहासाचे सार, तत्त्वज्ञान सांगण्याचे काम अरनॉल्ड टॉयन्बी याने केले. राजवाडे इतिहासलेखनाच्या तीन पद्धती दाखवतात. त्या 'कालसाक्षेप', 'देशसापेक्ष' व 'कुलसापेक्ष' अशा होय.

**रियासतकार गो.स. सरदेसाई**

(इ.स. १८६५-१९५९)

रत्नागिरी जिल्ह्यामध्ये 'हसोळ' येथे जन्म, पदवी परीक्षेनंतर त्यांनी बडोदा संस्थानात काही काळ सेवा केली. इतिहासाविषयी त्यांनी केलेल्या कामासाठी त्यांना अनुक्रमे 'रावसाहेब' १९३२), 'रावबहादुर' (१९३७), 'डॉक्टरेट' ही पुणे विद्यापीठाची पदवी (१९५१) व 'पद्मभूषण' (१९५७) यासारखे सन्मान प्राप्त झाले. सरदेसाईंच्या दीर्घ

परिश्रमांचे फळ म्हणून इ.स. १००० ते १८४८पर्यंतचा सुसंगत इतिहास उपलब्ध होतो. याशिवाय त्यांनी 'माझी संसारयात्रा' हा आत्मचरित्रपर ग्रंथ प्रकाशित केला. जदुनाथ सरकार यांच्याबरोबर त्यांची असलेली मैत्री सर्वज्ञात होती. रियासतींमध्ये काही उणिवा असल्या, तरी तत्कालीन इतिहासाचा अभ्यास रियासतीच्या वाचनाशिवाय पूर्ण होत नाही. 'श्रीमद् महाभारत'पासून 'इंग्लंड व ग्रीक देशाचा इतिहास' यासारखे २८ ग्रंथ त्यांच्या नावावर असून सरदेसाईंनी लिहिलेल्या 'मुसलमानी रियासती - १) हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास', या ग्रंथाचे दोन भाग, तसेच 'मराठी रियासती' यात हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास भाग २ पूर्वार्ध, मध्यविभाग आणि मध्यविभाग भाग २ आणि ३ असे एकूण चार ग्रंथ लिहिले. याशिवाय मराठी रियासतीचे चार खंड प्रकाशित केले. ब्रिटिश रियासती दोन खंडात प्रकाशित केल्या. यासाठी असंख्य कागदपत्रे तपासली. नवीन आवृत्ती मालिकेमध्ये स्वतंत्रपणे त्यांनी शहाजी, शिवाजी, संभाजी, राजाराम व शाहू यांच्यावर ग्रंथ लिहिले. याशिवाय बाळाजी विश्वनाथ, पेशवा बाजीराव, पेशवा बाळाजीराव व माधवराव, रघुनाथराव यांच्यावर ग्रंथ लिहिले आहेत. याशिवाय संपादित ग्रंथांमध्ये पेशवे दप्तर - ४५ खंड, रेसिडेन्सी रेकॉर्ड १४ खंडापैकी सुमारे ५ खंड त्यांनी संपादित केले. सातारा इतिहास संशोधक मंडळाची ऐतिहासिक लेखमाला, ऐतिहासिक राजघराण्याच्या वंशावळीत परमानंद काव्यम् (संस्कृत) या व अशा रचना सरदेसाईंच्या नावावर आहेत. मराठा इतिहासाची सलग आणि खातरीलायक ओळख करून देणारे हे एकमेव मराठी इतिहासकार ठरतात. त्यांनी भावी अभ्यासकांना संशोधनाची दिशा दिली.

**सद जदुनाथ सरकार** (सन १८७०-१९५८)

यांचा जन्म बंगालमध्ये झाला. ते महाराष्ट्रातील का.ना. साने, वासुदेवशास्त्री खरे, वि.का. राजवाडे, द.ब. पारसनीस, वि.द. भावे यांच्या समकालीन संशोधक होते. महाराष्ट्रातील अभ्यासकांची ओळख परप्रांतीयांना करून देण्यासाठी त्यांनी 'मॉडर्न रिव्ह्यू'मध्ये लेखन केले. त्यांच्यावर सुधारणावादी विचारांचा प्रभाव होता. बनारस हिंदू विद्यापीठात ते कार्यरत होते. कलकत्ता विद्यापीठाचे कुलगुरूही होते. मध्ययुगीन भारतीय इतिहासाचे अभ्यासक म्हणून ते सर्वमान्य आहेत. इ.स. १६००-१८०० हा त्यांच्या चिंतनाचा कालखंड होता. त्यांच्या नावावर एकूण २७ ग्रंथ आहेत. यामध्ये 'हिस्टरी ऑफ औरंगजेब - इट्स टोपोग्राफी, स्टॅटिस्टिक्स अँड रोड्स' या तत्कालीन भौगोलिक पार्श्वभूमीचा परिचय करून देणाऱ्या ग्रंथाबरोबर 'हिस्ट्रीरी ऑफ औरंगजेब' हा ग्रंथ चर्चेत राहिला. त्यांनी पाच खंडांमध्ये औरंगजेबचे चरित्र लिहिले आहे, शिवाय ४६७ पृष्ठांची संक्षिप्त आवृत्तीही काढली आहे. महाराष्ट्रातील औरंगजेबाच्या बारीक हालचालींचे तपशील या ग्रंथात मिळतात. याशिवाय 'मुघल ॲडमिनिस्ट्रेशन'चे तीन भाग, 'मासिर-ए-आलमगिरी'चे संपादन', 'ऐन-ए-अकबरी', (संपा.) दोन भाग, 'पर्शियन रेकॉर्डस ऑफ मराठा हिस्ट्रीरी', 'फॉल्स ऑफ मोघल एम्पायर' (४ खंड), 'इकॉनॉमिक्स ऑफ ब्रिटिश इंडिया', 'स्टडीज इन मुघल इंडिया' यासारख्या ग्रंथाबरोबर 'शिवाजी अँड हिज टाइम' १९२१ प्र. आवृत्ती, 'हाऊस ऑफ शिवाजी' (१९४०, प्र. आवृत्ती) हे त्यांचे ग्रंथ महत्त्वाचे होते. 'शिवाजी अँड हिज टाइम' या शिवचरित्रात फारसी साधनांचा उपयोग केला. प्रारंभी आवृत्तीमध्ये शिवाजीच्या नावाचा 'शिवा' असा केलेला उल्लेख सरदेसाईंनी लक्षात आणून दिल्यामुळे तो बदलून 'शिवाजी' असा केला. 'हाऊस ऑफ शिवाजी' या ग्रंथात मराठ्यांच्या इतिहासलेखनाच्या दृष्टीने वस्तुनिष्ठ नोंदी केल्याचे आढळते. 'द मिलिटरी हिस्ट्रीरी ऑफ इंडिया' या ग्रंथात युद्धतंत्राबरोबर भौगोलिक पार्श्वभूमीची चर्चा केली आहे. जदुनाथ सरकार यांची दृष्टी न्यायनिष्ठुरतेची होती. वस्तुनिष्ठता व शास्त्रशुद्ध लेखन हे त्यांच्या लेखनाचे वैशिष्ट्य. शिवाय, प्रत्यक्ष स्थलवर्णन, स्थलनिश्चिती, कालसापेक्ष विश्लेषण व पुराव्याआधारे घटनेचे विश्लेषण, जमिनीची पडताळणी ही त्यांच्या लेखनाची चतुःसूत्री होती. औरंगजेबाने त्याच्या कर्तृत्वाने जे पेरले होते, तेच त्याला अंतिम चरणात गोळा करावे लागले, यासारखी नोंद ते करतात. दैववादाची अपरिहार्यता ते मानत.

**रा.ब. द.ब. पारसनीस** (सन १८७०-१९२६)

झाशीच्या लक्ष्मीबाईविषयी काहीही लिहावयाचे असल्यास पारसनीसांनी लिहिलेल्या त्यांच्या चरित्राला पाहिल्याशिवाय पुढे जाता येत नाही. तत्कालीन 'महाराष्ट्राची कोकिळा' या मासिकामुळे ते सर्वांना परिचित झाले. ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकरांचे चरित्र हे त्यांचे दुसरे महत्त्वपूर्ण कार्य. अर्थात वि.का. राडवाडे यांना ही बाब पसंत पडली नाही. पारसनीसांनी संपादित केलेल्या कागदपत्रांमुळे किंकेडला 'हिस्टरी ऑफ दि मराठाज'चे तीन खंड काढता आले. पारसनीसांच्या नावावर ३२ ग्रंथ आहेत. यात 'महादजी शिंदे यांजकडील राजकारण' याचे पाच भाग, 'दिल्ली येथील मराठ्यांचे राजकारण', 'माहेश्वर दरबाराची बातमीपत्रे', 'होळकर दरबारांतील हिंगण्याची वकिली' हे व यासारखे ग्रंथ, मराठ्यांचे आरमार, मराठ्यांचे पराक्रम उल्लेखनीय आहेत. शिवाय पारसनीसांनी संपादित केलेले 'गोविंदपंत बुंदेल्यांची कैफियत' आणि 'वाड पेशवे दप्तरांतली कागदपत्रे', रा.ब. वाडकर कृत १५ खंडांपैकी खंड १,२,३ पारसनीसांनी संपादित केले. याशिवाय अन्य खंडांतही निवडक भागांचे संपादन पारसनीसांनी केले. पारसनीसांनी जमवलेली असंख्य कागदपत्रे त्यांच्या सोयीप्रमाणे वितरित झाली, ही खंत अभ्यासक व्यक्त करतात. पारसनीस यांना १९१२मध्ये 'रावबहादुर' पदवी देण्यात आली.

एकूण, मराठा इतिहासाच्या संदर्भात ज्यांनी मोठे योगदान दिले आहे, अशा विद्वानांची एक मोठी परंपरा महाराष्ट्राला लाभली आहे. सेतुमाधवराव पगडी, ग.ह. खरे, स.मा. गर्गे , वा.क्र. भावे, अ.रा. कुलकर्णी, शंकरराव देव अशी नावे टाळून याविषयीची नोंद पूर्ण होऊ शकत नाही. यामुळेच चरित्रकोश प्रकल्प हाती घेण्यात आला. अगदी अलीकडच्या काळात ज्यांचा उल्लेख जाणीवपूर्वक करावा त्यात भास्कर मेहेंदळे, निनाद बेडेकर यांची नोंद करावी लागते. छत्रपती शिवाजी महाराजांच्या वैशिष्ट्यपूर्ण कामगिरीची नोंद या दोघांच्या कामगिरीमुळे महाराष्ट्राली झाली. असे असले, तरी समग्र अभ्यासक नोंद हा या प्रस्तावनेचा हेतू नाही. किंबहुना लेखकाची मर्यादा मी स्वतः नोंद करतो आहे.

प्राच्यविद्येच्या खंडामध्ये विकसित होणाऱ्या परिघाच्या कक्षेत इतिहासलेखनशास्त्राची व त्याच्या विविध प्रवाहांची तोंडओळख करून देणे हा हेतू प्रमाण मानल्यास इतिहासलेखनाविषयीचे जे काही महत्त्वाचे सिद्धान्त मानले जातात, त्यात चक्राकार गतीचा सिद्धान्त, या अनुषंगाने प्राचीन भारतीय विचार, युगसंकल्पना, कौटलीय अर्थशास्त्रामध्ये इतिहासाची केलेली सर्वसमावेशक व्याख्या व पुराणांतर्गत असलेला भारताचा इतिहास - किंबहुना अथर्ववेदात इतिहास शब्दाचा उल्लेख आहे. छांदोग्योपनिषदात इतिहास व पुराण यांना 'पाचवा वेद' संबोधले आहे. गोपथब्राह्मणातमध्येही याविषयीची नोंद मिळते. असे असले, तरी भारतीयांना इतिहासविषयक जाणीव नव्हती, असे मानले गेले. या विधानाच्या वेगवेगळ्या बाजू पुढे येत आहेत. चक्राकार गतीचा (Cyclical), दुसरा एक सरळ रेषेचा (Linear), तिसरा मळसूत्राकार (Spiral) असे सिद्धान्त मांडले जातात. चक्राकार सिद्धान्त प्रारंभ बिंदूपासून एका मर्यादेनंतर पुन्हा सुरू होतो, अशी मान्यता आहे.

इस्लाम धर्मातील तत्त्ववेत्तेसुद्धा चक्राकार सिद्धान्त मांडतात. ईश्वरी इच्छेनुसारच सर्व घटना घडतात, अशी त्यांची मान्यता आहे. अरब इतिहासलेखनात 'इब्न खलूदन' हा चौदाव्या शतकातील विचारवंत आपल्या ग्रंथात इतिहास विकास व परिवर्तनाचे तत्त्वनिष्ठ विवेचन करतो व त्यातून सामान्य सिद्धान्ताचा शोध घेतो. असे असले, तरी संस्कृतीच्या चक्राकार गतीची संकल्पना अधिक स्पष्ट करतो. थोड्याबहुत फरकाने इतिहासाच्या पुनरावृत्तीबाबत ग्रीक, रोमन, चिनी, इराणी, ज्यू व ख्रिस्ती यांची भूमिका प्रारंभीच्या काळात तरी समान दिसते. इ.स.च्या पंधराव्या शतकात झालेल्या विद्येच्या पुनरुजीवनानंतर मानवी कर्तृत्वाचा विचार अधिकाधिक अधोरेखित होऊ लागला व यातून चक्राकार गतीचा सिद्धान्त काहीसा मागे पडला; परंतु काही आधुनिक विचारवंत पुन्हा एकदा तर्कशुद्ध वृत्तीने

पूर्वीचाच विचार पुन्हा मांडताना दिसतात. अशा तत्त्ववेत्त्यांमध्ये इटालियन विचारवंत गिआम्बा निस्ता विको (सन १६६८-१६७४), जर्मन तत्त्वचिंतक ओसवॉल्ड स्पेंगलर (सन १८८०-१९३६) आणि इतिहासाचा व्यापक व्यासंग असलेला ब्रिटिश इतिहासकार अरनॉल्ड टॉयन्बी हे अग्रगण्य होत.

समाजशास्त्रीय दृष्टीकोनातून इतिहासाचे अध्ययन ही संकल्पना इतिहासलेखनाच्या शाखेत बरीच अलीकडची आहे. १५० वर्षांपूर्वी या संकल्पनेचा उदय झाल्याचे दिसते. एकोणिसाव्या शतकापर्यंत इतिहासलेखनाचे विषय साधारण राजकीय असत. त्यानंतर लोकशाही युगात या विचारात परिवर्तन झाले. मानवी जीवनाच्या वाटचालीचे साकल्याने व तर्कशुद्ध आकलन करून सर्व ज्ञानशाखांचा सांस्कृतिक इतिहास हा एक नवा प्रवाह रूढ झाला. विल्यम रॉबर्टसेनने या विषयींचा पुरस्कार केला. जी.डी.एच. कोलचा ‘द कॉमन पीपल’ हा ग्रंथ सामाजिक इतिहास म्हणून विशेषत्वाने प्रसिद्ध झाला. इतिहास व समाजशास्त्र परस्परसंलग्न असल्यामुळे दोन्हींमध्ये विभाजक रेषा पुसून टाकावी, असे मत प्रा.इ. एच. कार यांनी ‘What is History’ या ग्रंथात मांडले. मार्क ब्लॉच, लुसियन फाब्रे या ॲनल्स गटातील इतिहासकारांनीदेखील गतकालीन समाजाचा अभ्यास समाजशास्त्रीय दृष्टीने करणे आवश्यक मानले. याचप्रमाणे एकोणिसाव्या शतकापासून इतिहास अध्ययनाचा एक वेगळा दृष्टीकोन ‘तौलनिक इतिहासलेखन’ (Comparative approach to History) रूढ होऊ लागला. विसाव्या शतकाच्या प्रारंभी या विचाराला बळ मिळाले. झपाट्याने होत जाणारा विकास, जागतिकीकरण यामुळे सांस्कृतिक देवाण-घेवाणीमध्ये झालेली वाढ यातून विविध ज्ञानशाखांचा एकत्रित अभ्यास उपयुक्त ठरू शकतो, ही बाब मार्क्स, ब्लॉच, जॉर्ज फ्रेडरिकसन, विलियन सीवेल अशा अनेक अभ्यासकांनी अधोरेखित केली आहे.

याशिवाय एकोणिसाव्या शतकामध्ये विकसित झालेला अन्य दृष्टीकोन म्हणजे परिस्थितिकी व इतिहास (Ecological approach to History). मानव हा इतिहासाचा अविभाज्य घटक आहे व या दोघातील नात्यांचे स्वरूप समजून घेण्यासाठी प्रथम ‘परिस्थिती विज्ञान’ आणि ‘निसर्ग विज्ञान’ म्हणजे काय व त्याचा मानवी जीवनाशी संबंध याचे आकलन करून घेण्याचा हा प्रयत्न होता. निसर्गाच्या संतुलनाचा जसा विकासप्रक्रियेत वाटा असतो, तसा नैसर्गिक असंतुलनामुळे मानवी जीवनावर त्याचे गंभीर परिणाम होऊ शकतात, याविषयीचा गांभीर्याने विचार इतिहास अध्ययनाच्या दृष्टीने होऊ लागला. इंग्लंडमध्ये तर ‘Environment and History’ या नावाचे नियतकालिक जॉन क्लार्क व पीटर कोट्स हे संपादित करीत आहेत. भारतातही यावर लेखन होत आहे. याशिवाय इतिहासाबाबत ‘संरचनावादी दृष्टीकोन’ (Structural approach to History) ही विसाव्या शतकातील देणगी मानली जाते. संपूर्ण सामाजिक व्यवहारातून व विचारातून आविष्कृत होणाऱ्या समाजाच्या आंतररचनांच्या आकृतिबंधांचा शोध घेणे व दर्शवणे म्हणजे संरचनावाद होय.

विसाव्या शतकापर्यंत पाश्चात्त्य जगातील बौद्धिक क्षेत्रात प्रभावी असलेल्या ‘पॉझिटिव्हिझम’ विरुद्धची प्रतिक्रिया होती. एखादी व्यक्ती किंवा घटना केंद्रबिंदू मानून केलेल्या ‘मानवकेंद्री’ लिखाणाविरुद्ध हा विचार होता. ऐतिहासिक घटनांचे केवळ निवेदन म्हणजे इतिहास नाही, असे संरचनावाद मानतो.

इतिहासाच्या क्षेत्रात संरचनावादाचा आविष्कार दोन प्रकारे झालेला आढळतो. पहिला प्रकार म्हणजे ॲनल्स गटातील इतिहासकारांचे, प्रामुख्याने मार्क ब्लॉच व फर्नाद ब्रोदेल यांचे आणि दुसरा मानववंशशास्त्र लेवी स्ट्रॉस याचे इतिहासलेखन हे होत. बहुशास्त्रीय ज्ञानशाखेचा अभ्यास हे लक्ष्य असल्यामुळे त्यांचे लेखन बहुआयामी आहे; पण ही एक बौद्धिक चळवळ असल्यामुळे यांच्या विषयाची मांडणी क्लिष्ट व गुंतागुंतीची आणि दुर्बोध वाटली जाऊ लागली. त्यातूनच इतिहासलेखनावर यांचा फारसा परिणाम आढळत नाही. त्यातून विरचनावाद, अगर उत्तर संरचनावाद प्रवाह पुढे आल्याने मूळ विचार १९८०च्या सुमारास लुप्त होऊ लागला.

'उत्तर आधुनिकतावाद' हाही एक प्रवाह मोठा सिद्धान्त असावा, असे सुरुवातीस वाटले; पण एकजिनसी विचार नसून अनेक विचारांचा मिळून बनलेला संच आहे. मुळात आधुनिकतावाद हा विवेकवादी, तंत्रज्ञानाला मदत करणारा मानवकेंद्री विचार होता; पण अठराव्या शतकानंतर मूल्यनिष्ठेचा ऱ्हास होत आहे, असा विचार प्रामुख्याने विसाव्या शतकाच्या तिसऱ्या-चौथ्या दशकात लक्षात आला. परंपरागत मूल्य फोल ठरत आहे, भ्रामक ठरत आहे अशी भूमिका १९७०-८०च्या दशकात मानली गेली. विशेषतः फ्रेंच विचारवंतांच्या लेखणीतून ही बाब स्पष्ट होऊ लागली. आधुनिकतेविरुद्धच्या नकारात्मक प्रक्रियेतून उत्तर आधुनिकतेचा व उत्तर आधुनिकवादाचा जन्म झाला. जगातील भिन्न मानवसमूह परस्पर जवळ येऊ लागल्याने राष्ट्रांतील सीमा धूसर होऊ लागल्या व व्यामिश्र स्वरूपाची एक संस्कृती उदयाला आली व यामध्ये संगणक प्रणालीचा मोठा वाटा असल्याने आधुनिकोत्तर जगाला 'संगणकाचे युग' असे संबोधले गेले. इतिहासाच्या बाबतीत उत्तर आधुनिकतावादाची दृष्टी पारंपरिक इतिहासलेखनाला छेद देणारी होती. यातून आत्यंतिक व्यक्तिस्वातंत्र्यवादाच्या पुरस्काराने समाज कोसळून मुळात धार्मिक तत्त्वतावाद उदयाला येईल, असा धोक्याचा इशारा दिला गेला. मानवी संस्कृती व जागतिक प्रवाह यांच्या संदर्भात निर्माण होणाऱ्या समस्या व वाद दाखवताना त्याचे निराकरण करण्याचा काही प्रयत्न होत नाही. एकूण आधुनिकोत्तर जगासंबंधी विचारवंतांच्या लेखनातून विविध प्रकारचे भाष्य विशेषतः पाश्चात्त्य जगतामध्ये होत असले, तरी त्यात कोणतेही समान सूत्र स्पष्ट होत नाही.

* * *

इतिहासलेखनाच्या वाटचालीचा आढावा घेताना हे लक्षात येते की जागतिक स्तरावर या विषयाची वाटचाल झाली, त्याचे प्राचीन काळ, मध्ययुगीन काळ, आधुनिक काळ असे टप्पे पडतात. किंबहुना या प्रत्येक कालखंडात इतिहासलेखनाची अशी काही वैशिष्ट्ये होती. विषय प्रतिपादन करण्याच्या स्वतंत्र शैली होत्या. 'हिस्टोरिओग्राफी' (Historiography) या शब्दाचा अर्थ 'इतिहासलेखनाचा इतिहास' असा करण्यात येतो. या दृष्टीने याचा आढावा घेणे सयुक्तिक ठरते.

**ग्रीक इतिहासलेखन** :-

ग्रीकांच्या इतिहासलेखनाला साधारण इ.स.पूर्व पाचव्या शतकात प्रारंभ झाला. त्यापूर्वी एखादी घटना किंवा कृती कथानकाच्या रूपात मनोरंजक पद्धतीने सांगण्यात येई. 'हेरोडोटस', 'थ्यूसिडाईडस', 'पॉलीबीयास' हे महत्त्वाचे इतिहासकार मानले जातात. ग्रीक इतिहासलेखन हे मानवकेंद्री व समाजाच्या लौकिक व्यवहाराचे चित्रण करणारे होते, केवळ राजकीय जीवनावर त्यांचा जोर नसे. ग्रीक देवतांपैकी 'क्लिओ' ही काव्याची व इतिहासाची देवता मानली गेली. प्रा. रॉबिन कॉलिंगवूड या विसाव्या शतकातील इतिहासकाराने इतिहासलेखनाची चार मूलभूत लक्षणे सांगितली - मानवकेंद्री लिखाण, मूळ ऐतिहासिक साधनांचा वापर, साधनांचे तर्कशुद्ध विश्लेषण व ऐतिहासिक परिवर्तनाची जाण या बाबी बऱ्याच प्रमाणात ग्रीक इतिहासलेखनात आढळतात.

**रोमन इतिहासलेखन** :-

साधारण इ.स.पूर्व तिसऱ्या शतकापासून रोमन इतिहासाला प्रारंभ झाला. तत्पूर्वी ऐतिहासिक स्वरूपाच्या ढोबळ नोंदी हे लोक करत. कॅटो, कॉर्नोलियस टॅसिटस व ज्युलिअस सीझर हे प्रमुख रोमन इतिहासकार मानले जातात. कोणतेही इतिहासलेखन हे त्या लेखकाच्या व्यक्तित्त्वाचे व तत्कालीन परिस्थितीचे निदर्शक असते व ही बाब रोमन इतिहासलेखनाला लागू पडते. स्वतःच्या महानतेविषयीचा अभिमान ही या लेखनाची प्रेरणा होती. रोमन साम्राज्याचा काळ हा सुवर्णयुग मानला जाई व याच भूमिकेतून तत्कालीन नायकांची चरित्रे रेखाटली गेली. इतिहासलेखनाला

शैक्षणिक मूल्य असल्याची त्यांची धारण होती. रोमन इतिहासकारांनी प्रारंभी ग्रीक भाषेत व नंतर लॅटीन भाषेत लेखन केले. इतिहासलेखनातील शास्त्रीय दृष्टीकोन रोमन इतिहास-लेखनात आढळत नाही. हे लेखन साधारणपणे वर्णनात्मक पद्धतीचे व भाषासौष्ठव सांभाळणारे होते.

**चिनी इतिहासलेखन** :-

या इतिहासलेखनाला ग्रीकांच्याही पूर्वी प्रारंभ झाला. अठराव्या शतकापर्यंत जागतिक इतिहासकारांचे त्यांच्याकडे म्हणावे तसे लक्ष गेले नाही. खरे तर चिनी लोकांना असलेली ऐतिहासिक दृष्टी हे त्यांचे सांस्कृतिक वैशिष्ट्य मानले जाते. चिनी इतिहासलेखन स्वयंप्रेरित व स्वयंप्रज्ञ असून कोणत्याही बाह्य विचाराचा प्रभाव येथे जाणवत नाही. विल ड्युरंट याने तर चीनला 'इतिहासकारांचा स्वर्गलोक' असे संबोधले आहे. चिनी माणूस आध्यात्मिकपेक्षा लौकिक जीवनात रस घेणारा आहे. येथे इ.स. सातव्या शतकात तत्कालीन शासनाने इतिहासलेखनाविषयीचा स्वतंत्र विभाग सुरू केला होता. कन्फ्युशिअस हा इ.स.पू. सहाव्या शतकातील मोठा तत्त्ववेत्ता होय. याशिवाय झूमा शिएन, झूमा कुमाँग, शिह तुंग, लिऊ शीह शी ही उल्लेखनीय नावे.

इतिहासलेखनशास्त्राच्या दृष्टीने प्रवासवर्णनाचे महत्त्व साधारण असे राहिले आहे. यामध्ये फाहिएन, ह्यू एन त्संग, इत्सींग या चिनी प्रवाशांनी भारतात प्रवेश केला व त्याविषयी सविस्तर वृत्त लिहून ठेवले. चीनमध्ये इ.स. पूर्व काळात लिपी विकसित झाली. इ.स.पूर्व दुसऱ्या-तिसऱ्या शतकात कागदाचाही शोध लागला व त्यामुळे लेखनाला गती मिळून इतिहासलेखनाचे दालन समृद्ध झाले.

**रशियन इतिहासलेखन :-**

रशियाचे सतराव्या शतकापर्यंतचे इतिहासलेखन हे बायझांटिन आदर्श समोर ठेवून केले गेले. किव्ह (Kiev) येथे सापडलेला वृत्तान्त बाराव्या शतकातील असून यात नॉव्हगोरॉड व इतर शहरांविषयी काही माहिती मिळते. सतराव्या, १८व्या शतकात रशियाचे आधुनिकीकरण सुरू झाले. सन १७२५मध्ये विज्ञान ॲकॅडेमीची स्थापना झाली व जी.एफ. म्यूलर, ए.एल. श्लट्स यासारख्या अभ्यासकांनी ऐतिहासिक कागदपत्रांची नोंद करायला सुरुवात केली. एकोणिसाव्या शतकात केवळ राष्ट्रवादी विचारसरणीचे लेखन मागे पडून शास्त्रशुद्ध इतिहास अभ्यासाला गती मिळाली. रशियातील कायदेपद्धती, लोकजीवन, सामाजिक बदल हे अभ्यासाचे विषय ठरले. ग्रडोव्हस्की, सर्गिव्हिच, ऱ्हुरोव्हस्की, कोर्क्यूनॉव्ह यांचे इतिहासविषयक लेखन तसेच क्ल्युचेव्हस्की (१८४१-१९११) याचा पाच खंडात लिहिलेला रशियाचा इतिहास महत्त्वाचा मानला गेला.

एम.एन. पक्रॉव्हस्की (१८६८-१९३२) हा रशियन इतिहासकारांतील पहिला मार्क्सवादी भाष्यकार ठरतो. रशियन इतिहासकारांनी या काळात रशियन समाज व संस्था, अन्य युरोपीय समाजजीवनापासून कशा वेगळ्या आहेत किंवा त्यांचे परस्पर संबंध कसे आहेत याच्या अभ्यासावर भर दिलेला दिसतो. रशियन राज्यक्रांतीनंतर मात्र हा प्रवाह वेगळा पडला व आशियाई दृष्टीकोनातून रशियाकडे पाहायला सुरुवात झाली. पक्रॉव्हस्की याच्या नेतृत्वाखाली रशियन इतिहासाचे मार्क्सवादी दृष्टीकोनातून पुनर्लेखन होऊ लागले. यातही 'इंव्हान द टेरिबल' आणि 'पीटर द ग्रेट' यांच्या विशेषत्वाने उल्लेख केला जातो. राष्ट्रीय आणि मार्क्सवादी अशा दोन्ही भूमिकांची उत्तरकालीन इतिहासात सरमिसळ दिसते. पूर्वी युक्रेन, लिथुआनिया अशा प्रदेशांचे वेगळे इतिहास लिहिले गेले. नंतरच्या काळात सोविएत राज्यपद्धतीचे इतर देश, विशेषत: आर्थिक व सामाजिक संस्था यांचा इतिहास वेगळ्या संदर्भासाहित्याआधारे संकलित करण्यावर भर दिला जाऊ लागला.

मुळात ब्रिटिश असलेला, एडवर्ड हॅलेट कार (१८९२-१९८१) याने रशियन समाजवादी क्रांतीमुळे प्रभावित होऊन 'सोशालिझम इन वन कंट्री' (Socialism in one country) या मथळ्याखाली लेखन केले. त्याने तीन खंडात

हा ग्रंथ लिहिला आहे. (१९२४-१९२६). ज्या काळात पाश्चात्त्य जग रशियाविरोधी होते, त्या काळात रशियावर चौदा खंडाचा प्रचंड संदर्भ ग्रंथ तयार करून त्यांनी इतिहासविश्वात आपले वेगळे स्थान निर्माण केले.

रशियन संघराज्याच्या विघटनानंतर मात्र नव्याने प्रादेशिक केंद्र प्रमाण मानून विचार केला जातो.

**अमेरिकेतील इतिहासलेखन :-**

कॅप्टन जॉन स्मिथ याने सन १६२४मध्ये व्हर्जिनिया व न्यू इंग्लंड या प्रदेशाचा समग्र इतिहास प्रसिद्ध केला. तत्पूर्वीचे बहुतेक इतिहासलेखन हे प्रवासवर्णनाच्या स्वरूपाचे होते. अमेरिकन स्वातंत्र्ययुद्धापूर्वी प्रसिद्ध झालेल्या इतिहासविषयक तपशिलात वसाहतीचा विस्तार, 'रेड इंडियन' समाजाशी झालेली युद्धे, घटकराज्यांचे गव्हर्नर व त्यांच्या विधानसभा यातील संघर्ष यांच्या नोंदी उपलब्ध होतात. सतराव्या शतकातील प्रमुख इतिहासलेखकांत विल्यम ब्रॅडफर्ड, एडवर्ड विंझ्लो, एडवर्ड जॉन्सन, विल्यम हवर्ड, रिचर्ड मॅथर यांच्या कामाचा उल्लेख करावा लागतो. व्हर्जिनिया, न्यू इंग्लंड, प्लायमाऊथ या वसाहतीचे इतिहास लिहिले गेले. अठराव्या शतकात या क्षेत्रात जे इतिहासकार होऊन गेले, त्यात कोलोन, विल्यम स्मिथ, टॉमस प्रिन्स आणि टॉमस हचिन्सन यांची नोंद करावी लागते. स्वातंत्र्ययुद्धामुळे (१७७८) इतिहासकारांनाही स्वतंत्र राष्ट्र म्हणून जाणीव होत होती. मर्सी वॉरेन हिने अमेरिकन क्रांतीचा इतिहास लिहिला. एकोणिसाव्या शतकात जॉर्ज बॅक्रॉफ्ट (१८००-१८९१) यांनी दहा खंडात अमेरिकेच्या स्वातंत्र्यापर्यंतच्या इतिहासाचा आढावा घेतला. राष्ट्राभिमान व नाट्यमय प्रसंग हे या लेखनाचे विशेष मानावे लागते. अमेरिकन इतिहासाची साधनसामग्री जमा करण्याचे काम अनेक संस्थांनी व संघराज्याच्या घटकांनी केल्याचे दिसते. जेअटेड स्पार्क्स (१७८९-१८६६) याने अमेरिकन क्रांतीवर उपलब्ध साहित्य प्रसिद्ध केले. साधारणपणे अमेरिकेतील इतिहासकार लेखनात घटनेविषयीचा आशय नोंदवताना अभिव्यक्तीलाही महत्त्व देतात. जॉन मॉटली (१८४१-१८७७) याने युरोपीय साम्राज्याच्या हकीकतीवर लेखन केले. अमेरिकन इतिहासकारांमध्ये प्रामुख्याने हेन्री ॲडम (१८३८-१९१८) यांचे प्रामुख्याने नाव घ्यावे लागते. सामाजिक इतिहासाचा पाया मकमास्टरने रचला. ही प्रथा शेलंड, डिक्सन, फॉकस विंसर आणि आर्थर श्लेझिंगर यापर्यंत चालत आली आहे. एडवर्ड टर्नर (१८८१-१९२९) याने अमेरिकन सरहद्दींचे महत्त्व प्रतिपादन करून इतिहासलेखनाला एक नवीन दृष्टी दिली. आधुनिक अमेरिकन इतिहासलेखन हे प्रामुख्याने भांडवलप्रधान समाजव्यवस्था विकसित होणाऱ्या उद्योगक्षेत्राचा सूक्ष्मपणे मागोवा घेताना दिसतात.

याच काळामध्ये जपान, अग्नेय आशिया व अन्य देशातून आपापल्या पद्धतीने इतिहासाचे लेखन सुरू होते. भारतातसुद्धा वेगवेगळ्या प्रांतांत इतिहासलेखनविषयक भिन्न प्रवाह आढळतात. बंगाल या क्षेत्रात अग्रेसर असल्याचे जाणवते.

**प्राचीन भारतीय इतिहासलेखन :-**

जागतिक संस्कृतीचा विचार करता ग्रीक, रोम, चीनप्रमाणे भारतीय संस्कृती प्राचीन आहे. धर्म, तत्त्वज्ञान, गणित, आयुर्वेद अशा विभिन्न ज्ञानशाखांमध्ये भारतीयांनी मूलगामी स्वरूपाचे योगदान दिले आहे. या विषयातील ग्रंथांच्या अध्ययनासाठी जर्मन, रशिया देशात स्वतंत्र अध्ययन विभाग स्थापन करण्यात आले. असे असूनही, भारतीयांना इतिहासविषयक दृष्टीकोन नव्हता, असे मानले गेले. सुरेंद्रनाथ बॅनर्जी, रमेशचंद्र मुजुमदार यांनी याविषयीचा प्रतिवाद केला असला, तरी स्थळ व काळ यांच्या चौकटीत केलेले गतकालीन वास्तव घटनांचे कथन म्हणजे इतिहासविषयक व्याख्येत बसतील, असे ग्रंथ भारताकडे अभावानेच उपलब्ध होतात. अर्थात सदाशिव आठवले, वि.का. राजवाडे यांसारख्यांनी हे मत नाकारले असून भारतीयांनी लिहिलेले 'कौटिल्य अर्थशास्त्र', पुराणातील युग संकल्पना, जैनांचा 'प्रबंधचिंतामणी', बौद्धांचे सूत्रवाङ्मय यातून इतिहासविषयक नोंदी स्पष्ट होतात, असे मानले.

**मध्ययुगीन इतिहासलेखन :-**

रोमन साम्राज्याच्या अंताबरोबर इ.स. पाचव्या शतकात युरोपात प्राचीन युगाची अखेर झाली. तुर्कांनी इ.स. १४५३ साली कॉन्स्टॅन्टिनोपलची सत्ता हस्तगत केल्यानंतर युरोपात झालेल्या प्रबोधन पर्वाने मध्ययुगाचा शेवट झाला आणि त्या वैचारिक क्रांतीतून आधुनिक काळाचा जन्म झाला, असे मानले जाते. भारताच्या इतिहासाला मात्र युगप्रवृत्तींच्या दृष्टीने या कालगणनेच्या सीमारेषा लागू पडत नाहीत. गुप्त साम्राज्याची अखेर ही प्राचीन व मध्ययुगीन भारताची सीमारेषा मानली जाते. त्यानंतर आलेले मध्ययुग भारतात अठराव्या शतकापर्यंत रेंगाळत राहिले आणि एकोणिसाव्या शतकात प्रारंभी सुरू झालेल्या प्रबोधनाबरोबर येथे आधुनिक युग अवतरले, अशी सर्वसामान्य धारणा आहे. या काळाचे वैशिष्ट्य म्हणजे माणसाच्या स्वतंत्र प्रज्ञेऐवजी ईश्वरी इच्छा प्रमाण मानली गेली. मानवी कर्तृत्वापेक्षा दैववाद, धर्मश्रद्धा महत्त्वाची झाली.

**ख्रिश्चन इतिहासलेखन :-**

ख्रिश्चन इतिहासलेखनातसुद्धा पोपचा एकाधिकार संपूर्ण ख्रिस्ती जगताने स्वीकारला गेला. धर्म हाच मानवी संस्कृतीचा केंद्रबिंदू मानला गेला. ख्रिस्त इतिहासलेखकांमध्ये युसीनियस, सेंट ऑगस्टीन, बीडे (Bede) ही महत्त्वाची नावे लक्षात येतात. 'ओटो' याने इतिहासलेखन करताना जर्मन सम्राट पहिला फ्रेडरिक याचे चरित्र लिहिले. तो समकालीन इतिहासाची माहिती व पोपबरोबर झालेल्या संघर्षाचे विवेचन अधिकृत कागदपत्रांच्या आधारे करतो, यावरून त्याची इतिहासविषयक जाण स्पष्ट होते. इतिहासातील 'पहिला चिकित्सक भाष्यकार' म्हणून याला ओळखतात. असे असले, तरी ख्रिस्त धर्म इतिहासलेखकांची वैशिष्ट्ये नोंदवताना ईश्वराला केंद्रस्थानी मानून वैश्विक इतिहासाचा केलेला विचार लक्षात येतो. यात व्यक्तीच्या कृतीला आणि भावनांना फारसे स्थान राहत नाही. ख्रिस्त इतिहासलेखनामध्ये काळाच्या दृष्टीने ख्रिस्ती इतिहासलेखक ग्रीकांचा काळ हा प्राचीन, रोमन काळ हा मध्ययुगीन व ख्रिस्त जन्मानंतरचा काळ हा आधुनिक काळ अशी विभागणी करतात. ख्रिस्त धर्मनिष्ठ इतिहासलेखनाने सुमारे १२-१३ शतकांचा काळ व्यापला असल्यामुळे युरोपीय इतिहास लेखनाच्या वाटचालीचा तो एक महत्त्वाचा टप्पा मानावा लागतो. ईश्वरी योजनेचे महत्त्व स्पष्ट करणे हा लेखनाचा हेतू होता. असे असूनही या लेखकांनी इतिहासाच्या कालखंडाच्या विभागणीची प्रथा रूढ केली. कालगणनेबरोबरच एकसूत्री कालगणना पद्धतीमुळे अनेक गोष्टींतील गोंधळ नाहीसा झाला व इतिहासलेखनशास्त्राला मध्ययुगीन ख्रिस्ती इतिहास लेखकांनी दिलेली मौलिक देणगी मानली जाते. तसेच वैश्विक इतिहासाची संकल्पनासुद्धा यांनी रूढ केली. प्रा. कॉलिंगवूड या इतिहासलेखन पद्धतीबद्दलचे वर्णन 'Universal, Linear व Impersonal' अशा शब्दात करतो.

**अरब इतिहासलेखन :-**

मध्ययुगीन इतिहास पद्धतीचा आढावा घेताना इतिहासाचे विषय, ऐतिहासिक दृष्टीकोन, लेखन पद्धती व तंत्र या दृष्टीने अरबांचे इतिहासलेखन हा जागतिक इतिहासलेखनाच्या प्रवाहातील महत्त्वाचा टप्पा ठरतो. किंबहुना, अरबांच्या वैशिष्ट्यपूर्ण लेखनामुळे प्राचीन व आधुनिक इतिहासलेखनाला जोडणारा एक भक्कम दुवा म्हणून याकडे पाहावे लागते. इ.स.च्या सातव्या शतकाच्या उत्तरार्धात अरबांनी इतिहासलेखनाला प्रारंभ केला. इस्लाम धर्माच्या उदयामुळे समाजात एकजिनसीपणा निर्माण झाला. साम्राज्यनिर्मिती ही जशी तत्कालीन रोमन इतिहासाची प्रेरणा होती, त्याप्रमाणे धर्मप्रसार व साम्राज्यनिर्मिती हे अरब इतिहासामागील प्रेरणास्रोत ठरले. या लेखनावर पर्शियन इतिहासलेखनाचा प्रभाव जाणवतो. अरबांनी इराणचा पाडाव केला हे खरे असले, तरी मूळ इराणी (Persian) संस्कृतीमुळे ते प्रभावित झाले. आठव्या शतकापासून अठराव्या शतकापर्यंत अरबी भाषेप्रमाणे पर्शियन भाषेतही अरब जगतात विविध विषयांवर लेखन झाले. इ.स.च्या आठव्या शतकाच्या उत्तरार्धात खलिफाचे पद अब्दुल अब्बासच्या

घराण्याकडे आले. त्याने आपले राजधानीचे शहर दमास्कसवरून बगदादला हलवले. अब्दुल अब्बासच्या घराण्याचा शासनकार हा अरब इतिहासलेखनाचा सुवर्णकाळ ठरला. चेंगीजखानच्या मुलाने इ.स. १२५८ साली बगदादवर केलेल्या आक्रमणामुळे अरब संस्कृती लयास गेली. अबू इब्न याह्या, अल वकीदी, अल मदाइनी अल बहादुरी, दीनावारी, अल मसूदी, इब्न खल्लीखान, रशीद अलदीन, अल बिरुनी, इब्न बतूता, इब्न खलुदून यासारखी उल्लेखनीय नावे आहेत. यात इब्न खलुदून याला इतिहासशास्त्राचा संस्थापक म्हणून गौरवले गेले. त्याला लिहिलेला ग्रंथ 'किताब-अल-इबर' (Kitab-al-Ibar) या ग्रंथाच्या प्रस्तावनेत तो ऐतिहासिक घटनांचे स्वरूप, त्यांचा परस्परसंबंध, त्यातील विचारप्रवाह, परिवर्तन व परिवर्तनामागील तार्किक घटक यांची तात्त्विक चर्चा करतो. इतिहासशास्त्राचा संस्थात्मक असा गौरव केला जातो. इस्लामच्या विश्वकोशाच्या तिसऱ्या खंडात याविषयी नोंद आली आहे. तो इतिहासाच्या अध्यापनात सत्यनिष्ठा, चिकित्सा व तर्कनिष्ठेला महत्त्व देतो. 'इतिहासविषयक ??? सांगणारा ग्रंथकार' म्हणून त्याची नोंद करावी लागते. एकूणच अरब इतिहासलेखनाची वैशिष्ट्ये पाहताना हे लक्षात येते की, या इतिहासलेखनात प्रतिबिंबित झालेला लौकिक जीवनविषयक दृष्टीकोन सकारात्मक होता, त्यांच्या लेखनावर इराणी संस्कृतीचा प्रभाव जाणवतो. मानवी संस्कृतीच्या विविध अंगांची नोंद घेण्याचा प्रयत्न जाणवतो. शिवाय, महंम्मद पैगंबराचे मक्केहून मदिनेला प्रयाण हे वर्ष इ.स. ६२२ आधार मानून हिजरी सन प्रचलित करून सर्व ऐतिहासिक घटनांची नोंद त्यानुसार केली. एकसूत्री कालगणना प्रचारात आणली. ऐतिहासिक स्रोतांच्या विश्वसनीयतेवर भर दिल्याने विकसित झालेली शास्त्रीय पद्धत पुढे आली. याला 'इस्नद' असे म्हणत. 'इस्नद' म्हणजे ऐतिहासिक साधने पडताळून घेण्यासाठी उपयोगात आलेले चिकित्सक विश्लेषणाचे तंत्र. या बाबी विचारात घेतल्याशिवाय तत्कालीन इतिहासलेखनाच्या वाटचालीचे नीट आकलन होत नाही.

इतिहासलेखनाला सत्याचा आधार देणे, ऐतिहासिक स्रोतांची विश्वसनियता तपासणे, या बाबी अरबांनी विकसित केल्या. त्यांनी इतिहासलेखन शास्त्राला दिलेले मौलिक योगदान मानावे लागते.

**भारतातील मध्ययुगीन इतिहासलेखन :-**

मध्ययुगात झालेल्या अरब व ख्रिस्त इतिहासलेखनाने जागतिक इतिहासलेखनाचे दालन समृद्ध केले. अरब इतिहासलेखनाचा प्रभाव बाराव्या शतकापर्यंत काहीसा ओसरू लागला आणि याच सुमारास भारतात मध्ययुगीन इतिहासलेखनाला प्रारंभ झाला. अकराव्या शतकातील कल्हणाच्या राजतरंगिणीवर अरब इतिहासलेखनाचा काहीसा प्रभाव आढळतो. खरे तर राजतरंगिणी हा ग्रंथ प्राचीन आणि मध्ययुगीन इतिहास प्रवाहांना जोडणारा दुवा ठरतो. बाराव्या शतकापासून भारतीय इतिहासलेखनाचे स्वरूप व तंत्र यात मूलभूत बदल घडून आले. याच काळात बिल्हणाचे 'विक्रमांकदेव चरित्र', हेमचंद्राचे 'कुमारपालचरित्र', संध्याकरनंदीचे 'रामचरित', मेरुतुंगाचा 'प्रबंधचिंतामणी' ही याच परंपरेतील उदाहरणे मानावी लागतात. बारावे ते अठरावे शतक हा भारतीय इतिहासलेखनातील मध्ययुगीन काळ मानला जातो. 'केंब्रिज हिस्ट्रीरी ऑफ इंडिया' या ग्रंथाचे संपादक प्रा. डॉटवेल यांनी 'मध्ययुगीन युरोपीय इतिवृत्तापेक्षा मध्ययुगीन भारतीय इतिहासलेखन निश्चितच वरच्या दर्जाचे होते' असे स्पष्टपणे नोंदवले आहे. एकोणिसाव्या शतकातील ब्रिटिश इतिहास लेखकांनीसुद्धा या काळातील इतिहास ग्रंथाच्या आधारे मध्ययुगीन भारताचा आलेख तयार केला व ही बाबसुद्धा मध्ययुगीन इतिहासलेखनाचे महत्त्व स्पष्ट करणारी ठरते.

या कालखंडाचे साधारणपणे दोन टप्पे मानावे लागतात. बारावे-पंधरावे शतक हा काळ सुलतानशाहीतील इतिहासलेखन म्हणून ओळखला जातो. तर सोळावे-अठरावे शतक हा मुघलकालीन इतिहासलेखनाचा काळ मानला जातो. पहिल्या टप्प्यातील प्रमुख इतिहासकारांमध्ये 'मिराज-उस-सिराज' याचा 'तबकत ई नासिरी' हा ग्रंथ तर

मुहम्मद गझनीच्या संदर्भात लेखन करणारे उतबी यांचा 'तारिख-ए-यामिनी' हा ग्रंथ तसेच झियाउद्दीन बरवी यांचा 'तारिख-ए-फिरोझशाही' हा ग्रंथ. या काळातील ग्रंथात बलबनने आपल्या वसियतमध्ये आपल्या मुलाला महम्मदला राज्य चालवण्याविषयीचा सुस्पष्ट व मौलिक असा सल्ला दिल्याचे दिसते. तर बारनी याने ग्रंथाच्या प्रारंभी इतिहासकार व इतिहासाच्या स्वरूपाविषयी सत्यसंशोधन, साधी भाषा, विवेकबुद्धी याविषयी विश्लेषण केले आहे. तत्कालीन बाजाराच्या नियंत्रणासारख्या धोरणाची तर्कशुद्ध पद्धतीने मीमांसा केलेली दिसते. याच मालिकेत आमिर खुसरो याचा 'तुघलक नामा', फेरिस्ता यांचा 'तारिखे फेटीस्सा' यांचा उल्लेख करावा लागतो. एकूण सुलतानाच्या आवतीभोवती फिरणारे हे लेखन असले तरी, वर्तमानकाळ हा भूतकाळातून उत्क्रांत होतो याविषयीची फारशी जाण आढळत नाही. या काळचे लेखन संशोधनात्मक पद्धतीने नसून ते निवेदनात्मक स्वरूपाचे आहे.

मुघलकालीन इतिहासलेखनामध्येसुद्धा दरबारी जीवनाभोवती घिरट्या घालताना काहीसे बाहेरच्या क्षेत्रातसुद्धा दृष्टी टाकणारे हे लेखन आहे. या काळात साधारणपणे आत्मचरित्र, प्रादेशिक इतिहास, दरबारी इतिवृत्त, सूफीचरित्र यांसारखे लेखन झाले. अकबराच्या प्रशासन व्यवस्थेची नोंद करणारा 'ऐन-इ-अकबरी' हा ग्रंथ तसेच 'अकबरनामा' हा अबुल फझल याने लिहिलेला ग्रंथ, औरंगजेबाविषयी नोंद करणारा आत्मगीरनामा व महम्मद साकी मुस्तेर खानाचा 'मासीरी आलमगिरी' तसेच काफीरखान याचा 'मुन्तख उल लुबब' हा तीन भागातील ग्रंथ तत्कालीन राजकारण व युद्धविषयक घडामोडींचे यथार्थ चित्रण करतो. जदुनाथ सरकार यांनीसुद्धा याच्या लेखनाची नोंद घेतली आहे. औरंगजेबाच्या दक्षिणेकडील मोहिमेची नोंद करणारा इतिहासलेखन निकोल्स मनुची याचा 'स्टोरीया दी मोगेर' या ग्रंथात हा वृत्तान्त आला आहे. वॉरन हेस्टींगच्या सूचनेवरून 'सईद गुलाम हुसैन खान' याने १७०७-१७८० या काळातील मुघल इतिहास व बंगालमधील इंग्रजी सत्तेचा प्रारंभ याविषयी नोंद करणारा 'सियार-उल-मुन्तखेरीन' (Siyar-Ul-Munta Kharin) हा ग्रंथ महत्त्वाचा ठरतो. एकूण या लेखनामध्ये एक प्रकारची परिपक्वता, कालगणनेविषयी अचूकता साधण्याचा प्रयत्न आढळतो. भारतीय इतिहासलेखनातील हा एक महत्त्वाचा टप्पा ठरतो व सुलतानशाहीतील इतिहासलेखनापेक्षा याचे स्वरूप अधिक ठळकपणे नजरेस येते.

याच काळात उर्दू इतिहासलेखनसुद्धा सुरू होते. त्यांनी प्रादेशिक सत्तांविषयी नोंदी केल्या. मराठी कालखंडात बखरींची निर्मिती झाली. बखर हा तवारीखांचा मराठी अवतार मानावा लागतो. महिकावतीची बखर, मयालदाची बखर, शिवादिग्विजय, ११ कलमी बखर या साहित्यकृतींचा उल्लेख करावा लागतो.

## तत्त्वज्ञान व इतिहासलेखन

एकूण इतिहासलेखन शास्त्राचा विचार करताना एकावेळी जागतिक पातळीवर सुरू असलेल्या प्राचीन काळापासूनच्या लेखनप्रकाराचा, त्यांच्या शैलीचा व त्यातील विविध वैशिष्ट्यांचा तपशील नोंदवणे हा एक भाग असू शकतो. असे असले तरी 'इतिहास' या विषयाला शास्त्र मानायचे की कला की आणखी काही? या विषयीसुद्धा न थांबणारी चर्चा सातत्याने सुरू असल्याचे दिसते. तरीही इतिहासाचे म्हणून एक तत्त्वज्ञान आहे. हे तत्त्वज्ञान म्हणजे इतिहास संशोधनाचे पद्धतीशास्त्र मानावे लागते.

निसर्गात घडणाऱ्या घटना, प्रक्रिया यांच्या स्वरूपाहून ते मूलत:च भिन्न असते. त्याचे स्वत:चे काही नियम असतात व या नियमांनुसार क्रमाने हे तत्त्वज्ञान विकसित होते किंवा इतिहासाचा कालक्रम उलगडत नेणे हे तत्त्वज्ञानाचे उद्दिष्ट असू शकते, हा एक दृष्टीकोन अनेक तत्त्ववेत्यांनी स्वीकारला. इतिहासातील घटना व त्याचा कालक्रम मुळातून तपासून घेणे, ऐतिहासिक घटनाक्रमांचा सर्वंकष अभ्यास करणे, त्याच्या विविध पैलूंची नोंद घेऊन त्याविषयीचा काही सर्वमान्य नियम ठरवीण्याचा प्रयत्न करणे याला 'इतिहासाचे तत्त्वज्ञान' किंवा 'इतिहासाचे परिकल्पक चिंतन' असे म्हणता येईल.

एक प्रगल्भ ज्ञानशाखा म्हणून इतिहासाला आपले स्थान अठराव्या शतकापासून प्राप्त झाल्याचे दिसते. ऐतिहासिक ज्ञानाचे स्वरूप, उद्दिष्ट, पद्धती, प्रामाण्याचे निकष याविषयीचा तर्कशुद्ध विचार या सुमारास सुरू झाला. डेव्हिड ह्यूमने ऐतिहासिक पुराव्याच्या विश्‍वसनीयतेचे निकष स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला. या क्षेत्रात इटालियन तत्त्ववेत्ता गिआम्बा निस्ता विको याने ऐतिहासिक ज्ञानाच्या स्वरूपाचे विश्‍लेषण केले. याच्या मताचा पुढे क्रोसे याच्या विचारावर प्रभाव जाणवतो. अठराव्या शतकात इतिहासविषयक चिंतनाची व त्यातून व्यक्त होणाऱ्या चिंतनाची सुरुवात झाली असली तरी याचा विकास एकोणिसाव्या शतकात नीबर, लिओपोल्ड रॅम्के यांच्या कार्यामुळे झाला. वस्तुनिष्ठ नोंद हे केवळ इतिहासकाराचे काम आहे. त्यातून काही भौतिक तात्पर्य काढणे किंवा त्याविषयीचे मत व्यक्त करणे, ऐतिहासिक विकासामागच्या गूढ प्रेरणा शोधण्याचा प्रयत्न करणे टाळले पाहिजे, अशी यांची धारणा होती. तर एकोणिसाव्या शतकात दुसऱ्या बाजूने इतिहासाच्या स्वरूपासंबंधी विचार होत होता. मिलने वैज्ञानिक पद्धतीने अनुभववादी भूमिकेतून घटनेचे विश्‍लेषण केले पाहिजे, असे प्रतिपादन केले. ऐतिहासिक घटना मानवी स्वभावाच्या नियमांनुसार घडतात, त्यांच्यामागे दैवी प्रेरणा असतात असे न मानता नैसर्गिक किंवा भौगोलिक घटनांमुळे मानवी स्वभावाला वेगवेगळे वळण लागते व त्यानुसार त्या त्या समाजाचा इतिहास घडतो हा सिद्धान्त बकल या इतिहासकाराने मांडला. त्याचप्रमाणे काँट याने समाजशास्त्राच्या नियमांच्या आधारे मानवी इतिहासाच्या प्रवाहाचा किंवा कालक्रमाचा व त्यातील विविध घटनांचा उलगडा करता येईल असे मत मांडले. नैसर्गिक घटनांचे स्पष्टीकरण ज्याप्रमाणे आपण कार्यकारण नियमांच्या आधारे करतो. त्याप्रमाणे ऐतिहासिक घटनांचे स्पष्टीकरणही व्यक्तीचे वर्तन व सामाजिक घटनांच्या कार्यकारण नियमाधारे करता येते असे मत मांडले. तथापि या भूमिकेच्या विरोधात एकोणिसाव्या शतकात तीव्र प्रतिक्रिया उमटल्या. व्हिल्हेम व्हिंडेलबांट, हाइनरिख रिकर्ट आणि विशेषत: व्हिल्हेम डिल्टी हे यांची भूमिका भिन्न होती.

इतिहासात आपण केवळ वस्तुस्थितीचे वर्णन करत नाही, तर नकळत घटनांचे मूल्यमापन करतो आणि म्हणून इतिहास शुद्ध वैज्ञानिक असू शकत नाही अशी भूमिका हाइनरिख रिकर्ट यांनी मांडली. या व अशा विविध संकल्पनेतून इतिहासविषयक तत्त्वज्ञान आकाराला येत गेले. ‘इतिहास’ या विषयावर ‘थॉमस बॅबिग्टन मेकॉले’ (सन १८००-१८५९) यांनी एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात इंग्लंडच्या इतिहासविश्‍वात अग्रगण्य स्थान भूषवले. त्यांच्या प्रभावी लेखनातून त्यांना लेखन लोकप्रियताही लाभली. तरीही त्यांच्या लेखनात वस्तुनिष्ठता अगर वैचारिकतेचा अभाव असल्याचे आक्षेप नोंदवले गेले. जॉर्ज विल्हेल्म फ्रेडरिक हेगेल (सन १७७०-१८३१) याने इतिहासातील तत्त्वज्ञानाचा विचार करताना मूक तत्त्वज्ञाच्या भूमिकेतून त्याकडे पाहिले. ‘इतिहास हा गतिशील आहे’ त्यात सतत स्थित्यंतरे घडत असतात’ असे तो मानतो. मानवी जीवनातील स्थित्यंतरे मला चक्राकार गतीने नव्हे, तर मळसूत्राकार (नागमोडी) (Spiral) पद्धतीने होतात व ती प्रगतीच्या मार्गानेच होत असतात. याचबरोबर विश्‍वचैतन्याची संकल्पनाही तो व्यक्त करतो. चैतन्यशक्तीला विशिष्ट प्रकारे आपला विकास घडवून आणायचा असतो, सर्व मानवी इतिहास म्हणजे माणसाच्या व समाजाच्या निमंत्रणापलीकडील त्या परमतत्त्वाचा आविष्कार आहेत. आपण आपले जीवन स्वत: घडवतो हा माणसाचा विचार केवळ भ्रममूलक आहे. चैतन्यशक्तीच्या योजनेनुसार व्यक्ती व समाज वाटचाल करत असतात. असे यासारखे हेगेलचे विचार काहीसे गूढवादी वाटले तरी त्याचे आंतरिक साम्य भारतीय तत्त्वज्ञानाशी जाणवू लागते.

‘द्वंद्वात्मक विकासाचा सिद्धान्त’ विकास प्रक्रियेसाठी हेगेल मांडतो. हा विरोध विकासाचा सिद्धांत व विश्‍वचैतन्याची संकल्पना हे त्याचे योगदान मानावे लागते. रॉबिन जॉर्ज कॉलिंगवुड (सन १८८९-१९४३) इतिहासाच्या ज्ञानशाखेचा एक ज्येष्ठ तत्त्वचिंतक होता. डब्ल्यू.एच. वॉल्श याने त्याच्या निर्देश ‘संकल्पनावादी

इतिहासकार' म्हणून केला. प्रत्यक्षात त्याने ऐतिहासिक घटना व व्यक्तीवर (Idealist) लेखन केले नाही. इतिहासलेखन प्रक्रियेबाबत मात्र त्याने सखोल चिंतन केले असून त्याने हे विचार 'आयडिया ऑफ हिस्टरी' या ग्रंथातून मांडले आहेत. १९३६ साली इतिहास या विषयावरील ३२ भाषणांचे संकलन 'आयडिया ऑफ हिस्टरी' या ग्रंथात केले गेले. 'फिलॉसॉफी ऑफ हिस्टरी' या लेखात त्याने इतिहासविषयक आपली मते व्यक्त केली. या ग्रंथाचे दोन भाग असून पहिल्या भागात इतिहासाचा विचार ग्रीकांपासून विसाव्या शतकापर्यंत कशा प्रकारे विकसित झाला याचे विवेचन असून दुसऱ्या भागात इतिहासाचे स्वरूप, विषय व पद्धती याचे तात्त्विक विवेचन आले आहे.

इतिहासविषयी कॉलिंगवुड याने काही मूलगामी विचार मांडले. त्यांच्या मते एक ज्ञानशाखा म्हणून इतिहासाचे शास्त्र असे स्थान असले तरी ते भौतिकशास्त्राहून सर्वस्वी भिन्न आहे. त्यांच्या मते इतिहासाची एका शास्त्राशी जवळीक आह व ती तत्त्वज्ञानाशी. त्यांच्या मते मानसिक प्रतिक्रिया दोन प्रकारच्या असतात. प्रथम विचार व त्यानंतर विचारांची होणारी जाणीव. पहिल्या बाबीत तो इतिहास तर दुसऱ्याला तत्त्वज्ञान मानतो. तसेच इतिहासाला असलेली गती ही चक्राकार असत नाही असे सांगताना इतिहासाची पुनरावृत्ती होत नाही. प्रत्येक ऐतिहासिक घटनेत काहीतरी वेगळेपण असते. प्रत्येक क्षण मागच्या क्षणाहून भिन्न असतो.

कॉलिंगवुडच्या मते, भूतकाळ हा इतिहासाचा विषय आहे. तथापि उद्याचा भविष्यकाळ हे आजच्या वर्तमानाचे फळ असतो. भूतकाळ हा वर्तमानापासून पूर्णत: वेगळा करता येत नाही. शिवाय भूतकाळाची पुनर्निर्मिती करत असताना (शोध घेत असताना) वर्तमानातील इतिहासकारांच्या भावना व विचार त्यात मिसळतात आणि तेव्हा इतिहास हा वस्तुनिष्ठ न राहणे स्वाभाविक ठरते. एका घटनेची मांडणी करताना दोन किंवा अधिक इतिहासकार वेगळे मत व्यक्त करतात आणि म्हणून प्रत्येक काळाचा धर्म भिन्न असल्याने प्रत्येक युगाने आपला इतिहास अवश्य लिहावा. (History is a reenactmest, reincarnation of the past events in the historian's mind.) त्याच्या या विचारावर इटालियन इतिहासकार बेनेडिट्टो क्रोमे यांच्या विचारांचा प्रभाव जाणवतो. 'सर्व इतिहास हा समकालीन इतिहास ठरतो.' (All history is a contemporary history) अर्थात बॉलिंगवुड मात्र स्वत:ला प्लेटा आणि व्हिको यांच्या विचारांची प्रेरणा आहे, असे मानतो. कॉलिंगवुड यांच्या मते घटनांमागील विचार उकलून दाखवणारा इतिहास व खरा इतिहास होय. गतकाळाच्या पुनरुज्जीवनाची प्रक्रिया ही ऐतिहासिक प्रक्रियेचाच भाग असतो यासारखे मत त्यांनी मांडले. त्याचे हे विचार निश्चितच मौलिक होते. तथापि कार्ल पॉवर, वॉल्श, कार व टॉयन्बी यांनी या प्रतिपादनातील उणिवा दाखवल्या आहेत. तरी त्याचे श्रेष्ठत्वही मान्य केले आहे.

एडवर्ड हॅलेट कार (सन १८९२-१९८२) याने मात्र 'व्हॉट इज हिस्टरी?' हा ग्रंथ लिहिला, त्यात घटना किंवा घटीने स्वत: बोलत नाहीत तर त्यांना बोलते करतो तो इतिहासकार असे सांगून इतिहास हा भूत व वर्तमानकाळाची सांगड असते. इतिहास हा वर्तमानकाळ व भूतकाळ यांचा अखंड चालणारा संवाद आहे, असे मत व्यक्त केले.

कारण कालचे मध्ययुग किंवा आजचे वर्तमान हे पूर्णत: आजचे असत नाही तर ते, प्राचीन पूर्वपीठिकेवर किंवा त्याच्या अंगाखांद्यावर वाढत असते आणि म्हणून असे परस्पर संबंध तपासणे/पाहणे सयुक्तिक ठरते. प्राच्यविद्येचा वाढता परीघ व त्याविषयी निर्माण झालेल्या विविध संकल्पना विचारात घेता प्राच्यविद्या किंवा भारतविद्या यामध्ये इतिहासलेखनपद्धती व तत्त्वज्ञान यांचा अभ्याससुद्धा अपरिहार्य ठरतो व याच हेतूने हे लेखन केले आहे.

एकूण इतिहासलेखनपद्धतीचा प्रारंभिक व विशेषत: मध्ययुगीन काळातील विविध प्रवाहांचा ओझरता परिचय येथे करून देण्यात आला असला तरी या संकल्पनेची ही केवळ तोंडओळख मानावी लागेल.

**- डॉ. अरुणचंद्र शं. पाठक**

**संदर्भसूची :-**

१. Danto, A.C. Analytical Philosophy of History, London, 1968.

२. Debbins, William, Ed., Essays in the Philosophy of History - R.G. Collingwood, New York, 1966.

३. Barnes, H.E., History of Historical Writings, New York, 1925.

४. Gooche, G.P., History and Historians in 19th Century, London, 1935.

५. Rosenthal, Franz, A History of Muslim Historiography, London, 1952

६. Sen, S.P. (fd), Historians and Historigography in Modern India, Calcutta, 1973.

७. Ali, B. Sheikh, History : It's Theory and Methods, 1979.

८. Carr, E.H., What is History?, 1983.

९. Kosambi D.D., Introduction to the Study of History.

१०. मराठी विश्वकोश, खंड २ मधील संपादित नोंद लक्ष्मणशास्त्री जोशी (संपा.),

११. कोठेकर शांता, इतिहास : तंत्र आणि तत्त्वज्ञान, नागपूर, २०११.

१२. शहा मु.ब. (संपा.) इतिहासाचार्य वि.का. राजवाडे समग्र साहित्य, धुळे.

१३. देशपांडे प्र.म. (संपा.), राजवाडेकृत मराठ्यांच्या इतिहासाची साधने, धुळे.

❋ ❋ ❋

# अ-ओ

## अकलूजकर, अशोक नरहर

**लेखक, विद्यावाचस्पती, संस्कृत अध्यापक**

**६ नोव्हेंबर १९४१**



'प्रथमे हि विद्वांसो वैयाकरणा:' या उक्तीप्रमाणे एक तलस्पर्शी विद्वान व्याकरणकार म्हणून आंतरराष्ट्रीय ख्यातकीर्त अशोक नरहर अकलूजकर यांचा जन्म पंढरपूर येथे झाला. संस्कृत आणि पाली या विषयांसह त्यांनी पुणे विद्यापीठातून पदव्युत्तर पदवी आणि हार्वर्ड विद्यापीठातून १९७० साली विद्यावाचस्पती या पदव्या संपादन केल्या. शिक्षण चालू असतानाच त्यांनी स.प. महाविद्यालय आणि फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे येथे आणि नंतर इलिनॉइज युनिव्हर्सिटी, मिशिगन स्टेट युनिव्हर्सिटी येथे संस्कृत अध्यापनाचे कार्य चालू ठेवले. युनिव्हर्सिटी ऑफ ब्रिटिश कोलंबिया, व्हँकूव्हर कॅनडा येथे व्याख्याता म्हणून रुजू होऊन अकलूजकर यांनी दीर्घकाळ संस्कृत आणि तत्संबंधी विषयांचे अध्यापन केल्यावर, त्याच विद्यापीठाचा 'सुप्रतिष्ठ प्राध्यापक' (Professor Emeritus) हा अत्युच्च सन्मान त्यांना प्राप्त झाला.

विद्यार्थिदशेपासूनच अत्यंत उज्ज्वल शैक्षणिक कारकीर्द असलेल्या अकलूजकर यांनी अनेक शिष्यवृत्त्या पटकावल्या. त्यांतील काही महत्त्वाच्या अशा : अमेरिकन काउन्सिल ऑफ लर्नेड सोसायटीज, सोशल सायन्सेस ॲण्ड ह्युमॅनिटीज रिसर्च काउन्सिल ऑफ कॅनडा आणि युनिव्हर्सिटी ऑफ ब्रिटिश कोलंबिया, सीनियर किल्लम फेलोशिप.

नवी दिल्ली येथील संस्कृत मंदाकिनी संघटन या संस्थेतर्फे त्यांना 'विद्या-सागर' या सन्मान पदवीने गौरवण्यात आले, तर अठराव्या आंतरराष्ट्रीय वेदान्त गोष्ठी २००८मध्ये त्यांना 'व्याकरण-प्रभाकर' असा किताब बहाल करण्यात आला. अखिल भारतीय संस्कृत संमेलन, संस्कृत क्षेत्रातील त्यांच्या योगदानाबद्दल २०१२मध्ये त्यांचा विशेष सत्कार करण्यात आला. भारत सरकारच्या मनुष्यबळ मंत्रालयाच्या अंतर्गत कार्य करणाऱ्या राष्ट्रीय संस्कृत संस्थान या देशव्यापी संस्थेतर्फे त्यांना सन्माननीय 'डी.लिट.' ही उपाधी सत्कारपूर्वक देण्यात आली.

संस्कृतच्या प्रसारासाठी अकलूजकर यांनी 'कॅनेडियन असोसिएशन ऑफ संस्कृत' ही संस्था कॅनडा येथे स्थापून तिचे सचिवपद त्यांनी दीर्घकाळपर्यंत भूषवले. त्याशिवाय, इंटरनॅशनल असोसिएशन ऑफ संस्कृत स्टडीज या संस्थेच्या सल्लागार मंडळाचे सदस्यत्व, अमेरिकन ओरिएन्टल स्टडीजच्या डायरेक्टर मंडळाचे सभासदत्व, शास्त्री इंडो-कॅनेडिअन संस्थेच्या संचालक मंडळाचे सदस्यत्व असे अनेक बहुमान त्यांना प्राप्त झाले.

अकलूजकर यांच्या प्रकाशित साहित्यापैकी 'संस्कृत : ॲन ईझी इन्ट्रोडक्शन टू ॲन एन्चान्टिंग लँग्वेज' (१९९२) या पुस्तकाची अनेक मुद्रिते निघाली. त्याशिवाय, 'द थिअरी ऑफ निपाताज (पार्टिकल्स) इन यास्कज निरुक्त' (१९९९), 'स्टडीज इन संस्कृत ग्रामर' (जॉर्ज कार्दोना व हिदेयो ओगावा या सहलेखकांसह) २००९, 'लिंग्विस्टिक ट्रॅडिशन ऑफ कश्मीर' (मृणाल कौल या सहलेखकासह) २००८, ही काही महत्त्वाची पुस्तके होत. नव्वदच्या वर संशोधननिबंध, मोनोग्राफ्स,

वीसवर परीक्षणे, या विद्वत्तापूर्ण लेखनाबरोबरच अकलूजकरांचे ललित लेख, हलक्या-फुलक्या संस्कृत कविता, संपादकीये अकलूजकरांच्या सर्वगामी संस्कृतप्रतिभेची साक्ष देतात. ऑल इंडिया रेडिओवर संस्कृतसंबंधी कार्यक्रमांची निर्मिती आणि सादरीकर 'शारदा'सारख्या संस्कृत नियतकालिकांचे संपादन, विदेशात अनेक ठिकाणी निबंधवाचन असा अकलूजकर यांचा व्यस्त जीवनक्रम असतो. भारतातही वाराणसी, चेन्नई, पुणे, मुंबई, तिरुपती, वडोदरा येथे आंतरराष्ट्रीय परिषदांमध्ये अकलूजकरांचे शोधनिबंध वाखाणले गेले आहेत. अकलूजकर यांच्यावरील एक गौरवांकही त्यांच्या चाहत्यांनी प्रसिद्ध केला आहे.

– डॉ. परिणीता देशपांडे

## अणे, माधव श्रीहरी

**संस्कृत अभ्यासक**

**२९ ऑगस्ट १८८० – २६ जानेवारी १९६८**

☛ ***मुख्य चरित्रनोंद - समाजकारण खंड***



भारताच्या स्वातंत्र्य चळवळीतील थोर नेते माधव श्रीहरी अणे यांचा जन्म यवतमाळ जिल्ह्यातील वणी येथे एका मध्यमवर्गीय कुटुंबात झाला. त्यांच्या अध्ययनात संस्कृत भाषेला खास प्राधान्य होते. वकिली व्यवसाय करीत असतानाच त्यांनी अनेक सार्वजनिक संस्थांमधून सदस्य, उपाध्यक्ष, अध्यक्ष या नात्यांनी कामे केली. त्यांनी 'लोकमत' हे साप्ताहिक काही वर्षे चालवले. १९२८ साली ग्वाल्हेरच्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष म्हणून त्यांची निवड झाली. लोकमान्य टिळकांचे ते कट्टर अनुयायी होते. त्यांनी १९४९मध्ये संस्कृत भाषेत 'तिलक यशोर्णव' या शीर्षकाने टिळकांचे चरित्र लिहिले. लोकमान्य टिळकांच्या होमरूल लीगचे ते एक प्रमुख प्रचारक व अनुयायी होते. टिळकांनी त्यांना होमरूल लीगचे उपाध्यक्षपद दिले होते. लोकमान्यांच्या मृत्यूनंतर ते महात्मा गांधींच्या असहकार चळवळीकडे आकृष्ट झाले. काँग्रेसच्या विविध अधिकारपदांवर त्यांची नियुक्ती झाली. यातूनच दुसऱ्या महायुद्धाच्या वेळी गव्हर्नर जर्नलच्या कार्यकारी मंडळात एक अभ्यासू सदस्य म्हणून त्यांची नियुक्ती झाली; परंतु महात्मा गांधींनी ८ ऑगस्ट १९४२ रोजी छोडो भारत चळवळ सुरू करून पुढे उपोषण केले, तेव्हा त्यांनी महात्मा गांधींना सहानुभूती दर्शविण्याकरिता १९४३मध्ये कार्यकारी मंडळाच्या सदस्यत्वाचा राजीनामा दिला. स्वातंत्र्योत्तर काळात त्यांनी वाचन-लेखन यांचा व्यासंग जोपासला. त्यांच्या बहुविध कार्यामुळे लोकांनी त्यांना 'लोकनायक' ही उपाधी दिली.




**टपाल तिकीट काढून अणे यांचा सार्थ गौरव**

– संपादित

**संदर्भ :**

*१. मराठी विश्वचरित्रकोश; संपादक - कामत, श्रीराम पांडुरंग; विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा.*

## अन्सारी, झैनुद्दीन दाऊद

**पुरातत्त्वशास्त्रज्ञ**

**१९२३ – १८ फेब्रुवारी १९९८**

डॉ. झैनुद्दीन दाऊद अन्सारी हे 'शेख' या नावाने परिचित होते. पुणे जिल्ह्यातील नारायणगाव येथे त्यांचा जन्म झाला. बालपणापासून कलेची आवड असल्याने मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण पूर्ण होताच केंद्र शासनाच्या पुणे येथील पुरातत्त्व सर्वेक्षण विभागात आर्टिस्ट/आरेखक या पदावर नोकरी करणे त्यांनी पसंत केले. या नोकरी दरम्यान त्यांनी पुरातत्त्वशाखेशी निगडित आरेखन व छायाचित्रणाचे ज्ञान श्री. जे.पी. जोगळेकर यांच्याकडून



आत्मसात केले. १९४८ मध्ये डॉ. ह.धी. सांकलियांनी त्यांचे कलागुण व इतर कौशल्य ओळखून डेक्कन कॉलेजमध्ये त्यांना प्राचारण केले व तेव्हापासून ते शेवटपर्यंत सांकलियांसोबत त्यांचा उजवा हात, तसेच त्यांचे ट्रस्टेड लेफ्टनन्ट म्हणून कार्यरत राहिले. *'बॉर्न फॉर आर्किऑलॉजी'* या सांकलियांच्या आत्मचरित्रात डॉ. अन्सारी यांच्याबाबत तसा उल्लेख केलेला आढळतो.

पुरातत्त्वशास्त्राचे क्षेत्रकार्य (फील्डवर्क) हे प्रमुख अंग मानले जाते. फील्डवर्कबाबत विशेष आवड, तसेच कौशल्य हा डॉ. झैनुद्दीन दाऊद अन्सारींचा उपजत गुण सांकलिया यांनी हेरला. यातूनच त्यांचा पुरातत्त्वीय संशोधनातील सहभाग सांकलियांच्या सर्व शोधमोहिमांत अपरिहार्य ठरला. महत्त्वपूर्ण पुराश्मयुगातील व त्याहूनही प्राचीन काळातील जीवाश्म शोधून काढण्याची त्यांची हातोटी व त्यामागची कारणमीमांसा यांमुळे त्यांच्या शोधमोहिमेला एक वेगळे परिमाण लाभले. यातूनच फील्डवर्क व अन्सारी असे समीकरण उदयास आले.

पुरातत्त्वीय शास्त्रशुद्ध उत्खनन व समन्वेषण कसे असावे या मूलभूत अंगाचे धडे डॉ. अन्सारी यांच्याकडून घेण्यास विद्यार्थिवर्गाव्यतिरिक्त पुरातत्त्वशास्त्रातील इतर संशोधकही उत्सुक असत. प्राचीन वसाहतींचा शोध व अश्मीभूत पुराव्याचा ठावठिकाणा नदीच्या प्राचीन निक्षेपातून लावण्याव्यतिरिक्त त्यांची प्रायोगिक पुरातत्त्वशास्त्रातही गती होती. पुराश्मयुगातील मानवाने पाषाणावर विविध आयुधे कशी घडविली व तिचा वापर कशा प्रकारे केला असावा हे त्यांनी स्वतः प्रत्यक्ष पाषाणावर हत्यारे करून तंत्र जाणून घेतले. तसेच, त्यांच्या उपयोगाबाबतही केलेल्या अनुमानाने पुरातत्त्वशास्त्रास एक उंची प्राप्त करून दिली. म्हणूनच पुरातत्त्वशास्त्रातील पदव्युत्तर शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना त्यांचे मार्गदर्शन मिळणे ही विशेष पर्वणी असायची. त्यांच्या निवृत्तीपर्यंत हा प्रशिक्षणाचा उपक्रम अखंडपणे कायम राहिला. त्याचप्रमाणे, पुरातत्त्वशास्त्रातील मुळाक्षरे मानली जाणारी मृद्‌भांडी व त्यांच्या अभ्यासाला विशेष महत्त्व आहे. त्यांच्या सखोल अभ्यासावरून प्राचीन मानवाच्या विविध अंगांचा अभ्यास करण्यात ते महत्त्वपूर्ण भूमिका बजावतात. ही मृद्‌भांडी बरेचदा मोडक्या अवस्थेत, परंतु असंख्य प्रमाणात सापडत असल्याने त्यांचा उपयोग मानवाच्या संस्कृतीचे विविध पैलू जाणून घेण्यास उपयुक्त ठरतो यात दुमत नाही. त्यामुळे मृद्‌भांड्यांच्या अभ्यासाला पर्याय नाही. डॉ. अन्सारी यांना याबाबतचे सखोल ज्ञान होते. त्याबाबत त्यांनी साध्यासोप्या भाषेत लेख लिहून मृद्‌भांड्यांच्या अभ्यासाच्या दिशेचा सचित्र परिचय करून दिला.

त्यांनी केलेली बहुतेक उत्खनने (१९५० ते १९७०च्या दशकातील) सांकलिया यांच्या सोबत एक सहकारी या नात्याने केली, तर काही त्यांच्या सहकाऱ्यांसोबत सह-उत्खनकाच्या भूमिकेत केलेली आढळतात. यांत ब्रह्मपुरी (कोल्हापूर), नेवासे, चांडोली, कायथा, द्वारका, संगनकल्लू, आहाड, महेश्वर आणि नावदाटोली, पिंपळसुटी व इनामगाव यांचा उल्लेख महत्त्वपूर्ण आहे. या उत्खननांमुळे प्रागैतिहासिक काळ, इतिहासपूर्व काळ व ऐतिहासिक काळातील सांस्कृतिक पुरावे उजेडात आले व त्यांचे वृत्तान्त प्रसिद्ध झाले आहेत. डॉ. अन्सारी यांचा दीर्घकाळ सहवास लाभलेले त्यांचे सहकारी डॉ. मधुकर ढवळीकर यांनी डॉ. अन्सारी यांच्या कार्याचा आढावा घेताना असे म्हटले आहे, की सांकलियांच्या पुरातत्त्वीय शोधकार्यातील यशात डॉ. अन्सारी यांचा महत्त्वपूर्ण वाटा आहे.

सुरी व ब्रश या दोन उपकरणांचा कौशल्यपूर्ण वापर व त्याला सूक्ष्म निरीक्षणाची जोड उत्खननित पुराव्याचा अभ्यास करण्यास खूपच उपयोगी पडतो. तसेच, उत्खननित खड्ड्यांतील विविध स्तरांमधील भेदही निश्चित करणे यासारखे महत्त्वपूर्ण काम त्यामुळे सुलभ होत असते. पुरातत्त्वशास्त्रातील ही खास कौशल्ये त्यांनी विकसित

केली असल्यामुळेच डॉ. अन्सारी यांना फील्डवर्कमध्ये अनन्यसाधारण स्थान प्राप्त झाले होते व त्यांचा उत्खननात सहभाग असणे अपरिहार्य झाले तर नवल नाही.

डेक्कन कॉलेजमध्ये आरेखक/छायाचित्रकाराची जबाबदारी सांभाळून त्यांनी ग्रॅज्युएट/पोस्टग्रॅज्युएट व पीएच.डी.पर्यंतचे शिक्षण पूर्ण केले. त्यांचा पीएच.डी.चा विषय *'जीओमेट्रिकल अ‍ॅप्रोच टू पॉटरी'* हा होता. त्यांच्या कर्तृत्वाला अनुसरून त्यांची डेक्कन कॉलेजमध्ये म्यूझियम प्रमुख, अधिव्याख्याता व प्रपाठक अशा विविध पदांवर बढती झाली व ते १९८३ साली निवृत्त झाले. त्यांचे आठ उत्खनन वृत्तान्त प्रसिद्ध झाले आहेत व त्यांत ते सह-वृत्तान्तलेखक आहेत. त्यांच्या लेखांचा विषय प्रामुख्याने पुरातत्त्वशास्त्रातील तंत्रकौशल्याबाबत आढळतो. डॉ. अन्सारी यांचा वयाच्या पंचाहत्तराव्या वर्षी मृत्यू झाला.

— प्रकाश जोशी

**संदर्भ :**


१. *ढवळीकर, मधुकर के.; 'ऑबिच्युअरी : झेड.डी. अन्सारी', १९९८; 'बुलेटिन ऑफ द डेक्कन कॉलेज पोस्टग्रॅज्युएट अ‍ॅण्ड रिसर्च इन्स्टिट्यूट ५६-५७'; १९९६-९७; पृष्ठे : ४१३-४१६.*

२. *पदैया, के.; 'ऑबिच्युअरी : झैनुद्दीन दाऊद अन्सारी, मॅन अ‍ॅण्ड एन्व्हायर्नमेंट'; २३ (१), पृष्ठे : ११७ - ११९; १९९८.*

३. *सांकलिया, ह.धी.; 'बॉर्न फॉर आर्किऑलॉजी'; बी.आर. पब्लिशिंग कॉर्पोरेशन, दिल्ली; १९८८.*


## अप्रबुद्ध

***पालेकर, विष्णू केशव***

**लेखक, क्रियाशील विचारवंत, चिंतक**

**३१ डिसेंबर १८८७ — ९ जुलै १९६७**

समाजात प्रतिथयश लेखकांना मानाचे स्थान आपोआपच मिळते. ललित साहित्य, काव्य, कादंबरी या प्रांतात यशस्वी लेखन करणारे कवी, लेखक, कादंबरीकार आपल्या कृतीमुळे मृत्युनंतरही कीर्तिरूपाने आज जीवंतच आहेत. त्यातही समाज हिताची व समाज



प्रबोधनाची कळकळ घेऊन वेळ पडल्यास समाजाला न पटणारे व न रूचणारे विचार सांगणारे कर्ते सुधारक देखील कालांतराने समाजाला आदरणीय ठरतात. समाजाला अत्यंत आवश्यक पण समाज प्रवाहाच्या वेगळे लेखन करून वाङमयात कायम स्वरूपी नाव खोदून ठेवणाऱ्या लेखकांत व देशभक्तात विष्णू केशव पालेकर उपाख्य अप्रबुद्ध यांचे नाव आदराने घ्यावे लागते.

अमरावती जिल्ह्यातील अचलपूर या गावी ३१ डिसेंबर १८८७ रोजी अप्रबुद्धांचा जन्म झाला. त्यांचे वडील केशवराव पालेकर हे शिक्षण खात्यात शिक्षणाधिकारी होते. सर्व भावंडात धाकटे असल्यामुळे आईवडिलांचा त्यांच्यावर लोभ होता. लहानपणीच त्यांचे वडील वारले. त्यांचे शालेय शिक्षण अमरावतीत झाले व महाविद्यालयीन शिक्षण करीता ते नागपूर येथे आले. नागपूरच्या हिस्लॉप महाविद्यालयामधून त्यांनी बी.ए.ची परीक्षा उत्तीर्ण केली. त्यांचे वडील बंधू अमरावती येथे वकिली करीत असत. भारतीय कीर्तीचे प्रसिद्ध पुढारी व वकील श्रीमंत दादासाहेब खापर्डे यांच्या जवळ अप्रबुद्धांचे वडील बंधू वकिली करीत असत. त्यामुळे पालेकर व खापर्डे या दोन्ही कुटुंबाचा स्नेह होता. नागपूर, अमरावती व यवतमाळ येथे त्याकाळी क्रांतिकारकांच्या चळवळी चालत असत. अप्रबुद्धांचा संबंध महाविद्यालयीन जीवनापासूनच या चळवळीशी आला. त्यांचा सक्रीय सहभाग त्या चळवळीत होता. टिळकांचे राजकारण तर दादासाहेब खापर्डे यांच्यामुळे त्यांच्यात मुरले होतेच. आळंदीचे श्री नरसिंह सरस्वती स्वामी यांचा मंत्र केशवराव पालेकर यांना होता. त्यामुळे पालेकर कुटुंब आळंदी येथील नरसिंह सरस्वती स्वामी महाराजांशी जुळले होते. लो. टिळक ज्यांना गुरूस्थानी मानीत ते महर्षी पटवर्धन यांचादेखील संबंध पालेकर कुटुंबाशी त्याचमुळे आला. १९१० मध्ये वडील भाऊ

आप्पासाहेब पालेकर यांच्यावर उपचार करण्यासाठी अप्रबुद्ध पुण्याला आले. ते मुक्कामी अण्णासाहेब पटवर्धनांकडेच राहिले. त्या आजारात अप्रबुद्धांचे वडील बंधू मरण पावले व अप्रबुद्ध मात्र महर्षी पटवर्धनांजवळ राहिले. अण्णासाहेब पटवर्धनाची पूर्ण सेवा त्यांनी केली. अण्णासाहेबांनी त्यांच्यावर पूर्ण कृपा केली. त्याच वेळी त्यांनी जीवनांत सरकारी नोकरी करायची नाही व ब्रह्मचारी राहून आजन्म देशसेवा करायची ही प्रतिज्ञा केली. स्वत: अण्णासाहेब पटवर्धनांनी केवळ बाह्य राजकारणानी देश स्वतंत्र होणार नाही त्या करीता ईश्वरी कृपा मिळायला पाहिजे व त्या करीता तपश्चर्येची गरज आहे हे ओळखून आपले उत्तरायुष्य त्या रीतीने घालविले. तोच कित्ता अप्रबुद्धांनी गिरविला.

अण्णासाहेब पटवर्धनांजवळ त्यांना भारतीय संस्कृतीची मूलतत्वे व धर्माची गुह्येही कळून आली. १९१७ साली अण्णासाहेब पटवर्धन यांनी शरीरत्याग केल्यानंतर अप्रबुद्ध हिमालयात उत्तर काशी येथे गेले. तिथे तपश्चर्या व योगाभ्यास करून संस्कृतीच्या मूलतत्त्वांची अनुभवसिद्ध प्रचिती त्यांनी घेतली. १९२६ साली अमरावतीला परत आल्यावर त्यांनी महर्षी अण्णासाहेब पटवर्धन यांचे चरित्र हे ४५० पानांचे पुस्तक लिहिले. या चरित्रामुळे त्याकाळी खूप खळबळ उडाली. पुढे पुन्हा ते हिमालयात जाऊन एकांतात तपसाधनेत गुंतले. १९३४ साली न्या. दादासाहेब परांडे यांनी स्थापन केलेल्या वर्णाश्रम स्वराज्य संघ यांचे मुखपत्र असणाऱ्या धर्मवीर या साप्ताहिकाचे संपादक म्हणून त्यांना नागपूरला बोलविण्यात आले व ते नागपूरला आले. तीन वर्षे त्यांनी धर्मवीर चालविले. पुढे ते वर्तमानपत्र बंद पडले.

अप्रबुद्धांनी वैदिक संस्कृतीचा प्रसार हेच आपले जीवनकार्य निश्चीत केले. धंतोली येथील एका झोपडीत एकटेच राहून ते आपले कार्य करीत असत. वेगवेगळ्या ठिकाणी व्याख्याने, वैयक्तिक संपर्क, लेखन हे त्यांचे कार्य नागपूरला सुरू झाले. वर्णाश्रम स्वराज्य संघाचे अध्यक्ष असल्यामुळे त्यांनी अखिल भारतीय दौरे ही केले. त्यातच त्यांनी संस्कृतीची मूलभूत तत्त्वे व विवरण करणारी वैदिक संस्कृतीची पुनर्घटना आणि ग्वेदाचा संदेश ही पुस्तके लिहीली.

अण्णासाहेब पटवर्धनांच्या शिकवणीचे सार व मूलभूत भारतीय संस्कृतीची मूलतत्वे विवरण करणारी अण्णासाहेब पटवर्धनांचे चरित्र, वैदिक संस्कृतीची पुनर्घटना व ऋग्वेदाचा संदेश ही तीन पुस्तके होत. पुढे त्यांनी पातंजली योगसूत्रावर मराठीत पुस्तक लिहिले व इंग्रजीत Science of Yoga हे मोठे पुस्तक लिहिले. सर्व तज्ञांनी हे पुस्तक वाखाणले आहे. पातंजल योगसूत्रावर अनुभवसिद्ध लेखकाने लिहिलेले पुस्तक अशी अनेकांनी भलावण केली आहे.

अप्रबुद्धांनी लिहीलेली आणखी पुस्तके- मराठ्यांचा उदयास्त, शिक्षणाचा खेळखंडोबा, वेदांचे अपौरूषेयत्व, लाल गुंडगिरी कम्युनिस्टांचे आरोपाचे उत्तर, जगायचे असेल तर, दोन साम्यवाद, आयुष्याच्या शेवटी लिहिलेले शंकराचार्यांच्या सौंदर्यलहरीवरील मराठी अनुवादासह केलेले विवरण, भारतीय विवाह शास्त्र

अप्रबुद्धांच्या भोवती तरुणांचा भरणा असे. त्यातील पुढे प्रसिद्ध झालेले विद्वानांची कांही नावे अशी- डॉ. ब.स. येरकुंटवार, अर्थशास्त्राचे प्रसिद्ध प्राध्यापक भा.ह.मुंजे, पुणे विद्यापीठाचे डॉ. गर्दे, ज्यांनी रा.स्व. संघाची संस्कृत प्रार्थना लिहीली ते श्री. न. ना. भिडे पूर्ण महाराष्ट्र ज्यांनी आपल्या वक्तृत्वाने गाजविला ते म. म. बाळशास्त्री हरदास इत्यादी. अप्रबुद्धांनी कुणाला गुरूमंत्र दिला नाही पण ही सर्व मंडळी अप्रबुद्धांना गुरुस्थानी मानणारी होती. अकिंचन अवस्थेत राहून व अपरिग्रहाचे व्रत घेऊन त्यांनी आयुष्य काढले. अण्णासाहेब पटवर्धनांच्या देहावसानानंतर त्यांनी अन्नत्याग केला, तो आयुष्याच्या अखेरपर्यंत. थोडे फराळाचे जिन्नस खाऊन ते राहत असत. नागपूर येथे त्यांचे देहावसान झाले. त्यांच्या देहावसानाच्या वेळी व आजारपणात रा.स्व.संघाचे पू. गुरूजी हजर होते. पुढे बाळशास्त्री हरदासांच्या देवस्थानात अप्रबुद्धांच्या छायाचित्राचे अनावरण पू. गुरूजींच्या हस्ते झाले. त्यावेळी पू. गुरूजींनी अप्रबुद्धांची व त्यांच्या साहित्याची

समाजाकडून अक्षम्य उपेक्षा झाली, याबद्दल खंत व्यक्त केली. ‘प्रज्ञालोक’ हे त्रैमासिक त्यांच्याच प्रेरणेने सुरू झाले. कोणतीही जाहिरात न घेता, कोणतेही अनुदान न स्वीकारता प्रज्ञालोक केवळ अप्रबुद्धांच्या आशीर्वादावर चालत आहे.

– श्रीश हळदे

## अभ्यंकर, काशीनाथशास्त्री वासुदेवशास्त्री

**संस्कृत व्याकरणशास्त्राचे गाढे पंडित**

**७ ऑगस्ट १८९० – १ डिसेंबर १९७६**



काशीनाथशास्त्री हे पुणे येथील सुविख्यात वैय्याकरण महामहोपाध्याय वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांचे ज्येष्ठ चिरंजीव होत. त्यांचे सर्व शिक्षण पुण्यातच न्यू इंग्लिश स्कूलमध्ये व फर्गसन महाविद्यालयात झाले. विद्यापीठाच्या सर्व परीक्षांत संस्कृत विषयात प्रथम क्रमांक मिळवून त्या विषयाकरिता असलेली सर्व बक्षिसे व पारितोषिके त्यांनी मिळवली. महाविद्यालयीन शिक्षण चालू असताना वडिलांजवळ व्याकरण, न्याय, धर्मशास्त्र, पूर्व-उत्तर मीमांसा, वेदान्त यांचा कसोशीने अभ्यास झाला. पुढे अध्यापन करताना याचा विशेष फायदा झाला. विविध प्रकारे अध्ययन झाल्याने विषयांची तयारी फारशी करावी लागत नसे व इतर शास्त्रांच्या पुढील अध्ययनाला पुरेसा वेळ मिळे. पदव्युत्तर परीक्षा व पीएच.डी. करता मार्गदर्शन करणे येथेही अवघड गेले नाही.

१९१२ साली एम.ए.ला बसण्यापूर्वीच गुजरात कॉलेज, अहमदाबाद येथे संस्कृत विषयाचे अध्यापक म्हणून त्यांची नेमणूक झाली. १९१९ साली ते संस्कृत विभाग प्रमुख झाले. १९४५ साली सेवानिवृत्त झाल्यानंतरही ते एम.ए.च्या व पीएच.डी.च्या विद्यार्थ्यांना मार्गदर्शन करीत होते. गुजरात विधानसभेने मानद अध्यापक म्हणून त्यांची नियुक्ती केली. तेथे ते १९५५ पर्यंत होते. मुंबई विद्यापीठाने १९२३ साली अर्धमागधी हा विषय सुरू केला, तेव्हा परीक्षक म्हणून व अध्यापक म्हणून गुजरात कॉलेजमध्ये त्यांची नेमणूक झाली. १९५५ नंतर ते पुण्याला स्थायिक झाले. १९६९ साली राष्ट्रीय संस्कृत पंडित म्हणून भारत सरकारने त्यांचा गौरव केला. महाविद्यालयात शिकवताना ‘उत्तररामचरित’, ‘मुद्राराक्षस’ व ‘स्वप्नवासवदत्त’ या पुस्तकांवर विद्यार्थ्यांना उपयुक्त होतील अशा टिप्पण्या काढल्या. अर्धमागधी शिकवायचे म्हणून त्यांनी जैन आगमग्रंथांचे अध्ययन केले आणि ‘कुम्मापुत्ताचरियव’, ‘दासावेआलियसुत्त’ व ‘विंशतिविंशतिका’ या तीन दुर्मीळ पुस्तकांच्या संशोधित आवृत्त्या त्यांनी काढल्या. ‘भैरवपद्मावतीकल्प’ हे जैन मंत्रशास्त्रावर आधारित असलेले दुर्मीळ पुस्तक - ज्याची एकच हस्तलिखित प्रत उपलब्ध होती, हेही त्यांनी सटीक संपादित केले. जैमिनीचा ‘उपदेशसूत्र’ हा फलज्योतिषावर असलेला ग्रंथ सटीक संपादित केला. ‘संस्कृत व्याकरणाचा इतिहास’, ‘संस्कृत व्याकरणाचा कोश’, ‘परिभाषासंग्रह’ (परिभाषांची सुमारे डझनभर लहान-लहान पुस्तके एकत्र आणून त्यांचा संग्रह केला व त्यास विस्तृत अभ्यासपूर्ण अशी प्रस्तावनाही लिहिली), हयग्रीवाचे ‘शक्तिदर्शन’ व त्यावर संस्कृतमधून भाष्य, भर्तृहरीची ‘महाभाष्यदीपिका’ व ‘वाक्यपदीय’ ग्रंथही संपादित केले. ‘महाभाष्यदीपिका’ व ‘वाक्यपदीय’ हे दोन्ही ग्रंथ त्यांनी भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिरात आचार्य वि.प्र. लिमये यांच्याबरोबर प्रकाशित केले.

त्यांचे वडील वासुदेवशास्त्री यांनी तयार केलेल्या ‘श्रीमद्भगवान्पतंजलीकृत व्याकरणमहाभाष्य’ या सप्तखंडात्मक ग्रंथाच्या संपादनाची महत्त्वाची कामगिरी केली. वासुदेवशास्त्री यांच्या हयातीत या भाषांतराचे दोन खंडच प्रसिद्ध झाले होते. उरलेले चार खंड व पाचवा स्वतंत्र प्रस्तावना खंड, अशी सात खंडांची ही आवृत्ती १९५१ ते १९५४ या काळात काशीनाथशास्त्रींनी प्रसिद्ध केली. प्रस्तावना खंडाचे कर्तृत्व संपूर्णपणे काशीनाथशास्त्री यांचे आहे. त्यात व्याकरणशास्त्रावरच्या

सर्व उपलब्ध ग्रंथांचा ऐतिहासिक व चिकित्सक पद्धतीने परामर्श घेतलेला आहे.

१९५१ साली वासुदेवशास्त्री यांच्याच 'शांकर ब्रह्मसूत्राचे मराठी भाषांतर' या ग्रंथाची द्वितीयावृत्ती उत्तम प्रकारे संपादून, त्याला विस्तृत व विवेचनात्मक प्रस्तावना जोडली आहे. अखेरच्या काही वर्षांमध्ये त्यांनी वैदिक व्याकरणात विशेष रस घेतला. त्यातील कठीण भागांवर 'वेदप्रदपाठचर्चा' हा ग्रंथ त्यांनी १९७४ साली लिहिला. त्यात सूत्रे, त्यांवर इंगजीतून स्पष्टीकरण, पदपाठासंबंधीचे व्याकरणाचे नियम व परंपरा यांचा विचार केलेला आहे. भारद्वाज बृहस्पतीचा 'उपलेखसूत्र' हा ग्रंथ वासुदेवशास्त्री यांनी १९७४ साली प्रकाशित केला. 'वेदविकृतिलक्षणसंग्रह' हा त्यांचा शेवटचा ग्रंथ आहे. यात वैदिक संहितामधील विकृतींचा विचार करणारे जे ग्रंथ आहेत, त्याचा संग्रह आहे. हा वासुदेवशास्त्री यांच्या मृत्यूनंतर प्रसिद्ध झाला.

काशीनाथशास्त्री यांनी संस्कृत-भारतीय विद्यांच्या अभ्यासात व संशोधनात आपले आयुष्य व्यतीत केले. या विषयांशी संबंधित असे त्यांचे संशोधनपर, विवेचनपर लेख अनेक नियतकालिकात प्रसिद्ध झाले. पुण्यात राहत असताना भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिराशी त्यांचे घनिष्ठ संबंध होते. आपले विद्वत्तापूर्ण संशोधन ते तेथेच करीत. याखेरीज संस्थेच्या वेगवेगळ्या महत्त्वाच्या पदांचेही काम त्यांनी पाहिले. शेवटी ते एक्झिक्युटिव्ह बोर्डाचे अध्यक्ष होते. तसेच पुण्यातील महत्त्वाच्या संस्था म्हणजे टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे विद्यापीठ, वैदिक संशोधन मंडळ, आनंदाश्रम अशा संस्थांशी ते संबंधित होते. अशा महान व्यक्तीची गुन्हेगारांकडून चोरीच्या उद्देशाने क्रूरपणे निर्घृण हत्या झाली.

– डॉ. कांचन मांडे

**संदर्भ :**


१. *संपादक - कामत श्रीराम पा., मराठी विश्वचरित्र कोश – खंड- २, विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा, २००३.*

२. *संपादक- प्रभा गणोरकर, संक्षिप्त मराठी वाङ्मयकोश - १९२०- २००३, जी. आर. भटकळ फाउंडेशन, मुंबई. २००४.*


## अभ्यंकर, वासुदेवशास्त्री महादेवभट्ट

**महामहोपाध्याय, प्रकाण्डपंडित,**

**संस्कृत अध्यापक**

**४ ऑगस्ट १८६३ – १४ ऑक्टोबर १९४२**



कालिदासाने 'मालविकाग्निमित्र' या नाटकात केलेले वर्णन : 'एखादा स्वत: शिक्षणात हुशार असतो, तर एखादा चांगल्या प्रकारे शिकवू शकतो; पण ज्याच्याकडे या दोन्ही गोष्टी असतील तोच शिक्षकांचा मेरुमणी होय' हे वर्णन ज्यांना अक्षरश: लागू पडते, त्या वासुदेवशास्त्री महादेवभट्ट अभ्यंकर यांचा जन्म वेदशास्त्रसंपन्न अशा घराण्यात झाला. त्यांच्या मातु:श्रींचे नाव दुर्गाबाई होते. वासुदेवशास्त्री दीड वर्षांचे असताना त्यांच्या वडिलांचे निधन झाले. वयाच्या सात वर्षांपर्यंत आजोबा - भास्करशास्त्री यांनी त्यांचा सांभाळ केला. परंतु, नंतर आजोबांचे निधन झाले व वासुदेवशास्त्री अगदी पोरके झाले. त्याच वेळी महर्षी रामशास्त्री गोडबोले यांच्याकडे त्यांचे व्याकरणाचे अध्ययन सुरू झाले. वयाच्या पाचव्या वर्षी कुशाग्र बुद्धीच्या वासुदेवशास्त्र्यांचे 'रूपावली' व 'समासचक्र' तोंडपाठ होते, तर वयाच्या सातव्या वर्षी 'अमरकोश' व 'अष्टाध्यायी' मुखोद्गत होती.

या काळात, विशेषत: वयाच्या आठ ते वीस वर्षांपर्यंत वासुदेवशास्त्र्यांची दिनचर्या पुढीलप्रमाणे होती : सकाळी सहाच्या सुमारास उठून स्नानसंध्यादी प्रात:कर्म उरकून सकाळी सातपासून नऊ वाजेपर्यंत मुख्यत: पाठांतर व शिकवलेल्या विषयाची चिंतनिका असा त्यांचा अभ्यास चाले. चिंतनिका म्हणजे गुरुजींनी शिकवलेला पाठ जसाच्या तसा सहाध्यायींना – बरोबरीच्या विद्यार्थ्यांना शिकवणे. सकाळी नऊ वाजल्यापासून अकरा वाजेपर्यंत रामशास्त्री गोडबोले गुरुजींजवळ सहाध्यायींबरोबर वासुदेवशास्त्र्यांचा अभ्यास चाले. भोजन – विश्रांतीनंतर एक ते चारपर्यंत गुरुजींजवळ पुन्हा अध्ययन होई. दुपारी

चार वाजता गुरुजी बाहेर गेल्यानंतर संध्याकाळी सहा वाजेपर्यंत ते आपल्यापेक्षा खालच्या अभ्यासक्रमातील विद्यार्थ्यांचा अभ्यास घेत. रात्री भोजनोत्तर पुन्हा एक – दीड तास सुमारे ८ ते ९.३० वाजेपर्यंत इतर विद्यार्थ्यांचे शंका, निरसन इत्यादी कार्यक्रम चाले. या सर्व दैनंदिन कार्यक्रमात गावातील मराठी शाळेत जाऊन शिक्षण घेणे वासुदेवशास्त्र्यांना अशक्य होते. म्हणून आठव्या वर्षी त्यांची जी शाळा सुटली, ती कायमचीच. परंतु, कोवळ्या वयात त्यांनी अभ्यासलेल्या ग्रंथांची केवळ नावे बघितली तरी त्यांच्या प्रकांडपांडित्याची जाणीव होते. डॉ. वा.गो. परांजपे यांनी पुढील माहिती (फर्ग्यु. त्रै. जुलै १९२८) दिली आहे –

वय वर्षे ८-११ असताना 'सिद्धान्तकौमुदी', 'रघु-सर्ग'-२, 'माघ-सर्ग'-१, वय वर्षे ११-१३ असताना 'मनोरमा (शब्दरत्न) कारकान्त' व सोबत 'तर्कसंग्रह', 'दीपिका', 'मुक्तावली'; वय वर्षे १३-१४ असताना 'शब्दकौस्तुभ' (नवाहिन्की) व सोबत 'मथुरानाथी-पञ्चलक्षणी', 'गदाधरी- स्वलक्षण', 'कुवलयानन्द', 'नवाहिन्की', 'अङ्गाधिकार'; वय वर्षे १४-१६ असताना 'परिभाषेन्दुशेखर'; वय वर्षे १६-२० असताना 'शब्देन्दुशेखर' व 'लघुमञ्जूषा' यातील महत्त्वाचे भाग; वय वर्षे २०-२३ असताना 'तैत्तिरीय संहिता' व 'ब्राह्मण' व सोबत 'काव्यप्रकाश', 'पञ्चदशी', 'वेदान्तपरिभाषा', 'ब्रह्मसूत्रशाङ्करभाष्य – अध्यापन'; वय वर्षे २३-२४ असताना 'अद्वैतसिद्धि' (पञ्चभङ्गी) व सोबत 'अध्यापन-लेखन तत्त्वादर्श' (परिभाषेन्दुशेखर टीका) व 'गूढार्थप्रकाश' (लघुशब्देन्दुशेखर टीका), अशा रितीने वयाच्या आठ ते वीस वर्षांपर्यंत वासुदेवशास्त्र्यांनी व्याकरणाच्या सर्व आकार ग्रंथांचे अध्ययन पूर्ण केले व त्याचबरोबर त्याला पूरक अशा अन्य शास्त्रांतील ग्रंथांचेही अध्ययन केले.

ते १८९२ मध्ये फर्ग्युसन महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून रुजू झाले व १९२८ मध्ये निवृत्त होईपर्यंत ३६ वर्षे त्यांनी फर्ग्युसन महाविद्यालयात ज्ञानदानाचे काम केले. वस्तुत:, वयाची ५५ वर्षे पूर्ण हे तेव्हा भारतातील सेवानिवृत्तीचे वय होते; तथापि वासुदेवशास्त्री वयाची ६५ वर्षे पूर्ण होईपर्यंत फर्ग्युसनमध्ये पूर्णवेळ प्राध्यापक होते. फर्ग्युसनमधील नोकरीप्रमाणेच संस्कृत पाठशाळेमध्ये त्यांनी ५२ वर्षे अध्यापनाचे काम केले. या कालावधीमध्ये व निवृत्तीनंतरही त्यांनी 'व्याकरण', 'अद्वैतवेदान्त', 'विशिष्टाद्वैतवेदान्त', 'योगशास्त्र', 'अलंकारशास्त्र', 'धर्मशास्त्र', 'दर्शने', 'न्यायशास्त्र', 'मीमांसाशास्त्र' या शाखांमध्ये विपुल लेखन केले. त्यांचे सुमारे ६,००० मुद्रित पृष्ठांचे एकंदर पंचवीस ग्रंथ उपलब्ध आहेत. यांपैकी विशेष उल्लेख करण्यासारखा ग्रंथ म्हणजे संपूर्ण व्याकरण महाभाष्याचा (आठ अध्याय) मराठी अनुवाद. आजपर्यंत कोणत्याही भारतीय किंवा परदेशी भाषेत व्याकरण महाभाष्याचे संपूर्ण भाषांतर उपलब्ध नाही.

वासुदेवशास्त्र्यांना १९२१ मध्ये ब्रिटिश सरकारकडून अत्यंत मानाची अशी 'महामहोपाध्याय' ही पदवी मिळाली. भारतामध्ये ही सर्वमान्य पदवी शास्त्रीय ग्रंथ निर्माण करणाऱ्या, त्यांचे अध्यापन करणाऱ्या किंवा ही दोन्ही प्रकारची कामगिरी करणाऱ्या अत्यंत श्रेष्ठ दर्जाच्या पंडितास आचार्यपीठाकडून अथवा राज्यकर्त्यांकडून देण्याची परंपरा अनेक शतके चालू आहे. अशा प्रकारे वासुदेवशास्त्र्यांनी आजन्म अध्ययन-अध्यापनाचे कार्य केले व सुमारे ७९ वर्षांचे कृतार्थ आयुष्य व्यतीत करून हा ज्ञानयोगी शिवस्वरूपी विलीन झाला.

– डॉ. कांचन मांडे

**संदर्भ :**

*१. डॉ. सहस्रबुद्धे स.वि.; प्रा. साठे म.दा.; 'महामहोपाध्याय वासुदेवशास्त्री अभ्यंकर : चरित्र व कार्य'; म.म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर जन्मशताब्दी महोत्सव समिती, पुणे ३०; १९६३.*

## अर्जुनवाडकर, कृष्ण श्रीनिवास

**प्राच्यविद्या अध्यापक, ग्रंथनिर्माता**

**३१ ऑक्टोबर १९२६ – ३० ऑगस्ट २०१३**

कृष्ण श्रीनिवास अर्जुनवाडकर यांचा जन्म बेळगाव येथे एका व्युत्पन्न घराण्यात झाला. त्यांचे पहिले शिक्षण वडिलांकडे आणि नंतर पुण्यातील बापटशास्त्री यांच्या



आचार्यकुलात झाले. तिथेच त्यांना प्राचीन पाठशाला पद्धतीने 'अद्वैत वेदान्तकोविद' ही पदवी प्राप्त झाली. त्यानंतर आधुनिक पद्धतीने संस्कृत-अर्धमागधी या विषयांसह पदव्युत्तर पदवीही प्राप्त झाली. वाडिया महाविद्यालय, पुणे (१९५५-६०), स.प. महाविद्यालय, पुणे (१९६१-७९) आणि मुंबई विद्यापीठ (१९७९-८६) येथे त्यांनी संस्कृतविद्या, अर्धमागधी आणि मराठी व्याकरण या विषयांचे प्रदीर्घकाल अध्यापन केले. संस्कृत आणि मराठी या दोन्हींतील डॉक्टरेट पदवीसाठी त्यांना मार्गदर्शक म्हणून पुणे आणि मुंबई विद्यापीठाची मान्यता मिळाली होती.

अर्जुनवाडकर हे भारत सरकारच्या संस्कृत भाषा आयोगाचे सदस्य होते. कॅनडातील युनिव्हर्सिटी ऑफ ब्रिटिश कोलंबियात अभ्यागत अध्यापक (१९७३-७४) आणि 'इंटरनॅशनल ऑथर्स', 'रायटर्स हूज हू' आणि 'मेन ऑफ अचीव्हमेंट' या ब्रिटिश संदर्भग्रंथांत त्यांच्या नावाचा समावेश झाला आहे. ते निवृत्तीनंतर सलग पंधरा वर्षे (१९७५-९०) ज्ञानप्रबोधिनीच्या 'संत्रिका' या संस्थेचे निदेशक म्हणून कार्यरत होते. बेल्जियम, जर्मनी आणि लंडन येथे त्यांनी योगशास्त्रावर अनेक व्याख्याने दिली.

अर्जुनवाडकर यांनी संस्कृत, मराठी, इंग्रजी आणि प्राकृत या भाषांतून चौफेर लेखन केले. 'कण्टकाञ्जलिः', 'चुक्रनीतिः', 'पाण्डित्यप्रकाशः', 'प्राणरक्षास्तोत्रम्', 'कौशिकीयोपनिषद्', 'गीताखिलाध्याय', 'प्रीतगौरीगिरीशम्', 'जनपति-अथर्वशीर्षम्' या त्यांच्या शैलीदार संस्कृत रचनांमध्ये खुसखुशीत उपरोध आणि चरचरीत उपहास यांचा सुरेख संगम आढळतो. महाराष्ट्र राज्य शिक्षण विभागासाठी 'संस्कृत भारती' या पाठ्यपुस्तक मालिकेसह 'मराठी व्याकरण : वाद आणि परिवाद', 'मराठी घटना, रचना परंपरा', 'अर्धमागधी घटना आणि रचना', संपादनशास्त्रास आदर्शभूत ठरलेल्या, 'शास्त्रीय मराठी व्याकरण' या मोरो केशव दामले यांच्या आणि 'महाराष्ट्र प्रयोग चन्द्रिका' या वेंकटमाधव यांच्या ग्रंथाची त्यांनी चिकित्सक आवृत्ती केली. 'योग एक्स्प्लेण्ड' यासारख्या ग्रंथाबरोबरच त्यांनी तीनशेहून अधिक संशोधनपर लेखांचे लेखन केले.

'मराठी व्याकरणाचा इतिहास' या पुस्तकासाठी अर्जुनवाडकर यांना 'साहित्यसम्राट न.चिं. केळकर' पुरस्कार, तसेच त्यांच्या संस्कृतसेवेसाठी 'आचार्य पाणिनी' पुरस्कार, टिळक महाविद्यालय, पुणे यांचे 'बेहरे' सुवर्णपदक, वेदशास्त्रोत्तेजक सभेचा 'नानासाहेब पेशवे' पुरस्कार, महाराष्ट्र शासनाचा 'कालिदास' पुरस्कार आणि अत्यंत प्रतिष्ठेचा 'राष्ट्रपती' पुरस्कार अशा असंख्य पुरस्कारांचा सन्मान लाभला. त्यांच्या 'मम्मटकृत काव्यप्रकाश' या भारदस्त ग्रंथास (पृष्ठसंख्या ९८६) 'महाराष्ट्र राज्य समीक्षा' पुरस्काराने गौरविण्यात आले.

प्राचीन पाठशाला पद्धतीच्या संस्कृत शिक्षणातून लाभलेली शास्त्रीय चिकित्सक वृत्ती आणि आधुनिक शिक्षणपद्धतीतून लाभलेला खुला दृष्टिकोन यांचा सुरेख समतोल अर्जुनवाडकरांच्या लेखनात दिसतो. सौम्य, तरीही वेधक बोलणे, प्रदीर्घ विचारांती मतप्रदर्शन, परखड लेखन आणि अथक परिश्रम करण्याचे सामर्थ्य हे त्यांचे प्रकर्षाने जाणवणारे गुण.

ग्रंथ कोणताही असो, त्याच्या मुळाशी जाऊन विषय समजावून सांगणे आणि ज्ञानाचा प्रसार विस्तृत रूपाने झाला पाहिजे या दृष्टीने अत्यंत शिस्तबद्ध रीतीने ग्रंथनिर्मिती करणे ही कृष्ण श्रीनिवास अर्जुनवाडकर यांची शिक्षक आणि लेखक म्हणून वैशिष्ट्ये सांगता येतील.

संस्कृत साहित्याचा साक्षेपी अभ्यासक, निरलस वैयाकरण, प्रकाशचित्रणाचा छांदिष्ट आणि सतत नवनवीन विषयांच्या अध्ययनात गढलेले हे व्यक्तिमत्त्व होते.

— डॉ. परिणीता देशपांडे

## आंबेडकर, भीमराव रामजी

***बाबासाहेब आंबेडकर***

**भारतीय राज्यघटनेचे शिल्पकार, इतिहास संशोधक व लेखक**

**१४ एप्रिल १८९१ – ६ डिसेंबर १९५६**

☛ ***मुख्य चरित्रनोंद – समाजकारण खंड***



सामाजिक परिवर्तनाचे उद्गाते, भारताच्या राज्यघटनेचे शिल्पकार आणि भारतातील बौद्धधर्माचे पुनरुज्जीवनकार अशा कर्तृत्वशाली भीमराव रामजी आंबेडकर यांचा जन्म मध्यभारतातील महू येथे झाला. तीव्र बुद्धिमत्ता, तिला उच्च शिक्षणाची जोड, कठोर प्रयत्नवाद, संघर्षाची तयारी आणि समताप्रस्थापनेची तळमळ यांमुळे हे शक्य झाले. त्यांनी केलेल्या समाजपरिवर्तक चळवळींना विस्तृत आणि सखोल विद्याव्यासंगाचा आधार होता. याचाच भाग म्हणून त्यांनी प्राच्यविद्येच्या क्षेत्रात केलेले संशोधनाधारित लिखाण हे गतानुगतिक समाजाच्या डोळ्यांत अंजन घालणारे आणि विद्वानांनाही विचार करायला लावणारे आहे. प्राच्यविद्येच्या क्षेत्रातील डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा अभ्यास मुख्यतः ३ विषयांभोवती केंद्रित झालेला दिसतो : जातिव्यवस्था, हिंदुधर्म, बौद्धधर्म.

कोलंबिया विद्यापीठात १९१० साली झालेल्या एका मानवशास्त्रविषयक चर्चासत्रात त्यांनी ‘भारतातील जाती : त्यांची यंत्रणा, उगम आणि विकास’ हा निबंध सादर केला. त्यात जातिव्यवस्थेची कारणमीमांसा त्यांनी एंडोगॅमीच्या म्हणजे गटांतर्गत विवाहप्रथेच्या संदर्भात केली. तसेच सतीप्रथा, बालविवाह यांसारख्या प्रथांचे मूळ याच प्रथेत असल्याची मांडणी त्यांनी केली.

पुढे १९३६ मध्ये जातपाततोडक मंडळाच्या परिषदेपुढे सादर करण्यासाठी लिहिलेल्या भाषणात त्यांनी जातिव्यवस्थेची बुद्धिनिष्ठ चिकित्सा केली. धर्मशास्त्रावरील श्रद्धेच्या आधारे कशा प्रकारे जातिव्यवस्था टिकवून ठेवली गेली आहे त्याचे त्यांनी विवेचन केले, तसेच जातिनिर्मूलनाच्या मार्गाचेही मूलगामी विवेचन केले.

एकूण जातिव्यवस्थेच्या अभ्यासाच्या जोडीला त्यांनी शूद्र आणि अतिशूद्र (अस्पृश्य) जातींच्या उगमाचा व त्यांना समाजात दिल्या गेलेल्या स्थानाचा स्वतंत्रपणे अभ्यास केला. या अभ्यासाच्या आधारे त्यांनी, ‘शूद्र कोण होते?’ आणि ‘अस्पृश्य कोण होते आणि ते अस्पृश्य का झाले’, अशी दोन पुस्तके लिहिली. त्यात त्यांनी दावा केला, की शूद्रांना एके काळी भारतीय-आर्य-समाजात क्षत्रियवर्णाचा दर्जा होता; पण ब्राह्मण-क्षत्रिय संघर्षाचा परिणाम म्हणून ब्राह्मणांनी काही क्षत्रियांवर उपनयनसंस्कार करण्यास नकार दिला. त्यातून चवथ्या वर्णाची उत्पत्ती झाली. अस्पृश्यतेचे मूळ बौद्ध संस्कृती व ब्राह्मणी संस्कृती यांच्यातील संघर्षात असल्याचे प्रतिपादन त्यांनी केले.

डॉ. आंबेडकर यांनी हिंदुधर्माची चिकित्सा वर्णव्यवस्था, जातिव्यवस्था, अस्पृश्यता या प्रांच्या अंगाने तर केलीच, पण त्या निमित्ताने त्यांनी हिंदुधर्माच्या आधारग्रंथांचे चिकित्सक वाचन केले. हे करत असताना त्यांना अनेक कोडी पडली. ही कोडी म्हणजे या स्रोतग्रंथांतील आंतरिक विसंगतींचा, शंकास्पद गृहीतकांचा शोध होता. या शोधांची मांडणी त्यांनी ‘रिडल्स इन हिंदुइझम’ या पुस्तकातून, तसेच ‘द रिडल ऑफ राम अ‍ॅण्ड कृष्ण’ या निबंधातून केली. त्यातून डॉ. आंबेडकर यांनी वेद, वेदान्त, स्मार्तधर्म व तांत्रिक धर्म, चातुर्वर्ण्य, कलिवर्ज, ब्रह्मवाद, तसेच रामायण व महाभारतातून दिसणारी अनुक्रमे राम व कृष्ण यांची व्यक्तिरेखा या संदर्भात अनेक चिकित्सक प्रश्न उपस्थित केले. हिंदूंनी आपल्या परंपरेकडे अधिक डोळसपणे पाहावे व विवेकवादाचा अंगीकार करावा, असा त्यांचा, त्यामागील दृष्टिकोन दिसतो.

भारताच्या सांस्कृतिक इतिहासात वैदिक परंपरेचा बौद्ध संस्कृतीशी झालेला संघर्ष व बौद्ध संस्कृतीचे

क्रांतिकारी योगदान यांचीही चर्चा डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी मुख्यत्वे, 'रेव्होल्यूशन ॲण्ड काउण्टर रेव्होल्यूशन' या ग्रंथातून केली.

१९५६ साली डॉ. आंबेडकर यांनी स्वतः नागपूर येथे बौद्धधर्म स्वीकारला व आपल्या लाखो अनुयायांना बौद्धधर्माची दीक्षा दिली. अर्थात, बौद्धधर्माला 'रिलिजन' या अर्थाने 'धर्म' न म्हणता, 'धम्म' म्हणणे त्यांनी पसंत केले. हे धर्मांतर करण्यापूर्वी, आपण ज्या बौद्धधम्मात प्रवेश करणार आहोत, त्याचे नेमके स्वरूप स्पष्ट करण्याची त्यांना गरज वाटली. त्या गरजेतून 'द बुद्ध ॲण्ड हिज धम्म'ची डॉ. आंबेडकर यांनी रचना केली.

या ग्रंथाची धाटणी एखाद्या धर्मग्रंथासारखी होती. पण तो एक प्रचंड व्यासंग करून लिहिलेला आणि संशोधनाधारित ग्रंथ होता. या दृष्टिकोनातून या ग्रंथाकडेही आंबेडकर यांच्या प्राच्यविद्येतील कामगिरीचा भाग म्हणून पाहिले पाहिजे.

या ग्रंथाच्या प्रस्तावनेत त्यांनी पारंपरिक बौद्ध धर्माच्या संदर्भात काही मूलभूत प्रश्न उपस्थित केले व ग्रंथातील प्रतिपादनाद्वारे या प्रश्नांना उत्तरे देण्याचा प्रयत्न केला. अशा रितीने वर्णव्यवस्था, जातिव्यवस्था, हिंदुधर्म व बौद्धधर्म या संदर्भांत मूलभूत प्रश्नांना हात घालणारे संशोधन हे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे प्राच्यविद्येच्या संदर्भातील महत्त्वपूर्ण योगदान होय.

— डॉ. प्रदीप गोखले

**संदर्भ :**


१. *आंबेडकर, बी.आर.; 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर, रायटिंग्ज ॲण्ड स्पीचेस'; 'कास्टस् इन इंडिया', 'ॲनिहिलेशन ऑफ कास्ट', खंड १; १९७९; 'रेव्होल्यूशन ॲण्ड काउण्टर रेव्होल्यूशन इन एन्शंट इंडिया', खंड ३; १९८७; 'रिडल्स इन हिंदुइझम', 'रिडल्स ऑफ राम ॲण्ड कृष्ण', खंड ४; १९८७; शिक्षण विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.*

२. *'कुबेर, वा.ना.; बी.आर. आंबेडकर' प्रकाशन विभाग, माहिती आणि प्रसारण खाते, भारत सरकार, दिल्ली; १९८७.*

३. *संघरक्षित; 'आंबेडकर ॲण्ड बुद्धिझम'; विंडहॉर्स पब्लिकेशन्स, ग्लास्गो; १९८६.*


## आठवले, अनंत दामोदर

***स्वामी वरदानंद भारती***

**आयुर्वेदतज्ज्ञ, लेखक, ग्रंथकार, कीर्तनकार**

**२७ सप्टेंबर १९२० – ५ सप्टेंबर २००२**



''स्वामी वरदानंद भारती तथा पूर्वाश्रमीचे प्राचार्य अनंत दामोदर आठवले त्यांच्या समग्र जीवनावर ओझरता जरी दृष्टिक्षेप टाकला, तरी ते सप्तरंगी इंद्रधनुष्याप्रमाणे, वेदप्रणीत जीवन, अनन्य गुरुनिष्ठा, माणूसपण, भगवंताचे गुणगान, संस्कृतीचे दर्शन, प्राचीन विचारांचे सम्यक प्रतिपादन आणि राष्ट्रासाठी अचूक मार्गदर्शन असे विविधांगी असल्याचे लक्षात येते.'' असे स्वामी गोविंददेव गिरी अर्थात पूर्वाश्रमीचे आचार्य किशोरजी व्यास यांनी म्हटले आहे.

आधुनिक महीपती म्हणून ख्यातकीर्त असलेले परमपूज्य संतकवी दासगणु महाराज अर्थात गणेश दत्तात्रेय सहस्रबुद्धे यांचे अनंत यांच्या वडिलांशी म्हणजेच दामोदर वामन आठवले यांच्याशी पितापुत्राप्रमाणे संबंध होते.

पुढे श्रीपादराव महाबळ यांच्या मोठ्या मुलीबरोबर दामोदर यांचा विवाह सन १९१४साली शिरडी येथे संपन्न झाला. गृहस्थाश्रमी दामोदर व राधाबाई यांच्या पोटी एक-दोन अपत्ये झालीदेखील, पण ती अल्पजीवी ठरली. पुढे अनंत चतुर्दशी शके १८४२म्हणजे दिनांक २७ सप्टेंबर १९२० या दिवशी सकाळी अनंत म्हणजेच स्वामी वरदानंद भारती यांचा जन्म झाला.

सन १९२४साली अनंत यांच्या वडिलांचे म्हणजेच दामोदर आठवले यांचे क्षयरोगाने निधन झाले. त्यामुळे साहजिकच अनंत यांचा प्रतिपाळ दासगणू महाराजांनी केला. दासगणू महाराजांजवळ त्यांचे शिक्षण अनौपचारिकरीत्या होऊ लागले. अनंताची स्मरणशक्ती उत्तम होती, वयाच्या तिसऱ्या वर्षी केलेले पाठांतर

सर्वांना स्तिमित करून टाकणारे होते. परंतु अनंता लहानपणी अगदी रोगट होता. त्यामुळे अनंता दहा वर्षांचा होईपर्यंत शाळेत गेला नाही. सन १९३०साली अनंताला पंढरपूरच्या आपटे महाविद्यालय या शाळेत घातले गेले. अनंताची तयारी पाहून त्याला एकदम दुसऱ्या वर्गात प्रवेश देण्यात आला.

अनंताला वयाच्या सहाव्या वर्षापासून ते पंधरा-सोळाव्या वर्षापर्यंत किमान चार वेळेला विषमज्वराचा त्रास झाला. वैद्यांना भरपूर औषधपाणी करावे लागे, दादा नेहमी विष्णुसहस्रनामाचे पाठ म्हणत अनंताच्या अंगावरून हलकेहलके हात फिरवत असत. महाराजांचे म्हणजेच दादांचे अनंतावरील प्रेम हे शब्दांच्या पलीकडचे होते.

इंग्रजी चौथीत असताना आपल्या प्रकृतीची काळजी आपण स्वत:च घ्यायची या निश्चयाने व्यायामासाठी संघाच्या शाखेत नियमित जायला सुरुवात केली. वाचनाचे वेड असलेल्या अनंताने याच काळात गीतारहस्यासारखा गंभीर ग्रंथ पूर्ण वाचून काढला. दररोज आठ-दहा तास चौफेर वाचन चालत असे. दादांशी अनेक विषयांवर त्यांचे वादविवाद होत. तो काळ इंग्रज राजवटीचा होता त्यामुळे साहजिकच भारतीय संस्कृतीच्या विचारधारेला तडे पडत होते. परंतु सिद्धान्तांच्या दृष्टीने तत्कालीन परंपराविरोधी मते ही फसवी, फुसकी आणि पक्षपाती आहेत आणि भारतीय संस्कृतीची तात्त्विक बैठक हा पाया आहे, हे अभ्यासाअंती अनंताच्या लक्षात आले.

सन १९३९-१९४० या शैक्षणिक वर्षात अनंताने मॅट्रिकच्या वर्गात प्रवेश केला. संघशाखा, कीर्तन, उत्सव-महोत्सव अशी अनेक व्यवधाने सांभाळून मॅट्रिकच्या परीक्षेचा अभ्यास चालू होता. शालान्त परीक्षेचे केंद्र पंढरपुरात होते. त्यानंतरची उन्हाळ्याची सुट्टी लांबलचक मोठी असल्यामुळे निकाल लागेपर्यंतच्या काळात वयाच्या विसाव्या वर्षी ‘श्रीशालिवाहन’ हे महाकाव्य लिहिण्यास सुरुवात केली. शकांच्या दास्यातून मातृभूमीला मुक्त करण्यासाठी तळमळणाऱ्या शालिवाहनाने कालिका देवीला केलेल्या प्रार्थनेने या महाकाव्याचा आरंभ केला. जून १९४०मध्ये शालान्त परीक्षेचा निकाल लागला, अनंता उच्चद्वितीय श्रेणीत उत्तीर्ण झाला. सर्वांना अतिशय आनंद झाला. पुण्यातील ख्यातनाम वैद्य श्री पुरुषोत्तमशास्त्री नानल यांनी आयुर्वेद महाविद्यालयाच्या प्रवेशासाठीचा अर्ज व मॅट्रिकमधील यशाबद्दल अनंताचे अभिनंदन करणारे पत्र दादांच्या नावे पाठवले. त्यांच्या आग्रहानेच ऑगस्ट १९४०पासून पुण्यातील आयुर्वेद महाविद्यालयात शिक्षण सुरू झाले.

दिनांक १९ फेब्रुवारी १९४१रोजी गोरज मुहूर्तावर पंढरपूर येथील खाजगीवाले यांच्या वाड्यात अनंतरावांचा विवाह पंढरपूरपासून जवळच असलेल्या कळमरोडचे स्टेशन मास्तर श्री. हरी गणेश लिमये यांची मुलगी विमल हिच्याशी संपन्न झाला. पू.दादांनी तिचे नाव इंदिरा ठेवले. अनंतरावांच्या वाचनाच्या आवडीला पुण्यातील वास्तव्यात खतपाणीच मिळू लागले. ते राजकीय, सामाजिक, ललित आदी वाङ्मय सारख्याच आवडीने वाचत असत. कथा, कीर्तन, नाटक, सिनेमा यांचीही त्यांना आवड होती. संगीत नाटक ते आवर्जून बघत असत. अनंतराव अत्यंत व्यासंगी, विद्वान तसेच रसिक, हौशी होते. तीव्र स्मरणशक्ती आणि एकाग्रता यांमुळे त्यांची अभ्यासावरील पकड कायम असे.

अनंतराव पुण्यात गेल्यावर राजकारणात सक्रीय झाले नाहीत, तरी हिंदुत्व जागृतीचा वसा घेऊन त्यांनी त्यांच्या कार्याची दिशा ठरवली. त्यातून त्यांचे समाजाबद्दलचे प्रेम व राष्ट्राबद्दलची निष्ठा प्रत्ययाला येते. आयुर्वेद महाविद्यालयातील दुसऱ्या वर्षाच्या विद्यार्थ्यांना रेडक्रॉस सोसायटीचे अध्यक्ष तथा प्रख्यात शल्य-चिकित्सक डॉ. एन. जे. बॅन्ड्रावाला हे शल्यचिकित्सा कक्षात मार्गदर्शन करत असत. डॉ. बॅन्ड्रावाला हे ‘विद्यार्थ्यांनी पॅन्ट घालूनच ऑपरेशन थिएटरमध्ये आले पाहिजे’ याबद्दल आग्रही होते. अनंतराव नेहमीप्रमाणेच धोतर नेसून आले होते. सेवकाने त्यांना प्रवेश नाकारला. डॉ. बॅन्ड्रावाला यांची सूचना कळल्याबरोबर स्वाभिमानी

अनंतराव डॉक्टरांच्या कार्यालयात गेले व त्यांनी विचारले, 'सर, आपण धोतर नेसणाऱ्याला प्रवेश नाकारला आहे काय?' 'हो, कारण जंतुसंसर्गाची भीती....' डॉ. बॅन्ड्रावाला यांना अडवत अनंतराव म्हणाले, 'तर मग माझी एक विनंती आहे. माझ्या वर्गातील इतर कोणत्याही एकाची पॅन्ट व माझे धोतर यांची आपण तपासणी (कल्चर) करू. पॅन्टपेक्षा माझ्या धोतरात जर जास्त जंतू आढळले, तर मी पॅन्ट घालून येईन. माझे धोतर रोज धुतलेले असते. चोपून-चापून नेसलेले असते. वर ॲप्रन घातलेला असतोच.' अनंतरावाची बोलण्याची पद्धत, प्रभावी व्यक्तिमत्त्व, बिनतोड युक्तिवाद यांमुळे त्यांना शल्य-चिकित्सा कक्षात धोतर नेसूनच प्रवेश दिला गेला. आपल्या संस्कृतीवरील त्यांची निष्ठा अशा पद्धतीने अनेक वेळा लहान-मोठ्या प्रसंगांतून व्यक्त होत गेलेली पाहावयास मिळते.

जबरदस्त स्मरणशक्ती, कुशाग्र बुद्धी, तीव्र आकलनशक्ती आदी गुणांमुळे अभ्यास करताना ते विषयाशी सहज एकरूप होत असत. ज्ञानार्जनाची तीव्र लालसा त्यांच्या ठिकाणी असल्यामुळे ते परीक्षार्थी कधीच नव्हते. जुलै १९४४मध्ये अनंतराव 'आयुर्वेद विशारद' ही पदवी परीक्षा प्रथम श्रेणीत उत्तीर्ण झाले.

पू. दादांनी १९४४सालापासून सर्व उत्सवांतली कीर्तन-प्रवचने त्यालाच करायला सांगितली. एव्हाना अनंतरावांना परिवारातील सर्व लोकदेखील अप्पा या टोपणनावानेच संबोधू लागले. इ. स. १९४४ ते १९४८ या काळात अप्पांनी पू. दादांबरोबर कीर्तनाच्या निमित्ताने भ्रमंती केली.

दादांचा मुंबईतही बराच शिष्यवर्ग होता. विलेपार्ल्याला श्री. भवनीशंकर गणपत सशीतल यांच्याकडे एकदा एकादशीनिमित्त कीर्तन होते. दादांना पोटदुखीचा त्रास होऊ लागल्यामुळे अप्पांनी कीर्तन केले. पूर्वरंगातील विद्वताप्रचुर, प्रासादिक विवेचन, सुश्राव्य, रसाळ व भावपूर्ण कथा, कथानक मांडण्याची अंत:करणाचा ठाव घेणारी शैली यांमुळे अप्पांचा मुंबईत अल्पावधीतच चांगला नावलौकिक झाला.

सन १९४५-१९४६ च्या दरम्यान पुण्यात डॉ. वा. रा. ढमढरे यांच्या घरी अप्पांच्या कीर्तनाचा कार्यक्रम ठरला. डॉ. ढमढरे यांनी पुण्यातील विविध क्षेत्रांतील अत्यंत निवडक अशा मंडळींना पाचारण केले. त्यात प्रसिद्ध साहित्यिक, प्राध्यापक, इतिहासकार आदींचा समावेश होता. पू. दादादेखील उपस्थित होते. श्रोत्यांमध्ये साहित्यसम्राट न. चिं. तथा तात्यासाहेब केळकर उपस्थित होते. त्यांनी लिहिलेला 'जुगारी तो जुगारी आणि वर धर्मराज' हा लेख अप्पांनी नुकताच वाचला होता. तो लेख वास्तवाला धरून नव्हता. त्यामुळे त्याचा अप्पांना राग आला होता. तो विषय लक्षात ठेवून अप्पांनी 'अनेकांची अनेक मते । तयाने चित्त व्यग्र होते ।।ध्रु।।' हे पूर्वरंगाचे पद लावले. संस्कृती संरक्षणाचे कार्य ज्यांनी आवर्जून केले पाहिजे, त्यांनीच भारतीय संस्कृतीचा मापदंड असलेल्या महाभारतासारख्या ऐतिहासिक ग्रंथातील व्यक्तिमत्त्वांचे असे अवमूल्यन करावे, याची मनस्वी चीड अप्पांनी पूर्वरंगातून व्यक्त केली. भारतीय संस्कृतीच्या संदर्भातले खंडण-मंडण तात्यासाहेबांच्या लेखासंदर्भातले आहे, हे व्यासंगी श्रोत्यांच्या लक्षात आल्याशिवाय राहिले नाही. पूर्वरंगाची भाषा बोचरी होती, पण लेख आणि लेखकाचा नामोल्लेख त्यांनी टाळला होता. त्यामुळे जेथे लागायला पाहिजे तेथे ते वाग्बाण बरोबर मर्माचा भेद करत होते. प्रत्यक्ष भेटीत तात्यासाहेब केळकरांनी अप्पांना कीर्तन आवडल्याचे सांगत पूर्वरंगाच्या पदावरील विवेचनाचा सर्व रोख आमच्यावरच होता ना? असेही विचारले. कीर्तनात आपण जी विधाने केली होती ती प्रामाणिक होती, सत्याला धरून होती, त्यामुळे अप्पांना आतून धीर वाटत होता. पण तात्यासाहेबांचा नावलौकिक मोठा म्हणून त्यावर काही उत्तर न देता अप्पांनी तो विषय तेथेच संपवला.

मिरजेचे राजे श्री. नारायणराव गंगाधरराव तथा तात्यासाहेब पटवर्धन यांनी तुलसीरामायण जसे साकी, चौपाई वृत्तात आहे त्याप्रमाणे कृष्णकथा रचावी, असा आग्रह दादांकडे धरला. परंतु अप्पांनीच ते लिहावे अशी

दादांची इच्छा होती. पू. दादांच्या आज्ञेप्रमाणे लिखाण सुरू झाले. सन १९४५ ते १९४९ या कालावधीत लिहून पूर्ण झालेल्या अठरा सर्गांच्या या काव्याला अप्पांनी 'श्रीकृष्ण-कथामृत' असे नाव दिले. बहुतेक पादाकुलक वृत्त, मधूनमधून साक्या असलेले हे काव्य चौपाई व दोहे यांच्या चालीवर रचलेले आहे. प्रत्येक सर्गाला मंगलाचरण असून ते संस्कृतमध्ये आहे. रामचरितमानसाशी साधर्म्य असलेले हे काव्य रसाळ, प्रासादिक, सुबोध, ओजस्वी तसेच भक्तिरसाने ओथंबलेले असून शांत रसासह सर्व रसांचा परिपोष यात आहे. हे अप्पांचे मराठीतील पहिले महाकाव्य आहे. १९५०साली ते प्रकाशित झाले. गुरुदेव श्री. रा. द. रानडे यांनी या काव्यग्रंथाला प्रस्तावना दिली. या काव्यनिर्मितीमुळे अप्पा वयाच्या पंचविशी-तिशीतच महाकवी पदवीला प्राप्त झाले.

'कीर्तन' हे समाजप्रबोधनाचे प्रभावी साधन होऊ शकते याची पूर्ण जाणीव पू. अप्पांना असल्याने त्यांच्या कसदार कीर्तनात साहित्यापासून राजकारणापर्यंत व कुटुंबव्यवस्थेपासून समाजकारणापर्यंत सर्व विषयांचा परामर्ष घेतला जाई. त्यामुळे पू. अप्पांची कीर्तने प्रत्यक्ष ऐकणे ही एक दिव्य अनुभूतीच! कीर्तनाची मांडणी अतिशय शास्त्रीय असे. पूर्वरंगामध्ये दृष्टान्तकथा, संदर्भ-दाखले देत विज्ञानाच्या आधाराने अतिशय सोप्या परंतु तर्कनिष्ठ, चिंतनशील आणि प्रभावी वक्तृत्वाने पू. अप्पा अत्यंत रसाळपणे तत्त्वज्ञानाची मांडणी करत. पूर्वरंगात प्रतिपादन केलेली तत्त्वे आचरणात आणणाऱ्या संतमहात्म्यांच्या चरित्रातील कथाप्रसंग आणि मग त्या आख्यानामागील तत्त्वांची उजळणी आणि ते तत्त्वज्ञान आचरणात आणण्यासाठी आग्रही प्रतिपादन अशा प्रकारे त्यांच्या कीर्तनाचे सामान्य स्वरूप असे. कीर्तनात श्रोत्यांना अंर्तमुख करणे, भक्तिभाव जागृत करणे, शिवाय श्रोत्यांच्या दंभावर प्रसंगी चिमटे घेऊन योग्य ते मार्गदर्शन पू. अप्पा अत्यंत प्रभावीपणे करत असत. त्यांचे अमोघ वक्तृत्त्व, अफाट बुद्धिमत्ता, सूक्ष्म निरीक्षण, आपली संस्कृति-परंपरा-शास्त्र यांचे यथार्थ ज्ञान, शब्दफेक, मार्मिक आणि नर्म विनोद अशी वैशिष्ट्ये पू. अप्पांच्या कीर्तनात श्रोता अनुभवत असे. आपल्या परंपरा, धर्म, श्रद्धा, इतिहास यांवर तथाकथित बुद्धिवाद्यांकडून सतत होणाऱ्या टीकांवर ते आपल्या कीर्तनातून तर्कनिष्ठ समाचार घेत असत. मुंबईतील एका कीर्तनाला प्रख्यात नाटककार श्री. विद्याधर गोखले उपस्थित होते. पू. अप्पांनी पं. जगन्नाथाचे चरित्र आख्यान लावले होते. संस्कृत, मराठी, हिंदी, उर्दू अशा विविध भाषांमधून पं. जगन्नाथाचे चरित्र अप्पांच्या रसाळ वाणीतून ऐकल्यानंतर श्री. विद्याधर गोखले म्हणाले की, "हे कीर्तन मी पूर्वी ऐकले असते, तर माझे पंडित जगन्नाथ हे नाटक वेगळे झाले असते.''

इ. स. १९४८ ते १९५० या काळात पुण्याच्या आयुर्वेद महाविद्यालयात 'आयुर्वेद पारंगत' या पदव्युत्तर अभ्यासक्रमासाठी अनंतरावांनी प्रवेश घेतला. त्यांचा संस्कृतचा अभ्यास दांडगा असल्याने संस्कृतातील आयुर्वेद संहितेवर ते इतर विद्यार्थ्यांना मार्गदर्शन करत. ते आयुर्वेद पारंगतची परीक्षा विशेष गुणवत्तेसह प्रथमश्रेणीत उत्तीर्ण झाले. इ. स. १९५० साली अनंतराव त्याच महाविद्यालयात अध्यापक म्हणून सेवेत रुजू झाले. ते इ. स. १९५५ मध्ये आयुर्वेद महाविद्यालयाचे उपप्राचार्य आणि पुढे इ. स. १९६१ साली प्राचार्य झाले. त्यांच्या कारकिर्दीतच आयुर्वेद महाविद्यालयाचे 'लोकमान्य टिळक आयुर्वेद महाविद्यालय' असे नामकरण झाले.

पू. अप्पांनी आयुर्वेद महाविद्यालयात अध्यापकपदापासून प्राचार्यपदापर्यंत पदे भूषवली. ते राष्ट्रीय शिक्षण मंडळाचे आजीव सदस्य होते. पुणे विद्यापीठ कार्यकारिणी सदस्यही होते. तसेच आयुर्वेद रसशाळा, पुणे येथे प्रमुख आणि ताराचंद रामनाथ रुग्णालयाचे अधीक्षक होते. पू. अप्पांच्या व्यक्तिमत्त्वाचा प्रभाव पाहता क्षणीच सर्वांवर पडत असे. महाराष्ट्रातील आयुर्वेद महाविद्यालयाचे एक शिष्टमंडळ राष्ट्रपतींना भेटण्यासाठी दिल्लीला गेले. सर्व मंडळी टाय-सूट-बूट घालून हजर होती. श्री. अनंतराव मात्र स्वच्छ पांढरा

सदरा, स्वच्छ पांढरे धोतर, तपकिरी काळा कोट व टोपी या आपल्या नेहमीच्याच भारतीय वेषात गेले. राष्ट्रपती डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन् त्यांच्या साध्या वेषाने प्रभावित झाले. प्राचार्य अनंतराव सर्वसामान्यांपासून ते अधिकारिवर्गापर्यंत सारखेच लोकप्रिय होते.

प्राचार्य अनंतरावांनी आयुर्वेद वाङ्मयामध्ये मोलाची भर घातली. त्यांचा 'निदान पंचक संप्राप्ति विज्ञान-व्याधिविनिश्चय- पूर्वार्ध' हा ग्रंथ सन १९६१ साली तर 'निदान पंचक संप्राप्ति विज्ञान-व्याधिविनिश्चय-उत्तरार्ध' हा ग्रंथ सन १९६२मध्ये प्रसिद्ध झाला. श्रीमत् आत्रेय प्रकाशन, पुणे या नव्या प्रकाशन संस्थेतर्फे 'कौमार भृत्यतंत्र' या वैद्य श्रीमती निर्मलाताई राजवाडे, वैद्य श्री. शि. गो. जोशी आणि श्री. अ. दा. आठवले या तीन लेखकांनी लिहिलेल्या ग्रंथाचे प्रकाशन जुलै १९५९मध्ये झाले, तर १९६०साली याच प्रकाशन संस्थेतर्फे 'शल्य शालाक्य तंत्र' या वैद्य श्री. शि. गो. जोशी, वैद्य श्रीमती निर्मलाताई राजवाडे आणि वैद्य श्री. अ. दा. आठवले या तीन लेखकांनी लिहिलेल्या ग्रंथाचे प्रकाशन करण्यात आले. अध्यापन काळात विद्यार्थ्यांना अभ्यासाच्या दृष्टीने पुस्तकांची अनुपलब्धता लक्षात घेऊन श्रीमत् वृद्ध वाग्भट विरचित 'अष्टांग संग्रह' या संपूर्ण संस्कृत भाषेतील ग्रंथावरील पू. अप्पांनी लिहिलेला 'अष्टांग संग्रह इंदु टीकेसहित' हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. आयुर्वेदाच्या आठ अंगांचा अभ्यास व आयुर्वेदाची सैद्धान्तिक दृष्टी आणि क्रियात्मक अनुभव यांसाठीदेखील या ग्रंथाचा उपयोग होतो. याशिवाय आयुर्वेदासंबंधीचे अनेक लेख आयुर्विद्या या नियतकालिकामधून वेळोवेळी प्रकाशित झाले आहेत. आयुर्वेदासारख्या शास्त्रीय विषयावरील एवढ्या प्रचंड ग्रंथसंभाराचे लेखन पू. अप्पांनी वयाच्या केवळ चाळिशीत पूर्ण केले.

विलक्षण नियोजनकौशल्यामुळे श्रीदासगणू परंपरेबरोबरच पू. अप्पांचे आयुर्वेद कार्य समर्थपणे चालू होते. दासगणू परिवारातील संबंध टिकणे आणि दृढ करणे या उद्देशाने मिरजेचे राजे पटवर्धन, इंदूरचे होळकर, औंधचे पंतप्रतिनिधी, सरदार पाटणकर, फलटणचे निंबाळकर या सर्व मंडळींशी त्यांचा संपर्क होता. पंढरपूरचा श्रीज्ञानेश्वर पुण्यतिथीचा आणि श्रीदासगणू जयंतीचा उत्सव हे विशेषत्वाने साजरे होत असत.

पू. दादांच्या कार्यात त्यांनी स्वत:ला झोकून दिले, तरीही पू. अप्पांची आयुर्वेदावरील निष्ठा तसूभरदेखील कमी झाली नाही.

गुरुवर्य मामा गोखले यांच्या निधनानंतर पू. अप्पांनीही परंपरारक्षणार्थ प्राचार्यपदाचा त्याग केला. १९५८ ते १९६३ या पाच वर्षांच्या कालावधीत आयुर्वेदावर एक पुस्तक प्रतिवर्षी प्रकाशित करत. त्याचबरोबर श्रीदासगणू महाराज समग्र वाङ्मयाच्या खंडांच्या प्रकाशनाचे कार्यही पूर्ण केले. सोबतच हिमालयाची यात्रा आणि प्रपंचाची जबाबदारी अशा विविध आघाड्यांवर ते लढत होते. दिनांक ३ जून १९६७रोजी पू. अप्पांनी राष्ट्रीय शिक्षण मंडळातील आजीव सेवकत्व आणि तदंगभूत प्राध्यापकचिकित्सक या सेवेचेदेखील त्यागपत्र दिले.

त्यांचे सर्वश्री पू. पांडुरंगशास्त्री आठवले, पू. रामचंद्र महाराज डोंगरे, पू. गोळवलकर गुरूजी, पू. किशोरजी व्यास, पू. धुंडामहाराज देगलुरकर, पू. सोनोपंत दांडेकर आदी मान्यवर मंडळींशी अत्यंत जिव्हाळ्याचे संबंध होते. त्यांच्या अंत:करणात देवभक्तीप्रमाणेच देशभक्तीदेखील प्रखर होती. त्यामुळेच त्यांनी युवापिढीला जागृत करण्यासाठी राष्ट्र संरक्षण पोवाडा रचला व समाजाला सतत प्रेरित करण्याचे अविरत कार्य केले.

पू. अप्पांनी सन १९९१साली आपल्या परंपरेनुसार चतुर्थ आश्रमात प्रवेश केला. उत्तरकाशी येथे पू. स्वामी उमानंद गिरी यांच्या उपस्थितीत पू. स्वामी विद्यानंद गिरी यांच्याकडून संन्यासदीक्षा ग्रहण केली आणि आपले सद्‌गुरू संतकवी दासगणू महाराजांची संन्यास घेण्याची अपूर्ण राहिलेली इच्छा एक प्रकारे पूर्ण केली.

पू. अप्पा हे एक अलौकिक व्यक्तिमत्त्व होते. त्यांच्या 'भावार्चना' या ग्रंथातील काव्यात त्यांना अनेक वेळा

भगवद्दर्शन व भगवद्संभाषण झाल्याचे त्यांनी व्यक्त केलेले आपणास दिसते. ते साधकाचे सिद्ध झाले असे नसून 'आम्ही वैकुंठवासी। आलो याच कारणासी। बोलले जे ऋषी। साच यावे वर्ताविया॥ याप्रमाणे वैकुंठातून भगवद्कार्यासाठी ते प्रतिनियुक्तीवर आले होते. परंपरेनुसार, चारही आश्रमानुसार जीवन व्यतीत करून श्रावण वद्य त्रयोदशीला म्हणजे ५ सप्टेंबर, २००२ रोजी त्यांनी आपल्या जिवलग नारायणाचे चरणी मिठी देत देह ठेवला. पू. अप्पांनी उत्तरकाशी येथे आपल्या प्रिय भागिरथी मातेच्या साक्षीने समाधी घेतली.

त्यांच्यावरील प्रकाशित संदर्भग्रंथ अशा प्रकारे आहेत- 'संतकवी श्रीदासगणू महाराज: व्यक्ती आणि वाङ्मय' (१९५५),'तेजाचं चांदणं : प्राचार्य अ. दा. आठवले तथा पू. स्वामी वरदानंद भारती यांचे जीवन चरित्र' लेखक समिती, श्रीराधादामोदर प्रतिष्ठान, पुणे (२००७), 'तेजोनिधी : प. पू. अनंत दामोदर आठवले तथा स्वामी वरदानंद भारती यांचे संक्षिप्त चरित्र', सौ. वसुधा महेश देशपांडे, श्रीदासगणू प्रतिष्ठान, गोरटे, ता. उमरी, जिल्हा नांदेड (जुलै २०१३),

स्वामी वरदानंद भारती (पूर्वाश्रमीचे प्राचार्य अ. दा. आठवले) यांची प्रकाशित ग्रंथसंपदा अशा प्रकारे- 'श्री शालिवाहन महाकाव्य १५ सर्ग' (अपूर्ण), 'उपनिषदर्थ कौमुदी १ ते ५ खंड', 'अनुवाद ज्ञानेश्वरी', 'मनोबोध', 'वाटा आपुल्या हिताच्या', 'महाभारताचे वास्तव दर्शन','कमयोग' (श्रीगीता तिसरा अध्याय) ,'आत्मसंयमन योग' (श्रीगीता सहावा अध्याय), 'तत्त्वविज्ञान' (श्रीगीता तेरावा अध्याय), 'पुरुषोत्तमयोग' (श्रीगीता पंधरावा अध्याय),'जीवनसाधना' (श्रीगीता अठरावा अध्याय), 'भगवान श्रीकृष्ण एक दर्शन' (राजनीती), 'श्रीकृष्ण कथामृत' (महाकाव्य), 'भावार्चना', 'श्रीरुक्मिणी स्वयंवर' (कीर्तनोपयोगी आख्यान), 'हिंदू धर्म समजून घ्या', 'विराण्या', 'साधकाची चिंतनिका' (चित्तप्रसाद व प्रात:स्मरण), 'आत्मानुसंधान' (योगतारावली-ओवीबद्ध-परापूजा गद्य), 'श्रीविष्णुसहस्रनाम (सार्थ): (हिन्दी अनुवाददेखील प्रकाशित), 'श्रीसद्गुरू षोडशोपचार पूजा' (ओवीबद्ध), 'राष्ट्र संरक्षण पोवाडा', 'संतकवी श्रीदासगणू महाराज: व्यक्ती आणि वाङ्मय' (१९५५), श्री महाराजांच्या निर्याणानंतर हाच ग्रंथ 'श्रीदासगणू महाराज: चरित्र आणि काव्य विवेचन' या नावाने पुन:प्रकाशित झाला (१९७४), 'यक्षप्रश्न', 'पूर्वरंग तरंग', 'पूर्वराग तरंगिणी', 'संघ प्रार्थना'

'श्रीरुक्मिणी स्वयंवर' (ओवीबद्ध), 'कर्मविचार', 'साधकसाधना', 'कथा संस्कारांच्या-संस्कृतीच्या', 'श्री ब्रह्मसूत्रार्थ दर्शिनी', 'श्रीदाहीर राजा' (कीर्तनोपयोगी आख्यान) 'श्रीनारद भक्तिसूत्रार्थदर्शिनी', 'गंगालहरी' (गंगातीर विहारिणी टीका), 'दासगणू महाराज समग्र वाङ्मय' (संपादित- १ ते १० खंड), 'आयुर्वेदीय व्याधिविनिश्चय', 'अष्टांगसंग्रह', 'गीता प्रवेश', 'स्थितप्रज्ञायोग' (श्रीगीता दुसरा अध्याय), 'निर्वाणष्टकम्',वाटा आपल्या हिताच्या (हिन्दी अनुवाददेखील प्रकाशित), 'भगवान श्रीकृष्ण एक दर्शन' (इंग्रजी अनुवाददेखील प्रकाशित), 'श्री. लोकमान्य टिळक चरित्र' (कीर्तनोपयोगी आख्यान), 'मनुस्मृती' (सार्थ-सभाष्य), 'मनोबोध' (मनाचे श्लोक भाष्य) याशिवाय अनेक प्रस्तावना, निबंध, लेख, अनुवाद, स्वतंत्र काव्य रचना, सुभाषिते, मंगलाष्टके- पाळणे, मकर-संक्रमण श्लोक, काव्य, स्फुट लेखन अशा अनेक प्रकाशित लेखनासह प्रचंड अप्रकाशित वाङ्मय अशी त्यांच्या लेखनाची व्याप्ती आहे.

– प्रा. नंदकुमार मेगदे

## आपटे, दत्तात्रेय विष्णू

**इतिहास संशोधक, संपादक**

**१३ मार्च १८८१ – २७ ऑक्टोबर १९४३**

इतिहासाचार्य राजवाड्यांनी स्थापन केलेल्या भारत इतिहास संशोधक मंडळाचे वटवृक्षात रूपांतर करण्यात ज्या कर्तबगार व्यक्तींचा हातभार लागला, त्यांत दत्तोपंत आपट्यांचे नाव प्रामुख्याने घ्यावे लागते. अनेक संशोधकांना एखाद्या कामात एकत्र आणून ते काम

तडीला नेण्याची दत्तोपंतांची हातोटी 'शिवाजी निबंधावली', 'शिवचरित्र निबंधावली', 'शिवचरित्रप्रदीप' यांसारख्या त्यांनी संपादित केलेल्या लेखसंग्रहांवरून दिसून येते. कामात सर्वांच्या पुढे आणि मानमरातबाच्या वेळी सर्वांच्या मागे या त्यांच्या स्वभावामुळे एककल्ली संशोधकही त्यांना वश होत. अनेक वर्षे मंडळाच्या कारभाराची सूत्रे अप्रत्यक्षपणे त्यांच्या हातात होती. पण त्यांचे चित्र मंडळात लावण्याचा त्यांच्या चहात्यांचा बेत त्यांनी स्वत:च्या हयातीत यशस्वी होऊ दिला नाही. १८९७ मध्ये ते मॅट्रिक झाले. त्यांचे महाविद्यालयीन शिक्षण कोल्हापूरच्या राजाराम महाविद्यालयात आणि पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयात झाले. गणित हा ऐच्छिक विषय घेऊन ते १९०२ मध्ये फर्गसन महाविद्यालयातून बी.ए. झाले.

इंग्रज सरकारची नोकरी करायची नाही असा त्यांनी निश्चय केला होता. बी.ए. झाल्यावर ते यवतमाळ येथे एका खासगी शाळेत शिक्षक म्हणून नोकरी करू लागले. तिथे ते तपस्वी बाबासाहेब परांजपे यांच्या संपर्कात आले आणि बाबासाहेबांनी त्यांना सार्वजनिक कामाची गोडी लावली. बंगालच्या फाळणीला विरोध करण्याकरिता सुरू झालेल्या चळवळीत यवतमाळ येथे जी राष्ट्रीय शाळा सुरू झाली, तिचे ते तीन वर्षे मुख्याध्यापक होते. पुढे १९०९ मध्ये मुंबईला येऊन त्यांनी तिथल्या 'राष्ट्रमत' नावाच्या दैनिकाचे संपादक म्हणून सहा महिने काम केले. त्यानंतर ते गोव्याला गेले आणि तिथे चार वर्षे त्यांनी एक शिक्षणसंस्था चालविली.

दत्तोपंत गोव्याला असताना कागदपत्रांच्या संशोधनासाठी चाललेल्या त्यांच्या भ्रमंतीत राजवाडे तिकडे गेले होते. तिथेच दत्तोपंतांची व त्यांची गाठ पडली आणि त्यांनी दत्तोपंतांना इतिहाससंशोधनाची दीक्षा दिली. राजवाड्यांबरोबर दत्तोपंत रत्नागिरी जिल्ह्यात हिंडले आणि जुनी मोडी कागदपत्रे, पोथ्या, ताम्रपट व शिलालेख वाचण्यात प्रवीण झाले.

बहुधा राजवाड्यांच्या प्रभावामुळेच दत्तोपंत १९१५ मध्ये गोव्याहून पुण्याला आले. तेव्हापासून त्यांचा भारत इतिहास संशोधक मंडळाशी जो संबंध जडला, तो कायमचाच. पुण्याला 'चिन्मय जगत्'चे ते सात वर्षे संपादक होते. संस्कृत भाषेतील ग्रंथांचा संग्रह करून त्यांचे प्रकाशन करणे अशा उद्देशाने स्थापन झालेल्या आनंदाश्रमाचे जानेवारी १९२४ पासून आयुष्याच्या अखेरीपर्यंत दत्तोपंत व्यवस्थापक होते. ते तिथेच राहत असत.

गणित, संस्कृत आणि इतिहास या तीनही विषयांमध्ये दत्तोपंतांना गती होती. 'लीलावती', 'ग्रहगणित', 'गोलाध्याय' या भास्कराचार्यांच्या ग्रंथांच्या आनंदाश्रमाने प्रकाशित केलेल्या आवृत्तींच्या मुद्रणप्रती दत्तोपंतांच्या देखरेखीखालीच तयार झाल्या. शिवाजी महाराजांच्या आश्रयाला असलेल्या कृष्ण ज्योतिषी या पंडिताने 'करणकौस्तुभ' हा ग्रहगणितावरील ग्रंथ शिवाजी महाराजांच्या आज्ञेवरून लिहिला. आनंदाश्रमाने त्या ग्रंथाची जी छापील आवृत्ती १९२७ मध्ये प्रकाशित केली, ती दत्तोपंतांनीच संपादित केलेली आहे.

पुण्याला आल्यापासूनच दत्तोपंत भारत इतिहास संशोधक मंडळाच्या कार्यात भाग घेत होतेच. १९२४ पासून १९३८ पर्यंत ते मंडळाच्या कारभारी मंडळाचे सदस्य होते आणि १९३८ पासून १९४१ पर्यंत मंडळाचे उपाध्यक्ष होते. पण पदांपुरते मर्यादित नव्हते. शिवचरित्राची साधने संशोधून ती प्रकाशित करण्याच्या कामाला मंडळाने सुरुवातीपासूनच प्राधान्य दिले होते. त्याकरिता मंडळाने श्री शिवाजी रायगड स्मारक मंडळाच्या सहकार्याने शिवचरित्र कार्यालय नावाची वेगळी संस्थाच स्थापन केली होती. दत्तात्रेय आपटे हे त्या कार्यालयाचे एक चिटणीस आणि मोठे आधारस्तंभ होते.

दत्तोपंतांची स्वतंत्र अशी ग्रंथरचना कमी आहे; पण 'दोस्तांची श्रीरंगपट्टणमवर मोहीम' अथवा 'सव्वाशे वर्षांपूर्वीचा दक्षिण हिंदुस्थान' हा त्यांचा ग्रंथ त्यांच्या व्यासंगाची कल्पना येण्यास पुरेसा आहे. त्यांच्या विद्वत्तेची अधिक चांगली कल्पना विविध नियतकालिकांमधील आणि लेखसंग्रहांमधील त्यांच्या

लेखांमधून येते. ‘शिवाजी महाराजांची खरी जन्मतिथी’ हा शिवचरित्रप्रदीप या ग्रंथातील त्यांचा लेख त्यांच्या उत्कृष्ट लेखांपैकी एक आहे. त्यांच्या अशा काही निवडक लेखांचा संग्रह त्यांच्या निधनानंतर दत्तोपंत आपटे स्मारक मंडळाने ‘दत्तोपंत आपटे लेखसंग्रह’ अशा नावाने प्रकाशित केला आहे. खाजगी कागदपत्रांमध्ये आलेले ओझरते उल्लेखदेखील राजकीय घडामोडींची सुसंगत हकिकत देण्यास कसे उपयोगी पडतात हे ज्यांना पाहावयाचे असेल, त्यांनी शिवचरित्र साहित्य, खंड १ या ग्रंथाला जोडलेली त्यांची लहानशीच, पण मार्मिक प्रस्तावना अवश्य वाचावी.

असा हा प्रखर राष्ट्राभिमानी, प्रसिद्धिपराङ्मुख, समतोल विचारांचा विद्वान इतिहास संशोधक पुण्याच्या आनंदाश्रमात निधन पावला.

— गजानन मेहेंदळे

## आपटे, वामन शिवराम

**कोशकार, संस्कृतचे गाढे अभ्यासक**

**१८५८ – ९ ऑगस्ट १८९२**



वामन शिवराम आपटे यांचा जन्म सिंधुदुर्ग जिल्ह्यातील सावंतवाडी तालुक्यातील असोलीपाल (बांदा-पेटा) येथे झाला. येथेच त्यांचे प्राथमिक शिक्षण झाले. वडील, आई व ज्येष्ठ बंधू यांच्या मृत्यूनंतर गरिबीची परिस्थिती आली, त्या वेळी त्यांनी माधुकरी मागून आपले शिक्षण चालू ठेवले. माध्यमिक शिक्षणासाठी त्यांना राजाराम हायस्कूलचे हेडमास्तर महादेव मोरेश्वर कुंटे यांनी मदत केली. अत्यंत हलाखीच्या परिस्थितीत त्यांचे शालेय शिक्षण पूर्ण झाले. मॅट्रिकच्या परीक्षेत त्यांना पहिली ‘जगन्नाथ शंकरशेट स्कॉलरशिप’ (१८७३) मिळाली. प्रो. कीलहॉर्न यांनी त्यांना डेक्कन महाविद्यालयामध्ये घेतले. बी.ए.ला गणित विषय घेऊन आपटे पहिल्या वर्गात उत्तीर्ण झाले (१८७७). त्यांनी आवश्यक म्हणून असलेल्या संस्कृत विषयात ‘भाऊ दाजी पारितोषिक’ मिळवले (१८७९). ‘भगवानदास शिष्यवृत्ती’ मिळवून त्यांनी एम.ए. पदवी संपादन केली. सरकारी नोकरीच्या मोहात न पडता १८८० साली पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये ते शिक्षक म्हणून दाखल झाले. त्यांनी बुद्धिमान आणि शिस्तप्रिय शिक्षक म्हणून नावलौकिक मिळविला.

१८८१ साली ‘केसरी’ व ‘मराठा’ ही नियतकालिके सुरू झाली, तेव्हा शाळेतील काम सांभाळून त्यांनी या नियतकालिकांच्या कामांस मदत केली. लोकमान्य टिळक, गोपाळ गणेश आगरकर, महादेव नामजोशी, विष्णुशास्त्री चिपळूणकर आणि स्वतः आपटे हे पाच जण ही शैक्षणिक व वृत्तपत्रीय कामे मिळून-मिसळून करीत असत. पुढे त्यांची सुपरिंटेंडंट पदावर नेमणूक झाली.

१८८५ मध्ये त्याच संस्थेचे ‘फर्गसन महाविद्यालय’ काढण्यात आले, तेव्हा त्या महाविद्यालयाचे प्राचार्य म्हणून त्यांची निवड झाली. हे कार्य करत असताना त्यांनी आपले लक्ष देशभक्तीवर केंद्रित केले होते. आधुनिक मराठी आणि राष्ट्रीय शिक्षण संस्थेचे जनक असलेल्या विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या मार्गदर्शनाखाली ते पारंगत झाले होते. १८८० साली त्यांनी न्यू इंग्लिश स्कूलच्या स्थापनेच्या पहिल्याच वर्षी स्वतःला राष्ट्रीय शिक्षणाला वाहून घेण्याचे ठरविले.

९ सप्टेंबर १८८९ साली त्यांनी विल्यम हंटर यांच्या अध्यक्षतेखाली असलेल्या मुंबई प्रांतिक शैक्षणिक सुधारणा समितीपुढे मोलाच्या सूचना ठेवल्या. १८५४ मध्ये त्यांनी धार्मिक तटस्थता तत्त्व पाळण्यासाठी अनुदानित शाळा आणि महाविद्यालयांमध्ये बायबल अध्यापन करण्यास विरोध केला. शैक्षणिक संस्थांना स्वायत्तता मिळावी म्हणून त्यांनी प्रयत्न केले. माध्यमिक शाळेला शालान्त परीक्षेपर्यंतचे शिक्षण कोणत्याही पद्धतीने देता यावे अशी त्यांची इच्छा होती. शिक्षणपद्धतीत सुधारणा करण्यावर त्यांचा भर होता. विशेषतः, प्राथमिक व माध्यमिक शाळेतील शिक्षण हे

अनुभव व निरीक्षणांवर आधारलेले असावे, असे त्यांना वाटत होते. मातृभाषेतून शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना महाविद्यालयीन शिक्षण घेताना अडचणी येऊ नयेत, अशी त्यांची इच्छा होती. शाळेला अनुदाने देतानासुद्धा शैक्षणिक दर्जाचा विचार केला जावा, असे त्यांचे मत होते. डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या पायाभरणीमध्ये त्यांचा मोलाचा सहभाग होता.

त्यांनी आपल्या ४४ वर्षांच्या अल्प आयुष्यात ग्रंथसंपदेत मोलाची भर घातली. त्यांनी 'स्टूडण्ट्स गाइड' (१८८१), 'स्टूडण्ट्स हॅण्डबुक ऑफ प्रोग्रेसिव्ह एक्झरसायझेस', भाग १,२, 'संस्कृत कॉम्पोझिशन' (१८८१), 'द स्टूडण्ट्स इंग्लिश - संस्कृत डिक्शनरी' (१८८४), 'द प्रॅक्टिकल संस्कृत - इंग्लिश डिक्शनरी' (१८९०), 'कुसुममाला' (१८९१) ही महत्त्वाची पुस्तके लिहिली आहेत.

– डॉ. गौरी माहुलीकर

**संदर्भ :**


१. *कामत, श्रीराम पांडुरंग; संपादक : मराठी विश्वचरित्र कोश, खंड १; विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा; १९७७.*

२. *संकेतस्थळ : www.mlbd.com authordescription.aspx?id=3499*

३. *संकेतस्थळ : http://dsal.uchicago.edu/dictionaries/apte/frontmatter/frontmatter.html*


## आळतेकर, अनंत सदाशिव

**इतिहास अभ्यासक, संशोधक व लेखक**

**१८९८ – १९६०**



अनंत सदाशिव आळतेकर इतिहासाचे सुप्रसिद्ध अभ्यासक, संशोधक व लेखक होते. ते एम.ए., डी.लिट होते. ते हिंदू विश्वविद्यालय बनारस येथे प्राचीन हिंदी इतिहास व संस्कृत यांचे 'मणींद्रचंद्र नंदी' प्राध्यापक होते. त्यांनी इंग्रजीत बरेच ग्रंथ लिहिले आहेत आणि ते उच्च दर्जाचे समजले जातात. त्यांनी 'डॉक्टर ऑफ लिटरेचर'करिता लिहिलेला 'राष्ट्रकूट' हा ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहे. त्यांचे हे मराठी ग्रंथ प्रसिद्ध आहेत. - १. प्राचीन शिक्षण पद्धती २. राष्ट्रकूट राजे व त्यांचा काळ ३. शिलाहार यांचे प्रसिद्ध झालेले इंग्रजी ग्रंथ : 1) History of Important Towns and Cities in Gujarat and Kathiawar, 2) A History of the Village Communities in Western India, 3) Education in Ancient India, 4) A New Gupta King, 5) Rashtrakootas and their Times (त्यांना या प्रबंधामुळे हिंदू विश्वविद्यालयाची डी.लिट. पदवी मिळाली. राष्ट्रकूटांच्या सत्तेखाली असणाऱ्या महाराष्ट्राचा इतिहास यात देण्याचा प्रयत्न करण्यात आला आहे. (१९३४))

– संपादित

**संदर्भ :**


१. *मराठी विश्वचरित्रकोश; संपादक - कामत, श्रीराम पांडुरंग; विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा.*


## इंद्रजी, भगवानलाल

**सुप्रसिद्ध पुराणवस्तुसंशोधक**

**१८३९ – १८८८**



भगवानलाल इंद्रजी हे जातीने गुजराती ब्राह्मण, यांची पोटजात प्रश्नोरा नागर होय. त्यांचे जन्मस्थान जुनागढ होय. त्यांचे भाऊ संस्थानाने काढलेल्या संस्कृत पाठशाळेचे प्रमुख होते. त्यामुळे महत्त्वाच्या संस्कृत ग्रंथांचे अध्ययन करण्याची संधी यांना घरीच मिळाली. परंतु पुढे लवकरच या अध्ययनाचा त्यांना कंटाळा येऊन इतिहास विषयात त्यांचे मन विशेष रमू लागले आणि त्याच्याच अनुसंधानाने आपल्या प्रांताच्या ऐतिहासिक परंपरेचा

मागोवा घेतघेत त्यांची बुद्धी गिरनार पर्वतावर कोरलेल्या लेण्यात स्थिर झाली. परंतु पौर्वात्य लिपी व हस्ताक्षरे यांच्या ज्ञानाच्या अभावी या लेण्यांमध्ये कोणत्याही प्रकारचे लक्ष लागण्याची शक्यता नाही ही गोष्ट लक्षात आल्यामुळे त्यांनी त्या अध्ययनास सुरुवात केली. लवकरच ‘अशोकस्तंभ’, ‘रुद्रदामनचे व स्कंदगुप्तचे शिलालेख’ या गिरनार पर्वतावरील महत्त्वाच्या शिलालेखांचे अर्थज्ञान होण्याइतपत त्या शास्त्रात त्यांची प्रगती झाली. त्या शास्त्राबद्दल त्यांना वाटणारी उत्कंठा लवकरच मि. अलेक्झांडर किन्लोक फोर्बस यांच्या लक्षात आली व त्यांनी डॉ. भाऊ दाजींशी इंद्रजींची गाठ घालून दिली (१८६१) व लवकरच त्यांचे मदतनीस म्हणून इंद्रजींनी काम करण्यास सुरुवात केली.

भाऊ दाजी यांचे मदतनीस म्हणून इंद्रजींनी केलेली कामगिरी ही प्रगतिपथावरील एक महत्त्वाचे पाऊल, या दृष्टीने महत्त्वाची आहे. शिलालेखांचे पद्धतशीर वाचन करणे, हे प्रमुख काम व उताऱ्यांच्या नकला, जुन्या नकलांशी रुजव्यात, त्याकरता पुन्हा नवीन नकला करणे, त्यामध्ये जागच्याजागी नव्यानव्या दुरुस्त्या करणे ही त्याच्या अनुषंगाने येणारी इतर कामे; असा त्यांचा त्यावेळच्या कार्याचा ठोबळ आराखडा होता.

या अहोरात्र केलेल्या कामाच्या पुण्याईवर त्यांना हीच कामे स्वतंत्रपणे मोठ्या प्रमाणावर करण्याची योग्यता आली, ही गोष्ट विसरता येणे शक्य नाही. इंद्रजींची ही तडफेने काम करण्याची शक्ती डॉ. भाऊ दाजी यांच्याही चांगली लक्षात आली. कारण शेवटीशेवटी काही दिवस हिंदुस्थानाच्या सर्व प्रांतांतील शिलालेखांचे काम त्यांनी इंद्रजींवर सोपवले होते. सर्व प्रांतांतील शिलालेख नकलणे व त्यांची मुद्रणप्रत तयार करणे या दोन गोष्टींचा अंतर्भाव या कामात होत असे. या कामानिमित्त त्यांना हिंदुस्थानातील कोपरान्‌कोपरा, गावन्‌गाव धुंडाळावे लागले. अत्यंत शीघ्र व बिनचूक रीतीने कोणतीही प्राचीन लिपी वाचून तिचा सुसंगत अर्थ लावणे या कामात यांचा हात धरणारा कोणी झाला नाही. अशा तऱ्हेने महत्प्रयासाने नकलेल्या नकलांचे यांनी नंतर काळजीपूर्वक भाषांतर केले व नंतर त्याची सूची तयार केली. इंग्लिश व प्राकृत या दोन भाषांशी तोंडओळख हा या कार्याचा तादृश फायदा सांगता येईल. १२-१३ वर्षाच्या या खडतर तपश्चर्येनंतर थोडासा सुटकेचा निःश्वास टाकण्याची संधी यांना मिळाली. याच वेळी भाऊ दाजी वारले (१८७४) व काहीतरी घरगुती प्रसंगामुळे इंद्रजींची त्यांच्याजवळ असलेली व इंद्रजींनी जमवलेली हस्तलिखिते यांच्याच स्वाधीन करण्यात आली. परंतु इतकी मोठी तपश्चर्या पाठीशी असून यांना योग्य असे काम मिळवण्याकरता थोडी वाटच पाहावी लागली. इंग्रजी भाषेचे अपुरे ज्ञान हीच गोष्ट या आपत्तीच्या मुळाशी होती.

अशा तऱ्हेने दोन वर्षे सक्तीची विश्रांती घेतल्यानंतर इंद्रजींचे हातून लिहिण्याच्या दृष्टीने काहीतरी भरीव कामगिरी होण्याची चिन्हे पुन्हा दिसू लागली. या गोष्टीला कारण होणारी घटना मात्र खरोखरच क्षुल्लक होती. डॉ. बुल्हेर यांच्यातर्फे ‘इंडियन अँटिक्वेरी’मध्ये इंद्रजींचा ‘केव्ह न्यूमरल्स’वरील कार्याची माहिती देणारा लेख प्रसिद्ध झाला. त्यामुळे मुंबईच्या ‘रॉयल एशियाटिक सोसायटी’ या संस्थेने इंद्रजींना आपले सन्माननीय सभासद करून घेतले व त्या संस्थेच्या लायब्ररीत यांचा प्रवेश घडून आला व अशा तऱ्हेने कितीतरी दिवसांची त्यांची इच्छा तृप्त झाली. केव्ह न्यूमरल्स म्हणजे लेण्यांमधील लेखांतील संख्यावाचन होय.

मुंबई गॅझेटियरच्या खंडांत इंद्रजींनी लिहिलेले लेख व डॉ. ए. कनिंगहॅम यांनी प्रसिद्ध केलेल्या ‘आर्किऑलॉजिकल व्हॉल्यूम’ या आपल्या लेखांनी त्यांनी लावलेल्या हातभाराबरोबर असणाऱ्या यांच्या लेखांची संख्या अठ्ठावीस आहे. यांच्या लेखांतील संशोधन टिकाऊ स्वरूपाचे असून हिंदी, इतिहास व शिलालेख यांचे एक यशस्वी विद्यार्थी या नात्याने चिरंतन व जिवंत स्मारक ठेवण्यास ते समर्थ आहेत. ‘केव्ह न्यूमरलस्’वरील संशोधनाखेरीज पूर्वी कोणी कधीही न जाणलेल्या पुष्कळ अक्षरांचे त्यांनी संशोधन केले आहे. ‘नाशिक शिलालेख’ची आज जी सुस्पष्ट व हुबेहूब नक्कल

आपल्या डोळ्यांसमोर आहे, तिचे जनकत्व त्यांचेकडेच आहे. अशोकाच्या ८व्या शिलास्तंभाचा तुकडा शोधून काढण्याचे श्रेय त्यांनाच द्यावे लागेल. नाहीतर हा स्तंभ कोकण काठावरील सोपारा गावामध्ये असेल, ही गोष्ट स्वप्नातसुद्धा कोणी खरी मानली नसती. मथुरेतील सिंहशीर्षकही यांनीच शोधून काढले. क्षत्रपांचे खरोष्टीतील अनेक लेख यावरच असल्याने या संशोधनास विशेष महत्त्व आहे. कामांच्या मशिदीवरील शूरसेनवंशी यादवांचा लेख त्यांनीच शुद्धतापूर्वक वाचला व प्रसिद्ध केला. इसवी सनाच्या सातव्या शतकातील हे लेख आहेत.

ओरिसा प्रांतातील 'खारवेलचा उदयगिरी शिलालेख' नकलून त्याचे भाषांतर करण्याचे कामसुद्धा त्यांनीच केले. त्यामध्ये मौर्य शकासंबंधी असणारा उल्लेख शोधून काढण्याचा पहिला मानही त्यांनाच मिळाला आहे. या सुप्रसिद्ध शिलालेखावर गेल्या तीस वर्षांत बरेच कार्य झाले आहे. परंतु 'इंटरनॅशनल काँग्रेस ऑफ ओरिएन्टॅलिस्टस्' या संस्थेत त्यांनी सादर केलेल्या मूलग्राही संशोधनावरच या सर्व संशोधनाचा पाया उभारला गेला आहे, ही गोष्ट विसरता येणे शक्य नाही.

त्याचप्रमाणे जुन्नरजवळ 'नानाघाट' येथील गुहेतील मोठा लेख व 'आंध्र नाणी' यांवरील यांच्या कार्यामुळेच आंध्राबद्दल आज उपलब्ध असणारी अतिशय महत्त्वाची माहिती आपणाला उपयोगी पडत आहे. मि.कॅम्बेलच्या अध्यक्षतेखाली प्रसिद्ध होणाऱ्या बाँबे गॅझेटियरच्या पहिल्या भागाकरता गुजरातचा इतिहास त्यांनीच लिहिला. त्यात राजपुतान्यावर राज्य करणाऱ्या सोळंकींचा विस्तृत इतिहास आला आहे.

नेपाळच्या राजवंशावरील व राजघराण्यावरील २१ शिलालेख शोधून काढण्याबद्दल डॉ. बुल्हेर यांनी इंद्रजींनी दिलेली 'नेपाळच्या इतिहासाचे पथनिर्देशक' ही पदवी खरोखरच सार्थ आहे. या गोष्टींची जाणीव आपण या कार्याचे महत्त्व जाणून घेतले असता होते. वेरूळ शिलालेखावरील यांच्या संशोधनानेही दक्षिण राष्ट्रकूटांच्या इतिहासात महत्त्वपूर्ण दालन उघडले गेले.

एके काळी बलाढ्य असणाऱ्या त्रैकूटक राजवंशाचे अस्तित्व व त्यांचा कलचूरी शक व हैहय त्यांच्याशी असणारा संबंध याचा पत्ता अहोरात्र काम करणाऱ्या या गृहस्थांनीच लावलेला आहे. आभीर राजा ईश्वरदत्त याच्याशी कलचूरी शकाचा संबंध लावून तो शक गुजरातेतला असला पाहिजे, हा त्यांचा सिद्धान्त व गुजरातचे व नाशिकचे आभीर व चेदीचे त्रैकूटक व हैहय हे दोन्ही एकच असावेत, हा त्यांचा दावा इतिहासातील त्यात्या क्षेत्रांत प्रकाश पाजणारा असून पुढील संशोधनांनी यांचे हे सिद्धान्त पक्केच होत आहेत. आपल्या मरणाचे पूर्वी गुजरातच्या इतिहासाचे संशोधन करण्यात ते गुंतले होते. इतर दिशेने त्यांनी लिहिलेले लेखसुद्धा काही उपेक्षणीय नाहीत. हिंदुस्थानातील धार्मिक चळवळींबरोबरच 'वेदवाद, ब्राह्मणवाद, बुद्धवाद या गोष्टींची वाढ होत नाही', हे त्यांचे मत त्या काळी भयंकर समजले जाण्याजोगे होते. त्यांनी शिलालेखांसंबंधी लिहिलेले लेखसुद्धा पूर्वीच्या भूगोलाचे ज्ञान दाखवण्यास समर्थ आहेत. अशा प्रकारच्या या थोर संशोधकाचे अभिनंदन करण्याचा पहिला मान लंडन युनिव्हर्सिटीने मिळवला. त्या युनिव्हर्सिटीने डॉ. कर्न यांच्या सूचनेवरून त्यांना ऑनररी पीएच.डी. केले. त्यांच्या पाठोपाठ हॉलंडच्या 'डच ओरिएन्टल सोसायटी' व इंग्लंडच्या व आयर्लंडच्या 'रॉयल एशियाटिक सोसायटी' या संस्थांनी त्यांना आपले ऑनररी सभासद करून घेतले.

हिंदी व त्याचबरोबर परकीय संशोधकांकडून वाहवा मिळवण्याचा अपूर्व मान त्यांना अनेक वेळेला मिळाला होता. परदेशातील यांच्या चहाते मंडळीत ई. सेनर्ट व जी. बुल्हेर यांच्यासारखे लोक होते.

भाऊ दाजी व इंद्रजी यांनी 'आर्किऑलॉजी'च्या क्षेत्रात जवळजवळ अर्धा शतकभर केलेली कामगिरी नि:संशय अविस्मरणीय आहे. हिंदी लोक ज्या क्षेत्राकडे जरा बावरूनच बघत होते, त्या क्षेत्रात परदेशी तज्ज्ञांच्याकडून प्रशंसा मिळवण्याइतकी मोठी कामगिरी करणे ही गोष्ट केव्हाही त्यांना भूषणावहच आहे. डॉ. भाऊ दाजी यांनी आपल्या केव्ह न्यूमरलसूच्या

सुप्रसिद्ध संशोधनात जरी त्यांचा उल्लेख केलेला नसला, तरी डॉ. बुल्हेर यांच्या मते या महत्त्वाच्या संशोधनातील बऱ्याच मोठ्या भागाच्या संशोधनाचे श्रेय इंद्रजींकडे आहे. भाऊ दाजी यांच्या अतिशय लाडक्या सहकाऱ्यांतील एक सहकारी असण्याचा मान यांना मिळाला होता. ज्या वेळी भाऊ दाजी अतिशय आजारी होते, त्या वेळी इंद्रजी नेपाळला निघाले आहेत, अशी बातमी त्यांना मिळाली. ज्या वेळी नेपाळ सरकारकडून 'तुमच्या विनंतीवरून आम्ही त्यांची व्यवस्था करत आहोत' असा निरोप आला, त्या वेळी भाऊ दाजींनी समाधानाचा नि:श्वास टाकला.

भाऊ दाजींच्या मृत्यूनंतर मात्र इंद्रजींची आर्थिक स्थिती कधीच समाधानकारक राहू शकली नाही. काठेवाडचे राजेसाहेब यांनी दिलेली देणगी व डॉ.कॅम्बेल व बर्गेस यांच्याकडून येणारे खंडित द्रव्य यांमुळे त्यांची आर्थिक स्थिती कधीच सुधारू शकली नाही. मात्र या दु:स्थितीची कल्पना कोणालाही येऊ नये याबद्दल त्यांचा कटाक्ष असे. जवळजवळ चौदा वर्षे अगदी निकटचे मित्र असूनही डॉ. बुल्हेर यांना मरते वेळेशिवाय आपल्या आर्थिक दैन्याचा सुगावा त्यांनी कधीही लागू दिला नव्हता. (एमिनन्ट ओरिएन्टालिस्ट).

इंद्रजींनी मरतेसमयी आपला क्षत्रप व इतर राजांच्या नाण्यांचा बहुमूल्य संग्रह व मथुरेचा सिंहध्वज ब्रिटिश म्युझिअमला भेट म्हणून दिला. इंद्रजींची जन्मशताब्दी मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीत मोठ्या थाटाने साजरी करण्यात आली. यांचे तैलचित्र तेथे लावण्यात आले व एक इंग्लिश लेखसंग्रहही यांच्या स्मरणार्थ प्रसिद्ध केला. तसेच गुजरात फोर्ब्स सोसायटीने यांच्या शताब्दीनिमित्त एक गुजराती लेखसंग्रह प्रसिद्ध केला. गुजरात संशोधनमंडळानेही इंग्रजी व गुजराती लेखांचा एक खंड यांच्या स्मरणार्थ काढला.

— संपादित

**संदर्भ :**

*१. मराठी विश्वचरित्रकोश; संपादक - कामत, श्रीराम पांडुरंग; विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा.*

## उटगीकर, नारायण बापूजी

**संस्कृत वाङ्मयाचे संशोधक व अभ्यासक**

**जन्मदिनांक अनुपलब्ध – १९३१**



नारायण बापूजी उटगीकर एम.ए. झाल्यानंतर प्रथम सरकारी हायस्कूलमध्ये ते शिक्षक म्हणून नोकरीस लागले. तेथून पुणे डेक्कन कॉलेजमध्ये ग्रंथालयात काम केले. त्यानंतर काही वर्षे ते पुण्याच्या भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिट्यूटचे मानद कार्यवाह होते (१९१६-१८). तेथेच हस्तलिखिताच्या संग्रहाचे ते क्युरेटर झाले. (१९१८-१९१९) त्यानंतर महाभारताची चिकित्सक प्रत तयार करण्याचे काम तेथेच सुरू झाले. उटगीकर यांना या प्रकल्पाचे मुख्य संपादक नेमण्यात आले. (१९१९-१९२४). त्याप्रमाणे त्यांनी नमुना म्हणून 'विराटपर्व' काढला. सर डॉ. रा.गो. भांडारकर यांच्या लेखसंग्रहाचे चार भाग निघाले, त्याचे संपादकत्व उटगीकर यांच्याकडेच होते. त्यांनी जर्मनीतील पंडित रिचर्ड गार्बे यांच्या भगवद्‌गीतेच्या प्रस्तावनेचे इंग्रजी भाषांतर केले. तसेच 'गौडवहो' या ग्रंथाची शुद्ध प्रत त्यांनी तयार केली. त्यांना स. १९२७ साली अर्धांगवायू झाला.

— संपादित

**संदर्भ :**

*१. मराठी विश्वचरित्रकोश; संपादक - कामत, श्रीराम पांडुरंग; विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा.*

## उपाध्ये, आदिनाथ नेमिनाथ

**प्राचीन भाषा तज्ज्ञ, संशोधक**

**जन्मदिनांक अनुपलब्ध – ८ ऑक्टोबर १९७५**

आदिनाथ नेमिनाथ उपाध्ये यांचा जन्म इचलकरंजीजवळील बारवाडपासून जवळच असलेल्या सदलगे मजले शमनेवाडी येथे झाला. वडील नेमिनाथ हे पूजाअर्चा, प्रवचन, धर्मकृत्ये करणाऱ्या उपाध्ये



घराण्यातील एक प्रतिष्ठित व्यक्ती म्हणून गणले जात. ते शेतीही करत. दुर्दैवाने त्यांची पहिली चार मुले जगली नाहीत. उतारवयात झालेला मुलगा म्हणजेच आदिनाथ होय. लहानपणी कोणाची दृष्ट लागू नये म्हणून आदिनाथाचे नाक टोचले होते व भिक्षेने पैसे जमवून त्यात चमकी घातली होती. पहिली चार मुले गेल्याचे दुःख वडिलांना असल्याने त्यांनी तो सोडून जाईल या भयाने आदिनाथलाही जवळ घेतले नाही, लळा लावला नाही. त्याचे नावही कल्लू (कानडी भाषेत कल्लू म्हणजे दगड) ठेवले. परंतु चार वर्षांचा झाल्यावर शाळेत घालताना त्याचे नामकरण आदिनाथ झाले.

आदिनाथ तिसरीत असतानाच वडिलांचे निधन झाले. त्यामुळे त्याचा सांभाळ काकांनी म्हणजेच बाबाजींनी केला. चौथीचे शिक्षण पूर्ण झाल्यावर आदिनाथचे पुढील शिक्षण बेळगावला गिलगेची अरताल हायस्कूलमध्ये झाले.

आदिनाथ जात्याच हुशार असल्याने त्याला दक्षिण महाराष्ट्र जैन सभेची व शाळेची अशी दुहेरी शिष्यवृत्ती मिळाली आणि १९२३ साली उत्तम गुण मिळवून शालान्त परीक्षा उत्तीर्ण झाला. सांगलीच्या राजाराम महाविद्यालयामधून महाविद्यालयीन शिक्षण सुरू झाले. तिथेच शंकरशेट शिष्यवृत्ती मिळाली. १९२८मध्ये मुंबई विद्यापीठातून ते संस्कृत ऑनर्स हा मुख्य विषय व अर्धमागधी हा अवघड विषय घेऊन बी.ए.ची परीक्षा उत्तीर्ण झाले.

त्यानंतर लगेच नोकरी न करता आदिनाथ यांनी आईच्या आग्रहास्तव पुण्याच्या भांडारकर संस्थेतून, अर्धमागधी विषयात मुंबई विद्यापीठाची एम.ए.ची पदवी प्राप्त केली. कोल्हापूरच्या महाराणी लक्ष्मीबाई प्रशाळेमध्ये आदिनाथ उपाध्ये शिक्षक म्हणून नोकरी करू लागले. काही काळानंतर राजाराम महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून कार्यरत झाले. सदलगे येथील मामांच्या धाकट्या कन्येशी १९३२ साली आदिनाथ विवाहबद्ध झाले.

प्रा. आदिनाथ उपाध्ये यांच्या शिक्षणातील बराचसा काल भांडारकर संस्थेत गेल्यामुळे जुनी हस्तलिखिते व तत्सम कामांची त्यांना कल्पना होती. तसेच आवडही निर्माण झालीच होती. अर्धमागधी विषयातील शिक्षण व प्राकृत विषयातील संशोधन यांमुळे कुंदकुदाचार्य यांनी जैन धर्मातील एकत्रीकरण प्रवचनसार या ग्रंथात केले होते, हे उपाध्येंच्या लक्षात आले. परंतु पुढे प्रादेशिकतेनुसार अनेक ठिकाणी याच्या प्रती उपलब्ध झाल्या व त्यांत अनेक दोषही होते. या ग्रंथाची शुद्ध प्रत तयार करण्याचे कार्य डॉ. उपाध्ये यांनी केले.

प्रवचनसार या ग्रंथाची शुद्ध प्रत तयार करण्याच्या कामाला आठ वर्षे लागली. डॉ. उपाध्ये यांना १९३८मध्ये, त्यांच्या या अभुतपूर्व कामाची दखल घेऊन ‘डी. लिट.’ ही बहुमानाची पदवी देऊन सन्मानित केले गेले. १९३० सालापासून राजाराम महाविद्यालयातील प्राध्यापक ते प्राचार्य असा त्यांचा प्रवास लक्षणीय होता. याच काळात ते विद्यार्थ्यांना संस्कृतच्या अभ्यासक्रमाकडे वळण्यास प्रवृत्त करत व मार्गदर्शनही करत. १९६२ ते १९७१ या काळात प्राचीन भाषा विभागाचे अध्यक्ष, अभ्यास मंडळाचे सदस्य व प्रभारी कुलगुरू अशी महत्त्वाची पदे त्यांनी भूषवली. त्यांनी १९७१मध्ये ऑस्ट्रेलियामधील कॅनबरा येथे भरलेल्या अठ्ठाविसाव्या जागतिक प्राच्य विद्या परिषदेत भारताचे प्रतिनिधित्व केले. त्यांनी म्हैसूर येथे जैनधर्म व प्राकृत भाषा संशोधन यासाठी संस्था स्थापन केली. या संस्थेची उभारणी डॉ. उपाध्ये यांनी केली.

डॉ. उपाध्ये सेहेचाळिसाव्या कन्नड साहित्य संमेलनाचे अध्यक्ष होते. १९७३मध्ये पॅरीस येथे प्राचीन भाषांच्या अभ्यासासाठी भरलेल्या परिषदेत भारतातर्फे बेल्जमधील सँटवर्प येथे भरलेल्या जागतिक विश्वशांती परिषदेत त्यांनी भारताचे प्रतिनिधित्व केले. डॉ. आदिनाथ उपाध्ये यांना १५ ऑगस्ट १९७५ रोजी प्राचीन

भाषा पंडित म्हणून राष्ट्रपती पुरस्कार मिळाला. १९७५मध्ये राज्यापालांच्या हस्ते सुवर्णपदक प्राप्त झाले. याशिवाय अनेक देशी व परदेशी नियतकालिकांत त्यांचे संशोधन निबंध प्रसिद्ध झाले. त्यांच्या प्रचंड कार्याची दखल देशात-विदेशांत घेतली गेली. परंतु डॉ. उपाध्ये यांनी आपले सर्व आयुष्य म्हैसूर येथील ‘जैनधर्म व प्राकृत भाषा’ संशोधन संस्थेच्या कामातच खर्ची घातले. डॉ. उपाध्ये यांचे कोल्हापूर येथे हृदयरोगाने देहावसान झाले.

— सुपर्णा कुलकर्णी

**संदर्भ :**

*१. कारेकर म. सुं. ‘डॉ. प्रा. आ.ने उपाध्ये’ चरित्र नवलकर, वि. आ. प्रकाशन, कोल्हापूर.*

## ओतुरकर, राजाराम विनायक

***भारतीय इतिहास संशोधक व इतिहासकार***

**२४ ऑक्टोबर १८९८ — २९ डिसेंबर १९७९**



राजाराम विनायक ओतुरकर यांचा जन्म गुजरातमधील बडोदा येथे झाला. त्यांच्या घरची परिस्थिती अगदी गरिबीची होती, तरी त्यांच्या वडिलांनी मोठ्या प्रयासाने त्यांना शिक्षण दिले. १९०६ साली ते पुण्यात स्थायिक झाले. १९१५ साली ओतुरकर मॅट्रिक झाले. त्यानंतर १९१७ साली पुढील शिक्षणासाठी न्यू पूना कॉलेजमध्ये दाखल झाले. तिथे त्यांना अण्णा खैर, ना.भि. परुळेकर, मामा दाते, शि.ल. करंदीकर असे स्नेही भेटले. पुढे १९१८ साली त्यांचे वडील निवर्तल्यामुळे ते निराधार झाले. तेव्हा त्यांच्या वडिलांच्या पितृतुल्य मित्रांनी धीर देऊन त्यांचे शिक्षण केले. ज्ञातिसंस्थेनेही त्यांना मदत केली. १९२० साली ओतुरकर बी.ए. झाले. त्यानंतर त्यांनी नोकरी करून दोन बहिणी व आई यांचा व्यवस्थित सांभाळ केला.

सन १९२४मध्ये अर्थशास्त्र या विषयात दुसरा वर्ग मिळवून ओतुरकर एम.ए. झाले. या आवडीच्या विषयात त्यांनी अध्यापन करून व बहुमोल लिखाण करून पुढील पिढीकरिता ज्ञानाचे दार खुले केले. १९२६मध्ये नाशिकच्या एच.पी.टी. कॉलेजमध्ये शिकवत असताना त्यांनी आंबेडकरांच्या व गांधीजींच्या चळवळीत भाग घेतला. त्यामुळे त्यांना तुरुंगवास भोगावा लागला. त्यांची नोकरी गेली. नाशिकमध्ये असताना त्यांनी मुलाच्या मुंजीत अस्पृश्यांना आमंत्रण दिले, म्हणून त्यांच्यावर समाजाचा रोष ओढवला.

ओतुरकर यांनी नाशिक सोडल्यानंतर पुण्या स.प. महाविद्यालयामध्ये प्राध्यापक म्हणून १४-१५ वर्षे काम केले. बडोदे संस्थानातून महाविद्यालयाला देणगी मिळवून दिली. ओतुरकर यांचे गुणग्राही विद्यार्थी उच्चपदी पोहोचले, याचा त्यांना अभिमान होता. आचार्य प्र.के. अत्रे त्यांचे वर्गमित्र होते.

स.प. महाविद्यालयामधून निवृत्त झाल्यावर ओतुरकर कायदा महाविद्यालयाच्या प्राध्यापकपदी रुजू झाले; परंतु ते महाविद्यालय दोन वर्षे बंद पडले. त्या वेळी मुंबईतील चर्चगेटच्या के.सी. महाविद्यालयामध्ये प्राध्यापक म्हणून त्यांना आमंत्रण आले. नंतर पुण्यातच राजाराम ओतुरकर ‘कॉलेज ऑफ जर्नालिझम’ व ‘कॉलेज ऑफ मार्केटिंग’ या दोन्ही महाविद्यालयांचे संस्थापक व प्राचार्य झाले.

ओतुरकर यांनी अनेक महत्त्वपूर्ण पुस्तके लिहिली. या पुस्तकांमुळेच ते प्रसिद्धीच्या झोतात आले. ती पुस्तके अशी - ‘हिंदुस्थानचा सोपपत्तिक इतिहास’, ‘भारताचा सांस्कृतिक इतिहास’, ‘भारताची राज्यघटना’, ‘जग आणि भारत’ (अनेक खंड), ‘जगाचा संक्षिप्त इतिहास’ इ. याशिवाय स्वतंत्र अभ्यासपूर्ण लेखही त्यांनी लिहिले. विजयनगरचे साम्राज्य, अमळनेर व येवले येथील विणकरी कामगारांचे जीवनमान यांसारखे अनेक लेख इंग्रजी-मराठी भाषांमध्ये त्यांनी लिहिले. अनेक ग्रंथांना प्रस्तावना व परिशिष्टे लिहिली. ओतुरकरांनी आपली सर्व पुस्तके अनाथ विद्यार्थी गृहास प्रकाशनास दिली. याद्वारे संस्थेस दोन लाखांपेक्षा जास्त अर्थप्राप्ती झाली. अ.वि.

गृहाने छापखाना काढला. ओतुरकर यांचे 'हिंदुस्थानचा सोपपत्तिक इतिहास' हे त्याचे पहिले प्रकाशन होते. त्यानंतर या ग्रंथाच्या अनेक आवृत्त्या निघाल्या. मुंबई राज्य पाठ्यपुस्तक मंडळाने ओतुरकरांच्या पुस्तकातील एका लेखाबद्दल आक्षेप घेऊन प्रकाशनावर बंदी आणली. हे प्रकरण न्यायालयापर्यंत गेले. अखेर ते खटला जिंकले व प्रकाशनावरील बंदी उठली.

१९५५-५६ या काळात कलकत्त्यास भरलेल्या 'ऑल इंडिया हिस्ट्री काँग्रेस'च्या एका विभागाचे ओतुरकर प्रमुख होते. १९५७-५८ या काळात त्यांनी रशिया, इजिप्त, चीन या देशांचा प्रवास केला. जागतिक इतिहाससंबंधीचा पूर्वेकडील विद्वानांचा दृष्टीकोन समजावा, हा त्यामागील उद्देश होता.

प्रा. रा.वि. ओतुरकर यांनी इतिहास संशोधक मंडळात ४० वर्षे सातत्याने काम केले. तसेच वडिलांच्या नावे २५,००० रु. देणगी दिली. श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी विद्यापीठाचे ते मानद सल्लागार होते.

— संपादित

**संदर्भ :**

१. *मराठी विश्वचरित्र कोश; संपादक - कामत, श्रीराम पांडुरंग; विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा.*

***

# क

## कंगले, रमाकांत पंढरीनाथ

**अध्यापक, अनुवादक, विश्लेषक, लेखक**

**२७ ऑगस्ट १८९९ – २७ जून १९८९**

नाशिक जिल्ह्यातील येवले या गावी रमाकांत पंढरीनाथ कंगले यांचा जन्म झाला. त्यांचे शालेय शिक्षण नाशिक येथे पार पडले व उच्च शिक्षण - संस्कृत वाङ्मय पारंगत (एम.ए.) एल्फिन्स्टन महाविद्यालय, मुंबई येथून एम.ए. पदवीचे प्रथम श्रेणीतील महाविद्यालयीन शिक्षण पूर्ण केले. शिक्षणानंतर उपजीविकेसाठी १९२३ ते १९५४ या कालखंडात ते सरकारी महाविद्यालयातून संस्कृत अध्यापक म्हणून कार्यरत राहिले. अध्यापन क्षेत्रातील कार्यबाहुल्यामुळे व अध्ययनाच्या गोडीमुळे निवृत्तीनंतर त्यांनी अभ्यासपूर्ण लेखनकार्याला सुरुवात केली. त्यांच्या लेखनकार्यातून अनेक विद्वत्तापूर्ण पुस्तकरूपी रत्ने संस्कृतखाणीत विराजमान झाली.

१. ‘कालिदासांची नाटके’ (१९५७), २. ‘प्राचीन भारतीय राजनीती’ (१९६९), ३. ‘रसभावविचार’ (१९७२), ४. ‘दशरूपकविधान’ (१९७४), ५. ‘प्राचीन काव्यशास्त्र’ (१९७४), ६. ‘कौटिलीय अर्थशास्त्र’ (१९८२), ७. ‘सर्वदर्शनसंग्रह’ (१९८५), ८. ‘उद्‌भट आणि त्यांचा काव्यालंकार सारसंग्रह’ (१९८७).

कंगले यांच्याकडे जर्मन, फ्रेंच, रशियन व इटालियन इ. भाषांचे ज्ञान होते, तर संस्कृतचे ते व्यासंगी ज्ञानोपासक होते. इंग्रजी भाषेवरच नव्हे, तर मराठीवरही त्यांचे प्रभुत्व अप्रतिम होते हे त्यांच्या लेखनसाहित्याकडे बघितले की जाणवते.

संस्कृत साहित्याचा शिरोमणी कालिदासांच्या साहित्यात प्रथम सुरुवात झाली. ‘कालिदासांची नाटके’ नामक पुस्तकामध्ये कालिदास रचित सर्व नाटकांचा म्हणजे ‘मालविकाग्निमित्रम्’, ‘अभिज्ञानशाकुंतलम्’ व ‘विक्रमोर्वशीयम्’ ही होत, त्यांमध्ये कवीविषयक माहिती, कालिदास रचित सर्व नाट्यांचे कथानक, नाट्यातील पात्रांचे स्वभाव, गुणवैशिष्ट्य, तसेच वाङ्मयीन टीका अशा प्रकारे नाट्यकुसुमांचे रसभरित सौंदर्यास्वाद व विवेचनात्मक वर्णन दिसते.

‘प्राचीन काव्यशास्त्र’ यात प्राचीनतम असलेल्या काव्यशास्त्रविषयक विविध पैलूंवर प्रकाश टाकत संस्कृत साहित्यशास्त्रविषयक निर्माण झालेल्या अनेक प्रश्न व तत्त्वांविषयी यामध्ये सविस्तर चर्चा करण्यात आली. प्राचीन काव्यशास्त्राचे स्वरूप व मर्यादा यांच्याबाबत विचारमंथन करीत असताना व तौलनिक दृष्टिकोनातून मांडताना आवश्यक तेथे पाश्चात्त्य विचारांनाही प्राधान्य दिले. ‘कौटिलीयम् अर्थशास्त्रम्’ या प्राचीन संस्कृत ग्रंथावर प्रा. कंगले यांनी मूळ संहितेसह इंग्रजी भाषांतर आणि अभ्यासकोपयोगी विवेचक प्रस्तावना व टिपायुक्त राजनीतिपर ग्रंथाची निर्मिती केली. या आंतरराष्ट्रीय ख्यातिप्राप्त ग्रंथाचे इंग्रजी व मराठी असे दोन्ही भाषांमधून अनुवाद झाले. विषयाच्या सखोलतेसह काटेकोर, अभ्यासपूर्ण विचारांच्या मुद्देसूद मांडणीमुळे या ग्रंथाची मूळ संहिता, टिपा व इंग्रजी भाषांतरासह त्रिखंडात्मक आवृत्ती १९६०-१९६५ मध्ये मुंबई विद्यापीठाने प्रकाशित केली. या ग्रंथावर आधारित ‘प्राचीन भारतीय राजनीती’ नामक ग्रंथाची निर्मिती त्यांच्या ज्ञानोपसेवी हातांमधून झाली. कौटिलीयम् अर्थशास्त्रम् या इंग्रजी भाषांतरित ग्रंथाचा मराठी अनुवाद ज.स. करंदीकर व य. हिवरगावकर यांनी केला व त्याचे दोन खंड १९२७-१९२९ मध्ये प्रकाशित झाले होते.

कौटिलीय अर्थशास्त्र हा मूळ १५ अधिकरणांचा

संस्कृत ग्रंथ असून मराठी भाषांतराचा ६८५ पानांचा विस्तार झाला. आधुनिक टीकाकार व अभ्यासकांच्या मतांना विचारात घेऊन हे भाषांतर व टीपा लिहिण्याचा प्रयत्न केला आहे. शब्दश: भाषांतरासह राजनीतिपरक कठीणतम विषय अतिशय सुबोधतेने या ग्रंथामध्ये मांडला गेला. कौटिलीय अर्थशास्त्र म्हणजे जणू राजनीतिशास्त्रच होय. जे केवळ तत्कालीन परिस्थितीलाच नव्हे, तर आधुनिक काळालाही उपयुक्त ठरेल अशा अनेकविध विषयांवर सखोल विचार प्रतिपादन केले. विवाद्य मतांच्या बाबत आपल्या अभ्यासपूर्ण मतांमधून योग्य वाटणाऱ्या अर्थांचे ग्रहण केले.

रमाकांत कंगले यांनी 'रस-भाव-विचार' या शीर्षकांतर्गत भरतमुनींच्या 'नाट्यशास्त्र' या संस्कृत ग्रंथातील रससिद्धान्तविषयक असलेल्या अध्याय ६ व ७ चे भाषांतर, तसेच अभिजात संस्कृत साहित्यातील नाटक व नाट्यशास्त्रविषयक असलेल्या दहा रूपक प्रकारांचे वर्णन असलेला नाट्यशास्त्रातील अध्याय १८-१९ चे अभिनवगुप्तांच्या 'अभिनवभारती' टीकेसह मराठी भाषांतर केले, ज्यामध्ये दशरूपक प्रकारांचे वर्णन केले आहे. या पुस्तकाचे प्रकाशन महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई यांनी केले. उपरोक्त दोन्ही पुस्तकांचे प्रस्तुत भाषांतर प्रा. कंगले यांनी अभिनवभारती टीकेच्या आधारे शब्दश: करण्याचा प्रयत्न केला आहे. अनेक ठिकाणी सुबोधता येण्यासाठी टीपांचा भरपूर उपयोग केला आहे.

'सर्वदर्शनसंग्रह' नामक, मध्वाचार्य लिखित चौदाव्या शतकामधील तत्त्वज्ञानाधिष्ठित ग्रंथाच्या सोळा सिद्धान्तांचे विस्तारपूर्वक विवेचन कंगले यांनी मराठी भाषेमध्ये केले. म.म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांच्या 'दर्शनाङ्कुर व्याख्ये'चा समावेश या ग्रंथात मराठीमध्ये केला गेला. तो ग्रंथ आजमितीला संदर्भग्रंथ म्हणून ओळखला जातो.

'उद्भट आणि त्यांचा काव्यालंकार सारसंग्रह' नामक र.पं. कंगले यांच्या लेखणीतून अवतरलेला हा परिचयग्रंथ. संस्कृत काव्यशास्त्रामध्ये आचार्य भामहांचे काव्यालंकार अतिशय प्रसिद्ध आहेत. या मौलिक ग्रंथावर उद्भटाने 'काव्यालंकार-सारसंग्रह' नामक टीका लिहिली. भामहांच्या संकल्पना स्पष्ट करताना त्यात स्वमते व इतर भर घातली.

उद्भटाचे हे भाष्यदेखील नंतर आलेल्या अनेक संस्कृत साहित्य शास्त्रकारांना उपयुक्त ठरले. या ग्रंथकाराच्या कृतीवर प्रा. कंगले यांनी लिहिलेला परिचय ग्रंथ संस्कृत व मराठी साहित्यशास्त्राचा अभ्यास करणाऱ्या व्यक्तींना मार्गदर्शकच आहे. त्यांनी होमरच्या 'इलियड' या ग्रीक महाकाव्याचा सुरस मराठी अनुवाद केला आहे. अभ्यासकांसाठी कंगले यांनी अतीव मोलाचे संदर्भग्रंथ प्रदान केले आहेत.

– प्रा. सुचित्रा ताजणे

## कंटक, माधव रामचंद्र

**शास्त्रशुद्ध इतिहास संशोधक, संपादक, लेखक**

**२९ ऑक्टोबर १९३५**



माधव रामचंद्र कंटक यांचा जन्म मुंबई येथे झाला. त्यांनी पुण्यातील मॉडर्न हायस्कूलमधून आपले शालेय शिक्षण पूर्ण केले. पुणे विद्यापीठातून इतिहास विषयात एम.ए. केले. मराठा मंदिर, मुंबई या संस्थेतर्फे शिवछत्रपतींच्या चरित्र लेखनाचा प्रकल्प डॉ. त्र्यं.शं. शेजवलकर यांच्या मार्गदर्शनाखाली सुरू होता. या शिवचरित्राच्या प्रकल्पात शेजवलकरांचे साहाय्यक म्हणून डॉ. कंटक काम करीत होते. शास्त्रशुद्ध इतिहासलेखनाबाबत आग्रही असणाऱ्या प्रा. शेजवलकरांच्या तालमीत तयार झालेल्या डॉ. कंटक यांना या कामाचा अनुभव पुढील इतिहास संशोधनात उपयोगी पडला. त्यांच्या इतिहास संशोधनात वस्तुनिष्ठ लेखनाचा आणि परखड मतदिग्दर्शनाचा शेजवलकरांचा ठसा व दृष्टिकोन आढळतो.

प्रा. शेजवलकरांच्या मृत्यूमुळे शिवचरित्राचा हा प्रकल्प अपूर्ण राहिला; परंतु डॉ. कंटकांनी यातूनच शेजवलकरांच्या 'संकल्पित शिवछत्रपती चरित्राचा आराखडा' हे पुस्तक तयार केले. आपल्या मार्गदर्शकाला त्यांनी एक प्रकारे ही श्रद्धांजलीच वाहिली. डॉ. मा.रा. कंटक हे १९७१ ते १९९३ या कालावधीत पुणे येथील डेक्कन महाविद्यालयामधील 'मराठा इतिहास संग्रहालयाचे' अभिरक्षक होते.

संग्रहालयातील अस्सल ऐतिहासिक मोडी कागदपत्रांच्या साहाय्याने मराठा इतिहासातील अनेक अज्ञात गोष्टींवर त्यांनी प्रकाश टाकला आहे. त्यातूनच त्यांचा 'फर्स्ट अँग्लो-मराठा वॉर' हा पीएच.डी.चा प्रबंध तयार झाला व तो नंतर पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाला. भारतीय इतिहासाला नवे वळण लावणाऱ्या गोष्टींमध्ये इंग्रज व मराठ्यांमधील पहिल्या युद्धाचा समावेश होतो. अठराव्या शतकाच्या अखेरीस दक्षिण भारतावर सत्ता प्रस्थापित करण्यासाठी मराठी सत्ता व ब्रिटिश यांच्यातील संघर्ष शिगेला पोहोचला होता. 'फर्स्ट अँग्लो-मराठा वॉर' या पुस्तकातून डॉ. कंटकांनी लष्करीदृष्ट्या या युद्धाचे परीक्षण केलेले दिसते. या घटनेत एकूण सहा मोठ्या लढाया झाल्या, त्यांत पाच कोकणातील होत्या, तर एक गुजरातच्या सरहद्दीवर झाली. डेक्कन महाविद्यालयामधील मेणवली दप्तरातील कागदपत्रे व पेशवे दप्तरातील मूळ कागदपत्रांच्या साहाय्याने डॉ. कंटक यांनी आत्तापर्यंत उजेडात न आलेल्या अप्रसिद्ध घटनांवर प्रकाश टाकला आहे. याचबरोबर दोन्हींकडील सैन्याची रचना, त्यांची संख्या, लष्करी डावपेच, मोहिमांमधील सैनिकांचे जीवन, तसेच या लढाईच्या सामाजिक व आर्थिक बाजूंचाही बारकाईने अभ्यास केलेला दिसतो.

इतिहासाचार्य डॉ. वि.का. राजवाडे हे इतिहासकार, भाषाशास्त्रज्ञ, व्याकरणकार, ऐतिहासिक कागदपत्रांचे संकलक-संपादक, निबंधकार, राजकीय व सामाजिक विचारवंत, शिलालेखतज्ज्ञ, तसेच अनेक मंडळ स्थापनेचे प्रणेते अशा विविध अंगांनी महाराष्ट्रातील जनतेला परिचित आहेत. विसाव्या शतकाच्या सुरुवातीच्या काळात राष्ट्रीय भावनेने प्रेरित होऊन त्यांनी जे काही काम केले, त्याला तोड नाही. परंतु त्यांचे सर्व लिखाण हे त्यांची मायबोली 'मराठी' भाषेमध्ये असल्याने त्यांच्या लिखाणातील विचार देश-परदेशांतील अन्य भाषिक अभ्यासकांपर्यंत नीट पोहोचू शकले नाहीत. राजवाड्यांच्या या लिखाणाचा परिचय इंग्रजीमध्ये फारच फुटकळ लेखांमधून मांडण्यात आला होता. डॉ. कंटकांनी हाच विचार करून, 'राजवाडे अ‍ॅण्ड हिज थॉट्स' हे पुस्तक संपादित केलेले आहे. राजवाड्यांच्या मराठीतील लिखाणांचा परिचय इंग्रजीमध्ये करून देण्यात हे पुस्तक बऱ्यापैकी यशस्वी ठरलेले आहे.

शेजवलकरांच्या ऐतिहासिक लेखनाचा, तसेच प्रगतीमधील लेखांचा अभ्यास करून त्यांनी शेजवलकरांची वैचारिक भूमिका काय होती याचे विश्लेषण त्यांनी शेजवलकर लिखित 'पानिपत १९६१' या पुस्तकाच्या द्वितीय आवृत्तीला लिहिलेल्या प्रस्तावनेत मांडले आहे. शेजवलकरांचे ऐतिहासिक, राजकीय व सामाजिक विषयांवरील लेखन परस्परपूरक आहे. त्यांची वैचारिक भूमिका स्पष्ट करण्याच्या दृष्टीने या परस्परपूरक असणाऱ्या लिखाणाचे स्वरूप, त्यांच्या लिखाणातील खास वैशिष्ट्ये, इतिहास व समाजधारणा या दोन्हींकडे पाहण्याचा त्यांचा विशिष्ट दृष्टिकोन आणि त्या दृष्टिकोनातून महाराष्ट्राच्या एकूण इतिहासाबद्दल त्यांनी मांडलेले वैचारिक सूत्र इत्यादी मुद्द्यांचा त्यांनी आपल्या प्रस्तावनेत परामर्श घेतला आहे.

डॉ. कंटकांचे यापुढील संशोधन हे 'खर्ड्याची लढाई' यावर आहे. बहुतेक इतिहास अभ्यासक या युद्धाकडे मराठ्यांनी त्यांच्या शत्रूवर मिळविलेला शेवटचा मोठा विजय असे वर्णन करतात. डॉ. कंटक (सहलेखक : डॉ. गो.त्र्यं. कुलकर्णी) यांनी या पुस्तकात संपूर्ण भारतीय इतिहासाच्या परिप्रेक्ष्यातून या लढाईकडे पाहिले आहे. या लढाईचा परिणाम म्हणून इंग्रजी सत्तेचा पाया व मराठा, निजाम, तसेच इतर देशी सत्तांचा विनाश कसा झाला, हे त्यांनी दाखवून दिले आहे. या पुस्तकात

त्यांनी मराठी व पर्शियन साधनांबरोबरच इंग्लिश साधनांचासुद्धा वापर केला आहे. राजवाडे व शेजवलकर या दोन प्रसिद्ध व्यक्तींच्या वैचारिक भूमिकेचा अभ्यास करतानाच डॉ. कंटक हे स्वत: पानिपत, खर्ड्याची लढाई, पहिले मराठा-इंग्रज युद्ध या तीन मुख्य लढायांचा अभ्यास करताना दिसतात. मराठ्यांच्या इतिहासातील या प्रमुख लढायांचा मूळ कागदपत्रांच्या साहाय्याने अभ्यास करणारे डॉ. कंटक हे त्यामुळेच इतर संशोधकांहून वेगळे वाटतात.

– डॉ. गिरीश मांडके

## कझिन्स, जेम्स हेन्री

***जयराम***

**आयरिश महापंडित**

**१८७३ – ५ नोव्हेंबर १९३३**

आयर्लंडमधील बेलफास्ट येथे जन्मलेल्या जेम्स हेन्री कझिन्स यांनी हिंदू धर्माप्रती आपल्या मनात असलेले विशेष प्रेम व्यक्त करण्याकरिता हिंदू धर्माचा विधिवत स्वीकार करून जेम्सऐवजी जयराम हे नाव धारण केले होते. विलक्षण प्रतिभेचे धनी असलेल्या कझिन्स यांनी वयाच्या विसाव्या वर्षी आपला पहिला काव्यग्रंथ प्रकाशित केला. विल्यम बटलर येट्स या सुप्रसिद्ध आयरिश कवीच्या सहकार्याने त्यांनी आयर्लंडमधील साहित्याच्या पुनरुज्जीवनाकरिता १८९७ साली एक संस्था काढली. १९०४मध्ये ते थिऑसॉफिकल सोसायटीचे सदस्य झाले व १९१५पर्यंत ते आयर्लंडमध्ये अध्यक्षांचे प्रतिनिधी म्हणून सोसायटीच्या कार्याचा प्रचार करीत होते. दरम्यान १९०३मध्ये जेम्स कझिन्स यांचा मार्गारेट एलिझाबेथ जिलेप्सी यांच्याशी विवाह झाला.

ॲनी बेझंट यांनी काढलेल्या ‘न्यू इंडिया’च्या संपादक मंडळात कझिन्स सन १९१५मध्ये दाखल झाले. बेझंट यांनी काढलेल्या ‘नॅशनल युनिव्हर्सिटी’ व ‘ब्रह्मविद्याश्रम’ या दोन संस्थांत प्राध्यापक म्हणून त्यांनी काम केले. मद्रास विद्यापीठाच्या कला विभागातील मंडळाचे व सिनेटचे ते सदस्य होते. मदनपल्ली येथील थिऑसॉफिकल कॉलेजचे ते कित्येक वर्षे प्राचार्य होते.

त्यांनी १९३३ साली इंग्लिश काव्यसंग्रहाचे वीस विभाग व १९३४मध्ये इंग्लिश गद्याचे वीस विभाग प्रसिद्ध केले. त्यांनी चारही खंडातील निरनिराळ्या विद्यापीठांतून काव्य व कला या विषयांतील प्राध्यापक म्हणून कार्य केले आहे. कझिन्स यांनी दोनदा जागतिक प्रवास केला आणि प्रमुख चित्रकारांची मूळ चित्रे ‘मॅजिक लॅंटर्न’च्या साहाय्याने जगभरातील विद्वान व रसिक लोकांना दाखवली. त्याचबरोबर त्यांनी शिक्षण, तत्त्वज्ञान, काव्य, हिंदी संस्कृती व थिऑसॉफी या विषयांवर व्याख्याने दिली. या सर्व कार्यात त्यांना त्यांच्या विद्वान व कलाभिज्ञ पत्नी मार्गारेट यांचे पूर्ण साहाय्य लाभले होते.

कझिन्स यांनी काही महत्त्वपूर्ण विषयांवर लेखनही केले आहे. ‘फंडामेंटल युनिटी ऑफ एशिया’, ‘फॉरेट मेडिटेशन’, ‘बेसेस ऑफ थिऑसॉफी’, ‘वर्क अँड वर्कशॉप’, ‘स्टडी इन सिंथेसिस’, ‘वर्क ऑफ प्रोमीथिअन’, ‘समदर्शन’ व ‘किंगडम ऑफ यूथ’ ही त्यांच्या प्रसिद्ध ग्रंथांची नावे आहेत.

इंग्रजी काव्याचे प्राध्यापक म्हणून १९१९-१९२०मध्ये केलेल्या उल्लेखनीय कार्याबद्दल जपानमधील कियोजीजुकू येथील विद्यापीठ व शिक्षण संस्थांकडून कझिन्स यांना डि.लिट्. पदवी देऊन त्यांचा गौरव करण्यात आला. त्रिवेंद्रम येथील सरकारी चित्रसंग्रहालयाला संघटित स्वरूप देऊन त्रावणकोर संस्थानच्या सांस्कृतिक जीवनाबाबत केलेल्या कार्याचे पारितोषिक म्हणून महाराजांकडून महापंडित म्हणून दरबारी पोषाख व ‘वीरशृंखला’ संज्ञक सुवर्णकंकण प्रदान करण्यात आले. तसेच दक्षिण हिंदुस्थानातील शिक्षक संघातर्फे ‘कुलपती’ पदवी इत्यादी अनेक सन्मान व पुरस्कार त्यांना लाभले.

– संपादित

**संदर्भ :**

१. *मराठी विश्वचरित्रकोश; संपादक - कामत, श्रीराम पांडुरंग; विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा.*

क

## कत्रे, सुमित्र मंगेश

**डेक्कन महाविद्यालयाचे शिल्पकार**

**११ एप्रिल १९०६ – २१ ऑक्टोबर १९९८**



आज एक उत्तम शैक्षणिक संस्था म्हणून जगभर नावाजलेले डेक्कन महाविद्यालय किंवा दक्षिणा महाविद्यालय हे सुरुवातीला पुण्यातल्या इतर महाविद्यालयांप्रमाणेच विशारद किंवा बी.ए. या पदवीपर्यंतचे शिक्षण देणारे महाविद्यालय होते. १९३४ मध्ये ते बंद पडले. माजी विद्यार्थ्यांच्या प्रयत्नांमुळे ते १९३९ मध्ये पुन्हा सुरू झाले ते पूर्णपणे नव्या स्वरूपात.

मुंबई विद्यापीठात नसलेल्या भाषाशास्त्र, पुरातत्त्वशास्त्र, समाजशास्त्र, मानवशास्त्र आणि मराठा इतिहास या विषयांतल्या पदव्युत्तर उच्च शिक्षणाचे आणि संशोधनाचे ते एक केंद्र मानले आहे. प्रा.डॉ. सुमित्र मंगेश कत्रे यांनी या महाविद्यालयात १९३९ मध्ये प्रवेश केला, तो युरो-भारतीय भाषाशास्त्राचे प्राध्यापक म्हणून. त्यानंतर तीनच वर्षांनी योगायोगाने डेक्कन महाविद्यालयाच्या संचालकपदाची जबाबदारी त्यांच्यावर येऊन पडली, ती वयाच्या पासष्ट वर्षांपर्यंत म्हणजे १९७१ सालापर्यंत. त्यांच्या या कारकिर्दीत डेक्कन महाविद्यालयाने चांगलेच बाळसे धरले. ते नावारूपाला आले ते त्यांच्याच समर्थ नेतृत्वामुळे, कर्तृत्वामुळे आणि द्रष्टेपणामुळे. महाविद्यालयाच्या उभारणीतले कत्रे हे प्रमुख आधारस्तंभ. डेक्कन महाविद्यालयाचे वर्धन, संरक्षण आणि उन्नयन झाले ते त्यांनी घातलेल्या मजबूत पायामुळेच.

आपल्या भावी आयुष्यात भारतातील भाषाशास्त्रज्ञांची एक संपूर्ण पिढीच्यापिढी तयार करणारे आणि संस्कृताभ्यासकांच्या पिढ्यान्‌पिढ्यांना आव्हान ठरेल असा संस्कृत महाकोशाचा भव्य प्रकल्प सुरू करणारे कत्रे सर भाषाशास्त्र आणि संस्कृतकडे कसे वळले हे मोठे मनोरंजक आहे. शालेय जीवनात का कोण जाणे, पण एका वर्षी त्यांना संस्कृत विषयात उत्तीर्ण होण्यापुरतेही गुण मिळाले नाहीत. पुढच्या वर्षी संस्कृत सोडायचे या अटीवरच त्यांना वरच्या वर्गात घालण्यात आले. खरे तर इथेच त्यांचे संस्कृतिशिक्षण संपायचे; पण विधिलिखित काही निराळेच होते. त्याच सुमारास दोन बंगाली मुलांचे त्यांच्या पाणिनीविषयक ज्ञानाचे मद्रासमध्ये प्रात्यक्षिक झाले आणि त्यांचे विद्वानांकडून भरघोस कौतुक झाले.

या घटनेने कत्रे अतिशय प्रभावित झाले आणि तसाही त्यांचा स्वभाव सहजासहजी हार मानणारा नव्हताच. त्यामुळेच केवळ भारतातल्याच नव्हे, तर जगातल्या आद्य भाषाशास्त्रज्ञांच्या, म्हणजेच पाणिनीच्या अष्टाध्यायीने त्यांनी पारंपरिक शिक्षण घेतलेल्या वैयाकरण शास्त्रींकडून धडे घेतले. पुढे उच्च शिक्षणासाठी ते ट्रिनिटी, केंब्रिज येथे दाखल झाले, ते गणित विषयातल्या अध्ययनासाठी. त्यासाठी प्रवेशाला आवश्यक असलेली कागदपत्रे त्यांचे आप्त डॉ. सावूर यांनी काही कारणाने प्रत्यक्ष त्यांच्याबरोबर न देता पोस्टाने पाठवली; पण काही चुकीने परत भारतात पाठवली गेली. ती परत इंग्लंडमध्ये पोहोचेपर्यंत प्रवेशाची मुदत टळून गेली होती. त्यामुळे गणित विषयातला त्यांचा प्रवेश हुकला आणि प्रवेश घ्यावा लागला, तो संस्कृत विषयासाठी. त्यासाठी आवश्यक असलेली अर्हता 'न भूतो न भविष्यति' इतक्या कमीतकमी वेळात देऊन, उत्तीर्ण होऊन त्यांचे शिक्षण सुरू झाले. राल्फ टर्नर, ब्लॉक, स्टीड, ऱ्हिस डेव्हिड्स अशा नामवंत विद्वानांच्या मार्गदर्शनाखाली अध्ययन करून आणि विद्यावाचस्पती पदवी संपादन करून ते पुण्यात आले. १९३३ ते १९३९ पर्यंत त्यांनी नौरोसजी वाडिया आणि सर परशुरामभाऊ महाविद्यालयात संस्कृतचे अध्यापन केले.

१९३९ मध्ये त्यांनी जेव्हा प्राध्यापक म्हणून डेक्कन महाविद्यालयामध्ये प्रवेश केला, त्या वेळी भारतात कलकत्ता (कोलकाता) आणि पुणे या दोनच ठिकाणी भाषाशास्त्र किंवा फिलॉलॉजी शिकवले जात होते.

त्यानंतरची दहा-बारा वर्षे संस्थेच्या दृष्टीने अतिशय धावपळीची आणि ओढगस्तीची गेली. दुसऱ्या महायुद्धाला सुरुवात झाली होती. लष्कराने महाविद्यालयाच्याच जागेवर तळ ठोकल्याने महाविद्यालयाचे स्थलांतर झाले होते. त्या वेळची ग्रंथालयात असलेली मोजकीच पुस्तके (१९३९), तीही बॉम्बे प्रेसिडेन्सीच्या वेगवेगळ्या संस्थांत हलवावी लागली होती. त्यामुळे खऱ्या अर्थाने सरांच्या कारकिर्दीला सुरुवात झाली ती १९५० मध्ये, महाविद्यालय पुन्हा आपल्या जागेवर सुरू झाल्यावर.

त्याच सुमारास राष्ट्राच्या इतिहासातही काही महत्त्वाच्या घटना घडल्या होत्या. १९४७ मध्ये देश स्वतंत्र झाला आणि शिक्षणाचे माध्यम म्हणून इंग्रजीची जागा घेण्यासाठी भारतातील प्रादेशिक भाषा सक्षम करण्याची गरज निर्माण झाली. राष्ट्रीय भाषाविषयक धोरण ठरवणे आवश्यक झाले. भारताची कार्यालयीन भाषा म्हणून इंग्रजीला पर्याय शोधण्यासाठी अमेरिकन विद्वानांना भारतीय भाषांचे ज्ञान आणि त्यात प्रावीण्य मिळविण्यासाठी, तसेच भारतीय भाषांमधल्या आपापसातल्या भाषिक आणि सांस्कृतिक विनिमयासाठी काही करता येईल का या दृष्टीने रॉकफेलर फाउण्डेशनच्या वतीने श्री. गिलपॅट्रिक यांनी डॉ. कत्रे यांची भेट घेतली. या सगळ्यासाठी भाषाशास्त्राचे – आधुनिक भाषाशास्त्राचे – शिक्षण आवश्यक होते. कत्र्यांनी त्या दृष्टीने देश आणि परदेशातील शिक्षणशास्त्रज्ञ आणि भाषाशास्त्रज्ञ यांची एक परिषद बोलावली आणि त्यानुसार १९५३ मध्ये जणूकाही एक भाषाशास्त्रीय चळवळच सुरू झाली. रॉकफेलर फाउण्डेशनने याला आवश्यक ते आर्थिक साहाय्य पुरविले आणि देशात पहिल्यांदाच डेक्कन महाविद्यालयामध्ये उन्हाळी आणि हिवाळी भाषाशास्त्रविषयक कार्यशाळा सुरू झाल्या. केवळ दोन वर्षांच्या अवधीत जवळजवळ दोन हजार भाषाशिक्षकांनी आणि इतरही विषयांच्या जिज्ञासूंनी भाषाशास्त्राचा परिचय करून घेतला. काहींनी त्यात प्रावीण्यही मिळविले आणि परत आपल्या विभागात गेल्यावर भाषाशास्त्राचे व्यवस्थित अभ्यासक्रम सुरू केले. यांतल्या काहींना तर अमेरिकन विद्यापीठात जाऊन उच्च शिक्षण आणि संशोधन यांचाही अनुभव घेता आला आणि भाषाशास्त्र या क्षेत्राचे चित्रच पालटून गेले. त्यातल्या वेगवेगळ्या शाखांतले नवनवीन प्रकल्प हाती घेऊन ते पार पाडण्यासाठी संशोधकांची एक उत्तम फळी तयार झाली.

बऱ्याच काळापासून सुमित्र कत्रे यांच्या मनात घोळत असलेली अशीच एक उत्तुंग कल्पना त्यांनी जाहीर केली ती विल्सन भाषाशास्त्रीय व्याख्यानमालेत, आणि ती म्हणजे संस्कृत भाषेचा ऐतिहासिक तत्त्वांवर आधारित विश्वकोशात्मक शब्दकोश. अशा पद्धतीचा एक अत्यंत उत्कृष्ट कोश रोथ आणि ब्योथलिंक या दोन विद्वानांनी अतिशय परिश्रमपूर्वक १८५५ ते १८८५ या काळात त्याच्या अनेक पुरवण्यांसह प्रसिद्ध केला होता. पण त्यात समाविष्ट असलेल्या ग्रंथांची संख्या केवळ पाचशे इतकी होती. त्यानंतर भासाच्या नाटकांसारखे अनेक नवीन ग्रंथ प्रकाशात आले होते. कित्येक ग्रंथांच्या महत्त्वाच्या टीकांचा या कोशात समावेश नव्हता. वास्तुशास्त्र, नाट्यशास्त्र, ज्योतिषशास्त्र, धर्मशास्त्र इत्यादी विषयांवरील अनेक ग्रंथ त्यात समाविष्ट नव्हते. त्यामुळे अशा एखाद्या अद्ययावत कोशाची अत्यंत तातडीने आवश्यकता होती. यात जवळजवळ दोन हजार संस्कृत ग्रंथांचा समावेश होणार होता. त्या दृष्टीने त्यांनी एक अत्यंत तपशीलवार सुसूत्र आराखडा तयार करून १९४२ मध्ये एका नियतकालिकात प्रसिद्धही केला. सुरुवातीला वेगवेगळ्या संस्थांनी वेगवेगळ्या विद्याशाखांवर काम करून एकमेकांच्या सहकार्याने असा कोश प्रसिद्ध करावा, अशी त्यांची कल्पना होती. पण प्रत्यक्षात मात्र आधीपासूनच पुराभिलेखातील संस्कृत आणि संस्कृतकोशवाङ्मय यांच्या कोशनिर्मितीत व्यग्र असलेल्या डेक्कन महाविद्यालयावरच ही सर्व जबाबदारी येऊन पडली आणि साठ विद्याशाखांतील वेगवेगळ्या ग्रंथांतील शब्दांची नोंद करण्याचे काम सुरू झाले. त्यानंतर संपादनाचे काम सुरू होऊन १९७६ मध्ये

पहिल्या खंडाचा पहिला भाग प्रसिद्ध झाला. २००५ मध्ये सातव्या खंडाचा तिसरा भाग प्रकाशित झाला. आतापर्यंत ३८४८ पाने प्रसिद्ध झालेली असून अन्नव्रत हा त्यातला शेवटचा शब्द आहे. अन्य शब्दांपासून पुढचा भाग छपाईच्या मार्गात आहे. जगभर या कोशाचा आता पुणे डिक्शनरी (PD) म्हणूनच उल्लेख होतो. हा कोश जेव्हा पूर्ण होईल, त्या वेळी संस्कृत शब्दांच्या वेदांपासून आजपर्यंतच्या चरित्राच्या किंवा जीवनेतिहासाच्या रूपाने संस्कृत भाषेचा समग्र इतिहास अभ्यासकांसाठी उपलब्ध होईल.

कत्रे यांची कारकीर्द हा सर्वार्थाने डेक्कन महाविद्यालयाच्या भरभराटीचा काळ होता. सुरुवातीला सात असलेली कर्मचारी संख्या ते निवृत्त होण्याच्या वेळी २५० झालेली होती. सुरुवातीला एकाच इमारतीत प्रशासन, ग्रंथालय इ. सर्व विभाग होते. हळूहळू ती जागा कमी पडायला लागली. तोपर्यंत सरांच्या नेत्रदीपक यशामुळे डेक्कन महाविद्यालयाविषयीच्या आणि कामाविषयीच्या निष्ठेमुळे राजदरबारी त्यांच्या शब्दाला वजन प्राप्त झाले होते. त्यांच्याबद्दल आदर आणि विश्वास निर्माण झाला होता. त्यामुळेच विद्यापीठ अनुदान आयोगाकडून भरघोस अनुदान मिळवण्यात त्यांना यश आले आणि त्यातूनच नवीन ग्रंथालय, पुरातत्त्वशास्त्र विभाग, भाषाशास्त्र विभाग यांच्या इमारती उभ्या राहिल्या. या सगळ्या बांधकामाकडे सर जातीने लक्ष पुरवत, ते चांगले आणि सुंदर होईल, याकडे त्यांचा कटाक्ष असे.

आपल्या सहकाऱ्यांची प्रगती व्हावी, शैक्षणिक गुणवत्ता वाढावी यासाठी ते सतत प्रयत्नशील होते. त्यामुळेच त्यांच्या काळात डेक्कन महाविद्यालयामधील अनेक कर्मचारी परदेशात प्रशिक्षण आणि उच्च शिक्षण घेऊन आले. कधीकधी तर एखाद्या विद्यार्थ्याची पारपत्र मिळवून देण्याची जबाबदारीही त्यांनी स्वीकारलेली आहे. आपल्या सहकाऱ्यांचे संशोधन आणि लेखन प्रकाशित व्हावे, यासाठी त्यांनी महाविद्यालयाचे नियतकालिक सुरू केले. ते अजूनही प्रकाशित होत असते. त्यांनी ‘वाक्’ नावाचे एक नियतकालिकही सुरू केले होते; पण ते थोड्याच दिवसांत बंद पडले. १९६४ मध्ये इमारतशताब्दीच्या निमित्ताने त्यांनी शंभर पुस्तके प्रकाशित करण्याचा संकल्प सोडला आणि तो पूर्णही केला. याखेरीज मोनोग्राफ सीरिज, डिस्सर्टेशन सीरिज अशा विविध मालिकांतून अनेक ग्रंथ प्रकाशित केले. महाविद्यालयाचा स्वत:चा छापखाना असावा, अशी त्यांची इच्छा होती.

१९६२ मध्ये महाविद्यालयाचे अस्तित्वच धोक्यात आले होते; पण त्यांच्या प्रयत्नांनी तो प्रसंग टळला. त्या वेळी चीनने भारतावर आक्रमण केले होते. सैनिकी शिक्षणासाठी आणि सैन्याच्या विस्तारासाठी अनेक योजना आखल्या जात होत्या. दुसऱ्या महायुद्धात डेक्कन महाविद्यालयाचा विस्तीर्ण टापू सैन्याने आपल्या ताब्यात घेतला होता, तो १९४९ मध्ये सोडला, तरी त्या वेळी बांधलेल्या बरॅक्स अजून शाबूत होत्या. या सगळ्या गोष्टी विचारात घेऊन सदर्न कमांडने महाविद्यालयाकडे जागेची मागणी केली. डेक्कन महाविद्यालयाच्या आणि सरांच्या सुदैवाने जनरल जे.एन. चौधरी सदर्न कमांडचे अधिकारी झाले. महाराष्ट्राचे मुख्यमंत्री यशवंतराव चव्हाण हे संरक्षणमंत्री म्हणून नियुक्त झाले. प्रा. सांकलिया आणि प्रा. धनंजयराव गाडगीळ यांना बरोबर घेऊन सर यशवंतराव चव्हाणांना भेटले आणि त्यांना आपली समस्या पटवून देण्यात यशस्वी झाले आणि महाविद्यालयावर आलेले गंडांतर टळले.

आवर्जून उल्लेख करायला हवा तो डेक्कन महाविद्यालयाच्या ग्रंथालयाचा. कुठल्याही शिक्षणसंस्थेचा ग्रंथालय हा गाभा असतो. ग्रंथांच्या आणि ग्रंथालयांच्या या महत्त्वपूर्ण स्थानाची कत्र्यांना पूर्ण जाणीव होती. त्यामुळेच १९५० मध्ये डेक्कन महाविद्यालयाची जागा परत हातात आल्याबरोबर त्यांनी इतर संस्थांमध्ये ठेवायला दिलेली पुस्तके परत मिळवायला सुरुवात केली आणि त्यात ते यशस्वीही झाले. हरप्रकारे महाविद्यालयाची ग्रंथसंपदा कशी वाढवता येईल, हाच त्यांना ध्यास असायचा. त्यांनी

इंग्लंड आणि अमेरिका इथून पुस्तके मागवली होती. त्यानंतर महायुद्ध सुरू झाले. त्याचा परिणाम न होता मागवलेली पुस्तके सुखरूपपणे महाविद्यालयामध्ये पोहोचतील यासाठी त्यांनी सर्वतोपरी काळजी घेतली. भाषाशास्त्र आणि पुरातत्त्व, त्याचप्रमाणे भारतविद्येवरची सर्व नियतकालिके त्यांनी त्यांच्या पहिल्या अंकापासून जमवली आणि ग्रंथालय समृद्ध केले. महाविद्यालयाच्या सर्व विभागांना या बाबतीत त्यांची सारखीच वागणूक होती. पुरातत्त्वशास्त्र विभागाला आजही उत्खननासाठी उपयोगी पडणाऱ्या सर्व्हे ऑफ इंडियाच्या टोपोशीट्सचा पूर्ण संचच्यासंच त्यांनी मिळवला. वेगवेगळ्या प्रकाशनसंस्थांच्या पुस्तकसूचींकडे त्यांचे कायम बारकाईने लक्ष असायचे. उपयुक्त पुस्तकांवर खुणा करून ते त्या ग्रंथालयाकडे पाठवत असत. ग्रंथालयातली स्वच्छता आणि वेगवेगळ्या सुखकर सोयी यांकडे त्यांचे जातीने लक्ष असायचे. तिथल्या खुर्च्या, टेबले इ. गोष्टींतही त्यांचा दर्जाचा आग्रह असे. प्रा. डे. यांची जवळजवळ तीन हजार पुस्तके केवळ त्यांच्या प्रयत्नांमुळे महाविद्यालयाकडे आली. त्यांतली कित्येक अत्यंत मौल्यवान आणि दुर्मीळ आहेत. अशाच रितीने त्यांनी अनेक दुर्मीळ हस्तलिखितेही मिळवली. संचालक म्हणून त्यांच्याकडे येणारी पुस्तके आणि नियतकालिके त्यांनी महाविद्यालयाला दिली, त्याखेरीज निवृत्तीनंतरही ११०० पुस्तके महाविद्यालयाला भेट दिली. डेक्कन महाविद्यालयामध्ये नियमित येणारी इण्डो-इराणियन-जर्नलची प्रत ही त्यांची वैयक्तिक प्रत आहे.

लौकिकानां हि साधूनां अर्थं वागनुवर्तते।
ऋषीणां पुनराद्यानां वाचमर्थोऽनुधावति ॥

हे वचन त्यांच्या बाबतीत सार्थ करणारी एक घटना इथे नोंदवायलाच हवी. डेक्कन महाविद्यालयाने पुणे विद्यापीठाकडून काही पुस्तके कर्जाऊ घेतली होती. हा संग्रह डेक्कन महाविद्यालयाकडे कायम राखण्यात त्यांना यश आले. ‘‘डेक्कन महाविद्यालयाकडून पुस्तके परत मागविण्यात येऊ नयेत; डेक्कन महाविद्यालयाला इतर महाविद्यालयांसारखी वागणूक देणे बरोबर होणार नाही. कारण, ही संस्था विद्यापीठाच्या दर्जाची आहे.’’ हे त्यांचे शब्द १९६१ चे आणि खरोखरीच त्यानंतर ३५ वर्षांनी, १९९६ मध्ये डेक्कन महाविद्यालयाला विद्यापीठाचा दर्जा मिळाला आणि ते अभिमत विद्यापीठ झाले.

२००५ ते २००६ हे या द्रष्ट्या महापुरुषाचे, डेक्कन महाविद्यालयाच्या शिल्पकाराचे जन्मशताब्दी वर्ष होते.

– डॉ. माधवी कोल्हटकर

## करंदीकर, जनार्दन सखाराम

**केसरीचे संपादक व अनेक विषयांचे सूक्ष्म अभ्यासक, लेखक**

**१८७५ – १२ मार्च १९५९**

***☛ मुख्य चरित्रनोंद – पत्रकारिता खंड***



जुन्या जमखिंडी संस्थानातील कुंदगोळ येथे जनार्दन सखाराम करंदीकर यांचा जन्म झाला. १८९७मध्ये ते फर्गसन महाविद्यालयातून बी.ए. झाले. पुढे मुधोळच्या शाळेत हेडमास्तर होते. नंतर ते एल.एलबी. झाले. नंतर ते धारवाड येथे शिक्षक होते.

समर्थ विद्यालयात शिक्षक (१९०७) व तेथेच वसतिगृहाचे पर्यवेक्षक होते. याच सुमारास ‘समर्थ’ साप्ताहिकाचे व ‘ग्रंथमाला’ मासिकाचे ते सहसंपादक होते. ‘चित्रमय जगत’चे संपादन ते काही दिवस करीत असत. १९११मध्ये त्यांनी केसरीत लिहिण्यास सुरुवात केली व १९१२ साली सहसंपादक म्हणून त्यांची तेथे नेमणूक झाली. मुळशी सत्याग्रहात त्यांना १९२२मध्ये तीन महिने सक्तमजुरीची शिक्षा झाली. पुणे येथील टिळक महाविद्यालयात ते इतिहास व अर्थशास्त्र हे विषय शिकवत असत. १९२७मध्ये वाईस भरलेल्या राष्ट्रीय शिक्षण परिषदेचे व झाशीस भरलेल्या बृहन्महाराष्ट्र परिषदेचे ते अध्यक्ष होते. १९३१मध्ये ते केसरीचे मुख्य

संपादक झाले. १९३२मध्ये कायदेभंगाच्या चळवळीत भाग घेतल्याने त्यांना दोन वर्षांची शिक्षा झाली.

त्यांची ग्रंथसंपदा : १. कौटिलीय अर्थशास्त्राचे मराठी भाषांतर (हिरवगावकर, नगर यांच्या सहकार्याने भाग १-२, १९२६-२८), २. जगातील क्रांतिकारक लढाया (कोसीच्या 'डिसायसिव्ह बॅटल्स ऑफ दि वर्ल्ड'चे भाषांतर १९०८), ३. हिंदुत्ववाद, ४. भारतीय युद्धाचा कालनिर्णय ५. भारतीय युद्धाचा तिथिनिर्णय अथवा गीताजयंतीनिर्णय.

याशिवाय राजकारण, इतिहास, इतिहास संशोधन, अर्थशास्त्र, फलज्योतिष, पंचांग संशोधन, गीतार्थ-चर्चा, रामदासी वाङ्मय वगैरे विविध विषयांवर त्यांचे अनेक लेख प्रसिद्ध झाले आहेत. त्यांचे विचार सूक्ष्म असून विचारांची पकड पक्की असते. त्यामुळे त्यांचे विशदीकरण आग्रही वाटले तरी महत्त्वाचे असते. त्यांची लेखणी विविध विषयात सफाईने चालत असे.

— संपादित

**संदर्भ :**

*१. अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*

## करमरकर, रघुनाथ दामोदर

**लेखक, व्याख्याते, संशोधक**

**२८ ऑगस्ट १८९३ – २८ नोव्हेंबर १९६५**



संस्कृतचे जुन्या पिढीतील प्राध्यापक, संस्कृतसंबंधी अनेक पुस्तके लिहिणारे लेखक, पुण्यातील शिक्षण प्रसारक मंडळीचे आजीव सदस्य, स.प. महाविद्यालयाचे अठराहून अधिक वर्षे प्राचार्य, पुणे विद्यापीठात वेदान्तविषयक व्याख्याने देणारे व्याख्याते, भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिराच्या उभारणीत मोलाचे कार्य करणारे व त्या संस्थेचे दुसरे मानद सचिव व पुढे स्नातकोत्तर विभागाचे निर्देशक, अतिशय उमद्या स्वभावाचे, विद्यार्थ्यांना सर्वतोपरी मदत करणारे सुजन विशाल अंत:करण असणारे; पण दुर्दैवाने कर्करोगासारख्या असाध्य व क्लेशदायक व्याधीने कालवश झालेले एक थोर सत्पुरुष म्हणजे रघुनाथ दामोदर करमरकर. रघुनाथ दामोदर करमरकर यांचा जन्म सातारा जिल्ह्यातील तासगाव तालुक्यातील भिलवडी गावी झाला. त्यांच्या आईचे नाव जानकीबाई होते. वडील पोलीसखात्यात नोकरीला होते, पण १९०९ मध्ये वडिलांचे निधन झाले व हळूहळू घरी विपन्नावस्था प्राप्त झाली. या वेळी कँवेल या जिल्हाधिकाऱ्याने त्यांना अर्थसाहाय्य केले. एक अभ्यासू विद्यार्थी असा लहानपणापासून रघुनाथपंत करमरकरांचा लौकिक होता. उच्च शिक्षणासाठी करमरकरांनी फर्गसन महाविद्यालयात प्रवेश घेतला. त्यांना 'वरजीवनदास शिष्यवृत्ती', तसेच 'जैन वाङ्मय शिष्यवृत्ती' मिळाली.

इंटरनंतर बी.ए. परीक्षेसाठी करमरकरांनी डेक्कन महाविद्यालयामध्ये प्रवेश घेतला. बी.ए.ला ते पहिल्या वर्गात दुसरे आले. त्या वेळी त्यांना संस्कृतातील प्रावीण्याबद्दल भाऊ दाजी पारितोषिक, तर सर्वसाधारण प्रावीण्याबद्दल 'गंगादास रंगिलदास शिष्यवृत्ती' मिळाली. डेक्कन महाविद्यालयामध्ये शिकत असताना अतिशय प्रतिष्ठेची 'दक्षिणा फेलोशिप' व संस्कृत, विशेषत: वेदान्त विषयातील नैपुण्यातील असलेली 'भगवानदास पुरुषोत्तमदास शिष्यवृत्ती', तसेच 'झाला वेदान्त' पारितोषिक मिळाले. प्रिन्सिपॉल बेन यांचे ते आवडते विद्यार्थी होते; त्यामुळे प्रिन्सिपॉल बेन यांनी करमरकरांना शिफारसपत्रही दिले. पण प्रा. करमरकरांनी सरकारी नोकरी न करण्याचा निश्चय केला होता व त्यामुळे त्यांनी ते शिफारसपत्र स्वीकारले तर नाहीच; पण आपले सतीर्थ्य - सहाध्यायी प्रा. गजेंद्रगडकर यांना ते फाडायला लावले. प्रा. करमरकरांची देशनिष्ठा यातून दिसून येते.

१९१६मध्ये लोकमान्य टिळकांच्या पुढाकाराने न्यू पूना महाविद्यालयाची (म्हणजे सर परशुरामभाऊ महाविद्यालयाची) स्थापना झाली व प्रा. करमरकर संस्कृत व इंग्रजीचे प्राध्यापक म्हणून तेथे रुजू झाले.

त्याच वर्षी १९१६-१७मध्ये ते शिक्षण प्रसारक मंडळी या मातृसंस्थेचे आजीव सदस्यही झाले. सर परशुरामभाऊ महाविद्यालयामध्ये १९३३ ते १९४५ अशी बारा वर्षे करमरकरांनी प्राचार्यपद भूषवले.

या काळात अध्यापन क्षेत्रात नावाजलेल्या व्यक्तींना प्रा. करमरकरांनी आपल्या महाविद्यालयामध्ये प्राध्यापक म्हणून घेतले. वानगीदाखल डॉ. एस.एम. कत्रे, डॉ. हरदत्त शर्मा, सौ. लीला वागळे, डॉ. के.ना. वाटवे, प्रा. माटे ही काही नावे सांगता येतील. त्याचबरोबर, विद्यार्थ्यांच्या हिताच्या अनेक गोष्टी झाल्या. भव्य ग्रंथालय व वाचनासाठी अभ्यासगृह, सभा-संमेलनासाठी देवी रमाबाई सभागृह, विद्यार्थ्यांना एकत्र येण्यासाठी विद्यार्थिगृह, रसायनशास्त्र प्रयोगशाळा इत्यादी गोष्टींमुळे महाविद्यालयाला पूर्णता आली.

प्रशासकीय कामाबरोबरच संस्कृत गद्य-पद्याचे इंग्रजीमध्ये शब्दश:, युक्त व सुगम भाषांतर करणाऱ्यांमध्ये प्रा. करमरकर अग्रणी होते. विद्यार्थ्यांना उपयुक्त अशा अनेक संस्कृत ग्रंथांच्या सटीक आवृत्त्यांचे त्यांनी संपादन केले. त्यामध्ये प्रामुख्याने कालीदास, भवभूती, शूद्रक यांची मिळून सहा नाटके, कालीदासाची तीन महाकाव्ये, बाणभट्टाच्या कादंबरीचा काही भाग यांचा समावेश होतो, त्याचबरोबर प्रा. गजेंद्रगडकरांसह तर्कसंग्रह, अर्थसंग्रह इत्यादी ग्रंथांचे संपादन, सर्वच ग्रंथांना विवेचक प्रस्तावना, स्पष्टीकरणात्मक टिपा व अनेक परिशिष्टे यांची जोड दिली आहे. या सर्वांबरोबर अत्यंत महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे प्रा. करमरकरांनी केलेला रामानुजांच्या ‘ब्रह्मसूत्र भाष्या’चा इंग्रजी अनुवाद. हे सर्व कार्य करीत असताना मुंबई विद्यापीठाचे पीएच.डी.चे गाइड म्हणून ते कार्यरत होते. संस्कृतच्या क्षेत्रात प्रतिष्ठित मानल्या गेलेल्या भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्थेशी ते स्थापनेपासून संबंधित होते.

शैक्षणिक क्षेत्रात प्रशासकीय, तसेच अध्यापनादी क्षेत्रात कार्यरत असणाऱ्या प्रा. करमरकरांचा देशाभिमान त्यांच्या लष्करी कार्यातून दिसून येतो. १९१९मध्ये निघालेल्या भारतीय संरक्षण दलामध्ये ते सैनिक म्हणून दाखल झाले. ह्यातून १९२१मध्ये यू.टी.सी. हा महाविद्यालयातील विद्यार्थ्यांना लष्करी शिक्षण देणारा स्वतंत्र विभाग करण्यात आला. उत्तरोत्तर लेफ्टनंट, कॅप्टन अशा क्रमाने १९४०मध्ये ते मेजर झाले व १९४४मध्ये त्यांना लेफ्टनंट कर्नल हा हुद्दा मिळाला. करडी शिस्त व करारीपणा ही प्राचार्य करमरकरांच्या स्वभावाची वैशिष्ट्ये होती; पण त्याचबरोबर त्यांचे अंत:करण प्रेमळ व हितैषी होते, ही गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे.

आयुष्यभर मुख्यत्वे प्राध्यापकी केल्याने संस्कृतच्या विद्यार्थ्यांसाठी ‘रघुवंश’ ( काही सर्ग ), ‘कुमारसंभव’ (सर्ग १-५), ‘मेघदूत’, ‘मालविकाग्निमित्र’, ‘विक्रमोर्वशीय’, ‘अभिज्ञानशाकुन्तलम’, ‘मीमांसा अर्थसंग्रह’, न्यायविषयावरील तर्कसंग्रह, प्रा. डॉ. गजेन्द्रगडकर यांच्या साहाय्याने इंटरमिजिएट संस्कृत-सिलेक्शन्स इत्यादी पाठ्यपुस्तकांचे उत्तम संपादक, रामानुजाचार्यांचे ‘श्रीभाष्य’, गौडपादांच्या ‘माण्डूक्यकारिका’ यावर उत्तम प्रस्तावना, आंग्ल भाषांतरे व भरपूर टीपा लिहिणारे लेखक, तसेच महाभारताच्या चिकित्सिक आवृत्तीसाठी या पर्वांचे संपादन करणारे, भांडारकर संस्थेच्या संशोधन लेखांच्या वार्षिक अंकांचे एक संपादक असलेल्या प्रा. रघुनाथ करमरकरांनी भगवद्‌गीताविषयक अनेक संशोधनपर निबंध लिहिले. कर्नाटक विद्यापीठ (धारवाड) यांच्या निमंत्रणावरून कालिदास व भवभूती यांवर विदग्ध व्याख्यानमाला देऊन त्या विद्यापीठाद्वारे त्यांनी ग्रंथ प्रकाशित केला.

सी.आर. देशपांडे (‘चम्पूकाव्य’), चिं.त्र्यं. केंधे (सांख्यकारिकेवरील ‘युक्तिदीपिका’), ‘अनुगीता’, ‘उद्धवगीता’ इत्यादी भगवद्‌गीतेतर गीतासाहित्य लिहिणारे, अशा अनेक संशोधन प्रबंधकारांना र.दा. करमरकरांनी सक्षम मार्गदर्शन केले. प्राचार्य करमरकरांच्या सर्वच संशोधनाचा आढावा या आटोपशीर लेखात घेणे केवळ अशक्य आहे. यासाठी वानगीदाखल काही बाबींचा येथे निर्देश केला आहे.

भगवद्‍गीतेवर करमरकरांचे तीन-चार संशोधनपर लेख आहेत. त्यांतील एका लेखात गीतेतील ‘पुष्पिता वाक्’ कोणती हे त्यांनी सांगितले आहे. गीतेवरील हनुमत्पिशाच-भाष्यात मुण्डकोपनिषदातील ‘एहि एहीती तमाहुतय: सुवर्चस: सूर्यस्य रश्मिभिर्यजमानं वहानि एष ते ते सुकृत: ब्रह्मलोक:’ ही श्रुती म्हणजेच गीतेतील ‘पुष्पिता वाक्’ (flowery speech) असा अर्थ केला आहे, तो नाकारून करमरकर म्हणतात, की गीतेबाहेरील साहित्यात ‘पुष्पिता वाक्’ शोधण्याचा प्रयत्न करणे हे मुळातच चूक आहे आणि ते अशासाठी, की गीतेनेच ‘यामिमां पुष्पितां वाचम्’ असे म्हणून गीतेतील त्याच संदर्भाच्या सान्निध्यातील एखादी श्रुती असल्याचा निर्वाळा गीतेने दिला आहे. ही श्रुती कोणती? करमरकर यांच्या मते ‘यावानर्थ उदपाने सर्वत: संप्लुतोदके...’ हा श्लोक होय. याच श्लोकाबाबतच्या दुसऱ्या एका लेखात त्यांनी शंकराचार्यकृत ‘सतिसप्तमीपर अर्थनिर्वचना’चा अस्वीकार केला आहे. त्यांच्या मताने ‘सर्वत: सम्प्लुतोदके सति उदपाने यावानर्थ’ असे मानण्यापेक्षा सरळसरळ उदपाने या सप्तम्येकवचनाचे विशेषण ‘सम्प्लुतोदके’ असे मानणे अधिक लाघवाचे व औचित्याचे आहे.

करमरकरांनी ‘असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वर...’ या श्लोकात चार्वाकांचा निर्देश आहे की बौद्धमताचा, याचीही प्रमाणभूत चर्चा केली आहे.

‘मालविकाग्निमित्रा’च्या प्रस्तावनेत त्यांनी डॉ. विल्सनने प्रतिपादलेले मत म्हणजे मालविकाग्निमित्र हे नाटक त्यातील शैली व गुणवत्ता (साहित्यिक) पाहता शाकुंतलकर्त्या कालिदासापेक्षा वेगळ्या कालिदासाचे आहे व हा कालिदास इ.स. अकराव्या शतकातला असावा या विधानाचा साधार प्रतिवाद केला आहे. विक्रमोर्वशीय (पुरुरवा - ऊर्वशी सूक्त, ऋग्वेद व पुरुरवा-ऊर्वशी संवाद; ‘शतपथब्राह्मण’) यावर आधारित आहे, तर ‘शाकुंतल’ हे महाभारतातील ‘शकुन्तलोपाख्याना’वर आधारित आहे; मात्र ‘मालविकाग्निमित्र’ हे रूपक इतिहासाधिष्ठित असल्याने कालिदासाच्या काव्यविलासाला मर्यादा पडल्या असल्या पाहिजेत हे सांगून कोणत्याही कवीच्या सर्व कृतींत सारखाच वाङ्मयीन दर्जा नसतो हे शेक्सपिअरच्या उदाहरणावरून दाखवून दिले. शेक्सपिअरच्या ‘मिडसमर नाइट्स ड्रीम’चा वाङ्मयीन दर्जा ‘ऑथेल्लो’ किंवा ‘हॅम्लेट’च्या वाङ्मयीन गुणवत्तेशी तुलना केली असता कमी प्रतीचा आहे म्हणून दोन शेक्सपिअरची उत्प्रेक्षा करणे प्रामादिक ठरेल असे सांगितले आहे. कालिदास हा प्राय: गुप्तकालीन गुप्तराजांचा आश्रित असताना त्याला अकराव्या शतकात आणून सोडणे हेही विलक्षण अनैतिहासिक असल्याचेही म्हटले आहे.

‘कुमारसंभवा’च्याही प्रस्तावनेत पहिले आठ सर्गच कालिदासाचे व पुढचे अन्य कोणाचे हे म्हणणेही रास्त नसल्याचे करमरकर याच कारणांसाठी आग्रहाने म्हणतात. करमरकरांच्या समीक्षेची चमक त्यांच्या अभिज्ञानशाकुंतलम्‌च्या समीक्षेत विशेषत: आढळते. मुळात ‘शाकुंतल’ हे पाच अंकाचेच नाटक होते. अप्सरस्तीर्थाजवळ आकाशातून एक स्त्री-देहाची ठेवण असणारी दिव्य ज्योती प्रकट होऊन ती शोकसंतप्त शकुंतलेला उचलून स्वर्गात जाते याचा ध्वन्यर्थ शकुंतला ‘दिवंगता’ होते असाच काढायला हवा. यामुळे संस्कृत साहित्यात इतरत्र कोठेच न आढळणारी शोकांतिका (ट्रॅजेडी) लाभली असती. केवळ भरतमुनींच्या, ‘नाटक सुखान्तच करायचे’ या दण्डकामुळे शाकुंतलात पुढचे दोन अंक कालिदासानेच जोडले असावेत, असे करमरकर सुचवतात. कालिदासाची इतर दोन नाटकेही पाच अंकांचीच आहेत.

कर्नाटक विद्यापीठाने प्रकाशित केलेल्या करमरकरांच्या भवभूतीविषयक पुस्तकात भवभूतीला असलेले कालिदासाचे ऋण आणि भारतीय साहित्य व संस्कृतीला भवभूतीचे योगदान हे नवीन मुद्दे विलक्षण भावतात. करमरकरांनी भवभूतीला अभिप्रेत असणारा रामकृत सीतात्याग व सातव्या हेन्रीने केलेला राजसिंहासनाचा त्याग यांची फार मनोज्ञ चर्चा केली आहे, ती वाचकांनी मुळातूनच वाचावी.

रामानुजाचार्यांची आलवारसंतांची भक्तिपरंपरा आणि गौडपाद यांच्यावर बौद्ध तत्त्वज्ञानाचा प्रभाव नसल्याचे केलेले विवेचनही जिज्ञासूंनी मुळातूनच वाचावे असे आहे.

– प्रा. डॉ. मो.गो. धडफळे/कांचन मांडे

## कर्झन, जॉर्ज *नर्थेनिएल*

**लॉर्ड कर्झन**

**व्हाइसरॉय, पुरातत्त्व कायदा जनक**

**११ जानेवारी १८५९ – २० मार्च १९२५**



हिंदुस्थानात व्हाइसरॉय म्हणून नेमण्यापूर्वी जॉर्ज नर्थेनिएल कर्झन हे चार वेळा हिंदुस्थानात येऊन गेले होते. त्यामुळे यांना हिंदुस्थानची बरीच माहिती होती. कट्टर कॉन्झर्व्हेटिव्ह म्हणून यांची फार ख्याती होती. अत्यंत हुषार व तडफदार व्यक्तिमत्त्व अशी त्याची ओळख होती. हट्टी, तडफदार, कुशाग्र बुद्धीचे व साधकबाधक विचार करणारे म्हणून यांची प्रसिद्धी होती. अमुक खात्यावरून त्यांचा हात फिरला नाही असे त्या वेळी एकही खाते शिल्लक राहिले नाही. डलहौसीनंतर हिंदुस्थानच्या कारभारावर यांचाच ठसा जास्त उठला आहे. येथे येण्यापूर्वी सन १८९१-१८९२मध्ये यांनी दुय्यम भारतमंत्र्यांचे काम केले होते. त्यांच्याइतका तरुण वयाचा व्हाइसरॉय त्यांच्यापूर्वी कोणी आला नव्हता.

सन १९०४मध्ये यांनी पुराणवस्तूंच्या संरक्षणाचा कायदा संमत केला. जुन्या ऐतिहासिक इमारतींची डागडुजी करण्याकरता व ज्या इमारती जमिनीत पुरल्या गेल्या होत्या त्या उकरून काढण्याकरता यांनी ‘पुराणवस्तू संशोधन खाते’ स्थापन केले. या खात्याचे काम फार समाधानकारक होत असून हिंदी कलाकुसरीची व संस्कृतीची स्मारके, जतन व संवर्धन करण्यासाठी ते खाते अहर्निश झटते. कर्झनच्या व्हाइसरॉयपदाच्या काळात जे कायदे संमत झाले, त्यापैकी एन्शंट मॉन्युमेंट्स प्रिझर्वेशन अ‍ॅक्टने त्यांना अत्यंत समाधान मिळवून दिले. ‘माझ्या कार्यकालाच्या शेवटी मी या देशाचे स्थापत्य आणि कला यांचे अनमोल खजिने मागे ठेवले आहेत,’ असे कर्झन यांनी स्वत:च म्हटले आहे.

बंगालच्या एशियाटिक सोसायटीत भाषण करताना लॉर्ड कर्झन म्हणाले होते, ‘‘प्रचंड शोधांच्या काळातही बहुतेक प्राचीन इतिहास म्हणजे केवळ तर्क आहेत. त्याचे धागेधेरे आपल्या भूमीत सर्वत्र विखुरले आहेत. गाडलेली शहरे, न उकललेल्या लिप्या, नाणी, कोसळत असलेले स्तंभ, शिलालेख हेच आपल्याला भूतकाळाचा वृत्तान्त जुळवण्यासाठी माहिती पुरवतात आणि नष्ट झालेल्या युगाची नैतिकता, साहित्य, राजकारण, कला यांचे दर्शन घडवतात.’’

काही युरोपियनांनी असे खुसपट काढले की, परक्या धर्माच्या मूर्तिपूजक कलेचे जतन करणे, हे ख्रिश्चन सरकारचे कर्तव्य ठरत नाही. कर्झन यांनी या आक्षेपाला काडीची किंमत दिली नाही. हिंदी पुरातत्त्व क्षेत्रात संशोधन करणाऱ्यांना त्याने पुरेपूर श्रेय दिले. या विषयावरच्या सर ए. कनिंगहॅम आणि जेम्स फर्गसन यांच्या ग्रंथांचे त्यांनी कौतुक केले. पण हे काम इतके अफाट होते की, ते एका व्यक्तीच्या ताकदीपलीकडचे होते. कर्झन यांनी आपल्या कार्यकाळाच्या प्रारंभीच स्पष्ट केले होते की, हिंदुस्थानचा स्थापत्यशास्त्रीय वारसा पुन:स्थापित करण्याचे काम मी एक कर्तव्य म्हणून अंगावर घेतले आहे. लॉर्ड कॅनिंग यांनी १८६०मध्ये आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ नॉर्थ इंडियाची स्थापना केली. पण प्रत्यक्ष काम मात्र थांबत–थांबत आणि कचरत चालले होते. कर्झन आपल्या महत्त्वाकांक्षेशी पुरेपूर प्रामाणिक राहिले. ते हिंदुस्थानात आले, त्या वेळी या कामासाठी प्रांतिक सरकार व हिंदी सरकार यांचा एकत्रित खर्च वर्षाला ७००० पौंड होता. १९०४पर्यंत हा आकडा वाढून दरसाल ३७,००० पौंड झाला आणि कर्झन हिंदुस्थानातून गेले, त्या वेळी हा आकडा आणखी पुष्कळ वाढला.

लॉर्ड कर्झन यांनी बजावलेली सर्वात मोठी कामगिरी म्हणजे भारतीय पुरातत्त्व वास्तू जतन करण्यासाठी त्यांनी केलेले प्रयत्न. प्राचीन काळातील उत्कृष्ट कलेला आणि वास्तूंना नष्ट होऊ देतील, एवढे ब्रिटिश हे मुळात स्वत: असंवेदनशील नाहीत, असे त्यांनी घोषित केले होते. त्यांच्यासाठी भारतातील वास्तूंचे जतन करणे हे सरकारचे आद्य कर्तव्य होते. यासाठी कर्झन यांनी उचललेले पहिले पाऊल म्हणजे पुरातत्त्व महासंचालकाची स्थापना केली, जो व्हाइसरॉयच्या धोरणांमध्ये समन्वय ठेवील आणि अशा वस्तूंच्या जतनासाठी प्रांतिक सरकारना निधी देईल.

१८८९ पर्यंत अस्तित्वात असलेले 'क्युरेटर ऑफ एन्शियन्ट मॉन्युमेंट्स' हे पद पुनरुज्जीवित करण्याची त्यांची इच्छा होती. नोव्हेंबर १९०१मध्ये 'सेक्रेटरी ऑफ टेस्ट' यांनी त्यांचा प्रस्ताव मान्य केला आणि पर्यायाने २२ फेब्रुवारी, १९०१ रोजी भारताच्या पुरातत्त्व संशोधन महासंचालकपदी (Director General as Archaeological Survey as India) सर जॉन मार्शल यांची नियुक्ती करण्यात आली. कर्झन यांनी अगदी आनंदाने स्थानिक सरकारांना आठ पटीने निधी मंजूर केला. मार्शल हे भारतीय कार्यालयातील सर्वोत्कृष्ट अधिकाऱ्यांपैकी एक होते.

त्यानंतर आग्रा, फतेहपूर सिक्री, लाहोर, दिल्ली, राजपुताना, कट्टक, विजयनगर, विजापूर, माऊंट अबू, ब्रह्मदेशामधील मंडाले आणि अनेक ठिकाणी पुरातत्त्व विभागाच्या कामाला सुरुवात झाली. या ठिकाणी झालेल्या कामाचा आवाका एवढा मोठा आहे की, त्यासाठी स्वतंत्र लेख लिहावा लागेल.

लॉर्ड कर्झन यांच्या व्हाइसरॉयपदाच्या कार्यकाळात मंजूर झालेल्या सर्व कायद्यांपैकी 'अॅन्शन्ट मॉन्युमेंट्स प्रिझर्वेशन अॅक्ट'ने त्यांना जे समाधान दिले, तसे इतर कोणत्याही कायद्याने दिले नाही. हा कायदा येण्यापूर्वी काही कायदे अस्तित्वात होते, उदा. रिलिजस एन्डॉवमेंट अॅक्ट (१८६३), द इंडियन ट्रेझर ट्रोव्ह अॅक्ट, १८७८ आणि १८९४ चा द लॅण्ड अॅक्विझिशन अॅक्ट, ज्यामुळे काही अंशी प्राचीन वस्तूंचे जतन झाले, परंतु ते अपुरे असल्याचे सिद्ध झाले. हा कायदा मंजूर व्हावा, यासाठी त्यांनी १९०४ साली वैयक्तिक पुढाकार घेतला. पुरातन वास्तूंबाबत लॉर्ड कर्झन यांना असलेल्या चिरकालीन प्रेमाचे प्रतिबिंब त्यांच्या या वक्तव्यात दिसून येते : 'सौंदर्याचा उपासक असलेला प्रवासी म्हणून मी या ठिकाणांना भेटी दिल्या, परंतु कर्तव्याच्या मंदिरातील पुजारी म्हणून त्यांचे जतन करण्याची आणि त्यांचे सौंदर्य पुन्हा प्राप्त करून देण्याची जबाबदारी मी स्वीकारली.' यातील अभिमान न्याय्य होता आणि त्यांनी त्यातून प्राप्त केलेले यश विखुरलेले असले तरी टिकून आहे. अनेक वर्षांनंतर जवाहरलाल नेहरूंनी म्हटले, ''भारतात जे काही सुंदर होते, ते पुन:स्थापित केल्याबद्दल कर्झनचे स्मरण केले जाईल.''

- संपादक मंडळ

**संदर्भ :**


१. *अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*

२. *साळगावकर, जयराज; कर्झनकाळ; मॅजेस्टिक पब्लिशिंग हाऊस.*


## कर्वे, इरावती दिनकर

**मानववंशशास्त्रज्ञ, पुरातत्त्वविद्या संशोधक, लेखिका**

**१५ डिसेंबर १९०५ – ११ ऑगस्ट १९७०**

*☛ मुख्य चरित्रनोंद – साहित्य खंड*



विसाव्या शतकातील एक प्रमुख मानवशास्त्रज्ञ व लेखिका म्हणून इरावती कर्वे मराठी माणसांना परिचित आहेत. आधुनिक महाराष्ट्रातील या अलौकिक विदुषीने मानवशास्त्राखेरीज पुरातत्त्व-विद्या आणि इतर सामाजिक शास्त्रांमध्ये भरीव संशोधनकार्य केले आहे.

इरावती कर्वे यांचा जन्म ब्रह्मदेशातल्या (आताच्या म्यानमार) मिंगयानमध्ये झाला. तिथल्या इरावदी नदीच्या

नावावरून त्यांचे नामकरण झाले. लहान वयातच त्या शिक्षणासाठी पुण्यात आल्या. फर्गसन महाविद्यालयात शिकत असताना विख्यात गणिती व तेव्हाचे प्राचार्य रँगलर परांजपे यांच्यामुळे त्या प्रभावित झाल्या. १९२६ मध्ये त्यांनी तत्त्वज्ञान विषयात पदवी संपादन केली. त्यांना मानाची समजली जाणारी मुंबई विद्यापीठाची 'दक्षिणा शिष्यवृत्ती' मिळाली. त्यांनी प्रा. घुर्ये यांच्या मार्गदर्शनाखाली पदव्युत्तर पदवी मिळवली. त्यांच्या प्रबंधाचे शीर्षक "The Chitpavan Brahmins - An Ethnic Study" असे होते. त्यानंतर इरावती कर्वे जर्मनीत गेल्या व तेथे त्यांनी सुप्रसिद्ध कैसर विल्हेम संस्थेमध्ये मानवशास्त्रात डॉक्टरेटची पदवी मिळवली. त्यांच्या प्रबंधाचा विषय "The Normal Asymmetry of Human Skull" असा होता व त्यांना त्या काळात गाजलेल्या सुप्रजननशास्त्र (Eugenics) या विषयाचे प्रा. युजेन फिशर यांचे मार्गदर्शन लाभले होते.

भारतात परतल्यावर काही वर्षे मुंबईच्या श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी विद्यापीठात कुलसचिव म्हणून काम पाहिल्यानंतर पुण्याला नव्याने पुन्हा सुरू झालेल्या डेक्कन महाविद्यालयामध्ये त्या इतिहास विषयाच्या प्रपाठक या पदावर रुजू झाल्या व अखेरपर्यंत त्या तिथेच राहिल्या. १९४९ मध्ये त्यांना प्राध्यापक पदावर बढती मिळाली. डेक्कन महाविद्यालयामध्ये इरावती कर्वे व ह.धी. सांकलिया यांनी मिळून पुरातत्त्वविद्येमधल्या आजच्या मानवशास्त्रीय संशोधनाचा पाया घातला व प्रारंभापासूनच हे संशोधन जागतिक पातळीच्या दर्जाचे व्हावे म्हणून प्रयत्न केले.

इरावती कर्वे यांना अनेक मानसन्मान मिळाले. त्यांनी १९४७ मध्ये दिल्ली येथे झालेल्या इंडियन सायन्स काँग्रेसमध्ये मानवशास्त्र विभागाचे अध्यक्षपद भूषवले. १९५५ मध्ये लंडन विद्यापीठात व १९५९-१९६० मध्ये बर्कलीच्या कॅलिफोर्निया विद्यापीठात विशेष व्याख्याने दिली. त्यांच्या 'युगान्त' या, 'महाभारत' या विषयावर आधारित पुस्तकाला १९६८ मध्ये साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळाला.

इरावती कर्वे व प्रा. सांकलिया या दोघांनी १९४९ मध्ये गुजरातमधील लांघणज या मध्याश्मयुगीन स्थळाचे उत्खनन केले. या ठिकाणी मानवी अवशेषही मिळाले असल्याने हे संशोधन महत्त्वाचे ठरले. त्यांच्या १९५३ मध्ये प्रसिद्ध झालेल्या ("Kinship Organization in India") या अतिशय गाजलेल्या पुस्तकात त्यांनी भारतीय समाजरचनेच्या संदर्भात अत्यंत गुंतागुंतीच्या प्रश्नांबद्दल स्पष्ट आणि नेमकी मांडणी केली. वांशिक व भाषिक गटांच्या दरम्यानचे फरक त्यांच्या बाह्य शरीररचनेच्या व आनुवंशिक संरचनेच्या आधारे अभ्यासता येतील का, हा त्यांच्या संशोधनाचा मूळ गाभा होता. त्याला अनुसरून इरावती कर्वे यांनी १९६१ मधल्या ("Hindu Society : An Interpretation") या पुस्तकात महाराष्ट्रातील समाजरचनेचे प्रारूप एका आकृतीत दिले आहे. इरावती कर्वे यांच्या वंश या संदर्भातल्या सर्व संकल्पना आज तरी मान्य होण्याजोग्या नसल्या, तरी त्या काळात केलेले संशोधन आजही मोलाचे आहे.

आज ज्ञानाचे स्वरूप विविधांगी झालेले आहे. मानवी जीवनाच्या अभ्यासासाठी पुरातत्त्व व मानसशास्त्र या सामाजिक शास्त्रांप्रमाणेच गणित, संख्याशास्त्र, जीवशास्त्र आणि भौतिकशास्त्रांच्या अनेक शाखा एकत्र येत आहेत. ही गरज इरावती कर्वे यांनी अर्धशतकापूर्वीच ओळखली होती. विसाव्या शतकातील एक तेजस्वी व्यक्तिमत्त्व असलेल्या इरावती कर्वे यांची प्रतिभा पुढील काळातील आव्हाने अगोदरच समजण्याएवढी विलक्षण होती. इतकेच नाही, तर आज समाजशास्त्रात मूलभूत बदल घडविणाऱ्या स्त्री-वाद व उत्तर-आधुनिकतावाद या संकल्पना त्यांच्या मानवशास्त्रावरील संशोधनपर आणि ललित लेखनात जाणवतात. प्राचीन भारतीय समाज जीवनाच्या अभ्यासासाठी इरावती कर्वे यांनी निवडलेला प्राचीन भारतीय साहित्याच्या विश्लेषणाचा मार्ग तेव्हा सर्वस्वी नवीन होता. कारण, कोणत्याही संस्कृतीचा अभ्यास तिचा इतिहास जाणून घेतल्याखेरीज करता येणार नाही व कोणत्याही समाजाची रचना परंपरा समजून

घेतल्या नाहीत तर कळणार नाही, ही त्यांची सैद्धान्तिक भूमिका अतिशय महत्त्वाची आहे.

मानवांमधील सांस्कृतिक-जैविक विविधतेचा अभ्यास करण्यासाठी संख्याशास्त्रातील 'मल्टि-व्हेरिएट' पद्धतींचा वापर करण्यात इरावती कर्वे अग्रणी होत्या. मानवांमधील जैविक विविधतेचा अभ्यास करताना कोणते एकक वापरावे याबद्दल अनेक मतप्रवाह आहेत. या संदर्भात इरावती कर्वे यांनी जातीची व सामजिक एककाची केलेली व्याख्या आजही समर्पक आहे. विविध जाती-भाषा समूहांच्या संख्याशास्त्रीय अभ्यासाचा इरावती कर्वे यांचा हेतू वंशावर आधारित वर्गीकरण करणे हा नसून जातींच्या उगमाची निरनिराळी गृहीतके तपासणे हा होता. म्हणूनच एक समाजशास्त्रज्ञ असूनही प्रसंगी सहकाऱ्यांची कडवट टीका स्वीकारून कर्वे यांनी समाजशास्त्रात जीवशास्त्रामधल्या आनुवंशिकतेच्या अभ्यासाचा आग्रह धरला होता.

'युगान्त' व इतर लेखनाच्या चिकित्सेतून आपल्याला दिसते, की वर्णव्यवस्था, जातीसंस्थेचा उगम आणि प्राचीन काळापासून भारतीय समाजात असलेले स्त्रीचे स्थान यांबद्दलचे इरावती कर्वे यांचे विचार मूलभूत पातळीवर इतरांच्यापेक्षा भिन्न होते. भारतीय समाजाची आजची रचना अशी का आहे, हा कर्वे यांच्या सर्व संशोधनाचा गाभा होता.

त्या स्वत:ला स्त्री-वादी म्हणत नव्हत्या; पण स्त्री-अभ्यास हे एक स्वतंत्र ज्ञानक्षेत्र म्हणून उदयास येण्याअगोदरच्या काळात कर्वे यांच्या संशोधनाचे निष्कर्ष काढण्याच्या पद्धतीत व त्यावर आधारित लेखनात स्त्री-वादी भूमिका आढळते.

इरावती कर्वे केवळ प्राचीन नव्हे, तर तत्कालीन सामाजिक प्रश्नांचाही विचार करत असत हे त्यांच्या लेखनातून जाणवते. कोयना धरणामुळे विस्थापित झालेल्यांवरील लेखात आपल्याला त्यांच्यामधल्या संशोधकाच्या सामाजिक संवेदनशीलतेचा हा पैलू दिसतो.

— डॉ. प्रमोद जोगळेकर

## कलबुर्गी, मल्लेशप्पा मडिवाळप्पा

***डॉ. एम.एम. कलबुर्गी***

**पुराभिलेखविद, ग्रंथ संपादक**

**२८ नोव्हेंबर १९३८ – ३० ऑगस्ट २०१५**



''विद्यार्थ्यांनी वेळेचा अपव्यय करू नये. एकदा गेलेली वेळ परत येत नाही, म्हणून आपल्या आवडीच्या विषयात निरंतर चिंतन मनन व संशोधन आणि लेखन करीत काळ सत्कारणी लावावा,'' हे उद्‌गार आहेत प्रख्यात संशोधक डॉ. एम.एम. कलबुर्गी यांचे.

महाराष्ट्रातील आतापर्यंत प्रसिद्ध झालेल्या कन्नड कोरीव लेखांचे सर्वांगीण परिचय करून देणारे म्हणून महाराष्ट्र त्यांना ओळखतो. डॉ. कलबुर्गी यांना कोरीव लेखांमध्ये खूप आसक्ती आहे. पूर्वप्रसिद्ध अशा सुमारे २५,००० कोरीव लेखांचे अभ्यास करणाऱ्या अपवादात्मक अभ्यासकांपैकी ते एक होत. अप्रकाशित ताम्र-शिलालेख वाचून प्रसिद्ध करणे, पूर्वप्रकाशित कोरीव लेखांचे पाठ परिष्करण करणे, त्यात आलेल्या कठीण शब्दांची अर्थनिश्चिती करणे, अपरिचित शब्दांचे अर्थ उलगडून दाखवणे आणि सखोल अभ्यास करून कर्नाटक-महाराष्ट्राच्या संस्कृतीवर नवा प्रकाश टाकणे, याचबरोबर स्थळनामनिश्चिती व स्थळनिश्चिती आदी बाबींवर भर देऊन त्यांनी इतिहासज्ञानात वाढ केली आहे.

डॉ. कलबुर्गी यांचे संशोधकीय व्यक्तिमत्त्व हे बहुमुखी आहे. कोरीव लेखांचा अभ्यास व संशोधन त्यांना प्रिय असले तरी ते हिमनगाचे एक टोक आहे, असे त्यांच्या एकंदर संशोधकीय कारकिर्दीकडे पाहिले असता दिसून येते. साहित्य, संस्कृती, लोकसाहित्य, इतिहास, कोरीव लेख-हस्तलिखित शास्त्र, ग्रंथ संपादन, वचन-वाङ्मय, छंद, व्याकरण इ. क्षेत्रांत त्यांनी अपार संशोधनकार्य करून ठेवले आहे. ज्याप्रमाणे थोर कवीस 'महाकवी'

म्हणतात, तद्वतच थोर संशोधकास 'समग्र संशोधक' म्हणतात. त्या दृष्टीने डॉ. कलबुर्गी हे समग्र संशोधक ठरतात.

डॉ. एम.एम. कलबुर्गी म्हणजेच मल्लेशप्पा मडिवाळप्पा कलबुर्गी यांचा जन्म त्यांच्या आजोळी, यरगल्ल, ता. सिंदगी, जि. विजापूर येथे झाला. त्यांचे मूळ गाव गुब्बेवाड, ता. सिंदगी, जि. विजापूर होय. मडिवाळप्पा व गंगम्मा हे त्यांचे जन्मदाते होते. त्यांचे प्राथमिक शिक्षण यरगल्ल येथे, तर माध्यमिक शिक्षण सिंदगी येथे झाले. त्यांनी इ.स. १९६०मध्ये विजय महाविद्यालय, विजापूर येथून बी.ए.ची पदवी घेतली. पुढे त्यांनी कर्नाटक विश्वविद्यालयातून इ.स. १९६२मध्ये त्यांचे पदव्युत्तर एम.ए. पूर्ण केले. कन्नड व कला विभागात प्रथम आल्याने त्यांना जय चामराज वडेयर पारितोषिक प्राप्त झाले. त्यांच्या शैक्षणिक जीवनावर डॉ. आर.सी. हिरेमठांचा दाट प्रभाव होता.

एम.ए. झाल्यावर धारवाड येथील कर्नाटक महाविद्यालयात ते अध्यापकाची सेवा करू लागले. दरम्यान त्यांनी कर्नाटक विश्वविद्यालयातून इ.स. १९६८मध्ये पीएच.डी. मिळवली. त्यांचा विषय होता, 'कविराजमार्ग परिसराचे कन्नड साहित्य'. पुढे हा प्रबंध कर्नाटक विश्वविद्यालयानेच प्रकाशित केला.

इ.स. १९६६ ते १९७१ दरम्यान कर्नाटक विश्वविद्यालयात कन्नड अध्ययनपीठात अध्यापक, इ.स. १९७१ ते १९८० दरम्यान प्रपाठक, इ.स. १९८०मध्ये बसवेश्वरपीठाचे प्रोफेसर, इ.स. १९८८मध्ये शिक्षणोत्तर कार्यासाठी पदत्याग, मार्च १९९८मध्ये कन्नड अध्ययनपीठाचे प्रोफेसर आणि त्याच वर्षी हंपी येथील कन्नड विश्वविद्यालयाचे कुलपती म्हणून नियुक्ती व तीन वर्षांनंतर सेवामुक्ती, असा एकंदर डॉ. कलबुर्गी यांचा अध्यापनाचा सेवाकाळ आहे.

सेवाकाळामध्येच त्यांनी अनेक संघ-संस्थांच्या व मठादींच्या कार्यांमध्येही सक्रिय भाग घेतला. एके काळी प्रसिद्ध असलेला धारवाडचा विद्यावर्धक संघ केवळ नामशेष झालेला असताना, त्यास पुन्हा उभारी देऊन त्यांनी त्याचे पुनरुज्जीवन केले व त्यास सक्रिय केले. प्रकाशने सुरू करण्यास चालनाही दिली.

मठ-मंदिरे केवळ मतीय प्रसारासाठीच असावेत असे धोरण कायम ठेवताना, त्यांचे सांस्कृतिक संस्थेत रूपांतर व्हावे म्हणून मठाधीशांची मने वळवून त्यांच्याकडून त्यांनी भरीव कामे करून घेतली. त्यानुसार बेळगाव येथील श्री नागनूर रुद्राक्षी मठाच्या आश्रयाने 'वीरशैव अध्ययन अकादमी'द्वारे मान्यताप्राप्त पीएच.डी. प्रबंध प्रकाशित करून आधुनिक साहित्याला विशेष देणगी दिली आहे. गदग येथील तोंटदार्य मठामार्फत वीरशैव अध्ययन संस्था अस्तित्वात आणून अनेक ग्रंथमालांची सुरुवात करून शेकडो ग्रंथ प्रसिद्ध करण्यास ते कारणीभूत ठरले. असे आणखीनही काही मठांमधील उपक्रम सांगता येतील.

हंपी येथील कन्नड विश्वविद्यालयाचे कुलपती असताना त्यांनी नव्याने अनेक विभाग उभे केले. त्यांपैकी विश्व कन्नड विभाग, द्रविड संस्कृती विभाग, महिला अध्ययन विभाग हे होत.

कोरीव लेखांवर जशी त्यांची प्रीती आहे, त्याचप्रमाणे हस्तलिखितांचा शोधसंग्रह व प्रकाशनकार्यातही त्यांची कामगिरी भरीव आहे. कर्नाटक विश्वविद्यालयातील कन्नड अध्ययनपीठातील कन्नड हस्तलिखितांचा संग्रह डॉ. कलबुर्गी यांच्यामुळे वृद्धिंगत झाला आहे. त्यांतील महत्त्वाच्या व निवडक ग्रंथांचे त्यांनी संपादन व प्रकाशन केले. समग्र हस्तलिखितांची सूचीही प्रसिद्ध केली. केवळ याच कामासाठी म्हणजे हस्तलिखितांच्या शोधासाठी ऑक्स्फर्ड, केंब्रिज व लंडन विश्वविद्यालयांना भेटी दिल्या.

बसवेश्वर पीठामध्ये डिप्लोमा इन बसव स्टडीज, वीरशैव ग्रंथालय, विशेषोपन्यासमाले, प्रचारोपन्यासमाले या चार विभागांत क्रमबद्धतेने ग्रंथ प्रकाशनांस चालना दिली.

डॉ. कलबुर्गी यांचा आवडीचा आणि अभ्यासाचा आणखी एक विषय म्हणजे लोकसाहित्य, जानपद साहित्य. कर्नाटक विश्वविद्यालयाच्या जानपद

संमेलनाच्या संस्थापकांपैकी ते एक होते. ‘जानपद साहित्य दर्शन’ या ग्रंथमालेचे ते संस्थापक होते. हंपी कन्नड विश्वविद्यालयामध्ये देशी संमेलनाची स्थापना करून त्यांनी जानपद वस्तुसंग्रहालयाची सुरुवात केली. कुलपतींच्या तीन वर्षांच्या कालावधीत डॉ. कलबुर्गी यांनी ३०० ग्रंथांच्या प्रकाशनांची पूर्वव्यवस्थाही करून ठेवली.

कोरीव लेखांच्या संशोधनाने आणि अभ्यासाने डॉ. कलबुर्गी यांनी काही महत्त्वपूर्ण बाबी उजेडात आणलेल्या आहेत. कुर्कियाळ (आंध्र प्रदेश) येथे सापडलेल्या कन्नड महाकवी पंप यांचा बंधू जीनवल्लभ यांच्या शिलालेखाचे पुनर्वाचन करून अर्थबदल सुचवला व तो विद्वानांत मान्य झाला. कोरीव लेखांच्या आधारे त्यांनी नागचंद्र यांनी निर्माण केलेल्या मल्लिनाथ बसदीचा शोध घेऊन त्याची स्थलनिश्चिती केली. ही बसदी म्हणजे विजापूर येथील करिमुद्दिन मशीद हे त्यांनी सिद्ध केले.

कोरीव लेखांमधून अपरिचित व व्यवहारातून लुप्त झालेले अनेक शब्द येतात. त्यांची अर्थनिश्चिती करून लेखाचा योग्य व शुद्ध अर्थ लावणे महाकठीण काम असते. कलबुर्गी यांनी अशा अनेक कठीण शब्दांचे योग्य अर्थ लावून कोरीव लेखांना बोलके केले आहे.

डॉ. कलबुर्गी यांची ग्रंथसंपदा विपुल आणि वैविध्यपूर्ण आहे. ‘मार्ग’ या शीर्षकाने त्यांचे संशोधनात्मक लेखांचे सहा खंड प्रकाशित झाले आहेत. त्यांनी संपादित केलेल्या ग्रंथांची संख्या सुमारे ४५ आहे : चार शास्त्रीय ग्रंथ, दोन लोकसाहित्य, एक कवितासंग्रह, एक नाटक, कर्नाटक सरकारच्या ‘समग्र वचन साहित्य’चे ते प्रमुख संपादक होते. त्याचे पंधरा खंड प्रसिद्ध झाले आहेत. त्यांच्या नावावर उणे-अधिक एकंदर सुमारे ७०-८० ग्रंथ आहेत.

डॉ. कलबुर्गी हे अनेक सन्मानांनी व गौरवांनी आणि पुरस्कारांनी नावाजले गेले आहेत. यू.जी.सी.कडून ते राष्ट्रीय प्राध्यापक म्हणनू सन्मानित झाले. त्यांनी बऱ्याच संस्थांचे व परिषदांचे अध्यक्षपद भूषवले. त्यांपैकी काही असे आहेत : ऑल इंडिया प्लेस नेम्स सोसायटी, तंजावर अधिवेशन (१९९७), अखिल भारत शरण साहित्य संमेलन, धर्मस्थळ साहित्य संमेलन, कर्नाटक इतिहास अकादमी इ.

डॉ. कलबुर्गी यांच्यावर पुरस्कारांचा व सन्मानांचा अगदी वर्षावच झाला आहे. त्यांच्या सहा पुस्तकांना राज्य साहित्य अकादमी पुरस्कार मिळाले आहेत. एकास विशेष सन्मान मिळाला आहे. राज्योत्सव प्रशस्ती, राज्यजानपद व यक्षगान अकादमी विशेष प्रशस्ती, पंप प्रशस्ती, विश्वमानव प्रशस्ती, वर्धमान प्रशस्ती, केंद्र साहित्य अकादमी प्रशस्ती, नृपतुंग प्रशस्ती इत्यादी अनेक सन्मान व प्रशस्ती पुरस्कार त्यांना मिळालेले आहेत.

‘संशोधन म्हणजे स्वल्पविराम-अर्धविरामाकडून पूर्णविरामाकडे प्रवास करणारे कार्य होय आणि क्रमही होय,’ असे ‘कन्नड संशोधनशास्त्र’ या ग्रंथाच्या प्रस्तावनेत डॉ. कलबुर्गी म्हणतात.

— आनंद नागप्पा कुंभार

## कवीश्वर, गजानन वासुदेव

**मराठी वाङ्मय संशोधक, लेखक व साहित्यतत्त्वविमर्शक**

**९ फेब्रुवारी १९१२ – मृत्युदिनांक अनुपलब्ध**

गजानन वासुदेव कवीश्वर यांचा जन्म मंडलेश्वर, जिल्हा खारगाव, मध्य प्रदेश येथे एका मध्यमवर्गीय कुटुंबात झाला. मंडलेश्वर व इंदूर येथे त्यांचे शिक्षण झाले. त्यांनी एम.ए. व एलएल.बी. या पदव्या संपादन केल्यानंतर इंदूरच्या होळकर महाविद्यालयात तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक म्हणून ते रुजू झाले आणि पुढे तेथूनच प्राचार्यपदावरून निवृत्ती स्वीकारली. त्यानंतर त्यांनी मुक्तलेखनास वाहून घेतले.

कवीश्वर हे नीतीचे पुरस्कर्ते, महाभारताचे संशोधक व श्रीमद्‌भगवद्गीतेचे विशेषज्ञ म्हणून प्रसिद्ध आहेत. ‘नीती आणि कलोपासना’ (१९३४) व ‘पावित्र्यविडंबनाचा वाद’ (१९४८) हे साहित्य विचारातील तात्त्विक विवेचन करणारे त्यांचे ग्रंथ महत्त्वपूर्ण मानले जातात. पहिल्या ग्रंथात कला व नीती यांचा परस्पर संबंध स्पष्ट करताना

नीतीवर येणाऱ्या सर्व आक्षेपांना समर्पक उत्तरे देत कलेचा नीतीशी असलेला निकटचा संबंध दाखवून त्यांनी कलावादी भूमिकेचे खंडन केले आहे. या ग्रंथास अनेक प्रतिष्ठित पुरस्कारही लाभले.

'पावित्र्यविडंबनाचा वाद' या त्यांच्या दुसऱ्या ग्रंथात अनिष्ट प्रभाव दाखवू लागलेल्या व साहित्य क्षेत्रातील पावित्र्याची हेटाळणी करू पाहणाऱ्या विडंबनकारांच्या प्रवृत्तीमुळे निर्माण झालेल्या वादाचा तात्त्विक परामर्श घेतला आहे. विषयाचे उत्तम आकलन, मुद्देसूद मांडणी, तर्कशुद्ध विवेचन व तात्त्विक भूमिकेचा आग्रह इत्यादी वैशिष्ट्यांमुळे वरील ग्रंथ दर्जेदार समीक्षाग्रंथ ठरले आहेत.

त्यांनी वैचारिक व ललित अशा दोन्ही प्रकारचे लेखन मराठीबरोबरच इंग्लिश व हिंदी या भाषांतून केले. त्यांचे अन्य लेखन असे - मराठी : 'वर्तमान काळ' (१९४४, पत्रात्मक सामाजिक कादंबरी), 'इंदूपासून हिंदू' (१९८९, व्युत्पत्तिशास्त्र), 'ज्ञानेश्वरी विरुद्ध गीता' (१९८०, वैचारिक), 'महाभारताची गूढ रहस्ये' (१९९०, वैचारिक); इंग्लिश : 'मेटाफिजिक्स ऑफ बर्क्ले' (१९३३), 'एथिक्स ऑफ गीता' (१९७१), 'क्रॉनोलॉजिकल सिक्रेट्स ऑफ महाभारत वॉर' (१९७१)- सर्व समीक्षात्मक; हिंदी; 'महाभारत के तेरह वर्ष' (१९७७, समीक्षा).

कवीश्वर यांना अनेक प्रतिष्ठित पुरस्कारांनी गौरवण्यात आलेले असून त्यात रावराजे साहित्य पुरस्कार (गोवा) व इचलकरंजी एज्युकेशनल ट्रस्टचा पुरस्कार आदींचा समावेश आहे.

- संपादित

## कवीश्वर, दत्तात्रेय धुंडिराज

***श्री दत्तमहाराज***

**संस्कृत पंडित**

**२ मार्च १९१० – मृत्युदिनांक अनुपलब्ध**

दत्तात्रेय धुंडिराज कवीश्वर यांचा जन्म कोल्हापुरातील नृसिंहवाडी येथे झाला. त्यांचे पिता धुंडिराज महाराज व आजोबा वक्रतुंड महाराज



प्रवचनकार म्हणून महाराष्ट्राला ज्ञात आहेत. लहानपणी दत्तमहाराजांना श्री वासुदेवानंद सरस्वती यांच्या चरणावर घालण्यात आले. तेव्हापासून श्री वासुदेवानंद सरस्वतींची कृपादृष्टी श्री दत्तमहाराजांवर होती. श्री दत्तमहाराजांचे बालपण नृसिंहवाडीत गेले. प्राथमिक शालेय शिक्षण तेथेच झाले. उपनयनानंतर त्यांच्या वेदाध्ययनास प्रारंभ झाला. त्यांनी नृसिंहवाडीतील जेरेस्वामींच्या संस्कृत पाठशाळेत काव्य, व्याकरण यांचे अध्ययन केले.

व्याकरणातील उरलेले अध्ययन सांगलीला पूर्ण केले. याच काळात श्री वासुदेवानंद सरस्वतींचे शिष्य श्री दीक्षित स्वामींनी अमरापूर येथे आपल्या गुरूंच्या पीठाची स्थापना केली. तिथे पहिला भागवत सप्ताह पूर्ण झाल्यावर श्री दीक्षित महाराजांनी शाल व संध्यापात्र देऊन त्यांचा सत्कार केला. तेव्हापासून - १९२५पासून १९६५पर्यंत असा भागवत सप्ताह अमरापूर येथे सतत चालू राहिला. त्यानंतर ते पुण्यातच श्री वासुदेव निवासात होते.

सांगली येथे व्याकरणशास्त्राचे अध्ययन पूर्ण झाल्यावर ते धारवाड येथे नागेशशास्त्री उप्पिनबेटिगेरी यांच्याकडे गेले. तेथे त्यांनी न्याय व वेदान्त या शास्त्रांचे अध्ययन केले. पुण्यात मीमांसा विद्यालयात पं. सुब्बाशास्त्री यांच्याकडे मीमांसाशास्त्राचे त्यांचे अध्ययन झाले. अध्ययन पूर्ण झाल्यावर १९३७ साली पुण्यातील शंकरमठात ते न्याय व वेदान्त यांचे अध्यापन करू लागले.

श्री दत्तमहाराज १९४८ साली टिळक महाराष्ट्र विद्यापीठात न्याय व वेदान्त विषयांचे अध्यापक म्हणून आले. तेथे असताना त्यांनी निम्बार्काचार्यांच्या ब्रह्मसूत्रावरील टीकेच्या-'वेदान्तपरिजातसौरभ'- संशोधनाचे काम केले. हा ग्रंथ १९६५मध्ये टिळक विद्यापीठाने प्रकाशित केला. भारतीय तत्त्वज्ञान,

भागवतधर्म, भक्तिमार्ग इत्यादींचे विवेचन करणारी विस्तृत, अभ्यासपूर्ण अशी प्रस्तावना त्यांनी या ग्रंथाला जोडली आहे आणि मराठी भाषेत अनुवाद केला आहे. माधवाचार्यांच्या सर्वदर्शनसंग्रहावर त्यांनी टीकाही लिहिली आहे. वासुदेवानंद सरस्वती हे श्रीदत्तमहाराजांचे परमगुरू. श्री वासुदेवानंद सरस्वतींनी संन्यस्त काळातील चोवीस चतुर्मासांमध्ये श्रीदत्तस्तुतिपर वाङ्मय रचले. ते सर्व श्री दीक्षित महाराजांनी अमरापूर येथे संग्रहित केले. श्री गुळवणी महाराज व श्री दत्तमहाराज या दोघांनी ते प्रकाशित करण्याचे काम पार पाडले. ते सर्व प्रकाशित होण्यासाठी ८-९ वर्षांचा काळ लागला. श्री दत्तमहाराजांनी संपादन, मुद्रितशोधन इत्यादी सर्व कामे केली आणि आपल्या सदगुरूंची ही वाङ्मयमूर्ती बारा खंडांमध्ये प्रकाशित केली.

दत्त संप्रदायातील अधिकारी पुरुष श्री गुळवणी महाराज यांनी आपल्या गुरूंच्या स्मृतीसाठी पुणे येथे श्री वासुदेव निवास स्थापन केला. त्यांच्या निर्वाणानंतर श्री दत्तमहाराज त्यांचे उत्तराधिकारी झाले. वासुदेवानंद सरस्वतींच्या रचना, भगवद्गीता, ज्ञानेश्वरी, उपनिषदे यातील एखादा विषय घेऊन त्यावर प्रवचने देण्याची सेवा त्यांनी चालवली.

कांची कामकोटी पीठाने त्यांना सुवर्णपदक देऊन गौरवले, तर द्वारकेच्या श्रीशंकराचार्य यांनी 'महामहोपाध्याय' ही पदवी देऊन त्यांचा सन्मान केला. पहिले राष्ट्रपती डॉ. राजेंद्रप्रसाद यांनी 'राष्ट्रीय संस्कृत पंडित' हे सन्मानपत्र व गौरवराशी देऊन सन्मानित केले आहे. श्री दत्तमहाराजांच्या एक्क्याऐंशीव्या जन्मदिनी सहस्रचंद्रदर्शन शांती करून त्यांना 'प्रसन्नपारिजात' हा विद्वज्जनांनी लिहिलेला ग्रंथ अर्पण करण्यात आला. त्यांचे कार्य व चरित्र याबद्दलचे मराठी ग्रंथ प्रकाशित झाले आहेत.

— संपादित

**संदर्भ :**


*१. मराठी विश्वचरित्र कोश; संपादक - कामत, श्रीराम पांडुरंग; विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा.*


## कस्तुरे, यज्ञेश्वर माधव

***यज्ञेश्वरशास्त्री कस्तुरे***

**वेदान्ततीर्थ, संपादक, संस्कृत आचार्य, लेखक**

**१९०८ – २४ ऑगस्ट २००६**



यज्ञेश्वर माधव कस्तुरे यांचा जन्म कळमनुरी (जि. हंगोली) येथे झाला. मागील सात पिढ्यांपासून अहिताग्नी वैदिक घराणे म्हणून प्रसिद्ध असलेल्या कस्तुरे घराण्यात त्यांचा जन्म झाला. त्यांच्या आईचे नाव मंदाकिनी होते. माधवशास्त्र्यांनी नंतर संन्यासाश्रम स्वीकारला. राजेश्वर, देवीदास, श्रीधर, प्रयाग, भगिनी ही त्यांची भावंडे होती. त्यांचे मातृछत्र लहानपणीच अंतरले, त्यामुळे काकू व मावश्यांनी त्यांचा सांभाळ केला.

शालेय शिक्षण त्या काळानुरूप सहावीपर्यंत झाले. घरी वैदिक घराण्याचे संस्कार असल्यामुळे संस्कृत विद्येसह प्राथमिक वेदशिक्षण घरीच झाले. मुळातच त्यांची ओढ संस्कृत विद्येतील शास्त्रीय ग्रंथांकडे असल्यामुळे वडिलांनी त्यांना शास्त्र शिकण्यासाठी नाशिक येथे डॉ. कूर्तकोटी शंकराचार्य यांच्याकडे पाठविले. मठात सहाध्यायी चांगले मिळाले; पण भोजनव्यवस्था नीट नव्हती. कधीकधी तर फुटाणे खाऊन राहावे लागे. पण त्यांनी चिकाटी सोडली नाही. त्याच काळात त्यांच्या 'आधुनिक काळात हिंदू संस्कृतीचे रक्षण कसे करावे' या विषयावर निबंध स्पर्धेत लिहिलेल्या निबंधाला प्रथम पारितोषिक मिळाले.

तेथून नंतर गुरुजी पुढील शिक्षणासाठी पुण्याला बापटशास्त्र्यांच्या 'आचार्य' कुलात दाखल झाले. तेथे दत्तमहाराज कवीश्वर, आचार्य द.वा. जोग यांसारखे सहाध्यायी त्यांना लाभले. ते आठ वर्षे आचार्य कुलात शिकले. त्याचबरोबर, पुणे येथील पंडित वाडीकरशास्त्री, पंडित निरगुडकरशास्त्री यांच्याकडेही त्यांनी न्याय, मीमांसादी शास्त्रांचे अध्ययन केले. त्या काळात आचार्य

कुलाच्या मासिकाचे संपादनही ते करीत. त्या वेळी त्यांनी लिहिलेला 'चातुर्वर्ण्य व भगवद्गीता' हा शोधनिबंध फार गाजला. त्यानंतर त्यांनी इंदूरला प्रयाण केले. तेथे वे.शा.सं. श्रीपादशास्त्री हसूरकर यांच्याकडे सर्व शास्त्रांसह विशेषत: वेदान्ताचे शिक्षण घेतले. त्या वेळी 'वेदान्ततीर्थ' परीक्षेत मुद्रणदोषामुळे विचारलेला प्रश्नच कसा चूक आहे तो कसा असावयास पाहिजे हे प्रथम सांगून त्याचे सविस्तर उत्तर लिहिले आणि श्रीपादशास्त्र्यांची शाबासकी मिळवली. अशा थोर विद्यागुरूकडून त्यांनी ज्ञान संपादन केले. त्यातून त्यांचे शिक्षण सकस, मूलग्राही व परिपक्व झाले. पुढे आचार्य ग.धों. देशपांडे यांच्याकडून त्यांनी आवश्यक तेवढे इंग्रजीचे ज्ञानही प्राप्त केले.

परिपूर्ण शिक्षणानंतर कस्तुरे यांनी नागपूर येथील 'धर्मवीर' या साप्ताहिकाचे संपादक म्हणूनही काम केले. तिथे हैद्राबाद मुक्ती संग्रामाचे प्रवर्तक सेनानी स्वामी रामानंद तीर्थ यांची भेट झाली व कस्तुरे यांच्या शिक्षणाचा मराठवाड्यासाठी उपयोग झाला पाहिजे म्हणून त्यांनी हिप्परगा येथील संस्थेत बोलावले. गुरुजींनी तेथे एक वर्ष शिकविले. नंतर काही वर्षे विदर्भातील श्रीक्षेत्र लोणी (सखाराम महाराज) येथील पाठशाळेत अध्यापन केले. पण तेथेही ते अधिक काळ रमले नाहीत. तेथून त्यांना मराठवाड्याचे मुख्य स्थान नांदेड या शहरी येण्याचा योग आला. १९३७ मध्ये संस्कृतप्रेमी जनांच्या साहाय्याने त्यांनी तिथे संस्कृत पाठशाळेची स्थापना केली. तेव्हापासून हीच त्यांची खरी कर्मभूमी ठरली. तेथे त्यांनी वयाच्या ५८ वर्षांपर्यंत अत्यंत अल्प मानधनात अध्यापनाचे कार्य केले. विद्यार्थ्यांच्या अध्यापनाकडे विशेष लक्ष देऊन मोफत गुरुकुल पद्धतीने विद्यार्थ्यांना ज्ञान दिले.

रझाकारांच्या विरोधाच्या काळात अत्यंत प्रतिकूल परिस्थितीतसुद्धा अत्यंत कष्टाने वीस विद्यार्थ्यांना बरोबर घेऊन ते बसार, जिंतूर, कार्ला, पुसद, धुळे इत्यादी ठिकाणी फिरत राहिले; पण पाठशाळा बंद पडू दिली नाही. हैद्राबाद मुक्तिसंग्रामानंतर पुन्हा पाठशाळा नांदेडला आली व पूर्ववत कार्य सुरू झाले. संस्थेचा उत्कर्षकाळ सुरू झाला. पाठशाळेचे महाविद्यालय झाले. मराठवाडा संस्कृत परिषदेची निर्मिती झाली. बालकांसाठी संस्कृत प्रचारासाठी सुलभ परीक्षावर्ग चालविले. संस्कृत भाषेची रुची निर्माण केली व वाढविली. बहि:शाल व्याख्यानमालेत व्याख्याने दिली. अंशकालीन प्राध्यापक म्हणून पीपल्स महाविद्यालय, नांदेड, आयुर्वेदिक महाविद्यालय, नांदेड येथे काही वर्षे अध्यापक म्हणून कार्य केले.

चिंतामणी महाराज वसमतकर, शंकर महाराज कंधारकर, हरी महाराज मुखेडकर, एकनाथ महाराज खडकेकर, अनंत महाराज टाकळीकर, डॉ. सीताराम जोशी, प्रभाकर जोशी, वसंत महाराज दीक्षित मिरखेलकर, नागनाथशास्त्री कोटगीरकर इ. संस्कृत शास्त्री-पंडितांच्या परंपरा कस्तुरे यांनी निर्माण केल्या.

ते अनेक जिज्ञासू व्यक्ती, प्राध्यापक, प्राचार्यांपर्यंत सर्वांना उत्तम मार्गदर्शन करून त्यांच्या शंकांचे निरसन करीत. विशेषत्वाने सांगायचे म्हणजे प्राचार्य डॉ. सुरेंद्र बारलिंगे, प्राचार्य नरहर कुरुंदकर, प्रा. राम शेवाळकर इ. विद्वान मंडळी गुरुजींच्या ज्ञानाचा आदर करीत. 'भामतीप्रकाश' या ग्रंथात त्यांनी अवघडातील अवघड विषय उदाहरणांनी अत्यंत सुलभ करून सांगितला आहे. शैक्षणिक विषयात 'वेदान्त उपाध्याय', 'वेदान्त रत्न', 'वेदान्ततीर्थ' या पदवी परीक्षेत ते सर्वप्रथम आले, तर अध्यापनकार्यात सांस्कृतिक व पारमार्थिक कार्यात त्यांना विविध उच्च पदव्यांनी, पुरस्कारांनी सन्मानित करण्यात आले.

महामहोपाध्याय, विद्यानिधी, महर्षि वेदव्यास पुरस्कार, आळंदी ब्रह्मवृंद पुरस्कार, श्रीमंत नानासाहेब पेशवे पुरस्कार, श्रीमद् जगद्गुरू आद्य शंकराचार्य पुरस्कार, संस्कृत पंडित पुरस्कार (महाराष्ट्र शासन), राज्य साहित्य गौरववृत्ती पुरस्कार (म.रा.सा.सं.मं.), जिजामाता विद्वत् गौरव पुरस्कार, भगवान बार्शी येथील जीवनव्रती पुरस्कार, अद्वैत वेदान्त पुरस्कार अशा अनेक पुरस्कारांचे ते मानकरी ठरले.

कस्तुरे यांचे ग्रंथलिखाणही विपुल आहे. त्यात प्रामुख्याने 'चातुर्वर्ण्य व भगवद्‌गीता', 'जगद्‌गुरु शंकराचार्याणाम् विद्यां च अविद्यां च', 'भरतमुनींचा रसविचार आणि प्राचीन दर्शनकार', 'प्रवृत्ती धर्म, निवृत्ती धर्म', 'भामती प्रकाश' खंड १ व २ यांचा उल्लेख करावा लागेल. याशिवाय इतरत्र प्रकाशित झालेले लेख- 'आचार्यांचे भक्तितत्त्व', 'पौर्वात्य तत्त्वज्ञान आणि कुरुंदकर', संस्कृत आत्मकल्याण, जनकल्याण करणारी भाषा, चातुर्वर्ण्य आणि जातिसंस्था यांचे स्वरूप, भगवद्‌गीता की गुरुगीता, भारतीय संस्कृती, कीर्तन - एकपात्री प्रयोगाची जन्मोत्री इ. अनेक विषयांवर लेख प्रकाशित आहेत. आकाशवाणीवरूनही त्यांची बहुमोल व्याख्याने झाली.

गुरुवर्यांचा विवाह बुलडाणा येथील वैदिक घराण्यातील वे.शा.सं. केशवगुरू धर्माधिकारी यांच्या सुशील, सुंदर मथुरा नावाच्या कन्येबरोबर इ.स. १९३५ मध्ये झाला. त्यांना तीन मुले व दोन मुली झाल्या.

५८ वर्षे पूर्ण होताच सर्व कार्यातून निवृत्त होऊन घरदार, पुत्र, संसार यांचा मोह न धरता उभयतांनी निर्णय घेतला आणि कोणालाही न सांगता 'आत्मार्थं पृथिवीं त्यजेत्' या न्यायाने आत्मचिंतनासाठी सावरगाव येथील वा.कि. कुलकर्णी यांच्या शेतात एका पर्णकुटीत त्यांचे ऋषितुल्य जीवन सुरू झाले (१९६६). हे ठिकाण आष्टी, ता. परतूर, जि. जालनापासून १३ कि.मी. व सावरगावापासून २ कि.मी दूर निर्जन प्रदेशात होते. साप, विंचू यांचे वसतिस्थान. पण नियतीच्या मनात त्यांचे राहिलेले वेदोद्धाराचे कार्य पूर्ण करून घ्यायचे होते.

'जीवेत् शरद: शतम्' या शास्त्रवचनानुसार ते ९८ वर्षे जगले. या दीर्घायूचा सदुपयोग त्यांनी संस्कृत विद्येचे व वेदसेवेचे पर्वतप्राय: विशाल कार्य करण्यात केला. स्वत: नि:स्पृह, त्यागी, ज्ञानसंपदा व सदाचारसंपन्न राहून केवळ परार्थ देह झिजवला. त्यांचे निधन भाद्रपद शुद्ध प्रतिपदेला झाले.

— डॉ. धुंडिराज कहाळेकर

## कहाळेकर, भालचंद्र महाराज

**व्यासंगी अध्यापक, कुशल संघटक, प्रभावी भाषोपासक**

**४ एप्रिल १९१७ – २८ मे १९७५**



इ.स. १९३८ ते १९४८ हा कालखंड मराठवाड्याच्या दृष्टीने नवजागरणाचा कालखंड होय. साहित्याच्या क्षेत्रातील ह्या पिढीचे अग्रणी म्हणून भालचंद्र महाराज कहाळेकर यांचे नाव नमूद करावे लागेल. मराठवाड्याच्या (हैद्राबाद धरून) वाङ्मयीन जीवनात त्यांनी एक प्रकारची सुसूत्रता आणली. सर्जनशील साहित्यिक अन् रसिक वाचक यांचा संपर्क घडवून आणला. मराठी मंडळासारख्या संस्था स्थापन करण्यात पुढाकार घेतला. आधुनिक कवितेचे आणि कथेचे मराठवाड्यातील अग्रदूत कविवर्य वा.रा. कांत अन् बी. रघुनाथ यांना आपल्या कोशातून बाहेर काढून, या वाङ्मयीन वातावरणात ओढले. मराठवाड्याचे सांस्कृतिक केंद्र असलेल्या हैद्राबादेत कार्यकर्त्यांचा एक उत्तम संच कहाळेकरांनी निर्माण केला. साहित्य परिषदेचा झपाट्याने कायाकल्प घडवून आणण्यात कहाळेकरांची योजकता, क्रांतदर्शित्व, कर्तृत्वशक्ती अन् निष्ठा कारणीभूत ठरली आहे.

कविश्रेष्ठ वा.रा. कांत यांच्या मते, प्रा. भालचंद्र महाराज कहाळेकर यांच्या विद्वत्तेने आणि प्रेरणेने प्रभावित झालेली एक पिढी हैद्राबादसह मराठवाड्यात निर्माण झाली आहे. त्यांच्यासारख्या सुसंस्कृत, बुद्धिमान अन् वाङ्मयप्रेमाने तळमळणाऱ्या नि:स्वार्थी माणसाची प्रतिमा त्यांच्या सहवासात आलेल्या सर्वांच्या अंत:करणात रुजली आहे यात संशय नाही.

भालचंद्र शंकर महाराज कहाळेकर यांचा जन्म मराठवाड्यात प्रसिद्ध असलेल्या, वैदिक परंपरेच्या कहाळेकर-जोशी-महाराज घराण्यात मु. परतूर, जि. परभणी, सध्याच्या जालना जिल्हा येथे मामाच्या गावी झाला. त्यांच्या आईचे नाव पार्वतीबाई. वडील

वेदशास्त्रसंपन्न शंकर शंभुनाथ महाराज कहाळेकर हे दशग्रंथी, घनपाठी, अग्निहोत्री, प्रख्यात आयुर्वेदीय वैद्य व संस्कृत पाठशाळा संस्थापक-संचालक होते.

कहाळेकर यांचे पणजोबा वेदशास्त्रसंपन्न गुंडभट नाना महाराज कहाळेकर (ब्र.भू. सच्चिदानंद नंदतीर्थ स्वामी महाराज) यांनी संन्यासोत्तर समाधी घेतली. पणजोबांची समाधी व कहाळेकर घराण्याचे कुलदैवत असलेल्या मल्हारीम्हाळसाकांतांचे मंदिर मु. कहाळा (जि. नांदेड) येथे गोदावरीच्या तीरावर आहे. या देवस्थानाचे वारसदार अन् वंशज म्हणून 'महाराज' ही उपाधी कहाळेकर घराण्याला लाभली आहे.

वडील शंकर महाराज यांच्याबरोबर लहानपणीच काशीयात्रा अन् तिथेच व्रतबंध, तसेच घरी नित्यपूजाविधी, बाणपूजा, सूर्यनमस्कार, दंडबैठकादि व्यायाम, संस्कृत अमरकोषादी अभ्यास, धर्मशास्त्र, सर्वसूक्ते ही त्यांच्या वडिलांची शिस्त कहाळेकरांना लाभली. त्या योगे बलदंड शरीरयष्टी, निर्भयवृत्ती, निर्व्यसनीपणा, लोकसंग्रह हा वडिलांचा वारसा त्यांच्या अंगी बाणला.

कहाळेकरांचे प्राथमिक शिक्षण परभणी येथे, तर विद्यालयापर्यंतचे शिक्षण औरंगाबादला झाले. पुढील शिक्षणासाठी ते हैद्राबादला आले. तिथे ते १९४४ मध्ये एम.ए., एल.एल.बी. झाले. इ.स. १९४७ मध्ये परभणी येथील नूतन विद्यामंदिर विद्यालयामध्ये मुख्याध्यापकपद स्वीकारून ती संस्था ऊर्जितावस्थेत आणली. ३/४ वर्षे शाळेची व्यवस्था पाहून कहाळेकर हैद्राबादला परत आले. एम.ए.ची पदवी दुसऱ्या वर्गात संपादन केल्यानंतर ते कायद्याच्या अभ्यासाकडे वळले. येथेही त्यांनी आपली चमक दाखविली. काही दिवस त्यांनी वकिली केली. परंतु, त्यांचा पिंड अध्यापन करण्याचा असल्याने ते पुन्हा अध्यापन क्षेत्राकडे वळले. मा. र.म. भुसारी यांच्या प्रयत्नांमुळे चादरघाट महाविद्यालयामध्ये मराठीचे प्राध्यापक व त्यानंतर अखेरपर्यंत उस्मानिया महाविद्यालयात मराठी विभाग प्रमुख म्हणून कहाळेकर अध्यापन क्षेत्रात कार्यरत राहिले. अध्यापनातील व्यासंगामुळे अन् वैचारिक अधिष्ठानामुळे, विद्यार्थ्यांची एक नवी अभ्यासू, चौकस पिढीच तयार झाली. प्रा. नरहर कुरुंदकर, प्रा. द.पं. जोशी, प्रा. डॉ. उषाताई जोशी, प्रा. तु.शं. कुलकर्णी, प्रा. मधू जामकर इ. शिष्यवत मांदियाळी गुरुवर्य कहाळेकरांचे अध्यापनातील वैचारिक ऋण मानणारी आहे.

प्राचार्य नरहर कुरुंदकर हे महाराष्ट्रातील ख्यातनाम व्यासंगी विचारवंत. जिज्ञासू दृष्टीने त्यांनी ज्ञानाची, साहित्याची परिक्रमा आरंभिली. या साधनेमागे गुरुवर्य प्रा. भालचंद्र महाराज कहाळेकर यांचे मार्गदर्शन सातत्याने लाभल्याविषयी ऋण व्यक्त करताना प्रा. कुरुंदकर म्हणतात, ''शालेय किंवा महाविद्यालयीन जीवनात मी त्यांचा विद्यार्थी कधीच नव्हतो. १९४९ ते आजतागायत त्यांच्याशी केल्या गेलेल्या कठोर अन् प्रदीर्घ वादविवादातून माझी मते क्रमाने स्पष्ट होत गेली. त्यांच्या 'निर्दय' टीकेतूनच दगडाला कंगोरे आले आहेत व म्हणूनच त्यांचे शिष्यत्व हे वैचारिक आहे. कहाळेकर महाराजांचा किती विषयांचा अन् किती व्यासंग होता याचा अंदाज मला शेवटपर्यंत घेता आला नाही. वाङ्मयसमीक्षा, भाषाशास्त्र, व्याकरण, इतिहास, राजकारण अन् समाजकारण ह्या विषयांतील व्यासंगी अन् प्रखर विवेचक माझ्या पाहण्यात नाही.''

आपल्या आयुष्यात कहाळेकरांनी थोडेफार जुजबी, पण मौलिक लेखन केले. मराठवाड्यातील वाङ्मयीन क्षेत्र त्यांनी नव्या जाणिवांनी, स्वाभिमानाने समृद्ध करण्याचे केलेले कार्य कमी महत्त्वाचे असू शकत नाही. स्वत:च्या प्रकाशात स्वत:च उजळून निघण्यापेक्षा इतरांना प्रकाशित करून आपली ओजस्वी परंपरा निर्माण करणे हे कहाळेकरांचे ध्येय होते अन् ते त्यांनी प्रभावीपणे साध्यही केले.

ज्ञानतपस्वी गुरुवर्य ना.गो. नांदापूरकर, न.शे. पोहनेरकर, कविवर्य वा.रा. कांत, वि.पा. देऊळगावकर, प्रा. भगवंतराव देशमुख, बी. रघुनाथ, राम पिंगळीकर, अनंत भालेराव, बा.गं. हरसूलकर, यशवंत कानिटकर, डॉ. सुरेंद्र बारलिंगे, डॉ. यु.म. पठाण, प्रा. ए.वि. जोशी,

रा.ब. माढेकर, तसेच महाराष्ट्रातील नामवंत साहित्यिकांनी प्रा. भालचंद्र महाराज कहाळेकर यांच्या व्यासंग, भाषानिष्ठा, अध्ययन, अध्यापन यांविषयी आपल्या लिखाण, भाषण अन् विचारांतून प्रशंसोद्गार काढले आहेत. म. गांधींच्या विचारांचा व तत्त्वज्ञानाचा त्यांच्यावर खूपच प्रभाव होता. कहाळेकर स्वत: चरख्यावर सूत कातत. आयुष्याच्या अखेरपर्यंत त्यांनी खादीचाच वापर केला. संपूर्ण खादीचा वेष, गौरवर्ण, कमी उंची, बलदंड शरीर, चेहऱ्यावरील व्यासंगी वृत्तीचे तेज असे त्यांचे रूप होते.

कहाळेकरांचे प्रभावी, ओजस्वी वक्तृत्व श्रोत्यांना केवळ भारावून टाकणारे नव्हते, तर अंतर्मुख करणारेही होते. ओघवती भाषा, कठोर विश्लेषण अन् परखड विचारसरणी या योगे त्यांनी अनेक सभा जिंकल्या. तसेच, आभारप्रदर्शनासारख्या किरकोळ समजल्या जाणाऱ्या भाषणांनी त्यांनी फड जिंकले आहेत. कहाळेकर हे सव्यसाची, व्यासंगी वक्ते होते. उपहास, उपरोध ही शस्त्रेही कुशलतेने आपल्या भाषणांतून वापरीत. विशेषत:, एखाद्या विरोधी विषयाच्या समर्थनार्थ ते उभे राहिले म्हणजे मग त्यांच्या वाणीला धार चढत असे.

मराठी साहित्य संमेलनात, परिषदेच्या कार्यात, संस्थेची घटना तयार करण्याच्या कामात कहाळेकरांनी अविश्रांत श्रम घेतले. कोणतीही बाब योजनाबद्ध असावी, त्यास संघटनेचे साहाय्य असावे याविषयी त्यांचा कटाक्ष असे. सबंध यंत्रणा तयार करण्यापासूनच थेट कुठले विषय ठरावाच्या रूपात चर्चेसाठी घ्यावेत याबद्दल त्यांची स्पष्ट अशी भूमिका असे. प्रा. भालचंद्र महाराज यांच्या ह्या योगदानाबद्दल नितान्त आदर बाळगून त्यांना १९६७ मध्ये जालना येथे संपन्न झालेल्या मराठवाडा साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद देऊन कृतज्ञता व्यक्त केली गेली. संमेलनातील त्यांचे भाषणही अत्यंत प्रभावी अन् मार्गदर्शक ठरले.

सार्वजनिक जीवनात कहाळेकर तर्ककठोर आग्रही वाटत. हाती घेतलेल्या संस्थांचे कार्य ते निष्ठापूर्वक, नि:स्वार्थीपणे, सचोटीने हाताळीत. मराठवाडा साहित्य परिषद ह्या साहित्यिक संस्थेत ते इतके विरघळून गेले होते, की ते स्वत:च एक सांस्कृतिक संस्था बनून गेले. म.सा.प.च्या प्रारंभकाळापासून ते संस्थेचे प्रमुख आधार होते. संस्थेची घटना तयार करणे, संस्थेचे केंद्रीय कार्यालय हैद्राबाद येथे ठेवून ते कार्यक्षम ठेवणे, वाङ्मयीन अभिरुची संपन्न करण्यासाठी अनेक कार्यक्रम आखणे, संशोधनपर ग्रंथांचे अन् साहित्याचे प्रकाशन करणे, नवीन प्रकाशन योजना राबविणे, प्रतिष्ठान, 'पंचधारा' मासिकाची मुहूर्तमेढ रोवून ते नावारूपास आणणे, संस्थेसाठी वास्तू उभारणे इ. अनेकविध कार्यांत कहाळेकर यांच्या योजकतेला, विचारांना, संयोजन कौशल्याला अन् निरलस परिश्रमांना फार मोलाचे स्थान आहे.

मराठवाडा साहित्य परिषद पुढे औरंगाबादला गेल्यानंतरही कहाळेकरांनी हैद्राबाद येथील आंध्र-मराठी साहित्य परिषदेचे कार्य तितक्याच जोमाने चालू ठेवले. प्रा. कहाळेकरांचा आणखी एक विशेष होता, तो म्हणजे मराठी निष्ठा अन् भारतीय निष्ठा यांतील अद्वैत मराठीची अन् मराठी संस्कृतीची उपासना, ही व्यापक भारतीय निष्ठेची साक्ष आहे. या परिक्रमेत कहाळेकर पूर्णतया तादात्म्य पावले. 'पंचधारा'च्या प्रत्येक अंकावर त्यांचा ठसा आहे. तेलुगू, तामीळ वाङ्मयाचे इतिहास, महाराष्ट्राचा धार्मिक इतिहास, याशिवाय प्राचीन ग्रंथांचे संशोधन-प्रकाशन, तेलुगू-मराठी कोष, साहित्यिकांचे विशेषांक इ. उपक्रमांमागे आधार राहिला तो कहाळेकरांच्या सक्रिय प्रेरणेचा. त्यांच्या आंध्रप्रदेशात मराठी भाषा, वाङ्मय अन् संस्कृती जतन करण्यात कहाळेकरांचा सिंहाचा वाटा आहे. त्यांच्या स्मृत्यर्थ आंध्र मराठी साहित्य परिषद, औरंगाबाद अन् परभणी येथे ग्रंथालये स्थापण्यात आली आहेत.

कौटुंबिक स्वास्थ्य कहाळेकरांना क्वचितच लाभले. १९३९ ते १९४७ ह्या वैवाहिक जीवनानंतर पत्नी सौ. गंगाबाई यांचे (दोन कन्या मागे ठेवून) दु:खद निधन झाले. त्यानंतर कहाळेकरांनी दुसऱ्या लग्नाचा विचारही

केला नाही. त्यांच्या आयुष्यातील विरक्तभाव अन् एकटेपणा अधिकच वाढला. अखेरच्या श्वासापर्यंत वाङ्मयीन क्षेत्र, साहित्यिक संस्थांची जडणघडण, अन् मराठी भाषेचा विकास हाच त्यांचा ध्यास अन् जीवनाधार बनला.

— डॉ. धुंडिराज कहाळेकर

## काजळे, मुकुंद डी.

**संशोधक, अध्यापक**

**२४ मे १९५०**



प्रा. मुकुंद काजळे यांचे शिक्षण पुणे येथे झाले. त्यांनी १९७२मध्ये वनस्पतिविज्ञान विषयात एम.एस्सी. पदवी संपादन केली व त्यानंतर १९७९मध्ये डेक्कन कॉलेजातून प्रा. शरद राजगुरू यांच्या मार्गदर्शनाखाली पीएच.डी. प्राप्त केली. त्यांच्या प्रबंधाचा विषय 'घोड नदीचा जैवपुरातत्त्वीय अभ्यास' असा होता.

प्रा. काजळे यांनी डेक्कन कॉलेजमध्ये पुरातत्त्व विभागात संशोधनाचे व अध्यापनाचे कार्य दीर्घ काळ केले. त्यांनी नेवासा, दायमाबाद, इनामगाव, वाळकी, कवठे, आपेगाव व तुळजापूर गढी या ताम्रपाषाणयुगीन पुरातत्त्वीय स्थळांच्या उत्खननात मिळालेल्या वनस्पतींच्या अवशेषांचा अभ्यास केला. तसेच त्यांनी नैकुंड, भागीमोहरी व अडम अशा अनेक महापाषाणयुगीन-ऐतिहासिक पुरातत्त्वीय स्थळांवर प्राप्त वनस्पती-अवशेषांवर संशोधन करून प्राचीन महाराष्ट्रातील शेतीच्या विकासावर प्रकाश टाकण्याचे महत्त्वाचे कार्य केले.

पुण्यातील डेक्कन कॉलेजात पुरातत्त्व विभागात वेगवेगळ्या विषयांच्या संशोधन प्रयोगशाळांमधील पुरातत्त्वीय वनस्पतिविज्ञान (Archaeobotany) या विषयाची प्रयोगशाळा निर्माण करण्याचे श्रेय प्रा. काजळे यांना दिले जाते. पुरातत्त्व विभागप्रमुख या पदावरून प्रा. काजळे २०१०मध्ये सेवानिवृत्त झाले. तथापि सेवानिवृत्तीनंतरही पुरावनस्पतिविज्ञान, पुरापरागविज्ञान व पुरापर्यावरण या विषयांमध्ये त्यांचे संशोधन सातत्याने सुरू आहे.

— डॉ. प्रमोद जोगळेकर

## काणे, पांडुरंग वामन

**प्राच्यविद्या संशोधक, धर्मशास्त्र अभ्यासक**

**७ मे १८८० — ८ मे १९७२**



महामहोपाध्याय पांडुरंग वामन काणे यांचे शालेय शिक्षण दापोली येथे, तर उच्च शिक्षण विल्सन महाविद्यालय येथे झाले. त्यांनी १९०३ मध्ये एम.ए., १९०८ मध्ये एल.एल.बी. आणि १९१२ मध्ये एल.एल.एम. या उपाधी प्राप्त केल्या. त्यानंतर १९०४ ते १९११ ही वर्षे त्यांनी सरकारी शाळेत शिक्षक म्हणून काम केले. याच काळात त्यांनी संस्कृत ग्रंथ अभ्यासण्यास प्रारंभ केला.

पुढे सरकारी नोकरी सोडून त्यांनी काही काळ उच्च न्यायालयात वकिली, तसेच सरकारी कायदा महाविद्यालयामध्ये प्राध्यापक म्हणून काम केले. १९१३ मध्ये 'विल्सन फिलोलॉजिकल व्याख्याने' देण्याचा मान त्यांना मिळाला. काण्यांनी १९१५ ते १९१७ या काळात 'स्प्रिंजर रिसर्च स्कॉलर' या नात्याने महाराष्ट्राच्या भूगोलासंदर्भात संशोधन केले.

धर्मशास्त्र व अलंकारशास्त्र हे काण्यांच्या लेखनाचे प्रमुख विषय. सरकारी शाळेत शिक्षक असताना, 'अलंकारशास्त्राचा इतिहास' (१९०६) व 'महाकाव्यात प्रतिबिंबित झालेल्या आर्यांच्या चालीरीती व नीती' (१९०८) या त्यांच्या इंग्रजी निबंधांना मुंबई विद्यापीठाचे वि.ना. मंडलिक सुवर्ण पारितोषिक प्राप्त झाले होते. विश्वनाथाचे 'साहित्यदर्पण' (काही भाग), भवभूतीचे




'उत्तररामचरित', बाणाची 'कादंबरी' व 'हर्षचरित' या संस्कृत साहित्यकृतींच्या विस्तृत टिपांसह चिकित्सक आवृत्त्या त्यांनी विद्यार्थ्यांसाठी तयार केल्या. १९१८ मध्ये प्रसिद्ध झालेली हर्षचरिताची चिकित्सक आवृत्ती हे पाठचिकित्सेचे आदर्श उदाहरण म्हणून गणले जाते. मुंबईच्या ब्राह्मण सभेत सामान्य माणसांना धर्मशास्त्राची ओळख करून देण्याच्या हेतूने त्यांनी १९३४ मध्ये चतुर्मासात २१ व्याख्याने दिली. त्या वेळी श्री. ओगले यांनी घेतलेल्या टिपणांवर आधारित 'धर्मशास्त्राचा विचार' हे पुस्तक १९३५ मध्ये प्रकाशित झाले. त्यांनी लिहिलेला युरोपच्या प्रवासाचा पत्ररूप वृत्तान्त १९३८ मध्ये 'युरोपचा प्रवास' या पुस्तकरूपात प्रसिद्ध झाला. काणे यांचे बरेचसे लेखन इंग्रजी भाषेमध्ये असून त्यांतील काही मराठीत अनुवादित झाले आहे, तसेच त्यांनी मराठीतही विपुल स्फुटलेखन केले आहे. 'विविधज्ञानविस्तार', 'मनोरंजन', 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' इ. नियतकालिकांतून त्यांचे अनेक विषयांवरील लेख प्रसिद्ध झाले आहेत. संस्कृत वाङ्मय, मराठी भाषा, शिक्षण, भूगोल, इतिहास, ज्योतिषशास्त्र हे त्यांपैकी काही विषय होत. 'भारत-रामायणकालीन समाजस्थिती' (१९११) व 'पूर्वमीमांसा पद्धतीचा इतिहास' (१९२५) हे त्यांच्या मूळ इंग्रजी निबंधांचे पुस्तकरूपी अनुवाद प्रकाशित झाले आहेत.

पां.वा. काणे यांच्या 'साहित्याचा मेरुमणी' या पाच खंडांत प्रसिद्ध झालेल्या ग्रंथात भारतीय धर्मशास्त्राचा समग्र इतिहास मांडला गेला आहे. सुमारे ६५०० पृष्ठसंख्या असलेल्या या ग्रंथाचे काम १९३० ते १९५८, इतका प्रदीर्घ काळ सुरू होते. प्रथम खंड १९३० साली, तर शेवटचा खंड १९६२ मध्ये प्रसिद्ध झाला. काण्यांनी हे महत्कार्य एकट्याने पूर्ण केले असून त्यातील प्रत्येक शब्द स्वहस्ताक्षरात लिहिला. धर्मशास्त्राशी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे संबंधित अशा सर्व विषयांचा तपशीलवार ऊहापोह यात आहे. या ग्रंथाच्या दुसऱ्या खंडाच्या प्रस्तावनेत लेखकाने स्वत:च लिहिल्याप्रमाणे, 'धर्मशास्त्राच्या विशिष्ट अंगांचे विवेचन करणारी अनेक पुस्तके आहेत; परंतु समग्र धर्मशास्त्राची चिकित्सा करणारा ग्रंथ यापूर्वी झाला नाही. हेच या ग्रंथाची विशेषता निर्देशित करते.'

पुढे काणे यांनी ग्रंथप्रयोजन विशद केले आहे. 'मूळच्या उपयुक्त संस्थांची कालांतराने अनिष्ट रूपांतरे होतात. ही बाब केवळ भारतातच नव्हे, तर सर्व जगात आढळते. भारताला पीडादायी ठरणाऱ्या अनिष्ट गोष्टींचे मूळ संपूर्णत्वाने धर्मशास्त्रात वर्णन केलेल्या जीवनक्रमातच असल्याचा विचार खोडून काढणे.' या ग्रंथाचा सारांशरूप मराठी अनुवाद यशवंत आबाजी भट यांनी केला असून तो १९६७ मध्ये दोन खंडांत प्रसिद्ध झाला. 'धर्मशास्त्राचा इतिहास' या ग्रंथाची रचना हे पां. वा. काणे यांचे सर्वोच्च कार्य मानावे लागेल. भारतीय संस्कृतीच्या गाभ्याचीच ओळख करून देणारा हा ग्रंथ एक विश्वासार्ह संदर्भग्रंथ म्हणून मान्यता पावला आहे.

'हिस्टरी ऑफ संस्कृत पोएटिक्स' हा 'साहित्यदर्पणा'च्या चिकित्सक आवृत्तीस जोडलेला प्रस्तावनात्मक निबंध अत्यंत महत्त्वाचा आहे. त्याचा मराठी अनुवाद काणे यांनी स्वत:च केला असून तो 'संस्कृत साहित्यशास्त्राचा इतिहास' या शीर्षकाने प्रसिद्ध झाला आहे. पां.वा. काणे यांच्या व्यक्तिमत्त्वाचे अनेक विशेष त्यांच्या लेखनातही प्रतिबिंबित झालेले आढळतात. व्यासंग, अथक परिश्रम, संशोधनपर वृत्ती, तपशीलवार व मुद्देसूद विवेचन, विषयाची साधार मांडणी, स्पष्टता, कार्यसातत्य हे त्यांपैकी काही ठळक गुण. ज्ञान-संपादनाची क्रिया सातत्याने करीत राहून स्वत:ची माहिती अद्ययावत करणे हा दुर्मीळ गुण

त्यांच्यापाशी होता. त्यांच्या बहुतेक ग्रंथांच्या अनेक आवृत्त्या निघाल्या. त्या वेळेस, दरम्यानच्या कालखंडातील घडामोडी व ज्ञानक्षेत्रातील प्रगती यांनुसार नवीन आवृत्तीत योग्य ते बदल करणे अथवा भर घालणे या बाबतीतील त्यांचा काटेकोरपणा वैशिष्ट्यपूर्ण आहे. स्वत:चे लेखन परिपूर्ण असल्याचा समज न बाळगता त्यात सुधारणा किंवा बदल करण्याची त्यांची नेहमीच तयारी असे.

ब्रिटिश सरकारने १९४२ मध्ये त्यांना 'महामहोपाध्याय' ही पदवी प्रदान केली. १९४७ ते १९४९ या काळात काणे यांनी मुंबई विद्यापीठाचे उपकुलगुरू म्हणून काम पाहिले. 'धर्मशास्त्राचा इतिहास' या ग्रंथासाठी साहित्य अकादमीने त्यांना सन्मानित केले. १९५९ मध्ये त्यांना 'नॅशनल प्रोफेसर ऑफ इंडॉलॉजी' ही सन्माननीय उपाधी दिली गेली. भारत सरकारने १९६३ मध्ये त्यांना 'भारतरत्न' या सर्वोच्च पुरस्काराने गौरविले. अलाहाबाद व पुणे विद्यापीठातर्फे पां.वा. काणे यांना सन्माननीय 'डी.लिट' ही पदवी प्रदान करण्यात आली. आजही काण्यांच्या सन्मानार्थ व्याख्याने आयोजित केली जातात. एशियाटिक सोसायटी ऑफ बॉम्बे या विद्वन्मान्य संस्थेत पां.वा. काणे संशोधन केंद्र असून दरवर्षी या केंद्रातर्फे प्राच्यविद्याविषयक विविध चर्चासत्रे होतात व संस्कृतचे अभ्यासक महामहोपाध्याय काण्यांना शब्दसुमनांजली अर्पित करतात.

– डॉ. गिरीश मांडके

## कानडे, मुकुंद श्रीनिवास

**संतसाहित्य अभ्यासक व समीक्षक, टीकाकार**

**३ डिसेंबर १९३१ – २५ जून २०१२**

मुकुंद श्रीनिवास कानडे यांनी संतसाहित्य, वाङ्मयीन समीक्षा, नाट्यविषयक अशा विविध क्षेत्रांत विपुल कार्य केले. त्याचे व्यक्तिमत्त्व बहुआयामी होते. संतसाहित्याचे गाढे अभ्यासक, भाषाशास्त्राचे ज्येष्ठ अध्यापक, विविध ग्रंथांचे मार्मिक मीमांसाकार, नाट्य वाङ्मयाचे व्यासंगी संकलक, नाट्यसंगीताचे मर्मज्ञ रसिक, इतिहासविषयक




बखरींचे संशोधक, पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागाचे प्रमुख आणि पीएच.डी.च्या विद्यार्थ्यांचे मार्गदर्शक, असे त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे विविध पैलू होते. संतसाहित्याचा अभ्यास करून त्यांनी या क्षेत्रात अभूतपूर्व काम करून ठेवले आहे. त्यातूनच 'संतसाहित्य संदर्भकोश' (१९९५), 'संताचे हे भेटी', 'संत नामदेव काव्यदर्शन' (२००१), 'ग्रंथराज दासबोध शब्दार्थ संदर्भकोश' (२००३) असे महान ग्रंथ निर्माण झाले. पुढच्या काळात 'ज्ञानेश्वरी टिपण', 'ज्ञानदेवांची सार्थ चिकित्सक गाथा', 'ज्ञानदेवांच्या साहित्याचा चिकित्सक अभ्यास' हे ज्ञानदेवविषयक ग्रंथ गाजले. तसेच 'संत नामदेवांचा सार्थ चिकित्सक गाथा', 'नामदेव गाथा - शब्दार्थ कोश', असे संत नामदेवांवर काम करून 'संत नामदेवांचा




सार्थचिकित्सक गाथा', 'नामदेव गाथा शब्दार्थ संदर्भकोश' आपल्या सहकाऱ्यांच्या साहाय्याने तसेच 'एकनाथी भागवताचा संदर्भ कोश', 'चोखामेळ्याची अभंगवाणी', 'समर्थ रामदास वाङ्मय शब्दार्थ कोश' असे विविध संतांविषयी साहित्य अभ्यासकांना मार्गदर्शनपर अनेक ग्रंथ त्यांनी लिहिले.

संतसाहित्याबरोबर कानडे यांना मराठी नाटकांचेही वेड होते. इ.स. १८८० ते २००५ या १२५ वर्षांच्या काळातील मराठी रंगभूमीची प्रयोगक्षम नाटके,

नाटककारांच्या जन्म-मृत्यूच्या नोंदी, विविध नाट्यप्रयोगांसंबंधी, त्यांच्या संगीताच्या लोकप्रियतेसंबंधी अनेक नोंदी 'प्रयोगक्षम नाटके' (१९६२) आणि 'मराठी रंगभूमीचा उष:काल' (१९६८) या दोन ग्रंथांतून आढळतात.

'कालचे नाटककार' या ग्रंथात आजच्या नाटकवेड्या पिढीलासुद्धा अपरिचित असलेले वीर वामनराव जोशी, वासुदेवशास्त्री खरे, माधवराव पाटणकर, वासुदेवराव शिरवळकर यांच्या नाटकांचा परामर्श घेत त्या त्या नाटककारांची ओळख करून दिली आहे. मराठी नाटकावर त्यांची सहा अभ्यासपूर्ण पुस्तके वेळोवेळी प्रसिद्ध झाली आहेत. 'प्रयोगक्षम मराठी नाटके (१९६२)', 'कालचे नाटककार (१९६७)', 'मराठी रंगभूमीचा उष:काल' (१९६८), 'नाट्यशोध' (१९८७), 'मराठी रंगभूमीची १२५ वर्षे' आणि 'मराठी नाट्य परिषद इतिहास आणि कार्य' हे सर्व अभ्यासपूर्ण लेखन कै. डॉ. रा.शं. वाळिंबे यांची मराठी विभाग प्रमुखाची गादी चालवत असताना त्यांनी केले, तेही विद्यार्थिप्रिय प्राध्यापक बिरुद लावून.

— वा.ल. मंजूळ

## कानोले, विश्वेश्वरराव अंबादासराव

***कानोले, तात्यासाहेब***

**इतिहासप्रेमी संशोधक**

**४ ऑगस्ट १९०४ – २ फेब्रुवारी १९८४**

मराठवाड्यातील एक प्रसिद्ध इतिहासप्रेमी, उत्कृष्ट इतिहास संशोधक विश्वेश्वरराव अंबादासराव कानोले हे तात्यासाहेब या नावाने ओळखले जातात. त्यांचा जन्म नांदेड येथे झाला. तात्यासाहेबांना मुळातच इतिहास, साहित्य, धर्म या क्षेत्रांमध्ये रुची होती. फारसी, गुरुमुखी, पंजाबी, उर्दू या भाषांवरही त्यांचे प्रभुत्व होते. १९६२ मध्ये बीड येथे भरलेल्या मराठवाडा साहित्य संमेलनाचे अध्यक्ष, नांदेड येथे भरलेल्या महानुभाव परिषदेचे उद्घाटक, महाराष्ट्र शासनाच्या पुराभिलेख व पुरातत्त्व समितीचे सदस्य, नांदेडच्या गोदातीर संशोधन मंडळाचे



संस्थापक इ.च्या माध्यमातून त्यांनी आपल्या कार्याचा ठसा उमटविला आहे.

विद्यार्थिदशेपासूनच तात्यासाहेबांना इतिहासाविषयी आकर्षण होते. त्यातून त्यांनी ऐतिहासिक वस्तूंच्या संकलनाची व संग्रहाची आवड जोपासली. जुन्या पोथ्या संकलित करण्याच्या वेडातून त्यांनी जवळपास दोन हजार हस्तलिखितांचा संग्रह केला; एवढेच नव्हे, तर त्यांनी नांदेड येथे हस्तलिखित ग्रंथाचे एक प्रदर्शनच आयोजित केले होते. त्यांच्या या कामाचे खुद्द द.वा. पोतदार यांनी कौतुक केले व तात्यासाहेबांना आपले शिष्य मानले.

तात्यासाहेबांनी नांदेड येथे गोदातीर इतिहास संशोधन मंडळाची स्थापना करून स्थानिक इतिहास संशोधनास चालना दिली. स्वत: राज्य व राष्ट्रीय स्तरावरील इतिहास परिषदांमधून नांदेड व परिसरातील इतिहासासंबंधी संशोधन शोधनिबंधाच्या माध्यमातून सादर केले.

मराठीचे आद्यकवी मुकुंदराज हे मूळचे अंबाजोगाईचे होते. नेताजी पालकरांचे वृद्धापकाळी वास्तव्य नांदेड जिल्ह्यात तामसा येथे होते. संत नामदेवांचे जन्मगाव नरसी हे सोलापूरजवळ नसून मराठवाड्यात हिंगोली जिल्ह्यात आहे अशी महत्त्वपूर्ण माहिती त्यांनी पुराव्याच्या आधारे सिद्ध केली. याशिवाय शिखांचे दहावे गुरू गुरुगोविंदसिंग यांच्या संक्षिप्त चरित्राचे लेखनही तात्यासाहेबांनी केले व प्रसिद्ध केले. विशेष म्हणजे, तत्कालीन राष्ट्रपती मा. ग्यानी झैलसिंग यांनी आपल्या नांदेड भेटीत तात्यासाहेबांशी शिखांच्या इतिहासाविषयी चर्चा केली. नांदेड व परिसरासंबंधी तात्यासाहेबांनी उपयुक्त संशोधन केले. नांदेड परिसरात सापडलेल्या उत्तर चाणक्यकालीन शिलालेखांची माहिती, नांदेड शहराचे धार्मिक, सांस्कृतिक व ऐतिहासिक महत्त्व, मुहम्मद गवान याने नांदेडमधील वसविलेली वजिराबादची वस्ती, नांदेडची प्राचीन कवी परंपरा, पन्नास वर्षांपूर्वीचे नांदेड,

नांदेड क्षेत्र माहात्म्य इ. महत्त्वपूर्ण व रोचक माहिती तात्यासाहेबांनी आपल्या संशोधनातून पुढे आणली. विविध शोधनिबंध, पुस्तिका, वृत्तपत्रातील लेख इ.च्या माध्यमातून केलेले सर्व लेखन संकलित केल्यास नांदेडचा इतिहास एकत्रित उपलब्ध होऊ शकेल. त्यांचे लेखन फक्त इतिहासापुरते मर्यादित नसून धार्मिक, साहित्यिक, संत साहित्य, नाट्य इत्यादींशी संबंधित आहे. नांदेडच्या प्राचीन कवी परंपरेची ओळखही त्यांनी करून दिली आहे. यामध्ये कवी वामन पंडित, रघुनाथ शेष यांपासून श्रीधर महाराज कंदकुर्तीकर इ. कवींची माहिती दिली आहे.

हस्तलिखितांचा संग्रह हे तात्यासाहेबांचे महत्त्वपूर्ण कार्य होय. त्यांच्या संग्रही संस्कृत व मराठी हस्तलिखितांचा संग्रह होता. संस्कृतमध्ये मुद्‍गलभट्ट वैद्य यांचा 'विमलबोध', विमलदेव चौहान यांचा 'प्रबोधचंद्रिका', रघुनाथ शेषांचा 'तंत्रदर्पण', देशिकेंद्र चिंतामणी कृत 'गुरुभागवत', बोपदेव कृत 'हरिलीला' या प्रमुख ग्रंथांचा समावेश होता. याशिवाय, ज्योतिषशास्त्रावरील 'मुहूर्त कल्पकद्रुम', 'तिथिदीपिका', 'कालसिद्धान्त', 'वर्षफलपद्धती' हे महत्त्वाचे ग्रंथही संग्रही होते.

मराठी हस्तलिखितांच्या यादीत 'ज्ञानेश्वरी'ची महाराष्ट्रातील सर्वांत प्राचीन प्रत, एकनाथांचे 'एकादशी माहात्म्य', मुक्तेश्वराचे 'महाभारत', वामन पंडितांची 'यथार्थ दीपिका', 'दासबोध' या महत्त्वाच्या ग्रंथांसह शेकडो मराठी ग्रंथांची हस्तलिखिते त्यांच्या संग्रही होती. अशा प्रकारे आपल्या प्रत्यक्ष कार्यातून तात्यासाहेबांनी इतिहास संशोधनाचा आदर्श भावी पिढीस घालून दिला. विशेष म्हणजे, हस्तलिखितांच्या संग्रहातून आपल्या इतिहासाचे जतन केले; स्थानिक इतिहासाला प्राधान्य देऊन संशोधनाच्या माध्यमातून तो पुढे आणला. तात्यासाहेबांनी केलेले नांदेडविषयीचे संशोधन भावी पिढीसाठी मार्गदर्शक म्हणून आजही उपयुक्त आहे.

— संपादित

## कामा, खर्शेदजी रुस्तमजी

**धर्मपंडित, प्राच्यभाषा अभ्यासक**

**११ नोव्हेंबर १८३१ – २० ऑगस्ट १९०९**



सर्वसाधारणपणे बहुतेक पारशी धर्मपंडित हे पुरोहित घराण्यातच जन्माला आले; पण खर्शेदजी कामांचा जन्म उद्योजकांच्या घरात झाला. किशोरावस्थेतच ते घरातील वरिष्ठांसमवेत व्यवसायात सहभागी झाले. असे दृष्टोत्पत्तीस येते, की एकोणिसाव्या शतकात बरेचसे पारशी उद्योजक चीनला भेट देत. त्याप्रमाणेच किशोरवय संपताच कामांनी चीनला भेट दिली. वयाच्या पंचविसाव्या वर्षी ते व्यावसायिक प्रतिष्ठान स्थापित करण्याच्या उद्देशाने दादाभाई नवरोजी आणि माणेकजी कामा ह्यांच्यासह इंग्लंडला गेले. त्यांनी चार वर्षे युरोपच्या भिन्न भिन्न भागांत भ्रमंती केली. विधिलिखित होते त्याप्रमाणेच त्यांनी प्राचीन इराणी भाषांचा, तसेच इंडो-जर्मनिक भाषांचा अभ्यास सुरू केला. ब्युरनॉफ, मेना, हाउग, दरमेस्ट्टेटे, जॅक्सन वगैरेंसारख्या पाश्चिमात्य विद्वानांचा सहवास त्यांना लाभला आणि त्यांच्याकडून कामांना खूप काही शिकायला मिळाले. मुंबईला परतल्यानंतरसुद्धा पत्रव्यवहारामार्फत त्यांच्याशी कामांचा दृढ संबंध होता. अवेस्तापहलवीच्या अभ्यासाला प्रोत्साहन देण्याच्या निमित्ताने ह्या जवळजवळ विस्मृतीत गेलेल्या प्राचीन भाषांचा समावेश मॅट्रिकची परीक्षा आणि मुंबई विद्यापीठाच्या कला विभागातल्या पदवी पाठ्यक्रमांच्या विषयांत करून कामा ह्यांनी महत्त्वाचे कार्य केले. ते युरोपहून परतल्यानंतर लगेचच, प्राचीन इराणी भाषांचे वेगवेगळे पैलू व बोलीभाषांच्या प्रकारांबरोबरच पाश्चिमात्य विद्वानांनी अंगीकारलेली दार्शनिक पद्धती अभ्यासण्यासाठी त्यांच्याभोवती अनेक तरुण गोळा झाले. त्यांमध्ये मुख्यत्वे धर्माचे अभ्यासक होते. शेरियारजी भरूचा, कावसजी कांगा, तेहमुरा स.

अंकलेसरिया असे काही त्यांच्या पहिल्या शिष्यांमध्ये होते. आजमितीलासुद्धा अवेस्ताचे पारशी, त्याप्रमाणेच पारशेतर अभ्यासक, कावसजी कांगा ह्यांच्या अवेस्ता-इंग्रजी शब्दकोशाचे आणि त्यांच्या नियाइशिस, यश्त, वंदिदाद व गाथांचा आधार घेतात.

१८६४ मध्ये कामा यांनी धर्मपंडितांची एक संस्था स्थापन करण्याचे महत्त्वाचे कार्य केले, जी झरतोस्ती (पारशी) धर्माचे कार्य पुढे नेऊ शकेल. या संस्थेचे गुजराती नाव होते, 'झरतोस्ती दिन-नी खोल करनारी मंडली' म्हणजे पारशी धर्माचे संशोधन करणारी मंडळी. विसाव्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत ह्या संस्थेचे सभासद इराणच्या कला, स्थापत्य, मुद्राशास्त्र आदी अभ्यासाच्या संदर्भातील अडचणींविषयी चर्चेसाठी वेळोवेळी एकत्र येत. त्यांच्या आयुष्यभराच्या कारकिर्दीत, उपरोल्लिखित संस्थेच्या सभासदांसमोर, तसेच राहनुमाए माझद्येसनी दिन सभा, द रॉयल एशियाटिक सोसायटी इत्यादी ठिकाणी कामा आपले शोधनिबंध सादर करीत. शिवाय मुल्ला फिरोज मदरसा, सर जमशेदजी जीजीभॉय मदरसा, नवसारीची नसरवानजी रतनजी टाटा मदरसा यांच्या कार्यांत बारकाईने लक्ष घालत. हे नमूद करायला हवे, की त्या काही वर्षांत या शाळांनी अनेक धर्मपंडित दिले. सर्व दृष्टिने कामा साधेपणाचे भोक्ते होते आणि नीटनेटकेपणासाठी आग्रही होते. ते स्वभावाने दयाळू आणि उदार होते. ते आत्मनिर्भरतेसाठी आणि मितव्ययी म्हणून ओळखले जात होते. एक दिवस लेखक स्वत: प्राध्यापक दिनशा कपाडिया ह्यांच्या पुणे येथील घरी त्यांना अभिवादन करण्यास गेला असता त्या वयोवृद्ध विद्वानाने कामांच्या व्यक्तिमत्त्वाचा एक पैलू स्पष्ट करण्याच्या मिषाने पुढील घटना विशद केली.

एका व्याख्यानाच्या कार्यक्रमप्रसंगी कामा अध्यक्ष होते आणि त्यांच्याबरोबर मंचावर त्या संध्याकाळचे व्याख्याता व कपाडिया होते. प्रेक्षकगणात फक्त एक सद्गृहस्थ होते. आणखी काही श्रोत्यांची थोडा वेळ वाट पाहिल्यानंतर वक्त्याने, त्या दिवसाचा कार्यक्रम स्थगित करणे उचित ठरेल काय, असे कामांना विचारले. पण कामांना तो प्रस्ताव अस्वीकारार्ह वाटला. ते म्हणाले, ''कदापि नाही. हे सद्गृहस्थ तुम्हांला ऐकण्यास्तव आले आहेत. त्यांना निराश करण्याची आवश्यकता नाही. अजून एक गोष्ट, कृपा करून व्याख्यानाच्या मुद्द्यांत काटछाट नको. वक्त्याने ते मानले आणि ४५ मिनिटे व्याख्यान देण्यास घेतली आणि त्यावर आपले विचार मांडण्यास अध्यक्षांनी वीस मिनिटे घेतली.

कामांच्या सत्तराव्या जन्मदिवशी, विद्वत्तापूर्ण लेख असलेला ग्रंथ मित्र व चाहत्यांनी त्यांना प्रदान केला. त्यांच्या निर्वाणानंतर सुमारे सात वर्षांनी 'के.आर. कामा ओरिएन्टल इन्स्टिट्यूट' नावाची संस्था लोकांनी जमवलेल्या निधीतून उदयास आली. १९७० मध्ये या संस्थेने 'द कलेक्टेड वर्क्स ऑफ के.आर. कामा' या शीर्षकाखाली दोन ग्रंथ प्रकाशित केले.

आत्तापर्यंत आपण ह्या असाधारण व्यक्तिमत्त्वाची सकारात्मक बाजू पाहिली. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या दुसऱ्या बाजूबद्दलही उल्लेख करणे उचित ठरेल. कामा रंगमंचावर अवतीर्ण होईपर्यंत पारशांमध्ये दोन पंथ होते, कदिती आणि शहनशाही. कामांनी तिसऱ्या पंथाचा परिचय करून दिला : फसली. विसाव्या शतकातल्या अनेक श्रेष्ठ विद्वानांना हे अस्वीकारार्ह वाटले. याव्यतिरिक्त एकोणिसाव्या शतकातल्या पारशांप्रमाणे कामा एच.डब्ल्यू. ब्लावस्कीच्या सिद्धान्तांनी मोहित झाले आणि स्वत:ला त्यात झोकून ते थिऑसॉफिस्ट/दैववादी बनले. थिऑसॉफी/दैववादाबरोबरच कामा स्त्रीत्ववादाकडे आकर्षित झाले. ह्या स्त्री-आंदोलनामुळे पारशी समाजातील स्त्रिया परंपरामुक्त होऊन स्वातंत्र्याच्या पुरस्कर्त्या झाल्याचे स्पष्ट झाले.

— फरीबोर्झ नरीमन

## कॉर्व्हिनस, गुडरून

**प्रागैतिहासिक पुरातत्त्वीय संशोधक**

**१९३२ – २००६**

डॉ. गुडरून कॉर्व्हिनस यांचा जन्म पोलंडमध्ये स्टेटीन येथे झाला. बॉन विद्यापीठातून पदवी घेतल्यानंतर



त्यापुढील शिक्षणासाठी ट्युबिंगन विद्यापीठात गेल्या. त्यांना लहान वयापासूनच भूविज्ञानाचे व निसर्गविज्ञानाचे आकर्षण होते. त्यांनी फ्रान्समधील जुरासिक कालखंडाच्या जीवाश्मांच्या अध्ययनावर डॉक्टरेट पदवी संपादन केली. याच काळात त्यांच्या प्रबंधाचे परीक्षक प्रा. एफ.ई. झॉयनर यांच्यामुळे त्या पुरातत्त्व या विषयाकडे ओढल्या गेल्या.

विवाहानंतर १९६१मध्ये डॉ. कॉर्व्हिनस भारतात आल्या व त्यांचा संबंध डेक्कन महाविद्यालयामधील प्रागैतिहासिक संशोधकांशी आला. त्यांनी चंदिगढ येथील प्रा. एम.आर. सहानी यांच्या मार्गदर्शनाखाली १९६४ ते १९६७ या काळात प्रवरा नदीच्या परिसरात अश्मयुगीन संस्कृतीच्या स्थळांचे सर्वेक्षण केले. प्रा.ह.धी. सांकलिया यांच्या प्रेरणेने डॉ. कॉर्व्हिनस यांनी नेवासाजवळील चिरकी या ठिकाणी उत्खनन (१९६७-१९६९) केले. अश्मयुगीन अवजारांच्या सखोल विश्लेषणामुळे भारतीय उपखंडातील प्रागैतिहासिक पुरातत्त्वीय संशोधनात हा महत्त्वाचा टप्पा मानला जातो. डॉ. कॉर्व्हिनस यांनी भारतात सर्वप्रथम अश्मयुगीन अवजार तयार करण्याच्या कोम्बेवा तंत्राचे संशोधन केले. तसेच त्यांनी अवजार बनवणारी व्यक्ती उजखुरी की डावखुरी होती यावर प्रकाश टाकला.

चिरकी उत्खनन पूर्ण करून त्याचा अहवाल प्रसिद्ध केल्यानंतर डॉ. कॉर्व्हिनस यांनी १९७२ ते १९८४ या काळात आफ्रिकेत अनेक ठिकाणी (ओल्डुवाय गॉर्ज, नामिबिया व दक्षिण आफ्रिका) काम केले. डॉ. कॉर्व्हिनस १९८४मध्ये पुन्हा भारतीय उपखंडातील प्रागैतिहासिक पुरातत्त्वीय संशोधनाकडे आल्या व सलग बारा वर्षे त्यांनी हिमालय व शिवालिक पर्वतरांगांमध्ये काम केले. त्यांच्या मृत्यूपर्यंत त्या कार्यरत होत्या.

— डॉ. प्रमोद जोगळेकर

## कालेलकर, नारायण गोविंद

**भाषाशास्त्रज्ञ**

**११ डिसेंबर १९०९ – ३ मार्च १९८९**

नारायण गोविंद कालेलकर यांचा जन्म रत्नागिरीतील बांबुळी येथे झाला. बडोदे, मुंबई व पॅरिस येथे त्यांचे शिक्षण झाले. त्यांनी फ्रेंच साहित्यातील पदविका, पॅरिस विद्यापीठाची डी.लिट. पदवी व ‘रॉकफेलर सीनियर फेलो’ हा सन्मान संपादन केला होता. १९४० ते १९५६पर्यंत त्यांनी बडोद्यात फ्रेंच भाषा-साहित्याच्या व भाषाशास्त्राच्या अध्यापनाचे कार्य केले. १९७३मध्ये त्यांनी पुण्यात डेक्कन महाविद्यालयामध्ये इंडो-आर्यन व इंडो-युरोपियन भाषाशास्त्राचे प्राध्यापक आणि मग मराठी महाशब्दकोशाच्या योजनेचे प्रमुख संपादक, तसेच महाराष्ट्र राज्यभाषा मंडळाचे अध्यक्ष म्हणून काम सांभाळले.

‘ध्वनिविचार’ (१९५५), ‘भाषा आणि संस्कृती’ (१९६०) आणि ‘भाषा : इतिहास आणि भूगोल’ (१९६०) हे त्यांचे ग्रंथ फार महत्त्वाचे असून यापैकी पहिल्या दोन ग्रंथांना महाराष्ट्र राज्य पारितोषिके आणि शेवटच्या ग्रंथाला साहित्य अकादमीचे पारितोषिक मिळाले. अनेक प्रकारच्या फ्रेंच साहित्याचे त्यांनी भाषांतरही केले. ‘युद्धकालीन भारतीय समाज’ (१९३५) आणि ‘कम्परॅटिव्ह मेथड इन हिस्टॉरिकल लिङ्ग्विस्टिक्स’ (१९६०) ही पुस्तकेही त्यांनी भाषांतरित केली. मराठी विश्वकोशात त्यांनी अनेक लेख लिहिले.




भाषेचा व बोलींचा शास्त्रीय पद्धतीने अभ्यास व्हावा,

असा डॉ. कालेलकरांचा आग्रह होता. भाषेच्या शुद्धाशुद्धतेच्या कल्पना बोलींच्या व पर्यायाने भाषेच्या विकासासाठी मारक आहेत, हे त्यांनी जागोजागी सांगितले आहे. बोलींच्या शास्त्रशुद्ध अभ्यासातून भाषेला समृद्ध करावे, नवीन अवजड शब्द तयार करून नव्हे, असे त्यांचे मत होते. भाषेची परिवर्तनशीलता लक्षात घेऊन दर वीस-पंचवीस वर्षांनी भाषेच्या नियमांचा पुनर्विचार व्हावा असे ते म्हणतात. भाषा आणि समाज यांचा घनिष्ठ संबंध त्यांनी ठिकठिकाणी स्पष्ट केला आहे. भाषेचे स्वरूप, व्याकरण, साहित्य, लेखन आणि भाषा-संस्कृती-संबंध अशा अनेक विषयांवर त्यांनी विवेचन केले आहे. जिज्ञासू वाचकाला भाषाशास्त्राबद्दल सहजसोप्या भाषेत ओळख करून देतानाच भाषा व भाषाशास्त्र यांबद्दलच्या दुराग्रहांचा ते परखडपणे समाचार घेतात. व्याकरणशुद्धतेच्या कल्पनांमध्ये आणि पांडित्यामध्येच अनेक विद्वान अडकून पडले होते, अशा काळात शुद्ध भाषाशास्त्रीय दृष्टिकोनाचा आग्रह धरणारा दूरदृष्टीचा भाषाशास्त्रज्ञ म्हणून त्यांची कायम ओळख राहील.

— ऋता पराडकर

## काशीकर, चिंतामण गणेश

**वेदशास्त्र अभ्यासक, लेखक**

**१७ ऑगस्ट १९१० – २८ डिसेंबर २००३**

चिंतामण गणेश काशीकर यांचा जन्म सातारा येथे एका वैदिक घराण्यात झाला. साताऱ्यामधील राष्ट्रीय शाळेत शिक्षण घेतल्यानंतर ते पुण्यास आले आणि टिळक महाराष्ट्र विद्यापीठास संलग्न असलेल्या टिळक महाविद्यालयात उच्च शिक्षण घेऊन त्यांनी ‘वाङ्मय विशारद’ (बी.ए) आणि ‘वाङ्मय पारंगत’ (एम.ए.) या पदव्या संपादन केल्या. वाङ्मय पारंगत या पदवीसाठी त्यांनी ‘ऋग्वेदकालीन सांस्कृतिक इतिहास’ हा प्रबंध लिहिला. तो पुढे १९३५ साली टिळक महाराष्ट्र विद्यापीठाने प्रसिद्ध केला. या विद्यापीठाची शाखा म्हणून स्थापन झालेल्या आणि लोकमान्य टिळकांच्या



वेदविषयक संशोधनाची प्रेरणा लाभलेल्या वैदिक संशोधन मंडळामध्ये ते १९३३ साली रुजू झाले आणि १९६७ पर्यंत कार्यरत राहिले.

मॅक्सम्यूल्लर यांनी संपादित केलेल्या सायणभाष्यासह ऋग्वेद संहितेची नवी चिकित्सक आवृत्ती तयार करण्याचा महत्त्वाकांक्षी प्रकल्प त्या वेळी वैदिक संशोधन मंडळाने हाती घेतला होता. त्या प्रकल्पाच्या कामात ते पं. ना.श्री. सोनटक्के यांच्यासह लक्ष घालू लागले आणि या दोन विद्वानांनी तो प्रकल्प पूर्ण केला. या कार्यामुळे डॉ. काशीकर यांना जागतिक पातळीवर मान्यता मिळाली. या प्रकल्पामध्ये डॉ. काशीकर यांनी संपादित केलेल्या ऋग्वेद खिल सूक्तांचाही समावेश आहे.

वैदिक संशोधन मंडळाने हाती घेतलेला दुसरा महत्त्वाचा प्रकल्प म्हणजे श्रौतकोश. वैदिक यज्ञांची माहिती देणाऱ्या या ज्ञानकोशाच्या संस्कृत भागाची जबाबदारी डॉ. काशीकर यांच्यावर सोपविण्यात आली. श्रोताचार्य धुंडिराजशास्त्री बापट यांच्या मार्गदर्शनाखाली डॉ. काशीकर यांनी काही खंडांचे संपादन केले. १९६७ साली डॉ. रा.ना. दांडेकर यांच्या आग्रहास्तव त्यांनी वैदिक संशोधन मंडळातील आपल्या पदाचा राजीनामा दिला व ते पुणे विद्यापीठामध्ये नव्यानेच स्थापन झालेल्या संस्कृत प्रगत अध्ययन केंद्रामध्ये प्रपाठक म्हणून रुजू झाले. याच सुमारास भारद्वाज श्रौतसूत्र या त्यांच्या संशोधन ग्रंथाबद्दल त्यांना पुणे विद्यापीठाची डी.लिट. ही पदवी प्राप्त झाली. संशोधनासाठी पुणे विद्यापीठाची डी.लिट पदवी प्राप्त करणारे डॉ. काशीकर हे पहिले विद्वान होत. पुणे विद्यापीठातून निवृत्त झाल्यावर १९७४ पासून १९८२ पर्यंत डॉ. काशीकर यांनी डेक्कन कॉलेजमधील संस्कृत कोश विभागात संपादकपदावर कार्य केले व त्या कार्यात मोलाची भर घातली.

वैदिक यज्ञविषयक ग्रंथांचे संपादन आणि अनुवाद

करीत असतानाच डॉ. काशीकर प्रत्यक्ष यज्ञयागातही सहभागी होत असत. पुण्यात १९५६ साली झालेल्या वाजपेय यज्ञात त्यांनी ऋत्विजाचे काम केले, त्याचबरोबर त्या यज्ञाची माहिती देणारी पुस्तिकाही त्यांनी तयार केली. यज्ञीय कर्मकांडांचे प्रत्यक्ष ज्ञान त्यांच्या ग्रांथिक अध्ययनासाठी अत्यंत उपयुक्त ठरले. १९७५ साली केरळमध्ये पांजाळ या गावी 'साग्निचित्य अतिरात्र' या सोमयागाचे आयोजन करण्यात आले. देशोदेशींच्या विद्वानांच्या सहकार्याने आणि प्रा. फ्रिट्झ स्टाल यांच्या पुढाकाराने या यज्ञाचे पूर्ण चित्रीकरण करण्यात आले आणि त्यासंबंधी माहिती देणारा 'अग्नी' हा मोठा ग्रंथही प्रकाशित करण्यात आला. डॉ. चिंतामण काशीकर यांनी या सर्व उपक्रमात मोलाचे मार्गदर्शन केले, तसेच त्या ग्रंथासाठी एक महत्त्वपूर्ण निबंधही सादर केला.

डॉ. काशीकर यांनी सुमारे वीस ग्रंथ आणि शंभराहून जास्त शोधनिबंध प्रकाशित केले आहेत. ते मुख्यत: वेदविषयक आहेत. त्याचबरोबर डॉ. यॉली (Jolly) या जर्मन विद्वानाने लिहिलेल्या 'Medicin' या ग्रंथाचा इंग्रजी अनुवाद डॉ. काशीकर यांनी केला आणि 'Indian Medicin' या नावाने तो स्वत: प्रसिद्ध केला. अनुवादाबरोबरच डॉ. काशीकर यांनी या ग्रंथामध्ये आपल्या अनेक टिपांची आणि संदर्भांची भर घालून त्यास अद्ययावत स्वरूप दिले. हा एक प्रमाणभूत ग्रंथ मानला जातो. काही काळापूर्वी या ग्रंथाची नवी आवृत्तीही प्रसिद्ध झाली आहे.

डॉ. काशीकर यांनी टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे विद्यापीठ, टिळक आयुर्वेद महाविद्यालय या ठिकाणी संस्कृत, वेद, आयुर्वेदीय इतिहास इत्यादी विषयांचे अध्यापन केले. तसेच, अनेक विद्यार्थ्यांना पीएच.डी.साठी मार्गदर्शन केले. संशोधनपर लेखनाबरोबरच डॉ. काशीकर यांनी सर्वसामान्य जिज्ञासूंसाठी लेख लिहिले. 'वैदिक संस्कृतीचे पैलू' या नावाने त्या लेखांचा संग्रह प्रसिद्ध झाला.

पुणे विद्यापीठ, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, वैदिक संशोधन मंडळ, वेदशास्त्रोत्तेजक सभा, भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्था, भारत गायन समाज अशा अनेक संस्थांशी डॉ. काशीकर यांचा घनिष्ठ संबंध होता. त्यांना अनेक पुरस्कार प्राप्त झाले; त्यांमध्ये संस्कृत विद्वत्तेसाठी दिल्या जाणाऱ्या राष्ट्रपती पुरस्काराचाही समावेश आहे. डॉ. काशीकर यांचे पुणे येथे वयाच्या त्र्याण्णवाव्या वर्षी वृद्धापकाळाने निधन झाले.

— डॉ. श्रीकांत बहुलकर

## काळे, मोरेश्वर रामचंद्र

**संस्कृत शिक्षक, लेखक व अनुवादक**

**६ जून १८६२ — ३ मे १९३०**

संस्कृत कवींच्या पावलावर पाऊल टाकीत, व्यक्तीपेक्षा कार्य श्रेष्ठ हा आदर्श डोळ्यांसमोर ठेवून, संस्कृत साहित्यातील एकंदर वीस कलाकृतींचा इंग्रजी अनुवाद करून संस्कृत जगतावर आपली मोहर उमटविणाऱ्या मोरेश्वर रामचंद्र म्हणजेच मो.रा. काळे यांनी कोणतीही वैयक्तिक माहिती एवढी सर्व पुस्तके लिहूनही दिलेली नाही. वास्तविक, त्यांच्या समकालीन असणाऱ्या त्यांच्याप्रमाणेच संस्कृतविश्वासाठी मोलाची कामगिरी करणाऱ्या गजेंद्रगडकर किंवा इतर विद्वानांनी निदान काही सुमार माहिती तरी प्रस्तावनेमध्ये अथवा इतरत्र लिहून ठेवलेली आढळते; परंतु मो.रा. काळे यांनी स्वत:बद्दल अगर इतरांनी त्यांच्याबद्दल कोठे माहिती लिहिली आहे असे आढळत नाही. अगदी 'भारतीय संस्कृती कोश', 'मराठी विश्वकोश', 'अर्वाचीन चरित्रकोश' यांनीही मो.रां.च्या कामाची दखल घेतलेली नाही हे आश्चर्य म्हणावे लागेल.

परंतु, एवढ्यातच प्रसिद्ध झालेल्या काळे कुलवृत्तान्तामध्ये मात्र त्यांची जी कौटुंबिक माहिती सापडते ती अशी : मो.रा. काळे यांचे दत्तकविधान झाले होते. दत्तकविधानापूर्वीचे त्यांचे नाव दामोदर बाळकृष्ण काळे असे होते. त्यांना दोन भार्या होत्या - पहिली अन्नपूर्णा व दुसरी जानकी व तीन मुली होत्या. काहींच्या मते, त्यांना केवळ एकच पुत्र - व्ही.एम काळे (ज्याचे

नाव मेघदूताच्या सहाव्या आवृत्तीच्या प्रस्तावनेमध्ये दिसते, संपूर्ण नाव मात्र सापडत नाही) असून तोदेखील संस्कृत विद्वान होता. मो.रा. काळे यांनी संस्कृत विषय घेऊन आपले बी.ए.पर्यंतचे शिक्षण पूर्ण केले होते. ते मुंबईतील विल्सन हायस्कूलमध्ये शिक्षक होते.

संस्कृत व इंग्रजी या दोनही भाषांवर सारखेच प्रभुत्व असणाऱ्या विद्वानांपैकी ते एक होत. त्यांनी हायर संस्कृत ग्रामर व अनेक संस्कृत नाटकांवर टिप्पणी इ. अनेक पुस्तके लिहिली. काळे कुलवृत्तान्ताप्रमाणे त्यांनी सुमारे ३० पुस्तके प्रसिद्ध केली; परंतु सध्या केवळ वीसच पुस्तके उपलब्ध आहेत. त्यांची नावे याप्रमाणे :

१. 'अभिज्ञान शाकुन्तल', २. 'मालविकाग्निमित्र' ही कालिदासाची नाटके; ३. 'प्रतिमा', ४. 'स्वप्नवासवदत्त' ही भासाची नाटके; ५. 'उत्तररामचरित', ६. 'मालतीमाधव' ही भवभूतीची नाटके; ७. 'प्रियदर्शिका', ८. 'रत्नावली', ही श्रीहर्षाची नाटके; ९. 'मृच्छकटिक शूद्रकाचे' हे नाटक व १०. 'वेणीसंहार' हे भट्टनारायणाचे नाटक; ११. 'रघुवंश', १२. 'कुमारसंभव' (सर्ग १ ते ७) ही कालिदासाची महाकाव्ये व १३. 'किरातार्जुनीयम्' (सर्ग १ ते ३) हे भारविचे महाकाव्य; १४. 'मेघदूत' हे कालिदासाचे खण्डकाव्य; १५. 'नीतिशतक' व 'वैराग्यशतक' ही भर्तृहरीची शतककाव्ये; १६. 'पञ्चतन्त्र', १७. 'हितोपदेश' हे कथासंग्रह; १८. बाणभट्टाच्या कादंबरीचा पूर्वभाग, १९. 'साहित्यसारसंग्रह - काव्य व काव्यप्रकार' हा साहित्यशास्त्रावर आधारित ग्रंथ आणि २०. 'Higher Sanskrit Grammar' हे संस्कृत भाषेच्या व्याकरणाचे विद्यार्थ्यांसाठीचे पुस्तक.

या सर्व पुस्तकांचे वैशिष्ट्य असे सांगता येईल, की सर्व पुस्तके ही मो.रा. यांनी संस्कृतचा विद्यार्थी डोळ्यांसमोर ठेवून, विद्यार्थ्यांच्या दृष्टिकोनातून लिहिली. बऱ्याच पुस्तकांच्या प्रस्तावनांमध्ये त्यांनी तसे म्हटलेदेखील आहे. त्यामुळे त्या-त्या साहित्यकृतीच्या लेखकाचा काळ, त्याच्या लिखाणाची वैशिष्ट्ये, त्या साहित्यकृतीची भाषा व भाषेची वैशिष्ट्ये, त्या कृतीची वैशिष्ट्ये, त्या कृतीचे साहित्यातील स्थान, त्या कृतीचा थोडक्यात आढावा, त्यातील पात्रांची व्यक्तिरेखा, तत्कालीन सामाजिक व सांस्कृतिक चित्र इत्यादी गोष्टीचा सविस्तर विचार त्यांच्या पुस्तकाच्या सुरुवातीस केलेला दिसतो. त्याचप्रमाणे, त्या साहित्यकृतीच्या भाषांतरानंतर आवश्यक त्या शब्दांसाठी, श्लोकांसाठी विश्लेषणात्मक टीपाही जोडलेल्या दिसतात. काळे यांच्या लिखाणाचे अजूनही एक वैशिष्ट्य सांगता येईल ते म्हणजे, पुस्तकाची Critical Edition न काढता ते प्रचलित आवृत्तीच निवडतात. इतर पाठभेदही त्या-त्या ठिकाणी नमूद करतात. तसेच, साहित्यकलाकृतीच्या बरोबरीने त्यावरील संपूर्ण उपलब्ध असणारी टीका निवडून तीदेखील प्रसिद्ध करण्याकडे त्यांचा कल दिसतो, आणि त्यातही बऱ्याचदा संस्कृत भाषेतील सुप्रसिद्ध टीकाकार मल्लिनाथ याची टीका ते आधिक्याने स्वीकारतात.

एकूणच मो.रा. काळे यांचे लिखाण पाहता त्यांच्या संस्कृत भाषेबद्दलच्या प्रागल्भ्याचा व विद्यार्थ्यांविषयीच्या कळवळ्याचा प्रत्यय येतो आणि बहुतेक म्हणूनच एका शालेय शिक्षकाने विद्यापीठीय विद्यार्थ्यांसाठी केलेले काम केवळ विद्यापीठीय विद्यार्थ्यांनाच नव्हे, तर संस्कृत भाषेच्या प्रत्येक अभ्यासकाला आजही दीपस्तंभाप्रमाणे मार्गदर्शक ठरते.

— संपादित

**संदर्भ :**

१. *'काळे कुलवृत्तान्त', पृष्ठ : ३१५.*

## किंकेड, चार्ल्स ऑगस्टस

**इतिहास लेखक, अभ्यासक**

**१८७० – मृत्युदिनांक अनुपलब्ध**

शेरबर्न स्कूल व ऑक्सफर्डचे बॅलिओल कॉलेज येथे आपले माध्यमिक व महाविद्यालयीन शिक्षण संपवून १८९१मध्ये चार्ल्स ऑगस्टस किंकेड हिंदुस्थानला आले. कराचीचे असि. कलेक्टर म्हणून त्यांनी प्रथमत: काम करण्यास सुरुवात केली. निवृत्त होण्याच्या सुमारास हे मुंबई हायकोर्टाचे न्यायाधीश बनले होते.



या सर्व कारभारात त्यांना सर्व हिंदुस्थानचा प्रवास घडून हिंदी इतिहास, संस्कृती व आचारविचार यामध्ये एक प्रकारची विशेष गोडी वाटू लागली. हिंदी इतिहासावर त्यांनी लिहिलेले ग्रंथ त्यांच्या या तन्मयतेचे जिवंत स्मारक होऊन आपणासमोर उभे आहेत.

हिंदुस्थानातील - विशेषत: सिंध, गुजरात व महाराष्ट्र या प्रांतातील सहवासाने उत्पन्न झालेल्या उत्कंठेने ऐतिहासिक माहिती मिळवून त्यांनी ती छोट्या छोट्या पुस्तकांत एकत्र केली आहे. नावीन्याच्या दृष्टीने आपल्या देशी वाचकांना त्यात विशेष महत्त्व वाटले नाही, तरी ब्रिटिशांकडून हिंदुस्थानची बदनामी करण्याचा पद्धतशीर प्रयत्न होत असता त्यांच्याच एका जातभाईने त्यातील सौंदर्यस्थळे दाखवण्याचा प्रयत्न करावा, हे विशेष कौतुकास्पद आहे.

रा.ब. द.ब. पारसनीस यांच्या सहकार्याने किंकेड यांनी लिहिलेला 'History of Maratha People' हा त्रिखंडात्मक (१९१८, २२, २५) ग्रंथ सर्वच दृष्टीने विशेष महत्त्वाचा आहे.

यांच्या इतर ग्रंथांत (1) Deccan Nursery




Tales (1914), (2) The Indian Heroes (1915), (3) The Tale of the Tulsi Plant, (4) The Outlaws of Kathiawar, (5) Tales from Indian Epics, (6) Tales of King Vikrama, (7) Tales of the Saints of Pandharpura, (8) Istur Phakde (1917), (9) The Hindu Gods and How to Recognize Them (1920), (10) Shrikrishna and other Stories (1920), (11) Tales from the Indian Drama, (12) The Anchorite, (13) Tales from Old Sind, (14) Folk Tales of Sind and Gujerat, व (15) Our Parsee Friends हे ग्रंथ प्रमुख आहेत.

त्यांचे चिरंजीव डेनिस किंकेड हेही मुंबई इलाख्यात सरकारी नोकरीत होते. त्यांचे 'Grand Rebel' हे छ. शिवाजी महाराजांच्या चरित्रावरील पुस्तक विशेष प्रसिद्ध आहे.

– संपादित

**संदर्भ :**

*१. अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*

## किनले, कॅथॉरिना आंद्रिया

**प्राच्यविद्या अभ्यासक**

**जन्म–मृत्युदिनांक अनुपलब्ध**

मूळची जर्मन, शिक्षण आणि जन्म दक्षिण जर्मनीतील स्टुटगार्ड येथील, मात्र आवड आणि ओढा भारतीय आणि प्राच्यविद्यांचा; वेदाध्ययनाची गोडी, संतसाहित्याचा साक्षेपी अभ्यास आणि पुणेकर होण्याची आवड ही कॅथॉरिनाची वैशिष्ट्ये अगदी प्रथमदर्शनी सांगता येतील. १९७८ मध्ये स्टुटगार्डची ही विदुषी कॅथॉरिना आंद्रिया किनले, जर्मन स्टूडंट फाउण्डेशनची शिष्यवृत्ती स्वीकारून, पोस्ट डॉक्टरेट करण्यासाठी पुण्यात आली. कॅथॉरिना ट्युबिनजेन विद्यापीठातून 'संस्कृत भाषा आणि चायनीज भाषा : तौलनिक अभ्यास' हा विषय घेऊन एम.ए. झाली. प्रसिद्ध जर्मन प्राच्यविद्यापंडित प्रा. पॉलथिमे यांच्या मार्गदर्शनाखाली



तिने पीएच.डी. केली. वयाच्या एकोणतिसाव्या वर्षी ती वेदाध्ययन अभ्यासासाठी पुण्यात आली.

तिचे वडील एका खासगी नाट्यगृहाचे स्टेज डायरेक्टर होते, तर आई 'सिनरी-ड्रेपरी' तज्ज्ञ होती. घरात संस्कृतचा गंध नसताना ती या विषयाकडे वळली याचेच आश्चर्य म्हणावे लागेल. वास्तविक, कर्मठ पिढीच्या मतानुसार स्त्रीला वेदाध्ययनाचा अधिकार नाही. तरीपण संस्कृत वैय्याकरणी डॉ. शि.द. जोशी यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी अभ्यास चालू ठेवला. सुरुवातीला संस्कृत व्याकरण डॉ. जोशी यांनी, तर वेदवाङ्मयाचा इतिहास डॉ. विद्याधर भिडे यांनी शिकवला. वेदमंत्र शिकवणारे पुरोगामी पुरोहित म्हणून ख्यात असलेले कै. दाजीशास्त्री सहस्रबुद्धे यांनी तिला संथा दिली. ऋग्वेद-यजुर्वेदाच्या निवडक ऋचा सस्वर म्हणण्याचा, मुखोद्गत करण्याचा त्यांनी आटोकाट प्रयत्न केला.

एका मुलाखतीत त्या म्हणाल्या, संस्कृतसाठी बनारस की पुणे असा प्रश्न त्यांच्यासमोर पडला असता, कै. डॉ. शांताराम जोशी यांनी जर्मनीत असताना पुण्याचे आमंत्रण दिले. पुण्याच्या वास्तव्यात त्या मराठी भाषा शिकल्या. कुटुंबात राहून शाकाहारी पाककला शिकल्या, संतसाहित्याच्या ओढीने एकदा पंढरपूरची वारीही करून आल्या. एका मुलाखतीत त्यांनी म्हटले आहे, 'येथील महिला पाश्चात्त्य वेशभूषेत वावरत असूनही देवपूजा, उपवास, धार्मिक ग्रंथांचे वाचन ह्या परंपरा आवडीने पाळतात आणि त्यामुळेच पुण्यात छोट्या वास्तव्यासाठी आल्यावर त्या हॉटेलऐवजी ओळखीच्या कुटुंबात राहणे पसंत करतात.

१९९७ मध्ये त्यांनी लायझिकमधून प्रकाशक फ्रँक स्टेइनर (स्टुटगार्ड) मार्फत ज्ञानेश्वर महाराजांच्या अभंगांचे 'साँग्स ऑफ योगी' या नावे चिकित्सक अभ्यास करून दोन खंडांमधून प्रकाशन केले. तिसऱ्या खंडातून नाथसंप्रदायावर माहिती देणारा ग्रंथ प्रकाशित केला. १९८४ ते १९८९ या काळात त्यांना जर्मन रिसर्च काउन्सिलने फेलोशिप दिली होती. हे काम त्यांनी कै. डॉ. शं.गो. तुळपुळे यांच्या मार्गदर्शनाखाली केले.

मराठी भक्तिसंगीताची त्यांना खूप आवड होती. त्यामुळे अभंग गायक कै. मनोहरपंत सबनीस यांचे शिष्यत्व स्वीकारून त्या सुश्राव्य अभंग-गवळणी शिकल्या. १९९७ मध्ये टिळक महाराष्ट्र विद्यापीठामार्फत भरलेल्या महाराष्ट्र कल्चर ॲण्ड सोसायटीमध्ये त्यांनी भाग घेऊन प्रबंध वाचला होता. तत्पूर्वी जर्मन प्राच्यविद्या पंडित डॉ. गुंथर सोन्थायमार यांनी आयोजित केलेल्या आंतरराष्ट्रीय भक्ती परिषदेच्या त्या एक आयोजक म्हणून लोकांसमोर आल्या. त्यानंतरच्या काळात त्यांचा आणि मराठी विदुषी दुर्गा भागवत यांचा खूप स्नेह जमला. त्यामधूनच त्यांनी दुर्गा भागवतांचे 'लहानी' हे लेखन जर्मनीमधून प्रसिद्ध केले. आचार्य अत्रे यांच्या 'बुवा तिथे बाया' या नाटकाचेही त्यांनी जर्मन भाषेत रूपांतर केले.

डॉ. गुंथर सोन्थायमार यांच्या प्रेरणेने त्यांनी खेड्यातील धार्मिक जीवनाचा अभ्यास सुरू केला. विविध जत्रा, लोकदेवतांच्या परंपरा यांवर त्यांनी विपुल लेखन केले आहे. अलीकडेच त्या महाराष्ट्र परिषदेच्या आयोजनात डॉ. ॲन फेल्डहौस (अमेरिका) आणि डॉ. इरिना ग्लुश्कोव्हा (रशिया) यांच्या बरोबरीने भाग घेत आहेत. सध्या त्या जर्मनीत आहेत.

— वा.ल. मंजूळ

## कीर्तने, नीळकंठ जनार्दन

**मराठा इतिहासाचे आद्य टीकाकार व चिकित्सक**

**१८४४ – १८९६**

नीळकंट जनार्दन कीर्तने हे विनायकराव कीर्तने यांचे धाकटे बंधू. त्यांचे प्राथमिक शिक्षण कोल्हापुरास व मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण मुंबईस झाले. १८६७मध्ये डेक्कन महाविद्यालयात असताना त्यांनी 'ग्रँट डफ कृत मराठ्यांच्या बखरीवरील टीका' हा प्रसिद्ध निबंध लिहिला व 'पूना यंग मेन्स असोसिएशन' या संस्थेपुढे तो

निबंध वाचला. तेव्हा कृष्णशास्त्री चिपळूणकर हे अध्यक्ष होते व श्रोत्यात शंकर पांडुरंग पंडित होते. या उभय विद्वानांनी त्यांची खूप प्रशंसा केली. पंडितांनी तर हा निबंध आग्रहपूर्वक मागून घेऊन 'इंदुप्रकाश'मध्ये छापला. या निबंधात सदर ग्रंथाचा कोतेपणा व प्रमाद दर्शवले आहेत. पुढे अस्सल कागदपत्रे शोधण्याने त्यांच्या निबंधातील विधानांना पुष्टीच मिळाली आहे. याशिवाय त्यांचे 'टेंपेस्ट' नाटकाचे मराठी भाषांतर व 'लोकप्रिय हिंदू धर्म व त्याची योग्यता' इत्यादी नावांचा एक निबंध प्रसिद्ध आहे. याशिवाय हमीर महाकाव्याचे (संस्कृत) त्यांनी केलेले संपादन प्रसिद्ध आहे. 'इंडियन अँटिक्वेरी' यांतही त्यांनी काही इंग्रजी लेख लिहिले होते. जावराव देवास धाकटी पाती यांच्या अधिपतींचे ते शिक्षक होते. देवासकडून यांना एक गावही त्याकरिता मिळाले होते. ते काही दिवस मंगळूर (काठेवाड) व देवास धाकटी पाती येथील दिवाणही होते.

ग्रँट डफवरील त्यांच्या निबंधाच्या अनेक आवृत्त्या निघाल्या व भारतीय लोकांनी इतिहास संशोधनाचे काम हाती घेतले. त्यांनीच १८८२मध्ये 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने' संपादण्यास सुरुवात करून पहिला खंड विविध ज्ञानविस्तारातून चिटणीसकृत शिवाजीच्या सप्तप्रकरणी चरित्ररूपाने काढला.

— संपादित

**संदर्भ :**

*१. अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*

## कीलहॉर्न, फ्रॅन्झ

### प्राच्यविद्या संस्कृत पंडित

### १८४० – १९०८

फ्रॅन्झ कीलहॉर्न यांचा जन्म जर्मनीत झाला. प्रथमपासूनच यांचा ओढा संस्कृत भाषा व व्याकरण यांकडे होता. प्रख्यात प्रो. मॅक्समूलर यांनी सायणभाष्यासह ऋग्वेद-संहिता प्रथम प्रसिद्ध केली. त्यास डॉ. कीलहॉर्न यांचे साहाय्य झाले. १९६६मध्ये यांची पूना कॉलेजात संस्कृत व प्राच्यभाषा यांचे



प्राध्यापक म्हणून नेमणूक झाली. त्यांनी त्यापूर्वीच शांतनवाचार्यकृत फिट्सूत्रे प्रसिद्ध करून व्याकरणाचे सूक्ष्म अभ्यासक असे नाव कमावले होते. येथे आल्यावर पं. अनंतशास्त्री पेंढारकर व इतर विद्वानांशी त्यांचा संबंध येऊन व्याकरणातील परिभाषेन्दुशेखरासारख्या कठीण ग्रंथांच्या इंग्रजी भाषांतरास त्यांनी हात घातला आणि नंतर पतंजलीच्या महाभाष्याची आवृत्ती प्रसिद्ध केली . इतरही अनेक व्याकरणविषयक लेख लिहून वेळोवेळी इंडियन अँटिक्वरी व इतर शास्त्रीय नियतकालिकांत प्रसिद्ध करून पहिल्या प्रतीचे वैय्याकरण व संस्कृत पंडित अशी यांनी ख्याती मिळविली.

१८८५ नंतर त्यांनी आपल्या अनुपम संस्कृत ज्ञानाचा ओघ प्राचीन लेख-साहित्याकडे वळवला आणि शिलालेख-ताम्रपट आदिकरून इतिहासाची साधने शास्त्रीय पद्धतीने कशी संपादावीत व त्यापासून इतिहासाची पुनर्घटना कशी करावी, याचा नव्यानेच उपक्रम केला. यांच्याच पुरस्कारामुळे, हिंदुस्थान सरकारने ही इतिहासाची साधने प्रसिद्ध करण्याकरता इंडियन अँटिक्वरीचे परिशिष्ट म्हणून 'एपिग्राफिया इंडिका' या त्रैमासिकाची जबाबदारी ५० वर्षांपूर्वी घेतली व त्याचे २५ खंड प्रसिद्ध झाले आहेत.

पाली-प्राकृत भाषांतून लिहिलेल्या प्राचीनतर लेखांकडे ते विशेष लक्ष वेधतात. गुप्तकालापासून नंतरच्या संस्कृत भाषेत लिहिलेल्या निरनिराळ्या ऐतिहासिक घराण्यांच्या राजवटीतील लेखांवरच भर देऊन, त्यांचा कालनिर्णय स्थिर करण्यासाठी डॉ. कीलहॉर्न यांनी अविरत श्रम घेतले. लेखात सापडणाऱ्या वर्ष-तिथी-वार इत्यादींचा मेळ घालून, बरोबर तिथी ठरवून मगच घराण्यांचे व राजांचे काल अचूक ठरवावयाचे असतात, त्या बाबतीत अविश्रांत मेहनत करून यांनी पाया घालून दिला. कलचूरी अथवा चेदिवत

यांचे आरंभस्थान त्यांनीच शोधून काढले. सर्वांत महत्त्वाची व संशोधकांस अत्यंत उपयोगी अशी त्यांची कामगिरी म्हणजे त्यांनी उत्तर व दक्षिण हिंदुस्थानात प्रसिद्ध झालेल्या सर्व लेखांची वर्षानुक्रमे पद्धतशीर यादी व राजवंशांची परिशिष्ट तयार करून भावी संशोधकांचा मार्ग सुलभ करून ठेवला आहे. यांच्या लेखवाचनातील बिनचूकपणा, त्यांनी नमूद केलेल्या तारखांचा काटेकोरपणा व ऐतिहासिक निष्कर्ष-साधनांतील पद्धतशीरपणा अद्याप आदर्श मानला जातो. याप्रमाणे या देशातील भाषा व इतिहास यांच्या संशोधनांत पूर्णपणे रंगून गेलेल्या या विद्वानाने सेवानिवृत्तीनंतर स्वदेशी गेल्यावर तेथील विश्वविद्यालयात संस्कृत प्राध्यापकाची जागा स्वीकारली व हिंदी विद्या व संस्कृती यांच्या अभ्यासाची आवड अनेक तरुण जर्मन विद्यार्थ्यांत उत्पन्न केली.

डॉ. कीलहॉर्न व डॉ. बुल्हर यांच्याच प्रयत्नाने प्रसिद्ध आर्य भाषा व संस्कृती यांची संशोधनात्मक लेखमाला प्रसिद्ध होत होत्या. भूमीचे वैभव व महत्त्व युरोपात प्रस्थापित करणे अलीकडील संशोधकांस चिकित्सापद्धतीचे आदर्श घालून देणे; या दुहेरी कामगिरीमुळे हे पूर्व व पश्चिम यांना सांधणारे खरेखुरे दुवे होत, असे म्हणणे योग्य होईल.

— संपादित

**संदर्भ :**

*१. अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*

## कुंटे, भगवान गणेश

**मध्ययुगीन इतिहासाचे गाढे अभ्यासक, अनुवादक**

**४ जून १९२७ – ९ मार्च २००५**

आयुष्याची उणीपुरी ७८ वर्षे सातत्याने कार्यरत असणे हा विशेष गुण डॉ. भगवान गणेश कुंटे यांनी शेवटच्या क्षणापर्यंत जोपासला. त्यांचे मूळ घराणे कोकणातील कणकवली येथील होते. त्यांचे शिक्षण ब्रिटिश आमदानीत झाले. त्यांनी रुइया महाविद्यालयातून १९४७ ते १९४९ या काळात अर्थशास्त्राचे प्राध्यापक



म्हणून काम केले. त्यांनी उमेदीच्या काळातच लेखन व वाचन सुरू केले. ललित साहित्य वा रहस्यकथांपासून अर्थशास्त्रापर्यंत, इतिहासापासून नाट्यलेखनापर्यंत त्यांना कोणतेही क्षेत्र अस्पर्शित नव्हते. त्यांच्या एकूण साहित्यनिर्मितीत अनुवाद हा विशेष भाग आहे. त्यांनी १९५०मध्येच अर्थशास्त्रात पीएच.डी. आणि पुढे इतिहास विषयात मुंबई विद्यापीठातून पीएच.डी. पदवी प्राप्त केली. शासनाच्या दर्शनिका विभागात सहसंपादक म्हणून ते नियुक्त झाले. १९६९पासून १९८१पर्यंत कार्यकारी संपादक व सचिव म्हणून ते कार्यरत होते. या काळात संपादनाचे मोठे काम झाले. जिल्हा गॅझेटिअर व स्वातंत्र्यसैनिक चरित्रकोश यासारख्या मालिकेतील त्यांचे काम उल्लेखनीय राहिले.

त्यांनी आयुष्याच्या पूर्वार्धात ठाणे, मुंबई परिसरात काम केले असले, तरी उत्तरार्धात बराच काळ अमेरिकेत शिकागो, नॅशव्हील, मिडल्सवरो यासारख्या ठिकाणी त्यांचे वास्तव होते. त्यांनी एन्सायक्लोपिडिया ब्रिटानिका शिकागो येथे १९९२ ते १९९४ या काळात साहाय्यक संपादक म्हणून काम पाहिले. त्यांनी पुढील दोन वर्षे नॉर्थ वेस्टर्न युनिव्हर्सिटीमध्ये सहकारी प्राध्यापक म्हणून काम केले. चौफेर वाचन, लेखन व भटकंतीचा छंद जपला. त्यामुळे त्यांनी महाराष्ट्रातील बहुतांश गडकोटांची भ्रमंती केली, तसेच विदेशातही भरपूर प्रवास केला.

दिसामाजी काही तरी ते लिहावे !
प्रसंगी अखंडित वाचीत जावे!

हे समर्थ रामदासांचे वचन त्यांनी शिरोधार्य मानले होते. त्यांची लेखणी अगदी शेवटच्या क्षणापर्यंत थांबली नाही. त्यांनी अनेक संकल्प सोडले. त्यात 'मनाचे श्लोक'चा इंग्रजी अनुवाद पूर्ण झाला. 'ज्ञानेश्वरी' व 'दासबोध' यांच्या अनुवादाचे काम अखेरपर्यंत सुरू होते. त्यांनी ऐन उमेदीत सुरू केलेल्या लेखनाला

यशवंतराव चव्हाणांचा पुरस्कार लाभला. 'आपले छत्रपती' (१९६०) या पुस्तकाच्या निमित्ताने प्रादेशिक वा राष्ट्रीय अभिनिवेशास बळी न पडता इतिहासकाराने सत्य, स्पष्ट व निःपक्षपातीपणे सांगितले पाहिजे, असे नोंदवून आपले 'छत्रपती सन १६०० ते १७४०' हा ग्रंथ या कसोटीला उतरतो असा विश्वास त्यांनी व्यक्त केला. हा ग्रंथ त्यांनी सेतुमाधवराव पगडी व न.र.फाटक यांना अर्पण केला.

सर वूल्स्ले हेग यांनी 'बुरहाने मासीर' या सय्यद अली तबातबाने लिहिलेल्या मूळ फार्सी ग्रंथाचे इंग्रजी भाषांतर केले व १९६२मध्ये डॉ. कुंटे यांनी त्याचा मराठी अनुवाद केला. याही वेळी ''हे पुस्तक महाराष्ट्राच्या मध्ययुगीन कालखंडावर प्रकाश टाकणारे एक नवीन साधन आहे, असे मी मानतो'' असे म्हणून व्यासंगी व संशोधक दृष्टीचा एक उदयोन्मुख लेखक म्हणून यशवंतराव चव्हाणांनी कुंटे यांचे अभिनंदन केले. पाठीवर पडणाऱ्या या शाबासकीच्या थापेमुळे सातत्याने पुढे झेपावत जाणारे कुंटे अनेक प्रकारचे चौफेर लेखन करताना दिसतात. अर्थशास्त्र आणि इतिहास या दोन्हीही क्षेत्रांत त्यांचे काम आहे.

प्रारंभिक काळामध्ये 'इलेग्ट ऑफ सिव्हिक्स कॉन्स्टिट्युशनल हिस्टरी ऑफ इंडिया', 'प्रिन्सिपल ऑफ इकॉनॉमिक्स', 'माल्थम', 'आपले छत्रपती', 'करपद्धतीचे ऐतिहासिक विवेचन', 'पैसा, बँका आणि त्यांचे व्यवहार', 'आर्थिक नियोजने', 'रिकार्डो', 'ॲडम स्मिथ', 'प्रोधन', 'मिल' 'से सायमन आणि सिसमॉन्डी', 'मार्क्सविषयी थोडेसे', युद्धाच्या धुमश्चक्रीत 'पानिपतचे युद्ध' इ. १९५९ ते १९६५ या काळातील हे ग्रंथलेखन होय. त्यांचे पुढील ग्रंथ अनुवादात्मक असले, तरी महत्त्वपूर्ण आहेत. महाराष्ट्राच्या मध्ययुगीन इतिहासाची जी काही अव्वल दर्जाची फारसी साधने आहेत, त्यामध्ये फरिश्ता याचे 'गुलशने इब्राहिमी', सय्यद अली तबातबाचे 'बुरहाने मासीर' हा मुळात दोन भागांत असलेला ग्रंथ व रफिउद्दीन शिराजी यांचे 'तजकरत उल् मुलुक' यापैकी बुरहाने मासीरमध्ये पहिल्या भागात 'बहमनी साम्राज्याचा उदय व ऱ्हास' याची माहिती असून, दुसऱ्या भागात 'अहमदनगरच्या निजामशाही' घराण्याचा संपूर्ण इतिहास दिलेला आहे. मेजर किंग यांनी यापैकी पहिल्या भागाचा इंग्रजी अनुवाद केला असून, सर वुल्स्ले हेग यांनी दुसऱ्या भागाचा अनुवाद केला आहे. मेजर किंग यांच्या पहिल्या भागाचा अनुवाद करताना डॉ. भगवान कुंटे यांनी या क्षेत्रात झालेल्या नवीन कामाची नोंद घेतली. विशेषतः हरुनखान शेरवानी यांचा 'बहमनी ऑफ द डेक्कन' हा ग्रंथ त्यांच्यासमोर होता. याच भागामध्ये मुळात किंग्ज यांना तबातबाच्या ग्रंथास पुरवणी म्हणून रफिउद्दीन शिराजी यांच्या ग्रंथाचाही संकीर्ण स्वरूपात अनुवाद दिला होता.

स्वाभाविकपणे कुंटे यांच्या सिद्धहस्त लेखणीतून वरील तिन्ही मूलगामी साधनांचा मराठी अनुवाद झाला आहे. असे अनुवाद करताना पूरक संदर्भ, टिपा, तत्कालीन किल्ल्यांची व महत्त्वाच्या स्थळांची सूची, निवडक घटकांची जंत्री देण्याच्या त्यांच्या पद्धतीमुळे आजही महाराष्ट्राच्या मध्ययुगीन इतिहासाच्या अभ्यासासाठी ते मार्गदर्शक ठरतात. कुंटे यांनी गुलशने इब्राहिमी या फरिश्त्याच्या ग्रंथाचा अनुवाद १९८२मध्ये केला आहे. यामध्ये बहमनी घराणे आणि अहमदनगरची निजामशाही, विजापूरची आदिलशाही, वऱ्हाडची इमादशाही, बरीदची बरीदशाही, गोवळकोंड्याची कुतुबशाही अशा शाह्यांच्या इतिहासाबरोबरच खानदेशच्या फारुकी घराण्याचा इतिहासही (इ.स. १३८२ ते १६०१) दिला आहे. याशिवाय गुजरातचे सुलतान, मोगल आणि इतर राजवटी यांचा आनुषांगिक उल्लेखही यात आला आहे. फरिश्त्याचा गुलशने-ई-इब्राहिमी म्हणजे मध्ययुगीन महाराष्ट्र-कर्नाटकाचा अस्सल साधनांनी युक्त असा इतिहास आहे.

याशिवाय कुंटे यांच्या 'दिल्लीच्या शहाजहानचा इतिहास' डॉ. व. प्र. सक्सेनालिखित 'हिस्टरी ऑफ शहाजहान ऑफ दिल्ली'चा अनुवाद किंवा जदुनाथ सरकारलिखित 'हिस्टरी ऑफ औरंगजेब' या ग्रंथाचा मराठी अनुवाद अतिशय सुरस झाले आहेत.

शहाजहानच्या अनुवादाच्या संदर्भात निवेदन करताना ते काही मूलगामी विचार सहजपणे मांडतात. 'बंडखोरीचे विष जणू काही मुस्लीम राज्यकर्त्यांच्या अंगी भिनले होते. औरंगजेबाने हीच बंडखोरी केली आणि आपल्या बापालाच - शहाजहानलाच जिवंतपणी नरकयातना भोगावयास लावल्या. शहाजहानचे चरित्र म्हणजे आनंद आणि शोक यांचा आविष्कार आहे.' एखाद्या मूलगामी साधनाचा सरस अनुवाद करताना तो मूळ साधनाइतकाच दर्जेदार असणे हे कौशल्य भगवान कुंटे यांना सहजसाध्य झाले होते.

कार्यकारी संपादक व सचिव म्हणून काम करताना त्यांनी सुधारित इंग्रजी गॅझेटिअरच्या एकूण १३ ग्रंथांच्या संपादनाचे काम केले, तर राज्य गॅझेटिअर मालिकेमध्ये ३ गॅझेटिअर ग्रंथ संपादित केले. 'सोर्स मटेरिअल फॉर हिस्ट्री ऑफ फ्रीडम मूव्हमेंट'मधील खंड ३ ते ९ या ७ खंडांचे ११ भागांत संकलन, संपादन व प्रकाशन केले. याशिवाय स्वातंत्र्यसैनिक चरित्रकोश ६ खंडात प्रकाशित केला. मराठवाडा विभागासाठी त्यांनी प्रदीर्घ प्रस्तावना लिहिली आहे. डॉ. सेतुमाधवराव पगडी यांच्यानंतर कुंटे यांनी केलेले काम तितकेच भरीव स्वरूपाचे आहे.

अगदी शेवटच्या क्षणापर्यंत सहयोगकर्ता लेखक म्हणून त्यांनी दर्शनिका विभागासाठी योगदान दिले. मात्र, मध्ययुगीन इतिहासाचे आकलन 'हिस्टरी ऑफ इंडिया ॲज टोल्ड बाय इट्स ऑन हिस्टॉरियन' या ग्रंथाचे लेखक इलियट डाऊन्सच्या दृष्टीकोनाचा प्रभाव त्यांच्या लेखनात जाणवतो. इलियटची लेखनपद्धती ही ब्रिटिश राजवटीचे समर्थन करणारी आणि इस्लामी सल्तनत ही प्रजेवर अन्याय करणारी जुलमी राजवट होती, हे मुसलमान लेखकांच्या लिखाणांचे उतारे देऊन सिद्ध करण्याचा प्रयत्न करणारी होती. स्वाभाविकपणे भाषांतरासाठी तसेच उतारे निवडले गेले.

वास्तविक तवारिखा व तवारिखकार यांची योग्य समीक्षा व्हायला हवी. इस्लामी जगतात इतिहास लेखनाच्या दोन परंपरा दिसतात. पहिली परंपरा अरबी इतिहासकारांची आणि दुसरी इराणी तवारिखकारांची. तुलनेत अरबी इतिहासकारांची दृष्टी अधिक व्यापक होती. संपूर्ण समाज त्यांच्या डोळ्यांसमोर होता.

झियाउद्दीन बरवी, अमीर खुसरो, इसामी हे सगळे इराणी परंपरेतील लेखक सुलतानाभोवती फिरताना दिसतात, तर इब्न बत्तुता आणि इब्न फादुल्ला (मृत्यू १२४८) हे दोन अरबी परंपरेतील लेखक मोहम्मद तुघलकाच्या काळातील आहेत. प्रा. सुलेमान नदवी यांनी याविषयीची ओळख करून दिली आहे. एकूण कुंटे यांचे इतिहासलेखन उत्तरकाळात तरी इलियट यांच्या दृष्टीकोनातून प्रभावित झालेले दिसते. खरे तर यानंतर या क्षेत्रात काम झाले आहे. आज त्यांच्या लेखनाचा वेगळ्या पद्धतीने विचार करणे शक्य आहे. असे असले, तरी महाराष्ट्राच्या मध्ययुगीन इतिहासाचे आकलन करण्यासाठी त्यांनी मूळ फारसी व इंग्रजी साधनांचा मराठी अभ्यासकाच्या हाती दिलेला ठेवा चिरंतन स्वरूपाचा आहे. तसेच गॅझेटिअर विभागात त्यांनी केलेले काम हे महाराष्ट्राचा गॅझेटिअरकार म्हणून त्यांची खऱ्या अर्थाने ओळख करून देणारे आहे.

— डॉ. अरुणचंद्र शं. पाठक

## कुंटे, महादेव मोरेश्वर

**कवी, इतिहासकार व षट्दर्शनज्ञ**

**१८३५ – १८८८**



साताऱ्याजवळ माहुली गावी गरीब भिक्षुक घराण्यात यांचा जन्म झाला. बारा वर्षांपर्यंतचे आयुष्य उनाडपणात काढून ते कोल्हापुरास पळाले. तेथे मराठी व इंग्लिश शिक्षण घेतले आणि आपले सहाध्यायी (रा.सा.) विठ्ठलराव पाठक, (रा.ब.) बाबाजीराव सामंत यांच्याबरोबर पुढील अभ्यासाकरता मुंबईला आले. पण जवळची पुंजी लवकरच संपल्याने यांना परत जावे

लागले. १८५९ मध्ये ते पुन्हा मुंबईला गेले आणि मॅट्रिक झाले व १८६४ साली बी.ए. झाले. सिंधमधील कराची हायस्कूलच्या मुख्याध्यापकपदी त्यांची नेमणूक झाली. तिथल्या दोन वर्षांच्या वास्तव्यात ते सिंधीचे वाकबगार पंडित झाले. सिंधीचे मॅट्रिकचे परीक्षक म्हणूनही काम केले. त्यानंतर ते कोल्हापुरातील राजाराम हायस्कूलमध्ये मुख्याध्यापक झाले. तेथे चार वर्षांत संस्कृतचे अध्ययन करून ते व्याकरण, अलंकार, न्याय वगैरे शास्त्रांत निष्णात झाले. तेथेच यांनी तत्कालीन राजाराम छत्रपतींच्या मृत्युविलापाचे काव्य केले (१८७१). तेथेच 'राजा शिवाजी', 'मन ही काव्ये' लिहून प्रसिद्ध केली. त्यानंतर १८७१ साली त्यांची नेमणूक माध्यमिक शाळेचे मुख्याध्यापक म्हणून झाली.

पुण्याला नेमणूक झाल्यापासून मधल्या दोन वर्षांखेरीज (१८७९-८०) ते सोळा वर्षे पुण्यालाच राहिले. मधल्या दोन वर्षांपैकी सहा महिने मुंबईला एल्फिस्टनमध्ये संस्कृतचे प्राध्यापक व पुढे अहमदाबाद महाविद्यालयामध्ये प्रभारी प्राचार्य या पदावर त्यांची नेमणूक झाली. यापूर्वीच त्यांनी मीमांसाशास्त्राचा अभ्यास केला. आपल्या ज्ञानाचा फायदा 'षड्दर्शनचिंतनिका' (१८७७) या मासिकाद्वारे लोकांना देण्यास यांनी सुरुवात केली. त्यात हे इंग्लिश व मराठी अशा दोन्ही भाषांत लिहीत. त्यावरून त्यांचे शास्त्रांतील नैपुण्य सहज दिसून येते.

इटलीच्या विद्वत्परिषदेकडून 'आर्य लोकांच्या हिंदुस्थानातील सुधारणाक्रमांचा इतिहास' लिहिणाऱ्यास बक्षीस देण्याचे प्रसिद्ध झाले, तेव्हा ते बक्षीस मिळवण्याच्या हेतूने कुंटेंनी 'व्हिसिसिट्यूडस् ऑफ आर्यन् सिव्हिलिझेशन इन इंडिया' (आर्यसंस्कृतीची स्थित्यंतरे) या नावाचे एक मोठे पुस्तक लिहून ते रोम येथे पाठवले आणि ते बक्षीस मिळवले. कुंटे यांच्या विद्वत्तेची व शोधक बुद्धीची ओळख पटवण्यास हे पुस्तक पुरेसे आहे.

त्यांनी मुंबईला जाण्यापूर्वी 'ऋषि' नावाचे इंग्लिश काव्य केले. त्याची इंग्लिश कवींनीही स्तुती केली. १८७६-७७ साली दुष्काळ पडला, त्याला अनुसरून त्यांनी 'फॅमिश्ड व्हिलेज' या नावाचे इंग्लिश काव्य करून प्रसिद्ध केले. त्यांनी हिंदुस्थानभर प्रवास केला होता. १८७८ पर्यंत ते पुण्यातील प्रार्थना समाजाचे पुरस्कर्ते व अध्वर्यू होते. पण यांचे मतान्तर होताहोता ते पूर्ण वारकरी सांप्रदायाचे बनले. ते शेवटी रोज एक तास चाळ बांधून हातात चिपळ्या व वीणा घेऊन घाम निघेपर्यंत भजन करत.

त्यांचे लक्ष औद्योगिक गोष्टीकडेही गेल्यामुळे त्यांनी 'सूर्यशलाका' नावाचा शिसपेन्सिलीचा कारखाना काढला. त्यात काही वर्षे घालवल्यावर त्यांचे लक्ष संगीतशास्त्राकडे वेधले गेले. त्याचाही खोल व्यासंग केल्यावर भारतीय संगीत श्रेष्ठ असल्याची त्यांची खात्री झाली. गायन समाजाचे काम ते मोठ्या आस्थेने करत. शेवटच्या काळात त्यांचे लक्ष भूगर्भशास्त्राकडे वेधले होते. पुणे नगरपरिषदेचे ते सभासद व अध्यक्ष होते. त्यांना अनेक भाषा येत आणि त्या भाषांत ते मोठे रसाळ वक्तृत्व करू शकत. थोडक्याच दिवसांत परकी भाषा तिच्यातील सफाईदार रचनेसह आत्मसात करणे हा त्यांचा मोठा गुण होय. मराठी भाषेतील त्यांचे वक्तृत्व निःसंशय मेजवानीसारखे असे. त्यांचे भाषण साधे पण विविध माहितीने भरलेले, रसाळ पण विस्तृत असे. ग्रंथांप्रमाणे भाषणे जतन करण्याची कला आपल्याकडे नव्हती याबद्दल चुटपूट लागल्याशिवाय राहत नाही. त्या वेळच्या पंडिती वळणांतील विद्वानांत त्यांच्या 'शिवाजी' वगैरे काव्याची आणि त्यातील नव्या साध्या मराठी वळणाची टरच उडवण्यात आली. संस्कृत शब्दांचा व अलंकारांचा सोस सोडून, अस्सल व्यावहारिक भाषेत काव्य करण्याची प्रथा पाडून नवीन युगाच्या प्रवर्तकत्वाचा मान यांनी आपल्याकडे घेतला आहे. इंग्लिश वळणावरची कविता त्यांच्यानंतर सुरू झाली.

– संपादित

**संदर्भ :**

*१. अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*

## कुंभार, आनंद नागप्पा
**पुराभिलेख संशोधक**
**२७ मे १९४१**



पुराभिलेख संशोधन, संपादन व प्रकाशन या कार्यात गेली ४० वर्षे सतत मग्न असलेले आनंद नागप्पा कुंभार यांचा जन्म सोलापुरात झाला. श्री. नागप्पा आणि सौ. काशीबाई हे त्यांचे जन्मदाते. आनंद कुंभार यांच्या जन्मदिवशीच एक नाट्य घडले. कुंभारांच्या आईच्या सतर्कतेमुळे त्या रुग्णालयात मुला-मुलीची होऊ घातलेली अदलाबदल टळली व ते मातेच्या कुशीत सुखरूप राहिले.

कुंभार यांचे प्राथमिक व माध्यमिक शालेय शिक्षण सोलापुरात झाले. घरची आर्थिक बाजू बेताची असल्यामुळे माध्यमिक शिक्षण रात्रशाळेतून घ्यावे लागले. शालेय जीवनात कोणत्याही तऱ्हेने ते नावाजले नाहीत. सर्वसाधारण बुद्धिमत्तेमुळे इयत्ता दहावीनंतर उदरनिर्वाहासाठी त्यांना प्रयत्न करावे लागले. घरी पिढीजात कुंभारकामाची कला असल्यामुळे त्यातच ते घरच्यांना कामात मदत करू लागले. परंतु, त्या कलाउद्योगात त्यांचे मन रमेना. त्या वेळीसुद्धा नोकरी सहजासहजी मिळत नसे. शेवटी एके दिवशी त्यांनी भारतीय सैन्यदलात जाण्याचा निर्णय घेतला आणि त्यांनी सैन्यात प्रवेश केला. दि. १० मे १९६० रोजी भारतीय सैन्यांतर्गत तोफखान्यात बिनतारी संदेश वाहक म्हणून आनंद कुंभार यांना दाखल करून घेण्यात आले.

सैन्यात सेवारत असतानाच चीन-भारताचे युद्ध झाले. पुढे अनेक गोष्टी घडल्या. या काळात किमान दोनदा तरी त्यांना यमद्वारी जाऊन परत यावे लागले. नियतीला त्यांचा अंत मान्य नव्हता. युद्धोत्तर काळात घरी काही प्रसंग असे घडले, की त्यांना सैन्यातील सेवेचा त्याग करून गावी परत यावे लागले. १९६४ मध्ये येथे आल्यानंतर येनकेन प्रकारेण उपजीविकेचा प्रश्न सोडविण्यात त्यांना यश मिळाले. पुस्तके, नियतकालिके आदी वाचण्याची आवड त्यांना पूर्वीपासूनच होती. विदर्भ संशोधन मंडळाच्या वार्षिकांतील संशोधनात्मक लेख वाचून ते स्तिमित तर झालेच; परंतु संमोहितही झाले. विशेषत:, म.म. डॉ. वा.वि. मिराशी यांचे ताम्रपट, शिलालेख व नाण्यांवरील संशोधनात्मक लेख त्यांच्या मनावर खोलवर परिणाम करणारे ठरले. आपणही या क्षेत्रात काम करावे, असे त्यांना वाटू लागले. या बाबतीत त्यांनी थेट म.म. डॉ. मिराशी यांच्याशी संपर्क साधला. सुयोगाने त्यांना प्रतिसाद मिळाला. पुराभिलेख विद्या काय किंवा नाणकशास्त्र काय, ही विद्वानांची विद्या आहे. त्याला संस्कृत भाषेचे उत्तम ज्ञान हवे, इंग्रजी भाषेत गती हवी आणि सर्वांत महत्त्वाची बाब म्हणजे पुरातन लिपी वाचता आली पाहिजे आणि लेख वाचल्यानंतर त्यांतील कथन, ज्ञाते इतिहासाची सांगड घालून, प्राप्त लेखाने नवी अशी भर कोणती पडली हे स्पष्ट करून सांगता आले पाहिजे. या गुणवत्तेपैकी एकही गुण श्री. कुंभारांकडे नव्हता.

सैन्यातून परत आल्यानंतर ते बाहेरून एस.एस.सी उत्तीर्ण झाले होते. ग्रंथांनाच गुरू मानून त्यांनी अभ्यास सुरू केला. म. म. डॉ. मिराश्यांना त्यांनी आपला निर्धार सांगितला. त्यांनी मग पुणे भारत इतिहास संशोधक मंडळातील डॉ. ग. ह. तथा तात्यासाहेब खरे यांची भेट घेण्यास सांगितले. डॉ. खरे यांनी त्यांना खूप मौलिक सूचना दिल्या व सर्वांत महत्त्वाचे म्हणजे पुराभिलेखाचे ठसे कसे घ्यावेत याचे ज्ञान दिले.

त्यांनी प्रथमत: पुराभिलेखांच्या सर्वेक्षणासाठी कार्यक्षेत्राची निवड केली. सोलापूर जिल्ह्यात एकूण अकरा तालुके आहेत. गावांची संख्या सुमारे १२०० ते १३०० च्या दरम्यान भरावी. जिल्ह्यातील प्रत्येक तालुकानिहाय पाहता हे काम एकट्यादुकट्याचे नव्हते. परंतु जिद्दीने व ओढीने आठवड्यातील शनिवार-रविवार या भ्रमंतीसाठी राखून ठेवून त्यांनी जिल्ह्यातील चार तालुक्यांचे सुमारे ५०० गावांचे सर्वेक्षण करून प्रसिद्ध /

अप्रसिद्ध अशा सुमारे १५० पुराभिलेखांचे ठसे घेतले. येथे नोंद घेण्यासारखी गोष्ट म्हणजे कुंभारांनी यासाठी व्यक्तींकडून, संस्थेकडून वा शासनाकडून एक पैसादेखील घेतला नाही. जवळची गावे सायकलवरून, तर दूरवरची गावे एस.टी.ने प्रवास करून पाहणी केली. अगदी मन:पूर्वक व इच्छाशक्तीच्या जोरावर काम केले तर यश दूर नसते हे यावरून सिद्ध होते. हे काम सतत १०/१५ वर्षे चालू होते. अद्यापि, क्षीण स्वरूपात का होईना, काम चालू असते. दरम्यानच्या काळात आनंद कुंभार, श्री. ग.ह. खरे आणि म. म.डॉ. मिराशीयांनी सुचविलेल्या पुराभिलेखांशी संबंधित अनेक ग्रंथ व नियतकालिकांचे वाचन, मनन करीत होते. त्यांना सरावाने जुनी देवनागरी लिपी वाचता येऊ लागली.

सुमारे ५०० गावांच्या सर्वेक्षणांतून १००/१५० लेख सापडले खरे; परंतु त्यांपैकी बहुतांशी कन्नड लिपी व भाषेतील होते, तर काही लेख पूर्वसुरींनी वाचून प्रसिद्ध केले होते. उरलेल्यांपैकी जेवढी म्हणून देवनागरी लिपी संस्कृत / मराठी भाषेत होती, त्याचे वाचन करून प्रसिद्धीसाठी शोध नियतकालिकांकडे पाठविली व यथावकाश प्रसिद्धही झाली. कन्नड लेखांबद्दल त्यांच्या मनामध्ये समस्या निर्माण झाली. या लेखांना बोलके कोण करणार हा प्रश्न समोर उभा राहिला. कर्नाटक विद्यापीठातील डॉ. कलबुर्गी व डॉ. रित्तींचे नाव या संदर्भात त्यांना सुचविण्यात आले. यथावकाश धारवाडला जाऊन त्यांनी त्यांची भेट घेऊन आपण करीत असलेल्या कामाची कल्पना दिली व कन्नड लेखांचे वाचन करून देण्याची विनंती केली. डॉ. कळबुर्गी यांनी मात्र डॉ. रित्ती हे काम त्यांच्यापेक्षा उत्तम तऱ्हेने करू शकतील अशी सूचना करून त्यांची शिफारस डॉ. रित्तींकडे केली. डॉ. रित्तींनी पूर्ण चौकशी केली व म्हणाले, ''या क्षेत्रात स्वखुशीने काम करणारे विरळाच, तुम्हांला या विषयाची आवड व ओढ आहे हे पाहून खूप संतोष झाला. तुम्ही कन्नड लेखांचे ठसे घेऊन येथे या. मी त्यांचे वाचन करून देतो. कुंभारांच्या दृष्टीने डॉ. रित्तींचे सकारात्मक सहकार्य मोठे आनंददायी होते.यथावकाश सर्व कन्नड लेखांचे ठसे घेऊन कुंभार डॉ. रित्तींकडे हजर झाले. शब्द दिल्याप्रमाणे त्यांनी सर्व लेखांचे वाचन केले. हे काम एका बैठकीत होणे शक्य नव्हतेच. दोघांच्या सवडीने सुमारे १/२ वर्षांत हे काम पार पडले. या दरम्यान श्री. कुंभारांना डॉ. रित्तींकडे, धारवाडला अनेक वेळा जावे लागले. लेखांचे जसजसे वाचन होऊ लागले, तसतसे डॉ. रित्ती आनंदित होऊ लागले. कारण, सोलापूर जिल्ह्यातील ज्या तालुक्यांतील गावांचे सर्वेक्षण करून ही सामग्री एकत्रित केली होती, त्याच्या वाचनाने अज्ञात अशी ऐतिहासिक माहिती प्रथमच उजेडात येऊ लागली. त्याचे फलस्वरूप म्हणजे १९८८ मध्ये 'इन्स्क्रिप्शन्स फ्रॉम सोलापूर डिस्ट्रिक्ट' या नावाने डॉ. रित्ती व श्री. कुंभार या जोडनावांनी ग्रंथ प्रसिद्ध झाला.

श्री. कुंभार यांनी स्वतंत्रपणे देवनागरी लिपीतले वाचलेले पुराभिलेख तथा पुराभिलेखांवर आधारित काही स्फुट लेखांचे एक पुस्तक महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाच्या नवलेखक अनुदानाने प्रसिद्ध झाले. १९८८ मध्ये प्रकाशित झालेल्या 'संशोधन तरंग' या शीर्षकाच्या पुस्तकास त्याच वर्षीचे मंडळाचे श्री. यशवंतराव चव्हाण यांच्या नावाचे उत्कृष्ट शोध ग्रंथ म्हणून पुरस्कार मिळाले.

श्री. कुंभार यांनी अथक परिश्रमाने नवीन पुराभिलेख उजेडात आणले. त्यांच्या प्रकटीकरणांमुळे अज्ञात अशी बरीच माहिती प्रथमच समोर आली, की जिच्या आधारे आज इतिहासकारांना या माहितीवरून इतिहास ग्रंथांत नवीन परिच्छेद लिहावे लागतील.

या नवोपलब्ध माहितीकडे विहंगावलोकन केल्यास काही ठळक गोष्टी दिसून येतात त्या अशा :

कुडल (ता. दक्षिण सोलापूर) येथे संगमेश्वर मंदिराच्या तुळईवर एक लेख मिळाला. तो केवळ अडीच ओळींचा असून ज्ञात माहितीप्रमाणे तो मराठी भाषेतील स्पष्ट कळोल्लेख झालेला पहिला शिलालेख आहे. लेखातील शेवटची ओळ 'वाछि तो विजेयां हो ऐवा' अशी कोरलेली आहे. काळ आहे 'श्री सकु ९४० कालयुक्त संवत्सरे माघ सु(ध)' २०१८ साली या लेखाची सहस्राब्दी होईल. पाहू या शासन कशा प्रकारे सहस्राब्दी साजरी करते ते. बाराव्या

क

शतकातील थोर शिवशरण शिवयोगी सोन्नलिगे (सोलापूर) सिद्धरामांशी निगडित चार लेख प्रथमच प्रकाशात आले आहेत. अद्भुत असे एक विवाहपुराण शिलालिखित झाले असून त्या विवाह पुराणास 'गिरिजाकल्याण' असे संबोधिले जाते. प्राचीन मराठी भाषेत अगदी अत्यल्प लेख उपलब्ध आहेत. कुंभार यांच्या शोधांनी आणखी ४/५ लेखांची भर यात पडलेली आहे. कलचुरी सम्राट बिज्जलदेव (दुसरा) याच्या पट्टराणीचे नाव पहिल्यांदाच समजले, तिचे नाव होते रंभादेवी. देवगिरीकर यादवांचा शेवटचा राजा सिंघणदेव (तिसरा) याचा लेख ( इ.स. १३१६ ) कामती खुर्द ( ता. मोहोळ ) येथे सापडला. क्रमिक इतिहास पुस्तकात याला 'शंकरदेव' म्हणून संबोधितात. कलचुरी राजघराण्यातील एक शासक महामंडलेश्वर अमुगीदेव याचे तीन लेख द. सोलापूर तालुक्यातून समोर आले आहेत. त्याच घराण्यातील पुढे स्वतंत्रपणे सम्राट झालेला बिज्जलदेवा (दुसरा) चा तो महामंडलेश्वर असतानाचा पहिला निर्देश असलेला लेख सोलापुरात मिळाला. असे अनेक अंश श्री. कुंभार यांच्या पुराभिलेख शोधाने प्रकाशित झाले आहेत. इतिहासाच्या बारीकसारीक अंगांवर प्रकाश टाकणारी विपुल माहिती या पुराभिलेखांतून पुढे आलेली आहे. आनंद कुंभार यांच्या या शोधकार्याची नोंद घेऊन हिराचंद नेमचंद वाचनालय, सोलापूर व अन्य संस्थांनी मिळून इ.स. २०११ च्या मार्चमध्ये त्यांचा भव्य नागरी सत्कार केला.

– संपादित

## कुरुंदकर, नरहर अंबादास

**विचारवंत, समीक्षक, इतिहास मीमांसक**

**१५ जुलै १९३२ – १० फेब्रुवारी १९८२**

नरहर अंबादास कुरुंदकर मराठवाड-महाराष्ट्रभर 'गुरुजी' या नावाने परिचित होते. हाडाचे शिक्षक असणाऱ्या नरहर कुरुंदकरांचा जन्म परभणी जिल्ह्यातील नांदापूरला झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण वसमतला झाले. मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण त्यांनी हैद्राबादच्या सिटी



हायस्कूलमधून पूर्ण केले. त्यांनी उच्च शिक्षणासाठी हैद्राबादच्याच सिटी महाविद्यालयामध्ये प्रवेश घेतला.

हैद्राबाद येथे शिकत असताना तिथल्या स्टेट लायब्ररीत बसून त्यांचे अखंड वाचन सुरू झाले. संस्कृती, धर्म, तत्त्वज्ञान, शिक्षण, वाङ्मय, राजकारण, इतिहास, अर्थशास्त्र अशी हाती पडतील ती पुस्तके त्यांनी वाचून काढली. मार्क्सवादी विचारसरणीने त्यांना अधिक प्रभावित केले होते. सुरुवातीपासून नरहर कुरुंदकर पूर्ण जडवादी, मार्क्सवादी होते. त्यांचे पहिले पुस्तक 'रूपवेध' इ.स. १९६३ मध्ये प्रकाशित झाले. महाराष्ट्र शासनाने 'उत्कृष्ट साहित्यकृती'चा पुरस्कार देऊन या पुस्तकाला गौरविले आहे. या पुस्तकात सौंदर्यशास्त्र, साहित्य सिद्धान्त, वाङ्मय समीक्षा आदींशी संबंधित लेखांचा समावेश आहे. 'रूपवेध'पूर्वी डॉ. शिवाजी गऊळकर यांच्या समवेत त्यांनी 'रिचर्ड्सची कलामीमांसा' (इ.स. १९६२) हे पुस्तक लिहिले होते.

इ.स. १९६७ मध्ये 'मागोवा' हा त्यांचा ऐतिहासिक लेखांचा संग्रह प्रसिद्ध झाला. या ग्रंथामध्ये 'भारतीय संगीत : एक आढावा', 'शाकुंतल : इतिहास, पुराण व काव्य', 'बेंद्रे यांचा संभाजी', 'कै. त्र्यं.शं. शेजवलकर', 'लोकायत' हे विविध प्रकारचे संदर्भमूल्य असणारे लेख समाविष्ट आहेत. 'गाजर' (१९६९) या पुस्तकामध्ये विविध विषयांवर चिकित्सक, संशोधनपर लेख आहेत. इ.स. १९७० मध्ये 'शिवरात्र' हे त्यांचे आणखी एक पुस्तक प्रसिद्ध झाले. कुरुंदकरांचे 'धार आणि काठ' (१९७१) हे मराठी कादंबरीचा आढावा घेणारे, 'पायवाट' (१९७४) हे वाङ्मयसमीक्षेचे पुस्तक प्रसिद्ध झाले. 'छायाप्रकाश' (१९७९), 'भजन' (१९८१), 'आकलन' (१९८२) ही त्यांची आणखी काही गाजलेली पुस्तके. कुरुंदकर समाजवादाचे पुरस्कर्ते होते.

समाजवाद, इहवाद, उदारमतवाद, लोकशाही यांविषयी ते कायम बोलत राहिले. सर्वांना समजेल अशा भाषेत बोलणारा, विचार प्रसृत करणारा कृतिशील विचारवंत ही त्यांची खरी ओळख होती.

'मनुस्मृती' (१९८२) हे कुरुंदकरांचे विवाद्य विषयावरचे मूलगामी विवेचन करणारे पुस्तक होय. या ग्रंथाव्यतिरिक्त विविध विषयांवर त्यांच्या काही पुस्तिका प्रकाशित झाल्या आहेत. यात 'वर्ण-वर्ग निराकरणाचा लढा', 'आरक्षणाचा प्रश्न', 'हमीद दलवाई', 'लोकशाही : अन्वय आणि अर्थ', 'छत्रपती शिवाजी महाराज जीवन रहस्य', 'राष्ट्रवाद आणि समाजवाद' इत्यादी प्रदीर्घ व्यासंगपूर्ण लेखांचा उल्लेख करावा लागेल. हैद्राबादच्या स्वातंत्र्यसंग्रामाच्या संदर्भात कुरुंदकरांनी लिहिलेल्या स्फुट लेखांचा आणि याच विषयावर भांगडीया स्मारक व्याख्यानमालेतील तीन व्याख्यानांचा 'हैद्राबाद विमोचन आणि विसर्जन' हा ग्रंथ इ.स. १९८५ मध्ये प्रकाशित झाला आहे. या ग्रंथामध्ये हैद्राबाद मुक्तिसंग्रामाव्यतिरिक्त इतर आनुषंगिक घटना व व्यक्ती यांचे निर्देश आणि चर्चा आहे.

कुरुंदकरांच्या मृत्युपश्चात त्यांची महत्त्वाची अशी काही पुस्तके प्रकाशित झालेली आहेत : 'वाटचाल' (१९८८), 'अभयारण्य' (१९८५), 'अन्वय' (१९८६), 'परिचय' (१९८७), 'वारसा' (१९८७), 'अभिवादन' (१९८७), 'रंगशाळा' (१९९४) इत्यादी पुस्तकांचा येथे उल्लेख करता येऊ शकेल. 'रूपवेध' या पुस्तकाप्रमाणे 'शिवरात्र' आणि 'धार आणि काठ' या त्यांच्या ग्रंथांना महाराष्ट्र शासनाचे उत्कृष्ट वाङ्मय-निर्मितीचे पुरस्कार मिळाले. मराठवाडा साहित्य परिषदेचे ते अनेक वर्षे अध्यक्ष होते. आकाशवाणी, भारतीय साहित्य अकादमी, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ आदी प्रतिष्ठित संस्थांचे सदस्य म्हणून त्यांनी काम केले. त्यांना महाराष्ट्र शासनाचा 'आदर्श शिक्षक' पुरस्कार मिळाला होता. इतिहासकार किंवा इतिहास संशोधक या संदर्भात काही विशिष्ट संकल्पना रूढ आहेत. या रूढ चौकटीत कुरुंदकर बसतात किंवा नाही हा मुद्दा महत्त्वाचा नाही. सामाजिक संवेदना अत्यंत प्रखर असणारा विचारवंत भोवतालच्या समाजजीवनात घडणाऱ्या घटनांचे सूक्ष्म निरीक्षण करीत असतो. त्यामुळे मराठी विषयाचे प्राध्यापक असणाऱ्या कुरुंदकरांचे समाजकारण, राजकारण, इतिहास यांसारखे विषयसुद्धा चिंतन, मननाचे असतात.

अशा समाजहितैषी विचारवंतांना समाजजीवनाचा वेध घेत असताना वर्तमानकालीन प्रश्नांचे धागेदोरे भूतकाळात कुठेतरी गुंतलेले असतात याची जाणीव असते आणि म्हणून इतिहासाचा अभ्यास त्यांच्या दृष्टीने महत्त्वाचा ठरतो. समाजाच्या स्थिति-गतीचा हा अभ्यास समाजाच्या उन्नति-प्रगतीसाठी आणि विशिष्ट वैचारिक दिशा देण्याच्या प्रेरणेने केलेला असतो. आयुष्यभर पत्करलेल्या जीवननिष्ठांच्या प्रेरणा अशा प्रकारच्या चिंतन, मनन आणि लेखनाच्या मुळाशी असतात.

कुरुंदकरांच्या इतिहासमीमांसेची मौलिकता लक्षात घेऊनच महाराष्ट्र इतिहास परिषदेचे (धुळे, १९८२) विभागीय अध्यक्षपद भूषविण्याचे भाग्य त्यांना लाभले. इतिहासतज्ज्ञ किंवा संशोधक असण्याच्या संदर्भात स्वत:विषयी कुरुंदकरांनी असे म्हटले आहे की, 'इतिहास हा माझ्या वाचन, चिंतनाचा आणि अभ्यासाचा अल्प प्रमाणात भाग असला, तरी मी कोणत्याही कक्षेत बसू शकेल असा इतिहास संशोधक नाही, याची मला जाणीव आहे. इतिहासतज्ज्ञ किंवा इतिहास संशोधक या उपाधीवर कोणत्याही प्रकारचा अधिकार मी सांगणार नाही.'

इतिहास अभ्यास आणि संशोधन यांची नवी-नवी क्षितिजे शोधण्यासाठी कुरुंदकर सातत्याने कार्यरत राहिले. महाकाव्य, नाटके, जैन वाङ्मय, बौद्ध वाङ्मय, वैदिक वाङ्मय, प्राचीन मराठी वाङ्मय इत्यादींची त्यांनी काळजीपूर्वक तपासणी केली. महाभारत, भगवद्गीता, मनुस्मृती, नाट्यशास्त्र इत्यादी ग्रंथांवरील त्यांच्या लिखाणामधून भारताचा प्राचीन इतिहास, पुराणे आणि संस्कृती यांचे अपूर्व दर्शन घडते. महाकाव्यकालीन साधनांचे महत्त्व स्पष्ट करताना रामायणाची व महाभारताची अधिकाधिक चर्चा होण्याची व्यापक

भूमिका त्यांनी मांडली आहे. महाभारत हा सातत्याने प्रक्षेप होत गेलेला ग्रंथ आहे याची अभ्यासकांनी कायम जाणीव ठेवली पाहिजे, अशी त्यांची आग्रही भूमिका होती. प्राचीन भारतातील विसंवादांनी भरलेल्या वर्णव्यवस्थेचा कुरुंदकरांनी अत्यंत सम्यक दृष्टीने अभ्यास केला. त्यांनी असे म्हटले आहे, की वर्णव्यवस्था कधी अस्तित्वात नव्हती. अस्तित्वात होती ती जातीव्यवस्था. धर्मग्रंथातील संदर्भाशिवाय वर्णव्यवस्थेचे प्रत्यक्ष व्यवहारात कुठेही अस्तित्व नव्हते. वर्णव्यवस्थेच्या नावाने जातीव्यवस्थेचे समर्थन होते म्हणून वर्णव्यवस्थेचा विरोध करावा लागतो. बौद्ध धर्माच्या मर्यादा स्पष्ट करून त्या धर्माचे ऐतिहासिक श्रेष्ठत्व कुरुंदकर स्पष्टपणे नमूद करतात. या अनुषंगाने ते असे म्हणतात, की जगाच्या संस्कृतीला भारताने दिलेली बौद्ध धर्म ही सर्वांत मोठी देणगी आहे. बौद्ध धर्म इतर धर्मांपेक्षा वेगळा असून तो केवळ धर्म नाही, तर ते अखंड त्याग व सेवाभावाचे वलय असलेले एक अभियान आहे...

तुलनात्मक विचार करता सर्वसमावेशक जागतिक धर्म असे हिंदू धर्माचे स्वरूप नव्हते. प्रसरणशीलता धर्माचे वैशिष्ट्यपूर्ण कार्य आहे. परंतु हिंदू धर्मास हे तत्त्व लागू पडत नाही. कुरुंदकर पुढे असे म्हणतात, की चित्र, शिल्प, मूर्ती ह्या कलांच्या क्षेत्रात सगळी भारतीय संस्कृती बौद्धांची अनुयायी आहे. ज्ञानाच्या क्षेत्रातही हेच सत्य आहे. हे ऐतिहासिक सत्य कोणताही पूर्वग्रह न ठेवता कुरुंदकर निर्भीडपणे मांडतात. भारतीय इतिहासातील अनेक गुंतागुंतीच्या प्रश्नांचा त्यांनी तटस्थपणे शोध घेतला आहे. सांख्य, चार्वाक तत्त्वज्ञानाचासुद्धा त्यांनी शोध घेतला. प्रा. डी.डी. कोसंबींच्या भगवद्‌गीतेवरील लेखावर त्यांनी भाष्य केले आहे. या सर्व लिखाणामधून कुरुंदकरांच्या विचारावरील मार्क्सवादाचा प्रभाव स्पष्टपणे दिसून येतो.

कुरुंदकरांनी इतिहासमीमांसा करीत असताना वि.का. राजवाडे, द.वा. पोतदार आणि शेजवलकर यांचे इतिहासचर्चा घडविण्याचे कार्य पुढे चालविले. हे करताना कुरुंदकर मार्क्सवादाची जोड देतात; कारण त्यांच्या दृष्टीने मार्क्सचे दर्शन कुणावर काही लादण्यासाठी नसून माणसाच्या मुक्ततेची खात्री देणारे दर्शन आहे.

कुरुंदकरांच्या मराठ्यांच्या इतिहासविषयक भूमिकेचा विचार शेजवलकरांवरील लेख, बेंद्रे यांचा संभाजी, ‘श्रीमान योगी’ या कादंबरीची प्रस्तावना, महाराष्ट्र इतिहास परिषदेतील भाषण, ‘शिवराजमुद्रा’तील लेख, लाड स्मृती व्याख्यानमालेतील त्यांनी दिलेली व्याख्याने, छत्रपती शिवाजी महाराज जीवन रहस्य, अकबर इत्यादी वेळोवेळी लिहिलेल्या लेखांमधून दृग्गोचर होतो.

मराठ्यांच्या इतिहासलेखनामध्ये राजवाडे, शेजवलकर या दोन ठळक प्रवाहांपेक्षा कुरुंदकर वासुदेवशास्त्री खरे यांच्या इतिहासमीमांसेला अधिक इतिहासनिष्ठ मानतात. या संदर्भात ते असे म्हणतात, की वासुदेवशास्त्री खरे यांच्या विवेचनाची वारसदारी आपणांला अजून पचविता आलेली नाही. या प्रवाहांपेक्षा कुरुंदकरांचे लेखन स्वातंत्र्योत्तर कालखंडातले आणि म्हणून काही बाबतींत वेगळे आहे. स्वातंत्र्यलढ्याची गरज संपून नव्या जाणिवा आणि नव्या समस्या निर्माण झाल्या होत्या. वर्तमानकालीन वास्तवाशी सुसंगत, सत्याच्या शोधासाठी नजीकच्या भूतकाळाची संपूर्ण छाननी करण्यासाठी ते उत्सुक होते.

ही छाननी करताना कुरुंदकरांनी मराठ्यांच्या इतिहाससंबंधी दोन बाबी आग्रहाने नोंदविल्या आहेत. त्यांतील पहिली बाब म्हणजे शिवाजी महाराज, संभाजी महाराज अथवा बाजीराव पेशवे यांची शौर्यगाथा सांगताना व गुणवर्णन करताना भारतात रेनेसान्स झालेला नाही हे ध्यानात घेतले पाहिजे, आणि दुसरी बाब म्हणजे या व्यक्तींची मूल्यमापने त्यांच्या चरित्र व चारित्र्यावर न करता त्यांचे सामाजिक कर्तृत्व व हिंदूंच्या इतिहासातील स्थान यांकडे पाहिले पाहिजे.

शिवाजी महाराजांचे कार्य कोणते आहे? त्यांचे मोठेपण कशात आणि कशासाठी आहे? छत्रपतींच्या मर्यादा कोणत्या?, आदी प्रश्नांची छाननी कुरुंदकरांनी केली आहे. ही छाननी करताना ते नमूद करतात, की अजूनही शिवाजी महाराज खऱ्या अर्थाने इतिहासाचा

भाग झालेले नाहीत. ऐतिहासिक व्यक्तींविषयी ज्या निर्विकारपणे चर्चा व्हावयाला पाहिजे, ती निर्विकारता आजही महाराष्ट्रीय मनाला शक्य नाही. छत्रपतींच्या राज्यनिर्मितीच्या खटाटोपाची चर्चा करताना कुरुंदकर म्हणतात, की छत्रपतींचा प्रयत्न नवे राष्ट्रच जन्माला घालण्याचा आहे. या नव्या राष्ट्रात हिंदू धर्माला सन्माननीय स्थान, त्याचबरोबर इतरांचे न्याय्य हक्क जतन करण्याचाही विचार आहे. प्रजेच्या सुखाचा, त्याचप्रमाणे राज्य टिकविण्याचाही विचार आहे. हा युगप्रवर्तक विचार करणारी सत्ता सतराव्या शतकातील राजेशाही सत्ता आहे. राज्याची दुसरी पर्यायी पद्धत त्या वेळेच्या भारताला उपलब्ध नाही. सतराव्या शतकातील राजेशाही असणे यात काही गैर आहे, असे कुरुंदकरांनी म्हटलेले नाही.

मराठ्यांच्या इतिहासाची कुरुंदकरांनी केलेली मीमांसा अतिशय तर्कशुद्ध व प्रभावी आहे. मुस्लीम राजे आणि सरदार यांनी दगा देणे यात नावीन्य काय होते? परंतु, छत्रपतींनी त्यांचे तंत्र आत्मसात करून त्याचा शत्रूवर यशस्वी उपयोग करणे ही छत्रपतींची महत्ता वाढविणारी आणि इतिहासप्रवाह बदलून टाकणारी घटना आहे. या अंगाने शिवछत्रपतींच्या मोठेपणाचा घेतलेला हा वेध नावीन्यपूर्ण स्वरूपाचा आहे. मराठ्यांच्या इतिहासमीमांसेचे क्षेत्र दुबळे आहे या पार्श्वभूमीवर आपल्या मूलगामी, मर्मग्राही आणि तर्कसुसंगत विवेचनाने हे दुबळे क्षेत्र त्यांनी संपन्न केले आहे याची आवर्जून नोंद घेतली पाहिजे.

— डॉ. ओमप्रकाश समदाणी

## कुलकर्णी, अनंत रामचंद्र

**मध्ययुगीन महाराष्ट्राच्या इतिहासाचे अभ्यासक, संशोधक, इतिहासकार.**

**१९ एप्रिल १९२५ — २४ मे २००९**

शिवकालीन महाराष्ट्राचा राजकीय इतिहास हा सर्वांच्याच आस्थेचा आणि अभिमानाचा विषय आहे. जेम्स कनिंगहॅम ग्रँट डफ्पासून या कालखंडाच्या राजकीय



इतिहासावर पुन्हा पुन्हा चांगल्या रितीने लिहिले गेले आहे किंबहुना आजही लिहिले जात आहे. डॉ. अ. रा. कुलकर्णी यांनी मात्र शिवकालीन महाराष्ट्राचा सामाजिक आणि आर्थिक अंगाने विशेष अभ्यास केला आहे. डॉ. कुलकर्णी यांचे वेगळेपण असे आहे की, त्यांना उपलब्ध असणारी साधनसामग्री त्यांच्या पूर्वीच्या इतिहास संशोधकांपेक्षा अधिक होती. अपरिहार्यपणे उपरोक्त कालखंडाची त्यांनी केलेली मांडणी अधिक परिपूर्ण झाली आहे. म्हणूनच 'Maharashtra in the age of Shivaji' (१९६९) आणि 'शिवकालीन महाराष्ट्र'(१९७८) हे कुलकर्णी यांचे ग्रंथ अत्यंत वस्तुनिष्ठ आणि मौलिक ठरले आहेत.

उपलब्ध साधनांचा समर्पक उपयोग आणि साधार विवेचन करणारे अनंत रामचंद्र कुलकर्णी यांचा जन्म १९ एप्रिल १९२५ रोजी दड्डी, ता. निपाणी, जि. बेळगाव येथे झाला. त्यांच्या आईचे नाव बनाबाई, तर वडीलांचे नाव रामचंद्र होते. अ.रा. कुलकर्णी नावाने पुढे ते ख्यातकीर्त झाले.

अ.रा. कुलकर्णी राणी पार्वतीदेवी महाविद्यालय बेळगाव, अमेरिकन मराठी मिशन्स कॉलेज अहमदनगर, दयानंद कॉलेज सोलापूर, मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद इत्यादी ठिकाणी प्राध्यापक म्हणून कार्यरत होते. त्यांनी इ.स. १९६४मध्ये 'Maharashtra in the age of Shivaji' हा प्रबंध मराठवाडा विद्यापीठात सादर केला. मराठवाडा विद्यापीठाचे इ.स. १९६४अखेर ते 'डॉक्टर' झाले. डॉक्टरेट मिळाल्यानंतर काही काळ डेक्कन कॉलेज, पुणे येथे आणि पुढे पुणे विद्यापीठात ते इतिहासाचे प्राध्यापक म्हणून रुजू झाले. निवृत्तीनंतर इ.स. १९९३ ते १९९६ या काळात टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचे मानद कुलगुरू झाले.

महाराष्ट्र इतिहास परिषदेची आणि अखिल भारतीय

इतिहास परिषदेची अध्यक्षपदे त्यांनी भूषवली. इ. स. १९६९मध्ये मराठ्यांचा आद्य इतिहासकार जेम्स कनिंगहॅम ग्रँट डफ यावर त्यांनी न.चिं. केळकर व्याखानमालेत एकूण सहा व्याखाने दिली. त्यांची व्याख्याने इ. स. १९७१मध्ये पुणे विद्यापीठाने ग्रंथरूपाने प्रकाशित केली. कीर्तने, राजवाडे आणि खरेशास्त्री या सर्वांनी डफच्या इतिहासातील दोष दाखवले होते. त्याचा इतिहास कालबाह्य ठरवण्यात आला होता. अ. रा. कुलकर्णी यांनी ज्या परिस्थितीत डफने इतिहासलेखन केले त्याचा विचार केला पाहिजे, असे सैद्धान्तिक विवेचन केले. त्याच्या इतिहासाची घडण कशी झाले हे स्पष्ट केले. कुलकर्णी यांच्या विवेचनामुळे ग्रँट डफची वेगळी प्रतिमा निर्माण झाली, याची आवर्जून नोंद घेणे गरजेचे आहे. ग्रँट डफ संदर्भातील कुलकर्णी यांचा पूर्वग्रहविरहित निकोप दृष्टीकोन इतिहास अभ्यासकांसाठी वस्तुपाठ आहे.

अ.रा. कुलकर्णी यांनी विपुल इतिहासलेखन केले आहे. 'शिवकालीन महाराष्ट्र', 'पुण्याचे पेशवे', 'कंपनी सरकार', 'अशी होती शिवशाही', 'जेम्स कनिंगहॅम ग्रँट डफ्', मराठे आणि महाराष्ट्र', 'मराठ्यांचे इतिहासकार' आदी त्यांचे प्रसिद्ध ग्रंथ आहेत इंग्लिशमध्ये 'Maharashtra in the age of Shivaji', 'The Marathas', 'Medieval Maharashtra', 'Medieval Maratha Country', 'Maharashtra Society & Culture', 'James Cunningham Grant Duff', 'Maratha Historiography' आदी त्यांच्या ग्रंथांमुळे मराठा इतिहासलेखनाचे क्षेत्र संपन्न झाले आहे. सामाजिक आणि आर्थिक इतिहासलेखनासाठी बारीकसारीक माहिती कणाकणाने गोळा करावी लागते. सामाजिक – आर्थिक इतिहास हा मुख्यत्वे लोकांचा इतिहास असतो. 'शिवकालीन महाराष्ट्र – सामाजिक, आर्थिक अभ्यास' हा कुलकर्णी यांच्या प्रबंधाचा विषय होता. त्यामुळे शिवकालीन महाराष्ट्राचा अभ्यास हाच त्यांच्या संशोधनाचा केंद्रबिंदू होता. त्यांनी 'शिवकालीन महाराष्ट्र' या विषयावर शिवाजी विद्यापीठाच्या मराठा इतिहास व्याख्यानमालेत जानेवारी १९७७मध्ये तीन व्याख्याने दिली. शिवकालीन समाजाचे सामाजिक आणि आर्थिक समग्र विवेचन यापूर्वी एवढे साधार आणि सखोल झाले नव्हते. मराठी, फार्सी, डच, पोर्तुगीज आणि इंग्लिश कागदपत्रांच्या आधारे केलेली ही मांडणी परिपूर्ण आणि इतिहासनिष्ठ आहे.

तत्कालीन शेती, गावगाडा, उद्योगधंदे, बाजारपेठा, समाजजीवन, दुष्काळ, अर्थव्यवस्था, लोकसंख्या, प्रशासन खर्च आदीबाबत तपशीलवार माहिती नंतर 'शिवकालीन महाराष्ट्र' या ग्रंथाद्वारे शिवाजी विद्यापीठ प्रकाशनाने प्रकाशित केली आहे. शिवकालीन लोकजीवनाचा अभ्यास करून अ.रा. कुलकर्णी यांनी काढलेला श्री शिवछत्रपती यांच्या संदर्भातील निष्कर्ष अधोरेखित करण्यासारखा आहे. डॉ. कुलकर्णी यांनी म्हटले आहे की, 'नूतन मराठी राज्य निर्माण करूनच ते थांबले नाहीत, तर हे राज्य 'सुजलाम सुफलाम' होण्यासाठी त्याचा आर्थिक पाया बळकट कसा होईल याचाही त्यांनी विचार केला. म्हणून शिवाजी महाराज म्हणजे, मध्ययुगातील एक थोर रचनात्मक काम करणारा प्रशासक होय.'

शिवकालीन महाराष्ट्राचा सामाजिक आणि आर्थिक अंगाने प्राध्यापक डॉ. कुलकर्णी यांनी घेतलेला हा वेध महत्त्वाचा आणि म्हणून मौलिक स्वरूपाचा आहे. डॉ. कुलकर्णी यांच्या इतिहासलेखनाची मौलिकता स्पष्ट करताना इरफान हबीब म्हणतात, 'प्रा. कुलकर्णी यांनी मराठ्यांच्या राजकीय इतिहासाच्या स्वरूपाचे योग्य आकलन व्हावे यासाठी सामाजिक व आर्थिक परिस्थितीचा वेध घेण्याच्या परंपरेला चालना दिली.' या संदर्भात पुढे त्यांनी नमूद केले आहे की, 'मराठ्यांच्या विद्यमान इतिहासकारांमध्ये त्यांचे कार्य पायाभूत म्हणावे लागेल.'

– डॉ. ओमप्रकाश समदाणी

**संदर्भ-**

*१. शिवकालीन महाराष्ट्र. – डॉ. अ. रा. कुलकर्णी (१९७८)*

*२. जेम्स कनिंगहॅम ग्रँट डफ्- डॉ. अ. रा. कुलकर्णी (१९७१)*

*३. मराठ्यांचे इतिहासकार - डॉ. अ. रा. कुलकर्णी (२००७)*

**कुलकर्णी, अंबा**
***अनंतपूर, अंबा पद्मनाभराव***
**अनुसारक, संगणकीकृत भाषांतर प्रणाली**
**संस्करणकार**
**५ मार्च १९६१**



भारतीय शास्त्रांची पताका संगणकशास्त्राद्वारे झळकवून आज दोन तपांहून अधिक काळ विदेशी शास्त्रज्ञांसाठी या क्षेत्रात संशोधनाची स्फूर्ती नि त्याच वेळी पारंपरिक पंडितांना आधुनिक काळातील संशोधनार्थ शास्त्रांची उपयुक्तता उदाहरणांनी समजावून मानवी भाषांच्या संगणकीकृत संस्करणास त्यांचे कुतूहल जागवण्याचा वसा घेतलेली विदुषी म्हणजे डॉ. अंबा कुलकर्णी. स्वामी चिन्मयानंदांच्या आध्यात्मिक परंपरेतील तंत्रशिक्षणाचे द्रष्टे विनीत चैतन्यजी, कुशल संगणकशास्त्रज्ञ व ख्यातनाम व्यवस्थापक प्रा. राजीव संगलजी यांच्या मार्गदर्शनाने १९९२-९४ या काळात आयआयटी, कानपूर येथे संगणकशास्त्रात एम.टेक.साठी 'विज्ञान-आणि-तंत्रज्ञांसाठी नव्य-न्याय' या विषयनिवडीने सुरू झालेली कुलकर्णी यांची शोधयात्रा त्यातून पुढे अक्षरभारतीच्या माध्यमातून उदयास आली.

पाणिनीच्या अष्टाध्यायीतील गणनप्रक्रियेवर आधारित 'अनुसारक' ही संगणकीकृत भाषांतर प्रणाली. डॉ. अंबा कुलकर्णी यांना या दशकभरात स्पेन, फ्रान्स, जर्मनी, जपान, अमेरिका, झेक रिपब्लिक इत्यादी देशांकडून व्याख्यानार्थ, तसेच संशोधनप्रकल्पांत सहभागी होण्यास मिळालेल्या निमंत्रणांतून त्यांच्या या योगदानाची जागतिक स्तरावरील मान्यता व्यक्त होते. प्राचीन संशोधनास इतिहास म्हणून महत्त्व आहेच; पण कालातीत अशी त्यांची ओळख उपयोजनांतून निर्माण करणे हे अधिक महत्त्वाचे. बहुभाषी राष्ट्रांत संगणकीकृत भाषांतरांतून संवाद-सुलभता या प्रेरणेस बाईंनी स्वत:ला वाहून घेतले. अनुसारकाची इंग्लिश-हिंदी भाषांतरक्षम प्रणाली १९९८-२००६ या काळात कार्यान्वित झाली तेव्हापासून डॉ. अंबा यांनी त्यांचे गुरू, सहकारी व विद्यार्थी यांच्या सहभागाने अनुसारकाच्या प्रगतीचा आलेख उत्तरोत्तर चढताच ठेवला. तेलुगू, कन्नड, मराठी, गुजराती, बांगला, पंजाबी आणि उर्दू या भाषांसाठी अनुसारकाच्या आवृत्तींचे काम विविध टप्प्यांवर उपलब्ध आहे. लोकसहभागातून भाषिक संसाधने वृद्धिंगत करणे हे या प्रकारच्या प्रकल्पांसाठी आवश्यकच. त्यासाठी गेल्या दशकात डॉ. अंबा यांनी हैदराबाद विद्यापीठ या त्यांच्या सध्याच्या कर्मभूमीसह ऊस्मानिया विद्यापीठ, उपयोजित भाषाविज्ञान आणि भाषांतर अभ्यास केंद्र, आयआयआयटी (हैदराबाद), चिन्मय शोध संस्थान, शंकराचार्य विद्यापीठ, मद्रास विद्यापीठ, केंद्रीय भारतीय भाषा संस्थान (म्हैसूर), महाराजा सयाजीराव विद्यापीठ, द्रविडीयन, तसेच नॉर्थ-ईस्टर्न हिल विद्यापीठ, एशियाटिक सोसायटी (कोलकाता), संस्कृत अकादमी (मीरत), बनारस हिंदू विश्वविद्यालय, भारतीय प्रौद्योगिकी संस्थान (मुंबई, कानपूर) अशा विविध ठिकाणी अक्षरश: शेकडो व्याख्यानांतून व चर्चासत्रांतून विद्यार्थी, शिक्षक व संशोधक यांना हिरिरीने मार्गदर्शन केले.

२०१२ साली भारतात 'पाणिनी पद्धतीने संगणकाद्वारे मानवी भाषा संस्करण' या विषयातील संशोधनाला २५ वर्षे झाली, त्यानिमित्त झालेल्या कार्यक्रमाच्या त्या प्रमुख संयोजक होत्या. २०१३ साली उज्जैन येथील संस्कृत साहित्योत्सवात त्यांनी 'संस्कृत संगणकीय संसाधने' या विषयावरील एकदिवसीय कार्यशाळेचे आयोजन केले. २००२ साली 'श्लेषनिराकरण' या विषयातील राष्ट्रीय स्तरावरील कार्यशाळेसाठी त्यांना युनिव्हर्सिटी ऑफ ब्रायटन या लंडनस्थित विद्यापीठाचे साहाय्य मिळाले होते, ही त्यांच्या कर्तव्यनिष्ठेची व तिला मिळालेल्या पावतीची वानगी.

अंबा कुलकर्णी या पूर्वाश्रमीच्या अंबा पद्मनाभराव अनंतपूर. गणिताचे विख्यात प्राध्यापक ए.बी.पी. राव

यांच्या कन्या. अंबा कुलकर्णी यांचा जन्म बिहार येथे झाला आणि त्यांचे शिक्षण सोलापूर मधील सरस्वती हायस्कूल आणि सिद्धेश्वर हायस्कूल येथे झाले. अत्यंत अचूक अंदाज हे त्यांचे वैशिष्ट्य प्रत्येक परीक्षेच्या निकालानंतर सिद्ध झालेले होते. दहावी-बारावीत उत्तम गुण मिळवूनही वैद्यक-अभियांत्रिकीला न जाता विज्ञानशाखा निवडून ९१% गुणांसह शिवाजी विद्यापीठाच्या पदवी परीक्षेत गणित विषयात त्यांनी नवा उच्चांक झळकवला.

राधाकृष्णन आणि कुंभोजकर या प्राध्यापकद्वयींच्या मार्गदर्शनाने १९८२ साली गणितातील पदव्युत्तर पदवी, टीआयएफआर निबंध स्पर्धेत द्वितीय क्रमांक, आकाशवाणीवर भाषण आणि संगीतातही गती असे हे बहुआयामी व्यक्तिमत्त्व. सोलापूरच्या दयानंद महाविद्यालयात गणितव्याख्याता अशी आपल्या व्यावसायिक जीवनाची सुरुवात करून पुढे १९८५पासून त्या वालचंद इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी येथे कार्यरत झाल्या.

विवाह हा साधारणत: भारतीय मुलींच्या शैक्षणिक-व्यावसायिक विकासास अडथळा असल्याची उदाहरणे अधिक; पण डॉ. अंबा मात्र १९९०साली प्रदीप कुलकर्णी यांच्याबरोबर विवाहबद्ध झाल्यानंतर एखाद्याच वर्षात वाढत्या कौटुंबिक जबाबदाऱ्यांचा बाऊ न करता सासरच्या प्रोत्साहनाने भारतीय प्रौद्योगिकी संस्थान, कानपूर या ख्यातनाम संस्थेत संशोधिकेच्या पदावर, तेही मानवी भाषा संस्करण या आधुनिक विषयात स्वत:ला सिद्ध करण्यात ठाकलेल्या दिसतात.

१९९८ ते २००३ दरम्यान सत्यम कॉम्प्युटर्स या त्या काळातील अत्यंत नावाजलेल्या कंपनीमध्ये त्या सल्लागार होत्या. शिक्षक-संशोधक या तुलनेत वेगळ्याच अपेक्षा असणारा तो अनुभव. संगणकीय आज्ञाप्रणाली संशोधित करून व्यावसायिक दर्जाने कार्यान्वित करण्यात हातखंडा या त्यांच्या विशेष गुणाचे बीज कदाचित इथे रुजले असेल. विभक्ती, कारक, समास, श्लेष, संयुक्त शब्द, नव्य-न्यायपद्धतीने वाक्यविश्लेषण आणि मांडणी, वाद-विश्लेषण, पाणिनीमध्ये न आलेल्या व्याख्या, धातुकोश यांसारख्या सैद्धान्तिक विषयांसह बालकांड, सुंदरकांड, संक्षेप रामायण, अमरकोश, हितोपदेश यांचे संगणकाधारे विश्लेषण हे ग्रंथविषय त्यांनी २००४ पासून आय.आय.आय.टी., हैदराबाद विश्वविद्यालय तसेच तिरुपती राष्ट्रीय संस्कृत विद्यापीठ येथे संशोधक-मार्गदर्शिकेच्या भूमिकेतून हाताळलेले दिसतात. सहकारी नि विद्यार्थी यांच्यासमवेत त्यांनी विकसित केलेल्या तेलुगू, मराठी, कन्नड, पंजाबी, बांगला मॉरफॉलॉजिकल ॲनलायजर, तसेच इंग्लिश-हिंदी आणि संस्कृत-इंग्लिशसह या भाषांसाठी अनुसारक, उर्दू-हिंदी मशीन ट्रान्सलेटर, संस्कृत मॉरफॉलॉजिकल ॲनलायजर ॲण्ड जनरेटर या प्रणाली; संधी, समास, अष्टाध्यायी, अमरकोश, संक्षेपरामायण यांचे संगणकीकृत विश्लेषण तुम्हाला LTRC website, Anusaaraka website आणि Department of Sanskrit Studies website HCU येथे पाहायला मिळतील. व्याकरणशास्त्रीय वाक्यविच्छेद (parsing), टिप्पणी (tagging and annotations), लेखनपद्धती (notations), रूप-रचनेच्या आधारे शब्द-विश्लेषण (morphological analysis), अर्थशोधन (semantic processing), शब्दलेखनसाहाय्य (spell check), तसेच अमरकोश, गीता, छंदशास्त्र अशा अनेक विषयांवरील त्यांचे संशोधन, सहलेखन नामांकित संशोधनपत्रांतून प्रसिद्ध झाले आहे. लँग्वेज ॲक्सेस - ॲन इन्फर्मेशन बेस्ड ॲप्रोच, ॲन्नाकोर्रा - बिल्डिंग ट्री बँक्स इन इंडियन लँग्वेजेस, अनुसारक - ओव्हरकमिंग लँग्वेज बॅरिअर इन इंडिया, इंग्लिश ग्रामर फ्रॉम हिंदी स्पीकर्स पॉइंट ऑफ व्ह्यू इन द लाइट ऑफ पाणिनीयन ग्रामर, इंग्लिश फ्रॉम हिंदी व्ह्यू पॉइंट - पाणिनीयन पर्स्पेक्टिव्ह, देवनागरी लिपी और संगणक, संस्कृत मॉरफॉलॉजिकल ॲनलायजर सम इश्यूज, इन्फॉर्मेशन कोडिंग इन अ लँग्वेज, सम इन्साइट फ्रॉम पाणिनीयन

ग्रामर, सब्जेक्ट इन इंग्लिश इज अभिहित, तेलुगू स्पेल चेकर हे त्यांचे वैयक्तिक किंवा अक्षरभारती, वरखेडीजी आणि इतरही सहकाऱ्यांच्या सोबतचे संशोधनपर निबंध पुढीलांसाठी मैलाचे दगड ठरावे.

डॉ. अंबा कुलकर्णी यांच्यासारख्या विषयाला वाहून घेतलेल्या आणि विद्यार्थ्यांच्या व्यक्तिगत जीवनातील अडचणीही तळमळीने समजून घेऊन समुपदेशन करणाऱ्या आदर्श मार्गदर्शिका हे भाग्य असल्याचे देश-विदेशात पुढील संधी मिळालेल्या त्यांच्या अनेक संशोधनार्थींनी आवर्जून नमूद केले आहे. २००६ साली हैदराबाद विश्वविद्यालयाच्या नव्याने सुरू झालेल्या संस्कृत अध्ययन विभागाची सूत्रे हाती घेतल्यावर विभाग उभारणीचे आव्हान आणि २००७ साली अकाली पतिनिधनाचा आघात यांवर मात करून त्यांनी २०१० साली 'उपयोजित भाषाविज्ञान' या विषयात अनुसारक प्रणालीच्या संशोधनावर प्रबंध सादर करून हैदराबाद विश्वविद्यालयाची पीएच.डी. संपादन केली. प्राध्यापक जी. उमा महेश्वर राव या त्यांच्या सहकारी व त्यांच्या शोधप्रबंधाच्या मार्गदर्शिका. संस्कृत अध्ययन केंद्रप्रमुख म्हणून काम करायचे तर संस्कृतमधील औपचारिक पदवी हवी, म्हणून डॉ. अंबा यांनी २०१२ साली कर्नाटक राज्य मुक्त विद्यापीठातून एम.ए. संस्कृतही केले. त्यांच्यातील विजिगीषू विद्यार्थी सदैव जागृत आहे तो असा.

संगणकाद्वारे प्रगती साधण्यात प्राचीन भारतीय शास्त्रांचे उपयोजन हा आगळा विषय जनमानसात रुजविण्यातले अंबा कुलकर्णी यांचे यश खचितच उल्लेखनीय आहे. गेली पंचवीस वर्षे मानवी भाषांचे संगणकाद्वारे संस्करण, संगणक आज्ञाप्रणालींचे लेखन, भारतीय आणि पाश्चात्त्य तर्कशास्त्राचा तौलनिक अभ्यास, भारतीय गणित, संख्याशास्त्रीय संकल्पना आणि अष्टाध्यायीतील संगणन असे विविध विषय त्या सोलापूर, हैदराबाद, तिरुपती आणि म्हैसूर येथील शिक्षण-संशोधन संस्थांमधून विज्ञानाच्या, तसेच मानव्यशास्त्राच्या पदव्युत्तर आणि संशोधनछात्रांना शिकवत आल्या आहेत. आयआयआयटी, हैदराबाद येथील गणनीय भाषाविज्ञानातील पीएच.डी. आणि तिरुपती राष्ट्रीय संस्कृत विद्यापीठातील 'शब्दबोध आणि भाषा तंत्रज्ञान' या विषयातील पदव्युत्तर पदविका या त्यांच्या कल्पनांना अनुक्रमे २००२ आणि २००४ साली विद्यापीठ आयोगाकडून नावीन्यपूर्ण अभ्यासक्रम म्हणून मान्यता मिळाली आहे.

श्री वेंकटेश्वरा वैदिक विद्यापीठ आणि राष्ट्रीय संस्कृत विद्यापीठ (तिरुपती), महात्मा गांधी आंतरराष्ट्रीय हिंदी विद्यापीठ (वर्धा) इत्यादींच्या अभ्यासमंडळांमध्ये आणि शिक्षणप्रक्रियेत सक्रिय सहभाग, केंद्रीय भारतीय भाषा संस्थानांतर्गत भारतीय भाषांची भाषावैज्ञानिक माहिती संकलन गट, भारतीय भाषा ठेवा संकलन प्रकल्प (Indian language corpora initiative), भारतीय भाषांसाठी माहिती-तंत्रज्ञानाचे विशेष गुणवत्ता केंद्र, तसेच भारत सरकारचे द्रविडी-इंग्लिश संगणकीय भाषांतरासाठी साधन आणि संसाधन निर्माण या देशांतर्गत उपक्रमांत नेतृत्व, संस्कृत लायब्ररी या अमेरिकन प्रकल्पाच्या संचालक मंडळात स्थान, आयकॉन, एससीएलएस, आयसीआयएसआयएल या जागतिक परिषदांचे देशविदेशांत नियोजन, तसेच शोधनिबंधपुस्तिकेच्या संपादन सल्लागार, एससीएलएस, आयसीआयएसआयएल, सिम्पल-०४, एनएलपीएआय-०६, एमएसपीआयएल-०६, किक्लिंग-२०११, कोलिंग-२०१२ आणि जर्नल ऑफ लँग्वेज इंजिनिअरिंगच्या समीक्षिका अशा अनेक भूमिकांतून त्या अव्याहत कार्यरत आहेत.

१९९८-२००९ या काळात हैदराबाद विश्वविद्यालयाच्या दूर-अध्ययन केंद्रासाठी त्यांनी भारतीय भाषांमध्ये संगणकाचे उपयोजन या पद्व्युत्तर पदविका अभ्यासक्रमासाठी संगणकाद्वारे भाषांतर (machine translation), मानवी भाषांचे गणिती प्रारूप (natural language modelling), भाषांतराची साधने (translation tools) या अभ्याससामग्रीचे सहसंपादन केले. आयकॉन २००२मध्ये आणि २०१२मध्ये त्यांनी आपल्या सहकाऱ्यांसोबत सादर केलेली गणनीय

भाषाविज्ञानाची ओळख (Introduction to Computational Linguistics) आणि भारतीय भाषांतील शब्दविश्लेषण, तसेच शब्दरूपांचे निर्माण (Building Morphological Analysers and Generators for Indian Languages using FST) ही सत्रे संशोधनार्थींसाठी उद्बोधक आहेत.

भारतीयत्वाचा वारसा सांगणाऱ्या प्रत्येकास, विशेषत: संगणक अभ्यासकांस अभिमान वाटावा, कार्यप्रेरणा मिळावी असे हे व्यक्तिमत्त्व. भारतीय भाषांतर्गत भाषांतरे या राष्ट्रीय संशोधनप्रकल्पात इंग्लिश-हिंदी-संस्कृत या भाषांतील संशोधनाचे नेतृत्व त्या यशस्वीपणे निभावत आहेत. उर्दू-हिंदी प्रकल्पाच्याही त्या समन्वयक आहेत. भारताबाहेरील जगद्विख्यात शास्त्रज्ञांनी त्यांना अशा संशोधनप्रकल्पात सहकारी म्हणून निमंत्रित केले आहे. २०११-१३ या काळात हाइनरीश हायने या जर्मन विद्यापीठातील प्रा. वेब्क पीटरसन यांच्या ‘ए क्वॉलिटेटिव्ह ॲनलिसिस ऑफ फोनोलॉजिकल डिस्क्रिप्टिव्ह टेक्निक्स ॲण्ड ए कम्पॅरिझन ऑफ पाणिनीज प्रत्याहार्स ॲण्ड फोनोलॉजिकल फीचर्स’ या प्रकल्पात भागीदारी, डाड-युजीसी योजनेअंतर्गत जर्मनीच्याच ऑलिवर हेल्विग युनिव्हर्सिटी ऑफ हायडेलबर्गकडून ‘ॲडव्हान्स्ड रिसर्च इन द कंप्युटेशनल प्रोसेसिंग ऑफ संस्कृत विथ स्पेशल फोकस ऑन वर्ड सेन्स डिसॲबिग्युएशन’ या विषयार्थ निमंत्रण आणि, ‘एनहान्सिंग ॲक्सेस टू प्रायमरी कल्चरल हेरिटेज मटेरिअल ऑफ इंडिया’ या अमेरिकेच्या ब्राउन विद्यापीठातील प्रा. पेटर शॉर्फ यांच्या प्रकल्पास कार्यान्वित करण्यातले डॉ. अंबा यांच्याकडून मिळालेले अपेक्षित सहकार्य जागतिक स्तरावरील अंबा कुलकर्णी या संशोधिकेस लाभलेली मान्यता अधोरेखित करणारे.

प्रा. जेरार्ड ह्युए या जगद्विख्यात फ्रेंच संगणकशास्त्रज्ञाने डॉ. अंबा यांच्यासोबत सहसंशोधनासाठी २००७पासून दाखवलेली उत्सुकता आणि उभयतांच्या सहकार्याचे नेत्रदीपक फलित हे तर त्यांच्या कारकिर्दीतील नि:संशय कौतुकाचे पान. अंबा कुलकर्णी यांच्या कार्याविषयी अधिक विस्ताराने माहिती http://sanskrit.uohyd.ernet.in/faculty/amba/ या संकेतस्थळावर उपलब्ध आहे.

— अंबुजा साळगावकर

## कुलकर्णी, वामन महादेव

**सौंदर्यशास्त्र अभ्यासक, समीक्षक**

**२२ नोव्हेंबर १९१७ – डिसेंबर २००९**



डॉ. वामन महादेव कुलकर्णी यांचा जन्म कोल्हापूर जिल्ह्यातील आजरा या गावी झाला. संस्कृत व प्राकृत भाषांमध्ये प्रथम श्रेणीत पदव्युत्तर पदवी मिळवून त्यांनी संस्कृतमध्येच पीएच.डी. ही पदवीसुद्धा प्राप्त केली. त्यांना अनेक शिष्यवृत्त्या व पारितोषिके मिळाली. त्यांतील विशेष नमूद करण्याजोगी पारितोषिके पुढीलप्रमाणे : ‘ए.टी. जैन’ शिष्यवृत्ती, ‘गंगादास रंगीलदास’ शिष्यवृत्ती, ‘दक्षिणा’ फेलोशिप इत्यादी.

संस्कृत काव्यशास्त्राच्या क्षेत्रात अनेक विद्वान व्यक्तींनी जरी उत्तम कामगिरी केली असली, तरी प्राकृत भाषेचे या क्षेत्रातील महत्त्व प्रथम डॉ. वा.म. कुलकर्णी यांच्याच लक्षात आले. प्राकृत गाथांच्या अध्ययनाशिवाय संस्कृत काव्यशास्त्रावरील ग्रंथांचा अभ्यास पूर्ण होऊ शकत नाही हे जाणून त्यांनी त्या दोन विषयांचे साक्षेपी अध्ययन सुरू केले. पीएच.डी. या पदवीसाठी ‘जैन वाङ्मयातील रामकथा’ हा प्राकृत भाषेतील विषयच त्यांनी निवडला होता. त्यासाठी त्यांनी सर्व जैन रामायणांचा चिकित्सक व विस्तृत अभ्यास केला. रामकथेबाबतच्या विविध प्रश्नांचा सखोल विचार केला. जैन पुराणकथांसह वाङ्मयीन समीक्षा व आस्वादही प्रस्तुत केला आणि वाल्मीकी रामायण आणि जैन रामायणांची तुलना उत्तम प्रकारे पुढे मांडली.

'स्टडीज इन जैन लिटरेचर' या पुस्तकात जैन लेखकांनी अलंकारशास्त्राला दिलेल्या देणगीचा त्यांनी परामर्श घेतला आहे. तसेच, जैन तत्त्वज्ञान, कथा वाङ्मय, स्त्रियांचे स्थान व तारायणाची सुभाषिते इत्यादींविषयी मौलिक चर्चा केली आहे. या पुस्तकातील लेखनाचा निष्कर्ष असा, की ब्राह्मण तत्त्वज्ञान, जैन तत्त्वज्ञान आणि बौद्ध तत्त्वज्ञान यांमध्ये अनेक भेद असले, तरी स्वनियंत्रण आणि वास्तवाच्या यथार्थज्ञानातून मुक्ती या विषयावर सांस्कृतिक एकमत दिसते. जैन सौंदर्यशास्त्राची कल्पना स्पष्ट करून त्यांनी प्राकृत गाथांमधील अपभ्रष्टता दूर केली आहे, ही या क्षेत्रास मोठीच देणगी आहे. त्याशिवाय रामचंद्राच्या 'मल्लिकामकरंद' या नाटकाचा रसास्वाद आणि हरिभद्राच्या 'समराइच्चकाहा' या ग्रंथाचे अध्ययन हे दोन आणखी विशेष होत.

सौंदर्यशास्त्राच्या क्षेत्रात त्यांचे अनेक निबंध गाजले आहेत. 'Sanskrit Theory of Beauty', 'Bharata's Concept of Bhava', 'Duel Nature of Sattvika-bhava-s', 'Rasa and its Pleasurable Nature', 'Hemachandra and Rasa-tradition' हे निबंध त्यांच्या विद्वत्तेचे उत्तम नमुने होत. या निबंधांच्या अभ्यासातून कोणत्याही विषयाचा सखोल, साक्षेपी विचार, घाईघाईने निष्कर्ष न काढण्याची वृत्ती, विषयाची सर्व अंगे तपासून पाहण्याची क्षमता आणि असामान्य बुद्धिमत्ता यांचाच प्रत्यय येतो.

त्यांनी लिहिलेल्या अनेक पुस्तकांच्या प्रस्तावना विशेष महत्त्वाच्या ठरल्या आहेत. विमलसूरीच्या 'पउमचरिय'च्या आवृत्तीला लिहिलेली प्रस्तावना, तसेच माहिंभट्टाच्या 'व्यक्तिविवेका'च्या प्रा. पटवर्धनांनी काढलेल्या आवृत्तीची प्रस्तावना या अभ्यासकांनी अवश्य वाचण्याजोग्या आहेत. त्याचबरोबर, त्यांनी केलेली पुस्तक-परीक्षणे ही विशेष लक्षणीय आहेत. याचे कारण असे, की केवळ पुस्तकाच्या लेखकाने मांडलेल्या विचारांवरून घाईघाईने पुनर्निरीक्षण न करता पुस्तकाच्या विषयाचा स्वतः अभ्यास करून, अन्य अभ्यासकांची मते लक्षात घेऊन, त्या पुस्तकाचे वैशिष्ट्य लोकांपुढे मांडण्याचे त्यांचे कौशल्य प्रशंसनीय होते. भरपूर वाचन, चिंतन आणि मनन या गुणांमुळे त्यांचा प्रत्येक लेख हा अभ्यासाचा आदर्श नमुना ठरला. डॉ. ए.एन. उपाध्ये यांनी संपादित केलेले 'सप्तशतिसार', के. कृष्णमूर्ती यांनी संपादित केलेले 'वक्रोक्तिजीवित', तसेच गो.के. भटांनी लिहिलेले 'Rasa Theory and Allied Problems' या सर्वांची परीक्षणे त्यांनी लिहिली आहेत. त्यांच्या नावावर एकूण ५३ पुस्तक-परीक्षणे असून 'जैनागमों की मूलभाषा', नीलकंठाचे 'यादवेन्द्रमहोदय' आणि मॅसन व पटवर्धनांनी संयुक्तपणे लिहिलेल्या 'अ‍ॅस्थेटिक रॅप्चर' या पुस्तकांची पुनर्निरीक्षणे स्वतंत्र लेखांइतकीच अभ्यासपूर्ण आहेत.

डॉ. वा.म. कुलकर्णी यांची स्वतःची ग्रंथसंपदा विपुल आहे. स्वतंत्र पुस्तके : 1. 'Bhoja and Harivijaya of Sarvasena', 2. 'Outline of Abhinava Gupta's Aesthetics', 3. 'Studies in Sanskrit Sahitya Shastra', 4. 'More Studies in Sanskrit Sahitya Shastra', 5. 'An anthology of Jain-texts', 6. 'Prakrit Verses in Sanskrit Works', 7. 'A Treasury of Jain Tales', 8. 'Studies in Jain Literature', 9. 'Abhinavabharati, text restored and other articles', पाच पुस्तक-परीक्षणे, संपादित पुस्तके : १०. 'गीतगोविंद' संपादित आवृत्ती, ११. 'उषानिरुद्धम'ची संपादित आवृत्ती, 12. Natyashastra with the Commentary of Abhinavagupta, Vol. II, III.', 13. 'Kumarshatakadvayam'.

यांखेरीज अनेकानेक पुस्तकांच्या प्रस्तावना आणि संपादित आवृत्त्यांद्वारे त्यांनी ग्रंथागारात मोलाची भर घातली आहे. त्यांचे १०५ शोधनिबंध प्रकाशित असून या सर्व कार्याचा गौरव विविध पुरस्कारांनी झाला आहे. वर नमूद केलेल्या पुरस्कारांव्यतिरिक्त त्यांना पुढील सन्मानही मिळाले आहेत : 1. 'Springer' Research Scholarship {for three years}, 2. Silver medal

for Research - Asiatic Society, Mumbai, 1983, 3. President's Award of Certificate of Honour as eminent Sanskrit Scholar, 1992, 4. 'Honorary Fellowship for Life' by the Asiatic Society, Mumbai,1993, 5. 'Acharya Hemachandrasuri Puraskar for Prakrit Works'.

सरकारी नोकरीत राहून, एन.सी.सी. ऑफिसर म्हणून काम करून एवढा प्रचंड विद्याव्यासंग करणारी व्यक्ती विरळाच.

– डॉ. उमा वैद्य

## कुवलयानंद

***गुणे, जगन्नाथ गणेश***

**तर्कनिष्ठ योगवैज्ञानिक**

**३० ऑगस्ट १८८३ – १८ एप्रिल १९६६**



स्वामी कुवलयानंद म्हणजे पूर्वाश्रमीचे जगन्नाथ गणेश गुणे हे थोर योगवैज्ञानिक होते. त्यांनी प्राचीन योगपरंपरा आधुनिक विज्ञानाच्या कसोटीवर पारखून योगाचा प्रसार अखिल मानवजातीच्या फायद्यासाठी केला.

जगन्नाथ गणेश गुणे यांचा गुजरातमधील दाभोई या खेड्यात जन्म झाला. त्यांचे वडील गणेशराव हे शिक्षक, तर आई सरस्वती गृहिणी होती. हलाखीची स्थिती असल्याने शिक्षण घेण्यासाठी त्यांना फार कष्ट करावे लागले. १९०३ साली मॅट्रिकच्या परीक्षेत त्यांना ‘जगन्नाथ शंकरशेट संस्कृत शिष्यवृत्ती’ मिळाल्यामुळे बडोद्याच्या महाविद्यालयात शिक्षण घेऊन, १९१० साली ते पदवीधर झाले. बडोद्यातील जुम्मादादा व्यायामशाळेचे राजरत्न माणिकराव यांनी स्वामीजींना १९०७ ते १९१० या काळात भारतीय पद्धतीचे शारीरिक शिक्षण दिले. बडोद्याच्या विद्यापीठात प्राध्यापक असलेले अरविंद घोष व त्याचबरोबर लोकमान्य टिळकांचा प्रभाव त्यांच्यावर विद्यार्थिदशेतच पडला. आपले जीवन मानवजातीच्या सेवेसाठी अर्पण करायचे त्यांनी ठरविले व ब्रह्मचर्य व्रत स्वीकारले.

स्वामीजींनी अमळनेर येथील खानदेश शिक्षण संस्था स्थापन करण्यास मदत केली. नंतर १९१६ साली ते तेथील राष्ट्रीय महाविद्यालयाचे प्राचार्य झाले. १९२० साली ब्रिटिश सरकारने प्रखर राष्ट्रीयतेचे वातावरण असलेले हे महाविद्यालय बंद केले. १९१६ ते १९२३ या कालावधीत प्राचीन भारतीय संस्कृती हा विषय ते शाळेत व महाविद्यालयात शिकवीत असत.

परमहंस माधवदासजी या थोर बंगाली योग्याशी १९१९ साली त्यांची भेट झाली. माधवदासजी अनेक वर्षे हिमालयात राहून नंतर बडोद्याजवळ नर्मदा नदीच्या काठावर मालसार येथे आले होते. त्यांनी स्वामीजींना योगाचे अंतरंग उघडून दाखविले. या गोष्टींचा स्वामीजींच्या जीवनकार्यावर मोठा प्रभाव पडला.

स्वामीजी आदर्शवादी व आध्यात्मिक प्रवृत्तीचे असूनही तर्कनिष्ठ होते. त्यामुळेच योगामुळे शारीरिक स्तरावर होणाऱ्या परिणामांचे वैज्ञानिक स्पष्टीकरण त्यांना जाणून घ्यायचे होते. म्हणून १९२०-२१ साली त्यांनी योगाच्या काही अंगांचा शरीरावर होणारा परिणाम बडोदा हॉस्पिटलच्या प्रयोगशाळेत पारखून घेतला. त्यांना योगसाधनेने आलेले अनुभव व वैज्ञानिक प्रयोगांचे वस्तुनिष्ठ परिणाम यांची तुलना केल्यावर योगाचा संदेश केवळ एकट्या व्यक्तीच्या शारीरिक, मानसिक व आत्मिक उन्नतीसाठी नसून तो साऱ्या मानवतेसाठी आहे ही त्यांची श्रद्धा बळकट झाली व त्या दिशेने त्यांचे कार्य सुरू झाले. योगाच्या वैज्ञानिक अभ्यासासाठी प्रयोगशाळा हवी म्हणून १९२४ साली त्यांनी लोणावळ्याला ‘कैवल्यधाम हेल्थ ॲण्ड योग रिसर्च सेंटर’ स्थापन केले. त्याच वर्षी त्यांनी योगाच्या वैज्ञानिक संशोधनाला वाहिलेले ‘योगमीमांसा’ हे वैज्ञानिक त्रैमासिक सुरू केले.

पाश्चात्त्य संशोधकही या प्रयोगांनी प्रभावित होऊन लोणावळ्याला येऊ लागले. १९२८ साली डॉ.

क

जोसेफाइन राथबोन, तर १९५८ साली कॅलिफोर्निया विद्यापीठाचे डॉ. वेंगर व मिशिगन विद्यापीठाचे डॉ. बागची काही काळ तेथे वास्तव्य करून गेले.

कैवल्यधामची मुंबई येथील शाखा १९३२ साली काही काळ सांताक्रूझ येथे, तर १९३६ साली चौपाटी येथे स्थापन झाली. योगाभ्यासातून रोगनिवारण व स्वास्थ्यसंवर्धन हे त्यांचे ब्रीद आहे. याच सुमारास अलिबागजवळ कणकेश्वर येथे व पुढे सौराष्ट्रातील राजकोट येथे १९४३ साली कैवल्यधामच्या आध्यात्मिक केंद्रांची स्थापना झाली.

१९४४ साली वैज्ञानिक व साहित्यिक संशोधनाला वाहिलेली ‘कैवल्यधाम श्रीमान माधव योग मंदिर समिती’ लोणावळ्याला स्थापन झाली. १९५१ साली गोवर्धनदास सक्सेरिया महाविद्यालयाची स्थापना झाली. त्याचा हेतू मानवजातीची नि:स्वार्थ सेवा करण्यासाठी तरुणांची आध्यात्मिक व बौद्धिक तयारी करून घेणे हा होता. १९६१ साली गुप्ता रुग्णालयाची योगाद्वारे जुनाट आजारांवर उपचार करण्याच्या उद्देशाने स्थापना झाली. स्वामीजींनी ‘आसन’ आणि ‘प्राणायाम’ ही दोन पुस्तके लिहिली. त्यांनी ‘गोरक्षशतकम्’चे संपादन केले. ८३ वर्षांचे कृतार्थ आयुष्य जगून स्वामी कुवलयानंद निजधामी गेले.

– डॉ. वीणा लोंढे

## केतकर, गोदावरी वासुदेव
**अध्यापिका, मौलिक विश्लेषक**
**६ जून १९०० – १९८८**

‘भारतीय नाट्यशास्त्र’ या मौलिक प्रबंधाच्या लेखिका गोदावरी वासुदेव केतकर यांचे शालेय व उच्च शिक्षण महर्षी कर्वे यांच्या हिंगणे येथील महिलाश्रमाच्या शाळेत व विद्यापीठात झाले. ‘गृहीतागमा’ (बी.ए. सदृश) झाल्यावर या संस्थेशी निगडित असलेले संस्कृत पंडित ह.रा. दिवेकर यांच्या मार्गदर्शनाखाली भरतमुनींच्या नाट्यशास्त्रावर प्रबंध लिहून त्यांनी ‘प्रदेयागमा’ (एम.ए. सदृश) पदवी संपादली. सातारा



कन्याशाळेत व कानपूरला एका शाळेत त्यांनी शिक्षिका म्हणून काम केले. कानपूरला गेल्यानंतर थोड्या महिन्यांत ग्वाल्हेरच्या राजकन्येची शिक्षिका म्हणून गोदावरी केतकर यांची नेमणूक झाली. राजकन्येच्या विवाहानंतर अगदी थोड्याच दिवसांत ग्वाल्हेरच्या महाराणी कन्याशाळेच्या त्या प्रधान अध्यापिका झाल्या. त्या शाळेची गोदावरीबाईंनी १९५५ पर्यंत २१ वर्षे सेवा केली.

गोदावरीबाईंच्या संशोधनात्मक प्रबंधात नाट्यशास्त्रावरचा आदिग्रंथ भरतमुनी कृत नाट्यशास्त्र यातील महत्त्वाच्या सूत्रांचे विवरण झाले आहे. ‘भारतीय नाट्यशास्त्र’ या नावाने तो १९२८ साली त्यांच्या वडिलांनी छापून प्रकाशित केला. १९६३ साली ‘भरतमुनीचे नाट्यशास्त्र’ अशी त्याची दुसरी आवृत्ती निघाली. त्याला लिहिलेल्या प्रास्ताविकात मधल्या काळात नाट्यशास्त्राविषयी पुनर्विचार झाला, त्याचा जागरूकतेने आढावा घेतला आहे.

ग्रंथाच्या अकरा प्रकरणांतून भरताच्या समग्र नाट्यविचाराची कल्पना देणारे विषय विस्ताराने चर्चिले आहेत. आवश्यक तेथे संस्कृत-मराठी नाटकांतील उदाहरणे दिली आहेत. स्वतंत्रपणे, विश्लेषक दृष्टीने, तरीही सोप्या, सरळ भाषेत घेतलेला परामर्श म्हणून या ग्रंथाचे महत्त्व आहे. भरतमुनींच्या नाट्यशास्त्राचा हा पहिला मराठी अवतार आहे. या विषयावरचा एक उत्कृष्ट संदर्भग्रंथ म्हणून मराठी आणि संस्कृत भाषेच्या दृष्टीने त्याचे महत्त्व आहे.

– डॉ. गौरी माहुलीकर

**संदर्भ :**

१. *‘संक्षिप्त मराठी वाङ्मयकोश’, (१९२० ते २००३ पर्यंत); संपादक : गणोरकर, टाकळकर, डहाके, दडकर, भटकळ, जी.आर.; भटकळ फाउण्डेशन, मुंबई; २००४.*
२. *केतकर, गोदावरी; ‘भरतमुनींचे नाट्यशास्त्र’; १९६३.*

क

## केतकर, श्रीधर व्यंकटेश

**समाजशास्त्रज्ञ, ज्ञानकोशकार**

**२ फेब्रुवारी १८८४ – १० एप्रिल १९३७**



महाराष्ट्रीय समाजाच्या प्रबोधनासाठी आयुष्यभर निर्धारपूर्वक कार्य करणारे समाजशास्त्रज्ञ व ज्ञानकोशकार डॉक्टर श्रीधर व्यंकटेश केतकर यांना त्यांच्या मूलगामी संशोधनामुळे 'प्रतिभाशाली, व्यासंगी समाजशास्त्रज्ञ' अशी जागतिक कीर्ती प्राप्त झाली. पांडित्य आणि प्राचंड्य हे ज्यांच्या प्रतिभेचे दोन पैलू होते, त्या केतकरांनी ज्ञानार्जन आणि विद्याप्रसार हेच आपले जीवनध्येय मानले व ते एखाद्या व्रतासारखे निष्ठेने पार पाडले.

रायपूर येथे जन्मलेल्या श्रीधर केतकर यांचे वडील पोस्टमास्तर होते. त्यांची आर्थिक स्थिती मध्यम होती. श्रीधर यांच्या जन्मानंतर वडिलांची मुंबईस बदली झाली; पण लगेचच दोन-तीन वर्षांत ते मृत्यू पावले. पाच वर्षांचे श्रीधर व त्यांची तीन मोठी भावंडे यांना घेऊन त्यांची आई अमरावतीस काकांच्या आधाराने राहिली. श्रीधर केतकर यांचे सर्व शालेय शिक्षण तेथेच झाले.

बुद्धिमान केतकर 'व्हर्नाक्युलर फायनल', 'हायस्कूल एन्ट्रन्स', इतर स्पर्धात्मक परीक्षा यांत सतत वरच्या क्रमांकाने उत्तीर्ण होत. त्यांचे चौफेर वाचन, बहुश्रुतता, तीव्र स्मरणशक्ती, उपक्रमशीलता व त्यातील नावीन्य यांमुळे शाळेतच त्यांना 'चालता-बोलता ज्ञानकोश' अशी पदवी मिळाली होती. मॅट्रिकला असताना आई व बहीण यांचा पाठोपाठ मृत्यू झाला. एक मोठा भाऊ आधीच निवर्तला होता. त्यामुळे घराची ओढ संपली. काकांच्या आग्रहामुळे त्यांनी मुंबईला विल्सन कॉलेजात प्रवेश घेतला.

लहानपणापासूनच स्वराज्य, स्वदेश व स्वभाषा यांचे तीव्र प्रेम असल्याने महाविद्यालयात अनुभवास येणारी युरोपियन साम्राज्यवादी वृत्ती व भारतीयांची होणारी हेटाळणी यांचा त्यांना विलक्षण त्रास होई. सहपाठी विद्यार्थ्यांबरोबर भारतीय स्वातंत्र्य व समाजप्रबोधन यांसंबंधी सतत चर्चा करीत असताना सशस्त्र क्रांतीनेच भारताला स्वातंत्र्य मिळेल असा विश्वास केतकरांना वाटू लागला. त्यासाठीचे लष्करी शिक्षण अमेरिकेस मिळेल अशी शक्यता दिसल्याने त्यांनी अमेरिकेस जाण्याचे ठरवले व त्यासाठी इतर कुटुंबीयांशी भांडून पैशांची जुळवाजुळव केली. १५ एप्रिल १९०६ रोजी त्यांनी अमेरिकेस प्रयाण केले; मात्र तेथे जाईपर्यंत त्यांचे विचार बदलले आणि भारतीयांची सामाजिक स्थिती आधी सुधारणे जरुरीचे आहे व त्यासाठी ज्ञानप्रसार करून त्यांचे प्रबोधन करणे आवश्यक आहे, अशी त्यांची धारणा झाली.

पूर्व अमेरिकेतील कॉर्नेल विद्यापीठात प्रवेश घेतल्यावर तेथील लवचीक शिक्षणपद्धतीचा आधार घेत त्यांनी दोन वर्षांत बी.ए. व एम.ए. या पदव्या आणि लगेचच तीन वर्षांत, १९११ मध्ये, पीएच.डी.ची पदवी मिळविली. या पदवीसाठी त्यांनी 'भारतीय जातिसंस्थेचा इतिहास' हा विषय निवडला. भारतातील अनेक सामाजिक समस्यांचे मूळ असणाऱ्या जातिसंस्थेबद्दलचे एका भारतीयाचे हे मूलगामी, व्यासंगपूर्ण संशोधन पाश्चात्त्य जगतात महत्त्वपूर्ण ठरले. पाश्चात्त्य संशोधकांच्या संशोधनातील त्रुटी दाखवून मूळ समस्येची उकल करून दाखवणाऱ्या केतकरांच्या या संशोधनाची पाश्चात्त्य विद्वज्जगाने मोठ्या प्रमाणावर दखल घेतली. हार्वर्ड, येल, लंडन, मॅन्चेस्टर यांसारख्या प्रतिष्ठित विद्यापीठांतील समाजशास्त्रज्ञांशी, तत्त्वज्ञांशी केतकरांचा संवाद सुरू झाला व त्यांना तिथे अनेक मानसन्मान मिळाले.

'The History of Caste in India' या नावाने त्यांच्या प्रबंधाचा पहिला खंड न्यूयॉर्कमध्ये प्रसिद्ध झाला. या खंडात 'मनुस्मृती'चे परीक्षण करून इसवी-सनाच्या तिसऱ्या शतकातील भारतीय, सामाजिक परिस्थितीवर त्यांनी प्रकाश टाकला. या प्रबंधाचा दुसरा खंड इ.स. १९११ मध्ये लंडन येथे 'Hinduism, its Formation and Future, Illustrating the Laws of

Social Evolution as Reflected in the History of Formation of Hindu Community' या नावाने प्रसिद्ध झाला.

त्यांनी आपल्या प्रबंधात जात, जमात (राष्ट्रजाती) या संकल्पनांच्या नेमक्या, स्पष्ट व समावेशक व्याख्या केल्या, त्याचबरोबर महावंश (Race), उपजाती यांच्याही व्याख्या करून स्पष्टीकरण दिले.

केतकर म्हणतात, 'जात म्हणजे दोन वैशिष्ट्यांनी युक्त असा एक सामाजिक समूह असतो. पहिले वैशिष्ट्य म्हणजे या समूहाचे सदस्यत्व जन्माधिष्ठित असते व दुसरे वैशिष्ट्य म्हणजे या गटातील सदस्यांना गटाबाहेरच्या व्यक्तीशी विवाह करण्यास कडक सामाजिक निर्बंधाने मनाई असते.' जातीची एवढी समर्पक व स्पष्ट व्याख्या त्यापूर्वी कोणीही केली नव्हती, असे त्यांच्या विरोधकांनीही मान्य केले.

केतकरांचे आपल्या प्रबंधातले महत्त्वाचे प्रतिपादन असे होते की : १) पूर्वीच्या अभंग, एकरूप हिंदू समाजाचे तुकडे पडून आजच्या जाती निर्माण झाल्या ही समजूत चुकीची असून असा एकसंध समाज कधीच अस्तित्वात नव्हता. २) आर्यलोक हिंदुस्थानात आले त्या वेळी येथे अनेक राष्ट्रे व राष्ट्रजाती (जमाती) अस्तित्वात होत्या व त्यांपैकी अजूनही पुष्कळ जातिरूपाने अस्तित्वात आहेत. ३) त्याचप्रमाणे, आर्य उत्तरेकडून येथे आले हे जरी खरे असले, तरी येथे येऊन ते उच्चवर्णीय झाले आणि येथे असणारे आधीचे लोक रानटी, अनार्य होते, त्यांच्यात युद्धे झाली व नंतर वर्णभेद निर्माण झाला ही समजूत साफ चुकीची आहे. ४) आर्य येथे येण्यापूर्वी येथील प्रत्येक राष्ट्रजातीत चार वर्ण होते व कर्मानुसार त्या-त्या व्यक्तीचा वर्ण ठरत असे.

याशिवाय यामध्ये जातिव्यवस्था कशी असावी, जातिसंस्था आणि हिंदू धर्म यांचे परस्पर नाते, हिंदू समाजाची जडणघडण कशी असावी व हिंदू समाजाचे भवितव्य काय असेल, काय असावे, याबद्दलचे आपले विचार त्यांनी मांडले आहेत. हिंदू धर्म म्हणजे हिंदूंची कर्तव्ये असे सांगून 'हिंदू कुणाला म्हणावे', यासारख्या प्रश्नांचीही त्यांनी चर्चा केली. 'जातिसंस्थेचा इतिहास' या पहिल्या खंडाला श्रीधर केतकर यांनी जे परिशिष्ट जोडले, त्यात मानववंशशास्त्रातील काही संज्ञांचे स्पष्टीकरण त्यांनी प्रथमच केले. त्यात महत्त्वाचे मुद्दे असे मांडले की : १) 'सापेक्ष स्थिरते'च्या तत्त्वानुसार मानवी समाजांचे वर्गीकरण करावे. २) ज्यांची समान शारीरिक वैशिष्ट्ये सापेक्षत: स्थिर असतील असे लोकसमूह एका महावंशाशी संबंधित असावेत व म्हणून त्यांची नावे संस्कृतिनिदर्शक (आर्य-द्रविड-सेमेटिक) अशी न ठेवता प्रदेशनिदर्शक (उत्तरेकडील मानववंश, भूमध्यसमुद्राजवळील मानववंश इ.) ठेवावीत. यामुळे पाश्चात्त्यांनी 'आर्य' हा शब्द चुकीच्या अर्थाने वापरून शेकडो वर्षे जो गोंधळ घातला आहे, तसे गोंधळ होणार नाहीत.

हिंदू समाजाची धर्ममूढता, निष्क्रियता, दैववादी, नियतिवादी जीवनव्यवहार यांची केतकरांना जाणीव होती व त्यांबद्दलची कारणमीमांसा त्यांनी मांडली आहे. जातिसंस्थेवर आधारित या समाजरचनेत परिवर्तन घडवून आणण्यासाठी असंख्य छोटे छोटे बदल घडवून आणल्यास ते मुळापर्यंत पोहोचतील, असे त्यांचे मत होते.

आपल्या विविध पुस्तकांमधून, कादंबऱ्यांमधून त्यांनी समाजपरिवर्तनाचाच विचार मांडला व त्यातून या खऱ्या समाजशास्त्रज्ञाचा ऐतिहासिक दृष्टिकोनच दिसतो. मानवधर्मशास्त्राचा अभ्यास करताना, जातिव्यवस्थेचे प्रमेय मांडतानाही हाच दृष्टिकोन होता. सामाजिक क्रांतीऐवजी सामाजिक उत्क्रांतिवादी दृष्टिकोन स्वीकारावा, त्यातच समाजहित आहे, असे त्यांचे मत होते. समाजपरिवर्तनासाठी ज्ञानविकास झाला पाहिजे, त्यातच राष्ट्रोद्धार आहे अशा ठाम विचारांमुळे, अमेरिकेत उपलब्ध असणाऱ्या संशोधनाच्या संधी न घेता ते भारतात परतले. मात्र, येण्यापूर्वी सव्वा वर्ष इंग्लंडमध्ये घालवून विकसित देशातील भिन्न संस्कृतीचे निरीक्षण आणि आधुनिक ग्रंथालयांद्वारे ज्ञानार्जन करण्यास ते विसरले नाहीत.

सप्टेंबर १९१२ मध्ये भारतात परतल्यावर तत्कालीन 'फॉरेन रिटर्ण्ड' लोकांप्रमाणे प्रतिष्ठेची पदे वा नोकरी न स्वीकारता त्यांनी कोलकाता विद्यापीठात दहा-अकरा महिने पदव्युत्तर विद्यार्थ्यांसाठी अर्थशास्त्र व राज्यशास्त्र या विषयांचे अध्यापन केले. त्याच काळात त्यांनी 'An Essay on Indian Economics' हा ग्रंथ लिहिला. त्यात भारतीय अर्थशास्त्रासंबंधी त्यांनी केलेली विधाने व वर्तवलेले अंदाज आज खरे ठरले आहेत असे दिसते.

१९१३ पासून पुढे जवळजवळ दोन वर्षे भारतभर व्याख्यानदौरे करून त्यांनी आपल्या 'सुधारणात्रयी'चा प्रचार केला. ही सुधारणात्रयी अशी : १) भाषावार प्रांतरचना, २) देशी भाषांमध्ये राज्यकारभार व ३) देशी भाषांमधून शिक्षण देणारी प्रांतवार विद्यापीठे. या तीन गोष्टींची समाजविकासाला नितांत आवश्यकता आहे, असे त्यांचे ठाम मत होते.

या दौऱ्यांमध्ये त्यांची पूर्वीची मते ठाम झाली, तसेच ज्ञानकोशासारख्या ज्ञानात्मक कामाची समाजाला गरज आहे असा त्यांना विश्वास वाटू लागला. ज्ञानकोशनिर्मितीचा मार्ग खडतर आहे अशी जाणीव लोकमान्य टिळक, इतिहासाचार्य राजवाडे यांसारख्या ज्येष्ठांनी करून दिली; पण त्याचबरोबर हे काम आवश्यक आहे असे पटल्याने केतकरांना पाठिंबाही दिला. राष्ट्रसेवा आणि राष्ट्रबलसंवर्धन यांसाठी ज्ञानकोशनिर्मिती करण्याचे ठरवून केतकर यांनी आपले सारे आयुष्य त्यासाठी झोकून दिले.

ज्ञानकोशाचा दर्जा, त्यातील ज्ञानपूर्ण लेखन यांच्याबरोबरच त्यातील व्यावहारिक बाजूचादेखील विचार श्रीधर व्यंकटेश केतकर यांनी केला. प्रत्येक राज्याला, प्रत्येक राष्ट्राला जसा आपला वेगळा भूगोल व वेगळा इतिहास असतो, तसेच प्रत्येक राज्याची स्वतंत्र अस्मिता आणि निराळे मानबिंदू असतात हे लक्षात घेऊन महाराष्ट्रीय समाजाच्या आवश्यकतेनुसार त्यांनी विषय निवडले. हा ज्ञानकोश म्हणजे पूर्वपरंपरागत ज्ञान आणि भविष्यकालीन स्थिती यांना जोडणारा, तसेच पाश्चात्त्य आणि पौर्वात्य संस्कृतींना जोडणारा दुवा ठरावा अशी त्यांची धारणा होती व ती त्यांनी संपूर्णपणे यशस्वी करून दाखवली.

केतकरांनी 'ज्ञानकोशमंडळ लिमिटेड' ही कंपनी स्थापून त्यासाठी शेअर काढले आणि वर्गणीदारांना आवाहन केले. ग्रंथनिर्मितीसाठी अशा प्रकारे भागधारकांच्या मदतीने भांडवल उभे करणे ही कल्पना त्यांनी प्रथमच अवलंबिली. संपादक मंडळ नेमून परिपूर्ण वाङ्मयसूची तयार केली. ज्ञानकोशाचे एकूण तेवीस भाग झाले. प्रस्तावनेचे पाच खंड, शरीरखंडाचे सोळा भाग, सूची खंड व हिंदुस्थान खंड असे भाग केले.

प्रस्तावना खंडाचे पाच भाग केवळ अपूर्व असे आहेत. 'हिंदुस्थान आणि जग' या पहिल्या खंडात त्यांनी भारतीय जनतेचे स्वत्व विस्तारपूर्वक उलगडून दाखवले, जग घडवणाऱ्या शक्तींची ओळख करून दिली. समाज हळूहळू कसा रूपांतरित होतो, समाजविघटन कसे होते याचे अतिशय मूलगामी व सूत्ररूप विवेचन केतकरांनी यात केले आहे.

दुसरा व तिसरा खंड अनुक्रमे 'वेदविद्या' आणि 'बुद्धपूर्व जग' या नावाने प्रसिद्ध झाले. ज्ञानकोश हे संकलनात्मक काम असतानाही वेदविद्येबद्दलची चुकीची पाश्चात्त्य मते महाराष्ट्रीयांपुढे मांडणे त्यांना अयोग्य वाटले व त्यात आपले बौद्धिक परावलंबित्व आहे असे त्यांना जाणवले. आपल्याकडे असे सखोल संशोधन झालेले नाही हे लक्षात येताच केतकरांनी य.रा. दाते, वेदवेत्ते सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांसारख्यांच्या मदतीने चारही वेदसंहिता, ब्राह्मणे, उपनिषदे इ. वेदांगांचा मुळातून अभ्यास केला. या दोन खंडांमधून त्यांनी यज्ञसंस्था आणि वैदिक वाङ्मय यांचे परस्पर नाते व त्यांच्या विकासाचा क्रम व इतिहास यांबद्दलचे अत्यंत महत्त्वाचे, नवीन तीस सिद्धान्त मांडले आहेत. यामुळे आपली वैदिक संशोधन परंपरा त्यांनी समृद्ध केली. म.मो. कुंटे, राजारामशास्त्री भागवत, लोकमान्य टिळक यांच्यासारख्यांच्या संशोधकीय परंपरेत केतकरांना स्थान मिळाले.

त्यांचा व्यासंग व विद्वत्ता यांनी महाराष्ट्र तर दिपून गेलाच; पण जर्मन संशोधक प्रो. विंटरनिट्झ

यांच्यासारख्यांनी हे लेखन इंग्रजीत व जर्मनमध्ये भाषांतरित करण्याची तयारी दाखवली. परंतु, त्यापेक्षा ज्ञानकोश पूर्ण करण्याची गरज अधिक वाटल्याने केतकरांनी त्या गोष्टींकडे फारसे लक्ष दिले नाही. १९२१ पासून १९२९ पर्यंत २३ खंडांचा संपूर्ण ज्ञानकोश छापून झाला. त्याआधी १९२८ मध्ये ज्ञानकोश मंडळातील सदस्य, संपादक यांच्यातील मतभेद तीव्र झाले व मंडळ फुटले. विविध प्रकारच्या अडचणी आल्या. छपाईदारांनी त्रास दिला. जे काही कर्ज होते ते एकट्या केतकरांवर पडले आणि त्याची फेड करण्यासाठी ज्ञानकोशाचे खंड घरोघरी जाऊन विकण्याची वेळ केतकरांवर आली.

मात्र, त्यांचा संपूर्ण व्यवहार पारदर्शक व सचोटीचा राहिला. त्यांनी कुणाहीकडून कसल्याही प्रकारच्या देणग्या या कामासाठी घेतल्या नाहीत व कुणालाही बुडवले नाही. केवळ बारा वर्षांत त्यांनी हे काम पूर्ण केले. त्यातले बहुतांश लेखन त्यांनी एकट्याने केले. ज्ञानकोशाचे गुजराती भाषांतर होत होते; पण त्यात महात्मा गांधींची आडकाठी आली आणि त्यासंबंधी झालेला खर्च वाया गेला.

ज्ञानकोशाचे खंड जसजसे बाहेर पडले, तसतसे समाजात त्यांचे कौतुक झाले, पण त्याबरोबर वादही उफाळले. 'केसरी'सारख्या वृत्तपत्राने ज्ञानकोशाची फारशी दखल न घेतल्याने न.चिं. केळकर व केतकर यांच्यात वाद झाला. ज्ञानकोशाच्या चौथ्या खंडात मुहंमद पैगंबराबद्दल चुकीची व बदनामीकारक माहिती प्रसिद्ध झाल्याच्या कारणावरून मुसलमानांनी कडवी चळवळ उभारली व केतकरांवर मोठे संकट आले. नंतर आपण मिळविलेल्या माहितीची खातरजमा करून त्यांनी पुन्हा नवीन, योग्य माहिती दिली. असाच वाद गौतमबुद्धाच्या चरित्राबद्दल झाला, विविध जातीजमातींबद्दल झाला. पण बुद्धचरित्राबाबत केतकरांनी स्वत: संशोधन केले होते आणि इतर जातींबद्दलचेही योग्य ते पुरावे त्यांच्याजवळ होते. त्यामुळे त्या निषेध चळवळींमधून काही निष्पन्न झाले नाही. केतकर इंग्लंडमध्ये असताना एडिथ कोहन नावाच्या जर्मन-ज्यू तरुणीशी त्यांची ओळख झाली होती. ज्ञानकोशातील कामात मदत करायला, जर्मन ग्रंथांचे भाषांतर करायला कोहन भारतात आल्या. पुढे १९२० मध्ये त्यांचा केतकरांशी विवाह झाला. मात्र, विवाहापूर्वी व्रात्यस्तोमविधीद्वारे कोहन यांना हिंदू धर्मात घेऊन त्यांचे नाव शीलवती ठेवण्यात आले.

समाजशास्त्रज्ञ, ज्ञानकोशकार केतकरांनी साहित्यनिर्मितीही मोठ्या प्रमाणावर केली होती. ज्ञानकोश निर्मितीच्या वेळी ते 'विद्यासेवक' नावाचे मासिक चालवत असत. त्यांच्या सात कादंबऱ्या, कविता, स्फुट लेख बरेचसे यातूनच प्रकाशित झाले.

आपल्या कादंबऱ्यांमधून समाजशास्त्रीय प्रश्नांवर आधारित कथानके रचून, त्या प्रश्नांच्या अनेक बाजू, त्यांवरील त्यांना सुचणारे उपाय व या प्रश्नांचे गांभीर्य लोकांपर्यंत पोहोचवण्यासाठी त्यांनी कादंबरी हे माध्यम हाताळले. 'ब्राह्मणकन्या' या सुरचित कलात्मक कादंबरीत मिश्रविवाह व त्यांची संतती हा विषय आहे तर 'गोंडवनातील प्रियंवदा' यामध्ये समाजव्यवहारात स्त्री-पुरुषसंबंध कसे असावेत, पुनर्विवाहावेळी कसा विचार केला जावा, समाजस्वास्थ्याच्या दृष्टीने काय करणे आवश्यक आहे या गोष्टींचा विचार त्यातील पात्रांद्वारे व्यक्त केला आहे.

याशिवाय 'महाराष्ट्रीयांचे काव्यपरीक्षण' हा काव्य-समीक्षेची समीक्षा करणारा त्यांचा ग्रंथही लक्षणीय आहे. स्फुटलेखनात नगररचनेपासून तो सौंदर्यस्पर्धा असाव्यात की नाही, यासंबंधीच्या अभिप्रायापर्यंत अनेक विषयांचा ऊहापोह केलेला दिसतो. याशिवाय 'महाराष्ट्र वाग्विलास' नावाचे आणखी एक मासिक त्यांनी अमेरिकेस जाण्यापूर्वी काही महिने चालवले होते. ज्ञानकोश मंडळातर्फे त्यांनी 'पुणे समाचार' नावाचे दैनिकही वर्षभर चालवले. 'नि:शस्त्रांचे राजकारण'मध्ये महात्मा गांधींच्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या मार्गाला समांतर वाटावा असा मार्ग त्यांनी 'स्वयंनिर्णयी संघा'ची स्थापना करताना सुचवला आहे.

१९२९ नंतरची सात-आठ वर्षे केतकरांना अतिशय हलाखीची गेली. डोक्यावर प्रचंड कर्ज, सहकारी सोडून

गेल्याने आलेले एकटेपण व मनात विलक्षण, नवनवीन कल्पना स्फुरत असतानाही त्या प्रत्यक्षात आणता येत नाहीत याबद्दलची हतबलता, यांमुळे त्यांना मानसिक क्षीणता आली असावी. त्यातूनही त्यांची आशावादी वृत्ती व संशोधनाची उमेद टिकली हे नवल!

'प्राचीन महाराष्ट्र' या नावाने त्यांनी महाराष्ट्राच्या इतिहास लेखनास आरंभ केला. त्यातील पहिला भाग त्यांनी प्रसिद्ध केला व दुसरा त्यांच्या मृत्यूनंतर शीलवतींनी प्रकाशित केला. पहिल्या भागातील 'शकपर्व' व 'सातवाहनपर्व' या विभागांमध्ये त्यांनी १२५ नवीन सिद्धान्त मांडले आहेत. या सर्व लेखनातून त्यांनी महाराष्ट्रीय समाजाच्या वाढीचे आणि विकासाचे चित्र उभे करून त्याच्या आत्म्याचे दर्शन घडवण्याचा प्रयत्न केला, तो एकमेवच ठरला आहे.

मराठी भाषेविषयी त्यांना विलक्षण प्रेम होते. आपल्या विपुल लेखनाने स्वभाषेत त्यांनी ज्ञानात्मक भर टाकली आहेच, पण भाषेमध्ये नवीन शब्दांचीही भर टाकली आहे. 'जागतिक', 'संप्रदाय', 'समाजचित्र', 'गृहचित्र' यांसारखे अनेक नवीन शब्द त्यांनी निर्माण केले.

१८ फेब्रुवारी १९२८ रोजी पुण्यातील सर्व महाविद्यालयांतील विद्यार्थ्यांनी त्यांचा मोठा सत्कार करून नवीन पिढीतर्फे कृतज्ञता व्यक्त केली. ज्ञानकोशाच्या पूर्तीनंतर नागपूरमध्येही त्यांचे सत्कार होऊन मानपत्रे दिली गेली. १९३१ मध्ये हैद्राबाद येथे झालेल्या मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद त्यांना देऊन त्यांचा सन्मान केला गेला. या सर्व प्रसंगी केलेली त्यांची भाषणे त्यांच्या चिंतनशील वृत्तीची द्योतक होती व मराठीचा अभिमान दर्शवणारी, मराठीचा सर्वत्र वापर व्हावा असा आग्रह धरणारी होती.

तीव्र बुद्धिमत्ता, अफाट ग्रहणशक्ती यांची देणगी लाभलेल्या डॉ. केतकरांचे व्यक्तित्व बहुरंगी होते. एकाच व्यक्तीने विविध क्षेत्रांतील प्रश्न जाणून घ्यावेत, अलक्षित क्षेत्रे ध्यानी घ्यावीत व त्यासाठी विशेष योजना सुचवाव्यात हे विशेष होते. फार पुढच्या काळातले विचार त्यांनी मांडल्याने त्यांच्यावर 'विक्षिप्त' असा शिक्का बसला. परंतु 'एका नव्या जगाची कल्पना' मांडताना त्यांनी दाखवलेला द्रष्टेपणा अपूर्व होता.

आपल्या पहिल्याच पुस्तकात त्यांनी एका जगाची, विश्व, राष्ट्रीयत्वाची, सांस्कृतिक ऐक्याची कल्पना मांडली होती. 'मनुष्यजातीचे परमोच्च ध्येय व कल्याण, जगातील सर्व माणसांचा एक समाज बनवणे हेच होय', असे ठासून प्रतिपादन करणारे डॉ. केतकर दुर्दैवाने आपल्या या कल्पनेचा पाठपुरावा करण्यास फार काळ जगले नाहीत. मधुमेहाने व इतर किरकोळ आजाराने पुणे येथे त्यांचा मृत्यू झाला. प्रसिद्ध संशोधक व अभ्यासक डॉ. प.ल. वैद्य यांनी म्हटल्याप्रमाणे, ''डॉ. केतकर म्हणजे मूर्तिमंत साहस! त्यांनी दिलेली बौद्धिक आव्हाने स्वीकारण्याची पात्रता असणारा विद्वान महाराष्ट्रात पुन्हा केव्हा निर्माण होईल तो होवो!'' (लोकशिक्षण, जुलै १९३७) पुणे येथील कमला नेहरू पार्कमध्ये डॉ. केतकर यांचे स्मारक १९६४ मध्ये उभारले गेले आहे.

— मीना वैशंपायन

**संदर्भ :**


१. *गोखले, द.न.; 'डॉ. केतकर'; मॅजेस्टिक बुक स्टॉल; १९८१; दुसरी आवृत्ती.*

२. *वैशंपायन, मीना; 'ज्ञानकोशकार श्रीधर व्यंकटेश केतकर'; श्रीगंधर्ववेद प्रकाशन; नोव्हेंबर २०१०.*


## केवलानंद सरस्वती

***मराठे, नारायण सदाशिव***

**प्राज्ञपाठशाळेचे संस्थापक, कोशकार, संशोधक**

**८ डिसेंबर १८७७ – १ मे १९५५**

गुरुवर्य केवलानंद सरस्वती म्हणजे पूर्वाश्रमीचे नारायण सदाशिव मराठे, यांचा जन्म कुलाबा जिल्ह्यातील, रोहे तालुक्यातील सुडकोली या गावी झाला. वयाच्या अकराव्या वर्षी अलिबाग येथे काही काळ अध्ययन केल्यावर अठरा वर्षांच्या सुमारास त्यांनी वाई गाठली. वेद, वेदांगे, न्याय, व्याकरण, वेदान्त इत्यादी शास्त्रांचे अध्ययन त्या-त्या शास्त्रातील विद्वानांकडे केल्यानंतर या मननशील मुनींनी आपले सर्व



आयुष्य अध्ययन, अध्यापन, विद्याव्यासंग, ध्यानधारणा आणि ईश्वरभक्ती यांत व्यतीत केले.

श्रीधर व्यंकटेश केतकर यांचा विद्याव्यासंग पहाटेपासूनच सुरू होत असे. याचेही दोन भाग असत. एक अध्यापनाचा व दुसरा इतर विषयांच्या वाचनाचा. मराठी व संस्कृत भाषेमधील अन्य विषयांवरील बरेच ग्रंथ त्यांनी अभ्यासले होते. इंग्रजी शिकण्याची इच्छा असूनही त्यांना फुरसत मिळाली नाही; पण दृष्टी चौफेर असल्याने पाश्चात्त्यांचे जग, वेदपुराणांशी ज्याचा संबंध नाही असे आहे; परंतु त्याचे वैशिष्ट्य व महत्त्व समजून घेतले पाहिजे, असे त्यांचे मत होते. त्यामुळे पदार्थविज्ञान, जीवविज्ञान, व सामाजिक शास्त्रे यांसंबंधी मराठीत प्रसिद्ध झालेले विद्वानांचे ग्रंथ त्यांनी मन:पूर्वक वाचून काढले. हिंदुस्थानचा व जगाचा इतिहास, आधुनिक खगोल व भूगोल यांची उत्कृष्ट माहिती मिळविली. नव्या सुशिक्षिताला साजेशी बहुश्रुतता संपादन केली. त्यामुळे नव्या जमान्यातील धार्मिक, सामाजिक व राजकीय आंदोलनांचे समग स्वरूप त्यांच्या विचारांच्या कक्षेत सामावले गेले.

गुरुवर्यांचा दैनंदिन जीवितक्रम व्रतस्थ व तपस्वी माणसाचा असे. एकांतवास व विद्याव्यासंग यांत कधीही खंड पडला नाही. वाईत आल्यापासून त्यांचा माधुकरीवरच जीवननिर्वाह होता. त्यांनी कसलाही अर्थसंग्रह केला नाही. कारण, त्यांना तशी वासनाच मुळापासून नव्हती. स्वत:ची सर्व कामे स्वत:च, अत्यंत वक्तशीरपणे करावयाची. वाणी व शरीर या दोहोंच्या बाबतीत टापटीप व स्वच्छता यांवर त्यांचा फार कटाक्ष होता. कितीही राग आला तरी त्यांच्या तोंडून कधीही अपशब्द आला नाही. स्वभाव प्रेमळ होता; पण त्यांच्या अत्यंत शुचिर्भूत वागणुकीचा एक प्रकारचा दरारा विद्यार्थ्यांवर असे. केवलानंद सरस्वती यांनी लोकांशीही सलोख्याचे संबंध ठेवले. अजातशत्रू या पदवीला ते खऱ्या अर्थाने प्राप्त झाले.

अध्ययन, अध्यापन यांतच आयुष्य वेचावयाचे हे नारायण मराठ्यांनी वयाच्या तेविसाव्या वर्षीच निश्चित केले होते. त्यांनी प्रत्यक्ष विधिवत संन्यास वयाच्या त्रेपन्नाव्या वर्षी घेतला. जुन्या शिक्षणपद्धतीतील तीन गुण त्यांनी आग्रहाने प्रतिपादन केले. अधिक तयारीच्या विद्यार्थ्यास ते ग्रंथातील ठरावीक भाग इतरांस सांगावयास लावत. इतर हेच पाठ अनेक विद्यार्थ्यांना शिकवत. यास ते ‘चिन्तनिका’ असे म्हणत. काही वेळेला गुरुजनांच्या अध्यक्षतेत स्वत:च्या विषयाचा काही भाग सांगण्यासाठी ते विद्यार्थ्यांच्या सभा घेत. त्यावर काही वेळेला वादविवाद होत. यामुळे विषय स्पष्टपणे समजत असे. प्रतिपादनाची सवय व उपस्थिती हे गुण वाढीस लागत. त्यामुळे उत्तम अध्यापक तयार होत.

आचार्यांनी प्राचीन प्रणालीला धरून शिक्षणपद्धती आखली; पण त्यातील वैगुण्ये व दोषस्थळे लक्षात घेऊन त्यात आवश्यक ते बदलही केले. पाठांतराचे फाजील महत्त्व कमी केले. संपूर्ण अमरकोश पाठ न करता तो कसा पाहावा हे शिकविले. पढीकपणा व कर्मठता यांपेक्षा सार व विचार यांचे ग्रहण करणारा सनातनी, पण व्यवहारज्ञ शास्त्री निर्माण करणे हे ध्येय ठरविले. ‘प्राज्ञमठ’ हे नाव त्यांचे गुरू प्रज्ञानंद सरस्वतींच्या स्मरणार्थ दिले गेले.

विद्वत्ता, बुद्धिमत्ता, दूरदर्शीपणा आणि परिस्थितीचे आकलन या अधिष्ठानांवर शोभणारे दोन गुण म्हणजे त्याग व नि:स्पृहता. या ऋषित्वाची छाप श्रीसोमनाथ प्रतिष्ठेच्या वेळी कन्हैयालाल मुन्शी, डॉ. राजेंद्रप्रसाद यांच्यावरही पडली. त्यामुळे स्वतंत्र भारताचे गुरू किंवा सामाजिक क्रांतीचे अध्वर्यू अशी त्यांची सार्थ कीर्ती पसरली. स्वधर्म व स्वसंस्कृतीच्या ज्ञानासाठी त्यांनी जशी प्राज्ञपाठशालेची स्थापना केली, तशीच संशोधनाची परंपराही स्थिर व अखंडित टिकण्याची व्यवस्था केली. पूर्वमीमांसा व वेदान्त यांवर परिश्रमपूर्वक कोश तयार केले. पूर्वमीमांसापाठाची संशोधित आवृत्ती

प्रसिद्ध केली. १९२४ साली त्यांनी सोनगीर येथे प्रथम ‘वेद हे अपौरुषेय नाहीत’ असा पक्ष मांडून जुन्या विचारसरणीला फारच मोठा धक्का दिला. १९२७ साली अकोला येथे ‘हिंदुधर्मातील सर्व जाती धार्मिक व सामाजिकदृष्ट्या समान आहेत’, अशी घोषणा केली. अशासारख्या अनेक घोषणा ठरावरूपाने मंजूर झाल्या. ‘धर्मनिर्णय मंडळाची भूमिका कधीही हटवादी किंवा उच्छृंखलही नाही. ती इतिहास व प्रत्यक्ष अनुमान यांवरच आधारित आहे,’ असेच केवलानंद सरस्वती म्हणत.

प्राज्ञपाठशाळेची स्थापना व धर्मकोशाचे काम यांबरोबरच त्यांनी विपुल लेखनकार्यही केले : १) ‘मीमांसादर्शनम्’ : चिकित्सक आवृत्ती, पदसूची, सूत्रसूची व अधिकरणसंज्ञांची चर्चा, २) ‘अद्वैतसिद्धी’चे मराठी भाषांतर, ३) ‘ऐतरेय’ : विषयसूची, ४) ‘कौषितकी ब्राह्मण’ : विषयसूची, ५) ‘तैत्तिरीय मंत्रसूची’, ६) ‘तैत्तिरीय शाखा’ : विषयसूची, ७) ‘सत्याषाढसूत्र’ : विषयसूची, ८) ‘अद्वैतवेदान्तकोश’, ९) ‘मीमांसाकोश’.

याखेरीज त्यांनी ‘शांकरभाष्यपरिभाषाकोश’, ‘नव्यवेदान्तमाला’, ‘ऋक्प्रातिशाख्या’चे भाषांतर, ‘ब्राह्मण’ व ‘आरण्यक’विषयक कोश, ‘केवलानंदीमीमांसासूत्रवृत्ती’ इत्यादी अनेक छात्रोपयोगी आणि संशोधनात्मक ग्रंथांची निर्मिती केली.

— हेमा डोळे

## केळकर, अशोक रामचंद्र

***☛ मुख्य चरित्रनोंद – साहित्य खंड***

## केळकर, दिनकर गंगाधर

***अज्ञातवासी***

**कवी, संपादक, संग्रहालयकार**

**१० जानेवारी १८९६ – १७ एप्रिल १९९०**

***☛ मुख्य चरित्रनोंद – साहित्य खंड***



राजा या आपल्या अकाली मृत्यू पावलेल्या मुलाच्या स्मृती जपण्यास उभ्या केलेल्या ‘राजा केळकर’ संग्रहालयासाठी स्वत:चे आयुष्य खर्ची घालणारे दिनकर गंगाधर केळकर यांचा जन्म करंजगाव येथे झाला. त्यांचे शिक्षण मॅट्रिकपर्यंत झाले. त्यांचा गणित विषय कच्चा होता; पण त्यांना कवितेत मात्र विशेष रुची होती. दिनकर गंगाधर केळकरांना ‘काकासाहेब’ या नावाने ओळखत. काकासाहेबांना सुरुवातीला अडकित्ते, दिवे अशा पुरातन वस्तूंचे जतन करण्याचा छंद लागला. त्यामुळेच त्यांना अडकित्तेवाले, दिवेवाले केळकर म्हणून ओळखू लागले. या ऐतिहासिक वस्तू जमविण्यापायी श्रम, वेळ आणि पैसा किती खर्ची पडला हे सांगणे कठीण आहे.

पुण्यातील कॅम्प भागात असलेले चष्म्याचे दुकान हे काकासाहेबांच्या उपजीविकेचे मुख्य साधन होते. पुरातन वस्तू जमविण्याच्या छंदासाठी त्यांनी पत्नीचे दागिनेदेखील गहाण ठेवले होते. काकासाहेबांच्या पत्नी कमलाबाई यांचा पतीचा छंद जोपासण्यात मोठा वाटा होता. काकासाहेबांनी संपूर्ण भारतभर फिरून या दुर्मीळ वस्तू जमवल्या.

काकासाहेब केळकर हे कवी होते. ते ‘अज्ञातवासी’ या नावाने काव्यलेखन करीत. ‘अज्ञातनाद’ (१९२४) आणि ‘अज्ञातवासींची कविता’ हे त्यांचे दोन कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत. गोपीनाथ तळवलकर यांनी संपादित केलेल्या ‘अज्ञातवासींची कविता’ या पुस्तकाचे दोन भाग प्रसिद्ध आहेत. अज्ञातवासींच्या कवितेमधून ‘वात्सल्यरस’ प्रतीत होतो. बालकांविषयीचे प्रेम आणि राष्ट्रीय विचार हे प्रामुख्याने त्यांच्या कवितांचे दोन विषय होते. ते इतिहासात रमत असल्याने त्यांना ऐतिहासिक वास्तू, पूर्वजांचे पराक्रम, गतवैभव यांविषयी विलक्षण अभिमान वाटे. त्यामुळेच हे विषय त्यांच्या काव्यलेखनात उतरले. काकांनी लिहिलेले ‘Lamps of India’ हे पुस्तक (इंग्रजी) भारत सरकारने १९६१ साली

प्रकाशित केले. याची प्रस्तावना डॉ. राजेंद्रप्रसाद यांनी लिहिली होती.

काकासाहेबांनी कवितालेखनाव्यतिरिक्त १९२३ मध्ये ‘महाराष्ट्र शारदा’ या पुस्तकाच्या पहिल्या भागाचे संपादन केले. तसेच, प्र. के. अत्रे यांच्या ‘झेंडूची फुले’ या संग्रहाचेदेखील संपादन केले. परंतु, प्रामुख्याने काकासाहेबांनी स्वत:ला संग्रहालयासाठी वाहून घेतले.

घडलेल्या सांस्कृतिक इतिहासाची जपणूक करणे आणि हा ठेवा भावी पिढीस बघता यावा या दोन दृष्टिकोनांतूनच ‘राजा दिनकर केळकर’ वस्तुसंग्रहालयाची पुण्यात उभारणी झाली. हा अमूल्य संग्रह १९७५ मध्ये काकासाहेबांनी महाराष्ट्र शासनास भेट दिला. राष्ट्राची संपत्ती राष्ट्रास अर्पण करणे ही त्यामागील भावना होती. देश-विदेशांतील पर्यटक, अभ्यासू तज्ज्ञ अशा लोकांचा ओढा या संग्रहालयाकडे आजही आहे.

आज पैशांत किंमत करता येणार नाही असे हे संग्रहालय त्या काळी हैदराबादचे नवाब सालारजंग खरेदी करण्यास आले होते. त्या बदल्यात त्यांनी काकासाहेबांना कोरा धनादेश दिला व रक्कम भरण्यास सांगितली; पण त्यांनी तो नम्रतापूर्वक नाकारला. राजाच्या, म्हणजेच एकुलत्या एका मुलाच्या स्मरणार्थ उभे केलेले संग्रहालय याची तुलना पैशांत होणे अशक्य होते.

१९७६ मध्ये काकासाहेबांना फाय फाउण्डेशनचा पुरस्कार मिळाला. काकासाहेब केळकर यांच्या अभूतपूर्व कार्याची दखल घेऊन १९७८ मध्ये पुणे विद्यापीठाने त्यांना डी.लिट. ही पदवी प्रदान केली, तर १९८० मध्ये भारत सरकारतर्फे त्यांना ‘पद्मश्री’ या किताबाने गौरविण्यात आले. त्याचप्रमाणे, त्यांना १९८८ मध्ये हैदराबादच्या सालारजंग संग्रहालयातर्फे सुवर्णपदक देऊन त्यांचा सन्मान करण्यात आला. त्यांच्या पश्चात त्यांचे नातू (मुलीचे मुलगे) या संग्रहालयाचे व्यवस्थापन उत्तमरीत्या बघतात.

— सुपर्णा कुलकर्णी

## केळकर, यशवंत नरसिंह

☛ *मुख्य चरित्रनोंद – साहित्य खंड*

## कँडी, टॉमस

**मराठीचे कोशकार, शालेय पुस्तकांचे कर्ते व कायद्याच्या पुस्तकांचे भाषांतरकार**

**१८०५ - १८७७**



ईस्ट इंडिया कंपनीचे अधिकारी म्हणून १८२२मध्ये मेजर टॉमस कँडी प्रथम हिंदुस्थानात आले. १८३१पासून त्यांनी शिक्षणखात्यात कामे केली. कॅप्टन मोलस्वर्थच्या मराठी-इंग्लिश कोशास त्यांनी बरीच मदत केली होती. कॅप्टन मोलस्वर्थने विलायतेला प्रयाण केल्यामुळे, अपूर्ण राहिलेला तो ग्रंथ टॉमस कँडी यांनी १८४९-४७ मध्ये पूर्ण केला. या ग्रंथाची सुधारलेली आवृत्ती त्यांनी १८७३मध्ये पुन्हा एकदा काढली होती. ते काही वर्षे पुणे कॉलेजमध्ये पहिले प्रिन्सिपॉल (१८५१-५७) व डेक्कन कॉलेजमध्ये (१८६७) प्राध्यापक होते. माझी मराठी क्रमिक पुस्तके, इंडियन पिनल कोड, सिव्हिल नि क्रिमिनल प्रोसिजर कोड यांची मराठी भाषांतरे त्यांनीच केलेली आहेत. शेवटी काही दिवस ते मराठी भाषांतरकारही होते.

— संपादित

**संदर्भ :**

१. *अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*

## ब्रॅमरिश, स्टेला

**भारतीय इतिहासतज्ज्ञ, आधुनिक कलाभ्यासक,**

**१८९६ - १९९३**

भारतीय कलेच्या पद्धतशीर अभ्यासाचा पाया घालणाऱ्या प्रोफेसर स्टेला ब्रॅमरिश म्हणजे ‘साऊथ एशियन आर्ट’ या विषयावरील एक नामवंत अधिकारी



कला इतिहासतज्ज्ञ, शांतिनिकेतनातील उत्कृष्ट शिक्षिका, भारतीय कलांना जागतिक व्यासपीठावर नेणाऱ्या गाढ्या अभ्यासक आणि फिलाडेल्फिया येथील कलासंग्रहालयाच्या माजी अधीक्षिका होत. ऑस्ट्रियातील निकोल्सबर्ग येथे जन्मलेल्या स्टेला क्रॅमरिश अचाट बुद्धिमत्ता घेऊन आल्या. व्हिएन्ना युनिव्हर्सिटीत जोसेफ स्ट्रायगॉझस्की यांच्या मार्गदर्शनाखाली शिक्षण पूर्ण करत असतानाच आपल्या विचारवैशिष्ट्यांमुळे त्या इतरांपेक्षा प्रभावी ठरल्या. विद्यार्थिदशेत असताना चित्रकार कॅन्डेन्स्की यांच्या विचारांचा प्रभाव त्यांच्यावर पडला. कलेच्या विशुद्ध अंतरंगाचा शोध घेणे आणि तिच्यातील अंतस्थ संरचना जाणून घेणे, त्यांना अधिक महत्त्वाचे वाटू लागले. रूडॉल्फ स्टेनर या तत्त्ववेत्त्याच्या विचारांचा प्रभावही क्रॅमरिश यांच्या त्या वेळच्या लिखाणामधून स्पष्ट दिसत असे. बाह्य साधने आणि आपली ज्ञानेंद्रिये यांतून मिळणाऱ्या ज्ञानाबरोबरच अंतस्थ प्रेरणेतून मिळणाऱ्या ज्ञानानुभूतीवर त्यांचा विश्वास होता. म्हणूनच विद्यार्थिदशेपासूनच समरसून जीवनानुभव घेण्याकडे त्यांचा कल होता.

१९२१मध्ये रवींद्रनाथ टागोर यांनी शांतिनिकेतनमध्ये कला शिक्षण देण्यासाठी त्यांना निमंत्रित केले. पाश्चात्त्य कलाजगताशी पूर्णपणे अनभिज्ञ असणाऱ्या येथील भारतीय विद्यार्थ्यांना त्यांनी 'इम्प्रेशनिझम ते क्युबिझम'पर्यंतच्या कलाप्रवासाचे धडे तर दिलेच, शिवाय कलावंतांच्या विविध संकल्पना, कलानिर्मितीमागचे चित्रकारांचे दाखले देऊन विद्यार्थ्यांसमोर मांडले. चित्राच्या विषयापलीकडे जाऊन त्यातील अंतर्गत रचनेकडे पाहण्याची एक वेगळी दृष्टी त्यांनी आपल्या विद्यार्थ्यांना दिली. त्यांचेच एक विद्यार्थी विनोदबिहारी मुखोपाध्याय त्यांच्याविषयी लिहितात - ''आपल्यापैकी बहुतेकांना आर्ट हिस्टोरियन म्हणून स्टेला क्रॅमरिश परिचित असल्या, तरी भारतीयांना आधुनिक कला-दृष्टी देण्यामध्ये त्यांचे योगदान फार मोठे आहे. आधुनिक विचार, प्रयोग, वेगवेगळ्या माध्यमांचा वापर इत्यादींशी परिचय घडविण्याचे कार्य तर त्यांनी केलेच; त्याचबरोबर भारतीय कलेचा आत्मा कशात आहे, तेही सप्रमाण दाखवून दिले.''

त्या स्वतः उत्कृष्ट नर्तिका होत्या आणि शांतिनिकेतनातील विद्यार्थ्यांना सांगीतिक कवायती शिकवत असत. त्या जर्मन भाषेच्या उत्तम शिक्षिकादेखील होत्या.

शांतिनिकेतनात राहत असतानाच स्टेला क्रॅमरिश यांची भारतीय संस्कृतीशी खऱ्या अर्थाने ओळख झाली. तिथे होणाऱ्या अनेकविध सांस्कृतिक कार्यक्रमांत त्यांचा सहभाग असे. 'रवींद्रनाथ टागोर यांच्या सहवासात भारत खऱ्या अर्थाने कळला' असे त्या म्हणत. भारतातील वास्तव्यात त्यांनी हिंदू आणि बौद्ध कलांचा सखोल अभ्यास केला. विशेष म्हणजे, त्यांचा हा अभ्यास केवळ विविध क्षेत्रांच्या भेटीपुरता मर्यादित न राहता, हिंदू धर्म आणि त्यातील संस्कृत ग्रंथांच्या गाढ अभ्यासापर्यंत विस्तारित झाला. भारतीय कलेवरील त्यांच्या लिखाणाला स्वानुभवातून लावलेल्या अन्वयार्थाचे परिमाण तर होतेच; त्याचसोबत ग्रंथाभ्यासातून आलेले विद्वत्तापूर्ण अधिष्ठान ही लाभले. त्यांच्या हातून भारतीय संस्कृती, कला आणि धर्म यांच्या सखोल अभ्यासातून विपुल ग्रंथरत्नांची निर्मिती झाली.

'Principles of Indian Art' (१९२४), 'Indian Sculpture' (१९३२), 'A Survey of Painting in the Deccan' (१९३७), 'Indian Terracottas', 'Crafts of Travancore' (१९६८) ही पुस्तके, त्यांची अफाट बुद्धिमत्ता, सखोल अभ्यास आणि नसानसात भिनलेली शुद्ध भारतीय आध्यात्मिकता यांची साक्ष देतात. १९३२ ते १९५० या काळात 'Journal of the Indian Society of Oriental Art' या प्राच्यविद्याविषयक अंकाचे त्यांनी सहसंपादन केले. १९३७ ते १९४१ या काळात 'भारतीय कला' या

विषयावरील त्यांनी Courtauld Institute, London इथे दिलेली व्याख्याने गाजली. १९५०नंतर अमेरिकेतील फिलाडेल्फिया येथे त्या स्थलांतरित झाल्या. पेन्सिल्व्हेनिया विद्यापीठात त्यांनी South Asian art या विषयाचे अध्यापन केले. फिलाडेल्फिया कला संग्रहालयात भारतीय कला विषयाच्या अधीक्षिका म्हणून त्या कार्यरत झाल्या. भारतीय कलेचा संपूर्ण जगात प्रसार करण्याचे मोठे कार्य स्टेला क्रॅमरिश यांनी केले.

अध्यापन आणि लेखन यांशिवाय स्टेला क्रॅमरिश या कला प्रदर्शनांच्या कुशल संयोजिका म्हणून नावाजल्या जात असत. फिलाडेल्फिया आर्ट म्यूझिअममध्ये त्यांनी भरविलेल्या 'Unknown India : Ritual Art in Tribe and Village' (१९६८), 'Himalayan Art' (१९७८) इ. प्रदर्शनांना उत्कृष्ट प्रतिसाद मिळाला. १९८१मध्ये त्यांनी याच म्युझिअममध्ये सादर केलेला 'Manifestations of Siva' हा प्रयोग गाजला.

'भारतीय कलेचा अभ्यास केवळ सौंदर्यशास्त्राच्या वैश्विक तत्त्वांचा मापदंड लावून न करता वैविध्यपूर्ण भारताच्या त्या-त्या ठिकाणाचे सांस्कृतिक, सामाजिक संदर्भ, त्या कलाकृतीमध्ये प्रतीत होणारे पुराकथांचे अंश, भारतीय तत्त्वज्ञान या साऱ्या बाबी लक्षात घेऊन व्हायला हवा,' असे स्टेला क्रॅमरिश यांचे मत होते. तोपर्यंतचे कला अभ्यासक काळानुसार अथवा शैलीनुसार चित्रांचे अथवा शिल्पांचे रूढ पद्धतीने वर्गीकरण करीत असत. तसे न करता वरील संदर्भांनुसार वेगवेगळ्या दृष्टिकोनांतून कलाकृतीकडे पाहायला हवे असे त्या म्हणत. कॅमरिश यांच्या लिखाणात निव्वळ कलाकृतीकडे न पाहता, ती घडविणारे कलावंत, त्यांचे आश्रयदाते आणि आर्थिक मदत पुरविणारा धनिकवर्ग यांच्याबाबतचे विचार त्यांच्या 'Artist Patron and Public in India, (1954), 'Traditions of the Indian Craftsman' (1958) यासारख्या लेखातून आढळतात.

स्टेला क्रॅमरिश भारतीय लोककलांच्या संदर्भातही मोलाचे विचार मांडतात. भारताच्या खेड्यापाड्यांमधून राहणाऱ्या विविध जाती-जमातींच्या जीवनाचे एक अंग बनून राहिलेल्या कलांचा अभ्यास मानववंशशास्त्राच्या दृष्टीकोनातून व्हायला हवा, असे त्यांना वाटे. धार्मिक कार्याच्या वेळी काढलेली भित्तिचित्रे असोत किंवा कलाकुसरीने युक्त अशी खेळणी, मुखवटे आणि अन्य वस्तू असोत, या साऱ्यांचा संग्रह करून त्याचे प्रयत्नपूर्वक जतन व्हायला हवे, अशी त्यांना तळमळ होती.

बौद्ध आणि हिंदू शिल्पकलेतून व्यक्त होणारी अभिजातता हा तर त्यांच्या हृदयाला भिडलेला विषय होता. आध्यात्मिक अनुभवांवर विश्वास असणाऱ्या स्टेला क्रॅमरिश यांना शिल्पांकडे पाहताना विलक्षण अनुभूती येत असे. एलिफंटा येथील महादेवाची शिल्पाकृती त्यांना विशेष आवडत होती. भारतीय शिल्पाकृतींची जडणघडण ही केवळ बाह्य साधनांनी केलेली निर्मिती नसून ही प्रक्रिया म्हणजे जणूकाही भारतीयांच्या आध्यात्मिक सूक्ष्म देहाचे दगडामध्ये झालेले रूपांतरण होय, असे त्यांना वाटे. गुप्त, पाल, सेन आणि चंदेला यांच्या काळातील भारतीय स्थापत्यकला, शिल्पकला आणि चित्रकला यांचा सखोल अभ्यास करून स्टेला क्रॅमरिश यांनी त्यांची निरीक्षणे पद्धतशीररित्या तर मांडलीच; पण त्याहीपेक्षा स्थूलतेमागे सतत जाणवणारे सूक्ष्माचे अधिष्ठान, भौतिकतेकडून अभौतिकतेकडे नेणारी भारतीय कलेतील जबरदस्त ताकद, मूर्तामागे दडलेले अमूर्त तत्त्व आणि बाह्य सौंदर्याकडून आत्मिक सौंदर्यात परिवर्तन होत जाणारी भारतीय मूल्ये यांचे सातत्य त्यांच्या लेखनामधून जाणवते. भारतीय स्थापत्यकला, शिल्पकला इत्यादींचे शास्त्रीय पद्धतीने केलेले विश्लेषण आणि त्याचबरोबर भारतीयांची धार्मिक मानसिकता आणि तत्त्वज्ञानांची बैठक यांचा सुरेख संगम स्टेला क्रॅमरिश यांच्या ग्रंथसंपदेत आढळून येतो.

जन्माने ऑस्ट्रियन असणाऱ्या स्टेला क्रॅमरिश मनाने मात्र पूर्णपणे भारतीय होत्या. विश्वभारतीने १९७४ साली 'देशिकोत्तम्' ही पदवी त्यांना बहाल करून त्यांनी केलेल्या कार्याचा यथोचित गौरव केला, तर १९८२मध्ये

भारत सरकारने त्यांना ‘पद्‌मभूषण’ पुरस्काराने सन्मानित केले.

स्टेला क्रॅमरिश यांचे १९९३ साली, फिलाडेल्फिया येथे देहावसान झाले.

– डॉ. सीमा सोनटक्के

## कोलते, विष्णू भिकाजी

***भाऊसाहेब कोलते***

**संशोधन महर्षी, चिकित्सक संपादक**

**२२ जुलै १९०८ – ८ एप्रिल १९९८**



विष्णू भिकाजी कोलते यांचा जन्म बुलढाणा जिल्ह्यातील नळगंगा नदीच्या तीरावर वसलेल्या नरवेल या गावी झाला. त्यांचे वडील कास्तकरी, वाणी होते. ज्ञानार्जनाची, साहित्याची फार मोठी परंपरा त्यांच्या घरामध्ये नव्हती. परंतु, तत्कालीन परिस्थितीची जाणीव, शिक्षणासंबंधी नवीन संधी याची कल्पना भिकाजी कोलते यांना होती.

विष्णू कोलते स्वत: सत्यशोधक समाजाचे होते. त्या कार्यकर्त्यांची ये-जा, उठबस त्यांच्या घरी होती. त्यामुळे भिकाजी कोलते यांनी लहानग्या विष्णूला शिकवण्याचे ठरवले होते. त्यांनी आपले लहानसे खेडे सोडले आणि ते मलकापूर येथे स्थायिक झाले. तेथे त्यांनी कापडाचे दुकान घातले. पंचक्रोशीतील समाजप्रबोधन करणारी मंडळी येथेही त्यांनी जोडली. उदा. ज्योतिराव फुल्यांचे चरित्रकार पंढरीनाथ सीताराम पाटील, ‘आत्मोद्धार’ नियतकालिक काढणारे जळगावचे सीताराम पाटील, एल.एस. भटकर इत्यादी. या काळात विष्णूला वाचनाची गोडी लागली होती. फुल्यांचे चरित्र वाचल्यावर तर विष्णूने शिक्षण घेण्याचे ठरवले. विष्णू मलकापूरच्या शाळेत दाखल झाला. सत्यशोधक चळवळीच्या जोडीला घरात वारकरी संप्रदायाचे वातावरणही होते. त्यामुळे विष्णूच्या बालमनावर संतांचे संस्कार झाले. तुकारामांचे अभंग त्याने मुखोद्‌गत केले.

मलकापूरचे शिक्षण संपवून १९२२ साली माध्यमिक शिक्षणासाठी विष्णूची रवानगी खामगाव येथे झाली. तेथील वास्तव्य त्याच्या व्यक्तिमत्त्वाला आकार देणारे ठरले. शाळेचे मुख्याध्यापक रावसाहेब गणेश मोरेश्वर गोरे यांनी त्याला प्राचीन मराठी कवितेची गोडी लावली. कविता वाचतावाचता विष्णू स्वत: कविता करू लागला. पुढे नामवंत कवी म्हणून तो प्रसिद्ध झाला. मॅट्रिकनंतर नागपूरच्या मॉरिस महाविद्यालयामध्ये त्याने प्रवेश घेतला. १९३१ साली ‘एम.ए. मराठी’ या परीक्षेमध्ये त्याने प्रथम श्रेणी, प्रथम क्रमांक पटकावला. याच परीक्षेमध्ये त्याला तीन सुवर्णपदके मिळाली.

पुढे, अमरावतीच्या किंग एडवर्ड कॉलेजमध्ये विष्णू कोलते यांना प्राध्यापक म्हणून नोकरी मिळाली. खरा पिंड अध्यापकाचा असल्यामुळे कोलते पाठाची पूर्ण तयारी करूनच वर्गात जात असत. याच काळात महानुभाव पंथीयांच्या वाङ्‌मयाकडे त्यांचे मन आकृष्ट झाले. ते साहित्य मराठी वाङ्‌मयाच्या प्रमुख प्रवाहात आणावे, असे त्यांना वाटू लागले. त्या दृष्टीने त्या साहित्याचा अभ्यास सुरू झाला. त्यांनी संशोधन, संपादन हेही क्षेत्र स्वीकारले. महानुभाव पंथाचे काही साहित्य कूटलिपींमध्ये बद्ध होते. त्यामुळे सामान्यांपर्यंत ते पोहोचत नसे. त्या पंथाचे महंत त्यातच समाधान मानीत. कोलते यांनी या कूटलिपी अभ्यासल्या. महानुभावांच्या अनेक ग्रंथांचे चिकित्सक संपादन केले. उदा. भास्कर भट्ट बोरीकर विरचित ‘उद्धवगीता’, ‘स्थानपोथी’, नरेंद्र विरचित ‘रुक्मिणी स्वयंवर’, महाई भट्ट संकलित श्री गोविंदप्रभू चरित्र इत्यादी अशा एकूण पंधरा महानुभावीय ग्रंथांचे विष्णू कोलते यांनी संपादन केले.

या संपादनाचे वैशिष्ट अनेक प्रकारे सांगता येईल. संपादन करताना डॉ. वि.भि. कोलते यांनी कोणताही ग्रह, कल न ठेवता तटस्थवृत्तीने काम केले. पोथ्यांची चिकित्सक प्रत तयार केली. त्या-त्या ग्रंथाचा कर्ता,

त्याचा काळ, तत्कालीन सामाजिक, धार्मिक स्थिती इत्यादी अंगांनी ग्रंथांचा अभ्यास केला. महानुभाव तत्त्वज्ञानावर प्रबंध लिहून त्यांनी 'आचार्य' ही सन्मानाची उपाधी मिळवली.

ग्रंथसंपादनाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे संपादनासाठी वापरलेली शोधप्रणाली. चिकित्सक प्रत कशी करावी?, कशी असावी?, यासंबंधी त्यांनी सखोल विचार केलेला दिसतो. त्यांनी स्वत:चे अनुभव आणि प्रचलित पद्धत यांची योग्य जुळणी करून काम पूर्ण केले. 'ज्ञातृनिष्ठ पद्धती' आणि 'ज्ञेयनिष्ठ पद्धती' (अनुक्रमे, subjective आणि objective पद्धती) यांची त्यांनी आपल्या एका लेखात उत्तम मीमांसा ('भाषा- साहित्य संशोधन'; म.सा.प.; १९८१) केलेली आहे. त्यांनी चिकित्सक पाठ कसा करावा याचा एक वस्तुपाठ घालून दिला असे म्हणता येईल. कोणत्याही एका पद्धतीच्या आहारी न जाता योग्य चिकित्सक निवडावा हे त्यांचे मत होते. या वैचारिक बैठकीमुळे डॉ. कोलते यांनी संपादित केलेल्या ग्रंथामध्ये 'पाठनिर्णय' आणि 'अर्थनिर्णय' या दोन्हींची सांगड झालेली दिसते.

अर्थनिर्णयपर टीपा, पारिभाषिक संज्ञा, महानुभावांचे आचारविचारांचे संकेत, त्यांचा अन्वयार्थ, या सर्वांकडे लक्ष दिलेले दिसते. संपादित ग्रंथाच्या शेवटी शब्दकोश देणे हे तर त्यांचे खास वैशिष्ट्य होय. संपादनशास्त्रालाच त्यांनी एक वैचारिक, सैद्धान्तिक बैठक घालून दिली. पुढील काळातील संपादनाला त्यांच्यापासून प्रेरणा मिळाली हे नि:संशय.

यथावकाश डॉ. वि.भि. कोलते प्राचार्य झाले. अमरावती, नागपूर असा त्यांचा हा प्राचार्यपदाचा प्रवास होता. कामाचा उरक, जिद्द, शिस्त, पुरोगामी दृष्टी ही त्यांच्या कारभाराची वैशिष्ट्ये होती. या पदावरून काम करताना उत्तम प्रशासक, सल्लागार म्हणूनही त्यांचे वैशिष्ट जाणवले होते.

यानंतर नागपूर विद्यापीठाचे पहिले सरकारनियुक्त पूर्णवेळ कुलगुरू म्हणून डॉ. वि.भि. कोलते यांची निवड झाली. शिक्षण क्षेत्राचा भरघोस अनुभव असल्यामुळे नागपूर विद्यापीठाचे कार्य जोरात सुरू झाले. पदव्युत्तर परीक्षेसाठी नागपूर विद्यापीठाने मराठी माध्यमाचा अवलंब केला. विद्यापीठातील शिक्षण हे अधिक प्रयोजनपूर्ण, समाजाभिमुख झाले. विद्यापीठातील प्राध्यापकांचा व्यासंग वाढावा यासाठी वार्षिक परिषदा, उन्हाळी अभ्यासवर्ग, चर्चासत्रे यांचे आयोजन करण्यात येऊ लागले.

महानुभाव साहित्याचे संशोधन, संपादन यांसंबंधी महत्त्वाचे काम झाल्यानंतर विदर्भ संशोधन मंडळाच्या १९५८ सालच्या वार्षिकामध्ये त्यांनी एक वेगळ्या विषयावरील लेख प्रसिद्ध केला. प्राचीन भारतीय इतिहासविषयक संशोधनाचा हा त्यांचा पहिला लेख म्हणता येईल. 'झरिका दानपत्र' हा त्या लेखाचा विषय होता.

त्यानंतर त्यांनी प्राचीन भारतीय इतिहासासंबंधीचे सुमारे ३०-३२ लेख लिहिले. महाराष्ट्राच्या विविध भागांत सापडलेले शिलालेख, ताम्रपट यांचे त्यांनी वाचन केले. त्यांचे विवरण, स्पष्टीकरण केले. हे लेख संस्कृत, प्राकृत, कानडी, मराठी या भाषांमधील होते. या अभ्यासासाठी त्यांनी आवश्यक त्या संदर्भग्रंथांचे वाचन केले. ब्राह्मिलिपीचा अभ्यास केला. भाषांचा अभ्यास केला. त्यांनी पुराभिलेख तज्ज्ञाला आवश्यक असे ज्ञान मिळवले. कोरीव लेखांचे विवरण करताना प्रखर न्यायनिष्ठा असावी लागते. हे सर्व गुण डॉ. कोलते यांच्याकडे होते. महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासाचा आरंभ मौर्यकाळात आणि शेवट देवगिरीच्या यादवकाळात होतो. सातवाहन, वाकाटक काळ, राष्ट्रकूट, पूर्वकालीन चालुक्य, उत्तरकालीन चालुक्य, शिलाहार, तुघलक अशा राजवंशांचे कोरीव लेख त्यांनी अभ्यासले. त्यामुळे इतिहासलेखनात भर पडलेली दिसते.

डॉ. वि.भि. कोलते यांचा 'लव्हाळी' हा काव्यसंग्रह आणि 'सोडचिठ्ठी' नावाचे नाटक हे ललित लेखन त्यांच्या कारकिर्दीच्या सुरुवातीलाच प्रसिद्ध झाले होते. वऱ्हाडी बोलीचे शब्द, त्यांची व्युत्पत्ती, महानुभाव पंथाचे साहित्य, संशोधन, संपादन, अन्य विषयांवरचे

लेख या साहित्यसेवेमुळे ते अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे १९६७ मध्ये अध्यक्ष झाले. हे संमेलन मध्यप्रदेशातील भोपाळ येथे भरले होते. आपल्या अध्यक्षीय भाषणामध्ये त्यांनी मराठी व्याकरण, शुद्धलेखन यांविषयी विचार मांडले. मराठी भाषा जोपासली पाहिजे, टिकवली पाहिजे, मराठी साहित्यवृद्धी झाली पाहिजे असे विचार मांडले. त्यासाठी विशेष प्रयत्नांची आवश्यकता आहे, हेही त्यांनी सांगितले.

डॉ. वि.भि. कोलते यांच्या षष्ट्यब्दीपूर्ती निमित्ताने त्यांचा सत्कार झाला आणि एक गौरवग्रंथ प्रकाशित झाला. नंतर त्यांच्या अमृतमहोत्सवी वर्षानिमित्तही गौरव करण्यात आला. त्यासाठी अमृतमहोत्सव समिती स्थापन करण्यात आली. त्यांच्याविषयी आदर, स्नेह असलेल्या व्यक्ती त्या समितीमध्ये होत्या. त्यांनी निधी संकलन केले आणि पुढाकार घेऊन 'अमृतमहोत्सव गौरवग्रंथ' प्रकाशित केला. त्या ग्रंथाचे नाव 'संशोधनाची क्षितिजे' (२२ जून १९८५). याचे संपादक डॉ. भा.ल. भोळे हे होते. अनेक मान्यवर साहित्यिक, मराठीचे अभ्यासक, तसेच पुराभिलेखविद्येचे श्रेष्ठ संशोधक डॉ. वा.वि. मिराशी इत्यादींचे लेख त्यात आहेत. या ग्रंथाचे वैशिष्ट असे, की त्यामध्ये डॉ. वि.भि. कोलते यांच्या अभ्यासाचे जे विषय आहेत, त्या विषयांतील मान्यवरांनी त्यांच्या स्वतःच्या संशोधनाबद्दल लिहिले आहे. या ग्रंथात डॉ. वि.भि. कोलते यांच्या कार्याचा साक्षेपी आढावा घेणारे लेख आहेत.

अमृतमहोत्सवानिमित्ताने जो सत्कार समारंभ झाला, त्या वेळी त्यांच्या सुविद्य पत्नी उषाताई यांनी डॉ. कोलते यांना आत्मचरित्र लिहिण्याची विनंती केली. ती विनंती स्वीकारून डॉ. कोलते यांनी 'अजून चालतोचि वाट' हे आत्मचरित्र लिहिले. त्यांचे प्रकाशित साहित्य प्रचंड आहे, ते पुढीलप्रमाण : एकूण ग्रंथ : ३२, संपादित ग्रंथ : १५, लेख : २३७, कविता : १०, प्रस्तावना आणि पुरस्कार : ४५, पुस्तक परीक्षणे : ९, यांशिवाय आकाशवाणीवर १६ भाषणे, अपूर्ण आणि अप्रकाशित लेख : ११. 'विदर्भ संशोधन पत्रिका', 'म.सा.प. पत्रिका' या नियतकालिकांमध्ये त्यांचे लेख प्रकाशित झाले.

त्यांच्या अमृतमहोत्सवी गौरवग्रंथाची पहिली आवृत्ती निघाली त्या वेळी, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळातर्फे डॉ. सुरेंद्र बारलिंगे यांनी त्यांना मानपत्र दिले. त्याचा अंतर्भाव गौरवग्रंथात केलेला आहे. अमृतमहोत्सवी गौरवग्रंथाची पहिली आवृत्ती संपल्यावर त्याची दुसरी, सुधारित आवृत्ती काढण्यात आली. २००७ हे त्यांचे जन्मशताब्दी वर्ष होते, म्हणून त्या वेळी गौरवग्रंथाच्या दुसऱ्या आवृत्तीचे प्रकाशन करण्यात आले.

— डॉ. कल्पना रायरीकर

## कोल्हटकर, कृष्णाजी केशव

**ग्रंथकार, योग व वेदान्त अभ्यासक**

**१४ जानेवारी १८८३ — २६ एप्रिल १९७५**

'भारतीय मानसशास्त्र अथवा सार्थ आणि सविवरण पातञ्जल योगदर्शन' हा केवळ एकच ग्रंथ लिहून ग्रंथकार म्हणून अत्युच्च गौरव होण्याचे भाग्य कृष्णाजी केशव कोल्हटकर यांना लाभले. त्यांचा जन्म सातारा येथे एका मध्यमवर्गीय कुटुंबात झाला.

इंटर आर्ट्‌सपर्यंत शिक्षण झाल्यावर त्यांचे डोळे बिघडल्यामुळे पुढील शिक्षण होऊ शकले नाही. १९०१ साली त्यांनी सातारा येथील जिल्हा न्यायाधीशाच्या न्यायालयात कारकुनाची नोकरी धरली.

नंतर १९१३ साली 'वेस्टर्न इंडिया लाइफ इन्श्युरन्स'मध्ये नोकरी धरली व त्यात अधिकारी श्रेणीपर्यंत त्यांना बढती मिळाली. कृष्णाजी कोल्हटकरांचे काका गणेश राघो कोल्हटकर हे योग व वेदान्तशास्त्राचे चांगले अभ्यासक होते. त्यांनी वाई येथे प्राज्ञपाठशाळेचे संस्थापक नारायणशास्त्री मराठे ह्यांच्याकडे वेदान्तशास्त्राचा अभ्यास केलेला होता. त्यांनीच कोल्हटकरांना योग व वेदान्ताची गोडी लावली व मार्गदर्शन केले.

१९३७ साली सेवानिवृत्त झाल्यावर कोल्हटकर यांनी अध्यात्म व योग यांचा सखोल अभ्यास करून ‘पातञ्जल योगदर्शन’ हा ग्रंथ लिहिला. पातञ्जल योगसूत्रे द्वैतमताला पोषक नसून अद्वैत वेदान्ताला पोषक आहेत व वेदान्ताचे ते प्रायोगिक अंग आहे हा सिद्धान्त त्यांनी आपल्या ग्रंथात सप्रमाण सिद्ध केला. हा सिद्धान्त नवा असून प्रचलित द्वैतवादी सिद्धान्ताविरुद्ध आहे; पण अनेक विचारवंत, अभ्यासू साधक व बॅ. जयकर, पण्डित राजेश्वरशास्त्री द्रविड, केवलानंद सरस्वतींसारख्या प्रगाढ विद्वानांनी कोल्हटकरांचा हा सिद्धान्त मान्य केला. ९ जुलै १९७२ रोजी पुणे विद्यापीठाने कोल्हटकर यांना डी.लिट. ही पदवी प्रदान केली.

हालअपेष्टा व संकटांना तोंड देत, उच्च शिक्षण पदरी नसतानाही निवृत्तीनंतर एखाद्या विषयाच्या मागे झपाटल्यासारखे लागून दहा वर्षांत योगदर्शनावरील सर्वांगसुंदर ग्रंथ लिहिण्याचे त्यांचे कर्तृत्व मोठे आहे. विद्यापीठानेही या कर्तृत्वावर आपली मान्यतेची मोहोर उमटविली आहे. यानंतर कृष्णाजी कोल्हटकरांचे शंकराचार्यांच्या ‘विवेकचूडामणी’वर लिहिलेले पुस्तक ‘शांकर-वेदान्त-दर्शन’, तसेच ‘महर्षी वेदव्यास, अवतारकार्य-तत्त्वज्ञान’ हा ग्रंथही प्रसिद्ध झाला.

कोल्हटकरांना संसारात, तसेच त्यांच्या लिखाणातही त्यांच्या पत्नीने उत्तम साथ दिली. त्यांच्या पत्नीचे शालेय शिक्षण झालेले नसूनही योगदर्शन या ग्रंथाची पहिली आवृत्ती त्यांनी पूर्णपणे वाचून एखाद्या ठिकाणी मार्मिक सूचनाही केली. पुणे विद्यापीठाने केलेला गौरव पाहण्याआधीच त्यांच्या पत्नीने इहलोकाची यात्रा संपविली. योगाभ्यास व अध्यात्मचिंतनात आयुष्याचा काळ व्यतीत करून वयाच्या ब्याण्णवाव्या वर्षी पुणे येथे त्यांचे निधन झाले.

— डॉ. वीणा लोंढे

**संदर्भ :**

१. *कोल्हटकर, कृष्णाजी केशव; ‘भारतीय मानसशास्त्र अथवा सार्थ आणि सविवरण पातञ्जल योगदर्शन’; प्रकाशक : आदित्य प्रतिष्ठान, द्वितीयावृत्ती; १८ फेब्रुवारी २००४.*

## कोसंबी, दामोदर धर्मानंद

**चतुरस्र इतिहास संशोधक, नाणकशास्त्र**

**३१ जुलै १९०७ – ४ जून १९४७**

☛ ***मुख्य चरित्रनोंद – विज्ञान व तंत्रज्ञान खंड***



बहुआयामी संशोधक, वैशिष्ट्यपूर्ण इतिहाससंशोधन-पद्धतीचे जनक दामोदर धर्मानंद कोसंबी यांचा जन्म गोव्यातील कोसंबे या गावी झाला. त्यांचे वडील प्रख्यात बौद्ध पंडित, भाषातज्ज्ञ व महात्मा गांधींचे निकट सहकारी होते. शालेय शिक्षण पुण्याला न्यू इंग्लिश स्कूल येथे झाल्यानंतर दामोदर कोसंबी १९१८ साली वडिलांबरोबर अमेरिकेत गेले. केंब्रिज येथील हार्वर्ड विद्यापीठातून त्यांनी पदवीपर्यंत शिक्षण पूर्ण केले. १९२९ पर्यंत त्यांनी गणित, इतिहास, भाषा या तीन विषयांत बी.एस्सी. ही पदवी मिळविली.

‘संख्याशास्त्र’ हा त्यांच्या खास आवडीचा विषय होता. अनुवंशशास्त्राच्या अभ्यासात त्यांचा ‘कोसंबी थिअरम’ उपयुक्त ठरतो. १९४९ साली शिकागोला भूमितीचे ‘व्हिजिटिंग प्रोफेसर’ म्हणून गेलेल्या कोसंबी यांनी प्रख्यात गणिती आइन्स्टाइन यांची भेट घेऊन त्यांच्याशी चर्चा केली.

कुशाग्र बुद्धिमत्ता, अखंड परिश्रम व चिकित्सक वृत्ती हे संशोधकाला आवश्यक असणारे गुण त्यांच्यात होते. कोसंबी यांनी अनेक विद्याशाखांचा अभ्यास जिज्ञासू संशोधकाच्या नजरेतून केला. विशेष म्हणजे, त्यांचे संशोधन साचेबद्ध मार्गाने जाणारे नव्हते. ‘वैज्ञानिक, संश्लेषणात्मक इतिहास संशोधन पद्धतीचे जनक’ अशी त्यांची प्रमुख ओळख आहे. प्राचीन भारतीय इतिहासाच्या अभ्यासाला त्यांनी पूर्णत: वेगळे वळण दिले. केवळ तारखा व घटना यांमध्ये गुंतून न पडता, व्यक्तिनिष्ठ व घटनानिष्ठ दृष्टिकोनातून इतिहासाचा मागोवा घेत असताना सामाजिक परिस्थिती, प्राचीन वाङ्मयीन

संदर्भ हेदेखील कोसंबी महत्त्वाचे मानीत असत. इतिहाससंशोधनाच्या जोडीनेच नाणकशास्त्र, मानववंशशास्त्र, पुराणवस्तू संशोधन इत्यादी शाखांतील ग्रंथांचा त्यांनी तौलनिक अभ्यास केला. त्यांचे एक प्रमुख कार्य म्हणजे, मोहेंजोदारो येथे सापडलेल्या नाण्यांची कालनिश्चिती. नाण्यांची होणारी झीज व त्याला लागणारा काल प्रमाणभूत मानून, ७००० नाण्यांचे वजन करून त्यांनी हा सिद्धान्त मांडला.

दामोदर कोसंबी १९३१ साली नलिनी मडगावकर यांच्याशी विवाहबद्ध झाले. १९३३ पासून पुण्यात स्थायिक झाल्यानंतर त्यांनी फर्गसन महाविद्यालयात अध्यापन केले. तत्पूर्वी, बनारस हिंदू विद्यापीठ व अलिगड मुस्लीम विद्यापीठ येथे काही काळ त्यांनी अध्यापनकार्य केले होते.

दामोदर कोसंबी हे खऱ्या अर्थी चतुरस्र प्रतिभेचे संशोधक होते. इटालियन, जर्मन, फ्रेंच, रशियन, लॅटिन, ग्रीक इत्यादी बारा भाषा त्यांना अवगत होत्या. त्यांनी लिहिलेल्या लेखांच्या व निबंधांच्या शीर्षकांवरून त्यांनी हाताळलेल्या विषयांच्या विविधतेची कल्पना येते. त्यांपैकी काही पुढीलप्रमाणे: ऊर्वशी आणि पुरुखा, गेल्डनरचे ऋग्वेद, सॉक्रेटिसच्या चौकशीच्या निमित्ताने भारतातील जाती आणि मुक्ती, उत्तर हिंदुस्थानातील जातीय संस्थेचे प्राथमिक टप्पे, भारतातील सुती कापडाच्या उत्पादनाचा आणि उपयोगाचा विकास, मार्क्सवादी दृष्टिकोनातून भारतातील कालगणना, भर्तृहरीच्या काव्यातील सर्वसंगपरित्यागाचा गुणविशेष.

१९४६ ते १९६२ हा प्रदीर्घ काळ मुंबईच्या TIFR (Tata Institute of Fundamental Research) या संस्थेत गणित व इतिहासविषयक संशोधनकार्य कोसंबी यांनी अविरत चालू ठेवले.

त्यांचे बहुतेक सर्व लिखाण इंग्रजीत आहे. सातत्याने चालू असलेल्या संशोधनाचे फलित असे त्यांचे अनेक लेख व निबंध प्रसिद्ध झाले आहेत. विविध विषयांशी निगडित असलेले हे लिखाण कोसंबी यांच्या बहुआयामी प्रतिभेचे द्योतक आहे.

१९३० ते १९३६ या काळात त्यांनी गणित-संशोधनात्मक असे आठ निबंध लिहिले. कोसंबी यांनी एकूण १४९ संशोधनात्मक लेख व प्रास्ताविक ग्रंथ लिहिले. त्यांतील काहींचे एकत्रीकरण करून दोन ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत : १) ‘The Study of Indian History’ (१९५६), २) 'The Culture and Civilisation of Ancient India in Historical Outline' (१९६५).

'Myth and Reality' आणि 'Exasperating Essays' हे त्यांचे आणखी दोन प्रकाशित झालेले लेखसंग्रह आहेत.

कोसंबी यांची विचारसरणी मार्क्सवादी होती. त्यांनी ‘उत्पादन साधने व उत्पादन संबंध यांतील बदलांचा कालक्रमाने झालेला विकास’ अशी इतिहासाची व्याख्या केली आहे.

दामोदर कोसंबी यांनी १९४७ साली इंडियन सायन्स काँग्रेसच्या गणित विभागाचे अध्यक्षपद भूषविले. त्यांना १९३४ साली संख्याशास्त्रातील संशोधनाबद्दल ‘रामानुजम’ पुरस्कार, १९४९ साली ‘भाषा’ पुरस्कार मिळाला आणि १९६५ साली CSIR (Council for Scientific and Industrial Research) तर्फे ‘सायंटिफिक एमिरेट्स’ म्हणून गौरव करण्यात आला.

जागतिक मान्यताप्राप्त गणिती आणि आंतरविद्याशास्त्रीय (Interdisciplinary) इतिहास-संशोधनपद्धतीचे जनक अशी दुहेरी कीर्ती लाभलेले दामोदर धर्मानंद कोसंबी एक चतुरस्र प्रतिभेचे संशोधक म्हणून नेहमी स्मरणात राहतील यात शंका नाही.

— डॉ. म.के. ढवळीकर

## कोसंबी, धर्मानंद दामोदर

**बौद्धधर्म संशोधक, बुद्धोपासक, चिकित्सक**

**९ ऑक्टोबर १८७६ -**

धर्मानंद दामोदर कोसंबी यांचा जन्म भारतामधल्या गोवा राज्यातील लहानशा खेड्यात झाला. त्यांच्या आईचे नाव आनंदीबाई, तर वडिलांचे नाव दामोदर होते.



लहानपणी त्यांची प्रकृती तोळामासाच होती. त्यांचे केवळ शालेय शिक्षण पाचव्या इयत्तेपर्यंत झाले. धर्मानंद फर्गसन महाविद्यालय, बनारस हिंदू विद्यापीठ, काशी विद्यापीठ, कोलकात्याचे नॅशनल महाविद्यालय, कोलकाता विद्यापीठ, महात्माजींनी अहमदाबादेत स्थापलेल्या गुजरात विद्यापीठात (पाली भाषा व बौद्ध धर्म या विषयांचे प्राध्यापक, विभागप्रमुख) व अमेरिकेतील हार्वर्ड विद्यापीठात एकूण चार वेळा संशोधक साहाय्यक म्हणून निमंत्रित केले गेले. धर्मानंद यांनी साधलेली संस्कारित, चिकित्सा केलेली, संपादित आचार्य बुद्धघोष 'विशुद्धिमार्ग-विसुद्धिमग्ग' या अभिधर्मविषयक लघुज्ञानकोशांची रोमन लिपीतील आवृत्ती हार्वर्ड विद्यापीठाने प्रथम व भारतीय विद्या भवन प्रकाशनाने देवनागरी लिपीत त्यानंतर प्रथम प्रकाशित केली. हार्वर्ड विद्यापीठाने ग्रंथ प्रकाशित करावा, असे पहिले भारतीय व आपल्या दृष्टीने महाराष्ट्रीय संशोधक पंडित म्हणजे आचार्य धर्मानंद कोसंबी होत.

१८९७ मध्ये 'बालबोध' या मासिकात प्रकाशित झालेला बुद्धाच्या जीवनावरचा लेख वाचून व मग हाती पडेल ते बुद्धचरित्र व बौद्धविचारधारा या विषयांवरची पुस्तके झपाटल्यासारखी वाचून काढून स्वत:चे आयुष्य बौद्धपरंपरेचा प्रचार-प्रसार-विकास यांस वाहून घेण्याचा निर्धार करून हे स्वप्न प्रत्यक्षात साकारणारे बुद्धोपासक म्हणजे धर्मानंद कोसंबी. तरुणपणातच नैराश्यजनक विचारांनी ग्रस्त होऊन, शरीराने व मनाने पार कमकुवत झाल्यामुळे आत्महत्येच्या विचारांपर्यंत पोहोचलेले धर्मानंद कोसंबी, तुकाराम महाराजांचे चरित्र, तुकारामगाथा यांचे पारायण करून, त्यांतून प्रेरणा घेऊन अर्थपूर्ण जीवन जगण्यासाठी उत्साहित झाले. याच उत्साहित मन:स्थितीत, खिशात पैसा नसतानाही धर्मानंद कोसंबी ज्ञानार्जनासाठी जगप्रवासाला निघाले. कधी बैलगाडी, आगगाडी, आगबोट आणि नाही तर निव्वळ पायपीट करत, तहान-भूक विसरून, जवळजवळ पूर्ण भारतवर्ष, नेपाळ, सिक्कीम, तिबेट, श्रीलंका, ब्रह्मदेश, इंग्लंड, रशिया, अमेरिका (थोडक्यात त्रिखंडी) संचार करून मिळेल तेवढे ज्ञान व अनुभव गाठी बांधतच राहिले. या सर्व स्थळांना पर्यटकांप्रमाणे धावती भेट न देता यांतील बऱ्याच ठिकाणी बऱ्यापैकी मुक्काम करून धर्मसाधना करणारा चिनी ह्युएनत्संग, फाहिआन, इत्सिंग यांचा नकळत अनुसार करणारा श्रेष्ठ प्रवासी, राहुल सांकृत्यायनांच्या आधीचा जागतिक ज्ञानक्षेत्राचा एक ज्ञानवेचक प्रवासी ठरले.

बौद्धधर्मविषयक इतके विपुल व दर्जेदार लेखन त्यांनी केले, की त्यांतील अनेक ग्रंथांचे हिंदी-गुजराती इत्यादी भाषांत अनुवाद करण्याचा मोह रत्नपारखी अभ्यासकांना आवरता आला नाही. कित्येक ग्रंथांच्या कितीतरी पुनरावृत्त्या काढाव्या लागल्या. उच्च सारस्वत ब्राह्मण कुळात जन्मलेल्या, हीन वागणूक प्राप्त न झालेल्या धर्मानंदांनी बौद्धधर्माचे वैश्विक कार्य प्रज्ञेने जाणून स्वेच्छेने केवळ बौद्धधर्माची उपासक-दीक्षाच नव्हे, तर श्रामणेर-दीक्षा आणि पुढे जाऊन उपसम्पदापूर्वक बौद्ध-भिक्षु-दीक्षा धर्मद्वीप मानल्या गेलेल्या श्रीलंकेत सुमंगलाचार्यांसारख्या थोर महाभिक्षूंकडून घेऊन 'भगवान बुद्ध' हे अद्वितीय पुस्तक लिहिले.

या पुस्तकाची महती ओळखून भारताच्या केंद्र शासनाने राष्ट्रीय पातळीवर भव्य रितीने साजऱ्या केलेल्या बौद्धधर्माची २५०० वर्षे (2500 Years of Buddhism) या राष्ट्रव्यापी ज्ञानसोहळ्यात मूळ मराठी भाषेसहित इतर तेरा राष्ट्रीय भाषांमधून या पुस्तकाचा अनुवाद भारतीय साहित्य अकादमीतर्फे प्रसिद्ध केला व त्यांतील हिंदी अनुवादाची एक छापील प्रत तत्कालीन राष्ट्रपती व भारतीय धर्म-तत्त्वज्ञानाचे मूलग्राही गाढे अभ्यासक डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन यांना २४ ऑक्टोबर १९५६ या दीक्षादिनाच्या आधीच २२ मे १९५६ रोजी सादर करण्यात आली. धर्मानंदांच्या कार्यकाळात अशोकाच्या शिलालेखांचे धार्मिक-सांस्कृतिक-राष्ट्रीय-

ऐतिहासिक महत्त्व जाणून, चिकित्सक लेखन भारतीयेतर, विशेषत: पाश्चात्य बौद्ध अभ्यासकांकडून झाले होते. ज्या अशोकस्तंभाच्या चक्राचा प्रतीक म्हणून स्वीकार भारतीय राष्ट्रध्वजावर झाला, त्या अशोकाचा एकूण शिलालेखांपैकी महत्त्वाच्या शिलालेखांचा मराठी अनुवाद करून त्यावर महत्त्वाचे चिकित्सक लेखन करणारे पहिले भारतीय महाराष्ट्रीय विद्वान म्हणजे धर्मानंद कोसंबी. पुढे श्री.व्यं. केतकर यांनी महाराष्ट्रीय ज्ञानकोशात अशोकाच्या शिलालेखांची सुयोग्य दखल, त्यासाठी पुष्कळ पाने खर्चून घेतली आणि आचार्यांकडून स्फूर्ती घेऊन ज्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये आचार्यांनी पालीचे अध्यापन केले, तेथेच पुढे ज्यांची शिक्षक म्हणून नेमणूक झाली, त्या ना.वा. तुंगार यांनी ‘अशोकाचा राजधर्म’ या नावाची संस्थाच पुण्यातील नारायण पेठेतील मुंजाबाच्या बोळात, राहत्या घरात स्थापून त्या विषयावर सहस्राधिक व्याख्यान-यज्ञांचे सत्र यशस्वी रितीने पार पाडले. त्यांचे स्फूर्तिस्थान होते ते अर्थातच आचार्य धर्मानंद कोसंबी.

अनेक बौद्धसंस्था व प्रार्थनामंदिरांसारख्या बौद्धेतर-संस्थांशी आचार्यांचा केवळ कार्यरूप संबंध होता एवढेच नाही, तर प्रार्थनासमाजाच्या व्यापक समाज सुधारणात्मक कार्याची माहिती ‘सुबोधपत्रिके’सारख्या बहुवाचित दैनिकातून अनेकविध लेख लिहून धर्मानंदांनी जनतेपर्यंत पोहोचवली.

विवाह झालेला असूनही संकुचित स्वरूपाच्या कौटुंबिक आयुष्यात न रमता, घर सोडून, जागतिक कुटुंबकार्य करत असतानाही विवाहप्राप्त अशा स्वत:च्या कुटुंबासाठीची कर्तव्ये धर्मानंद कधीही विसरले नाहीत. भिक्षुपद स्वीकारून, विशाल मानव कुटुंबाचे कार्य पुरेसे आटोपून धर्मानंद मात्र पुन्हा एकदा गृहस्थ झाले व त्याही आधी कालिदासाचा महत्त्वाचा शब्द वापरून सांगायचे झाले, तर या ‘सर्वोपकारक्षम’ गृहस्थाश्रमाच्या कर्तव्यांचा भिक्षू जीवनातही त्यांना कधीच विसर पडला नव्हता. माफक प्रमाणात का होईना, पण कुटुंबाच्या चरितार्थासाठी नोकरी करून अर्थार्जन साधणे, मुलाच्या शिक्षणाची पुरेपूर काळजी व व्यवस्था करणे, रुग्ण व नातेवाइकांना आर्थिक मदत व वडिलांचे कर्ज फेडण्याची जबाबदारी पार पाडणे, अशा कर्तव्यांच्या बाबतीत धर्मानंदांनी कधीच कसूर केली नाही. त्यांचे कुटुंबीय व नातेवाईक एका गोष्टीला मात्र मुकले. माया-मोहपाश व डोळ्यांतील अश्रू यांना टाळण्यासाठी निग्रहकठोर धर्मानंदांनी आसन्नमरण अवस्थेतही एकाही कुटुंबीयाला, जवळच्या वा दूरच्या नातेवाइकाला वर्धा स्थित पवनार आश्रमात भेटीस येण्यासाठी मरणापर्यंत मज्जाव केला. पण धर्मानंद एकाच वेळी रामकृष्ण भांडारकरांना अपेक्षित असे ‘ज्ञानयोगी’ व ‘कर्मयोगी’ असे दोन्ही एकस्थ होते व त्यांचे वर्णन करण्यास गीतेतील पदसंहती ‘स संन्यासी च योगी च’ ही अतिशय समुचित वाटते.

एकदा बौद्ध विचारधारा सतत प्रवाहित ठेवण्याचे जीवनकार्य अंगीकारले म्हटल्यावर आपल्या पश्चातही ही गंगा वाहती कशी राहील व आटली कशी जाणार नाही या दूरदर्शी विचाराने आचार्यांनी, विशेषत: पुण्यातील फर्गसन महाविद्यालयात अध्यापन करत असताना भक्कम अभ्यासाची बैठक असलेली, संशोधनाची कुवत असणारी, सतत व्यासंगी राहणारी छात्रांची एक मांदियाळीच जन्माला घातली. याला आपल्या भारतीय परंपरेत ‘शिष्यवंश’ असे म्हणतात.

रशियातील वास्तव्यात रशियन भाषेच्या ज्ञानाबरोबरच रशियन क्रांती, त्याआधीची फ्रान्सची क्रांती, मार्क्सवाद, समाजवाद इत्यादी विषयांवरील ग्रंथांच्या वाचन-मननाने समाजवाद-साम्यवाद यांकडे धर्मानंद ओढले गेले. अशा प्रकारच्या विचारांचा काही स्वरूपात पाली-बौद्ध ग्रंथांत, अशोकाच्या शिलालेखात आढळ झाल्यावर त्यास अनुसरून आचार्यांनी ‘सुबोधपत्रिके’सारख्या दैनिकातून क्रमश: लेख लिहिले. पैकी तीन लेख एकाच मुख्य मथळ्याखाली होते. त्यांचा विषय मराठी-हिंदी कामगारांची स्थिती सुधारण्यास उपाय : १) हिंदुस्थान सरकारचे कर्तव्य, ‘आलसस्य बलं राजा’, २) हिंदी धनिकांचे कर्तव्य, ३) उपोद्घात ४) नगरपालिकांचे कर्तव्य असा होता. या विषयावर

लिहिताना धर्मानंदांनी अचूकपणाने ज्ञानेश्वरीतील अशा विचारांची पार्श्वभूमी असणाऱ्या ओव्यांचे उद्धरण दिले हे त्यांचे विशेष.

१९३० मध्ये महात्मा गांधी यांच्या स्वातंत्र्यविषयक सत्याग्रह आंदोलनात सक्रिय सहभाग व तुरुंगवास, अनेक सत्याग्रही छावण्यांचे पुढारीपण व एकूणच मानव समतेविषयी आंतरिक ओढ असल्याने १९३७ मध्ये त्यांनी विपुल वस्तीच्या मुंबईमध्ये 'बहुजनविहार' स्थापण्याचे महत्त्वपूर्ण कार्य केले.

महात्मे हे सर्वधर्मियही असतात व सर्वधर्मातीतही असतात व म्हणूनच खरेखुरे 'निधर्मी'ही असतात. त्यांचा धर्म असलाच तर एकच : 'सर्वमानवकल्याणकारी धर्म.' धर्मानंद तसेच होते. म्हणूनच सर्व धर्मियांसाठी त्यांनी बहुजनविहाराची द्वारे खुली ठेवली होती. बुद्धाने बोधिप्राप्तीनंतर म्हटले होते, 'अपारुता तेसं अमतस्स द्वारा' (तेसं म्हणजे त्यांच्यासाठी, अमतस्स-अमृताची, द्वारे म्हणजे कवाडे, अपारूता-अपावृत, उघडी आहेत.) पण धर्मानंद केवळ ब्राह्मणवादी, जैनवादी, बौद्धवादी नव्हते. ते राष्ट्रवादी, गांधीवादी, प्रार्थनासमाजवादी, बहुजनविहारवादी, विश्वमानव-कल्याणवादी विश्वपुरुष होते. विशाल, उदार, असीम, परमेश श्रीकृष्ण भगवान जे याविषयी म्हणाला, तसेच ते होते. 'वाद्यांमधला (वादी याचे बहुवचन, वाद्य याचे नव्हे) मी 'वाद' आहे. (शब्द आहे.) 'वादः प्रवदतामहम्' (गीता, १०.३२) वाद म्हणजे शब्द व शब्द म्हणजे Logos (At first there was God, the word was with God and the word was God. Bible) हेच उपनिषदांचे व वाक्यपदीयकार भर्तृहरीचे 'शब्दब्रह्म'.

ब्राह्मणवादी... गांधीवादी... मार्क्सवादी... विश्वकल्याणवादी असे आपणांस भासणारे धर्मानंद खरे तर होते 'धर्मानंदवादी'. गांधीजींचा संलेखना सोडण्याचा आग्रह त्यांनी मानला; पण अखेर संलेखना स्वीकारलीच. ते बौद्ध भिक्षू झाले आणि पुन्हा गृहस्थही झाले. या सर्वांचे कारण म्हणजे अंधपणाने गांधीवाद, बौद्धवाद, प्रार्थनासमाजवाद, तुकारामवाद, मार्क्सवाद पूर्णपणे स्वीकारणारे ते नव्हते. ते वैचारिक निवड करणारे 'निवडक' होते. त्यांचा वाद 'वि-वेचक' वाद (मराठीतील 'वेच' करणारा हा शब्द) होता. त्यांचा ism हा Eclectecism होता.

गांधीजींचा मान राखायचा म्हणनू संलेखनाव्रताची केलेली 'धारणा' त्यांनी 'पारणा' रूपात परिवर्तित केली, पण करण्यासाठी काही उरलेले नाही. म्हणूनच आपण 'कतकिच्च' (कृतकृत्य) झालो आहोत या प्रत्ययाने त्यांनी ४ जून १९४७ मध्ये, विदर्भात वर्धा येथील पवनार आश्रमात देह ठेवून निर्वाणग्रामी महाप्रस्थान केले.

- प्रा. डॉ. मो.गो. धडफळे

## कोसंबी, मीरा दामोदर

**मुक्त संशोधिका, प्राध्यापिका**

**२४ एप्रिल १९३९**



महाराष्ट्रातील विदुषी मीरा दामोदर कोसंबी फर्गसन महाविद्यालयाच्या नामांकित विद्यार्थिनी होत्या. इंटरमीजिएट आर्ट्सला त्या प्रथमश्रेणीत आल्या व विद्यापीठात अग्रमानांकित ठरल्या. बी.ए.ला. त्यांनी कोणताही विशेष व उपविषय न घेता साधारण (जनरल) विषय घेऊन पुनश्च प्रथमश्रेणी मिळविली. स्नातकोत्तर (एम.ए.) परीक्षेसाठी मात्र त्यांनी इंग्रजी (विशेष) व पाली (उपविषय) म्हणून निवडले. तिथेही त्या प्रथमश्रेणीत आल्या.

यानंतर त्या फर्गसन महाविद्यालयात इंग्रजी हा विषय 'अधिव्याख्यात्या' म्हणून शिकवू लागल्या. फर्गसनमध्ये प्राध्यापकी करणारी कोसंबी कुळातली ही तिसरी पिढी. त्यांचे आजोबा बौद्धधर्माचे प्रकाण्डपंडित, निर्वाण प्राप्त धर्मानंद कोसंबी पाली या विषयाचे पहिले विभागप्रमुख, तर त्यांचे वडील कै. दामोदर हे गणित विषयाचे प्राध्यापक होते. मीरा कोसंबी इंग्रजी विषयाच्या

प्राध्यापिका होत्या. पुढे त्यांनी ग्रंथपालन विषयात पदवी प्राप्त करून घेऊन मुंबईला ब्रिटिश लायब्ररीच्या प्रमुख ग्रंथपाल म्हणून काम केले. थोरली बहीण माया यांच्याबरोबर त्यांनी स्वीडनला सुमारे वीस वर्षे वास्तव्य केले.




भारतात परत आल्यावर कोणत्याही एखाद्या सेवेची जोखीम न पत्करता ‘मुक्त संशोधिका’ म्हणून त्यांनी उच्च दर्जाचे संशोधन केले. त्यांचे आवडीचे प्रमुख विषय म्हणजे स्त्री-मुक्ती, महाराष्ट्र संस्कृती, पाली, बौद्धधर्म इत्यादी हे होत. महाराष्ट्र संस्कृतीच्या पाश्चात्त्य व भारतीय अभ्यासक मंडळात ॲन फील्ड हाउस (अमेरिका), इरिना ग्युश्कोव्हा (रशिया), डॉ. अ.रा. कुलकर्णी यांच्या समवेत त्यांनी ऑस्ट्रेलिया, रशिया, अमेरिका, भारत येथे महाराष्ट्र संस्कृतीच्या विविध पैलूंवर दर्जेदार शोधनिबंध सादर केले.

नुकतेच दिल्ली स्थित एका प्रकाशकानाद्वारे, त्यांनी त्यांच्या विख्यात आजोबांच्या हिंदी-मराठी लेखनाचा आंग्ल अनुवाद प्रकाशित करून धर्मानंदांचे बौद्धधर्मविषयक लेखन सर्व आंग्ल-वाचकांना उपलब्ध करून दिले आहे.

– प्रा. डॉ. मो.गो. धडफळे

***

# ख



## खंदारकर, शंकर महाराज

***साधू, शंकर धुंडिराज***

**ग्रंथकार कीर्तन-प्रवचनकार**

**१९२३ – १९८५**



शंकर महाराज खंदारकर हे धर्मव्यवस्थेला मानवतेच्या पातळीवर आणून अर्थशून्य कर्मकांडापेक्षा समता, बंधुभाव, भूतदया, परोपकार, सहिष्णुता या मूल्यांना प्रतिष्ठा मिळवून देणाऱ्या संतपरंपरेचे पाईक होते. मराठवाड्यातील प्रसिद्ध संत श्री साधुमहाराज (इ.स. १७०८ - १८१२) यांच्या कुळात शंकर महाराज यांचा जन्म झाला. संत एकनाथ महाराजांनंतर लोकजागृतीचे कार्य करणारी जी संतपरंपरा निर्माण झाली, त्यात कंधारचे प्रसिद्ध संत साधुमहाराज हे होते. साधुमहाराजांपासून सातव्या पिढीचे शंकर महाराज यांनी भागवतधर्मपरंपरेला उजाळा दिला.

शंकर धुंडिराज साधू, उपाख्य शंकर महाराज यांचा जन्म फाल्गुन वद्य ३, शके १८४४ रोजी कंधार (जि. नांदेड) येथे धुंडिराज महाराज व मथुराबाई या धर्मशील दाम्पत्याच्या पोटी झाला. महाराजांचे शालेय शिक्षण अल्पच होते. संस्कृत भाषा, व्याकरण, साहित्य, वेद-वेदान्ताचे त्यांनी सखोल अध्ययन केले. वेदशास्त्रसम्पन्न गोविंदशास्त्री देवणीकर यांच्याकडे महाराजांनी संस्कृतचे प्राथमिक शिक्षण घेतल्यावर नांदेड येथे महामहोपाध्याय यज्ञेश्वरशास्त्री कस्तुरे यांच्या मार्गदर्शनाखाली महाराजांनी ‘काव्यतीर्थ’ ही पदवी संपादन केली. संस्कृतच्या अध्ययनानंतर महाराज चतुर्मासात पंढरपूर येथे राहू लागले. तेथे त्यांनी पंडितप्राण भगवानशास्त्री धारूरकर यांच्या सहवासात वेदान्त, न्यायशास्त्र, भाष्यग्रंथांचा सखोल अभ्यास केला. संतांच्या साहित्याचा वेद, उपनिषदे, भाष्यग्रंथ व अद्वैत तत्त्वज्ञानावरील इतर ग्रंथांशी सुंदर समन्वय साधण्याची अभ्यासपद्धती महाराजांना अवगत झाली. वयाच्या तेविसाव्या-चोविसाव्या वर्षापासूनच ते अभ्यासपूर्ण कीर्तने व प्रवचने करू लागले. वेदान्त ग्रंथांबरोबरच महाराजांनी ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, तुकोबांची गाथा या प्रस्थानत्रयीचे सूक्ष्म चिंतन केले.

श्रीसंत साधुमहाराजांपासून पंढरीच्या पायी वारीची परंपरा मध्यंतरी निझामी राजवटीत खंडित झाली होती. ती परंपरा शंकर महाराज व त्यांचे थोरले बंधू सीताराम महाराज यांनी पुन्हा सुरू केली. १९५४ साली कंधारहून पंढरपूरला दिंडी सोहळ्याने पायी वारी करण्याची परंपरा पुन्हा एकदा पुनरुज्जीवित केली. या पायी वारीच्या वाटचालीत गावोगावी जाऊन कीर्तन-प्रवचने या माध्यमांतून संतांच्या वाणींचे लोकमानसावर दृढ संस्कार होत असत.

पंढरपूरला महाराजांचे चार महिने वास्तव्य असे. या काळात ते ज्ञानेश्वरीवर नित्य प्रवचन तर करीत असतच, पण त्याचबरोबर ‘पंचदशी’, ‘गीताभाष्य’, ‘भामती’, ‘ब्रह्मसूत्रभाष्य’ यांसारख्या वेदान्त ग्रंथांवर निरूपण करीत. शास्त्र न शिकलेल्या माणसालासुद्धा कळेल अशा पद्धतीने महाराज कठीण विषय सोपा करून सांगत. महाराजांची स्वतःची अशी एक कीर्तनशैली होती.

कर्म, भक्ती, ज्ञान, विवेक, वैराग्य इत्यादी सिद्धान्तांचा परिपोष साधत ते निरूपण करीत. त्यांच्या कीर्तन-प्रवचनात सप्रमाणता, मुद्देसूदपणा, विनोद,

मार्मिकता, सखोल चिंतन असे. त्यांच्या कीर्तनाला पंढरपुरात प्रचंड गर्दी होत असे. चातुर्मास्यानंतर महाराज गावोगावीच्या भ्रमंतीला निघत.

महाराष्ट्राच्या शहराशहरांत व खेड्यापाड्यांत महाराजांनी ज्ञानेश्वरीचा नंदादीप पोहोचवला. कोणतीही दळणवळणाची साधने नव्हती, साधी वीजही नव्हती अशा काळात महाराजांनी लोकांना हरिकीर्तनाचा अमृतरस भरभरून दिला. ते ज्या गावी कार्यक्रमासाठी जात असत, त्या गावाला एखाद्या यात्रेचे स्वरूप येत असे.

वक्तृत्वाबरोबरच महाराजांनी ग्रंथलेखनही केले. संतांच्या वाणींचा परिपूर्ण अर्थ लोकांना मिळावा या हेतूने महाराजांनी 'ज्ञानेश्वरी भावदर्शन' : दोन खंड, 'भावार्थ एकनाथी भागवत' : दोन खंड, 'श्री तुकाराम महाराज गाथाभाष्य' : दोन भाग, 'श्रीअनुभवामृतभाष्य', 'हरिपाठभाष्य', 'सार्थ एकनाथी भारुडे', 'ज्ञानदेवांचे पसायदान', 'नामदेवचरित्रविवेचन' असे आठ ग्रंथ लिहिले. संतांच्या साहित्यांचा सूक्ष्म अभ्यास करण्यासाठी महाराजांच्या ग्रंथांचा अतिशय उपयोग होतो. त्यांचे ग्रंथ आजही लोकप्रिय आहेत.

गरीब वारकऱ्यांबद्दल महाराजांना विलक्षण कळवळा होता. मागासलेल्या जातींच्या अनेक वारकऱ्यांना महाराजांनी स्वतःजवळ ठेवून घेतले आणि त्यांना वेदान्तात पारंगत केले. कीर्तन- प्रवचनाची कला शिकविली. त्यांच्या प्रेरणेतून आज असंख्य वारकरी कीर्तन-प्रवचने करून लोकजागृतीचे कार्य करतात. महाराजांच्या सहवासात अनेक कुमार्गी लोक सन्मार्गाकडे वळले. त्यांच्या अनुग्रहामुळे अनेक मूढ व पापी असलेले लोक साधक बनले व साधकाचे सिद्ध झाले. महाराज म्हणजे चालतेबोलते ज्ञानपीठच होते.

साडेतीन तपे महाराजांनी वारकरी संप्रदायासाठी देह झिजविला व प्रभावी ग्रंथलेखन केले. शंकर महाराज खंदारकरांचे हे निर्मोही व्यक्तिमत्त्व अश्विन वद्य सप्तमी, शके १९०७ रोजी काळाच्या पडद्याआड गेले.

— डॉ. यशवंत साधू

## खंडालवाला, कार्ल जमशेद

**ललित कला समीक्षक, कायदेतज्ज्ञ**

**१६ मार्च १९०४ – मृत्युदिनांक अनुपलब्ध**

कार्ल जमशेद खंडालवाला यांच्या आईचे नाव खोरशेद होते. कायद्याची पदवी प्राप्त केल्यावर अल्पावधीतच कार्ल यांनी वकिलीत नावलौकिक मिळवला. विद्यार्थिदशेपासूनच प्राचीन भारतीय चित्रकलेकडे त्यांचा ओढा होताच. कायद्याच्या अभ्यासाबरोबर त्याचाही व्यासंग वाढत गेला. प्रगाढ विधिज्ञता आणि कला इतिहास नैपुण्य अशा दोन विभिन्न क्षेत्रांत कार्ल खंडालवाला यांना चांगलीच प्रतिष्ठा लाभली आणि ललित कला (प्राचीन) खंडाच्या संपादनाची जबाबदारी त्यांच्याकडे आली. तसेच मार्ग पब्लिकेशनच्या प्रकाशनांसाठी तज्ज्ञ सल्लागार म्हणूनही त्यांनी काम पाहिले. पीएच.डी. पदवीसाठी परीक्षक म्हणून अनेक विद्यापीठांनी खंडालवाला यांची नियुक्ती केली आहे. कलाक्षेत्रामध्ये खंडालवाला यांनी प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियम, मुंबईचे चेअरमन व बोर्ड ऑफ ट्रस्टीजचे सदस्य; 'कला एन्शंट'चे सन्माननीय प्रमुख संपादक अशी मानाची अनेक पदे भूषवली.

खंडालवाला यांनी लिहिलेल्या आणि संपादन केलेल्या काही प्रमुख पुस्तकांमध्ये 'पहाडी मिनिएचर पेंटिंग्ज', 'न्यू डॉक्युमेंट्स ऑफ इंडियन पेंटिंग्ज', 'इंडियन पेंटिंग्ज अँड स्कल्प्चर्स', 'अमृता शेरगील', 'हेब्बर', 'गुल्शन-इ-मुसावी', 'कलेक्टर्स ड्रीम' इत्यादीचा समावेश आहे. यातील काही ग्रंथांसाठी डॉ. मोतीचंद्र आणि शरयू दफ्तरी दोशी यांनी सहलेखन केले आहे. भारत सरकारने कार्ल खंडालवाला यांना 'पद्मश्री' देऊन सन्मानित केलेले असून त्यांना कलकत्त्याच्या एशियाटिक सोसायटीचे 'रामप्रसाद चंद्र मेडल' बहाल करण्यात आले होते. ते ललित कला अकादमीचे सन्माननीय फेलो होते.

एक कायदेपंडित म्हणून निवृत्त झाल्यावर वार्धक्यातही त्यांनी चित्रकलेचा छंद जोपासला.

— संपादित

## खरे, गणेश हरी
**इतिहास संशोधक**
**१० जानेवारी १९०१ – ५ जून १९८५**



गणेश हरी खरे यांचा जन्म पनवेल येथे झाला. त्यांच्या वयाच्या आठव्या वर्षीच त्यांचे वडील निधन पावल्यामुळे त्यांना लहानपणापासूनच दारिद्र्याचे चटके सहन करावे लागले. त्यांचे माध्यमिक शिक्षण वाईच्या द्रविड हायस्कुलात झाले. ते चालू असतानाच त्यांनी व त्यांच्या काही मित्रांनी एक विद्यार्थी मंडळ स्थापन करून वाईत तीन ठिकाणी प्रौढांकरिता रात्रीच्या मोफत शाळा चालविल्या होत्या.

१९२० मध्ये मॅट्रिक झाल्यावर खऱ्यांनी सांगलीच्या विलिंग्डन महाविद्यालयात प्रवेश घेतला. तिथे पहिल्या वर्षाला असतानाच त्यांनी महात्मा गांधींच्या असहकारितेच्या चळवळीत उडी घेतली आणि महाविद्यालय सोडले. या सुमारास कोयना धरणाची योजना विचाराधीन होती. ते धरण झाल्यास जी गावे उठतील, त्यांतील रहिवाशांना योग्य ती नुकसानभरपाई देऊन त्यांचे पुनर्वसन व्हावे असा प्रचार खरे आणि त्यांचे काही मित्र यांनी सुरू केला. भाषणे करून अशांतता माजविल्याच्या आरोपाखाली त्यांच्यावर, त्यांनी एक वर्ष अशी चळवळ करणार नाही असा जामीन द्यावा म्हणून, खटला दाखल झाला. असहकारितेच्या तत्त्वाला अनुसरून खऱ्यांनी जामीन देण्यास नकार दिला. त्यामुळे त्यांना एक वर्ष साध्या बंदिवासाची शिक्षा होऊन १२ ऑगस्ट १९२२ रोजी त्यांची कारागृहात रवानगी झाली. या बंदिवासाच्या काळात त्यांनी ज्ञानेश्वरी, तुकारामगाथा, गीतारहस्य, तुलसीरामायण इत्यादी ग्रंथांची पारायणे केली.

तुरुंगातून सुटका झाल्यावर त्यांनी सुमारे वर्षभर सातारा जिल्हा काँग्रेसचे एक चिटणीस म्हणून काम केले. त्यानंतर तत्कालीन राजकीय व सामाजिक वातावरणामुळे खऱ्यांनी सक्रिय राजकारण सोडले आणि १९२४ ते १९२९ या काळात साताऱ्याच्या राष्ट्रीय शाळेत अल्प वेतनावर शिक्षक म्हणून काम केले.

ज्ञानार्जनाची तळमळ खऱ्यांना स्वभावत:च असल्यामुळे सातारा येथे मुलांना शिकवीत असताना त्यांनी स्वत:चा अभ्यासही चालू ठेवला. आवड आणि परिस्थितीच्या मर्यादा यांमुळे त्यांनी त्याकरिता इतिहास हा विषय निवडला. सातारा येथील वास्तव्यात त्यांनी भारत इतिहास संशोधक मंडळाची प्रकाशने आणि इतिहासाचार्य राजवाडे व वासुदेवशास्त्री खरे यांनी संपादित केलेले कागदपत्रांचे खंड यांपैकी मिळतील ती सर्व पुस्तके वाचून त्यांनी टिपणेही काढली. राजवाडे, खरे इत्यादी पूर्वसूरींनी जसे काम केले, तसेच आपणही करावे असे या अभ्यासातून त्यांना वाटू लागले. इतिहास संशोधक होण्याचे ठरविल्यावर त्यांनी त्याकरिता पूर्वतयारी सुरू केली. शिलालेखांचे ठसे घेण्याचे काम ते प्रामुख्याने स्वत:च्याच प्रयासांनी शिकले; ब्राह्मी आणि उर्दू या लिपीही त्यांनी आत्मसात केल्या.

सातारा येथील साडेचार वर्षांच्या वास्तव्यात एवढी पूर्वतयारी झाल्यावर खऱ्यांनी अधिक अभ्यासाकरिता पुण्याला जाण्याचे ठरविले. भारत इतिहास संशोधक मंडळ व रायगड स्मारक मंडळ या दोन संस्थांनी मिळून ‘शिवचरित्र कार्यालय’ नावाची शिवचरित्रविषयक कामाला वाहिलेली एक संस्थाच तेव्हा स्थापन केली होती. तिथे नोकरी मिळेल अशा भरवशावर खरे पुण्याला आले. पण तत्कालीन अडचणींमुळे त्यांना शिवचरित्र कार्यालयात लगेच काही नोकरी मिळू शकली नाही. मात्र, त्या संस्थेकडून त्यांना प्रामुख्याने मोडी कागदपत्रांचे लिप्यंतर करण्याचे काम दिले जाई. त्यातून त्यांना सहा महिन्यांत सुमारे शंभर रुपये मेहनताना म्हणून मिळाले. या सहा महिन्यांत त्यांचा दिनक्रम असा असे; दिवसभर भारत इतिहास संशोधक मंडळात अभ्यास करायचा व मिळाले तर काम करायचे, अप्पा बळवंत चौकातील आनंदाश्रम या संस्कृत ग्रंथांच्या प्रकाशनास वाहिलेल्या

संस्थेत जाऊन अंघोळ करायची, एका मित्राकडे घेऊन ठेवलेले दीड पावशेर दूध व दोन पैशांचा पाव यांवर होईल तेवढी क्षुधाशांती करून पुन्हा मंडळात अभ्यास किंवा काम करायचे आणि रात्री उपाशीपोटीच मंडळात किंवा आनंदाश्रमात झोपायचे.

असे सहा महिने काढल्यावर खऱ्यांना शिवचरित्रकार्यात तेव्हाचे चिटणीस दत्तोपंत आपटे यांनी दरमहा २५ रुपये पगारावर नोकरीत घेतले. त्यांनी ब्राह्मी व फारसी यांचे बऱ्यापैकी ज्ञान मिळविल्याचे दिसून आल्यावर १९३० मध्ये त्यांना दरमहा ५० रुपये पगारावर भारत इतिहास संशोधक मंडळाच्या सेवेत घेण्यात आले आणि राहण्याकरिता मंडळातच एक छोटी खोलीही मिळाली.

मंडळात काम करू लागल्यापासूनच खऱ्यांनी फारसीच्या अभ्यासावर लक्ष केंद्रित केले होते. त्याकरिता पुस्तकांनाच त्यांनी गुरू केले. शिवाय काही काळ ते भावे स्कुलातील फारसीच्या वर्गातही बसत. शिवकालीन व शिवपूर्वकालीन मोडीतही ते पारंगत झाले. प्रामुख्याने स्वाध्यायाच्या बळावरच ते कानडी तर शिकलेच; पण जुने कानडीही (हळे कन्नड) त्यांनी आत्मसात केले. अशा प्रकारे मोडी, ब्राह्मी, प्राकृत, संस्कृत, उर्दू (दक्खिनी हिंदी), कानडी व फारस या लिपी व भाषा त्यांनी अवगत करून घेतल्या. ग्रंथवाचनाने त्यांनी स्वत:च्या इंग्रजीच्या ज्ञानातही वाढ केली. आवश्यक ती पुस्तके अभ्यासण्याकरिता ते पुण्यातील विविध ग्रंथालयांमध्ये जाऊ लागले. त्याकरिता फार पायपीट करावी लागे आणि वेळही फार जाई, म्हणून प्रौढ वयात ते सायकल चालवायला शिकले.

साधारण १९३० पासून खऱ्यांचे संशोधन प्रकाशित होऊ लागले. त्या वर्षी प्रकाशित झालेल्या शिवचरित्र-साहित्य, खंड ३ मध्ये छापण्यात आलेल्या मराठी कागदपत्रांपैकी काही कागदपत्रे खऱ्यांनी संपादित केली आहेत. पुढे शिवचरित्रसाहित्य, खंड ६ (१९३७), ११(१९५८), १२ (१९६४) व १३ (१९६५) हे खंड पूर्णपणे त्यांनीच संपादित केले आणि त्या मालेच्या चौदाव्या खंडाच्या संपादक मंडळात ते प्रमुख होते. ऐतिहासिक फारसी साहित्याचे सहा खंड त्यांनी संपादित केले. त्यांपैकी पहिला खंड १९३४ मध्ये प्रकाशित झाला. आतापर्यंत प्रकाशित झालेल्या आदिलशाही फर्मानांपैकी ७५ टक्क्यांहून अधिक फर्माने एकट्या खऱ्यांनी संपादित केली आहेत.

खऱ्यांनी शिवकालाप्रमाणेच पेशवेकालीन कागदपत्रांचेही अध्ययन केले होते. महाराष्ट्र साहित्य परिषदेत १९४३ मध्ये दिलेल्या एका व्याख्यानात रियासतकार सरदेसायांनी सर जदुनाथ सरकार यांच्या सांगण्यावर विसंबून पुढील अर्थाचे विधान केले : 'मराठ्यांनी अटकेपार झेंडे लावले ही निव्वळ थाप आहे, तिला कोणताही आधार नाही.' त्यानंतर महिन्याभरातच खऱ्यांनी 'हा घ्या मराठे अटकेपार गेल्याचा पुरावा' असा लेख लिहून मराठे अटकेपार गेले होते हे, ज्या फारसी कागदपत्रांवर जदुनाथ सरकारांचा मोठा भरवसा असे, अशा फारसी कागदपत्रांच्या आधारेच, सिद्ध केले. त्यांनी दाखल केलेले पुरावे इतके बिनतोड होते, की सरदेसायांना व सरकारांनाही आपले विधान चुकीचे असल्याचे मान्य करावे लागले.

मोडी व फारसीप्रमाणेच ब्राह्मी व संस्कृतचाही अभ्यास खऱ्यांनी केला असल्यामुळे इतिहाससंशोधनाच्या त्याही क्षेत्रात त्यांनी आपला ठसा उमटविला. 'दक्षिणेच्या मध्ययुगीन इतिहासाची साधने' या ग्रंथाच्या पहिल्या तीन खंडांमध्ये त्यांनी संपादित केलेले ब्राह्मी, कानडी व संस्कृत लेख छापलेले आहेत. नाणी, मूर्ती व ऐतिहासिक स्थळे यांचाही सखोल अभ्यास त्यांनी केलेला होता. 'मंडळातील नाणी' हे त्यांचे पुस्तक अभ्यासकांमध्ये प्रसिद्ध आहे. 'श्रीक्षेत्र आळंदी', 'श्रीविठ्ठल आणि पंढरपूर', 'सिंहगड, शनिवारवाडा आणि स्वराज्यातील तीन दुर्ग' ही त्यांची पुस्तके म्हणजे ऐतिहासिक स्थळांवरील संशोधकीय पुस्तके कशी लिहावीत याचा कित्ताच आहे. मराठी इतिहास संशोधकांचे संशोधन जगापुढे यायला हवे असेल तर त्यांनी इंग्रजीतही लिहिले पाहिजे, असे

खऱ्यांचे मत होते. खरे आपली मते आचरणात आणीत असत. त्यानुसार त्यांनी इंग्रजीत शंभराहून अधिक लेख लिहिले आणि ते प्रतिष्ठित संशोधकीय नियतकालिकांमध्ये प्रकाशितही झाले. त्यांत शिवकालावरील व पेशवेकालावरील लेख आहेत, नाण्यांवरील आहेत, मूर्तींवरील आहेत आणि ताम्रपटांवरीलही आहेत. त्यांच्या निवडक इंग्रजी लेखांचे पुस्तक 'सिलेक्ट आर्टिकल्स' अशा नावाने त्यांनी प्रकाशितही केले.

भारत इतिहास संशोधक मंडळात कागदपत्रांचा व इतर वस्तूंचा जो अमूल्य संग्रह आहे, तो गोळा करण्यात खऱ्यांचा फार मोठा वाटा आहे. मंडळासाठी त्यांनी चार हजारांहून अधिक पृष्ठे लिहिली किंवा संपादित केली. त्यांनी लिहिलेल्या लहानमोठ्या मराठी व इंग्रजी पुस्तकांची संख्या पन्नासहून अधिक आहे आणि लेखांची संख्या सुमारे साडेतीनशे आहे. त्यांच्या ग्रंथसंपदेतील 'मूर्तिविज्ञान' आणि 'संशोधकाचा मित्र' या ग्रंथांचा आवर्जून उल्लेख केला पाहिजे.

खऱ्यांच्या इतिहाससंशोधनातील एक विशेष असा आहे, की पुरातत्त्वापासून भारताच्या स्वातंत्र्यचळवळीच्या इतिहासापर्यंत त्यांच्या ज्ञानाची व संशोधनाची व्याप्ती होती. अशी व्याप्ती असणारा इतिहास संशोधक महाराष्ट्रात नव्हे, तर भारतातही क्वचितच आढळेल. खऱ्यांच्या लेखनातले महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे त्यातील काटेकोरपणा व मुद्देसूदपणा. कमीतकमी शब्दांत ते जास्तीत जास्त माहिती देत असत.

शेवटपर्यंत अविवाहित राहिलेल्या खऱ्यांना आयुष्यात अनेक मानसन्मान मिळाले. इंडियन हिस्टॉरिकल रेकॉर्ड्स कमिशनवर १९४२ पासून मंडळाचे प्रतिनिधी म्हणून आणि १९७२ पासून सरकारने नेमलेले प्रतिनिधी म्हणून ते जात असत. ते स्वत: पदवीधर नसूनही पुढे विद्यापीठाने इतिहासातील डॉक्टरेटकरिता मार्गदर्शक व परीक्षक म्हणून त्यांची नेमणूक केलेली होती. १९७४ मध्ये ते न्युमिस्मॅटिक सोसायटी ऑफ इंडिया या संस्थेच्या अधिवेशनाचे अध्यक्ष होते. डिसेंबर १९७९ मधील इंडियन हिस्टरी काँग्रेसच्या अधिवेशनाचे ते अध्यक्ष होते. १९८४ मध्ये पुणे विद्यापीठाने त्यांना सन्माननीय डी.लिट. देऊन गौरविले.

— संपादित

## खोबरेकर, विठ्ठल गोपाळ

**लेखक, पुराभिलेख संशोधक, संपादक**

**९ सप्टेंबर १९१८ — २२ ऑगस्ट १९७०**

पुराभिलेख व पुरातत्त्व विभागाचे माजी संचालक व इतिहास संशोधक डॉ. विठ्ठल गोपाळ खोबरेकर यांचा जन्म पूर्वीच्या रत्नागिरी व आताच्या सिंधुदुर्ग जिल्ह्यात कवठी येथे झाला. त्यांचे मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण मालवण येथे व पुढील उच्च शिक्षण मुंबईतील सेंट झेविअर कॉलेजमधून झाले. त्यांनी १९५३ साली 'मराठ्यांच्या सत्तेचा दक्षिणेकडील विस्तार' या विषयावर प्रबंध लिहून मुंबई विद्यापीठाची एम.ए. पदवी संपादन केली व 'कोकणचा इतिहास' लिहून पीएच.डी. पदवी मिळवली. १९५४ साली महाराष्ट्र शासनाच्या पुराभिलेख खात्यात संशोधक साहाय्यक म्हणून प्रवेश केला. १९५८-६० या काळात बडोदे दप्तरखान्याचे प्रमुख म्हणून काम केले. १९६०-६९ या काळात महाराष्ट्र शासनाच्या पुराभिलेख विभागाचे साहाय्यक संचालक म्हणून काम पाहिल्यावर १९६९-८१ या काळात ते पुराभिलेख व पुरातत्त्व विभागाचे संचालक झाले. 'इंग्रजी सत्तेविरुद्धचा महाराष्ट्रातील सशस्त्र उठाव' व 'गुजरातेतील मराठी राजवट' या दोन ग्रंथांमुळे इतिहास संशोधक म्हणून ते प्रसिद्धीस आले.

त्यांनी वरीलशिवाय अनेक सन्माननीय जागांवर कामे केली. ते लंडनच्या रॉयल एशियाटिक सोसायटीचे फेलो होते व इंडियन हिस्टॉरिकल रेकॉर्डस कमिशन आणि इंडियन हिस्टरी काँग्रेस या संस्थांचे १५ वर्षे सभासद होते. महाराष्ट्र शासनाचे प्रतिनिधी म्हणून व महाराष्ट्र राज्य पुराभिलेख व पुरातत्त्व मंडळाचे चिटणीस म्हणूनही १५ वर्षे काम केले. मुंबई व एस.एन.डी.टी विद्यापीठाच्या इतिहास व पुरातत्त्व अभ्यास मंडळाचे सभासद, मुंबई

येथील इतिहास संशोधन मंडळाचे सभासद, सचिव व संचालक आणि 'भारतीय इतिहास आणि संस्कृती' या त्रैमासिकाचे संपादक म्हणून ते कार्य करत होते.

डॉ. खोबरेकर यांची पुराभिलेख व इतिहास संशोधनातील इतर कामगिरी अशीच उल्लेखनीय आहे. ते १९७२ मध्ये मॉस्को येथे भरलेल्या सातव्या आंतरराष्ट्रीय पुराभिलेखाधिकारी परिषदेच्या अधिवेशनास राज्य प्रतिनिधी म्हणून उपस्थित राहिले होते. त्यानंतर ते लंडनला कोल्हापूरचे छत्रपती राजर्षी शाहू महाराजांसंबंधी कागदपत्रांचा शोध घेण्यासाठी जाऊन आले. भारतातील प्रमुख दप्तरखान्यातील ऐतिहासिक साधनांचा अभ्यास केला. तंजावर, इंदोर, मद्रास, दिल्ली, गोवा, बिकानेर वगैरे ठिकाणी असलेल्या महाराष्ट्राच्या इतिहासाच्या साधनांचे अवलोकन केले. पेशवे दप्तर (पुणे) व कोल्हापूर रेकॉर्ड ऑफिसमधील मोडी लिपीतील ऐतिहासिक कागदपत्रांची वर्णनात्मक सूची तयार करण्याची योजना त्यांनी कार्यान्वित केली आणि या चार लाख कागदपत्रांची सूची चार खंडात प्रसिद्ध केली.

'महाराष्ट्रातील दप्तरखाने' या त्यांच्या संशोधनात्मक ग्रंथास १९७० सालातील उत्कृष्ट ग्रंथ म्हणून पारितोषिक मिळाले. ते अनेक इतिहास परिषदांमध्ये सहभागी होऊन आपले स्वतःचे शोध निबंध वाचत असत. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या इतिहास संशोधन मंडळाचे ते सुरुवातीपासून - म्हणजे १९६८पासून मानद संचालक होते. इतिहास संशोधन मंडळातर्फे त्यांनी अनेक वेळा इतिहास परिषदांचे आयोजन केले, तर एकवीस वेळा चर्चासत्रे आयोजित केली. त्यांनी अनेक व्याख्यानांचे आयोजन केले, तसेच स्वतः अनेक व्याख्याने दिली. इ.स. १९८१ व १९८४ या दोन वर्षी त्यांनी नागपूर व अमरावती विद्यापीठाच्या इतिहास परिषदांचे अध्यक्षस्थान भूषवले होते. त्यांनी तीसपेक्षा अधिक ग्रंथांची निर्मिती केली. त्यात अधिकतर साधनग्रंथांचाच समावेश दिसतो. अनेक ठिकाणी वाचलेल्या व प्रकाशित केलेल्या त्यांच्या ऐतिहासिक शोध निबंधांची संख्या शंभरपेक्षा अधिकच भरेल. मराठ्यांच्या इतिहासाचा अभ्यास त्यांनी मूळ कागदपत्रांवरून केला असून 'शिवकालीन ऐतिहासिक कागदपत्रे' व 'तारीख-इ दिलकशा' असे शिवकालावरील कागदपत्रांवर आधारित साधनग्रंथ संपादित करून प्रसिद्ध केले. अभ्यासूंसाठी शिवकालाची साधनचिकित्सा लिहून 'इतिहास आणि संस्कृती' या त्रैमासिकाच्या 'श्री छत्रपती शिवाजी महाराज त्रिशत्सांवत्स समारोह संशोधकीय विशेषांक' प्रसिद्ध केला.

महाराष्ट्राबाहेरील ज्या स्थळांना छत्रपती शिवाजी महाराजांचे पाय लागले, त्या त्या स्थळी जाऊन त्याबद्दलचे निरीक्षणात्मक अहवाल त्यांनी शासनाला सादर केले आहेत. त्यांचा शिवकालाचा व्यासंग दांडगा होता.

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने त्यांच्याकडे महाराष्ट्राच्या इतिहासाचा 'पेशवे कालखंड' लिहिण्याचे काम सोपवले होते. ते त्यांनी सातशे पृष्ठे लिहून पूर्ण केले. त्यांचा 'मराठ्यांच्या स्वाऱ्यांचे मुक्काम' हा ६१० पृष्ठांचा साधनग्रंथ त्यांच्या संशोधन चिकाटीची, श्रमाची व इतिहास ज्ञानाची साक्ष देतो. मराठ्यांनी राज्यविस्तारासाठी दक्षिण व उत्तर हिंदुस्थानात व इतरत्र अनेक स्वाऱ्या केल्या. (इ.स. १७०७-१८०३) प्रत्येक स्वारीत सैन्याने कोणत्या गावी, कोणत्या तारखेस व किती दिवस तळ दिला, याची जंत्रीवजा माहिती पेशवे दप्तरातून टिपून ती या ग्रंथात साधार दिलेली आढळते. मराठी लष्करांच्या तळांचे कालज्ञान इतिहासावर प्रकास टाकत असल्याने पेशवे काळाच्या अभ्यासकांना हा एक उपयुक्त मौलिक साधनग्रंथ म्हणून महत्त्वाचा आहे.

महाराष्ट्रात इंग्रजी सत्ता स्थापन झाल्यावर ठिकठिकाणी जे सशस्त्र उठाव झाले, त्याची माहिती त्यांनी 'इंग्रजी सत्तेविरुद्ध महाराष्ट्रातील सशस्त्र उठाव' या आपल्या ग्रंथात दिली आहे.

इ.स. १८५७ ते १९४७ या कालखंडात स्वातंत्र्याकरिता जे सशस्त्र उठाव झाले, बंडे झाली त्यासंबंधीच्या हकिगतीची तत्कालीन कागदपत्रे

अभ्यासून ती पाच खंडात अर्काईव्हज बुलेटिनमध्ये प्रसिद्ध केली आहेत. महाराष्ट्रातील सव्वीस जिल्हा कार्यालयात स्वातंत्र्य आंदोलनासंबंधीची जी कागदपत्रे होती, ती त्यांनी अभ्यासली असून इतिहास अभ्यासकांना त्यांचा उपयोग होण्यासाठी ती त्यांनी औरंगाबाद, नागपूर, कोल्हापूर, मुंबई येथील अभिलेखागारात आणून जपून ठेवण्याची कामागिरी केली. त्यांनी इंडियन काउन्सिल ऑफ हिस्टॉरिकल रिसर्च (ICHR) या संस्थेकडून फेलोशिप मिळवून ‘कोकणचा सामाजिक व आर्थिक इतिहास’ (१६५०-१८१८) पुरा केला.

- डॉ. आर.एच. कांबळे

***

# ग



## गजेंद्रगडकर, अश्वत्थामा बाळाचार्य

**लेखक, संपादक, भाषांतरकार**

**जन्ममृत्युदिनांक अनुपलब्ध**



संस्कृतचे गाढे अभ्यासक, काव्यशास्त्र, नाट्यवाङ्मय, तत्त्वज्ञान इ. विविध विषयांवरील ग्रंथांचे अभ्यासपूर्ण लेखन करणारे लेखक. संस्कृत विभाग, एल्फिन्स्टन महाविद्यालय मुंबई, येथे प्रोफेसर म्हणून ते कार्यरत होते. मुंबई मराठी साहित्य संघ, चर्नी रोड, मुंबई हा साहित्य संघ २१ जुलै १९३५ रोजी स्थापन झाला. त्यामध्ये अ. बा. गजेंद्रगडकरांच्या अध्यक्षतेखाली सेंट्रल साहित्यिक संस्था सुरू झाली.

कालिदास इ. कवींच्या काव्यकृतींमधून मिळणारे ज्ञान अनंत काळापर्यंत टिकणारे आहे. त्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण लेखनशैलीने ते संस्कृत साहित्याच्या अत्युच्च शिखरावर आहेत. गजेंद्रगडकरांच्या साहित्याचा थोडक्यात सारांश सांगणे कठीण काम आहे. परंतु सामान्य अभ्यासकांच्या सोयीसाठी त्यांच्या या कार्याविषयी ही माहिती. गजेंद्रगडकर यांनी ‘अभिज्ञानशाकुंतलम्’ ह्या कालिदासांच्या नाट्यकृतीचा सटीप इंग्रजी अनुवाद केला. अभिज्ञानशाकुंतलावरील विविध विचारपैलूंचे दर्शन घडवले. विसाव्या शतकातील अ.ब. गजेंद्रगडकरांनी भारतीयांनाच नव्हे, तर पाश्चात्त्यांनाही भुरळ पाडणाऱ्या अभिज्ञानशाकुंतलमचे जे नूतनीकरण केले, ते विद्यार्थ्यांना व संशोधकांना निश्चितच उपयोगी ठरेल.

१४-१५व्या शतकातील लौगाक्षी भास्कराचा अर्थसंग्रह हा पूर्वमीमांसेवरील प्रकरण ग्रंथ आहे. आर. डी. करमरकर व प्रा. गजेंद्रगडकर यांनी या संस्कृत ग्रंथाचे स्पष्टीकरणात्मक भाषांतर केले. याचे वैशिष्ट्य म्हणजे जणू हा पूर्वमीमांसेचा कोशच. त्याला ‘पूर्वमीमांसासार्थसंग्रह’ असेही नाव आढळते.

भासविरचित ‘स्वप्नवासवदत्तम’ ह्या संस्कृत नाटकाचे इंग्रजी भाषांतर व स्पष्टीकरणात्मक टिपा, तसेच ‘वेणीसंहार : चिकित्सक अध्ययन ह्यामध्ये गजेंद्रगडकरांनी वेणीसंहारातील अनेक विषयांचे, संदर्भांचे चिकित्सक अध्ययन व ‘हर्षचरित’ या महाकाव्याचे इंग्रजी भाषांतर व संदर्भयुक्त टीपा ग्रंथाचे आणि काव्यशास्त्रातील मम्मटांचे ‘काव्यप्रकाश’ या ग्रंथातील १,२,३,१० उल्लास, यांचे मराठी भाषांतर केले.

अ.बा. गजेंद्रगडकराच्या भाषांतरित व संपादित साहित्यामुळे मराठी व संस्कृत, तसेच इंग्रजी साहित्याचे दालन अतिशय समृद्ध झाले. उपरोक्त तिन्ही भाषिक वर्गातील साहित्यिकांना, विद्यार्थिवर्गाला व संशोधकांना त्यांचे हे साहित्य निश्चितच मार्गदर्शक आहे.

त्यांच्या लिखित साहित्याकडे एक दृष्टीक्षेप टाकला असता त्यांच्या विद्वत्तेची खोली कळते.

१) अभिज्ञानशाकुंतलम् (सटीप इंग्रजी भाषांतरासहित) १९२०, २) अर्थसंग्रह - लौगाक्षी भास्कर (आर.डी. करमरकर व अ.बा. गजेंद्रगडकर) १९८४, ३) काव्यप्रकाश - मम्मट (१,२,३ व १०वा उल्लास) १९७०, ४) तर्कसंग्रह - अन्नंभट्ट (आर.डी. करमरकर व अ.बा. गजेंद्रगडकर) १९३०, ५) तर्कभाषा - केशवमिश्र (आर.डी. करमरकर व अ.बा. गजेंद्रगडकर) १९३४, ६) दशकुमारचरित -

दंडी (पूर्वपीठिका व १-२ उच्छवास) (स.द. गजेंद्रगडकर व अ.बा. गजेंद्रगडकर) १९२०, ७) भट्टनारायणकृत वेणीसंहार : चिकित्सक अध्ययन १९३३, ८) बाण हर्षचरित - उच्छवास १-७ (स.द. गजेंद्रगडकर व अ.बा. गजेंद्रगडकर), ९) स्वप्नवी सवदत्तम् (भास) १९३८, १०) फर्स्ट इयर संस्कृत पोएटिक सिलेक्शन नं. १ (आर.डी. करमरकर व अ.बा. गजेंद्रगडकर) १९२८, ११) इंटरमिडिएट संस्कृत सिलेक्शन नं. २ (संपादन व संपूर्ण भाषांतर इंग्रजी प्रस्तावनेसह), १२) ॲनल्स ऑफ द भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिट्यूट खंड १४ (१९३२-१९३३) संपादक - डी.आर. भांडारकर व अ.ब. गजेंद्रगडकर.

— सुचित्रा ताजणे

## गर्गे, सदाशिव मार्तंड

***स. मा. गर्गे***

**कोशकार, पत्रकार**

**४ नोव्हेंबर १९२० – ४ नोव्हेंबर २००५**



सदाशिव मार्तंड गर्गे यांचा जन्म मराठवाड्यातील बीड जिल्ह्यात निजामाच्या राज्यातील लहूरी या लहानशा गावात झाला. त्यांनी उर्दू भाषेत प्राथमिक शिक्षण कसेबसे पुरे केले. त्याच वेळी वडिलांच्या आग्रहामुळे हरिविजय, पांडवप्रताप अशा धार्मिक पोथ्यांचे वाचन झाले. त्यामुळे वाचायची गोडी लागली. माध्यमिक शिक्षणासाठी त्यांना तालुक्याच्या गावी जावे लागले. तेथे स्वामी दयानंद सरस्वतींचा 'सत्यार्थप्रकाश' हा आर्य समाजाचा प्रमुख ग्रंथ वाचायला मिळाला. त्याचा विशेष परिणाम म्हणजे ते पोथी वाङ्‌मयातून बाहेर पडून ललित वाङ्‌मय, वैचारिक लेख वाचू लागले.

शालेय शिक्षण संपल्यावर कायद्याचा अभ्यास करण्यासाठी गर्गे हैदराबादला गेले. या निराळ्या जगात त्यांना आगरकरांचे लेखन वाचायला मिळाले. त्याचबरोबर लक्ष्मणशास्त्री जोशी, श्री.म. माटे, पु.ग. सहस्रबुद्धे यांचे वैचारिक लेखनही त्यांनी वाचले. कायद्याचे शिक्षण घेत असताना गर्गे यांच्या वडिलांचे निधन झाले. त्यामुळे शिक्षण अर्धवट सोडून ते नोकरीसाठी औरंगाबादला आले.

औरंगाबादला गर्गे यांनी १९४०-१९४५मध्ये सरस्वतीभुवन शाळेत पाच वर्षे नोकरी केली. या काळात मराठवाड्यात निजामविरोधी चळवळ फार जोरात होती. त्यात सहभागी असलेल्या गोविंदभाई श्रॉफ यांच्यासारख्या विचारवंताचा सहवास त्यांना लाभला. तेथील अभ्यासवर्तुळात त्यांना मार्क्सवादाची ओळख झाली. तसेच समाजवाद, लोकशाही, रॉयिस्ट विचार यासंबंधी खूप ऐकायला मिळाले. त्याचा महत्त्वाचा परिणाम म्हणजे गर्गे यांच्यावर नवीन पुरोगामी विचारांचे संस्कार घडू लागले. मात्र ते या चळवळीत अडकून पडले नाहीत.

१९४५मध्ये औरंगाबाद येथे झालेल्या साहित्य संमेलनाचे ज्येष्ठ पत्रकार ग.त्र्यं. माडखोलकर अध्यक्ष होते; तर गर्गे संमेलनाचे कार्यवाह होते. माडखोलकरांच्या संपर्कामुळे गर्गे यांनी पत्रकारितेच्या नव्या क्षेत्रात उडी घेतली. माडखोलकरांबरोबर दै. तरुण भारतमध्ये काम करताना गर्गे यांचे समाजशास्त्र, राज्यशास्त्र आणि अर्थशास्त्र या विषयांचे वाचन, आकलन आणि व्यासंगही वाढला. या विषयांवर स्वतंत्र लेखन करण्याची कल्पना त्यांच्या मनात येथेच रुजली. मात्र १९४८च्या गांधीखुनानंतर गर्गे यांनी नागपूर सोडले आणि ते पुण्याला आले.

पुण्यात आल्यावर गर्गे दै. सकाळमध्ये रुजू झाले. सकाळचे संस्थापक, संपादक कै. ना.भि. परुळेकर यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांना पत्रकारितेचा उत्तम अनुभव मिळाला. दहा वर्षे दै. सकाळमध्ये काम केल्यावर ते दै. विशाल सह्याद्रीत गेले. १९७०मध्ये त्यांनी वृत्तपत्रातील नोकरी सोडून स्वतंत्र लेखन सुरू केले. मधल्या काळात इंग्रजी लेखक कर्नल मनोहर

माळगावकर आणि कोल्हापूरचे शहाजी महाराज यांच्या प्रेरणेने गर्गे यांनी 'करवीर रियासत' हा ग्रंथ लिहिला. त्यातून त्यांना इतिहासाची आवड निर्माण झाली आणि त्यांनी करवीरच्या इतिहासाच्या कागदपत्रांचे संपादन केले.

स्वतंत्र लेखन सुरू केल्यावर गर्गे यांनी समाजविज्ञान कोशाचा बृहदप्रकल्प हाती घेतला. १९७६ ते १९८६ या कालखंडात समाजविज्ञान कोशाचे एकूम सहा खंड प्रकाशित झाले. भारतीय भाषांतील समाजशास्त्रावरील उत्कृष्ट संदर्भग्रंथ म्हणून या कोशाला अनन्यसाधारण महत्त्व आहे.

ज्ञानलालसेसाठी केलेला संघर्ष आणि सरस्वतीची उपासना या दोन बाबी त्यांच्या जीवनाची ठळक वैशिष्ट्ये म्हणून सांगता येतील. एक समाजविज्ञान कोशकार, पत्रकार, प्रज्ञावंत आणि स्थितप्रज्ञ अशा विविध अंगांनी त्यांची नोंद घेता येते. त्यांनी केलेले ठळक काम म्हणून भारतीय समाजविज्ञान कोशाच्या एकूण ६ खंडांकडे बघावे लागते.

अशा खंडातील कामात येणाऱ्या अडचणींचा विचार करता, एखादी विशिष्ट नोंद केल्यावर त्या संदर्भात वेगळा अभिप्राय देणे शक्य असते. पण एखादी नोंद करण्याविषयी सातत्याने पाठपुरावा करूनसुद्धा काम पूर्ण करून देणारी मंडळी मात्र अभावानेच आढळतात आणि संपादक म्हणून अंतिम निर्णय आपल्यालाच घ्यावा लागतो. नोंदीतील वस्तुनिष्ठता आत्यंतिक तटस्थतेने पाहावयाला हवी. काम उभे करताना सातत्याने परिश्रम घ्यावयाचे आणि शेवटी निरर्थक टीकेचे धनीही व्हायचे. असे असले तरी आपल्या कामावरची निष्ठा कुठेही ढळू न देणारा हा तपस्वी होता. कुठलाही अभिनिवेश आणि किंचितही गर्व त्यांना कधीही स्पर्श करू शकला नाही.

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी त्यांच्या कामाविषयी नोंद करताना म्हणतात, ''भारतीय समाजविज्ञान कोश हा उपयुक्त साधनग्रंथ संपादन करून श्री. स.मा. गर्गे यांनी मराठी भाषेत महत्त्वाचे कार्य केले आहे. समाजव्यवस्था, राजकीय जीवन, आर्थिक स्थिती अशा सर्व क्षेत्रांत या देशात मोठे परिवर्तन घडून येत आहे. त्याचा अन्वयार्थ समजण्यासाठी व समाजाचा सखोल अभ्यास करण्यासाठी या कोशाचा फार मोठा उपयोग होईल. सद्य:स्थितीत भारतीयांना समाजसेवेच्या अनेक क्षेत्रांत ज्या जबाबदाऱ्या पार पाडावयाच्या आहेत, त्यांचे सांगोपांग ज्ञान होण्यासाठी तर या कोशाच्या रूपाने मराठी भाषेला एक उत्कृष्ट शास्त्रीय संदर्भग्रंथाचे वरदानच लाभले आहे.''

स.मा. गर्गे या समाजविज्ञान कोशाच्या कामामुळे चिरंजीव झाले असले, त्यांची अन्य कामेही त्याच तोडीची आहेत. विशेषतः रियासतकार सरदेसाई यांनी लिहिलेल्या 'रियासती' म्हणजे इ.स. ११०० ते इ.स. १८५७ या कालखंडाचा इतिहास आहे. या रियासतीच्या बारा खंडांचे नव्या संदर्भासह संपादनाचे काम त्यांनी हाती घेतले. यातील आठ खंडांचे काम ते पूर्ण करू शकले. कोल्हापूरच्या छत्रपतीच्या घराण्याचा इतिहास त्यांनी करवीर रियासतीच्या स्वरूपात लिहून पूर्ण केला. त्यामध्ये सन १७१० ते १९४९ या काळातील इतिहास त्यांनी लिहिला. कर्नल मनोहर माळगावकर यांची प्रेरणा या कामी होती. याशिवाय 'हिंदूराव घोरपडे घराण्याचा दक्षिणेकडील इतिहास' या महत्त्वपूर्ण ग्रंथाबरोबरच त्यांनी गोपाळ गणेश आगरकर यांच्या संदर्भात केलेले लेखन आणि 'राज्यशास्त्राचा विकास' (१९५४), समाजवादी समाजरचना (१९५६), 'भारतीय राज्यघटनेचा इतिहास' (१९६१), 'स्वप्न आणि सत्य' (१९६५) 'सुलभ राज्यशास्त्र' (१९६७) यासारखे अन्य काही ग्रंथ त्यांनी लिहिले.

त्यांची पत्रकारिता विधायक आणि पुरोगामी विचारांची होती. 'शांतिपर्वातील कथा' यामध्ये त्यांनी रूपककथा लिहून समाजस्थितीवर भाष्य केले. स.मा. गर्गे यांना जे सन्मान प्राप्त झाले आणि त्या वेळी त्यांनी जे विचार व्यक्त केले, ते नवी दिशा देणारे ठरले. 'आकांक्षा पत्रकारितेच्या' याविषयी त्यांचे चिंतन मराठी पत्रकार परिषदेच्या अध्यक्षीय भाषणांच्या स्वरूपात उपलब्ध आहेत. महाराष्ट्र इतिहास परिषदेच्या व्यासपीठावर

आपले विचार व्यक्त करताना त्यांनी असेच मूलगामी चिंतन केल्याचे दिसते. संपूर्ण इतिहासाच्या व्याख्येत बहुजन समाजस्थितीचा उल्लेख महत्त्वाचा आहे. राजवाडे यांच्या पुढे जाऊन समाजाचा संपूर्ण इतिहास म्हणजे सामाजिक परिवर्तनाचा इतिहास, तात्पर्याने बहुजन समाजस्थितीचा आणि त्या स्थितीत परिवर्तन घडवून आणणाऱ्या विचारांचा इतिहास असायला हवा. इतिहासाच्या घडणीत मुख्य घटक असतो तो समकालीन वैचारिक प्रेरणांचा. अशा प्रेरणांचा शोध घेण्यानेच सामाजिक घटनांचा अर्थ समजू शकतो. तसेच समाज परिवर्तनाची दिशा, गती, कार्य आणि परिणाम यांचेही आकलन होऊ शकते, अशा मूलगामी बाबी ते स्पष्ट करतात.

महाराष्ट्राच्या इतिहासाच्या संदर्भात १३व्या शतकापासून १९व्या शतकापर्यंत ७०० वर्षांच्या कालखंडात तीन प्रमुख सामाजिक परिवर्तने घडली, असे ते स्पष्ट करतात. यादवकालाच्या उत्तरार्धात इस्लामी आक्रमणाच्या वेळी पहिले परिवर्तन घडले. त्याला ज्ञानदेव आणि त्यांच्या समकालीन तत्त्वचिंतकांनी केलेल्या परिवर्तनाचे स्थान आणि कार्य महत्त्वाचे होते. त्यातून निर्माण झालेला भक्तिमार्गाचा प्रवाह समाजजीवन ढवळणारा होता. छत्रपती शिवाजी महाराजांच्या वेळी दुसरे परिवर्तन घडले व १९व्या शतकाच्या प्रारंभी पाश्चात्त्य विचारांच्या आणि विज्ञानाच्या, तत्त्वज्ञान्यांच्या प्रेरणेतून तिसरे परिवर्तन झाले. अशा प्रकारचे त्यांनी व्यक्त केलेले विचार हे त्यांच्या सातत्याने केलेल्या सखोल चिंतनाचा परिपाक ठरतो. स.मा. गर्गे वयाच्या ८५व्या वर्षी अनंतात विलीन झाले.

एकूण आपल्या चिंतनशील शैलीने आणि सततच्या ज्ञानसाधनेने महाराष्ट्राच्या इतिहास अभ्यासकांना आणि एकूणच बहुविध क्षेत्रात कार्य करणाऱ्या अनेकांना प्रेरणादायी ठरणारे मोठे काम स.मा. गर्गे यांच्या हातून झाले आहे.

— कविता भालेराव/
डॉ. अरुणचंद्र शं.पाठक

## गुंथर, सोन्थायमर
**इतिहास संशोधक, लेखक**
**२१ एप्रिल १९३४ – १ जून १९९२**



प्राच्यविद्या आणि भारतीय विद्या या विषयांवर पाश्चात्त्य संशोधकांनी गेल्या शे-दीडशे वर्षांत प्रचंड संशोधन केले. विशेषत: जर्मन संशोधकांनी संस्कृत भाषेच्या आश्रयाने भारतीय संस्कृतीचा मागोवा अधिक स्वरूपात घेतला. पण मराठी संस्कृतीसाठी वाहून घेतलेल्या आणि 'गुरुणां गुरू' म्हणून ओळखले गेलेल्या, जर्मनी येथील हायडेलबर्गच्या डॉ. गुंथर सोन्थायमर यांचे नाव अजरामर झाले आहे. लोकदेवता, जत्रा-यात्रा, श्री विठ्ठल, खंडोबा यासारखी लोकप्रिय दैवते, धनगर समाजाची संस्कृती, त्यांची लोकगीते अशा अनेक विषयांवर प्रचंड स्वरूपात काम करणाऱ्या ह्या संशोधकाचे वस्तुसंग्रहालयाच्या स्वरूपात स्मारक करण्याचे मराठी लोकांनी ठरवले असून ते मूर्त स्वरूपात आणण्याचा प्रयत्न चालू आहे.

डॉ. सोन्थायमर यांना लंडनमधून पीएच.डी. मिळाल्यावर १९५४ साली ते पुण्यात आले. पुण्यात येण्यामागे डॉ. रा.ना. दांडेकर, डॉ. डी.डी. कोसंबी आणि डॉ. शं.गो. तुळपुळे यांच्याकडून क्रमश: संस्कृत, गणित आणि प्राचीन मराठी शिकण्याचा त्यांचा मानस होता. धर्मशास्त्राचा अधिक अभ्यास करण्यासाठी पुण्याच्या कायदा महाविद्यालयामध्ये ते दाखल झाले. प्राचार्य पंडित यांनी त्यांना प्रेम-जिव्हाळा दिला. धर्मशास्त्राच्या समस्या सोडवण्यासाठी ते म.म. काणे यांच्याकडे मुंबईस जात. त्या निमित्ताने भांडारकर संस्थेत त्यांचे येणे-जाणे वाढले. डॉ. दांडेकरांशी दृढ संबंध आले. दांडेकर १९३८मध्ये हायडेलबर्ग (जर्मनी) विद्यापीठातून पीएच.डी. करून आले होते. ते संस्थेचे सचिव होते. कोसंबी यांच्याकडे गणित शिकतानाच सोन्थायमर यांची लोकदेवतांच्या अभ्यासाची गोडी

वाढली. पुस्तकी ज्ञानापेक्षा भटकंतीतून मिळणारा अनुभव त्यांना महत्त्वाचा वाटला. त्यातून लोकदैवते विरोबा-विठोबा, खंडोबा, वीरगळ, धनगर जमात इत्यादी विषयांचा त्यांचा अभ्यास सुरू झाला आणि त्यांच्या रचनांचा अभ्यास करतानाच श्रीविठ्ठलाचे मूळ एका वीरगळात आहे असा धक्कादायक सिद्धान्त त्यांनी मांडला. ज्या ओव्यांवर-संदर्भांवर तो आधारित होता, तो भाग पुढे म.म. मिराशींनी प्रक्षिप्त ठरवल्याने त्यावर पुढे काही झाले नाही. सोन्थायमर यांची जन्मभूमी हायडेलबर्ग त्यांच्या व्यासंगाने प्राचीन मराठी भाषेची कर्मभूमी बनली. १९७० सालानंतर पश्चिम जर्मनीतून त्यांच्या मार्गदर्शनाखाली पीएच.डी. करण्यासाठी विविध विद्वान पुण्यात येऊन राहिले. त्यामध्ये संतसाहित्य आणि प्राचीन मराठी हाच प्रमुख विषय होता. डॉ. स्कोय हॉक (एकनाथी भागवत), डॉ. मायकेल मार्टीनस (श्रीगोंद्याचा शेख महंमद), डॉ. जेनसन (तुळजाभवानी), डॉ. किट्टेकोनिग (लोकदेवता) आणि बरेच विद्यार्थी त्यांनी महाराष्ट्रात अभ्यासासाठी आणले.




१९८८ साली हायडेलबर्गमध्ये सोन्थायमर यांनी महाराष्ट्र सांस्कृतिक आणि संस्था परिषदेचे पहिले अधिवेशन आयोजले होते. त्यात जगभरातून पन्नास अभ्यासक महाराष्ट्र संस्कृतीवर शोध-निबंध वाचण्यासाठी हजर राहिले होते. डॉ. दांडेकर आणि डॉ. शं.गो. तुळपुळे या परिषदेला हजर होते. एक आंतरराष्ट्रीय भक्ती परिषद त्यांनी हायडेलबर्गलाच घेतली होती. विशेष म्हणजे वारकरी संप्रदायाचे ह.भ.प. सोनोपंत दांडेकरांच्या कीर्तनाचे ध्वनिमुद्रण त्यांनी तिथे ऐकवले. १९३८मध्ये डॉ. दांडेकरांना वेदावर पीएच.डी. मिळाली होती. त्याला १९८८मध्ये पन्नास वर्षे पूर्ण झाली आणि त्याच क्षेत्रात ते सातत्याने काम करीत आहेत, हे पाहून हायडेलबर्ग विद्यापीठाने या पदवीच्या नूतनीकरणाचा समारंभ योजला होता. त्यातही डॉ. सोन्थायमर यांचा पुढाकार होता.

खंडोबा आणि धनगर जमात यांचा अभ्यास करताना सातत्याने त्यांचा मुक्काम जेजुरीत असे. तिथल्या वास्तव्यात खेड्यातील जानपद मराठी भाषा त्यांच्या तोंडी असे. ‘व्हय’, ‘नगं’, ‘लई’ आणि शहरात इंग्रजी, विद्यार्थ्यांशी जर्मन असे बहुविध दर्शन त्यांच्या सहवासात मिळे.

लोकदेवतात वीरगळ (ज्यावर त्यांनी पुढे ‘हिरोस्टोन’ नावाचा संशोधनात्मक ग्रंथ काढला.) विठोबा, म्हस्कोबा, यमाई-तुकाई, मरिआई या विषयाच्या अभ्यासासाठी, देवतांच्या स्थानासाठी ते महाराष्ट्र कर्नाटकात खूप हिंडले. धनगर मंडळींच्या वस्त्यावर राहिले. त्यांची गाणी ध्वनिमुद्रित केली, त्यांच्या जत्रा-यात्रात भाग घेतला, त्यावर त्यांनी संशोधनात्मक लेखन केले, शोधनिबंध वाचले. काही मंडळी तर त्यांच्या आप्तइतकी जवळची झाली होती.

पंढरपूरची वारी, पालखी सोहळा हा गुंथर यांच्या अतिजिव्हाळ्याचा विषय. वारीवर त्यांनी १९८९मध्ये एकूण दीड तासांचा एक सुंदर माहितीपट काढला. हा लघुपट प्रथम प्रदर्शित करण्याचा मान जर्मन दूरचित्रवाणीने घेतला. त्यानंतर आशय फिल्म संघटनेने खासगीत फर्गसनमध्ये हा लघुपट दाखवला. त्यावर भाष्य करण्यासाठी डॉ. सोन्थायमर उपस्थित होते. भारताच्या दूरचित्रवाणीवर तो फार उशिरा दाखवला गेला. या लघुपटात त्यांनी अनेक मान्यवरांच्या मुलाखती, आठवणी, मत-मतांतरे चित्रित केली होती. जुन्या मूर्ती (धातूंच्या), पारंपरिक गाणी, हस्तलिखिते या सर्वांचा एक उत्तम संग्रह त्यांच्याकडे निर्माण झाला होता. पुढे त्यांच्यानंतर डॉ. सोन्थायमर वस्तुसंग्रहालय काढण्याची योजना होती आणि तेही जेजुरीमध्येच. पण अद्याप त्याला मूर्त स्वरूप आलेले नाही. डॉ. दांडेकरांच्या पीएच.डी.च्या नूतनीकरणाच्या कामात हायडेलबर्गमध्ये गुंथर यांनी बरीच धावपळ केली. असे काही होणार आहे याची डॉ. दांडेकरांनी पुण्यात कोणासही चाहूल लागू

दिली नाही. पण समारंभाचे प्रत्यक्षदर्शी डॉ. शं.गो. तुळपुळे यांनी पुण्यात आल्यावर 'सकाळ'मध्ये यावर सविस्तर लेख लिहिला. दांडेकरांचे सर्वत्र अभिनंदन झाले. पुढे दांडेकरांनी भांडारकर संस्थेमध्ये गुंथर सोन्थायमर यांच्या सत्काराचा कार्यक्रम योजला होता.

डॉ. सोन्थायमर अविवाहित होते. त्यांचे वडील तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक होते. १९८५च्या सुमाराला थोड्या फरकाने माता-पित्याचे छत्र हरपले आणि जर्मनीतील आकर्षण संपले. सोन्थायमर यांच्या संशोधनात डॉ. ॲन फेल्ड हौस यांचाही सहभाग मोठा असे. त्यांनी व्यंकटेश माडगूळकरांच्या 'बनगरवाडी'चे जर्मन भाषांतर केले होते. वीरगळावर 'हिरोस्टोन' नावाचे पुस्तकही खूप गाजले होते. डॉ. सोन्थायमर यांचे वयाच्या चोपन्नाव्या वर्षी हृदयविकाराने राहत्या घरी जर्मनीत निधन झाले. मृत्यूनंतर आपल्या कलेवराचे दहन करावे आणि रक्षा जेजुरीला कऱ्हेच्या पात्रात टाकावी, असे मरण्यापूर्वी त्यांनी लिहून ठेवले होते. त्यानुसार अस्थी पुण्यात भांडारकर ग्रंथालयात ठेवल्या होत्या. जेजुरीकरांनी गडाच्या पायथ्याला अस्थिकलशावर पुष्पवर्षाव करून त्यांना श्रद्धांजली वाहिली व कऱ्हा नदीत अस्थिविसर्जन केले. सोन्थायमर यांचे नाव आणि संशोधन अजरामर झाले.

— वा. ल. मंजूळ

## गुणे, पांडुरंग दामोदर

**भांडारकर प्राच्यविद्या संस्थेचे संस्थापक**

**मे १८८४ — २५ नोव्हेंबर १९२२**

पायाभरणी करून शून्यातून विश्व उभे केलेल्या भांडारकर प्राच्यविद्या संस्थेचे ते संस्थापक आणि पहिले मानद सचिव होते. पांडुरंग दामोदर गुणे यांचा जन्म नगर जिल्ह्यात राहुरीस झाला. त्यांच्या पत्नी इंदिराबाई (माहेरचे नाव चंपा) श्रीधर वामन कीर्तने यांच्या कन्या होत्या. यांची कन्या मधुमालती गुणे (वाडिया कॉलेजचे प्राचार्य एन.जी. सुरू यांच्या पत्नी) स्वत:च्या



हिमतीवर बी.जे. मेडिकल महाविद्यालयामधून L.C.P.S. डॉक्टर झाल्या आणि पुढे 'डब्लिनचा रोटंडा' डिप्लोमा मिळवला. १९३४च्या सुमारास डेक्कम जिमखाना, पुणे येथे 'इंदिरा प्रसूतिगृह' काढून व्यवसायात उत्तम यश मिळवले. दुसरी कन्या कुमुदिनी अकालीच (वयाच्या सोळाव्या वर्षीच) वारली.

पांडुरंगपंतांना तात्यासाहेब गुणे या नावाने संबोधले जात असे. दामूकाकांचे ते शेवटचे पुत्र असल्याने फारच लाडके होते. प्राथमिक शिक्षणानंतर तात्यांनी नगर एज्युकेशन सोसायटीत पुढील शिक्षण घेतले. मुंबई विश्वविद्यालयातून ते १९००मध्ये मॅट्रिक झाले. संस्कृतच्या आवडीमुळे त्यांना दुसरी 'जगन्नाथ शंकरशेठ' शिष्यवृत्ती मिळाली. पुढे मुंबईच्या विल्सन महाविद्यालयामधून पहिल्या वर्गातून बी.ए. उत्तीर्ण झाले. महाविद्यालयीन जीवनात त्यांनी संस्कृतची अनेक पारितोषिके मिळवली. एम.ए. करताना त्यांना दक्षिणा फेलोशिप मिळाली. १९०६मध्ये ते एम.ए. उत्तीर्ण झाले. या परीक्षेसाठी सर भांडारकर परीक्षक होते. त्यांनी या विद्यार्थ्याचा खूप गौरव केला.

पौर्वात्य ज्ञानाच्या संशोधनाचा जगभर प्रसार व्हावा म्हणून त्यांनी डी.ई. सोसायटीत प्रवेश केला. अनेक सरकारी नोकऱ्या सोडून फर्गसन महाविद्यालयामध्ये आणि न्यू इंग्लिश स्कूलमध्ये ते शिकवू लागले. सन १९०८पासून ते केवळ महाविद्यालयाचे काम पाहू लागले. याच साली ते संस्थेचे आजीव सदस्य बनले. विनोदी मोकळा स्वभाव, आकर्षक पद्धतीने शिकवणे यामुळे ते विद्यार्थिप्रिय बनले.

भारती विद्या आणि प्राच्यविद्यांच्या प्रसाराची इच्छा प्रबळ असल्याने १९१० साली त्यांना हिंदुस्थान सरकारची शिष्यवृत्ती मिळाली आणि जर्मन भाषा शिकून ते जर्मनीच्या लिपझिग येथे प्रा. बुगमान यांच्या

मार्गदर्शनाखाली तीन वर्षे केवळ भाषाशास्त्राचा अभ्यास केला. त्यासाठी ते लॅटिन आणि ग्रीक भाषाही शिकले. दुर्दैवाने १९१२च्या सुमारास त्यांची प्रकृती बिघडली. त्यांना क्षयाची (टी.बी.ची) बाधा झाली. तीन महिने अभ्यास सोडून वैद्यकीय उपचार घ्यावे लागले. तिसऱ्या वर्षाच्या शेवटी भाषाशास्त्रावरचा प्रबंध पूर्ण करून त्यांनी तो विद्यापीठाला सादर केला व त्यांना 'डॉक्टरेट' मिळाली. जर्मनीस जाण्यापूर्वी ते काही दिवस लंडनला गेले होते. त्यामुळे अनेक ब्रिटिश आणि जर्मन संशोधकांची मैत्री त्यांनी संपादन केली. ती त्यांना भांडारकर संस्थेच्या उभारणीत उपयोगी पडली आणि त्याचे मुख्य कारण त्याचे आकर्षक व्यक्तिमत्त्व आणि संभाषण पद्धती होय.

१९१४ मध्ये हिंदुस्थानास परत आले. इकडे आल्यावर त्यांनी 'माझा युरोपचा प्रवास' (१९१५) व 'जर्मनीतील लोकशिक्षण' (१९१६) ही दोन पुस्तके लिहिली. जर्मनीत असताना त्यांनी तेथे 'भाषाशास्त्र' या आपल्या आवडत्या विषयाचे संशोधनपूर्वक अध्ययन केले. भाषाशास्त्रावर त्यांनी लिहिलेले 'An Introduction to Comparative Phylology' हे इंग्रजी पुस्तक व त्या विषयावरील त्यांचे अनेक इंग्रजी-मराठी निबंध यांचा त्या विषयावरील अधिकार दाखवण्यास पुरेसे आहेत. प्राकृत भाषांचा त्यांचा व्यासंगही वाखाणण्यासारखा होता. भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिर, पुणे या संस्थेच्या संस्थापकांपैकी ते एक प्रमुख होते (१९१६). मुंबई विद्यापीठात विल्सन फॉयलॉजिकल लेक्चर्स देण्याचा मानही यांना मिळाला होता.

पांडुरंग गुणे यांनी मराठी कवितेच्या पूर्वीच्या व हल्लीच्या स्थितीविषयी तुलनात्मक प्रासंगिक विचार (महाराष्ट्र साहित्य पत्रिका), भाषाशास्त्र व निरुक्ती (विविध ज्ञानविस्तार), मराठी भाषेचा कालनिर्णय (भा.इ.सं.मं. षष्ठ इतिवृत्त), अपभ्रंश भाषेतील वाङ्मय (भा.इ.सं.मं. सप्तमवृत्त) व अनेक ग्रंथांची परीक्षणे लिहिली आहेत.

१९१३ ते १९२० हा त्यांच्या कर्तबगारीचा मुख्य काल. १९१६ साली त्यांनी पुढाकार घेऊन आनंदाश्रम पुण्याच्या संस्कृत विद्वानांची बैठक बोलावली. त्यांना डॉ. श्री.कृ. बेलवलकर यांचे साहाय्य लाभले. ६ जुलै १९१७ रोजी भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्था स्थापन झाली. सुरुवातीपासूनच तात्यासाहेब संस्थेचे महासचिव बनले. १९१७मध्येच अ.भा. प्राच्यविद्येचे पहिले अधिवेशन पुण्यात संस्थेच्या समोरच भरले होते. सर भांडारकर पहिले अध्यक्ष आणि डॉ. गुणे पहिले सचिव होते. या परिषदेच्या निमित्ताने अनेक विद्वान त्यांना भेटले. त्यांनी संस्था उभारणीसाठी साहाय्य देऊ केले. तात्यांनी उभी केलेली प्राच्यविद्या परिषद एक वर्षाआड भारताच्या विविध विद्यापीठामार्फत भरत असते. संस्थेचे सचिव असताना त्यांनी विविध संशोधन प्रकल्प सुरू केले. त्यामध्ये 'महाभारताची चिकित्सक आवृत्ती'चे मोठे काम संस्थेकडे आले. अनेक पुस्तक प्रकाशने, संशोधन प्रकल्प, त्याचबरोबर विद्यार्थ्यांना शिकवणे या सर्व गोष्टी ते मनापासून करीत. विशेषत: वेद शिकवताना ते तल्लीन होऊन जात. तात्यांना गरीब विद्यार्थ्यांचा मनापासून कळवळा. त्यामुळे ते सदैव गरीब विद्यार्थ्यांना मदत करीत.

१९२० साली क्षयाने पुन्हा डोके वर काढले. बराच काळ ते अंथरुणावर पडून होते. शस्त्रक्रियाही करावी लागली. नंतर हवाबदलासाठी, कोरड्या स्वच्छ हवेसाठी ते पंढरपूरला चुलत बंधू डॉ. त्र्यंबकराव (अण्णा) यांच्याकडे वास्तव्याला आले. तेथे ते खूपच बरे झाले. मार्च १९२१मध्ये ते पुण्यास परतले. पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयामधून सांगलीला विलिंग्डन कॉलेजमध्ये त्यांची बदली झाली. सांगलीची हवा त्यांना मानवली नाही. २५ नोव्हेंबर १९२२ रोजी ते निवर्तले. मृत्यूच्या अगदी शेवटच्या क्षणापर्यंत ते लेखन करीत होते. प्राकृत भाषेवर एक पुस्तक छपाईच्या अवस्थेत होते. अवघ्या ३८ वर्षांच्या जीवनात फार मोठा 'जीवनठसा' त्यांनी लोकांसमोर ठेवला. विद्वान असून गर्व नाही, मोठेपणाचे वलय नाही. सर्वांशी मिळून मिसळून वागण्याचा

स्वभाव. त्यामुळे सर्वांना खूपच हळहळ वाटली. फर्गसन महाविद्यालयाच्या डिसेंबर १९२२च्या अंकात संपादकीय लेखात त्यांचा गौरव केला आहे. त्यांच्या अकाली जाण्याने प्राच्यविद्या क्षेत्राला मोठाच धक्का बसला.

पांडुरंग गुणे यांचे महत्त्वाचे ग्रंथ भांडारकर संस्थेच्या संग्रहात सांभाळले गेले आहेत. काहींच्या नव्या आवृत्त्याही काढल्या आहेत. काही नावे अशी - 'तुलनात्मक भाषाविज्ञान' (१९७४), 'महाभारताच्या नवीन चिकित्सक आवृत्तीचा उपयोग', 'पहिल्या अ. भा. प्राच्यविद्या परिषदेचे प्रोसीडिंग (१९२२), तुलनात्मक भाषा शास्त्र (१९१८), गीतेवरील लेखसंग्रह (१९५२).

एका महान पंडिताला, कार्यशील विद्वानाला अपुऱ्या आयुष्यामुळे अर्धवट कार्यनिवृत्ती घ्यावी लागली, याचा खेद भांडारकरांच्या संशोधकांना सतत जाणवत राहील.

- वा.ल. मंजूळ

## गुप्ते, रमेश शंकर

**ख्यातनाम इतिहासवेत्ता**

**२७ सप्टेंबर १९२४ – २९ ऑगस्ट १९७५**



रमेश शंकर गुप्ते हे जबरदस्त आत्मविश्वास असलेले, अपार उत्साही आणि झपाटलेले, कधीकधी तर अतिक्रियाशील असे व्यक्तित्व होते. प्रचंड बौद्धिक ताकदीमुळे विषयासंबंधी त्यांची ठाम मते असत. प्रचलित राजकीय व आर्थिक परिस्थितीची सूक्ष्म पारख, इंग्रजी भाषेवर दांडगे प्रभुत्व, उत्तम वक्तृत्व कौशल्यामुळे श्रेष्ठ वाक्पटुत्व कमावलेले गुप्ते हे श्रोतृसमुदायाला जागीच खिळवून ठेवीत असत.

रमेश शंकर गुप्ते यांचा जन्म बडोदा (वडोदरा) येथे झाला. एकूण आठ भावंडांमध्ये ते सर्वांत लहान असून सर्वांचे लाडके होते. त्यांचे शालेय शिक्षण बडोदे येथेच झाले. नंतर त्यांच्या वडिलांनी मुंबईला स्थलांतर केले. हे स्थलांतर डॉ. गुप्ते यांच्याकरिता वरदान ठरले; कारण त्यांना उत्कृष्ट वातावरणात शिक्षण मिळाले. त्यांचे पदवीपर्यंतचे शिक्षण प्रसिद्ध रुइया महाविद्यालयात झाले आणि पदव्युत्तर शिक्षण मुंबई विद्यापीठात झाले. येथील स्वातंत्र्य चळवळीशी युवक रमेश समरस झाले आणि पोषक बौद्धिक वादविवादांत सहभागी झाले. बुद्धिवाद आणि तर्कशास्त्र त्यांच्या भावी जीवनात लाभदायी झाले. वादविवादात भाग घेताना तार्किकता व भावात्मकता यांतील सूक्ष्म फरक त्यांच्या ध्यानात आला.

पदव्युत्तर शिक्षण पूर्ण केल्यावर गुप्ते लगेच काम मिळण्यासाठी प्रयत्न करू लागले. अगोदरच्या त्यांच्या काही कामांचे अनुभव मजेशीर होते. पोलीस अधिकारी प्रशिक्षणार्थी ही त्यांची पहिली नोकरी. प्रशिक्षण घेण्यासाठी ते नागपूरला रवाना झाले; परंतु पहाटेच्या वेळची कष्टदायक कामे, कवायती, व्यायाम त्यांना फार त्रासदायक वाटे. या जाचातून सटकण्याचे ठरवून त्यांनी पलायन केले. बडोद्याच्या क्षेत्रात नडियाद येथे त्यांना डाकूंशी सामना करावा लागला. तिथल्या महाविद्यालयात ते व्याख्याता म्हणून कार्यरत होते; पण डाकूंचे रात्रीचे हल्ले भयभीत करीत, त्यामुळे गुप्ते शेवटी औरंगाबादला पोहोचले.

औरंगाबादच्या वास्तव्यात एका मागोमाग एक यशाची पायरी चढताना त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची जडणघडण झाली. ते मिलिंद कला आणि विज्ञान महाविद्यालयात व्याख्याते म्हणून प्रारंभी रुजू झाले आणि नंतर ते देवगिरी महाविद्यालयात गेले. या दोन्ही महाविद्यालयांत मिळून त्यांनी चौदा वर्षे काढली. देवगिरी महाविद्यालयात व्याख्याते म्हणून कार्यरत असताना त्यांनी एलोरा येथील लेण्यांतील मूर्तिशिल्प विषयात डॉक्टरेट पूर्ण केली आणि १९६२ मध्ये त्यांना डॉक्टरेट पदवी प्रदान करण्यात आली. त्याच वर्षी मुंबई येथील तारापोरवाला या विख्यात प्रकाशकांनी 'अजंठा, एलोरा आणि औरंगाबाद लेणी' हे त्यांचे पुस्तक

प्रकाशित केले आणि १९६५ मध्ये याच प्रकाशकांनी डॉ. गुप्ते यांचा प्रबंध पुस्तकरूपाने प्रकाशित केला. महाविद्यालयामधील त्यांच्या आरंभीच्या काळात त्यांनी विद्यार्थ्यांसाठी 'समाजशास्त्र आणि नागरिकशास्त्र' व 'भारतीय राज्यघटना' या नावाची दोन पाठ्यपुस्तकेही प्रकाशित केली होती.

यानंतर नव्यानेच स्थापन झालेल्या मराठवाडा विद्यापीठात १९५९ मध्ये डॉ. गुप्ते यांची निवड इतिहास विभाग प्रमुख म्हणून झाल्याने त्यांच्या शैक्षणिक व संशोधनकार्याच्या योगदानाला फळ मिळाले. त्यांनी आपल्या विद्यापीठीय नोकरीत वेगाने प्रगती केली; कारण १९६६ मध्ये अमेरिकेने नॉर्थ कॅरोलिना राज्यातील विन्स्टन सालेम युनिव्हर्सिटीत अभ्यागत प्राध्यापक या नात्याने डॉ. रमेश गुप्ते यांना आमंत्रित केले. ते विन्स्टन सालेम युनिव्हर्सिटीत एक वर्ष व नंतर बून युनिव्हर्सिटीत एक वर्ष होते. त्यांनी भारतीय कला, वास्तुशिल्प, संस्कृती हे विषय शिकवले आणि नंतर ते साम्यवादी चीन आणि दक्षिण-पूर्व आशियाकडे वळले. या दोन वर्षांत त्यांनी अमेरिकेच्या अनेक संस्थानांचा दौरा करून विविध विद्यापीठे आणि महाविद्यालयांतून व्याख्याने दिली. यांत मिशिगन व वॉशिंग्टन युनिव्हर्सिटीचाही समावेश होता आणि तेथील डॉ. रमेश गुप्ते यांच्या व्याख्यानांचे खूप कौतुकही झाले.

अमेरिकेतून परतल्यावर त्यांच्यावर चीनचा बराच प्रभाव पडला आणि त्यामुळे शैक्षणिक क्षेत्रातील आपले लक्ष चीनसंबंधी पुस्तकांचे लेखन करण्याकडे वळविले. त्यांनी चीनवर पुस्तके प्रकाशित केली. यांत चीनमधील राष्ट्रवाद आणि साम्यवाद, अर्वाचीन चीनचा आणि दक्षिण-पूर्व आशियाचा इतिहास ही १९७२-७३ मधील पुस्तके होत. १९७२ मध्येच त्यांचे 'हिंदू, बौद्ध आणि जैन लेणी' या नावाचे पुस्तकसुद्धा प्रसिद्ध झाले. मुळातच संशोधक असलेल्या डॉ. गुप्ते यांनी आयुष्यभर संशोधनपर लेख लिहिले, जे राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावरच्या वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झाले. त्यांचे संशोधनपर लेख, विदेशी घडामोडींचे अहवाल (फॉरेन अफेअर्स रिपोर्ट) राजनीतिशास्त्राचा इतिहास आणि साम्यवादी चीन, भारतीय दैनिकांतून, भांडारकर ओरिएंटल इन्स्टिट्यूटच्या वार्षिकांमधून प्रसिद्ध झाले.

गुप्ते यांनी स्वत:ला शिक्षण व संशोधनापुरतेच मर्यादित न ठेवता उत्खननाकडेही लक्ष वळविले. नागपूर व मराठवाडा विद्यापीठांनी १९६७ मध्ये संयुक्तरीत्या पुरातन स्थळ 'भोकरदन' (भोगवर्दन) या ठिकाणी पुरातत्त्वीय उत्खनन केले. या जागेतून अनेक पुरातत्त्वीय संग्राह्य वस्तू हातास लागल्या.

भोकरदन उत्खननापूर्वीसुद्धा गुप्ते प्राचीन स्थळांच्या आजूबाजूला फिरत असताना अनेकदा जुनी मंदिरे, त्यांच्या स्तंभांचे अवशेष, मूर्तिकला, मध्यकालीन वाडे, की ज्यांमध्ये गहन व दुर्लभ असे नक्षीकाम नजरेस पडले. या अनाथ, स्वामिहीन संग्राह्य वस्तूंमुळे त्यांना एका ऐतिहासिक वस्तुसंग्रहालयाची कल्पना सुचली. हे करणे जरी तत्काळ शक्य झाले नाही, तरी त्यांनी विभागीय वर्गखोल्यांचे रूपांतर इतिहास वस्तुसंग्रहालयात केले. हे करण्यापूर्वी त्यांनी या गैरमालकीच्या संग्राह्य वस्तू गोळा करण्यासाठी महाराष्ट्र राज्य सरकारची परवानगी घेतली होती. थोड्याच अवधीत डॉ. गुप्ते यांनी मंदिरांचे अवशेष, सोने, रुपे, तांबे यांची नाणी, सचित्र हस्तलिखिते, मोडी लिपीतले दस्तावेज, मराठेशाहीतली अनन्य अशी रंगीत चित्रे अशी मूल्यवान संपदा संग्रहित केली. अनेक व्यक्तींनी त्यांच्याकडील संग्रह नाममात्र किमतीला त्यांना विकत दिले.

गुप्ते यांनी वस्तुसंग्रहालयाच्या स्वतंत्र इमारतीसाठीपण प्रस्ताव सादर केला होता. सांस्कृतिक आणि कला, इतिहासविषयक भारतीय राष्ट्रीय ट्रस्ट, दिल्ली यांच्या अध्यक्षांनी दिल्लीच्या राष्ट्रीय वस्तुसंग्रहालयाच्या नमुन्याप्रमाणे वस्तुसंग्रहालयाच्या भवनासाठी नकाशा बनवण्यात गुप्ते यांना मदत केली होती.

त्याच वर्षी गुप्ते यांनी पर्यटन विषयात पदविका अभ्यासक्रम सुरू केला, जो त्या काळाचा विचार करता खूपच पुरोगामी होता. हा अभ्यासक्रम नोकरीदेय

असल्याने त्याला उत्तम प्रतिसाद मिळाला. पदविका अभ्यासक्रम पूर्ण केल्यावर बहुसंख्य विद्यार्थ्यांना भारत सरकारच्या पर्यटन विभागात आणि महाराष्ट्र राज्य पर्यटन महामंडळात सरकारी नोकऱ्या मिळाल्या.

पुढे गुप्ते यांना विद्यार्थी कल्याण विभागाचे संचालक नियुक्त केले गेले. त्यांनी आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या शास्त्रीय नर्तक पथकाला आमंत्रित एका उत्सवाचे आयोजन केले. नर्तकांनी पौराणिक नृत्य, नाटक सादर केले व मराठवाड्यातील रसिकांना तासन्तास खिळवून ठेवले. प्रस्तुत आयोजनाने या क्षेत्रातल्या विद्यार्थ्यांना एका परमसुंदर सांस्कृतिक कार्यक्रमाची ओळख करून दिली.

मध्यंतरी डॉ. गुप्ते यांनी आपले शैक्षणिक कार्य चालूच ठेवले. ते युनिव्हर्सिटीच्या इतिहास अभ्यास मंडळाचे अध्यक्ष आणि उस्मानिया, मुंबई, पुणे आणि कोल्हापूरसारख्या नामांकित विश्वविद्यालयांच्या अभ्यास मंडळांचे सदस्यदेखील होते.

वयाच्या केवळ एकावन्नाव्या वर्षी एका भीषण अपघातात डॉ. गुप्ते यांचे निधन झाले. जागतिक दर्जाच्या वस्तुसंग्रहालयाचे त्यांचे स्वप्न त्यांच्या हयातीत साकार होऊ शकले नाही; परंतु १९८२ मध्ये शेवटी काही अंशी ते पूर्ण झाले.

– वि.ग. जोशी

## गुलाबराव महाराज

**सत्पुरुष 'प्रज्ञाचक्षु'**

**६ जुलै १८८१ – २० सप्टेंबर १९१५**

***☛ मुख्य चरित्रनोंद – धर्मपरंपरा खंड***

अमरावतीजवळ माधान येथे कुणबी जातीत जन्मलेल्या गुलाबरावांना चौथ्या महिन्यात अंधत्व आले व त्याच वर्षी आईचे निधन झाले. त्यामुळे त्यांच्या आजीने त्यांचा सांभाळ केला. त्यांचे आडनाव मोहाडे होते. माधान गावची पाटीलकी त्यांच्या घरात होती. त्यांना बालपणापासून 'ज्ञानेश्वरी'त गोडी वाटू लागली. एका आख्यायिकेनुसार ज्ञानेश्वरांनी स्वप्नात येऊन त्यांना वैदिक धर्म व कृष्णभक्ती यांचा उपदेश करण्याची आज्ञा



केली. तेव्हापासून ते स्वत:ला 'ज्ञानेश्वरकन्या' व 'श्रीकृष्णपत्नी' समजू लागले व म्हणून मंगळसूत्र, कुंकू व वेणी अशी सौभाग्यलेणी ते वापरू लागले. त्यांचे आचरण श्रौत परंपरेस धरून व अतिशय शुद्ध होते. ज्ञानेश्वरांच्या अनुग्रहानंतर त्यांना सांख्ययोग व वेदान्त या गहन विषयांचे ज्ञान प्राप्त झाले व तेच त्यांनी लोकांपर्यंत पोहोचवले. अशा ज्ञानप्राप्तीनंतर नाश पावत नाही, हा भक्तिसिद्धान्त मांडून त्यांनी मधुराद्वैत दर्शनाचा पुरस्कार केला. यासाठी त्यांनी शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाचा आधार घेतला होता.

सांख्य, योग वगैरे षड्दर्शने परस्परपूरक असल्याचे त्यांचे म्हणणे होते. सर्वधर्मसमन्वयवादी भूमिका त्यांनी मांडली होती. त्या भूमिकेनुसार हिंदू, बौद्ध, जैन, ख्रिस्ती, इस्लामी वगैरे धर्म व भारतातील नानाविध धार्मिक संप्रदाय हे वैदिक धर्माच्या एकेका अंशावर उभारले आहेत, असे त्यांचे म्हणणे होते. २५०० वर्षांपूर्वी वैदिक धर्मच फक्त विश्वव्यापक होता, असे ते म्हणत.

डार्विनचा उत्क्रांतिवाद, स्पेन्सरचे तत्त्वज्ञान इ. पाश्चिमात्य विचारांचे त्यांनी खंडन केले होते. आर्य बाहेरून येथे आलेला एक वंश आहे, हे मॅक्स म्यूलर व लोकमान्य टिळक यांचे मत त्यांना मान्य नव्हते. गणित, रेडियम, ध्वनिशास्त्र, ईथर, इलेक्ट्रॉन, उष्णता-गति-प्रकाश, विमानविद्या, विज्ञान इ. आधुनिक वैज्ञानिक विचार प्राचीन भारतीय ग्रंथांत आढळतात, असे त्यांचे म्हणणे होते. मात्र खंडित परंपरेमुळे त्यांचा मुळातून अभ्यास विस्तार केल्यास नवीन भौतिक शोध लागून भारतीय भौतिकशास्त्राची परंपरा पुढे चालू राहील, असेही त्यांना वाटत असे. या रीतीने भारतीय शास्त्रातून अशी परंपरा प्रगत होऊ शकेल, असे गुलाबराव महाराज यांचे प्रतिपादन होते.

गुलाबराव महाराजांनी जवळजवळ १२५ पुस्तके लिहिली. सूत्रग्रंथ, निबंध, प्रश्नोत्तर, पत्रे, आख्याने, नाटके, लोकगीते, (लावण्या), प्रकरणे, व्याकरण, कोश, आत्मचरित्र इ. प्रकारचे लेखन त्यांनी केले. त्यांनी जवळजवळ सहा हजार पृष्ठे लिहिली असून त्यात २७ हजार ओव्या, प्रत्येकी अडीच हजार अभंग व पदे, तीन हजार श्लोकादी रचना आहेत. 'अलौकिकव्याख्याने' (१९१२), 'साधुबोध' (१९१५), 'कुंज' (१९१८), 'संप्रदाय सुरतरु' (१९९१) हे त्यांचे अधिक महत्त्वाचे ग्रंथ आहेत. त्यांच्या निधनानंतर १९६४पर्यंत हा संप्रदाय श्री बाबाजी महाराज पंडितांनी चालवला. मात्र नंतर या संप्रदायाला अधिकारी लाभला नाही; तथापि उत्सवादी कार्यक्रम मात्र अमरावतीला चालतात. अमरावतीतील श्रीज्ञानेश्वर मधुराद्वैत सांप्रदायिक मंडळ हे काम करते. कात्यायनी व्रत, शिवरात्र, श्रीकृष्णजन्म वगैरे उत्सव या मंडळातर्फे साजरे करतात. तसेच या संप्रदायाच्या ग्रंथालयाचे जतन करणे आणि पुस्तके प्रकाशित करणे ही कामेही हे मंडळ करते.

– संपादित

## गोखले, शोभना लक्ष्मण

**पुराभिलेख व नाणकशास्त्र संशोधक**

**१९२८ – २०१३**



शोभना गोखले यांचा जन्म सांगली येथे झाला व त्यांचे शिक्षण अमरावती येथे झाले. विवाहानंतर त्यांनी डेक्कन महाविद्यालयामधून प्रथम प्राचीन इतिहास व पुरातत्त्व या विषयात एम.ए. व १९६० मध्ये डॉक्टरेट या पदव्या संपादन केल्या. त्यांचा डॉक्टरेटसाठीचा विषय मध्य प्रदेशातील सांस्कृतिक व ऐतिहासिक भूगोल असा होता. प्रबंध पूर्ण होताच डेक्कन महाविद्यालयात त्या १९६०मध्येच व्याख्याता या पदावर रुजू झाल्या व तेथूनच १९८८ मध्ये निवृत्त झाल्या. या काळात त्यांनी पुराभिलेखविद्या (Epigraphy) व नाणकशास्त्र (Numismatics) या दोन क्षेत्रांत संशोधनाचे व अध्यापनाचे कार्य केले.

शोभना गोखले यांनी १९६० ते १९६८ या काळात प्रथम विदर्भात व नंतर गुजरातमध्ये अभिलेखांवर संशोधन केले. या दरम्यान त्यांनी वाकाटक, क्षत्रप व अभीर यांच्या इतिहासांमध्ये मोलाची भर घातली. कोकणातील ताम्रपटांचे विस्तृत अध्ययन (१९६८-१९७२) केल्यानंतर त्यांनी १९७२ ते १९७६ या काळात मराठवाड्यात काम करून राष्ट्रकूट राजवंशासंबंधी अभिलेखीय संशोधन केले. तसेच त्यांनी पंढरपूर येथील शिलालेखांचे संपादन केले.

शोभना गोखले यांचे इतिहास व पुरातत्त्व यांतील सर्वांत महत्त्वाचे कार्य पश्चिम महाराष्ट्रात आहे. त्यांनी १९७६पासून सातत्याने कान्हेरी, जुन्नर, नाशिक व इतर ठिकाणी केलेल्या अभिलेखीय संशोधनामुळे पश्चिम महाराष्ट्रातील बौद्ध धर्माच्या इतिहासाविषयी मोलाची माहिती प्रकाशात आली. तसेच सातवाहन राजवंशाच्या सांस्कृतिक इतिहासात मोलाची भर पडली.

क्षत्रप राजवंशाच्या नाणेनिधीच्या एका (Coin hoard) अभ्यासाने शोभना गोखले यांच्या नाणकशास्त्रातील संशोधनाला १९७४मध्ये सुरुवात झाली. त्यांनी सेवानिवृत्त होण्यापूर्वी कलचुरी, क्षत्रप व सातवाहन या राजवंशाच्या नाण्यांचा अभ्यास करून अनेक शोधनिबंध प्रकाशित केले.

सेवानिवृत्त झाल्यानंतरही शोभना गोखले कार्यरत होत्या. त्यांनी पुणे येथील भारत संशोधक मंडळाच्या अध्यक्षपदाची जबाबदारी पार पाडली. त्या रॉयल न्युमिस्मॅटिक्स सोसायटीच्या फेलो होत्या. पुराभिलेखविद्या आणि नाणकशास्त्र या दोन क्षेत्रांत शोभना गोखले यांना बिडुल्फ पदक (१९८५) व परमेश्वरीलाल पदक (२००६) असे मानसन्मान मिळाले आहेत.

– डॉ. प्रमोद जोगळेकर

## गोखले, वासुदेव विश्वनाथ

***बौद्धविद्या पंडित***

**२१ मार्च १९०० – मृत्युदिनांक अनुपलब्ध**



बौद्ध त्रिपिटकांची ‘तायशो एडिशन’ भांडारकर ग्रंथालयास अर्पण करण्यासाठी १९९० साली जपानी स्कॉलर, त्यांच्या अधिकाऱ्यांसह भांडारकर संस्थेत दाखल झाले होते. समारंभास ज्येष्ठ बौद्धविद्या पंडित डॉ. पु.वि. बापट आणि डॉ. वा.वि. गोखले खास पाहुणे म्हणून उपस्थित होते. संस्थेचे सचिव डॉ. रा.ना. दांडेकरांनी त्यांच्या पद्धतीप्रमाणे कार्यक्रमात पुढाकार घेऊन सोहळा साजरा केला. बौद्ध धर्मग्रंथाचे - त्रिपिटकाचे जाणकार असलेल्या डॉ. बापट आणि डॉ. गोखले यांचे खूप कौतुक केले आणि ‘बुद्धिक्षमप्रधान देशात शिक्षणक्षेत्रात या दोन महान व्यक्ती आहेत, असे मत व्यक्त केले. या त्रिपिटकापूर्वी चीनमधून असेच चिनी त्रिपिटक आले होते. मात्र ते ग्रंथरूपात किंवा सुटे कागद नसून कागदाच्या मोठ्या गुंडाळ्या (रोल) होत्या आणि पुढे डॉ. बापट यांनी त्यांचे ८१ खंडांत रूपांतर केले आणि पुणे संस्थेच्या ग्रंथालयात विविध आठ त्रिपीटके झाली.

डॉ. वासुदेव विश्वनाथ गोखले यांचा जन्म कोल्हापुरात झाला. वडील विश्वनाथराव कोल्हापूर संस्थानचे मुख्य न्यायाधीश होते. शालेय व विद्यापीठीय शिक्षणानंतर १९२६मध्ये ते कोलकत्याला शांतीनिकेतनमध्ये दाखल झाले. गोखले यांची विद्वत्ता पाहून स्वत: रवींद्रनाथांनी त्यांचा गौरव केला आणि प्रो. तान यून शान यांच्याबरोबर काम (संशोधनात्मक) करण्याची शिफारस केली. पुढे १९२७ साली जर्मनी, बॉन आणि नंतर हायडेलबर्ग विद्यापीठाला त्यांनी भेटी दिल्या. १९३१मध्ये भारतात परत आल्यावर योग्य असे काम समोर न आल्याने ते कोल्हापूरला परतले, परंतु डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या मंडळींना ते पुण्यात हवे होते. १९३२मध्ये पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयात ‘बुद्धिस्ट लॉजिक’ आणि ‘जर्मन भाषा’ शिकवण्यासाठी ते रुजू झाले. १९३५मध्ये सोसायटीचे आजीव सदस्यही झाले. पुढे शांतीनिकेतनमध्ये ‘चायना भवन’चे संशोधन कार्य सुरू झाले आणि त्याचे संचालक म्हणून गोखले सरांना तिकडे बोलावणे आले. १९३७-३८ या काळात तेथे काम करीत असता पुन्हा पुण्याला परत येऊन फर्गसनमध्ये त्यांना शिकवावे लागले ते अगदी १९५९ अखेरपर्यंत निवृत्त होईपर्यंत. मधल्या काळात भारताचे पंतप्रधान मा. पंडित जवाहरलाल नेहरू यांनी १९४८ ते १९५० या काळात ल्हासा येथील इंडियन मिशनचे विशेष प्रतिनिधी म्हणून त्यांची नेमणूक केली. हा त्यांचा विशेष सन्मान होता. तो त्यांनी स्वीकारला. त्यातून मुक्त झाल्यावर ते पुन्हा फर्गसन महाविद्यालयामध्ये दाखल झाले. शिकवणे हा त्यांचा आवडीचा विषय!

फर्गसनमधील १९५९च्या निवृत्तीनंतर दिल्ली विद्यापीठात ‘बुद्धिस्ट स्टडी’ या विषय विभागाचे प्राध्यापक म्हणून त्यांची नेमणूक झाली. भगवान गौतम बुद्धांच्या परिनिर्वाणाला २५००ला वर्षे झाली. १९६० साली ते दिल्ली विद्यापीठात दाखल झाले. हा विभाग राष्ट्रपती डॉ. राधाकृष्णन यांनी सुरू केला. १९६२मध्ये डॉ. गोखले या विभागाचे स्वतंत्रपणे प्रमुख झाले. अनेक विदेशी बौद्ध संशोधकांनी या विभागाला भेटी दिल्या, संशोधन केले व पीएच.डी. पदवीही मिळवली. त्यामध्ये पुण्याच्या डॉ. मालती शेंडगे यांचा समावेश होता.

हे काम करत असताना त्यांनी संशोधनात्मक ग्रंथही लिहिले. ‘भोजनाय मालिका’ (१९५५), ‘गौतम बुद्धाचा सत्यविषयक दृष्टीकोन’ (१९६५), ‘बौद्ध धर्मांची दुर्मीळ हस्तालिखिते’ याचबरोबर ‘अमेरिकेच्या हार्वड विद्यापीठाच्या शोधपत्रिकेचे संपादन’ व ‘डॉ. दामोदर धर्मानंद कोसंबी यांच्याबरोबर ‘सुभाषित रत्नकोश’ आणि आणखी काही ग्रंथ त्यांनी प्रसिद्ध केले. विविध संशोधनात्मक नियतकालिकातून २६ लेख लिहिले, तसेच अनेक बौद्ध संहितांची भाषांतरे केली.

खेदाची गोष्ट अशी की, या महान विद्वानांची खूण-

स्मृती मात्र भांडारकर संस्थेत कोठे सापडत नाही. त्या काळात दिल्लीच्या वास्तव्यात अनेक जपानी स्कॉलर त्यांच्या हाताखालून शिकून गेले, जे आज मान्यवर अभ्यासक बनले आहेत. आणि म्हणूनच 'बौद्ध त्रिपीटकांची तायशो एडिशन' भांडारकर संस्थेला अर्पण करताना जपानी संशोधकांना डॉ. गोखले यांची उपस्थिती हवी होती.

बुद्धिस्ट तत्त्वज्ञानात 'प्रतीत्य समुत्पाद' हा विषय त्यांच्या जिव्हाळ्याचा होता. पं. राहुल सांकृत्यायन यांनी तिबेटी भ्रमंती करून अनेक बौद्ध ग्रंथ भारतात आणले. या ग्रंथांच्या छायाचित्रांवरून डॉ. गोखले यांनी अनेक ग्रंथांचा अभ्यास केला. त्यामध्ये 'तर्कज्वला', 'मध्यन्त विभागशास्त्र आणि भाष्य', 'मैत्रेयी कारिका व - सुबंधूचे भाष्य व स्थिरमती टीका', 'माध्यमक हृदय (भाव्यकृत) भावविवेकसह', 'वसुबंधूचा अभिधर्म कोश कारिका' यांचा समावेश आहे.

दिल्लीच्या विद्यापीठीय कारकिर्दीत त्यांनी नेपाळला भेट दिली. बौद्ध धर्माच्या अभ्यासकांचे एक पथक मॉस्को (रशिया) आणि मंगोलिया या ठिकाणी पाठवले. १९७२मध्ये त्यांनी जपान-अमेरिका-युरोप असा अभ्यास दौरा केला. १९७८मध्ये आंतरराष्ट्रीय प्राच्यविद्या परिषदेला कॅनबेरा (ऑस्ट्रेलिया) येथे ते हजर होते. डॉ. दामोदर धर्मानंद कोसंबी त्यांचे जवळचे सहकारी! कायम प्रसिद्धिपराङ्मुख राहून संशोधन आणि विद्यार्थ्यांना मार्गदर्शन करीत राहिले.

डॉ. पु.वि. बापट आणि डॉ. वा.वि. गोखले भांडारकर संस्थेच्या बौद्ध धर्मअभ्यासाचे मुख्य आधारस्तंभ म्हणावे लागतील.

- वा.ल. मंजूळ

## गोगटे, विश्वास दत्तात्रेय

**पुरातत्त्व रसायनशास्त्रज्ञ**

**२२ सप्टेंबर १९४७**

पुणे विद्यापीठातून रसायनशास्त्र या विषयात एम.एस्सी. व डॉक्टरेट संपादन करून विश्वास दत्तात्रेय



गोगटे काही काळ पुणे विद्यापीठातच अध्यापन करत ते १९७८ मध्ये डेक्कन महाविद्यालयात पुरातत्त्व विभागात काम पाहू लागले व तेथूनच २००७ मध्ये निवृत्त झाले. पुरातत्त्वीय संशोधनात निरनिराळ्या वैज्ञानिक पद्धतींच्या वापराचे महत्त्व प्रा. ह. धी. सांकलियांनी ओळखले होते. त्यांच्या या विचारांमधून पुण्यात डेक्कन महाविद्यालयात पुरातत्त्व विभागात जागतिक दर्जाच्या अनेक संशोधन प्रयोगशाळा निर्माण झाल्या. त्यात पुरातत्त्वीय रसायनविज्ञान (Archaeological Chemistry) या विषयाला वाहिलेली प्रयोगशाळा वाढवण्याचे महत्त्वाचे काम विश्वास गोगटे यांनी केले.

आपल्या जवळजवळ तीस वर्षांच्या सेवाकाळात त्यांनी पुरातत्त्वीय रसायनविज्ञानाच्या अनेक पैलूंवर संशोधन केले. पुरातत्त्वीय रसायनविज्ञान व प्राचीन तंत्रज्ञान या संबंधात त्यांचे भारतीय व परदेशांतील नियतकालिकांत ४५ शोधनिबंध प्रसिद्ध झाले आहेत.

प्राचीन नाण्यांचा रासायनिक अभ्यास करणे, पुरातत्त्वीय उत्खननांमध्ये मिळणाऱ्या काचेच्या बांगड्या, मणी व काचपात्रे यांच्या तौलनिक रासायनिक विश्लेषणातून त्या वस्तूंच्या उगमाबद्दल निष्कर्ष काढणे व प्राचीन काळातील लोह-तांबे यांच्या निर्मिती प्रक्रियेच्या संदर्भात अनुमाने काढणे ही त्यांच्या संशोधनाची ठळक वैशिष्ट्ये आहेत. प्राचीन काळातील पर्यावरणात झालेल्या बदलांचा मागोवा घेण्यासाठी राजस्थानातील संशोधनात त्यांचा सहभाग होता. प्राचीन भारतात रौलुटेड वेअर या नावाने ओळखली जाणारी मृद्भांडी कोठे तयार होत व त्यांचा देशात व परदेशात कसा व्यापार चालत असे, या संदर्भात विश्वास गोगटे यांचे संशोधन महत्त्वाचे मानले जाते. त्यांनी एक्स-रे डिफ्रॅक्शन पद्धतीचा (XRD Methodचा) वापर करून तुर्कमेनिस्तान, थायलंड, जॉर्डन व श्रीलंका अशा

निरनिराळ्या देशांमधल्या मृद्‌भांड्यांच्या अवशेषांचा अभ्यास केला व प्राचीन व्यापारी संबंधांविषयी महत्त्वाची अनुमाने काढली.

– डॉ. प्रमोद जोगळेकर

## गोडे, परशुराम कृष्ण

**संशोधक व अभ्यासक**

**११ जुलै १८९१ – मृत्युदिनांक अनुपलब्ध**



परशुराम कृष्ण गोडे यांचा जन्म देवरूख (जि. रत्नागिरी) येथे झाला. गोडे यांचे मूळ उपनाव ठाकूर होते. हे घराणे काश्यप गोत्री कऱ्हाडे ब्राह्मणांचे असून त्यांचे मूळ वसतिस्थान रत्नागिरी जिल्ह्यातील देवगड तालुक्यात जामसांडे व हडपीड गावी होते. हल्लीचे जामसांडे येथील ठाकूर व गोडे हे एकच होत. यांनी आपल्या घराण्याविषयी बरेच ऐतिहासिक संशोधन केले आहे. प्रसिद्ध केलेल्या कागदपत्रांमध्ये गोडेवखर व मुडागडच्या लढाईचा इतिहास (Bombay University Journal, January 1937) हे महत्त्वाचे आहेत. गोडे यांचे एक पूर्वज नारो रायाजी गोडे (ठाकूर) यांनी सुमारे दहा हजार सैन्य जमा करून इ.स. १७४८मध्ये तुळाजी आंग्रे याने वसवलेल्या मुडागडावर स्वारी करून तो किल्ला जमीनदोस्त केला. या पराक्रमाबद्दल गंगाधर कृष्ण प्रतिनिधी यांनी नारो रायाजी यांस विशालगडच्या पायथ्याशी असलेली देवडे व भडकंबे ही दोन गावे खोती इनाम दिली ती अद्याप गोडे घराण्याकडे चालू आहेत. सुमारे इ.स. १७८२पासून गोडे घराण्याची वस्ती भडकंबे येथे आहे.

यांचे वडील कृष्णाजी गोविंद गोडे (इ.स. १८६१-१९३०) हे समाजसुधारक होते. यांना वाचनाचा फार नाद होता. त्यांच्या विचारांवर आगरकर व लोकमान्य टिळक यांच्या लेखांचा फार प्रभाव होता. त्यांनी आपल्या तीन मुलींना महर्षी अण्णासाहेब कर्वे यांच्या शिक्षणसंस्थेत शिक्षण दिले. नंतर या मुलींपैकी सर्वांत वडील कै. सौ. बनूबाई सहस्रबुद्धे, रावबहादूर डॉ. दत्तात्रेय लक्ष्मण सहस्रबुद्धे यांच्या पत्नी व त्यांच्या भगिनी मालतीबाई कर्वे, र. धों. कर्वे यांच्या पत्नी यांनी परशुराम कृष्ण गोडे यांचे शिक्षण पूर्ण केले. सन १९०० पासून १९०७ पर्यंत गोडे यांचे प्राथमिक शिक्षण राजापूर, रत्नागिरी व कोल्हापूर (समर्थ विद्यालय) येथे होऊन सन १९०८साली ते पुढील शिक्षणाकरता न्यू इंग्लिश स्कूलमध्ये दाखल झाले. सन १९१०मध्ये मॅट्रिक परीक्षा पास करून त्यांनी फर्गसन महाविद्यालयामध्ये पुढील अभ्यासक्रम पूर्ण केला. नंतर सन १९१६ मध्ये हे बी.ए.ची (सेकंड क्लास ऑनर्स-संस्कृत) परीक्षा पास झाले. नंतर पुण्यातील तीन माध्यमिक शाळांमध्ये शिक्षकाची नोकरी करून सन १९१८मध्ये हे एम.ए.ची परीक्षा (इंग्रजी व संस्कृत) उत्तीर्ण झाले. सन १९०८ पासून १९१८ पर्यंत यांना कै. डॉ. पांडुरंग दामोदर गुणे यांच्या अध्यापनाचा लाभ झाला. सन १९१८-१९१९ रा. गोडे हे कर्वे विद्यापीठामध्ये इंग्लिश व संस्कृत या विषयांचे प्राध्यापक होते. डॉ. गुणे व त्यांचे साहाय्यक यांनी याच वेळी भांडारकर ओरिएण्टल रिसर्च इन्स्टिट्यूट स्थापन केली. डॉ. गुणे व प्रा. रा. द. रानडे (अलाहाबाद विद्यापीठामधील तत्त्वज्ञान विषयाचे प्रधान अध्यापक) यांचे सल्ल्यावरून यांनी भांडारकर इन्स्टिट्यूटमध्ये असिस्टन्ट क्यूरेटरची जागा २६ एप्रिल १९१९रोजी स्वीकारली. लवकरच म्हणजे जानेवारी १९२१मध्ये यांना इन्स्टिट्यूटचे क्यूरेटर म्हणून नेमण्यात आले. सन १९४३मध्ये इन्स्टिट्यूटच्या रौप्य महोत्सवप्रसंगी यांना त्यांच्या प्रशंसनीय सेवेबद्दल व संशोधनात्मक कार्याबद्दल संस्थेकडून एक रौप्यपदक (Distinguished Services Medal) सर राधाकृष्णन यांचे हस्ते अर्पण करण्यात आले.

यांचे संशोधनकार्य हे बी.ए.च्या वर्गात असताना सुरू झाले असे म्हणण्यास हरकत नाही. यांचा पहिला संशोधनात्मक निबंध महाभारताविषयी असून तो

ग

Sanskrit Research (Bangalore) या नियतकालिकात १९१६मध्ये प्रसिद्ध झाला. या निबंधाबद्दल डॉ. कुर्तकोटी (शंकराचार्य) यांनी त्यांना ५० रुपयांचे बक्षिस दिले. त्यानंतर यांनी आपली नोकरी सांभाळून संशोधनास वाहून घेतले. सन १९२२ साली डॉ.गुणे (भांडारकर इन्स्टिट्यूटचे पहिले चिटणीस) वारल्यामुळे यांना मार्गदर्शक असा गुरू मिळाला नाही. नंतर त्यांनी १९२५पासून त्यांच्या ताब्यात दिलेल्या सरकारी हस्तलिखित संग्रहाचा उपयोग करून संस्कृत ग्रंथ व ग्रंथकार यांचे कालनिर्णयात्मक संशोधन सुरू केले व तद्विषयक सुमारे २०० निबंध प्राच्यविद्याविषयक अनेक नियतकालिकांत प्रसिद्ध केले. सन १९४१साली यांची ५० वर्षे पूर्ण झाली त्या वेळी त्यांनी आपल्या २०२ निबंधाची सूची (Bibliography) प्रसिद्ध केली. या सूचीच्या शेवटी यांनी हिंदुस्थानातील व बाहेरील विद्वानांची मते छापली आहेत. त्यावरून त्यांच्या संशोधन कामगिरीची पूर्ण कल्पना येते.

सन १९४१नंतर यांचे लक्ष हिंदी संस्कृतिविषयक इतिहासाकडे वेधले गेले व त्यांनी या संस्कृतीसंबंधाने सुमारे १०० निबंध लिहिले आहेत. या निबंधांत काही निबंध मराठ्यांच्या इतिहासाबद्दल आहेत. यांनी वरील सूचीच्या शेवटी आपल्या निबंधांचे विषयवारी वर्गीकरण (Subject Index) केले आहे. त्यातील विषय - अलंकारशास्त्र, छंदशास्त्र, संस्कृत ग्रंथाचे टीकाकार, धर्मशास्त्र, लोककथा, गणित, हिंदी संस्कृती, हिंदुस्थानचा इतिहास (गुजरात, काठेवाड, माळवा, महाराष्ट्र, राजपुताना विजयनगर वगैरेंबद्दल व मुसलमानांच्या इतिहासासंबंधी), जैन ग्रंथ व ग्रंथकार ज्योतिःशास्त्र, कामशास्त्र, काव्य, कोश, मीमांसा, नाटक, नाट्य, नाणकशास्त्र, न्यायशास्त्र, मानसशास्त्र, पुराणे, संगीत, समाजशास्त्र, तंत्र, वैद्यक, वेदान्त, विज्ञान, व्याकरण, योग-यांप्रमाणे आहेत.

संस्कृत वाङ्मयाचा बिनचूक इतिहास लिहिण्यास त्यांच्या निबंधांची बरीच मदत होईल, असे प्रसिद्ध आंग्ल प्राच्यविद्याविशारद डॉ. ए. बी. कीथ (एडिंबरो) यांचे मत आहे. ते लिहितात - "Your excellent contributions to our exact knowledge of literary Chronology. Such work is most useful to future historians of Sanskrit literature and I am very glad, you are taking it up so consistently." यांच्या काही निबंधांची भाषांतरे हिंदी, संस्कृत व गुजराती मासिकांत प्रसिद्ध झाली आहेत.

यांच्या निबंधांची काही शीर्षके अशी आहेत. बैलगाडीचा इतिहास, नथीचे प्राचीनत्व, कऱ्हाडे ब्राह्मणांचा इतिहास, जिलबीचा इतिहास, अंजीराचा इतिहास, जोंधळ्याचा इतिहास, भवानी तलवारीसंबंधी तत्कालीन पुरावा देणारा लेख, चहाचा इतिहास, छत्रपती संभाजीचा पारिजात ध्वज (भगवा झेंडा), गाबीत, साळी व पद्मसाळी या जातींचा इतिहास, सवाई जयसिंगने केलेल्या अश्वमेधाबद्दल निबंध, कागदाचा इतिहास, गुलाबपाण्याचा इतिहास इत्यादी.

ऐतिहासिक संशोधनाखेरीज यांनी बरेच संपादकीय काम केले आहे. या कामाचा आरंभ १९३०मध्ये झाला. प्रा. रा. द. रानडे यांनी स्थापन केलेल्या ॲकेडमी ऑफ फिलासॉफी ॲन्ड रिलिजन या संस्थेचे हे आरंभापासून चिटणीस होते. या संस्थेतर्फे यांनी Review of Philosophy and Religion हे नियतकालिक सुरू करून ते १९३६पर्यंत चालवले.

सन १९३८-१९४० या काळात त्यांनी Oriental Literary Digest नावाचे मासिक डॉ. सुमित्र मंगेश कत्रे (डेक्कन कॉलेज रिसर्च इन्स्टिट्यूटचे डायरेक्टर) यांचे साहाय्याने चालवले. नंतर १९३८मध्ये या दोघा विद्वानांनी New Indian Antiquary नावाचे मासिक सुरू केले. या मासिकात जगातील सर्व नामांकित विद्वानांचे प्राच्यविद्याविषयक लेख येत. रा. गोडे व डॉ. कत्रे यांनी New Indian Antiquary Extra Series नावाची ग्रंथमालाही सुरू केली. या दोघांनी संपादन केलेल्या ग्रंथांमध्ये प्रा. पां.वा. काणे स्मारक ग्रंथ, डॉ. टॉमस स्मारक ग्रंथ, सर डेनिसन रॉस स्मारक ग्रंथ व सुखटणकर स्मारक ग्रंथ हे उल्लेखनीय आहेत. सन

१९३७पासून यांच्या सर्व संपादकीय कार्यामध्ये यांचे मित्र डॉ. कत्रे यांचे अमूल्य साहाय्य झाले. त्याचप्रमाणे यांना सन १९२५ ते सन १९४३ कै. डॉ. सुखटणकर (भांडारकर इन्स्टिट्यूटच्या महाभारताचे प्रसिद्ध संपादक) यांच्या मैत्रीचा व साहचर्याचा चिरस्मरणीय लाभ झाला व या मैत्रीचे प्रतीक म्हणून त्यांनी सुखटणकर स्मारक ग्रंथ (२ भाग) (१९४४-४५) प्रसिद्ध केले. याशिवाय परशुराम गोडे यांनी सुमारे ३५० ग्रंथांचे समालोचन प्रसिद्ध केलेले आहे.

— संपादित

**संदर्भ :**

*१. मराठी विश्वचरित्रकोश; संपादक - कामत, श्रीराम पांडुरंग; विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा.*

## गोरक्षकर, सदाशिव वसंतराव

**संग्रहालयशास्त्रज्ञ**

**३१ मे १९३३**



सदाशिव वसंतराव गोरक्षकर यांचा जन्म मुंबई येथील सांताक्रूझ येथे झाला. शाळेतल्या मित्रामुळे वयाच्या ११व्या वर्षी त्यांचे रा.स्व. संघाशी नाते जुळले. कुटुंबाला आर्थिक हातभार लावण्यासाठी नोकरी करत करत त्यांनी महाविद्यालयीन शिक्षण पूर्ण केले. इतिहास विषयाच्या आवडीमुळे त्यात बी.ए. केले आणि मग एम.ए. करताना प्राचीन भारतीय संस्कृतीचा अधिक खोलात जाऊन अभ्यास केला. त्यांनी १९६०मध्ये एलएल.बी.ही पूर्ण केले. इतिहास विषयातली त्यांची आवड आणि गती लक्षात घेऊन इतिहासाच्या प्राध्यापकांनी बडोदा येथे असलेला म्युझिऑलॉजीचा दोन वर्षांचा पदवी अभ्याक्रम करण्याविषयी त्यांना सांगितले. गोरक्षकरांनी बडोद्याला जाऊन पदवी घेतल्यानंतर १९६२-६३मध्ये महाराजा सयाजीराव विद्यापीठात संग्रहालयशास्त्रातील व्याख्याते म्हणून नोकरी केली. त्यानंतर मुंबईत परतल्यावर काही काळ वकिली करून १९६४मध्ये ते काळा कोट उतरवून प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियममध्ये असिस्टंट म्हणून रुजू झाले आणि पुढची बत्तीस वर्षे तिथेच रमले. १९६४ ते १९७५ या काळात साहाय्यक/ क्युरेटर व १९७५पासून १९९६मध्ये निवृत्त होईपर्यंत संचालक म्हणून त्यांनी काम केले.

संग्रहालयशास्त्रात गोरक्षकारांचे फार मोठे योगदान आहे. आपण केलेल्या वस्तूंच्या मांडणीतून भेट देणाऱ्या व्यक्तींच्या मनात अधिक माहिती मिळवण्याची जिज्ञासा जागी करणे, हे संग्रहालयाचे एक प्रमुख उद्दिष्ट असले पाहिजे. गोरक्षकरांनी प्रिन्स ऑफ वेल्समधील आपल्या सहकाऱ्यांमध्ये हा विचार रुजवला, चेअरमनसह सर्व विश्वस्तांना पटवला. स्थापनेनंतर पन्नास वर्षांनी या म्युझियमने कात टाकली. केवळ संग्रहातल्या वस्तूंची विषयानुरूप पारंपरिक मांडणी, इतकेच संग्रहालयाचे स्वरूप मर्यादित न ठेवता गोरक्षकरांनी नवनव्या विषयांवर, संकल्पनांवर आधारित दालने उभी केली.

सर्वसामान्यांपर्यंत त्यांची माहिती पोहोचवण्याची व्यवस्था केली. त्यामुळे या दिशेने न वळलेल्यांची पावलेही संग्रहालयाकडे वळायला लागली. म्युझियममध्ये आल्यावर दोनच वर्षात गोरक्षकरांना रॉकफेलर फाउंडेशनची शिष्यवृत्ती मिळाली. यामुळे युरोपातील व विशेषत: अमेरिकेतील उत्तमोत्तम संग्रहालये पाहता आली. या अनुभवामुळे त्यांचा दृष्टिकोन अधिक व्यापक झाला. गोरक्षकरांच्या कार्यकाळात अनेक दुर्मीळ, वैशिष्ट्यपूर्ण वस्तूंचा खजिना म्युझियममध्ये आला. त्यातही घारापुरीच्या लेण्यांशी नाते सांगणाऱ्या शिवमूर्तीचा गोरक्षकरांना लागलेला शोध हा त्यांच्या कारकिर्दीतला एक मानाचा तुरा आहे.

जवळजवळ बत्तीस वर्षे गोरक्षकर आणि म्युझियम हे अद्वैत होते. या काळात त्यांनी म्युझिऑलॉजी या विषयातील अनेक आंतरराष्ट्रीय परिषदांत देशाचे प्रतिनिधित्व केले. विविध विषयांवरचे संशोधनात्मक प्रबंध सादर केले. स्वीडन, जपान, मॉरिशस, बल्गेरिया

या चार देशांमध्ये भारत सरकारतर्फे प्रदर्शन मांडण्याची जबाबदारी सोपवण्यात आली. या दरम्यान मुंबई विद्यापीठाच्या सेनेटवर Chancellors Nominee म्हणून व राष्ट्रकुल परिषदेचे (Commonwealth Association of Museumsचे) अध्यक्ष म्हणून निवड झाली. तत्कालीन केंद्रीय पेट्रोलियम मंत्री राम नाईक यांनी सुचवल्यामुळे ओ.एन.जी.सी.साठी उभारून दिलेले संग्रहालय, मुंबईत वडाळा इथे उभारलेले कुष्ठरोगावरचे म्युझियम, वानगीदाखल ही दोन उदाहरणेही त्यांच्या कामातले वैविध्य दाखवण्यासाठी पुरेशी आहेत. मुंबई येथील नेहरू सायन्स सेंटरच्या कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष आणि ललितकला प्रकाशनाच्या प्राचीन मंडळाचे सन्माननीय सहसंपादक म्हणून त्यांनी उत्कृष्ट कामगिरी केली. गोरक्षकर यांना इ.स. २००३मध्ये 'पद्मश्री' व २००७मध्ये 'श्रीगुरुजी पुरस्कार' प्राप्त झाले आणि २०११मध्ये अतिशय मानाची अशी 'टागोर फेलोशिप' जाहीर झाली, तेव्हा ८०च्या उंबरठ्यावर असलेल्या या ज्ञानसाधकाने पूर्वीच्याच उत्साहाने आणि शिस्तीने दिल्लीच्या नॅशनल म्युझियममधील धातुमूर्तींचा अभ्यास सुरू करून त्या विषयाला न्याय दिला. २०१७मध्ये चतुरंगच्या 'जीवनगौरव' पुरस्काराचे ते मानकरी ठरले. आपल्या समृद्ध ऐतिहासिक, सांस्कृतिक वारशाचे निगुतीने जतन करून पुढील पिढ्यांपर्यंत त्याचे महत्त्व पोहोचवण्यासाठी गोरक्षकरांनी शब्दश: आपलं आयुष्य वेचले आहे.

— दीपक हनुमंत जेवणे

## ग्रिअर्सन, जॉर्ज अब्राहम

**भाषाशास्त्रज्ञ, प्राच्यविद्यापंडित**

**७ जानेवारी १८५१ - ९ मार्च १९४१**

आयर्लंडमधील डब्लिनजवळ ग्लेनेजरी येथे जॉर्ज अब्राहम ग्रिअर्सन यांचा जन्म झाला. ट्रिनिटी कॉलेज (डब्लिन) येथे गणिताचा विद्यार्थी असताना त्यांनी संस्कृत व हिंदी भाषांविषयी पारितोषिके मिळवली. ऑक्टोबर १८७३मध्ये ते बंगालमध्ये भारतीय सनदी



सेवेत रुजू झाले. तेथे १८९८ सालापर्यंत शासकीय सेवेबरोबरच त्यांनी भाषांविषयीच्या संशोधनातही पुष्कळ लक्ष घातले. त्यांनी प्रबंध, परीक्षणे, शोधनिबंध व पुस्तके या रूपात प्रचंड लेखन केले. आपल्या कामातून मिळणाऱ्या रिकाम्या वेळेत त्यांनी हिंदुस्थानातील असंख्य भाषा व लिप्या यांचा अभ्यास केला. त्यांनी कालिदासावरील आपला पहिला निबंध १८७७मध्ये प्रसिद्ध केला. तेव्हापासून अखेरपर्यंत त्यांचा व्यासंग सतत चालू होता.

१९३६ साली यांचा ८५वा वाढदिवस साजरा करण्यात आला, त्या वेळी यांना 'व्हॉल्यूम ऑफ इंडियन अँड इराणियन स्टडीज' हा ग्रंथ अर्पण करण्यात आला. त्या ग्रंथात हिंदुस्थानात ६० वर्षापर्यंत त्यांनी केलेल्या भाषाशास्त्रविषयक अभ्यासाचा अत्यंत गौरवपूर्वक उल्लेख करण्यात आला आहे. त्याच ग्रंथाची २० पाने त्यांच्या लिखाणाच्या सूचीने व्यापलेली होती. यावरून त्यांच्या लिखाणाचा व्याप ध्यानात येतो. तसेच हिंदुस्थानातील २००पेक्षा अधिक लिप्यांवर असलेले प्रभुत्वही समजून येते. अनेक लिप्यांप्रमाणे अनेक भाषाही त्यांना येत असल्या, तरी हिंदुस्थानातील वायव्य भागाच्या भाषेवर यांचे विशेष प्रभुत्व होते. यांनी त्यापैकी कित्येक ज्ञात व अज्ञात भाषांची व्याकरणे लिहिली. तसेच मध्ययुगीन व अर्वाचीन इंडो-आर्यन यांची भाषांतरे केली.

त्यांनी 'लिंग्विस्टिक सर्व्हे ऑफ इंडिया' या ग्रंथाचे २० खंड प्रसिद्ध करून हिंदुस्थानातील भाषांच्या अभ्यासकांना पूर्वपरंपरा तर प्रकट करून दाखवलीच, त्याशिवाय त्या त्या भाषेतील अनेक उतारे देऊन नवीन अभ्यासकांना सांगाडा निर्माण करून देऊन त्यांच्या घटनेचा अभ्यास करून, त्यांची वर्गवारी करण्याचा प्रयत्न केला. यांच्या या कार्यामुळे हिंदी

विश्वविद्यालयाचे भाषाशास्त्राच्या शास्त्रीय अभ्यासाकडे लक्ष ओढले गेले. यापुढे प्रत्येक संशोधकावर त्यांच्या या कार्याची छाप पडणे अपरिहार्य होऊन बसले आहे.

'सेव्हन ग्रामर्स ऑफ द डायलेक्ट्स अँड सबडायलेक्ट्स ऑफ द बिहारी लँग्वेज' (१८८३-८७) आणि 'बिहार पीझंट लाइफ' (१८८५) ही त्यांच्या सर्वात महत्त्वाच्या पुस्तकांपैकी दोन पुस्तके होत. यापैकी दुसऱ्या पुस्तकात भाषेविषयीची पुष्कळ माहिती आहेच, शिवाय यात बिहारमधील शेतकऱ्यांचे जीवन, शेतीच्या पद्धती व श्रद्धा याविषयीचे वर्णनही आलेले आहे. त्यांनी हिंदी, वायव्य भारतातील दद्रिक भाषा व काश्मिरी भाषा याविषयीही संशोधन केले.

त्यांनी भारताचे भाषाशास्त्रीय दृष्टीने सर्वेक्षण केले. १८९८-१९२८ या कालावधीमध्ये आणि ३६४ भाषा आणि बोलीभाषा याविषयी माहिती मिळवली. भारताच्या भाषाविषयक सर्वेक्षणाला (पाहणीला) त्यांनी १८९८ साली सुरुवात केली आणि त्यापुढील ३० वर्षे अथक प्रयत्न करून त्यांनी ८००० पृष्ठांचे १९ खंड भरतील एवढी माहिती गोळा केली. नॉर्वेजियन भाषाशास्त्रज्ञ स्टेन कोनौनी 'लिंग्विस्टिक सर्व्हे ऑफ इंडिया' (१८९४-१९२७) या एकोणीस खंडांपैकी इंडो-युरोपियन भाषांविषयीचे पाच खंड तयार केले, तर इतर बहुतेक ग्रिअर्सननी सिद्ध केले होते. हे सर्वेक्षण म्हणजे संघटनाचातुर्यातील मोठे यश होते. कारण यात त्यांनी इंडोयुरोपियन, चिनी, ऑस्ट्रो-आशियाई आणि भारतातील द्राविडी भाषाकुल यांचा एकत्रित आढावा घेतला होता. बहुतेक भाषा व बोलीभाषांच्या बाबतीत शब्दसंग्रहांशिवाय व्याकरणाचा आराखडा व थोडक्यात संहिताही दिल्या होत्या. या सर्वेक्षणाचे ते १८९८-१९२८ दरम्यान संचालक होते व त्यांनी १९०३पासून कँबर्ली या आपल्या गावातून हे काम केले. या सर्वेक्षणाच्या काळात त्यांनी अनेक पुस्तके लिहिली. उदा.– 'ॲन इंट्रोडक्शन टू द मैथिली डायलेक्ट ऑफ द बिहारी लँग्वेज (१९१०), 'अ मॅन्युअल ऑफ काश्मिरी लँग्वेज' (१९११), 'ए डिक्शनरी ऑफ द काश्मिरी लँग्वेज' (१९१६-३२), 'लल्ला-वाक्यानि' (१९२०) वगैरे. शिवाय त्यांनी अनेक प्राचीन संहिता व कोरीव लेख यांची भाषांतरे केली.

त्यांचा हा प्रचंड प्रयत्न भाषाशास्त्रातील नवीन शोधास जन्म देणारा असल्याने त्यांच्या उत्तरायुष्यात त्यांच्यावर जगातील सर्व भागांतून पदव्या व मान यांचा वर्षाव झाला. बंगालच्या व मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीच्या शाखेचे हे ऑननरी फेलो होते. नागरी प्रचारिणी सभा (काशी), बिहार अँड ओरिसा रिसर्च सोसायटी, दि मॉडर्न लँग्वेज असोसिएशन, लिंग्विस्टिक सोसायटी ऑफ इंडिया व बंगीय साहित्य परिषद या संस्थांचे ते मानद सभासद होते. मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीचे कँबेल सुवर्णपदक व बंगाल रॉयल एशियाटिक सोसायटीचे सर विल्यम जोन्स सुवर्णपदकही त्यांना मिळाले होते.ग्रिअर्सनना १९१२ साली 'सर' हा किताब तर १९२८ साली 'द ऑर्डर ऑफ मेरिट' हा इंग्लंडचा सर्वोच्च बहुमान देण्यात आला. कँबर्ली (सरे, इंग्लंड) या त्यांच्या गावी वयाचा नव्वदाव्या वर्षी त्यांचा मृत्यू झाला.

– संपादित

**संदर्भ :**

१. *मराठी विश्वचरित्रकोश; संपादक - कामत, श्रीराम पांडुरंग; विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा.*

२. *अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*

## ग्रँट डफ, जेम्स कनिंगहॅम

**मराठेशाहीचे आद्य इतिहासकार**

**८ जुलै १७८९ – २३ सप्टेंबर १८५८**

मराठी राज्याचा शेवट ज्याने पाहिला व तो घडवून आणण्यात भाग घेतला आणि नंतर मराठ्यांच्या राजधानीत, साताऱ्यात ज्याने पहिला पोलिटिकल एजंट बनण्याचा बहुमान मिळविला, तेच ग्रँट डफ मराठेशाहीचा आद्य इतिहासकार होय. मराठी राज्याच्या उगमापासून पेशवाईच्या अंतापर्यंत त्यांनी सलग कालक्रमानुसार समग्र एकटाकी इतिहास लिहिण्याचे काम

केले. मराठ्यांचा पहिला संगतवार सुसूत्र इतिहास म्हणून ग्रँट डफ यांच्या लेखनाचे महत्त्व आहे. मराठ्यांच्या राजकारणातील इंग्रजांची बाजू समजावून घ्यावयाला तो ग्रंथ उपयुक्त ठरतो.

कॅप्टन जेम्स कनिंगहेम ग्रँट डफ यांचा जन्म स्कॉटलंडमधील बॉन्फ या गावी ग्रँट कुटुंबात झाला. त्यांची आई मार्गारिट मिल्न ही ईडनच्या डफ घराण्यात होती. तिच्या भावाच्या मृत्यूनंतर डफ कुटुंबाची मालमत्ता मार्गारिटला मिळाल्यामुळे जेम्स ग्रँटला मातुलगृहाचे 'डफ' हे उपनाम कायमचे चिकटले. वयाच्या सोळाव्या वर्षीच शिक्षणाला रामराम ठोकून ते इ.स. १८०५ मध्ये ईस्ट इंडिया कंपनीच्या लष्करात दाखल झाले. मुंबईत लष्करात प्राथमिक प्रशिक्षण घेतल्यानंतर तत्काळ त्यांना कमिशन मिळून २३ एप्रिल १८०७ रोजी ते अधिकारी बनले. सुरुवातीच्या लष्करी मोहिमांनंतर ते १८१० मध्ये पुण्यातील इंग्रजांच्या रेसिडेन्सीत एल्फिन्स्टनचा मदतनीस म्हणून रुजू झाले. लष्करामध्ये असतानाच त्यांनी फार्सी भाषा शिकून घेतली होती. १८१७ मध्ये खडकीच्या लढाईत जेम्स ग्रँटने जो पराक्रम केला, त्या योगे इंग्रजांना त्या लढाईत मराठ्यांविरुद्ध जय मिळाला. त्यानंतर लवकरच मराठी राज्याची इतिश्री झाली. सातारचे स्वतंत्र राज्य ठेवण्याचा निर्णय कंपनीने घेऊन त्याची व्यवस्था पाहण्यासाठी एल्फिन्स्टनने जेम्स ग्रँट डफ यांची निवड केली.

इ.स. १८१८ ते १८२२ असे चार वर्षे डफ साताऱ्यात राहिले. पेशवाईच्या अखेरच्या काळात निर्माण झालेली दुरावस्था नष्ट करून संस्थानाची घडी त्यांनी नीट बसवली. छ. प्रतापसिंह यांना शिक्षण देऊन सुशिक्षित व सुसंस्कृत केले. ग्रँट डफ यांनी राजावरील आपल्या अधिकाराचा वापर करून छत्रपतींच्या दप्तरखान्यातील कागदपत्रांचा अभ्यास केला. कैफियती, बखरी, करीने, कुळकटे व महजरे गोळा करून इतिहासाचा आराखडा बनविला. मराठ्यांचा इतिहास लिहिण्याचा आपला मनोदय एल्फिन्स्टनला सांगितल्यावर त्यांनी त्यांच्या या कल्पनेचे स्वागत केले. त्यासाठी त्यांनी ग्रँटला काही मौलिक सूचना व मार्गदर्शनही केले. सन १८२२ मध्ये सातारा सोडताना त्यांच्या मराठ्यांच्या इतिहासाचा कच्चा खर्डा तयार झाला होता. इंग्लंडमध्ये परत गेल्यावर सन १८२३ ते १८२६ अशी तीन वर्षे त्यांनी मराठ्यांच्या इतिहासावर अखेरचा हात फिरविला व अंतिम मुद्रणप्रत तयार केली. सन १८२६ मध्ये लाँगमन ॲण्ड कंपनीने त्यांचे तीनही खंड प्रसिद्ध केले. इतिहास समीक्षकांनी आपल्या ह्या इतिहासलेखनावर टीका करू नये याची खबरदारी व काळजी त्यांनी घेतलेली होती.

ग्रंथ प्रसिद्धीनंतर दीर्घ काळापर्यंत या ग्रंथाची दखल घेतली गेली नाही. सुमारे ४२ वर्षांनी पुण्यातील डेक्कन महाविद्यालयामधील एक विद्यार्थी, नीलकंठ जनार्दन कीर्तने याने या इतिहासावर सर्वप्रथम टीका केली. कीर्तन्यांचा मुख्य मुद्दा असा होता, की तत्कालीन ब्रिटिश प्रशासनातील त्याच्या पदामुळे त्याला जी साधनसामग्री मिळाली होती, त्याचा त्याला पुरेपूर आणि योग्य उपयोग करून घेता आला नाही. त्यामुळे ग्रँटचा इतिहास म्हणजे मराठ्यांच्या इतिहासाचे निरस निवेदन असेच म्हणावे लागेल.

इतिहासाचार्य वि.का. राजवाडे यांनी आपल्या लेखातून ग्रँट यांच्या इतिहासातील अनेक उणिवा आणि चुका दाखवून दिल्या आहेत. ग्रँट डफन यांनी आपला इतिहास मुख्यत्वे मराठी बखरी, मुसलमानी तवारिका, सरदारांनी दिलेल्या कैफियती व अशाच स्वरूपाची इतर टिपणे ह्यांची संगती जुळवून तयार केला आहे. ह्या बहुतेक बखरी, तवारिका व कैफियती कमी-जास्त प्रमाणाने अविश्वसनीय आहेत व त्यांच्या आधारावर रचलेला मराठ्यांचा इतिहास अपूर्ण व अविश्वसनीय होण्याची बहुतेक खात्री आहे. पुणे व सातारा येथील दप्तरे व इतर कागदपत्रे ग्रँट डफ यांना मिळूनही त्याचा उपयोग त्यांना करता आला नाही. योग्य शिक्षणाच्या अभावामुळे कोणताच इतिहास लिहिण्याची व विशेषत: मराठ्यांचा इतिहास लिहिण्याची ग्रँट डफ यांची योग्यता नव्हती. विदेशीय लोकांना मराठ्यांच्या हालचालींचे सामान्य ठोकळ ज्ञान झाले म्हणजे आपले काम झाले, अशी ग्रँट

डफ यांची समजूत होती.

राजवाडे व इतर इतिहास अभ्यासकांनी ग्रँटच्या इतिहासावर केलेली टीका जरी ग्राह्य मानली, तरी त्या इतिहासाचे मूल्यमापन करताना त्या वेळची परिस्थिती, साधनांची कमतरता व या कामासाठीचा निवांतपणाही लक्षात घ्यावा लागतो. वरील सर्व लोकांनी ग्रँटचा इतिहास प्रसिद्ध झाल्यानंतर ५० ते ७० वर्षांनी त्याची समीक्षा केली आहे. त्या काळात मराठा संशोधकांच्या प्रयत्नांमुळे मराठा इतिहासाची अनेक साधने उपलब्ध झाली होती. थोडक्यात असे म्हणता येईल, की ग्रँट डफ यांच्या मराठ्यांच्या इतिहासात काही उणिवा असल्या तरी मराठ्यांच्या संपूर्ण इतिहासलेखनाच्या प्रक्रियेतील तो एक पहिला टप्पा आहे. म्हणून इतिहासकारांना व संशोधकांना त्यांच्या कार्याचा विचार करावा लागेल. ते ईडन (स्कॉटलंड) येथे मरण पावले.

– डॉ. गिरीश मांडके

ग

***

# घ

घ

## घाटगे, अमृत माधव

**भाषातज्ज्ञ**

**१९१३ – मृत्युदिनांक अनुपलब्ध**



डॉ. अमृत माधव घाटगे यांचा जन्म १९१३ साली कोल्हापूर येथे झाला. त्यांचे शिक्षण कोल्हापूर, मुंबई आणि अमेरिकेतील पेनसिल्वानिया येथे झाले. डॉ. घाटगे हे भारतीय व युरोपीय भाषांचे तज्ज्ञ म्हणून ओळखले जातात.

डॉ. घाटगे यांचा भाषाशास्त्राचा आणि साहित्याचा गाढा अभ्यास आहे. त्यांनी पाली, प्राकृत, संस्कृत आणि भाषाशास्त्र या विषयांचे, पुण्याचे डेक्कन महाविद्यालय व सर परशुराम महाविद्यालय, कोल्हापूरचे राजाराम महाविद्यालय, धारवाड येथील कर्नाटक महाविद्यालय आणि नागपूर महाविद्यालय या ठिकाणी अध्यापन केले. मुंबईतील विल्सन महाविद्यालयामधील ख्यातनाम संस्कृततज्ज्ञ प्रा. एच. डी. वेलणकर यांचे डॉ. घाटगे हे विद्यार्थी होते. भाषाशास्त्रविषयक विल्सन व्याख्यानमालेमध्ये त्यांनी ‘इतिहासकालीन भाषाशास्त्र व भारतीय आर्यांच्या भाषा’ या विषयांवर जी व्याख्याने दिली, त्यामुळे त्यांचे सर्वत्र नाव झाले.

डॉ. घाटगे १९६८मध्ये पुणे येथील डेक्कन महाविद्यालयाचे सहाय्यक संचालक आणि सेंटर फॉर ॲडव्हान्स्ड स्टडीज इन लिंग्विस्टिक्सचे संचालक झाले. डेक्कन महाविद्यालयाने १९७३मध्ये हाती घेतलेल्या संस्कृत शब्दकोशाचे प्रमुख संपादकपद त्यांनी स्वीकारले.

१९८५मध्ये भरलेल्या ऑल इंडिया ओरिएंटल कॉन्फरन्सचे ते अध्यक्ष होते. तसेच १९९०मध्ये बंगळुरू येथे भरलेल्या भारतातील पहिल्या प्राकृत संमेलनाचे अध्यक्षपद डॉ. घाटगे यांनी भूषवले होते. डॉ. घाटगे १९३५पासून पुण्यातील ‘भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिट्यूट’चे आजीव सभासद आहेत. त्यांनी केलेल्या कार्याबद्दल १९९३मध्ये त्यांना ‘प्राकृत ज्ञानभारती’ पुरस्कार प्रदान करण्यात आला.

डॉ. घाटगे यांची महत्त्वाची प्रकाशने : Introduction to Ardha-Maghadi (1941) - अर्धमागधीची तोंडओळख (१९४१), Konkani of South Kanara (1963) - दक्षिण कानडामधील कोंकणी भाषा (१९६३), Cochin Dialect (1967) - कोचीन बोलीभाषा (१९६७), Marathi of Kasargode (1969), कासारगोडमधील मराठी भाषा (१९६९), Marathi Dialect Texts- I (1971) मराठी बोली- (१९७१).

- र.वि. नातू

## घुर्ये, गोविंद सदाशिव

**मानववंशशास्त्रज्ञ, समाजशास्त्रज्ञ, अभ्यासक व लेखक**

**१८९३ – मृत्युदिनांक अनुपलब्ध**

हे मूळचे सिंधुदुर्ग जिल्ह्यातील मालवणचे राहणारे असून यांचे इंटरपर्यंतचे शिक्षण जुनागड येथे झाले. १९१८ साली हे मुंबईच्या एल्फिन्स्टन महाविद्यालयामधून संस्कृत, इंग्लिश घेऊन पहिल्या वर्गात एम.ए. उत्तीर्ण झाले. त्यांना बी.ए.च्या परीक्षेत भाऊ दाजी प्राइज व गंगादास कालिदास शिष्यवृत्ती मिळाली होती. पुढे एल्फिन्स्टन महाविद्यालयात हे



दक्षिणाफेलो होते. एम.ए.च्या परीक्षेत त्यांना चॅन्सेलर्स मेडल, भगवानदास पुरुषोत्तमदास आणि सर लॉरेन्स जेकिन्स शिष्यवृत्त्या मिळाल्या. पुढे त्यांना स्प्रिंजर रिसर्च शिष्यवृत्ती व भगवानदास मूळजी प्राइज मिळाले. सन १९१९ पासून काही काळ हे एल्फिन्स्टन महाविद्यालयात संस्कृतचे प्राध्यापक होते. सन १९१९ पासून १९२०पर्यंत त्यांनी युनिव्हर्सिटी स्कूलमध्ये समाजशास्त्राचा अभ्यास केला, तसेच विद्यापीठाची शिष्यवृत्ती मिळाल्यामुळे ते अधिक अभ्यासाकरता इंग्लंडला गेले. १९२०-१९२३ या काळात लंडन येथील स्कूल ऑफ इकॉनॉमिक्स व केंब्रिज येथे अध्ययन केल्यानंतर ते केंब्रिजमधून पीएच.डी. झाले. सन १९२३ पूर्वीच्या गव्हर्नमेंट सबॉर्डिनेट सर्व्हिसचा त्यांनी राजीनामा दिला. त्यांना एक वर्ष मुंबई विद्यापीठाची खास शिष्यवृत्ती मिळाली होती. सन १९२४पासून मुंबई विद्यापीठाने त्यांची 'रीडर इन सोशिऑलॉजी' म्हणून नेमणूक केली. यांची कित्येक ग्रंथपरीक्षणे 'सर्व्हंट ऑफ इंडिया', 'सोशल सर्व्हिस क्वार्टली', 'जर्नल ऑफ दि बाँबे ब्रँच ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी', 'करंट सायन्स व जर्नल ऑफ दि युनिव्हर्सिटी ऑफ बाँबे' यांत प्रसिद्ध झाली आहेत. याशिवाय लंडन, व्हिएन्ना येथील सोशिऑलॉजिकल व मॅन इन इंडिया या पत्रांत त्यांचे लेख प्रसिद्ध झाले आहेत. यांचे संशोधनात्मक लेखन सतत चालू असते.

यांचे संशोधनात्मक लेखन अगदी नवे आणि जगातील त्या शास्त्रावर लिहिलेल्या ग्रंथांचा विचार लक्षात घेऊन लिहिलेले असल्यामुळे मौलिक असते. यांच्या काही लेखांची यादी पुढे दिली आहे.

1. Rent Statistics of the Bombay Labour Office (Indian Economist, 1925), 2. Growth of Population in India and Elsewhere (Indian Economist, 1925), 3. Ethnic Theory of Caste (Man in India, 1925), 4. Civilization and Fecundity (Man in India, 19125), 5. Funerary Movements in India-Two articles (Man in India 1926), 6. Some Village Studies (in collaboration with another), (Indian Journal of Economics, 1927), 7. Working Class Conditions in Bombay (Indian Journal of Economics, 19131), 8. Untouchable Classes and their Assimilation in Hindu Society (Aryan Path, Feb, 1933), 9. Fertility Data of the Indian Census of 1931 (Bombay University Journal 1934), 10. The Age of Marriage (Marriage Hygiene 1935), 11. Presidential Address, Section of Anthropology (Indian Science Congress, 1935), 12. A Note on the Indian Potter's Wheel (Man in India, 1936), 13. Marriage and Widowhood in India (Marriage Hygiene, 1936), 14. Account of an Exploratory Tour in certain parts of Sind in search of Pre-historic Culture (Bombay University Journal 1936), 15. A Note on Cross-Cousin Marriage in Kathiawar (Bombay Iniversity Journal, 1936), 16. Disposal of Human Placenta (Bombay University Journal, 1937), 17. A Buddhist Site near Khaipur (Bombay University Journal, 1937), 18. Census Contribution to the Racial Analysis of India (Quarterly Journal of Mythic Society, 1937), 19. The Social Process (R. R. Kale Memorial Lecture, 1938 G.I.P.E.), 20. Social Work and Sociology (Reprinted from the Servant of India, 1938), 21. Physical Data from Kathiawar (Jubilee Number of the Journal of the Bombay Anthropological Society), 22. Some problems in Indian Ethnic

घ

History (Presidential Address to the Section of Ethnology and Folk-lore of the 9th All-India Oriental Conference, 1938), 23. A Type of Boonerang from Palanpur (Current Science, 1939), 24. Two Old Sites in Kathiawar (Bombay University Journal, 1939), 25. Some Old Sites in Palanpur (Science and Culture, 1939), 26. Sex Habits of a Sample of Middle Class People in Bombay (Indian Population Problems, 1939), 27. Birth Control Practice in Bombay (Indian Population Problems, 1939), 28. Salary and other Conditions of Work of Clerks in Bombay City (Bombay University Journal, 1941), 29. Woman and Indian Life of Tomorrow (Bulletin of National Council of Women, Feb. and March 1942), 30. Anthropological Approach to the Study of Indian Sociology (Science and Culture, April 1942), 31. Dual Organization in India (J.R.A.I. 1923), 32. Egyptian Affinities of the Indian Funerary Practices (Anthropos, 1923).

यांचे ग्रंथ -

Caste and Race in India (Kegan Paul & Co., 1932, 'Aborigines-So-called and Their Future' (Gokhale Institute of Economics & Politics, Poona, 1943).

- संपादित

**संदर्भ :**

*१. मराठी विश्वचरित्रकोश; संपादक - कामत, श्रीराम पांडुरंग; विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा.*

✻✻✻

# च



## चापेकर, नारायण गोविंद

**इतिहास संशोधक, समाजशास्त्रज्ञ, लेखक**

**१८६९ – १९६८**

नारायण गोविंद उर्फ नानासाहेब चापेकर हे जुन्या पिढीतील नामवंत संशोधक, समाजशास्त्रज्ञ व साहित्यिक म्हणून सुपरिचित आहेत. मुंबईतील एल्फिन्स्टन हायस्कूल व विल्सन महाविद्यालय या संस्थांमध्ये शिक्षण घेऊन बी.ए., एलएल.बी. झाल्यावर त्यांनी काही काळ वकिली केली. सन १९०० ते १९२५ अशी सुमारे २५ वर्षे सबजज्ज या नात्याने सरकारी न्यायखात्यात सेवा दिल्यानंतर १९३१मध्ये त्यांनी औंध संस्थानात सरन्यायाधीशपद स्वीकारले. न्याय देण्यास दिरंगाई न करणे, कायदा आणि आपली सदसद्विवेकबुद्धी यांव्यतिरिक्त अन्य कशाचीही ढवळाढवळ आपल्या न्यायदानात होऊ न देणे, वशिलेबाजीला पूर्ण आळा घालणे ही त्यांच्या कारकिर्दीची महत्त्वाची वैशिष्ट्ये होती. त्यांचे या कालखंडातील विशेष उल्लेखनीय कार्य म्हणजे त्यांनी औंध संस्थानच्या घटना समितीच्या अध्यक्षपदाची धुरा वाहिली.

नानासाहेबांनी महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष म्हणून सुमारे दहा वर्षे जबाबदारी सांभाळली. परिषदेचे मुखपत्र असलेल्या महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचे बंद पडलेले प्रकाशन पुन्हा सुरू करून आठ वर्षे पत्रिकेच्या संपादनाचे कामही केले. पुणे येथे जागा मिळवून परिषदेची स्वत:ची वास्तू उभारली. त्यांच्या योगदानाविषयी म.म. द.वा. पोतदार यांनी ‘महाराष्ट्र साहित्य परिषदेचा इतिहास’ या ग्रंथात म्हटले आहे, ‘चापेकर यांनी कळकळीच्या मंडळींना वाव देऊन त्यांच्याकडून पुष्कळच काम उठवून दाखवले... जातीने परिषदेसाठी कष्टही सोसले... परिषदेचे स्वरूप अधिक पुष्ट झाले. दप्तराची व्यवस्था लागली; आणि लिपी-व्याकरणादी जटिल प्रश्नांच्या सोडवणुकीचा कसून प्रयत्न झाला... म.सा. परिषदेच्या संसारात असा सोन्याचा दिवस उगवला आणि तिचा कायापालट स्पष्ट प्रतीत होऊ लागला.’

नानासाहेबांनी विपुल संशोधनात्मक लेखन केले. त्यांचे सुमारे वीस ग्रंथ व अनेक स्फुट लेख प्रसिद्ध झाले आहेत. ग्रंथ मराठीत असून लेख क्वचित इंग्रजीतही आहेत. त्यांच्या लेखनातील वैविध्य आश्चर्यकारक आहे. वेद, धर्मशास्त्र, समाजशास्त्र, इतिहास, साहित्य, समीक्षा अशा अनेकविध क्षेत्रांतील त्यांच्या व्यासंगाचे स्पष्ट प्रतिबिंब या लेखनामध्ये दिसून येते.

‘बदलापूर’ हा नानासाहेबांचा ग्रंथ समाजशास्त्रातील संशोधनाचा आदर्श म्हणून आजतागायत मान्यता पावलेला आहे. अडीच हजार वस्ती असलेल्या, महाराष्ट्रातील या प्रातिनिधिक खेड्याची आर्थिक, ऐतिहासिक, सामाजिक व धार्मिक पाहणी करून हा ग्रंथ सिद्ध केलेला आहे. विशेष म्हणजे गावातील स्त्रियांकडून माहिती मिळवता यावी, म्हणून त्यांनी आपल्या पत्नीसही आपल्या कामात सहभागी करून घेतले. ‘बदलापूर’ ग्रंथाची ख्याती परदेशातही पोहोचली व अमेरिकन विद्यापीठातही त्यावर संशोधन झाले.

‘पेशवाईच्या सावलीत’ या ग्रंथात उत्तरपेशवाईतील- म्हणजे सन १७४५ ते १८६२ या सव्वाशे वर्षांच्या दीर्घ कालावधीतील जमाखर्चाच्या नोंदींचा अभ्यास करून तत्कालीन सांस्कृतिक व आर्थिक व्यवहारांवर प्रकाश टाकलेला आहे. इतिहासाचे साधन म्हणून जमाखर्चांच्या नोंदींचा उपयोग त्यांच्यापूर्वी कोणीच केलेला नव्हता. इतिहासाच्या अभ्यासाचे एक नवीन दालन नानासाहेबांनी

अभ्यासकांना उघडून दिले, असेच म्हणावे लागेल. नानासाहेब सुधारणावादी होते. 'गच्चीवरील गप्पा' या ग्रंथात त्यांनी धार्मिक विधींमधील जे भाग कालबाह्य किंवा अशास्त्रीय आहेत, ते निरर्थक व म्हणूनच त्याज्य असल्याचे प्रतिपादन केले आहे.

'काश्मीर' व 'हिमालयात' हे नुसते प्रवासवर्णनपर ग्रंथ नाहीत, तर प्रवासादरम्यान केलेल्या सूक्ष्म समाजनिरीक्षणांचा अर्क या ग्रंथांमध्ये उतरलेला आहे. 'चित्पावन' या ग्रंथात चित्पावन ब्राह्मण समाजाचा ऐतिहासिक, सांस्कृतिक बव सामाजिक अंगांनी अभ्यास केलेला आहे. 'वैदिक निबंध' हा ग्रंथ ऋग्वेद आणि अथर्ववेद यांतील विविध विषयांची सखोल चिकित्सा करणारा आहे. यांशिवाय 'चापेकर', 'जीवनकथा', 'साहित्यसमीक्षण', 'समाजनियंत्रण', 'पैसा', 'तर्पण', 'रज:कण', 'निवडक लेख' (भाग १ व २), 'एडमंड बर्कचे चरित्र' असे त्यांचे अनेक ग्रंथ विद्वन्मान्य झाले आहेत.

नानासाहेबांचे सर्व साहित्य चिकित्सक, समीक्षणात्मक, संशोधनपर आहे. परिश्रम, बौद्धिक प्रयास, सूक्ष्म निरीक्षण आणि स्वतंत्र विचार ही नानासाहेबांच्या लेखनाची वैशिष्ट्ये आहेत. आपली अभ्यासपूर्ण मते त्यांनी निर्भीडपणे व परखडपणे मांडली. त्यांची लेखनशैली वैचारिक विषयांना अनुरूप अशीच आहे. काटेकोर शब्दयोजना, बांधेसूद वाक्यरचना हे तिचे स्वाभाविक गुणधर्म आहेत. त्यांची भाषा इंग्रजीच्या प्रभावापासून अलिप्त आहे. संस्कृत भाषेशी घनिष्ठ संबंध असूनही त्यांची भाषा संस्कृतच्या बेडीत अडकून जड व कृत्रिम झालेली नाही. गंभीर विषय सोप्या भाषेत सहजतेने कसा मांडावा ते त्यांच्या लेखनातून समजते. नानासाहेबांच्या निधनानंतर आचार्य अत्रे यांनी 'मराठा'मध्ये जो अग्रलेख लिहिला, त्यात नानासाहेबांच्या लेखनाची वैशिष्ट्ये पुढीलप्रमाणे नमूद केलेली आहेत - 'सर्व लेखन त्या त्या विषयाचा अत्यंत सूक्ष्म विचार करून आणि त्यात कोणत्याही तऱ्हेचे दोष वा चूक राहू नये या विषयी पराकाष्ठेची सावधगिरी बाळगून अतिशय तर्कशुद्ध पद्धतीने लिहिलेले आहे. त्यांच्या लेखनात फालतू मुद्दे आणि गैरलागू युक्तिवाद यांचा फापटपसारा मुळीच नसे. स्वत:च्या लेखनावर इतके कष्ट घेणारा त्यांच्याएवढा चोखंदळ लेखक आम्ही पाहिला नाही.'

नानासाहेबांनी सन १९३४मध्ये बडोदे येथे भरलेल्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद भूषवले. पुणे विद्यापीठाने त्यांना 'डी.लिट.' पदवी देऊन सन्मानित केले होते. तसेच शंकराचार्य मठाच्या वतीने 'सूक्ष्मावलोक' या बिरुदाने त्यांचा गौरव करण्यात आला होता. पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयातील पीएच.डी.च्या विद्यार्थ्यांना ते मार्गदर्शन करीत असत. परदेशी विद्वानांनीही त्यांच्या मार्गदर्शनाचा लाभ मिळवला होता. महाराष्ट्रातील साहित्यिक व सांस्कृतिक वातावरणाच्या जोपासनेमध्ये नानासाहेबांचा फार मोलाचा वाटा होता. सन १९२४मध्ये त्यांच्या मातोश्रींचे निधन झाले. तेव्हापासून पुढे सलग पंचवीस वर्षे ते बदलापूर येथे मातोश्रींचे श्राद्ध आगळ्या पद्धतीने करीत असत. महाराष्ट्रातील अग्रगण्य साहित्यिक आणि विद्वान अभ्यासक-संशोधक यांची मांदियाळी श्राद्धाच्या निमित्ताने बदलापूर येथे भरत असे आणि विविध विषयांवर चर्चा, व्याख्याने यांच्याद्वारा वैचारिक देवाणघेवाण होत असे.

अखेरपर्यंत सतत कार्यरत राहून नानासाहेबांनी वयाच्या ९९व्या वर्षी बदलापूर येथे जगाचा निरोप घेतला.

— मंजूषा गोखले

## चिटणीस, विजया

**मराठी भाषातज्ज्ञ, अध्यापनतज्ज्ञ, लेखिका**

**२३ जुलै १९३७ – २४ जुलै १९८४**

अमराठी भाषिकांना मराठी शिकवण्याच्या संदर्भात डॉ. विजया चिटणीस यांचे नाव सर्वत्र प्रसिद्ध आहे. त्यांचे वडील श्रीधर बाळकृष्ण चिटणीस धुळ्यातील नामवंत वकील होते. आई कमल श्रीधर चिटणीस या



सुगृहिणी होत्या. त्यांना तीन मुले आणि तीन मुली, त्यापैकी एक विजया होत. सर्व भावंडे उच्चशिक्षित असून चिटणीसांचे घराणे त्या काळात सुधारक म्हणून ज्ञात होते. आईला जर ‘अगं, तूगं’ म्हणायचे तर वडिलांनाही ‘ए बाबा’ म्हटले पाहिजे, अशा स्त्री-पुरुष समानतेच्या मताचे विजया चिटणीसांचे वडील होते.

विजया चिटणीसांचा जन्म धुळे येथे झाला. १९५९मध्ये मराठी घेऊन त्या पदवीधर झाल्या व त्यात त्या सर्वप्रथम आल्या. त्यांनी १९६१मध्ये पुण्याच्या डेक्कन महाविद्यालयामधून भाषाशास्त्र या विषयात पीच.डी. पदवी मिळवली. खानदेशातील ‘अहिराणी बोली’ हा त्यांच्या प्रबंधाचा विषय होता. या प्रबंधासाठी त्यांना जागतिक कीर्तीचे भाषाशास्त्रज्ञ डॉ. ना.गो. कालेलकर यांचे उत्तम मार्गदर्शन लाभले. यातूनच पुढे भाषाशास्त्रीय तत्त्वांच्या आधारे अमराठी भाषिकांना मराठी शिकवण्याची प्रेरणा त्यांना मिळाली. भाषा शिकवण्यात येणाऱ्या अडचणी, त्यातील बारकावे यांविषयी सखोल अभ्यास व चिंतन करून अमराठी भाषिकांना सुलभपणे आणि सुकरपणे मराठी शिकता आणि शिकवता यावे यासाठी त्यांनी ‘An Intensive Course in Marathi’ हे पुस्तक लिहिले, ते म्हणजे या क्षेत्रातील पहिल्या क्रमाकांचा संदर्भग्रंथ आहे.

भाषाशास्त्रातील विद्यावाचस्पती अर्थात पीएच.डी. पदवी मिळवल्यानंतर त्यांनी अनेक परदेशी विद्यार्थ्यांना मराठी शिकवले. तसेच बँकांतील व इतर सरकारी क्षेत्रांतील उच्चपदस्थ अमराठी अधिकाऱ्यांना मराठी शिकवण्याचे वर्ग घेतले आणि अमराठी भाषिकांना मराठी शिकवण्याच्या क्षेत्रातील एक तज्ज्ञ शिक्षक म्हणून त्यांचा लौकिक झाला. हे काम चालू असतानाच १९६९-७० या वर्षी डेक्कन महाविद्यालयामध्ये भारतीय भाषा संस्थान (Indian Institute of Central Languages, Mysore) या संस्थेचे पश्चिम विभागीय भाषा केंद्र (Western Regional Languages Centre - W.R.L.C.) सुरू झाले. म्हैसूरच्या भाषासंस्थानच्या अशा पाच विभागीय शाखा असून W.R.L.C., पुणे येथे अमराठी भाषा शिक्षक (शाळेतील) मराठी, सिंधी, गुजराती, कोकणी यापैकी कोणतीही भाषा आपल्या पसंतीनुसार शिकू शकतात. पुण्यातले हे केंद्र १९६९-७०मध्ये जेव्हा सुरू झाले, त्या आरंभापासून ते आयुष्याच्या अखेरीपर्यंत डॉ. विजया चिटणीस त्याच्या प्राचार्य होत्या. अनेक शिक्षक-प्रशिक्षणार्थी विद्यार्थ्यांना त्यांच्या शिकवण्याचा लाभ झाला. वयाच्या ४८व्या वर्षी कर्करोगाने त्यांचे अकाली निधन झाले. पन्नासहून कमी वर्षांच्या आयुष्यातही विजया चिटणीसांनी भाषाशिक्षक म्हणून चांगला नावलौकिक मिळवला. त्याचबरोबर जे शोधनिबंध लिहिले, तेही भाषाशिक्षणाशी निगडित होते. ते असे-

मराठीत १) ‘मातृभाषेचं शिक्षण’ १९७९, २) ‘स्वनविचार’ १९८२

इंग्रजीत - १) Observations of language teaching in Primary & Secondary Schools of Bombay Municipal Corporation - A Report. 2) Special Training course for primary teachers of Madhya Pradesh - A report, 3) The place of Grammer in Mother-tongue teaching - 1979 आणि पुस्तक An Intensive course in Marathi. इलिनॉय विद्यापीठाच्या विदुषी भाषाशास्त्रज्ञ डॉ. श्रीमती काशीवाली यांच्याबरोबरही अमेरिकेत विजयाताईंनी काम केले होते. (१९७७)

ललित लेखनातही त्यांना रस होता, गती होती. मराठी शिकणारे परभाषिक यावर आधारित अशी एक छोटी नाटिका त्यांनी लिहिली होती. तसेच त्या उत्तम वक्ता/वाक्पटू होत्या. मुख्यत्वेकरून भारतीय आणि परदेशी अशा अमराठी भाषिकांना मराठी शिकवणे - त्यासाठीचे Training and Orientation अर्थात

प्रशिक्षण आणि उद्‌बोधन वर्ग यशस्वीरित्या घेणे हे त्यांचे कार्यक्षेत्र होते आणि अखेरपर्यंत त्यामध्ये त्या व्यग्र होत्या.

– डॉ. अपर्णा झा

**संदर्भ :**

१. *पश्चिम विभागीय भाषा केंद्र (W.R.L.C.) ग्रंथालय, डेक्कन कॉलेज, पुणे.*

च

## चित्राव, सिद्धेश्वरशास्त्री विष्णू

**प्राच्यविद्यापंडित, चिकित्सक संशोधक व मराठी कोशसाहित्यकार**

**१ फेब्रुवारी १८९४ – २२ जानेवारी १९८४**



सिद्धेश्वरशास्त्री विष्णू चित्राव यांचे मूळ नाव रंगो वामन धडफळे असे होते. ते चित्राव घराण्यात दत्तक म्हणून गेले. पुणे येथील वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांच्या संस्कृत पाठशाळेत सन १९२० ते १९२२ या काळात मुंबईची संस्कृत पाठशाळा, टिळक महाविद्यालय, पुणे इत्यादी ठिकाणी त्यांचे शिक्षण झाले. नंतर जैन महाविद्यालयात त्यांनी शिक्षकी पेशा पत्करला.

पुढे १९२५पर्यंत सरस्वती मंदिर, पुणे नाईट हायस्कूल व भारत हायस्कूल या शाळांमध्ये त्यांनी अध्यापन केले. पुण्याच्या डेक्कन विद्यापीठातील संस्कृत विभागात शास्त्री म्हणून त्यांची नियुक्ती झाली. महाराष्ट्रातील हिंदू महासभेचे तळमळीचे कार्यकर्ते व पुढारी, अखिल भारतीय शुद्धिसभेचे स्वागताध्यक्ष (१९३५), वेदशास्त्रोत्तेजक सभेचे कार्यवाह (१९३४-५०), भारतीय चरित्रकोश मंडळ या पुण्यातील संस्थेचे संस्थापक व अध्यक्ष इत्यादी महत्त्वाची पदे त्यांनी भूषवली. कांची कामकोटी पीठाच्या शंकराचार्यांकडून १९२०मध्ये ‘विद्यानिधी’ ही उपाधी, पुरीच्या शंकराचार्यांकडून १९५२मध्ये ‘महामहोपाध्याय’ ही पदवी, १९६५मध्ये राष्ट्रपतींकडून ‘राष्ट्रीय संस्कृत पंडित’ म्हणून मानपत्र, ‘Review of Indological Research in last seventy five years.’ हा ग्रंथ १९६७मध्ये राष्ट्रपतींकडून अर्पण, १९६९मध्ये पुणे विद्यापीठाकडून सन्मान्य डी.लिट्. ही पदवी आणि १९७१मध्ये भारत सरकारकडून ‘पद्मश्री’ आदी बहुमान त्यांना प्राप्त झाले.

वेदविद्या व भारतीयांचे धार्मिक संस्कार सामान्य मराठी वाचकांपर्यंत पोहोचवण्याचे अनमोल कार्य करणारे ग्रंथकार म्हणून त्यांचा यथार्थ लौकिक आहे. पूर्वसुरींचे ऋग्वेद संहितेच्या भाषांतराचे अपूर्ण राहिलेले कार्य दहाव्या मंडळापासून सुरुवात करून उलट्या क्रमाने त्यांनी ते १९२८मध्ये पूर्ण केले. अथर्ववेदाचे संपूर्ण भाषांतर करून भारतीय लोकसाहित्याची गंगोत्री १९७२मध्ये महाराष्ट्राला उपलब्ध करून दिली. या भाषांतराला जोडलेली ९० पृष्ठांची प्रस्तावना म्हणजे एक चिकित्सक प्रबंधच आहे.

वैदिक संस्कृती व हिंदू धर्म यांचे पुरस्कर्ते या नात्याने त्यांनी १९२७मध्ये प्रसिद्ध केलेली धर्मग्रंथमाला संध्या, ब्रह्मयज्ञ, वैश्वदेव, पूजा, श्राद्धप्रयोग यांचा परिचय करून देते. गणेश अथर्वशीर्ष यांसारख्या धर्मप्रवण भारतीयांत प्रचलित असलेल्या दैनंदिन स्तोत्रांचा मराठी अनुवाद व परिचय करून दिला. याशिवाय हिंदू धर्मातील संस्कारांचे महत्त्व लोकांना पटवून देण्याच्या उद्देशाने चौल, उपनयन, यज्ञोपवित, समावर्तन, विवाह व शुद्धी या विषयांवर लहान लहान पुस्तके प्रकाशित केली.

या मालेतले पहिले पुस्तक ‘धार्मिक संस्कार व नित्यकर्मे’ १९६५मध्ये प्रकाशित झाले. आचार, संस्कृत आणि मंत्र यांपासून दुरावत चाललेल्या भारतीयांना संस्कारांची आजच्या काळातील आवश्यकता सोदाहरण पटवून देणारी ही माला धार्मिक साहित्यात मोलाची भर टाकणारी आहे. ‘शुद्धिसंस्कार’च्या प्रस्तावनेत धर्मांतर, प्रायश्चित्त व शुद्धीकरण यांबद्दलचे विचार आज अधिक उद्‌बोधक

वाटणारे आहेत. 'हिंदुधर्मतत्त्वसंग्रह' या पुस्तकात हिंदू धर्माच्या तत्त्वांचे सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांनी केलेले विवेचन आणि 'धर्मशिक्षण' या ग्रंथात धर्मशिक्षणाची आवश्यकता समजावून सांगितली. देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण परिचय ग्रंथातही वैदिकांचे मूलस्थान, महाराष्ट्राची वसाहत यात त्यांच्या ऐतिहासिक दृष्टीची प्रचिती येते. ब्राह्मणांची शरीररचना व स्वभाव यांच्या विवेचनात त्यांनी डॉ. घुर्ये, रिश्ते यांसारख्या समाजशास्त्रज्ञांच्या विचारांचा मागोवाही घेतला व भावी दिशा दाखवताना लोकसेवेच्या व्रतावर जोर दिला, हे लक्षणीय आहे.

या कार्यापेक्षाही कोशकार म्हणून चित्रावशास्त्री यांचे निवृत्तीनंतरचे कार्य मराठीत चिरंजीव ठरले. ज्ञानकोश मंडळात वैदिक विभागाचे सहसंपादक म्हणून सन १९१८ ते १९२२ या पाच वर्षांत ज्ञानकोशाच्या प्रस्तावना खंडातील 'दाशराज्ञ युद्ध' व 'वैदिक शब्दसृष्टी' ही त्यांच्या हातची महत्त्वाची प्रकरणे लिहिली होती. त्यांनी महामहोपाध्याय श्रीधरशास्त्री पाठक यांच्या साहाय्याने संपादित केलेली 'महाभाष्यपदसूची' व 'अष्टाध्यायादि पदसूची' व्याकरणाच्या अभ्यासकांच्या दृष्टीने उल्लेखनीय ठरतात. चिकित्सक बुद्धिमत्ता, चिकाटीचे प्रयत्न व कामाची उरकशक्ती या गुणांच्या जोरावर त्यांनी एकट्याने अकारविल्हे टिपणे करून 'प्राचीन चरित्रकोशा'ची ७०० पृष्ठांची पहिली आवृत्ती भारतीय चरित्रकोश मंडळातर्फे १९३२ मध्ये प्रकाशित केली. यात वेदकाळापासून चंद्रगुप्त मौर्य (इ.स. पूर्व ३८०) पर्यंतच्या पूर्वकालीन व्यक्तींसंबंधीची माहिती संगतवार दिली आहे. मौर्य चंद्रगुप्तांपासून पेशवाई अखेरपर्यंतच्या काळाला 'मध्ययुग' असे नाव देऊन त्या काळातील ऐतिहासिक व्यक्तींच्या संगतवार चरित्रांचा कोश 'मध्ययुगीन चरित्रकोश' या नावाने सन १९३७मध्ये प्रकाशित झाला व १८१८ ते १९४५ पर्यंतच्या अर्वाचीन काळातल्या व्यक्तींची चरित्रे सन १९४६ मध्ये 'अर्वाचीन चरित्रकोश' या ग्रंथात संगतवार मांडली. या तिन्ही भागांच्या २२०० पृष्ठांत एकूण १९००० चरित्रे दिलेली आहेत. 'प्राचीन चरित्रकोशा'च्या परिवर्धित संस्करणाची हिंदी आवृत्ती सन १९६४मध्ये प्रकाशित झाली. या आवृत्तीत सुमारे २०० पृष्ठांची नवी भर घातलेली आहे. त्यातली टिपणे साधार तर आहेतच, शिवाय डॉयसेन पाल यांसारख्या हिंदी तत्त्वज्ञानाच्या जर्मन अभ्यासकांसंबंधीची माहितीही अंतर्भूत आहे. या हिंदी ग्रंथाला मध्य प्रदेश सरकारने अहिंदी प्रांतात प्रकाशित झालेला सर्वोत्कृष्ट ग्रंथ म्हणून १९६७मध्ये पारितोषिक दिले.

च

सन १९६९मध्ये त्यांच्या 'प्राचीन भारतीय स्थलकोशा'चा पहिला खंड प्रकाशित झाला. हा भारताच्या सांस्कृतिक भूगोलाचा ज्ञानकोश आहे. पार्गीटर, मॅक्किनडल, फ्लीट या परदेशी भूगोलकारांप्रमाणे डॉ. नंदलाला डे, डॉ. विमलाचरण लॉ यांसारख्या एतद्देशीय भूगोलकारांच्या साहित्याचा सुवर्णमध्य साधून या कोशात प्राचीन भारतातील भौगोलिक स्थलांचे साधार व सुबोध वर्णन आहे. या कोशाची १०१ पानांची प्रस्तावना ही चित्रावशास्त्री यांच्या सांस्कृतिक भूगोलविषयक व्यापक, परंतु चिकित्सक दृष्टीकोनावर प्रकाश टाकणारी आहे. प्राचीन भारतातील विभिन्न नैसर्गिक, प्रादेशिक आणि राजकीय उपविभागांचे या कोशातले वर्णन हे आणखी एक विलोभनीय वैशिष्ट्य. भौगोलिक स्थलांच्या प्राचीन व आधुनिक नावांबरोबर त्यांचे आधुनिक महत्त्व सांगण्याची कोशकारांची पद्धत वाखाणण्यासारखी आहे. विराट भारतवर्षाच्या सांस्कृतिक एकात्मतेचे दर्शन घडवणाऱ्या या कोशाचा दुसरा खंड दुर्दैवाने प्रकाशित झालेला नाही. तात्पर्य, संशोधनाच्या क्षेत्रात संशोधनासाठी संशोधन ही विशुद्ध ज्ञानोपासना करण्याची प्रवृत्ती व संशोधनातही राजकीय व सामाजिक प्रगतीचा आलेख आवश्यक मानण्याचा दृष्टीकोन या दोन्हींचा सुंदर संगम व जुन्या पठडीच्या विद्वानांची सूक्ष्मता आणि आधुनिक विद्वानांची ऐतिहासिक चिकित्सा पद्धती यांचा मनोज्ञ मेळ आपल्या नव्वद वर्षांच्या दीर्घोद्योग व व्यासंग यांनी समन्वित

असलेल्या आयुष्यात घडवून आणणाऱ्या म.म. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांचे कार्य मराठीत अद्वितीय मानावे लागेल.

— संपादित

**संदर्भ :**

१. *मराठी विश्वचरित्र कोश; संपादक - कामत, श्रीराम पांडुरंग; विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा.*

च

## चुट्टिवंस, नंदना

**पुरातत्त्वज्ञ, लेखक, संपादक**

**१९४२**

नंदना चुट्टिवंस यांचा जन्म थायलंडमधील बँकॉक येथे झाला. १९५९ साली त्यांनी पुरातत्त्व विद्येच्या अध्ययनाला बँकॉक सिल्पको विद्यापीठात सुरुवात केली. १९६३ साली त्यांनी पुरातत्त्व विद्येत पदवी प्राप्त केली. याच वर्षी त्यांनी नेदरलॅण्ड्सच्या शिक्षण मंत्रालयातर्फे ॲम्स्टरडॅम विद्यापीठातील 'इन्स्टिट्यूट ऑफ साउथ एशियन आर्किऑलॉजी' या संस्थेत अध्ययनासाठी शिष्यवृत्ती मिळविली. त्यांनी पदव्युत्तर पदवी भारतीय व इराणी भाषा आणि संस्कृती (Indian - Iranian Languages & Cultures) या विषयात ॲम्स्टरडॅम विद्यापीठातून घेतली. यापुढील त्यांचे योगदान मात्र बौद्ध विद्येच्या क्षेत्रात आहे. त्यांनी नेदरलॅण्ड्समधील लायडन (University of Leiden) विद्यापीठातील 'दक्षिण व आग्नेय आशियातील अवलोकितेश्वराचे मूर्तिशास्त्र' (The Iconography of Avalokites'vara In Mainland South East Asia) या विषयावर पीएच.डी. संपादन केली.

१९६८ पासून त्या इन्स्टिट्यूट ऑफ साउथ एशियन आर्किऑलॉजीत संशोधनकार्यात व विविध पदांवर कार्यरत आहेत. आजमितीस त्या अनेक आंतरराष्ट्रीय संशोधन प्रकल्पांवर कार्यरत आहेत. त्यांचे विशेष संशोधन हे बौद्ध कला आणि पूर्व व दक्षिण आशियातील सांस्कृतिक संबंध यां संदर्भातील असून त्यांनी भारतीय कला आग्नेय आशियातील बौद्ध कला व श्रीलंकेतील कला या विषयांवरील संशोधनात विशेष योगदान दिले आहे. त्यांनी अनेक शोधनिबंध व ग्रंथ लिहिले आहेत. त्यांचा पीएच.डी.चा प्रबंध ग्रंथ म्हणून प्रकाशित झाल्यावर विद्वानांनी त्यांच्या कार्याची वाखाणणी केली. त्यानंतर त्यांनी बौद्ध देवता मैत्रेय याच्या मूर्तिशास्त्रावर 'Buddha of the Future : an early Maitreya from Thailand' हा ग्रंथ लिहिला. त्यांच्या अनेक ग्रंथांपैकी आग्नेय आशियावरील 'Ancient Trades and Cultural Contacts in South-East Asia' आणि 'Indonesian Brozes in the Domela Nieuwenhuis on Form & Function' हे दोन ग्रंथ महत्त्वाचे आहेत. त्यांनी आंतरराष्ट्रीय ख्यातीचे पुराविद डॉ. रोलॅण्ड सिल्वा यांच्या गौरवग्रंथाचे संपादन केले. डॉ. नंदना चुट्टिवंस यांच्या पुरातत्त्व कलैतिहास आणि सांस्कृतिक अध्ययन या विषयांतील विशेष योगदानाबद्दल जगभरातील विद्वानांनी 'अभिनंदनमाला' नावाचा त्यांचा गौरवग्रंथ नुकताच प्रकाशित केला.

— प्राची चौधरी

## चौहान, देवीसिंग व्यंकटसिंग

**मराठवाडा स्वातंत्र्यसेनानी, लेखक, प्राच्यविद्यापंडित**

**२ मार्च १९११ – २००१**



स्वामी रामानंद तीर्थ यांच्या मार्गदर्शनाखाली हैदराबाद मुक्ती लढा लढवीत असता दोन वर्षे उस्मानाबादच्या तुरुंगात डांबले गेल्यावर, तुरुंग फोडून बाहेर पडल्यावर पुन्हा अटक होऊन जुलूम सहन करणारा काँग्रेस कार्यकर्ता, महाराष्ट्र सरकारच्या मंत्रीमंडळात दाखल झाल्यावर पक्षाकडून अपमान होताच राजकारण सोडून प्राच्यविद्येच्या क्षेत्रात आंतरराष्ट्रीय नाव मिळवणारा मराठवाड्यातील एक विद्वान पंडित प्रा. देवीसिंग चौहान यांची जन्मशताब्दी २०११ या वर्षात झाली.

उस्मानाबाद जिल्ह्यातील औसा तालुक्यातील शंभर उंबऱ्याचे नागरसोगे हे गाव, तिथले व्यंकटसिंग एक अशिक्षित पण उमदे शेतकरी, पत्नी अंबिकाबाई, मूळचे घराणे उत्तर प्रदेशातील क्षत्रिय ठाकुरांचे. राजे जयसिंगांच्या महाराष्ट्र स्वारीत ही कुटुंबे इकडे आली. व्यंकटसिंग-अंबिकाबाईंचे सुपुत्र देवीसिंग, एक भाऊ आणि दोन बहिणी त्यांच्या आधी जन्माला आल्या, पण लवकरच निवर्तल्या. जवळच्या तीन गावात मिळून दोनशे एकर जमीन, बैल-बारदान; जमीन कसायची एवढेच ध्येय लहानपणी होते.

देवीसिंग यांचे औसामधील उर्दू माध्यमाच्या शाळेत प्राथमिक-माध्यमिक शिक्षण झाले. त्यांना शिष्यवृत्तीही मिळाली. सातवीनंतर ते हिप्परगा येथे राष्ट्रीय शाळेत शिक्षणासाठी दाखल झाले. महात्मा गांधींच्या आवाहनावरून राष्ट्रीय चळवळीत ही शाळा स्थापन झाली होती. १९३१ मध्ये देवीसिंग मॅट्रिक झाले आणि १९४६मध्ये शाळा बंद पडली. आज तिथे स्वामी रामानंदांच्या नावे एक हायस्कूल उभे आहे. राष्ट्रीय शाळेच्या वसतिगृहात दोनशे विद्यार्थी होते. संस्थापक अ. गो. कुलकर्णी आणि व्यं. मा. देशमुख महात्मा गांधींच्या आंदोलनात दोनदा तुरुंगवास भोगून आले होते. देवीसिंग यांनी याच शाळेत २५ रुपये महिना पगारावर तीन वर्षे शिक्षक म्हणून नोकरी केली. १९२७मध्ये स्वदेशाची शपथ घेतल्याने त्यांनी मरेपर्यंत खादीचा वापर केला. साखर खाणे बंद केले होते, पण नगरला साखर कारखाना (पहिला) सुरू झाला आणि ते साखर वापरू लागले.

जून १९३४मध्ये महाविद्यालयीन शिक्षणासाठी ते पुण्यात आले. म.म. द.वा. पोतदार यांच्या प्रोत्साहनाने स.प. महाविद्यालयात दाखल झाले. ह.भ.प. मामा दांडेकरांनी वार लावून जेवायची सोय केली. १९३८मध्ये गणित घेऊन देवीसिंग बी.ए. झाले. १९३७मध्ये हैदराबाद संस्थानात राजकीय काँग्रेस निघाली. त्यावर पुढे बंदी आली. पण २-३ वर्षांच्या काळात भूमिगत होऊन त्यांनी काम केले. मध्य प्रदेशचे डी.पी. मिश्रा आणि रविशंकर शुक्ल यांच्या परिचयातून कायदा शिकण्यासाठी १९३९मध्ये नागपूरला गेले. पुढे वकिली न करता त्यांनी उमरग्याला १९४१मध्ये राष्ट्रीय शाळा स्थापन केली. १९४४मध्ये ते मुख्याध्यापक झाले. स्वदेश-स्वधर्म-स्वभाषा यावर निष्ठा हे त्यांचे ध्येय होते. पण स्वामी रामानंदांचा एक नेता म्हणून निजाम सरकारने त्यांना १९४७मध्ये उस्मानाबादच्या तुरुंगात टाकले. त्यातून ते तुरुंग फोडून बाहेर पडले, पण पुन्हा पकडले गेले. सप्टेंबर १९४८मध्ये पोलीस कारवाईमध्ये तुरुंग फोडून त्यांनी स्वत:ची सुटका केली. मधल्या काळात देवीसिंगांना महात्माजी गेल्याचे मोठे दु:ख झाले.

हैदराबाद काँग्रेसचे ते सक्रिय कार्यकर्ते झाले व औसामधून आमदार म्हणून निवडून आले. बी. रामकृष्ण रावांच्या मंत्रीमंडळात सहकार आणि शिक्षण खात्याचे मंत्री झाले. पुढे मुख्यमंत्र्यांशी त्यांचे मतभेद झाले आणि ते बाहेर पडले. पण मराठवाडा आणि विदर्भ महाराष्ट्रात सामील करावा यासाठी १९५३मध्ये नागपूर करार झाला, त्यामध्ये मराठवाड्याच्या वतीने देवीसिंगांनी स्वाक्षरी केली. १९५६मध्ये संपूर्ण महाराष्ट्राच्या निवडणुकांत पुन्हा औसा मतदारसंघातून ते निवडून आले, पण भाऊसाहेब हिरे आणि यशवंतराव चव्हाण यांच्या सत्तास्पर्धेत ते मागे पडले. नाइलाज म्हणून त्यांना शेती खात्याचे उपमंत्रिपद देऊ केले. अपमानास्पद वागणूक असूनही त्यांनी ते पद स्वीकारले. लोकाग्रहास्तव १९५७ ते १९६२ या कालावधीत ते सांभाळले. १९६३मध्ये पुन्हा निवडणुका झाल्या. ते काँग्रेसच्या तिकिटावर उभे राहिले. राज्यकर्त्यांना ते नको होते. सच्चा काँग्रेसवाला असूनही त्यांना अंतर्गत राजकारणातून अपयश पत्करावे लागले.

सततच्या कार्यमग्न जीवनातून थोडी उसंत मिळताच रिकामपणात त्यांना वाचनाची संधी मिळाली. ऐतिहासिक उर्दू दस्तऐवज, संस्कृत नाटके, वैदिक संहिता यात ते गढून गेले. अगदी प्रथमच त्यांनी मुल्ला नुस्त्रुतीच्या 'तारीख-इ-सिकंदरी' काव्याचे संपादन केले. प्रा. ग.ह. खरे यांनी त्यांचे प्रकट कौतुक केले. ''इतिहास आणि भाषा संशोधनात लक्ष घाला'' असे त्यांना म्हटले. त्यांना

च

दख्खिनी हिंदीची गोडी लागली. देविसिंगांनीच मराठी भाषेला या हिंदीची प्रथमच ओळख करून दिली. नंतरच्या काळात 'इब्राहिम नामा', 'मराठी आणि दख्खिनी हिंदी' तसेच 'दख्खिनी हिंदीतील मराठा इतिहासही मौल्यवान ग्रंथसंपदा त्यांच्या लेखणीतून जन्माला आली. तसेच 'भारत इराणी संश्लेष' भाग १-२, पन्हाळगडासंबंधीचे संस्कृत काव्य 'पर्नाल पर्वत ग्रहणाख्यान' असे काही ग्रंथ त्यांनी लिहिले. १९६४ ते १९७० या काळात ते महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे सदस्य होते. राष्ट्रभाषा सभेच्या मराठवाडा विभागाचे पुढे ते अध्यक्ष झाले. त्यानिमित्ताने त्यांनी मराठवाडा-पुणे एक सांस्कृतिक साखळी जोडली. पुण्यातील राष्ट्रभाषा सभेच्या अतिथिगृहातील वास्तव्य आणि जवळच वास्तव्य करणारे आचार्य लिमये यांचा घनिष्ट परिचय यातून त्यांच्या नवीन अभ्यासाला वाव मिळाला. संस्कृत आणि भांडारकर संशोधन संस्था यांच्याशी ते संलग्न झाले. डॉ. दांडेकर (रा.ना.) यांच्या मार्गदर्शनाने ऋग्वेदाचा भाषाशास्त्रीय अभ्यास सुरू झाला. फारसी-संस्कृत भाषांचा तौलनिक अभ्यास सुरू केला. हिस्टरी काँग्रेसबरोबर ऑल इंडिया ओरिएंटल कॉन्फरन्सच्या अधिवेशनाला जाऊन ते संशोधनात्मक निबंध सादर करू लागले.

त्यांनी १९३३पासून प्रा. ग.ह. खरे यांना गुरू मानले होते. नंतर पुण्यात आल्यावर भाषाशास्त्राच्या अभ्यासासाठी आचार्य वि.प्र. लिमये यांना आणि भांडारकरमध्ये आल्यावर डॉ. रा.ना. दांडेकरांना वेदाभ्यासासाठी गुरू मानले. 'अंडरस्टँडिंग ऋग्वेद' हा त्यांचा ग्रंथ भांडारकर संस्थेने प्रकाशित केला. 'ऋग्वेद समस्या आणि उकल' हा त्यांचा मराठी ग्रंथ त्यापाठोपाठ प्रसिद्ध झाला आणि मग भौतिक पातळीवरून वेदांचा अभ्यास करण्याची नवी दृष्टी देवीसिंगांनी संशोधकांना, भाषणे आणि शोधनिबंध याद्वारा करून दिली. या विषयाच्या अभ्यासाठी एखादी संस्था स्थापन करावी असा त्यांचा संकल्प होता, तो अपूर्णच राहिला.

त्यांच्या कार्याचा गौरव म्हणून मराठवाडा विद्यापीठाने १९८७मध्ये त्यांना डी.लिट्. दिली व त्यांच्या संशोधनकार्याचा गौरव केला. संशोधन क्षेत्रातील त्यांचे कार्य पाहून त्यांचे टीकाकार देवीसिंगाना 'वाट चुकलेला पुढारी' म्हणत असत. राजकारण व समाजकारण सोडून त्यांनी विद्याव्यासंग केला.

भांडारकर संस्थेला आपली ग्रंथसंपत्ती देऊन ते ऋणातून मुक्त झाले. वयाच्या ९०च्या सुमारास ते लातूरमध्ये निवर्तले.

– वा.ल. मंजूळ

***

# ज

## जाधव, सुरेश वसंत

**पुरातत्त्व छायाचित्र अभिलेखक**

**१३ नोव्हेंबर १९३४ – १० मार्च २०१२**



डॉ. सुरेश वसंत जाधव यांचा जन्म सावंतवाडी येथे एका मध्यमवर्गीय कुटुंबात झाला. वडिलांच्या अकाली निधनामुळे ते मुंबईला काकांकडे आले. वयाच्या दहाव्या वर्षापासूनच सुरेश जाधव हे काकांबरोबर ‘मिनर्व्हा मुव्हीटोन’ मध्ये काम करायला लागले.

कुठलेही शालेय शिक्षण नसताना सुरेश जाधव यांच्या इच्छाशक्तीमुळे त्यांना वाचनाची आवड निर्माण झाली. काम करून मिळवलेल्या पैशांतून ते पुस्तके विकत घेत असत. जाधव हे इंग्रजी, मराठी उत्तम वाचत. मिनर्व्हा मुव्हीटोनमध्ये त्यांनी छायाचित्रणाचे धडे घेतले. शालेय शिक्षण नसलेले सुरेश जाधव १९५२ मध्ये छायाचित्रणाच्या शिक्षणाच्या पाठबळावर भारतीय पुरातत्त्वीय सर्वेक्षणात रुजू झाले.

जाधव यांनी पुण्यातील कार्यालयात काम केले व त्याचबरोबर औरंगाबाद येथील बहाल, दायमाबाद, मास्की, पितळखोरा, कान्हेरी व वेरूळ येथील उत्खननात सहभाग घेतला.

सुरेश जाधव यांच्या विविध छायाचित्रांना श्री. घोष, देशपांडे, कृष्णास्वामी इत्यादी मोठ्या पुरातत्त्व शास्त्रज्ञांनी प्रोत्साहन दिले.

१९५५ मध्ये त्यांनी ‘Darid Dela Harport’ यांच्या ‘युनेस्को’ प्रोजेक्टमध्ये अजिंठ्याच्या रंगीत छायाचित्रणाचे काम केले. त्यांनी काढलेली लयण-चित्रे, युरोपचे नकाशे, महाराष्ट्राचे नकाशे यांनी पुष्कळ लौकिक मिळविला.

प्रो. स्पिंक या अजिंठा अभ्यासक व तज्ज्ञ यांच्या सहवासात आल्यामुळे त्यांच्या कलेला व विद्वत्तेला वाव मिळाला. त्यांच्याबरोबर अजिंठ्यावर काम करत असताना त्यांनी बी.ए. व एम.ए.चे शिक्षण पूर्ण केले. डेक्कन महाविद्यालयामधील त्यांचे मित्र गुरुवर्य डॉ. ढवळीकर यांच्या प्रोत्साहनामुळे त्यांनी पुरातत्त्व विद्येत ‘The Rock-Cut Cave Temples at Jinwa- An Integrated Study’ या विषयात पीएच.डी. पूर्ण केली.

मिशिगन विद्यापीठातील एसीएसएए प्रकल्पाकरिता त्यांनी भारत, नेपाळ, अफगाणिस्तान, इंडोनेशिया, ब्रिटिश म्युझियम इत्यादी ठिकाणची लेणी, मंदिरे, शिल्पे, प्राचीन स्थळे यांचे अनेक प्रकारे छायाचित्रांकन केले.

सन १९८५ व १९९२ साली त्यांना अमेरिकेची सिनिअर फुलब्राइट फेलोशिप मिळाली. त्या वेळी ते अभ्यागत व्याख्याता म्हणून कार्यरत होते.

१९९३ मध्ये ते २२व्या एसीएसएएचे अध्यक्ष होते. या सर्व उपाधी असूनही ते अत्यंत नम्र व विनयशील होते. त्यांनी काढलेल्या एलिफन्टाच्या महेशमूर्तीच्या छायाचित्रांत दिसणाऱ्या ‘शिवाचे’ योगिरूप फक्त त्यांच्या कलेतून साध्य होऊ शकते.

जाधव यांनी लिहिलेले ८० हून अधिक शोधनिबंध, सर्व तरुण पुरातत्त्व शास्त्रज्ञांना कायम मार्गदर्शक ठरत राहतील.

– डॉ. श्रीकांत जाधव

## जामखेडकर, अरविंद प्रभाकर
**संस्कृत तज्ज्ञ, पुरातत्त्व अभ्यासक**
**६ जुलै १९३९**



अरविंद प्रभाकर जामखेडकर यांचा जन्म ६ जुलै १९३९ रोजी नाशिक जिल्ह्यातील मालेगाव या तालुक्याच्या गावी प्रभाकर श्री. जामखेडकर व त्यांच्या पत्नी लक्ष्मी प्र. जामखेडकर यांच्या पोटी मध्यमवर्गीय घरात झाला. पारंपरिक गाणपत्य संप्रदायाचे वातावरण असलेल्या त्यांच्या घरात गणेशोत्सवात गणपतीची मूर्ती घरीच बनवण्याची परंपरा होती आणि ती आजही पाळली जाते. घरातूनच त्यांना कलादृष्टी आणि बुद्धिवादी तत्त्वज्ञानाचा वारसा मिळाला. त्यांचे वडील मालेगावच्या शाळेत शिक्षक होते. डॉ. अरविंद प्रभाकर जामखेडकरांना घरातूनच संस्कृत विषयाचे बाळकडू मिळाले होते. त्यांच्या सहाही वडील बहिणीदेखील संस्कृत विषयात प्रवीण होत्या. संस्कृतबरोबरच इंग्लिश भाषेचे ज्ञान आणि गणित विज्ञानातील प्रावीण्य हादेखील त्यांना लाभलेला विद्वत्तेचा वारसा होता. त्यांचे शालेय शिक्षण मालेगाव येथेच पार पडले. उच्च शिक्षणासाठी ते पुण्याला आले. १९५४ ते १९५८ या काळात बालमुकुंद लोहिया संस्कृत पाठशाळेत (आताचे टिळक महाराष्ट्र विद्यापीठ) त्यांचे संस्कृतचे पारंपरिक शिक्षण झाले आणि सर परशुरामभाऊ (स. प.) महाविद्यालयात व नंतर पुणे विद्यापीठात (आता सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ) औपचारिक शिक्षणाची सुरुवात झाली. या काळात त्यांनी वेदांचा अभ्यास सुरू केला. त्यांच्या पुण्यातील वास्तव्याच्या सुरुवातीच्या काळात त्यांच्यावर सिद्धेश्वरशास्त्री चित्राव आणि प्रा. रा.ना. दांडेकर यासारख्या भारतविद्येच्या गाढ्या अभ्यासकांचा व पं. भागवत गुरुजी (पं. वा.भा. भागवत) आणि धुपकर गुरुजी या संस्कृतप्रेमींचा मोठा प्रभाव पडला. या काळात त्यांनी व्याकरण, मीमांसा यासारख्या विषयांचेही अध्ययन केले. त्यांच्या पदवी अभ्यासक्रमासाठी त्यांनी संस्कृतबरोबरच अर्धमागधी हा विषय अभ्यासला. मुळातच कुशाग्र बुद्धी, उत्तम स्मरणशक्ती आणि जिज्ञासू वृत्ती असलेल्या डॉ. अरविंद जामखेडकरांनी आपल्या पदवी अभ्यासक्रमानंतर एक वेगळा मार्ग निवडला.

वेदांच्या अध्ययनासाठी भाषाशास्त्राचे ज्ञान असणे गरजेचे आहे, हे लक्षात आल्यावर १९५८ ते १९६०मध्ये येरवडा येथील डेक्कन महाविद्यालयामध्ये त्यांनी संस्कृत विषयाबरोबरच भाषाशास्त्र हा तज्ज्ञतेचा (specializationचा) विषय स्वीकारून पदव्युत्तर पदवीचा (एम.ए.) अभ्यास करण्यासाठी प्रवेश घेतला. तेथे नंतरच्या काळात त्यांनी संस्कृत डिक्शनरीमध्ये काम केले. या काळात त्यांना डॉ. एस.एम. कत्रे, डॉ. ह.धि. सांकळिया, डॉ. शां.भा. देव अशा विद्वानांचा सहवास लाभला. पुणे विद्यापीठाने त्यांना 'वसुदेवहिंडीः एक सांस्कृतिक अध्ययन' (Cultural History of Vasudevhindi) या विषयावर प्रा. डॉ. शां.भा. देव यांच्या मार्गदर्शनाखाली लिहिलेल्या प्रबंधासाठी (१९६१-१९६६) प्राचीन भारतीय संस्कृती या विषयामध्ये विद्यावाचस्पती (Ph.D.) पदवी प्रदान केली. या काळात डॉ. ह.धि. सांकळिया आणि डॉ. शां.भा. देव यांच्या मार्गदर्शनाखाली १९६०-६१मध्ये नेवासा आणि १९६१मध्ये चांडोली या ताम्रपाषाणयुगीन पुरातत्त्वीय स्थळांवर होत असलेल्या उत्खननामध्ये सहभाग घेतला. १९६६ ते १९६८ या काळात अर्धमागधीचे साहाय्यक प्राध्यापक (Assistant Professor) म्हणून श्री शिवाजी विद्याप्रसारक संस्थेच्या कला, विज्ञान आणि एम.एफ.एम.ए. वाणिज्य महाविद्यालय, धुळे येथे काम केले. यानंतर ते नागपूर विद्यापीठाच्या प्राचीन भारतीय इतिहास, संस्कृती आणि पुरातत्त्व या पदव्युत्तर विभागामध्ये अधिव्याख्याता म्हणून रुजू झाले. १९७७पर्यंत त्यांनी सोनगाव (१९६५), टाकळघाट–खापा (१९६८-६९), पौनी (१९६९-७१), माहूरझरी (१९७०-७१), भोकरदन (१९७२-७३),

मांढळ (१९७५-७७) अशा अनेक पुरातत्त्वीय उत्खननात सहभाग घेऊन त्यापैकी काहींचे उत्खनन अहवाल लिहिण्यातही योगदान दिले.

१९६९मध्ये त्यांचे पितृछत्र हरपले. १९७१-७२ साली त्यांना नेदरलँड सरकारची रेसीप्रोकल फेलोशिप मिळाली. या काळात त्यांनी आग्नेय आशियाच्या संस्कृतीवर काम केले. संस्कृत, अर्धमागधी, भाषाशास्त्र, कोशशास्त्र, पुरातत्त्व हा प्रवास या काळात कला आणि कलेतिहासाच्या दिशेने होऊ लागला. या काळात युरोपातील अनेक वस्तुसंग्रहालयांना आणि कला वस्तुसंग्रहांना त्यांनी भेट दिली.

सन १९७३ मध्ये अनुराधा यांच्याशी त्यांचा विवाह झाला. त्यांना पुष्कर (१९७५), मृणालिनी (१९७६) आणि प्रमोद (१९८०) अशी तीन अपत्ये झाली.

१९७७ साली डॉ. अ.प्र. जामखेडकर यांची महाराष्ट्र राज्याच्या पुरातत्त्व आणि वस्तुसंग्रहालय विभागाच्या संचालकपदी नियुक्ती झाली. त्यांच्या २० वर्षांच्या कार्यकाळात त्यांनी विभागाच्या कार्यपद्धतीत काही मोलाचे आमूलाग्र बदल घडवून आणले, अनेक नवीन वस्तुसंग्रहालयांची स्थापना केली, अनेक पुरातत्त्वीय उत्खनने केली. या काळात त्यांनी डॉ. शां.भा. देव, डॉ. नागराजा राव, डॉ. म.न. देशपांडे, डॉ. वॉल्टर स्पिंक, डॉ. मेरलीन लीज, डॉ. जेरी मलांड्रा, डॉ. नंदना चुटीवॉन्ग अशा अनेक दिग्गज विद्वानांबरोबर काम केले. त्यांच्या कार्यकाळातील सर्वात मोलाचे योगदान म्हणजे १९९३मधील लातूरजवळील किल्लारी येथे झालेल्या भूकंपानंतरचे पुरातत्त्वीय स्थलांच्या आणि स्मारकाच्या संवर्धनाचे कार्य. १९८३-९६ या काळात एकूण तीन वेळा महाराष्ट्र शासनाच्या पुराभिलेखागाराच्या संचालकपदाचा अधिभार त्यांच्यावर सोपवण्यात आला.

१९८४ साली केंद्रीय विद्यापीठ आयोगाने (University Grants Commissionने) राष्ट्रीय अधिव्याख्याता (National Lecturer) म्हणून नियुक्ती देऊन त्यांचा सन्मान केला. १९८५ साली त्यांनी जागतिक धर्म परिषदेत भारताचे प्रतिनिधित्व केले. १९८८ साली एशियाटिक सोसायटी ऑफ मुंबईने त्यांना रजतपदक (Silver Medal) (१९८३-८६) देऊन त्यांचा सत्कार केला.

डॉ. अरविंद जामखेडकरांच्या २० वर्षांच्या संचालकपदाच्या कारकिर्दीत त्यांनी स्वतंत्रपणे तसेच नागपूर विद्यापीठ, डेक्कन कॉलेज, औरंगाबाद विद्यापीठ अशा अनेक विद्यापीठांबरोबर अनेक पुरातत्त्वीय उत्खनने हाती घेतली. नायकूंड (१९७७-८०), माहूरझरी (१९७८-७९), नागरा (१९७९-८३), सोअनेर (१९८०-८१), खैरवाडा (१९८१-८२), भागिमाहिरी (१९८२-८४), हमलपुरी (१९८२-८३), चारठाणा (१९८२-८३), तेर (१९८३-८४, १९८७-८८ आणि १९८८-८९), कंधार (१९८४-८५), मांढळ (१९८४-८५), अगर (१९८४-८५), थाळनेर (१९८४-८५), दौलताबाद (१९८४-८५), मुलचेरा आणि विवेकानंदपूर (१९८७-९०), इर्ला (१९८९-९०), मांढळ (१९९१-९२), वाशिम (१९९२-९३, १९९४-९५) आणि पैठण (१९९४-९५) ही त्यापैकीच काही होत.

या कामाच्या व्यापातही त्यांचे संशोधनही सातत्याने सुरूच होते. त्यांचे आजपर्यंत शंभरच्या जवळपास लेख प्रकाशित असून संशोधनात्मक आणि ललित अशा अंगांनी त्यांनी लेखन केले आहे. त्यांच्या उल्लेखनीय ग्रंथांमध्ये ऑक्स्फर्ड विद्यापीठाच्या प्रकाशनाने प्रसिद्ध केलेला 'अजिंठा' (२००९) तसेच महाराष्ट्र राज्य गॅझेटीअर विभागाने प्रकाशित केलेला 'महाराष्ट्रः प्राचीन काळ, भाग १ खंड २, महाराष्ट्र स्थापत्य आणि कला' हे ग्रंथ आहेत. त्यांनी भारतीय संस्कृतीतील हिंदू, बौद्ध आणि जैन या तिन्ही धर्मपरंपरांवर विपुल लेखन केले आहे. कला, स्थापत्य, मूर्तिविज्ञान, मूर्तिशास्त्र, तत्त्वज्ञान, पुराकथा, पुरातत्त्व, पुराभिलेखविद्या, भाषाशास्त्र, संस्कृत-प्राकृत साहित्य, मौखिक परंपरा आणि चरित्र अशा विविध विषयांवर लेखन केले.

वाकाटक नृपती आणि त्यांचे सांस्कृतिक योगदान या विषयावर त्यांचे महत्त्वाचे काम आहे. त्यांनी वाकाटकांशी संबंधित अनेक पुरातत्त्वीय पुरावे उजेडात

आणले. वाकाटकांचे पुराभिलेख, कला, साहित्य, काळ अशा अनेक विषयांवर त्यांनी लेखन केले.

त्याशिवाय वेद आणि सिंधू संस्कृती, वेदांचा काळ, वैदिक देवता, शैव-वैष्णव-शाक्त परंपरा, अदिती-लज्जागौरी, पाञ्चरात्र परंपरा व त्यांचा साहित्य व कलेवरील प्रभाव, स्मार्त व श्रौत परंपरांचा कलेवरील प्रभाव, मंदिर स्थापत्य : उगम आणि विकास, जैन साहित्य, कला, संस्कृती, स्थापत्य, बौद्ध धर्म आणि तत्त्वज्ञान, बौद्ध कला, हीनयान ते महायान, स्तूप : संकल्पना आणि तिचा विकास, अग्नेय आशियातील भारतीय संस्कृतीचा प्रसार आणि प्रभाव, तेथील कला, स्थापत्य आणि पुराभिलेख अशा अनेक विषयांवर त्यांनी मूलभूत लेखन केले आहे.

१९९७मध्ये निवृत्त झाल्यावर त्यांना अनंताचार्य इंडॉलॉजिकल रिसर्च इन्स्टिट्यूटमध्ये मुंबई विद्यापीठाकरिता प्राचीन भारतीय संस्कृती या विषयासाठी मार्गदर्शक (Research Guide) म्हणून नेमणूक झाली. यानंतर त्यांनी क. जे. सोमैया सेंटर फॉर बुद्धिस्ट स्टडीज येथे विद्यार्थ्यांना मार्गदर्शन देण्यास सुरुवात केली. सौंदर्यशास्त्र (Aesthetics), पुरातत्त्वविद्या, बौद्धविद्या, प्राचीन भारतीय कला आणि विज्ञान, नाणकशास्त्र, प्राचीन भारतीय संस्कृती इ. अनेक विषयांचे विविध अभ्यासक्रम मुंबई विद्यापीठामध्ये आखण्यात त्यांचे भरीव योगदान आहे. त्यांचे हे प्रचंड कार्य पाहून त्यांना २००१ या वर्षी इंडियन हिस्टरी काँग्रेसच्या कोलकाता येथे भरलेल्या ६१व्या अधिवेशनाचे पुरातत्त्व विभागाचे अध्यक्ष म्हणून सन्मानिले गेले. महाराष्ट्रातील आणि देशातील शैक्षणिक संस्थांमध्येच नव्हे, तर जगभर त्यांच्या विद्वत्तेचा स्नमान केला गेला आहे.

यशाच्या आणि कीर्तीच्या शिखरावर असतानाच त्यांच्या मातोश्री लक्ष्मी प्र. जामखेडकर यांचे सन २००६मध्ये निधन झाले. २००७ ते २०१३ या काळात डॉ. अरविंद प्र. जामखेडकर एशियाटिक सोसायटी ऑफ मुंबई या संस्थेचे उपाध्यक्ष होते. ते आजही या संस्थेचे पदाधिकारी म्हणून काम पाहतात. एशियाटिक सोसायटी ऑफ मुंबईमध्ये त्यांनी अनेक संशोधनात्मक उपक्रम सुरू करून संस्थेला मोठा लौकिक प्राप्त करून दिला. संस्थेच्या ग्रंथालयातील हस्तलिखितांच्या अध्ययनाचा संशोधन प्रकल्प हा त्यापैकीच एक होय.

भारतीय पुरातत्त्व सर्वेक्षणाने (Archaeological Survey of Indiaने) स्थापन केलेल्या अजिंठा हेरिटेज कमिटीचे सदस्य सल्लागार म्हणूनही डॉ. जामखेडकर काम पाहत होते. डॉ. जामखेडकर यांनी छत्रपती शिवाजी वस्तुसंग्रहालयाचे (पूर्वीच्या प्रिन्स ऑफ वेल्स म्युझिअमचे) सल्लागार व महाराष्ट्र राज्याच्या गॅझेटीअर विभागाच्या संपादक मंडळाचे सदस्य म्हणूनही काम पाहिले. आज डॉ. जामखेडकर हे भारतीय इतिहास संकलन समितीच्या कोकण प्रांताचे अध्यक्ष आहेत. मुंबई विद्यापीठांतर्गत १५ विद्यार्थ्यांना त्यांच्या मार्गदर्शनाखाली पदवी बहाल करण्यात आल्या आहेत.

अशा या ज्ञानसूर्याच्या सन्मानार्थ मुंबई विद्यापीठाने २०१४ साली 'महाराष्ट्रातील पुरातत्त्वीय सर्वेक्षण' या विषयावर परिसंवाद आयोजित केला होता. २०१५च्या मार्च महिन्यात पुण्यातील संविद्या या संस्थेने त्यांच्या सन्मानार्थ एक आंतरराष्ट्रीय चर्चासत्राचे आयोजन केले होते. याच चर्चासत्रात त्यांचा गौरवग्रंथ प्रकाशित करण्यात आला. आजही पुरातत्त्वविद्या, प्रच्यविद्या, प्राचीन साहित्य, धर्म व तत्त्वपरंपरा अशा अनेक विषयावर त्यांचे अविरत संशोधन सुरू आहे.

– डॉ. सूरज अ. पंडित

## जावडेकर, शंकर दत्तात्रेय

**पत्रकार आणि विचारवंत**

**२७ सप्टेंबर १८९४ - १० डिसेंबर १९५५**

☛ ***मुख्य चरित्रनोंद - पत्रकारिता खंड***

शंकर दत्तात्रेय जावडेकर यांचा जन्म २७ सप्टेंबर १८९४ रोजी मलकापूर संस्थानातील मलकापूर येथे झाला. त्यांचे वडील दत्तात्रेय जावडेकर हे विशाळगड संस्थानिकांचे खासगी कारभारी होते. वयाच्या दुसऱ्या वर्षी आचार्यांच्या आईचे निधन झाले. कोल्हापूरच्या



प्रायव्हेट हायस्कूलमधून इंग्रजी सहावी झाल्यावर पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमधून मॅट्रिक आणि १९१८मध्ये तत्त्वज्ञान हा विषय घेऊन मुंबईच्या विल्सन महाविद्यालयामधून ते बी.ए. झाले. एम्.ए.चा अभ्यास चालू असतानाच १९२० साली त्यांनी गांधीजींच्या असहकाराच्या आंदोलनात भाग घेतला. त्यामुळे त्यांना पदवी संपादन करता आली नाही. संवेदनक्षम वयात गांधीवादाचा आणि मार्क्सवादाचा त्यांनी सखोल अभ्यास केला. राष्ट्रीय आंदोलनात भाग घेतल्यामुळे त्यांना १९३०मध्ये, १९३२-३३मध्ये व १९४२मध्ये तुरुंगात जावे लागले. १९३० मध्ये झालेल्या मिठाच्या सत्याग्रहात पुण्याहून गेलेल्या सत्याग्रहींमध्ये ते सहभागी झाले होते.

१९३८पासूनच त्यांना सतत आजारपणाचा सामना करावा लागला. या परिस्थितीवर मात करून त्यांनी आपला व्यासंग कायम ठेवला. कार्ल मार्क्स यांच्या 'कॅपिटल'चा व हॅरॉल्ड लास्कीच्या 'अ ग्रामर ऑफ पॉलिटिक्स'चा अभ्यास करून त्यांनी १९२६मध्ये 'राजनीतिशास्त्र' हा ग्रंथ लिहिला. पुण्याच्या टिळक महाविद्यालयात इतिहास, अर्थशास्त्र आणि राज्यशास्त्र शिकवण्यासाठी त्यांची नियुक्ती केली गेली. त्या वेळी त्यांना 'आचार्य' ही उपाधी प्राप्त झाली. १९२० ते १९५५ या कालखंडात महाराष्ट्रातील तरुण पिढीला सत्याग्रही समाजवादाची शिकवण देऊन तिच्यावर बुद्धिवादाचे आणि नैतिकतेचे संस्कार करण्यासाठी आचार्य जावडेकरांचे प्रयत्न कारणीभूत ठरले. स्थितप्रज्ञाच्या भूमिकेतून रचनात्मक कार्य करण्याकडे त्यांच्या मनाचा कल होता.

'स्वराज्य', 'नवशक्ती' आणि 'लोकशक्ती' या वृत्तपत्रांचे संपादक म्हणून त्यांनी कार्य केले. भारतीय राजनीती आणि पाश्चात्त्य राज्यशास्त्र यांच्या आधाराने राष्ट्रीय चळवळीला बळ देण्यात जावडेकरांच्या तेजस्वी लेखणीचे विशेष योगदान आहे. विशेषत: 'लोकशक्ती'च्या माध्यमातून ध्येयनिष्ठ पत्रकारितेची परंपरा आचार्य जावडेकरांनी चालू ठेवली. १९५० ते १९५५पर्यंत रावसाहेब पटवर्धनांबरोबर आचार्य जावडेकर यांनी 'साधना' साप्ताहिकाच्या संपादकपदाची धुरा वाहिली. 'लोकशिक्षण' 'नवभारत' आणि 'अखंड भारत' या पत्रांमधून त्यांनी विविध विषयांवर लेखन केले. ते 'नवभारत'च्या संपादक मंडळांत होते.




पत्रकारिता आणि साहित्य क्षेत्रातील प्रचंड लेखनाने ज्येष्ठ विचारवंत असा लौकिक मिळालेले आचार्य प्रज्ञावंत, तत्त्वचिंतक, ऋषितुल्य व्यक्तिमत्त्व होते.

राजकीय व सामाजिक विषयांवर मूलगामी विवेचन करणारे अनेक ग्रंथ त्यांनी लिहिले. त्यांच्या प्रतिपादनशैलीला बुद्धिवादाची ठाम बैठक लाभलेली आहे. 'महाराष्ट्रातील राष्ट्रीय पक्षांची उत्क्रान्ती' (१९२१), 'हिंदी राजकारणाचे स्वरूप' (१९२४), 'विश्वकुटुंबवाद' (१९२९), 'राज्यशास्त्रमीमांसा' (१९३४), 'गांधीवाद' (१९४५), 'काँग्रेस आणि महायुद्ध' (१९४५), 'लोकमान्य टिळक व गांधी' (१९४६) आणि 'गांधी जीवनरहस्य' (१९४६) इ. ग्रंथ त्यांनी लिहिले.

'आधुनिक भारत' हा त्यांचा महत्त्वाचा ग्रंथ होय. पेशवाईच्या अस्तापासून स्वातंत्र्यप्राप्तीपर्यंतच्या वैचारिक चळवळींचे समालोचन त्यांनी यात केलेले आहे.

शंकर जावडेकर यांनी १९४९मध्ये पुण्याला भरलेल्या ३२व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद भूषवले. आपल्या अध्यक्षीय भाषणामधून त्यांनी क्रांतिरसाची संकल्पना मांडली. सत्याग्रहाने

जनतेचे जडत्व नष्ट केले आणि सत्याच्या आग्रहाची नवी निष्ठा निर्माण केली, असे त्यांनी प्रतिपादन केले.

दम्याच्या त्रासामुळेच कोरड्या हवेच्या सांगली जिल्ह्यातील इस्लामपूर येथेच त्यांचे बहुतांश काळ वास्तव्य होते. दम्याच्या विकारानेच आचार्य जावडेकरांचे निधन झाले.

— संपादित

ज

## जिनविजय मुनी

**पुरातत्त्ववेत्ता**

**२७ जानेवारी १८८८ – मृत्युदिनांक अनुपलब्ध**



''आपल्या प्राचीन संस्कृतीचे संशोधन आणि उद्धार करण्याच्या कार्यात जिनविजय मुनींसारखे कट्टर धर्माचरण करणारे, त्यागी, तपस्वी विरळच आहेत. सर्वस्वी माझ्या अखत्यारीत असते तर सर्वाधिक धन ह्या कार्यासाठी देण्याची व्यवस्था मी केली असती.'' या शब्दांमध्ये भारताचे पहिले राष्ट्रपती डॉ. राजेंद्रप्रसाद यांनी १ एप्रिल १९५५ रोजी जोधपूर येथे पुरातत्त्व मंदिराचा शिलान्यास करताना जिनविजयजींच्या कार्याचा गौरव केला होता.

जिनविजय मुनी यांचे पूर्वाश्रमीचे नाव 'किसनसिंह', तर टोपणनाव 'रणमल' होते. त्यांचे पिता परमवंशीय क्षत्रियकुळातील 'श्री. बिरधीसिंह' (बडदसिंह) होते. त्यांची माता देवडावंशीय चौहाण घराण्यातील सिरोही यांची कन्या 'राजकुंवर' होती.

जिनविजय यांचा जन्म भिलवाडा जिल्ह्यातील हुरडा तालुक्यातील रुपाहेली गावात झाला.

१८५७च्या लढ्यात सहभागी झाले म्हणून इंग्रजांनी त्यांच्या पूर्वजांची संपत्ती जप्त केली होती. परिस्थितीमुळे त्यांना शाळेत अक्षरज्ञान घेता आले नाही. श्री यतिसिंह, गुरू मुनिदेवहंस ह्यांच्या सहवासात ते राहिले. त्यांनी जिनविजयना अक्षरओळख, धर्माचे बाळकडू दिले. अत्यंत तीव्र जिज्ञासा, कुशाग्र बुद्धी यामुळे हळूहळू त्यांनी लेणी, शिलालेख वाचण्याचे कौशल्य प्राप्त केले. गुरूंच्या घरी, मंदिरामध्ये, धर्मशाळेत, जिथे मिळेल तेथे राहून शिकण्याची जिद्द त्यांच्याकडे होती.

प्रथम मुनिदेव यांचे शिष्य म्हणून, नंतर त्यांच्या मृत्यूनंतर खाकीबाबा शिवानंद यांच्याकडून दीक्षित किशनभैरव, जैन स्थानकवासी उपासक संघांबरोबर भ्रमण करता करता स्थानकवासी दीक्षा, शेवटी मंदिरमार्गी श्वेतांबर धर्माची दीक्षा असा त्यांचा जीवनप्रवास सुरू होता. दीक्षा घेताना मंदिरमार्गी श्वेतांबर मुनी सुंदरविजयजी यांनी त्यांना 'जिनविजय' हे नाव दिले. या दीक्षेनंतर त्यांच्या ज्ञानाच्या शाखा आणखी रुंदावल्या. इतिहास, संशोधन यातील त्यांची रुची परिपक्व झाली. पाटण, सुरत, बडोदा येथे जैन ग्रंथांचे अवलोकन व निरीक्षण करून त्यांना अनेक भाषांमधील अलभ्य ग्रंथांचे संशोधन, संपादन, प्रकाशन करण्याची प्रेरणा होऊ लागली. मुनीश्रींच्या अथक परिश्रमाने संपूर्ण राज्यातून प्राच्यविद्येची दुर्लभ माहिती जमा केली व बृहद् भंडार तयार केले. १९०६ ते १९१६ या काळात योग्य साधुचर्यापालन करत असताना १९१५मध्ये पुणे येथे भांडारकर इन्स्टिट्यूट येथे कार्यरत असताना राष्ट्रीय जागृतीच्या वातावरणातील लोकमान्य टिळक, म. धोंडो केशव कर्वे यांच्या प्रभावाने ते अत्यंत प्रेरित झाले. धर्माच्या अध्ययनाबरोबरच इतर विषयांच्या अध्ययनामुळे, मनन, चिंतन वाढल्याने त्यांचा दृष्टीकोन सर्वसमावेशक झाला. स्वातंत्र्यचळवळीत भाग घेण्याच्या प्रेरणेने त्यांनी आपल्या साधुवेशातून व आचरणातून सवलत घेतली.

१९२०साली गांधीजींनी गुजरातला 'राष्ट्रीय विद्यापीठा'ची स्थापना केली आणि भांडारकर इन्स्टिट्यूट येथे कार्य करणारे हे पुरातत्त्ववेत्ते गुजरातला परत गेले आणि राष्ट्रीय विद्यापीठात पुरातत्त्वाचार्य झाले. येथे जर्मनीहून आलेल्या विद्वानांच्या निमंत्रणावरून ते जर्मनीला गेले. बर्लिन येथे विद्वानांबरोबर भारतीय

साहित्य, दर्शन ह्या विषयांवर त्यांनी सखोल चर्चा केली. भारतीय संस्कृतीच्या प्रचार व प्रसारासाठी त्यांनी तेथे 'हिंदुस्थान हाऊस'ची स्थापना केली. या संस्थेच्या विकासासाठी १९३०मध्ये भारतात परत येऊन त्यांनी गांधीजींची भेट घेतली.

महात्मा गांधीजींच्या प्रभावामुळे त्यांनी मिठाच्या सत्याग्रहात भाग घेतला. तुरुंगवासामध्ये कन्हैयालाल मुन्शी यांच्याशी त्यांचा परिचय झाला, म्हणूनच 'भारतीय विद्याभवन' येथे सामान्य निदेशकपदी कार्य केले. रवींद्रनाथ टागोर यांच्या निमंत्रणावरून त्यांनी शांतीनिकेतन विद्यालयात जैन साहित्य विभाग सुरू करून त्याचे आचार्यपद भूषवले. कलकत्ता येथील चार-पाच वर्षांच्या वास्तव्यात 'सिंघी जैन ग्रंथमाला'च्या अंतर्गत ७६ गुप्त लुप्त ग्रंथांचे प्रकाशन केले.

प्रकृतिअस्वास्थ्यामुळे राजस्थानला परत येऊन त्यांनी 'राजस्थान प्राच्य विद्या प्रतिष्ठान' (पुरातत्त्व मंदिर) येथे भारतीय साहित्यातील पन्नास महत्त्वाचे ग्रंथ प्रकाशित केले.

चंदेरियाला १९५० साली त्यांनी 'सर्वोदय साधना आश्रम'ची स्थापना केली. त्याच गावामध्ये 'सर्वदेवायतन' असे सर्व धर्मांच्या देवांचे एकत्र मंदिर स्थापित केले. आपल्या जन्मगावी रुपाहेली येथे 'महात्मा गांधी स्मृती मंदिर' उभे केले.

त्यांनी भारतीय विद्या, पुरातत्त्वविद्या, राजस्थान पुरातत्त्व, जैनविद्या यांच्या प्राचीन सामग्रीचे अध्ययन, शोध, प्रकाशन करण्याचे मौलिक, ऐतिहासिक कार्य केले.

मुनी जिनविजय यांच्या महान कार्याचा गौरव म्हणून जर्मन ओरिएन्टलद्वारा १९५२मध्ये 'ऑनररी सदस्य' सन्मान त्यांना मिळाला. १९६२ साली भारतातील सन्माननीय 'पद्मश्री' उपाधी प्राप्त झाली. १९६३ साली भारतीय विद्याभवनचे 'सन्माननीय सदस्य' म्हणून त्यांची निवड झाली. जिनविजय यांचा जन्म जरी राजस्थानमधील असला, तरी त्यांचे कार्यक्षेत्र मात्र राजस्थान, गुजरात, महाराष्ट्र, बंगाल होते. तसेच बर्लिन, जर्मन येथेही ते कार्यशील होते.

— लीना दोशी

**संदर्भ :**


१. *पुरातत्त्वाचार्य मुनिजिनविजय अभिनंदन ग्रंथ १९७१. संयोजक-संपादक - श्री. जवाहरलाल जैन. प्रकाशक - श्री मुनिजिनविजय सम्मान समिती, जयपूर.*

२. *पुरातत्त्वाचार्य पद्मश्री मनीषी मुनी श्री जिनविजयजीका व्यक्तित्व और कर्तृत्व. २ ऑक्टोबर १९७१. लेखक - रविशंकर भट्ट. प्रकाशक - केशरपुरी गोस्वामी, अध्यक्ष, सर्वोदय साधनाश्रम, चंदेरिया.*

३. *जिनविजय जीवनकथा १९७१. लेखक - मुनिजिनविजय. प्रकाशक - काशिलाल शर्मा, प्रबंधक, महात्मा गांधी स्मृती मंदिर, रुपहेली.*

४. *पुरातत्त्वाचार्य पद्मश्री, मनीषी मुनि श्री जिनविजयजी महाराज संक्षिप्त जीवन परिचय. १५ ऑगस्ट १९७१. लेखक - पद्माधर पाठक. प्रकाशक - केशरपुरी गोस्वामी, सर्वोदय साधनाश्रम, चंदेरिया.*


## जोग, केशव पांडुरंग

**राष्ट्रीय संस्कृत व्याख्याता, संशोधक**

**२६ मार्च १९२५ — २५ जानेवारी २०००**

संस्कृतचे विद्यार्थिप्रिय प्राध्यापक असा लौकिक मिळविलेल्या केशव पांडुरंग जोग यांचे पदवीपर्यंतचे शिक्षण मुंबईच्या एल्फिन्स्टन महाविद्यालयातून झाले आणि त्यांना ह.दा. वेलणकर यांच्या मार्गदर्शनाखाली वेदविभागातील संशोधनाकरिता मुंबई विद्यापीठाची डॉक्टरेट १९६५ मध्ये मिळाली. विद्यार्थिदशेत त्यांना 'दक्षिणा शिष्यवृत्ती', 'अक्षीकर शिष्यवृत्ती आणि सुवर्णपदक', 'भाऊ दाजी लाड सुवर्णपदक' असे प्रतिष्ठेचे पुरस्कार मिळाले. सुरुवातीस मुंबई येथील खालसा महाविद्यालय (१९५०-५४), कीर्ती महाविद्यालय (१९५४-६१) येथे संस्कृतचे अध्यापन केल्यावर त्यांनी पुणे विद्यापीठाच्या संस्कृत प्रगत अध्ययन केंद्रात आपल्या बुद्धिमत्तेचा ठसा उमटविला.



त्यानंतर त्यांनी डेक्कन महाविद्यालयाच्या वैदिक संस्कृत विभागाचे प्राध्यापकपद भूषविले. त्यांनी डेक्कन महाविद्यालयाच्या कोशप्रकल्पाच्या प्रधान संपादकपदाची धुरा वाहिली (१९८०-८५). त्यांच्या विविधांगी आणि चिकित्सक संस्कृत ज्ञानामुळे विद्यापीठ आयोगाने 'राष्ट्रीय व्याख्याता' म्हणून त्यांचा गौरव केला होता. त्यांनी एशियाटिक सोसायटीच्या म.म. काणे संशोधन संस्थेचे मानद निदेशकपद आणि भारतीय विद्या भवनाच्या सांस्कृतिक संशोधन विभागाचे प्रमुखपद भूषविले (१९९०-९२).

डॉ. जोग यांनी वेद, अलंकारशास्त्र, अभिजात संस्कृत वाङ्मय, सांख्य, वेदान्तदर्शन आणि प्राकृत अशा सर्वच विषयांत चौफेर आणि विपुल संशोधनपर लेख लिहिले आणि 'भारतीय विद्ये'च्या विविध अंगांवर त्यांनी अधिकारवाणीने व्याख्याने दिली.

मुंबई विद्यापीठाची संस्कृत आणि अर्धमागधी अभ्यासक्रमाची पुस्तके त्यांनी सटीप संपादित केली. त्यांच्या एकंदर सोळा प्रकाशित/संपादित पुस्तकांमध्ये सुरेश्वरांच्या वार्तिकांवरील मूलभूत संशोधनपर अशा नऊ पुस्तकांचा विशेष उल्लेख करावा लागेल. याशिवाय त्यांचे साठाच्यावर संशोधनपर लेख आणि जवळजवळ चाळीस पुस्तक परीक्षणे आंतरराष्ट्रीय जर्नल्समधून प्रसिद्ध झालेली आहेत.

विद्यार्थ्यांचे ते केवळ गुरू आणि मार्गदर्शकच नव्हते, तर त्यांचे हितचिंतक मित्रही होते. आपल्या चिकित्सक अभ्यासू वृत्तीने आणि शिष्यांबद्दल वाटणाऱ्या आस्थेने त्यांनी केवळ भारतीयच नव्हे, तर अनेक विदेशी विद्यार्थ्यांनाही आकृष्ट केले होते. विद्यार्थ्यांना संस्कृतचा अभ्यास करण्याची नवी दृष्टी देऊन त्यांनी त्यांना लिहिते केले. त्यांच्या कुशल मार्गदर्शनाखाली अकरा विद्यार्थ्यांनी डॉक्टरेटची पदवी मिळविली. एक उत्तम संस्कृत शिक्षक आपल्यामागे कसा वारसा निर्माण करतो याचा वस्तुपाठ जोग सरांनी घालून दिला.

– डॉ. परिणीता देशपांडे

## जोगळेकर, जयवंत दत्तात्रेय

**समीक्षक, भारतीय राष्ट्रवादाचे अभ्यासक, युद्धशास्त्र अभ्यासक**

**७ ऑक्टोबर १९२१ – १६ जुलै २०१६**



१९९८ मध्ये जयवंत दत्तात्रेय जोगळेकर यांना स्वा. सावरकर राष्ट्रीय स्मारकाने एक पुरस्कार देऊन सन्मानित केले. या प्रसंगी महाराष्ट्र टाइम्सचे तत्कालीन संपादक गोविंदराव तळवलकर विशेषत्वाने उपस्थित होते. तळवलकर म्हणाले की ''ज.द. जोगळेकर म्हणजे एक व्यासंगी विद्वान, कधीही मदतीला धावून येणारा मित्र, लिखाणाला पूर्णता आणण्याकरिता भरपूर कष्ट उपसणारा एक जिद्दी लेखक व चालता-बोलता संदर्भ ग्रंथ आहे.'' तळवलकर पुढे म्हणतात, ''आम्हा दोघांत वैचारिक मतभेद असले, तरी ज.द. जोगळेकर यांच्यातील वरील गुणांमुळे आमच्या दोन दशकांहून अधिक काळच्या मैत्रीत कधीच व्यत्यय आला नाही. उलट ज.द. जोगळेकर यांच्यासारखा अष्टपैलू गृहस्थ आपला मित्र आहे, याचा आपल्याला अभिमान वाटतो.'' एके काळी गोविंद तळवलकर, विद्याधर गोखले, दि.वि. गोखले व ज.द. यांच्या बौद्धिक मैत्रीची कुतूहलाने चर्चा होत असे. तळवलकरांनी ज.दं.विषयी काढलेले उद्गार त्यांच्या कर्तृत्वाची व वैचारिक उंचीची साक्ष पटवून देतात.

ज.द. जोगळेकर हे ज्येष्ठ सावरकरवादी चिंतक व भारतीय राष्ट्रवादाचे गाढे अभ्यासक व एक विलक्षण समीक्षक म्हणून सर्वांना परिचित होते. अनेक वर्षे त्यांनी राष्ट्रीय विचारांची कास धरून, वैचारिक क्षेत्रात प्रदीर्घ काळ लेखन केले. जयवंत दत्तात्रेय जोगळेकरांचा जन्म

मुंबईत चिखलवाडीत झाला. जयवंतराव केवळ सहा महिन्यांचे असताना वडिलांनी त्यांना बडोद्यास नेले. त्या काळी हिंदुस्थानात सयाजीराव गायकवाडांच्या बडोदे संस्थानाचा एक लौकिक होता. अशा प्रगतिशील संस्थानाच्या शिक्षण खात्यात जयवंतरावांच्या वडिलांनी नोकरी मिळवली व ते तिथेच स्थायिक झाले.

जयवंतरावांचे शालेय शिक्षण बडोद्यात झाले. शाळेत असताना अभ्यासापेक्षा, खेळ व अवांतर वाचनाकडे त्यांचा अधिक ओढा असावयाचा. लहानपणापासून स्वतंत्रपणे वागण्याची व विचार करण्याची सवय त्यांना होती. याचा परिणाम असा झाला की, पुढील काळात जोगळेकर हे एक स्वतंत्र, प्रतिभाशाली विचारवंत बनू शकले.

चरित्र वाचनाची आवड त्यांना शालेय जीवनातच लागली. शिवाजी, नेपोलिअन, बाजीराव, सीझर यांची चरित्रे सुरुवातीस त्यांनी वाचली. जोगळेकर पुढील शिक्षणासाठी पुणे येथील फर्गसन महाविद्यालयात दाखल झाले. त्यांचा वाचनाचा नित्य परिपाठ इथेही चालू राहिला. ॲबटचा नेपोलियन, गॅरिबाल्डी, डीव्हॅलेरा, मॅझिनी इ. चरित्रे त्यांनी त्या काळात वाचली. फर्गसनमध्ये असतांना युनिव्हर्सिटी ट्रेनिंग कोअरमध्ये ते दाखल झाले. परेडचा भत्ता म्हणून त्या वेळी दर सहा महिन्यांनी पंधरा रुपये मिळत. जयवंतरावांनी 'माईन काम्फ' हे हिटलरचे आत्मचरित्र विकत घेण्यासाठी या पहिल्या हप्त्याचा उपयोग केला होता. त्यांच्या वाचनप्रेमाचा यापेक्षा उत्तम दाखला तो कोणता? बुद्धीच्या विकासाला वाचनाने हातभार लागतो याची प्रचिती जयवंतरावांना महाविद्यालयीन जीवनात आली. अनेक विषयांचा अभ्यास करण्याच्या त्यांच्या इच्छेचा पाया बहुधा त्या वेळी घातला गेला. १९३८च्या उत्तरार्धात द्वितीय जागतिक महायुद्धाचे ढग जमू लागले होते. महायुद्धाविषयी उत्सुकता वाढीस लागल्याने जोगळेकरांनी चर्चिल, रुझवेल्ट, हिटलर या नेत्यांविषयी वाचलेच, त्या शिवाय वेव्हेल, ऑकिन्लेक, माँटगॉमारी, मॅकआर्थर, मार्शल, रुडस्टेंड, रोमेल इ. देशोदेशीच्या सेनानींच्या चरित्रांचाही त्यांनी तितक्याच जिज्ञासेने अभ्यास केला. यातूनच पुढे 'भारतीय युद्धशास्त्राची उपेक्षा' हा ग्रंथ त्यांनी लिहिला.

तरुण वयात माणसाचा स्वभाव थोडा धाडसी असतो. जयवंतरावही यास अपवाद नव्हते. १९५२मध्ये खिशात दमडी नसताना मित्रांकडून उसने पैसे घेऊन त्यांनी युरोपचा दौरा केला. हे त्यांच्या दृष्टीने जीवनातील एक अविवेकी धाडस होते. लंडनमध्ये त्यांनी आंतरराष्ट्रीय कायद्याचा वर्षभराचा अभ्यासक्रम पूर्ण केला. त्यांनी याच वास्तव्यात वृत्तपत्रांना लेख लिहून पाठवण्यास सुरुवात केली. एका अर्थाने पुढील काळात त्यांच्या हातून झालेल्या वृत्तपत्रीय लिखाणाचा श्रीगणेशा होता.

भारतात परत आल्यानंतर डोक्यावर कर्जाचा आर्थिक बोजा असल्यामुळे जयवंतरावांनी नोकरी शोधण्यास प्रारंभ केला. बडोद्यात असताना काही काळ त्यांनी वकिली केली. याच काळात हिंदू महासभेचे कार्यही त्यांनी नेटाने केले. दि. ३ मे १९५७ रोजी मुंबईत बेस्टमध्ये त्यांनी नोकरीस सुरुवात केली. जनसंपर्क अधिकारी म्हणून त्यांनी तब्बल २१ वर्षे बेस्टमध्ये काम केले. नोकरीत असतानाही ज.दं.नी लेखन, वाचन, जगप्रवास यासाठी त्यांच्या रजांचा उपयोग केला, हे त्यांचे आगळेवेगळे वैशिष्ट्यच!

त्यांच्या या यशस्वी जीवन प्रवासात त्यांच्या पत्नी स्व. डॉ. शोभा जोगळेकर यांनी जयवंतरावांना लिखाणासाठी पूर्ण स्वातंत्र दिले, इतकेच नव्हे, तर मानसिक आधाराबरोबर आर्थिक पाठबळही दिले.

राष्ट्रवादाविषयी मनात असलेली स्वच्छ धारणा व त्यावर असलेली अपरंपार निष्ठा हा जोगळेकरांचा एक विशेष. जयवंतरावांच्या जीवनात स्वा. सावरकरांना अनन्यसाधारण स्थान आहे. सावरकरांच्या बुद्धिवादाचा त्यांच्यावर पगडा आहे. पुण्यातील वास्तव्यात सावरकरांची भाषणे, सभा, चर्चा जयवंतरावांना प्रत्यक्ष ऐकावयास मिळाल्या. १९३८मध्ये स्वातंत्र्यवीर सावरकरांनी पुण्यात लाला हरदयाळ यांच्यावर जे भाषण

केले, त्या भाषणाने जयवंतराव अत्यंत प्रभावित झाले व तेव्हापासून ते सावरकरवादी झाले. मात्र भावनेच्या भरात ते सावरकरवादी झाले नाहीत, तर घरातील वातावरण, बुद्धीला पटलेले सावरकरांचे विचार यामुळे ते सावरकरांचे अनुयायी झाले. टिळक, केळकर, सावरकर यांच्या साहित्याबरोबरच शॉ, वेल्स, रसेल यांचे साहित्य व युरोपीय वैचारिक साहित्य यामुळे 'रॅशनल' विचार करण्यास आपण शिकलो, असे जोगळेकर सांगत. अचाट स्मरणशक्ती, प्रशासकीय निपुणता, हजरजबाबीपणा, स्पष्टवक्तेपणा आणि मिश्कीलता हे ज.दं.चे आणखी काही स्वभावविशेष!

ज.द. जोगळेकर म्हणजे राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय घटनांकडे राष्ट्रवादाच्या संदर्भात बघणारा थोर विचारवंत आहे. त्यांच्या चिंतनाला आधुनिक काळातील संदर्भाची परिभाषा असते.

युरोपमध्ये गेल्या चार-पाचशे वर्षात ज्या घटना घडल्या, त्यांच्याशी संबंधित जयवंतरावांचे बहुतांश लिखाण राहिले आहे. या काळात युरोपमध्ये आधुनिकतेचे अनेक प्रवाह निर्माण झाले. त्यातील आधुनिक राष्ट्रनिर्मितीच्या प्रवाहासंदर्भात जयवंतरावांच्या इतके सातत्याने लिखाण मराठीत तरी कोणीही केलेले नाही. सांप्रदायिक वर्चस्वापासून आपली मुक्ती करून घेऊन ऐहिक ज्ञानाच्या बळावर युरोपमध्ये राष्ट्रनिर्मितीची प्रक्रिया कशी घडली, हे स्पष्ट करण्यासाठी त्यांनी फ्रान्सचा रिशेल्यू, इटलीतील काहूर, फान्सचा तालेराँ, जर्मनीचा बिस्मार्क, हंगेरीचा कोसूथ, अमेरिकेचा जेफर्सन, तुर्कस्थानचा केमाल पाशा आदींच्या राष्ट्र उभारणीच्या कार्याचे महत्त्व सांगणारा 'निधर्मी राष्ट्रवादाचे शिल्पकार' असा ग्रंथ लिहिला. राष्ट्रनिर्मितीची प्रक्रिया जटिल असते, अनेक हितसंबंधांना राष्ट्रहिताशी जोडून ती करावी लागते याची माहिती देण्याकरिता ही उदाहरणे त्यांनी अभ्यासकांपुढे ठेवली.

युरोप जेव्हा चर्चच्या सांप्रदायिक सत्तेच्या अधीन होता, तेव्हा तिथे अंधारयुग होते व जसजसा युरोपला ग्रीक बुद्धिवादाचा व ऐहिक ज्ञानशाखांचा परिचय झाला, तेव्हा युरोपमध्ये पुनरुत्थानाचे पर्व सुरू झाले. ज्या अरब देशांकडून युरोपला हा ज्ञानलाभ झाला, त्या अरबस्थानने जेव्हा या ऐहिक ज्ञानापेक्षा इस्लामी सांप्रदायिक वर्चस्वाला मान्यता दिली, तेव्हापासून अरबस्थानचे बौद्धिक मागासलेपण सुरू झाले. सांप्रदायिक विचारांचा प्रभाव, राष्ट्रवाद व आधुनिकता यांच्या परस्पर संबंधांचा एवढा मूलगामी वेध मराठीत तरी क्वचितच कोणी घेतली असेल. त्यामुळे या संबंधात जगभरात घडणाऱ्या घटनांवर त्यांचे चौफेर लक्ष असे व त्या घटना ते लगेच वाचकापुढे ठेवीत. 'युगप्रवर्तनाच्या उंबरठ्यावरचे अरब जग' हे मध्यपूर्व देशांतील घडामोडींवर त्यांचे पुस्तक प्रसिद्ध झाले आहे.

ज.द. हे प्रागतिक विचारांचे होते. भारतीय इतिहासाकडे डोळसपणे बघण्याची त्यांची दृष्टी होती. म्हणूनच त्यांनी भारतात युद्धशास्त्राची उपेक्षा कशी झाली हे सांगणारे पुस्तक लिहिले. भारताच्या इतिहासाला निर्णायक वळण देणाऱ्या अलेक्झांडर व पोरस, पृथ्वीराज चौहान व महंमद घोरी, राणा संग व बाबर, विजयनगरचे राक्षस तागडी येथील रामराया विरुद्ध दक्षिणेतील सुलतान, सदाशिवरावभाऊ व अब्दाली यांचे पानिपत आणि दौलतराव शिंदे व वेलस्ली अशा सहा निवडक लढायांचे विश्लेषण केले. या सर्व युद्धात हत्तीदळाचा हल्ल्यासाठी वापर करणे, घोडदळाच्या गतिमान युद्धांशी परिचय नसणे, कमी दर्जाची शस्त्रास्त्रे, राखीव सैन्यदल नसणे आदी त्याच-त्याच चुका या सहाही युद्धात कशा केल्या गेल्या, हे त्यांनी अधोरेखित केले. युद्धशास्त्राचा शास्त्रीय अभ्यास न केल्याने असे घडले हे त्यांचे त्यावरील अभ्यासपूर्ण प्रतिपादन.

ज.दं.च्या वडिलांनी लिहिलेली चार पिढ्यांची हकिकत ज.दं.नी अलीकडेच प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या आत्मचरित्रात दिली आहे. त्यात, त्यांच्या पणजीने घरात कर्ता पुरुष कोणी नसल्याने सगळा कारभार हाती घेऊन दूरदूर असणाऱ्या शेतांकडे जाऊन नि उत्पन्न घेऊन मोठ्या कुटुंबाचा संसार चालवला, याची माहिती आहे. तसेच त्यांचे आजोबा इंग्रजी शिक्षण नसूनही सामाजिक कार्यात

भाग घेत असत. त्यामुळे ते काप दापोलीच्या नगरपालिकेचे अध्यक्ष म्हणून निवडून आले. पण पुढे मुलाच्या शिक्षणासाठी त्यांनी मुंबईस जाण्याचे ठरवले. त्यांनी अध्यक्षपदाचे त्यागपत्र दिले, तेव्हा त्या वेळचा इंग्रज कलेक्टर त्यांना म्हणाला, ''जोगळेकर, तू मुंबईला कशाला जात आहेस? मी तुला रावसाहेब पदवी द्यावी अशी सरकारकडे शिफारस करीत आहे.'' परंतु त्यांच्या आजोबांनी रावसाहेब पदवीचा मोह सोडला व मुलांच्या उच्च शिक्षणासाठी ते मुंबईला निघून आले.

कर्तृत्ववान पणजी नि पदवीचा मोह सोडणारे आजोबा, अशी परंपरा असलेले जोगळेकर सहजतेने वीर सावरकरांचे पुढील वाक्य नेहमी सांगत, ''इंद्रपद जरी माझ्याकडे येत असले, तरी पहिला अहिंदू म्हणून जगण्यापेक्षा शेवटचा हिंदू म्हणून मी मरण पत्करीन.'' मी राष्ट्रवादाचा अभ्यासक आहे आणि सावरकर विचारांचा प्रचारक आहे, अशी जोगळेकरांची भूमिका होती. जोगळेकरांनी राष्ट्रवादावर जितके साहित्य लिहिले, ते पाहिल्यावर कोणीही म्हणेल की त्यांनी केलेले स्वतःचे वर्णन यथार्थ आहे.

लोकसत्तेचे दिवंगत संपादक व नाटककार विद्याधर गोखले हेही ज.दं.चे एक स्नेही होते. ज.दं.नी 'सावरकर : एक वादळी जीवन' हे पुस्तक लिहिले, त्या वेळी गोखले म्हणाले की, ''जणू गगनदीप हे झळकतात मोजू किती? स्वातंत्र्यवीर सावरकरांसारख्या कर्तृत्वसंपन्न महापुरुषाच्या बहुरंगी जीवनाकडे पाहताना आपली अशीच काहीशी स्थिती होते. महाभारतासारखेच त्यांचे चरित्र, त्यातील प्रत्येक पर्व रसोत्कट आणि नानाविध घटनांनी, विचारांनी खच्चून भरलेले!... असे हे चरित्र अवघ्या २२५ पानांत कोणतीही उल्लेखनीय गोष्ट न वगळता साधार, सप्रमाण कथन करणे आणि या चरित्राला अथपासून इथपर्यंत उजाळा देणारे लोकोत्तर चरित्र पानोपानी प्रकट करणे हे सोपे काम नव्हे. आमचे स्नेही नि लोकसत्तेचे एक धुरंधर लेखक श्री. ज.द. जोगळेकर यांनी हे उत्तम प्रकारे केले आहे.''

जयवंतरावांना त्यांच्या वैचारिक क्षेत्रातील उल्लेखनीय कामगिरीबद्दल तब्बल १७ पुरस्कार प्राप्त झाले. 'युद्धशास्त्राची उपेक्षा', 'साम्यवादी देशातील फेरफटका' या पुस्तकांना महाराष्ट्र शासनाचे पुरस्कार मिळाले आहेत. स्वा. सावरकर राष्ट्रीय स्मारक, दादर, राष्ट्रीय विचार प्रबोधन परिषद, औरंगाबाद या संस्थांनी त्यांचा गौरव केला आहे, तर धर्माचार्य ब्रह्मचारी विश्वनाथजी पुरस्कार, ब.ल. वष्ट पुरस्कार हे त्यांना प्राप्त झालेले काही प्रमुख पुरस्कार आहेत.

ज.द. जोगळेकर शरीराने थकले होते, अनेक व्याधींनी ग्रस्त होते, तरीसुद्धा लेखन व वाचनाबद्दलची त्यांची तळमळ दिसून येत होती. भारतीय युवकांमध्ये वाचन संस्कृतीची जोपासना झाली पाहिजे, असे ते युवा लेखकांना आवाहन करीत. परंतु त्यासाठी भारताचा व जागतिक इतिहास, जागतिक युद्धे, क्रांत्या, युद्धशास्त्र हे विषय, बाजारात नवनवीन येणारी इंग्रजी भाषेतील पुस्तके, तसेच शिवाजी, बाजीराव, नेपोलियन व वॉशिंग्टन इत्यादींच्या नेतृत्वाचा अभ्यास आवश्यक आहे, असे सांगत. मुंबई येथे आजारपणामुळे त्यांचा मृत्यू झाला.

– रवींद्र माधव साठे

## जोगळेकर, प्रमोद प्रभाकर

**पुराजीवशास्त्रज्ञ, पुराप्रणिशास्त्रज्ञ**

**१७ जुलै १९६०**

प्रमोद प्रभाकर जोगळेकर हे पुराजीवशास्त्र (Bioarchaeology), विशेषतः पुराप्राणिशास्त्र (Archaeozoology) या विषयांतील सध्याचे आघाडीचे अभ्यासक आहेत. डेक्कन कॉलेजच्या पुरातत्त्व विभागामध्ये प्राध्यापक म्हणून ते कार्यरत आहेत.

पुणे विद्यापीठामधून प्राणिशास्त्र या विषयामध्ये पदव्युत्तर पदवी प्राप्त केल्यानंतर त्यांनी संख्याशास्त्राचे अध्ययन केले आणि त्या विषयामध्ये एम.फिलची पदवी घेतली. पुणे येथील आघारकर संस्थेमध्ये संशोधन साहाय्यक म्हणून काम केल्यानंतर त्यांनी डेक्कन कॉलेज येथे संशोधन साहाय्यक म्हणून कामास



प्रारंभ केला. तेथेच पुरातत्त्व या विद्याशाखेतील पीएच.डी. ही पदवी प्राप्त केली. अश्मयुगाचे तिन्ही कालखंड – पुराश्मयुग, मध्याश्मयुग आणि नवाश्मयुग, तसेच हडप्पा आणि हडप्पेतर अशा दोन्ही ताम्रयुगीन संस्कृती यांच्या पुरातत्त्वीय स्थळांपासून थेट इतिहासाच्या प्राचीन, मध्ययुगीन आणि अर्वाचीन कालखंडापर्यंतच्या प्राण्यांच्या उत्खनित अवशेषांचा वैज्ञानिक अभ्यास करण्याची संधी त्यांना मिळाली.



इतिहासाचा कोणताही कालखंड तसेच कोणताही प्रदेश यांनी वर्ज्य मानला नाही. त्यामुळेच मध्य प्रदेश, राजस्थान, महाराष्ट्र, ओदिशा येथील आणि हिमालयातील प्राचीन स्थळांवर डॉ. जोगळेकर यांनी इतर संशोधकांना साहाय्य केले आहे. तसेच स्वतंत्रपणे उत्खनन प्रकल्पही हाती घेतलेले आहेत. भारताबाहेर तुर्कमेनिस्तान, हॉलंड, इराण आणि बेल्जियम या देशांमध्येही पुरातत्त्वीय समन्वेषणाच्या कामांमध्ये त्यांचा सहभाग होता.

हिमालयातील रूपकुंड हे ठिकाण एक प्राचीन तीर्थक्षेत्र होते. या ठिकाणी यात्रेला गेलेले यात्रेकरू इसवीसनाच्या आठव्या-नवव्या शतकात बर्फात गाडले गेलेले होते. या ठिकाणी नॅशनल जिऑग्राफ़िक तसेच इतर संस्थांच्या झालेल्या संशोधनामध्ये त्यांनी सहभाग घेतला, तसेच त्या शोधतुकडीचे नेतृत्वही केले. गाडले गेलेले हे यात्रेकरू महाराष्ट्रातील कोल्हापूर भागातून तिकडे गेलेले असावे, ही बाब रूपकुंड येथून मोठ्या प्रयत्नाने मिळवलेल्या मानवी डी.एन.ए.च्या तसेच इतर अवशेषांच्या अभ्यासातून त्यांनी सिद्ध केली.

संशोधनाप्रमाणेच यांचे अध्यापनही विविधांगी राहिलेले आहे. ते डेक्कन कॉलेज येथे प्राचीन भारतीय इतिहास, संस्कृती आणि पुरातत्त्व यांतील विविध विषयांचे अध्यापन करतात. पुरातत्त्वीय विज्ञानातील पुराजीवशास्त्र (Bioarchaeology), जैविक-मानवशास्त्र (Biological Anthropology) हे विषय डॉ. जोगळेकर यांचे मुख्य अध्यापनविषय आहेत. त्याचबरोबर पुरातत्त्वीय सिद्धान्त, क्षेत्र-पुरातत्त्व (Field Archaeology), संशोधनपद्धती, नाणकशास्त्र, मूर्तिविज्ञान, भारताचा राजकीय, सामाजिक आणि आर्थिक इतिहास हे विषयही यांच्या अध्यापनाचे घटक आहेत. टिळक महाराष्ट्र विद्यापीठ आणि इतर उच्च शैक्षणिक संस्थांमध्येही ते नैमित्तिक स्वरूपात विविध विषयांचे अध्यापन करतात. त्याचबरोबर भारतीय लोकसेवा आयोग, महाराष्ट्र लोकसेवा आयोग यांच्या परीक्षा तसेच राष्ट्रीय प्रज्ञा शोध परीक्षा इत्यादी स्पर्धापरीक्षांना बसणाऱ्या विद्यार्थ्यांनाही ते मार्गदर्शन करीत असतात.

संशोधन आणि अध्यापन यासोबतच नियमित लेखन हे डॉ. जोगळेकर यांचे एक दुर्मीळ वैशिष्ट्य आहे. इतिहास आणि पुरातत्त्व या आपल्या अध्ययनविषयातील बारा पुस्तके आणि एकशेऐंशी शोधनिबंध, तसेच सुमारे पंचवीस समीक्षात्मक लेख आणि लोकप्रिय लेख त्यांनी लिहिलेले आहेत. अभ्यासविषयातील या लेखनाबरोबरच ललित लेखन आणि इंग्लिश साहित्याचा मराठी अनुवाद या बाबी त्यांनी हिरीरीने केलेल्या आहेत. लिखित आणि अनुवादित अशी त्यांची तीसपेक्षाही अधिक पुस्तके प्रकाशित झालेली आहेत. वैज्ञानिक विषयांवरील इंग्लिश भाषेतील अनेक कथांचे आणि विज्ञान कादंबऱ्यांचे मराठी भाषान्तर डॉ. जोगळेकर यांनी केलेले आहे. डॉ. प्रमोद प्रभाकर जोगळेकर यांना अनेक पुरस्कार आणि सन्मान प्राप्त झालेले आहेत. ह.धी. सांकलिया युवा पुरातत्त्वज्ञ पुरस्कार, फोर्ड फाउंडेशनची शिष्यवृत्ती, केंब्रिज विद्यापीठाची चार्ल्स वॅलेस संशोधनवृत्ती, याचबरोबर भारतीय प्रकाशक परिषदेचा सर्वोत्तम प्रकाशन पुरस्कार, रणजित देसाई वाङ्मय पुरस्कार असे पुरस्कारही त्यांना मिळालेले आहेत. विविध संशोधन परिषदांमध्ये त्यांनी अध्यक्षस्थान भूषवलेले आहे.

भारतीय संस्कृती इतिहास, पुरातत्त्व आणि विज्ञान या क्षेत्रांत कार्यरत असणाऱ्या भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिर, इंडियन सोसायटी फॉर प्रीहिस्टॉरिक अँड क्वार्टर्नरी स्टडीज, सोसायटी फॉर साउथ एशियन आर्किऑलॉजी, मराठी विज्ञान परिषद, बृहन्महाराष्ट्र प्राच्यविद्या परिषद इत्यादी संस्थांशी पदाधिकारी आणि सदस्य या नात्याने डॉ. जोगळेकर यांचा निकटचा संबंध आहे.

— डॉ. श्रीनंद बापट

## जोगळेकर, सदाशिव आत्माराम

**संपादक, लेखक**

**१८९७ – १९६३**



सदाशिव आत्माराम जोगळेकर यांचा जन्म बेळगाव येथे झाला. ते आठ वर्षांचे असताना त्यांच्या मातोश्रींचे निधन झाले. त्यांचे वडील डॉक्टर झाले आणि त्या व्यवसायात स्थिरस्थावर होण्याचा प्रयास करीत होते. त्यांना संगमनेर हे गाव योग्य वाटल्यामुळे त्यांनी दुसरा विवाह केल्यानंतर तिकडे प्रयाण केले. सदाशिव यांचे आजोबाही डॉक्टरच होते. त्यांच्याजवळच वडिलांनी छोट्या सदाशिवला ठेवले होते. आजोबांचा ग्रंथसंग्रह समृद्ध होता आणि सदाशिवला वाचनाची खूप आवड होती.

आजोबांच्या मृत्यनंतर सदाशिव एकाकी झाले. त्यांना पुढील शिक्षणासाठी वडिलांनी पुण्यास पाठविले. डेक्कन महाविद्यालयात त्यांचे उच्चशिक्षण पार पडले. शिकत असतानाच पुण्यातील प्राध्यापक चिंतामण गंगाधर भानू यांची कन्या शांताबाई हिच्याशी त्यांचा विवाह झाला. जोगळेकरांनी शिक्षणावर लक्ष केंद्रित करून पत्नीला तिच्या सासरी म्हणजे संगमनेरलाच ठेवले. शिक्षण पूर्ण झाल्यानंतर त्यांनी पत्नीला पुण्यात आणले व ते तेथेच स्थायिक झाले.

जोगळेकर पेशाने वकील होते. तथापि लहानपणापासून त्यांचा ओढा साहित्याकडेच होता. ‘मॅझिनीची जीवन कहाणी’ आणि ‘मानवी कर्तव्ये’ या नावाने भाषांतराचा संग्रह प्रकाशित करून त्यांनी आपल्या लेखनाला सुरुवात केली.

आरंभीच्या काळात अनेक नियतकालिकांशी ते संबंधित होते, पण लेखक आणि संपादक म्हणून त्यांचा बोलबाला झाला तो ‘यशवंत’ या मुख्यत: कथा साहित्याला वाहिलेल्या मासिकाचे त्यांनी संपादकत्व पत्करल्यावर. अखेरच्या काळात त्यांनी उत्तम रहस्यकथाही लिहिल्या. किंबहुना मराठीतील रहस्यलेखनाचे ते जनक मानले जातात. कारण यशवंत मासिकाचे संपादक असताना त्यांनी ‘चार आणे माला’ च्या माध्यमातून अनेक डिटेक्टिव्ह कथांची भाषांतरे करून ती पुस्तकरूपाने प्रकाशित केली होती. ‘घारापुरी’, ‘देवगिरी’ आणि ‘सह्याद्री’ यावर त्यांनी अभ्यासपूर्ण ग्रंथलेखन केले. त्यांनी संपादित केलेली ‘गाथा सप्तशती’ हा संपादनाचा आदर्श वस्तुपाठ समजला जातो. त्यातून त्यांचे पांडित्य आणि चिकित्सक वृत्तीचे खोल दर्शन घडले. या ग्रंथाचा अभ्यास करताना त्यांनी अर्धमागधी भाषा शिकून घेतली होती.

संयुक्त महाराष्ट्र चळवळीच्या काळात त्यांनी लिहिलेला ‘संयुक्त महाराष्ट्र – महागुजरात’ हा ग्रंथ त्या दोन राज्यांच्या जडणघडणीचा अद्ययावत ज्ञानकोश समजावयास हरकत नाही. ‘अहल्या आणि इतर कथा’ हा त्यांचा लघुकथा संग्रह आहे. त्यातील कथा अतिशय वेधक आहेत. ‘सूर्यफूल’ हा त्यांचा इतर कथांचा आणखी एक संग्रह, त्यांच्या मरणोत्तर तो प्रकाशित झाला.

जोगळेकर उत्तम फोटोग्राफरही होते आणि दिलरुबा नावाचे वाद्यही उत्तम वाजवत असत. कामाच्या निमित्ताने त्यांनी कांजीवरमपासून पेशावरपर्यंत प्रवास करताना शेकडो प्राचीन नाणी जमवली व त्यांचा उत्तम संग्रहही केला होता.

— संपादित

## जोशी, केशव रामराव
**संस्कृत पंडित, तत्त्वचिंतक**
**७ एप्रिल १९२८ – १२ जून २०१३**



केशव रामराव जोशी यांचा जन्म मध्य प्रदेशामधील छिंदवाडा जिल्ह्यातील रंगारी येथे झाला. त्यांनी नागपूर विद्यापीठातून एम.ए., पीएच.डी. आणि शास्त्री या तीन पदव्या संपादन केल्या. तसेच जयपूर विद्यापीठातून साहित्याचार्य, कलकत्ता विद्यापीठातून काव्यतीर्थ, बडोदा विद्यापीठातून साहित्योत्तमा आणि वाराणसी विद्यापीठातून संपूर्ण दर्शनमध्यमा या पदव्या संपादन केल्या. त्यानंतर नागपूर विद्यापीठाच्या संस्कृत विभागात पदव्युत्तर शाखेसाठी (वर्गासाठी) त्यांनी अध्यापक व विभाग प्रमुख म्हणून कार्य केले.

३० वर्षांच्या प्रदीर्घ अध्यापनाबरोबरच संस्कृत प्रचाराचे अखंड व्रत घेतलेल्या डॉ. जोशी यांनी संस्कृतच्या प्रचारासाठी अनेक उपक्रम राबवले. ते नागपूर विद्यापीठाच्या संस्कृत अभ्यास मंडळाचे अध्यक्ष होते. कला शाखेचे सदस्य, विद्वत परिषदेचे सदस्य आणि सिनेट मेंबर या सर्व पदांवरून विद्यापीठ स्तरावर त्यांनी संस्कृतच्या विकासासाठी कार्य केले. कविकुलगुरू कालिदास संस्कृत विद्यापीठाच्या विविध प्राधिकरणांचे ते सदस्य होते. अनेक विद्यार्थ्यांनी त्यांच्या मार्गदर्शनाखाली आचार्य उपाधीसाठी संशोधन केले. त्यांनी विद्यापीठ अनुदान आयोगाद्वारा अनुदानित १९८२मध्ये ‘प्रॉब्लेम्स ऑफ संस्कृत एज्युकेशन इन नॉन हिंदी स्टेट्स’ आणि १९८५मध्ये ‘पोस्ट इंडिपेंडन्स संस्कृत लिटरेचर’, या दोन अखिल भारतीय चर्चासत्रांचे आयोजन केले.

डॉ. जोशी १९६० ते १९८५ या काळात ‘संस्कृतभवितव्यम्’ या साप्ताहिकाचे संपादक होते. विद्यापीठ अनुदान आयोगाद्वारा प्रायोजित १९८५ ते १९८८ या कालावधीत आद्य शंकराचार्यांच्या शारीरक भाष्यातील विषयांचे विश्लेषणात्मक अध्ययन आणि २००० ते २००३ या कालावधीत पदार्थविज्ञानशास्त्र, आयुर्वेद, मानसशास्त्र व कामशास्त्र यांच्या संदर्भात वैशेषिकांच्या द्रव्यगुणविचारांचा चिकित्सक अभ्यास हे दोन प्रधान संशोधन प्रकल्प त्यांनी पूर्ण केले. शास्त्राध्ययन करताना जुन्या शास्त्रांचे अध्ययन करून आधुनिक शास्त्रांच्या संदर्भात त्यांची उपयुक्तता दाखवून देण्याचा केशव जोशी यांचा सतत प्रयत्न असतो. म्हणूनच वैशेषिक दर्शनाचे अध्ययन करून त्यांनी आधुनिक भौतिकशास्त्रासाठी हे शास्त्र कसे उपयुक्त आहे, हे आपल्या लेखांमधून दाखवून दिले.

केशव जोशी यांच्या प्रगल्भ विचारसरणीचा आणि प्रगाढ पांडित्याचा परिपाक म्हणजे त्यांची ग्रंथसंपदा. विविध विषयांवर त्यांचे अनेक ग्रंथ प्रकाशित झालेले आहेत. ‘नीलकंठ दीक्षित व त्यांची काव्यसंपदा’ हा त्यांचा आचार्य उपाधीसाठी सादर केलेला शोधप्रबंध नागपूर विद्यापीठाने १९७७मध्ये प्रकाशित केला. या ग्रंथामुळे अभ्यासकांना नीलकंठ दीक्षितांसारख्या संस्कृत ग्रंथकाराचा सविस्तर परिचय होऊ शकला. ‘न्यायसिद्धान्त मुक्तावली’ हा त्यांचा विद्वन्मान्य ग्रंथ ‘संस्कृत-मराठी स्पष्टीकरणासहित’ पुणे येथील भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्थेने १९८५मध्ये प्रकाशित केला. त्याचप्रमाणे नागपूर विद्यापीठाच्या संस्कृत विभागाने ‘प्रॉब्लेम्स ऑफ संस्कृत एज्युकेशन इन नॉन हिंदी स्टेट्स’, नागपूरच्या प्रचारिणी सभेमार्फत ‘नीलकण्ठविजयम्’, पुणे भारतवाणीतर्फे ‘रहस्यमयी’, नागपूरच्या भारती प्रकाशनतर्फे १९९३मध्ये ‘संस्कृतत्रिदलम्’, नागपूरच्या विश्वभारती प्रकाशनतर्फे २००१मध्ये ‘अभिनवं शास्त्रत्रिदलं’, ‘तीरे संस्कृताची गहनें’ अशी त्यांची ग्रंथसंपदा प्रकाशित आहे. या ग्रंथसंपदेवरून साहित्य, न्याय, व्याकरण, भाषाशास्त्र इ. सर्वच शास्त्रांमध्ये त्यांची गती दिसून येते. शास्त्रविषयक चर्चा करणारे डॉ. जोशी काव्याबद्दल चर्चा करताना तेवढेच रसज्ञ होतात. संस्कृत क्षेत्रातील त्यांच्या अनमोल कामगिरीचा शासन स्तरावर सन्मान झाला. त्यांना

१९८९ मध्ये महाराष्ट्र राज्य शासनाद्वारा संस्कृत पंडित पुरस्कार देऊन गौरवण्यात आले. तसेच २००० मध्ये पुण्यातील ज्ञानप्रबोधिनीद्वारा, २००२ मध्ये रामटेकच्या कालिदास संस्कृत विश्वविद्यालयाद्वारा, २००३ मध्ये पुण्यातील देवदेवेश्वर संस्थानाद्वारा, २००३ मध्ये पर्वती देवस्थानचा नानासाहेब पेशवे पुरस्कार, २००३ मध्ये जयपूरच्या संस्कृत सेवा परिषदेद्वारे, २००४ मध्ये स्वामी श्री जयेंद्र सरस्वती कांची कामकोटी पीठाद्वारा, तसेच २००५ मध्ये अमेरिकन बायोग्राफिकल इन्स्टिट्यूट, रालेहा (नॉर्थ कॅरोलिना)द्वारा द मॅन ऑफ दि इयर २००५ विथ कॉमेमरेटिव्ह गोल्ड मेडल, २००६ मध्ये द ऑनर्ड बाय द फ्रेंडशिप फोरम ऑफ इंडिया, न्यू दिल्ली विथ द भारत एक्सलन्स अवॉर्ड अँड गोल्ड मेडल, २००९-१० चा श्रृंगेरी पीठम् आणि २००९ मध्ये राष्ट्रपती पुरस्कार अशा अनेक सन्मानांनी केशव जोशी यांना गौरवण्यात आले.

— डॉ. नंदा पुरी

## जोशी, गजानन नारायण

**व्यासंगी तत्त्वज्ञ, लेखक व स्वातंत्र्यसेनानी**

**१७ मार्च १९२१ — १९ मार्च २००९**



डॉ. गजानन नारायण जोशी हे नाव तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात आणि तत्त्वज्ञानात रस असणाऱ्या कोणत्याही मराठी माणसाला सुपरिचित आहे. पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाचा इतिहास मराठी भाषेत तीन खंडांमध्ये आणून आणि भारतीय तत्त्वज्ञानाचा बृहद् इतिहास बारा खंडांमध्ये लिहून त्यांनी मायमराठीची बहुमोल सेवा केलेली आहे. पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाच्या इतिहासात डॉ. जोशी यांनी अगदी ग्रीक तत्त्वज्ञानापासून आधुनिक तत्त्वज्ञानापर्यंतचा विस्तृत आढावा घेतलेला आहे. भारतीय तत्त्वज्ञानाच्या बृहद् इतिहासामध्ये प्राचीन भारतीय तत्त्वचिंतन संपूर्णपणे व सलगपणे मराठी भाषेत आणलेले आहे. या दोन वाङ्मयीन कृतींद्वारे त्यांनी मराठी सारस्वतात मोलाची भर टाकलेली आहे. याशिवाय त्यांचे विविध विषयांवरील अनेक ग्रंथही विद्वन्मान्य ठरलेले आहेत. काही ग्रंथांना पुरस्कारही प्राप्त झालेले आहेत.

डॉ. जोशी अंमळनेर तालुक्यात उंच टेकड्यांवर वसलेल्या जळोद या चिमुकल्या गावचे रहिवासी. त्यांचे वडील नारायण विष्णू जोशी हे प्राथमिक शिक्षक होते. आई यमुनाताई या उत्तम गृहिणी होत्या. पारोळ्यानजीक बहादरपूर या गावी गजानन यांचे प्राथमिक शिक्षण झाले. नंतर त्याच गावी मराठी शाळेतून १९३५मध्ये व्हरनॅक्युलर फायनल परीक्षा उत्तीर्ण झाले. पुढील शिक्षणासाठी ते अंमळनेर येथील प्रताप हायस्कूलमध्ये दाखल झाले. १९४१मध्ये मॅट्रिक परीक्षा देऊन त्यांनी त्यात उत्तम यश मिळवले. प्रताप विद्यालयातच त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची खरी घडण झाली.

मॅट्रिकनंतर त्यांनी पुणे येथील फर्गसन महाविद्यालयामध्ये प्रवेश घेतला आणि महाविद्यालयाला रामरामही ठोकला आणि 'भारत छोडो' आंदोलनात उडी घेतली. आपल्या मित्रांना भेटून मार्गदर्शन करण्यासाठी एक दिवस भूमिगत अवस्थेत पूज्य साने गुरुजी अचानक अंमळनेरला आले. अनेक अनुयायांनी त्यांची भेट घेतली. गजाननही गुरुजींना भेटले. महाविद्यालय सोडून दिल्याची हकीकत सांगितली, तेव्हा साने गुरुजींनी त्यांना सल्ला दिला, ''हे देशव्यापी आंदोलन दीर्घकाळ चालणार आहे. स्वतंत्र्य तर नक्कीच मिळणार आहे. पण तुझे वय शिक्षण घेण्याचे असल्याने तू पुन: महाविद्यालयाला जा. देश स्वतंत्र झाल्यानंतर त्याची पुनर्बांधणी करण्याचे प्रचंड कार्य उत्तमपणे करण्याची जबाबदारी तुमच्या पिढीला स्वीकारावी लागणार आहे.'' या आदेशानुसार गजानन यांनी शिक्षण सुरू ठेवण्याचा निर्णय घेतला.

पुण्यात त्यांच्याविरुद्ध पोलीस वॉरंट असल्याने ते फर्गसन महाविद्यालयामध्ये येऊ शकले नाहीत. तेव्हा ते बडोद्याला गेले. आर्थिक स्थिती हलाखीची असतानासुद्धा विविध प्रकारची कामे करून त्यांनी

पदवीपर्यंतचे आपले शिक्षण पूर्ण केले. तत्त्वज्ञान व समाजशास्त्र हे विषय घेऊन ते १९४८मध्ये पुण्यामध्ये एम.ए. प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण झाले. १९५५मध्ये फर्गसन महाविद्यालयामध्ये प्राध्यापक म्हणून रुजू झाले. तत्पूर्वी त्यांनी सुरतजवळील नवसारी येथील महाविद्यालयामध्ये व्याख्याता म्हणून पाच वर्षे काम केले. १९४९ ते १९५२ या काळात त्यांनी आपला पीएच.डी. प्रबंध पूर्ण करून डॉक्टरेट मिळवली. त्यांचा विषय होता 'The Evolution of the concept of the Atman and Moksa in the different systems of Indian philosophy' आणि परीक्षक होते गुरुदेव रा.द. रानडे.

डॉ. जोशींचा पिंड शिक्षकाचा होता. आवड ज्ञानाची होती, तर अभिवृत्ती नित्य अध्ययन-अध्यापन-लेखनाची होती. महाविद्यालयात अध्यापनाचे कार्य सुरू असतानाच त्यांनी मोठ्या प्रमाणात लेखनकार्यही चालू ठेवले. त्याच वेळी डेक्कन शिक्षण संस्थेचा आजीव सदस्य या नात्याने विविध पदांवर जबाबदारीची कामेही त्यांनी पार पाडली. तसेच अंमळनेर येथील जागतिक कीर्तीचे प्रताप तत्त्वज्ञान केंद्र पुणे विद्यापीठाशी संलग्न करण्यात त्यांनी सिंहाचा वाटा उचलला. अंमळनेरच्या अत्यंत उदार मनाच्या श्रीमंत प्रतापशेठ यांनी तत्त्वज्ञानाच्या अभ्यासासाठी स्थापन केलेली ही असामान्य स्वरूपाची व अतुलनीय अशी संस्था आहे. तिची रचना व घडण करण्यात प्रतापशेठना डॉ. राधाकृष्ण, गुरुदेव रानडे, सुप्रसिद्ध तत्त्वज्ञ कृष्णचंद्र भट्टाचार्य, प्रोफेसर राशबिहारी दास, चंद्रोदय भट्टाचार्य यांसारख्या विद्वान व व्युत्पन्न पंडितांचे मार्गदर्शन व साह्य मिळाले होते. डॉ. जोशी हे काही काळ या संस्थेत फेलो म्हणून होते.

१९८१मध्ये फर्गसन महाविद्यालयामधून सेवानिवृत्त झाल्यानंतर डॉ. जोशींच्या लेखनाला बहर आला. त्यांची ग्रंथसंपदाही मोठी झाली. तत्त्वज्ञान आणि अन्य विषयांवर त्यांचे ३२ ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. त्यात 'पूज्य साने गुरुजींचे अंतरंग', 'योगी अरविंदांच्या सावित्री या महाकाव्यातील तत्त्वज्ञान'. 'जे कृष्णमूर्तींची जीवनदृष्टी', 'पातंजल योगदर्शन', 'पू. साने गुरुजींचे तत्त्वचिंतन', 'डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन यांचे तत्त्वचिंतन', 'आचार्य काका 'कालेलकरांचे जीवन चिंतन', 'संस्कृति-संभ्रम', 'रवींद्रनाथ टागोर' (मराठी अनुवाद), 'आनंद कुमारस्वामी' (मराठी अनुवाद), 'कालीमातेची मुले' (मराठी अनुवाद) इत्यादी महत्त्वपूर्ण ग्रंथांचा समावेश आहे. याशिवाय प्रारंभी उल्लेखिलेल्या ग्रंथांचा समावेश आहेच.

थोर तत्त्वचिंतक प्रो. डी.डी. वाडेकर यांच्या त्रिखंडात्मक मराठी तत्त्वज्ञान महाकोशाचा सहसंपादक म्हणूनही त्यांनी केलेले योगदान महत्त्वाचे आहे. प्रो. वाडेकरांच्या पश्चात तत्त्वज्ञान महाकोश मंडळाच्या संचालकपदाची जबाबदारीही त्यांनी पार पाडली. या काळात विद्वान लेखकांनी लिहिलेली सुमारे ३५ पुस्तके मंडळातर्फे प्रसिद्ध झाली. डॉ. ग. ना. जोशी यांचे सर्वच लेखनकार्य म्हणजे मराठी भाषेतील एक मौलिक ठेवा आहे. त्यांच्या लेखनाला लिहिण्याची विलक्षण गती व वेग होता. ज्ञानेच्छूंना मार्गदर्शन करण्यात ते नेहमीच तत्पर असत. त्यांच्या मार्गदर्शनामुळे सहा विद्यार्थ्यांना पीएच.डी. प्राप्त झाली. याशिवाय अखिल भारतीय तत्त्वज्ञान परिषदेचे सहकार्यवाह म्हणूनही त्यांनी सहा वर्षे सेवा केली. अखिल भारतीय चर्चासत्रांमध्येही त्यांचा सहभाग असे.

डॉ. जोशी यांच्या ग्रंथांची योग्य अशी नोंदही महाराष्ट्राने घेतली. अनेक संस्थांनी पुरस्कार देऊन त्यांचा गौरव केला. त्यात प्रामुख्याने उत्कृष्ट वाङ्मय निमिर्तीबद्दल महाराष्ट्र राज्याचा पुरस्कार, महाराष्ट्र साहित्य परिषदेकडून पं. रामाचार्य अवधानी पुरस्कार, अंमळनेर येथील मुक्ताई पुरस्कार, पुणे येथील देवदेवश्वर संस्थेकडून श्रीमंत पेशवे धार्मिक आणि आध्यात्मिक पुरस्कार यांचा आवर्जून उल्लेख करता येईल.

डॉ. जोशी हे तत्त्वचिंतक, समाजसेवाव्रतधारक आणि स्वातंत्र्यसैनिक तर होतेच, तसेच साधा, निगर्वी, प्रेमळ आणि विनोदबुद्धी असलेला एक माणूस म्हणूनही ते परिचित होते. जीवनविषयक भारतीय विचारधारा आणि पाश्चात्त्य विचारधन यांचा तौलनिक अभ्यास व चिंतन

केल्यानंतर भारतीय जीवनपद्धतीची विशेषता त्यांनी विशद केलेली आहे. त्यांच्या मते पाश्चात्त्य जीवनपद्धतीत आणि आदर्शरहित विचारसरणीत भौतिक समृद्धी, सुख, चैन आणि उथळ चित्तवृत्ती यांना जे अवास्तव आणि गैरवाजवी महत्त्व व प्राधान्य दिले जाते, ते मानवाच्या खऱ्या विकासाला, आत्मजीवनाला पोषक न ठरता काही प्रमाणात अपायकारक आणि विघातक ठरत आहे, याची गंभीरपणे दखल घेणे आवश्यक आहे. सध्या भौतिक समृद्धी देणाऱ्या आणि सुखलालसा तृप्त करणाऱ्या ऐहिक मनोवृत्तीचे अत्यंत सूक्ष्मपणे विश्लेषण आणि मूल्यमापन करण्याची, साक्षेपीपणाने विचार करून इष्ट-अनिष्ट, शुभ-अशुभ, चांगले-वाईट ठरवण्याची वेळ आलेली आहे.

आज विज्ञान आणि तंत्रविज्ञान यांच्या विषयांना जे अधिक महत्त्व दिले जाऊन त्यांचे ज्ञान मिळवण्यास महाविद्यालयात आणि विद्यापीठांमध्ये जे अतिरेकी महत्त्व व प्रोत्साहन दिले जाते, त्याला पायबंद बसण्यासाठी तर्कशुद्ध व मूल्यात्मक पद्धतीने आणि साक्षेपी दृष्टीने विचार करण्यासाठी तत्त्वज्ञानाच्या पद्धतीने विचार करून घडणाऱ्या घटनांचे मूल्यमापन करण्यास अधिक महत्त्व व प्रोत्साहन देण्याची फार मोठी आवश्यकता आहे. असे जर झाले नाही, तर भौतिक व ऐहिक विषयोपभोगांच्या ओझ्याखाली माणुसकीच्या कोमल व उदात्ततेकडे नेणाऱ्या वृत्ती व भावना चिरडल्या जाऊन मानवाचे आंतरिक भावभावनांचे जीवन शुष्क, भकास आणि केवळ आहार-निद्रा-भय-मैथुन यांनी पुष्ट होऊन त्याच्या पलीकडे वैचारिक, बौद्धिक आणि आंतरिक जीवनाची उपासमार होऊन त्याचे यांत्रिकीकरण होत जाईल. मानवाचे मानवत्व नष्ट होण्याची क्रिया झपाट्याने वाढत जाईल. मानवाचा अध्यात्माच्या दिशेने विकास होणे थांबेल. माणूस हा वैज्ञानिक आणि तंत्रवैज्ञानिक यांच्या हातातील एक निर्जीव खेळणे बनेल. असे घडत गेल्याने मानवी संस्कृती उच्च, उदात्त आणि मंगलमय न बनता आजारी (Sick) आणि रोगट बनेल. त्यामुळे माणसाचे दैवीकरण होण्यास वाव आणि आवाहन उरणार नाही. अशी मते गजानन जोशी यांनी व्यक्त केली.

— बी.आर. जोशी

**संदर्भ :**

१. *'तत्त्वज्ञान मंदिर' त्रैमासिक, म. ना. जोशी यांची 'मुलाखत', प्रताप तत्त्वज्ञान केंद्र, अंमळनेर, जिल्हा जळगांव.*

२. *बी. आर. जोशी– 'श्रद्धांजली', 'डॉ. ग. ना. जोशी – एक व्यासंगी तत्त्वज्ञ', 'परामर्श' त्रैमासिक, खंड ३०, अंक १ व २, मे–आक्टोबर २००८, पुणे विद्यापीठ, तत्त्वज्ञान विभाग, पुणे.*

३. *डॉ. ग. ना. जोशी, 'पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाचा इतिहास', खंड पहिला, 'लेखकाचे निवेदन', कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९७५.*



## जोशी, चिंतामण विनायक

☛ ***मुख्य चरित्रनोंद - साहित्य खंड***

## जोशी, दत्तात्रेय पंढरीनाथ

**प्राच्यविद्या व इतिहास संशोधक, बहुभाषाकोविद, भाषांतरकार**

**१४ ऑक्टोबर १९३२ – ३० डिसेंबर २०११**



दत्तात्रेय पंढरीनाथ जोशी मूळचे मराठवाड्यातील परभणीचे. नूतन विद्यालयात शालेय शिक्षण पूर्ण करून ते हैदराबादला आले. अतिशय कठीण आर्थिक परिस्थितीत राहून त्यांनी उस्मानिया विद्यापीठातून मराठी विषयात एम.ए.ची पदवी मिळवली. नंतर त्यांनी विवेकवर्धिनी विद्यालयात अध्यापन केले. इतिहासाचे प्रेम, पूर्वसुरींबद्दल आदर, कामाची आवड, अभ्यासू वृत्ती आणि कुशाग्र बुद्धी ही त्यांची वैशिष्ट्ये होती. जोशी इथे आले आणि सार्वजनिक कामांत गुंतत गेले. उस्मानिया विद्यापीठातील पुरातत्त्व विभाग व मराठी साहित्य परिषदेतील हस्तलिखितांच्या पोथ्या जोशी यांच्या

नजरेखालून गेलेल्या आहेत. राज्य मराठी संस्थेने प्रकाशित केलेल्या 'हैदराबादेतील मराठी हस्तलिखिते' या पुस्तकातील मराठी साहित्य परिषदेतील हस्तलिखिते ही सूची जोशी यांनी तयार केली आहे. जोशी यांनी अभ्यास, वाचन आणि लेखन यामध्ये कधी उसंत घेतली नाही.

'लक्ष्मणा स्वयंवर अर्थात विवेक विळास' हे महानुभाव कवी डिंभ यांचे आख्यानक काव्य जोशी यांनी संपादित केले आहे. सोळाव्या शतकातील या कवीने 'कृष्णमुनी विराटदेशे कवि डिंभ' या नावाने २५ ग्रंथ लिहिले आहेत. बृहत्सेन राजाच्या लक्ष्मणा या सुंदर कन्येला कृष्णाचे आकर्षण वाटते आणि कृष्णाला ती आवडते, या भागवतातील उल्लेखावरून डिंभने ३००० ओव्यांचे हे काव्य रचले. सोळाव्या शतकातील वाङ्मयीन परंपरेचे उदाहरण म्हणून जोशी यांनी त्याची चिकित्सा केली आहे. पंथीय काव्यापेक्षा त्याचे वेगळेपण कसे आहे, ते दाखवले आहे. 'ज्ञानेश्वरांचा किंवा नरेंद्राचा प्रभाव असला तरी डिंभाचे म्हणून काही निराळेपण आहेच. विशेषत: संगीत, चित्र, नाट्य, कला व योग, वनस्पती युद्धशास्त्राचे तपशील देताना व वर्णने करताना कवीने नवी शब्दनिर्मिती घडवली आहे. हा प्रयत्न सबंध काव्यभर आहे, किंबहुना ते ह्या काव्याचे वाङ्मयीनदृष्ट्या मुख्य प्रयोजन आहे.' हे विधान नवनवीन शब्दांची अनेक उदाहरणे देऊन जोशी यांनी येथे सिद्ध केले आहे.

बहुभाषाकोविद जोशी यांनी विविध भाषांतील प्राचीन साहित्याचा वेध घेतला आहे. महाभारताचे वाङ्मयीन आकलन, मोरोपंतांचे कर्णपर्व यावरील अभ्यासपूर्ण लेख याची साक्ष देतील. उर्दू भाषेवर त्यांचे प्रभुत्व होते. त्यांनी मराठी संस्कृतीचा आविष्कार दखनी भाषेतून दाखवणारे दोन लेख लिहिले. दखनी भाषांतील साहित्यावर संत रामदासांचा प्रभाव दाखवून शाह तुराब (१८वे शतक) यांच्या 'मनसमझावन'चा परिचय करून दिला. हे काव्य मनाचे श्लोकांवर आधारित आहे. त्यांनी चार्ल्स ब्राऊन या तेलगू अभ्यासकाच्या वाङ्मयीन जीवनाची ओळख करून दिली. १७९८मध्ये जन्म झालेल्या या तेलगू शब्दकोशकाराचे आत्मचरित्र मराठी वाचकांसमोर उलगडले. विल्यम ब्राऊन याने १८१८मध्ये तेलगू भाषेचा शब्दकोश व व्याकरण (निघंटु) छापले होते; तर चार्ल्स तेलगू, तामिळ, मराठी, संस्कृतसह अनेक पाश्चात्त्य भाषा जाणत होते. त्यांनी दक्षिणेतील भाषांसाठी किती मोलाचे काम केले आहे, ते जोशी यांच्या शोधक नजरेमुळे आणि बहुभाषिकतेमुळे मराठीत आले आहे.

जोशी यांनी मराठवाडा साहित्य परिषदेच्या आणि मराठी साहित्य परिषदेच्या माध्यमातून सुमारे ६० वर्षे निरंतर साहित्यसेवा केली. १९७४पासून म.सा.प. आंध्र प्रदेशचे कार्यवाह आणि २००३पासून जीवनान्तापर्यंत अध्यक्ष म्हणून काम पाहिले. त्यांनी काळात स्वतंत्र, अनुवादित, संपादित असे १५ ग्रंथ लिहिले. विख्यात तेलगू संशोधक के.व्ही. लक्ष्मणराव यांचे चरित्र लिहून त्याबरोबर त्यांचे तेलगू, मराठी आणि इंग्रजी लेखनही जोशी यांनी प्रकाशित केले. उस्मानिया विद्यापीठातील मराठी विभागाचे पहिले प्रमुख, प्राच्यविद्या, लोकसाहित्य यांचे अभ्यासक, मराठीतील साक्षेपी लेखन चिं.नी. जोशी यांचे चरित्र तर लिहिलेच, तसेच त्यांचे संशोधनपर साहित्य प्रकाशित करून प्राचीन साहित्याचा अभ्यास लोकांसमोर आणला. त्यांनी 'निजाम विजय' या वर्तमानपत्रातील १९२० ते ४० या कालखंडातील निवडक साहित्य प्रकाशित केले.

या उपक्रमातून हैदराबाद संस्थानातील लोकजीवनाचा पट 'काळाच्या पडद्याआड'च्या तीन खंडातून लोकांसमोर उलगडला. डॉ. ना.गो. नांदापूरकर यांचे समग्र साहित्य दोन खंडातून संपादित केले. या पुढचा भव्य प्रकल्प म्हणजे 'सेतुमाधवराव पगडी समग्र साहित्य'. पगडी यांची ५० मराठी व १५ इंग्रजी पुस्तके ८ खंडातून संपादित केली. प्रा. जोशी व त्यांची पत्नी डॉ. उषाताई या प्रकल्पाचे प्रमुख संपादक व डॉ. विद्या देवधर व प्रा. धनंजय कुलकर्णी सहसंपादक आहेत. डॉ. गो.बं. देगलूरकर इंग्रजीच्या दोन्ही खंडांचे संपादक

आहेत. पगडी यांचे प्राचीन साहित्य व इतिहास या विषयावरील हजारो पृष्ठांचे लेखन उपलब्ध नाही, हे लक्षात घेऊन जोशी यांनी वयाची ७५ वर्षे ओलांडल्यानंतर हा प्रकल्प पूर्ण केला, यावरून त्यांची या विषयातील ओढ लक्षात येते.

प्राच्यविद्या व इतिहास हे जोशी यांचे जिव्हाळ्याचे विषय. त्यांनी स्वत: या विषयांचा अभ्यास केला आणि अन्य अभ्यासकांकडून करून घेतला. 'पंचधारा' हे म.सा.प.चे वाङ्मयीन त्रैमासिक. १९७४पासून जोशी यांनी अनेक वर्षे त्याचे संपादन केले आणि शेवटपर्यंत पंचधारेसाठी ते नवनवीन विषय सुचवत होते. लिहीत होते. विद्वानांना लिहिते करून ते छापत होते. पुराणकथा आणि भारतीय ललित साहित्य या विषयावरील 'पंचधारा'चा अंक, कूर्तकोटी यांचे लेखन, एकलव्य हे कन्नड नाटक, अशी अनेक उदाहरणे देता येतील. प्राच्यविद्या म्हणजे केवळ शिलालेख नव्हे, हे लक्षात घेऊन प्राचीन साहित्याबरोबर संगीत, शिल्प, चित्र या सर्व कलांसंबंधी संशोधनाला, लेखनाला 'पंचधारा'मध्ये स्थान दिले.

संगीतकला आणि मध्ययुगीन साहित्य, प्राचीन व मध्ययुगीन संस्कृत व मराठी साहित्य आणि चित्रकला, स्थापत्य आणि वास्तुकला, शिल्प आणि मूर्तिशास्त्र, नृत्य-नाट्य, भारतातील मध्ययुगीन संतांचे सांगीतिक योगदान, तंजावरचे बृहदेश्वर मंदिर किंवा वेरूळचे कैलास लेणे यासारख्या विषयांवरील पंचधारेतील अभ्यासपूर्ण लेख जोशी यांच्या संपादनशैलीचे महत्व अधोरेखित करतात.

मराठी साहित्य परिषदेतर्फे या विषयांची चर्चासत्रे जोशी यांनी आयोजित केली होती. अभ्यासू माणसाला संपूर्ण समाजात जागृती आणण्याची ओढ असेल, तरच तो केवळ स्वत:च्या संशोधनात न रमता व्याख्याने, चर्चासत्रे घडवून आणण्यासाठी धडपड करतो. द.पं. जोशी यांच्यासारखे बुद्धिमान आयोजक ही समाजाची आणि पर्यायाने भाषाभ्यासाची गरज आहे. दत्तात्रेय पंढरीनाथ जोशी यांनी १९५१पासून लेखनाला प्रारंभ केला. १९६० ते १९८४पर्यंत ते मराठवाडा वृत्तपत्रात साप्ताहिक स्तंभलेखन करीत होते. त्यांनी नरेंद्र कोहली यांच्या हिंदी कादंबरीचा 'अहिल्योद्धार' या नावाने अनुवाद केला.

पौराणिक आशयाला धक्का न लावता त्या कथानकाचा आधुनिक संदर्भ कोहली यांनी लावला आहे, त्याचे वाङ्मयीन व सांस्कृतिक मोल लक्षात घेऊन जोशी यांनी हे काम केले होते. तोच दृष्टीकोन ठेवून त्यांनी जिलानी बानू यांच्या दोन कादंबऱ्यांचे अनुवाद केले. कुर्तुल एन हैदर यांच्या 'पतझडकी लकीर'चा अनुवाद व श्री.व्यं. केतकर यांचे इंग्रजी चरित्र साहित्य अकादमीसाठी लिहिले. नरहर कुरुंदकर यांचे हैदराबाद मुक्तिसंग्रामाची व अन्य अनुषंगिक विषयांची चर्चा करणारे लेख 'हैदराबाद विमोचन आणि विसर्जन' या नावाने संपादित केले आहेत. त्यांनी लिहिलेल्या निवडक अभ्यासपूर्ण लेखांचे १२०० पृष्ठांचे चार संग्रह त्यांच्या निधनानंतर दोन महिन्यांनी प्रकाशित झाले. अनेक अभ्यासकांच्या व्यक्तिचित्रांचा एक संग्रह व 'हैदराबादचा इतिहास व भारताचे राजकारण', 'मिर्झा गालिब व सरदार जाफरी यांची निवडक पत्रे' असे दोन संग्रह आहेत. मराठी भाषिक जनसमूह आणि त्यांच्या संपर्कातील दाक्षिणात्य संस्कृती, भाषा, इतिहास यांची चर्चा करणारे निवडक लेख 'दक्षिण व प्रदक्षिणा' या संग्रहात आहेत. इन्स्टिट्यूट ऑफ डेक्कन स्टडीजचे ते पदाधिकारी होते.

प्राच्यविद्यांमधून संस्कृतीच्या विकासाचा आलेख दिसून येतो, या विचारातून जोशी यांनी साहित्यसेवा केली. 'मराठी व सबंध उर्वरित भारतीय साहित्य कला व संस्कृती व्यवहार याच्या ज्ञानसाधना आणि सर्जनशीलता या दोन अंगांनी होणारा, पण अनेक परीने होणारा आविष्कार न्याहाळणे हा 'पंचधारा'चा ध्यास आहे.' पंचधारेतील अशा अनेक संपादकीयातून त्यांचे जीवनध्येय आणि 'पंचधारा'चा ध्यास एकच असल्याचा प्रत्यय येईल.

— डॉ. विद्या देवधर

ज

## जोशी, नीळकंठ पुरुषोत्तम

**मूर्तिशास्त्रतज्ज्ञ, पुरातत्त्वज्ञ**

**१६ एप्रिल १९२२ - १५ मार्च २०१६**



नीळकंठ पुरुषोत्तम जोशी यांचा जन्म मुंबई येथे झाला. त्यांचे वडील पुरुषोत्तम व्यवसायाने डॉक्टर होते. आईचे नाव राधाबाई होते. हे कुटुंब मूळचे रत्नागिरी जिल्ह्यातील हर्णे-मुरुड येथले.

नीळकंठ जोशी यांनी बनारस हिंदू विद्यापीठातून प्राचीन भारतीय इतिहास व संस्कृती या विषयात एम.ए.ची पदवी इ.स. १९४५मध्ये प्राप्त केली. १९५६मध्ये प्राच्यविद्या पंडित वासुदेव शरण अग्रवाल यांच्याकडे पीएच.डी. (हिंदी साहित्य संमेलनाची विशारद) ही पदवीही प्राप्त केली.

आधी १९४६मध्ये वस्तुपालक म्हणून त्यांनी लखनौच्या शासकीय वस्तुसंग्रहालयात व नंतर अधिव्याख्याता म्हणून बनारस येथील शासकीय संस्कृत महाविद्यालयात कार्य केले.

१९६३मध्ये मथुरा येथील शासकीय संग्रहालयात अभिरक्षक म्हणून कामास सुरुवात करून त्यांनी चार वर्षे ते काम केले. १९६७ ते सेवानिवृत्त होईपर्यंत लखनौ येथील वस्तुसंग्रहालयाच्या संचालकपदी राहिले. या दोन्ही वस्तुसंग्रहालयातल्या असंख्य प्राचीन देवप्रतिमांनी डॉ. नी.पु. जोशींना भारावून टाकले. निवृत्तीनंतर कुठलेही पद न स्वीकारता नी.पु. देवतांच्या सहवासात रमले. ते त्यातच संशोधन, लिखाण, भाषण करीत आहेत.

मूर्तिशास्त्रावरील डॉ. जोशींचा अधिकार लक्षात घेऊन महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळाने भारतीय मूर्तिशास्त्रावरील ग्रंथ सिद्ध करण्याची जबाबदारी त्यांच्याकडे सोपवली. या ग्रंथाद्वारे असंख्य मंडळींना, संशोधक विद्यार्थ्यांना मूर्तींच्या अभ्यासाचे अनेक आयाम कळले. डॉ. जोशींच्या संस्कृत भाषेच्या प्रभुत्वामुळे वेदवाङ्मय, पुराणे इत्यादी ग्रंथांतील माहितीद्वारे हे शास्त्र अधिक समृद्ध करता आले आणि त्यांना मूलभूत संशोधनाचा दर्जाही प्राप्त झाला.

मथुरा शिल्पकला, गांधार शिल्पकला या विषयांवर त्यांचा अधिकार आहे. भारतीय मूर्तिकला, पार्वती, बलराम, प्राचीन उत्तारापथ इत्यादी त्यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहे. मुंबई येथील मुक्ताबोध इंडॉलॉजिकल रिसर्च इन्स्टिट्यूट, गणेशपुरी याचे ते संस्थापक सदस्य आहेत.

गेल्या अनेक वर्षांपासून वाराणसी येथील प्राचीन भारतीय संस्कृती संबंधात कार्य करणाऱ्या ज्ञानप्रवाह या नामांकित संस्थेशी त्यांचा 'आचार्य' म्हणून संबंध आहे. त्या संस्थेतर्फे शिल्पसहस्रदल या योजनेअंतर्गत तीन खंडांपैकी दोन खंड त्यांनी प्रकाशित केले असून मूर्तिशास्त्रावरील हे अभूतपूर्व ग्रंथ ठरावेत.

डॉ. जोशी हे कीर्तनकार असून त्या माध्यमातूनही ते भारतीय संस्कृतीचा प्रसार करीत असतात. डॉ. जोशी हे सध्या ९२ वर्षांचे असून अजूनही उत्साहाने संशोधनकार्य करीत असतात.

— डॉ. गो.बं. देगलूरकर

## जोशी, प्रल्हाद नरहर

☛ *मुख्य चरित्रनोंद - साहित्य खंड*

## जोशी, प्रभाकर शंकर

**संस्कृत पंडित**

**१९२४ – २८ जुलै २०१३**

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे चरित्र 'भीमायनम्' या नावाने संस्कृत महाकाव्याच्या स्वरूपात रेखाटणारे प्रा. प्रभाकर शंकर जोशी एक ख्यातकीर्त संस्कृत पंडित आणि विद्यार्थिप्रिय शिक्षक होते.

प्र.शं. जोशी सरांचा जन्म कोल्हापूर जिल्ह्यातील गडहिंग्लज तालुक्यात १९२४ साली झाला. इचलकरंजी आणि हैदराबाद येथे त्यांनी संस्कृत आणि उर्दू भाषांचे अध्ययन केले. संस्कृत भाषेचे पारंपरिक पद्धतीने अध्ययन करीत त्यांनी काव्यतीर्थ आणि काव्यकोविद



यांसारख्या पदवी-परीक्षा उत्कृष्ट गुणांनी पार केल्या. संस्कृत व्याकरण शिकत असता त्यांनी व्याकरणविशारद ही पदवीदेखील प्राप्त केली.

दुसरीकडे आधुनिक पद्धतीनेदेखील त्यांचे शिक्षण चालू होतेच. उच्च माध्यमिक परीक्षा सर्वोत्कृष्ट गुणांनी उत्तीर्ण होऊन त्यांनी जगन्नाथ शंकरशेठ आणि अकबर नवीस या शिष्यवृत्त्या प्राप्त केल्या. स्वातंत्र्यपूर्व काळात संस्कृत शिक्षक म्हणून कराची येथे नोकरी करणारे जोशी सर भारतास स्वातंत्र्य मिळाल्यानंतर पुण्यात स्थायिक झाले. या काळात त्यांनी बी.ए., बी.टी., एम.ए. इत्यादी पदव्या मिळवल्या आणि नूतन मराठी विद्यालय (नू.म.वि.), न्यू इंग्लिश स्कूल, टिळक रोड आणि फर्गसन महाविद्यालय, पुणे इत्यादी शाळा-महाविद्यालयामध्ये अध्यापनाचे कार्य केले.

डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या रसायनी येथील महाविद्यालयात प्राचार्य म्हणून त्यांनी काही काळ काम पाहिले. पुणे येथील टिळक महाराष्ट्र विद्यापीठामध्येदेखील सुमारे १५ वर्षे त्यांनी अध्यापन केले. त्यांचे मार्गदर्शन लाभलेल्या अनेक भारतीय आणि परदेशी विद्यार्थ्यांनी पुढे संस्कृततज्ज्ञ म्हणून नावलौकिक मिळवला आहे.

व्याकरण आणि साहित्य हे जोशी यांचे विशेष आवडीचे विषय होत. त्यांनी मोठ्या प्रमाणावर संस्कृत कथासाहित्याचा मराठी अनुवाद केला. विविध पाठ्यपुस्तकांची निर्मिती आणि संपादन त्यांनी केले आहे. ‘सुभाषितरत्नकलश’ या नावाने गोळा केलेला संस्कृत सुभाषितांचा संग्रह आणि योगवासिष्ठाचा इंग्रजी अनुवाद हे त्यांचे विशेष उल्लेखनीय कार्य होय. निवृत्तीनंतरही त्यांचे लेखनकार्य अव्याहतपणे सुरूच राहिले. सरांचे शरीर एकीकडे थकत होते, अंधत्वदेखील आले होते; परंतु अशा प्रतिकूल परिस्थितीतही स्वस्थ न राहता त्यांनी भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे चरित्र संस्कृत भाषेमध्ये शब्दबद्ध करण्याची आपली मनीषा ‘भीमायनम्’ हे १५७७ श्लोकांचे आणि २१ सर्गांचे महाकाव्य रचून पूर्ण केली.

टिळक महाराष्ट्र विद्यापीठातर्फे ‘कै. ल.वि. आगाशे उत्कृष्ट शिक्षक पुरस्कार’, ‘श्रीमती इंदिरा बेहेरे पुरस्कार’, तसेच ‘लोकमान्य टिळक संस्कृत पुरस्कार’ देऊन जोशी यांचा गौरव करण्यात आला होता. शेवटच्या क्षणापर्यंत संस्कृतचा ध्यास उराशी बाळगणाऱ्या प्रा. प्र.शं. जोशी यांचे वयाच्या ८८व्या वर्षी निधन झाले.

– डॉ. अंबरीश खरे

## जोशी, मधुकर रामदास

**हस्तलिखितशास्त्र तज्ज्ञ, प्राचीन मराठी साहित्य संशोधक**

**१९ जून १९३१**



मधुकर रामदास जोशी यांचा जन्म अकोला येथे झाला. त्यांच्या आईचे नाव मथुराबाई होते.सर्वसाधारण परिस्थिती असलेल्या घरात जन्म झाला असला तरीही बालपण सुखात गेले. मधुकर यांचे शालेय शिक्षण अकोला येथे झाले. अकोल्याच्या सीताबाई महाविद्यालयातून शिक्षण पूर्ण झाले.जात्याच हुशार असलेल्या मधुकर यांना संशोधनाची मुळातच आवड होती. त्यावेळी घरात वडिलांच्या मित्रांचे येणे जाणे असे. त्या नामवंत व हुशार मित्रमंडळींमध्ये दत्त संप्रदायाचे अभ्यासक अप्रबुद्ध यांचे ही येणे जाणे होते. त्यांच्या हुशारीचा, अभ्यासाचा प्रभाव मधुकर यांच्यावर पडला आणि प्राचीन पोथ्या, पुराणे, हस्तलिखिते वाचण्याची आवड निर्माण झाली. पदव्युत्तर शिक्षणानंतर एम. ए. मराठी व संस्कृत या द्विपदव्या संपादित केल्या. तसेच ‘नाथ संप्रदाय’ या विषयात प्रबंधलेखन करून डॉक्टरेट ही पदवी संपादित केली.

महाविद्यालयीन शिक्षण पूर्ण झाल्यावर अकोल्याच्याच सीताबाई महाविद्यालयात व्याख्याता म्हणून नोकरी लागली. काम सुरू असतानाच हस्तलिखितांचे वाचन संशोधन सुरू होते. त्यांचा हा व्यासंग, अभ्यासू वृत्ती पाहून नागपूर विद्यापीठाचे तत्कालीन कुलगुरू डॉ. वि.भि. कोलते यांनी स्वतः घरी येऊन नागपूर विद्यापीठात प्राध्यापक म्हणून कार्यभार संभाळण्यासाठी निमंत्रित केले. एखाद्या विद्यापीठाच्या कुलगुरुंनी घरी येऊन काम करण्यासाठी बोलावणे ही फार मोठी गोष्ट आहे. यावरूनच मधुकर रामदास जोशी यांच्या विद्वत्तेची प्रचिती येते. ते १९६१ मे मध्ये पूर्वाश्रमीच्या निशा देशपांडे यांच्याशी विवाहबद्ध झाले.



प्रा. मधुकर जोशींना नागपूर विद्यापीठात काम करण्याची संधी मिळाली आणि ज्ञानग्रहणाची कक्षा अधिक विस्तृत झाली. नागपूरला विद्वत्ताप्रचुर मंडळींचा सहवास लाभला त्यामध्ये प्रामुख्याने शिलालेख व ताम्रपट या विषयातील महामहिम डॉ. वा. वि. मिराशी, हस्तलिखितांचे संशोधक, अभ्यासक डॉ. य. खु. देशपांडे, महानुभाव लिपी तज्ज्ञ डॉ. वा. ना. देशपांडे, संस्कृततज्ज्ञ डॉ. ग. त्र्यं. देशपांडे आणि डॉ. सुरेश डोळके अशा दिग्गज मंडळींचा समावेश होता. या विद्वान मंडळींकडून बरेच काही शिकता आले आणि त्यांना अभ्यासाची नेमकी दिशा लाभली.

डॉ. मधुकर जोशी यांनी हस्तलिखितांच्या वर्णनात्मक यादीच्या संपादनाचे महत्त्वपूर्ण काम केले. नागपूर विद्यापीठाच्या कोशकार्याच्या कार्यकारिणीचे ते संपादकीय सदस्य म्हणून काम पाहिले. त्याचप्रमाणे त्यांनी समर्थ रामदासांचे समग्र कार्य, सुमंगल प्रकाशन, मुबई, संत तुकारामांचे समग्र कार्य, सुमंगल प्रकाशन मुंबई , मराठी वाङ्मयाचा इतिहास, व्हिनस प्रकाशन, पुणे, समर्थ रामदासांच्या दासबोधाचे टीकात्मक समीक्षण, प्रकाशक सज्जनगड प्रतिष्ठान, सातारा आणि महाभारत प्रतीच्या पाठ संहितेचा इतिहास आदी संशोधनात्मक कार्य प्रकाशित झाले आहे. डॉ. मधुकर जोशी यांची 'नाथ संप्रदाय', व्हिनस प्रकाशन पुणे, 'मनोहर अंबानगरी', नागपूर हिंदू धाम मंदिर प्रकाशन, 'स्टडीज ऑफ ज्ञानेश्वरी', साहित्य प्रसार केंद्र, नागपूर, मंगेश प्रकाशन नागपूर द्वारा 'श्री विठ्ठल आणि पंढरपूर', ब्रज मंडळातील कृष्णसखा– स्वामी सच्चिदानंद, मोहपा यांचे चरित्र व कार्य ही पुस्तके प्रकाशित झाली आहेत.सध्या शके १५०० मधील श्री गुरुचरित्राच्या प्राचीन संहितेचे मुद्रण सुरू आहे.

आतापर्यंत डॉ. जोशी यांनी चाळीस हजाराच्यावर हस्तलिखितांचे वाचन व अभ्यास झालेला आहे. फक्त ज्ञानेश्वरीच्याच १३५० पोथ्यांचे वाचन व अभ्यास केला आहे. महानुभाव पंथाच्या सत्तावीस लिप्यांपैकी तेवीस लिपींची त्यांना ओळख आहे. पुण्याच्या द. वा. पोतदार, ग. ह. खरे, शं. गो. तुळपुळे, रा. शं वाळिंबे, अ. का. प्रियोळकर आदी मान्यवर तज्ज्ञांबरोबर काम करण्याची संधी मिळाली आहे.

डॉ. मधुकर रामदास जोशी यांनी विदर्भ संशोधन मंडळाचे चिटणीस व संपादक म्हणून काम पाहिले आहे. ते नागपूर विद्यापीठाच्या एम. फिल. संशोधन शास्त्र विभागाचे संचालक पदी नियुक्त होते. त्यांनी नागपूर विद्यापीठांतर्गत १९८७ मध्ये भरलेल्या 'ज्ञानेश्वर' या विषयावर भरलेल्या परिसंवादाचे प्रमुख म्हणून काम पाहिले. हस्तलिखिते व हस्तलिखित शास्त्र या विषयात त्यांचा विशेष अभ्यास आहे.त्यामुळे ते महाराष्ट्र सरकारच्या हस्तलिखितशास्त्र समितीवर सल्लागार म्हणून काम केले आहे. सरस्वती महाल वााचनालय थंजावूर, तामीळनाडू येथे हस्तलिखितशास्त्रज्ञ म्हणून मंडळावर नियुक्त आहेत.

आजपर्यंत डॉ. जोशी यांनी सत्तावीस विद्यार्थ्यांना पीएच. डी. साठी मार्गदर्शन केले आहे त्यापैकी पाच विद्यार्थ्यांना 'थंजावूर साहित्य' या विषयात प्राप्त झाली आहे.त्यांनी नागपूर व जबलपूर या विद्यापीठाच्या अभ्यास मंडळावर सदस्य म्हणून काम केले आहे तसेच पुणे, बरोडा, हैदराबाद, औरंगाबद, कोल्हापूर, अमरावती, आदी विद्यापीठांवर परीक्षक म्हणून काम केले आहे. डॉ. जोशीं यांना मुंबई विद्यापीठाचे

प्रियोळकर पुरस्कार प्राप्त झाला. तसेच विदर्भ साहित्य संघ, जिजामाता शिव प्रतिष्ठान मंडळ, नागपूर, ज्ञानेश्वर प्रतिष्ठान, अचलपूर, समर्थ साहित्य पुरस्कार, सज्जनगड आदी संस्थांकडून मानाचे पुरस्कार प्राप्त झाले आहे.

डॉ. जोशी वयाच्या चौऱ्यांशीव्या वर्षी सुद्धा कार्यरत आहेत. त्यांना दोन मुले व दोन मुली असून मोठा मुलगा अजय वैज्ञानिक म्हणून कार्य करीत आहे.

- सुपर्णा कुलकर्णी

## जोशी, महादेव मल्हार
**संस्कृत भाषेचे व तत्त्वज्ञानाचे अभ्यासक**
**१८७४ - १९२८**

महादेव मल्हार जोशी लहानपणापासून अत्यंत हुषार म्हणून गणले जात होते. त्यांचे प्राथमिक शिक्षण गोरेगाव येथे, नंतर इंग्रजी शिक्षण रोहे येथे व इंग्रजी पाचवीपासूनचे शिक्षण पुण्याच्या न्यू इंग्लिशमध्ये झाले. त्यांना मॅट्रिकमध्ये पहिली जगन्नाथ शंकरशेट स्कॉलरशिप मिळाली. त्याचप्रमाणे त्यांनी एम.ए. संस्कृतमधील सर्व बक्षिसे मिळवली. सरकारी नोकरी मिळण्याचा संभव असतानाही यांनी राष्ट्रीय भावनेतून खासगी नोकरी पत्करली व नगर सोसायटीच्या गुरुकुलात हेडमास्तर म्हणून काम केले. १९२०मध्ये तेथून ते जुनागडला गेले व बहुद्दीन कॉलेजमध्ये संस्कृतचे प्रोफेसर म्हणून नोकरी करू लागले. तेथे यांनी उत्तम लौकिक संपादन केला. पंचवीस वर्षे नोकरी केल्यानंतर यांनी पेन्शन मिळाली. पण तिचा उपभोग घेण्यास ते जगले नाहीत. लेखक व वक्ते म्हणूनही ते प्रसिद्ध होते.

त्यांना घरात ‘अण्णा’ असे म्हणत. तरल बुद्धिमत्ता, प्रगाढ विद्वत्ता, सखोल व गाढा अभ्यास, जुन्या परंपरेचा जाज्वल्य अभिमान, देशप्रेम, झळ सोसून केलेला त्याग, विचारांची तरलता वगैरे गुण त्यांच्यात होते.

महादेव मल्हार जोशी यांचे ग्रंथ - १. आधुनिक सुशिक्षितांचा वेदान्त. महादेव मल्हार जोशी यांनी आपल्या शंकांची व मतभेदाची पुस्ती जोडली आहे. तत्त्वज्ञानाची इतक्या उच्च भूमिकेवरून केलेली मनोरंजक चर्चा अन्यत्र क्वचितच पाहावयास सापडेल, असे काका कालेलकरांनी या पुस्तकासंबंधी लिहिले आहे. २. सच्चिदानंद बाबांची पत्रे.

— संपादित

## जोशी, रघुनाथ कृष्ण
☛ *मुख्य चरित्रनोंद - दृश्यकला खंड*



## जोशी, रामचंद्र
**पुरातत्त्वीय भूवैज्ञानिक**
**१९२० – १९९७**

रामचंद्र जोशी हे भारतातील आद्य पुरातत्त्वीय भूवैज्ञानिक होते. त्यांचा जन्म कर्जत येथे झाला. फर्गसन महाविद्यालयातून १९४२मध्ये प्रथम श्रेणीत बी.एस्सी. पदवी घेतल्यानंतर त्यांनी मुंबई विद्यापीठातून भूविज्ञान या विषयात १९४५ या वर्षी एम.एस्सी. पदवी संपादन केली. शिक्षण पूर्ण होताच ते व्याख्याता म्हणून धारवाडला नोकरी करू लागले.

लंडनच्या सुप्रसिद्ध इन्स्टिट्यूट ऑफ आर्किऑलॉजी येथील पर्यावरण व पुरातत्त्व या क्षेत्रातले अग्रणी प्रा. एफ.ई. झॉयनर हे भारतात आले होते. प्रा. जोशींना त्यांच्याबरोबर काम करण्याची संधी मिळाली. त्यांच्याकडून प्रेरणा घेऊन जोशींनी प्रा. ह.धी. सांकलिया यांच्या मार्गदर्शनाखाली १९५४मध्ये डॉक्टरेट ही पदवी संपादन केली. त्यांच्या प्रबंधाचा विषय ‘Pleistocene Studies in the Malaprabha Basin’ असा होता. डॉक्टरेट मिळताच त्याच वर्षी कर्नाटक विद्यापीठात नव्याने स्थापन झालेल्या भूविज्ञान विभागाचे प्रमुख म्हणून त्यांची नेमणूक झाली.

भूविज्ञान विभागप्रमुख या पदावर तीन वर्षे उत्तम काम करून त्यांनी विभागाचा विकास केला व नंतर ते १९५७मध्ये भारतीय पुरातत्त्व सर्वेक्षण (Archaeological Survey of India) या संस्थेच्या प्रागैतिहास विभागात अधिकारी म्हणून रुजू झाले. या संस्थेत त्यांनी पंधरा वर्षे काम केले व अनेक प्रागैतिहासिक पुरातत्त्वीय

स्थळांचा शोध लावला. मध्य प्रदेशात आदमगढ नावाच्या अतिशय महत्त्वाच्या प्रागैतिहासिक शैलाश्रयाचे (Rock Shelter चे) त्यांनी उत्खनन केले व या उत्खननाचा अहवाल पुस्तक स्वरूपात १९७८ मध्ये प्रसिद्ध केला. भारतीय पुरातत्त्व सर्वेक्षणात अधिकारी असताना जोशींनी नेपाळमध्ये काठमांडूच्या परिसरात केलेले संशोधन हा तेथील पुरातत्त्वीय संशोधनात अतिशय महत्त्वाचा टप्पा मानला जातो.



एक भूवैज्ञानिक या नात्याने प्रा. जोशींनी अश्मयुगीन संस्कृतीच्या गाळाच्या निक्षेपांमध्ये मिळणाऱ्या अवशेषांच्या अभ्यासाची पद्धत तयार केली. त्यांचे गोदावरीच्या खोऱ्यातील भूपुरातत्त्वीय संशोधन विशेष उल्लेखनीय आहे. त्याचप्रमाणे त्यांनी महाराष्ट्रातील कोकण किनाऱ्यावर सखोल सर्वेक्षण करून तेथे मिळणारी सूक्ष्मअवजारे वापरणारी संस्कृती (microlithiic culture) व इतिहासपूर्व काळात समुद्राच्या पातळीत वेळोवेळी झालेले बदल यांची सांगड घालण्याचा प्रयत्न केला. त्याचप्रमाणे त्यांनी रायगडच्या पायथ्याशी असणाऱ्या पाचाड येथे एका शैलाश्रयाचे उत्खनन केले. दख्खनच्या पठारावर, विशेषत: महाराष्ट्रात मध्याश्मयुगात हवामान अधिक आर्द्र होते व त्यामुळे मध्याश्मयुगीन पुरातत्त्वीय स्थळे कमी प्रमाणात मिळतात, अशी सिद्धान्तकल्पना त्यांनी मांडली होती.

पुरातत्त्वीय संशोधनामध्ये पर्यावरणासंबंधी निष्कर्ष काढण्यासाठी व प्राचीन वसाहतींमध्ये विविध कामे कशी व नेमकी कोणत्या भागांमध्ये चालत असत, हे समजण्यासाठी रासायनिक पद्धतीचा अधिक वापर व्हायला हवा, असे प्रा. जोशींचे मत होते. यासाठी त्यांनी पुढाकार घेतला. त्यांच्या मार्गदर्शनाखाली एकूण चार विद्यार्थ्यांनी पीएच.डी. संपादन केली आहे. ते १९७२मध्ये डेक्कन महाविद्यालयामध्ये प्रागैतिहास या विषयाचे प्राध्यापक म्हणून रुजू झाले. तेथूनच ते १९८१मध्ये सहसंचालक या पदावर असताना निवृत्त झाले.

— डॉ. प्रमोद जोगळेकर

## जोशी, लक्ष्मणशास्त्री बाळाजी

**संस्कृत पंडित, मराठी विश्वकोशकार**

**२७ जानेवारी १९०१ — २७ मे १९९४**



खान्देशातील पिंपळनेर येथे लक्ष्मणशास्त्री जोशी यांचा जन्म झाला. महान संस्कृत पंडित, महाराष्ट्रातील एक अग्रगण्य बुद्धिवादी विचारवंत, मराठी विश्वकोशाचे आद्य प्रमुख संपादक व महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे स्थापनेपासून वीस वर्षे अध्यक्ष. त्यांचे प्रारंभिक संस्कृत अध्ययन घरी व वेदाध्ययनाचा आरंभ वडिलांच्या भिक्षुक स्नेह्यांकडे झाला.

वयाच्या चौदाव्या वर्षी ब्रह्मीभूत स्वामी केवलानंदशास्त्री (पूर्वाश्रमीचे नारायणशास्त्री मराठे) यांनी सन १८९६मध्ये स्थापलेल्या वाई येथील प्राज्ञपाठशाळेत प्राचीन व्याकरण, न्याय, वेदान्त आदी शास्त्रांच्या अध्ययनाचा शुभारंभ झाला.

सन १९१८मध्ये त्यांनी न्यायशास्त्राच्या अध्ययनासाठी वाराणसीला प्रस्थान ठेवले. कै. राजेश्वरशास्त्री द्रविड व नंतर कै. वामाचरण भट्टाचार्य यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी न्यायशास्त्राचे सखोल अध्ययन केले व सन १९२२मध्ये कलकत्त्याच्या शासकीय संस्कृत महाविद्यालयाकडून सन्मानासह ‘तर्कतीर्थ’ ही पदवी संपादन केली. वंगीय संस्कृत परिषदेची ‘तर्कतीर्थ’ ही पदवी असामान्य नाही. महाराष्ट्रात व एकूण भारतातच अनेक ‘तर्कतीर्थ’, ‘काव्यतीर्थ’, ‘मीमांसातीर्थ’ व ‘व्याकरणतीर्थ’ आहेत.

लक्ष्मणशास्त्र्यांनी ‘तर्क’ (खरे तर ‘न्याय’) या विषयावर काहीच लेखन केले नाही. तरीही आयुष्यभर ‘तर्कतीर्थ’ म्हणूनच ते ओळखले गेले, याचे कारण त्यांची तर्कशुद्ध विचारसरणी होय. ‘प्रमाणैरर्थपरीक्षणं न्याय:।’ ‘प्रमाणांद्वारा सप्तपदार्थांचे परीक्षण म्हणजे न्याय’ लक्ष्मणशास्त्री यांनी या पदवीला इतकी थोरवी

प्राप्त करून दिली, की तर्कतीर्थ म्हणजे लक्ष्मणशास्त्री जोशीच! कालिदासाच्या भाषेत 'द्वितीयगामी न हि शब्द एष:' (दुसऱ्या कुणाला ही पदवी देता येणारच नाही.) याच वर्षी प्राज्ञपाठशाळेत परतून शिक्षक म्हणून त्यांनी आपले कार्य सुरू केले.

सन १९३४मध्ये मंडळाच्या 'धर्मकोश' प्रकल्पाच्या मुख्य संपादनाची जबाबदारी त्यांच्याकडे आली. १९५५मध्ये केवलानंद सरस्वतींच्या निर्वाणानंतर ते मंडळाचे तह्यात अध्यक्ष झाले.

सन १९१७मध्येच प्राज्ञपाठशाळेतच आचार्य विनोबा भावे यांच्याकडून इंग्लिशचे प्राथमिक धडे घेऊन त्यांनी स्वप्रयत्नांनी इंग्लिश भाषेचा व पाश्चात्त्य विद्यांचा दीर्घ व्यासंग आरंभला.

सन १९३०पासूनच गुरूंच्या मार्गदर्शनाखाली धर्मसुधारणेच्या आंदोलनाला त्यांनी सुरुवात केली. महात्मा गांधींच्या नेतृत्वाखाली स्वातंत्र्यलढ्यात सक्रिय भाग घेऊन सन १९३०मध्ये व १९३२मध्ये कारावासही अनुभवला.

महात्मा गांधींजींच्या अस्पृश्यता निवारणकार्यास शास्त्रीजींनी हिंदू धर्मशास्त्राचे पूरक भाष्य तयार करून दिले. सन १९३६च्या सुमारास मानवेंद्रनाथ रॉय या आंतरराष्ट्रीय ख्यातीच्या मार्क्सवादी नेत्याच्या प्रभावामुळे नवमानववादाच्या वैचारिक मंथनात त्यांनी महत्त्वाचा वाटा उचलला व रॉय यांच्याकडून 'भारतीय प्रबोधनाचे प्रसादचिन्ह' असा गौरव प्राप्त झाला.

सन १९५१मध्ये, परंपरेने अस्पृश्य मानलेल्या सर्वांना सोमनाथ मंदिर खुले राहील असे मंदिराच्या विश्वस्तांकडून आश्वासन घेऊन त्यांनी सन १९५१मध्ये भारत सरकारलाच मंदिराच्या जीर्णोद्धाराचे अध्वर्युत्व पत्करण्यास भाग पाडले. भारतीय राज्यघटनेचे संस्कृत भाषांतर करण्यासाठी भारत सरकारने नेमलेल्या समितीचे ते सन्मान्य सदस्य होते. त्यांनी आपल्या ९३ वर्षांच्या प्रदीर्घ आयुष्यात केलेले संशोधनात्मक व संपादनात्मक कार्य आणि निर्माण केलेली बहुमोल ग्रंथसंपत्ती 'शुद्धिसर्वस्वम्' (१९३४), 'आनंदमीमांसा' (१९३८), 'हिंदुधर्माची समीक्षा' (१९४१), 'जडवाद' (९१४१), 'ज्योतिनिबंध' (१९४७), 'वैदिक संस्कृतीचा विकास' (१९५१), 'आधुनिक मराठी साहित्याची समीक्षा व रससिद्धान्त, जोतिचरित्र' (१९७३) याशिवाय साहित्य अकदमीसाठी त्यांनी राजवाडे लेखसंग्रह (१९५८) व लो. टिळक लेखसंग्रह यांचे संपादन केले.

धर्मानंद कोसंबींच्या 'बुद्धलीला' आणि सुमंत मुरंजनांच्या 'ब्राह्मणवर्गाचे वर्चस्व' या पुस्तकांना त्यांनी लिहिलेल्या अभ्यासपूर्ण प्रस्तावनाही उल्लेखनीय आहेत. जपान, रशिया, अमेरिका आदी देशांतील धार्मिक वा अन्य परिषदांमधून शास्त्रीजींनी शोधनिबंध सादर केले. 'नवभारत' मासिकाची धुरा त्यांनी अखेरपर्यंत वाहिली.

नवीन विद्यांच्या प्रकाशात प्राचीन भारतीय विद्या तपासून घेतली पाहिजे, याबद्दलचा त्यांचा आग्रह रास्त होता. तथापि 'वैदिक संस्कृतीचा विकास' (१९५१) या पूर्वीच्या ग्रंथात मार्क्सवादी विचारसरणीच्या काहीशा अतिरिक्त प्रभावामुळे वैदिक संस्कृतीतील आध्यात्मिक व वैचारिक स्थिर मूल्यांच्या शक्तीकडे पाहिजे तितके लक्ष दिले गेले नाही आणि आर्थिक उत्पादन पद्धतीच्या स्थित्यंतरांवर प्रभुत्व गाजवणाऱ्या मानसिक मूल्यांची हिंदू धर्माने जी जोपासना केली त्याचीही उपेक्षा झाली, हे त्यांनी या पुस्तकात मोकळेपणे मान्य केले.

१ मे १९६० रोजी संयुक्त महाराष्ट्र राज्य स्थापन झाल्यानंतर डिसेंबरमध्ये महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ निर्माण झाले व त्याच्या अध्यक्षपदी शास्त्रीबुवांची नियुक्ती झाली व आपले गुरू स्वामी केवलानंद सरस्वतींच्या त्रिखंडात्मक मीमांसाकोशाच्या अनुभवाच्या जोरावर वीस खंडांच्या मराठी 'विश्वकोशा'च्या प्रमुख संपादकाची जबाबदारी स्वीकारून प्रत्येकी एक सहस्र ते बाराशे पृष्ठांच्या सतरा खंडांची भव्य योजना त्यांनी आखली. यात तंत्रविज्ञान व मानविकींना समान महत्त्व देण्यात येणार असल्यामुळे आपल्याकडील भाषा अस्तित्वात नसलेली नवी परिभाषा निर्माण करणे आवश्यक होते. यासाठी इंग्लिश संकल्पनांसाठी मराठी संज्ञांची व मराठी संकल्पनांना योग्य अशा इंग्लिश संज्ञांची

व्यवस्था असलेला परिभाषासंग्रह हा या विश्वकोशाचा अठरावा खंड आधी प्रसिद्ध करण्यात आला. याशिवाय एक नकाशाखंड व उर्वरित सूचिखंड प्रसिद्ध करण्याचेही ठरवले.

सन १९६०पासून १९८०पर्यंत महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाची धुरा शास्त्रीबुवांकडेच होती. त्यानंतर महाराष्ट्र राज्य विश्वकोश निर्मिती मंडळाचे ते अखेरपर्यंत अध्यक्ष व विश्वकोशाचे प्रमुख संपादक होते. त्यांच्या अध्यक्षतेच्या काळात विज्ञान, वैद्यक, धर्म, इतिहास, सामाजिक शास्त्रे, ललितकला यांसारख्या विषयांवर स्वतंत्र शंभर पुस्तके प्रकाशित झाली. यात उर्दू-मराठी शब्दकोशाबरोबर आयुर्वेदीय शब्दकोशाचाही समावेश आहे. याखेरीज म.म. पांडुरंग काणे लिखित 'हिंदू धर्मशास्त्राचा इतिहास', बौद्ध वाङ्मयातील महत्त्वाचे ग्रंथ, न्यायमूर्ती रानडे, निकोलाय मनुची, बर्ट्रांड रसेल, जदुनाथ सरकार, एम.एन. रॉय यांसारख्या लेखकांच्या निरंतर वैचारिक मूल्य असणाऱ्या लेखनाची अडुसष्टपेक्षा जास्त भाषांतरित पुस्तके प्रसिद्ध करण्याचेही अवधान मंडळाने ठेवले.

या कोशातील नोंदी लिहिण्याच्या बाबतीत कर्नाटक, पंजाब आदी अन्य भाषिक प्रदेशांतील विद्वानांचे आवश्यक सहकार्य मिळवून शास्त्रीबुवांनी या कोशकार्याला आगळे महत्त्व प्राप्त करून दिले. या विश्वकोशाचे प्रकाशित झालेले सतरा खंड मराठीला भूषणभूत आहेत. या विश्वकोशाच्या संपादनात शास्त्रीबुवांनी महाराष्ट्रीय विद्वानांबरोबर निरनिराळ्या देशांच्या भारतीय दूतावासांचेही सहकार्य मिळवले, हे फिनलँड, जपान आणि इतर देशांवरील नोंदींवरून स्पष्ट होते.

विश्वकोशाप्रमाणेच या मंडळाने महाराष्ट्राच्या इतिहासाच्या लेखनाची योजना आखली व प्रागैतिहासिक कालापासून आधुनिक कालखंडापर्यंतच्या इतिहासाचे पाच भाग पाडून त्यांच्या लेखनाचे व संपादनाचे काम विद्वानांकडे सोपवलेले आहे. शास्त्रीय विज्ञान ग्रंथमाला प्रकाशित करण्याच्या साहित्य संस्कृती मंडळाच्या उपक्रमाला अनुसरून 'रेडिओ रचना आणि कार्य', 'मधुमेह', 'प्राणिसृष्टी', 'बुद्धिबळ', 'पाणीपुरवठा' यांसारख्या विषयांवरील ४५ पुस्तके मराठीत प्रकाशित करून लोकभाषा मराठीच्या माध्यमातून विज्ञान लोकांपर्यंत पोहोचवण्याचे कार्यही शास्त्रीबुवांच्या मार्गदर्शनाखाली पूर्ण झालेले आहे.

पांडित्य किंवा विद्वत्ता, त्याचे संपादन व संवर्धन यांना शास्त्रीजींनी आपल्या प्रदीर्घ आयुष्यात समाजात एक न्याय्य स्थान मिळवून दिले व आधुनिक लोकशाही मूल्यप्रणालीशी सुसंगत असे तिचे हक्क व कर्तव्ये यांची समाजाला जाणीव करून देऊन प्रबोधनाचे भरीव काम केले.

प्राचीन आचार्यांच्या परंपरेतूनच विचारांची, विचारांच्या स्वातंत्र्याची जडणघडण होते. इतकेच नव्हे, तर आधुनिक काळाला अनुरूप असणाऱ्या नवनिर्मितिक्षम विचारांची, विवेकपूर्ण विचारांची वीण गुंफता येते हे सोदाहरण दाखवून देऊन समाजाचे प्रबोधन करणाऱ्या आधुनिक विचारवंतांत शास्त्रीबुवांचे स्थान असाधारण होय.

यामुळेच नवी दिल्लीतील साहित्य अकादमीचा मराठी ग्रंथाचा पहिला पुरस्कार (१९५५), राष्ट्रीय संस्कृत पंडित (९१७३), राजर्षी छत्रपती शाहू पुरस्कार, कोल्हापूर (१९९०), पद्मभूषण (१९७६), पद्मविभूषण (१९९२) तसेच एशियाटिक सोसायटीची गौरववृत्ती (१९९१), फाय फाउंडेशनचा 'राष्ट्रभूषण' पुरस्कार हे त्यांच्या वाट्याला आले व मध्य प्रदेश संस्कृत अकादमीनेही १९९२मध्ये त्यांचा गौरव केला. दिल्ली येथील १९५४मधील मराठी साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते. वयाच्या ९३व्या वर्षी महाबळेश्वर येथे त्यांचा मृत्यू झाला.

– डॉ. मो.गो. धडफळे /
संपादक मंडळ

**संदर्भ :**

१. *मराठी विश्वचरित्रकोश; संपादक - कामत, श्रीराम पांडुरंग; विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा*

## जोशी, शिवराम दत्तात्रेय

**अर्वाचीन भाषाशास्त्रज्ञ, राष्ट्रीय संस्कृत पंडित**

**१५ ऑगस्ट १९२६ – २९ जुलै २०१३**



शिवराम दत्तात्रेय जोशी यांचा जन्म रत्नागिरी येथे झाला. त्यांच्या वडिलांचे नाव दत्तात्रेय सदाशिव जोशी व आईचे नाव सगुणाबाई होते. बालपणीच पितृछत्र हरपल्यामुळे शिवरामला त्याचे चुलते प्रख्यात वय्याकरणी महेश्वरशास्त्री जोशी यांच्याकडे पुण्यात, शिक्षणासाठी पाठविले. व्याकरणशास्त्राचे संपूर्ण अध्ययन महेश्वरशास्त्र्यांकडे केल्यानंतर पुढे शंकरशास्त्री मारूळकर यांच्याकडे विशेष सैद्धान्तिक अध्ययन झाले. 'व्याकरणतीर्थ', 'व्याकरणोत्तम', 'व्याकरणचूडामणी', 'व्याकरणाचार्य' अशा पारंपरिक व्याकरणाच्या परीक्षा उत्तीर्ण होऊन, १९४७ साली, वयाच्या अवघ्या एकविसाव्या वर्षी पूना संस्कृत कॉलेज या ठिकाणी ते प्राचार्य म्हणून रुजू झाले. १९५५ पर्यंत त्यांनी प्राचार्यपदाचा हा कार्यभार सांभाळला. या काळात केवळ विद्यार्थ्यांनाच नाही, तर अन्यत्र शिक्षक, प्राध्यापक, संशोधक असणाऱ्यांनाही ते संस्कृत व्याकरण शिकवीत असत. याच काळात व्याकरणशास्त्राचा अभ्यास करण्यासाठी भारतात आलेल्या हार्वर्ड विद्यापीठाच्या प्रा. इंगाल्स यांना व्याकरण शिकविण्याची जबाबदारी महामहोपाध्याय काशिनाथशास्त्री अभ्यंकर यांनी त्यांच्यावर सोपविली. यातूनच त्यांच्या आयुष्यास नवी दिशा मिळाली.

जोशी यांची व्याकरणशास्त्रातील उपस्थिती आणि बुद्धी पाहून प्रा. इंगाल्स यांनी त्यांना बी.ए. करून हार्वर्डला पीएच.डी.साठी यायला सांगितले. प्रा. इंगाल्स यांच्या मार्गदर्शनाखाली 'Kaundabhatta on the Meaning of Sanskrit Verbs' या विषयावर हार्वर्ड विद्यापीठाची पीएच.डी. मिळवून १९६० साली ते पुण्याला परत आले. दरम्यानच्या काळात १९५८ साली कलावती भागवत (नंतरचे नाव सुलोचना) यांच्याशी त्यांचा विवाह झाला. त्यानंतर १९६०-१९६४ या काळात त्यांनी डेक्कन कॉलेज येथील ऐतिहासिक महाकोशाच्या प्रकल्पात काम केले. १९६४ मध्ये ते संस्कृत प्रगत अध्ययन केंद्र, पुणे विद्यापीठ येथे प्रपाठक म्हणून रुजू झाले. त्यानंतर विद्यापीठाच्याच संस्कृत प्राकृत विभागाचे प्रमुख, संस्कृत केंद्राचे संचालक अशा विविध पदांवर काम करून १९८७ मध्ये ते निवृत्त झाले. आपल्या कार्यकाळात संस्कृत भाषेच्या अध्ययन, अध्यापन, संशोधन आणि प्रसाराच्या दृष्टीने तिला लोकाभिमुख करणे यास त्यांनी निश्चित दिशा व गती दिली. निवृत्तीनंतर त्यांनी डेक्कन कॉलेजमधील ऐतिहासिक महाकोशाच्या संपादकपदाची धुरा खांद्यावर घेतली.

हार्वर्ड आणि नागोया (जपान) या ठिकाणी अतिथी प्राध्यापक म्हणून १९७१-७२ आणि १९७६-७७ असे एक एक वर्ष डॉ. शि.द. जोशी यांनी अध्यापन व संशोधनपर मार्गदर्शन केले. त्याखेरीज भारतात आणि भारताबाहेरील अनेक विद्यापीठांत त्यांनी व्याकरणशास्त्रावर व्याख्याने दिली.

व्याकरण महाभाष्यातील महत्त्वाच्या आह्निकांचे बारा खंड आणि अष्टाध्यायीचे चौदा खंड संपादित करून (सहसंपादक : जे.ए.एफ. रूडबेर्गेन) शि.द. जोशी यांनी व्याकरणशास्त्राच्या अभ्यासकांना व संशोधकांना कायमचे आपले ऋणी केले आहे. मूळ ग्रंथाचा शब्दश: आणि तरीही सुबोध अनुवाद, त्यातील संज्ञा-संकल्पनांचे परिपूर्ण विवरण, त्याविषयीच्या सर्व मतमतांचे समीक्षण, विस्तृत व साक्षेपी प्रस्तावना, विविध प्रकारच्या सूची यांमुळे महाभाष्य व अष्टाध्यायीच्या अभ्यासास हे ग्रंथ अतिशय महत्त्वाची मदत पुरवितात.

'Kaundabhatta on the meaning of the Sanskrit Verbs' हा डॉ. शि.द. जोशी यांचा प्रबंध पुढे नागोया विद्यापीठाच्या 'संभाषा' या पत्रिकेमधून प्रकाशित झाला. (खंड : १४ (१९९४), १६ (१९९६)

व १८ (१९९८)). ‘Sphotanirnaya of Kaundabhatta’ या ग्रंथात डॉ. शि.द. जोशींनी स्फोट सिद्धान्ताचे सर्व अंगांनी समालोचन केलेले आहे. व्याकरणशास्त्राच्या परंपरेची प्रामाणिक आणि प्रगल्भ जाण, न्याय आणि मीमांसा या शास्त्रांचे परिशीलन, अर्वाचीन भाषाशास्त्राचा सखोल अभ्यास यांमुळे डॉ. शि.द. जोशी यांची पुस्तके म्हणजे प्रगाढ पाण्डित्याचे खरोखर अक्षररूप आहे. डॉ. शि.द. जोशी हे हाडाचे शिक्षक असल्यामुळे मुद्दे, उपमुद्दे यांची लहान लहान परिच्छेदात विभागणी करतात. त्यामुळे ग्रंथ वाचत असताना त्यातील विषयाचे आणि आशयाचे आकलनही सहज होत जाते.

ऐतिहासिक महाकोशाच्या तिसऱ्या, चौथ्या व पाचव्या अशा तीन खंडांचे (तिसरा व पाचवा सहयोगाने, सहावा स्वतंत्रपणे) डॉ. शि.द. जोशी यांनी केलेले संपादन त्यांच्या व्यापक व्यासंगाचे दर्शन घडविणारे आहे. याखेरीज विविध राष्ट्रीय, आंतरराष्ट्रीय पत्रिका / गौरवग्रंथ / स्मरणग्रंथ यांतून त्यांनी शंभरावर शोधनिबंध प्रकाशित केले आहेत.

डॉ. शि.द. जोशी यांनी ‘संगीत शारदा’ आणि ‘हॅम्लेट’ या नाटकांचे अत्यंत सुगम संस्कृत अनुवाद केले, एवढेच नव्हे, तर त्यांचे रंगमंचीय प्रयोगही मोठ्या धाडसाने घडवून आणले.

डॉ. शि.द. जोशी यांच्या संशोधनपर कार्याचे थोडक्यात सार असे आहे : १) पाणिनीची ‘अष्टाध्यायी’ ही एकाच वेळेस एकाच व्यक्तीने केलेली रचना नसून कमीतकमी दोन टप्प्यांत तरी तिची रचना झाली असावी, त्यांपैकी तद्धिताचा भाग हा मागाहूनचा असावा. शैली आणि रचनातंत्राची सुबकता हा निकष यामागे आहे. २) तद्धितप्रकरण हे व्याकरण आणि कोशशास्त्र यांचे मिश्रण आहे. ३) ‘असिद्ध अधिकार’ सोडल्यास अष्टाध्यायीतील सर्व सूत्रे एकमेकांस सिद्ध आहेत. म्हणजे ती एकमेकांचे कार्य गृहीत धरतात. ४) शब्दसिद्धीच्या प्रक्रियेत विविध पायऱ्या असतात. त्यांपैकी एखाद्या पायरीवर दोन सूत्रे एकाच वेळेस हक्क सांगू लागली किंवा प्राप्त झाली, तर त्यांपैकी कोणते एक निवडायचे किंवा त्याचा त्याग करायचा, याची मार्गदर्शक सूत्रे सांगितली आहेत. त्यांना ‘परिभाषा’ म्हणतात. डॉ. शि.द. जोश्यांनी परंपरेच्या चौकटीत राहूनच अशी काही नवीन मार्गदर्शक सूत्रे सांगितली आहेत, जी निर्विवादपणे लागू पडतात. ५) ‘काशिका’ या अष्टाध्यायीवरील व्याख्येत दोन वेगवेगळे विचारप्रवाह दिसून येतात. एक महाभाष्यास माहीत नसलेल्या तत्पूर्वीच्या परंपरेचा आणि दुसरा खुद्द महाभाष्यातीलच!

डॉ. शि.द. जोशी यांची विद्वत्ता, संशोधनातील दृष्टी, भविष्यलक्ष्यी दृष्टी, प्रशासनिक चोखपणा, व्यवस्थापनातील औदार्य यांचा लाभ अनेक संस्थांना व समित्यांना मिळाला. ऑल इंडिया ओरिएन्टल कॉन्फरन्सचे ते अनेक वर्षे सचिव होते. भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिर व वैदिक संशोधन मंडळ या ठिकाणी विविध समित्या व अधिकार मंडळांवर डॉ. शि.द. जोशी यांनी काम केले.

या त्यांच्या कार्याबद्दल डॉ. शि.द. जोशी यांना अनेक पुरस्कारांनी गौरविले गेले, त्यांपैकी काही : महाराष्ट्र शासनाचा ‘उत्कृष्ट शिक्षक’ पुरस्कार, राष्ट्रपतींकडून ‘राष्ट्रीय संस्कृत पंडित’ पुरस्कार तसेच, देवदेवेश्वर संस्थान, पर्वती यांच्याकडून ‘पेशवे’ पुरस्कार.

मात्र, देशात आणि परदेशांतही व्याकरणाचे अध्ययन, अध्यापन व संशोधन करणारे, त्यांनी घडवलेले विद्यार्थी, हा त्यांना मिळालेला फार मोठा पुरस्कार म्हणायला हवा!

– डॉ. भाग्यलता पाटसकर

## जोशी, सुरेश दामोदर

**क्यूरेटर, लेखक**

**२७ फेब्रुवारी १९३४ – १६ ऑक्टोबर २०१२**

अहमदनगर जिल्हा ऐतिहासिक संग्रहालयाची स्थापना, उभारणी व त्याचबरोबर अहमदनगर जिल्ह्याला महाराष्ट्राच्या ऐतिहासिक मानचित्रात मानाचे स्थान देण्यात ज्यांनी आपल्या आयुष्याची परिपूर्ती मानली, त्या



सुरेश दामोदर जोशी यांचा जन्म नगर जिल्ह्यातील बांबारी या गावी झाला. श्री. द.वि. केतकर या त्यांच्या शालेय मुख्याध्यापकांनी लिहिलेले 'इतिहासातील अंतःप्रवाह' हे पुस्तक वाचून श्री. जोशींचे अंतःकरण उचंबळले आणि 'इतिहास' या शब्दाच्या व्याप्तीची त्यांना शालेय जीवनातच जाणीव झाली. पुढे महाविद्यालयीन जीवनात त्यांना महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदारांसारख्या इतिहास संशोधकाचे साहचर्य व मार्गदर्शनही लाभले. शिलालेख, ताम्रपट, मूर्ती, चित्रे, नाणी, ऐतिहासिक कागदपत्रे जमवीत असताना ते अनेक इतिहास अभ्यासकांच्या संपर्कात आले.

अहमदनगर महाविद्यालयातील १९५५ ते १९५९ या शिक्षणकाळात सुरेश जोशींच्या नगर शहरातील ओळखी वाढत गेल्या. त्या वेळी महाविद्यालयाचे कार्यालयीन अधिक्षक प्रा. प्रमोद गद्रे यांनी डेक्कन महाविद्यालयाच्या पुरातत्त्व विभागाचे प्रमुख प्रा. ह.ध. सांकलिया यांच्या मार्गदर्शनाखाली 'कल्चरल हिस्टरी ऑफ अहमदनगर' हा संशोधन प्रकल्प लिहिला. त्या कामी जोशी यांनी प्रा. गद्रे यांना सहकार्य केले. नगरच्या या वास्तव्यात जोशी अनेक लोकांच्या संपर्कात आले. त्यामध्ये बाबासाहेब मिरीकर, सदाशिव निसळ, मुन्शी उम्मीद साहेब वगैरेंशी त्यांचा परिचय झाला व ते इतिहास संशोधनात रस घेऊ लागले.

सुरेश जोशींच्या जीवनाला कलाटणी देणाऱ्या दोन घटना सन १९६०साली घडून आल्या. पहिली गोष्ट म्हणजे बाबासाहेब मिरीकरांच्या प्रयत्नांमुळे १ मे १९६० रोजी नगरपालिकेचा एक विभाग म्हणून ऐतिहासिक जिल्हा संग्रहालयाची स्थापना झाली. या संग्रहालयाच्या स्थापनेपासूनच जोशी हे त्याच्याशी संबंधित झाले. आपल्या जीवनाची इतिश्री (सन २०१२) होईपर्यंत ते या संस्थेशी इतके एकरूप झाले की ऐतिहासिक जिल्हा संग्रहालय व जोशी या एकाच नाण्याच्या दोन बाजू समजल्या जाऊ लागल्या. दुसरी घटना म्हणजे जुलै १९६०ला जोशी हे पुण्याच्या डेक्कन महाविद्यालयामध्ये दाखल झाले. डॉ. सांकलिया, डॉ.शां.भा. देव, डॉ. शोभना गोखले, डॉ. अन्सारी यांच्याबरोबर त्यांनी नेवासे, आहाड आदी ठिकाणच्या उत्खननांत भाग घेतला. १९६२मध्ये ते पुरातत्त्वशास्त्रात एम.ए. झाले. त्याच दरम्यान महाराष्ट्र शासनाच्या पुराभिलेख व पुरातत्त्व विभागात डॉ.पी.एम. जोशी यांच्यामुळे ते 'एक्सप्लोरेशन असिस्टंट' या पदावर नोकरीला लागले. या फिरतीच्या नोकरीत त्यांना नगर जिल्ह्यातील संरक्षित ऐतिहासिक स्थळांना भेटी देऊन सर्वेक्षण करावे लागे. पुढे दोन- तीन वर्षांनी डॉ. पु.म. जोशी निवृत्त झाल्यानंतर डॉ. मोरेश्वर गंगाधर दीक्षित यांच्या संचालकपदाच्या कारकिर्दीत सध्या अहमदनगर जिल्हा ऐतिहासिक संग्रहालयात असलेल्या छत्रपती संभाजी महाराजांच्या वधाच्या चित्रावरून मतभेद होऊन जोशींनी आपल्या पदाचा राजीनामा दिला व त्यांच्या आयुष्यातील आर्थिक अस्थिरतेचा काळ पुन्हा सुरू झाला. पुढे (१९८३) पुण्याच्या राजा केळकर संग्रहालयातील क्युरेटर पदावर त्यांची नेमणूक झाली. परंतु तिथेही त्यांचे मन रमेना. जीवनाच्या सुरुवातीला ज्या संस्थेच्या कार्यामध्ये त्यांनी आपले स्वत्व शोधले होते, त्या अहमदनगर जिल्हा संग्रहालयाच्या उभारणीमध्येच ते पुन्हा रममाण झाले.

बाबासाहेब मिरीकरांच्या प्रयत्नांमुळे १९६२मध्ये कलेक्टर बंगल्याच्या आवारातील जागा अहमदनगर जिल्हा ऐतिहासिक संग्रहालयासाठी मिळाली. बाबासाहेब मिरीकर हे या संग्रहालयाचे पहिले कार्यकारी विश्वस्त झाले. बाबासाहेब मिरीकरांना श्री. जोशींच्या 'तात्त्विक' स्वभावाची चांगलीच कल्पना होती. शासकीय नोकरीतून बाहेर पडलेल्या जोशींचे कोणाशीही पटणे अवघड आहे, त्यांनी बाहेर कोठेही काम करू नये म्हणून बाबासाहेब मिरीकरांनी जोशींना संग्रहालयात क्युरेटर या पदावर नेमले. तेथे त्यांनी विविध उपक्रम, सभा-संमेलने, वस्तूंचे संकलन व संशोधन केले. १९६८

ज

ते १९९० या काळात सध्या अस्तित्वात असलेली संग्रहालयाची इमारत उभी राहिली. जोशींनी इतिहास परिषदेचे अधिवेशनही घेतले. त्यांनी सुरू केलेल्या डॉ. जिन्सिवाले व्याख्यानमाला व पंडित वासुदेवशास्त्री व्याख्यानमाला नगरकरांमध्ये लोकप्रिय झाल्या. त्यामध्ये द.वा. पोतदार, प्रा. न.र. फाटक, सेतूमाधवराव पगडी, बाबासाहेब पुरंदरे, प्राचार्य शिवाजीराव भोसले, प्राचार्य राम शेवाळकर यांच्यासारखे नावाजलेले अभ्यासू वक्ते येऊन गेले. मिरीचे ऐतिहासिक दर्शन, निजामशाहीची राजधानी अहमदनगर, निवृत्ति-मुक्ताई संवादरूप 'ज्ञानबोध' इत्यादी ऐतिहासिक विषयांवरील पुस्तके त्यांनी लिहिली. गावोगावी जाऊन, लोकांकडून ऐतिहासिक महत्त्वाच्या वस्तू, शस्त्रे व कागदपत्रे संग्रहालयासाठी मिळविण्यात त्यांचा हातखंडा होता. या ऐतिहासिक साधनांचे संशोधन तर त्यांनी केलेच परंतु, सर्वसामान्य लोकांमध्ये याविषयी जागृती व्हावी यासाठी वृत्तपत्रे आणि मासिके यांमधून लेखनही केले. त्यातूनच त्यांची दोन पुस्तके इतिशोध व शोधपर्व (अप्रसिद्ध) तयार झाली. पुणतांबा येथील हस्तलिखित संग्रह, नगर जिल्ह्यातील, पळशी येथील होळकरांचे दिवाण पळशीकर यांचा कागदपत्र संग्रह, डुबेर, ता. सिन्नर, जि. नाशिक येथील थोरल्या बाजीरावांच्या आजोळचा म्हणजेच बर्वे यांचा कागदपत्र संग्रह, भांबोरकर- भोसले संग्रह, कडेकर देशमुखांकडील जन्मपत्रिका, लक्ष्मणराव पोतदारांकडील छत्रपती संभाजी महाराजांच्या वधाचे चित्र, रतनगडचे किल्लेदार असलेल्या टाकळकर घराण्यातील १२० रंगीत चित्रांचा संग्रह, वेल्हाळे, ता. संगमनेर येथील यादव सामंत वेसुराज यांचा ताम्रपट तसेच यादव सम्राट भिल्लम, दुसरा यांचा ताम्रपट, राष्ट्रकूट सम्राट गोविंद चतुर्थ याचा सांगली ताम्रपट अशा शेकडो वस्तू व कागदपत्रे त्यांनी संग्रहालयासाठी गोळा केल्या. इतिहास संशोधनाच्या प्रसिद्धीसाठी संग्रहालयातर्फे 'इतिहास संशोधन प्रदीप' नावाचे त्रैमासिकही सुरू केले होते. अशा या अवलिया इतिहास संशोधकाचे वृद्धापकाळाने निधन झाले. 'अहमदनगर जिल्हा ऐतिहासिक संग्रहालय' या संस्थेच्या रूपाने सुरेश जोशींचे स्मरण आपणास सदैव राहील.

– डॉ. गिरीश मांडके

**संदर्भ :**


१. *जोशी सुरेश, इतिशोध, द्वितीयावृत्ती, पद्मगंधा प्रकाशन, पुणे, २०००.*

२. *जोशी सुरेश, शोधपर्व, अप्रसिद्ध पुस्तक.*

३. *जोशी सुरेश, मिरीचे ऐतिहासिक दर्शन, अहमदनगर कॉलेज प्रकाशन, अहमदनगर, १९६३.*

४. *जोशी सुरेश (संपादक), इतिहास संशोधन प्रदीप, महाराष्ट्र इतिहास परिषद स्मरणिका, अहमदनगर, १९९१.*


***

# झ

## झा, वसिष्ठ नारायण

**संस्कृत अध्यापक, लेखक, नैयायिक**

**२० जुलै १९४६**



प्रा. वसिष्ठ नारायण झा यांना पूर्ण संस्कृतविश्व आज ओळखते ते एक नैयायिक म्हणून. परंतु त्यांच्या विद्यार्थिदशेत त्यांच्या विशेष आवडीचे विषय होते व्याकरण आणि भाषाशास्त्र. म्हणूनच वैदिक व्याकरणात संशोधन करण्यासाठी प्रा. झा १९६८मध्ये पुणे विद्यापीठातील संस्कृत प्रगत अध्ययन केंद्रात दाखल झाले.

प्रबंधाचे अंतिम रूप सिद्ध झाल्यावर प्रा. वसिष्ठ नारायण झा पुण्यातील डेक्कन कॉलेजमध्ये सुरू असलेल्या संस्कृत महाकोशाच्या प्रकल्पात उपसंपादक म्हणून रुजू झाले. तिथे विविध शास्त्रांतील पारिभाषिक संज्ञांवर काम करताना येणाऱ्या अडचणी सोडवण्यासाठी त्याच प्रकल्पात कार्यरत असलेल्या पं. श्रीनिवास शास्त्री आणि पं. शिवरामकृष्ण शास्त्री यांची मदत ते घेत असत. या दोन ऋषितुल्य विद्वानांकडून प्रा. प्रा. वसिष्ठ नारायण झा यांनी न्याय आणि मीमांसाशास्त्राचे ज्ञान मिळवले. प्रा. वसिष्ठ नारायण झा त्यांच्या या दोन गुरूंमुळे आणि विशेषत: पं. श्रीनिवास शास्त्रींकडे बरीच वर्षे केलेल्या न्यायाच्या अध्ययनामुळे न्याय म्हणजेच भारतीय तर्कशास्त्राच्या कठोर आणि नि:संदिग्ध तर्कसंगतीच्या जणू कायमचे प्रेमात पडले आणि आज संपूर्ण संस्कृतविश्व त्यांना एक नैयायिक, एक न्यायशास्त्रविद् म्हणूनच ओळखते.

उत्तर बंगालमधील रायगंज येथे एका ब्राह्मण कुटुंबात प्रा. झांचा जन्म झाला. त्यांच्या वडिलांचे नाव बद्रिनारायण झा आणि आईचे नाव आरतीदेवी. त्यांचे पदवीपर्यंतचे शिक्षण रायगंज येथेच झाले. शाळेत असताना पारंपरिक पद्धतीने संस्कृतचे अध्ययन करण्यासाठी ते मधुसूदन चतुष्पाठी पाठशाळेत जात. तेथे पं. सीताकांत आचार्य या गुरूंकडून त्यांनी 'मुग्धबोध व्याकरण' आत्मसात केले. त्यांच्या पाठशाळेतील गुरूंनीच त्यांना वेदतीर्थ, काव्यतीर्थ आणि व्याकरणतीर्थ या परीक्षांसाठी मार्गदर्शन केले आणि त्यामुळे संस्कृतमध्ये बी.ए. पदवी मिळवतानाच प्रा. झांनी तिन्ही 'तीर्थ' पदव्याही मिळवल्या होत्या. १९६५मध्ये बी.ए. झाल्यानंतर 'वेद' हा विशेष विषय घेऊन प्रा. झा बनारस हिंदू विद्यापीठातून एम.ए. झाले आणि त्यानंतर 'भाषाशास्त्र' या विषयात एम.ए. करण्यासाठी कलकत्ता विद्यापीठात दाखल झाले. काव्यतीर्थ, वेदतीर्थ, व्याकरणतीर्थ आणि हिंदी भाषेची राष्ट्रभाषारत्न एवढ्या सगळ्या पदव्या त्यांनी मिळवल्या होत्या. दोन एम.ए. पदव्या घेतल्यानंतर संशोधनासाठी पुणे विद्यापीठात आलेल्या प्रा. झांचा प्रबंध होता- 'ऋग्वेद पदपाठाचे भाषाशास्त्रीय विश्लेषण'. हा अशा प्रकारचा सर्वप्रथम अभ्यास होता. त्यामुळे या प्रबंधाचे विशेष कौतुक झाले. त्यानंतर अभ्यासकांना अभ्यासाची एक नवी दिशा मिळाली आणि पुढे इतर वेद-संहितांच्या पदपाठांचेही अशा प्रकारचे विश्लेषण झाले. त्यापैकी काही प्रा. झांच्याच मार्गदर्शनाखाली झाले, तर काही इतरही अशा प्रकारचे अध्ययन झाले.

पुणे विद्यापीठातील संस्कृत प्रगत अध्ययन केंद्रात संशोधन साहाय्यक म्हणून प्रा. झा १९७७मध्ये आले.

१९७९मध्ये ते प्रपाठक झाले आणि १९८६मध्ये प्राध्यापक. केंद्राचे संचालक म्हणून १९८७मध्ये त्यांची नियुक्ती झाली. तेव्हापासून २००६मध्ये निवृत्त होईपर्यंत अगदी अथकपणे त्यांनी जे महत्त्वाचे कार्य केले, ते म्हणजे बहु-आंतर्विद्याशाखीय अभ्यासाचे महत्त्व सांगून त्याद्वारा संस्कृतअध्ययनाचे आजच्या काळातील माहात्म्य अधोरेखित करणे. केंद्राचे संचालक म्हणून त्यांनी आयोजित केलेल्या पहिल्याच चर्चासत्राचा विषय होता : 'आजच्या भारतात संस्कृतची सुसंगती' (Relevance of Sanskrit in India Today). त्यानंतर लवकरच संस्कृतात संशोधन करणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी त्यांनी एक मोलाचा ग्रंथ प्रकाशित केला. 'भारतीय विद्येतील संशोधनाची नवी क्षितिजे' (New Horizons of Research in Indology). संपूर्ण जीवन संस्कृतविद्येच्या अभ्यासाला वाहिलेल्या तपस्वी विद्वानांनी या ग्रंथात लिहिलेल्या लेखांतून संस्कृत विद्याशाखांमध्ये कोणकोणते विषय आवर्जून अभ्यासले पाहिजेत, त्याचे ज्ञान नवीन संशोधकांना होते आहे. संशोधकांसाठी मदतीचा आणखी एक हात म्हणून प्रा. झांनी संस्कृतच्या क्षेत्रात विविध विषयांत झालेल्या कामाच्या सूची प्रकाशित करण्यास सुरुवात केली. १९९४ ते २००० या सात वर्षांत संस्कृतातील एकूण दहा विषयांच्या अभ्यास-सूची केंद्राने प्रकाशित केल्या.

झ

पुणे विद्यापीठातील 'संस्कृत प्रगत अध्ययन केंद्र' हे संस्कृत आणि भारतीय विद्येच्या अभ्यासकांचे महत्त्वाचे अभ्यासकेंद्र म्हणून अत्युच्चस्थानी असावे आणि केंद्राने संस्कृतचे आधुनिक काळातील महत्त्व विशद करून इतर संस्कृत संस्थांना मार्गदर्शन करावे ही केंद्राचे संचालक म्हणून प्रा. झांची तळमळ होती. त्यासाठी त्यांनी राबवलेले काही महत्त्वाचे उपक्रम म्हणजे :

१. विविध बहुविद्याशाखीय विषयांवर चर्चासत्रे आयोजणे. अर्थातच यामुळे विविध विद्याशाखांचे विद्वान केंद्रामध्ये येत.

२. भारतभरातील विद्यापीठांतील आणि महाविद्यालयांतील प्राध्यापकांसाठी आंतर्विद्याशाखीय विषयांचे पुनश्चर्या पाठ्यक्रम चालवणे. यामुळे आधुनिक काळातील संस्कृतचे महत्त्व पुन: पुन्हा अधोरेखित झाले.

३. महत्त्वाच्या विविध विषयांवर प्रसिद्ध विद्वानांची व्याख्याने आयोजणे. नवीन संशोधकांना आणि विद्यार्थ्यांना याचा विशेषत्वाने लाभ झाला.

या सर्व उपक्रमांमुळे 'संस्कृतचा बालेकिल्ला' ही केंद्राची ओळख अधिक विस्तृत होऊन ते विविध विषयांवरील चर्चेचे एक मैत्रीपूर्ण व्यासपीठ बनले. प्रा. झांनी आयोजलेल्या सर्व चर्चासत्रांत वाचले गेलेले निबंध त्यांनी पुस्तकरूपाने प्रसिद्ध केले आहेत, तसेच विद्वानांनी दिलेली व्याख्यानेही प्रसिद्ध केली आहेत. हे खरे असले, तरी हे उपक्रम तसे नैमित्तिकच. केंद्रात बहुविद्याशाखीय अध्ययन आणि अध्यापन याहूनही अधिक सातत्याने चालावे म्हणून प्रा. झांनी 'हस्तलिखितशास्त्रा'चे दोन अभ्यासक्रम १९९१मध्ये सुरू केले, तर १९९८मध्ये त्यांनी आणखी चार अभ्यासक्रम केंद्रात सुरू केले, ते म्हणजे भारतीय तर्कशास्त्र आणि प्रमाणशास्त्र याविषयात पदविका (१ वर्ष) आणि पदवी (२ वर्षे), तसेच संस्कृत भाषाशास्त्रात पदविका (१ वर्ष) आणि पदवी (२ वर्षे).

प्राचीन भारतीय तर्कशास्त्र आणि प्रमाणशास्त्र याबरोबरच पाश्चात्त्य तर्कशास्त्र आणि प्रमाणशास्त्राचे अध्ययन करता यावे म्हणून पहिले दोन अभ्यासक्रम विविध तज्ज्ञांच्या मदतीने तयार केले होते, तर संस्कृतातील पारंपरिक भाषाशास्त्र आणि आधुनिक भाषाशास्त्र यांच्या अध्ययनाची सोय इतर दोन अभ्यासक्रमामध्ये आहे.

प्रा. झांना वेद, व्याकरण, भाषाशास्त्र, भारतीय तत्त्वज्ञान, भारतीय तर्कशास्त्र, हस्तलिखितशास्त्र, संशोधनपद्धती तसेच आधुनिक काळातील इ-संस्कृत, इ-शास्त्र इत्यादी विविध विषयांमध्ये रुची आहे. या विषयांवर त्यांनी अनेक ग्रंथ लिहिले आणि संपादित केले आहेत. जिज्ञासूंना प्रा. झांच्या सन्मानार्थ लिहिलेल्या 'न्याय-वसिष्ठ' या ग्रंथामध्ये याविषयीची अधिक माहिती मिळेल. या वर उल्लेखिलेल्या सर्व विषयांवर भारतातील विविध विद्यापीठांमध्ये प्रा. झांनी शेकडो भाषणे,

व्याख्याने दिली आहेत. खरे म्हणजे 'सर्वोत्तम शिक्षक' किंवा 'गुरूंचे गुरू' हीच प्रा. झांची खरी ओळख आहे. उत्तम शिक्षक अनेक असतील, पण 'सर्वोत्तम' म्हणण्यासारखे फारच थोडे!

भारताबाहेरही जपानमधील नागोया विद्यापीठात नव्यन्याय (म्हणजे भारतीय तर्कशास्त्र) या त्यांच्या सर्वाधिक प्रिय विषयाचे अध्यापन त्यांनी अनेकदा केले. या भेटींमध्ये तोक्यो विद्यापीठात, क्योतो येथील ओतानि विद्यापीठांतही त्यांनी व्याख्याने दिली. याशिवाय जर्मनीतील हुम्बोल्ट विद्यापीठ, स्वित्झर्लंडमधील लुझान विद्यापीठ तसेच मॉरिशिस येथील महात्मा गांधी संस्था या ठिकाणीही 'भारतीय तर्कशास्त्र' शिकवण्यासाठी प्रा. झांनी वास्तव्य केले.

नव्यन्यायाचे ज्ञान भारतात सर्वदूर पसरावे, या उद्देशाने प्रा. झांनी तीन पातळ्यांवरील सारगर्भ व सखोल असे अभ्यासक्रम स्वत: तयार केले आहेत. त्यांनी २००० साली कालडी येथील श्री शंकराचार्य विद्यापीठात या अभ्यासक्रमांचे सर्वप्रथम अध्यापन केले. त्यानंतर जम्मूपासून केरळपर्यंत आणि कलकत्त्यापासून बडोद्यापर्यंत विविध विद्यापीठांमध्ये आणि संस्थांमध्ये प्रा. झा या अभ्यासक्रमांचे अध्यापन अविरतपणे करीत आहेत. २००६मध्ये निवृत्त झाल्यापासून तर या अध्यापनाला अधिकच गती मिळाली आहे. या सर्व अभ्यासक्रमांमध्ये 'संस्कृतचे ज्ञान' अत्यावश्यक नाही असे असूनही 'संस्कृत शिकण्याची ओढ लागणे' हाही या अभ्यासक्रमांचा एक दृश्य परिणाम. ज्यांना ही तीव्र इच्छा आहे, अशा विद्यार्थ्यांसाठी संस्कृत भाषेचा पाच पातळ्यांवरील अभ्यासक्रम तयार करण्याचे काम प्रा. झांनी सध्या हाती घेतले आहे. जून २०१४मध्ये केरळमधील वेलियनाड येथे चिन्मय मिशनच्या आश्रमात या अभ्यासक्रमाच्या अध्यापनाचा आरंभ झाला. हे आदिशंकराचार्यांचे जन्मस्थान होय. भारतभर परिक्रमा करून वेदान्ताच्या ज्ञानाचा प्रसार करणाऱ्या सातव्या शतकातील विभूती आदिशंकराचार्यांच्या पवित्र स्थानापासून प्रा. झांच्या सर्व अभ्यासक्रमांच्या अध्यापनाची सुरुवात व्हावी, हा एक विलक्षण योगायोगाच म्हणायचा. 'गुरूंकडून मिळवलेल्या ज्ञानाचे पुढील पिढीला दान केल्यानेच ऋषिऋणातून थोडेफार मुक्त होणे शक्य आहे' अशी प्रा. झांची श्रद्धा आहे.

प्रयाग येथील हिंदी साहित्य संमेलनाने २००२मध्ये प्रा. झांना 'संस्कृत महामहोपाध्याय' ही उपाधी देऊन गौरवले, तर २००७मध्ये तिरुपती येथील राष्ट्रीय संस्कृत विद्यापीठाने त्यांना सन्माननीय 'वाचस्पती' पदवी दिली. राजमुंड्री येथील मॉरिस स्टेला कॉलेजने त्यांना २००८मध्ये 'पंडित सार्वभौम' ही उपाधी दिली. २०१२मध्ये राष्ट्रीय संस्कृत संस्थानने डी.लिट. ही पदवी देऊन त्यांचा गौरव केला.

– उज्ज्वला झा

झ

## झेलिएट, एलिनॉर

**दलित-आंबेडकरी चळवळीच्या आंतरराष्ट्रीय अभ्यासक, ललित लेखक**

**७ ऑक्टोबर १९२६ – ५ जून २०१६**



एलिनॉर बाईंचे नाव घेतले की भारतीय दलित व्यक्ती आणि साहित्याचा जगभराचा विस्तार आणि कौतुक करणारी एक आंतरराष्ट्रीय कीर्तीची विदुषी अशी प्रतिमा उभी राहते. 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर आणि महार जमात चळवळ' या विषयावर १९६९ मध्ये अमेरिकेच्या पेन्सिल्व्हानिया (फिलाडेल्फिया) विद्यापीठात पीएच.डी. प्रबंध सादर करून, सुरुवात आणि नंतर सतत याच विषयाचे चाळीस वर्षे अध्ययन-अध्यापन-संशोधन करणाऱ्या त्या एकमेव विदेशी विदुषी म्हणाव्या लागतील.

अगदी अलीकडे, इ.स. २००० नंतर मला त्यांच्याबरोबर 'संत चोखामेळा : विविध दर्शन' हा संशोधनपूर्वक ग्रंथ संपादन करण्याची संधी मिळाली.

आणि त्यातूनच त्यांच्या संशोधनपद्धतीचा आणि फील्डवर्कचा अनुभव मला घेता आला. डॉ. एलिनॉर मिनेसोटाच्या कार्लेटोन कॉलेजमधून १९९३ मध्ये निवृत्त झाल्या. तत्पूर्वी त्या असोसिएट एडिटर (अमेरिकन फ्रेंड, इंडियाना), अध्यापक (स्कॅटरगुड स्कूल, आयव्हा), एडिटर (पेंडलहिल पब्लिकेशन, पेन्सिल्व्हानिया), समर टीचिंग टीचर (विस्कॉन्सिन युनिव्हर्सिटी), असि. प्रोफेसर (मिनेसोटा युनिव्हर्सिटी) कार्लेटोन कॉलेज इतिहास विभाग (प्राध्यापक) अशा विविध पदांवर कार्यरत होत्या. सन १९५२-५३ मध्ये त्या भारतात येऊन गेल्या. केवळ दोन महिन्यांच्या वास्तव्यात त्यांना भारत देश खूप भावला. १९५५ मध्ये त्या मॉस्कोला (रशिया) एका मिशनसाठी जाऊन आल्या. दिल्लीमध्ये अमेरिकन इन्स्टिट्यूट ऑफ इंडियन स्टडीज स्थापन झाल्यावर, पुणे केंद्राच्या त्या बराच काळ 'फेलो' होत्या. त्यानंतर काही वर्षे त्या पुण्याला एसीएम प्रोग्रॅमच्या (असोसिएटेड कॉलेजेस ऑफ मिडवेस्ट) संचालक म्हणून राहून गेल्या. या प्रोग्रॅममध्ये ३०/४० अमेरिकन पदविपूर्व महाविद्यालयीन विद्यार्थी पुण्यात वेगवेगळ्या कुटुंबांत राहून चार महिने मराठी समाज संस्कृतीचा अभ्यास करीत. त्याशिवाय संगीत -चित्रकला आदिकलांचा अभ्यास करून टर्मच्या शेवटी एका विषयावर रिसर्च पेपर देत. त्यासाठी मार्गदर्शकाची आवश्यकता भासे. प्रा. एलिनॉर यांनी बऱ्याच विद्यार्थ्यांना एसीएम संचालक म्हणून मार्गदर्शन केले.

उत्तर भारतात सहा महिने डॉ. आंबेडकरांच्या जीवन-कार्यावर व्याख्याने देण्यासाठी इंडियन 'काउन्सिल फॉर कल्चरल रिलेशन' प्रकल्पात त्यांनी १९९२ मध्ये मोठा दौरा केला. लंडनच्या इंडिया ऑफिस लायब्ररीसाठी समर रिसर्च प्रोगॅममध्ये त्या १९६९ आणि १९८८ मध्ये जाऊन आल्या. १९७५-१९७६ मध्ये त्यांना अमेरिकन इन्स्टिट्यूट ऑफ इंडियन स्टडीजची प्रो. नॉर्मन ब्राउन फेलोशिप मिळाली होती. त्या अकरा महिन्यांच्या काळात त्या पुन्हा भारतात आल्या होत्या. १९८७ मध्ये अभ्यासदौरा करण्यासाठी त्या व्हिएतनामला गेल्या होत्या. १९९२ मध्ये अमेरिकेची फुलब्राइट स्कॉलरशिप घेऊन त्या भारतात आल्या होत्या. अकॅडेमिक अध्ययनाबरोबर त्यांनी काही ललित लेखन केले. महानुभावपंथीय गुंडम राऊळ यांच्या रचना, 'घाशीराम कोतवाल' या मराठी नाटकाचे इंग्रजी रूपांतर त्यांनी केले आहे. नवबौद्धांची सद्य:स्थिती, एकनाथी भारुडे, एकनाथ आणि चोखामेळा यांचा तौलनिक अभ्यास, पालखी सोहळा, महार जमातीचा इतिहास, चित्पावन ब्राह्मणांची परंपरा, महाराष्ट्रातील लोकसंस्कृती अशा विविध विषयांवर त्यांनी अभ्यासपूर्ण लिखाण केले आहे. नंतर मात्र त्यांनी महाराष्ट्रातील दलित, अस्पृश्य (तथाकथित) संतांच्या जीवनावर आपले लक्ष केंद्रित केले आहे.

संत चोखामेळा प्रकल्पावर काम करताना त्यांनी या संतकवी आणि त्यांच्या कुटुंबीयांनी रचलेल्या, मुद्रित आणि अमुद्रित रचनांचा शोध घेतला. परिवाराचा इतिहास, त्यांच्या वास्तव्याची गावे, तेथील त्यांची स्मारके, त्यांची आजची अवस्था, आजच्या तरुण दलितांच्या कैफियती, सुशिक्षित आणि अशिक्षित दलितांची मनोगते, भागवत म्हणजेच वारकरी संप्रदायात चोखामेळा, रोहिदास, अजामेळा दिंड्यांचे व्यवस्थापन, या संतांच्या समाध्यांची दुरावस्था, नवबौद्धांचे या दलित संतांबद्दलचे मत, राजकीय नेते आणि दलित साहित्यिक यांना चोखोबाबद्दल काय वाटते, अशा विविध अंगांनी विचार करून त्यांनी ग्रंथलेखन केले, जे 'संत चोखामेळा : विविध दर्शन' या नावाने काही वर्षांपूर्वी प्रसिद्ध झाले आहे. त्याकरिता त्यांनी वयाच्या पंचाहत्तरीतसुद्धा पंढरपूर, मंगळवेढा, आळंदी आदी क्षेत्रांचा प्रवास केला.

त्यांना मिळालेले गौरव पुरस्कार, त्यांच्या विविध लेखांची यादी मोठी आहे. चोखोबांच्या गावाचा, मंगळवेढ्याचा पहिला 'चोखामेळा' पुरस्कार त्यांना मिळाला.

– वा.ल. मंजूळ

***

# ठ

## ठाकरे, केशव सीताराम

**समाजसुधारक व ब्राह्मणेतर चळवळीचे अध्वर्यू, प्रबोधनकार**

**१७ सप्टेंबर १८८५ - २० नोव्हेंबर १९७३**

☛ *मुख्य चरित्रनोंद - पत्रकारिता खंड*



केशव सीताराम ठाकरे यांचे प्राथमिक माध्यमिक शिक्षण पनवेल व देवास येथे झाले. १९०३मध्ये मुंबईतून ते मॅट्रिक झाले. त्यांनी सुरुवातीस काही वर्षे रेल्वेत नोकरी केली. त्यानंतर त्यांनी टंकलेखन, छायाचित्रकार, विमा एजंट असे अनेक व्यवसाय केले. त्यांची स्वत:ची नाटक कंपनीही होती. ते छत्रपती शाहू महाराजांच्या मर्जीतील होते व ब्राह्मणेत्तर चळवळीतील त्यांचे एक खंदे पुरस्कर्ते होते. मराठी व इंग्लिश या दोन्ही भाषांवर त्यांचे प्रभुत्व होते. बालविवाह, विधवांचे प्रश्न, सोवळेओवळे, हुंडाबळी, अस्पृश्यता इत्यादी अनिष्ट रूढींविरुद्ध त्यांनी लेखणीद्वारे जनमत तयार केले. त्यांनी 'प्रबोधन' नावाचे नियतकालिक काढून त्यातून सडेतोड लेख लिहिले. त्यामुळे त्यांना महाराष्ट्रीय लोकांनी 'प्रबोधनकार' ही उपाधी दिली.

सामाजिक विषमतेवर त्यांनी परखडपणे टीकास्त्र सोडले. ते उत्तम वक्ते होते. आपल्या व्याख्यानातून ते जुन्या रूढींवर टीका करीत. ठाकरे पत्रकार म्हणून यशस्वी झालेच, त्याशिवाय त्यांनी विपुल लेखनही केले. सामाजिक परिवर्तनाचा हेतू डोळ्यांसमोर ठेवून त्यांनी 'कोदंडाचा टणत्कार', 'ग्रामण्याचा इतिहास', 'भिक्षुकशाहीचे बंड', 'कुमारिकांचे शाप' इत्यादी पुस्तके लिहिली. 'खरा ब्राह्मण', 'टाकलेले पोर', 'विधिनिषेध' ही नाटकेही त्यांनी त्याच उद्देशाने लिहिली. याशिवाय त्यांनी 'पंडिता रमाबाई', 'रंगो बापूजी गुप्ते', 'संत गाडगेबाबा' इत्यादींची दर्जेदार चरित्रे लिहिली. त्यांनी रामदासांवर 'समर्थ रामदास' हे इंग्लिश पुस्तक लिहिले. इतर प्रांतीयांना रामदासांच्या व्यक्तिमत्त्वाचा परिचय व्हावा, हा त्यामागे हेतू होता. त्यांचे 'वक्तृत्वशास्त्रा'वरील पुस्तकही महत्त्वाचे आहे. संयुक्त महाराष्ट्र चळवळीत त्यांचा सहभाग मोठा होता. हक्कासाठी लढणाऱ्या संघटनेला 'शिवसेना' हे नाव त्यांनीच सुचवले; पुढे त्यांचे पुत्र बाळासाहेब ठाकरे यांच्या नेतृत्वाखाली 'शिवसेना' हा पक्ष फोफावला. 'माझी आत्मगाथा' हे त्यांचे आत्मचरित्र आहे.

- संपादित

**संदर्भ :**

*१. मराठी विश्वचरित्रकोश; संपादक - कामत; श्रीराम पांडुरंग, विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा.*

ठ

## ठोसर, हरिहर शाहुराव

**पुराभिलेखविद, इतिहासकार**

**२३ जुलै १९३८ – २२ मे २००५**

''पूर्वसुरींनी पुराभिलेखांचे खूप संशोधन करून ठेविले आहे. त्यांच्या काळात इतिहास संशोधनाने जेवढी माहिती उपलब्ध होती, त्याच्या मदतीने नवोपलब्ध साधनांची संगती त्या विद्वानांनी लावली आहे. परंतु काळ जसजसा पुढे सरकत जातो, तशी नवी ऐतिहासिक साधने उजेडात येतात. त्याच्या आधाराने पूर्वप्रकाशित ऐतिहासिक साधनांचे पुनरावलोकन करून नवी समीकरणे



मांडणे गरजेचे असते. त्या पुराभिलेखांचे पुनर्वाचन करणे, पाठनिश्चिती करणे, कठीण शब्दांची अर्थनिश्चिती करणे, त्यात आलेल्या स्थळांची ओळख पटवून स्थळनिश्चिती करणे आदी बाबींची चर्चा करणे हेसुद्धा संशोधनाचे एक अंग बनले आहे. ऐतिहासिक साधनांचे रवंथच म्हणा ना!'' हे उद्‌गार आहेत पुराभिलेख संशोधक डॉ. हरिहर ठोसरांचे.

ठ

डॉ. हरिहर ठोसरांचा जन्म केसापुरी, जि. बीड येथे झाला. ते १९६५मध्ये मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद येथे इतिहास विषयात एम.ए. झाले. त्याच विद्यापीठात त्यांनी 'हिस्टॉरिकल जिऑग्राफी ऑफ मराठवाडा' या विषयावर प्रबंध सादर करून १९७७मध्ये पीएच.डी. पदवी संपादन केली. त्यांनी आपल्या बिकट अशा कौटुंबिक परिस्थितीवर मात करून स्वकर्तृत्वावर शिक्षण पूर्ण केले.

पदव्युत्तर शिक्षणानंतर सुरुवातीला त्यांनी पुरातत्त्व खात्यात संशोधक म्हणून सेवा केली. तदनंतर औरंगाबाद येथील शासकीय कला व विज्ञान महाविद्यालयात इतिहासाचे प्राध्यापक म्हणून कार्य केले. ते एल्फिन्स्टन महाविद्यालयामध्ये प्रपाठक आणि इतिहास विभाग प्रमुख म्हणून रुजू झाले. इ.स.१९९६मध्ये ते त्या पदावरूनच सेवानिवृत्त झाले. सेवानिवृत्तीनंतर त्यांनी मुंबई येथील अनंताचार्य इंडॉलॉजिकल रिसर्च इन्स्टिट्यूटमध्ये इतिहास संशोधक म्हणून बहुमोल योगदान दिले. त्यांनी सुमारे ५०हून अधिक विद्यार्थ्यांना पीएच.डी.साठी मार्गदर्शन केले.

पुराभिलेख संशोधन व वाचन, पाठ पुन:परिष्कर त्यांनी खूप काम केले. विशेषत: स्थळनाम व त्यांची निश्चिती आणि कोरीव लेखांतील भूगोल यांची त्यांना आवड होती. त्यांनी आपले पीएच.डी. प्रबंधसुद्धा 'हिस्टॉरिकल जिऑग्राफी ऑफ मराठवाडा' या विषयावरच सादर केला. या प्रबंधात आणखी भर घालून 'हिस्टॉरिकल जिऑग्राफी ऑफ महाराष्ट्र अँड गोवा' या शीर्षकाने इ.स. २००४मध्ये प्रकाशित केला. प्राचीन आणि मध्ययुगीन महाराष्ट्राच्या व गोव्याच्या भूगोलावरील एक विद्वतपूर्ण ग्रंथ म्हणून त्याची नोंद घ्यावी लागेल. या काळातील भूगोलाविषयीचा एक मोठी खाणच अभ्यासकापुढे उघडी झाली आहे, असे म्हटल्यास ती अतिशयोक्ती ठरू नये. या क्षेत्रातील विद्वानांकडून या कृतीचे विशेष स्वागत व प्रशंसा झाली.

'एपिग्राफिक सोसायटी ऑफ इंडिया' व 'प्लेसनेम्स सोसायटी ऑफ इंडिया' या संस्थांचे ते सक्रिय सभासद होते. सुरुवातीपासून ते या परिषदांच्या अधिवेशनास हजेरी लावून तेथे शोधनिबंध सादर करीत. पुराभिलेख आणि ऐतिहासिक भूगोल या विषयांवर डॉ. ठोसर यांनी सुमारे १२५ शोधनिबंध वाचले. हे निबंध संस्थेच्या जर्नल्समधून नंतर प्रसिद्ध झाले आहेत.

पुराभिलेख या विषयातील त्यांच्या पांडित्याचा सन्मान म्हणून 'एपिग्राफिकल सोसायटी ऑफ इंडिया' या संस्थेने त्यांना इ.स.२००१मध्ये ताम्रपट प्रदान करून त्यांचा गौरव केला. या गौरवाने त्यांचा या विषयातील उत्साह द्विगुणित झाला. प्राचीन भूगोल आणि स्थलनामे ही इतिहास रचनेची प्रमुख स्रोत होत, अशी त्यांची ठाम विचारधारा होती.

महाराष्ट्र शासनाच्या दर्शनिका विभागाकडून प्रसिद्ध होणाऱ्या जिल्हा दर्शनिकामधील इतिहास विभागातील नोंदीचे कार्य डॉ. ठोसर यांनी केलेले आहे. या विभागाकडून प्रकाशित झालेल्या 'महाराष्ट्र राज्य गॅझेटिअर', इतिहास : प्राचीन काळ (खंड १), यातील वातापीचे चालुक्य व राष्ट्रकूट राजवंश ही दोन्ही प्रकरणे डॉ. ठोसरांच्या लेखणीतून उतरले आहेत.

मराठवाड्यातील व कोकणातील ग्रामीण भागातील महाविद्यालयामधील विद्यार्थ्यांना त्यांनी इतिहासाविषयी बहुमोल मार्गदर्शन केले. त्याबद्दल संबंधितांकडून त्यांचा उचित गौरवही झाला. अखिल भारतीय महाराष्ट्र इतिहास परिषदेचे चौथे अधिवेशन इ.स.१९९५मध्ये नागपूर येथे

भरले होते. त्या अधिवेशनात प्राचीन विभागाचे अध्यक्षपद डॉ. ठोसरांनी भूषवले हाते. इ.स.२००१मध्ये वसई विकासिनी तर्फे गुणिजन संशोधक म्हणून त्यांना गौरवण्यात आले.

इ.स.२००१मध्ये तामिळनाडूतील कोर्टालम येथे २७वे अखिल भारतीय पुराभिलेख परिषदेचे अधिवेशन भरले होते. त्या अधिवेशनात परिषदेतर्फे डॉ. ठोसरांना ताम्रपट देऊन त्यांचा सन्मान करण्यात आला. २००२मध्ये म्हैसुरू विश्वविद्यालयाकडून त्यांना जीवन गौरव पुरस्कार देण्यात आला आणि २००३मध्ये भारतीय राष्ट्रीय ग्रंथालय, कोलकाता शताब्दी महोत्सवानिमित्त अविरत संशोधनासाठीचा पुरस्कार देऊन गौरवण्यात आले.

महाराष्ट्राच्या प्राचीन ऐतिहासिक भौगोलिक विषयासंबंधी अभ्यास व चर्चा ज्या ज्या वेळी होईल, त्या त्या वेळी डॉ. ठोसरांचे नाव अवश्य घ्यावे लागेल एवढे कार्य त्यांनी करून ठेवले आहे.

– आनंद नागप्पा कुंभार

***

ठ

# ड

## डांगे, सदाशिव अंबादास
**संशोधक, कोशकार, लेखक**
**२३ ऑगस्ट १९२२ – २५ ऑक्टोबर १९९९**



सदाशिव अंबादास डांगे यांचा जन्म हिंगणघाट गावात झाला. त्यांचे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण वर्ध्यात झाले. पुढे हिस्लॉप महाविद्यालयातून ते संस्कृत विषय घेऊन १९४२ साली बी.ए. झाले. आपल्या आयुष्यातील सलग ८ वर्षे त्यांनी समाजसेवेकरिता वाहिली. त्यासाठी तामिळनाडू व केरळ हे त्यांचे कार्यक्षेत्र होते.

त्यांनी मुंबईच्या विल्सन महाविद्यालयातून १९५२मध्ये एम्.ए. पदवी संपादित केली. त्यांनी १९५५मध्ये प्रयाग येथून हिंदी भाषेत साहित्यरत्न ही पदवी प्राप्त केली. त्यांनी १९५७मध्ये नागपूर विद्यापीठातून हिंदी विषयात एम्.ए. पदवी प्राप्त केली. १९६०मध्ये त्यांनी ‘लीजंड्स इन द महाभारत – विथ अ ब्रीफ सर्व्हे ऑफ फोक टेल्स’ या विषयात विद्यावाचस्पती (पीएच.डी.) ही पदवी प्राप्त केली. त्यानंतर नागपूर विद्यापीठातूनच डी.लिट. पदवी प्राप्त केली. ते विदर्भातील खामगाव – नागपूर येथील महाविद्यालयात १९५४-१९६२ या काळात संस्कृत विभागप्रमुख म्हणून कार्यरत होते. १९६२-१९६९ ही सात वर्षे त्यांनी नागपूर विद्यापीठातील अधिस्नातक विभागात अधिव्याख्याता म्हणून काम पाहिले. नंतर १९६९-१९७९ या काळात मुंबई विद्यापीठात प्रपाठक म्हणून त्यांची नियुक्ती झाली. १९७९-१९८२ मुंबई विद्यापीठाचे संस्कृत विभागाचे आर.जी. भांडारकर प्राध्यापकपद आणि विभागप्रमुखपद भूषवून ते सेवानिवृत्त झाले. डांगे यांच्या अध्यापनाचे प्रमुख विषय वेद, वैदिक विधी, पुराणे, धर्मशास्त्र आणि व्याकरण हे होते. त्यांचे लेखनकार्य पुढीलप्रमाणे आहे -

१) ‘लीजंड्स इन द महाभारत’ – १९६९ (दुसरी सुधारित आवृत्ती – ‘मिथ्स फ्रॉम द महाभारत – क्वेस्ट फॉर इम्मॉर्टेलिटी’ – खंड १, १९९७) २) ‘पॅस्टोरल सिम्बॉलिझम फ्रॉम द ऋग्वेद’, - १९७० ३) ‘वेदिक कन्सेप्ट ऑफ फिल्ड अँड द डिव्हाईन फ्रक्टीफिकेशन’ – १९७१, ४) ‘हिंदू धर्म आणि तत्त्वज्ञान’ - १९७३, दु. आ. २०१६, ५) ‘अश्वत्थाची पाने’ - १९७४, ६) ‘कल्चरल सोर्सेस फ्रॉम द वेद’ - १९७७, ७) ‘सेक्शुअल सिम्बॉलिझम फ्रॉम द वेदिक रिच्युअल’ - १९७९, ८) ‘वेदिक मिथ्स इन सोशल पर्स्पेक्टिव्ह’ - १९८२, ९) ‘पुराणिक मिथ अँड कल्चर’ - १९८७, १०) ‘एन्सायक्लोपीडिया ऑफ पुराणिक बिलिफ्स अँड प्रॅक्टिसेस’ - खंड १ ते ५ – १९८६ ते १९९०, ११) ‘क्रिटिक्स ऑन संस्कृत ड्रामाज’ - १९६३; १९९४, (सहलेखिका डॉ. सिंधू डांगे,) १२) ‘डिव्हाईन हिम्स अँड ॲन्शिएंट थॉट’ खंड १-२, १९९५, १३) ‘पुराकथांचा अर्थ - वाद आणि विवेचन’ - १९९४, १४) ‘टुवर्ड्स अंडर्स्टॅंडिंग हिंदू मिथ्स’ - १९९६, १५) ‘इमेजस फ्रॉम वेदिक हिम्स ॲण्ड रिच्युअल्स’ - २०००, १६) ‘वेदिक सॅक्रिफाईसेस’ – ‘अर्ली नेचर’ – खंड १-२, २०००, १७) ‘मिथ्स फ्रॉम द महाभारत : स्टडी इन पॅटर्न्स अँड सिम्बल्स’, खंड २, - २००१, १८) ‘मिथ्स फ्रॉम द महाभारत : प्रोब इन अर्ली डिम हिस्ट्री अँड फोकलोर’, खंड ३, - २००१, १९)

'ग्लिनिंग्स फ्रॉम वेदिक टू पुराणिक एज' (डॉ. स. अं. डांगे यांच्या शोधनिबंधांचे संकलन) संपादन - डॉ. सिंधू डांगे - २००२. याशिवाय देशी-परदेशी नियतकालिकांतून त्यांचे २६०पेक्षा अधिक शोधनिबंध प्रसिद्ध झाले. त्यांनी विविध चर्चासत्रे, विद्यापीठे यांतून मार्गदर्शनपर विद्वत्तापूर्ण अशी शंभराहून अधिक व्याख्याने दिली.

डॉ. डांगे यांनी वैदिक विधींवर सखोल व चिकित्सक संशोधन केले. त्याला लोकसंस्कृतीच्या अभ्यासाची जोड दिली आणि असा निष्कर्ष काढला की, या दोन्ही संस्कृतींमध्ये देवाणघेवाण झाली आहे. वैदिक विधींमध्ये लैंगिक प्रतीके अधिकतर आढळतात. हे धार्मिक विधी द्यावापृथ्वी मीलनाचे विधी आहेत. त्यांच्यामुळे भूमातेचे आकाशाशी नाते जडते आणि पृथ्वीवर धनधान्य, फळे, पशुपक्षी यांची सुबत्ता होते. यज्ञप्रसंगी वैदिक विधींमध्ये रूढ असणारी लैंगिक प्रतीकात्मकता आजपर्यंत विविध रूपांत टिकून आहे. उत्खननांत उपलब्ध झालेल्या असंख्य अवशेषांतून-विशेषत: विचित्र अवस्थेतील मूर्तीतून ते दृग्गोचर होते, तद्वतच मंदिरांवरील मिथुन-मैथुन शिल्पांतूनही ती दिसते. व्रतांच्या उद्यापनाच्या वेळी आपण जे मेहूण (मिथुन) बोलावतो, तिथवर या विधींची परंपरा आढळते. या संशोधनामुळे वैदिक सूक्तांचे गूढ आणि कूट अर्थ उलगडण्यास मदत झाली. डॉ. डांगे यांनी 'कॉस्मोसेक्शुॲलिझम' हा नवा शब्द तयार करून इंग्रजी वाङ्मयाला दिला. त्यांच्या संशोधनामुळे आणखी काही कूट प्रश्नांची उत्तरे मिळाली. उदा. मुंजीत गोटा का करतात, पाद्री विवाहविधीत वधूचे चुंबन का घेतो, गणपतीच्या उपासनेत लाल रंग आणि मंगळवार यांना का महत्त्व, युद्धात रथाचा ध्वज तुटणे अपशकुनी का ? इत्यादी.

संस्कृत नाटकांच्या प्रांतात प्रचलित मान्यतांना धक्का देऊन काहीतरी वेगळे प्रतिपादन करण्याचे श्रेय नाटककार भासाला दिले जाते, त्याप्रमाणे डॉ. डांगे यांच्या काही लेखांमधूनही असाच प्रत्यय येतो. 'उत्तररामचरितम्' हे भवभूतीचे नाटक करुणरसप्रधान आहे, असा सर्वमान्य समाज! पण आपल्या 'क्रिटिक्स ऑन संस्कृत ड्रामाज्' या पुस्तकात (सहलेखिका डॉ. सिंधू डांगे) त्यांनी समाजाला धक्का देऊन प्रस्तुत नाटक विप्रलंभ - शृंगारप्रधान आहे, हे पटवून दिले. सदर पुस्तकातील 'प्रतिमानाटक अँड राज्यशुल्क ऑफ कैकेयी' या लेखातही प्राचीन हिंदू धर्मशास्त्रास अनुसरून वेगळा मुद्दा मांडला आहे. दशरथ-कैकेयी यांच्या विवाहसमयी वधुपित्यास दिले गेलेले शुल्क हे अयोध्येच्या राज्याच्या स्वरूपात होते. त्यामुळे दशरथाच्या मृत्यूनंतर अयोध्येचे राज्य, कैकेयीचा पुत्र म्हणून भरताकडे किंवा भरताच्या अनुपस्थितीत कैकेयीच्या भावांकडेच जाणे अपरिहार्य होते. सामान्य माणसांना अज्ञात असणाऱ्या गोष्टी तज्ज्ञांच्या प्रयत्नांद्वारे अशा प्रकारे ज्ञात होऊ शकतात, याचे हे उत्तम उदाहरण आहे.

डॉ. डांगे यांनी 'पुराकथांचा अर्थ - वाद आणि विवेचन' या ग्रंथाची मराठीत निर्मिती केली. प्रस्तुत ग्रंथाची निर्मिती करताना त्यांनी Mythology या इंग्लिश शब्दासाठी 'मिथ/मिथक/दिव्यकथा/देवकथा' अशा संज्ञा वापरण्याऐवजी पुराकथा ही संज्ञा तयार केली. वरील सर्व संज्ञांपेक्षा पुराकथेची संकल्पना व्यापक आहे. तसेच 'Functionalism'साठी प्रयोजनवाद आणि 'Structuralism'साठी बांधणीवाद ही संकल्पना नव्याने तयार करून वापरली.

बारा विद्यार्थ्यांना विद्यावाचस्पती (पीएच.डी.) पदवीसाठी सदाशिव अंबादास डांगे यांचे मार्गदर्शन लाभले. मुंबई विद्यापीठात संस्कृत प्रमाणपत्र व पदविका अभ्यासक्रम सुरू करण्यातही डॉ. डांगे यांचा मोलाचा सहभाग आहे.

डॉ. डांगे यांना एशियाटिक सोसायटी ऑफ मुंबई तर्फे भारतविद्येतील असामान्य योगदानाबद्दल १९८३ साली रजतपदक प्राप्त झाले. उत्तर प्रदेश संस्कृत अकादमीतर्फे १९८९मध्ये त्यांना 'विशिष्ट पुरस्कार' मिळाला. १९९०मध्ये महाराष्ट्र शासनाने त्यांच्या संस्कृत क्षेत्रातील योगदानाबद्दल त्यांचा बहुमान केला. १९९३मध्ये भारत सरकारने राष्ट्रपती पुरस्कार देऊन त्यांचा गौरव केला.

'पुराकथांचा अर्थ' या पुस्तकाला १९९४मध्ये महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार प्राप्त झाला. तसेच 'अश्वत्थाची पाने' या पुस्तकाला महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार मिळाला. 'हिंदू आणि तत्त्वज्ञान' या ग्रंथाला महाराष्ट्र शासन, पुणे विद्यापीठ तसेच केसरी-मराठा ट्रस्ट पुणे यांच्याकडून पुरस्कार प्राप्त झाला. मुंबई विद्यापीठाने संस्कृत विभागात डॉ. डांगे यांच्या स्मरणार्थ 'प्रा. एस. ए. डांगे भारतविद्या अध्यासन' असे अध्यासनही स्थापन केले.

वेद आणि वैदिक कर्मकांड हा जरी त्यांचा प्रिय विषय असला, तरी रामायण-महाभारत, पुराणे, धर्मशास्त्र, व्याकरण, धर्म व पुराकथाशास्त्र तसेच नाटके या अनेक प्रांतातही त्यांची लेखणी स्वच्छंद विहरत होती. त्यामुळेच खऱ्या अर्थाने त्यांना भारतविद्येचा तज्ज्ञ म्हणता येते.

ड

— डॉ. गौरी माहुलीकर

## डांगे, श्रीपाद अमृत

**स्वातंत्र्यसैनिक, समाजसेवक, लेखक**

**१० ऑक्टोबर १८९९ – २२ मे १९९१**

**☛ मुख्य नोंद - राजकारण खंड**



श्रीपाद अमृत डांगे यांचा जन्म मुंबई येथे झाला. श्रीपाद डांगे हे दोन वर्षाचे असतानाच त्यांच्या आईला देवाज्ञा झाली. त्यानंतर त्यांची काकी दगूताई यांनी त्यांचा सांभाळ केला. दगूताई विधवा झाल्यावर त्यांनी नाशिकला प्रयाण केले ते सात वर्षाच्या लहानग्या श्रीपादबरोबरच. त्यामुळे डांगे यांच्या वयाच्या सातव्या वर्षापासून काकीबरोबर नाशिकला त्यांचे वास्तव्य होते.

डांगे यांचा बालपणीचा काळ सुखात गेला. मात्र आईचे छत्र लहानपणीच हरपल्यामुळे आणि काकीला मूलबाळ नसल्याने त्यांची अतिशय काळजी घेतली जात असे व साहसी गोष्टींपासून त्यांना दूर ठेवले जात असे. काकी त्यांच्या खेळापेक्षा त्यांच्या अभ्यासाची अधिक काळजी करीत असत.

मुंबईला असताना वयाच्या सहाव्या वर्षी त्यांनी टिळकांची मिरवणूक पाहिली होती. इ.स. १९०८ साली लोकमान्य टिळकांना मंडालेच्या कारागृहात पाठवण्यात आले व स्वदेशी चळवळ दडपली गेली. इ.स. १९१० साली नाशिकमध्ये अनंत कान्हेरे या तरुणाने जॅक्सन या कलेक्टरला गोळी घालून त्याचा वध केला. या प्रमुख तीन घटनांचा डांगे ह्याच्या मनावर खोलवर परिणाम झाला. याचाच परिणाम म्हणजे डांगे यांचे पहिलेवहिले महाविद्यालयीन आंदोलन. डांगे विल्सन महाविद्यालयात शिकत असताना बायबलचा तास अनिवार्य करण्यात आला. मात्र धर्मनिरपेक्ष डांगे यांना हे मान्य नव्हते. त्यांनी व त्यांच्या बारा सहाध्यायींनी याविरोधात हरताळ पाळला. याचा परिणाम म्हणून त्यांना महाविद्यालयातून काढून टाकण्यात आले.

इ.स. १९१९ साली All India Trade Union (आयटक) संस्था स्थापन करण्याचे ठरवले होते व डांगे यांनी त्याचे सर्व काम बघावे, अशी टिळकांची इच्छा होती. डांगे यांनी सुरुवातीपासूनच अनेक चळवळींमध्ये हिरिरीने सहभाग घेतला. त्यातील एक महत्त्वाची चळवळ म्हणजे असहकार चळवळ. इ.स. १९२२ साली असहकाराची चळवळ मागे घेतल्यावर झारिया येथे आयटकचे अधिवेशन झाले ज्यात डांगे यांचा सहभाग होता. त्याच वर्षी डांगे यांनी कामगार किसान पक्षाची स्थापना करण्यास सुरुवात केली. भारतात स्वतंत्र मजूर पक्षाची स्थापना झालीच पाहिजे, असे डांग्यांचे स्पष्ट मत होते. १९२२नंतर डांगे यांनी मागे वळून पाहिलेच नाही. एकापुढे एक आंदोलने, अनेक चळवळीतील सक्रिय सहभाग यांनी त्यांचे पूर्ण आयुष्य भारले होते.

अन्यायाविरुद्धची चीड हे त्यांच्या राजकारणातील सहभागाचे मूळ कारण होते. त्याच प्रेरणेने त्यांनी अनेक चळवळींमध्ये भाग घेतला, संप केले, तसेच त्यांनी त्याकरिता तुरुंगवासही भोगला, मात्र स्वत:च्या तत्त्वांना

कधीही मुरड घातली नाही. त्यांच्या संपूर्ण जीवनात त्यांनी अनेक संस्थांची महत्त्वाची पदे भूषवली. उदाहरणार्थ, १९५२ साली आयटकचे सरचिटणीस, त्यानंतर संयुक्त महाराष्ट्र चळवळीचे नेते, तसेच भारतीय कम्युनिस्ट पक्षाचे अध्यक्ष इत्यादी. अशा प्रकारे डांगे यांचे राजकीय जीवन अनेक महत्त्वाच्या घटनांनी भरलेले होते. त्यांनी कामगारांची साथ आजन्म सोडली नाही. काही काळाने कम्युनिस्ट पक्षाच्या बदलत्या धोरणांमुळे त्यांचा स्वत:चा असा डांगे मतप्रवाह स्वतंत्रपणे उदयास आला, ज्याला 'डांगे लाईन' असे संबोधले जाऊ लागले.

डांगे यांना सोवियत संघाचे राष्ट्रपती निकोलॉय पॉडगोर्नी यांच्या हस्ते सोवियत संघाचा 'Order of Lenin' हा सर्वोच्च पुरस्कार, तर बल्गेरियातर्फे 'दिमित्रो लॉरिट' हा पुरस्कार देण्यात आला.

अगदी सुरवातीच्या काळातच डांगे यांच्या लेखनाला प्रारंभ झाला. इ.स. १९२१ साली अवघ्या बाविसाव्या वर्षी त्यांचे 'गांधी विरुद्ध लेनिन' हे पुस्तक प्रसिद्ध झाले व चांगलेच गाजले.

त्यानंतर इ.स. १९२२मध्ये त्यांनी 'सोशलिस्ट' हे इंग्रजी वर्तमानपत्र काढले, तर इ.स. १९२७ मध्ये कानपूर खटल्यामध्ये चार वर्षाचा सश्रम कारावास भोगल्यानंतर कारागृहातील अनुभवांवर आधारित 'Hell found' हे पुस्तक प्रकाशित केले. लहानपणापासूनच भाषा आणि इतिहास या विषयांची आवड असणाऱ्या डांगे यांनी देवळीच्या व नंतर नाशिकच्या तुरुंगात 'भारत: प्राथमिक साम्यवाद ते गुलामगिरी' या नावाचे, तर मार्क्सवादी दृष्टीकोनातून 'प्राचीन इतिहासाची रूपरेषा' या उपशीर्षकाचे पुस्तक इंग्रजीतून लिहिले, जे १९४९ साली प्रकाशित झाले. १९५५ पर्यंत या पुस्तकाच्या सहा आवृत्त्या निघाल्या.

डांगे यांचे बरेच लेखन अजून अप्रकाशित असल्याचा उल्लेख डॉ. अशोक चौसाळकर यांनी डांगे यांच्या विषयीच्या त्यांच्या पुस्तकात केला आहे. अशा प्रकारे डांगे यांचे ९२ वर्षांचे जीवन हे भावनिक, राजकीय व वैचारिकदृष्ट्या समृद्ध व प्रगल्भ असल्याचे दिसून येते. त्यांचे संपूर्ण जीवन समाजासाठी वाहिलेले असून लोकसेवेचा वसा त्यांनी कधीही टाकला नाही. दूरदृष्टी असणाऱ्या अशा नेत्यांबाबत कवी नारायण सुर्वे म्हणतात-

घनतमात जळता तुम्ही ठेविला दीप
तो अमर जाहला इथे क्रांतीचा स्तूप
शिल्पकार तुम्ही नव्या युगाचे श्रीपाद
कंठात घुमतो अखंड तव जयनाद।

— भावना भालचंद्र बालते

**संदर्भ :**


१. *आवटे लीला, कॉ. श्री. अ. डांगे, लोकवाङ्मय गृह, १९७५.*
२. *चौसाळकर अशोक, कॉ. श्रीपाद अमृत डांगे, कॉ. गोविंद अमृत पानसे महोत्सव समिती, कोल्हापूर, २०११.*


ड

## डांगे, सिंधू सदाशिव

**संस्कृत संशोधक, लेखिका, संपादक**
**३ जानेवारी १९३७**



सिंधू सदाशिव डांगे यांचे पूर्वाश्रमीचे नाव सिंधू पागे होते. त्यांचा जन्म अमरावती येथे झाला. उत्तम शालेय कारकिर्द असणाऱ्या त्यांनी १९५५मध्ये मुंबई विद्यापीठातून संस्कृत विषयात स्नातक (बी.ए.) प्रथम क्रमांकाने प्राप्त केली. त्यांना भाऊ दाजी पुरस्कार आणि गजानन आचार्य पुरस्कार प्राप्त झाले. १९५७मध्ये त्यांनी नागपूर विद्यापीठातून संस्कृत विषयात अधिस्नातक (एम.ए.) पदवी द्वितीय क्रमांकाने प्राप्त केली. १९६७मध्ये 'फोक एलिमेंट इन द भागवत पुराण' या विषयावरील प्रबंध लिहून त्यांनी विद्यावाचस्पती (पीएच.डी) ही पदवी नागपूर विद्यापीठाकडून संपादन केली. वैदिक वाङ्मय, वैदिक कर्मकांड, धर्मशास्त्र आणि पुराणे हे त्यांच्या आवडीचे विषय. मुंबई विद्यापीठाच्या संस्कृत

विभागातून त्या आर. जी. भांडारकर प्राध्यापक आणि विभागप्रमुख म्हणून सेवानिवृत्त झाल्या. त्यांनी ५० वर्षांहून अधिक काळ अध्ययन-अध्यापनाला वाहून घेतले.

डॉ. सिंधू डांगे यांच्या मार्गदर्शनाखाली १३ विद्यार्थ्यांनी पीएच.डी.चा अभ्यासक्रम पूर्ण केला आहे. विविध जगप्रसिद्ध माहितीकोश (एन्सायक्लोपीडिया) उदा. एन्सायक्लोपीडिया ऑफ हिंदुइझम, द्रविडियन एन्सायक्लोपीडिया तसेच प्रोजेक्ट ऑफ हिस्ट्री ऑफ इंडियन सायन्स, फिलॉसॉफी अँड कल्चर, भारतीय समाज विज्ञान कोश, हिंदू-ख्रिश्चन डिक्शनरी यांमधून डॉ. सिंधू डांगे यांनी विविध विषयांवर विस्तृत नोंदी लिहिल्या आहेत.



अखिल भारतीय प्राच्यविद्या परिषद व बृहन्महाराष्ट्र प्राच्यविद्या परिषद या परिषदांमध्ये, तसेच अनेक राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय चर्चासत्रांमध्ये बीजभाषणकार, विभागीय अध्यक्ष, सत्राध्यक्ष तसेच शोधनिबंधवाचक अशा पातळ्यांवर त्यांनी योगदान दिलेले आहे. विदर्भ संशोधन मंडळ - नागपूर, संस्कृत आणि प्राकृत भाषा विभाग – पुणे विद्यापीठ, रा.तु.म. नागपूर विद्यापीठ, राजस्थान विश्वविद्यालय – जयपूर, एशियाटिक सोसायटी – मुंबई अशा अनेक नामवंत संस्थांमधून निमंत्रणावरून डॉ. सिंधू सदाशिव डांगे यांनी विविध विषयांवर व्याख्याने दिलेली आहेत.

डॉ. सिंधू डांगे यांना अनेक पुरस्कार व सन्मान प्राप्त झाले आहेत. मुंबई विद्यापीठातर्फे १९९६ मध्ये सन्मान; महाराष्ट्र राज्य शासनातर्फे १९९७ मध्ये सन्मान व पुरस्कार; मनुष्यबळ विकास मंत्रालय, भारत सरकार यांच्यातर्फे राष्ट्रीय संस्कृत संस्थानमार्फत सन्मान व पुरस्कार (२०००); स्वाध्याय मंडळ पार्डी, गुजरात यांच्यातर्फे २००४ मध्ये सन्मान; श्रीमान बस्तीरामजी सारडा सद्गुरू श्री गंगेश्वरानंद प्रतिष्ठान, नाशिक यांच्यातर्फे २००४ मध्ये श्री गुरू गंगेश्वरानंद वेद-वेदांग राष्ट्रीय पुरस्कार; २००५मध्ये भारताच्या राष्ट्रपतींकडून दिला जाणारा सन्माननीय राष्ट्रपती पुरस्कार; २००५ मध्ये एशियाटिक सोसायटी मुंबईकडून २००३ ते २००६ या कालावधीतील प्रकाशित पुस्तकांकरिता रजतपदक; कविकुलगुरू कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, नागपूर यांच्यातर्फे २०१२ मध्ये 'महामहोपाध्याय' ही उपाधी प्राप्त. हे त्यापैकी काही उल्लेखनीय सन्मान व पुरस्कार. अनेक नामांकित शैक्षणिक व सांस्कृतिक संस्थांचे सन्माननीय आजीव सदस्यत्व.

डॉ. सिंधू डांगे यांची ग्रंथसंपदा -

१) 'क्रिटिक्स ऑन संस्कृत ड्रामाज' - (दुसरी सुधारित आवृत्ती), १९९४, (सहलेखक - सदाशिव अंबादास डांगे), २) 'भारतीय साहित्याचा इतिहास' भाग १ - १९७५, ३) 'बौद्ध धर्म आणि तत्त्वज्ञान' (दुसरी आवृत्ती) - २००८, ४) 'जैन धर्म आणि तत्त्वज्ञान' (दुसरी आवृत्ती) - २०१३, ५) 'द भागवत पुराण - मायथो सोशल स्टडी' - १९८४ , ६) 'हिंदू डोमेस्टिक रिच्युअल्स - अ क्रिटिकल ग्लान्स'- १९८५, ७) पुराणिक एटीमॉलॉजीज अँड फ्लेग्झिबल फॉर्म्स - १९८९, ८) 'आस्पेक्ट्स ऑफ स्पीच इन वेदिक रिच्युअल' - १९९६, ९) 'वेदिक बिलीफ्स अँड प्रॅक्टिसेस थ्रू अर्थवाद' - खंड १- २००५, १०) 'वेदिक बिलीफ्स अँड प्रॅक्टिसेस थ्रू अर्थवाद' - खंड २ - २००५. ११) 'रिव्हीलिंग डीपर मीनिंग्ज - नॅरेटिव्हज् फ्रॉम वेद टु पुराणाज्' - २०१६.

संपादित पुस्तके –

१) 'मिथ्स ऑफ क्रिएशन' - १९८५, २) 'सॅक्रिफाईस इन इंडिया – कन्सेप्ट अँड इव्होल्युशन' - १९८६, ३) 'अल्टिमेट इन एन्शियण्ट इंडियन थॉट अँड डिसिप्लिन' - १९८७, ४) 'ग्लिनिंग्स फ्रॉम वेदिक टू पुराणिक एज' - २००२, ५) 'अभिजात संस्कृत साहित्याचा इतिहास' -२००४.

लिखित व संपादित पुस्तकांसोबत काही ग्रंथांची डॉ. सिंधू डांगे यांनी केलेली समीक्षणेही प्रकाशित झाली आहेत. त्यांचे १६७पेक्षा अधिक शोधनिबंध प्रकाशित झाले आहेत.

– डॉ. गौरी माहुलीकर

## डिस्कळकर, दत्तात्रेय बाळकृष्ण
**पुराभिलेख तज्ज्ञ**
**२० नोव्हेंबर १८९२ – २ नोव्हेंबर १९६२**



दत्तात्रेय बाळकृष्ण डिस्कळकर यांचा जन्म सातारा येथे झाला. त्यांचे बालपण आणि प्राथमिक शिक्षण सातारा येथेच झाले. नंतर त्यांनी १९१६ साली इंदूर येथील होळकर महाविद्यालयामधून बी.ए. ही पदवी प्राप्त केली. १९१९ साली त्यांनी अलाहाबाद विद्यापीठांतर्गत बनारस येथील क्वीन्स कॉलेजमधून एम.ए. ही पदवी प्राप्त केली. या पदवीसाठी त्यांनी संस्कृत, पुराभिलेख विद्या, पुरालिपीशास्त्र हे विषय प्राधान्याने निवडले होते. यासाठी त्यांना डॉ. राधाकुमुद मुकर्जी यांचे मार्गदर्शन लाभले होते. एम.ए. पदवी प्राप्त केल्यानंतर त्यांनी राजकोट येथील वॅटसन म्युझियम येथे क्युरेटर (संग्रहालय व्यवस्थापक) म्हणून नोकरीस सुरुवात केली.

संस्कृत, इतिहास, संस्कृती या विषयांमध्ये त्यांना विशेष रुची आणि प्रावीण्य असल्यामुळे त्यांनी तेथील ८०० अभिलेखांचा अभ्यास केला. तसेच सौराष्ट्रात अन्यत्र विखुरलेल्या अभिलेखांचा अभ्यास केला. त्या अभ्यासामुळे त्यांनी काठेवाडच्या पुराभिलेखांवर अनेक शोधनिबंध लिहिले. पुढे १९४१ साली त्यांनी या सर्व लेखांचे ‘इन्स्क्रिप्शन्स ऑफ काठेवाड’ या नावाने एक पुस्तक प्रसिद्ध केले. कर्नाटक पब्लिशिंग हाऊस त्याचे प्रकाशक होते.

सौराष्ट्रच्या आणि काठेवाडच्या मध्ययुगीन इतिहासाच्या अभ्यासासाठी हे एक प्रमाणित आणि मूलभूत असे संशोधन मानले जाते. तसेच ‘सिलेक्शन्स फ्रॉम संस्कृत इन्स्क्रिप्शन्स’ हे भारतातील विद्यापीठांच्या अभ्यासक्रमास उपयुक्त असे आणखी एक पुस्तक १९२५-२६मध्ये लिहिले. हे पुस्तक त्यांनी दोन भागांमध्ये प्रसिद्ध केले. याही पुस्तकाची विद्वानांनी प्रशंसा केली. ‘पुराभिलेख विद्या’ या विषयासाठी संदर्भ ग्रंथ म्हणून हे पुस्तक अजूनही अभ्यासले जाते.

यानंतर प्रा. डिस्कळकर यांनी राजकोट सोडले आणि ते मथुरेला गेले. त्यानंतर सातारा या आपल्या मूळगावी परत आले. सातारा ऐतिहासिक संग्रहालयात क्युरेटर म्हणून ते नोकरी करू लागले. त्यानंतर ते पुन्हा इंदूर येथील ‘नररत्न संग्रहालय’ या ठिकाणी नोकरीस रुजू झाले. नंतर ग्वाल्हेर येथील ‘ग्वाल्हेर म्युझियम’मध्ये नोकरी करू लागले.

१९४९ साली ते असिस्टंट डायरेक्टर ऑफ आर्किऑलॉजी (मध्य प्रदेश) म्हणून निवृत्त झाले. निवृत्तीनंतर ते पुणे येथे राहू लागले. पुणे येथील विद्यापीठात मानद प्राध्यापक म्हणून काम पाहू लागले. नागपूर विद्यापीठ, मुंबई विद्यापीठ, पुणे विद्यापीठ या विद्यापीठांमध्ये ‘प्राचीन भारतीय संस्कृती’ या विषयाचे बी.ए.साठी, एम.ए.साठी परीक्षक म्हणून ते काम पाहत असत. काही वर्षे त्यांनी भांडारकर ओरिएन्टल रिसर्च इन्स्टिट्यूट येथे पदव्युत्तर अभ्यासक्रमासाठी प्राध्यापक म्हणून काम केले. भांडारकर ओरिएन्टल रिसर्च इन्स्टिट्यूटच्या महाभारत प्रकल्पासाठीसुद्धा त्यांनी काम केले. पुण्यातीलच भारत इतिहास संशोधन मंडळ या संस्थेशीसुद्धा ते निगडित होते.

त्यांच्या संपूर्ण कार्यकाळात ते अनेक नियतकालिकांमध्ये संशोधनपर लिखाण करीत असत, तसेच नियतकालिकांचे संपादन करीत असत. उदा. ‘जर्नल ऑफ इंडियन हिस्ट्री’ (त्रिवेंद्रम), ‘एपिग्राफिका इंडिका’, ‘जर्नल ऑफ रॉयल एशियाटिक सोसायटी’, मुंबई, ‘जर्नल ऑफ ओरिएन्टल इन्स्टिट्यूट’ (बडोदा) इत्यादी.

त्यांनी अनेक शोधनिबंध वाचले आणि प्रसिद्ध केले. ओरिएन्टल कॉन्फरन्स, हिस्ट्री कॉन्फरन्स, सायन्स काँग्रेस या संस्थांमध्ये कॉन्फरन्ससाठी त्यांना आमंत्रित केले जात असे आणि ते त्यात सहभागी होत असत. शोधनिबंध वाचत असत, बीजभाषण देत असत, इंग्रजी, मराठी, गुजराती व हिंदी भाषांमध्ये त्यांचे शोधनिबंध प्रसिद्ध

झाले होते. शोधनिबंधांमध्ये त्यांनी अनेक विषय हाताळलेले दिसतात. उदा. 'गुजरात आणि गुजरातचे शेजारी', 'अहमदाबादची उत्पत्ती', 'लोदाईची उत्पत्ती', 'कळवन प्लेट्स' 'मुरादशहाचे नाणे', 'गुप्तवंशाची सोन्याची नाणी' (होळकर स्टेट, बममाळा), 'वल्लभी येथील बुद्धिस्ट मोनॅस्ट्री', 'लखनौ येथील वेधशाळेची स्थापना', 'परमार राजांचा कालक्रम', 'अहिल्याबाई होळकर', 'साऊथ इंडियन इन्स्क्रिप्शन्स', 'पार्सीस इन् इंडिया', 'गुजरातना धार्मिक इतिहासनी रूपरेषा', 'गुजरातना उत्कीर्ण लेखोनु पर्यालोचन', 'सोमेश्वर देव और कीर्तीकौमुदी के संबंध में स्फुट टिप्पणियाँ' इत्यादी अनेक विषयांवर त्यांनी भरपूर लेखन केले. इंग्रजीत ११८, मराठीत ३८, गुजरातीत २०, हिंदीत ३ इतके शोधनिबंध त्यांनी लिहिले आणि प्रकाशित केले. भारत इतिहास संशोधक मंडळाच्या त्रैमासिकात 'मराठा हिस्ट्री' विषयांवर त्यांचे लेख प्रसिद्ध झाले होते.

त्यांना अनेक शैक्षणिक पुरस्कारही मिळाले होते. सुरुवातीच्या काळात मुंबई विद्यापीठाची संशोधनवृत्ती त्यांना मिळाली. इंडियन एपिग्राफी या विषयात त्यांनी जे काम केले, ते या संशोधनवृत्तीमार्फतच. १९५२-५३मध्ये मुंबई विद्यापीठाने त्यांना पं. भगवानलाल इंद्रजी व्याख्यानमालेसाठी निमंत्रित केले होते. त्यानंतर त्यांची ही व्याख्याने पुस्तकरूपात प्रसिद्ध झाली. कन्नड रिसर्च इन्स्टिट्यूट येथे त्यांनी 'बुद्धिस्ट अँड जैन एपिग्राफी' या विषयावर महत्त्वाची व्याख्याने दिली. त्यांची विद्वत्ता जाणून पुणे विद्यापीठाने त्यांना संशोधनवृत्ती बहाल केली. या संशोधनवृत्तीअंतर्गत त्यांनी 'संस्कृत अँड प्राकृत पोएट्स नोन फ्रॉम इन्स्क्रिप्शन्स' हा प्रकल्प हाती घेतला. पुणे विद्यापीठाने न.चिं. केळकर स्मृती व्याख्यानमालेसाठी १९६२ साली प्रा. डिस्कळकर यांना आमंत्रित केले. त्या वेळी त्यांनी 'ॲन्शिएंट हिस्ट्री अँड सिव्हिलायझेशन ऑफ महाराष्ट्र' हा विषय निवडला होता. त्याच वर्षी मुंबई विद्यापीठानेही त्यांना 'ठक्कर वासनजी' व्याख्यानासाठी आमंत्रित केले. त्यासाठी त्यांनी तयारी सुरू केली, पण अचानक त्यांची प्रकृती बिघडली आणि त्यांचे अकस्मात निधन झाले. त्यांच्या निधनाने इंडॉलॉजी आणि एपिग्राफी या विषयांची हानी झाली असेच म्हणावे लागेल. केंद्रीय मंत्री हुमाँयुन कबीर यांनी 'आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया' या संस्थेच्या एका सभेत त्यांच्या निधनाची नोंद घेतली. ऑक्स्फर्ड विद्यापीठातील इतिहासाचे प्रोफेसर एडवर्ड थॉम्पसन यांनीही त्यांच्या संशोधनाबद्दल गौरवोद्गार काढले.

डॉ. ब्यूल्हर, डॉ. भगवानलाल इंद्रजी यांनी गुजरातमध्ये केलेल्या उत्खननानंतर प्रा. द.बा. डिस्कळकर यांनीच गुजरातच्या इतिहास संशोधनामध्ये भरीव कार्य केले असे म्हणता येईल.

द.बा. डिस्कळकर यांची ग्रंथसंपदा–

१) 'सिलेक्शन फ्रॉम संस्कृत इन्स्क्रिप्शन्स', (I,II), १९२५., २) 'हिस्टॉरिकल पेपर्स ऑफ सिंदियाज ऑफ ग्वाल्हेर', ३) 'मिसलेनियस इन्स्क्रिप्शन्स ऑफ काठेवाड' (कर्नाटक प. हाऊस), ४) 'हँडबुक ऑफ इंदौर म्युझियम', ५) 'मॅग्निफिसंट महेश्वर', (डायरेक्टर ऑफ इन्फर्मेशन, होळकर स्टेट), ६) 'महाराष्ट्राचा प्राचीन इतिहास व संस्कृती' (पुणे विद्यापीठ), ७) 'मटेरिअल्स यूज्ड फॉर इंडियन एपिग्राफिकल रेकॉर्ड्स' (Bori).

दत्तात्रेय बाळकृष्ण डिस्कळकर यांची संस्कृत आणि प्राकृत पोएट्स नोन फ्रॉम इन्स्क्रिप्शन्स कलेक्शन्स ऑफ रिसर्च पेपर्स ऑन इंडॉलॉजी ही अप्रकाशित पुस्तके आहेत.

– डॉ. कल्पना रायरीकर

***

# ढ

## ढवळीकर, मधुकर केशव
**पुरातत्त्वज्ञ, लेखक**
**१६ मे १९३०**



मधुकर केशव ढवळीकर हे अशा निष्ठावंत पुरातत्त्वज्ञांपैकी आहेत ज्यांनी आयुष्यभर पुरातत्त्वज्ञ म्हणून काम केलेच शिवाय त्या क्षेत्रामध्ये काम करण्यासाठी अनेक जणांना तयार केले. डॉ. ढवळीकर हे १९५३मध्ये ऑर्किओलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडियामध्ये रुजू झाले. १९६७मध्ये ते पुण्यातील डेक्कन महाविद्यालयामध्ये ऑर्किओलॉजीचे रीडर झाले. १९८०मध्ये ते ऑर्किओलॉजीचे प्राध्यापक झाले आणि १९८३मध्ये ते डेक्कन महाविद्यालयाचे सहाय्यक संचालक व १९८५मध्ये संचालक झाले. ते पद त्यांनी १९९०मध्ये निवृत्त होईपर्यंत भूषवले.

या कालावधीमध्ये त्यांनी मध्य, पश्चिम आणि दक्षिण भारतामध्ये- विशेषत: इतिहासपूर्व स्थळांचे उत्खनन केले. त्या कामांपैकी ‘इनामगाव’ येथील उत्खननासाठी त्यांनी वापरलेली पद्धत आणि उत्खननात सापडलेल्या अवशेषांची लावलेली समर्पक संगती यांसाठी त्यांची फार प्रशंसा झाली होती.

भारत सरकारतर्फे १९९१मध्ये इजिप्तला जे सांस्कृतिक प्रतिनिधी मंडळ गेले होते, त्याचे डॉ.ढवळीकर सदस्य होते. कला आणि पुरातत्त्व या विषयांवर त्यांनी आत्तापर्यंत वीसपेक्षा अधिक पुस्तके लिहिलेली आहेत. त्यांपैकी काहींची शीर्षके अशी आहेत. Ajanta - A Cultural Study - अजंठा - एका संस्कृतीचा शोध, Sanchi - सांची, Ellora- वेरूळ, Environment and Culture - पर्यावरण आणि संस्कृती, Satavahana Art - सातवाहनकालीन कला, First Farmers of the Deccan Cultured Imperialism, Indus Civilization in Western India - पश्चिम भारतातील सिंधुसंस्कृतीच्या खुणा, Kuntasi - A Harappan Emporium on West Coast - कुंतासी- पश्चिम किनाऱ्यावरील हरप्पाकालीन व्यापारीपेठ, Indian Protohistory - इतिहासकाळपूर्वीचा भारत, Historical Archeology of India– भारतातील इतिहाससंबंधी पुरातत्त्व.

– र. वि. नातू

## ढेरे, रामचंद्र चिंतामण
**इतिहास संशोधक, समीक्षक**
**२१ जुलै १९३० - १ जुलै २०१६**
**☛ मुख्य चरित्रनोंद - साहित्य खंड**



रामचंद्र चिंतामण ढेरे यांचा जन्म पुण्यातील निगडी येथे झाला. वयाच्या पाचव्या वर्षी त्यांच्या आई-वडिलांचे निधन झाले. त्यांच्या वृद्ध आजी भागीरथी काशीनाथ पुंडले यांनी त्यांचा सांभाळ केला. गावात खाजगी शाळेत त्यांचे चौथीपर्यंतचे शिक्षण झाले. त्यांचे चुलत आजोबा कृष्णाजीपंत पुंडले यांच्या आग्रहामुळे ते १९४४ साली पुण्याला आले. रामचंद्र चिंतामण ढेरे यांचे संपूर्ण आयुष्य म्हणजे त्यांच्यावर आलेली संकटे, बिकट परिस्थिती

आणि त्यावर त्यांनी जिद्दीने केलेली मात यांची मालिकाच होती.

रात्रीच्या शाळेत जाऊन त्यांना आपले शिक्षण पूर्ण करावे लागले. १९५० साली ते मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले. पुढे त्यांनी हिंदीच्या व मराठीच्या अनेक परीक्षा दिल्या. ग्रंथालयशास्त्राची आणि एस.टी.सी. या पदविका प्राप्त केल्या. कधी चहाच्या गोदामात, तर कधी पुठ्ठ्यांची खोकी बनवण्याच्या कारखान्यात, कधी मुद्रितशोधक म्हणून तर कधी विद्यालयात ग्रंथपाल म्हणून काम करीत त्यांना पुढचे शिक्षण घ्यावे लागले. १९६३मध्ये ते बाहेरून बी.ए.ची परीक्षा उत्तीर्ण झाले. तांत्रिक कारणांमुळे त्यांच्या एम.ए.च्या टर्म्स नामंजूर करण्यात आल्या. १९७५मध्ये एम.ए.शिवाय संशोधन करून त्यांनी पीएच.डी. प्राप्त केली.



जून १९६५ ते ऑगस्ट १९६६ या कालावधीत त्यांनी भारतीय संस्कृतीकोश मंडळात उपसंपादक म्हणून काम पाहिले. डेक्कन महाविद्यालयामध्ये विद्यापीठ अनुदान मंडळातर्फे १९७६ ते १९७८ या काळात ‘बालग्रह : एक दैवतशास्त्रीय अभ्यास’ हा शोधप्रकल्प त्यांनी पूर्ण केला. पुढे जून १९७९पासून पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागात विद्यापीठ अनुदान मंडळातर्फे ‘श्री विठ्ठल दैवत, संप्रदाय आणि साहित्य’ या शोधप्रकल्पाला प्रारंभ करून तो पूर्ण केला. त्यांना पुणे विद्यापीठाने १९८० साली डी.लिट. पदवी प्रदान केली.

‘उद्धरेत आत्मनात्मानम्’ याला अनुसरून डॉ. ढेरे यांनी आपला आपण अभ्यास करून स्वत:चा व्यासंग वाढवला. संशोधनासाठीही त्यांनी कोणत्याही संस्थेचे साहाय्य घेतले नाही.

रा.चिं. ढेरे यांनी पूर्ण वेळ लेखनकार्यासाठी आणि संशोधनाला वाहून घेतलेले आहे. त्यांचे विशाल अध्ययनक्षेत्र स्तिमित करणारे आहे. विविधांगी आणि विपुल ग्रंथसंपदा निर्माण केली. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासापासून ते लोकसाहित्यापर्यंतच्या सर्व क्षेत्रांत त्यांची शोधप्रतिभा सहजतेने विहार करते आणि त्यातून नवनवे पैलू शोधण्याचा प्रयत्न करते. वेगवेगळ्या पातळ्यांवरून त्यांनी केलेले संशोधन त्यांच्या बहुश्रुततेची आणि चिकित्सक दृष्टीची साक्ष घडवते. त्यांनी प्राचीन मराठी साहित्यकृतींची विपुल संपादने केली. ‘नरेंद्रांचे रुक्मिणी स्वयंवर’ (१९६५), ‘श्रीकृष्णचरित्र’ (१९७३), ‘महिकावतीची बखर’ (१९७३), ‘शिवदिग्विजय’ (१९७५), ‘मुरारी मल्लाची बालक्रीडा’ (१९७७), ‘सुभद्रा स्वयंवर’ (१९८७), ही त्यातील काही प्रमुख संपादने आहेत. ही संपादने विवेचक प्रस्तावना, प्रमाणसंहिता व स्पष्टीकरणात्मक टीका यांनी ती संपन्न आहेत. ‘विविधा’ (१९६७), ‘गंगाजली’ (१९७२), ‘शोधशिल्प’ (१९७७) यातून त्यांचे अनेक स्फुट शोधनिबंध आले आहेत. आपल्या काही ग्रंथांतून त्यांनी संतचरित्राचा वेध घेण्याचा प्रयत्न केला आहे. हे चरित्रग्रंथ केवळ परिचयात्मक नसून नवी दृष्टी प्रदान करतात.

मराठी वाङ्मयाला प्रेरक ठरणाऱ्या व महाराष्ट्राची सांस्कृतिक जडणघडण करणाऱ्या वेगवेगळ्या संप्रदायांचा अर्थपूर्ण अभ्यास हाही त्यांच्या संशोधनाचा एक विषय आहे. ‘नाथ संप्रदायाचा इतिहास’ (१९५९), ‘दत्त संप्रदायाचा इतिहास’ (१९६४), ‘प्राचीन मराठीच्या नवधारा’ (१९७२), ‘चक्रपाणी’ (१९७७), ‘श्रीविठ्ठल : एक महासमन्वय’ (१९८४) हे त्यापैकी महत्त्वाचे ग्रंथ. त्यातील ‘चक्रपाणी’ हा त्यांच्या अभ्यासाचा व संशोधन पद्धतीचा उत्तम नमुना होय. षटस्थळ या विसोबा देवचरांच्या नवीन उपलब्ध ग्रंथातील गुरुपरंपरेचे निमित्त करून त्यांनी चक्रधरांच्या जीवनावर एक नवा प्रकाशझोत टाकला आहे. चक्रधर-चांगदेव राऊळ व हरिनाथ यांचे एकत्व प्रतिपादन करताना व षटस्थलामधील गुरुपरंपरेचे संबंध उकलून दाखवताना त्यांनी महानुभावी यांच्या पारंपरिक श्रद्धांना धक्का दिला आहे. त्यांच्या संशोधनपर ग्रंथांतून त्यांचा सखोल व्यासंग आणि दीर्घकालीन चिंतन प्रकट झालेले आहे. रसिकतेचा आणि अंगभूत लालित्याचा स्पर्श त्यांच्या लेखनशैलीला आहे. संशोधनाद्वारे नवा अन्वयार्थ लावण्याची हातोटी त्यांच्या लेखनात आहे.

'लज्जागौरी : आदिमातेच्या स्वरूपावर प्रकाश व उपासनेवर नवा प्रकाश', 'श्रीविठ्ठल : एक महासमन्वय', 'महाराष्ट्राचा देव्हारा', 'संतसाहित्य' आणि 'लोकसाहित्य' असे विद्वन्मान्य ग्रंथ ढेरे यांनी लिहिले आहेत.

'शिखर शिंगणापूरचा श्रीशंभूमहाराज' या ग्रंथात शिवाजी महाराजांच्या चरित्रावर आणि त्यांच्या सिसोदिया कुळाच्या अज्ञात पार्श्वभूमीवर आंतरज्ञानशास्त्रीय दृष्टीने अभ्यास करून इतिहासाची पुनर्मांडणी करण्याचा प्रयत्न त्यांनी केलेला आहे.

संशोधन कसे करावे, याबद्दलचे तंत्रशुद्ध शिक्षण डॉ. ढेरे यांनी कुठेही घेतले नव्हते, तरीही त्यांच्या संशोधन कार्यावर महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार, धर्मानंद कोसंबी, सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, व्ही. एस. अगरवाल व राजवाडे यांच्या कार्यपद्धतीची छाप आढळते.

डॉ. ढेरे यांना प्राप्त झालेले पुरस्कार/सन्मान : संगीत नाटक अकॅडमीचे Life Time Achievement Award, महाराष्ट्र सरकारचा 'महाराष्ट्र भूषण' पुरस्कार, अमेरिकेतील महाराष्ट्र फाउन्डेशनचा Life Time Achievement Award, एशियाटिक सोसायटी ऑफ मुंबईतर्फे मानद फेलोशिप व २००६-२००९सालासाठीचे कॅम्पबेल स्मृती सुवर्ण पुरस्कार.

— संपादित

**संदर्भ :**

१. *मराठी विश्वचरित्रकोश; संपादक - कामत, श्रीराम पांडुरंग; विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा.*



***

# त

## तगारे, गणेश वासुदेव

**पर्यावरण रक्षक, संस्कृत पंडित, अनुवादक**

**२८ जुलै १९११ — १९ नोव्हेंबर २००७**



महाराष्ट्रात पुण्या-मुंबईचे विद्वान मुख्य प्रवाहातील समजले जातात. पण आपल्या पांडित्याने ग.वा. तगारे यांनी सांगलीसारख्या गावातून कष्ट साध्य अभ्यास करून प्राच्यविद्येच्या क्षेत्रात आपले स्थान पक्के केले, अशी त्यांची ख्याती. राष्ट्रीय संस्कृत संस्थानाने त्यांच्याकडे अठरा महापुराणांच्या इंग्लिश भाषांतराचा प्रकल्प सुपुर्द केला होता. हे अजस्र काम चोखम्बा प्रकाशनाने दिल्लीत प्रकाशित केले. १९७१ ते १९९६ अशी पंचवीस वर्षे प्रा. तगारे यांनी भागवत, नारदपुराण, कूर्मपुराण, वायू-ब्रह्मांड-स्कंद अशा सहा प्रचंड पुराणांचे भाषांतर केले. ते पावणेदोन लक्ष श्लोकांचे होते. याखेरीज संस्कृत, प्राकृत, पाली, अर्धमागधी भाषांवर त्यांचे प्रभुत्व होते, ग्रंथही प्रकाशित झाले.

ग.वा. तगारे मूळचे सांगली जिल्ह्यातील आष्टे गावचे. त्यांच्या घरातील संस्कारक्षम जीवनात ते लहानाचे मोठे झाले. तसे तगारे घराणे मूळचे राष्ट्रकूटांची राजधानी उस्मानाबाद म्हणजेच धाराशिवमधील ‘तगर’, ‘तेर’ गावचे. चौदाव्या शतकात ही मंडळी आष्टे येथे स्थलांतरित झाली. आजही वाळवे-इस्लामपूर-अधनी येथील तगारे घराणी मूळचे आष्टा येथीलच सांगतात. वडिलांचा सराफीचा व्यवसाय, पण ग.वा. यांना संस्कृतची गोडी लागली.

शालेय वयात ते सांगलीच्या सिटी हायस्कूलमध्ये दाखल झाले. पदवीसाठी महाराष्ट्रातील ख्यातनाम विलिंग्डन महाविद्यालयात दाखल झाले. फक्त एका गुणाने त्यांची ‘जगन्नाथ शंकरशेठ’ शिष्यवृत्ती हुकली, पण त्यांनी आपल्या कर्तृत्वाने ही उणीव भरून काढली. पदवीनंतर नाइलाजाने त्यांना सीटी हायस्कूलमध्ये शिक्षकाची नोकरी पत्करावी लागली, पण मनात विद्यानगरी पुण्यात येऊन पुढचा अभ्यास करावयाचा होता. बलवत्तर मनीषा धरून ते पुण्यात आले.

सुप्रसिद्ध संस्कृत विद्वान डॉ. प.ल. वैद्य यांचे साहाय्यक म्हणून काम करीत असताना त्यांनी एम.ए.ची पहिली टर्म पूर्ण केली, पण पुढच्या काळात आजारपणामुळे आणि आर्थिक अडचणींमुळे त्यांना कराडला मावशीकडे यावे लागले. कराड-शिराळा-भालोद (खान्देश) अशा विविध ठिकाणी शिक्षकाच्या नोकऱ्या करीत त्यांनी १९३९ साली एम.ए. पूर्ण केले आणि पीएच.डी.साठी पुण्याला डेक्कन महाविद्यालयात येण्याचे ठरवले. तगारे सांगलीत होते, त्या वेळी त्यांना रानडे वाड्यात सुप्रसिद्ध न्यायमूर्ती राम केशव रानडे यांचा शेजार व सख्य लाभले.

पुण्यातील शिक्षणासाठी आर्थिक तरतूद म्हणून पुण्याजवळच्या भोर संस्थानच्या राजेसाहेबांकडे मुलांना शिकवण्याची जबाबदारी घेतली. डेक्कन कॉलेजमध्ये ‘हिस्टॉरिकल ग्रामर ऑफ अपभ्रंश’ या विषयावर पीएच.डी. मिळवली. ग्रंथरूपाने हा प्रबंध प्रसिद्ध झाला. जगभर भाषा कोविदांनी त्यांचा गौरव केला. डॉ. सु.मं. कात्रे त्यांचे मार्गदर्शक होते. भोरच्या राजेसाहेबांनी डॉ. तगारे यांना भोरच्या विद्यालयाचे मुख्य नेमण्याची इच्छा दर्शवली आणि प्रबंध प्रकाशित करायला डेक्कन

महाविद्यालयाला देणगी दिली. संस्थानच्या विलीनीकरणानंतर त्यांना 'डायरेक्टर ऑफ एज्युकेशन'ची नोकरी देऊ केली, पण सरकारी प्रशासकीय काम त्यांना नको होते. उस्मानाबाद-कोल्हापूर अशी प्राध्यापकी करीत ते आपला संस्कृतचा व्यासंग वाढवत होते. राजाराम कॉलेजचे प्रा. डॉ. आ.ने. उपाध्ये यांच्याशी तगारे यांचा घनिष्ट संबंध आला. त्यांनी मराठीतून प्राकृत भाषांचा इतिहास लिहिण्यास सुचवले. कोल्हापूर वास्तव्यात भाऊसाहेब खांडेकर, रणजित देसाई, शंकर पाटील, रमेश मंत्री व पुढे बाळाचार्य खुपेरकर शास्त्री यांच्याशी त्यांची घनिष्ट मैत्री झाली. जैन आणि शैव तत्त्वज्ञानाच्या अभ्यासासाठी त्यांना 'हेमचंद्र पुरस्कार' मिळाला.

डॉ. तगारे यांच्या पत्नीचे नाव शांताबाई. या दोघांना चार पुत्र झाले, पण त्यांना कन्येची आवड असल्याने त्यांनी देवीला नवस केला होता. (आशा कुलकर्णी, मिरज). वयाच्या सदुसष्टाव्या वर्षी ते पुन्हा पुण्यात डेक्कन कॉलेजच्या संस्कृत कोशात काम करण्यासाठी आले. त्यांचे वास्तव्य पद्मावतीजवळ होते. उतारवयातही ते बसने ये-जा करीत.

डॉ. तगारे यांनी केलेले पुराणाचे इंग्लिश रूपांतर ४३ खंडात आहे. त्याखेरीज अपभ्रंश भाषेवरचा पीएच.डी. प्रबंध, 'स्पंदकारिका', 'सिद्धान्तज्योतीचा तत्त्व निर्णय', 'वसुगुप्ताची शिवसूत्रे', 'कुंदकुंदाचार्यांचे प्रवचन सार', 'काश्मीरशैव दर्शन', 'पाली-प्राकृत भाषांचा इतिहास' असे बरेच ग्रंथ त्यांच्या विद्वत्तेची चौफेर दृष्टी दाखवून देतात. मूर्तिविज्ञानाधारे कोल्हापूरच्या महालक्ष्मीच्या मूर्तीचा अभ्यास करून ही 'लक्ष्मी' विष्णुपत्नी नसून शिवपत्नी 'पार्वती' आहे असा सिद्धान्त मांडला.

कोणत्याही प्रकारच्या लौकिकाची, आर्थिक अभिलाषेची तमा न बाळगता केवळ अभ्यासाला वाहून घेणारा हा पंडित विरळाच म्हणावा लागेल. ९७ वर्षांच्या दीर्घायुष्यानंतर प्रा. तगारे अनंतात विलीन झाले. ग्रंथरूपाने ते मागे उरले, एवढे मात्र खरे!

— वा.ल. मंजूळ

## तर्खडकर, दादोबा पांडुरंग

**मराठी व्याकरणकार**

**९ मे १८१४ – १० ऑक्टोबर १८८२**



आधुनिक महाराष्ट्रावर ज्यांनी आपली नाममुद्रा उमटवली, अशांतील एक महत्त्वपूर्ण नाव म्हणजे दादोबा पांडुरंग तर्खडकर. मराठी व्याकरणकार, ग्रंथकार आणि कळकळीचे धर्मसुधारक ही दादोबांची खरी ओळख. दादोबा हे इंग्रजांच्या आगमनानंतर नवे शिक्षण घेणाऱ्या पहिल्या विद्यार्थ्यांपैकी एक होते. इंग्रजांच्या सत्तेच्या प्रारंभीच्या काळापासून ती भारतभर स्थिरावेपर्यंत दादोबा इंग्रजी राज्याचे एक घटक होते. मुंबईत असिस्टंट मास्टरच्या नोकरीने दादोबांनी इंग्रज सरकारच्या नोकरीचा प्रारंभ केला. मग पुढे जावऱ्याच्या नबाबाचे शिक्षक, सुरतेच्या इंग्रजी शाळेत प्रभारी मुख्याध्यापक, मुंबई इलाख्यातील देशी शाळांचे हंगामी अधीक्षक आणि नॉर्मल क्लासचे हंगामी संचालक अशा नोकऱ्या त्यांनी शिक्षणखात्यात केल्या. पुढे १८५२पासून, आधी अहमदनगर येथे आणि मग ठाण्यामधील महसूल खात्यात डेप्युटी कलेक्टर आणि मॅजिस्ट्रेट म्हणून ते रुजू झाले. अहमदनगरला असताना भिल्लांचा पुढारी पटाजी नाईक याचे बंड त्यांनी १८५७ साली समन्वयाने मोडून काढले. त्याबद्दल सरकारने त्यांना रावबहादुर ही पदवी बहाल केली. ठाण्यात असताना नोकरीतील वरिष्ठांच्या त्रासामुळे त्यांनी स्वेच्छानिवृत्ती घेतली. अखेरीस मराठी भाषांतरकार म्हणून ते कार्यरत होते.

मूळ वसईजवळील तर्खड या गावचे रहिवासी असणारे दादोबांचे आजोबा यशवंत तर्खडकर रोजगारासाठी मुंबईत स्थायिक झाले. त्यांचा मुलगा पांडुरंग एका महिन्याचा असतानाच ते वारले. पुढे प्रतिकूल आर्थिक परिस्थितीत आई आणि मावशी यांनी पांडुरंग तर्खडकर यांना शिकवून मोठे केले. योग्य मुलगी

त

शोधून त्यांचा विवाह केला. पांडुरंग तर्खडकरांनी भरपूर कष्ट करून घरची आर्थिक स्थिती सुधारली. खेतवाडीमध्ये घर बांधले. ते आध्यात्मिक प्रवृत्तीचे होते. त्यामुळे त्यांचा ज्येष्ठ पुत्र असणाऱ्या दादोबांवर बालपणापासूनच उत्तम संस्कार झाले. दादोबांना भास्कर, सुंदराबाई, राघोबा, आत्माराम आणि दीनानाथ अशी एकूण पाच भावंडे होती. त्यापैकी भास्कर आणि दीनानाथ अल्पायुषी ठरले. राघोबा हे इंग्रजी शिकवणारी 'तर्खडकर पाठमाला' तयार करणारे म्हणून पुढे प्रसिद्धीस आले.

तत्कालीन रिवाजानुसार दादोबांचे प्राथमिक शिक्षण आधी शेणवी शाळेत मग खाजगी इंग्रजी शाळेत व नंतर सुरू झाले. पण त्यातील अस्थिरता लक्षात घेऊन पुढे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीच्या सरकारी शाळेत दादोबा शिकले. ज्ञानग्रहणाची वृत्ती असल्याने दादोबांनी स्वत: होऊन फारसी आणि संस्कृत या भाषादेखील शिकल्या. इंग्रजी शाळेत प्रवेश झाल्यावर अंगच्या हुशारीमुळे दादोबा लवकरच वरच्या वर्गात गेले. तेथून बाळशास्त्री जांभेकरांबरोबर मॅट्रिकच्या वर्गापर्यंत ते एकत्रच शिकले.

'मराठी भाषेचे पाणिनी' ही दादोबा पांडुरंग यांची ओळख होण्याचे मुख्य कारण म्हणजे त्यांनी रचलेले मराठी व्याकरण. इ.स. १८३६मध्ये दादोबांनी 'मराठी भाषेचे व्याकरण' लिहिले. शैक्षणिक गरजेपोटी सरकारने केलेल्या विनंतीवरून त्यांनी इ.स. १८५०मध्ये 'महाराष्ट्र भाषेचे व्याकरण' या नावाने याच ग्रंथाची दुसरी सुधारित आवृत्ती काढली. पुढे इ.स. १८६०मध्ये 'इंग्रजी व्याकरणाची पूर्वपीठिका', इ.स. १८९५मध्ये 'मराठी लघुव्याकरण' आदी व्याकरणग्रंथ त्यांनी रचले व ते प्रसिद्धही झाले. फारसी आणि गुजराती भाषेची व्याकरणेही त्यांनी रचली, पण ती प्रकाशित होऊ शकली नाहीत. शिक्षणाच्या वाढत्या प्रसारामुळे महाराष्ट्रातील सर्व बोलीभाषिकांना कळेल अशा मध्यवर्ती पुणेरी बोलीचा आधार घेऊन दादोबांनी आपले व्याकरण रचले. हे व्याकरण रचताना त्यांनी संस्कृत आणि इंग्लिश अशा दोन्ही भाषांतील व्याकरणांचा आधार घेतला. त्यामुळे त्यांचे व्याकरण अभ्यासपूर्ण ठरले आणि त्यामुळेच लोकप्रिय झाले. दादोबांच्या या व्याकरणामुळे मराठी भाषेचे प्रमाणीकरण होण्यास प्रारंभ झाला. पुढे शालेय गरजेतूनच त्यांनी लघुव्याकरणही तयार केले. यामुळेच लोकहितवादींनी त्यांना 'मराठी भाषेचे पाणिनी' असे संबोधीले.

व्याकरणाबरोबरीनेच दादोबांनी मोरोपंतांच्या 'केकावली'वर इ.स. १८६५मध्ये लिहिलेली 'यशोदा पांडुरंगी' ही टीका महत्त्वाची ठरते. यामध्ये त्यांनी मोरोपंतांची केकावली सर्वसामान्य वाचकांस सहज आकलन होण्याच्या दृष्टीने लेखन केलेली दिसते. इ.स. १८६८पासून आपले आत्मचरित्र लिहिण्यास त्यांनी प्रारंभ केला. त्यांच्या मृत्यूनंतर बऱ्याच वर्षांनी – म्हणजे १९४७मध्ये ते प्रकाशित झाले. 'विधवाश्रुमार्जन' (१८५७), 'दादोकृत शिशुबोध' (१८८४), 'विद्येच्या लाभाविषयी', 'मराठी नकाशाचे पुस्तक' (१८३६), 'गुजराती नकाशाचे पुस्तक' (१८३८), 'The Absurdity of the Holi Festival as it now practised by the Hindus' (1829), 'A Prize Essay of the Native Female Education' (1839), 'A Journal of a Trip from Jowrah to Tonk in Malwa', 'An Address to the inhabitant of Surat Showing the advantages of taking the precedence of Bombay in the introduction of Spinning and Weaving Mills' (1841), 'A Hindu Gentleman's Reflections respecting the works of Emanuel Swedenborg' (1878) इत्यादी त्यांची पुस्तके प्रकाशित झाली. बरोबरीने 'शाकुंतलाचे मराठी भाषांतर', इंग्रजी-मराठी-गुजराती-हिंदुस्थानी कोश किंवा मराठी-इंग्रजी-फारसी-तेलंगी कोश यांसारखे त्यांचे अभ्यासपूर्ण लेखन प्रसिद्ध होऊ शकले नाही, तर 'महाराष्ट्र भाषेची पूर्वपीठिका' किंवा 'माबाईच्या ओव्या' यांसारखे त्यांचे ग्रंथ अपूर्ण राहिले.

इंग्रजी शिक्षण घेणाऱ्या पहिल्या पिढीचे प्रतिनिधी असल्यामुळे तत्कालीन सुशिक्षितांप्रमाणे हिंदू धर्मातील

केशवपन, जातीयता, बालविवाह इत्यादींसारख्या अनेक रूढी त्यांना मान्य नव्हत्या. त्यातच मिशनरी शाळेतील शिक्षकांमुळे त्यांना ख्रिश्चन धर्माची ओळख झाली होती. मात्र सुरत येथील प्रो. हेन्री ग्रीन यांसारख्या अज्ञेयवादी मुख्याध्यापकामुळे ख्रिश्चन धर्मातील चुकीच्या तत्त्वांशीही त्यांचा परिचय झाला. परिणामी दादोबांना कोणत्याही एका धर्मात सर्व चांगली तत्त्वे सापडत नसतात, या सत्याची जाणीव झाली आणि त्यांनी १८४९मध्ये मुंबईत 'परमहंस सभा' या पंथाची स्थापना केली. 'ईश्वर एकच आहे, मानवाची जात अथवा धर्म एकच आहे, मनुष्यातील गुणांवरून उत्तम किंवा अधम ठरवावे, कुळावरून ठरवू नये, विवेकाला अनुसरून कर्म करावे, ईश्वराचा अनुग्रह व्हावा, यासाठी भक्ती करावी' इत्यादी या संस्थेची तत्त्वे होती. त्यासाठी दादोबांनी 'धर्मविवेचन' नावाची एक पुस्तिकाही इ.स. १८६८मध्ये लिहिली होती. याच संस्थेतून पुढे प्रार्थना समाजाचा जन्म झाला. अशा रितीने जीवनाच्या सर्व क्षेत्रांत सहज संचार करणारे दादोबा वयाच्या ६८व्या वर्षी मुंबईत मृत्यू पावले.

— आनंद काटीकर

## तलगेरी, श्रीकांत

**आर्येतिहास विश्लेषक, प्राच्यविद्या संशोधक**

**१४ ऑगस्ट १९५८**



श्रीकांत तलगेरी यांची मातृभाषा कोकणी असून त्यांचे शिक्षण मुंबईत झाले. वन्यजीवसंपदा, संगीत, भाषाशास्त्र, धर्म व तत्त्वज्ञान, इतिहास व संस्कृती हे त्यांचे आवडते विषय आहेत.

''इतिहासपुराणाभ्यां वेदं समुपबृंहयेत्'' ह्या उक्तीनुसार पुराणांच्या मदतीने वेदांचा अर्थ लावताना अनेक वर्षांच्या अविरत अध्ययन व संशोधनाने त्यांनी 'आर्य बाहेरून आले' या पाश्चात्त्यांच्या मताचे मुद्देसूद खंडन केले. 'The Aryan Invasion Theory : A Reappraisal' हा १९९३ साली प्रसिद्ध झालेला त्यांचा पहिलाच ग्रंथ पौर्वात्य व पाश्चात्त्य विद्वानांसाठी विचारप्रवर्तक व विवाद्य ठरला. राजकीय भाष्यासहित काढलेली या पुस्तकाची आवृत्ती 'The Aryan Invasion Theory and Indian Nationalism' या नावाने निघाली व त्याचे पुनर्मुद्रण २००३ साली झाले.

मध्यंतरी २००० साली त्यांचे 'The Rigveda : A Historical Analysis' हे ऋग्वेदाचे ऐतिहासिक दृष्टिकोनातून विश्लेषण करणारे दुसरे पुस्तक प्रसिद्ध झाले. यावर जी विरुद्ध मत-मतांतरे प्रसिद्ध झाली त्यांचा परामर्श घेऊन पुनर्मुद्रित आवृत्तीत तलगेरी यांनी त्यांची भूमिका तीन मुद्दे देऊन स्पष्ट केली. १) हिंदुत्व हा भारतीयांना एकत्र आणणारा सांस्कृतिक ऐक्याचा मुद्दा आहे, २) इस्लाम व ख्रिश्चन धर्म हे अभारतीय आहेत, तर हिंदू भारतीय आहे. ३) हिंदू म्हणजे आर्य नव्हे, तर भारतीयच होय.

मूळ संस्कृत वेदसंहिता वाचून ऋग्वेदातील १० मंडलांची प्राचीन, मध्यकालीन व अर्वाचीन अशी फेररचना करताना तलगेरी यांनी मंडलकर्ते ऋषी, राजकुले, तत्कालीन इतिहास व भूगोल, नद्यांची नावे, अवेस्ता ह्या पारशी लोकांच्या धर्मग्रंथात आढळणारी साम्यस्थळे या सर्वांचा सखोल अभ्यास केला व निष्कर्ष काढला, की आर्य भारताच्या उत्तर प्रदेशातील रहिवासी असून विस्तारासाठी ते पश्चिमेस व वायव्येस गेले. भारतातून त्यांनी इराण व अन्य प्रदेशांत स्थलांतर केले.

त्यांचा निष्कर्ष दृढ करण्यासाठी त्यांनी पुन्हा आठ वर्षे संशोधन केले व 'The Rigveda and the Avesta The Final Evidence' हा ग्रंथ २००८ साली प्रसिद्ध केला. आर्यांच्या स्थलांतराविषयी, ऋग्वेदातील मंडलांच्या पौर्वापर्याविषयी हा निर्णायक ग्रंथ आहे असे लेखक आत्मविश्वासाने मांडतो. हार्वर्ड विद्यापीठातील संस्कृतचे प्राध्यापक मायकेल विट्झेल यांच्या पूर्वग्रहदूषित मतांचे, शालेय जीवनापासून भारतीयांना विभाजित करण्यासाठी हेतुपुरस्सर प्रसृत केलेल्या आर्य-

त

अनार्य वादाचे खंडन या निर्णायक ग्रंथात आढळते. यातील निष्कर्ष असे : १) ख्रिस्तपूर्व ३००० वर्षांपासून वैदिक ऋषी सरस्वतीच्या तीरावर पुरू/पौरव म्हणून राहत होते. २) इराणी, आर्मेनिअन लोक आर्यांच्या पश्चिमेस 'अनू' या नावाने ओळखले जात. ३) अनूंच्या पश्चिमेस व उत्तरेस मध्य आशियात द्रुहयू होते. ४) यदू तुर्वसू वैदिकांच्या दक्षिणेस, तर ईक्ष्वाकू पूर्वेस होते.

हडप्पा येथील उत्खननात मिळालेल्या अवशेषांवरून, तौलनिक भाषाशास्त्राच्या अध्ययनातून, मूळ संहितांच्या वाचनातून व भारतीयत्वाच्या निष्ठेतून लिहिलेले हे तीनही ग्रंथ व त्यांतील मौलिक विचारधन वेदांच्या अभ्यासकांना व संशोधकांना पथप्रदर्शक ठरतील यात संदेह नाही.

– डॉ. गौरी माहुलीकर

त

## तारळेकर, गणेश हरी

**संस्कृत व संगीताचे जाणकार पंडित**

**७ मे १९१४ – १२ डिसेंबर २००१**

**☛ मुख्य चरित्रनोंद - संगीत खंड**



संस्कृत आणि संगीत यांचा एकत्रित समन्वय क्वचित पाहायला मिळतो. पुण्यात डॉ. अरविंद मंगरूळकर आणि प्रा. ग.द. तारळेकर ही दोन नावे डोळ्यासमोर येतात, पण तारळेकरांचा बराच काळ खान्देशातल्या धुळे-जळगावमध्ये गेला. निवृत्तीनंतर ते भांडारकर संस्थेत येऊ लागले व बरीच वर्षे रेग्युलेटिंग काउन्सिलचे ते सभासदही होते.

कोल्हापूर जिल्ह्यातील तारळे गावी गणेश हरी तारळकरांचा जन्म झाला. एम.ए. संस्कृतची पदवी त्यांनी मुंबई विद्यापीठातून घेतली. नंतर बनारस हिंदू विद्यापीठातून हिंदीची एम.ए. आणि मुंबई विद्यापीठातून बी.टी. या पदव्या मिळवल्यावर १९६२ साली पुन्हा पुणे विद्यापीठातून पीएच.डी. पदवी घेतली. त्यानंतर ते संस्कृतचे प्राध्यापक म्हणून प्रथम जळगावच्या एम.जे. महाविद्यालयामध्ये आणि नंतर धुळ्याच्या एस.एस.व्ही.पी. महाविद्यालयामध्ये दाखल झाले. १९७४ साली धुळ्याच्या महाविद्यालयामधून संस्कृत विभागप्रमुख म्हणून निवृत्त झाले आणि पुण्याला आले. त्यांनी संस्कृतच्या पीएच.डी. विद्यार्थ्यांबरोबर 'इंडियन म्युझिकॉलॉजी'च्या विद्यार्थ्यांना मार्गदर्शन केले.

त्यांच्या अजोड कर्तृत्वामुळे त्यांना अनेक पुरस्कार मिळाले. त्यामध्ये महाविद्यालयीन निवृत्त विशेष प्राध्यापक म्हणून विद्यापीठ अनुदान मंडळाचा गौरव पुरस्कार, मुंबईच्या संगीत सभेकडून 'स्वरसाधना रत्न' टिळक महाराष्ट्र विद्यापीठाकडून 'आदर्श संस्कृत अध्यापक' आणि संगीतातील संशोधनाचा विशेष पुरस्कार मुंबईच्या संगीत संस्थेकडून मिळाला आणि अलीकडे भारत सरकारतर्फे 'राष्ट्रपती संस्कृत पंडित' पुरस्कारही मिळाला होता.

डॉ. तारळेकर पुण्यामध्ये आल्यावर त्यांनी विद्यापीठाच्या विविध संस्कृत समित्यांवर काम केले. भारत गायन समाजाचे ते बराच काळ अध्यक्ष होते. तसेच महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक सभेचे ते अध्यक्षही होते. भांडारकर संस्थेच्या सल्लागार मंडळावर बरीच वर्षे काम केल्यावर ते संस्थेचे शेवटपर्यंत विश्वस्त होते.

डॉ. तारळेकरांचा संशोधनाचा विषय संगीत आणि संस्कृत असला तरी त्यांनी प्रामुख्याने 'भरत नाट्यशास्त्रावर' खूप संशोधन केले. तसेच प्राचीन भारतीय संगीताच्या इतिहासाची त्यांना खूप जाण होती. अलीकडे ते सामवेदाचे शास्त्रोक्त गायन शिकले होते, ही गोष्ट संस्कृतच्या क्षेत्रात दुर्मीळ होती.

'नाट्यशास्त्र' या तारळेकरांच्या ग्रंथाची दुसरी आवृत्ती अलीकडेच प्रसिद्ध झाली होती. शार्ङ्गदेवाचा 'संगीत रत्नाकार' तीन खंडांमधून त्यांनी प्रसिद्ध केला होता. त्यासाठी साहित्य संस्कृती मंडळाने मदत दिली होती. 'पुष्पसूत्र' या सामवेदाच्या ग्रंथाचे काम त्यांनी मोठ्या मेहनतीने केले होते. जे इंदिरा गांधी नॅशनल सेंटर

फॉर आर्ट्सतर्फे प्रसिद्ध झाले आहे. ‘भरत नाट्यशास्त्रा’चा अठ्ठाविसावा अध्याय त्यांनी लिहून पूर्ण करून छपाईसाठी दिला. पण प्रत्यक्ष ग्रंथ पाहावयाला ते मुकले, याची सर्वांना जाणीव आहे. ‘इंडियन म्युझिकल इन्स्ट्रुमेंट्स’ हा त्यांचा ग्रंथ जगभराच्या रसिकांनी वाखाणला आणि ‘सामवेदाचे स्वरोच्चार’ लोकांनी कौतुकाने स्वीकारले होते. त्यांच्या जीवनात त्यांच्या पत्नी नलिनीताईंचा मोठा सहभाग होता. तारळेकरांच्या प्रत्येक कार्यात त्या आघाडीवर असत.

– वा.ल. मंजूळ

## तालीम, मीना व.
**पाली भाषा तज्ज्ञ**
**२५ मे १९३०**



डॉ. मीना व. तालीम हे पाली साहित्य, प्राचीन भारतीय संस्कृती, बौद्ध कला व स्थापत्य या विषयांच्या अभ्यासकांपैकी एक उल्लेखनीय नाव. डॉ. मीना तालीम (पूर्वाश्रमीच्या मीनाक्षी सदानंद साळवी) यांचा जन्म मुंबईमधील शिवाजी पार्क येथे झाला. घरात शिक्षणाला पोषक वातावरण असल्याने त्यांच्या सहा बहिणी व एक भाऊ या सर्वांनीच आपापल्या क्षेत्रात उच्च शिक्षण संपादन केले. त्यांची मोठी बहीण गुलाबभाई शेटे ह्या डॉक्टर, तर दुसरी बहीण इंदिराबाई कालेवार ह्या शारदा सदनच्या मुख्याध्यापिका होत्या. मीना यांचे शालेय शिक्षण ओरिएंट शाळा, शिवाजी पार्क, दादर येथे झाले. सेंट झेवियर्स महाविद्यालय, मुंबईतून आपले महाविद्यालयीन शिक्षण पूर्ण करणाऱ्या मीना यांनी १९५२मध्ये पाली व मराठी विषय घेऊन बी.ए. पदवी प्राप्त केली. त्यानंतर १९५४मध्ये याच विषयांमध्ये मुंबई विद्यापीठाची एम.ए. पदवी प्राप्त करून पाली भाषेचे प्रसिद्ध विद्वान प्रा. ना.के. भागवत यांच्या मार्गदर्शनाखाली पीएच.डी.चे संशोधन सुरू केले. १९६०मध्ये ‘Woman As Depicted In Early Buddhist Literature’ या विषयातील संशोधनाकरिता मुंबई विद्यापीठाच्या पाली विषयाची पहिली पीएच.डी. पदवी संपादन करण्याचा मान त्यांना मिळाला. हा संशोधनग्रंथ पुढे मुंबई विद्यापीठाच्या समाजशास्त्र व इतिहास विषयांच्या एम.ए.च्या अभ्यासक्रमामध्ये समाविष्ट केला गेला.

डॉ. मीना यांच्या सुमारे पन्नास वर्षांच्या प्रदीर्घ अध्यापन व संशोधन कारकिर्दीची सुरुवात १९६२मध्ये झाली. त्या वर्षी त्या मुंबईच्या सेंट झेवियर्स महाविद्यालयात व्याख्याता म्हणून रुजू झाल्या. प्रा. ना. के. भागवत यांच्या निवृत्तीनंतर त्यांच्या उत्तराधिकारी म्हणून त्यांनी त्याच वर्षी पाली भाषा विभागाच्या प्रमुखपदाची सूत्रे हाती घेतली. पुढे १९७५ सालापासून झेवियर्स महाविद्यालयाच्या प्राचीन भारतीय संस्कृती विभागाच्या प्रमुखपदाची धुरादेखील त्यांनी सांभाळली. १९९०मध्ये सेंट झेवियर्स महाविद्यालयातून प्राचीन भारतीय संस्कृती व पाली या दोन्ही विभागांच्या विभागप्रमुख म्हणून त्या निवृत्त झाल्या. त्यादरम्यान पतीचे आजारपण व नंतर झालेल्या त्यांच्या निधनाच्या धक्क्यातून सावरून १९९५पासून प्रा. मीना तालीम मुंबई विद्याविहार येथील के. जे. सोमैय्या सेंटर फॉर बुद्धिस्ट स्टडीज व पाली विभाग, मुंबई विद्यापीठ येथे अनुक्रमे मानद प्राध्यापक व अतिथी प्राध्यापक म्हणून पुन्हा एकदा संशोधन व अध्यापन करू लागल्या. त्यांचे हे कार्य आजतागायत सुरू आहे. त्यांच्या मार्गदर्शनाखाली सेंट झेवियर्स महाविद्यालय, हेरास रिसर्च इन्स्टिट्यूशन व के.जे. सोमैय्या सेंटर फॉर बुद्धिस्ट स्टडीज, मुंबई येथून १५ संशोधकांनी आपले पीएच.डी.चे संशोधन पूर्ण केले आहे. आजही त्या हेरास इन्स्टिट्यूट वगळता अन्य दोन संस्थांमधून पीएच.डी.च्या संशोधकांना मार्गदर्शन करत आहेत.

प्रा. तालीम यांनी इंग्रजी, हिंदी व मराठी या भाषांमधून पाली साहित्य, बौद्ध कला, स्थापत्य, प्राचीन

त

भारतीय संस्कृती व इतिहास तसेच प्राचीन भारतीय स्त्री व वैद्यक या विषयांवर विपुल लेखन केले. त्यांची 'Buddhavamso' (University of Bombay, 1969), 'Woman as depicted in Early Buddhist Literature' (University of Bombay, 1972), 'Bagh Painting - Identification and interpretation' (Somaiya Publication, Mumbai, 2002), 'Science of Medicine and Surgery in Buddhist India' (Buddhist World Press, New Delhi, 2009), 'Edicts of King Asoka - A New Vision' (Aryan Books International, New Delhi, 2010), 'Life of Woman in Buddhist Literature' (Buddhist World Press, New Delhi, 2010) ही पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत. त्यांनी त्यांचे पालीचे शिक्षक प्रा. ना.के. भागवत यांच्यावरील 'Memoir' ही स्मरणिका संपादित केली. (ओरिएंटल प्रिंटर्स, मुंबई, १९६३)

त

प्रा. तालीम यांचे इंग्रजी, हिंदी तसेच मराठी भाषांतील विविध विषयांवरील सुमारे ५० लेख व शोधनिबंध प्रसिद्ध झाले आहेत. यामध्ये त्यांनी प्रामुख्याने पाली भाषा-अध्ययनाच्या नवीन दिशा, पाली साहित्य व त्याचे बौद्ध चित्रकलेत उमटलेले प्रतिबिंब, अजिंठा व बाघ येथील बौद्ध चित्रकला, बौद्ध लेणी, त्यातील स्थापत्य व मूर्तिकला, बौद्ध कला व स्थापत्यातील स्थित्यंतरे, सम्राट अशोक व त्याचे शिलालेख, बौद्ध धर्माचे आश्रयदाते, बौद्धकालीन स्त्रीजीवन, बौद्ध शिक्षणपद्धती, बौद्ध युगातील वैद्यकशास्त्र, शल्यचिकित्सा व शल्यउपकरणे, प्राचीन उद्याने इत्यादी विविध विषयांचा मागोवा घेतल्याचे दिसते. या व्यतिरिक्त त्यांनी विविध राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय चर्चासत्रांतून पन्नासहून अधिक शोधनिबंध सादर केले आहेत.

प्रा. तालीम यांचे Indian Studies (Ed. by J. Bloch, J. Charpentier and R. L. Turner), Ladakh : Crossroad of High Asia (J. Rizvi, Oxford University Press), The Social Dimension of Early Buddhism (Uma Chakravarti, Oxford University Press) इत्यादी चौदा पुस्तकांवरील परीक्षात्मक लेख प्रसिद्ध आहेत. यासोबतच त्यांनी मुंबई विद्यापीठाच्या पाली व प्राचीन भारतीय संस्कृती या विषयांच्या पदवी अभ्यासक्रमाच्या पाठ्यपुस्तक निर्मितीतही महत्त्वपूर्ण योगदान दिले. या लेखनकार्याच्या जोडीला त्यांनी थेरीगाथा व अशोकाच्या शिलालेखांसंबंधी संशोधन प्रकल्प तडीस नेले.

प्रा. तालीम यांचे 'बंधनाच्या पलीकडे' (धर्मचक्र, फेब्रुवारी १९५२, मुंबई), 'भद्रा कुण्डलकेशा' (धर्मचक्र, ऑक्टोबर १९५२, मुंबई) 'तो गेला! तो कायमचा गेला!!' (धर्मचक्र, सप्टेंबर १९५३, मुंबई), 'बौद्धकालीन स्त्री' (धर्मचक्र, ऑक्टोबर १९५४, मुंबई), 'अनित्य अनित्य' (धर्मचक्र, १९५८, मुंबई) व 'आमचे गुरुवर्य ना.के. भागवत' (स्मरणांजली, १९६३, मुंबई) इत्यादी ललित लेख प्रसिद्ध आहेत.

प्रा. मीना तालीम यांना त्यांच्या बहुमोल संशोधनाकार्याकरिता २००९मध्ये पाली पाठ संस्थेचा पालिरत्न पुरस्कार प्रदान करण्यात आला. २०१०मध्ये त्यांना बौद्ध विकास मंडळाचा पालिविभूषण हा पुरस्कार प्राप्त झाला. प्रा. मीना तालीम यांनी आपल्या सखोल व वैविध्यपूर्ण संशोधनाने, तसेच अभ्यासपूर्ण व विद्यार्थिकेंद्री अध्यापनाने सुमारे पाच दशके प्राचीन भारतीय अध्ययनाची व विशेषत्वाने पाली व बौद्ध अध्ययनाची ज्योत तेवती ठेवली आहे. आजही तिच्या प्रकाशाने अनेकांच्या भावी अध्ययनाच्या वाटा उजळून निघत आहेत.

– डॉ. महेश देवकर

## तुळपुळे, शंकर गोपाळ

**प्राचीन मराठी शब्दकोशकार, भाषाशास्त्रज्ञ**

**५ फेब्रुवारी १९१४ – ३० ऑगस्ट १९९४**

मराठी भाषा, संस्कृती, संतसाहित्य यांच्या अध्ययनाचे जगभरच्या अभ्यासकांचे, संशोधकांचे गुरू



म्हणजे डॉ. शं.गो. तुळपुळे असे समीकरण १९५० ते १९९४ अशी सतत पस्तीस वर्षे पुण्यात, विद्येच्या माहेरघरात ग्राह्य धरले गेले होते.

मराठीच्या प्राचीन आणि मध्ययुगीन कालातील अनेक रचनांतून निर्माण झालेल्या शब्दसामग्रीचा अभ्यासपूर्ण 'शब्दकोश' तयार करण्याचे प्रचंड काम त्यांच्या कर्तृत्वाचा एक मोठा पैलू होता. संतांच्या रचना, त्याचे भाषाशास्त्र, शिलालेख, त्यांची ऐतिहासिकता, लोककला, लोकदेवता यांचा अभ्यास आणि त्याचे पाश्चात्त्यांना मार्गदर्शन, असे त्यांच्या जीवनाचे अनेक पैलू सांगता येतील.

शंकर गोपाळ तुळपुळे यांचा जन्म पुण्यात झाला. त्यांचे वडील गोपाळ विष्णू तुळपुळे, एक ज्ञानसंपन्न व्यक्तिमत्त्व होते. तुळपुळे यांचे शालेय आणि महाविद्यालयीन शिक्षण पुण्यात झाले. त्यांनी मुंबई विद्यापीठातून १९३८ साली एम.ए. आणि १९४० साली पीएच.डी. पदवी प्राप्त केली . पुणे विद्यापीठाची स्थापना झाल्यावर सुमारे वीस वर्षे म्हणजे १९६९ सालापर्यंत ते मराठी भाषा-साहित्य विभागाचे प्राध्यापक आणि विभाग प्रमुख होते. विद्यापीठाच्या सुरुवातीच्या काळात विभागाला आणि मराठीच्या अभ्यासाला एक प्रकारची शिस्त लावण्याचा मोठा प्रयत्न त्यांनी केला, अनेक नामवंत विद्यार्थी घडवले.

शंकर गोपाळ तुळपुळे यांनी १९६० नंतर आपले संशोधनात्मक ग्रंथ लोकांसमोर आणले त्यामध्ये : १) 'अॅन ओल्ड मराठी रीडर' (जे पाश्चात्त्यांना मराठी शिकण्यासाठी अधिक उपयुक्त होते) १९६०, २) 'लिंग्विस्टिक स्टडी ऑफ ओल्ड मराठी' १९७३, ३) 'फाइव्ह पोएट सेंट्स ऑफ महाराष्ट्र' १९६२, ४) 'मराठी शिलालेख' १९६३, ५) 'महानुभाव संप्रदाय आणि साहित्य', ६) 'रा.द. रानडे जीवन आणि तत्त्वज्ञान' १९६५, ७) 'महाराष्ट्र सारस्वताची पुरवणी', अशी सुमारे वीस ग्रंथांची नावे देता येतील. 'प्राचीन मराठी शब्दकोश' हा सुमारे आठशे पानांचा महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे डॉक्टरांची मराठी भाषेला महत्त्वाची देणगी म्हणावी लागेल. डॉ. अॅनफेल्ड हौस (अरिझोना विद्यापीठ, अमेरिका) यांच्या साहाय्याने १९९९ साली, मुंबईच्या पॉप्युलर प्रकाशनाने हा शब्दकोश प्रसिद्ध केला. याचे कार्य सुरू असतानाचा तुळपुळे यांचा मृत्यू झाल्यामुळे पुढचे सर्व काम डॉ. अॅन फेल्डहौस यांनी पूर्ण केले. अकराव्या शतकापासून तेराव्या शतकाच्या अखेरपर्यंतच्या मराठी संतांच्या रचनांतून येणाऱ्या मराठी शब्दांच्या व्युत्पत्ती, व्याकरण, अर्थ आणि उद्धरणे अशा प्रकारे सविस्तर माहिती देणारा हा शब्दकोश मराठीत आजही अद्वितीय आहे.

डॉ. तुळपुळ्यांना असा कोश करण्याची कल्पना १९८३ साली सुचली. डॉ. पेठे, डॉ. जयश्री गुणे यांच्या साहाय्याने आणि डॉ. अॅन फेल्डहौस यांच्या मदतीने त्यांनी १९८९ साली काम सुरू केले. प्रत्येकी तीनशे नोंदी असलेल्या ६० फाइली तयार झाल्या. त्या-त्या क्षेत्रातल्या तज्ज्ञांची मदत घेतली गेली. अठरा मराठी शिलालेख आणि काही ताम्रपट यांतील शब्दांच्या नोंदीदेखील यामध्ये दिल्या गेल्या. इ.स. १०१८ हे साल मराठीचा जन्मकाळ, हे या कोशावरून ध्यानात आले. मराठी भाषा मुख्यत्वे त्या काळी भीमा-कृष्णा-गोदावरीच्या खोऱ्यात नांदत होती. या क्षेत्रातील गावांचा एक दुर्मीळ नकाशाही यात दिला आहे. संदर्भ ग्रंथांची यादी या विषयांच्या अभ्यासकांना महत्त्वाची वाटते.

अनेक पाश्चात्त्य अभ्यासकांना त्यांनी मराठीची आणि संत साहित्याची गोडी लावली. डॉ. गुंथर सोन्थायमर हे पश्चिम जर्मनीचे विद्वान प्रमुख मानावे लागतील. धनगर जमात, खंडोबा-बिरोबा-विठोबा ही दैवते, इतर लोकदेवता, वीरगळ (हिरोस्टोन) इत्यादी विषय त्यांच्या अभ्यासाचे होते आणि त्यांना डॉ. तुळपुळे यांचे अखेरपर्यंत मार्गदर्शन लाभले. पुढे सोन्थायमर यांचेच विद्यार्थी महाराष्ट्रात अभ्यासासाठी येत राहिले. त्यांनाही तुळपुळे सरांनी मार्गदर्शन केले. जर्मनीच्या कॅथरिना

त

किनले या संत ज्ञानदेवांच्या 'अभंग गाथा'च्या संपादनासाठी भारतात आल्या. त्यांच्या दोन खंडात्मक ग्रंथाला तुळपुळे यांनीच मार्गदर्शन केले. १९८० साली डेन्मार्कच्या रॉयल डॅनिश लायब्ररीच्या प्रा. एलिझाबेथ स्ट्रॅण्डबर्ग तंजावूरच्या मराठी राजांच्या कागदपत्रांचा अभ्यास करण्यासाठी पुण्यात आल्या, मोडी शिकल्या आणि त्या कागदपत्रांचा ग्रंथ डॉ. तुळपुळे यांच्या मार्गदर्शनाखाली छापून प्रसिद्ध केला. अशी अनेक पाश्चात्त्य संशोधकांची कामे सांगता येतील, ज्यांमध्ये डॉ. तुळपुळे यांचे त्यांना मार्गदर्शन लाभले.

पुणे विद्यापीठाच्या सेवेतून मुक्त झाल्यावर १९७६ साली हायडेलबर्ग विद्यापीठाने आयोजिलेल्या युरोपीय देशातील व्याख्यान दौऱ्यावर ते गेले होते. त्यांनी जर्मनीतील हायडेलबर्ग, हॅम्बुर्ग, कोपनहेगेन (डेन्मार्क) या ठिकाणी व्याख्याने दिली. पश्चिम जर्मनीच्या वेसबेडनच्या हॅरासोविट्झतर्फे त्यांचा 'मराठी विदग्ध वाङ्मयाचा इतिहास' या नावाचा ग्रंथ प्रसिद्ध झाला. हायडेलबर्ग विद्यापीठाच्या संशोधन प्रकल्पात डॉ. गुंथर सोन्थायमर यांच्याबरोबर त्यांनी महानुभावाच्या लीळाचरित्रचा इंग्रजी अनुवाद पूर्ण केला. अमेरिकेच्या विस्कॉन्सिन विद्यापीठाच्या, लॉरेन्सचे प्रा. जॉन स्टॅनले यांच्याबरोबर मराठी संत साहित्याचे सर्वेक्षण केले. त्यांनी अमेरिकेच्या क्रिस्टीन राव यांच्याबरोबर मराठी लावणीसंबंधीचे संशोधन-मार्गदर्शन केले. पोवाडा-लोकगीते-लावण्या यांच्याबरोबर भारुडे, भजने, अभंग यांच्याही अभ्यासाची दिशा त्यांनी दाखविली.

लंडनच्या स्कूल ऑफ ओरिएंटल ॲण्ड आफ्रिकन स्टडीजचे प्रा. आय.एम.पी. रिसाइड १९६५ साली पंढरपूरच्या विठ्ठलाच्या संस्कृत पांडुरंग माहात्म्यावर काम करण्यासाठी पुण्यात आले होते. डॉ. तुळपुळे यांनी रिसाइड यांना मुक्त हस्ते मदत केली होती. पंढरपुरातील माहात्म्यवर्णित (श्रीधराच्या पांडुरंग माहात्म्यातील) जुने अवशेष तुळपुळे यांनी उलगडून दाखविले. पंढरपुरातील शिलालेख पुनश्च अभ्यासून पंढरपुराच्या ऐतिहासिक स्वरूपात भर घातली. असेच काम नंतर डेन्मार्कच्या प्रा. एरिक सॅण्ड यांनी केले. प्रा. शार्लोट वोदविले या फ्रेंच विदुषीने ज्ञानदेवांच्या हरिपाठाची चिकित्सक आवृत्ती १९६९ साली पॅरिसमध्ये प्रसिद्ध केली. या संशोधनालाही डॉ. तुळपुळे यांचे मार्गदर्शन होते. ही सर्व नावे, त्याचे देश, आणि प्रकल्प वाचल्यावर डॉ. तुळपुळे यांनी आंतरराष्ट्रीय स्तरावर फार मोठे काम केले, नव्हे मराठी-भाषा, संत साहित्य जगभर पोहोचते केले. आजही त्यांचे कार्य विदेशांत गौरविले जाते.

पुणे विद्यापीठाच्या स्थापनेनंतर डॉ. रा.ना. दांडेकर (संस्कृत) आणि डॉ. शं.गो. तुळपुळे (मराठी) विद्यापीठ सेवेत रुजू झाले. १९८८ साली डॉ. दांडेकरांच्या पीएच.डी.ला पन्नास वर्षे पूर्ण झाली. त्यानिमित्त त्यांच्या डिग्रीचे नूतनीकरण समारंभपूर्वक हायडेलबर्गमध्ये करण्यात आले. ही जगावेगळी घटना डॉ. दांडेकर संकोचाने सांगू शकले नाहीत पण, डॉ. तुळपुळे कार्यक्रमाला हजर होते. पुण्यात परतल्यावर त्यांनी दै. सकाळमध्ये सविस्तर लेख लिहून ही अभिमानाची घटना भारतीयांसमोर आणली. काही वर्षांपूर्वी संत साहित्याचा आंतरराष्ट्रीय स्तरावर प्रसार व्हावा या हेतूने जर्मनीत हायडेलबर्ग येथे डॉ. सोन्थायमर यांनी भक्ती परिषद भरविली. त्याची संपूर्ण जबाबदारी डॉ. तुळपुळे यांनी उचलली, नव्हे एका सत्रात वारकरी संप्रदायाचे कीर्तनही सादर केले गेले, अनेक शोधनिबंधांनी मराठी संत जगभर पोहोचले.

वयाची ऐंशी वर्षे पूर्ण करीत असता, पुण्यात त्यांचे निधन झाले.

- वा.ल. मंजूळ

## तेलंग, काशीनाथ त्र्यंबक

**कायदेपंडित, न्यायमूर्ती, प्राच्यविद्यापंडित व काँग्रेसचे संस्थापक**

**१८५० – १८९३**

एकोणिसाव्या शतकाच्या सुमारास जी बारा सारस्वत ब्राह्मणांची घराणी गोव्याहून मुंबईला आली, त्यांत काशीनाथ त्र्यंबक तेलंग यांचे घराणे प्रमुख होते. शाळेत



व महाविद्यालयात अत्यंत हुशार विद्यार्थी म्हणून यांची प्रसिद्धी होती. हे एम.ए., एलएल.बी. झाले व यांनी वकिली करण्यास सुरुवात केली. संस्कृत भाषेवरील प्रभुत्व व अस्खलित वक्तृत्व यांमुळे यशस्वी कायदेपंडित म्हणून ख्याती झाली. पुढे त्यांची उच्च न्यायालयात न्यायमूर्तीपदी नेमणूक झाली आणि हिंदू कायद्यात सुधारणा करण्याच्या त्यांच्या प्रयत्नांमुळे तर ते लोकांच्या विशेष लक्षात आले.

मात्र सुरुवातीपासून त्यांचा स्वाभाविक कल वाङ्मय आणि संशोधन या विषयांकडे होता. वकिली करत असता यांचा लेखनव्यवसाय तर चालू होताच, पण न्यायमूर्तींची जागा स्वीकारण्यातही लेखनादिकाला अधिक शांतता मिळावी अशी त्यांची योजना होती. त्यांनी वाङ्मय, समाज, संशोधन व राजकारण या सर्व क्षेत्रांत महत्त्वाची कामगिरी केली.

हे इंडियन नॅशनल काँग्रेसच्या संस्थापकांपैकी एक असून काही दिवस हे तिचे कार्यवाहही होते. (१८८५-८९). तिच्या अंतर्गत योजनेत त्यांचा महत्त्वाचा सहभाग असे. पहिल्या अधिवेशनापासून त्यांनी महत्त्वाच्या ठरावांवर भाषणे केली. सर ऑकल कॉल्विन व लॉर्ड डफरिन यांनी काँग्रेसवर केलेल्या टीकेस त्यांनी झणझणीत उत्तरे दिली.

‘शास्त्र व रुढी यांच्या बलाबलांविषयी विचार’ (१८८६) व ‘सामाजिक विषयासंबंधी तडजोड’ हे त्यांचे मराठीतील दोन निबंध यांच्या प्रगमनशील विचारांचे द्योतक आहेत. ‘कालमानानुसार धर्मात बदल करण्याची योजना आपल्या इतिहासाने आपल्याला शिकवली आहे. तिला आपण सोडल्यास आपल्या धर्मातील जिवंतपणा नाहीसा होईल’ असे विचार काशीनाथ तेलंग यांनी पहिल्या निबंधात मांडले असून दुसऱ्या निबंधात विचारस्वातंत्र्याचे महत्त्व काशीनाथ तेलंग यांनी दाखवले आहे. अशा धडाडीने त्यांनी राजेंद्रलाल मित्र यांच्या इंडियन अँन्टीक्वेरीतील लेखाला उत्तर दिले. पूर्वीच्या काळी हिंदुस्थानातील लोक गोमांस भक्षण करत असले, तरी पुढे येथील लोकांनी ते विचारपूर्वक सोडले आहे. म्हणून त्याचा आता विचार करण्याची आवश्यकता नाही, असा मुद्दा त्यांनी त्यांच्याविरुद्ध मांडला आहे.

पण यापेक्षाही डॉ. वेबरच्या रामायणविषयक लेखाच्या रे बॉइड यांनी केलेल्या अनुवादाला त्यांनी दिलेले उत्तर विशेष गाजले. हिंदुस्थानातील प्राचीन समजल्या जाणाऱ्या ग्रंथांचा काल ख्रिस्त पूर्व तीन-चार शतकांच्या मागे जात नाही व होमरच्या इलियडची दाट छाया रामायणावर पडली, असे वेबरचे दोन प्रमुख मुद्दे होते.

या लेखाला त्यांनी ‘Was Ramayan Copied from Homer’ या शीर्षकाखाली उत्तर दिले. त्यांनी त्या दोन ग्रंथांतील फरक स्पष्ट करून वेबरने ठरवलेल्या रामायणकालाचे खंडन करण्यासाठी वेबरने दिलेल्या आधारांचा फोलपणा स्पष्ट केला आणि रामायणाचा काळ ख्रिस्तपूर्व अनेक शतके असल्याचा सिद्धान्त लोकांपुढे मांडला. पुढील संशोधकांनीही यांच्या या सिद्धान्ताला दुजोराच दिला आहे.

भगवद्‌गीता ही बायबलवरून केली आहे या लेरिंगेरच्या विधानालाही त्यांनी मुद्देसूद उत्तर दिले. भगवद्‌गीता हा स्वतंत्र ग्रंथ असून तो बायबलवरून केलेला नाही हे काशीनाथ तेलंग यांनी साधार सिद्ध करून दाखवले.

पश्चिम मगधचा राजा पूर्णवर्मा राज्य करत असताना शंकराचार्य उदयास आले, हा त्यांचा स्वत:चा असा महत्त्वाचा सिद्धान्त त्यांनी सिद्ध करून दाखवला. सन ५९० हा त्यांचा काळ आहे असे त्यांनी ठरवले.

हिंदुस्थानातील महत्त्वाच्या गोष्टींसंबंधी प्रतिपादन करताना पाश्चात्त्यांकडून अनेक ठिकाणी कळतनकळत अपसिद्धान्त प्रतिपादले जात. त्याला त्यांच्याच भाषेत, त्यांच्याच पद्धतीने आणि त्यांच्याइतका सखोल अभ्यास करून सडेतोडपणे उत्तर देणाऱ्या तेलंग यांच्यासारख्या

पंडिताची त्या वेळी फार आवश्यकता होती. त्यांनी ते कार्य उत्कृष्टपणे पार पाडल्याने जगभरच्या अभ्यासकांत त्यांची ख्याती झाली.

यांचे ग्रंथ -

संपादित - १. भर्तृहरीचे नीति व वैराग्यशतक. २. मुद्राराक्षस

भाषांतरित - इंग्रजी १. भगवद्‌गीता पद्यमय अनुवाद (डॉ. लेरिंगेरला दिलेल्या उत्तरासह), २. भगवद्‌गीतेचा गद्यमय अनुवाद, ३. जर्नल ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी व इंडियन अँटिक्वेरी या नियतकालिकात लिहिलेले निबंध.

मराठी - १. शहाणा नाथन (Nathan the Wise याचे भाषांतर), २. स्थानिक स्वराज्य व्यवस्था (भाषांतर इंग्लिशमधून मराठीत १८८६), ३. शास्त्र व रुढी यांच्या बलाबलाचा विचार (व्याख्यान १८८६), ४. सामाजिक विषयासंबंधी तडजोड.

- संपादित

**संदर्भ :**

*१. अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*

***

त

# थ

## थिटे, गणेश उमाकांत

**प्राच्यविद्यापंडित, संस्कृत तज्ज्ञ**

**२ मे १९४४**



गणेश उमाकांत थिटे हे संस्कृतचे एकनिष्ठ, गाढे अभ्यासक असून संस्कृतविद्येच्या विविध अंगांचा अभ्यास व विशेषतः वेदविद्या तसेच वैदिक कर्मकांड या विषयांचे मौलिक चिंतन आणि संशोधन करणारे प्राच्यविद्यापंडित म्हणून प्रसिद्ध आहेत. डॉ. थिटे यांचा जन्म, शिक्षण आणि अध्यापन तसेच संशोधनकार्य पुणे याच नगरात झाले. न्यू इंग्लिश स्कूल, रमणबाग, टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचे बालमुकुंद संस्कृत महाविद्यालय, संस्कृत पाठशाळा, पुणे विद्यापीठ या संस्थांमधून त्यांचे शिक्षण झाले.

एस.एस.सी. परीक्षेत त्यांना संस्कृतमध्ये प्रथम क्रमांक आणि अनेक पारितोषिके, शिष्यवृत्त्या मिळाल्या. त्यात सर्वात महत्त्वाची म्हणजे १९६०मध्ये त्यांना पहिल्या क्रमांकाची जगन्नाथ शंकरशेठ शिष्यवृत्ती मिळाली. पुणे विद्यापीठातून 'Sacrifice in Brahmana Texts' या प्रबंधावर पीएच.डी. मिळाली. विविध प्रकारच्या अध्ययनवृत्ती स्वीकारीत पुढे पुणे विद्यापीठाच्या संस्कृत विभागात प्रपाठक (रीडर) आणि प्राध्यापक (प्रोफेसर), तसेच विभागप्रमुख म्हणून काम करून त्यांनी २००४मध्ये सेवानिवृत्ती स्वीकारली. सेवानिवृत्तीनंतर भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिरात मानद संग्रहाध्यक्ष (Honorary Curator) म्हणून त्यांनी कार्य केले. सध्या 'महाभारताची सांस्कृतिक सूची' या प्रकल्पातील ते प्रधानसंपादक म्हणून ते कार्यरत आहेत. त्यांनी अध्यापनकालात १७ विद्यार्थ्यांना पीएच.डी.चे मार्गदर्शन केले. डॉ. थिटे यांच्या संशोधनकार्याची थोडक्यात ओळख करून देणे महत्त्वाचे ठरेल. रूढ, प्रचलित मतांच्या, प्रवाहाच्या उलट जाऊन वेगळे, मौलिक विचार त्यांच्या सर्व ग्रंथांत आणि लेखांमध्ये मांडलेले दिसतात. 'Sacrifice in Brahmana Texts' या प्रबंधात असा मुख्य विचार मांडला आहे की ब्राह्मणग्रंथात आपाततः जरी कर्मकांडाचा विस्तार आणि गुंतागुंत दिसत असली, तरी तेथे नियमांच्या शब्दशः पालनाला महत्त्व नसून त्यामागील तत्त्वाला, आशयाला, श्रद्धेला महत्त्व दिले आहे. 'Medicine : its magicoreligious aspects according to the Vedic and Later Literatire' (Pune, 1981) या ग्रंथात तसेच 'Music in the Veda, its magicoreligious significances' (Delhi,, 1996) या ग्रंथात अनुक्रमे आयुर्वेद आणि संगीत या विषयांचा अन्य अभ्यासकांप्रमाणे 'शास्त्रेतिहास' किंवा 'कलेतिहास' या दृष्टीकोनातून अभ्यास न करता 'धर्मेतिहास' या दृष्टीकोनातून अभ्यास केला आहे. आयुर्वेदीय ग्रंथांमध्ये आढळणारी 'आदिम' विचारधारा तसेच संगीतविषयक विवेचनातूनही भारतीय विचारसरणीतील आदिम प्रवाह या दोन्ही ग्रंथांतून स्पष्ट केले आहेत. 'यज्ञ : काल, आज, उद्या' (पुणे २०००) या मराठी पुस्तकात कर्मकांडाची अपरिहार्यता, वैदिक विचारसरणीत आणि कर्मकांडात असलेले काम आणि क्रोध (वेदोत्तर काळात बौद्ध विचारसरणीच्या परिणामामुळे यांना शत्रू मानले जाते) यांचे महत्त्वाचे

थ

स्थान, अभिचार आणि प्रायश्चित्ती यांचा घनिष्ठ संबंध, पशुयागातील हिंसा, यज्ञाविषयी अपव्ययाच्या कारणावरून होणाऱ्या टीकेतील फोलपणा, यज्ञात होणाऱ्या तडजोडी, सध्याच्या काळातील यज्ञ आणि इतर कर्मकांडाची स्थिती, वेद तसेच वैदिक कर्मकांडाचे गेल्या काही वर्षात झालेले पुनरुज्जीवन, वेदाध्ययनाचे आणि वैदिक कर्मकांडाचे भवितव्य यासारख्या अनेक विषयांवर मार्मिक, मौलिक आणि तटस्थ वास्तववादी असे चिंतन व्यक्त केले आहे. याशिवाय 'आपस्तंबश्रौतसूत्र' आणि 'कात्यायनश्रौतसूत्र' या ग्रंथांचे इंग्रजी अनुवाद (अनुक्रमे दिल्ली २००५ आणि २००८), 'यज्ञ : आशय आणि आविष्कार, (पुणे १९७९), 'चार्वाकसमीक्षा, (पुणे १९७८)' हे संपादित ग्रंथही प्रकाशित झाले आहेत. जर्मनमधून इंग्लिशमध्ये भाषांतर केला गेलेला Windisch या लेखकाचा 'History of Sanskrit Philology' (Delhi, 2009) तसेच Meyer या लेखकाचा 'Festivals in India' (Delhi, 2012) याचाही उल्लेख महत्त्वाचा ठरेल. फ्रेंचमधील वेदविषयक काही भाषांतरित ग्रंथ अजून अप्रकाशित आहेत.

विविध नियतकालिकांतून किंवा गौरवग्रंथातून प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या लेखांची संख्या सुमारे दोनशेहूनही अधिक आहे. त्यातील काही प्रमुख निष्कर्ष थोडक्यात नोंदवणे उपयुक्त ठरेल. हे निष्कर्षही संस्कृतच्या इतर अभ्यासकांच्या विचारप्रवाहाच्या विरुद्ध जाणारे आहेत. 'संस्कृतमध्ये Nature या अर्थी शब्द नाही. निसर्ग, प्रकृती यांचे मूळ अर्थ वेगळे आहेत. ज्याप्रमाणे अत्यंत आरोग्यसंपन्न माणसाला आपणास हृदय, मेंदू, यकृत यासारखे अवयव असतात याची जाणीव नसते, त्याप्रमाणे संस्कृतमधील कवींना 'पर्यावरण'विषयक जाणीव नव्हती. 'प्रदूषण' माहीत नव्हते, कारण प्रदूषणच नव्हते. म्हणून प्राचीन भारतातील पर्यावरण-विचार ही कल्पना कालविपर्यासावर आधारलेली आहे.'

'प्राचीन भारतात विज्ञान आणि तंत्रविद्या (आयुर्विद्येसह) शूद्रांचे विषय मानले होते आणि या विषयांना अत्यंत हीन स्थान होते. या उलट वेदविद्या, कर्मकांड, तत्त्वज्ञान, व्याकरण यांना सर्वोच्च स्थान होते आणि ते विषय ब्राह्मणांकडे सोपवले होते. दैनंदिन जीवनात जो विषय जितका जास्त उपयोगी, तो सर्वात नीच स्थानावर आणि जो सर्वात कमी उपयोगी असा विषय (व्याकरण) हा सर्वात श्रेष्ठ मानला गेला होता.' 'वैदिक यज्ञांपैकी अश्वमेध, पुरुषमेध, सर्वमेध, सहस्रसंवत्सरसत्र – इतकेच नव्हे, तर राजसूय, व्रात्यस्तोम, गोसव यांसारखे यज्ञ, महाव्रत यांसारखे विधी अनेक दृष्टींनी शब्दश: करणे कठीण असल्यामुळे हे यज्ञ काल्पनिकच मानावे लागतील.

इतिहासकालीन शिलालेख, नाणी किंवा अभिजात संस्कृत साहित्य यांमध्ये हे यज्ञ केल्याचे उल्लेख आले असले, तरी त्यांची विश्वसनीयता संदिग्ध आहे. आपली प्रसिद्धी वाढवण्यासाठी राजांनी त्यांच्या भाटांकरवी असे उल्लेख कृत्रिमरीतीने करवून घेतले असावेत. मात्र प्रत्यक्षात ते शब्दश: करणे अशक्य आहे,' 'पंचतंत्रातील कथा प्रौढ अशा राजकुमारांना सांगितल्या असल्या, तरी प्रत्यक्षात त्या राजाने आपले राज्य कसे सांभाळावे किंवा वाढवावे हे सांगण्यासाठी नसून राजदरबारी सेवकांनी आपले स्थान कसे टिकवून धरता येईल आणि दुर्बल प्राण्यांनी किंवा व्यक्तींनी सबळ प्राण्यांच्या जगात स्वत:ला कसे जगवता येईल ते सांगण्यासाठी उपयुक्त आहेत. दुर्बल प्राण्यांनी सबल प्राण्यांची वंचना करून स्वसंरक्षण करावे. वंचना, दंभ म्हणजेच गनिमी कावा हाच दुर्बलांना जगण्याचा आधार कसा होतो, ते पंचतंत्रात शिकवले आहे. त्यामुळे धार्मिक साहित्यात आढळणारी, 'पुण्याचा विजय आणि पापाचा पराजय' ही कल्पना पंचतंत्रात उलट स्वरूपात आढळते. तेथे पुण्याचा पराजय आणि पापाचा विजय दाखवला आहे.' 'भारतीय अभ्यासक सर्व जुन्या कल्पना, ग्रंथ किंवा विचारवंतांचे विचार आजही प्रस्तुत (relevant) आहेत असे दाखवण्याचा प्रयत्न करतात. हे एक प्रस्तुततेचे वेड (relevance-mania) आहे. त्या त्या व्यक्तींच्या जन्ममृत्युदिनी असे विचार प्रकट होतात. यातील तार्किक विसंगती लोकांच्या लक्षात येत नाही. मोठ्या व्यक्तींचे

मोठेपण आजच्या प्रस्तुततेच्या निकषावर न मोजता ऐतिहासिकतेच्या निकषांवर मोजले पाहिजे.' 'संस्कृत भाषा धर्मभाषा, अभिजातभाषा किंवा देववाणी म्हणून प्राचीन भारतीय ऐतिहासिक ठेवा ह्या स्वरूपात जपली आणि अभ्यासली पाहिजे. तिला लोकभाषा किंवा दैनंदिन व्यवहाराची भाषा करण्याचा प्रयत्न अनावश्यक आहे. त्यामुळे संस्कृतचे 'संस्कृतत्व' नष्ट होईल आणि तिचे प्रदूषण होईल. संस्कृत प्रचारकांनी संस्कृतचा प्रचार केला नसून जे आधीच प्रचारात होते ते संस्कृत आपल्या फायद्यासाठी आणि प्रसिद्धीसाठी वळवले. देवभक्ती, देशभक्ती, (महापुरुष)-देहभक्ती आणि अनुकरण यांच्यावर अर्वाचीन संस्कृत साहित्य आधारलेले आहे. त्याला प्रतिभेची बैठक नाही.' 'भारतीयांचे वेदाध्ययन फलगामी आहे, तर पाश्चात्त्यांचे वेदाध्ययन मूलगामी आहे' यासारखे अनेक विचार डॉ. थिटे यांनी संकीर्ण लेखांमधून किंवा अन्यत्र मांडले आहेत. त्यांच्या लेखनाची सूची, तसेच त्या लेखनातील प्रमुख विचारांचे संकलन 'Problems in Vedic and Sanskrit Literature' (संपादक Maitreyee Deshpande, Delhi 2004) या ग्रंथात (पृ. ३८७-४१२) पाहावयास मिळेल.

डॉ. थिटे यांना उज्जैन येथील महर्षी सांदीपनी वेदविद्या प्रतिष्ठानतर्फे वेदवेदाङ्गपुरस्कार, देशस्थ ऋग्वेदी शिक्षणोत्तेजक सभेचा ऋग्वेद पुरस्कार, तसेच टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचे इंदिरा बेहरे सुवर्णपदक असे पुरस्कार मिळाले आहेत. त्यांनी पूर्व जर्मनी, स्वित्झर्लंड, नेदरलँड्स, फ्रान्स, युनायटेड स्टेट्स ऑफ अमेरिका, रुमानिया यासारख्या देशातील चर्चासत्रात भाग घेणे किंवा अध्यापनकार्य करणे या प्रकारचे कार्य केले. सप्टेंबर २०१६मध्ये त्यांच्या गौरवार्थ अमेरिकेतील कॅलिफोर्निया विद्यापीठात एक वेदविषयक चर्चासत्र आयोजित केले गेले होते.

डॉ. थिटे यांच्या मौलिक विचारसरणीचे एक चिन्ह म्हणून त्यांनी पूर्वी कधीही कुणीही न वापरलेले नव्याने बनवलेले काही शब्द उल्लेखिता येतील. उदाहरणार्थ Animalism, heno-ritualism, henoism, relevance-mania, archeosophy, philovedism, विदूषिका इत्यादी.

— मैत्रेयी देशपांडे

## थॉमस, पप्पी कुझवेलील

**पुरातत्त्वीय प्राणिविज्ञान शास्त्रज्ञ**

**५ मार्च १९४७ - २९ ऑगस्ट २०१५**



पप्पी कुझवेलील थॉमस यांचा जन्म केरळात मुथुकुलम येथे झाला. बडोदा येथून संग्रहालयविद्या आणि प्राचीन इतिहास व पुरातत्त्व या विषयांत पदव्या संपादन करताना थॉमस यांनी प्राचीन काळातील गोवंशासंबंधी संशोधन केले. पुरातत्त्वीय प्राणिविज्ञानाच्या क्षेत्रातील एक आद्य अभ्यासक असणाऱ्या डी.आर. शाह यांचे मार्गदर्शन त्यांना लाभले होते. याच विषयात काम करत राहून त्यांनी डेक्कन कॉलेजमधून १९७७ मध्ये डॉक्टरेट संपादन केली. त्यांच्या प्रबंधाचा विषय प्रागैतिहास काळातील पुरातत्त्वीय प्राणिजीवन असा होता. याच काळात त्यांनी पुरातत्त्वीय प्राणिविज्ञानाला अत्यावश्यक असलेले विविध प्राण्यांचे सांगाडे जमवले व हाडांवरून प्राणी ओळखण्याची पद्धत विकसित केली. यानंतर २००७ मध्ये निवृत्त होण्याअगोदरच्या तीस वर्षांच्या सेवा काळात त्यांनी पुरातत्त्वीय प्राणिवैज्ञानिकांची नवी पिढी तयार केली. पुण्यात डेक्कन कॉलेजात पुरातत्त्व विभागात वेगवेगळ्या वैज्ञानिक विषयांच्या ज्या संशोधन प्रयोगशाळा आहेत, त्यांमधील पुरातत्त्वीय प्राणिविज्ञान (archaeozoology) या विषयाची प्रयोगशाळा निर्माण करण्याचे श्रेय पी.के. थॉमस यांना दिले जाते.

प्राचीन काळातील प्राणी, पशुपालन व विविध कालखंडांतील अर्थकारणात प्राण्यांचे स्थान या संबंधातील त्यांचे ६० शोधनिबंध राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय

नियतकालिकांत प्रसिद्ध झाले आहेत. त्यांनी बागोर व बालाथल (राजस्थान), भीमबेटका (मध्य प्रदेश), दमदमा (उत्तर प्रदेश), वीरापुरम (आंध्र प्रदेश) व कुंतासी (गुजरात) अशा अनेक राज्यांमधील पुरातत्त्वीय स्थळांवरील प्राणिअवशेषांचा अभ्यास केला.

तथापि महाराष्ट्रातील ताम्रपाषाणयुगाच्या (Chalcolithic) व महापाषाणयुगाच्या (Megalithic) पुरातत्त्वीय स्थळांच्या संबंधातील त्यांचे संशोधन विशेष महत्त्वाचे आहे. माहूरझरी, रायपूर, खैरवाडा व भागीमोहरी या महापाषाणयुगीन स्थळांमध्ये मिळालेल्या घोड्यांच्या दफनांबद्दलचे त्यांचे निष्कर्ष विशेष उल्लेखनीय आहेत. भारतीय पुरातत्त्वाच्या संबंधात मैलाचा दगड मानल्या जाणाऱ्या इनामगाव येथील उत्खननात मिळालेल्या प्राण्यांच्या सर्व अवशेषांचा त्यांनी अभ्यास केला. पुरातत्त्वीय प्राणिविज्ञानातल्या सर्व आधुनिक पद्धतींचा वापर करून त्यांनी अनुमाने काढली. त्यांचे हे संशोधन प्राचीन काळातील पर्यावरण व त्यातील बदल यांचा मागोवा घेण्यासाठी उपयोगी ठरले. काटेकोर निरीक्षणांचा वापर करून प्राचीन काळातील मानव व प्राणी यांच्यामधील नातेसंबंध समजून घेतल्यास त्यामधून किती महत्त्वाची माहिती मिळते, हे थॉमस यांनी दाखवून दिले.

थॉमस दीर्घकाळ आय.ए.सी.झेड. (IACZ) या पुरातत्त्वीय प्राणिविज्ञानातील आंतरराष्ट्रीय संस्थेचे पदाधिकारी होते. तसेच आय.एस.पी.क्यू.एस. (ISPQS) या पुरातत्त्वातील प्रतिष्ठित संस्थेचे ते दीर्घ काळ महासचिव होते.

– डॉ. प्रमोद जोगळेकर

***

थ

# द

## दप्तरी, केशव लक्ष्मण

*भाऊजी दप्तरी*

**प्राच्यविद्या चिकित्सक, संशोधक**

**२२ नोव्हेंबर १८८० – १९ फेब्रुवारी १९७२**



केशव लक्ष्मण उपाख्य भाऊजी दप्तरी यांचा जन्म नागपूर येथे झाला. आपल्या ७६ वर्षांच्या जीवनात त्यांनी ज्योतिर्गणित, धर्मशास्त्र, समाजशास्त्र आणि वैद्यकशास्त्र या विषयांवर मूलगामी चिंतन करून मौलिक संशोधन केले.

शालेय जीवनापासून नेमलेल्या अभ्यासक्रमावर संतुष्ट राहणे त्यांच्या कुशाग्र बुद्धीला आणि तीव्र ज्ञानलालसेला मानवत नसे. शाळेत असताना त्यांनी सिद्धान्त कौमुदीचा संपूर्ण अभ्यास केला व महाविद्यालयात जाण्यापूर्वी त्यांनी ज्योतिष्यगणित व शरीरविज्ञान या विषयांत प्रावीण्य मिळविले. त्यानंतर त्यांनी कलकत्ता विद्यापीठातून १९०५ साली बी.ए.ची आणि कायद्याचीही पदवी मिळविली. बी.ए. झाल्यावर त्यांना मॉरिस महाविद्यालयात फेलोशिप मिळाली.

वकिलीची परीक्षा पूर्ण केल्यावर त्यांनी वेद, रामायण, महाभारत, भागवत, भगवद्गीता, पुराणे, स्मृतिग्रंथ, धर्मसूत्र, भाष्यग्रंथ, मिताक्षरी टीकाग्रंथ यांचा चिकित्सक दृष्टीने अभ्यास करून पुढील संशोधनकार्याचा पाया भक्कम केला.

धर्मरहस्य, धर्मविवादस्वरूप, तात्त्विक मीमांसा पद्धती, जैमिन्यर्थदीपिका, व्यासार्थदीपिका, उपनिषदर्थव्याख्या, औपनिषदिक जीवनसौख्य, उपनिषदांचा वस्तुनिष्ठ व बुद्धिप्रत्ययक अर्थ या विषयांवरील त्यांच्या विशाल ग्रंथसंपदेवरून त्यांच्या प्रगाढ पांडित्याचा, स्वतंत्र प्रज्ञेचा, लोकविलक्षण प्रतिभेचा आणि मूलग्राही संशोधनवृत्तीचा प्रत्यय येतो. आपल्या सखोल आणि सूक्ष्म अध्ययनातून त्यांनी अनेक सिद्धान्त प्रतिपादित केले. ते पूर्वपरंपरागत समजुतींना आणि श्रद्धांना धक्का देणारे आहेत व त्यातून भाऊजींची निर्भयता आणि सत्यनिष्ठा यांचे प्रखर दर्शन घडते.

वैद्यकशास्त्र हासुद्धा त्यांच्या अभ्यासाचा आणखी एक महत्त्वाचा विषय होता. या विषयावर त्यांची दहा संशोधनपर पुस्तके प्रसिद्ध आहेत.

बी.ए. झाल्यानंतर त्यांनी काही काळ नागपूर येथील पटवर्धन शाळेत संस्कृत आणि गणित विषयाचे अध्यापन केले होते. पुढे, ही नोकरी सोडून ते लोकमान्य टिळकांचे कट्टर आणि विश्वसनीय अनुयायी झाले. पुढे अस्पृश्यता निवारणाच्या चळवळीत ते महात्मा गांधींचे खंबीर पाठीराखे होते. काही काळ ते नागपूर येथून निघणाऱ्या ‘Young Patriot’चे संपादक होते. नागपूर येथे १९२१ साली नॅशनल एज्युकेशन सोसायटीची स्थापना झाली. राष्ट्रीय शिक्षण देणाऱ्या सोसायटीच्या महाविद्यालयामध्ये त्यांनी निर्वेतन प्राध्यापकी केली . १९३० मध्ये स्वराज्य विद्यालयाचे मुख्याध्यापक, धर्मनिर्णय मंडळाचे अध्यक्ष, नाशिकच्या संस्कृत महाविद्यालयाचे प्राचार्य, अशी पदे त्यांनी भूषविली. १९३०-३१ च्या कायदेभंगाच्या मोहिमेत त्यांनी खजिनदाराचे काम सांभाळले.

भाऊजी व्यवसायाने वकील होते. त्यांनी आपली सत्यनिष्ठा कधीच सोडली नाही. पैसा मिळत असूनही त्यांनी खोटे बोलणे भाग पडेल अशा अशिलांचे खटले नेहमीच नाकारले. वकिली सोडल्यावर ते वैद्यकीचा

व्यवसाय करू लागले. त्यात द्रव्यलाभ फार कमी होई, पण त्यांची कीर्ती देशांतरी गेली. पुढे ते सर्वांनाच चिकित्सक म्हणून परिचित झाले. त्यात त्यांची प्रामाणिकता आणि सिद्धान्तनिष्ठा यांचा अनेकांना अनुभव आला.

भाऊजींना पोटाचा विकार होता. सर्व प्रकारचे ज्ञात इलाज झाल्यानंतर भाऊजींनी केवळ स्वत:ला बरे करण्याच्या दृष्टीने म्हणून होमिओपॅथीचा व बायोकेमिस्ट्रीचा अभ्यास केला व स्वत:वर प्रयोग केले. ईश्वरकृपेने ते बरे झाले. त्यामुळे त्यांचा या चिकित्सेवर दृढ विश्वास बसला. नंतर ते अधिकाधिक सखोल अभ्यास करीत गेले आणि अशा निष्कर्षाप्रत पोहोचले, की बायोकेमिस्ट्री हीच एकमेव शंभर टक्के, तर्कशुद्ध चिकित्सापद्धती आहे. त्यानंतर त्या चिकित्सापद्धतीच्या प्रचारासाठी भाऊजींनी अथक परिश्रम केले. त्यांच्याच प्रयत्नाने मध्यप्रदेशात होमिओपॅथिक वैद्यकीय शिक्षणाचा कायदा झाला.

द

१९५१ साली त्यांनी 'मध्यप्रदेश प्रगतिशील समचिकित्सा मंडळ' स्थापन करून होमिओपॅथी व बायोकेमिस्ट्रीला सरकारमान्यता मिळविण्याकरिता त्यांचे एक बोर्ड स्थापन करून त्या पॅथीचे कॉलेज व परीक्षा सुरू करण्याकरिता खूप खटपट केली. होमिओपॅथीला लोकप्रतिष्ठा मिळवून देण्याच्या मुळाशी भाऊजींचे अविश्रांत परिश्रम आहेत.

भाऊजींनी शास्त्रग्रंथ निर्मितीचे युगप्रवर्तक कार्य केले. त्यांना साधनांची फारशी अनुकूलता नव्हती. आपल्या प्राचीन धर्मग्रंथांचे एक क्रांतिकारी दर्शन त्यांनी घडविले. ज्यात धर्मशास्त्रांचा विचार शास्त्रीय पद्धतीने व्यवस्थितपणे व पूर्णपणे केला आहे असा 'जैमिनिसूत्रे' हा एकमेव ग्रंथ आहे, असे भाऊजींच मत होते. 'या सूत्रावर भाष्य लिहिताना शबरस्वामींनी दुर्दैवाने यातील अर्थाचा विपर्यास करून जैमिनीची सुंदर कृती विरूप करून टाकली व चुकीच्या धर्मशास्त्राचा पाया घातला. श्री कुमारीलभट्ट व नंतरच्या निबंधकारांनी या विकृत धर्मकल्पनांना भरपूर खतपाणी घातल्याने हिंदू समाजाच्या ऱ्हासाची पुढील दिशा निश्चित झाली', असा भाऊजींचा आरोप आहे. वेद व उपनिषदांचा अर्थ सांगताना श्री कुमारील भट्ट, श्री शंकराचार्य इत्यादी पूर्वाचार्यांची बरीच मते संपूर्णत: चुकलेली असून नि:श्रेयस धर्माच्या दृष्टीने अगदी त्याज्य आहेत असे स्पष्टपणे सांगण्यात भाऊजींच्या असामान्य धैर्याचे कौतुक करावेसे वाटते. वेदांच्या अपौरुषेयत्वाच्या वादातही त्यांनी सनातन्यांशी निडरपणे झुंज घेतली. वेदान्तातील तत्त्वज्ञान सर्वाधिक लोकविमुख करण्याचे कार्य श्री शंकराचार्यांनी केले असा भाऊजींचा श्री शंकराचार्यांवर प्रमुख आरोप आहे. 'व्यासांची श्री शंकराचार्यांवर फिर्याद' या आपल्या लेखात त्यांनी आपली बाजू अतिशय कलात्मक आणि मनोरंजकतेने मांडली आहे.

वेदान्ताला अध्यात्मशास्त्र व जगदुत्पत्तिशास्त्र ठरवून पूर्वाचार्यांनी उपनिषदांचा परलोकपर अर्थ केला. जगाच्या उत्पत्ती, स्थिती आणि लयाला कारणीभूत होणारे ब्रह्म हे पूर्वाचार्यांनी उपनिषदांचे मुख्य प्रतिपाद्य मानले; पण ब्रह्माला पारलौकिकत्वाचे अधिष्ठान दिले. याउलट, भाऊजींनी कर्तव्याकर्तव्य शास्त्र (Ethics) असा उपनिषदांचा अर्थ उलगडून दाखविला. भाऊजींच्या मते, जीवाला इहलोकातच परमोच्च आनंदाची प्राप्ती कशी होईल हा उपनिषदांचा एकमेव विषय आहे. पूर्वाचार्यांच्या आणि भाऊजींच्या उपनिषदाकडे पाहण्याच्या दृष्टिकोनातील हा मूलभूत फरक प्रकर्षाने लक्षात येतो. बुद्धिनिष्ठ व मानवतावादी दृष्टिकोनातून उपनिषदांचा अर्थ लावण्याचा आजतागायतचा हा अगदी पहिलाच प्रयत्न आहे. या दृष्टीने भाऊजी क्रांतिकारी विचारवंत ठरतात.

'भारतीय महायुद्धकाल' हा निबंध १९१८ साली प्रसिद्ध करून भाऊजींनी आपल्या ग्रंथप्रकाशनाला सुरुवात केली व आपल्या पहिल्या प्रकाशनाने लोकमान्य टिळक, ज्योतिर्विद श्रीपाद कृष्ण कोल्हटकर इत्यादी विद्वानांचे लक्ष आपल्याकडे आकर्षित केले. त्यांचे गणिताचे व ग्रहज्योतिषशास्त्राचे प्रावीण्य लोकमान्य टिळकांच्या लक्षात आल्यामुळे उभ्या

महाराष्ट्रात या कामासाठी हाच एक पुरुष लायक आहे अशी खात्री झाल्यामुळे त्यांनी शुद्ध पंचांग करण्यास मार्गदर्शक होणारा नवा 'करणकल्पलता ग्रंथ' रचण्यास भाऊजींना सांगितले. हा ग्रंथ दोन भागांत प्रसिद्ध झाला. त्याचा पहिला भाग केसरी संस्थेने १९२५ साली प्रसिद्ध केला. या ग्रंथाला त्या काळी एक हजार रुपयांचे पारितोषिक मिळाले, तर दुसरा पन्नास वर्षांनी विदर्भ संशोधन मंडळाने प्रसिद्ध केला.

त्यांच्या या ग्रंथाचा बोलबाला गणितज्ञांत विशेष झाला. ज्योतिषशास्त्रावरील उपरोक्त ग्रंथाशिवाय त्यांनी मराठीमध्ये 'पंचांगचंद्रिका' आणि 'भारतीय ज्योतिषशास्त्र निरीक्षण' ही पुस्तके लिहिली. विविध विषयांवरील सुमारे २८ ग्रंथांचे लेखन त्यांनी आपल्या हयातीत केले. त्यांच्या 'धर्मविवादस्वरूप' या ग्रंथाला दक्षिण महाराष्ट्र साहित्य पुरस्कार समितीने 'श्रीमंत मिरजकर' पारितोषिकाने गौरविले. त्यांच्या अनेक ग्रंथांना महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, तसेच साहित्य अकादमीने अनुदान देऊन गौरविले आहे.

वैदिक कालगणनेची एक अभिनव उपपत्ती भाऊजींनी अभ्यासकांसमोर मांडली आहे. या पद्धतीच्या आधारे त्यांनी कंसवधाची तारीख, श्रीरामजन्मनिर्णय, श्रीरामाच्या वनवासातील रोजनिशी व अनेक प्राचीन ऐतिहासिक कोडीही सोडवून दाखविली आहेत. आपली पुराणे कपोलकल्पित कथा नसून त्यात आपल्या प्राचीन इतिहासाचे दर्शन घडते असा नवीनच दृष्टिकोन त्यांनी भारताला दिला.

१९४० साली भाऊजींनी नागपूर विद्यापीठात 'The Astronomical Method and its Application Ancient Cronology of India' आणि 'Social Institution in Ancient India.' या विषयांवर व्याख्याने दिली. विद्यापीठाने ही दोन्ही व्याख्याने पुस्तकरूपाने प्रसिद्ध केली आहेत. नागपूर विद्यापीठाने त्यांचा व्याख्याते म्हणून सन्मान तर केलाच; पण त्यांना एक सुवर्णपदक आणि सन्मान्य अशी D.Litt. पदवी देऊन विभूषित केले. पण कमालीचे निरिच्छ असलेले भाऊजी ही पदवी घेण्यास तयार नव्हते. विद्यापीठ कार्यकारिणीचे सभासद घरी आले व त्यांनी विनंती केली, तेव्हा भाऊजी मोठ्या मिनतवारीने कबूल झाले; पण मी खादीचाच झगा घालेन व इंग्रज गव्हर्नरशी हस्तांदोलन करणार नाही, दुरूनच नमस्कार करीन अशा त्यांनी दोन अटी घातल्या.

'य: क्रियावान् स पण्डित:' ही उक्ती त्यांनी समाजसुधारणेच्या चळवळीत सक्रिय सहभाग घेऊन सार्थ केली. विदर्भ मंडळाचे ते पहिले उपाध्यक्ष होते. त्यांना त्यांच्या विद्वत्तेदाखल 'विद्वद्रत्न' ही उपाधी मिळाली. त्यांच्या विद्वत्तेला मानवंदना देण्यासाठी विदर्भ संशोधन मंडळात त्यांचा अर्धपुतळा उभारण्यात आला.

– डॉ. स्मिता होटे

**संदर्भ :**

१. *'डॉ. भाऊजी दप्तरी स्मृतिग्रंथ'.*

## दवे, रमेश महिपतराम

**तत्त्वज्ञानाचे अभ्यासक व व्याख्याते**

**२८ नोव्हेंबर १९४०**



डॉ. रमेश महिपतराम दवे यांनी मुंबई विद्यापीठातून तत्त्वज्ञान विषयात एम.ए. आणि पीएच.डी. या उपाधी प्राप्त केल्या. त्यानंतर संस्कृतमध्ये कोविद, हिंदी विषयात कोविद व विनीत या उपाधी मिळविल्या. मुंबईच्या एस.आय.इ.एस. महाविद्यालयात तर्कशास्त्र, तत्त्वज्ञान, मानसशास्त्र या विषयांचे अध्यापन त्यांनी केले. त्यांनी ३७ वर्षांचा प्रदीर्घ कालखंड महाविद्यालयीन अध्यापनात व्यतीत केला आहे. २००० मध्ये तत्त्वज्ञान विभागप्रमुख या पदावरून ते निवृत्त झाले. निवृत्तीनंतर त्यांनी 'अनंताचार्य भारतीय विद्या संशोधन मंडळ' या संस्थेचे संचालक म्हणून कार्यभार स्वीकारला.

भारतीय संस्कृती, तत्त्वज्ञान, धर्म हे त्यांचे अभ्यासविषय. भारतीय विद्या भवन, सोमय्या

द

संस्कृतिपीठम्, जैन सोशल ग्रुप, एशियन आर्ट्स अ‍ॅन्ड कल्चरल सेंटर, नूतन महिला महाविद्यालय (विलेपार्ले) अशा विविध ठिकाणी त्यांनी अनेक व्याख्याने दिली आहेत. ‘ऑल इंडिया रेडियो’वरून गुजराती व हिंदी भाषांतून त्यांची व्याख्याने प्रसारित झाली आहेत.

१००हून अधिक चर्चासत्रे व परिषदा यांमध्ये उपस्थित राहून त्यांनी अनेक शोधनिबंध प्रस्तुत केले आहेत. यांपैकी काही नावे- जागतिक धर्मपरिषद (लंडन १९८०), आंतरराष्ट्रीय भक्ती परिषद (वाराणसी १९८५), पौर्वात्य-पाश्चिमात्य तत्त्वज्ञान संमेलन परिषद (मुंबई १९८८), पुराणांविषयी आंतरराष्ट्रीय परिषद (मुंबई १९९७) उपासनेविषयी आंतरराष्ट्रीय चर्चासत्र (सोमैया, मुंबई १९९३). डॉ. रमेश दवे यांची एकूण २० पुस्तके प्रकाशित झाली आहेत. गुजराती, हिंदी व इंग्लिश भाषांमधील ही पुस्तके तत्त्वज्ञान, धर्म, तर्कशास्त्र या विषयांशी निगडित आहेत. त्यांपैकी काही महाविद्यालयीन अभ्यासक्रमात अंतर्भूत करण्यात आली आहेत.

द

डॉ. दवे अनेक विख्यात संस्थांचे आजीव सदस्य आहेत. त्यांपैकी काही आहेत - All India Philosophical Congress, गुजरात तत्त्वज्ञान परिषद, अखिल भारतीय दर्शन परिषद, Bombay Philisophical Society, Bombay Astrological Society. संयुक्त राष्ट्रसंघ पुरस्कृत WCRP (World Congernece of Religion for Peace) या संस्थेच्या मुंबई विभागाचे उपाध्यक्ष म्हणून त्यांनी १९७५ ते १९८५ अशी दहा वर्षे काम पाहिले.

शिक्षणक्षेत्रात व्याख्याते म्हणून त्यांनी महत्त्वाची भूमिका बजाविली आहेच, त्याचबरोबर इतर जबाबदाऱ्याही पार पाडल्या आहेत. १९७९ ते १९९९ या कालावधीत तत्त्वज्ञान विषयाच्या अभ्यासमंडळाचे सदस्य म्हणून मुंबई विद्यापीठात त्यांनी कार्य केले. १९८४ ते १९८७ या काळात कुलगुरूंचे प्रतिनिधी म्हणून त्यांनी मुंबई विद्यापीठाच्या विश्वपरिषदेतही काम केले.

- डॉ. गौरी माहुलीकर

## दहेजिया, विद्या

**पुरातत्त्व अभ्यासक, अभिरक्षक**

**जन्मदिनांक अनुपलब्ध**



स्मिथसोनियन इन्स्टिट्यूट, वॉशिंग्टन डीसीच्या सहयोगी संचालिका विद्या दहेजिया. फ्रिअर गॅलरी ऑफ आर्ट (कलावीथिका) आणि आर्थर एम सॅक्लिअर गॅलरी, अमेरिकेतल्या या दोन्ही ठिकाणी आशियाई कलाकृतींचा मोठा साठा आहे आणि विद्याताई दहेजिया या त्याच्या मुख्य अभिरक्षक म्हणजे क्युरेटर आहेत. ‘प्राचीन भारतीय संस्कृती’ हा विषय घेऊन विद्याताईंनी मुंबईच्या सेंट झेवियर्स महाविद्यालयामधून पदवी संपादन केली. नंतर त्यांनी केंब्रिज विद्यापीठाची ‘भारतीय कला’ विषयातील अंतिम परीक्षा उत्तीर्ण केली. ‘ख्रिस्तपूर्व २०० ते इ.स. २००च्या कालखंडातील बौद्ध लेणी’ या विषयावर त्याच विद्यापीठाला प्रबंध सादर करून विद्याताईंनी डॉक्टरेट मिळवली.

डॉक्टरेट पदवी संपादन केल्यानंतर त्यांनी ऑस्ट्रेलियातील सिडनी येथे कला इतिहासविषयक शिष्यवृत्ती मिळवून या विषयाचा अधिक सखोल अभ्यास केला. हाँगकाँग येथे त्यांनी कला-इतिहास विषयाचे दोन वर्षे अध्यापन केले आणि भारतात परतल्यावर नवी दिल्ली येथे सहा वर्षे संशोधनकार्य केले. डॉ. होमी भाभा शिष्यवृत्तीच्या अंतर्गत त्यांनी संशोधन करून ‘ओरिसामधील मंदिरे’ नावाचा ग्रंथ आणि ICSR शिष्यवृत्तीद्वारे ‘भारतातील योगिनींची मंदिरे’ नावाचा ग्रंथ लिहिला. आत्मानुभूती हा सर्वश्रेष्ठ भक्तिभाव आहे, हे भक्ती आंदोलनाने प्रस्थापित केल्याने योगिनी प्रभाव क्षीण होत गेला. विद्याताईंनी योगिनी मंदिरे नावाचा लिहिलेला ग्रंथ राष्ट्रीय संग्रहालय, दिल्लीने प्रकाशित केला. विद्याताईंनी होनोलुलू, हवाई येथे १९७९ ते १९८१ या काळात दक्षिण भारतातील संत -

तामिळनाडू या विषयावर संशोधन केले. १९८२पासून न्यूयॉर्कच्या कोलंबिया विश्वविद्यालयात भारतीय कलेचे अध्यापन करीत असताना त्यांच्या संशोधनाची परिणती दोन पुस्तके लिहिण्यात झाली.

कोलंबिया विश्वविद्यालयात कला व कलेचा इतिहास हे प्रमुख विभाग असून मोठ्या संख्येने विद्यार्थी तिथे आकर्षिले जातात. विद्याताई दहेजिया यांनी तेथे भारतीय कला या विषयाचे अध्यापन केले. भारतातील ब्रिटिशयुगीन कला व कलापुस्तके यांचे प्रदर्शन ही त्यांची मुख्य कामगिरी होय. नंतर त्यांनी ‘एडवर्ड लियरकृत भारत’ नावाचे प्रदर्शन आयोजित केले. त्यात १८६३ ते १८६५च्या अवधीत लियरने जलरंगांनी रेखाटलेली ३००० चित्रे प्रदर्शित केली होती. अमेरिका तेथे भारतीय कलेला व्यापक प्रमाणावर उठाव देऊ इच्छित होती. म्हणून फ्रिअर व सॅक्लियर गॅलरींच्या प्रमुखपदी व नॅशनल म्युझियम ऑफ एशियन आर्ट तसेच दि स्मिथसोनियन इन्स्टिट्यूटच्या क्युरेटर (अभिरक्षक) पदासाठी १९९४ साली विद्याताईंना पाचारण केले गेले. स्मिथसोनियन हे व्यापक संकुल मोक्याच्या जागी राजधानीत स्थापन केले आहे. एकाच क्षेत्रात संग्रहालयाच्या सोळा इमारती आहेत. ही संस्था १५० वर्षांची असून त्यात विश्वभरातील इतिहास व कलासंस्कृतीविषयक काही अनमोल वस्तूंचा संग्रह आहे. त्यात होप डायमंडचा समावेश आहे. जगातले हे एकमेव असे संग्रहालय आहे, ज्याच्या प्रमुखपदी कॅबिनेट दर्जाचा मंत्री आहे. ते खास कायदा करून पूर्णत: सरकारकडून चालवले जाते. यामुळे मालकी हक्काचे सुयोग्य कायदेशीर दस्तऐवज असल्याशिवाय इतिहास व संस्कृती संबंधित कलाकृती खरेदी करू शकत नाही. ही संस्था या नियमाचे पालन करते. येथे चोरटे व संशयास्पद परिस्थितीतले काहीही विकत घेतले जात नाही.

१९९९ साली विद्याताईंनी देवीरूपांचे प्रेक्षणीय प्रदर्शन भरवले. त्यांनी युरोप, ब्रिटन येथील व जगभरातल्या ३७ खाजगी संग्रहकर्त्यांकडून सामग्री जमवली. ख्रिस्तपूर्व पहिले शतक ते १९८७ एवढा कालखंड त्यांनी व्यापला. या प्रसंगी अगणित घडामोडींचे दर्शन घडले. अमेरिकेच्या मॅपिन पब्लिशर्सने सदर प्रदर्शनाच्या कॅटलॉगचे (तालिकेचे) प्रकाशन केले.

विद्या दहेजिया वॉशिंग्टन येथे वास्तव्य करतात व काम करतात; परंतु चर्चासत्रे, पाठ्यक्रम, व्याख्याने आणि भारतीय कलेच्या प्रसंगी जगभर प्रवास करीत असतात.

– वि.ग. जोशी

## दांडेकर, शंकर वामन

***सोनोपंत दांडेकर***

**वारकरी संप्रदायाचे अध्वर्यू, तत्त्वज्ञ**

**२० एप्रिल १८९६ – ९ जुलै १९६८**

☛ ***मुख्य चरित्रनोंद - धर्मपरंपरा खंड***



ऐहिक आणि पारलौकिक क्षेत्रात अग्रेसर राहणाऱ्या व्यक्तींपैकी एक, व्यवहार आणि परमार्थ दोन्ही एकाच जीवनाच्या दोन बाजू मानणारे वारकरी संप्रदायाचे अध्वर्यू प्रा. शंकर वामन दांडेकर मूळचे कोकणातले. व्यवसायाच्या निमित्ताने दांडेकर कुटुंबीय मुंबईजवळील पालघर येथे स्थायिक झाले. गणेश रामराव दांडेकर यांचे तृतीय चिरंजीव वामनराव, वामनरावांचे मोठे बंधू केशवराव ऊर्फ अप्पाजी हे लौकिक शिक्षणात फारच मोठे झाले. पंचम जॉर्जच्या कार्यक्रमात त्यांना रावसाहेब, रावबहादूर, सी.आय.ई. असे किताब मिळाले. वामनराव देवभक्त, सत्त्वस्थ, सदाचारी गृहस्थ होते. शास्त्री-पुराणिकांकडून प्रतिवर्षी रामायण-महाभारत-भागवत यांचे पारायण करून घ्यायचे. त्यांच्या पत्नी लक्ष्मीबाई रूपवान, गुणवान, कुलशील, संपन्न अशा होत्या. या दोघांच्या संसारात काशीबाई, दुर्गाबाई, यमुनाबाई, गंगूबाई या चार कन्या आणि विष्णु व शंकर हे दोन पुत्र जन्माला आले. यांतील शंकर हेच मामासाहेब दांडेकर.

वामनरावांचे काका शेजारी राहत. त्यांच्या पत्नी उमाआजी शंकरचा गोंडसपणा पाहून त्याला 'सोनू' म्हणून संबोधित. अखेरपर्यंत ते 'सोनूमामा दांडेकर' म्हणून ओळखले गेले. वडिलांच्या उदार स्वभावामुळे ते ठाणे जिल्ह्यात देवमाणूस म्हणून प्रसिद्ध होते. सोनू दीड वर्षांचा असताना त्याची आई गेली, घरातील भजन-कीर्तन-पुराण यांमुळे तो बालपणीच देवभक्त बनला. सोनूची पत्रिका पाहून हा असामान्य देवभक्त होईल असे भविष्य ज्योतिष्यांनी वर्तवले होते. माहीमच्या मराठी शाळेत सोनूचे प्राथमिक शिक्षण झाले. तो १९०४ साली पुढच्या शिक्षणासाठी पुण्यात आला व नूमविमध्ये दाखल झाला.

सोनू सोहोनी वाड्यात राहत असे. तेथेच सत्पुरुष विष्णुबुवा जोग विश्रांतीस येत. विष्णुबुवांची आळंदी क्षेत्र आणि ज्ञानेश्वर माउलींवर अनन्य श्रद्धा. जोग महाराजांचे धार्मिक अध्ययन नानामहाराज साखरे यांच्याकडे झाले होते. तीच परंपरा सोनूमामांकडे आली. नूमविमध्ये माध्यमिक शिक्षण झाल्यावर १९१२ मध्ये ते फर्गसनमध्ये दाखल झाले. त्यांचे संस्कृत, मराठी हे आवडीचे विषय. याच वयात एकदा वडिलांच्या श्राद्धदिनी मामांनी जोग महाराजांच्या मार्गदर्शनाखाली बालवयात 'कीर्तन' केले.

महाविद्यालयात गुरुदेव रानडे शिकवायला येत. प्रो. रानडे-भाटे यांच्या मार्गदर्शनाखाली १९१७ साली दांडेकर बी.ए. झाले. जोग महाराजांनी १९१७ साली आळंदी क्षेत्रात वारकरी शिक्षण संस्थेची स्थापना केली. घासवाल्याच्या धर्मशाळेत मामांनी प्रथम वारकरी विद्यार्थ्यांचा वर्ग घेतला. १९१९ साली मामा तत्त्वज्ञान विषय घेऊन एम.ए. झाले.

मामांनी जोग महाराजांची ब्रह्मचर्य व्रताची, वारकरी संप्रदायाची आणि संतवाङ्मय अभ्यासाची परंपरा स्वीकारली, तर गुरुदेव रानडे यांची ध्यान, एकनिष्ठता, गुरुभक्ती, लोकसंग्रहाचे व्रत स्वीकारले. मामा न्यू पूना कॉलेजात (नंतरचे एस.पी. कॉलेज) प्राध्यापक म्हणून रुजू झाले. १९१६ साली लॉर्ड विलिंग्डन यांच्या हस्ते हे महाविद्यालय सुरू झाले. पहिले प्राचार्य होते विनायकराव आपटे. फर्गसनच्या लोकप्रियतेला टक्कर देत न्यू पूना कॉलेज हळूहळू लोकप्रिय होत गेले. त्या वेळचे पोतदार, देवधर, करमरकर, तुळपुळे हे आजीव सदस्य मामांच्या बरोबर होते. १९२० साली मामा शिक्षण प्रसारक मंडळीचे आजीव सदस्य आणि न्यू पूनाचे प्रोफेसर झाले. कॉलेजमुळे मामांची सार्वजनिक जीवनात प्रतिष्ठा वाढली. मामांवर पुत्रवत प्रेम करणारे जोग महाराज १९२० साली पंचतत्त्वात विलीन झाले.

स.प.मध्ये तत्त्वज्ञान शिकवताना भारतीय परंपरेसह पाश्चात्त्य तत्त्वज्ञ सॉक्रेटीस, ॲरिस्टॉटल, स्पिनोझा, प्लेटो यांच्याविषयी बोलताना मामासाहेब रंगून जात. मामांचा साधेपणा, निगर्वी-सात्त्विक स्वभाव, संत- साहित्याची आवड यांमुळे विद्यार्थी त्यांच्या व्याख्यानात तल्लीन होत. मामांच्या पहिल्या नामांकित विद्यार्थ्यांत ना.भि. परुळेकर (संस्थापक : 'सकाळ') ग.श्री. खैर (संस्थापक : अ.वि. गृह) इत्यादींचा समावेश होता. यातून तत्त्वज्ञान मंडळाची कल्पना पुढे आली. बाहेरचे विद्वान व्याख्यानासाठी स.प.मध्ये येऊ लागले. मामांच्या लेखनात 'उपनिषदातील मानसशास्त्र', 'ज्ञानदेव ॲण्ड हिज फिलॉसॉफी', 'ज्ञानेश्वर ए स्टडी', 'नीतिशास्त्र परीक्षण' असे विषय त्यांनी समर्थपणे मांडले. जोगांचे शिष्य बंकटस्वामींनी ज्ञानेश्वरीची हस्तलिखिते गोळा करून टिपणे, भाषांतरासहित ग्रंथ छापला, त्यात मामांचे योगदान महत्त्वाचे होते. दांडेकरांची ज्ञानेश्वरी घरोघरी पोहोचली.

ज्ञानेश्वरीचे काम १९२५ साली संपले. तेव्हा बंकटस्वामींच्या गैरहजेरीत मामा प्रवचने करू लागले. श्रीसंत तुकाराम अभंगगाथेला प्रदीर्घ अभ्यासपूर्ण प्रस्तावना त्यांनी याच काळात लिहिली. कॉलेजचे काम सांभाळून मामा बाहेरगावी प्रवचनास जाऊ लागले. रेखीव शरीर, कोकणस्थी गोरेपणा, धोतर-कोट-टोपी असा साधा वेश, रसाळ वाणी, नि:स्पृह वृत्ती यांमुळे मामा वारकरी संप्रदायात लोकप्रिय झाले. ज्ञानकोशकार केतकरांच्या सांगण्यावरून वारकरी पंथाचा इतिहास लिहून मामांनी मराठी वाङ्मयात भर घातली. कट्टर

पुराणवादी आणि समाजसुधारक यांचेही या प्रबंधाने समाधान झाले. त्यांची संप्रदायाकडे पाहण्याची दृष्टी बदलली. परिणामत: अनेक डॉक्टर, वकील, इंजिनिअर मामांच्या बरोबर पालखी सोहळ्यात सामील होऊ लागले.

मामांच्या काळात श्रीमंत सरदार जगन्नाथ पंडित यांनी २५ एकर जमीन स.प. महाविद्यालयाला दान दिली. १९२७ साली त्यावर प्रचंड इमारत उभी राहिली. त्या इमारतीचे उद्‌घाटन गव्हर्नर सर लेस्ली विल्सन यांनी केले. लोकमान्य टिळकांनी या कार्यास खूप मदत केली. तसेच, जमखंडीच्या राजेसाहेबांनी वडिलांच्या स्मृतिप्रीत्यर्थ दोन लक्ष रुपयांची देणगीही दिली. या सर्व मंगलकार्यांत मामांचा सहभाग होता.

मामासाहेब १९३४ साली नूमवि शाळेचे व्यवस्थापक झाले. याच काळात डॉ. राधाकृष्णन यांची आणि मामांची भेट झाली. गांधीयुगाचा परिणाम म्हणून मामा खादी वापरू लागले. बराच काळ मुंबई विद्यापीठाच्या सिनेटचे/बोर्ड ऑफ स्टडीजचे ते सभासद होते. नंतर ते रुइया महाविद्यालयाचे उपप्राचार्य झाले आणि अखेरीस स.प. महाविद्यालयाचे प्राचार्य झाले.

माधवराव देशमुखांनी मामांना लिहिते केले. य.गो. जोशींच्या ‘प्रसाद’ मासिकात मामा लिहू लागले. य.गो. जोशी, स.आ. जोगळेकर यांच्याबरोबर शं.वा. दांडेकर संस्थापक संपादक झाले. बृहन्महाराष्ट्र शुगर सिंडिकेटचे मालक चंद्रशेखर आगाशे यांनी मामांच्या प्रोत्साहनाने वैदिक वाङ्मय, संतसाहित्य व्याख्यानमालेसाठी स्वत:च्या गोत्राच्या ‘कौशिक’च्या नावाने देणगी दिली व व्याख्यानमाला सुरू केली.

१५ ऑगस्ट १९४७ रोजी स्वातंत्र्य मिळाल्यावर मामांनी विद्यार्थ्यांसमोर केलेले भाषण अविस्मरणीय होते. पुढे, पुणे विद्यापीठाच्या स्थापनेत मामांनी प्रा. करमरकरांबरोबर सक्रिय भाग घेतला. १९५१ साली मामा स.प.मधून निवृत्त झाले. त्यांना डॉ. धनंजयराव गाडगीळ यांच्या अध्यक्षतेखाली सत्कारपूर्वक निरोप दिला गेला. काही हजारांची थैलीही अर्पण केली गेली. मानपत्र देण्यात आले. या देणगीतून प्रा. दांडेकर धार्मिक वाङ्मय प्रकाशन संस्था काढण्यात आली. त्यातून ‘सार्थहरिपाठ’, ‘भजनसंग्रह’, ‘वारकरी पंथाचा इतिहास’, ‘गीता प्रवचने’ असे धार्मिक ग्रंथ प्रकाशित करण्यात आले.

पुण्यात, १९५१ साली अ.भा. तत्त्वज्ञान परिषद भरविली गेली. त्यात एका विभागाचे प्रा. दांडेकर अध्यक्ष होते. १९५२ साली त्यांनी नागपूर विद्यापीठात चार दिवस ‘श्री ज्ञानदेवांचे जीवनविषयक तत्त्वज्ञान’ या विषयावर व्याख्याने दिली. निवृत्तीनंतर सोनोपंत कीर्तन-प्रवचनात महाराष्ट्रभर हिंडू लागले. याच काळात महाराष्ट्र सरकारने संतसाहित्याच्या स्वस्त-शुद्ध आवृत्ती तयार करण्यासाठी समिती नेमली. ‘ज्ञानेश्वरी’, ‘नामदेवगाथा’, ‘भावार्थ रामायण’ या ग्रंथांचा त्यात समावेश होता. मामांनी पूर्वीची बंकटस्वामींसाठी केलेलीच ज्ञानेश्वरी मराठी भाषांतरासहित प्रसिद्ध केली.

स्वामी विवेकानंद जन्मशताब्दीच्या निमित्ताने सोनोपंत रामकृष्ण मठामध्ये नियमित प्रवचनासाठी जाऊ लागले. नंतर त्यांनी बाहेरगावी प्रवचन-कीर्तन करीत स्वामी विवेकानंदांच्या विचारांचा प्रसार केला. ३० नोव्हेंबर १९५८ रोजी शि.प्र. मंडळीचा अमृत महोत्सव स.प.च्या मैदानावर झाला. सोनोपंतांनी या निमित्ताने केलेले हृदयस्पर्शी भाष्य गाजले.

काळाबरोबर मामांना धक्के सहन करावे लागले. गुरुदेव रानडे गेले, थोरली बहीण जीजी वृद्धापकाळाने गेली, थोरले बंधू बाबूराव गेले. एका पाठोपाठ एक धक्के बसले. मामांना जलोदर झाला. वारकरी संप्रदायात एकच चिंतेची लाट उसळली. डॉ. वाय.व्ही. फाटकांसहित अनेक डॉक्टर काळजी घेत होते. वैद्य तरडेशास्त्र्यांच्या आयुर्वेदिक उपचाराने उतार पडला. मामांचे निकटवर्ती धुंडामहाराज आता मामांची ज्ञानेश्वरी-प्रवचनाची गादी चालवू लागले. मामा अशक्तपणामुळे उभे राहून कीर्तन करू शकत नव्हते. स.प. महाविद्यालयाचा सुवर्णमहोत्सव साजरा करण्यासाठी मामा पुन्हा पुण्याला परतले. याच काळात ‘ज्ञानदेव

आणि प्लेटो' पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाले. १९६८च्या सुमारास कै. जोग महाराज जन्मशताब्दी महोत्सव आणि वारकरी शिक्षण संस्था सुवर्णमहोत्सव मामांच्या उपस्थितीत पार पडले. आता पालखी सोहळ्यात भाग घेणेही प्रकृतीमुळे अशक्य झाले. पुढे मामांच्या मृत्यूमुळे संपूर्ण महाराष्ट्र हळहळला. अंत्ययात्रा आळंदीला नेली. दहनभूमीवर स्मृतिमंदिर उभे राहिले.

— वा.ल. मंजूळ

## दांडेकर, रामचंद्र नारायण

**संस्कृत, प्राच्यविद्या व भारतविद्या संशोधक**

**१७ मार्च १९०९ - ११ डिसेंबर २००१**



रामचंद्र नारायण दांडेकर यांचा जन्म सातारा येथे झाला. पुण्याच्या डेक्कन महाविद्यालयातून ते बी.ए. झाले व जर्मनीतील हायडलबर्ग विद्यापीठातून त्यांनी संस्कृत विषयाची एम.ए. पदवी मिळविली. मुंबई विद्यापीठातून प्राचीन भारतीय संस्कृती या विषयातही त्यांनी एम.ए. केले. दोन्ही एम.ए. परीक्षांमध्ये ते प्रथम वर्गात उत्तीर्ण झाले. जर्मनीतील हायडलबर्ग विद्यापीठातून १९३८ साली पीएच.डी. मिळवली. (याच विद्यापीठाने पन्नास वर्षांनंतर, म्हणजे १९८८ साली त्यांच्या कार्याचा गौरव म्हणून जुन्या पदवीचे नूतनीकरण करून एका विशेष समारंभात सन्मानपूर्वक पदवी प्रदान केली.) आणखी दोन वर्षे शिष्यवृत्ती मिळाल्याने जर्मनीत अध्ययन करून त्यांनी पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयात संस्कृत व प्राचीन भारतीय संस्कृतीचे प्राध्यापक म्हणून १९५०पर्यंत शिकवले. १९४५ ते १९५० या काळात ते डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीव सदस्य व सेक्रेटरी होते. १९५० साली नव्याने स्थापन झालेल्या पुणे विद्यापीठात संस्कृत विभागप्रमुख व प्राध्यापक म्हणून दाखल झाले. (१९५० ते १९६९). पुणे विद्यापीठान्तर्गत असलेल्या प्रगत संस्कृत अध्ययन केंद्राचे ते संचालक झाले. (१९६४ ते १९७४). १९५९ ते १९६५ या काळासाठी पुणे विद्यापीठात कलाशाखेचे ते प्रमुख झाले.

अनेक संस्कृत संमेलनांमध्ये सदस्य, निमंत्रित सदस्य, उपाध्यक्ष, अध्यक्ष अशी सन्माननीय पदे त्यांना मिळाली आहेत. भारत सरकारच्या शिक्षण खात्याच्या राष्ट्रीय संस्कृत संस्थानचे सदस्य, युनेस्कोतर्फे सांस्कृतिक संबंधविषयक भारतीय काउन्सिलचे सदस्य ही त्यांतील वेचक नावे. अनेक देशी-परदेशी महत्त्वाच्या नियतकालिकांच्या संपादकीय मंडळांवर ते होते. भारतीय व भारताबाहेरील विशेषत: संस्कृत, भारतविद्या, प्राच्यविद्या यांविषयक काम करणाऱ्या अनेक विद्यापीठांशी त्यांचा संबंध आला.

१९३९ या वर्षी त्यांना डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीव सदस्यपद मिळाले. त्यांनी आपले अध्यापनक्षेत्र पक्के केले आणि भांडारकर संस्थेचे सक्रिय सदस्यपद स्वीकारले. अखेरपर्यंत ते भांडारकर संस्थेशी निगडित होते.

दांडेकरांनी मराठी, संस्कृत व इंग्लिश या भाषांमधून विपुल लेखन करून आपल्या विद्वत्तेची वारंवार प्रचिती आणून दिली आहे. या सर्वांत महत्त्वाचा ठरू शकेल, असा ग्रंथ म्हणजे त्यांनी केलेली वैदिक ग्रंथांची, लेखांची सूची (वैदिक बिब्लिओग्राफी - पाच भागांमध्ये) फ्रेंच विद्वान लुई रनू यांनी १९४५पर्यंतच्या वैदिक अध्ययनाची एक सूची छापली होती. त्यानंतरच्या काळात संस्कृत, भारतविद्या यांच्यावर विपुल लेखन झाले.

१९४५ पासून १९९० पर्यंतच्या पंचेचाळीस वर्षांच्या कालावधीत निरनिराळ्या कालखंडांसाठी बिब्लिओग्राफी-सूची छापली आहे. सुरुवातीला कोणत्या नियतकालिकातून लेख, परीक्षणे घेतली आहेत, त्यांची सूची आहे. नंतर विषयवार विभागणी करून (सुमारे १९० वर्ग) पुस्तके व लेख यांची अकारविल्हे यादी दिली आहे. अभ्यासकाला ही सूची त्याच्या मार्गदर्शकाइतकीच मार्गदर्शक ठरते. त्यांची ग्रंथसंपदा मोजकी असली, तरी ती मूल्यवान आहे.

द

त्यांच्या ग्रंथांपैकी 'वैदिक देवतांचे अभिनव दर्शन' (१९५१), 'अ हिस्टरी ऑफ द गुप्ताज' (१९४१), 'सम अस्पेक्टस ऑफ द हिस्टरी ऑफ हिंदूइझम' (१९६७), 'सुभाषितावलि', 'रसरत्न प्रदोपिका' (१९४५), 'श्रौतकोश' (सहकार्याने), महाभारत (काही पर्वे त्यांनी संपादिली) वगैरे मान्यवर आहेत.

डॉ. दांडेकरांनी इतक्या प्रदीर्घ काळात अध्यापन केले. मार्गदर्शन केले. ठिकठिकाणी देशात व देशाबाहेर भेटी दिल्या. त्यामुळे त्यांचा शिष्यवर्ग व चाहतावर्ग खूप मोठा आहे. त्यांना १९६९ साली त्यांच्या साठाव्या वर्षी व १९८४ साली त्यांच्या पंच्याहत्तराव्या वाढदिवसाच्या वेळी 'अमृतधारा' असा ग्रंथ अर्पण करून त्यांच्या शिष्यवर्गाने आपली गुरुदक्षिणेची पुष्पे अर्पण केली आहेत.

वृद्धापकाळातही ते तरुणांइतकेच कार्यरत होते. सरस्वतीदेवीच्या कृपेने यश व कीर्ती कशी लाभते. याचे उदाहरण म्हणजे डॉ. रामचंद्र नारायण दांडेकर होत. पुणे येथे वृद्धापकाळाने त्यांचे निधन झाले.

– संपादित

**संदर्भ :**

१. *मराठी विश्वचरित्रकोश; संपादक - कामत, श्रीराम पांडुरंग; विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा.*

## दा कुन्हा, जोस गेर्सन

### पुरातत्त्वज्ञ, प्राच्यविद्या संशोधक

### २ फेब्रुवारी १८४४ – ३ ऑगस्ट १९००

जोस गेर्सन दा कुन्हा यांचा जन्म गोव्यातील एका गोवन कॅथलिक कुटुंबात झाला. एकूण बारा भावंडांपैकी जोस गेर्सन हे सर्वांत ज्येष्ठ होते. त्यांचे वडील फ्रान्सिस्को हे पोर्तुगीज सैन्यात होते. या घराण्याची वंशपरंपरा बाळकृष्ण शेणॉय या कुट्ठाळी गावातील सोळाव्या शतकातील गौड सारस्वत ब्राह्मण व्यक्तीपर्यंत जाते. बाळकृष्ण शेणॉय १५५५ साली पोर्तुगीज चाकरीमध्ये बार्देस येथे स्थलांतरित झाले आणि कालांतराने ख्रिस्ती धर्म स्वीकारून त्यांनी 'दा कुन्हा' हे उपनाम धारण केले.

जोस गेर्सन दा कुन्हा यांनी आपले प्राथमिक शिक्षण पणजी येथे संपवून वैद्यकशास्त्रातील पुढील अध्ययनासाठी मुंबईतील ग्रॅण्ड मेडिकल कॉलेजमध्ये प्रवेश घेतला, येथे त्यांनी अनेक पारितोषिके मिळवली. १८६४ साली ते मुंबई विद्यापीठातून लंडनला गेले आणि १८६७ साली त्यांनी एल.आर.सी.पी., लंडन (Licentiate of the Royal College of Physicians) आणि एम.आर.सी.एस., इंग्लड (Membership of the Royal College of Surgeons) या दोन पदविका घेतल्या. १८६८ साली ते मुंबईत येऊन वैद्यकी करू लागले. त्यांनी वैद्यकशास्त्रातील अनेक विषयांवर शोधनिबंध लिहिले; परंतु याव्यतिरिक्त इतिहास, भाषाशास्त्र, नाणकशास्त्र, संस्कृत अशा विविध विषयांची त्यांना आवड व गती होती. त्यांनी या विषयांशी संबंधित अनेक प्रबंध, शोधनिबंध व वीसहून अधिक पुस्तके लिहिली.

तत्कालीन गोव्यातील लेखक त्यांचे ग्रंथ पोर्तुगीज भाषेत लिहीत असत; परंतु जोस गेर्सन दा कुन्हा यांनी त्यांचे साहित्य इंग्रजी भाषेत लिहिण्याचा निर्णय घेतला आणि त्यांचे साहित्य जगभर पोहोचू शकले. 'The Origin of Bombay' हा त्यांचा पहिला ग्रंथ प्रकाशित होण्यास वेळ लागला व त्यांच्या मृत्यूनंतर इ.स. १९०० मध्ये तो Bombay Branch of the Royal Asiatic Society (एशियाटिक सोसायटी ऑफ मुंबई) यांनी प्रकाशित केला. परंतु त्यांचे इतिहास, संस्कृती, पुरातत्त्व यांच्याशी संबंधित ग्रंथ 'Memoir on the History of the Tooth-Relic of Ceylon, with a Preliminary Essay on Gautama Buddha, The Life and System of Gautama Buddha' (1875), 'The History and Antiquities of Chaul and Bassein' (1876) यांच्यामुळे ते अधिक नावारूपास आले. त्यांनी १८८१ साली 'The Konkani Language and Literature' हा ग्रंथ लिहिला. यातून त्यांचे भाषाशास्त्राचे सखोल ज्ञान प्रत्ययास येते. यात त्यांनी कोकणी भाषेची वैशिष्ट्ये, तिचा उगम यांसंबंधी चर्चा केली आहे. या

ग्रंथात ते कोकणी ही स्वतंत्र भाषा असून कुडाळीसारख्या इतर बोलीही त्यात अंतर्भूत होतात, असे मत मांडतात. कोकणी व मराठीत साम्य असले, तरी ती मराठीपेक्षा भिन्न असून त्या भाषेवर मराठी-व्यतिरिक्त संस्कृत, पर्शियन, कन्नड, पोर्तुगीज या भाषांचा मोठा प्रभाव व शब्दसंपत्ती जाणवते.

१८७६ मध्ये जोस गेर्सन दा कुन्हा यांनी प्राचीन नाणी संकलनाला सुरुवात केली. त्याव्यतिरिक्त त्यांनी जेम्स गिब्स व भाऊ दाजी लाड यांचे संकलित नाणेसंचय विकत घेतले. त्यांचे स्वत:चे संकलन सत्तावीस हजार नाण्यांपेक्षा जास्त असून ते तत्कालीन ब्रिटिश साम्राज्यातील सर्वोत्कृष्ट खासगी संकलन मानले गेले. त्यांनी १८८८ साली या नाण्यांचा कॅटलॉग प्रकाशित केला. त्यांनी 'Indo-Portuguese Numismatis' हा ग्रंथही प्रकाशित केला.

या सर्व कार्याबद्दल त्यांना अनेक पुरस्कार व सन्मान मिळाले. ते मुंबईतील वैद्यकशास्त्राशी संबंधित असलेल्या अनेक संस्थांशी संलग्न होते. त्यांना गोव्यातील Instituto Vasco da Gama (1871) आणि Bombay Branch of Royal Asiatic Society (1873) यांचे सन्माननीय सदस्यत्व बहाल केले गेले. त्यांनी मुंबईतील Asiatic Society व Anthropological Society यांचे अध्यक्षपदही भूषविले होते. त्यांना १८७७ व १८९९ साली अनुक्रमे फ्लॉरेन्स आणि रोम येथे भरलेल्या 'Congress of Orientalists' मध्ये सन्मानित करण्यात आले. १८७७ साली त्यांनी, त्यांना उपलब्ध असलेल्या स्कंदपुराणातील सह्याद्री खंडाच्या पोथ्यांचे संकलन - संपादन करून 'The Sahyadri-Khanda of the Skanda Purane : a Mythological Historical & Geographical Account of Western India' हा ग्रंथ प्रकाशित केला. एक आघाडीचे प्राच्यविद्याकार म्हणून त्यांचा गौरव करण्यात आला. प्राच्यविद्येत अतुलनीय योगदान देणाऱ्या या विद्वानाचे गोव्यात देहावसान झाले.

– प्राची चौधरी

## दाते, यशवंत रामकृष्ण

**कोशकार**

**जन्मदिनांक अनुपलब्ध – २१ मार्च १९७३**

यशवंत रामकृष्ण दाते यांचा जन्म रत्नागिरीतील किन्हळ गावात झाला. बी.ए. व कायद्याची पदवी घेऊन १९१९मध्ये ज्ञानकोशकार केतकरांच्या ज्ञानकोश मंडळात काम करण्यासाठी ते पुण्यात आले. विद्यासेवक मासिकाचे संपादन, स्थानिक शिक्षणासाठी सरस्वती मंदिरची स्थापना अशी कार्येही त्यांनी ज्ञानकोशाचे काम सांभाळून केली. ज्ञानकोश मंडळाने मराठीचा शब्दकोश तयार करावा अशी अनेकांची इच्छा होती, पण मंडळाला हे शक्य नसल्याने दातेंनी हे काम मनावर घेऊन शब्दकोशनिर्मितीसाठी अन्य संपादकांसोबत स्वतंत्र संस्था स्थापन केली.

या कोशाबद्दलची त्यांची आस्था आणि कळकळ प्रत्येक खंडासाठी लिहिलेल्या प्रस्तावनेमधून दिसून येते. आधुनिक कोशशास्त्राप्रमाणे कोश तयार करायचे म्हटले, तर हे काम अनेक दशके चालले असते. पण तेवढा वेळ, तेवढे अर्थसाह्य आणि तेवढ्या संख्येने भाषाशास्त्रज्ञ उपलब्ध नसल्याने कमीत कमी वेळात जास्तीत जास्त काम करून हा कोश बनवण्याचे आव्हान होते. केवळ प्रमाण भाषेतील रूपांवर समाधान न मानता, संपूर्ण भारतात जिथे-जिथे मराठी भाषा बोलली जाते, त्या-त्या ठिकाणच्या बोलींतील शब्दसंग्रह जमवून तो कोशात समाविष्ट करायचा, असा त्यांचा आग्रह होता. कोशासाठी विचारात घेतले गेलेले साहित्य आणि बोली यांचा पसारा प्रचंड मोठा असूनही कोशाचा पहिला खंड त्यांनी कर्वे यांच्यासोबत केवळ चार वर्षांमध्ये प्रसिद्ध केला. १९३२-१९३८ या काळात सात खंडांचा महाराष्ट्र शब्दकोश प्रसिद्ध झाला. या कोशांच्या अभ्यासपूर्ण प्रस्तावना महाराष्ट्र भाषाभ्यास (१९३८) यात दात्यांनी संगृहीत केल्या. कोशाचा पुरवणी खंड १९५० मध्ये प्रसिद्ध झाला.

याव्यतिरिक्त या द्वयीने 'सुलभ विश्वकोश' (६ भाग, १९४९-१९५१), 'महाराष्ट्र वाक्संप्रदाय कोश' (२ खंड,

१९४२, १९४७) आणि ‘शास्त्रीय परिभाषा कोश’ (१९४८) हे प्रसिद्ध केले. दाते यांनी रा.त्र्यं. देशमुख यांच्या सहकार्याने ‘महाराष्ट्रीय वाङ्मयसूचि’ (१९१९) तयार केली. कर्वेसमवेत ‘डॉ. केतकरांचे सान्निध्य’ (१९४६) हे केतकरांचे लघुचरित्रही त्यांनी लिहिले आहे. ‘पिता-पुत्र संबंध’ (१९४३) या नावाचे सामाजिक लेखनही त्यांनी केले.

सोलापूर येथे भरलेल्या मुद्रकसंमेलनाचे ते अध्यक्ष होते. भाषाशास्त्रातील विद्वत्तेमुळे भारतीय राज्यघटनेचे हिंदी व मराठी अनुवाद करण्यासाठी नेमलेल्या समित्यांचे सभासद तसेच महाराष्ट्र शासनाच्या भाषा सल्लागार मंडळाचे अध्यक्ष म्हणून त्यांनी काम सांभाळले. त्यांचे पुणे येथे निधन झाले. कोशनिर्मितीचे महत्त्व जाणून, जुन्या व आधुनिक पद्धतींची योग्य सांगड घालून मराठी भाषेचा एक उत्तम कोश निर्माण केल्याबद्दल त्यांचे नाव नेहमीच आदराने घेतले जाते.

— ऋता पराडकर

## दाते, शंकर गणेश

**मराठीतील लोककथासंग्राहक, मराठी-ग्रंथ-सूचिकार व संशोधक**

**१९०५ — मृत्युदिनांक अनुपलब्ध**

शंकर गणेश दाते यांचा जन्म रत्नागिरी येथे झाला. मुंबई येथे बी.ए.पर्यंत त्यांचे शिक्षण झाले. मराठीत लोककथा, लोकगीते, लोकभ्रम, म्हणी, बाळखेळ इत्यादी लोकवाङ्मय शास्त्रीय पद्धतीने संपादून पुस्तकरूपाने प्रसिद्ध करण्यास त्यांनीच प्रथम सुरुवात केली व १९२९-३० मध्ये त्याचे दोन स्वतंत्र भाग प्रसिद्ध केले. यानंतर त्यांनी मराठी ग्रंथसूची तयार करण्यास सुरुवात केली. त्यांच्यापूर्वी डॉ. श्री.व्यं. केतकर यांनी य.रा. दाते व रा.त्र्यं. देशमुख यांच्याकडून ‘महाराष्ट्रीय वाङ्मयसूची’ करवून महाराष्ट्रीय ज्ञानकोशमंडळ लि.तर्फे १९१९मध्ये प्रसिद्ध केली होती. त्यानंतर १९४४ साली यांचा ग्रंथ प्रसिद्ध झाला. यांच्या ग्रंथात स. १८००-१९३७ या कालावधीमध्ये प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांचा समावेश आहेत. या सूचीच्या प्रथम खंडात दशांश वर्गीकरण पद्धतीने ग्रंथ विषयवार लावून प्रत्येक पुस्तकाची माहिती, ग्रंथकार, ग्रंथनाम, आवृत्ती, प्रकाशनस्थळ, प्रकाशक, मुद्रणालय, मुद्रणस्थळ, प्रकाशनकाल, पृष्ठे, आकार, चित्रे, मालाक्रमांक, मूल्य व टिप्पणी या क्रमाने दिली आहे. द्वितीय खंडात ग्रंथकार, ग्रंथनामे, विषय, अप्रत्यक्ष संदर्भ हे सर्व वर्णानुक्रमाने दिले असून ग्रंथकाराच्या नावापुढे जन्म-मृत्यूचे सालही नोंदण्याचा प्रयत्न केला असून त्यांच्यासंबंधीचे एकंदर मुद्रित वाङ्मय एकत्र दिसेल, असे दर्शित केले आहे.

त्यांच्या या ग्रंथाने मराठी वाङ्मयाचा अभ्यास करणाऱ्यांची उत्कृष्ट सोय झाली आहे. १९३७ सालापर्यंत मराठीत कोणत्याही विषयावर काय वाङ्मय प्रसिद्ध झाले आहे, याची त्यांच्या ग्रंथावरून तपशीलवार माहिती मिळते आणि अभ्यासकाला झालेले कार्य लक्षात घेऊन त्यापुढे कार्य करण्याची सूचना मिळते. त्यांच्यात संशोधनाची दृष्टी उपजत होती व रेखीव काम करण्याकडे त्यांचा कल होता.

— संपादित

**संदर्भ :**

*१. अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*

## दामले, मोरो केशव

**मराठीचे व्याकरणकार**

**१८६८ — १९१३**



मोरो केशव दामले हे कवी केशवसुतांचे बंधू. १८९३ साली इतिहास व तत्त्वज्ञान हे विषय घेऊन मुंबई विद्यापीठातून एम.ए. झाले. पुढे १८९४ ते १९०७पर्यंत उज्जैनच्या माधव कॉलेजात ते लॉजिक व फिलॉसॉफी या विषयांचे प्राध्यापक होते. १९११मध्ये त्यांनी ‘शास्त्रीय मराठी व्याकरण’ हा अत्यंत महत्त्वाचा ग्रंथ लिहिला. हा

ग्रंथ ९९० पानांचा असून मराठी व्याकरणाची शास्त्रीय पद्धतीने रचना करण्याच्या उद्देशाने लिहिला आहे. पूर्ववैय्याकरणांच्या कृतीचे यात परीक्षण केलेले आहे. इतिहास संशोधक वि.का. राजवाडे यांनी या पुस्तकावर परीक्षणात्मक, सूचनात्मक व संशोधनात्मक असा एक निबंध लिहिला आहे.

'बर्ककृत आधुनिक असंतोष', 'विचारपरिभ्रमण', 'शुद्धलेखन व सुधारणा' हे त्यांचे तीन निबंध 'ग्रंथमाला' मासिकातून प्रसिद्ध झाले. त्यांनी न्यायशास्त्रावरही एक पुस्तक लिहिले असून ते गायकवाड सरकारने दोन भागात प्रसिद्ध केले. माधव कॉलेज बंद पडल्यामुळे नागपूरच्या सरकारी सिटी हायस्कूलमध्ये त्यांची नेमणूक झाली. परंतु १९१३च्या मे महिन्यात मोरो केशव दामले नागपूरहून पुण्यास येत असताना रेल्वे अपघातामध्ये त्यांचे निधन झाले.

— संपादित

**संदर्भ :**

*१. अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव, सिद्धेश्वरशास्त्री.*

द

## दिवेकर, हरी रामचंद्र

**स्त्रीशिक्षणाचे पुरस्कर्ते, संस्कृत लेखक**

**५ नोव्हेंबर १८८४ – १८ मार्च १९७५**



हरी रामचंद्र दिवेकर उर्फ डॉ. दादासाहेब दिवेकर भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्थेचे संस्थापक सदस्य होते. १९१५-१६ सालच्या आनंदाश्रमात संस्था स्थापनेसंबंधी ज्या बैठका झाल्या, त्यात त्यांचा प्रामुख्याने भाग होता. त्यांच्या विद्वत्तेचा, चाहत्या शिष्यांचा पसारा ग्वाल्हेरमध्ये जरी होता, तरी त्यांचे कार्यकर्तृत्व पुण्यात अधिक उजळले गेले. १८ मार्च १९७६ रोजी दादांची पहिली पुण्यतिथी. त्या दिवशी पुण्यात मित्रमंडळ कार्यालयात डॉ. दांडेकर-आचार्य लिमये संपादित 'डॉ. ह.रा. दिवेकर: चरित्र आणि लेखन' ग्रंथाचे प्रकाशन वयोवृद्ध संशोधक डॉ. प.ल. वैद्य यांच्या हस्ते झाले.

दिवेकर घराणे मूळचे कोकणातले. हरी रामचंद्र दिवेकर यांचे आजोबा पांडुरंग रावजी दिवेकर कोल्हापुरात एक मराठी शाळा चालवत होते. न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे हे त्यांचे आवडते विद्यार्थी. १८५४मध्ये ते ग्वाल्हेरच्या युवराजांना शिकविण्यासाठी मध्य प्रदेशात गेले. पांडुरंग यांना दोन पुत्र. मोठा काशिनाथ व धाकटा रामचंद्र. रामचंद्र यांना व्यायामाचा आणि शिक्षकी पेशाचा खूप नाद. लहानपणापासून हरी यांना विहिरीत पोहण्याची आणि दंड-बैठका मारण्याची सक्ती होती. त्यांच्या एकसष्टीच्या वेळी त्यांनी मल्लखांबांची प्रात्यक्षिके करून त्यांची पैलवानी वृत्ती दाखविली.

रामरावजी हरी यांना पहाटे उठवून आकाशातले तारे, पूर्वेवरचा सूर्य, धो-धो पडणारा पाऊस असे पाहायला पाठवीत. कडाक्याची थंडी, डोळ्यांवरची झोप सर्व विसरून धाकाने हरी यांना ते ऐकावे लागे. त्यांची आई राधाबाई बडोदे संस्थानातील केशवराव कोल्हटकरांची कन्या. केशवराव सयाजीरावांच्या खासगी सेवेत होते. लग्नानंतर त्या ग्वाल्हेरला आल्या. पतीच्या गैरहजेरीत शेजारणींना जमवून राधाबाई पोथीवाचन करीत. पत्नीचे व्रत पाहून रामरावांना समाधान वाटले. हरी यांच्यावर आईचे प्राचीन संस्कार झाले. त्यांचा माध्यमिकपर्यंतचा अभ्यास घरीच झाला. त्यांची पाठांतरशक्ती चांगली होती. संस्कृतची गोडी बालपणापासूनच, त्यामुळे गुरुजींकडून शिकल्यावर उपनयनानंतर (९व्या वर्षी) देवपूजा, रुद्रपाठ, पुरुषसूक्त ते स्पष्टपणे म्हणत. पुण्यात आल्यावर ते गीताईची शिबिरे घेऊ लागले. अनेक स्त्री-पुरुषांना त्याचा लाभ झाला.

हरी यांचे आई-वडिलांवर खूप प्रेम होते. पुढे आई खूप आजारी झाल्या. मृत्युशय्येवरच्या मातेच्या इच्छेनुसार सोळाव्या वर्षी इ.स. १९००मध्ये त्यांनी लग्न केले. ग्वाल्हेरचे आगाशे यांची कन्या 'कुशी' हरिभाऊंची 'लक्ष्मी' झाली. हरी यांना दोन बहिणी आणि एक लहान

काळात ते गंगानाथ झा यांच्या हाताखाली साहाय्यक म्हणून काम करीत होते. कर्वे अनाथाश्रमाच्या पार्वतीबाई आठवले यांचा परिचय झाल्यावर त्यांनी पुण्याला येण्याचे ठरवले. आपल्या बहिणीला - कृष्णाबाई (विधवा) यांना आश्रमात दाखल केले. आता त्यांना पुण्यात येऊन महर्षी कर्वे यांच्याबरोबर काम करावेसे वाटले.

१९१६ साली हिंगण्यास येऊन कर्वे यांना 'महिला विद्यापीठ' स्थापन करण्यास हरी यांनी मदत केली. स्थिरस्थावर झाल्यावर त्यांनी पत्नीला व मुलाला पुण्यात वास्तव्यासाठी आणले. गोदुताई केतकर आणि त्यांच्या पाच भगिनी त्यांच्या कन्या झाल्या. त्यात डॉ. चंपावती वासुदेव केतकर यांनी १९७६ साली दादांच्या स्मृतिग्रंथात त्यांचे समग्र जीवनदर्शन घडवले. अण्णासाहेब कर्वे यांना हरी यांचा सल्ला खूप मोलाचा वाटू लागला. १९१६ साली आनंदाश्रमात भांडारकर संस्था स्थापन करण्याचा ठराव झाला. त्यात ह.रा. दिवेकरांचा मोठा वाटा होता. भांडारकरांनी तर त्यांना घरी येऊन पुस्तके वापरण्याची परवानगी दिली होती. यातूनच त्यांचे संस्कृत काव्य-नाटकावर प्रेम वाढले. संशोधनात्मक लेखन सुरू झाले. फ्रान्सचे पंडित डॉ. सिल्वँ लेवीनी त्यांना फ्रान्सला बोलावले. संस्कृत अलंकारशास्त्रावर अभ्यास करण्यासाठी ते पॅरिसला गेले. तत्पूर्वी फ्रेंच भाषा शिकले. १९२७ साली कर्वे संस्थेत मतभेद सुरू झाले. हरी दिवेकर यांना ही दुही असह्य झाली. त्यामुळे हिंगण्याची सेवा सोडून ते पॅरिसला कर्ज काढून गेले. ते हिंगणे संस्थेत १९१६-१९३१ अशी १५ वर्षे होते. डी.लिट्. साहित्याचार्य हरी यांना ग्वाल्हेर संस्थानचे तत्कालीन शिक्षणमंत्री रावसाहेब मुळे यांना ग्वाल्हेरला बोलावून घेतले. त्यांनी स्त्रियांसाठी स्वतंत्र शाळा स्थापन केली.

वयाच्या साठाव्या वर्षी ते निवृत्त झाले. समाजकार्य म्हणून १९३१मध्ये त्यांनी शरद व्याख्यानमाला सुरू केली. अच्युतानंद व्यायाम शाळेला ऊर्जितावस्था आणली. वाईकर मठात वाद माजले होते. ते मिटवून त्यांनी ती संस्था पुढे आणली. मध्यमवर्गीय लहान मुलांसाठी लोकमान्य बालशाळा सुरू केली. आज ती गाजते आहे. १९४५ ते ६६ या काळात त्यांनी पंधरा विद्यार्थ्यांना पीएच.डी.साठी मार्गदर्शन केले.

हरी यांना आचार्य विनोबा भावे यांच्या भूदान चळवळीत रस वाटला. त्यांनी चंबळ खोऱ्यातील दस्यू बांधवांचा अभ्यास केला. विनोबांच्या सांगण्यावरून त्यांच्या सुधारणेसाठी ते कारागृहात वास्तव्याला गेले.

'आमचा महाभारतपूर्व इतिहास', 'हिंदी वाङ्मयाचा इतिहास', 'ऋग्वेद सूक्त विकास', 'केशवपन पद्धतीवरील भाष्य', 'कौशिक सूत्र' (दारीळा भाष्य) अशी एकूण वीस पुस्तके त्यांनी लिहिली. एकूण तेवीस संशोधनात्मक इंग्लिश लेख, तर ११५ संस्कृत-मराठी लेख त्यांनी वयाच्या उतरत्या काळात लिहिले. १९७५मध्ये ते बडोद्याला गेले. उतारवयात पुत्रशोकाचा धक्का त्यांना सहन करावा लागला. अखेर वयाच्या ९१व्या वर्षी पुण्यात १८ मार्च १९७५ रोजी हा ज्ञानदीप मालवला.

– वा.ल. मंजूळ

द

## दिवेकर, रंगराव रामराव

**कानडीतील लेखक, स्वातंत्र्यसेनानी**

**जन्म व मृत्युदिनांक अनुपलब्ध**

रंगराव रामराव दिवेकर हे हुबळीचे माध्व वैष्णव ब्राह्मण समाजातील होत. बी.ए. झाल्यावर काही काळ हुबळीच्या कर्नाटक एज्युकेशन सोसायटी हायस्कूलमध्ये शिक्षक म्हणून नोकरी केली. एम.ए. झाल्यावर कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजात ते इंग्रजीचे प्राध्यापक झाले. एल.एल.बी. होते तरी त्यांनी वकिली कधीच केली नाही. असहकारिता चळवळीत ते सुरुवातीपासूनच अग्रेसर होते. यासाठी १९२१साली त्यांना पहिली शिक्षा झाली त्यानंतरही या कार्यासाठी ते अनेक वेळा तुरुंगात गेले. अत्यंत साधी राहणी, संग्राहक वृत्ती आणि कष्टाळू स्वभाव यामुळे यांना लोक 'कर्नाटक गांधी' असे म्हणत.

कानडी, इंग्रजी, हिंदी व मराठी या भाषा त्यांना चांगल्या येत. त्यांनी कानडी भाषेची मनोभावे सेवा केली. 'संयुक्त कर्नाटक' या दैनिक पत्राच्या संस्थेची

संस्थापना करून, तिचे विश्वस्त झाले. त्या संस्थेतर्फे ‘कर्मवीर’ हे कानडी साप्ताहिकही निघत असे. त्यांचे कानडी भाषेतील लेखन अत्यंत लोकप्रिय आहे. राष्ट्रीय वृत्ती आणि भक्तिमार्गी आध्यात्मिकता या गोष्टींच्या यांच्या ग्रंथातील सुंदर मिलाफामुळे त्यांना लोकप्रियता लाभली. छोटी वाक्ये आणि ठसठसीत प्रतिपादन हा दिवेकरांच्या लेखनाचे मुख्य वैशिष्ट्य आहे. कानडी भाषेच्या विशेष सेवेमुळे यांना बल्लारी कर्नाटक साहित्य परिषदेचे अध्यक्षस्थान देण्यात आले होते. हे कर्नाटक-एकीकरण चळवळीचेही फार मोठे पुरस्कर्ते होते.

त्यांनी लिहिलेले कानडी ग्रंथ असे आहेत. -१. हरिभक्तिसुधे, २. उपनिषद कथावली, ३. कर्मयोग, ४. उपनिषद्‌कथावली, ५. उपनिषद् प्रकाश, ६. अन्तरात्मनिगे, ७. गीतेय गुट्टु (गीतेचे मर्म), ८. भक्तिसूत्रगळु (नारद व शांडिल्य या सूत्रांवरील टीका), ९. सत्याग्रह (इतिहास मत्तु तंत्र), १०. राष्ट्रीय शिक्षण (वर्धायोजना मत्तु प्रौढर शिक्षण), ११. वचनशास्त्र (लिंगायत धर्मग्रंथावर).

– संपादित

**संदर्भ :**

*१. अर्वाचीन चरित्रकोश; चित्राव, सिद्धेश्वरशास्त्री.*

## दीक्षित, काशीनाथपंत ना.

**लेखक, संशोधक**

**१८८९ - १९४६**

केंद्र सरकारच्या पुरातत्त्व खात्यात प्रशिक्षित विद्यार्थी म्हणून काशीनाथपंत दीक्षित रुजू झाले. मोहेंजोदारो उत्खननात त्यांचा सहभाग होता. कालांतराने त्यांची अधिकारी म्हणून नेमणूक झाली व १९३७-४४ मध्ये ते महासंचालक होते. त्यांनी सिंध प्रांतात सर्वेक्षण करून सिंधू संस्कृतीची काही स्थळे शोधून काढली होती. पुढे कोलकाताला अधीक्षक असताना त्यांनी पहारपूर (आता बंगलादेश) येथे मोठ्या प्रमाणावर उत्खनन केले. तेथील स्तूप आणि विहार व बौद्धकला यांवरचा त्यांचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. ते महानिदेशक असतानाचा काळ अत्यंत कठीण होता. कारण त्या वेळी दुसरे महायुद्ध सुरू होते. त्यामुळे त्यांच्या खात्यातील काही मंडळी युद्धावर गेली होती. शिवाय त्यांच्या खात्यावरचा खर्च खूप कमी केला होता. त्यामुळे संशोधन, उत्खनन आणि वास्तूंचे विशेष संवर्धन होणे अशक्य होते. तेव्हा टीकाकारांचे फावले आणि त्याचा परिणाम म्हणून त्यावेळी जगभर प्रसिद्ध असलेले पुरातत्त्व लिओनार्ड वूली यांची भारत सरकारने पुरातत्त्वतज्ज्ञ खात्याची चौकशी करण्यासाठी नेमणूक केली.

टीकाकार तेच आणि चौकशी तेच करणार, तेव्हा वूली यांचा वृत्तान्त घणाघाती होता, पण आपले काम कुठल्याही प्रकारे कमी दर्जाचे नाही हे सिद्ध करण्यासाठी दीक्षितांनी त्याआधीच १९३८मध्ये उत्तर प्रदेशात अहिच्छत्रा येथे मोठ्या प्रमाणावर उत्खनन सुरू केले होते. त्याचा वृत्तान्तही त्यांनी सविस्तर प्रसिद्ध केला होता. परंतु त्याचा काही उपयोग झाला नाही.

दीक्षितांचा बौद्ध कलेचा विशेष अभ्यास होता. त्यांनी मुंबईजवळील सोपारा उत्खननात सापडलेल्या मानुषी बुद्धांच्या मूर्तींचा योग्य तो कालनिर्णय केला. तो आजही विद्वन्मान्य आहे. त्या मूर्ती ८व्या-९व्या शतकांतील असून त्या पूर्व भारतातील पाल राजांच्या कारकिर्दीत तयार केल्या होत्या व तेथून त्या महाराष्ट्रात आणल्या होत्या, हे त्यांनी सप्रमाण सिद्ध केले.

त्यांची सारी कारकिर्द उत्तर आणि पूर्व भारतात गेल्यामुळे महाराष्ट्रात त्यांच्याबद्दल फारशी माहिती नाही.

– डॉ. म. के. ढवळीकर

## दीक्षित, शंकर बाळकृष्ण

**गणितज्योतिषाचे अभ्यासक व ग्रंथलेखक**

**२४ जुलै १८५३ – २७ एप्रिल १८९८**

शंकर बाळकृण दीक्षित यांचा जन्म दापोली तालुक्यातील मुरूड गावी झाला व तेथेच प्राथमिक मराठी शिक्षण झाले. त्या वेळी संस्कृत व वेद यांचेही बेताचे शिक्षण त्यांनी घेतले. पुढे दोन वर्षे दापोली कोर्टात उमेदवारी करण्यात व इंग्लिश शिकण्यात गेली.



सन १८७०पासून तीन वर्षे हे पुणे ट्रेनिंग कॉलेजात होते. पुढे हे मॅट्रिक झाले (१८७४). नंतर रेवदंडा, ठाणे, बार्शी, धुळे येथे शाळेमध्ये व ट्रेनिंग कॉलेजमध्ये काम केल्यावर शेवटची चार वर्षे यांनी पुण्याच्या ट्रेनिंग कॉलेजमध्ये काढली. त्यांना पहिल्यापासून गणित विषयाची आवड होती. परंतु ज्योतिषाचा नाद लागण्यास वर्तमानपत्रातील लेखांचे वाचन कारणीभूत झाले. रेवदंड्याला असताना कै. विसाजी कृष्ण लेले यांचे 'स्फुट वक्ता अभियोगी' या सहीने सायनवादावर वर्तमानपत्रात लेख येत असत. ते वाचून शंकर दीक्षित यांचे लक्ष ज्योतिषाकडे वेधले गेले.

पुढे ठाण्याला जर्नादन बाळाजी मोडक यांच्याशी स्नेह झाल्याने यांचा ज्योतिषाचा अभ्यास वाढला. शेवटी तर ते मोडक यांना आपले गुरू मानू लागले. लेल्यांप्रमाणे सायनवादी बनून या तिघांनी सायनपंचांग प्रसिद्ध करण्याचा उपक्रम केला तो यांनी १०-१२ वर्षे चालवला, पण तो त्यांच्या पश्चात बंद पडला.

डॉ. फ्लीट यांनी आपल्या 'गुप्त इनस्क्रिप्शन्स' या ग्रंथात 'यांची मदत नसती, तर मला गुप्तांचा शककाल निश्चित करता आलाच नसता'; अशी स्पष्ट कबुली दिली आहे. त्याचप्रमाणे 'इंडियन कॅलेंडर' या ग्रंथाची योजना ठरवून त्याचे गणित पुरे करण्यापर्यंत सुएलने मजल गाठली असता त्यांची व यांची भेट झाली. त्याबरोबर मेष संक्रांतीचे व इतर काही आकडे देऊन सदर ग्रंथाची उपयुक्तता वाढवण्याची युक्ती दीक्षितांनी दाखवली व ती सुएललाही इतकी महत्त्वाची वाटली की, 'तो भाग दीक्षितांनी तयार करावा व ग्रंथ दोघांच्याही नावाने प्रकाशित व्हावा' असे ठरले. या ग्रंथाच्या प्रास्ताविक भागात बहुतेक टीपा S.B.D. या त्यांच्या सहीच्या आहेत. त्यातील काही माहिती अगदी नवी व प्रचलित विचारांना धक्का देणारी होती. ती माहिती यांनी निर्भयपणे नमूद केली आहे.

'भारतीय ज्योतिषशास्त्र', या ग्रंथाच्या प्रस्तावनेत हे लिहितात- 'आमच्यातील काहीकाही विद्वानांनादेखील युरोपियनांचे वाक्य म्हटले की, ते कसेही असले तरी वेदवाक्य वाटते. ही गोष्ट स्वतःच्या योग्यतेचा भरवसा व विद्वत्तेची खात्री नाही, असे दाखवणारी आहे.'

'भारतीय ज्योतिषशास्त्र' हा त्यांचा मराठी भाषेतील ग्रंथ अत्यंत उच्च दर्जाचा ग्रंथ आहे. वैदिक कालापासून त्यांच्या वेळेपर्यंतच्या अनेक भारतीय ग्रंथांतून आढळणारी ज्योतिषविषयक माहिती एकत्र करून तिच्यावरून निघणारी अनुमाने या ग्रंथात ऐतिहासिक पद्धतीने आणि अत्यंत थोडक्यात मांडलेली आढळतात. याकरता यांनी पाचशेपेक्षा अधिक संस्कृत ग्रंथांचे बारकाईने वाचन केले. शेकडो दुर्बोध स्थळे सुबोध केली. आर्यभट्ट, वराहमिहिर, ब्रह्मगुप्त, भास्कराचार्य वगैरे ग्रंथकारांचा परिचय करून घेण्याचे सुलभ साधन मराठीत निर्माण केले.



पंचांगशोधनविषयक माहिती व पक्षोपक्षांचे मुद्दे या ग्रंथात संग्रहित केले. तसे करताना १. सायन पंचांगाची ग्राह्यता, २. वेदांचे प्राचीनत्व, ३. ज्योतिषशास्त्रातील गणित भागाचे भारतीयत्व, इत्यादी आपली मतेही नमूद केली. यांपैकी दुसऱ्या व तिसऱ्या विषयांचे प्रतिपादन करताना त्यांना युरोपियनांचे सिद्धान्तवत मानलेले अभिप्राय कसे चुकीचे आहेत, हे दाखवावे लागले आणि 'कृत्तिका पूर्व दिशेस उगवतात, तेथून त्या चळत नाहीत.' या अर्थाच्या शतपथ ब्राह्मणातील उताऱ्यावरून इ.स.पूर्व दोन हजार वर्षे; हा जो त्या ग्रंथाचा काल त्यांनी ठरवला, तो कसा खोडावा हे युरोपियनांना कोडे पडले. तसेच 'ग्रीक ज्योतिषांची मूळतत्त्वे हिंदुस्थानात आली' या थिबोच्या मताचे त्यात कोठेही साम्य नसल्याचे दाखवून यांनी खंडन केले. (भा. ज्यो. पा. ५१३). 'टॉलेमीपासून हिंदूंना ज्योतिषांचे सर्वस्व मिळाले.' या बर्जेसच्या प्रतिपादनाचे खंडन करताना 'टॉलेमीपूर्वीच्या वासिष्ठ सिद्धान्तात अंशांचे साठ भाग' सापडतात हे दाखवून दिवसाचे ६० विभाग ही कल्पना टॉलेमीने आमच्यापासून

घेतल्याचे त्यांनी दाखवून दिले.

ज्योतिषविषयक प्रश्नांच्या वादात ते अधिकारयुक्त वाणीने बोलू शकत, कारण यांनी पाश्चात्त्य व पौर्वात्य दोन्ही ग्रंथांचे परिशीलन व मनन करून तो अधिकार प्राप्त केला होता. हे सव्यसाचित्व यांच्या विद्वत्तेचे अंग होते.

सायन-निरयन वादावरून त्यांचे लक्ष ज्योतिषाकडे गेल्यावर ज्योतिषाचा प्राचीन काळाचा शोध करण्यास त्यांनी आरंभ केला. इतक्यात ज्योतिषाच्या इतिहासावर ग्रंथ लिहिण्यास बक्षीस अशी जाहिरात 'दक्षिणा प्राइज कमेटी'ने दिली. त्यामुळे त्यांनी ग्रंथ लिहिण्यास सुरुवात केली. याच सुमारास अशाच प्रकारच्या ग्रंथास गायकवाड सरकारनेदेखील बक्षीस लावले होते. गायकवाड सरकारास हिंदू पंचांगाचे पुस्तक पाहिजे होते. यासंबंधीची माहितीही पुस्तकात समाविष्ट केली असल्यामुळे त्यांना ही बक्षिसे मिळाली.

त्यांच्या या ग्रंथांची योग्यता फार मोठी आहे. ज्याच्या अभ्यासाकरता अन्य देशांतील लोकांनाही मराठी ज्ञान मिळवण्याची स्फूर्ती उत्पन्न व्हावी अशा योग्यतेचा त्यांचा हा ग्रंथ आहे. वैदिक वाङ्मयाच्या समावेशाची परिपूर्णता, वेदाङ्गकालीन ज्योतिषाचे विवेचन व इतर विद्वानांना कुंठित करणाऱ्या गूढ गोष्टींचा उलगडा, यांमुळे यांच्या या ग्रंथास विद्वानांची मान्यता मिळाली आहे. परिपूर्णता आणि उपयुक्तता हा त्यांच्या ग्रंथांचा विषय आहे.

पाश्चात्त्य व पौर्वात्य या ज्ञानाच्या दोन्ही शाखांत मिळवलेल्या प्रावीण्यामुळे यांच्या बारीकसारीक ग्रंथालाही एक प्रकारचे वजन प्राप्त होई.

त्यांचे ग्रंथ - ज्योतिषशास्त्र - १. ज्योतिर्विलास २. हिंदुपंचांग, ३. भारतीय ज्योति:शास्त्र अथवा भारतीय ज्योतिषाचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास (पहिली आवृत्ती सन १८९६, दुसरी आवृत्ती सन १९३१). ४. धर्ममीमांसा (१-२ भाग, १८९५ मॅक्स मूलरच्या पुस्तकाचे भाषांतर). भूगोल ५. भारतभूवर्णन (भाषांतर १८९९), ६. विद्यार्थिबुद्धिवर्धिनी (शालेय), ८. सोप्रत्तिक अंकगणित (शालेय), ९. चमत्कार (शालेय)

— संपादक मंडळ

**संदर्भ :**

*१. अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*

## देगलूरकर, गोरक्ष बंडामहाराज
**मूर्तिशास्त्रज्ञ, मंदिरस्थापत्य तज्ज्ञ, संशोधक**
**१० सप्टेंबर १९३३**



दगडधोंड्याच्या महाराष्ट्रामध्ये कलाकारांनी वेरूळ-अजिंठासारख्या लेणी व अंबरनाथ-खिद्रापूर येथे उभारलेल्या मंदिर स्थापत्यासारख्या अनेक कलाकृती निर्माण केल्या. मध्ययुगीन कालखंडात परकीय आक्रमकांनी उद्ध्वस्त केलेला हा ठेवा यथायोग्य रितीने अभ्यासणाऱ्या संशोधकांमध्ये डॉ. गोरक्ष बंडामहाराज देगलूरकर यांचे नाव अग्रभागी असलेले दिसते. मराठवाड्यातील हिप्परगा, ता. लोहारा, जि. लातूर येथे जन्म झालेल्या डॉ. देगलूरकरांच्या जीवनात भक्ती आणि ज्ञान यांचा परस्पर मेळ झालेला दिसतो. पैतृक घराण्यातून वारकरी म्हणजेच भागवत भक्तीचा मिळालेला वारसा तसेच मातुल घराणे म्हणजेच पेशवाईतील साडेतीन शहाण्यांपैकी एक असलेल्या सखारामपंत बोकिलांच्या घराण्यातून मिळालेल्या ज्ञानाचा वारसा यांद्वारे त्यांचे व्यक्तिमत्त्व फुललेले दिसते.

प्रारंभिक शिक्षण हैदराबाद येथे झाल्यावर उच्च शिक्षणासाठी ते पुण्यात स.प. महाविद्यालयात दाखल झाले. इतिहासातील पदव्युत्तर शिक्षण त्यांनी हैदराबाद येथील उस्मानिया विद्यापीठातून (सन १९५९) घेतल्यानंतर पुणे स्थित डेक्कन महाविद्यालयामधून 'मराठवाड्याचा सांस्कृतिक इतिहास' या विषयात त्यांनी पीएच.डी. पूर्ण केली. मराठवाड्याच्या इतिहासाबरोबरच

तिथल्या मूर्तींचा, मंदिरांचा, प्राचीन ग्रंथांचा आणि शिलालेखांचा अभ्यास करून मराठवाड्याची संस्कृती म्हणजेच प्राचीन महाराष्ट्राची संस्कृती होय, हा सिद्धान्त त्यांनी मांडला.

१९५९पासून १९६८पर्यंत त्यांनी औरंगाबाद येथील शासकीय महाविद्यालयात तर, १९६८पासून १९८०पर्यंत नागपूर विद्यापीठातील 'प्राचीन भारतीय इतिहास, संस्कृती व पुरातत्त्व' या विभागात अधिव्याख्याता म्हणून काम केले. डॉ. शां.भा. देव हे त्यांचे पीएच.डी.चे मार्गदर्शक तर होतेच, परंतु नागपूर विद्यापीठात तर ते त्यांच्या विभागाचे प्रमुखच होते. त्यांच्याच सल्ल्याने त्यांनी मूर्तिशास्त्र आणि मंदिरस्थापत्य या विषयांत अध्यापनाचे कार्य सुरू केले. कालांतराने हेच दोन विषय त्यांच्या जीवनाचे अविभाज्य घटकच बनले. याच ध्यासातून त्यांचा 'Temple Architecture and Sculptures of Maharashtra' हा बृहद्ग्रंथ निर्माण झाला. भारतातील इतर प्रांतांतील मंदिरांचा आणि शिल्पांचा अभ्यास करून अनेक ग्रंथ त्यांनी लिहिले. परंतु महाराष्ट्रातील विद्वानांचे या विषयाकडे फारसे लक्ष गेले नव्हते. या ग्रंथाने ही उणीव भरून निघाली. अभ्यासकांमध्ये हा ग्रंथ मान्यता पावलाच परंतु विद्यापीठानेही या ग्रंथावर विद्वत्तेची मोहर उमटवून डॉ. देगलूरकरांना 'डी.लिट.' प्रदान केली. प्राचीन भारतीय इतिहास व पुरातत्त्व या विषयात डी.लिट. मिळविणारे ते महाराष्ट्रातील पहिले अभ्यासक ठरले. याच काळात त्यांनी मराठवाड्यातील बुलढाणा जिल्ह्यातील सातगाव येथील मंदिरावरही 'Medieval Temple of Satgaon' नावाचा ग्रंथ लिहिला.

१९८०च्या सुमारास त्यांच्या अध्यापकीय जीवनात बदल घडला व ते पुण्यातील आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या डेक्कन महाविद्यालयामध्ये प्रपाठक म्हणून रुजू झाले. सन १९९३ साली निवृत्त होईपर्यंत ते तिथे कार्यरत होते. या काळात त्यांनी महाराष्ट्राच्या धार्मिक जीवनात अधिराज्य गाजविणाऱ्या श्रीविठ्ठलाच्या अभ्यासाकडे लक्ष दिले. स्वत:च्या घराण्यात पिढ्यान्‌पिढ्या चालत आलेली विठ्ठल उपासना व भारतीय मूर्तिशास्त्र या विषयात प्रावीण्य संपादन केलेल्या डॉ. देगलूरकरांचे लक्ष महाराष्ट्राच्या समाज जीवनावर प्रभाव असलेल्या विठ्ठलाकडे गेले नसते तरच नवल! याला नैमित्तिक कारण घडले ते म्हणजे डेक्कन महाविद्यालयाने प्रसिद्ध केलेला, फ्रेंच संशोधक फादर दलरी यांचा 'Cult of Vithoba' हा ग्रंथ. याच ग्रंथाचा आधार घेऊन अभ्यासकांनी वीरगळाचा विठ्ठल झाला अशी संकल्पना मांडली. ही संकल्पना योग्य असेल, तर ती मूर्तिशास्त्राच्या आधारे सिद्ध व्हायला हवी.

डॉ. देगलूरकरांनी संशोधनांती असे अनुमान काढले की, पंढरपूर येथील विठ्ठलमूर्ती ही योगस्थानक मूर्ती आहे. योग, भोग, वीर आणि अभिचारक हे मूर्तींचे चार प्रकार असतात. ऐहिक समृद्धी प्राप्त करून देणारी तिरूपती बालाजीची मूर्ती भोगस्थानक, मारुती किंवा महिषासुरमर्दिनीची मूर्ती ही वीरमूर्ती, दोन हाताच्या विठ्ठलाच्या एका हातात शंख तर दुसऱ्या हातात कमळ आहे. गदा व चक्र ही शस्त्रे त्याच्या हातात नाहीत कारण तो योगी आहे. डॉ. देगलूरकरांनी मूर्तिशास्त्राच्या आधारे विठ्ठलाची मूर्ती ही योगस्थानक आहे, असे प्रतिपादन करताना संतश्रेष्ठ ज्ञानेश्वरांच्या 'ऐसा हा योगीराजू, तो विठ्ठल मज उजु' या अभंगाचा दाखला देऊन संतमंडळीही विठ्ठलाला योगी समजत असत असे दाखवून दिले. (Deglurkar G.B., 1990. Iconography of shri Viththala : A Reappraisal, Bulletin of the Deccan College Post-Graduate and Research Institute, Vol. 49, PP.113-116)

डेक्कन महाविद्यालयामध्ये डॉ. देगलूरकरांच्या अभ्यासाला आणखी एक आयाम लाभला तो म्हणजे उत्खननशास्त्राचा. खरे म्हणजे नागपूर विद्यापीठामध्ये असतानाच त्यांनी भोकरदन, मांढळ, माहूरझरी आदी ठिकाणच्या उत्खननांत भाग घेतला होता. त्यांमध्ये सापडलेल्या काही वस्तूंचा तसेच मूर्तींचा अभ्यासही त्यांनी केला. त्यामध्ये भोकरदन येथे सापडलेल्या हस्तिदंती स्त्री प्रतिमेचा, तसेच मांढळ येथे सापडलेल्या

वाकाटककालीन अष्टमूर्ती शिव व सर्वपार्श्वमुख शिव या दोन शिवमूर्तींचा प्रामुख्याने उल्लेख करावा लागेल. डेक्कन महाविद्यालयामध्ये मात्र त्यांनी रायपूर व भागीमहारी या विदर्भातील बृहदाश्मयुगीन स्थळांचे उत्खनन केले. त्यातूनच त्यांचा 'Megalithic Raipur' हा ग्रंथ तयार झाला. या ग्रंथलेखनाच्या अनुषंगाने पुढे त्यांना इंग्लंडमधील ब्रिटिश म्युझिअममधील वस्तूंचा अभ्यास करण्याची संधी मिळाली.

१९९३ मध्ये डेक्कन महाविद्यालयामधून निवृत्त होताना, जीवनभर अभ्यास केलेल्या मूर्तिशास्त्र आणि मंदिरस्थापत्य या विषयांवर आपली मते प्रतिपादन करताना त्यांनी बिंबब्रह्म आणि वास्तुब्रह्म या दोन अभिनव संकल्पना मांडल्या. टी. गोपिनाथराव यांचे 'Elements of Hindu Iconography', जे.एन. बॅनर्जी यांचे 'The Development of Hindu Iconography' यांच्यानंतरचा मूर्तिशास्त्रातील पुढचा टप्पा म्हणजे 'Ultimate in Hindu Iconography' हा विषय देगलूरकरांनी पहिल्यांदाच मुंबई विद्यापीठातील 'कर्णिक व्याख्यानमालेत' प्रतिपादन केला.

ज्या वास्तूत गेल्यावर ब्रह्माचे आकलन होते, ती वास्तू म्हणजे वास्तुब्रह्म. परिपूर्ण मंदिरांची वास्तुरचनाच अशी असते की ती सर्वांना 'अहं ब्रह्मास्मि'पर्यंतचा प्रवास करायला लावते आणि चरम प्रकारची म्हणजे उन्नत अवस्थेतील मूर्ती म्हणजे बिंबब्रह्म.

बिंब म्हणजे मूर्ती, ब्रह्माचे आकलन ज्या मूर्तीमुळे होते, अशी मूर्ती. चर्यापाद, क्रियापाद, योगपाद आणि ज्ञानपाद या चार पायांवर उभ्या असणाऱ्या शैवसिद्धान्ताला मूर्तिरूपात दाखवताना शिल्पकारांनी पाद या शब्दाचा श्लेष करून दोन पाय सोडलेले व दोन पाय पद्मासनात असलेले अशी 'विलक्षण सदाशिवाची' मूर्ती तयार केली. चार प्रमेयांवर शैवसिद्धान्त आहे, हे सांगणारी ती मूर्ती आहे. अशा मूर्तीचे दर्शन घेताना शैवसिद्धान्त आठवतो आणि त्याचे अनुकरण करण्याची प्रेरणा मिळते. अशा मूर्तींना बिंबब्रह्म म्हणतात. अर्धनारीश्वराची मूर्तीही अशाच स्वरूपाची आहे. ती प्रकृति-पुरुषाची मूर्ती होय. प्रकृती म्हणजे निसर्ग आणि पुरुष म्हणजे चैतन्य. निसर्ग आणि चैतन्य यांच्यामुळे चराचरांची निर्मिती झाल्याचे दिसते. अर्धनारीश्वराची मूर्तीही तशीच मूर्ती आहे. यालाच काही जण अद्वैत तत्त्वज्ञानाची मूर्ती म्हणतात. अशा प्रकारच्या मूर्तींतून एखादे तत्त्वज्ञान समूर्त केले जाते. अशा मूर्तींना मूर्तिशास्त्राचा अंतिम टप्पा मानतात. आधी मूर्ती घडवल्या त्या अनेक कारणांनी, अनेक अवस्थांच्या. त्यानंतर मूर्तीत तत्त्वज्ञान आणले गेले. याहून आता पुढचा टप्पा असणार नाही.

यानंतर त्यांना १९९३-१९९६ या कालखंडासाठी के.के. बिर्ला फेलोशिप मिळाली. यातूनच त्यांचा इंग्रजीतील 'Potrayal of the woman' हा ग्रंथ तयार झाला. स्त्री-जीवनावरच्या या पुस्तकामध्ये स्त्रियांचे वैयक्तिक आयुष्य, भावभावना आणि त्यांची विविध प्रकारची कार्ये हे सर्व शिल्पातून आणि चित्रातून जे दृगोच्चर झाले; त्यावर आधारलेला हा ग्रंथ होता.

यानंतरचा डॉ. देगलूरकरांचा महत्त्वपूर्ण ग्रंथ म्हणजे 'सुरसुंदरी'. विविध विभ्रमातील स्त्रियांची म्हणजे अप्सरांची, सुरसुंदरींची शिल्पे देवळाच्या बाहेरच्या भिंतींवर असतात. लोकांना देवळापर्यंत आणायचं काम त्या सुरसुंदरी करतात, असा समज असावा. खरे तर त्यांचे प्रयोजन वेगळे आहे म्हणून हा ग्रंथ लिहिण्यास ते प्रवृत्त झाले. देवाकडे वा गुरूकडे जाताना रिक्तहस्ते जायचे नाही, अर्पण करण्यासाठी पत्र, पुष्प, फल, तोय यांपैकी काहीतरी घेऊन जायला पाहिजे अशी आपल्याकडे धारणा आहे. मंदिराच्या बाहेरील अंगावर अशा सुरसुंदरी आहेत. पुष्प घेतलेली पद्मगंधा, पाण्याच्या कुंभासह जया, झाडाचे पान वाहून घेणारी दालमालिका अशा काही सुरसुंदरी मंदिराच्या बाह्यांगावर दाखवतात. याबरोबरच नृत्य करणाऱ्या व वाद्य वाजविणाऱ्या सुरसुंदरीही असतात. देवाची पूजा रंगभोग स्वरूपाने करायची असे त्या सुचवितात. देवळात जाताना तुम्ही कसे गेले पाहिजे, हे त्या सुरसुंदरी दाखवत असतात.

डॉ. देगलूरकरांनी महाराष्ट्राला शिल्पकलेचे, मूर्तिकलेचे रसग्रहण करायला शिकवले- मग ते वेरूळच्या कैलास लेणीतील रावणानुग्रहाचे शिल्प असेल, की त्याच्या उत्तर-दक्षिण बाजूवर कोरलेले महाभारत-रामायणातील प्रसंग असोत, घारापुरी येथील प्रसिद्ध त्रिमूर्ती अथवा महासदाशिवाची मूर्ती असो की कल्याणसुंदर शिल्पपटाचे रसग्रहण असो, मार्कंडी औंढ्यानागनाथ, अन्वा येथील मंदिर स्थापत्य व त्याचबरोबर मूर्तिशिल्पाचे रसग्रहण असो. हे शब्द आपल्या सिद्धहस्त लेखणीने बद्ध करत त्यांनी 'विष्णुमूर्ते नमस्तुभ्यम', 'वेरूळ दर्शन', 'घारापुरी दर्शन', 'मार्कंडी मंदिरे', 'दुर्गम दुर्ग देवगिरी' आदी ग्रंथ लिहिले व हा विषय जनसामान्यांपर्यंत कसा पोहचेल याकडे आस्थेने लक्ष दिले.

'संपादक देगलूरकर' हे डॉ. गो.बं. देगलूरकरांच्या व्यक्तिमत्त्वाचे आणखी एक वैशिष्ट्य होय. भारतीय इतिहास संकलन समितीने महाराष्ट्रातील शहरांवर विशेष अशी चर्चासत्रे घेतली. त्यांमध्ये नाशिक, पैठण, कोल्हापूर आदी शहरांवरील चर्चासत्रे उल्लेखनीय ठरली. या ठिकाणी वाचल्या गेलेल्या निबंधांचे संपादन करून त्यांनी या शहरांचे विविधांगी स्वरूप ग्रंथरूपाने अभ्यासकांसमोर मांडले.

सेतूमाधवराव पगडी हे महाराष्ट्रातील अग्रगण्य इतिहास अभ्यासक होत. त्यांच्या इंग्रजी ग्रंथांचे व लेखांचे संपादनही त्यांनी केलेले आहे. त्यांनी प्राचीन भारतीय इतिहास व संस्कृती या विषयांवर लिहिलेले पुस्तक, अभ्यासक तसेच महाविद्यालयीन विद्यार्थ्यांमध्ये लोकप्रिय आहे. डी.एन. झा लिखित 'Revenue System in Post Maurya and Gupta Times' याचा त्यांनी अनुवादित केलेला 'मौर्यत्तर आणि गुप्तकालीन राजस्वपद्धती' हा ग्रंथही महत्त्वाचा आहे.

डॉ. देगलूरकरांच्या अभ्यासाच्या विषयांमध्ये विविधता आढळून येते. त्यामध्ये प्राचीन भारतीय इतिहास, प्रामुख्याने महाराष्ट्राचा प्राचीन इतिहास, महाराष्ट्रातील किल्ले, मंदिरे तेथपासून ते छत्रपती शिवराय इथपर्यंतचे विषय दिसून येतात. अनेक राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय परिषदांमध्ये भाग घेऊन आपले शोधनिबंध त्यांनी सादर केले आहेत. त्यांच्या मार्गदर्शनाखाली सात विद्यार्थ्यांनी पीएच.डी. पदवी मिळविली आहे. या सर्व गोष्टी लक्षात घेऊनच त्यांना अनेक पुरस्कारही मिळालेले दिसतात. त्यामध्ये 'जिजामाता विद्वतगौरव पुरस्कार', 'श्रीमंत नानासाहेब पेशवे धार्मिक व आध्यात्मिक पुरस्कार', 'न.र. फाटक पुरस्कार', 'स्नेहांजली पुरस्कार' हे उदाहरणादाखल सांगता येतील.

त्यांच्या या सर्व कार्याचे महत्त्व लक्षात घेऊन टिळक महाराष्ट्र विद्यापीठाने त्यांना सन २०१३ साली सन्माननीय 'डी.लिट.' पदवी बहाल केली. सन २००६ पासून डेक्कन महाविद्यालय अभिमत विद्यापीठाचे 'कुलपती' म्हणूनही ते काम पाहत आहेत. विदर्भ संशोधन मंडळ, नागपूर या संस्थेचे कार्यवाह, महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक संस्थेचे कार्यवाह, राजा केळकर संग्रहालयाचे सल्लागार, महाराष्ट्र दार्शनिका विभागाचे सल्लागार, मार्गदर्शक अशा विविध स्वरूपांत अनेक संस्थांमध्येही त्यांनी आपल्या कार्याचा ठसा उमटविला आहे.

– डॉ. गिरीश मांडके



## देव, कृष्ण

**पुरातत्त्ववेत्ता, प्राच्यविद्याविशारद**

**१९१४ – मृत्युदिनांक अनुपलब्ध**

डॉ. कृष्ण देव हे भारतातील अग्रगण्य पुरातत्त्ववेत्ता आणि प्राच्यविद्या विशारद म्हणून ओळखले जातात. डॉ. देव ऑर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडियाचे महासंचालक जनरल म्हणून निवृत्त झाले.

डॉ. कृष्ण देव यांनी त्यांच्या उमेदवारीच्या काळामध्ये, १९३८ साली प्रख्यात पुरातत्त्ववेत्ते एन. जी. मुजुमदार यांच्या हाताखाली सिंध प्रांतामध्ये काम केले. तसेच सर ऑरेल स्टेन यांच्याबरोबर १९४०-४१मध्ये राजस्थान, बहावलपूर आणि बलुचिस्तान येथे काम केले आणि सर मॉर्टिमर व्हीलर यांच्याबरोबर १९४४ ते १९४७ या काळात काम केले. त्यानंतर डॉ. देव यांनी

स्वतंत्रपणे उत्खनन व संशोधन करण्यास सुरुवात केली आणि नगर, अग्रोहा, काशीपूर, कुमराहर (पाटलीपुत्र) आणि वैशाली या ठिकाणी उत्खननाचे काम पार पाडले. तक्षशीला, अरिकामेडू आणि हरप्पा येथे सापडलेल्या मातीच्या भांड्यांच्या अवशेषांचे त्यांनी केलेले वर्गीकरण आणि त्यासंबंधीचा अहवाल हे त्यानंतरच्या संशोधकांसाठीही आदर्श मानले गेले.

डॉ. कृष्ण देव यांनी उत्तर भारतातील मंदिरांचे परीक्षण करण्याची योजना हाती घेतली आणि त्या योजनेनुसार १९५६ ते १९६२ या काळामध्ये उत्तर भारतातील आणि मध्य भारतातील मंदिरांची पद्धतशीर नोंदणी व मापणी केली.

नेपाळमधील धार्मिक चित्रे व शिल्पे यांची पाहणी करण्यासाठी भारत सरकारने डॉ. देव यांची नियुक्ती केली होती. ऑर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडियामधून निवृत्त झाल्यावर त्यांनी नेपाळ सरकारचे पुरातत्त्वविषयक सल्लागार म्हणून काम पाहिले.



वाराणसी येथील ‘अमेरिकन इन्स्टिट्यूट ऑफ आर्ट ॲन्ड कल्चर’ या संस्थेचे संचालक म्हणूनही डॉ. कृष्ण देव यांनी काम पाहिले. तसेच तेथीलच ‘अमेरिकन इन्स्टिट्यूट ऑफ इंडियन स्टडीज’ या संस्थेतर्फे सुरू असलेल्या भारतीय मंदिरांच्या विश्वकोशाच्या प्रकल्पाचे ते सल्लागार आहेत.

डॉ. कृष्ण देव यांनी पुरातत्त्व विषयावर भरपूर लिखाण केले आहे. त्यांपैकी महत्त्वाची प्रकाशने : Vaishali Excavations 1956- वैशाली येथील उत्खनन- १९५६, Temples of North India 1969- उत्तर भारतातील मंदिरे- १९६९, Catalogue of Stone Sculpture in the Allahabad Museum- 1997- अलाहाबाद वस्तुसंग्रहालयातील शिल्पाकृतींची सूची- १९९७, Temples of Khajuraho- 2 Vols-1990 खजुराहो येथील मंदिरे-दोन खंड- १९९०.

डॉ. कृष्ण देव हे ‘जर्नल ऑफ द इंडियन सोसायटी ऑफ ओरिएंटल आर्ट’चे संपादक आहेत.

— र. वि. नातू

## देवतारे, भास्कर

**पुरातत्त्व अभ्यासक**

**३ सप्टेंबर १९५१**

भास्कर देवतारे यांनी १९७५मध्ये अकोल्याच्या पंजाबराव कृषी विद्यापीठामधून कृषी विषयातील एम.एस्सी. ही पदवी संपादन केली. त्यानंतर १९७६ ते १९८६ या दरम्यान ते पुण्याच्या डेक्कन कॉलेजमध्ये पुरातत्त्व विभागात संशोधन साहाय्यक या पदावर कार्यरत होते. तेथेच १९८६पासून पुरावनस्पतिविज्ञान या विषयाचे व्याख्याता म्हणून १९८६पासून काम पाहू लागले. ते पुरातत्त्व विभागाचे प्रमुख व प्राध्यापक म्हणून संशोधन व अध्यापनाचे कार्य पूर्ण करून २०१३मध्ये सेवेतून निवृत्त झाले. तथापि पुरामृदरसायनविज्ञान, पुरावनस्पतिविज्ञान, पुरापरागविज्ञान व पुरापर्यावरण या विषयांमध्ये त्यांचे संशोधन सुरू आहे.

भास्कर देवतारे यांनी १९८१मध्ये पुरातत्त्वविद्या या विषयात प्रा. रामचंद्र जोशी यांच्या मार्गदर्शनाखाली पीएच.डी. प्राप्त केली. अनेक पुरातत्त्वीय उत्खननांमध्ये व संशोधन प्रकल्पांमध्ये त्यांचा सहभाग होता.

‘प्राचीन वसाहतींच्या टेकड्यांचा रासायनिक अभ्यास’ हा विद्यापीठ अनुदान आयोगाचा व ‘राजस्थानातील पुरापराग व त्या अनुषंगाने तत्कालीन हवामानाचा अभ्यास’ हा भारत सरकारच्या विज्ञान व तंत्रज्ञान विभागाचा प्रकल्प या दोन्हीमध्ये त्यांच्या संशोधनाचा मोठा सहभाग होता. पॅरिसची इन्स्टिट्यूट ही पॉलिओन्टॉलॉजी व मार्सेलीची लॅबोरेटरी डी जिऑलॉजी ॲण्ड क्वाटर्नरी या पुरातत्त्वविज्ञानातील महत्त्वाच्या प्रयोगशाळांना त्यांनी १९९३मध्ये भेट दिली आणि तेथील संशोधनांत ते सहभागी झाले.

देवतारे यांनी सन २०००मध्ये विदर्भात पुरातत्त्वीय सर्वेक्षणाला व उत्खननांना प्रारंभ केला. ते व शीला मिश्रा यांनी मिळून सन २००१मध्ये अमरावती जिल्ह्यात असलेल्या कौडिण्यपूर या ठिकाणी उत्खनन केले. या पुरातत्त्वीय स्थळावर त्यांना तांदळाचे अवशेष मिळाले, ही बाब विशेष उल्लेखनीय आहे. यानंतर अगोदर

पद्धतशीर सर्वेक्षण करून २००२ या वर्षी देवतारे यांनी बुलढाणा जिल्ह्यातील पातुर्डा या पुरातत्त्वीय स्थळाचे उत्खनन केले. पूर्णा नदीच्या खोऱ्यातील या स्थळामध्ये त्यांना प्राचीन व मध्ययुगीन कालखंडातील वसाहतीचे अवशेष मिळाले. विदर्भातील अन्नधान्याच्या प्राचीन लागवडीच्या अधिक संशोधनासाठी त्यांनी २००३ ते २००७ अशी सलग पाच वर्षे बुलढाणा जिल्ह्यातील भोन या पुरातत्त्वीय स्थळाचे उत्खनन केले. या ठिकाणी त्यांना प्राचीन वसाहतीबरोबरच एका स्तूपाचे अवशेष मिळाले. त्याचप्रमाणे या ठिकाणी प्राचीन कालखंडातील विटांनी व्यवस्थित बांधलेल्या जलवाहिनीच्या अथवा सांडपाण्याच्या नाल्याच्या बांधकामाचा महत्त्वाचा पुरावा मिळाला. विदर्भातील प्राचीन पर्यावरण व पिके या संबंधातील अभ्यासाचा पुढचा टप्पा म्हणून देवतारे यांनी २००७ ते २००९ या काळात अमरावती जिल्ह्यात खोलापूर या पुरातत्त्वीय स्थळाचे उत्खनन केले.

देवतारे यांचे संशोधनावर आधारित पाच पुस्तके व ४५ शोधनिबंध विविध नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले आहेत. तसेच त्यांनी पस्तीस वर्षांच्या प्रदीर्घ सेवाकाळात राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय पातळीवर अनेक चर्चासत्रांमध्ये कृतिशील सहभाग घेऊन शोधनिबंध सादर केले आहेत.

- डॉ. प्रमोद जोगळेकर

## देव, प्रभाकर रघुनाथ

**इतिहास संशोधक**

**२० फेब्रुवारी १९३७**

महाराष्ट्राच्या प्राचीन परंपरांचा धांडोळा घेत १४व्या शतकापर्यंतच्या शिल्प-स्थापत्य-अवशेषांचा ऐतिहासिक वारसा अभ्यासणारे, महाराष्ट्राच्या समृद्ध परंपरांचे जागरण करत महाराष्ट्रातील ऐतिहासिक पर्यटकाला प्रोत्साहित करणाऱ्या सातवाहन, वाकाटक, राष्ट्रकूट, चालुक्य, यादव इत्यादी राजवटींच्या काळातील बांधीव आणि गुहा स्थापत्यावर लेखन-संशोधन करणारे, इतस्तत: विखुरलेल्या हजारो उद्ध्वस्त अवशेषांमधील कलात्मक वारसा धुंडाळत, मूर्ति-शिल्पांचा आस्वाद घेत,



महाराष्ट्राच्या प्राचीन कलात्मक वैभवाचे जागरण करणारे नांदेडचे ख्यातनाम इतिहास संशोधक प्रा. डॉ. प्रभाकर देव हे या क्षेत्रातील एक बहुआयामी व्यक्तिमत्व आहे.

प्रभाकर रघुनाथ देव यांचा जन्म औरंगाबाद येथे कमलाबाई आणि रघुनाथ हरिहर देव या दाम्पत्याच्या पोटी झाला. त्यांचे शालेय शिक्षण नूतन विद्यालय, सेलू, जिल्हा परभणी येथे पूर्ण झाले. त्यांनी औरंगाबादच्या शासकीय ज्ञान-विज्ञान महाविद्यालयातून पदवी (बी.ए.) आणि औरंगाबादच्याच तत्कालीन मराठवाडा विद्यापीठातून पद्व्युत्तर शिक्षण (एम. ए. इतिहास) पूर्ण केले.

पदव्युत्तर शिक्षण पूर्ण झाल्यावर प्रभाकर देव यांनी सन १९६१साली बीड येथील बलभीम महाविद्यालयात इतिहासाचे प्राध्यापक म्हणून अध्यापनक्षेत्रात पदार्पण केले. प्रतिभा यांच्याशी प्रा. डॉ. प्रभाकर देव यांचा विवाह ४ जून १९६३रोजी संपन्न झाला. सन १९७१मध्ये प्रा. डॉ. प्रभाकर देव यांनी प्रा. डॉ. र. शं. गुप्ते यांच्या मार्गदर्शनाखाली पूर्ण केलेल्या 'टेम्पल्स ऑफ मराठवाडा : ए स्टडी इन आर्ट ॲन्ड आर्किटेक्चर' या संशोधन विषयासाठी तत्कालीन मराठवाडा विद्यापीठाने त्यांना पीएच. डी. ही पदवी प्रदान केली. प्रा. डॉ. प्रभाकर देव यांची सन १९७१साली नांदेड येथील यशवंत महाविद्यालयात पद्व्युत्तर इतिहास व संशोधन विभागप्रमुख म्हणून नियुक्ती झाली. सन १९९७साली छत्तीस वर्षांच्या प्रदीर्घ सेवेनंतर ते सेवानिवृत्त झाले.

मराठवाड्यातल्या गावोगावी विखुरलेल्या व इतस्तत: पडलेल्या मूर्तिशिल्पांचा, उद्ध्वस्त स्थापत्य अवशेषांचा त्यांनी अभ्यास, सर्वेक्षण केले. वेरूळ, अजिंठा, पितळखोरे, कार्ले, भाजे, एलिफन्टा या जगप्रसिद्ध गुहा स्थापत्यांतील शिल्पपरंपरांचा मागोवा घेत पुढील काळात बांधीव स्थापत्यातून ही परंपरा कशी जिवंत

द

राहिली याचा शोध घेत, राष्ट्रकूट, चालुक्य, यादव कालखंडांतील बांधीव स्थापत्य अवशेषांचा त्यांनी अभ्यास केला.

मराठवाड्यातील प्राचीन मंदिर स्थापत्याचा धांडोळा आणि त्यांवरील शिलालेखांचा शोध घेत प्रा. डॉ. देव सरांनी त्यांवर संशोधनपर लेख आणि ग्रंथ लिहिले. मराठवाड्यातील अनेक प्राचीन मंदिरांचा अभ्यास केला, त्यांचे नकाशे तयार केले, मूर्तींची वैशिष्ट्ये विशद केली, त्यांच्या सौंदर्याची आणि कलात्मकतेची सौंदर्यस्थळे नेमकेपणाने दाखवली, त्यांच्या विविध शैली वर्णन केल्या आणि त्यांचा कालनिर्णयही स्पष्ट केला. त्यामुळे मराठवाड्याच्या वैभवशाली इतिहासकाळात जी स्थापत्यकला विकसित झाली, तिचे अत्यंत मनोरम दर्शन 'टेम्पल्स ऑफ मराठवाडा' (१९९३) या त्यांच्या ग्रंथात आपल्याला घडते.

महाराष्ट्रात अनेक प्राचीन शहरे आहेत. दीड-दोन हजार वर्षांची परंपरा सहज सांगता येईल अशा अनेक शहरांपैकी एक असलेल्या नांदेड या प्राचीन नगरीच्या इतिहासाचा धांडोळा घेताना डॉ. देवांनी १९८६साली, नांदेडचे तत्कालीन जिल्हाधिकारी अमिताभ राजन यांच्या पुढाकाराने महाराष्ट्र राज्याच्या रौप्य महोत्सवी वर्षानिमित्त साकार झालेला, 'स्थानिक इतिहास व साहित्य : एक शोधण नांदेड' हा प्रकल्प यशस्वी करण्यात महत्त्वाची भूमिका पार पाडली. नांदेड ही भूमी शिखांचे दहावे गुरू आणि खालसा पंथाचे संस्थापक श्री गुरू गोविंदसिंहजी महाराज यांच्या पवित्र पदस्पर्शाने पावन झालेली आहे. सन २००८साली आक्टोबर महिन्यात गुरुग्रंथसाहेब या शिखांच्या पवित्र ग्रंथाला गुरुपदी स्थापित करण्याच्या कार्यक्रमाला तीनशे वर्ष पूर्ण झाल्यानिमित्त सरकारतर्फे संपन्न झालेल्या गुर-ता-गद्दी तिनसौ सालाना बरसी आणि महाराष्ट्र राज्याच्या सुवर्ण महोत्सवी वर्षानिमित्त आयोजिलेल्या कार्यक्रमादरम्यान डॉ. देवांनी घेतलेला नांदेडच्या प्राचीनत्वाचा 'हेरिटेज नांदेड कल्चर, आर्ट अॅन्ड आर्किटेक्चर' या अप्रतिम ग्रंथाच्या रूपाने, भारताच्या तत्कालीन राष्ट्रपती प्रतिभा पाटील यांच्या शुभहस्ते, प्रकाशित करण्यात आला.

डॉ. देवांनी नांदेड जिल्ह्यातील वाकाटककालीन म्हणजे आजपासून सुमारे दीड हजार वर्षांपूर्वीच्या लेण्यांचा शोध १९७०च्या सुमारास घेतला. तत्कालीन मराठवाडा विद्यापीठाच्या संशोधन पत्रिकेत त्यांनी शिऊरच्या लेण्यांवरील पहिला संशोधनपर लेख लिहिला. महाराष्ट्रातील प्राचीन शहरांची ओळख करून देण्याच्या दृष्टीने अनेक नामवंत लेखकांनी लिहिलेल्या विविध पुस्तकांपैकी, डॉ. देवांनी लिहिलेल्या 'कंधार-एक ऐतिहासिक शहर' हे अप्रतिम पुस्तक राष्ट्रकूटकालीन कंधारची ऐतिहासिक सफर घडवणारे लिखाण ठरले आहे. कल्याणीच्या चालुक्यांच्या काळातील एक प्रसिद्ध शहर पोट्टलनगरी नांदेड जिल्ह्यात आहे. ही पोट्टलनगरी म्हणजे देगलूर तालुक्यातील आजचे होट्टल हे गाव होय. या ठिकाणी चार शिलालेखांसह अनेक वास्तू अवशेष चालुक्य कलाशैलीच्या इतिहासाचे जागरण करत आहेत. डॉ. देवांच्या आणि इन्टॅच (इंडियन नॅशनल ट्रस्ट फॉर आर्ट अॅन्ड कल्चरल हेरिटेज) नांदेड शाखेने या मंदिर समूहाचा सतत पाठपुरावा केला. ''या दगडातल्या देवापेक्षा त्या कलात्मक देवमूर्तींना जन्म देणारा माणूस शोधणे मला अधिक आवडते '' असे डॉ. देव आवर्जून सांगतात.

निवृत्तीनंतर स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेडच्या वतीने हैद्राबाद मुक्ती-संग्राम आंदेलनाच्या अभ्यासाची साधने धुंडाळण्याची संधी डॉ. देवांना मिळाली. साधन-संकलन-संशोधन प्रकल्पांतर्गत जुन्या हैद्राबाद राज्यातील सोळा जिल्ह्यांची त्यांना भटकंती करावी लागली. कर्नाटकाचे बिदर, गुलबर्गा व रायचूर हे तीन जिल्हे, तेलंगण्याचे हैद्राबाद, वरंगल, करीमनगर, निझामाबाद, अदिलाबाद, मेदक, मेहबुबनगर, नलगोंडा हे आठ जिल्हे आणि मराठवाड्याचे औरंगाबाद, नांदेड, परभणी, बीड व उस्मानाबाद हे जुने पाच जिल्हे अशी भटकंती करत असताना सर्वश्री माजी कुलगुरू जी. आर. म्हैसेकर,

तत्कालीन कुलगुरू डॉ. जे. एम. वाघमारे, डॉ. डी. एस. देशपांडे यांच्या समवेतचा हा धांडोळा चिरस्मरणीय ठरला.

हैद्राबाद मुक्तिसंग्राामातील हिंदी, उर्दू, तेलुगू आणि कन्नड भाषिक समकालिनांच्या इंग्रजी-हिंदी भाषांतील मुलाखतींच्या आधारे मौखिक इतिहासाचे विश्लेषक ठरणारे हे सविस्तर विवेचन आहे. हैद्राबाद मुक्तिसंग्रामातील स्वातंत्र्यसैनिक, तत्कालीन पत्रकार, सनदी अधिकारी-नोकर, सहभागी झालेल्या सामान्यांसह आणि सामान्य प्रत्यक्षदर्शींसह जवळपास दिडशे लोकांच्या मुलाखती असलेले हे ग्रंथ म्हणजे हैद्राबाद मुक्ती संग्रामाचा 'आंखो देखा हाल', प्रत्यक्ष वर्णन करणारे साधन-ग्रंथ होत. पद्मविभूषण मा. गोविंदभाई श्रॉफ यांच्या मार्गदर्शनाखाली घेतलेल्या तत्कालीन पंतप्रधान श्री पी. व्ही. नरसिंहराव, माजी मुख्यमंत्री डॉ. चन्नारेड्डी, फरिद मिर्झा आदींच्या लक्षणीय मुलाखती असलेल्या या साधन-ग्रंथांचे दोन खंड (एक मराठी व दुसरा इंग्रजी-हिंदी भाषेतील) विद्यापीठाने प्रकाशित केले असून त्यांचे संपादन प्रा. डॉ. देव यांनी केले आहे.

डॉ. देवांनी या पुस्तकाच्या माध्यमातून इतिहासाकडे पाहण्याची दिलेली नवी दृष्टी हे या क्षेत्रासाठीचे त्यांचे फार मोठे योगदान आहे, असे म्हटल्यास वावगे ठरू नये.

डॉ. प्रभाकर देव यांच्यावरील गौरवग्रंथ 'प्राचीन महाराष्ट्र : परंपरा आणि समृद्धी' रश्मी प्रकाशन, नांदेड, (मे २०१३) यांच्यातर्फे प्रकाशित झाला आहे. डॉ. प्रभाकर देव यांचे 'हेरिटेज नांदेड- कल्चर, आर्ट अॅन्ड आर्किटेक्चर, इन्टॅक' (इंडियन नॅशनल ट्रस्ट फॉर आर्ट अॅण्ड कल्चरल हेरिटेज), नांदेड चॅप्टर, (२००८) 'इतिहास-संशोधन, अध्यापन, लेखन परंपरा', ब्रेन टॉनिक प्रकाशन, नाशिक, (२००७) 'गोदा खोरे- इतिहास आणि संस्कृती'(संपादित), जनशक्ती वाचक चळवळ, औरंगाबाद, (प्राध्यापिका शोभा कोरान्ने. गौरव ग्रंथ), २००६ 'हैदराबाद लिबरेशन स्ट्रगल' (संपादित), रजिस्ट्रार, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ नांदेड, (२००४) 'टेम्पल्स ऑफ मराठवाडा', पब्लिकेशन स्किम, जयपूर, (१९९३), 'स्थानिक इतिहास आणि साहित्य : एक शोध, नांदेड' (संपादित), महाराष्ट्र राज्य रौप्य महोत्सवी प्रकाशन, नांदेड जिल्हा संदर्भग्रंथ समिती, १ (मे १९८६), 'कंधार, एक ऐतिहासिक शहर', संचालक, पुरातत्त्व व वस्तुसंग्रहालये विभाग, महाराष्ट्र शासन, मुंबई, (१९८५) आदी महत्त्वाचे ग्रंथ प्रकाशित झाले आहेत.

— प्रा. नंदकुमार मेगदे

## देव, शंकर श्रीकृष्ण

**समर्थभक्त, स्वातंत्र्यसैनिक, संतसाहित्य संशोधक**

**१० ऑक्टोबर १८७१ – २३ एप्रिल १९५८**

**☛ मुख्य चरित्रनोंद - धर्मपरंपरा खंड**



शंकर श्रीकृष्ण देव यांचा जन्म धुळे येथे झाला. त्यांचे वडील अण्णासाहेब पुणे, सातारा व धुळे येथे कारागृह अधिकारी होते. त्यांना चार मुले होती. दोन मुलगे हरी व शंकर आणि दोन मुली समूताई व साळूताई. या दोघींचा विवाह धुळे येथेच झाला; अनुक्रमे शिदोरे व टकले यांच्याकडे. डॉ. हरी श्रीकृष्ण देव वयाच्या पंचावन्नाव्या वर्षी, १९१८ मध्ये धुळ्यातच मृत्यू पावले.

पोरबंदरला महात्मा गांधींचे घर त्यांच्या निवासस्थानाजवळच होते. महात्मा गांधी नानासाहेबांचे म्हणजे शंकर श्रीकृष्ण देवांचे समवयस्क. गांधी कुटुंबाचे व त्यांचे फार घरोब्याचे संबंध होते. डॉ. देवांबद्दल महात्मा गांधींनाही खूप आदर वाटे. चंपारण्य सत्याग्रहात डॉ. देवांकडे त्यांनी खूप मोठी कामगिरी सोपवली होती. डॉ. राजेंद्र प्रसादांचे ते आदरस्थान होते.

नानासाहेबांचे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण येथल्या गरुड हायस्कूलमध्येच झाले. उत्कृष्ट व आदर्श विद्यार्थी म्हणून त्यांची ख्याती होती. १८८९ मध्ये त्यांनी वकिली

व्यवसायाला सुरुवात केली. आदिवासींबद्दल त्यांना विशेष ममता होती. १९०३ पासून नानासाहेबांनी जमा केलेला हस्तलिखितांचा संग्रह १९३० सालापर्यंत अक्षरश: प्रचंड झाला. सन १९३४ मध्ये शिवराज्याभिषेक दिनी त्यांनी सत्कार्योत्तेजक सभा स्थापन केली. १९३४ पर्यंत त्यांनी अखिल भारताचे सहा वेळा दौरे केले. 'केसरी' आणि 'नवाकाळ' त्यांच्या पाठीमागे होते. त्यामुळे नानासाहेबांच्या संशोधनाला खूप बळ मिळाले. श्री समर्थ वाग्देवता मंदिराचा उद्‌घाटन सोहळा अपूर्व झाला. इंदूर महाराणी इंदिराबाई होळकर यांनी चांदीच्या किल्लीने मंदिराचे कुलुप उघडले.

जांबचे श्री समर्थ वाग्देवता मंदिर, दास विश्रामधाम, धुळ्याचे समर्थ वाग्देवता मंदिर, राजवाडे संशोधन मंदिर या सर्व कार्यांत महाराणींचा पाठिंबा होता. छत्रपतींचे निवाडे, समदा, मजहर, श्री संप्रदायाविषयी ८०० अधिक तत्कालीन संतांची हस्तलिखिते, १४०० पृष्ठांचे चार भाग असे साहित्य जमा झाले आहे. मंदिराला अनेक देणगीदार मिळाले व मामासाहेबांनी त्या सर्वांचे आभार मानले. शके १८३८मध्ये नानासाहेबांनी 'इतिहास आणि ऐतिहासिक' मासिकाचा प्रारंभ केला. दादासाहेब मावळणकर त्या वेळचे अध्यक्ष होते. देशभर श्रीसमर्थांचे उत्सव, व्याख्याने यांची रेलचेल झाली.

नानासाहेब देवांनी 'आता रजा पाहिजे' असे जाहीरपणे सांगितले. तेव्हा महात्मा गांधींनी 'राजकीय कार्य सोडू नका,' अशी विनंती केली. वृत्तपत्रांत अनेक लेख आले. नानासाहेबांनी गांधीजींना उत्तर लिहिले, 'स्वराज्य आज ना उद्या मिळेल; पण ही प्राचीन कागदपत्रे नाहीशी झाली तर पुनरपि मिळणार नाहीत.' १९४० नंतर राजकीय वातावरण फारच गढूळ झाले. फाळणी झाल्यानंतर मनस्वी देव अतिशय उद्विग्न झाले.

नानासाहेब देवांचे राजकीय कार्यही खूप मोठे हाते. १८९३ मध्ये काउन्सिलच्या निवडणुकीत लोकमान्य टिळक उभे होते. त्या वेळेला प्रचाराची धुरा नानासाहेबच सांभाळत. लोकमान्य टिळकांच्या प्रभावळीतील अतिजहाल क्रांतिकारकांशी नानासाहेबांचा संबंध होता. अभिनव भारताच्या स्थापनेनंतर चाळीस वर्षांनी स्वातंत्र्यवीर सावरकर श्री समर्थ वाग्देवता मंदिरास भेट देण्यासाठी आले. देवांना पाहताच ते अत्यंत श्रद्धेने व लीनतेने वाकले. सेनापती बापट पुण्यापासून देवांच्या मित्रमंडळीत होते. देवांच्या सल्लामसलतीने बाबू अरविंद घोषांकडे बॉम्ब तयार करण्याची विद्या आत्मसात करण्यासाठी गेले. बाबू अरविंद घोषांचा मुक्काम आठ दिवस देवांकडे होता. राष्ट्रीय सभेचे प्रांतिक अधिवेशन धुळ्याला झाले, त्याची सर्व व्यवस्था देवांकडे होती.

सत्कार्योत्तेजक संस्थेने केशव शास्त्री दामले यांचे 'एकश्लोकी गीता' हे पुस्तक छापले. त्यातल्या आठव्या अध्यायातील सातव्या श्लोकाबद्दल श्री दामले व श्री देव यांच्यावर राजद्रोहाचा खटला भरण्यात आला. देव व दामले शास्त्री यांना अटक झाली. काही काळ देवांना रत्नागिरीच्या तुरुंगात ठेवले. पण अपिलानंतर देव निर्दोष सुटले. दामले शास्त्र्यांना सहा महिन्यांची सजा झाली.

१९१३ ते १९१८ या सहा वर्षांत नानासाहेब धुळे नगरपालिकेचे नगरसेवक होते. १९१७ मध्ये लोकमान्य टिळक पुन्हा धुळ्याला आले. होमरूलच्या प्रचारासाठी त्यांनी खानदेशाचा दौरा केला होता. १९२७ मध्ये महात्मा गांधींचा खानदेश दौरा ठेवला. महात्मा गांधींची धुळे शहरातून भव्य मिरवणूक काढण्यात आली.

नानासाहेब देव हे एकच व्यक्तिमत्त्व असे आहे, की ज्यांनी श्रद्धाभावाने लोकमान्यांना २४ वर्षे मानले व त्याच उमेदीत महात्मा गांधींचे नेतृत्वही पुढे २४ वर्षे स्वीकारले.

— संपादित

**संदर्भ :**

१. *कुबेर, शरद वासुदेव; 'नाना सुकृताचे फळ'; सत्कार्योत्तेजक सभा, धुळे.*

## देव, शांताराम भालचंद्र

**उत्खनन तज्ज्ञ, पुरातत्व अभ्यासक**

**९ जून १९२३ - १ ऑक्टोबर १९९६**

शांताराम भालचंद्र देव यांचा जन्म तळेगाव, ढमढेरे जि. पुणे येथे झाला. वडील भालचंद्र हे श्रीमोरया गोसावी



यांच्या घराण्यातील असून शांताराम हे तेराव्या पिढीतील. श्रीमोरया हे थोर गाणपत्य असून संत तुकाराम आणि छत्रपती शिवाजी महाराज यांचे समकालीन होते. आई त्रिवेणीबाई या फलटण येथील श्रीज्ञानेश्वरभक्त डॉ. गोविंद महाराज उपळेकर यांच्या एकुलत्या एक भगिनी. आई आणि वडील दोन्हीकडूनही धार्मिकतेचा आणि आध्यात्मिकतेचा समृद्ध वारसा त्यांना लाभला.

वडिलांच्या पोलीस खात्यातील नोकरीमुळे शांतारामांचे प्राथमिक शाळेतील शिक्षण अनेक ठिकाणच्या शाळांतून झाले. वयाच्या सहाव्या वर्षी मातृसुखास पारखे झाल्यामुळे शांतारामाची देखभाल सातारा व पुणे येथील बहिणींनी केली. न्यू इंग्लिश स्कूल, पुणे येथून १९३९मध्ये उत्तमरीत्या मॅट्रिक उत्तीर्ण झाले. पुढील महाविद्यालयीन शिक्षण ब्रह्मे शिष्यवृत्ती आणि शिकवण्या यांच्यामुळे शक्य झाले. फर्गसन महाविद्यालयातील प्रा.आर.डी. वाडेकर यांचे ते आवडते विद्यार्थी होते. देवांवर त्यांचा बराच प्रभाव होता. प्राकृत वाङ्मय आणि जर्मन भाषा हे विषय घेऊन बी.ए. झाल्यावर पाली आणि अर्धमागधी या विषयांत ते १९४७ मध्ये मुंबई विद्यापीठाचे एम.ए. झाले.

येथून पुढे डॉ. शांतारामांचे आयुष्य प्रसिद्ध डेक्कन महाविद्यालयाशी निगडित झाले ते अखेरपर्यंत. पीएच.डी.साठी ख्यातकीर्त पुरातत्त्वज्ञ डॉ.ह.धी. सांकलिया यांच्या सहवासात ते आले. त्यांच्या आयुष्याला आणि व्यक्तिमत्त्वाला योग्य असे वळण मिळाले. ‘अभिलेखांतून आणि वाङ्मयातून उलगडणारा जैन मुनीसंघाचा इतिहास’ या विषयात डॉ.देवांची पीएच.डी. होती. विशेष म्हणजे प्राकृत आणि जैनधर्म या विषयांचे तत्कालीन जगन्मान्य विद्वान डॉ.अल्सडॉर्फ आणि डॉ.उपाध्ये या परीक्षकांनी प्रबंधाची वाखाणणी तर केलीच, पण तो लगेच प्रकाशित करावा अशी शिफारसही केली. अहमदाबादेतील कस्तुरभाई लालभाई यांच्या आर्थिक मदतीने तो लगेच प्रकाशितही झाला.

डॉ. सांकलिया यांच्यामुळे श्री. देव यांना डेक्कन महाविद्यालयात आधी संस्कृत कोश योजनेत काम करता आले. त्या वेळचे संचालक श्री. सुमंत कत्रे यांनी उत्खननात भाग घेण्याची संधीही श्री. देव यांना त्याच वेळी दिली. पुरातत्त्वखात्याचे डॉ.बी.जी. लाल शिशुपालगढ, ओडिशा येथे करीत असलेल्या उत्खननात डॉ. सांकलियांच्या प्रेरणेने देवांना भाग घेऊन उत्खननाचे तंत्र जाणून घेता आले. विशेष म्हणजे पुढे ५०-६० वर्षे भारतीय पुरातत्त्वाची सर्वतोपरी धुरा वाहणारी मंडळी त्यांना येथे भेटली. त्यांत सर्वश्री बाळकृष्ण थापर, रंगनाथ राव, गोपालाचारी, बॅनर्जी, सौंदरराजन यांचा समावेश होता. या सर्वांनी मिळून भारतीय पुरातत्त्वाची कीर्ती दिगंत केली. याच वेळी सर मार्टिमर व्हीलर या जागतिक कीर्तीच्या पुरातत्त्वज्ञाची ओळख झाली ती अखेरपर्यंत राहिली.

डॉ.सांकलियांच्या पारखी नजरेत भरल्यामुळे त्यांनी श्री.देव यांना १९५५मध्ये अध्यापनक्षेत्रात संधी दिली. श्री.देव यांच्याबद्दल ‘मोजक्या पण चांगल्या सवयी असलेली आणि अल्प गरजा असलेली व्यक्ती’ अशी नोंद डॉ.सांकलियांनी त्यांच्या आत्मचरित्रात केली आहे.

येथून पुढे पुरातत्त्वाशी जडलेले नाते दृढ होत गेले. लांघनज (१९४९), उत्खनन, साबरमती खोरे, नाशिक-जोर्वे (१९५०-५१), नावडाटोली-महेश्वर (१९५२-५३; १९५७-५९), नेवासा (१९५४-५६; १९५९-६१), चांडोली (१९६१), आहार (१९६१-६२), सोनगाव (१९६५) आणि त्रिपुरी (१९६६) येथील उत्खननांत त्यांचा सक्रिय सहभाग होता. देवांचे लिखाण हे आशयघन, नेटके, संदर्भासहित आणि सर्वसामान्यांनाही समजेल अशा सोप्या भाषेत असायचे. त्यामुळे वरील सर्व आणि अन्य ठिकाणच्या उत्खननांचे वृत्तान्त लिहिण्याचे काम त्यांनाच करावे लागले व ते त्यांनी चोखपणे पार पाडले. १९६३-१९६५ या काळात इंडिया एड मिशनने त्यांची नेमणूक प्राचीन भारतीय

द

इतिहास आणि संस्कृती या विषयांचे प्राध्यापक म्हणून काठमांडू येथील त्रिभुवन विद्यापीठात केली. तेथे त्यांनी पैसिया, बंजारही आणि काठमांडू येथे पुरातत्त्वीय उत्खननेही केली. १९६६ साली महामहोपाध्याय प्रा.वा.वि. मिराशी निवृत्त झाल्यावर त्या जागेवर डॉ. देवांची निवड झाली. त्यामुळे त्यांना नागपूर येथे जावे लागले. तेथेही नागपूर विद्यापीठाच्या प्राचीन भारतीय इतिहास, संस्कृती व पुरातत्त्व विभागातर्फे त्यांनी टाकळघाट-खापा (१९६७-१९६८), माहुरझरी (१९७८-१९७९), बोरगाव (१९८०-१९८१), खैरवाडा (१९८१-१९८२), रायपूर (१९८५), नयकुंड (१९८२) आणि पवनार (जि. वर्धा) या ठिकाणी बृहदाश्मयुगीन संस्कृतीसंबंधात उत्खनने केली. नागपूर विद्यापीठाला हे नवीनच होते. त्यामुळे ही उत्खनने गाजली आणि पुरातत्त्वाचे महत्त्व जनसामान्यांपर्यंत पोहोचले. डेक्कन महाविद्यालयाच्याच परंपरेप्रमाणे या सर्व उत्खननांचे वृत्तान्तही लगेच प्रसिद्ध केले गेले.

या शास्त्राच्या जाणकारांचे आणि अभ्यासकांचे लक्ष विदर्भाकडे वेधले गेले. विदर्भातल्या गाजलेल्या उत्खननांत पवनी (जि. भंडारा) येथील उत्खननाचा उल्लेख अनिवार्य आहे. भारतीय पुरातत्त्व सर्वेक्षण आणि नागपूर विद्यापीठाचा पुरातत्त्व विभाग यांच्या संयुक्त विद्यमाने हे उत्खनन झाले. येथील उत्खननात इसवीसनापूर्वीच्या शतकातल्या एका मोठ्या स्तूपाचे अवशेष प्राप्त झाले. शुंगकालीन शिल्पे उपलब्ध झाली. प्रसिद्ध सांची स्तूपापेक्षा हा स्तूप मोठ्या परिघाचा होता; इत्यादी. नागपुरात असतानाच मराठवाडा विद्यापीठाच्या इतिहास विभागाच्या सहकार्याने डॉ. देव यांनी औरंगाबाद जिल्ह्यातील भोकरधन येथेही उत्खनन केले. सातवाहन काळातील एक वसाहत येथे उघडकीस आली. अनेक मौल्यवान वस्तूंमध्ये एक हस्तिदंती स्त्री-प्रतिमाही मिळाली. पॉम्पी (इटली) येथे इसवीसनाच्या पहिल्या शतकातील जी स्त्रीची प्रतिमा मिळाली होती, तिची ही जुळी बहीण शोभेल अशी होती.

डॉ. देव आणि त्यांचे गुरू डॉ. सांकलिया यांचे नाते असे की सांकलिया निवृत्त होण्याच्या सुमारास त्यांनी डॉ. देव यांना प्राध्यापक म्हणून पुण्याला पुन्हा बोलावून घेतले आणि जगप्रसिद्ध डेक्कन महाविद्यालयाच्या संचालकपदी त्यांची निवड १९७८ मध्ये झाली आणि डॉ. देव हे डॉ. सांकलियांचे खऱ्या अर्थाने उत्तराधिकारी झाले.

पुरातत्त्वाचा अभ्यास करायचा तर अनुषंगाने आवश्यक ठरणाऱ्या अन्य शाखांचेही साहाय्य घ्यावे लागते, हे अनुभवाने देवांच्या लक्षात आले होतेच. त्यांनी मग रसायनशास्त्र, पुरावनस्पतिशास्त्र, पुराजीवशास्त्र, मानववंशशास्त्र यांचा शास्त्रदृष्ट्या उपयोग करून घेण्यासाठी प्रयोगशाळांची व्यवस्था केली आणि भारतातल्या विद्यापीठांत एकमेव ठरावा असा, प्रयोगशाळांनी सुसज्ज पुरातत्त्व विभाग विस्तारित केला. जोडीला इमारतीचाही विस्तार केला. देवांच्या अथक परिश्रमाने आपले असे वैशिष्ट्यपूर्ण स्थान डेक्कन महाविद्यालयाने प्राप्त केल्याचे पाहून १९८५मध्ये विद्यापीठ अनुदान मंडळाच्या संबंधीत समितीने या संस्थेला अभिमत विद्यापीठाचा दर्जा दिलाच पाहिजे अशी शिफारस केली. स्वत:च्या वैयक्तिक भल्यापेक्षा डेक्कन महाविद्यालयाची प्रतिष्ठा वाढली पाहिजे याकडेच त्यांनी अधिक लक्ष दिले. १९७३मध्ये डॉ.सांकलियांच्या अमृत महोत्सवानिमित्त एक परिषद बोलावून भारत आणि भारताबाहेरील पुरातत्त्व पंडितांच्या साक्षीने त्यांनी सांकलियांचा सत्कार करून गुरुऋण फेडले.

डॉ. देवांनी भाषणासाठी, चर्चासत्रात भाग घेण्यासाठी जर्मनी, इंग्लंड, अमेरिका, स्वित्झरलँड, रशिया इत्यादी देशांत प्रवास केला. १९९६ मध्ये जागतिक पुरातत्त्व परिषद साउथम्पटन (इंग्लंड) येथे भरली होती. तीत विभागीय अध्यक्ष म्हणून त्यांनी भाग घेतला, तर भारत-रशिया सहकार्य योजनेत अक्शाबाद (रशिया) येथील परिसंवादात भाग घेण्यासाठी विद्यापीठ अनुदान मंडळाने त्यांची निवड केली होती. नेपाळ येथे तर इंडिया एड मिशनने त्रिभुवन विद्यापीठात भारतीय विद्या विभाग सुरू करण्यासाठी प्राध्यापक म्हणून त्यांची नियुक्ती केली होती

(१९६३-१९६५). तेथे त्यांनी दोन ठिकाणी उत्खनने केली. त्यांच्या वृत्तान्तासह नेपाळमधील काष्ठशिल्प यावरील पुस्तकही प्रसिद्ध केले.

ग्रंथसंपदेचा विचार करता डॉ. देवांनी लिहिलेल्या 'पुरातत्त्व विद्या' या ग्रंथाचा सर्वप्रथम विचार करावा लागेल. इतका साक्षेपी, 'विस्तृत आणि मराठी' पारिभाषिक शब्दांची निर्मिती करून या विषयावर लिहिलेला हा पहिलाच ग्रंथ होय. अन्य ग्रंथांत महाराष्ट्रातील उत्खनने, जैन संप्रदाय व संस्कृती : काही विचार, महाराष्ट्र : एक पुरातत्त्वीय समालोचन या सर्व ग्रंथांना शासकीय वा अन्य पारितोषिके मिळाली. तर महाराष्ट्र व गोवा : शिलालेख व ताम्रपत्रांची वर्णनात्मक सूची. हे ग्रंथही त्यांच्या नावावर जमा आहेत. उत्खनन-वृत्तान्तावरील अनेक ग्रंथांशिवाय मार्कण्डी टेम्पल्स, हिस्ट्री ऑफ जैन मोनॅरिजम फ्रॉम इन्स्क्रीप्शन्स ॲन्ड लिटरेचर, जैन मोनॅस्टिक ज्युरिस्प्रुडल्स, प्रॉब्लेम ऑफ साउथ इंडिअन मेगॅलिथ्स, जैन कॅनॅनीकल लिटरेचर इत्यादी ग्रंथ प्रकाशित झाले.

याशिवाय देशी-परदेशी जर्नल्समधून ७५च्या वर विविध विषयांवरील लेख ही जमेची बाजू आहेच. 'आपणासारखे करिती तत्काल' या संत वचनानुसार व हेतूने सुमारे २० विद्यार्थ्यांना (त्यांतील बरेच जण या घडीला नामवंत) त्यांनी पीएच.डी.साठी मार्गदर्शन केले. डॉ. देवांनी बनारस, मद्रास, मुंबई, कर्नाटक, नागपूर, हैद्राबाद, बडोदा, म्हैसूर येथे तसेच परदेशात लेनीनग्राड, लंडन विद्यापीठ, लंडन येथे विशेष व्याख्याने दिली. त्यांना जे पुरस्कार मिळाले, त्याचीही नोंद येथे करावी लागेल. भारतीय पुरातत्त्व सर्वेक्षण विभागाने त्यांचा मानद विद्वान म्हणून सन्मान केला. विद्यापीठ अनुदान मंडळ व भारतीय इतिहास अनुसंधान परिषद, राज्य पुरातत्त्व विभाग, राष्ट्रीय संग्रहालयाची पुरावस्तू निवड समिती आणि अनेक विद्यापीठांच्या समित्यांशी त्यांचा संबंध होता. निवृत्त झाल्यावर १९८५मध्ये त्यांची नेमणूक भोगीलाल भारतीय विद्या संस्था, दिल्ली येथे संचालक म्हणून झाली. त्यांना भारतीय इतिहास अनुसंधान परिषदेने दोन वेळा विद्वतवृत्ती दिली. विद्यापीठ अनुदान मंडळाने राष्ट्रीय व्याख्यातेपद दिले. विशेष म्हणजे दक्षिण भारत जैन सभेने मानपत्र, मानधन देऊन त्यांचा सत्कार केला. महाराष्ट्र शासनाने त्यांना जीवनभरासाठी मानद प्राध्यापक म्हणून गौरविले.

— डॉ. गो.बं. देगलूरकर

## देवस्थळी, गोविंद विनायक

**संस्कृत प्राध्यापक, प्राच्यविद्या संशोधक**

**२ ऑक्टोबर १९०६ – १० मार्च १९९४**



गोविंद विनायक देवस्थळी यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यातील धामापूर या गावी झाला. त्यांचे शिक्षण मुंबईमध्ये झाले. मुंबईतील सेंट झेवियर्स आणि विल्सन महाविद्यालयातून त्यांनी बी.ए.पर्यंत शिक्षण घेतले आणि मुंबई विद्यापीठातूनच एम.ए. आणि पीएच.डी.ची पदवी प्राप्त केली. एम.ए.चे शिक्षण घेत असताना त्यांना मुंबई विद्यापीठाचे वेदान्त पारितोषिक मिळाले होते.

काही काळ मुंबईतील शाळेत काम केल्यानंतर त्यांनी नाशिक येथील एच.पी.टी. महाविद्यालयात २७ वर्षे प्राध्यापक म्हणून काम केले. त्यानंतर १९६४ ते १९६९ या काळात पुणे विद्यापीठातील संस्कृत प्रगत अध्ययन केंद्रात प्राध्यापक म्हणून काम केले. १९६९ ते १९७३ या काळात यु.जी.सी.च्या सेवानिवृत्त शिक्षकांसाठी असलेल्या योजनेखाली देवस्थळी यांनी पुणे विद्यापीठात प्राध्यापक म्हणून कार्य केले, त्याचप्रमाणे डेक्कन महाविद्यालयातील संस्कृत शब्दकोश प्रकल्पात संपादक म्हणून आणि त्यानंतर भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिरातील पदव्युत्तर विभागात प्राध्यापक म्हणून शेवटपर्यंत संशोधनाचे कार्य केले.

डॉ. देवस्थळी यांचे संशोधनकार्य विविध स्वरूपाचे आहे. त्यांपैकी 'Mimamia the Vakyas'astra of

Ancient India'; मुंबई १९६९ हा त्यांचा संशोधन प्रबंध आहे. तसेच, १९६५ मध्ये पुणे विद्यापीठातील भाऊ दाजी अष्टेकर व्याख्यानमालेतील 'रिलिजन ॲण्ड मायथॉलॉजी ऑफ द ब्राह्मणाज', पुणे, १९६५ हा ग्रंथही महत्त्वाचा आहे. तसेच, 'अनुबंधाज ऑफ पाणिनी'; पुणे, १९६९ हा ग्रंथही प्रसिद्ध आहे. डॉ. गोविंद देवस्थळी यांचे संपादन क्षेत्रातील कार्य विशेष उल्लेख करण्यायोग्य आहे. यामध्ये 'डिस्क्रिप्टिव्ह कॅटलॉग ऑफ संस्कृत ॲण्ड प्राकृत मॅन्युस्क्रिप्ट्स' याचे त्यांनी मुंबईमध्ये १९४४ साली संपादन केले. 'Phitsutras of shantnav'; पुणे, १९६७; 'Sarasiddhanta Kaumudi'; पुणे, १९६८; 'Vedavikruti Laksana Sangraha' (सहकार्याने); पुणे १९७८ यांचा विशेष उल्लेख करावा लागेल. याशिवाय विद्यार्थ्यांना अध्ययनासाठी उपयोगी पडतील अशा प्रकारच्या काही कार्याचा उल्लेख करणे योग्य ठरेल. यामध्ये १९३६ मध्ये मुंबईत 'पॉकेट डिक्शनरी ऑफ संस्कृत-इंग्लिश'; मुंबई, १९३६; 'Introduction to Mudraraksasa'; मुंबई, १९४८; 'Introduction to Mrcchakatika'; मुंबई, १९५१; वेणीसंहाराची संपादित आवृत्ती, मुंबई १९५३ हे कार्य महत्त्वाचे आहे. याखेरीज 'स्वरमंजिरी'; पुणे, १९६५ आणि 'शृंगाररसमंडण; पुणे, १९७६ हे संपादित ग्रंथही महत्त्वाचे आहेत. 'Oriental Thought', तसेच 'Indian Antiquary' (Third series) या नियतकालिकांचे संपादनही त्यांनी काही वर्षे केले.

डॉ. देवस्थळींच्या संकीर्ण लेखांमध्ये अनेक शोधनिबंध, तसेच अन्य संकीर्ण लेखनाचा उल्लेख करता येईल. संकीर्ण लेखनामध्ये भारतीय विद्याभवनातर्फे प्रसिद्ध झालेल्या 'द हिस्टरी ॲण्ड कल्चर ऑफ द इंडियन पीपल' या ग्रंथातील काही भाग, मराठी तत्त्वज्ञान कोशातील काही भाग आणि धर्मकोश यांतील काही भाग महत्त्वाचा आहे. डॉ. देवस्थळी अखिल भारतीय प्राच्यविद्या परिषदेच्या कार्यकारी मंडळात, तसेच भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिराच्या नियामक मंडळात आणि कार्यकारी मंडळात होते. अखिल भारतीय प्राच्यविद्या परिषदेतील अभिजात संस्कृत विभागाचे १९५६ मध्ये आणि १९७६ मध्ये वैदिक विभागाचे अध्यक्ष म्हणून त्यांनी काम केले होते.

— गणेश थिटे

## देवी, गणेश नारायणदास

**भाषाशास्त्र तज्ज्ञ / भाषाशास्त्र अभ्यासक, लेखक**
**१ जुलै १९५०**



''प्राचीन भारतीय तत्त्वज्ञानात इतका विपुल भाषाविचार असतानाही आपल्या आजच्या भाषाशास्त्रज्ञांना त्याचा उपयोग कसा करायचा हे समजत का नाही? शिवाय भाषाशास्त्र केवळ अठराव्या शतकात युरोपमध्ये निर्माण झाले, असे ते का मानतात?'' ('वानप्रस्थ' २००६, पृ. ३०)

डॉ. गणेश देवी यांना पडणारा हा प्रश्न त्यांच्यातील भाषाअभ्यासकाची भूमिका प्रकाशात आणतो. 'भारतीय भाषांचे लोकसर्वेक्षण' हा बृहद्प्रकल्प पूर्ण करून ७८० भारतीय भाषांचा माहितीपूर्ण खजिना सादर करण्याचे त्यांचे कार्य जागतिक पातळीवरही अजोड ठरले आहे.

गणेश देवी यांचा जन्म भोर (जि. पुणे) येथे झाला. प्रतिभादेवी आणि नारायणदास हे त्यांचे आईवडील. भोर येथे शालेय शिक्षण घेतल्यावर ते सांगलीला गेले. तेथे पदवीपर्यंतचे शिक्षण झाल्यावर कोल्हापूर येथील शिवाजी विद्यापीठात त्यांनी पदव्युत्तर शिक्षण व पीएच.डी. पूर्ण केले. गुजरात राज्यातील बडोदा येथील महाराजा सयाजीराव विद्यापीठ हे त्यांचे कार्यक्षेत्र राहिले. १९८० ते १९९६ या कालावधीमध्ये ते तेथे इंग्रजीचे प्राध्यापक व विभागप्रमुख होते. इंग्लंडमधील लीड्स आणि अमेरिकेतील येल विद्यापीठात त्यांनी काही काळ

अध्ययन-अध्यापन केले. डॉ. देवी यांच्या 'आफ्टर ॲम्नेशिया' या इंग्रजी पुस्तकाला साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळाला. त्यांनी इंग्रजी, गुजराती आणि मराठी या भाषांमध्ये पुस्तके लिहिली असून संपादनाचे कामही केले आहे. 'इन अनदर टंग', 'पेंटेड वर्ड्सः लिटरेचर ऑफ आदिवासीज अँड डिनोटिफाईड ट्राईब्ज', 'इंडियन लिटररी क्रिटिसिझम : थिअरी अँड इंटरप्रिटेशन', 'ए नोमॅड कॉल्ड थीफ', 'द जी. एन. देवी रिडर', 'ऑफ मेनी हीरोज' ही इंगजी पुस्तके, 'आदिवासी जाने छे', 'विकास विचार' ही गुजराती पुस्तके आणि 'वानप्रस्थ', 'साठ वर्षांची गोष्ट' ही मराठी पुस्तके त्यांच्यातील चिंतनशील लेखकाचे दर्शन घडवतात.

डॉ. देवी यांनी वयाच्या ४५व्या वर्षी उत्तम अकादमिक स्थितीमध्ये नोकरीकडे पाठ फिरवली आणि आदिवासी भाषा संस्कृतीच्या जपणुकीसाठी स्वतःला झोकून दिले. त्यांनी तेजगढ येथे आदिवासींसाठी शांतिनिकेतन स्थापन करण्याचा ध्यास घेतला. आदिवासींसाठी त्यांनी 'आदिवासी अकादमी', 'भाषा संशोधन प्रकाशन केंद्र', 'ग्रामविकास केंद्र', 'ढोल' या नियतकालिकाची निर्मिती अशा कामांची उभारणी केली. अलक्षित अशा भाषासमूहांविषयीची सामाजिक उत्तरदायित्वाची भावना त्यांना अस्वस्थ करीत होती. त्यातून त्यांनी २००९मध्ये भारतीय भाषांच्या लोकसर्वेक्षणाचा प्रकल्प हाती घेतला. ८५ संस्थांच्या मदतीने अनेक शास्त्रज्ञ आणि स्वयंसेवक यांच्या सहभागातून ४ वर्षे चाललेल्या या प्रकल्पाचे डॉ. देवी यांनी नियोजनबद्ध पद्धतीने धुरीणत्व स्वीकारले. त्यासाठी त्यांनी २०१२मध्ये व २०१३मध्ये भाषापरिषदांचे आयोजन केले. त्यात राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय भाषातज्ज्ञांचा समावेश होता. सामायिक बांधिलकीच्या भावनेतून त्यांनी हे अवघड काम पूर्ण केले. त्यातून ७८० भारतीय भाषांची ३५००० पृष्ठे भरतील इतकी (अनेक खंडात्मक) माहिती सादर झाली आहे. (महाराष्ट्रातील भाषांच्या सर्वेक्षणाचा खंड अरुण जाखडे, पद्मगंधा प्रकाशन यांनी संपादित केला आहे.) समाजशास्त्र, मानववंशशास्त्र आदींसाठीही ही माहिती उपयुक्त ठरेल. लिपी नसलेल्या अनेक भाषा बोलणाऱ्या समूहांचे आवाज या प्रकल्पामुळे मुख्य प्रवाहापर्यंत पोहोचणे शक्य होणार आहे. त्यांनी पहाडी भाषेच्या आणि संस्कृतीच्या अभ्यासासाठी हिमालयात 'हिमलोक' ही संस्थादेखील स्थापन केली आहे.

'वानप्रस्थ' या पुस्तकातून त्यांच्यामधील तत्त्वज्ञ वृत्तीच्या कविमनाची आणि कृतिशील विचारवंताची ओळख पटते. गुजरात येथील दंगलीत आदिवासींचे समुपदेशन करतानाची त्यांची तळमळ त्यांच्यावरील म. गांधींचे शांतता आणि अहिंसा या मूल्यांचे संस्कार दर्शवणारी आहे. परंपरा आणि आधुनिकता या द्वंद्वाकडे पाहण्याची दृष्टी पोथीनिष्ठ नाही. चौकटीबाहेर जाऊन विचार करणे, उदात्त स्वप्न पाहणे आणि ती प्रत्यक्षात उतरवण्यासाठी झटणे, ही त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची वैशिष्ट्ये आहेत. बिनराजकीय कृतिप्रवणता आणि बिनआध्यात्मिक अपरिग्रह हा मिलाफ त्यामुळेच त्यांच्या जीवनात दिसतो. 'आफ्टर ॲम्नेशिया' या त्यांच्या इंग्रजी ग्रंथाचे उपशीर्षक आहे - 'भारतीय साहित्यसमीक्षेची परंपरा आणि तिच्यातील परिवर्तन'. हा त्यांचा ग्रंथ देशीवादाचा एक अधिकृत दस्तऐवज मानला जातो. (डॉ. म. सु. पाटील यांनी हा ग्रंथ मराठीत अनुवादित केला आहे.)

डॉ. देवी यांना लेखनासाठी अनेक पुरस्कार व सामाजिक कार्यासाठी अनेक सन्मान प्राप्त झाले आहेत. 'वानप्रस्थ' या पुस्तकाला महाराष्ट्र शासन, महाराष्ट्र फाउंडेशन आदी संस्थांचे सहा पुरस्कार मिळाले आहेत. 'आफ्टर ॲम्नेशिया'ला १९९३चा केंद्रीय साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळाला आहे. 'भारतीय भाषांचे लोकसर्वेक्षण' हे त्यांचे काम स्वातंत्र्योत्तर कालखंडातील पहिले सर्वेक्षण ठरले. त्याबद्दल केंद्र सरकारने २०१४मध्ये त्यांना 'पद्मश्री' हा किताब दिला आहे. युनेस्को, स्पेन या संस्थेने 'लिंग्वापॅक्स' हा जागतिक पातळीवरचा सन्मान त्यांना दिला आहे. भाषेच्या माध्यमातून शांती आणि सामंजस्य घडवण्यासाठी त्यांनी

केलेल्या प्रयत्नांना मिळालेली ही सर्वोच्च पावती आहे. तीस राष्ट्रांतील अनेक संस्थांनी त्यांना निमंत्रित केले आहे. सार्क रायटर्स फाउंडेशन अ‍ॅवॉर्ड, गुन्थर सोन्थायमर अ‍ॅवॉर्ड, येल विद्यापीठाची फुलब्राइट फेलोशिप आणि प्रिन्स कलाऊज अ‍ॅवॉर्ड असे अनेक सन्मान त्यांना प्राप्त झाले आहेत. आजही आदिवासी अकादमीच्या माध्यमातून ते आदिवासी विकास कार्याबरोबर शिक्षणविषयक नवनव्या उपक्रमांसाठी क्रियाशील आहेत.

— डॉ. नीलिमा गुंडी

**संदर्भ :**


१. *'वानप्रस्थ', गणेश देवी, पद्मगंधा प्रकाशन, पुणे २००६.*
२. *मराठी प्रकाशक परिषद, पुणेतर्फे डॉ. देवी यांना १२/२/२०१४ रोजी दिलेले गौरवपत्र.*
३. *जाखडे, अरुण - 'भारतीय भाषांचे लोकसर्वेक्षण' भाषा आणि जीवन (त्रै), बोली विशेषांक, दिवाळी २०१२, पृ. १०७-१११.*




## देशपांडे, गजानन त्र्यंबक

***नानासाहेब देशपांडे***

**भारतीय साहित्यशास्त्र चिकित्सक, संपादक, प्राच्यविद्या संशोधक**

**१४ ऑगस्ट १९१० – मृत्युदिनांक अनुपलब्ध**

गजानन त्र्यंबक देशपांडे यांचा जन्म अमरावती जिल्ह्यातील वडनेर खेडेगावात झाला. त्यांचे शालेय शिक्षण अमरावती येथील हिंदू हायस्कूलमध्ये आणि त्यांचे महाविद्यालयीन शिक्षण नागपुरातील मॉरीस महाविद्यालयात झाले. बी.ए.ला संस्कृत या विषयात सर्वप्रथम आल्याबद्दल त्यांना 'सरस्वतीबाई कोलते' सुवर्णपदक प्राप्त झाले. त्यानंतर त्यांनी एल.एल.बी. पदवी प्राप्त केली. पुढे १९४६ मध्ये त्यांनी खाजगीरीत्या संस्कृत या विषयात एम.ए. पदवी प्राप्त केली आणि या परीक्षेतही सर्वप्रथम आल्याबद्दल त्यांना 'दाजी हरी वाडेगावकर' सुवर्णपदक प्राप्त झाले.

त्यांना १९५२ मध्ये मुंबई मराठी साहित्य संघात 'साहित्यशास्त्र' या विषयावर व्याख्याने देण्यासाठी पाचारण करण्यात आले. या व्याख्यानांवर आधारित 'भारतीय साहित्यशास्त्र' हा ग्रंथ म्हणजे मराठी वाङ्मयाचे व साहित्यशास्त्राचे अनमोल लेणे होय. पॉप्युलर प्रकाशनाने प्रकाशित केलेल्या या ग्रंथाला साहित्य अकादमीचा पुरस्कार प्राप्त झाला. प्रस्तुत ग्रंथासाठी नागपूर विद्यापीठाने त्यांना डी.लिट. ही पदवी देऊन एक प्रकारे ग्रंथाच्या अपूर्वतेची पावतीच दिली.

नानासाहेब १९५६ मध्ये नागपूर विद्यापीठाच्या संस्कृत विभागात 'रीडर' म्हणून रुजू झाले. पुढे ते त्याच विभागात प्राध्यापक झाले. नागपूर विद्यापीठात स्नातकोत्तर अध्यापन विभाग (मानव्यविद्या) या विभागाचे प्रमुख पद त्यांनी 'ऑफिसर इन चार्ज' म्हणून भूषविले. कला शाखेचे अधिष्ठाता म्हणून त्यांनी वरील विद्यापीठात काही काळ कार्यभारही सांभाळला. संस्कृत विभागामध्ये व्याकरण, वेद, पुराण, मीमांसा, धर्मशास्त्र अशा बहुविध शाखा निर्माण केल्यामुळे त्यांच्या कारकिर्दीत संस्कृत विभागाची भरभराट झाली. अनेक विद्यार्थ्यांना त्यांच्या मार्गदर्शनाखाली वेद, पुराणे, मीमांसा-धर्मशास्त्र, व्याकरण, अभिजात संस्कृत साहित्य, दर्शनशास्त्र, संस्कृत साहित्यशास्त्र आणि भक्तिशास्त्र या शाखांवर आधारित पीएच.डी. करण्याचे भाग्य लाभले. नागपूर विद्यापीठाच्या जर्नलचे मुख्य संपादक म्हणूनही त्यांनी कार्यभार सांभाळला.

डॉ. पंजाबराव देशमुख यांच्या शिवाजी शिक्षण संस्थेने सुरू केलेल्या शिवाजी महाविद्यालयामध्ये १९४६-१९५९ या काळात नानासाहेबांनी संस्कृतचे उत्कृष्ट प्राध्यापक म्हणून लौकिक मिळविला. याच काळात त्यांनी कायद्याचे अध्यापन केले. तसेच, अमरावती येथील लोकविद्यापीठाचे रजिस्ट्रार पददेखील सांभाळले.

भारतीय साहित्यशास्त्र या ग्रंथामध्ये पूर्वार्धात नानासाहेबांनी भरतमुनींपासून जगन्नाथ पंडितांपर्यंत भारतीय साहित्यशास्त्राचा विकास कसा होत गेला याची सुसंगत मांडणी केली आहे. नानासाहेबांच्या मते भरत,

भामह, वामन यांच्या संप्रदायांचा समन्वय होऊ शकतो. त्या सगळ्यांच्या मतांना भिन्न संप्रदाय मानणे ही वैचारिक गल्लत होय. ग्रंथाच्या उत्तरार्धात त्यांनी शब्दार्थाचे स्वरूप, अभिधा, लक्षणा, व्यंजना, व्यंगार्थ अथवा ध्वनी, रसप्रक्रिया यांसारख्या विषयांचे चिकित्सक विवेचन केले आहे. अभिनवगुप्ताच्या 'अभिनवभारती' व 'ध्वन्यालोकलोचना' या टीकांच्या आधारे विविध सिद्धान्तांची केलेली चिकित्सा या ग्रंथाला आशयघनता प्राप्त करून देते.

रसविषयक प्रश्नामध्ये नानासाहेब म्हणतात, ''रसविवेचनाचा अभ्यास करताना एक गोष्ट अवश्य लक्षात ठेवली पाहिजे. विभाव, अनुभाव, व्यभिचारी, स्थायी इत्यादिकांचे आपण जे विवेचन करतो, ते नेहमी अपोद्धार बुद्धीने केलेले विवेचन होय; वस्तुत: रसास्वाद ही रसिकाची अखंड एकघन प्रतीती आहे. ती प्रतीती खंडश: येत नाही.''

'सांख्यकारिका' या ग्रंथात ईश्वरकृष्णांच्या सांख्यकारिकांचा नानासाहेबांनी मराठीत अनुवाद केला आहे. 'सत्तर कारिकांपैकी ५२ कारिका प्रमाणित आहेत व उरलेल्या कारिका प्रक्षिप्त आहेत,' असे मत नानासाहेबांनी व्यक्त केले आहे. 'गौडपाद आणि वाचस्पती मिश्र यांच्या कारिकांवरील टीका कित्येकदा परस्परविरोधी आहेत. त्यांचा स्वतंत्र अभ्यास आवश्यक आहे,' असे नानासाहेब म्हणतात. या ग्रंथातील सत्कार्यवाद आणि आरम्भवादाचे विवेचन वाचकाला नानासाहेबांच्या स्वतंत्र प्रज्ञेचा प्रत्यय करून देते.

'अभिनवगुप्त' या इंग्रजी भाषेतील ग्रंथात अभिनवगुप्ताचे चरित्र आणि ग्रंथांची माहिती नानासाहेबांनी दिली असून काश्मिरी अद्वैत शैवमताचा ऐतिहासिक मागोवा घेतला आहे. तसेच, या मताचे तत्त्वज्ञान प्रतिपादित केले आहे. सौंदर्यमीमांसा आणि रससिद्धान्ताचे सांगोपांग विवेचन या ग्रंथात आढळते. 'अभिनवगुप्ता'चा प्रभाव नंतरच्या साहित्यिकांवर कसा पडला याचे त्यांनी सप्रमाण प्रतिपादन केले आहे.

'स्पन्दकारिका' या ग्रंथात मूळ संस्कृत कारिकांचा इंग्रजी भाषेत अनुवाद केला असून काश्मिरी शैवमताचे विवेचन केले आहे. स्पन्द म्हणजे शिवाची शक्ती! प्रतिभा! साहित्यशास्त्रातील प्रतिभेचे शक्तीशी असलेले नाते स्पष्ट करताना नानासाहेबांच्या मूलगामी प्रतिभेचा विलास अनुभवास येतो.

'अलंकारप्रदीप' हे पुस्तक नानासाहेब व प्रा. पु.गो. निजसुरे या दोघांनी मिळून लिहिले. अमरावतीच्या ठाकूर आणि कंपनी लिमिटेड या प्रकाशन संस्थेने १ ऑगस्ट १९५४ या दिवशी ते प्रकाशित केले. या पुस्तकाची या दोन्ही लेखकांनी शब्दबद्ध केलेली 'शब्दशक्ती आणि अलंकार' ही प्रस्तावना शब्दार्थ, रस, गुणालंकार, अभिधा, लक्षणा, व्यंजना, शब्दालंकार, अर्थालंकार या विषयांच्या साक्षेपी विवेचनाने मंडित झालेली आहे. संस्कृत आणि मराठी भाषेच्या विद्यार्थ्यांसाठी हे पुस्तक लिहिण्यात आले. विदर्भ संशोधन मंडळाच्या 'इंडॉलॉजिकल पेपर्स'मध्ये नानासाहेबांच्या संशोधनपत्रांचा समावेश आहे.



१९५० साली नानासाहेबांनी 'किरातार्जुनीयम्' या भारवीच्या महाकाव्याच्या आवृत्तीचे संपादन केले, तसेच 'वैदर्भी रीति' ('तरुण भारत' दिवाळी अंक, १९४७), 'भवभूतीच्या करुणरसाचे विवर्त' ('युगवाणी', एप्रिल १९४८), 'ऋग्वेदातील साहित्य' ('युगवाणी', जानेवारी १९५१), 'साहित्यशास्त्रातील काही प्राचीन वाद' ('सत्यकथा', जुलै १९५३) यांसारख्या अनेकविध अभ्यासपूर्ण लेखांनी त्यांनी वैचारिक वाङ्मयात मोलाची भर घातली. 'मेघदूतातील फुले' यासारख्या नावीन्यपूर्ण विषयावरची त्यांची व्याख्याने रसिक मनाला भावली. नोव्हेंबर १९५३ मध्ये नानासाहेबांनी वाई येथे प्राज्ञ पाठशाळेतर्फे 'मीमांसा व कायदेशास्त्र' या विषयावर व्याख्याने दिली.

याशिवाय नागपूर येथे अयाचित मंदिरात आद्य शंकराचार्य जयंती उत्सवात नानासाहेबांनी 'शंकराचार्य-स्तोत्रे व त्यातील गूढार्थ' या विषयावर प्रवचन दिले. नागपुरातीलच दक्षिणामूर्ती मंदिरात 'आद्य शंकराचार्य व अभिनवगुप्त' या विषयावरही त्यांनी प्रवचन केले.

जीवनवाद आणि कलावादाचा संगम असलेला अलौकिकतावाद हे नानासाहेबांच्या लिखाणाचे सूत्र आहे. वाङ्मयातील अनुभव आस्वादयोग्य असावा. तो जीवनमूल्यांचे समर्थन करणारा व जीवनमूल्यविरोधी तत्त्वांना विरोध करणारा असावा, असे त्यांचे मत होते. हे मत भविष्यकाळातील लेखकांची वाट एखाद्या दीपस्तंभाप्रमाणे उजळून टाकण्यास समर्थ आहे.

— डॉ. कला आचार्य

## देशपांडे, प्रल्हाद नरहर
**लेखक, संपादक, संशोधक**
**१७ सप्टेंबर १९३६ – २७ मे २००७**



''या आपल्या थोर देशात साहाय्यांची व सहानुभूतीची कमतरता नाही. कमतरता योग्य काम योग्य सामर्थ्याने वठविणाऱ्या कर्तबगार कामकऱ्यांचीच आहे.'' इतिहासचार्य वि. का. राजवाडे यांच्या या विधानाचे साहाय्य घेत डॉ. अ. रा. कुलकर्णी यांनी डॉ. प्रल्हाद नरहर देशपांडे यांच्या इतिहासविषयक कामगिरीची समीक्षा करताना त्यांचा उल्लेख 'एक कर्तबगार कामकरी' या शब्दांत केलेला आहे.

प्र.न. देशपांडे यांचा जन्म पंढरपूर येथे झाला. आपले पदवी व पदव्युत्तर शिक्षण औरंगाबाद येथे पूर्ण करून तेथेच ते केंद्र सरकारच्या पुरातत्त्व विभागात सर्वेक्षक (सर्व्हेअर) म्हणून रुजू झाले. या नोकरीच्या निमित्ताने त्यांनी देवगिरी (दौलताबाद) या किल्ल्याचे सर्वेक्षण केले. ऐतिहासिक दृष्टिकोनातून किल्ल्यांचा अभ्यास कसा करावा, याचा वस्तुपाठच त्यांना या कामातून मिळाला. पुढे यासंबंधीच्याच विषयात पुढे जात 'महाराष्ट्रातील किल्ले' या विषयावर डॉ. अ. रा. कुलकर्णी यांच्या मार्गदर्शनाखाली पुणे विद्यापीठात त्यांनी पीएच.डी. पदवी मिळविली. सन १९६६ मध्ये धुळ्यास विद्यावर्धिनी महाविद्यालयात इतिहास विषयाचे व्याख्याते म्हणून ते रुजू झाले. महाविद्यालयात अध्यापन करीत करतानाच ते राजवाडे शिष्य भास्कर वामन भट स्थापित इतिहासाचार्य वि. का. राजवाडे संशोधन मंडळाशी निगडित झाले. भट घराण्यातील कर्तबगार मंडळींचा वारसा लाभलेल्या राजवाडे मंडळाच्या मुख्य चिटणीसपदी त्यांची नियुक्ती झाल्यानंतर मंडळातील इतिहासविषयक काम करणे, हेच त्यांनी आपले ध्येय ठेवले. मंडळातील ऐतिहासिक दस्ताऐवज तसेच इतर साम्रगी यांची जपणूक करणे, त्यात काळाच्या ओघात भर टाकणे, खानदेशमध्ये ऐतिहासिक तसेच पुरातात्त्विक सर्वेक्षण करणे, प्रसंगी 'थाळनेर'सारख्या ठिकाणी उत्खनन करणे, मंडळात असलेल्या ऐतिहासिक सामग्रीकरता एक संग्रहालय उभे करणे, मंडळात येणाऱ्या संशोधकांना मदत तसेच मार्गदर्शन करणे; ही कामे त्यांनी अतिशय मनोभावे व निरपेक्षपणे केली.

मंडळाचा संशोधन विभाग नेहमी कार्यरत राहावा यासाठी त्यांनी स्वत: प्रयत्न केले. छत्रपती शिवाजी महाराजांची पत्रे, १०९ कलमी बखर हे दोन ग्रंथ त्यांनी प्रस्तावनेसह संपादून प्रसिद्ध केले. राजगड, रायगड या छत्रपतींच्या दोन राजधान्यांवर स्वतंत्रपणे लिहिलेल्या पुस्तिका, महाराष्ट्र संस्कृती - जडणघडण, मराठ्यांचा उदय व उत्कर्ष हे क्रमिक पुस्तक तसेच अनेक इतिहासविषयक संशोधन लेख त्यांच्या नावावर आहेत. त्यांनी स.मा.गर्गे यांच्या मराठी रियासतीच्या पहिल्या खंडाच्या संपादन सहकार्यास हातभार लावला आहे. 'छत्रपती शिवाजी महाराजांची पत्रे' या ग्रंथास अभ्यासपूर्ण प्रस्तावना लिहून त्यांनी शिवाजी महाराजांच्या सुमारे दोनशे पत्रांचे एकत्रीकरण केले व योग्य त्या ठिकाणी कठीण शब्दांचे अर्थ तसेच टिपा देऊन यथायोग्य संपादन केले आहे.

या सर्वांपेक्षा त्यांनी संपादक म्हणून केलेले काम हे आगळेवेगळे आहे. 'संशोधक' हे राजवाडे मंडळाचे मुखपत्र होय. कै. भास्करराव भटांनी सुरू केलेल्या या त्रैमासिकाचे सुमारे २५ वर्षे त्यांनी संपादन केले. अनेक

नवीन तरुणांना संशोधन करण्यास प्रवृत्त केले. राजवाडे संपादित ‘मराठ्यांच्या इतिहासाची साधने’ या दुर्मीळ झालेल्या मालिकेचे पुन:संपादन त्यांनी केले. त्यांच्या इतिहासविषयक कामगिरीत मैलाचा दगड ठरेल अशी ही गोष्ट आहे.

डॉ. प्र.न. देशपांडे हे जसे उत्तम संशोधक होते, तसेच उत्तम संस्थापकही होते. ‘अखिल महाराष्ट्र इतिहास परिषद’, ‘खानदेश इतिहास परिषद’ इत्यादी संस्थांच्या स्थापनेमध्ये त्यांचा मोलाचा सहभाग होता. उत्तर महाराष्ट्र विद्यापीठाच्या कक्षेतील कागदपत्रे गोळा करणे, त्यांच्या आधारे शोधनिबंध लिहिणे, यासाठी खानदेशातील तरुण संशोधकांना त्यामुळे प्रेरणा मिळाली. महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ, तंजावर पेपर्स कमिटी, इंडियन हिस्टॉरिकल रेकॉर्ड कमिशन, नवी दिल्ली इत्यादी मंडळांवर त्यांची नियुक्ती झाली होती. त्यांच्या मार्गदर्शनाखाली अनेक विद्यार्थ्यांनी पीएच.डी. पदवी मिळविली आहे.

– डॉ. गिरीश मांडके

## देशपांडे, माधव मुरलीधर

**संस्कृत व प्राकृत भाषातज्ज्ञ**

**१४ मार्च १९४६**



‘अमेरिकेतील पुणेकर संस्कृत पंडित’ डॉ. माधव मुरलीधर देशपांडे यांचा जन्म पुण्यात झाला. त्यांच्या आईचे नाव मंदाकिनी आणि वडिलांचे नाव मुरलीधर वासुदेव देशपांडे होते. ते संस्कृत विषयात बी. ए. असून फर्ग्युसन महाविद्यालयातील ग्रंथालयात काम करीत होते. ते मोठे पुस्तकप्रेमी गृहस्थ असून त्यांचा मित्रपरिवार संस्कृत क्षेत्रातलाच होता. त्यामुळे त्या विषयातील घडामोडींची चर्चा घरात कानावर पडे. याचा परिणाम असा झाला की, लहानपणापासूनच डॉ. देशपांडे यांना संस्कृत या विषयाची गोडी वाटू लागली.

एस. एस. सी. परीक्षेत अत्यंत मानाची समजली जाणारी पहिली जगन्नाथ शंकरशेठ शिष्यवृत्ती त्यांनी पटकावली (१९६२). पुढील शिक्षणातही संस्कृत विषयातील पहिला क्रमांक त्यांनी कधीच सोडला नाही. इतकेच नव्हे तर पुढे फर्ग्युसन महाविद्यालयातून बी.ए. (१९६६) व पुणे विद्यापीठातून एम.ए. (१९६८) उत्तीर्ण होताना केवळ संस्कृत विषयात नाही तर सर्व विषयांतील विद्यार्थ्यांत विद्यापीठात ते सर्वप्रथम आले.

शालेय आणि महाविद्यालयीन शिक्षणाबरोबरच १९५८ ते १९६८ ही दहा वर्षे देशपांडे यांनी टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे येथे पारंपरिक शास्त्रे आणि काव्ये यांचा अभ्यास केला.

पुणे विद्यापीठात एम.ए. करत असताना तेथील व्याकरणाचे नामांकित प्राध्यापक डॉ. शि.द. जोशी हे देशपांडे यांच्या वडिलांचे जवळचे स्नेहीही होते. त्यांच्या प्रभावामुळे पुढील शिक्षणासाठी अमेरिकेला जाण्याचे देशपांडे यांनी ठरविले. डॉ. जोशी हे स्वतः पारंपरिक पद्धतीने संस्कृत व्याकरण आत्मसात करून पुढे हार्वर्ड विद्यापीठात शिकून आले होते.

आपल्या विद्यार्थ्यांनी परदेशी जाऊन तेथील प्रगत व चिकित्सक संशोधन पद्धती शिकून यावी असा त्यांचा आग्रह होता. मुख्यतः त्यांच्या प्रोत्साहनानेच देशपांडे अमेरिकेतील पेन्सिल्व्हेनिया विद्यापीठात दाखल झाले. तेथे त्यांना ग्रॅज्युएट फेलोशिपही मिळाली. ‘ओरिएंटल स्टडीज्’मध्ये पीएच. डी. मिळवून डॉ. देशपांडे मायदेशी परतले (मे १९७३). पण त्या सुमारास पुणे विद्यापीठात झालेल्या काही घडामोडींमुळे तेथील सर्व नव्या नेमणुकांवर बंदी घालण्यात आली होती. योगायोगाने त्याच वेळी देशपांडे यांची अमेरिकेतील अनार्बर येथे मिशिगन विद्यापीठात प्राध्यापकपदी नेमणूक झाली. आशियाई भाषा, संस्कृत विभाग आणि भाषाविज्ञान विभागात ते संस्कृत भाषा आणि हिंदू संस्कृती या विषयाचे प्राध्यापक आहेत. संस्कृत ग्रंथांचा अभ्यास करताना येथील पारंपरिक अध्ययन पद्धतीबरोबरच त्या

द

ग्रंथांचा ऐतिहासिक, तौलनिक, सामाजिक व राजकीय संदर्भ लक्षात घेऊन अभ्यास करण्याचा प्रयत्न डॉ. देशपांडे करतात. संस्कृत व्याकरण परंपरा, संस्कृत उच्चारणशास्त्र, ऐतिहासिक व सामाजिक भाषाविज्ञान, भारतातील इंडो-आर्यन भाषा तसेच हिंदू, बौद्ध व जैन या धार्मिक आणि दार्शनिक परंपरा हे त्यांच्या अभ्यासाचे विषय आहेत. या विषयांवर आत्तापर्यंत त्यांची १५ पुस्तके व १५० शोधनिबंध प्रकाशित झाले आहेत. पारंपरिक व आधुनिक अशा दोन्ही पद्धतींचा अभ्यास असल्याने डॉ. देशपांडे यांचे संशोधनपर लिखाण लक्षणीय झाले आहे.

संस्कृत भाषा परदेशी विद्यार्थ्यांना शिकविताना विशिष्ट धर्माची, गूढ किंवा मृत भाषा म्हणून न शिकविता अन्य भाषांप्रमाणेच ती शिकवावी असा त्यांचा दृष्टीकोन आहे. त्यानुसार शिकविताना आलेले अनुभव लक्षात घेऊन 'संस्कृत प्रबोधिनी' हे पाठ्यपुस्तक देशपांडे यांनी इंग्रजीत लिहिले आहे. जडजंबाल व्याकरणाचे ओझे न वाटता सोपेपणाने संस्कृत शिकविण्याचा प्रयत्न यात केला आहे. आजही युरोप-अमेरिकेत विद्यापीठ स्तरावरील अनेक विद्यार्थी हे पाठ्यपुस्तक वापरत आहेत.

पुण्यात विद्यार्थी असताना देशपांडे यांनी अनेक संस्कृत काव्ये व नाटके लिहिली. संस्कृत नाटकात अभिनय केला. वक्तृत्व स्पर्धांत पदके मिळविली. पुढे अमेरिकेत गेल्यावर परिषदांच्या निमित्ताने जगभर प्रवास केला. अनेक शास्त्रीय व वाङ्मयीन चर्चासत्रांत भाग घेतला. आपले दोन गुरुजी डॉ. शि.द. जोशी व प्रा. कार्दोना यांच्या तसेच अनेक अन्य विद्वानांच्या गौरवग्रंथांचे संपादनही डॉ. देशपांडे यांनी केले आहे.

गेली ४०हून अधिक वर्षे डॉ. देशपांडे अमेरिकेत आहेत. पण ते मराठीला विसरले नाहीत. सन १९९३मध्ये त्यांनी पुण्यात मराठीतून दिलेल्या नऊ व्याख्यानांचे परिवर्धित आणि परिष्कृत रूप 'संस्कृत आणि प्राकृत भाषा-व्यवहार, नियमन आणि शास्त्रचर्चा' या नावाने पुस्तक रूपाने प्रसिद्ध झाले आहे. गेल्या तीन-चार हजार वर्षांतल्या संस्कृत व प्राकृत भाषांविषयीच्या परिवर्तनशील कल्पनांचा इतिहास या पुस्तकात देशपांडे यांनी उभा केला आहे. या पुस्तकाला महाराष्ट्र सरकारचे पारितोषिकही मिळाले आहे (१९९५).

सन १९८३च्या सुमारास 'काय रायटर' हे सॉफ्टवेअर वापरून डॉ. देशपांडे यांनी संगणकावर देवनागरी वापरण्याची प्रणाली विकसित केली असून तिचा अनेक ठिकाणी वापर होत आहे.

— डॉ. प्रतिभा मोहन पिंगळे

## देशपांडे, मधुसूदन नरहर

**पुरातत्त्वज्ञ, प्राच्यविद्या अभ्यासक**

**११ नोव्हेंबर १९२० – ७ ऑगस्ट २००८**

मधुसूदन नरहर देशपांडे एक विलक्षण व्यक्तिमत्त्व होते. ते एखाद्या स्थानाला भेट देत, तेव्हा त्या स्थानाबरोबर पूर्णपणे एकरूप होत. समाधान होईपर्यंत ते सातत्याने शिल्पांबरोबर संवाद साधत. किंबहुना, काळाच्या ओघात नष्टप्राय होणारे अवशेष आपली संवेदना जणू त्यांच्यासमोर व्यक्त करत. त्यांनी केलेले काम तसे मोजकेच, पण बोलके असे आहे. सातारा जिल्ह्यातील कडेढोण-मायणी (रहिमतपूर) या लहानशा गावात त्यांचा जन्म झाला. 'आपले कुटुंब हे विश्वभारती आहे', असे ते म्हणत. विविध प्रांतांबरोबर त्यांच्या कुटुंबीयांचे नातेसंबंध प्रस्थापित झाले होते. भारतीय पुरातत्त्व विभागात अधीक्षक या पदावर त्यांनी आपल्या कामाची सुरुवात केली. ते महासंचालक, भारतीय पुरातत्त्व विभाग या पदावरून निवृत्त झाले. पुढे नेहरू सेंटर, मुंबई येथे त्यांनी काही काळ प्रमुख म्हणून काम केले.

डॉ. मधुसूदन नरहर देशपांडे यांना 'अजातशत्रू' म्हणून ओळखले गेले. आपल्या विविध क्षेत्रांतील कामांसाठी जगभरातील पुरातत्त्वज्ञांना त्यांचे आकर्षण राहिले. त्यांनी केलेल्या जतनविषयक कामांतून विविध महत्त्वपूर्ण उपलब्धी झाल्या. १९४६ मध्ये केंद्रीय पुरातत्त्व विभागात कामाला सुरुवात करताना त्यांना मार्टिमर

द

व्हिलर यांचे मार्गदर्शन लाभले. प्रारंभीच त्यांना 'तक्षशिला' येथील उत्खननाचा अनुभव मिळाला. १९७८ मध्ये त्यांनी डायरेक्टर जनरल या सर्वोच्च पदावरून निवृत्ती स्वीकारली.

फर्गसन महाविद्यालयातून 'अर्धमागधी' या विषयात पदवी घेतल्यानंतर ह.धी. सांकलिया यांच्या मार्गदर्शनाखाली 'अ कल्चरल हिस्टरी ऑफ जैन बेस्ड ऑन कॅनोनिकल लिटरेचर ॲण्ड आर्किओलॉजी' (जैनांचा सांस्कृतिक इतिहास-धार्मिक साहित्य व पुरातत्त्वाधारे) या विषयात पीएच.डी. पदवी घेतली. आयुष्यात निवडक असे साधारण पन्नास शोधनिबंध प्रकाशित झाले असले तरी त्याला आंतरराष्ट्रीय दर्जा होता. नेवासा, विशेषत्वाने बहाळ व टेक वडा उत्खनन हे प्रागैतिहासिक इतिहासाच्या संदर्भात महत्त्वाचे ठरले. दायमाबाद उत्खननात त्यांचेच मार्गदर्शन शंकर साळी यांस लाभले. अजिंठा पेन्टिंग्स, एलोरा शिल्प, तसेच भाजा येथील लेण्यांतील लाकडी फासळ्यांवरील शिलालेखांचे वाचन, तसेच पितळखोरा येथील लेण्यांवरील संशोधन अनेक दृष्टीने महत्त्वाचे ठरले. 'तेर' येथील रोमन मृद्‌भांडी व रोमन संपर्क यां संदर्भात त्यांचे लेखन लक्षणीय आहे.

पंजाबमधील अंबखेरी येथे त्यांनी हडप्पन संस्कृतीचे अवशेष शोधले, तर तामलुक (Tamluk) येथे गुप्तकाळातील मृद्‌भांड्यांच्या संदर्भातील काम लक्षणीय होते. त्यांची तीन दिवसांची व्याख्यानमाला, जी नामग्याल इन्स्टिट्यूट ऑफ तिबेटोलॉजी, गंगटोक येथे झाली. त्याचा विषय अजिंठा आणि टॅबे लाहोल स्पिटी (हिमालयन अजंठा) हा होता (१९७३). त्यांच्या निवृत्तीनंतर 'मधू' या नावाने गौरवग्रंथ (फेलिसिटेशन व्हॉल्यूम) १९८१ मध्ये निघाला, तो संदर्भग्रंथ म्हणून मानला जातो. त्यांनी निवृत्तीनंतर पंडित जवाहरलाल नेहरू यांच्या 'डिस्कव्हरी ऑफ इंडिया' या ग्रंथाधारे नेहरू सेंटर येथे कलादालनाची निर्मिती केली.

**कैलासबरोबरचा संवाद :** वेरूळ लेण्यांतील कैलासच्या निर्मितीचा इतिहास सांगताना देशपांडे प्रत्यक्ष कैलास श्रोत्यांसमोर उभा करीत. यांतील प्रत्येक शिल्पनिर्मितीची त्यांना जाण होती. एकूण भारतीय कलाइतिहासावर त्यांची चांगली पकड होती. दशावतार लेण्यांच्या बाबतीत (लेणे क्र.१५, वेरूळ, जि. औरंगाबाद) ते म्हणतात, ''येथे सातव्या-आठव्या शतकात दोन ताल व तीन ताल, रावण की खाई, दशावतार या विशाल लेण्यांची निर्मिती कैलासच्या आधी झाली. मुळात सहाव्या-सातव्या शतकात बदामी चालुक्यांच्या प्रभावाखाली दशावतार लेणे खोदण्यास सुरुवात केली गेली. आठव्या शतकाच्या प्रारंभी बौद्ध धर्मियांनी या स्थानावर आपला प्रभाव जमवला व लेण्याच्या वरच्या मजल्यावर त्यांनी बुद्ध प्रतिमा खोदण्यास प्रारंभ केला. याची साक्ष येथील बुद्ध प्रतिमा व तत्संबंधी परिवार देवतांच्या मूर्तिशिल्पांवरून मिळते. नंतर राष्ट्रकूट राजा दंतिदुर्ग याने हे लेणे बौद्धानुयायांकडून काढून घेतले. (इ.स. ७३५ ते ७५५).

लेण्यांच्या प्रांगणात एकाश्म नंदीमंडपाच्या दर्शनी भागावर दंतिदुर्गाचा शिलालेख आहे. येथे त्याने काही काळ वास्तव्य केले होते असे दिसते. मंडपाचे जाळीदार वातायन हे चालुक्य स्थापत्यशैलीचे वैशिष्ट्य व्यक्त करते. किंबहुना, ते ऐहोळीच्या लाडखाण ते पट्टदखल-विरूपाक्ष पापनाथ परंपरेतील आहे. द्वितीय विक्रमादित्याच्या काळात लेण्यांच्या उत्खननास सुरुवात झाली होती. नंदीमंडपासमोरील शिवालयाचे व शिवपिंडीचे काम रेंगाळले होते. हे काम शेवटचा चालुक्य राजा द्वितीय कीर्तिवर्मन याच्या कार्यपद्धतीमुळे रेंगाळले असावे. याचा फायदा बौद्ध धर्मियांना झाला. वरील मजल्यावर बुद्ध व बोधिसत्त्व परिवारकांची शिल्पे उत्कीर्ण केली गेली, तर राष्ट्रकूट राजा दंतिदुर्ग याने हे लेणे पुन्हा हिंदुधर्मियांकडे सोपविले. परिणामी, वरील मजल्यावर असलेल्या शिल्पपटात नव्याने मूर्तींचे रूपांतर केले गेले. जुन्या बौद्ध प्रतिमा नव्या शिल्पात थोड्या फरकाने सामावून घेतल्या गेल्या. उदा. शिवतांडव शिल्पातील पार्वती ही मुळातील संव्यललितासनात बसलेली तारेची मूर्ती आहे.

अंतराळात समोरासमोर कोरलेले मूळ यक्ष-कुबेर व महामयूरी यांच्या मूर्ती थोड्याफार किंवा अर्धवट प्रयत्नांनी परिवर्तित केल्या गेल्या. येथील यक्ष-कुबेरांचे गणपतीमध्ये परिवर्तन झाले, तर महामयूरीचे मयूरवाहन कार्तिकेयास बहाल करण्यात आले. असे करताना मूळ स्त्री-देवतेचे पुरुष (कार्तिकेय) प्रतिमेत रूपांतर करण्यात आले. अशी सूक्ष्म निरीक्षण देशपांडेच करीत. एकूण राष्ट्रकूट काळात बौद्ध कलेच्या प्रसारास आळा बसला, तर शैव उपासनेला प्राधान्य मिळाले.

मुंबई परिसरामध्ये सहाव्या शतकात घारापुरी, जोगेश्वरी, मंडपेश्वर या ठिकाणी शैव शैलगृहांची निर्मिती झाली. काण्हेरी येथे मात्र बाराव्या शतकापर्यंत तांत्रिक वज्रायानी केंद्र सुरू होते. बौद्ध धर्म टिकून होता. कोंडिवटे येथेपण बौद्ध धर्म टिकून होता. मुळातील हिनयान विहार आता महाकाल नावाने ओळखला जाऊ लागला, यांसारखे त्यांचे निरीक्षण विलक्षण आहे.

महाराष्ट्रामध्ये राष्ट्रकूट काळात शैव लेणी खोदण्यास प्रारंभ झाला. पाताळेश्वर लेणी (पुणे), हरिश्चंद्र गडावरील लेणी व ढोके (टाकळी ढोकेश्वर, जि. अहमदनगर) येथे लयन निर्मिती झाली. थोड्या आधीच्या काळात लाकुलिश शिवाला प्राधान्य असलेली कलचुरींची शिवमंदिरे उभारली गेली.

**गणपती :** ॐपासून साकारलेला गणेश वैदिक काळापासून असल्याची मान्यता असली, तरी प्रत्यक्ष शिल्पाच्या स्वरूपात महाराष्ट्रात सहाव्या शतकाच्या सुमारास गणपती व कार्तिकेय शिल्पे दिसू लागतात. कल्याणजवळील लोणाड येथे पाचव्या शतकात कोरलेली पहिली स्वतंत्र गणेशाची मूर्ती दिसते, ती दोन हातांची आहे. नंतर सप्तमातृकांबरोबर वेरूळमध्ये गणेश दिसू लागतो. कैलास लेण्यांत मात्र आठव्या शतकात गर्भगृहात सभोवताली असलेल्या सप्तपरिवार देवतेच्या मंदिरात गणपतीला स्वतंत्रपणे स्थान दिल्याचे दिसते. येथून याच्या स्वतंत्र पंथाची सुरुवात झाली असावी. म्हणजे सहाव्या शतकात यक्ष-कुबेराची जागा घेऊ लागलेला गणेश राष्ट्रकूट काळात प्रथमच शैव उपासनेत नंतर देवता परिवारातील एक घटक व पुढे स्वतंत्र देवता याप्रमाणे महाराष्ट्रात गणेशपूजेला प्रारंभ झाला.

शिलाहार राजा अपराजिताने शके ९१९ च्या भांदक दानपत्रापासून ''ॐ नमो विनायकाय'' अशी दानपत्राची सुरुवात होऊ लागली. त्यानंतर विस्तृत शिवस्तुतिकारक श्लोक येऊ लागले. अरिरकेसरीच्या शके ९३९, ठाणा ताम्रपटात गणपतीच्या स्तुतीसाठी एका स्वतंत्र श्लोकाची सुरुवात झाली : ''सिद्धां जयश्चाभ्युदयश्चं लभते सर्वकार्येषु पूजया गणनायक:। विघ्नं निघ्नन्सव: पायाद् पायाद् गणनायक:।। '' आणि हीच परंपरा जवळजवळ सर्व लेखांत दिसते. यावरून असे म्हणता येते, की दहाव्या शतकाच्या अखेरीपासून गणपतीच्या पूजेला महाराष्ट्रात अग्रस्थान मिळू लागले. पन्हाळे काझी येथील शिलाहार काळात परिवर्तित केलेल्या लेण्यांच्या प्रवेशद्वारांवरील ललाटबिंबांवर गणेशमूर्ती आली. यांसारखे सूक्ष्म निरीक्षण ते सहजपणे नोंदवीत असत.

पितळखोरा (जि. औरंगाबाद) येथील लेण्यांच्या जतनविषयक कामात शराव घेतलेल्या यक्षाची मूर्ती मिळाली, जिच्या हाताच्या मनगटावरील बाजूस ब्राह्मी लेख आहे, तर येथे मिळालेल्या हत्तीच्या रांगेचा अभ्यास करताना पुढे विकसित झालेल्या मंदिराच्या अधिष्ठानावरील गजथराचा प्रारंभ येथे पाहायला मिळतो असे त्यांनी नोंदवले. शेवटी त्यांनी ठाणाळा बौद्धलेणी - पन्हाळे काजी, वज्रयान केंद्र शैव, गाणपत्य व नाथ संप्रदायांवर नवा प्रकाश ही व्याख्यानमाला, 'हुतात्मा विष्णू गणेश पिंपळे स्मारक व्याख्यानमाला' म्हणून विदर्भ संशोधन मंडळ, नागपूर येथे दिली (१९८१). पुढे याचा इंग्रजी ग्रंथही प्रकाशित झाला. कोकणातील लयनस्थापत्यावर नव्याने प्रकाश टाकणारे हे संशोधन त्यांची विलक्षण प्रतिभा, सर्व धर्मसंप्रदायांच्या कामांची व विकासाची असलेली जाण, तत्कालीन साहित्याचे आकलन या व अशा अनेक बाबी स्पष्ट करणारे व सामान्य अभ्यासकाला थक्क करणारे आहे. ठाणाळे (नाडसूर) ता. सुधागड, जि. रायगड पालीपासून २३ कि.मी. बुद्धलयन लेणी, एक चैत्यगृह, एक स्मारक

स्तूपसमूह (Memorial Stup Complex) आणि २१ विहार लेणी आहेत. या लयनसमूहातील काही लेणी भाजेपेक्षा जुनी असावीत असे त्यांनी मत नोंदवले. किमान पाच वेळा येथे परिवर्तन, खोदकाम व रंगलेपन (चित्रे) केले गेले. चौलचे बंदर म्हणून महत्त्व संपले, तसे पाचव्या शतकानंतर ही लेणी ओस पडली. लेणे क्र. तीन हे स्मारक स्तूपगृह आहे. विशेष म्हणजे, या लेण्यांचा नंतर अन्य कोणी उपयोग केला नाही. या लेण्यांचा अभ्यास करताना, लेण्यांची साफसफाई करताना त्यांनी घेतलेल्या दक्षतेमुळे तत्कालीन अवशेष उपलब्ध होऊ शकले. म्हणजे पुढे उपयोगात न आल्यामुळे काही वस्तू तशाच धूळ व मातीत गाडल्या गेल्याचे दिसून आले आहे. याला पुरातत्त्वीय भाषेत Cultural Debris म्हणतात. ते साफ करून मूळ वापरातील भूमी तपासण्याची संधी त्यांना मिळाली ती त्यांच्याच कार्यपद्धतीमुळे. येथे वासुदेव बळवंत फडके काही काळ राहिले होते.

**पन्हाळे-काजी :** कोकणातील एक तांत्रिक वज्रयान केंद्र (ता. दापोली, जि. रत्नागिरी) येथे एकूण २९ लेणी सापडल्या. इ.स. दुसऱ्या शतकापासून लयननिर्मितीस प्रारंभ झाला, ते तेराव्या-चौदाव्या शतकापर्यंत सुरू होते. हिनायन, वज्रयान हिंदू नाथपंथीय याप्रमाणे येथील परिवर्तने पाहावयास मिळतात, ती केवळ देशपांडे यांच्या तरल बुद्धिमत्तेमुळेच स्पष्ट झाली, असे मानावे लागते. पन्हाळे-काजी येथील वज्रयान पंथीयांचा संपर्क काण्हेरी, तसेच पूर्व भारतातील बिहार येथील वज्रयान संप्रदायाशी होता. पुढे हेच वज्रयानपंथी केंद्र नाथ संप्रदायाकडे वळले असावे. यासारखी मते देशपांडे सप्रमाण नोंदवतात. लेणीसमूहातील एकूण २९ लेण्यांपैकी १४ लेणी इ.स. तिसऱ्या ते पाचव्या शतकापर्यंत पूर्ण झाली होती, तर क्र.१,३,१२ व १३ या बाराव्या शतकात हिंदू लेणी म्हणून कोरली गेली. तेराव्या शतकात लेणी क्र. २४, २६ व २९ विकसित झाली. लेणे क्र. १९ ची रचना करताना पुढे मोकळे प्रांगण ठेवून, त्यानंतर मंडप व प्रदक्षिणा पथयुक्त सांधार गर्भगृह खोदले. येथेच करोटक वितान व बाजूने समतल वितान ठेवले गेले, शिवाय प्रवेशालगत कठडा आहे. क्र. २९ चे लेणे खोदताना पुढे प्रांगण, उत्तर बाजूला एकाश्म खडकातील खोदकाम, तर दक्षिण बाजूला भिंत बांधली आहे. येथे ८५ पट असून अशा चौकोनी स्तबकात आदिनाथ आणि गिरिजा, तसेच मच्छिंद्रनाथ, त्रिपुरसुंदरी व गोरक्षनाथ दाखवले आहेत. पन्हाळे-काजीचे वैशिष्ट्य म्हणजे लेणी क्र. १० मधील महाचण्डरोषणाची मूर्ती तांत्रिक वज्रयान पंथाच्या दृष्टीनेही महत्त्वाची मानली जाते.

**महाचण्डरोषण :** यालाच 'चंडरोषण' किंवा 'अचल' असेही म्हणतात. हत्ती व सिंह असलेल्या सप्तरथ अधिष्ठानावर हा स्थिर आहे. चंडरोषणाच्या अन्यही प्रतिमा या परिसरात मिळाल्या आहेत. चण्डरोषण दिसायला भयंकर, हातात खड्ग व तर्जनी पाश घेतलेला, डावा गुडघा जमिनीवर टेकलेला, वीरासनात दिसतो. पुढे पंधराव्या-सोळाव्या शतकात नेपाळमध्ये कापडी थकावर व तिबेटमध्ये अठराव्या शतकात या मूर्ती पाहावयास मिळतात. याची पूजा, उपासना अत्यंत गुप्तपणे करावी असा संकेत आहे.

तांत्रिक उपासनेचा प्रणेता, मैत्रेय मानला जातो. बुद्धाच्या नंतर एक हजार वर्षांनी महायान पंथात या तंत्रयानाचे आरोहण झाले. साधारणपणे सहाव्या शतकात औरंगाबाद, वेरूळ यांही ठिकाणी वज्रायान पंथ दिसायला लागतो. तो अवलोकितेश्वराच्या स्वरूपात. ओरिसा, तसेच बंगाल आणि खाली आंध्र-कर्नाटकातसुद्धा या पंथाचे लोण पसरले होते. या पंथात उपासना करताना, विशेषत: चंडरोषणाचे ध्यान करताना मुकुटावर अक्षोभ्याची प्रतिमा आहे अशी कल्पना केली जाते. पन्हाळे-काजी येथे अक्षोभ्याच्या जवळपास पाच प्रतिमा मिळाल्या. अक्षोभ्य देवता परिवार पंचध्यानी बुद्धांच्या कल्पनेशी निगडित आहे. हा पंचध्यानी बुद्ध आदिदेव असून त्याचा मूळ वज्रयान पंथ अनेकेश्वरवादी झाला. यासारखे तपशील नोंदवताना पुढे या पंथाची जागा नाथपंथीयांनी कशी घेतली हे ते सांगतात.

शिलाहार काळात विकसित झालेल्या लेण्यामध्ये या बाबी प्रामुख्याने अधोरेखित केल्या गेल्या. वज्रयानामध्ये सुमारे आठव्या-नवव्या शतकापासून ८४ सिद्धांचे युग सुरू झाले असे म्हटले जाते, आणि ही ८४ सिद्धांची परंपरा नाथपंथामध्येही काही फरकाने सामावली आहे. तांत्रिक वज्रयान पंथात ८४ सिद्धांची नावे मिळतात. नेपाळ व तिबेट येथे या सिद्धांची पूजा अद्यापही प्रचलित आहे. अर्थात, या परंपरेचा समन्वय स्पष्टपणे दाखवणे तितकेसे सोपे नाही ही बाब ते नोंदवतात. असे करताना लेण्यात असलेल्या मूर्तिशिल्पांची निश्चिती करण्याचा प्रयत्न त्यांनी केला आहे. यासाठी ते या पंथाचे संपूर्ण तत्त्वज्ञान, ज्ञानेश्वरी व तत्कालीन अन्य उल्लेख यांचे दाखले देतात. एकूण, पन्हाळे-काजी येथील लेण्यांतील मूर्तिशिल्पांचे स्पष्टीकरण व नामनिश्चिती करण्याचा त्यांनी केलेला प्रयत्न हा एक अविस्मरणीय असा ठसा आहे. यामुळे महाराष्ट्राच्या, विशेषत: कोकणाच्या सांस्कृतिक इतिहासाचे वेगळे दालन त्यांनी अभ्यासकांपुढे उभे केले.

म.न. देशपांडे यांचे प्रत्यक्ष लेखन वाचणे, अभ्यासणे आणि त्यांचे व्याख्यान ऐकणे हा संशोधकांना निखळ आनंद देणारा भाग होता. नुसत्या शब्दांनी, कुठल्याही अन्य साधनाशिवाय ते संपूर्ण कैलास उभा करत व श्रोत्यांना वेगळ्या भावविश्वात घेऊन जात. असे करताना एकूण मध्य आशियाई व भारतीय कला - इतिहासाचा परस्पर संबंध व संपर्क ते सहजपणे स्पष्ट करतात.

— डॉ. अरुणचंद्र पाठक

**संदर्भ :**

१. *'मधु' : Madhu–Recent Researches in Indian Archeology & Art History; अगम कला प्रकाशन, दिल्ली; १९८१.*

२. *ठाण्याला बौद्धलेणी–पन्हाळे–काजी वज्रयान केंद्र-शैव, गाणपत्य व नाथ संप्रदायावर नवा प्रकाश, विदर्भ संशोधन मंडळ; १९०३.*

## देशमुख, पंजाबराव श्यामराव

**कृषीतज्ज्ञ, शिक्षणतज्ज्ञ**

**२७ डिसेंबर १८९८ – १० एप्रिल १९६५**

**☛ मुख्य चरित्रनोंद - कृषी व पशुसंवर्धन खंड**



पंजाबराव श्यामराव देशमुख यांचा जन्म वतनदार देशमुख कुटुंबात अमरावती जिल्ह्यातील पापळ येथे झाला. त्यांच्या आईचे नाव राधाबाई होते. त्यांचे मूळ आडनाव कदम, पण देशमुखी वतनामुळे ते देशमुख झाले. वडील श्यामराव हे शेती करीत, तर आई धार्मिक वृत्तीच्या कर्तव्यदक्ष गृहिणी होत्या.

पंजाबरावांनी पापळ येथे प्राथमिक शिक्षण घेऊन १९१८मध्ये अमरावतीच्या हिंदू हायस्कूलमधून ते मॅट्रिक झाले. पुढे ते फर्गसन महाविद्यालयात (पुणे) दाखल झाले; पण पदवी घेण्यापूर्वीच त्यांनी उच्च शिक्षणासाठी इंग्लंड गाठले. तिथे त्यांनी एम.ए. (एडिंबरो), डी. फिल. (ऑक्स्फर्ड) व बार अ‍ॅट लॉ या पदव्या मिळवल्या. त्यांनी डॉक्टरेटसाठी 'वैदिक वाङ्मयातील धर्माचा उद्‌गम आणि विकास' हा प्रबंध सादर केला होता. ऑक्स्फर्ड विद्यापीठात संस्कृत भाषेचे संशोधक म्हणून काही दिवस काम करून ते १९२६मध्ये अमरावतीस परतले व त्यांनी वकिली सुरू केली.

त्यानंतर १९२७मध्ये त्यांनी मुंबईतील सोनार जातीतील विमलाबाई वैद्य या मुलीशी विवाह केला. या आंतरजातीय विवाहामुळे मराठा समाजात थोडी खळखळ झाली. लग्नानंतर विमलाबाईंनी बी.ए., एल्‌एल.बी. पदव्या घेऊन पंजाबरावांना त्यांच्या शैक्षणिक व सामाजिक कार्यात साथ दिली.

पंजाबराव १९२८मध्ये जिल्हा बोर्डाचे (अमरावती) अध्यक्ष झाले, तेव्हा त्यांनी सार्वजनिक विहिरी दलितांसाठी खुल्या केल्या. जिल्ह्यात प्राथमिक शिक्षण सक्तीचे केले. करातून येणारे उत्पन्न शिक्षणासाठी

वापरले. अमरावतीच्या अंबाबाई मंदिरात दलितांना प्रवेश द्यावा, म्हणून सत्याग्रह केला. १९३०मध्ये तत्कालीन प्रांतिक कायदेमंडळात त्यांची निवड झाले. ते शिक्षण, कृषी, सहकार या खात्यांचे मंत्री झाले; पण १९३३मध्ये त्यांनी राजीनामा देऊन आपल्या जिल्ह्यात सामाजिक कार्य करण्याचे ठरवले. ते अमरावती मध्यवर्ती बँकेचे अध्यक्ष झाले.

तत्पूर्वी त्यांनी 'श्रद्धानंद छात्रालय' (१९२६) व 'श्रीशिवाजी शिक्षण संस्था' (१९३२) या दोन संस्था स्थापन केल्या. पुढे त्यांनी प्राथमिक शिक्षकांच्या प्रश्नांसाठी 'भारतीय शिक्षक संघ' स्थापन केला. तसेच पारंपरिक कृषी पद्धतीत सुधारणा करण्यासाठी प्रयत्न केले.

स्वातंत्र्योत्तर काळात ते लोकसभेवर १९५२, १९५७ व १९६२ असे अनुक्रमे निवडून आले. १९५२-१९६२ या कालावधीमध्ये नेहरूंच्या मंत्रीमंडळात ते कृषिमंत्री होते. या काळात त्यांनी विविध समित्यांद्वारे कापूस बाजार, शेती या क्षेत्रांत आमूलाग्र सुधारणा केल्या. दलितांसाठी अखिल भारतीय मागास संघ, भारत कृषक समाज (१९५५), आफ्रो-आशियाई ग्रामीण पुनर्रचना संघटना इत्यादी स्थापून जपानी भातशेतीचा प्रयोग केला. त्यांच्या पुढाकारानेच 'राष्ट्रीय कृषी सहकारी खरेदी-विक्री संघ' आणि 'कृषक सहकारी भारतीय अधिकोश' यांची स्थापना झाली.

भारतीय कृषी क्षेत्रातील प्रगती आंतरराष्ट्रीय स्तरावर निदर्शनास यावी म्हणून त्यांच्या प्रेरणेने १९६०मध्ये दिल्ली येथे जागतिक कृषी प्रदर्शन भरविण्यात आले. त्यांनी कृषिमंत्री म्हणून विविध देशांना सदिच्छा भेटी दिल्या. पक्षाघाताने पंजाबरावांचे निधन झाले. त्यांच्या स्मरणार्थ १९६९मध्ये अकोला येथे पंजाबराव कृषी विद्यापीठ स्थापन करण्यात आले.

— संपादित

**संदर्भ :**

१. *मराठी विश्वचरित्रकोश; संपादक - कामत, श्रीराम पांडुरंग; विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा.*

## देशपांडे, ब्रह्मानंद श्रीकृष्ण

**इतिहास संशोधक, संपादक**

**१३ जून १९४० – ६ ऑगस्ट २०१३**



डॉ. ब्रह्मानंद श्रीकृष्ण देशपांडे यांचा जन्म रिसोड (जि. वाशिम) येथे झाला. बुलढाणा जिल्ह्यातील जळगाव जामोद येथील वतनदार असलेल्या ब्रह्मानंद देशपांडे यांचे वडील श्रीकृष्ण रामचंद्र देशपांडे जळगावकर हे रिसोड येथे शिक्षक होते. रिसोड येथे प्रारंभीचे शिक्षण झाल्यानंतर मध्य प्रदेशातील सागर येथील हरिसिंग गौर विश्वविद्यालयातून १९६३ साली बी.एस्सी.ची पदवी प्राप्त केली. याच विद्यापीठातून त्यांनी १९६५मध्ये प्राचीन भारतीय इतिहास आणि संस्कृती तसेच नागपूर विद्यापीठातून १९७१मध्ये आधुनिक इतिहास घेऊन एम.ए. ही पदवी मिळविली. १९६५-१९६६ साली प्रतिष्ठान महाविद्यालय, पैठण तसेच १९६६-१९६७ या दरम्यान औरंगाबाद तसेच १९६७-१९६९ दरम्यान नागपूर येथील शासकीय महाविद्यालयात अध्यापक म्हणून नोकरी केली. १९६९ ते २००० या दरम्यान सेवानिवृत्त होईपर्यंत औरंगाबाद येथील सरस्वती भुवन कला व वाणिज्य महाविद्यालयात अध्यापक म्हणून काम केले.

शिक्षणाच्या निमित्ताने डॉ. ब्रह्मानंद देशपांडे मध्य प्रदेशातल्या सागर येथे वास्तव्य करून होते. रायपूरला त्यांच्या बंधूंकडे त्यांचे शिक्षणासाठी वास्तव्य होते. त्यामुळे त्यांचे हिंदी साहित्यावर प्रभुत्व प्रस्थापित झाले. नागपुरात शिक्षणाच्या आणि नोकरीच्या निमित्ताने संस्कृत भाषेचा परिचय झाला. इतिहास हा त्यांचा अभ्यासाचा विषय होता. पैठण येथल्या महाविद्यालयात नोकरीच्या काळात ते महानुभाव आश्रमात जाऊन बसत असत. त्या काळात आणि 'देवगिरीचे यादव' या ग्रंथाच्या निर्मितीच्या निमित्ताने त्यांचा महानुभाव

साहित्याचा विशेष अभ्यास झाला. या अभ्यासातूनच ते महानुभाव साहित्याच्या प्रेमात पडले. तो त्यांच्या निदिध्यासाचा विषय झाला.

डॉ. ब्रह्मानंद देशपांडे यांच्या इतिहाससंशोधनाचे दोन विभाग करता येतात. एक - महानुभाव पंथ आणि त्याचे साहित्य आणि दोन - प्राचीन भारत विशेषत: प्राचीन महाराष्ट्राच्या इतिहासाचे संशोधन. प्राचीन भारतीय इतिहास आणि संस्कृती या अभ्यासविषयाचे मध्ययुगीन साहित्याशी एकात्म नाते आहे, याची जाणीव ठेवून डॉ. देशपांडे यांनी संशोधन केले आहे. डॉ. देशपांडे यांचे शिक्षण मध्य प्रदेशात झाले. त्यांच्या भाषेवर संस्कार झाले ते हिंदीचे, पण त्यांनी महानुभाव साहित्याचा अभ्यास जिद्दीने केला. महानुभाव साहित्याचे अंतरंग जाणून घेतले. सकळी, सुंदरी या लिप्या शिकले. यादव काळाचा अभ्यास करताना ते या साहित्याकडे आकृष्ट झाले. 'चक्रपाणी चिंतन' या ग्रंथाला त्यांनी डॉ. रा.चिं. ढेरे यांनी मांडलेल्या महानुभाव पंथविषयक अपसिद्धान्ताचे झडाडून खंडण केले. 'शब्दवेध' या ग्रंथातून त्यांनी प्राचीन मराठी शब्दांच्या व्युत्पत्ती मांडल्या. केशिराज बासांचे 'रत्नमाला स्तोत्र' हे काव्य संपादित केले. 'लीळाचरित्र एकांक' आणि 'श्रीगोविंदप्रभुचरित्र' हे त्यांनी संपादित केलेले आणखी दोन महानुभावीय ग्रंथ. महानुभाव साहित्याचे जे बोटावर मोजण्याइतके साक्षेपी संशोधक आहेत, त्यांत ब्रह्मानंद देशपांडे यांचे नाव घेतले जाते. औरंगाबादहून प्रसिद्ध होणाऱ्या 'महानुभाव' मासिकाचे ते काही काळ संपादकही होते. सप्तपर्णी, तीन शोधनिबंध आणि महानुभावीय शोधनिबंध खंड पहिला; हे तीन ग्रंथ त्यांचा महानुभावीय साहित्यावरचा अभ्यास व अधिकार प्रदर्शित करणारे आहेत.

प्राचीन भारत आणि विशेषत: प्राचीन महाराष्ट्र हे त्यांच्या अभ्यासाचे आणखी एक क्षेत्र. त्यांच्या 'देवगिरीचे यादव' या ग्रंथाला महाराष्ट्र शासनाने पुरस्कार देऊन त्यांचा गौरव केला. ब्रह्मानंदांचा खरा प्रांत शिलालेख, ताम्रपटाचा. त्यासाठी त्यांनी अवघा महाराष्ट्र पिंजून काढला. ते फार शिस्तप्रिय अध्यापक होते. शिलालेख वा ताम्रपट सापडताच ते घाईघाईने प्रकाशित करून स्वत:च्या नावाचा उदोउदो करणे त्यांना जमले नाही. त्या लेखाचा ते सगळ्या अंगांनी अभ्यास करत. अतिशय साक्षेपाने त्यांचे संपादन भाष्य लिहीत. त्यामुळे त्यांचे संपादन खोडून काढणे अशक्यप्राय आहे. आधीच्या संशोधकांनी प्रसिद्ध केलेले शिलालेख, ताम्रपट यांचाही ते सूक्ष्म अभ्यास करत. त्यांतील त्रुटी दाखवत. नवीन विवेचन सादर करत. डॉ. मो.गं. दीक्षित, म.म.वा.वि. मिराशी, डॉ. वाल्टर स्पिंक यांच्यासारख्या दिग्गजांच्या लेखनावर त्यांनी साक्षेपाने विवेचन केले आहे. त्यांच्या लेखांचे पाच संग्रह 'शोधमुद्रा' नावाने प्रसिद्ध झाले आहेत.

महाराष्ट्रावर आधिपत्य गाजविणाऱ्या जवळजवळ सर्व राजघराण्यांचा डॉ. ब्रह्मानंद देशपांडे यांनी अभ्यास केलेला दिसतो. त्यामध्ये सातवाहनांपासून यादव-शिलाहारपर्यंत अनेक राजघराण्यांचा समावेश आहे. या दोहोंमधील वाकाटक-चालुक्य-राष्ट्रकूटादी राजघराण्यांच्या काळातील महाराष्ट्र हा विषय त्यांनी आपल्या अभ्यासाचा विषय बनविला. तसेच त्रैकूटक, सिंद, विदर्भाचे राष्ट्रकूट, कलचूरी, परमार आदी महाराष्ट्राच्या संदर्भात तुलनेने कमी महत्त्वाच्या राजघराण्यांवरही आपली संशोधकीय लेखणी चालविलेली दिसते. वाकाटकांच्या संदर्भात वाकाटक नृपती हरिषेण एक पुनर्मूल्यांकन (शोधमुद्रा-२), खानदेश आणि वाकाटक राजवंश (शोधमुद्रा-३) आणि वाकाटक-त्रैकूटक संबंध (शोधमुद्रा-४) हे तीन लेख विशेष उल्लेखनीय होत. 'वाकाटक नृपती हरिषेण - एक पुनर्मूल्यांकन' हा त्यांचा लेख अमेरिकी विद्वान डॉ.वाल्टर स्पिंक यांच्या अजिंठ्याविषयक लेखाचा प्रतिवाद करण्यासाठी लिहिला गेला. मिराशी-शोभना गोखले यांच्या मतांमधील विसंगती ब्रह्मानंदांनी अचूकपणे हेरतात. गोखले व वॉल्टर स्पिंक यांनी अजिंठा लेणे क्र.१६मधील शिलालेखात 'त्रिकूटलाटांध्रापरांत' असे केलेले वाचन हे छंदशास्त्राच्या आधारे चुकीचे कसे

आहे, हे सांगून हरिषेणाचा अपरांत विजय ते त्याज्य ठरवितात. डॉ.देशपांडे दशकुमारचरितातील कथानकाचा हरिषेणाशी काहीही संबंध नाही, हे सिद्ध करून वाल्टर स्पिंकचा हरिषेणाच्या मृत्यूच्या आधारे अजिंठा लेण्याचा काळ नक्की करण्याच्या सिद्धान्तालाच आव्हान देतात. 'वज्रटाची समस्या' या लेखात डॉ. देशपांडे राष्ट्रकूट ताम्रपटांमध्ये दंतीदुर्गाने पराभूत केलेल्या कर्णाट सैन्याने पराभूत केलेल्या, ज्या वज्रट या राजाचे नाव येते, तो वज्रट कोण या समस्येचा विचार मांडला आहे.

राष्ट्रकूट नृपतींची मानपूर राजधानी, राष्ट्रकूटांच्या इतिहासातील एक कोडे (शोधमुद्रा-२), विदर्भाचे राष्ट्रकूट, राष्ट्रकूट परबलाचा पठारी स्तंभलेख (शोधमुद्रा-३), राष्ट्रकूट नृपती नित्यवर्ष खोट्टिगदेव याचा लोणी ताम्रपट (शोधमुद्रा-४) या राष्ट्रकूट घराण्यासंबंधीच्या लेखांबरोबरच चालुक्य नृपती सोमेश्वर तृतीय भूलोकमल्ल याचा धर्मापुरी शिलालेख, परमार राजकुल आणि मराठवाडा- एक अभ्यास (शोधमुद्रा-१) यांद्वारे महाराष्ट्रातील इतर राजवटींसंबंधी चर्चा केली आहे. शिलालेखांत येणाऱ्या धान्यकटक, भारशिव, पातालमल्ल आणि कपालसंधि, पिवळे जांभुळ, गंधवारण, आदिआछिपलेआ, मरुवक्कसर्प, छदाम, आसु, दाम आणि विसोबा आदी शब्दांचासुद्धा ऐतिहासिक आढावा घेतला आहे. ब्रह्मानंद देशपांडे यांचे स्वत:चेच अध्ययन अतिशय चौफेर आहे. ते एका शिलालेखाचा इतर अनेक लेखांशी, इतिहासाशी असलेला संबंध स्पष्ट करतात. असे संबंध स्पष्ट करताना निरनिराळ्या ऐतिहासिक समजुती बदलून टाकतात. आजतागायतची समजूत अशी की घारापुरी येथील लेणी कलचुरींची आहेत. ब्रह्मानंदांनी ती चालुक्यांची ठरविली आहेत. मराठवाड्यातील परमार राजवंशाच्या संचाराकडे त्यांनी लक्ष वेधले. शिलालेखाच्या समकालीन जैन, संस्कृत आणि महानुभाव वाङ्मयांशी असलेला सांधा त्यांनी स्पष्ट केला.

राष्ट्रकूटांनंतर यादव राजवटीची चर्चा होणे स्वाभाविक आहे. पण त्याहीपूर्वी एका महत्त्वाच्या प्रश्नाची दखल घेणे आवश्यक ठरते. तो म्हणजे मराठीमधील आद्य शिलालेखाचा. या प्रश्नाची सविस्तर चर्चा ब्रह्मानंद त्यांच्या 'मराठीतील पहिला शिलालेख कोणता?' (शोधमुद्रा-२) या लेखामधून करतात. श्रवणबेळगोळ येथील भगवान बाहुबलीच्या किंवा गोमटेश्वराच्या पायाशी 'श्रीचावुंडराजे करवियले' आणि 'श्रीगंगराजे सुत्ताले करवियेले' असे दोन शिलालेख आहेत. त्यांच्यातील पहिला शिलालेख हा मराठीतील आद्य शिलालेख असल्याची सर्वसाधारण समजूत आहे. याच परिसरात सापडलेल्या कन्नड आणि तामिळ शिलालेखांची मदत ब्रह्मानंद यांनी घेतली. त्यामुळे आद्यत्वाचा प्रश्न सुटायला मदत तर झालीच शिवाय मराठी अभ्यासकांनी कन्नड व तामिळ शिलालेखांकडे केलेला कानाडोळा याच्याकडेही लक्ष वेधले जाते. मराठी लेखांप्रमाणे कन्नड लेखांचा अभ्यास केला असता त्यांच्यातील अक्षरविन्यास भेदामुळे ते वेगवेगळ्या काळी लिहिले गेले असल्याचे स्पष्ट होते. ब्रह्मानंद असे मानतात की, 'चावुंडराजे करवियले' हा मराठी लेख कन्नड आणि तामिळ लेखाबरोबर शके ९०५ मध्ये कोरला गेलेला आहे.

यादवकालीन ताम्रपट, शिलालेख आणि महानुभावादी साहित्य यांच्या अभ्यासाचा पूर्ण परिपाक ब्रह्मानंदांच्या 'देवगिरीच्या राजवंशावर नवीन प्रकाश' या लेखात दिसून येतो. (शोधमुद्रा-२). यादव राजवंशाविषयीच्या काही गैरसमजांचे निराकरणही त्यांनी केले आहे. यात एक प्रमुख गैरसमज रामदेवराव यादवाबद्दल आहे. आमणदेवाला कपटाने पदच्युत करून रामदेवराव राज्यावर आला, हा तो समज होय. रामचंद्रदेवाने देवगिरी दुर्गात नाचे लोकांचा वेष घेऊन प्रवेश केला आणि आमणदेव नाचगाण्याचा आस्वाद घेत असताना त्याला कपटाने ठार मारले असा गैरसमज पुरुषोत्तमपुरी ताम्रपटाच्या चुकीच्या वाचनामुळे प्रस्तुत केला आहे. डॉ. मिराशींचा हा गैरसमज मूळच्या 'वृत्त' हा शब्द चुकीने 'नृत्त' असा वाचल्यामुळे झाल्याचे ब्रह्मानंद यांनी दाखवून दिले आहे. वस्तुत: दुर्गाबाहेर

द

घनघोर युद्ध झाले व त्यात तटाला शिड्या लावून रामदेवाचे सैन्य आत शिरले, यात कपट काहीच नाही.

यादवांची शिलाताम्रशासने गोळा करण्यासाठी ब्रह्मनंदांनी अपार भटकंती केली. अहमदनगर जिल्हा ऐतिहासिक संग्रहालयातील आईरमदेव यादवाचा ताम्रपट त्यांनी संपादित केला (शोधमुद्रा-३). या ताम्रपटाचे संपादन करताना त्यांनी यादवांच्या आईरमदेवापर्यंतच्या सर्व उपलब्ध शिलाताम्रशासनांचा धांडोळा घेतला. दृढप्रहारसारखा नवा वीर कसा पुढे आला, त्या वेळी राजकीय परिस्थिती त्याला कशी अनुकूल होती, याचे यथायोग्य विवेचन त्यांनी दिले आहे. महाकुमार सिंघणदेव आणि त्याचा चनई शिलालेख यांचा आईरमदेवाच्या आश्वी आणि अहमदनगर संग्रहालय ताम्रपट यांच्याशी त्यांनी सुरेख मेळ घातला. अंबाजोगाई येथील संगीत मशीद शिलालेखही त्यांनी सिंघणदेव प्रथम याचा ठरविला आहे. कल्याणी येथील चालुक्य राजवंशात गृहकलह लागला, त्यामुळे सिन्नर येथील सेऊणदेशकर यादव याचे महत्त्व कसे वाढले, ते मराठवाड्याच्या दिशेने पुढे कसे सरकले, सेऊणदेशकर यादव सिंघणदेव प्रथम याच्या काळापासून देवगिरीकर कसे झाले, यांचे अतिशय साक्षेपी विवेचन त्यांनी केले आहे.



डॉ. ब्रह्मानंद देशपांडे यांनी दोन महत्त्वाची संपादने आपल्या आयुष्याच्या शेवटच्या कालखंडात पूर्णत्वास नेली. त्यांपैकी पहिले म्हणजे त्यांनी संपादित केलेला 'इतिहासाचार्य वि.का. राजवाडे समग्र साहित्य - खंड चौथा : अभिलेख संशोधन' हा ग्रंथ होय. वि.का. राजवाडे हे जरी इतिहासकार म्हणून ओळखले जात असले तरी मराठी भाषा व वाङ्मय यांविषयी त्यांच्या मनात असलेल्या उत्कट जिज्ञासू वृत्तीपोटी ते मराठीच्या उत्पत्तीविषयीचे संशोधन करण्यास प्रवृत्त झाले. त्यातूनच ते महाराष्ट्रातील शिलाताम्रशासनांच्या अभ्यासाकडे वळले. राजवाडे यांनी संपादलेले लेख बहुधा यादवकालीन अथवा यादवोत्तरकालीन मराठी भाषेतील आहेत. काही थोडे संस्कृत आहेत. संस्कृत, प्राकृत आणि मराठी या तिन्ही भाषांवर त्यांचे असामान्य प्रभुत्व होते. ते पट्टीचे वैयाकरणी होते. त्यांनी प्रकाशित केलेल्या सर्व शिलाताम्रशासनाचा नव्याने आढावा घेऊन आणि काळाच्या ओघात नव्याने उजेडात आलेल्या संशोधनाची जोड देऊन डॉ.ब्रह्मानंद देशपांडे यांनी या ग्रंथाचे साक्षेपी संपादन केले आहे. डॉ. ब्रह्मानंद देशपांडे यांनी संपादित केलेला दुसरा महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे भारत इतिहास संशोधन मंडळाने प्रकाशित केलेले दक्षिणेच्या मध्ययुगीन इतिहासाच्या साधनांचे चार खंड. इतिहासतज्ज्ञ ग.ह. खरे व मो.गं. दीक्षित यांनी संपादित केलेले ग्रंथ प्रकाशित होऊन बराच कालखंड लोटला होता. खरे, मिराशी, दीक्षित यांच्या संपादनातील चुका, त्यांचे चुकलेले वाचन, नव्याने उजेडात आलेली इतर शिलाताम्रशासने इत्यादींचा आढावा घेत देशपांडे यांनी अतिशय उत्तम तऱ्हेने हे खंड संपादित केले आहेत.

डॉ. ब्रह्मानंद देशपांडे हे औरंगाबादचे रहिवासी. पर्यटन हा त्यांचा आवडीचा विषय. अजिंठा, वेरूळ, दौलताबाद हा प्रदेश त्यांनी आपल्या अभ्यासार्थ अनेक वेळा पालथा घातला. त्यांतील शिल्पांचा, शिलालेखांचा नव्याने अभ्यास करून नवी प्रमेये मांडण्याचा त्यांनी प्रयत्न केलेला दिसतो. या त्यांच्या आवडीतून त्यांनी या तिन्ही ठिकाणांवर मराठीत तसेच इंग्लिशमध्येही पर्यटकांना उपयोगी पडतील अशी पुस्तके लिहिली आहेत. त्यांनी केलेले संशोधन हे जगभरातील मान्यवर अभ्यासकांपर्यंत पोहोचावे यासाठी त्यांनी अभ्यासलेल्या शिलाताम्रशासनांचे 'Sutdies in Epigraphy, Vol. I' आणि 'Studies in Ajintha and Ellora Epigraphs' हे दोन इंग्लिश ग्रंथ लिहिले.

त्यांचे १५०च्या वर शोधनिबंध मान्यवर नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले आहेत. ते बहुभाषाकोविद होते. हिंदी, संस्कृत, इंग्लिश, प्राकृत, अपभ्रंश, उर्दू या भाषांवर त्यांचे प्रभुत्व होते. ते पट्टीचे व्याख्याते होते. अनेक परिषदा, चर्चासत्रे यांमधून त्यांनी दिलेली व्याख्याने गाजली आहेत. पीएच.डी.चे ते मार्गदर्शक होते. महानुभाव साहित्य, वाङ्मय व इतिहास

संशोधन यांत त्यांनी केलेल्या अभ्यासासाठी त्यांना अनेक पुरस्कारही मिळाले आहेत. त्यामध्ये ‘रत्नमाला’ या ग्रंथाला ‘महानुभाव विश्वभारती’ पुरस्कार, अखिल भारतीय महानुभाव परिषदेकडून ‘विद्याभूषण’ ही पदवी, मधुकर इनामदार न्यासाचा ‘संग्रहालय शास्त्रज्ञ’, छत्तीसगड शोध संस्थान, रायपूरद्वारे ‘शोध विभूषण’ पुरस्कार, उत्तर भारतीय ब्राह्मण महासंघातर्फे ‘महामहोपाध्याय’ ही पदवी, यांचा समावेश होतो. इ.स. २००२ मध्ये नागपूर विद्यापीठाने त्यांना त्यांच्या ‘Inscriptional aspects of Ancient Maharashtra’ या ग्रंथाला डी.लिट. पदवी देऊन त्यांचा यथोचित सन्मानही केला आहे. अशा या विद्वानाचे पुणे मुक्कामी निधन झाले.

— गिरीश मांडके, डॉ. विद्या गाडगीळ

## देशपांडे, यशवंत खुशाल

**इतिहास संशोधक, लेखक**

**१४ जुलै १८८४ - २० नोव्हेंबर १९७०**

☛ ***मुख्य चरित्रनोंद – साहित्य खंड***



विदर्भातील महानुभाव पंथाचे संशोधक यशवंत खुशाल देशपांडे यांचा जन्म अमरावती जिल्ह्यातील पाहपळला झाला. घरी मालगुजारी होती. परंतु, जेमतेम गुजराण होईल असे उत्पन्न होते. नवीन बाळ जन्माला आले म्हणून आनंद मानण्याइतकी सुबत्तेच्या काळातही परिस्थिती नव्हती. त्यांचे वडील सबरजिस्ट्रार झाल्याची बातमी प्राप्त झाली, म्हणून बाळाचे नाव ‘यशवंत’ ठेवण्यात आले. यशवंत चौथीत असताना शाळा खात्याचे संचालक शाळा तपासावयास आले. त्यांनी प्रत्येकाला ‘तू परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर काय करणार?’ असा प्रश्न विचारला, तेव्हा यशवंत याने ‘‘परीक्षा झाल्यानंतर मी पुढे मोठी पुस्तके लिहिणार,’’ असे उत्तर दिले. त्या वेळी संचालकांनी त्याच्या पाठीवर थाप मारून शाबासकी दिली. तेव्हापासून त्यांना लिहिण्याचे वेड लागले. वयाच्या १४व्या वर्षी त्यांनी शारदेला ‘गणेश पद्यावली’ हे सुंदरसे पिंपळपान वाहिले.

त्यांच्या आयुष्यात तीन व्यक्तींनी त्यांना विशेष प्रभावित केले. यवतमाळजवळ असणाऱ्या पिंपळगावचे रोहिले साधू, उनकेश्वराचे ब्रह्मचारी बुवा व धनज माणिकवाडा येथील वडांच्या झाडाखाली ध्यानस्थ बसलेले तपस्वी.

गावात कॉलऱ्याची साथ पसरली. गावातील लोक पटापट मरू लागले, तेव्हा बाबांनी साथ निघून जाईल असे सांगितले. तेव्हा योगायोग म्हणा, सर्व व्यवस्थित झाले. तेव्हापासून या बाबांवर त्यांची निष्ठा बसली. थोडक्यात, त्यांचा पिंड धार्मिक, श्रद्धाळू होता. त्यांनी हायस्कूलचे शिक्षण अमरावतीला पूर्ण केले. डॉ. केतकर त्यांचे सहाध्यायी होते. दोघांनाही शिष्यवृत्ती मिळाली.

दोघेही मराठीचे स्कॉलर म्हणून ओळखले जाऊ लागले. त्यांचे ‘गणेश पद्यावली’ हे पुस्तक डॉ. केतकरांच्या पुढाकाराने प्रकाशित झाले. डॉ. देशपांडे यांनी नाट्यलेखनही केले. त्यांनी ‘भारत भूछल’ व ‘सत्यप्रभा’ ही संगीत नाटके लिहिली. माध्यमिक शिक्षण पूर्ण झाल्यानंतर ते मुंबईच्या विल्सन महाविद्यालयामध्ये शिक्षणासाठी दाखल झाले. त्याही ठिकाणी डॉ. केतकर त्यांच्याबरोबर शिक्षण घेत होते.

डॉ. य.खु. देशपांडे बी.ए. करत असताना ‘होळकरांची थैली’ हे ऐतिहासिक बखरीवजा पुस्तक त्यांना ‘खडी धामणी’ येथील कुळकर्णी यांच्या दप्तरात मिळाले. राजवाड्यांनी हे इतिहास साधनांच्या तिसऱ्या खंडात प्रकाशित केलेले आहे; परंतु ते अपूर्ण होते. यशवंतरावांना हे पुस्तक पूर्णरूपात मिळाल्यामुळे आपणही राजवाड्यांप्रमाणे संशोधनकार्य करावे हा विचार त्यांच्या मनात आला. त्यानंतर वामन कवीची एक महत्त्वाची पोथी त्यांना उपलब्ध झाली. अशा प्रकारे ऐतिहासिक संशोधन क्षेत्रात त्यांचे पदार्पण झाले.

‘माझी शांती’ हे पुस्तक प्रकाशित झाल्यानंतर

यशवंतराव हे खेर यांच्या वडिलांकडे गेले, तेव्हा त्यांनी यशवंतरावांना सल्ला दिला, की प्रणयप्रधान कादंबऱ्या लिहिण्यापेक्षा भारदस्त विषयावर लिहाल तर देशाला फायदा होईल. 'माझी शांती' प्रणयप्रधान कादंबरी असली, तरी अभिरुचीस बाधक असे यात काहीही नव्हते. तरीपण खेरांचा विचार त्यांना मननीय वाटला. त्यांनी एम.ए., एलएल.बी.पर्यंतचे शिक्षण पूर्ण केले. यानंतर ते यवतमाळला आले. त्यांची वकिली करण्याची इच्छा होती; परंतु त्यांचे चुलतबंधू, ज्यांनी त्यांच्या शिक्षणाला मदत केली, त्यांचे मत नोकरी करावे असे होते. त्या वेळी त्यांच्याकडे अनेक शिफारसपत्रे होती, त्यामुळे त्यांना सहजतेने नोकरी मिळाली असती; परंतु वकिलीसारखा स्वतंत्र व्यवसाय करून वाङ्मयीन सेवा करता येईल असे त्यांचे मत होते.

१९०८ मध्ये त्यांनी यवतमाळच्या बारमध्ये प्रवेश केला. त्या वेळी बारमध्ये केवळ बारा वकील होते. वकिली व्यवसायात त्यांचा सुरुवातीला चांगला जम बसला. जवळपास पंधरा वर्षे वकिली व्यवसायाबरोबरच त्यांनी संशोधन व सार्वजनिक चळवळीतही भाग घेतला.

ते यवतमाळच्या राष्ट्रीय शाळेच्या कार्यकारी मंडळात सामील झाले. त्यांनी सरकारनिर्मित बँकेचे कार्यवाह, तालुका बोर्डाचे अध्यक्ष तसेच वि. सा. संघाचे अक्ष्यक्ष म्हणून काम केले. थिऑसॉफिकल सोसायटीचे ते बरेच वर्षे अध्यक्ष होते. थिऑसॉफीच्या अभ्यासामुळे इतर धर्मांतील चांगली तत्त्वे मूळची धार्मिक वृत्ती न सोडता त्यांनी स्वीकारली. त्यांनी राजगृह पावापुरी, शिरपूर, एलिचपूर, भांदक, पावागड येथील जैनांचे प्राचीन अवशेष अवलोकन करून त्यांवर संशोधनपर लेख लिहिले. त्याचप्रमाणे, वऱ्हाडात व मध्यप्रांतात बुद्धाचे जे प्राचीन अवशेष होते, त्यांचे अवलोकन करून त्यांनी लेखमाला सुरू केली. यासाठी ते बुद्धगया, नालंदा, राजगृह व सारनाथ या ठिकाणी गेले. महानुभव पंथासंबंधी त्यांनी 'चक्रधराचा वेद' या विषयावर लिखाण करण्यासाठी माहूर, पेशावर, रिधपूर, रावळपिंडी, हरिपूर येथील मंदिरांत जाऊन तेथील महत्त्वाच्या व्यक्तींशी चर्चा केली. इस्लाम धर्मातील व समाजातील ऐतिहासिक पर्शियन सनदा, परगण्याचे हिशेब, मोगल इतिहासासंबंधी कागदपत्रे, युरोपमध्ये गेले असताना इस्लाम मशिदीचे पेशइमामा यांच्या विनंतीवरून त्यांनी लंडनमधील 'वोकिंग' नावाच्या भागात मुहम्मदाच्या शिकवणीपासून आपल्याला काय घेता येणे शक्य आहे या विषयावर विद्वत्ताप्रचुर व सुश्राव्य भाषण केले. थिऑसॉफीमधील तत्त्वे आत्मसात केली असे नव्हे, तर ती प्रत्यक्ष आपल्या जीवनात त्यांनी उतरविली हेच वरील गोष्टीवरून स्पष्ट होते. डॉ. य.खु. देशपांडे यांनी कोणत्याही पक्षाचे पुढारीपण स्वीकारले नाही; परंतु राजकीय पुढाऱ्यांच्या कार्याविषयी त्यांना नेहमीच आदर वाटत असे. १९१९ मध्ये लोकनायक बापूजी अणे, श्री भि.ह. जतकर व सदाशिवराव बल्लाळ यांनी 'लोकमत' नावाचे राष्ट्रीय धोरणाचे मुखपत्र सुरू करण्याचे ठरविले व त्यासाठी निधी जमा करायचा होता. डॉ. देशपांडे हे जहालवादापासून दूर राहणारे व ताबडतोब त्या वेळी मोठी मदत देणे कठीण होते. त्यांनी ५००/– रुपयांची मदत केली; परंतु कधीही आपला या वृत्तपत्रात हिस्सा आहे याची वाच्यता केली नाही.

१९२० ते १९३५ या काळात त्यांचा संशोधनाकडे विशेष कल होता. त्यांना महानुभाव पंथीयांच्या पोथ्या चाळत असताना अतिशय महत्त्वाची पोथी सापडली; परंतु ती सांकेतिक भाषेत असल्यामुळे त्याचा उलगडा होत नव्हता. श्री. भावे यांच्या 'महाराष्ट्र सारस्वत' या ग्रंथात दिलेल्या लिप्यांच्या आधारावर त्यांनी या पोथीचे वाचन करून महानुभाव पंथीयांचा हा पवित्र आद्यधर्मग्रंथ 'परिसिद्धान्त सूत्रपाठ' आहे हे कथन केले. यानंतर त्यांनी स्वत:ला महानुभाव साहित्य संशोधनात वाहून घेतले. माहूरचे महन्त दत्तलक्षराज यांचा जयवंतराव लोणकर यांच्या माध्यमातून परिचय झाला. यानंतर त्यांनी माहूर, चांदूर बाजार येथून, तसेच गोपीराजबुवा ऊर्फ महात्मा मुसाफिर यांनी पंजाबातील त्यांच्या प्रवासात बरोबर राहून त्यांना अनेक पोथ्या व ग्रंथ मिळवून दिले. यानंतर डॉ. य.खु. देशपांडे यांचे घर कृष्णवस्त्र धारण करणाऱ्या

संन्याशांनी फुलून जाऊ लागले. अनेकांना त्यांनी महानुभावपंथ स्वीकारला असे वाटले. १९२६ साली त्यांचा, बृहन्महाराष्ट्रात अपूर्व स्वागत झालेला 'महानुभावीय मराठी वाङ्मय' हा ग्रंथ प्रकाशित झाला. याच वर्षी त्यांनी यवतमाळला 'शारदाश्रम' नावाची संस्था स्थापन केली. त्यामार्फत 'ऋद्धिपूर' वर्णन व 'विष्णुदासाची कविता' भाग पहिला, हे ग्रंथ प्रकाशित करण्यात आले. १९२८ मध्ये शासनाने त्यांची हिस्टॉरिकल रेकॉर्ड्स कमिशनचे नामनियुक्त (कोऑप्टेड) सदस्य म्हणून नेमणूक केली. इंडियन हिस्टरी कॉंग्रेस व ओरिएंटल कॉन्फरन्स (प्राच्यविद्या परिषद) चे ते सदस्य होते. बहुतांश अधिवेशनांत त्यांची उपस्थिती होती.

बडोदा ओरिएंटल कॉन्फरन्समध्ये डॉ. देशपांडे यांनी 'Buddhist Antiquities in Vidarbha' व त्रिवेन्द्रम येथील कॉन्फरन्समध्ये 'Jain Antiquities in Ancial vidarbha' हे दोन महत्त्वाचे लेख वाचले. १९३५ ते १९५१ या काळात जी अखिल भारतीय इतिहास परिषदेची अधिवेशने झाली, त्यांत डॉ. देशपांडे यांच्या संशोधन व्यासंगाची प्रभावी छाप पडली. अनेक संस्था व संशोधक विद्वान व्यक्तींशी त्यांचा संबंध आला व त्यांचा संशोधनविषयक दृष्टिकोण अधिकाधिक व्यापक होत गेला.

१९४१ साली डॉ. देशपांडे यांच्या प्रोत्साहनाने 'वऱ्हाड-मध्यप्रांत जैन संशोधन मंडळ' ही संस्था अस्तित्वात आली. तिचे सल्लागार तेच होते. नागपूर विद्यापीठाने मराठी, हिन्दी, उर्दू इत्यादी देशी भाषांचे माध्यम ठेवण्याबाबतचा विचार करणारी कमिटी नेमली. त्याचे सभासदत्व डॉ. देशपांडे यांनी स्वीकारले.

'भारत इतिहास संशोधन मंडळ', पुणे या संस्थेचे ते बरेच वर्षे सदस्य होते. डॉ. देशपांडे १९३८ मध्ये जागतिक प्राच्यविद्या परिषद, झ्यूरिच (स्वित्झर्लंड) येथील निमंत्रित प्रतिनिधी म्हणून शारदाश्रमातर्फे गेले. त्याच वेळी ब्रुसेल्स (बेल्जियम) या ठिकाणी प्राच्यविद्या परिषदेचे अधिवेशन होते. या परिषदेत त्यांनी आपले संशोधनपर लेख वाचले. यानंतर ते लंडनला गेले. संस्कृतचे प्राध्यापक डॉ. बार्नेट, इंडिया ऑफिस लायब्ररीचे डायरेक्टर डॉ. रॅन्डेल यांच्या सूचनेवरून त्यांना 'रॉयल एशियाटिक सोसायटी ऑफ ग्रेट ब्रिटन' या संस्थेचे सदस्य करण्यात आले. त्यांच्या पूर्ण समारंभात त्यांनी ''शारदाश्रम संस्थेने संशोधनरूपाने आजवर जी सेवा केली, तिचा हा गौरव आहे,'' असे उद्‌गार काढले. ''हा माझा सत्कार नसून शारदाश्रमचा आहे,'' असे प्रांजळपणे कबूल केले. नागपूर विद्यापीठाने त्यांच्या कार्याचा गौरव म्हणून त्यांना 'डॉक्टर ऑफ लेटर्स': डी.लिट. ही बहुमानाची पदवी दिली.

१९४५ मध्ये नागपूर विद्यापीठात हस्तलिखित संग्रह करण्याची योजना डॉ. देशपांडे यांच्या प्रोत्साहनाने अस्तित्वात आली. त्यांनी वर्षभर विनावेतन, वऱ्हाड व त्याच्या बाहेर प्रवास करून सुमारे २००० हस्तलिखित ग्रंथ एकत्रित करून विद्यापीठाच्या स्वाधीन केले. त्यामुळे विद्यापीठात संशोधन वाङ्मयाच्या कार्याला चालना मिळाली. अखिल भारतीय इतिहास परिषदेने 'नागपूर राज्य १८१८ ते १८५८' हा भाग डॉ. य.खु. देशपांडे यांच्याकडे सोपविला. तो लिहून त्यांनी १९४८ मध्ये संपादक मंडळाकडे पाठविला. 'वस्सगुल्ममाहात्म्य' या संस्कृत ग्रंथाच्या आधारे हिंदू मंडळाला प्रिव्ही काउन्सेलिंगमध्ये महत्त्व प्राप्त झाले. त्याची विस्तृत प्रस्तावना त्यांचीच होती. वाशिम या ठिकाणी त्यांचा गौरव करण्यात आला. ग्वाल्हेर सरकारच्या सूचनेवरून डॉ. देशपांडे यांनी विक्रमादित्य व्दिसहस्राब्दी उत्सव ग्रंथासाठी 'विक्रमादित्य ऐतिहासिक की काल्पनिक' हा उत्कृष्ट निबंध लिहिलेला होता. डॉ. देशपांडे यांना संस्कृत, हिंदी, उर्दू, फारशी, प्राकृत, अर्धमागधी अपभ्रंश भाषाज्ञान होते. यादवांनंतर ६०० वर्षे मुस्लिमांचा अंमल वऱ्हाडावर होता. त्यामुळे जुने कागदपत्र बहुतेक पर्शियन भाषेत होते. ही ऐतिहासिक कागदपत्रे त्यांनी 'शारदाश्रमा'त संकलित केली. त्यासाठी त्यांनी उर्दू व पर्शियन भाषेचा अभ्यास केला. त्यांनी युरोपात जाण्यापूर्वी फ्रेंच भाषेचा अभ्यास केलेला होता.

त्यांना पुढे सर्वांत जुने दोन शिलालेख वणी तालुक्यात

कायर येथे सापडले. ते सातवाहनकालीन दुसऱ्या व तिसऱ्या शतकातील आहेत. एक संस्कृतात असून दुसरा प्राकृतात आहे. त्याची लिपी दुसऱ्या शतकातील ब्राह्मी लिपी आहे.

शारदाश्रमावर त्यांचे पुत्रवत प्रेम होते. त्यासाठी त्यांना आर्थिक अडचणीला सामोरे जावे लागले. शारदाश्रमामधील ग्रंथसंपदा घेऊन भटकंती करावी लागली, तरी त्यांचा संशोधनाचा ध्यास कमी झाला नाही.

त्यांनी या जगाचा निरोप घेतला; परंतु यवतमाळ येथील शारदाश्रम त्यांच्या प्रेरणास्रोत म्हणून आज अस्तित्वात आहे.

- प्रा. सी.बी. देशपांडे

**संदर्भ :**

*१. डॉ. हुड; ना.ना. 'विदर्भ संशोधनाचा इतिहास'. 'डॉ.य.खु. स्मृतिकण'; डॉ. यशवंत खुशाल देशपांडे यांच्या आठवणी.*



## दोशी, सरयू विनोद
**कलाविषयक तज्ज्ञ**
**२२ ऑक्टोबर १९३२**



सरयू विनोद दोशी या भारतीय शास्त्रीय व समकालीन कला विषयाच्या प्रख्यात पंडिता आहेत आणि १९९६ ते २००५ या काळात त्या भारत सरकारच्या राष्ट्रीय आधुनिक कलादालनाच्या मानद संचालिका होत्या. या अवधीत त्यांनी तेरा मोठी प्रदर्शने व कलात्मक वस्तूंचे 'शो' आयोजित केले. १९९९ ते २००६ या काळात त्या ललित कला अकादमीच्या प्रभारी अध्यक्षा होत्या आणि १९८१ ते १९८६ या अवधीत मार्ग प्रकाशन, मुंबई याच्या संपादक होत्या. अमेरिकेतील मिशिगन युनिव्हर्सिटी, कॅलिफोर्निया युनिव्हर्सिटी, बर्कले येथे अभ्यागत व्याख्यात्या (व्हिजिटिंग प्रोफेसर) होत्या.

त्यांचा जन्म लीलावती आणि नगिनदास दुल्लभजी दफ्तरी या दाम्पत्याच्या पोटी गुजरातमधील जेतपूर येथे झाला. तीन बहिणी व दोन भाऊ अशा पाच भावंडांत सरयू या सर्वांत ज्येष्ठ होत. त्या अत्यंत संवेदनशील आहेत. त्यांचे ग्रँटरोडच्या सेन्ट कोलंबा हायस्कुलात शालेय शिक्षण झाले. त्यानंतर एलफिन्स्टन महाविद्यालयात शिक्षण झाल्यावर त्यांनी सर जे.जे. कला महाविद्यालयात २ वर्षे शिक्षण घेतले. एप्रिल १९५६मध्ये त्यांचा विवाह लालचंद हिराचंद यांचे सुपुत्र विनोद दोशी यांच्याशी झाला. नंतर त्या अमेरिकेतील मिशिगन विद्यापीठातून कला-इतिहास हा विषय घेऊन बी.ए. (ऑनर्स) झाल्या.

मुंबई विद्यापीठातून त्यांनी प्राचीन भारतीय इतिहास आणि संस्कृती या विषयात डॉक्टरेटची पदवी संपादन केली.

यानंतर १९७३मध्ये डॉक्टरेट पदव्युत्तर कामासाठी त्यांना जे.डी. रॉकफेलर-III निधीतून अनुदान मिळाले. त्यांनी अमेरिकेत शिकागो विद्यापीठात मोगल पेंटिंग हा विषय घेऊन हे कार्य केले आणि शिवाय न्यूयॉर्क विद्यापीठामध्ये चित्रपट तंत्रज्ञान व चित्रपट निर्मिती हा उन्हाळी पाठ्यक्रम केला.

भारत सरकारने आंतरराष्ट्रीय ख्यातीच्या या कला-इतिहासवेत्तीला १९९९मध्ये 'पद्मश्री' पुरस्कार देऊन सन्मानित केले. इतकेच नव्हे तर, भारतात इटालिअन संस्कृतीचा प्रसार करण्याच्या कामगिरीबद्दल २००६ साली इटालिअन सरकारने डॉक्टर सरयू दोशी यांना 'ऑर्डर ऑफ दि स्टार ऑफ इटालिअन सॉलिडॅरिटी' ही पदवी देऊन गौरविले. भारतीय कला समाज किंवा आर्ट सोसायटी ऑफ इंडियाने जीवनगौरव पुरस्कार देऊन त्यांचा गौरव केला. सन २००१मध्ये 'बॉम्बे वेस्ट लेडीज सर्कल १०' या संस्थेने 'महिला उल्लेखनीय कार्य' या पुरस्काराने त्यांना सन्मानित केले व अखिल भारतीय दिगंबर जैन समाजाने त्यांचे संशोधन कार्य व योगदान यांबद्दल जैन विदुषी पुरस्कार देऊन त्यांचा आदर केला.

त्यांनी कला, इतिहास व संस्कृती यांवर एकट्याने व

संयुक्तपणे अनेक पुस्तके लिहिली व तशाच विषयांवर पंधरापेक्षा अधिक पुस्तकांचे संपादन केले. भारतात व परदेशातील अमेरिका, कॅनडा, यु.के., जर्मनी, ग्रीस, पोलंड, चीन, दक्षिण आफ्रिका, बोत्सवाना, मॉरिशस, ईजिप्त आणि ओमान या देशांतील अनेक वस्तुसंग्रहालये व विश्वविद्यालये यांतून कला विषयावर अनेक व्याख्याने त्यांनी दिली आहेत. आकाशवाणी, दूरदर्शन व बी.बी.सी. या प्रसारमाध्यमांवर त्यांनी भाषणे केली आहेत. वर्तमानपत्रे व संपर्कमाध्यमे यांतून कलाविषयक पुरवण्या आणि अंक यांतून त्यांनी अनेकदा सदर चालवले आहे.

– डॉ. गीता साळी

## द्रविड, राजेश्वरशास्त्री

**संस्कृत पंडित**

**१९०० – मृत्युदिनांक अनुपलब्ध**



राजेश्वरशास्त्री द्रविड भारतवर्षीय कीर्तीचे सुप्रसिद्ध काशीवासीय पंडित होते. आपले वडील लक्ष्मणशास्त्री द्रविड यांचे कार्य त्यांनी पुढे चालवले. न्याय-वेदान्तादी शास्त्रांचे अध्ययन करून त्यांनी काशीतील विख्यात पंडित अशी कीर्ती मिळवली. तेथील साङ्गवेद विद्यालयाचे ते प्रमुख होते. वादविवादांत ते अत्यंत निष्णात होते. सनातनी विचारसरणी कशी खंबीर व तर्कशुद्ध पायावर उभारली आहे, हे प्रतिपादण्यात यांचा हातखंडा होता. हिंदुस्थानच्या सर्व प्रांतांमध्ये भरलेल्या विद्धत्परिषदांत त्यांना सखोल ज्ञानाने, तर्कशुद्ध प्रतिपादनाने आणि शुद्ध आचरणाने अग्रमान मिळाला होता. सध्याच्या लोकशाहीच्या व समतेच्या काळात सनातनी विचारसरणी टिकत नाही असे वाटत असले, तरी ती भरभक्कम पायावर उभारलेली आहे याबद्दल त्यांच्यासारख्यांच्या प्रतिपादनाने खातरी पटल्याशिवाय राहत नाही. कारण कोणतीही समाजरचना किंवा धर्मशात्र विचाराच्या भरभक्कमपणापेक्षा राजसत्तेच्या पाठिंब्यावर अवलंबून असते. त्यांनी त्या दृष्टीने ग्रंथलेखनही केले आहे.

– संपादित

**संदर्भ :**

*१. अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*

## द्रविड, लक्ष्मणशास्त्री

**संस्कृत पंडित**

**जन्मदिनांक अनुपलब्ध – १९३१**

लक्ष्मणशास्त्री द्रविड हे भारतवर्षीय कीर्तीचे, काशी येथे राहणारे सुप्रसिद्ध संस्कृत पंडित होते. त्यांनी कलकत्त्यास विश्वविद्यालयांत नोकरी केल्यावर शेवटी ते काशीस राहिले. अलीकडच्या काळात सनातनी विचारसरणीचा पुरस्कार करून धर्मसुधारकांशी दोन हात करण्याचे काम त्यांनी अत्यंत यशस्वीपणे केले. अखिल भारतीय वर्णाश्रम स्वराज्य संघाची स्थापना करून त्यांनी सनातनी पक्षाला संघटित केले, आणि काशीला अखिल भारतीय ब्राह्मण संमेलन भरवून सनातनी विचारसरणीवर हल्ला करणाऱ्यांस आव्हानपूर्वक अंगावर घेऊन, सनातनी विचारसरणी कशी कणखर पायावर उभारलेली आहे हे लोकांच्या निदर्शनास आणले. विवाह-वयोमर्यादनियंत्रण कायद्याच्या निषेधार्थ त्यांनी नोकरी व पदवी याचा त्याग केला होता. राजेश्वरशास्त्री हे त्यांचे चिरंजीव होत.

– संपादित

**संदर्भ :**

*१. अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*

***

द

# ध

## धडफळे, मोहन गोविंद

**बौद्ध व पाली या विषयांचे प्रकांड पंडित**

**१० ऑगस्ट १९३७**



पट्टीचे शिक्षक व वक्ते, प्रस्थापित परंपरांच्या मूलगामी अर्थाचा सातत्याने धांडोळा घेणारा एक व्यासंगी विद्वान असा नावलौकिक मिळवलेले वाग्वैद्य मोहन गोविंद धडफळे हे प्राच्यविद्येच्या आधुनिक पिढीतील एक महत्त्वाचे नाव. त्यांचा जन्म पुणे येथे झाला. त्यांचे वडील इंग्रज अमदानीत रेल्वेमध्ये नोकरीला होते. तीन बहिणी व एक भाऊ अशी चार भांवडे असणाऱ्या धडफळे यांचे शालेय शिक्षण पुण्यामध्ये सुरुवातीला रमणबाग व नंतर मॉडर्न हायस्कूल या शाळांमध्ये झाले. अनुक्रमे १९५९ व १९६१ या वर्षात ते संस्कृत व पाली विषय घेऊन बी.ए. व एम.ए. परीक्षा विशेष प्रावीण्यासह उत्तीर्ण झाले. पुढे १९७७मध्ये 'Synonymic Collocations in the Tipitaka : A Study' त्रिपिटकातील समानार्थक प्रयोग: एक अध्ययन या मध्ययुगीन भारतीय भाषाशास्त्राशी संबंधित विषयावर संस्कृत, प्राकृत भाषा व भाषाशास्त्राचे प्रख्यात विद्वान प्रा. वाग्वैद्य अ.मा. घाटगे यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी पुणे विद्यापीठाची पीएच.डी. पदवी प्राप्त केली.

१९६१ ते १९९७ या कालावधीत त्यांनी फर्गसन महाविद्यालयात संस्कृत व पाली भाषांचे पूर्ण वेळ अध्यापन केले. याच काळात त्यांनी पुणे विद्यापीठ व टिळक महाराष्ट्र विद्यापीठ येथेदेखील अतिथि–प्राध्यापक म्हणून अध्यापन केले. ते पुणे विद्यापीठ व टिळक महाराष्ट्र विद्यापीठ यांचे पीएच.डी.साठीचे मान्यताप्राप्त मार्गदर्शक होते.

अध्यापनकार्यासोबत त्यांनी फर्गसन महाविद्यालयाच्या संस्कृत विभागाच्या प्रमुखपदाची धुरा सांभाळली. १९८६ ते १९९२ या कालावधीत ते डेक्कन शिक्षण संस्थेच्या सचिवपदी होते. आपल्या कारकिर्दीच्या शेवटच्या दहा वर्षांत फर्गसन महाविद्यालयाच्या उपप्राचार्यपदाचा अतिरिक्त भारदेखील त्यांच्याकडे होता. १९९६ ते १९९९ दरम्यान टिळक महाराष्ट्र विद्यापीठाच्या कला आणि ललित कला विद्याशाखेचे अधिष्ठाता म्हणून त्यांनी काम पाहिले. १९९९ ते २००२ तसेच २००६ ते २००८ या कालावधीत ते भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्थेचे मानद सचिव होते. १९९५मध्ये पुण्यात स्थापन झालेल्या बृहन्महाराष्ट्र प्राच्यविद्या परिषदेचे ते स्थापनेपासून कार्याध्यक्ष आहेत. आपल्या संशोधन कारकीर्दीत त्यांनी पाली व संस्कृत यांसोबत प्राकृत, कन्नड व अवेस्ता या भाषांवरदेखील प्रभुत्व मिळविले. युरो-भारतीय भाषाशास्त्र, आर्यभारतीय भाषाशास्त्र व द्रविडी भाषाशास्त्र हे त्यांच्या संशोधनाचे प्रमुख विषय. त्यातूनही विशेषत्वाने दक्षिण-पूर्व आशियाई अध्ययन हा त्यांचा विशेष जिव्हाळ्याच्या विषय.

आपल्या कारकिर्दीत त्यांनी अखिल भारतीय प्राच्यविद्या परिषद व त्यासारख्या अन्य प्रतिष्ठित परिषदांमध्ये पाली-बौद्ध अध्ययन, द्रविडी भाषाशास्त्र, दक्षिण-पूर्व आशियाई अध्ययन तसेच वेद व अवेस्ता या विषयांच्या सत्राध्यक्षतेची धुरा अनेक वेळा सांभाळली. मुंबई विद्यापीठाची विल्सन फिलॉलॉजिकल लेक्चर्स,

शिक्षण प्रसारक मंडळींची कौशिक व्याख्यानमाला, रत्नागिरीची कालिदास स्मृतिव्याख्यानमाला, स्वामी केवलानंद व्याख्यानमाला, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, एच.डी. वेलणकर स्मृतिव्याख्यानमाला इत्यादी प्रसिद्ध व्याख्यानमालांमध्ये व्याख्याने देण्याचा मान त्यांना मिळाला. अमेरिकेतील शिकागो व मिशिगन विद्यापीठ येथे त्यांनी व्याख्याने दिली. तसेच इटलीतील तुरिन, फिनलंडमधील हेलसिंकी, जपानमधील क्योतो तसेच रुमेनियामधील बुखारेस्ट येथील आंतरराष्ट्रीय परिषदांमध्ये त्यांनी निबंधवाचन केले.

त्यांच्या संशोधनपर लेखनामध्ये (Some Aspects of (Buddhist) Literary Criticism (१९७५), Synonymic Collocations in the Tipitaka: A Study (१९८०), Indo-Italica (२००९), Sanskrit Language and its Grammars (२००९) या इंग्रजी व पाली बौद्ध संत साहित्य (२००४), साहित्य सावित्री (२००९), बौद्ध धर्म भाष्यकार: धर्मानंद कोसंबी (२०१०) या मराठी ग्रंथांचा समावेश होतो. याव्यतिरिक्त त्यांनी प्रा. वा. शि. आपटे स्मृतिग्रंथ (१९७८) तसेच टिळक महाविद्यालय ऑफ एज्युकेशनच्या सुवर्णमहोत्सवी वर्षाच्या निमित्ताने प्रसिद्ध झालेल्या मानवी स्मृती (१९९३) या ग्रंथाच्या संपादनाचे महत्त्वपूर्ण काम केले. ग्रंथास पारितोषिक प्राप्त झाले.

इंग्लिश व मराठी यांसोबत धडफळे यांनी अभिजात संस्कृत व पाली या भाषांतून स्वतंत्र ललितसाहित्याची निर्मिती केली. यामध्ये त्यांची सरस्वतीसदनम्, वाजिराजमत्ताङ्गिनीयम् व अनसूयाशारद्वतम् (२०१०) ही तीन संस्कृत नाटके, तसेच धम्मानंदचरिया, गन्धियह्वचरियागाथायो या पाली पद्यरचना आणि उत्तरमारचरितम् या पाली नाटकाचा समावेश होतो. त्यांनी भगवदज्जुकम् या कवी बोधायनलिखित पारंपरिक संस्कृत प्रहसनाचे सरल संस्कृतमध्ये आधुनिक रूपांतर केले. त्यांच्या या अभिनव नाट्यकृतीला महाराष्ट्र शासनाच्या संस्कृत नाट्यस्पर्धेत पाच बक्षिसे मिळाली. त्यांनी फिल्म इन्स्टिट्यूटनिर्मित व के.बी. जॉन दिग्दर्शित पुनुउत्थान या पहिल्यावहिल्या पाली चित्रपटाचे संहितालेखन केले. एन.डी. कुलकर्णी यांच्या अष्टावक्रगीता, गंगाधर महांबरे यांच्या भावगीतकार ज्ञानेश्वर, डॉ. गं.ना. जोगळेकर यांच्या मराठीचे भाषाज्ञान व दिगंबर रणपिसे यांच्या महापरिनिर्वाणसूत्र या ग्रंथांना त्यांनी अभ्यासपूर्ण प्रस्तावना लिहिल्या. याच्या जोडीला इंग्लिश, मराठी व संस्कृत भाषांमधून विविध विषयांवरील शंभराहून अधिक संशोधनपर व ललित लेख त्यांच्या नावावर जमा आहेत.

शिक्षणक्षेत्रातील त्यांच्या कार्याबद्दल प्रा. धडफळे यांना देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण शिक्षण संस्थेचा ऋग्वेद पुरस्कार, पर्शिअन टीचर्स असोसिएशनचा दानिशमंद मुमताज-ई-फारसी पुरस्कार व इंडियन सोसायटी फॉर बुद्धिस्ट स्टडीजचा 'मंजुश्री पुरस्कार', दिवंगत वाग्वैद्य 'जयश्री गुणे पुरस्कार' इत्यादी पुरस्कार मिळाले. बंगळुरू येथे तत्कालीन राष्ट्रपती डॉ. अब्दुल कलाम यांच्या हस्ते त्यांचा महाभारतविषयक संशोधन यासाठी विशेष सत्कार झाला. गोवा राज्याचे भूतपूर्व मुख्यमंत्री मनोहर पर्रीकर यांच्या हस्तेही त्यांचा गौरव करण्यात आला.

संशोधनविषयांचे वैविध्य, त्यांची व्याप्ती व लेखनातील झपाटा ही प्रा. धडफळे यांच्या संशोधनाची प्रमुख वैशिष्ट्ये म्हणता येतील. शास्त्रीय विषयांचे ललित्यपूर्ण व मनोरंजक सादरीकरण हा त्यांच्या लेखनशैलीचा स्थायिभाव म्हणावा लागेल. विविध भाषा, त्यांतील शब्दरूपे, त्यांच्या अर्थच्छटा व त्यांचे परस्परसंबंध यांविषयीचे त्यांचे विचार मूलगामी व नावीन्यपूर्ण आहेत. विविध परंपरा, पारंपरिक संकेत व तात्त्विक मतप्रवाह यांचा मागोवा घेण्यात त्यांचे संशोधन गुंतलेले दिसते. संपर्कात आलेल्या महनीय व्यक्तींविषयीचा पुरेपूर आदर व त्यांच्याशी असलेले भावनिक नातेसंबंध त्यांच्या चरित्रात्मक लेखनातून प्रकट झाले आहेत. प्रा. धडफळे यांच्या संस्कृत व पाली रचना, त्या भाषांवरील त्यांची हुकमत व त्यांनी कमावलेली अभिजात भाषाशैली यांचा प्रत्यय देणाऱ्या आहेत.

— डॉ. महेश देवकर

## धनागरे, दत्तात्रेय नारायण

**समाजशास्त्रज्ञ, लेखक**

**६ नोव्हेंबर १९३६ - ७ मार्च २०१७**



दत्तात्रेय नारायण धनागरे हे ख्यातनाम समाजशास्त्रज्ञ म्हणून प्रसिद्ध होते. त्यांनी भारतातील विविध सामाजिक प्रश्नांबाबत फार चांगले काम केले. त्यांच्या विशेष आवडीचे विषय म्हणजे राजकारणातील समाजशास्त्र, विकासाचा सिद्धान्त, सामाजिक चळवळींचे समाजशास्त्र, भारतामधील कृषिआधारित सामाजिक बदल, महाराष्ट्रातील प्रादेशिक विकास आणि सामाजिक शास्त्रांची कार्यपद्धती होत.

प्रा. धनागरे यांचे उच्चशिक्षण नागपूर विद्यापीठामध्ये झाले. तिथे त्यांनी बी.ए. पदवी आणि समाजशास्त्र विषय घेऊन एम.ए. ही पदवी प्रथम क्रमांकाने प्राप्त केली. नंतर १९७३ साली ससेक्स विद्यापीठातून त्यांनी डी.फिल. आणि त्याबरोबर 'कॉमनवेल्थ फेलोशिप' मिळवली. त्यांनी त्यांच्या डॉक्टरेटसाठी सादर केलेला 'भारतातील १९२०-१९५० या काळातील शेतकऱ्यांच्या चळवळी' हा प्रबंध ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेसने १९८३मध्ये प्रसिद्ध केला. इतिहास आणि समाजशास्त्र या दृष्टीने या चळवळींचा अभ्यास या प्रबंधामध्ये करण्यात आला आहे.

प्रा. धनागरे यांचे अनेक लेख राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेले आहेत. त्यांपैकी विशेष उल्लेखनीय लेख खालीप्रमाणे आहेत :

Agravian Movements and Gandhian Politics. (१९७५) कृषीविषयक आंदोलने व गांधीवाद (१९७५), Themes and Perspectives in Indian Sociology (1993) भारतातील समाजशास्त्रातील संकल्पना (१९९३), उच्चशिक्षण : ध्येयवादाकडून बाजारपेठेकडे (२०१०). प्रा. धनागरे हे अतिशय कळकळीचे अध्यापक होते व त्यांनी एस. एस. कॉलेज, अमरावती, नागपूर विद्यापीठ, इन्स्टिट्यूट ऑफ सायन्सेस- आग्रा विद्यापीठ, आय. आय. टी. कानपूर येथे अनेक विद्यार्थ्यांना तयार केले आहे. पुणे विद्यापीठातही ते बरीच वर्षे या विभागाचे प्राध्यापक व प्रमुख होते.

प्रा. धनागरे यांनी नवी दिल्ली येथील आय. सी. एस. एस. आर. या संस्थेतही सदस्य-सचिव म्हणून कार्यभार सांभाळला. ते कोल्हापूर येथील शिवाजी विद्यापीठाचे उपकुलगुरूही होते. इंडियन सोशिओलॉजिकल सोसायटी या भारतातील समाजशास्त्रज्ञांच्या अग्रगण्य संस्थेचे ते सचिव आणि अध्यक्षही होते.

प्रा. धनागरे यांना अनेक पुरस्कार प्राप्त झाले आहेत. त्यांना लंडनमधील वाचनालयाच्या कामाबद्दल 'इंडियन काउंन्सिल ऑफ हिस्टॉरिकल रिसर्च फेलोशिप' प्राप्त झाली होती. तसेच 'शास्त्री इंडो-कॅनेडियन इन्स्टिट्यूटची' फेलोशिपही मिळाली होती. कोपनहेगन येथील 'स्कॅन्डिनेव्हियन इन्स्टिट्यूट ऑफ एशियन स्टडीज' येथे आशियासंबंधीचे तज्ज्ञ म्हणून त्यांना बोलावले होते. ते युनिव्हर्सिटी ग्रांट कमिशनसाठी देशभर प्राध्यापक म्हणून जात असतात आणि 'टोकियो युनिव्हर्सिटी ऑफ फॉरिन स्टडीज'मध्ये विद्यार्थ्यांना संशोधनामध्ये मार्गदर्शन करण्यासाठी जातात.

रशियाला गेलेल्या आय.सी.एस.आर.च्या शिष्टमंडळाचे आणि चीनला गेलेल्या 'इंडियन काउंन्सिल ऑफ सोशल सायन्स रिसर्च'च्या शिष्टमंडळाचे ते सदस्य होते. समाजशास्त्रातील उत्कृष्ट कार्याबद्दल त्यांना यु.जी.सी.तर्फे २००७ साली स्वामी प्रणवानंद सरस्वती पुरस्कार देण्यात आला. तसेच २०१०मध्ये इंडियन सोशिओलॉजिकल सोसायटीने त्यांना 'जीवन गौरव' पुरस्कार देऊन गौरव केला.

या ज्ञानतपस्वी प्राध्यापकाचा पुणे येथेच वृद्धापकाळाने मृत्यू झाला.

— र. वि. नातू

ध

## धर्माधिकारी, त्रिविक्रम नारायण
**संशोधक, अध्यापक**
**२ मे १९३१**



त्रिविक्रम नारायण धर्माधिकारी यांचा जन्म वैशाख पौर्णिमा या दिवशी धुळे जिल्ह्यातील एरंडोल गावी लक्ष्मी व नारायण या दाम्पत्याच्या उदरी झाला. प्राथमिक शिक्षण घेत असतानाच संस्कृत भाषेच्या अध्ययनाची सुरुवात वडिलांकडेच झाली. शालेय शिक्षण पूर्ण झाल्यावर संस्कृतच्या पुढील अभ्यासासाठी ते पुण्यात आले. पुण्यात टिळक महाराष्ट्र विद्यापीठाच्या बालमुकुंद संस्कृत महाविद्यालयातून १९५४ साली साहित्य विशारद ही पदवी त्यांनी प्राप्त केली. त्यानंतर १९५७ साली ते पुणे विद्यापीठातूनच एम.ए. झाले. पुढे १९७१ साली कृष्ण यजुर्वेदाच्या मैत्रायणी संहितेची भाषा व कर्मकाण्ड या विषयावरील त्यांच्या अभ्यासपूर्ण प्रदीर्घ प्रबंधाला पुणे विद्यापीठाने पीएच.डी. पदवी बहाल केली.

डॉ. त्रिविक्रम नारायण धर्माधिकारी यांची संशोधक म्हणून कारकिर्द सुरू झाली ती पुण्यातील वैदिक संशोधन मंडळ या संस्थेतून. या संस्थेत सन १९५७ ते १९९३ अशी एकूण ३६ वर्षे संशोधक व संपादक म्हणून ते कार्यरत होते. तसेच डॉ. धर्माधिकारी यांनी १९६७ ते १९९१ या काळात वैदिक संशोधन मंडळाचे सचिवपद समर्थपणे सांभाळले.

१९८३ साली भारत शासनाने वैदिक संशोधन मंडळाला 'आदर्श संस्कृत शोध संस्था' म्हणून मान्यता दिली. तेव्हापासून सन १९९३ पर्यंत या संस्थेचे संचालकपदही डॉ. धर्माधिकारी यांनी अतिशय समर्थपणे सांभाळले. अशा प्रकारे प्रशासकीय कार्यात व्यग्र असतानासुद्धा त्यांनी प्रचंड संशोधनात्मक कार्य केले. त्यांच्या संशोधनकार्यातील सर्वमूर्धन्य कार्य म्हणजे कृष्ण यजुर्वेदाच्या तैतिरिय संहितेचे संपादन होय. सप्तकांडात्मक अशा त्या संहितेच्या भट्टभास्कर व सायण भाष्यांसहित पदपाठ देऊन अतिशय शुद्ध आवृत्ती त्यांनी संपादित केली आहे.

चार खंडातील आठ भागांतून वैदिक संशोधन मंडळाकडून प्रकाशित झालेली चार हजारांहून अधिक पृष्ठसंख्येची ही आवृत्ती पारंपरिक व आधुनिक अशा दोन्ही प्रकारच्या विद्वानांकडून प्रशंसनीय ठरली व तिला प्रमाणभूत आवृत्ती म्हणून जगभरात नावलौकिक मिळाला आहे.

बौधायन श्रौतसूत्राच्या भवस्वामी भाष्याच्या संपादनाचे अतिशय महत्त्वपूर्ण कार्य त्यांनी केले. नवी दिल्ली येथील इंदिरा गांधी राष्ट्रीय कला केंद्रासाठी समग्र बौधायन श्रौतसूत्राची भवस्वामी भाष्यासहित चिकित्सीत आवृत्ती त्यांनी संपादित केली आहे. तसेच वैदिक संशोधन मंडळाकडून प्रकाशित झालेल्या चार हजारांहून अधिक हस्तलिखित पोथ्यांचे डेस्क्रिप्टिव्ह कॅटलॉग्स, हीरक महोत्सवी ग्रंथ, यज्ञायुधानि, मैत्रायणी संहिता, इट्स रिचुअल ॲण्ड लॅग्वेज इत्यादी प्रकाशनेदेखील त्यांचे महत्त्वपूर्ण कार्य होय. याव्यतिरिक्त इतर अनेक संस्थांसाठी डॉ. धर्माधिकारी यांनी संशोधनात्मक कार्य केले आहे.

डॉ. त्रिविक्रम नारायण धर्माधिकारी यांचे अध्यापनकौशल्यदेखील विलक्षणच आहे. वेद व उपनिषद यांसारखा गूढ तत्त्वज्ञानात्मक विषय असो, न्याय मीमांसादी क्लिष्ट शास्त्रीय परिभाषा असो, निरुक्तादी किचकट व्युत्पत्ती शास्त्र असो किंवा जटिल श्रौत कर्मकांडात्मक भाग असो; ते सर्व अतिशय सोप्या पद्धतीने विद्यार्थ्यांना अनेक प्रकारचे समर्पक दाखले देऊन डॉ. धर्माधिकारी समोरच्या विद्यार्थ्यांच्या हृदयात पूर्णपणे बिंबवत असत. असे केल्याशिवाय त्यांचे कधीही समाधान होत नसे. यामुळे असे म्हणायला हवे की, ते खरोखरच शिष्यचित्तापहारक असे गुरू आहेत.

ग्रंथसंपादन शास्त्राबाबत (टेक्स्चुअल क्रिटिसिझमबाबत) तर 'यास्तेषां स्वैरकथाः ता एव

भवन्ति शास्त्राणि' या वचनानुसार त्यांची सहज विधानेदेखील शास्त्रवचनांप्रमाणेच प्रमाणभूत आहेत. टिळक महाराष्ट्र विद्यापीठात अनेक वर्षे नियमितपणे अभ्यागत प्राध्यापक म्हणून व संपूर्ण भारतभरात अनेक विद्यापीठांत व शैक्षणिक संस्थांमध्ये प्रासंगिक अध्यापनाचे कार्य त्यांनी केले आहे. संपूर्ण भारतभरात व परदेशात अनेक ठिकाणी व्याख्याने, कार्यशाळा, चर्चासत्रे, बीज भाषणे इत्यादी रूपांनी त्यांनी केलेले लेखन अतिशय मौलिकच आहे. त्यांतील पंचाहत्तर लेखांचा संग्रह ग्रंथरूपाने प्रकाशित झाला असून पुढील पन्नास लेखांचा संग्रह पुढे प्रकाशित झाला.

प्राच्यविद्या क्षेत्रातील अतुलनीय कार्याबद्दल त्यांना भारत शासनाचा राष्ट्रपती पुरस्कार, दक्षिणाम्नाय शृंगेरी शारदा पीठम्‌चा पुरस्कार, गुरु गङ्गेश्वरानन्द पुरस्कार, वेदरत्न पुरस्कार, श्रीमंत नानासाहेब पेशवे पुरस्कार, पुरुषोत्तम पुरस्कार इत्यादी पंधराहून अधिक नामवंत पुरस्कार प्राप्त झाले आहेत व लाल बहादूर शास्त्री केंद्रीय विद्यापीठ, दिल्ली या विद्यापीठाची सन्माननीय डी.लिट. पदवी प्रदान करण्यात आली आहे. डॉ. धर्माधिकारी यांनी केवळ पुण्यातीलच नव्हे तर भारतातील अनेकविध संस्थांमध्ये पदाधिकारी म्हणून जबाबदारी सांभाळून त्या-त्या संस्थांच्या वाटचालीत महत्त्वाचे योगदान दिले आहे.

— डॉ. परशुराम परांजपे

## धारूरकर, विठ्ठलशास्त्री दाजीशास्त्री

**संस्कृत पंडित**

**जन्मदिनांक अनुपलब्ध – १९१०**

विठ्ठलशास्त्री दाजीशास्त्री धारूरकर यांनी सातारचे सुप्रसिद्ध पंडित रामशास्त्री गोडबोले यांच्याकडे व्याकरण, धर्म वगैरे शास्त्रांचे अत्यंत गाढे अध्ययन केले. ते शुक्लयजुर्वेदी माध्यंदिन शाखेचे होते.

पंढरपूर येथे विठ्ठलशास्त्री धारूरकर यांनी १८२०मध्ये चार वेद व शास्त्रे यांची पाठशाळा स्थापन केली. ती पाठशाळा 'धारूरकर वेदशास्त्रशाळा' या नावाने प्रसिद्ध आहे. सुप्रसिद्ध पंडित भगवानशास्त्री धारूरकर हे त्यांचे चिरंजीव होत. त्यांचे उल्लेखनीय ग्रंथ खालीलप्रमाणे आहेत - १. उपयुक्त धर्मशास्त्रसंग्रह (संस्कृत व मराठी), २. प्रायश्चित्तव्यवहारप्रकाश (संस्कृत व मराठी), ३. श्रीपंढरीमाहात्म्य (संस्कृत, मराठी, गुजराथी), ४. पंढरीतत्त्वविवेक: (संस्कृत), ५. बाळशिक्षक (मराठी), ६. ज्योतिषरत्नभांडार (अप्रसिद्ध), ७. पंढरपूर येथे सर्वकाल विवाह करण्याचा निर्णय (संस्कृत व मराठी). या ग्रंथातून त्यांनी अतिशय तर्कशुद्ध विवेचन केलेले आढळते.

— संपादित

**संदर्भ :**

*१. अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*

***

# न

## नांदापूरकर, नारायण गो.
**भाषा अभ्यासक, लोकसाहित्य संशोधक**
**१४ सप्टेंबर १९०१ - ९ जून १९५९**



मराठी भाषेवर नितांत प्रेम करणारा मराठीचा भक्त, कवी, अभ्यासक, संशोधक आणि अध्यापक असलेल्या नारायण नांदापूरकर यांचा जन्म मराठवाड्यातील कळमनुरी गावामध्ये झाला. सातवी उत्तीर्ण झाल्यानंतर पंधरा वर्षांच्या या विवाहित नारायणरावांना त्यांच्या वडिलांनी सांसारिक जबाबदारीची जाणीव दिली. मात्र, नारायणरावांना शिकायचे होते. म्हणून ते पुढे हैद्राबादला आले. अतिशय प्रतिकूल परिस्थितीत वार लावून, लोकांकडे राहून शिकवण्या, नोकऱ्या करीत त्यांनी मॅट्रिक पूर्ण केले व बी.ए. झाल्यावर ते औरंगाबादला शिक्षक झाले. १९३८ मध्ये हैदराबादला उस्मानिया विद्यापीठात ते अध्यापन करू लागले. त्यापूर्वी ते अलिगड विद्यापीठातून खासगीरीत्या संस्कृत विषयात एम.ए. झाले. पुढे उस्मानियात एम.ए. करून १९५०मध्ये मराठी विभागातील ते पहिले पीएच.डी. पदवीधर झाले. मराठी विभाग प्रमुख म्हणून उस्मानिया विद्यापीठामधून १९५६ मध्ये नांदापूरकर निवृत्त झाले.

'मुक्त-मयूरांची भारते' या संशोधन प्रकल्पासाठी त्यांनी दहा वर्षे अपार मेहनत घेतली. प्राचीन मराठी साहित्यनिर्मिती आणि तिच्या स्रोताची चिकित्सा करणारा हा ग्रंथ भारतीय भाषाभ्यासामध्ये महत्त्वाचा ठरला आहे. 'मुक्तेश्वरी भारतांची पाच पर्वे' आणि मोरोपंतांचे 'आर्याभारत' यांपैकी काही पर्वांचा स्वतंत्र अभ्यास विद्यापीठात होत असे. पण या दोन्ही थोर कवींच्या भारती काव्यांचा तुलनात्मक अभ्यास करून त्यांचे मूल्यमापन आतापर्यंत कोणी केले नव्हते. त्याकरिता फार परिश्रमांची आणि रसिक व चिकित्सक अभ्यासकाची आवश्यकता होती. नांदापूरकरांनी या मोठ्या कामाला धैर्याने प्रारंभ केला आणि अनेक अडचणींना तोंड देत हे कार्य पुरे केले. (प्रबंध, 'आशीर्वाद'; शं.दा. पेंडसे; १०-८-१९५६)

भारतीय भाषांमधील बंगालीचा अपवाद वगळता महाभारताचे वाङ्मयीन मूल्यमापन नांदापूरकर यांनीच केले आहे. त्यांनी महाभारत कथेतील प्रत्येक प्रसंग वाङ्मयीन निकष लावून तपासला. तसेच व्यक्तिदर्शन, रसनिर्मिती, अलंकारशैली, सामाजिकता या सर्वांचा अभ्यास समोर ठेवला. मोरोपंत व मुक्तेश्वर यांची आपसात तुलना करून मूळ महाभारताच्या रचनेशी तुलना केली. १८८५ ते १९५० पर्यंत झालेल्या मराठी काव्य समीक्षेपुढे नांदापूरकरांचे हे तौलनिक अभ्यासाचे कार्य वेगळेपणाने उठून दिसते. त्यांनी मराठी समीक्षेला महत्त्वपूर्ण योगदान दिले. साहित्याचा सर्वांगीण अभ्यास गणिती पद्धतीने मांडला.

नांदापूरकरांच्या अभ्यासाचे क्षेत्र मर्यादित नाही. संत काव्य, महानुभवी वाङ्मय, पंडिती व शाहिरी वाङ्मयाचे ते अभ्यासक होते. तसेच भाषाशास्त्र, समीक्षा आणि छंदशास्त्रावरही त्यांनी अभ्यासपूर्ण लेखन केले आहे. रवींद्रनाथ टागोर यांच्या 'गार्डनर'चा त्यांनी 'फुलारी' हा अनुवाद व अन्य दोन अनुवादित पुस्तके, बालवाङ्मय, दोन संपादित हस्तलिखिते आणि दोन काव्यसंग्रह त्यांच्या नावावर आहेत. 'मायबोलीची कहाणी' या

त्यांच्या ग्रंथात मराठीच्या उगमापासून तुकारामापर्यंत मायबोलीचा इतिहास, कहाणीच्या आकृतिबंधातून रसाळपणे लिहिलेला आहे. गद्यकाव्याचा हा उत्कृष्ट नमुना आहे.

लोकसाहित्याचे प्रेम आणि त्याचे सांस्कृतिक महत्त्व त्यांच्या विपुल ओवीसंग्रहातून दिसते. मराठवाड्यातील खेड्यापाड्यांतील अशिक्षित भगिनींनी शेकडो वर्षांपासून आपला सांस्कृतिक ठेवा, आपला इतिहास, रामायणादी ग्रंथ व पुराणे मौखिक परंपरेने जपले होते. दुर्गम भागात पायपीट करीत या ओव्या नांदापूरकरांनी मोठ्या मुष्किलीने गोळा केल्या. 'माहेरचं मराठी', 'मराठीचा मोहोर', 'मराठीची माया' हे स्त्री-गीतांचे संग्रह प्रकाशित केले. परंतु, त्यावर कळस म्हणजे रामायणासंबंधित ६००० ओव्यांमधून 'मऱ्हाठी स्त्री-रचित रामकथा' संपादित केली. ओवी वाङ्मयाची भावनिक ओढ आणि भाषाशास्त्रीय महत्त्व असा दुहेरी अभ्यास करीत त्यांनी ग्रामीण स्त्रियांच्या कल्पनेची भरारी मराठी जनांना दाखवून दिली. मराठीतली ओवी वाङ्मयाचा उगम शोधत ते ज्ञानेश्वरपूर्व काळापर्यंत पोहोचले. तेराव्या शतकातील किंवा कदाचित त्यापूर्वीची मराठी रचना व आजचे मराठवाड्यातील ग्रामजीवन, स्त्री-जीवन, बोली भाषाशैली, म्हणी यांत त्यांना निश्चित अनुबंध आढळला. आपल्या लेखनातून ते तो अनुबंध पुन:पुन्हा तपासत राहिले. मराठी आणि इंग्रजीत मिळून प्रकाशित, अप्रकाशित असे २० ग्रंथ व ६० लेख नांदापूरकरांनी लिहिले.

एकनाथ खंडाचे ते मुख्य संपादक होते. मराठवाडा साहित्य परिषदेच्या 'प्रतिष्ठान' या मुखपत्राचेही ते एक वर्ष संपादक होते. साहित्य अकादमी, दिल्लीच्या पहिल्या मराठी सल्लागार मंडळावर त्यांची नेमणूक झाली होती. मराठवाडा साहित्य परिषदेच्या परळी येथील संमेलनाचे (१९५५) अध्यक्षपद नांदापूरकरांनी भूषविले होते.

९-६-१९५९ रोजी नांदापूरकरांनी मृत्यूपूर्वी महाराष्ट्राकडे अखेरचे मागणे मागितले. त्यातील शेवटच्या दोन ओळी : 'मराठीच्या मोहनांनो, मराठी आपली मायाळू माउली, सगळी सुखं तिच्या पावलो-पावली. मराठी जनता मराठीच्या भजनी लागावी. तिनं मराठी कवींचं स्मरण करावं. त्याचं ऋण फेडावं आणि मराठीचं लेणं नव्या नवलाईनं घडावं.' ('पंचधारा', सप्टेंबर १९५९)

– डॉ. विद्या देवधर

## नाईक, जगन्नाथ विश्राम

**इतिहास व्याख्याता, संशोधक, अभ्यासक**

**१४ मे १९३४**



राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर पोहोचलेले, महाराष्ट्राच्या विद्यापीठीय क्षेत्रातील इतिहास-शिक्षक आणि आधुनिक महाराष्ट्राच्या, विशेषत: एकोणिसाव्या शतकाच्या इतिहासाविषयी मोलाचे संशोधन करणारे ख्यातनाम अभ्यासक जगन्नाथ विश्राम नाईक यांचा जन्म गोव्यातील सावर्डे या गावी झाला. त्यांच्या आईचे नाव लक्ष्मी होते. त्यांचे वडील विश्राम जगा नाईक हे एक छोटे दुकानदार होते; पण त्यांचे मराठी साहित्याचे चौफेर वाचन होते आणि मोडी लिपीत ते सफाईदारपणे आपली दैनंदिनी व पत्रे लिहीत असत.

कोकणी व मराठी भाषांच्या संस्कारात वाढलेल्या जगन्नाथ यांनी पुढील शिक्षणात हिंदी व इंग्रजी भाषा आत्मसात केल्या आणि संशोधनाच्या निमित्ताने फ्रेंच आणि पोर्तुगीज भाषांचे जुजबी ज्ञानही प्राप्त केले. १९६० मध्ये मुंबई विद्यापीठाची इतिहास विषयातील एम.ए. ही पदवी प्राप्त केल्यावर प्रथम एल्फिन्स्टन महाविद्यालयात (१९६०-६२) व त्यानंतर मुंबईच्याच इस्माइल यूसुफ शासकीय महाविद्यालयात (१९६२-७३) त्यांनी इतिहासाचा व्याख्याता म्हणून नोकरी केली.

त्यांची उर्वरित कारकीर्द मुंबई विद्यापीठाच्या इतिहास विभागात (१९७३-९४) पार पडली. ३१ मे १९९४

रोजी प्राध्यापक व विभाग-प्रमुख पदावरून ते निवृत्त झाले. प्रा. नाईक सुमारे अर्धशतकाहून अधिक काळ संशोधनात मग्न राहिले. तसेच, त्यांच्या मार्गदर्शनाखाली अनेक विद्यार्थ्यांनी एम.फिल. व पीएच.डी. या पदव्या मिळवल्या. या प्रवासात प्रा. नाईक यांना मुंबई येथील 'इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स' मध्ये गणिताचे अध्यापन करणाऱ्या त्यांच्या पत्नी नीला नाईक यांची साथ लाभली.

अभिलेखागारे व ग्रंथालये यांमधील अस्सल कागदपत्रांच्या आधारे सुमारे अर्धशतकभर संशोधन-साधना करणारे प्रा. ज.वि. नाईक यांनी आधुनिक महाराष्ट्राच्या इतिहासाविषयी जी मोलाची कामगिरी केली, ती ग्रंथांपेक्षा शोधनिबंधांच्या रूपाने अधिक ज्ञात आहे. लोकप्रिय माध्यमे वा व्यासपीठे यांच्यापेक्षा विद्यापीठीय व संशोधकीय अभ्यासजगतात प्रा. नाईक अधिक वावरले. त्यांनी प्राधान्याने इंग्रजीमध्ये लेखन केले व व्याख्याने दिली. एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्रेतिहासावर, विशेषत: १८५७ पूर्व इतिहासावर प्रा. नाईक यांनी प्रकाश टाकला.

एकोणिसाव्या शतकाच्या आरंभकालातील सर्वच मराठी विचारवंतांनी ब्रिटिश अंमल म्हणजे 'ईश्वरी वरदान' मानले, हा गैरसमज असल्याचे प्रा. नाईक यांनी स्पष्ट केले. किंबहुना, भास्कर पांडुरंग, भाऊ महाजन, रामकृष्ण विश्वनाथ यांनी ब्रिटिश अमलाची समीक्षा करून गोऱ्या साहेबांवर खरमरीत टीका केल्याचे त्यांनी दाखवून दिले. या विचारवंतांच्या अर्थशास्त्रीय मीमांसांवर भाष्य करताना प्रा. नाईक यांनी त्यांना 'दादाभाई नौरोजींच्या शोषण-सिद्धान्ताचे पूर्वसुरी' म्हणून गौरविले आहे. परमहंससभेच्या रूपाने उद्‌भवलेल्या आरंभकालीन जातिविरोधी चळवळीचे महत्त्वही त्यांनी अधोरेखित केले. भाऊ महाजन यांचे योगदान यथार्थपणे मांडताना त्यांच्या 'ज्ञानदर्शन'मध्ये प्रकाशित झालेली (१८५४-५६) 'परागंदा झालेल्या गृहस्थाची कन्या' ही कादंबरी प्रा. नाईक यांनी उजेडात आणली. अपूर्ण स्वरूपात का होईना, पण 'यमुनापर्यटन'च्या आधी प्रसिद्ध झालेली ही 'मराठीतील पहिली कादंबरी' असल्याचा संशोधकीय दावा प्रा. नाईक यांनी केला. त्यांचे एकमेव मराठी पुस्तक या विषयाचा मागोवा घेणारे आहे.

एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्राच्या प्रबोधनाविषयीचे व समाज-सुधारणा चळवळीविषयीचे त्यांचे लेखन अत्यंत अभ्यासपूर्ण आहे. महाराष्ट्राच्या प्रबोधनावरील पाश्चात्त्य विचारवंतांचा प्रभाव, जॉर्ज जर्व्हिसचे 'गणित-शिल्प-विद्यालय', १८५७ पूर्व मराठी नियतकालिके, प्रार्थना समाजाविषयीचे संख्याशास्त्रीय विश्लेषण, महात्मा जोतिबा फुले, डॉ. भाऊ दाजी लाड, मामा परमानंद, डॉ. रा.गो. भांडारकर, न्या. म.गो. रानडे, सार्वजनिक काका, राजर्षी शाहू महाराज, र.धों. कर्वे इ. सुधारकांचे योगदान या विषयांवरचे प्रा. नाईक यांचे लेखन त्याचीच साक्ष देते. लोकमान्य टिळकांविषयीचे प्रा. नाईक यांचे लेखन त्याच्या वेगळेपणामुळे उठून दिसते. कार्ल मार्क्सचा परिचय भारताला प्रथम टिळकांनीच करून दिला (१८८१), असे प्रा. नाईक यांनी सिद्ध केले आहे.

मंडालेच्या तुरुंगवासातून टिळकांना मुक्त करताना ब्रिटिश सरकारने 'गीतारहस्या'चे हस्तलिखित ठेवून घेऊन संशयात्म्याच्या नजरेने त्याची कशी कसून तपासणी केली याविषयी नाईक यांनी जे साधार विवेचन केले आहे, ते त्यांच्या मूळ इंग्रजी ग्रंथातून वाचण्याजोगे आहे. मध्ययुगीन भारतीय संतांची कामगिरी; छत्रपती शिवाजी महाराजांच्या स्वराज्याची अर्थपूर्णता; राजा राममोहन रॉय, स्वामी दयानंद व भारतीय प्रबोधन; बंगालमधील वंगभंगविरोधी चळवळीचा पश्चिम भारतातील प्रभाव; भारतीय स्वातंत्र्य-चळवळीला महाराष्ट्राचे योगदान; राष्ट्रवाद व राष्ट्रीय ऐक्य; गांधीजींची वर्तमानातील प्रस्तुतता; फ्रेंच राज्यक्रांती इत्यादी विषयही प्रा. नाईक यांनी हाताळले आहेत. इतिहासाविषयी चिंतनपर लेखन करताना, 'इतिहास-लेखन ही एक नैतिक कृती असते' आणि 'तो सत्याचा अखंड चाललेला शोध असतो', हे मुद्दे त्यांनी अधोरेखित केले आहेत.

नाईक यांनी अनेक राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय चर्चासत्रे व परिषदांमध्ये शोधनिबंध सादर केले. विविध प्रतिष्ठित व्याख्यानमालांमध्ये त्यांनी विद्वत्तापूर्ण व्याख्याने दिली. त्यांच्या कार्याचा गौरव करण्यासाठी १९९९ मध्ये इंग्रजीत प्रा. नाईक गौरवग्रंथ प्रकाशित करण्यात आला. अखिल महाराष्ट्र इतिहास परिषद (२००६), इंडियन हिस्टरी काँग्रेस (२००७) आणि कोकण इतिहास परिषद (२०१२) यांची त्यांनी अध्यक्षपदे भूषविली. 'शास्त्री इंडो-कॅनडियन इन्स्टिट्यूट'चे फेलो म्हणून कॅनडा येथील टोरोंटो विद्यापीठाला (१९८२), विद्यापीठ अनुदान मंडळाचे व्हिजिटिंग फेलो म्हणून त्यांनी अनुक्रमे वडोदरा येथील महाराजा सयाजीराव विद्यापीठाला (१९९१) व कोल्हापूर येथील शिवाजी विद्यापीठाला (२०००-२००१) भेटी दिल्या. ते २००० साली मुंबई विद्यापीठाचे 'पंडित सेतुमाधवराव पगडी फेलो' होते.

भारत सरकारच्या सांस्कृतिक मंत्रालयाचे राजा राममोहन रॉय फाउण्डेशन (कोलकाता), नॅशनल बुक ट्रस्ट (नवी दिल्ली), भारतीय इतिहास अनुसंधान परिषद (नवी दिल्ली), मणिभवन गांधी संग्रहालय (मुंबई), एशियाटिक सोसायटी (मुंबई) इत्यादी नामवंत संस्थांशी सदस्य वा सल्लागार या नात्याने प्रा. नाईक यांचा निकटचा संबंध आला. एशियाटिक सोसाटीच्या विश्वस्त मंडळाचे ते अध्यक्ष आहेत. एकंदरीत, इतिहासाचे एक नामवंत अध्यापक व संशोधक म्हणून नाईक यांनी आपला खास असा ठसा उमटवला आहे.

— डॉ. राजा दीक्षित

**संदर्भ :**


१. *Dossal, Mariam and Maloni, Rubi, 'State Intervention and Popular Response : Western India in the Nineteenth Century' (Professor J.V. Naik Felicitation Volume); Popular Prakashan Pvt. Ltd., Mumbai; 1999.*

२. *Naik J.V.; 'British Secret Official View Regarding Lokmanya Tilak and Gita-Rahasya' (with original documents); Tilak Smarak Trust, Pune; 2005.*

3. *Ranganathan Murali (ed.), 'The Collected Works of J. V. Naik : Reform and renaissance in nineteenth century Maharashtra', Asiatic Society of Mumbai, Mumbai, 2016.*

४. *नाईक ज.वि., 'भाऊ महाजन आणि 'पहिली' मराठी कादंबरी'; डायमंड पब्लिकेशन्स, पुणे; २०१०.*


## नॉय, जेम्स हॅरी

**भाषाशास्त्र तज्ज्ञ, ग्रंथपाल, द. आशिया भाषा–संस्कृती अभ्यासक**

**२० ऑक्टोबर १९४६**



भारताच्या प्रांतोप्रांतीच्या भाषांच्या आणि संस्कृतीच्या उत्थानात ज्ञानसंग्रह उभे करून क्रांती करणारे आधुनिक ज्ञानोपासक, शिकागो विद्यापीठाचे मुख्य ग्रंथपाल आणि दक्षिण आशियाई केंद्राचे प्रमुख म्हणून डॉ. जेम्स हॅरी नॉय प्रख्यात आहेत. भारताच्या चेन्नई, हैदराबाद, पुणे, लखनौ या राजधानी नगरात त्या त्या प्रांताची, भाषा-संस्कृतीची विपुल साहित्य असलेली ग्रंथालये स्वत: पदरमोडीने उभे करणारे ते एकमेव अमेरिकन पंडित होय. त्यांनी स्थापन केलेल्या ग्रंथालयातून, तामिळ-तेलगु-मराठी-हिंदी या प्रादेशिक भाषांच्या ग्रंथांचे हजारोच्या संख्येत संकलन करण्यात आले आहे.

प्रा. जेम्स नॉय यांच्या वडिलांचे नाव हॅरी एडविन नॉय जेम्स हे विस्कॉन्सिन विद्यापीठाच्या मॅडिसन नगरीत वास्तव्याला होते. जीन मॅरी त्यांच्या पत्नी, त्यांच्याच वयाच्या आणि पेशाने शिक्षिका होत्या.

जेम्स नॉय यांनी तत्त्वज्ञान हा विषय घेऊन आक्सबर्ग महाविद्यालयामधून १९६४-६८मध्ये बी.ए. व धर्म या विषयात येल विद्यापीठातून १९६८-७०मध्ये एम.ए. पदवी मिळवली. नंतर १९७०मध्ये रोचेस्टर विद्यापीठातून हिंदी भाषेचा डिप्लोमा मिळवला. १९७०-७१मध्ये

पेनसिल्व्हानिया विद्यापीठातून 'साउथ एशियन स्टडीज' या विषयाचा अभ्यास केला. त्यानंतर त्यांनी १९७२-७४मध्ये ड्रेक्सेन विद्यापीठातून ग्रंथालय शास्त्राची पदवी मिळवली.

१९८० पासून शिकागो विद्यापीठात ग्रंथपाल आणि साउथ एशियन स्टडीज या आंतरराष्ट्रीय संघटनेचे प्रमुख म्हणून ते कार्य करू लागले.

१९८१-८२ या वर्षात त्यांनी संस्कृत-हिंदी भाषांचा अभ्यास लेखन-वाचनासहित पूर्ण केला, जो पुढे पुणे विद्यापीठात त्यांना पुराणावर संशोधनात्मक काम करताना उपयोगी पडला.

१९८२-८३ साली नॉय उपपुराणातील 'विष्णु' संकल्पनेवर अधिक संशोधन करण्यासाठी पुण्यात येऊन राहिले. पीवायसी ग्राऊंडजवळील एका बंगल्यात त्यांचे सपत्नीक एक वर्ष वास्तव्य होते.

साउथ एशियन स्टडीजच्या प्रकल्पातून भारतातील विविध प्रांतांच्या भाषांची सर्वसमावेशक ग्रंथालये निर्माण करून त्यासाठी निवडक संग्रह संकलित करून त्यांनी स्थानिक कार्यकर्त्यांवर त्यांची जबाबदारी सोपवली. यातूनच लखनौ (हिंदी), पुणे (मराठी), हैदराबाद (तेलगू), चेन्नई (तामिळ) आदी भाषांची ज्ञानकेंद्रे भारतात उभी राहिली. गेल्या दोन-तीन वर्षांत श्रीलंका, काठमांडू (नेपाळ) येथील केंद्रेही सुरू केली. गतवर्षी लाहोर (पाकिस्तान) येथे उर्दू-पर्शियन भाषेचे केंद्र त्यांनी चालू केले.

पुण्याच्या वास्तव्याने त्यांना शाकाहारी बनवले. त्यांचे घर म्हणजे ग्रंथालय कम् एथ्निक म्युझियमच आहे. साउथ एशियन स्टडीजच्या निमित्ताने इंग्लंड, रशिया, जपान, अमेरिकेचे विविध प्रांत आणि दक्षिण आशियाई देशातून जमवलेला वस्तुसंग्रह एखाद्या म्युझियमएवढा समृद्ध आहे.

जगभरातल्या अनेक शोधप्रकल्पात प्रा. नॉय यांचे मोठे योगदान आहे – मग मुंबईतील संस्कृत पदव्युत्तर अभ्यासकेंद्र असो, पुण्यातील दातेसूची असो की मराठी भाषा-संस्कृती केंद्र असो, त्यावर छाप मात्र प्रा. नॉय यांच्या कार्यकर्तृत्वाचीच!

प्रा. नॉय यांनी लिहिलेले काही ग्रंथ : 'सेक्रेड कोरल म्युझिक इन प्रिंट' (१९७४), 'सेक्युलर कोरल म्युझिक इन प्रिंट्स' (फिलाडेल्फिया/१९७४), 'लायब्ररी ऑटोमेशन इन स्मॉल कॉलेजेस' (१९७६).

– वा. ल. मंजूळ

## नियोगी भवानीशंकर

☛ ***मुख्य चरित्रनोंद - समाजकारण खंड***

✻✻✻

# प

## पंडित, शंकर पांडुरंग

**संस्कृत पंडित, प्राध्यापक, भारतीय भाषांचे अनुवादक**
**१८४० – १८ मार्च १८९४**



शंकर पांडुरंग पंडित यांचा जन्म सावंतवाडी संस्थानातील बांबुली या गावी एका सारस्वत कुटुंबात झाला. त्यांच्या कुटुंबाकडे कुलकर्ण्याचे काम होते. प्रारंभी पंडितांनी तोच व्यवसाय केला. त्यांचे प्राथमिक शिक्षण त्याच गावी झाले तथापि इंग्लिश शिकण्याच्या तीव्र इच्छेने ते मुंबईला गेले आणि त्यांनी १८६५ मध्ये एलफिन्स्टन महाविद्यालयामधून एम.ए.ची पदवी संपादन केली. ते त्या महाविद्यालयाचे फेलो झाले. नंतर पुण्यास येऊन त्यांनी दक्षिणा प्राइझ कमिटीचे कार्यवाह म्हणून काम करण्यास प्रारंभ केला. त्याच काळात ते संस्कृत आणि जर्मन भाषा शिकले. १८६८ साली त्यांची महाविद्यालयामध्ये साहाय्यक प्राध्यापक म्हणून नियुक्ती झाली. लवकरच प्राच्य भाषांचे प्राध्यापक म्हणून त्यांची पदोन्नती करण्यात आली. १८७४ मध्ये युरोपमध्ये भरलेल्या जागतिक परिषदेसाठी त्यांना ब्रिटिश सरकारने पाठवले.

परिषदेहून परतल्यावर मुंबईत आयकर आयुक्त (Incom Tax Collector) म्हणून त्यांची नियुक्ती झाली. भारतीय भाषांचे अनुवादक (Oriental Translator) म्हणूनही त्यांनी सरकारसाठी काम केले. नंतर पोरबंदर संस्थानचे प्रशासक म्हणून त्यांची नियुक्ती झाली. त्यांना ‘रावबहादूर’ हा किताब बहाल करण्यात आला. अमेरिकन ओरिएंटल सोसायटीचा ‘सन्माननीय सदस्य’ हा बहुमानही त्यांना प्राप्त झाला.

डेक्कन महाविद्यालयामध्ये प्राध्यापक म्हणून कार्य करीत असताना मुंबई विद्यापीठाच्या बी.ए. आणि एम.ए. यांसाठी नियुक्त करण्यात आलेल्या संस्कृत आणि प्राकृत ग्रंथांच्या चिकित्सीत आवृत्त्या त्यांनी तयार केल्या. यामध्ये रघुवंश, मालविकाग्निमित्र, विक्रमोर्वशीय, गउडवहो, कुमारपालचरित, द्वयाश्रयकाव्य यांचा समावेश आहे. तुकाराम महाराजांची गाथाही त्यांनी प्रकाशित केली. ऋग्वेदातील काही सूक्तांचे मराठी आणि इंग्लिश भाषांतर ‘वेदार्थयत्न’ या नावाने प्रसिद्ध झाले. ते बहुधा त्यांनी केले असावे, तथापि आपला उल्लेख त्यांनी टाळला असावा. प्रा. लुई रनू यांच्या Bibliographie Vedique या संदर्भग्रंथामधील उल्लेखावरून हा तर्क करणे शक्य आहे. या अनुवादाची प्रशंसा करणारी परीक्षणे आढळतात.

पंडित यांचे अथर्ववेदविषयक कार्य हे प्राच्यविद्येच्या अभ्यासात त्यांनी दिलेले महत्त्वपूर्ण योगदान आहे. अथर्ववेदाच्या शौनक संहितेची पहिली चिकित्सित आवृत्ती रुडॉल्फ रोथ (R. Roth) आणि व्हिटनी (W.D. Whitney) यांनी १८५६ साली बर्लिन येथून प्रसिद्ध केली. त्यांना उपलब्ध असलेल्या हस्तलिखितांवर ही आवृत्ती आधारित होती. पंडित यांनी शौनक संहितेची अनेक हस्तलिखिते गोळा केली. महाराष्ट्र, गुजरात, वाराणसी, ग्वाल्हेर इत्यादी ठिकाणी असलेल्या नामवंत अथर्ववेदी पंडितांना पाचारण करून त्यांच्या पठणाची नोंद घेतली. सायणाचा यांच्या अथर्ववेदभाष्याचीही हस्तलिखिते जमा करून अथर्ववेदाच्या शौनक संहितेची सायणभाष्यासह पहिली चिकित्सित आवृत्ती मुंबई येथून

या काळात प्रकाशित केली. देशोदेशीच्या विद्वानांनी त्यांच्या या कार्याची दखल घेतली.

— डॉ. श्रीकांत बहुलकर

## पगडी, सेतुमाधवराव श्रीनिवासराव

**इतिहास संशोधक, इतिहासकार**

**२७ ऑगस्ट १९१० – १४ ऑक्टोबर १९९४**



सेतुमाधवराव श्रीनिवासराव पगडी हे नाव थोडेसे कुतूहल जागविणारे. या वेगळ्या धाटणीच्या नावामुळे मनात औत्सुक्य निर्माण झाल्याशिवाय राहत नाही. मराठेशाहीच्या इतिहासलेखनाशी संबंधित अग्रक्रमाने येणाऱ्या नावांपैकी हे एक नाव. ज्ञानलालसा, प्रज्ञा, प्रतिभा यांचा सुरेख समन्वय सेतू माधवरावांच्या व्यक्तिमत्त्वामध्ये झाला आहे. रसाळ लिखाण, प्रभावी वक्तृत्व ही या इतिहासकाराची गुणवैशिष्ट्ये होत. त्यांचे संपूर्ण आयुष्य सनदी नोकरीमध्ये गेले. मराठी, उर्दू, फारसी, गोंडी, कोलमी भाषांचे सेतू माधवरावांना आकर्षण होते. महाराष्ट्र संस्कृती, मराठ्यांचा इतिहास, महाराष्ट्रातील धर्म, पंथ आदी विषयांचा त्यांचा व्यासंग होता. समर्थ संप्रदाय, सूफी संप्रदाय, शिवचरित्र, पेशवे-निजाम संबंध, मराठेशाहीच्या इतिहासाची फारसी साधने, मराठ्यांचे स्वतंत्र युद्ध आदी त्यांच्या चिंतन, मनन, लेखन आणि संशोधनाचे विषय होते. उर्दू साहित्य, शेरोशायरीविषयी त्यांना आकर्षण होते. त्यांच्यात उर्दू काव्यातील सौंदर्य आणि नजाकत टिपणारी संवेदनक्षमता होती.

सेतुमाधवराव पगडी यांचा जन्म लातूर जिल्ह्यातील निलंगा या तालुक्याच्या गावी झाला. निलंगा निजाम राजवटीत बिदर जिल्ह्याचा भाग होता. त्यांचे शालेय शिक्षण गुलबर्गा आणि उस्मानाबाद येथे झाले. ते इ.स.१९२५ मध्ये न्यू इंग्लिश स्कूल, पुणे येथून मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले. त्यांनी महाविद्यालयीन शिक्षण निजाम कॉलेज, हैदराबाद आणि बनारस हिंदू विश्वविद्यालयातून पूर्ण केले. त्यांनी इ.स.१९३० मध्ये बी.ए.ची पदवी पहिल्या वर्गात, पहिले येऊन प्राप्त केली. त्यांनी 'रायचंडी प्रसाद' सुवर्णपदक पटकाविले. इ.स. १९३२ मध्ये अलाहाबाद विश्वविद्यालयातून राज्यशास्त्र विषयात, एम.ए.च्या वर्गात ते पहिल्या वर्गात पहिले आले. मार्च १९३३ मध्ये ते तहसीलदार पदावर नियुक्त झाले. त्यांनी मामलेदार, डेप्युटी कलेक्टर, कलेक्टर, सचिव अशा विविध प्रशासकीय पदांची जबाबदारी सांभाळली. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे सचिव आणि 'महाराष्ट्र जिल्हा गॅझेटिअर'चे कार्यकारी संपादक म्हणून त्यांनी काही काळ काम केले. त्यांनी मे १९५३ च्या मराठवाडा साहित्य परिषदेच्या हैदराबाद येथील अधिवेशनाचे अध्यक्षपद भूषवले होते. त्यांनी इतिहासाशी संबंधित स्वतंत्र ग्रंथ आणि अनेक फारसी साधन ग्रंथांचे अनुवाद लिहून प्रसिद्ध केले. महाराष्ट्र आणि मराठे, इतिहासाचा मागोवा, शिवचरित्र : एक अभ्यास, छत्रपती आणि त्यांची प्रभावळ, मराठे व निजाम, पानिपतचा संग्राम, मराठे व औरंगजेब, मोगल आणि मराठे, हिंदवी स्वराज्य आणि मोगल, छत्रपती शिवाजी (इंग्रजी ग्रंथ) अशी इतिहासाशी संबंधित त्यांची ग्रंथसंपदा आहे. याव्यतिरिक्त समर्थ संप्रदाय, भारतीय मुसलमान, वरंगलचा इतिहास, हैदराबाद स्वातंत्र्य चळवळ, काश्मीर व पाकिस्तानविषयक विचार, आदिवासी जीवन, उर्दू-ग़ज़ल इत्यादी विविध विषयांवर त्यांनी लेखन केले आहे. एकूण सेतुमाधवराव पगडी बहुआयामी, बहुप्रसवी आणि रसीले लेखक होते. डिसेंबर १९६९मध्ये त्यांनी 'जीवनसेतू' नावाचे आत्मचरित्र लिहून प्रसिद्ध केले.

'शिवचरित्र : एक अभ्यास' या पुस्तकामध्ये इतिहासलेखकाविषयीची आपली संकल्पना त्यांनी स्पष्ट केली. इतिहासलेखक कोण आहे, हा कोणत्या वातावरणात वाढला आहे, याच्यावर संस्कार कोणते झाले आहेत, कोणत्या गोष्टींनी याला आनंद वाटतो

प

आणि कोणत्या गोष्टीचे दु:ख होते, कोणत्या गोष्टी तो अनुल्लेखनाचे टाळतो आणि कोणत्या आवर्जून लिहितो, या पद्धतीने कोणत्याही इतिहास ग्रंथाकडे पाहण्याची चिकित्सक दृष्टी सेतुमाधवरावांची आहे.

इतिहासलेखनशास्त्राच्या दृष्टीने ही भूमिका अत्यंत सयुक्तिक आहे. कारण, इतिहासलेखकाचा दृष्टिकोन, त्याच्या भावभावना अभिनिवेशात रूपांतरित होतात. समकालीन इतिहासलेखकाच्या बाबतीत ही संभाव्यता मोठ्या प्रमाणात निर्माण होऊ शकते. शिवचरित्रातील अनेक घटना अशक्यप्राय वाटतात आणि म्हणून मग समकालीन इतिहासकारांना हे सर्व चमत्कार वाटतात. परमानंदासारखा शिवपूजक शिवाजी महाराजांना विष्णूचा अवतार मानतो. इतिहासात अनेक घटनांना दैवी रूप प्राप्त होते. इतिहासलेखनातील या धोक्यांच्या जागी छाननी आणि चिकित्सा आवश्यक असते. ही पगडी यांची इतिहासलेखनविषयक भूमिका इतिहासशास्त्राच्या तत्त्वांना अनुसरूनच आहे.

शिवचरित्राविषयीचे पगडी यांचे विचार समजून घेण्यासारखे आहेत. शिवाजी महाराजांची अनेक चरित्रे इंग्रजी आणि मराठीमधून आतापर्यंत प्रसिद्ध झाली आहेत. या प्रत्येक लेखकाचा शिवचरित्रविषयक दृष्टिकोन वेगळा असल्याचे जाणवते. त्यातही आपल्याकडे इतिहासाविषयीचे आकर्षण कमालीचे असले, तरी इतिहास समजून घेण्यासाठी इतिहास ग्रंथांचे वाचन न करता, नाटक, कथा, कादंबऱ्यांच्या वाचनाकडे अधिक ओढा आहे. या माध्यमातूनच लोक इतिहास समजून घेतात. या संदर्भात पगडी यांची भूमिका स्वच्छ आणि स्पष्ट आहे. हे सर्व लिखाण म्हणजे इतिहास नव्हे व त्यांचे लेखक म्हणजे इतिहासकार नव्हेत असे निखळ सत्य त्यांनी नमूद केले आहे. या बाबतीत ते पुढे असे म्हणतात, की शिवाजी महाराजांच्या चरित्राचा शोध घेताना तत्कालीन लेखकांनी आपापला दृष्टिकोन स्वीकारून घटना व प्रसंग यांचे वर्णन केलेले आहे. त्यामुळे शिवचरित्रावर भाविकतेने चमत्काराची अथवा श्रद्धेने जी पुटे चढवली गेली आहेत, ती दूर करून शिवाजी महाराजांचे तेजस्वी आणि स्वयंभू चरित्र पाहिले पाहिजे.

शिवाजीराजे महाराष्ट्राच्या आदराचा आणि जिव्हाळ्याचा विषय आहेतच. म्हणून जदूनाथ सरकारांच्या शिवाजी महाराजांच्या एकेरी उल्लेखाची तीव्र प्रतिक्रिया महाराष्ट्रात उमटली. जगभर जे चरित्र गाजले, ज्या ग्रंथाच्या अनेक आवृत्त्या निघाल्या, तो ग्रंथ मात्र महाराष्ट्रीय मनाला भावला नाही. सेतू माधवराव पगडी शिवचरित्रलेखनात शिवाजी महाराजांच्या तत्कालीन प्रेरणांचा बौद्धिक अन्वयार्थ लावला पाहिजे, अशी रास्त भूमिका घेतात. शिवचरित्रात असे अनेक प्रसंग आहेत, ज्यांविषयी इतिहासकार मुग्धता बाळगून आहेत हे आवर्जून लिहितात. पगडी यांच्या शिवचरित्रलेखनामुळे सर्वसामान्य इतिहासवाचकांच्या समजुतीवर चढलेली पुटे ऐतिहासिक सत्यान्वेषण करून ते दूर करतात. इतिहासातील कल्पितांना इथे थारा मिळत नाही. इतिहासलेखनाच्या बाबतीत 'ना मूलं लिख्यते किंचित्' या भूमिकेवर ते ठाम राहतात. आधार असल्याशिवाय लेखणी उचलणार नाही अशी पगडी यांची तटस्थता होती. पगडी इतिहास अभ्यासकांना आवाहन करतात, की कोणतीही गोष्ट प्रमाण मानू नका. मुळाकडे जा! विचारांचा पगडा आपल्या मनावर बसू देऊ नका आणि अभ्यास करून rational thinking ज्याला म्हणू, ती तर्कशुद्ध विचारसरणी आत्मसात करा. अत्यंत तटस्थ दृष्टिकोन स्वीकारून इतिहास घटिताच्या मुळापर्यंत जाऊन शोध घेण्याचा निरपवाद ऐतिहासिक सत्यापर्यंत पोहोचण्याचा सेतुमाधवरावांचा हा प्रयत्न होता.

सेतुमाधवराव शिवाजी राजांच्या स्वराज्याचे वेगळेपण आणि वैशिष्ट्य सोप्या भाषेत समजावून सांगतात. राजांच्या कृतीच्या आधारे स्वराज्याच्या उभारणीमागचे तत्त्वज्ञान उलगडतात. मोगलाईचे स्वरूप आणि स्वराज्याची रूपरेषा यांत महद् अंतर अपरिहार्य आहे. स्वराज्यामध्ये लोक सुरक्षित असले पाहिजेत यासाठी महाराजांचा सततचा प्रयत्न होता. दुसरी गोष्ट धार्मिक सहिष्णुता, कोणाच्याही धर्मामध्ये ढवळाढवळ

प

नाही, तसेच कोणत्याही धर्माचे आक्रमण मान्य नाही. तिसरी गोष्ट स्त्रियांच्या बाबतीत अन्याय सहन न करण्याची. शिवसत्तेची ही वैशिष्ट्ये आहेत. स्वराज्याचा हेतू पगडी यांनी अत्यंत सुलभ भाषेत स्पष्ट केला आहे. विशेष म्हणजे, राजांची महत्ता वर्णन करताना उदात्तीकरण मात्र सेतुमाधवरावांनी टाळले आहे.

मराठ्यांच्या इतिहासातील इ.स. १६८० ते १७०७ हा स्वातंत्र्यसंग्रामाचा कालखंड मानला जातो. 'हिंदवी स्वराज्य' आणि 'मोगल' या पुस्तकांमधून हा इतिहास त्यांनी मांडला आहे. मराठी सत्ता या काळात तावून-सुलाखून निघाली. स्वातंत्र्यसंग्रामाच्या कालखंडावर अत्यंत बारीकसारीक तपशिलासह फारसी साधनांच्या आधारे त्यांनी लेखन केले. या संघर्षासाठी त्यांनी 'महाराष्ट्राचे महाभारत' या शब्दाचा प्रयोग केला. अत्यंत प्रतिकूल परिस्थितीमध्ये नेतृत्व नसताना महाराणी येसूबाई आणि युवराज शाहू मोगलांच्या कैदेत होते, तरीसुद्धा मराठे प्राण पणाला लावून लढले. औरंगजेब बादशहा एक-दोन नव्हे, पूर्ण सत्तावीस वर्षे मराठ्यांचे राज्य बुडविण्यासाठी निकराचा प्रयत्न करीत होता. मराठे बादशहाला अक्षरश: पुरून उरले. या स्वातंत्र्यसंग्रामामागे प्रेरणा काय होती? स्वातंत्र्याविषयीचे विलक्षण प्रेम कोठून आले होते? या प्रश्नांची उत्तरे पगडी यांनी दिलेली आहेत. स्वातंत्र्याचा मंत्र आणि स्वाभिमानाची भावना मराठ्यांमध्ये छत्रपतींनी निर्माण केली होती. मराठ्यांचा लढा जनतेचा लढा होता. औरंगजेब बादशहा एखाद्या राजसत्तेशी किंवा राजघराण्याशी लढत नव्हता, तर मराठी जनतेशी त्याला लढावे लागत होते. औरंगजेबाची आक्रमक वृत्ती, विस्तारवादी धोरण, धार्मिक असहिष्णुता एकीकडे, तर दुसरीकडे मराठी जनता, असा हा संघर्ष होता. मोगल प्रजेसाठी हे युद्ध बादशहाचे होते. मराठ्यांचे यश आणि औरंगजेब बादशहाचे अपयश याचा अत्यंत वस्तुनिष्ठ पद्धतीने सेतुमाधवरावांनी घेतलेला हा वेध होता.

सेतुमाधवराव पगडी यांचे फारसी ग्रंथांच्या अनुवादाचे कार्य अतिशय महत्त्वाचे समजले जाते. 'मराठ्यांच्या इतिहासातील बारीकसारीक धागेदोरे, मराठा घराण्यांच्या नात्यागोत्यांचे अनेक तपशील, महाराष्ट्राच्या धार्मिक आणि सामाजिक परंपरेमधील अनेक बारकावे यांचा तपशील सेतुमाधवराव पगडी यांना परिचित असल्यामुळे त्यांच्या अनुवादाला अधिकच भरीवपणा आला आहे. महाराष्ट्राच्या भौगोलिक वैशिष्ट्यांची आणि विविध स्थानांची पगडी यांना सखोल माहिती असल्यामुळेही त्यांच्या अनुवादांत स्थाननिश्चिती अधिक स्पष्ट झालेली आहे.' श्री. स.मा. गर्गे यांचा फारसी साधन ग्रंथांच्या अनुवादांविषयीचा उपरोक्त अभिप्राय अनुवादग्रंथांचे मोल स्पष्ट करणारा आहे. सुमारे पाच हजार पृष्ठांचा फारसी भाषेतील मजकूर त्यांनी मराठी भाषेत अनुवादित करून इतिहासलेखकांना कायमचे ऋणी करून ठेवले आहे. त्यांनी एकूण विविध विषयांवर ६४ पुस्तके लिहिली. पगडी यांच्या समग्र लेखनाचे डबल क्राउन आकाराचे ८ खंड (मराठी ६ व इंग्रजी २, पृष्ठसंख्या अदमासे अकरा हजार) सेतू माधवराव पगडी जन्मशताब्दी वर्षाच्या निमित्ताने मराठी साहित्य परिषद, आंध्रप्रदेश, हैदराबादद्वारा ऑगस्ट २०१० मध्ये प्रकाशित करण्यात आले आहेत.

भारत सरकारने इ.स. १९९१मध्ये 'पद्मभूषण' पुरस्काराने त्यांचा गौरव केला. बहुभाषा प्रभुत्व, बहुआयामी, बहुपेडी आणि बहुप्रसवी व्यक्तिमत्त्वाचे धनी असणारे सेतुमाधवराव पगडी जीवनविषयीची कृतज्ञता व्यक्त करताना 'जीवनसेतू' या त्यांच्या आत्मचरित्रात असे नमूद करतात की,

अय गर्दिशे अय्याम तेरा शुक्रिया।
हमने दुनिया का हर पहलू देख लिया॥

जीवनाच्या प्रत्येक पहलूचा (पैलूचा) त्यांना अनुभव मिळाला. या अनुभवसंपन्नतेतून ते सकल जनांना शहाणे करण्यासाठी अथक लिहीत राहिले. परिणामी, इतिहासलेखन क्षेत्र संपन्न झाले.

— डॉ. ओमप्रकाश समदाणी

**संदर्भ :**

१. *'समग्र सेतुमाधवराव पगडी'; खंड २ व ३ (इतिहास); मराठी*

प

*साहित्य परिषद, आंध्रप्रदेश, हैदराबाद; ऑगस्ट २०१०.*

२. *'पंचधारा', वर्ष ५३, अंक २; मराठी साहित्य परिषद, आंध्रप्रदेश, हैदराबाद; २०१०.*

## पटवर्धन, माधव वासुदेव

**प्राध्यापक, समीक्षक, अभ्यासक, अनुवादक**

**१९०६ – २५ नोव्हेंबर १९८८**



माधव वासुदेव पटवर्धन हे उत्तम विद्वान होते. विद्यार्थिदशेतच त्यांनी मिळविलेल्या सुप्रसिद्ध जगन्नाथ शंकरशेट व इतर शिष्यवृत्त्यांमुळे त्यांच्या यशाची पावती मिळते. शैक्षणिक क्षेत्रामध्ये १९३० पासून पदार्पण केले. प्रा. पटवर्धनांनी सांगली येथील विलिंग्डन महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून कारकिर्द सुरू केली.

त्यानंतर त्यांची न्यू इंग्लिश स्कूल, रमणबाग, पुणे येथे पर्यवेक्षक म्हणून नियुक्ती झाली. ५ वर्षांनंतर फर्गसन महाविद्यालयात संस्कृत-प्राकृत प्राध्यापक म्हणून पुण्याला कार्यरत होते. १९६७ मध्ये ते निवृत्त झाले. शैक्षणिक कारकिर्दीत त्यांचे उत्तम शिक्षकाचे गुण व वडिलांसारखे प्रेम ह्या गोष्टींचा अनुभव विद्यार्थ्यांना येत असे. त्यामुळेच ते विद्यार्थ्यांमध्ये 'मामा' शब्दाने ओळखले जात. निवृत्तीनंतर त्यांनी आपले जीवन संस्कृत साहित्य व प्राकृत साहित्य ह्यांच्या अभ्यासासाठी वाहून दिले. अनेक संस्कृत-प्राकृत विषयांवर नियतकालिकांतून लेख लिहिले.

विद्यार्थ्यांना प्रत्येक विषयाचे ज्ञान सुलभतेने व्हावे ह्यासाठी त्यांची झटपट नित्य सुरू असायची. त्यांच्या लेखणीतून बाहेर आलेल्या संस्कृत-प्राकृत विषयावर प्रकाशित पुस्तकांच्या मालिकेतून आपल्याला ती स्पष्ट जाणवते.

१. दशवैकालिकसूत्र : एक अध्ययन - प्रथम भाग (१९३३) व द्वितीय भाग (१९३६) इंग्लिश

२. वेणीसंहार (मराठी अनुवाद)

३. बाणाची कादंबरी (काही भागांचे इंग्लिश अनुवाद)

४. हस्तिमल्ल या जैन लेखकाची संस्कृत-प्राकृत नाटके (इंग्लिश)-अंजनापवनंजय इत्यादी

५. वज्जालग्ग - प्राकृत सुभाषित संग्रह (इंग्लिश) १९६९

६. शांतरस व अभिनवगुप्तकृत रसास्वादोपपत्ती (प्रा. जे. एल. मसन) यांच्या सहकार्याने, इंग्लिश, १९६९.

७. भरताच्या नाट्यशास्त्रातील रसाध्याय व रसास्वाद (प्रा. जे. एल. मसन यांच्या सहकार्याने, इंग्लिश, १९७०)

८. हालाची गाथा सप्तशती या ग्रंथाचा पहिला खंड १९८०

९. महिमभट्टाच्या व्यक्तिविवेकावरील परिचय ग्रंथाचे लेखन.

१०. मराठी रघुवंश (गेयकाव्य) या पुस्तकाचे कर्ते १९८२ मध्ये हे पुस्तक प्रकाशित.

११. आनंदवर्धनाचे ध्वन्यालोक अभिनवगुप्ताच्या लोचन टीकेसह, मराठी अनुवाद - पु.ल. वीरकरांच्या सहकार्याने.

१२. आनंदवर्धनांचे ध्वन्यालोक अभिनवगुप्ताच्या लोचन टीकेसह इंग्लिश अनुवाद - जे.एल. मसन व डॉ. डी.एच.एच. डगलस यांच्या सहकार्याने - तीन खंड

१३. सुभद्रानाटिका, १९५०

उपरोक्त लिखित साहित्याची थोडक्यात माहिती पुढीलप्रमाणे आहे.

साहित्यशास्त्रातील संस्कृत ग्रंथांच्या मालिकेत आनंदवर्धनाचा ध्वन्यालोक हा ग्रंथ अनमोल आहे. ज्यामध्ये ध्वनितत्त्वावर प्रकाश टाकण्यात आला. इतक्या मौल्यवान असलेल्या ह्या ग्रंथाचा मराठी अनुवाद १९ व्या शतकात लिहिला गेला हे विशेष. हा ग्रंथ १९८२मध्ये प्रकाशित झाला.

महाराष्ट्रातील विद्यापीठातून संस्कृत साहित्यशास्त्र

प

घेऊन एम.ए. होण्याची इच्छा बाळगणाऱ्या तसेच बी.ए. व एम.ए. ह्या परीक्षांसाठी मराठी साहित्यशास्त्र घेणाऱ्या विद्यार्थ्यांच्या आवश्यक गरजांच्या पूर्तीसाठी संपूर्ण विषयावर मराठी भाषेतून लिहिला जाणारा हा पहिलाच ग्रंथ आहे. पु.ना. वीरकरांच्या सहकार्याने संस्कृतातील हे विचारधन सामान्य लोकांपर्यंत पोहोचवण्यासाठी मा.वा.पटवर्धनांनी टाकलेले हे पाऊल अभ्यासकांच्या दृष्टीने वंदनीय आहे. मराठीत आलेल्या अशा ग्रंथांमुळे साहित्यशास्त्रविषयक मूलग्राही चर्चा, चर्वणा सर्व काही मराठीत होऊ शकेल असे मत सुरेंद्र बारलिंगेनी प्रदर्शित केले, ते योग्यच वाटते.

डॉ. वा.म. कुळकर्णी ह्यांनी असे म्हटले आहे की, आनंदवर्धन व अभिनवगुप्त यांच्यासारख्या असामान्य साहित्यशास्त्रकारांना प्रा. वीरकर व प्रा. पटवर्धन यांच्यासारखे संस्कृत पंडित व सहृदय भाष्यकार त्यांच्या ग्रंथाच्या मराठी रूपांतरासाठी लाभावेत, हा एक अपूर्व योग होय. भरताच्या नाट्यशास्त्रातील रसाध्याय व रसास्वाद हा ग्रंथ प्रा. जे. एल. मसन यांच्या सहकार्याने इंग्लिशमध्ये लिहिला. पहिल्या भागामध्ये लेखकांनी रसाध्याय व रसास्वाद ह्यांविषयक प्रश्नांवर विचार मांडला. तसेच संस्कृत साहित्यावरील टीकात्मक विवेचनाने नैसर्गिक साहित्यिक अनुभव मिळतो. लेखकाच्या अभिनवभारती ह्या उत्कृष्ट पुस्तकाच्या अभ्यासाने रसविषयक विचारांबाबत असलेल्या मतभिन्नता व पूर्वी न बघितलेल्या विचारांचे वर्णन केले आहे. शांतरस आणि अभिनवगुप्तकृत रसास्वादोपत्ती प्रा. जे.एल मसन यांच्या सहकार्याने लिहिले आहे.

अभिनवगुप्ताच्या विचाराचे परीक्षण काश्मीर शैवसंप्रदायाच्या आधारे ग्रंथबद्ध करण्याचा हा प्रथम प्रयत्न. लेखकाने ह्यामध्ये अभिनवगुप्ताने मांडलेल्या शांतरसाला विचारात घेऊन त्याचे संस्कृत काव्यशास्त्रातील सौंदर्यामध्ये रसतत्त्व कसे व किती मोलाचे योगदान आहे, ते दाखविण्याचा प्रयत्न केला. रसतत्त्व संकल्पना तत्त्वज्ञानात्मक बैठकीवर कशी आधारलेली आहे आणि अभिनवाला रससंकल्पना संज्ञा द्यावी असे का वाटले, ह्या प्रश्नाचाही लेखकाने परामर्श घेतला.

संस्कृत साहित्यात रससंकल्पनेची उपयुक्तता विस्तृत रूपाने दाखविण्याचा प्रयत्न केला. तसेच लेखकांनी रसास्वाद व ब्रह्मास्वाद ह्यांमधील साम्य-भेद दाखविण्याचा प्रयत्न केला आणि सूचीमधून नंतरच्या लेखकांचे शांतरस व रसास्वाद ह्या बाबतीतील योगदान दाखविण्याचा प्रयत्न केला.

महिम भट्टाचा व्यक्तिविवेक हा एक परिचय ग्रंथ होय. महिम भट्टाच्या व्यक्तिविवेक ह्या ग्रंथांची उपयुक्तता, अनुमितिवादाला काव्यामध्ये हे बहुरंगी स्वरूप कसे प्राप्त झाले आहे; ह्यांचे पांडित्यपूर्ण विवेचन वाचण्यासाठी व अनुमितिवादाचा रसिकांना परिचय करून देण्यासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने प्रकाशित केलेला हा परिचय ग्रंथ. संस्कृत सौंदर्यशास्त्राच्या अभ्यासकांना या परिचय प्रबंधाचा पुरेपूर उपयोग होईल यात संशय नाही, असे मत डॉ. मधुकर आष्टीकरांनी महिमभट्टकृत व्यक्तिविवेक ह्या परिचय ग्रंथाच्या निवेदनात मांडले आहे.

प्रा. पटवर्धन हे संस्कृतप्रमाणेच प्राकृत भाषेचेसुद्धा विद्वान होते. त्यांचे प्राकृतभाषेतील योगदानही अमूल्य आहे. त्याचा आढावा असा- जयवल्लभाच्या वज्जालग्गम् या प्राकृत सुभाषित संग्रहाचा रत्नदेवाच्या संस्कृत टीकेसह असलेल्या ग्रंथाची इंग्लिशमध्ये संशोधित प्रत लिहिली. यामध्ये प्रस्तावनेत विविध विषयांवर विचारविनिमय केला आहे. साहित्यिक गुण, भाषेचे वैशिष्ट्य व विषयाची गहनता हे ह्या पुस्तकाचे वैशिष्ट्य. अनुवाद, टिपा, स्पष्टीकरण तसेच व्याकरण, व्युत्पत्ती आणि संस्कृतचा प्रभाव व मराठी-हिंदी भाषांतील शब्दसाम्य दाखविण्याचा प्रयत्न ह्यात केला गेला.

हालाचा गाहाकोश भुवनपालाच्या संस्कृत टीकेसह दोन भागांमध्ये प्रकाशित झाला. गाहाकोश हा गाथासत्तसई म्हणून प्रसिद्ध आहे. त्यात प्राचीन भारतातील सामान्य माणसाचे जीवन प्राकृत काव्यामध्ये प्रतिबिंबित झाले आहे. प्रा. बेबर ह्यांची ही प्रत न

समजणारी तसेच विद्यार्थी व विद्वान यांना जर्मन भाषेत जोडणारी नव्हती, म्हणून प्रा. पटवर्धनांनी त्यांच्या संशोधनात्मक पुस्तकात देवनागरी लिपीसह त्याचा संपूर्ण अभ्यास इंग्लिशमध्ये करण्याची जबाबदारी यथार्थपणे पार पाडली. सहृदय पटवर्धनांनी गाथाकोशातील गाथांचे सौंदर्य दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.

प्रा. पटवर्धनांनी मिथकशास्त्र व ऐतिहासिक संदर्भ यांसह केलेला हा गाथाकोश तरुण आणि विद्वत अभ्यासकांच्या भविष्यातील अभ्यासासाठी अमूल्य देणगीच होय. दशवैकालिकसूत्र ह्या ग्रंथाचे चिकित्सक अध्ययन - जैन साधूसाठी असलेले नियम व त्यांच्या योग्य गुणवत्तेचे वर्णन ह्यात केले आहे. ह्याचे दोन भाग आहेत. व्याकरण दृष्टिकोणातून संदर्भाचा गोषवारा, सामान्य विवेचन आणि प्रत्येक भागाची विभागणी, परिणामात्मक दृष्टिकोणातून अध्ययन आणि पारंपरिक अध्ययन व्युत्पत्तीद्वारे दोन कुलिकांचे अध्ययन केले गेले आहे. त्यांनी टीकात्मक संशोधन लिखाणासाठी अनेक हस्तलिखितांचे अध्ययन केले. प्रा. पटवर्धनांनी आपले संपूर्ण जीवन संस्कृत-प्राकृत भाषांच्या अध्ययनासाठी खर्ची केले. त्यांच्या उपरोक्त लिखित साहित्याच्या खजिन्याकडे बघितले असता असे जाणवते की, संस्कृत-प्राकृत या भाषिक वर्गातील विद्यार्थी आणि विद्वान यांच्याकरिता पटवर्धनांचे हे अलौकिक कार्य नेहमीच उपयुक्त ठरेल ह्यात तिळमात्र संशय नाही.

— सुचित्रा ताजणे

## पठाण, युसुफ महंमद

☛ *मुख्य चरित्रनोंद - साहित्य खंड*

## पणशीकर, वासुदेवशास्त्री लक्ष्मणशास्त्री

**संपादक, प्रकांड पंडित**

**३० मे १८६० – २ सप्टेंबर १९३७**



‘‘निर्णयसागरच्या माध्यमातून आधुनिक काळात प्राचीन संस्कृत ग्रंथांच्या मुद्रणाचे जे महान कार्य संपन्न झालं त्याच्या प्रमुख आधारस्तंभांत वासुदेवशास्त्री पणशीकर होते. संस्कृत विद्येच्या अभ्यासकांवर पं. वासुदेवशास्त्रींचे जे ऋण आहे त्यातून मुक्त होणे कोणालाच शक्य नाही. दोनशेपेक्षाही अधिक ग्रंथांचं संपादन करणं म्हणजे जागतिक कीर्तीचा विक्रमच आहे.’’ असे गौरवोद्गार मराठीतील थोर विचारवंत कै. नरहर कुरुंदकर यांनी काढले आहेत.

मुंबईतल्या प्रख्यात निर्णयसागर मुद्रणालयात प्रसिद्ध झालेल्या अनेक संस्कृत ग्रंथांवर ‘पणशीकरोपाह्व विद्वद्वरलक्ष्मणशर्मतनुजनुषा वासुदेवशर्मणा परिष्कृता संस्कृता च।’ अशी विद्वत्तापूर्ण व समासप्रचुर भाषेत संपादकांनी आपली नाममुद्रा उमटवलेले अनेक संस्कृत ग्रंथ अभ्यासकांच्या चांगलेच लक्षात असतील. प्रकाशक निर्णयसागर व संपादक वासुदेवशास्त्री पणशीकर ही ‘द्वयी’ म्हणजे ग्रंथाच्या प्रमाणतेची साक्षच मानली जायची, भारतवर्षातच नव्हे, तर भारताबाहेरही! आजही जाणते संस्कृत अभ्यासक अनेक मुद्रित प्रती उपलब्ध असूनही वा.ल. पणशीकरांनी संपादित केलेल्या आवृत्तीचाच मागोवा घेत अगदी परदेशातूनही भारतात येतात.

१४ पिढ्यांपासून वैदिक व शास्त्र यांची परंपरा असलेल्या वेदशास्त्रसंपन्न पणशीकर घराण्यात, गोमांतकातील पेडणे या छोट्या गावात वासुदेवशास्त्रींचा जन्म झाला. त्यांचे वडील लक्ष्मणशास्त्री आणि आई सत्यभामाबाई. त्यांची कुशाग्र बुद्धिमत्ता व लहान वयातही विद्याध्ययनाकडे असलेला ओढा लक्षात घेऊन गावातील प्रमुख देशप्रभू कुटुंबीयांनी पुढाकार घेऊन त्यांना कोल्हापूरला शिक्षणासाठी पाठविले. तेथे कान्ताचार्य महापण्डितांकडे याज्ञिकीचे व संस्कृत व्याकरणाचे सांगोपांग अध्ययन झाले. अवघ्या २५व्या वर्षी ते ६ शास्त्रांमध्ये पारंगत झाले. सुप्रसिद्ध साहित्यिक भाऊसाहेब माडखोलकर यांच्या वडिलांनी त्यांना मुंबईत

आणले. मुंबईत निर्णयसागर या प्रसिद्ध छापखान्यात ते 'प्रधानशास्त्री' म्हणून काम पाहू लागले. मुद्रणकलेचा विकास होत असतानाच वासुदेवशास्त्रींच्या द्रष्टेपणामुळेच भारतभर हस्तलिखितांच्या स्वरुपात विखुरलेले अनेक संस्कृत ग्रंथ हे शुद्ध मुद्रित रुपात संस्कृत अभ्यासकांच्या हाती आले. ग्रंथ संपादन करणे म्हणजे केवळ शुद्धलेखन तपासणे नव्हे तर हस्तलिखितांचे संकलन, उपलब्ध प्रतींच्या पाठभेदांचे संशोधन, कठीण शब्दांचे अर्थ, टीपा व व्याख्या देणे, शास्त्रांच्या आधारे त्रुटींची पूर्तता करणे आणि परिशिष्टे व लेखकांचा परिचय देऊन ग्रंथाची उपयुक्तता वाढविणे म्हणजे ग्रंथसंपादन होय अशी वासुदेवशास्त्रींची धारणा होती. निर्णयसागर या मुद्रणालयाच्या माध्यमातून सातत्याने ५१ वर्षे (१८८५-१९३७) २००हून अधिक ग्रंथांच्या शुद्धतम व प्रमाणित प्रतींचे देखणे संपादन करून वासुदेवशास्त्री यांनी या प्रती लोकार्पण केल्या. लंडन विद्यापीठातील वाचनालयामध्ये वासुदेवशास्त्री पणशीकरांनी संपादित केलेल्या संस्कृत पुस्तकांचा २ कपाटांचा एक स्वतंत्र विभागच स्थापन केला असून शास्त्रीबुवांच्या ग्रंथसंपदेचे तेथे मोठ्या गौरवाने जतन केले आहे.

भगवद्‌गीता, आश्वलायनगृह्यसूत्र, ऐतरेय आरण्यक, ब्रह्मसूत्रभाष्य, संस्कृत काव्य व नाटके, ललितासहस्रनाम, योगवासिष्ठ, मनुस्मृति, मीमांसापरिभाषा, गंगालहरी, सिद्धान्तकौमुदी या पंडित वासुदेवशास्त्रींनी संपादित केलेल्या ग्रंथांच्या नामावलीवर नुसता दृष्टिक्षेप जरी टाकला, तरी त्यांचे संपादन करण्यासाठी लागणाऱ्या विद्वत्तेची योग्यता आपल्या लक्षात येईल. एकनाथी भागवत, तुकाराम गाथा, भावार्थ रामायण, ज्ञानेश्वरी असे संत साहित्याचेही अत्यंत साक्षेपी संपादन केले. त्यासाठी विशेष अभ्यास करताना वारकऱ्यांचे शिष्यत्वही स्वीकारले. त्यांनी संपादित केलेली पोस्टकार्ड आकारात छापलेली तुकाराम गाथा विशेष लोकप्रिय झाली.

शास्त्रीबुवांचा शुद्धलेखनाबद्दल कमालीचा आग्रह, त्यामुळे प्रसंगी ८-१० वेळासुद्धा ते प्रुफे तपासत. निर्णयसागरमध्ये त्यांच्या हाताखाली ६ शास्त्री साहाय्यक म्हणून काम करत होते. अलौकिक बुद्धिमत्ता व पराकोटीचे परिश्रम यांमुळे तत्कालीन शास्त्री, वैदिक, पुराणिक व पुरोहित या सर्वांनाच शास्त्रीबुवांच्या कार्याचा लाभ होत होता. सर्वच शाखांच्या विद्वानांचे शास्त्रीबुवा हे श्रद्धास्थानच होते. अनेक मान्यवर त्यांच्याकडे शास्त्रार्थासाठी येत असत, तेव्हा हा शास्त्रार्थ अथवा संवाद कित्येकदा संस्कृतभाषेतच होई.

त्यांनी संपादित केलेल्या ग्रंथांपैकी ९८ ग्रंथांची सूची भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्थेत तर ६९ ग्रंथांची सूची पुणे विद्यापीठात आहे. अनेक ग्रंथ अहमदनगरच्या जैन मंदिरातही उपलब्ध आहेत. पं. वासुदेवशास्त्रींचे वैशिष्ट्य म्हणजे संपादित ग्रंथाच्या प्रारंभी ग्रंथप्रशस्ती व विद्वदभ्यर्थनम् हे दोन्हीही ते काव्यरूपातच रचत असत. शास्त्रीबुवांच्या लांबलचक व पल्लेदार संस्कृत वाक्यरचना यामुळे बाणभट्टाच्या शैलीचीच आठवण होत असे. संपादित ग्रंथाची प्रस्तावना हीदेखील ग्रंथाइतकीच महत्त्वाची असते. शास्त्रीबुवांच्या पांडित्यपूर्ण प्रस्तावनांमुळे हे ग्रंथ विद्वन्मान्य झाले. असे असूनही त्यांनी स्वतंत्र ग्रंथनिर्मिती मात्र केली नाही. नवीन रचनेपेक्षा 'प्राप्तस्य परिरक्षणम्' या तत्त्वाने त्यांनी आपली सारी प्रतिभा संशोधनाकरिताच पणाला लावली. कोणत्याही मानसन्मानाची अथवा प्रसिद्धीची कामना न बाळगता ध्येयासक्तीने ग्रंथसंस्करणाचे व्रत निष्ठेने करीत राहिले. संस्कृत भाषेच्या प्रचारात या ग्रंथांचे मोठेच योगदान आहे.

'ग्रंथसंपादनाच्या व प्रकाशनाच्या रूपाने सरस्वतीची उपासना' हेच वासुदेवशास्त्रींच्या जीवनाचे उच्चतम ध्येय होते. आपल्या पुढच्या पिढ्यांवर ज्ञानाचेच संस्कार त्यांनी केले. त्यांचे सुपुत्र व्याकरणतज्ज्ञ पंडित विष्णुशास्त्री पणशीकर, नातू - संस्कृत पंडित व ज्योतिर्विद् आबाजी पणशीकर, नटश्रेष्ठ प्रभाकर पणशीकर व महाभारताचे भाष्यकार दाजीशास्त्री पणशीकर यांनी महाराष्ट्रात पणशीकर घराण्याचा ठसा वेगवेगळ्या क्षेत्रांत उमटवला आहे.

भारतीय संस्कृतीच्या रक्षणार्थ वासुदेवशास्त्रींनी केलेल्या लोकोत्तर कार्याने प्रेरित होऊन व त्यांचे हे कार्य सतत लोकांसमोर राहावे म्हणून नटश्रेष्ठ प्रभाकर पणशीकर यांना 'महर्षि व्यास विद्या प्रतिष्ठान' ही संस्कृत प्रचाराला वाहिलेली संस्था १९९६ रोजी स्थापन केली. या संस्थेतर्फे २००३ सालापासून संस्कृत भाषेच्या अध्ययनात आणि अध्यापनात अत्यंत महत्त्वपूर्ण स्थान असलेल्या अमरकोश या ग्रंथाच्या पाठांतरास प्रोत्साहन मिळावे म्हणून अमरकोश पठण स्पर्धा आयोजित केली जाते. गुणवत्तापूर्ण सहभागाबद्दल 'विद्वद्रत्न वासुदेवशास्त्री पणशीकर स्मृती चषक' दिला जातो. आजमितीस १०,००० हून अधिक विद्यार्थ्यांनी या स्पर्धेत सहभाग घेतला आहे.

वासुदेवशास्त्री पणशीकर हे संस्कृत साहित्याचे प्रकांड पंडित होते व मराठीभाषेवरही त्यांचे जबरदस्त प्रभुत्व होते. अलीकडच्या काळातील एक थोर विद्वान या नात्याने गोमांतकातील विद्वत्परंपरा त्यांनी राखली यात शंका नाही.

— तरंगिणी खोत

**संदर्भ :**

*१. सातोस्कर बा.द.; गोमांतकीय मराठी साहित्याचे शिल्पकार*

प

## पदय्या, के.

***कटरागड्डा पदय्या***

**पुरातत्त्व संशोधक, लेखक**

**२० मे १९४३**

भारतीय पुरातत्त्व क्षेत्रात प्रागैतिहासिक काळासंबंधी मोलाचे संशोधन करणारे आणि पुरातत्त्वातील तत्त्वज्ञानात मूलगामी भर टाकणारे कटरागड्डा पदय्या यांचा जन्म आंध्र प्रदेशातील पामुलपाडू या छोट्या गावात झाला. आंध्र विद्यापीठातून इतिहास विषयात पदवी घेतल्यांनंतर ते पुण्यात आले आणि त्यांनी डेक्कन कॉलेजमधून १९६५मध्ये एम.ए. पूर्ण केले. त्यांनी पद्मभूषण या सन्मानाने गौरवण्यात आलेल्या प्रा. ह.धी. सांकलिया यांच्या मार्गदर्शनाखाली १९६८मध्ये पीएच.डी. संपादन



केली. 'उत्तर कर्नाटकातील शोरापूर दुआबातील प्रागैतिहासिक व इतिहासपूर्व संस्कृती' हा त्यांच्या प्रबंधाचा विषय होता.

हॉलंडमध्ये काही काळ संशोधन केल्यानंतर पदय्या १९७२मध्ये डेक्कन कॉलेजात व्याख्याता म्हणून रुजू झाले. प्राध्यापक म्हणून दीर्घकाळ अध्यापन केल्यानंतर ते २००३मध्ये डेक्कन कॉलेजचे संचालक झाले. हे पद भूषवून निवृत्त झाल्यावरही पदय्यांची ज्ञानलालसा आणि जिज्ञासा कमी झालेली नाही. ते सध्या डेक्कन कॉलेजमध्ये सुप्रतिष्ठित प्राध्यापक म्हणून संशोधनाचे कार्य करत आहेत. प्रा. पदय्या जरी जन्माने मराठी नसले, तरी महाराष्ट्र ही आपली कर्मभूमी मानून त्यांनी पन्नास वर्षांपेक्षा जास्त काळ पुरातत्त्वात मोलाची कामगिरी केली आहे.

प्रा. पदय्यांनी कर्नाटकातील हुन्सगी आणि बैचबाळ खोऱ्यांमध्ये अत्यंत प्राचीन अशा अशुलियन या पुराश्मयुगीय आणि नवाश्मयुगीन संस्कृतीच्या अवषेशांवर जवळजवळ दोन दशके सखोल असे संशोधन केले आहे. त्यांनी हुन्सगी, येदियापूर आणि इसामपूर पुराश्मयुगीय स्थळांचे उत्खनन केले. या त्यांच्या या कामामुळे भारतीय पुरातत्त्वात प्रथमच पुराश्मयुगातील मानवी जीवनाचे साकल्याने आकलन होऊ शकले. शोरापूर दुआबात प्रा. पदय्यांनी कोडेकल आणि बुदिहाळ या नवाश्मयुगीन स्थळांचे उत्खनन केले आणि त्या वेळच्या कृशी-पशुपालक सांस्कृतिक जीवनाच्या विविध पैलूंवर प्रकाश टाकला. हे करत असताना त्यांनी पुरातत्त्वातील सर्व पद्धतींचा उपयोग केला.

भारतीय पुरातत्त्वात हाताच्या बोटांवर मोजता येईल इतक्याच लोकांनी सिद्धान्तांचा विचार केला. प्रा. पदय्या त्यामधील एक व जगभर मान्यता असलेले एक आहेत. पुरातत्त्वीय सिद्धान्तांमध्ये १९५०नंतर आमूलाग्र बदल घडून आले व नवपुरातत्त्वाचा (New

Archaeologyचा) उदय झाला. प्रा. पदय्यांनी यानंतर निर्माण झालेल्या चर्चांमध्ये सहभाग तर घेतलाच, शिवाय नवपुरातत्त्वाने पुरस्कार केलेल्या प्रक्रियावादी तत्त्वज्ञानाचा प्रत्यक्ष क्षेत्रीय संशोधनात कसा वापर करायचा ते दाखवून दिले. या संदर्भातील त्यांचा 'न्यू आर्किओलॉजी अँड आफ्टरमॅथ' (१९९०) हा ग्रंथ आजही मैलाचा दगड मानला जातो. पुरातत्त्वीय सिद्धान्त हा समजायला आणि शिकवायला अवघड विषय ते अत्यंत सोप्या पद्धतीने शिकवत असत. अनेकदा, 'उन्हात काम करणे टाळणारे लोक आरामखुर्चीत पुरातत्त्वीय सिद्धान्तांची मांडणी करतात' अशी सिद्धान्तावर काम करणाऱ्यांची कुचेष्टा केली जाते व त्यांच्याकडे दुर्लक्ष केले जाते. परंतु स्वत: दीर्घकाळ प्रत्यक्ष उत्खनन व क्षेत्रीय कार्य केले असल्याने प्रा. पदय्यांच्या आग्रही प्रतिपादनाकडे दुर्लक्ष करता येत नाही.

प्राचीन सांस्कृतिक स्थळांमध्ये घडणारे बदल आणि त्यांच्यावर होणारे विविध परिणाम यांचा अभ्यास (Site formation Processes) पुरातत्त्वात १९९०नंतर सुरू झाला. प्रा. पदय्यांनी सातत्याने भारतीय पुरातत्त्वात अशा अभ्यासांचा आग्रह धरला व २००७मध्ये या विषयावरील ग्रंथाचे त्यांनी संपादन केले.

पुरातत्त्वाचा इतिहास आणि विविध विद्वानांनी केलेले योगदान हा प्रा. पदय्यांच्या आवडीचा विषय आहे. 'एसेज इन हिस्ट्री ऑफ आर्किओलॉजी' (२०१३) आणि 'रिव्हायटलायझिंग इंडियन आर्किओलॉजी' (२०१६) हे ग्रंथ त्यांच्या प्रदीर्घ व्यासंगाची साक्ष देतात. आपण जे काम करतो, त्यात आपल्या गुरुजनांचा मोठा वाटा असतो, म्हणून त्यांचे स्मरण करून त्यांच्यापासून प्रेरणा घेतली पाहिजे असे ते नेहमी सांगतात. त्यांनी स्वत: त्यांचे गुरू त्यांचे प्रा. ह.धी. सांकलिया आणि प्रा. इरावती कर्वे यांच्या जन्मशताब्दीच्या प्रसंगी आंतरराष्ट्रीय चर्चासत्रांचे आयोजन करून त्यांचे वृत्तान्त प्रकाशित केले आहेत.

प्रा. पदय्यांचे शंभरापेक्षा जास्त शोधनिबंध प्रसिद्ध झालेले असून जगभर त्यांचे संदर्भ सातत्याने दिले जातात. अनेक संस्थांना पुरातत्त्व क्षेत्रातील प्रा. पदय्यांच्या अनुभवाचा फायदा झाला. ते २००५ ते २०११ या काळात भारतीय इतिहास अनुसंधान परिषदेचे (ICHRचे) सदस्य होते. त्याचप्रमाणे भारतीय पुरातत्त्व सर्वेक्षण व सरकारच्या अनेक तज्ज्ञ समित्यांमध्ये त्यांचा सक्रिय सहभाग आहे.

प्रा. पदय्यांना त्यांच्या कारकिर्दीत अनेक मानसन्मान लाभले. दोन वेळा (१९८६ व १९९९) त्यांनी फुलब्राइट फेलो म्हणून अमेरिकन विद्यापीठांमध्ये संशोधन व अध्यापनकार्य केले आहे. कोलकाताच्या बंगीय साहित्य परिषदेने २००२मध्ये राखालदास बॅनर्जी पदकाने त्यांचा गौरव केला. लंडनमधील सोसायटी ऑफ ॲन्टिक्वेरीज या संस्थेने २०११मध्ये त्यांना मानद सदस्यत्व दिले. त्यांच्या अर्धशतकातील कार्याची दखल घेत भारत सरकारने पद्मश्रीने त्यांचा सन्मान केला.

- डॉ. प्रमोद जोगळेकर

## पप्पू, रघुनाथ सुबराव
**पुरातत्त्व संशोधक**
**१८ नोव्हेंबर १९३३**



रघुनाथ सुबराव पप्पू यांचे महाविद्यालयीन शिक्षण पुण्यात फर्गसन महाविद्यालयात झाले. त्यांनी पुणे विद्यापीठातून भूविज्ञान या विषयात एम.एस्सी. पदवी संपादन केली. त्यानंतर डेक्कन महाविद्यालयामधील पुरातत्त्व विभागात ते विद्यार्थी म्हणून आले. तेथे त्यांनी प्रा. ह. धी. सांकलिया यांच्या मार्गदर्शनाखाली १९६६ मध्ये डॉक्टरेट ही पदवी संपादन केली. त्यांच्या प्रबंधाचा विषय 'प्लिस्टोसिन स्टडीज इन दी अपर कृष्णा बेसिन' असा होता. ह्या प्रबंधासाठी त्यांनी कृष्णा नदीच्या खोऱ्याच्या उगमाकडील भागात म्हणजे सातारा व कोल्हापूर या जिल्ह्यांमध्ये सर्वेक्षण केले. याखेरीज कर्नाटकातील काही

प

भागांतही या संशोधनाची व्याप्ती होती.

डेक्कन महाविद्यालयात पुरातत्त्व विभागात व्याख्याता या पदावर नेमणूक झाल्यानंतरच्या काळात पप्पू यांनी प्रामुख्याने महाराष्ट्राबाहेर पुढील संशोधन केले. त्यांचे कर्नाटकातील बदामी येथील व घटप्रभा नदीच्या खोऱ्यातील अश्मयुगीन संस्कृतीचे पुरातत्त्वीय भूविज्ञानाच्या आधारे केलेले विश्लेषण अतिशय महत्त्वाचे आहे. रघुनाथ पप्पू यांनी पुरातत्त्वीय निष्कर्षांना मदत होईल अशा प्रकारची नवीन पद्धत महाराष्ट्रातील इनामगाव या ठिकाणी वापरली. या पद्धतीला 'साइट कॅचमेन्ट ॲनॅलिसिस' असे म्हणतात.

एखाद्या पुरातत्त्वीय स्थळाच्या आजूबाजूला सखोल व बारकाईने निरीक्षणे करून त्या ठिकाणी राहणाऱ्या लोकांनी कोणती संसाधने (रिसोर्सेस) कोणत्या प्रकारे उपयोगात आणली असावीत याबद्दल अनुमाने काढली जातात. इनामगाव येथे पप्पू यांनी या पद्धतीचा वापर यशस्वीपणे केला. अशाच प्रकारचे संशोधन त्यांनी गुजरातमधील कुंतासी या सिंधू संस्कृतीच्या पुरातत्त्वीय स्थळावरदेखील केले.

दीर्घकाळ अध्यापन करून रघुनाथ पप्पू १९९३ मध्ये प्रपाठक या पदावरून निवृत्त झाले. त्यांनी दोन विद्यार्थ्यांना पीएच.डी.साठी मार्गदर्शन केले. पुरातत्त्वीय भूविज्ञान (जिओआर्किओलॉजी) व भूरूपविज्ञान (जिओमॉर्फोलॉजी) या त्यांच्या अभ्यासाच्या क्षेत्रात पप्पू यांचे ५० शोधनिबंध प्रसिद्ध झाले आहेत.

याशिवाय त्यांनी दोन पुस्तके लिहिली असून संपूर्ण भारतीय उपखंडातील 'अश्युलियन' या अतिप्राचीन अश्मयुगीन संस्कृतीचा सर्वंकष आढावा घेणारे 'अश्युलियन कल्चर इन पेनिनस्युलर इंडिया' हे पुस्तक अतिशय महत्त्वाचे मानले जाते. त्याचप्रमाणे, पप्पू यांनी पुरातत्त्वीय भूविज्ञानाचे महत्त्व विशद करणारी मराठीतील लेखांची एक मालिका 'संशोधक' या नियतकालिकात लिहिली.

— डॉ. प्रमोद जोगळेकर

प

## परांजपे, वासुदेव गोपाळ
**संशोधक, वेदशास्त्र अभ्यासक**

**१२ जून १८८७ – ५ एप्रिल १९७६**

वासुदेव गोपाळ परांजपे यांचा जन्म सातारा जिल्ह्यातील रहिमतपूर येथे झाला. त्यांनी १९०६ मध्ये पुण्यातील डेक्कन महाविद्यालयातून बी.ए. आणि १९०८ मध्ये मुंबई विद्यापीठातून एम.ए.चे शिक्षण पूर्ण केले. १९११ मध्ये ते एलएल.बी. परीक्षाही उत्तीर्ण झाले. त्यानंतर १९१३ मध्ये त्यांनी डेक्कन एज्युकेशन सोसायटीत प्रवेश केला. १९१५ मध्ये ते त्या संस्थेचे आजीव सदस्य झाले. त्यानंतर फर्गसन महाविद्यालयात संस्कृतचे आणि इंग्लिशचे अध्यापन कार्य त्यांनी सुरू केले. शासकीय शिष्यवृत्ती घेऊन ते १९२०मध्ये फ्रान्समधील पॅरिस येथे संशोधनासाठी गेले व त्यांनी डी.लिट्. पदवी प्राप्त केली. पॅरिस येथे असताना पुढे जे महान प्राच्यविद्या संशोधक ठरले असे सुनीलकुमार चटर्जी आणि सुशीलकुमार डे हे त्यांचे समकालीन मित्र होते. तर फ्रान्समधील सिल्हँ लेव्ही हे महान प्राच्यविद्या पंडित त्यांचे मार्गदर्शक होते. डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या विविध विद्यालयांत आणि महाविद्यालयांत त्यांनी कार्य केले.

वासुदेव परांजपे यांनी १९३१ ते १९३३ या काळात साताऱ्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये मुख्याध्यापक म्हणून कार्य केले. पुढे १९४६मध्ये सेवानिवृत्त होईपर्यंत फर्गसन महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून त्यांनी कार्य केले. उंबरगाव येथील शाळा ही त्यांचीच निर्मिती होय. त्या शाळेत ते 'व्हिजिटर' या नात्याने कार्य करत होते. हे करत असताना त्यांनी शाळेत भरपूर सुधारणा केल्या. रहिमतपूर येथे शाळेची स्थापना केली. यासाठी त्यांनी स्वत:ची मालमत्ताही शाळेला दिली. पुण्यातील भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिराचे १९२३ ते १९२७ या काळात ते सचिव होते. या संस्थेतील अतिथिगृह व मुद्रणालय ही त्यांचीच निर्मिती आहे. भांडारकर संस्थेच्या ॲनल्स या नियतकालिकाचे १९३४ ते १९३९ या काळात त्यांनी संपादक म्हणून कार्य केले.

वासुदेव परांजपे यांचे संशोधन व प्रकाशन कार्यही विस्तृत प्रमाणात होते. त्यांनी पी. पीटरसनच्या (Hymns of the Rigveda) आवृत्तीचे संपादन, १९३६मध्ये महाभारत सौप्तिकपर्व आणि स्त्री-पर्व, १९३७ मध्ये (Toy-cart of Clay) भाग १/२ संपादन, १९४० मध्ये पंडित रंगाचार्य रेड्डी यांच्या लेखसंग्रहाचे संपादन, १९२२मध्ये 'लतीर्तिक द कात्यायन', १९६९ ते १९७४ या काळात पुणे येथे 'द वेदिक रिलिजन' या बर्गेन्यच्या ग्रंथाचा 'द वेदिक रिसर्च' हा फ्रेंचमधून इंग्लिशमध्ये अनुवाद, तसेच ओल्डेनबर्गच्या ग्रंथाचा जर्मनमधून इंग्लिशमध्ये अनुवाद केला. याशिवाय विविध संकीर्ण लेख, पुस्तक परीक्षणे इत्यादी सर्व भांडारकर संस्थेच्या ॲनल या नियतकालिकातून प्रसिद्ध झाले. त्यांचा गौरवग्रंथ त्यांच्या मृत्यूनंतर १९७७ मध्ये दिल्लीमध्ये प्रसिद्ध झाला.

डॉ. परांजपे संस्कृतध्ये त्यातही वेद विषयातील विद्वान होतेच; शिवाय त्यांना इंग्लिश, फ्रेंच, जर्मन ह्या भाषांचेही उत्तम ज्ञान होते. फर्गसन महाविद्यालयात संस्कृत, इंग्लिश यांबरोबरच स्वयंस्फूर्तीने ते जर्मन व फ्रेंच भाषाही शिकवत असत. ज्या काळात या भाषांच्या अध्ययनाची व्यवस्था (सोय) नव्हती, त्या काळातही या भाषांचे प्राच्यविद्येच्या अध्ययनातील महत्त्व जाणून ते त्या भाषा शिकले व त्या शिकण्यास इतरांनाही प्रवृत्त केले. भारतात आज जर्मन, फ्रेंच यांसारख्या भाषांच्या अध्ययनाची सोय सर्वच विद्यापीठांत आहे. परंतु या भाषांच्या अध्ययनाचा व अध्यापनाचा प्रारंभ पुण्यातील प्राच्यविद्या पंडितांनी स्वयंस्फूर्त व विनामूल्य पद्धतीने केला. असे कार्य करणाऱ्यांमध्ये डॉ. वासुदेव गोपाळ परांजपे यांचे स्थान मोठे आहे.

— डॉ. गणेश उमाकांत थिटे

## पराडकर, मोरेश्वर दिनकर

**प्रकांड पंडित, अभ्यासक, संशोधक**

**१७ नोव्हेंबर १९२५ — १३ डिसेंबर २०१२**

मोरेश्वर दिनकर पराडकर यांचा जन्म मराठीतील ख्यातनाम पंतकवी कविवर्य मोरोपंत यांच्या सातव्या



पिढीमध्ये झाला. भाषा आणि पांडित्य यांचा वारसा त्यांच्याकडे अशा प्रकारे वशंपरंपरागतरीत्या आला.

प्रकांड पंडित हे विशेषण ज्यांच्या नावामागे चपखलपणे बसू शकेल, त्या मोरेश्वर दिनकर पराडकर यांचे भाषाभिवृद्धीतील योगदान मोठे तर आहेच; पण मूलभूत स्वरूपाचेही आहे. संस्कृत भाषा आणि साहित्य यांचे गाढे अभ्यासक, हिंदी भाषेचे प्रचारक इंग्लिश आणि मराठी भाषांवर प्रभुत्व ही मोरेश्वर दिनकर पराडकर यांची विशेष ओळख आहे. भाषा विकासाच्या क्षेत्रात आवाक्याने मोठे आणि मूलभूत स्वरूपाचे संशोधन, लेखन करणारे अभ्यासक आज हाताच्या बोटांवर मोजावे इतकेच असतील. डॉ. मो.दि. पराडकर दुर्मीळ आणि विद्वान अभ्यासकांपैकी एक होत.

डॉ. मो.दि. पराडकर यांचा जन्म मराठवाड्यातील परभणीत आजोळी म्हणजे गोविंदराव नानल यांच्या घरी झाला. पण स्वातंत्र्यपूर्व काळामध्ये हा प्रदेश हैद्राबादच्या निजामाच्या अख्यत्यारीत होता. गोविंदराव नानल हे त्या काळामधले प्रसिद्ध वकील होते. वकिलीबरोबरच त्यांचे संस्कृत, उर्दू, मराठी, पर्शिअन या भाषा व या भाषांतील साहित्य यावर विशेष प्रेम होते. या प्रेमातूनच त्यांच्या घरी या भाषांमधील साहित्याचे समृद्ध ग्रंथालय निर्माण झाले होते.

आजोबांच्या प्रेरणेतूनच केवळ पाच वर्षांचे असताना त्यांनी शारदोत्सवातील स्पर्धेत भाग घेऊन गीतेचा पंधरावा अध्याय म्हटला. या स्पर्धेत त्यांना कांस्य पदक मिळाले. गोविंदरावांच्या प्रोत्साहनातून व प्रेरणेतून पराडकर यांच्या मनात या अभ्यासाची ओढ निर्माण होत गेली. कुटुंबात सर्वांत लहान असल्याने ते सर्वच कुटुंबीयांचे अतिशय लाडके होते. निजामशाहीच्या त्या दिवसातील शालेय जीवनात शिक्षणाचे माध्यम उर्दू होते. पराडकर यांच्या उच्चारशैलीवर उर्दूचा परिणाम आजही

जाणवतो. उर्दूच्या या प्रभावातूनच जीवनात पुढील वाटचालीतील हिंदी भाषा प्रचारक म्हणून काम करण्याची बीजे रोवली गेली.

काही वर्षे परभणीला राहिल्यानंतर आपल्या वडिलांबरोबर पराडकर मुंबईला आले. त्यांचे वडील हे मध्यवर्ती पोस्ट कार्यालयात कामाला होते. बालवयातच साहित्य आणि संस्कृती यांबद्दलच्या आस्थेचे रंग मनात निर्माण झाले होते. परळच्या आर.एम.भट हायस्कूलमध्ये वडिलांनी त्यांना दाखल केले. त्या शाळेचे तत्कालीन मुख्याध्यापक मो.वा. दोंदे यांच्या समृद्ध व्यक्तिमत्त्वाचा आणि शाळेतील संस्कृत शिकवणाऱ्या वाय.बी. जोशी यांच्या व्यासंगी अध्यापनाचा पराडकरांवर खोलवर संस्कार झाला. मो.वा. दोंदे हे पुढे नगराध्यक्ष झाले. पराडकर हे त्यांचे अतिशय आवडीचे विद्यार्थी होते. त्यांच्या मार्गदर्शनामुळेच पराडकर ६७% गुण मिळवून शालान्त परीक्षेत पहिले आले. त्याबद्दल त्यांना शिष्यवृत्तीही मिळाली.

शिष्यवृत्ती आणि उत्तम गुण मिळालेले असल्याने डॉ. पराडकर यांना माटुंग्याच्या राम नारायण रुइया महाविद्यालयामध्ये प्रवेश मिळाला. काही कौटुंबिक अडचणींमुळे पराडकर यांना नोकरी करून शिकणे भाग पडले. पण या महाविद्यालयीन कालखंडातही त्यांचे संस्कृत साहित्यातील व भाषेतील स्वास्थ्य टिकून होते. पदवीसाठी मुख्य विषय कोणता निवडायचा, असा प्रश्न समोर आला तेव्हा स्वाभाविकच संस्कृत विषय निवडण्याचे त्यांनी निश्चित केले. त्या काळी संस्कृत निवडणाऱ्या विद्यार्थ्याला विशेष मान होता आणि बालवयापासून त्यांच्यावर संस्कृतचे संस्कारही झाले होते. रुईया महाविद्यालयात पराडकर यांना न.र. फाटक, द.के. केळकर, गोवर्धन पारिख अशा अत्यंत नाणावलेल्या प्राध्यापकांचे मार्गदर्शन आणि सहवास मिळाला. संस्कृत हा प्रमुख विषय घेऊन डॉ. पराडकर यांनी बी.ए.ची परीक्षा दिली. ते भाऊ दाजी पारितोषिकाचे आणि एस.जी. आचार्य शिष्यवृत्तीचे मानकरी ठरले. याचा एक लाभ असा झाला की, संस्कृत विषय घेऊनच एम.ए. करण्याची त्यांना संधी मिळाली. एम.ए.च्या प्रथम वर्गाबरोबरच त्यांना त्यांच्याच महाविद्यालयात म्हणजे रुईयामध्ये शिकवायची संधी मिळाली.

आपली संस्कृती आणि संस्कृत भाषा यांच्याबद्दल आपल्याकडे अनेक गैरसमज आहेत, असे त्यांच्या लक्षात आले. ऐहिक अभ्युदयासाठी झटण्याऐवजी जीवनाकडे वैराग्याने आणि तुच्छतेने आम्ही पाहतो, परलोकांबद्दल विचार करतो याचा परिणाम ज्ञानशाखा आणि विज्ञान यांच्याकडे दुर्लक्ष होण्यामध्ये झालेला दिसून येतो. हे दूर करणे आणि भारतीयांच्या जीवनसृष्टी संबंधाने योग्य त्या अभिमानास प्रोत्साहन देण्याची गरज आहे, याची खातरी पटल्यामुळे डॉ. पराडकर यांनी गेली सुमारे सहा दशके अनेक लेख लिहिले. प्रा. एच. डी. वेलणकर या संस्कृतमधील ख्यातनाम अभ्यासकाच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी मुंबई विद्यापीठाची विद्यावाचस्पती ही पदवी १९५४मध्ये प्राप्त केली.

आपल्या अध्यापकीय कारकिर्दीत संस्कृत व अर्धमागधी या भाषांचे त्यांनी अनेक महाविद्यालयांतून अध्यापन केले. संस्कृत भाषेचे ख्यातनाम शिक्षक म्हणून मुंबई विद्यापीठाच्या संस्कृत विभागास त्यांनी मोलाचे योगदान दिले. विद्यावाचस्पतीच्या अनेक विद्यार्थ्यांना त्यांनी मार्गदर्शन केले. वेदान्त व अलंकार या विषयांतील त्यांचे संशोधन महत्त्वाचे मानण्यात येते.

पालघर येथे सोनोपंत दांडेकर यांच्या नावे नव्यानेच महाविद्यालय सुरू झाले होते. या महाविद्यालयात डॉ. पराडकर यांनी प्राचार्यपदाची सूत्रे हाती घेतली. त्यानंतर काही वर्षे डोंबिवली येथील कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालयाचे प्राचार्य म्हणून त्यांनी काम पाहिले. १९८५ साली ते निवृत्त झाले.

१९४२ साली राष्ट्रभाषा कोविद या परीक्षेत सर्वप्रथम आल्यापासून त्यांनी हिंदी राष्ट्रभाषा प्रचारक म्हणून आपले काम एकीकडे चालू ठेवले होते. अर्थातच याचे महत्त्वाचे कारण म्हणजे हिंदी भाषेत व साहित्यात त्यांना विलक्षण रस होता.

१९५१ साली ते हिंदी साहित्यरत्न ही अत्यंत मानाची परीक्षा उत्तीर्ण झाले. त्यामुळे मुंबई हिंदी विद्यापीठाचे अधिकारी आणि अखिल भारतीय हिंदी संस्थेचे कार्यवाह म्हणून त्यांच्या कर्तृत्वास वाव मिळाला. हिंदी साहित्यातील अनेक नामवंत विद्वान संशोधक, कवी यांचा पराडकरांशी संबंध आला.

१९८४ साली त्यांच्याकडे असणाऱ्या कविवर्य मोरोपंत यांच्या हस्तलिखितांचा निर्णय घेण्याची वेळ आली, त्या वेळी त्यांच्या काकांनी ही हस्तलिखिते देणगीदाखल चांगल्या ग्रंथालयाला द्यावीत, असे सुचवले. याच दरम्यान डॉ. उषा देशमुख आणि मा. न. आचार्य या मराठीतील विद्वान मंडळींशी त्यांचा संबंध आला. या हस्तलिखितांचे महत्त्व, या विषयावर त्यांनी विवेचक लेख लिहिला. संस्कृतमधील डॉ. टी.एन. धर्माधिकारी, डॉ. जी.व्ही. पळसुले, डॉ. व्ही.एम. कुलकर्णी अशा अनेक संस्कृत पंडितांशी डॉ. पराडकर यांचे अनेक वर्षांचे संबंध आहेत. डॉ.पराडकर यांचे प्रकाशित झालेले साहित्य हा स्वतंत्र निबंधाचा विषय ठरेल. लेख, शोधनिबंध यांची बरीच मोठी यादी त्यांच्या नावावर जमा आहे.

डॉ. मो.दि. पराडकर यांची प्रसिद्ध झालेली ग्रंथसंपदा अशी आहे

Similies in Manusmriti;

Malavikagnimitram - A Criticl Study;

Ed. Studies in the Gita.

मराठी शाकुन्तल (कथा), मालविकाग्निमिम (कथा) (१९७८), भारतातील प्राचीन विद्यापीठे- दुसरी आवृत्ती (१९९०). संपादित- आर्याभारत ६ खंड, हरिवंश (१९६४), चतुराख्यान (१९८०), वाडेश्वर माहात्म्य (१९८१). हिंदी अनुवादित ग्रंथ - वैदिक संस्कृतिका विकास (१९५७), रवीन्द्रनाथ जीवनगाथा (१९६५), ऋक्सूक्तवैजयंती (१९६७), विवेकानन्दांची पत्रे (१९७०). संपादित - रजत जयंती ग्रंथ (१९६३), हिन्दी भाषा साहित्य और संस्कृती (१९८८).

— डॉ. मोहन पाठक

## पवार, अप्पासाहेब

**शिक्षण संचालक, संशोधक**

**५ मे १९०६ — ३० डिसेंबर १९८१**



गरीब मराठा शेतकरी कुटुंबात जन्मलेला एक मुलगा एके दिवशी एका मोठ्या राज्याचा शिक्षण संचालक, एका नव्या विद्यापीठाचा शिल्पकार आणि थोर इतिहास संशोधक होऊ शकेल असे कोणी स्वप्नातही पाहिले नसेल, पण डॉ. अप्पासाहेब पवार यांच्या बाबतीत मात्र हे प्रत्यक्षात घडलेले आहे. ग्रामीण भागातील विद्यार्थ्यांविषयी आत्यंतिक तळमळ असणारा हाडाचा शिक्षक, बहुजन समाजाच्या शैक्षणिक उत्थानासाठी झटणारा शासकीय अधिकारी, मराठ्यांच्या तेजस्वी परंपरेचा अभिमान असणारा विद्वान इतिहास संशोधक, कुशल व कार्यक्षम प्रशासक, शिवाजी विद्यापीठाचा पहिला कुलगुरू व शिल्पकार म्हणून डॉ. अप्पासाहेब पवार यांनी स्वत:ची ओळख निर्माण केली आहे.

डॉ. अप्पासाहेब पवार यांचा जन्म कर्नाटक राज्यातील, बेळगाव जिल्ह्यातील मुचंडी या छोट्या खेडेगावात झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण बेळगावमध्ये आणि महाविद्यालयीन शिक्षण कोल्हापूर येथील राजाराम महाविद्यालयामध्ये झाले. त्यांनी १९२८मध्ये बी.ए., १९३०मध्ये एम.ए., १९३१मध्ये एलएल.बी. पदवी संपादन केली. बेळगावातील थोर सत्यशोधक राष्ट्रवीरकार शामराव देसाई आणि कोल्हापुरातील राजाराम महाविद्यालयाचे प्राचार्य थोर शिवचरित्रकार डॉ. बाळकृष्ण या गुरूंचे त्यांच्यावर संस्कार झाले. ते उच्चशिक्षणासाठी १९३१मध्ये लंडनला गेले. तेथे पीएच.डी. व बार-अ‍ॅट-लॉ या शिक्षण क्षेत्रातील उच्च पदव्या संपादन करून ते १९३५मध्ये मायदेशी आले.

त्यांनी १९३५मध्ये राजाराम महाविद्यालयात इतिहास-अर्थशास्त्राचे प्राध्यापक म्हणून आपल्या

शैक्षणिक कार्याला सुरुवात केली. अल्पावधीतच एक अभ्यासू व विद्यार्थिप्रिय प्राध्यापक म्हणून त्यांनी लौकिक संपादन केला. १९४५मध्ये त्यांची राजाराम महाविद्यालयाच्या प्राचार्यपदी नेमणूक झाली. त्यांनी महाविद्यालयाच्या प्रगतीमध्ये स्वत:ला झोकून दिले. महाविद्यालयाचे ग्रंथालय समृद्ध बनविले, सुसज्ज अभ्यासिकेची सोय केली, क्रीडा परंपरा अबाधित राखण्यासाठी खेळाडूंना प्रोत्साहन दिले. त्यांचा एक विद्यार्थी खाशाबा जाधव १९४८च्या ऑलिंपिक सामन्यात चमकला. त्यांच्याच कारकिर्दीत राजाराम महाविद्यालयाचे नाव आंतरमहाविद्यालयीन क्रीडा स्पर्धेतून खूप गाजले. सर्व जातींतील गरीब विद्यार्थ्यांना आर्थिक मदत व सवलत देऊन त्यांनी अनेकांना उच्च शिक्षणाचा मार्ग खुला करून दिला. स्वत:च्या शिस्तप्रिय, वक्तशीर व करारी स्वभावाद्वारे सर्व कर्मचाऱ्यांमध्ये शिस्त निर्माण केली. महाविद्यालयाच्या आत्तापर्यंतच्या वैभवशाली परंपरेला शोभेल अशीच स्वत:ची प्राचार्यपदाची कारकिर्द निर्माण करण्यात ते यशस्वी झाले.

१९४९साली गुजरातमधील वीसनगरच्या एम.एन. महाविद्यालयाचे प्राचार्य म्हणून त्यांची बदली झाली. भिन्न भाषा, भिन्न प्रांत, रखरखीत वाळवंटाचे सान्निध्य, शैक्षणिकदृष्ट्या मागासलेला भाग आणि नुकतेच सुरू झालेले महाविद्यालय अशा अनेक अडचणींवर मात करीत त्यांनी महाविद्यालयाला ऊर्जितावस्था प्राप्त करून दिली. त्यांच्या कर्तव्यनिष्ठेची नोंद घेऊन १९५२ साली सरकारने त्यांची नेमणूक जुन्या मुंबई राज्याचे शिक्षण उपसंचालक म्हणून केली आणि केवळ दोनच वर्षांत, १९५४ साली शालान्त परीक्षा मंडळाचे अध्यक्ष म्हणून त्यांची निवड झाली. त्यानंतर त्यांची १९५८ साली द्विभाषिक मुंबई राज्याचे शिक्षण सहसंचालक व १९५९ साली शिक्षण संचालक म्हणून नेमणूक झाली. १ मे १९६० रोजी महाराष्ट्र राज्याची स्थापना झाल्यानंतर ते महाराष्ट्र राज्याचे पहिले शिक्षण संचालक झाले.

प्राथमिक शिक्षण हा माध्यमिक शिक्षणाचा पाया आहे. प्राथमिक व माध्यमिक शिक्षण सुधारल्याशिवाय उच्च शिक्षणात आवश्यक तो बदल करता येणार नाही, हे जाणून त्यांनी महाराष्ट्राच्या ग्रामीण भागात प्राथमिक व माध्यमिक शिक्षणाच्या सुधारणेवर भर देऊन, सर्वत्र शिक्षणाचे जाळे विणले.

त्यांच्या शिक्षण संचालकाच्या कारकिर्दीत ग्रामीण भागात २५ प्राथमिक प्रशिक्षण महाविद्यालये, ४ हजारांहून अधिक प्राथमिक शाळा, १ हजारांहून अधिक नवीन माध्यमिक शाळा, १००हून अधिक उच्च शिक्षण देणाऱ्या संस्था निर्माण झाल्या. एक महत्त्वाचे सैनिकी महाविद्यालय सातारा येथे त्यांनी सुरू केले. त्यांनी ग्रामीण भागातील शाळा, महाविद्यालयांच्या इमारतींसाठी कोट्यवधी रुपयांचे शैक्षणिक अनुदान मंजूर करवून बहुजन समाजात शिक्षणाचा प्रसार करणाऱ्या शिक्षण संस्थांना स्थैर्य प्राप्त करून दिले. अनुदान देताना सर्वप्रथम खेडे, नंतर तालुका, त्यानंतर जिल्हा आणि शेवटी पुणे, मुंबई यांसारखी मोठी शहरे असा क्रम त्यांनी निश्चित केला. तळागाळातील समाजाला शैक्षणिकदृष्ट्या वर आणण्यासाठी नि:स्वार्थीपणे धडपडणारा डॉ. अप्पासाहेब पवार यांच्यासारखा शिक्षणाधिकारी नसता तर मंत्री अनुकूल असूनही बहुजन समाजाला त्याचा फायदा झाला नसता. १९६२मध्ये अप्पासाहेब पवार यांची शिवाजी विद्यापीठाचे पहिले कुलगुरू म्हणून नेमणूक करण्यात आली. 'शिवाजी विद्यापीठ' या नावाव्यतिरिक्त काहीही नसताना एका नव्या विद्यापीठाची उभारणी करण्याचे शिवधनुष्य त्यांनी उचलले. प्रारंभी ३४ महाविद्यालये व १४ हजार विद्यार्थिसंख्येवर विद्यापीठ सुरू झाले. कोल्हापूर शहराच्या दक्षिण-पूर्व दिशेकडील जुन्या पुणे-बंगळुरू राष्ट्रीय महामार्गाच्या दोन्ही बाजूंची 'सागरमाळ' म्हणून ओळखली जाणारी सुमारे एक हजार एकर जागा विद्यापीठासाठी निश्चित करण्यात आली होती. १९६५पासून त्यांनी इमारतींच्या बांधकामाला प्रारंभ केला. अवघ्या तीन वर्षांत ३० इमारती बांधून घेतल्या. कुलगुरुपदाच्या बारा वर्षांच्या काळात त्यांनी ७०हून अधिक इमारतींचे बांधकाम, खेळाचे मैदान,

रस्ते, पाणी, वीज आणि नयनमनोहर बगिचे अशा पायाभूत सुविधांसह निर्जन सागरमाळावर ज्ञानाचे नंदनवन उभे केले.

त्यांनी विद्यापीठाच्या बाह्यांगाप्रमाणेच अंतरंगही कष्टपूर्वक घडवून नव्या प्रथा, परंपरा व योजना सुरू केल्या. विद्यापीठीय शिक्षण समाजातल्या तळागाळापर्यंत पोहोचविण्यासाठी त्यांनी 'बहि:शाल शिक्षण मंडळा'ची स्थापना केली. विद्यापीठ जनतेपर्यंत नेण्याची (Taking the University to the People) त्यांची कल्पना होती. त्यासाठी बहि:शाल शिक्षण मंडळामार्फत 'ग्राम शिबिरे' भरवून ग्रामीण भागातील शेतकऱ्यांसाठी शेती, धान्योत्पादन, दुग्धव्यवसाय, कुक्कुटपालन व आरोग्य यांसारख्या खेड्यातील जीवनाच्या विविध अंगाशी संबंधित विषयांवर व्याख्याने, चर्चासत्रे व परिसंवाद घडवून आणले. विद्यापीठ केवळ सुशिक्षितांपुरतेच मर्यादित राहू नये तर ते ग्रामीण भागातील जनतेचे बनावे यासाठी ते प्रयत्नशील राहिले. संलग्न महाविद्यालयांतून 'खेडे दत्तक योजना' त्यांनी अमलात आणली. समाजाच्या ज्ञानसाधनेची भूक भागविण्यासाठी त्यांनी लोकमान्य टिळक स्मृती व्याख्यानमाला, मराठा इतिहास व्याख्यानमाला, शाहू स्मृती व्याख्यानमाला असे उपक्रम सुरू केले. परिणामी लोकाभिमुख विद्यापीठाचा आदर्श शिवाजी विद्यापीठाने निर्माण केला. विद्यार्थ्यांचे प्रश्न विद्यार्थ्यांनीच सोडवावेत, त्यांना स्वत:ची कर्तव्ये व जबाबदारी यांची जाणीव व्हावी या उद्देशाने त्यांनी 'विद्यार्थी कल्याण मंडळा'ची स्थापना केली. विद्यार्थ्यांच्या हाती दर्जेदार पाठ्यपुस्तके पडावीत यासाठी 'पाठ्यपुस्तक प्रकाशन योजना', गरीब व होतकरू विद्यार्थ्यांना पदव्युत्तर शिक्षण स्वकमाईतून घेता यावे यासाठी 'कमवा आणि शिका योजना', युवाशक्तीचा विधायक उपयोग करून घेण्यासाठी 'राष्ट्रीय सेवा योजना', राज्य व राष्ट्रीय पातळीवरील स्पर्धा परीक्षांची तयारी करून घेण्यासाठी 'स्पर्धा परीक्षा मार्गदर्शन केंद्र' आणि विद्यापीठाचे भावी खेळाडू तयार करण्याच्या दृष्टीने 'कॅच देम यंग स्कीम' असे उपक्रम त्यांनी सुरू केले.

त्याच वेळी त्यांनी विद्यापीठ कार्यक्षेत्रात शिक्षण प्रसारालाही मोठी चालना दिली. त्यामुळे त्यांच्या कुलगुरुपदाच्या काळात महाविद्यालयांची संख्या ३४वरून ८४पर्यंत आणि विद्यार्थी संख्या १४ हजारांवरून ६४ हजारांवर पोहोचली. 'व्यवसायाभिमुख आणि जीवनाभिमुख शिक्षण' ही दृष्टी ठेवून त्यांनी शिवाजी विद्यापीठात अनेक अभिनव योजना आखल्या आणि त्या यशस्वीपणे राबवल्या. त्यांच्या अनेक योजना विद्यापीठ अनुदान मंडळाने नंतर देशभर राबवल्या. अलीकडे 'नॅक'नेही ज्या योजनांची शिफारस करायला सुरुवात केली आहे, त्या योजना ५० वर्षांपूर्वी डॉ. पवार यांनी शिवाजी विद्यापीठात सुरू केलेल्या होत्या. यावरून त्यांची प्रगल्भ दूरदृष्टी दिसून येते.

शिवाजी विद्यापीठ हेच डॉ. अप्पासाहेब पवार यांचे खरे 'चिरंतन स्मारक' होय. डॉ. अप्पासाहेब पवार हे मूळात मराठा इतिहासाचे अभ्यासक आणि व्यासंगी संशोधक होते. अनेक संशोधन पत्रिकांमधून व स्थानिक वर्तमानपत्रांमधून त्यांनी ऐतिहासिक लेख लिहिले. मराठ्यांचा चुकीचा इतिहास सबळ पुराव्यानिशी खोडून काढण्याचे आणि खरा इतिहास उजेडात आणण्याचे कार्य त्यांनी केले. मराठा इतिहासाचे मूलगामी संशोधन व्हावे म्हणून त्यांनी कोल्हापूर, तंजावर, मद्रास इत्यादी ठिकाणांहून अत्यंत दुर्मीळ कागदपत्रे अतिशय परिश्रमपूर्वक जमा केली, संपादित केली आणि ती विद्यापीठामार्फत प्रकाशित करण्याची योजना सुरू केली. त्यासाठी त्यांनी विद्यापीठात 'इतिहास ग्रंथमाला' आणि 'स्टडीज् इन मराठा हिस्ट्रीज' अशा दोन ग्रंथमाला सुरू केल्या. त्यांच्यामुळेच ताराबाईकालीन कागदपत्रांचे तीन खंड, जिजाबाईकालीन कागदपत्रे, ताराबाईकालीन फारशी पत्रव्यवहार, राजर्षी शाहू महाराजांची कागदपत्रे, 'Studies in Maratha History' इत्यादी अनेक खंड प्रकाशित झाले. या खंडाच्या माध्यमातून संभाजी महाराज, राजाराम महाराज व महाराणी ताराबाई, कोल्हापूरची राणी जिजाबाई यांच्या कारकिर्दीमधील अनेक अज्ञात घटना व व्यक्ती उजेडात आणल्या गेल्या.

राजर्षी शाहू महाराजांच्या जीवन कार्याचे सखोल संशोधन व्हावे यासाठी त्यांनी पुढाकार घेऊन विद्यापीठ परिसरात १९७० साली 'शाहू संशोधन केंद्र' स्थापन केले. त्यासाठी 'India Office Library, London' येथून शेकडो कागदपत्रे त्यांनी आणवली व त्यांचे संपादन केले. इतिहास संशोधनातील त्यांच्या योगदानामुळे इतिहासाचार्य वि.का. राजवाडे, वासुदेवशास्त्री खरे, रियासतकार सरदेसाई, वा.सी. बेंद्रे अशा इतिहासकारांच्या नामावलीत डॉ. अप्पासाहेब पवार यांचे नाव घेतले जाते.

शिवाजी विद्यापीठ प्रशासन आणि इतिहास संशोधन अशा दोन्ही आघाड्या समर्थपणे सांभाळत असतानाच, राज्य व केंद्र शासनाच्या विविध समित्यांवरही त्यांनी काम केले. २० जानेवरी १९७५ रोजी शिवाजी विद्यापीठाच्या कुलगुरुपदावरून डॉ. अप्पासाहेब पवार निवृत्त झाले. निवृत्तीनंतर शाहू महाराजांवरील संशोधनासाठी त्यांनी स्वत:ला वाहून घ्यायचे ठरवले होते, पण दुर्दैवाने त्यांच्या प्रकृतीने त्यांना साथ दिली नाही. त्यामुळे शाहू संशोधन केंद्र विद्यापीठाच्या स्वाधीन करून ते पुण्याला स्थायिक झाले. तेथेच त्यांचे निधन झाले.



– डॉ. भाग्यश्री जाधव

## पवार, जयसिंगराव भाऊसाहेब

**इतिहास संशोधक**

**३० डिसेंबर १९४२**

डॉ. जयसिंगराव भाऊसाहेब पवार यांचा जन्म सांगली जिल्ह्यातील तडसर या खेडेगावात झाला. सत्यशोधक चळवळीने प्रेरित झालेले गाव आणि शिक्षणाचे महत्त्व जाणलेले वडील, यांमुळे डॉ. पवारांना महाविद्यालयीन शिक्षणासाठी कोल्हापूरला जाण्याची संधी मिळाली. शाहू महाराजांनी स्थापन केलेल्या 'प्रिन्स शिवाजी मराठा बोर्डिंग'मध्ये ते केवळ एक ट्रंक व वळकटी घेऊन दाखल झाले. कोल्हापूरच्या राजाराम महाविद्यालयामधून इतिहास विषयातून ते बी.ए.



व नंतर एम.ए. झाले. कोल्हापूरच्याच शिवाजी विद्यापीठात एम.ए.ला त्यांनी इतिहास विषयात प्रथम क्रमांक मिळवला. एम.ए. उत्तीर्ण झाल्यावर शिवाजी विद्यापीठाचे पहिले कुलगुरू व थोर इतिहास संशोधक डॉ. अप्पासाहेब पवार यांनी त्यांची मराठा इतिहास विभागात संशोधन साहाय्यक म्हणून निवड केली (१९६४). वयाच्या अवघ्या २३व्या वर्षी इतिहास संशोधक म्हणून त्यांची जडणघडण सुरू झाली. ऐतिहासिक कागदपत्रांचे संशोधन व संपादन याचे प्राथमिक धडे डॉ. अप्पासाहेब पवार यांच्याकडून त्यांना मिळाले. शिवाजी विद्यापीठातील हा चार-पाच वर्षांचा कालखंड त्यांच्या दृष्टीने इतिहास संशोधन क्षेत्रातील प्रशिक्षण म्हणून महत्त्वाचा ठरला.

पुढे १९६९ ते २००१ या काळात डॉ. पवारांनी महाविद्यालयीन क्षेत्रात इतिहास अध्यापनाचे कार्य केले. या तीन दशकांहून अधिक काळात इतिहास विषयाच्या पदवी व पदव्युत्तर अभ्यासक्रमांची २० पुस्तके त्यांनी लिहिली आणि ती सर्व महाराष्ट्रभर लोकप्रिय झाली. अनेक संदर्भग्रंथ अभ्यासून अत्यंत सोप्या शैलीत इतिहासाची चिकित्सापूर्वक मांडणी या पुस्तकांमध्ये केली असल्यामुळे ती क्रमिक पुस्तके न राहता, इतिहासप्रेमींची संदर्भ पुस्तके झाली.

या अध्यापनकाळातच पवारांनी 'Chh. Rajaram Maharaj and The Maratha State' हा शिवपुत्र राजाराम महाराजांच्या कारकिर्दीवर प्रकाश टाकणारा पीएच.डी.चा आपला प्रबंध सादर करून डॉक्टरेट मिळविली. मार्गदर्शकाशिवाय पूर्ण केलेली ही शिवाजी विद्यापीठाच्या इतिहासातील एकमेव डॉक्टरेट होती. या प्रबंधातून डॉ. पवारांनी संयमी व मुत्सद्दी अशा छत्रपती राजारामांच्या कर्तृत्वाला न्याय दिला आहे. तसेच मराठ्यांच्या इतिहासातील राजाराम महाराजांचे योगदान

अधोरेखित करत असताना प्रथमच पोर्तुगीज, फ्रेंच, इंग्लिश व पर्शिअन साधनांचा वापर करून त्यांनी राजारामकालीन मराठ्यांच्या स्वातंत्र्ययुद्धाच्या बिकट कालखंडाच्या इतिहासाची पुनर्मांडणी केली आहे.

न्यायमूर्ती रानडे, इतिहासाचार्य राजवाडे, रियासतकार सरदेसाई यांसारख्या इतिहासकारांनी मराठ्यांच्या इतिहासाची मांडणी करून बराच काळ लोटला होता. आता नवनवीन ऐतिहासिक पुरावे व साधने उपलब्ध होऊन त्या इतिहासाची पुनर्मांडणी करण्याची गरज होती. अशी मांडणी वा.सी. बेंद्रे, सेतुमाधवराव पगडी, डॉ. अप्पासाहेब पवार यांनी केली. या तिन्ही इतिहासकारांचा प्रत्यक्ष सहवास व मार्गदर्शन डॉ. पवार यांना लाभले. स्वाभाविकच डॉ. पवारांनी त्यांचा वारसा पुढे चालवला. मराठा इतिहासावर संशोधन करत असताना त्यांच्या हे लक्षात आले की, मराठ्यांच्या इतिहासातील, विशेषत: स्वातंत्र्ययुद्धाच्या कालखंडातील, व्यक्ती व त्यांच्या कामगिऱ्या उपेक्षित राहिल्या आहेत. त्यांच्या कार्याची दखल इतिहासलेखनात घेतली गेलेली नाही. राजाराम महाराजांशिवाय रामचंद्र पंडित अमात्य, सेनापती संताजी घोरपडे, धनाजी जाधव, महाराणी ताराबाई अशा अनेक कर्तबगार स्त्रीपुरुषांची कामगिरी अंधारात राहिली होती. मग शिवछत्रपतींनंतर ज्यांनी-ज्यांनी स्वराज्यरक्षणाची धुरा सांभाळली त्यांचा इतिहास प्रकाशात आणावा, या कृतज्ञतेच्या भावनेतून डॉ. पवार मराठ्यांच्या इतिहासाकडे आकृष्ट झाले.

डॉ. पवारांच्या संशोधनाची निष्पत्ती म्हणजे त्यांनी लिहिलेल्या मराठ्यांच्या इतिहासातील स्त्रीकर्तव्य सिद्ध करणारा ‘महाराणी ताराबाई’ हा संशोधनात्मक ग्रंथ. अत्यंत चिकित्सक वृत्तीने व संशोधकीय बैठकीने तयार केलेला हा ग्रंथ मराठ्यांच्या या राणीचे कर्तृत्व सिद्ध करणारा महाराष्ट्रातील पहिला ग्रंथ ठरला. या ग्रंथामध्ये त्यांनी ताराबाईंचा, छत्रपती राजारामांच्या मृत्यूनंतरचा, ७-८ वर्षांचा औरंगजेबाविरुद्धचा अविश्रांत लष्करी व राजनैतिक लढा, त्यांची रणनीती आणि स्वराज्यनिष्ठा या सर्वांची चिकित्सा नवीन कागदपत्रांच्या आधारे केली. त्यासाठी त्यांनी सर जदुनाथ सरकार, रियासतकार सरदेसाई, ब्रिज किशोर या इतिहासकारांच्या मांडणीचे खंडण करून स्वातंत्र्ययुद्धाच्या इतिहासाची पुनर्मांडणी केली. महाराणी ताराबाईंच्या चरित्रलेखनामुळे इतिहासाची न्यायप्रणीत मांडणी होऊन मराठ्यांच्या इतिहासातील स्त्रीप्रणीत लेखनाला सुरुवात झाली. डॉ. पवारांच्या या चरित्र ग्रंथाला महाराष्ट्र शासनाचा उत्कृष्ट ग्रंथ-निर्मिती पुरस्कारही मिळाला.

मराठ्यांच्या इतिहासातील वादग्रस्त पण इतिहासप्रेमींना आकर्षित करणारे व्यक्तिमत्त्व म्हणजे छत्रपती संभाजी महाराज. त्यांच्या जीवनाप्रमाणेच इतिहासलेखनातही त्यांची शोकांतिका झाली होती. ही शोकांतिका दूर करण्याचा प्रयत्न इतिहासकार वा.सी. बेंद्रे प्रभृतींनी केला होता. तोच धागा पकडून १९८९ साली डॉ. पवार यांनी संभाजीमहाराजांच्या हौतात्म्याच्या त्रिशताब्दीच्या निमित्ताने एक स्मारक ग्रंथ प्रकाशित करून या मराठा राजाच्या व्यक्तिमत्त्वावर आणि कामगिरीवर अधिक प्रकाश टाकला. या ग्रंथाच्या प्रदीर्घ प्रस्तावनेत त्यांनी मराठी व फारसी बखरकार, इतिहास संशोधक, साहित्यिक व विचारवंत यांच्या संभाजीमहाराजांवरील लिखाणाचा चिकित्सक परामर्श घेतला. विशेषत: शिवाजी-संभाजी या पिता-पुत्रांच्या समज-गैरसमजातून निर्माण झालेल्या भावनिक गुंत्याचा त्यांनी ऐतिहासिक साधनांच्या आधारे उलगडा केला.

महाराणी ताराबाईंवरील ग्रंथाप्रमाणेच डॉ. पवारांच्या ‘सेनापती संताजी घोरपडे’ या चरित्रग्रंथामुळे मराठा इतिहासलेखनात मोलाची भर पडली. मराठ्यांच्या एका महान पण उपेक्षित सेनापतीवरील हा पहिला संशोधनात्मक ग्रंथ ठरला. डॉ. पवारांचे ग्रंथलेखन हे औरंगजेबाचे इतिहासकार साकी मुस्तैदखान, खाफीखान, भीमसेन सक्सेना यांचे इतिहासग्रंथ, मोगल दरबारातील बातमीपत्रे व पुराभिलेखागारातील प्रकाशित व अप्रकाशित कागदपत्रे यांचा आधार घेऊन साकारले आहे. यातून संताजीच्या पराक्रमाची, असामान्य

नेतृत्वाची व त्याच्या गनिमीकाव्याच्या अद्वितीय कौशल्याची चर्चा करून त्याच्या जीवनाच्या शोकांतिकेला त्याचा स्वभावच कसा कारणीभूत ठरला, याचे परखड विवेचन केले आहे.

मराठ्यांच्या इतिहासातील अनेक अज्ञात व दुर्लक्षित व्यक्तींवर तसेच घटनांवर पुनर्चिकित्सेचा झोत टाकत त्यांना प्रकाशात आणणारा डॉ. पवारांचा आणखी एक महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे 'मराठेशाहीचा मागोवा'. यामध्ये त्यांनी संभाजीमहाराजांना मोगली कैदेतून सोडवण्यासाठी झालेला एक अज्ञात प्रयत्न, १६८९ची मराठ्यांची मसलत, शिवछत्रपती व त्यांचा परिवार असे अनेक काळाच्या पडद्याआड गेलेले विषय हाताळले आहेत.

याशिवाय डॉ. पवारांनी 'शिवछत्रपती एक मागोवा', 'शिवचरित्रापासून आम्ही काय शिकावे?', 'मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध', 'छत्रपती संभाजी- एक चिकित्सा', 'आमच्या इतिहासाचा शोध आणि बोध' असे अनेक ग्रंथ लिहून मराठ्यांच्या इतिहासाचे दालन समृद्ध केले आहे. १९९२ साली डॉ. पवारांनी 'इतिहास संशोधन आणि त्याद्वारे समाज प्रबोधन' हे ध्येय ठेवणारी 'महाराष्ट्र इतिहास प्रबोधिनी' ही संस्था स्थापन केली. 'इतिहासो हि राष्ट्रस्य समाजस्य प्रबोधक:' हे ब्रीद अंगीकारलेली संस्था उभी केल्यावर डॉ. पवार महाराष्ट्राच्या प्रबोधनकाळाकडे आकृष्ट होणे स्वाभाविकच होते. यातूनच त्यांच्या आधुनिक काळातील थोर समाजक्रांतिकारक राजा राजर्षी शाहू यांच्या कार्यावरील संशोधनास प्रारंभ झाला. ७-८ वर्षांच्या अथक परिश्रमांतून त्यांनी राजर्षी शाहूंवरील १२०० पानांचा एक त्रिखंडात्मक बृहद्ग्रंथ संपादित केला. या ग्रंथामुळे विश्लेषणात्मक शाहू-चरित्राबरोबरच शाहूकालीन छायाचित्रे, जाहीरनामे, पत्रव्यवहार व कायदे असा दुर्मीळ दस्तऐवज प्रकाशित झाला.

यानंतर राजर्षी शाहू छत्रपतींचे समाजक्रांतीचे विचार महाराष्ट्राच्या बाहेर आसेतुहिमाचल गेले पाहिजेत, असा ध्यास डॉ. पवारांनी घेऊन भारताच्या १४ प्रादेशिक भाषांमध्ये शाहूचरित्र अनुवादित करण्याचा संकल्प सोडला. त्यानुसार कानडी, कोकणी, उर्दू, तेलगू, गुजराती व हिंदी या भाषांत ते आणले गेले. त्याची इंग्रजी व जर्मन आवृत्ती त्यांनी नुकतीच प्रसिद्ध केली असून रशिअन आवृत्ती प्रकाशनाच्या मार्गावर आहे.

१९९२ साली महाराष्ट्रातील इतिहास-अभ्यासकांनी एकत्र येऊन 'अखिल महाराष्ट्र इतिहास परिषदे'ची स्थापना केली. या संस्थेचे पहिले संस्थापक अध्यक्ष डॉ. पवार झाले. परिषदेच्या एका अधिवेशनात वाचले गेलेले शोधनिबंध पुढच्या अधिवेशनात प्रसिद्ध केले जातात. हा पायंडा डॉ. पवारांनी सुरू केला. त्यामुळे परिषदेतर्फे आजपर्यंत २२ शोधनिबंध संग्रह प्रकाशित झाले आहेत.

१९७० साली डॉ. पवार यांचे गुरू डॉ. अप्पासाहेब पवार यांनी शिवाजी विद्यापीठात 'शाहू संशोधन केंद्र' या संस्थेची स्थापना केली. राजर्षी शाहूंच्या कारकिर्दीच्या कागदपत्रांचे अनेक खंड केंद्रातर्फे प्रकाशित झाले आहेत. गेली ७-८ वर्षे डॉ. जयसिंगराव पवार हे आपल्या गुरूने स्थापन केलेल्या संशोधन संस्थेत फक्त १/- रु. प्रतिकात्मक मानधन घेऊन संचालक म्हणून कार्यरत आहेत. राजर्षी शाहूंच्या चरित्राशी व आधुनिक महाराष्ट्राच्या इतिहासाशी संबंधित अशा अनेक ग्रंथांचे प्रकाशन या केंद्रातर्फे त्यांनी 'राजर्षी शाहू साहित्य माला' द्वारे केलेले आहे. डॉ. पवार यांना आत्तापर्यंत २५हून अधिक सामाजिक व साहित्यिक पुरस्कार प्राप्त झाले आहेत.

– डॉ. मंजुश्री पवार

## पळसुले, गजानन बाळकृष्ण

**आधुनिक संस्कृत महाकवी**

**१ नोव्हेंबर १९२१ – २८ नोव्हेंबर २००५**

'आधुनिक संस्कृतमहाकवि' म्हणून यथार्थ गौरव झालेल्या गजानन बाळकृष्ण पळसुले यांचा जन्म महाराष्ट्रातील सातारा गावी झाला. बालपण गरिबीत गेले तरी बौद्धिक श्रीमंती आणि अपरंपार कष्ट यांच्या जोरावर पळसुले यांनी विद्वत्त्व व कवित्व संपादन केले. अगदी किरकोळ शरीरयष्टी असणारे हे व्यक्तिमत्त्व अत्यंत

प



प्रसिद्धिपराङ्मुख होते, परंतु आपल्या कर्तृत्वाने स्वत:ची आणि त्यांच्या संस्कृतरचनांची कीर्ती त्यांनी जगभर पसरवली. बालवयात वारावर भोजन करून शिक्षण पूर्ण करण्याची उमेद बाळगत त्यांनी संस्कृत-व्याकरणाचा सखोल अभ्यास केला आणि त्यांनी १९४३ साली बी.ए., १९४८ मध्ये एम.ए. आणि १९५७ साली पीएच.डी. अशा पदव्या मिळविल्या. पीएच.डी.साठी त्यांनी संस्कृत धातुपाठ हा विषय निवडला होता. एम.ए. पदवी प्राप्त केल्यानंतर लगेच १९४९ साली ते भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिरात संशोधन साहाय्यक म्हणून काम करू लागले. ते १९५६पर्यंत तेथेच कार्यरत होते. १९५६ साली ते डेक्कन महाविद्यालय, पुणे येथील संस्कृतकोश विभागात उपसंपादक म्हणून रुजू झाले. ते १९६४पर्यंत त्या पदावर राहिले. १९६५ ते १९७५ या कालावधीत पुणे विद्यापीठात संस्कृत प्रगत अध्ययन केंद्रात प्रपाठक म्हणून काम केले आणि १९७५ ते १९८२ या काळात तेथेच प्राध्यापक म्हणून सेवा केली. १९८२ ते १९८७ या काळात पुन्हा भांडारकर प्राच्यविद्यासंशोधन मंदिरात स्नातकोत्तर विभागाचे प्रमुख म्हणून त्यांनी काम पाहिले आणि तेथेच विश्वविद्यालय अनुदान आयोगाच्या योजनेनुसार १९९०पर्यंत अतिथि-प्राध्यापक म्हणून कार्यरत राहिले. त्यानंतर एक वर्षभर त्याच संस्थेत प्राकृत कोशविभागात संपादक-साहाय्यक म्हणून काम केले. १९९३ ते १९९७ या कालावधीत साहित्य अकादमीच्या सल्लागार मंडळाचे सदस्य म्हणूनही त्यांनी काम पाहिले. ही सर्व पदे सांभाळात असतानाच त्यांनी पारंपरिक व्याकरणशास्त्र आणि आधुनिक संस्कृतसाहित्य यांत अत्यंत महत्त्वाची भर घातली.

पळसुले यांनी अविश्रांत परिश्रम घेऊन कविकल्पद्रुम- बोपदेवीय धातुपाठाची चिकित्सक आवृत्ती, संस्कृत धातुपाठज्- अ क्रिटिकल स्टडी, अ कॉनकॉर्डन्स ऑफ संस्कृत धातुपाठज, सिक्स उपनिषद्स ऑफ द वेद या जर्मन ग्रंथांचा अनुवाद, व्हर्बल फॉर्म्स इन् दि ऋग्वेद (मण्डल-६), युभात: संस्कृत प्रति-इव्होल्युशन ऑफ संस्कृत फ्रॉम द प्रोटो-इंडो-युरोपिअन, संस्कृतचा इतिहास व पूर्वेतिहास, संस्कृत-भाषेच्या काही समस्यांवर आधुनिक भाषाशास्त्राने टाकलेला प्रकाश, वैदिक भाषेच्या जडणघडणीचे काही पैलू हे ग्रंथ प्रसिद्ध केले. शेवटच्या तीन या वास्तविक मराठी व्याख्यानमाला होत्या व त्यांचे नंतर पुस्तकात रूपांतर झाले. याखेरीज व्याकरणशास्त्रात अत्यंत महत्त्वाचे काम म्हणजे संशोधनपर लेख त्यांनी लिहिले. भर्तृहरीच्या महाभाष्यदीपिकेच्या काही खंडांचे चिकित्सक संपादन त्यांनी केले. हे खंड भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिरानेच प्रसिद्ध केले आहेत. याशिवाय त्यांचे १००हून अधिक शोधनिबंध प्रकाशित झाले आहेत. या सर्व मौलिक अध्ययनपर ग्रंथांखेरीज त्यांचे ललित संस्कृत साहित्यही अत्यंत लोकप्रिय ठरले आहे. त्यांपैकी अनुवादित साहित्याचा भाग पुढीलप्रमाणे- १) अग्निजा व २) कमला- हे दोन्ही सावरकरांच्या कवितांचे अनुवाद आहेत, तर ३) तुकावक्ति (तुका म्हणे) हा तुकारामांच्या अभंगाचा अनुवाद होय. आधुनिक संस्कृत नाटककार म्हणूनही त्यांची विशेष ख्याती आहे. भ्रातृकलह:, ४) यदा रायगडो जागर्ति, ५) अथातो ज्ञानदेवोभूत, ६) धन्येयं गायनी कला, ७) अत्रमृत्युर्विलज्जित:, ८) अन्धं युगम; ही नाटके भाषांतरित असली तरी आधुनिक विषयही संस्कृतातून किती समर्पकपणे मांडता येतात याचे उत्तम उदाहरण आहेत.

वरील अनुवादित नाटकांखेरीज स्वप्रतिभेने लिहिलेली तीन नाटके म्हणजे आधुनिक संस्कृत साहित्याची भूषणे आहेत. १) 'समानमस्तु वो मन:' या त्यांच्या नाटकाला सर्वोत्कृष्ट नाट्यरचनेचा भारत शासनाचा पुरस्कार १९६३, प्राप्त झाला आहे. २) सावरकरांच्या जीवनावरील 'धन्योऽहं धन्योऽहं' हे नाटक त्यांच्या देशभक्तीची व सावरकरभक्तीची साक्ष

प

आहे. ३) ‘भासो हास’ या सर्वांगसुंदर नाटकात परंपरेने भासावर केलेले आरोप आणि अग्निदिव्याला सामोरी गेलेली त्याची नाटके हा विषय अतिशय नाट्यमयरीत्या मांडला आहे. विलक्षण कल्पकता, प्रतिभा, अभिजात संस्कृतातून दर्जेदार लेखन ही डॉ. पळसुले यांच्या नाटकांची वैशिष्ट्ये आहेत.

संस्कृत नाटक सादरीकरणाच्या स्पर्धांमध्ये वरील नाटकांच्या प्रयोगांनी सर्वोत्कृष्ट नाटककाराचे पारितोषिक अनेकदा मिळविले आहे. वरील साहित्यकृतींमध्ये भर पडली आहे ती ‘विनायकवीरगाथा’ आणि ‘विवेकानन्दचरितम’ या दोन चरित्रांची! कोणत्याही भारतीयाला अभिमान वाटावी अशी ही दोन व्यक्तिमत्त्वे, सावरकर आणि विवेकानंद! या दोघांनीही जणू डॉ. पळसुले यांच्या प्रतिभेला साद घातली आणि नव्या संस्कृत वाङ्मयात दोन चरित्रांची अनमोल भर पडली. या स्वतंत्र लेखनाबरोबरच भारतवाणी या संस्कृत पाक्षिक पत्रिकेचे आद्य संपादक म्हणूनही त्यांनी काम पाहिले. या सर्व रचनांचा मुकुटमणी शोभलेली आणि डॉ. पळसुले यांच्या शिरपेचात मानाचा तुरा खोवणारी रचना म्हणून त्यांच्या ‘वैनायकम्’ या महाकाव्याचे नाव अमर झाले आहे. डॉ. पळसुले यांनी प्रथम सावरकरांवर ‘धन्योऽहं धन्योऽहं’ हे नाटक लिहिले मग त्यातूनच चरित्र लिहिले आणि त्यानेही समाधान न होऊन पूर्ण महाकाव्यच लिहिले. ब्रिटिश राज्याच्या अन्यायाचा हा जणू संस्कृतातला आलेख आणि त्या पार्श्वभूमीवर सावरकरांच्या व्यक्तिमत्त्वाची तेजस्विता झळाळून उठते.



या महाकाव्याला बिर्ला फाउंडेशनचा सर्वोत्कृष्ट संस्कृत-साहित्यकृतीचा पुरस्कार, कालिदास पुरस्कार व दालमिया पुरस्कार असे तीन पुरस्कार मिळाले आहेत. यांखेरीज डॉ. पळसुले हे श्रीमंत नानासाहेब पेशवे धार्मिक आणि आध्यात्मिक पुरस्कार, पुणे (१९९१), राष्ट्रीय संस्कृत-पण्डित राष्ट्रपति पुरस्कार, (१९९५), अमृतमन्दाकिनी गौरवग्रंथसमर्पणम् (१९९६), स्मृतिग्रंथमाला : षट्-प्रसूननि (२००६-२०११) इत्यादी पुरस्कारांनी सन्मानित झाले आहेत. व्याकरणकार आणि कवी या सामान्यत: निसर्गभिन्नास्पद मानल्या गेलेल्या दोन गुणधर्मांचा सुंदर आणि क्वचितच सापडणारा संगम डॉ. पळसुले यांच्या व्यक्तिमत्त्वात दिसतो. अत्यंत मृदुभाषी, विनम्र, सतत कार्यमग्न आणि विद्यार्थिप्रिय अशा डॉ. पळसुले यांच्या निधनामुळे संस्कृत साहित्य क्षेत्र एका प्रतिभावंताला मुकले.

— डॉ. उमा वैद्य

## पांगारकर, लक्ष्मण रामचंद्र

**संतचरित्रकार, ग्रंथकार**

**१८७२ — १९४१**

☛ ***मुख्य चरित्रनोंद - धर्मपरंपरा खंड***



मराठी भाषेतील प्राचीन संत चरित्राचे लेखक, वक्ते आणि ग्रंथकार म्हणून उभ्या महाराष्ट्रात आदराने स्थान भूषविणाऱ्या लक्ष्मण रामचंद्र पांगारकरांचा जन्म पुण्याजवळील पौडगावचा. त्यांच्या मातोश्रीचे नाव जानकीबाई होते. पांगारकर यांचे प्रारंभीचे शिक्षण पुणे इथे झाले. त्यांनी बी.ए. झाल्यावर शिक्षकाची नोकरी स्वीकारली. त्यांना सुरुवातीला पुण्यात आणि नंतर वऱ्हाडात जावे लागले. शिक्षकाची नोकरी करताना पांगारकरांना संत एकनाथांच्या साहित्याची गोडी लागली. नंतरच्या काळात मोरोपंत, वामन पंडित, मुक्तेश्वर यांच्या रचना ते मुखोद्‍गत करू लागले. पाठांतर आणि ग्रहणशक्ती चांगली असल्याने ते कण्ठस्थ काव्य सुरात म्हणत असत. ते नित्याच्या बोलण्यातसुद्धा संतांची अवतरणे देत. नंतर त्यांना शिक्षकी पेशा अडचणीचा वाटू लागला. आवाज मधुर असल्याने पुढे-पुढे ते संतांच्या रचना गाऊन दाखवत असत. व्याख्याने, प्रवचने, वारकरी संप्रदायाची कीर्तने करण्यात त्यांना रस वाटू लागला. भावभक्तीपूर्ण शब्दांत संतांची रसाळ चरित्रे लिहिण्याची हातोटी याच काळात

त्यांना साधली. शिक्षकाच्या नोकरीत त्यांना रस उरला नाही. जसा काळ जाऊ लागला, तसे पांगारकर भक्तीमार्गी संत बनले. पंढरीची वारी, गळ्यात तुळशीमाळ आणि मुखाने हरिनाम यांतच ते गुंतले. संतांचा महिमा गाता-गाता त्यांची रसाळ चरित्रे लिहिते झाले. त्यातूनच भक्तीमार्गप्रदीप (शके १८६६) हा पहिला ग्रंथ अस्तित्वात आला. त्यांच्या रसाळ पण बुद्धिनिष्ठ कीर्तन-प्रवचनांतून श्रोते मंत्रमुग्ध होत असत. लेखनातही विद्वत्ता-चिकित्सा-रसिकता असल्याने नव्या पिढीला ती संतचरित्रे 'पुराणातली वानगी' न वाटता परंपरेचा ठेवा वाटू लागली. पांगारकरांच्या लेखणीने-वाणीने महाराष्ट्रात एक नवे पर्व निर्माण झाले.

मोरोपंतांच्या शैलीचा त्यांच्यावर मोठा प्रभाव होता. त्यामुळे नंतरच्या काळात मोरोपंतांचे चरित्र आणि काव्य-विवेचन ग्रंथ लिहून पराडकरांच्या अभ्यासाचा पाया त्यांनी घातला (इ.स.१९१५). एकनाथी भागवत रसाळ भाषेत लिहून भागवत पारायणाची सुरुवात करून दिली. ती आजतागायत खेड्यापाड्यांतून परंपरेने वर्षानुवर्षे समारंभपूर्वक चालू आहे. 'ज्ञानेश्वरांची प्रभावळ' (इ.स. १९२८) या ग्रंथाने ज्ञानदेवांच्या कार्याचा आढावा त्यांनी घेतला. 'मराठी वाङ्मयाचा इतिहास' (खंड १-३, इ.स. १९३५-३६) लिहून त्यांनी मराठी भाषिकांवर अनंत उपकार केले. 'नारदभक्तिसूत्रे' हा त्यांचा आणखी एक ग्रंथ! जो भक्ति सांप्रदायिकांत लोकप्रिय ठरला. 'चरित्रचंद्र' नावाने आत्मचरित्र लिहून आपले अंतरबाह्य प्रेमळ-रसाळ जीवन लोकांच्या समोर व्यक्त केले (१९३८). हे चरित्र वाचताना त्यांच्या जीवनातील अनेक प्रसंग लोक अनुभवतात.

मराठी वाङ्मयाचा इतिहास हा पूर्व उल्लेखित ग्रंथ तीन खंडांत आणि तीन कालखंडांत विभागला आहे. १) ज्ञानेश्वर-नामदेव काळ. २) एकनाथ काळ. ३) तुकाराम-रामदास काळ. यांखेरीज पांगारकरांनी बरेचसे स्फुट लेखन केले. त्यांच्या 'भक्तिमार्गप्रदीप' ग्रंथाच्या अनेक आवृत्त्या प्रसिद्ध झाल्या. असे भाग्य आजवर इतर कोणालाही लाभले नाही. पांगारकरांवर त्यांच्या सुहृदांनी 'पांगारकर साहित्य गौरव', 'पांगारकर स्मारक ग्रंथ भाग १-२' आणि 'पांगारकर स्मृति-सुमने' असे तीन ग्रंथ लिहिले आहेत.

— वा.ल. मंजूळ

## पाठक, अरुणचंद्र शंकरराव

**इतिहास अभ्यासक**

**१६ सप्टेंबर १९५६**



अरुणचंद्र शंकरराव पाठक यांचा जन्म जालना जिल्ह्यातील अंबड या गावात झाला. त्यांचे विद्यालयीन व महाविद्यालयीन शिक्षण मराठवाडा येथे झाले. १९९३ साली 'गोदावरी खोरे एक पुरातत्त्वीय अभ्यास' या विषयावर लघुप्रबंध सादर करून एम.फिल्. पदवी प्राप्त केली. तर विद्यावाचस्पती ही पदवी 'गोदावरी खोरे एक सांस्कृतिक अभ्यास: महानुभाव स्थान पोथीच्या संदर्भात' या विषयावर प्राप्त केली. आपल्या शोध प्रबंधामध्ये यादवकालीन नगररचना, समाजजीवन, स्थापत्य विषयक विविध घटक यांची नोंद घेऊन त्यांनी चक्रधर परिभ्रमणाच्या अनुषंगाने काही विशेष बाबी अधोरेखित केल्या. त्यांमध्ये महत्त्वाची बाब म्हणजे तत्कालीन पैठण येथील १२५ वास्तूंची नोंद व स्थलनिश्चिती. चक्रधारांच्या अनुषंगाने महानुभाव साहित्यातील नोंदीआधारे गृहरचना, दुर्ग, जलव्यवस्थापन व एकूणच नगररचनेचा आराखडा स्पष्ट करता येतो, हे स्पष्ट केले.

१३व्या शतकानंतर इस्लामिक आक्रमणामुळे महाराष्ट्राच्या समाजजीवनाचे संदर्भ बदलले व त्यामुळे अनेक स्मारके काळाच्या ओघात नष्ट झाली तर काहींमध्ये परिवर्तन केले गेले. चक्रधरांनी तत्कालीन महाराष्ट्रातील महत्त्वपूर्ण स्थानांना जाणीवपूर्वक भेट दिली होती. यात रामटेक, मनसर (जि. नागपूर) येथील स्मारके

प

उदाहरणार्थ भोगराम मंदिर, पाचवे शतक. याची ओळख डॉ. पाठकांनी केलेल्या सर्वेक्षणाआधारे होते. नेवासा, पैठण यांसारखी स्थाने प्रागैतिहासिक व प्रारंभिक ऐतिहासिक काळापासून अस्तित्वात होती. या स्थानांचे सातत्य चक्रधारांपर्यंत होते, ही बाब त्यांनी आपल्या संशोधनात्मक कामातून व गवेषणातून स्पष्ट केले.

'महाराष्ट्रातील बारव स्थापत्य' या ग्रंथात त्यांनी पाणी व्यवस्थापनाच्या परंपरेचे व वास्तुवैशिष्ट्याचे तपशिलात विवेचन केले आहे. मराठी भाषेत रूढ असलेल्या आड, विहीर, बारव, पोखरणी या शब्दांना असलेले स्वतंत्र अर्थ त्यांच्या या कामामुळे स्पष्ट झाले. पुरातत्त्व विभागात काम करीत असताना महालक्ष्मी मंदिर जागजी, शिरढोण जि. नांदेड येथील अष्टदिक्पालाची प्रभावळ असलेली ब्रह्मदेवाची मूर्ती, यासारख्या काही बाबी प्रथमच विभागाच्यावतीने नोंदविल्या. पैठण, दौलताबाद, कन्धार, वाशिम अशा ठिकाणी पुरातत्त्वीय गवेषण, उत्खनन कार्यांचा त्यांना अनुभव आहे. याशिवाय 'मराठवाडा एक शोध' या पुस्तकात पैठण, चारठाणा, धर्मपुरी, आंबाजोगाई यांसारख्या यादवकालीन नगरांवर प्रकाश टाकला.

आपल्या संशोधनविषयक कामामध्ये राष्ट्रकूटकालीन जलव्यवस्थापन, कंधार येथील जगत्तुंग समुद्र जलाशयाची स्थलनिश्चिती त्यांनी केली. त्यांचे पुढील विषयांवरील म्हणजेच महाराष्ट्रातील बारव स्थापत्य, स्थानपोथी पुरातत्त्वीय अभ्यास (यादवकालीन महाराष्ट्र), धारूर किल्ला (सहलेखकासह) असे ग्रंथ प्रकाशित आहेत तर इतिहास व पुरातत्त्व, लोककला या विषयांवर आधारित १०० पेक्षा अधिक शोधनिबंध राष्ट्रीय व राज्य पातळीवर प्रकाशित आहेत व पीएच.डी. मार्गदर्शक म्हणून उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव; टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे; तसेच डेक्कन महाविद्यालयाच्या कार्यकारी समितीवर कार्यरत आहेत. महाराष्ट्र शासनाच्या दर्शनिका विभागात ते १९९७पासून २०१६ पर्यंत विभाग प्रमुख म्हणून कार्यरत होते. या काळात त्यांनी विभागाचे प्रकाशित, पूर्व प्रकाशित सर्व गॅझेटिअर ई-बुक आवृत्तीमध्ये निर्माण केले, ही बाब विशेष उल्लेखनीय ठरते. दार्शनिका विभागात काम करताना संपादकीय दृष्टिकोण कसा असावा, याविषयीचा वस्तुपाठ निर्माण केला. याशिवाय जिल्हा गॅझेटिअरमध्ये नवीन प्रयोग सुरू केले.मराठी जिल्हा गॅझेटिअरमध्ये प्रकरण ग्राम निर्देशिका पुन्हा सुरू केली. प्रत्येक जिल्हा निर्मितीची तारीख, पुनर्वसित गाव, भूकंपाची नोंद, मठस्थापत्य, गढी यांची नोंद असे विविध जिल्ह्यांचे वैशिष्ट्य त्या-त्या गॅझेटिअरमध्ये तपशिलाने नोंदवून अधोरेखित करण्याचा प्रयत्न त्यांनी सातत्याने केल्याचे दिसून येते.

राज्य गॅझेटिअर मालिकेत सातारा, नांदेड, नागपूर, लातूर, गॅझेटिअर ग्रंथ संपादित करून प्रकाशित, स्थापत्य व कला, इतिहास, प्राचीन काळ, मध्ययुगीन काळ, क्वीट इंडिया मुव्हमेंट या विशेष राज्य गॅझेटिअरबरोबरच औषधी वनस्पती, वनसंपदा, महाराष्ट्र लॅन्ड अॅन्ड पिपल प्रमाणे नदी खोरे निहाय गॅझेटिअर निर्मितीचा भारतातील पहिला प्रयोग 'राज्य गॅझेटिअर प्रवरा खोरे' हे प्रकाशित करून त्यांनी केला. सतत नवीन प्रयोग करण्याकडे कल, चौकस बुद्धी व गुणग्राहकता, अभ्यासकाचा शोध घेऊन त्यांच्याकडून काम करून घेणे; या बाबींसाठी ते ओळखले जातात.

— डॉ. दिलीप बलसेकर

## पाठक, काशीनाथ बापूजी

**जैन वाङ्मयाचे संशोधक व शिलालेख तज्ज्ञ**

**१८५० – १९३२**

काशीनाथ बापूजी पाठक हे १८७७मध्ये बी.ए. झाल्यानंतर बेळगावच्या सरदार महाविद्यालयामध्ये शिक्षकाचे काम करू लागले. याच सुमारास फ्लीट यांचे हिंदी शिलालेखांवरील इंडियन अॅन्टिक्वेरीतील लेख त्यांच्या वाचनात आले व त्यातील दोषस्थले दाखवण्याच्या निमित्ताने हे संशोधनकार्यात शिरले. इंडियन अॅन्टिक्वेरीतील त्यांचे सुरुवातीचे लेख वाचूनच फ्लीट यांनी पाठक यांना आपल्या सहकाऱ्याची जागा देऊ केली, परंतु यांनी ती नाकारली व आपला

प

शिक्षकाचा पेशा चालू ठेवला. पुढे मिरजेच्या राजेसाहेबांच्या शिक्षकाची जागा त्यांना देण्यात आली (१८८४) व त्या निमित्ताने कोल्हापूरच्या सरस्वती भांडारातील जैन वाङ्मयाचे अध्ययन करण्याची संधी त्यांना मिळाली. यांचे हे अध्ययन पुढे इतके वाढले की, त्यांना या विषयातील तज्ज्ञ मानण्यात येऊ लागले.

यानंतर म्हैसूर सरकारच्या पुरातत्त्व विभागात (आर्किओलॉजिकल डिपार्टमेन्टमध्ये) काही दिवस काम केल्यानंतर त्यांची पुण्याच्या डेक्कन महाविद्यालयात संस्कृतचे प्राध्यापक म्हणून नेमणूक झाली. या जागेवरून पुढे हे कार्यनिवृत्त झाले (१९०८).

जैन वाङ्मयातील जुने ग्रंथ व शिलालेख यांचा त्यांनी अतिशय सूक्ष्म अभ्यास केला होता. याच कारणाने या विषयावर त्यांनी लिहिलेल्या ग्रंथांना व निबंधांना जगाच्या संशोधन क्षेत्रात मान मिळाला. १८९३साली लंडन येथे भरलेल्या इंटरनॅशनल कॉन्फरन्स ऑफ ओरिएन्टॅलिस्टसच्या नवव्या अधिवेशनात यांनी Position of Kumarila in Digambara Jain Literature हा निबंध पाठवला. अध्यक्ष मॅक्स मूलर व फ्लीट ल्यूमन इत्यादी पंडितांनी या निबंधातील मूलग्राही संशोधनाचे मनापासून स्वागत केले.

शंकराचार्यांच्या काळासंबंधीचे त्यांचे संशोधनही असेच महत्त्वाचे आहे. परंतु यापेक्षाही फ्लीट यांच्या ३१९-३२० या गुप्तकालाच्या संशोधनाला पाठक यांनी जैन वाङ्मयातील संशोधनाने पुरवलेले आधार विशेष महत्त्वाचे आहेत. स्वत: फ्लीट यांनी पाठक यांच्या या मदतीचा उल्लेख पुढे अनेक वेळा केला. पाठक यांनी संशोधन करून प्रसिद्ध केलेल्या शिलालेखांची संख्या वीस असून लिहिलेल्या निबंधांची संख्या पन्नासपेक्षा अधिक आहे. Inscriptions in the Kanarese Districts of Bombay Presidency या विषयावर व्याख्यान देण्यासाठी त्यांना मुंबई विद्यापीठाने भगवानलाल इंद्रजी लेक्चरर म्हणून निवडले होते (१९०८). उणादि सूत्रे ही पाणिनीची असल्याबद्दलचा त्यांचा निबंध तसेच किलहॉर्नच्या महाभाष्यातील त्रुटित भागांचे संशोधन करणारे निबंध हे त्यांच्या सूक्ष्म बुद्धीचे द्योतक आहेत.

— संपादित

**संदर्भ :**

*१. अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*

## पाठक, श्रीधरशास्त्री त्र्यंबक

***महामहोपाध्याय***

**संस्कृत पंडित, लेखक व वक्ते**

**१८७७ – मृत्युदिनांक अनुपलब्ध**

म.म. श्रीधरशास्त्री त्र्यंबक पाठक हे पूर्व खानदेशातील पारोळ्याचे राहणारे. यांचे शिक्षण इंदूर व काशी येथे झाले. हे शुक्ल यजुर्वेदी माध्यंदिन शाखेचे होते. व्याकरण, वेदान्त, धर्मशास्त्र वगैरे विषयांचा त्यांचा चांगला व्यासंग होता. शास्त्री म्हणून सरकारी हायस्कूलमध्ये व कॉलेजमध्ये काम करून ते सेवानिवृत्त झाले. नंतर ते धुळे येथे राहत. त्यांनी संन्यास घेऊन शंकरानंद असे नाव धारण केले होते.

श्रीधरशास्त्री धर्मपरिवर्तनवादी होते. अस्पृश्यतेला शास्त्रांत आधार नाही म्हणून म. गांधींनी येरवडा तुरुंगातून काढलेल्या पत्रकाला त्यांची मान्यता होती.

त्यांनी वेदशास्त्रोत्तेजक सभा व भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिट्यूट या संस्थांतर्फे व्याख्याने दिली. १९२४ साली प्रयाग येथे भरलेल्या व सोनगीर येथे भरलेल्या भारतीय पंडित परिषदेस ते उपस्थित होते.

त्यांचे पुढील ग्रंथ प्रसिद्ध आहेत. संस्कृत - १. ईश, २. केन, ३. कठ, ४. मुण्डक, यावर बालबोधिनी टीका, ५. महाभाष्यशब्दकोशः (सहकार्याने). मराठी - ६. शुक्ल यजुर्वेदाचे मराठी भाषान्तर, ७. नित्यविधि, ८. अस्पृश्यतानिवारणाचा शास्त्रार्थ. याशिवाय त्यांनी अनेक निबंध लिहिले व भाषांतरे केली आहेत.

— संपादित

**संदर्भ :**

*१. अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*

प

## पाटील, शरद
**इतिहास व प्राच्यविद्येचे अभ्यासक**
**१९२५ – २०१४**



मार्क्सवादी विचारांच्या मुशीतून घडलेल्या, बहुविध प्रतिभा लाभलेल्या आणि प्राचीन भारतीय इतिहास व प्राच्यविद्या यांमध्ये आगळी क्रांतिकारक विचारधारा निर्माण करून हादरे देणारे प्राच्यविद्या अभ्यासक व विचारवंत कॉम्रेड शरद पाटील यांचा जन्म धुळे येथे झाला. कॉम्रेड पाटील यांनी भारतीय समाजातील विविध प्रकारची विषमता नष्ट करण्यासाठी सातत्याने वैचारिक मंथन केले. त्यांनी जातिव्यवस्थेवर व विषमतेवर आधारलेल्या समाजरचनेला आव्हान देण्यासाठी आयुष्यभर संघर्ष केला. त्यांनी सत्यशोधक, मार्क्सवादी या नियतकालिकांतून आपले विचार मांडले. सामाजिक समतेसाठीच्या अनेक लढ्यांमध्ये त्यांचा सक्रिय सहभाग होता. ते मुंबईला जे.जे. स्कूल ऑफ आर्ट्समध्ये असताना, विद्यार्थिदशेतच त्यांच्या लढ्यांची सुरुवात झाली. त्यानंतर ते कामगार चळवळ, आदिवासींच्या वनहक्कांसाठीची चळवळ, धरणग्रस्तांचा लढा, शेतकरी व कष्टकरी यांच्या प्रश्नांचा लढा व नामांतराची चळवळ, अशा अनेक लढ्यांमध्ये सक्रिय होते.

कॉम्रेड पाटील यांचा मार्क्सवादाचा गाढा अभ्यास तर होताच. त्यांनी वेद, पुराणे, महाकाव्ये व बौद्ध धर्माचे ग्रंथ यांचा स्वतंत्रपणे अभ्यास केला. त्यासाठी ते संस्कृत शिकले. त्यांनी आपल्या अभ्यासामधून काढलेले मूलगामी निष्कर्ष चकित करणारे होते. महात्मा फुले व डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या विचारधारांचा त्यांनी सखोल अभ्यास केला होता.

भारतातील सामंतशाहीचा उगम व गुलामगिरी याबद्दल त्यांचे निष्कर्ष मार्क्सवादी विश्लेषणाच्या प्रस्थापित विचारसरणीपेक्षा वेगळे होते. तसेच शोषणमुक्त भारतीय समाजाची नवरचना करायची असेल, तर केवळ वर्गसंघर्षावर अवलंबून राहता येणार नाही, तर सर्वप्रथम प्राचीन इतिहासाला वर्णवादी, जातीयवादी, स्त्रीविरोधी व वर्गवर्चस्ववादी पूर्वग्रहांपासून मुक्त केले पाहिजे; यावर त्यांचा मुख्य भर होता.

१९४५पासून कॉम्रेड पाटील मार्क्सवादी पक्षाचे (भारतीय कम्युनिस्ट पक्ष व १९६४नंतर भारतीय कम्युनिस्ट पक्ष- मार्क्सवादी) सदस्य होते. मार्क्सवादी पक्ष भारतीय समाजातील जातिअंताला महत्त्व देत नसल्याने या पक्षात राहून आपण अपेक्षित कार्य करू शकत नाही, हे लक्षात आल्यावर त्यांनी १९७८मध्ये सत्यशोधक कम्युनिस्ट पक्षाची स्थापना केली. प्राचीन काळापासून भारतीय समाजाची रचना गुंतागुंतीची आहे. त्यात मुळापासून बदल घडविण्यासाठी मार्क्स, फुले व आंबेडकर या तिन्ही विचारधारांचा योग्य उपयोग केला पाहिजे, हा त्यांच्या विचारांचा गाभा होता. अशा विचारांनीच जात, वर्ण, वर्ग व स्त्रीदास्य यांचा शेवट होऊन समतेवर आधारित समाज तयार होऊ शकेल, असे त्यांचे प्रतिपादन होते.

प्राचीन इतिहास व साहित्य यांचे सर्वस्वी निराळे विश्लेषण करण्यासाठी वेगळी पद्धत हवी व त्यासाठी प्रस्थापित अथवा पारंपरिक चौकटी मोडणे गरजेचे आहे, असे त्यांचे आग्रही प्रतिपादन होते. जरी त्यांच्या मनाची जडणघडण मार्क्सवादी विचारधारेची असली, तरी ते मार्क्सवादी विश्लेषणाच्या जंजाळात अडकून पडले नाहीत. एका अर्थाने कॉम्रेड पाटील हे प्राच्यविद्येत विरचनावादाचा (Deconstructionism) व उत्तर आधुनिकवादाचा (Postmodernism) वापर करणारे होते. प्राचीन इतिहास, साहित्य, धर्म व संस्कृती यांच्या संदर्भात त्यांनी प्रस्थापित मतांना हादरे देणारे नवे सिद्धान्त मांडले. त्यांनी जाणीव-नेणिवान्वेषी तर्कशास्त्राची (dialectical logic) उयुक्तता सांगून सामाजिक बदलांसाठी त्याचा वापर करण्याची गरज असल्याचे मत मांडले आहे. ‘अब्राह्मणी साहित्याचे सौंदर्यशास्त्र’, ‘दास-शूद्रांची गुलामगिरी’, ‘रामायण-महाभारतातील

प

वर्णसंघर्ष', 'कास्ट फ्युडल सर्व्हिट्यूड', 'शिवाजीच्या हिंदवी स्वराज्याचे खरे शत्रू कोण - महंमदी की ब्राह्मणी', 'प्रिमिटिव्ह कम्युनिझम - मट्रिआर्की', 'गायनोक्रॅसी अॅन्ड मॉडर्न सोशॅलिझम' हे कॉम्रेड पाटील यांचे काही गाजलेले ग्रंथ आहेत.

कॉम्रेड पाटील यांना २०१४मध्ये महाराष्ट्र इतिहास परिषदेने वा.सी. बेंद्रे पुरस्काराने गौरवले होते. तसेच, त्याच वर्षी त्यांना महर्षी विठ्ठल रामजी शिंदे पुरस्कार देण्यात आला.

— डॉ. प्रमोद जोगळेकर

## पाध्ये, काशीनाथ अनंत

***बाबा पाध्ये***

**लेखक, धर्मसिंधुकार**

**१७९० — १८०६**

काशीनाथ अनंत उपाध्याय तथा बाबा पाध्ये हे धर्मसिंधुकार विद्वान लेखक आणि अठराव्या शतकाच्या शेवटी पंढरपूर क्षेत्राचे सर्वेसर्वा म्हणून महाराष्ट्राला त्यांची ओळख आहे. 'बाबा वाक्यं प्रमाणम्' हा वाक्प्रचार त्यांच्यामुळे मराठीत प्रचारात आला, असे पंढरपूरकर मानतात. मूळचे रत्नागिरी जिल्ह्यातील संगमेश्वर तालुक्यातील गोळवली गावचे. या वंशजांना संगमेश्वरमधील ७२ गावांचा अग्रहार (जोसीपण) दिलेले होते. मूळ पुरुष काशीनाथपंताना लोक सार्वभौम विद्वान मानत होते. त्यांना यज्ञेश्वर आणि अनंत अशी दोन मुले होती. पैकी यज्ञेश्वर धौतमार्गात निष्णात ज्योतिषी होते आणि व्याकरणामध्ये पारंगत होते. अनंताचार्यांचा कल ईश्वरभक्तीकडे अधिक होता. त्यांच्यामध्ये सात्त्विकवृत्तीचे अनेक गुण होते. कोकणातील आपली जन्मभूमी सोडून अनंतभट्ट पंढपुरात श्रीविठ्ठल सेवेत दाखल झाले. त्यांना काशीनाथ उर्फ बाबा नावाचे चिरंजीव होते. वडिलांच्या मृत्यूनंतर बाबांनी पंढरपुरातच अध्ययन केले.

बाबांच्या २-३ रचना ज्या संस्कृतात आहेत, त्यांपैकी 'धर्मसिंधु', 'विठ्ठलस्तवराज', 'विठ्ठल ऋग्मंत्रसार' आणि 'विठ्ठल भूषण ग्रंथ' हे लोकांना माहीत झाले. पैकी शेवटचे तीन ग्रंथ लहान असून पुण्याच्या मराठी हस्तालिखित केंद्रात त्यांची हस्तलिखिते आहेत. शके १९१२ साली धर्मसिंधु रचला. जो अजरामर झाला. धार्मिक व्यवहारासाठी आवश्यक अशा सर्व विषयांचा विचार या ग्रंथात त्यांनी घेतला आहे. हा ग्रंथ तयार करताना निर्णयसिंधु, पुरुषार्थ चिन्तामणि, कालमाधव हेमाद्रि, कालतत्त्वविवेचन, कौस्तुभ, स्मृत्यर्थसा या धर्मशास्त्रीय ग्रंथांचा परामर्श घेतला आणि कित्येक ठिकाणी स्वत:ला योग्य असा निर्णय पूर्वासूरींच्या मताविरुद्ध घेतला आहे. बाबा पाध्ये यांच्या धर्मसिंधूचा शास्त्रार्थ काशीपासून रामेश्वरापर्यंत आजही स्वीकारला जातो. बाबांचे बंधू विठ्ठलपंत पाध्ये यांनी हा ग्रंथ काशीला विद्वानांच्या अवलोकनासाठी नेला होता. वाराणसीच्या पंडित परिषदेसमोर ग्रंथ परीक्षणार्थ ठेवला. सर्व पंडितांनी ग्रंथ अधिकृत-शास्त्रीय-उत्तम असल्याचा निर्णय एकमताने दिला. विशेष म्हणजे या ग्रंथाची पालखीतून मिरवणूकही काढण्यात आली.

धर्मसिंधूचे तीन विभाग आहेत. पहिल्या व दुसऱ्यामध्ये, वर्षातील बारा महिन्यांत येणाऱ्या धर्मकृत्यांसंबंधी कालनिर्णयपूर्वक विचारविमर्श केला आहे. तिसऱ्या विभागात पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असे दोन उपविभाग आहेत. त्यांमध्ये सोळा संस्कार, नित्य-नैमित्तिक कर्मे, अग्निहोत्रादी विधी, मूर्तीची अर्चना, गृहारंभ, गृहप्रवेश, प्रवास, इत्यादी व्यावहारिक गोष्टसंबंधीही धार्मिक सल्ला त्यांनी दिला आहे. नंतर त्यांनी कलियुगाच्या अनुषंगाने वर्ज्य-अवर्ज्य गोष्टींचे सांगोपांग विवेचन केले आहे. चातुर्वर्ण्य, व्यक्तिजीवनातील ब्रह्मचर्यादी चार आश्रमांचे सांगोपांग वर्णन केले आहे. हा ग्रंथ मूळ संस्कृतमध्ये असून त्याचे मराठीकरणही बापुशास्त्री मोघे यांच्याकडून करवून घेऊन जावजी दादाजी यांनी ग्रंथाचे मराठी रूपांतर ८४ वर्षांनंतर प्रसिद्ध केले. काशीनाथ-तथा बाबा पाध्ये यांचे हे कार्य समोर ठेवून गेल्या शतकात मुंबईचे महामहोपाध्याय पां.वा.काणे यांनीही असाच 'धर्मशास्त्राचा इतिहास' नावाचा सात खंडाचा ग्रंथ इंग्लिशमधून लिहिला. तो पुढे

भांडारकर संस्थेने प्रसिद्ध केला. बाबांनी पंढरपुरात एक संस्कृत पाठशाळादेखील चालविली होती. पेशव्यांकडून या पाठशाळेला सालीना बाराशे रुपये असे द्रव्यानुदान दिले जात होते. बाबांच्या पाठशाळेत सोलापूरचे शाहीर राम जोशी दोन वर्षे संस्कृत शिक्षणासाठी राहिले होते, असे त्यांनी स्वत:च्या चरित्रात म्हटले आहे. त्यांच्या लावण्यांत २-३ क्षेत्रवर्णनपर संस्कृत लावण्या आढळतात. एका तमासगिराचे कीर्तनकारात रूपांतर करण्यात बाबांचा आशीर्वाद उपयोगी पडला. पुढे बारामतीला संतकवी मोरोपंत पराडकर यांच्या अनुग्रहाने ते केवळ कीर्तनकार पुराणिक बनले. त्यांनी शाहिरीचा डफ मोरोपंतांसमोर फोडून प्रतिज्ञा घेऊन तमासगिरी सोडली.

बाबा श्रीविठ्ठलचे महान भक्त होते. वडिलांचा, अनंतरावांचा वारसा त्यांनी चालवला. विठ्ठलमंदिरातील नित्य आणि नैमित्तिक उपचारांना बाबांनी पद्धत घालून दिली. ती आज दीड-दोनशे वर्षांनंतरही तशीच चालू आहे. विठ्ठलासमोर सकाळ-संध्याकाळ स्वरचित संस्कृत आरत्या ते म्हणत. लोकांनी ही प्रथा उचलून धरली. बाबांची निष्काम सेवा, भक्ती आणि शिस्त यांमुळे ऐन मुसलमानांच्या त्रासात, उपद्रवात श्रीविठ्ठलमूर्ती सुरक्षित सुखरूप राहिली. बाबांच्या एका संस्कृत विठ्ठल स्तोत्रात श्रीमूर्तीचे वर्णन करताना तिच्या छातीवर मंत्र असल्याचा उल्लेख आहे. त्यामुळे सोलापूर जिल्ह्याच्या माढे गावातील विठ्ठलमूर्तीशी तिचे साम्य जुळले गेले. त्यावर मधल्या काळात बरीच चर्चा झाली.

बाबांची विद्वता आणि सदाचार यांमुळे पंढरपूर नगरवासीय त्यांना गुरुस्थानी मानीत. त्या वेळी विठ्ठलाखेरीज अन्य देवतांचे महत्त्व वाढू द्यायचे नाही, असा पंढरपूरकरांचा निश्चय होता. चंद्रभागातीरावर रास्तेवाड्यासमोर तुका विप्राच्या वाड्यात दत्तमूर्ती स्थापन करण्याचा प्रयत्न काही रामदासी भक्तांनी केला. त्यावर पंढरपूरवासीयांनी बहिष्कार टाकला. या भक्तांना उपवास घडला, भिक्षाच मिळाली नाही. पुढे विठ्ठलाच्या साक्षात्काराने बाबांनी वाद सोडवला. दत्तमूर्ती उभी राहिली. एकमुखी शालिग्राम दगडाची सुंदर मूर्ती पंढरपूरचे वैभव ठरले. (पाहा - सेतुमाधवराव पगडी: समर्थ रामदास आणि संप्रदाय)

पंढरपुरात आल्यावर विठ्ठलदर्शनानंतर भक्तगण बाबांच्या दर्शनासाठी जात. त्यामध्ये विद्वान पंडित, राजे-राजवाडे यांचा समावेश असे. मृत्यूपूर्वी काही दिवस आधी त्यांनी संन्यास स्वीकारला होता. पंढरपूर येथील कासार घाटाजवळ कासार धर्मशाळेशेजारी काशिनाथ पाध्ये यांचा मठ आहे. तेथे बाबा यांच्या आई-वडिल यांच्या समाध्या आहेत. सभागृहाच्या मध्यभागी बाबांची समाधी आहे. ही वास्तू अलीकडे वादामुळे बराच काळ दुर्लक्षिली होती. आता तेथे समर्थ संप्रदायाचा मठ आहे.

— वा.ल. मंजूळ

## पानसे, मुरलीधर गजानन

***लेखक, संशोधक, संपादक***

**९ सप्टेंबर १९१८ — २२ ऑगस्ट १९७०**

‘यादवकालीन महाराष्ट्र’ या संशोधनपर ग्रंथाने प्रसिद्धीस आलेले डॉ. मुरलीधर गजानन पानसे यांचा जन्म पुणे येथे झाला. त्यांचे प्राथमिक आणि महाविद्यालयीन शिक्षण पुणे येथेच झाले. १९४७मध्ये त्यांनी पीएच.डी. पदवी मिळवली आणि त्यांनी मुंबईच्या रुईया महाविद्यालयात १९४७-४९ या काळात अध्यापनाचे काम केले. डेक्कन कॉलेज, पुणे येथे १९५०-६२या काळात त्यांनी संस्कृत महाकोश योजनेत काम केले. या कामानिमित्तानेच प्रकाशित शिलालेख, ताम्रपट वाचण्याचा योग आला आणि त्यातूनच साकारला त्यांचा सुप्रसिद्ध ग्रंथ ‘यादवकालीन महाराष्ट्र!’ यादवांचे साम्राज्य महाराष्ट्रावर होते. कर्नाटकातील पुष्कळसा भाग त्यांच्या ताब्यात होता. त्यांचे कोरीव लेख मराठीत आहेत, तसे कानडीतही आहेत. या ग्रंथात यादवांच्या एकंदर राज्याबद्दल किंवा त्यांच्या राजवटीबद्दल विचार केलेला नाही, तर मराठी प्रदेशातील त्या काळातील सामाजिक व सांस्कृतिक परिस्थिती समजून घेण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. हा ग्रंथ

प

लिहिण्यासाठी त्यांना एक वर्षाची रजा आणि एशिया फाऊंडेशनची शिष्यवृत्ती मिळाली होती१९६१च्या पानशेतच्या पुरात या ग्रंथाची काही हस्तलिखित पाने आणि काही संदर्भ ग्रंथ नष्ट झाले. परंतु पुन्हा पहिल्यापासून तयारी करून पानसे यांनी या विषयावरील हा असाधारण महत्त्वाचा ग्रंथ मराठी वाचकांना सादर केलाच. १९६३मध्ये प्रकाशित झालेल्या ग्रंथाला अजूनही कोणी मागे टाकून या विषयावर अधिक केलेला अभ्यास किमान मराठीत तरी आढळत नाही; हेच पानसेंच्या अभ्यासाचे या विषयातील महत्त्व अधोरेखित करणारे आहे.

याचा अर्थ मात्र असा नाही की, पानसे या ग्रंथावरच थांबले. १९४३मध्येच त्यांच्या लेखनाला सुरुवात झाली. त्या वर्षी त्यांनी ज्ञानेश्वरीच्या भाषावैशिष्ट्यावरील प्रबंध लिहून पूर्ण केला. प्राचीन व अर्वाचीन मराठीतील फरक जाणून घेण्याच्या दृष्टीने हा प्रबंध महत्त्वाचा ठरतो. त्यांनी अनेक संशोधनपर लेखही लिहिले. श्रीपती भट्ट यांच्या 'ज्योतिष रत्नमाला' या संस्कृत ग्रंथाचे व त्यावरील मराठी टीकांचे संपादन व त्याची प्रस्तावना हेही पानसे यांचे भाषाविषयक संशोधन कार्यातील महत्त्वाचे योगदान मानले पाहिजे. प्राचीन मराठी, यादवकालीन मराठी, फारसी आणि अरबी मराठी भाषा, संतवाङ्मयाची भाषा, अशा अनेक भाषाविषयक लेखांबरोबरच 'भाषा अंतःसूत्र आणि व्यवहार' (१९६९) या ग्रंथाचे संपादनही त्यांनी केले. त्यांनी इंग्लिशमधूनही अनेक लेख लिहिले. व्यासंग, ऐतिहासिक दृष्टी आणि मांडणीचा नेटकेपणा हे त्यांच्या लेखनाचे विशेष गुण होते.

१९५७ साली त्यांनी पुणे विद्यापीठातून संस्कृत विषयात एम.ए. केले, तर १९६२-६८ या काळात पुण्याच्या डेक्कन कॉलेजात भाषा विज्ञान विभागामध्ये प्राध्यापक आणि प्रपाठक म्हणून काम केले. लिंग्विस्टि सोसायटी ऑफ इंडियाचे सहकार्यवाह पद त्यांनी काही काळ भूषवले, तर महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या भाषा समितीचे निमंत्रक म्हणूनही ते काही काळ कार्यरत होते. वयाच्या केवळ ५२व्या वर्षी त्यांना मृत्यूने गाठले. केवळ ५२ वर्षांच्या आयुष्यात डॉ. पानसे यांनी लेखन, संशोधन, संपादन यामध्ये केलेली कामगिरी थक्क करून टाकणारी आहे, यात शंका नाही.

- डॉ. आर.एच. कांबळे

## पारसनीस, दत्तात्रेय बळवंत

**इतिहास संशोधक, संग्राहक, लेखक व चतुरस्र कार्यकर्ते**

**२७ नोव्हेंबर १८७० – १९२६**



दत्तात्रेय बळवंत पारसनीस यांचा जन्म व मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण सातारा येथे झाले. शाळेत असल्यापासूनच यांना लेखनवाचनाचा नाद होता व वादविवादसभेतही हे भाग घेत. शिक्षण सुटल्यानंतर यांचे लक्ष इतिहास संशोधनाकडे वेधले. १८८७साली यांनी सुरू केलेले 'महाराष्ट्र कोकीळ' मासिक बरेच लोकप्रिय होते. त्यातील लेखांवरून त्यांना ऐतिहासिक माहिती व अस्सल कागदपत्रे गोळा करण्याची आवड तेव्हापासून होती असे दिसते.

पारसनीस यांना झाशीच्या महाराणी लक्ष्मीबाई यांचे दत्तक पुत्र दामोदरपंत यांचा सहवास लाभला. त्यांच्याकडून सरकारी व बिनसरकारी, देशी-परदेशी माहिती एकत्र करून त्यांनी आपल्या इतिहास संशोधन व लेखन या कार्यास सुरुवात केली. त्यांनी मराठीतून लिहिलेले लक्ष्मीबाईंचे चरित्र अनेक दृष्टींनी वैशिष्ट्यपूर्ण आहे. तेव्हापासून त्यांनी अस्सल कागदपत्रे, वस्तू, चित्रे वगैरेंच्या संदर्भात संग्रह संपादन, लेखन, प्रसिद्धी, संकलन वगैरे अनेक दृष्टींनी अत्यंत महत्त्वाची कामगिरी केली.

१९०२साली ते कोल्हापूरकर छत्रपतींबरोबर इंग्लंडमध्ये जाऊन आले. तिकडील अनेक संग्रहालये व संस्था पाहिल्या. आपल्याजवळ जमलेला संग्रह रसिकांच्या उपयोगाला यावा या दृष्टीने चांगले ग्रंथालय व

प

वस्तुसंग्रहालय काढण्याची खटापट सुरू केली. २९ ऑगस्ट १९१४मध्ये असे संग्रहालय स्थापण्याचा मुंबई सरकारचा ठराव प्रसिद्ध झाला. पण इमारत बांधणे वगैरे काम पहिल्या महायुद्धामुळे तहकूब झाले. ३ नोव्हेंबर १९२५ रोजी मुंबईचे गव्हर्नर सर लेस्ली विल्सन यांच्या हस्ते सातारा येथे मुद्दाम बांधलेल्या नव्या इमारतीत यांच्या कागदपत्रांच्या विभागाचे उद्घाटन झाले. या पारसनीस म्युझियममध्ये काही हजार मराठी, चार हजार इंग्रजी कागदपत्रे व तीन हजार इंग्रजी ग्रंथ होते. ते लवकरच वारले आणि तो संग्रह आता पुणे येथे डेक्कन कॉलेज पोस्ट ग्रॅज्युएट रिसर्च इन्स्टिट्यूटच्या ताब्यात देण्यात आला आहे.

पेशवे दप्तरातील निवडक पत्रे अलीकडे ४५ भागात प्रसिद्ध झाली. त्यांपैकी पुष्कळ पत्रे आधीच त्यांनी तेथे नेऊन निवडून व नकलून ठेवली होती. त्या वेळी त्यांना ती प्रसिद्ध करणे शक्य झाले नाही. त्यांच्या इतिहासक्षेत्रातील कार्यास खरे व राजवाडे यांच्या पूर्वीच सुरुवात झाली. त्या क्षेत्रातील यांची कामगिरी बहुविध आणि प्रचंड स्वरूपाची आहे. त्या कामी त्यांचा डेक्कन व्ह.ट्रा. सोसायटीशी घनिष्ठ संबंध होता.

संशोधन, संग्रह, प्रकाशन या कामी त्यांनी मुंबईचे पुरुषोत्तम विश्राम मावजीशेठ, राजेमहाराजे व मुंबई सरकार यांचेही साहाय्य मिळवले. यांची राहणी खानदानी, मूलगामी, काम करण्याची पद्धत सुबक व भाषाशैली चित्तवेधक नि मनोहारी असे. इतके प्रचंड काम करताना उपयुक्तता व व्यावहारिक दृष्टी त्यांनी कायम ठेवली. निष्कारण बडेजाव कधी मिरवला नाही. हाती घेतलेले काम संयम राखून तन्मयतेने पार पाडण्याचा त्यांचा गुण वाखाणण्याजोगा होता. त्यांचे वाङ्मय - मराठी - १. कीर्तिमंदिर १८९०, २. झाशीच्या महाराणी लक्ष्मीबाई यांचे चरित्र १८९४, ३. मराठ्यांचे पराक्रम- बुंदेलखंड प्रकरण १८९५, ४. अयोध्येचे नवाब १८९९, ५. मुसलमानी आमदानीतील मराठे सरदार १९००, ६. महापुरुष ब्रह्मेन्द्रस्वामी धावडशीकर यांचे चरित्र व पत्रव्यवहार १९००, ७. बायजाबाई शिंदे यांचे चरित्र १९०२, ८. दिल्ली अथवा इन्द्रप्रस्थ १९०२, ९. मराठ्यांचे आरमार १९०४, १०. सवाई माधवराव पेशव्यांचा दरबार १९०५, ११. स्वल्पमूल्यचरित्रमाला; (अ) परशुरामपंत प्रतिनिधी; (आ) नाभाजी; (इ) मुधोळ संस्थानचे घोरपडे, चरित्रे १२. पं. अयोध्यानाथ १८९२, १३. वामन शिवराम आपटे, १४. ए. ओ. ह्यूम १८९३, कविता १५. वाक्पुष्पांजली १८८९, १६. भारतभाग्योदय. ऐतिहासिक कागदपत्रे- १७. महेश्वर दरबारची बातमीपत्रे भाग १-२, कारकिर्द- अहिल्याबाई होळकर १९१०, १९११, १८. पेशवे दप्तरातील निवडक उतारे, खंड १-२, शिवाय दिल्लीचे राजकारण वगैरे अनेक अस्सल पत्रव्यवहार त्यांनी इतिहाससंग्रहातून प्रसिद्ध केले. १९. बाळाजी बाजीराव पेशवे यांची रोजनिशी, भाग १-२, २०. कैफियत यादी (दक्षिणेतील सरदारांच्या) १९०८, २१. वतनपत्रे, निवाडपत्रे १९०९, २२. सनदापत्रे १९१३, २३. तह करारमदार १९१४, (हा सर्व पेशवे दप्तरातील भाग सरकारी नोकर रा. ब. गणेश चिमणाजी वाड यांच्या साहाय्याने निवडून मावजी वगैरेंच्या साहाय्याने त्यांनी प्रसिद्ध करवला.) ग्वाल्हेर दरबारपत्रे- २४. महादजी शिंदे यांचा अस्सल पत्रव्यवहार व राजकारण खंड १-५, (यांपैकी पहिल्या खंडावर १९१५ हे साल असून पाचव्या खंडावर प्रायव्हेट (खासगी) असे छापले आहे.

मासिके - १. सुभाष्यचंद्रिका (हस्तलिखित १८८७), २. महाराष्ट्र कोकीळ (ऑक्टोबर १८८७- १८९२), ३. भारतवर्ष (सन १८९६पासून २४ अंक), ४. इतिहाससंग्रह (ऑगस्ट १९०८-ऑक्टोबर १९१६).

इंग्रजी ग्रंथ - 1. Notes on Satara, 2. Mahabaleshwar, 3. Sangali State, 4. Panhala, 5. Poona in bygone days, 6. History of the Maharastras (किंकेड व पारसनीस, दुसरा खंड १९२२)

— संपादित

**संदर्भ :**

१. *अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*

प

## पिसुर्लेकर, पांडुरंग सखाराम

**इतिहास संशोधक**

**३० मे १८९४ – १० जुलै १९६९**



पांडुरंग सखाराम पिसुर्लेकर यांचा जन्म गोव्यातील पिसुर्ले येथे झाला. गोमंतकाची राजधानी पणजी येथील लिसेव या संस्थेत १९१३ साली त्यांचे माध्यमिक शिक्षण पूर्ण झाले. १९१६मध्ये त्यांनी तीन वर्षांचे अध्यापकीय प्रशिक्षण घेतले. मोडी लिपीचे ज्ञान, तसेच संस्कृत, मराठी, कोंकणी या भाषांत अभ्यास असूनही त्यांचे संपूर्ण अध्ययन पोर्तुगीज भाषेतून झाले. त्याशिवाय इंग्लिश, फ्रेंच, लॅटिन याही पाश्चात्त्य भाषांत त्यांना उत्तम गती होती. त्यांनी १९१९पासूनच पोर्तुगीज शासनाच्या अभिलेखागारातील ऐतिहासिक कागदपत्रांचे पोर्तुगीज-मराठे संबंध या विषयाचा अभ्यास करण्याच्या जिज्ञासू बुद्धीने त्याचे वाचन करण्याची पोर्तुगीज शासनाकडून महतप्रयासाने संमती मिळवून त्या संशोधनपर साधनांचा सूक्ष्म अभ्यास करण्याचे व्रत अंगीकारले. १९२०मध्ये कायद्याची परीक्षा उत्तीर्ण झाले. त्यांना १९५६मध्ये लिस्बन विद्यापीठाने डी.लिट.ची मानद पदवी देऊन सन्मानित केले. ते स्वतः कायदेतज्ज्ञ असल्याने त्या क्षेत्रात धनसंचय करण्याची उत्तम संधी असूनही, आरंभी डिचोली येथील प्राथमिक विद्यालयात पोर्तुगीज भाषा व गणित या विषयांचे ते अध्यापन करू लागले. त्यांनी सांखळी, वाळपई, जुने गोवे व नेरूल येथील विद्यालयात १९३१पर्यंत अध्यापन केले; तथापि दरम्यान त्यांच्या अविरत संशोधनपर कार्याची विद्वत्वर्गात प्रशंसा झाल्याने १९३१मध्ये शासनाने गोमंतकातील पोर्तुगीज-भारतीय ऐतिहासिक व इतर विषयांशी संबंधित असलेल्या अभिलेखागाराच्या प्रमुखपदी त्यांची नियुक्ती केली. तीस वर्षांच्या प्रदीर्घ सेवेनंतर १९६१मध्ये ते त्या कार्यालयातील संचालकपदावरून निवृत्त झाले. त्यांना गोवामुक्तीनंतर १९६५मध्ये मुंबई विद्यापीठाने पणजी येथे स्थापन केलेल्या पदव्युत्तर अध्ययन व संशोधन केंद्राशी संलग्न असलेल्या इतिहास संशोधन केंद्राचे संचालकपद, तसेच इतिहास विषयाचे प्राध्यापकपद दिले. शिवाय त्यांना पीएच्.डी.साठीचे मार्गदर्शक शिक्षकपदही दिले गेले. पिसुर्लेकरांनी त्या सेवेच्या काळात पश्चिम बंगालची राजधानी असलेल्या कोलकत्यातील सुप्रसिद्ध इतिहासकार तसेच मराठ्यांच्या इतिहासाचे गाढे अभ्यासक डॉ. सुरेंद्रनाथ सेन यांच्या मार्गदर्शनानुसार अभिलेखागारातील अत्यंत दुरवस्थेत असलेल्या सहस्रावधी अभ्याससाधनांच्या नोंद विभागात सुधारणा केलीच, शिवाय त्यातील मराठी, कानडी व फार्सी कागदपत्रेही खंडवार लावल्यानंतर त्याविषयीची एक सूची व दोन मार्गदर्शनपर पुस्तिकाही प्रकाशित करून संबंधित अभ्यासकांसाठी सोय केली.

१९५१मध्ये लोवे अभिलेखागाराचे जे ठीकठाक स्वरूप होते, त्याचे श्रेय पोर्तुगीज शासकांनी पिसुर्लेकरांनाच दिले. 'पोर्तुगेज - मराठे संबंध' (१९६७) या त्यांच्या अजोड ग्रंथातील पहिले व्याख्यान वाचले, तरी त्यांच्या अध्ययनातील अभ्याससाधनांची व्याप्ती किती विशाल होती, याविषयीचा कयास करता येतो. त्यांनी मराठ्यांच्या इतिहासासंबंधी चार तपे केलेला अभ्यास सादर करणारा हा त्यांचा मराठीतील पहिला व शेवटचा ग्रंथ लिहिण्यापूर्वी, रक्तदाबाने अस्वस्थ असूनही पुणे विद्यापीठाचे कुलगुरू महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार यांच्या आग्रहावरून १९६३मध्ये त्या विषयावर नरसिंह चिंतामण केळकर स्मारक व्याख्यानमालांतर्गत सात व्याख्याने दिली होती. आपले एकही विधान निराधार असू नये, हा खऱ्या संशोधकाला शोभणारा बाणा पिसुर्लेकर यांनी तंतोतंत पाळला आहे. या ग्रंथातील पानोपानी भरलेल्या तळटिपा याची साक्ष देतील अशी ग्वाही, तसेच 'पोर्तुगेज - मराठे संबंध' या विषयावर असा भरघोस आणि साधार ग्रंथ आजवर कोणत्याही भाषेत झालेला नाही, असा या ग्रंथाविषयीचा अभिप्राय भारत इतिहास संशोधन मंडळाचे

प

कार्याध्यक्ष असलेल्या कुलगुरू पोतदारांनी दिला होता. यावरून पिसुर्लेकरांच्या परिश्रमपूर्वक संशोधनाचे फलित स्पष्ट होते. सर जदुनाथ सरकार तर पिसुर्लेकरांचे Friend, Philosopher & guideच होते. पिसुर्लेकरांना इतिहासाचार्य राजवाडे यांचे जीवन स्फूर्तिप्रद वाटत असे. त्यांनी तत्पूर्वी इतिहासशास्त्राच्या आधारे पोर्तुगीज भाषेत 'पोर्तुगेज अ माराताज', 'आन्तिगल्यश' वगैरे पुस्तके लिहिली होती. सर जदुनाथ सरकार, डॉ. सुरेंद्रनाथ सेन, डॉ. बाळकृष्ण, रियातसतकार गो.स. सरदेसाई, दत्तोपंत आपटे, प्रा. एस.आर. शर्मा, लंडन विद्यापीठाचे डॉ. सी.आर. बॉक्सर, डॉ. मोरायस, य.न. केळकर अशा अनेक इतिहासकरांनी त्या संदर्भसाधनांचा उपयोग केला होता, यावरून पिसुर्लेकरांच्या लेखनाचे मूल्य ध्यानात येते. पिसुर्लेकरांनी काही ठिकाणी तर सरकारांचेही निष्कर्ष कसे चुकीचे होते, यावरही प्रकाशझोत टाकला आहे.

पिसुर्लेकरांच्या या संशोधनपर लेखनामुळे एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धातील व विसाव्या शतकातील पहिल्या तीन दशकांत विद्वत्वर्तुळात सुपरिचित झालेल्या रावबहादुर का.ना. साने, वासुदेवशास्त्री खरे, इतिहासाचार्य विश्वनाथ काशिनाथ राजवाडे, रावबहादुर द.ब. पारसनीस या ज्येष्ठ संशोधकांच्या प्रभावळीत डॉ. पिसुर्लेकर यांचेही नाव घेतले जाऊ लागले.

पुढे प्रा. दामोदर धर्मानंद कोसंबी आणि प्रा. अ.का. प्रियोळकर या ऋषितुल्य संशोधकांशी ते अधिक परिचित झाले. पिसुर्लेकरांनी पोर्तुगीज भाषेत ८२, मराठीत २८, इंग्रजीत १० व फ्रेंचमध्ये दोन लेख व शोधनिबंध लिहिले. अभ्यासकांना त्यांच्या पुढील ग्रंथांचे विशेष मूल्य वाटते : 'अ आन्तिग् ईन्दीय ई ऊ मून्दू इश्तेर्नु' (१९२२), 'आश्पेंक्तुश दा सिव्हिलिझासांव् दा ईन्दीय आन्तिग' (१९२४), 'पुर्तुगेझिश् ई मारातश्' (१९२६-३९), 'रेजिमेन्तुश दुश् फोर्तालेझश् दा ईन्दीय्' (१९५१), 'आर्जेन्तिश् दा दिप्लोमासीय पुर्तुगेझ ना ईन्दीय्' (१९५२), 'आस्सेन्तुश् दु कोंसेल्यु दू इश्तादु दा ईन्दीय' (१९५३-५७). त्यांनी कृष्णसंप्रदाय इसवी सनाआधीपासून प्रचलित होता, असे 'अ आनितगिदादि दु क्रिश्नाईज्मु' या त्यांच्या रचनेत सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. पिसुर्लेकरांनी कागदपत्रांची काळजीपूर्वक केलेली निवड आणि त्यांच्या आधारे केलेले संशोधन व संपादन जे. एच. कुञ्ज-रिव्हार तसेच ब्रागांज परेरा यांच्या ग्रंथापेक्षा मौलिक स्वरूपाचे आणि निर्दोष बनले आहे, असा अभिप्राय आंग्ल इतिहासकार सी.आर. बॉक्सर यांनी व्यक्त केला आहे.

पिसुर्लेकरांनी गोव्यातील शिलालेख, ताम्रपट व नाणी यांचाही संग्रह केला. दुर्मीळ कागदपत्रांच्या सूक्ष्मपट्टिकाही (मायक्रोफिल्म) संग्रहित केल्या. सतराव्या व अठराव्या शतकांतील काही मराठी कागदपत्रांचे दोन-तीन सटीप भाग प्रकाशित करण्याची त्यांची तीव्र मनीषा होती. अशा या कार्यमग्न इतिहासकारांना मानसन्मानही तितक्याच तोलामोलाचे मिळाले. पिसुर्लेकरांना पोर्तुगाल शासनाने १९३५मध्ये 'Knight of Military order of Santiago' हा पुरस्कार अर्पण केला. त्यांना १९५२मध्ये पुन्हा 'Knight Officer' हा पहिल्याहून अधिक वरच्या स्तरावरचा बहुमान देण्यात आला.

१९४८मध्ये कोलकत्यातील रॉयल एशियाटिक सोसायटी ऑफ बेंगॉल या संस्थेने मध्ययुगीन इतिहास लेखनासाठी ठेवलेले सर जदुनाथ सरकार सुवर्णपदक दिले, तर एशियाटिक सोसायटी ऑफ बाँबेने १९५३मध्ये कॉम्पबेल स्मृतिप्रीत्यर्थ सुवर्णपदक दिले. त्यांनी भारतीय इतिहासाच्या संशोधनाचे जे अव्याहत व्रत अंगीकारले होते, त्यासाठीची कृतज्ञता म्हणून बृहन्महाराष्ट्र मंडळाकरवी १९६९मध्ये सुवर्णपदक देऊन त्यांना गौरवण्यात आले. वयाच्या पंचाहत्तराव्या वर्षी कर्करोगाने त्यांचे निधन झाले.

— संपादित

**संदर्भ :**

१. *मराठी विश्वचरित्रकोश; संपादक - कामत, श्रीराम पांडुरंग; विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा.*

प

## पीटर्सन, पीटर
### संस्कृतचे प्राध्यापक व संशोधक
### १८४७ – १८९९

पीटर पीटर्सन यांनी एडिम्बरो व ऑक्सफर्ड येथे इंग्रजीबरोबर संस्कृतचे अध्ययन केले. मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजमध्ये संस्कृतचे प्राध्यापक म्हणून त्यांची नेमणूक झाली (१८७३). मुंबई सरकारतर्फे संस्कृत व प्राकृत ग्रंथ शोधण्याकरिता त्यांनी गुजराथ व राजपुतान्यामध्ये अनेक दौरे काढले. राजपुतान्यात हिंडत असता त्यांना इतिहासाला उपयुक्त अशी पुष्कळ संस्कृत काव्ये सापडली.

कर्नल टॉडला न लागलेला कोटाच्या जवळील कणसाराच्या मंदिरावरील शिलालेख त्यांनी बरोबर लावून शुद्धतापूर्वक संपादन केला. त्यांनी पुस्तकाच्या शोधासंबंधी सहा रिपोर्ट प्रसिद्ध केले आहेत. त्यात अनेक महत्त्वाचे ग्रंथ आहेत. शिवाय अलवार राज्यातील पुस्तक भांडारांचे महत्त्वपूर्ण सूचिपत्र त्यांनी १८९२ मध्ये प्रसिद्ध केले आहे.

– संपादित

**संदर्भ :**

*१. अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*

## पुसाळकर, अच्युतराव दत्तात्रेय
### संस्कृत पंडित, पुराणांचे अभ्यासक
### २२ नोव्हेंबर १९०५ - ६ जून १९७३

डॉ. अच्युतराव दत्तात्रेय पुसाळकर क्युरेटर - डायरेक्टर म्हणून मुंबईच्या भारतीय विद्या भवनातून निवृत्त होऊन भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्थेमध्ये दाखल झाले होते. याआधीचे क्युरेटर प्रा. गोडे यांचे वृद्धापकाळाने निधन झाल्याने तेथे पुसाळकरांची नियुक्ती संस्थेने केली होती. अच्युत पुसाळकर यांचा जन्म डोंगर या रत्नागिरीतील कोकण - खेड्यात झाला. चार भावंडांत अच्युतरावांचा दुसरा क्रमांक होता. पुण्यातील स.प. महाविद्यालयातून १९२७ साली संस्कृत विषय घेऊन ते बी.ए. झाले. त्यातील विशेष प्रावीण्यामुळे



त्यांना ‘अनसूया’ पुरस्कार मिळाला. १९२९ साली ते मुंबईमधून एम.ए. झाले. त्यांना ‘एम.आर जयकर मीमांसा’ पुरस्कार मिळाला. मीमांसा विषयाच्या गोडीमुळे शि.प्र. मंडळीच्या मीमांसा विद्यालयात त्यांनी किंजवडेकर शास्त्री आणि कात्रे शास्त्री यांच्याकडे पारंपरिक पद्धतीने अध्ययन केले. डॉ. वि.स. सुखटणकर त्या वेळी भांडारकर संस्थेत महाभारताची चिकित्सक आवृत्ती संपादन करीत होते. त्यांच्याकडे अच्युतरावांनी ‘भास : ए स्टडी’ या विषयावर १९४१ साली पीएच.डी. प्राप्त केली. मधल्या काळात ते पुण्याच्या लॉ कॉलेजमधून एल.एल.बी. झाले; पण त्यांनी कोर्टाची पायरी चढून प्रॅक्टिस केली नाही.

अध्ययन व अध्यापनाचा छंद असलेल्या या विद्याव्रतीचा अनेक पुरस्कारांनी गौरव झाला. त्यांना ‘मंडलीक गोल्ड’ प्राइझ (मुंबई विद्यापीठ, १९३२), ‘भगवानलाल इंद्रजी’ प्राइझ (मुंबई विद्यापीठ, १९३४), ‘भारतीय विद्या भवन मुन्शी’ सुवर्णपदक (१९४४), ‘एशियाटिक सोसायटी’ रजत प्राइझ (१९५६) आणि १९७१ मध्ये राष्ट्रपतींकडून ‘संस्कृत पंडित’ सन्मान आणि आजीवन विद्यावेतन लाभले.

भांडारकर इन्स्टिट्यूटच्या पदावर काम करण्यापूर्वी, १९३६-१९५९ असा प्रदीर्घ काळ ते मुंबईच्या भारतीय विद्या भवनचे सहसंचालक होते. याच काळात त्यांनी ‘हिस्टरी ॲण्ड कल्चर ऑफ इंडियन पीपल’ या महान ग्रंथमालेचे लेखन व सहसंपादन केले. एकूण दहा खंडांपैकी पाच ते दहा हे खंड डॉ. पुसाळकरांचे लेखनकर्तृत्व मानायला हवे. भांडारकर संस्थेतील वास्तव्यात त्यांनी भारतीय पुराणांचा अभ्यास केला. तत्पूर्वी ‘एपिक्स ॲण्ड पुराणज’ नावाचा मार्गदर्शक ग्रंथ, ‘भास : ए स्टडी’ हा पीएच.डी.चा ग्रंथ, ‘हिस्टरी ऑफ

प

बॉम्बे', असे अनेक अभ्यासपूर्ण ग्रंथ त्यांच्या नावावर प्रसिद्ध झाले होते. डॉ. नम्बियार आणि डॉ. जी.के. पै हे पुराणावर पीएच.डी. करणारे त्यांचे अखेरचे दोन विद्यार्थी होत. एकीकडे लेखन, संशोधन, अध्यापन आणि प्रशासन असा कार्यभाग चालू असताना अ.भा. संस्थांच्या संचालक मंडळांवर ते मार्गदर्शक म्हणून काम करीत होते, त्यांमध्ये अ.भा. प्राच्यविद्या परिषद, हिस्टरी काँग्रेस, एशियाटिक सोसायटी, भारत इतिहास संशोधक मंडळ आणि पुण्यातील अन्य संस्कृत संस्थांशी त्यांचा निकटचा परिचय होता.

भांडारकर इन्स्टिट्यूटच्या निजाम अतिथिगृहात ते एकटेच राहत असत. त्या वेळी त्यांचे धाकटे बंधू, जे एक मोठे कारखानदार होते, त्यांचा पुण्यात बंगला होता. पण वानप्रस्थाश्रमी विद्वान, साधनेत गुंतल्यामुळे ते भांडारकर संस्थेतच राहत. सतत वाचन, रेडिओवरील बातम्यांतून जगाशी संपर्क, याव्यतिरिक्त अन्य काही छंद नव्हते. ते पुसाळकर कुटुंबात राहत नसले तरी रोजचा जेवणाचा डबा वहिनीकडून पोहोचता होत असे. पुण्यात राहून सभा, संमेलने, परिषदा, अध्यक्षपद अशा लौकिक जीवनापासून ते दूर असत.

चौघी भावंडे. वडिलांच्या मृत्यूनंतर मोठ्या बंधूंचे पाचगणीत निधन झाले, तेव्हा अच्युतरावांना कुटुंबाचा आधार व्हावे लागले. आईची इच्छा, त्यांनी गृहस्थाश्रम स्वीकारावा अशी होती; पण अच्युतरावांना संन्यास घेऊन रामकृष्ण परमहंसांच्या कार्यात जायचे होते. आईच्या आग्रहाखातर त्यांनी संन्यास घेतला नाही; पण त्यांनी 'वानप्रस्थी' जीवन जगले आणि अध्ययन-अध्यापन हेच ध्येय मानले. भांडारकर संस्थेतील अध्ययन, अध्यापनात ते अग्रेसर होतेच; पण त्यांच्या काळात संस्थेत डॉ. राष्ट्रपती राधाकृष्णन, राष्ट्रपती झाकीर हुसेन येऊन गेले. अनेक मान्यवर विद्वान जेव्हा विदेशातून येत, त्या सर्वांचे स्वागत स्वतः पुसाळकर जातीने करीत. संस्थेतच राहत असल्याने त्यांच्या या कर्तव्याला वेळेचे मोजमाप नसे. आयुष्यभर ब्रह्मचर्य पाळून निष्ठेने विद्याव्यासंग, वागण्यात एकटेपणा, सामूहिक जीवनाची आवड नाही, अशा वेगळ्या व्यक्तिमत्त्वाचे ते स्वरूप होते. त्यांनी १९६१ ते १९७२ अशी जवळजवळ बारा वर्षे संस्था सांभाळली. १९७३ साली मुंबईला परतल्यावर दुर्धर रोगाने झोपेतच त्यांचा मृत्यू झाला. १९७४ साली दिल्लीचे महान विद्वान डॉ. सत्यव्रत शास्त्री यांनी डॉ. पुसाळकर स्मृतिग्रंथ संपादन करून त्यांच्या प्रचंड कार्याचे दर्शन घडवून दिले.

पुसाळकरांचे कर्तृत्व अबोल असल्याने त्यांच्या मृत्यूनंतर डॉ. दांडेकरांनी, त्यांच्या बसण्याच्या जागी, एक मोठे छायाचित्र स्वखर्चाने लावले.

— वा.ल. मंजूळ

## पेंडसे, शंकर दामोदर

**संत साहित्य अभ्यासक, लेखक**

**१८९७-१९७४**

☛ *मुख्य चरित्रनोंद - धर्मपरंपरा खंड*

शंकर दामोदर पेंडसे हे विसाव्या शतकातील एक अमित प्रभावी व केवळ आदरणीयच नव्हे, तर ऋषितुल्य साहित्यिक होऊन गेले. लेखणी आणि वाणी ही दोन्ही त्यांना सारखीच वश होती. परिसंवाद व चर्चासत्रे यांत डॉ. शं. दा. पेंडसे यांच्या भाषणांचा प्रभाव पुसून टाकणे ही भल्याभल्यांनाही अशक्य असणारी गोष्ट होती. तरुण वयात स्वातंत्र्य लढ्यात भाग घेऊन देशसेवा करण्याची ऊर्मी प्रबल झाल्याने त्यांच्या माध्यमिक शिक्षणाची बरीचशी हेळसांड झाली व शिक्षणासाठी त्यांना पुष्कळच भ्रमंती करावी लागली. परंतु मोठ्या कष्टाने व चिकाटीने त्यांनी आपले शिक्षण पूर्ण केले. एम.ए. (संस्कृत), एम.ए (मराठी), (नागपूर विद्यापीठ) शास्त्री, (पंजाब विद्यापीठ), एम.एल.ओ. (मास्टर ऑफ ओरिएंटल लर्निंग) या पदव्या त्यांनी प्राप्त केल्या व सेवानिवृत्तीपूर्वी सुमारे ४० वर्षे नागपूर येथील हिस्लॉप महाविद्यालयात मराठी या विषयाचे अत्यंत प्रभावी अध्यापन केले. 'ज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान' या विषयावर त्यांनी आपला पीएच.डी.चा प्रबंध लिहिला व नंतर हा प्रबंध ग्रंथरूपाने प्रकाशितही झाला. प्राचीन मराठी



साहित्य, संस्कृत साहित्य, वेदोपनिषदे व मराठी संतांचे साहित्य हे त्यांच्या जिव्हाळ्याचे व खास अभ्यासाचे विषय होते. या विषयांवरील त्यांचे प्रभुत्व सर्वमान्य होते. 'भागवत धर्म' ही डॉ. पेंडसे यांच्या 'जीवींची आवडी' होती. वेदोपनिषदांतून प्रतीत होणारा भारतीय भागवत धर्माचा विकास व श्रीज्ञानदेवादी संतांच्या वाङ्मयातून दृष्टोत्पत्तीस येणारा महाराष्ट्राचा भागवत धर्म या विषयांवरील डॉ. पेंडसे यांचे ग्रंथ पुढच्या कित्येक पिढ्यांना दीपस्तंभाप्रमाणे मार्गदर्शक ठरणारे आहेत.

डॉ. पेंडसे यांच्या तात्त्विक लेखनाची सुरुवात लोकमान्य टिळकांच्या मार्गदर्शनाखाली झाली. 'गीतेतील कर्मयोग' हा आपला प्रदीर्घ निबंध त्यांनी १९१९साली लिहिला व तो लोकमान्य टिळकांना दाखविला. टिळकांनी तो आस्थेने वाचला व 'हा लेख प्रसिद्ध करण्याजोगा आहे', असा अनुकूल अभिप्राय त्यावर लेखी स्वरूपात नमूद केला. १९१९ ते 'राजगुरु रामदास' हा त्यांचा ग्रंथ १९७४मध्ये प्रसिद्ध होईपर्यंत म्हणजे सतत ५५ वर्षे डॉ. शं. दा. पेंडसे तात्त्विक विषयांवर मौलिक लेखन करत राहिले. हे सर्व लिखाण श्रेष्ठ गुणांनी संपन्न असून 'अक्षर वाङ्मय' या सदरात नि:शंकपणे समाविष्ट करण्याजोगे आहे.

'भागवत-धर्म' म्हणजे डॉ. पेंडसे यांच्या मते, देशकालवस्तु-परिच्छेदशून्य, सच्चिदानंद असा जो परमात्मा त्याच्या उपासकांचा धर्म होय. सर्व वेद, उपनिषदे, पुराणे या सर्व वाङ्मयाचे तात्पर्य 'परमात्मा' हाच आहे. परंतु जिज्ञासू अभ्यासकाला हे तात्पर्य 'अरुंधती-न्यायाने' शोधून काढावे लागते. 'ज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान' या आपल्या संशोधनपर ग्रंथात डॉ. पेंडसे म्हणतात की, जरी ज्ञानेश्वर श्रीशंकराचार्यांचे अनुसरण करत असले व शंकराचार्यांना वाट विचारतच त्यांनी आपली गीता-टिका पूर्ण केली असली, तरी ज्ञानेश्वरी हा शंकराचार्यांच्या गीताभाष्याचा काव्यानुवाद नव्हे. ते तत्त्वज्ञ ज्ञानेश्वरांच्या कविप्रतिभेला आलेले मधुर फळ आहे, असे डॉ. पेंडसे म्हणतात.

ज्ञानेश्वरांचा सुप्रसिद्ध 'चिद्विलासवाद' हा श्रीशंकराचार्यांच्या प्रतिपादनाच्या कक्षेबाहेरचा विचार आहे- महाराष्ट्राचा भागवत-धर्म या ग्रंथमालेतील 'ज्ञानदेव-नामदेव' हा १ ला खंड. हे पुस्तक बहारीचे आहे. आशय, भाषासौष्ठव, शैलीविज्ञान यांपैकी कोणत्याही दृष्टीने त्यात न्यून म्हणून सापडणार नाही 'भागवतोत्तम संत एकनाथ' या ग्रंथात डॉ. पेंडसे यांनी संत एकनाथांना कथा-काव्याचे जनक असे म्हटले असून पुढील पिढ्यांतील कथा-काव्ये आणि आख्यान लिहिणाऱ्या अनेक कवींचे नाथमहाराज हे स्फूर्तिस्थान आणि प्रेरणास्थान होत, असे मत त्यांनी नोंदविले आहे. श्रीमद्‌भागवताच्या एकादश स्कंधावर त्यांनी लिहिलेला 'बृहत भाष्य' मराठी भाषेचे अमर भूषण आहेच, परंतु मुद्दाम नोंदविण्यासारखे वैशिष्ट्य म्हणजे 'चतु:श्लोकी भागवत', 'हस्तामलक' व 'आनंदलहरी' यांसारखी अत्यंत अवघड संस्कृत प्रकरणे कमालीची सुबोध करून त्यांनी मराठी वाचकांच्या हाती सुपुर्द केली आहेत. नाथमहाराजांचा हरिपाठ हा ज्ञानदेवांच्या हरिपाठाच्या तोडीचा म्हणून वारकरी संप्रदायात मान्यता पावलेला आहे.

संत नामदेवांच्या काव्याचे परीक्षण करताना डॉ. पेंडसे यांची लेखणी जरा भावुक झाली आहे. नामदेवांची भावनाशीलता, त्यांच्या काव्यातील कल्पनासौंदर्य, त्यांची विठ्ठल भेटीची आर्त ओढ, श्रीज्ञानदेवांबद्दल त्यांच्या मनात वसत असलेली प्रगाढ आदरभावना यांबद्दल डॉ. पेंडसे यांनी समरसून लिहिले आहे. भागवत धर्माची ध्वजा त्यांनी पंजाबमध्ये घुमानपर्यंत फडकावली याबद्दल अभिमान व्यक्त केला आहे. श्रीज्ञानदेवांच्या संजीवन समाधी सोहळ्याचे नामदेव हे प्रत्यक्षदर्शी साक्षीदार असल्याने त्यांचे संजीवन सोहळ्याचे वर्णन अत्यंत प्रत्ययकारी उतरलेले आहे, असे डॉ. पेंडसे म्हणतात. परंतु त्याच वेळी

नामदेवांचे ‘तीर्थावळीचे अभंग’ म्हणजे कपोलकल्पित कादंबरी आहे, हे सांगावयाला डॉ. पेंडसे विसरलेले नाहीत.

महाराष्ट्राचा भागवत धर्म या डॉ. पेंडसे यांच्या ग्रंथमालेतील ‘राजगुरू रामदास’ हा शेवटचा ग्रंथ. हा ग्रंथ प्रकाशित झाल्यानंतर आठच दिवसांनी डॉ. पेंडसे यांनी जगाचा निरोप घेतला. हा ग्रंथ लिहायला घेतला त्या वेळी डॉ. पेंडसे यांची प्रकृती फार खालावलेली होती. ग्रंथ-लेखन पूर्ण होण्याबाबत ते साशंक होते. अशा स्थितीत ते पावस येथे गेले व त्यांनी स्वरूपानंद यांना आपली व्यथा सांगितली. ‘तुम्ही आपला ग्रंथ निर्विघ्नपणे पूर्ण कराल. या ग्रंथाचा प्रकाशन समारंभ स्वत:च्या डोळ्यांनी पाहीपर्यंत तुम्हांस कोणताही धोका नाही,’ असे स्वामी स्वरूपानंदांनी डॉ. पेंडसे यांना असंदिग्ध शब्दांत सांगितले. स्वामीजींचा शब्द खरा ठरला. या ग्रंथात डॉ. पेंडसे यांनी समर्थ रामदासस्वामींचे शैशव, त्यांची गोदावरीकाठची १२ वर्षांची तपश्चर्या, बारा वर्षेपर्यंत समर्थांनी केलेले भारत-भ्रमण व समाज-निरीक्षण, महाराष्ट्रात परतताना समर्थांनी केलेली ११०० मठांची व ११ मारुतींची स्थापना, चाफळच्या राममंदिराची प्राणप्रतिष्ठा, महाडजवळील वरंधा घाटातील शिवथर घळ येथील ग्रंथरचना यांचे तपशीलवार व समरसून वर्णन केले आहे.

समर्थ रामदास हे प्रवृत्तिमार्गी व युयुत्सू वृत्तीचे असल्याने त्यांनी समाजात चैतन्य व कर्तृत्व फुलविले, असे डॉ. पेंडसे यांना सार्थपणे वाटते. या पुस्तकात त्यांचा मुख्यत्वे वाद रंगला आहे. तो प्रा. न. र. फाटक यांच्याशी. ‘समर्थ रामदास हे शिवाजी राजांचे मोक्षगुरू असून शिवाजीराजांच्या स्वराज्यस्थापनेच्या उद्योगाशी समर्थांचा सुतराम संबंध नव्हता,’ असा पक्ष प्रा. न. र. फाटकांनी स्वीकारला. प्रा. फाटकांच्या मताला डॉ. पेंडसे यांनी वस्तुत: आपल्या ग्रंथाच्या शीर्षकातच उत्तर दिले आहे. रामदास स्वामी शिवाजीराजांचे मोक्षगुरू तर होतेच; परंतु स्वराज्य स्थापनेच्या कार्याशी रामदास स्वामी किती विविध प्रकारे जोडलेले होते, याचे अनेकविध पुरावे देऊनसुद्धा प्रा. फाटक आपला हट्ट सोडेनात, तेव्हा ‘फाटक वेड पांघरून पेडगावला जात आहेत’, अशी कडवट प्रतिक्रिया नोंदवून डॉ. पेंडसे यांनी वाद मिटवलेला आहे.

समर्थ रामदास हे काही रूढ अर्थाने शिवाजी राजांचे चरित्रकार नाहीत; परंतु ‘निश्चयाचा महामेरू । बहुतजनांसी आधारू । अखंड स्थितीचा निर्धारु । श्रीमंत योगी ॥ या रामदासांच्या ओवीच्या आशयापलीकडे अद्याप एकही शिवचरित्र गेलेले नाही, असे डॉ. पेंडसे यांना निभ्रांतपणे वाटते. डॉ. पेंडसे यांचा आधुनिक ललित मराठी साहित्याचा फारसा व्यासंग नव्हता. बोर्ड ऑफ स्टडिजच्या सभांमध्ये जेव्हा असे प्रश्न चर्चेला येत, तेव्हा ते अध्यक्षीय खुर्चीत त्यातील कोणा जाणकाराला बसवत. संत ज्ञानेश्वर हे डॉ. पेंडसे यांचे परमआदराचेच नव्हे, तर परमश्रद्धेचे स्थान होते. ग त्र्यं. माडखोलकर यांनी एकदा श्रीज्ञानदेवांची निंदा करणारा संपादकीय मजकूर नागपूरच्या ‘तरुण भारत’ या दैनिक वृत्तपत्रात लिहिला, तेव्हा डॉ. पेंडसे फार दुखावले गेले व त्यांनी माडखोलकरांशी असलेले दीर्घकालीन मैत्रीचे संबंध तत्काळ तोडून टाकले.

डॉ. पेंडसे यांचे उभे आयुष्य नागपुरात गेले. परंतु शेवटी-शेवटी ते पुण्याला स्थलांतरित झाले व ‘माउली’ नावाच्या निवासस्थानात अखेरपर्यंत राहिले. पुण्यातील निवास काळात ते महाराष्ट्र साहित्य परिषदेचे अध्यक्ष होते. १९५५साली पंढरपूर येथे भरलेल्या मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद त्यांनी भूषवले.

डॉ. पेंडसे उच्च कोटीचे विद्वान असूनही पराकाष्ठेचे श्रद्धाजीवी होते. सत्पुरुषांचे दर्शन व त्यांचे आशीर्वाद यांचा आपल्या कार्यसिद्धीत मोलाचा वाटा आहे, असे ते मानत. त्यांचा समर्थ रामदासांवरील ग्रंथ पावसच्या स्वामी स्वरूपानंद यांच्या आशीर्वादामुळेच पूर्ण होऊ शकला, अशी त्यांची श्रद्धा होती.

यात योगायोग असा की, स्वामी स्वरूपानंद व डॉ. शं. दा. पेंडसे हे दोघे समवयस्क असून परस्परांची योग्यता जाणून होते. स्वामी स्वरूपानंदाकडे जेव्हा काही

आध्यात्मिक साधक मार्गदर्शनासाठी येत, तेव्हा स्वामीजी त्यांना उपदेश करत- 'अति वाचन करू नका. ते शब्दारण्य आहे. महाजाल आहे व चित्तभ्रमण कारक आहे.' परंतु पुढे ३ ग्रंथकारांची नावे घेऊन सांगत 'यांचे लिखाण अवश्य वाचा. त्याने चित्ताला स्थिरता व विचारांना दृढता येईल.' ते तीन ग्रंथकार म्हणजे - १) प्रा. सोनोपंत दांडेकर २) डॉ. शं. दा. पेंडसे व ३) डॉ. प्र. न. जोशी.

– प्रा. प्र. द. सरदेशमुख

## पोतदार, दत्तो वामन

**इतिहास संशोधक, प्राच्यविद्यापंडित, संस्कृतपंडित, विचारवंत**

**५ ऑगस्ट १८९० – ६ ऑक्टोबर १९७९**



पुण्याचा चालता-बोलता ज्ञानकोश म्हणजे दत्तो वामन पोतदार. त्यांचा जन्म रायगड जिल्ह्याच्या महाड तालुक्यात बिरवाडी येथे झाला. त्यांचे मूळ आडनाव 'ओर्पे'. त्यांच्या पाठीवर चार भाऊ, तीन बहिणी जन्माला आल्या. दत्तोपंतांचे प्राथमिक शिक्षण महाडला झाले. १९०६ साली पुण्यात वास्तव्याला आल्यावर नूतन मराठी विद्यालयामधून ते मॅट्रीक उत्तीर्ण झाले आणि १९१० साली फर्गसन महाविद्यालयातून 'इतिहास' विषय घेऊन बी.ए. झाले. याच वर्षी ७ जुलैला भारत इतिहास संशोधक मंडळाची स्थापना झाली. इतिहासाचार्य राजवाडे आणि खं. चि. मेहेंदळे यांच्या आग्रहावरून दत्तोपंत मंडळाकडे आकर्षिले गेले. १९१३ साली मंडळाचे सदस्य आणि १९१५ साली सहचिटणीस झाले. त्यांनी एलएल.बी.साठी नाव नोंदविले. ते पुणे मराठी ग्रंथालयाचे संस्थापक सदस्य बनले. १९१२ साली शिक्षण प्रसारक मंडळात अर्धवेळ शिक्षक आणि पुढे आजीव सदस्य झाले. १९१५-१९१८ या काळात पुण्यातील प्रसिद्ध वसंत व्याख्यानमालेचे चिटणीस झाले व १९१६-१९२५ या काळात नूतन मराठी विद्यालयाचे मुख्याध्यापक झाले. १९३८-१९४६ या काळात त्यांनी राष्ट्रभाषा वर्धा समितीचे काम केले. १९४५ सालापासून पुढे चाळीस वर्षे ते महाराष्ट्र राष्ट्रभाषा समितीचे अध्यक्ष होते. १९३१ साली न्यू पूना कॉलेजचे (सध्याचे स. प. महाविद्यालय) प्राध्यापक बनले. तसेच मीमांसा विद्यालयाचे अध्यक्ष बनले.

इतिहास हा दादांचा आवडीचा विषय आणि भारत इतिहास मंडळ म्हणजे प्राचीन साधनांची खाण, दादांच्या संशोधनाला आव्हान, नवनवीन पुरावे शोधून सिद्धान्त मांडायला अवसर, हाती खात्रीशीर पुरावा असल्यावर दादा कोणत्याही दबावाला बळी न पडता, जे सत्य ते लोकांसमोर स्वच्छपणे मांडत. १९३२ साली कोल्हापूरला झालेल्या साहित्य संमेलनात त्यांनी 'इतिहास' विभागाचे अध्यक्षपद सांभाळले.

१९३३-१९३६ या काळात महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचे ते संपादक बनले तसेच मध्यभारत (उज्जैन) मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष तर बडोदा संमेलनाचे इतिहास विभागाचे अध्यक्ष बनले. १९३५ साली पोतदारांच्या इतिहास संशोधनाला वाव मिळाला. अखिल भारतीय इतिहास परिषदेची स्थापना झाली आणि पुण्याच्या पहिल्या अधिवेशनाचे ते सरचिटणीस झाले. इतिहास परिषदेत सर्वोच्च मान असलेल्या दिल्लीच्या अखिल भारतीय इतिहास परिषदेवर १९४८ साली त्यांची अध्यक्ष म्हणून निवड झाली.

१९३९ साली अहमदनगरच्या अ.भा. मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष होण्याचा मान त्यांना लाभला. याच अध्यक्षपदावरून महाराष्ट्र विद्यापीठाची, मराठी कारभार चालवणाऱ्या विद्यापीठाची त्यांनी मागणी केली. त्यातूनच पुढे १९४८मध्ये 'पुणे विद्यापीठ' जन्माला आले. याच विद्यापीठाचा कुलगुरू होऊन दीक्षान्त भाषण 'मराठीतून' देण्याचा उपक्रम दादांनी २४ सप्टेंबर १९६१रोजी करून दाखवला. सन १९४५ ते १९७२ या काळात प्रा. पोतदार हे टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचे

कुलगुरू होते. काही काळ कुलपतीही होते. दादांच्या शिक्षणक्षेत्रातील या भारदस्त कार्यामुळे हिंदुस्थान सरकारने त्यांना १९४६ साली 'महामहोपाध्याय' पदवी दिली.

भारत इतिहास संशोधक मंडळ, शिक्षण प्रसारक मंडळी, साहित्य परिषद, राष्ट्रभाषा सभा, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, मराठी साहित्य महामंडळ, भारतीय संस्कृती कोश, भांडारकर संशोधन संस्था, संयुक्त महाराष्ट्र परिषद अशा अनेक संस्थांच्या उभारणीमध्ये त्यांचा यातील महत्त्वाचा सहभाग होता. महाराष्ट्रभरातील उपस्थितीमुळे त्यांचे जीवन एक प्रकारे सार्वजनिक बनले होते. अनेक अखिल भारतीय अभ्यास मंडळांचे ते पदाधिकारी होते. विविध शैक्षणिक समित्यांवर ते तज्ज्ञ म्हणून असायचे, त्याच वेळी 'तमाशा सुधार समिती', 'वसंत व्याख्यानमाला' यासारख्या सर्वसामान्यांच्या आवडीच्या क्षेत्रांतही ते पुढाकार घ्यायचे. आर्योद्धारक संस्था (१९०३), आर्य क्रीडोद्धारक मंडळ (१९१४), आरोग्य मंडळ (१९१४), सहकारी वस्त्र भांडार (१९१८), रेल्वे पॅसेंजर असोसिएशन (१९१९) अशा संघटनांवरही त्यांनी आरंभीच्या काळात काम केले.

१९५६ साली इटलीतील फ्लोरेन्सला मुंबई सरकारचे प्रतिनिधी म्हणून ते हजर होते. तेथून ते लंडन, पॅरीस, जिनेव्हा, नेपल्स, वार्सा अशी शैक्षणिक भ्रमंतीही करून आले (१९६४). भारत-नेपाळ मैत्री संघाचे ते अध्यक्ष होते. १९६३मध्ये भारतीय विद्यापीठाच्या कुलगुरू शिष्टमंडळाचे नेते म्हणून ते सोव्हिएत रशियाला जाऊन अनेक विद्यापीठांना भेटी देऊन आले.

प्रा. पोतदारांचे संशोधनात्मक कार्य, संस्थांचे नेतृत्व पाहून १९६५ साली प्रयागच्या हिंदी साहित्य संमेलनाने त्यांना 'साहित्य वाचस्पति' पदवी दिली. १९६७ साली काशी विद्यापीठाची 'डी.लिट.' पदवी मिळाली. १९६२ साली राष्ट्रीय संस्कृत पंडित म्हणून राष्ट्रपतींकडून गौरव आणि आजीवन वर्षासन मिळाले. १९६७ साली भारत सरकारकडून त्यांना 'पद्मभूषण' सन्मान मिळाला.

वयाच्या ऐंशीनंतर पोतदारांच्या कार्यकर्तृत्वावर प्रकृतीचे बंधन आले. वृद्धत्वाची छाया पडू लागली. वाईच्या गंगापुरीत १९६८ साली खरेदी केलेले घर 'आनंदीधाम'. त्यामधील सर्व संग्रहासह शिक्षण प्रसारक मंडळींना अर्पण केले.

प्रा. पोतदारांनी दोनशेच्यावर शोधनिबंध इतिहास, प्राच्य-विद्या, संस्कृत आणि मराठी साहित्य या विषयावर लिहिले. त्याखेरीज 'मी युरोपात काय पाहिले', 'श्रोतेहो' (भाषणसंग्रह), 'मराठे व इंग्रज' अशी त्यांची लिहिलेली व संपादलेली एकूण २४ पुस्तके आहेत. तर लहान मुलांसाठी 'खेळावे कसे', 'अभ्यास', 'नागरिकत्व', 'मनाची मशागत', 'निश्चय', 'परीक्षा' अशी सुमारे पंचवीस पुस्तके लिहिली. त्यांची भाषणे, प्रस्तावना, अभिप्राय यांची गणतीही अवघड!

१९७७ ला पुण्यात अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन भरले. ८७ वर्षांचा कार्यकर्ता हा वारकऱ्याच्या निष्ठेने व्यासपीठावर हजर झाला. १९७९च्या सुमारास शनिवार पेठेतील घरात त्यांना आणले आणि तेथेच आजारी अवस्थेत त्यांचे देहावसान झाले.

— वा. ल. मंजूळ

## पोहनेरकर, नरहर शेषराव

☛ *मुख्य चरित्रनोंद - साहित्य खंड*

## प्रियोळकर, अनंत काकबा

☛ *मुख्य चरित्रनोंद - साहित्य खंड*

***

# फ

## फडके, हरी अनंत
**संशोधक, अभ्यासक**
**१३ ऑक्टोबर १९३२ – ३ फेब्रुवारी २००७**

हरी अनंत फडके यांचा जन्म वाराणसी येथे कोजागिरी पौर्णिमेस झाला. अनंतशास्त्री यांच्या विद्वत्तेची कीर्ती देशभर पसरली होती. विनोबाजींच्या कानावरही त्यांची कीर्ती पोहोचली होती. गीता प्रवचने सर्व भारतीय भाषांत रूपांतरित करून प्रसिद्ध करावीत अशी विनोबाजींची योजना होती. संस्कृत भाषांतराची जबाबदारी त्यांनी अनंतशास्त्रींवर सोपविली होती. ती त्यांनी कोणतेही मानधन न घेता समर्थपणे पार पाडली. गोळवलकर गुरुजींनी अनंतशास्त्रींकडून मनुस्मृती लिहून घेतली व ती पुस्तकरूपात प्रसिद्ध केली. अच्युतराव पटवर्धन, रावसाहेब पटवर्धन, विनोबाजी, आचार्य दादा धर्माधिकारी, सेतू माधवराव पगडी, दत्तो वामन पोतदार, गोळवलकर गुरुजी, मोरोपंत पिंगळे यांच्या प्रभावामुळे हरी अनंत फडके यांना बालपणापासूनच एक विशाल दृष्टी प्राप्त झाली.

वाराणसीत त्यांचे वास्तव्य दोन वाड्यांत झाले. एक नाना फडणवीसांचा अन् दुसरा वाडा पंत प्रतिनिधींचा.

फाउंडेशन फॉर न्यू एज्युकेशन, राजघाट येथे त्यांनी प्रदीर्घ काळ अध्ययन केले. तसेच मीरत कॉलेज, मीरत; काशी हिंदू विश्वविद्यालय, वाराणसी व कुरुक्षेत्र महाविद्यालय, हरियाणा येथे अध्ययन व अध्यापन, संशोधन कार्य करून त्यांनी मोठे नाव मिळवले. बनारस हिंदू विश्वविद्यापीठातून त्यांनी आपले शिक्षण पूर्ण केले. १९५५ साली इतिहास विषयात एम.ए., १९९२ साली प्राचीन भारतीय इतिहास, संस्कृती व पुरातत्त्व विभागाची एम.ए. पदवी त्यांनी प्राप्त केली. सन १९६६ साली त्यांनी ‘त्रिकोणात्मक संघर्ष’ या विषयावर प्रबंध पूर्ण करून पीएच.डी. प्राप्त केली. या काळात त्यांचे प्रा. दामोदर धर्मानंद कोसंबी यांच्याशी संबंध आले.

डॉ. फडके कुरुक्षेत्र विश्वविद्यालयात भारत इतिहास संशोधन व पुरातत्त्व विभागाचे अध्यक्ष आणि प्राच्य विद्या संकल्पाचे अधिष्ठाता म्हणून कार्यरत होते. त्यांनी रशिया व विद्यापीठ आयोग यांची फेलोशिप प्राप्त केली. हिंदी आणि मराठी भाषांतील निपुणतेमुळे विविध प्राचीन शाखांमध्ये संशोधन, निर्देशन करून त्यांनी शंभराहून अधिक शोधनिबंध, विविध शोधपत्रिकांतून व ग्रंथांतून प्रकाशित केले होते. त्यांनी लिहिलेले रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांचे चरित्र नॅशनल बुक ट्रस्ट दिल्लीने प्रकाशित केले.

'History of Kurukshetra' आणि 'Haryana Ancient and Medieval', ‘महाराष्ट्र ऐतिहासिक व सांस्कृतिक चिंतन’ या त्यांच्या ग्रंथांनी त्यांना विशेष प्रसिद्धी प्राप्त झाली.

भारताच्या इतिहासाचे विकृतीकरण थांबवायला हवे, इतिहासाच्या संदर्भात ‘रामदास व तुलसीदास’ तसेच ‘भारतीय इतिहास अभ्यासक्रमाची संकल्पना’ या ग्रंथांनी मराठी विश्वात व इतिहास क्षेत्रात विशेष भर टाकण्याचे काम त्यांनी केले आहे. या विषयावर त्यांनी ५३ लेख लिहून एक विक्रमच केला.

सेवानिवृत्तीनंतर १० वर्षे त्यांनी नाशिकला स्थायिक होऊन अनेक स्नेहबंध निर्माण केले.

‘इतिहास म्हणजे काय?’, ‘राष्ट्रीय जीवनात शिक्षकांचे योगदान’, ‘स्वातंत्र्यपूर्व व स्वातंत्र्योत्तर’, ‘जनस्थान’, ‘जिजाबाई’, ‘रामदास’, ‘अहिल्याबाई होळकर’ इत्यादी अनेक विषयांवर त्यांनी आपल्या

व्याख्यानांद्वारे सुंदर विचार मांडले. कुरुक्षेत्र विद्यापीठात असताना पानिपत स्मारक उभारावे यासाठी हरियाणा सरकारकडे त्यांनी सातत्याने प्रयत्न केला, आज ते पूर्ण झाले आहे.

याच विद्यापीठात दोन पदांवर काम करत असताना विद्यापीठाच्या अभ्यासक्रमात 'मराठ्यांचा इतिहास' हा विषय त्यांनी सुरू केला. अनेक विद्यार्थी व शिक्षक या विषयाचा सखोल अभ्यास आजही करत आहेत.

'लुप्त सरस्वती' हा त्यांचा चिंतनाचा विषय होता. कै.मा. मोरोपंत पिंगळे यांनी सरस्वती शोध प्रकल्प हाती घेतला, तेव्हा हरी अनंत फडके यांचाही त्यात सहभाग होता. इतिहास संकलन समितीच्या माध्यमातून अनेक प्रकल्प साकार करण्यासाठी ते मदत व मार्गदर्शन करत असत.

— डॉ. अरुणचंद्र पाठक

## फादर दलरी
**दलरी, गाय अल्बर्ट**
**विठ्ठलभक्त, फ्रेंच प्राच्यविद्यापंडित**
**१९२२ – मृत्युदिनांक अनुपलब्ध**

प्रो. गाय अल्बर्ट दलरी यांचा जन्म फ्रान्समध्ये १९२२ साली झाला. फ्रान्समध्ये असताना त्यांच्यावर फ्रेंच संस्कृत विद्वान प्रा. सिल्व्ह लेवी यांच्या कार्याची छाप पडली. त्यांना संस्कृत ग्रंथ समजावून घेण्याची इच्छा झाली; परंतु त्यासाठी देशांतर करावे लागेल, यामुळे ते काही काळ संस्कृत सोडून मराठीकडे वळले. भारतातील अध्यात्माची - विशेषत: वारकरी संप्रदायाच्या सर्वसमावेशक तत्त्वज्ञानाची त्यांना गोडी लागली आणि संत तुकारामांच्या १०१ अभंगांचे - जे वारकऱ्यांच्या नित्यपाठात होते त्यांचे - फ्रेंच भाषांतर त्यांनी १९५६ साली केले. हे सर्व अभंग फडावर गाईले जाणारे होते आणि त्यातून एखाद्या धर्मग्रंथापेक्षा मराठी धर्म संप्रदायावर अभ्यास करावा असे त्यांना वाटले. त्याखेरीज त्यांनी 'इंडिया रिबेल कॉन्टीनेंट', 'महात्मा गांधी', 'तुकाराम', 'महाराष्ट्र संस्कृत' असे ग्रंथ लिहिले. १९४३ ते १९७३मध्ये ते भारतात वास्तव्याला होते. १९६० साली त्यांनी विठ्ठल संप्रदायावर पीएच.डी. संशोधन करण्याचे ठरवले. त्यांनी म्हटले आहे, ''महायुद्धामुळे घडलेल्या मानव संहारामुळे मनाला उद्विग्नता आली. भारताची हजारो वर्षांची आध्यात्मिक परंपरा मी ख्रिश्चन असूनही मला खेचू लागली. पुण्यात आल्यावर मी वारकरी समाजाकडे खेचलो गेलो. १९५१ त्यांना कै. मामासाहेब दांडेकरांच्या दिंडीतून पायी वारी केली आणि नंतर पुढे आठ वर्षे पंढरपूर श्रीविठ्ठल यांचा अभ्यास सुरू केला. डेक्कन कॉलेजचे डॉ. एस.एम. कात्रे आणि डॉ. ह.धी. सांकालिया यांनी मला प्रोत्साहन दिले.''

वारकरी संप्रदाय, क्षेत्र पंढरपूर, विठ्ठलदेवता या सर्वांचा इतिहास, भूगोल, मूर्तिविज्ञान इत्यादी विषयांवर संशोधनात्मक छायाचित्रे, नकाशे यांच्यासहित क्षेत्राभ्यास करून 'कल्ट ऑफ विठोबा' नावाचा ग्रंथ तयार केला. त्याला मूर्तिविज्ञानाची जोड दिली. ग्रंथ अलौकिक झाला. फ्रान्स आणि भारत दोन्ही देशात गाजला. पुणे विद्यापीठाच्या अनुदानातून तो प्रसिद्ध झाला आणि आता नुकतीच त्याची दुसरी आवृत्ती निघाली.

१९५६मध्ये संत तुकारामांच्या अभंगाचे फ्रेंच भाषांतर डॉ. दलरींच्या आग्रहाखातर फ्रान्सच्या रेडिओवर प्रसारितही झाले. फादर दलरींचा 'कल्ट ऑफ विठोबा' अभ्यासल्याखेरीज देशी-विदेशी, वारकरी संप्रदाय, विठ्ठल दैवत, पंढरपूर यांच्या अभ्यासकांना पुढे जाता येणार नाही. १९६० साली डेक्कन कॉलेजने तो प्रकाशित केला. अलीकडेच प्रा. जी.ए. दलरी एक अभ्यासाचा विषय बनले असून पुण्यातील एक विदुषी त्यांचे चरित्र लिहीत आहेत, असे कळते.

एक मात्र खरे, वारकरी संप्रदाय, श्रीविठ्ठल आणि पंढरपूर यावर जर आंतरराष्ट्रीय स्तरावर अभ्यास करायचा असेल, तर फादर दलरी यांच्या 'कल्ट ऑफ विठोबा'शिवाय पर्याय नाही.

— वा.ल. मंजूळ

## फेल्डहौस, ॲन
**इतिहास संशोधक, प्राध्यापक, लेखक**
**१४ सप्टेंबर १९४९**



भारतीय साहित्य, तत्त्वज्ञान, भाषा, दैवते यांचा अभ्यास करणारी अनेक मंडळी आहेत, पण सातत्याने प्रतिवर्षी एकदोन वेळ अमेरिकेहून पुण्यात येऊन नवनवीन प्रकल्पांवर संशोधन करणाऱ्या ॲन फेल्डहौस यांच्यासारखे खूपच विरळ. गेल्या चाळीस वर्षांत शेकडोंनी शोधनिबंध-ग्रंथ-प्रकल्प-प्रवास-फिल्डवर्कद्वारे मराठी संस्कृतीच्या सर्वांगांनी विचार करणारी ही 'मराठीची लेक' पाश्चात्त्य विद्वानांत आदरणीय ठरली आहे. वयाच्या विसाव्या वर्षी बी.ए. करीत असताना १९७० साली ॲन पुण्यात प्रथम आल्या आणि पुण्याच्या संस्कृतीच्या प्रेमात अडकल्या.

१९७१ मध्ये मॅनहॅटनविले महाविद्यालयामधून बी.ए. झाल्यावर १९७६मध्ये युनिव्हर्सिटी पेन्सिल्व्हानियामधून पीएच.डी. झाल्या. त्यानंतर कोई महाविद्यालय, फोर्डहॅम विद्यापीठामध्ये पाच वर्षे प्राध्यापकी करून १९८१ ते १९८८ या काळात अरिझोना विद्यापीठात रिलिजअस स्टडीजच्या आठ वर्षे प्राध्यापिका होत्या. त्यानंतर हाइडेलबर्ग (जर्मनी), व्हीएन्ना (ऑस्ट्रिया), पॅरीस (फ्रान्स) जेरुसलेम (इस्रायल) आणि अमेरिकेत पेनसिल्व्हानिया या ठिकाणी अध्यापन केले. १९७९पासून प्रतिवर्षाला विविध प्रकल्पांच्या संशोधन-अभ्यासाच्या सुमारे बत्तीस शिष्यवृत्ती मिळवून २०११पर्यंत त्या जगभर हिंडल्या आहेत आणि नुकतीच २०११ ते २०१४ अशी तीन वर्षांची नॅशनल ग्रँट मिळवून महाराष्ट्रातील नद्या-पर्वत-वनराया यांचा जुन्या संदर्भग्रंथांद्वारे संशोधनात्मक अभ्यास करीत आहेत.

गेली काही वर्षे लंडनच्या ब्रिटिश काउन्सिल ग्रंथालयाच्या हस्तलिखित संशोधनाच्या प्रकल्पावर त्या काम करीत आहेत. महाराष्ट्रातील मराठी हस्तलिखितांचा शोध, त्यांची विवरणात्मक सूची, त्यांची डिजिटल आणि फोटो आवृत्ती तयार करणे आणि महाजालावरही प्रचंड म्हणजे सुमारे दहा हजार ग्रंथांची लिखिते, तेराव्या शतकापासून आजतागायत माहिती दाखल करणे हे काम त्या पूर्ण करीत आहेत.

मराठी हस्तलिखितांचा शोध घेण्यासाठी अनेक हस्तलिखित संग्रहालये, खासगी संग्रह, देवस्थाने, मठ-फड, परंपरागत ग्रंथ सांभाळणारे क्षेत्रस्थ यांना त्यांनी भेटी दिल्या आहेत. एकट्या पुणे शहरात त्यांना श्रीज्ञानेश्वरीची सव्वाशे हस्तलिखिते पाहावयास मिळाली आहेत. त्यांतील सर्वात जुने इ.स. १६९६ सालाचे आहे. त्याखेरीज अनेक मराठी संतांची (सुमारे तीस) चरित्रे-आत्मचरित्रे, यांच्या जुन्या पोथ्यांचा त्यांनी अभ्यास केला आहे. संत ज्ञानेश्वरांच्या नावावर असणाऱ्या चाळीस ग्रंथांचा शोध त्यांनी लावला आहे. अर्थातच या कामी त्यांना ग्रंथपाल वा. ल. मंजूळ यांचे सहकार्य मिळाले आहे.

डॉ. ॲन यांच्या संशोधनाची सुरुवात प्राचीन मराठीच्या महानुभाव संप्रदायापासून झाली. डॉ.शं.गो. तुळपुळे यांचे मार्गदर्शन त्यांना लाभले. त्यातूनच महानुभवांचा सूत्रपाठ (१९८३), रिद्धीपूरच्या दैवताचे कार्य (१९८४), वॉटर अँड वुमनहूड, रिलीजन मीनिंग ऑफ रिव्हर्स इन महाराष्ट्र (१९९५), कनेक्टेड प्लेसेस, रिजन पिलग्रिमेज अ‍ॅन्ड जिओग्राफिकल इमॅजिनेशन इन महाराष्ट्र (२००३) ही त्यांची स्वतंत्र पुस्तके आहेत.

त्यांनी अभ्यासासाठी महानुभाव साहित्य-तत्त्वज्ञान हा विषय १९७४ साली पक्का केला. ग्रंथालयातून पुस्तके वाचल्यावर, विविध मठांतील हस्तलिखिते पाहिल्यावर लक्षात आले की, या संप्रदायात खूप लिखाण झाले आहे, पण त्यांतील थोडेच इंग्लिशमध्ये आले आहे आणि जगाला माहीत झाले आहे. महानुभव वाङ्मय सांकेतिक लिपित होते. डॉ. ॲन यांनी सुरुवातीच्या काळात ती लिपीसुद्धा शिकून घेतली. महानुभाव सांप्रदायिकांच्या मठांतून हस्तलिखिते मिळवून

फ

अभ्यासली. केवढी जिद्द मराठी ज्ञानसंपादनाची! आणखी एक विशेष म्हणजे विद्यार्थिदशेत असताना पुण्याला येण्या-राहण्याच्या खर्चाची तरतूद करण्यासाठी ॲन यांनी न्यूयॉर्कमध्ये वर्षभर टॅक्सी चालविण्याची जिद्द दाखविली. पुण्याला आल्यावर सुरुवातीला कोठावळे कुटुंबीयांच्या प्रेमळ आतिथ्याच्या आणि डॉ. तुळपुळे यांच्या अभ्यासपूर्ण मार्गदर्शनाचे ऋण त्या मान्य करतात.

ॲन यांना लोकसंस्कृति-लोकधर्म-लोकदेवता या महाराष्ट्रीय वैशिष्ट्यांची उत्कंठा लागली होती. त्यांच्या मार्गदर्शनासाठी त्यांना वेगळी दृष्टी आणि शोधपद्धती हवी होती. जर्मनीतील या विषयाचे ज्येष्ठ अभ्यासक डॉ. गुंथर सोन्थायमर यांचे मार्गदर्शन लाभले. आपल्या गुरूला दक्षिणा म्हणून त्यांनी 'विठोबा-म्हसोबा व खंडोबा' या जर्मन ग्रंथाचे इंग्लिश रूपांतर करून प्रसिद्ध केले.

डिक्शनरी ऑफ ओल्ड मराठी (इ.स. १००० ते १३५०) या ग्रंथाची कल्पना डॉ. तुळपुळे यांची. सुमारे आठशे पानांच्या या अपूर्व शब्दकोशाची शास्त्रीय आखणी १९८९ मध्ये ॲन यांनी सुरू केली. पेठे, गुणे, कोपरकर या सहकाऱ्यांच्या मदतीने प्राचीन शब्द शोधणे आणि त्यांचा सर्वांगपूर्ण अभ्यास करून अर्थ मांडण्याचे काम ॲन यांनी केले. पुढे १९९४ मध्ये डॉ. तुळपुळे यांच्या निधनानंतर हे काम १९९९ मध्ये पॉप्युलर प्रकाशनातर्फे प्रकाशित करण्यापर्यंत सर्व परिश्रम ॲन यांनी घेतले. एकूण ६० फायलींमधून प्रत्येकी ३०० नोंदीचा त्यांनी अभ्यास केला. हे प्रचंड शिवधनुष्य पेलून त्यांनी प्राचीन मराठी अभ्यासातील प्राबल्य दाखविले आणि मराठीच्या ऋणातून मुक्त होण्यासाठी त्यांनी अरिझोनामध्ये प्राचीन मराठी अभ्यास मंडळही स्थापन केले. डॉ. सोन्थायमर यांनी गोळा केलेल्या धनगरी मौखिक परंपरेतील कथा-गीते त्यांनी इ.स. २००६मध्ये ग्रंथरूपाने प्रकाशित केली आणि संपादकत्वाची जबाबदारी पार पाडली. पश्चिम महाराष्ट्राच्या लोकदेवता हा सोन्थायमर यांच्या ग्रंथाचे त्यांनी १९८९मध्ये भाषांतर केले होते. अलीकडे डॉ. रा.चिं. ढेरे यांचा 'श्री विठ्ठल' हा ग्रंथ इंग्लिशमध्ये रूपांतरित करून मराठीची अस्मिता-देवता जगभर पोहोचवली. न्यूयॉर्कमधील ऑक्स्फोर्ड विद्यापीठ प्रेसने २०११मध्ये या ग्रंथाच्या प्रकाशनाचे काम पूर्ण केले.

डॉ. ॲन फेल्डहौस यांनी सुमारे आठ ग्रंथ सहकार्यांच्या मदतीने संपादन करून प्रसिद्ध केले आहेत. त्यामध्ये डॉ. लोथर लुट्झ स्मृतिग्रंथ (१९९४) मराठी साहित्य आणि धर्मपद्धतीतील स्त्रीदर्शन (१९९६), मराठी समाजातील स्त्री-दर्शन (१९९८), मराठी संस्कृतीतील घर (१९९८), डॉ. गुंथर सोन्थायमर स्मृतिग्रंथ (२००५), भारतातील प्रदेशवाद, राजकारण आणि संस्कृती (२००६) आणि दलित साहित्यासंबंधीचे डॉ. सोन्थायमर यांचे दोन ग्रंथ डॉ. फेल्डहौस ह्यांनी संपादित केले आहेत. त्यांमध्ये खंडोबा दैवतावरील शोधनिबंध (१९९७) आणि धर्म-साहित्य आणि कायदा यांवरील डॉ. सोन्थायमर यांचे शोधनिबंध (२००४) आहेत. याशिवाय डॉ. फेल्डहौस यांचे महत्त्वाचे संशोधन म्हणजे विविध परिषदांमधून वाचलेले शोधनिबंध, गौरव-स्मृतिग्रंथांतून मांडलेले संशोधनात्मक विचार, विविध नियतकालिकांतील संशोधनात्मक लेखन, अशा निबंधांची संख्या सुमारे चाळीस होते. त्यांमधील काही विभाग असे.

१) महानुभाव संप्रदाय, गुंडमराऊळ, महानुभावकालीन महाराष्ट्र, रिद्धिपूर, महानुभावांच्या यात्रा, महानुभवांचा कर्मठपणा.

२) मराठी संतविषयक लेखन, बहिणाबाई स्त्री-संत; मराठी स्त्री-संत, महाराष्ट्राच्या यात्रा-जत्रा, पुण्यभूमी महाराष्ट्र, गोंधळी परंपरा, महाराष्ट्रातील नद्या-उपवने, धार्मिक भूगोल, उत्सवी पुणे इत्यादी.

३) दैवते लोकदेवता, शिवदेवता, नद्या-पर्वत, महाराष्ट्रातील नदीदेवता, पैठण, मराठी धार्मिक संप्रदाय, गौतमी माहात्म्य इत्यादी.

अलीकडील ३-४ वर्षे महाराष्ट्रातील नद्या-पर्वत यांचा जुन्या माहात्म्य ग्रंथांच्या आधारे संशोधन करण्याचा त्यांचा प्रकल्प चालू आहे. जानेवारी-फेब्रुवारी २०१२मध्ये त्यांनी त्र्यंबकेश्वर, भीमाशंकर,

फ

महाबळेश्वर, औरंगाबाद अशा वाऱ्या करून शोध घेण्याचा प्रयत्न केला आहे.

कै. दिलीप चित्रे यांच्या कार्याविषयी त्यांना खूप आत्मीयता होती. त्यांच्या काही आठवणी त्यांनी शब्दबद्ध केल्या आहेत. ‘श्रीविठ्ठल’ आणि ‘पंढरपूर’ या ग्रंथांचे संपादन डॉ. झेलिस्ट यांच्या सहकार्याने त्या करीत आहेत. महाराष्ट्रातील जत्रा-यात्रा आणि लोकदेवता यांवरही त्या संशोधन करीत आहेत. ‘तेराव्या शतकातील महाराष्ट्र’ हा मोठा प्रकल्प त्यांनी नुकताच सुरू केला आहे.

मराठी हस्तलिखितांची महाराष्ट्रातील परवड पाहून लंडनच्या ब्रिटिश काउन्सिल ग्रंथालयातर्फे अशा ग्रंथांचे मायक्रोफिल्मिंग आणि डिजिटायजेशन असा एक तीन वर्षांचा प्रकल्प त्यांनी नुकताच पूर्ण केला आहे. ज्या वेळी हे ग्रंथ विवरणात्मक सूचीमधून महाजालाच्या माध्यमातून अभ्यासकांसमोर येतील, त्या वेळी या संशोधन कार्याचे महत्त्व लक्षात येईल.

भारत-महाराष्ट्र यासंबंधीचे गेल्या पंचेचाळीस वर्षांतील त्यांचे शोधकार्य पाहून अनेक संस्थांशी त्यांचा संबंध आहे. त्यामध्ये अमेरिकन अकादमी ऑफ रिलीजन, मेंबर ऑफ एशिअन स्टडीज कमिटी, बोर्ड डायरेक्टर साउथ एशिअन स्टडीज, अमेरिकन ओरिएन्टल स्टडीज, महाराष्ट्र कल्चर ॲण्ड सोसायटी कॉन्फरन्स फाउंडर मेंबर, सिलेक्शन कमिटी सदस्य, अमेरिकन इन्स्टिट्यूट ऑफ इंडिअन स्टडीज, एशिअन स्टडीजच्या उपाध्यक्ष, अध्यक्षा इत्यादी.

— वा.ल. मंजूळ

## फ्लीट, जॉन फेथफुल

### शिलालेख - ताम्रपटवाचक व संशोधक

### १८४७ – १९१७

जॉन फेथफुल फ्लीट हे लंडनच्या मर्चन्ट्स टेलर स्कूल व युनिव्हर्सिटी कॉलेजमधून आपले शिक्षण संपवून इंडियन सिव्हिल सर्व्हिसमध्ये शिरले. हिंदुस्थानामध्ये येणाऱ्या माणसाला त्या वेळी आवश्यक समजल्या जाणाऱ्या संस्कृत भाषेचे जुजबी शिक्षण घेऊन १८६८मध्ये ते हिंदुस्थानात आले.

मुंबई प्रांतात आल्यावर यांनी असिस्टन्ट कलेक्टर, एज्युकेशनल इन्स्पेक्टर, हिंदुस्थान सरकारच्या एपिग्राफिकल डिपार्टमेन्टचे पहिले प्रमुख, कस्टम्स कमिशनर अशी अनेक कामे केली. कार्यनिवृत्तीनंतर १८९७मध्ये ते एलिंग येथील आपल्या निवासस्थानी कार्यमग्न झाले. रॉयल एशियाटिक सोसायटीचे ते कित्येक वर्षे सेक्रेटरी होते. त्यांच्या संशोधनकार्याबद्दल १९१२मध्ये त्या संस्थेने त्यांना सुवर्णपदक दिले.

‘Pali, Sanskrit and Old Kanarese Inscriptions’ हा यांच्या शिलालेखसंग्रहातील पहिला महत्त्वाचा ग्रंथ होय. सहाव्या शतकापासून ते सोळाव्या शतकापर्यंतचा दक्षिण हिंदुस्थानाचा सुसंगत इतिहास सादर करणाऱ्या शिलालेखांचा संग्रह पूर्वी अनेकांनी केला होता. परंतु अद्ययावत माहितीचा उपयोग करण्याच्या त्यांच्या कार्यपद्धतीमुळे, त्यांचे हे संपादन विशेष यशस्वी ठरले. सरकारी मदतीच्या अपूर्णतेमुळे या ग्रंथाच्या फक्त नऊच प्रती छापण्यात आल्या.

‘Inscriptions of the Early Gupta Kings and their Successors’ या आपल्या ग्रंथात त्यांनी गुप्तकालीन ८१ शिलालेख त्यांच्या इंग्लिश अनुवादासह प्रसिद्ध केले. राजपुतान्यांपैकी गंगाधार (झालवड राज्य) येथे मिळालेला (सन ४३२) व विजयगढ येथे मिळालेला यौधेयांचा व विष्णुवर्धनाचे (३७०) हे या ग्रंथात देण्यात आलेले शिलालेख विशेष महत्त्वाचे आहेत. परंतु यापेक्षाही गुप्तराजांची कालनिश्चिती हा या ग्रंथाचा प्रमुख विशेष होय. हिंदी व परदेशी कालगणनापद्धतीतील फरकामुळे जुन्या इतिहासातील कालक्रम ठरवणे मुश्किल होई. त्यातही गुप्त घराण्याच्या इतिहासात वीसपेक्षा अधिक कालपद्धतींच्या झालेल्या गल्लतींमुळे ते काम विशेष कठीण झाले. अशा स्थितीत यांनी प्रथम मन्दॅसोर शिलालेखावरून व नंतर केरो लक्ष्मण छत्रे यांनी प्रसिद्ध केलेल्या दोन कालगणनापद्धतींची सांगड घालणाऱ्या कोष्टकांवरून गुप्त राजांची सुरुवात ३१९-३२० ठरवली.

पुढे का.बा. पाठक यांनी जैन ग्रंथांच्या साहाय्याने काढलेल्या निष्कर्षाने त्यांच्या या सिद्धान्ताला पुष्टीच दिली. 'The Dynasties of Kanarese Districts' हा त्यांचा आणखी एक महत्त्वाचा ग्रंथ होय. कॅम्बेलने प्रसिद्ध केलेल्या मुंबई गॅझेटियरच्या पहिल्या खंडातील दुसरा भाग म्हणून हा ग्रंथ प्रसिद्ध करण्यात आला. हिंदुस्थानच्या पश्चिम भागातील जाती-पोटजातींची संगतवार माहिती पुरवणारा असा ग्रंथ प्रथमच झाला.

परंतु यापेक्षाही 'इंडियन अ‍ॅन्टिक्वेरी', 'अर्किऑलॉजिकल रिपोर्ट्स ऑफ वेस्टर्न इंडिया' व 'एपिग्राफिया इंडिका' यातून त्यांनी केलेले स्फुट लिखाण विशेष महत्त्वाचे आहे. बऱ्याच शिलालेखांचे अनुवाद त्यांनी प्रसिद्ध केले. इंडियन अ‍ॅन्टिक्वरीमध्ये त्यांनी प्रसिद्ध केलेली शिलालेखांविषयीची लेखमाला विशेष महत्त्वाची आहे. शिलालेखांवरील रंग पुसण्यापासून ते थेट त्यांचा अनुवाद करेपर्यंतची सर्व माहिती त्यात देण्यात आली आहे. ते १८८५-१८९१ या कालावधीमध्ये सहा वर्षे इंडियन अ‍ॅन्टिक्वरीचे संपादक होते .

दिल्ली व अलाहाबाद येथील अशोकाच्या स्तंभलेखांच्या मूळ प्रती व त्यांच्या अनुवादाचे प्रकाशन हे त्यांचे आणखी एक महत्त्वाचे कार्य होय. हिंदुस्थानातील गावांची नावे व त्यांची पूर्वठिकाणे ही संशोधनशाखा आयुष्याच्या शेवटी त्यांचा विचारविषय झाली होती. देशी व परदेशी भाषांवरील अजोड प्रभुत्व व केवळ अभ्यासकाची दृष्टी ठेवून काम करण्याची त्यांची पद्धत यांमुळे हिंदी शिलालेखांच्या ज्ञात्यांतील प्रमुख स्थानास ते पोहोचले. आयुष्याच्या अगदी शेवटच्या कालखंडातही आपल्या ग्रंथातील चुका दुरुस्त करण्यासाठी त्यांच्या नव्या आवृत्त्या काढण्याची तळमळ त्यांना लागली होती.

- संपादित

**संदर्भ :**


१. *अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*


***

फ

# ब

## बर्कसन, कार्मेल

**संशोधक, उत्कृष्ट शिल्पकार, छायाचित्रकार, लेखिका**

**१९२४**



अमेरिकेसारख्या भौतिकदृष्ट्या संपन्न असणाऱ्या देशात जन्म घेऊन, भारतीय शिल्पकलेच्या आणि संस्कृतीच्या प्रेमात पडून, भारत हेच आपल कार्यक्षेत्र करण्याऱ्या कार्मेल बर्कसन या भारतीय शिल्पकलेच्या इतिहासात महत्त्वपूर्ण योगदान देणाऱ्या कला-इतिहासतज्ज्ञ होत!

इब्राहिम अलकाझी यांच्या मते -‘कार्मेल बर्कसन यांचे आयुष्य म्हणजे भारतीय अभिजात शिल्पकलेतील सामर्थ्याचे रहस्य उलगडण्यासाठी केलेला एक झपाटलेला प्रवास आहे. त्यांच्या अन्तर्दृष्टीतील आणि अन्वयार्थातील सखोलता यांची प्रचीती त्यांच्या भेदक नजरेतून तर येतेच, पण त्याहीपेक्षा शिल्पकर्ती म्हणून केलेल्या कलात्मक निर्मितीतून येते. सर्जनात्मक दृष्टी आणि आध्यात्मिक गहनता जपणाऱ्या भारताच्या समृद्ध इतिहासाशी नाळ जोडणे आणि आधुनिक काळाशी त्याचा संबंध प्रस्थापित करणे या कार्यात त्यांनी आपले अवघे आयुष्य खर्ची केले. आणि म्हणूनच आजच्या युगातील शिल्पकारांना आणि विद्वत्‌जनांना मार्गदर्शक ठरणारे एक महान कार्य उभे राहिले.’

कार्मेल बर्कसन यांचा जन्म न्यूयॉर्क, अमेरिका येथे झाला. ड्यूक विद्यापीठातून इतिहासाची पदवी घेतल्यानंतर, कोलंबिया विद्यापीठात प्रथितयश शिल्पकार मिल्टन हेबाल्ड यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी शिल्पकलेचा अभ्यास केला. पुढील काही वर्षे पती मार्टिन फ्लेशर यांच्यासोबत वैवाहिक आयुष्य व्यतीत करत असतानाच, माती, लाकूड, प्लास्टर आणि धातू यांपासून शिल्पनिर्मिती करण्यात त्या मग्न होत्या. परंतु १९७०साली पर्यटक म्हणून त्या भारतामध्ये आल्या आणि त्यांच्या आयुष्याला कलाटणी मिळाली.

भारताच्या प्राचीन लेण्यांमधील विशेषत: एलिफंटा, वेरूळ आणि महाबलिपुरम्‌ येथील कोरीव शिल्पांनी त्या अत्यंत प्रभावित झाल्या. इथल्या शिल्पांमध्ये एकवटलेली ऊर्जा आणि प्रतीत झालेली भारतीय परंपरा यांकडे आकर्षित होऊन त्यांनी शिल्पकलेचे आपले काम बाजूला ठेवले आणि भारताविषयी अधिक जाणून घेण्यास सुरुवात केली. भारताचा वैभवशाली इतिहास आणि सौंदर्यपूर्ण कलानिर्मिती यांमागची आध्यात्मिक बैठक यांनी त्यांच्यातला संवेदनशील कलावंत अस्वस्थ झाला.

१९७७ साली पाठीवर एक बॅग, हातात कॅमेरा, मनात इतिहासकाराची उत्सुकता आणि हृदयात अस्वस्थ कलावंताची तरलता सोबतीला घेऊन त्या भारतभ्रमणाला सज्ज झाल्या. त्यानंतर तब्बल २० वर्षे सातत्याने भारतभरातील शेकडो शिल्पांची, लेण्यांची, मंदिरांची छायाचित्रे घेतली. त्यांचा बारकाईने अभ्यास केला आणि त्याबद्दल संशोधनात्मक लिखाण केले. प्राचीन भारतीय शिल्पांची छायाचित्रे, त्यांचा अंतस्थ दृष्टीने घेतलेला वेध आणि त्यावरील संशोधनावर आधारित विश्लेषण असणारी त्यांची पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत.

वेरूळच्या लेण्यांवरील पुस्तक, एलिफंटा गुंफावरील पुस्तक किंवा औरंगाबादमधील शिल्पांचे पुस्तक असो, कार्मेल बर्कसन यांच्यातली चिकित्सक संशोधिका प्रकर्षाने जाणवत राहते. त्यांची अभ्यासू वृत्ती आणि विश्लेषणात्मक लेखनपद्धती यांमुळे त्यांची पुस्तके भारतीय शिल्पकलेच्या अभ्यासकांना अत्यंत उपयुक्त ठरली आहेत. 'Indian Sculpture - Towards The Rebirth of Aesthetics' (2005) हे कार्मेल बर्कसन यांचे सर्वांत अलीकडच्या काळात प्रसिद्ध झालेले पुस्तक, आधुनिक भारतीय शिल्पकारांना पथदर्शक ठरावे असेच आहे.

प्राचीन भारतीय शिल्पकलेच्या या ओघवत्या शोधप्रवासात त्यांनी काढलेल्या शेकडो छायाचित्रांची प्रदर्शने वेळोवेळी भारतात आणि परदेशातही झाली. भारतातील शिल्पकृतींच्या संग्रहाचे (Documentation) एक मोठे कार्य अनायसेच त्यांच्या हातून झाले.

१९७७पासून भारतामध्ये वास्तव्य करून राहणाऱ्या श्रीमती बर्कसन या २००१साली पुन्हा एकदा शिल्पनिर्मितीकडे वळल्या. पण या वेळी त्यांनी अनुभवलेल्या, शोधलेल्या प्राचीन भारतीय शिल्पकलेतील प्रेरणा घेऊनच शिल्पनिर्मितीकडे वळल्या त्यामुळे त्यांच्या शिल्पकृतींना एक वेगळेच परिमाण लाभले.

भारतीय शिल्पकलेतील त्यांच्या या कार्याचा यथोचित गौरव २०१०साली राष्ट्रपती प्रतिभा पाटील यांच्या हस्ते पद्मश्री पुरस्कार देऊन, व एशियाटिक सोसायटी मुंबईची सन्माननीय फेलोशिप देऊन करण्यात आला. भारतातील अप्रतिम लेणी, मंदिरे, आश्चर्यकारक कोरीव काम यांतील वैशिष्ट्यांबद्दल बोलताना बर्कसन म्हणतात,'भारतीय शिल्पकला ही कधीच वैयक्तिक पातळीपुरती मर्यादित राहिली नाही. राजसत्ता, पाण्डित्य, कलावंत, कारागीर, स्थापत्यकार या साऱ्यांच्या सुरेख समन्वयातून येथील अजरामर शिल्पकृतींचा जन्म झालेला दिसतो.'

आजच्या स्पर्धात्मक युगात टिकाव धरण्यासाठी, पाश्चात्यांचे निवळ अंधानुकरण करणाऱ्या तथाकथित भारतीय शिल्पकारांना मोलाचा सल्ला देताना त्या म्हणतात, 'सद्यःकालीन भारतीय शिल्पकार केवळ आर्थिक फायद्यासाठी आजच्या युगाशी आपल्या कलाकृतींचा संबंध जोडण्यात प्रयत्नशील दिसतात. परंतु तसे करतानादेखील आपल्या पूर्वजांनी साकारलेल्या शिल्पांतील सौंदर्यशास्त्राचा विसर त्यांनी पडू देता कामा नये. तरच भारतीय शिल्पांतील चैतन्य अबाधित राहील.'

कार्मेल बर्कसन यांच्या मते, अभिजात कलावंत हा कोणत्याही मातीत जन्मलेला असो, त्याची संस्कृती, इतिहासाची भिन्नता यांमुळे त्याच्या कलाकृतीच्या बाह्य स्वरूपात जरी भिन्नता दिसली, तरीही त्यामागील अंतस्थ प्रेरणा ही सर्वत्र सारखीच आढळते.

बर्कसन यांच्या उदाहरणावरूनच त्यांच्या बोलण्यातील सत्यता दिसून येते. खरोखरच, अभारतीय असूनही भारतातील आणि महाराष्ट्रातील शिल्पांनी भारावून जाऊन भारतीय शिल्पकलेला आपलेसे करणाऱ्या आणि तिच्यातील सजीवता जपण्यासाठी अवघे आयुष्य अर्पण करणाऱ्या कार्मेल बर्कसन, आधुनिक काळातील एक आदर्शच बनून राहिल्या आहेत!

— डॉ. सीमा सोनटक्के

ब

## बर्जेस, जेम्स

**भारतीय लिपिशास्त्राचे अभ्यासक, पुरातत्त्वज्ञ, इतिहासतज्ज्ञ**

**१८३२ – १९१६**

भारतात येऊन संस्कृती जाणून घेण्याचा प्रयत्न करताना, इथली पुरातन स्थापत्ये, शिल्पे, शिलालेख इत्यादींनी अचंबित होऊन आपला वैभवशाली इतिहास शोधून काढण्याचे आणि हा अमूल्य ठेवा लिखित स्वरूपात जतन करून भारतीयांच्या हातात अलगदपणे ठेवण्याचे महान कार्य करणारे एक भारदस्त व्यक्तिमत्त्व म्हणजे डॉ. जेम्स बर्जेस.

भारतातील Epigraphy चे (लिपिशास्त्राचे)



अभ्यासक, ज्येष्ठ पुरातत्त्वज्ञ, इतिहासतज्ज्ञ, 'Archaeological Survey of India'ची धुरा समर्थपणे सांभाळणारे कुशल संयोजक जेम्स बर्जेस म्हणजे एक उत्तुंग माणूस! इंग्लंडमधील डम्फ्रेशायर येथे जन्मलेल्या बर्जेस यांचे शिक्षण एडिंबर्ग येथे झाले. १८५६ साली भारतात आल्यानंतर कलकत्ता येथील शैक्षणिक कामात ते व्यग्र होते.

त्यानंतर १८६१मध्ये ब्रिटिश सरकारने मुंबईला त्यांची बदली केली. मुंबईच्या परिसरातील पुरातन वास्तूंकडे आकर्षित होऊन त्यांनी इतिहासाचा आणि स्थापत्यशास्त्राचा अभ्यास सुरू केला, हाच अभ्यास त्यांच्या पुढील आयुष्यातील महान कार्याची पायाभरणी करणारा ठरला. 'रॉयल एशियाटिक सोसायटी'चे सभासद झाल्यानंतर १८६९मध्ये त्यांनी आपले पहिले पुस्तक 'The Temples of Satrunjay' प्रसिद्ध केले आणि लागोपाठच 'Rock-cut Temples of Elephanta' हेसुद्धा प्रसिद्ध केले. 'Bombay Geographical Society'चे कार्यवाह म्हणून त्यांची नियुक्ती करण्यात आली. १८७२ साली 'The Indian Antiquary' हे नियतकालिक त्यांनी सुरू केले. पुढील १३ वर्षे त्यांनी या नियतकालिकाचे संपादकत्व सांभाळले. हे नियतकालिक म्हणजे भारतीय इतिहासाच्या पाऊलखुणांचा शास्त्रोक्त पद्धतीने घेतलेला वेध. बर्जेस यांच्या कामाचा हा झपाटा पाहून १८७३ साली 'Archaeological Survey of Western India'च्या प्रमुखपदाची धुरा त्यांच्यावर सोपवण्यात आली.

तोपर्यंत उत्तर भारतातील ऐतिहासिक वास्तूंच्या अभ्यासावर अधिक भर देण्यात आला होता. उर्वरित भारतातील अनमोल खजिना दुर्लक्षित होता. बर्जेस यांनी अमाप उत्साहाने आणि पद्धतशीरपणे या प्राचीन वास्तूंचा अभ्यास आरंभला आणि फलित म्हणून 'Report on the Antiquities of the Belgaum Kaladgi Districts' (1874) हा अहवाल प्रसिद्ध झाला. हा आणि या मागोमाग प्रकाशित झालेले सर्वेक्षणाचे अहवाल म्हणजे प्राचीन भारतीय इतिहास आणि स्थापत्यकला यांचे त्यांचे उत्कृष्ट संदर्भग्रंथच बनले. उत्तम प्रतीचा कागद, उत्कृष्ट बांधणी आणि ऐतिहासिक वास्तूंच्या छायाचित्रांसह असणारा माहितीपूर्ण संग्रह ही या अहवालांची वैशिष्ट्ये म्हणावी लागतील. १८८१मध्ये दक्षिण भारतातील सर्वेक्षणाची जबाबदारी पार पाडताना तामिळ आणि संस्कृत शिलालेखांच्या अभ्यासावर त्यांनी विशेष लक्ष केंद्रित केले होते.

पश्चिम आणि दक्षिण भारतातील त्यांच्या या घोडदौडीनंतर १८८६मध्ये. संपूर्ण देशाच्याच पुरातत्त्व खात्याची जबाबदारी बर्जेस यांच्या समर्थ हातात सोपवण्यात आली. Archaeological Survey of Indiaच्या प्रमुखपदी असताना त्यांच्या आयुष्यातील अत्यंत महत्त्वपूर्ण कार्य घडून आले. संपूर्ण भारतात-विशेषत: दक्षिण भारतात अनेक प्राचीन शिलालेख आणि ताम्रपट लेख सर्वेक्षणातून उपलब्ध झाले होते. त्या सर्व लेखांचे लिप्यंतरण आणि भाषांतर करवून घेऊन त्यांचे पद्धतशीरपणे प्रकाशन करण्याचे श्रेय बर्जेस यांच्याकडे जाते. 'Epigraphia Indica'चा पहिलाच खंड आला तो याकोबी, फ्लीट यांच्यासारख्या विद्वानांच्या वैशिष्ट्यपूर्ण लेखांसह! १८९२ साली सुरू झालेली 'Epigraphia Indica'ची परंपरा पुढील १४ वर्षे सातत्याने प्रकाशित करण्याची अत्यंत अवघड कामगिरी बर्जेस यांनी पार पाडली. खरे तर मधल्या काळात ते सरकारी नोकरीतून निवृत्त झाले होते. परंतु तरीही या प्रकाशनांची जबाबदारी त्यांनी उत्साहाने पार पाडली. बर्जेस यांच्याच शब्दात सांगायचे झाले तर "Epigraphia Indicaमधील ऐतिहासिक पुरावे म्हणजे अन्य कुठल्याही देशापेक्षा काकणभर सरस असणारे प्राचीन इतिहासाचे साक्षीदार ठरणारे दस्तऐवज आहेत.''

ब

आपल्या पूर्वजांनी स्वत:च्या शब्दात मांडून ठेवलेले लिखित पुरावे उपलब्ध झाल्याने तत्कालीन समाजाचे एक चित्रच आपल्यापुढे उलगडले गेले. या खंडामुळे प्राचीन काळातील भारतीय समाजव्यवस्था, धर्मव्यवस्था, चालीरिती इत्यादीवर प्रकाश पडलाच, त्याचबरोबर प्राचीन भारतातील भौगोलिक संदर्भ, बोलल्या जाणाऱ्या विविध भाषा, लेखनाच्या पद्धती इत्यादीची माहितीसुद्धा उपलब्ध झाली. विविध राजवंश, त्यांचे परस्परांमधील संबंध, शिष्टाचार यांच्या अभ्यासासाठीसुद्धा या नियतकालिकातील लेखांचा उपयोग झाला. खरे तर काळाच्या पडद्यामागे दडून बसलेल्या, गाडल्या गेलेल्या प्राचीन भारतीय इतिहासाचे पुनरुत्थानच या निमित्ताने झाले. इतिहासाचे भान हे आपल्या मातृभूमीशी नाते अधिक घट्ट करण्यास कारणीभूत ठरतेच, तसेच आपल्या अभ्युदयाची दिशा निश्चित करते. जेम्स बर्जेस यांनी केलेल्या कार्याचे महत्त्व अनन्य आहे.

Indology क्षेत्रामध्ये इतके मोलाचे योगदान देणाऱ्या जेम्स बर्जेस यांनी निरलसपणे आणि अखंडपणे या कार्यात स्वत:ला वाहून घेतले होते. असामान्य आत्मविश्वास, झोकून देण्याची वृत्ती आणि मन:शक्ती यांच्या बळावर जेम्स बर्जेस यांनी आश्चर्य वाटावे इतके कार्य केले. विविध संस्थांनी त्यांना मानद पदव्या देऊन त्यांच्या कार्याचा गौरव केला. तसेच जागतिक स्तरावरील अनेक संस्थांची गौरवपदे त्यांनी भूषवली. उदाहरणार्थ रॉयल सोसायटी ऑफ एडीबंरोचे ते मानद सदस्य होते, तर इंपिरियल रशियन आर्किऑलॉजिकल सोसायटी, अमेरिकन ओरिएंटल सोसायटी, रॉयल फिलॉसॉफीकल सोसायटी ऑफ ग्लासगो इत्यादींचे सभासदत्व त्यांनी भूषवले.

आयुष्याच्या उत्तरार्धात हृदयविकाराने त्यांना ग्रासले, परंतु तरीसुद्धा त्यांचा उत्साह कमी झाला नव्हता. पुरातत्त्व क्षेत्रात काम करणाऱ्या, धडपडणाऱ्या कैक संस्थांसाठी आणि लोकांसाठी त्यांनी मदतीचा हात पुढे केला. पुढील पिढीतील उत्सुक अभ्यासकांना स्वत:च्या अनुभवसंपन्नतेचा आणि ज्ञानाचा फायदा व्हावा, यासाठी ते स्वत:च्या प्रकृतीचाही विचार बाजूला ठेवत असत. खरोखरच, कामावरील त्यांची निष्ठा, अथक प्रयत्नांची शिकस्त, कार्य तडीस नेण्याची जिद्द आणि तळमळ वाखाणण्याजोगी आहे. ज्ञानाच्या या अगाध सागराने स्वत:चे जीवन तर समृद्ध केलेच, तसेच आपल्या कामाने भारतीयांची मनेही जिंकली.

— डॉ. सीमा सोनटक्के

## बहुलकर, श्रीकांत शंकर
**बौद्धविद्या व वेदविद्या अभ्यासक**
**१४ डिसेंबर १९४९**



पुणे जिल्ह्यातील खेड तालुक्यातील बहुळ या खेड्यात यांचा जन्म झाला. तेथील प्राथमिक शिक्षणानंतर पुणे शहरात माध्यमिक शिक्षण झाले. संस्कृत विषय घेऊन स. प. महाविद्यालयातून बी.ए. उत्तीर्ण होऊन नंतर पुणे विद्यापीठातून वेद विषयात एम. ए. तसेच अथर्ववेदातील भैषज्य या विषयावर पीएच.डी.ची पदवी त्यांनी संपादन केली. रा. ना. दांडेकर, चिं. ग. काशीकर, शि. द. जोशी, ग. बा. पळसुले, पु. द. नवाथे इत्यादी ख्यातनाम विद्वानांचे मार्गदर्शन त्यांना लाभले. टिळक महाराष्ट्र विद्यापीठामध्येही त्यांनी अध्ययन केले. तिथे पं. वामनशास्त्री भागवत यांच्या कार्याचा मोठा प्रभाव त्यांच्यावर पडला. जपान देशातील नागोया विद्यापीठात संशोधन आणि अध्यापन यांकरीता १९७८-७९मध्ये त्यांना निमंत्रित करण्यात आले होते. तेथून परत आल्यानंतर डेक्कन महाविद्यालयातील संस्कृत कोश प्रकल्पामध्ये त्यांनी उपसंपादक म्हणून काम पाहिले.

१९८१मध्ये टिळक महाराष्ट्र विद्यापीठाच्या श्रीबालमुकुंद संस्कृत महाविद्यालयाचे प्राचार्य म्हणून

ब

त्यांची नियुक्ती झाली आणि या विभागाचे प्रमुख तसेच प्राध्यापक म्हणून २००९पर्यंत ते कार्यरत होते. सारनाथ (जि. वाराणसी, उत्तर प्रदेश) येथील केंद्रीय उच्च तिब्बती अध्ययन विश्वविद्यालयातील 'दुर्लभ बौद्ध ग्रंथ संशोधन प्रकल्प' याचे संचालक आणि मुख्य संपादक म्हणून त्यांनी काम पाहिलेले आहे. प्राच्यविद्येच्या क्षेत्रातील अनेक संस्थांशी त्यांचा घनिष्ठ परिचय असून अनेक संस्थांच्या अधिकार मंडळावर त्यांनी काम केलेले आहे. बृहन्महाराष्ट्र प्राच्यविद्या परिषदेचे ते संस्थापक सचिव आहेत.

जपान, कॅनडा, डेन्मार्क, जर्मनी, द नेदरलँडस, रोमानिया, फिनलँड, रशिया, अमेरिका इत्यादी देशांमध्ये व्याख्याने, परिषदा यांकरीता त्यांचा प्रवास झालेला आहे. आजवर कॅनडातील ब्रिटिश कोलंबिया विद्यापीठ, जर्मनीतील फ्राय विद्यापीठ, तसेच हार्वर्ड विद्यापीठ या ठिकाणी त्यांना अध्यापनाकरता पाचारण करण्यात आले आहे. संस्कृतचे 'राष्ट्रीय अधिव्याख्याता' म्हणून भारत सरकारने त्यांना १९८६-८७मध्ये सन्मानपूर्वक नियुक्त केले होते. एकूण ११ विद्यार्थ्यांनी त्यांच्या मार्गदर्शनाखाली पीएच.डी.ची पदवी संपादन केली आहे. बहुलकर यांचा प्रबंध 'मेडिकल रिच्युअल इन द अथर्ववेद ट्रॅडिशन' या नावाने प्रकाशित झालेला असून त्या विषयावर त्यांनी पुढेही मोठे संशोधन केले आहे. अथर्ववेदीय कौशिकसूत्राच्या कौशिक पद्धति या ग्रंथाचे ते एक संपादक होते. पवित्रेष्टि या यज्ञाची माहिती सांगणाऱ्या 'इंडियन फायर रिच्युअल' या ग्रंथाचे ते सहलेखक आहेत.

अथर्ववेद आणि आयुर्वेद यांच्या तौलनिक अभ्यासाच्या क्षेत्रात त्यांचे काम जागतिक ख्यातीचे आहे. डेन्मार्क शासनाच्या अर्थसाहाय्याने ध्वनिमुद्रणाच्या माध्यमातून वेदांचे जतन करण्याच्या कामी पुढाकार घेऊन त्यांनी ते ध्वनिमुद्रण वेदशास्त्रोत्तेजक सभा या संस्थेकडे सुपुर्द केले. आहारशास्त्र हा त्यांच्या अभ्यासाचा विषय असून या विषयाची संशोधन-सूची त्यांनी संपादित केली आहे. याचबरोबर विविध विषयांवरचे सुमारे सत्तर शोधनिबंध त्यांच्या नावावर जमा आहेत. बौद्धविद्या विशेषत: तिबेटी बौद्ध परंपरा हा विषय प्राच्यविद्येच्या मोजक्याच भारतीय अभ्यासकांनी हाताळलेला आहे. १९७७-७८मध्ये जपानमध्ये असताना बहुलकर यांनी तिबेटी भाषेचा अभ्यास केला. तेथील प्राध्यापक ताचिकावा तसेच पुण्यातील वि.वि. गोखले यांच्याबरोबर त्यांनी तिबेटी ग्रंथांचे अध्ययन केले.

१९८५मध्ये त्यांनी भावविवेकाच्या 'मध्यमक-हृदय-तर्क-ज्वाला' या ग्रंथाच्या पहिल्या प्रकरणाचे अनुवादासहित संपादन करण्याच्या कामी त्यांनी डॉ. वा. वि. गोखले यांना साहाय्य केले. 'गुह्यसमाज-तंत्र' या महत्त्वाच्या तंत्रग्रंथावरील चंद्रकीर्तीची 'प्रदीपोद्योतन' नामक टीका संपादित करण्याचा प्रकल्प त्यांनी हाती घेतला. कालचक्रतंत्र या ग्रंथाची विमलप्रभा ही संस्कृत टीका प्रकाशित करण्याच्या सारनाथ येथील उच्च तिब्बती अध्ययन संस्थेच्या उपक्रमाचे ते अध्वर्यू होते. तसेच त्या संस्थेच्या 'धी:' या संशोधन-नियतकालिकाचे संपादकही होते. बौद्ध स्तोत्रसाहित्याचाही त्यांचा मोठा अभ्यास आहे. 'श्रद्धा-त्रय-प्रकाशन' या नावाचे त्यांचे संस्कृत काव्य खुद्द दलाई लामा यांच्याकडून वाखाणले गेले आहे.

बहुलकर हे एक श्रेष्ठ दर्जाचे कवी असून आजवर त्यांनी सुमारे १५ रचना केल्या आहेत. संस्कृतातील गद्य आणि पद्य या दोन्ही काव्यप्रकारांवर त्यांची चांगली हुकमत आहे. अभिजातता, व्याकरणशुद्धता, लयबद्धता आणि वृत्तबद्धता, सोपेपणा आणि प्रासंगिक तसाच शाब्दिक सूक्ष्म विनोद ही त्यांच्या लेखनाची (आणि भाषण-संभाषणाचीही) वैशिष्ट्ये म्हणून सांगता येतील. 'मुलगी झाली हो' या पथनाट्याचे 'अर्थो हि कन्या' या नावाने त्यांनी केलेले भाषांतर अतिशय गाजले होते.

सध्या पुणे विद्यापीठातील पाली आणि बौद्धविद्या अध्ययन विभागात अभ्यागत प्राध्यापक म्हणून ते कार्यरत आहेत.

— डॉ. श्रीनंद बापट

## बाकरे, अलका
**संस्कृत व समाजशास्त्र अभ्यासक**
**१० ऑक्टोबर १९४२**



मुंबई विद्यापीठाच्या संस्कृत विभागात (१९९३-१९९४) आरंभी प्रपाठक म्हणून, आर. जी. भांडारकर संस्थेत प्राध्यापक व नंतर विभागप्रमुख (२०००-२००२) म्हणून कार्य केलेल्या डॉ. अलका बाकरे यांच्या कार्याचा ८ सप्टेंबर २०११ रोजी महाराष्ट्र शासनाने 'महाकवी कालिदास संस्कृत साधना पुरस्कार' देऊन उचित गौरव केला. संस्कृतबरोबर इतर विषयांतील त्यांचा अभ्यास उल्लेखनीय आहे. संस्कृतप्रमाणेच समाजशास्त्र या विषयातदेखील त्या अधिस्नातक पदवी प्राप्त आहेत. त्याशिवाय अर्धमागधी या प्राकृत भाषेवरही त्यांचे प्रभुत्व आहे. अद्वैत तत्त्वज्ञान ही त्यांची विशेष आवड आहे. १९६४पासून १९९३पर्यंत त्यांनी रामनारायण रुईया महाविद्यालयात व नंतर ऑक्टोबर १९९४ पासून २००२ पर्यंत मुंबई विद्यापीठात अध्यापनाचे कार्य केले. आजतागायत त्यांचे अध्यापनाचे कार्य अखंड सुरू आहे. त्यांच्या मार्गदर्शनाखाली सात विद्यार्थ्यांनी विद्यावाचस्पती (पीएच.डी.) पदवी प्राप्त केली असून तीन विद्यार्थ्यांचे संशोधनाचे काम सुरू आहे.

अनेक राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय चर्चासत्रे, परिषदा व अधिवेशने यांतून त्यांनी सादर केलेल्या शोधनिबंधांची यादी फार मोठी आहे. याशिवाय केवळ भारतातच नव्हे, तर भारताबाहेरील आंतरराष्ट्रीय चर्चासत्रांतूनदेखील त्यांनी अध्यक्षपदाची धुरा सांभाळली आहे.

ईस्टर्न बुक लिंकर्स, दिल्ली यांनी 'रिलिजन इन सोशल फ्लक्स ॲज सीन इन द मेन पुराणाज' हा त्यांचा ग्रंथ प्रकाशित केला आहे. त्यांच्या 'ॲन इन डेप्थ स्टडी ऑफ व्हॅल्यूज रिफ्लेक्टेड इन संस्कृत रिलिजस वर्क्स' या बृहत्संशोधन प्रकल्पाला विद्यापीठाच्या अनुदान आयोगातर्फे अनुदान प्राप्त झाले आहे. एन्सायक्लोपिडिया ऑफ रिलिजन, हृषीकेश येथून प्रकाशित झालेल्या ज्ञानकोशात त्यांच्या अकरा लेखांचा समावेश आहे. याशिवाय आय.ए.एस. परीक्षेसाठी संस्कृतचा अभ्यासक्रम तयार करण्याकरता केंद्र शासनाने नेमलेल्या समितीच्या सदस्य म्हणूनही त्यांनी पदभार स्वीकारला आहे. समाजात संस्कृतची आवड निर्माण व्हावी म्हणून संस्कृतप्रेमींनी स्थापिलेल्या ऋतायन या संघटनेच्या त्या सचिव आहेत. या संस्थेतर्फे संस्कृतच्या संवर्धनासाठी प्रतिवर्षी शालेय व महाविद्यालयीन पातळीवर संस्कृतमधून निबंध, वक्तृत्व, गीतगायन, कथाकथन व नाट्यस्पर्धा अशा विविध स्पर्धांचे आयोजन सातत्याने केले जात आहे.

एकूण संस्कृत ग्रंथांवर आधारित कोणत्याही विषयाचे संशोधन करत असताना समाजशास्त्रीय दृष्टीकोनातून त्यांनी केलेला अभ्यास मौलिक व मार्गदर्शकही आहे.

— डॉ. आसावरी बापट

## बाबर, सरोजिनी
☛ *मुख्य चरित्रनोंद - साहित्य खंड*

## बापट, धुंडिराज गणेश
**श्रौतविद्याविशारद, शुक्लजुर्वेदसंहिता व ऐतरेय ब्राह्मण यांचे मराठी भाषांतरकार व मराठी लेखक**
**१८८२ - मृत्युदिनांक अनुपलब्ध**

धुंडिराज गणेश बापट यांचे शिक्षण आजोबांकडे झाले. त्यांच्या घराण्यात अनेक पिढ्या अग्निहोत्राची व श्रौतविद्येची परंपरा आहे. त्यांनी ज्ञानकोशाच्या द्वितीय खंडाच्या प्रस्तावनेमध्ये श्रौतविषयक माहिती लिहिली. स्वाध्यायमंदिर ही संस्था काढून त्रैवर्णिकांत वैदिक संस्कारांचा प्रचार केला. त्यांनी 'स्वाध्याय' मासिक काही दिवस चालवले. त्यांचे वक्तृत्वही परिणामकारक होते. त्यांनी अग्निष्टोम वगैरे यज्ञ केले. त्यांचे पुढील ग्रंथ प्रसिद्ध आहेत - १. ऐतरेय ब्राह्मण - मराठी भाषांतर,

ब

२. शुक्लयजुर्वेद, वाजसनेयसंहिता मराठी भाषांतर, ३. आर्यांचे संस्कार, ४. श्रौतकोश इत्यादी.

— संपादित

**संदर्भ :**

*१. अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*

## बापट, पुरुषोत्तम विश्वनाथ

### आंतरराष्ट्रीय कीर्तीचे संशोधक व पाली भाषेचे अभ्यासक

### १८९४ – ४ नोव्हेंबर १९९१



डॉ. पुरुषोत्तम विश्वनाथ बापट हे पाली भाषेचे व बौद्ध धर्माचे विश्वविख्यात प्रकांडपंडित धर्मानंद कोसंबींचे छात्रोत्तम होते. ते फर्गसनमध्ये पालीविभाग प्रमुख असून डेक्कन शिक्षण संस्थेचे आजीव सदस्य होते. पंडित नेहरूंनी त्यांच्या अधिपत्याखाली चीन देशाला पहिले शिष्टमंडळ पाठवले. अमेरिकेत हार्वर्ड येथील येन चिंग संस्थेमध्ये त्यांनी चिनी भाषेचे शिक्षण घेतले होते. डॉ. हिराकरबा यांच्यासह बुद्धघोषाचार्यांच्या विनयपिटकावरील समन्तपासादिका या महाअट्टकथेचा चिनी अनुवाद शान-शिन-पिपोशा म्हणून प्रसिद्ध केला आणि तो भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिरातर्फे प्रकाशित झाला.

डॉ. बापट १९२९ मध्ये अमेरिकेतील हार्वर्ड विद्यापीठाच्या निमंत्रणावरून अमेरिकेस गेले. तेथे ‘विसुद्धीमग्ग’ या पाली ग्रंथाचे इंग्रजीत भाषांतर करण्याचे काम यांच्याकडे सोपवले गेले होते. तो ग्रंथ इसवी सनाच्या पाचव्या शतकात तयार झाला असून प्राचीन काळच्या बौद्ध धर्माचे स्वरूप त्यावरून कळून येते. त्याकरिता ते तेथे तीन वर्षे होते. तेवढ्या अवधीत त्यांनी चिनी भाषेचा अभ्यास केला आणि पीएच.डी. ही पदवी संपादन केली. मूळ बौद्ध ग्रंथांचे ज्ञान व अध्ययन करायचे असल्यास चिनी भाषेचे ज्ञान आवश्यक असते. ते मिळवून १९३२मध्ये हिंदुस्थानात परत आले. १९४३मध्ये बनारस येथे भरलेल्या ओरिएन्टल कॉन्फरन्सच्या वेळी ते पाली व बौद्ध विभागाचे अध्यक्ष होते.

त्यांनी पुरातन पाली ग्रंथांची इंग्रजीत व मराठीत भाषांतरे बरीच केली आहेत. त्यात ‘विमुत्ति-मग्ग’, ‘विसुद्धि-मग्ग’, ‘सूत्तनिपातो’, ‘धम्मसंगणि’ व ‘अठ्ठसालिनी’ ही पुस्तके प्रसिद्ध आहेत. यापैकी शेवटची दोन पुस्तके त्यांनी प्रो. र.द. वाडेकर यांच्या मदतीने भाषांतरित केली आहेत. मातृभाषा मराठी व इंग्रजी याशिवाय त्यांना संस्कृत, पाली, चिनी व तिबेटी या भाषांचे चांगले ज्ञान होते. आवश्यक जर्मन व फ्रेंच भाषांचे ज्ञानही त्यांनी संपादन केले.

काही काळाने शांतीनिकेतनमध्ये संशोधनकार्य करण्यासाठी त्यांची नेमणूक झाली. चिनी-बौद्ध वाङ्मयासंबंधी संशोधन करून ग्रंथप्रकाशन करणे हे त्यांचे तेथील मुख्य काम होते. हिंदुस्थानातून नेलेले हजारो ग्रंथ ऐतिहासिक कालात (चौथ्या-अकराव्या शतकात) चिनीत भाषांतरित झाले. त्यापैकी सुमारे दोन हजार ग्रंथ १९४६पर्यंत संशोधून प्रसिद्ध झाले आहेत.

‘संघभद्र’ नावाच्या चिनी पंडिताने इ.स. ४७०मध्ये ‘समंतपासादिका’ नावाचा ग्रंथ पालीतून चिनीत भाषांतरित केला. तो पाली ग्रंथ आता उपलब्ध नाही, म्हणून त्या ग्रंथाचे पाली किंवा इंग्रजी भाषांतर करण्याचे काम त्यांच्याकडे देण्यात आले. शांतिनिकेतनमध्ये राहून, तेथील चीनभवनातील मुख्य प्रो. तानू-युन-शान यांच्या देखरेखीखाली ते हे काम करीत होते.

आयुष्यभर मुख्यत्वे बुद्धघोषाचार्यांचा अभिधर्मपर विश्वकोश ‘विसुद्धीमग्ग’ या विषयावर त्यांनी अमेरिकेत हार्वर्ड येथे व शान्तिनिकेतन, दिल्ली व पुणे येथे संशोधनपर कार्य केले. ‘विसुद्धीमग्ग व विमुत्तिमग्ग - एक तौलनिक अध्ययन’ हा त्यांचा संशोधन प्रबंध होता.

फर्गसन महाविद्यालयातून निवृत्त झाल्यावर बापटसरांची नेमणूक दिल्ली येथे सुरू केलेल्या बौद्ध-

ब

अध्ययन केंद्राचे प्रमुख म्हणून झाली. शान्तिनिकेतनला राहून त्यांनी तिबेटी भाषा व तिब्बती बौद्धधर्म यांचा अभ्यास केला. शान्तिनिकेतननेच त्यांचे सुत्तनिपातातील अट्ठकवग्ग यावरील पुस्तक प्रकाशित केले.

डॉ. बापट यांनी सुत्तनिपात, मज्झिमनिकारा (मज्झिमपण्णासक), अट्ठसालिनी व धम्मसङ्गणि ही दोन पुस्तके (सहाकार्याध्यापक प्रा. रं.द. वाडेकर यांच्या सहकार्याने) प्रकाशित केली. कै. पुरुषोत्तम मंगेश लाड यांनी सुरू केलेल्या, पण त्यांच्या निधनामुळे अपूर्ण राहिलेल्या धम्मपद (धर्मपद) या ग्रंथाचे सानुवाद, सटीप संपादन त्यांनी केले. ते महाराष्ट्र साहित्य संस्कृती मंडळाने प्रकाशित केले. या कार्यात त्यांना त्यांच्या चिनी भाषेचा व्यासंग फार उपयोगी पडला. उदाहरणार्थ, 'विस्संधम्मं समादाय' याचा बुद्धघोषकृत 'विश्वधर्म' हा अर्थ चुकीचा आहे. त्याचप्रमाणे 'वेश्यधर्म' वा 'वेश्मधर्म' हे अनुवादही प्रमादिक आहेत, चिनी परंपरेत विस्तधर्म (शिळा स्वभाव) हा अर्थच योग्य आहे, असे ते प्रतिपादन करू शकले.

नालंदा महाविहाराने त्रिपिटकाची देवनागरीतली आवृत्ती प्रकशित केली. यातील काही खंड प्रा. बापट यांनी संपादित केले. मुख्य म्हणजे 'बौद्ध धर्माची २५०० वर्षे' (Twenty Five Hundered years of waddhism) या संक्षिप्त विश्वकोशाचे ते प्रधान संपादक होते. महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने प्रकाशित केलेले बापटांचे पालि सिलेक्शन्स (पाली-संग्रह) महत्त्वाचे आहे.

— डॉ. मो.गो. धडफळे

**संदर्भ :**

*१. अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*

## बापट, विष्णू वामन

**लेखक, अनुवादक**

**२२ मे १८७१ - २० डिसेंबर १९३३**

विष्णू वामन बापट यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यातील राजापूर तालुक्यात धाऊलवल्ली या गावी झाला. वयाच्या आठव्या वर्षी पितृवियोग झाल्यावर चुलत्याने त्यांना रामदुर्गला आपल्या घरी नेले. त्यांची तल्लख बुद्धिमत्ता पाहून वडिलार्जित भिक्षुकीच्या धंद्याला चिकटून राहण्यापेक्षा शिकावे म्हणून मराठी शाळेत घातले. पुढे प्राथमिक शिक्षण झाल्यावर पुढील शिक्षणासाठी आजोळी शिराळे येथे रवानगी करण्यात आली. येथे शिक्षणाबरोबर तालमीत जाण्यास सुरुवात झाली. पण मित्रांच्या संगतीने मामांचा डोळा चुकवून लळीत व तमाशा पाहण्यास जाऊ लागले. ही गोष्ट लक्षात आल्यावर मामांनी चांगलीच कानउघडणी केली. ते सहन न होऊन घरातून पलायन केले व एका नाटक कंपनीत नोकरी धरली.

चार महिन्यांनी मामांना त्यांचा शोध लागल्यावर ते त्यांना तेथून घेऊन आले व गव्हर्नमेंट टेलिग्राफिक क्लासमध्ये शिक्षण घेण्यासाठी पुण्यास पाठवले. तेथे उत्तम प्रकारे उत्तीर्ण झाल्यावर सदर्न-मराठा रेल्वेत दरमहा पंधरा रुपयांची नोकरी लागली. नोकरीच्या निमित्ताने बापटांना हुबळी-धारवाडकडे जावे लागले. तेथे विद्याव्यासंगी माणसांशी त्यांची गाठ पडली. त्याचा परिणाम म्हणजे हातात येईल ते पुस्तक वाचण्याची सवय जडली. त्याच वेळी त्यांना आपण शिकलो नाही याची खंतही वाटू लागली. उत्तमोत्तम ग्रंथ वाचताना आपण उत्तम ग्रंथकार व्हावे, ही इच्छा मूळ धरू लागली. विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या निबंधातील 'मराठीत चांगला ग्रंथकार होण्यासाठी संस्कृत भाषा तितकीच उत्तम आली पाहिजे,' या वाक्याने त्यांच्या जीवनाचे ध्येय निश्चित झाले.

वयाच्या तेविसाव्या वर्षी भांडारकरांच्या पुस्तकावरून संस्कृत अध्ययनाला सुरुवात झाली. दरम्यान काशी गोखले यांच्याशी विवाहबद्ध झाले. विवाह झाल्यावर गदग येथे नोकरीसाठी गेले. पुढे नॉर्थ वेस्टर्न रेल्वेत कराची येथे सिग्नलरची नोकरी मिळाली. कराचीला अनेक विद्वान ब्राह्मण कुटुंबे राहत होती व उत्तम ग्रंथसंग्रहालये होती. येथेच हरी लक्ष्मण लागू या संस्कृतच्या प्राध्यापकांशी परिचय झाला. बापटांनी त्यांना

आपली ज्ञानतृष्णा पुरी करण्याची गळ घातली. त्यांनीही ते मान्य केले. लागूंचे घर बापटांच्या घरापासून अडीच मैल दूर व दोघांच्याही नोकरीच्या वेळा वेगवेगळ्या अशी अडचण होती. यावर उपाय म्हणून बापट लागूंच्या घरी पहाटे चार वाजता जाऊ लागले. चार ते सात अध्ययन व नंतर नोकरी असा दिनक्रम सुरू झाला. येथेच अष्टाध्यायीच्या अभ्यास पूर्ण झाला.

जर्मन तत्त्ववेत्ता डॉयसन यांनी त्यांच्या व्याख्यानात, 'ज्यांनी शांकरवेदान्त वाचला नाही, त्यांचे जीवन व्यर्थ आहे' असे म्हटले होते. ते ऐकून आचार्यांचे तत्त्वज्ञान जाणून घेण्याची उत्सुकता वाढली. संस्कृतचा अभ्यास चांगला झाला होता, पण तत्त्वज्ञान मात्र गुरुमुखातूनच जाणून घेतले पाहिजे, असे वाटू लागले. या कालावधीत वाई येथील देवळात प.पू.श्री. प्रज्ञानंद सरस्वती हे शांकरभाष्यावर प्रवचने करतात असे समजले. त्यांच्याशी पत्रव्यवहार करून स्वत:विषयी माहिती दिली व तत्त्वज्ञान शिकण्याची इच्छा कळवली. स्वामींकडून बोलावणे आले.

रेल्वेतील नोकरी सोडून सपत्नीक वाईला गेले. तेथे मोदवृत्त छापखान्यात नोकरी करत अध्ययनाला प्रारंभ झाला. अकरा महिन्यांच्या कठोर अध्ययनानंतर, 'प्रस्थानत्रयीचा अर्थ ग्रहण करण्याची पात्रता तुमच्यात आली आहे. पुढील ग्रंथांचे श्रवण करण्याची गरज नाही. कोणाच्याही साहाय्यावाचून ते तुम्हांला समजू लागतील.' अशा शब्दांत स्वामींनी जाण्याची परवानगी दिली. यानंतर पुन्हा बेलपपहाड स्टेशनवर रेल्वेत नोकरी पत्करली. चार महिन्यांनी खोमसारा या आडगावी बदली झाली.

येथे अध्ययनाला वेळ मिळू लागला. सुभाषितसंग्रहासारख्या लहान ग्रंथाच्या भाषांतराला सुरुवात केली. ही भाषांतरे मुंबईचे शेठ दामोदर सावळाराम यंदे यांना पाठवून ती प्रसिद्ध करण्याविषयी विचारणा केली. अनुकूलता दिसताच नोकरी सोडून मुंबईला आले. यंदेंनी धार्मिक ग्रंथांची भाषांतरे केल्यास मोबदला देण्याची तयारी दर्शवली. एकीकडे भाषांतराचे हे काम सुरू असतानाच आनंदगिरीच्या टीकेसह प्रस्थानत्रयीच्या अध्ययनाला प्रारंभ झाला. या अध्ययनाची आवर्तने केली. शांकरभाष्यावर प्रभुत्व प्राप्त झाले.

१९०१मध्ये मुंबईच्या आर्यन हायस्कूलच्या संस्कृतच्या प्राध्यापकांशी परिचय झाला. त्यांच्याबरोबर उपनिषदांचा अभ्यास सुरू केला. १९०३मध्ये सिंधमधील गिडमुल वेदपाठशाळेत मुख्याध्यापकाची नोकरी मिळाली. येथील ग्रंथालय दुर्मीळ ग्रंथांनी समृद्ध होते. कोणत्याही वेळी कोणीही विद्यार्थी बापट गुरुजींकडे शंका घेऊन येऊ शकत होता. विद्यार्थिप्रिय शिक्षक, असा गुरुजींचा लौकिक होऊ लागला.

गुरुजी जुन्या मताचे पुरस्कर्ते होते, पण स्त्रियांविषयी उदारमतवादी होते. 'स्त्रियांनी संस्कृतचा, वेदान्ताचा अभ्यास करावा, धर्मशास्त्र त्यांना अवगत असले पाहिजे, त्याच धर्मरक्षण करणार आहेत' असे ते नेहमी म्हणत. १९१२मध्ये ते पुण्यास आले. येथे आल्यावर त्यांनी ब्रह्मविद्याग्रंथमाला व दर्शनमाला अशा दोन माला सुरू केल्या. पुढे वर्षानंतर 'आचार्य' नावाचे पाक्षिक सुरू केले.

वेदान्तातील शास्त्रींचा अधिकार एवढा मोठा होता की, गीतारहस्य लिहिताना लोकमान्यांनीही त्यांच्याशी चर्चा केली होती. पण टिळकांची काही मते शास्त्रींना पटली नाहीत. त्यावरून त्यांच्यात वैचारिक मतभेद झाले. त्यामुळे ते टिळकविरोधक म्हणून प्रसिद्ध झाले.

शास्त्रींचा तत्त्वज्ञानातील अभ्यास पाहून त्यांना विविध उपाधी प्राप्त झाल्या होत्या. सिंधमध्ये असताना हंपी मठाधिपतींकडून 'आचार्यभक्त' ही पदवी प्राप्त झाली होती. डाकूरचे शंकराचार्य श्री. राजराजेश्वर यांनी 'सद्धर्मभास्कर' ही उपाधी दिली. डॉ. कुर्तकोटीस्वामींनीही 'वेदान्तचूडामणी' ही उपाधी दिली पण शास्त्रींनी ती साभार परत केली. १९२७ मध्ये बनारस येथील श्रीभारतधर्ममहामंडळातर्फे 'शास्त्रसुधारक' ही उपाधी प्रदान करण्यात आली. त्यांची दोन्ही मुले १९१६ मध्ये निवर्तली आणि

ब

त्यांच्यावर दु:खाचा डोंगर कोसळला. शास्त्रीबुवा विरक्त होत गेले. यानंतर जागोजागी व्याख्याने, अखंड लेखन सुरू झाले. लोकांनी सांगूनही प्रकृतीकडे दुर्लक्ष केले.

१९२५मध्ये 'आचार्यकुल' नावाची संस्था काढली. संस्थेचा विस्तार होत होता, त्याच वेळी प्रकृतीही ढासळत होती. शेवटी शास्त्रीजी आपल्यामागे वेदान्तातील फार मोठी संपदा ठेवून पंचत्वात विलीन झाले. त्यांची ग्रंथसंपदा अशी आहे-

भाष्यार्थ - ईश, केन, कठ इत्यादी प्रमुख दहा उपनिषदांचा भाष्यार्थ; गीताभाष्यार्थ; ब्रह्मसूत्रशारीरभाष्यार्थ ३ भाग; सुबोध पंचदशी; सुबोध उपनिषत्संग्रह; सुबोध ब्रह्मसूत्र; आत्मपुराण; अध्याय १, २, १०; अनुभूतिप्रकाश अध्याय १, २; अपरोक्षानुभूति; शतश्लोकी, तत्त्वानुसंधानसार.

दर्शने - चार्वाक, बौद्ध, जैन, रामानुज, पूर्णप्रज्ञ, वल्लव, माहेश्वर, जैमिनि, पाणिनि, तर्कसंग्रह, ऐतरेयोपनिषद, नारायणोपनिषद, प्रश्नोत्तररत्नमालिका, वेदान्तशब्दकोश, वेदान्तपरिभाषा.

दामोदर सावळाराम मंडळींनी प्रकाशित केलेली ग्रंथसंपदा - सार्थ सुभाषित संग्रह, आनंदरामायण, कथासरित्सागर ३ भाग, पंचदशीसार २ भाग, आत्मबोध, वेदान्तसार, सांख्यतत्त्वकौमुदी, हरिमीडेस्तोत्र, जीवन्मुक्तिविवेकसार, बृहद्योगवासिष्ठ ३ भाग.

पुराणप्रकाशक मंडळी - गणेशपुराण २ भाग, भविष्यपुराण २ भाग, देवी भागवत २ भाग, मनुस्मृति, याज्ञवल्क्यस्मृति.

चिपळूणकर मंडळी - योगवासिष्ठ २ भाग, बालबोधिनी गीता,

इंदिरा छापखाना - एकनाथी भागवतार्थ २ भाग

कर्नाटक प्रेस - महाभारतार्थ ७ भाग

आनंदाश्रमचे रानडे मूर्ती यांच्या आनंदमूर्तिचरित्राचे भाषांतरसुद्धा बापट यांनी केले आहे.

— डॉ. आसावरी बापट



## बापुदेवशास्त्री, नृसिंह सीताराम

**गणितज्ञ, ज्योतिषी व ग्रंथकार**

**१८२१ - १८९०**

बापुदेवशास्त्री हे अहमदनगर जिल्ह्यातील टोके येथील राहणारे ऋग्वेदी चित्पावन ब्राह्मण होते. त्यांच्या पित्याचे नाव सीताराम, तर मातेचे नाव सत्यभामा होते. नागपूर येथे प्राथमिक शिक्षण घेऊन त्यांनी धुंडिराज नावाच्या कान्यकुब्ज ब्राह्मणाकडे भास्करचार्यांच्या लीलावतीचे व बीजगणिताचे अध्ययन केले. सिहूर येथे संस्कृत पाठशाळेवर त्यांची नेमणूक झाली असता त्यांनी सेवाराम यांच्याकडे रेखागणिताचे अध्ययन केले. पुढे १८४१मध्ये काशीतील संस्कृत पाठशाळेत रेखागणित शिकवण्याकरिता त्यांची नेमणूक झाली. तेव्हापासून शेवटपर्यंत ते काशी येथे होते व त्यांची मानमान्यता व हुद्दा सारखा वाढत गेला. ते रॉयल एशियाटिक सोसायटी, ग्रेट ब्रिटनचे व बंगालचे सन्माननीय सभासद, कलकत्ता व अलाहाबाद विश्वविद्यालयाचे फेलो, महामहोपाध्याय, सी.आय.ई. इत्यादी पदव्यांनी विभूषित होते. एकदा चंद्रग्रहण बरोबर वर्तवल्याबद्दल जम्मूच्या राजाने यांना एक हजार रुपये बक्षीस दिले.

त्यांनी आपल्या विषयावर संस्कृत, हिंदी व इंग्रजीमध्ये अनेक ग्रंथ केले आहेत.

— संपादित

**संदर्भ :**

*१. अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*

## बारलिंगे, सुरेंद्र शिवदास

**तत्त्वचिंतक, लेखक, समीक्षक**

**२० जुलै १९१९ – १९९७**

सुरेंद्र शिवदास बारलिंगे यांचा जन्म नागपूर येथे झाला. तेथेच त्यांचे शालेय, महाविद्यालयीन व विद्यापीठीय शिक्षण झाले. तेराव्या वर्षापासूनच ते स्वातंत्र्य आंदोलनात सहभागी झाले होते. विद्यार्थी वयात ऑल इंडिया स्टुडंट काँग्रेसचे ते संस्थापक सदस्य



व सहसचिव होते. अखिल भारतीय काँग्रेसच्या आंदोलनात विविध कमिट्यांवर त्यांनी काम केले. बेचाळीसच्या आंदोलनात ते सहभागी होते. त्यानंतर १९४३ ते १९४५ या काळात भूमिगत राहून ते स्वातंत्र्यलढ्यात सहभागी झाले. हैद्राबादच्या स्वातंत्र्य आंदोलनासाठी शस्त्रपुरवठा करण्यातही त्यांचा सहभाग होता. दैनिक देशबंधू, दैनिक इन्कलाब या दैनिकांचे संपादनही त्यांनी केले.

संस्कृत, व्याकरण व गणित यांचे बाळकडू त्यांना वडिलांकडून मिळाले होते. नागपूर विद्यापीठातून ते तत्त्वज्ञान विषयात एम.ए. (१९४२) व पीएच.डी. (१९५७) झाले. १९५८-१९५९ या वर्षांसाठी त्यांना ऑक्सफर्ड विद्यापीठाची डॉक्टरेटोत्तर संशोधन छात्रवृत्ती प्राप्त झाली. ऑक्सफर्ड विद्यापीठात गिल्बर्ट राइल या प्रसिद्ध तत्त्वचिंतकाचा सहवास त्यांना लाभला. भारतात परत आल्यावर भारतातील नांदेड येथील तसेच आंध्र प्रदेशातील पीपल्स महाविद्यालयाचे ते संस्थापक प्राचार्य झाले, तसेच भारतात आंध्र प्रदेश, दिल्ली, पुणे येथील विद्यापीठांतून आणि क्रोएशिया व ऑस्ट्रेलिया या विदेशांतील विद्यापीठांतून त्यांनी अध्यापनाचे कार्य केले. त्यांच्या अध्यापनाच्या कारकिर्दीतील सगळ्यांत मोठा टप्पा म्हणजे पुणे विद्यापीठातील तत्त्वज्ञान विभागाचे प्रमुख म्हणून १९७० ते १९८० या काळात त्यांनी केलेले कार्य होय.

या काळात त्यांनी तत्त्वज्ञान विभाग नावारूपाला आणला. भारतीय व प्राश्चात्त्य तत्त्वज्ञानाचा चिकित्सक समन्वय त्यांच्या व्यक्तिमत्त्वात झाला होता. तसेच दोन्ही परंपरांचे संमेलन त्यांनी तत्त्वज्ञान विभागात घडवून आणले. एकीकडे पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाचे ख्यातनाम विद्वान डॉ. सुंदर राजन यांची नेमणूक केली तर दुसरीकडे, न्यायदर्शनाचा सखोल अभ्यास विभागात घडून यावा यासाठी 'न्यायपंडित' हे पद निर्माण केले व त्यावर परंपरागत पद्धतीने अध्ययन झालेल्या न्यायपंडितांची नेमणूक केली. तसेच जैन तत्त्वज्ञानाच्या अध्ययनासाठी अध्यासनाची निर्मिती केली.

या काळातले त्यांचे महत्त्वाचे कार्य म्हणजे तीन भाषांतून तीन संशोधनपर त्रैमासिकांचे संपादन. अमळनेर येथील 'तत्त्वज्ञान मंदिर' या संस्थेची बंद पडलेली नियतकालिके पुनरुज्जीवित करण्याच्या निमित्ताने त्यांनी 'इंडियन फिलॉसॉफिकल क्वार्टरली' (इंग्लिश), परामर्श (हिंदी) व परामर्श (मराठी) या त्रैमासिकांची स्थापना केली, दीर्घकाळ संपादन केले व ही नियतकालिके स्थिरस्थावर व्हावीत यासाठी निधीचीही उभारणी केली. त्यामुळे या तिन्ही भाषांतून तत्त्वज्ञानविषयक चिंतन, मनन व संशोधन करणाऱ्या अभ्यासकांना एक दर्जेदार व्यासपीठ उपलब्ध झाले.

सुरेंद्र बारलिंगे हे विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात भारतातील ख्यातनाम तत्त्वचिंतकांपैकी एक होते. संस्कृत, न्यायदर्शन तसेच पाश्चात्त्य तत्त्वज्ञान व तर्कशास्त्र यांच्या समन्वित अभ्यासातून त्यांनी भारतीय न्यायशास्त्राच्या आधुनिक तार्किक परिभाषेत परिचय करून देणारा 'ए मॉडर्न इंट्रोडक्शन टु इंडियन लॉजिक' हा महत्त्वाचा ग्रंथ लिहिला. भारतीय तर्कशास्त्राप्रमाणेच भारतीय नीतिमीमांसा तसेच भारतीय सौंदर्यमीमांसा यांचाही 'आधुनिक परिचय' करून देणारे ग्रंथ (ए मॉडर्न इंट्रोडक्शन टु इंडियन एथिक्स', ए मॉडर्न इंट्रोडक्शन टु इंडियन एस्थेटिक थिअरी') त्यांनी लिहिले.

तत्त्वज्ञानाचे स्वरूप, तर्कशास्त्र, ज्ञानमीमांसा, विश्वातील मानवाचे स्थान, मानवी स्वातंत्र्य नवसमाजनिर्मिती, आदर्श समाजाचे प्रारूप यांसारख्या विविध प्रश्नांवर त्यांनी विपुल निबंध-लेखन केले. त्यांच्या निबंधांची संकलने 'बिलीफ्स, रीझन्स अँड रिफ्लेक्शन्स' व 'पॉव्हर्टी, पॉवर, प्रोग्रेस' ही यथावकाश प्रसिद्ध झाली. काही महत्त्वाच्या निबंधांमध्ये त्यांनी भारतीय तत्त्वज्ञानातून प्राप्त झालेल्या काही सूत्रांचा अभिनव पद्धतीने विकास केलेला दिसतो. न्याय वैशेषिक

ब

दर्शनातील ‘संयोग व समन्वय’ या संकल्पनाभेदाचा विकास त्यांनी ‘डिस्टिंग्विशेबल्स अ‍ॅन्ड सेपरेबल्स’ या निबंधात केला, तर शंकराचार्यांनी मांडलेल्या वस्तुतंत्र व पुरुषतंत्र या भेदाचा विकास करून त्यांनी विश्वाची भौगोलिक-खगोलशास्त्रीय संकल्पना व मनुष्यकेंद्रित संकल्पना हा भेद स्पष्ट केला.

भारतीय तत्त्वज्ञानातील विविध दर्शनांचा व त्या दर्शनांतील वैचारिक संघर्षाचा नव्याने अन्वयार्थ लावणारे अनेक निबंध त्यांनी लिहिले. या निबंधांचे संकलन पुढे ‘रीअंडरस्टडिंग इंडियन फिलॉसॉफी’ या शीर्षकाने प्रसिद्ध झाले. देहातीत जीवात्मा, पुनर्जन्म, परलोक, यज्ञादी कर्मकांड, वर्ण-जातिव्यवस्था यांचे समर्थन करणारे पूर्वमीमांसादर्शन एका बाजूला तर या पूर्वमीमांसेच्या विचारधारेला विरोध करणारी (पण कालौघात काही वेळा पूर्वमीमांसेच्या विचारधारेला शरण जाणारी) अन्य दर्शने दुसऱ्या बाजूला अशी भारतीय दार्शनिक इतिहासातील वैचारिक आंदोलनाची अभिनव मांडणी त्यांनी केली.

तत्त्वज्ञानातील त्यांच्या कर्तृत्वाचे फलित म्हणून त्यांना अनेक सन्मान प्राप्त झाले. उदाहरणार्थ इंडियन फिलॉसॉफिकल काँग्रेसच्या मद्रास अधिवेशनाचे (१९७९) अध्यक्षपद त्यांनी भूषवले. तसेच इंडियन कौन्सिल ऑफ फिलॉसॉफिकल रिसर्चने त्यांना ‘विद्यावृत्ती’ देऊन गौरवले.

ब

सुरेंद्र बारलिंगे जसे सौंदर्यविषयक तत्त्वचिंतक होते, तसे समीक्षक व ललितलेखकही होते. पुणे विद्यापीठातील सेवेतून निवृत्त झाल्यावर त्यांचे कथा, कादंबरी, आत्मचरित्र असे ललितलेखन बहरले. १९८१-१९८७ या कालावधीसाठी महाराष्ट्र शासनाने त्यांची महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे अध्यक्ष म्हणून नेमणूक केली.

या काळात त्यांनी केलेले विशेष कार्य म्हणजे त्यांनी नवलेखकांची भरवलेली शिबिरे व नवलेखकांना प्रोत्साहन देण्यासाठी राबवलेली नवलेखक अनुदान योजना. याच काळात त्यांनी थिंकर्स अ‍ॅकॅडमी जर्नल हे नियतकालिक सुरू केले व चालविले.

त्यांचे तत्त्वचिंतन व शैक्षणिक-सामाजिक कार्य अखेरपर्यंत सुरू होते. आयुष्याच्या शेवटच्या टप्प्यावर त्यांचे भारतीय सौंदर्यशास्त्रविषयक संशोधन सुरू होते. त्यांचे पुणे येथे हृदयविकाराने निधन झाले. त्यांचे भारतीय सौंदर्यशास्त्रविषयक ‘ए मॉडर्न इंट्रोडक्शन टु इंडियन एस्थेटिक थिअरी’ हे पुस्तक त्यांच्या मृत्यूनंतर प्रकाशित झाले.

– डॉ. प्रदीप गोखले

## बाळकृष्ण

**इतिहास अभ्यासक व लेखक**

**२२ जुलै १८८२ – २१ ऑक्टोबर १९४०**

छत्रपती शिवाजी महाराजांवर लेखन करणारे एक साक्षेपी, चिकित्सक व व्युत्पन्न इतिहासकार म्हणून डॉ. बाळकृष्ण ओळखले जातात. त्यांचा जन्म सध्या पाकिस्तानात असलेल्या पंजाब प्रांतातील मुलतान येथे झाला. बालपणीच त्यांच्यावरील मातापित्यांचे छत्र हरपले. एका मुसलमान शेतकरी कुटुंबाने त्यांचे संगोपन केले. पुढे आजोबांनी त्यांना आपल्या घरी आणून त्यांचे शिक्षण केले. त्यांनी मुलतान हायस्कूल आणि दयानंद महाविद्यालय (लाहोर) यांतून अध्ययन करून १९००मध्ये इतिहास व अर्थशास्त्र या विषयांत बी.ए. व १९०२मध्ये एम.ए. पदव्या मिळवल्या. विद्यार्थिदशेतच त्यांचा विवाह दयाबाई मालसे या बालिकेसोबत झाला.

त्यांनी श्रद्धानंदांच्या गुरुकुल कांग्री विद्यापीठात (हरिद्वार) अध्यापनाची जबाबदारी स्वीकारले. इथे त्यांनी दहा वर्षे अध्यापन केले. ते उपप्राचार्य आणि पुढे प्राचार्यही झाले. या काळात त्यांना दम्याचा विकार जडला व त्याने अखेरपर्यंत पिच्छा पुरवला. उच्च शिक्षणासाठी इंग्लंडला जाण्याची तीव्र इच्छेपोटी त्यांनी अथक प्रयत्न करून १९१९मध्ये इंग्लंडमधील ‘लंडन स्कूल ऑफ इकॉनॉमिक्स अँड पॉलिटिक्स’ या जगन्मान्य संस्थेत प्रवेश घेतला. तिथे त्यांनी संशोधन करून ‘कमर्शिअल रिलेशन्स बिट्विन इंडिया अँड इंग्लंड’ हा महत्त्वपूर्ण प्रबंध लंडन विद्यापीठाला सादर केला.

१९२२मध्ये ते पीएच.डी. झाले आणि त्या वर्षीच्या मार्चमध्ये भारतात आले. मे १९२२मध्ये कोल्हापूर संस्थानने राजाराम महाविद्यालयाच्या प्राचार्यपदी त्यांची नियुक्ती केली. अखेरपर्यंत ते त्या पदावर होते. या पदाबरोबरच त्यांच्याकडे संस्थानच्या शिक्षण अधिकाऱ्याचे काम देण्यात आले. त्यांनी संस्थानातील सर्व माध्यमिक विद्यालयांतील शैक्षणिक दर्जाचे, सोयीसुविधांचे सर्वेक्षण करून एक अहवाल संस्थानला सादर केला. हा अहवाल तत्कालीन शैक्षणिक परिस्थितीवर प्रकाश टाकतो.

राजाराम महाविद्यालय ही त्या वेळी दक्षिण महाराष्ट्रातील एक नामवंत व उच्च शिक्षण देणारी एकमेव संस्था होती. तीत फक्त कला महाविद्यालय होते आणि जेमतेम तीनशे विद्यार्थी शिकत होते. डॉ. बाळकृष्णांनी आपल्या कारकिर्दीत पदव्युत्तर शिक्षणाची सोय करून महाविद्यालयाच्या विद्याशाखांचा विस्तार केला. तसेच शास्त्रशाखाही सुरू केली. शहरात एक विधी महाविद्यालय आणि अध्यापक प्रशिक्षण महाविद्यालय सुरू केले. दक्षिण महाराष्ट्रात मुख्यत्वे कोल्हापूरला, शिवाजी विद्यापीठ स्थापन करण्याची मूळ कल्पना बाळकृष्णांचीच होती. कोल्हापूरच्या आर्य समाजाच्या चळवळीत ते अग्रणी असत. त्यांनी अर्थशास्त्र व इतिहास या विषयांना आयुष्य वाहिले. त्यावर व्याख्याने दिली. चर्चासत्रे आयोजित केली.

प्राचार्यपदाच्या सुमारे अठरा वर्षांच्या कारकिर्दीत बाळकृष्णांनी शिवचरित्राला सर्वार्थाने वाहून घेतले. त्यांनी उपलब्ध सर्व कागदपत्रांचा धांडोळा घेऊन त्याचा साक्षेपी अभ्यास करून १९४०मध्ये 'शिवाजी द ग्रेट' हा चार खंडात्मक सुमारे १६३० पृष्ठांचा बृहद्ग्रंथ सिद्ध केला. या चरित्राची व्याप्ती आणि आवाका फार मोठा आहे. 'शिवाजी द ग्रेट' हा त्यांचा महत्त्वपूर्ण संशोधनात्मक ग्रंथ होय. पहिल्या खंडाच्या प्रास्ताविकात त्यांनी या चरित्राच्या रूपरेषेविषयी व उद्देशांविषयी स्पष्ट कल्पना दिली आहे. त्यांनी मूळ साधनांतून अस्सल साधने निवडून पारखून त्यांवर प्रथम लक्ष केंद्रित केले. याकरिता त्यांनी लंडन, द हेग, बटेव्हिया (अमेरिका), मुंबई, पणजी (गोवा), पुदुचेरी (पाँडेचरी), चेन्नई (मद्रास), तंजावर, सातारा, पुणे येथे पुराभिलेखागारांना भेटी देऊन शिवाजी महाराजांच्या संदर्भातील असंख्य कागद पाहिले. त्यांतून टिपणे काढली. याशिवाय परदेशी प्रवाशांचे तत्कालीन वृत्तान्त, फॅक्टरी रेकॉर्ड्ज आणि बखरी यांचे सूक्ष्म अवलोकन केले. 'इंग्लिश रेकॉर्ड्ज ऑन शिवाजी' (पहिला व दुसरा खंड - १९३१) हे तत्पूर्वी प्रसिद्ध झाले होते. डॉ. एस.एन. सेन व रॉलीसन्स यांच्या पुस्तकांचाही उपयोग केला. हेग व बटेव्हिया येथील डच साधनांचा भरपूर उपयोग केला आणि नंतर शिवचरित्रातील प्रमुख घटना निवेदन केल्या. तिसरा खंड त्यांनी शिवराज्याभिषेक (१६७४) आणि कर्नाटकाची मोहीम (१६७६-१६७८) या दोन महत्त्वांच्या विषयांना वाहिला आहे. शेवटच्या चौथ्या खंडात बाळकृष्णांनी महाराजांची लष्करी व्यवस्था, नागरी प्रशासन, आर्थिक व्यवस्था, न्यायपद्धती, आरमार व धार्मिक धोरण यांची सविस्तर माहिती दिली असून तत्कालीन राजकीय परिस्थितीच्या संदर्भात ती किती शिस्तबद्ध, कडक व काटेकोर होती, याचे वर्णन केले आहे.

या चरित्रात बाळकृष्णांनी उपलब्ध - विशेषत: डच साधनसामग्रीतील पत्रे, उतारे जसेच्या तसे उद्धृत केले असल्यामुळे इतिहासाचा सूक्ष्म अभ्यास करणाऱ्या संशोधक-अभ्यासकाला एक संदर्भग्रंथ म्हणून या ग्रंथाचे मोल वादातीत आहे.

बाळकृष्णांनी शिवचरित्र लिहिण्यासाठी मराठी आत्मसात करून मोडी लिपीचा अभ्यास केला. उत्तर हिंदुस्थानात जीवनातील ४० वर्षे व्यतीत करूनही अखेरच्या पर्वात ते कोल्हापूर संस्थान आणि महाराष्ट्र यांच्याशी एकरूप झाले.

शिवचरित्राव्यतिरिक्त त्यांनी लिहिलेले अन्य ग्रंथ हे प्रामुख्याने अर्थशास्त्रविषयक आहेत. त्यांचा प्रबंध पुढे पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाला. याशिवाय 'द इंडस्ट्रियल डिक्लाइन ऑफ इंडिया', 'द वेदिक साम्स्', 'द थिअरी ऑफ द स्टेट इन एन्शंट इंडिया' आणि 'फ्रॉम द कौंटर

टू द क्राऊन' हे त्यांचे आणखी काही ग्रंथ होत. त्यांनी हिंदीतूनही स्फुट लेख लिहिले होते.

—संपादित

**संदर्भ :**


१. *मराठी विश्वचरित्रकोश; संपादक - कामत, श्रीराम पांडुरंग; विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा.*

२. *चित्राव, सिद्धेश्वरशास्त्री; अर्वाचीन चरित्रकोश.*


## ब्यूह्लर, योहान गेऑर्ग

**प्राध्यापक, संशोधक**

**१९ जुलै १८३७ - ८ एप्रिल १८९८**



योहान गेऑर्ग ब्यूह्लरचा जन्म जर्मनीतील हानोव्हर प्रांतातील बोस्ट्रेल येथे झाला. इ.स.१८५८ मध्ये त्यांनी ग्योटिंगेन विद्यापीठाची डॉक्टरेट मिळविली. लोकसाहित्याचे अभ्यासक आणि प्रसिद्ध भाषाशास्त्रज्ञ थिओडोर बेन्फे हे त्यांचे गुरू. त्यांचे सुरुवातीचे लेखन हे तौलनिक भाषाशास्त्र (Philology) आणि वैदिक पुराणशास्त्र (Mythology) यांविषयी होते. प्रथम तौलनिक भाषाशास्त्राचा केवळ एक भाग म्हणून संस्कृतचा अभ्यास करणाऱ्या ब्यूह्लर यांना संस्कृतमध्ये अधिकाधिक रुची वाटू लागली व त्यामुळेच भारतात येण्याची तीव्र इच्छा त्यांच्या मनात निर्माण झाली.

इ.स. १८६२ मध्ये भारत सरकारच्या शिक्षण खात्यात जागा आहे, असे समजताच लगेचच ते मुंबईत दाखल झाले, मात्र त्यांना कबूल करण्यात आलेली ती जागा आता रिकामी नसल्याचे लक्षात आले; पण एल्फिन्स्टन महाविद्यालयाचे प्राचार्य सर अलेक्झांडर ग्रँट यांच्याशी परिचय होऊन ब्यूह्लर त्या महाविद्यालयाचे संस्कृतचे पहिले प्राध्यापक म्हणून नियुक्त झाले. ब्यूह्लर तेथे संस्कृत, लॅटिन या भाषा, Philology आणि प्राचीन इतिहास हे विषय शिकवत असत. त्यांच्या प्रयत्नांमुळे महाविद्यालयाच्या ग्रंथालयात अनेक उत्तम संस्कृत ग्रंथांची भर पडली. भारतीयांना युरोपातील संशोधन पद्धतीची माहिती करून देण्यासाठी त्यांनी विशेष प्रयत्न केले. त्याचबरोबर संस्कृताभ्यासाच्या प्रगतीसाठी पारंपरिकरीत्या शिक्षण घेतलेल्या पंडितांचे योगदानही तितकेच महत्त्वाचे आहे, असे त्यांचे मत होते. एखाद्या शास्त्र्याची निवड संस्कृत प्राध्यापकाचा सहायक म्हणून केली जावी अशी शिफारस त्यांनी सरकारला केली, युरोपातील आणि प्राचीन हिंदू शिक्षणपद्धतीतील चांगल्या गोष्टी एकत्र करण्याचा त्यांनी सतत प्रयत्न केला. त्या काळात विद्यार्थिदशेत असलेले आणि नंतर भारतातील आधुनिक संस्कृतविद्येचे अग्रणी ठरलेले रामकृष्ण भांडारकर, शंकर पां. पंडित, काशीनाथ तेलंग, वामन शि. आपटे यांसारख्यांवर ब्यूह्लरच्या या प्रयत्नांचा मोठा प्रभाव पडलेला दिसून येतो.

इ.स. १८६५-१९६६ मध्ये 'बॉम्बे संस्कृत सिरीज' या प्रसिद्ध प्रकाशनमालेची योजना आखण्यात आली. चिकित्सक आणि विद्वत्तापूर्ण संपादनामुळे या मालिकेतील पुस्तके जगभरातल्या संस्कृताभ्यासकांसाठी उपयुक्त ठरली. योहान ब्यूह्लर आणि आणखी एक जर्मन विद्वान फ्रान्स कीलहॉर्न हे त्यातील पहिले संपादक होते. या मालिकेमध्ये ब्यूह्लरने पंचतंत्रांची २ ते ५ ही तंत्रे आणि दंडीच्या दशकुमारचरिताचा पहिला भाग संपादित केला.

इ.स.१८७० मध्ये ब्यूह्लरने मुंबई सरकारच्या शिक्षणखात्यातील उत्तर विभागाचा Eudcation Inspector म्हणून काम करण्यास सुरुवात केली. प्राच्यविद्येच्या दृष्टीने हा एक भाग्यकारक योग होता, असे म्हणावे लागेल. पुढील दहा वर्षे त्यांनी आपल्या अखत्यारीतील जिल्ह्यांच्या शिक्षणाचा दर्जा वाढविण्याचे कार्य केले. गुजरातमधील प्राथमिक शिक्षणाचा पाया ब्यूह्लरच्या कामामुळे घातला गेला असे म्हणता येईल. सरकारी महाविद्यालयात शिक्षक आणि परीक्षक म्हणून त्यांनी केलेल्या कामामुळे पश्चिम भारतातील प्राच्यविद्येच्या क्षेत्रातील गुणवत्ता वाढण्यास मदत झाली.

ब

या नियुक्तीचा उपयोग ब्यूह्लरने अत्यंत समर्थपणे विविध प्रदेशांतील संस्कृत व प्राकृत हस्तलिखिते गोळा करण्यासाठी केला. या प्रकारच्या कामाची गरज त्यांनी युरोपात असतानाच ओळखली होती. भारतात आल्यावर त्यांनी वैयक्तिकरीत्या या कामाला लगेचच सुरुवात केली होती. तेव्हा त्यांनी सुमारे ३०० हस्तलिखित पोथ्या गोळा केल्या. त्यांचे कौशल्य आणि उत्साह यांपासून प्रेरणा घेऊन मुंबई सरकारने १८६६मध्ये त्यांना दक्षिण महाराष्ट्रातून आणि उत्तर कर्नाटकातून सरकारसाठी पोथ्या गोळा करण्याकरिता नेमले. इ.स. १८६६ ते १८६८ या काळात त्यांनी २०० पोथ्या मिळवल्या. इ.स. १८६८ मध्ये भारत सरकारने संपूर्ण भारताकरिता अशा स्वरूपाचा प्रकल्प हाती घेतला. अर्थातच मुंबई इलाख्यात ह्या कामाचे नेतृत्व ब्यूह्लरकडे आले. इतर इलाख्यांपेक्षा मुंबई इलाख्यात हे काम अधिक प्रभावीपणे आणि अधिक काळ चालू होते. ब्यूह्लर भारतात असेपर्यंत, म्हणजे इ.स. १८६८ ते १८८० या काळात सरकारसाठी २,३६३ दुर्मीळ पोथ्या मिळविण्यात आल्या. या कामात प्रा. कीलहॉर्न यांचाही सहभाग होता. सत्तरच्या दशकाच्या शेवटी रा.गो. भांडारकरही या प्रकल्पात सहभागी झाले. सुरुवातीला हा संग्रह एल्फिन्स्टन महाविद्यालयामध्ये ठेवण्यात आला. त्यानंतर इ.स. १८७५मध्ये तो पुण्यात डेक्कन महाविद्यालयाला हलविण्यात आला. इ.स. १९१७ मध्ये भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिराची स्थापना करण्यात आली. त्यानंतर १९१५ पर्यंत गोळा करण्यात आलेल्या सगळ्या पोथ्या त्या संस्थेकडे १९१८ मध्ये सुपूर्द केल्या गेल्या.

ब्यूह्लरने शोधून काढलेल्या अनेक ग्रंथांवर पुढे मौलिक संशोधन केले गेले. पंडितांशी संस्कृतमध्ये संवाद साधत तर सर्वसामान्यांसाठी मराठी, गुजराती किंवा हिंदी या भाषांचा आधार घेत, त्यांच्या परंपरेशी एकरूप होऊन, धर्माचा, प्रथांचा, भावनांचा आदर राखत, हजारो वर्षे जुन्या अशा इतिहासाचा, साहित्याचा मागोवा घेण्यासाठी ब्यूह्लरने या गावातून त्या गावात, प्रसंगी दुर्गम भागातून प्रवास करीत जिद्दीने, धैर्याने आणि कौशल्याने केलेले काम अतुलनीय असेच म्हणावे लागेल.

प्राच्यविद्येच्या दोन शाखा त्यांनी नष्ट होण्यापासून वाचवल्या. १) काश्मिरी ग्रंथसंपदा, ज्यामध्ये वैदिक ग्रंथ, काश्मिरी शैवतंत्राच्या पोथ्या, राजतरङ्गिणीसारखे महत्त्वाचे ऐतिहासिक ग्रंथ, दारा शुकोहने पर्शियन भाषेत अनुवाद करवून घेतलेले भागवतपुराण यांचा अंतर्भाव होतो. २) श्वेतांबर जैनांचे संस्कृत व प्राकृत ग्रंथ. ज्यांच्या आधारे वेबर, याकोबी, क्लाट, लॉयमान या संशोधकांनी आपले ग्रंथ लिहिले. ब्यूह्लरने जमवलेल्या एकूण सुमारे ३००० पोथ्यांमुळे केवळ जैनच नव्हे तर इतर अनेक प्राच्यविद्याशाखांच्या संशोधनाला नवी दिशा मिळाली. या कामाचे त्यांनी लिहिलेले अहवालसुद्धा सविस्तर आणि महत्त्वाचे आहेत. विशेषत: काश्मीर, राजपुताना आणि मध्य भारत येथील १८७५-१९७६मध्ये केलेल्या हस्तलिखित सर्वेक्षणांच्या अहवालांमुळे त्यापूर्वी अज्ञात असलेल्या अनेक ग्रंथांची आणि ग्रंथकारांची ओळख जगाला झाली. उदाहरणार्थ, काश्मीरचा इतिहास लिहिणाऱ्या क्षेमेन्द्रचे साहित्य ब्यूह्लरच्या प्रयत्नांमुळेच उजेडात आले. या अहवालांमध्ये पोथ्यांचे वर्गीकरण करून त्यांची संक्षिप्त यादी दिलेली आहे. तसेच त्यांचे साहित्यिक आणि ऐतिहासिक मूल्यमापनही केलेले आहे. त्याच धर्तीवर पुढे भांडारकर आणि पीटरसन यांनी त्यांचे अहवाल लिहिले.



ब्यूह्लरचे दुसरे महत्त्वाचे योगदान म्हणजे अनेक पुराभिलेखांचा शोध, वाचन आणि अर्थ लावून त्यांचा ऐतिहासिक कालानुक्रम ठरविणे. त्यांचे या संदर्भातील १६०हून अधिक शोधनिबंध Indian Antiquary, Epigraphia Indica यांसारख्या संशोधनविषयक नियतकालिकांमधून प्रसिद्ध झाले. त्यांपैकी सुमारे ५३ निबंध हे सम्राट अशोकाच्या शिलालेखांविषयी होते. प्रा. मॅक्सम्यूलर यांनी संस्कृत साहित्याच्या अभ्यासाच्या आधारे संस्कृत साहित्याच्या पुनरुज्जीवनाचा सिद्धान्त मांडला होता. त्यांच्या मते संस्कृत साहित्याचा प्रवाह इसवीसनाच्या आधी काही काळ कुंठित झाला असावा.

इसवीसनाच्या ४थ्या शतकापासून संस्कृत साहित्यात नवचैतन्य निर्माण झाले आणि उत्तमोत्तम साहित्यकृती निर्माण होऊ लागल्या. पण ब्यूह्लरने पुराभिलेखांतील पुराव्यांच्या आधारे वरील सिद्धान्त खोडून काढला आणि असे दाखवून दिले की, संस्कृत साहित्यनिर्मिती कधीही थांबली नव्हती व संस्कृत साहित्याच्या विकासाचा काळ इसवीसनाच्याही पूर्वीचा ठरतो. अशाच प्रकारे पुराभिलेखांच्या मदतीने वैदिक शाखांचा विकास आणि देशाच्या विविध भागांतील त्यांच्या प्रसाराचा मागोवा घेता येणे शक्य आहे, असे ब्यूह्लरचे मत होते. प्राचीन भारतीय लिप्यांच्या इतिहासासंबंधी त्यांनी 'On the Origin of the Indian Brahmi Alphabet' हा ग्रंथ लिहिला. त्यात त्यांनी ब्राह्मी, खरोष्ठी या लिपी आणि ब्राह्मी अंक यांचा उदय व विकास यांविषयी मूलभूत असे सिद्धान्त मांडले आहेत. भारतीय पुरालिपिशास्त्रविषयीचा सर्वंकष अभ्यास मांडणारा त्याचा ग्रंथ म्हणजे 'Indian Palaeography' होय.

ब्युह्लरने जैन धर्माची स्वतंत्र ओळख पटवून देण्यापूर्वी जैन धर्म ही बौद्ध धर्माची केवळ एक शाखा मानली जात होती. जैन धर्म हा बौद्ध धर्माच्या समकालीन पण स्वतंत्र धर्म होता, हे प्रतिपादन जैन धर्माच्या अभ्यासाच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण ठरले. प्रसिद्ध वैयाकरणी आणि कोशकार जैन मुनी हेमचन्द्रांचे चरित्रही त्यांनी लिहिले.

संस्कृतमध्ये रूढार्थाने ऐतिहासिक स्वरूपाची काव्ये फारशी नाहीत. क्षेमेन्द्राची राजतरंगिणी व बिल्हणाचे विक्रमाङ्कदेवचरित ही त्या दृष्टीने महत्त्वाची आहेत. हे ग्रंथ ब्यूह्लरनेच उजेडात आणले. त्यांपैकी त्यांनी विक्रमाङ्कदेवचरित संपादित केले. तर राजतरंगिणीविषयी आपल्या अहवालामध्ये सविस्तर चर्चा केली. प्राचीन भारताचा सविस्तर आणि बृहत् असा इतिहास लिहावा अशी त्यांची योजना होती, पण अकाली ओढवलेल्या मृत्यूमुळे ते काम त्यांच्या हातून होऊ शकले नाही. भारतीय फिलॉलॉजी आणि पुरातत्त्वविद्या यांची अशी बहुधा एकही शाखा नाही की ज्या शाखेविषयी ब्यूह्लरने काही मूलभूत संशोधन केले नाही. भारतीय विद्येतील कोणत्याही शाखेसंबंधी आधी झालेल्या संशोधनाचा आढावा घेताना ब्यूह्लरचे नाव घेतल्याशिवाय पुढे जाता येणार नाही, इतके त्यांचे काम मूलभूत स्वरूपाचे आहे. इ.स.१८६७ मध्ये सर रेमंड वेस्ट यांच्याबरोबर त्यांनी 'The Digest of Hindu Law' हे पुस्तक लिहिले. त्यात त्यांनी उपलब्ध धर्मशास्त्रीय ग्रंथांचा आढावा घेतला. अशा स्वरूपाचा तो पहिलाच प्रयत्न होता. त्यानंतर त्यांनी आपस्तम्बधर्मसूत्राची चिकित्सित आवृत्ती काढली. कोणत्याही धर्मसूत्र ग्रंथाचे अशा प्रकारचे संपादन त्यापूर्वी झाले नव्हते. आपस्तम्ब, गौतम, वसिष्ठ आणि बौधायन या धर्मसूत्रांचे तसेच मनुस्मृतीचे त्यांनी केलेले भाषांतर मॅक्स म्यूलरच्या 'Sacred Books of the East' या मालिकेत प्रसिद्ध झाले. मनुस्मृतीच्या भाषांतराबरोबरच मुनस्मृतीचे इतर धर्मशास्त्रीय ग्रंथांबरोबरचे संबंध स्पष्ट करण्याचा त्यांनी प्रयत्न केला. काही थोडे अपवाद वगळता तोपर्यंत महाभारताविषयी फारसे संशोधन झाले नव्हते. त्यातही फक्त अंतर्गत पुराव्यांचाच आधार घेतला गेला होता. ब्यूह्लरने महाभारतासाठीसुद्धा पुराभिलेखांचा आणि संस्कृतसाहित्यातील इतर ग्रंथांचा आधार घेतला. त्यांचे हे संशोधन 'Contributions to the History of the Mahabharata' या नावाने प्रसिद्ध झाले. या विषयात आणखी संशोधन होण्याची गरज लक्षात घेऊन त्यांनी त्यांच्या विद्यार्थ्यांना त्यासाठी प्रोत्साहन दिले. त्यांपैकी विशेषत: मोरिझ विंटरनिट्ज्स या विद्वानाने पुढे उल्लेखनीय कामगिरी केली. त्यांनी महाभारताच्या चिकित्सित आवृत्तीची गरज आग्रहाने प्रतिपादली आणि त्यासाठी पुढाकार घेतला.

त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे त्यांचे भारतीय विद्वानांशी आणि पंडितांशी असलेले जिव्हाळ्याचे संबंध. यामुळे त्यांना भारतीय मनाचा आणि विचारांचा जवळून परिचय होता. भारतीय इतिहास आणि संस्कृती यांच्या रहस्यांचा उलगडा करण्यासाठी आवश्यक असलेली दृष्टी त्यातून त्यांना लाभली होती. पंडित भगवानलाल इंद्रजी या ज्येष्ठ

अभ्यासकाने पुरातत्त्व आणि पुराभिलेखांविषयी गुजराती भाषेत लिहिलेल्या लेखांचे त्यांनी इंग्लिशमध्ये भाषांतर केले होते. भारताविषयी परदेशात केले जाणारे लेखन भारतीयांना सहज समजावे या हेतूने ते इतर युरोपीय भाषांत न करता इंग्लिशमधूनच प्रसिद्ध केले जावे असा त्यांचा आग्रह होता. ते स्वत: बऱ्याचदा जर्मनऐवजी इंग्लिशमधूनच लिहीत असत.

उपखंडातील हवामानाचा प्रतिकूल परिणाम त्यांच्या तब्येतीवर झाल्यामुळे इ.स. १८८० मध्ये त्यांना युरोपात परत जावे लागले. ऑस्ट्रियातील व्हिएन्ना येथील विद्यापीठात संस्कृत आणि भारतीय विद्या अध्यासनावर लगेचच त्यांची नियुक्ती झाली. संस्कृत शिकविण्याची जी पद्धत त्यांनी भारतातील महाविद्यालयात वापरली, त्याच पद्धतीने त्यांनी तिथेही संस्कृत शिकवायला सुरुवात केली. जर्मन विद्यार्थ्यांना जर्मन भाषेतून संस्कृत शिकता यावे म्हणून संस्कृतचे प्राथमिक धडे देणारे एक पुस्तक त्यांनी लिहिले. ते पुस्तक इतके उपयुक्त ठरले की दोनच वर्षांत अमेरिकेत त्याचे इंग्लिश भाषांतर प्रसिद्ध झाले. ब्यूह्लर आणि मार्टिन हॉग यांनी भारतातील शाळांमध्ये माध्यमिक स्तरावर संस्कृत शिकवण्यासाठी ज्या पद्धतीचा वापर केला त्या पद्धतीला अनुसरून हे पुस्तक लिहिलेले आहे. व्हिएन्ना विद्यापीठात त्यांनी प्राच्यविद्या संस्थेची स्थापना केली. व्हिएन्ना हे प्राच्यविद्या संशोधनाचे एक केंद्र बनावे हा त्यामागे हेतू होता. त्यासाठीच 'Vienna Oriental Journal' सुरू करण्यात आले. त्यांच्या पुढाकारामुळे आणि मदतीने प्राच्यविद्यांच्या आंतरराष्ट्रीय काँग्रेसमध्ये भारतातील पुरातत्त्व आणि पुराभिलेखांच्या संशोधनासंबंधी भारत सरकारला विनंती करणारे ठराव वेळोवेळी संमत केले गेले.

आयुष्याच्या शेवटच्या काही वर्षांत त्यांच्याच संकल्पनेतून साकारलेल्या 'Encyclopedia of Indo-Aryan Research' या प्रकल्पाच्या कामात ते मग्न होते. जगभरातल्या विविध देशांतील संशोधकांचा सहभाग असलेला, भारतविद्येच्या सर्व अंगांना कवेत घेणारा असा विस्तृत प्रकल्प प्राच्यविद्येच्या क्षेत्रात त्यापूर्वी झाला नव्हता आणि त्यानंतर कधी झाला नाही. त्या अंतर्गत प्राच्यविद्यासंशोधनाचाही स्वतंत्र इतिहास लिहिण्यात आला. ब्यूह्लरने यातील तब्बल २८ ग्रंथांचे संपादन केले.

अभ्यासातील शंका असोत, काही सल्ला हवा असो किंवा भारतातील नोकरीसाठी शिफारसीची आवश्यता असो; आपल्या सहकाऱ्यांना आणि विद्यार्थ्यांना ते नेहमीच मदत करत असत. विंटरनिट्‌सने असे नमूद केले आहे की, ब्यूह्लरच्या वर्गात कधीही नसलेले अनेक जण स्वत:ला त्यांचे विद्यार्थी म्हणवून घेत. विंटरनिट्‌सच्याच शब्दांत सांगायचे तर "His inspirations were more wonderful than his science", त्यांच्या कार्याची प्रेरणा त्यांच्या विद्येपेक्षा अधिक प्रभावी होती.

१८९८मध्ये झुरिक येथे असलेल्या आपल्या कुटुंबासमवेत ईस्टर साजरा करण्यासाठी व्हिएन्ना येथून निघून वाटेत एका गावात त्यांनी मुक्काम केला. ८ एप्रिल रोजी त्या गावातील एका मोठ्या तलावात एकटेच नौकाविहार करत असताना ते दुर्दैवाने बुडून मरण पावले. काही कामानिमित्त व्हिएन्ना येथेच त्यांना थांबावे लागले असावे, असे त्यांच्या पत्नीला वाटले. शोध घ्यायला सुरुवात होऊन त्या गावातील हॉटेलात मुक्कामी परत न आलेली व्यक्ती म्हणजे प्रा. ब्यूह्लर होते, हे कळायला १६ एप्रिल उजाडला. ना त्यांचा मृतदेह मिळाला ना मृत्यूचे नेमके कारण कळू शकले. प्राचीन भारताच्या गूढ अज्ञाताचा मागोवा घेणाऱ्या या संशोधकाच्या मृत्यूचे कारण अज्ञात आणि एक गूढ बनून राहिले.

— अमृता नातू

**संदर्भ :**

*१. इंडियन ॲंटिक्वेरी, १८९८ खंड २७, पा.क्र.३३७-३८६*

## बेंद्रे, वासुदेव सीताराम

**इतिहास संशोधक, लेखक**

**१८ फेब्रुवारी १८९४ – १६ जुलै १९८४**

'इतिहास ही राष्ट्राची ज्योत आहे' असे महाभारतकार व्यासांनी म्हटले आहे. आपल्या देशाचा

ब



उज्ज्वल आणि स्फूर्तिदायी इतिहास समाजापुढे यथावत यावा यासाठी मागील पिढीतील काहींनी इतिहास संशोधन केले, त्यांत महाराष्ट्राच्या इतिहासाच्या संशोधन क्षेत्रात अतिशय मोलाचे काम करणारे बहुव्यासंगी व्यक्तिमत्त्व म्हणजे वासुदेव सीताराम बेंद्रे हे होय. आई भागिरथीबाई व वडील सीतारामपंत यांनी अतिशय श्रमसायासाने त्यांना घडविले. कुलाबा जिल्ह्यातील (हल्लीचा रायगड जिल्हा) पेण या ठिकाणी प्राथमिक शिक्षणानंतर तत्कालीन मॅट्रीकच्या परीक्षेस बसण्यास १४व्या वर्षी तयारी असलेल्या वासुदेवाला १६ वर्षे पूर्ण होईपर्यंत म्हणजे दोन वर्षे थांबावे लागले, त्या दोन वर्षांत त्यांनी जी.आय.पी. ऑडीट विभागात विनावेतन उमेदवारी केली. नंतर लघुलेखन (शॉर्टहँड) शिकून नोकरीस लागले. वयाच्या १९व्या वर्षी लघुलेखन परीक्षेत सुवर्णपदक विजेते झाले आणि शिक्षण खात्यात नोकरीला लागले.

त्यानंतर त्यांनी १९१८ साली भारत इतिहास संशोधनाचा उंबरठा ओलांडला आणि आपले जीवन महाराष्ट्राच्या इतिहास संशोधनात झोकून दिले ते अगदी अखेरच्या क्षणापर्यंत! इ. स. १९२८ साली ‘साधन चिकित्सा’ हा ग्रंथ लिहून त्यांनी आपल्यातील इतिहास संशोधनवृत्ती सिद्ध केली. नोकरीतील सचोटी, दीर्घोद्योग, चिकाटी, नम्रता आणि कामावरील निष्ठा यांमुळे त्यांना पदोन्नत्या मिळत गेल्या, ते ‘राजपत्रित अधिकारी (Gazetted Officer) या पदापर्यंत पोहोचले. त्यांच्यातील इतिहास संशोधकाला प्रेरणा मिळाली ती शिक्षणाधिकारी ‘कोव्हनन्टन’ यांच्यामुळे. त्यांनी त्यांना पुणे दप्तरखात्याच्या संशोधन अधिकारी पदापर्यंत पोहोचविले. तेथे त्यांनी आपली कार्यक्षमता सिद्ध केली. पेशवे दप्तरातील सुमारे चार कोटी ऐतिहासिक कागदपत्रे विस्कळीत अवस्थेत होती. त्याचे कॅटलॉगिंग व विषयावर मांडणी करण्याच्या कामात त्यांनी बारकाईने लक्ष घातले. या सर्व गोष्टी शास्त्राशुद्ध व्हाव्यात यासाठी त्यांनी ‘Alienation Office Records and Poona Dafter’ (इ.स. १९५०) असे पुस्तक लिहिले. आज हे पुस्तक वस्तुसंग्रहालय आणि इतिहास अभ्यासक यांच्यासाठी बहुमहत्त्वाचे आहे. ते अभ्यासल्याशिवाय कागदपत्रे हाताळता येत नाहीत. त्याच वेळी त्यांनी प्रसिद्ध केलेला अहवाल (Report of Peshave Dafter Or Guide to the Records) हाही तितकाच मोलाचा आहे. याशिवाय राजस्थानातील बिकानेर आणि तमिळनाडूतील तंजावर येथील दप्तरखान्याची पाहणी करून तेथील तपशिलांची नोंदणी करण्याची जबाबदारी त्यांनी दिलेल्या वेळेपूर्वीच अतिशय काटेकोरपणे पूर्ण केली.

वरील अनेक कागदांच्या ढिगाऱ्यांच्या अनुभव आल्यामुळे बेंद्रे यांचे लक्ष मराठ्यांच्या इतिहास संशोधनाकडे स्थिरावले. वरील कागदपत्रे तपासत असताना त्यांनी इब्राहीम खान नावाच्या एका परकीय चित्रकाराने काढलेले छत्रपती शिवाजी महाराजांचे मुस्लीम पेहरावातील चित्र पाहिले. हे चित्र काही योग्य नाही, हे त्यांच्या लक्षात आले होते. त्यामुळे ते अधिक संशोधनासाठी सरसावले आणि मॅकेनझीच्या ग्रंथाचे अवलोकन करताना त्यांना व्हलेन्टाइन या डच चित्रकाराने काढलेले सुरतेच्या वखारीतील तेथील गव्हरर्नरच्या भेटीच्या वेळेचे चित्र मिळाले. ज्या वेळी ते इंग्लंडला गेले, त्या वेळी त्यांनी या चित्राची खातरी करून घेतली आणि हे चित्र त्यांनी पुढे आणले. इंडिया हाउसकडून परवानगी मिळविली आणि पुण्याच्या शिवाजी मंदिरात साहित्यसम्राट न.चिं. केळकर यांनी ते प्रसिद्ध केले. आज सरकारी कचेरीत लावले जाणारे तेच हे चित्र! वा. सी. बेंद्रे यांची ही कामगिरी इतिहास संशोधन क्षेत्रात उत्तुंग अशी झाली!

इतिहास संशोधनाच्या अपुऱ्या साधनांमुळे छत्रपती संभाजी राजांची मलिन झालेली प्रतिमा प्रथम धुऊन काढण्याचे प्रचंड मेहनती काम बेंद्रे यांनी केले. अनेक

अडचणींच्या प्रसंगांना तोंड देऊन, परदेशात जाऊन अनेक साधने त्यांनी मिळविली. सतत ४० वर्षे संशोधन केले, १९३८ साली 'त्यांना हिस्टॉरिकल रिसर्च स्कॉलरशिप' मिळाली व संशोधनासाठी ते इंग्लंडला गेले. तेथून त्यांनी २५ खंड होतील इतकी संशोधन सामग्री मिळविली.

सन १८५८ साली छत्रपती संभाजी महाराजांचे चरित्र हा ६५० पृष्ठांचा चिकित्सक ग्रंथ प्रसिद्ध झाला. छत्रपती संभाजी महाराजांची युद्धनीती, त्यांची धर्मप्रवण वृत्ती त्यांचा ज्वलज्ज्वलन तेजस् पराक्रम या गोष्टी त्यामुळे सर्वांना ज्ञात झाल्या. या ग्रंथाच्या प्रसिद्धीसाठी यशवंतराव चव्हाण यांनी ७००० रुपयांचे अनुदान दिले.

छत्रपती संभाजी महाराजांच्या वढू येथील समाधीचा शोध त्यांनी लावला आणि तेथे स्मृतिदिन साजरा होऊ लागला.

तुकाराम महाराजांच्या चरित्राचा प्रचंड अभ्यास आणि चरित्र लेखन करून त्यांचे अप्रकाशित अभंग प्रसिद्ध करून त्यांनी आपल्या संशोधन कार्यात मानाचा तुरा खोवला. याशिवाय छत्रपती मालोजीराजे, शहाजीराजे, छत्रपती शिवाजी महाराज, राजा जयसिंग आणि शिवाजी महाराज, महाराष्ट्रेतिहासाची साधने (३ खंड), विजापूरची अदिलशाही, गोवळकोंड्याची कुतुबशाही, तुकाराम महाराज संतसांगाती, शिवराज्याभिषेक प्रयोग, तुकाराम महाराजांचे अप्रकाशित अभंग अशी ६०पेक्षा अधिक ग्रंथरचना त्यांनी केली.

त्यांच्या पुढाकाराने सन १९६५मध्ये महाराष्ट्रेतिहास परिषद ही संस्था सुरू झाली. १९६३पासून मुंबई इतिहास संशोधन मंडळाचे ते संचालक झाले. महाराष्ट्र इतिहास परिषदेचे मुख्य कार्यवाह झाले.

वयाच्या ८४व्या वर्षी तत्कालीन राज्यपाल सादिक अली यांच्या हस्ते त्यांना राज्य पारितोषिक मिळाले. याशिवाय मालोजी, शहाजी, शिवाजी महाराज या ग्रंथांना महाराष्ट्र राज्याची चार पारितोषिके मिळाली.

आपले इतिहास संशोधन अतिशय सिद्धहस्त लेखणीद्वारे त्यांनी महाराष्ट्रशारदेच्या दरबारात रुजू केले . वयाच्या ८०व्या वर्षीसुद्धा त्यांनी राजाराम चरित्र लिहिले. हे करीत असता त्यांनी हुंडाविरोधी चळवळ उभी केली. ब्रदरहुड स्काउट संघटना काढली आणि वयाच्या ९०व्या वर्षी त्यांना देवाज्ञा झाली.

त्यांनी उभ्या केलेल्या अखिल महाराष्ट्र इतिहास परिषदेला त्यांच्या नातीने, सौ. साधना डहाणूकर हिने देणगी दिली. त्यातून प्रतिवर्षी मान्यवर इतिहास संशोधकांना कै. वा. सी. बेंद्रे पुरस्कार दिला जातो.

— डॉ. सदाशिव शिवदे

## बेलवलकर, श्रीपाद कृष्ण

**तत्त्वज्ञ, प्राच्यविद्या संशोधक, लेखक, प्राध्यापक**

**१२ डिसेंबर १८८० - ८ जानेवारी १९६७**



डॉ. श्रीपाद कृष्ण बेलवलकर यांचा जन्म कोल्हापूर जिल्ह्यातील नरसोबाची वाडी येथे झाला. ते २० महिन्यांचे असताना त्यांच्या मातोश्रींचा मृत्यू झाला. त्यानंतर त्यांच्या वडिलांनी व आत्याने त्यांचा सांभाळ केला. त्यांचे वडील खूप शिस्तप्रिय होते. त्यांचे शालेय शिक्षण वडिलांच्या देखरेखीखाली हेर्ले येथे झाले. शाळेत असताना त्यांना माध्यमिक आणि उच्च माध्यमिक शालेय शिष्यवृत्ती मिळाली. वयाच्या सोळाव्या वर्षीच त्यांचा विवाह एका सात वर्षांच्या मुलीशी झाला आणि या सहधर्मचारिणीने त्यांना पुढे साठ वर्षे साथ दिली.

१८९७ मध्ये ते कोल्हापूरच्या राजाराम विद्यालयातून मॅट्रिक उत्तीर्ण झाले आणि नंतर राजाराम महाविद्यालयातून इंटरमीजिएट परीक्षा उत्तीर्ण झाले. नंतर ते पुण्याच्या डेक्कन महाविद्यालयामध्ये पुढील शिक्षणासाठी आले. १९०२ मध्ये ते इंग्रजी आणि संस्कृत घेऊन मुंबई विद्यापीठाचे बी.ए. झाले. नंतर

ब

डेक्कन महाविद्यालयाचे 'दक्षिणा फेलो' म्हणून त्यांची निवड झाली. बेलवलकर १९०४ मध्ये इंग्रजी व संस्कृत घेऊन एम.ए. झाले व नंतर इतिहास आणि राज्यशास्त्र विषय घेऊन १९०५ मध्ये एम.ए. झाले. १९०६ मध्ये त्यांनी मुंबईच्या एल्फिन्स्टन विद्यालयामध्ये वर्षभरासाठी शिक्षकाची नोकरी केली आणि नंतर ते डेक्कन महाविद्यालयाच्या हस्तलिखित संग्रहाचे क्युरेटर म्हणून नेमले गेले. तेथे त्यांनी प्रथम व्याकरणाच्या हस्तलिखितांची विवरणात्मक सूची, 'डिस्क्रिप्टिव्ह कॅटलॉग' तयार केला. त्याच वेळेस त्यांनी ग्रीक आणि युरोपीय तत्त्वज्ञान हे विषय घेऊन पुन्हा एम.ए. केले. त्याच सुमारास त्यांनी 'सिस्टिम्स ऑफ संस्कृत ग्रामर' हा निबंध लिहिला. याच शीर्षकाचे त्यांचे पुस्तक असून ते अत्यंत महत्त्वपूर्ण पुस्तक मानले जाते.

याच काळात डॉ. श्रीपाद बेलवलकर यांनी हार्वर्ड विद्यापीठाचे प्रोफेसर जे.एच. वूड्स यांना त्यांच्या संशोधनकार्यात सहकार्य केले आणि याचाच परिणाम म्हणून त्यांना पुढील शिक्षणासाठी हार्वर्डला बोलावले गेले. १८ मे १९१२ रोजी बेलवलकर अमेरिकेला रवाना झाले. हार्वर्डला त्यांनी प्रोफेसर सी.आर. लानमन यांच्या मार्गदर्शनाखाली 'उत्तररामचरित' या विषयावर प्रबंध लिहिला आणि १९१४ मध्ये त्यांना पीएच.डी. मिळाली. त्यांचा प्रबंध नंतर हार्वर्ड ओरिएंटल सिरीज क्र. २१ मध्ये प्रकाशित झाला. ते १६ सप्टेंबर १९१४ रोजी मुंबईला परतले. १९१५ मध्ये त्यांच्या प्रबंधाचे मराठी भाषांतर प्रकाशित झाले. अमेरिकेहून परतल्यानंतर डॉ. बेलवलकरांची डेक्कन महाविद्यालयामध्ये संस्कृत प्राध्यापक या पदावर नियुक्ती झाली. ते या पदावर पुढील अठरा वर्षे होते. याच काळात त्यांनी अनेक ग्रंथ आणि शोधनिबंध लिहिले.

सर रामकृष्ण गोपाळ भांडारकर, प्रो. व्ही.जी. विजापूरकर, डॉ. सी.आर. लानमन हे त्यांचे गुरू आणि आदर्श होते. बेलवलकरांवर लोकमान्य टिळकांच्या कर्मयोग तत्त्वज्ञानाचा प्रभाव होता. बेलवलकरांनी जेव्हा टिळकांना सांगितले, की सर भांडारकरांच्या नावाने त्यांचे शिष्य एक संस्था स्थापन करीत आहेत, तेव्हा त्यांनी बेलवलकरांना ह्या कार्यासाठी पाठिंबा दिला आणि संस्थेच्या उभारणीसाठी एक हजार रुपये दिले.

१९२५ मध्ये डॉ. व्ही.एस. सुखटणकरांनी प्रमुख संपादक ह्या नात्याने महाभारताच्या चिकित्सक आवृत्तीचे काम भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिरात सुरू केले. त्यातील भीष्मपर्वाचे काम डॉ. बेलवलकरांनी केले. जानेवारी १९४३ मध्ये डॉ. सुखटणकरांना अचानक मृत्यू आला आणि सर्वांनुमते प्रमुख संपादकाची जबाबदारी डॉ. बेलवलकरांवर सोपवली गेली. त्यांनी अठरा वर्षे (१९४३ -१९६१) ही जबाबदारी समर्थपणे सांभाळली. त्यांनी भीष्म, शांति, आश्रमवासिक, मौसल, महाप्रस्थानिक आणि स्वर्गारोहण या पर्वांचे संपादन केले.

१९२७ - १९३३ या काळात डॉ. बेलवलकर भांडारकर संस्थेचे सचिव होते. त्यांच्या काळात डेक्कन महाविद्यालयामधील हस्तलिखितांचा शासकीय संग्रह भांडारकर संस्थेस सांभाळण्यासाठी दिला गेला. १९३४ मध्ये तेव्हाच्या मुंबई सरकारने डेक्कन महाविद्यालय बंद करण्याचा निर्णय घेतला. डॉ. बेलवलकरांनी डॉ. जयकर आणि डॉ. काणे ह्यांच्या मदतीने त्याला विरोध केला; पुढे सरकारला तो निर्णय मागे घ्यावा लागला. बेलवलकरांना संघटनात्मक कामात रस होता, त्याहून अधिक रस त्यांना विद्याव्यासंगात होता. त्यांनी अखिल भारतीय प्राच्यविद्या परिषदेच्या पहिल्या अधिवेशनापासून त्यात भाग घेतला आणि अनेक निबंध सादर केले. ते या परिषदेच्या बनारस येथे १९४३ साली झालेल्या अधिवेशनात मुख्य अध्यक्ष (जनरल प्रेसिडेंट) झाले. त्यांनी अनेक विद्वानांच्या गौरवासाठी काढलेल्या ग्रंथांत लेख लिहिले. डॉ. बेलवलकरांना शिकवण्याची आवड होती. त्यांनी बी.ए.च्या आणि एम.ए.च्या विद्यार्थ्यांचेही अध्यापन केले. त्यांनी शांकर आणि रामानुज मतांनुसार वेदान्त तत्त्वज्ञान, प्राचीन भारतीय संस्कृती, सांख्य आणि योग अशा अनेक विषयांवर विद्यार्थ्यांसाठी व्याख्याने दिली. भांडारकर संस्थेच्या रौप्यमहोत्सवी वर्षात त्यांनी भगवद्गीतेवर २५ व्याख्याने

दिली. १९४१ मध्ये भगवद्गीतेच्या ज्ञानकर्मसमुच्चय टीकेचे संपादन केले. ही टीका आनंदवर्धनाची असून त्याचे एकुलते एक हस्तलिखित शारदा लिपीमध्ये आहे. नंतर त्यांनी ह्या टीकेचे इंग्रजी भाषांतरही केले.

त्यांनी अनेक ग्रंथ लिहिले. त्यांचे 'रामज लेटर हिस्टरी ऑर उत्तररामचरित' हेही उल्लेखनीय पुस्तक आहे. त्यांनी दंडीच्या काव्यादर्शाचे संपादन आणि इंग्रजी अनुवाद केला. तसेच, शांकरभाष्यासहित ब्रह्मसूत्राचे संकलन व सटीप इंग्रजी भाषांतर केले. प्रा. रा.द. रानडे यांच्यासोबत 'हिस्टरी ऑफ इंडियन फिलॉसॉफी'च्या दुसऱ्या भागाचे म्हणजे 'क्रिएटिव्ह पीरियड'चे लेखन केले. कलकत्ता विद्यापीठाने आयोजित केलेली 'बासू मल्लिक लेक्चर्स ऑन वेदान्त फिलॉसॉफी' ही डॉ. बेलवलकरांची व्याख्याने प्रकाशित केली गेली आणि विद्वानांनी त्यांच्या विद्वत्तेचे कौतुक केले. त्यांनी अनेक लेखही लिहिले. उदा. 'लिटररी स्ट्रॅटा इन ऋग्वेद', 'कॅनन्स ऑफ टेक्स्च्युअल ॲण्ड हायर क्रिटिसिझम ॲज अप्लाइड टू द शाकुंतल ऑफ कालिदास', 'अंडरकरंट्स इन जैनिझम', 'रिलेशन बिटवीन भासज चारुदत्त ॲण्ड शूद्रकज मृच्छकटिक', 'ओरिजिन ऑफ इंडियन ड्रामा', 'जैमिनिज शारीरक सूत्र', 'श्वेताश्वेतर उपनिषद् ॲण्ड भगवद्‌गीता', 'द भगवद्‌गीता 'रिडल' अनरिडल्ड, ॲटिट्यूड ऑफ हिंदूइझम टुअर्ड्स द प्लेझर्स ऑफ द वर्ल्ड', 'श्री शंकराचार्यांचा कालनिर्णय', 'श्री शंकराचार्य आणि रहस्यकार', 'अभिज्ञानशाकुंतल नाटकाची पाठपरंपरा' इत्यादी. या अनेक लेखांचा विद्वानांनी त्यांच्या अभ्यासात अनेकदा उल्लेख केलेला आढळतो. डॉ. श्रीपाद बेलवलकर यांचे वेद, व्याकरण, आर्ष महाकाव्ये, अभिजात संस्कृत साहित्य, काव्यशास्त्र, भारतीय तत्त्वज्ञान इत्यादी विषयांतील योगदान हे उल्लेखनीय आहे.

डॉ. बेलवलकरांचा मृत्यू पुण्यात झाला.

- डॉ. मैत्रेयी देशपांडे

***

ब

# भ

## भट, गोविंद केशव

**संस्कृत नाट्य अभ्यासक, कादंबरीकार**

**२ मे १९१४ – १८ जुलै १९८९**

*☛ मुख्य चरित्रनोंद - साहित्य खंड*



रसिक संस्कृत पंडित व मराठी, इंग्लिश आणि संस्कृत या तीनही भाषांतील ललित वाङ्मयाचे व नाट्यवाङ्मयाचे चिकित्सक अभ्यासक असलेल्या गोविंद केशव भट यांचा जन्म नाशिक येथे झाला. इंटर आर्ट्‌सला तर्कशास्त्रातील व बी.ए.ला मुंबई विद्यापीठातील सर्व पुरस्कार व शिष्यवृत्त्या त्यांना मिळाल्या होत्या. एम.ए.नंतर महाराष्ट्रामधील व गुजरातमधील विविध सरकारी महाविद्यालयात संस्कृतचे प्राध्यापक म्हणून त्यांनी १९७२सालापर्यंत काम केले. निवृत्तीनंतर १९७९सालापर्यंत त्यांनी पुण्याच्या भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्थेचे क्युरेटर व संचालक म्हणून काम केले.

डॉ. भट यांचा पीएच.डी.चा प्रबंध भासाच्या नाटकांविषयी आहे. भरतमुनींचे नाट्यशास्त्र, नाट्याचे विविध पैलू, भास, कालिदास, शूद्रकाची अभिजात नाटके हे त्यांच्या चिंतनाचे व लेखनाचे प्रमुख विषय होते. त्यांच्या सुमारे ३० ग्रंथांपैकी निम्म्याहून अधिक याच विषयांसंबंधी आहेत.

संस्कृत नाट्यातील विदूषकावर त्यांनी संशोधनात्मक निबंध लिहिला होता. त्याला मुंबई विद्यापीठाचे व्ही. एन. मंडलिक सुवर्णपदक मिळाले होते. हा निबंध पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाल्यावर १९६०मध्ये त्याला महाराष्ट्र राज्याचा पुरस्कार मिळाला. मुळात इंग्लिशमध्ये असलेल्या या पुस्तकाचे मराठीत व हिंदीत भाषांतर झाले.

मालविकाग्निमित्र, मुद्राराक्षस, उत्तररामचरित व स्वप्नवासवदत्त, वेणीसंहार या नाटकांचे त्यांनी संपादन केले आहे. तर मृच्छकटिक या नाटकाची विस्तृत प्रस्तावना (Preface to Mricchakatika) लिहिली आहे. भास स्टडीज् व भासाच्या एकांकिका ही त्यांची पुस्तके अत्यंत वाचनीय आहेत.

भट यांचे Tragedy and Sanskrit Drama, Sanskrit Drama- a perspective in theary and practice, Theatrical aspcts of Sanskrit drama, Bharat Natya Manjiri आणि Natya-Manajri Saurabha ही इंग्लिश पुस्तके नाट्याच्या विविध अंगांची ओळख करून देतात.

भरताच्या रंगमंचानुसार नेपथ्य करून मुद्राराक्षस नाटकाचे प्रयोग श्रीमती विजयाबाई मेहता यांनी मराठी व जर्मन भाषेत केले होते. त्या वेळी भरताच्या रंगमंचाविषयी व सादरीकरणाविषयी विजयाबाई डॉ. भटांशी चर्चा करत असत. ते संस्कृत नाट्याचे प्रगाढ अभ्यासक असल्याने त्यांच्याशी केलेल्या चर्चेचा विजयाबाईंना पुष्कळ फायदा झाला होता.

संस्कृत नाट्यसृष्टी, कालिदास दर्शन व संस्कृत नाटके आणि नाटककार ही त्यांची मराठी पुस्तके त्यांच्या रसिकतेची साक्ष देतात. संस्कृत काव्यशास्त्राची प्रस्तावना हे त्यांचे अत्यंत सुगम व उद्‌बोधक असे पुस्तक आहे.

गुरुवर्य रवींद्रनाथ टागोरांच्या जन्मशताब्दीनिमित्ताने त्यांच्या ‘विसर्जन’ नाटकाचे डॉ. भटांनी ‘माते तुला

काय हवंय' या नावाने मराठीत भाषांतर केले. आय.एन.टी.ने त्याची निर्मिती केली व नानासाहेब फाटक, दुर्गाबाई खोटे अशा प्रथितयश कलावंतांनी त्यात काम केले होते. त्याचा पहिला प्रयोग बिर्ला मातोश्री सभागृहात, प्रथमच फिरत्या रंगमंचाचा वापर करून केला गेला होता. त्यांच्या 'गृहदाह' या नाटकाला महाराष्ट्र राज्याचा पुरस्कार मिळाला होता. त्यांच्या नावे 'परक्याचे धन' हे नाटक, 'पानगळ' व 'विदिशा' हे कथासंग्रह व 'प्रणय' ही कादंबरीसुद्धा आहे. विदूषकांवरील लेखांचे त्यांचे वेडगावचे शहाणे हे पुस्तकही वाचनीय आहे. संस्कृत नाट्य, संस्कृत काव्यशास्त्र, सौंदर्यशास्त्र अशा विविध विषयांवर ते व्याख्याने देत. त्यांचे वक्तृत्व प्रसन्न व प्रवाही होते. तसेच आपले साहित्यचिंतन श्रोत्यांच्या मनात संक्रांत करण्याचे त्यांचे सामर्थ्यही अलौकिक होते.

— डॉ. वीणा लोंढे

## भट, भा. वा.

**इतिहास अभ्यासक**

**२ जानेवारी १८७६ — २७ डिसेंबर १९५२**

रत्नागिरी जिल्ह्यातील सिरगाव तालुक्यात 'म्हाळुंगे' हे भट घराण्याचे मूळ गाव. महाळुंगे किंवा पावस अशीही त्याची दुसरी नावे होत. याच त्र्यंबकशास्त्री यांच्या कुटुंबात वि. का. राजवाडे मंदिराचे संस्थापक ॲड. भा. वा. भट यांचा जन्म झाला. त्र्यंबकशास्त्री हे भा. वा. भटांचे खापरपणजे होत. धुळे जिल्ह्यातील सर्व जण ॲड. भा.वा. भटांना 'तात्यासाहेब' म्हणत. तात्यांचे प्राथमिक शिक्षण वाईला झाले. पुढील शिक्षणासाठी ते मुंबईला आपले वडील बंधू महादेव यांच्याकडे गेले.

कायद्याच्या परीक्षेत 'हिंदू लॉ' या विषयात त्यांना प्रथम पारितोषिक मिळाले. व्यवसायासाठी त्यांनी धुळ्याची निवड केली. गरताडच्या साठे घराण्यातील सत्यभामाबाईंशी त्यांनी लग्न केले.

१८९९मध्ये ते जेव्हा धुळ्यात आले, तेव्हा मोठ्या भावाने दिलेले रु. ६०, थोडे कपडे व काही भांडी-कुंडी एवढेच त्यांच्याकडे होते. एकार्थाने शून्यातून जग उभारण्याची किमया त्यांनी करून दाखविली.

धुळ्याच्या सार्वजनिक क्षेत्रातले एक मोठे नाव होते, शंकर श्रीकृष्ण देव. श्री. देवांशी परिचय झाल्यावर तात्यासाहेबांनी संशोधन कार्यात कधी उडी घेतली, ते त्यांनाही कळले नाही. समर्थवाङ्मय, समर्थ संप्रदाय व मध्यकालीन साहित्य यांविषयी त्यांची आवड हळूहळू वाढत गेली.

दोन-चार वर्षांतच तात्यांचा जम वकिलीत बसला. त्यांचा स्वभाव मितभाषी होता. अनेक सार्वजनिक संस्थांचे ते पदाधिकारी होते व अनेक संस्थांच्या स्थापनेत त्यांनी पुढाकार घेतला होता.

समर्थ रामदासांच्या दासबोधाची एक उत्तम प्रत वि.का. राजवाडे यांच्याकडे आहे म्हणून शं.श्री. देव व तात्यासाहेब भट हे मे १९०३मध्ये साताऱ्याला श्री. वि. का. राजवाडे यांना भेटले. ही त्यांची पहिली भेट. १९०४मध्ये राजवाडे प्रथमत: धुळ्यात आले. त्यानंतर १९१२-१९१३ सालापासून त्यांचा मुक्काम तात्यासाहेबांकडेच होऊ लागला.

खरे तर इतिहास व इतिहासलेखन हे तात्यासाहेबांचे क्षेत्र नव्हते. पण देव, चांदोरकर व नंतर राजवाडे यांच्या संगतीत राहिल्याने त्यांनाही या विषयाची गोडी लागली व पुढे त्यांनी या क्षेत्रात खूप मोठे कार्य केले.

१९०४ पासून राजवाडे दरवर्षी धुळ्याला येत व येथून पुढे पुणे, तळेगाव किंवा अन्यत: संशोधनाला जात. तटस्थता व नि:पक्षपातीपणा हे तात्यासाहेबांचे दोन मोठे गुण होते. विद्वता, प्रतिभा व परिश्रम त्यांनी स्वत:हून कमावले होते. वि. का. राजवाडे संशोधन मंदिरात राजवाड्यांनी हयातभर खर्च करून केलेल्या सर्व संग्रहाची रचना करणे, तत्कालीन इकॉनॉमिक लायब्ररीचे ग्रंथ मिळवून राजवाडे संशोधन मंडळाचे ग्रंथालय उभारणे, त्यासाठी बडोद्यातून, काश्मीरमधून ग्रंथ मिळविण्याचे कार्य तात्यासाहेबांनी केले. राजवाडे यांच्या सर्व संग्रहाची नीट व्यवस्था लावणे, हे साधे काम नव्हते. पण तात्यासाहेबांनी ते नेटाने केले.

भ

द्रव्याअभावी सार्वजनिक संस्थांचा कारभार बहुतांशी रडतखडतच चालतो. संशोधन संस्थांची अवस्था तर अधिकच दारुण असते. तात्यासाहेब यांनी राजवाडे मंडळात पीपल्स को.ऑप. बँकेची स्थापना केली. या बँकेचे सर्व भागधारक आपल्याला मिळणाऱ्या डिव्हिडंडचा काही भाग मंडळाच्या संशोधन कार्याला नियमितपणे देतात. पहिल्या वर्षी १७-१८ रु. देऊ शकणारी बँक आता दरवर्षी जवळपास दोन-तीन लाख रुपये या कामासाठी देते. देशात संशोधन कार्यासाठी नियमितपणे एवढा पैसा देणारी दुसरी बँक नव्हती.

संशोधनपर लेखन प्रकाशित होत राहावे, या उद्देशाने तात्यासाहेबांनी 'संशोधन' हे मासिक सुरू केले. राजवाडे मंडळात शोधकार्य निरंतर चालावे यासाठी त्यांनी खूप परिश्रम केले. 'संशोधक' मासिकात त्यांचे जवळपास ३० लेख प्रकाशित झाले. याव्यतिरिक्त त्यांचे ७ ग्रंथ आहेत. त्यांनी राजवाडे यांच्यासोबतच्या २४ वर्षांच्या विद्वतसहवासाची कथा आपल्या इतिहासाचार्य विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांचे चरित्र व राजवाड्यांचा दोन तपांचा विद्वत सहवास' या आपल्या ६२५ पानी विशाल ग्रंथात शब्दबद्ध करून ठेवली. चरित्रलेखनाच्या दृष्टीने तो स्वैर व पसरट वाटतो, पण वि. का. राजवाडे यांच्यासंबंधीची जास्त प्रामाणिक माहिती देणारा ग्रंथ या दृष्टीने त्याचे मोल अपूर्व आहे. डॉ. रा. चिं. ढेरे म्हणतात त्याप्रमाणे, 'मानव्य विद्यांपैकी अशी एकही विद्या नसावी की जिला राजवाड्यांचा प्रज्ञास्पर्श झालेला नाही.'

— प्रतिभा रानडे

**संदर्भ :**

*१. संशोधक, वर्ष ७८, डिसेंबर २०१०.*

## भवाळकर, तारा चिंतामण

**लोकसाहित्य अभ्यासक व संशोधक**

**१ एप्रिल १९३९ –**

☛ ***मुख्य चरित्रनोंद - साहित्य खंड***

तारा चिंतामण भवाळकर या लोकसाहित्य, लोककला, नाट्यसंशोधन व नाट्यसमीक्षा या क्षेत्रांतील



मान्यवर संशोधिका आहेत. १९६७साली मराठी साहित्य या विषयात एम.ए.ची पदवी संपादन केलेल्या भवाळकरांनी 'मराठी पौराणिक नाटकाची जडणघडण (प्रारंभ ते १९२०)' या विषयावर १९८२साली पीएच.डी. पदवी संपादन केली त्यांच्या या प्रबंधाला पुणे विद्यापीठाचा सर्वोत्कृष्ट प्रबंधाचा पुरस्कार प्राप्त झाला. ज्ञानक्षेत्राच्या ओढीतून त्यांनी अध्यापनाचा पेशा स्वीकारला. त्यांनी १९५७ ते १९७० या काळात माध्यमिक शाळेत शिक्षिका म्हणून विद्यादानाचे कार्य केले. तसेच त्यांनी १९७० ते १९९९ या काळात सांगली येथील श्रीमती चंपाबेन बालचंद शाह महाविद्यालयात पदवी व पदव्युत्तर अध्यापनाचे कार्य केले. विद्यावाचस्पती या पदवीसाठी त्यांनी मार्गदर्शक म्हणूनही काम केले. लोकसाहित्य क्षेत्रातील मान्यवर दुर्गा भागवत आणि डॉ. रामचंद्र चिंतामण ढेरे यांना प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष गुरुस्थानी मानले. मराठी रंगभूमीचे पूर्वरंग शोधून लोकनागर रंगभूमीचे साक्षेपी संशोधन करणाऱ्या अग्रगण्य संशोधकांत त्यांनी आपल्या लेखनाने स्वतंत्र ठसा उमटवला.

'स्त्रीवादी साहित्य' हा डॉ. तारा भवाळकर यांच्या चिंतनाचा विषय आहे. त्यांची 'लोकसाहित्यातील स्त्रीप्रतिमा' (१९९०), 'स्त्रीमुक्तीचा आत्मस्वर' (१९९४), 'मायवाटेचा मागोवा' व 'लोकपरंपरा आणि स्त्रीप्रतिमा' (२००२) ही पुस्तके स्त्रीवादी दृष्टीकोनातून मराठी लोकसाहित्याचा अभ्यास करण्याऱ्यांसाठी मूल्यवान संदर्भ ग्रंथ ठरले आहेत.

लोकसाहित्य, लोककला आणि नाटक हा अभ्यासविषय असणाऱ्या डॉ. भवाळकर यांनी १९७५साली 'राणीसाहेब रुसल्या' या एकांकिकेचे लेखन केले. त्यानंतर 'मधुशाला' या हरिवंशराय बच्चन यांच्या काव्याकृतीचा काव्यानुवाद त्यांनी केला. एकूण

भ

३५ ग्रंथ त्यांच्या नावावर असून 'यक्षगान आणि मराठी नाट्यपरंपरा', 'लोकनागर रंगभूमी', 'महामाया', 'मिथक आणि नाटक', 'मराठी नाट्यपरंपरा : शोध आणि आस्वाद', 'लोकसंस्कृतीची शोधयात्रा', 'लोकांगण', 'मातीची रूपे', 'नाट्याचार्य खाडिलकर चरित्र' हे त्यांचे काही महत्त्वपूर्ण ग्रंथ. 'लोकसाहित्याच्या अभ्यासदिशा' हे त्यांचे पुस्तक लोकसाहित्याचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी बहुमोल असेच आहे. लोकसाहित्यांतर्गत जानपद गीतातील स्त्रीचे सत्त्व आणि स्वत्व ताराबाईंनी आपल्या वैविध्यपूर्ण लेखणीतून प्रकट केले .

भवाळकरांनी आत्तापर्यंत अनेक राष्ट्रीय तसेच आंतरराष्ट्रीय स्तरावरील चर्चासत्रे, परिसंवाद यांतून शोधनिबंध सादर केले. अनेक परिसंवादांचे अध्यक्षपद भूषवले. मुंबई येथील रवींद्र नाट्यमंदिरमध्ये २०११मध्ये आयोजित झालेल्या पहिल्या अखिल भारतीय महिला लोककला संमेलनाचे बीजभाषण त्यांनी केले. अरिझोना स्टेट युनिव्हर्सिटी, अमेरिका येथे १९९१साली झालेल्या 'भारतीय समाज, संस्कृती आणि स्त्री' या विषयावरील चर्चासत्रात खास निमंत्रणावरून भाग घेऊन, त्यांनी 'भारतीय संस्कृतीतील स्त्री-प्रतिमा या विषयावर शोधनिबंध सादर केला. या निमित्ताने त्यांनी अमेरिका, इंग्लंड आदी राष्ट्रांचा दौरा केला.

मराठी वाङ्मयकोश, मराठी ग्रंथकोश, मराठी समाजविज्ञानकोश, मराठी विश्वकोश, शिल्पकार चरित्रकोश आदी महत्त्वाच्या कोशनिर्मितीत भवाळकर यांचा मोलाचा सहभाग आहे. विविध साहित्यसंमेलनांची अध्यक्षपदेही त्यांनी भूषवलेली असून त्यात इस्लामपूर-जागर साहित्य संमेलन, उचगाव (बेळगाव) महाराष्ट्र-कर्नाटक सीमा प्रदेशीय साहित्य संमेलन, कारदगा-महाराष्ट्र-कर्नाटक सीमा प्रदेशीय साहित्य संमेलन, अलिबाग (आवास)- कोंकण मराठी साहित्य परिषद, पहिले महिला साहित्य संमेलन, जळगाव सूर्योदय साहित्य संमेलन यांचा समावेश होतो. साहित्यविषयक उपक्रम आणि संस्थात्मक उपक्रम यांमध्येही डॉ. भवाळकर यांचा मोलाचा सहभाग असतो. अनेक मानसन्मानांनी त्यांना गौरवण्यात आले आहे. त्यात 'लोकसंचित' या पुस्तकासाठी मिळालेला महाराष्ट्र राज्य उत्कृष्ट ग्रंथनिर्मिती पुरस्कार (१९९२), 'अखिल भारतीय दलित साहित्य ॲकॅडमी', दिल्ली या संस्थेतर्फे डॉ. बाबासाहेब आंबेडकर गौरववृत्ती (१९९४), विशेष कर्तृत्वात स्त्रीसाठी असलेला 'मंगल पुरस्कार' (१९९५), 'मराठी नाट्यपरंपरा : शोध आणि आस्वाद' या पुस्तकासाठी 'श्री. ना. बनहट्टी पुरस्कार' (१९९६) तसेच 'वि. म. गोखले पुरस्कार' (१९९६), 'माझीये जातीच्या' पुस्तकाकरता वाङ्मय चर्चा मंडळ, बेळगाव या संस्थेतर्फे 'विशेष वाङ्मय पुरस्कार, 'मराठी नाटक : नव्या दिशा नवी वळणे'साठी 'वाङ्मय समीक्षा पुरस्कार' आणि साहित्यप्रेमी भगिनी, पुणे तर्फे दिलेला 'कै. मालतीबाई दांडेकर जीवनगौरव पुरस्कार' (२००४) शरश्चंद्र चटोपाध्याय पुरस्कार, विशेष सन्मानवृत्ती: म. राज्य साहित्य संस्कृती मंडळ, 'रत्नशारदा पुरस्कार'; सह्याद्री दूरदर्शन वाहिनी, निर्मलकुमार फडकुले स्मृती पुरस्कार, 'गार्गी' पुरस्कार; श्री सिद्धिविनायक ट्रस्ट, मुंबई, दे.भ. रत्नाप्पाअप्पा कुंभार स्मृतिमंच; 'साहित्य रत्न' पुरस्कार, सु.ल. गद्रे पुरस्कार आदीं सुमारे २९ पुरस्कारांचा समावेश आहे.

कर्नाटकातील यक्षगान, महाराष्ट्रातील दशावतार, ललीत, विष्णुदास भावे यांची नाटके, भागवत मेळे, लोककलांच्या शैलींचा वापर करून मराठी प्रायोगिक रंगभूमीवर आलेली प्रायोगिक नाटके या सर्व विषयांवरील डॉ. तारा भवाळकर यांचे लेखन लोकसाहित्य आणि लोक नागर रंगभूमी यांना नवे परिमाण देणारे आहे.

— प्रा. डॉ. प्रकाश खांडगे

## भांडारकर, देवदत्त रामकृष्ण

**पुरातत्त्वज्ञ, प्राध्यापक, संशोधक**

**१९ नोव्हेंबर १८७५ — ३० मे १९५०**

देवदत्त रामकृष्ण भांडारकर यांचा जन्म पुणे येथे झाला. रामकृष्णपंत व मातोश्री अन्नपूर्णाबाई यांचे

भ



देवदत्त हे तिसऱ्या क्रमांकाचे चिरंजीव. देवदत्त आणि रामकृष्णपंतांचे भाचे भास्कर गोठोस्कर (पुढे एशियाटिक सोसायटीचे ग्रंथपाल झाले) यांचे शिक्षण एकत्र झाले आणि ते कुटुंबामध्ये सर्वांत अधिक शिकले. डेक्कन महाविद्यालयामधून १८९६मध्ये बी.ए. झाल्यावर कायद्याचा अभ्यास सुरू केला. मुंबई विद्यापीठासाठी त्यांनी 'पूर्व मुसलमान काळातील महाराष्ट्राच्या ग्रामीण-नागरी वसाहतीचे संक्षिप्त समालोचन' हा प्रबंध सादर केला. त्यात त्यांना 'भगवानलाल इंद्रजी' पारितोषिक मिळाले. आपल्या वडिलांच्या इच्छेनुसार त्यांनी १९०० साली संस्कृत-प्राचीन भारतीय इतिहास आणि पुराभिलेख' या विषयावर मुंबई विद्यापीठाची एम.ए.ची पदवी संपादन केली. नंतर तीन वर्षे भारताच्या 'शिरगणती' खात्यात नोकरी केली. ब्रिटिश अधिकाऱ्यांना देवदत्तांनी पुढे संशोधन करण्याची अपेक्षा होती. पहिली नोकरी सोडून मुंबई मंडलाच्या पुरातत्त्व विभागात 'साहाय्यक सर्वेक्षक' पद स्वीकारून १९०४ ते १९०७ अशी चार वर्षे काम केले. १९१५साली पुरातत्त्व विभागाच्या पश्चिम मंडलाचे ते अधिकारी झाले. या काळात अनेक शिलालेख-ताम्रपट यांवर त्यांनी शोधनिबंध लिहिले. १९१७ साली पुण्यात वडिलांच्या नावे संस्था स्थापन होत असताना, देवदत्त कोलकात्यात दाखल झाले आणि कोलकाता विद्यापीठात 'प्राचीन भारतीय इतिहास आणि संस्कृती' या विषयाचे 'कारमाईकल प्राध्यापक' म्हणून रुजू झाले. हे काम १९३६मध्ये निवृत्त होईपर्यंत त्यांनी समर्थपणे पार पाडले.

सर रामकृष्ण गोपाळ या आपल्या वडिलांपेक्षा देवदत्तांचा स्वभाव वेगळा होता. वाडवडिलांचा घराण्याचा मोठेपणा न सांगता, अधिकार व द्रव्यप्राप्ती यांचा लोभ न ठेवता हा विद्वान स्वत:च्या आवडीच्या विषयांमध्ये रमला होता. प्राचीन इतिहास, पुराभिलेख, नाणक शास्त्र या वडिलांपेक्षा वेगळ्या विषयांत अभ्यास करून, त्यांनी निष्णात पद प्राप्त करून घेतले होते. एम.ए.साठी गुजरात राष्ट्रकूट युवराज पहिला कर्क्क याच्या नवसारी ताम्रपटावर (इ.स. ७३८) केलेला अभ्यास आणि कुशाण राजपरंपरा आणि शककाला उगम याविषयीचे शिलालेखांवरून काढलेले निष्कर्ष, फ्रेंच प्राच्यविद्यापंडित डॉ. बार्थ आणि सर भांडारकरांना खूप आवडले होते.

एकीकडे वेगळ्या विषयावर अभ्यास करत असताना, तसेच 'जनगणना' कार्यालयात काम करत असताना, 'धर्म आणि धर्मपंथ', 'जाति आणि जमाती' यांसारख्या तदनुषंगिक विषयात प्रा. एंथोवन यांना मदत करून एक वेगळी दृष्टी दिली. तसेच 'अहिर' जमातीवर स्वतंत्र संशोधन करून संशोधकाचा पिंड दाखवून दिला. 'गुर्जर राज्याचा कालानुक्रम आणि विस्तार' नव्याने मांडला. मिहिर भोजच्या ग्वालियर अभिलेखाचे अचूक वाचन करून कालनिर्णय केला. तो तत्कालीन विद्वानांनी मान्य केला.

मुंबई मंडलात सर्वेक्षक म्हणून काम करत असताना राजपुतान्यात अभ्यासासाठी जाऊन पुरातत्त्वीय अभ्यासाची सामग्री संकलित केली. पाशुपत पंथाचा संस्थापक लकुलीश यावरील देवदत्तांचे संशोधन आणि काढलेले निष्कर्ष सर रामकृष्ण यांनाही उपयोगी पडले. १९१५मधील 'गुहिलोत' या राजपुतांच्या सर्वश्रेष्ठ जमाती विषयी केलेल्या संशोधनामुळे, तसेच 'हिंदू लोकसमाजामधील परदेशी अंश' या लेखामुळे त्यांनी पुरवलेल्या ऐतिहासिक माहितीचे मोल मोठे मानले गेले आहे.

देवदत्तांचे महत्त्वाचे संशोधन म्हणजे विदिशा नगरीजवळील उत्खननात सापडलेला 'खाम्बाबा पिलर'! हा गोलाकार स्तंभ ग्रीक राजदूत हेलिओडोरस याने आपल्या वासुदेवभक्तीचे आदरचिन्ह म्हणून उभारलेला आहे. तो दोन पोलादी पट्ट्यांवर उभा असून आजूबाजूचे बांधकाम पक्क्या विटांचे आणि चुनखडी

भ

गिलाव्याचे होते. देवदत्तांनी पोलाद तपासणीसाठी विदिशात, तर चुनखडी मिश्रण पुण्याच्या शेतकी महाविद्यालयाच्या तत्कालीन प्राचार्यांकडे, डॉ. मॅन यांच्याकडे तपासास पाठवून दिले. इ.स. पूर्व १२५ सालात बनवताना म्हणजेच मौर्यकालात हा स्तंभ अस्सल पोलाद, चुनखडी गिलावा व भाजक्या विटांचा उपयोग केला होता असे सिद्ध केले. देवदत्तांनी संशोधनाची आदर्श आणि फिल्डवर्क पद्धती दाखवून दिली.

ब्रिटिश बादशहा पंचम जॉर्ज, ५ डिसेंबर १९११ रोजी मुंबईत आले त्या वेळी त्यांना 'घारापुरीची एलिफंटा' दाखवायचे ठरले. त्या वेळी 'द गाईड टू एलिफंटा केव्ह' पुस्तक लिहून, या मार्गदर्शनातून एकच एकसंध शिळा कोरून प्रचंड शिवमूर्ती-त्रिमूर्ती निर्माण झाल्याचे आश्चर्य त्यांनी तत्कालीन राज्यकर्त्यांना दाखवून दिले. देवदत्तांच्या संशोधनातून- १) एन्शंट हिस्टरी ऑफ इंडिया (१९१८), २) द गाइड टू एलिफंटा केव्ह (१९११), ३) लेक्चर्स ऑन एन्शंट इंडियन न्युमॅस्मेटिक्स (१९२१), ४) अशोक (कारमायकेल लेक्चर्स) १९२५, ५) लिस्ट ऑफ इन्स्क्रीप्शन्स ऑफ नॉर्दन इंडिया १९२७, ६) सम ऑस्पेक्ट्स ऑफ एन्शंट हिंदु पॉलिटी १९२९, ७) सम ऑस्पेक्ट्स ऑफ एन्शंट इंडियन कल्चर, असे महत्त्वाचे ग्रंथ एकापाठोपाठ निर्माण झाले. त्याशिवाय सुमारे पन्नास शोधनिबंध त्यांनी वेगवेगळ्या परिषदांतून सादर केले. एकूण ५७ शिलालेखांचे त्यांनी संपादन केले. संपादनात बी.सी.लॉ. व्हाल्यूम, अशोक इन्स्क्रीप्शन्स, पुरातत्त्वीय संशोधनाचे रिपोर्ट, केशव मिश्राची तर्कभाषा, तीर्थकल्प इत्यादी ग्रंथांचे संपादनही त्यांनी केले.

त्यांनी कित्येक वर्षे इंडिया, इंडियन अ‍ॅन्टीक्वरी, इंडियन कल्चर या संशोधनात्मक नियतकालिकांचे संपादन केले होते. पुरातत्त्वशास्त्र, नाणकशास्त्र, लिपिशास्त्र, प्राचीन भूगोल, मूर्तिशास्त्र, साहित्य, राजकीय इतिहास इत्यादी विषयांवर पन्नासहून अधिक लेख त्यांनी प्रसिद्ध केले. याशिवाय विविध परिषदांतील अध्यक्षीय भाषणे, ग्रंथ समीक्षणे याच्याही बऱ्याच नोंदी आढळतील.

कोलकाता विद्यापीठात अध्यापन-संशोधन करत असताना 'कार्मायकेल व्याख्यानमाला' त्यांनी सुरू केली. यामध्ये त्यांच्यासह अनेक विद्वानांनी भाषणे दिली, जी पुढे प्रतिष्ठेची व्याख्यानमाला ओळखली गेली.

एवढ्या प्रचंड व्यासंगानंतर त्यांना एशियाटिक सोसायटी कोलकाता व लंडन यांचे सदस्यत्व, कोलकाता विद्यापीठाची सन्मान्य डॉक्टरेट (१९२१), विमल चरण लॉ सुवर्णपदक, इत्यादी सन्मान मिळाले. सर आशुतोष मुखर्जी यांनी देवदत्तांना मोठ्या भांडारकरांची छोटी आवृत्ती न मानता प्रति मोठे भांडारकरच मानून मोठा सन्मान केला. वडील महाराष्ट्रात, तर चिरंजीव बंगालमध्ये कीर्तिध्वजा फडकवत होते. सर्वच क्षेत्रांत वडिलांपेक्षा वेगळी जीवननिष्ठा दाखवणाऱ्या देवदत्तांनी एक गोष्ट वडिलांची परंपरा आवडली म्हणून पाळली. बंदोपाध्याय संपादित भांडारकर शताब्दी ग्रंथामध्ये एका विशेष छायाचित्रात देवदत्त हरिदासी पद्धतीचे कीर्तन करत असल्याचे दाखवले आहे. बाजूला साथीला तबला-पायपेटी, मागे तंबोरा-झांज, आणि पगडी - उपरणे या वेशात देवदत्त कीर्तन करत असल्याचे दाखवले होते. या ग्रंथाचे १९८४साली कोलकाता विद्यापीठात पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधी यांच्या हस्ते विमोचन झाले होते. रामकृष्ण गोपाळदेखील कीर्तन करत. संत तुकारामांचे अभंग त्यांना अक्षरश: मुखोद्गत होते.

– वा.ल. मंजूळ



## भांडारकर, रामकृष्ण गोपाळ

**शिक्षणतज्ज्ञ, प्राच्यविद्याविशारद, समाजसुधारक**

**६ जुलै १८३७ – २४ ऑगस्ट १९२५**

भारतीय संस्कृतीवर पाश्चात्त्यांचा प्रभाव पडू लागल्याच्या संक्रमणकाळात, आपल्या देशाच्या इतिहासाला नवे वळण देण्याचे काम करणारे रामकृष्ण



गोपाळ भांडारकर यांचा जन्म मालवण येथे सारस्वत ब्राह्मण घराण्यात झाला. त्यांच्या घराण्याला मालवणमध्ये जकात गोळा करण्याचे अधिकार मिळाले होते. वडिलांच्या बदलीच्या नोकरीमुळे सर्वच कुटुंबास फिरावे लागे, परंतु त्यामुळेच रामकृष्णांना उच्च शिक्षणाच्या चांगल्या संधीही प्राप्त झाल्या. इ.स. १८४७मध्ये इंग्रजी शिक्षणास सुरुवात करून, इ.स. १८५४मध्ये ते मुंबईच्या एलफिन्स्टन इन्स्टिट्यूटच्या माध्यमिक शाळाविभागातून पहिल्या वर्गात उत्तीर्ण झाले. इंग्रजी, इतिहास, तत्त्वज्ञान आणि गणित हे त्यांचे अत्यंत आवडते विषय होते. या अभ्यासाचा त्यांना प्राचीन भारतीय विद्याशाखांच्या चिकित्सक व तुलनात्मक अभ्यासासाठी अतिशय उपयोग झाला.

डॉ. रा.गो. भांडारकर यांच्या जीवनचरित्राचे चार स्पष्ट भाग दिसतात. १) शिक्षणतज्ज्ञ, २) प्राच्यविद्याविशारद, ३) समाजसुधारक आणि ४) धर्मसुधारक. या प्रत्येक भागात त्यांचे कार्य महनीय आहे.

**शिक्षणतज्ज्ञ**

इ.स. १८५८मध्ये एलफिन्स्टन महाविद्यालयातून त्यांनी आपले शिक्षण पूर्ण केले आणि नंतर प्राचार्यांचे साहाय्यक म्हणून व एलफिन्स्टन इन्स्टिट्यूटमध्ये अध्यापक म्हणून काम केले. लगेच पुढच्याच वर्षी त्यांना विशेष प्रतिष्ठेची दक्षिणा फेलोशिप मिळाली. विद्याभ्यासासाठी अशी फेलोशिप मिळवणारे भांडारकर हेच पहिले अभ्यासक होय. या साडेपाच वर्षांच्या काळात त्यांनी संस्कृतचा सखोल अभ्यास केला. एवढेच नव्हे, तर त्यांनी संस्कृत व्याकरणावर आपले पहिले पुस्तकही लिहिले. या अभ्यासात त्यांनी एवढे प्रावीण्य मिळविले की, इ.स. १८६४मध्ये डॉ. ह्यूग यांच्या रजेच्या काळात त्यांनी संस्कृतचे प्राध्यापक म्हणून काम पाहिले. त्यांची या विषयातील गती पाहून डॉ. हॉवर्ड यांनी त्यांना असे स्पष्ट सांगितले की, 'आपल्यासारख्या संस्कृतच्या गाढ्या विद्वानाने शासकीय नोकरीच्या भानगडीत पडू नये, शिक्षणखाते हेच तुमचे योग्य स्थान आहे.' इ.स. १८६५मध्ये ते रत्नागिरीच्या माध्यमिक शाळेचे मुख्याध्यापक झाले. इतके महत्त्वाचे पद मिळवणारे भांडारकर हे पहिलेच भारतीय होत. त्यांच्या येथील कारकिर्दीमध्ये शालान्त परीक्षेचा निर्णय १००टक्के लागला आणि याच शाळेचे विद्यार्थी सन्मानाची जगन्नाथ शंकरशेट संस्कृत शिष्यवृत्ती मिळवू लागले. याच काळात त्यांनी संस्कृत व्याकरणावरील दुसरे पुस्तक लिहिले. ही दोन पुस्तके पुढे संस्कृतच्या अभ्यासाची मानदंड ठरली.

शिक्षणक्षेत्रात अतिशय मोलाची कामगिरी करत ते क्रमाने मुंबई विद्यापीठाचे परीक्षक, फेलो व सभासद, कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष आणि उपकुलगुरू झाले. भारतीय असल्यामुळे ते कुलपती होऊ शकले नाहीत, परंतु महर्षी कर्वे यांच्या महिला विद्यापीठाचे कुलपती मात्र झाले. त्यांच्यामुळेच आधुनिक संस्कृत पंडितांची संलग्नता मुंबई विद्यापीठाशी झाली आणि त्यामुळेच विद्यापीठालासुद्धा अखिल भारतीय दर्जा प्राप्त झाला. ही त्यांची फार मोठी देणगी आहे. अभ्यासक्रमामध्ये नवनवीन विषयांचा समावेश करण्यासाठी त्यांनी खूप मेहनत केली. संस्कृत, लॅटिन, इतिहास यांसारख्या विषयांचा विद्यापीठीय अभ्यासक्रमामध्ये समावेश होणे, हे त्यांच्या परिश्रमाचे फळ आहे. याशिवाय हंटर शिक्षण समितीला उपयुक्त शिफारसी करणे, स्त्री-शिक्षणाला उत्तेजन देणे, विद्यार्थ्यांसाठी नीतिबोधपर पुस्तके लिहिणे किंवा तशी शिफारस करणे अशी अनेक शिक्षणविषयक कामे त्यांनी केली आहेत.

शिक्षणविषयक अतिशय मूलभूत विचार हे भांडारकरांचे मोठेच योगदान आहे. अचूक दृष्टिकोन तयार होण्यासाठी मार्गदर्शन करणे ही त्यांच्या मते शिक्षणाची व्याख्या आहे. सदसद्विवेकबुद्धीने किंवा नैतिक निर्णयशक्तीने क्रियांना प्रेरणा मिळणे, हे शिक्षणाचे

भ

ध्येय असले पाहिजे असे त्यांचे मत होते. शिवाय आपल्यामधील उणिवांची जाणीव असणे खऱ्या प्रगतीसाठी आवश्यक आहे, असे त्यांना वाटे. शिक्षणाने होणारा मानसिक प्रवृत्तीचा विकास आणि भावनांमधील नैतिक सुसंगती यांमुळे देशाची निश्चित प्रगती होईल, असा त्यांना विश्वास होता. सत्य व न्याय यांवर आधारित शिक्षण हेच समाजातील रूढींना व चालीरितींना वळण लावते आणि देशाच्या विकासाला मदत करते, यावर त्यांचा दृढ विश्वास होता. अशा रितीने केवळ वैयक्तिक शिक्षणापुरते आपले विचार मर्यादित न ठेवता त्यांनी संपूर्ण समाजासाठी शिक्षणाचा उपयोग कसा होईल, याचा विचार केला त्यामुळे त्यांची गणना थोर शिक्षणतज्ज्ञांमध्ये होते.

**प्राच्यविद्याविशारद**

वास्तविक प्राचीन भारताची अनेक विद्याशाखांच्या अभ्यासाची थोर परंपरा होती. तथापि काळाच्या ओघात त्यांच्या अभ्यासाकडे दुर्लक्ष होऊ लागले होते. परंतु पाश्चात्य विचारांचा भारतात शिरकाव झाल्यापासून अभिजात विद्यांकडे पाहण्याची नवीन दृष्टी तयार झाली आणि डॉ. भांडारकरांनी तिचा मोकळेपणाने स्वीकार करून प्राच्यविद्यांच्या अभ्यासाची एक नवीन पद्धत निर्माण केली. सर विल्यम जोन्स, हेन्री थॉमस कुक, कोलब्रुक आणि जेम्स प्रिन्सेप या युरोपीय विद्वानांनी भारताचा इतिहास, प्राचीनत्व, कला, साहित्य व शास्त्र यांचा शोध घेण्याची मोहीमच सुरू केली होती. त्यांच्या हातात हात मिळवून आघाडीच्या भारतीय विद्वानांनीसुद्धा या दिशेने काम करण्यास सुरुवात केली. डॉ. भांडारकरांना विल्सन, कीथ, मॅक्डोनल, फर्गसन या व अशासारख्या विद्वानांबरोबर चर्चा व काम करण्याची संधी मिळाल्यामुळे त्यांची दृष्टी आणि कार्यक्षेत्र व्यापक झाले. मॅक्सम्यूलरने या क्षेत्रातील भारतीयांच्या प्रगतीविषयी काढलेले उद्‌गार फार बोलके आहेत. ते म्हणतात, 'युरोपीय प्राध्यापकांकडून शिक्षण मिळालेली नव्या व अतिशय होतकरू अशा संस्कृत अभ्यासकांची एक पिढी उदयास येत आहे आणि ते आमच्या विद्वानांपुढे अधिक भक्कम प्रतिस्पर्धी म्हणून उभे राहतील.' 'प्राध्यापक भांडारकर, शंकर पांडुरंग पंडित यांनी मुंबईत प्रकाशित केलेल्या संस्कृत पाठ्यपुस्तकाच्या आवृत्त्या युरोपीय विद्वानांच्या उत्तमोत्तम पुस्तकांच्या बरोबरीने सहज बसू शकतील.' याचा उघड अर्थ असा आहे की, भांडारकर करत असलेले काम व त्यांची लेखनपद्धती पाश्चात्य संशोधकांच्याही पसंतीस उतरली होती.

पौर्वात्य विद्यांच्या संदर्भात प्राध्यापक भांडारकर यांनी पाच प्रकारची कामगिरी केली आहे. भारतीय इतिहासाचा सखोल अभ्यास, धर्म आणि तत्त्वज्ञान यांविषयी मूलभूत संशोधन, संस्कृत पाठ्यपुस्तकांचे चिकित्सक संपादन, भाषाशास्त्र आणि व्याकरणाच्या क्षेत्रात विशेष अभ्यास आणि इतरांच्या ग्रंथांचे अचूक परीक्षण ही ती कामगिरी होय.

भारताचा पहिला इतिहासकार म्हणून डॉ. रा. गो. भांडारकर यांचेच नाव घेतले जाते. दख्खनचा प्राचीन इतिहास ('अर्ली हिस्ट्री ऑफ दि डेक्कन') आणि प्राचीन भारतीय इतिहास - एक दृष्टिक्षेप ('अ पीप इन टु अर्ली हिस्ट्री ऑफ इंडिया') या त्यांच्या दोन पुस्तकांनी इतिहासाच्या अभ्यासात अत्यंत मोलाची भर घातली आहे. पहिल्या पुस्तकात आर्यांच्या वसाहत काळापासून ते १३१८मधील हिंदू राजवटीच्या अंतापर्यंतचा दक्षिणेचा इतिहास प्रथमच लिहिला गेला आहे. दुसऱ्या पुस्तकात बौद्ध धर्माच्या उदयापासून ते गुप्त राजवटीत घडलेल्या ब्राह्मण धर्माच्या पुनरुज्जीवनापर्यंतच्या प्राचीन भारतीय इतिहासाचा संपूर्ण मागोवा घेतला गेला आहे. याखेरीज विविध विषयांवर त्यांचे अनेक लेख प्रकाशित झाले आहेत. 'वेदज इन् इंडिया' हा इंडियन अँटिक्वरीतील लेख आणि 'नासिक केव्ह इन्स्क्रिप्शन्स' हा लंडन येथील प्राच्यविद्यापरिषदेत सादर केलेला लेख हे त्यांचे विशेष गाजलेले लेख. शिवाय चिकित्सक, तुलनात्मक व ऐतिहासिक संशोधनपद्धती या त्यांच्या लेखाने ऐतिहासिक संशोधनास एक वेगळीच दिशा प्राप्त करून दिली आहे. त्यांनी मांडलेली संशोधनाची तत्त्वे अशी -

इतिहासकार नि:पक्षपाती असला पाहिजे. त्याने न्यायाधीशाच्या पद्धतीने पुराव्यांचा अवलंब केला पाहिजे. त्याच्या मनात पूर्वग्रह असू नये, तसेच संशोधन करत असताना आपल्या देशाचा मोठेपणा सांगणे हा हेतू असू नये. वस्तुनिष्ठ सत्यदर्शन हे एकमेव उद्दिष्ट त्यासमोर असले पाहिजे. पुराव्यांची विश्वसनीयता आणि आपल्या विधानांची संभाव्यता त्याने पारखून घ्यायला हवी.

यावरून हे स्पष्ट होते की, भांडारकरांनी इतिहास संशोधनाचा अत्यंत मूलगामी विचार केला होता. आपल्या देशाच्या संस्कृतीवरील बाह्य प्रभाव नाकारणे आणि आपल्या इतिहासातील घटना अतिप्राचीन मानणे या भारतीय विद्वानांच्या प्रवृत्तीवर त्यांनी टीका केली तसेच आपल्या संस्कृतीवर ग्रीक, रोमन आणि ख्रिश्चन लोकांचा अधिक प्रभाव दाखवणे आणि वस्तुत: प्राचीन असलेल्या भारतीय घटना व साहित्य हेतुत: आधुनिक ठरवणे या पाश्चात्य प्रवृत्तीवरही त्यांनी कडाडून टीका केली. सातवाहन राजांच्या पुराणातील नामावली चिकित्सकपणे हाताळून शिलालेख, नाणी व इतर पुरावे यांच्या आधारे एक निश्चित कालनिर्णय करण्यात भांडारकरांना यश आले. त्यांच्या इतिहासविषयक विचारात दैवी हस्तक्षेप किंवा कल्पना यांना अजिबात प्रवेश नव्हता.

प्राच्यविद्यांच्या क्षेत्रातील आणखी एक महत्त्वाची कामगिरी म्हणजे संस्कृत पाठ्यपुस्तकांच्या चिकित्सक आवृत्त्या. त्यातील सर्वांत उल्लेखनीय म्हणजे मालतीमाधवाची आवृत्ती. याशिवाय विद्याधराची एकावली आणि मल्लिनाथाची त्यावरील टीका, बल्लालसेनाचे अद्‌भुतसागर, जल्हणाचे सूक्तिमुक्तावली व सोमेश्वराचे सुरतोत्सव यांचाही निर्देश करावयास हवा. ते इतर विद्वानांनी लिहिलेल्या पुस्तकांचेही सुजाण व निर्भय टीकाकार होते. मार्टिन हॉगचे ऐतरेय ब्राह्मण, गोल्डस्ट्यूकरचे पाणिनि व व्हिसेंट स्मिथचे अर्ली हिस्ट्री ऑफ इंडिया या पुस्तकांच्या परीक्षणांवरून ही गोष्ट स्पष्ट होते. युरोपमध्येही डॉ. भांडारकरांचे लेखन अधिकृत म्हणून उद्‌धृत केले जात होते आणि त्यांचा शब्द अखेरचा मानला जात असे. प्रा. कीलहॉर्न यांनी म्हटले आहे की, ‘आधुनिक काळात भारतात जन्माला आलेल्या सर्वश्रेष्ठ संस्कृतपंडितांपैकी ते एक होत.’

**समाजसुधारक**

पाश्चात्य विद्वानांच्या सान्निध्यात राहिल्यामुळे भांडारकरांची विचारधाराही परंपरेपेक्षा अधिक विवेकी आणि चिकित्सक बनली होती. भारतीय आचारपद्धतीतील दोष दूर करून हिंदू समाजाच्या परिस्थितीत सुधारणा घडवून आणण्यासाठी प्रथम येथील समाजव्यवस्थेचा सखोल अभ्यास करून त्यांनी खूप प्रयत्न केले. दि सोशल हिस्ट्री ऑफ इंडिया हा लेख म्हणजे या दिशेने टाकलेले पहिले पाऊल होय. वास्तविक जातीय निर्बंध भारताबाहेरील अनेक देशांमध्येही होते परंतु भारतात त्यांना दृढ होण्यास अनुकूल भूमी मिळाली. पश्चिमेत उत्कट राजकीयत्वाच्या व राष्ट्रीयत्वाच्या भावनेची वाढ जातीय बंधने शिथिल करण्यास कारणीभूत झाली परंतु भारतात मात्र या भावनांच्या अभावामुळे ही बंधने अधिकच दृढ झाली, असे त्यांचे मत होते. परमहंससभा या संस्थेचे सभासदत्व स्वीकारून त्यांनी समाजसेवेसाठी पुष्कळ प्रयत्न केले. अंतर्गत जातिव्यवस्थेबरोबरच हिंदू-मुस्लिम-धर्मकलह दूर करण्याचासुद्धा त्यांनी कसून प्रयत्न केला. भारतीय स्त्रियांवर लादलेल्या अन्याय्य दु:खाविरोधात त्यांनी आवाज उठवला होता. पुरुषांना मिळणाऱ्या अनेक विवाहविषयक सवलती आणि त्याचविषयी स्त्रियांवर घातलेल्या निर्बंधांमुळे स्त्रियांचे होणारे शारीरिक व मानसिक नुकसान यामुळे वास्तविक संपूर्ण समाजाचेच नुकसान होत असते, हे पटवून देण्याचा त्यांनी परोपरीने यत्न केला. बालस्त्रीहत्येची चाल, बहुपतित्व आणि बहुपत्नीत्व या सामाजिक दोषांचाही त्यांनी निषेध केला. देशाच्या सांस्कृतिक आणि धार्मिक विकासात स्त्रियांचे योगदान मोठे असते, हे त्यांनी इतिहासाचे दाखले देऊन सिद्ध करून दाखवले होते. या विषयावर त्यांचे लोकमान्य टिळकांशी मतभेदही झाले पण ते आपल्या मतावर ठाम राहिले. आपल्या लोकांचे बळ कमी

करणाऱ्या आणि त्यांच्या शक्तीला व सामर्थ्याला पुरेसा वाव न देणाऱ्या दुष्ट रूढींचे निर्मूलन करणे, हे सामाजिक चळवळीचे मुख्य उद्दिष्ट आहे असे त्यांचे मत होते. याखेरीज शेतकऱ्यांचे दारिद्र्य व सावकारी पाश यांच्या विचाराने त्यांचे मन खिन्न होई आणि ते त्यावर उपाय शोधत. अशा थोर विचारांमुळेच त्यांची गणना राजा राममोहन रॉय, ईश्वरचंद्र विद्यासागर इत्यादींबरोबर होऊ लागली.

आपल्या सखोल विद्वत्तेने, धार्मिक आणि सामाजिक सुधारकी वृत्तीने आणि सत्यावरील अतूट निष्ठेने डॉ. रा. गो. भांडारकर यांनी महर्षी ही पदवी प्राप्त केली आहे. भांडारकरांच्या मर्त्य अवशेषांवर एक स्तूप उभारला गेल्याची माहिती मिळते. परंतु पुण्यातील भांडारकर इन्स्टिट्यूट हे त्यांच्या संशोधनाचे आणि प्राच्यविद्यांच्या अभ्यासासाठी केलेल्या अथक परिश्रमांचे प्रतीक आहे.

– डॉ. उमा वैद्य

## भागवत, दुर्गा नारायण

**ललित लेखिका, प्राच्यविद्या संशोधिका**

**१० फेब्रुवारी १९१० – ७ मे २००२**

☛ ***मुख्य चरित्रनोंद - साहित्य खंड***



लेखिका म्हणून दुर्गाबाई भागवतांचे योगदान विलक्षण ताकदीचे आहे. त्यांच्या लेखनातून दिसतो तो त्यांचा चिंतनशील व्यासंग, भावगर्भ, लालित्यपूर्ण भाषेचे सौंदर्य, वाचकाला खिळवून ठेवणारी नादमधुर प्रसन्न शैली आणि वाचकाला विचारप्रवृत्त करणारे त्यांचे विषय ही बाईंच्या साहित्यातील त्यांची वैशिष्ट्ये त्यांच्या प्राच्यविद्या क्षेत्रातील लेखनातही दिसून येतात.

जीवनाबद्दलची निस्सीम उत्सुकता आणि ज्ञानाचा असीम ध्यास यांतूनच दुर्गाबाईंचे लेखन समृद्ध होत गेले. संस्कृत आणि इंग्रजी या विषयांत त्यांनी बी.ए.ची पदवी प्रथम वर्गात मिळवली. बी.ए.चा अभ्यास करताना त्यांनी शंकराचार्यांच्या 'ब्रह्मसूत्र भाष्या'चा अभ्यास केला होता. त्यामध्ये शंकराचार्यांनी म्हटले होते, की व्यावहारिक आणि पारमार्थिक असे सत्याचे दोन प्रकार असतात. व्यावहारिक पातळीवर ईश्वराचे अस्तित्व असते; परंतु अंतिम अशा पारमार्थिक पातळीवर ईश्वर असा कोणी नसतोच, तिथे असते ते फक्त ब्रह्मज्ञान. हे वाचून बाईंनी शंकराचार्यांच्या आधीच्या बौद्धधर्माचा अभ्यास करण्याचे ठरविले. पण काही तांत्रिक कारणांमुळे बाईंनी अभ्यास केला तो 'अर्ली बुद्धिस्ट ज्युरिस्प्रुडेन्स' या विषयाचा. मूळ पाली, संस्कृत आणि अर्धमागधी भाषांतील ग्रंथ वाचून बाईंनी हा प्रबंध पूर्ण केला. तो तपासण्यासाठी केंब्रिज विद्यापीठाकडे पाठविण्यात आला. तेथील बौद्धधर्माचे विद्वान जाणकार डॉ. इ.जे. थॉमस, महाबोधि सोसायटी आणि जपानी बौद्ध भिक्षूंनीही या प्रबंधाचे भरभरून कौतुक केले. हा प्रबंध प्रसिद्ध करण्यासाठी थॉमस यांनी शिफारस करून अनुदानही दिले होते. या प्रबंधामध्ये बाईंनी बुद्धपूर्व काळातील संन्याशांच्या जीवनाचा आढावा घेऊन, बौद्धभिक्षूंच्या आचारविचारांसाठी गौतम बुद्धाने घालून दिलेले यमनियम, अपराधांचे स्वरूप, त्यासाठीच्या शिक्षा यांचे विवरण केले. त्याचबरोबर बौद्धसंघाची जडणघडण, कामकाज, बौद्धधर्माची हिंदू आणि जैन धर्मियांचे आचारविचार, कायदे, शिक्षा यांची तौलनिक चर्चा केली. बाईंनी दाखवून दिले आहे, की गौतम बुद्धाने घालून दिलेले कायदे, शिक्षा यांबद्दलच्या विचारांचा आवाका आणि काटेकोरपणा, हिंदुधर्मातील स्मृती, धर्मसूत्रांमध्येदेखील आढळत नाही. पण त्याच वेळी हेदेखील दाखवून दिले, की बुद्धाच्या करुणा, दयावृत्ती पितृसत्ताक संस्कृतीचा प्रभाव कमी करू शकल्या नाहीत.

बौद्ध संघातील भिक्षुणींचे स्थान अत्यंत दुय्यम होते, अपमानास्पद होते. त्यांना होणाऱ्या शिक्षा या भिक्षुकांना होणाऱ्या शिक्षांपेक्षा फार कठोर होत्या. यानंतर बाईंनी पीएच.डी.साठी 'सिन्थेसिस ऑफ हिन्दू ॲण्ड ट्रायबल कल्चर ऑफ सेन्ट्रल प्रोव्हिन्सेस ऑफ इंडिया' हा विषय

निवडला. अभ्यासासाठी त्यांना विद्यापीठाकडून अनुदानही मिळाले. संशोधनासाठी मध्यप्रदेशातील दुर्गम भागातील आदिवासींच्या जीवनशैलीची माहिती मिळवायला गेल्या असता त्यांनी विषारी सुरण खाल्ले आणि बाई ७-८ वर्षे अंथरुणाला खिळून राहिल्या होत्या. बाईंचे मार्गदर्शक डॉ. धुर्ये यांनी बाईंना डॉक्टरेट द्यायला नकार दिला. अनुदानाचे पैसेही बाईंच्या वडिलांनी परत केले. या विषयाचा बाईंचा अभ्यास मात्र भक्कम झालेला होता.

ललित लेखनाबरोबरच बाईंनी प्राच्यविद्येच्या संदर्भात, इंग्रजी, मराठीमधून महत्त्वाचे लेखन केले, त्याला बाईंच्या या दोन्ही संशोधनांचा भक्कम पाया होता. भारतीय प्राचीन वाङ्मयातील लोककथा, प्रेमकथा, शृंगारकथा, कूट-कोडी, एकेश्वरवाद, सम्राट अशोककालीन आणि त्यानंतरच्या काळातील ब्राह्मीलिपीतील एकेश्वरमतवाद, मध्यप्रदेशातील आदिवासींची दैवते, सणवार, परंपरा, नृत्य, संगीत, लोकसाहित्य, काव्य, अशा अनेक विषयांवर भरपूर लेखन केले. मूळ संस्कृत, पाली भाषेतून त्यांनी बौद्धांच्या जातककथांचे मराठीत भाषांतर केले. सिद्धार्थ जातकाच्या चारही खंडांचे मराठीत भाषांतर केले. या सगळ्याच लेखनाला बाईंच्या एम.ए. आणि पीएच.डी.साठी केलेला संशोधन-अभ्यासाचा बळकट आधार होता. हे लेखन सुबोध आणि आकर्षक झाले आहे. बाईंचे हे लेखन म्हणजे पुढील कित्येक पिढ्यांसाठी अमूल्य असा ठेवा आहे.

— डॉ. प्रतिभा रानडे

## भागवत, राजारामशास्त्री रामकृष्ण

**धर्मशास्त्र, व्युत्पत्ती, वेद-पुराणे-स्मृती यांचे अभ्यासक; इतिहास संशोधक**

**११ नोव्हेंबर १८५१ - ४ जानेवारी १९०८**



राजारामशास्त्री रामकृष्ण भागवत यांचा जन्म कशेळी (ता. राजापूर, जि. रत्नागिरी) येथे झाला. लहानपणीच त्यांच्या आईचे निधन झाले. वडील मुंबई महानगरपालिकेत नोकरीला होते. त्यांचे लहानपण कष्टात गेले. मुंबईस एल्फिन्स्टन हायस्कूलमधून १८६७मध्ये ते मॅट्रिक झाले. अभ्यासू वृत्ती म्हणून वडिलांच्या सांगण्यावरून ग्रँट वैद्यकीय महाविद्यालयामध्ये तीन वर्षे वैद्यकीय शिक्षण घेतले. वडिलांच्या निधनानंतर हा अभ्यास सोडून ते संस्कृत वेदशास्त्रादी शास्त्रांचा अभ्यास करू लागले. शास्त्री म्हणून त्यांचा गौरव झाला. १८७५मध्ये रॉबर्ट मनी हायस्कूलमध्ये त्यांनी अध्यापन केले. त्यानंतर आयुष्याच्या अखेरपर्यंत सेंट झेवियर महाविद्यालयामध्ये संस्कृतचे प्राध्यापक म्हणून काम पाहिले. विद्यार्थ्यांवर सुसंस्कार व्हावेत, शिक्षणाची आवड निर्माण व्हावी, अधिकाधिक विद्यार्थ्यांना शिक्षणाचा लाभ मिळावा म्हणून १८८४मध्ये त्यांनी ‘बाँबे हायस्कूल’ आणि ‘मराठा हायस्कूल’ या शाळांची स्थापना केली. या शैक्षणिक संस्थेच्या कार्यात नारायण व्यंकोजी खोत यांचे त्यांना सहकार्य लाभले होते.

आयुष्यभर शिक्षणक्षेत्रात कार्यरत असताना अनेक भाषांचाही त्यांनी अभ्यास केला. त्यातल्या त्यात अरबी, ग्रीक, अवेस्ता, लॅटीन या भाषा ते आवर्जून शिकले. पाश्चात्य व पौर्वात्य संस्कृती यांचा तौलनिक अभ्यास करण्यासाठी या भाषाभ्यासाचा त्यांना विशेष उपयोग झाला. ‘विधवा विवाह - सशास्त्र की अशास्त्र?’ (१८८५), ‘ब्राह्मण व ब्राह्मणी धर्म किंवा वेद व वैदिक धर्म’ (१८८९), ‘ब्राह्मण म्हणविणाऱ्यास सवाल’ (१८९९), ‘पारसी व पारसी धर्म’ (१८९१), ‘मोगल व मोगली धर्म’ (१८९०), ‘शककालविचार’ (१८९३), असे विविध धर्म-संस्कृतीविषयक प्रबोधनपर निबंध तत्कालीन विद्वानांमध्ये चर्चेचा विषय होते. स्त्री शिक्षण, विधवा विवाह, अस्पृश्यता निवारण, वेदोक्त प्रकरण हे त्यांचे भाषणाचे, प्रबोधनाचे व लेखनाचे विषय होते. त्यांच्या लेखनातून त्यांच्या वैदिक वाङ्मयाच्या सखोल

अभ्यासाचा प्रत्यय येतो. 'वेदार्थयत्नकारांचे स्मारक' ही विविधज्ञानविस्तार या नियतकालिकातील लेखमाला विशेष लक्षणीय होती. त्यात ऋग्वेदातील वेगवेगळ्या सूक्तांचे भाषांतर व कठीण शब्दांची फोड करून, तसेच व्यक्तींची आणि प्रसंगांची ऐतिहासिक छाननी करून मूळच्या वैदिक कथा व पौराणिक कथा यातील तफावत त्यांनी निदर्शनास आणून दिली आहे.

शास्त्रीबुवांच्या मते शाळेच्या अभ्यासक्रमात धार्मिक शिक्षणाचा अंतर्भाव होणे गरजेचे होते. त्याप्रमाणे त्यांनी स्वतःच शाळेत तुकाराम, एकनाथ इ. संतांच्या पुण्यतिथी दर वर्षी साजऱ्या करण्याचा उपक्रम सुरू केला. संतांची छोटी चरित्रे लिहून ती ते विद्यार्थ्यांना देत आणि त्या संतांची शिकवण तसेच भागवत धर्माची तत्त्वे मुलांना समजावून सांगत असत. त्यांना मराठी धर्माबद्दल प्रेम होते. त्यांच्या मते, 'मराठी धर्म म्हणजे मराठी संतांचा भागवत धर्म म्हणजेच महाराष्ट्र धर्म; मुकुंदराय हा त्या धर्माचा आद्य जनक, ज्ञानदेव हा संस्थापक तर एकनाथ, रामदास, तुकाराम हे धर्माचे प्रचारक आहेत.' ज्ञानदेवांना शास्त्रीबुवा 'ज्ञानर्षी' असे म्हणत. ज्ञानेश्वर, तुकाराम, एकनाथ, रामदास यांच्या काव्यरचनेचे निवडक वेचे घेऊन त्यांनी त्याचे निरूपण लिहिले. 'ब्राह्मण पण हिंदू नव्हे' अशा सहीने ते लेख लिहीत.

'हिंदुस्थानाचा छोटा इतिहास : भाग १ ते ४' (१८८७), 'शिवाजी' (१८९२), 'संभाजी' (१८९६), 'राजाराम' (१८९२), 'एकनाथ' (१८९३) इत्यादी चरित्रे त्यांनी लिहिली. 'ऐतरेयोपनिषद्' (१८९८) व 'श्वेताश्वतरोपनिषद्' (१९००) अशी दोन उपनिषदे विस्तृत प्रस्तावनेसह त्यांनी मराठीत व इंग्लिशमध्ये भाषांतरित केली. 'प्राकृत भाषेची विचिकित्सा', 'संस्कृत भाषेची विचिकित्सा' हे शास्त्रीबुवांचे महत्त्वपूर्ण ग्रंथ. 'महाभारताची विचिकित्सा', 'भगवद्गीतेतील बुड्या', 'एकपादकली वेदार्थयत्नाची गुरुकिल्ली' इत्यादी संशोधनात्मक लेख त्यांनी लिहिले. विविधज्ञानविस्तारप्रमाणे सुधारक, ज्ञानप्रकाश, पुणे वैभव, दीनबंधू, सुबोधपत्रिका, इंदुप्रकाश इत्यादी मासिकांतून, वृत्तपत्रांतून त्यांचे अशा विविध विषयांवरचे लेख प्रसिद्ध झाले. वेदवेदान्त, गीता अशा विषयांवरील दहा निबंधवजा पुस्तके त्यांनी इंग्लिशमध्ये लिहिली आहेत.

प्राचीन वाङ्मय बारकाईने वाचून पूर्वीचे विचार कोणते, आजचे काय आहेत, ते कसे योग्य असावयास पाहिजेत याचा विचार करून ते आपले लेख लिहीत असत. शास्त्रपरिपाटीपेक्षा मानवतेला धरून त्यांचे लेखन असे. 'वैदिक समाजाची अर्वाचीन समाजाहून आचारांच्या बाबतीत भिन्नता त्यांनी वारंवार महाराष्ट्रीयांच्या नजरेस आणून दिली. त्यांनी वैदिक वाङ्मयावर मराठीमध्ये जितके लिहिले, तितके कोणत्याही महाराष्ट्रीयाने आजपर्यंत लिहिले नाही.' असे ज्ञानकोशकार डॉ. केतकर यांनी म्हटले आहे. गोंडी भाषेचाही त्यांचा दांडगा अभ्यास होता. त्यावरील लेख त्यांच्या चिकित्सक अभ्यासू वृत्तीची साक्ष आहे. शास्त्रीबुवा हे गोंडी भाषेसंबंधी लेखन करण्यात महाराष्ट्रात नव्हे, तर सबंध हिंदुस्थानात पहिले विद्वान आहेत.

अव्याहत वैदिक वाङ्मयापासून थेट सोवळ्या-ओवळ्याच्या थोतांडापर्यंत अनेक गहन आणि साध्यासुध्या विषयांवर शास्त्रीबुवांनी सतत ३५ वर्षे लेखन केले. पुराणवस्तुशास्त्र शोधाचा विषय भागवतांनीच प्रथम मराठी भाषेत लिहून आपले वेगळे स्थान निर्माण केले. महाराष्ट्रातील सामाजिक, सांस्कृतिक, शैक्षणिक, वाङ्मयीन क्षेत्रात त्यांचे असे महत्त्वाचे योगदान आहे. शिक्षणासाठी सर्व आयुष्य वाहून घेणाऱ्या विद्वान राजारामशास्त्री यांनी एक उत्तम पिढी आपल्या शिकवणीतून निर्माण केली. त्यात महर्षी कर्वे, रँग्लर परांजपे, बॅरिस्टर जयकर इ. नामवंत विद्यार्थ्यांचा विशेष उल्लेख करावा लागेल. टिळक-आगरकरांच्या या काळात आपला स्वतंत्र बाणा राखून अनेक विषयांवर प्रक्षोभक मते व्यक्त करणारा स्वाध्यायनिरत, वैचारिक आंदोलक म्हणून मराठी वाङ्मयात राजारामशास्त्रींचे स्थान महत्त्वाचे आहे.

– डॉ. रजनी अपसिंगेकर

**संदर्भ :**

*१. जोशी तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री; 'मराठी विश्वकोश खंड १२', प्रकाशक, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई, १९७६.*

*२. कुलकर्णी वि. गो.; 'गाथा मुहूर्तमेढीची', राजहंस प्रकाशन, पुणे, २००१.*

## भागवत, वामन बाळकृष्ण

**लेखक, वैयाकरणी, संस्कृत भाषातज्ज्ञ**

**२४ जानेवारी १९१८ – ९ फेब्रुवारी २००४**



वामन बाळकृष्ण भागवत यांचा जन्म सातारा जिल्ह्यातील चाफळ येथे झाला. सहा महिन्यांचे असतानाच त्यांचे मातृछत्र हरपले. व्हर्नाक्युलर फायनल म्हणजे इयत्ता ७वीची परीक्षा त्यांनी चाफळला दिली. त्यानंतर ते इचलकरंजीला पंडित लक्ष्मणशास्त्री जोशी-मुरगुडकर यांच्या पाठशाळेत दाखल झाले आणि तेथे त्यांनी व्याकरणाचे पारंपरिक पद्धतीने अध्ययन केले. पुढे न्यायाचे अध्ययन वाराणसीला गणपतीशास्त्री हेब्बार यांच्याकडे, तर वेदान्ताचा आणि मीमांसेचा अभ्यास वाईला ब्रह्मस्वरूप केवलानंद यांच्याकडे केला. याच अध्ययनाबरोबर त्यांनी व्याकरणरत्न (बडोदा), व्याकरणचूडामणि (वेदशास्त्रोत्तेजकसभा, पुणे) व व्याकरणपारंगत (टि.म.वि.,पुणे) या परीक्षा दिल्या व त्यात अत्युच्च श्रेणी मिळवली.



त्यानंतर त्यांनी प्रथम कऱ्हाड, मग पुणे येथे अध्यापनकार्य सुरू केले. अध्यापनाचा प्रवास माध्यमिक स्तरापासून विद्यापीठीय स्तरापर्यंत आहे. वयाच्या ८५ वर्षापर्यंत त्यांनी अध्यापनाचे कार्य अव्याहतपणे केले. अध्यापन हेच आपले जीवनकार्य त्यांनी मानले आणि स्वत:ला 'शिक्षक' संबोधून घेण्यातच त्यांना आनंद वाटत होता.

१९४७मध्ये टि.म.वि.त सुरू झालेल्या बालमुकुंद संस्कृत महाविद्यालयाच्या प्राचार्यपदाची धुरा त्यांनी तीस वर्षे समर्थपणे सांभाळली. शिवरामकृष्ण शास्त्री यांच्याकडून न्याय शिकण्यासाठी पन्नाशीनंतरही ते डेक्कन महाविद्यालयात जात असत.

संस्कृतचा प्रचार व प्रसार या दृष्टीने त्यांनी केलेले महत्त्वाचे कार्य म्हणजे प्रसार परीक्षांची सुरुवात. संस्कृत म्हणजे बुद्धिमान, विद्वज्जड अशांसाठी असलेला विषय ही समजूत बदलण्यासाठी त्यांनी विद्यार्थि वयोगटानुसार श्रेणीबद्ध पाठ्यपुस्तके तयार केली व रोचक सुभाषितांचा त्या पुस्तकांत समावेश केला. या परीक्षांमुळे संस्कृत सामान्यांपर्यंत पोहोचण्यास मदत झाली. यात पारंपरिक अभ्यास होताच, पण नवीन पद्धतीने शिकवला जाऊ लागल्यामुळे संस्कृत अध्ययनाची गोडी लागण्यास मोठी मदत झाली. सबंध महाराष्ट्रातून या परीक्षांना मोठा प्रतिसाद मिळाला.

शालेय विद्यार्थ्यांपासून पदव्युत्तर विद्यार्थ्यांपर्यंत सर्वांना मुक्तद्वार असणाऱ्या संस्कृत स्पर्धांची योजना त्यांनी केली. तीन मिनिटांच्या गोष्टीपासून ते वादविवाद, स्मरणशक्ती, वाक्यसंयोजन, समस्यापूर्ती, अन्त्याक्षरी अशा अनेक प्रकारचा त्यात समावेश होता. हेतू हा की विद्यार्थ्यांना संस्कृत बोलण्याचा सराव व्हावा. अशा स्पर्धांमुळे आत्मविश्वासपूर्वक बोलण्यासाठी टिळक विद्यापीठातील एक छोटे व्यासपीठच उपलब्ध झाले. १९६४सालापासून गुरुजींनी राष्ट्रीय स्तरावर शास्त्र प्रतियोगितांसाठी विद्यार्थी पाठवण्यास सुरुवात केली. या विद्यार्थ्यांची तयारी त्यांनी इतक्या कसोशीने करून घेतली की, या प्रतियोगितांमध्ये १० वर्षे महाराष्ट्राला पारितोषिके मिळाली.

बिनभिंतींची शाळा या संकल्पनेप्रमाणे बिनपुस्तकांचा अभ्यास ही संकल्पना त्यांनी रुजवली. रोज ते एक नवीन श्लोक सांगत. यात प्रथम पदे पाडणे, क्रियापद हुडकणे, अन्वयार्थ लावणे असे सर्व पद्धतशीर काम चाले. तो श्लोक लिहून न घेता दुसऱ्या दिवशी पाठ म्हणून दाखवल्यावर पुढचा नवा श्लोक ते सांगत. त्यामुळे

प्रत्येक ग्रंथाच्या आरंभीचा श्लोक, अनेक प्रहेलिका किंवा कोडी, सुंदर अर्थचमत्कृती, कल्पनाचमत्कृती असलेले अनेक श्लोक विद्यार्थ्यांना पाठ झाले.

संस्कृत शिकवणाऱ्या शिक्षकांच्या अडीअडचणी जाणून, शासनाकडे पाठपुरावा करून शिक्षकांसाठी मे महिन्यात प्रशिक्षणवर्ग चालू केले. यामुळे ग्रामीण भागातल्या विद्यार्थ्यांची संस्कृत शिक्षणाची सोय झाली. त्यांचे एक महत्त्वाचे योगदान म्हणजे श्रद्धाजाड्यं परित्यज्य... यानुसार त्यांनी संस्कृतचे अध्ययन अबौद्धिक पाठांतरावरून वेगळ्या दिशेला नेले. वेळेचा सदुपयोग आणि नियोजन यांवर त्यांचा फार मोठा भर होता.

जुन्या पद्धतीने अध्ययन करूनसुद्धा त्यांच्या शिकवण्यात आग्रही वृत्ती नव्हती. ऋजू आणि मृदू व्यक्तिमत्त्व आणि पांडित्य या दोन्हींचा योग्य समन्वय त्यांच्या ठायी होता. स्वत:चे मत निश्चितपणे पण अनाग्रही वृत्तीने ते मांडत. परमसहिष्णुवृत्तीने दुसऱ्याच्या मताचाही आदर करत. त्यांनी लिहिलेल्या अनेक पुस्तकांपैकी महत्त्वाचे म्हणजे भर्तृहरीच्या वाक्यपदीयाच्या ब्रह्मकाण्डाचे सविस्तर विवेचनासह केलेले मराठी भाषांतर होय. पाणिनीय व्याकरणाचा परिचय व अंतरंग ही पुस्तकेही अभ्यासकांना फार उपयोगी ठरलेली आहेत. परमलघुमंजुषेचेही मराठी भाषांतर त्यांनी केले. ही सर्व पुस्तके टिळक महाराष्ट्र विद्यापीठाने प्रकाशित केलेली आहेत.

पुस्तकांबरोबरच ज्ञानाचा हा ठेवा पुढील पिढीपर्यंत पोहोचावा यासाठी त्यांनी सिद्धान्तकौमुदी आदी ग्रंथांचे विवेचन करणाऱ्या सुमारे १००० ध्वनिफिती तयार केल्या आणि त्या टिळक विद्यापीठाकडे सुपुर्द केल्या. हे विद्यापीठाचे कायमचे ज्ञानभांडार ठरले. विद्यापीठानेही त्याचे आता संचयिकेत (सीडी) रूपांतर केलेले आहे.

या सर्व कार्याची दखल विद्वान व शासन यांनी घेतली. १९७५साली त्यांना राज्य सरकारचा आदर्श शिक्षक हा गौरव पुरस्कार मिळाला. तर १९९९मध्ये त्यांचा 'राष्ट्रीय पंडित' म्हणून राष्ट्रपतींच्या हस्ते गौरव झाला. २००२साली तिरुपति विद्यापीठाने, तर २००३साली टिळक महाराष्ट्र विद्यापीठाने त्यांना डी.लिट. ही पदवी बहाल केली.

१९९८साली शृंगेरी येथील विद्वत्सभेत श्रीमद्‌भारतीर्थशंकराचार्य यांच्या हस्ते त्यांना सन्मानित करण्यात आले. याबरोबरच गोवा सरकारकडून सांदीपनी पुरस्कार, (उत्तर प्रदेश), श्रीपर्वतीदेवदेवेश्वर संस्था, (पुणे) या व इतर अनेक संस्थांकडील पुरस्कार त्यांनी आदराने पण थोड्याशा अलिप्तपणे स्वीकारले. गुरुजी म्हणत 'उपकार ही भावनासुद्धा गळून जायला पाहिजे म्हणून 'तुका म्हणे आता, उरलो उपयोगापुरता' हीच भावना आयुष्यात असावी', तसेच ते जगले.

— डॉ. हेमा डोळे

## भागवत, सखाराम जगन्नाथ

**विचारवंत, लेखक**

**२६ एप्रिल १९०३ - ८ जानेवारी १९७३**

आचार्य सखाराम जगन्नाथ भागवत यांचा जन्म महाड येथे झाला. १९२० साली मॅट्रिक झाल्यावर उच्च शिक्षणासाठी त्यांनी मुंबईच्या विल्सन महाविद्यालयामध्ये प्रवेश घेतला. महात्माजींची असहकाराची हाक आल्याबरोबर १९२१मध्ये महाविद्यालयाला रामराम ठोकून त्यांनी राष्ट्रीय चळवळीत उडी घेतली. तेथपासून १९४७च्या १५ ऑगस्टला स्वातंत्र्य प्राप्त होईपर्यंत त्यांच्या जीवनात राजकीय चळवळीला पहिले स्थान होते, व अन्य साऱ्या गोष्टी दुय्यम होत्या.



१९२७ साली पुण्याला लोकमान्य टिळक विद्यापीठात अध्यापन करत असताना आचार्य शं.द. जावडेकर यांच्याशी आचार्य भागवतांचा स्नेह जुळला. या दोघांनी महाराष्ट्रभर महात्माजींच्या विचारांचा प्रसार करण्याचे व्रत घेतले. प्रखर बुद्धिमत्ता असूनही ध्येयवादाच्या ऊर्मीपोटी त्यांना उच्च शिक्षणाचा लाभ घेता आला नाही. मान्य विद्यापीठाची पदवी त्यांना मिळाली नाही. खरी पण ज्ञानाची लालसा व अध्यापनातील कौशल्य या त्यांच्या गुणांमुळे 'आचार्य'

हे बिरुद त्यांना प्राप्त झाले. मनात नसताना त्यांना विवाहबंधनात पडावे लागले. दुर्दैवाने पत्नीचे निधन झाले. ऐन पस्तिशीत क्षयरोगाने शरीरात ठाण मांडले. निरामय आरोग्य त्यांना कधी लाभले नाही. असे असूनही त्यांची रसिकता व उत्साह सतत अबाधित राहिला. मनाने संन्यस्तमय वृत्तीने चैतन्याने रसरसलेले असे त्यांचे व्यक्तिमत्त्व होते.

आचार्य जावडेकरांच्या 'आधुनिक भारत' या विचारप्रवर्तक ग्रंथाला प्रस्तावना लिहिणाऱ्या आचार्यांनी साने गुरुजींच्या 'पत्री' काव्यसंग्रहालाही मौलिक प्रस्तावना लिहिली. 'नवभारत' आणि 'ग्रामीण शिक्षण' मासिकांच्या संपादक मंडळात ते होते. कोल्हापुरात 'मौनी विद्यापीठ'च्या स्थापनेत त्यांचा पुढाकार होता. साने गुरुजींच्या निधनानंतर 'आंतरभारती'चे काम त्यांनी पुढे नेले.

अश्लील कविता लिहिल्याबद्दल १९५१मध्ये मर्ढेकरांवर खटला झाला, तेव्हा आचार्य भागवतांनी न्यायालयात महत्त्वाची साक्ष दिली. मर्ढेकरांची निर्दोष मुक्तता झाली. याचे बरेचसे श्रेय आचार्यांच्या साक्षीला आहे. त्यांनी मंगेश पाडगावकरांच्या 'धारानृत्य' या पहिल्या काव्यसंग्रहाला लिहिलेल्या प्रस्तावनेत त्यांची सौंदर्यदृष्टी व रसिकता याचे हृद्य दर्शन घडते.

आचार्यांनी मोजके लेखन केले, त्या लेखनात सखोल, मूलगामी विचारांचे दर्शन होते. 'चौफुला' (१९४४), 'जीवनशिक्षण' (१९४५), 'जीवन व साहित्य' (१९४४), 'जीवन चिंतन' (१९५८) या पुस्तकांव्यतिरिक्त त्यांनी असंख्य लेख लिहिले आणि महत्त्वाच्या अनेक विषयांवर विस्तृत भाषणे केली.

लोकमान्य टिळकांच्या निष्काम कर्मयोग सिद्धान्ताचा वेध घेणारे, महात्मा गांधींच्या तत्त्वविचाराचे मूलग्राही विश्लेषण करणारे, महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनाचा परामर्श घेणारे त्यांचे लेख 'आचार्य भागवत : संकलित वाङ्मय' ग्रंथाच्या दोन खंडांत प्रसिद्ध झाले आहेत. शिक्षणासंबंधी मूलभूत विचार मांडणारे, आर्थिक विषमता निर्मूलनावर भर देणारे, साहित्याबाबत व्यापक जीवनवादी भूमिका घेणारे लेख या खंडांत समाविष्ट झालेले आहेत. ज्ञानाच्या क्षेत्राविषयीचे जागते प्रेम आणि समाजाविषयी असणारा उत्कट जिव्हाळा या दोहोंचे विलोभनीय मिश्रण आचार्यांच्या व्यक्तिमत्त्वात झालेले होते.

— डॉ. सुभाष भेंडे

## भाटे, सरोजा विद्याधर

**संस्कृत पंडित, लेखक, प्रशासक**

**५ जानेवारी १९४२**



अनेक कामे झपाट्याने उरकून पुन्हा नवी कामे करण्यात पुढाकार घेणारे व्यक्तिमत्त्व म्हणजे डॉ. सरोजा भाटे. यांचे पूर्वाश्रमीचे नाव सरोजा सदाशिव चितारी. त्यांचे आजोबा औंध संस्थानात चित्रकार होते व त्यांना पंतप्रतिनिधींनी चितारी ही पदवी दिली होती. १९५८साली त्या पुण्याच्या टिळक महाराष्ट्र विद्यापीठातील श्री बालमुकुंद संस्कृत महाविद्यालयात दाखल झाल्या. त्या बरोबरीने फर्गसन महाविद्यालयातून १९६२साली संस्कृत, इंग्लिश व तत्त्वज्ञान हे विषय घेऊन त्या प्रथम श्रेणीत बी.ए. झाल्या. १९५८साली मॅट्रिकमध्ये सर्वाधिक बक्षिसे मिळवणाऱ्या पहिल्या पाच विद्यार्थ्यांमध्ये त्या होत्या. १९६४साली पुणे विद्यापीठातून प्रथम श्रेणी व प्रथम क्रमांकासह त्या एम.ए. झाल्या. १९७१मध्ये 'Pre-paninian Grammatical Element in Panini's Astadhayi' या विषयावर प्रबंध सादर करून त्यांनी पीएच.डी. मिळवली. १९६२पासून २००१पर्यंत त्यांचा पुणे विद्यापीठातील संस्कृत विभागाशी अनेक प्रकारे संबंध आला. १९८७पासून २००१पर्यंत त्या संस्कृत विभागप्रमुख म्हणून कार्यरत होत्या.

राष्ट्रीय संस्कृत पंडित म्हणून राष्ट्रपती प्रतिभा पाटील यांच्या हस्ते त्यांचा सन्मान करण्यात आला.

भ

टिळक विद्यापीठात त्या सर्व विद्यार्थ्यांत लोकप्रिय होत्या. पं. वा. बा. भागवत यांच्याकडून त्यांनी व्याकरणाचे पारंपरिक पद्धतीने, तर डॉ. शि. द. जोशी यांच्याकडून आधुनिक पद्धतीने अध्ययन केले. त्यांना संगीतातही उत्तम गती होती. त्या नाटकातही उत्तम कामे करत. वाराणसी येथे संस्कृत वक्तृत्वात त्यांनी १९६४साली दोन सुवर्णपदके पटकावली होती.

भाटे यांनी त्यांच्या कारकिर्दीत एक उत्तम प्रशासक म्हणूनही लौकिक मिळवला. त्यांची अनेक विषयांवरील पुस्तके प्रकाशित झालेली आहेत. त्यांतील महत्त्वाची पुस्तके पाणिनी, पाणिनीय संप्रदाय, महाभाष्य, भर्तृहरीची महाभाष्य दीपिका, वाक्यपदीय, सिद्धान्तकौमुदी ही आहेत. तसेच अनेक राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय परिषदांमधील त्यांच्या निबंधांची संख्या पन्नासपेक्षाही अधिक आहे. हे सर्व लिखाण इंग्लिश, मराठी किंवा संस्कृत यामध्ये केले आहे. याखेरीज त्यांच्या मार्गदर्शनाखाली पीएच.डी. मिळवलेल्या विद्यार्थ्यांची संख्या वीसपेक्षा अधिक आहे.

पुण्यातील भांडारकर प्राच्यविद्यामंदिर, दिल्ली येथील केंद्रीय संस्कृत मंडळ, अखिल भारतीय प्राच्यविद्या परिषद, अभ्यंकर पाठशाळा, पुणे, पाणिनी प्रतिष्ठान वगैरे अनेक संस्थांशी त्या निगडित आहेत.

– डॉ. हेमा डोळे

## भावे, विनायक लक्ष्मण

**प्राचीन मराठी सारस्वत इतिहासांचे अभ्यासक, संशोधक**

**१८७१ – १९२६**

विनायक लक्ष्मण भावे यांचा जन्म पनवेलनजीक पळस्पे ह्या गावी झाला. यांचे मराठी व इंग्रजी शिक्षण ठाणे येथे व उच्च शिक्षण मुंबईच्या विल्सन महाविद्यालयात झाले. १८९१मध्ये मॅट्रिक, तसेच १८९५मध्ये बी.एस्सी. झाले.

शाळेत व महाविद्यालयात अनुक्रमे जनार्दन बाळाजी मोडक व प्रा. अलेक्झांडर या विद्वान अभ्यासकांचा



सहवास घडून त्यांना इतिहास, जुनी मराठी कविता व शास्त्रीय विषय यांच्या अभ्यासाची गोडी लागली. काव्येतिहाससंग्रह व काव्यसंग्रहकर्ते ज. बा. मोडक यांच्या सहवासात भावे यांचे मराठी सारस्वताचे वाचन व मनन झाले. वडील गेल्यानंतर घरचाच मिठागराचा व्यवसाय त्यांनी मोठ्या हिकमतीने चालवला व वाढवला. व्यवसायानिमित्त झालेल्या प्रवासाचा उपयोग त्यांनी वाङ्मय संशोधनासाठी करून घेतला.

महाविद्यालयीन जीवनात भावे यांना लागलेल्या ग्रंथवेडामुळे त्याच्याकडे मराठी पुस्तकांचा उत्तम संग्रह जमला. १ जून १८९३रोजी आपल्या या संग्रहाला सार्वजनिक रूप देत त्यांनी ठाणे येथे मराठी ग्रंथसंग्रहालयाची स्थापना केली. जुनी पुस्तके व हस्तलिखिते मिळवून त्यांचा संग्रह करणे, वाचनाची अभिरूची निर्माण करून ती वाढवणे आणि तदनुषंगिक अनेक वाङ्मयीन कार्ये उभारणे अशा व्यापक उद्दिष्टांनी भावे यांनी मराठी ग्रंथसंग्रहालयातर्फे सन १९०३मध्ये प्राचीन मराठी ग्रंथ प्रकाशित करण्यासाठी 'महाराष्ट्र कवी' मासिक पुस्तक सुरू केले व ते चार-साडेचार वर्षे चालवले. या मासिकातून दासोपंत, रंगनाथ स्वामी निगडीकर, रंगनाथ मोगरे, आनंदतनय, शिवराम, निरंजन माधव इत्यादिकांचे अप्रकाशित ग्रंथ व अनेक कवींच्या स्फुट कविता, 'पंचतंत्रा'चे गद्य भाषांतर वगैरे प्रकरणे प्रसिद्ध झाली आहेत. 'महाराष्ट्र कवी' च्या पुनरुज्जीवनासाठी त्यांनी भारत इतिहास संशोधन मंडळामार्फत प्रयत्न चालवले व त्याचेच फलित म्हणून 'महाराष्ट्रीय सारस्वत व महाराष्ट्र कवी' अशा जोडनावाने हे मासिक सुरू झाले; पण अवघ्या सहा महिन्यांतच बंद पडले. प्राचीन मराठी गद्य व पद्य या दोनही वाङ्मयप्रकारांचा त्यात अंतर्भाव केला गेला होता.

छत्रे, कृष्णशास्त्री चिपळूणकर व परशुरामतात्या गोडबोले यांच्या लेखनाने, तसेच जनार्दन बाळाजी मोडकांसारख्या शिक्षकांच्या प्राचीन मराठी कवितेविषयीच्या कार्यामुळे महाविद्यालयीन जीवनातच भावे यांच्यात वाङ्मयप्रेम निर्माण झाले होते. श्रीधर, महिपती, मुक्तेश्वर वगैरेंच्या वाङ्मयाची टाचणे त्यांनी त्याच वेळी तयार केली होती. सुमारे शंभर पृष्ठे भरतील एवढा हा निबंध त्या वेळच्या उपलब्ध साधनांचा मागोवा घेऊन लिहिला होता. हा त्यांचा निबंध ग्रंथमालेत मार्च १८९८ ते मे १८९९मध्ये पहिल्यांदा क्रमशः प्रसिद्ध झाला. भावे यांनी हा अभ्यास पुढे तसाच चालू ठेवला. महाराष्ट्र कवीच्या निमित्ताने त्यांनी अनेक कवींच्या रचनांचा अभ्यास केला. मूळच्या शंभर पानी ग्रंथाचा सहाशे पृष्ठांइतका विस्तार करून त्याला त्यांनी ग्रंथराजाचे स्वरूप दिले. सन १९१९मध्ये भारत इतिहास संशोधक मंडळामार्फत त्यांनी 'महाराष्ट्र सारस्वत' या ग्रंथाची द्वितीय आवृत्ती प्रसिद्ध केली.

द्वितीय आवृत्तीनंतरही त्यांचा प्राचीन मराठी कवितेचा व्यासंग सुटला नाही. त्यांच्या व त्यांच्या सहकारी संशोधक मित्रांनी केलेल्या संशोधनामुळे तृतीय आवृत्ती काढण्याचे त्यांनी निश्चित केले. या वेळी मात्र त्यांना मराठी सारस्वताचे एक अज्ञात दालनच खुले होते, ते म्हणजे महानुभवीय साहित्य होय. महानुभवीय महंताच्या सहकार्याने भाव्यांनी सांकेतिक लिप्यांमध्ये बद्ध झालेले वाङ्मय सर्व जगापुढे खुले केले. महाराष्ट्र सारस्वताची तिसरी आवृत्ती त्यांनी दोन खंडांत प्रसिद्ध केली. त्यांपैकी पहिला खंड सन १८२४मध्ये निघाला, तर दुसरा खंड हा त्यांच्या निधनानंतर त्यांच्या मुलाने प्रसिद्ध केला. ज्ञानेश्वर – पूर्वकालीन व समकालीन अस्तित्वात असलेल्या व पुढेही विस्तार पावलेल्या पण महाराष्ट्रात सात-आठ शतके अज्ञात असलेल्या महानुभाव वाङ्मयाचा शोध व बोध अत्यंत चिकाटीने करवून घेऊन त्याचा परिचय ह्या ग्रंथात जो करून दिला आहे ती त्यांची कामगिरी मराठी वाङ्मयेतिहासात अपूर्व व अविस्मरणीय अशी आहे. वाङ्मय संशोधनाइतकेच इतिहास संशोधनाचेही वेड भावे यांना लागले होते. यामागची त्यांची प्रेरणा सर्वस्वी राष्ट्रीय अस्मितेच्या उत्थापनाची होती. मराठ्यांच्या गौरवशाली इतिहासाविषयी त्यांना नितांत अभिमान वाटत असे. इंग्रजांनी हेतुतः केलेली आपल्या इतिहासाची विटंबना पाहून त्यांचा संताप अनावर होत असे. राष्ट्राचा तेजोभंग करणारे हे इंग्रज पुरस्कृत इतिहास-लेखन पुसून टाकवयाचे असेल, तर आमची इतिहास साधने आम्ही परिश्रमपूर्वक धांडोळली पाहिजे, आमच्या दृष्टीने अभ्यासली पाहिजेत आणि मग राष्ट्रीय इतिहासाची रचना केली पाहजे; असे त्यांना वाटत असे. महाराष्ट्रीयांना त्यांची स्वतःची जाणीव नीट व्हावी या हेतूने भावे यांनी ठाणे येथे इ.स.१९१७मध्ये 'मराठी दप्तर' या नावाची संस्था स्थापन केली होती. इतिहास संशोधकांच्या परिश्रमांनी उपलब्ध झालेली ऐतिहासिक कागदपत्रे निवडून यथामूल स्वरूपात छापून प्रसिद्ध करणे हे या संस्थेचे उद्दिष्ट होते. या दप्तराचे 'रुमाल पहिला' 'रुमाल दुसरा' आणि 'रुमाल तिसरा' असे तीन ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. पहिल्या रुमालात 'श्रीमंत महाराज भोसले यांची बखर', दुसऱ्या रुमालात 'सेनापती बापू गोखले याची कैफियत' तर तिसऱ्या रुमालात 'शिवकालीन' व 'अलिबहादराची पत्रे' असे कागद प्रसिद्ध झाले आहेत. रुमाल दुसरा याला भावे यांनी विस्तृत प्रस्तावना लिहिली असून त्यात मराठेशाहीच्या अखेरीची मीमांसा केली आहे. बाजीराव रघुनाथला न्याय देणारी भावे यांची ही मीमांसा त्यांच्या समकालीनांना फारशी रुचलेली दिसत नाही.

शिवाजी महाराजांचे एक विस्तृत चरित्र लिहिण्याचा भावे यांचा मानस होता. त्यासंबंधीची साधने गोळा करून व आराखडा आखून त्यांनी काही प्रकरणे लिहूनही काढली होती. त्यांतील काही नियतकालिकातून प्रसिद्धही केली होती. अफजलखानाचा वध, श्रीशिवाजीमहाराजांचे एक राजकारण, शाहिस्तेखानाची मोहीम, शिवाजीची वंशकुळी ही त्यांतील काही प्रकरणे होत. अफजलखानाचा वध आणि शाहिस्तेखानाचा फजीतवाडा हे दोन प्रसंग शिवचरित्रात विलक्षण

भ

महत्त्वाचे असल्यामुळे त्या प्रसंगातले सर्व बारकावे हेरणारी आणि शिवप्रभूंच्या मुत्सद्देगिरीच्या, चातुर्याच्या आणि विक्रमाच्या दृष्टीने त्यांची वेधक मांडणी करणारी ही प्रकरणे आहेत. भावे यांच्या ग्रंथसंभारात 'महाराष्ट्र सारस्वता'च्या खालोखाल त्यांच्या 'चक्रवर्ती नेपोलियन' या चरित्रग्रंथाचे महत्त्व आहे. मराठीतील चरित्र वाङ्मयाच्या इतिहासात एक उत्तम चरित्रग्रंथ म्हणून त्याची गणना करतात.

काव्य व इतिहास ह्या क्षेत्रांत भावे ह्यांनी आपल्या कल्पनेप्रमाणे पोटतिडकीने जो उद्योग केला त्यामुळे त्या-त्या विषयाच्या अभ्यासक्षेत्रात नवीनांना बरीच प्रेरणा मिळाली. अनेक अभ्यासकांना पुढे पाऊल टाकण्यास पाथेयही भरपूर मिळाले.

– डॉ. गिरीश मांडके

**संदर्भ :**

*१. खानोलकर गं. दे., अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक, चतुर्थ खंड, स्वस्तिक प्रकाशन हाऊस, मुंबई, १९५७*

*२. ढेरे रा. चिं. वारसा, विश्वकर्मा साहित्यालय, पुणे, १९७१.*

## भिडे, गणेश रंगो

**मराठी विश्वकोशाचे निर्माते, पत्रकार**

**६ जून १९०७ - ८ जून १९८१**



गणेश रंगो भिडे यांचा जन्म मध्यमवर्गीय कुटुंबात झाला. अष्टे, सांगली या जन्मगावी सुरुवातीचे शिक्षण घेऊन त्यांनी कोल्हापूरच्या राजाराम महाविद्यालयामधून एम.ए. व श्रीमती ताराराणी महाविद्यालयातून बी.टी. या पदव्या संपादन केल्या. तत्पूर्वी मॅट्रिकनंतर त्यांनी काही काळ प्रभात फिल्म कंपनीत नोकरी केली. बी.टी. होऊनही त्यांनी अध्यापन व्यवसाय पत्करला नाही. प्रभात कंपनीत काम करीत असताना विणकाम, पाकशास्त्र या विषयांवरची पुस्तके, 'हाऊसहोल्ड एन्सायक्लोपीडिया' पाहून मराठीमध्येदेखील अशा तऱ्हेची पुस्तके असणे गरजेचे आहे, असे त्यांना वाटले. त्यांनी तत्काळ सुमारे ३५ विषयांची सूची तयार केली आणि दि. २० एप्रिल १९३१ रोजी मा.त्र्यं. पटवर्धन यांच्या अध्यक्षतेखाली एका समारंभात 'व्यावहारिक ज्ञानकोश मंडळा'ची स्थापना केली.

त्यानंतर १९३२मध्ये त्यांनी 'सिनेमासृष्टी' हे पहिले मराठी सिने नियतकालिक काढले. पुढे १९३३मध्ये त्यांनी व्यावहारिक मंडळाचे रूपांतर 'लिमिटेड कंपनी'त केले. १९३५ साली या कोशाचा पहिला खंड प्रकाशित झाला. त्याशिवाय 'सेवक', 'पुढारी' व 'उष:काल' या नियतकालिकांतही त्यांनी काम केले. पुण्याच्या 'केसरी' व 'त्रिकाल' वृत्तपत्रांचे वार्ताहर म्हणूनही त्यांनी काम पाहिले.

१९३५-४० या कालावधीत त्यांच्या 'व्यावहारिक ज्ञानकोशा'चे पाच खंड प्रकाशित झाले. यातील लेखांचे लेखक अप्रसिद्ध पण व्यासंगी होते. त्यांच्या लेखनाचा दर्जा उत्तम होता. चित्रे, छायाचित्रे, सुबक बांधणी आणि वाजवी किंमत ही या कोशाची वैशिष्ट्ये होती. स्वातंत्र्योत्तर काळात नवे ज्ञान देणाऱ्या 'अभिनव मराठी विश्वकोशा'चे पाच खंड त्यांनी १९३६-१९७९ या कालखंडामध्ये प्रकाशित केले. जे.पी. नाईकांच्या सूचनेवरून तयार केलेला शैक्षणिक कोश मात्र नाईकांनी कोल्हापूर सोडल्याने पुढे पूर्ण होऊ शकला नाही.

कोश वाङ्मयाव्यतिरिक्त त्यांनी बहुविध विषयांवर लेखन केले आहे. त्यापैकी 'फोटो कसे घ्यावेत', 'सावरकर सूत्रे', 'कोल्हापूर दर्शन' (पु.ल. देशपांडे यांच्या सहकार्याने, १९७१), कलामहर्षी बाबूराव पेंटर' (१९७८) ही महत्त्वाची व मान्यताप्राप्त पुस्तके होत. 'कलामहर्षी बाबूराव पेंटर' हे त्यांचे चरित्रात्मक पुस्तक फार गाजले.

- संपादक मंडळ

**संदर्भ :**

*१. मराठी विश्वचरित्रकोश; संपादक - कामत; श्रीराम पांडुरंग, विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा.*

## भुसारी, रघुनाथ महारुद्र
### प्राच्यविद्या इतिहासकार, पुरातत्त्ववेत्ते
### ४ सप्टेंबर १९०४ – १ मे १९८६



प्राचीन महाराष्ट्रातील धर्म, संस्कृती, इतिहास व वाङ्मय यांचे प्रगाढ पंडित प्रा. रघुनाथ महारुद्र भुसारी हे मूळचे मराठवाड्यातील परभणी जिल्ह्यातील होत. पाथरी व परभणी येथे शालेय शिक्षण व हैद्राबादमध्ये पदवी घेतल्यानंतर त्यांनी विद्यापीठात अध्यापन सुरू केले. उस्मानिया विद्यापीठामध्ये एलएल.बी. केल्यानंतर त्यांनी नागपूरहून एम.ए.ची पदवी घेतली. १९३० पासून १९८५ पर्यंत त्यांचा उस्मानिया विद्यापीठाशी संबंध जोडलेला होता. प्रा. चिं.नी. जोशी यांच्याबरोबर ते विभागात काम करू लागले, तसेच संशोधनातही रमत गेले. १९४९ ते १९५२ या काळात ते मराठी विभागप्रमुख होते.

१९२६ मध्ये कलकत्त्याला जाऊन उच्च शिक्षण घेण्यासाठी त्यांना दोन वर्षे शिष्यवृत्ती मिळाली होती. त्या काळात संस्कृतमध्ये एम.ए. करून ते देवदत्त भांडारकर यांच्या हाताखाली प्राच्यविद्या इतिहास या विषयात पारंगत होऊन आले. त्यांनी ‘तेराव्या शतकातील मराठी साहित्य’ असा प्रकल्प हाती घेतला. साहित्य संशोधनाला भाषाशास्त्रीय आधाराबरोबरच प्राच्यविद्येचे अधिष्ठान दिले. त्याचबरोबर त्यांनी द्राविडी भाषा व संस्कृतीचे तुलनात्मक अध्ययन सुरू केले. या दोन्ही अभ्यासांचे फलित ग्रंथरूपाने आले नाही; पण त्यांनी या विषयांवर लेख मात्र लिहिले. प्राचीन महाराष्ट्र समजण्यासाठी तुलनात्मक अभ्यास आवश्यक आहे, हे मराठीत प्रथमच सप्रमाण दाखवले गेले.

भुसारी यांनी ‘प्राचीन महाराष्ट्राचा धार्मिक इतिहास’ (१९६५) लिहिताना भांडारकर यांना प्रमाण मानले. मात्र, प्रत्येक धर्मपंथाची मीमांसा करताना त्यांनी स्वतःची वेगळी मते मांडून निष्कर्ष सांगितले आहेत. महानुभाव, वारकरी, दत्त, लिंगायत, सूफी अशा अनेक धर्मपंथांचे स्वतंत्र ग्रंथ असले, तरी असा तुलनात्मक आणि वेगळ्या साधनांचा आधार घेऊन लिहिलेला हा एकमेव ग्रंथ मानला जातो. या संप्रदायांचे सांस्कृतिक कार्य भुसारींनी सर्वप्रथम सांगितले.

सातवाहन कालखंड हे प्रा. भुसारी यांच्या अभ्यासाचे खास क्षेत्र होते. ‘आद्य महाराष्ट्र आणि सातवाहन काल’ (१९७९) या ग्रंथासाठी त्यांनी प्राच्यविद्या क्षेत्रातील शिलालेख, नाणी, स्थापत्य, चित्र, शिल्प यांबरोबर प्राचीन लोकराज्ये, जनपदे, महाराष्ट्र-आंध्र परस्पर संबंध, शालीवाहन शक आणि विक्रम संवत, यांची कालनिर्णयपद्धती या सर्वांचा विचार केला. सातवाहन महाराष्ट्रीय वंशाचे होते. त्यांना आंध्रचे का म्हटले गेले व ते कसे चूक आहे, हे स्पष्ट केले. सातवाहनकालीन धार्मिक, सामाजिक जीवन व ‘गाथासप्तशती’तील ग्रामीण जीवन यांची तुलना केली. या पुस्तकाने सातवाहनांच्या इतिहासावर नवीन प्रकाश पडला. त्यांनी ग्रंथाला जोडलेली परिशिष्टे उद्‌बोधक आणि रोचकही आहेत. त्यांत प्रामुख्याने ग्रीक व भारत आणि महाराष्ट्र यांचे संबंध दाखवले आहेत.

प्रा. भुसारी यादवकालीन महानुभावी साहित्याचे साक्षेपी संशोधक व चिकित्सक अभ्यासक होते. एल्हणकृत ‘अष्टनायिकाविवाह’ (१९६७), ‘वसंतवर्णन’ (१९६८) आणि नागराजकृत ‘प्रतिष्ठानवर्णन’ (१९५७) (प्रा. माढेकर यांच्यासह) हे महानुभावी ग्रंथ, साक्षेपाने संपादित केले. विस्तृत प्रस्तावनेसह, काव्याची भाषा, अलंकारवैभव व शब्दकोशासह परिपूर्ण असे हे संपादन आहे. महानुभाव साहित्याविषयी व अभ्यासकांविषयी काही लेखही त्यांनी लिहिले आहेत. ‘अमृतानुभव’ आणि ‘विवेकसिंधू’ यांमधील तत्त्वज्ञानाची बैठक एक कशी आहे ते त्यांनी सांगितले आहे.

प्रा. भुसारी हाडाचे पुरातत्त्ववेत्ते होते. शिलालेखांचे संशोधन, लेखन आणि वाचन हे अतिशय जिकिरीचे आणि कष्टाचे काम असते. व्यावहारिक यशाची चिंता न करणाराच असे संशोधन करू शकतो. भुसारींनी या

भ

कामाचा आयुष्यभर ध्यास घेतला होता. एखादा काव्यसंग्रह वाचावा तसा ते सहजतेने शिलालेख वाचीत आणि त्याचा आनंद घेत असत, असे डॉ. उषाताई जोशी यांनी म्हटले आहे. हतनूरचा यादवकालीन शिलालेख त्यांनी उजेडात आणला. रामदेवराव यादवांचा कर्नाटकातील कानडी भाषेतील शिलालेख त्यांनी उजेडात आणला. हा कानडी भाषेतील शिलालेख मराठीत संपादित करून, यादवांच्या सत्तेचा विस्तार किती दूरवर पसरला होता, हे त्यांनी दाखविले आहे. त्यांच्या या अध्ययनामुळे महाराष्ट्राच्या राजकीय, सामाजिक व सांस्कृतिक जीवनावर नवा प्रकाश पडतो.

शिलालेख, ताम्रपट आणि प्राचीन नाणी, यांचे संशोधन करीत असताना धर्मशास्त्राचा अभ्यास त्यांना आवश्यक वाटला. प्राचीन काळातील दानपत्रे, यज्ञादिकांचे उल्लेख, यांची उकल करण्याच्या दृष्टीने हा अभ्यास त्यांना उपयुक्त ठरला.

'साहित्य व संशोधन' (१९५१) या त्यांच्या लेखसंग्रहात सात लेख आहेत; पण साहित्यापेक्षा त्यात संशोधनच अधिक आहे. मुकुंदराजाचा 'कालनिर्णय', महानुभाव व लिंगायत पंथ, द्राविडसीमेवरील मराठी, चक्रधर, एकनाथ, नरेंद्र अशा अनेक विषयांना येथे हात घातलेला दिसेल. उस्मानिया विद्यापीठाच्या 'स्वाध्याय संशोधन पत्रिके'मधून ते सातत्याने अभ्यासपूर्ण लेखन करीत राहिले. त्यांनी मराठवाडा साहित्य परिषदेच्या लातूर येथील संमेलनाचे अध्यक्षपद भूषविले. प्राच्यविद्या परिषदांमधून शोधनिबंध वाचले. ऐतिहासिक कागदपत्रांचे वाचन व प्रकाशन केले. तीन स्वतंत्र, तीन संपादित ग्रंथ, ३० लेख, ग्रंथपरीक्षणे व एक लघुकथाही त्यांच्या नावावर आहे. पण यापेक्षा महत्त्वाचे आहे, तो त्यांनी दिलेला वाङ्मयीन दृष्टीकोन. मराठीचे संशोधन फक्त महाराष्ट्रात राहून शक्य नाही. या भौगोलिक सीमांपलीकडे जाऊन पाहिले पाहिजे हे भुसारी यांनी दाखवून दिले. तसेच, भाषेचा अभ्यास अनेक अंगांनी कसा होतो, ते प्रा. भुसारी यांचे लेखन वाचले की अभ्यासकांच्या लक्षात येईल.

शरीर थकले तरी त्यांचा व्यासंग अखंड चालू होता. शंकराचार्यांचे अद्वैत तत्त्वज्ञान आणि आइन्स्टाइनचा सापेक्षतावादी सिद्धान्त यांची तुलना करण्याचा त्यांना ध्यास लागला होता. ज्ञानाची निरपेक्ष साधना करणाऱ्या या विद्याव्रतीने हा प्रकल्प पूर्ण होण्यापूर्वी जगाचा निरोप घेतला.

— डॉ. विद्या देवधर

**संदर्भ :**


१. *प्राचार्य भुसारी, र.म., डॉ. जोशी, उषा; 'मराठी स्वाध्याय संशोधन पत्रिका', मराठी रिसर्च जर्नल, अंक १७; १९९१.*

२. *मराठी साहित्य परिषद, आंध्रप्रदेश; 'पंचधारा', जुलै-सप्टेंबर १९८६.*


## भोळे, भास्कर लक्ष्मण

**लेखक तत्त्वचिंतक व विचारवंत**

**३० सप्टेंबर १९४२ - २४ डिसेंबर २००९**



भास्कर लक्ष्मण भोळे यांचा जन्म बुलढाणा जिल्ह्यातील तालखेड येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षण जळगाव जिल्ह्यातील वरणागाव येथे झाले. औरंगाबादचे मिलिंद महाविद्यालय आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ येथे त्यांची खरी जडणघडण झाली.

१९६२मध्ये बी.ए. आणि १९६४मध्ये एम.ए. परीक्षा प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण झाल्यावर त्यांनी १९६४-१९७० या कालावधीत मराठवाडा विद्यापीठात अध्यापनाचे काम केले.

त्यानंतर १९७०पासून ते नागपूर विद्यापीठात दाखल झाले आणि विदर्भ हीच त्यांची कर्मभूमी बनली. महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, महाराष्ट्र राज्य दर्शनिका समिती इत्यादींचे ते सदस्य होते. याशिवाय त्यांनी 'समाजप्रबोधन पत्रिका',

भ

'आजचा सुधारक', 'विचारशलाका' वगैरे नियतकालिकांच्या सल्लागार मंडळांवर काम केले. हे काम करीत असतानाच त्यांनी भारतीय शेतकरी कामगार पक्षाच्या स्थापनेपासून त्याच्या ध्येयधोरणांच्या चळवळींचा अभ्यास-संशोधन करून १९८२मध्ये नागपूर विद्यापीठाची पीएच.डी. पदवी मिळवली.

सुमारे ३०-३५ ग्रंथांची निर्मिती करतानाच त्यांनी विविध विषयांवर वृत्तपत्रांतून ५००हून अधिक लेख लिहिले असून भोळे यांचा कल सामाजिक, राजकीय विश्लेषणाकडेच राहिला. 'नवी घटनादुरुस्ती : अन्वय आणि अर्थ' (१९७७), 'दुसरे स्वातंत्र्य' (१९७७), 'राजकीय भारत' (१९७८), 'सत्तांतर आणि नंतर' (१९७९), 'यशवंतराव चव्हाण : राजकारण आणि साहित्य' (१९८६), 'महात्मा जोतिराव फुले : वारसा आणि वसा' (१९९०), 'शिक्षण आणि संस्कृती' (१९९२), 'डॉक्टर आंबेडकरांचा वैचारिक वारसा' (१९९८), 'विसावे शतक आणि समता विचार' (१९९९) हे त्यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. याशिवाय त्यांनी 'नवहिंदुत्वाची व्याघ्रमुद्रा' (१९८९), 'जातीपातींचे राजकारण' (१९९८), 'महाराष्ट्रातील सामाजिक चळवळींचे राजकीयीकरण : स्वरूप आणि परिणाम' (१९९८) अशा काही विचारप्रवर्तक पुस्तिका लिहिल्या. सामाजिक अन्यायाविरुद्ध प्रबोधन करणाऱ्या फुले-आंबेडकरवादी विचारसरणीशी जवळीक साधणारी भूमिका घेऊन त्यांनी वैचारिक लेखन केले आहे.

यशवंतराव चव्हाण, रयत शिक्षण संस्था, फुले-आंबेडकर इत्यादी विषयांवर त्यांनी सामाजिक प्रश्नांच्या अनुषंगाने समीक्षा लेखन केले आहे. सामाजिक पातळीवरून केलेली त्यांची वाङ्मयीन समीक्षा विशेष गाजली. त्यांना राज्य व राष्ट्रीय पातळीवर अनेक शिष्यवृत्त्या व पुरस्कार लाभले. त्यांना अत्यंत प्रतिष्ठेचा 'युगांतर' पुरस्कारही मिळाला. लोकशाही, समाजवाद, धर्मनिरपेक्षता, विवेकवाद आणि सामाजिक न्याय या तत्त्वांशी बांधिलकी मानून सामाजिक कार्यात त्यांचा डोळस सहभाग होता. महाराष्ट्रातील पुरोगामी चळवळी, संस्था उपक्रम व व्यासपीठे यांच्याशी त्यांचा जवळून संबंध होता. सामाजिक परिवर्तनाच्या कार्यासाठी एक प्रभावी साधन म्हणून त्यांनी लेखन व भाषण या माध्यमांचा वापर केला आहे.

- संपादक मंडळ

**संदर्भ :**

१. *मराठी विश्वचरित्रकोश; संपादक - कामत; श्रीराम पांडुरंग, विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा.*

***

भ

# म

## मंगरूळकर, अरविंद गंगाधर

**तत्त्वज्ञ, भाषापाणिनी, नखचित्रकार, विद्याव्यासंगी**

**२९ एप्रिल १९०९ – २७ मे १९८६**

अरविंद गंगाधर मंगरूळकर यांचा जन्म द. आफ्रिकेतील 'किस्मायू' या बेटावर झाला. त्यांच्या वडिलांचा तेथे काड्यापेट्यांचा व्यवसाय होता. परंतु, दुर्दैवाने वयाच्या आठव्या-दहाव्या वर्षी वडील आणि आई यांना ते अंतरले. त्यानंतरचे त्यांचे बालपण सोलापूर येथे मामाकडे झाले. पहिली 'जगन्नाथ शंकरशेट' शिष्यवृत्ती, 'भाऊ दाजी' पारितोषिक, 'नेस वाडिया' सुवर्णपदक असे मोठे स्पृहणीय टप्पे गाठत ते एम.ए. झाले. प्रथम नू.म.वि. आणि नंतर स.प. महाविद्यालयात त्यांनी अध्यापनकार्य केले. यथाकाल अनेक अधिकारपदे, मानसन्मान आणि महत्त्वाची कामे त्यांच्याकडे चालत आली आणि पुण्याच्या साहित्य संगीत-कला क्षेत्रावर त्यांनी अखंड पंचेचाळीस वर्षे आपला ठसा उमटविला.

प्रसन्न, नीटनेटके दर्शन, ऋजू, मुद्देसूद वक्तृत्व, विविधांगी लेखन, व्यासंग, विद्यासक्ती, अध्यापनकौशल्य, विद्यार्थिप्रेम, ठाशीव दृष्टिकोन, माणसे मिळविण्याचे कौशल्य, गुणग्राहकता या आपल्या वैशिष्ट्यांसह मंगरूळकर ज्ञानासाठी, कलेसाठी आणि अनेक संस्थांसाठी झटले. जीवनातील साऱ्याच क्षेत्रातील सौंदर्य, अभिजातता यांची मनस्वी ओढ असलेले मंगरूळकर यांची व्याकरणातील तलस्पर्शी दृष्टी 'मराठी व्याकरणाचा पुनर्विचार' या ग्रंथात, तर वाङ्मयाची सूक्ष्म आणि साक्षेपी जाण, 'मम्मटाचा काव्यप्रकाश' (सहलेखक अर्जुनवाडकर) आणि 'ज्ञानेश्वरी' या ग्रंथात व्यक्त झाली आहे. त्यांना सर्वच ललितकलांविषयी जिव्हाळा होता. त्यांची संगीतातील व्यासंगी-जाणकारी त्यांच्या 'नादातील पाउले' या पुस्तकातील विविध लेखांत प्रकट झाली आहे.

मराठीच्या निखळपणाविषयी ते अतोनात आग्रही असत. तत्कालीन पुणे विद्यापीठाचे कुलगुरू काकासाहेब गाडगीळ त्यांना 'मराठी भाषेचे पाणिनी' असे संबोधत. त्यांच्या हाताखाली शिकलेल्या विद्यार्थ्यांच्या पिढ्यान्‌पिढ्या 'सु-अक्षर' बनून गेल्या.

मराठी आणि संस्कृतखेरीज इंग्रजी, प्राकृत, पाली, हिंदी, कानडी, बंगाली आणि फ्रेंच या सर्व भाषा त्यांना अवगत होत्या. 'भारतीय संस्कृतीमधील भारतीयत्व' हा तत्त्वज्ञानात्मक विचार नेहमी त्यांच्या बोलण्यात येत असे. त्यांना चित्रकलेचेही अंग होते. नखचित्रे तर ते उत्तमच काढीत. सुस्पष्ट उच्चार, आवाजाचे अर्थबोधक चढउतार, उत्तम देखणे हस्ताक्षर, सौंदर्यदृष्टीने काव्यविवरण आणि लेखन, अशा सौंदर्यस्पर्शाने त्यांचे सारे विश्व, आयुष्य व्यापून गेले होते.

– डॉ. परिणीता देशपांडे

म

## मंजूळ, वासुदेव लक्ष्मण

**ग्रंथपाल, ग्रंथकार**

**१७ जून १९३५**

प्राच्यविद्येच्या क्षेत्रात अनेक देशी-विदेशी पंडितांच्या, अभ्यासकांच्या परिचयाचे व्यक्तिमत्त्व म्हणजेच वासुदेव लक्ष्मण मंजूळ होय. भांडारकर संशोधन ग्रंथपाल पदावरून सतत चाळीस वर्षे प्राच्य विद्या-विभूषितांच्या कार्यात, संशोधन प्रकल्पांत साहाय्य करत असतानाच स्वत:ची एक अभ्यासक म्हणून वेगळी



ओळख निर्माण करून त्यांनी आजवर पंचवीसहून अधिक ग्रंथ संशोधनात्मक पद्धतीने सादर केले. भांडारकर संस्थेस महाराष्ट्र, गुजरात, मध्य प्रदेश व कर्नाटक या चार प्रांतांतून सुमारे दहा हजार हस्तलिखिते दान स्वरूपात संकलित करून राजवाड्यांची परंपरा चालवली. निवृत्तीनंतरही मराठी हस्तलिखितांचे संगोपन केंद्र काढून मराठी भाषेची आणि संतसाहित्याची आगळीवेगळी सेवा केली.

वा.ल. मंजूळ मूळचे पंढरपूरचे, त्यांचा तेथेच जन्म झाला. आजोबा त्र्यंबकराज अग्निहोत्री होते. श्रौतेपंडित, चारी वेदांचे घनान्त अध्ययन, शंकराचार्यांकडून ‘वैदिक मुकुटमणी’ पदवी प्राप्त; त्यांचे चिरंजीव लक्ष्मण उर्फ बाबूराव, उत्तम हरिदासी कीर्तनकार, त्यांना ह्या क्षेत्रातल्या सहा पदव्या होत्या. धर्मार्थ महाराष्ट्र संगीत विद्यालयाचे गायनाचे अध्यापक, उत्तम ज्योतिषी, मंजूळांच्या घराण्यात श्रीविठ्ठल मंदिरात चतुर्मासात भागवत पुराण सांगण्याची परंपरा तीही गायकीचा तंबोरा मांडीवर ठेवून, त्याच्या स्वरावर श्लोक गायचे. या परंपरेला व्यास कीर्तन परंपरा (बैठे कीर्तन) म्हणत असत. आजोबा-वडील आणि वडिलांच्या गैरहजेरीत आठवीतल्या वा.लं.नी सभामंडपात पुराणही सांगितले. घरातली भिक्षुकी, कीर्तनकला आणि पुराणिकाच्या अल्पप्राप्तीचा भविष्यातला विचार करून ते पुण्यात आले.

कै. मामासाहेब दांडेकरांच्या आशीर्वादाने स.प.महाविद्यालयात प्रवेश घेऊन, विद्यार्थी साहाय्यक समिती, कै. श्रीमती वेणुताई पटवर्धन आणि कै. श्रीमती रमाबाई पुणतांबेकर यांच्या आश्रयाने बी.ए. (सं.) आणि ग्रंथपाल पदविका मिळवून डॉ. रा. ना. दांडेकरांच्या आदेशावरून भांडारकर संस्थेत साहाय्यक ग्रंथपाल म्हणून दाखल झाले. संस्थेत डॉ. प. कृ. गोडे, डॉ. गो. वि. देवस्थळी, डॉ. व. ग. राहूरकर, डॉ. अ. द. पुसाळकर यांचे मार्गदर्शन क्युरेटर म्हणून लाभले. डॉ. गो. के. भट, प्राचार्य र. दा. करमरकर, डॉ. म. गो. माईणकर, डॉ. प. ल. वैद्य, डॉ. रा. ना. दांडेकर, डॉ. अ. म. घाटगे अशा कित्येक महान प्राच्यविद्या पंडितांच्या हाताखाली वा.लं.ना काम करायला मिळाले.

त्याखेरीज ग्रंथालयात संशोधनासाठी येणाऱ्या पन्नासहून अधिक विदेशी संशोधकांना त्यांचे साहाय्य झाले. त्यांमध्ये डॉ. सोन्थायमर (जर्मनी), डॉ. ॲन फेल्डहौस (अमेरिका), डॉ. एरिक सँड (डेन्मार्क), डॉ. इरिना ग्लुश्कोव्हा (रशिया), डॉ. तोशिहिरोवादा (जपान), प्रा. आय. एम. पी. रिसाईड (लंडन) इत्यादींच्या शोध-प्रकल्पांना तसेच अनेक विदेशी विद्यार्थ्यांना पीएच.डी.साठी मंजूळ यांचे साहाय्य झाले. त्यातूनच ‘भारतीय विद्येचे विदेशी विद्वान’ हा ग्रंथ तयार झाला. ही सर्व विदेशी अभ्यासक मंडळी संतसाहित्यावर काम करणारी होती.

ग्रंथालयात नित्य येणाऱ्या विद्वानांत डॉ. रा. शं. वाळिंबे, डॉ. रा. चिं. ढेरे, श्रीमान म. रा. यार्दी, डॉ. एस. व्ही. सोहोनी यांसारख्या दिग्गज प्राच्यविद्वानांचा सहवास होताच! डॉ. वाळिंबे यांच्या आग्रहामुळे मराठी विषयावर एम.ए. आणि पीएच.डी. करावयाची संधी मंजूळ यांना मिळाली. संस्थेच्या आवारातच वास्तव्य असल्यामुळे विविध जबाबदाऱ्या त्यांनी सहजपणे सांभाळल्या. एतद्देशीय प्राच्य-विद्या संशोधकांच्या जीवन-कार्यावर मंजूळ यांनी वृत्तपत्रांतून लेखन केले.

१९९९मध्ये निवृत्त झाल्यावर तीन वर्षे महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटीच्या ‘विश्वभारत सांस्कृतिक केंद्र’ या संस्थेचे ते मानद संचालक झाले. भांडारकर संस्थेच्या कार्याचीच परंपरा पुढे चालू राहिली. त्यांनी २००५मध्ये ‘मराठी हस्तलिखित केंद्र’ नावाची संस्था स्थापन केली. त्या संस्थेच्या माध्यमातून संत साहित्यविषयक जुनी मराठी एक हजार हस्तलिखिते गोळा केली. दीड हजारांचे मायक्रोफिल्मिंग आणि डिजीटल प्रती तयार करण्याचे काम डॉ. फेल्डहौस यांच्या मार्गदर्शनाखाली सहा वर्षांत

म

पूर्ण केले. आणि नंतर सुमारे आठ हजार मराठी हस्तलिखितांच्या, चार खंडांतील ग्रंथाच्या एकत्रित विवरणात्मक सूचीचे काम सुरू केले आहे. त्यांनी काही महत्त्वाचे ग्रंथलेखनही केले. त्यांमध्ये आमची संस्कृती (१० खंड), श्रीकृष्णदयार्णवामृत, कुलदैवत-कुलाचार-कुलपुरुष, अमृतानुभवाची वासुदेवी टीका, पंढरपूरच्या अलक्षित कथा, ईश्वरनिष्ठांच्या पाऊलखुणा, भारती विद्येचे विदेशी विद्वान, डॉ. रा. ना. दांडेकर चरित्र, डॉ. रा. गो. भांडारकर चरित्र, भगवद्‌गीतेचा विश्वसंचार, चाणक्यनीती, संत चोखामेळा, चला विठ्ठलाच्या गावा पंढरपुरातील मठ फड-दिंड्यांचा इतिहास (UGC) प्रकल्प नुकताच पूर्ण अशी सुमारे तीस पुस्तके त्यांनी लिहिली. ही मुख्यत्वे उत्कर्ष प्रकाशनने प्रसिद्ध केली. नुकतेच महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक सभेने २ ग्रंथांना पुरस्कार दिले. ग्रंथपाल असलेले मंजूळ निवृत्तीनंतर ग्रंथकार मंजूळ झाले.

भांडारकर संस्थेत काम करताना त्यांना अनेक पुरस्कार मिळाले. त्यांमध्ये 'ग्रंथाली'चा आदर्श ग्रंथपाल, 'भांडारकर'चा आदर्श कर्मचारी, 'अखिल भारतीय प्राच्यविद्या परिषदे'चा उत्तम कार्यकर्ता, कोशकार केतकर पुरस्कार, ऋग्वेद अभ्यासक, याज्ञवल्क्य भूषण, पुणे मराठी ग्रंथालयाचा सन्मान्य ग्रंथपाल, विधिलिखित ब्रह्मभूषण, फलज्योतिष मंडळाचा जीवनगौरव, ज्योतिषाचार्य, पुणे विद्यापीठ नामदेव अध्यासन शिष्यवृत्ती आणि संस्कृत विभागातून पुण्यपुरुष पदवी इत्यादींचा समावेश आहे.

श्री. मंजूळ शोधनिबंध वाचण्यासाठी महाराष्ट्र कल्चर ॲन्ड सोसायटीच्या मास्को, टोकियो, अमेरिका, पुणे येथील परिषदांना उपस्थित राहिले. मॉरिशसच्या जागतिक रामायण परिषदेलाही ते गेले होते, त्याशिवाय अमेरिकेच्या विस्कान्सिनच्या (मॅडसिन) साउथ एशियन कॉन्फरन्सला सलग तीन वेळा हजर होते. मलेशिया, सिंगापूर अशा विदेश वाऱ्याही त्यांनी केल्या आहेत.

कीर्तन-ज्योतिष-हस्तलिखित शास्त्र, संत-साहित्य यांविषयी अनेक व्याख्याने त्यांनी दिली आहेत. कीर्तनकुल पुणे, महाराष्ट्र प्राच्य विद्या परिषद यांचे ते संस्थापक सदस्य आहेत. भांडारकर संस्थेच्या सल्लागार मंडळाचे सध्या सदस्य, तुळशीबागचे विश्वस्त अशा अनेक संस्थांशी ते निगडित आहेत.

सौ. मंजूळ यांना पौराहित्यात रस आहे. भारत सरकारने मंजूळ यांच्या मार्गदर्शनाखाली 'स्त्री पौरोहित्यावर' एक अनुबोधपट नुकताच प्रकाशित केला आहे.

— सु. वा. जोशी

## मजुमदार, रमेशचंद्र हलधर

**विश्वप्रसिद्ध इतिहासकार**

**४ डिसेंबर १८८८ – ११ फेब्रुवारी १९८०**



रमेशचंद्र हलधर मजुमदार यांचा जन्म खंडारपाटा, जिल्हा फरीदपूर, बंगाल (आता बांगला देश) येथे सधन कुटुंबात झाला. रमेशचंद्र यांच्या आईचे नाव बिधुमुखी होते. प्राचीन इतिहास रमेशचंद्र यांच्या अध्ययनाचा प्रमुख विषय होता. त्यांनी मध्ययुगीन बृहत्तर व आधुनिक भारताचाही अभ्यास व संशोधन केले. भारतीय इतिहासाविषयीचे त्यांचे संशोधनकार्य आदर्श आणि प्रेरणादायी आहे.

कटक व रेवनशॉ महाविद्यालयात सुरुवातीचे शिक्षण झाल्यावर १९११मध्ये प्रेसिडेन्सी महाविद्यालयातून कोलकाता विद्यापीठाची एम.ए. पदवी त्यांनी मिळवली. ते ढाका विद्यापीठात अधिव्याख्याते व प्राध्यापक असतानाच त्यांना प्रेमचंद रायचंद शिष्यवृत्ती मिळाली व त्यांनी कुशाण वंशाचे संशोधन केले. 'कॉर्पोरेट लाइफ इन एन्शंट इंडिया' या प्रबंधामुळे रमेशचंद्रांनी पीएच.डी. पदवीबरोबर ग्रिफिथ मेमोरिअल पारितोषिकही मिळवले. नंतर ते ढाका विद्यापीठात इतिहास विभागप्रमुख (१९२१) व कुलगुरू (१९३७-४२) आणि मग

बनारस हिंदू विद्यापीठात इतिहास विभागप्रमुख (१९४२) झाले. पुढे १९५८-५९ या कालावधीमध्ये शिकागो व पेनसिल्व्हेनिया व अन्य परदेशी विद्यापीठांत ते अभ्यागत व्याख्याते म्हणून गेले होते. अध्यापनासाठी ते १९२८ साली युरोपातील विविध देशांत गेले होते. त्यांनी इजिप्त तसेच सुमात्रा, कंबोडिया, सयाम, मलाया येथील प्रवासात त्या देशांवरील भारतीय संस्कृतीचा प्रभाव व प्रसार याचा अभ्यास केला आणि 'एन्शंट इंडियन कॉलनीज इन द फार ईस्ट' (१९२७, ३ खंड) हा बृहद्‌भारतावरील ग्रंथ लिहिला.

रमेशचंद्रांनी 'सिपाय म्युटिनी ॲन्ड द रिव्होल्ट ऑफ १८५७' (१९५७) या पुस्तकात १८५७चे स्वातंत्र्ययुद्ध नव्हते तर बंडच होते, असेच मांडले. 'क्लासिकल अकौंट्स ऑफ इंडिया' (१९६०) या ग्रंथात त्यांनी प्राचीन पाश्चिमात्य इतिहासकार व प्रवासी यांची भारताविषयीची मते संकलित केली आहेत. इतिहासातील त्यांचे प्रभुत्व लक्षात घेऊन कन्हैयालाल मुनशींनी त्यांना भारतीय विद्याभवनाचे इतिहासप्रमुख आणि 'द हिस्टरी ॲन्ड कल्चर ऑफ द इंडियन पीपल' (११ खंड, १९४४-७७) या इतिहास मालिकेचे संपादक म्हणून नेमले. रमेशचंद्रांनी ही ९,००० पृष्ठांची मालिका मोठ्या चिकाटीने पूर्ण केली.

रमेशचंद्र मजुमदार यांनी इतिहासाशी निगडित पुस्तकांना अभ्यासपूर्ण प्रस्तावनाही लिहिल्या. या प्रस्तावनांमधून त्यांची विद्वता व परखड, निर्भय वृत्ती प्रत्ययास येते. 'ग्रेट वूमेन ऑफ इंडिया' (१९५३), 'एक्स्पान्शन ऑफ आर्यन कल्चर ॲन्ड ईस्टर्न इंडिया' (१९६०), 'ग्लिम्प्सेस ऑफ बेंगॉल इन द नाइन्टीन्थ सेंच्युरी' (१९६०), 'हिस्टरी ऑफ द फ्रीडम मूव्हमेंट इन इंडिया' (१९६३, ३ खंड), 'इंडियन रिलिजन्स' (१९६३), 'कॉलनीज इन द फार ईस्ट' (१९७३) वगैरे त्यांचे महत्त्वाचे लोकप्रिय ग्रंथ आहेत. याशिवाय त्यांचे अनेक शोधनिबंधही प्रसिद्ध झाले आहेत. मृदू व लाघवी वाणीमुळे रमेशचंद्रांची इंग्लिश व्याख्याने मंत्रमुग्ध करणारी असत.

रमेशचंद्रांना अनेक मानसन्मान लाभले होते. उदाहरणार्थ, अखिल भारतीय इतिहास परिषद, अखिल भारतीय प्राच्यविद्या परिषद व इस्तंबूलच्या प्राच्यविद्या परिषदेची एक शाखा यांचे अध्यक्षपद, एशियाटिक सोसायटी (कोलकाता व मुंबई) व रॉयल एशियाटिक सोसायटी (ग्रेट ब्रिटन-आयर्लंड) यांची सन्माननीय फेलोशिप, १९६७-६८मध्ये कोलकाताचे नगरपालपद, युनेस्को प्रसृत 'द हिस्टरी ऑफ मॅनकाइंड' या जागतिक लेखन समितीचे उपाध्यक्षपद, सर जॉर्ज कँबेल, बी.सी. लॉ आणि सर विल्यम जोन्स स्मृती सुवर्णपदके, तसेच कोलकाता, जादवपूर, रवींद्र भारती वगैरे विद्यापीठांच्या सन्माननीय डी.लिट. पदव्या इत्यादी. तसेच इतिहास संशोधक मंडळ व भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्था (पुणे), फादर हेरास इन्स्टिट्यूट (मुंबई), वंगीय साहित्य परिषद (कोलकाता) वगैरे संस्थांशी रमेशचंद्रांचा निकटचा संबंध होता.

— संपादित

**संदर्भ :**

१. *मराठी विश्वचरित्रकोश; संपादक - कामत, श्रीरंग पांडुरंग; विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा.*

२. *अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*

## मलांट्रा, जेरी

**इतिहास संशोधक, लेखक**

**१९४९**

भारतातील - विशेषत: वेरूळ-अजिंठा लेण्यातील शिल्पांनी अनेक भारतीय-अभारतीय अभ्यासकांना भुरळ घातली आहे. आजवर अनेकांनी या लेण्यांचा अभ्यास केला असला, तरी जेरी मलांट्रासारख्या मोजक्याच इतिहास संशोधकांचे विशेष योगदान लाभले आहे. अमेरिकेतील ज्येष्ठ शिक्षणतज्ज्ञांपैकी एक असा नावलौकिक असणाऱ्या, अमेरिकन उच्च-शिक्षण समितीतील वरिष्ठ पदाधिकारी, टेक्सास विद्यापीठातील धोरणात्मक नियोजनाचे श्रेय ज्यांच्याकडे जाते, अशा जेरी मलांट्रा यांच्या अत्युच्च शैक्षणिक आलेखाला

म



भारतातील - विशेषत: महाराष्ट्रातील बौद्ध लेण्यांच्या अभ्यासाची पार्श्वभूमी आहे, हे वैशिष्ट्य म्हणावे लागेल.

मिनसोटा विद्यापीठातून मानववंशशास्त्र आणि पुरातत्त्व या विषयातन १९७३ साली पदवी संपादन केल्यानंतर त्यांनी प्राच्यविद्येमध्ये पदव्युत्तर शिक्षण पूर्ण केले. त्यानंतर पीएच.डी.च्या अभ्यासाचा विषय म्हणून त्यांनी भारतातील वेरूळ लेण्यांची निवड केली. १९८१मध्ये अभ्याससाठी त्या भारतात आल्या. या ठिकाणी अभ्यास करताना त्यांना जाणवले की, वेरूळ येथील बौद्ध लेण्यांची रचना वैशिष्ट्यपूर्ण असून त्यांच्या मांडणीतून बौद्ध धर्माचा एक समग्र इतिहासच डोळ्यासमोर येत आहे. आपल्या संशोधनाद्वारे एका नव्या दृष्टीकोनातून या लेण्यांचा त्यांनी अभ्यास केला. यातूनच त्यांचा प्रबंध हा महाराष्ट्रातील तसेच भारतातील बौद्ध धर्माचा इतिहास सांगणारा महत्त्वपूर्ण दस्तऐवज ठरला आहे. ‘Unfolding a Mandala : The Buddhist Cave temples at Ellora’ या पुस्तकातून पुढे तो प्रकाशित झाला.

या अभ्यासाच्या दरम्यानच त्यांच्यातील अस्वस्थ संशोधिकेला भारतातील विविध ठिकाणची प्राचीन बौद्ध लेणी, शिल्पे आणि बौद्ध धर्म यांनी इतके झपाटून टाकले की, प्रबंध पूर्ण झाल्यावरही त्या १९८३नंतर वारंवार भारतभेटीस येत राहिल्या. त्यांनी वेरूळ, अजिंठा, अमरावती, नागार्जुनकोंडा, सांची, सारनाथ, उज्जयिनी इत्यादी अनेक ठिकाणांना भेटी देऊन तिथल्या बौद्ध वास्तूंचा, शिल्पांचा सखोल अभ्यास केला. १९८७ ते ९० या काळात त्यांनी केलेले हे काम ‘The Encyclopedia of Asian History’मध्ये समाविष्ट आहे.

बौद्ध वास्तू, शिल्पे यांच्याकडे कलात्मक दृष्टीने पाहण्याची रसिकता आणि त्याचबरोबर एका इतिहासतज्ज्ञाची अभ्यासक नजर या दोन्हींचा संगम मलांट्रा यांच्या ठिकाणी झालेला दिसतो. आंतरराष्ट्रीय स्तरावर विविध ठिकाणी त्यांनी सादर केलेल्या शोधनिबंधांच्या आणि व्याख्यानांच्या विषयवैविध्यावरून हेच दिसून येते. उदाहरणार्थ ‘Mara’s Army : Text and Image in Early Indian Art’ किंवा ‘The date of Ajanta Cave 27 Inscription’ इ. केवळ लिखाणातूनच नव्हे, तर विद्यार्थिदशेत असताना भारतीय संगीताचा अभ्यास करण्यासाठी भारतात येण्यावरूनही त्यांच्यातली कलासक्त वृत्ती प्रत्ययाला येते.

लहानशा बीजापासून वटवृक्ष निर्माण व्हावा, त्याप्रमाणे जेरी मलांट्रा यांच्या संशोधनाचा विस्तार वेरूळ लेण्यांपासून सुरू होऊन दक्षिण आशियाई देशातील बौद्ध धर्माच्या अभ्यासापर्यंत जाऊन पोहोचला. आज South Asian Buddhist Art & History या विषयावरील त्या एक अधिकारी व्यक्ती आहेत. ज्या विद्यापीठातून शिक्षण पूर्ण केले, त्या मिनसोटा विद्यापीठातच इतिहास-प्राध्यापिका म्हणून कार्यरत (१९९२-२००२) होण्याचे भाग्य त्यांना लाभलेच; पण तेवढ्यावरच न थांबता, जेरी मलांट्रा या बहुआयामी व्यक्तिमत्त्वाने संशोधन आणि उच्च-शिक्षण क्षेत्रातील स्वत:च्या देशातील एक ज्येष्ठ मार्गदर्शिका होण्यापर्यंतचा टप्पा गाठला आहे. बरोबरच त्यांची जिद्द, अभ्यासू वृत्ती, प्रामाणिकपणा आणि आधुनिक दृष्टीकोन हे गुण आजच्या पिढीला आदर्शवत ठरतील, यात शंका नाही!

– डॉ. सीमा सोनटक्के



## महाजन, देविदास लक्ष्मण

**शिक्षक, भाषातज्ज्ञ, लेखक, अनुवादक**

**२१ जून १८९६ – ३ एप्रिल १९६७**

निझामाच्या राज्यात उर्दू माध्यमातून शिक्षण घेणे सक्तीचे असताना मराठी भाषेचे वैभव लयाला जाऊ न देण्याचे कार्य ज्या-ज्या महनीय व्यक्तींनी केले, त्यांत संत दासगणू व देविदास लक्ष्मण महाजन यांचा आवर्जून उल्लेख केला पाहिजे. या भागात शिक्षणाचा प्रसार



अतिशय कमी होता. तालुक्याच्या ठिकाणी सातव्या इयत्तेपर्यंत व जिल्ह्याच्या ठिकाणी मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण मिळू शकत असे. मराठवाडा सातशे वर्षे इस्लामच्या अधिपत्याखाली राहिला. मात्र या राज्यकर्त्यांना येथे फार मोठे इस्लामीकरण करता आले नाही, त्याचे कारण दारिद्र्यात राहूनही आपल्या निष्ठा न विकणारे या भागातील लोक या संतांमुळे सुसंस्कारित झाले होते.

दे.ल. महाजन यांचे मूळ नाव देविदास श्रीनिवास कुळकर्णी आहे. त्यांचे वडील श्रीनिवासराव कुळकर्णी हे नांदेड जिल्ह्यातील बिलोली तालुक्यातील कुंडलवाडीचे रहिवासी. कुळकर्णी यांची आर्थिक परिस्थिती बिकट होती. भजन-कीर्तन यात ते आपले मन रमवत. सगरोळीचे सरंजामदार केशवराव देशमुख हे त्यांचे नातलग होते. पत्नी गरोदर असताना बाळंतपण व्यवस्थित व्हावे म्हणून त्यांनी आपल्या पत्नीला नांदेड येथील त्यांचे नातलग श्री. बाऱ्हाळे यांच्याकडे आणले. तेथे त्या प्रसूत झाल्या आणि २१ जून १८९६रोजी मुलगा जन्माला आला. दुर्दैव म्हणजे बाळाची आई त्याच्या जन्मानंतर थोड्या दिवसांतच मरण पावली. त्यांच्या मावशीला आपली बहीण गेल्याचे अतिशय दु:ख झाले आणि त्यांनी बाळाला कुलक्षणी ठरवले. एका टोपलीत बाळाला घालून गावातील महादेवाच्या मंदिरात नेऊन ठेवले. गोविंदराव बिंदू हे मंदिरात देवदर्शनासाठी आले असताना हे बालक त्यांच्या दृष्टीस पडले. गोविंदराव हे अंबुताईंचे मुनीम होते. हे गोविंदराव बिंदू म्हणजेच हैद्राबाद स्वातंत्र्य संग्रामात गाजलेले थोर स्वातंत्र्यसेनानी आणि हैद्राबाद राज्याचे नावाजलेले गृहमंत्री दिगंबरराव बिंदू यांचे वडील.

गोविंदराव बिंदू यांनी परिस्थितीचा विचार करून अंबुताईंना 'या बाळाचा देवाचा प्रसाद म्हणून स्वीकार करावा' अशी विनंती केली. पुढे त्यांनी या बाळाला दत्तक घेतले. आपल्या कुलदेवतेवरून त्याचे नाव देविदास ठेवले. श्रीमती अंबुताई यांचे सगरोळीच्या देशमुखांशी जवळचे नाते होते. त्यामुळे सगरोळीकर देशमुख महाजनांचेही नातलग झाले. नंतर त्यांचा विवाह दिगंबरराव बिंदू यांचे चुलत बंधू आनंदराव यांची कन्या राजाबाई यांच्याशी झाला. त्यामुळे गृहमंत्री दिगंबरराव बिंदू व देविदास ल. महाजन यांचे नाते सासरे-जावई असे झाले. मात्र समवयस्क असल्यामुळे ते जिव्हाळ्याच्या मित्राप्रमाणेच वागले आणि पुढे मराठी भाषेच्या विकासासाठी दोघेही प्रयत्नशील राहिले.

दे. ल. महाजन यांचे शिक्षण नांदेडला शासकीय शाळेत सातव्या वर्गापर्यंत झाले होते. त्यानंतरचा काही काळ त्यांनी साधुसंतांची चरित्रे आणि विविध प्रकारचे ग्रंथ वाचण्यात व्यतीत केला आणि १९४०साली प्रतिभा निकेतन शाळेत ते शिक्षक झाले. आरंभी काही दिवस या शाळेचे मुख्याध्यापक श्री. मोहरीर होते. त्यानंतर दे.ल. महाजन मुख्याध्यापक झाले. नंतर श्री. दत्तुसिंग गहिलोत हे मुख्याध्यापक झाले आणि हायस्कूलचे वर्ग सुरू झाल्यानंतर १९४२साली श्री. वि.द. सर्जे गुरुजी हे मुख्याध्यापक झाले. १९५५साली प्रतिभा निकेतनमध्ये नरहर कुरुंदकर शिक्षक म्हणून आले आणि शाळेला केवळ नांदेड जिल्ह्यातच नव्हे, तर सर्व मराठवाड्यात गुणवत्तेमुळे खूपच कीर्ती मिळाली.

महाजन सातवी उत्तीर्ण होते, तरी मराठी भाषेवर त्यांचे विलक्षण प्रभुत्व होते शिवाय उर्दू आणि हिंदी या भाषांवरही प्रभुत्व होते. संस्कृत भाषेवर त्यांनी स्वत: अभ्यास करून प्रभुत्व मिळवले. प्राचीन ग्रंथ, पुराणे, रामायण-महाभारतांसारखी आर्ष महाकाव्ये आणि वैदिक तत्त्वज्ञान यांचा त्यांनी भरपूर अभ्यास केला होता. त्यांनी हैद्राबाद येथील धुंडीराज शास्त्री यांना गुरू केले होते. शिवाय गणंजय महाराज वसमतकरही त्यांचे गुरू होते. ह.भ.प. धोंडू महाराज कंधारकर हे त्यांचे परंपरागत गुरू होते. सातवीपर्यंत शिक्षण झालेले महाजन दहावीपर्यंतच्या विद्यार्थ्यांना मराठी, हिंदी असे विषय

म

शिकवायचे. संत दासगणू महाराजांकडून त्यांना कीर्तन करण्याची प्रेरणा मिळाली. पुढे ती त्यांनी खूप विकसित केली. आपल्या कीर्तनात ते स्वरचित आख्याने लावत असत. ‘कीर्तनरत्नमाला’ या नियतकालिकाचे ते काही काळ संपादक होते. पुढे महाजन यांनी ‘आख्यान रत्नमाला’ नावाने ही सर्व आख्याने पुस्तकरूपाने प्रकाशित केली.

लाला रघुवीर नावाचे त्यांचे एक मित्र होते. त्यांनी महाजनांना फारसी भाषा शिकवली. शिवाय त्यांच्याकडूनच त्यांनी ‘तुलसी रामायण’ समजून घेतले. हा ग्रंथ त्यांना एवढा आवडला की, त्यांनी ‘मानसचरित्र’ या नावाने तुलसीदासाच्या रामायणाचा मराठीतून काव्यात्म अनुवाद केला. साहित्य संमेलनातही त्यांचे कीर्तनाचे कार्यक्रम होत असत. स्वत: सनातनी असूनही ते राजकीय, सामाजिक संदर्भ डोळ्यांसमोर ठेवून एखाद्या सुधारकाप्रमाणे टीकाटिप्पणी करत असत. नव्या मूल्यांचा आदर करून सुधारणावादी गोपाळ गणेश आगरकरांच्या विचारांचा ते तळमळीने प्रचार करत. पुढे त्यांनी इंग्लिश भाषाही शिकून घेतली.

दे.ल. महाजनांचे दत्तक येण्यापूर्वीचे वडीलबंधू दुर्वर्तनी व व्यसनी होते. त्यांनी इस्लाम धर्माची दीक्षा घेतली होती. त्यांच्या निधनानंतर महाराजांनी कुणाचीही पर्वा न करता त्यांचा अंत्यविधी हिंदू पद्धतीने केला आणि श्राद्धही केले. यामुळे नांदेडच्या सनातनी पुरोहितांनी त्यांच्यावर बहिष्कार टाकला. पुढे अनेकांनी मध्यस्थी केल्यामुळे महाजनांवरील बहिष्कार उठला. त्यांची हिंमत, विद्वत्ता आणि वक्तृत्व यांचे मोठेपण त्यांना प्रतिष्ठा मिळवून देण्यास कारणीभूत झाले. आगरकरांबरोबर महर्षी कर्व्यांचाही त्यांच्यावर खूप प्रभाव होता. त्या काळी त्यांनी हिंमतीने सगळ्यांचे म्हणणे झुगारून दोन विधवा स्त्रियांची लग्ने लावून दिली होती.

महाजन हे हरिदासी कीर्तनकार होते. संगीत महर्षी अण्णासाहेब गुंजकर हे हार्मोनियमची व रंगनाथबुवा देगलूरकर तबल्याची साथ त्यांना कीर्तनात करत असत. अत्यंत साधे राहणारे महाजन सातत्याने व्यासंगमग्न असत. स्फुटकाव्य, चरित्रकाव्य, आख्यानकाव्य, खंडकाव्य, अनुवादित काव्य असे अनेक काव्यप्रकार त्यांनी हाताळले. ‘महाजन साहित्य मंडळा’ने त्यांची अनेक पुस्तके प्रकाशित केली आहेत. त्यांतील महत्त्वाची म्हणजे ‘महाजनांची कविता’, ‘मोत्याची मागणी’, ‘आख्यान रत्नमाला’ (चार भाग), ‘नामदेव महाराजांचे चरित्र’ हे त्यांचे स्वत:चे ग्रंथ, तर ‘मानसविहार’, ‘देवीमाहात्म्यसार’, ‘भर्तृहरी शतकत्रयम्’, ‘गुरुपरंपरा’ (दोन भाग), ‘मनोबोधसार’, ‘महाराष्ट्र गीतांजली’ ही त्यांची अनुवादित पुस्तके होत.

निझामाच्या काळात उर्दूचे गोडवे गायले जात असताना, मराठी भाषेचे महत्त्व जनमानसात टिकवण्याचे काम करणे अत्यंत अवघड होते. कुणालाही न दुखावता मराठीचे मोठेपण जाहीरपणे सांगण्याची हिंमत त्यांनी दाखवली. सुधारणावाद जपला आणि इस्लाम राजवटीचा प्रभाव आणि भीती असताना माणसांची अस्मिता टिकवली. हे त्यांचे कार्य कधीही विसरता येणार नाही.

— प्राचार्य स.दि. महाजन

## मांडवकर, भाऊराव मारुती

☛ *मुख्य चरित्रनोंद - साहित्य खंड*

## मांडे, प्रभाकर भानुदास

**लोकसाहित्य अभ्यासक, लेखक**

**१६ डिसेंबर १९३३**

प्रभाकर भानुदास मांडे यांचा जन्म औरंगाबाद जिल्ह्यातील गंगापूर तालुक्यातील सावखेड या गावी झाला. मुलांच्या शिक्षणाची आबाळ होऊ नये म्हणून आई लक्ष्मीबाई व वडील भानुदासराव मांडे यांनी औरंगाबादेतच घर करून त्यांना शिक्षण घेण्याची संधी प्राप्त करून दिली. एम.ए.बी.एड., पीएच.डी., डी.लिट. असे उच्चविद्या वैभव प्राप्त करून त्यांनी आई-वडिलांचे स्वप्न साकार केले. अध्ययन व अध्यापन हेच जीवनध्येय ठरल्याने १९५१ ते १९६१ या काळात



माध्यमिक शिक्षक, नंतर १९६२ ते १९७३ अशी १२ वर्षे महाविद्यालयांमध्ये मराठीचे प्राध्यापक व पुढे डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठाच्या मराठी विभागात १९७३ ते १९८९ या काळात प्रपाठक म्हणून, तर १९८९ ते १९९३ या काळात प्राध्यापक म्हणून अध्यापनाचे कार्य त्यांनी केले आहे. १९९४-९५मध्ये धुळे येथील का.स. वाणी मराठी प्रगत अध्ययन संस्थेचे संचालकपद त्यांनी भूषवले. तर पुढे १९९५ ते १९९७ या काळात महाराष्ट्र राज्य प्रौढ शिक्षण संस्था औरंगाबाद येथे संचालकपदाची जबाबदारी त्यांनी पार पाडली.

महाविद्यालयीन जीवनापासूनच त्यांना संशोधन कार्याची आवड होती. मध्वमुनीश्वर यांच्या चरित्रावर लिहिलेल्या लेखाने संशोधनाचा श्रीगणेशा घडला. हा लेख मिलिंद महाविद्यालयाचे तत्कालीन प्राचार्य म. भि. चिटणीस यांना खूपच भावला. त्यांनी मांडे यांना डॉ. बाबासाहेब आंबेडकरांकडे नेले. डॉ. आंबेडकरांनी या लेखाचे कौतुक केले व ‘असाच अभ्यास करत राहा, शोध घेत राहा’, असा आशीर्वाद दिला. तेव्हापासून मांडे यांचे संशोधन कार्य झपाटलेपणाने सुरू झाले ते आजतागायत तसेच सुरू आहे.

म

डॉ. मांडे यांनी शास्त्रीय दृष्टीकोनाचा अवलंब करून चिकित्सक दृष्टीने एकवीस हजार ओवीगीते, दीड हजारांवर लोकगीते व शेकडो लोककथा यांचे साक्षेपी संशोधन केले. गोदावरी शोध प्रकल्पांतर्गत गोदाकाठी पदयात्रा काढून या परिसराच्या प्राचीनतेचा वेध घेतला. महाराष्ट्रभर अनेक शोधयात्रा काढून, प्रत्यक्ष क्षेत्रीय संशोधन करून, लोकजीवनामध्ये प्रचलित असलेल्या विधी, रूढी, परंपरा, लोकगीते, कथागीते, लोकविश्वास, विधिनाट्ये इत्यादींचा धांडोळा घेतला व आपल्या विविध ग्रंथांद्वारे त्यांवर भाष्य केले आहे. लोकसाहित्यात पुरातत्त्वांचे लोकप्रचलित स्वरूप आढळत असल्याने डॉ. मांडे यांचे लोकसाहित्यावरचे ग्रंथ पुरातत्त्वशास्त्रदृष्ट्या महत्त्वाचे आहेत.

लोकसाहित्य तत्त्वांच्या आधारे पुरातत्त्वांचा वेध कसा घेता येतो, याचे उत्तम उदाहरण म्हणजे डॉ. मांडे यांचा ‘रामकथेची मौखिक परंपरा’ हा महत्त्वपूर्ण ग्रंथ होय. रामायण हे केवळ मिथक नाही, काल्पनिक नाही तर ऐतिहासिक सत्यावर आधारलेले महाकाव्य आहे, हे डॉ. मांडे यांनी या ग्रंथातून दाखवून दिले आहे व रामायणाच्या रचनेपूर्वी काही हजार वर्षे रामचरित्रासंबंधीच्या कथा-गाथा मौखिक परंपरेने प्रवाही होत्या, पण या मौखिक परंपरांचे पाश्चिमात्य अभ्यासकांना यथार्थ आकलन झाले नाही; असा निर्वाळा देऊन रामायणाच्या प्राचीनतेवर त्यांनी प्रकाश टाकला आहे.

‘गावगाड्याबाहेर’, ‘सांकेतिक आणि गुप्त भाषा, परंपरा व स्वरूप’, ‘मांग आणि त्यांचे मागते’ आणि ‘मौखिक वाङ्मयाची परंपरा, स्वरूप आणि भवितव्य’ हे त्यांचे ग्रंथही या दृष्टीने महत्त्वाचे आहेत.

‘गावगाड्याबाहेर’ या ग्रंथामध्ये त्यांनी भटक्या जातीजमातींच्या जीवनाचा वेध, त्यांच्या प्राचीन परंपरा, रूढी, विधी व भाषा यांसह घेतला आहे. यातील जीवनदर्शन अस्वस्थ करणारे, दाहक आहेच पण प्राचीन समाजजीवनाच्या अनेक अलक्षित कंगोऱ्यांवर प्रकाश टाकणारे आहे. ‘डक्कलवार’ या जातीचे विशेष, त्यांचे ‘बसवपुराण’ अशा विषयांवरचे ग्रंथातील विवेचन याची साक्ष देणारे आहे. ‘सांकेतिक आणि गुप्तभाषा, परंपरा व स्वरूप’ या ग्रंथामध्ये डॉ. मांडे यांनी व्यावसायिक आणि दलाल यांची गुप्तभाषा; भटके-विमुक्त जातींच्या गुप्तभाषा यांविषयी सोदाहरण चर्चा करून गुप्तभाषेचे स्वरूप समाजासमोर आणले आहे. भटकेविमुक्तांच्या जीवनसरणीचा अभ्यास करण्यासाठी महत्त्वाचा दस्तऐवज ठरणारा हा ग्रंथ आहे.

‘मांग आणि त्यांचे मागते’ या ग्रंथात त्यांनी मांग या जातीच्या परंपरांचा अत्यंत साक्षेपाने वेध घेतला आहे.

लोकपरंपरेने प्रचलित असलेल्या कथा आणि समजुती लक्षात घेऊन मांग ही अतिप्राचीन जमात कशी होती व एके काळी ऐश्वर्य भोगलेल्या जमातीला काळाच्या प्रवाहात अनेकविध कारणांनी आजची अवस्था का प्राप्त झाली, याचे मौलिक विवेचन त्यांनी केले आहे. लोकसाहित्य सामग्रीचा वापर करून एखाद्या जातीविषयी कसे संशोधन करता येते, याची साक्ष म्हणजे हा ग्रंथ होय.

'मौखिक वाङ्मयाची परंपरा, स्वरूप आणि भवितव्य' या ग्रंथामधून त्यांनी मौखिक वाङ्मयाच्या स्वरूपाची चिकित्सा करून या वाङ्मयाच्या आशयातून अभिव्यक्त होणाऱ्या गाभ्याच्या तत्त्वात, भारतीयांच्या जीवनविषयक धारणांचे एकत्व कसे दिसते याचे मर्मग्राही विवेचन केले आहे व लोकाविष्कारांमधून हजारो वर्षांपासून प्रवाही असणाऱ्या धारणाच विविधतेतून एकात्मता कशी साकार करतात, याचे सूत्र उलगडून दाखवले आहे. 'लोकसाहित्याचे अंत:प्रवाह' हा त्यांचा ग्रंथही लोकधर्मीय तत्त्वांवर मूलगामी प्रकाश टाकणारा आहे. आपले जीवन लोकसाहित्य अभ्यासक्षेत्राला वाहून घेतलेल्या या व्यासंगी संशोधकाला कै. विनायकराव चारठाणकर पुरस्कार, मातोश्री जोंधळे पुरस्कार, कै. यशवंतराव चव्हाण पुरस्कार, बन प्रतिष्ठानचा जीवनसाधना पुरस्कार असे विविध पुरस्कार लाभले आहेत. त्यांचे अनेक ग्रंथही पुरस्कारप्राप्त आहेत. 'पंडित दामोदर विरचित महानुभावीय पद्मपुराण' या ग्रंथास अखिल भारतीय महानुभाव परिषदेचा पुरस्कार मिळाला आहे.

'लोकरंगभूमी' या ग्रंथास महाराष्ट्र राज्य उत्कृष्ट वाङ्मय निर्मिती पुरस्कार लाभला आहे. त्यांचे 'मांग आणि त्यांचे मागते', 'रामकथेची मौखिक परंपरा' हे ग्रंथही महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे या संस्थेच्या पुरस्काराने सन्मानित आहेत. विविध आंतरराष्ट्रीय, राष्ट्रीय व राज्यस्तरीय चर्चासत्रांमध्ये त्यांनी शोधनिबंध सादर केले आहेत. २१ विद्यार्थ्यांना पीएच.डी. पदवीसाठी व १३ विद्यार्थ्यांना एम.फिल. पदवीसाठी त्यांनी मार्गदर्शन केले आहे. २९व्या मराठवाडा साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद व औरंगाबाद येथे संपन्न झालेल्या समरसता साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद त्यांनी भूषवलेले आहे.

लोकसाहित्याचे व लोकसंस्कृतीचे अभ्यासक्षेत्र पुरातत्त्वांचा वेध घेण्यासाठी कसे उपयोगी ठरते याचा वस्तुपाठच डॉ. मांडे यांनी आपल्या ग्रंथांमधून अभ्यासकांसमोर ठेवला आहे. त्यांचे हे कार्य पुरातत्त्व अभ्यासकाला दिशा देणारे आहे.

— डॉ. संजय देशमुख

**संदर्भ :**

*१. लोकप्रज्ञा (आविष्कार आणि स्वरूप) संपादक - कवठेकर, प्रा. डॉ. बाळकृष्ण; मोहरीर, प्रा. डॉ. ल. का.; प्रकाशक - अमृत महोत्सव समिती- २००७.*

## माईणकर, त्र्यंबक गोविंद

**प्राध्यापक, भाषातज्ज्ञ, लेखक**

**१५ मार्च १९१५ – १७ सप्टेंबर १९८१**



डॉ. त्र्यंबक गोविंद माईणकर हे छात्रप्रिय विद्वान प्राध्यापक आणि कुशल व आश्वासक प्रशासक म्हणून प्रसिद्ध होते. त्यांनी संस्कृत व इंग्लिश हे विषय घेऊन बी.ए. ही पदवी मिळविली (१९३५). संस्कृत व अर्धमागधी, आणि मराठी व पाली असे विषय घेऊन दोन वेळा एम.ए.ची पदवी मिळविली (१९३७, १९४२). 'भरताच्या नाट्यशास्त्रातील संधी व संध्यङ्गे' या विषयावरील संशोधनासाठी त्यांना पीएच.डी. ही पदवी मिळाली (१९४३) आणि त्याचबरोबर व्ही. एन. मंडलिक पारितोषिकही मिळाले. नंतर मुंबई विद्यापीठाची डी.लिट. ही पदवीही त्यांना मिळाली (१९६२).

विलिंग्डन महाविद्यालय, सांगली आणि फर्गसन महाविद्यालय, पुणे येथे ते संस्कृत-मराठी-पाली या विषयांचे प्राध्यापक होते. विषयाचे सांगोपांग, सखोल,

म

मार्मिक विश्लेषण आणि ओघवती, रसाळ वक्तृत्वशैली यांमुळे त्यांची व्याख्याने नेहमीच ज्ञान, आनंद व प्रेरणा देणारी असत.

फर्गसन महाविद्यालयाचे प्राचार्य, पंडित धर प्रोफेसर व पदव्युत्तर-संस्कृत विभाग प्रमुख, दिल्ली विद्यापीठ, रा. गो. भांडारकर प्रोफेसर व पदव्युत्तर संस्कृत-पाली-प्राकृत विभाग प्रमुख, मुंबई विद्यापीठ या पदांवर काम करताना प्रशासकीय कामात नियमांचे काटेकोर पालन करत असतानाही आपल्या सौम्य व सौजन्यशील वागणुकीने ते विद्यार्थ्यांमध्ये आणि हाताखालच्या लोकांमध्येही प्रिय होते. प्रशासकीय कामे करत असतानाही आपल्या विषयाचे मनन, चिंतन, संशोधन त्यांनी सतत चालू ठेवले होते. हे त्यांनी स्वतंत्रपणे लिहिलेल्या (१७) व संपादित केलेल्या (९) अशा पंचवीसहून अधिक पुस्तकांतून आणि तीसहून अधिक संशोधित निबंधांतून प्रकट झाले आहे. इंग्रजी (१०), मराठी (२), हिंदी (२) आणि संस्कृत (३) अशा चारही भाषांतून त्यांनी पुस्तके लिहिली आहेत. संस्कृतमधील एखाद्या विशिष्ट शाखेशी मर्यादित न राहता साहित्य (५), वेद (५), वेदान्त (४) अशा तीन शाखांतील विविध विषयांवर त्यांनी मूलगामी संशोधनात्मक लेखन केले आहे.

बनारस हिंदू विद्यापीठाचे कुलपती व्ही. एस. अगरवाल, माईणकरांच्या वसिष्ठ रामायणावरील पुस्तकासंबंधी लिहितात, 'The distinct merit of his work lies in the fact that auther has many new things to say and invites its reader to a renewed considerations of the problems connected with the Vasistha Ramayana.' माईणकरांच्या सर्वच पुस्तकांच्या बाबतीत हे खरे आहे. पाली आणि प्राकृत भाषांवर प्रभुत्व असल्यामुळे बौद्ध व जैन वाङ्मयाचा त्यांचा चांगला अभ्यास होता. या ज्ञानाचा संस्कृत वाङ्मयाचे मूल्यमापन करताना त्यांनी विशेष उपयोग केला.

पालीमधील थेरगाथा, थेरीगाथा, अश्वघोषाचे बुद्धचरित या पार्श्वभूमीवर कालिदासाच्या कुमारसंभवाचे महत्त्व ते विशद करत. हा एक वेगळाच दृष्टिकोन होता. इंग्लिश वाङ्मय आणि आधुनिक पाश्चात्त्य वाङ्मय यांचे मूल्यमापनाच्या चिकित्सा पद्धतींच्या आधारे विश्लेषण करून प्राचीन संस्कृत वाङ्मयाचे एक नवेच रूप त्यांनी अभ्यासकांसमोर ठेवले आहे. Mysticism in Rgveda, Rgvedic foundations of classical poetics. यांसारख्या पुस्तकांतून ऋग्वेदाचे तत्त्वज्ञानात्मक व साहित्यिक वैशिष्ट्य व महत्त्व नावीन्यपूर्ण रितीने त्यांनी उलगडले आहे. 'इतिहासपुराणाभ्यां वेदं समुपबृहयेद्' या पारंपरिक विवेचनपद्धतीनुसार The Upabrmhana and Rgveda Interpretation, या पुस्तकात अगस्त्य-लोपामुद्रा (१.१७९), मुद्गल-मुद्गलानी(१०.१०२) या सूक्तांचे विवेचन केले आहे. साहित्यातील त्यांचे अत्यंत महत्त्वाचे पुस्तक म्हणजे Kalidasa - his art and thought. यामध्ये त्यांनी 'ईश्वरकृष्ण कालिदास' हा त्यांचा स्वत:चा महत्त्वाचा सिद्धान्त त्यांनी अनेक पुराव्यांच्या आधारे सिद्ध केला आहे. सुंदर इंग्लिशमध्ये प्रसन्न शैलीत केलेले कालिदासाच्या सर्व ग्रंथांचे विश्लेषण अतिशय रसपूर्ण व मधुर झाले आहे. सांख्यकारिकेचा कर्ता ईश्वरकृष्ण व रघुवंशादी ग्रंथांचा कर्ता कवी कालिदास हे एकच होत ह्या सिद्धान्ताबद्दल त्यांची खातरी पटली होती. त्यामुळे Sankhyakarika with Gaudapadabhasya या सांख्यकारिकेच्या संपादित आवृत्तीच्या प्रस्तावनेत सांख्यकारिकांची काव्यात्मता ते विशेषकरून स्पष्ट करतात. Studies in Dramatic Criticism या पुस्तकात ते टीका वाङ्मयाचे महत्त्व अनेक अंगांनी अधोरेखित करतात व टीकांच्या अभ्यासाकडे दुर्लक्ष करणे हा 'अक्षम्य अपराध' आहे असे मत व्यक्त करतात. 'वैदर्भीय संस्कृत वाङ्मय आणि काव्यशास्त्रीय विचार' या मराठी पुस्तकात आधुनिक शैलीशास्त्रदृष्ट्या व सौंदर्यशास्त्रदृष्ट्या संस्कृत वाङ्मयाचे मूल्यमापन केले आहे. 'स्मृतितरङ्गम्' हे त्यांचे संस्कृत काव्य मराठी 'विरहतरंगा'ची आठवण करून देते. 'गायिकाशिल्पकारम्' या काव्याने 'सुनीत' (Sonnet) हा आधुनिक काव्यप्रकार त्यांनी संस्कृतमध्ये आणला

आहे. त्यांचा तत्त्वज्ञानाचा अभ्यास 'वासिष्ठ रामायण', 'गीताभाष्यप्रकाश', 'वैदिक संहिता व उपनिषदे' या ग्रंथांतून व्यक्त झाला आहे. 'Making of the Vedanta' हे अप्रतिम पुस्तक त्यांच्या परिणतप्रज्ञेचे फल आहे. त्यांनी अनेक विद्यापीठांतून व्याख्याने दिली. अनेक संस्थांमध्ये अधिकारपदे भूषवली. राष्ट्रीय पंडित, महामहोपाध्याय अशा पदव्यांनी व म. म. काणे सुवर्णपदकांसारख्या सन्मानांनी त्यांना गौरवान्वित केले गेले.

— डॉ. नलिनी चापेकर

## माटे, मधुकर श्रीपाद

**प्राध्यापक, पुरातत्त्वज्ञ, लेखक**

**३० मार्च १९३०**



प्राध्यापक मधुकर श्रीपाद माटे यांच्या गेल्या अर्धशतकाच्या काळातील, ज्ञानक्षेत्रातील कार्याचा विचार करताना तीन-चार ठळक अशा शाखा दिसतात, की ज्यामध्ये त्यांनी उल्लेखनीय कामगिरी केली आहे, भर घातली आहे. पहिली शाखा 'ज्ञानदान' ही आहे. १९५४पासून डेक्कन महाविद्यालयामधील 'पुरातत्त्व आणि प्राचीन भारतीय इतिहास व संस्कृती' या विषयाच्या विद्यार्थ्यांना, प्राचीन भारताचा इतिहास, प्राचीन समाजव्यवस्था, प्राचीन भारतीय कला-शिल्प हे विषय, त्यांच्या निवृत्तीपर्यंत म्हणजे पस्तीस वर्षे ते शिकवत होते. हे विद्यार्थी पदव्युत्तर वर्गातील असत. ते पीएच.डी.चे मार्गदर्शकही होते.

विद्यार्थ्यांबरोबर नेहमी विचारांची देवघेव करणे, त्यांना प्रश्न विचारण्यास उद्युक्त करणे हा त्यांच्या अध्यापनपद्धतीचा विशेष होता. याविषयी ते एके ठिकाणी म्हणतात की, 'या संग्रहातील निम्मे तरी निबंध अशा वैचारिक भूमिकेचा आधार होता. भारतातील राजकीय सत्तांचा उदय व ऱ्हास, महापुरुषांची कर्तबगारी व त्यावरील मर्यादा या तेथील भौगोलिक परिस्थितीने, भूपृष्ठरचनेने ठरतात; वंश, धर्म, जात, अर्थ या आजपर्यंत निर्णायक ठरवण्यात आलेल्या घटकांइतकीच किंबहुना काही अधिकच निर्णायक ठरतो 'भूगोल', असा विचार ते मांडतात आणि याचे सर्वोत्तम उदाहरण म्हणून ते छत्रपती शिवाजी महाराजांचा दाखला देतात. १६७७मध्ये गोवळकोंड्याच्या सुलतानांशी सख्य करून आल्यावर, विजापूर दरबारच्या सेवेत असणाऱ्या मालोजी घोरपडे या सरदारास, या जुटीत सामील होण्याचे आवाहन महाराजांनी एका दीर्घ पत्रात केले असून त्यातले सर्वांत महत्त्वाचे वाक्य, 'दक्षणचे राज्य दक्षिणियांचे हाती राहावे ते करावे, उत्तरेचा पठाण नको.'

प्रा. माटे यांचे दुसरे कार्यक्षेत्र म्हणजे पुरातत्त्व विद्या आणि त्यातले संशोधन. १९५२पासून त्यांचे गुरू प्रा. ह. धी. सांकलिया यांचे त्यांना सतत मार्गदर्शन व उत्तेजन मिळाले, याचा ते अत्यंत कृतज्ञतापूर्वक उल्लेख करतात. पुरासंशोधनात ज्या-ज्या गोष्टींची दखल घ्यावी लागते, अन्वयार्थ लावावा लागतो, त्यात अभिलेख, वास्तुशिल्प, मूर्तिशिल्प, चित्रकला, नाणी अशा सगळ्यांचा समावेश करण्यात येतो. त्याशिवाय पुरातत्त्व संशोधनाचे अत्यंत उपयुक्त व महत्त्वाचे साधन म्हणजे उत्खनन. माटे यांना दोन्ही अंगांचा उत्तम परिचय झाला. त्यांचा डॉक्टरेट पदवीचा प्रबंध 'मराठा आर्किटेक्चर' असा आहे. राजवाडे यांनी भले इतिहासात कोणत्या गोष्टी अंतर्भूत होतात याची नोंद केलेली असेल मात्र त्यांच्यानंतर जे मराठी इतिहास-संस्कृती यांचे अभ्यासक आले; त्यांनी आपल्या गुरूच्या या सांगण्याकडे पूर्ण दुर्लक्ष केले. त्यामुळे महाराष्ट्राला, विशेषत: मराठेशाहीला, शिल्प, चित्र यांचे वावडेच होते असा समज रूढ झाला.

प्रा. माटे यांनी महाराष्ट्रात सर्वत्र फिरून, मराठेशाही दुर्ग, नगरे, वाडे, मंदिरे अशा सर्वांची नोंद व वैशिष्ट्ये यांचा अभ्यास केला आणि खास 'मराठी' म्हणावी अशी शिल्पकला येथे निर्माण झाली आहे, हे स्पष्ट केले. त्यानंतर त्यांच्याच उत्तेजनाने लघुचित्रे, भित्तिचित्रे,

म

पोथीचित्रे या सगळ्यांचा शोध व अभ्यास त्यांच्या शिष्यांनी केला व मराठी चित्रशैली अस्तित्वात होती, हे सप्रमाण सिद्ध केले.

आपल्याला प्राप्त झालेल्या उत्खनन विद्येचा उपयोग करून पुरातत्त्वविद्येत, देवगिरी येथे त्यांनी नऊ वर्षे उत्खनन केले. यादवकाळापासून ते अठराव्या शतकापर्यंत नगर आखणी, वाडे, मंदिरे, भूमिगत पाणीपुरवठा, दुर्गरचना अशा गोष्टी हाती घेऊन त्यांनी मध्ययुगीन नागरसंस्कृतीचा पूर्ण पट उलगडला.

अहमदनगर, विजापूर ही राजधानीची शहरे होती मात्र तेथे एकोणिसाव्या-विसाव्या शतकात नवनवी बांधकामे होत गेली आणि मध्ययुगीन नगररचना, नागरसंस्कृती लुप्तच झाली होती. देवगिरी-दौलताबाद येथील नगररचनेचे अवशेष पुरातत्त्व विभागाने सुरक्षित राखले म्हणून येथील अवशेष हे मध्ययुगीन संस्कृतीचे एकमेव साक्षीदार ठरतात.

येथे गवसलेल्या पाणीपुरवठ्याच्या योजनांपासून स्फूर्ती घेऊन माटे यांनी, प्राचीन शिल्पशास्त्रे, शिलालेख आणि प्रत्यक्ष अवशेष यांचा शोध घेऊन जवळपास दोन हजार वर्षांच्या काळातील भारतीय समाजाने उपलब्ध पाण्याचा केलेला वापर, त्याचे तंत्र व मंत्र हे सर्व अभ्यासकांसमोर मांडले. अशा रितीने इतिहास व पुरातत्त्व या दोन्हीच्या साहाय्याने माटे यांनी मध्ययुगीन मराठी/दखनी संस्कृती उजेडात आणली आहे, असे म्हणता येते.

पुण्यातील भारत इतिहास संशोधन मंडळाचे ते १० वर्षे कार्यवाह होते. मराठी व इंग्लिश भाषेमध्ये त्यांनी अनेक पुस्तके लिहिली. मराठा आर्किटेक्चर, इस्लामिक आर्किटेक्चर ऑफ डेक्कन, टेम्पल्स अँड लिजन्डस् ऑफ महाराष्ट्र, वॉटर मॅनेजमेंट व हायड्रालिक टेक्नॉलॉजी ऑफ इंडिया, तारिफे-इ-हुसेनशाही, प्राचीन भारतीय कला, प्राचीन कलाभारती, मध्ययुगीन कलाभारती, मध्ययुगीन महाराष्ट्र : सामाजिक आणि सांस्कृतिक ही त्यांची आजपर्यंत प्रसिद्ध झालेली ग्रंथसंपदा आहे.

— डॉ. गिरीश मांडके

म

## मावजी, पुरुषोत्तम विश्राम

**इतिहासविषयक व कलाविषयक वस्तूंचे संग्राहक व अभ्यासक**

**१८७८ – १९२९**

काठेवाडात द्वारकेजवळ वरवाला या गावी सधन भाटिया जातीत पुरुषोत्तम विश्राम मावजी यांचा जन्म झाला. त्यांनी मॅट्रिक झाल्यावर मि. जेम्स मॅकडोनल्ड या इंग्रज गृहस्थाजवळ घरीच अभ्यास केला आणि त्याचा परिणाम म्हणून त्यांना इतिहास संशोधनाचा, कलाप्रेमाचा आणि प्राचीन वस्तुसंग्रहाचा नाद लागला. गोवर्धनराम माधवराव त्रिपाठी व सर विठ्ठलदास दामोदर ठाकरसी या त्यांच्या जिवलग मित्रांचा त्यांच्यावर विशेष प्रभाव होता. ते व्यवसायाने व्यापारी होते. कापडाच्या गिरण्यांशी त्याचा विशेष संबंध होता. द्वारका सिमेंट फॅक्टरीचे ते मूळ संयोजक व संस्थापक होते. त्यांचा परदेशाशीही व्यापारविषयक मोठा संबंध होता.

इतिहास, राजकारण, साहित्य, कला, पुराणवस्तू (Antiquities) व शिल्प हे त्यांचे आवडते विषय होते. मुंबई रॉयल एशियाटिक सोसायटीचे ते एक प्रमुख सभासद होते. महाराष्ट्राच्या इतिहासाचे ते विशेष जाणकार होते. ऐतिहासिक लेख, वस्तुचित्रे वगैरे साहित्याचा संग्रह विपुल खर्च करून त्यांनी जमवलेला होता. या संग्रहाचा एक महत्त्वाचा भाग मुंबईमधील छत्रपती शिवाजी वस्तुसंग्रहालयामध्ये (तत्कालीन प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियममध्ये) ठेवला आहे.

याच कलाप्रेमामुळे त्यांनी मुंबईस ‘लक्ष्मी आर्ट प्रिंटिंग प्रेस’ काढला आणि त्याद्वारा चित्रकलेच्या प्रसाराची व्यवस्था केली. या इलाख्यात ‘सुवर्णमाला’ नावाचे चित्रांचे नियतकालिके त्यांनीच काढले व सचित्र पुस्तके काढण्याची प्रथाही त्यांच्यामुळेच सुरू झाली. गुजराथी साहित्य परिषदेत त्यांनी ऐतिहासिक साहित्याच्या स्वरूपाविषयी अनेक लेख वाचले.

अहमदाबादच्या सहाव्या गुजराती साहित्य संमेलनाच्या वेळी कलाप्रदर्शनाचे अध्यक्षस्थान मावजी यांना देण्यात आले होते. त्यांच्या औदार्यपूर्ण सेवेबद्दल

तत्कालीन बडोदे सरकारने त्यांना 'राजरत्न' ही पदवी दिली होती.

मावजी यांची ग्रंथ संपदा अशी आहे - १. रजपुतानांना देशी राज्यो, २. रणवीरसिंह, ३. प्रबोधभारत १-२ भाग, ४. सुरसागरनी सुंदरी, ५. शिवाजीनो वाघनखो, ६. मानवधर्ममाला, ७. संध्या अने मराठा राज्यनो सूर्यास्त, ८. रणयज्ञ याने पचीस वर्षनुं युद्ध, ९. नीतिवचन, १०. वज्राघात अने विजयनगरनो विनाशकाल, ११. चार संन्यासी, १२. वतनपत्रे, निवाडपत्रे (मराठी), १३. कैफियत यादी, १४. नेटीव ॲडमिनिस्ट्रेटिव जीनियस ऑफ नाइन्टीन्थ सेन्चुरी (इंग्रजी), १५. व्हॉट लिटरेचर डू वुइ वॉन्ट (इंग्रजी), १६. शिवाजीनुं स्वराज्य, १७. धी इंडियन स्ट्रे थॉट्स सीरिज १, २, ३ (इंग्रजी).

– संपादित

**संदर्भ :**

*१. अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*

## माहुलीकर, गौरी
**संस्कृततज्ज्ञ, संशोधक, लेखक**
**३० ऑगस्ट १९५३**



डॉ. गौरी माहुलीकर यांनी संस्कृतच्या प्रेमापोटी बँकेतील कायमस्वरूपी अधिकारीपदाची नोकरी सोडली व त्या अध्यापिका म्हणून मुंबई विद्यापीठात १९९० साली रुजू झाल्या.

डॉ. माहुलीकर या संस्कृत विषयातच स्नातक व स्नातकोत्तर अशा दोन्ही परीक्षांमध्ये मुंबई विद्यापीठात सर्वप्रथम आल्या. त्यांनी सुवर्णपदकांसह अनेक पारितोषिके पटकावली होती. वेदकाळातील मूलतत्त्वेच पुराणकालात धार्मिक विधी व मंत्रांतून कशी दिसून येतात, थोडक्यात 'श्रुति-स्मृति पुराणोक्त' हे प्रत्येक धार्मिक विधीच्या आधी म्हटले जाणारे वचन कसे सत्य आहे या हेतूने त्यांनी 'वेदिक एलिमेन्ट्स इन पुराणिक मन्त्रज ॲण्ड रिच्युअल्स' या विषयात संशोधन केले. या संशोधनामुळे वैदिक संस्कृती आजपर्यंत कशी अखंडपणे प्रवाहित आहे ते सहज लक्षात येते.

अफाट विस्तार असलेल्या संस्कृतसाहित्याचा थोडक्यात आढावा घेणे हा हेतू डोळ्यापुढे ठेवून लिहिलेल्या 'अभिजात संस्कृत साहित्याचा इतिहास' या पुस्तकाच्या त्या सहलेखिका आहेत. मुंबई विद्यापीठात 'फॅसेट्स ऑफ फेमिनिटी' या विषयावर झालेले चर्चासत्र व त्यातील शोधनिबंधांचे त्यांनी संपादन केले (२००५). मुंबईतील 'हेरास' या संस्थेद्वारे प्रकाशित होणाऱ्या 'इंडिका' या शोधपत्रिकेतून व एशियाटिक सोसायटीच्या नियतकालिकांतून त्यांच्या पुस्तकांची परीक्षणे प्रसिद्ध झालेली आहेत. याशिवाय, विविध राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय चर्चासत्रांत सादर केलेल्या शोधनिबंधांना उत्कृष्ट निबंध म्हणून पारितोषिके मिळाली आहेत.

त्यांनी अनेक विद्वत्सभा व चर्चासत्रांतून अध्यक्षपदे भूषविली आहेत. त्यांनी आंतरराष्ट्रीय ख्यातीच्या नियतकालिकांमधून व आकाशवाणीवर विविध विषयांवर लेख व कार्यक्रम सादर केले आहेत. प्राचीन लिप्यांच्या प्रचार व प्रसाराच्या ध्येयाने त्यांनी 'सर्टिफिकेट कोर्स इन मॅन्युस्क्रिप्टॉलॉजी', अर्थात हस्तलिखित शास्त्राचा प्रमाणपत्र अभ्यासक्रम व पुढे पदविका व प्रगत पदविका हे अभ्यासक्रम सुरू केले. यातून विद्यार्थ्यांना संशोधन व अर्थप्राप्तीचीही संधी प्राप्त होते. 'वेदान्त' या विषयात संशोधन करण्याकरिता विद्यार्थ्यांना प्रवृत्त करण्यासाठी त्यांनी शंकरमठम्, माटुंगा यांजकडून २.१२ लाखांची देणगी मिळवली. त्यातून दरवर्षी दोन विद्यार्थ्यांना दरमहा ५०० रुपये शिष्यवृत्ती दिली जाते.

संस्कृतचे स्वतःचे भवन असावे या ध्येयाने प्रेरित होऊन त्यांनी भवनाच्या निर्मितीसाठी अनेकांकडे अर्थसाहाय्यासाठी विचारणा केली. त्याचे फलित म्हणजे, त्यांची तळमळ जाणवून जमनालाल बजाज

म

फाउण्डेशन यांनी सव्वा कोटीचे आर्थिक साहाय्य केले व आज 'रामकृष्ण बजाज संस्कृत भवन' ही संस्कृत भाषेची स्वतःची वास्तू दिमाखात उभी आहे.

आतापर्यंत दहा विद्यार्थ्यांनी त्यांच्याकडे पीएच.डी.च्या अभ्यासक्रमासाठी मार्गदर्शन प्राप्त केले आहे. डॉ. माहुलीकरांचा कुठल्याही विषयाचा तौलनिक अभ्यास करून प्राचीन भारतीयांची त्या विषयातील प्रगती शोधण्याचा नेहमी प्रयत्न असतो. यादृष्टीने त्यांनी केलेल्या ग्रीक नाटके व भरताचे नाट्यशास्त्र यांच्या तौलनिक अभ्यासाला 'लिमजी' सुवर्णपदकाने सन्मानित करण्यात आले आहे (१९७७). संस्कृत भाषेच्या प्रचारासाठी केलेल्या योगदानाबद्दल त्यांना कॅनडियन एज्युकेशन फाउण्डेशनतर्फे दिला जाणारा आंतरराष्ट्रीय 'रामकृष्ण' पुरस्कार (२००३) प्राप्त झाला आहे.

तसेच त्यांना कांची कामकोटी पीठम् शंकर मठम्चा 'आदि शंकरा' पुरस्कार, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ (पुणे)चा 'इंदिराबाई बेहेरे' पुरस्कार व महाराष्ट्र राज्य सरकारचा 'महाकवी कालिदास संस्कृत साधना' पुरस्कार आदी पुरस्कारही मिळालेले आहेत.

— डॉ. आसावरी बापट

## मिराशी, वासुदेव विष्णू

**पुरातत्त्ववेत्ता, पुरालिपी शास्त्रज्ञ, नाणकशास्त्रतज्ज्ञ**

**१८९४ - ३ एप्रिल १९८३**



वासुदेव विष्णू मिराशी यांचा जन्म कोकणात झाला. त्यांचे शिक्षण पश्चिम महाराष्ट्रात झाले, तर विदर्भ ही त्यांची कर्मभूमी राहिली. त्यांनी केलेल्या कामासाठी १९४१ साली त्यांना 'महामहोपाध्याय' अशी पदवी भारत सरकारने दिली, तर सागर, नागपूर व मुंबई विद्यापीठ यांच्या वतीने त्यांना डी.लिट. ही पदवी प्रदान करण्यात आली. सन १९७१मध्ये शासनाने 'पद्मभूषण' देऊन त्यांचा गौरव केला व साहित्य अकादमीची फेलोशिप त्यांना मिळाली.

मुंबई येथे एल्फिन्स्टन महाविद्यालयामध्ये प्राध्यापक म्हणून त्यांनी जून १९१७मध्ये नोकरी स्वीकारली. त्यांची ज्ञानसाधना आयुष्यभर कायम राहिली. शिस्तप्रिय शिक्षक, प्राच्यविद्येचे अभ्यासक, प्रकांड पंडित व मराठी भाषेतील प्रगल्भ लेखक, संशोधक अशा विविध अंगांनी त्यांची ओळख करून देता येते. रावबहादुर का.ना. दीक्षित आणि रावबहादुर हीरालाल यांच्या प्रेरणेने मिराशी पुराभिलेख आणि प्राचीन नाणकशास्त्र यांच्या अभ्यासाकडे वळले. संस्कृत वाङ्मयाविषयी त्यांचा ओढा कायम होता. तसेच त्यांनी एल्एल.बी. पदवीही प्राप्त केली होती. १९१८ साली त्यांनी सदानंद यतींच्या 'अद्वैत ब्रह्मसिद्धी' या ग्रंथांचे इंग्लिश भाषांतर केले. यासाठी त्यांना 'वेदान्ती' असे संबोधले गेले. 'धर्मसूत्रे आणि स्मृती यांचा परस्परसंबंध आणि त्यातून प्रतीत होणारा हिंदू विधीं (Laws)चा विकास' या त्यांच्या प्रबंधाला मुंबई विद्यापीठाचे मंडलिक सुवर्णपदक मिळाले. या ग्रंथात त्यांच्या विवेचक बुद्धीचे आणि संशोधनाला आवश्यक असणारे भान स्पष्ट झाले. त्यांचा सर्वांत गाजलेला ग्रंथ कालिदासावर असून तो १९३४ साली प्रसिद्ध झाला. या ग्रंथाची अनेक भाषांतरे झाली. हा ग्रंथ प्रथम त्यांनी मराठीत लिहिला. इंग्लिशमध्ये सुमारे २५०, मराठीत अंदाजे १५० लेख त्यांनी प्रकाशित केले. संशोधन मुक्तावलीचे 'दहा सर' त्यांच्या लेखनाचे सातत्य सिद्ध करण्यास पुरेसे आहेत. 'दशकुमारचरित', 'हर्षचरित', 'लघुकौमुदी', कालिदास व भवभूती, त्यांचे जीवन व वाङ्मय यांवर त्यांनी केलेले लेखन तसेच 'हालाची गाथा सप्तशती' आणि तिचा काळ व स्वरूप, गॅझेटिअर विभागाच्या वतीने प्रकाशित होणाऱ्या नागपूर, अमरावती व अन्य जिल्हा गॅझेटिअरमधून त्यांनी लेखन केले. 'हिस्टरी एन्शंन्ट पिरिअड' (सन १९६७) या राज्य गॅझेटिअरचे संपादन करण्यासाठी सेतुमाधवराव पगडी यांनी त्यांना सांगितले होते. विविध परिषदांमधून

म

दिलेली अध्यक्षीय भाषणे व प्राकृत वाङ्मयावरील लेखन यांवरून त्यांच्या संशोधनाचा आवाका लक्षात येतो. त्यांच्या लेखांचे एकत्रित प्रकाशन 'स्टडीज इन इन्डोलॉजी' या मालिकेत केले. 'कॉर्पस इन्स्क्रिपशन्स इंडिकॅरम' (Corpus Inscriptions Indicarrum) या मालिकेचे आजपर्यंत सहा खंड प्रकाशित झाले असून तीन खंड मिराशी यांनी संपादित केले आहे.

- The Corpus Inscriptions Indicarrum, Vol IV, Inscriptions Kalchuri-Chedi-era
- Vol V Inscriptions of the Vakataka.
- Vol VI Inscriptions of Shilahara

आणि - History and Inscriptions of the Satvahanas and Western Kshatrapas (साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई) यातून त्यांनी कळचुरीचेदी, वाकाटक, शिलाहार व सातवाहन आणि पश्चिमी क्षत्रप या राजवंशांविषयी तपशील, स्थलनिश्चिती, कालनिश्चिती, व या काळात निर्माण झालेल्या साहित्य, कला व शिल्प यांविषयी माहिती दिली असून तत्कालीन समाजजीवनाचाही वेध घेतला आहे.

रामटेक आणि मेघदूतातील रामगिरी यांचा समन्वय घालण्याचा त्यांनी केलेला प्रयत्न व रामटेक व रामगिरीवरील लेखन बरेच चर्चेत राहिले. चतुरस्र बुद्धिमत्तेचा हा विद्वान बोलण्याचालण्यात अतिशय काटेकोर असे. मिराशींचे अनेकांशी बौद्धिक वाद झाले. त्यात केतकर, डॉ. दिनेशचंद्र सरकार, दु.आ. तिवारी, म.म. कृष्णशास्त्री धुले, शिवरामपंत बारलिंगे, अ.ज. करंदीकर, प्रा. कृ.मो. शेंबवणेकर अशी अनेक नावे घेता येतील. आपल्या मतांचा आग्रह असला तरी व्यक्तिगत कटुता ते येऊ देत नसत. डॉ. हरिहर ठोसर यांनी सुप्रतिष्ठान हे सातवाहनांचे राजधानी असलेले पैठण आहे, या संदर्भात मिराशींचा प्रतिवाद केल्याचे दिसते. मिराशी शक्यतो आपल्या मतावर ठाम असत; पण योग्य पुरावा सादर केल्यास त्या मताचा ते आदर करत. विदर्भावर त्यांचे विशेष लक्ष असे, तरी एकूण महाराष्ट्राच्या इतिहासासंदर्भात त्यांनी केलेले काम चिरस्मरणीय आहे. त्यांची भाषा भारदस्त आणि प्रौढ होती. रामगिरीवरील आपल्या संशोधनात ते म्हणतात, ''प्राचीन वाङ्मयाचे संशोधन करताना केवळ कल्पनाशक्तीने भागत नाही. त्याकरिता संस्कृत व्याकरण, अलंकारशास्त्र, शिल्पशास्त्राचे ज्ञान आवश्यक असते. विशेषत: आपली चूक दाखवून दिल्यास तो मान्य करण्याचा प्रांजळपणा असावा लागतो. (संशोधन मुक्तावलि सर चौथा, पृष्ठ ३९) अर्थात विरोधकांचा खुमासदार उपासहाससुद्धा ते करीत. वाकाटकांच्या संदर्भात त्यांनी केलेले संशोधन व रामटेक येथील 'रामगिरीस्वामिन: पादमूलात्' या नोंदीच्या आधारे त्यांनी दिलेले स्पष्टीकरण 'रामगिरीस्वामिन् म्हणजे प्रभु रामचंद्र' असे स्पष्ट करून पादुकांची प्रचलित असलेली पूजा स्पष्ट केली. रामटेक येथील डॉ. अ.प्र. जामखेडकर यांनी केलेल्या संशोधनातून मिराशींचे मूलगामी संशोधन व वाकाटक राजवंशाविषयीचे त्यांचे मत अधिकच स्पष्ट झाले. प्रभावती गुप्ताचा शिलालेख केवल नरसिंह मंदिरात मिळाला. शिवाय त्रिविक्रम मंदिर, वराह मंडप यांबरोबर केवल नरसिंह मंदिर, गुप्तराम मंदिर या वास्तू रामटेक येथे असल्याचे स्पष्ट झाले. कालिदासाच्या मेघदूताच्या संदर्भात त्यांचा अभ्यास, त्यासाठी त्यांनी अभिलेखीय पुरावे, स्थानपोथी, बखरी, स्थलमाहात्म्य यांचा एकत्रित केलेला अभ्यास त्यांच्या संशोधनाची साक्ष देतो. त्यांनी रामायणातील काही स्थलांची निश्चिती करण्याचे असेच कार्य केले. पां.वा. काणे यांचा धर्मशास्त्राचा इतिहास, गुप्त राजवंशाचे ताम्रपट, काव्यमीमांसा हा ग्रंथ, पुराणे, ज्ञानेश्वरी, नेवासा येथील उत्खनन वृत्तान्त, भवभूती व बाण यांचे वाङ्मयीन पुरावे देऊन अगस्त्याश्रम नेवाश्यापासून जवळच मुळा नदीच्या काठी होता, असे स्पष्ट केले. आपल्या मताच्या पुष्ट्यर्थ ते कितीतरी व्यापक पुरावे मांडत.

'सातवाहन आणि पश्चिमी क्षत्रप यांचा इतिहास व कोरीव लेख' हा ग्रंथ त्यांनी आयुष्याच्या शेवटच्या काळात १९७९मध्ये लिहिला व सातवाहन हे मूळ महाराष्ट्रातील होते व त्यांची मूळ राजधानी जुन्नर येथे

असावी व नंतर ते प्रतिष्ठान येथे आले. महाराष्ट्रावर राज्य करणारा हा प्राचीन राजवंश होता. त्यांनी सुमारे ४५० वर्षे (इ.स.पू. २३० - इ.स. २३०) राज्य केले. मिराशींच्या एकूण कामातून महाराष्ट्राचा १५०० वर्षांचा इतिहास स्पष्ट झाला. महाराष्ट्र, वऱ्हाड व विदर्भ या शब्दांविषयीच्या उत्पत्तीचे त्यांचे भाष्यही लक्षणीय आहे. केवळ अभिलेखात नाही, तर नाणकशास्त्रातील त्यांचे कार्य उल्लेखनीय होते. १९६१ मध्ये भारतीय मुद्रा परिषदेने 'नेल्सन रिट्' हे पदक देऊन वासुदेव मिराशी यांचा गौरव केला.

१९४१मध्ये त्यांनी अकोला जिल्ह्यातील तऱ्हाळा येथे सापडलेल्या सातवाहन नाण्यांच्या संचाचा अभ्यास केला व या संचातील नाणी अकरा राजांची असून कुंभ सातकर्णी व कर्ण सातकर्णी यांची नाणी प्रथमच सापडली. नाणकशास्त्रीय पुराव्यांच्या आधारे त्यांनी सातवाहन राजवंशाच्या पुराणातील नावांचा शोध घेतला. अभिलेखीय पुराव्याआधारे - विशेषत: नाणेघाट येथील नागानिकेचा शिलालेख व प्रतिमालेख यांतून त्यांचे मूळ महाराष्ट्र असल्याचे स्पष्ट केले. हैदराबाद राज्यातील कोंडापूर येथे सातवाहन राजांची नाणी सापडली. त्यात सातवाहन हे कुलनाम सातवाहन राजाच्या नावावरून पडल्याचे मिराशी यांनी स्पष्ट केले.

याच प्रकारे डॉ. मिराशींनी वाकाटक राजा प्रवरसेनाच्या स्थलांतराची व राजधानी बदलाची चर्चा केली आहे. ही राजधानी नंदीवर्धनवरून पद्मपुरात स्थलांतरित झाल्याचे म्हटले. यासाठी तत्कालीन परिस्थितीचे अचूक विवेचन त्यांनी केले. प्रत्येक गोष्ट व्यवस्थितपणे मांडताना त्यामागचा अभ्यास लक्षात येईल. गुणाढ्याविषयी नोंद असेल किंवा हालांच्या गाथासप्तशतीविषयक चर्चा; ते समकालीन पुराव्यांच्या आधारे करीत. कलचुरी, चेरी, सामंताचे कोरीव लेख या त्यांच्या कामामुळे एक नवीन संवत व राजवंशाची ओळख झाली. माझे जन्मस्थान कोकणात होते. तेथे राज्य करणाऱ्या शिलाहार राजवंश आणि त्याची दुसरी शाखा जेथे माझे शिक्षण घेण्यासाठी मी अठरा वर्षे घालवली, त्या कोल्हापूर परिसरात होती, असे सांगत शिलाहाराच्या ऋणातून मुक्त होण्यासाठी त्यांनी कॉर्पस इन्स्क्रिपशन्स इंडिकेरम (खंड-६) संपादित केला. त्यातून स्वतंत्र मराठी ग्रंथाची सिद्धी केली.

इ.स.च्या ९व्या शतकापासून १३व्या शतकापर्यंत ४५० वर्षे आधी मांडलिक म्हणून व नंतर स्वतंत्रपणे राज्य करणारा हा राजवंश ते स्वत:ला तगरपुराधीश्वर म्हणत. शिलाहारांच्या नावाची उत्पत्ती त्यांनी तर्कशुद्धपणे मांडली आहे. शिलाहारांच्या तिन्ही शाखा स्वत:ला विद्याधर जीमूतवाहन, ज्याने गरुडाच्या तावडीतून नागकुमारास स्वत:ची ढाल देऊन मुक्त केले, त्याच्या वंशातील मानतात. 'शिलाहार' (गरुडाकरिता शिलेवरील आहार म्हणजे शिलाहार) असे नाव या राजवंशास प्राप्त झाले. प्राच्यविद्येच्या दृष्टीने संस्कृत साहित्य व विविध राजवंशांचे अभिलेख यांतील मिराशींचे काम अनन्यसाधारण राहिले आहे.

— डॉ. अरुणचंद्र पाठक

## मिश्र, वीरेंद्रनाथ

**मानवशास्त्रज्ञ, संशोधक**

**१७ ऑगस्ट १९३५ - ३१ ऑक्टोबर २०१५**



वीरेंद्रनाथ मिश्र यांचा जन्म उत्तर प्रदेशातील फरुकाबाद जिल्ह्यातल्या खंडौली या छोट्या गावात झाला. कानपूरमधून इतिहास विषयात बी.ए. पदवी घेतल्यानंतर ते १९५५मध्ये लखनौला गेले. दरम्यान त्यांनी संस्कृतचेही शिक्षण घेतले होते. लखनौ विद्यापीठातून त्यांनी मानवशास्त्रात १९५७मध्ये एम.ए. ही पदवी संपादन केली. येथे त्यांना विख्यात मानवशास्त्रज्ञ प्रा. डी.एन. मजुमदार यांचे मार्गदर्शन लाभले. ते शिक्षणात सदैव अव्वल असत आणि त्यामुळे त्यांना अनेक पारितोषिके मिळाली होती.

म

मानवशास्त्राचा अभ्यास करताना मिश्र हे पुरातत्त्वाकडे आकृष्ट झाले होते. लखनौ विद्यापीठात व्याख्याता म्हणून अल्प काळ काम केल्यावर प्रा. डी.एन. मजुमदार यांच्या सल्ल्यानुसार ते या क्षेत्रात संशोधन करण्यासाठी १९५८मध्ये पुणे येथे डेक्कन कॉलेजात आले. प्रा. ह.धी. सांकलिया यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी १९६१मध्ये पीएच.डी. पदवी संपादन केली. 'स्टोन एज कल्चर्स ऑफ राजपुताना' हा त्यांच्या प्रबंधाचा विषय होता. पीएच.डी.चे काम पूर्ण झाल्यानंतर अगोदर ठरल्याप्रमाणे मिश्र लखनौ विद्यापीठात व्याख्याता या पदावर रुजू झाले.

तथापि दरम्यान डेक्कन कॉलजमध्ये प्रागितिहास विषयात व्याख्याता पद निर्माण झाले होते. लखनौ विद्यापीठात ठरल्याप्रमाणे एक वर्ष अध्यापन केल्यावर मिश्र पुन्हा डेक्कन कॉलेजमध्ये आले आणि नंतर १९९५मध्ये ते प्राध्यापकपदावरून निवृत्त झाले. डेक्कन कॉलेज अभिमत विद्यापीठाचे संचालक म्हणून २०००मध्ये निवृत्त होईपर्यंत डेक्कन कॉलेजशी त्यांचा संबंध होता. प्रागैतिहासिक व इतिहासपूर्व संस्कृती आणि विविध जमातींच्या लोकजीवनाचा अभ्यास यात प्रा. मिश्र यांना प्रामुख्याने रस होता. त्यांनी १९६२ ते १९६५ या काळात राजस्थानातील उदयपूर, भिलवाडा आणि चितोडगड या भागात सर्वेक्षण केले. या दरम्यान त्यांनी अनेक आद्य पुराश्मयुग, मध्य पुराश्मयुग, मध्याश्मयुग आणि ताम्रपाषाणयुग या युगांतील पुरास्थळांचा शोध लावला. त्यांनी बारमेर जिल्ह्यातील तिलवाडा आणि भिलवाडा जिल्ह्यातील बागोर येथे उत्खनन केले. नंतरच्या काळात त्यांनी उदयपूर जिल्ह्यातील बालाथल येथे १९९४ ते २००० असे दीर्घकाळ उत्खनन केले. ताम्रपाषाणयुगीन पुरातत्त्व संशोधनातील हा एक अत्यंत महत्त्वाचा टप्पा मानला जातो, कारण इसवीसनापूर्वी ३७००मध्ये हडप्पाशी संबंध नसलेले, पशुपालन व कृषी यावर उपजीविका असलेले खेडेगाव अस्तित्वात असल्याचे सिद्ध झाले.

प्रा. मिश्र यांचे प्रागैतिहासिक संशोधन प्रामुख्याने राजस्थान व मध्य प्रदेश येथील आहे. ते आणि वि.श्री. वाकणकर यांनी मिळून भीमबेटका येथे १९७३ ते १९७७ अशी पाच वर्षे उत्खनन केले. या उत्खननामधून त्यांना 'अशुलियन' या प्रागैतिहासिक संस्कृतीपासून ते मध्याश्मयुगापर्यंतचे पुरावशेष मिळाले.

प्रा. मिश्र आणि त्यांचे सहकारी शरद राजगुरू, ए.के. सिंघवी, गुरदीप सिंग व डी.पी. अगरवाल यांनी राजस्थानात १९७७ ते १९८३दरम्यान सिंगी तलाव, जायल, सोळा-आर आणि इंदोला की धानी अशा अनेक पुरास्थळांवर संशोधन केले. हा पुरापर्यावरणाच्या अभ्यासातील एक मैलाचा दगड मानला जातो.

मध्य प्रदेशात १९८६ ते १९९० या काळात नर्मदा नदीच्या खोऱ्यात प्रा. मिश्र आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी आद्य पुराश्मयुग, मध्य पुराश्मयुग आणि मध्याश्मयुग या कालखंडांमधील पुरास्थळांचा शोध लावला. तसेच त्यांनी नरसिंगपूर जिल्ह्यातील समनापूर या मध्य पुराश्मयुग स्थळाचे उत्खनन केले. भारतातील प्रागैतिहासिक संशोधनाची दखल जागतिक पातळीवर घेतली जाण्याचे श्रेय प्रा. मिश्र यांना दिले जाते.

गोंड, पारधी, वनवाघरी, कंजार, काळबेलीया, भिल्ल आणि कुचबंदीया अशा अनेक जमातींच्या लोकजीवनाचा अभ्यास हे प्रा. मिश्र यांचे महत्त्वाचे योगदान आहे. त्यांना या कामात त्यांच्या सहकारी मालती नागर याची साथ मिळाली. प्रा. मिश्र, मालती नागर आणि एम.एल. के. मूर्ती यांनी मिळून भारतात लोकलक्षी पुरातत्त्व (Ethnoarchaeology) या शाखेचा पाया घातला. प्रा. मिश्रांकडे लोकांमध्ये मिसळण्याची विलक्षण कला होती.

अनेक बोलीभाषांवरील प्रभुत्वामुळे ते सहज गप्पाटप्पा करत आणि मग त्यांना हवी ती माहिती मिळत असे. इतकेच नाही, तर रानात फिरताना भेटलेल्या डाकूंशी अनेकदा बोलून त्यांना पुरातत्त्व म्हणजे काय हे त्यांनी समजावून दिले आहे. प्रस्तुत नोंद करणाऱ्या लेखकाने मध्य प्रदेशात लोकांचा विश्वास संपादन करण्याच्या त्यांच्या हातोटीचा अनुभव घेतला आहे.

मातृभाषा हिंदीखेरीज इंग्लिश, जर्मन, फ्रेंच अशा अनेक भाषा प्रा. मिश्र यांना अवगत होत्या. ते नेहमी मराठी वाचत आणि बोलत. त्यांना हिंदीच्या जवळजवळ सर्व बोलींमध्ये संवाद साधता येत असे. त्यांना लोकसंस्कृतीच्या अभ्यासात त्याचा उपयोग झाला.

प्रत्यक्ष क्षेत्रीय संशोधनाशिवाय प्रा. मिश्र यांनी पुरातत्त्व आणि मुख्यत: प्रागितिहास या शाखेच्या वाढीसाठी कार्य केले. त्यांनी स्वराज्यप्रकाश गुप्ता, दिलीप चक्रवर्ती आणि डी.पी. अगरवाल यांच्या मदतीने प्रागितिहास याचा विशेष अभ्यास करण्यासाठी १९७७मध्ये 'इंडियन सोसायटी फॉर प्रीहिस्टॉरिक अँड क्वार्टर्नरी स्टडीज' ही संस्था स्थापन केली आणि 'मॅन अँड एन्व्हरॉनमेन्ट' हे आंतरराष्ट्रीय नियतकालिक सुरू केले. ते गेली चाळीस वर्षे सुरू आहे. सुरुवातीपासून ते त्यांच्या अखेरपर्यंत प्रा. मिश्र यांनी या नियतकालिकाचे संपादन केले. लेखनात आणि संपादनात काटेकोरपणा, दर्जा आणि अचूकता याबाबत ते कमालीचे आग्रही होते.

एकूण पंचवीस विद्यार्थ्यांनी प्रा. मिश्र यांच्या मार्गदर्शनाखाली पीएच.डी. प्राप्त केली. त्यांचे एकशेवीस शोधनिबंध प्रसिद्ध झालेले आहेत. तसेच त्यांनी पाच पुस्तकांचे लेखन व संपादन केले आहे.

प्रा. मिश्र यांना अनेक मानसन्मान लाभले. बर्कलीच्या युनिव्हर्सिटी ऑफ कॅलिफोर्नियात १९८४ मध्ये ते फुलब्राइट फेलो होते. त्यांचे गुरू प्रा. डी.एन. मजुमदार यांच्या नावाचे पदक (२००२) मिळवण्याचा मान त्यांना लाभला. ते भारतीय इतिहास अनुसंधान परिषदेचे (ICHRचे) २००० ते २००३ या काळात ते नॅशनल फेलो होते. तसेच २००३ ते २००५ या काळात ते विद्यापीठ अनुदान आयोगाचे सुप्रतिष्ठित प्राध्यापक होते. मध्य प्रदेश शासनाने २००७मध्ये वि.श्री. वाकणकर पदकाने त्यांचा सन्मान केला. प्रा. मिश्र यांच्या प्रागितिहासातील योगदानासाठी श्रीलंका सरकारने २०१४मध्ये देरयानिगला पदकाने त्यांचा गौरव केला.

- डॉ. प्रमोद जोगळेकर

म

## मिश्रा, शीला
**अश्मयुगीन पुरातत्त्व संशोधक**
**२१ सप्टेंबर १९५३**



शीला मिश्रा यांचे शालेय व पदवीपर्यंतचे शिक्षण कॅनडामध्ये झाले. बर्नबेरीच्या सायमन फ्रेझर विद्यापीठातून बी.ए.ची पदवी घेतल्यानंतर पुणे येथील डेक्कन कॉलेजमधून प्राचीन भारतीय इतिहास, संस्कृती व पुरातत्त्व या विषयांत १९७८ मध्ये त्यांनी एम.ए. पदवी संपादन केली. त्यांना एम.ए. परीक्षेत प्रथम क्रमांक मिळविणाऱ्या विद्यार्थ्याला दिले जाणारे तेलंग पदक मिळाले. त्यानंतर 'भूगर्भपुरातत्त्व' या विषयातील तज्ज्ञ प्रा. शरद राजगुरू यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी १९८५ मध्ये डॉक्टरेट संपादन केली. डॉक्टरेटसाठी शीला मिश्रा यांनी 'अर्ली मॅन ॲण्ड एन्व्हायर्नमेन्ट्स इन वेस्टर्न मध्य प्रदेश' हा विषय निवडला होता.

शीला मिश्रा १९८४मध्ये डेक्कन कॉलेजात 'संशोधन साहाय्यक' या पदावर रुजू झाल्या. त्यानंतर १९८६ मध्ये त्या व्याख्याता झाल्या आणि २०१० मध्ये त्या प्राध्यापक झाल्या. २०१४ मध्ये त्यांची पुरातत्त्व विभागप्रमुख या पदावर नेमणूक झाली आणि त्या २०१५मध्ये निवृत्त झाल्या. त्यांचे ७५ शोधनिबंध विविध राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले आहेत. तसेच, त्यांनी जगभरातील अनेक देशांत झालेल्या राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय चर्चासत्रांमध्ये सहभाग घेऊन ७४ शोधनिबंध सादर केले आहेत. शीला मिश्रांच्या मार्गदर्शनाखाली आठ विद्यार्थ्यांनी पीएच.डी. पदवी संपादन केली आहेत.

शीला मिश्रा यांचे बहुतेक संशोधन इतिहासपूर्व काळासंबंधी आहे. त्यांनी संशोधनाची सुरुवात मध्यप्रदेशातील मेहताखेडी उत्खननाने केली व दीर्घकाळ नर्मदा नदीच्या मध्यप्रदेशातील खोऱ्यात सर्वेक्षण, क्षेत्रीय

अध्ययन व उत्खनन केले. त्यांनी त्यांच्या सहकाऱ्यांसमवेत मध्यप्रदेशात खापरखेडा, करोंदिया व कसरावद या पुरातत्त्वीय स्थळांचे उत्खनन केले आहे. महाराष्ट्रातील पुरातत्त्वीय संशोधनाला शीला मिश्रा यांनी १९९५ मध्ये प्रारंभ केला. त्यांनी १९९५ ते १९९८ दरम्यान गोदावरी खोऱ्यातील पुरापर्यावरणासंबंधी प्रकल्प पूर्ण केला. शीला मिश्रा यांनी १९९४ मध्ये औरंगाबाद जिल्ह्यातील आपेगाव येथे व सन १९९९ मध्ये बीड जिल्ह्यात साक्षाळ पिंपरी येथे उत्खनन केले. त्यांनी व त्यांचे सहकारी प्रा. भास्कर देवतारे यांनी मिळून सन २००१ मध्ये अमरावती जिल्ह्यात असलेल्या कौडिण्यपूर या ऐतिहासिक स्थळाचे उत्खनन केले.

आपल्या संशोधकीय कारकिर्दीच्या उत्तरार्धात शीला मिश्रा यांनी महाराष्ट्रातील प्रागैतिहासिक कालखंडावर लक्ष केंद्रित केले. त्यांनी व त्यांच्या सहकारी प्रा. सुषमा देव यांनी एकत्रितपणे पुणे जिल्ह्यातील मोरगाव येथे सन २००२ ते २००९ पर्यंत सातत्याने उत्खनन केले. या ठिकाणी प्राचीन मानवी अस्तित्वाचा मिळालेला पुरावा व त्यावरील निष्कर्ष हे भारतीय अश्मयुगीन पुरातत्त्वाला कलाटणी देणारे ठरले.

प्रागैतिहासिक कालखंडामधील ‘अश्युलियन’ या सर्वांत प्राचीन संस्कृतीच्या भारतातील अध्ययनाला जागतिक स्तरावर मान्यता मिळवून देणे, अश्मयुगीन काळातील पर्यावरणासंबंधी कालमापनावर आधारित ठोस निष्कर्ष काढणे आणि भारतातील अश्मयुगाच्या कालक्रमासंबंधी नवीन सिद्धान्तकल्पना मांडणे हे शीला मिश्रा यांचे योगदान आहे.

— डॉ. प्रमोद जोगळेकर

## मुजुमदार, गणेश गंगाधर

**पुरातत्त्वज्ञ, संशोधक**

**१९ मार्च १९१७ - २००२**

रसायनशास्त्रातील ‘विद्या-वाचस्पती’ ही सर्वोच्च पदवी प्राप्त झाल्यानंतर गणेश गंगाधर मुजुमदार ह्यांनी पुरातत्त्वशास्त्र हे संशोधन कार्यक्षेत्र व पुण्यातील डेक्कन



कॉलेज ही कर्मभूमी निवडली व ते शेवटपर्यंत त्यातच रमले. प्राचीन पर्यावरण आणि भाजलेल्या मातीच्या भांड्यांच्या विविध रंगांचा त्यांनी सखोल शास्त्रीय अभ्यास केला. या संशोधनातून प्राचीन हवामानातील बदलांवर आणि कुंभारांच्या भांडी भाजण्याच्या प्राचीन तंत्रकौशल्यावर नवीन प्रकाश टाकणे शक्य झाले. बाळासाहेब या नावाने निकटवर्तीयांना परिचित असलेले डॉ. गणेश गंगाधर मुजुमदार यांचा जन्म पुण्याच्या ऐतिहासिक सुप्रसिद्ध सरदार मुजुमदार यांच्या घराण्यात झाला. त्यांचे वडील आबासाहेब मुजुमदार हे त्या काळातील अत्यंत लोकमान्य व्यक्तिमत्त्व होते. राजकारण, समाजकारण, संगीत आणि इतिहास ह्यांचा आबासाहेबांचा सखोल अभ्यास होता. त्यामुळे बालपणापासूनच बाळासाहेबांना शिक्षणातील विविध पैलूंचे दर्शन घडत गेले.

स्वातंत्र्यपूर्वकाळात, १७७२ साली बांधलेल्या पुण्यातील प्रसिद्ध मुजुमदार वाड्यात त्यांचे वास्तव्य असल्यामुळेच इतिहासाचे आणि जुन्या वास्तूंबद्दल त्यांना आकर्षण होते. त्या काळात त्यांच्या वाड्यात ब्रिटिश गव्हर्नर येत असत, तसेच गणेशउत्सवात भारतातील प्रसिद्ध संगीतकार मैफल करीत असत.

बाळासाहेबांचे शालेय शिक्षण नूतन मराठी प्रशाळा व महाविद्यालयातील शिक्षण फर्गसन महाविद्यालयात झाले. १९४९ मध्ये त्यांना बॉम्बे युनिव्हर्सिटीची ‘कायिक रसायनशास्त्रातील डॉक्टरेटची पदवी प्राप्त झाली. त्यांचे मार्गदर्शक डॉ. दिनकर धोंडो कर्वे, प्रसिद्ध धोंडो केशव कर्वे यांचे चिरंजीव, होते. त्यांचा संशोधनाचा विषय ‘हायड्रोलिसिस ऑफ नायट्राइल्स’ असा होता. ह्या संशोधनात त्यांनी ‘नायट्राइल’ आणि ‘सल्फ्युरिक आम्ल’ यांमध्ये होणाऱ्या रासायनिक प्रक्रियांचा वेग याबाबत अभ्यास केला होता.

बाळासाहेबांच्या या मूलभूत संशोधनाचा उपयोग भावी काळात काही सेंद्रिय पदार्थ (ॲमाइड्स) कमी वेळात करण्याकरिता होणार होता. परंतु, हे मूलभूत शास्त्रीय संशोधन त्या काळात महाराष्ट्रात औद्योगिकीकरण झालेले नसल्यामुळे मागे पडले. डॉ. मुजुमदारांनी त्यानंतर आयुर्वेदातील च्यवनप्राशामध्ये वापरण्यात येणारे वंशलोचन (बांबूत मिळणारे सिलिका जेल, अर्थात कठीण पांढरा गारेसारखा खडा) ह्यावर संशोधन केंद्रित केले होते. ह्या संशोधनासाठी त्यांनी सह्याद्री पर्वत, कोकण आणि कर्नाटकाच्या किनारपट्टीत बरीच भटकंती केली. त्या दरम्यान त्यांनी निरनिराळे बांबू गोळा करून त्यांतील वंशलोचनाचे रासायनिक पृथक्करण करून त्यांच्या रासायनिक गुणधर्मांची माहिती मिळविली. मात्र, त्यांचे हेही संशोधन प्रसिद्धीपासून दूर राहिले. आयुर्वेद महाविद्यालयात, तसेच फर्गसन महाविद्यालयात त्यांनी या काळात मानद व्याख्याता म्हणून काम केले.

त्यांची १९५९ मध्ये डेक्कन महाविद्यालयात, पुणे येथे पुरातत्त्व विभागात रासायनिक पुरातत्त्व शिकविण्यासाठी, तसेच संशोधनासाठी व्याख्याता म्हणून नेमणूक झाली. १९५९ ते १९७८ ह्या काळात त्यांनी पुरातत्त्व विभागात पुरातत्त्व शास्त्राशी निगडित रासायनिक प्रयोगशाळा उभारली आणि त्या प्रयोगशाळेत प्राचीन नाणी, वस्तू, शिलालेख, पाषाणमूर्ती, खापरे, धातूंची हत्यारे, दागिने यांवर रासायनिक प्रक्रिया करून त्या वस्तूंची जडणघडण, वापरलेले तंत्रज्ञान आणि जतन करण्याच्या विविध पद्धतींबाबत विपुल संशोधन केले. त्यांच्या विविध क्षेत्रांतील संशोधनाचा मागोवा येथे घेणे शक्य नाही; मात्र राष्ट्रीय पातळीवर मान्यता पावलेल्या केवळ दोन संशोधनांबद्दल इथे माहिती दिली आहे.

महाराष्ट्रात आणि मध्यप्रदेशात 'काळी माती' सर्वत्र मिळते. ह्या मातीबाबत शास्त्रीय संशोधन करून डॉ. मुजुमदार यांनी असे दाखवून दिले, की ही माती सहा ते चार हजार वर्षे पूर्वीच्या काळात, चांगल्या हवामानात तयार झाली. त्या काळी येथे आजच्यापेक्षा दहा ते पंधरा टक्के जास्त पाऊस पडत असावा, असे अनुमान केले. अशा या सुपीक काळ्या मातीवर पश्चिम महाराष्ट्राच्या आजच्या दुष्काळी प्रदेशात शेतकीप्रधान जोर्वे या नावाने ओळखली जाणारी ताम्रपाषाणयुगीन संस्कृतीची सुरुवात सुमारे ३८०० ते ३५०० वर्षांपूर्वी झाली.

डॉ. मुजुमदारांचे दुसरे महत्त्वाचे संशोधन प्राचीन काळातील तांबडी व काळी (Black & Red Ware), तसेच राखी चित्रित (Painted Gray Ware) या वैशिष्ट्यपूर्ण मृद्‌भांड्यांच्या तंत्रज्ञानाविषयी होते. याबाबत सखोल संशोधनातून त्यांनी असे दाखविले, की ही भांडी सुमारे ३००० ते ७००० सेल्सियस तापमान निर्माण केलेल्या भट्टीत भाजली गेली असावीत. शेण, गवत, राख यांचे भांड्यावर लेप देऊन, तसेच विशिष्ट तापमानावर नियंत्रण ठेवून ही मृद्‌भांडी तयार केली असावीत, असे अनुमान काढले. डॉ. मुजुमदार डेक्कन कॉलेजमधून १९७८ मध्ये रासायनिक पुरातत्त्वाचे प्रपाठक म्हणून निवृत्त झाले, तरी त्यांचे प्राचीन भांड्यांच्या तंत्रज्ञानाविषयीचे संशोधन पुढील पंधरा वर्षे अखंड चालू होते. त्यांना नवीन शिकण्याचा ध्यास होता. आयुष्याच्या अखेरच्या टप्प्यातही ते संगणक शिकत होते. ते उत्कृष्ट छायाचित्रकार होते. आवडीचे संशोधन, सतत नवीन करण्याचा ध्यास यांकरिता त्यांनी आपले जीवन समर्पित केले. त्याकरिता त्यांनी अविवाहित राहणे पसंत केले. डेक्कन महाविद्यालयामध्ये त्यांनी उभारलेली प्रयोगशाळा हे त्यांचे महत्त्वाचे योगदान मानले जाते. त्यांनी शून्यातून पुरातत्त्वशास्त्राशी निगडित रसायनशास्त्राची प्रयोगशाळा सुरू केली. आज डेक्कन कॉलेजमध्ये पुरारसायनशास्त्राच्या प्रयोगशाळेव्यतिरिक्त पुराभूशास्त्र, पुराप्राणिशास्त्र, पुरावनस्पतिशास्त्र, पुरामानव्यशास्त्र, पुराजीवशास्त्र आणि संगणकशास्त्र अशा विविध अद्ययावत प्रयोगशाळा असण्याचे भाग्य डेक्कन महाविद्यालयाच्या पुरातत्त्वशास्त्र या विभागाला लाभले आहे. अशा तऱ्हेच्या शास्त्रीय संशोधनाची सोय असलेले भारतातील विद्यापीठ पातळीवरचे हे एकमेव ठिकाण आहे. याचे बरेचसे श्रेय डॉ. मुजुमदारांना जाते.

डॉ. मुजुमदारांचे, संशोधनावर आधारित लिखाण मात्र खूपच कमी झाले आणि त्यामुळेच ते प्रसिद्धीच्या झोतात कधीच आले नाहीत. त्यांची काही महत्त्वाची प्रकाशने खालीलप्रमाणे आहेत :

१. मुजुमदार, ग.गं. आणि राजगुरू, शरद न.; 'कॉमेंट्स ऑन सॉइल्स अॅज एन्व्हायर्नमेन्टल अॅण्ड क्रॉनॉलॉजिकल टूल, इन इंडियन प्रिहिस्टरी' (व्ही.एन. मिश्र आणि एम.एस. माटे : संपादक), डेक्कन महाविद्यालय, पुणे; १९६४.

२. मुजुमदार, ग.गं. आणि राजगुरू, शरद न.; 'एस्कॅव्हेशन अॅट कुपगल', डेक्कन महाविद्यालय, पुणे १९६६.

३. मुजुमदार, ग.ग.; 'प्रॉब्लेम ऑफ ब्लॅक अॅण्ड रेड वेअर : अ टेक्नॉलॉजिकल अप्रोच', इन सेमिनार पेपर्स ऑफ द मेगॅलिथिक प्रॉब्लेम ऑफ इंडिया (नारायण, ए.के. : संपादक), पृष्ठे ९०-९३; बनारस हिंदू विश्वविद्यालय, बनारस; १९६९

— डॉ. श.न. राजगुरू

## मुनशी, कन्हैयालाल माणेकलाल

**संस्कृत अभ्यासक, कायदेतज्ज्ञ, शिक्षणतज्ज्ञ, साहित्यिक**

**३० डिसेंबर १८८७ – ८ फेब्रुवारी १९७१**



कन्हैयालाल माणेकलाल मुनशी यांचा जन्म गुजरातमधील भडोच येथे झाला. भारताच्या स्वातंत्र्यचळवळीत सहभागी असतानाही त्यांनी कायदेतज्ज्ञ व शिक्षणतज्ज्ञ म्हणून महत्त्वाची कामगिरी केली. गुजराती साहित्यातील ते एक श्रेष्ठ सारस्वत असून ते फर्डे वक्तेही होते. भारतातील साहित्याची व संस्कृतीची ओळख जगाला करून देण्यासाठी त्यांनी भारतीय विद्याभवन ही संस्था स्थापन केली. या संस्थेने आंतरराष्ट्रीय कीर्ती संपादन केली आहे. त्यांनी इंग्लिशमध्येही ग्रंथ लिहिले आहेत.

कन्हैयालाल हे माणेकलाल व तापीबेन यांचे चिरंजीव होत. वडील मोठे सनदी अधिकारी होते. आधी घरच्या घरी शिकून कन्हैयालाल भडोचच्या खानबहादुर हायस्कूलमधून १९०१मध्ये मॅट्रिक झाले, मग बडोदा महाविद्यालयातून मुंबई विद्यापीठाच्या बी.ए. (१९१०) व एलएल.बी. (१९१६) या पदव्या संपादन केल्या. या महाविद्यालयात अरविंद घोष प्राध्यापक असल्याने कन्हैयालाल क्रांतिकारक चळवळीकडे आकृष्ट झाले होते. मात्र हा प्रभाव काही काळाने कमी झाला. विद्यार्थिदशेत असतानाच त्यांनी प्राचीन संस्कृत साहित्य अभ्यासतानाच इंग्लिश, फ्रेंच, जर्मन इत्यादी युरोपीय भाषा आत्मसात करून त्यातील साहित्यही अभ्यासले.

मुनशी यांनी वकिली सुरू केली. त्यासाठी १९१३मध्ये ते मुंबईला आले व तेथेच स्थायिक झाले. मग १९१५मध्ये होमरूल चळवळीचे चिटणीस म्हणून काम केल्यावर ते काँग्रेस पक्षाचे सदस्य झाले. १९२७ साली विद्यापीठ मतदारसंघातून मुंबई विधान परिषदेवर त्यांची निवड झाली. बारदोलीच्या सत्याग्रहात सामील झाल्यावर ते पूर्णपणे गांधीवादी बनले. १९३०-३६ या काळात काँग्रेस कार्यकारिणीचे सदस्य व सरचिटणीस तसेच काँग्रेस मंत्रिमंडळातील मुंबई इलाख्याचे गृहमंत्री म्हणून काम करताना ते स्वातंत्र्य आंदोलनातही सहभागी झाले होते. उदा. मिठाचा सत्याग्रह. यामुळे त्यांना अनेकदा तुरुंगवास भोगावा लागला. मात्र 'छोडो भारत' चळवळीत सहभागी न होता त्यांनी अखंड हिंदुस्थान या संकल्पनेचा भारतभर प्रचार केला. तथापि या आंदोलनातील कार्यकर्त्यांच्या खटल्यात मुनशींनी त्यांची बाजू विनामूल्य मांडली. दरम्यान मतभेदामुळे त्यांनी काँग्रेस सोडली होती, पण महात्मा गांधीजींच्या सांगण्यावरून १९४६मध्ये ते परत काँग्रेस पक्षात दाखल झाले. तेव्हा ते भारताची घटना तयार करणाऱ्या घटनासमितीवरील सदस्य झाले. हैदराबाद संस्थानाचे




भारतात विलीनीकरण करण्यासाठी १९४८मध्ये शासनाने त्यांना एजंट जनरल म्हणून नेमले होते.

१९५२ साली लोकसभेवर निवड झाल्यावर ते अन्न खात्याचे मंत्री झाले. उत्तर प्रदेशाचे राज्यपाल म्हणूनही १९५३-५८ या कालावधीमध्ये त्यांनी काम केले. मतभेदांमुळे पुन्हा काँग्रेस सोडून १९६०मध्ये ते चक्रवर्ती राजगोपालाचारींच्या स्वतंत्र पक्षात सामील झाले. या पक्षाचे ते उपाध्यक्षही झाले होते. मात्र राजकारणाचा कंटाळा आल्यावर त्यांनी त्यातून निवृत्त होऊन सामाजिक, शैक्षणिक व साहित्यिक कार्याला वाहून घेतले.

मुनशी अनेक सामाजिक व शैक्षणिक संस्थांचे सदस्य, उपाध्यक्ष व अध्यक्ष होते. सन्माननीय डॉक्टरेटसह अनेक मानसन्मान त्यांना मिळाले होते. पाचगणीचे संजीवन हायस्कूल (मूळ हिंदू हायस्कूल) त्यांनी स्थापले. १९३९ साली त्यांनी स्थापन केलेली भारतीय विद्याभवन संस्था हेच त्यांचे चिरंतन स्मारक आहे. भारतात या संस्थेच्या अनेक शाखा आहेत. 'हिस्ट्री अँड कल्चर ऑफ इंडियन पीपल' (संपादक रमेशचंद्र मजुमदार १९५८-७७) हा दहा खंडांचा ग्रंथ हे या संस्थेचे मौलिक कार्य आहे. यात भारताचा संपूर्ण इतिहास आला आहे.

गुजराती व इंग्लिश भाषांत मुनशी यांनी अनेक ग्रंथ लिहिले असून वृत्तपत्रातील व नियतकालिकांतील त्यांचे लेखनही व्यापक आहे. याशिवाय त्यांनी गुजरातीत कादंबऱ्या व नाटके लिहिली आहेत. त्यांच्या गुजराती लेखनामुळे त्या साहित्यात मोलाची भर पडली आहे. पौराणिक, ऐतिहासिक, सामाजिक कादंबऱ्या व नाटके त्यांनी लिहिली असून त्यांच्या काही प्रमुख गुजराती साहित्यकृती पुढीलप्रमाणे - 'बरेनी वसुलात' (१९१४), 'स्वप्नद्रष्टा' (१९२५) या सामाजिक आणि 'पृथ्वीवल्लभ' (१९२१) व 'भगवान कौटिल्य' (१९२५) या ऐतिहासिक कादंबऱ्या. शिवाय 'पुरंदर पराजय' (१९२३) व 'लोपामुद्रा' (१९३३) ही पौराणिक आणि 'डॉ. मधुरिका' (१९३६) व 'ब्रह्मचर्याश्रम' (१९३१) ही सामाजिक व इतर नाटके. त्यांनी आत्मचरित्रात्मक लेखनही केले आहे.

त्यांची इंग्लिश ग्रंथसंपदा अशी आहे - 'गुजरात अँड इट्स लिटरेचर' (१९३५), 'आय फॉलो द महात्मा' (१९४०), 'अखंड हिंदुस्थान' (१९४२), 'द क्रिएटिव्ह आर्ट ऑफ लाइफ' (१९४६), 'पिलग्रिमेज टू फ्रीडम' (१९६८), 'सागा ऑफ इंडियन स्कल्प्चर' (१९५९), 'कृष्णावतार' (१९६७) इ. 'ईस्ट अँड वेस्ट', 'हिंदुस्थान रिव्ह्यू', 'भार्गव' (गुजराती मासिक, १९१२), 'यंग इंडिया (सहसंपादक १९१५), 'गुजरात' (सचित्र मासिक, १९२२), सोशल वेल्फेअर (साप्ताहिक, १९४०) 'भवन्स जर्नल, (१९५४) इत्यादी नियतकालिकांत त्यांनी विपुल लेखन शेवटपर्यंत केले. हंस लिमिटेड ही संस्था त्यांनी १९३६मध्ये स्थापली. ही संस्था स्थापनात भारतीय भाषांतील मुख्य साहित्य हिंदीत आणण्यासाठी त्यांचे भाषांतर व संकलन करणे हा हेतू होता.

मुनशी समाजसुधारकही होते. पहिल्या पत्नी वारल्यानंतर त्यांनी १९२६मध्ये विधवा जैन स्त्रीशी पुनर्विवाह करून आंतरजातीय पुनर्विवाहाचा आदर्श समाजापुढे ठेवला. लालाभाई सेठ यांच्या विधवा लीलाबाई (१८९९-१९७८) या मुनशींच्या दुसऱ्या पत्नीही सामाजिक कामात व साहित्यात रस घेणाऱ्या होत्या. भारताच्या स्वातंत्र्यलढ्यात सहभागी झाल्याने (१९३२-१९४०) त्यांना बंदिवासही घडला होता.

खाद्यपेय आयोजनाचे शिक्षण देणारे पहिले महाविद्यालय मुंबईत लीलाबाईंनी काढले. विविध सामाजिक व राजकीय संस्था-संघटनांमध्ये लीलाबाईंनी

म

महत्त्वाची पदे भूषवली होती. उदा. राज्यसभा, मुंबई विधिमंडळ, मुंबई महागरपालिका, हरिजन सेवक संघ, हिंदी विद्यापीठ वगैरे. त्या लेखिकाही होत्या. त्यांनी अनेक पत्रके व स्फुट लेख लिहिले.

त्यांची काही महत्त्वाची पुस्तके पुढीलप्रमाणे - 'रेखाचित्रो अने बीजा लेखे (१९२५), 'कुमारदेवी' (१९२९), 'जीवनमंथी जडेली' (१९३२), 'रेखाचित्रो जुना अने नवा' (१९३५) वगैरे अशा प्रकारे या दांपत्याने सामाजिक क्षेत्र, स्वातंत्र्यलढा, साहित्य आणि विविध संस्था-संघटना यात मोठे कार्य केले आहे.

कन्हैयालाल मुनशी आणि पर्यायाने लीलाबाई यांची अधिक माहिती कन्हैयालाल यांच्या पुढील आत्मचरित्रपर व गौरव ग्रंथातून मिळू शकेल. 'मारी विंजवबदर कहानी' (के.एम. मुनशी, १९४३), 'के. एम. मुनशी : हिज आर्ट अँड वर्क' (डायमंड ज्युबिली व्हॉल्युम, (१९४७).

- संपादित

**संदर्भ :**

१. *मराठी विश्वचरित्रकोश; संपादक - कामत, श्रीराम पांडुरंग; विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा*

## मुसळगावकर, गजाननशास्त्री सदाशिवशास्त्री

**संस्कृत पंडित, लेखक**

**१५ ऑक्टोबर १९१७ – २००९**



महामहोपाध्याय डॉ. गजाननशास्त्री सदाशिवशास्त्री मुसळगावकर हे भारतातील विख्यात संस्कृत पंडितांमधील एक होत. त्यांचे पिता म.म.पं. सदाशिवशास्त्री मुसळगावकर हे ग्वालियर राजदरबारात प्रधान पंडित होते. त्यांनी आजीवन संस्कृतची सेवा केली. त्यांची शिष्यसंख्या विपुल होती. त्यामध्ये भारताचे प्रथम राष्ट्रपती डॉ. राजेंद्र प्रसाद, लालबहादूर शास्त्री, अमरनाथ झा, श्यामा नेहरू इत्यादी होते. पंडित गजाननशास्त्री यांचे एक काका ज्योतिर्विन्मणि पं. पुरुषोत्तमशास्त्री हे ग्वालियर दरबारातील राजज्योतिषी होते. त्यांचे दुसरे काका पं. वेदमूर्ती गंगाधरशास्त्री हे वैदिक घनपाठी होते. मुसलगावकर यांचे शुक्ल यजुर्वेद माध्यंदिनीय शाखा (संहिता व पद), कर्मकांड, तंत्रशास्त्र, न्यायशास्त्र, धर्मशास्त्र, भारतीय राजनीतिशास्त्र, न्याय-वैशेषिक, मीमांसा-वेदान्त, सांख्य-योग तसेच वेदभाष्ये इत्यादींचे शिक्षण अनुवांशिक पद्धतीने झाले. त्यांनी विद्यालयातही शिक्षण घेऊन मीमांसाचार्य, वेदान्ताचार्य, साहित्याचार्य, साहित्यरत्न, एम.ए., पीएच.डी. आदी पदव्या संपादन केल्या. गजानन मुसळगावकरांनी ३६व्या वर्षापर्यंत वेगवेगळ्या संस्थांमध्ये अध्यापन केले. त्यांनी प्रवक्ता, रीडर, विभागाध्यक्ष- काशी हिंदू विश्वविद्यालय, वाराणसी; यु.जी.सी. व्हिजिटिंग प्रोफेसर- एम.एस. युनिव्हर्सिटी, बडोदा, गुजरात; शास्त्र चूडामणी प्रोफेसर गंगानाथ झा रिसर्च इन्स्टिट्यूट, इलाहाबाद अशा विविध संस्थांमध्ये विविध पदांवर काम केले. १९७७ साली पंडित गजाननशास्त्री काशी हिंदू विद्यापीठातून बाहेर पडल्यावर त्यांनी निरंतर विविध शास्त्रांचे नि:शुल्क विद्यादान करून संस्कृत वाङ्मयाच्या सेवेत ते मग्न होते. पंडित गजाननशास्त्री शास्त्रमर्मज्ञ तर होतेच परंतु ते वैदिक पंडितही होते. आपल्या देशावरील भक्तीमुळे त्यांनी महर्षी महेशयोगींद्वारे वॉशिंग्टन विद्यापीठात सन्माननीय वेतनासहित भारतीय दर्शन शिकविण्यासाठी केलेला आग्रह त्यांनी नम्रतापूर्वक नाकारला. पंडित गजाननशास्त्रींची मातृभाषा मराठी असूनही संस्कृतच्या प्रसाराबरोबर हिंदीचा प्रसार व्हावा म्हणून त्यांनी संस्कृतमधील शास्त्रीय ग्रंथ राष्ट्रभाषा हिंदीमधून लिहिले.

पंडित गजाननशास्त्रींनी लिहिलेले 'मीमांसा दर्शन का विवेचनात्मक इतिहास', 'वैदिक साहित्य का इतिहास', 'मीमांसापदार्थ संग्रह' (संस्कृतमध्ये प्रस्तावित) इत्यादी प्रमुख ग्रंथ आहेत. तसेच त्यांचे पूर्वमीमांसा-मीमांसा परिभाषा व्याख्या, शाबर भाष्य, शास्त्रदीपिका (तर्कपाद); वेदान्त : उपदेशसाहस्री, तत्त्वानुसंधान,

म

वेदान्त परिभाषा, वेदान्तसार, तत्त्वदीपिका की भूमिका; सांख्य : सांख्यतत्त्वकौमुदी, सांख्य प्रवचन भाष्य; न्याय : सिद्धान्तमुक्तावली, तर्कभाषा; साहित्य : काव्यप्रकाश; वेद : वेदार्थपारिजात, शुक्लयजुर्वेद भाष्य की हिंदी व्याख्या; पुराण : चंद्रलाम्बामाहात्म्य (११ हजार श्लोकांची व्याख्या व संपादन) नीतिशास्त्र : मित्रलाभ, सुहृद्भेद, संस्कृत कुसुमावली; शैवागम : अनुभव सूत्र हे व्याख्याग्रंथ प्रसिद्ध आहेत.'संस्कृत वाङ्मय का बृहद् इतिहास' (उ.प्र. संस्कृत अकादमी, लखनऊ, दर्शन खंड) आणि 'चित्सुखी की बृहद् भूमिका' या ग्रंथांचे त्यांनी संपादन केले आहे. त्यांना राष्ट्रपती पुरस्कार- सर्टिफिकेट ऑफ ऑनर-१९९०; विश्वभारती पुरस्कार- उत्तर प्रदेश संस्कृत संस्थानद्वारे- संस्कृत क्षेत्रातील सर्वोच्च पुरस्कार- १९९९; आद्यशंकराचार्य- सांस्कृतिक पुरस्कार (करवीर पीठ-कोल्हापूर); महर्षी वेदव्यास पुरस्कार- महर्षी वेदव्यास प्रतिष्ठान अलंकारणी आदी पुरस्कार मिळाले आहेत. तसेच त्यांना वैदिक तिलक (विश्वसंस्कृत मंडळ, ग्वालियर), १९७८; मीमांसा भूषण (सामवेद विद्यालय, वाराणसी), १९८९ या उपाधींनीही सन्मानित करण्यात आले आहे.

— राजेश्वरशास्त्री मुसळगावकर

## मेडोज टेलर, फिलीप

**इतिहास व पुरातत्त्वाचे अभ्यासक, प्रशासक**

**१८०८ – १८७६**



कर्नल फिलीप मेडोज टेलर यांचा जन्म इंग्लंडमध्ये लिव्हरपूल येथे झाला. १८२३-१८२४च्या दरम्यान जेमतेम शालेय शिक्षण घेतल्यानंतर घरच्या कठीण परिस्थितीमुळे कोवळ्या वयात त्यांना मेसर्स येट्स ब्रदर्स या कंपनीत वेठबिगाराप्रमाणे काम करावे लागले. कंपनीतल्या हालअपेष्टांमधून सुटका झाल्यानंतर वयाच्या अवघ्या सोळाव्या वर्षी ते नशीब काढण्यासाठी भारतात आले; परंतु ज्या व्यापारी संस्थेमध्ये काम करायला ते आले होते ती संस्था दिवाळखोरीत असल्याने मुंबईत अनेक खटपटी केल्यावर मेडोज टेलर यांना हैद्राबाद निझामाच्या राज्यात लष्करी व मुलकी अधिकारी म्हणून नोकरी मिळाली. ते १८२४ रोजी लेफ्टनंट म्हणून औरंगाबादला रुजू झाले व या सेवेत १८६० पर्यंत होते. सन १८४१ ते १८५३ या कालावधीत मेडोज टेलर यांनी कर्नाटकात असलेल्या शोरापूर या संस्थानात पोलिटिकल एजंट म्हणून काम केले. त्यानंतर १८५३ ते १८५७ या दरम्यान त्यांनी नळदुर्ग जिल्ह्यात प्रशासक म्हणून काम केले. सन १८५७-५८ या अशांततेच्या व बंडाळीच्या काळात त्यांनी समाजातील आपल्या प्रतिष्ठेच्या बळावर वऱ्हाड भागात शांतता राखली.

निझामाच्या सेवेत असताना मेडोज टेलर यांनी प्रशासकीय व लष्करी सेवा चोख बजावली. निझामाच्या राज्यात असणाऱ्या मराठवाडा व वऱ्हाड या भागांमध्ये धाडसी व कडक पोलीस अधिकारी म्हणून मेडोज टेलर यांनी लौकिक मिळवला. प्रारंभापासून त्यांनी भारतीय समाजात मिसळायला सुरुवात केली. एकाच वर्षात हिंदुस्थानी व पार्शियन या भाषांवर त्यांनी प्रभुत्व मिळवले. तसेच चित्रकला, मंदिरस्थापत्य व संगीत या विषयांमध्ये त्यांना रुची निर्माण झाली. मेडोज टेलर यांचे स्थानिक लोकांशी अत्यंत जिव्हाळ्याचे संबंध होते व त्यांची भारतीय समाजाबद्दलची जाण परिपक्व होती. त्यांची पत्नी मेरी पाल्मर ही वंशाने अर्धी भारतीय होती.

सन १८६० मध्ये प्रकृतीच्या कारणामुळे मेडोज टेलर यांनी सेवानिवृत्ती घेतली व ते मायभूमीत परतले. त्यानंतर १८६० ते १८७६ या दरम्यान १८७५ मधली भारतभेट वगळता डब्लिन येथे ते लेखनात मग्न होते.

भारतातल्या वास्तव्यातच त्यांना संशोधनाची व लेखनाची गोडी लागली होती. त्यांनी लंडनच्या 'द टाइम्स'साठी दीर्घकाळ लेखन केले. ठगांच्या समस्येवर अभ्यासपूर्वक लिहिलेली 'कन्फेशन्स ऑफ अ ठग' (१८३९) ही त्यांची अत्यंत गाजलेली कादंबरी आहे.

याखेरीज तत्कालीन भारतीय समाजाचे उत्कृष्ट चित्रण करणाऱ्या 'टिपू सुलतान : अ टेल ऑफ द म्हैसूर वॉर' (१८४१), 'तारा' (१८६३), 'राल्फ डार्नेल' (१८६५), 'सीता' (१८७३) व 'ए नोबल क्वीन' (१८७८), या इतर कादंबऱ्याही गाजल्या. त्यांच्या मृत्यूनंतर 'द स्टोरी ऑफ माय लाइफ' हे त्यांचे आत्मचरित्र प्रसिद्ध झाले.

मेडोज टेलर यांनी भारतीय इतिहास व पुरातत्त्व यावर विपुल लेखन केले. प्रशासकीय सेवा केली, त्या सर्व ठिकाणी, विशेषत: शोरापूर संस्थानात असताना त्यांनी पुरातत्त्वीय अवशेषांची नोंदणी केली व काही महापाषाणयुगीन स्थळांचे उत्खनन केले. पुरातत्त्वाचा इतिहास मांडणाऱ्या अभ्यासकांनी मेडोज टेलर यांच्या अचूक व पद्धतशीर संशोधनाचे कौतुक केले आहे. त्यांनी कृष्णा-भीमा दोआबाच्या प्रदेशात अनेक पुरातत्त्वीय स्थळांचा शोध लावला व त्यांचा अर्थ लावण्याचा प्रयत्न केला. या काळात पुरातत्त्व निवळ कुतूहल व प्राचीन अवशेषांची लुटमार करण्याच्या अवस्थेत होते, तेव्हा उत्खनन करण्याचा उद्देश स्पष्टपणे समजणारा आणि रूढार्थाने विद्वान नसलेला हा ब्रिटिश अधिकारी अनोखा पुरातत्त्व संशोधक होता. त्यांची उत्खननाची व अहवाल लेखनाची पद्धत तर काळाच्या पुढे होती. स्वत: मेडोज टेलर यांनी आत्मचरित्रात म्हटल्याप्रमाणे 'फारसे औपचारिक शिक्षण नसतानाही' त्यांनी साहित्य, भारतीय इतिहास व पुरातत्त्व यांत केलेली कामगिरी थक्क करणारी आहे.

– डॉ. प्रमोद जोगळेकर

## मेहेंदळे, मधुकर अनंत

**प्राध्यापक, भाषाशास्त्रज्ञ, वेद-अवेस्ता पंडित**

**१४ फेब्रुवारी १९१८**

मधुकर अनंत मेहेंदळे यांचा जन्म मध्य प्रदेशातील हरसूल येथे झाला. त्यांच्या आईचे नाव सत्यभामाबाई होते. वडील गुजरात रेल्वेमध्ये नोकरी करीत असल्यामुळे डॉ. मेहेंदळे यांचे सुरुवातीचे शिक्षण



गुजरातमध्ये झाले. बडोदा महाविद्यालय (गुजरात) येथून बी.ए. (१९३७) व विल्सन महाविद्यालय मुंबई येथून एम.ए. (१९३९) या दोन्ही पदव्या प्रथम श्रेणीत मिळवून पीएच.डी.साठी ते पुण्यातील सर्वांत जुन्या व नावाजलेल्या डेक्कन महाविद्यालयामध्ये आले. या दरम्यान ते भगवानदास पुरुषोत्तमदास संस्कृत शिष्यवृत्ती (१९३९), व्ही.एन. मंडलिक पारितोषिक (१९४२) व भगवानलाल इंद्रजी सुवर्णपदक व पारितोषिक (१९४३) (सर्व मुंबई विद्यापीठातर्फे) यांचे मानकरी ठरले. सन १९४३मध्ये पीएच.डी. मिळाल्यानंतर डॉ. मेहेंदळे यांनी आपल्या शैक्षणिक कारकिर्दीची सुरुवात कर्नाटकातील बागलकोट येथे बसवेश्वर महाविद्यालयामध्ये व्याख्याता म्हणून केली. (१९४४-४५). त्यानंतर गुजरातमधील नवसारी येथे एस.बी. गार्डा महाविद्यालयामध्ये प्राध्यापक म्हणून त्यांनी काम केले. (१९४५-५१).

इ.स. १९५१मध्ये डॉ. मेहेंदळे डेक्कन महाविद्यालयामध्ये वेदिक संस्कृतचे प्रपाठक या पदावर रुजू झाले. डेक्कन महाविद्यालय ही भाषाशास्त्राची पंढरी समजली जाते. आधुनिक दृष्टीकोनातून भाषाशास्त्राचा अभ्यास करणाऱ्या भारतीय विद्वानांच्या पहिल्या पिढीपैकी डॉ. मेहेंदळे हे एक आहेत. म्हणूनच त्यांच्यासारख्या अभ्यासकाला डेक्कन महाविद्यालयामधील वातावरण व विद्वानांचा सहवास कामासाठी पोषकच ठरला.

डेक्कन महाविद्यालयामध्ये आल्यावर लगेचच जर्मनीतील ग्योटिंगन विद्यापीठात अभ्यागत व्याख्याता म्हणून दोन वर्षांसाठी त्यांना पाचारण करण्यात आले (१९५२-५४). पुढे अमेरिकेतील येल विद्यापीठात सीनियर रॉकफेलर फाउंडेशन फेलो म्हणून वेद व भाषाशास्त्र शिकण्याची संधी त्यांना मिळाली (१९५७-

५८). इंग्लंडमधील केंब्रिज विद्यापीठात अवेस्ता शिकण्याचा योगही जुळून आला. या सर्व अनुभवामुळे त्यांच्या अभ्यासाला एक विस्तृत आणि तौलानिक परिमाण लाभले. याची साक्ष त्यांच्या संशोधनपर लिखाणात ठायीठायी दिसून येत आहे. आधी संस्कृतचे प्रपाठक, मग प्राध्यापक व मग डेक्कन महाविद्यालयामध्ये अजूनही ज्याचे काम चालू आहे त्या ज्ञानकोशात्मक संस्कृत कोश प्रकल्पाचे संयुक्त संपादक अशा विविध पदांवर डॉ. मेहेंदळे यांनी डेक्कन महाविद्यालयामध्ये काम केले (१९५१-१९८३). तेथून निवृत्त झाल्यावरही पुण्याच्या भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिरात 'महाभारत - उपसंहार, व कल्चरल इंडेक्स ऑफ महाभारत भाग १' यांचे संपादक म्हणून कार्यभार त्यांनी उचलला आहे.

डेक्कन महाविद्यालयामधील प्रदीर्घ कारकिर्दीत, एकीकडे तेथे व पुणे विद्यापीठात अध्यापन तसेच पीएच.डी.च्या विद्यार्थ्यांना मार्गदर्शन आणि त्याबरोबरच दुसरीकडे आपल्या विषयात मौलिक संशोधन असा त्यांचा प्रवास चालला होता. डॉ. मेहेंदळे यांच्या अभ्यासाच्या विषयाचा आवाका खूप मोठा आहे. वैदिक संस्कृत, निरुक्त, पाली आणि प्राकृत, ऐतिहासिक भाषाशास्त्र, अवेस्ता आणि महाभारत इत्यादी परस्परसंबद्ध विषयांवर चौदाहून अधिक ग्रंथ डॉ. मेहेंदळांच्या नावावर आहेत. अशोकन् इन्स्क्रिप्शनस् इन् इंडिया, हिस्टॉरिकिल ग्रामर ऑफ इन्स्क्रिप्शनल प्राकृत्स, दि निरुक्त नोट्स, तसेच सम आस्पेक्ट्स ऑफ इंडो-आर्यन लिंग्विस्टिक्स इत्यादी ग्रंथ आजही या विषयातील जागतिक विद्वानांत प्रमाणभूत मानले जातात. याबरोबरच संशोधनपर लेखनाला वाहिलेली देशी-विदेशी अनेक नियतकालिके, स्मृतिग्रंथ व गौरवग्रंथ यांत डॉ. मेहेंदळे यांचे शंभराहून अधिक शोधनिबंध इंग्लिशमधून प्रसिद्ध झाले आहेत. त्यांचा संग्रह मधु-विद्या या नावाने प्रसिद्ध झाला आहे.

गेली सुमारे सत्तर वर्षे डॉ. मेहेंदळे लेखन करीत आहेत. त्यांचे बरेच संशोधनपर लिखाण इंग्लिशमधून आहे. त्यांचे अनेक मराठी लेख नवभारतमध्ये प्रसिद्ध झाले आहेत. अनेक परस्परपूरक विद्याशाखांचा अभ्यास असल्यामुळे त्यांच्या मराठी लेखनातही विषयांचे वैविध्य लक्षणीय आहे. हे लेख मुख्यत: वेद, उपनिषदे, रामायण व महाभारत यांवर लिहिलेले असून ते रसिक व चिकित्सक अभ्यासक अशा दोन्ही दृष्टीकोनांतून लिहिले आहेत. यांतील निवडक लेखांचा संग्रह 'प्राचीन भारत: समाज व संस्कृती' या नावाने प्राज्ञपाठशाळा, वाई येथून प्रसिद्ध झाला आहे. या ग्रंथात समाविष्ट केलेली विनोबाजींची गीताई व गीताप्रवचने, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशीकृत वैदिक संस्कृतीचा विकास अशा काही प्रसिद्ध मराठी ग्रंथांची अभ्यासपूर्ण व मर्मग्राही परीक्षणे वाचली, तर मूळ ग्रंथ अधिक चांगला समजतो. कुठल्याही अभिनिवेशाचा अभाव, सप्रमाण विधाने आणि कमालीचा समतोलपणा ही डॉ. मेहेंदळे यांच्या संशोधनाची वैशिष्ट्ये समजली जातात. त्यांच्या कामाची दखल घेऊन अनेक सुप्रतिष्ठित व्याख्यानमाला गुंफण्यासाठी त्यांना आदरपूर्वक निमंत्रित केले गेले.

विल्सन फिलालॉजिकल लेक्चर्स मुंबई विद्यापीठ, मुंबई (१९६६), भाऊ विष्णु अष्टेकर वैदिक व्याख्याने, पुणे विद्यापीठ, पुणे (१९७८), डॉ. पां. वा. काणे स्मृती व्याख्यान, एशियाटिक सोसायटी, मुंबई (१९८५), तसेच पुण्यातील डॉ. ह. रा. दिवेकर (१९८७), प्रा. गो. के. भट (१९९०), प्रा. अरविंद मंगरूळकर (१९९१), डॉ. रा. शं. वाळिंबे (१९९४) यांच्या स्मृती व्याख्यानमाला ही त्यातील काही नावे आहेत. विद्येच्या क्षेत्रातील काही महत्त्वपूर्ण अध्यक्षपदेही डॉ. मेहेंदळे यांच्याकडे चालून आली. अखिल भारतीय प्राच्यविद्या परिषदेच्या दोन अधिवेशनांत भारतीय भाषाशास्त्र विभाग अध्यक्ष (अन्नमलाई नगर, १९५५) आणि वैदिक विभाग अध्यक्ष (कुरुक्षेत्र, १९७४) ही जबाबदारी पार पाडली. लिंग्विस्टिक सोसायटी ऑफ इंडिया (कोलकाता, १९७९) आणि बृहन्महाराष्ट्र प्राच्यविद्या

परिषद, संस्कृत वाङ्मय व भाषाशास्त्र विभाग (अधिवेशन १) यांची अध्यक्षपदेही त्यांनी भूषवली आहेत. त्यांना मिळालेल्या पुरस्कारांची संख्याही कमी नाही. गुरू गंगेश्वर राष्ट्रीय वेद-वेदांग पुरस्कार (नाशिक, १९९७), पंडित राजारामशास्त्री नाटेकर पुरस्कार (पुणे, १९९७), पुरुषोत्तम पुरस्कार (सांगली, १९९७), प्रा. न. र. फाटक स्मृती पुरस्कार (पुणे, १९९८) व श्रीमंत नानासाहेब पेशवे धार्मिक-आध्यात्मिक पुरस्कार (श्रीदेवदेवेश्वर संस्थान पुणे, १९९९) असे हे पुरस्कार त्यांच्या जीवनकार्याचा गौरव करण्यासाठी त्यांना दिले गेले. एशियाटिक सोसायटी, मुंबई यांच्यातर्फे देण्यात येणारे महामहोपाध्याय पां.वा. काणे सुवर्णपदकही त्यांना मिळाले आहे. दि. ६ ऑक्टोबर २०१२ रोजी डेक्कन महाविद्यालयाने त्यांना सन्मानीय डी.लिट्. पदवीने गौरवले. विद्यापीठ स्तरावरील उत्तम शिक्षकासाठी असलेला पुरस्कार महाराष्ट्र राज्य सरकारने त्यांना बहाल केला (१९७६). तसेच राष्ट्रपतींचे सन्मानीय प्रशस्तिपत्र त्यांना मिळाले आहे (१९९०). गांधीवादी असलेल्या डॉ. मेहेंदळे यांचा स्वावलंबनावर नितांत विश्वास आहे. पू. विनोबा भावे हे त्यांचे श्रद्धास्थान आहे. दूरदर्शनवरील रामायण व महाभारत या मालिकांमधील विपर्यस्त चित्रणाची दखल घेणारे लेखनही त्यांनी केले आहे. त्यांच्या सुविद्य पत्नी कुसुमताई या ग्रंथपाल असून खादी वापरण्याचे व्रत पाळत. डॉ. मेहेंदळे यांच्या दीर्घ आणि कृतकृत्य जीवनप्रवासात त्यांची साथ मोलाची होती.

– डॉ. माधवी कोल्हटकर

## मॅक्सम्यूलर, फ्रेडरिक विल्हेम

**वेदाभ्यासक, सायणभाष्ययुक्त ऋग्वेदाच्या चिकित्सक प्रतीचे संपादक व भाषाशास्त्रज्ञ**

**६ डिसेंबर १८२३ – २८ ऑक्टोबर १९००**

फ्रेडरिक मॅक्स म्यूलर हे सुप्रसिद्ध जर्मन कवी विल्हेम म्यूलर यांचे पुत्र. लिपझिग युनिव्हर्सिटीमधून बी.ए. झाल्यानंतर त्यांनी पॅरिस युनिव्हर्सिटीत बर्नाफ, बॉप,



स्केलिंग विख्यात पंडितांजवळ संस्कृत भाषेचा विशेष अभ्यास केला, व ते १८४८मध्ये ऑक्स्फर्डला आले. तेथे प्रथम युरोपीय भाषांचे व नंतर तौलनिक भाषाशास्त्राचे प्राध्यापक म्हणून काम केल्यावर ते सेवानिवृत्त झाले. ऑक्स्फर्ड युनिव्हर्सिटीत संस्कृत भाषेचे प्राध्यापक होण्याची त्यांची इच्छा मात्र अपूर्णच राहिली.

तौलनिक भाषाशास्त्राचे अध्ययन करीत असता संस्कृत भाषेचे विशेष महत्त्व त्यांच्या ध्यानी आले. अनेक प्रकारच्या क्रान्त्यांमध्ये संस्कृतचे भारतीय महत्त्व कायमच राहिले, याचे त्यांना कौतुक वाटले व वेदांच्या अध्ययनानंतर तर ते संस्कृतचे अभिमानी बनले.

तौलनिक धर्मशास्त्राच्या अध्ययनातही वैदिक धर्माचे श्रेष्ठत्व त्यांच्या ध्यानात आले. निरनिराळ्या धर्मांचा अभ्यास करीत असता राष्ट्राच्या जीवनात एकरूप झालेला दुसरा धर्म त्यांना आढळला नाही. विवाहापासून प्रत्येक गोष्ट वेदाला धरून करण्याची पद्धत त्यांना अगदी नवी वाटली. भक्त, पंडित व भिकारी या सर्वांच्या जीवनावर सारख्याच प्रकारे दिसणारी वैदिक धर्माची छाप त्यांना नमुनेदार आढळली. देव – न्यायाधीश आणि मनुष्य – अपराधी या ख्रिस्ती कल्पनेपेक्षा प्रत्येकाला कर्मानुसार गती मिळते, ईश्वरालासुद्धा त्यात बदल करता येत नाही हा वैदिक सिद्धान्त त्यांना नमुनेदार वाटला.

यामुळे हिंदुस्थान, तेथील लोक व संस्कृती याबद्दल त्यांच्या मनात अत्यंत आपलेपणा उत्पन्न झाला. तिकडे भेटणाऱ्या हिंदी लोकांची ते मनापासून वास्तपुस्त करीत. इतकेच नव्हे, तर हिंदुस्थानात पुनर्जन्म घेण्याची कल्पनाही हे अनेक वेळेला बोलून दाखवत. लो. टिळकांसारख्या वैदिक पंडिताला राजद्रोहाच्या आरोपावरून शिक्षा झाली, तेव्हा त्यांच्या शिक्षेची मुदत भरण्यापूर्वी त्यांना सोडवण्याच्या कामात मूलर यांनी

म

पुढाकार घेतला. स्वामी विवेकानंदांनी त्यांच्या हिंदुस्थानच्या प्रेमाबद्दलच्या आठवणी लिहिल्या असून प्राचीन ऋषिमुनींची आठवण करून देणारे यांचे व्यक्तित्व असल्याची कबुली दिली आहे. स्वामी विवेकानंदांनीच पुरवलेल्या माहितीचा उपयोग करून म्यूलर यांनी 'Ramakrishna, his Life and Sayings' हा आपला सुप्रसिद्ध ग्रंथ लिहिला.

म्यूलर यांचे कामही मोठे पद्धतशीर असे. ऋग्वेदाची आवृत्ती काढण्यापूर्वी यांनी ऋक्प्रातिशाख्याचा सूक्ष्म अभ्यास करून त्यांचे जर्मन भाषेत भाषांतर केले, आणि त्याची भरपूर चिकित्सा केली. ऋग्वेदाची सायणभाष्यासह चिकित्सक आवृत्ती काढण्याकरिता त्यांनी अत्यंत मेहनत घेतली व त्या प्रतीवर 'ऋग्वेदसंहिता - शार्मण्यदेशोत्पन्नेनेग्लण्ड देश निवासिना मोक्षमूलरभट्टेन संशोधिता गोतीर्थाभिधाने नगरे' असे संस्कृतमध्ये लिहिले. यातील शार्मण्य = जर्मन, स्वत:च्या नावाला लावलेले भट्ट व ऑक्स्फर्ड = गोतीर्थ हे ध्यानात घेण्यासारखे आहे.

ऋग्वेद प्रकाशनाकरिता त्यांनी ईस्ट इंडिया कंपनी व विजयनगरचे महाराज यांच्याकडून आर्थिक साहाय्य मिळवले होते. त्यांच्या वेळेपर्यंत जर्मनीत जर्मन भाषेत वेदार्दिवाङ्मयाचा पुष्कळ पद्धतशीर अभ्यास झाला होता. त्यामुळे आणि म्यूलर यांच्या लोकप्रिय इंग्रजी भाषेमुळे त्यांच्याकडे जगाचे लक्ष वेधले व वेदार्दिवाङ्मयाची जगाला गोडी लावण्याचा मान म्यूलर यांना मिळाला.

त्यांचे ग्रंथ - भाषाशास्त्र : (1) The Science of Language, (2) Last Essays (पहिला खंड), (3) The Silesian Horseherd (भाषा व विचार यांचे संबंध) इत्यादी.

धर्मशास्त्र : (1) Origin and Growth of Religion, (2) Introduction to the Science of Religion, (3) Natural Religion, (4) Physical Religion, (5) Anthropological Religion, (6) Psychological Religion इत्यादी.

हिंदुस्थानसंबंधी : (1) History of Ancient Sanskrit Literature, (2) India, What can she teach us, (3) Three Lectures on Vedanta, (4) The Six Systems of Indian Philosophy इत्यादी.

इतर : (1) My Autobiography, (2) Deutsche Liebe (जर्मन प्रेम, आत्मचरित्रपर), (3) Chips from a German Workshop, (4) Auld Lang Syne (तीन खंड), (5) The Science of Thought, (6) The Science of Mythology इत्यादी.

संपादन : Sacred Books of the East (५१ खंड).

- संपादित

**संदर्भ :**

*१. अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*

## मोरवंचीकर, रामचंद्र श्रीनिवास
**इतिहासकार, इतिहास संशोधक**
**६ डिसेंबर १९३७**



प्रशाला शिक्षक, व्याख्याता, प्रपाठक, प्राध्यापक तथा प्राचीन भारतीय संस्कृती आणि इतिहास विभाग प्रमुख डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद असा शिक्षणाच्या व संशोधनाच्या क्षेत्रातील चढता आलेख असणाऱ्या डॉ. रामचंद्र श्रीनिवास मोरवंचीकर यांचा जन्म चिंचोली (काटी), ता. मोहोळ जि. सोलापूर येथे झाला. बी.ए. ऑनर्स (इतिहास) आणि एम.ए. (इतिहास) असे पदवी आणि पदव्युत्तर शिक्षण त्यांनी पुणे विद्यापीठातून पूर्ण केले. प्रशाला शिक्षक (१९५९ ते १९६८) म्हणून काम केल्यानंतर व्याख्याता तथा विभाग प्रमुख, प्रतिष्ठान महाविद्यालय पैठण, येथे अध्यापनाचे व संशोधनाचे

काम केले. इ.स. १९७८मध्ये मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबादकडून त्यांना पीएच.डी. पदवी प्रदान करण्यात आली. 'Paithan through the ages' हा त्यांच्या प्रबंधाचा विषय होता. इ.स.१९८० ते १९९७ या दरम्यान प्रपाठक, प्राध्यापक, इतिहास तथा पर्यटनशास्त्र विभाग प्रमुख, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद येथे ते कार्यरत होते. त्यांच्या मार्गदर्शनाखाली अकरा छात्रांनी पीएच.डी. पदवीसाठी आणि एकोणीस छात्रांनी एम.फीलसाठीचे संशोधन पूर्ण केले आहे.

त्यांच्या संशोधनाची व प्राविण्याची विशेष क्षेत्रे म्हणून प्राचीन भारतीय इतिहास-संस्कृती तथा भौतिक संस्कृती, नाणकशास्त्र, ऐतिहासिक पुरातत्त्व, दुर्ग व दुर्गव्यवस्थापन, नगररचना, प्राचीन व मध्ययुगीन जलव्यवस्थापन, काष्ठशिल्प, पर्यटन आदींचा प्रामुख्याने उल्लेख करावा लागेल. पैठणच्या वास्तव्यात प्रतिष्ठान या प्राचीन नगरीच्या व्यक्तिमत्त्वाचे आडवे-उभे पदर त्यांनी उजागर केले. सातवाहनपूर्व व सातवाहनकालीन साधनांच्या साहाय्याने पैठणचे व सातवाहनाचे संबंध काय होते, त्यांच्या उदयात व विकासात प्रतिष्ठानचे किती, कसे व काय योगदान होते हे मोरवंचीकरांनी अधोरेखित केले आहे. सातवाहन आणि पैठण यांच्या संदर्भातच प्रामुख्याने मोरवंचीकरांनी संशोधन केले आहे. सारे पैठण आणि पैठणाचा परिसर त्यांनी पिंजून काढला. पैठणमधील वाडे, शस्त्रे आणि अस्त्रे, पाषाणशिल्पे, काष्ठशिल्पे, पैठणी, दस्तऐवज, पुरातत्त्व, पोथ्या, प्रथा आणि परंपरा यांचा त्यांनी धांडोळा घेतला आणि पैठण बोलू लागले.

सातवाहनपूर्व पैठणच्या अस्तित्वाच्या अनेक कथा, काही शिलालेखांतून त्याचा उल्लेख, मूलकची राजधानी म्हणून पैठणच्या बाबरीच्या कथांतील उल्लेख या सगळ्या गोष्टी पैठणचे ऐतिहासिकत्व जातक काळापर्यंत मागे नेतात. त्यांच्या मते इ.स.पूर्व सहाव्या शतकापासून आजपर्यंत कधी नायकाच्या, कधी उप-नायकाच्या कधी प्रेक्षकाच्या, तर कधी साक्षीदाराच्या भूमिकेतून पैठणचे वेगळेपण इतिहासाच्या पृष्ठावरती साकार होत गेले. इ.स.पूर्व सहाव्या शतकापासून पैठणला वजन प्राप्त झाले. व्यापार, उद्योग आणि दळणवळण यांचे केंद्र या दृष्टीकोनातून पैठण क्रमाने प्रगत होत गेले. निसर्गाच्या अनुकूल प्रतिसादामुळे ही वसाहत कायम राहिली आणि विकसित होत गेली. वसाहतकारांचे प्रयत्न आणि निसर्गाची साथ यांमुळे पैठणच्या वसाहतीला आकार प्राप्त होत गेला. इ.स.पूर्व पाचवे शतक ते इ.स. पाचवे शतक यांमधील पर्यावरण हे जागतिक संस्कृतिसंवर्धनासाठी अत्यंत अनुकूल होते. या अनुकूलतेमुळे पैठणची वसाहत वेगाने वाढली. एका छोट्या केंद्राचे रूपांतर मोठ्या व्यापारीपेठेमध्ये, प्रशासकीय केंद्रामध्ये, कलाकेंद्रामध्ये, शिक्षण आणि संस्कृतीच्या सर्वांगाचा विचार करणाऱ्या केंद्रामध्ये झाले. सातवाहनांच्या, मोठ्या सत्तेच्या राजधानीचे शहर म्हणून पैठणला आंतरराष्ट्रीय महत्त्व आणि दर्जा मिळाला. पैठणचे आंतरराष्ट्रीय महत्त्व, वाढता व्यापार या संदर्भातील सप्रमाण सैद्धान्तिक मांडणी आपल्या संशोधनातून मोरवंचीकरांनी केली आहे.

सातवाहन, वाकाटक, राष्ट्रकूट, यादव, मुस्लीम आणि मराठे यांच्या कालखंडातील म्हणजे दोन-अडीच हजार वर्षांतील पैठणची विविध रूपे मोरवंचीकरांच्या संशोधनातून उजागर झाली आहेत. राजधानीचे शहर, एक आहार, एक भुक्ती म्हणून, एक आध्यात्मिक केंद्र, शैक्षणिक केंद्र, व्यापारी केंद्र अशा बहुपेडी, बहुआयामी व्यक्तिमत्त्वाचे एकमेव सांस्कृतिक केंद्र पैठण असल्यामुळे या बहुविध क्षेत्रांत विखुरलेले अनेकविध धागे मोरवंचीकरांनी एकत्र गुंफले. महाराष्ट्राच्या जडणघडणीमध्ये पैठणचे योगदान मोरवंचीकरांच्या संशोधनामुळे ठळकपणे अधोरेखित झाले. पैठणच्या संपन्न इतिहासाच्या अनेक पदरांना उलगडून दाखवणाऱ्या 'दक्षिण काशी पैठण' या मोरवंचीकरांच्या ग्रंथास इ.स. १९८९चा महाराष्ट्र शासनाचा उत्कृष्ट ग्रंथ निर्मितीचा पुरस्कार देऊन गौरवण्यात आले.

मोरवंचीकरांच्या 'सातवाहनकालीन महाराष्ट्र' या ग्रंथास महाराष्ट्र साहित्य परिषदेचा उत्कृष्ट वाङ्मय

निर्मितीचा पुरस्कार प्रदान करण्यात आला. मोरवंचीकरांचे संशोधन प्रामुख्याने सातवाहनाकालापासून सुरू होते. पैठणच्या परीसरात सातवाहनकालाचे भौतिक पुरावे फार मोठ्या प्रमाणात उपलब्ध झालेले आहेत. सातवाहन कालखंड हा भारतीय पातळीवरती अत्यंत महत्त्वाचा आणि वेगळा कालखंड मानला जातो. जागतिक संस्कृतिसंवर्धन आणि संस्कृति विकास यांसाठी अत्यंत अनुकूल असणाऱ्या या कालखंडात पैठण येथील एका छोट्या केंद्राचे रूपांतर सर्व अंगोपांगानी मोठ्या केंद्रामध्ये झाले. मोरवंचीकर यांच्या सैद्धान्तिक विवेचनामधून सातवाहनांचा आणि महाराष्ट्राचा अतूट अशा प्रकारचा संबंध अत्यंत प्रभावी पद्धतीने स्पष्ट होतो. त्यांच्या प्रतिपादनामध्ये सातवाहन कुठले आहे, त्यांचा कालखंड कोणता, यापेक्षा सातवाहनांचे योगदान काय, याची त्यांनी प्रामुख्याने चर्चा केली आहे. सातवाहनांच्या योगदानाचा महाराष्ट्राला इतका लाभ झाला आहे की, सातवाहन कालखंड महाराष्ट्राचे 'सुवर्णयुग' ठरावे अशी मांडणी ते करतात. सुवर्णयुगाची पर्यायाने समृद्धीची लक्षणे कोणती, हा मुद्दा स्पष्ट करताना ते असे म्हणतात की; एकंदर जनजीवनामध्ये कुठल्याही प्रकारची सामाजिक अथवा आर्थिक विषमता आढळून न येणे याला आपण समृद्धी मानायला हरकत नाही. सातवाहनांचा कालखंड अनुकूल पर्यावरणाचा कालखंड होता. संपूर्ण जगाचा विचार केल्यास इ.स.पूर्व पाचशे ते इ.स.पाचशे या हजार वर्षांच्या कालावधीमध्ये मानवाच्या सुदृढ वाटचालीसाठी पोषक असे वातावरण निर्माण झाले. पोषक पर्यावरणाच्या या अनुकूल पार्श्वभूमीवर जागतिक पातळीवर दोन साम्राज्ये निर्माण झाली होती. त्यांपैकी एक रोमन साम्राज्य आणि दुसरे सातवाहनांचे साम्राज्य. सातवाहन सम्राटांच्या संदर्भामध्ये मोरवंचीकरांनी मांडलेला पहिला सिद्धान्त असा आहे की, रोमन साम्राज्याशी आपण जवळीक साधू शकलो, आर्थिक आणि सांस्कृतिक देवाणघेवाण करू शकलो, तर आपलीही उन्नती होईल. आपला समाजसुद्धा समृद्ध आणि संपन्न असे जीवन जगू शकेल, असा विचार करणारे भारतातील सातवाहन हे अपवादात्मक एकमेव राजघराणे आहे. दुसऱ्या सिद्धन्तामध्ये मोरवंचीकर असे म्हणतात की, उपयुक्त भूमिकेला पोषक असे वातावरण निर्माण करण्याची नैतिक आणि भौतिक जबाबदारी सातवाहनांनी स्वीकारली होती. नैतिक या अर्थाने की, जिथे राजाश्रयाची गरज आहे, तिथे त्यांनी राजाश्रय उपलब्ध करून दिलेला आहे. भौतिक या दृष्टीकोनातून व्यापारवाढीला त्यांनी आवश्यक त्या सोयीसुविधा उपलब्ध करून दिलेल्या आहेत. रस्ते तयार करणे श्रेण्यांना नाणी पाडण्याचे स्वातंत्र्य देणे, स्वत:च्या नाण्यावर देखरेख करणे, चोरी, लबाडी, दरोडे यांपासून रक्षण करणे. सुदृढ समाज-संघटना निर्माण करणे त्याचप्रमाणे या संघटनांना धार्मिक जोड देता आली, तर तीही देणे असे कार्य सातवाहनांनी केले आहे. सातवाहनांचा कालखंड बौद्ध धर्माच्या महाराष्ट्रातील उत्कर्षाचा कालखंड आहे. त्याचप्रमाणे व्यापारवादाच्या उदयाचा आणि विकासाचा हा कालखंड आहे. सातवाहनांनी या दोघांमध्ये समन्वयाची भूमिका पार पाडली आहे. बौद्ध धर्मामुळे व्यापाराचा प्रसार झाला. त्याचप्रमाणे बौद्ध धर्मप्रचारकांनी व्यापारातील तंत्रज्ञान, नाण्यांमधले तंत्रज्ञान, लेण्यांमधले तंत्रज्ञान, कृषी तंत्रज्ञान, पाणी साठवण्यामधील तंत्रज्ञान यांचा प्रसार केला. या प्रसारामुळे आणि व्यापारवाढीमुळे सातवाहनांच्या कालखंडामध्ये महाराष्ट्राभर संपन्न अशी शहरे निर्माण झालेली दिसतात. या विवेचनामधून महाराष्ट्राचे खरे नागरीकरण सातवाहनांच्या कालखंडामध्ये झाले आहे असा निष्कर्ष मोरवंचीकर काढतात. सातवाहन कालखंडाच्या संदर्भात मोरवंचीकर या सर्वांच्या पाठीमागची मूलभूत बैठक व्यापारवादावर आधारित आहे असे म्हणतात. व्यापारवाद म्हणजे आयात कमी आणि निर्यात जास्त. सातवाहनांनी रोमनांच्या गरजा समजून घेतल्या आणि त्याप्रमाणे व्यापारी चळवळीला त्यांनी उत्तेजन दिले. त्यामुळे आयात कमी आणि निर्यात जास्त अशी स्थिती निर्माण करण्यामध्ये सातवाहन

म

यशस्वी ठरले. सातवाहनांच्या संदर्भामध्ये गुजरात, कर्नाटक, महाराष्ट्र, आंध्र या प्रदेशामध्ये उपलब्ध अवशेषांच्या आधारे मोरवंचीकर असे म्हणतात की, सातवाहनांचे जास्तीतजास्त अवशेष महाराष्ट्रात मिळालेले आहेत. त्यामुळे त्यांची जन्मभूमी महाराष्ट्र होती. प्रोटो महाराष्ट्रियन म्हणजे मराठीला जवळची अशी प्राकृत भाषा त्यांनी प्रामुख्याने वापरलेली आहे. महाराष्ट्राची अस्मिता, जडणघडण सातवाहनांच्या काळामध्ये फार मोठ्या प्रमाणावर झालेली आहे.

'सेवानिवृत्तीनंतर खऱ्या अर्थाने माझ्या संशोधनाला प्रारंभ झाला', असे 'भारतीय जलसंस्कृती स्वरूप आणि व्याप्ती' या ग्रंथाच्या मनोगतात त्यांनी नमूद केले आहे. या ग्रंथात पाणी आणि समाज, विभिन्न पातळीवरील त्यांचे नाते, नदी आणि समाज, सरोवर आणि समाज, पर्जन्य आणि समाज त्याचप्रमाणे विशेषत्वाने स्त्री, आदिम समाज, भटका समाज या सर्वांचे पाण्याशी असणाऱ्या नात्याचे धागे त्यांच्या हाती आले आहेत. पाणी व लोकधारा, पाणी व साहित्यधारा, जलव्यवस्थापन पद्धतीचे भारतभर विखुरलेले अवशेष, त्यामध्ये कालानुक्रमे व विभागनिहाय झालेली स्थित्यंतरे, आदींचा शोध 'भारतीय जलसंस्कृती: स्वरूप आणि व्याप्ती' या ग्रंथातून त्यांनी घेतला आहे. जल हे त्यांच्या चिंतनांचे मूलभूत सूत्र असून ते इतिहासलेखनाचे महत्त्वाचे साधन ठरू शकते, असा त्यांनी दावा केला आहे. मागील काही काळात त्यांनी भारतभर प्रवास करून शेकडो स्थळांना भेटी देऊन भारतीय इतिहासाच्या भिन्न कालखंडांतील जलसंस्कृतींचा व त्यांच्या भौतिक पुरावशेषांचा सर्वांगीण अभ्यास केला. त्याचप्रमाणे यूनेस्को पुरस्कृत जागतिक जल सहयोगितेच्या आंतरराष्ट्रीय जल परिषदेच्या व्यासपीठावरून भारतीय जल-संस्कृतीच्या विभिन्न पैलूंना उजागर केले आहे. वरील ग्रंथांच्या बरोबर मोरवंचीकरांचे -

★ Paithan Through the Ages (1985);

★ Devgiri-Daulatabad, Archaeological Overview (1993);

★ Paithany Romance in Brocades (1993);

★ Wood work of western India (1994)

'शुष्क नद्यांचा आक्रोश' (सुमेरू प्रकाशन), 'येई परतोनी ज्ञानदेवा', 'भीष्म', 'जैनांचे सांस्कृतिक योगदान', 'युगानुयुगे चांदवड' आदी ग्रंथ आणि जवळपास दोनशे शोधनिबंध प्रकाशित झाले आहेत.

अखिल महाराष्ट्र इतिहास परिषद, खानदेश इतिहास परिषद, मराठवाडा इतिहास परिषद, पुणे विद्यापीठ, इतिहास अध्यापक परिषद, जल साहित्य परिषद, (नागपूर अधिवेशन), बृहन्महाराष्ट्र प्राच्यविद्या परिषद अशा अनेक परिषदांची मोरवंचीकरांनी अध्यक्षपदे भूषवली आहेत. विद्यापीठ अनुदान मंडळाच्या विद्यमाने सांस्कृतिक आदान-प्रदान योजनेतर्गत इ.स.१९८७मध्ये युरोप, सायप्रस, इस्रायल आदी देशांस भेटी दिल्या आहेत. वैश्विक जल-सहभागिते अंतर्गत भारत सरकारच्या समन्वयात नेपाळला आणि बांगला देशाला त्यांनी भेटी दिल्या आहेत.

— प्रा. ओमप्रकाश समदाणी

**संदर्भ :**

१. *डॉ. रा. श्री. मोरवंचीकर गौरवग्रंथ, २००८.*

२. *डॉ. मोरवंचीकर रा. श्री., भारतीय जलसंस्कृतीः स्वरूप व व्याप्ती, सुमेरू प्रकाशन, २००६.*

## मोरे, शेषराव बापुराव

**विचारवंत, ग्रंथकार**

**१७ ऑगस्ट १९४८**

शिक्षणाची परंपरा नसलेल्या एका वतनदार पोलीस पाटलाच्या कुटुंबात विचारवंत शेषराव मोरे यांचा जन्म झाला. नांदेडपासून सव्वाशे कि.मी.वर असलेले जांब हे त्यांचे जन्मगाव. इतिहास व सामाजिक विषयाची शालेय जीवनापासून आवड. मात्र इतरांच्या आग्रहामुळे त्यांना विद्युत अभियांत्रिकीचे पदवीधर व पुढे प्राध्यापक व्हावे लागले. वीस वर्षे ही शासकीय सेवा केल्यानंतर त्यांनी १९९४मध्ये स्वेच्छानिवृत्ती घेतली. सेवेत असताना सामाजिक शास्त्राचा अभ्यास करण्यासाठी त्यांना आठ-

म



दहा तासच मिळत. आता भरपूर वेळ मिळू लागला. शालेय जीवनापासूनच वडिलांच्या प्रचंड धाकामुळे सतत अभ्यासात व्यग्र राहण्याची व गंभीर विषयावर विचार करण्याची सवय लागल्यामुळे खेळ, चित्रपट, दूरदर्शन, करमणूक व इतर गप्पागोष्टी वर्ज्य होत्या.

ज्या विषयावर ग्रंथलेखन करायचे आहे, त्या विषयावरील अधिकात अधिक ग्रंथसंग्रह करण्याची त्यांची पद्धत आहे. 'काश्मीर'वर लिहिण्यासाठी त्यांनी पुणे-मुंबईसहित जम्मू व दिल्लीतील सर्व विद्यापीठांतून दोनशेपेक्षा अधिक ग्रंथ मिळवले होते. १८५७च्या उठावासंबंधीही एवढेच ग्रंथ मिळवले. इस्लामवर व इस्लामच्या इतिहासावर सध्या त्यांच्याकडे दोन हजारांपेक्षाही अधिक ग्रंथ आहेत. ग्रंथ लेखनविषयावरील निवडक सहा-सात हजार ग्रंथांचा संग्रह त्यांच्याकडे आहे. यासाठी वडिलोपार्जित सर्व शेतजमीन त्यांनी विकून टाकली.

ग्रंथविषय निवडण्याचा त्यांचा एक विशिष्ट दृष्टीकोन आहे. तो विषय राष्ट्रीय वा सामाजिकदृष्ट्या आजच्याकरिता महत्त्वाचा असला पाहिजे. त्या विषयासंबंधी विचारवंतांनी व अभ्यासकांनी मांडलेली वा समाजात प्रचलित असलेली मते त्यांच्या दृष्टीने चुकीची असली पाहिजेत. विशेषतः अशा स्वरूपाच्या विषयासंबंधात मांडल्या जाणाऱ्या विसंगतीची चिकित्सा व स्पष्टीकरण हे त्यांच्या लेखनाचे मध्यवर्ती सूत्र आहे. यामुळे प्रचलित लोकप्रिय मतांपेक्षा वेगळे निष्कर्ष मांडणारे त्यांचे सर्व ग्रंथ समाजमनासाठी धक्कादायक ठरले. सावरकर एकाच वेळी प्रखर बुद्धिवादी व जाज्वल्य हिंदुत्ववादी कसे? या प्रथमदर्शनीच दिसणाऱ्या विसंगतीच्या अभ्यासातून 'सावरकरांचा बुद्धिवाद एक चिकित्सक अभ्यास' (इ.स. १९८८) या पहिल्याच ५६० पानी ग्रंथाचा जन्म झाला. सावरकरांनी आज वागण्यासाठी बुद्धिवाद, तर हिंदूंच्या न्याय हक्कांसाठी व हिंदूंचे एकत्व घडवण्यासाठी हिंदुत्व मांडले, हा त्यांचा ग्रंथनिष्कर्ष नवीन होता. सावरकरांच्या क्रांतिकारक समाजकारणाचे सत्य स्वरूप मांडून, त्यांच्या विरोधकांनी व अनुयायांनीही त्याचा कसा विपर्यास केला हे त्यांनी 'सावरकरांचे समाजकारण : सत्य आणि विपर्यास' (इ.स. १९९२) या ७०० पानी ग्रंथात सप्रमाण मांडले आहे. या दोन्ही ग्रंथांनी सावरकरांकडे व हिंदुत्वाकडेही पाहण्याची नवी दृष्टी दिली. यासंबंधात दोन विद्वानांनी दिलेले पुढील अभिप्राय उल्लेखनीय ठरतील. 'सावरकरांकडे इतक्या बुद्धिपूर्वक कुणी पाहिले नसेल' - डॉ. द.न. गोखले; 'त्यांनी खरे सावरकर उजेडात आणले' - डॉ. स.ह. देशपांडे ('दुसऱ्या पिढीचे आत्मकथन' (इ.स. २००८, पृ. ४५).

'काश्मीर : एक शापित नंदनवन' (इ.स. १९९५) हा त्यांचा ग्रंथ अशाच प्रकारे एक राष्ट्रीय विसंगतीचा शोध घेणारा आहे. मुस्लीम प्रश्न सोडवण्यासाठी आपण फाळणी करतो, परंतु पाकिस्तानला लागून असलेला मुस्लीम काश्मीर भारतात ठेवून घेतो या विसंगतीची व काश्मीरच्या मूळ समस्येची खरी कहाणी सांगणारा हा ग्रंथ आहे. काश्मीर प्रश्न हा मूलतः मुस्लीम प्रश्न असून एकूण भारतीय मुस्लीम प्रश्न- एवढेच नव्हे, तर जागतिक मुस्लीम प्रश्न सोडवण्यावर त्याची सोडवणूक अवलंबून आहे, असे त्यांचे म्हणणे आहे.

हिंदू धर्माचा गौरव करणारे व हिंदू संघटनेचे राष्ट्रीय महत्त्व सांगणारे डॉ. आंबेडकर इ.स. १९३५नंतर नेमके याविरुद्ध का बोलू लागले? त्यांच्या विचारात व धोरणात कशी परिवर्तने होत गेली, याची अभ्यासपूर्ण मांडणी करण्यासाठी त्यांनी 'डॉ. आंबेडकरांचे सामाजिक धोरण : एक अभ्यास' (इ.स. १९९८) हा ग्रंथ लिहिला. ग्रंथाच्या मूळ नावात 'परिवर्तने' असा शब्द होता; पण ग्रंथ स्फोटक वाटू नये, म्हणून नंतर नाव बदलण्यात आले व त्याचमुळे हा बहुमोल ग्रंथ बहुतांशी दुर्लक्षित झाला, असे म्हणावे लागेल. इस्लाम शांतता, अहिंसा, संयम, सहिष्णुता, बंधुता अशा मानवी मूल्यांची शिकवण देतो,

त्याचप्रमाणे आक्रमकता, जिहाद, तलवार यांचीही शिकवण देतो, असे कुराणाचेच आधार देऊन सांगितले जाते. यातील विसंगतीचा शोध घेण्यासाठी मूळ इस्लामचा सखोल अभ्यास व त्यातून निष्पन्न झालेला 'मुस्लीम मनाचा शोध' (इ.स. २०००) हा ७८४ पानी ग्रंथ म्हणजे मोरे यांनी हिंदूंना दिलेली एक देणगी मानावी लागेल. पैगंबरांच्या अनुयायांची संख्या अल्प असताना मक्का-काळात यातील पहिल्या प्रकारची, तर सामर्थ्य वाढल्यानंतरच्या मदिना-काळात दुसऱ्या प्रकारची शिकवण कुराणात आली आहे, हे त्यांनी दाखवून दिले आहे. अल्लाचा संदेश (म्हणजे इस्लाम) न मानणाऱ्यांना अल्लाच्या पृथ्वीवर राहण्याचा हक्क नाही, हे इस्लामी तत्त्वही त्यांनी स्पष्ट करून सांगितले आहे. या ग्रंथाचे इंग्लिश भाषांतर 'Islam Maker of the Muslim Mind' (2004) या नावाने प्रसिद्ध झाले आहे. पाच मुस्लीम पंडितांनी ६१ पानी प्रस्तावना लिहून या ग्रंथाचा पुरस्कार केला आहे.

इस्लामप्रमाणे 'इस्लामचा इतिहास' लिहिण्याचे ठरवून त्यांनी 'प्रेषितांनंतरचे चार आदर्श खलिफा' (अर्थात इस्लामचा सुवर्णकाळ) (इ.स. २००६) हा ६५६ पानी ग्रंथ लिहिला. या चार खलिफांना (अबू बकर, उमर, उस्मान व अली यांनी) इस्लाममध्ये प्रेषितांच्या खालोखाल प्रमाण व श्रद्धेय मानले जाते. या खलिफांच्या काळाप्रमाणे आदर्श इस्लामी राज्य स्थापन करण्याची आकांक्षा सर्व काळातील मुसलमान बाळगून असतात. या खलिफांच्या काळातच (इ.स. ६३२-६६१) पर्शियाचे पूर्ण पर्शियन व अर्धे रोमन साम्राज्य नष्ट होऊन तेथे इस्लामी राज्य कसे स्थापन झाले, याचा रोमहर्षक, रक्तलांछित व उद्बोधक इतिहास या ग्रंथात आहे. १९४७च्या स्वातंत्र्यासाठी हिंदू-मुस्लीम ऐक्य झाले नाही, मात्र तोच इंग्रज शत्रू असताना १८५७च्या उठावात ते ऐक्य कसे झाले, या विसंगतीच्या अभ्यासावरून '१८५७चा जिहाद' (इ.स.२००७) हा ग्रंथ जन्मास आला. 'मुस्लीम साम्राज्याची पुनःस्थापना करण्यासाठी मुस्लिमांनी केलेला हा जिहाद होता' हा डॉ. आंबेडकरांनी १९४० साली मांडलेला निष्कर्ष पुराव्यांनी सिद्ध करणारा हा ग्रंथ आहे. मूलतः हा उठाव परकीयांविरुद्ध नव्हता, तर काफिरांविरुद्ध होता; ब्रिटिशांपूर्वी तो शिखांविरुद्ध व मराठ्यांविरुद्ध झाला होता. काफिरांच्या राज्यावर (यात सेक्युलर राज्यही आले.) मुसलमान निष्ठा ठेवू शकतात काय? हा मूलभूत प्रश्न या उठावाशी संबंधित आहे. (या ग्रंथाचे इंग्लिश भाषांतर 'The 1857 Jihand' नुकतेच दिल्लीच्या मानस पब्लिकेशन्सने प्रसिद्ध केले आहे.) त्याच्या पुढील (२०१२) ग्रंथ म्हणजे 'काँग्रेसने व गांधीजींनी अखंड भारत का नाकारला?' हा होय.

अप्रिय पण सत्य व हितकारक लिहिणे हा त्यांचा पिंडच आहे. 'अप्रिय पण..' या नावाने त्यांनी तीन वर्षे सामना दैनिकात स्तंभलेखन केले, ते त्याच नावाने दोन ग्रंथ भागात प्रसिद्ध झाले आहे. 'विचार कलह' या नावानेही त्यांचे दोन ग्रंथ भाग प्रसिद्ध झाले आहेत. त्यांनीही कलह माजवलाच आहे. शेषराव मोरे काही वर्षे म. रा. साहित्य संस्कृती मंडळाचे सदस्य होते. ते म.रा. दर्शनिका मंडळाचेही सदस्य होते. त्यांच्या चार ग्रंथांना राज्य शासनाचे ग्रंथ-पुरस्कार मिळाले आहेत. नांदेडकरांनी त्यांना 'नांदेडभूषण' पुरस्कार देऊन गौरवले आहे. २०१५च्या अंदमान येथे भरलेल्या ४थ्या विश्वमराठी साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते.

— अरविंद बाळ

**संदर्भ :**

१) *'दुसऱ्या पिढीचे आत्मकथन, - २००८; मुंबई साहित्य संघ प्रकाशन.*



## मोल्सवर्थ, जेम्स टी.

**कोशकार**

**१७९५ – १३ जुलै १८७२**

आद्य मराठी शब्दकोशकारांपैकी एक असलेल्या जेम्स टी. मोल्सवर्थ यांचा १५ जून १७९५ रोजी बाप्तिस्मा झाला. एक्झीटर (डेव्हन) येथे त्यांचे शिक्षण झाले. त्यानंतर लष्करात भरती होऊन ते भारतात आले.

१८१४मध्ये मराठी आणि हिंदुस्थानी या दोन भाषांची परीक्षा दिली. संस्कृत, फार्सी, लॅटिन, ग्रीक या भाषाही त्यांना अवगत होत्या. नेटिव्ह इन्फन्ट्रीच्या नवव्या रेजिमेंटमध्ये भाषाभिज्ञ म्हणून त्यांची निवड झाली. १८३७मध्ये ते लष्करी सेवेतून मुक्त झाले.

मोल्सवर्थ यांचे महत्त्वपूर्ण कार्य म्हणजे त्यांनी १८३१मध्ये 'ए डिक्शनरी ऑफ मराठी अँड इंग्लिश' या नावाने तयार केलेला मराठी–इंग्रजी शब्दकोश हे होय. या कोशापूर्वीच्या शब्दकोशरचनेचा साक्षेपाने उपयोग करून घेऊन, तसेच सामूहिक कार्यपद्धतीचा अवलंब करून मोल्सवर्थ यांनी हा कोश तयार केला. संस्कृत, फार्सी, अरबी, हिंदुस्थानी तसेच ग्रामीण व अश्लील शब्दही या कोशनिर्मितीसाठी त्यांनी विचारात घेतले आणि सुमारे ४० हजार शब्द पहिल्या आवृत्तीसाठी निवडले. सुमारे सहा वर्षांच्या परिश्रमानंतर हा शब्दकोश पूर्ण झाला. या कामी त्यांना जॉर्ज आणि टॉमस या कँडी बंधूंचे, तसेच तत्कालीन काही विद्वान शास्त्री मंडळींचे साहाय्य लाभले. शब्दसंख्या, शब्दार्थ, अधिकृतता इत्यादी दृष्टींनी हा कोश महत्त्वाचा आहे. तथापि, मराठी शब्दांचे अर्थ व माहिती त्यात इंग्रजीतून दिलेली असल्याने निव्वळ मराठी भाषा जाणणाऱ्यांसाठी मात्र त्याचा तितकासा उपयोग नाही. मात्र या कोशामुळे महाराष्ट्रात शब्दकोशरचनेचा पाया घातला गेला, हेही तितकेच खरे. १८५७मध्ये या कोशाची दुसरी आवृत्ती निघाली. त्यासाठी १८३५मध्ये इंग्लंडला परत गेलेले मोल्सवर्थ मुद्दाम भारतात आले होते. या आवृत्तीत सुमारे ६० हजार शब्द आहेत.

इंग्रजी–मराठी शब्दकोशाचे कामही मोल्सवर्थ यांनी हाती घेतले होते. पण प्रकृती अस्वास्थ्यामुळे ते पूर्ण करणे त्यांना शक्य झाले नाही. त्यांच्या मृत्यूनंतर टॉमस कँडी यांनी तो पूर्ण केला. 'पापपीडितास शांती' (१८२९) आणि 'ज्ञानमार्गाची सूचना' (१८४९) या दोन ख्रिस्तिधर्मपर पुस्तिका त्यांनी लिहिल्या आहेत.

– संपादित

**संदर्भ :**

१. *अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*

***

म

# य

## यार्दी, मधुकर रामराव

**ग्रंथपाल, संशोधक, केंद्रीय वित्त सचिव**

**२२ ऑगस्ट १९१६ – २० ऑगस्ट २००१**

***☛ मुख्य चरित्रनोंद - प्रशासन खंड***



राज्य सरकार आणि केंद्र सरकारकडे सनदी अधिकारी म्हणून काम करूनही, संस्कृत व संत साहित्यामध्ये रस घेऊन, त्यावर संशोधनात्मक काम करून पुण्याच्या भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्थेच्या कार्यात सातत्याने गाजलेले विद्वान म्हणजेच मधुकर रामराव यार्दी. गणित आणि स्टॅटिस्टिक विषयांवर प्रभुत्व असून त्याच्या वापरामुळे त्यांची सिद्धान्त मांडण्याची पद्धती आणि त्यामुळे भांडारकर परंपरेत ते वेगळेपणाने सन्मानित झाले. ग्रंथपाल या नात्याने भांडारकर संस्थेशी सतत तीस वर्षे त्यांचा संबंध आला. मधुकर रामराव यार्दी यांचा जन्म कारवार येथे झाला. कारवारचे हिंदू हायस्कूल, धुळ्याचे गरुड हायस्कूल या ठिकाणी प्राथमिक व माध्यमिक शिक्षण झाले. धुळ्याच्या हायस्कूलमध्ये श्री. वि.ह. निजसुरे या शिक्षकांनी त्यांना संस्कृतची गोडी लावली. पुण्यात फर्गसन महाविद्यालयात पदवीसाठी दाखल झाले, त्या वेळी डॉ. रा.ना. दांडेकर यांचे मार्गदर्शन मिळाले. मॅट्रिकमध्ये जगन्नाथ शंकरशेठ ही संस्कृत विषयाची सन्माननीय शिष्यवृत्ती त्यांनी मिळवली. बी.ए.च्या परीक्षेत मुंबई विद्यापीठात सर्वप्रथम येण्याचा विक्रम करून कुलपतीचे एलिस प्राइजही प्राप्त केले (१९३७). एम.ए.ला पुन्हा मुंबई विद्यापीठात सर्वप्रथम आले (१९३९) आणि चॅन्सेलर मेडलही त्यांनी मिळवले. गणित आणि संख्याशास्त्र हे त्यांचे आवडीचे विषय आणि त्यासाठी स.प. महाविद्यालयाचे प्रा. द.वा. केरकर आणि आंतरराष्ट्रीय कीर्तीचे विद्वान डॉ. दा.ध. कोसंबी यांचे त्यांना मार्गदर्शन लाभले. संस्कृत विषय घेऊन १९४०मध्ये आय.सी.एस. परीक्षेला ते सर्वप्रथम आले.

सनदी नोकरीत, पुणे-नाशिक कलेक्टर, राज्य सरकारचे विकास आयुक्त, नियोजन सचिव, अर्थसचिव अशी पदे भूषवून ते पुढे केंद्र सरकारच्या अखत्यारीत अर्थखात्याचे संयुक्त सचिव, गृह खात्याचे अतिरिक्त सचिव, अर्थखात्याचे सचिव इत्यादी पदे यशस्वीरीत्या गाजवून ते १९७४मध्ये सेवानिवृत्त झाले. आय.सी.एस. अधिकारी कधी निवृत्त होत नाही. नोकरीनंतर सरकार त्यांची विविध समित्यांवर नेमणूक करते आणि त्यांच्या अनुभवाचा उपयोग करून घेते, पण ही सर्व प्रलोभने सोडून यार्दी पुण्यात आले. नाशिकला जिल्हाधिकारी असताना त्यांनी करवीर पीठाचे शंकराचार्य आचार्य कुर्तकोटी यांच्याकडे, सिद्धान्त कौमुदी, ब्रह्मसूत्र आणि त्यावरील शांकरभाष्य यांचे नियमितपणे अध्ययन केले तर पुण्याला परतल्यावर मार्क्सवादी, डॉ. दामोदर धर्मानंद कोसंबी यांच्याकडे गणित आणि संख्याशास्त्र यांचा अधिक अभ्यास केला. निवृत्त यार्दींची नियुक्ती श्री क्षेत्र आळंदीच्या विश्वस्तपदी झाली. वयाच्या सत्तरीपर्यंत सोहळाप्रमुख, मुख्य विश्वस्त, ज्ञानेश्वर प्रतिष्ठानचे अध्यक्ष या माध्यमातून माउलींच्या सेवेतून त्यांनी अनेक सुधारणा घडवून आणल्या. नियम तयार केले, जे आजवर मार्गदर्शक ठरले आहेत. याच काळात त्यांना श्रीज्ञानेश्वरीची गोडी लागली. त्यातून नित्य पारायणाची सवय त्यांनी लावून घेतली. रोज काही ओव्या ते श्रद्धेने

वाचत असत. पुण्यामध्ये कन्हैयालाल मुन्शींच्या भारतीय विद्याभवनची शाखा निघणार होती. मुंबईच्या मुख्यालयामधून यार्दी यांची नेमणूक झाली.

शून्यातून सध्याची प्रचंड वास्तू आणि कार्य त्यांनी निर्माण केले. सेनापती बापट रस्त्यावरील भव्य वास्तू; सरदार नातू सभागृह, शिशु-प्राथमिक-माध्यमिक शाळा, परुळेकर पत्रकारिता वर्ग, आय.ए.एस.चे वर्ग, संगणक प्रशिक्षण, वि. ग. भिडे यांच्या मदतीने उभी केलेली शास्त्रीय उपकरणाची विज्ञान शाळा आणि प्र. न. जोशी प्राचीन मराठी अभ्यास केंद्र असे या संस्थेचे आजचे विशाल स्वरूप आहे. प्राचीन भारतीय कीर्तन परंपरेचा वारसा जतन करण्यासाठी आळंदी क्षेत्री कीर्तन महाविद्यालय स्थापन केले. दुर्दैवाने ५-६ वर्षांनंतर ते विद्यार्थ्यांच्या अभावी बंद करण्यात आले. अतिशय नेटक्या कार्यप्रणालीइतकीच त्यांना संशोधनाची आस्था होती. 'योग ऑफ पतंजली' (१९७९), महाभारत इट्स जेनेसीस ॲन्ड ग्रोथ, ए स्टॅटिस्टिकल स्टडी, 'भगवद्‌गीता ॲज ए सिंथेसिस', 'रामायण इट्स ओरिजिन ॲन्ड ग्रोथ', 'शांकरभाष्य ऑन ब्रह्मसूत्र', 'गीतामाय' आणि सर्वांत कळस म्हणजे भावार्थ दीपिका, ज्ञानेश्वरीचे इंग्लिश-मराठी-हिंदी भाषांतर, दोन वर्षे सतत प्रतिदिनी सहा तास काम करून, पदरचे दीड-दोन लक्ष रुपये खर्च करून प्रचंड काम उभे केले. आज लोकप्रियतेमुळे या ग्रंथांच्या सतत आवृत्त्या निघत आहेत. ही सर्व संशोधनात्मक ग्रंथ निर्मिती म्हणजे एक 'डी.लिट्.'ची योग्यता असलेले साहित्य; पण यार्दींची ही सेवा निष्काम होती.




ज्ञानेश्वरी सप्त-शताब्दी वर्षात इंग्लिश (आंतरराष्ट्रीय), हिंदी (भारतीय), मराठी (महाराष्ट्रीय) अशा तीन भाषांतून वाचकांना उपलब्ध करून देण्यासाठी दोन वर्षे सतत प्रतिदिन सहा तास काम करत. एखादा शब्द अडला, तर लगेच फोन करून भांडारकर संस्थेच्या ग्रंथालयाची मदत घेत. एकूण तीन हजार फुलस्केप पानांची मुद्रणप्रत, अठराशे छापील पानांत रूपांतरित झाली. त्याच काळात त्यांच्यावर मोतीबिंदूची शस्त्रक्रिया झाली. हृदयविकाराचा थोडा त्रास झाला, पण निष्ठेने आणि ज्ञानेश्वर माउलींच्या कृपेने काम तडीस गेले. केवळ भारतीय विद्याभवनाचे पुणे केंद्राचे ते संचालक नव्हते, तर डॉ. रा. ना. दांडेकरांच्या आग्रहावरून भांडारकर संस्थेच्या कार्यकारी मंडळाचे सदस्य आणि काही काळ अध्यक्षही होते. याखेरीज अन्य सामाजिक संस्थांनाही त्यांची नेहमी मदत असे. त्यामध्ये रामकृष्ण आश्रम, विवेकानंद केंद्र, शारदामाता केंद्र हे प्रामुख्याने येतात. संशोधनाच्या कामासाठी ते डॉ. रा. ना. दांडेकरांशी प्राच्यविद्या आणि डॉ. डी. डी. कोसांबींशी संख्याशास्त्र या विषयासाठी नित्य संपर्क साधत असत.

त्यांच्या संशोधनातील महत्त्वाची सूत्रे अशी : १) ज्ञान-भक्ति-कर्म या तिन्ही योगांचा पुरस्कार गीतेने केला आहे. गीता एका लेखकाने म्हणजे सौतीने (उग्रश्रवस्) तयार केली. शौनक म्हणजे भार्गवकुलाकडून त्याला प्रोत्साहन मिळाले. श्रीकृष्ण-नीती भार्गवकुलाच्या संपर्कातून सौतीने मांडली. २) सतत दहा वर्षे महाभारताच्या चिकित्सक आवृत्तीचा अभ्यास करून, त्याच्या अनुष्टुप् छंदाचा संख्याशास्त्राने विचार करून महाभारताचा काळ आणि केवळ व्यासांचे कर्तृत्व इतकेच नव्हे तर जय-भारत-महाभारत अशा तीन स्वरूपात ग्रंथ वाढवणाऱ्या व्यासपरंपरेचे कर्तृत्व त्यांनी मांडले आहे. ३) संख्याशास्त्राची पद्धती वापरून एके काळी त्यांनी शेक्सपीयरच्या नाटकावर 'क्रोनालॉजी ऑफ शेक्सपीयर्स प्लेज' नावाचा ग्रंथ लिहिला होता. त्याच पद्धतीचा उपयोग रामायण-महाभारत-लेखनाच्या विश्लेषणात त्यांनी केला. हे सर्व ग्रंथ भांडारकर संस्था आणि भारतीय विद्याभवन यांनी छापले आहेत. अशा एका कर्तृत्वसंपन्न जीवनाचा पुण्यात शेवट झाला.

—वा. ल. मंजूळ

***

# र

**राजगुरू, शरद नरहर**
**भूपुरातत्त्वशास्त्रज्ञ**
**२६ नोव्हेंबर १९३३**
☛ ***मुख्य चरित्रनोंद - विज्ञान व तंत्रज्ञान खंड***



ईश्वरी प्रेम, कर्मवाद, प्रामाणिकपणा, संशोधनात लागणारे धैर्य, आपल्याला न पटणाऱ्या विचारांनाही मान देणे, हे मी माझ्या विद्यार्थ्यांकडून शिकलो असे प्रांजळपणे मानणारे विद्यार्थिप्रिय शिक्षक भूपुरातत्त्वशास्त्रज्ञ (जिओआर्किऑलॉजिस्ट) डॉ. शरद राजगुरू, यांचे कार्यक्षेत्र प्राचीन मानवाच्या विकासाची विविध स्थित्यंतरे, संस्कृतीची जडणघडण होत असताना निसर्गाची तत्कालीन भूमिका कशा स्वरूपाची होती याबाबतची कारणमीमांसा व त्या अनुषंगाने संशोधन, असे राहिले.

मोसमी वाऱ्यांचे लहरीपण या विषयापासून ते लाव्हारसाचा उद्रेक व त्याचे प्राचीन तसेच अर्वाचीन संस्कृतीवर दिसून येणारे परिणाम व त्याची व्याप्ती हा त्यांच्या संशोधनाचा व अनेक व्याख्यानांचा विषय त्यांच्या जीवनाचा अविभाज्य घटक ठरला.

शाळकरी मुलामुलींचे वर्ग असो की, पुरातत्त्व वा भूगर्भशास्त्राच्या पदव्युत्तर विद्यार्थांकरता नियमित अभ्यासक्रमाची तासिका असो वा अन्य विद्वत सभा असो, सोप्या बोलीभाषेत विषयाचा गाभा स्पष्ट करत असताना किमान दोन-तीन प्रसंगी विषयाचे गांभीर्य राखून हास्यविनोदाचाही त्यात समावेश करणे, अशी ही राजगुरू शैली म्हणून ओळखली जाते. स्पष्टवक्तेपणाच्या जोडीला वस्तुनिष्ठ पुरावा असल्याशिवाय ते कुठलेही विधान करत नाहीत, तसेच इतरांनी केलेल्या पुरावाविरहित अशास्त्रीय विधानांनी ते अस्वस्थ तर होतातच, एवढेच नाही तर त्यावर योग्य ते भाष्य केल्याशिवाय त्यांना चैन पडत नाही. त्याकरता मित्र वा सहकारी वर्ग दुरावतील तसेच हित वा अहित याचा विचार त्यांच्या मनातही डोकावत नाही.

अशा स्वरूपाच्या त्यांच्या संशोधनाच्या कार्यपद्धतीमुळे डेक्कन महाविद्यालयामध्ये कार्यरत असतानाच्या कालावधीत, १९९३पर्यंत तसेच तद्‌नंतर आजतागायत झालेले संशोधन हे मूलभूतस्वरूपाचे व भावी संशोधकांना दिशादर्शक व प्रेरणादायी ठरले आहे. हे संशोधन लोकाभिमुख करण्यासाठी भारतात व भारताबाहेर आजही अखंड पायपीट करताना त्यांना निसर्गाने विशेष ऊर्जा व उत्तम आरोग्य दिले आहे व कुटुंबाचे पाठबळही मिळाले आहे.

शरद नरहर राजगुरू यांचा जन्म पुणे येथे झाला. पुण्यात शालेय शिक्षण घेत असतानाच शिक्षक होण्याचे स्वप्न व निसर्गाच्या सान्निध्यात भटकंतीची तीव्र इच्छा उराशी बाळगून त्यांनी जीवनाची वाटचाल केली आणि म्हणूनच १९५७मध्ये भूगर्भशास्त्र हा विषय घेऊन पुणे विद्यापीठातून पदव्युत्तर शिक्षण व त्यानंतर पीएच.डी. पदवीच्या निमित्ताने, तसेच शिक्षकाच्या भूमिकेत; कालांतराने प्राध्यापक, विभाग प्रमुख व संस्थेच्या सह-संचालकाच्या भूमिकेत पुणे येथील डेक्कन महाविद्यालयामध्ये दीर्घ काळ संशोधनाची संधी त्यांना प्राप्त झाली. डॉ. हसमुख सांकलियांसारख्या संशोधकाच्या व विद्यार्थिवर्गाच्या सान्निध्यात मानवी

र

विकासाचा पाया व विकासाची जडणघडण व प्राचीन काळातील निसर्गाचे स्वरूप जाणून घेण्यात त्यांनी सर्वस्व पणाला लावले.

पंधराहून अधिक पीएच.डी. दर्जाचे संशोधक त्यांच्या मार्गदर्शनाखाली तयार झाले, नव्हे एक संशोधकाची पिढी घडवण्यात राजगुरूंना यश प्राप्त झाले. हे नवे संशोधक भारतात व भारताबाहेर उपलब्ध साधनसामग्री व अनुदान यांनुसार त्यांच्या संशोधनात गर्क आहेत. असे असले तरी गुरुवर्यांचा सहवास व त्यातून निर्माण होणारे संशोधनपूरक वातावरण विद्यार्थ्यांना कायम हवेहवेसे वाटते. यातूनच राजगुरूंची भटकंती भारतातील सर्व प्रांतांत तसेच भारताशेजारील राष्ट्रांमध्ये झाली. यात बांग्लादेशाचा विशेष उल्लेख करता येईल. हे भटकंतीचे सत्र आजही चालू आहे. सखोल संशोधनाकरता प्रामुख्याने त्यांनी महाराष्ट्र, मध्य प्रदेश, सौराष्ट्र व राजस्थानचे वाळवंट निवडले. सौराष्ट्राच्या किनारपट्टीवरची मानवी संस्कृती आणि समुद्रपातळीतील बदल यांवर त्यांचे संशोधन महत्त्वाचे मानले जाते. त्याचप्रमाणे भूकंपदृष्ट्या अस्थिरभूमी, मान्सून प्रणालीतील पावसाचा चढउतार, नद्यांचे पूर आणि समुद्रपातळीतील बदलांबाबतचे त्यांचे संशोधन राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय पातळीवरील शोधपत्रिकांमध्ये प्रसिद्ध झाले आहेत.

राजस्थानचे वाळवंट तसेच ऑस्ट्रेलिया, अरिझोना, इराण येथील वाळवंटांचा अभ्यास हा त्यांचा आवडीचा विषय. डॉ. राजगुरू व त्यांचे सहाध्यायी आणि संशोधक विद्यार्थी यांच्या संयुक्त संशोधनामुळे मान्सूनच्या पावसाच्या प्रमाणात गेल्या दोन लाख वर्षांत झालेल्या बदलाबाबत बरीच नवीन माहिती उजेडात आली आहे व ती आजच्या काही जटिल समस्यांची सोडवणूक करण्यास महत्त्वपूर्ण ठरेल. आजचे पर्यावरणाच्या संदर्भातील प्रश्न सोडवायचे असतील, तर त्याला प्राचीन पर्यावरणाची माहिती आवश्यक आहे, (पास्ट इज की टू फ्यूचर), असे डॉ. राजगुरू मानतात.

संशोधनाला पूरक असे त्यांचे हस्ताक्षर होय. पत्र अथवा नोंदी देवनागरीतील असोत की रोमन लिपीतील त्यांतील नीटनेटके व सौंदर्यपूर्ण, आखीव-रेखीव असे त्यांचे हस्ताक्षर आहे. मानसन्मानाने वा संस्थेत काही विशेष अधिकार प्राप्त झाल्याने त्यांच्या वागण्या-बोलण्यात कधीही वेगळेपणाचा वा ज्येष्ठ-कनिष्ठ भावनांचा कधी स्पर्श झाला नाही, हा त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा एक महत्त्वपूर्ण पैलू मानला जातो.

डेक्कन महाविद्यालयामध्ये कार्यरत असताना व निवृत्तीनंतरच्या काळातील संशोधन-कार्यपद्धती यांत तिळमात्र फरक नाही आणि त्याचा परिपाक म्हणून त्यांना विविध असामान्य मानसन्मान प्राप्त झाले. यांतील इन्का फेलो हा सन्मान भारतीय उपखंडातील क्वाटर्नरी या कालखंडासंबंधातील संशोधनात सातत्य (सस्टेन्ड रिसर्च) असल्याने दिला गेल्याची नोंद १९२८पासून कार्यरत असलेल्या इंटरनॅशनल युनियन फॉर क्वाटर्नरी रिसर्च (इन्का) या संस्थेच्या मार्च २०१२मध्ये प्रसिद्ध केलेल्या गौरवपत्रात आढळते.

दर चार वर्षांतून एकदा ही संस्था कॉटर्नरी रिसर्च या क्षेत्रात असामान्य संशोधन करणाऱ्या संशोधकांना सन्मान्य फेलो निवडते. स्वित्झर्लंड येथील बर्न येथे जुलै २०११मध्ये झालेल्या १८व्या काँग्रेसमध्ये डॉ. राजगुरूंना या सन्मानाकरता निवडले. या काँग्रेसला सुमारे २१०० प्रतिनिधी उपस्थित होते. हा आंतरराष्ट्रीय दर्जाचा सन्मान प्राप्त झालेले ते पहिले भारतीय ठरले आहेत. या सन्मानाव्यतिरिक्त त्यांना नॅशनल ॲकॅडमी ऑफ सायन्सेस (अलाहाबाद), संस्थेचा फेलोशिपचा सन्मान १९८६मध्ये प्राप्त झाला; तर २००५मध्ये त्यांना भूपुरातत्त्वशास्त्रातील योगदानाबद्दल बेंगाल एशियाटिक सोसायटीचे सुवर्णपदक प्रदान केले गेले. पन्नास वर्षांहून अधिक काळ त्यांनी संशोधनात व्यतीत केला आहे. या दीर्घ संशोधनाच्या वाटचालीत त्यांनी अनेक देशांना भेटी दिल्या. यांत अमेरिका, ऑस्ट्रेलिया, जपान, चीन, इस्त्रायल इत्यादींचा समावेश आहे.

— डॉ. प्रकाश जोशी

र

## राजवाडे, विश्वनाथ काशिनाथ
**इतिहासाचार्य, लेखक**
**१२ जुलै १८६४ – ३१ डिसेंबर १९२६**



छत्रपती श्रीशिवाजी-महाराजांच्या काळी या घराण्यातील कोणी गृहस्थ महाराजांच्या पदरी, राजवाड्यातील खासगी नोकरीवर होता. त्यामुळे या घराण्याचे नाव 'राजवाडे' पडले असे काही जण म्हणतात. कोकणात 'राजवाडी' नावाचे गाव आहे. या गावावरून घराण्यास 'राजवाडे' हे नाव पडले असावे असे शंकर रामचंद्र राजवाडे यांचे मत आहे.

राजवाडे घराण्याचे गोत्र शांडिल्य आहे. निंबे हे या घराण्याचे कोकणातील मूळ गाव आहे. कित्येक वर्षांपूर्वी ऐतिहासिक कागदपत्रांचे संशोधन करण्यासाठी वि. का. राजवाड्यांनी कोकणात प्रवेश केला. ठिकठिकाणच्या घराण्यांच्या मुख्यांकडून जुने कागदपत्र मिळवले. त्यांना तिथे गावासंबंधी काही जुने कागदपत्र मिळाले. ते राजवाडे संशोधन मंदिरात अजूनही सुरक्षित आहेत.

राजवाड्यांच्या पणज्याचे नाव काशीनाथ. आज्याचे नाव बापजी, वडिलांचे नाव काशीनाथ होय. राजवाड्यांचे मातुल घराणे कोकणातील वरसाई गावचे.

त्यांना एक वडील भाऊ होता, त्याचे नाव वैजनाथ. पुढे हेच वैजनाथ 'अहिताग्नि राजवाडे' म्हणून प्रसिद्ध झाले. वैजनाथ व विश्वनाथ यांचे प्राथमिक शिक्षण शनिवारातील रामभाऊ जोगळेकर यांच्या तिसऱ्या क्रमांकाच्या वाड्यासमोरील भाव्यांच्या शाळेत झाले. डेक्कन महाविद्यालयामधून मुंबई विश्वविद्यालयाची बी.ए.ची परीक्षा त्यांनी दिली. राजवाड्यांचे वडील पुण्यास वकिलीचा व्यवसाय करत. राजवाडे कुटुंबाची सांपत्तिक स्थिती अगदी सामान्य प्रकारची होती. राजवाडे यांचे लग्न इ.स.१८८८मध्ये पुणे येथील विष्णू नारायण गोडबोले यांच्या मुलीशी झाले. बायकोचे माहेरचे नाव मंथूताई व सासरचे नाव अन्नपूर्णा होते. सन १८९१मध्ये, मार्च महिन्यात त्यांना एक मुलगा झाला. पण तो दोन महिन्यांचा असतानाच वारला. अन्नपूर्णांचे दुसरे बाळंतपण हे अपुरे दिवसांचे झाले. इ.स.१८९२ साली एक मुलगी झाली पण प्रसूतीनंतर अन्नपूर्णा बाई व नूतन जन्मलेल्या मुलीचा अंत झाला.

इ.स.१८८६ पासून म्हणजे मुळाक्षरे गिरविण्यापासून ते १८९० पर्यंत त्यांनी अनेक शाळा बदलल्या व उच्च शिक्षणार्थ डेक्कन महाविद्यालयात प्रवेश केल्यानंतरही त्यांची कधी वर्गात नियमित हजेरी नव्हती. पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये त्यांनी काही दिवस शिक्षकाची नोकरी केली. पण इ.स.१८९२च्या ऑगस्टमध्ये त्या जागेचाही राजीनामा दिला.

आता राजवाड्यांचा, अस्सल व विश्वसनीय इतिहाससाधने शोधण्याच्या धडपडीला प्रारंभ झाला. कोल्हापूर येथे कै. अण्णा विजापूरकर यांनी 'समर्थ' वर्तमानपत्र काढायला प्रारंभ केल्यानंतर राजवाडे यांचे बरेच लेख त्यातून प्रसिद्ध झाले.

जानेवारी १८९४मध्ये राजवाड्यांनी 'भाषांतर मासिक' सुरू केले. हे मासिक इ.स.१८९७पर्यंत चालले व पुढे बंद पडले. इ.स.१८९५मध्ये श्रीमंत सर सयाजीराव गायकवाड यांनी 'भाषांतर' मासिकाच्या प्रती दरसाल विकत घेण्याचा उपक्रम सुरू केला. त्यांनी इ.स.१८९७ पासून मराठ्यांच्या इतिहासाची साधने लिहायला प्रारंभ केला व १८९९मध्ये ते काम पूर्ण केले. हा अंक तीनदा छापला. नंतर एका पाठोपाठ एक 'मराठ्याच्या इतिहासाची साधने' प्रकाशित होत राहिली.

जेव्हा राजवाडे मंदिराची कोनशिला बसवायला प्रारंभ झाला त्या दरम्यान राजवाडे यांनी वेगवेगळे लेख लिहून राष्ट्रभर पाठवण्याचा उपक्रम सुरू केला. त्या वेळेला प्रसिद्धीची साधनेही कमी होती. इतिहासाचार्य म्हणून त्यांनी जी कामगिरी केली, त्याला खरोखर जोड नाही. वेदांवरचे १५३ ग्रंथ, पूर्वमीमांसेचे ७ ग्रंथ, याजिकाचे ५२९ ग्रंथ, धर्मावरचे १२४ ग्रंथ, वेदान्तावरचे १६६ ग्रंथ, मराठीत वेदान्तावरचे १३२

र

ग्रंथ, मराठी काव्यावरचे २१६ ग्रंथ, धर्मावरचे ४ ग्रंथ, मराठीत याज्ञिकीवरचे १३ ग्रंथ, योगावरचा एक ग्रंथ, मराठीतले नीतिग्रंथ ११, मराठी तंत्रावर ४, मराठी वैद्यकावरचे १८ ग्रंथ, मराठी ज्योतिषावरचे १८ ग्रंथ, मराठी पुराणावरचे १२ ग्रंथ, माहात्म्यावरचे १७ ग्रंथ, भटितसाहित्यावरचे २२, रामदासी साहित्याचे २२ ग्रंथ, मराठी व्याकरणावरचा एक, मराठी भूगोलावरचा एक व मराठी छंदावरचा एक, अंकगणितावरचे ३, मराठी कोषावरचा एक, बुद्धिबळावरचा एक, सामुद्रिकावरचे दोन, मराठी बाडावरचे २६ ग्रंथ, मराठीचे छापील ग्रंथ ९, व्रजभाषा २६ ग्रंथ, कानडी ग्रंथ ४, व महानुभवी ग्रंथ ३, 'मराठी इतिहासाची साधने'चे सहा व इतिहासावरचे शेकडो लेख लिहिले. आयुष्यभर त्यांनी ग्रंथ जमा करण्याचा व लेखनाचा विचार केला. राजवाड्यांची, श्री. नानासाहेब देव व भा. वा. भट यांच्याशी सातारा येथे पहिली भेट झाली व त्यांच्यापासून नानासाहेब देवांनी जुन्या दासबोधाची एक हस्तलिखित प्रत व गिरीधरच्या कवितांच्या हस्तलिखित बाडांची प्राप्ती केली.




श्री. वि. का. राजवाडे यांचे लेखन फार आहे. त्यांच्या केवळ समग्र साहित्याचेच १३ खंड निघाले आहेत. (इतिहासाचार्य वि. का. राजवाडे, १३ खंड, संपादक डॉ. मु. ब. शहा) त्याव्यतिरिक्त त्यांनी केलेल्या 'मराठ्याच्या इतिहास साधने'चे २१ खंड व प्रचंड पत्रव्यवहार बाकी राहतोच. डॉ. रा. चिं. ढेरे म्हणतात ते सर्वथा खरे आहे की 'मानव्य विद्यांपैकी अशी एकही विद्या नसावी, जिला राजवाड्यांचा प्रज्ञास्पर्श झालेला नाही. या सर्व विद्याशाखांविषयी त्यांनी केलेल्या चिंतनाची आणि लेखनाची मूलगामी समीक्षा अजूनही बाकी आहे. एकच गोष्ट सांगतो, खानदेशातील त्या वेळेच्या प्रत्येक गावाच्या नावाची व्युत्पत्ती वि. का. राजवाडे यांनी शोधून काढली. तसा कोषही तयार केला. ती व्युत्पत्ती बरोबर आहे का चूक आहे, हे कुणीही सुचवले नाही.

इ.स.१९१२-१३पासून ते भा.वा.भट यांच्याकडेच मुक्काम करत असत. भा. वा. भट त्यांचा खूप आदर करत. पुण्याच्या भारत इतिहास संशोधन मंडळाशी असलेला त्यांचा संबंध जवळपास पूर्णत: तुटला होता. मग त्यांना व्यक्तिश: सांभाळणे व त्यांचे सर्व लेखन प्रकाशित करणे हे महत्कार्य तात्यासाहेब भटांनी केले.

राजवाड्यांच्या स्वभावात विक्षिप्तताही तेवढीच मोठी होती. अशा व्यक्तींच्या लहरी, राग-लोभ आणि आकांक्षा सांभाळणे भयंकर कठीण कार्य असते. पण तात्यासाहेब भट यांनी तो सर्व विक्षिप्तपणा तर सहन केलाच पण कधी कुणाकडेही तक्रार केली नाही किंवा राजवाडे यांना टाकलेही नाही. तात्यासाहेब व राजवाडे यांच्या वयात जवळपास १०-१२ वर्षांचे तरी अंतर असावे. राजवाडे यांनी कुणालाही गुरू मानले नाही, पण तात्यासाहेब व राजवाडे यांच्यामध्ये एक नाते होते व ते गुरु-शिष्याचेच होते. 'इतिहास व ऐतिहासिक' या मासिकाचा प्रारंभ १८३८मध्ये झाला. त्याचे प्रत्येक संपादकीय स्वत:चे नाव न देता वि. का. राजवाडे लिहीत. त्यांच्या मृत्युनंतर 'राजवाडे संशोधन मंडळा'ची स्थापना झाली. ते असेतोपर्यंत त्यांचे सारे महत्त्वपूर्ण ग्रंथ प्रकाशित झाले होते. राजवाडे यांनी सर्व देशांत प्रवास तर केलाच पण बैतुल व मुलताई प्रदेशांतही जाऊन आले. त्यांची साधी निव्यर्सनी राहणी, खाण्यापिण्यात नियमित असण्याचा त्यांचा कटाक्ष, त्यांची नि:स्पृह आणि व्यासंगी वृत्ती, मूलग्राही पांडित्य, व्यापक आणि कुशाग्र बुद्धी व जळजळीत देशभक्ती हे गुण अंगी बाणण्यासारखे आहेत.

राजवाड्याच्या अंत:करणात तीव्र देशाभिमान होता. परकीय सत्तेचा व ती चालवणाऱ्या लोकांचा तीव्र द्वेष करणारा त्यांच्यासारखा दुसरा कोणी आढळणे दुर्घट

र

होते. राजवाड्यांना इष्ट व प्रिय वाटणारी गोष्ट साक्षात घडवून आणण्याकरता देशात एक संस्था स्थापन केली गेली असूनही त्यात राजवाडे सहभागी झाले नाहीत, अगर त्या संस्थेने चालवलेल्या हालचालींत बिलकुल भाग घेतला नाही.

मराठ्यांविषयी गैरसमज पसरवणाऱ्या ग्रँट डफ व किंकेड यांच्या लिखाणाला मराठीत उत्तर देऊन त्यांनी प्रतिकार केला, पण एखाद्या इंग्लिश मासिकातून सदर मजकूर प्रसिद्ध करण्याची त्यांची इच्छा अपूर्णच राहिली. आपले लेखन मराठीतच प्रसिद्ध करेन हा त्यांचा अट्टाहास होता. 'भौतिक शास्त्रांचा अभ्यास आणि विकास हिंदी लोकांनी स्वत: करून पाश्चात्त्य राष्ट्रातील लोकांची बरोबरी केल्याखेरीज हिंदी स्वातंत्र्याचा व स्वराज्याचा प्रश्न सुटणार नाही.' असे त्यांचे मत होते.

मराठ्यांच्या इतिहास साधनांचे त्यांनी २१ खंड प्रसिद्ध केले व त्यांनी संग्रह केलेले व अप्रसिद्ध कागदपत्रे यांचे १५० खंड काढता येतील एवढी मोठी साधनसामग्री त्यांनी मिळवली होती. हे काम इतक्या थोड्या वर्षांत करणे हे शक्य नाही.

— डॉ. मु. ब. शहा

**संदर्भ :**

१. *'इतिहासाचार्य विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांचे चरित्र व राजवाड्यांचा दोन तपांचा विद्वत्सहवास'.*

## राजवाडे, वैजनाथ काशीनाथ

***अहिताग्नी राजवाडे***

**वाग्वैद्य, निरुक्त अभ्यासक, व्युत्पत्तिशास्त्रज्ञ**

**२७ फेब्रुवारी १८६० — १७ डिसेंबर १९४४**

वैजनाथ काशीनाथ राजवाडे हे महाराष्ट्रातील एक श्रेष्ठ वाग्वैद्य (Philologist) आणि नैरुक्त (व्युत्पत्तिशास्त्रज्ञ) होते. त्यांचा जन्म वरसई (तालुका पेण, जिल्हा रायगड) येथे फाल्गुन शुक्ल पंचमी, शालिवाहन शके १७५१ रोजी झाला. राजवाडे हे उपनाम असलेले लोक मूळचे जोशी या उपनामाचे शाण्डिल्य गोत्री चित्पावन ब्राह्मण होत. ते मूळचे रत्नागिरी जिल्ह्यातील राजावाडी या



गावचे. पुढे ते संगमेश्वर तालुक्यातील निंबे या गावी येऊन स्थायिक झाले होते. या मंडळींचा कुलस्वामी केशवराज, याचे मंदिर असूद या गावी आहे. कुलस्वामिनी योगेश्वरी, तिचे मंदिर अंबाजोगाई, बीड येथे आहे. राजवाडे घराण्यात भाषीय विद्येतील निपुण असे चार प्रसिद्ध वाग्वैद्य झाले. त्यात वैजनाथ काशीनाथ राजवाडे, इतिहासाचार्य विश्वनाथ काशीनाथ राजवाडे, अहिताग्नी शंकर रामचंद्र राजवाडे आणि पाली भाषेचे अभ्यासक (वैजनाथ काशीनाथ राजवाडे यांचे थोरले चिरंजीव) चिंतामणी वैजनाथ राजवाडे यांचा समावेश होतो.

वैजनाथ यांचे पितृछत्र त्यांच्या वयाच्या सातव्या वर्षीच हरवले. त्यांचे प्राथमिक शिक्षण वरसई येथे, माध्यमिक शिक्षण अलिबाग येथे झाले. पुढे १८७५मध्ये ते पुण्यास आले. तेथील मेहुणपुरा भागात ते राहत होते. १८७६मध्ये न्यू इंग्लिश स्कूलमधून ते मॅट्रिक झाले. त्यांचे हस्ताक्षर सुरेख होते. नंतर डेक्कन महाविद्यालयामध्ये प्रि. रा. गो. भांडारकर यांच्या मार्गदर्शनाखाली १८८३मध्ये ते बी.ए. झाले. १८८५मध्ये मुंबईच्या विल्सन महाविद्यालयातून ते एम.ए. झाले. १८८४-१८८५च्या सुमारास त्यांचा विवाह झाला. १८८५मध्ये ते डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीवन सदस्य झाले.

पुण्यातील पंचहौद मिशन येथे मिशनरी लोकांबरोबर असलेल्या सभेत लो. टिळक, आगरकर यांसह उपस्थित राहिलेल्या सदस्यांमध्ये वैजनाथ राजवाडे उपस्थित होते. त्यानंतर तेथील 'चहापाना'मुळे 'चहा ग्रामण्य प्रकरण' झाले. याबाबतीत प्रायश्चित घेण्यास त्यांनी नकार दिला होता.

१८८६मध्ये ते कराची येथील दयाराम जेठमल महाविद्यालयामध्ये शिकवण्यास गेले. नामदार गोखले यांच्या विनंतीवरून ते कराची सोडून १८९६मध्ये

र

पुण्यास फर्गसन महाविद्यालयात अध्यापन करू लागले. त्यांचे इंग्लिश आणि संस्कृत या भाषांवर प्रभुत्व होते. त्यांची सेवाज्येष्ठता दूर सारून रँ. र. मु. परांजपे यांना १९०२मध्ये फर्गनस महाविद्यालयात प्राचार्य म्हणून नेमण्यात आले, तरी तक्रार न करता त्यांनी उपप्राचार्यपद स्वीकारले. तसेच संस्थेचे सचिवपद सांभाळून रँ. परांजपे यांना सहकार्य केले. पं. मदनमोहन मालवीय यांच्याशी त्यांचा चांगलाच परिचय होता. मालवीयांनी त्यांना अधिक वेतनावर बनारस हिंदू विद्यापीठात स्थान देऊ केले, परंतु संस्थेशी एकनिष्ठ राहून वैजनाथ यांनी ते नाकारले. याच संस्थेच्या नानावडा येथील शाळेत त्यांनी पर्यवेक्षक म्हणूनही काम केले. ते गरीब विद्यार्थ्यांना आपल्या घरी ठेवून घेऊन, त्यांच्या शिक्षणास मदत करत. इ.स. १९१४मध्ये ते निवृत्त झाले.

त्यानंतर त्यांनी ऋग्वेद, निरुक्त या विषयांच्या अध्ययनास सुरुवात केली. त्यांचे निरुक्ताचे इंग्लिश भाषांतर तसेच मराठी भाषांतर प्रसिद्ध आहे. ऋग्वेदातील अनेक शब्दांच्या अर्थांची चिकित्सा आणि अर्थनिर्णय करणारे त्यांचे अनेक लेख भांडारकर इन्स्टिट्यूटच्या ॲनलूसमध्ये प्रसिद्ध झाले आहेत. उदाहरणार्थ आद्रनस, विहायस, कृपा, मेहना, चित्र या शब्दांवरील लेख पहिल्या अंकातच प्रसिद्ध झाले. सुमारे साठ शब्दांवरचे त्यांचे लेख प्रसिद्ध झाले आहेत. निरुक्त ग्रंथाच्या इंग्रजी भाषांतरात त्यांनी निरुक्तकार यास्क यांचा काळ, निरुक्ताचे गुणदोष, त्यातील व्युत्पत्तीची तत्त्वे इत्यादी विविध प्रश्नांची चर्चा केली आहे. अनेक परिशिष्टांनी तो ग्रंथ फारच उपयोगी ठरला आहे. निरुक्ताच्या मराठी अनुवादाची दुसरी आवृत्ती २०१४मध्ये धुळ्याच्या राजवाडे संशोधन मंदिरात प्रसिद्ध केली आहे. राजवाडे यांच्या लेखनाचे वैशिष्ट्य म्हणजे वस्तुनिष्ठता, सखोल अध्ययन आणि परखड चिकित्सक चर्चा. अन्य भारतीय अभ्यासकांप्रमाणे वेदाध्ययन म्हणजे वेदांचा प्रचार करणे या दृष्टीकोनाचा स्वीकार न करता अत्यंत तटस्थपणे त्यांनी वेदाध्ययन केले आहे. त्यामुळे त्यांना वास्तव अर्थाने ‘वाग्वैद्य’ किंवा ‘नैरुक्त’ म्हणता येईल.

वैजनाथ राजवाडे यांचे दुसरे मोलाचे कार्य म्हणजे त्यांचा सार्वजनिक संस्थांमधील सहभाग. प्राच्यविद्येच्या क्षेत्रातील भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिट्यूट तसेच वैदिक संशोधन मंडळ या संस्थांची स्थापना करण्यात त्यांचा महत्त्वाचा भाग होता. भांडारकर संस्थेमध्ये ते एम.ए.संस्कृतचे अध्यापनसुद्धा कुठलेही मानधन न घेता करीत. एका बँकेच्या संचालक मंडळावरही ते होते. अशा रितीने त्यांनी सामाजिक कार्यही केले. मात्र ते राजकारणापासून अलिप्त राहत. ते खऱ्या अर्थाने एका विद्वानाचे जीवन जगले. आपल्या तरुण मुलाचा अकाली अंत, धाकटे भाऊ इतिहासाचार्य राजवाडे यांचा अंत, वेडसर आईचा सांभाळ, नातवाचे शिक्षण यांसारख्या सांसारिक गोष्टीही त्यांनी सोसल्या. जीवनात काही वेळा आलेले अन्यायाचे प्रसंग सहन केले. यात त्यांची धीरगंभीर प्रवृत्ती दिसून येते. ते सतारही उत्तम वाजवत. वयाच्या चौऱ्याऐंशीव्या वर्षी त्यांचे देहावसान झाले.

- गणेश उमाकांत थिटे

**संदर्भ :**

१. *निरुक्ताचे मराठी भाषांतर, राजवाडे संशोधन मंदिर, धुळे, २०१४ या पुस्तकाला आनंद दत्तात्रेय राजवाडे यांनी लिहिलेली प्रस्तावना.*

## रानडे, महादेव गोविंद

**उदारमतवादी समाजसुधारक, धर्मसुधारक, राजनीतिज्ञ, अर्थशास्त्रज्ञ व द्रष्टे विद्वान**

**१८ जानेवारी १८४२ - १६ जानेवारी १९०१**

**☛ मुख्य चरित्रनोंद - राजकारण खंड**

महादेव गोविंद रानडे यांचा जन्म नाशिकमधील निफाड या गावी झाला. माधवराव या नावानेही ते सुपरिचित होते. त्यांच्या आईचे नाव गोपिकाबाई होते.

रानडे यांचे शालेय शिक्षण कोल्हापूर येथे झाल्यावर त्यांनी उच्च शिक्षणही मुंबईत घेतले. १८६२ साली प्रथम वर्गात बी.ए. पदवी मिळवल्यावर त्यांनी इतिहास व अर्थशास्त्र विषय घेऊन हीच पदवी सन्मानपूर्वक संपादन केली. औपचारिक शिक्षण चालू असतानाच

र



त्यांनी भारताचा व मराठ्यांचा इतिहास अभ्यासला. तसेच अभ्यासक्रमाबाहेरील अनेक ग्रंथांचा त्यांनी अभ्यास केला. त्यांनी मुंबईच्या एल्फिन्स्टन महाविद्यालयात इतिहास, भूगोल, गणित, अर्थशास्त्र, इंग्लिश, तर्कशास्त्र, निबंधलेखन वगैरे अनेक विषयांचे अध्यापन केले. १८६४मध्ये एम.ए. व १८६५मध्ये कायद्याची पदवी संपादन करून ते मुंबई विद्यापीठाचे फेलोही झाले.

मराठी ग्रंथांवरील अभिप्राय लिहिण्यासाठी १८६६मध्ये ओरिएंटल ट्रान्सलेटर (पौर्वात्य साहित्य अनुवादक) या पदावर त्यांची नेमणूक झाली. वाङ्मय, इतिहास, समाजशास्त्र इ. विषयांवरील ग्रंथांवर त्यांनी लिहिलेल्या अभिप्रायांत विस्तृत विवेचन केलेले असे. ते १८६८ साली एल्फिन्स्टन महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून कायम झाले. मग ते पुण्याला १८७१ साली न्यायाधीश (दंडाधिकारी) म्हणून रुजू झाले. पुढे ॲडव्होकेटची परीक्षा उत्तीर्ण होऊन ते न्यायखात्यात काम करू लागले. उच्च न्यायालयातील न्यायाधीशांचे पद त्यांच्याकडे १८९३ साली चालत आले. इंग्रजांच्या अमदानीत भारतीयाला या पदावर नेमणे अशक्यप्राय होते. त्यामुळे विविध संस्था-संघटनांनी त्यांचा गौरव केला. त्यांच्या या नेमणुकीने न्यायासनच सन्मानित झाल्याचे सरन्यायाधीश सर मायकेल वेस्ट्रॉप म्हणाले होते. कारण रानडे यांजकडे नि:स्पृहपणा, न्यायनिष्ठा, कायद्याचे सखोल ज्ञान व न्यायदानासाठी घ्यावयाचे परिश्रम हे असाधारण गुण होते.

महादेवरावांच्या बाराव्या वर्षीच त्यांचे पहिले लग्न झाले होते. मात्र पत्नीचे निधन झाल्यावर त्यांनी आपल्या वडिलांच्या आग्रहाखातर, केवळ अकरा वर्षांच्या असलेल्या कुमारिका रमाबाई यांच्याशी १८७३मध्ये दुसरा विवाह केला. विधवा विवाहाचा पुरस्कार करणाऱ्या महादेवरावांवर बरीच टीका झाली. मात्र रमाबाईंबरोबरचा त्यांचा संसार सुखासमाधानाचा झाला. पतीच्या उदात्त राहणीशी रमाबाई पूर्णतया समरस झाल्या होत्या. पतिनिधनानंतर त्यांनी लिहिलेले ‘आमच्या आयुष्यातील काही आठवणी’ (१९१०) हे पुस्तक मराठीतील उत्तम साहित्यकृती ठरले. महादेवराव वारल्यावर रमाबाईंनी स्त्रियांच्या सेवेसाठी आयुष्य वेचले. स्त्रियांना व्यवसाय शिक्षण देणारी संस्था रमाबाईंनी स्थापन केली. स्त्रियांच्या शिक्षणासाठी विविध प्रकारे काम करणारी ‘सेवासदन’ ही संस्था त्यांच्या प्रेरणेतूनच उभी राहिली. आर्य महिला समाज व लेडी डफरिन फंड कमिटी यांच्याबरोबर रमाबाईंचा जवळचा संबंध होता. सरकारी पाठ्यपुस्तक समितीवर त्यांनी चार वेळा काम केले. त्या महिला संमेलनाच्या अध्यक्षा होत्या.

लोकहितवादी, विष्णुशास्त्री पंडित, ज्योतीराव फुले यांनी सुरू केलेल्या समाजसुधारणेच्या चळवळीत महादेवराव सामील झाले होते. समाजसुधारणेची मीमांसा करणारे महादेवरावांचे लेख ‘इंदुप्रकाश’ या वृत्तपत्राच्या इंग्लिश विभागात आले होते. १८६५ साली स्थापन झालेल्या विधवाविवाहोत्तेजक मंडळाने घडवून आणलेल्या विधवा विवाहामुळे परंपरावादी सनातनी धर्मनिष्ठ मंडळींनी या विवाहाच्या पुरस्कर्त्यांवर शंकराचार्यांच्या परवानगीने बहिष्कार टाकला होता. या वादातून रानडे यांनी एक विद्वत्ताप्रचुर लेख लिहून वेद, स्मृती, पुराणे व इतिहास यांचा तपशीलवार आढावा घेतला. राजा राममोहन रॉय यांनी हिंदू धर्मात मौलिक, तात्त्विक सुधारणा करण्याची चळवळ सुरू केली होती. या चळवळीत आपल्या धर्मचिंतनाद्वारे रानडे यांनी भर घातली. त्यांच्या धार्मिक चिंतनाचे सार म्हणजे सर्व मानवजातीचा मूळचा शुद्ध धर्म एकच असल्याचे ठामपणे म्हणता येते. याविषयीची त्यांची कारणमीमांसा अशी होती : माणसांच्या अंत:करणातच धर्माच्या अनुभवाची नैसर्गिक योग्यता असते. चिंतनशील अंत:करण विकारांच्या बंधनातून मुक्त झाले म्हणजे अंतरीचा, विवेकाचा प्रकाश मिळतो व निराकार, पावन ईश्वराची

अनुभूती येते. यातून शुद्ध नैतिक विवेक जागा होतो. हे विचार संतांच्या व धर्मसंस्थापकांच्या विचारांनी अधिक बळकट होतात. मनुष्यप्राण्याची नैतिक मूल्ये विवेकबुद्धीनेच ठरतात आणि निराकार, पवित्र, एकमेव परमात्म्याचा प्रत्यय येऊन अंत:करणात त्याच्याविषयीचा भक्तिभाव जागा होतो.

महादेवरावांनी इंडियन नॅशनल काँग्रेस व सामाजिक परिषद या संस्था स्थापण्यात पुढाकार घेतला. समाजसुधारणेच्या पायाभूत विचारांचे निश्चित तत्त्वज्ञान त्यांनी मांडले. राजकीय, आर्थिक, धार्मिक आणि सामाजिक या सर्व सुधारणा एकमेकांशी निगडित आहेत. यामुळे समग्र समाजजीवन अभ्यासले पाहिजे, असा व्यापक विचार त्यांनी मांडला. त्यांच्या मते वंश वा धर्म यामुळे माणसामाणसांमध्ये भेदभाव न करता त्यांच्यात समानता व न्याय प्रस्थापित केला पाहिजे. यासाठी परंपरागत अंधश्रद्धा व धर्मग्रंथांची बंधने यातून प्रथम मानवी बुद्धी मुक्त झाली पाहिजे. आंधळ्या दैववादाच्या जागी बुद्धिनिष्ठा रुजायला हवी. समतेच्या तत्त्वानुसार मानव्याची प्रतिष्ठा झाली पाहिजे. त्यांच्या मते सर्व धर्माच्या मुळाशी असलेले रहस्य म्हणजे उच्च विश्वनियामक ईश्वरी तत्त्व व त्याची मानवी अंत:करणातील प्रेरणा होय.

उच्च धर्माचे माणसाच्या विवेकबुद्धीला आकर्षण वाटण्यासाठी मूर्तिपूजा व कर्मकांड यातून तो मुक्त व्हायला हवा. याकरिता रानडे यांनी मुंबईत प्रार्थना समाज स्थापन केला. तो राजा राममोहन रॉय यांच्या ब्राह्मो समाजासारखा होता. या पंथाची तत्त्वे, विधी व उपासनापद्धती विशद करणारा निबंध रानडे यांनी इंग्लिशमध्ये लिहिला. त्याच्या शीर्षकाचा अर्थ ‘एकेश्वरनिष्ठाची कैफियत’ असा होतो. संत एकनाथांच्या भागवत धर्माचा - म्हणजे वारकरी संप्रदायाचा महादेवांवर मोठा प्रभाव होता. यामुळे प्रार्थना समाज भक्तिप्रसारार्थ असल्याचे हा पंथ स्थापणाऱ्या रानडे यांचे व त्यांच्या मित्रांचे मत होते. न्या. रानडे यांनी १८७० साली पुण्यात सार्वजनिक सभा स्थापन केली. १८७१ साली पुण्यात बदली झाल्यावर त्यांनी संस्थेची सूत्रे स्वत:कडे घेतली व तिच्या कार्याला राजकीय चळवळीचे रूप दिले. यामुळे भारतात प्रागतिक सनदशीर राजकारणाचा पाया त्यांनी घातला. या संस्थेचे चिटणीस सार्वजनिक काका (गणेश वासुदेव जोशी) यांनी न्यायमूर्तींच्या मार्गदर्शनाखाली मोठी कामगिरी केली. १८९० साली सामाजिक सुधारणेचा वाद चिघळला आणि सामाजिक सभेत फाटाफूट झाली. लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांनी आपल्या सहकाऱ्यांसह या संस्थेत बहुमत निर्माण करून न्यायमूर्तींच्या समर्थकांना संस्थेतून दूर केले. यातून रानडे यांनी पुण्यातच ‘डेक्कन सभा’ स्थापली (१८९६). आपले राजकीय तत्त्वज्ञान स्पष्ट करण्यासाठी त्यांनी या वेळी एक परिपत्रक काढले. त्यानुसार राजकीय चळवळ लोकशिक्षणासाठी असावी, असे त्यांचे म्हणणे होते. राजकारणाच्या पहिल्या टप्प्यात स्वाभिमानी व स्वावलंबी नागरिक तयार व्हायला हवेत. स्वाभिमान व स्वावलंबन अंगी आणण्यासाठी दीर्घ काळ लागतो. जातीपातीचा दुरभिमान सोडणे उदारमतवादाच्या दृष्टीने महत्त्वाचे असल्याचे त्यांचे मत होते.

रानडे व सार्वजनिक काका यांनी स्वदेशीचा प्रसार व संघटनेचे कार्य हाती घेतले. भारताचा आर्थिक ऱ्हास व विकास यांची शास्त्रशुद्ध मीमांसा करणारी दोन व्याख्याने रानडे यांनी दिली. देशातील औद्योगिक क्रांतीसाठी संरक्षक जकातीच्या तत्त्वाची त्यांनी पाठराखण केली. भारताच्या अर्थशास्त्राच्या पाया घालताना त्यांनी ब्रिटिश राज्य भारताच्या आर्थिक विकासाच्या विरुद्ध कसे कार्यरत आहे, हे स्पष्ट केले होते.

महाराष्ट्रातील मोठ्या दुष्काळाच्या काळात (१८७४-७६) सार्वजनिक सभेने येथील शेतकऱ्यांच्या आर्थिक स्थितीचे सर्वेक्षण केले. शेतकऱ्यांची हलाखीची स्थिती सरकारी धोरणाने उद्‍भवली असल्याचा निष्कर्ष या सर्वेक्षणातून निघाला. हजारो लोकांच्या स्वाक्षऱ्या असलेला जबाबदार राजपद्धतीच्या मागणीचा अर्ज त्यांनी इंग्लंडच्या संसदेकडे पाठवला. दिल्लीच्या

र

दरबारात राणी व्हिक्टोरियांना हिंदुस्थानच्या सम्राज्ञी ही पदवी देण्यात आली, तेव्हा सार्वजनिक सभेने राणींना मानपत्राबरोबर हिंदुस्थानी जनतेच्या मागण्यांचा अर्जही सादर केला होता. रानडे यांचे हे राजकारण सरकारविरुद्धच्या बंडाला प्रेरक ठरेल अशी मोठी भीती सरकारला वाटली होती. मात्र रानडे यांच्यावर ठेवण्यात आलेल्या कडक नजरेतून काही ठोस पुरावा पुढे आला नाही. परिणामी १८८५मध्ये काउन्सिलवर त्यांची नेमणूक झाली व त्यांना फायनान्स कमिटीतही घेण्यात आले. त्याच वर्षी काँग्रेसची स्थापना झाली व या स्थापनेत रानडे यांचा मोठा सहभाग होता. रानडे यांचे कार्य पुढे गोपाळ कृष्ण गोखले यांनी चालवले.

न्या. रानडे यांनी १८९०मध्ये औद्योगिक परिषदेची स्थापना केली. त्या वेळी आणि नंतर त्यांनी अनेक व्याख्याने दिली. या व्याख्यानांत त्यांनी हिंदुस्थानच्या आर्थिक स्थितीवर भाष्य केले होते. आर्थिकदृष्ट्या अवकळा आलेल्या या देशाला स्वतंत्र अर्थशास्त्राची आवश्यकता असल्याचे त्यांचे म्हणणे होते. ११ मे १८७८ रोजी भरलेल्या मराठी ग्रंथकार संमेलनाचे ते अध्यक्ष होते. या संमेलनातून नंतर मराठी साहित्य संमेलनाची कल्पना पुढे आली.

न्यायमूर्तींनी १८९४-१९०० दरम्यान मराठ्यांच्या इतिहासावर शोधनिबंध लिहिले आणि ते संस्था व सभा येथे वाचूनही दाखवले. यांचा नंतर प्रसिद्ध झालेला निबंधसंग्रह म्हणजे ‘राइज ऑफ द मराठा पॉवर अँड अदर एसेज’ (मराठी शीर्षक ‘मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष’) हा ग्रंथ होय. या ग्रंथाद्वारे रानडे यांनी प्रथमच मराठ्यांच्या इतिहासाचा अन्वयार्थ स्पष्ट केला.

महादेवराव रानडे दीर्घकाळ आजारी होते व त्यातच त्यांचे निधन झाले. लोकमान्यांनी लिहिलेल्या मृत्युलेखात न्यायमूर्ती रानडे यांच्या कार्याचे नेमकेपणाने स्मरण करून देताना म्हटले होते : ‘‘थंड गोळा झालेला महाराष्ट्र जिवापाड मेहनत करून पुन्हा जिवंत करण्याचे दुर्धर काम प्रथम महादेवरावांनीच केले.’’

- संपादक मंडळ

## रानडे, रामचंद्र दत्तात्रेय

***गुरुदेव रानडे***

**तत्त्वज्ञ, तत्त्वचिंतक, लेखक**

**३ जुलै १८८६ – ६ जून १९५७**

☛ ***मुख्य चरित्रनोंद - धर्मपरंपरा खंड***



रामचंद्र दत्तात्रेय रानडे गेल्या शतकात एक मोठे आध्यात्मिक तत्त्वचिंतक म्हणून प्रसिद्धीस आले. त्यांच्या आध्यात्मिक क्षेत्रातील नेतृत्वामुळे ते गुरुदेव रानडे या नावाने प्रसिद्ध आहेत. त्यांचा जन्म कर्नाटकातील जमखिंडी येथे झाला. तेथील सर परशुरामभाऊ हायस्कूल येथे त्यांचे शालेय शिक्षण झाले. मॅट्रिक परीक्षेत मुंबई इलाख्यात ते दुसरे आले व संस्कृत विषयात पहिले आल्याने त्यांना जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ती प्राप्त झाली. पुढे पुण्याच्या डेक्कन महाविद्यालयामध्ये त्यांचे बी.ए. पदवीचे शिक्षण पूर्ण झाले. १९१४मध्ये ते एम.ए. झाले व फर्गसन महाविद्यालयात तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक म्हणून ते रुजू झाले. त्यांच्या अध्यापनशैलीमुळे ते विद्यार्थ्यांत अत्यंत प्रिय होते. पुढे प्रकृतीच्या कारणाने त्यांची सांगली येथील विलिंग्डन महाविद्यालयात बदली झाली. व्यवस्थापनाशी मतभेद झाल्याने त्यांनी १९२४मध्ये नोकरीचा राजीनामा दिला व १९२५मध्ये त्यांनी निंबाळ येथे ‘अ‍ॅकॅडमी ऑफ फिलॉसॉफी अँड रिलिजन’ या संस्थेची स्थापना केली. भारतीय तत्त्वज्ञानाच्या ज्ञानकोशात्मक इतिहासाचा मोठा प्रकल्प तेथे त्यांनी हाती घेतला व अनेक ग्रंथांची निर्मिती केली.

१९२६मध्ये त्यांना अलाहाबाद विद्यापीठाने निमंत्रित केले. १९२७ ते १९४६ या काळात तेथे त्यांनी तत्त्वज्ञानाचे अध्यापन केले व तेथूनच ते कुलगुरू म्हणून सेवानिवृत्त झाले. १९४७मध्ये अलाहाबाद विद्यापीठाने त्यांना सन्माननीय डी.लिट. पदवी प्रदान केली. १९४६मध्ये निंबाळला परतल्यावर आध्यात्मिक

र

तत्त्वज्ञानविषयक ग्रंथलेखन, व्यक्तिगत आध्यात्मसाधना व साधकांना मार्गदर्शन हे त्यांचे मुख्य कार्य राहिले.

रानडे यांच्या जीवनात त्यांचे तत्त्वज्ञानविषयक शैक्षणिक कार्य व त्यांची अध्यात्मसाधना या गोष्टी अलग करता येणार नाहीत. शालेय वयात म्हणजे अकरावीमध्ये असतानाच भाऊसाहेब महाराज उमदीकर यांच्याकडून त्यांनी नामजपाची दीक्षा घेतली. गुरूच्या उपदेशानुसार त्यांनी मॅट्रिक परीक्षेच्या अभ्यासाच्या जोडीने जोमाने नामसाधना सुरू केली. १९०८मध्ये ते बनारस येथे ॲनी बेझंट यांना भेटले. ॲनी बेझंट यांनी त्यांच्या आध्यात्मसाधनेविषयी आणि त्यांच्या गुरूविषयी विचारणा केली व प्रसन्नता व्यक्त केली. याच काळात त्यांना गंभीर अशा क्षयरोगाने ग्रासले. त्या वेळी ते महाविद्यालयीन शिक्षण घेत होते. प्राध्यापकांनी त्यांना रुग्णालयात दाखल होऊन आधुनिक वैद्यकीय उपचार घेण्याचा सल्ला दिला. पण रानडे यांनी तो न जुमानता आयुर्वेदिक उपचार व ध्यानसाधना चालू ठेवली. सद्‌गुरू आणि ध्यानसाधना यांच्यामुळेच आपण बरे होऊ, असा त्यांचा विश्वास होता व ते बरे झालेही.

रानडे यांना बऱ्याच भाषा अवगत होत्या. इंग्रजी, हिंदी, मराठी, कानडी या तर होत्याच. पण ग्रीक, लॅटिन, जर्मन, पर्शियन व हिब्रू या भाषाही त्यांना अवगत होत्या. या विविध भाषांतील प्राचीन व आधुनिक तत्त्वज्ञानाचे आणि साहित्याचे अध्ययन त्यांनी केले होते व त्यांकडे तौलनिक परिप्रेक्ष्यातून ते पाहत होते. ‘ए कन्स्ट्रक्टिव्ह सर्व्हे ऑफ उपनिषदिक फिलॉसॉफी’ हा त्यांचा पहिला महत्त्वाचा ग्रंथ होय. त्या मागोमाग ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास अशा अनेक संतांच्या ‘वचनामृतांचा’ धांडोळा घेणारी पुस्तके त्यांनी लिहिली. ‘मिस्टिसिझम’ हे त्यांच्या लिखाणाचे एक प्रमुख सूत्र होते. ‘मिस्टिसिझम’ या शब्दाचे भाषांतर सर्वसामान्यपणे केले जाते तसे ‘गूढवाद’ असे न करता त्यांनी ‘आत्मसाक्षात्कारवाद’ असे केले.

भगवद्‌गीतेचा साक्षात्कारपर अन्वयार्थ लावणारे ‘दि भगवद्‌गीता, ए फिलॉसॉफी ऑफ गॉड रिअलायझेशन’, महाराष्ट्रातील संतांमध्ये साक्षात्कारवाद कसा दिसतो, याची मांडणी करणारे ‘मिस्टिसिझम इन महाराष्ट्र’ हे पुस्तक, ‘पाथवे टु गॉड इन हिंदी लिटरेचर’ व ‘पाथवे टु गॉड इन कन्नड लिटरेचर’ हे त्यांचे ग्रंथ त्यांच्या साक्षात्कारवादी तत्त्वज्ञानाचा आवाका दर्शवणारे आहेत. आत्मसाक्षात्कार किंवा ईश्वरसाक्षात्कार हा त्यांच्या दृष्टीने केवळ सत्ताशास्त्रीय/ तात्त्विक चिंतनाचा विषय नव्हता, तर तो शास्त्रीय विषय होता. आध्यात्मसाधकांची ईश्वरसाक्षात्काराकडे किंवा आत्मसाक्षात्काराकडे जी वाटचाल होते, ती निश्चित अशा काही टप्प्यांतून होत असते. हे टप्पे वेगवेगळ्या संतांना त्यांच्या जीवनात कसकसे अनुभवाला आले, ते त्यांनी त्यांच्या साहित्यातील विश्लेषणाच्या आधारे दाखवून दिले. आध्यात्मिक प्रगतीचा सच्चेपणा तपासण्यासाठी त्यांनी काही निकष तयार केले होते आणि अशा रितीने धर्माला, विज्ञानाचा दर्जा प्राप्त करून देण्याचा प्रयत्न त्यांनी केला. आध्यात्मिक तत्त्वज्ञान किंवा स्पिरिच्युअल फिलॉसॉफी या विषयाला गुरुदेव रानडे यांनी दिलेले हे महत्त्वाचे योगदान मानावे लागेल. वयाच्या एक्काहत्तराव्या वर्षी गुरुदेव रानडे यांचे देहावसान झाले.

— प्रदीप आपटे

## राव, एम. एस. नागराज

**अभिरक्षक (क्युरेटर), संचालक, महानिदेशक**

**१९३२**

डॉ. एम. एस. नागराज राव यांनी त्यांचा पदव्युत्तर परीक्षेसाठीचा अभ्यास, ख्यातनाम इतिहासकार के. नीळकंठशास्त्री यांच्या मार्गदर्शनाखाली पूर्ण केला. उत्खननाचे आणि संशोधनाचे तंत्र या बाबतीत त्यांना पुरातत्त्ववेत्ते म. न. देशपांडे यांनी मार्गदर्शन केले. डॉ. राव यांना त्यांच्या पीएच.डी.साठीचे संशोधन, डेक्कन महाविद्यालयाच्या डॉ. ह. धी. सांकलिया यांच्या हाताखाली करण्याची संधी मिळाली. हे संशोधन तुंगभद्रेच्या खोऱ्यामध्ये करत असताना त्यांना टेक्कलकोट्टा आणि हल्लूर येथील अवशेषांचा शोध लागला.

र

डॉ. राव यांना केंब्रिज विद्यापीठाकडून कॉमनवेल्थ स्कॉलरशिप मिळाली व तिथे त्यांनी इतिहासपूर्वकालीन पुरातत्त्वाचा विशेष अभ्यास केला. त्यांना अमेरिकेला जाण्याची संधी मिळाली आणि त्यामुळे वस्तुसंग्रहालयशास्त्राशी त्यांचा परिचय झाला.

त्यांना 'टेक्कलकोट्टा येथील (आदिवासी) गिरिनिवासी' या त्यांच्या प्रबंधाबद्दल १९६६साली डॉक्टरेट पदवी मिळाली.

धारवाड विद्यापीठाच्या वस्तुसंग्रहालयाचे चीफ क्युरेटर म्हणून त्यांनी काही वर्षे काम पाहिले (१९६४) आणि त्यांच्यावर कर्नाटक विद्यापीठाच्या वस्तुसंग्रहालयाची, व नंतर पुरातत्त्वविभागाच्या संचालकपदाची जबाबदारी सोपवण्यात आली (१९७२). पुरातत्त्वसंबंधित अनेक विषयांचा त्यांचा सखोल अभ्यास असल्यामुळे तीन वर्षांसाठी त्यांना आर्किओलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडियाचे महानिदेशक म्हणून पाठवण्यात आले (१९८३).

डॉ. एम. एस. नागराज राव यांच्या पुरातत्त्व संशोधनाचे विविध पैलू आहेत. त्यांच्या टेक्कलकोट्टा येथील उत्खननामुळे दक्षिण भारतातील इतिहासपूर्व पुरातत्त्व संशोधनास अधिक चालना मिळाली, तर त्यांच्या संगनकल्लू येथील संशोधनामुळे भारतातील लोहयुगाचा काळ इ. स.पूर्व १००० पर्यंत मागे नेला गेला. मध्ययुगातील पुरातत्त्व संशोधनामध्ये त्यांनी नवीन पायंडा पाडला. त्यांच्या 'किरातार्जुनीयम्'संबंधीच्या ग्रंथामध्ये त्यांनी शिल्पकार व चित्रकार यांना हे कथानक कसे स्फूर्तिदायक वाटते, ते दाखवले आहे.

डॉ. राव यांचे अनेक शोधनिबंध आणि पुस्तके प्रकाशित झालेली आहेत. त्यांपैकी महत्त्वाची प्रकाशने : Excavations at Sangankallu (संगनकल्लू येथील उत्खनने), Prehistoric Culture, of Tungabhadra Valley (तुंगभद्रा खोऱ्यातील इतिहासपूर्व संस्कृती), Panorama of Karnataka (कर्नाटक दर्शन).

हम्पी येथे मोठ्या प्रमाणात झालेल्या उत्खननांच्या अहवालाचे संपादनही डॉ. राव यांनी केले होते. डॉ. राव हे डॉ. सांकलिया यांचे शिष्य होते आणि आपल्या गुरूंप्रमाणे त्यांनीही सर्वसामान्यांमध्ये विशेषत: शाळकरी मुलांमध्ये पुरातत्त्व वास्तूंचे संरक्षण याबद्दल जागृती निर्माण करण्यासाठी प्रयत्न केले.

पुराणवास्तूंचे संरक्षण व जीर्णोद्धार हा डॉ. राव यांच्या आवडीचा विषय होय. ते जेव्हा ऑर्किओलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडियाचे प्रमुख होते, तेव्हा त्यांनी आग्रा येथील ताजमहाल, दिल्ली येथील लाल किल्ला, कुतुबमिनार, हुमायुनची कबर, पुरी येथील जगन्नाथ मंदिर, ऐरावतेश्वर मंदिर- दारासुरम, तामिळनाडूमधील एक्कमपटू येथील रंगनाथ मंदिर, आंध्र प्रदेशातील आलमपूरजवळील पापनासी येथील २३ मंदिरांचे स्थलांतर, गुजरातमधील रानी की वाव अशा अनेक वास्तूंची सुव्यवस्थित देखभाल केली व जीर्णोद्धार केला.

डॉ. नागराज राव हे ऑर्किओलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडियाचे प्रमुख असताना १९८६साली 'सार्क' देशांची आंतरराष्ट्रीय पुरातत्त्व परिषद भरवण्यात आली होती. त्यानंतर कंबोडियामधील स्मारकांचे/मंदिरांचे जीर्णोद्धाराचे काम त्यांच्याकडे सोपवण्यात आले.

डॉ. राव या 'जीर्णोद्धार' मोहिमेचा (ज्यात वास्तूंचे संरक्षण, डागडुजी व परंपरांचे पालन हे विषय येतात) पाठपुरावा करण्यासाठी प्रसिद्ध आहेत.

– र.वि. नातू

## राव, क्षमा
**संस्कृत भाषातज्ज्ञ**

**४ जुलै १८९० – मृत्युदिनांक अनुपलब्ध**

क्षमा राव यांचा जन्म पुणे येथे झाला. त्यांचे वडील शंकर पांडुरंग पंडित हे महान व्यासंगी, भाषाशास्त्रज्ञ आणि संस्कृतचे गाढे विद्वान होते. बुद्धिमत्तेचा आणि भाषाज्ञानाचा वारसा त्यांना पित्याकडून मिळाला. वडिलांचा सहवास त्यांना फार थोडा काळ मिळाला, पण बालवयातच त्यांना आपल्या पित्याची थोरवी कळून आली होती. त्यांच्या व्यक्तित्वाचा मोठा प्रभाव त्यांच्यावर होता. बालपण काहीसे हालात गेले, पण



वयाच्या दहाव्या वर्षीच त्यांनी लेखनाला सुरुवात केली आणि मृत्यूपूर्वी एक आठवडा त्यांचे 'ज्ञानेश्वरचरितम्' पूर्ण झाले. जवळजवळ पन्नास वर्षे त्या लिहीत होत्या.

मुंबईतील विख्यात डॉक्टर राव यांच्याशी विवाह झाल्यावर क्षमाबाईंचे आयुष्य पार बदलून गेले. वडिलांप्रमाणेच त्यांना अनेक भारतीय व विदेशी भाषा अवगत होत्या. इंग्लिश, फ्रेंच आणि इटालियन या भाषांवर त्यांचे प्रभुत्व होते. इंग्लिशमधील आणि इतर भाषांमधील त्यांचे लेखन भारताबाहेरच जास्त प्रसिद्ध झाले व लोकांना आवडलेही, पण आज भारतात ते फारसे उपलब्ध नाही. भारतातील अनेक प्रांतांत आणि जगातील अनेक देशांमध्ये जाऊन राहण्याची आणि तेथील जनजीवन समजून घेण्याची संधी त्यांना मिळाली. आपल्या अनुभवाचे, निरीक्षणाचे प्रतिबिंब बाईंच्या साहित्यात दिसून येते. इंग्लिश लेखनातील त्यांच्या प्रभुत्वामुळे त्यांना प्रतिसरोजिनीदेवी म्हणत असत. संस्कृत भाषेवरील त्यांचे नितांत प्रेम आणि निष्ठापूर्वक केलेले अध्ययन यांच्या जोरावर त्यांनी संस्कृतमध्येही विपुल रचना केली. गद्य आणि काव्य या दोन्ही प्रकारांत त्यांनी आपली नाममोहोर उमटवली.

औंधच्या संस्कृत-कार्यालयाने १९३८मध्ये त्यांना 'पंडिता' ही पदवी दिली, तर चारच वर्षांनंतर 'साहित्यचंद्रिका' ही उपाधी बहाल केली. त्यांच्या लेखनावर अनेक मान्यवर वृत्तपत्रे, मासिके यांमधून भारतात व भारताबाहेरही उत्तम अभिप्राय प्रसिद्ध झाले आहेत. त्यात फ्रेंच रिव्हू, टाइम्स ऑफ इंडिया, सर्च लाइट (पटना), द हिंदू (मद्रास), चित्रमय जगत्, भारतज्योती, दि इव्हिनिंग न्यूज, प्रेरणा इत्यादींचा समावेश आहे. क्षमाबाईंवर जसा पित्याचा प्रभाव होता, तसाच कन्या लीला दयाळ यांच्यावर आईचा प्रभाव होता. क्षमाबाईंच्या साहित्यकृतींवर आधारित संस्कृतनाट्यलेखन लीला दयाळ यांनीही केले. आपल्या आईचे एक लघुचरित्र क्षमा राव यांनी लिहिले असे समजते.

क्षमाबाईंच्या उमेदीच्या काळात स्वातंत्र्य मिळवण्याचे प्रयत्न देशभर मोठ्या प्रमाणावर चालू होते. महात्मा गांधी देशाचे नेतृत्व करत होते. भारतीय तत्त्वज्ञानावर आधारलेले स्वातंत्र्यप्राप्तीचे नवीन मार्ग शोधून काढून महात्माजी प्रचारात आणत होते. महात्माजींच्या जीवनकार्याने क्षमाबाई भारावून गेल्या होत्या. त्यांच्यावर भगवद्‌गीतेचा मोठाच प्रभाव होता. स्वातंत्र्ययुद्धात प्रत्यक्ष भाग घेणे त्यांना शक्य नव्हते, पण त्या प्रयत्नांची संपूर्ण माहिती त्या सतत घेत होत्या. त्यातूनच स्वातंत्र्यप्राप्तीतील महात्मा गांधींचे योगदान आणि त्या काळातल्या घटना यांवर आधारित दोन काव्ये त्यांनी गीतेप्रमाणे अठरा अध्याय आणि मुख्यतः अनुष्टुप् छंदात लिहिली.

सत्याग्रह, गीता आणि उत्तरसत्याग्रहगीता या दोन काव्यांत महात्मा गांधींचे चरित्र, तत्त्वज्ञान आणि मिठाच्या सत्याग्रहापर्यंतच्या भारतातील महत्त्वाच्या घटना यांचे प्रत्ययकारी चित्रण आले आहे. आपल्या वडिलांबद्दलचा त्यांचा अपार आदर त्यांनी 'शंकरजीवनाख्यम्' या चरित्रकाव्यात व्यक्त केला आहे. या त्यांच्या काव्याला साहित्यसम्राट न. चिं. केळकर यांची संस्कृतमध्ये प्रस्तावना आहे. (क्षमाबाईंच्या पुस्तकांना प्रस्तावनाही थोर लोकांच्या आहेत. पां. वा. काणे (भारतरत्न), सरदार पणिक्कर)

क्षमा राव यांनी लिहिलेली महाराष्ट्रीय संतांची चरित्र हा संस्कृत भाषेचा मोठा अमूल्य अलंकार आहे. तुकारामचरितम्, रामदासचरितम् या दोन्ही काव्यांचे इंग्लिश भाषांतरही बाईंनी केले आहे. संत मीराबाईंच्या जीवनावरील मीरालहरी काव्यात, तर संस्कृतटीकेमधून आपल्या काव्यातला ध्वनीही त्यांनी स्वोपज्ञ टीकेतून दाखवला आहे. त्याचे इंग्लिश भाषांतरही दिले आहे. 'ज्ञानेश्वरचरितम्' हे क्षमाबाईंचे परिपक्व वयातले शेवटचे

र

लेखन. या पुस्तकाचा इंग्लिश अनुवाद त्यांची मुलगी लीला दयाळ यांनी केला. क्षमाबाईंनी कथासरित्सागरच्या धर्तीवर पद्यात अनेक कथा लिहिल्या. 'ग्रामज्योती' या कथासंग्रहातील ३ कथांना स्वातंत्र्यसंग्रामाची पार्श्वभूमी आहे. 'कथापञ्चकम्'मध्ये भारतीय स्त्री-जीवनातील कारुण्यधर्म, अगतिकता तरी जिजीविषा यांचे प्रत्ययकारी चित्रण आहे. कथामुक्तावलीमध्ये १५ उत्तम गद्यकथा आहेत. वास्तवाबरोबरच अद्‌भुतरम्यता, कल्पनाविलास, निसर्गवर्णन आणि वेगवेगळ्या ठिकाणचे समाजजीवन यांचे चित्रण त्या कथांमध्ये पाहावयास मिळते. भाषा प्रौढ आणि प्रसादिक आहे. 'विचित्रपरिषद यात्रा' हे १९३८ साली त्रिवेंद्रम येथे आयोजिलेल्या अखिल भारतीय प्राच्यविद्यापरिषदेच्या अधिवेशनावर आधारित लघुपुस्तिका प्राच्यविद्याभ्यासकांचा विचार करायला लावणारी आहे.

भारतीय संस्कृती, संस्कृत भाषा यांबद्दलचा मनस्वी आदरभाव, अभ्यास, प्रयोगशीलता, उद्यमशीलता, उत्कटता यांचा प्रत्यय पंडिता क्षमाबाईंचे साहित्य वाचताना येतो.

इंग्लिशवर व इतर भाषांवर प्रभुत्व असूनही त्यांनी संस्कृतमध्ये लिहिले त्याचे कारण त्यांनी एका प्रस्तावनेत दिले आहे. संस्कृतभाषा ही इतर कोणत्याही भाषेइतकीच किंबहुना त्यांच्याहूनही अधिक कोणताही जीवनानुभव व्यक्त करायला समर्थ भाषा आहे, हे त्यांना सिद्ध करावयाचे होते. आधी संस्कृतमध्ये लिहिलेल्या व नंतर संस्कृतमध्ये अनुवादित केलेल्या काही कथा याची साक्ष देतात.

बाईंनी सात एकांकिका, तीन अंकी तीन नाटके, पस्तीस कथा, अनेक निबंध, पत्रे आणि प्रवासवर्णने लिहिल्याचा उल्लेख सापडतो, पण हे सर्व साहित्य उपलब्ध झालले नाही. संस्कृत साहित्याचा विचार करता महाराष्ट्रातच नव्हे तर भारतात त्यांच्या तोडीची एकही स्त्री-लेखिका आढळत नाही.

— डॉ. आशा गुर्जर

## राशिवडेकर, अप्पाशास्त्री सदाशिवशास्त्री

**आद्य संस्कृत वृत्तपत्रकार**

**२ नोव्हेंबर १८७३ — २५ ऑक्टोबर १९१३**



कोल्हापुरातील राशिवडे नामक गावच्या सदाशिवशास्त्री व पार्वतीबाई या अनन्य शिवभक्त दाम्पत्याच्या पोटी जन्माला आलेल्या अप्पाशास्त्रींनी वडिलांची शिवभक्ती व घराण्यातील पांडित्य परंपरा अतिशय आस्थेने आणि कसोशीने पुढे नेली. प्रथम वडिलांकडून आणि नंतर वेदान्त, व्याकरण, ज्योतिष व न्याय अशा शास्त्रांत प्रवीण असणाऱ्या त्यांच्या रुकडीकर, एकसंबेकर इत्यादी सहकाऱ्यांकडून अप्पाशास्त्रींनी त्या-त्या शास्त्राचे शिक्षण घेतले. वयाच्या पंधराव्या वर्षी स्वतंत्र पंचागाची निमिर्तीही त्यांनी करून पाहिली. कोल्हापूर दरबारी असलेले पंडित कांताचार्य यांच्याकडे त्यांनी पुढील शिक्षण घेतले.

बंगालमधून आयोजित एका निबंधस्पर्धेत अप्पाशास्त्रींच्या 'मातृभक्ती'वरील लेखाला पहिला पुरस्कार मिळाला. त्या निबंधातून प्रकटलेली त्यांची सहजसुंदर, ओघवती भाषाशैली, भाषेवरील असाधारण प्रभुत्व यांनी प्रभावित होऊन बंगालमध्ये प्रारंभी प्रकाशित होणाऱ्या 'संस्कृतचंद्रिका' नामक संस्कृत पाक्षिकाचे संपादकत्व त्यांच्याकडे आले आणि त्या वेळेपासून अप्पाशास्त्री संस्कृतचे वृत्तपत्र चालवणारे महाराष्ट्रातले पहिले संपादक/प्रकाशक झाले. 'संस्कृतचंद्रिका' चालवणे, त्यामार्फत समाजाचे धार्मिक, सामाजिक व राष्ट्रीय प्रबोधन करणे, हे अप्पाशास्त्रींचे जीवनध्येय बनले. बंगाली लोकांनीच तेथील संस्कृत संमेलनात अप्पाशास्त्रींना 'विद्यावाचस्पती' ही पदवी दिली.

चंद्रिकेतून त्यांनी 'मणिकुण्डलोपाख्यानम्', 'धर्मस्य सूक्ष्मा गति:' यांसारख्या कथा, 'मूर्तिपूजनम्', 'एकादशीश्राद्धविधिनिर्णय:', 'पतितोद्धारमीमांसा

खण्डनम्' असे धार्मिक निबंध, 'मातृगोत्रवर्जननिर्णयप्रकाश' आणि 'निर्णयप्रकाश' यांसारखे धर्मशास्त्रीय मीमांसा करणारे प्रबंध, 'केन प्रणीतानि सांख्यसूत्राणि?', 'अपि विद्यते कश्चित जीवो नाम?', 'मा कर्मफलहेतुर्भू' असे तत्त्वज्ञानविषयक विवेचन करणारे लेख; 'जानपदशिक्षणम्', 'स्त्रीशिक्षणम्', 'किमपराद्धं ब्राह्मणैः' असे सामाजिक विषयांवरील लेख आणि 'स्वदेशीयान्दोलनम्', 'वङ्गविक्षोभः', 'लेखनस्वातंत्र्यशिरश्च्छेदः' असे सामाजिक व राजकीय विषयांवरील लेख लिहून आपल्या बहुमुखी प्रतिभेचा परिचय त्यांनी दिला. याशिवाय 'धर्मे सर्वं प्रतिष्ठितम्' हे घोषवाक्य असणाऱ्या 'सूनृतवादिनी' नावाच्या संस्कृत साप्ताहिकाची निर्मिती करून त्यामधूनही समाजाला राजकीय, सामाजिक, धार्मिक बाबींचे ज्ञान देण्याचा यशस्वी प्रयत्न केला.

प्राचीन विज्ञानाबाबत लोकांमध्ये जागृती करणे हे अप्पाशास्त्रींना महत्त्वाचे वाटत होते. त्यामुळे 'प्राचीनानां वृष्टिपरिमापनयन्त्रम्', 'प्राच्यां भूगोलविज्ञानम्', 'विज्ञानविलासः' यांसारखे विविध लेख त्यांनी आवर्जून लिहिले. 'गोस्तन्यमसूरिका' नामक लेखात 'देवीच्या रोगावर लसीकरण हाच उपाय आहे' असे आग्रहाने प्रतिपादन करताना त्याच्या समर्थनार्थ प्राचीन आयुर्वेदाचा दाखला त्यांनी आवर्जून दिला होता. गद्यलेखनाची त्यांची शैली असामान्य पण ओघवती होती. त्यातून विविध संस्कृत शास्त्रांचे ज्ञान सहजपणे प्रकट होई. खण्डनमण्डनाचे कौशल्य प्रकर्षाने जाणवत असे. मात्र या शास्त्रांच्या ज्ञानाबरोबरच संस्कृत साहित्यविश्वातला त्यांचा संचार अधिक मुक्त होता.

'पञ्जरबद्धःशुकः', 'वल्लभविलापम्' यांसारखी काव्ये, 'श्रीशाहोकुमारावाप्तिः' व 'तिलकमहाशयस्य कारागृहनिवासः' यांसारखी खण्डकाव्ये, 'संमार्जनी शलाका'सारखा लघुनिबंध, समस्यापूर्तीसाठी केलेली काव्यरचना, इंदिरा, लावण्यमयी या बंगाली कादंबऱ्यांचा संस्कृत अनुवाद, महाभारत, विष्णुपुराण इत्यादींची सरस मराठीत केलेली भाषांतरे, 'न मातुः परदैवतम्'सारखा ललितनिबंध हे सारे वाङ्मय त्यांच्यातील सहृदय लेखकाचा आणि कवीचा परिचय देणारे आहे. 'अरेबिअन नाइट्स'मधील 'Alladin and His Wonderful Lamp' या कथेचा त्यांनी संस्कृतमध्ये केलेला अनुवाद हा मूळ कथेपेक्षा अधिक सरस उतरल्याची ग्वाही श्रीकृष्णम्माचारी यांच्यासारख्या जाणकार समीक्षकाने दिली आहे. सूनृतवादिनी व चंद्रिका या आपल्या नियतकालिकांतून ठरवल्याप्रमाणे अप्पाशास्त्रींनी सात महान व्यक्तींची चरित्रे लिहिली. त्यांत शंकराचार्य होते, महाकवी गुणाढ्य होता आणि महाकवी कालिदासही! या सर्वांच्या काळाचा निर्णय करणे हा अप्पाशास्त्रींचा आवडता विषय होता त्यामुळे त्याबाबतची चर्चा त्या चरित्रांत आवर्जून आढळते. याशिवाय मालविकाग्निमित्रम्, वेणीसंहार, नलोपाख्यान, सावित्री उपाख्यान इत्यादींवर अप्पाशास्त्रींनी अभ्यासपूर्ण टीकाही लिहिल्या.

प्राचीन धर्मतत्त्वांचा पुरस्कार जसा 'ग्रहण', 'हरतालिका तृतीया महोत्सव' इत्यादीं धर्मविषयक निबंधांमधून त्यांनी केला, तरी काही आधुनिक महत्त्वपूर्ण विचारांची साग्रह मांडणी हे अप्पाशास्त्रींचे वैशिष्ट्य होते. देवीच्या रोगावर दैवी उपाय न करता लसीकरण करून घेण्याचा आग्रह त्यांनी धरला तसेच चंद्रिकेच्या प्रकाशनासाठीची आर्थिक तरतूद म्हणून त्यांनी त्या काळी भागभांडवलाची कल्पना हिरिरीने मांडली. त्या कल्पनेचा सातत्याने काही काळ पाठपुरावा केला. थोडक्यात जे-जे भारतीय संस्कृतीला उपकारक व मानवी जीवनाला समृद्ध करणारे, ते केवळ जुने वा नवीन म्हणून त्यांनी नाकारले नाही. विरोध झाला तरी विहित कार्याची उमेद न सोडता कोल्हापूर, वाई, पुणे, सातारा अशी ठिकाणे बदलून संस्कृत प्रचार-प्रसाराचे, राष्ट्रीय विचार प्रसाराचे, प्रबोधनाचे आणि संस्कृतच्या विविध शाखांतील संशोधनाचे काम पदरमोड करून आणि मनस्ताप सोसूनही त्यांनी चालूच ठेवले.

व्यक्तिगत आयुष्यात प्रापंचिक सुख फारसे लाभले नसले, तरी त्याविषयी दुःख न करता चंद्रिकेचा संसार

अप्पाशास्त्रींनी खूप काटाकाळजीने वाढवला आणि सांभाळलाही. या त्यांच्या कार्याची पावती म्हणून भारत धर्म महामण्डलाकडून 'विद्यालंकार' व 'महोपदेशक' अशा दोन पदव्या त्यांना मिळाल्या.

'योगवासिष्ठ' व 'वाल्मीकि रामायण' या दोन ग्रंथांच्या अनुवादाचे काम अर्ध्यावर आले असता ग्रंथिज्वराने पुणे येथे २५ ऑक्टोबर १९१३ रोजी अप्पाशास्त्री उर्फ हरि सदाशिव राशिवडेकर या महान प्राच्यविद्या अभ्यासकाचे, महाराष्ट्रातील आद्य संस्कृतवृत्त पत्रकाराचे दु:खद निधन झाले.

अवघ्या चाळीस वर्षांच्या आयुष्यात अप्पाशास्त्रींनी संस्कृतच्या प्रसारासाठी, राष्ट्रीय विचारांच्या पुनरुज्जीवनासाठी केलेले काम खरोखर अलौकिक आहे. 'पारावार: पाण्डित्यस्य प्रतिमूर्ति: प्रतिभाया: निवासभूमी: सौजनस्य धरणिधरो धार्मिकताया:' हे क्षितीशचंद्र चट्टोपाध्याय यांनी केलेले वर्णन त्यांची नेमकी ओळख सांगणारेच आहे.

— डॉ. अंजली माधव पर्वते

**संदर्भ :**


१. *वर्णेकर श्री.भा.; अर्वाचीन संस्कृत साहित्याचा इतिहास; नागपूर.*

२. *औदुंबरकर वासुदेवशास्त्री; 'अप्पाशास्त्रिचरितम्'; शारदा गौरव ग्रंथमाला; पुणे.*


## राहुरकर, वसंत गजानन

### संस्कृती संवर्धक, संस्कृत प्रसारक, संशोधक

### जन्ममृत्युदिनांक अनुपलब्ध

राहुरकर हे विख्यात प्राच्यविद्याविशारद वाग्वैद्य रा.ना. दांडेकर यांच्या मार्गदर्शनाखाली संशोधन प्रबंध सादर करणारे पहिले विद्यार्थी. त्यांच्या प्रबंधाचा विषय होता, 'ऋग्वेदातील ऋषी' ('सीअर्स इन द ऋग्वेद') हा प्रबंध पुढे विद्यापीठाने प्रकाशित केला. याआधी राहुरकरांनी संस्कृतच्या महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी पाठ्यपुस्तका-वरच्या मार्गदर्शिका प्रसिद्ध केल्या होत्या. दांडेकरांनीच राहुरकरांना पुणे विद्यापीठाच्या संस्कृत



विभागात अधिव्याख्याता म्हणून नियुक्त केले.

काही काळ राहुरकर हे डेक्कन महाविद्यालयातील ऐतिहासिक तत्त्वावर आधारित विश्वकोशात्मक संस्कृत कोशात कार्य करीत होते. पुढे पुणे विद्यापीठात संस्कृत विभागात संस्कृत विषयाचे अधिव्याख्याता, नंतर संस्कृत प्रगत अभ्यास केंद्रात प्रपाठक व अखेर भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिरात संशोधक म्हणून काम करत होते. संस्कृत इतकाच त्यांचा अर्धमागधी, प्राकृत, जैनधर्म यांचाही अभ्यास होता. महाराष्ट्र व गुजरात या प्रांतांत भरलेल्या अनेक प्राकृत परिसंवादांत त्यांनी उत्तम शोधनिबंध सादर केले.

धर्मानंद कोसंबी स्मृतिव्याख्यानात आयोजित केलेल्या पंडित दलसुखभाई मालवाणिया यांच्या परिचयपर लघुभाषणात त्यांनी आवर्जून 'धम्मानंदचरिया' वंशकाव्यातील गाथा उद्धृत केल्या. राहुरकरांनी प्राचीन भारतीय संस्कृतीवरही लेखन केले. ग.बा. पळसुले यांच्याबरोबर त्यांनी 'भारतवाणी' या संस्कृत नियतकालिकाच्या संपादनाची धुराही सांभाळली.

राहुरकरांचे अन्य कार्य म्हणजे संस्कृतचा प्रसार. ते राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे कार्यकर्ते होते. अखिल भारतीय विद्यार्थी परिषदेचे ते पहिले अध्यक्ष होते. पुणे विद्यापीठातर्फे उज्जयिनीला कालिदास वक्तृत्व स्पर्धेसाठी विद्यार्थ्यांना घेऊन गेले असताना उज्जयिनीच्या विद्यार्थी परिषदेने त्यांचा गौरव करून त्यांचे मार्गदर्शनपर व्याख्यान आयोजिले. इंदिरा गांधींनी पुकारलेल्या आणीबाणीच्या विरोधात निदर्शने केल्याने वसंतरावांना कारावासाची शिक्षाही भोगावी लागली.

वसंतराव हे अतिशय ऋजू स्वभावाचे, ममताळू, राष्ट्रसेवक होते. शि.प्र. मंडळींनी त्यांचे हे गुण लक्षात घेऊन त्यांना नियामक समितीवर मानाचे स्थान दिले.

— प्रा. मो.गो. धडफळे

## रित्ती, श्रीनिवास हनुमंताचार्य
**पुराभिलेखतज्ज्ञ, इतिहासकार**
**८ जून १९२९**



डॉ. श्रीनिवास हनुमंताचार्य रित्ती हे भारतातील अग्रगण्य पुराभिलेखतज्ज्ञ आहेत. कर्नाटकासहित महाराष्ट्रातील बहुसंख्य, विशेषत: नांदेड, सोलापूर व कोल्हापूर जिल्ह्यातील कन्नड कोरीव लेखांचे वाचन, संपादन व प्रकाशनाचे श्रेय त्यांच्याकडे जाते. काही व्यक्ती एखाद्या विशिष्ट कार्यासाठीच जन्म घेत असाव्यात असे वाटते; कारण डॉ. रित्ती यांनी आत्तापर्यंतच्या आपल्या आयुष्यातील सर्व काळ कोरीव लेखांच्या विश्वातच काढला आणि त्याच्या अभ्यासात व संशोधनात रमण्यातच आपल्या आयुष्याचे सार्थक आहे, असे त्यांना वाटते. वडील हनुमंताचार्य तथा आई भारती यांच्या उदरी त्यांचा जन्म झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण हावेरी, जि. हावेरी (कर्नाटक) येथे, तर महाविद्यालयीन शिक्षण कर्नाटक महाविद्यालय, धारवाड येथे झाले. त्यांनी बी.ए.ला संस्कृत व कन्नड विषय घेऊन, तर एम.ए.साठी संस्कृत व प्राकृत हे विषय घेऊन, पदवी प्राप्त केली. कर्नाटक विश्वविद्यालयातून प्राचीन भारतीय इतिहास व संस्कृती या विभागात देवगिरीच्या यादव राजघराण्यावरील 'दि सेऊणस' या विषयावर पीएच.डी. पदवी प्राप्त केली.

पदवी प्राप्त केल्यानंतर डॉ. रित्ती यांनी तत्कालीन मुंबई इलाख्यातील कायदा विभागात १९५३-१९५५ दरम्यान भाषांतरकार म्हणून सेवा केली. त्यानंतर त्यांनी भारतीय पुरातत्त्व विभागातील पुराभिलेख विभागाच्या कार्यालयात सेवेस आरंभ केला. ही सेवा त्यांनी १९५५ ते १९६४ पर्यंत रुजू केली. त्या वेळी पुराभिलेखाचे कार्यालय हे उटकमंड येथे होते. तेथे डॉ. रित्ती यांना डॉ. दिनेशचंद्र सरकार, डॉ. पांडुरंगराव देसाई, डॉ. बी.सी. छबरा, श्री. एन. लक्ष्मीनारायणराव, डॉ. जी.एस. गयी आदी बिनीच्या पुराभिलेखतज्ज्ञांचे सान्निध्य लाभले. या दिग्गजांच्या सहवासामुळे पुराभिलेखविद्येमध्ये डॉ. रित्ती पूर्ण लीन झाले. पुढे इ.स. १९६४ नंतर ते कर्नाटक विश्वविद्यालयात आले. तेथील प्राचीन भारतीय इतिहास आणि पुराभिलेख विभागात क्रमश: व्याख्याते, प्रपाठक, प्राध्यापक आणि विभागप्रमुख म्हणून ते इ.स.१९६४ ते १९८९ पर्यंत सेवा रुजू करून सेवानिवृत्त झाले. विभागात कार्यरत असताना त्यांनी अनेक विद्यार्थ्यांना पीएच.डी.साठी मार्गदर्शन केले.

उटकमंड येथील कार्यालयात एपिग्राफिकल असिस्टंट म्हणून काम करताना भूतपूर्व निजामराज्यातील लिंगसुगूर मानवी तालुक्यातील (जि. रायचूर) खेडे न् खेडे कोरीव लेखांचा शोध घेण्यासाठी अक्षरश: पिंजून काढले. या मोहिमेमध्ये शेकडो नवे लेख सापडले. त्यांतून अज्ञात असा ऐतिहासिक माहितीचा साठाच पुढे आला. नवीन लेखांचे वाचन व संपादन करून डॉ. रित्ती यांनी ते अनेक शोधनियतकालिकांतून व 'एपिग्राफिया इण्डिया' या भारत सरकारच्या पुराभिलेख विभागामार्फत प्रसिद्ध होणाऱ्या नामांकित नियतकालिकातून छापून प्रसिद्ध केले. कोरीव लेखांच्या वाचनाने अमूल्य व अज्ञात अशी ऐतिहासिक माहिती प्रकाशात येताना दिसून आल्यामुळे डॉ. रित्ती स्तिमित तर झालेच; परंतु या विषयाकडे ते पुरते ओढले गेले. प्राचीन कोरीव लेखांच्या वाचन व अभ्यासासाठी संस्कृत भाषेचे ज्ञान तर आवश्यक आहेच, तथापि प्राचीन लिपी वाचण्याचे ज्ञान व समकालीन इतिहास ज्ञात असणे अत्यंत गरजेचे आहे. डॉ. रित्ती यांना संस्कृतबाबत अडचण नव्हती. लिपिवाचनाचे ज्ञान मात्र त्यांनी सरावाने प्राप्त करून घेतले. शिवाय, सोबतीला डॉ. पांडुरंगराव देसाई व एन. लक्ष्मीनारायणरावांसारखे गुरुजन होतेच. इतिहासज्ञानासाठी त्यांनी ग्रंथांना गुरू केले.

उटकमंड येथे असेपर्यंत या विद्येत त्यांनी बरीच प्रगती केली. त्याच सुमारास कोरीव लेखांसाठी वाहिलेल्या 'साउथ इंडियन इन्स्क्रिप्शन्स'च्या खंड १५, १८, २०

यांसाठी मोलाचे योगदान दिले. अंत:स्फूर्तीने व विषयाच्या ओढीने नांदेड जिल्ह्यातील कोरीव लेखांचे ठसे डॉ. जी.सी. शेळके यांनी, सोलापूर जिल्ह्यातील कोरीव लेखांचे ठसे श्री. आनंद कुंभार यांनी, तर कोल्हापूर जिल्ह्यातील ठसे श्री. ए.बी. करवीरकर यांनी संग्रहित करून त्या लेखांना बोलके करण्यासाठी डॉ. रित्ती यांच्याशी संपर्क साधला. सर्व योग योग्य रितीने जुळून आल्यामुळे या तिन्ही जिल्ह्यांतील कन्नड कोरीव लेखांनी प्रकाश पाहिला. त्यांचे तीन खंड प्रसिद्ध झाले आहेत : १) 'इन्स्क्रिप्शन्स फ्रॉम नांदेड डिस्ट्रिक्ट' (१९६८), 'इन्स्क्रिप्शन्स फ्रॉम सोलापूर डिस्ट्रिक्ट' (१९८८) व 'इन्स्क्रिप्शन्स फ्रॉम कोल्हापूर डिस्ट्रिक्ट' (२०००).

भारतीय इतिहास अनुसंधान परिषद, नवी दिल्ली या संस्थेशी डॉ. रित्ती यांचा अनेक वर्षांचा संबंध आहे. सुमारे आठ वर्षे ते परिषदेचे सदस्य म्हणून कार्यरत आहेत. विजयनगर साम्राज्याशी निगडित कोरीव लेखांच्या संपादनाच्या योजनेचे संचालक म्हणून ते जबाबदारी पार पाडीत आहेत. आतापर्यंत त्यांनी स्वत: व डॉ. बी.आर. गोपाल यांच्या सहयोगाने तीन खंड सिद्ध करून दिले. ते तिन्ही खंड परिषदेने प्रसिद्ध केले. त्यांच्याच मार्गदर्शनाखाली तेलुगू, तामीळ आणि संस्कृत कोरीव लेखांच्या संपादनाचे कार्य प्रगतिपथावर आहे. हे विजयनगर साम्राज्याच्या समग्र कोरीव लेखांचे एकत्रीकरण म्हणजे एक महत्त्वाचे कार्य होय.

पूर्वी डॉ. बी.एल. राइस या युरोपियन विद्वानाने संपादित व प्रसिद्ध केलेल्या 'एपिग्राफिया कर्नाटिका'च्या पुन:परिष्करणाचे काम मैसुरू विश्वविद्यालयाच्या कन्नड अध्ययन संस्थेने सुरू केले असून त्याचे जिल्ह्यावार असे बरेच खंड प्रकाशित झालेले आहेत. या मालिकेत डॉ. रित्ती यांनी तुमकुरू जिल्ह्याचा खंड सिद्ध करून दिला आहे आणि तो प्रसिद्धही होत आहे. दावणगेरे जिल्ह्याचे काम प्रगतिपथावर आहे. 'साउथ इण्डियन इन्स्क्रिप्शन्स' या मालिकेतील एका खंडाचे कामही सुरू आहे.

कर्नाटक विश्वविद्यालयामध्ये सेवारत असताना त्यांचे प्रकाशित झालेले ग्रंथ असे : 'हिस्टरी ऑफ कर्नाटक' (१९७०), 'ॲन्शण्ट हिस्टरी ऑफ इण्डिया' या दोन्ही ग्रंथांचे सहलेखक डॉ. पी.बी. देसाई व डॉ. बी.आर. गोपाल, 'दि सेऊणस' (१९७२), 'कर्नाटक ग्रामसूची' (१९८५). या सूचीमध्ये जिल्ह्यावार ग्रामनामे कन्नड व इंग्रजी लिपीतून दिली आहेत. 'डिस्क्रिप्टिव्ह ग्लॉसरी ऑफ ॲडमिनिस्ट्रेटिव्ह टर्म्स इन ॲन्शण्ट कर्नाटक', (२०००) या ग्रंथात शब्दांचे अर्थ कन्नड व इंग्रजी भाषांत आणि लिप्यांत दिले आहेत. अनेक संशोधनात्मक लेख निरनिराळ्या नियतकालिकांतून प्रकाशित झाले आहेत.

कोरीव लेखांच्या अभ्यासाच्या प्रीतीतून डॉ. रित्ती व त्यांचे सहकारी एकत्र येऊन त्यांनी १९७५ मध्ये 'अखिल भारतीय पुराभिलेख परिषदे'ची स्थापना केली. अशा एका केंद्रीय संस्थेची गरज होतीच. गेली ३६ वर्षे त्याची अधिवेशने विनाखंड भरत आहेत. नवीन पिढीतील अनेक पुराभिलेख विद्यासंस्थेपुढे येऊन आपले शोधनिबंध मांडतात. त्या निबंधांतूनच निवडक निबंधांची एक पत्रिका दर अधिवेशनासमयी प्रकाशित होत असते. या संस्थेत डॉ. रित्ती यांनी सचिव, अध्यक्ष आणि पत्रिकेचे संपादक म्हणून काम पाहिले आहे.

डॉ. रित्ती यांच्या पुराभिलेखविद्येच्या संशोधन व अविरत अमूल्य सेवेचे फळ म्हणून अनेक नामांकित संघसंस्थांनी त्यांचा गौरव व सन्मान करून काही प्रशस्ती पुरस्कार दिले आहेत. त्यांत शासकीय तथा शैक्षणिक सन्मानांचा समावेश आहे.

गेल्या अनेक वर्षांपासून डॉ. रित्ती भारतीय पुराभिलेख परिषदेचे अध्यक्षस्थान भूषवीत आहेत. आलूर वेंकटराय प्रतिष्ठानाचे ते मागील पंधरा वर्षांपासून अध्यक्ष असून त्या प्रतिष्ठानाकडून प्रसिद्ध होणाऱ्या श्री. आलूर वेंकटराय समग्र साहित्याचे ते संपादक आहेत. इण्डियन हिस्टरी काँग्रेसच्या एका अधिवेशनाच्या पुराभिलेख विभागाचे अध्यक्षस्थान त्यांनी भूषविले आहे. कर्नाटक इतिहास अकादमी, भारतीय पुराभिलेख परिषद, भारतीय स्थलनाम परिषद, मराठवाडा इतिहास परिषद इत्यादी संस्थांच्या वार्षिक संमेलनांचे सर्वाध्यक्ष म्हणून त्यांची निवड झालेली आहे.

भारतीय पुराभिलेख परिषदेच्या पुणे अधिवेशनाचे ते अध्यक्ष असताना (१९९२) त्यांचा परिषदेने ताम्रपट देऊन गौरव केला. बेंगळुरूच्या मिथिक सोसायटीने त्यांच्या हीरक महोत्सवानिमित्त डॉ. रित्ती यांच्या कार्याबद्दल त्यांचा गौरव केला. श्रवणबेळगोळचा ‘चारुकीर्ति भट्टारक प्रशस्ती’ (२००१), कर्नाटक इतिहास अकादमीचा डॉ. ‘बी.आर. गोपाल स्मारक प्रशस्ती’ (२००२), मंत्रालयाचे स्वामी राघवेंद्र स्वामी मठाचा ‘श्री सुजयश्री प्रशस्ती’ (२००७), कर्नाटक सरकारचा ‘सुवर्ण कर्नाटक राज्योत्सव प्रशस्ती’ (२००७), कृष्णदेवरायांच्या पट्टाभिषेकाच्या पाचशेव्या वर्षानिमित्त कर्नाटक सरकारच्या पट्टाभिषेक समितीतर्फे सन्मान (२०१०), गुलबर्गा विश्वविद्यालयाकडून डी.लिटने गौरवान्वित (२०१०), चिदानंद प्रशस्ती समितीमार्फत (२०१०, बेंगळुरू) ‘शं.रा. जोशी प्रशस्ती’ कन्नड संघ, शिवमोग्गा (२०१०), ‘जीवन गौरव पुरस्कार’, रोटरी क्लब, धारवाड (२०११), कर्नाटक विद्यावर्धक संघ, धारवाड स्थापनादिनानिमित्त सन्मान (२०११), भारतीय प्राचीन विज्ञान व पुरातत्त्व संस्था, मैसूरकडून सन्मान तथा गौरव सदस्यत्व (२०११), भारतीय पुरातत्त्व सर्वेक्षण, नवी दिल्लीकडून अवॉर्ड ऑफ एक्सेलन्स (२०११), ‘श्री ना.श्री. राजपुरोहित प्रशस्ती’ (२०१२) इत्यादी सन्मान पुरस्कारांनी डॉ. रित्ती गौरवान्वित झाले आहेत.

डॉ. श्रीनिवास रित्ती यांनी इतिहास अधिवेशनानिमित्त जपानला तीन वेळा, तर जर्मनीतील बर्लिन येथे एकदा निबंधवाचनासाठी भेटी दिल्या आहेत.

— आनंद नागप्पा कुंभार

र

## र्‍हिस डेव्हिड्स, थॉमस विल्यम

**बौद्ध वाङ्मय संशोधक, प्राध्यापक**

**१२ मे १८४३ – २८ डिसेंबर १९२२**

थॉमस विल्यम हे बौद्ध वाङ्मयात टी.डब्ल्यू. र्‍हिस डेव्हिड्स या नावानेच अधिक परिचित आहेत. त्यांचा जन्म लंडनच्या ईशान्येस असलेल्या इसेक्स प्रांतातील



कोलचेस्टर येथे झाला. आपले शिक्षण पूर्ण केल्यावर त्यांनी सिलोन सर्व्हिसमध्ये प्रवेश केला व तेथे सनदी नोकर म्हणून ते कार्य करू लागले. तेथे असताना बौद्धधर्माबद्दल अभिरुची उत्पन्न होऊन त्यांनी पाली भाषा व साहित्य यांचा अभ्यास सुरू केला. त्याकरिता त्यांनी सनदी नोकरीचा राजीनामा दिला आणि पूर्णपणे बौद्ध साहित्यास वाहून घेतले. १८७७ मध्ये त्यांनी बॅरिस्टरचीही परीक्षा दिली.

ते अनुराधापूर येथे असताना आर्किऑलॉजिकल कमिशनर होते. १८७८ मध्ये त्यांनी लंडन सोसायटीसाठी ख्रिश्चनांच्या माहितीसाठी बुद्धाचे चरित्र लिहिले. त्याचे नावच ‘बुद्धिझम’ असे दिले. १८८१ मध्ये अमेरिकेत निमंत्रण आल्यावरून त्यांनी बौद्धधर्माची सुरुवात आणि प्रसार दर्शविणारी भाषणे दिली ती ‘हिबर्ट लेक्चर्स’ म्हणून प्रसिद्ध आहेत. १८८२ मध्ये त्यांनी ‘पाली टेक्स्ट सोसायटी’ या संस्थेची मुहूर्तमेढ रोवली. या संस्थेने सुमारे १०० पाली ग्रंथ प्रसिद्ध केले असून पाली भाषा युरोप, अमेरिकेत लोकप्रिय करण्यासाठी अतिशय परिश्रम घेतले आहेत. पाली भाषेतील ग्रंथ रोमन लिपीत छापण्याचा पायंडा पडल्यामुळे अन्य लिपींची पाश्चिमात्य पंडितांना वाटणारी भीती नाहीशी झाली.

१८९२ मध्ये युनिव्हर्सिटी कॉलेज, लंडन या संस्थेत पाली भाषा व बौद्ध वाङ्मय या विषयांचे प्राध्यापक म्हणून त्यांची नेमणूक झाली. १८९४ मध्ये कॅरोलिना ऑगस्टा फोले (रेव्हरंड जॉन फोले यांची कन्या) यांच्याशी त्यांचा विवाह झाला व पती-पत्नी उभयतांनी पाली भाषेच्या सेवेस स्वत:ला वाहून घेतले.

‘बुद्धिस्ट बर्थ स्टोरीज’ (१८७९), ‘एन्शन्ट कॉइन्स ॲण्ड मेझर्स इन सिलोन’ हे ग्रंथ, तसेच श्री कारपेन्टर यांच्याबरोबर ‘दीघनिकाय’ या ग्रंथाच्या तिन्ही विभागांचे इंग्रजी भाषेत भाषांतर (१८८९-१९२१), तसेच

ओल्डेनबर्ग यांच्यासह 'विनयपिटका'चे इंग्रजी भाषांतरही त्यांनी 'सेक्रेड बुक्स ऑफ दि इस्ट' या ग्रंथमालेत प्रसिद्ध केले. दीघनिकायाच्या इंग्रजी भाषांतराची प्रस्तावना - हे सारे ग्रंथ त्यांच्या गाढ विद्वत्तेची साक्ष देतात. त्याशिवाय 'अभिधम्मत्थसंगहो' (१८४४), 'दाठावंस' (१८८४), 'मिलिंद पन्ह' दोन भाग (१८९०-९४) हेही याच ग्रंथमालेत प्रसिद्ध झाले. त्यांचे स्वतंत्र ग्रंथ 'बुद्धिझम' (१८९६) आणि 'बुद्धिस्ट इंडिया' (१९०३) हे तर बौद्ध जगतात मान्यता पावलेले असे ग्रंथ आहेत. त्यांचे शेवटचे महत्त्वाचे कार्य म्हणजे त्यांनी डॉ. वुलियम स्टीड यांच्या साहाय्याने आरंभलेला पाली - इंग्रजी कोश. परंतु, या कोशाच्या फक्त पहिल्या तीन विभागांचे प्रकाशन झाल्यावर त्यांचे निधन झाले.

– डॉ. परिणिता देशपांडे

## ऱ्हिस डेव्हिड्स, कॅरोलिना

**बौद्ध वाङ्मय संशोधक, प्राध्यापक**

**१८५८ – १९४२**



कॅरोलिना ऱ्हिस डेव्हिड्स या टी.डब्ल्यू. ऱ्हिस डेव्हिड्स यांच्या सुविद्य पत्नी असून आपल्या पतीच्या निधनानंतर त्यांनी 'पाली टेक्स्ट सोसायटी'चे काम मोठ्या हिमतीने आणि निष्ठेने पुढे नेले. त्या अत्यंत हुशार आणि बुद्धिमान असून 'लंडन स्कूल ऑफ ओरिएन्टल अ‍ॅण्ड आफ्रिकन स्टडीज'मध्ये प्राध्यापक म्हणून कार्यरत होत्या. निरनिराळ्या देशांतील विद्यार्थी केवळ त्यांच्यामार्गदर्शनाखाली शिकण्यासाठी त्या संस्थेत येत.

पाली भाषेच्या संशोधनाचे काम करीत असताना त्यांना महायुद्धाची झळ चांगलीच जाणवली. पहिल्या महायुद्धात त्यांचा एकुलता एक पुत्र धारातीर्थी पडला आणि दुसऱ्या महायुद्धात 'पाली टेक्स्ट सोसायटी'च्या इमारतीवर बॉम्बचा वर्षाव झाला. या दोन्ही संकटांतून बाहेर पडून ही ज्ञानपिपासू विदुषी एखाद्या तपस्विनीप्रमाणे बौद्ध साहित्याचे काम करीत राहिली.

पाली भाषेचा सखोल आणि दांडगा व्यासंग आणि संशोधकांची प्रखर दृष्टी असलेल्या या विदुषीचे 'साम ऑफ सिस्टर्स' व 'साम ऑफ ब्रदर्स' ('थेरीगाथा' व 'थेरगाथा' या पाली ग्रंथांची काव्यात्मक भाषांतरे), 'बुद्धिस्ट सायकॉलॉजिकल एथिक्स', 'विसुद्धिमग्ग', 'डायलॉग्ज ऑफ द बुद्ध' (खंड : १, २, ३), 'बुद्धिस्ट फिलॉसॉफी', 'गौतम : द मॅन', 'स्टोरीज ऑफ द बुद्ध', 'मॅन्युअल ऑफ बुद्धिझम', 'साक्य ऑर बुद्धिस्ट ओरिजिन्स', 'व्हॉट वॉज द ओरिजिनल गॉस्पेल ऑफ बुद्धिझम' हे काही प्रसिद्ध ग्रंथ आहेत.

बौद्धधर्माच्या इतिहासात आणि साहित्यात टी.डब्ल्यू. ऱ्हिस डेव्हिड्स आणि त्यांच्या विदुषी संशोधक पत्नी सी.ए.एफ. ऱ्हिस डेव्हिड्स यांचे योगदान खरोखरच असामान्य दर्जाचे आहे.

– डॉ. परिणिता देशपांडे

## रेगे, मेघश्याम पुंडलिक

**तत्त्वज्ञ, प्राध्यापक, व्यासंगी प्रबोधनकार**

**२४ जानेवारी १९२४ – २००२**



व्युत्पन्नता व सामाजिक बांधीलकी यांचा अत्यंत दुर्मीळ असा संयोग असणारे प्रा. मे.पुं. रेगे हे महाराष्ट्रातील विचारविश्वाला सॉक्रेटिक शिक्षक, शिक्षकांचे शिक्षक आणि व्यासंगी प्रबोधनकार म्हणून परिचित आहेत. तत्त्वज्ञानाबरोबरच तर्कशास्त्र, सौंदर्यशास्त्र, धर्म, भाषा, साहित्य इत्यादी विषयांमध्येही त्यांना रस होता. इतकेच नव्हे, तर आपल्या साक्षेपी व सखोल अभ्यासाने त्या-त्या क्षेत्रात त्यांनी विद्वत्तेचे व अभिजात लेखनाचे नवे मानदंड निर्माण केले. प्रा. मेघश्याम पुंडलिक रेगे यांचे शालेय शिक्षण रत्नागिरी व मुंबई येथे झाले. मुंबईच्या

र

एल्फिन्स्टन महाविद्यालयातून त्यांनी तत्त्वज्ञान विषय घेऊन बी.ए. आणि मुंबई विद्यापीठातून तत्त्वज्ञान हा विषय घेऊनच एम.ए. केले. १९४६ पासून ते प्राध्यापकी पेशात रुजू झाले. नवसारी, अहमदाबाद, औरंगाबादचे मिलिंद महाविद्यालय, अशा वेगवेगळ्या ठिकाणी तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक म्हणून काम करून १९५४ साली ते मुंबईच्या कीर्ती महाविद्यालयामध्ये तत्त्वज्ञान विभागप्रमुख म्हणून काम पाहू लागले व पुढे उपप्राचार्य, प्राचार्य इत्यादी जबाबदाऱ्या त्यांनी १९७९ पर्यंत सांभाळल्या. १९७९-१९८१ या काळात मुंबईच्या जी.डी. पारीख रिसर्च सेंटरचे पहिले संचालक म्हणून त्यांनी काम पाहिले. १९८१-१९८४ या काळात पुणे येथील इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ एज्युकेशनचे संचालक म्हणून ते कार्यरत होते. १९८४ पासून अखेरपर्यंत वाईच्या प्राज्ञ पाठशाळा मंडळाच्या धर्मकोशाचे ते अध्यक्ष होते.

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या निधनानंतर १९९४ पासून विश्वकोश मंडळाच्या अध्यक्षपदाची धुरादेखील त्यांच्या खांद्यावर आली व तीही त्यांनी अखेरपर्यंत सांभाळली. १९८१ पासून अखेरपर्यंत 'New Quest' या मासिकाचे व १९८४ ते १९९८ या काळात त्यांनी प्राज्ञ पाठशालेच्या 'नवभारत' या वैचारिक मासिकाचे संपादक म्हणून काम पाहिले. या संबध कारकिर्दीत त्यांना काही उल्लेखनीय पुरस्कार प्राप्त झाले. महाराष्ट्र फाउण्डेशनच्या वतीने वैचारिक साहित्याबद्दल दिला जाणारा प्रथम पुरस्कार (१९९५), कोकण साहित्य भूषण गौरवचिन्ह, मुंबई महानगर साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद इत्यादी.

आपल्या प्रदीर्घ कारकिर्दीत दोन मासिकांचे संपादक म्हणून त्यांनी लेखन केलेच; पण त्याव्यतिरिक्तही इतर लेखन विपुल प्रमाणात केले. त्यामध्ये वैचारिक प्रबोधनपर लिखाण, अनुवाद, तात्त्विक लिखाण, टीकात्मक/समीक्षात्मक लेखन अशा विविध प्रकारांचा समावेश होईल. आपल्या लेखनातून विविध सामाजिक, धार्मिक, साहित्यिक, तात्त्विक प्रश्नांच्या बाबतीत समाजाचे, विशेषत: तरुणवर्गाचे प्रबोधन करण्याचे काम त्यांनी अत्यंत चिकाटीने व निरलसतेने केले. तरीही त्यांचा उल्लेख 'विचारवंत' म्हणून करणे त्यांना स्वत:ला पसंत पडणार नाही. त्यांच्याच शब्दांत सांगायचे तर, 'बहुश्रुत माणूस – आणि हा सर्वसाधारणपणे महाराष्ट्रात बहुमोल असतो – आणि शास्त्रकार हा भेद महाराष्ट्रात अजून उदयाला आलेला दिसत नाही. आणि हा भेद स्पष्टपणे केला जाणे आणि ध्यानात वागविला जाणे, हे बौद्धिक जीवनाच्या निकोपपणाच्या दृष्टीने आवश्यक आहे. 'विचारवंत' हे जे एक आदरार्थी, पण भोंगळ पद महाराष्ट्रात अलीकडे रूढ झाले आहे, ते घातक आहे.' ('अनेकविद्यामूलतत्त्वकोविद'; संपादकीय टिपण, 'नवभारत', एप्रिल १९८२) या अर्थाने त्यांना विचारवंत म्हणणे अन्यायकारक ठरेल.

तत्त्वज्ञान व तदनुषंगिक ज्ञानशाखांचा त्यांनी आयुष्यभर व्रतस्थ निष्ठेने सर्वांगपरिपूर्ण व्यासंग केला. त्यांचा मूळ पिंड तत्त्वचिंतकाचा होता व तो पोसला गेला तो मुख्यत: एल्फिन्स्टन महाविद्यालयातील तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक डान्ड्राड यांच्या अध्यापनावर. (संदर्भ : 'तत्त्वज्ञानातील माझी वाटचाल') प्रा. डान्ड्राडांच्या शिकवण्याच्या सॉक्रेटिक पद्धतीमुळे तत्त्वज्ञानातील अनेक समस्यांचा, ग्रंथांचा व विद्वानांचा रेगे यांना सखोल परिचय झाला आणि त्या अध्यापनशैलीचा त्यांच्या स्वत:च्या अध्यापनशैलीवरही बराच प्रभाव पडला. याबाबत एक खास नोंदवण्यासारखी बाब म्हणजे महाविद्यालयातील अध्यापक म्हणून काम करतानाही त्यांचा व्यासंग केवळ त्या चाकोरीपुरता सीमित कधीच राहिला नाही. विद्यापीठातील प्राध्यापकांनाही मार्गदर्शक ठरेल अशी विद्वत्ता व व्यासंगी वृत्ती त्यांच्या ठायी होती. या अर्थाने ते खरोखरच 'शिक्षकांचे शिक्षक' होते. तत्त्ववेत्त्यांच्या मूळ ग्रंथांकडे आपण सरळ (कुणाच्या मदतीविना) जावे, या वृत्तीने कान्ट, जी.ई. मूर, सी.डी. ब्रॉड, सिज्विक, रसेल इत्यादी अनेक तत्त्ववेत्त्यांचे ग्रंथ त्यांनी स्वत:च वाचले. त्यांच्याच शब्दांत सांगायचे तर, 'कमकुवत शिक्षकांमुळे तत्त्वज्ञानात्मक लिखाण वाचण्यात स्वायत्तता आली.'

पाश्चात्य तत्त्वज्ञानाच्या प्रभावाखाली असणारे प्रा. रेगे भारतीय तत्त्वज्ञानाचा गांभीर्याने विचार करू लागले, ते मुख्यत: दोन व्यक्तींमुळे : डॉ. बाबासाहेब आंबेडकर व प्रा. के.जे. शहा. औरंगाबादच्या मिलिंद महाविद्यालयामध्ये काम करीत असताना डॉ. आंबेडकर यांच्या सहवासामुळे त्यांना बौद्ध तत्त्वज्ञानाविषयी रुची व दलितांच्या समस्यांविषयी सजग आस्था निर्माण झाली. प्रा. के.जे. शहा यांच्यामुळे त्यांच्या तत्त्वज्ञानीय दृष्टीकोनाची दिशा बदलली. आपले तत्त्वज्ञान घडवण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे, धार्मिक परंपरेने प्रभावित असलेल्या आपल्या समाजाला अधिष्ठान ठरू शकेल असे सामाजिक व धार्मिक तत्त्वज्ञान आपण रचले पाहिजे, सर्वांत महत्त्वाचे म्हणजे आपण आपल्या अभिजात परंपरेकडे वळले पाहिजे, या के.जे. शहा यांच्या दृष्टीकोनाशी प्रा. रेगे पूर्णपणे सहमत झाले व भारतीय तत्त्वज्ञानाचा गांभीर्याने विचार करू लागले.

प्रा. रेगे यांच्या कारकिर्दीतील दोन घटना त्यांच्यामधील 'सॉक्रेटिक शिक्षक' समजून घेण्यासाठी अत्यंत महत्त्वाच्या आहेत. एक म्हणजे १९५९-१९६० या काळात ब्रिटिश काउन्सिलची स्कॉलरशिप मिळून ते एका वर्षासाठी ऑक्स्फर्ड विद्यापीठात गेले. ही स्कॉलरशिप त्यांना (व प्रा. एन.जी. कुलकर्णी यांना) ए.जे. एयर यांच्या शिफारशीमुळे देण्यात आली होती.

या वर्षभराच्या काळात त्यांनी गिल्बर्ट राईल, जे.एल. ऑस्टिन, ए.जे. एयर, मायकेल डमेट, पी.एफ. स्ट्रॉसन या विद्वानांची व्याख्याने ऐकली, सांकेतिक तर्कशास्त्राचे विशेष अध्ययन केले; पण त्यांच्या स्वत:च्या म्हणण्यानुसार, 'हा (नवीन) विषय शिकण्यासाठीसुद्धा ऑक्स्फर्डला जाणे आवश्यक होते असे मला वाटत नाही. मी दुसऱ्यापासून ऐकून फारसे शिकू शकत नाही.' (संदर्भ : 'माझी तत्त्वज्ञानातील वाटचाल') मात्र, ऑक्स्फर्डला असताना त्यांच्या लक्षात आलेली गोष्ट म्हणजे इतर विषयांप्रमाणेच तत्त्वज्ञानाचे अध्ययन व अध्यापन तेथे अत्यंत गांभीर्याने होत असे. आपल्याकडे हे अभावानेच आढळते.

आपल्या लेखनातून, व्याख्यानांतून, चर्चांमधून असे वातावरण निर्माण करण्याचा त्यांनी सातत्याने व जाणीवपूर्वक प्रयत्न केला. बॉम्बे फिलॉसॉफिकल सोसायटी, इंडियन फिलॉसॉफिकल असोसिएशन या व इतर चर्चासत्रांमधील त्यांची उपस्थिती कायमच आल्हाददायक व आम्हां विद्यार्थ्यांना समृद्ध करणारी, विषयाच्या मूळ गाभ्याकडे जाण्याची दृष्टी देणारी असे. त्यांचे ऑक्स्फर्डमधील वास्तव्य त्यांना नसले तरी त्यांच्या सहवासात येणाऱ्या इतरांना चांगलेच लाभदायक ठरले.

दुसरी महत्त्वाची घटना म्हणजे 'रेगे' प्रयोग (पंडित फिलॉसॉफर प्रॉजेक्ट) तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात पूर्व-पश्चिम संवाद घडवून आणण्याचे शिवधनुष्य प्रा. रेगे यांनी प्रा. दयाकृष्ण, डॉ. प्रल्हादाचार इत्यादी विद्वानांच्या मदतीने उचलले व यशस्वीपणे पेलले. रसेलच्या 'प्रिन्सिपिआ मॅथेमॅटिका'मधील विधानविषयक सिद्धान्त व त्याला पारंपरिक पद्धतीने दर्शनाचे अध्ययन केलेल्या संस्कृत पंडितांचा – नैयायिकांचा मिळणारा प्रतिसाद – असे या संवादाचे स्वरूप होते. फोर्ड फाउण्डेशनच्या आर्थिक पाठबळाच्या जोरावर पुणे, वाई, वाराणसी, मुंबई अशा अनेक ठिकाणी यासाठी अनेक चर्चासत्रे घेतली गेली व घडून आलेली चर्चा 'संवाद' या पुस्तकरूपाने प्रसिद्धही झाली. तत्त्वज्ञान विषयाच्या प्रगतीला मोठी चालना देणाऱ्या या अभिनव प्रयत्नाचे प्रा. दयाकृष्ण यांनी मोठ्या गौरवाने 'रेगे एक्स्परिमेन्ट' असे नामकरण केले.

प्रा. रेगे हे ज्ञानशास्त्रात कान्टवादी व नीतिशास्त्रात मूरवादी होते. परंतु, त्यांचे तत्त्वज्ञान पुस्तकी पांडित्यापर्यंत कधीच मर्यादित नव्हते. प्रा. के.जे. शहा यांच्या भारतीय अभिजात दर्शनपरंपरेविषयीच्या गांभीर्याशी सहमत होताना या परंपरेची व ब्रिटिशकाळात सुरू झालेल्या वैचारिक प्रबोधनाची परस्परांशी कशी सांगड घालता येईल, याचा त्यांनी आत्मीयतेने व तत्त्वचिंतकाच्या विचक्षण दृष्टीने विचार केला. डॉ. अंतरकर म्हणतात त्यानुसार, 'वैचारिक स्वराज्याची भूमिका त्यांनी अंगीकारली व अत्यंत निष्ठेने ती पारही

पाडली. आपली तत्त्वज्ञानीय भूमिका स्पष्ट करणारे लेखन त्यांनी विपुल प्रमाणात केले, त्याचबरोबर समीक्षात्मक / टीकात्मक लेखनही अत्यंत हेतुपूर्वक व सजगतेने केले. अशा लेखनामागील त्यांची भूमिका अत्यंत प्रांजळ, निकोप व व्यक्तिनिरपेक्ष होती, प्रसंगी औपरोधिक, बोचरी, ग्रंथकाराच्या तथाकथित विद्वत्तेचे वाभाडे काढणारी होती.' विद्वानांनी आपले ज्ञान अद्ययावत व अचूक राखले पाहिजे व ते तशाच स्वरूपात वाचकांपर्यंत पोहोचले पाहिजे या तळमळीतून त्यांनी प्रसंगी आक्रमक अशी टीकाशैली अंगीकारली. या समीक्षात्मक लेखनातून त्यांची विषयाबद्दलची आस्था, ज्ञानक्षेत्राचे पावित्र्य राखण्याची तळमळ व मूलभूत चिंतन वाचकांपर्यंत थेट पोहोचते. 'सौंदर्याचे व्याकरण' व 'तर्करेखा' ही डॉ. बारलिंगे लिखित पुस्तके, 'ज्ञानसमस्या' हे डॉ. वीणा गजेंद्रगडकर यांनी अनुवाद केलेले पुस्तक इत्यादींच्या प्रा. रेगे यांनी केलेल्या समीक्षांतून त्यांच्या या टीकाशैलीचे प्रत्यंतर येते.

त्यांचे बरेचसे लेखन मराठीतून झालेले आहे व हा त्यांनी जाणीवपूर्वक स्वीकारलेला वसा होता. ग्रामीण महाराष्ट्रातील मोठा वर्ग तत्त्वज्ञानातील विविध समस्या, धर्म व समाजविषयक प्रश्न व त्यांतील चर्चा जाणून घेण्यास उत्सुक आहे. त्यांच्यासाठी प्रा. रेगे यांनी मराठीतून विपुल लेखन केले व तत्त्वज्ञान, सौंदर्यशास्त्र, तर्कशास्त्र, धर्म इत्यादींशी संबंधित अनेक विषयांचा वाचकांना परिचय करून दिला. हे लेखन करताना वापरली जाणारी शास्त्रीय परिभाषा प्रमाणभूत, बिनचूक व नेमकी असावी यावर त्यांचा कटाक्ष असे.

आपल्या लेखनातून विज्ञाननिष्ठा व विवेकवाद यांच्या मर्यादा त्यांनी दाखवून दिल्या. या दोहोंच्या पलीकडे असणारा प्रांत धूसर असतो व त्यावर धूसरपणेच लिहिता येईल हे त्यांना मान्य होते. मात्र, आधुनिक मानवी जीवनाला या दोहोंची जशी आणि जितकी गरज आहे, तशी व तितकीच धर्माची व अध्यात्माची गरज आहे, असे त्यांचे स्पष्ट मत होते.

ही अज्ञेयवादी भूमिका आहे का? त्यांच्याच शब्दांत सांगायचे तर, ''मी आध्यात्मिक वृत्तीने जगत नाही, पण तत्त्वज्ञानाचा अभ्यासक म्हणून विश्वाचा पसारा समजून घेण्यात आध्यात्मिक दृष्टीला स्थान आहे, असे मानतो... आध्यात्मिक साधनांच्या सर्व रूपांचा मी आदर करतो.''

ज्ञान क्षेत्रातील हा उदारमतवादी दृष्टीकोनही प्रा. रेगे यांच्या व्यक्तिमत्त्वाची अत्यंत लोभस व तितकीच मूल्यवान बाजू होती. या दृष्टीमुळे वादचर्चेत समोरच्या व्यक्तीच्या म्हणण्याचे आकलन त्यांना अचूकपणे होई व चर्चेसाठी निकोप वातावरण तयार होई. कुठल्याही सिद्धान्तात किंवा दृष्टीकोनात वैयक्तिकरीत्या गुंतून न राहता त्याचे साक्षेपी विश्लेषण व विवेचन करण्याची विलक्षण हातोटी त्यांच्याजवळ होती. या वृत्तीनेच त्यांनी अध्यापनाचे व ज्ञानदानाचे कार्य अतिशय ध्येयनिष्ठेने व समरसून केले. महत्त्वाचे म्हणजे, या विचारयज्ञाचा सामाजिक बांधीलकी व कृतिशीलता यांच्याशी असणारा धागाही तेवढाच मजबूत ठेवला.

– डॉ. मीनल कातरणीकर

**संदर्भ :**


१. *डॉ. देव सुनीती, संपादक; 'प्रा. मे.पुं. रेगे यांचे तत्त्वज्ञान'; वितरण : राजहंस प्रकाशन, पुणे; २०००.*
२. *इनामदार, एस.डी.; संपादक : 'मर्मभेद'; मे.पुं. रेगे यांचे टीकालेख; प्रतिमा प्रकाशन, पुणे; २००७.*
३. *डॉ. कामत, प्रतिभा; 'प्रा. मे.पुं. रेगे यांचे तत्त्वचिंतन'; 'परामर्श', खंड २८, अंक १; मे-जुलै २००६.*


र

✻✻✻

# ल

## लाड, पुरुषोत्तम मंगेश

**संतसाहित्याचे गाढे अभ्यासक, अर्थशास्त्रज्ञ**

**२९ मार्च १९०५ – मार्च १९५७**



पुरुषोत्तम मंगेश लाड यांचे प्रारंभिक शिक्षण त्यांच्या आजोळी सावंतवाडी येथे झाले. १९२२मध्ये मॅट्रिक परीक्षेत ते प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण झाले. त्यांना अनेक पारितोषिके व शिष्यवृत्त्या मिळाल्या. मराठी व संस्कृत भाषांवर त्यांचे प्रभुत्व होते. बी.ए.च्या परीक्षेत अर्थशास्त्र आणि इतिहास या विषयांत ते सर्वप्रथम आले. १९२७मध्ये ते लंडन येथे गेले. तेथे त्यांनी परीक्षा दिल्या व ते अर्थशास्त्रज्ञ झाले. नंतर ते आय.सी.एस. उत्तीर्ण होऊन भारतात परत आले.

असिस्टंट कलेक्टर म्हणून सुरतमध्ये त्यांची नेमणूक झाली. नंतर अहमदनगर, धुळे, रत्नागिरी, ठाणे, बेळगाव, पुणे या ठिकाणी सत्र न्यायाधीश म्हणून त्यांची नियुक्ती झाली. १९३७मध्ये ते विलायतेला गेले व बॅरिस्टर होऊन भारतात परतले. नभोवाणी आणि माहिती मंत्र्यांनी त्यांना आपल्या खात्याचे सचिवपद दिले. त्यांनी आकाशवाणीच्या कार्यक्रमात खूपच सुधारणा घडवून आणल्या. कोकणी विभाग सुरू करून विविध कार्यक्रम करण्यात येऊ लागले. या कार्यक्रमांना साहित्यिक स्पर्श व्हावा, म्हणून त्यांनी प्रादेशिक सल्लागार मंडळाची नेमणूक केली. लाड यांनी साहित्यिक कारकिर्दीला सुरुवात केली व ‘प्रतिभा’ या लोकप्रिय नियतकालिकामधून ‘चिकित्सक एम.ए.’ या टोपण नावाने पुस्तक परीक्षण करीत लेख प्रसिद्ध केले. त्यांनी लिहिलेल्या सहा लेखांचा संग्रह ‘कृत्तिका’ या नावाने प्रकाशित झाला. ‘मधुपर्क’ या नावाने त्यांचा काव्यसंग्रह प्रसिद्ध झाला. ते लिहीत असलेले संत तुकारामांचे समग्र चरित्र प्रकृति अस्वास्थ्यामुळे अपूर्णावस्थेतच राहिले. वयाच्या ५२व्या वर्षी मेंदूच्या विकारामुळे त्यांचे निधन झाले.

– संपादित

**संदर्भ :**


१. *मराठी विश्वचरित्रकोश; संपादक - कामत, श्रीराम पांडुरंग; विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा.*


## लाड, भाऊ दाजी

**प्राच्यविद्या पंडित, समाजसेवक आणि वैद्यकशास्त्रज्ञ**

**६ जून १८२२ – ३१ मे १८७४**

☛ ***मुख्य चरित्रनोंद - विज्ञान व तंत्रज्ञान खंड***



भाऊ दाजी लाड यांचा जन्म पेडणे, गोवा येथील मांद्रे या गावी झाला. त्यांचे संपूर्ण नाव रामकृष्ण विठ्ठल लाड असे होते. मात्र ते भाऊ या नावाने लोकप्रिय होते. त्यांचे वडील विठ्ठल (दाजी) कारकुनाचे काम करीत असत. काही व्यवसायामुळे १८३२मध्ये लाड घराणे मुंबई येथे गेले. भाऊ दाजी यांचे प्रारंभिक शिक्षण नारायणशास्त्री पुराणिक यांच्या मराठी शाळेत झाले. मुंबई येथे महाविद्यालयीन शिक्षणानंतर त्यांनी संस्कृत भाषेचा

सखोल अभ्यास केला. नंतरच्या काळात एल्फिन्स्टन महाविद्यालयामध्ये त्यांची नेमणूक झाली. १८४३मध्ये पार्वतीबाई यांच्याशी त्यांचा विवाह झाला.

भाऊ दाजी यांनी कच्छ व काठेवाडमधील बालकन्या हत्येच्या प्रथेवर इंग्रजी व गुजराती अशा दोन भाषांमधून लिहिलेल्या निबंधाला त्यांना बक्षिस मिळाले होते. यामुळे त्यांना संशोधन करण्याविषयी प्रेरणा मिळाली. तसेच अध्ययनालाही चालना मिळाली. नंतर त्यांना ग्रँट मेडिकल कॉलेजची फॅरिश शिष्यवृत्ती मिळाली. १८५१मध्ये त्यांनी वैद्यकशास्त्राची पदवी मिळवली. त्या वेळी विद्यापीठ नसल्याने 'बोर्ड ऑफ एज्युकेशन'ने त्यांना उच्च न्यायालयाच्या न्यायाधीशांच्या हस्ते जी.जी.एम.सी. ही पदवी दिली. सब असिस्टंट सर्जनची जागा निर्माण करून त्या पदावर त्यांना नेमण्यात आले. पण नोकरी न करता त्यांनी स्वतंत्रपणे वैद्यकीय व्यवसाय सुरू केला आणि लोकांकडून 'अश्विनीकुमार, धन्वंतरी' अशा शब्दात गौरव प्राप्त केला. त्यांचे रक्तपित्तावरील औषध रामबाण समजण्यात येई.

महाविद्यालयामध्ये असताना त्यांनी ग्रंथपालाचे काम केले. कुष्ठरोगावर वनस्पतींच्या बियांपासून तयार केलेले देशी औषध शोधून काढले. पुढे त्यांनी वैद्यकीय व्यवसायात पदार्पण केले. अचून निदान व शस्त्रक्रियेतील कौशल्य यामुळे त्यांनी अमाप लोकप्रियता मिळवली.

त्यांनी अनेक सामाजिक आणि औद्योगिक सुधारणांकडेही लक्ष पुरवले. मुंबईत कापूस व कापड गिरण्या उभारण्यात त्यांचा महत्त्वाचा वाटा आहे. १८५४मध्ये वेस्टर्न इंडियन कॅनल अँड इरिगेशन या कंपनीचे ते संचालक बनले.

'स्टुडंट लिटररी अँड सायंटिफिक सोसायटी' या संस्थेचे ते १८६३-१८७३ या कालावधीमध्ये पहिले भारतीय अध्यक्ष होते. विधवा विवाह चळवळीला त्यांचा पाठिंबा होता. लोहार चाळीतल्या कन्याशाळेला त्यांनी आर्थिक साहाय्य दिले होते. हीच कन्याशाळा 'भाऊ दाजी लाड गर्ल्स स्कूल' या नावाने प्रसिद्ध आहे. जातिव्यवस्थेचे ते कट्टर विरोधक होते. त्यांनी सार्वजनिक कामे पाहून सरकारने मुंबईच्या शेरीफ पदावर त्यांची नेमणूक केली.

वनस्पती आणि प्राचीन इतिहास यांचे त्यांनी संशोधन केले. त्यांनी भारतभर प्रवास करून हस्तलिखिते, शिलालेखांचे ठसे, दुर्मीळ चित्रे, नाणी, ताम्रपट, शस्त्रे यांचा संग्रह केला.

संस्कृत वाङ्मयातील त्यांच्या संशोधनाची सुरुवात कालिदासाच्या कालनिर्णयापासून झाली. नंतर शकाच्या हल्ल्याशी संबंध असणाऱ्या कालकाचार्यांची जैन कथा, जैन धर्माचार्यांची परंपरा, जैन पट्टावलीचा कालानुक्रम, हेमाद्रीचा काल वगैरे संशोधनांनी ते विख्यात झाले. कालनिर्णयावर त्यांची बरीच टिपणे आहेत.

शिलालेखवाचनाच्या बाबतीतील त्यांचे कार्य महत्त्वाचे आहे. गिरनार पर्वतावरील रुद्रदामनचा व त्याच पर्वतावरील गुप्तांचे शिलालेख त्यांनी प्रथम वाचले. गुप्त-शिलालेख वाचताना गुप्तशकाचा सार्वत्रिक प्रचार त्यांच्या ध्यानी आला व ते सर्व शिलालेख गुप्तकाळातील असल्याचे त्यांनी ठरवले. शक, गुप्त व मैत्रक यांचे शक आणि घराण्यासंबंधी यांनी ठरवलेले सिद्धान्त दीर्घकाळ अबाधित राहिले.

याशिवाय यांनी कितीतरी शिलालेख पद्धतशीरपणे वाचन व भाषांतर करून प्रथमच लोकांपुढे आणले. मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीचे ते पहिले हिंदी सभासद होते. त्यांनी अगदी आरंभीच्या काळात या क्षेत्रात पाऊल टाकून प्रतिकूल परिस्थितीत महत्त्वाची कामगिरी बजावली.

'भगवानलाल इंद्रजी' ही त्यांची संशोधनशाखेला महत्त्वाची देणगी होय. ग्रँट मेडिकल कॉलेजमध्ये ले. एस.आर. मुळगावकर यांच्या हस्ते त्यांच्या तैलचित्राचे अनावरण करण्यात आले.मुंबईच्या 'रॉयल एशियाटिक सोसायटी'चे ते प्रथम भारतीय सभासद होते, नंतर अध्यक्ष झाले. त्यांच्या मृत्यूनंतर 'रायटिंग्ज अँड स्पीचेस ऑफ डॉ. भाऊ दाजी' या शीर्षकाखाली त्र्यं.गो. माइणकर यांनी १९७४मध्ये त्यांचे समग्र लेखन संपादित

करून प्रसिद्ध केले. त्यांच्या स्मृत्यर्थ संस्कृत विषयात बी.ए. परीक्षेत सर्वप्रथम विद्यार्थ्यास भाऊ दाजी लाड पुरस्कार दिला जातो.

— संपादित

**संदर्भ :**


*१. मराठी विश्वचरित्रकोश; संपादक - कामत, श्रीराम पांडुरंग; विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा.*

*२. चित्राव सिद्धेश्वरशास्त्री, संपादक; अर्वाचीन चरित्रकोश*


## लामतुरे, रामलिंगप्पा खंडप्पा

**पुरातन वस्तुसंग्राहक, संशोधक, तज्ज्ञ**

**१९०४ — १९७४**



पेरिप्लस आणि टालेमी यांनी उल्लेख केलेले म्हणजे आजच्या उस्मानाबाद जिल्ह्यातील तेर हेच ठिकाण प्राचीन 'तगर' होय असे फ्लीट आणि हेन्री कझिन्स यांनी जरी सुनिश्चित केले असले, तरी इसवी सनाच्या प्रारंभिक शतकात सातवाहनकालीन भारत व रोम या देशांदरम्यान होणाऱ्या व्यापाराचे प्रसिद्ध केंद्र अर्थातच प्राचीन 'तगर' या स्वरूपात वस्तुनिष्ठ पुराव्याने तेरची खरी ओळख पटवून देण्याचे महत्कार्य जर कोणी केले असेल, तर ते आहेत तेरचे रहिवासी रामलिंगप्पा लामतुरे. त्यांच्यामुळेच तेर या गावाला भारतात तसेच अन्य देशांतही बरीच ख्याती प्राप्त झाली आहे. रामलिंगप्पांचा जन्म तेर येथे झाला. त्यांच्या आईचे नाव सुगंधाबाई असे होते. बीड जिल्ह्यातील युसुफ वडगाव हे त्यांचे मूळ गाव होते. येथे त्यांचे शेत व स्वतःचे घर होते. घरची परिस्थिती हलाखीची होती, म्हणून उपजीविकेसाठी ते उस्मानाबाद जिल्ह्यातील तेर या गावी आले आणि मोलमजुरी करून द्रव्यार्जन करू लागले. रामलिंगप्पा हे खंडप्पांचे एकमेव अपत्य होते. रामलिंगप्पांचे प्रारंभिक जीवन अत्यंत हलाखीचे होते. त्यामुळे त्यांना प्राथमिक शिक्षणही पूर्ण घेता आले नाही. तेर येथील गावठी शाळेतच इयत्ता तिसरीपर्यंत त्यांचे शिक्षण झाले. आप्पांचे मराठी व मोडीचे अक्षर अतिशय सुंदर होते. ते कपड्याच्या व्यापाराची नोंद मोडीतच करत असत. त्यांचे शिक्षण अल्प असले, तरी व्यवहारातून आप्पांनी बऱ्याच भाषांचे ज्ञान अवगत केले होते.

अंदाजे ९ ते १०व्या वर्षी त्यांचा पहिला विवाह झाला. काही कालावधीनंतर त्यांचा दुसरा विवाह झाला. आप्पांची दुसरी पत्नी उस्मानाबाद जिल्ह्यातील वाणेवाडी येथून असून त्यांचे नाव ममताबाई असे होते. आप्पांना एक मुलगा व दोन मुली अशी तीन अपत्ये झाली. मुलाचे नाव होते भागवत आप्पा. ते सर्वात शेवटचे अपत्य होते.

रामलिंगप्पांचे संपूर्ण आयुष्य तेर येथेच गेले. प्रारंभी हालअपेष्टात दिवस काढून त्यांनी एका सावकाराकडे १५ रुपये पगारावर मुनीमाची नोकरी केली. नंतर स्वतःचा व्यवसाय करावयास आरंभ केला. शेती, कापड व्यापार आणि सावकारी यावर किफायतशीर धंदा करून एक धनाढ्य व प्रतिष्ठित नागरिक म्हणून त्यांनी लौकिक मिळवला. माणसाची पारख करण्याची त्याची कला उच्च दर्जाची होती. एखाद्या घटनेचे सूक्ष्म निरीक्षण करून त्याच्या तळाशी जाऊन ते आत्मसात करायचे कसब हे रामलिंगप्पांच्या स्वभावातील सर्वात महत्वाचे वैशिष्ट्य होते. त्यांचे राहणीमान अत्यंत साधे असले तरी शिस्तबद्ध होते.

रामलिंगप्पा लामतुरे यांनी तेर अर्थात प्राचीन तगर या गावी सापडणाऱ्या पुरातन वस्तूंच्या जमवलेल्या अजोड संग्रहामुळेच या गावास देशात व परदेशांतही बरीच ख्याती प्राप्त झाली. तसेच यावरून लामतुरे यांचे इतिहासप्रेम, कलासक्ती आणि आपल्या प्राचीन सांस्कृतिक वारशाबद्दलचा जिव्हाळा दिसून येतो. रामलिंगप्पा लामतुरे यांना तेरच्या परिसरातून जुन्या वस्तू गोळा करण्याचा नाद अगदी सहजगत्या लागला. सन १९३०च्या सुमारास एक युरोपियन गृहस्थ लातूर येथील राजस्थान विद्यालयाचे तत्कालीन बंगाली हेडमास्तर चटर्जी यांच्याबरोबर तेर येथे आले होते. तेव्हा आप्पांना

ल

सोबत घेऊन त्यांनी तेर येथील प्राचीन मंदिरे व अवशेष पाहिल्यावर परत जाताना प्राचीन वसाहतीच्या टेकाडांवरील काही खापरेही ते रुमालात मोठ्या आस्थेने जमा करून घेऊ लागले. तेव्हा ''हा काय प्रकार आहे?'' असे आप्पांनी हेडमास्तर चटर्जी यांच्यामार्फत त्या युरोपियन महोदयांना विचारले. तेव्हा त्यांनी 'इतिहासरचनेस ही खापरे अत्यंत महत्त्वाची आहेत' असे उत्तर दिले. खापऱ्या जमवणाऱ्यांचा अतीव उत्साह व सापडणाऱ्या मूर्तींची व इतर पुरातन वस्तूंची कलाकुसर पाहून रामलिंगप्पा यांनीही तशा वस्तू गोळा करण्यास सुरुवात केली. प्रथम शाडूच्या (केओलीनच्या) बाहुल्यांवर त्यांनी जास्त भर दिला. नंतर गावातील खेळकरी मुलांना पैपैसा देऊन त्यांनी सापडेल ती पुरातनवस्तू जमा करून वर्षानुवर्षे त्यांची जपणूक करण्यास सुरुवात केली.

तेरच्या परिसरात सापडणाऱ्या प्राचीन वस्तूंचा संग्रह एक छंद म्हणून लामतुरे यांनी जमवला. जवळजवळ ४० ते ४५ वर्षांच्या दीर्घ कालावधीत त्यांनी विविध वस्तू गोळा केल्या. खापरे, भाजलेल्या मातीच्या व शाडूच्या (केओलीनच्या) वस्तू व बाहुल्या, रोमन मृद्भांडी, रोमन बनावटीचे दिवे, रोमन बनावटीची दगडी जाती, नाणी, हस्तिदंती व हाडाच्या मूर्ती, शंखाच्या बांगड्या, वेगवेगळ्या दगडांचे (उपरत्नांचे) आणि मातीचे निरनिराळ्या आकारातील मणी, अलंकार व नाणी तयार करावयाचे साचे, कर्णभूषणे, हस्तिदंती अंजन-शलाका, हस्तिदंती अत्तरदाणी, धान्य मोजण्याचे माप, वेगवेगळ्या आकाराच्या सुरया, रोमन ॲम्फोरा, अर्चनाकुंड (votive tank) वेगवेगळ्या आकारातील ताईत, खेळणी, माती व शंखापासून तयार केलेले फासे, द्यूत खेळण्यासाठीचे लांब, आखूड व चौकोनी आकाराचे हस्तिदंती फासे, काचेच्या वस्तू, दगडी मूर्त्या व शिल्पावशेष, सती शिळा आणि शिलालेख इत्यादी पुरातन वस्तू त्यांनी सहजगत्या जमवल्या. त्यांच्या संग्रहातील एक हस्तिदंती मूर्ती प्रख्यात असून रोमच्या पॉम्पे येथील उत्खननात मिळालेल्या हस्तिदंती मूर्तीशी तिचे कमालीचे साम्य आहे. तेर येथे सापडणाऱ्या रोमन बनावटीच्या वस्तू व मृद्भांडे आणि रोम येथे सापडणाऱ्या भारतीय बनावटीच्या हस्तिदंती व इतर वस्तू भारत व रोम या देशांमध्ये सातवाहनकालात होत असलेल्या व्यापाराची साक्ष देतात व त्या कालखंडात तेर हे अशा आंतरराष्ट्रीय व्यापाराचे केंद्र होते, असेही सिद्ध करतात.

तेर येथे भेट देणारे पुरातत्त्व खात्याचे अधिकारी, परदेशी प्रवासी व संशोधक यांच्या साहाय्याने आवश्यक तेवढे अध्ययनही आप्पांनी केले व प्रत्येक वस्तूतील बारकावे व लकबी लवकरच आत्मसात केल्या. वस्तूंचे सान्निध्य व वारंवार मार्गदर्शन प्राप्त होत गेल्याने वस्तूंचा झालेला परिचय ह्यांच्यामुळे तेरमधील कुठलीही वस्तू त्यांच्यासमोर नेली, तर तिचे प्राचीनत्व व शैली इत्यादीविषयीचा अचूक अंदाज ते बांधू शकत होते. वस्तू जमवण्याचा त्यांचा छंद त्यांच्या मृत्यूपर्यंत सतत सुरूच होता. १९७४ साली आप्पा कैलासवासी झाले.

रामलिंगप्पा लामतुरे यांचा पुरातन वस्तुसंग्रह इतका वैशिष्ट्यपूर्ण व महत्त्वाचा सिद्ध झाला की त्या आधारे विविध दालनांचे एक संग्रहालय स्थापन करणे क्रमप्राप्त झाले. पंडित भगवानलाल इंद्रजी, रामकृष्ण भांडारकर, फ्लीट, हेन्री कझिंस, बार्नेट, राजवाडे, ग.ह. खरे, डॉ. मोरेश्वर गंगाधर दीक्षित, डॉ. शां.भा. देव, म.न. देशपांडे, म.के. ढवळीकर, तगारे इत्यादी भारतीय व परदेशी विद्वान संशोधकांनी वेळोवेळी तेरला भेटी देऊन तेरचा प्राचीन इतिहास जाणून घेण्याचा प्रयत्न केला. यापैकी अधिकांश संशोधकांनी आपापल्या भेटीदरम्यान आप्पांची प्रत्यक्ष भेट घेऊन त्यांच्या पुरातन वस्तु संग्रहाचे व त्यांचे कौतुक केले.

भुलाभाई देसाईंच्या स्नुषा माधुरीबेन देसाई यांनी ब्रिटिश म्युझिअमचे डॉ. डग्लस बॅरट यांच्याबरोबर तेरला येऊन जेव्हा रामलिंगप्पांचा संग्रह पाहिला, तेव्हा ते थक्कच झाले. १९६७-६८ साली तेर येथे महाराष्ट्र राज्य पुरातत्त्व विभागातर्फे सुरू असलेल्या उत्खननास माधुरी देसाई व डग्लस बॅरट यांनी भेट दिली. त्या भेटीदरम्यान, तत्कालीन पुरातत्त्व संचालक

ल

डॉ. दीक्षितांच्या आदेशानुसार उत्खननात सहभागी प्रस्तुत लेखकास आप्पांचा उक्त वस्तुसंग्रह डग्लस बॅरट यांना दाखवण्याची जबाबदारी देण्यात आली. त्या वेळी संग्रहातील हस्तिदंती मूर्ती पाहून ते अत्यंत प्रसन्न झाले आणि आप्पांकडे, त्या मूर्तीची दहा हजार डॉलर्स एवढी किंमत देण्याची इच्छा व्यक्त केली. रामलिंगप्पांना हे अनपेक्षित ऐकून धक्काच बसला आणि त्यांनी हस्तिदंती बाहुलीच काय, संग्रहातील कोणतीही वस्तू विकण्यास स्पष्ट नकार दिला. शेवटी रामलिंगप्पांनी आपल्या प्राणांपेक्षाही जास्त जपलेल्या त्यांच्या पुरातन वस्तूंकरिता साजेसे संग्रहालय स्थापित करण्याचा प्रस्ताव समोर आला. याला मूर्त रूप देण्याकरता तत्कालीन शिक्षण मंत्री मधुकरराव चौधरी यांच्या सूचनेप्रमाणे देवीसिंह चौहान आणि उस्मानाबादचे तत्कालीन जिल्हाधिकारी पानसे यांची एक समिती नेमण्यात आली. वस्तुसंग्रहालय तेर येथेच स्थापन व्हावे, या अटीवर कसलाही मोबदला न घेता आप्पांनी आपला संग्रह महाराष्ट्र शासनास देऊ केला. त्यानुसार १९६७ साली शासनाने हा संग्रह आपल्या ताब्यात घेण्याचा निर्णय घेतला. त्या वेळी या संग्रहात २३८९२ पुरातन वस्तू होत्या. नियोजित संग्रहालय तेर येथे शासकीय जागेवर बांधलेल्या इमारतीत जानेवारी १९८० साली औपचारिकरित्या जनतेकरता खुले करण्यात आले. आप्पांच्या स्मरणार्थ या संग्रहालयास ‘कै. रामलिंगप्पा शासकीय पुराण वस्तुसंग्रहालय, तेर’ असे नाव दिले.

— के. दे. कावडकर

**संदर्भ :**


1. *Douglas Barrett - Ter (1960)*
2. *Chapekar B.N. : Report on excavation at Ter (1969)*
३. *डॉ. दीक्षित मो. ग. पुरातत्त्व विभाग म.शा. - भारतीय इतिहास आणि संस्कृती त्रैमासिक. एप्रिल व जुलै १९७२ (तेर वस्तुसंग्रहालयातील पुरातन वस्तूंचा परिचय)*
४. *देव शां. भा. - तेर, पुरातत्त्व व वस्तुसंग्रहालये विभाग म. शा. (१९७५)*
५. *प्रा. जामवाडीकर सुलभा : सुवर्णनगरी तेर (१९९३) (एम. फिल. प्रबंध - मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद यावर आधारित)*
६. *प्रा. भोसले राजेसाहेब गंगाधरराव - रामलिंगप्पा लामतुरे यांचे ऐतिहासिक योगदान, (एप्रिल २००८) (यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ नाशिक येथे मान्य एम.फिल. प्रबंध)*


## लाळ्ये, प्रमोद गणेश
**संशोधक, अभ्यासक**
**१९२८**



प्रमोद गणेश लाळ्ये यांचा जन्म पुण्यात झाला व त्यांचे शिक्षणही पुणे येथेच झाले. त्यांनी पुणे विद्यापीठात संस्कृत विषयात व नंतर हैद्राबादच्या उस्मानिया विद्यापीठातून हिंदी विषयात अशा दोन एम.ए. पदव्या संपादन केल्या. तसेच १९६९ साली उस्मानिया विद्यापीठातून त्यांनी पीएच.डी. प्राप्त केली. त्यांच्या प्रबंधाचा विषय ‘स्टडीज इन देवी भागवत’ असा होता. याखेरीज ते हिंदी प्रचारसभेचे साहित्याचार्य आहेत. प्रा. लाळ्ये यांचे संस्कृत साहित्य व भाषाविज्ञान या क्षेत्रांत महत्त्वाचे योगदान आहे. सन २०००मध्ये त्यांना राष्ट्रपती गौरव प्रमाणपत्राने सन्मानित करण्यात आले.

प्रा. लाळ्ये यांनी उस्मानिया विद्यापीठाच्या संस्कृत विभागात संशोधनाचे व अध्यापनाचे दीर्घकाळ कार्य केले, आणि तेथूनच ते १९८८मध्ये विभागप्रमुख या पदावरून निवृत्त झाले. त्यांची दहा पुस्तके व अनेक शोधनिबंध आहेत. त्यांतील ‘स्टडीज इन देवी भागवत’ (पॉप्युलर प्रकाशन, १९७३), ‘पुराणविमर्शसूची’ (१९८५), ‘मल्लीनाथ’ (साहित्य अ‍ॅकॅडमी, २००२), ‘लौकिकनायककोश’ (भारतीय कला प्रकाशन, २००६) व ‘कर्सेस अ‍ॅन्ड बून्स इन वाल्मिकी रामायण’ (भारतीय कला प्रकाशन, २००८) हे ग्रंथ महत्त्वाचे

ल

आहेत. प्रा. लाळ्ये यांच्या सन्मानार्थ 'प्रमोदसिंधू' हा गौरवग्रंथ २००३ मध्ये प्रकाशित झाला आहे.

— डॉ. प्रमोद जोगळेकर

## लिमये, विष्णू प्रभाकर

**प्राच्यविद्या अभ्यासक, लेखक, संपादक**

**२८ एप्रिल १९०० — २८ मार्च १९८४**



विष्णू प्रभाकर लिमये यांचा जन्म सांगली येथे झाला, मात्र त्यांचे शिक्षण आणि बाकी सर्व कार्य पुण्यात झाले. १९१७ मध्ये ते मॅट्रिक झाले तेव्हा ते सर्व विद्यार्थ्यांत तिसरे आणि संस्कृतमध्ये पहिले आले होते. त्यांना जगन्नाथ शंकरशेठ शिष्यवृत्तीही मिळाली होती. पुढे त्यांनी फर्गसन महाविद्यालयात शिक्षणास सुरुवात केली; परंतु बी.ए.च्या शेवटच्या वर्षातील दुसऱ्या सत्रामध्ये, १९२१ मध्ये काँग्रेसच्या असहकारितेच्या आंदोलनात भाग घेऊन त्यांनी महाविद्यालय सोडले. नंतर राष्ट्रीय शिक्षण संस्थेच्या टिळक महाविद्यालयातून ते १९२१ मध्ये 'वाङ्मय विशारद' झाले.

विष्णू लिमये यांनी १९२१ ते १९३३ या काळात टिळक महाविद्यालयात अध्यापनाचे कार्य केले, तसेच १९२४ मध्ये त्या महाविद्यालयाचे प्राचार्य म्हणूनही त्यांनी कार्य केले. कायदेभंगाबद्दल १९३४ मध्ये त्यांना तीन महिने कारावासाची शिक्षा झाली. १९३८ ते १९४० या काळात ते पुणे महानगरपालिकेचे सदस्य होते. १९३९ ते १९४६ मध्ये ते पुणे शहर काँग्रेसचे अध्यक्ष व त्यानंतर महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमिटीचे, त्याचप्रमाणे अखिल भारतीय काँग्रेस कमिटीचे सदस्य होते. १९४०-४१ मध्ये सत्याग्रह, १९४२ मध्ये 'चले जाव' चळवळीतील सहभाग यांमुळे त्यांना कारावास घडला, त्यांनी १९५० मध्ये मुंबईच्या 'नवभारत' दैनिकाचे संपादक म्हणून कार्य केले. १९५५ मध्ये त्यांची मुंबई विधान परिषदेत नेमणूक झाली; परंतु संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनात झालेल्या गोळीबारानंतर लिमये यांनी तेथून राजीनामा दिला. विष्णू लिमये यांनी भूदान, सर्वोदय अशा आंदोलनांतही भाग घेतला.

१९७६ मध्ये आणीबाणीच्या काळात, विनोबा भावे यांच्या 'आचार्य संमेलना'तही ते उपस्थित होते. त्यांना १९७७ मध्ये संस्कृतमधील पांडित्य आणि शास्त्रनिष्ठा यांसाठी राष्ट्रपती पुरस्कार मिळाला. आचार्य लिमये १९२१ ते १९७१ दरम्यान टिळक महाराष्ट्र विद्यापीठाच्या नियामक मंडळाचे आणि कार्यकारी मंडळाचे सदस्य होते, तसेच उपाध्यक्षही होते. १९५४ ते १९६४ या काळात ते पुणे विद्यापीठाच्या विधिसभेचे सदस्य होते. भारतीय धर्म, तत्त्वज्ञान मंडळाचे संचालक होते. याशिवाय, पुणे विद्यापीठातील संस्कृत प्रगत अध्ययन केंद्राच्या सल्लागार मंडळाचे सदस्य, भारत इतिहास संशोधक मंडळाचे उपाध्यक्ष, पुणे येथील भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिराचे उपाध्यक्ष, कार्यकारी मंडळाचे सदस्य अशा विविध ठिकाणी त्यांनी प्राच्यविद्येच्या क्षेत्रात कार्य केले.

आचार्य विष्णू प्रभाकर लिमये यांचे लेखन व प्रकाशनकार्यही विपुल प्रमाणात आहे. त्यांनी यामध्ये १९२८ मध्ये अल्बेरूणीची गीता आणि इतर निबंध, १९३५ मध्ये आचार्य रबडे यांचे चरित्र, १९६५ मध्ये 'वाक्यपदीय', १९७२ मध्ये 'कौशिकसूत्रदीरे' याचे संपादन व सहकार्य, १९७४ मध्ये 'क्रिटिकल स्टडीज ऑन द महाभाष्य', १९७६ मध्ये डॉ. हरी दिवेकर यांच्या निवडक लेखसंग्रहाचे संपादन, १९८२ मध्ये 'कौशिकसूत्र' व 'कौशिकपद्धती'चे संपादन, 'ॲडिशन ॲण्ड करेक्शन टू सरनप्स निरुक्त इन पाणिनि' आणि भर्तृहरिकृत 'महाभाष्य दीपिका'चे संपादन असे विस्तृत कार्य केले. आचार्य लिमये यांची बुद्धी अतिशय तरल होती. अगदी दूरच्या दोन गोष्टींमधले साम्य आणि वैषम्य त्यांना अगदी सहजपणे लक्षात येत असे. अशा प्रकारचे तुलना करण्याचे कौशल्य त्यांच्या उपनिषदे,

ल

वाक्यपदीय, निरुक्त, महाभाष्य यांसंबंधीच्या टिपांमध्ये वाचकाला जाणवत राहते. ते जन्मजात 'नैरुक्त' होते. अनेक शब्दांच्या व्युत्पत्तींसंबंधीचे त्यांचे लिखाण आणि काही टिपणे अप्रकाशितच राहिली आहेत. अशा प्रकारच्या शाब्दिक क्रीडा ते सतत करीत आणि भेटणाऱ्या व्यक्तींना त्या क्रीडा ऐकवीत. अशा क्रीडांचे वर्णन ते 'चूष' या शब्दाने करीत. त्यांची जिज्ञासा, विद्यार्थिदशा शेवटपर्यंत ताजी राहिली. मृत्यूपूर्वी सहा दिवस आधी लिहिलेली त्यांची वाक्ये त्यांच्या व्यक्तिमत्त्वावर प्रकाश टाकतात. 'देशासाठी कार्य केले, अध्यात्माचा विचार केला, संस्कृत विद्येची जोपासना केली; परंतु आत्मज्ञान झाले नाही.'

— डॉ. गणेश थिटे

## लेले, वामन केशव

**भाषा अभ्यासक, समीक्षक**

**२९ मे १९३३ — १३ फेब्रुवारी २००७**



डॉ. वामन केशव लेले हे संस्कृतकाव्यशास्त्र आणि पाश्चात्त्य शैलीशास्त्र यांचे गाढे अभ्यासक आणि समीक्षक होते. त्यांना मराठी, संस्कृत, इंग्रजी, हिन्दी आणि गुजराती अशा पाच भाषा अवगत होत्या. मराठी आणि संस्कृत या दोन्ही भाषांमधील अधिकारी विद्वान म्हणून त्यांचा लौकिक होता. अध्यापन आणि अध्ययन यांबरोबरच त्यांनी अनेक गंभीर व संशोधनपर ग्रंथ लिहिले. ते ग्रंथ देशविदेशांत मान्यता पावले.

विश्वविद्यालय अनुदान आयोगाच्या योजनेच्या अंतर्गत पुणे, नागपूर व मराठवाडा विद्यापीठांमध्ये 'पाश्चात्त्य शैलीशास्त्र आणि मराठी साहित्य' ह्या विषयावर व्याख्याने देऊन त्यांनी अभ्यासकांच्या मनांत जिज्ञासा उत्पन्न केली या प्रयत्नांमुळे कालांतराने महाराष्ट्रातील सर्वच विद्यापीठांनी शैलीशास्त्र हा एक स्वतंत्र विषय म्हणून आपापल्या एम.ए.च्या अभ्यासक्रमांत समाविष्ट केला.

वा.के. लेले यांचा जन्म मुंबईत कुर्ला येथे झाला. केशव बाबूराव लेले हे त्यांचे वडील. ते नामवंत शिल्पकार व सुवर्णपदकांचे मानकरी होते. त्यांच्या शिल्पांची प्रदर्शने त्या काळात परदेशांतही भरत असत. चिकाटी आणि नेटक्या कामाचे संस्कार त्यांच्यावर वडिलांकडूनच झाले. त्यांच्या आईचे नाव लक्ष्मी. कोकणातील मुटाट हे लेल्यांचे मूळ गाव. डॉ. वामनराव लेले यांचे प्राथमिक शिक्षण दादरला म्युनिसिपल शाळेत झाले आणि हायस्कूलचे शिक्षण पिंटो व्हिला हायस्कूल (हल्लीचे किंग जॉर्ज — राजा शिवाजी विद्यालय) येथे झाले. त्यांच्या वडिलांचे अकाली निधन झाल्यामुळे त्यांना मॅट्रिकनंतरचे संपूर्ण शिक्षण नोकरी सांभाळून करावे लागले. कारण, थोरला मुलगा या नात्याने आई आणि धाकटा भाऊ यांची जबाबदारी त्यांच्यावरच होती. मॅट्रिक झाल्यावर लगेचच ते एल.आय.सी.मध्ये नोकरी करू लागले. सकाळचे महाविद्यालय आणि पूर्ण वेळ नोकरी असा त्यांचा दिनक्रम असे. इतके कष्ट करूनही त्यांनी प्रथम श्रेणी मात्र सोडली नाही. एम.ए.ला मराठी विषय घेऊन मुंबई विद्यापीठात प्रथम श्रेणी प्रथम क्रमांकाने मिळवून त्यांनी 'न.चिं. केळकर' सुवर्णपदक पटकावले आणि वडिलांचा वारसा राखला.

एम.ए. झाल्याबरोबर १९५७ मध्ये मुंबईला ना.दा. ठाकरसी महिला विद्यापीठात त्यांनी मराठी आणि संस्कृत शिकविण्यास प्रारंभ केला. चार वर्षांनंतर म्हणजे १९६१ मध्ये ते बनारस हिंदू विद्यापीठात मराठी विषयाचे विभागप्रमुख म्हणून गेले. हे स्थलांतर त्यांच्या संस्कृत साहित्यशास्त्राच्या सखोल अभ्यासाचा पाया ठरले. कारण, तेथील वास्तव्यात त्यांना अनेक शास्त्री-पंडितांचा सहवास लाभला. 'भारतीय काव्यशास्त्राची उत्क्रान्ती : प्रथम युग' हा त्यांचा प्रबंध त्याच अभ्यासाचे फलित होते. या प्रबंधाचे वैशिष्ट्य म्हणजे, त्यांनी स्वत: अभ्यास करून मार्गदर्शिका, शिवाय प्रबंधरचना करून, तो बनारसहून पुणे विद्यापीठात सादर केला. त्याकरिता

ल

त्यांना महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार यांची परवानगी मिळवावी लागली. त्यांच्या प्रबंधाचे परीक्षक होते तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी व डॉ. रा.बा. आठवले. त्यांचा हा प्रबंध म्हणजे काव्यशास्त्राच्या प्रथम युगाचा धांडोळा चिकित्सक पद्धतीने घेणारा एक छोटा ज्ञानकोशच आहे. हा प्रबंध त्यांनी मुद्रित स्वरूपात विद्यापीठाला सादर केला व पुढे यथावकाश तो ग्रंथरूपात प्रसिद्ध झाला. पुणे विद्यापीठाचे उत्कृष्ट प्रबंधाबद्दल डॉ. य.वि. परांजपे पारितोषिक आणि न.चिं. केळकर पारितोषिक डॉ. वामनराव लेले यांना १९६९-१९७० मध्ये मिळाले. १९७० मध्ये महाराष्ट्र शासनाने पुरस्कार देऊन या ग्रंथाचा यथार्थ गौरव केला. त्या वेळी ते बनारस येथेच होते. बनारस हिंदू विद्यापीठात मराठी विभागाला प्रतिष्ठा प्राप्त करून देण्यासाठी त्यांनी अतिशय कष्ट घेतले.

महाराष्ट्रातील विद्यापीठांमध्ये शैलीशास्त्र हा विषय सुरू करण्यास जसे ते कारणीभूत ठरले, त्याचप्रमाणे अतिशय जिद्दीने, अडचणींवर मात करून बनारस हिंदू विद्यापीठातही एम.ए.च्या अभ्यासक्रमात त्यांनी 'Western Stylistics and its Application' हा नवीन विषय सुरू केला आणि पुढे अनेक वर्षे शिकविला. बनारसला असतानाच स्वत:चा व्यासंग, अध्यापन, पीएच.डी.च्या विद्यार्थ्यांना मार्गदर्शन यांबरोबरच त्यांचे लेखनही सतत चालू होते. साहित्यशास्त्र, शैलीशास्त्र इत्यादी विषयांवर सखोल अभ्यास करून त्यांनी वीस ग्रंथ लिहिले. त्यांपैकी 'कविकण्ठाभरण', 'भारतीय काव्यशास्त्राची उत्क्रान्ती', 'काव्यशास्त्र व संस्कृती', 'ललितलेखन व शैली', 'ज्ञानेश्वरीचा शास्त्रीय अभ्यास' ('The Doctrine of the Tantrayuktis') 'कलेतिहास व रसग्रहण', 'औचित्य सिद्धान्त' आणि 'औचित्यविचारचर्चा' या ग्रंथांचा विशेषत्वाने उल्लेख करावयास हवा. १९९३ मध्ये सेवानिवृत्त होऊन ते पुण्याला स्थायिक झाले. त्यानंतर २००६ पर्यंत त्यांनी आणखी बारा ग्रंथांची निर्मिती केली. त्यांची ग्रंथरचना प्रामुख्याने मराठी, इंग्रजी व हिन्दी या भाषांमध्ये आहे.

डॉ. वामनराव लेले यांनी लिहिलेल्या शोधनिबंधांपैकी १४० निबंध निरनिराळ्या ठिकाणी प्रकाशित झाले आहेत. त्यांनी लिहिलेल्या एकूण बत्तीस ग्रंथांपैकी तेरा ग्रंथांना पुरस्कार प्राप्त झाले. त्यांत महाराष्ट्र शासनाने चार, तर केन्द्र सरकारचा विश्वविद्यालयस्तरीय मौलिक ग्रंथासाठीचा १९८१ मध्ये मिळालेला पुरस्कार यांचाही समावेश आहे. याखेरीज, महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक संस्था, पुणेतर्फे, 'अमृत महोत्सव विशेष पारितोषिक' १९६९ मध्ये व नंतर १९७१ व १९७६ मध्ये पुन्हा दोन पुरस्कारांनी त्यांना सन्मानित केले. काशी हिन्दू विश्वविद्यालयाने (वाराणसी) ५ सप्टेंबर २००१ रोजी मानपत्र व विश्वविद्यालयाचे बोधचिन्ह देऊन निष्ठावान शिक्षक म्हणून त्यांचा सुयोग्य सन्मान केला. निरनिराळ्या सतरा देशी व विदेशी नियतकालिकांमध्ये त्यांचा अल्प वा विस्तृत परिचय प्रसिद्ध झालेला आहे.

२००१ ते २००६ या कालावधीत त्यांनी 'मराठी-इंग्रजी व्यावहारिक वाक्यकोश' भाग १, २, ३ यांची निर्मिती केली. वयाची सत्तरी ओलांडली तरी त्यांचे लेखन सातत्याने चालूच होते. राजहंस प्रकाशनाने त्यांचे तीन वाक्यकोश प्रकाशित केले. त्या वेळी लिहिलेल्या एका पत्रात दिलीप माजगावकरांनी असे म्हटले होते,

'एक विषय अभ्यासासाठी निवडला, की त्याचा तळ गाठायचा आणि लेखन इतकं चिरेबंदी करायचं, की समीक्षकाला त्याची पसंतीची टाळी वाजवावीच लागेल, असं तुमचं काम असतं.' आयुष्याच्या अखेरीपर्यंत ते सतत अध्ययन, अध्यापन, संशोधन आणि लेखन यांत मग्न होते. ते अनेक सामाजिक आणि शैक्षणिक संस्थांचे सभासद होते. त्यांनी केलेले लेखन हे पुढील अनेक पिढ्यांना मार्गदर्शक ठरेल असेच आहे. सुंदर हस्ताक्षर, शिस्तबद्ध लेखन, चिकाटी, उत्तम वक्तृत्व आणि वैचारिक समीक्षण ही त्यांची प्रमुख वैशिष्ट्ये होत. त्यांच्या अखेरच्या आजारपणातही त्यांनी 'प्राचीन भारतीय वाङ्मयीन संस्कृती' हा ग्रंथ लिहिला, पण तो प्रसिद्ध होऊ शकला नाही. त्यांचे पुण्यात निधन झाले.

— डॉ. रोहिणी केतकर

## लेवी, सिल्व्हन लुईस

**फ्रेंच प्राच्यविद्यापंडित व इतिहास संशोधक**

**२८ मार्च १८६० - ३० ऑक्टोबर १९३५**



सिल्व्हँ लेव्ही यांचा जन्म मध्यमवर्गीय सुशिक्षित कुटुंबात झाला. पॅरिस येथे त्यांचे सर्व शिक्षण झाले. प्रख्यात फ्रेंच संस्कृत पंडित अबेल बर्ग्ने यांच्या सहवासाने त्यांना संस्कृत भाषा व बौद्ध धर्म यांच्या अध्ययनाची गोडी लागली. १८८९पासून लेव्ही सॉरबॉन येथे संस्कृतचे अध्यापन करू लागले. १८९० साली त्यांनी 'द इंडियन थिएटर' (इं.शी.) हा प्रबंध लिहून पॅरिस विद्यापीठाची डी.लिट. पदवी संपादन केली. बर्ग्ने यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या जागा एशियाटिक सोसायटीच्या काउन्सिलवर लेव्ही यांची नेमणूक झाली. १८९४ साली 'कॉलेज ऑफ फ्रान्स'मध्ये प्राध्यापक म्हणून त्यांची नियुक्ती झाली.

हिंदू नाट्यासंबंधी त्यांनी लिहिलेल्या प्रबंधाने यांच्या या कार्यास सुरुवात झाली. त्यांनी चिनी, तिबेटी, पाली, संस्कृत इत्यादी भाषांचे वर्ग सुरू केले. हिंदी संस्कृतीचे अध्ययन करण्याच्या हेतून त्यांनी Ecole Francaise d'Extreme Orient या संस्थेची स्थापना केली.

त्यांचे शिष्य पेलियट यांनी मध्य आशियात प्रवास करून शोधून आणलेल्या हस्तलिखिताच्या वाचनासाठी त्यांनी एक संस्था स्थापन केली.

विख्यात फ्रेंच भाषाशास्त्रज्ञ आंत्वान मेये यांच्याबरोबर लेव्हींनी आशियातील चिनी तुर्कस्थानच्या प्रदेशात बोलल्या जाणाऱ्या तोखारियन भाषेवर संशोधन कार्य केले. पुढे त्याला सर मार्क ऑरलस्टाइन (कार. १८६२-१९४३) या पुराणवस्तुसंशोधकांच्या संशोधनामुळे पुष्टी मिळाल्याने लेव्हींची सर्वत्र प्रशंसा झाली. १९३३ साली 'तोखारियन बी'मधील (तोखारियनची पश्चिमेकडील बोली) कूचा येथे सापडलेल्या काही ग्रंथांचे अंश त्यांनी प्रसिद्ध केले. (इं.शी. 'फ्रॅगमेंट्स ऑफ टेक्स्ट्स फ्रॉम कूचा'). त्यांनी १८९७-९८ या कालखंडात भारताचा आणि जपानचा दौरा केला. या दौऱ्यातील अनुभवांतून त्यांचा 'द डॉक्ट्रिन ऑफ सॅक्रिफाइस इन ब्राह्मणज' (इं.शी., १८९८) हा ग्रंथ सिद्ध झाला.

१९२२ साली रवींद्रनाथ टागोरांच्या खास विनंतीवरून त्यांनी विश्वभारतीला भेट दिली. Bergaigne and Indianism या निबंधात हिंदुस्थान प्रत्यक्ष पाहण्याची प्रकट केलेली कल्पना सत्यदृष्टीत उतरल्याबद्दल त्यांना फारच समाधान वाटले.

बौद्ध धर्म आणि संस्कृत भाषा यांचा एकाच वेळी व्यासंग करण्याबद्दल लेव्हींची प्रसिद्धी आहे. एकीकडे ते 'शाकुंतल'वर व्याख्यान देत, तर दुसरीकडे संस्कृत व चिनी भाषेतील धम्मपदांची चर्चा करत. एकीकडे संस्कृत, तिबेटी व चिनी भाषांतील कोटीकर्णवादनाचा, तर दुसरीकडे महाभारताचा अभ्यास अशा सव्यासाची व्यासंगामुळे त्यांना मानाचे स्थान प्राप्त झाले.

समुद्र व पर्वत यामुळे सर्व जगापासून वेगळी झालेली रानटी जात ही हिंदू लोकांबद्दलची कल्पना बदलून टाकणाऱ्या पाश्चात्त्य संशोधकांत ते प्रमुख आहेत. जावा, कंबोडिया, सुमात्रा, बोर्निओ या दूर देशात हिंदू लोकांनी प्रस्थापित केलेली साम्राज्ये व श्रीलंका, ब्रह्मदेश (म्यानमार), सयाम, कंबोडिया, चंपा, जावा इत्यादी देशांतील लिपी, भाषा, वाङ्मय, शास्त्र या सर्व ज्ञानशाखांवर हिंदू - मग ते ब्राह्मण असोत किंवा बौद्ध असोत - लोकांनी गाजवलेले वर्चस्व प्रथम उजेडात आणण्याचे श्रेय त्यांच्या परंपरेला दिले पाहिजे. मुसलमान लोकांनी खूप प्रयत्न करूनही तिकडील हिंदू प्रभुत्व नाहीसे करता आलेले नाही.

त्यांचे ग्रंथसंपदा अशी आहे - फ्रेंच - (1) Le Théâtre Indien (1890), (2) La Doctrine du Sacrifice dans les Brahamanas (1898), (3) Le Népal (1905), (4) Annales Musee Guimet, (5) India (La Grande Encyclopedie मध्ये)

(6) याशिवाय Revue Critique, Journel T'oungPao, Journel Asiatique, Ecole Francaise d'Extreme Orientच्या Bulletineमध्ये संशोधनपर लेख.

इंग्रजी - (1) What about Greece Ancient Indian Monuments Conserved, (2) Studies in Buddha Charitra, (3) Doctrine of Sacrifice in Brahmanas.

संपादित - (1) Sutralankara of Asanga, (2) La Grande Encyclopedie (सहकार्याने).

'नेपाळ : हिस्टॉरिकल स्टडी ऑफ ए हिंदू किंग्डम' (३ खंड, १९०५-०८, इं.शी.) आणि 'इंडिया अँड द वर्ल्ड, (१९२६, इं.शी.) हे त्यांचे ग्रंथही उल्लेखनीय आहेत. जगातील विविध राष्ट्रांच्या संदर्भात भारत कोणती भूमिका बजावू शकतो, यासंबंधीची चर्चा त्यांनी 'इंडिया अँड द वर्ल्ड' या ग्रंथात केली आहे. १९२१-२३ या कालखंडात त्यांनी अतिपूर्वेकडील देशांचा दौरा केला. त्यातून त्यांचा 'होबोजिरिन, डिक्शनरी ऑफ बुद्धिझम बेस्ड ऑन चायनीज अँड जॅपनीज सोअर्सिस' (१९२९, इं.शी.) हा महत्त्वाचा कोश तयार झाला. बौद्ध धर्माचे जपानी पंडित ताकाकुसू जंजीरो यांचे सहकार्य त्यांना लाभले.

वयाच्या पंचाहत्तराव्या वर्षी पॅरिस येथे त्यांचे निधन झाले.

– संपादित

**संदर्भ :**

*१. मराठी विश्वचरित्रकोश; संपादक - कामत, श्रीराम पांडुरंग; विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा.*

*२. अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री.*

***

ल

# व

## वझे, कृष्णाजी विनायक

**स्थापत्यविशारद, स्थापत्यविषयक प्राचीन ग्रंथाचे संशोधक**

**१६ डिसेंबर १८६९ – ३१ मार्च १९२९**

कृष्णाजी विनायक वझे एल.सी.ई. झाले. त्यानंतर त्यांनी सरकारी नोकरी पत्करली. कृष्णाजी वझे यांना सन्माननीय अशी 'रावसाहेब' ही पदवी देण्यात आली. वझे यांनी 'धर्मशिक्षणाचा ओनामा' (एकूण १-८ भाग) ही पुस्तकमाला लिहून प्रसिद्ध केली. या पुस्तकमालेतून त्यांनी जुन्या आचारविचारांचा नव्या दृष्टीने उलगडा करून दाखवला.

कृष्णाजी विनायक वझे यांनी शिल्पविषयक जुन्या संस्कृत वाङ्‌मयाचा शोध घेऊन अनेक हस्तलिखिते मिळवली व ती प्रकाशात आणण्याचा प्रयत्न केला. याशिवाय त्यांनी अनेक विषयांवर आपले महत्त्वाचे विचार प्रदर्शित केले. त्यांच्या व्याख्यानाची मांडणीही मोठी मनोरंजक व नवी असे. त्यांचे ग्रंथ-शिल्प १) आर्य शिल्प - हिंदी यंत्रशास्त्र, २) प्राचीन हिंदी शिल्पशास्त्र ४ भाग, ३) प्राचीन हिंदी शिल्पशास्त्रसार, ४) शिल्प शिक्षणाचे महत्त्व; चित्र ५) आर्य शिल्पचित्रविद्या अथवा चित्रलेखनशास्त्र; युद्ध ६) प्राचीन युद्धविद्या; स्वराज्य ७) आजच्या स्वराज्यसंस्था (म्युनिसिपालिटी वगैरे प्राचीनपासून आजतागायत); व्यापार ८) व्यापारी शिक्षणमाला पुस्तक १ले, ९) व्यापारीमित्र. याशिवाय काश्यपशिल्पम् वगैरे संस्कृत ग्रंथ शोधून त्यांनी प्रसिद्ध केले.

– संपादित

**संदर्भ :**

*१. अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*

## वर्णेकर, श्रीधर भास्कर

**संस्कृत पंडित, 'प्रज्ञाभारती'**

**३१ जुलै १९१८ – १० एप्रिल २०००**



श्रीधर भास्कर वर्णेकर हे अर्वाचीन काळातील श्रेष्ठ संस्कृत साहित्यकार, संस्कृत भाषेचे अस्खलित, धाराप्रवाही दशसहस्रेषु वक्ता व पंडित होते. श्री कांची कामकोटी पीठाच्या शंकराचार्यांनी त्यांना 'प्रज्ञाभारती' उपाधी प्रदान केली, जी मोठ्या अभिमानाने त्यांनी आजन्म आपल्या नावापुढे आवर्जून धारण केली. कारण, त्यामुळे उपाधी प्रदात्याचाच बहुमान होत असतो, असे दादा म्हणत. भूतपूर्व अर्थमंत्री डॉ. सी.डी. देशमुखांच्या शब्दांत, ''श्री वर्णेकर हे संस्कृतचे प्रगाढ व्यासंगी, ध्येयनिष्ठ व प्रतिभावान उपासक, लेखक तसेच प्रसाद, कल्पना-वैचित्र्य, पदलालित्य अशा दुर्मीळ गुणांनी युक्त काव्यनिर्मिती करणारे कवीही आहेत!''

महाकवी डॉ. श्रीधर भास्कर वर्णेकर यांचा जन्म नागपुरातील एका सुसंस्कृत, मध्यमवर्गीय परिवारात झाला. वडील भास्करराव वास्तुविशारद व ज्योतिषी होते. वयाच्या अवघ्या नवव्या वर्षी प्रत्यक्ष रा.स्व. संघ संस्थापक डॉ. हेडगेवारांना विचारून त्यांनी संघात प्रवेश घेतला व विविध जबाबदाऱ्या मोठ्या कर्तृत्वाने पार पाडीत हे व्रत आजन्म पाळले. श्रीधर शाळेत असताना महात्मा गांधींच्या नेतृत्वाखाली सर्वत्र चालणाऱ्या स्वातंत्र्य आंदोलनाचे चैतन्यमय वातावरण होते. अशाच एका 'पिकेटिंग'च्या चळवळीत भाग घेतल्यामुळे बाल

श्रीधरला पोलिसांनी पकडून कोतवाली ठाण्यात ठेवले. या प्रकरणातून श्रीधरची सरकारी शाळा जरी सुटली, तरी पुत्राच्या शिक्षणाची काळजी घेणाऱ्या प्रेमळ पित्याने त्याला घराजवळील केवलेशास्त्र्यांच्या पाठशाळेत टाकले. तेथे गुरुकुल पद्धतीने 'अमरकोश', 'लघुसिद्धान्त कौमुदी', पंचमहाकवींचे साहित्य श्रीधरने लवकरच कंठस्थ करून संस्कृत भाषेवर बरेच प्रभुत्व मिळविले व तो छोटी छोटी, स्फुट काव्यरचना करू लागला. पुढे खाजगीरीत्या ज्या वेळी श्रीधर शालान्त (मॅट्रिक) परीक्षा उत्तीर्ण झाला, त्याच सुमारास दुर्दैवाने कॉलरा रोगाच्या साथीत केवळ आठ दिवसांच्या अंतराने त्याचे आई-वडील निधन पावले! चार भावंडांसह श्रीधर अनाथ झाला! परिवाराचा योगक्षेम वाहण्यासाठी खारीचा वाटा देत स्वतःचे शिक्षण पूर्ण करावे या उद्देशाने श्रीधररावांनी स्थानीय अंधविद्यालयात शिक्षक-सहायकवृत्ती घेतली व यथावकाश स्नातक आणि पुढे स्नातकोत्तर (एम.ए.) पदव्या प्राप्त केल्या. १९४१ ते १९५९ पर्यंत धनवटे नॅशनल महाविद्यालयात व नंतर नागपूर विद्यापीठाच्या संस्कृत विभागात ते प्राध्यापक होते. १९७९ साली ते संस्कृत विभागाध्यक्ष पदावरून सेवानिवृत्त झाले. या दरम्यान मा. बाबासाहेब आपट्यांच्या प्रेरणेतून त्यांनी आधुनिक काळातदेखील अक्षुण्णपणे चालणाऱ्या संस्कृत भाषेच्या विकासकार्याविषयी विशेष संशोधन करीत डी.लीट.ची सर्वोच्च पदवी प्राप्त केली. तसेच, संस्कृत भाषेत सात शतककाव्ये ('वात्सल्य रसायनम्', 'विनायक वैजयन्ती', 'कालिदास रहस्यम्', 'रामकृष्ण परमहंसीयम्', 'जवाहर तरङ्गिणी', 'मन्दोर्मिमाला', 'सङ्घगीता'), याशिवाय अडुसष्ट सर्गांचे, चार हजार श्लोकांचे 'शिवराज्योदयम्' हे महाकाव्य, तीन गीतिकाव्ये, दोन नाटके, सतरा कथा व विपुल प्रमाणात स्फुट साहित्याची निर्मिती केली. यांतील 'विवेकानंद-विजयम्' या महानाट्याचे प्रयोग सर्वत्र सादर करण्यात आले व ते खूप गाजले.

'राष्ट्रशक्ती' या मराठी साप्ताहिकाचे, तसेच 'भवितव्यम्' या संस्कृत साप्ताहिकाचे सम्पादकपद त्यांनी अनेक वर्षे भूषविले. तीन खंडांत प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या संस्कृत वाङ्मयकोशाचे लोकार्पण डॉ. शंकरदयाल शर्मा यांच्या हस्ते, तसेच 'प्रज्ञाभारतीयम्' या त्यांच्या सर्व साहित्यसंग्रह ग्रंथाचे विमोचन अटल बिहारी वाजपेयी यांच्या हस्ते झाले. १९५३ साली 'युनेस्को'द्वारा प्रवर्तित 'अखिल भारतीय संस्कृत कथा स्पर्धे'चे संयोजक, १९५२ ते १९५६ पर्यन्त कन्हैयालाल मुंशीद्वारा संस्थापित संस्कृत विश्व परिषदेचे सचिव, संस्कृत भाषा प्रचारिणी सभेचे सचिव, केंद्र सरकारच्या साहित्य अकादमीचे सन्माननीय सदस्य व तन्त्रविज्ञान परिभाषा समिती सभासद, महाराष्ट्र शासनाच्या स्थायी संस्कृत समितीचे सदस्य, भोंसला वेदशाळा, योगाभ्यासी मंडळाचे अध्यक्ष इत्यादी महत्त्वाची पदे डॉ. श्री. भा. वर्णेकरांनी भूषविली. अमेरिकेतील न्यूयॉर्क विद्यापीठाने आयोजित केलेल्या संस्कृतसम्मेलनात भारत सरकारचे प्रतिनिधी म्हणून ते गेले होते व तेथेच त्यांचे 'तीर्थभारतम्' हे काव्यसंग्रहाचे पुस्तक प्रकाशित करण्यात आले.

संस्कृत साहित्य क्षेत्रातील या त्यांच्या अभूतपूर्व कार्याचा गौरव अनेक पुरस्काररूपाने करण्यात आला. त्यांत 'महाराष्ट्र गौरव' पुरस्कार, मध्यप्रदेश सरकारचा 'कालीदास' पुरस्कार, उत्तर प्रदेश व दिल्ली प्रदेशांचे 'संस्कृत साहित्य' पुरस्कार, केंद्र सरकारचा 'साहित्य अकादमी' पुरस्कार, 'राष्ट्रपती' पुरस्कार, 'रामकृष्ण दालमिया श्रीवाणी अलङ्करणम् (श्री दलाई लामांच्या हस्ते), 'डॉ. हेडगेवार प्रज्ञा' पुरस्कार हे प्रमुख होत.

डॉ. वर्णेकरांनी मराठी भाषेतदेखील अभंग छन्दोबद्ध गेय धम्मपद, प्रतिओवीबद्ध सुबोध ज्ञानेश्वरी, 'भारतीय धर्म व तत्त्वज्ञान' हा प्रबंधात्मक ग्रंथ, अनेक वैचारिक वृत्तपत्तीय लेख तसेच विविध हिंदी रचनादेखील केल्या आहेत. त्यांच्या साहित्यातील बराचसा भाग विविध विद्यापीठांतून अभ्यासक्रमात घेतला जातो. संस्कृत साहित्यातील संशोधकास त्यांचे कार्य मार्गदर्शक ठरते. त्यांनी संस्कृत भाषेतून देशविदेशांत हजारो व्यासपीठांवरून सुबोध, मधुर, प्रवाही व्याख्याने दिली.

शास्त्रीय संगीतातील विविध रागांवर आधारित स्वरचित काव्यांना चाली लावण्यासाठी सेवानिवृत्तीनंतर डॉ. वर्णेकर पद्धतशीरपणे संगीताचे धडे घेत असत. यातूनच 'गीर्वाण-गीतार्चना' या लोकप्रिय सी.डी.ची निर्मिती भैय्याजी सामक यांच्या मार्गदर्शनाखाली करण्यात आली, ज्याचे प्रकाशन श्रीधररावांच्या निधनानंतर, २००१ साली रा. स्व. संघाचे सरकार्यवाह सूर्यनारायणराव यांच्या शुभहस्ते करण्यात आले. ही गीते आजही सर्वत्र शाळा-महाविद्यालयांतून, सार्वजनिक समारंभांतून, गणेशोत्सव, शारदोत्सवांतून, आकाशवाणी, दूरदर्शन माध्यमांतून गुंजत असतात. ज्या काळात स्वतंत्र भारताचा विकास केवळ भलेमोठे कारखाने, धरणे, इमारती, रस्ते अशा भौतिक निर्मितीतून होण्याची स्वप्ने राजकीय नेते पाहत होते, त्या काळी दुर्लक्षित संस्कृत भाषेच्या माध्यमातून चारित्र्यवान समाज घडविण्याचे महत्कार्य डॉ. श्रीधर भास्कर वर्णेकर यांच्या हातून घडले यात संघसंस्कारांचा मोठा गौरव आहे. अशी ही व्यक्ती दुर्दैवाने एका संस्कृत उपक्रमात भाग घेण्यासाठी जात असताना मार्गातील अपघातात निधन पावली. 'मरावे परि कीर्तिरूपे उरावे' ही समर्थ कीर्ती त्यांनी सार्थक केली. बरेचशे यश त्यांनी 'याची देही याची डोळा' बघितले. भौतिक देह विलीन झाला तरी प्रज्ञाभारतीचे सांस्कृतिक कार्य अजरामर होऊन नव्या पिढीला कार्यप्रवण करीत आहे.

अनेक विद्यार्थ्यांचे गुरू व मार्गदर्शक, ज्ञान-भक्ती-कर्मयोगाचा त्रिवेणी संगम असणारे दादा परिपूर्ण, समाधानी जीवन जगले. ते विद्वान होते, पण विद्वज्जड, खूप गंभीर नव्हते. हास्य-विनोद-कोट्या भरपूर करीत असत. कर्मयोगी होते, पण कर्मठ नव्हते. ज्ञानोत्तर भक्तिमार्गाच्या या साधकाचे 'भागवतातील भक्तिनिर्झर' हे पुस्तक रामकृष्णाश्रमाने त्यांच्या निधनानंतर प्रकाशित केले आहे. वर्णेकर यांच्या पत्नीने यासाठी विशेष परिश्रम घेतले.

त्यांनी विद्यार्थ्यांच्या अनेक पिढ्या घडवल्या. त्यांतील कित्येक आज प्राध्यापक, प्राचार्य वा अन्यत्र उच्चपदस्थ आहेत. त्यांतील डॉ. पंकज चांदे यांनी कालिदास संस्कृत विद्यापीठाचे कुलगुरुपद सलग ९-१० वर्षे भूषवून विक्रम केला. डॉ. रूपा कुळकर्णी सामाजिक, सांस्कृतिक कार्यांत अग्रेसर आहेत. अशी अनेक उदाहरणे आढळतात. आरमार, बांधकामविभाग, अभियांत्रिकी महाविद्यालये, विविध प्रकारच्या संस्था यांची त्या-त्या विषयाशी संबंधित सुगम गेय संस्कृत गीते त्यांनी रचून दिली, जी आजही गायली जातात. घरी आलेल्या प्रत्येक लग्नपत्रिकेची पोच ते संस्कृत-मंगलाष्टकाने आवर्जून देत असत व वऱ्हाडी मंडळी आनंदाने विवाहप्रसंगी ती गात असत. एवढ्या विशाल संस्कृत साहित्याचे कर्तृत्व त्यांनी कधीच स्वतःकडे घेतले नाही.

प्रभो! तव कृपां विना तृणकणोऽपि न स्पन्दते<br>
सहस्रकिरणोऽपि न क्षणशतांशमुद्योतते।<br>
न चेन्दुरपि राजते न खलु गीष्प्रतिर्भाषते<br>
कुतो जडमतेरितः स्फुरति काव्यगीर्वाण गीः॥

''परमेश्वरच माझ्याकडून हे करवितो,'' असे ते या श्लोकातून नेहमी म्हणत असत.

– डॉ. चन्द्रगुप्त वर्णेकर

## वऱ्हाडपांडे, नीलकंठ रघुनाथ

**पुरातत्त्वीय इतिहासतज्ज्ञ, संशोधक**

**२५ फेब्रुवारी १९२१ – २१ ऑगस्ट २०१५**



ज्ञानसाधनेसाठी आपले आयुष्य पणाला लावणाऱ्या ऋषिमुनींच्या आणि मनीषींच्या थोर परंपरेतील महान संशोधक डॉ. नीलकंठ रघुनाथराव वऱ्हाडपांडे! स्वतःच्या नावातील आद्याक्षरांनी तयार झालेले 'नीरव' ह्या टोपणनावाने संस्कृत लेखन करणारे वऱ्हाडपांडे परिचितांमध्ये 'नीर' या नावाने ओळखले जातात.

डॉ. वऱ्हाडपांडे मूळचे पश्चिम महाराष्ट्रातील 'मूळावे' गावचे. त्यांचे पूर्वज करवसुलीचे काम करत असत.

व

असे काम करणाऱ्यांना 'पांडे' ही पदवी असे. भोसल्यांच्या राज्यात वऱ्हाड प्रांताचा कर वसूल करण्यासाठी त्यांच्या पूर्वजांना नेमण्यात आले होते, म्हणून त्यांचे नाव 'वऱ्हाडपांडे' असे पडले.

रघुनाथपंत व पार्वती यांच्या पोटी नीलकंठ हे पाचवे अपत्य रायपूर येथे जन्मले. नीरंना तीन मोठ्या बहिणी, एक मोठा व एक धाकटा भाऊ. त्यांचे वडील अतिरिक्त जिल्हा न्यायाधीश या पदावरून निवृत्त झाले. न्यायप्रियता आणि सत्यनिष्ठा ह्या दोन्ही गुणांचा वारसा छोट्या नीरंना तीर्थरूपांकडून मिळाला. लहानपणापासून व्याख्या करणे, विश्लेषण करणे ही नीरंची सवय. कीर्तन आणि प्रवचने ऐकण्याचा नाद त्यांना बालवयातच जडला. कीर्तनाने संस्कृत काव्याची गोडी आणि प्रवचनांनी भारतीय तत्त्वज्ञानाबद्दल त्यांच्या बालमनात कुतूहल निर्माण झाले. त्यामुळे पुढे मॅट्रिकच्या वर्गात गेल्यावर नीरंनी संस्कृत आणि तत्त्वज्ञान या विषयांचे शिक्षण घेण्याचा आपला मनसुबा जाहीर केला. नीर लहानपणापासून आपल्या निर्णयावर ठाम असत. वयाच्या बाराव्या वर्षी आपण लेखक म्हणून प्रसिद्ध व्हावे ही महत्त्वाकांक्षा त्यांच्या मनात जागी झाली आणि 'निस्यन्द' नावाचे एक हस्तलिखित त्यांनी मित्राच्या मदतीने काढले. वयाच्या अवघ्या विसाव्या वर्षी नीरंनी 'सुखदुःखविवेक' हा तत्त्वज्ञानात्मक ग्रंथ लिहिला. माणसाच्या जीवनात येणाऱ्या सुखदुःखात्मक प्रसंगांचे व त्यामुळे त्याच्या एकूण जीवनावर होणाऱ्या परिणामांचे त्यांनी ह्या ग्रंथात अत्यंत मूलगामी विश्लेषण केले.

१९४० साली 'काव्यतीर्थ' या परीक्षेचा अभ्यास करताना नीरंनी साहित्यशास्त्राचे अनेक ग्रंथ वाचले. त्यांतील रसचर्चेत मानसशास्त्राची बरीच चर्चा आहे. त्याला आधुनिक मानसशास्त्राच्या चौकटीत बसवणारा 'रसांचे मानसशास्त्र' हा प्रबंध त्यांनी लिहिला. प्रसिद्ध कादंबरीकार माडखोलकर यांना तो दिला त्या वेळी तो प्रबंध वाचून माडखोलकर म्हणाले, ''तुम्हांला या प्रबंधाबद्दल पीएच.डी. मिळायला पाहिजे. मी हा प्रबंध 'ज्योत्स्ना' मासिकात प्रकाशित करतो.'' अशा प्रकारे नीरंचे पहिले लिखाण वि.स. खांडेकर यांच्या संपादनाखाली निघणाऱ्या 'ज्योत्स्ना' मासिकात पाच लेखांत प्रसिद्ध झाले. त्या वेळी नीर नागपूरच्या मॉरीस महाविद्यालयामध्ये बी.ए.च्या तिसऱ्या वर्षाला होते. हे लेख वाचून त्यांच्या इंग्रजीच्या प्राध्यापिका कुसुमावती अनिल देशपांडे यांनी त्यांचे अभिनंदन केले. त्यांच्या व्यासंगी प्रतिभेची व रसज्ञतेची साक्ष देणारा 'वाणी आणि वाङ्मय' हा ग्रंथ त्यांनी रचला.

१९४२ साली नीर एम.ए. समकक्ष पदवी परीक्षेत विद्यापीठातून पहिले आले. त्यानंतर त्यांना संस्कृतचे प्राध्यापकपद मिळाले. याच सुमारास भारतीय तर्कशास्त्रावर संशोधन करण्यासाठी त्यांना किंग एडवर्ड मेमोरिअल शिष्यवृत्ती मिळाली. नागपुरातील प्रसिद्ध विद्वान प्रा. गो.के. गर्दे यांच्याजवळ नीरंनी भारतीय तत्त्वज्ञानाचे अध्ययन सुरू केले. सर्व भारतीय दर्शनांचा अभ्यास करून त्यांनी 'शास्त्री' पदवी प्राप्त केली. पुढे ते पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाकडे वळले.

१९४५ साली त्यांनी तत्त्वज्ञानामध्ये एम.ए.ची परीक्षा प्रथम श्रेणीत उत्तीर्ण केली. त्यानंतर संस्कृतच्या प्राध्यापक पदावरून तत्त्वज्ञानाच्या प्राध्यापक पदावर त्यांची बदली करण्यात आली. त्यांनी काही काळ सागर विश्वविद्यालयातील संलग्न महाविद्यालयात प्राध्यापकी केली.

**तर्कशास्त्रीय संशोधन :** तत्त्वज्ञानाचा अभ्यास करताना नीरंनी बर्टरँड रसेलच्या ग्रंथांचे सर्वाधिक वाचन केले. त्यामुळे विज्ञानाच्या आणि गणिताच्या मुळाशी असलेल्या तर्कशास्त्रात त्यांना विशेष रुची निर्माण झाली आणि काल, स्थल आणि गती या क्षेत्रांत विशेष संशोधन करण्याचे ठरवून त्यांनी नागपूर विद्यापीठात नाव नोंदविले. या क्षेत्रातील संशोधनासाठी मद्रास विश्वविद्यालयातील गणिताचे प्रोफेसर पी.व्ही.के. मेनन व प्रसिद्ध गणिती रँग्लर महाजनी यांची त्यांना विशेष मदत झाली. या संशोधनातून सिद्ध झालेला 'टाइम, स्पेस अ‍ॅण्ड मोशन' हा त्यांचा प्रबंध नागपूर विद्यापीठाने प्रकाशित केला. या प्रबंधाचे परीक्षक दिल्ली

व

विश्वविद्यालयातील तत्त्वज्ञानाचे प्रोफेसर बॅनर्जी यांनी लिहिले आहे की, 'हा प्रबंध माझ्याकडे आजपर्यंत आलेल्या सगळ्या प्रबंधांत मूर्धन्य आहे.' दुसरे परीक्षक प्रो. राजू यांनी मत नोंदविले की, 'मौलिकतेच्या बाबतीत या प्रबंधाची तुलना करता येण्यासारखा दुसरा प्रबंध मी वाचला नाही.' या प्रबंधासाठी नागपूर विद्यापीठाने त्यांना पीएच.डी. पदवी बहाल केली. तर्कशास्त्रावरील त्यांच्या मूलगामी चिंतनाला प्रकट करणारे आणखी एक पुस्तक म्हणजे 'विवेकवाद'. पुढे १९४७ साली त्यांना ऑक्स्फर्ड विद्यापीठात मनोविज्ञानाचे शिक्षण घेण्यासाठी सरकारी शिष्यवृत्ती मिळाली. नीर ऑक्स्फर्डमध्ये इन्स्टिट्यूट ऑफ एक्स्परिमेंटल सायकॉलॉजीमध्ये दाखल झाले. या शिक्षणाच्या आधारावर नीरंना रक्षाविज्ञान खात्यात नोकरी मिळाली. याच खात्यातून 'मुख्य मानसशास्त्रज्ञ' आणि 'मानसशास्त्रीय संशोधन संचालक' म्हणून ते १९८१ साली निवृत्त झाले.

**मानसशास्त्रीय संशोधन :** रक्षाविज्ञान खात्यात नीरंच्या संशोधन गुणांना खूप वाव मिळाला. मानसिक कसोट्या तयार करण्याचे दायित्व त्यांच्यावर होते. ह्या कसोट्या तयार करण्यासाठी जी मोठ्या प्रमाणात आकडेमोड करावी लागे, त्यासाठी गणित विषयावर प्रभुत्व असणे आवश्यक होते. तेथे काम करणाऱ्या श्री पुष्येन्दुशेखर चौधरी ह्या निष्णात सांख्यिकाच्या मार्गदर्शनाखाली नीरंनी गणिताचे नव्याने अध्ययन सुरू केले. त्याचा फायदा पुढे त्यांना खगोल आणि पुरातत्त्व क्षेत्रातील संशोधनात झाला. त्या वेळी त्यांना या गोष्टीची प्रकर्षाने जाणीव झाली, की सामाजिक शास्त्रातील कोणतीही समस्या असो, केवळ एका विद्याशाखेचे ज्ञान असून भागत नाही किंवा अमुक एक विषय माझा प्रांत नाही, असेही संशोधकाला म्हणता येत नाही. याच भूमिकेतून वऱ्हाडपांडे यांनी बहुविध ज्ञानशाखांना गवसणी घातली.

रक्षाविज्ञान खात्यात काम करताना त्यांनी विविध क्षेत्रांत काम करण्यासाठी आवश्यक असलेल्या क्षमता पारखण्यासाठी शेकडो कसोट्या तयार केल्या. त्यावर संशोधन पत्रिकांमध्ये पन्नासांवर निबंध प्रकाशित केले. या संशोधनाने त्यांनी हे प्रमाणित केले की, 'बुद्धिमत्ता वयाप्रमाणे बदलते. १६ ते १९ वर्षांनंतर बुद्धिमत्तेची वाढ होत नाही. उतरत्या वयाचा सर्वच क्षमतांवर विपरीत परिणाम होतो. बुद्धीही त्याला अपवाद नाही. कोणतीही समस्या सोडविणे हे केवळ बुद्धीचे काम नव्हे, तर त्या-त्या क्षेत्रातील ज्ञानही बुद्धीइतकेच महत्त्वाचे आहे. वाढत्या वयात पूर्वीसारखी बुद्धी सक्षम नसली तरी ज्ञान सतत वाढत असल्याने समस्या सोडविण्यात तरुणांपेक्षा वयस्क व्यक्ती जास्त सक्षम असते.' ह्या संशोधनावर आधारित त्यांची तीन पुस्तके प्रकाशित झाली. 'एबिलिटीज ॲण्ड एज्युकेशन' हे पहिले, 'ए स्टडी ऑफ स्कोअर्स ऑन इंटेलिजन्स टेस्ट बॅटरीज' व 'इंटेलिजन्स टेस्ट - स्कोअर्स ॲण्ड कॅण्डिडेट्स ॲट द सर्व्हिसेस सिलेक्शन बोर्ड' ही ती तीन पुस्तके होत.

**पुरातत्त्वीय संशोधन :** जात्याच संशोधकाचा पिंड असल्यामुळे रक्षाविज्ञान खात्यातून निवृत्त झाल्यावर संशोधनाची अनेक क्षेत्रे नीरंना खुणावू लागली. आणि ते आर्याक्रमणाच्या पुरातत्त्वीय संशोधनाकडे वळले. या संशोधनासाठी त्यांनी संस्कृत सोबत भाषाशास्त्र, खगोलशास्त्र, इतिहास, उत्खनन, भूगर्भीयशास्त्र इत्यादी अनेक शास्त्रांच्या आधारे अत्यंत वैज्ञानिक पद्धतीने १९७८ ते १९८९ अशी अकरा वर्षे संशोधन करून 'कपोलकल्पित आर्य आणि त्यांच्या स्वाऱ्या' हा ग्रंथ सिद्ध केला. त्यांच्या या संशोधनाने त्यांनी आर्यांचे भारतावरील आक्रमण हे कपोलकल्पित आहे हे सप्रमाण सिद्ध केले. या त्यांच्या संशोधनापुढे जगभरातील विद्वानांनी आपली लेखणी उतरवून ठेवली आहे. ह्या संशोधनाने अनेक प्राच्य आणि पाश्चात्त्य विद्वानांच्या प्रस्थापित मतांचे खंडन केले. त्यांच्या ह्या ग्रंथाला भारताचे तत्कालीन राष्ट्रपती डॉ. शंकरदयाळ शर्मा यांच्या हस्ते ११,००० रुपयांचे 'श्री शेवडे' पारितोषिक मिळाले. विदर्भातील रामटेक येथील कविकुलगुरू कालिदास संस्कृत विद्यापीठाने डी.लिट. उपाधी देऊन त्यांच्या या संशोधनाचा बहुमान केला.

या पुरातत्त्वीय संशोधनाच्या निमित्ताने अनेक तथ्ये त्यांच्या हाती आली. त्यांतून त्यांनी 'न्यू लाइट ऑन द डेट ऑफ ऋग्वेद' हे पुस्तक लिहिले. वेदसंहिता, त्यांचे विविध पाठ, त्यांच्या चिकित्सक आवृत्त्या स्वतः वाचून पारंपरिक, ऐतिहासिक, भौगोलिक, भाषाशास्त्रीय, ग्रहगणितीय, ज्योतिषशास्त्रीय, धातुशास्त्रीय अशा अनेकविध शास्त्रांनी उपलब्ध करून दिलेल्या पुराव्यांच्या कसोट्यांवर घासून त्यांनी ऋग्वेद निर्मितीची पूर्वसीमा इ.स.पूर्व ४००० वर्षे, तर उत्तरसीमा इ.स.पूर्व ३१०० अशी निर्धारित केली.

या संशोधनासोबत वनस्पतिशास्त्राचा अभ्यास करून त्यांनी ऋग्वेदातील बहुचर्चित अशा 'सोम' वनस्पतीचा शोध लावला आणि 'ऋग्वेदिक सोम' हे संशोधन पुस्तकरूपाने प्रसिद्ध केले. त्याद्वारा 'सोम' ही वनस्पती म्हणजे 'भांग' होय हे सप्रमाण सिद्ध केले.

या सर्व संशोधनामागे नीरमधील एक इतिहासतज्ज्ञ डोकावतो. ह्या इतिहास संशोधनाच्या आवडीने त्यांना इतिहासातील विवाद्य, तसेच अलक्षित विषयांकडे आकृष्ट केले. त्याची परिणती 'मेमरीज ऑफ मदर इंडिया' ह्या ग्रंथात झाली. '१८५७ चे स्वातंत्र्ययुद्ध आणि त्याचे निंदक' या त्यांच्या पुस्तकाने या स्वातंत्र्ययुद्धाला नाकारणाऱ्या निंदकांना चोख उत्तर दिले आहे. त्यांच्या परखड आणि सडेतोड वृत्तीचे गमक असलेले त्यांचे आणखी एक संशोधन नेहरू ह्या राजकीय व्यक्तीभोवती केंद्रित आहे. त्यांच्याविषयीची अनेक राजकीय रहस्ये, त्यांचे राजनैतिक तत्त्वज्ञान, इत्यादी अनेक गोष्टी त्यांनी निर्भीडपणे, कसलाही मुलाहिजा न ठेवता, 'द नेमिसिस ऑफ नेहरू वर्शिप' आणि 'नेहरू आणि नेहरूवाद' या दोन पुस्तकांतून मांडल्या आहेत.



पराकोटीच्या तर्कनिष्ठ, सत्यनिष्ठ, जातिवंत संशोधक असलेल्या नीरंच्या अप्रतिहत प्रज्ञेला आणि अकुंठित प्रतिभेला एक लसलसता कवित्वाचा कोंब आहे हे पाहून आश्चर्य वाटल्याशिवाय राहत नाही. तो कवित्वाचा कोंब म्हणजे नीरंचा 'कूजन' हा मराठी तसेच 'कूजनम्' हा संस्कृत भाषेतील काव्यसंग्रह. ह्याशिवाय 'सावळागोंधळ' हे तीन अंकी आणि 'सावज' हे दोन अंकी नाटक अप्रकाशित स्वरूपात आहे. त्यांपैकी 'सावळागोंधळ' या नाटकाचा 'गड़बड़घोटाला' ह्या नावाने दिल्लीला प्रयोग सादर झाला आणि दस्तुरखुद्द नीरंनी त्याचे दिग्दर्शन केले. याशिवाय नीरंच्या प्रज्ञेला विनोदाचे कोंदण लाभले आहे. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची मिस्कील बाजू 'भम्पकराव बाताडे आणि इतर गोष्टी' या विनोदी कथासंग्रहातून प्रकट होते.

नीरंच्या बहुआयामी व्यक्तित्वाचा एक उल्लेखनीय पैलू म्हणजे नीरंची पत्रकारिता. गेल्या ६७ वर्षांपासून अव्याहत चालू असलेल्या 'संस्कृत भवितव्यम्' ह्या संस्कृत साप्ताहिकाचे ते गेल्या सव्वीस वर्षांपासून प्रधान संपादकपद आणि संस्कृत भाषा प्रचारिणी सभेच्या अध्यक्षपदाची धुरा सांभाळत आहेत. सभेचे मुखपत्र असलेल्या 'संस्कृत भवितव्यम्'मधील त्यांचे अग्रलेख संस्कृत भाषेचे अभिव्यक्तिसामर्थ्य आणि नीरंची सर्वसंचारी प्रतिभा एकाच वेळी प्रकट करतात. नीर जरी भाषाप्रभू असले, तरी संस्कृतविषयी त्यांना विशेष आत्मीयता आहे. अन्य भाषांचा व्युत्पत्तिदृष्ट्या तौलनिक अभ्यास करून, लिपिचिकित्सा करून त्यांनी संस्कृतचे श्रेष्ठत्व सिद्ध केले आहे. इतकेच नव्हे, तर इंग्लिश शब्दांचे संस्कृत मूळ दर्शविणाऱ्या आगळ्यावेगळ्या शब्दकोशाची निर्मितीही ते करीत आहेत.

त्यांच्या संशोधन सेवेनिमित्त महाराष्ट्र शासनाने 'संस्कृत पंडित' पुरस्कार देऊन त्यांचा गौरव केला आहे आणि त्यांच्या आजवरच्या सतरा पुस्तकांच्या लेखनांतून प्रकट झालेल्या बहुआयामी कर्तृत्वाला आणि बहुविध संशोधनाला मानाचा मुजरा करण्यासाठी नागपूर येथील संस्कृत भाषा प्रचारिणी सभेने त्यांच्या नव्वदाव्या वाढदिवसानिमित्त 'तर्कवीरदर्शन' हा गौरवग्रंथ प्रकाशित केला.

— डॉ. स्मिता होटे

**संदर्भ :**

१. *'तर्कवीरदर्शन' (गौरवग्रंथ); प्रकाशक : संस्कृत भाषा प्रचारिणी सभा, नागपूर; प्रथमावृत्ती : २०११.*

## वाकणकर, विष्णू श्रीधर
**प्रागैतिहासिक पुरातत्त्वीय संशोधक, शैलचित्रे अभ्यासक**
**१९१९ – १९८८**



विष्णू श्रीधर वाकणकर यांचा जन्म मध्यप्रदेशातल्या नीमच या गावात झाला. शाळेत असल्यापासूनच वाकणकरांना कलेविषयी व विशेषत: चित्रकलेबद्दल ओढ वाटत असे. शाळेत असतानाच त्यांनी निसर्गचित्रे व व्यक्तिचित्रे काढायला सुरुवात केली होती. त्यांना बाहेर फिरून चित्रे काढायला व प्रवास करायला अतिशय आवडत असे. राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे स्वयंसेवक म्हणून आदिवासींमध्ये समाजकार्य व शैक्षणिक कार्य करण्यासाठी वाकणकर घनदाट जंगल असणाऱ्या भागात आले व तेथे त्यांची नजर प्राचीन चित्रांवर पडली व या चित्रांचा अभ्यास हे त्यांचे जीवनकार्यच बनले.

जवळपास पन्नास वर्षे जंगलात सतत पायपीट करून वाकणकरांनी हजारो शैलचित्रे शोधून काढली. त्यांची वैज्ञानिक पद्धतीने नोंदणी करून फोटो काढले आणि उत्तम रेखाटने केली. त्यांनी ठिकठिकाणी शैलचित्रांची प्रदर्शने केली, तसेच देशभर व परदेशांमध्ये अनेक व्याख्याने दिली. संशोधकांसाठी व सामान्य माणसांसाठीही त्यांनी अनेक लेख लिहिले. त्यांनी व एक अमेरिकन विद्वान आर.आर. ब्रूक्स यांनी मिळून १९७६ मध्ये 'शैलचित्रे' या विषयावरचे भारतातले पहिले पुस्तक प्रकाशित केले.

वाकणकरांनी मुंबईच्या जे.जे. स्कूल ऑफ आर्टस येथून 'फाइन आर्ट्स' या विषयात डिप्लोमा मिळवला. शैलचित्रे या विषयात झोकून दिल्यानंतर त्यांनी एम.ए.पर्यंत शिक्षण पूर्ण केले. प्रा. ह.धी. सांकलिया यांचे मार्गदर्शन घेऊन वाकणकरांनी पुणे विद्यापीठातून १९७३ मध्ये पीएच.डी. संपादन केली. त्यांचा प्रबंध 'भारतातील प्रागैतिहासिक शैलचित्रे' असा होता. वाकणकरांच्या संशोधनामुळे 'भारतीय शैलचित्रे' या विषयाकडे जगाचे लक्ष वेधले गेले. त्यांच्या अविरत परिश्रमांमुळेच 'शैलचित्र' या विषयाला पुरातत्त्वविद्येत मानाचे स्थान मिळाले. वाकणकरांना १९६२ मध्ये विश्वविख्यात फ्रेंच पुरातत्त्वज्ञ आन्द्रे लेरॉ-गुर्हन यांच्याकडे 'पुरातत्त्व व शैलचित्रे' या विषयावर अभ्यास करण्याची संधी मिळाली. वाकणकरांनी १९८६ मध्ये साउदॅम्प्टनला झालेल्या वर्ल्ड आर्कियोलॉजिकल काँग्रेसमध्ये भाग घेतला. तेथे भारतीय शैलचित्रांवरच्या त्यांच्या शोधनिबंधाचे खूपच कौतुक झाले होते.

वाकणकरांच्या या कामापासून प्रेरणा घेऊन आज अनेक भारतीय व विदेशी विद्वान प्रागैतिहासिक शैलचित्रांवर संशोधन करत आहेत. वाकणकरांमुळे प्रेरित झालेल्या या संशोधकांनी 'रॉक आर्ट सोसायटी ऑफ इंडिया' ही संस्था स्थापन केली आहे. ही संस्था दरवर्षी आपले अधिवेशन भरवते आणि 'पुराकला' नावाचे नियतकालिक काढते. एकेकाळी दुर्लक्षित झालेला शैलचित्रे हा विषय आता भारतात चांगलाच लोकप्रिय झालेला दिसतो. अर्थातच, त्याचे सारे श्रेय डॉ. वाकणकरांना आहे. शैलचित्रांच्या संशोधन क्षेत्रात त्यांचे नाव अजरामर झाले आहे.

प्रा. ह.धी. सांकलियांनी १९६१ मध्ये मध्यप्रदेशातल्या महेश्वर व नावडाटोली या नर्मदा नदीच्या तीरांवरील पुरातत्त्वीय स्थळांचे उत्खनन करण्याची मोहीम हाती घेतली. वाकणकरांनी प्रा. सांकलियांकडून उत्खननात सहभागी होण्याची परवानगी मिळवली व तेथे त्यांच्याकडून पुरातत्त्वीय उत्खननाची पद्धत शिकून घेतली. तसेच, नर्मदा नदीच्या आजूबाजूला असणारी प्रागैतिहासिक स्थळे शोधण्याच्या मोहिमेत काम करण्याची संधीही त्यांना मिळाली. या मोहिमेत वाकणकरांनी क्वेटर्नरी काळाचे भूशास्त्र, पुराजीवशास्त्र व प्रागैतिहासिक काळाच्या अभ्यासाची प्राथमिक तंत्रे शिकून घेतली. मंदसौर जिल्ह्यामध्ये आवरा व मनोती या

ठिकाणी मध्यप्रदेशाच्या पुरातत्त्व व संग्रहालय खात्यातर्फे केलेल्या उत्खननात वाकणकरांचा सहभाग होता.

भीमबेटकाचा शोध वाकणकरांनी १९५७ मध्ये लावला. नंतरच्या काळात त्यांनी आजूबाजूच्या प्रदेशात सर्वेक्षण केले. या दरम्यान त्यांनी भौनेरवाली, विनायक, जोन्द्रा, लखाजौर, दिवेतिया, बांसकुवर आणि करीतलाई अशा अनेक टेकड्यांवर १००० पेक्षा जास्त स्थळे शोधून काढली. वाकणकरांनी व त्यांचे गुरुबंधू असलेल्या वीरेंद्रनाथ मिश्र यांनी मिळून, मध्यप्रदेशातल्या रायसेन जिल्ह्यातल्या, भीमबेटका या सुप्रसिद्ध प्रागैतिहासिक स्थळाचे १९७३ ते १९७७ असे पाच वर्षे उत्खनन केले. भीमबेटका गुहांमध्ये त्यांना प्राथमिक निक्षेपांत पुराश्मयुगीन अवजारे मिळाली. या संशोधनामुळे भारतीय उपखंडातील पुराश्मयुगीन पुराव्यांत फार मोलाची भर पडली.

वाकणकरांनी उज्जैन जिल्ह्यातल्या कायथा आणि दंगवाडा या दोन पुरातत्त्वीय स्थळांचे उत्खनन केले. त्यामुळे इसवीसनपूर्व ३५०० ते इसवीसन ६०० एवढ्या प्रदीर्घ काळातील माळव्याच्या इतिहासावर मोठा प्रकाश पडला. कायथ्याचे उत्खनन १९६५-६६ असे दोन वर्षे झाले. या दोन्ही ठिकाणांच्या उत्खननाला विशेष महत्त्व आहे; कारण त्यामुळे माळव्यामध्ये शेती करून स्थिर जीवन सुरू करणाऱ्या लोकांविषयी फार महत्त्वाची माहिती मिळाली. वाकणकरांना फक्त प्रागितिहास, इतिहासाचा संधिकाल किंवा शैलचित्रे यांच्यातच रस होता असे मात्र नाही. नाणकशास्त्र, पुराभिलेखविद्या, संस्कृत साहित्याचा इतिहास अशा प्राचीन भारतीय इतिहास व पुरातत्त्वाच्या इतर कितीतरी शाखांमध्ये त्यांना संशोधनाची आवड होती. भारतीय पुरातत्त्वामध्ये वाकणकरांनी केलेल्या कामगिरीची दखल घेण्यात आली. त्यांना अनेक मानसन्मान मिळाले. वाकणकरांना भारताच्या राष्ट्रपतींनी १९७६ मध्ये 'पद्मश्री' देऊन सन्मानित केले.

वाकणकरांच्या निकट असणारे त्यांचे सहकारी त्यांना दादा म्हणून संबोधत. आपल्या देशाचा इतिहास जगासमोर आणायच्या ध्येयाने वाकणकर भारून गेले होते. इतकेच नाही, तर त्यांना युरोपच्या व उत्तर अमेरिकेच्या इतिहासातही प्रचंड रस होता. या दोन्ही ठिकाणी त्यांनी भरपूर प्रवासही केला होता.

स्वच्छ पारदर्शी भूमिका, इतिहास व संस्कृतीविषयीचे जबरदस्त प्रेम यांमुळे त्यांच्या सहवासात येणाऱ्या सर्वांना ते पूर्णपणे आपलेसे करून टाकत. वाकणकर शहरी, ग्रामीण व आदिवासी अशा सर्व लोकांमध्ये कमालीच्या सहजतेने, साधेपणाने वावरत. जंगलात राहणाऱ्या व साधेसुधे जीवन जगणाऱ्या आदिवासी-गिरिजनांविषयी त्यांना मनोमन जिव्हाळा होता, असे त्यांच्या सहकाऱ्यांनी नमूद केले आहे. वाकणकरांच्या व्यक्तिमत्त्वात मुळातच साधेपणा होता. त्यांनी शोधून काढलेल्या स्थळांचे उत्खनन इतरांनी करायला त्यांची अजिबात हरकत नसे. कारण, त्यांना वैयक्तिक प्रसिद्धीपेक्षा ज्ञानप्रसारात अधिक रस होता. याच भावनेतून भीमबेटका व कायथा या त्यांनी शोधलेल्या दोन महत्त्वाच्या स्थळांच्या उत्खननासाठी वाकणकरांनी प्रा. सांकलियांना बोलवले होते.

वाकणकरांनी पुरातत्त्वाचे ज्ञान मुख्यत: स्वप्रयत्नांमधून मिळवले होते. वाकणकर हे मुळामध्ये एक गवेषक (एक्स्प्लोअरर) होते. हजारो शैलाश्रय, अनेक प्रागैतिहासिक व ऐतिहासिक स्थळे शोधून काढणे ही त्यांची भारतीय पुरातत्त्वसंशोधनातील फार मोठी कामगिरी आहे. किंबहुना, जागतिक ताम्रपाषाणयुगीन नकाशात भारताला स्थान मिळवून देण्याचे श्रेय प्रा. सांकलियांच्या बरोबरीने वाकणकरांचे आहे.

त्यांचे प्राचीन इतिहासाचे प्रेम व त्याविषयीचा उत्साह यांवर वाढत्या वयाचा काहीही परिणाम झालेला नव्हता. वयाच्या सदुसष्टाव्या वर्षी, १९८५ मध्ये त्यांनी लुप्त सरस्वतीच्या शोधमोहिमेचे नेतृत्व केले. हिमाचलच्या दुर्गम पहाडांमध्ये, राजस्थानच्या वाळवंटात, गुजरात, पंजाब व हरियाणाच्या मैदानी प्रदेशांत त्यांनी कित्येक महिने, पायी प्रवास केला. घग्गर-हक्रा या आता शुष्क पडलेल्या नदीकाठी असणाऱ्या सिंधू-सरस्वती

संस्कृतीच्या अवशेषांचा मागोवा घेत असताना त्यांनी प्राचीन सरस्वतीच्या भौगोलिक खाणाखुणांचा शोध घेतला. तसेच, त्यांनी सरस्वतीविषयक लोकसाहित्याचेही संकलन केले. त्यांच्या या शोधमोहिमेला खूप प्रसिद्धी लाभली. वाकणकरांनी त्या विषयावर अनेक ठिकाणी व्याख्याने दिली. त्यांनी मिळालेले पुरावे दिल्लीसह अनेक ठिकाणी प्रदर्शित केले.

वाकणकरांच्या मृत्यूनंतर मध्यप्रदेश सरकारने दिल्लीच्या इंडियन आर्कियोलॉजिकल सोसायटीला पंधरा लक्ष रुपयांची देणगी दिली. या संस्थेने वाकणकरांची स्मृती जागृत ठेवण्यासाठी, त्यांच्या नावाने एक पुरस्कार सुरू केला आहे. प्रत्यक्ष क्षेत्रीय पुरातत्त्व संशोधनात भरीव कामगिरी करणाऱ्या व्यक्तीला दर दोन वर्षांनी हा पुरस्कार दिला जातो.

– डॉ. रोहिणी केतकर

**संदर्भ :**

*१. जोगळेकर, पी.पी. (भाषांतर); २००२; मिश्रा, व्ही एन.; 'पद्मश्री विष्णू श्रीधर वाकणकर'; भारतीय इतिहास संकलन समिति, पुणे.*

*२. मिश्रा, व्ही.एन.; 'विष्णू श्रीधर वाकणकर' (श्रद्धांजलिपर लेख), 'मॅन अ‍ॅण्ड एन्व्हायर्नमेन्ट १३', पृष्ठे : १०१-१०२; १९८९.*

*३. वाकणकर, व्ही.एस.; 'पेन्टेड रॉक शेल्टर्स ऑफ इंडिया', पीएच.डी. प्रबंध; डेक्कन महाविद्यालय, पुणे; १९७३.*

*४. वाकणकर, व्ही.एस.; 'प्रिहिस्टॉरिक केव्ह पेन्टिंग्स', 'मार्ग' २८(४), पृष्ठे : १७-३४; १९७५.*

*५. वाकणकर, व्ही.एस.; 'चॉकोलिथिक कल्चर्स ऑफ मालवा', 'प्राच्य प्रतिभा' ४(२); १९८४.*

## वाकणकर, सिद्धार्थ यशवंत

**हस्तलिखितशास्त्र व भाषाशास्त्रज्ञ, संशोधक**

**१६ जानेवारी १९४७**

सिद्धार्थ वाकणकर यांनी १९६७साली, मुंबई विद्यापीठातून संस्कृत विषयात बी.ए. व १९६९साली एम.ए.पदव्या प्राप्त करून बडोद्यातून पीएच.डी. उपाधी



संपादन केली. ते संस्कृत, अर्धमागधी, प्राचीन इतिहास, संस्कृती, भाषाशास्त्र या विषयांचे अभ्यासक आहेत. हस्तलिखितशास्त्र व प्राचीन संस्कृत साहित्य यांमधून व पोथ्यांमधून आढळणारे क्रीडाप्रकार, संस्कृतमधील विज्ञान व तंत्रज्ञान हे त्यांचे विशेष अभ्यासाचे व संशोधनाचे विषय होत. महाराष्ट्र व गुजरात या राज्यांमधील विद्वानांचे संस्कृतला योगदान, संस्कृत साहित्यातील कलहकाव्य या विषयांवरील दुर्मीळ काव्यप्रकाराचा अभ्यास, चतुरंग, बुद्धिबळ, सारीपाट, पत्ते अशा खेळांवरील संस्कृत पुस्तके व पोथ्या यांविषयीचे प्रकल्प त्यांनी पूर्ण केले.

चेतोविनोदनकाव्य, आनंदकाव्य, यादवेंद्रमहोदय या ग्रंथांचे चिकित्सक संपादक. संस्कृत साहित्यातील साहित्यरत्ने, गजशास्त्र, शतप्रश्नोत्तरी, डॉ. वा. म. कुलकर्णी यांचा अभिनंदनग्रंथ इत्यादी ग्रंथांचे लेखन व संपादन त्यांनी बडोद्याच्या प्राच्यविद्यासंस्थेतून निवृत्त होण्यापूर्वी पूर्ण केले. तर्कसंग्रह-कौतुक, वनमालीकीर्तिच्छन्दोमाला (सटीक), आहारशास्त्रावरील दुर्मीळ ग्रंथ भोजनकुतूहल, गोपाळविवेक, गुणमन्दारमञ्जिरी, शंकरमन्दारसौरभचम्पू, कल्याणमल्लाचा अनंगरंग व त्यावरील अनंगरंगप्रकाशिका ही टीका, शालिहोत्राचे अश्वशास्त्र त्यावरील टीका व इंग्रजी भाषांतर या ग्रंथांचे लेखन तसेच प्रा. रं. रा. देशपांडे यांच्या शताब्दीनिमित्त प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथांचे संपादन त्यांनी केले.

वाकणकरांचे इंग्लिश, मराठी, गुजराती व संस्कृत या भाषांमधील १००हून अधिक शोधनिबंध नामांकित नियतकालिकांमधून, वृत्तपत्रांतून तसेच संशोधन पत्रिकांमधून प्रसिद्ध झाले आहेत.

अखिल भारतीय प्राच्यविद्या परिषदांमध्ये तसेच राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय चर्चासत्रांमध्ये सहभागी होऊन

खेळीमेळीच्या वातावरणात चर्चा करणे, तरुण अभ्यासकांना प्रोत्साहन देणे, सत्राध्यक्ष म्हणून कार्यभार सांभाळतानाही आपल्या विद्वत्तेचे ओझे न बाळगणे या त्यांच्या सहृदयतेमुळे डॉ. वाकणकरांचे व्यक्तिमत्त्व असाधारण वाटते.

त्यांच्या सातत्यपूर्ण संशोधनामुळे डॉ. वाकणकर अनेक राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय पुरस्कारांचे मानकरी ठरले आहेत. त्यातील काही पुढीलप्रमाणे : श्रीधर रामकृष्ण भांडारकर पारितोषिक (१९६९), कॅनेडिअन एज्युकेशन फाउंडेशनतर्फे दिलेला रामकृष्ण संस्कृत पुरस्कार (२००१), वेद भारती हैदराबादने दिलेला राष्ट्रकवी पं. ओगेटि अच्युतराम शास्त्री संस्कृत पुरस्कार (२००६), तसेच स्प्रिंजर रिसर्च स्कॉलरशिप, मुंबई विद्यापीठ (२००७-२००९) महाराष्ट्र शासनाचा महाकवी कालिदास संस्कृत साधना पुरस्कार (२०१५) इत्यादी. केवळ भारतातच नव्हे, तर संपूर्ण विश्वात ‘प्राचीन क्रीडाप्रकार तसेच हस्तलिखितशास्त्र’ या विषयांवर व्याख्याने देण्यासाठी त्यांना विविध विद्यापीठे, शैक्षणिक संस्था, प्राच्यविद्यासंशोधन संस्था यांच्याकडून सादर निमंत्रित केले जाते.

– डॉ. गौरी माहुलीकर

## वाटवे, केशव नारायण

**प्राध्यापक, समीक्षक, अभ्यासक**

**१९ एप्रिल १८९५ – ९ मे १९८१**

केशव नारायण वाटवे ह्यांचे शिक्षण औंध व पुणे येथे झाले. ते मराठीचे प्राध्यापक तर संस्कृत व मराठी यांतील साहित्याचे रसिक अभ्यासक होते. त्यांच्या लेखणीतून त्यांनी अनेक साहित्यांचे गहनतेने सूक्ष्म अवलोकन केले आहे. रसविमर्श (१९४२), संस्कृत काव्याचे पंचप्राण (१९४७) (पंच महाकाव्याधिष्ठित), किरातार्जुनीयम् कथा (१९६०), नलदमयंती काव्य (१९६१), संस्कृत नाट्यसौंदर्य (१९६२), प्राचीन मराठी पंडिती काव्य (१९६४), माझी वाटचाल (१९६४), पंडिती काव्य (१९६८), संस्कृत साहित्यातील विनोद ही वाटवे यांची



ग्रंथसंपदा आहे. केशव नारायण वाटवेंच्या ह्या साहित्यकुंजीमध्ये अनेक रत्ने विखुरलेली आहेत. त्यांच्या रसविमर्श ह्या पुस्तकामध्ये रसावरील अनेकविध विचारांचा ऊहापोह केलेला दिसतो. भरतमुनींपासून विद्यमान पंडितांपर्यंत सगळ्यांची रसविषयक मते व मतांतरे घेऊन मानसशास्त्रीय दृष्टिकोनातून विचारांद्वारे नवप्रकाश टाकण्याचा प्रयत्न यात केलेला आहे. रसविवेचनाकरता त्यामध्ये केशवसुतांनंतरची मराठी उदाहरणे घेतली आहेत. तसेच रसचर्चेतील मुद्दे मांडताना संस्कृत व प्राकृत पंडितांची मते संक्षिप्तपणे कथन केली आहेत. ‘रसविमर्श’ या पुस्तकाला १९४२सालातील उत्तम पुस्तक म्हणून मुंबई विश्वविद्यालयाचे दादोबा पांडुरंग तर्खडकर पारितोषिक मिळाले. तसेच भोर येथील शंकराजी नारायण आणि डेक्कन सोसायटीचे इचलकरंजी पारितोषिक मिळाले. मुंबई, पुणे, नागपूर, कर्नाटक, गुजरात इत्यादी विद्यापीठांनी हा ग्रंथ मराठी सन्मान शाखेत बी.ए.ला व एके ठिकाणी एम.ए.लासुद्धा संदर्भग्रंथ म्हणून ठेवला. ह्या ग्रंथाच्या द्वितीय आवृत्तीत करुणरसाबाबत दुरुस्ती तसेच वीररसाबाबत थोडा बदल करण्याचा प्रयत्न केला.

करुणरसाचा भरतांनी दिलेला स्थायिभाव शोक आहे. शोकभावना प्रेमाच्या पूर्वस्थितीवर अवलंबून आहे इत्यादी गोष्टी दाखवून त्या आधारे करुणरसाची कशीतरी उभारणी केली होती. मात्र आता तीच चुकीची वाटत असल्याने प्रेम हा करुणरसाचा स्थायिभाव मानावा हे दाखवण्याचा प्रयत्न केला आहे. उत्साह हा वीररसाचा स्थायिभाव भावनारूप नसल्याने ‘अमर्ष’ हा स्थायिभाव मानावा, असे म्हटले होते. अमर्ष म्हणजे आक्रमण सहन न होणे अर्थात राग. याच्यामध्ये स्वयंप्रभूतेची (Self-assertion) सहजप्रवृत्ती असल्याने अहंभाव हाच वीररसाचा स्थायिभाव असावा, असे मत मांडले आहे.

व

ह्यातील विषयांचा क्रम बघितल्यास आपल्याला ह्या पुस्तकाच्या संस्कृत-मराठी साहित्यातील योगदानाची कल्पना येऊ शकते.

विषय प्रवेश-

१) रसांचा संस्कृतीतील उद्‌गम व विकास.

२) रसांचा मराठीतील अवतार.

निकष-

१) रसांचे मानसशास्त्रीय अधिष्ठान.

२) रससामग्री

३) रसनिष्पत्ती प्रक्रिया

४) रसास्वाद किंवा काव्यानंदमीमांसा

५) रससंख्यानिर्णयाची तत्त्वे

६) भक्तिरस

७) नवरसस्वरूपदर्शन

८) रसाची व काव्याची उपांगे

९) रस व ललितकला

१०) रस व पाश्चात्त्य साहित्यशास्त्र

११) रस व्यवस्थेचे संस्कारण व आधुनिक मराठी साहित्यशास्त्राचा पाया.

के.ना. वाटवे ह्यांनी संस्कृत साहित्यात अग्रगण्य असणाऱ्या पाच महाकाव्यांविषयी लिहिलेले ‘संस्कृत काव्याचे पंचप्राण’ हे पुस्तक, ज्यामध्ये रघुवंशम्, कुमारसंभवम्, किरातार्जुनीयम्, शिशुपालवधम् आणि नैषधीयचरितम् या काव्यांवरती प्रकाशझोत टाकण्यात आला आहे. पंचमहाकाव्यांची रूपरेषा देऊन त्यांतील सौंदर्याचा आस्वाद अतिशय मधाळपणे घेऊन त्यांचे रसग्रहण, पात्रचित्रण इत्यादी वर्णन सुगम आणि सरल भाषेत केले गेले आहे. जे विद्यार्थ्यांना आणि संस्कृत व मराठी अभ्यासकांना अमूल्य मार्गदर्शन प्रदान करते.

नाटकांविषयीच्या सर्व घटकांचा विचार करणारे संस्कृत नाट्यसौंदर्य नामक पुस्तक आहे. निवडक नऊ नाट्यकृतींचे परिशीलन करण्याचा प्रयत्न के. ना. वाटवे यांनी केला आहे. संस्कृत साहित्यातील विनोद निर्मिती करणारा घटक म्हणजे विदूषक. विदूषक या संकल्पनेवर विचार मांडून संस्कृत साहित्यामध्ये विखुरलेल्या व विदूषकाच्या आवतीभोवती फिरणाऱ्या विनोदाचे मार्मिक चित्रण यात दिसून येते. संस्कृत साहित्यविषयक विचार मांडणाऱ्या या कवीच्या लेखणीद्वारे मराठी साहित्यालासुद्धा अधिक समृद्ध केले. त्यामध्ये प्राचीन मराठी पंडिती काव्य व मराठी पंडिती काव्य या दोन पुस्तकांचा समावेश होतो. या दोन्ही पुस्तकांमध्ये प्राचीन काळातील पंडिती काव्य म्हणजे काय व पंडिती काव्यामागील मूल प्रेरणास्रोत शोधण्याचा प्रयत्न यामध्ये केलेला दिसतो. पंडितीकाव्य समीक्षक आणि संस्कृत कवींचा पंडित कवींवर पडणारा प्रभाव यांच्याबाबत विस्तृत विवेचन केले आहे.

‘नल-दमयंती’ यांच्यावर आधारित असलेले ‘नल-दमयंती’ हे काव्य त्यांनी मराठी भाषेत छंदोबद्ध लिहिले. साध्या सोप्या मराठी भाषेत लिहिलेली किरातार्जुनीयम् नामक कथा हे त्यांचे आणखी एक प्रसिद्ध पुस्तक होय. आपल्या संपूर्ण वैयक्तिक जीवनचरित्रावर प्रकाश टाकणारा प्रांजळ, आत्मकथनपर असा ‘माझी वाटचाल’ हा ग्रंथ होय. लोकांना मार्गदर्शनपर ठरतील असे अनेक संस्कृत व मराठी भाषांतील ग्रंथ त्यांच्या लेखणीतून रचनाबद्ध झाले. मराठी व संस्कृत साहित्याला मिळालेला हा अमूल्य ग्रंथरूपी ठेवा होय. ज्यासाठी दोन्ही भाषिक वर्ग निरंतर त्यांचे ऋणी असेल.

– प्रा. सुचित्रा ताजणे

**संदर्भ :**

*१. मराठी वाङ्मयसेवक चरित्रकोश; १०३९ ते १९४०; खंड पहिला.*

## वाडेकर, देविदास दत्तात्रेय

**तत्त्वज्ञानाचे सखोल अभ्यासक, प्राध्यापक**

**२५ मे १९०२ – ५ मार्च १९८५**

देविदास दत्तात्रेय वाडेकर यांचा जन्म कुरोली (ता. खटाव), जिल्हा सातारा येथे झाला. मुंबई विद्यापीठाची तत्त्वज्ञान विषयात एम.ए. ही पदवी संपादन केल्यानंतर त्यांनी अध्यापन कार्याला सुरुवात केली. १९२६ ते १९३२ पर्यंत पुण्यातील डेक्कन महाविद्यालय व

कोल्हापूरचे राजाराम महाविद्यालय येथे त्यांनी अध्यापन केले. पुढे फर्गसन महाविद्यालयात (१९३२ ते १९३९), विलिंग्डन महाविद्यालयात (१९३९ ते १९४३), पुनश्च फर्गसन महाविद्यालयात (१९४३ ते १९६२) असे विविध महाविद्यालयांत अध्यापन कार्य करून ते विभाग प्रमुख म्हणून निवृत्त झाले. प्रामुख्याने 'मराठी तत्त्वज्ञान कोश' (तीन खंड) यांचे संपादक म्हणून त्यांनी केलेले काम पुढील पिढ्यांसाठीही बहुमूल्य असे आहे.

भगवद्गीतेवरील संशोधनाने त्यांच्या व्यासंगाला सुरुवात झाली. पुढे ग्रीक तत्त्वज्ञान, ज्ञानमीमांसा, सद्वस्तूमीमांसा अशा अनेक शाखांचा त्यांनी सखोल अभ्यास केला. आधुनिक मानसशास्त्र व त्यातील विविध सांप्रदायांची ओळख त्यांनी करून दिली.

मराठी तत्त्वज्ञान महाकोश परिषदेची स्थापना करून व तेथे संचालक म्हणून त्यांनी अभूतपूर्व काम केले. त्यातूनच मराठी तत्त्वज्ञान कोशाचे तीन खंड प्रकाशित झाले. त्यांनी 'भगद्गीता - ए फ्रेश स्टडी' (१९२४), 'भारतीय मानसशास्त्र परिभाषा'(१९४४), 'आधुनिक मानसशास्त्र : इतिहास व संप्रदाय' (१९५१), 'विगमन' (१९५६), 'निगमन' (१९६३), 'विगमनातील शब्द आणि वाक्प्रचार पद्धती' (१९६३) असे विपुल लेखन केले. 'इंडियन फिलॉसॉफिकल काँग्रेस'च्या ४३व्या अधिवेशनाचे ते मुख्य अध्यक्ष (जनरल प्रेसिडेंट) होते. हे अधिवेशन धारवाड येथे भरले होते. 'इंडियन फिलॉसॉफिकल काँग्रेस'च्या गोल्डन ज्यूबिली सेशन १९७५ दिल्लीमध्ये एका विभागाचे ते अध्यक्ष होते. त्यांचे निधन वृद्धापकाळाने झाले.

– प्रा. विजय कारेकर

व

## वाडेकर, मुकुंद लालजी

**धर्मशास्त्रे व स्मृतींचे अभ्यासक**

**१९५५**

मुकुंद लालजी वाडेकरांनी बडोद्याच्या महाराजा सयाजीराव विद्यापीठातून संस्कृतमध्ये बी.ए., एम.ए. तसेच पीएच.डी. अशा उपाध्या संपादन केल्या. धर्मशास्त्रे, पुराणे, हस्तलिखित शास्त्र हे त्यांचे विशेष अध्ययनाचे विषय, अध्ययनानंतर काही काळ गोध्रा व बडोदा येथे अध्यापन करून नंतर बडोद्याच्या प्राच्यविद्या संस्थेत ते उपसंचालकपदी कार्यरत आहेत.

विष्णुपुराणाच्या चिकित्सक आवृत्तीचे प्रमुख संपादक म्हणून नियुक्ती झाली असतानाचे त्याबरोबरच देवलस्मृतीची पुनर्रचना व चिकित्सक अध्ययनाचे दोन खंडात्मक लेखन, मार्कंडेय पुराणातील दोन खंडांतील अध्ययनात्मक लेखन, लक्ष्मीधराच्या कृत्यकल्पतरु (शान्तिकांड), गायकवाड ओरिएन्टल ग्रंथमालेतील खंड, पीताम्बराचार्यांच्या टीकेसह देवीमाहात्म्य, पंडित जनार्दन पदेशास्त्रींच्या मराठी लेखांचे संकलन, प्राच्यविद्याविषयक स्वलिखित निबंधांचा संग्रह इत्यादी ग्रंथांची त्यांनी निर्मिती केली. याव्यतिरिक्त बडोद्याच्या प्राच्यविद्यासंस्थेच्या शोधपत्रिकेचे संपादन, स्वाध्याय व वेदव्यासंग या गुजराती त्रैमासिकांचे संपादन या जबाबदाऱ्या ते निष्ठेने पार पाडत आहेत.

त्यांनी अनेक चर्चासत्रे, कार्यशाळा व राष्ट्रीय तथा आंतरराष्ट्रीय परिषदांमध्ये सहभाग घेतला असून १००हून अधिक शोधनिबंध इंग्लिश, मराठी, गुजराती, हिंदी व संस्कृत या भाषांमधून प्रसिद्ध झाले आहेत. यांतील काही महत्त्वाचे विषय असे - ब्रह्मसूत्रशांकरभाष्यात आढळणारी स्मृतीतील उदाहरणे, विष्णुपुराणातील रामचरित्र - काही ठळक नोंदी, रामचंद्र पंडितांचे दशोपनिषत्सार, देवलस्मृती व ज्योतिष, वाल्मीकी रामायणाच्या चिकित्सक आवृत्तीची संशोधनप्रणाली, गृह्यसूत्रातील वास्तुविज्ञान, रमालहरी, सौभाग्यलहरी, गणेशलहरी, लावण्यलहरी या दुर्मीळ लहरीवाण्यांचे अध्ययन, शुक्लयजुर्वेद आणि विज्ञान, अथर्ववेद व सूक्ष्मजीवशास्त्र इ.इ. डॉ. वाडेकरांची प्रतिभा प्राच्यविद्येच्या सर्वच प्रांतात चौफेर संचार करताना दिसते. स्वतंत्र अध्ययनात्मक लेखनाव्यतिरिक्त डॉ. वाडेकरांनी अनुवादही केले आहे. जगन्मंगलस्तोत्र योगविंशिका, रावणकृत अर्कप्रकाश यांचा अनुवाद त्यांनी केला आहे. 'आज गोकुळात रंग खेळतो हरी' चा

संस्कृत अनुवाद, दयारामाच्या पाच गुजराती कवनांचा संस्कृत अनुवाद त्यांच्या नावावर आहे.

विद्यार्थिदशेत प्रत्येक वर्षी परीक्षेतील सर्वोत्तम कामगिरीसाठी अनेक पारितोषिके, पदके, शिष्यवृत्त्या मिळवणाऱ्या वाडेकरांना ज्ञानप्रबोधिनी, पुणे यांनी डॉ. जयश्री गुणे राष्ट्रीय संशोधन पुरस्काराने त्यांच्या संस्कृत प्राच्यविद्या क्षेत्रातील अतुलनीय योगदानासाठी सन्मानित केले. त्यांनी अनेक शैक्षणिक संस्थांचे आजीव सदस्य, विश्वस्त व सल्लागार म्हणून कार्य केले. त्यांच्या कार्यकाळात गायकवाड ओरिएंटल सीरीजने अनेक गुजराती तसेच इंग्लिश पुस्तके (काही हस्तलिखिते, सूचिग्रंथ, व्याख्यानमाला) प्रकाशित केली.

— डॉ. गौरी माहुलीकर

## वाडेकर, रंगनाथ दत्तात्रेय

**भाषातज्ज्ञ, संशोधक, संस्कृत पंडित**

**१ जानेवारी १९०० — १ एप्रिल १९८९**



रंगनाथ दत्तात्रेय वाडेकर यांचा जन्म सिद्धेश्वर कुरोली (जि. सातारा) येथे मध्यमवर्गीय ब्राह्मण कुटुंबात झाला. त्यांचे मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण अहमदनगर येथे व महाविद्यालयीन शिक्षण पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयात झाले. सन १९२१मध्ये त्यांनी (संस्कृत व इंग्लिश या विषयांत) बी.ए. ही मुंबई विद्यापीठाची पदवी मिळवली. नंतर पाली या भाषेचा अभ्यास स्वत:च करायचा असे ठरवून त्यांनी संस्कृत व पाली हे दोन विषय घेऊन १९२६मध्ये एम.ए.ही पदवी मिळवली. १९२७ ते १९३६ या काळात त्यांनी भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्थेत संस्कृतचे व पालीचे प्राध्यापक म्हणून काम केले. प्रा. एस. के. बेलवलकरांचे संशोधनातील मदतनीस म्हणूनही त्यांनी काम केले. सन १९३६मध्ये फर्गसन महाविद्यालयात संस्कृत-प्राकृत भाषांचे प्राध्यापक म्हणून ते रुजू झाले व सन १९६१साली निवृत्त होईपर्यंत तिथे अध्यापनाचे काम केले. नव्याने स्थापन झालेल्या पुणे विद्यापीठातही त्यांनी १९४८-१९६१ या काळात संस्कृत-पाली-प्राकृत विषय शिकविले.

टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, न्यू इंग्लिश स्कूल, अहिल्यादेवी हायस्कूल येथेही त्यांनी शिक्षकाचे काम केले. त्यांनी स्वत: पीएच.डी. पदवी मिळवली नाही परंतु पीएच.डी.च्या अनेक विद्यार्थ्यांना त्यांनी खूप मदत केली. मेधा व प्रज्ञा हे बुद्धीचे दोन्ही गुण त्यांच्या ठिकाणी प्रकर्षाने असल्याने ते एक चालता-बोलता ज्ञानकोशच होते. संस्कृत आणि प्राकृत विषयात पुढे संशोधन करण्यासाठी जर्मन आणि फ्रेंच भाषांचे ज्ञान आवश्यक असते असे त्यांचे गुरू पी. डी. गुणे यांनी सांगितल्यावरून त्यांनी या दोन भाषा आत्मसात केल्या. डी. व्ही. आपटे या इतिहास संशोधकांना शिवाजीवरील पोर्तुगीज पत्रे वाचण्यासाठी डच भाषेचा जाणकार हवा होता. वाडेकर त्यांच्यासाठी डच भाषाही शिकले. त्या काळात डच भाषा जाणणारे ते एकमेव भारतीय होते. भाषा-अध्ययनाची विशेष आवड आणि कुशलता त्यांच्या ठिकाणी होती. ग्रीक-लॅटिनपासून मॉडर्न रशियनपर्यंत चौदा भाषा त्यांना अवगत होत्या.

फ्रेंच, जर्मन, अर्धमागधी, पाली या भाषांचा परिचय करून देणारी प्राथमिक पुस्तके वाडेकरांनी तयार केली. तसेच अनेक पाली ग्रंथांच्या संपादित आवृत्त्या त्यांनी प्रसिद्ध केल्या. मिलिन्द (१९४०), पातिमोक्ख (१९४१), तेलकटाहगाथा (१९४१), धम्मसंगणि (१९४०) आणि डॉ. पी. व्ही. बापट यांच्याबरोबर अठ्ठसालिनी (१९४२) हे पाली ग्रंथ आणि उत्तराध्ययनसूत्र हा जैन अर्धमागधी ग्रंथ (१९५९) असे ग्रंथ त्यांनी प्रसिद्ध केले. पाली तिपिटक देवनागरी लिपीमध्ये छापण्याचाही एक प्रकल्प १९३०पासूनच त्यांच्या मनात होता, पण तो त्या काळी प्रत्यक्षात येऊ शकला नाही. वैदिक संशोधन मंडळाने प्रसिद्ध केलेला (Eighteen Principal Upanisads) हा ग्रंथ

वाडेकरांनी आचार्य वि. प्र. लिमये यांच्या जोडीने संपादित केला. या उपनिषदांवर त्यांनी लिहिलेल्या टिपा, तळटिपा त्यांच्या सूक्ष्म व सखोल ज्ञानाची साक्ष देतात. बौद्ध, जैन तसेच पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाच्या तौलानिक विचारांनी लिहिलेल्या या टिपा वैशिष्ट्यपूर्ण आहेत.

वाडेकर हे वैदिक संशोधन मंडळाचे संस्थापक सदस्य होते. भारतीय धर्मतत्त्वज्ञान संशोधन मंडळाचेही ते सदस्य होते. तसेच मराठी तत्त्वज्ञान कोषाशीही ते संबंधित होते. तसेच लोणावळा येथील कैवल्यधाम योग केंद्रात योगविषयक ज्ञानकोशाचे संशोधक निदेशक म्हणूनही (१९६१-१९६६) त्यांनी काम केले.

वाडेकर मूलत: शिक्षक होते. आपल्या विद्यार्थ्यांवर त्यांचे नि:स्सीम व नि:स्वार्थी प्रेम होते. त्यांना सर्वतोपरी मदत करायला ते तयार असत. फर्गसन महाविद्यालयात त्यांनी ट्युटोरिअल डिपार्टमेंट नावाचा एक अत्याधुनिक, असाधारण असा या प्रकारचा या देशातला पहिला विभाग सुरू केला. त्यातून कोणत्याही विषयाच्या विद्यार्थ्याला शैक्षणिक सामग्री, उपलब्ध करून दिली जाई. सुट्टीच्या काळात ते वेगवेगळ्या भाषा विषयांचे वर्ग घेत. हे सर्व अत्यंत निरपेक्षपणे ते करत. त्यांनी विद्यार्थ्यांकडून किंवा कोणाकडूनच कशाचीही अपेक्षा केली नाही.

आध्यात्मिक साधना हे त्यांच्या आयुष्याचे मुख्य ध्येय होते वयाच्या सतराव्या-अठराव्या वर्षाच्या सुमारास त्यांना स्वप्नात साक्षात्कार होऊन आध्यात्मिक साधनेची दीक्षा मिळाली. मग १९३०-१९३६ या काळात ते रोज संध्याकाळी साधनेसाठी भाजे येथील लेण्यामधील गुहेत जात. वाडेकरांचे मनन, चिंतन सतत चालू असे. योगी अरविंदांच्या ग्रंथांचे त्यांनी चांगले परिशीलन केले होते व त्यांचा त्यांच्यावर प्रभाव होता. भगवद्‌गीता, जैन ग्रंथ, बायबल व कुराण यांचाही अभ्यास त्यांनी केला होता. पाश्चात्त्य तत्त्वज्ञानातील नित्शे, कांट, हेगेल आणि विशेषत: विटगेनस्टाइनच्या सिद्धान्ताचा त्यांना चांगला परिचय होता. त्यांची मते त्यांनी तावून-सुलाखून स्वीकारली होती. तत्त्वज्ञानाच्या ग्रंथाप्रमाणेच वैज्ञानिक साहित्यही त्यांना वाचायला आवडे. स्वयंपाकापासून मोटार दुरुस्तीपर्यंत सर्व कामे त्यांना येत होती व ती कामे स्वत:च करण्याबद्दल त्यांचा आग्रह असे. भाषा, भाषाशास्त्र, पुरातत्त्वशास्त्र, तत्त्वज्ञान, इंजिनिअरिंग, टेलीकम्युनिकेशन अशा अनेक विषयांमध्ये त्यांना गती होती. त्यामुळे ते सतत कार्यमग्न असत. त्यांच्याबद्दल फर्गसनमधील प्राध्यापक म्हणाले, ‘If you allow him to work at his fullest capacity, half of your staff will have to be dismantled’

अशा कर्मयोगी, छात्रप्रिय, नि:स्पृह वाडेकरांना लौकिक मानसन्मान फारसे मिळाले नाहीत. १९८१मध्ये ‘राष्ट्रीय संस्कृत पंडित’ म्हणून त्यांना गौरवले गेले.

— डॉ. नलिनी चापेकर

## वाळिंबे, रामचंद्र शंकर

**साहित्यिक, संस्कृततज्ज्ञ, समीक्षक**

**९ नोव्हेंबर १९११ – २ फेब्रुवारी १९८९**



एक नामवंत साहित्यिक, सव्यसाची शिक्षक, तज्ज्ञ वक्ता, समीक्षक, नाट्यभाष्यकार, प्राचीन मराठी भाषा आणि संत साहित्य यांचे ज्येष्ठ जाणकार, संस्कृत विद्वान रामचंद्र शंकर वाळिंबे यांचे सुरुवातीचे शिक्षण पुण्यात झाले. त्यानंतर संस्कृत (पूर्ण) घेऊन १९३३-१९३५मध्ये मुंबई विद्यापीठातून बी.ए. झाले. त्यांना जगन्नाथ शंकरशेठ शिष्यवृत्ती व वरजीवन माधवदास शिष्यवृत्ती मिळाली. पुण्याच्या स.प.महाविद्यालयात ते संस्कृतचे फेलो झाले. १९३८मध्ये ते एम.ए. झाले व १९४३मध्ये त्यांनी शिक्षणशास्त्रातील बी.टी.पदवी मिळवली. ज्ञानेश्वरीतील ‘विदग्ध रसवृत्ति’ या विषयावर १९४३मध्ये त्यांना पुणे विद्यापीठातून पीएच.डी. मिळाली. याच विषयावरील प्रबंधाला मध्य प्रदेश शासनाचा अ.भा. पुरस्कारही देण्यात आला.

वाळिंबे कुटुंबीय मूळ पुणे-सातारा रस्त्यावरील शिरवळ गावचे, ते नंतर पुण्यात स्थायिक झाले. डॉ. वाळिंबे हाडाचे शिक्षक होते. त्यामुळेच प्रारंभी १९३८-४२ याच काळात शिक्षण प्रसारक मंडळीच्या नूतन मराठी विद्यालय हायस्कूलमध्ये ते संस्कृतचे अध्यापक झाले. याच मंडळाच्या टिळक कॉलेज ऑफ एज्युकेशनमध्ये ते १९४३-४६ तीन वर्षे प्राध्यापक होते. नंतर सर परशुरामभाऊ (स.प.) महाविद्यालयामध्ये संस्कृत-मराठी विषयाचे प्राध्यापक झाले. १९४६-५६ सुमारे दहा वर्षे त्यांनी विद्यार्थिप्रिय शिक्षक म्हणून नाव कमावले. शि. प्र. मंडळीच्या योजनेतून मुंबईच्या राम नारायण रुइया महाविद्यालयाचे मराठी विभाग प्रमुख म्हणून १९५६-६४ अशी आठ वर्षे आणि नंतर १९६४-६९ या काळात पुण्याला स.प. महाविद्यालयात मराठी विभाग प्रमुख म्हणून काम पाहिले. नुकतीच पुणे विद्यापीठाची स्थापना झाली होती. १९६९ साली मराठी विभाग प्रमुख म्हणून डॉ. वाळिंबे यांची नेमणूक झाली. त्यांच्या कार्याची कीर्ती पूर्ण महाराष्ट्रभर पसरू लागली होती. याच वर्षांपासून महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे इथे त्यांची वर्णी लागली आणि 'साहित्य-समीक्षक' स्वरूपात ते लोकांसमोर आले. प्रथम सभासद, नंतर पत्रिकेचे संपादक व १९६७-७३ या काळात ते कार्याध्यक्ष झाले. साहित्याच्या क्षेत्रात उज्ज्वल काम करीत असतानाच ते नाट्यक्षेत्रातही रस घेऊ लागले. परिणामी १९६६ ते ७३ या काळात ते पुण्याच्या सुप्रसिद्ध भरत नाट्य संशोधन मंडळाचे संचालक झाले. या काळात त्यांनी भरतमुनींच्या नाट्यशास्त्रावर संशोधनात्मक अनेक व्याख्याने दिली. १९७३ साली ते साहित्य परिषदेचे अध्यक्ष झाले आणि त्याच काळात साहित्य अकादमीवर त्यांची नियुक्ती झाली.

नाट्यशास्त्राच्या अभ्यासानंतर मराठी जुनी नाटके आणि नाटककार यांच्याकडे त्यांची कुतूहलवृत्ती वळली आणि त्यातूनच नागपूर, कलकत्ता, पुणे, मुंबई इत्यादी ठिकाणी विविध दृष्टीकोनातून मराठी नाटके आणि नाटककार यांचा अभ्यास करून त्यांनी व्याख्यानमाला गाजवल्या, त्यातूनच अभ्यासपूर्ण ग्रंथ जन्माला आले. त्यामध्ये 'गडकऱ्यांचे अंतरंग' (१९५१), 'रंगभूमीवरील वास्तववाद' (१९६६) 'नाटककार गडकरी' (१९५७), 'एकच प्याला -विवेचक रसास्वाद' (१९५९), 'मराठी नाट्य समीक्षा' (१९६८) अशी बहुमोल ग्रंथरत्ने वाचकांना पाहावयास मिळाली. त्याचबरोबर (१) 'एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्राची सामाजिक पुनर्घटना', (२) 'कुरुकुलाचा सीमावृक्ष', (३) 'भा.रा. तांबे यांची कलाविषयक भूमिका', (४) 'नॅचरॅलिझम', (५) 'प्राचीन भारतीय कला : इतिहास आणि रूपदर्शन', (६) 'बालकवी ठोंबरे : काव्यसमीक्षा', (७) 'मराठी वाङ्मय इतिहासाची प्रस्तावना', (८) 'मुक्तात्म्यापासून प्रमद्वरेपर्यंत' (माडखोलकर कादंबरी समीक्षा), (९) 'राधेय कर्ण', (१०) 'वाङ्मयीन टीका : शास्त्र आणि पद्धती', (११) 'साहित्यमीमांसा', (१२) 'साहित्याचा ध्रुवतारा', (१३) 'साहित्यातील अश्लील आणि ग्राम्य', (१४) 'ज्ञानेश्वरीतील विदग्ध रसवृत्ति', (१५) 'सुधाकर की एकच प्याला', अशी एकापेक्षा एक सरस पुस्तके त्यांनी अभ्यासकांच्या हाती दिली. साहित्यिक-समीक्षक व नाट्यशास्त्र भाष्यकार म्हणून डॉ. वाळिंबे लोकांसमोर आले.

एकीकडे नवनवीन विषयावर ग्रंथलेखन करीत असताना त्यांनी आवडीच्या ग्रंथांचे संपादन करून संस्कृत व मराठी विषयाच्या विद्यार्थ्यांना अनमोल मदत केली. त्यांच्या संपादनात 'अभिज्ञान शाकुंतल', 'मुद्राराक्षस', 'मेघदूत', 'वेणीसंहार', 'स्वप्नवासवदत्ता', 'मुद्राराक्षस' (इंग्रजी), अशी संस्कृत संपदा, तर 'केशवसुत – काव्य आणि परामर्श', 'संगीत भावबंधन', मराठी निबंध', 'वाग्वैजयंती', 'संशय कल्लोळ', 'संगीत सौभद्र', 'ज्ञानेश्वरी (अ. १६)', 'ज्ञानेश्वरी (अ. १७)' अशी मराठीविषयक अनेक ग्रंथरत्ने त्यांनी अभ्यासकांना दिली. शिवाय वेगवेगळ्या कार्यक्रमांच्या निमित्ताने त्यांनी अभ्यासपूर्ण असे ३७ लेख प्रसिद्ध केले आहेत. नऊ ग्रंथांना प्रस्तावना, वीस ग्रंथांची अभ्यासपूर्ण परीक्षणे आणि डझनाहून अधिक

मान्यवर विद्वानांचे ते पीएच.डी.चे मार्गदर्शक होते. त्यामध्ये डॉ. हे.वि. इनामदार, डॉ. भीमराव कुलकर्णी, डॉ. केशवराव जोशी अशी कित्येक नावे घेता येतील.

डॉ. वाळिंबे १९६०नंतर भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्थेकडे वळले. समृद्ध संस्कृत साहित्य आणि डॉ. दांडेकर, डॉ. बेलवलकर, वैद्य यासारख्या दिग्गज संस्कृत पंडितांचा परिचय, यातूनच त्यांनी संस्कृत काव्य-नाटकाचा विश्लेषणात्मक अभ्यास केला. महाभारताची चिकित्सक आवृत्ती अभ्यासली. ते काही काळ संस्थेच्या रेग्युलेटींग समितीचे सदस्य आणि नंतर अध्यक्ष होते. प्रत्येक शनिवारी सकाळी भांडारकर संस्थेच्या ग्रंथालयास भेट देऊन नवीन ग्रंथ आणि परिचितांच्या भेटी त्यांनी कधी चुकवल्या नाहीत.

डॉ. वाळिंबे आणि डॉ. वि.म. दांडेकर हे दोघे दिग्गज ज्योतिषशास्त्राचे पाठीराखे होते. त्यात दांडेकर ज्योतिषशास्त्र शिकलेले होते, तर वाळिंबे यांचा अभ्यास दांडगा होता. १९८० साली पुण्यात फलज्योतिष परिषदेचे पहिले अधिवेशन मोठ्या प्रमाणात झाले. सुमारे ५००-६०० ज्योतिषी भारतातून एकत्र आले होते. या परिषदेच्या उद्‌घाटनाला वाळिंबे सरांनी या शास्त्रावर आक्षेप घेणाऱ्यांची भंबेरी उडवली, इतकेच नव्हे तर, पुढे आणखी एक-दोन परिषदांच्या उद्‌घाटनाला ते पुण्याबाहेर हजर होते. एखादा विषय मांडावयाचा म्हटले की ते त्याचा अंगोपांगांनी मुळापासून अभ्यास करीत. केशवराव जोशी यांचा थेसिस कुंडलिनी (योग) यावर होता. पू. गुळवणी महाराजांचे ते निकटवर्तीय होते. वाळिंबे सरांनी, मार्गदर्शन करावयाचे ठरवल्यावर त्याचा खूप अभ्यास केला. त्यावर एक-दोन व्याख्याने दिली. एक ग्रंथही लिहिला. महाभारत हा त्यांचा आवडता विषय. 'सीमावृक्ष' (भीष्म) आणि 'राधेय कर्ण' ही दोन पुस्तके लिहिताना त्यांनी भांडारकर संस्थेची चिकित्सक आवृत्ती पूर्णपणे अभ्यासली होती. शेवटी ते संगीताचा सामवेदाशी असणाऱ्या संबंधाचा अभ्यास करीत होते.

डॉ. वाळिंबे यांच्या वक्तृत्वाचा पूर्ण महाराष्ट्रभर बोलबाला झाला होता. मध्य प्रदेश, गुजराथ, कर्नाटक, गोवा या जवळपासच्या राज्यांतून त्यांना व्याख्यानाची अनेक आमंत्रणे येत. गोव्याला जात असताना रेल्वे प्रवासातच त्यांचे दुर्दैवी निधन झाले.

— वा. ल. मंजूळ

## वाळिंबे, सुभाष रामचंद्र
**पुरामानवविज्ञान संशोधक**
**११ जुलै १९५०**



पुरातत्त्वीय स्थळांवर उत्खननात अनेकदा मानवांची दफने आढळून येतात. मानवी अस्थींचा सखोल अभ्यास करून प्राचीन काळातील मानवांसंबंधी विविध प्रकारचे निष्कर्ष काढता येतात. मानवी अस्थिपंजराचा जीवशास्त्रीय दृष्टीकोनातून अभ्यास करणाऱ्या शाखेला पुरामानवविज्ञान (पॅलिओअँथ्रॉपॉलॉजी) असे म्हणतात. या विषयाला संपूर्णपणे वाहिलेली सुसज्ज संशोधन प्रयोगशाळा डेक्कन कॉलेजमध्ये निर्माण करणे व ती वाढवणे हे सुभाष रामचंद्र वाळिंबे यांचे प्रमुख योगदान आहे. प्रा. वाळिंबे यांनी पुणे विद्यापीठातून प्राणिविज्ञान या विषयात बी.एस्सी. ही पदवी घेतल्यानंतर मानवविज्ञान या विषयात १९७२मध्ये एम.एस्सी. ही पदवी घेतली. त्यानंतर १९७२ ते १९७५ या काळात त्यांनी कोलकाता येथे भारतीय मानवविज्ञान सर्वेक्षण या संस्थेत नोकरी केली. ते १९७६मध्ये पुणे विद्यापीठाच्या वारली जमातीवरील संशोधन प्रकल्पात सहभागी झाले. नोकरीच्या दरम्यान त्यांनी डॉक्टरेटसाठी संशोधन केले व १९७८मध्ये 'बायो-जेनेटिक ॲफिनिटिज ऑफ कोलीज ऑफ महाराष्ट्र' हा प्रबंध लिहून त्यांनी पीएच.डी. पदवी संपादन केली. १९८०मध्ये ते डेक्कन कॉलेजमध्ये व्याख्याता या पदावर रुजू झाले व तेथे ते २००९पर्यंत होते. त्यानंतर ते २०१०मध्ये पुणे विद्यापीठातून प्राध्यापक या पदावरून निवृत्त झाले.

व

त्यांचे भारतातील व परदेशांतील नियतकालिकांत ८० शोधनिबंध प्रसिद्ध झाले आहेत.

प्रा. वाळिंबे यांनी त्यांच्या तीस वर्षांच्या सेवाकाळात पुरामानवविज्ञानाच्या अनेक पैलूंवर मूलभूत संशोधन केले. पुरामानवविज्ञानात मानवसमूहाच्या उत्क्रांतीचा व त्या दरम्यान झालेल्या जैविक व सांस्कृतिक बदलांचा मागोवा घेतला जातो. प्रा. वाळिंबे यांचे संशोधन प्रामुख्याने जैविक पैलूंशी निगडित होते. पुरामानवविज्ञानाचे अनेक प्रकल्प त्यांनी पूर्ण केले. त्यांच्या सर्व संशोधनाचे अहवाल प्रसिद्ध झाले आहेत.

मानवाने शेतीला सुरुवात केल्यानंतर दातांच्या रचनेत फरक पडला ही सिद्धान्तकल्पना योग्य आहे की नाही, हे पाहण्यासाठी त्यांनी १९८४-१९८६ दरम्यान ओरेगॉन विद्यापीठातील प्रा. जॉन ल्युकाक्स यांच्या सहकार्याने एक संशोधन प्रकल्प पूर्ण केला. त्याचप्रमाणे वाळिंबे व ल्युकाक्स यांनी डेक्कन कॉलेजमध्ये उपलब्ध असलेल्या ताम्रपाषाणयुगीन सांगाड्यांच्या दातांचा त्या दृष्टीकोनातून विशेष अभ्यास केला. प्रा. वाळिंबे यांनी कोळी जमातीच्या केवळ परस्परांशी लग्नसंबंध ठेवणाऱ्या सहा गटांवर संशोधन करताना त्यांच्या शरीराची पुरामानववैज्ञानिक पद्धतीने मोजमापे केली. हे काम त्यांनी महाराष्ट्रातील सात जिल्ह्यांमध्ये केले होते.

पुरातत्त्वीय स्थळांवर उत्खननात मिळणाऱ्या मानवी अस्थींवरून त्या काळातील आहाराचा व कुपोषणाचा अभ्यास करण्यासाठी आजच्या काळातील मानवाचा अभ्यास करणे गरजेचे असते. प्रा. वाळिंबे यांनी जवळजवळ क्ष-किरण वापरून १५०० अस्थी नमुन्यांचा अभ्यास केला व त्यांची पुरातत्त्वीय अस्थींशी तुलना केली. शेतीला प्रारंभ केलेल्या मानवसमूहांचा त्यांच्या अस्थींवरून सर्वांगीण अभ्यास करण्याचे महत्त्वाचे कार्य प्रा. वाळिंबे यांनी केले. त्यांनी नेवासे, चांडोली, इनामगाव, कवठे व दायमाबाद या ताम्रपाषाणयुगीन स्थळांवर मिळालेल्या सर्व मानवी सांगाड्यांचा सखोल अभ्यास केला. माणूस जिवंत असताना त्याला जे काही विकार होतात अथवा त्याला ज्या सर्व शारीरिक समस्यांना तोंड द्यावे लागते, त्यांमधल्या काहींच्या खुणा अस्थींवर व दातांवर दिसून येतात. पुरातत्त्वीय स्थळांवर उत्खननात मिळणाऱ्या मानवी अस्थी आणि दात यांच्या अवशेषांचा उपयोग करून प्राचीन काळातील रोग-विकार अथवा शारीरिक विकृती यांचा सखोल अभ्यास पुरामानवविज्ञानाच्या पुराविकृतिविज्ञान या उपशाखेत केला जातो. भारतात अशा प्रकारचे संशोधन करण्याचे श्रेय प्रा. वाळिंबे यांचे आहे. तसेच त्यांनी प्राचीन आहारासंबंधी (पॅलिओडाएट) अतिशय महत्त्वाचे निष्कर्ष काढले आहेत

हिमालयात रूपकुंड या हिमनदीच्या भागात बर्फामध्ये अनेक माणसांचे अवशेष आढळले आहेत. तेथे नॅशनल जिओग्राफिक या वाहिनीने केलेल्या मोहिमेत प्रा. वाळिंबे यांचा सहभाग होता. रूपकुंड येथे मिळालेल्या मानवी अवशेषांमधील डीएनए रेणूंचा अभ्यास करण्यासाठी त्यांनी डेक्कन कॉलेजमधील डॉ. प्रमोद जोगळेकर व हैद्राबाद येथील डॉ. लालजी सिंग यांच्या सहकार्याने भारतातील पहिली प्राचीन डीएनए प्रयोगशाळा कार्यान्वित केली. तसेच डॉ. लालजी सिंग यांच्यासह त्यांनी महादेव, कोळी, वारली, ठाकर, कातकरी व गोंड अशा आदिवासींच्या डीएनए रेणूंमधील विविधता पाहण्याचा प्रकल्प पूर्ण केला. डीएनए रेणूंमधील विविधता तपासून वेगवेगळ्या जमातींची गेल्या काही शतकांमधील स्थलांतरे व त्यांच्यातील जैविक घडामोडी यांचा मागोवा घेणे हा या प्रकल्पाचा उद्देश होता.

— डॉ. प्रमोद जोगळेकर

## वेलणकर, हरी दामोदर
**संस्कृत पंडित व ग्रंथकार**

**१८ ऑक्टोबर १८९३ — १३ जानेवारी १९६७**

व

हरी दामोदर वेलणकर यांचा जन्म कोकणातील तारळ येथे एका मध्यमवर्गीय कुटुंबात झाला. त्यांचे सुरुवातीचे शिक्षण कोकणात देवरुख येथे झाले. उपजीविकेसाठी त्यांनी दुकान काढले, पण ते चालले नाही. घरच्या खडतर आर्थिक स्थितीमुळे वैद्यकीय शिक्षणाचा विचार



त्यांनी सोडून दिला. त्यानंतर मुंबईला येऊन विल्सन महाविद्यालयात त्यांनी प्रवेश घेतला. गोकुळदास तेजपाल मोफत वसतिगृहात ते राहत. त्यांनी अभ्यासासाठी संस्कृत हा मुख्य विषय घेतला. प्रगती आणि यश यांनी हरी वेलणकरांची सदैव साथसंगत केली. बी.ए.ला प्रथम येऊन त्यांनी भाऊ दाजी पारितोषिक मिळवले व ते महाविद्यालयाचे फेलो झाले. एम.ए. झाल्यावर लगेचच त्यांची नेमणूक विल्सन महाविद्यालयातच संस्कृत विभाग प्रमुख म्हणून झाली. अननुभवी आणि तरुण व्यक्तीला मोठ्या विश्वासाने सुस्थिर अशा संस्कृत विभागाचे प्रमुख नेमणे, ही महाविद्यालयाच्या दृष्टीने धाडसाची बाब होती, पण वेलणकर यांनी हा विश्वास १९१४ ते १९५२ एवढा काळ काम करून सार्थ ठरवला. त्यांच्या या दीर्घ व सलग साहचर्याचा महाविद्यालयाला खूप फायदा झाला. वेलणकर यांच्या कामाची पद्धत अतिशय सूत्रबद्ध व प्रेरणादायी होती. संस्कृतच्या प्रत्येक अध्ययनशाखेचे त्यांनी तितक्याच उत्साहाने अध्ययन-अध्यापन केले. संस्कृत, प्राकृत, वेद, व्याकरण आणि योग या विविध शाखांमधील विद्यार्थ्यांना त्यांनी मार्गदर्शन केले. त्यामुळे विद्यापीठातील परीक्षांमध्ये त्यांचे विद्यार्थी उच्च गुण मिळवून पारितोषिक विजेते ठरले.

विल्सन महाविद्यालयातून निवृत्त झाल्यानंतर भारतीय विद्याभवनाच्या पदव्युत्तर विभागाचे ते सहसंचालक झाले. त्यानंतर त्यांचे संशोधन अडथळ्याशिवाय होत होते. मुंबई विद्यापीठाने १९६२ मध्ये संस्कृत विभाग स्थापन केला आणि प्राध्यापक वेलणकरांना त्याचे प्रमुखपद - डॉ. आर.जी. भांडारकर चेअर - बहाल केले. वेलणकर यांच्या संस्कृत प्रेमाचा, अध्ययनाचा, अध्यापनाचा हा सन्मान आहे. प्रा. वेलणकरांनी वेद, अभिजात संस्कृत, छंदशास्त्र, काव्यशास्त्र, प्राकृत, हस्तलिखितशास्त्र या शाखांमध्ये मोलाची भर घातली. त्यांचे अनेक भाषांवर प्रभुत्व होते, हे त्यांच्या लिखाणावरून दिसून येते. जसे अलंकार, ज्योतिष, मीमांसा, वेद, व्याकरण आणि योग इत्यादी. अध्यापन आणि पीएच.डी. विद्यार्थ्यांना मार्गदर्शन यांद्वारे त्यांनी पुढील पिढीला प्रेरणा दिली. निरनिराळ्या शाखांद्वारे स्वत: काम करून विद्यार्थ्यांना संशोधनाची मूलतत्त्वे त्यांनी समजावून दिली. स्वत:जवळचे उत्कृष्ट ते त्यांनी आपल्या विद्यार्थ्यांना दिले आणि त्यांच्याकडून कसलीच अपेक्षा ठेवली नाही.

आपल्या कारकिर्दीची सुरुवात त्यांनी रॉयल एशियाटिक सोसायटी, मुंबईमधील हस्तलिखितांची सूची करून केली. अचूकता व सर्वसमावेशकता हे या सूचीचे वैशिष्ट्य होय. मुंबई विद्यापीठाच्या ग्रंथालयातील इच्छाराम सूर्यराम देसाई संकलनाचीसुद्धा त्यांनी सूची तयार केली. स्वत: जमवलेली सुमारे दोन हजार हस्तलिखिते आपले गुरू डॉ. भडकमकर यांच्या स्मरणार्थ मुंबई विद्यापीठाच्या ग्रंथालयाला दिली.

निरनिराळ्या विद्यापीठांनी त्यांना त्यांच्या अभ्याससमित्यांवर निमंत्रित केले होते. ऑल इंडिया ओरिएन्टल कॉन्फरन्समध्ये ते अनेकदा वैदिक व प्राकृत विभागाध्यक्ष झाले होते. १९६२मध्ये वेलणकर यांना राष्ट्रपतींनी ‘संस्कृतपंडित’ म्हणून गौरवले.

१) १९२५ ते १९३० - त्यांनी विविध ठिकाणांहून संहितेचे संशोधन केले व त्यांची सूची तयार केली. (खंड- १ ते ४). २) १९४४- जिनरत्नकोश- जैन ग्रंथांची वर्णनात्मक सूची तयार केली. ३) १९४९- जयदामन या ग्रंथात संस्कृत छंदांचा उद्गम आणि विकास यासंबंधीचा अभ्यास. ४) १९५३- ऋग्वेदातील भक्तिमार्ग- हा त्यांचा महत्त्वाचा ग्रंथ आहे. ५) १९५६- महाभारतातील सौप्तिक पर्वाचे संपादन त्यांनी केले. ६) त्यांच्या कालिदासाच्या विक्रमोर्वशीय नाटकाची चिकित्सक आवृत्ती साहित्य अकादमीने १९६१ साली प्रसिद्ध केली आहे. ७) १९६१- ‘छांदानुशासान’ या हेमचंद्रांच्या ग्रंथाचे संपादन केले. या ग्रंथात प्राकृत व

अपभ्रंश छंदांचा विचार मांडलेला आहे. ८) 'रत्नमंजुषा' या छंदशास्त्रावरही त्यांनी भाष्य केले. ९) ऋग्वेदातील उपमा यांवरही त्यांनी लिखाण केले. 'ऋग्वेद' हा त्यांचा परमप्रिय विषय. 'ऋग्वेदातील इंद्र व अग्निसूक्ते टीपांसह त्यांनी इंग्रजीत भाषांतरीत केली. ऋग्वेदातील सातव्या मंडलाचे इंग्रजीत भाषांतर, टीपा, त्याचे उत्कृष्ट अभ्यासपूर्ण विवेचन प्रस्तावनेद्वारे मांडून त्यांनी विद्यार्थ्यांची व अभ्यासकांची गरज भागवली. १०) याशिवाय 'ऋग्वेदातील जादूगार', 'ऋग्वेदातील ऋत व सत्य', 'ऋग्वेदातील निर्मितिसूक्ते', 'दिवोदास अतिथिग्व आणि इतर अतिथिग्व', 'सप्तवधी आणि वध्रीमति यांची कथा' असे त्यांचे काही निवडक लेख अभ्यासपूर्ण आहेत.

— डॉ. गौरी माहुलीकर

**संदर्भ :**


*१. मराठी विश्वचरित्र कोश- खंड-४, संपादक- श्रीराम पांडुरंग कामत, विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा, १९७७.*

*२. संक्षिप्त मराठी वाङ्मयकोश, संपादक- गणोरकर, टाकळकर, डहाके, दडकर, भटकळ, जी.आर. भटकळ फाउण्डेशन, मुंबई, २००४.*


## वैद्य, उमा चंद्रशेखर

**कुलगुरू, प्राध्यापक, संस्कृतज्ज्ञ**

**१९ सप्टेंबर १९५२**



कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालयाचे कुलगुरुपद भूषवणाऱ्या डॉ. उमा चंद्रशेखर वैद्य यांनी विद्यापीठाच्या सर्वांगीण विकासासाठी मोलाचे योदान दिले आहे. यापूर्वी मुंबई विद्यापीठाच्या संस्कृत विभागात डॉ. आर.जी. भांडारकर प्राध्यापक व विभागप्रमुख म्हणून कार्यरत असणाऱ्या डॉ. उमा वैद्य या स्नातक (बी.ए.) व अधिस्नातक (एम.ए.) दोन्ही परीक्षांत प्रथम क्रमांकाबरोबरच अनेक पारितोषिकांच्या मानकरी आहेत. मुंबई विद्यापीठाच्या संस्कृत विभागात विभागप्रमुख म्हणून पदभार स्वीकारण्यापूर्वी वीस वर्षांपेक्षासुद्धा अधिक काळ त्या अध्यापन क्षेत्रात कार्यरत आहेत. या काळात त्यांनी सोमय्या व विल्सन महाविद्यालयात अध्यापनाचे कार्य केले आहे. संस्कृत, मराठी इत्यादी भाषांबरोबरच पाली भाषेचा त्यांचा व्यासंग फार मोठा आहे. पीएच.डी. सुरू असताना एक व त्यानंतर चार असे एकूण पाच संशोधन प्रकल्प आतापर्यंत पूर्ण झाले आहेत. याचबरोबर आतापर्यंत त्यांची स्वतंत्र लिहिलेली चार पुस्तके, चार संपादित पुस्तके व एकूण दीडशेपेक्षा जास्त संशोधन निबंध प्रकाशित झाले आहेत.

युनेस्कोकडून मान्यता मिळालेल्या साहित्य अकादमीच्या 'एन्सायक्लोपीडिया ऑफ इंडियन पोएटिक्स' या प्रकल्पातील काही नोंदी त्यांनी लिहिल्या. गोगटे महाविद्यालयात संस्कृतचा अधिस्नातकोत्तर विभाग सुरू करण्यात त्यांनी मोलाचे साहाय्य केले आहे. चीनमधील काही विश्वविद्यालयांचा संस्कृतचा अभ्यासक्रम तयार करून दिला आहे. त्यांनी मुंबई विद्यापीठ शैक्षणिक व प्रशासकीय अशा सर्व समित्यांवर काम केले आहे. याशिवाय विविध विद्यापीठांत व इतरत्र त्यांनी दिलेल्या व्याख्यानांच्या विषयाची यादी फार मोठी आहे. या सर्व व्यस्ततेत त्यांचे संशोधन अव्याहत सुरू आहे. अनेक विषयांवरील त्यांचे शोधनिबंध केवळ भारतातच नव्हे, तर भारताबाहेर मॉरिशस, इटली, जपान, ऑस्ट्रेलिया, अमेरिका अशा देशांत मान्य झाले आहेत. याचबरोबर त्यांनी मॉरिशस येथे तीन महिने अध्यापनाचेही कार्य केले आहे.

संस्कृत हेच जीवनाचे ध्येय असलेल्या डॉ. वैद्य यांनी संस्कृत विषयाच्या प्रचार व प्रसार कार्यासाठी लोकांच्या मनात संस्कृतबद्दल प्रेम निर्माण व्हावे, यासाठी आतापर्यंत शंभरावर अधिक व्याख्याने, संस्कृत संभाषण वर्गांचे आयोजन, तसेच विविध उपक्रम राबवले आहेत. संस्कृतप्रेमींनी सुरू केलेल्या 'ऋतायन' या संस्थेच्या

उपाध्यक्ष म्हणून त्या कार्यरत आहेत. व्याकरण, अर्थशास्त्र यासारख्या विषयांतील त्यांचा व्यासंग पाहून ब्राह्मण सभा, मुंबई यांनी त्यांना प्रज्ञावंत पुरस्कार (२००६-२००७). इंडियन इंटरनॅशनल फ्रेंड्स सोसायटीतर्फे राष्ट्रीय गौरव पुरस्कार (२०१०), द इंटरनॅशनल पब्लिशिंग हाऊसतर्फे द बेस्ट सिटिझन ऑफ इंडिया (२०१०), अशा पुरस्कारांनी त्यांना सन्मानित केले आहे. विद्यापीठातील त्यांच्या योगदानाबद्दल विद्यापीठाच्या १५० वर्षे पूर्तीच्या वेळी त्यांना बेस्ट परफॉरमन्स इन्सेन्टिव्ह अॅवॉर्ड (२००७-२००८) देऊन गौरवण्यात आले.

— डॉ. आसावरी बापट

## वैद्य, चिंतामण विनायक

**इतिहास तज्ज्ञ अभ्यासक**

**१८ ऑक्टोबर १८६१ — २० एप्रिल १९३८**



महाभारताचे मर्मज्ञ मीमांसक, रामायणाचे रसिक विश्लेषक, प्राचीन भारतीय साहित्य संस्कृतीचे प्रकांड पंडित, अर्वाचीन इतिहासाचे साक्षेपी विवेचक, लोकमान्य टिळकांचे राष्ट्रीय चळवळीतील सहकारी अशी चिंतामण विनायक वैद्य यांची ओळख आहे. सुखवस्तू वकील पित्याच्या घरी कल्याण येथे त्यांचा जन्म झाला. त्यांचे बालपण व प्राथमिक शिक्षण कल्याण येथेच झाले. मुंबईच्या एलफिन्स्टन हायस्कूल व याच महाविद्यालयामध्ये पुढील शिक्षण त्यांनी घेतले. ते १८७७ साली मॅट्रिक, तर १८८४ साली त्यांनी एलएल.बी. पूर्ण केले. त्यांनी सर्व शिक्षण प्रथम श्रेणीत तसेच विविध पारितोषिकांसह केले.

पुढे त्यांनी कोल्हापूर संस्थानात न्यायाधीशाची नोकरी स्वीकारली. १८८६मध्ये वडिलांच्या निधनानंतर त्यांनी ग्वाल्हेर संस्थानात जिल्हा न्यायाधीश नोकरी स्वीकारली. उज्जैन येथे काही काळ राहिल्यानंतर ते मुख्य न्यायाधीश झाले. १९०५ नंतर ग्वाल्हेर येथून स्वेच्छानिवृत्ती घेऊन ते टिळकांबरोबर समाजकार्यात (१९०५-१९२०) सहभागी झाले. टिळकांनंतर ते म.गांधींच्या सहवासात (१९२०-१९३०) आले.

चिंतामणरावांनी अनेक ग्रंथांचे लेखन केले. विशेषत: महाभारताचे उपसंहार, श्रीकृष्णचरित्र, भारतीय वीरकथा, दुर्दैवी रंगू (पानिपतावरील ऐतिहासिक कादंबरी) ही त्यांची पुस्तके घरोघरी पोहोचली. गीतारहस्य वगळता त्या तोडीचा दुसरा ग्रंथ म्हणून वैद्यांनी लिहिलेला महाभारताचा उपसंहार हा होता. १८० पृष्ठांचा हा उपसंहार १९१८साली प्रसिद्ध झाला. वैद्य यांचा हा उपसंहार वाचताना त्यांच्या विद्वत्तेचा प्रत्यय जागोजागी येतो. आपल्या ग्रंथलेखनासाठी त्यांनी विविध ग्रंथांचा आधार घेतला होता. वैद्यांच्या या लेखनाविषयी काही मतभेद व्यक्त केले गेले असले, तरी त्यांनी आपल्या उपसंहार लेखनात, (भांडारकर संस्थानाने प्रसिद्ध केलेली महाभारताची संशोधन आवृत्ती तेव्हा प्रसिद्ध झालेली नव्हती, हे लक्षात घ्यावे) 'कुंभकोणम' प्रतीतील श्लोक व देवनागरी पाठातील काही प्रक्षिप्त श्लोक विचारात घेतल्यामुळेच हे मतभेद झाले. त्यांचे काम आजही अभ्यासकांना मार्गदर्शकात्मक आहे. महाभारतावरील त्यांचा अभ्यास लक्षात घेऊन लोकमान्य टिळकांनी त्यांना सन १९०५मध्ये 'भारताचार्य' या पदवीने सन्मानित केले. टिळकांच्या स्मरणार्थ स्थापन केलेल्या टिळक महाराष्ट्र विद्यापीठात त्यांचा सहभाग होता. ते या विद्यापीठाचे 'कुलगुरू' (१९२२ ते १९३४) व (१९३४ ते १९३८) 'कुलपती' झाले. चिंतामणयांनी १९२०-१९३८ हा आपल्या आयुष्याचा १८ वर्षांचा काळ टिळक महाराष्ट्र विद्यापीठासाठी घालवला. ६ मे १९२१ रोजी स्थापना झालेले हे विद्यापीठ नावारूपाला आणून त्यांनी राष्ट्रीय शिक्षणाचा पुरस्कार केला. ज्ञानक्षेत्रातील त्यांचा अधिकार जाणून टिळक विद्यापीठाने 'विद्वत्कुलशेखर' ही सन्मानाची पदवी त्यांना दिली.

वैद्य यांची ग्रंथसंपदा विपुल आहे. त्यांनी 'विविध ज्ञानविस्तार'मधून विविध लेख प्रसिद्ध केले व नंतर ते ग्रंथ स्वरूपात आणले. 'अबलोन्नती ग्रंथमाला' (आठ लेख) (१८८९-१८९५); 'महाभारत-ए-क्रिटीसिझिम' (१९०४-मुंबई); 'संक्षिप्त भारत-श्लोकरूपाने' (१९०५); 'रिडल ऑफ रामायण' (१९०६); 'संक्षिप्त रामायण-श्लोकरूपाने' (१९०६); 'अबलोन्नती लेखमाला' (१९०६); 'माझा प्रवास' (विष्णुभट गोडसे यांची १८५७च्या बंडाबद्दल हकिकत (१९०७); 'एपिक इंडिया' (१९०७); 'संक्षिप्त मनुस्मृती' (१९०९); 'श्रीराम चरित्र' (१९११); 'दुर्दैवी रंगू' (१९१४); 'श्रीकृष्णचरित्र' (१९१६); 'वैद्यांचे वाङ्मयात्मक निबंध' (१९१६); 'महाभारताचा उपसंहार' (१९१८); 'मिडिव्हल हिंदू इंडिया'- व्हॉल्युम वन (१९२१); 'मिडिव्हल हिंदू इंडिया'- व्हॉल्युम टु (१९२४); व्हॉल्युम थ्री- 'मिडिव्हल हिंदू इंडिया' (१९२६); 'संस्कृत वाङ्मयाचा त्रोटक इतिहास' (१९२२); 'मध्ययुगीन भारत भाग' (१९२५); 'डाउनफॉल ऑफ हिंदु' (१९२६); 'गझनीच्या महमूदाच्या स्वाऱ्या' (१९२६); 'ए हिस्टरी ऑफ संस्कृत लिटरेचर' (१९२६); 'भारतीय वीरकथा' (१९२८); 'वैद्यांचे ऐतिहासिक निबंध' (१९३१); 'शिवाजी, द फाउंडर ऑफ मराठा स्वराज' (१९३१); 'हिंदुधर्माची तत्त्वे' (१९३१); 'श्रीमद्‌भगवद्‌गीता व तिचे भाषांतर' (१९३२); 'महाभारताचे खंड सभापर्व-विराटपर्व-उद्योगपर्व' (१९३३-३५); 'संयोगिता नाटक' (१९३४).

ही सर्व सूची पाहता, वैद्यांनी प्राच्यविद्या, मध्ययुगीन इतिहास, ऐतिहासिक कादंबरी यांशिवाय संस्कृत साहित्याचा इतिहास, हिंदू तत्त्वज्ञान अशा क्षेत्रांत विपुल काम केल्याचे दिसते. त्यांच्या कामात सूक्ष्म चिंतन, एखाद्या विषयाची साक्षेपाने समीक्षा करण्याची जिद्द दिसते. अभ्यासकांना त्यांचा अभ्यास मार्गदर्शक ठरतो. त्यांच्या अभ्यासपद्धतीमुळे व त्यांनी कालिदासाच्या संस्कृत साहित्याचा अभ्यास केल्याने त्यांच्या लेखनात भाषावैभव प्रकर्षाने जाणवते. प्राच्य काव्याचा ते लीलया वापर करत. त्यांचे एक चिंतन मराठी भाषेच्या संदर्भात 'विविध ज्ञानविस्तार'मधून प्रकाशित झाले होते. या संदर्भात व्याख्याने देताना मराठी भाषेच्या भौगोलिक सीमा स्पष्ट करून 'महाराष्ट्र देश व मराठी भाषा' यांचे अस्तित्व ख्रिस्त सनापासून असल्याचे स्पष्ट केले. महाराष्ट्रीय भाषा ही शौरसेनीची बहीण असल्याचे म्हटले आहे. होर्न्ले, ग्रिर्यसन यांनी केलेल्या 'अंतर्वर्तुळातील भाषा व बहिर्वर्तुळातील भाषा' या वर्गीकरणाची दखल घेऊन मराठी भाषा ही बहिर्वर्तुळातील भाषा असली, तरी शौरसेनीसारख्या अंतर्वर्तुळाच्या भाषेशी साधर्म्य आहे असे मत त्यांनी मांडले. वैद्य यांची 'निबंध आणि भाषणे' हा लेखसंग्रह महत्त्वाचा आहे.

मराठीच्या उगमाविषयी (काळाबाबत) त्यांनी 'ज्ञानविस्तार'मध्ये लिहिले. 'शंकराचार्यांची चळवळ' हा त्यातील एक महत्त्वाचा मुद्दा प्रतिपादन केला. या व अशा अनेक विषयांवर त्यांनी लेखन केले. याशिवाय त्यांचा प्रत्येक राष्ट्रीय चळवळीत सहभाग होता. एक प्रकांड पंडित व वक्ते म्हणून त्यांची नोंद करावी लागते. लोकमान्य टिळकांनी सन १८९२मध्ये म्हणजेच वैद्यांचा उगम होत असताना 'वैद्यांच्या व्यापक बुद्धीचे, दीर्घ परिश्रमाचे, अवलोकनाचे आश्चर्य वाटल्यावाचून राहणार नाही,' असे मत नोंदवले होते. त्यांच्याविषयी दत्तो वामन पोतदार यांनी म्हटले की, 'अत्यंत साधी राहणी, अत्यंत प्रखर बुद्धिमत्ता, प्रगाढ व्यासंग, ज्योतिष, संगीत, इतिहास, पुराणे, वेद, धर्मशास्त्राचा दीर्घ व सखोल अभ्यास आणि या अभ्यासाची फळे इंग्रजी-मराठी भाषेमध्ये निरलसपणे सादर करण्याची तत्परता... या सर्वांमुळे, चिंतामणरावांनी भीष्माचार्य, भारताचार्य या लोकार्पित पदव्या सार्थवून महाराष्ट्राची व भारताची चिरस्मरणीय सेवा केली.' (सह्याद्री, मे, १९३८)

— डॉ. अरुणचंद्र शं. पाठक

**संदर्भ :**

*१. भारताचार्य चिं. वि. वैद्य स्मृतिग्रंथ- द. भि. कुलकर्णी, प्रा. नारायण भालचंद्र वैद्य संपादित, १९९६, नागपूर.*

व

## वैद्य, परशुराम लक्ष्मण
**वाग्वैद्य, प्राध्यापक, भाषातज्ज्ञ**
**२९ जून १८९१ – मृत्युदिनांक अनुपलब्ध**



परशुराम लक्ष्मण वैद्य यांचा जन्म कोकणातील केंबळी गावात झाला. वैद्य कुटुंबाची आर्थिक अवस्था कमालीची गरिबीची होती. लक्ष्मणराव वैद्यांना दरमहा ४-५ रुपयेच पगार मिळत असे. कुटुंबास हातभार लावण्यासाठी परशुरामांच्या मातोश्रींना काबाडकष्ट करावे लागत. खेडेगावात एक छोटेसे घर होते व थोडी शेतीवाडी सावकाराच्या ताब्यात होती.

सहाव्या वर्षी बटू परशुरामाची मुंज झाली. त्या वेळी 'मुंज' हा एक औपचारिक समारंभ नसायचा. तो खराखुरा 'उपनयन संस्कार' होता. दुसऱ्या दिवसापासूनच बटू परशुरामाचे वेदपठण सुरू झाले. चौथ्या इयत्तेपर्यंत 'ॐ भवति भिक्षां देहि' हे भिक्षाव्रतच चालू होते. त्यानंतर परशुरामाचे संस्कृत शिक्षण सिद्धेश्वर या गावी जोरात सुरू झाले. व्याकरणशास्त्राचे शिक्षण सांगलीस झाले, तर आयुर्विद्या ते नाशिकला शिकले. वस्तुत: उत्तम आयुर्विद्या जाणत असतानाही केवळ वय लहान असल्याने वैद्यकीय व्यवसाय सुरू केला नाही.

प्रथमत: तर्खडकरांच्या पुस्तकाच्या साहाय्याने नाशिक मुक्कामी ते आंग्लभाषा शिकले. डे. ए. सोसायटीचे आजीव सदस्य व संस्कृतचे प्राध्यापक पानसे यांनी पुण्यात न्यू इंग्लिश स्कूलमध्ये (त्या वेळी नानावाड्यात भरत असे) त्यांना प्रवेश मिळवून दिला. मॅट्रिकच्या परीक्षेत त्यांना दुसरी शंकरशेट शिष्यवृत्ती (१९१२) मिळाली.

मध्यंतरी बरीच स्थित्यंतरे होऊन परशुराम वैद्यांचे आईवडील रोह्यातच स्थायिक झाले. यामुळे सन १९१२ साली दोन्ही जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्त्या रोहे या टुमदार गावात मिळाल्या.

मॅट्रिक परीक्षेनंतर परशुरामपंत महाविद्यालयीन शिक्षणासाठी फर्गसन महाविद्यालयात दाखल झाले. काही शिकवण्या करून स्वत:चे व भावाचे शिक्षण परशुरामपंत पुढे रेटत होते. पण या दगदगीमुळे इंटरमिजिएट परीक्षेत प्रथम श्रेणी मिळाली नाही. परशुरामपंतांनी काहीशा वैतागातच पुढील शिक्षणाला रामराम ठोकला.

न्यू इंग्लिश स्कूलमध्ये त्यांना शिक्षकाची नोकरी मिळाली. ती सांभाळून त्यांनी पुढील शिक्षण करावयाचे ठरवले. ते न जमल्यामुळे शिक्षकी पेशा सोडून, कर्ज काढून पुढील महाविद्यालयीन शिक्षण करावे असे त्यांच्या मनात आले. सुदैवाने त्या काळी रँग्लर पु. र. परांजपे हे फर्गसनचे प्राचार्य होते. त्यांनी वैद्यांना पुरेसे कर्ज दिले तसेच परतफेड करण्याचा तगादा लावला नाही.

पदवीपरीक्षेत त्यांना प्रथमश्रेणी व भाऊ दाजी शिष्यवृत्ती मिळाली. नंतर त्यांनी एक वर्ष कोल्हापूरच्या राजाराम महाविद्यालयात प्राध्यापकी केली. पुढे सांगलीच्या विलिंग्डन महाविद्यालयात ते प्राध्यापक झाले. न्यू इंग्लिश स्कूल, फर्गसन व तिन्ही विलिंग्डन महाविद्यालये ही डेक्कन एज्युकेशन सोसायटीची असल्याने, त्या सोसायटीने वैद्यांना आजीव सदस्य करून घेतले. पुढे परशुरामपंत वैद्य कोलकाता येथे गेले. तेथे पाली हा विषय घेऊन पदव्युत्तर परीक्षेत ते पहिले आले.

यानंतर त्यांना भारत शासनाची शिष्यवृत्ती मिळाली. त्या शिष्यवृत्तीच्या बळावर ते फ्रान्स व बेल्जियम या देशांत गेले. पॅरिसला असताना त्यांनी फ्रेंचमध्ये आर्यदेवाच्या कृतीवर प्रबंध लिहून तेथे डि.लिट. पदवी मिळवली. त्यानंतर परत ते पुण्याला फर्गसनला आले. पण काही दिवसांतच नियामक मंडळाबरोबर त्यांचे मतभेद झाले म्हणून त्यांनी डेक्कन एज्युकेशन सोसायटी व फर्गसन महाविद्यालय सोडले. पुढे ते व्ही. जी. जोगांच्या पुढाकाराने वाडिया महाविद्यालय (प्रोग्रेसिव्ह एज्युकेशन सोसायटी) येथे संस्कृत व प्राकृत शिकवू लागले. सांगलीत विलिंग्डन महाविद्यालयात प्राध्यापक

असताना, इचलकरंजी संस्थानचे महाराज घोरपडे यांनी बौद्ध धर्मावर तीन व्याख्याने देण्यासाठी परशुरामपंत वैद्यांना निमंत्रण दिले. पुढे या व्याख्यानत्रयीचे ‘बौद्ध धर्माचा अभ्युदय व प्रसार’ या शीर्षकाखाली एक पुस्तक तयार झाले.

निवृत्तीनंतर पाच वर्षे वाराणसीला बनारस हिंदू विद्यापीठात विद्यापीठीय प्राध्यापक म्हणून त्यांनी काम केले. त्यानंतर चार वर्षे मिथिला इन्स्टिट्यूट (दरभंगा) येथे बौद्ध संस्कृत ग्रंथांची संस्करणे केली. या संस्कारित ग्रंथांची एकूण पृष्ठसंख्या २०,००० एवढी आहे. पुढे परशुराम वैद्यांनी १९६१पासून पुण्याच्या भांडारकर संस्थेत महाभारताच्या संशोधित आवृत्तीचे तिसरे व अखेरचे प्रमुख संपादक म्हणून काम केले. महाभारताचे खिलपर्व, हरिवंश, त्याचे संशोधित संस्करण व पदसूचीचे (प्रतीक सूची) सहा मोठे खंड वैद्यांनीच संपादित केले.

भांडारकर संस्थेत महाभारताच्या संशोधित आवृत्तीचे काम व बडोदा येथील सयाजीराव गायकवाड संस्थेच्या रामायणाच्या संशोधित आवृत्तीचे काम, अयोध्या व युद्धकांड मिळून एकूण १-५ भागांचे संशोधित संस्करण, जैन कवी पुष्पदंत याचे अपभ्रंश भाषेतील महापुराण, हेमाद्रीचे प्राकृत व्याकरण, बौद्धगयार्थसंग्रह अशा रितीने परशुरामपंत वैद्यांनी संस्कृत-पाली-प्राकृतात भरघोस काम केले.

वस्तुत: प्रा. वाग्वैद्य आदिनाथ नेमिनाथ उपाध्ये हे स्वत: प्राकृतचे गाढे व्यासंगी व पंडित पण त्यांनी भांडारकर संस्थेच्या संशोधनवार्षिकात (खण्ड ५०, १९६९, पृष्ठ ९१-९४) एक खास लेख लिहून प. ल. वैद्य यांनीच केवळ दशरूपकाच्या अवलोकटीकेत उद्‌धृत एका अपभ्रंश गाथेची नेमकी संस्कृत छाया तयार करून कसे अचूक अर्थनिरूपण केले आहे, याची प्रशंसा केली आहे.

एका अनाकलित अपभ्रंश गाथेची, तिच्यातील शब्दनादानुसार, पुनर्बांधणी करून, त्याची संस्कृत-छाया निर्माण करून अचूक अर्थनिरूपण केल्याची प्रशंसापावती आदिनाथ नेमिनाथ उपाध्येंकडून मिळावी व उपाध्यांनी वैद्यांना अपभ्रंशाच्या बाबतीतले ‘मार्गशोधक’ म्हणावे, यापेक्षा अधिक काय स्तुती असू शकेल?

सन १९६६मध्ये महाभारताच्या प्रकाशानाच्या वेळी भारताचे तत्कालीन राष्ट्रपती डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन उपस्थित होते.

महत्त्वाचा भाग असा की, या अमोल कार्यासाठी वैद्य यांनी एक छदामही घेतला नाही. एवढेच नाही तर ज्या वेळी संस्थेकडे सेवकांचा पगार द्यायला पैसा नव्हता, त्या वेळी या साधुपुरुषाने आपल्या मिळकतीची गंगाजळी सेवकांचे वेतन देण्यासाठी कायमची देऊ केली. त्या वर्षी त्यांना राष्ट्रपती पुरस्कार प्राप्त झाला.

– डॉ. मो.गो. धडफळे

***

व

# श

## शर्मा, ओगेटी परीक्षित
**संस्कृत पंडित, लेखक**
**२० ऑगस्ट १९३०**



ओगेटी परीक्षित शर्मा यांचा भारतातील आंध्र प्रदेशामधील गुंटुर जिल्ह्यात माजली या गावी जन्म झाला. ओगेटी वंशातील परदेशी हे पणजोबा, कृष्णय्या हे आजोबा तसेच कौसल्यादेवी व साम्बमूर्ती हे मातापिता होत. कौंडिण्य गोत्रातील कृष्णयजुर्वेदीय घराणे. पिढीजात व्यवसाय भिक्षुकी व अध्यापन होय. पित्याने त्या काळात वैदिक प्रसारासाठी मुलींसाठी पाठशाळा काढली होती, यावरून त्यांच्या उदारमतवादी धोरणांची कल्पना येते.

वयाच्या आठव्या वर्षी उपनयन झाल्यावर गावातील एका शास्त्रींकडे स्मार्तभागाचे अध्ययन केले. त्यानंतर पोन्नुर गावी श्रीभावनारायण संस्कृत वेद पाठशाळेत आठ वर्षे संस्कृतचे व तेलगूचे शिक्षण, दक्षिण भारत हिंदी-प्रचारिणी सभेच्या दोन परीक्षांसाठी अध्ययन केले. पाठशाळेच्या शिक्षणानंतर ते आंध्रगीर्वाण विद्यापीठात दाखल झाले. बनारस हिंदू विद्यापीठातून संस्कृत, हिंदी, इंग्रजी, प्राचीन भारतीय संस्कृती व पुरातत्त्वविद्या हे विषय घेऊन स्नातक (बी.ए) झाले. मुंबई विद्यापीठातून संस्कृत, प्राकृत, भाषाशास्त्र व इंग्रजी हे विषय घेऊन स्नातकोत्तर पदवी (एम.ए.) मिळवली.

संपूर्ण अध्ययन माधुकरी मागून, वारावर जेवून झाले. पूर्ण निर्धनत्वामुळे जीवन आर्थिक, शारीरिक व मानसिक विपत्तींनी भरलेले असायचे. हाताने रिक्षा ओढणे, भोजनालयात वाढपी म्हणून व वस्त्रालयात कामगार म्हणून धनप्राप्तीचे प्रयत्न केले. शिक्षणानंतर मात्र मद्रास व मुंबई येथे विविध शैक्षणिक संस्थांमध्ये अध्यापन केले. महाराष्ट्र शासनाच्या भाषासंचलनालयातून साहाय्यक संचालक म्हणून निवृत्त झाले. सेवानिवृत्तीनंतर कॅनडातील येथील मंदिरात नागरिकांसाठी संस्कृतचे अध्यापन केले.

गौतमबुद्धांची धर्मपत्नी यशोधरा हिच्या उपेक्षाग्रस्त जीवनाची गाथा असणारे ‘यशोधरा’ हे नायिकाप्रधान आणि ८० सर्गांचे सहा कांडांत विभागलेले शूर देशभक्त महायोद्धा महाराणा प्रताप यांच्या वीर्यगाथेवर आधारित ‘श्रीमत्प्रतापराणायनम्’ ही दोन महाकाव्ये, ‘परीक्षिन्नाटकचक्रम्’ या नावाचा २७ लघुनाटकांचा संच, ‘कारगिल विजयम्’ हे देशभक्तीपूर्ण प्रेरक नाटक, ‘जानपदनृत्यगीतमंजिरी’ हा लोकगीतांचा संग्रह, ‘अक्षयगीतरामायणम्’ व ‘अक्षयगीतमुकुन्दम्’ ही रामकृष्णांवरील गीतिकाव्ये, ‘सौंदर्यमीमांसा’ हा काव्यशास्त्रावरील लक्षणग्रंथ, ‘हिन्दुमतम्’ नावाचे गद्य व ‘कालाय तस्मै नम:’ ही आत्मचरित्रात्मक कादंबरी असे विपुल व वैविध्यपूर्ण साहित्य पंडित परीक्षित शर्मांच्या वैदुष्याचे व संस्कृतविषयीच्या प्रेमाचे फलित आहे. यांची काही नाटके दिल्ली दूरदर्शनवर प्रदर्शित झाली, तर काही आकाशवाणीवर नभोनाट्यरूपाने सादर झाली आहेत. ठिकठिकाणच्या विद्यापीठांतील पदवी अभ्यासक्रमात त्यांच्या काही साहित्याचा समावेश झाला आहे. संस्कृत साहित्यात कादंबरी हा वाङ्मयप्रकार नाही व आत्मचरित्रात्मक साहित्यही अत्यल्प आहे. पंडित शर्मांनी या दोन्हीच्या समन्वयातून ‘नवल’(कादंबरी) या

साहित्यप्रकाराशी संस्कृतप्रेमींची ओळख करून दिली.

कुटुंबातील पारंपरिक धार्मिक वातावरणामुळे पंडित शर्मा वैदिक संस्कृतीचे कट्टर समर्थक व पुरस्कर्ते झाले. स्वातंत्र्यपूर्व काळात वडिलांनी नोकरी सोडली, तेव्हापासून देशभक्तीचे बीज त्यांच्या मनात रुजले. तरुणपणात संघप्रमुख गोळवलकर गुरुजींच्या व्याख्यानांनी व त्यांच्या प्रासंगिक सहवासाने प्रेरित होऊन राष्ट्रकार्यासाठी संघप्रवेश, सत्याग्रह करून कारावास पत्करला. तिथेच राणाप्रतापच्या योगदानाचे संस्कार होऊन त्यांना महाकाव्याची प्रेरणा प्राप्त झाली. कारगिलविजय ही देशभक्तीने ओतप्रोत एकांकिका नाटकचक्रातील अन्य काही नाटके यांतून त्यांची जाज्वल्य राष्ट्रनिष्ठा प्रतीत होते.

देशप्रेमाएवढेच संस्कृतप्रेमही शर्माजींच्या अणुरेणूत भरलेले दिसते. घरातील पाठशाळेतच त्यांचे पारंपरिक संस्कृतशिक्षण सुरू झाले. आर्थिक विवंचनेमुळे व कलासक्त मनामुळे संस्कृतकडे पाठ फिरवण्याचा विचार आला, तरीही परिस्थितीवशात ते पुन्हा संस्कृतच्याच आश्रयाला आले. त्यांनी कायावाचामनाने संस्कृतप्रसारास वाहून घेतले. क्लिष्टतेच्या आरोपातून संस्कृतभाषेला मुक्त करण्यासाठी त्यांनी आधुनिक, सोपे, सुलभ शब्द वापरले व समाजाला संस्कृत वाचण्यास प्रेरणा दिली. त्यांच्या साहित्यातून, विशेषत: आत्मचरित्रात्मक कादंबरीतून संस्कृतविषयक विचार व्यक्त झालेले दिसतात. संस्कृतव्यतिरिक्त अन्य भाषांमध्ये लिहायचे नाही, असा त्यांनी पणच केला होता.

त्यांच्या लिखाणावर पूर्वसूरींचा लक्षणीय प्रभाव पडलेला दिसून येतो. आदिकवी वाल्मीकींपासून जगन्नाथ पंडितांपर्यंत सर्वच कवींना त्यांनी त्यांच्या कृतीत स्थान दिलेले आहे. प्राचीन कवींप्रमाणेच समकालीन कवी व साहित्यिक प्रज्ञाभारती श्री. भा. वर्णेकर, डॉ. रेवाप्रसाद द्विवेदी, डॉ. सत्यव्रत शास्त्री, डॉ. ग. बा. पळसुले, पं. वसंतराव गाडगीळ यांच्याशी असलेला त्यांचा स्नेह उल्लेखित आहे. यशोधरा हे शर्माजींचे पहिलेच महाकाव्य असल्याने त्यातील भाषा थोडी क्लिष्ट आहे. काव्यसंकेतानुसार यात वसंत विहार, सूर्योदय वर्णन, नगरवर्णन, यशोधरा विलापादी प्रसंग आहेत. दुसऱ्या महाकाव्यात (श्रीमत्प्रतापराणायनम्) दुर्बोधता, कच्चे दुवे आढळत नाहीत. भाषा अधिक प्रासादिक, सुलभ व भावरम्य आहे. त्यांची नाटके प्रसंगनिष्ठ व प्रयोगप्रधान आहेत. लोकसंगीताच्या लयीवर व ठेक्यावर गाता येणारी त्यांची जानपदगीते संस्कृत महाविद्यालयांमध्ये व विद्यापीठांमध्ये सांस्कृतिक कार्यक्रमाचा अविभाज्य भाग बनली आहेत. संस्कृतचे कवी प्राचीन काळातील, वैभवातच रमतात हा समज त्यांच्या 'कारगिल विजयम्'सारख्या नाटकातून दूर होतो. सद्य:स्थितीवर भाष्य करण्यासाठीही संस्कृत उपयुक्त आहे, हा संदेश त्यांच्या लेखनातून मिळतो.

'यशोधरा'साठी अखिल भारतीय कालिदास पुरस्कार, 'श्रीमत्प्रतापराणायनम्'करता अखिल भारतीय साहित्य अकादमी पुरस्कार, राष्ट्रीय संस्कृत विद्यापीठ (तिरुपती) यांच्याकडून वाचस्पती (डि.लिट.) ही मानद पदवी, शिवाय पंडित, महाकवी, गीर्वाणयोगचक्रवर्ती इत्यादी उपाधींनी सन्मानित पंडित परीक्षित शर्मा नवोदित संस्कृत साहित्यिकांसाठी प्रेरणास्थान व मानदंड आहेत यात संशय नाही.

– डॉ. गौरी माहुलीकर

## शास्त्री, अजय मित्र

**पुरालिपि-नाणकशास्त्रतज्ज्ञ, प्राध्यापक**

**२६ फेब्रुवारी १९३४**

अजय मित्र शास्त्री यांचा जन्म मध्य प्रदेशातील गुणा येथे झाला. लहानपणापासूनच ते अतिशय हुशार होते. १९५७मध्ये बनारस विद्यापीठातून प्राचीन भारताचा इतिहास व संस्कृती हे विषय घेऊन ते पहिल्या वर्गामध्ये एम.ए. झाले. पुढे त्यांनी १९६२साली नागपूर विद्यापीठामधून पीएच.डी. आणि १९८६साली डी.लिट. या पदव्या सन्मानपूर्वक प्राप्त केल्या.

प्रा. शास्त्री हे एक विद्वान व निष्ठावान अध्यापक होते. १९५७पासून ते नागपूर विद्यापीठातील 'भारतीय

इतिहास, संस्कृती आणि पुरातत्त्व' विभागामध्ये अध्यापन करत असत आणि १९९४साली ते त्याच विभागाचे प्रमुख म्हणून निवृत्त झाले.

स्वत:च्या अध्यापनाच्या जबाबदाऱ्या सांभाळून त्यांनी पवनार, टाकळघाट, खापा, पवनी, माहुरीझरी, भोकरदन व मांदल अशा ठिकाणच्या उत्खननांत भाग घेतला. या क्षेत्रातील उत्खननाबद्दलचा अहवालात लेखन केले. भारतातील शिलालेख आणि मुद्रा (नाणी) या विषयांचे ते जाणकार आहेत व त्या शाखांच्या प्रगतीस त्यांनी हातभार लावलेला आहे.

आपल्या प्रदीर्घ कारकिर्दीमध्ये प्रा. शास्त्रींचा अनेक शैक्षणिक आणि व्यावसायिक संस्थांशी संबंध आला. युनिव्हर्सिटी ग्रँट्स् कमिशनच्या अनेक समित्यांचे ते सदस्य होते.

भारताच्या पुरातत्त्व संशोधन विभागाच्या 'शिलालेख आणि मुद्रा' विषयक सल्लागार समितीचे ते सदस्य होते. तसेच 'जर्नल ऑफ द न्युमिसमॅटिक सोसायटी ऑफ इंडिया', 'दि एपिग्राफिक सोसायटी ऑफ इंडिया' आणि 'न्युमिसमॅटिक डायजेस्ट' यांसारख्या प्रतिष्ठित नियतकालिकांचे ते संपादकही होते.

प्रा. शास्त्री यांनी एम. सोमशेखर शर्मा स्मृती व्याख्यानमाला, महाराजा रणवीरसिंह स्मृती व्याख्यानमाला, व्ही. एस. अगरवाल स्मृती व्याख्यानमाला आणि डॉ. एस. पी. तिवारी स्मृती व्याख्यानमाला अशा विद्वन्मान्य व्याख्यानमालांमधून भाषणे दिली आहेत.

प्रा. शास्त्री यांनी वीस पुस्तके लिहिली आहेत, अनेक पुस्तकांचे संपादन केले आहे आणि त्यांचे ३५०पेक्षा अधिक शोधनिबंध व परीक्षणे यांचे प्रकाशन आंतरराष्ट्रीय नियतकालिकांतून झाले आहेत.



प्रा. शास्त्री यांना मध्य प्रदेश शासनाच्या साहित्य परिषदेचा अखिल भारतीय रवींद्र साहित्य पुरस्कार-१९७१, न्युमिसमॅटिक सोसायटी ऑफ इंडिया यांचे अकबर रजत पदक-१९८४, न्युमिसमॅटिक सोसायटी ऑफ इंडिया यांचे आळतेकर पदक-१९८२, एशियाटिक सोसायटी ऑफ बॉम्बे यांचे कॅम्पबेल स्मृती सुवर्ण पदक-१९९२-१९९५ आदी पुरस्कार प्राप्त झाले.

प्रा. शास्त्री यांनी सत्र अध्यक्ष- इंडियन हिस्ट्री काँग्रेस- १९७८, अध्यक्ष-एपिग्राफिकल सोसायटी ऑफ इंडिया- १९८७, अध्यक्ष - इंडियन हिस्ट्री अ‍ॅण्ड कल्चरल सोसायटी-१९९१, अध्यक्ष-इंटरनॅशनल कलोक्विअम ऑन कॉइनेज, ट्रेड अ‍ॅन्ड इकॉनॉमी - १९९१, अंशत: अध्यक्ष - ऑल इंडिया ओरिएंटल कॉन्फरन्स १९९४ पदे भूषवली.

- र. वि. नातू

## शास्त्री, के.ए. नीलकंठ

**भारतीय इतिहास संशोधक व संस्कृतचे अभ्यासक**

**१२ ऑगस्ट १८९२ – १५ जून १९७५**



नीलकंठ शास्त्री यांचा जन्म तामिळनाडूतील कल्लिदायकुरिची येथे एका तेलुगू नियोगी ब्राह्मण कुटुंबात झाला. नीलकंठ शास्त्री यांचे वडील प्राथमिक शिक्षक होते. नीलकंठ यांचे सुरुवातीचे शिक्षण जन्मगावी व अंबसमुद्रम् येथे झाले. थोरल्या बंधूंच्या प्रोत्साहनामुळे शिष्यवृत्ती मिळवून नीलकंठ शास्त्री हे बी.ए. (१९११) व एम.ए. (१९१३) या परीक्षा पहिल्या वर्गात उत्तीर्ण झाले.

त्यानंतर १९१८-१९२० या काळात तिरुनेलवेली येथील हिंदू महाविद्यालयात व्याख्याते त्यानंतर बनारस व अन्नमलई विद्यापीठांत इतिहासाचे प्राध्यापक, १९२९-१९४७ या काळात मद्रास विद्यापीठात इतिहास आणि पुरातत्त्वविद्या या विषयांचे विभागप्रमुख, तसेच १९५२-१९५६मध्ये म्हैसूर विद्यापीठात भारतीय संस्कृती या विषयाचे विभागप्रमुख म्हणून नीलकंठ शास्त्री यांनी काम केले. शिकागो विद्यापीठातही ते १९५९ पर्यंत अभ्यागत प्राध्यापक होते.

नीलकंठ शास्त्री हे एक उत्तम वक्ते आणि लेखकही होते. त्यांनी इतिहासावर - विशेषत: दक्षिण भारताच्या इतिहासावर मौलिक संशोधनपर ग्रंथलेखन केले व त्यातील वादग्रस्त प्रकरणांवर प्रकाश टाकला. त्यांच्या ग्रंथांपैकी 'द चोलज' (खंड ३, १९३५-१९३७), 'स्टडीज इन चोल हिस्टरी अँड ॲडमिनिस्ट्रेशन' (१९४१), 'द तमिळ किंगडम्स ऑफ साउथ इंडिया' (१९४८), 'मेडीईव्हल इंडिया' (खंड २, १९५०), 'हिस्टरी ऑफ इंडिया' (खंड १ ते ३, १९५२-१९५३), 'एज ऑफ नंदज अँड मौर्यज' (१९५२), 'अ हिस्टरी ऑफ इंडिया' (१९६६) हे उल्लेखनीय होत. याशिवाय प्राचीन भारताचा इतिहास व संस्कृती यावरील त्यांचे सुमारे १६० संशोधनलेखही प्रकाशित झाले.

पाटणा येथे १९४६मध्ये भरलेल्या भारतीय इतिहास परिषदेच्या आणि १९५१मध्ये लखनौ येथील प्राच्यविद्या परिषदेच्या अध्यक्षपदी त्यांची निवड झाली होती. पुणे येथील भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्थेशी त्यांचे निकटचे संबंध होते. १९६८ साली या संस्थेच्या सुवर्णमहोत्सव प्रसंगी त्यांना संस्थेचे सन्माननीय सदस्यत्व बहाल करण्यात आले होते. त्यांनी अनेक अखिल भारतीय समित्यांवर काम केले. जपान, मलाया, नेपाळ इत्यादी देशांना त्यांनी भेटी दिल्या होत्या. १९५८मध्ये पद्मभूषण पुरस्काराने त्यांना गौरवण्यात आले होते.

— संपादित

**संदर्भ :**

*१. मराठी विश्वचरित्रकोश; संपादक - कामत, श्रीराम पांडुरंग; विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा.*

## शिंदे, वसंत शिवराम

**पुरातत्त्वज्ञ**

**१५ जून १९५६**

समकालीन पुरातत्त्वज्ञांमध्ये अग्रणी वसंत शिवराम शिंदे यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यातील मोरवणे या गावी झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण खेड तालुक्यात खोपी



या गावी, तर पदवीपर्यंतचे शिक्षण पुणे येथे झाले. सन १९७९मध्ये त्यांनी डेक्कन कॉलेजमधून प्राचीन भारतीय इतिहास, संस्कृती व पुरातत्त्व या विषयांत एम.ए. पदवी संपादन केली. आंतरराष्ट्रीय कीर्तीचे पुरातत्त्वज्ञ प्रा. म. के. ढवळीकर यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी सन १९८४मध्ये डॉक्टरेट संपादन केली. त्यांचा डॉक्टरेटसाठीच्या प्रबंधाचा विषय 'अर्ली सेटलमेन्ट इन सेंट्रल तापी बेसीन' हा होता. पोस्ट-डॉक्टरल संशोधन हे त्यांनी केंब्रिज विद्यापीठ व डेन्मार्कमध्ये राष्ट्रीय संग्रहालयात केले.

डॉक्टरेटच्या प्रबंधाचे काम करत असतानाच वसंत शिंदे सन १९८२मध्ये संशोधन साहाय्यक या पदावर डेक्कन कॉलेजमध्ये रुजू झाले. त्यानंतर त्यांच्या पुरातत्त्वातील सातत्यपूर्ण कामांमुळे त्यांची संपूर्ण कारकिर्द डेक्कन कॉलेजमध्ये बहरत गेली. उत्खनन पर्यवेक्षक, प्रपाठक, प्राध्यापक व सहसंचालक असे क्रमाक्रमाने जात सन २०१४मध्ये प्रा. शिंदे डेक्कन कॉलेज अभिमत विद्यापीठाचे कुलगुरू झाले. ते १९९९-२००० च्या दरम्यान जपानच्या इंटरनॅशनल रिसर्च सेंटर फॉर जापानीज स्टडीज, क्योटो स्थित संस्थेमध्ये व्हीजिटिंग प्रोफेसर होते.

प्रा. शिंदे यांनी गुजरात व हरियाणा या राज्यांमधील सिंधू संस्कृतीच्या अभ्यासात मोलाचे योगदान दिलेले आहे. त्यांच्या पाद्री, फर्माना, गिरावड, मिताथल व राखीगढी या उत्खननांनी सिंधू संस्कृतीच्या आपल्या आकलनाला सर्वस्वी नवी दिशा दिली आहे. गुजरातमधील पाद्री येथील संशोधनामधे त्यांनी सिंधू संस्कृतीचा इ.स. पूर्व ४०० चा काळ प्रथमच प्रकाशात आणण्याचे महत्त्वाचे योदान आहे. याखेरीज राजस्थानात त्यांनी बालाथल व गिलुंड या ताम्रपाषाणयुगीन पुरातत्त्वीय स्थळांचे उत्खनन केले. या

श

ठिकाणी करण्यात आलेल्या संशोधनामुळे मध्य भारतातील आद्य शेतीचा उगम व विकास राजस्थानमध्ये झाला. त्याचा पुरावा प्रथमच प्रा. वसंत शिंदे यांनी शोधला. सध्या चालू असलेल्या हरियाणातील राखीगढी येथील संशोधनामुळे सिंधू संस्कृतीचे सगळ्यात मोठे शहर राखीगढी हेच होते हे सिद्ध केले आहे. तसेच या संशोधनामुळे सिंधू संस्कृतीचे लोक कोण होते, त्यांचे समकालीन तसेच अर्वाचित लोकांशी काय संबंध होते हे डी.एन.ए. संशोधनातून प्रकाशात आणण्याचा त्यांचा प्रयत्न सुरू आहे. संशोधनानिमित्त त्यांनी जवळ जवळ सर्व जगभर प्रवास केला आहे.

महाराष्ट्राच्या संदर्भात प्रा. शिंदे यांचे पुरातत्त्व क्षेत्रात मोठे योगदान आहे. त्यांची या क्षेत्रातली जडणघडण इनामगाव या महाराष्ट्रातील सुप्रसिद्ध ताम्रपाषाणयुगीन पुरातत्त्वीय स्थळाच्या उत्खननाच्या दरम्यान झाली. प्रा. म. के. ढवळीकर यांच्या मार्गदर्शनाखाली झालेल्या वाळकी व कवठे या ठिकाणच्या उत्खननात त्यांचा मोठा सहभाग होता. तसेच त्यांनी त्यांच्या इतर सहकाऱ्यांबरोबर सोलापूर जिल्ह्यातील सिद्धापूर व मुढवी आणि पुणे जिल्ह्यातील जुन्नर येथे उत्खनन करून महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासात मोलाची भर घातली आहे.

प्रा. वसंत शिंदे यांची संशोधनावर आधारित नऊ पुस्तके आहेत व विविध राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय नियतकालिकांतून दिडशेपेक्षा अधिक शोधनिबंध प्रसिद्ध झाले आहेत. तसेच त्यांनी बत्तीस वर्षांच्या प्रदीर्घ सेवाकाळात अनेक राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय चर्चासत्रांमध्ये सहभाग घेऊन शोधनिबंध सादर केले आहेत.

दक्षिण आशियातील पुरातत्त्व अभ्यासकांमध्ये सहकार्य वाढीस लागावे म्हणून प्रा. वसंत शिंदे यांनी सोसायटी ऑफ साउथ एशियन आर्किओलॉजी या संस्थेची स्थापना केली. त्यांनी ३० विद्यार्थ्यांना पीएच.डी.साठी मार्गदर्शन केले आहे.

— डॉ. प्रमोद जोगळेकर

## शेजवलकर, त्र्यंबक शंकर
**इतिहास संशोधक**
**१५ मे १८९५ – २८ नोव्हेंबर १९६३**



मराठ्यांच्या इतिहासाशी संबंधित विषयावर स्पष्ट, धाडसी आणि वेगळ्या प्रकारची मते बिनधास्तपणे व्यक्त करणारे म्हणून प्रो. त्र्यं. शं. शेजवलकर यांनी मराठी इतिहास लेखनात आपला स्वतंत्र ठसा उमटविला आहे. कोकणातील कशेळी गावी (ता. राजापूर, जि. रत्नागिरी) त्यांचा जन्म झाला. त्यांचे वडील शंकर हरी शेजवलकर हे मुंबई नगरपालिकेत नोकरीला होते. शंकर हरींना वाचनाची व सार्वजनिक कार्याची विशेष आवड होती. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या आद्य प्रवर्तकांमध्ये त्यांचा समावेश होता.

मुंबई येथे १९११ साली ते मॅट्रिकची, तर १९१७ साली बी.ए.ची परीक्षा उत्तीर्ण झाले. यानंतर मुंबईतील मिलिटरी अकाउण्ट्समध्ये त्यांनी काही काळ कारकुनी केली. मुंबई विद्यापीठाच्या एम.ए.च्या पदवीसाठी त्यांनी 'मुसलमानी संस्कृतीचा हिंदू संस्कृतीवरील प्रभाव' या विषयावरील इंग्रजी प्रबंधाचे लेखन केले. पण परीक्षकांशी मतभेद झाल्यामुळे आणि आपल्या मत-प्रतिपादनाशी ठाम राहिल्यामुळे एम.ए.च्या पदवीला ते कायमचे वंचित राहिले.

शेजवलकरांच्या व्यावसायिक कारकिर्दीतील दोन ठळक टप्पे म्हणजे 'प्रगती' या साप्ताहिकाचे संपादन (१९२९-३२) आणि पुणे येथील डेक्कन कॉलेज पोस्ट ग्रॅज्युएट ॲण्ड रिसर्च इन्स्टिट्यूटमध्ये प्रपाठक म्हणून नोकरी (१९३९-५५).

१९२९ साली मुंबईच्या कर्नाटक प्रेसचे मालक आणि चतुर प्रकाशक मंगेशराव कुळकर्णी यांनी शेजवलकरांसाठी 'प्रगती' नावाचे पत्र काढून दिले. पुढील तीन वर्षांत शेजवलकरांनी ते मोठ्या प्रतिष्ठेचे,

श

उच्च दर्जाचे साप्ताहिक म्हणून नावारूपाला आणले. आपली लेखणी त्यांनी चौफेर दांडपट्ट्यासारखी चालवली. शेजवलकरांचा व्यासंग व्यापक होता. वाङ्मयाचे वाचनही वाङ्मयाच्या अभ्यासकाला लाजवील असे होते. विशेषणांची खैरात न करता सूत्रमय लेखनपद्धतीने लिहिण्याकडे त्यांचा कल होता. त्यांनी केलेले वाङ्मय-समीक्षण वैशिष्ट्यपूर्ण आहे.

आज ६०-७० वर्षांनीही त्यांच्या लिखाणाकडे पाहता लेखकाच्या चिंतनातील द्रष्टेपण अधिक पारदर्शक वाटते. 'माझे रामायण', 'ब्राह्मणकन्या', 'सुशीलेचा देव', 'सह्याद्रीच्या पायथ्याशी' या पुस्तकांची त्यांनी केलेली परीक्षणे काय किंवा 'विभावरीचे टीकाकार' या पुस्तकाची प्रस्तावना काय, ते निर्भीड समीक्षेचे वस्तुपाठ होते. 'प्रगती' साप्ताहिकातील राजवाडे आणि भांडारकर, दयानंद, न्यायमूर्ती तेलंग, आगरकर, 'प्रतिभा' पाक्षिकातील डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर, 'सह्याद्री' मासिकातील समाजशास्त्रज्ञ डॉ. केतकर यांच्यासारख्या व्यक्तींच्या कार्यांचे मूल्यमापन करणारे, त्यांच्यातील मतप्रवाहांचे दर्शन घडविणारे, त्यांच्या जीवनादर्शाची चिकित्सा करणारे लेखन केवळ अभ्यासनीयच नव्हे, तर देशकारण, समाजकारण यांसंबंधीची जाण व समज उंचावणारे आहे.

शेजवलकरांनी मराठा इतिहासाचा कालखंड दोन भागांत विभागला होता. एक म्हणजे शिवाजीचे युग आणि दुसरे पेशव्यांचे युग. शिवाजीच्या युगाचे ते फार मोठे समर्थक होते, तर पेशव्यांच्या युगावर त्यांनी टीकेची झोड उठविली होती. त्यांच्या मते, पेशवे यांनी शिवाजीचा मार्ग न अनुसरल्यामुळे मराठ्यांच्या सत्तेचा ऱ्हास झाला.

शेजवलकर १९१८ मध्ये भारत इतिहास संशोधक मंडळात जाऊ लागले. तेथील संशोधकांपैकी द.वि. आपटे यांचा प्रभाव शेजवलकरांवर पडला. गो.स. सरदेसाई यांच्याबरोबर त्यांनी काही काळ बडोद्याला काम केले. या अल्पकालीन सहवासात सरदेसाई यांनी शेजवलकरांची चिकित्सक बुद्धी हेरून त्यांना 'नानासाहेब पेशवे' या पुस्तकास प्रस्तावना लिहिण्याची विनंती केली. शेजवलकरांनी पेशव्यांविरुद्धचे आपले विचार स्पष्टपणे प्रस्तावनेत लिहिले. नानासाहेब पेशव्यांबद्दलची सरदेसाई आणि शेजवलकरांची मते अगदीच विरुद्ध होती. या विचारप्रक्षोभक प्रस्तावनेमुळे शेजवलकरांचे नाव इतिहासक्षेत्रात गाजू लागले.

१९५४ मध्ये शेजवलकरांनी 'निझाम-पेशवे संबंध' हा ग्रंथ लिहिला. यामध्येही त्यांनी पेशवेकालावर टीका केली आहे. पेशव्यांनी निझामाला कधीही पूर्णपणे नेस्तनाबूद केले नाही. निझामाबाबतची त्यांची राजनीती नेहमीच अस्थिर होती. दख्खनमध्ये निझाम स्थिर होण्यामागे पेशव्यांची राजनीतीच जबाबदार होती, असे प्रतिपादन शेजवलकरांनी यामध्ये केलेले आहे.

यानंतरचे शेजवलकरांचे महत्त्वाचे पुस्तक म्हणजे 'पानिपत-१७६१' हे होय. शेजवलकरांनी या पुस्तकात वि.का. राजवाडे व जदुनाथ सरकार यांच्या १७६१ च्या पानिपताच्या प्रसंगावरील लिखाणांतील त्रुटीही दाखवून दिल्या आहेत. राजवाड्यांनी पानिपत युद्धाचे खापर मल्हारराव होळकर किंवा गोविंदपत बंदेले यांच्यावर फोडले; परंतु शेजवलकरांनी राजवाड्यांच्या या मताचे जोरदार खंडन केले. त्यांच्या मते, मराठ्यांची प्रशासकीय अव्यवस्था पानिपताच्या पराभवाला कारणीभूत होती. तसेच पानिपत ही राष्ट्रीय आपत्ती होती. मराठ्यांनी मुलूख संपादण्यासाठी अथवा स्वतःच्या भरभराटीसाठी हे युद्ध केले नव्हते. त्यामागे, 'भारतीयांसाठी भारत आणि भारतीयांचे राज्य' या तत्त्वाचा बचाव करण्याचे ध्येय होते असे शेजवलकरांचे म्हणणे होते.

शेजवलकरांचे लेख :

'दत्तोपंत आपटे व्यक्तिदर्शन' (१९४०), 'निजाम-पेशवे संबंध : अठरावे शतक' (१९५९), 'पानिपत : १७६१' (१९६१), 'कोकणच्या इतिहासाची पार्श्वभूमी' (१९६१), 'श्रीशिवछत्रपती : संकल्पित शिवचरित्राची प्रस्तावना, आराखडा व साधने' (१९६४), 'नानासाहेब पेशवे' (लेखक : गो.स. सरदेसाई) या ग्रंथाची प्रस्तावना आणि शेजवलकरांचे इंग्रजी ग्रंथ : 'Panipat : 1761'

(१९४६) आणि 'The Influence of Muhammadan Culture on the Hindu Civilization' (१९१८). शेजवलकरांनी 'Nagpur Affairs', खंड १ (१९५४) आणि खंड २ (१९५९) हे मराठी कागदपत्रांचे संग्रह संपादित करून त्यांचे प्रस्तावनालेखन इंग्रजीत केले आहे.

शेजवलकरांनी हाती घेतलेला शेवटचा मोठा विषय म्हणजे 'शिवछत्रपतींचे चरित्र' होय. मुंबईच्या मराठा मंदिराने त्यांच्याकडे हा प्रकल्प सोपविला. त्यांनी हाती घेतलेला शिवचरित्र लेखनाचा महाप्रकल्प त्यांच्या मृत्यूमुळे दुर्दैवाने पूर्ण होऊ शकला नाही ही मराठा इतिहास-लेखनक्षेत्रातील मोठी शोकांतिका म्हणावी लागेल. पण शेजवलकरांच्या मृत्यूपूर्वी त्यांनी केलेल्या कामाची एकत्र जुळणी करून निदान शिवाजीविषयक सुमारे साडेसहाशे पानी ग्रंथ सिद्ध तरी होऊ शकला. ('श्रीशिवछत्रपती : संकल्पित शिवचरित्राची प्रस्तावना, आराखडा व साधने') हा ग्रंथ व त्यातील अठ्ठ्याण्णव पानी अपूर्ण प्रस्तावना यांचे मोल एवढे मोठे आहे, की या ग्रंथासाठी शेजवलकरांना साहित्य अकादमीचा पुरस्कार (मरणोत्तर) प्राप्त झाला.

विविध साहित्य प्रकारांत गती असूनही त्यांचे जीवनक्षेत्र 'इतिहास संशोधन' हेच होते. इतिहास, भूगोल, भूस्वरूपवर्णन, कालगणना, राजनीती, सैन्यरचना इत्यादी शास्त्रांचा, तसेच समाजशास्त्र व मानवशास्त्राचा त्यांनी सूक्ष्म अभ्यास केला होता.

– डॉ. गिरीश मांडके

**संदर्भ :**


१. *शेजवलकर, त्र्यं.शं.; 'पानिपत १७६१' (दुसरी आवृत्ती); राजहंस प्रकाशन, पुणे; १९९३.*

२. *दीक्षित, राजा; 'निवडक शेजवलकर', साहित्य अकादमी, नवी दिल्ली; २००७.*

३. *देशपांडे, सुरेश; 'मराठेशाहीचे आधुनिक भाष्यकार', गोकूळ मासिक प्रकाशन, पुणे; १९९४.*

४. *कुलकर्णी, अ.रा.; 'मराठ्यांचे इतिहासकार', डायमंड पब्लिकेशन, पुणे; २००७.*

५. *नाफडे, जगन्नाथ, 'मराठा इतिहासाचे एक श्रेष्ठ आचार्य कै. त्र्यं.शं. शेजवलकर', 'संशोधक', वर्ष ६१, अंक ३; १९९३.*


## शेवाळकर, राम बाळकृष्ण

☛ ***मुख्य चरित्रनोंद – साहित्य खंड***

***

श

# स

## सरदेसाई, गोविंद सखाराम
**रियासतकार**

☛ *मुख्य चरित्रनोंद – साहित्य खंड*

## सरदेसाई, नरहर गोपाळ
**प्राच्यविद्या अभ्यासक**

**१७ ऑगस्ट १८७३ – २२ जून १९४३**



भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्था ज्या चार मुख्य आधारस्तंभांवर उभी राहिली, पैकी एक न.गो. सरदेसाई. पुण्यामध्ये प्राच्यविद्येचा अधिकृत अभ्यास सुरू होण्याआधी, इ.स. १९१५ मध्ये शुक्रवार पेठेत 'ओरिएंटल बुक हाउस' नावाची संस्था स्थापन करून त्यामधून प्राच्यविद्येचे अनेक चिकित्सापूर्ण ग्रंथ सर्व महाराष्ट्रभर पोहोचविण्याचे काम सरदेसाई घराण्याने केले. नरहर गोपाळ त्यांपैकी महत्त्वाचे होत.

डॉ. नरहर गोपाळ सरदेसाई यांचे प्रारंभिक शिक्षण पंढरपूर येथील त्यांच्या आत्या राधाबाई पाध्ये यांच्याकडे झाले. पाध्ये घराणे पंढरपूरचे त्या काळचे भूषण, पं. काशीनाथ अनंत उपाध्याय ऊर्फ बाबा पाध्ये पंढरपूरचे एक विद्वान आणि कर्तृत्वसंपन्न व्यक्तिमत्त्व. 'धर्मसिंधू' नावाचा ग्रंथ लिहून ते नाव अजरामर झाले. श्रीविठ्ठल मंदिराची संपूर्ण व्यवस्था, रचना, शास्त्रार्थ बाबा पाध्ये पाहत असत. श्रींच्या नित्य-नैमित्तिक उपासना-अर्चनांची योजना त्यांनी त्या वेळी घालून दिली, जी आजतागायत चालू आहे. बाबा जसे धर्मशास्त्रकार होते, तसेच ते संस्कृत पंडितही होते. 'विठ्ठल सहस्रनाम', 'विठ्ठलाष्टक' अशी अनेक स्तोत्रे त्यांनी रचली. बाबा उत्तम कीर्तनकार होते. न.गो. यांनी नंतरचे शिक्षण आत्याच्या इच्छेनुसार मुंबईत जाऊन वैद्यकीय पदवी घेऊन पूर्ण केले. १९७० साली त्यांनी विदर्भातील यवतमाळ येथे स्वतःचा दवाखाना सुरू केला. लवकरच त्यांना मलाया देशातील पिनँग या ठिकाणी साहाय्यक सर्जन म्हणून काम करण्याची संधी मिळाली. तेथील वास्तव्यात इचलकरंजीचे संस्थानाधिपती यांच्याबरोबर जावा, सुमात्रा, बाली अशा जवळच्या देशांचा दौरा करण्याची संधी मिळाली.

या दौऱ्यामध्ये त्यांनी हिंदू संस्कृती, साहित्य, धर्म, चालीरीती आदींचा अभ्यास केला. रामायण-महाभारतावरील त्यांची श्रद्धा जाणून घेतली, नोंदवून ठेवली. यातूनच त्यांना प्राच्यविद्याभ्यासाची गोडी लागली. त्याच सुमारास पुण्यातील डेक्कन कॉलेजचे संस्कृत विद्वान डॉ. श्रीपाद कृष्ण बेलवलकर यांच्याशी नात्याचे संबंध आले. संस्कृतची गोडी वाढली. 'वैद्यकीय शास्त्र-निष्णात' म्हणून त्यांचा बोलबाला मागे पडला व 'प्राच्यविद्या अभ्यासक' म्हणून नाव समोर आले. १९१५-१६ साली पुण्यातील आनंदाश्रमात संस्कृत विद्वानांची बैठक झाली, त्यामध्ये महापंडित सर रामकृष्ण गोपाळ भांडारकरांच्या गौरवार्थ एखादी संस्था स्थापन करण्याचे ठरले. सरांच्या ऐंशीव्या वाढदिवसानिमित्त ६ जुलै १९१७ रोजी 'भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्था' स्थापन झाली. या सर्वांमध्ये न.गो. यांचा प्रामुख्याने सहभाग होता. परदेशातून परतल्यावर त्यांनी प्रथम १९१५ साली प्राच्यविद्येला वाहिलेले प्रकाशन पुण्यात सुरू केले.

भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्था स्थापन झाल्यावर प्रथम डॉ. बेलवलकर, डॉ. सरदेसाई या विद्वानद्वयींनी प्रयत्नपूर्वक सर भांडारकरांचा सुमारे साडेतीन हजार दुर्मीळ ग्रंथांचा संग्रह संस्थेकडे आणला आणि सर्वसामान्यांना हे भांडार खुले झाले. आज नव्वदहून अधिक वर्षे झाली. उत्तम प्रकारे हा संग्रह जपला आहे. त्याचे शास्त्रीय वर्गीकरण डॉ. बेलवलकरांचे निकटवर्ती स्नेही प्रा. रं.द. वाडेकर यांनी करून दिले. पुढे हळूहळू संस्थेच्या ग्रंथसंग्रहात वाढ झाली. आज सुमारे तीस हजार दुर्मीळ हस्तलिखिते आणि एक लाख दहा हजार ग्रंथ संस्थेकडे आहेत. त्याचा 'श्रीगणेशा' डॉ. न.गो. यांनीच केला. त्यानंतरच्या सुमारे वीस वर्षांच्या काळात त्यांनी संपूर्ण भारतभर प्रवास केला. तत्पूर्वी १९१९ साली भांडारकर संस्थेच्या पुढच्या बाजूस, बेलवलकरांच्या निवासस्थानामधील मैदानावर पहिल्या प्राच्यविद्या परिषदेचे अधिवेशन भरले होते. आता या परिषदेची चाळीसहून अधिक अधिवेशने भारतभर भरली. डॉ. दांडेकर आणि तत्पूर्वीच्या प्राच्यविद्या पंडितांच्या प्रयत्नांमुळे 'आंतरराष्ट्रीय प्राच्यविद्या परिषदे'चेही एक अधिवेशन दिल्लीत भरले होते. अलीकडील पंधरा वर्षांत भांडारकर संस्थेच्या कर्मचाऱ्यांच्या प्रयत्नांमुळे 'बृहन्महाराष्ट्र प्राच्यविद्या परिषदे'ची सात-आठ अधिवेशने महाराष्ट्र-मध्यप्रदेशात भरली होती. त्या काळी अत्यंत खडतर असणारी, कैलास-मानसरोवर यात्राही त्यांनी केली होती. पूर्वीच्या नारायण पेठेमधील त्यांच्या निवासात संस्कृत भाषा शिकवण्याचे ते वर्गही त्यांनी नंतरच्या काळात संस्कृत प्रेमाखातर चालू केले होते. रोज पहाटे ते संस्कृत श्लोकांची संथा देत असत. त्या काळात नव्या पिढीला संस्कृतची गोडी लावण्याचे काम त्यांनी आवडीने केले.

डॉ. राधाकृष्ण आणि बॅरिस्टर विद्याधर सरदेसाई हे त्यांचे चिरंजीव तेवढेच गाजले. विद्याधर यांचे चिरंजीव डॉ. एच.व्ही. सरदेसाई यांना चालू जमान्यात अग्रणी वैद्यकशास्त्रविशारद मानले जाते.

— वा.ल. मंजूळ

## सरदेसाई, राधाकृष्ण नरहर

**प्राच्यविद्या अभ्यासक, ग्रंथ प्रकाशक**

**१९०३ – १९६४**



प्राच्यविद्येच्या क्षेत्रातील डॉ. नरहर गोपाळ सरदेसाई यांचा वारसा त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव डॉक्टर राधाकृष्ण यांनी समर्थपणे चालविला. त्यांचे सुरुवातीचे शिक्षण वडिलांप्रमाणेच पंढरपुरात पाध्ये घराण्यात झाले. त्या घराण्याचे संस्कार नकळत त्यांच्यावर झाले. त्यांचे महाविद्यालयीन शिक्षण पुण्याच्या डेक्कन महाविद्यालयामध्ये झाले आणि त्यांनी वैद्यकीय महाविद्यालयातून वैद्यकीय शिक्षण पूर्ण केले. सुदैवाने पुढील उच्च शिक्षणासाठी त्यांना जर्मनीच्या विद्यापीठातून 'फॉन हुंम्बोल्ट' शिष्यवृत्ती मिळाली आणि पुढील अभ्यासासाठी ते जर्मनीच्या लायप्झिक शहरात दाखल झाले.

पदव्युत्तर शिक्षण करीत असताना पारंपरिक संस्कृतीचा वारसा, जर्मनीसारख्या संस्कृत भाषाप्रेमी देशात त्यांना स्वस्थ बसू देईना. आपण काही वेगळे पाहावे, लिहावे असे त्यांना सतत वाटू लागले. त्या काळात युरोपमध्ये अनेक मान्यवर संस्कृत आणि प्राच्यविद्येचा अभ्यास करीत होते.

वेद, संस्कृत भाषा, नाटके, पुराणे, दैवतशास्त्र यांवर अनेक विद्वान संशोधन करीत होते. त्यांचे हे काम पुण्यात डॉ. राधाकृष्ण यांच्या कानावर अनेक वेळा आले होते. त्या संशोधकांना भेटावे, त्यांची चरित्रविषयक माहिती, अध्ययन, संशोधन यांचा एखादा कोश काढावा असा प्रकल्प त्यांनी हाती घेतला. त्या दृष्टीने त्यांनी अनेकांच्या भेटीगाठी, बोलणी, मुलाखती एकत्रित केल्या. त्यांची छायाचित्रे आवर्जून मिळवली. वास्तविक, विदेशी अभ्यासकांची प्रसिद्धिपराङ्मुख वृत्ती पाहता हे काम खूपच अवघड होते; पण डॉ. राधाकृष्ण यांनी ते पूर्ण केले

स

आणि भारतात परतल्यावर ओरिएंटलतर्फे 'Picturesque Orientalia' या नावाचा ग्रंथ प्रकाशित केला, जो आजही अद्वितीय स्वरूपाचा मानला जातो, जो पुढच्या अनेक पिढ्यांना मार्गदर्शक ठरला.

डॉ. राधाकृष्ण यांचा नाणकशास्त्राचाही अभ्यास होता. अनेक देशांतून भ्रमण करताना किंवा पुस्तक व्यवसायाच्या निमित्ताने अनेक विदेशी पंडितांच्या भेटींतून त्यांनी नाणी गोळा केली. अनेकांना त्यांचा हा संग्रह कुतूहलाचा वाटे. त्यांच्या चिरंजीवांनी, प्रा. वैकुंठ यांनी हा संग्रह अद्यापही उत्तम प्रकारे सांभाळला आहे.

ओरिएंटल बुक एजन्सीद्वारा पिता–पुत्रांनी सुमारे शंभर ग्रंथ प्रकाशित केले. या पुस्तकांना जगभरातून नित्य मागणी असे. आणखी पुढे जाऊन त्यांनी 'द ओरिएंटॅलिस्ट' नावाचे त्रैमासिक सुरू केले. अनेक देशांतील संशोधकांना आपले संशोधन मांडायला ते खूपच उपयुक्त ठरले. प्राच्यविद्येवरील संशोधनात्मक देशी–विदेशी विद्वानांचे लेख यात असत, जे आजच्या काळात अपूर्वाईचे वाटतील. दर दोन वर्षांनी भरणाऱ्या, भारतभर अधिवेशने चालणाऱ्या अ.भा. प्राच्यविद्या परिषदेचे ते सक्रिय सदस्य होते. त्या निमित्ताने ते देशोदेशीच्या पंडितांना पुण्यात आणीत, घरी आग्रहाने ठेवून घेत. आपली संस्कृती–इतिहास समजावून देत. एक प्रकारचे त्यांना 'पुण्यपत्तनस्थ भारतीय राजनीतिज्ञ वकील'च म्हणावे लागेल.

पुण्याच्या संभाजीपार्कच्या कोपऱ्यावरील झाशीची राणी लक्ष्मीबाई यांचा पुतळा त्यांच्या सामाजिक कार्याचे एक एकमेवाद्वितीय उदाहरण म्हणावे लागेल. महाराष्ट्रातील कऱ्हाडे ब्राह्मण संघांच्या माध्यमातून निधी उभारून, पुढाकार घेऊन त्यांनी हा झाशीच्या राणीचा पुतळा उभा केला, जो आज पुण्याचे भूषण मानला जातो.

त्यांच्या पश्चात, ओरिएंटल बुक सर्व्हिसचे स्थलांतर त्यांचे चिरंजीव कैलास सरदेसाई यांनी नारायण पेठेत स्वतंत्रपणे, एका प्रशस्त जागेत केले.

— वा.ल. मंजूळ

## सांकलिया, हसमुख धीरजलाल
**पुरातत्त्वज्ञ, संस्कृत अभ्यासक**
**१० डिसेंबर १९०८ – २८ जानेवारी १९८९**



हसमुख धीरजलाल सांकलिया यांना आधुनिक भारतीय पुरातत्त्वाचे जनक (Father of Indian Archaeology) म्हटले जाते. भारत स्वतंत्र होण्यापूर्वी एम.ए. व एलूएल.बी. या पदव्या संपादन केल्यानंतर सांकलिया पुढील शिक्षणासाठी इंग्लंडला गेले. त्यांनी लंडन विद्यापीठामधून 'गुजरातेतील पुरातत्त्व' या विषयावर डॉक्टरेट पदवी मिळवली. प्राचीन भारतीय इतिहासाचा अभ्यास करण्यासाठी, विशेषत: पुराणांचे ऐतिहासिकत्व सिद्ध करण्यासाठी आपण महाविद्यालयीन जीवनापासूनच प्रेरित झालो, असे त्यांनी आत्मचरित्रात नमूद केले आहे. त्यासाठी सांकलियांनी संस्कृतचा अभ्यास केला. त्यांची ही संस्कृतची पार्श्वभूमी त्यांना प्राचीन भारतीय इतिहास व पुरातत्त्व यांच्या सखोल अभ्यासात उपयोगी पडली.

भारतात परतल्यानंतर सांकलियांनी काही काळ मुंबईला प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियम (छत्रपती शिवाजी महाराज संग्रहालय), द एशियाटिक सोसायटी व हेरास इन्स्टिट्यूट येथे काम केले. जुन्या डेक्कन कॉलेजचे १९३९मध्ये पुनरुज्जीवन झाल्यानंतर सांकलियांची प्राध्यापक या पदावर नेमणूक झाली. सांकलियांनी हे पद स्वीकारणे हा क्षण भारतीय पुरातत्त्वाला निर्णायक वळण देणारा ठरला. गेल्या सहा-सात दशकांमध्ये भारतीय पुरातत्त्वाला जो वैज्ञानिक पाया प्राप्त झाला, त्याला प्रा. सांकलियांचे द्रष्टेपण कारणीभूत ठरले.

नावलौकिक मिळवल्यानंतर अनेक प्रलोभने नाकारून, सांकलियांनी डेक्कन कॉलेजमध्येच राहून संस्थेची जोपासना करणे पसंत केले. त्यांनी अठ्ठेचाळीस विद्यार्थ्यांना डॉक्टरेटसाठी मार्गदर्शन केले. याखेरीज

स

त्यांचा सहवास मिळवून प्रभावित झालेले व पुरातत्त्वीय पद्धती शिकलेले इतर अनेक विद्यार्थी आहेत. त्यांनी जवळजवळ तीन पिढ्यांच्या विद्यार्थ्यांना अध्यापन केले. सांकलियांच्या हाताखाली तयार झालेल्या पुरातत्त्वज्ञांनी गेली पन्नास वर्षे भारतीय पुरातत्त्वाच्या क्षेत्रात मोलाची भूमिका बजावली आहे. सांकलियांचे विद्यार्थी के. पदय्या यांनी सांकलियांच्या व्यक्तिमत्त्वाबद्दल जे गौरवोद्‌गार काढले आहेत त्यातून सांकलियांची एकूण जीवनदृष्टी व त्यांची राष्ट्रवादी प्रेरणा समजते.

"Through his many - sided efforts, he sought to imprint the study of the past onto national conciousness." (Paddayya 1999:581)

प्रा. सांकलियांनी त्यांच्या आयुष्यात संशोधन केले व मुख्य म्हणजे भरपूर लेखन केले. त्यांनी एकूण १० सर्वेक्षणे व उत्खनन वृत्तान्त प्रकाशित केले. त्यांनी ३५ पुस्तके लिहिली. यांतील १२ पुस्तके हिंदी, मराठी व गुजराती या भाषांमधील आहेत, कारण पुरातत्त्वीय संशोधनातून मिळालेले ज्ञान सर्वसामान्यांना कळेल अशा प्रकारे मांडणे ही संशोधकांचीच जबाबदारी आहे, असे ते मानत. त्यांनी संशोधनपर नियतकालिकांमध्ये सुमारे २०० शोधनिबंध तर लिहिलेच, पण त्याखेरीज त्यापेक्षाही जास्त लेख त्यांनी वर्तमानपत्रांमध्ये व मासिकांमध्ये प्रकाशित केले.

रॉबर्ट ब्रूस फूट यांच्या लेखनातून धागा निवडून सांकलियांनी १९४०मध्ये सर्वेक्षण केले. साबरमती नदीच्या खोऱ्यात मेहसाणा जिल्ह्यात अनेक पुराश्मयुगीन व मध्याश्मयुगीन स्थळे शोधून काढली आणि गुजरातमधील लांघणज या मध्याश्मयुगीन स्थळाचे उत्खनन केले. एखाद्या मध्याश्मयुगीन स्थळाचे हे भारतातील पहिलेवहिले उत्खनन होते.

सांकलियांनी १९४३-४४मध्ये गोदावरी नदीच्या खोऱ्यात प्रागैतिहासिक सर्वेक्षणाची सुरुवात केली. गोदावरी व तिच्या उपनद्यांच्या खोऱ्यांमध्ये नाशिक जिल्ह्यात अनेक प्रागैतिहासिक स्थळे शोधून काढली. १९५२मध्ये सांकलियांना नाशिकजवळ गंगापूर येथे बसॉल्टचा वापर करून तयार केलेली अनेक प्रकारची पुराश्मयुगीन अवजारे मिळाली. १९५४-१९५५मध्ये नेवासे येथे उत्खनन करत असताना सांकलियांनी प्रवरा नदीच्या खोऱ्यात सर्वेक्षणाचे काम हाती घेतले. तेथे त्यांना तीन पुराश्मयुगीन सांस्कृतिक कालखंडांतील अवजारांचे संच स्तरनिबद्ध मिळाले. त्या शोधामुळे बसॉल्ट उपलब्ध असणाऱ्या ठिकाणी प्रागैतिहासिक मानवी वसाहतींचे पुरावे मिळणार नाहीत हे रॉबर्ट ब्रूस फूट यांचे मत योग्य नसल्याचे सिद्ध झाले. या संशोधनाचा परिणाम म्हणून पूर्वी प्रागैतिहासिक अवशेष मिळणार नाहीत अशी समजूत असणाऱ्या अनेक भागांत प्रागैतिहासिक संशोधन करण्याची प्रेरणा त्यांचे विद्यार्थी व इतर संशोधक यांना मिळाली.

प्रागैतिहासिक स्थळांचे सर्वेक्षण व संशोधन करत असतानाच सांकलियांचे लक्ष इतर सांस्कृतिक अवशेषांकडे होतेच. सांकलियांनी संशोधनाला प्रारंभ केला, तेव्हा प्रागैतिहासिक व ऐतिहासिक कालखंडांमध्ये मोठी पोकळी होती. तत्कालीन भारताच्या वायव्य भागात सिंधू संस्कृतीच्या स्थळांचा शोध लागल्याने काही प्रमाणात ही पोकळी कमी झाली होती. तसेच दक्षिण भारतात अनेक ठिकाणी नवाश्मयुगीन कुऱ्हाडी मिळाल्या होत्या. तथापि प्रागैतिहासिक काळ व गंगा-यमुना खोऱ्यातील चित्रित राखी मृद्‌भांडी वापरणाऱ्या ग्रामीण संस्कृतींच्या काळादरम्यान काय घडले, हे जाणून घेण्यासाठी अधिक संशोधनाची गरज होती. सांकलियांनी या संदर्भात भारतीय पुरातत्त्वाच्या इतिहासात मोलाची भूमिका बजावली.

प्रवरा नदीच्या काठावरील जोर्वे येथे सांकलियांनी सर्वप्रथम १९५०-१९५१मध्ये ताम्रपाषाणयुगीन स्थळाचे उत्खनन केले. या ठिकाणी चाकावर घडवलेली व पक्की भाजलेली लाल रंगाची चित्रित मृद्‌भांडी मिळाली. यानंतर सांकलियांनी मध्य प्रदेशातील महेश्वर व नावडातोली या नर्मदा नदीच्या दोन्ही काठांवरील स्थळांचे १९५३ ते १९५९ दरम्यान उत्खनन केले. त्या काळात भारतात नावडातोली हे आडव्या पद्धतीने

उत्खनन झालेले सर्वांत मोठे पुरातत्त्वीय स्थळ होते. या उत्खननातून ताम्रपाषाणयुगीन खेडेगावाचा विस्तृत आराखडा हाती आला व लोकजीवनाची माहिती मिळाली. सांकलियांनी १९५४-१९५६मध्ये व पुन्हा १९५९-१९६१मध्ये महाराष्ट्रातील अहमदनगर जिल्ह्यातल्या नेवासे या ठिकाणी उत्खनन केले. या उत्खननांमध्ये ताम्रपाषाणयुगीन संस्कृतीच नव्हे तर प्रागैतिहासिक काळापासून ते मराठा कालखंडापर्यंतचा सलग पुरातत्त्वीय पुरावा हाती आला.

सांकलिया यांनी १९६१-१९६२मध्ये राजस्थानातील अहाड या अत्यंत महत्त्वाच्या ताम्रपाषाणयुगीन स्थळाचे उत्खनन केले. या उत्खननाने ताम्रपाषाणयुगातील अहाड संस्कृतीच्या अभ्यासाचे नवे दालन उघडले. घोडनदीच्या काठावरील इनामगाव हे सांकलियांनी उत्खनन केलेले अखेरचे ताम्रपाषाणयुगीन स्थळ आहे. सलग १२ वर्षे उत्खनन झालेले हे ताम्रपाषाणयुगीन स्थळ भारतीय पुरातत्त्वाच्या इतिहासातला एक मैलाचा दगड मानले जाते. जरी सांकलियांना प्रागैतिहासिक व आदि-ऐतिहासिक काळात मुख्य रस होता, तरी त्यांनी अनेक ऐतिहासिक स्थळांचे उत्खनन केले आहे. त्यांनी १९४५-१९४६मध्ये कोल्हापूर येथे व १९५०-१९५१मध्ये नाशिक येथे उत्खनन केले. सांकलियांना ऐतिहासिक (पुराणांमधील) माहितीचा वापर करून काही पुरातत्त्वीय पुरावे मिळतात का, ते पाहायचे होते. त्यासाठी १९६६ या वर्षी त्रिपुरी येथे उत्खनन केले.

जरी पुरातत्त्व ही मानव्य शास्त्राची एक शाखा आहे, असे मानले जात असले, तरी सांकलियांनी फार पूर्वीपासून ओळखले होते, की पुरातत्त्वीय पुराव्यांचा अर्थ लावून प्राचीन मानवी व्यवहार व वर्तन यांच्यासंबंधी अनुमाने काढण्यासाठी विविध वैज्ञानिकांची मदत आवश्यक असते. विशेषत: प्राचीन काळातील पर्यावरण, उदरनिर्वाह, साधने, कालमापन व स्तररचनेचे विश्लेषण यांसाठी निरनिराळ्या वैज्ञानिक पद्धतींचा वापर करावा लागतो. म्हणूनच लांघणज उत्खननापासूनच सांकलियांनी प्रा. कुरुलकर, जे. सी. जॉर्ज, डी. आर. शहा, ज्यूलिएट क्लटन-ब्रुक, केनेथ केनेडी व विष्णू मित्रे अशा विविध तज्ज्ञ वैज्ञानिकांचे सहकार्य घेतले. पुढील काळात सांकलियांच्या दूरदृष्टीमुळे डेक्कन महविद्यालयात पुरातत्त्वीय विज्ञानाच्या विविध शाखांच्या जागतिक दर्जाच्या संशोधन प्रयोगशाळा निर्माण झाल्या.

विद्यार्थी असतानाच प्राचीन भारतीय इतिहासाकडे आकृष्ट झालेल्या सांकलियांना लिखित साधनांमध्ये व विशेषत: प्राचीन संस्कृत साहित्यात रस होता. पुरातत्त्वीय पुरावे व लिखित साधने एकत्रितपणाने वापरली पाहिजेत असा त्यांचा आग्रह होता. वैयक्तिक जीवनात धार्मिक असूनही सांकलियांनी लिखित साधनांमध्ये ऐतिहासिक सत्य असतेच, असे ठोकळेबाजपणे कधीच मानले नाही. ठोकळेबाजपणे त्यांनी लिखित साधनांमधील सत्य शोधण्यासाठी व नंतरच्या काळात घुसलेले भाग ओळखण्यासाठी रामायणाचे सखोल संशोधन केले. रामायणाच्या लिखित संहितांमधलाच अंतर्गत पुरावा व पुरातत्त्वीय पुरावे यांची सांगड घालून सांकलियांनी रामायणाच्या रचनेचा काळ निश्चित केला. तो इसवीसनाच्या तिसऱ्या शतकापूर्वी फार मागचा नसावा असे अनुमान त्यांनी काढले. रामायणात उल्लेख असणारी लंका ही आजचा श्रीलंका देश नसून ती मध्य भारतात एका छोट्या बेटावर होती असे प्रतिपादन त्यांनी केले. सांकलियांच्या या मताला असणाऱ्या पुराव्यांचा विचार न करता अनेकांनी (संस्कृत व पुरातत्त्व दोन्हीचे अज्ञान असणाऱ्यांनीही) या मताला विरोध केला. काही जणांनी (संस्कृत व पुरातत्त्व दोन्हींचे अज्ञान असणाऱ्यांनीही) तर वृत्तपत्रीय लेखनात सांकलियांची चेष्टाही केली. तथापि आजही त्यांच्या या संशोधनातील अनेक मुद्दे खोडून काढता येत नाहीत.

— डॉ. प्रमोद जोगळेकर

**संदर्भ :**

1. *Misra, V. N. 1989. Hasmukh Dhirajlal Sankalia (1908-1989): Scholar and Man, Man and Environment XIV (2): 1-20.*

स

2. Paddayya, K. 1999. Hasmuskh D. Sankalia, in The Encycleopedia of Archaeology. The Great Archaeologists Volume II (T. Murrary Ed.), pp. 581-589. Santa Barbara: ABC- CLIO.
3. Paddayya, K., P. P. Joglekar, K. K. Basa and R. Sawant (Eds.) 2009. Recent Research Trends in South Asian Archaeology. Proceedings of Birth Centenary Seminar. Pune: Deccan College.
4. Sankalia, H.D. 1963. Prehistory and Protohistory of India and Pakistan. Mumbai: University of Bombay.
5. Sankalia, H.D. 1973. Ramayana. Myth or Reality? New Delhi: Peoples Publishing House.
6. Sankalia, H.D. 1978. Born for Archaeology. New Delhi: B.R. Publishing Corp.

## साखरे, नाना महाराज

☛ *मुख्य चरित्रनोंद – धर्मपरंपरा खंड*

## सातवळेकर, श्रीपाद दामोदर

**संस्कृत पंडित, वेदमूर्ती**

**१९ सप्टेंबर १८६७ – ३१ जुलै १९६८**



वेदाभ्यास हे पंडितजींचे उपजीविकेचे किंवा अर्थार्जनाचे साधन नव्हते. इयत्ता सहावीनंतर घरच्या आर्थिक अडचणींमुळे त्यांना शालेय शिक्षण सोडावे लागले. त्या वेळी मुंबईला जाऊन त्यांनी जे.जे. स्कूल ऑफ आर्टमध्ये प्रवेश घेतला, चित्रकलेतील प्रावीण्याबद्दल दिल्या जाणाऱ्या 'मेयो' पदकासह पदवी प्राप्त केली आणि पुढे त्यातच व्यवसाय सुरू केला. पण त्याच वेळी एकीकडे शास्त्री परंपरेने संस्कृतचे पठण करून, वेदाभ्यास करून त्यातही ते इतके पारंगत झाले की, 'तद् अपश्यत् तद् अभवत् तदासीत्' या यजुर्वेदवचनाप्रमाणे साक्षात वेदमूर्तीच होऊन गेले. ते वेदप्रावीण्यही कसे, तर वयाच्या पंचविसाव्या वर्षी त्यांनी काही वैदिक ऋचांचा जो अर्थ लावला, तो लोकमान्य टिळकांसारख्या वेदज्ञाला भावला आणि 'केसरी'सारख्या दैनिकाच्या अग्रलेखात मानाचे पान पटकावून बसला. 'कुठल्याही फळाची अपेक्षा न करता वेदांचा अभ्यास आणि पठण, जतन केले पाहिजे', या पतंजलिमहर्षींच्या आदेशाचे त्यांनी अक्षरशः पालन केले. कुठल्याही ऐहिक लाभाची अपेक्षा न ठेवता 'केवळ वेदाभ्यासासाठी वेदाभ्यास' या निष्ठेने वेदाध्ययन करून त्यांनी आयुष्यभर वेदांचे संपादन, प्रकाशन, प्रसिद्धी आणि प्रसारासाठी अविरत प्रयत्न केले. त्यासाठी त्यांनी मराठीत 'पुरुषार्थ', गुजरातीत 'वेदसंदेश', हिंदीत 'वैदिक धर्म' आणि संस्कृतमध्ये 'अमृतलता' ही चार नियतकालिके चालवली. त्यांनी स्वतः लिहिलेल्या पुस्तकांची संख्या चारशेच्यावर आहे.

गुजरातमध्ये बलसाड जिल्ह्यातल्या पारडी या गावी स्वतंत्र परीक्षा केंद्र सुरू झाले आणि पारडीचे स्वाध्याय मंडळ हे जणू काही एक स्वतंत्र विद्यापीठच बनून गेले. वैदिक धर्म हाच खरा मानवधर्म आहे आणि त्याबद्दल सर्वसामान्य जनतेत ज्ञान आणि जागृती निर्माण झाली तर ब्रिटिशांना भारतात राहणे अशक्य होईल, असा त्यांचा दृढ विश्वास होता आणि त्या दिशेने त्यांचे प्रयत्न होते.

वैदिक धर्म हा प्रवृत्तिपर, ऐहिक जीवनाभिमुख आहे, निवृत्तीपर नाही. त्यात आश्रम तीनच. संन्यासाश्रम हा मागाहून समाविष्ट करण्यात आला. वैदिक ब्राह्मण हे फक्त यज्ञयागच करत असत आणि कर्मकांडातच रमत असत अशी जर कुणाची समजूत असेल, तर ती साफ चुकीची आहे, असे म्हटले पाहिजे. जेव्हा परकीय आक्रमणे होत, त्या वेळी राजाच्या बरोबरीने राजपुरोहित रणांगणावर हजर असत. ते त्याच्या विजयासाठी प्रार्थना करत. एवढेच नाही, तर काही वैदिक ग्रंथांच्या मते,

संयत आणि सुरक्षित सारथ्यासाठी राजरथांचे लगामही पुरोहितांच्याच हाती असत. याही आघाडीवर पंडितजी कुठल्याही प्रकारे मागे नव्हते.

भारतीयांचे एकछत्री साम्राज्य असावे, या दयानंद महर्षींच्या मताशी ते सहमत होते आणि त्यामुळेच ते स्वराज्यप्राप्तीच्या लढ्यात सक्रिय सहभागी होते. परिणामी, त्यांना प्रथम हैद्राबाद नंतर गुरुकुल कांगडी आणि मग लाहोर सोडावे लागले.

त्यानंतर औंध संस्थानातही त्यांचे स्वराज्य आणि सुराज्य यांसाठी वेगवेगळ्या पातळ्यांवर प्रयत्न चालूच होते. गांधीखुनानंतर झालेल्या दुर्दैवी विध्वंसामुळे १९४८ मध्ये वयाच्या एक्याऐंशीव्या वर्षी त्यांना परत एकदा स्थलांतर करायची वेळ आली. त्या वेळी त्यांनी पारडीला आपले स्वाध्याय मंडळ पुनः प्रस्थापित केले. तिथे पूर्वी असलेल्या ख्रिस्ती चर्चच्या जागी वेदमंदिराची स्थापना केली. खरोखरीच, हार कशी ती त्यांना माहीतच नव्हती. वैदिक धर्मात गृहस्थाश्रमाला फार महत्त्व आहे. किंबहुना, तो समाजजीवनाचा पायाच मानला गेला आहे म्हटले तरी चालेल. याही आघाडीवर त्यांचे आचरण आदर्शभूत वाटावे, असेच आहे. वैयक्तिक जीवनात ते अतिशय साध्या राहणीचे होते. त्यांचे गृहजीवन अतिशय समृद्ध आणि समाधानी होते. अतिथि-अभ्यागतांचे त्यांच्याकडे सदैव मनःपूर्वक स्वागत असे. पारडीचे त्यांचे प्रशस्त घर, छापखाना, वेदमंदिर, गोशाळा आणि त्याचबरोबर त्यांचे गार्हस्थ्यजीवन आणि कार्यजीवन पाहिले की त्यांच्याकडे अप्रतिम व्यवस्थापन कौशल्य असणार, असे निःशंकपणे वाटू लागते.

त्यांचे एक चिरंजीव माधवराव सातवळेकर यांनी त्यांच्या चित्रकलेचा वारसा चालवला, तर दुसरे चिरंजीव वसंतराव यांनी व्यवस्थापनाचा. त्यांनी पंडितजींचे छपाई, प्रकाशन आणि इतर अनेक उद्योग अतिशय समर्थपणे सांभाळले, वाढवले आणि एका क्षणी कोणताही मोह न बाळगता सर्व मालमत्ता विश्व हिंदू परिषदेकडे सोपवली.

— डॉ. माधवी कोल्हटकर

## साधले, आत्माराम नीळकंठ

**आनंद साधले**

**संस्कृत अभ्यासक, अनुवादक, ललित लेखक**

**५ जुलै १९२० - २६ एप्रिल १९९६**



संस्कृत विदग्ध साहित्याचा मराठी वाचकांना ललित शैलीत परिचय करून देण्याचे महत्त्वाचे काम आनंद साधले यांनी केले आहे. स्वतःला आवडलेले हे काम मनापासून करता यावे म्हणून पोस्टखात्यातील नोकरीत त्यांनी कायम रात्रपाळी मागून घेतली होती. साधले संस्कृतचे पंडित नव्हते, किंबहुना त्यांचे संस्कृत ज्ञान फार जुजबी होते, तरी आवड म्हणून संस्कृत साहित्याचा सानुवाद अभ्यास त्यांनी केला आणि आपल्या देवदत्त प्रतिभेच्या साहाय्याने त्यावर आधारित बरीच साहित्यसंपदा त्यांनी निर्माण केली. आयुष्याच्या उत्तरकाली प्रथम पत्नीशी घटस्फोट घेऊन त्यांनी हैदराबाद येथील संस्कृत प्राध्यापक नलिनी पराडकर यांच्याशी विवाह केला. ऐच्छिक निवृत्ती घेऊन वयाच्या पंचावन्न-छप्पन्नाव्या वर्षी ते हैदराबादला स्थायिक झाले, ते निधनापर्यंत तेथेच राहिले. अशा प्रकारे मुंबई आणि हैदराबाद ही त्यांची कर्मभूमी होती.

आनंद साधले यांचे साहित्य स्थूलमानाने असे विभागता येईल : संशोधनपर निबंध, आत्मनिष्ठ ललित साहित्य, कथा साहित्य आणि अनुवाद. अनुवादात भावानुवाद आणि भाषांतर असे दोन्ही प्रकार आहेत. त्यांच्या संशोधनपर साहित्यात महाभारत आणि रामायण यांवरील साहित्य प्रामुख्याने विचारात घ्यावे लागेल. त्यातही महाभारतावरील त्यांचे पुस्तक 'हा जय नावाचा इतिहास आहे', हे भल्या-बुऱ्या, दोन्ही अर्थांनी गाजले. त्याच काळात लिहिल्या गेलेल्या 'युगान्त', 'व्यासपर्व' इ. पुस्तकांच्या पठडीतले हे पुस्तक असून त्यातील अनेक विधानांचा परामर्श प्रा. अ.दा. आठवले यांनी

स

'महाभारताचे वास्तव दर्शन' या ग्रंथात घेतला आहे.

'परि हरि हा ब्रह्मचारी' या पुस्तकात श्रीकृष्ण हा रंगेल, कामुक नव्हता जसा तो चित्रकार आणि काही कवींनी रंगविला आहे, तर विवाह होईपर्यंत तो ब्रह्मचारी होता हे अनेक ग्रंथांद्वारे सप्रमाण दाखवले आहे. याच पुस्तकातील 'वसुंधरेचे स्तन्य उसळले' या लेखात गंगा, यमुना, गोदावरी, नर्मदादी नद्यांचे पुराणैतिहासिक साहित्य समन्वित झाले असे जे रसगर्भ वर्णन आहे, त्यात प्राकृतिक सौंदर्याच्या अनुभूतीने त्यांच्या मनात उसळलेल्या आनंदकल्लोळाचा प्रत्यय वाचकांनाही येतो. त्यांच्या या दोन्ही पुस्तकांना महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार मिळाला.

'शाकुंतल', 'मालविकाग्निमित्र', 'विक्रमोर्वशीय', 'मालती माधव', 'वेणीसंहार', 'मृच्छकटिक', 'मुद्राराक्षस' अशा प्रसिद्ध संस्कृत नाटकांचा अनुवाद साधले यांनी कादंबरीरूपात केला. 'शकुंतला', 'मालविका', 'ऊर्वशी', 'मालती', 'द्रौपदी', 'वसंतसेना', 'चाणक्य' अशी नावे त्यांनी कादंबरीस दिली. 'कुट्टनीमतम्', 'अमरुशतक', 'गीतगोविंद' या काव्याचा त्यांनी गद्यात अनुवाद केला. याशिवाय त्यांनी अनेक संस्कृत विषयांवर लेख लिहिले आणि त्यांचे संग्रह प्रसिद्ध झाले. अनुवादित आणि आधारित असे हे जे साहित्य साधले यांनी निर्माण केले, त्यांत त्यांची भावमधुर कविवृत्ती, सौंदर्यग्राही प्रकृती आणि आपली संपूर्ण श्रीकळा घेऊन अवतरलेली भाषाशैली मोहवून टाकते. त्यांची भाषा संस्कृतप्रचुर असली तरी प्रासादिक आहे. कोमल वर्णयुक्त असल्याने श्रुतिमधुर आहे. संस्कृतातील आशय स्पष्ट करण्याइतकी भावगर्भ आहे, रसार्द्र आहे. वाचकांवर ते संस्कृत, रसगंधी साहित्यफुलांचा नुसता सडा घालतात. संस्कृत साहित्याची ही सौंदर्यदालने मराठी वाचकांना उघडून दाखवण्याचे मोलाचे काम साधले यांनी केले आहे.

'महाराष्ट्र रामायण' हे त्यांचे प्रचंड काव्य सीतेच्या व्यक्तित्वावर विशेष प्रकाश टाकणारे असले, तरी त्याची दखल समीक्षकांनी घेतली नाही. साधले यांच्या स्वतंत्र अशा साहित्याची दखल समीक्षकांनी घेतली नाही याचे कारण, त्या कथा, एक-दोन अपवाद वगळता, अतिशृंगारिक, किंबहुना अश्लीलतेकडे झुकणाऱ्या होत्या, कलात्मक दृष्टीनेही सामान्य होत्या. पाश्चात्त्य शृंगारकथांचा आधार घेऊन त्यांनी या कथा लिहिल्या. पण त्यांचे 'चतुर्भाणी' हे शृंगारिक असले तरी संस्कृत ग्रंथाचे रूपांतर असून 'भाण' हा रूपक प्रकार मराठीत आणण्याचे मोठे काम त्यांनी केले आहे. पात्राशी एकरूप होऊन केलेले त्यांचे स्वभाववर्णन, प्रसन्न शैली, वाचनीयता हे त्यांचे गुण निश्चितच प्रशंसेस पात्र आहेत.

साधले फार परोपकारी होते. शारीरिक कष्ट सोसून, आर्थिक झळ सहन करून ते इतरांना साहाय्य करीत. नवलेखकांना ते नेहमी प्रोत्साहन देत. पत्नी नलिनी पराडकरांच्या मागे लागून त्यांनी त्यांच्याकडून कथा 'सरित्सागर' या विषयावर पीएच.डी.चा प्रबंध पूर्ण करून घेतला, तुलसी रामायणाच्या बालकांडाचा संस्कृत अनुवाद पूर्ण करून घेतला.

नलिनीचे मार्गदर्शक वेगळे होते; पण प्रेरणा मात्र साधले यांची होती. या दाम्पत्याला संगीताची गोडी व जाण होती. मित्रांमध्ये दिलखुलास गप्पा करणारे साधले सभेमध्ये मुखदुर्बळ होत. त्यांनी कधी भाषण दिले नाही. जीवनाचा उपभोग त्यांनी अत्यंत रसिकतेने घेतला.

— प्रा. दिनकर खंडेराव देशपांडे

**संदर्भ :**

१. प्रा. देशपांडे, दिनकर; 'आनंद साधले : लेखक आणि माणूस', 'राजस'; ऑक्टोबर १९८०.

## साधले, नलिनी आनंद

**संस्कृत पंडित, लेखक, अनुवादक, कृषितज्ज्ञ**

**३ नोव्हेंबर १९३४ - १ डिसेंबर २०१०**

नलिनी साधले यांनी पुणे विश्वविद्यालयातून एम.ए. झाल्यावर उस्मानिया विश्वविद्यालयातून पीएच.डी. पदवी संपादन केली. पीएच.डी.च्या अभ्यासात त्यांनी संस्कृत साहित्यातील कथानकांचा व त्यातदेखील सोमदेवाच्या कथासरित्सागर या ग्रंथाचा विशेष अभ्यास केला. या



अभ्यासानंतर संस्कृत साहित्यातील कथासाहित्याची पुनर्बांधणी करण्याची गरज असल्याचे मत त्यांनी प्रतिपादले. त्यांच्या या अभ्यासासाठी त्या सातवळेकर सुवर्णपदकाच्या मानकरी ठरल्या. १९९४मध्ये उस्मानिया विद्यापीठातून संस्कृतच्या प्राध्यापिका व विभागप्रमुख म्हणून निवृत्त झाल्या. त्यांनी अनेक महनीय संस्थांना व समित्यांना मार्गदर्शन केले. राष्ट्रीय संस्कृत संस्थान, दिल्ली येथे शास्त्रचुडामणीच्या विद्वान म्हणून काम पाहिले. त्यांची अनेक पुस्तके प्रसिद्ध झाली. त्यातील संस्कृत काव्यातील कथा हे पुस्तक विशेष गाजले. त्यांची तुलसी रामायणाची संस्कृत समश्लोकी तुलसी मानस नलिनम् या नावाने प्रसिद्ध आहे. या ग्रंथाच्या पहिल्या भागात विविध वृत्तांतील २९२६ श्लोक आहेत. हा ग्रंथ पुणे येथे त्या वेळचे पंतप्रधान मोरारजी देसाई यांच्या हस्ते प्रकाशित झाला.

संस्कृत, इंग्लिश, हिंदी, मराठी व तेलगू या भाषांच्या उत्तम जाणकार असणाऱ्या नलिनीताईंनी अनेक संस्कृत ग्रंथांची वरील विविध भाषांत भाषांतरे केली. उर्वशी व वसंतसेना या संस्कृत नाटकांचे व तेलगू नाटक सीताज्योसमचे मराठी भाषांतर केले. प्राचीन शेती हा त्यांचा विशेष अभ्यासाचा विषय होता. या विषयावर ॲग्रीकल्चर ॲण्ड ऋग्वेद, वृक्षायुर्वेद, इकॉलॉजी ॲन्ड एन्शन्ट इंडियन ॲग्रिकल्चर, रेन प्रॉडक्शन थिअरीज ऑफ पराशर, आयुर्वेद ऑफ प्लॉट्स, प्राचीन भारतीय उद्यानविद्या अशा अनेक विषयांवर त्यांनी व्यक्तिश: व एकत्रितपणे शोधनिबंध लिहिले. इ.स.१०००मधील सुरपालाचा वृक्षायुर्वेद (१९९६), पहिल्या शतकातील पराशराचा कृषिपराशर (१९९९), आठव्या शतकातील काश्यपीय कृषिसूक्ति (२००२), १५५७मध्ये चक्रपाणि मिश्रा यांनी रचलेला विश्ववल्लभ (२००८), व तेराव्या शतकातील मृगपक्षिशास्त्र (२००८) अशा विविध ग्रंथांची त्यांनी भाषांतरे केली. शेतीच्या प्राचीन इतिहासावर त्यांनी केलेल्या श्रेष्ठ कार्यासाठी एशियन ॲग्रो हिस्ट्री फाउंडेशन या संस्थेतर्फे त्यांना सुवर्णपदकाने (२००२) सन्मानित करण्यात आले आहे.

— डॉ. आसावरी बापट

## साळी, शंकर अण्णाजी

**पुरातत्त्व संशोधक**

**१९२७ – १९९९**



शंकर अण्णाजी साळी यांचा जन्म अहमदनगर जिल्ह्यातील संगमनेर येथे झाला. तेथे शेती खात्यात काम करत असताना योगायोगाने ते पुरातत्त्वीय संशोधनाकडे आले. १९५० मध्ये त्यांना संगमनेरच्याजवळ प्रवरा नदीच्या काठावरील जोर्वे येथे काही खापराचे तुकडे मिळाले. त्याबद्दल कुतूहल वाटून साळींनी पुण्याला येऊन प्रा. सांकलियांची भेट घेतली. हा क्षण त्यांच्या जीवनाला आणि त्याचबरोबर महाराष्ट्राच्या अतिप्राचीन इतिहासाला कलाटणी देणारा ठरला. या स्थळाचे वेगळेपण लक्षात येताच सांकलियांनी १९५०-१९५१मध्ये जोर्वे येथे उत्खनन केले. तेथे एक नवीन ताम्रपाषाणयुगीन संस्कृती प्रकाशात आली व साळी पुरातत्त्वविद्येकडे आकृष्ट झाले.

त्या वेळी साळी फक्त मॅट्रिक झालेले होते. परंतु प्रा. सांकलिया व भारतीय पुरातत्त्वीय सर्वेक्षणातील म. न. देशपांडे यांनी प्रोत्साहन दिल्याने साळींनी पुढील शिक्षण घेतले व जळगाव जिल्ह्यातील पाटणे येथील प्रागैतिहासिक कालक्रम या विषयावर त्यांनी १९८१मध्ये पीएच.डी. संपादन केली.

— डॉ. प्रमोद जोगळेकर

स

## साळुंखे, आण्णा हरी

**प्राध्यापक, लेखक, विचारवंत**

**१ जून १९४३**



आण्णा हरी साळुंखे यांचा जन्म सांगली जिल्ह्यातील शिवाजीनगर (पूर्वीचे नाव खाडेवाडी), ता. तासगाव या छोट्याशा खेड्यात, शेतकरी कुटुंबात झाला. त्यांच्या आईचे नाव अंजूबाई, थोरला भाऊ पांडुरंग. घरी पंढरीची वारी असे. गावी चौथीपर्यंत शाळा असल्याने चौथीनंतर गावापासून आठ कि.मी. अंतरावरील तासगाव येथे इयत्ता पाचवी ते अकरावीपर्यंत शिक्षण झाले. तासगावी ते पायी चालत जात. वडील बंधू पांडुरंग यांनी त्यांना अभ्यासाची गोडी लावली व अभ्यासाची तयारी करून घेतली. त्यांचे महाविद्यालयीन शिक्षण सांगलीच्या विलिंग्डन कॉलेजमध्ये झाले. त्यांनी बी.ए.ची पदवी संस्कृत हा विशेष आणि हिंदी व तत्त्वज्ञान हे ऐच्छिक विषय घेऊन संपादन केली. बी.ए. व एम.ए. (संस्कृत) या परीक्षांत ते शिवाजी विद्यापीठात सर्वप्रथम आले. त्यांना भारत सरकारची राष्ट्रीय शिष्यवृत्तीही मिळाली होती. मराठी विषयातही त्यांनी एम.ए.ची पदवी मिळविली होती. डॉ. वि.बा. इनामदार यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी पीएच.डी.ची पदवी संपादन केली. कोल्हापूर येथील स्वामी विवेकानंद शिक्षण संस्थेच्या सातारा येथील लाल बहादूर शास्त्री महाविद्यालयात त्यांनी ३२ वर्षे संस्कृतचे अध्यापन केले. काही वर्षे मराठीचेही अध्यापन केले . शिवाजी विद्यापीठात संस्कृत अभ्यास मंडळाचे सदस्य व अध्यक्ष, तसेच वाङ्मय विद्याशाखेचे अधिष्ठाता (डीन) म्हणूनही त्यांनी काम केले आहे. या काळात त्यांनी वेगवेगळ्या अभ्यासक्रमांसाठी विविध पुस्तकांच्या संपादनांत सहभाग घेतला. यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिकच्या सातारा येथील अभ्यास केंद्राचे प्रमुख म्हणूनही त्यांनी काम पाहिले आहे. साळुंखे यांनी विपुल ग्रंथसंपदा निर्माण केली आहे. त्यांनी १९८१ मध्ये ‘किर्लोस्कर’ मासिकात मराठा समाजविषयक आत्मनिरीक्षणात्मक लेख लिहिला, तसेच त्यांनी त्याच दरम्यान ‘नवभारत’ (वाई) या मासिकात ‘लोकायत दर्शना’वर लेखमाला लिहिली. त्यांनी ‘चार्वाक दर्शनाचा चिकित्सक अभ्यास’ हा पीएच.डी.चा प्रबंधही प्रसिद्ध केला आहे. याशिवाय त्यांनी केलेले लेखन पुढीलप्रमाणे :

१. धर्म व तत्त्वज्ञानपर ग्रंथ : ‘धर्म की धर्मापलीकडे?’, ‘महात्मा फुले आणि धर्म’, ‘आस्तिक शिरोमणी चार्वाक’, ‘आता आमच्या धडावर आमचेच डोके असेल’, ‘वैदिक धर्मसूत्रे आणि बहुजनांची गुलामगिरी’, ‘ऐतरेय ब्राह्मण : एक चिकित्सा’, ‘गुलामांचा आणि गुलाम करणाऱ्यांचा धर्म एक नसतो’, ‘मातृचेटकृत शतपंचाशत्क बुद्धस्तोत्र’.

२. शिक्षणविषयक ग्रंथ : ‘चिंतन : बळीराजा ते रवींद्रनाथ’, ‘बहुजनांसाठी जीवनवादी सुभाषिते’, ‘चांदण्यात भिजायचे राहून जाऊ नये, म्हणून’, ‘त्यांना सावलीत वाढवू नका!’, ‘शंभर कोटी मेंदू, दोनशे कोटी हात’, ‘मित्रांना शत्रू करू नका’, ‘मन निरभ्र व्हावे’, ‘परिवर्तन : शास्त्रही, कलाही’.

३. चरित्रात्मक ग्रंथ : ‘विद्रोही तुकाराम’, ‘तुकारामांचा शेतकरी’, ‘विद्रोही तुकाराम : समीक्षेची समीक्षा’, ‘सर्वोत्तम भूमिपुत्र : गोतम बुद्ध’, ‘शिवराय : संस्कार आणि शिक्षण’.

४. सांस्कृतिक इतिहासपर ग्रंथ : ‘बळीवंश’, ‘परशुराम : जोडण्याचे प्रतीक की तोडण्याचे?’ ‘एकलव्य, शंबूक व झलकारीबाई’.

५. स्त्रीविषयक ग्रंथ : ‘हिंदू संस्कृती आणि स्त्री’, ‘महाभारतातील स्त्रिया’, भाग १ व २, ‘तुळशीचे लग्न : एक समीक्षा’.

६. ललित ग्रंथ : ‘तुझ्यासह आणि तुझ्याविना’, ‘अशी भेटत रहा तू’, ‘जीवनाची लय वेदनेत’.

७. भाषणसंग्रह : ‘संवाद सहृदय श्रोत्यांशी’, ‘ना

गुलाम ना उद्दाम', 'अंधाराचे बुरूज ढासळतील!' 'हृदयातून हृदयांकडे'.

८. आक्षेपांना उत्तरे : 'वादांची वादळे', 'सर्वोत्तम भूमिपुत्र : आक्षेप - डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे विचार आणि लेखकाची भूमिका'.

९. भाषांतरित ग्रंथ : ❖ इतर लेखकांच्या इंग्रजी ग्रंथांचे मराठी भाषांतर : १) 'स्वातंत्र्याचे भय', २) 'शीख धर्मातील धर्मनिरपेक्ष जाणिवा', ३) 'नागार्जुन'.

❖ संस्कृत ग्रंथांचे मराठी भाषांतर : 'शाहूचरितम्'- लाटकर शास्त्री.

१०. लेख : 'मराठी विश्वकोशात संस्कृत आणि तुलनात्मक धर्मशास्त्र' या विषयावर सुमारे शंभर लेख.

साळुंखे यांनी महाराष्ट्र व महाराष्ट्राबाहेर विविध विषयांवर शेकडो व्याख्याने दिलेली आहेत.

संमेलन अध्यक्षपदे : 'विचारवेध संमेलन' (बेळगाव), 'सत्यशोधक साहित्य संमेलन' (लातूर), 'विद्रोही साहित्य संमेलन' (सोलापूर), 'ग्रामीण साहित्य संमेलन' (विटा, जि. सांगली), 'सत्यशोधक समाज' पस्तिसावे अधिवेशन' (गेवराई, जि. बीड), 'शिवाजी विद्यापीठ इतिहास परिषद', तेरावे अधिवेशन (आटपाडी, जि. सांगली).

साळुंखे यांना पंचाहत्तरहून अधिक पुरस्कार प्राप्त झाले आहेत. त्यांतील काही उल्लेखनीय पुरस्कार याप्रमाणे :

'महाराष्ट्र फाउण्डेशन (अमेरिका) साहित्य' पुरस्कार (१९९४-९५), 'यशवंतराव चव्हाण ज्ञान-विज्ञान मंडळ', वाई, जि. सातारा यांच्याकडून सन्मानपत्र (२०१०), 'दलित मित्र' (महाराष्ट्र शासन) पुरस्कार (२००६), 'कविकुलगुरू कालिदास संस्कृत साधना' पुरस्कार (महाराष्ट्र शासन), राजर्षी शाहू छत्रपती मेमोरिअल ट्रस्ट, कोल्हापूर यांचा 'राजर्षी शाहू' पुरस्कार (२०१०), 'कर्मवीर डॉ. मामासाहेब जगदाळे समाज परिवर्तन गौरव' पुरस्कार (२०११), 'सार्वजनिक शिवजयंती उत्सव समिती', दिग्रस, जि. यवतमाळ यांच्याकडून सन्मानपत्र (२०११).

विशेष : महाराष्ट्र शासनाने सुवर्णमहोत्सवानिमित्त राज्याचे जे सांस्कृतिक धोरण जाहीर केले, त्या धोरणाच्या मसुदा समितीचे अध्यक्ष.

डॉ. साळुंखे यांनी 'हिंदू धर्म', 'चार्वाक', 'मनुस्मृती', 'बळीराजा', 'गौतम बुद्ध', 'फुले', 'शाहू', 'आंबेडकर' इत्यादी विषयांवर शेकडो व्याख्याने दिली आहेत. त्यांचे व्याख्यान ही एक बौद्धिक मेजवानी असते. त्यांची लेखणी आणि वाणी बहुजन समाजाला नवी दिशा देण्याचे, त्यांची अस्मिता जागृत करण्याचे, धर्माकडे पाहण्याचा नवा दृष्टिकोन देण्याचे बहुमोल कार्य करीत आहे. त्यांची व्याख्याने व ग्रंथसंपदा म्हणजे आधुनिक महाराष्ट्राच्या सामाजिक घडामोडीचा आढावाच आहे.

— प्रा. डॉ. शिवदास कुंडलिक जाधव

**संदर्भ :**

*१. गौरवपत्र; राजर्षी शाहू पुरस्कार प्रदान सोहळा; २०१०.*

## सुकथनकर, विष्णू सीताराम

**संपादक, संस्कृततज्ज्ञ, महाभारत टीकाकार**

**जन्म–मृत्युदिनांक अनुपलब्ध**



भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिराने आजवर साधलेले महत्तम संशोधनकार्य ज्या जगातील अखिल संस्कृताभ्यासकांना एकमताने दाद द्यावी लागली, ते म्हणजे भारताचे आर्ष लक्षश्लोकात्मक विराट आर्ष (सौत) महाकाव्य महाभारत याची तयार केलेली चिकित्सित आवृत्ती. वस्तुतः मुळात हे कार्य युरोपात व्हायचे, पण जागतिक महायुद्धामुळे युरोपखंड पेटला होता. अखेर हे कार्य महाराष्ट्रात विद्येच्या माहेरघरी पुण्यात १९१९ साली सुरू झाले. त्याची पूर्तता (प्रतीक अनुक्रमणिका व उपसंहार वगळता) झाली ती १९६६ साली, तत्कालीन राष्ट्रपती जगत्पंडित, तत्त्वज्ञ, वाग्वैद्य सर्वपल्ली राधाकृष्णन्

स

यांच्या शुभहस्ते. अगदी प्रथम मुख्य संपादक म्हणून प्रा. उद्गीकर यांनी या कामाचा श्रीगणेशा केला; पण १९२३ साली संस्थेचे पाचवे मानद सचिव विष्णू सीताराम सुकथनकरांनी प्रमुख व खऱ्याखुऱ्या अर्थाने (उद्गीकरांचा किरकोळ अपवाद वगळता) प्रमुख संपादक म्हणून कार्यधुरा स्वतःच्या मजबूत खांद्यावर घेतली. तेव्हा एकूण १,२५९ हस्तलिखिते (भारतातील, भारताबाहेरील, ताडपत्रांवर व भूर्जपत्रांवर, जुन्या कागदांवर विविध लिपींमध्ये लिहिलेली) पडताळून व त्याच्या जोडीला क्षेमेन्द्राची महाभारतकथामञ्जरी, यवद्वीपीय महाभारत संस्करण, पर्शियन भाषेत 'रज्मनामा' हा बदायुनीने अकबराच्या सांगण्यावरून महाभारताचा केलेला अनुवाद, तसेच विराटपर्वाचे गुजराथी भाषांतर साहाय्याला घेऊनच कोणते पाठ स्वीकारायचे, कोणते तळटिपात किंवा परिशिष्टात टिपायचे, चिकित्सित व ग्राह्य पाठांचे निकष कोणते, या सर्व बाबींचा साकल्याने, साक्षेपाने, सूक्ष्मतेने व सावधानतेने ऊहापोह करून सुकथनकर महाभारत महर्षींनी स्वतःचा महान 'उपोद्घात' (Prolegomena) लिहिला. या उपोद्घातातील निकषांच्या आधारेच इतर पर्वसंपादकांनीही आपापल्या वाट्याला आलेल्या पर्वांच्या चिकित्सित आवृत्त्या तयार केल्या. सर्वांचा चिकित्साधर्म, धर्म एकच- 'सुकथनकरं शरणं गच्छामि'. असे हे भगवान बुद्धसमान पाठचिकित्सा धर्मसंस्थापक विष्णुशास्त्री सीताराम सुकथनकर.

विष्णू सुकथनकर यांचे शालेय शिक्षण मुंबईला, उच्च शिक्षण प्रथम इंग्लंडला ऑक्स्फर्ड विद्यापीठात, नंतर स्कॉटलंडला एडिम्बरा येथे व अखेरीस जर्मनीला बर्लिन येथे झाले. बर्लिनला सुकथनकरांना हाइन्‌रिश ल्युडर्ससारख्या प्रकांड चिकित्सक विद्वानाच्या बोधपर, आदर्श, अभ्यासपूर्ण व्याख्यानश्रवणाचा लाभ घडला. आपल्या शिष्यावर चिकित्सित आवृत्तीची जबाबदारी सोपवल्याविषयी हाइन्‌रिश ल्युड्र्सने समाधान व्यक्त केले. डॉ. मॉरित्स विन्टरनिट्झ् यांनी इटलीत रोमला भरलेल्या पहिल्या जागतिक संस्कृत परिषदेच्या अधिवेशनात आवेशाने व आग्रहाने महाभारताच्या चिकित्सित आवृत्तीची आवश्यकता सांगितली होती. या झेकोस्लोव्हाकीय संस्कृत अभ्यासकाने पुढे लंडनला इंडिया ऑफिस लायब्ररीतील महाभारताची दक्षिण भारतातील हस्तलिखिते अभ्यासून स्वतःच्या चिकित्सक आवृत्तीची नमुनाप्रत तयार केली, तर तिकडे जर्मनीतील उपलब्ध महाभारताची हस्तलिखिते पडताळून बर्लिनच्या प्राध्यापक हाइन्‌रिश ल्युडर्स यांनी सुकथनकर यांच्या चिकित्सक आवृत्तीची नमुनाप्रत सिद्ध केली.

भांडारकर संस्थेत उद्गीकरांनी विराटपर्वातील जरत्कारू आख्यानातील काही अंशाची चिकित्सित नमुनाप्रत तयार केली. ही प्रत छापून संस्थेतर्फे जगभरातील विद्वानांना त्यांच्या अभिप्रायांसाठी पाठवण्यात आली. सर्वांनी 'हिरवा कंदील' दाखवल्यावरच काम पुढे चालू झाले व लवकरच सुकथनकरांकडे सुपुर्द झाले.

'भारत' म्हणजे 'महाभारत' व महाभारताच्या चिकित्सक आवृत्तीचे शिल्पकार म्हणजे वाग्वैद्य वि.सी. सुकथनकर हे एक सुनिश्चित समीकरण आहे.

सुकथनकरांनी 'न्यू इंडियन ॲन्टिक्विरी' या संशोधन नियतकालिकात अनेक संशोधनपर लेख लिहिले. महाभारताखेरीज भासाच्या नाटकांसंबंधीही त्यांनी उत्तम संशोधन केले. स्वप्नवास्तवदत्तेची स्वतःची आवृत्तीही काढली.

सन १९३४च्या आधी त्यांनी मुंबई विद्यापीठात विल्सन फिलॉलॉजिकल व्याख्यानमाला गुंफली. मुंबई विद्यापीठातच त्यांची महाभारताविषयीची 'द मीनिंग ऑफ महाभारत' ही दोन व्याख्याने झाली आणि अखेरचे तिसरे त्यांच्या आकस्मिक निधनानंतर विद्यापीठात वाचले गेले. महाभारताचा आध्यात्मिक रूपकार्थ त्यांनी या व्याख्यानातून उलगडून दाखवला.

सुकथनकर पाठनिर्धारणेबाबत स्वतः घालून दिलेल्या निकषांबाबत विलक्षण ठाम होते. आदिपर्वात 'महाभारत' या नामाचे निर्वचन देणारा एक श्लोक येतो.

डॉ. मॉरित्स विन्टरनिट्झच्या (पुढे डॉ. म.अ. मेहेंदळे यांनीही हेच मत उचलून धरले.

श्लोक पुढीलप्रमाणे :-

महत्वाभ्दारवत्त्वाच्च (सुकथनकर स्वीकृत पाठ, तर विन्टरनिट्झ-मेहेंदळे संमत पाठ भारतत्त्वाच्च) महाभारतमुच्यते।

अर्थात चिकित्सा-औदार्याने सुकथनकरांनी स्वगृहित पाठाखालीही अनिश्चितता निदर्शक गोमूत्र रेखा काढली आहे.

शं. बा. जोशी यांनी एका लेखात असे प्रतिपादन केले आहे की, पाठचिकित्सा शास्त्राची धारदार कातरी लावून आयुष्यभर सुकथनकरांनी ज्या लोकप्रसिद्ध (Vulgate) महाभारत आवृत्तीची प्रचंड काटछाट केली, ती त्यांची त्यांनाच आयुष्याच्या अखेरच्या काळात काहीशी पटेनाशी झाली. केवळ एवढेच नव्हे, तर स्वतःच्या 'उपोद्घाता'त (Prolegommena मध्ये) स्वीकारलेले चिकित्सित पाठ संहिता शास्त्राचे निकषदेखील त्यांना निर्दोष वाटेनासे झाले होते.

सुकथनकरांच्या चिकित्सक वृत्तीची प्रशंसा करणारे त्याच तोलामोलाचे एक पंडित म्हणजे वाग्वैद्य दामोदर धर्मानंद कोसंबी. सुकथनकर मृत्युशय्येवर असताना या आपल्या मुमुर्षू प्रिय पंडित मित्राला भेटायला कोसंबी गेले. आसन्नमरण सुहृदाला थोडेसे खुलवावे म्हणून गमतीने ते म्हणाले, ''सुकथनकर, आयुष्यभर तुम्ही मूळ महाभारताच्या फेररचनेत गुंग होतात. समजा, मी म्हणतो उद्या मध्य आशियात तुर्फान प्रांतात तुमच्या संग्रही असलेल्या जुन्यातल्या जुन्या पोथीपेक्षाही अधिक जुनी पोथी तुम्हाला कोणी आणून दिली, तर मला सांगा की, तुम्ही उभी केलेली चिकित्सित प्रत या पोथीच्या तुलनेत नेमकी कोठे बसेल?'' सुकथनकरांना विनोदबुद्धी अंमळ कमीच होती. ही गंमत आहे, हे न लक्षात घेता त्यांनी प्रतिप्रश्न केला, ''दामोदरजी, माझ्या संग्रहातील जुन्यात जुन्या पोथीहूनही अलीकडची म्हणजे त्या उत्प्रेक्षित पोथीचा काळ काय?'' कोसंबी म्हणाले, ''समजा, इ.स. तिसरे शतक, गुप्त-युग!'' ''तर मग, दामोदरजी मी तुम्हाला निक्षून सांगतो की, माझी चिकित्सित प्रत व ही पोथी तंतोतंत सारखीच असेल. केवळ काही शब्द ज्यांच्या खाली मी नागमोडी रेघ काढली आहे, ते सोडून.'' काय हा संशोधकाचा आत्मविश्वास? दा.ध. कोसंबींच्या डोळ्यात पाणी आले.

सुकथनकरांच्या निधनाने व्यथित झालेले, सभापर्वाची चिकित्सत आवृत्ती संपादणारे अमेरिकेतील येल (Yale) विद्यापीठातील वाग्वैद्य प्रा. फ्रँकलिन एजर्टन यांनी विशेषपत्र लिहूनच (ABORI. Vol. 24, 1948 P. 136) आपला सुकथनकरांविषयीचा ऋणनिर्देश व्यक्त केला, तर कृष्णमूर्तीशास्त्रींनी संस्कृतात 'शोकोद्‌गार:' या शीर्षकाखाली सुकथनकरांना मानवंदना सादर केली.

– डॉ. मो.गो. धडफळे

## सुरू, नरहर गोविंद

**संस्कृततज्ज्ञ**

**२८ डिसेंबर १८९८ – २६ ऑगस्ट १९८०**

संस्कृतचे गुणज्ञ आणि रसिक शिक्षक अशी उदंड लोकप्रियता लाभलेल्या प्रा. नरहर गोविंद उर्फ नानासाहेब सुरू यांचा जन्म सासवड येथे झाला. शालान्त परीक्षेत संस्कृतात सर्वप्रथम येऊन त्यांनी सन्मानाची जगन्नाथ शंकरशेठ शिष्यवृत्ती पटकावली आणि संस्कृतात स्नातकोत्तर पदवी मिळवून फर्गसन महाविद्यालयात आपल्या अध्यापनकार्याचा श्रीगणेशा केला. शिक्षणप्रसारासाठी नवनवीन संस्था स्थापन करण्यात त्यांनी पुढाकार घेतला. वाडिया महाविद्यालयात (पुणे) या संस्थेचे ते संस्थापक प्राचार्य (१९३२-५८) होते. त्यानंतर रुपारेल महाविद्यालय, मुंबई (१९६०-६५) आणि त्यानंतर दहा वर्षे मॉडर्न एज्युकेशन सोसायटीचे सचिव म्हणून त्यांनी काम पाहिले. आपल्या कर्तृत्वाने त्यांनी या संस्थांना स्थैर्य व प्रतिष्ठा प्राप्त करून दिली.

व्यवस्थापकीय जबाबदाऱ्या सांभाळतानाच आपला साहित्याचा व्यासंगही सुरूंनी वाढवला. व्यायामाने उत्तम राखलेली शरीरसंपदा, रसिकता आणि व्यासंग याचे अपूर्व रसायन त्यांच्या व्यक्तिमत्त्वात होते. संस्कृत,

प्राकृत आणि इंग्लिश या भाषांवर असामान्य प्रभुत्व असलेल्या सुरूंनी 'शाकुन्तल', 'मालतीमाधव' या संस्कृत, तर 'गउडवहो' आणि 'कर्पूरमञ्जरी' या प्राकृत पुस्तकांच्या संपादनाने तरल रसास्वादाचा आदर्श घालून दिला. 'माझी आकाशभाषिते' हे त्यांचे पुस्तक कालिदास व भवभूती यांच्यावरील प्रेमाची साक्ष पटवणारे आहे. त्यांनी केलेले 'अमरकाव्यम्' हे उमरखय्यामच्या रुबायांचे समश्लोकी संस्कृत भाषांतर त्यांच्या अभिजात रसिकतेची ग्वाही देणारे आहे. दुर्दैवाने ते प्रकाशित झालेले पाहणे त्यांच्या भाग्यात नव्हते.

प्राचार्य सुरू एक सच्चा माणूस आणि गुणग्राही व्यक्तिमत्त्व होते. प्रशासकीय सेवेत एखाद्याशी मतभेद झाले, तरीही त्यांनी न्यायबुद्धी सोडली नाही. प्राचार्यपदाची धुरा वाहताना धैर्याची परीक्षा पाहणारे अनेक प्रसंग आले तरीसुद्धा न डगमगता शांतपणे त्यांनी ते तडीस लावले. शिष्यांच्या बाबतीत वत्सल, गुणग्राही आणि उदार राहून त्यांनी शिष्यांच्या अनेक पिढ्या घडवल्या. गरजू विद्यार्थ्यांना आणि संस्थांना उदारहस्ते मदत करणारे सुरू जणू दीनदुबळ्यांचा कल्पवृक्षच होते. अशा या कुशल प्राचार्यांवराची आणि रसिक संस्कृतज्ज्ञांची सरकारदरबारी मात्र विशेष दखल घेतली गेली नाही, याची खंत वाटते.

— डॉ. परिणीता देशपांडे

## सोनटक्के, नारायण श्रीपाद

**वाङ्मयविशारद, संस्थाचालक**

**२४ मे १९०२ — ११ डिसेंबर १९८५**

आपल्या भारतराष्ट्राची प्राचीनतम, पवित्रतम व श्रेष्ठ विद्या म्हणजे 'वेदविद्या'. या वेदविद्येच्या अध्ययनासाठी निर्माण केलेल्या वैदिक संशोधनाचे प्रथमपासून ते अखेरपर्यंतचे अथक सेवक म्हणजे ना. श्री. सोनटक्के. त्यांना सर्व जण 'नानासाहेब' म्हणत असत. त्यांनी जीवनभर वैदिक संशोधन मंडळाची विविध अंगांनी सेवा केली. तो काळ ब्रिटिश आमदानीचा म्हणजे पारतंत्र्याचा होता. मेकॉलेसाहेबांनी भारतात



आंग्लपद्धतीची शिक्षण व्यवस्था आणली. अशा वेळी ज्यांना भारतीयत्वाचा, भारतीय शिक्षण पद्धतीचा अभिमान होता, त्यांनी राष्ट्रीय शिक्षण योजना स्वीकारली. त्या योजनेचा अवलंब करून बी.ए. समकक्ष विशारद व एम.ए. समकक्ष पारंगत असे अभ्यासक्रम सुरू केले. नानासाहेब स्वत:चा परिचय करून देताना गमतीने 'मी 'टिम'चा 'वावि' आहे', असे म्हणत. म्हणजे टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचे वाङ्मयविशारद. त्यांचे सहकारी प्रा. वाग्वैद्य चिं. ग. काशीकर हे 'टिम'चे पारंगत होते. सोनटक्के व काशीकर ही दुक्कल वैदिक संशोधन मंडळाचे दोन आधारस्तंभ.

काशीकरांनी संस्थेत मुख्यत्वे अध्ययन व संशोधन केले. पण 'संस्था' म्हटली म्हणजे तिची आर्थिक स्थिती बळकट करण्याचे कार्य संस्थाचालक, आजीव सदस्य यांनाच करावे लागते. ते मुख्यत्वे नानासाहेबांनी केले. त्यांना हरिभाऊ जोशींची साथ होती. सिंधुताई धडफळे यांनी मंडळाला आर्थिक मदत केली.

डॉ. त्र्यं. गो. माईणकर हे मंडळाच्या नियामक मंडळाचे अध्यक्ष झाले होते. ते दिल्ली विद्यापीठात संस्कृत विभाग प्रमुख होते. नानासाहेबांनी त्यांना सेवकांच्या पगारवाढीबाबत व मंडळाच्या इतर आर्थिक बाबतीत साहाय्य करण्याची विनंती केली. दिल्ली मंत्रालयावर असल्याने माईणकरांनी हे काम केले. त्याचे श्रेय त्यांच्याकडे विनंतीकरून हे काम करवून घेणाऱ्या नानासाहेबांना जाते. नानासाहेब व गुरुवर्य यांच्यात 'भाविकता' हा समान धागा होता. चाकूरीच्या आश्रमात स्त्रिया वेदाध्ययन-वेदपठण करायच्या. त्यांना वेद शिकवण्यासाठी नानासाहेब जायचे. एकदा ते माईणकरांना सोबत घेऊन गेले आणि महाराजांचे दर्शन दोघा भाविकांनी घेतले.

नानासाहेबांनीच मंडळाच्या प्रकाशनासाठी

स

अल्पदरात व आगाऊ पैसे न देता कागदाची असंख्य रिळे श्री. पारखे यांच्याकडून मिळवली.

याचा अर्थ नानासाहेब संस्थेतील अध्ययनाचे काहीच काम करत नव्हते असे नाही, तर आजीव सदस्यांमधील श्रमविभाजनानुसार काशीकर-धर्माधिकारी हे दोघे अध्ययनात अधिक तर नानासाहेब व हरिभाऊ हे अर्थाजनात अधिक लक्ष घालायचे. आजमितीस वैदिक संशोधन मंडळ हे राष्ट्रीय संस्कृत संस्थानाकडून प्रगत अध्ययन केंद्र म्हणून मान्यता पावले आहे.

१९५६साली वैदिक संशोधन मंडळाकडून सर परशुरामभाऊ महाविद्यालयाच्या पटांगणावर वाजपेय याग करण्यात आला. त्याच्या संयोजनात नानासाहेबांचा मोठा सहभाग होता.

वैदिक संशोधन मंडळाने पारित केलेल्या नानासाहेबांच्या निधनोत्तर शोक ठरावात त्यांच्या विशेष योगदानाचा निर्देश न चुकता केला आहे.

पुणे विद्यापीठ स्थापन होण्याच्या आधी पुण्यातील सर्व महाविद्यालये व संशोधनसंस्था मुंबई विद्यापीठाशी संलग्न होत्या. पदव्युत्तर संस्कृत परीक्षेसाठी वेदांबरोबर त्याला पूरक असणारा अवेस्ता हाही अभ्यासक्रमात होता. आजमितीस पुण्यात भांडारकर संस्था, संस्कृत प्रगत अध्ययन केंद्र, पुणे विद्यापीठ, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, डेक्कन महाविद्यालय यांपैकी कुठेच अवेस्ता शिकवण्याची व अवेस्ताविषयक संशोधनाची सोय उपलब्ध नव्हती.

सोनटक्के महर्षींनी 'भारत-इराण संश्लेष!' (हे देवीसिंग चौहान यांच्या एका ग्रंथाचे शीर्षक आहे.) घडवून आणणारा वेदसाहित्यासह अवेस्तासाहित्य (पहलवी-पांझर यांसह) मंडळात सुरू केला. अेर्वद्, मा. फ. कांगा यांच्यासह संपूर्ण अवेस्ता व खोर्दे-अवेस्ता यांचे देवनागरीतील खंड त्यांनी मंडळातर्फे प्रकाशित केले. ते स्वत: अवेस्ता शिकले. एखाद्या अवेस्ता पुरोहिताने म्हणावे तसे त्या उच्चारात विविध समारंभांत अवेस्तातील काही गाथांचे पठण ते करू लागले. पूर्वी अवेस्ता-गुजराती असा कांगांचा कोश होता पण तो अपुरा वाटल्याने मंडळातर्फे अवेस्ता-आंग्ल कोशाची सुरुवात केली.

डॉ. म. अ. मेहेंदळे यांच्याकडून 'झरतुष्ट्राच्या गाथा' हे पुस्तक लिहवून मंडळातर्फे प्रकाशित केले. याचे सर्व श्रेय नानासाहेबांच्या प्रोत्साहनास जाते.

पूर्वी मंडळाकडे मोठी प्रशस्त इमारत नव्हती. आज टिळकस्मारक मंदिर आहे तिथे एक जुनी इमारत होती. त्यातील काही खोल्या टिळक महाराष्ट्र विद्यापीठाने वैदिक संशोधन मंडळास दिल्या होत्या. पुढे गुलटेकडीला टि. म. वि.च्या प्रशस्त जमिनीवर वैदिक संशोधन मंडळाची तीन मजली प्रशस्त इमारत उभारली आहे. या इमारतीच्या उभारणीतही नानासाहेबांचा सिंहाचा वाटा होता. हुबळी, रत्नागिरी येथील अवेस्ता व झरतुष्ट्रीय धर्मविषयक 'खारावाला' यांच्या वार्षिक मालिकेत एक पुष्प नानासाहेबांनी बांधले होते.

– नलिनी धडफळे

## सोहोनी, श्रीधर वासुदेव

**भारतीय प्राच्यविद्या संशोधक व पुरातत्त्ववेत्ते**

**१९ मे १९१४ – १५ फेब्रुवारी २००२**



श्रीधर वासुदेव सोहोनी यांचा जन्म रत्नागिरीजवळच्या आगरगुळे येथे एका सुसंस्कृत, सधन कुटुंबात झाला. ते अर्थशास्त्र हा विषय घेऊन बी.ए. व एम.ए. या पदव्या पहिल्या वर्गात उत्तीर्ण झाले. विद्यार्थिदशेत श्रीधर सोहोनी यांना १९३०मध्ये कानडे पारितोषिक, १९३२मध्ये बाल दया कोनवार ब्रिज भुखणदास शिष्यवृत्ती, १९३६मध्ये सर विल्यम वेडरबर्न शिष्यवृत्ती, तसेच के.टी. तेलंग सुवर्णपदक व पारितोषिक आणि सर फिरोजशहा मेहता व सर लॉरेन्स जेकिन्स शिष्यवृत्ती आदींचा लाभ झाला.

१९३६मध्ये आय.सी.एस.साठी त्यांची निवड

झाली. तेथून केंब्रिजला जाऊन त्यांनी अर्थशास्त्रातील ‘ट्रायपॉस’ ही सन्माननीय पदवी मिळवली. याशिवाय डॉ. जे.ई. टॉमस यांच्या मार्गदर्शनाखाली भारतीय इतिहासातील ‘इन्डोबॅक्ट्रिअन’वर संशोधन केले. इंग्लिश, मराठी, हिंदी, उर्दू, गुजराती या भाषा त्यांना उत्तम प्रकारे अवगत होत्या. तसेच संस्कृत, प्राकृत व पाली या भाषांचेही ज्ञान होते.

आय.सी.एस. पदवी घेऊन ते १९३८मध्ये भारतात परतले. त्यांनी १९४५पर्यंत बिहारमधील निरनिराळ्या जिल्ह्यात प्रशासकीय काम केले. नंतर ओरिसा राज्यात १९४९पर्यंत राजकीय विभाग, नियोजन विभाग इत्यादी क्षेत्रात काम केले. ओरिसा राज्यातील संस्थाने भारतामध्ये विलिन करण्यासाठी त्यांनी महत्त्वपूर्ण मसुदा तयार केला. ही त्यांची सर्वात महत्त्वाची कामगिरी म्हटली पाहिजे. हा मसुदा इतर संस्थानांनाही लागू करण्यात आला. १९४९मध्ये ते बिहारला परतले आणि अनेक विभागांचे सचिव म्हणून त्यांनी तेथे काम केले. १९५२-१९५३ साली त्यांनी विभागीय कमिशनर आणि कमिशनर म्हणून पाटणा विभागाचे काम पाहिले. १९६४-१९७२ या काळात त्यांनी महत्त्वाच्या अनेक पदांवर काम केले. बिहार सरकारचे प्रमुख सचिव आणि बिहारच्या राज्यपालांचे मुख्य अधिकारी म्हणून त्यांनी काम पाहिले. त्यांचा प्रदीर्घ प्रशासकीय अनुभव लक्षात घेऊन बिहार सरकारने लोकायुक्त म्हणून १९७२ ते १९७८पर्यंत त्यांची नेमणूक केली.

भारतीय संस्कृती आणि इतिहास याविषयी ४००हून अधिक शोधनिबंध त्यांनी प्रसिद्ध केले. डॉ. राजेंद्रप्रसाद लिखित ‘चंपारण में महात्मा गांधी’ या पुस्तकाची सुधारित आवृत्ती त्यांनी तयार केली. ‘जर्नल ऑफ बिहार रिसर्च सोसायटी’चे ते १० वर्षे प्रमुख संपादक होते. ‘इंडिया न्यूमिस्मॅटिक क्रॉनिकल’ या जुन्या नाण्यांच्या अभ्यासविषयक मासिकाचे ते संस्थापक-संपादक होत. १९६४ साली भरलेल्या भारतीय मुद्रा परिषदेचे व बोधगया येथील जागतिक बुद्धिस्ट ॲकॅडमीचे ते अध्यक्ष होते. सोहोनी यांनी अत्यंत महत्त्वपूर्ण ग्रंथलेखन केले आहे. ‘महावंश टीका’, ‘दि ऑम्बुड्समन इन इंडिया’, ‘सिटीज डिस्क्राइब्ड बाय कालिदास’ ही त्यांची पुस्तके अत्यंत प्रसिद्ध आहेत.

सोहोनी यांना प्राचीन मूर्ती, शिल्पे, ताम्रपट, सनदा, चित्रे वगैरे गोळा करण्याची आवड होती. या ऐतिहासिक ऐवजांच्या संग्रहाचे पाटणा येथील राष्ट्रीय संग्रहालयात एक विशेष दालन आहे.

त्यांना अनेक मान-सन्मानांनी व पुरस्कारांनी गौरवण्यात आले असून, १९६०मध्ये दरभंगा विद्यापीठाची विद्यावाचस्पती, १९७०मध्ये नालंदा विद्यापीठाची विद्यावारिधी, १९७२मध्ये विक्रम विद्यापीठाची डी.लिट्. या पदव्यांचा त्यांत अंतर्भाव आहे.

— संपादित

**संदर्भ :**

१. *मराठी विश्वचरित्रकोश; संपादक - कामत, श्रीराम पांडुरंग; विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा.*

## स्टाइन, मार्क ऑरेल

**पुराणवस्तुसंशोधक, संग्राहक व लेखक**

**२ नोव्हेंबर १८६२ — १९४३**



मार्क ऑरेल स्टाइन यांचा जन्म हंगेरीत झाला व शिक्षण बुडापेस्ट, व्हिएन्ना, लाइपोझिग, ऑक्स्फर्ड व लंडन येथे त्यांचे शिक्षण झाले. संस्कृत भाषा व सर्व्हे यांचे शिक्षण घेतल्यावर ते प्रथम लाहोर ओरिएन्टल कॉलेजचे प्रिन्सिपॉल व नंतर पंजाब युनिव्हर्सिटीचे रजिस्ट्रार झाले. याच वेळी दहा वर्षे परिश्रम करून त्यांनी ‘राजतरंगिणी’ची सटीप व भाषांतरित आवृत्ती काढली.

प्रथम १८९८मध्ये बूनेर फील्डफोर्सबरोबर व नंतर आशिया खंडात त्यांनी अनेक सफरी काढल्या (१९००मध्ये, १९०६-१९०८मध्ये, १९१३-१९१६

मध्ये) व या सफरी करताना त्यांनी मध्ययुगीन फाहियान, सूनूयुंग, युआनच्वांग इत्यादी व अर्वाचीन बोनिन, पी. पेलिओ, स्वेन हेडिन (१८९६) वगैरेंच्या प्रवास वृत्तांचा उपयोग केला.

त्यांना तुर्फानच्या परिसरात सापडलेल्या अवशेषांची शंभर खोकी वाहण्यास पन्नास उंट लागले. दुनहुआंग येथील सहस्रगुंफेत मिळालेली हस्तलिखिते व चित्रे यांनी चौतीस पेटारे भरले. दुसऱ्या सफरीत त्यांनी ऐंशी उंटांवर एकशे ब्याऐंशी खोकी आणली. त्यांनी आणलेल्या अवशेषांनी दिल्लीतील सेंट्रल एशियन अँटिक्विटीज म्युझियमचे दोन्ही भाग व्यापले आहेत. तसेच त्यांनी आणलेल्या विपुल अवशेषांपैकी पुष्कळ युरोपातील म्युझियममध्ये विखुरलेले आहेत. त्यात हजारो प्रकारच्या वस्तू आहेत. यातील लिपी व भाषा आज नष्ट झाल्या असून त्या समजून घेण्याचा प्रयत्न चालू आहे. हे सर्व साहित्य इ.स. पूर्व २ ते इ.स.च्या ११व्या शतकापर्यंतचे आहे.

यासाठी त्यांना बर्फाची व वाळूची वादळे टाळून पुष्कळ ठिकाणी उत्खनन करावे लागले. पुढे पुढे यांच्या या प्रचंड हव्यासास स्थानिक लोकांचा विरोध होऊ लागला व घेतलेल्या वस्तूही परत कराव्या लागल्या. पुराणवस्तूंचे राष्ट्रीय महत्त्व लक्षात घेऊन चीन सरकारने त्यांच्या मंगोलियातील सफरीस बंदी केली. त्यांनी आपले सफरीवरील ग्रंथ शास्त्रीय व लोकप्रिय अशा दोन्ही प्रकारच्या भाषेत लिहिले आहेत.

१९४०मध्ये त्यांनी वैदिक संस्कृतींचे माहेरघर असलेल्या सरस्वतीच्या खोऱ्यात संचार केला. ती नदी आज अंशत: लुप्त असून प्रदेश वालुकामय आहे. घग्गर किंवा हकडा असे नदीचे नाव आहे. त्या बिकानेर, जैसलमीर वगैरे भागात यांना वैदिक अवशेष सापडले नाहीत.

सिंधू नदीचे खोरे व लासवेला संस्थान (सिंधू नदी, अरबी समुद्र व बलुचिस्तान यामधील प्रदेश) या भागात त्यांनी १९४१-४२मध्ये संचार केला व अफगणिस्तानात गेले असता तिकडे ते मृत्यू पावले.

स्टाइन यांचे ग्रंथ - (1) Sand-buried Ruins of Khotan, (2) Ancient Khotan (२ खंड, १९०८), (3) Ruins of Desert Cathay (२ खंड, १९१२), (4) Serindia (५ खंड, १९२१), (5) The Thousand Buddhas, (6) Memoir on Maps of Chinese Turkestan and Kansu (२ खंड), (7) Innermost Asia (४ खंड, १९२८), (8) On Alexander's Track to the Indus, (9) On Central-Asian Track (1933), (10) Old Routes of Western Iran. याशिवाय गेड्रोशिया, वझिरीस्थान, बलुचिस्थान येथील सफरींची प्रवासवृत्ते.

संपादित ग्रंथ - १. Chronicles of the King of Kashmir (कल्हणकृत, संस्कृत ग्रंथ १८९२, अनुवाद १९००), २. राजतरंगिणी, ३. हातिम्स टेल्स, ४. संस्कृत-इंग्रजी डिक्शनरी इत्यादी.

– संपादित

**संदर्भ :**

*१. अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*

## स्पिंक, वॉल्टर

**अजिंठा लेणी अभ्यासक**

**१६ फेब्रुवारी १९२८**



प्रो. वॉल्टर स्पिंक यांचा जन्म वोर्सेस्टर (यू.एस.ए.) येथे झाला. उच्च शिक्षणानंतर पुरातत्त्वशास्त्रातील ‘Rock-Cut-Monuments of the Andhra Period : Style and Chronology’ या विषयावर त्यांनी पीएच.डी. पूर्ण केली. १९६१ पासून आजपर्यंत त्यांनी मिशिगन विद्यापीठात अध्यापन केले आहे. या कालखंडात त्यांनी ‘अजिंठा’ येथील जगप्रसिद्ध लेण्यांवर अध्ययन व संशोधन केले आहे. वॉल्टर स्पिंक यांचे सर्वांत महत्त्वाचे कार्य म्हणजे, अजिंठ्याची लेणी ही वीस वर्षांत कोरली गेली आहे,

हे सर्वांत प्रथम त्यांनी दाखवून दिले आहे. अजिंठ्यावर त्यांनी लिहिलेली १) 'Arguments about Ajanta, Painting' २) 'Painting, Sculpture, Architecture Ajanta : Year by Year' ३) The End of the Golden Age, Cave by Cave. ही पुस्तके समग्र व अभ्यासपूर्ण आहेत. तसेच त्यांचे 'Ajanta to Ellora' हा 'मार्ग' या नियतकालिकाचा विशेष अंक सर्व विद्वानांनी शिरोधार्य मानला. त्यांनी अजिंठा व इतर लेण्यांवर ७०हून अधिक शोधनिबंध व पुस्तके लिहिली आहेत. त्यांना ३०हून अधिक शोध अनुदाने मिळाली. ज्यामध्ये प्रामुख्याने 'अमेरिकन इन्स्टिट्यूट ऑफ इंडियन स्टडीज'चे अजिंठा येथील काम, 'Indonesia' साठीची 'Fullbright Scholarship' यांचा समावेश आहे. २०हून अधिक शोध संस्थांचे माननीय सभासदत्व व कित्येक कार्यशाळांमध्ये बीजभाषण त्यांनी दिले आहेत. वॉल्टर स्पिंक यांनी अजिंठ्याच्या प्रसिद्धीकरिता दरवर्षी सर्वसामान्य लोकांकरिता शिबिरे आयोजित केली. त्या शिबिरांच्या माध्यमातून त्यांनी अजिंठा येथील भित्तिचित्रे व त्यांचे महत्त्व सामान्य लोकांना पटवून दिले. त्यांच्या प्रयत्नांनी सर्वसामान्य जनतादेखील या लेण्या व त्यामधील उत्कृष्ट वारशाविषयी जागरूक झाली. त्यांचे मार्गदर्शन प्राप्त झाल्यामुळे बरेच कला अभ्यासक प्रोत्साहित झाले.

वॉल्टर स्पिंक यांचे अजिंठ्यावरचे प्रेम वयाच्या ८५ वर्षीदेखील तेवढेच आहे. दरवर्षी चार महिने अजिंठा-वेरूळ येथे त्यांचे वास्तव्य असते. प्रत्येक वेळी तेवढ्याच उत्साहाने ते विद्यार्थ्यांना शिकवत असतात. अजिंठा लेण्यांसाठी त्यांचे अतुलनीय योगदान आहे; ते शब्दांत मांडणे कठीण आहे. त्यांनी केलेले लेखन अनंतकाळपर्यंत अजिंठ्यांच्या चित्रांना बोलते करीत राहील.

– डॉ. श्रीकांत जाधव

***

स

# ह

## हरदास, बाळशास्त्री
**श्रीरंभट्टलवार, बाळाराव व्यंकटेश**
**संस्कृतज्ञ, लेखक**
**३० ऑगस्ट १९१८ – ११ ऑगस्ट १९६८**



आंध्र प्रदेशातून महाराष्ट्रात येऊन स्थायिक झालेल्या घराण्यांपैकी एक महत्त्वाचे घराणे म्हणजे श्रीरंभट्टलवार यांचे होय. गोदावरीच्या उत्तर किनाऱ्यावरील चिन्नूर या गावी विश्वनाथ महाराज श्रीरंभट्टलवार राहत होते. उग्र तपश्चर्या, वेदांचे प्रखर अध्ययन, निःस्पृहता, अपरिग्रह या सर्व श्रेष्ठ गुणांमुळे आंध्रात त्यांचे नाव मोठ्या मानाने घेतले जाई. लोक त्यांना आदराने 'सांबावतारम्' म्हणत असत. विश्वनाथ व पार्वती यांना एक मुलगा व एक मुलगी होती. मुलाचे नाव नारायण होते. नारायण दोन वर्षांचा असताना विश्वनाथरावांचे निधन झाले व पार्वतीबाई मुलांना घेऊन आपल्या माहेरी, नागपूरला आल्या.

नारायणाला हरिभजनाचेच आकर्षण अधिक होते. त्यांनी नागपूरजवळ असलेल्या सहस्रचंडी मंदिरातील ब्रह्मचारी महराजांकडून मंत्रदीक्षा घेतली. त्यांची उपासना बघून लोक त्यांना नारायण महाराज तेलंग असे म्हणू लागले. या नारायण महाराजांना व्यंकटेश नावाचा एकुलता एक मुलगा होता. मोठेपणी हा उत्तम कीर्तनकार झाला. लोक त्यांचा उल्लेख 'व्यंकोबा हरदास' असा करू लागले. श्रीरंभट्टलवार घराण्याचा हरदास या आडनावापर्यंतचा प्रवास हा असा आहे. व्यंकोबांना बाबूराव व बाळाराव अशी दोन मुले होती.

बाळारावांचा जन्म श्रावण वद्य नवमीला, नागपूरमध्ये झाला. बाळारावांचे प्राथमिक शिक्षण आदितवार दरवाजा शाळेमध्ये व माध्यमिक शिक्षण कायदे हायस्कूलमध्ये झाले. सर्व विषयांत त्यांची उत्तम प्रगती होती; पण गणित मात्र त्यांना जमत नसे. एकदा गणिताचे शिक्षक त्यांना म्हणाले की, ''अरे, अशाने तू आपल्या घराण्याचं नाव बुडवशील.'' बाळाराव संतापले व म्हणाले, ''सर, माझ्या घराण्याचा लौकिक गणितात नाही. मी तो उंचावूनच दाखवीन.'' त्यानंतर त्यांनी पुन्हा शाळेचे तोंड पाहिले नाही. त्यांनी पंडितसम्राट कृष्णशास्त्री घुले यांच्याकडे व्याकरणाचा, श्रीनिवासशास्त्री हरदास यांच्याकडे संस्कृत पंचकाव्यांचा व काशीचे पंडित भाऊशास्त्री वझे यांच्याकडे वेदान्ताचा अभ्यास करायला सुरुवात केली. 'काव्यतीर्थ', 'वेदान्ततीर्थ' आणि 'साहित्याचार्य' अशा तीन्ही परीक्षांत ते वयाच्या केवळ अठराव्या वर्षी वरच्या श्रेणीत उत्तीर्ण झाले. यानंतर त्यांनी धर्मग्रंथांचा अभ्यास सुरू केला. त्यांना प्रवचनांची निमंत्रणे येऊ लागली. ते थिऑसॉफिकल सोसायटीत ब्रह्मसूत्र शांकरभाष्यावर प्रवचने देत. ती ऐकायला न्यायमूर्ती सर भवानीशंकर नियोगी, श्रीमंत बाबासाहेब खापर्डे यांसारखे महान श्रोते असत. लोक त्यांना 'बाळशास्त्री' असे म्हणू लागले. संस्कृतच्या अध्ययनाबरोबर आधुनिक काळाला अनुसरून त्यांनी इंग्लिशचाही अभ्यास सुरू केला. धर्मग्रंथांच्या अभ्यासाबरोबरच देशापुढील समस्या शास्त्रीबुवांना महत्त्वाच्या वाटू लागल्या. ते हिंदुत्वनिष्ठ चळवळींतून भाग घेऊ लागले.

भारतभर होत असलेले हिंदूंवरील अत्याचार, धर्मांतर, हिंदू स्त्रियांचे अपहरण, अस्पृश्योद्धार अशा

विविध समस्यांवर हिंदुमहासभा कार्य करत होती. जनजागृतीसाठी श्रीशिवजयंती, शिवराज्यारोहणदिन, टिळक पुण्यतिथी असे उत्सव हिंदुमहासभा साजरे करत होती. या उत्सवांतून शास्त्रीबुवांची जाज्वल्य भाषणे होत. सखोल अभ्यास, धर्माविषयी प्रखर अभिमान असलेले शास्त्रीबुवा विशेषतः तरुणांवर योग्य प्रभाव पाडत. हिंदुमहासभेसाठी सामाजिक व राजकीय कार्य करत असताना शास्त्रीबुवांना १९३९मध्ये भागानगर येथे, १९४१मध्ये भागलपूर येथे आणि १९४९मध्ये रायपूर येथे कारावास घडला.

व्याख्यानांच्या जोडीला अनेक लोकांपर्यंत पोहोचायचे, तर वृत्तपत्रे हे प्रभावी माध्यम आहे. म्हणून त्यांनी नियतकालिकांतून लिखाण सुरू केले. १९४०मध्ये राष्ट्रधर्म प्रसारक संस्थेची स्थापना करून बाळशास्त्री यांनी ग्रंथ प्रकाशनालाही सुरुवात केली. पहिल्याच वर्षी या संस्थेतून प्रकाशित झालेला त्यांचा ग्रंथ म्हणजे 'भाई परमानंदांचे चरित्र'. हिंदुमहासभेच्या प्रसारासाठी त्यांनी स्वतः स्थापन केलेल्या विद्यापीठांमुळे त्यांचा विविध ठिकाणी प्रवास होई अशा परिस्थितीत त्यांना दिसलेल्या बिहारवर, 'What I See in Bihar' हा त्यांचा दुसरा ग्रंथ इंग्लिशमध्ये प्रकाशित झाला. संस्कृत, मराठी, हिंदी व इंग्लिश या चारही भाषांवर सारखेच प्रभुत्व असल्याने त्यांना भाषेची अडचण कधीच जाणवली नाही. त्यांना अनेक ठिकाणांहून व्याख्यानांची निमंत्रणे येऊ लागली.

बाळशास्त्री यांच्या व्याख्यानमाला होऊ लागल्या. काही व्याख्यानमाला १५ ते २८ व्याख्यानांच्यासुद्धा झाल्या. याचे फलित म्हणजे वाल्मिकी रामायण, महाभारत, भगवान श्रीकृष्ण, वेदांतील राष्ट्रदर्शन, छत्रपती शिवाजी, भारतीय स्वातंत्र्यसमर, आर्य चाणक्य, रामायण व महाभारतातील राज्यव्यवस्था अशा राष्ट्रभावना उद्दीपित करणाऱ्या विविध विषयांवरील ग्रंथनिर्मिती. याशिवाय आद्य शंकराचार्य, स्वातंत्र्यवीर वि.दा. सावरकर, स्वामी विवेकानंद, श्रीसमर्थ रामदास, महारुद्र देवतेचे स्वरूप अशा अनेक विषयांवर शास्त्रीबुवांनी व्याख्याने दिली; पण ती ग्रंथरूपात प्रसिद्ध झाली नाहीत. शास्त्रीबुवांचे नियतकालिकांतून सामाजिक, ऐतिहासिक, साहित्यविषयक, व्यक्तिचित्रण करणारे व संतविषयक एवढे लेख आहेत, की त्यांची जंत्री करणे केवळ अशक्य आहे. पुराणकाळविषयक समाजातील गैरसमजुती व अपप्रचारांचेही ते समर्थपणे खंडन करत होते. त्यामुळे बाळशास्त्री यांनी अशा विषयांना वाहिलेले स्वतंत्र लेख लिहिले. याशिवाय, नागपूरच्या 'साप्ताहिक महाराष्ट्र'मधून त्यांनी १९४९ ते १९६३ असे सतत पंधरा वर्षे लेखन केले. हे लेखन म्हणजे विविध विषयांवरील ग्रंथांचे समालोचन होते. हे समीक्षणात्मक लेखनही इतके समृद्ध आहे की, त्या सर्व लेखांचा संग्रह केला, तर जवळपास दोन हजार पृष्ठांचा ग्रंथ सहजी तयार होईल. ते पत्रकार म्हणूनही प्रसिद्ध होते. 'आदेश', 'युगांतर' या साप्ताहिकांचे ते संपादक होते. त्यांनी 'हिंदुहृदय' या नावाचे त्रैमासिकही सुरू केले. हळूहळू ते मासिक, पाक्षिक, साप्ताहिक व दैनिक अशा प्रगतिपथावर नेण्याचा त्यांचा मानस होता.

वैचारिक, समीक्षणात्मक, ऐतिहासिक, सामाजिक असे विविध प्रकारचे लेखन करत असतानाच त्यांची काव्यप्रतिभाही तेवढ्याच ताकदीने बहरत होती. संस्कृत व मराठी अशा दोन्ही भाषांतून त्यांची कविता अभिव्यक्त होत होती. महाभारताच्या विविध प्रसंगांवर, विविध वृत्तांतून त्यांनी रचलेले 'गीतभारत' हे ३५० पृष्ठांचे सटीप काव्य १९७५ साली प्रकाशित झाले.

बाळशास्त्री यांनी वाल्मिकिरामायणाचे समवृत्त रूपांतर मराठीतून करायला सुरुवात केली होती. त्यातील बालकांड व अयोध्याकांड यांतील काही सर्ग रूपांतरित करून झाले, पण दुर्दैवाने ते कार्य अपूर्ण राहिले. बाळशास्त्रींची विद्वत्ता व व्यासंग पाहून गोवर्धनपीठाच्या शंकराचार्यांनी त्यांना 'महामहोपाध्याय' ही पदवी दिली. त्यांच्या ठिकाणी राष्ट्रभक्ती व धर्मभक्ती यांचा सुंदर संगम होता. हिंदू संस्कृतीच्या प्रचारासाठी आसिंधुसिंधू भारतभ्रमण करत असताना त्यांच्या नित्य उपासनेत कोणताही खंड पडला नाही. स्नान, संध्या, जप

व धर्मग्रंथांचे नित्य वाचन हे नियमितपणे होत असे. त्यांना धर्मग्रंथांत भगवद्गीता अत्यंत प्रिय होती. त्याखालोखाल ज्ञानेश्वरीचे स्थान होते.

चतुर्मासात भागवताची प्रत्येकी सात दिवसांचे एक पारायण अशी त्यांची पारायणे होत. पुढेपुढे तर ते 'एकाह भागवत' म्हणजे एका दिवसात संपूर्ण भागवताचा पाठ करू लागले. असे एकाह द्वारका, मथुरा व पुष्कर या ठिकाणी करण्याचा त्यांचा मानस होता. पैकी, द्वारकेचा एकाह पूर्ण झाला. इतर दोन पूर्ण होऊ शकले नाहीत.

हिंदुमहासभा, राष्ट्रीय स्वयंसेवक संघ, विदर्भ साहित्य संघ, महाराष्ट्र संस्कृत परिषद, भोंसला वेदशास्त्र महाविद्यालय, महाराष्ट्र ब्राह्मण सभा, स्वातंत्र्यवीर सावरकर स्मारक समिती, महाराष्ट्र मंडळ, अशा अनेक संस्थांपैकी काहींचे ते अध्यक्ष, तर काहींचे मानद सभासद होते. ज्या संस्थेसाठी त्यांनी कितीही अल्पकाळ काम केले तरी त्या संस्थेला त्यांनी केवळ ऊर्जितावस्थेतच नव्हे, तर सरकारदरबारीही त्या संस्थेची पत वाढेल असे प्रयत्न केले. त्यासाठी विविध योजनांची आखणी, मोठमोठे उत्सव व मोठ्या लोकांना संस्थेत आणणे यांसारख्या गोष्टी ते करत.

शास्त्रीबुवांचे सर्वच ग्रंथ गौरवले गेले; महाराष्ट्र शासनानेही त्यांच्या डॉ. मुंजे यांच्या चरित्राला प्रथम क्रमांक देऊन त्याचा यथायोग्य गौरव केला. श्री. बापूजी अणे त्यांचा 'चालते-बोलते विद्यापीठ' असाच उल्लेख करत. त्यांचे व्यक्तिगत जीवनही स्पृहणीय आहे.

शास्त्रीबुवांना स्वतःच्या घराण्याचा सार्थ अभिमान होता. त्यांचे सर्वांशी जिव्हाळ्याचे संबंध होते. त्यांचे दातृत्वही वाखाणण्यासारखे होते. १९६३पर्यंत उत्तम शरीरयष्टी असणाऱ्या शास्त्रीबुवांना पाठीला काळपुळी झाली. १९६४मध्ये सेल्युलायटिस झाले. १९६५मध्ये पाय मुरगळल्याचे निमित्त होऊन त्यांच्या पायाला भेग पडली व त्यात खडा अडकून त्याचे सेप्टिक झाले. पण १९६७मध्ये त्यांना अनाकलनीय अशी व्याधी झाली. तिचे निदान कोणत्याच डॉक्टरला करता आले नाही आणि अवघ्या सहा महिन्यांत ते अनंतात विलीन झाले. एक ज्ञाननिधी हरपला. संस्कृतीचा अखंड वाहणारा प्रवाह असा अचानक खंडित झाला. एक चालते-बोलते विद्यापीठ अस्तास गेले!

— डॉ. आसावरी बापट

## हेरास, हेन्री

**इतिहासाचे प्राध्यापक, संशोधक व धर्मगुरू**
**११ सप्टेंबर १८८८ — १४ डिसेंबर १९५५**



स्पेनमध्ये हेन्री हेरास यांचे शिक्षण झाल्यावर हिंदुस्थानच्या इतिहासाचे प्राध्यापक म्हणून ते मुंबईच्या सेंट झेवियर कॉलेजमध्ये आले. इंडियन हिस्टॉरिकल रिसर्च इन्स्टिट्यूटचे ते डायरेक्टरही होते. हेन्री हेरास यांना दक्षिण हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासावर प्रकाश टाकणारे अनेक संशोधनात्मक लेख लिहिण्याचा व वस्तू वगैरे जमा करण्याचा नाद होता व त्यांनी अफगाणिस्थान वगैरे भागातून अनेक वस्तू संग्रहित केल्या होत्या.

हेन्री हेरास यांच्या मताप्रमाणे द्रविड संस्कृती अत्यंत प्राचीन पण सुधारणेच्या शिखराला पोहोचलेली होती, तर आर्य हे मागासलेले रानटी होते. हेन्री हेरास यांचा सर्वात महत्त्वाचा शोध म्हणजे मोहेंजोदाडो येथील उत्खननात सापडलेल्या लिपीचा उलगडा करून हेन्री हेरास यांनी तिचे वाचन केले, हा होय. हेन्री हेरास यांचे इंग्रजी ग्रंथ- १. हिस्टरी ऑफ मांचू डायनॅस्टी ऑफ चायना (३ व्हा.) २. दि अरविदु डायनॅस्टी ३. दि रायटिंग ऑफ हिस्टरी वगैरे. याशिवाय त्यांनी स्पॅनिश भाषेतही लेखन केले होते.

— संपादित

**संदर्भ :**

*१. अर्वाचीन चरित्रकोश; संपादक, चित्राव सिद्धेश्वरशास्त्री*

ह

***

# क्ष

## क्षीरसागर, अनुपमा अरविंद
**पुरामापनविज्ञानतज्ज्ञ**
**१३ ऑक्टोबर १९४२**



अनुपमा क्षीरसागर यांनी पुणे विद्यापीठातून अकार्बनी रसायनविज्ञान या विषयात १९६५मध्ये एम.एस्सी. ही पदवी संपादन केली व नंतर दोन वर्षे (१९६५-६६) पुणे विद्यापीठातच रसायनविज्ञान विभागात डेमॉन्स्ट्रेटर म्हणून काम केले. त्यानंतर घरातील जबाबदारी समर्थपणे पार पाडून १९७७ मध्ये संशोधनाच्या क्षेत्राकडे परतल्या व डेक्कन महाविद्यालयामध्ये पुरातत्त्व विभागात १९८० मध्ये संशोधन साहाय्यक या पदावर रुजू झाल्या.

डेक्कन महाविद्यालयामध्ये पुरातत्त्व विभागात नोकरी करत असतानाच त्यांनी प्रा. रामचंद्र जोशी या भारतातील सुप्रसिद्ध पुरातत्त्वीय भूवैज्ञानिकाच्या मार्गदर्शनाखाली १९८४मध्ये डॉक्टरेट ही पदवी संपादन केली. त्यांच्या प्रबंधाचा विषय 'Fluorine and other Chemical Studies of Quaternary Animal Fossils from India' असा होता. अनुपमा क्षीरसागर यांना १९८४-१९८५मध्ये स्वीडिश इन्स्टिट्यूटतर्फे शिष्यवृत्ती मिळाली व या अंतर्गत त्यांनी स्टॉकहोमच्या सुप्रसिद्ध आर्किओलॉजीकल रिसर्च लॅबोरेटरीत सहा महिने संशोधन केले व पुरामापनविज्ञानात प्रावीण्य मिळवले.

सेवानिवृत्त होईपर्यंत अनुपमा क्षीरसागर यांनी पुरारसायनविज्ञान (Archaeological Chemistry) आणि पुरामापनविज्ञान (Archaeometry) या विषयांमध्ये संशोधनाचे व अध्यापनाचे कार्य केले. प्राचीन आहार हा त्यांच्या संशोधनाचा एक प्रमुख विषय होता. तसेच त्यांनी कालमानाची रासायनिक पद्धत यशस्वीपणे वापरून भारतातील अनेक ठिकाणी प्राप्त झालेल्या अश्मीभूत अस्थींचे कालमापन केले. त्यामध्ये इनामगाव, वाळकी व कवठे या खेरीज डेक्कन महाविद्यालयामध्ये महाराष्ट्रात उत्खनन झालेल्या स्थळांचा समावेश आहे.

त्यांच्या संशोधनावर आधारित एक पुस्तक व ५० शोधनिबंध प्रसिद्ध आहेत. त्यांची 'प्राचीन संस्कृतीचे कालमापन' ही मराठीतून पुस्तिका पुरारसायनविज्ञानाची सर्वसामान्य वाचकांना अत्यंत उपयुक्त आहे. त्यांनी 'मराठी विश्वकोश', 'संशोधक', 'सकाळ', 'केसरी' यांमधून अनेक मराठी लेख प्रसिद्ध झाले आहेत.

– डॉ. प्रमोद जोगळेकर

***

# परिशिष्ट – १ : संस्था परिचय

## क.जे. सोमय्या भारतीय संस्कृती पीठम्

क.जे. सोमय्या भारतीय संस्कृती पीठम्चे मूळ उद्देश दोन :

- मूल्यांचे शिक्षण देणे

- भारतीय संस्कृती, तत्त्वज्ञान, इतिहास आणि संस्कृत भाषा यांच्या शिक्षणासाठी आणि त्यातील संशोधनासाठी संधी उपलब्ध करून देणे. या हेतूने हे स्थापन झाले.

स्थापना : थोर मानवतावादी, दानशूर आणि द्रष्टा असलेल्या पद्मविभूषण कै. क.जे. सोमय्या यांनी २० ऑक्टोबर १९८९ रोजी क.जे. सोमय्या भारतीय संस्कृती पीठम्ची स्थापना केली.

पीठम्मध्ये भारतीय संस्कृती, तत्त्वज्ञान, भारतीय शास्त्रे–पुराणे, धर्मांचा तौलनिक अभ्यास, संस्कृत भाषा आणि संबंधित विषयांवर १६००० ग्रंथांचे ग्रंथालय आहे. त्याशिवाय वेळोवेळी झालेल्या परिसंवादात विद्वानांनी दिलेल्या संस्कृत, इंग्लिश, मराठी, हिंदी भाषांमधील भाषणांच्या, व्याख्यानांच्या ध्वनीफिती, सीडी, डीव्हीडी यांचा संग्रह आहे.

संस्कृत आणि योग याविषयी पदविका, पदवी, पदव्युत्तर पदविका आणि पीएच.डी. अभ्यासक्रम चालवण्यासाठी महाराष्ट्र सरकारने पीठम्ला कायमस्वरूपी परवानगी दिली आहे.

संस्कृत भाषा, इतिहास आणि धर्मांचा तौलनिक अभ्यास (तत्त्वज्ञान) या विषयांमध्ये संशोधक करण्यासाठी मुंबई विद्यापीठाचे पीठम्ला मान्यता दिलेली आहे. मंडळाच्या धर्मशिक्षणातील पदविका व पदवी अभ्यासक्रमाला मुंबई विद्यापीठाने मान्यता दिलेली आहे.

पीठम्च्या 'भारतीय संस्कृती व मूल्ये' या अभ्यासक्रमाला महाराष्ट्र शासनाने मान्यता दिली आहे.

महाराष्ट्र शासनाने सन १९९५मध्ये पीठम्ला 'संस्कृतीविषयक संशोधन केंद्र' म्हणून मान्यता दिली आहे.

क.जे. सोमय्या भारतीय संस्कृती पीठम् हे भारतीय परंपरांचा वा शाश्वत मूल्यांचा जगभर प्रसार होऊन जगात सदैव शांती, समता व बंधुत्व नांदावे यासाठी वेगवेगळ्या धर्मांमध्ये सुसंवाद घडवण्याचा प्रयत्न करीत असते. त्याचप्रमाणे शिक्षणाद्वारे सर्वसामान्यांना भारताच्या परंपरांची ओळख करून देण्याचे प्रयत्न करीत असते.

त्या दृष्टीने हिंदू व ख्रिश्चन या धर्मांमध्ये सुसंवाद साधण्यासाठी पीठम्ने पुढाकार घेतला आहे. पीठम्च्या धर्माच्या तौलनिक अभ्यासक्रमात चर्चमधील विद्वान मंडळी येऊन व्याख्याने देतात. तसेच चर्चने आयोजित केलेल्या कार्यक्रमात पीठम्मधील शिक्षक सहभागी होतात. व्हॅटिकनमधील संबंधित अधिकारी मंडळानेही पीठम्च्या या स्तुत्य प्रयत्नांची नोंद घेतली आहे. पीठम्च्या प्रतिनिधी मंडळाला त्यानिमित्ताने पोप जॉन पॉल (द्वितीय) यांचे आशीर्वादही लाभले आहेत.

आतापर्यंत पीठम्ने हिंदू-ख्रिश्चन धर्माची १८ चर्चासत्रे आयोजित केली आहेत. त्यापैकी तीन रोममध्ये भरली होती.

रोमसह इतरत्र विविध चर्चासत्रे पीठम् द्वारा आयोजित केली गेली आहेत. सन २००५मध्ये पोप बेनेडिक्ट (सोळावे) यांच्या पदग्रहण प्रसंगी पीठम्च्या प्रतिनिधींनी हिंदू धर्माचे प्रतिनिधित्व केले होते.

सन २००५पासून पीठम्ने आंतरधर्मीय संवादामध्ये इस्लामशी सुसंवाद साधण्यास सुरुवात केली आहे. पीठम्च्या डॉ. कला आचार्य या मुस्लीम संस्थांनी आयोजित केलेल्या अशा चर्चासत्रात/परिसंवादात सहभागी होतात.

**– र.वि. नातू**

✲✲✲

# भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे

इतिहास संशोधकांना ऐतिहासिक साधने पुरवणारी आणि संशोधनाचे प्रशिक्षण देणारी ही संस्था आहे. इतिहास संशोधकांना ऐतिहासिक साधने शोधण्यास बरेच कष्ट होतात व वेळ लागतो. तो वाचवणारी व जिथे ऐतिहासिक साधने सहज मिळू शकतील अशी एखादी संस्था असावी, अशी वि.का. राजवाडे यांची तीव्र इच्छा होती आणि सरदार मेहेंदळे यांनी त्यांच्या या इच्छेला पूर्ण साहाय्य करण्याची तयारी दर्शवली.

७ जुलै १९१० रोजी ख्यातनाम इतिहासकार विश्वनाथ काशीनाथ राजवाडे आणि सरदार खंडेराव चिंतामणी मेहेंदळे यांनी पुणे येथील अप्पा बळवंत चौकातील मेहेंदळे यांच्या वाड्यात मंडळाची स्थापना केली. त्या पहिल्या कार्यक्रमाला राजवाडे यांनी त्यांचा निबंध वाचला. तो ऐकायला एकच श्रोता होता - सरदार मेहेंदळे! पुढे मंडळ सदाशिव पेठेतील इमारतीत गेले.

राजवाडे सन १९२६मध्ये पुणे सोडून धुळे येथे गेले. मात्र मंडळाचे काम पुण्यात जोमात सुरू होते आणि त्यामुळे इतिहास संशोधकांना त्यांच्या संशोधनकार्यास खूप साहाय्य व प्रोत्साहन मिळाले. अनेक उदार व्यक्तींनी नंतर मंडळाला आपल्याकडील कागदपत्रे, वस्तू व देणग्या देऊन उपकृत केले. राजवाडे यांचे शिष्य दत्तो वामन पोतदार, गणेश हरी खरे आणि वासुदेव सीताराम बेंद्रे यांनी मंडळाच्या उन्नतीसाठी मोलाची कामगिरी केली.

**ऐतिहासिक साधने**

मंडळाच्या संग्रहामध्ये आज जवळजवळ १५ लाख ऐतिहासिक कागदपत्रे आणि ३० हजारपेक्षा जास्त पोथ्या/बाडे आहेत. ते जास्त करून मराठी, मोडी, पर्शियन, पोर्तुगीज व इंग्लिश या भाषांमध्ये आहेत. शिवाय ४००० नाणी, १००० चित्रे, शिल्पाकृती व शिलालेखही आहेत.

मंडळाच्या ग्रंथालयात २७,००० ग्रंथ आहेत. त्यामध्ये मराठी साम्राज्याचा इतिहास, मराठी संस्कृती आणि मराठी साहित्य यावरील ग्रंथ आहेत. इंग्लिश राजवट व मोगल सत्तेसंबंधीची कागदपत्रे येथे आहेत. हे ग्रंथ संशोधकांना / अभ्यासकांना तिथे नि:शुल्क वाचावयास मिळतात वा अल्प शुल्क भरून वाचावयास घरी नेता येतात.

मंडळातर्फे 'त्रैमासिक' नावाचे एक नियतकालिक प्रकाशित केले जाते, ज्यात नवे संशोधनपर निबंध, लेख प्रसिद्ध केले जातात. मंडळातर्फे नामवंत इतिहासकारांचे ग्रंथही प्रकाशित केले जातात. तरुण अभ्यासकांसाठी व इतिहास संशोधकांसाठी मार्गदर्शनपर व्याख्याने, चर्चासत्रे, प्रशिक्षण शिबिरे आयोजित केली जातात. वार्षिक अधिवेशनांचे अहवालही प्रकाशित केले जातात.

भारत इतिहास संशोधक मंडळाला सन २००९मध्ये शंभर वर्षे पूर्ण झाली. त्यानिमित्ताने मंडळाच्या संग्रहातील जीर्ण कागदपत्रांचे जतन करण्यासाठी त्यांचे मायक्रोफिल्मिंग व डिजिटलायझेशन करण्याचा मंडळाचा संकल्प आहे. त्यासाठी एक कोटी रुपयांचा कायम निधी जमा करून त्याच्यातून येणाऱ्या व्याजातून हे काम पूर्ण करण्याचा विचार आहे.

**मंडळाच्या निवडक प्रकाशनांची यादी**

- चित्रांचा संग्रह
- वार्षिक शोधनिबंध, वार्षिक अधिवेशनांचे अहवाल, 'त्रैमासिक'
- भारतीय इतिहाससंबंधी निवडक निबंध
- विजयनगर स्मृतिग्रंथ
- साधन चिकित्सा

**मंडळात उपलब्ध असलेली विशेष ऐतिहासिक साधने**

- शिवकालीन कागदपत्रे
- मराठा इतिहासाची साधने - वि.के. राजवाडे संपादित
- मध्ययुगीन दख्खनच्या इतिहासाची साधने

**– र.वि. नातू**

***

# गीताधर्म मंडळ, पुणे

लोकमान्य टिळक जयंतीला २३ जुलै १९२४ रोजी गीताधर्म मंडळाची स्थापना करण्यात आली. मंडळाचे संस्थापक अध्यक्ष होते वेदान्ताचार्य गीतावाचस्पती सदाशिवशास्त्री भिडे आणि संस्थापक कार्यवाह होते ग.वि. केतकर.

मंडळाच्या स्थापनेनंतर १९२४मध्ये भिडेशास्त्री यांनी भारतभर दौरा केला आणि गीताधर्म मंडळाचा प्रसार केला, तर केतकर यांनी वृत्तपत्रांतून गीताविषयक विपुल लिखाण केले. गीतापठणाच्या स्पर्धा आयोजित केल्या. या त्यांच्या प्रयत्नांनी मार्गशीर्ष शुद्ध एकादशी हा दिवस 'गीता जयंती' म्हणून साजरा केला जाऊ लागला.

स्थापनेपासून भिडेशास्त्री यांच्या भाड्याच्या घरात, सदाशिव पेठेत मंडळाचे कार्य चालत असे. शास्त्रीबुवांच्या निधनानंतर (१९४०नंतर) ते खालकर तालीम चौकातील गोडबोले वाड्यात आणले गेले. १९७० साली मंडळाने सदाशिव पेठेत १०,००० चौ. फुटांची वास्तू खरेदी केली. तीच ११४१ भिडेवाडा, सदाशिव पेठ होय.

'गीतादर्शन' या मासिकाची सुरुवातही १९७०मध्येच झाली. पी.डी.ए. या प्रसिद्ध नाट्यसंस्थेचे संस्थापक व भारतीय संस्कृतीचे अभ्यासक भालबा केळकर यांनी १९८३-८९ या काळात मंडळाचे अध्यक्षपद भूषवले. त्यांच्या कार्यकालात मंडळाच्या 'धर्मार्थ होमिओपॅथिक दवाखान्याची' सुरुवात झाली. तसेच 'गीताधर्म दैनंदिन ज्ञानसत्राचा' अव्याहत उपक्रम (व्याख्याने/प्रवचने) सुरू झाला.

१९९३-१९९९ या कालखंडात दर वर्षी एका विषयावर सलग २१ दिवसांच्या व्याख्यानमालेचे आयोजन करण्यात आले. त्यात श्रीज्ञानेश्वर, श्रीनामदेव, श्रीएकनाथ, श्रीतुकाराम, श्रीसमर्थ रामदास तसेच ग्रंथराज ज्ञानेश्वरी आणि श्रीमद्भगवद्गीता या विषयांवर महाराष्ट्रातील नामवंत वक्त्यांची व्याख्याने होत. याच कालखंडामध्ये 'मराठी तत्त्वज्ञान महामंडळ, (पुणे), या नामवंत संस्थेचे गीताधर्म मंडळात विलीनीकरण झाले. नंतरच्या कालखंडात संतसाहित्याच्या अभ्यासिका व प्रसिद्ध प्रवचनकार डॉ. कल्याणी नामजोशी यांनी अध्यक्षपद भूषवले. त्यांच्या कार्यकाळात गीता संथा वर्ग, दैनंदिन ज्ञानसत्र व प्रकाशन या उपक्रमांना विशेष गती मिळाली. इ.स. २०१०पासून नामवंत संतसाहित्य अभ्यासक, लेखक गीताधर्म मंडळाचे अध्यक्ष आहेत.

**गीताधर्म मंडळाचे उल्लेखनीय कार्य :**

- १९२४पासून गीताधर्माच्या प्रचार–प्रसाराची निरलस सेवा.
- १९७०पासून 'गीतादर्शन' या सांस्कृतिक मासिकाचे प्रकाशन.
- दैनंदिन अखंड ज्ञानसत्र (व्याख्यान, प्रवचन, कीर्तन).
- पत्रद्वारा 'गीताव्रती', 'ज्ञानेश्वरी प्रबोध' आणि 'श्री तुकोबाराय गाथा प्रवेश' हे अभ्यासक्रम.
- गीता संथा वर्ग – विनाशुल्क साखळी वर्ग.
- विशेष ग्रंथ प्रकाशन.
- समृद्ध ग्रंथालय.
- गीता कंठस्थ स्पर्धा, अध्यायवार पाठांतर स्पर्धा, उन्हाळी व हिवाळी संस्कारवर्ग, ज्ञानरंजन शिबिर, संस्कृत संभाषण वर्ग, सूर्यनमस्कार वर्ग वगैरे.

**– र.वि. नातू**

❊❊❊

# वैदिक संशोधन मंडळ, पुणे

प्रकांडपंडित लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांच्या स्मृतीनिमित्त १ ऑगस्ट १९२८ रोजी 'वैदिक संशोधन मंडळा'ची स्थापना करण्यात आली. वै. का. राजवाडे, न.चिं. केळकर, वि. प्र. लिमये, नानासाहेब सोनटक्के, ज.स. करंदीकर यांनी पुढाकार घेऊन वेदवाङ्‌मयाचा विशेष अभ्यास करण्याच्या उद्देशाने हे मंडळ स्थापन केले.

वेदवाङ्‌मयाच्या उच्चस्तरीय अभ्यासासाठी सोयी उपलब्ध करून देणे, वेदसंबंधित ग्रंथांचा, पोथ्यांचा संग्रह करणे, वेद व त्यासंबंधी मूलभूत ग्रंथांच्या सटीक आवृत्तीचे प्रकाशन करणे, वेदाच्या अभ्यासास उपयुक्त अशा सूची, समीक्षणे इत्यादींचे प्रकाशन करणे आणि वेदविषयक संशोधनास चालना देणे ही मंडळाची उद्दिष्टे होती.

मंडळाचे बोधवचन आहे, 'अगन्म ज्योतिरुत्तमम्'. याचा अर्थ आम्ही सर्व मिळून श्रेष्ठ तेजाकडे जाऊ!

वै.का. राजवाडे वैदिक संशोधन मंडळाचे पहिले अध्यक्ष होते. सध्या डॉ. सरोजा भाटे व्यवस्थापक समितीच्या अध्यक्षा आहेत व डॉ. भाग्यलता पाटसकर संचालिका आहेत.

सन १८५४मध्ये जर्मन पंडित मॅक्स म्यूलर याने सायण भाष्यासह ऋग्वेद पहिल्यांदा छापला; परंतु त्यामध्ये भारतात प्रचलित असलेल्या मौखिक परंपरेचा परामर्श घेतला गेला नव्हता. तसेच त्यात दोन-तीन त्रुटीही राहिल्या होत्या. या ऋग्वेदाची सुधारित व निर्दोष आवृत्ती काढण्यापासून मंडळाच्या कार्यास सुरुवात झाली.

सन १९८३मध्ये भारत सरकारकडून मंडळाला 'आदर्श संस्कृत शोध संस्था' हा दर्जा देण्यात आला. म्हणून मंडळाचे नाव 'वैदिक संशोधन मंडळ (आदर्श संस्कृत शोध संस्था)' पुणे असे लिहिले जाते.

मंडळास राष्ट्रीय संस्कृत संस्थान (नवी दिल्ली) व तंत्र व उच्च शिक्षण संचालनालय (महाराष्ट्र शासन) यांच्याकडून पूर्ण अनुदान मिळते. आदर्श संस्कृत शोध संस्थेचे अध्यक्ष केंद्र सरकारकडून नेमले जातात. हल्ली डॉ. रवींद्र अंबादास मुळ्ये (प्राध्यापक, संस्कृत प्रगत अध्ययन केंद्र, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ) हे अध्यक्ष आहेत.

ग्रंथालय, हस्तलिखितांचा संग्रह, प्रकाशने व अवेस्ता विभाग हे मंडळाचे विविध विभाग आहेत.

**ग्रंथालय :** वेद व आनुषंगिक विषयांची बहुतेक पुस्तके येथे आहेत. पाश्‍चिमात्य व भारतीय संशोधकांचे ग्रंथ

येथे आहेत. मॅक्स म्यूलर यांनी सायण भाष्यासहित प्रकाशित ऋग्वेदाची पहिल्या आवृत्तीची प्रत येथे आहे. श्रीधर व्यंकटेश केतकर यांचे महाराष्ट्रीय ज्ञानकोशाचे सर्व खंड मंडळाच्या संग्रही आहेत.

**हस्तलिखितांचा संग्रह :** मंडळात जवळपास १६००० हस्तलिखिते आहेत. त्यापैकी १०००० हस्तलिखितांची वर्णनात्मक सूची तयार आहे. यामध्ये श्रौतप्रयोग, दर्शने व अभिधान, रामायण-महाभारत, पुराणे, शांति व प्रायश्चित्त, ज्योतिष व आयुर्वेद या विषयांवरील हस्तलिखितांचा समावेश आहे. १५३०मधील 'शतपथ ब्राह्मण' हे मंडळातील सर्वात जुने हस्तलिखित आहे. ताडपत्रावरील पोथ्या, भूर्जपत्रावरील पोथ्या, लेखनसामग्री यांचे कायमस्वरूपी प्रदर्शन मंडळात आहे.

यज्ञामध्ये वापरली जाणारी उपकरणे – उदा. अग्निमंथनाची आरणी, यज्ञकुंडाची भूमी तयार करावयाची उपकरणे, यज्ञात वापरायच्या पळ्या, चमस, सोमरसाची पात्रे प्रदर्शनात मांडली आहेत. तसेच यज्ञकुंडाचे आराखडे व प्रतिकृतीही आपल्याला पाहावयास मिळतात.

मंडळात वेदांबरोबर 'अवेस्ता' या पारशी धर्मग्रंथाचाही अभ्यास चालतो. ऋग्वेद व अवेस्ता ही जुळी भावंडे आहेत. यस्न म्हणजे पारशी उपासना कर्माची सामग्री व अफरगानयू म्हणजे त्यांचे अग्निकुंड.

हे संग्रहालय मंडळाचे बलस्थान आहे.

**ग्रंथप्रकाशन :** आजपर्यंत मंडळाने ७५ ग्रंथ प्रकाशित केले आहेत. ऋग्वेदाच्या संशोधित आवृत्तीचे काम २१ वर्षे चालू होते. सूची खंड हे मंडळाचे वैशिष्ट्य आहे. तैत्तिरीय (कृष्ण यजुर्वेद), काव्य संहिता (शुक्ल यजुर्वेद), श्रौतकोश, अष्टादश उपनिषदे, झेंद अवेस्ता (देवनागरी), स्टडीज ऑन वेद अँड अवेस्ता, फोर सेक्रेड मेअर्स हे ग्रंथ या मंडळाने प्रकाशित केले आहेत.

श्रौतयज्ञाची संपूर्ण प्रक्रिया लहान लहान कर्म, क्रमवार दाखवणारी डी.व्ही.डी, शुक्ल यजुर्वेद माध्यमिक शाखेची संहिता व क्रमपाठाच्या डी.व्ही.डी ज्यात घनपाठ म्हटलेला आहे, वाजपेय यज्ञ डी.व्ही.डी, पूर्णमासेष्टि डी.व्ही.डी तयार केल्या आहेत. तसेच यज्ञीय सामग्रीचा आल्बम व 'यज्ञायुधाग्नी' हे पुस्तक प्रकाशित केले आहे.

महाराष्ट्रीय ज्ञानकोशाच्या वेदविद्या खंडाचे काम आता पूर्ण होत आले आहे. ज्ञानकोशकार केतकरांच्या ज्ञानकोशाचा हा पूरक ग्रंथ आहे.

मंडळास प्रकाशनकार्यासाठी राष्ट्रीय संस्कृत संस्थानाकडून नियमित अनुदान मिळते. तसेच खाजगी व्यक्तींकडून व संस्थांकडूनही अर्थसाहाय्य मिळते.

**अवेस्ता विभाग :** सन १९५१मध्ये अवेस्ता ग्रंथाच्या अभ्यासासाठी मंडळात स्वतंत्र अवेस्ता विभागाची स्थापना करण्यात आली. आय.जे.एस. तारापोरवाला, एम.एफ. कांगा आणि रुयिन्तन पीर यांनी बरीच वर्षे विभागाची जबाबदारी सांभाळली. हल्ली डॉ. म.अ. मेहेंदळे हे मंडळात अवेस्ता शिकवीत आहेत.

**इतर उपक्रम :** मुख्यत: वेद या विषयाला धरून स्थानिक व राष्ट्रीय पातळीवर चर्चासत्रे आयोजित केली जातात. त्यासाठी भारतभरातील अभ्यासकांना आमंत्रित केले जाते. ही चर्चासत्रे विशेषत: विद्वानांसाठी असतात.

सर्वसामान्यांसाठी वेदभांडार खुले व्हावे, यासाठी मंडळाने वैदिक व्याख्यानमाला आयोजित केल्या व त्यांना चांगला प्रतिसाद मिळाला. तसेच श्रौतयज्ञाबद्दल माहिती व प्रात्यक्षिक करण्यासाठी श्रौत परिचय निवासी वर्ग घेण्यात आले.

पारशी वर्षारंभ - पतेतीनिमित्ताने शुभेच्छा पत्रे पाठवली जातात. त्यामध्ये अवेस्तातील एक सुवचन व त्याच्याशी सुसंगत वेदातील वचन दिले जाते.

**महत्त्वाच्या व्यक्तींच्या भेटी :** राष्ट्रपती डॉ. राजेंद्रप्रसाद यांच्या हस्ते मंडळाच्या भवनाचे उद्घाटन झाले

होते. उपराष्ट्रपती व्ही.व्ही. गिरी यांनीही भेट दिली होती.

अलीकडे योगगुरू रामदेवबाबा, शृंगेरी मठाचे शंकराचार्य भारतीतीर्थ महास्वामी, स्वामी गोविंददेवगिरी या मान्यवरांनी मंडळास भेटी दिल्या आहेत.

– र.वि. नातू

***

# मुक्तबोध इंडॉलॉजिकल रिसर्च इन्स्टिट्यूट, नाशिक

'मुक्तबोध' शब्दाचा अर्थ मुक्त मानवाचे ज्ञान.

मुक्तबोध इंडॉलॉजिकल रिसर्च इन्स्टिट्यूटचे उद्दिष्ट आहे भारतातील पारंपरिक, धार्मिक, तत्त्वज्ञानविषयक, नष्ट होत चाललेल्या ग्रंथांचे जतन करणे व त्यामधील ज्ञान जगभरातील सर्वांना उपलब्ध करून देणे. इन्स्टिट्यूटचा विश्वास आहे की, या ग्रंथांमधील ज्ञान समस्त मानवतेला आजही प्रेरणादायी, उपयुक्त आहे.

भारतामध्ये संत, योगी, तत्त्वज्ञ यांच्या अनुभवावर आधारित पुरातन हस्तलिखित ग्रंथांचा आणि मौखिक पद्धतीने दिल्या जाणाऱ्या ज्ञानाचा खजिना आहे. काळानुसार भारत आज विज्ञान–तंत्रज्ञान क्षेत्रात आघाडी घेत आहे आणि त्यामुळे समाजात अनेक बदल घडत आहेत. जागतिकीकरणामुळे आर्थिक व सांस्कृतिक ताणतणाव वाढले आहेत. संत, योगी, तत्त्वज्ञ यांना समाजाकडून मिळणारा आश्रय कमी झाला. सामान्यांच्या विचारसरणीतही बदल होऊन ती भौतिकवादी बनते आहे. हवामानामुळे या पुरातन ग्रंथांची दुर्दशा होऊ लागली आहे, ते नष्ट होऊ लागले आहेत. या कारणामुळे त्यामधील ज्ञान आता विस्मृतीमध्ये जाऊन नष्ट होण्याची भीती आहे.

या ज्ञानभांडाराचे जतन करवणे हा मुक्तबोध इन्स्टिट्यूटचा उद्देश आहे. केवळ भारतातील अभ्यासकांसाठीच नव्हे, तर संपूर्ण जगातील अभ्यासकांना ते उपलब्ध करून देणे हे मुक्तबोधचे ध्येय आहे. कारण ते सर्व मानवजातीला उपयुक्त असे ज्ञान आहे. मात्र 'मुक्तबोध'ची या बाबतीत काळाशी शर्यत चाललेली आहे. त्यामुळे जतन करण्याच्या पारंपरिक आणि अत्याधुनिक पद्धतींचा वापर संस्था करीत आहे.

**स्थापना :** सिद्ध योग मिशनच्या गुरुमाई चिद्‌विलासानंद यांच्या प्रेरणेने १९९७ साली मुक्तबोधची स्थापना झाली. अमेरिकेतील SYDA Foundation आणि भारतातील गुरुदेव विद्यापीठ यांच्या सहयोगाने एक स्वतंत्र शैक्षणिक संस्था म्हणून मुक्तबोधची स्थापना करण्यात आली.

तंत्र आणि आगम मार्गातील ग्रंथांचे जतन करण्याबरोबर वेदपठण, वेदांतील विधी व त्यामागील तत्त्वांचा शोध घेतला जातो. शास्त्र–ग्रंथात लिहिलेले व मौखिक अशा दोन्ही पद्धती सारख्याच महत्त्वाच्या असल्यामुळे त्यांचे संरक्षण व जतन करण्यावर भर आहे व त्यासाठी विविध उपक्रम हाती घेतले आहेत.

**संगणकीकृत ग्रंथालय :** संस्कृतमधील मूळ हस्तलिखितांचा निरनिराळ्या माध्यमांद्वारा संचय केला जातो व त्यामुळे मुक्तबोधच्या वेबसाइटवर ती कोणालाही पाहता येतात, अभ्यासता येतात. सुरुवातीला काश्मीर शैव संप्रदायाशी संबंधित हस्तलिखिते वेबसाइटवर दिली गेली आहेत. मुक्तबोधकडे कौल त्रिका, शैव सिद्धान्त, वीरशैव, पंचरात्र, श्रीविद्या, शाक्त आणि नाथ संप्रदायातील ग्रंथ आहेत. 'फ्रेंच इन्स्टिट्यूट ऑफ पाँडेचरी'मधील प्रवचनेही उपलब्ध आहेत.

**प्रकाशन :** या मूळ तंत्र व वेदिक ग्रंथावरील टीका आणि भाषांतरे प्रकाशित केली जातात.

**वेदशाळा :** वेदपठणाची परंपरा सुरू राहावी यासाठी तैत्तिरीय कृष्ण यजुर्वेदच्या हिरण्यकेशी शाखेच्या परंपरेनुसार

वेदपठण शिक्षणासाठी सातारा येथे २००८मध्ये ही वेदशाळा सुरू करण्यात आली. आता ती स्वतंत्रपणे काम करीत आहे.

**दृक्-श्राव्य संग्रह :** तैत्तिरीय कृष्ण यजुर्वेद हिरण्यकेशी शाखेच्या परंपरेनुसार केल्या जाणाऱ्या मंत्रपठणाचे व केल्या जाणाऱ्या विधींचे दृक्-श्राव्य मुद्रण मुक्तबोधने केले आहे.

**अध्यापनवृत्ती, शिष्यवृत्ती :** भारतीय व पाश्चात्त्य अभ्यासकांना प्राच्यविद्या अभ्यास करण्यासाठी उपयोगी व्हावा म्हणून मुक्तबोध काही अध्यापनवृत्ती व शिष्यवृत्ती देते.

**र.वि. नातू**

***

# कृष्ण यजुर्वेद वेदशाळा, सातारा

भारतामध्ये वेदपठणाची फार पुरातन परंपरा आहे. काही वर्षांपूर्वी भारतातील वेदशाळा नामशेष होत आल्या होत्या. कारण वेदशाळेला समाजाकडून मिळणारा पूर्वापार आश्रय कमी होत चालला होता आणि फारच कमी तरुण या ज्ञानशाखेकडे आकर्षित होत असत. मात्र आता परिस्थिती बदलली आहे आणि आज जवळजवळ साठ वेदशाळा वेदपठणाचे शिक्षण देत आहेत. कृष्ण यजुर्वेदातील मंत्र आणि त्यामधील ज्ञान लुप्त होऊ नये, या हेतूने मुक्तबोधने सन १९९८मध्ये सातारा येथे एक वेदशाळा सुरू केली. त्यामुळे वेदमंत्रपठणाची परंपरा वाचवता आली. वैदिक घराण्यातील चौदाव्या पिढीतील अधिकारी विवेक लक्ष्मण गोडबोले यांच्या मार्गदर्शनाखाली ही वेदशाळा सुरू करण्यात आली. या वेदशाळेत कृष्ण यजुर्वेदाच्या तैत्तिरीय हिरण्यकेशी शाखेचा अभ्यास होतो.

आज ही वेदशाळा देशातील वैदिक पंडितांच्या प्रशंसेस पात्र ठरली आहे आणि UNESCOनेही The Intangible Heritage of Humanity या त्यांच्या कार्यक्रमाअंतर्गत तिला मान्यता दिली आहे.

या वेदशाळेतील प्रशिक्षित प्रगत विद्यार्थीच वेदशाळेत अध्यापनाचे काम करू लागतात. अशा रितीने या वेदशाखेचे पुनरुज्जीवन झाले आहे. एक परंपरा पुढे सुरू राहिली आहे. सन २००८पासून वेदशाळेचे कामकाज आता स्वतंत्रपणे सुरू आहे आणि कृष्ण यजुर्वेद ट्रस्ट व विवेक गोडबोले वेदशाळेचा कार्यभार सांभाळत आहेत.

**– र.वि. नातू**

***

# गुरू गंगेश्वरानंद प्रतिष्ठान, नाशिक

वेद हे जर ज्ञानाचे सर्वोत्कृष्ट प्रतीक मानले, तर गुरू गंगेश्वरानंद हे साक्षात तापश्चर्यारूप होते. सर्व वेद कंठस्थ असणारे ते एकमेव विद्वान होते. शिवाय ते वेदांचे भाष्यकारही होते. भारताच्या वेदांमधील ज्ञान आधुनिक जगताला पुन्हा एकदा दाखवून देणे हे त्यांच्या आयुष्याचे ध्येय होते.

चंद्रेश्वर हे गुरू गंगेश्वरानंदांचे पूर्वाश्रमीचे नाव. त्यांचा जन्म पंजाबमध्ये २७ डिसेंबर १८८१ रोजी झाला. त्यांच्या मातोश्री श्रीरामानंदजींच्या भक्त होत्या. लहानपणापासूनच चंद्रेश्वर अतिशय तल्लख बुद्धीचे होते. दुर्दैवाने वयाच्या सहाव्या वर्षी त्यांना 'देवी' या रोगाची लागण झाली आणि त्यांची दृष्टी गेली. गुरू रामानंदजींनी त्यांना व त्यांच्या मातोश्रींना विष्णुसहस्रनाम आणि गीतापाठ करावयास सांगितले.

वयाच्या चोविसाव्या वर्षी त्यांना पूर्णावस्था प्राप्त झाली. उदासीन आखाड्यातून त्यांनी संन्यास ग्रहण केला व 'गंगेश्वरानंद' असे त्यांचे नाव झाले. त्यांच्या गुरूंच्या आज्ञेवरूनच त्यांनी तीन वर्षे काशीमध्ये वास्तव्य केले व सर्व वेद कंठस्थ केले. त्याचबरोबर त्यांनी पंजाब विद्यापीठाची पदवीही प्राप्त केली. आपल्या सुशिक्षित सोबत्यांबरोबर त्यांनी भारतात व परदेशात दौरे केले व शेकडो वेदसंस्था, मंदिरे, आश्रम सुरू केले. वेदातील त्यांच्या अधिकारामुळे त्यांचे शिष्यमंडळ व भक्तमंडळ फार मोठे होते.

वेदांचे जाणकार असल्यामुळे त्यांनी 'भगवान वेद' या ग्रंथाचे स्वरोच्चारचिन्हांसह संपादन केले. त्यामुळे देश-विदेशातील विद्वान त्यांच्या ज्ञानाचा लाभ घेण्यासाठी त्यांच्याकडे येत असत. गुरू गंगेश्वरानंद एक ज्ञानी, विरागी आणि भक्त होते. त्यांच्या ठायी श्री अरविंदांचे तत्त्वज्ञान, श्रीरामकृष्णांची अंतर्दृष्टी, विवेकानंदांची कार्यचेतना आणि चैतन्याची संपूर्ण शरणागती होती.

### श्री गुरू गंगेश्वर वेदमंदिर

श्रीमान शेठ किसनलालजी सारडा यांनी आपले पिताश्री बस्तीरामजी सारडा यांच्या स्मरणार्थ नाशिक येथे हे भव्यसुंदर मंदिर उभारले आहे. सत्यम्-शिवम्-सुंदरम् यांचा अनुपम संगम असे हे मंदिर आता गुरू गंगेश्वरानंदांना समर्पित असे सांस्कृतिक केंद्र बनले आहे. या मंदिरात ज्ञानरूपी भगवान वेदाच्या मूर्तीसमोर गुरू गंगेश्वरनंदांची मूर्ती स्थापन केली आहे.

### श्री गुरू गंगेश्वरानंद प्रतिष्ठान, नाशिक यांच्यातर्फे चालवले जाणारे उपक्रम

**वेदशाळा :** भारतातील ही एकमेव वेदशाळा आहे, जिथे सर्व जातीच्या लोकांना आणि स्त्रियांना वेदाभ्यासासाठी प्रवेश दिला जातो. सामान्यत: येथे २० ते ४० विद्यार्थी वेदशिक्षण घेत असतात.

**संगणकीकृत वेद संग्रहालय :** नामांकित वेदपंडितांनी केलेल्या मुखर वेदपठणाचे ध्वनिमुद्रण स्टुडिओत करण्यात येते. हे ध्वनिमुद्रण सीडी स्वरूपात अत्यल्प किमतीत अभ्यासकांना उपलब्ध आहे.

**वेद ग्रंथालय :** प्रतिष्ठानात वेद संशोधनासाठी ग्रंथालय आहे.

**ग्रंथ आणि सीडी–ध्वनिचित्रफितींचे प्रकाशन :** वेद व त्यासंबंधी विषयांवरील ग्रंथ, ध्वनिफिती, सीडी यांचे प्रकाशन प्रतिष्ठानने केले आहे,

**वैदिक पंडितांची सूची :** प्रतिष्ठान भारतात सर्वत्र आपले प्रतिनिधी पाठवून वैदिक पंडितांसंबंधी माहिती गोळा करते. प्रतिष्ठानच्या वेबसाइटवर ती माहिती उपलब्ध आहे.

**वेद पारायणे :** भारतातील सर्व वेदांच्या पंडितांना आमंत्रित करून प्रतिष्ठान वेद पारायणांचे आयोजन करते. आजपर्यंत अशी अनेक पारायणे झाली आहेत.

**वेदमंदिर :** शेठ किसनलाल सारडा यांच्यातर्फे नाशिक येथे वेदमंदिर उभारण्यात आले आहे. सारडा समान संधी पुरस्कार, धर्मशाळा, ज्ञानेश्वरी स्पर्धा वगैरे उपक्रम चालतात.

**– र.वि. नातू**

***

# सत्कार्योत्तेजक सभा, धुळे

या संस्थेचे नावच तिच्याबद्दल बरेच काही सांगून जाते. चांगल्या व समाजोपयोगी कार्याला प्रोत्साहन देणारी ही संस्था आहे.

संस्थेची प्रमुख उद्दिष्टे अशी आहेत –

१. समाजाच्या कल्याणासाठी केल्या जाणाऱ्या कार्याला पाठिंबा देणे.

२. सर्वसामान्यांमध्ये देशभक्तीची भावना निर्माण करणे.

३. समाजामध्ये राष्ट्रीय वृत्ती निर्माण करणे.

४. मातृभाषा मराठीला समृद्ध करणे.

५. देशकार्यासाठी स्वार्थत्यागाला प्रोत्साहन देणे.

नानासाहेब देव हे संस्थेचे सर्वस्व होते आणि त्यांनी संस्थेसाठी आपले तन, मन व धन वेचले.

**सत्कार्योत्तेजक सभेचे कार्य :**

सुरुवातीला सभेचे कामकाज अगदी लहान प्रमाणात होते. म्हणजे शिवराज्याभिषेक दिन, दसरा, गणपती उत्सव साजरा करणे वगैरे. या निमित्ताने नामांकित व्यक्तींची व्याख्याने आयोजित केली जात. यातूनच सभेच्या कार्याला गती मिळाली. उत्तम संस्कार व नीतिशिक्षण देता यावे यासाठी सभेने एक विद्यालय सुरू केले. त्याचबरोबर रोजगार मिळणे सोपे जावे म्हणून औद्योगिक शाळा सुरू केली. त्याशिवाय कायद्याचे अभ्यासवर्गही सुरू केले.

**प्रकाशने :** सन १९०३पासून सभेने प्रकाशनाचे कार्य सुरू केले. भागवत संप्रदायासंबंधी ‘प्रबोध’ मासिक १९०६मध्ये सुरू केले. महाराष्ट्राच्या संस्कृतीबद्दलची पुस्तके महाराष्ट्र ग्रंथमालेतर्फे प्रकाशित करण्यात आली. त्यानंतर ‘रामदास आणि रामदासी’ ही ग्रंथमाला सुरू झाली व नंतर ‘रामदास आणि रामदासी मासिक पुस्तक’ सुरू केले. सन १९१६मध्ये ‘इतिहास आणि ऐतिहासिक पुस्तक’ सुरू केले. मात्र ३७ अंकांनंतर त्याचे प्रकाशन बंद करण्यात आले.

आतापर्यंत सभेने १५०हून अधिक पुस्तके प्रकाशित केली आहेत व त्यातून विविध विषयांवरील जवळपास ४०,००० पानांचा मजकूर अभ्यासू वाचकांना सादर केला आहे. ही बहुतेक पुस्तके संदर्भग्रंथ आहेत.

या संदर्भग्रंथांचा लाभ घेऊन शंभराहून जास्त अभ्यासकांनी - ज्यात परदेशी अभ्यासकही आहेत पीएच.डी. संपादन केली आहे. सभेने समर्थ रामदासांच्या ‘श्रीमत् दासबोध’ या ग्रंथाच्या २५,०००हून जास्त प्रती आणि ‘मनाचे श्लोक’च्या एक लाखाहून अधिक प्रती प्रकाशित केल्या आहेत.

सभेच्या पुढाकाराने समर्थ रामदासांच्या जन्मगावी - जांब येथे श्री समर्थ स्मारक उभारण्यात आले. नानासाहेब देव यांनी राजवाडे संशोधन मंडळाची सुरुवात केली आणि आज भारतभर सदस्य असलेल्या ‘श्री समर्थ संघा’ची स्थापना केली. सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्यांनी धुळे येथे श्री समर्थ वाग्देवता मंदिराची स्थापना केली.

**– र.वि. नातू**

***

# श्री समर्थ वाग्देवता मंदिर, धुळे

श्री समर्थ वाग्देवता मंदिर, धुळे हा सत्कार्योत्तेजक सभा, धुळेचा प्रशंसनीय उपक्रम आहे. श्री समर्थ वाग्देवता मंदिराची स्थापना सन १९३५मध्ये करण्यात आली. या मंदिरात समर्थ रामदासांच्या समग्र वाङ्मयाची पूजा केली जाते. या वाग्देवतेची पूजा म्हणजे त्याचे अध्ययन आणि संशोधन करणे.

नानासाहेब देव हे श्री रामदास स्वामींचे भक्त होते आणि त्यांनी समर्थ संप्रदायाचे तसेच इतर समकालीन संतांचे वाङ्मय एकत्र करण्याचे व त्याचे संशोधन करण्याचे महान कार्य केले. श्री रामदासस्वामींचे जमा केलेले वाङ्मय सुरक्षित ठेवण्यासाठी नानासाहेब देव आणि त्यांच्या सहकाऱ्यांना चांगल्या संग्रहालयाची गरज भासू लागली. त्यासाठी नानासाहेबांनी स्वत:चा भूखंड या संग्रहालयासाठी देणगी म्हणून दिला, तर आर्किटेक्ट वासुदेव गोपाळ गोगटे यांनी त्यावर सुबक वास्तू उभी केली आणि १९३५मध्ये श्री समर्थ वाग्देवता मंदिराचे उद्‌घाटन झाले.

हस्तलिखितांच्या संग्रहाला बाड म्हणतात. या मंदिरामध्ये संशोधित आणि असंशोधित अशी अनेक हस्तलिखिते, दस्तावेज, हुकूमनामे व बाडे आहेत. समर्थ रामदासांनी सन १६२२मध्ये स्वहस्ते लिहिलेले वाल्मिकी रामायण, रघुनाथ भट याला मोडीमध्ये लिहिलेली पत्रे, कल्याणस्वामी, उद्धवस्वामी, गिरिधर यांचे साहित्य, दासोपंतांच्या गीतार्णव ग्रंथातील ९वा अध्याय, समर्थांच्या कविता व समर्थांच्या आधीच्या काळातील एकनाथी भागवताची प्रत येथे पाहावयास मिळेल. तसेच शिवाजी महाराज, संभाजी, राजाराम, रामचंद्र नीळकंठ यांची पत्रे येथे आहेत. तसेच शिवाजी महाराजांनी समर्थ रामदासांना दिलेल्या सर्वाधिकार पत्राची प्रत येथे आहे.

संग्रहालयात दासबोधाच्या सुबक प्रती, सचित्र गीता, गीतगोविंद, ताम्रपत्रे, ताडपत्रे वगैरे बहुमोल संग्रह आहे. हस्तलिखितांचे कागद आता जीर्ण झाले आहेत. त्यामुळे अभ्यासकांना त्याची सत्य प्रत (Photocopy) देण्यात येते. एकही कागद मंदिराबाहेर नेता येत नाही.

समर्थ रामदासांव्यतिरिक्त अन्य ३०० संतांचे साहित्यही मंदिरात आहे. संग्रहातील काही कागदपत्रे ५५० वर्षांपूर्वीची आहेत. मराठी, फारसी, हिंदी, हिंदुस्थानी, तमिळ, तेलगू, गुजराथी व संस्कृत भाषांतील कागदपत्र आहेत. यापैकी ३००० बाडांचा अभ्यास झाला आहे, पण बरीच बाडे अजून अभ्यासावयाची आहेत.

साहित्य, विज्ञान, कला, आयुर्वेद, औषधशास्त्र, रसायनशास्त्र, समाजशास्त्र, मानसशास्त्र, चित्रकला, ज्योतिष, इतिहास, जादूटोणा वगैरेसंबंधी हस्तलिखिते येथे आहेत.

नानासाहेब देव यांनी सन १९०३मध्ये सुरू केलेले संशोधनकार्य आजही येथे सुरू आहे. आजपर्यंत देशातील व परदेशातील २५० अभ्यासकांनी आपल्या एम.फिल. पीएच.डी.च्या अभ्यासासाठी या मंदिरातील ग्रंथसंपदेचा लाभ घेतला आहे आणि अजूनही श्रीसमर्थ वाग्देवता मंदिरामध्ये विविध विषयांवरील संशोधनासाठी बराच वाव आहे.

**– र.वि. नातू**

***

# कविकुलगुरू कालिदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक

महाराष्ट्र राज्यामध्ये संस्कृत भाषेसाठी स्वतंत्र असे विद्यापीठ नव्हते. अथक प्रयत्नांनंतर १८ सप्टेंबर १९९७ रोजी या संस्कृत विद्यापीठाची स्थापना करण्यात आली. संस्कृत साहित्यातील प्रतिभावंत कवी व नाटककार कालिदास

यांचे नाव या विद्यापीठाला देण्यात आले. कालिदासांनी रामटेक येथे आपली साहित्यरचना केली, असे मानले जाते. त्यामुळे हे विद्यापीठ रामटेक येथे स्थापन करण्यात आले.

डॉ. श्रीकांत जिचकार हे या विद्यापीठाचे पहिले उपकुलगुरू होते. हल्ली डॉ. उमा वैद्य या विद्यापीठाच्या उपकुलगुरुपदावर आहेत.

जगातील सर्वात जुन्या अशा संस्कृत भाषेचा सखोल अभ्यास व्हावा हा कविकुलगुरू कालिदास संस्कृत विद्यापीठाच्या स्थापनेमागील मूळ हेतू आहे. येथे विद्यार्थी बी.ए., एम.ए., एम.फिल आणि पीएच.डी. यासाठीचे अभ्यासक्रम घेऊ शकतात. या विद्यापीठाचे वैशिष्ट्य म्हणजे संस्कृत भाषेकडे नवीन दृष्टीकोनातून पाहणारा नावीन्यपूर्ण अभ्यासक्रम. पारंपरिक संस्कृत भाषेच्या संरक्षण–संवर्धनाबरोबरच येथे संस्कृत भाषेमध्ये असलेली पुराणकालीन शास्त्रे व तंत्रज्ञान यांच्या अभ्यासावर भर दिला जातो.

**– र.वि. नातू**

***

# शारदाश्रम इतिहास संशोधन संस्था, यवतमाळ

जागतिक कीर्तीचे इतिहासकार डॉ. य.खु. देशपांडे आणि लोकनायक बापूजी अणे यांनी सन १९२६मध्ये शारदाश्रम इतिहास संशोधन संस्थेची स्थापना केली. १९३२मध्ये तिची घटना तयार करण्यात आली आणि १९४७ मध्ये तिची रीतसर नोंदणी करण्यात आली.

संस्थेमध्ये निरनिराळ्या विषयांवरील ३००० हस्तलिखित ग्रंथांचा आणि १०००पेक्षा जास्त ऐतिहासिक कागदपत्रांचा संग्रह आहे. या कागदपत्रांमध्ये न्यायशास्त्र, तर्कशास्त्र, अलंकारशास्त्र, तंत्रज्ञान, वैद्यक, तीर्थविषयक, मंत्रतंत्र, ज्योतिषशास्त्र, स्त्रीधर्म, धर्मनिर्णय, शासनपत्रे, शाहू महाराजांची पत्रे, पेशव्यांचा पत्रव्यवहार, नागपूरकर भोसले, सिंदखेडचे जाधव यांच्यासंबंधी कागदपत्रे यांचा समावेश आहे.

संस्थेच्या वस्तुसंग्रहालयात ताम्रपट, शिलालेख, भूर्जपत्रे, नाणी पाहावयास मिळतील.

उद्योगपर्वातील प्रत्येक पृष्ठावर रंगीत चित्र असलेल्या महाभारताची एक प्रत येथे आहे.

संस्थेचे संस्थापक डॉ. य.खु. देशपांडे यांनी प्राचीन साहित्याचा अभ्यास केला. लीळाचरित्र या ग्रंथाच्या विशेष अभ्यास करून महानुभाव लिपी उजेडात आली. शब्दकोशकार ग.वि. केतकर हे त्यांचे सहकारी होते. या संशोधनानिमित्त त्यांना १९३४-१९३५मध्ये जर्मनी व बेल्जियम येथील जागतिक इतिहास परिषदेस आमंत्रित करण्यात आले होते व त्यांचा गौरव करण्यात आला होता.

शारदाश्रम संस्थेत आजपर्यंत वा.ना. देशपांडे, रा.द. दामले, द.बा. महाजन, पां.आ. गोरे, श्री.दे. महाजन, ना.ना. हूड, वि.भि. कोलते, शेवाळकर, पं.रा. देशमुख अशांनी संशोधनकार्य केले आहे व साहित्यनिर्मिती केली आहे. हल्ली डॉ. व्ही.एन. पेशवे, प्रा. अरविंदराव कुलकर्णी, प्रा. आ.प्रा. देशपांडे हे येथील साहित्यसंपदा जतन करण्यासाठी प्रयत्न करीत असतात.

**– र.वि. नातू**

***

# पाणिनी प्रतिष्ठान, पुणे

गेल्या शतकातले पुण्यातले श्रेष्ठ संस्कृत विद्वान व आंतरराष्ट्रीय ख्यातीचे वैयाकरण पं. वामनशास्त्री भागवत यांच्या प्रेरणेने आणि पुढाकाराने १९९६ साली पाणिनी प्रतिष्ठानची स्थापना झाली. पाणिनीय व्याकरण परंपरेच्या शास्त्रीय पद्धतीला अनुसरून अध्ययनास व प्रगत संशोधनास प्रोत्साहन देणे, तसेच प्राचीन हस्तलिखितांच्या अध्ययनास विद्यार्थ्यांना प्रवृत्त करणे व संस्कृत तसेच प्राकृत, पाली इ. अभिजात भाषांचा प्रसार करणे ही या प्रतिष्ठानची प्रमुख उद्दिष्टे. या उद्दिष्टांच्या पूर्ततेसाठी प्रतिष्ठानने विविध प्रकारचे उपक्रम राबवले. त्यापैकी महत्त्वाचे उपक्रम पुढीलप्रमाणे -

१. पाणिनीय अष्टाध्यायीच्या चिकित्सित संपादित आवृत्तीचे प्रकाशन करणे.

२. हस्तलिखितांच्या अभ्यासाला प्रोत्साहन देण्यासाठी प्रतिष्ठानने वैदिक संशोधन मंडळाच्या सहकार्याने एका हस्तलिखित कार्यशाळेचे आयोजन केले. २००५ साली आयोजित केलेल्या या कार्यशाळेत सुमारे तीस विद्यार्थ्यांनी भाग घेतला. हस्तलिखितांचे महत्त्व, इतिहास, लेखनपद्धती, लिप्या, संपादन इ. अनेक विषयांवर तज्ज्ञांनी मार्गदर्शन केले.

३. २००६ साली आनंदाश्रम संस्था व वेदभवन यांच्या संयुक्त सहकार्याने प्रतिष्ठानने वाक्यार्थसभेचे आयोजन केले. या वाक्यार्थसभेत पं. तेजपाल शर्मा, पं. अंजनेय शर्मा, पं. श्रीपाद सुब्रह्मण्यम इ. ज्येष्ठ वैयाकरणांनी व्याकरणातील वेगवेगळ्या विषयांवर शास्त्रार्थ सादर करून प्राचीन अध्ययनपद्धतीमधील त्याचे महत्त्व स्पष्ट केले.

भारताच्या विविध राज्यांतून आलेल्या या ज्येष्ठ वैयाकरणांप्रमाणेच अनेक संस्कृत विद्यार्थ्यांनीही पूर्वपक्ष-उत्तरपक्ष पद्धतीने वेगवेगळ्या विषयांवर शास्त्रार्थ सादर केले. या वाक्यार्थसभेच्या आयोजनामुळे व्याकरणशास्त्राच्या पारंपरिक अध्ययनांचा एक वस्तुपाठ तरुण विद्यार्थ्यांना मिळाला.

४. टिळक महाराष्ट्र विद्यापीठ या पुण्यातील संस्थेने २००८ साली आयोजित केलेल्या संस्कृत अध्यापकांच्या उन्हाळी वर्गामध्ये प्रतिष्ठानने सहभागी होऊन काही विद्वानांना या वर्गात प्रबोधन करण्यासाठी नियुक्त केले.

५. पं. वामनशास्त्री भागवत यांच्या जयंतीनिमित्त दि. २४ जानेवारी २००९ या दिवशी प्रतिष्ठानतर्फे कॅनडामधील संस्कृत विद्वान डॉ. अशोक अकलूजकर यांचे व्याख्यान आयोजित करण्यात आले होते. आपल्या व्याख्यानात डॉ. अकलूजकरांनी पाणिनीय व्याकरणाच्या पाश्चात्त्य अध्ययनपरंपरेचा आढावा घेतला.

६. मे २०१०मध्ये मध्य प्रदेशातील ज्येष्ठ संस्कृत विदुषी डॉ. पुष्पा दीक्षित यांचे व्याख्यान प्रतिष्ठानतर्फे आयोजित करण्यात आले. आपल्या व्याख्यानात त्यांनी पाणिनीय व्याकरणाच्या, त्यांनी विकसित केलेल्या, सोप्या व अभिनव पद्धतीचा परिचय करून दिला.

७. २६ व २७ मार्च २०१६ या दिवशी प्रतिष्ठान व आनंदाश्रम संस्था यांनी संयुक्तपणे वाक्यार्थसभेचे आयोजन केले. या सभेत ज्येष्ठ व युवा छात्र मिळून तीस अभ्यासकांनी शास्त्रार्थ सादर केला. व्याकरणशास्त्राकडे पाहण्याच्या आधुनिक तसेच पाश्चात्त्य दृष्टीकोनाचा परिचय व्हावा, या उद्देशाने या सभेचे आयोजन केले होते.

८. प्रतिष्ठानतर्फे जून २०१५मध्ये पाणिनी प्रबोधन वर्गाचे आयोजन केले होते. त्यात ६० अभ्यासकांनी भाग घेतला. तेव्हापासून आनंदाश्रम संस्थेत नियमितपणे दर मंगळवारी पाणिनी वर्गाचे आयोजन केले जाते.

**- सरोजा भाटे**

***

# आनंदाश्रम संस्था, पुणे

मुंबई उच्च न्यायालयाचे तत्कालीन नामांकित वकील महादेव चिमणाजी आपटे यांनी १८८८मध्ये आनंदाश्रम संस्थेची स्थापना केली. आपली सर्व मालमत्ता त्यांनी या संस्थेच्या उभारणीसाठी लावली. या संस्थेतून अनेक संस्कृततज्ज्ञ व ज्ञानी मंडळी पुढे आली आहेत.

शाळा, महाविद्यालयांमधील विद्यार्थ्यांसाठी वसतिगृहाची उभारणी, सच्चिदानंद शिव मंदिराची स्थापना, तसेच या मंदिरात वैदिक व धार्मिक कार्यक्रमांचे आयोजन करणे, जुन्या पोथ्या, हस्तलिखिते यांचा संग्रह करणे, त्यांचे जतन करणे व या हस्तलिखितांचे अत्यंत कमी मूल्यात पुनर्मुद्रण करणे ही या संस्थेच्या कार्याची वैशिष्ट्ये आहेत.

या संस्थेमध्ये जतन केलेल्या काही पोथ्यांची नावे व संख्या उदाहरणादाखल सांगता येतील.

उपनिषद - ६१७, काव्य - ७१५, कोश - १४३, ज्योतिष - १३०८, न्याय - ८२०, पुराणेतिहास रामायण - १९९, पुराणेतिहास महाभारत - ३१८, पुराणेतिहास गीता - १५७, पुराणेतिहास भागवत - ३८५, याज्ञिक - २६२४, व्याकरण - ११९१.

याव्यतिरिक्त शिल्प, श्रौत, सांख्य, संगीत, मंत्रतंत्र, मीमांसा, योगशास्त्र, वेद, वेदान्त, वैद्यकशास्त्र इत्यादी विषयांवरील एकूण १५,०८६ एवढी ग्रंथसंपदा उपलब्ध आहे.

आनंदाश्रम संस्थेने ' पैशाचे भाष्य', 'काश्यप' 'शिल्पम, 'विधानमाला', 'संध्याभाषा', 'समुचलाया', 'कायापर शुद्धी', 'अंगतवाणी रुक्ती:', 'संस्कार रत्नमाला' – भाग १ व २, 'भाष्यार्क रत्नमाला' 'इश्केतकटोपनिशत', 'मध्वतंत्र', 'श्राद्धमंजिरी', 'पाश्वलंभमीमांसा', 'रुद्राध्याय', 'अग्निहोत्र चंद्रिका', 'कालमध्वकारिका' अशा जवळपास ९१ पुस्तकांचे पुनर्मुद्रण अत्यल्प दरात केले आहे.

आतापर्यंत या संस्थेत चौदा हजार हस्तलिखितांचे सूचिकरण झाले आहे. ही सर्व हस्तलिखित संपदा राष्ट्रीय व सांस्कृतिकदृष्ट्या अत्यंत मोलाची आहे.

काळाच्या गरजेनुसार या सर्व दस्तावेजांचे डिजिटायझेशन होणे गरजेचे आहे व ते कार्य जोमाने सुरू आहे. या कार्यासाठी राष्ट्रीय हस्तलिखित मंडळाकडून ८० टक्के सवलत प्राप्त झाली आहे. उर्वरित काम संस्थेद्वारे होणार आहे.

**– सुपर्णा कुलकर्णी**

***

# लेखक परिचय



**डॉ. कला आचार्य,** एम.ए. (संस्कृत), पीएच.डी., एम.ए. संस्कृत अभ्यासक्रमात नागपूर विद्यापीठाची चॅन्सेलर्स गोल्ड मेडलसह चार सुवर्णपदके. क. जे. सोमैया भारतीय संस्कृती पीठाच्या संचालिका. हिंदू-ख्रिश्चन आंतरधर्मीय संवादासाठी १६ आंतरराष्ट्रीय परिसंवादांचे आयोजन. शोधनिबंध सादरीकरणासाठी विविध देशांचा प्रवास. दोन पुस्तके प्रकाशित व १५ पुस्तकांचे संपादन.



**डॉ. धुंडिराज कहाळेकर,** आयुर्वेद प्रवीण. दोन कवितासंग्रह, १२ बालकथा व कवितासंग्रह, तसेच विविध कथासाहित्य, चरित्र आणि चिंतनपर साहित्य प्रकाशित. विविध रचनांचा अनुवाद. अण्णा हजारे व अन्य चरित्र प्रकाशित.



**प्रा. रमेश हरिभाऊ (आर.एच.) कांबळे,** एम.ए., एम.फिल. (इतिहास), पीएच.डी., गोगटे जोगळेकर महाविद्यालय, रत्नागिरी येथे इतिहासाचे प्राध्यापक. 'आशिया खंडातील राष्ट्रवाद', 'फ्रेंच राज्यक्रांती', 'आधुनिक चीन व जपान', 'प्राचीन भारत', 'आधुनिक भारताचा सामाजिक, आर्थिक आणि सांस्कृतिक इतिहास' आदी प्रकाशित ग्रंथसंपदा. सम्राट अशोक प्रियदर्शनी पुरस्कार प्राप्त. विविध संस्थांचे आजीव सभासद व विविध सामाजिक संस्थांत कार्य.



**डॉ. आनंद काटीकर,** एम.ए., पीएच.डी. साहाय्यक प्राध्यापक, फर्गसन महाविद्यालय. कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद. चौदा शोधनिबंध प्रकाशित.



**डॉ. मीनल कातरणीकर,** मुंबई विद्यापीठाच्या जैनविद्या अध्ययन केंद्राच्या सहयोगी प्राध्यापक व नंतर तत्त्वज्ञान विभागात सहयोगी प्राध्यापक. 'जैन परंपरेतील परोक्ष प्रमाण : एक अध्ययन' व 'प्रेमाचे प्रयोग' या दोन पुस्तकांच्या सहलेखक. आंतरराष्ट्रीय चर्चासत्रे, परिषदा यांसाठी विदेशात प्रवास. ४० शोधनिबंध प्रकाशित. अनाम प्रेम परिवाराच्या सामाजिक उपक्रमात सहभाग. परामर्श व प्रज्ञासंकेत यांच्या सल्लागार मंडळावर कार्यरत.

**डॉ. विजय कारेकर,** एम.ए. (तत्त्वज्ञान), सर परशुरामभाऊ महाविद्यालयात तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक. कवितासंग्रह आणि एक नाटक प्रकाशित. गेटवे ऑफ हेवन या कथेवर लघुपट प्रदर्शित व फिल्म फेस्टिव्हलमध्ये पुरस्कार प्राप्त. पंचवीस एकांकिकांचे लेखन. टि. म. विद्यापीठाचे अधिष्ठाता.

# प्राच्यविद्येच्या अभ्यासाची साधने



रायगडावरील जगदीश्वराच्या मंदिरावरील छत्रपती शिवाजी महाराज यांचा अभिलेख दि. ६ जून १६७४ इ.



वाकाटक नृपती द्वितीय प्रवरसेन यांचा जांब–खांडवी ताम्रपट यांचा अभिलेख दि. ३ जुलै ५४२ इ.

(वरील छायाचित्रे डॉ. श्रीनंद बापट यांच्या सौजन्याने)





पणजी गोवा येथील कदंब राजा त्रिभुवनमल्ल याचा नागरी लिपीतील ताम्रपटाचे पत्रे आणि सिंह राजमुद्रा (१०४९ इ.)

(वरील छायाचित्रे सौ. साक्षी पळांडे–दातार यांच्या सौजन्याने)



रामटेक, नागपूर येथील
केवल नरसिंह मंदिरातील
वाकाटक राणी प्रभावती गुप्ता
हिचा ब्राह्मी लिपीतील अभिलेख
(पाचवे शतक)



पुण्याजवळील कार्लेलेणी येथील
स्तंभावरील ब्राह्मी लिपीतील दानलेख
(इस. पूर्व पहिले शतक)



अंबेजोगाई येथील
[illegible] खोलेश्वर मंदिरातील
यादव सेनापती खोलनायक
याचा नागरी लिपीतील शिलालेख
(१३वे शतक)



नांदेड येथील कंधार किल्ल्यातील
मुघल सम्राट औरंगजेब याचा
फारसी शिलालेख (१६८४ इ.)

(मुखपृष्ठ व वरील छायाचित्रे सौ. सायली पलांडे-दातार यांच्या सौजन्याने)



**डॉ. के. दे. कावडकर,** एम.ए. (संस्कृत/पुराभिलेख व प्राचीन नाणकशास्त्र). पुरातत्त्वशास्त्रात पदव्युत्तर पदविका. महाराष्ट्र राज्य पुरातत्त्व व संग्रहालये संचालनालय येथून संचालक म्हणून निवृत्त. विदर्भातील व मराठवाड्यातील अनेक राज्यसंरक्षित स्मारकांचे जतनकार्य.



**आनंद कुंभार,** पुराभिलेख संशोधन, संपादन व प्रकाशन या कार्यात गेली ४० वर्षे सतत मग्न. काही काळ भारतीय सैन्यांतर्गत तोफखान्यात बिनतारी संदेश वाहक म्हणून काम. 'इन्स्क्रिप्शन्स फ्रॉम सोलापूर डिस्ट्रिक या नावाने डॉ. रिती व श्री. कुंभार या जोडनावांनी ग्रंथ प्रसिद्ध. 'संशोधन तरंग' या पुस्तकास यशवंतराव चव्हाण उत्कृष्ट शोध ग्रंथ म्हणून पुरस्कार.

**डॉ. दुलारी कुरेशी,** डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, पर्यटन व्यवस्थापन विभाग संचालक म्हणून निवृत्त. ऐतिहासिक पर्यटनस्थळांच्या संदर्भातील वीस पुस्तके प्रकाशित. एलोरा-अजंता औरंगाबाद फेस्टिव्हलच्या संस्थापकांपैकी एक. विविध दैनिकांमधून १७२हून अधिक लेख प्रकाशित. ८६ शोधनिबंध प्रकाशित. विविध राष्ट्रीय-आंतरराष्ट्रीय परिषदांतून सहभाग.



**डॉ. रोहिणी केतकर,** एम.ए., पीएच.डी.(साहित्य शास्त्र), टिळक महाराष्ट्र विद्यापीठात अध्यापन. एस.एस.सी. बोर्डाच्या संस्कृत अभ्यास मंडळावर समन्वयक दोन वेळा म्हणून कार्य.



**डॉ. माधवी कोल्हटकर,** एम.ए., पीएच.डी., ज्योतिष विशारद, बौद्ध धर्मावर पदव्युत्तर संशोधन. डेक्कन कॉलेजच्या संस्कृत शब्दकोश विभागाच्या साहाय्यक संपादक. विविध पुस्तकांचे लेखन, सहलेखन व संपादन. विविध शोधनिबंध प्रकाशित. राज्य दर्शनिका विभागात लेखन.



**डॉ. प्रकाश सहदेव खांडगे,** एम.ए. (ऑनर्स), पीएच.डी. (मराठी), विभाग प्रमुख, लोककला अकादमी, मुंबई विद्यापीठ. समन्वयक, शाहीर अमरशेख अध्यासन, मुंबई विद्यापीठ. लोककला संशोधक. 'खंडोबाचे जागरण' या पुस्तकासाठी महाराष्ट्र शासनाचा २०१०चा वाङ्मय पुरस्कार. विविध दैनिकांतून लोकसाहित्यविषयक व संशोधनपर लेखन. लोकरंग मालिकेचे लेखन. लावणी महोत्सव समन्वयक. विविध माहितीपटांचे लेखन. बीजिंग फोरम शोधनिबंधाचे वाचन.



**डॉ. तरंगिणी खोत**
एम.ए. संस्कृत. मुंबई विद्यापीठाच्या सुवर्णपदकाच्या मानकरी. बी.एड. (संस्कृत).
इंडियन एज्युकेशन सोसायटीत गेली २५ वर्षे संस्कृत केंद्र संचालिका म्हणून कार्यरत. 'चंदामामा' या बालमासिकाच्या संस्कृत आवृत्तीच्या संपादनाचे दोन वर्षे कार्य.



**डॉ. विद्या गाडगीळ,** एम.ए. पीएच.डी., पी.डी. कारखानीस कला आणि वाणिज्य महाविद्यालयात इतिहास विभाग प्रमुख म्हणून कार्यरत. दहा शोध निबंध प्रकाशित. महाराष्ट्र राज्य शासनाचा उत्कृष्ट ग्रंथनिर्मितीचा पुरस्कार प्राप्त. तंजावरचे मराठी राज्य व संस्कृती ह्या विषयावरील ग्रंथ प्रकाशित.



**डॉ. नीलिमा माधव गुंडी,** एम.ए., पीएच.डी., ई.एच.ई., स.प. महाविद्यालय, पुणे येथे अध्यापनाचे कार्य. बालकवितासंग्रह व बालकथा प्रकाशित. भाषा आणि जीवन या त्रैमासिकाच्या संपादक मंडळावर कार्य. मराठी अभ्यास परिषद कार्यवाह. विदर्भ साहित्य संघातर्फे वि.स. खांडेकर पुरस्कार. 'लाटांचे मनोगत' या काव्यविषयक लेखसंग्रहातून स्त्रियांच्या काव्याचा चिकित्सक व अभ्यासपूर्ण आढावा.

**डॉ. आशा गुर्जर,** एम.ए., पीएच.डी. (संस्कृत), डेक्कन कॉलेज संस्कृत शब्दकोश विभागात ३० वर्षे कार्य. समर्पणम् पुस्तकाचे संपादनकार्य. विविध २० पुस्तकांचे संपादन. संस्कृत प्रचार-प्रसारकार्य.



**डॉ. प्रदीप गोखले,** सारनाथ येथील सेंट्रल युनिव्हर्सिटी ऑफ तिबेटियन स्टडीजमध्ये डॉ. बाबासाहेब आंबेडकर रिसर्च प्रोफेसर. 'इन्फरन्सेस अँड फॅलसीज् डिस्कस्ड इन एन्शंट इंडियन लॉजिक', 'वादन्याय ऑफ धम्मकीर्ती', 'हेतुबिंदू ऑफ धम्मकीर्ती' इत्यादी पुस्तके प्रकाशित. 'स्टडीज इन इंडियन मोराल फिलॉसॉफी : प्रॉब्लेम्स, कन्सेप्ट्स अँड पर्स्पेक्टिव्ह या पुस्तकाचे सहसंपादन व 'द फिलॉसॉफी ऑफ डॉ. बी. आर. आंबेडकर' या पुस्तकाचे संपादक.

**डॉ. नलिनी चापेकर,** वेदान्त, पाली व बौद्ध साहित्याच्या अभ्यासिका. मुंबई, पुणे, श्री.ना.दा.ठा. विद्यापीठांत अध्यापन. टिळक महाराष्ट्र विद्यापीठामध्ये आणि भांडारकर प्राच्यविद्या संस्थेत संशोधन. इराण, ग्रीक आणि भारतीय संस्कृतीचे आंतरबंध यावर ग्रंथ प्रकाशित. तर्कसंग्रह, वेदान्तसार, अनुवादशास्त्र या विषयांवर पुस्तके प्रकाशित.

**डॉ. प्राची मोहन चौधरी,** एम.ए. (मराठी साहित्य), पीएच.डी., अनुवादक. महाराष्ट्र राज्य दर्शनिकेत लेखन. विविध शोधनिबंध प्रकाशित. राष्ट्रीय-आंतरराष्ट्रीय परिषदांत सहभाग.



**डॉ. भाग्यश्री जाधव,** एम.ए., पीएच.डी., शिवाजी विद्यापीठाच्या दूरशिक्षण केंद्रामार्फत प्रकाशित सात इतिहास पुस्तकांच्या सहलेखिका. 'डॉ. आप्पासाहेब पवार - जीवन आणि कार्य' हा चरित्रग्रंथ शिवाजी विद्यापीठामार्फत प्रकाशित व त्याला ना.ह. आपटे ग्रंथ पुरस्कार.



**डॉ. शिवदास कुंडलिक जाधव,** एम.ए. (संस्कृत, अर्धमागधी). पीएच.डी., संस्कृत विभाग प्रमुख, छत्रपती शिवाजी महाविद्यालय, सातारा. महाराष्ट्र शासनाच्या महाकवी कालिदास संस्कृत साहित्य साधना पुरस्काराने सन्मानित. 'संस्कृत अध्यापन पद्धती', 'भामिनीविलास' या पुस्तकाचे व अनेक पाठ्यपुस्तकांचे संपादन. महाराष्ट्र राज्य शैक्षणिक व संशोधन परिषद, पुणे आणि उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव येथे संस्कृत अभ्यास मंडळावर सदस्य म्हणून काम.



**डॉ. श्रीकांत जाधव,** एम.ए., पीएच.डी. (पुरातत्त्व), पुरातत्त्व आणि संग्रहालय संचलनालयाचे उपसंचालक. विविध उत्खननांत सहभाग. विविध शोधनिबंध सादर केले आहेत. विविध राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय परिषदांत सहभाग. सध्या डेक्कन कॉलेजच्या उत्खननविषयक कामाचे अधीक्षक.



**डॉ. अरविंद प्र. जामखेडकर,** एम.ए., पीएच.डी., 'कल्चरल हिस्ट्री फ्रॉम द वासुदेवहिंडी' या विषयात डॉक्टरेट. निवृत्त संचालक, पुरातत्त्व व वस्तुसंग्रहालय विभाग महाराष्ट्र शासन-१९७७ ते १९९७. 'कुवलयमाला-अ कल्चरल स्टडी' पुस्तक प्रकाशित. 'नैकुंड एक्स्कॅव्हेशन', 'वासुदेवहिंडी - अ कल्चरल स्टडी' इत्यादी लेखन प्रकाशित. जैन साहित्य, शिल्पकला, स्थापत्य यांचे जाणकार. सोमय्या बुद्धिस्ट स्टडी सेंटरचे संचालक. डेक्कन कॉलेज अभिमत विद्यापीठाचे कुलपती.



**दीपक हनुमंत जेवणे,** बी.कॉम., एलएल.बी., द्वितीय वर्ष. शिल्पकार चरित्रकोश - प्रकल्प कार्यकारी संपादक. अ.भा. कीर्तन संस्थेतून कीर्तनाचे प्रशिक्षण. संमोहन शास्त्राचे प्रशिक्षण. 'मराठी, हिंदी व इंग्रजी भाषांत एकूण २५ पुस्तके प्रकाशित. महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, सदस्य. समरसता अध्ययन केद्र, समन्वयक.



**डॉ. प्रमोद जोगळेकर,** प्राणिशास्त्रात पदव्युत्तर पदवी व एम. फिल., पीएच.डी. (पुरातत्त्व). पुराजीवशास्त्र विशेषतः पुराप्राणिशास्त्र या विषयांतील अभ्यासक. डेक्कन कॉलेज पुरातत्त्व विभागात प्राध्यापक. अनेक उत्खनन प्रकल्पांत सहभाग. १० पुस्तके प्रकाशित. ललित लेखक व अनुवादक. विविध पुरस्कार मिळाले आहेत.



**डॉ. प्रकाश जोशी,** विदर्भातील महापाषाणीय संस्कृती या विषयावर पुणे विद्यापीठातून पीएच.डी., एम.ए. (पुरातत्त्वशास्त्र). पंचवीसहून अधिक उत्खननांत सहभाग व सहनिर्देशक (कहाली-ब्रह्मपुरी), 'ग्लिम्प्सेस ऑफ ॲन्शंट महाराष्ट्र थ्रू आर्किऑलॉजिकल एक्स्कॅव्हेशन्स' या पुस्तकाचे संपादक व सहलेखक.



**डॉ. भीमसेन रंगाचार्य जोशी,** एम.ए., पीएच.डी. (तत्त्वज्ञान), माजी उपप्राचार्य, विद्यावर्धिनी महाविद्यालय, धुळे. माजी कार्याध्यक्ष, महाराष्ट्र तत्त्वज्ञान परिषद. सामाजिक शास्त्रांतील संज्ञा-सिद्धान्तांचा स्पष्टीकरणात्मक कोश - लेखक व संपादक. एकंदर आठ खंड प्रकाशित. विविध सामाजिक शास्त्रांवर ग्रंथनिर्मिती. विश्वमाता फाउंडेशनतर्फे राज्यस्तरीय विश्वरत्न पुरस्कार.

**डॉ. सु.वा. जोशी,** इतिहास व साहित्य या विषयांचे अभ्यासक. विविध विषयांवर साक्षेपी लेखन.



**डॉ. अपर्णा झा,** एम.ए., पीएच.डी. (भाषाशास्त्र), विविध बंगाली पुस्तकांचे मराठीत अनुवाद. जपान येथील कानाझावा विद्यापीठात सहयोगी प्राध्यापकपदावर कार्य.



**डॉ. उज्ज्वला झा,** एम.ए., पीएच.डी., संस्कृत प्रगत अध्ययन केंद्र, पुणे येथे प्राध्यापक. सहा पुस्तके प्रकाशित. १७ विविध ग्रंथांचे संपादन. सत्तरहून अधिक शोधनिबंध सादर. अनेक कार्यशाळांत व चर्चासत्रांत सहभाग.



**डॉ. हेमा डोळे,** एम.ए.,बी.एड., पीएच.डी. (संस्कृत व्याकरण). टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे येथे दीर्घकाळ संस्कृतचे अध्यापन. शालेय विद्यार्थ्यांसाठी संस्कृत पाठ्यपुस्तक निर्मितीत समन्वयक. पुणे मनपाचा आदर्श शिक्षक पुरस्कार प्राप्त.



**डॉ. म. के. ढवळीकर,** ज्येष्ठ पुरातत्त्वज्ञ, डेक्कन महाविद्यालयामध्ये संचालक म्हणून निवृत्त. कला आणि पुरातत्त्व या विषयांवर वीसहून अधिक पुस्तके प्रकाशित. भारत सरकार सांस्कृतिक प्रतिनिधी मंडळ, इजिप्तमध्ये सदस्य होते. इनामगाव उत्खननात सहभाग. पद्मश्री पुरस्कार प्राप्त.



**प्रा. सुचित्रा शरद ताजणे,** एम. ए. संस्कृत, यूजीसी नेट (संस्कृत), बी.एड., साहाय्यक प्राध्यापक, संस्कृत विभाग, मुंबई विद्यापीठ. विविध अनियतकालिकांत प्रबंध प्रकाशित आणि राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावरील परिषदांत सहभाग.



**डॉ. गणेश उमाकांत थिटे,** ‘सॅक्रिफाइस इन ब्राह्मणा टेक्स्ट्स या प्रबंधावर पीएच.डी., पुणे विद्यापीठ संस्कृत विभाग प्रमुख म्हणून निवृत्त. भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिराचे मानद संग्रहाध्यक्ष. विविध ग्रंथ प्रकाशित व दोनशेहून अधिक लेख प्रकाशित. विविध देशांत चर्चासत्रांतून सहभाग व अध्यापनकार्य. इंदिरा बेहरे सुवर्णपदकाने व अन्य पुरस्कारांनी सन्मानित.



**डॉ. राजा दीक्षित,** इतिहास व साहित्य या विषयांचे अभ्यासक. विविध विषयांवर साक्षेपी लेखन.



**डॉ. गो.बं. देगलूरकर,** डी.लिट., अध्यक्ष, डेक्कन कॉलेज पुणे. प्राचीन भारतीय कला व स्थापत्य या विषयांतील राष्ट्रीय पातळीवरील सर्वमान्य अभ्यासक. महाराष्ट्राच्या मंदिर स्थापत्यावरील डी.लिट. अनेक पुस्तके प्रकाशित. डेक्कन कॉलेज अभिमत विद्यापीठ माजी कुलपती.



**डॉ. महेश देवकर,** एम.ए. (संस्कृत आणि पाली). पीएच.डी., सहयोगी प्राध्यापक, कानाझावा विद्यापीठ, जपान. पाली विभाग प्रमुख, पुणे विद्यापीठ. राज्यस्तरीय बुद्धिस्ट नाट्यस्पर्धा, पाली व संस्कृत भाषेत आयोजन केले. देशना इन्स्टिट्यूट ऑफ बुद्धिस्ट अँड अलाइड स्टडीजचे अध्यक्ष. अतिथी प्राध्यापक, डिपार्टमेंट ऑफ इंडॉलॉजी अँड तिबेटॉलॉजी, फिलिप्स युनिव्हर्सिटी, मारबर्ग, जर्मनी. बहुजन भूषण पुरस्कार व डॉ. बाबासाहेब आंबेडकर जीवनगौरव पुरस्कार प्राप्त.



**डॉ. विद्या देवधर,** एम.ए., एम.फिल., पीएच.डी., डॉ. रा.ब. माढेकर सुवर्णपदक, यूजीसीची संशोधनवृत्ती पाच वर्षे, कृष्णामृतनट प्राचीन हस्तलिखिताचे संशोधन व संपादन, 'स्त्रीलिखित कादंबरी - प्रेरणा व प्रवृत्ती' व अन्य पुस्तके प्रकाशित. अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ - माजी उपाध्यक्ष व सदस्य. सेतुमाधवराव पगडी समग्र साहित्य (सहा खंड) सहसंपादक व अन्य संपादनकार्यात सहभाग. विविध साहित्य संमेलनात वक्ता म्हणून सहभाग.



**डॉ. दिनकर देशपांडे,** बी.ए., बी.एस्सी., एम.ए. (हिंदी, संस्कृत, भाषाशास्त्र), पीएच.डी., उपप्राचार्य, प्राच्य महाविद्यालय. उस्मानिया विद्यापीठात हिंदी विभागात विविध भाषाविषयक प्रकल्प पूर्ण. विविध बारा विषयांवर साडेचारशेहून अधिक लेख प्रकाशित. तीन ग्रंथ प्रकाशित. दोन ग्रंथांचे अनुवाद प्रकाशित. कै. पु.भा. भावे स्मृती पुरस्कार, गीता गौरव पुरस्कार व अन्य पुरस्कार प्राप्त.



**डॉ. परिणिता देशपांडे,** एम.ए., पीएच.डी., एशियाटिक सोसायटी ऑफ मुंबईच्या एम.एम. काणे पी.जी. रिसर्च इन्स्टिट्यूटच्या संचालक. क.जे. सोमय्या सेंटर फॉर बुद्धिस्ट स्टडीजच्या साहाय्यक संचालक. विविध कार्यक्रमांचे लेखन व मंचन. तीन पुस्तकांचे सहसंपादन.



**डॉ. मैत्रेयी देशपांडे,** एम.ए., पीएच.डी. (संस्कृत, पाली)., 'कन्सेप्ट ऑफ टाइम इन वेदिक रिच्युअल' हे पुस्तक प्रकाशित. भांडारकर प्राच्यविद्या मंदिर या संस्थेच्या मानद सचिव. देशस्थ ऋग्वेदी संस्थेच्या पुरस्काराने व वेदमूर्ती पं. सातवळेकर पुरस्काराने सन्मानित.

**डॉ. सी.बी. देशपांडे,** इतिहास व साहित्य या विषयांचे अभ्यासक. विविध विषयांवर साक्षेपी लेखन.



**डॉ. संजय देशमुख,** एम.ए. (मराठी, समाजशास्त्र, राज्यशास्त्र), पीएच.डी., संतसाहित्य व लोकसाहित्य यांचा अभ्यास. 'पारंपरिक नाट्यरूप लोकोत्सव', 'ललिततातील संपादणी' इत्यादी ग्रंथ प्रकाशित. विविध विषयांवर साक्षेपी लेखन.



**डॉ. लीना राजेश दोशी,** बी.कॉम., एम.बी.ए., एम.ए. (संस्कृत - सुवर्णपदक). भाषामहोत्सव कार्यशाळा, लेक्सिकोग्राफी कार्यशाळा, संस्कृत लेखन कार्यशाळा, इत्यादी कार्यशाळांत सहभाग. वेदाचार्य जी.बी. फाटक गुरुजी पुरस्कार. जवाहरलाल नेहरू स्मृती गुणवत्ता पारितोषिक. महाराष्ट्र राज्य शासन संस्कृत प्रावीण्य पारितोषिक.



**डॉ. मो.गो. धडफळे,** पदवी परीक्षेत विद्यापीठात प्रथम. संस्कृतची सर्व पारितोषिके व सर्व शिष्यवृत्त्या. फर्गसन महाविद्यालयामध्ये दहा वर्षे उपप्राचार्य. टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचे कलाशाखेचे अधिष्ठाता. अखिल भारतीय प्राच्यविद्या परिषदांमध्ये दोन वेळा पाली-बौद्ध धर्म विषयाचे अध्यक्ष. आजवर ३१ पुस्तके व ८४ शोधनिबंध प्रसिद्ध.



**नलिनी धडफळे,** संस्कृत विषयात पदवी. भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिराच्या महाभारत प्रकल्पात सेवा. त्यानंतर श्री. नाथीबाई दामोदर ठाकरसी महाविद्यालयात प्राध्यापिका. वैदिक संशोधन मंडळाच्या पहिल्या महिला आजीव सदस्य. अवेस्ता लिपी अवगत. मा.फ. कांगा यांच्या सहयोगाने 'अवेस्ता रिडर' हे इंग्लिश पुस्तक प्रकाशित. अवेस्तावर अनेक लेख प्रसिद्ध.

**डॉ. फरिबोर्झ नरिमन,** इतिहास व साहित्य या विषयांचे अभ्यासक. विविध विषयांवर साक्षेपी लेखन.



**डॉ. अमृता नातू,** पीएच. डी. (संस्कृत)., भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्थेमध्ये असिस्टंट क्यूरेटर इन चार्ज. द इरासमुस मुंडुस शिष्यवृत्तीच्या आधारावर जर्मनीतील गेऑर्ग-ऑगस्ट विद्यापीठात एक वर्ष अध्ययन.



**डॉ. सूरज पंडित,** एम.ए., पीएच.डी., पुरातत्त्वज्ञ व कलेतिहास तज्ज्ञ. के.सी. कॉलेज तसेच साठ्ये कॉलेज व शैलेंद्र कॉलेज येथे व्याख्याता म्हणून कार्यरत. कान्हेरी गुंफा या विषयात डॉक्टरेट. वेगवेगळ्या विषयांवरील कार्यशाळांचे आयोजन. अकरा शोधनिबंध प्रसिद्ध. राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय पातळीवर अठरा निबंधांचे सादरीकरण.



**डॉ. अंजली माधव पर्वते,** एम.ए., पीएच.डी (संस्कृत), सहयोगी प्राध्यापक, किसानवीर कॉलेज, वाई. ११ पुस्तके प्रकाशित. दोन पुस्तकांना राज्य साहित्य पुरस्कार प्राप्त. तसेच एका पुस्तकाला कमल तांबे पुरस्कार व एका पुस्तकाला संत रामदास पुरस्कार मिळाला आहे.

**डॉ. परशुराम परांजपे,** इतिहास व साहित्य या विषयांचे अभ्यासक.
विविध विषयांवर साक्षेपी लेखन.



**ऋता पराडकर,** भाषाशास्त्र या विषयातून पदव्युत्तर शिक्षण घेऊन डेक्कन महाविद्यालय, पुणे येथे भाषाशास्त्र विभागात पीएच.डी.वर कार्यरत.



**डॉ. मंजुश्री जयसिंगराव पवार,** यशवंतराव चव्हाण वारणा महाविद्यालय, इतिहास विभाग प्रमुख म्हणून कार्यरत. राष्ट्रीय-आंतरराष्ट्रीय पातळीवर १७ शोधनिबंध प्रकाशित. 'राजर्षी शाहू अँड ब्रिटिश पॅरामाउंट इन इंडिया, हे पुस्तक प्रकाशित व अन्य तीन पुस्तकांच्या सहलेखिका. महाराष्ट्र राज्य राजर्षी शाहू चरित्रसाधने प्रकाशन समितीवर नियुक्ती.



**डॉ. भाग्यलता अशोक पाटसकर,** बी.ए., एम.ए. (संस्कृत, भाषाशास्त्र). पीएच.डी. संचालक, वैदिक संशोधन मंडळ, पुणे. 'गुरुगीता', 'कथा आरण्यक', 'पवित्रेष्ठी', 'बैठा परिभाषा' आदी पुस्तके प्रकाशित. १३ पुस्तकांचे संपादन. सहा पुस्तकांच्या सहयोगी संपादक. राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय परिषदांतून सहभाग. सातवळेकर पुरस्काराने व अन्य पुरस्कारांनी सन्मानित.



**डॉ. अरुणचंद्र पाठक,** एम.ए., पीएच.डी., 'गोदावरी एक सांस्कृतिक अभ्यास - महानुभाव पोथीच्या विशेष संदर्भात' ह्या विषयात डॉक्टरेट. दर्शनिका विभाग, महाराष्ट्र शासन येथे कार्यकारी संपादक व सचिव म्हणून कार्यरत. तत्पूर्वी राज्य पुरातत्त्व विभागात सेवा. तीस संशोधनपर लेख, तसेच 'महाराष्ट्रातील बारव स्थापत्य', प्राचीनकाळ, मध्ययुगीनकाळ हे ग्रंथ, राज्य व सातारा, लातूर, नागपूर व जिल्हा गॅझेटिअरचे संपादन.



**प्रा. मोहन पाठक,** विद्या प्रसारक मंडळाच्या बाळकृष्ण नाईक बांदोडकर विज्ञान महाविद्यालयाचे ग्रंथपाल. दिशा मासिकाचे कार्यकारी संपादक होते. 'ठाणे वैभव' व 'सन्मित्र' या दैनिकांमध्ये विपुल लेखन.



**डॉ. प्रतिभा मोहन पिंगळे,** एम.ए. (संस्कृत, पाली), एम.ए. (भाषाशास्त्र), बी.ए. (जर्मन), पीएच.डी. (संस्कृत), फर्गसन महाविद्यालयात अध्यापन, डेक्कन कॉलेजमध्ये संस्कृत महाकोशात कार्यरत व संपादकपदावरून निवृत्त. 'सोलर डिव्हिनिटीज इन द ऋग्वेद' या शोधनिबंधास डॉ. बेलवलकर संशोधन पुरस्कार. 'द कन्सेप्ट ऑफ वाक् इन वेदिक लिटरेचर' हे पुस्तक प्रकाशित.



**डॉ. नंदा जयंत पुरी,** एम.ए. (संस्कृत), एम.फिल., पीएच.डी., बी.एड. अधिष्ठाता, कविकुलगुरू कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेक. महाराष्ट्र शासनाचा शिक्षक पुरस्कार (२००७). महाकवी कालिदास संस्कृत साधना पुरस्कार (२०१४). पाच पुस्तके प्रकाशित. विविध पाठ्यपुस्तके प्रकाशित. राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय परिषदांतून सहभाग. तसेच सचिव म्हणून आयोजन.



**डॉ. दिलीप बलसेकर,** कार्यकारी संपादक व सचिव, दर्शनिका विभाग. राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर शोधनिबंध प्रकाशित. मुद्राशास्त्र आणि इतिहास या विषयांवर ६ ग्रंथ प्रकाशित. मुद्रासंशोधन पुरस्कार. गोदारत्न पुरस्कार. लो. टिळक पुरस्कार. म.म.द.वा. पोतदार पुरस्कार व अन्य पुरस्कार प्राप्त.



**डॉ. श्रीकांत बहुलकर,** बी.ए., एम.ए. पीएच.डी., टिळक महाराष्ट्र विद्यापीठात श्रीबालमुकुंद संस्कृत महाविद्यालयाचे प्राचार्य. सारनाथ येथील केंद्रीय उच्च तिब्बती अध्ययन विश्वविद्यालयातील दुर्लभ बौद्ध ग्रंथ संशोधन प्रकल्प संचालक व मुख्य संपादक. पुणे विद्यापीठात पाली आणि बौद्धविद्या अध्ययन विभागात साहाय्यक प्राध्यापक म्हणून कार्यरत.



**डॉ. आसावरी बापट,** बी.ए., एम.ए. पीएच.डी. (संस्कृत)., विविध प्राचीन लिप्यांचा अभ्यास. विविध विद्यापीठांत व महाविद्यालयांत अभ्यागत अध्यापक म्हणून कार्य. संस्कृत पदविका अभ्यासक्रम परीक्षांच्या अध्यक्ष. बहिःशाल शिक्षण विभागात मोडी अध्यापन. विविध राष्ट्रीय चर्चासत्रांतून निबंधांचे सादरीकरण. 'गव्हर्नन्स इन एन्शंट इंडिया' व 'गौरीगौरवम्' या ग्रंथांचे संपादन व 'कोकणची लोकसंस्कृती' हे भाषांतरित पुस्तक प्रकाशित.



**डॉ. श्रीनंद लक्ष्मण बापट,** एम.ए. (प्राचीन भारतीय इतिहास, संस्कृती आणि पुरातत्त्व), पीएच.डी. निबंधक आणि अभिरक्षक (भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्था. (ऑल इलस्ट्रेटेड प्राकृत मॅन्युस्क्रीप्ट ऑफ पर्युषण कल्पसूत्र' (इंग्लिश) व 'जपून ठेवा अपुला ठेवा' ही पुस्तके प्रकाशित. राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय परिषदांत सहभाग आणि विविध विषयांवर लेखन प्रकाशित.

**भावना भालचंद्र बालते,** एम.ए. टिळक महाराष्ट्र विद्यापीठातून संस्कृतमध्ये पदविका, महाकवी कालिदास संस्कृत पाठशाळेच्या माध्यमातून संस्कृत प्रसारकार्यात सहभाग. पाली व संस्कृत भाषा प्रमाणपत्र व पदविका अभ्यासक्रमासाठी परीक्षक.



**अरविंद बाळ,** सिव्हील इंजिनिअर म्हणून ४७ वर्षे भारतभर फिरती. २००२ साली पुण्याला स्थायिक. राष्ट्रवाद, हिंदुत्व आणि विशेषत: इस्लाम व सेक्युलॅरिझम याविषयी अभ्यास व चिंतन. ज्ञानप्रबोधनीतील 'राष्ट्रवाद बैठक'शी क्रियाशील संबंध. 'परम मित्र'मध्ये स्फुट लेखन. मुस्लीम सत्यशोधक मंडळाशी घनिष्ठ संबंध.



**कविता भालेराव,** विज्ञानलेखक. 'जिज्ञासेतून विज्ञान', 'मैत्री करू या पर्यावरणाशी', 'शोधांचे शोध', 'तंत्रज्ञानाची मुळाक्षरे' आदी पुस्तके प्रकाशित. 'पेशीबद्ध जीवन : एक निरंतर प्रवास', 'माझा यंत्रमानव मित्र रोबो', 'सामान्य आजारांवरील नैसर्गिक उपाय' इत्यादी अनुवादित पुस्तके प्रकाशित. विविध कोश व सूची वाङ्मय कार्यात सहभाग.



**वा.ल. मंजूळ,** भांडारकर संशोधन संस्थेच्या ग्रंथालयात २८ वर्षे मुख्य ग्रंथपाल. अनेक देशी–विदेशी विद्वानांना संशोधनात सहकार्य. महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटीच्या विश्वभारत सांस्कृतिक केंद्राचे तीन वर्षे संचालक. पंचवीस ग्रंथांचे लेखन आणि संपादन. विविध संस्थांचे संस्थापक सदस्य व विविध पुरस्कारांनी सन्मानित.



**डॉ. स.दि. महाजन,** एम.ए. (मराठी साहित्य), माजी प्राचार्य - प्रतिभा निकेतन महाविद्यालय. महाराष्ट्र शासनाच्या दर्शनिका संपादक मंडळाचे सदस्य. विश्वकोश निर्मिती मंडळ कार्यकारिणी सदस्य. अमेरिकन बायोग्राफिकल इन्स्टिट्यूटच्या संशोधन समितीवर सल्लागार सदस्य. मराठवाडा साहित्य परिषदेचे २८ वर्षे विश्वस्त. अ.भा. मराठी साहित्य संमेलन, नांदेडचे कार्याध्यक्ष (१९८५).



**डॉ. गिरीश दत्तात्रेय मांडके,** एम.ए. (इतिहास), मराठ्यांच्या इतिहासाचे अभ्यासक. मराठा इतिहास संग्रहालय, डेक्कन कॉलेज, पुणे येथे क्यूरेटर या पदावर कार्यरत.



**डॉ. कांचन मांडे,** एम.ए. पीएच.डी. (संस्कृत वेदान्त), राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर अनेक कार्यशाळांत व चर्चासत्रांत सहभाग. विविध विषयांवर लेखन प्रकाशित.



**डॉ. गौरी माहुलीकर,** संस्कृत विषयात स्नातक व स्नातकोत्तर परीक्षांत सुवर्णपदक. 'अभिजात संस्कृत साहित्याचा इतिहास' या पुस्तकाच्या सहलेखिका. लिमजी सुवर्णपदकाने सन्मानित. आंतरराष्ट्रीय रामकृष्ण पुरस्काराने सन्मानित.



**नंदकुमार गणपतराव मेगदे,** एम. ए. (इतिहास), एम.पी.एड., शारीरिक शिक्षण संचालक, श्रीगुरुगोविंदसिंघजी अभियांत्रिकी व तंत्रशास्त्र महाविद्यालय, विष्णुपुरी, नांदेड. 'शारीरिक शिक्षणातील पर्यवेक्षण १९९९-२०००' हे पुस्तक प्रकाशित. प्राचीन भारतीय खेळांचा इतिहास आणि प्राचीन नांदेडचा इतिहास यांबद्दल २५ लेख प्रकाशित. राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय विविध क्रीडा संघटनांशी संबंध.

**डॉ. गजानन मेहेंदळे,** इतिहासाचे अभ्यासक.
विविध विषयांवर साक्षेपी लेखन.



**डॉ. रामचंद्र श्रीनिवास मोरवंचीकर,** एम.ए. (इतिहास), पीएच.डी., प्राचीन भारतीय सांस्कृतिक विभाग, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद येथून प्राध्यापक म्हणून निवृत्त. भारतीय जलसंस्कृती मंडळाचे ते उपाध्यक्ष होते. प्राचीन भारतीय संस्कृती, पुरातत्त्व, वारसा, जलव्यवस्थापन, इतिहास संशोधन, कला व इतिहास, भारतीय जलसंस्कृती इत्यादी विषयांवरील ३० पुस्तकांचे लेखन. राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय पातळीवर २०० शोधनिबंधांचे सादरीकरण.



**डॉ. श.न. राजगुरू,** डेक्कन कॉलेज, पुणे येथून भू-पुरातत्त्वाचे प्राध्यापक म्हणून निवृत्त. तीन पुस्तके व ४०० शोधनिबंध प्रसिद्ध. संशोधनाबद्दल एशियाटिक सोसायटीतर्फे सुवर्णपदक प्राप्त.



**डॉ. प्रतिभा रानडे,** बी.ए. (अर्थशास्त्र–राज्यशास्त्र), पत्रकारितेची पदविका. 'लामाचे रहस्य', 'बंद दरवाजा' आदी अनुवादित पुस्तके प्रकाशित. 'अफगाण डायरी', 'बुरख्याआडच्या स्त्रिया', 'मानुषी', 'काबुल कंदाहारकडील कथा', 'ऐसपैस गप्पा दुर्गाबाईंशी', 'ऐरणीवरचे प्रश्न', 'स्मरणवेळा' इत्यादी पुस्तके प्रकाशित. 'बदनसीब' आणि 'अफगाण डायरी' या पुस्तकांना उत्कृष्ट वाङ्मयनिर्मितीचा महाराष्ट्र राज्य पुरस्कार.



**डॉ. कल्पना रायरीकर,** एम.कॉम., एम.ए. (इंडॉलॉजी), भांडारकर प्राच्यविद्या संस्थेमध्ये जुन्नर शिलालेख प्रकल्पामध्ये साहाय्यक संशोधक म्हणून कार्य. 'महाराष्ट्र संस्कृती' व 'महाराष्ट्राच्या इतिहासाचे साक्षीदार' या दोन पुस्तकांचे सहलेखन. विविध संस्थांमध्ये व्याख्याने व शोधनिबंध सादर.



**डॉ. वीणा लोंढे,** बी.ए. व एम.ए. संस्कृत विषयात प्रथम वर्गात प्रथम क्रमांक आणि सुवर्णपदक. पीएच.डी.साठी वेदांवर प्रबंधलेखन. राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय चर्चासत्रांत निबंधवाचन. मुंबई विद्यापीठाच्या संस्कृत विभागात डॉ. स.अं. डांगे अध्यासनावर मानद प्राध्यापिका. कैवल्यधाम लोणावळ्याच्या प्रशिक्षित योग शिक्षिका व २५ वर्षे योग क्षेत्रात कार्यरत. तीन पुस्तके प्रसिद्ध.



**डॉ. चंद्रगुप्त वर्णेकर,** बी.ई., एम.टेक., पीएच.डी., संगणकीय आज्ञावली व हार्डवेअर क्षेत्रात संशोधन व कार्य. देवनागरी फाँटवेअरचे जाणकार. आय.एस.टी.ई.चे आजीव सदस्य. संस्कृत भाषा प्रचारिणी सभेचे सचिव. विविध संस्कृत नियतकालिकांतून मुलांसाठी विज्ञान या विषयावर संस्कृत लेख प्रकाशित. भारतीय संस्कृत पत्रकार संघाचे उपाध्यक्ष.



**डॉ. उमा वैद्य,** एम.ए. संस्कृत प्रथम वर्गात प्रथम - सुवर्णपदक. पीएच.डी., डी.लिट., रामटेक येथील कविकुलगुरू कालिदास संस्कृत विद्यापीठाच्या कुलगुरू. माजी आर.जी. भांडारकर प्रोफेसर - संस्कृत, संस्कृत विभाग प्रमुख, मुंबई विद्यापीठ. सात पुस्तके आणि ८५ शोधनिबंध प्रकाशित. महाराष्ट्र शासनाचा कालिदास संस्कृत साधना पुरस्कार प्राप्त.



**डॉ. मीना वैशंपायन,** एम.ए., बी.एड., पीएच.डी. (मराठी व संस्कृत). एशियाटिक सोसायटीच्या उपाध्यक्ष. ‘दुर्गापर्व’, ‘ज्ञानकोशकार केतकर’, ‘साहित्यवेध’, ‘ती’चं अवकाश’ इत्यादी एकूण १४ पुस्तके प्रकाशित. ‘दुर्गापर्व’ला राज्य शासनाचा उत्कृष्ट समीक्षेचा पुरस्कार. ‘तीचं अवकाश’ला सावाना, नाशिक संस्थेचा वि.दा. सावरकर पुरस्कार.

**डॉ. मु.ब. शहा,** इतिहास व साहित्य या विषयांचे अभ्यासक.
विविध विषयांवर साक्षेपी लेखन.



**डॉ. सदाशिव शिवदे,** पशुवैद्यक पदविका, एम.ए. (मराठी/इतिहास), पीएच.डी. (इतिहास/ संस्कृत), ‘ज्वलज्ज्वलनतेजस संभाजीराजा’, या ग्रंथास महाराष्ट्र साहित्य परिषदेचा म.म. द.वा. पोतदार पुरस्कार. महर्षी वेदव्यास प्रतिष्ठान पुरस्कार. सह्याद्री प्रतिष्ठान पुरस्कार. एकूण १८ पुस्तके प्रकाशित.



**प्रा. ओमप्रकाश समदानी,** पीएच.डी., ‘त्र्यंबक शंकर शेजवलकरांच्या संदर्भात विशेष अभ्यास’ या विषयात डॉक्टरेट. मराठ्यांचा इतिहास आणि इतिहासकार हा त्यांचा अभ्यासाचा विषय. मराठवाडा इतिहास संशोधन पत्रिकेतून शोधनिबंध प्रकाशित. विविध वृत्तपत्रे व नियतकालिके यातून लिखाण प्रसिद्ध. ‘चीन आणि जपानचा इतिहास’ हे पाठ्यपुस्तक प्रकाशित. राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय परिषदांमधून शोधनिबंधांचे सादरीकरण.



**डॉ. प्र.द. सरदेशमुख,** एम.ए., (इंग्लिश), आरंभी आयुर्विमा महामंडळात नोकरी व नंतर पालघर येथील सोनोपंत दांडेकर महाविद्यालयात अध्यापन. संतसाहित्याचा अभ्यास आणि प्रवचनकार.



**डॉ. यशवंत साधू,** एम.ए. (मराठी), बी.एड., पीएच.डी., मध्ययुगीन साहित्याची समीक्षा करणारे लेखसंग्रह - 'गवाक्ष', 'मंथन', 'अन्वय' प्रकाशित. 'निळोबांची अभंगवाणी - आकलन व आस्वाद' (मसाप पुरस्कार). 'भावार्थ एकनाथी भागवत', 'अनुभवामृत भाष्य', 'सार्थ एकनाथी भारूड' हे संपादित साहित्य.



**डॉ. अंबुजा साळगावकर,** बीएस्सी. पीएच.डी. (कॉम्प्युटर सायन्स). संचालक, इन्स्टिट्यूट ऑफ डिस्टन्स अँड ओपन लर्निंग, मुंबई विद्यापीठ. राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय परिषदांत सहभाग. विविध वृत्तपत्रांतून व नियतकालिकांतून वेगवेगळ्या विषयांवर लेखन प्रकाशित. रोबोटिक्स प्रोग्रॅमिंग व संगणक संबंधित विषयांत संशोधन.



**डॉ. गीता साळी,** इतिहास संशोधक, छत्रपती शिवाजी महाराज वस्तुसंग्रहालयात कार्य केले आहे. विविध विषयांवर शोधनिबंध सादर केले आहेत. शरयू दोशी, डॉ. फिरोजा गोदरेज आणि मधुरिका माहेश्वरी यांच्यासोबत कार्य केले आहे.



**डॉ. सीमा सोनटक्के,** एम.ए., पीएच.डी. (संस्कृत), एशियाटिक सोसायटी ऑफ मुंबईच्या एम.एम. काणे पी.जी. रिसर्च इन्स्टिट्यूटच्या रिसर्च फेलो. विविध विषयांवर लेख प्रकाशित.



**श्रीश हळदे,** प्रधान संपादक-'प्रज्ञालोक', नामवंत लेखक, वृत्तपत्रातील लेख, व्याख्याने, प्रवचने याद्वारे जनजागृती. 'लेखावली', 'शेतकऱ्यांच्या आत्महत्या' ही पुस्तके प्रकाशित.



**डॉ. स्मिता होटे,** एम.ए., बी.एड., एम.फिल., पीएच.डी., संस्कृत विभाग प्रमुख, लेडी अमृताबाई डागा महाविद्यालय, नागपूर. अनेक शोधनिबंध प्रकाशित. राष्ट्रीय व राज्यस्तरीय परिषदांत सहभाग. विविध पुस्तकांचे संपादन. 'वैदर्भीय कवी दत्तात्रेय येरकुंटवार', 'इतस्ततः', 'तस्याःकथा', 'नाट्यत्रिदलम्' आदी पुस्तके प्रकाशित.

विवेक
आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण
शिल्पकार चरित्रकोश
ही गाथा कर्तृत्वाची! प्रगल्भ नेतृत्वाची!

खंड ८

भाग २

# धर्मपरंपरा

संपादक
विद्याधर ताठे

खंड सहयोग
ICHR
भारतीय इतिहास अनुसंधान परिषद
(आयसीएचआर), नवी दिल्ली

प्रायोजक
दि सारस्वत को-ऑप. बँक लि.

प्रकाशक
साप्ताहिक विवेक
(हिंदुस्थान प्रकाशन संस्था)

**आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण**
**शिल्पकार चरित्रकोश, खंड ८**
धर्मपरंपरा



**पहिली आवृत्ती :**
माघ शुद्ध नवमी, शके १९३९, २६ जानेवारी २०१८

**प्रकाशक**
साप्ताहिक विवेक (हिंदुस्थान प्रकाशन संस्था)
५/१२, कामत औद्योगिक वसाहत,
३९६, स्वा. सावरकर मार्ग, प्रभादेवी,
मुंबई - ४०० ०२५.
दूरध्वनी : (०२२) २४२२ १४४०/५६३९
फॅक्स : (०२२) २४३६ ३७५६
e-mail : charitrakosh@gmail.com
Website : www.maharashtranayak.com

**संगणकीय अक्षरजुळणी**
आस्वाद प्रकाशन प्रा. लि., प्रभादेवी, मुंबई.

**मुद्रितशोधन**
मिलिंद केसरीनाथ वेलिंगकर

**मांडणी**
वीणा कुलकर्णी

**मुखपृष्ठ**
आस्वाद प्रकाशन प्रा. लि., मुंबई

**मुद्रक**
सिद्धी ऑफसेट, प्रा. लि., प्रभादेवी, मुंबई - २५.
दूरध्वनी : (०२२) २४२२००६२

**विशेष आभार**
निळकंठ पालेकर

**मूल्य :**
रु. १२००/-



धर्मपरंपरा

**संपादक**
विद्याधर ताठे

**सहसंपादक**
दीपक हनुमंत जेवणे

**संपादन साहाय्य**
सुपर्णा कुलकर्णी (कार्यालयीन)



**THE PUBLICATION OF THIS BOOK HAS BEEN FINANCIALLY SUPPORTED BY THE INDIAN COUNCIL OF HISTORICAL RESEARCH. THE RESPONSIBLITY FOR THE FACTS STATED OR OPINIONS EXPRESSED IS ENTIRELY OF THE AUTHOR AND NOT OF THE COUNCIL.**

# आशीर्वचन



**स्वामी गोविंदगिरीजी**
**तथा आचार्य किशोरजी व्यास**

- विश्वविख्यात भागवत-रामायण कथाकार; जाज्ज्वल्य राष्ट्रभक्त व समाजसन्मुख संत; आचार्य.
- श्रीमद्‌शंकराचार्य - भारतमाता मंदिराचे संस्थापक स्वामी सत्यमित्रानंद गिरी यांचे शिष्य व उत्तराधिकारी.
- श्रीक्षेत्र आळंदीस्थित महर्षी वेदव्यास प्रतिष्ठानचे संस्थापक.
- देशभर भागवत कथांचे - रामायण कथांचे सोहळे व धर्मजागरण.
- अनेक ग्रंथांचे लेखक.

परमेश्वराची सर्वश्रेष्ठ कृती म्हणजे मनुष्य होय! अनंत, अपार असलेल्या विश्वसृष्टीचा विचार बाजूला ठेवून ज्या पृथ्वीवर आपण निवास करतो केवळ तिचाचा विचार केला तरी असंख्य योनी आपल्या दृष्टोत्पत्तीला येतात. आपल्या पारंपरिक धारणेनुसार ८४ लक्ष योनींच्या अस्तित्वाबद्दल आपण ऐकत असतो. मी हा आकडा लक्षणेने घेत असे व इतक्या मोठ्या संख्येबद्दल साशंकही असे, पण ऑस्ट्रेलियाच्या प्रवासात एक मत्स्यालय बघण्याचा योग आला आणि केवळ माशांचे अक्षरश: हजारो विविध रंगांचे आणि अनेक आकृतींचे प्रकार बघून मी चक्रावून गेलो. माझे या विषयातील जुजबी ज्ञान १०-१२ प्रकारांपलीकडे नव्हते. त्यामुळे या अनुभवाने मी आश्चर्यात बुडणे स्वाभाविक होते. एक साध्या माशाचे इतके प्रकार असू शकतात तर अज्ञात व अदृष्ट विश्वात अस्तित्वात असलेल्या योनींची गणना कुणी व कशी करावी? केवळ असंख्य हाच शब्द योग्य वाटावा इतके हे प्रकार नाकारता येत नाहीत हेच खरे!

श्रीमद्‌भागवतात असे म्हटले आहे की, अशा असंख्य योनींच्या निर्मितीनेही ब्रह्मदेवांना समाधान प्राप्त झाले नाही, पण मानवाकृतीची कल्पना करताच ते आनंदून गेले. गोष्ट खरीच आहे. आमच्या सर्व शास्त्रांनी एकमुखाने मानवदेहाची महती गाइली. **‘धन्य धन्य हा नरदेहो, येथील अपूर्वता पहा हो’** असे म्हणून समर्थांनी त्याचा गौरव केला आणि **‘शरीरासारखे यंत्र आणिक नाही’** असे म्हणून त्याची विलक्षणताही अधोरेखित केली. मनुष्य हा बुद्धिवान प्राणी आहे, असे ॲरिस्टॉटलने म्हटले आहे खरे, पण ही व्याख्या पुरेशी नाही कारण भगवान आदिशंकराचार्यांनी ब्रह्मसूत्र भाष्यात म्हटल्याप्रमाणे, ‘अल्प बुद्धि तर गाय, घोडा, कुत्रा इ. पशूंनाही असते.’ हत्ती, चिम्पँझी किंवा डॉल्फिन यांच्यात तर पुष्कळच अधिक बुद्धी असल्याचे दिसते. मानवातील बुद्धी

यांच्यापेक्षा फारच अधिक आहे हे खरे! पण केवळ बुद्धी हे माणसाचे वैशिष्ट्य नाही. अगदी स्पष्ट सांगायचे तर आत्मबुद्धी हे माणसाचे खरे लक्षण आहे. मी कोण आहे, याचे ज्ञान माणसाला केवळ देहापुरते नसते तर त्याच्या ज्ञानाच्या, भावनांच्या कक्षेत मागल्या व पुढल्याही अनेक पिढ्या असतात. म्हणजेच त्याला इतिहासाचे भान असते आणि स्वत:च्याच नव्हे तर आपल्या पुढील पिढ्यांच्याही भविष्याचा वेध घेण्याची त्याची लालसा असते आणि म्हणूनच मागल्या पिढ्यांचे संचित ज्ञान तो सांभाळतो. आपल्या कुवतीनुसार त्यात वाढही करतो आणि हे सर्व संचित पुढल्या पिढ्यांना देण्याची तजवीजही करतो. अन्य योनींपेक्षा माणसांचे वेगळे वैशिष्ट्य ते हे होय! यालाच इतिहास म्हणतात. हे इतिहासाचे भान मानवेतर सृष्टीत आढळत नाही.

इतिहासाचे हे ज्ञान व त्याचे अंतरंगातील विश्लेषण जितके अधिक तितकी प्रगल्भता त्याच्या व्यक्तिमत्वाला व कार्याला येते. स्वामी विवेकानंदांच्या चरित्र व कार्याचा विचार करतांना ही गोष्ट प्रकर्षाने लक्षात यायला हवी. त्यावेळचे अन्य साधक किंवा संन्यासी यांच्या योग-वेदांताच्या ज्ञानापेक्षा स्वामी विवेकानंदांचे वेदांतशास्त्राचे ज्ञान फार अधिक होते असे नाही. परंतु त्यांच्या वेदांत ज्ञानाला व भक्तिसाधनेला त्यांच्या इतिहास ज्ञानाची लाभलेली जोड ही त्यांच्यातील अपूर्वाई होय. किशोरवयापासून त्यांनी इतिहासाचा प्रचंड अभ्यास केलेला होता. भारत, युरोप आणि संपूर्ण विश्वाचा इतिहास जणू त्यांच्या जिव्हाग्री होता. ऐतिहासिक घटनांच्या ज्ञानाने त्यांच्या मानसिकतेला प्राप्त झालेला आकार मात्र अन्य कोणा साधूंमध्ये दिसत नाही. इतिहासाचे हे अपरंपार महत्त्व कुठल्याही मानवी क्षेत्राला लागू पडेल असे आहे. सांस्कृतिक उत्थानाच्या दिशेच्या बाबतीत स्वामी विवेकानंदांना त्याचा उपयोग झाला. ज्याला राजकारणाच्या क्षेत्रात काम करावयाचे त्यालाही योग्य ते निर्णय घेताना ऐतिहासिक ज्ञानाचा उपयोग झाल्याशिवाय रहात नाही. अगदी कायद्यांचा विचार करून केस लढविताना किंवा निर्णय देताना तत्सम केसेसमधील मागील निवाड्यांचे ज्ञान अतिशय उपयुक्त ठरते. इतिहास केवळ राजनैतिक घटनांचा नसतो. पदार्थविज्ञान, रसायनशास्त्र, आयुर्वेद, चित्रकला, संगीत या सर्वच ज्ञानशाखांना इतिहास आहे आणि त्या त्या शाखेच्या इतिहास ज्ञानाने येणारी प्रगल्भता अनोखी असते, हा सार्वत्रिक अनुभव आहे.

आपण ज्या समाजात जन्माला येतो आणि वावरतो त्या समाजाच्या विकासाचाही इतिहास असतो. घडणाऱ्या प्रत्येक घटनेला भूतकाळाची काही पार्श्वभूमी असते आणि भविष्यकालीन समाज मनावर काहीतरी परिणाम करून जाते. यातूनच समाजाची जडण-घडण होत जाते आणि या जडण-घडणीतूनच समाज मनाचे व समाज स्थितीचे शिल्प साकारले जाते. या शिल्पाची दोन अंगे असतात. एक म्हणजे समाजाची किंवा देशाची भौतिक उन्नती, या भौतिक प्रगतीलाच आजकाल विकास म्हटले जाते. हा विकास या शिल्पाचे बहिरंग असते, पण बहिरंगातील होणारा हा विकास होताना सामाजिक स्वास्थ्याच्या दृष्टीने जीवनमूल्यांची सतत जपणूक होत रहाणे हे अंतरंग शिल्प होय. सूक्ष्म विचार करताना सहज लक्षात येते की अंतरंग जीवनमूल्यांची जपणूक जितकी अधिक प्रमाणात होते तितक्याच प्रमाणात बहिरंग विकास सर्वांना सुखदायक ठरतो. रावणाची लंका भौतिक विकासाच्या शिखरावर होती, पण एका राजाच्या वासनेने त्याची धूळधाण झाली. भौतिक उन्नतीचा उपयोग विधायक कार्यासाठी व्हावा की विनाशासाठी हे शेवटी मानसिकतेच्या पोतावर अवलंबून असते. आपल्या वैयक्तिक जीवनातही आपल्या क्रियांचे नियंत्रण बव्हंशी मनाकडून केले जाते. समाजमनाचेही तसेच आहे. सामाजिक मन जितके निकोप राहील तितके वातावरणही सुखदायक होईल. मानसिकताच जर विकृत झाली तर भौतिक उन्नतीही विनाशाकडे म्हणजे पर्यायाने दु:खाकडे नेईल.

मुख्य प्रश्न आहे तो, अवघ्या समाजमनावर संस्कार कुणी व कसे करावेत? भारतीय परंपरा ज्ञानप्रधान आहे. भा म्हणजे आभा म्हणजेच प्रकाश होय. ज्ञानाच्या प्रकाशात निरंतर रत म्हणजे रममाण असलेला देश म्हणजे भारत! ज्ञान प्रदानाचे हे कार्य विभिन्न पातळ्यांवरून या देशात सदैव प्रवाहमान राहिले आहे. प्राचीन गुरुकुलांतून गुरूंच्या द्वारा मोजक्या विद्यार्थ्यांना असंख्य आश्रमांतून, तपोवनांतून ज्ञान दिले जाई. नालंदा, तक्षशिला, आदि विशाल विद्यापीठांतून अनेक आचार्यांच्या द्वारा विविध विषयांचे ज्ञान विद्यार्थ्यांना मोठया प्रमाणावर प्रदान केले जात असे. त्यातील ज्ञान मुख्यत: उपजीविकाप्रधान असले तरी सदाचाराचे शिक्षण हे गुरुकुलातील, तपोवनातील व विद्यापीठातील शिक्षणाचे अभिन्न अंग होते, पण हा गुरुकुलवास ब्रह्मचर्य आश्रमापुरता असे आणि शिक्षण आटोपल्यानंतर हे सर्वच छात्र आपल्या पारिवारिक व सामाजिक जीवनात प्रवेश करीत. सदाचाराचे शिक्षण केवळ बालपणी देऊन चालत नाही. सदाचारात्मक जीवनमूल्यांना आजीवन, पुन:पुन्हा उजाळा देत रहाणे सामाजिक हिताच्या दृष्टीने अनिवार्य असते. या देशातील अध्यात्मप्रधान सांस्कृतिक प्रवाहात स्वाभाविकपणे हे कार्य संतांच्याकडून घडत गेले.

डोंबिवलीच्या कीर्तन महोत्सवातील एका परिसंवादात मी अध्यक्षस्थानी असताना एका सुविद्य वक्त्यानेच जिज्ञासा उभी केली की **ऋषि, आचार्य** आणि **संत** या शब्दांचे नेमके अर्थ काय? माउलींचे स्मरण करून माझ्या भाषणात उत्तर देताना मी म्हटले, '**अंतरंगातून भगवंताशी साधलेली समरसता जेव्हा प्रज्ञेच्या अंगाने प्रकट होते तिला ऋषि म्हणतात, प्रचाराच्या अंगाने प्रकट होते तेव्हा तिला आचार्य म्हणतात व प्रेमाच्या अंगाने प्रकट होते तेव्हा तिला संत म्हणतात.**' त्या चपखल व्याख्येत काहीही बदल करावासा मला अजून वाटत नाही. '**संत**' या संज्ञेचा अत्यल्प विचार केला तरी '**भगवंताची भक्ति म्हणजेच देवावरील प्रेम ज्याच्या ठायी वसते**' हा कमीत कमी अर्थ ध्वनित होतो. भगवंतावरील उत्कट प्रेमामुळे आपोआप अंगी बाणणाऱ्या आणि जागरुकतेने विकसित केलेल्याही अनेक गुणांचा सुगंध संतांच्या जीवनात व परिसरात दरवळताना दिसतो. संतांच्या या गुणांचे वर्णन संस्कृत व प्राकृत वाङ्मयात अनेक ठिकाणी आढळते.

त्यातल्या त्यात भगवद्गीतेतील १२ व्या अध्यायात भगवंतांनी सांगितलेली भक्ताची लक्षणे खालील प्रकारे आहेत-

> *'अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्र: करुण एव च।*
> *निर्ममो निरहङ्कार: समदु:खसुख: क्षमी ।। १३ ।।*
> *संतुष्ट: सततं योगी यतात्मा दृढनिश्चय:।*
> *मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्त : स मे प्रिय:।। १४ ।।*
> *यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च य:।*
> *हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो य: स च मे प्रिय:।। १५ ।।*
> *अनपेक्ष: शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथ:।*
> *सर्वारम्भपरित्यागी यो मद्भक्त: स मे प्रिय:।। १६ ।।*
> *यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न काङ्क्षति।*
> *शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्य: स मे प्रिय:।। १७ ।।*

*समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः।*
*शीतोष्ण-सुखदुःखेषु समः सङ्गविवर्जितः।। १८ ।।*
*तुल्यनिन्दास्तुतिर्मौनी सन्तुष्टो येन केनचित्।*
*अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः।। १९ ।।*

किंवा श्रीमद्भागवताच्या तृतीय स्कंधात भगवान कपिल महामुनींनी देवहूति मातेला सांगितलेली संतांची लक्षणे म्हणजे -

*'तितिक्षवः कारुणिकाः सुहृदः सर्वदेहिनाम्।*
*अजातशत्रवः शान्ताः साधवः साधुभूषणाः ।। २१ ।।*
*मय्यनन्येन भावेन भक्तिं कुर्वन्ति ये दृढाम्।*
*मत्कृते त्यक्तकर्माणस्त्यक्तस्वजनबान्धवाः।। २२ ।।*
*मदाश्रयाः कथा मृष्टाः श्रृण्वन्ति कथयन्ति च।*
*तपन्ति विविधास्तापा नैतान्मद्गतचेतसः।। २३ ।।*
*त एते साधवः साध्वि सर्वसङ्गविवर्जिताः।*
*सङ्गस्तेष्वथ ते प्रार्थ्यः सङ्गदोषहरा हि ते ।। २४ ।।*

यात जवळपास सर्व संतलक्षणांचा समावेश होतो. या दोन्ही ठिकाणांच्या संत लक्षणांचा साकल्याने विचार केला असता भगवंतावर उत्कट प्रेम करणारे संत कुणाचाही द्वेष करीत नाहीत. सर्वांवर त्यांचे समान प्रेम असते. सर्वांशी त्यांची मैत्री भावना असते. ते अजात शत्रू आणि करुणेने ओथंबलेले असतात. सर्वांच्या हिताची ते काळजी घेतात. नेहमी संतुष्ट, निरपेक्ष, शुचिर्भूत आणि सावधान असतात. अनुकूल-प्रतिकूल प्रसंगांचा त्यांच्या अंतरंगावर परिणाम जाणवत नाही.

गीता-भागवतात संतांच्या संबंधी झालेले विचार संत वाङ्मयातही ठिबकलेले-प्रवाहित झालेले दिसतात. ज्ञानेश्वर महाराज भगवंताचे मनोगत सांगताना म्हणतात,

***'आत्मज्ञाने चोखडीं । संत जे माझी रूपडीं ।***
***तेच दृष्टि पडो आवडी । कामिनी जैसी ।।'***
***(ज्ञा. अ. १८, ओ. १३५६)***

आत्मज्ञानाने शुद्ध असलेले जे संत आहेत, ते माझी रूपे आहेत. जशी सुंदर स्त्रीवर (कामुकाची) प्रेमाने (आसक्तिने) दृष्टी पडते, तशी तुझी दृष्टी या संतांवर पडू दे.

**'आत्मज्ञानी संत ही माझीच रूपे आहेत,'** हे भगवंताचे मनोगत माउलींनी अधोरेखित केले आहे. हाच विचार तुकाराम महाराज वेगळ्या शब्दांत असा मांडतात.

***देव ते संत । देव ते संत ।***
***निमित्त त्या प्रतिमा ।।***

देव आणि संत एकच आहेत त्यांच्या प्रतिमा भक्तीच्या निमित्ताने ज्या वेगळ्या आहेत. तुकाराम महाराज स्वतःचा अनुभव या शब्दांत नोंदवितात.

***अंगे अनुभव झाला मज ।***
***संत रजचरणांचा ॥ १ ॥***
***सुखी झालो या सेवने ।***
***दु:ख नेणे या वरी ॥ २ ॥ (अ.क्र. १९९७)***

मला संतांच्या चरण धुळीचा प्रत्यक्ष अनुभव आला आहे. या चरणधुळीमुळे माझे दु:ख सरले व मी सुखी झालो.

तुकाराम महाराजांच्या सारखे संत स्वत:चा अनुभव म्हणून ही बाब सांगतात तेव्हा ती बहुमोलच असणार याबद्दल कोणी शंका घेण्याचे कारण नाही.

तुकाराम महाराज असेही म्हणतात,

***मायबापे पिंड । पाळियेला माया ।***
***जन्म मरण जाया । संत संग ॥ (अ.क्र. १९९१)***

आईवडिलांनी आपल्याला जन्म दिला, प्रेमाने आपला प्रतिपाल केला (हे सत्य असले तरी) जन्म मरणाचा फेरा चुकविण्यासाठी संत सहवासच आवश्यक आहे. (आई-वडिल हा फेरा चुकवू शकत नाहीत.) महाराज असेही सांगतात,

***रवि, दीप, हिरा । दाविती देखणे ।***
***अदृश्य दर्शने । संतांचेनि ॥ १ ॥ (अ.क्र. १९९१)***

सूर्य, दिवा आणि हिरा ज्या दृष्य वस्तू आहेत त्याच दाखवितात, पण संत मात्र अदृष्य असलेला परमात्मा दाखवितात.

संतांचे उपकार फेडणे शक्य नाही असेही महाराज म्हणतात.

***तुका म्हणे काय । होऊ उतराई ।***
***जीव ठेवू पायी । संतांचिये ॥ ४ ॥ (अ.क्र. १९८३)***

संतांचे माझ्यावर इतके उपकार आहेत जे मी कधीच फेडू शकत नाही म्हणून आपला जीव त्यांना अर्पण करावा हेच बरे.

संत कोणाला म्हणावे, ते कसे असतात हे सांगायला महाराज विसरले नाहीत. ते म्हणतात,

***तुका म्हणे तोचि संत ।***
***सोसी जगाचे आघात ॥ ४ ॥ (अ.क्र. २०५९)***

आपली वृत्ती न बिघडू देता जगाचे आघात जो सहन करतो तोच खरा संत आहे.

ज्ञानेश्वर माउलींना काय गरज होती शुद्धीपत्र मिळविण्याची? थोडे का छळले तत्कालीन समाजाने त्यांना? संतांना कोणी त्रास देत नाही असे अजिबात नाही, पण संत हा त्रास मानत नाहीत. बाळाची लाथ, ते गर्भाशयात असतानाही आईला लागते, पण ही बाब आईला गोडच वाटते. तसे संतांचे असते. संत तुकाराम महाराज संतांबद्दल असेही सांगतात,

***जे का रंजले गांजले ।***
***त्यांसी म्हणे जो आपुले ॥ १ ॥***

***तोचि साधु ओळखावा ।***
***देव तेथेचि जाणावा ।। २ ।। (अ.क्र. २०६५)***

*जे विविध प्रकारच्या दु:खानी त्रस्त झालेले आहेत, त्यांना जो आपले मानतो व त्यांची दु:खे दूर करतो तोच खरा संत आहे असे ओळखावे व देव तेथेच आहे हे ही समजून घ्यावे. रोम जळते आहे आणि राजा किडल वाजवतो आहे, असे संतांच्या बाबतीत घडत नाही. **'बुडती हे जन न देखवे डोळा। म्हणोनी कळवळा येतसे'।** अशी त्यांची वृत्ती असते. **ऐसी कळवळ्यांची जाती। करी लाभाविण प्रीति'।** हा संतत्वाचा धर्म आहे.*

समग्र विश्वातील संतांच्या जीवन व कार्याचे अवलोकन करता त्यांच्यामधे काही बाबी अगदी समान आढळून येतात. या सर्व बाबींचा साकल्याने विचार करता या समान घटकांच्या प्रवाहाला **'संत संस्कृति'** असे नाव देणे अयोग्य ठरणार नाही असे जाणवते. या **'संत संस्कृति'** च्या मार्गाने गेल्यास मानव जीवनातील अनेक समस्यांचे निराकरण आपोआप घडेल असेही वाटते. या संदर्भात मला महाभारताच्या वनपर्वातील एक प्रसंग आठवतो. यक्षाने धर्मराजास विचारलेल्या शतावधि प्रश्नात एक प्रश्न आहे- **'का दिक्?'** म्हणजे दिशा कोणती? याचे पूर्व पश्चिम इत्यादि जुजबी उत्तर न देता धर्मराजाने दिलेले फारच चपखल उत्तर आहे. **'संतो दिक्'** म्हणजे संतांनी मानव समाजास दाखविलेली दिशा हीच जीवन विकासाची सर्वोत्तम दिशा होय! तेथेच दुसरा एक प्रश्न आहे - **'क: साधु:?'** म्हणजे संत कोणास म्हणावे? याचे मार्मिक उत्तर धर्मराजाने दिले - **'सर्वभूतहित: साधु:'** म्हणजे जगाच्या कल्याणासाठी जो रात्रंदिवस झटतो तोच संत होय. एकूण जगाच्या हितासाठी नि:स्वार्थपणे झटणारे सत्पुरुष जो मार्ग दाखवितात तोच जगाच्या कल्याणाचा खरा मार्ग होय. असेच लोक समाजजीवनाची विधायक जडण-घडण करतात म्हणून तेच समाजाचे खरे शिल्पकार ठरतात. असो.

उपरोक्त संत संस्कृतीची काही नेमकी वैशिष्ट्ये ही विचारांती निश्चित ठरविता येतात. त्यातील पहिली बाब म्हणजे **परमेश्वरविषयक अनन्य आस्था.** परमेश्वराची स्थल-काल-संप्रदाय-रुचि परत्वे विभिन्न नामे व रूपे जरी संतांनी अंगीकारिली व उपासिली असली तरी विश्वनियंत्रक सर्वसमर्थ अतींद्रिय शक्तीबद्दलची सुदृढ श्रद्धा व तिच्या अनुभूतिची आकांक्षा ही पायाभूत समानता होय. दुसरे महत्त्वाचे लक्षण म्हणजे **कर्मकांडाचा अनाग्रह**. कुठल्याही पंथ-संप्रदायात काही पारंपारिक कर्मकांड असतेच. सामान्यपणे संत-सत्पुरुष हे निरुपद्रवी कर्मकांडाच्या विरुद्ध नसले तरी ते त्याचे फारसे आग्रहीही नसतात. त्यामुळे आचरणात सुलभता जाणवते. संत किंवा साधु पुरुषांच्या जीवन व उपदेशात ईश्वरपरायणतेला अनन्य साधारण महत्त्व असले, तरी परमेश्वरी कृपाप्राप्तिसाठी भौतिक उन्नतिकडे किंवा प्रपंचाकडे पाठ फिरवणे-ऐहिकाची उपेक्षा करणे आवश्यक होय अशी त्यांची शिकवण नसते. उलट **'प्रपंच करावा नेटका, मग घ्यावे परमार्थविवेका ।'** अशी केवळ प्रपंचाशी अविरोधाचीच नव्हे तर समन्वयाची त्यांची भूमिका दिसते.

अन्य बाबतीत अनाग्रही दिसणारे हे संत नैतिक जीवनमूल्यांच्या पालनाबाबत मात्र आग्रही असतात. प्रत्येकाचे आचरण सदाचाराच्या चौकटीत बसावयास हवे हा त्यांचा स्वर त्यांच्या जीवनशैलीत व उपदेशात सर्वत्र हमखास विद्यमान असतोच. तसेच त्यांचा जन्म कुठल्याही देशात-संप्रदायात-जाती-जमातीत झालेला असला तरी अंतरंगातून ते विश्वमनाशी एकरूप झालेले असतात व म्हणूनच त्यांच्या सहज व्यवहारातही संकीर्णतेचा मागूस नसतो. उलट केवळ विश्वात्मकताच नव्हे तर विश्वप्रेमाचा आविष्कार त्यांच्या जीवनशैलीतून सतत जाणवत राहतो. या

विश्वप्रेमाच्या पोटीच सर्वांचेच हित व्हावे अशी त्यांची धारणा दृढ झालेली असते व ज्या लोकांना स्वहिताचे भानच नाही, त्यांच्या उत्थानासाठी संतांच्या अंत:करणात स्वाभाविक उमाळा असतो, जो अनेकदा तळमळीच्या रूपात व्यक्त होताना दिसतो. **त्यांच्या या भक्तिमूलक विश्वकल्याणभावनेचा सहज आविष्कार म्हणजे त्यांचे समता-ममता-समरसतापूर्ण प्रबोधन व सेवाकार्य होय.** त्यांच्या या अव्यंग प्रबोधनाने व उपलब्ध साधनांनी केलेल्या कमी-अधिक सेवाकार्याने समाजमनावर उमटविलेला ठसा मात्र चिरंतन असतो. त्यांच्या मळलेल्या पाऊलवाटेवरून पुढल्या पिढ्या चालू लागतात-तो राजरस्ता होऊन जातो व सामाजिक जाणिवेला त्यांनी दिलेल्या या दिशेने तदनुकूल समान मनाच्या केलेल्या जडण घडणीने ते **सामाजिक शिल्पकार ठरतात**.

अशा संतांची चरित्रे प्रसिद्ध करून या कोशाने जगासमोर पथदीप ठेवले आहेत. या चरित्रांचा आस्वाद घेणारे आपले जीवन या दीपप्रकाशात उज्ज्वल करू शकतील. कोशकार केवळ संतांची चरित्रे देऊन थांबले नाहीत, त्यांनी समाज घडविणारे देशाला संविधान देणारे महामानव डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचेही चरित्र रेखाटले आहे, महात्मा फुले यांचेही शब्दचित्र रेखाटले आहे ही या ग्रंथाची विशेष बाब आहे. पृष्ठमर्यादेचे भान ठेवत संपादकाला हे सर्व करावे लागते. अन्यथा स्व. विठ्ठल रामजी शिंदे, राजर्षि शाहु महाराज यांची ही चरित्रे या कोशात असती तर कोशाची उंची अधिक वाढली असती. संतचरित्रे रेखाटतांना केवळ हिंदू धर्मातील संतांची चरित्रे त्यांनी रेखाटली नाहीत हे ही या ग्रंथाचे एक वैशिष्ट्य आहे. जैन, मुस्लीम इ. धर्मातील संतांची ही चरित्रे या ग्रंथात आहेत. मधमाशा जशा विविध प्रकारच्या फुलांचा मध गोळा करून मधाच्या पोळ्यात साठवतात व तेथे विविध प्रकारच्या मधाचे एक सुंदर मिश्रण जसे तयार होते, तसे या ग्रंथाचे झाले आहे. ग्रंथाच्या शीर्षकात **'शिल्पकार'** हा सूचक शब्द उपयोजिलेला आहे. मूर्ती घडविताना शिल्पकार बाहेरचे काही त्या दगडाला लावत नाही, तर दगडाचा नको असलेला भाग काढून टाकतात त्यामुळे दगडातच असलेले शिल्प व्यक्त होते, स्पष्ट होते. तसे संत व महापुरुष मानवातील नको असलेल्या, अहितकारक बाबी काढून टाकतात व मानवाचे खरे रूप प्रकट करतात हे त्यांचे मौलिक योगदान असते. म्हणून कोशाच्या नावातील **'शिल्पकार'** हा शब्द फारच समर्पक झाला आहे.

या चरित्रकोशासाठी ज्यांनी ज्यांनी लेखन केले आहे, त्या सर्वांचे कौतुक करावेसे वाटते. त्यांनी फापट पसारा न मांडता, मोठया नेमकेपणाने, आत्मीयतेने व्यक्तिचित्रे रेखाटली आहेत. श्री. विद्याधर ताठे व डॉ. अजित कुलकर्णी यांनी केलेले परिश्रम स्तुत्य आहेत. चरित्रकोश ही समाजाची गरज असते. सर्वच जणांना महत्त्वाच्या सर्वच विभूतींची माहिती असतेच असे नाही. त्यामुळे अशी माहिती उपलब्ध करून देणे हे तृषार्ताला जीवन देण्यासारखे मौलिक काम आहे. हे चरित्र अधिक चांगले रेखाटले गेले आहे तर ते थोडे कमी चांगले रेखाटले गेले असेही झालेली नाही. जवळपास सर्वच चरित्रे एका स्तराची लिहिली गेली आहेत हे विशेष. लेखक, संपादकांनी सिद्ध केलेला हा अमृतकुंभ **साप्ताहिक 'विवेक'** ने वाचकांना उपलब्ध करून दिला आहे. **'विवेक'** च्या दर्जेदार प्रकाशन मालिकेत या ग्रंथाने अमूल्य भर पडली आहे. प्रकाशकांचे हार्दिक अभिनंदन! त्याचा लाभ न घेणारे करंटे ठरतील असे वाटते. लेखक, संपादकांची, प्रकाशकांची पाठ थोपटावी तेवढी कमीच आहे.

भगवान शंकराचार्यांनी म्हटल्याप्रमाणे,

***शान्ता महान्तो निवसन्ति सन्तो । वसन्तवत् लोकहितं चरन्त: ।***
***तीर्णा: स्वयं भीमभवार्णवं जनान । अहेतुनान्यानपि तारयन्त: ।।***

सत्पुरुषांचे कार्य हे वसंतऋतुप्रमाणे समाजात मांगल्य, शांती, समृद्धी, आनंद यांचा वर्षाव करणारे असते ते स्वत: दुस्तर भवसागर पार करून जातात, शिवाय इतरांचाही उद्धार करतात. या ग्रंथाच्या प्रकाशनाने हे कार्य आपोआप घडू लागेल. सत्पुरुषांची चरित्रे ही केवळ वाचनीय नसून त्याचे अनुकरण करण्यासाठी उपयक्त ठरतात. म्हणून हा ग्रंथ केवळ वाचनीय नसून संग्राह्य पण आहे. लेखक-संपादक-प्रकाशक या सर्वांनी फार मोठे काम केले आहे. त्यांना मन:पूर्वक धन्यवाद! इति शम्।

धर्मश्री, पुणे
देवदीपावलि, मार्ग. शु. १/शके १९३८
दि. : ३०/११/२०१६

श्री ज्ञानेश्वरपदाश्रित



स्वामी गोविंदगिरी
तथा आचार्य किशोरजी व्यास

# संपादकीय



**विद्याधर मा. ताठे**
**(एम.ए.; बी. जर्नालिझम)**

- श्रीक्षेत्र पंढरपूर येथे जन्म. तेथेच बी.कॉम., एलएल.बी. शिक्षण. पंढरपूर अर्बन को-ऑपरेटिव्ह बँकेत नोकरी. संघपरिवारातील वनवासी कल्याण आश्रम संस्थेत पूर्णवेळ कार्य करण्यासाठी नोकरीचा राजीनामा.
- सहा वर्षे नाशिक तसेच नागालँड-मणिपूर राज्यात संघटनमंत्री.
- दै. तरुण भारत (पुणे) उपसंपादक, 'सा. विवेक'चे विशेष प्रतिनिधी म्हणून चार वर्षे कार्य.
- शिर्डीच्या साईबाबा संस्थानच्या 'साईलीला' या नियतकालिकाचे १३ वर्षे कार्यकारी संपादक.
- २००५ पासून गेली १२ वर्षे एकता मालिकाचे संपादक म्हणून दायित्व. सुमारे १०० ग्रंथांचे संपादन. संत साहित्याचा विशेष अभ्यास व व्यासंग.

**सगुण चरित्रे परम पवित्रे सादर वर्णावी ।**
**सज्जन वृंदे मनोभावे आधी वंदावी ।।**

**- संत एकनाथ**

मुंबई येथून प्रकाशित होणाऱ्या हीरकमहोत्सवी साप्ताहिक 'विवेक'ने हाती घेतलेल्या, 'आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण – शिल्पकार चरित्रकोश' या प्रकल्पातील काही खंड प्रकाशित झालेले आहेत व त्या खंडांचे वाचकांकडून-अभ्यासकांकडून चांगलेच स्वागत झालेले आहे. या प्रकल्पाबद्दल अनेक राष्ट्रप्रेमी-संस्कृतिप्रेमी वाचकांनी विवेकला कृतज्ञतापूर्वक धन्यवादही दिलेले आहेत. या प्रकल्पातील *'धर्म परंपरा'* या खंडाचा संपादक या नात्याने प्रस्तुत खंड वाचकांना सादर करताना मला कर्तव्यपूर्तीचा विशेष आनंद होत आहे.

या संपादकीयाच्या निमित्ताने 'विवेक' परिवाराशी असलेल्या माझ्या स्नेहबंधाबद्दल दोन शब्द लिहिणे मला अगत्याचे वाटते; ते येथे अनाठायी वाटणार नाहीत असे मला वाटते. श्री. दिलीप करंबेळकर 'विवेक'चे संपादक झाले आणि माझे विवेकशी एक लेखक या नात्याने स्नेहबंध जुळून आले. तेव्हा मी आसाम-नागालँड-मणिपूर या पूर्वोत्तर भागांत वनवासी कल्याण आश्रमाचा संघटनमंत्री म्हणून सेवारत होतो. 'पूर्वांचलचा कानोसा' या नावाने 'विवेक'मध्ये प्रासंगिक लेखांनी माझा 'विवेक'मधील लेखनाचा (१९७९-८०) श्रीगणेशा झाला. पुढे मी पुण्यातील 'दैनिक तरुण भारत'मध्ये उपसंपादक झालो आणि करंबेळकर यांनी 'विवेक'तर्फे दरवर्षी आषाढी यात्रेनिमित्त 'वारकरी विशेषांक' काढण्याची योजना माझ्यापुढे ठेवून 'विशेष अतिथी संपादकपदा'ची धुरा माझ्या खांद्यावर सोपविली व पुढे अनेक वर्षे मी ती यशस्वीपणे सांभाळली.

आज सुमारे २५ वर्षे झाली, मी विवेक वारकरी विशेषांकाचा एक लेखक म्हणून लिहिण्याचा आनंद घेत आहे. या पूर्वपीठिकेमुळेच 'विवेक'ने माझ्यावर 'शिल्पकार चरित्रकोश' प्रकल्पातील 'धर्म परंपरा' या खंडाच्या संपादकपदाचे दायित्व सोपविले व संतसंगाचा, अभ्यासाचा एक विशेष

आनंद मला दिला. श्री. करंबेळकर व ‘विवेक’ परिवारास त्याबद्दल मन:पूर्वक धन्यवाद देऊन मी या खंडाच्या संपादकीयाकडे वळतो.

भारतीय धर्म व संप्रदाय यांना फार मोठी प्राचीन परंपरा आहे. धर्म हेच एकेकाळी येथील समग्र जीवनव्यवहारांचे व विचारांचे एकमेव अधिष्ठान होते. अर्थकारण, राजकारण, समाजकारण, वाङ्मय, विज्ञान, कला, शिक्षण या संस्कृतीच्या विविधांगांचा विचारही धर्माच्याच परिघात राहून केला जात होता. भारतीय धर्म व संस्कृतीची थोरवी अनंत व अगाध आहे. या भूमीला लाभलेली संतांची थोर परंपरा हे आपले वैशिष्ट्य आहे. विविध धर्म-संप्रदायांमध्ये झालेले सहस्रावधी संतमहात्मे हेच आपल्या देशाचे खरे वैभव आहे. धर्म व संप्रदायाच्या अंगाने महाराष्ट्राच्या जडणघडणीचा विचार करताना डोळ्यांपुढे येते ती मराठी संतांची थोर परंपरा. या संतपरंपरेचे महाराष्ट्राच्या जडणघडणीतील अपूर्व योगदान शब्दातीत आहे. महाराष्ट्राला तेराव्या शतकातील निवृत्तिनाथ-ज्ञानदेव यांच्यापासून ते थेट विसाव्या शतकातील गाडगेमहाराज - तुकडोजीमहाराज यांच्यापर्यंत संतांची समृद्ध-संपन्न परंपरा लाभलेली आहे.

या संतांच्या कार्यांचे मुख्य स्वरूप धार्मिक - पारमार्थिक असले, तरी त्यांचे सामाजिक व वाङ्मयीन कार्यही मौलिक स्वरूपाचे आहे. न्यायमूर्ती म.गो. रानडे यांच्यासह अनेक विचारवंतांनी संतकार्याच्या सामाजिक-राष्ट्रीय कामगिरीबद्दल मोठ्या अभिमानाने लिहिलेले आहे. ‘विवेक’च्या शिल्पकार चरित्रकोशाच्या इतिहास खंडाचे संपादक, थोर इतिहासतज्ज्ञ डॉ. रा.श्री. मोरवंचीकर खंडाच्या प्रस्तावनेत म्हणतात, ‘महाराष्ट्राच्या जडणघडणीत ज्या विभूतींचा मोठा वाटा आहे, त्यांमध्ये संत ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, रामदास आणि तुकाराम या संतपंचकाचे योगदान फार मोठे आहे.’ डॉ. मोरवंचीकर एव्हढ्यावरच न थांबता पुढे म्हणतात, ‘हे संत महापुरुष झाले नसते, तर महाराष्ट्राचा सर्वनाश निश्चित होता. हे एक ऐतिहासिक सत्य आहे.’

महाराष्ट्रभूमीमध्ये अनेक धर्मसंप्रदाय गुण्यागोविंदाने नांदलेले आहेत. अन्य प्रांतांमध्ये विविध संप्रदायांत जसे तीव्र संघर्ष झाले, तसे महाराष्ट्रात झाले नाहीत. महाराष्ट्रात जे संप्रदाय नांदले, त्यांमध्ये नाथसंप्रदाय, महानुभावसंप्रदाय, वारकरी संप्रदाय, दत्तसंप्रदाय, समर्थसंप्रदाय हे प्रमुख व त्याशिवाय गाणपत्य, सौर, अवधूत, नागेश, देवी, शाक्त अशाही काही संप्रदायांचा समावेश आहे. याशिवाय जैन, वीरशैव, बौद्ध असे स्वत:स स्वतंत्र धर्म मानणारे संप्रदायही या भूमीत भक्तिरत असलेले दिसतात. मोगल राजवटीनंतर सूफी व इंग्रज राजवटीत इसाई या धर्ममतांनी महाराष्ट्रात वावर सुरू केला व काही केंद्रे स्थापन झालेली आहेत. या विविध

धर्मसंप्रदायांमध्ये अगणित संतमहात्मे झालेले आहेत.

अशा या थोर संतपरंपरेत, इ.स. १८०० ते २००० या २०० वर्षांच्या कालावधीत, म्हणजेच एकोणिसाव्या व विसाव्या शतकांत, महाराष्ट्रात नांदलेल्या विविध धर्म-संप्रदायांमध्ये होऊन गेलेल्या प्रमुख संत-महात्म्यांच्या चरित्रांचा, या कोशाच्या मर्यादेत आढावा घेतला आहे. **महाराष्ट्रातील पंथ-संप्रदायांची विपुलता आणि त्या-त्या संप्रदायांत झालेल्या संत व सत्पुरुषांची प्रचंड संख्या पाहता सर्वच संतांचा-सत्पुरुषांचा या खंडात समावेश करता येणे शक्यच नाही, तसेच ही महाराष्ट्रातील संतांची खानेसुमारी नाही**, तर प्रातिनिधिक, प्रमुख संतांच्या चरित्रांची नोंद आहे हे लक्षात घेऊनच या चरित्रखंडाकडे पाहावे ही विनंती.

इतिहास खंड, विज्ञान खंड, कृषी खंड, साहित्य खंड या खंडांतील शिल्पकार चरित्रांची निवड करणे तसे सोपे होते; कारण प्रत्येक व्यक्तीचे ठोस कार्य – सप्रमाण दर्शविता येत असते. संतांचे कार्य मात्र सप्रमाण दर्शविता येणे तितके सहज-सोपे नसते. कारण, संतांचे कार्य हे वेगळ्या प्रकारचे असते; त्याचे स्वरूपही वेगवेगळे असते. तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक डॉ. सदानंद मोरे म्हणतात, ''सामाजिक, आर्थिक, राजकीय, साहित्यिक कार्य बाह्य, दृश्यस्वरूपाचे असते, ते सहजपणे, चटकन लक्षात येते; पण संतांचे कार्य अंतरंग स्वरूपाचे असते, ते दिसत नाही.'' ते समजून घेण्यास वेगळ्या दृष्टीचीच गरज असते. अशी वेगळी दृष्टी नसली तर भले भले चकतात व संतांच्या कार्यावर भलतेच आरोप करतात. उदाहरणच द्यायचे, तर थोर इतिहास संशोधक वि.का. राजवाडे यांनी वारकरी संतांच्या कार्याची प्रारंभी 'टाळकुटे' अशी संभावना केली होती. न्या. म.गो. रानडे यांनी नेमकेपणाने संतकार्याचे मोल जाणले व शिवस्वराज्य निर्मितीतील संतांचे योगदान अवघ्या अभ्यासकांना समजावून दिले. असो.

महाराष्ट्राच्या भूमीत अनेक धर्ममते व विविध संप्रदाय नांदले असले तरी 'वारकरी संप्रदाय' हाच सर्वव्यापी, सर्वमान्य संप्रदाय मानला गेला. एवढेच नव्हे, तर महाराष्ट्रातील नामवंत विद्वान, विचारवंत अभ्यासकांनी वारकरी संप्रदायालाच 'महाराष्ट्राची सत्त्वधारा' म्हणून गौरविलेले आहे. या संदर्भात विदुषी इरावती कर्वे, राजारामशास्त्री भागवत, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, डॉ. म.वा. धोंड, डॉ. सदानंद मोरे यांनी केलेले लेखन वारकरी विचारधारेचा नेमकेपणाने, चिकित्सकपणे गौरव करणारे आहे. वारकरी संप्रदायाला संत ज्ञानेश्वर ते संत गाडगेमहाराज यांच्यापर्यंत लाभलेली प्रदीर्घ संतमालिका हे वारकरी संप्रदायाचे खरे वैभव आहे. अशी सातत्यपूर्ण संतमालिका अन्य कोणत्याही संप्रदायास लाभलेली नाही. ही संतमालिका

आणि संप्रदायाचा सर्वसमावेशक, उदार दृष्टिकोन यांमुळे समाजातील अठरा पगड जातींच्या वेदवंचित, उपेक्षित लोकांना मिळालेला पारमार्थिक अधिकार, या दोन प्रमुख गोष्टींमुळे वारकरी विचाराला महाराष्ट्राच्या सत्त्वधारेचा मान प्राप्त झाला. प्रस्तुत खंडात निवडलेल्या संतचरित्रांमध्ये यामुळेच वारकरी विचारधारेचे प्रतिनिधित्व करणाऱ्यांची नावे अधिक आहेत, आणि मला वाटते ते स्वाभाविकही आहे.

महाराष्ट्राच्या जडणघडणीत समाजसुधारक, साहित्यिक, शास्त्रज्ञ, उद्योजक, तंत्रज्ञ, कलाकार, राजकीय नेते यांच्याबद्दल कोणालाच शंका नसते; पण साधुसंतांच्या योगदानाबद्दल अनेकांना शंका वाटते. अनेकांच्या मते : ईश्वरी चिंतनात-साधनेत, मठ-मंदिरात राहणारा हा साधुसंतांचा वर्ग आत्मोद्धारात लीन झालेला असतो. त्याला ना स्वत:च्या, ना समाजाच्या ऐहिक सुखदु:खाची चिंता असते. हे मत असत्य नाही, पण एकांगी आहे एवढेच मला सांगावेसे वाटते. संतांच्या जीवनाला दोन बाजू आहेत, एक आत्मोद्धाराची व दुसरी समाजोद्धाराची. आपण या दुसऱ्या बाजूची उपेक्षा करून संतांच्या कार्यावर अन्याय करणे उचित ठरणार नाही. काही संप्रदायांत आत्मोद्धार- मोक्ष हेच जीवनोद्दिष्ट मानून समाजविन्मुख राहून घोर तपश्चर्या करणारे काही योगी, संत असतीलही; पण ते अपवाद समजावेत. आपण महाराष्ट्रापुरता विचार करताना आपणांस असे दिसते, की वारकरी संत ना मोक्ष मागणारे आहेत, ना केवळ आत्मोद्धाराला प्राधान्य देणारे आहेत. **'बुडते हे जन न देखवे डोळा'** असे निखळ समाजोद्धार हेच संतांचे ब्रीद आहे. **'जे का रंजले गांजले । त्यांसी म्हणे जो आपुले । तोचि साधु ओळखावा । देव तेथेचि जाणावा ।।'** अशी त्यांची धारणा आहे. आणि हाच विचार संतांनी प्रवचन-कीर्तनांद्वारे, अभंगांद्वारे समाजात प्रसृत केलेला आहे. अशा प्रकारे संतांची समाजसन्मुखता व सामाजिक बांधीलकी प्रश्नातीत आहे, आणि या समाजसन्मुखतेचे महाराष्ट्राच्या जडणघडणीमध्ये फार मोठे योगदान आहे. म्हणूनच **'जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती । देह कष्टविती उपकारे ।।'** अशा अभंगचरणांनी त्यांची थोरवी अवघा महाराष्ट्र गातो.

### आधुनिक विज्ञान व संतांचे साक्षात्कार

लोकमानसाच्या जडणघडणीत संतांचे जे योगदान आहे, त्याचे श्रेय संतांच्या झोळीत विना खळखळ टाकण्यात सर्वांत मोठी अडचण असते ती विज्ञानवादी तर्कदुष्टांची. संतसाहित्याचे थोर अभ्यासक डॉ. वि.रा. करंदीकर म्हणतात, ''विज्ञाननिष्ठा हा आधुनिक समाजसंस्कृतीचा सर्वांत मोठा विशेष गुण झालेला आहे. त्यामुळे विज्ञानयुगातील शास्त्रीय दृष्टिकोनाच्या अतिरिक्त अहंभावापोटी अनेक जण संतांना, ऋषिमुनींना

विज्ञानविरोधी मानून संतांच्या सामाजिक कार्याची उपेक्षा करताना दिसतात.'' या विज्ञानआंधळ्या विद्वानांना प्रत्येक गोष्ट प्रयोगशाळेत पडताळून पाहता आली म्हणजेच सत्य वाटते. पण आइन्स्टाइन, **हायझेनबर्ग, नील्स बोहर** या जगविख्यात वैज्ञानिकांनी विज्ञानाच्या मर्यादा स्पष्ट करीत विज्ञाननिष्ठांना काही निर्देशही दिलेले आहेत. आइन्स्टाइन म्हणतो, **''आपल्या प्रयोगाच्या, अवलोकनाच्या कक्षेत जेव्हढे काही येऊ शकते, त्याच्या आधारावरच ज्ञानातील अंतिम सत्याची, सिद्धान्तांची उभारणी करणे फार धोक्याचे आहे. ज्यांचे अनुभव अतींद्रिय पातळीवर आणि साक्षात्काराच्या स्वरूपाचे असतात, त्यांमध्ये भावनेची अगाध खोली आणि सौंदर्याच्या अनुभवाची परिसीमा आढळते.''** आइन्स्टाइनच्या या मताचा यथोचित मान राखून तथाकथित विज्ञानवादी, संतांच्या साक्षात्कारी जीवनाकडे उपेक्षेऐवजी आस्थेने पाहतील असे वाटते.

प्रयोगशाळेतील प्रयोगाकडून विज्ञान प्रत्यक्षानुभूती-साक्षात्कारानुभूतीकडे जी वाटचाल करीत आहे, त्याकडे विधायक दृष्टीने पाहून अध्यात्माविषयीचे सर्व पूर्वग्रह टाकून विज्ञाननिष्ठांनी भारतीय संतजीवनाचा अभ्यास करावा. नवविज्ञान (New physics - Micro physics) हे पारंपरिक अर्थाने व रूपाने प्रयोगनिष्ठ शास्त्र राहिले नसून ***'जे दिसतं तेव्हढंच असतं, असं नसतं. आणि म्हणून जे दिसत नाही, ते नसतंच, असं नाही',*** हे आता सर्व शास्त्रज्ञांना मान्य होऊ लागले आहे. पदार्थनिष्ठतेचा (Materialism) त्याग करून चेतनाशक्ती (Consciousness) चा विचार नवविज्ञानात स्वीकारला जात आहे. १९२५ सालचे **नोबेल विजेते श्रोडिंजर** व १९८४ मधील **नोबेल विजेते जोसेफसन** या दोन वैज्ञानिकांनी भौतिकशास्त्रातील अशाश्वत विचार व भारतीय वेदान्त विचार हे एककेंद्राभिमुख आहेत हेच जगाला दाखवण्याचा यशस्वी प्रयत्न केलेला आहे. ***''विश्वोत्पत्तीबद्दल भारतीय तत्त्वज्ञांनी जे सांगितलेले आहे, त्यापेक्षा अधिक मी काहीच सांगू शकत नाही,''*** हे जोसेफसन यांचे मत आणि श्रोडिंजर यांनी बृहदारण्यक उपनिषदाचा आधार सश्लोक आपल्या ग्रंथात दिला असून Vedantic vision नावाचा स्वतंत्र परिच्छेदच लिहिलेला आहे. अशा प्रकारे, विज्ञानाच्या आधुनिक दृष्टिकोनातूनही भारतीय ऋषी, मुनी, संत यांच्या साक्षात्कारी जीवनानुभवाचे महत्त्व आहे. काही दिवसांपूर्वी मी 'गुरुसेवा' नियतकालिकाचे जुने अंक चाळत होतो. त्यामध्ये इंदूर येथील कै. प्रभाकर अडसूळ यांचा एक लेख वाचला. 'ज्ञानदेवांची चांगदेव पासष्टी आणि नवविज्ञान' यावर त्यांचा एक ग्रंथही प्रकाशित झालेला आहे. कै. अडसूळ

यांना 'Outstanding people of the 20th Century' अवॉर्ड (१९९९) मिळालेले आहे. हे अवॉर्ड केंब्रिज (इंग्लंड) येथील इंटरनॅशनल बायोग्राफिकल सेंटर या आंतरराष्ट्रीय संस्थेतर्फे दिले जाते. कै. अडसूळ म्हणतात, ''Now the west has recognised science of consciousness (चैतन्यविज्ञान) and has honoured Dnyaneshwar (ज्ञानेश्वर) as a scientist in the field of consciousness. सायन्स हे केवळ मॅटरचेच क्षेत्र राहिले नसून चैतन्याचेही आहे हे आता सर्वमान्य होत आहे.''

**संतांची समाजसन्मुखता**

'धर्म-संप्रदाय' क्षेत्राचा, महाराष्ट्राचा गेल्या २०० वर्षांचा (एकोणिसावे व विसावे शतक) इतिहास डोळ्यांपुढे आणला तरी एक गोष्ट आपणांस निर्विवाद मान्य करावी लागते, ती म्हणजे – महाराष्ट्रास जसे व जेवढ्या संख्येने संत लाभले, तेवढे व तसे संत अन्य कोणत्याही प्रांताला लाभलेले नाहीत. संतपरंपरेच्या बाबतीत महाराष्ट्राचे महात्मेपण सर्वमान्य आहे. महाराष्ट्रातील आधुनिक संतांचे एकच उदाहरण द्यायचे तर शिर्डीच्या साईबाबांचे देता येईल. भारतातच नव्हे, तर इतर देशांतही साईमंदिरे व भक्तमंडळे दिसून येतात. त्यांच्या वतीने होणारी समाजोपयोगी कार्येही खूप मोठी आहेत.

'संत' शब्दाची भागवतधर्मीय संत ज्ञानदेव-तुकाराम यांनी केलेली व्याख्या आपण लक्षात घेतली, की समाजाच्या जडणघडणीतील त्यांचे निर्विवाद स्थान स्पष्ट होते. ''समाज नामक लोकसंस्था चिरस्थायी राहावी, ती नीतिवान बनावी यासाठी या लोकसंस्थेचे अंतर्बाह्य रक्षण करणे हे संतांचे पहिले कर्तव्य आहे,'' असे संत ज्ञानदेव म्हणतात. या दृष्टीने समाजसन्मुखता, परोपकारी निःस्पृह वृत्ती, सर्व प्राणिमात्रांविषयी करुणा आणि सकल समाजाप्रती समभाव ही संतांची मुख्य लक्षणे मानली जातात. संत म्हणजे लोकशिक्षक, समाजाच्या हाताला धरून सन्मार्गाकडे नेणारी व्यक्ती म्हणजे संत. अर्थात, हे कार्य करताना आईच्या ठायी असणारे प्रेम व संयम आणि शिक्षकाच्या ठायी असणारी चिकाटी व शाश्वत कल्याणाची भूमिका अशा सकल गुणांचा संगम संतांच्या ठायी झालेला दिसतो. शिक्षक स्वत: हाती पाटी घेऊन मुलाला जसे गिरवण्यास शिकवतो, तसे संत स्वत:च्या आचरणाने समाजापुढे नीतिमूल्यांचे-कर्तव्यनिष्ठतेचे आदर्श ठेवतो.

संतांची आध्यात्मिकता व समाजसन्मुखता या परस्परविरोधी नाहीत. कारण, संत समाजामध्ये देव पाहतात. ते जनता हाच जनार्दन मानतात. संतांना समाजाच्या सुखात आपले सुख वाटते. आणि समाजकल्याणातच

आपले कल्याण वाटते. समाजाला बरोबर घेऊन त्यांना समाजाचा जीवनविकास घडवायचा आहे. संत साहित्यात 'उद्धार' असा शब्द येतो तो जीवनविकास-कल्याण या अर्थाने. समाजोद्धारातच संत स्वत:चा उद्धार मानतात. त्यांना एकटे ना स्वर्गसुख पाहिजे, ना मोक्ष पाहिजे. संतांच्या समाजोन्मुख आचार-विचार-लेखन या सर्वांचा आपण सूक्ष्मविचार केला, तर संत हे समाजाचे (आजच्या भाषेत) 'फ्रेण्ड, गाइड अॅण्ड फिलॉसॉफर' आहेत. ज्ञानदेवांची **'मार्गाधारे वर्तावे । विश्व मोहरे लावावे।...'** ही ओवी यासाठी एक ढळढळीत साक्ष आहे.

समाज संतांशी कसाही वागो, पण संतांनी समाजाबरोबर कसे वागायचे याचाही आदर्श वस्तुपाठ संत मुक्ताईंनी सांगितलेला आहे. त्या म्हणतात, **'जग जरी झाले वन्ही । संती सुखी व्हावे पाणी।'** एवढेच नव्हे, तर **'जीभ दातांनी चावली । कोणे बत्तिशी तोडली ।।'** स्वत:च्या दातांनी जीभ चावली तर आपण दात तोडतो का? तसेच, समाज काही वेडेवाकडे वागला तरी संतांनी आपली समाजकल्याणाची भूमिका सोडता कामा नये. **'तुका म्हणे संत । सोशी जगाचे आघात ।'** असे म्हणणारे संत तुकोबा समाजाला सोयरा म्हणतात व सोयऱ्याबद्दलचा प्रेमभाव व्यक्त करतात. **'अवघे जन मज झाले लोकपाळ । सोईरे सकळ प्राणसखे ।।'**

काही अभ्यासक **'संत'** व **'भक्त'** यांमध्ये भेद करतात; पण भागवतधर्मिय विभूतींचा विचार करता 'संत' व 'भक्त' यांमध्ये भेद नसून या दोन्ही भूमिका अभेद आहेत. भक्त हा पूर्ण निरूपाधिक असतो, तर संतांना लोकांमध्येच विश्वात्मक देवाचे विश्वरूप दर्शन घडत असते, आणि या दोन्ही अवस्था ज्ञानदेव - तुकाराम - गाडगेमहाराज यांच्यामध्ये दिसतात. विश्वात्मक देवांची, स्वकर्माच्या फुलांनी पूजा करण्याची कला संतांनी समाजात रुजविली. त्यामुळेच दळणकांडणाचे कार्य जनाबाईंना आणि **'कांदा मुळा भाजी । अवघी विठाई माजी ।'** अशी शेतमळ्यातील कामे सांवता माळ्यांना ईश्वराची पूजा वाटू लागली. आधुनिक काळात हाच संतसंस्कार लोकमान्य टिळक, न्या. रानडे यांच्या समाजकार्यामागे असल्याचे दिसून येते.

## संतांचे चमत्कार व भोंदूगिरीचे प्रदूषण

संतांच्या जीवनातील वादग्रस्त भाग म्हणजे त्यांच्या जीवनातील 'चमत्कार' कोटीतील घटना व प्रसंग! ज्या घटना व प्रसंगामागचा कार्यकारण भाव सिद्ध करता येत नाही, अशा तर्काच्या पलीकडच्या घटनांना सामान्य माणसे चमत्कार म्हणतात. खरे संत चमत्कार करत नसतात. त्यांना असे चमत्कार करण्याची स्वाभाविक गरजच वाटत नसते. 'मी असा चमत्कार करून अतर्क्य असे काही करून दाखविण्याचा जो

दावा करतो, तो मुळात संत राहिलेलाच नसतो.' 'मीपणा' व लोकेषणापासून दूर राहतो तोच संत! काही संतांच्या जीवनात काही अशा घटना-प्रसंग घडलेले दिसतात, की त्यांना 'चमत्कार' म्हटले जाते. या घटना-प्रसंग अतर्क्य वाटले, तरी ती त्या संत - महात्म्याची अंतरंग शक्ती व सहज स्थिती असते. इतर लोक, भक्तमंडळ या घटनांचा 'चमत्कार' म्हणून प्रचार करीत असतात. धर्म, संप्रदायाच्या क्षेत्रातही अनेक प्रकारचे भोंदू आहेत. ते अज्ञानी, नडलेल्या, गरजवंत, भाबड्या भाविकांना नादी लावून ठगवितात हेही खरे आहे. अध्यात्माची दुकानदारी मांडून आलिशान मठ, आश्रमात विलासीपणे राहणारे जे गुरु-बाबा-महंत आहेत, ते मुळात सच्चे संत नाहीत. निरपेक्षवृत्तीने समाजसन्मुख राहून समाजाच्या सुखासाठी कार्यरत राहणे हे खऱ्या संताचे लक्षण. फी घेऊन दर्शन सोहळे साजरे करणारे प्रदर्शनीय बाबा-गुरू हे कसले संत? त्यामुळे भोंदू संतांच्या प्रचाराला बळी पडून आपण समग्र संतमहंतांकडे पूर्वग्रहदूषित दृष्टीने पाहू नये.

चांगले व वाईट सर्वच क्षेत्रांत आहे. चांगले आदर्श शिक्षक आहेत, तद्वत वाईट शिक्षकही आहेत. चांगले समाजसेवक, नेते आहेत; तसे खोटे, भोंदू, दिखाऊ नेतेही आहेत. अपप्रवृत्ती या विकृती आहेत. ती प्रकृती समजण्याचा वेडेपणा आपण करू नये. संत ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास यांनी भोंदूगिरीविरुद्ध अत्यंत परखडपणे लिहिले आहे. 'दाढी, कपाळावरील टिळे आणि भगवी वस्त्रे या बाह्यांगावर भुलून आपण कोणालाही संत समजून त्याच्या नादी लागू नये. कुत्र्याचा रंगही भगवा असतो. बगळाही पाण्यात डोळे मिटून ध्यानस्थ होतो म्हणून ते संत नव्हेत,' असा परखड सल्ला उपरोक्त संतांनी दिलेला आहे हेही आपण लक्षात घ्यावे व संतकार्याकडे निकोप दृष्टीने पाहावे.

बहुतेक लोक 'चमत्कार' या शब्दाचा अवास्तव बाऊ करतात व संतांच्या कार्याकडे पूर्णपणे पाठ फिरवतात. असे लोक आपणांला विज्ञानवादी, बुद्धिवादीही मानतात. पण, या चमत्काराचा मुळापासून शोध घेण्याचा प्रयत्न करीत नाहीत. या देशी बुद्धिवाद्यांशी विदेशातील बुद्धिवादी, विज्ञानवादी यांच्याशी तुलना केली तर काय दिसते? तर विदेशी बुद्धिवादी भारतीय संतांच्या चमत्कारांकडे अत्यंत सावधपणे, चिकित्सकवृत्तीने, पण आस्थेने पाहतात. देशी बुद्धिवाद्यांप्रमाणे या विदेशी बुद्धिवाद्यांमध्ये संतांच्याबद्दल उपेक्षेची, तुच्छतेची भावना नसते असे दिसते.

जगविख्यात पत्रकार, संपादक पॉल ब्रॅन्टनचेच उदाहरण घ्या. हा प्रखर बुद्धिवादी, विज्ञाननिष्ठ पत्रकार पाश्चात्त्य देशातून संतांच्या चमत्कारांचे गूढ

समजून घेण्यास भारतात येतो व अनेक वर्षे भारतीय बनून, विविध संतांच्या सहवासात राहून, आध्यात्मिक रहस्यांचा शोध घेतो. 'A Search in Secret India' (भारताच्या आध्यात्मिक रहस्याच्या शोधात) हे त्याचे पुस्तक संतजीवने कशी अभ्यासावीत याचा एक वस्तुपाठ आहे. या पुस्तकाचे विविध देशांत, विविध भाषांत अनुवाद झालेले आहेत. भारतीय अध्यात्मसंपदेचा पॉल ब्रन्टनने घेतलेला शोध सर्वच भारतीयांनी डोळसपणे वाचला पाहिजे. संत-योगी-महंत यांच्या ठायी असणाऱ्या अतींद्रिय शक्तींचा, सिद्धींचा, यौगिक सामर्थ्यांचा त्याने परिश्रमपूर्वक, अपार सहनशीलवृत्तीने आणि तितक्याच चिकित्सकपणे घेतलेला पूर्वग्रहविरहित धांडोळा खरोखरीच थक्क करणारा आहे.

**पॉल ब्रन्टन** म्हणतो, **'तसे पाहिले तर प्रत्येक पौर्वात्य भोळ्या समजुतीच्या तळाशी काहीतरी खरीखुरी हकिकत ही असतेच. पण ती शोधून काढण्याकरिता प्रगल्भ अशा जागरूकतेची आवश्यकता असते. मी जेथे गेलो, तेथे टीकाकारांच्या दृष्टीनेच गेलो. तत्त्वज्ञानापेक्षा मला चमत्कार व आध्यात्मिक रहस्ये शोधून काढावयाची होती. मुळात खऱ्या असलेल्या गोष्टींवर अनेक वर्षे, अनेक प्रकारच्या ढोंगबाजीची पुटे चढलेली होती.'** पॉल पुढे असेही म्हणतो की, **'मौल्यवान रत्ने व किमती हिरे यांहूनही अधिक किमतीची अध्यात्मविद्या येथील संतमहंतांजवळ आहे. असा एक दिवस निश्चित येईल, की जगाला याचे यथार्थ मूल्य कळेल.'** असो.

अपेक्षेपेक्षाही हे संपादकीय खूपच सविस्तर झाले आहे; पण संतमहंत, योगी या आध्यात्मिक सत्पुरुषांविषयी बुद्धिवादी, साक्षर समाजात असलेल्या काही गैरसमजाच्या यथाशक्ती निराकरणार्थ थोडे सविस्तर लिहिणेच गरजेचे होते. या शिल्पकार चरित्रकोशात अधिकाधिक संतचरित्रांची माहिती देण्याचा प्रयत्न केलेला आहे. काही संत घराणी आहेत, त्यांपैकी ज्येष्ठांची, मान्यवर संत व्यक्तींची माहिती देऊन पुढील पिढीतील उत्तराधिकाऱ्यांची नावे दिलेली आहेत. उदा. ह.भ.प. धुंडामहाराजांच्या माहितीत पुढील उत्तराधिकारी भानुदासमहाराज व नातू चैतन्यमहाराज यांचे उल्लेख केलेले आहेत. त्यांची वेगळी, स्वतंत्र माहिती दिलेली नाही. तसेच देहूकर, वासकर या संत घराण्यांबद्दल करावे लागलेले आहे. त्याचप्रमाणे, विवेकी 'सत्यधर्मा'ची मांडणी करणारे महात्मा जोतिबा फुले आणि धम्मचक्रप्रवर्तन करून बौद्ध धम्माची समाजबांधवांना दीक्षा देणारे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्यासारख्या रूढार्थाने 'संत' नसलेल्या पण धर्म व समाजसुधारक सत्पुरुषांचाही या खंडात समावेश केला आहे.

या चरित्रकोशात फक्त दिवंगत सत्पुरुषांचीच माहिती आहे व हयात

विद्यमान संतांची सूची, माहिती परिशिष्टात दिलेली आहे. बहुतेक सर्व धर्मसंप्रदाय, पंथांतील संतांचा समावेश करण्याचा आम्ही प्रामाणिक प्रयत्न केलेला आहे. अनवधनाने कोणा संताची माहिती राहिली असेल तर ती संपादकाची चूक समजावी, प्रकाशकांची नव्हे.

ही संतांची खानेसुमारी नाही, त्यामुळे एखादे नाव राहिल्यास या कोशामागील सद्‌हेतू ध्यानी घेऊन भाविकभक्तांनी क्षमा करावी, ही प्रार्थना. हा खंड तयार करण्यासाठी अनेक लेखकांचे सहकार्य लाभले, त्या सर्वांचा मी ऋणी आहे. तसेच, लेखकांशिवाय अनेकांचे हात या कार्यसिद्धीमागे आहेत, त्या सर्वांच्या ऋणांत राहणेच मला आवडेल.

**न्यून ते पुरते । अधिक ते सरते ।।**
**करुनि घ्यावे हे तुमते । विनवितु असे ।।**
**– ज्ञानेश्वरी**

**– विद्याधर मा. ताठे**
SVS इम्प्रेसिया, ३०२ तिसरा मजला, विणकर सोसा., विणकर सभागृहाशेजारी, चव्हाण नगर, धनकवडी, पुणे -११ ०४३.
भ्रमणध्वनी : ९८८१९ ०९७७५
इ-मेल : vidyadhart@indiatimes.com

# अनुक्रमणिका

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाचे योगदान | मुख्य नोंद |
|---|---|---|---|
| • केशवदत्त महाराज | ५७४ | समाजप्रबोधन व सेवा | |
| • केळकर गोपाळ रामचंद्र | ५७५ | लेखक, ग्रंथकार | |
| • कैकाडीबाबा | ५७६ | समाजप्रबोधक कीर्तनकार | |
| • खुपेरकर माधवाचार्य बाळाचार्य शास्त्री | ५७८ | तत्त्वचिंतक, संस्कृत तज्ज्ञ | |
| • गगनगिरी महाराज | ५८० | बालयोगी | |
| • गजानन महाराज (शेगांव) | ५८२ | साक्षात्कारी संत | |
| • गाडगे महाराज | ५८३ | समाजप्रबोधक कीर्तनकार | |
| • गुरुदेव रानडे | ५८५ | तत्त्वज्ञ, विचारवंत | |
| • गुप्ते गजानन महाराज (अक्कलकोट) | ५८७ | योगी पुरुष | |
| • गुलाबराव महाराज (प्रज्ञाचक्षु) | ५८८ | मधुराभक्ती उपासक | |
| • गुळवणी महाराज | ५८९ | शक्तिपात योग योगीराज | |
| • गोंदवलेकर महाराज | ५९१ | सत्पुरुष, समाजप्रबोधक | |
| • गोपालनाथ महाराज (त्रिकुटी) | ५९२ | सत्पुरुष, सिद्धयोगी | |
| • गोयंका सत्यनारायण | ५९४ | विपश्यना आचार्य | |
| • चंदावरकर, नारायण गणेश | ५९७ | प्रार्थना समाज, कायदेपंडित | |
| • चव्हाण काशीबाई महाराज | ५९८ | समाजसेवी महायोगिनी | |
| • चिमड महाराज | ६०० | साक्षात्कारी सिद्ध पुरुष | |
| • चितारीबुवा | ६०१ | चित्रकार, सत्पुरुष | |
| • चिद्घन महाराज | ६०३ | समाजप्रबोधनकार, सिद्धयोगी | |
| • चिले महाराज | ६०४ | सत्पुरुष, अवलिया | |
| • चौंडे महाराज गोजीवन | ६०५ | समाजप्रबोधक कीर्तनकार | |
| • जंगली महाराज | ६०७ | समाजसुधारक, साक्षात्कारी संत | |
| • जालवणकर नारायण महाराज | ६०९ | सिद्ध पुरुष, ग्रंथलेखक | |
| • जोग विष्णुबुवा नरसोपंत | ६१० | वारकरी शिक्षण संस्था संस्थापक | |
| • जोगन विठाबाई | ६१२ | योगी | |
| • जैतुनबी | ६१३ | वारकरी, कीर्तनकार, जनप्रबोधन | |
| • झुरळे महाराज | ६१५ | ग्रंथ प्रकाशक, समाजप्रबोधक | |
| • टेंब्येस्वामी वासुदेवानंद सरस्वती | ६१७ | सिद्धयोगी परिव्राजक | |
| • टेंब्ये महाराज शिवानंद | ६१८ | सिद्धयोगी | |

अ

# प्रस्तावना



**प्राचार्य डॉ. मुकुंद रघुनाथ दातार**

- एम.ए. (मराठी, संस्कृत), पीएच.डी.
- संत साहित्याभ्यासक, विचारवंत
- प्रबंध लेखन : संतश्रेष्ठ एकनाथांचे वाङ्‌मयीन व्यक्तिमत्त्व (१९८१)
- साहित्य सेवा :
  संत साहित्यपर समीक्षा ग्रंथ - ६
  सांस्कृतिक विषयांवर संपादित ग्रंथ -४
  सामाजिक विवरण ग्रंथ - ३
- अध्यक्ष : गीताधर्म मंडळ
- अध्यक्ष : सकल संत विचारपीठ
- साहित्य लेखन आणि वक्तृत्त्व सेवा यांबद्दल बारा पारितोषिके
- महत्त्वाची पुस्तके :
  १) संतकवी एकनाथ
  २) ॥ तुका म्हणे ॥
  ३) वारकरी संप्रदायाची प्रस्थानत्रयी
  ४) वारकरी-विश्‍व आणि समर्थ रामदास
  ५) एकनाथांची बोधवाणी
  ६) भगवद्‌गीता काय शिकविते?

आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण कशी झाली? हे विशद करणाऱ्या, द्वादश खंडात्मक, ‘शिल्पकार चरित्रकोश’ मालिकेतील प्रस्तुत खंड हा ‘प्राच्यविद्या आणि धर्मपरंपरा’ असा द्विदल आहे. त्यापैकी ‘धर्मपरंपरा’ या विभागासाठी प्रस्तावना सादर करताना सर्वप्रथम ‘धर्म’ आणि ‘परंपरा’ या दोन्ही महत्त्वाच्या संज्ञांचा ‘संस्कृत शब्दकोशा’तील नेमका अर्थ काय आहे? हे लक्षात घेणे उचित होईल.

श्री. वामन शिवराम आपटे यांच्या ‘संस्कृत शब्दकोशात’ ‘धर्म’ या संज्ञेचा अर्थ पुढीलप्रमाणे विविध संदर्भ देऊन सांगितला गेला आहे. तो असा – ‘धर्म म्हणजे कर्तव्यपालन, परंपरापालन, संप्रदाय–आचरण, नैतिक गुणांचे आचरण, सम्यक न्यायबुद्धी, निष्पक्षपातीपणा, पवित्रता, शालीनता, औचित्य, नीतिशास्त्र, सत्संग, भक्तिभावना’ इत्यादी अनेक अर्थ या संदर्भात उल्लेखिले गेले आहेत. तसेच श्री. जनार्दन विनायक ओक यांच्या ‘गीर्वाण लघु कोशा’मध्ये धर्म या संज्ञेच्या उपरिनिर्दिष्ट विविध अर्थांशिवाय ‘पुण्यकर्म, प्रावीण्य, योग्यता, स्वभाव, सदृश्य’ इत्यादी अन्य अर्थही सांगितले गेले आहेत.

याचप्रमाणे ‘परंपरा’ या संज्ञेचा नेमका अर्थ कोणता? कोशगत अर्थ काय? हेही पाहणे आवश्यक आहे. मुळात ‘परंपरा’ हा शब्द ‘परंपर’ या विशेषणार्थी संज्ञेपासून आलेला आहे. त्याचे अर्थ पुढीलप्रमाणे आहेत – ते असे, ‘पूर्वानुपर, उत्तरोत्तर, अविच्छिन्न, पंक्तिनिविष्ट, नियमांकित, पद्धती, प्रणाली, क्रम, सुव्यवस्था’ इत्यादी अर्थ सांगितलेले आहेत.

याचप्रमाणे पुढचा महत्त्वाचा मुद्दा असा की, वरील व्युत्पत्यर्थ लक्षात घेऊन, प्रस्तुत चरित्रकोशाच्या नामाभिधानातील ‘धर्म’ या संज्ञेचा नेमका अर्थ काय? आपणास कोणता अर्थ अभिप्रेत आहे? तर त्याचे सुस्पष्ट उत्तर असे आहे की, आपणास ‘धर्म’ याचा अर्थ

'सद्धर्म' असा अपेक्षित आहे. म्हणजेच मानवी आचरणाबाबत उदात्त जीवनपद्धती (Noble way of life) असा अर्थ अभिप्रेत आहे. या 'धर्म-सद्धर्म' अर्थाच्या संज्ञेत आज जगभर रूढ असणारे सर्व धर्म (म्हणजे Religions) येतात. अंतर्भूत होतात. अनुस्यूत ठरतात. अशी आपली भूमिका आहे आणि त्याच दृष्टीने पुढे विवरण-विवेचन केले आहे.

याचप्रमाणे 'धर्मपरंपरा' या संज्ञेपैकी 'परंपरा' या शब्दाचा नेमका कोणता अर्थ आपणास अभिप्रत आहे? तर 'परंपरा' म्हणजे आपणास पिढ्यान्‌पिढ्यांची 'मानवता-शरण, आचार-विचार - पद्धती' अपेक्षित आहे. त्याचप्रमाणे 'परंपरा' म्हणजे गुरुशिष्य परंपरेने पुढे पुढे जाणारी विशिष्ट जीवनदृष्टी अभिप्रेत आहे. म्हणजेच विशेष अशी उपदेश-प्रणाली किंवा वैशिष्ट्यपूर्ण अशी आचरणपद्धती अपेक्षित आहे. त्याचप्रमाणे पिढ्यान्‌पिढ्यांनी घडवलेली मूल्य-संचय ही परंपरा या संज्ञेतून आपणास अभिप्रेत आहे. मात्र परंपरा याचा केवळ संकुचित अर्थ म्हणजे 'कर्मकांडात्मक संकेत-पुंज' हा अर्थ आपणास अभिप्रेत नाही, हेही आपण लक्षात घेतले पाहिजे.

**धर्मपरंपरेचे तीन कालखंड :**

अशा या धर्मपरंपरेचे सामान्यपणे तीन कालखंड जाणवतात. ते पुढीलप्रमाणे नमूद करता येतील.

१) प्राचीन कालखंड - इ.स. पूर्व ते इ.स. १२०१

२) मध्ययुगीन कालखंड - इ.स. १२०१ ते इ.स. १८०१

३) अर्वाचीन कालखंड - इ.स. १८०१ ते अगदी आजपर्यंत

अशा या तिन्ही कालखंडांत आपल्या भारतवर्षामध्ये 'धर्म' या संज्ञेचा अर्थ, 'सद्धर्म', असाच राहिला आहे. त्या दृष्टीने आपल्या प्राचीन संस्कृत साहित्यामध्ये 'धर्म' या संज्ञेविषयी कशाप्रकारचा विचार-विमर्श झाला आहे? त्याचा आढावा घेणे इष्ट होईल. या संदर्भात याज्ञवल्क्य ऋषी यांनी उत्तम विवेचन केले आहे. ते म्हणतात -

''श्रुतिः स्मृतिः सदाचारः स्वस्थ च प्रियमात्मनः।

सम्यक् संकल्पजः कामो धर्ममूलमिदं स्मृतः।।

याचा अर्थ असा की, ''वेदवाङ्मय, स्मृतिवाङ्मय, सत्पुरुषांची आचारप्रणाली, स्वतःच्या मनाचा कौल; तसेच उत्तम संकल्पांची मनीषा आणि शास्त्राच्या अविरोधी असणाऱ्या प्रापंचिक इच्छा या पाच गोष्टी, 'धर्म - संकल्पनेच्या मूलाधार' आहेत.''

याचप्रमाणे 'श्रेष्ठतम धर्म' किंवा 'मानवता धर्म' कोणता? याबद्दलही याज्ञवल्क्य म्हणतात -

''इज्याचारदमाहिंसादानस्वाध्यायकर्मणाम्।

अयं तु परमो धर्मो यद्योगेनात्मदर्शनम्।।

याचा भावार्थ असा की, त्यागवृत्ती, सदाचरण, इंद्रिय-निग्रह, अहिंसा, दानबुद्धी, शास्त्राध्ययन, शास्त्रसंमत कर्माचरण या गोष्टींचे पालन करणे म्हणजे 'परम' ध्येय होय. तसेच परमात्मतत्त्वाशी संयोग पावण्यासाठी 'आत्म' साक्षात्कार साधणे हाच सर्वोत्तम धर्म होय! परमोच्च धर्म होय! असे याज्ञवल्क्य सांगतात.

**अथातो धर्मजिज्ञासा :**

या याज्ञवल्क्य ऋषींप्रमाणे जैमिनी या ऋषींनीही 'धर्मा-संबंधी' महत्त्वाचे विवेचन केलेले आहे. त्यांच्या जैमिनी सूत्रांचा प्रारंभच 'अथातो धर्माजिज्ञासा।' या सूत्राने होतो. ते पुढे दुसऱ्या सूत्रात सांगतात -

''चोदनालक्षणोर्थः धर्मः।

''चोदना'' म्हणजे सम्यक प्रेरणा. पवित्र प्रेरणा. मानवतावादी प्रेरणा. तसेच चोदना या संज्ञेचे अन्य अर्थ म्हणजे आज्ञा, उपदेश, विधीविधान इत्यादीही आहेत. अशा या शुद्धतम प्रेरणेने सर्वांना ज्ञात होणारा, सर्वथा श्रेयस्कर अशा क्रियाकलाप म्हणजे धर्माचरण होय. शुद्ध धर्माचरण होय. साहजिकच हा उपदेश, अतींद्रिय सामर्थ्य असणारे आणि अनुराग, द्वेष यांच्यापासून मुक्त असणारे असे जे मंत्रद्रष्टे ऋषिमुनी यांच्यापासून प्राप्त झालेला असावा किंवा ईश्वरी संदेश प्राप्त झालेले प्रतिभावान आणि प्रज्ञावंत यांच्याकडून लाभलेला असावा अथवा 'दिव्य जीवनाचे' समर्थ भाष्यकार असे जे कोणी महामानव असतील त्यांच्याकडून मिळालेला असावा. याचाच अर्थ असा की, आपल्या ऐहिक जीवनात आणि पारलौकिक किंवा पारमार्थिक जीवनात दिव्यत्वाची, मांगल्याची प्राप्ती करून देणारा आणि अनिष्ट प्रवृत्तींचे निवारण करणारा विचार-आचार तो धर्म होय; 'सद्धर्म' होय.

आतापर्यंत निर्देश केलेल्या याज्ञवल्क्य आणि जैमिनी या दोन ऋषिश्रेष्ठांप्रमाणे कणाद या ऋषिवर्यांनीही, आपल्या वैशेषिक दर्शनामध्ये सद्धर्माची व्याख्या करताना म्हटले आहे- ''यतोऽभ्युदयनिःश्रेयस सिद्धिः स धर्मः।'' भावार्थ असा की- मानवमात्रास 'अभ्युदया'ची आणि ''निःश्रेयसाची'' म्हणजे दोन्हींची प्राप्ती करून देणारा जो तो धर्म होय. आता या दोन सुप्रसिद्ध संज्ञांचा नेमका अर्थ कोणता? तर 'अभ्युदय' म्हणजे ऐहिकता आणि निःश्रेयस म्हणजे 'पारमार्थिकता'. या दोहोंचाही समावेश 'धर्म' या संकल्पनेत होतो. फक्त एकाच गोष्टीचा नाही. याचा अर्थ, ऐहिक न्याय्य सुखवैभव आणि पारमार्थिक भक्तिसुख किंवा कैवल्यप्राप्ती या दोघोंचेही संतुलन, खऱ्या धर्मविचारामध्ये निश्चितार्थाने अभिप्रेत आहे.

आता यापुढचा विचार असा की- 'अभ्युदय' या व्यापक कल्पनेमध्ये कोणकोणत्या गोष्टींचा समावेश होतो? तर अभ्युदय म्हणजे ऐहिक सुख, राज्यलक्ष्मी, धनसंचय, सत्ताप्राप्ती, लोकेषणा इत्यादी गोष्टी प्रस्तुत संकल्पनेत सामावतात. त्याचप्रमाणे 'अभ्युदय' या संकल्पनेमध्ये देशाचे राजकीय स्वातंत्र्य, दारिद्र्यमुक्ती, सामाजिक दास्यविमोचन या गोष्टीही समाविष्ट होतात. तसेच 'अभ्युदय' म्हणजे सम्यक-धारणा, समाज-धारणा, सु-धारणा, प्रगतिशीलता, प्रगमनशीलता या गोष्टीही अभिप्रेत आहेत. याचबरोबर शिक्षणव्यवस्था, विज्ञाननिष्ठा, अर्थकारण, राज्यकारण, समाज व्यवस्थापन या गोष्टीही 'अभ्युदय' या संकल्पनेमध्ये अंतर्भूत होतात. आपल्या ऋषिमुनींना अभिप्रेत असणारी 'अभ्युदयाची' व्याप्ती एवढी मोठी आहे.

त्याचप्रमाणे 'निःश्रेयस' मध्ये भवचक्रातून मुक्ती, मोक्षप्राप्ती, सच्चिदानंदप्राप्ती, भगवद्भक्ती, ईश्वरी साक्षात्कार, आत्मसाक्षात्कार या संकल्पना समाविष्ट आहेत. पण त्यापुढे जाऊन सर्व भूतमात्रांमध्ये भगवंत अनुभवणे, तसेच स्वकर्तव्यनिष्ठा, मानवता, प्रेम, नैतिकता, सामाजिकता, समाष्टिशरणता याही संकल्पनांचा समावेश आहे. याचाच धर्म असा की 'निःश्रेयस' याच्या मूळ संकल्पनेत, 'आत्मोद्धार' आणि 'लोकोद्धार' या दोन्ही गोष्टी अभिप्रेत आहेत. एवढेच नव्हे तर, आपण जनलोकांच्या सर्वतोपरी कल्याणासाठी, अविरत प्रयत्न केल्याशिवाय, आपला 'आत्म'विकास पूर्णच होत नाही, अशी सामाजिक, सांस्कृतिक धारणा आपल्या भारतवर्षीय तत्त्वचिंतन-परंपरेची आहे.

**व्यासकृत महाभारतातील धर्मलक्षण :**

यापुढे जाऊन, 'धर्म' या संज्ञेचा नेमका अर्थ लक्षात घेताना, श्रीव्यासकृत 'महाभारत' आणि महाभारतांर्गत ग्रंथित झालेली 'श्रीमद्भगवद्गीता' - यांमधील विवेचन-विवरण, सर्वार्थाने महत्त्वाचे ठरते. महाभारतकार व्यासमुनींनी 'धर्म'लक्षण सांगताना स्पष्टपणे म्हटले आहे की-

''धारणात धर्म इत्याहु:।'' (महाभारत शांतिपर्व, १०९.११) या संदर्भात डॉ. ज.वा. जोशी म्हणतात - ('धर्माचे

तत्त्वज्ञान' कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे-३०, १९७५, पृष्ठ १०९) वैदिक पशुयागाऐवजी एकेश्वरभक्ती, केवळ श्रद्धामूलक धर्माचाराऐवजी, नैतिक तत्त्वांची श्रेष्ठता याला महाभारतकार श्रीव्यास जास्त महत्त्व देतात. श्रेष्ठत्व देतात. तसेच परमार्थाचा सर्वांना समान अधिकार, सर्वभूतहितबुद्धी, सत्पुरुषांच्या आचारावर आधारलेले धर्मप्रामाण्य यांनाही श्रीव्यास अधिक महत्त्व देतात. त्यामुळे पारलौकिक श्रद्धांवर आधारलेल्या धर्मकल्पनेऐवजी 'समाजधारणा' या संकल्पनेस मध्यवर्ती मानणारे धर्मस्वरूप श्रीव्यासांनी सांगितलेले आढळते. धर्म हे त्यानुसार 'लोकव्यवहारशास्त्र' होते. म्हणून लोकजीवनाचे पायाभूत नैतिक अधिष्ठान म्हणजे 'धर्म' होय, असे त्या वेळी सांगितले गेले.

यासाठी धर्मशास्त्रनिर्णयात महाभारतकारांनी 'अर्थविज्ञान' हे आधारभूत मानलेले आहे. (शांतिपर्व, १४२.११) तसेच श्रीव्यासांनी सामाजिक परिवर्तनानुसार, धर्माचे परिवर्तन, धर्म-संस्थांचे परिवर्तन प्रमाण मानलेले दिसते. (अनुगीता : १४३) तसेच नैतिक मूल्ये आणि आचारप्रणाली यांचे श्रेयस्करत्व हे स्थलकालसापेक्ष असल्याचे श्रीव्यास मानतात. म्हणजेच धर्म आणि नीती यांचा संबंध समाजधारणेशी असल्याने, तत्संबंधी सामाजिक संदर्भ पाहून मग त्यांची मीमांसा करणे, तसेच मूल्यमापनही करणे हेच योग्य होय, युक्त होय. असा अभिप्राय महाभारतकार व्यासांचा दिसतो. (शांतिपर्व : १५.३.२९) याचा अर्थ असा की - धर्म म्हणजे केवळ परलोकविद्या नव्हे किंवा पारमार्थिक, अतीत, कल्पना सिद्धान्तांचे शास्त्र नव्हे तर ते ऐहिक, सामाजिक व्यवस्थचेही शास्त्र आहे, असे व्यास मानतात. म्हणूनच 'श्रीव्यासांची धर्म-कल्पना ही बुद्धिवादी असल्याचा अभिप्राय', तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी व्यक्त केला आहे. (वैदिक संस्कृतीचा विकास, पृ. ९०.)

अशा तऱ्हेने श्रीमद्‌भगद्‌गीतेची शिकवण असणारा 'निष्काम कर्मयोग' हा तर प्रवृत्तिनिवृत्ती संयोग आहे. इथे निष्काम म्हणजे आत्मसुखाचीही अपेक्षा न ठेवता केलेले कर्म- असा अर्थ नाही. कारण ती तर धर्माची प्रवृत्ती आहे. मग 'निष्काम' म्हणजे काय? तर 'आत्मसुखाखेरीज, अन्य सुखाविषयी उदासीनता म्हणजे निष्कामता होय. श्रीमद्‌भगवद्‌गीता सांगते की - सर्वांना जर नि:श्रेयसाची प्राप्ती व्हावयास हवी असेल तर, त्यासाठी समाजातील सर्व घटकांमध्ये परस्पर-सहकार्य, परस्पर-सहयोग असण्याची नितान्त आवश्यकता आहे. गीता म्हणते -

''देवान्भावयतानेन ते देवा भावयन्तु व:।
परस्परं भावयन्त श्रेय: परमवाप्स्यथ।।

(अध्याय ३, श्लोक ११)

त्याचबरोबर भगवद्‌गीता पुढे सांगते की-
''स्वे स्वे कर्मण्यभिरत: संसिद्धिं लभते नर:।''

(१८.४५)

याचा अर्थ असा की - स्वधर्माचरण आणि परस्पर सहकार्य- या दोन गोष्टींमधूनच समाजधर्माची जोपासना होईल आणि समाजस्वास्थ्यही निर्माण होईल. मग 'धारणात् धर्म: इत्याहु:।' हे श्रीव्यासवचनही सार्थ होईल.

श्रीमद्‌भगवद्‌गीता असेही सांगते की, सर्वभूतमात्रांकडे आत्म्यौपम्य बुद्धीने पाहणारी व्यक्तीच, (गीता अध्याय-६) महाभारतात शांतिपर्वात, व्यक्त केलेली अपेक्षा म्हणजे 'सर्वेषां यः सुहृन्नित्यं सर्वेषां च हितेरत:।' हा अपेक्षित आदर्श व्यवहारात मूर्त स्वरूपात उतरवू शकेल! मुळात भगवद्‌गीतेला, 'सर्वत्र समदर्शिन:।' हीच अनुभूती घेणारी व्यक्तीच खरी 'धर्मप्रवण' वाटते. अशाच आदर्श-मूर्तीची चित्रे भगवद्‌गीतेत सर्वत्र रेखाटली गेली आहेत. उदाहरणार्थ स्थितप्रज्ञ (अ.२), योगमुक्त (अ.६), ज्ञानी भक्त (अ.१२), त्रिगुणातीत (अ.१४), ज्ञाननिष्ठ (अ.१८) यांच्या

रूपाने भगवद्‌गीतेने आदर्श मूर्तींचीच चित्रे रेखाटलेली आहेत. म्हणूनच लोकमान्य टिळक म्हणतात की – 'भगवद्‌गीता हा सद्‌धर्माचे सम्यक आणि परिपूर्ण स्वरूप प्रकट करणारा भारतीय संस्कृतीतील प्रातिनिधिक ग्रंथ आहे.'

**प्रवृत्तिनिवृत्तिसमन्वयात्मक धर्म :**

लोकमान्य टिळक आपल्या 'गीतारहस्य' या ग्रंथाच्या प्रारंभीच्या बृहत् अशा 'संजीवनी' टीकेमध्ये म्हणजे गीतारहस्य ग्रंथाच्या प्रस्तावनेमध्ये सांगतात की, भगवद्‌गीताप्रणीत 'धर्म' हा प्रवृत्ती (अभ्युदय) किंवा निवृत्ती (नि:श्रेयस) या दोहोंपैकी कोणालाच, एकांगी महत्त्व देणारा नसून तो प्रवृत्तिनिवृत्तिसमन्वयात्मक आहे. म्हणजे असे की, प्रापंचिक कर्मे गौण किंवा त्याज्य ठरवून ब्रह्मज्ञान भक्तिमार्ग इत्यादी फक्त मोक्ष–मुक्तिमार्गाचेच, भगवद्‌गीतेत निरूपण आहे – असे जे मत सांगितले जाते, ते आम्हाला मान्य नाही. मात्र मोक्षप्राप्तीच्या मार्गाचे, भगवद्‌गीतेत मुळीच विवेचन नाही, असेही आमचे म्हणणे नाही. किंबहुना आम्हाला असेच वाटते की, प्रत्येक मनुष्याने, परमेश्वरस्वरूपाचे शुद्ध ज्ञान संपादन करून तत्‌द्वारा आपली बुद्धी होईल तितकी निर्मळ आणि पवित्र करावी हेच त्याचे या जगातील पहिले कर्तव्य आहे. असेच गीताशास्त्राचे सांगणे आहे – असेच आम्हास वाटते. म्हणजेच अशी युक्ती हवी की, कर्मे तर केली पाहिजेत, पण त्यांचे कोणतेच पाप न लागता अखेर त्यामुळेच मोक्षमुक्तीही मिळाली पाहिजे. अशी युक्ती भगवद्‌गीता सांगते, असे आम्हास वाटते. ती म्हणजे 'ज्ञानमूलक भक्तिप्रधान कर्मयोगाचे' आचरण सर्वांनी केले पाहिजे. हाच भगवद्‌गीतेचा धर्म–संदेश आहे.

यापुढे जाऊन, श्रीमद्‌भगवद्‌गीतेचे वेगळेपण आणि मोठेपण विशद करताना लोकमान्य टिळक सांगतात, अध्यात्मदृष्ट्या भगवद्‌गीतेत प्रतिपादन केलेल्या, नीतितत्त्वापेक्षा दुसरे एखादे निराळे नीतितत्त्व, अद्यापि कोठेही कोणी शोधून काढलेले नाही. अगदी पाश्चिमात्य तत्त्वचिंतनसृष्टीचे अवलोकन केले तरी, हेच दिसते. जसे 'पाप हे अज्ञानमूलक असते' असे सॉक्रेटिसचे मत होते तर 'पूर्णावस्थेस पोहोचलेल्या ज्ञानी पुरुषांचे वर्तन, इतरांसाठी आदर्शभूत असते,' असे प्रतिपादन ग्रीक तत्त्ववेत्त्यांनी केले आहे. ही सारी तत्त्वे भगवद्‌गीतेत अंतर्भूत आहेतच. तसेच श्री. मिल्ल, श्री. स्पेन्सर या तत्त्वचिंतकांनी असे म्हटले आहे की –'मानवी हितासाठी प्रयत्न करीत राहणे हीच नीतिमत्तेची कसोटी होय, पराकाष्ठा होय.' नेमके हेच तत्त्व, भगवद्‌गीतेच्या 'सर्वभूतहिते' रत:।' या लक्षणात सांगितले आहे. तसेच श्री. कान्ट यांनी मांडलेली कर्तव्यबुद्धीची भूमिका आणि इच्छास्वातंत्र्याची भूमिका या दोन्ही भगवद्‌गीतेच्या विचारधनात अंतर्भूत झालेल्या आहेत. या साऱ्या अत्यंत विशेष आणि महत्त्वाच्या गोष्टी आहेत, असे लोकमान्य सांगतात. याचाच सुस्पष्ट अर्थ असा की, गीतोक्त धर्म हा मानवधर्मच आहे. तो अखिल मानवांच्या कल्याणासाठी सांगितलेला सद्‌धर्मच आहे.

**व्यासकृत महाभारतातील धर्मलक्षण :**

आता अशा या सद्‌धर्माचे कार्य कोणते? स्वरूप कसे असते? आणि या सद्‌धर्माची उपयुक्तता कोणती? यासंदर्भात विवेचन करताना, स्वामी विवेकानंद सांगतात–(विवेकानंदांचे समग्र साहित्य खंड–६, ८, ९) 'धर्माचा संबंध पारमार्थिक सत्ताशास्त्रीय समस्यांशी असतो. तो व्यक्तिमात्राच्या अंतर्विश्वाशी असतो. उलट विज्ञान हे मुख्यत: भौतिकतेचे आणि बाह्यविश्वाचे संशोधन करते. म्हणून या जगात, त्या एका परमेश्वराची नामाभिधाने कितीही असोत, कोणतीही असोत, पण खरा धर्म हा शेवटी 'आत्म'धर्मच असतो! तो केवळ पारलौकिक कल्पनांना महत्त्व

देत नाही; तर 'या जगात' आणि 'या जन्मात' आत्मसाक्षात्काराने परमोच्च आनंद मिळवून देऊ इच्छितो. त्या दृष्टीने पाहता सर्व मुनष्यमात्रांचा 'धर्म' हा एकच आहे. त्याचे मार्ग आणि पद्धती अनेकानेक असतील - पण सर्वांचे ध्येय मात्र एकच आहे. यासाठीच केवळ धर्मतत्त्वे सविस्तर सांगून, धर्माचे कार्य संपत नाही तर 'धर्म' हे आचरणशास्त्रही आहे. त्याबाबतीत 'सत्यदर्शन' हा मार्ग स्वत:च्या विवेकबुद्धीने निवडावा, ठरवावा! मात्र हे सदैव लक्षात ठेवावे की-'सर्वत्र समभाव' आणि 'सदैव सहिष्णुता' या दोन गोष्टीच, सद्‌धर्माचे मूळ रहस्य सांगतात आणि राखतात!

यापुढे जाऊन स्वामी विवेकानंद आपणास असेही सांगतात की - तो परमेश्वर हा, सर्वांतर्यामी असल्यामुळे सर्व सृष्टी ही धर्म-क्षेत्र किंवा प्रयोगशाळा बनते. सद्‌धर्माची पराकाष्ठा ही परमेश्वर 'पाहण्यात' नाही तर परमेश्वररूप 'होण्यात' आहे. कारण तो एक परमेश्वरच सर्वत्र आहे. आत आहे. बाहेर आहे. सर्वदूर आहे. या दृष्टीने या सर्व सृष्टीला जन्म देणाऱ्या तिचे प्रतिपालन करणाऱ्या, ईश्वराची सेवा करण्याचे, त्या ईश्वराची भक्ती करण्याचे सर्व मानवांना, त्यांच्या-त्यांच्या इच्छेप्रमाणे, स्वातंत्र्य आहे. या दृष्टीने पाहता, धर्माचे बाह्य भेद किंवा व्रताचरण भेद या गौण गोष्टी आहेत. खरे म्हणजे आपण सारे त्या एकाच सर्वांतर्यामी परमेश्‍वराचे अंश आहोत. त्या भगवंताचे सेवक आहोत. आपण करतो ती भक्ती म्हणजे, त्या एकच परमात्म्याची विनम्र सेवा असली पाहिजे. आपल्या जगातील बाह्य आचरणारचे भेद हे त्या सद्‌धर्माचे ध्येय किंवा साध्य यांबाबतीत मतभेद किंवा संघर्ष निर्माण करूच शकत नाहीत. कारण हे अगदी स्पष्ट आहे की, जेथे संघर्ष असतो तेथे खरा धर्म नसतो!

**आत्मिक प्रेरणांचा विकास :**

याचप्रमाणे धर्माची, सद्‌धर्माची उपयुक्तता कोणती? ही गोष्ट विशद करताना स्वामी विवेकानंद म्हणतात-केवळ अन्न, वस्त्र, निवारा एवढ्या गरजांपुरतीच, आपली उपयुक्तेची भावना सीमित करणारे आपले भौतिकवादी अभ्यासक मित्र खरे म्हणजे मनुष्य आणि मनुष्येतर प्राणी यांमधील मूळ भेदच ओळखीत नाहीत. या जगातील प्रतिष्ठा आणि पैसा या दोहोंवर मनुष्यमात्राची खरी श्रीमंती आणि स्पृहणीय प्रतिष्ठा, मुळीच अवलंबून नाही. उलटपक्षी माणसामधील आत्मिक प्रेरणांचा विकास हीच खरी प्रगती आहे. या संदर्भात, आपण एक गोष्ट नीट लक्षात घ्यावयास हवी की, माणसाच्या सुखाच्या आणि समृद्धीच्या आड नेमके कोण येते? तो आड येणारा धर्म नसतो की नीती नसते. तर आड येतात ते 'स्वार्थ, अहंकार, वासना आणि विकार!' बस्स! याच गोष्टी! आणि मग यातून निर्माण होणाऱ्या आणखी दोन गोष्टीच समाजात विषमता निर्माण करतात! त्या दोन गोष्टी म्हणजे संचय प्रवृत्ती आणि त्यासाठी आक्रमकता! यातूनच दु:ख आणि पाप यांची बीजे पेरली जातात. उलट सत्य आणि आनंद या आत्मिक प्रेरणांच्या विकासावर, आधारलेली मानवधर्माची प्रेरणा आणि तदनुकूल आचार, याच गोष्टी मानवमात्रांची सामाजिक दु:खे दूर करू शकतात, असे स्वामी विवेकानंद निश्चयपूर्वक सांगतात. स्वामी विवेकानंदांचे हे धर्मविषयक विचारधन, अत्यंत महत्त्वाचे आहे. सर्वथैव मननीय आहे.

'धर्म, सद्‌धर्म' या संदर्भात, 'भारतीय संस्कृतिकोश', खंड चौथा (संपादक - पंडित महादेवशास्त्री जोशी) पृष्ठ ५५८ ते ५८४ यांमध्ये केले गेलेले विवेचन-विवरण सर्वांच्या विचारांना चालना देणारे आहे. त्यातील काही महत्त्वाचे मुद्दे, काही माहिती आपण इथे मुद्दाम लक्षात घेण्याची गरज आहे. ते विवरण असे-'धर्म' ही संज्ञा मानव्यविद्याशाखेमधील आहे. धृ= धारण करणे, या धातूपासून 'धर्म' ही संज्ञा तयार झाली आहे. या संज्ञेची

व्याख्या, 'धरति लोकान् ध्रियते पुण्यात्मभि: इति वा' अशी केली गेली आहे. तिचा भावार्थ असा– 'जो लोकांना समाजाला धारण करतो किंवा पुण्यात्म्यांकडून जो धारण केला जातो तो 'धर्म' होय. ऋग्वेदामध्ये 'धर्म' ही संज्ञा अनेक ठिकाणी आलेली आहे. याचप्रमाणे 'धृ' या धातूचा अर्थ–धारण करणे हा जसा आहे, त्याचप्रमाणे 'धृ' म्हणजे आधार देणे, उचलून धरणे, टिकवून ठेवणे असाही आहे. हेही आपण लक्षात घेतले पाहिजे.

ऋग्वेदामध्ये काही ठिकाणी 'धर्म' या संज्ञेचा अर्थ, नैतिक कायदे किंवा सामाजिक आचारप्रणाली, असाही आहे. तेथे धर्म म्हणजे काळाच्या कसोटीवर टिकलेले, सत्त्वप्रधान असलेले प्राचीन नीतिनियम असा अर्थ आढळतो. उदाहरणार्थ, ऋग्वेदात एक वचन असे येते की, ''द्यावापृथिवी वरुणस्य धर्मणा विष्कभिते अजरे भूरिरेतसा।'' (ऋग्वेद–६.०७.१) या वचनाचा अर्थ असा की नीतिधर्मरक्षक असणाऱ्या त्या सम्राट वरुणाच्या, नीतिनियमांनी ती द्यावा म्हणजे पृथिवी, हिच्यामध्ये सारे काही आपापल्या ठिकाणी सुयोग्य रीतीने, सावरून धरलेले आहे. ते कधी झिजत नाही, किंवा त्याची निर्मितिक्षमता, कधी कमी होत नाही.

**मनुष्यमात्राची कर्तव्यभूमिका** :

याचप्रमाणे छांदोग्य उपनिषदात, 'चार आश्रमांची विशिष्ट कर्तव्ये' या अर्थाने 'धर्म' ही संज्ञा उपयोजिलेली दिसते. यापुढे जाऊन असेही जाणवते की, 'धर्म' या संज्ञेच्या अर्थाबाबत वेद–उपनिषदांच्या कालखंडात बदलत्या काळानुसार, काही परिर्वतनेही झाली आणि अखेर 'धर्म' म्हणजे मनुष्यमात्राची 'कर्तव्याची भूमिका' हा अर्थ स्थिर झाला. यातूनच तैत्तिरीय उपनिषदात 'सत्यं वद, धर्मं चर।' असा जो उपदेश येतो, त्यामध्ये 'धर्म' या संज्ञेचा अर्थ, 'कर्तव्याचरण' असाच अभिप्रेत आहे.

महाभारतकार श्रीव्यासांनी 'धर्माचे लक्षण सांगताना 'धारणात धर्म: इत्याहु:।' असे म्हटले आहे, असे पूर्वी या प्रस्तावनेत नमूद केले आहे.

तो संपूर्ण श्लोक असा –

''धारणाद्धर्ममित्याहुर्धर्मो धारयते प्रजा:।

य: स्वाद्धारणसंयुक्त स धर्म इति निश्चय:।। (महाभारत, शांतिपर्व, १०९.११)

भावार्थ असा की, ''जो धारणा करतो तो 'धर्म' होय. धर्म हा जनलोकांची धारणा करतो. जो धारण–संयुक्त असतो, तो 'धर्म' होय. असा निश्चितार्थ आहे.'' श्रीव्यासांनी केलेल्या या व्याख्येत, समाजधारणा सामाजिक धारणा शक्ती हे 'धर्म' या संज्ञेचे मुख्यतत्त्व मानले आहे. ही धारणा साहजिकच सर्वांना सुस्थिर ठेवणारी हवी, आणि प्रगतीचा मार्ग दाखवणारी हवी.

यापुढे जाऊन श्रीव्यासांनी 'शब्दप्रामाण्याला' महत्त्व न देता, 'अनुभूतिप्रामाण्याला' अधिक महत्त्व दिले आहे, हीसुद्धा विशेष गोष्ट आहे.

या संदर्भात श्रीमहाभारतातीलच श्रीव्यासकथित एक श्लोक विशेष महत्त्वाचा आहे. तो असा –

''श्रुतिधर्म इति हयेके नेत्याहुरपरे जना:।

नं च नत्प्रत्यसूयामो न हि सर्व विधीयते।।'' (महाभारत, शांतिपर्व, १०९.१३)

भावार्थ असा की, ''कोणी म्हणतात की श्रुतीमध्ये (वेदवाङ्मयामध्ये) सर्व धर्म सामावलेला आहे. तर दुसरे कोणी म्हणतात की – तसे काही नाही. याबाबतीत आम्हाला कोणताही अभिनिवेश नाही. कारण सगळेच काही

पूर्वीच्या श्रुतींमध्ये सांगितलेले असेल किंवा सामावलेले असेल हे शक्य नाही.'' श्रीव्यासकथेत धर्म-विचार बुद्धिवादी आहे तो असा!

**धर्माची दोन अंगे :**

याचप्रमाणे आपल्या उपनिषदवाङ्‌मयातही, उदाहरणार्थ ईशावास्य उपनिषदात, स्पष्टपणे सांगितले आहे की- धर्माची दोन अंगे आहेत- कर्मनिष्ठा आणि ज्ञाननिष्ठा या दोहोंमध्ये सदैव संतुलनाची गरज आहे. ईशावास्य स्पष्टपणे म्हणते-(१.११) जे नुसते कर्मच करीत राहतात ते गाढ अंधकारात शिरतात. तसेच जे कोणी केवळ ज्ञान-प्राप्तीलाच महत्त्व देतात, तेही त्यातून अधिक काळोख्या अंधकारात प्रवेश करतात. म्हणून आपणाला विद्याही कळली पाहिजे आणि अविद्याही कळली पाहिजे. या दोन्ही गोष्टी जो जाणतो तोच अविद्येने (म्हणजे कर्माने) मृत्यूतून तरून जातो आणि विद्येने (म्हणजे ज्ञानवैराग्याने) अमृत (म्हणजे आत्मसुखही) मिळवतो. अशी ही विचित्र वाटणारी पण विशेष गोष्ट आहे. याचा नेमका अर्थ असा की-'कर्म' ही प्रवृत्ती आहे आणि 'ज्ञान' ही निवृत्ती आहे आणि असा 'प्रवृत्ति-निवृत्ति-संयोग' साधणे तो आचरता येणे, हेच सद्‌धर्माचे खरे रहस्य आहे.

**सामानस्य सूक्त :**

यासाठीच धर्म किंवा सद्‌धर्म आपणास सांगतो की, समाजातील परस्परांनी, परस्परांना साहाय्य करून सर्वांनीच उच्च सुख मिळवावे. या संदर्भात अथर्ववेदातील 'सामनस्य' नावाचे एक सूक्त महत्त्वाचे आहे. (३.३०) त्यात म्हटले आहे - ''...समंच्य: सव्रता भूत्वा वाचं वदत भद्रया।'' भावार्थ असा- 'तुम्ही सगळे एकमेकांना अनुकूल आणि एकच व्रत धारण करणारे व्हा. तसेच सर्वांनी सर्वांशी कल्याणकारक वाणीने बोला.' असे हे सहकाराचे, सामंजस्याचे आणि सहजीवनाचे सूक्त आहे. याचप्रमाणे आपले हित आणि दुसऱ्याचे हित, यादृष्टीने याच सिद्धान्तावरून ठरविण्यात आलेला एक व्यावहारिक नियमही महाभारतात दिला आहे. तोही महत्त्वाचा आहे. तो असा -

'' न तत्परस्य संदध्यात् प्रतिकूलं यदात्मन:।
एष संक्षेपतो धर्म: कामादत्य: प्रवर्तते।।''

(महाभारत, अनुशासन पर्व,११३-८)

भावार्थ असा-आपणाला स्वत:ला जे वर्तन प्रतिकूल म्हणजे दु:खदायक वाटते तर तसे ते वर्तन आपणही दुसऱ्याशी करू नये. हेच तर 'धर्माचे' सार आहे आणि याच्या उलट वर्तन करणे हा 'अधर्म' आहे. ते लोभमूलक पापाचरणच आहे. साहजिकच यालाच आत्मौपम्य बुद्धी किंवा आत्मौपम्य वर्तन असे म्हटले गेले आहे.

यापुढे जाऊन आपण जेव्हा 'धर्म-विचारा'संबंधी अधिक उत्सुक होतो, तेव्हा आपणाला श्री. दफ्तरी यांच्या 'धर्मरहस्य' हा महत्त्वाचा ग्रंथ सुयोग्य मार्गदर्शन करतो. या ग्रंथात श्री. दफ्तरी यांनी धर्माची म्हणजे सद्‌धर्माची नऊ लक्षणे सांगितली आहेत व ती सर्वांनी लक्षात घेण्याची गरज आहे.-

''रतिरात्मसुखे नित्ये तथा बाह्यसुखेऽस्पृहा।
सर्वभूतेषूपकारवृत्तिरन्योन्य भावना।।
हिंसात्पत्वं दीर्घदृष्टि: सुखज्ञानं सदुद्यम:।
सिदध्यसिद्‌ध्यो: समत्वं च धर्मस्यांगानि वै नवं।।''

अर्थ असा– आत्मसुखाची नित्य आवड, बाह्यसुखाद्दल वैराग्य सर्व भूतमात्रांच्या ठायी परोपकाराची वृत्ती, परस्परांमधील सहकार्य, आपल्या आचरणात, हिंसा शक्य तितकी कमी करणे, भविष्याकडे दृष्टी सुखस्वरूपाने नेमके ज्ञान, सप्रवृत्त उद्योग आणि यश आणि अपयश यांच्या बाबतीत समतोल राखणे ही धर्माची नऊ अंगे आहेत.

**धर्मचर्चेचे सार :**

असा हा सद्धर्म पूर्णपणे लक्षात घेत पुन: महाभारताकडे वळत श्रीव्यासांच्या 'महाभारत' ग्रंथातील सर्व धर्मचर्चेचे सार सांगावयाचे तर, ते असे आहे– श्रीव्यासांच्या मते 'धर्म' हे साध्य नसून साधन आहे. समाजाची उन्नती हे धर्माचे साध्य आहे. ज्याच्या योगाने सर्व जनलोकांचा उत्कर्ष होईल त्यालाच 'धर्म' म्हणावे!

याचा अर्थ असा की– ज्यायोगे समाजाचा किंवा राष्ट्राचा उत्कर्ष होईल, असे नीतिनियम म्हणजेच धर्म होय.

विशेष गोष्ट अशी की, महाभारतात वर्णिलेला धर्म हा विवेचक बुद्धिवादावर आधारलेला नैतिक धर्म आहे. सत्याचरण आणि आत्मौपम्य दृष्टी हे या श्रीव्यासकथित धर्माचे मूलाधार आहेत. याचेच वर्णन बृहदारण्यक उपनिषदात तत्त्वत्रयीतून केले आहे. ती तत्त्वत्रयी अशी 'दाम्यत, दत्त, दयध्वम्।' यांचा अर्थ असा 'तुम्ही इंद्रियांचे दमन करा, दान करा आणि दया करा' – असा जो नैतिक आग्रह आहे तोच सद्धर्म विचाराचा मथितार्थ आहे.

पुढे असेही सांगता येईल की, या सद्धर्माचे उगमस्थान, मानवाचे अंत:करण आहे. मनुष्यमात्राच्या जीवनाच्या दृष्टीने कल्याणकारक, हितकारक, इष्ट आणि मंगल असे असे जे जे असेल, ते ते आणि त्या त्या गोष्टी सिद्ध करून देणारी अनेकानेक साधने या गोष्टीच अंतिमत: 'श्रेयस्कर' या सदरात येतात. अशा सद्धर्माला साध्य आणि साधन यांची एकरूपता, अनुरूपता अपेक्षित असते. म्हणून असा हा 'धर्म'विचार, साध्याइतकेच साधनांचेही मूल्य मानतो. अशा या श्रेयोरूप उद्दिष्टालाच 'परमार्थ' असे म्हणतात. आपल्या प्राचीन तत्त्वचिंतन परंपरेत दहा सद्गुणांचा किंवा गीतोक्त 'दैवी संपद्'चा 'धर्म' सांगितलेला आहे. ते दहा गुण असे– धैर्य, क्षमा, मन:संयम, अचौर्य, पावित्र्य, इंद्रियनिग्रह, विवेकबुद्धी, ज्ञानलालसा, सत्याचरण आणि अक्रोध – असा तो दशविध लक्षणयुक्त धर्म सांगितला गेला आहे तो अत्यंत महत्त्वाचा आहे. हा सद्धर्म सर्व मानवांसाठी सांगितलेला धर्म आहे. या धर्मात कोणालाही निषेध नाही. कोणालाही मज्जाव नाही.

आपण व्यवहारातही नेहमी म्हणतो की– माणसाने माणसाशी माणसासारखे वागावे. या म्हणण्याचा अर्थही उपरिनिर्दिष्ट दशविध लक्षणयुक्त धर्म सर्वांनी अंगी बाणविण्याचा प्रयत्न करणे हाच आहे. अशा या श्रेष्ठ आणि उदात्त भावनेला, नैतिक भावना किंवा आध्यात्मिक भावना असे म्हणतात. अशा या श्रेष्ठ आणि उदात्त प्रवृत्तींचा आपल्या जीवनात विकास करणे हाच खरा धर्म होय. कारण 'धर्माचा' श्रेष्ठतर असा उद्देश तरी कोणता? तर मुनष्यमात्राची नैतिक आणि आध्यात्मिक उन्नती करणे होय. यासाठी नीतिमत्ता हेच खऱ्या धर्माचे महत्त्वाचे अंग असून, 'अर्थ आणि काम' या दोन्ही प्रवृत्तींचे नियमन करणे, हे तिचे स्वरूप आहे.

असा हा धर्म, सद्धर्म हा मानवमात्राला शरण्य आहे. तो अभ्युदय आणि नि:श्रेयस साधून देणारा आहे. अशा या धर्माहून श्रेष्ठ असा मानवाचा कोणीही मित्र नाही. सर्व नातेवाईक, इष्ट–मित्र एक दिवस माणसाला सोडून जातात पण 'धर्म' हा मात्र जीवनभर आणि जीवनाच्या अंतानंतरही त्याचा खरा सोबती राहतो. यासाठीच 'धर्मो रक्षति रक्षित:।' असे वचन आहे. आपण धर्माचे रक्षण करावे, म्हणजे धर्मही आपले रक्षण करायला चुकत नाही असे श्रीव्यास आपणास सांगतात. यासाठी ते 'महाभारत' या ग्रंथात एके ठिकाणी अगदी तळमळीने आणि कळकळीने साऱ्या

मानवमात्रांना प्रश्न करतात की, ''अहो, अगदी बाहू उभारून मी तुम्हाला पुन:पुन्हा हेच सांगतो आहे, पण तुम्ही माझे ऐकत नाही, याला काय  करावे? अहो, केवळ धर्माचरणानेच सुयोग्यपणे अर्थप्राप्ती आणि कामप्राप्ती दोन्ही साध्य होतात, मग असे असताना तुम्ही त्या 'धर्मा'चीच कास का धरत नाही'' श्रीव्यासांचे शब्द असे–

''उर्ध्वबाहुविरौम्येष न च कश्चिच्छृणोति मे।
धमदिर्थश्च कामश्च स्त धर्म: किं न सेव्यते।।''

**धर्मपरायण जीवनाचे प्रतिनिधी 'संत' :**

असा हा खरा धर्म, सद्धर्म सांप्रदायिकतेच्या पलीकडचा असतो. पूर्णपणे अतीत असतो. तो तर मानवमात्राच्या इहपर कल्याणाची चिंता वाहतो. तो सर्वार्थाने मानवधर्म असतो. तो मानवतेचा धर्म असतो. तो आपणास मानव–चारित्र्य–योग शिकवतो. तो विशिष्ट उपासनेवर किंवा कर्मकांडावर अवलंबून नसतो. तो सर्वस्वी नैतिक गुणांवर, स्पृहणीय सद्गुणांवर दैवी गुणसंपदेवर आध्यात्मिक विचारशीलतेवर अवलंबून असतो. हेच सद्धर्माचे सांगणे आहे. अगदी मन:पर्वूक सांगणे आहे.

अशा या सद्धर्माचे धर्मपरायण जीवनाचे प्रतिनिधी म्हणजे आपले संतश्रेष्ठ. या सत्त्वप्रधान परंपरेचे पाईक म्हणजे आपले सद्गुरू. असे हे लोकशिक्षक संत आणि अवतारी सत्पुरुष हेच आपल्या धर्मपरंपरेचे रक्षक आहेत. संवर्धक आहेत. याबाबतीत आपला महाराष्ट्र परम भाग्यशाली आहे. अशा या संत–सत्पुरुषांचा कार्य–परिचय प्रस्तुत शिल्पकार कोशात करून देण्यात आला आहे. त्यांच्या त्या एकूण कार्याचे अवलोकन करण्यापूर्वी संतत्व म्हणजे नेमके काय? हेही लक्षात घेऊ.

**मानवता धर्मरक्षक 'संत' :**

'संत' या संज्ञेचा नेमका अर्थ काय? तर 'संत' या शब्दाच्या व्युत्पत्तीपासून आपणास नेमका अर्थबोध होऊ शकतो. म्हणजे असे की, मुळात अस् = होणे, असणे या धातूपासून 'सन्' हे रूप तयार झाले आहे आणि त्याचे बहुवचन 'संत' असे आहे. त्याच्या व्युत्पत्यर्थ होणारा, असणारा म्हणजे 'आस्तिक' असा आहे आणि आपणाला हेही जाणवते की, सर्व संत हे 'आस्तिकच' असतात. ईशवादी असतात. ईश्वरवादी असतात. त्यांचा त्या परमात्म्यावर, त्या ईश्वरी तत्त्वावर, त्या जगन्नियंत्यावर पूर्ण विश्वास असतो व दृढ विश्वास असतो.

उदाहरण सांगायचे तर, सूर्य हा ढगाआड झाला तर आपल्या लौकिक दृष्टीला दिसत नाही. पण ढगाचे 'दिसणे'सुद्धा त्या सूर्यावरच अवलंबून असते. आपल्याला ढग दिसतात ते ढगामागे असणाऱ्या सूर्यामुळे! परमात्म्याचेही तसेच आहे. तोही सूर्याप्रमाणे नजरेसमोर नसतो. तो दिसत नाही पण तो असतो. खचित असतो. किंबहुना, त्याच्यामुळेच आपण असतो, तो आहे म्हणून सर्व आहे–असा संतांचा दृढ विश्वास असतो. पूर्ण विश्वास असतो. सारे संत–सत्पुरुष या अर्थाने पूर्ण 'आस्तिक'च असतात.

यापुढचा विचार असा की, 'संत' या संज्ञेचा अर्थ काय? 'संत' म्हणजे शाश्वत, अविकारी, अव्यय, असा अर्थ आहे. 'संत' ही वस्तू आहे. परम वस्तू आहे. ती एक रस आहे. ती सदैव अविकृत असते व रहाते. असे हे 'संत' म्हणजे ब्रह्मतत्त्व. परमात्मतत्त्व. ते सत् 'चित्' असते. 'आनंद'–स्वरूप असते. म्हणून आपण 'सत्–चित्–आनंद' अर्थात 'सच्चिदानंद' असा एकवट उल्लेख करतो. या संदर्भात उपनिषदे म्हणतात – 'एकं सत्' पण 'विप्रा: बहुधा वदन्ति।' मात्र त्याने काही बिघडत नाही. 'सत्' हे एकच आहे. एकमेव आहे. 'ॐ तत् सत्!' अशी ही ग्वाही

भारतीय तत्त्वचिंतन-परंपरेने दिलेली आहे. 'सत् श्री अकाल'- असाही सश्रद्ध उद्घोष आहे. थोडक्यात, अशा या सर्वव्यापी 'सत्' वर ज्याचा पूर्ण विश्वास असतो तो 'संत' होय. असा संत हा सद्धर्माचा पाईक असतो. सर्व रूढ धर्म-पंथ-संप्रदायांमधील 'संत' हे एकच असतात. एकात्म असतात. म्हणूनच आपणाला पक्की खात्री असते की, ''साधू दिसती वेगळाले, परि ते स्वरूपीं मिळाले, अवघे मिळोनि जाहले, एकचि वस्तू।''

अशा या संतांचा किती गौरव करावा? संतश्रेष्ठ एकनाथ यांच्या भागवत भाष्यात 'एकनाथी भागवता'त म्हणाले आहेत, संत म्हणजेच देव. देव म्हणजेच संत. इथे नाथांनी प्रत्यक्ष भगवंतमुखाने सांगितले आहे की,

''प्रतिमा माझ्या अचेतन व्यक्ती।
संत सचेतन माझ्याच मूर्ती।
दृढभावें केलिया त्यांची भक्ती।
ते मज निश्चिती पावती जाण।।''

असे संत हेच मानवताधर्माचे रक्षक असतात. पोषक असतात. अशा या संतांचे अवतारकार्य सांगताना, संत-कवयित्री मुक्ताबाई त्यांच्या 'ताटीच्या अभंगावली'त म्हणतात-

''संत जेणे व्हावे। जग बोलणे सोसावे।।
थोरपण जेथ वसे। तेथ भूतदया असे।।
शब्दशस्त्रे जाले क्लेश। संती मानावा उपदेश।।
संत तोचि जाणा जगीं। दया, क्षमा ज्याचे अंगी।।
विश्व पट, ब्रह्म दोरा। ताटी उघडा ज्ञानेश्वरा।।
एकापासोनि अनेक झाले। त्यासी पाहिजे सांभाळिले।।
सुख-सागर आपण व्हावे। जग बोधे निववावे।।
तुम्ही तरोनि विश्व तारा। ताटी उघडा ज्ञानेश्वरा।।''

संत कवयित्री मुक्ताबाईंनी संतविषयक आपले हे हृद्गत ज्या ज्ञानेश्वरांना सांगितले, त्या ज्ञानदेवांनी आपल्या भावार्थदीपिकेत संत-गौरव अनेक ठिकाणी केला आहे. उदाहरणार्थ, ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायात साक्षात भगवंतमुखानेच संतगौरव करताना, श्रीज्ञानेश्वर म्हणतात-

''तेही प्राणापरौते। आवडती हे निरूते।
जे संत (भक्त) चरित्रांते। प्रशंसिती।। (१२.२२७)

**संतचरित्रकोशाचे प्रयोजन :**

अशा या संतचरित्रांचे आपण का अवलोकन केले पाहिजे? ही संतचरित्रे आपणांस काय शिकवितात? या संत-सत्पुरुषांच्या प्रस्तुत चरित्रकोशाचे प्रयोजन काय?- याचे स्पष्ट उत्तर असे आहे की, संत-चरित्रे म्हणजे मानवमात्राच्या मनावर, सु-संस्कार करण्याचे फार मोठे साधन आहे. मग अशा या संतचरित्रांतून आपण नेमके काय लक्षात घ्यावे? तर हे संत स्वत:च्या जीवनात ज्या उच्चतम अवस्थेला पोचले, त्यासाठी त्यांनी किती कष्ट उपसले, केवढा त्याग केला, आपले स्वभावगत दोषही कसे जिंकले? तसेच गीतोक्त दैवी गुणसंपदा - मग तो अक्रोध असेल, अनासक्ती असेल, निस्पृहता असेल, भूतदया असेल, मानवता असेल, परमार्थ-निष्ठा असेल, सत्याचरण असेल- असे हे

अत्यंत महत्त्वाचे सात गुण, सप्त सद्‌गुण, त्यांनी कसे आत्मसात केले? आपल्या अंगी प्रयत्नपूर्वक कसे बाणविले- एवढेच नव्हे तर, त्यासाठी आपल्या स्वत:च्या मनाशीही कसा संघर्ष केला? साऱ्या जगाने केलेले आघात, कसे धैर्याने सहन केले- आणि अखेर त्यात विजयी झाले- हे सारे सारे, आपण समजून घेणे फार अगत्याचे आहे.

यादृष्टीनेही सारे संत जो विचार मांडतात, तो 'संत-विचार' आपण समजून घेणे, हेही मानवतेच्या रक्षणासाठीही अत्यावश्यक आहे. नेमके काय घडते? तर असे सांगितले जाते की, मीमांसक, तत्त्ववेत्ते आणि विज्ञानवेत्तेही- मानवी जीवनाचा अर्थ लावण्याचा मन:पूर्वक प्रयत्न करतात, त्यासाठी ते ज्ञान-विज्ञानाचा आधार घेतात, पण अनेकदा, कधीही न संपणारे 'शून्य-शोधन'च करीत राहतात. उलट संत हे आदर्श मानवी जीवनाची उगमस्थाने गृहीत धरतात - (उदाहरणार्थ ईश्‍वर, नीतिधर्म, सदाचार इ.) आणि मग एकूण मानवी जीवनाला, मानवी व्यवहाराला, संपूर्ण न्यायाचे आणि असीम कारुण्याचे वरदान देऊ पाहतात. ते मानवी जीवनातील दु:खे कमी करण्याचा प्रयत्न करतात. किमानपक्षी, ती दु:खे सहनीय करण्याचा प्रयत्न करतात. कारण, 'संत-विचार' हा मुळातच सामाजिक न्यायाचा आणि अपार कारुण्याचा आहे.

या संदर्भात, कविवर्य बा.भ. बोरकर यांची सुप्रसिद्ध कविता, 'जीवन त्यांना कळले हो!' आणि त्यातील काही चरण तरी, मुद्दाम लक्षात घेण्याची गरज आहे. संत कसे असतात? तर ते निरहंकारी असतात. सेवाशील असतात. धर्मात्मे असतात, पुण्यात्मे असतात आणि संत हे आत्मज्ञानी असतात. याच गोष्टी, अगदी अचूक शब्दकळेत सांगताना कविश्रेष्ठ बोरकर म्हणतात -

''जीवन त्यांना कळले हो!<br>
...मीपण ज्यांचे पक्व फळापरी सहजपणाने गळले हो।<br>
...चराचरांचे होऊन जीवन, स्नेहासम पाजळले हो।<br>
...आपत्काली अन् दीनांवर घन होऊनि जे वळले हो।<br>
...आत्मदळाने नक्षत्रांचे वैभव त्यांनी तुळिले हो।<br>
...सायासाविण ब्रह्म सनातन, घरीच ज्यां आढळले हो।<br>
- उरीच ज्यां आढळले हो।<br>
जीवन त्यांना कळले हो।''

म्हणूनच आपण, नेहमीच्या व्यवहारातही 'संत' ही संज्ञा कोणाच्या बाबतीत उपयोजितो? तर जो बुद्धिमान, परोपकारी, सदाचारी, ईश्‍वरभक्त आणि पवित्रात्मा असतो- त्याच्याबाबतीत! हे सामर्थ्य त्यांना कोठून प्राप्त होते? तर 'संत' हे, 'सत्' ती उपासना करतात म्हणून! 'सत्'चे दर्शन व्हावे, साक्षात्कार घडावा, यासाठी प्रयत्न करतात म्हणून!- इथे पुन:स्मरण करूया की, 'सत्' म्हणजे काय? तर जे सदैव आहेच, ते शाश्‍वत ब्रह्म. आणि त्या 'सत्' चे अस्तित्व, जो पूर्णपणे जाणतो आणि मनोमन मानतो, तोच संत होय. यातूनच या संत-पुरुषांना, या मानवी जीवनातील शाश्‍वत ब्रह्मही ओळखता येते आणि अशाश्‍वत गोष्टीही ओळखता येतात.

**विवेकनिष्ठ संत-सत्पुरुष :**

असे हे संत-सत्पुरुष विवेकनिष्ठ असतात. विवेकशील असतात. नीरक्षीरविवेक, उपजतच अंगी असणारे, ते जणू

'हंस' असतात. नेमक्या शब्दांमध्ये सांगवयाचे तर, 'देहबुद्धी' आणि 'आत्मबुद्धी' यांमधील भेदाची नेमकी ओळख ज्याला पटते, तोच संत होय. एवढेच नव्हे तर, यापुढे जाऊन, संत हा आपल्या आत्मोद्धाराला तो परोपकारी लोकोद्धाराची जोड देतो. त्याशिवाय त्याला राहवतच नाही किंवा त्याशिवाय आपला स्वत:चा उद्धार, आत्मोद्धार, नेमक्या शब्दांत आत्मविकास संपूर्ण होत नाही– हेही त्याला नेमके कळते. म्हणून तो पाण्यातील नौकेप्रमाणे सर्वांना तारण्याचा प्रयत्न करतो. संतश्रेष्ठ तुकाराम म्हणतात–

''तुका म्हणे नाव। जनांसाठी उदकी ठाव।
तैसे संत जगी। क्रिया करूनि दाविती अंगी।।''

हेच सर्वथा महत्त्वाचे आहे आणि त्यातच मानवतेचे रक्षणही आहे. याच संदर्भात आद्य श्रीशंकराचार्यांनी म्हटले आहे की, लोकसंग्रह म्हणजे काय? तर आद्य श्री शंकराचार्य आपल्या गीता–भाष्यात (३.२०) या संदर्भात उल्लेख करतात की,

''लोकस्य उन्मार्गप्रवृत्तिनिवारणं लोकसंग्रह:।''

ही व्याख्या फार महत्त्वाची आहे. हीच गोष्ट लक्षात घेऊन संत आपले जीवनकार्यच मानतात की,

''लोकस्य सन्मार्गप्रवृत्तिप्रवर्धनं लोकसंग्रह:।''

यासाठी संतश्रेष्ठ एकनाथांची साक्ष देता येईल. ते आपल्या भागवत भाष्यात अध्याय एकोणतीसमध्ये श्रीभगवंतमुखाने सांगतात–

''अभेदभक्ती वैराग्य–ज्ञान। स्वयें आचरोनि आपण।
शेखीं लावावें इतरजन। लोकसंग्रह जाण या नांव।।''

(ओवी क्र. ८१७)

''पावोनिया ब्रह्मज्ञान। स्वयें उद्धरला आपण।
न करीचि दीनोद्धारण। हे भंडपण ज्ञात्याचे।।''

(ओवी क्र. ८२८)

भंडपणा म्हणजे आपमतलबीपणा, स्वार्थ! तो त्याज्यच आहे.

श्रीएकनाथ पुढे सांगतात–

''स्वयें तरोनि जनां तारी। हे ज्ञानाची अगाध थोरी।
ती म्यां दिधली तव करीं। जन उद्धरी उद्धवा।

(ओवी क्र. ८३२)

एवं नित्य निरभिमान। भक्तियुक्त वैराग्य–ज्ञान।
स्वयें आचरोनि आपण। शिष्यसज्जन उपदोशिजे।।

(ओवी क्र. ८४५)

असे लोकसंग्रह–समर्थ, संत–सत्पुरुष, केवढी मानवतेची सेवा करतात! या संत–सत्पुरुषांचा गौरव नेमक्या शब्दांमध्ये करावयाचा तर, असे म्हणता येईल की,– हे सर्वजण, खरेतर, ईश्वरीसत्तेची लौकिक पातळीवरची स्वरूपेच असतात. हे संत–सत्पुरुष आपणाला जो परमार्थ शिकवितात, तो नेमका काय असतो? तर ते 'वेषांतर' नसते, तर 'वृत्त्यंतर' असते. आपल्या वृत्ती या बदलल्याशिवाय त्या सत्प्रवृत्ती झाल्याशिवाय मुक्ती मिळणे शक्यच

नाही. तुमचे ‘व्यक्तित्व’च बदलल्याशिवाय तुम्हाला ‘सत्यत्व’ कसे मिळणार? – आपल्या सुदैवाने आपल्या भाग्याने हेच परोपकारी कार्य संतचरित्रे करीत असतात.

**संतांचे नेमके कार्य :**

या संदर्भात संतकार्य कसे असते? ते स्पष्टपणे विशद करताना डॉ. ज. वा. जोशी सांगतात, (संतसाहित्य : मूलस्रोत आणि समीक्षा, गीताधर्म मंडळ प्रकाशन, २००५), खरेच आपण सर्वांनी विचार करण्याची गरज आहे, की संतांनी नेमके कोणते मोठे कार्य केले? तर उत्तर आहे की, आपल्या संतांनी ‘साधुत्व, साधना, अनुभूती आणि प्रबोधन’ या चतु:सूत्रीच्याद्वारे भारतीय ब्रह्मविद्येच्या परममंगल भागीरथीचे स्वरूप प्रकट केले. या संतश्रेष्ठींच्या जीवनकार्यातून आणि साहित्यसृष्टीतून भारतीय अध्यात्मक्षेत्रात जणू प्रबोधन–युग सुरू झाले. सुधारणा–युग निर्माण झाले. (Age of Renaissance and Reformation) हे आपला समाज, आपली संस्कृती आणि आपले साहित्य या क्षेत्रांमधील ‘प्रबोधन–पर्व’ आहे. हे ‘उन्मेष–पर्व’ आहे. ते आपण नीट समजून घेतले पाहिजे. या संतांच्या साहित्यविश्वातून प्रकट झालेल्या दोन गोष्टी– त्या म्हणजे एका अर्थाने ‘जीवनमुक्तीचे व्याकरण’ आहे. ते आपण सर्वांनीच नेमकेपणाने समजून घेतले पाहिजे.

या संत–सत्पुरुषांनी आपणांस सांगितले की, विवेक आणि वैराग्य या दोन गोष्टी खऱ्या परमार्थांचा पाया आहे. आत्मानुभूती, भगवत्भक्तीचे भावजीवन हा परमार्थाचा गाभा आहे. तर ‘सर्वांभूतीं भगवत्भाव, वसुधैव कुटुंबकम्, सकळ कर्मांमध्ये समाधि’ या त्रयीने संपन्न झालेले मानवी जीवन, हीच पारमार्थिक जीवनाची फलश्रुती आहे. संत–जीवन आणि संत–साहित्य हे ‘शब्देविण संवादिजे’ अशा स्वात्मानुभूतीशी संवाद साधावयास शिकविते. ‘नायं आत्मा प्रवचनेन लभ्य:’ ‘नैषा तर्केण मतिरापनीया’ ‘यत्र वाचो निवर्तन्ते अत्राप्य मनसासह’ अशाच पद्धतीचे आहेत. याबाबतीत उपनिषद–श्रुतींची भूमिका यथार्थ आहे.

**संतसाहित्यातील सामाजिक कारुणा :**

संतांचे व्यक्तिमत्त्व हेच मुळात, कवित्व–रसिकत्व–परतत्त्वस्पर्श या त्रयींचे एकात्म दर्शन घडविणारे असते. ते स्वभावत:च बहुमिती असते. संतांच्या साहित्यातून ‘रसो वै स:’ अशा ब्रह्मरसानुभूतीचा उत्कट आणि उत्स्फूर्त आविष्कार अत्यंत सहजतेने प्रकट होतो. त्या साहित्य–विश्वात युक्तिवादाने जाणलेले सत्य नसते, तर परमात्मसत्तेची स्वानुभूती असते. खरोखरच संत–साहित्यातून व्यक्त होणारी सामाजिक करुणा म्हणजे श्रीमद्‌भगवद्‌गीतेमधील त्या सुप्रसिद्ध ‘लोकसंग्रहात्मक’ भूमिकेचे उदात्त दर्शन असते. ही विशेष गोष्ट आहे की, मुळात संत–सत्पुरुष हे स्वत:च ‘अनंताचे आनंदयात्री’ असतात. त्यांचे जीवनकार्य म्हणजे त्या आनंदयात्रेची कथा असते, तर संतसाहित्य म्हणजे आत्मस्फुरणातून उमललेली, त्या आनंदयात्रेची गाथा असते.

याचसंदर्भात डॉ. ज.वा. जोशी संतकर्तृत्वाचे आणि संतसाहित्याचे असाधारण सुयश नेमकेपणाने सांगताना म्हणतात, खरोखरच नेमक्या शब्दकळेत सांगावयाचे तर संत–सत्पुरुषाचे जीवन म्हणजे भगवद्‌भक्तीने सुगंधित झालेले, ब्रह्मरसानुभूतीचा स्वाद देणारे, देवदुर्लभभाग्याने उमललेले जणू ‘ब्रह्मकमळ’ असते. या संत–सत्पुरुषांची पारमार्थिक साधना ही, तत्कालीन आणि त्यानंतरच्या कालखंडातील सर्व पारमार्थिकांचे परमसुंदर ‘पाथेय’ असते. या संत–सत्पुरुषांची अनुभूती ही सद्‌धर्म रहस्य प्रकट करते. एवढेच नव्हे तर, आपल्या या मानवी जीवनाचे

परमसाध्य कोणते? हे मानवी जीवन सफलसुंदर करण्याची साधना कोणती? या सर्वांविषयी संतजीवन, संतकार्य आणि संतविचार आपणास अगदी निश्चितार्थाने मार्गदर्शन करतात.

नेमके काय घडते? तर 'असत्‌कडून सत्‌कडे', 'तमस्‌कडून ज्योतिर्मय जीवनाकडे', 'मरणाकडून अमरत्वाकडे' होणारे हे संक्रमण असते. ते 'पशुभाव, देहभाव, प्रपंचभाव आणि जीवनभाव' यांच्या सीमा ओलांडणारे असते. ते 'वयं अमृतस्य पुत्रा:' अशी ग्वाही देते. 'ब्रह्मविद् ब्रह्मैव भवति' असे अभिवचन इथे गवसते. एवढा सारा अमृतकलश संतविचारात असतो. संतसाहित्यात असतो. तो अमृतकुंभ आपण नीट समजून घेतला पाहिजे. ही काळाची गरज आहे. आता याकडे दुर्लक्ष केले तर, काळ क्षमा करणार नाही. अशी टोकाची स्थिती आता येऊ घातली आहे. असो.

**संतसाहित्याची नेमकी व्याख्या :**

यापुढील विचार असा की, संतजीवन, संतकार्य, संतविचार या त्रयींतून उमलणारे 'संत-सारस्वत' कसे असते? त्याची गुणवैशिष्ट्ये कोणती असतात? या संतसाहित्याची नेमकी व्याख्या कशी करता येईल? या संदर्भात डॉ. व.दि. कुलकर्णी यांचे विचारधन आपणास मोठे मार्गदर्शन करणारे आहे. 'संत-साहित्याची संकल्पना' विशद करताना त्याच नामाभिधानाच्या आपल्या पुस्तकात डॉ. व.दि. कुलकर्णी सांगतात- (महाराष्ट्र साहित्य परिषद, हैदराबाद, प्रकाशन १९८९) आपण जरा विचार करूया की, संतसाहित्याचे 'काव्यलक्षण' कोणते? तर ते 'परतत्त्वस्पृष्टं रसात्मकं काव्यम्' असे आहे. या 'काव्यनिर्मितीची' विविध रूपे कशी असतात? तर ती 'आत्मानुभूतीची क्रीडा' असते. 'क्रीडारूप आत्माविष्कार' नसतो. म्हणजे उदाहरणाने सांगावयाचे तर, श्रीज्ञानेश्वरांनी 'आत्मानुभूती' घेतली आणि त्यातून शब्द-क्रीडा होऊन, काव्यनिर्मिती झाली. मुळात संत-सारस्वताचे 'काव्यप्रयोजन'च 'अवघाचि संसार सुखाचा करीन' हे असते. श्रीज्ञानदेवांच्या 'पसायदाना'तून हे अगदी सुस्पष्ट होऊन जाते. हे पसायदान संत-साहित्याचा केंद्रबिंदूही दाखविते आणि परीघही स्पष्ट करते. या संतसारस्वतातील भक्ती ही भावना शांतरसाला पोषक अशी भावना आहे. खरे म्हणजे भाव-रसायन आहे. इथे शेवटी 'प्रशान्तमनोविश्रांती' अपेक्षित आहे. मग या संदर्भात रसिक वाचकांनी काय करावे? तर, तत्त्वज्ञान, त्याची अनुभूती आणि साहित्यशास्त्र या तिन्ही गोष्टींचे रसायन आपल्या मनात साधून कुणाच्याही मदतीशिवाय, मूळ ग्रंथाला भिडावे- मग ब्रह्मरसास्वादसहोदर कशाला, साक्षात ब्रह्मरसास्वादच भेटेल!

**विश्वधर्माचा गगनदीप 'पसायदान' :**

याच पद्धतीने आणि याच भूमिकेतून ('संत-सारस्वत: आकलन आणि आस्वाद', 'संत सारस्वताचे हृदयगान-पसायदान' या आपल्या दोन पुस्तकांमधून) डॉ. व. दि. कुलकर्णी सांगतात - श्रीज्ञानदेवांच्या पसायदानात समग्र ज्ञानेश्वरीच 'स्फटिक-रूप'(crystalised) होऊन आली आहे. हे पसायदान म्हणजे अखिल संत-सारस्वताचे हृदयगान आहे. हृद्‌गत आहे. खरे म्हणजे तो विश्वधर्माचा गगनदीप आहे. 'पसायदान' मागण्याची ज्याची आत्मिक शक्ती असते, तोच संत होय. सत्पुरुष होय.

श्रीज्ञानदेवांचे 'पसायदान' आणखी एका दृष्टीने महत्त्वाचे आहे. त्यात ज्ञानदेवांनी विश्वोद्धारक स्वधर्म-विचार सांगितला आहे. श्रीज्ञानदेवांनी सांगितलेली ही स्वधर्माची कल्पना, कर्तव्यप्रधानतेची आहे. त्यागप्रवणतेची आहे.

ती शास्त्रपुनीत आहे. जी समयोचित कर्तव्यचरण सांगते. ती कालसुसंगत कर्माचरण सांगते. असा हा स्वधर्म-विचार, समजा विसरला गेला, तर समाज फुटेल आणि राष्ट्रही अवनत स्वरूपास जाईल. म्हणून हा ज्ञानेश्वरीकथित स्वधर्मविचार नीट समजून घेतला पाहिजे. आचरणातही आणला पाहिजे. हे केल्याने काय होईल? तर - आपल्या पायाखालची जमीन शाबूत राहील आणि आकाशाची भेट घेण्याचे बळही अंगी येईल.

**महाराष्ट्रातील धर्म-संप्रदाय :**

अशा तऱ्हेने या प्रस्तावनेत आतापर्यंत आपण 'सद्धर्म-विचार' आणि 'संत-सत्पुरुषविचार' यासंबंधी पूर्वसुरींचा मागोवा घेत, विवरण-विवेचन केले. हे विचारधन, संतसाहित्याच्या आणि संत-सत्पुरुषांच्या जीवनकार्याच्या संदर्भात, तिन्ही कालखंडांना समान आहे. आता पुढचा प्रश्न असा की,- मध्ययुगीन आणि अर्वाचीन कालखंडात, आपल्या महाराष्ट्रात कोणकोणते धर्म-संप्रदाय दिसतात? तर ते पुढीलप्रमाणे नोंदवता येतील - नाथसंप्रदाय, महानुभाव संप्रदाय, वारकरी संप्रदाय, श्रीदत्त संप्रदाय, समर्थ संप्रदाय तसेच जैन धर्म, बौद्ध धर्म, वीरशैव धर्म याचप्रमाणे आनंद संप्रदाय, नागेश संप्रदाय, सौर संप्रदाय, गणेश संप्रदाय, देवी संप्रदाय, लोकदैवतीय संप्रदाय, माध्व संप्रदाय, रामानुज संप्रदाय, हरिनारायण संप्रदाय, अवलीया संप्रदाय, सूफी संप्रदाय इ. संप्रदाय आणि त्यांना मानणारे संत-सत्पुरुष महाराष्ट्रामध्ये झालेले आहेत. यापैकी १८०१ ते २००१ या अर्वाचीन कालखंडात जे जे संत-सत्पुरुष कार्यरत राहिले, त्यांचा जीवन-कार्य-परिचय 'अर्वाचीन महाराष्ट्राचे शिल्पकार-धर्मसंप्रदाय कोश' यामध्ये करून देण्यात आला आहे.

इथे आपणांस स्पष्टपणे जाणवते की, उपरिनिर्दिष्ट सर्व धर्म-संप्रदाय हे भक्तिमार्गी संप्रदाय आहेत. भक्तिसंप्रदाय आहेच. त्यात द्वैती आहेत. अद्वैती आहेत. अद्वयी आहेत. चिद्विलासवादी आहे. अभेदभेदवादी आहेत. अनात्मवादीही आहेत. पण हे सारे सारे धर्मसंप्रदाय अंतिमत: अवतारित्वाचा किंवा ईश्वरीभक्तीचा उपदेश करणारे आहेत. अशा या सर्व संप्रदायामध्ये महाराष्ट्र भूमीत 'वारकरी' संप्रदाय हा बहुतांशी प्रधान - स्वरूपात दिसतो. त्याची तत्त्वदृष्टी ही सर्वसामान्य होण्यासारखी आहे किंवा असे म्हणता येईल की, वारकरी संप्रदायाची तत्त्वदृष्टी ही महाराष्ट्रातील अन्य सर्व संप्रदायांच्या तत्त्वविचारांशी, अविरोधी राहिलेली आहे. त्यामुळे आपण यापुढे वारकरी संप्रदायाची तत्त्वदृष्टी आणि तत्त्वसृष्टी यांचे सार रूपाने अवलोकन केले तर, महाराष्ट्रातील सर्व धर्म - संप्रदायांना, एका अर्थाने समान असणाऱ्या, तत्त्वविचारांचेच ईषत दर्शन घेतले असे होईल. यादृष्टीने वारकरी संप्रदायाचे विचार-विश्व समजून घेऊ.

**वारकरी संप्रदायाची तत्त्वदृष्टी :**

असे दिसते की, वारकरी संप्रदायाची विचारसरणी ही सर्वांसर्वांना, तत्त्वत्रयींची संदेश देणारी आहे. ती त्रिदली तत्त्वे म्हणजे 'समता, ममता आणि एकता'! या तत्त्वप्रणालीने अनन्यानिष्ठ भक्तियोगाचा उपदेश, आम जनतेला केलेला आहे. आणि तिला तात्त्विक दृष्टीने, मानसिकरित्या, उच्च पातळीवर नेण्याचा नम्र प्रयत्न केला आहे. या विचारप्रणालीने, श्रीमद्भगवद्गीतेने सांगितलेल्या उदात्त गुणांची 'दैवी' गुणसंपदेची जोपासना, सर्वांना शिकवली. तसेच सतत विशुद्ध लोकधर्म सांगितला. तिने सामाजिक जीवनाच्या परिशुद्धीचाही आग्रह धरला. निम्न स्तरांवरील देव- देवतांच्या तामसी उपासनेला प्रतिबंध केला. आणि उच्च, उदात्त, परमकारुणिक आणि सर्व - संग्राहक अशा विश्वव्यापक एकदेवत्वाची संकल्पना गौरविली. या वारकरी तत्त्वदृष्टीने कर्मठपणाचे बंड मोडले, पण मानवी

जीवनातील कर्मप्रवृत्तीचा नाश होऊ दिला नाही. तिने पढिकतेचा निषेध केला, पण डोळसपणाचा आग्रह सोडला नाही. तसेच विशुद्ध विवेक, बुद्धी आणि परोपकारी सामाजिक नीती – यांना वारकरी तत्त्वप्रणालीने सर्वोच्च स्थान दिले. त्यामुळे साहजिकच ही वारकरी तत्त्वदृष्टी, महाराष्ट्रातील सर्व धर्मसंप्रदायांना अविरोधी राहिली आहे.

अशी ही वारकरी तत्त्वदृष्टी ही 'अद्वय' भावाची आहे. पराभक्तीची आहे. ती साऱ्यांना 'आत्मोद्धार' शिकविते आणि 'लोकोद्धार'ही शिकविते. ही विचारप्रणाली – भक्ती आणि नीती यांची जोडी, कधी फुटू देत नाही. या तत्त्वदृष्टीचा पाया घालणाऱ्या श्रीज्ञानदेवांनी सर्वांना शिकविले की, स्वकर्तव्यकर्माच्या सुगंधित कुसुमांनी देवदेवेश्वराची पूजा करा. अशा तऱ्हेने वारकरी तत्त्वसृष्टीने सांगितलेली, भक्ती संकल्पना ही प्रवृत्तीनिष्ठ आहे. मात्र तिला 'सकामते' चे वावडे आहे. ती एकदेववादी आहे. विठ्ठलशरण आहे, पण तितकीच सर्वसमावेशक आहे. ही वारकरी विचारप्रणाली, वत्सल भक्तीचा सदैव पुरस्कार करते. ती देव – भक्तांचे नाते हे, माय–लेकरांचे मानते. हा विशुद्ध भाव, भक्तीही जोपासतो आणि सामाजिक शुचिताही राखतो. याचप्रमाणे वारकरी तत्त्वचिंतन – परंपरा ही तथाकथित धर्मकल्पनेची मिरासदारी संपविते आणि अध्यात्म प्रधान कर्मयोग शिकविते. शिवमंगल श्रद्धेचे व्रत सांगते.

अशा या वारकरी विचारप्रणालीचा केंद्रबिंदू आहे– भक्ती, अद्वैतभक्ती, अद्वयभक्ती, अभेदभक्ती म्हणजेच –

''।। विश्वीं विश्वंभर । बोले वेदान्ताचे सार।
जनीं जनार्दन । संत बोलती वचन।।''

वारकरी तत्त्वप्रणाली असेही मानते की, परम साध्य असणाऱ्या भगवद्भक्तीसाठी साधनही अनन्यभक्तीच आहे. यासाठी,

''हा निर्विकल्प देव। येतसे रूपां।
करावया कृपा। भक्तजनां।।''

अशी या तत्त्वप्रणालीची ग्वाही आहे. 'दोन्ही टिपरी एकच नाद। सगुणनिर्गुण नाही भेद रे।।' असे तिचे सांगणे आहे. त्याप्रमाणे वारकरी तत्त्वप्रणालीने, विशेष म्हणजे, हरिहरैक्य सांगितले आहे. इथे संत जगन्मित्र नागा म्हणतात – ''शिव मस्तकीं धरिला। भेदभक्तांचा काढिला।।'' किंवा एकनाथ सांगतात. ''एका जनार्दनी हरिहर। भवसिंधू उतरी पार।।'' अथवा श्रीतुकाराम म्हणतात– ''हरिहरां भेद नाही, करू नये वाद।।'' तसेच ''एका वेलांटीची आढी। मूर्ख नेणती बापडी।।'' याशिवाय वारकरी तत्त्वचिंतनात, एक चतु:सूत्री ही महत्त्वाची मानली गेली आहे. ती म्हणजे १) नामवेदास प्राधान्य २) लोकधर्माचे उन्नयन ३) समन्वय प्रधानता आणि ४) वात्सल्य भक्ती अशा या गोष्टींना इथे पुरेपूर महत्त्व दिले गेले आहे.

म्हणजे असेही म्हणता येते की, वारकरी तत्त्वदृष्टीने, वैदिक धर्माचेच, कालसुसंगत असे, उज्ज्वल स्वरूप प्रकट करण्याचा प्रयत्न केला. वारकरी संत–सत्पुरुषांनी, एका दृष्टीने, वैदिक धर्मातच सुधारणा घडविण्याचा प्रयत्न केला. मुक्तीच्या आणि भक्तीच्या मार्गांमध्ये, जन्मदत्त जातिव्यवस्थेला, कोणतीही किंमत नाही ही गोष्ट त्यांनी, स्पष्टपणे निदर्शनास आणली. एका विशिष्ट जातीतील माणसास किंवा चार आश्रमांपैकी, विशिष्ट आश्रम धारण करणाऱ्या व्यक्तीस मोक्ष हा सुलभतेने मिळू शकेल अशी कल्पना, दुर्दैवाने आपल्याकडे काही रूढ होती. त्या समजुतीविरुद्ध अगदी स्पष्टपणे आवाज उठविण्याचे काम वारकरी विचारप्रणालीने केले. त्यांनी स्पष्टपणे सांगितले की ''सकळांसी येथे आहे अधिकार। कलियुगीं उद्धार हरीच्या नामे।।'' किंवा ''उत्तमापासोंनि सर्वतोपरी। मुक्तीची सेल मागावी रे।।'' वारकरी विचारप्रणालीने भक्तिसामर्थ्य, मोक्षपद, गुरुपद हे सर्व सामाजिक स्तरांपर्यंत, मोठ्या कळकळीने

आणि कटाक्षपूर्वक पोचविले. यामधूनच महाराष्ट्रीय समाजजीवनात, प्रगमनशीलतेची बीजे पेरली गेली.

यापुढे जाऊन, वारकरी तत्त्वप्रणाली मानते की, आपल्या अद्वयी भावनेत, किंचितही बिघाड होऊ न देता, भक्तिसुखाचा आनंद सर्वासर्वांना उपभोगता येतो. म्हणजे ''आपणाचि होऊनि ब्रह्म। सारिजे कृत्याकृत्याचे काम। मग किजे का निस्सीम। सेवा जयाची।।'' ही ती भूमिका आहे. वारकरी तत्त्वदृष्टीची ही भूमिका, 'सहजसमाधी' च्या संकल्पनेतून, अचूकपणे प्रकट होते. वारकरी तत्त्वदृष्टी सांगते की समाधी म्हणजे काष्ठा समाधी नव्हे. ताटस्थ नव्हे. क्रियाशून्यता नव्हे. श्रीज्ञानेश्वर आपल्या अमृतानुभवात, आवर्जून सांगतात–

''व्यापाराचे गाडे। मोडितांही अपाडे।

अक्रियत्वाचे न मोडे। पाऊल की।।''

हीच ती खरी समाधी. अखंड समाधी. सकल समाधी. सहज समाधी. परम समाधी!

परमसमाधीची हीच भूमिका, महत्त्वाची भूमिका, आपल्या नाथभागवतात, श्री एकनाथांनी पुन:पुन्हा प्रकट केली आहे. जसे नाथ आपल्या साहित्यसृष्टीत म्हणतात – ''अर्जुनां देऊनि निज–समाधी। सवेचि घातला निर्वाण युद्धी। परि तो कृष्ण कृपानिधी। तटस्थ त्रिशुद्धी नेदीचि येऊ।।'' म्हणूनच वारकरी तत्त्वप्रणाली, कधीच सर्वसंन्यासवृत्तीचा उपदेश करीत नाही. उलट आपण स्वत: ज्या भगवद्भक्तीच्या मार्गाने मुक्त झालो, तो मार्ग जाणीवपूर्वक इतरांना शिकविण्याचा प्रयत्न करणे आणि सर्वांनाच, स्वानंदाचे साम्राज्य मिळवून देणे – हीच वारकरी भूमिका आहे.

याचपद्धतीने वारकरी तत्त्वप्रणालीने, भक्ती, अनन्यनिष्ठ भक्ती, भगवद्भक्तीही स्वतंत्र जीवननिष्ठा मानली आहे. म्हणजे असे की ज्ञानी लोक जिला 'स्वसंवित्ती' म्हणतात, शैव जिला 'शस्ती' म्हणतात, तिलाच आम्ही 'परम भक्ती' म्हणतो, असे श्रीज्ञानेश्वरांनी, आपल्या भावार्थदीपिकेच्या अठराव्या अध्यायामध्ये स्पष्टपणे सांगितले आहे. इथे आपल्या असेही लक्षात येते की 'केवल अद्वैत' या विचारामध्ये 'ब्रह्म आणि माया ही जोडी आढळते. त्या विचारात माया ही मिथ्या मानली असून, ती ब्रह्माची उपाधी आहे. उलट वारकरी विचारप्रणालीने मानलेली 'देवो–देवी' ही दोन्ही, निरुपाधिक आहेत, आणि सत्य आहेत. दोन्ही मिळून एकच सत्ता दर्शवितात. दोन्ही परस्परसहकारी आहेत. असा हा ब्रह्मकारणवादी पण चिद्विलासभाव आहे. चिद्विलासवाद आहे.

याचाच अर्थ असा की, वारकरी तत्त्वप्रणालीच्या दृष्टीने जग हे 'अज्ञान – कार्य' नसून जगत म्हणजे 'चिद्विलास' आहे. ब्रह्मकारणवादही स्पष्टपणे अभिप्रेत आहे. वारकरी तत्त्वचिंतनानुसार, जगत् म्हणजे, त्या परमशक्तीचाच आविष्कार होय. क्रीडा होय. विलास होय. म्हणजे असे की, इथे एकच परमात्मा, अनेक रूपांनी व्यक्त झाला आहे. अभिव्यक्त झाला आहे. म्हणजे या ठिकाणी अद्वैतच, स्वेच्छेने, द्वैतरुपाने प्रकट झाले आहे, आणि त्यामुळे अद्वयभावाची शोभा वृद्धिंगतच होत आहे. ज्याप्रमाणे पाणी हे लाटांच्या रूपाने स्वत:शी क्रीडा करते. त्याचप्रमाणे परमात्मा हा, जगद्रुपाने, स्वत:शी क्रीडा करीत आहे. तो परमात्माच, नित्य नव्या रूपाने प्रकट होतो आहे. त्यामुळे पूर्वीचे रूप आपणास क्षणभंगुर वाटते.

याच संदर्भात, वारकरी तत्त्वचिंतन – परंपरा विचारते की, जर परमात्म्याचा चिन्मय अंश, माझ्या मृण्मय देहपुरीत वसणारा जीवमात्र आहे, तर मग, या अंशाचे – या चैतन्यांशाचे, जीवत – प्रयोजन काय? तर उत्तर आहे– त्या परमात्म्याची साक्षात अनुभूती प्राप्त करून घेणे! हेच प्रत्येक जीवमात्राचे अंतिम आणि सर्वश्रेष्ठ प्रयोजन असू शकते! इथे हेही लक्षात घेतले पाहिजे की, या भवनचक्रातून सुटका हे जीवमात्राचे प्रयोजन असू शकते. त्या दृष्टीने 'मोक्ष – मुक्ती' हे श्रेष्ठ प्रयोजन मानले गेलेही. ते सत्यही आहे. पण वारकरी विचारधारा मानते की, भक्ती,

भगवद्भक्ती, ही चतुर्थ पुरुषार्थ असणाऱ्या मोक्ष-मुक्तीहून श्रेष्ठ आहे. तेच मानवी जीवताचे सर्वथा सुंदर साफल्य आहे. ही भगवद्भक्ती, पंचम पुरुषार्थ आहे. हीच वारकरी तत्त्वनिष्ठा आहे. भावनिष्ठा आहे. ''चहुं पुरुषार्थ शिरीं। भक्ती जैसी।।'' असे श्रीज्ञानेश्वरीचे, इथे स्पष्ट प्रमाण आहे. (१८-८६७)

एवढेच नव्हे तर, अद्वैतानुभूतीचा आणि अनन्यनिष्ठ भगवद्भक्तीचा या दोहोंचा एकमेकांशी विरोध मानण्याचेही कारण नाही. अद्वयानुभूतीतही भगवद्भक्ती संभवते. एवढेच नव्हे तर, पूर्ण अद्वैतानुभूतीचे पर्यवसान,अखेर भगवद्भक्तीच होते. जसे

''देव देऊळ परिवारू। किजे कोरूनि डोंगरू।
तैसा भक्तीचा व्यहारू। कां न व्हावा।।''
(अमृतानुभव - ९.४१)

किंवा

'' घडोनि सिंधूचिया अंगा। सिंधुवरी तळपे गंगा।
तैसा पाहु तया भोगा। अवधारिजो जी।।''
(ज्ञानेश्वरी - १८-११३७)

थोडक्यात वारकरी तत्त्वप्रणालीस अभिप्रेत असणारा 'धर्म' हा केवळ भक्तिप्रधानच नाही, तर भक्तीस्वरूप आहे. ही खरोखरच विशेष गोष्ट आहे. म्हणूनच श्रीज्ञानेश्वर सांगतात-

''जे जे भेटे भूत। ते ते मानिजे भगवंत।
हा भक्तियोगु निश्चिता जाणा माझा।।''
(ज्ञानेश्वरी - १० - ११८)

अशा या वारकरी तत्त्वज्ञानाचे, अखेरीचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे 'प्रपंच - परमार्थ - समन्वय'. आपण प्रपंचही नेटका करावा आणि परमार्थ उत्तम साधावा. म्हणूनच वारकरी तत्त्वसृष्टी सांगते की - संसार सोडायचा नाही, पण त्यात सर्वस्वी बुडावयाचे नाही. तर ईश्वरी नामस्मरण करीत, अनासक्तीने पण यथोचित, सर्व लौकिक व्यवहार, संपन्न करावयाचे! श्रीएकनाथांच्या शब्दकळेत सांगावयाचे तर ही, पंचसूत्री आहे. जीवनाच्या क्षणभंगुरतेचे सतत स्मरण ठेवून, सदैव ईश्वराशी अनुसंधान राखून, भूतमात्रांमध्ये भगवंत पहात, प्रपंचातील सर्व कर्मे ईश्वरापर्ण बुद्धीने करीत, आपला प्रपंचच परमार्थरूप करावयाचा! म्हणजे आपण सहृदयतेच्या विकासाबरोबरच संयम आणि सदाचार, यांचाही विकास साधला पाहिजे. तसेच आपल्या जीवनात 'ज्ञान, कर्म, वैराग्य आणि भक्ती' या चतु:सूत्रीचा सुसंवाद असावा! मानवी जीवनामध्ये आपण, भगवद्भक्तीची, परमेश्वरी प्रेमाची अनुभूती वारंवार घेऊन, आपले जीवन खऱ्या अर्थाने समृद्ध आणि सुंदर केले पाहिजे. संपन्न आणि शुभंकर केले पाहिजे.

**प्रकाशाचे गाणे गाणारी व्यक्तिमत्त्वे :**

थोडक्यात महाराष्ट्रातील सर्व धर्म संप्रदायांच्या तत्त्वचिंतनाशी, अविरोधी असणारी, वारकरी तत्त्वदृष्टी ही व्यष्टि - सृष्टी - समष्टि आणि परमेष्टि यांच्यामध्ये एकात्मता हवी असे मानते. ती स्नेहधर्मी समन्वय सांगते. तसेच ती सर्वांच्या सम्यक प्रगतीचा आग्रह धरते. एवढेच नव्हे तर, सत्पाचरण आणि सामाजिकता या दोहोंचा संगम

साधणारा, वैदिक ऋतधर्म सर्वांना शिकवू पाहते. अशीही सर्वच संत सत्पुरुषांची तत्त्वदृष्टी असते. भावदृष्टी असते. हिचा परिचय, प्रस्तुत 'शिल्पकार' कोशात 'धर्मपरंपरा' या विभागात, करून देण्यात आला आहे. अशा या साऱ्याच, संत – सत्पुरुषांची परमकारुणिक व्यक्तिमत्त्वे म्हणजे 'ज्ञान – वैराग्य – उदारता आणि भक्तिमयता' यांचे आदर्शपाठ असतात. त्यामुळे त्यांच्या वाणीला ही प्रकाशमयता आलेली असते. जणू ते 'प्रकाशाचे गाणे' गात असतात. या संत-सत्पुरुषांच्या वृत्तिप्रवृत्ती या सत्यनिष्ठ असतात. परमार्थप्रवण असतात. त्यात औदार्य असते. सहिष्णुता असते. करुणा असते आणि मानवताही असते.

अशा या सर्व धर्म – संप्रदायातील, सर्व संत – सत्पुरुषांची भावनिष्ठा कशी असते? त्यांची भावसृष्टी कशी असते? या संदर्भात डॉ. उषा देशमुख यांचा, 'संत वाङ्मय फलश्रुती' हा लेख महत्त्वाचा आहे. (ग्रंथ – मध्ययुगीन धर्म संप्रदायी वाङ्मय – संपादक डॉ. मुकुंद दातार, स्नेहल प्रकाशन, पुणे २००४) सदर लेखात डॉ. देशमुख सांगतात. मराठी संतसाहित्याने आपल्या सातत्यशील अभिव्यक्तीतून, 'मानवचारित्र्ययोग' साधला आहे, असेच म्हणावे लागेल. निष्कलंक आणि सामर्थ्यसंपन्न समाज निमार्ण करण्याचे प्रयत्न, या साहित्याने आपल्या भक्तिविचारातून लोकजीवन मुरविले. हीच संत साहित्याची शक्तीही आहे आणि फलश्रुतीही आहे. या संत – सत्पुरुषांची वाणी, प्रज्ञा, प्रतिभा या साऱ्या गोष्टी 'ऋतंभरा' असतात. त्यांच्या साहित्यातून साधला जाणारा शब्दाविष्कार हा मंत्राक्षरी स्वरूपाचा असतो. तसेच या ऋतोपासक सामर्थ्यामुळे, त्यांच्या वाणीला, सर्वात्मकता प्राप्त होते, त्याचप्रमाणे आत्मसाक्षात्कारी ओजस्विताही प्राप्त होते.

म्हणजे असे की – जणू काही या संत साहित्यातून, 'भक्तिभावाचे केशरमळे' बहरून आलेले दिसतात. या साहित्यातून पारदर्शक आत्मनिष्ठा जशी व्यक्त होते, त्याच प्रमाणे उपदेशगर्भ वैचारिकता ही प्रभावी ठरते. मानवी जीवन चिंतनाचे सारही, या संतसाहित्यातून आविष्कृत होते असल्यामुळे, त्याला ठिकाणी, सुभाषितपरताही प्राप्त होताना दिसते. अशा या साहित्यनिर्मात्या किंवा उपदेशकर्त्या संत – सत्पुरुषांनी नेमके काय केले? तर आदर्श जीवनध्येयाला मुखरित करणारा आणि पुरुषार्थ विचारांची प्रचिती देणारा विचार आणि आचार या संत सत्पुरुषांनी सांगितला. त्यांनी खचित मानवधर्माची जोपासना केली आणि तोच अनुभव, उपदेशरूपाने समाजासमोर मांडला. या पाठीमागची त्यांची तळमळ, त्ताजुता, करुणा आणि कणव लक्षात घेण्यासारखी आहे. या सर्व संत-सत्पुरुषांचे (या चरित्रकोशात उल्लेखित केल्याप्रमाणे) जरी वेगवेगळे संप्रदाय असले, किंवा त्यांनी केलेली तत्त्वज्ञानाची मांडणीही प्रसंगी भिन्न स्वरूपाची वाटली तरी हे सर्व संत-सत्पुरष मानवी कल्याणाच्या एकाच ध्येयाने प्रेरित झालेले महामानव आहेत, हे आपल्या लक्षात येते. आणि हे साधुसंत, 'ऐक्य भावाचे शिल्पकार' ठरतात!

म्हणूनच डॉ. उषा देशमुख म्हणतात (उपरिनिर्दिष्ट लेख) नाथ, महानुभाव, वारकरी, दत्त, समर्थ, जैन, वीरशैव, नागेश असे विविध संप्रदाय आणि त्यांचे भक्त-शिष्य, आपल्या या महाराष्ट्रात एकोप्याने राहिले. त्यांच्या साहित्यसृष्टीतून आपणाला, आध्यात्मिक लोकशाहीचे प्रतिबिंब उमटलेले दिसते. हे सर्वच संप्रदाय, परस्परपूरक राहिले. ते एकत्रितपणे जनजागृती करीत राहिले. त्यांनी भक्तीला नीतीची बैठक दिली. अद्वैतभक्तीच्या पायावर, मानवधर्माचे प्रवर्तन केले. जीवनमूल्यांना धर्माचा आधार दिला आणि धर्माधिष्ठित कर्मविचार, मानवता प्रेमात विसर्जित केला. विशेष म्हणजे सांस्कृतिक, एकात्मता, लोकोद्धाराची तळमळ, मानवतावादाचा पुरस्कार, लोकसंग्रह, लोकोद्धार, लोकजीवनाचे व्यवस्थापन या सर्वांसाठी, या सर्व संत-सत्पुरुषांनी आपली आयुष्ये वेचिली. त्यासाठी हालअपेष्टा सहन केल्या पण आपल्या ध्येयापासून किंवा उद्दिष्टांपासून ते मागे हटले नाहीत.

**विविध पंथसंप्रदायातील संत परिचय :**

अशा या संत-सत्पुरुषांच्या मालिकेतील अर्वाचीन संत-सत्पुरुषांच्या जीवतकार्याचे, उत्तम दर्शन, प्रस्तुत ग्रंथात आपणास घडते. आधुनिक महाराष्ट्राची जडण घडण सांगणाऱ्या, शिल्पकार चरित्रकोश मालिकेतील, 'धर्म-परंपरा' या प्रस्तुत विभागात हा संत-सत्पुरुष परिचय, साक्षेपपूर्वक करून देण्यात आला आहे. एकूण २३३ पृष्ठांच्या या खंडात, एकूण १५५ संत सत्पुरुषांच्या लोकहितकारी कार्याचा, नीटस-नेटका परिचय, सादर झाला आहे. या परिचयात्मक माहितीमध्ये जे संप्रदाय प्राधान्याने दिसतात ते म्हणजे नाथ, वारकरी, समर्थ, श्रीदत्त, अवधूत, जैन, वीरशैव, चिमड, सूफी, अवलिया इत्यादी. याशिवाय अन्य संप्रदायांमधील काही संतांच्या कार्यांचा परिचयही आपणास घडतो.

इथे एक गोष्ट विशेष जाणवते, ती अशी की कार्यपरिचय सादर करताना, फार मोठी चौफेर दृष्टी ठेवण्यात आली आहे. त्यामुळे अवतारी मेहेर बाबा, आरफळकर हैबत बाबा, पिंपळगावकर कावडीबाबा, कैकाडीबाबा, 'विपश्यना' कार गोयंका, चितारी बुवा, जोगन विठामाई, वारकरी, जैतुनबी, ताजुद्दिन बाबा, दत्ता बाळ, देव मामलेदार, निसर्गदत्त महाराज, भक्तीवेदान्त स्वामी प्रभुपाद, विष्णुबुवा ब्रह्मचारी, साधू वासवानी, हंसराज स्वामी, अशी संत - सत्पुरुष श्रेष्ठांची नामावली अवलोकिली तर या चरित्रकोशच्या संपादकांची दृष्टी किती चौफेर आहे. साऱ्या कर्तृत्व नोंदी किती दक्षतापूर्वक, साक्षेपपूर्वक आणि चोखंदळपणे करण्यात आल्या आहेत, हे लक्षात येते. आणि सांस्कृतिक क्षेत्राच्या अभ्यासकाला मोठे समाधान वाटते.

**लोकशिक्षक संत आणि अवतारी सत्पुरुष :**

या अशा, अर्वाचीन धर्म-परंपरा निर्माणक सर्व संत सत्पुरुषांच्या कर्तृत्वक्षेत्राचे निरीक्षण केले तर, आपणाला त्यांचे दर्शन दोन भूमिकांच्या संदर्भात घेता येते. त्या दोन भूमिका अशा-

१) लोकशिक्षक संत

२) अवतारी पुरुष

यातील पहिली भूमिका ही परमार्थ-विचाराच्या प्रबोधकाची आहे, तर दुसरी भूमिका ही, परमार्थ-सिद्धीच्या मार्गदर्शकाची आहे. वानगीदाखल बोलावयाचे तर- गुरूदेव रा.द. रानडे, पावसचे स्वामी स्वरूपानंद, पांडूरंगशास्त्री आठवले आणि प्राचार्य शं.वा. दांडेकर हे पहिल्या भूमिकेत दिसतात. तर अक्कलकोटचे श्री स्वामी समर्थ, शिर्डीकर साईबाबा, गोंदवलेकर महाराज आणि शेगावनिवासी गजानन महाराज- हे दुसऱ्या भूमिकेत दिसतात.

या सर्वांनीच, आपल्या कार्यकर्तृत्वाने अर्वाचीन धर्मपरंपरा, समर्थ आणि समृद्ध केली आहे. त्यांनी अवघ्या महाराष्ट्राला 'धर्म जागो निवृत्तीचा' आणि 'धर्म जागो राघवाचा' अशीच शिकवण दिली आहे. त्यांनी सर्वासर्वांना सद्‌धर्मपरायण बनविले आहे. त्यांनी सर्वांना, संस्कृतिसंवर्धनाची दीक्षा दिली आहे. त्यांनी आदर्श मानवी जीवनाचा मार्ग दाखविला आहे आणि साऱ्यांची सत्वभावना टिकविली आहे. त्याचप्रमाणे सत्यनिष्ठा जागविली आहे. आणि हेच त्यांचे पिढ्यान्‌पिढ्यांवर उपकार करणारे कार्य, कर्तृत्व आपण दोन काव्यरचनांतून सांगू शकू.

१

अर्वाचिन संत जाले। तत्त्वज्ञान बहरले।।१।।

निंबाळचे गुरूदेव। गीता-साक्षात्कारयोग।।२।।

पावसचे स्वरूपानंद। 'सोऽहं ज्ञान' बोध कंद।।३।।
तत्त्वशास्त्री पांडुरंग। 'स्वाध्याय' तो सांगोपांग।।४।।
वारकरी सोनोपंत। चिद्‌विलास भावामृत।।५।।
मुद्रा म्हणे जाणा तत्त्वा। दृढ करा परमार्था।।६।।

२

श्रीअवतार जाहले। भाग्य उदयासी आले।।१।।
अक्कलकोटचे समर्थ। दत्तभक्ती करिती सार्थ।।२।।
शिर्डीकर साईबाबा। श्रद्धा सबुरी सर्वदा।।३।।
गोंदवले श्री चैतन्य। अंतर्यामी राम जाण ।।४।।
शेगावीचे गजानन। गण-सेवा, भक्ति ज्ञान।।५।।
मुद्रा म्हणे गाऊ कीर्ती। दृढ राहू परमार्थी।।६।।

अशा तऱ्हेने 'साप्ताहिक विवेक' निर्मित, आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण सांगणाऱ्या शिल्पकार चरित्रकोश मालिकेतील प्रस्तुत 'धर्म-परंपरा' विभागाचे कार्य, उत्तम तऱ्हेने संपन्न झालेले आहे. हे कार्य ऐतिहासिक महत्त्वाचे आहे आणि सांस्कृतिक सेवा-कार्याचे आहे. हे खरोखरच 'अक्षर' कार्य आहे. असे हे कार्य प्रारंभापासून समापनापर्यंत सिद्धीस नेणाऱ्या सर्व साहित्यिक बंधू-भगिनींचे आणि संपादक समितीचे जेवढे कौतुक करावे, तेवढे थोडेच आहे.

मी या सर्वांचे मन:पूर्वक अभिनंदन करतो आणि या 'प्रस्तावने'च्या लेखनाच्या निमित्ताने या सर्वांना हार्दिक शुभेच्छा देतो.

– डॉ. मुकुंद दातार
कल्याणीनगर, पुणे-६

❀ ❀ ❀

# अ ते औ

## अनंतदास रामदासी

***लोहकरे, दत्तात्रेय मोरेश्वर***

**रामदासी संप्रदाय**

**१८८५ - १९६३**



अनंतदास रामदासी म्हणजेच पूर्वाश्रमीचे दत्तात्रेय मोरेश्वर लोहकरे यांचा जन्म पुणे जिल्ह्यातील भोर संस्थानात ज्येष्ठ शुद्ध दशमी, या तिथीला झाला. त्यांच्या आईचे नाव रंगूबाई. दत्तात्रेय २-३ वर्षांचा असतानाच त्याचे मातृछत्र हरपले. दत्तात्रेयाचे वडील शाळा खात्यात नोकरीला होते. त्यांची शिस्त अत्यंत कडक त्यामुळे नीटनेटकेपणा, स्वच्छता, टापटीप, स्वावलंबन हे चांगले गुण लहान वयातच त्यांच्या अंगी बाणले. वडिलांच्या सतत बदल्यांमुळे नेवासे, संगमनेर, अहमदनगर, पुणे इत्यादी ठिकाणी त्याचे शिक्षण पार पडले.

फायनलची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर दत्तात्रेयांनी काही काळ वऱ्हाडात नोकरी केली व नंतर ल.रा. पांगारकर यांच्या ‘मुमुक्षु’ मासिकातही काही काळ नोकरी केली. पण त्यात त्यांचे मन रमले नाही. त्यांनी नोकरी सोडून दिल्यामुळे वडिलांनी रागावून दत्तात्रेयांना घर सोडून जाण्यास सांगितले, तेव्हा त्यांनी खरोखरच घर सोडले. शोधाशोध करूनही दत्तात्रेय न सापडल्यामुळे शोकाकुल होऊन वडिलांनी इहलोक सोडला.

दत्तात्रेयांना विशीतच ल.रा. पांगारकरांचा सहवास लाभल्यामुळे त्यांच्या सदुपदेशाने दासबोधाची आवड निर्माण झाली होती. पांगारकरांचा निरोप घेऊन दत्तात्रेयाने नाशिक-पंचवटीकडे प्रयाण केले. तेथे काही वर्षे गायत्री पुरश्चरण केले आणि समर्थभक्तीची सुरुवात केली. नंतर त्यांनी नाशिक सोडून पदभ्रमण सुरू केले. गोपाळ नावाच्या एका दशग्रंथी ब्राह्मणासोबत अनेक तीर्थक्षेत्रे हिंडत दत्तात्रेय १९०७ च्या माघ महिन्यात काशीला आले. दत्तात्रेयाने तेथे गोजीवन चौंडे महाराजांच्या नेतृत्वाखाली रामघाटावरील बालकराम मंदिरात चाललेल्या त्रयोदशाक्षरी महामंत्र अनुष्ठानात सहभाग घेतला. दत्तात्रेयांची भक्ती व सेवाभाव पाहून महाराजांनी त्यांच्यावर कृपानुग्रह केला. रथसप्तमीच्या पवित्र दिवशी दत्तात्रेय रामदासी झाले आणि त्यांचे नामकरण ‘अनंतदास रामदासी’ असे करण्यात आले. त्याच मुहूर्तावर काशीत समर्थांची मूर्ती व पादुकांची प्राणप्रतिष्ठा करण्यात आली. काशीपासून आठ कोसांवर असलेल्या हनुमान मंदिरात अनंतदासांनी दीड वर्षे पुरश्चरण केले.

अनंतदास १९०९ मध्ये चौंडे महाराजांच्या सोबत काशीहून वाईस आले. तेथे गोशाळेची व संस्कृत पाठशाळेची जबाबदारी त्यांनी उत्कृष्टपणे सांभाळली. तसेच, त्यांनी विरोधकांना तर्कशुद्ध पद्धतीने तोंड देत गोवर्धन संस्थेने चालविलेल्या तीन मासिकांचे व पाक्षिकांचे संपादन केले.

श्री चौंडे महाराजांच्या आज्ञेनुसार श्रीसमर्थकृत अभंग संकलित करण्याचे कार्य हाती घेऊन मठाच्या वतीने 'श्रीसमर्थांची अभंग गाथा' अनंतदासांनी प्रकाशित केली. १९०९ साली सज्जनगडावर १३ कोटींचे जपानुष्ठान झाले व त्यानंतर गोवर्धन संस्थेचे अनंतदास विश्वस्त झाले. एक-दोन वर्षे त्यांनी चौंडे महाराजांबरोबरच्या दौऱ्यात भ्रमंती केली. १९११ साली 'श्री रामदासी सांप्रदायिक उपासना पद्धती' प्रकाशित झाली. १९१८ मध्ये त्यांनी 'गोरक्षण' वृत्तपत्राचे संपादकत्व स्वीकारले. गणेशोत्सव, गोवर्धन मठ सुरू करून समाजात गोरक्षणाविषयी जागृती निर्माण केली. रामदासकथा, ब्रह्मांड भेदून पैलाड न्यावी यासाठी महाराजांसमवेत व स्वतंत्रपणे अनंतदास यांनी भारतभर पर्यटन केले. सतत संचार करून समर्थसंप्रदाय व गोसेवेच्या कार्याचा प्रचार व प्रसार केला.

विदर्भात हिंगणघाट, जि. वर्धा यापासून सुमारे १५ मैलांवर असलेल्या गिरड खेडेगावात पुरातन श्रीराम मंदिर आहे. अशा या दोन-अडीचशे वर्षांची थोर परंपरा असलेल्या मठावर सर्वसंग परित्यागी, वितरागी अशा अनंतदासजींची मठाधीश म्हणून १९३५ साली नियुक्ती झाली. मठाचे कार्य लोकाभिमुख करण्याकडे लक्ष घातल्यामुळे मध्यंतरीच्या काळात नाममात्र राहिलेल्या गिरड मठाचे नाव अनंतदास यांच्यामुळे महाराष्ट्रभर नव्हे, तर संपूर्ण हिंदुस्थानात झाले. १९४२ साली वेदशास्त्रसंपन्न रामदासशास्त्री जोशी व वामनराव मुळे यांच्या साहाय्याने गिरड, हिंगणघाट व नागपूर येथे संस्कृत पाठशाळा स्थापन करण्यात आल्या.

अनंतदास यांनी १९३५ मध्ये श्री चौंडे महाराजांच्या विस्तृत चरित्रलेखनाचे कार्य सुरू केले. माहिती गोळा करण्यासाठी पुन्हा एकदा भारतभ्रमण केले. कल्याण पालखीच्या निमित्ताने मराठवाड्यात जास्त येणे-जाणे होऊ लागले. परांडा व धाराशिव येथे श्री योगीराज कल्याण महाराजांच्या सेवेचा योग आला. इकडे नित्य प्रवचने, उपासना, जपानुष्ठान, उत्सव व ग्रंथलेखनादी कार्ये होऊ लागली. तेथे निष्ठावंत सेवक निर्माण झाले. गोवर्धन संस्था सोडल्यावर शरीर थकल्यामुळे गिरडचे कार्य चालवणे कठीण झाले; पण वृद्धपणी शिष्यांनी फुलासारखे जपले. त्यांनी ग्रंथलेखन, मुद्रणाचा खर्च केला, कशाचीही उणीव पडू दिली नाही. श्री कल्याण स्वामी महाराजांना, हैद्राबाद सुलतानशाहीला शह देण्यासाठी डोमगाव प्रांती नेमले होते.

मराठवाडा भागात श्री कल्याणस्वामी महाराजांनी मठाचे ४० ठिकाणी जाळे पसरवले. १९४७ मध्ये श्री अनंतदासजींसारख्या मुरब्बी मिशनऱ्याची स्वधर्म प्रचाराची त्या भागातील मोहीम, त्या वेळी त्यांनी केलेल्या प्रचंड जनकार्याचा इतिहास मराठवाड्यातील जनताजनार्दनाच्या हृदयपटलावर कायमचा कोरला गेला आहे. सज्जनगड पालखी सोहळ्याच्या वतीने प्रतिवर्षी श्री दासनवमीस ठिकठिकाणाहून श्रीसमर्थशिष्य, प्रशिष्यांच्या पालख्या आणण्याचा प्रघात १९२० सालापासून सुरू आहे. त्यात श्रीक्षेत्र डोमगावहून श्री योगिराज कल्याणस्वामी महाराजांची पालखी आणण्याचा मान श्री अनंतदासजींकडे होता. तो त्यांनी देहान्तापर्यंत चालवला. इतकेच नव्हे, तर ही प्रथा अव्याहतपणे चालू राहण्याची व्यवस्था करून ठेवली. मेथवडे मठातूनही श्री समर्थ पालखी सोहळ्याच्या कार्यास तेथील भक्तांना प्रवृत्त केले.

अनंतदासजींच्या चर्येवर विलक्षण तेज होते. सरळ, लांब नासिका, भव्य कपाळ, गोरा, तेजस्वी चेहरा, पांढरीशुभ्र दाढी असे लोभस व्यक्तिमत्त्व होते. ते त्रिकालज्ञानी साक्षात्कारी तपस्वी होते. त्यांची प्रवचने अत्यंत रसाळ, महत्त्वपूर्ण व बोधप्रद वाटत.

''गोरस आरोग्यदायक व सत्त्वबुद्धिकारक आहे. शरीरप्रकृती सुदृढ राखण्याकडे पूर्ण लक्ष ठेवले पाहिजे. आहारात गाईचेच दूधदुभते वापरण्याचा निश्चय करावा. गोमाता ही भगवन्मूर्ती आहे. तिची सेवा ही श्रीरामसेवाच आहे.'' असे ते सांगत. श्रीदेवीच्या नवरात्रात अश्विन शुद्ध एकादशी, रविवार, पहाटे ४ वाजता श्रीरामनामस्मरणात अनंतदासजींनी समर्थचरणी आपला देह ठेवला. वयाच्या अठ्ठ्याहत्तराव्या वर्षी धाराशिव येथे

त्यांचे प्राणोत्क्रमण झाले. नागनाथ मंदिराजवळील भूमीत त्यांच्यावर अंत्यसंस्कार करण्यात आले व तेथे पादुका स्थापन करून छोटेसे मंदिर बांधण्यात आले व परांडा येथील श्री हंसराजस्वामी यांच्या मठात त्यांची समाधी बांधण्यात आली.

– संपादित

**संदर्भ :**

१. *अ‍ॅड. माढेकर, श्रीराम; 'श्री अनंतदास रामदासी महाराज जीवन चरित्र'*

## अमळनेरकर, सखाराम रामभट

***सखाराम महाराज***

**वारकरी पंथ, रामानुजाचार्य परंपरा**

**जन्मदिनांक अनुपलब्ध – १८१८**

**खा**न्देशामधील अमळनेर हे 'प्रतिपंढरपूर' म्हणून समस्त खान्देशीयांचे श्रद्धास्थान आहे. येथील अमळनेरकर संस्थानाला २५० वर्षांची प्रदीर्घ परंपरा आहे. संत सखाराम महाराज अमळनेरकर हे या संस्थानाचे आद्य सत्पुरुष होत.

सखाराम रामभट अमळनेरकर ऊर्फ सखाराम महाराज यांचा जन्म अमळनेर जवळील चिखली नदीच्या काठी 'पिंपळी' या छोट्याशा खेड्यात झाला. त्यांच्या आईचे नाव सीताबाई होते. बालपणापासूनच छोट्या सखारामला विठ्ठलाचा नाद होता. तो सारखा विठ्ठल नामाचा घोष करीत असे व गाईगुरे राखताना सगळ्या सवंगड्यांना गोळा करून पुराणातील देवांच्या कथा सांगत असे. त्याचा हा छंद सर्वसामान्यांना न कळणारा होता म्हणून बहुतेक लोक सखारामलाच वेडा म्हणत होते. आई-वडिलांचे निधन झाल्यामुळे सखाराम लहान वयातच पोरका झाला. त्याचा चुलतभाऊ रंगनाथ याने सखाराम व त्याची सावत्रआई नानूबाई यांचा सांभाळ केला. सखारामाचे देवाचे वेड कमी होण्यासाठी त्याचे सोळाव्या वर्षीच लग्न लावून देण्यात आले. पण पत्नीच्या सहयोगाने सखारामाची साधना उत्तरोत्तर वाढत गेली. एके दिवशी एरंडोलचे थोर सत्पुरुष रघुनाथस्वामी यांनी सखारामच्या घराच्या दारात उभे राहून 'सखाराम' म्हणून जोरदार हाक मारली आणि ते पुढे निघून गेले. गुरुकृपेची वाट पाहणारा सखाराम धावत घराबाहेर आला व त्यांच्या मागेमागे चालत थेट एरंडोलपर्यंत गेला. रघुनाथस्वामी यांनी त्याचा निष्ठावंतभाव पाहून अडावद येथे, श्रीनिवास महाराज यांच्याकडे त्यास गुरुपदेशासाठी पाठविले. श्रीनिवास महाराज व सखारामची दृष्टिभेट होताच गुरुशिष्याची एकमेकांस ओळख पटली. श्रीनिवास महाराज हे रामानुजाचार्य परंपरेतील थोर सत्पुरुष होते. त्यांनी सखारामाच्या मस्तकावर हात ठेवून त्याला पारमार्थिक अनुग्रह दिला.

पूर्वजांच्या घरात हक्क नाकारून चुलतभाऊ रंगनाथ याने सखारामला घराबाहेर काढले. सखारामने याबद्दल रंगनाथला धन्यवाद दिले व वाडी नावाच्या भागात एक झोपडी बांधून विठ्ठलनामाच्या आनंदात तो दंग झाला. यामुळे सारे गाव थक्क झाले.

सखारामची पत्नी माहेरची सधन होती. ती बाळंतपणानंतर अमळनेरला परतली आणि नवऱ्याची झोपडी पाहूनही आहे त्या स्थितीत पतिसेवा करीत त्यांच्या आध्यात्मिक साधनेला तिने मदत केली. ग्रामस्थांच्या इच्छेने सखाराम यांनी पुढाकार घेऊन 'हरिनाम सप्ताहा'चे आयोजन केले. ईश्वरी कृपेने हा हरिनाम सप्ताह यशस्वी झाला. हरिनाम सोहळ्यात येणाऱ्यांची गैरव्यवस्था व्हावी व सखारामची नाचक्की व्हावी असा काही ग्रामस्थांचा दुष्ट हेतू होता. पण या हरिनाम सप्ताह सोहळ्याच्या यशामुळे सखारामची कीर्ती दूरवर पसरली. सखारामच्या संतत्वाचा, साधुत्वाचा सुगंध सर्वत्र दरवळला.

अमळनेरजवळच्या अंबर्षी टेकडीवर तपश्चर्या करणारे योगी महादेवबुवा एके दिवशी सखारामकडे आले. सखारामच्या संसाराची विपन्नावस्था पाहून ते त्याला परमार्थ सोडून संसाराकडे लक्ष देण्यास सांगून त्यांनी त्याला मदत करण्याचीही तयारी दर्शविली; पण ''परमार्थ हेच माझे जीवन आहे. मला संसाराची आसक्ती नाही. मला आपणांकडून काही नको, फक्त आपली कृपा असू

द्या,'' अशी सखारामने त्यांना प्रार्थना केली. सखारामची ही एक परीक्षाच होती. त्याची ही निःस्पृहता व विठ्ठलनिष्ठा पाहून योगी महादेवबुवा यांनी त्यांना काही सिद्धी देऊ केल्या होत्या.

पंढरपुरी आषाढी वारीसाठी अमळनेरहून पायी जाणे व चार महिने पंढरीतच चतुर्मास वास्तव्य करणे हा सखारामांचा नियम होता. एकदा आषाढीसाठी पायी पंढरीकडे निघाले असताना वाटेत कायगाव टोके येथे गोदावरी नदीला प्रचंड पूर आलेला होता. चार-पाच दिवस पूर ओसरण्याचे लक्षण नव्हते. त्या वेळी सखाराम यांनी चक्क पुरात उडी घेतली व देवकृपेने ते सुखरूपपणे पैलतीरी लागले. पंढरीवारीचा नियम पूर्ण झाला. असेच एका वर्षी वारीला जाताना चोपड्याजवळ सातपुड्यातील कुविख्यात दरोडेखोर मान्या किल्ले याने त्यांना अडवून, बंदी बनवून जंगलात नेले. तेथे सखाराम महाराज यांनी नेहमीची वेळ होताच विठ्ठलाची पूजा व भजन सुरू केले. त्यांची पूजा व भजनातील तल्लीनता पाहून मान्या भिल्लही देहभान हरपून गेला. महाराजांना शरण येऊन त्याने 'आपल्याला काहीतरी सेवा देऊन क्षमा करावी' अशी विनंती केली. महाराजांनी मान्याला अमळनेर येथील रथयात्रा उत्सवात लागणारा लाकूडफाटा पुरविण्याची सेवा दिली.

दुसऱ्या बाजीराव पेशव्यांची सखाराम महाराजांवर विशेष श्रद्धा होती. ते आळंदीची कार्तिकवारी झाल्यावर सखाराम महाराजांना सन्मानाने पुण्यात शनिवारवाड्यात पाचारण करून संतपूजा करीत असत. एकदा पेशवे यांनी महाराजांपुढे आपल्या राज्याबद्दल चिंता व्यक्त केली. तेव्हा त्यांना सखाराम महाराज यांनी अत्यंत परखडपणे बजावले, ''अनीती व अत्याचारामुळे या राज्याचा सर्वनाश होणार हे निश्चित आहे.'' इ.स. १८१८ मध्ये आपल्या इहलोकीच्या कार्याची समाप्ती जवळ आली आहे असे लक्षात येताच सखाराम महाराज यांनी 'अखंड हरिनाम सप्ताह' सुरू केला. अन्नपाणी वर्ज्य करून हरिनामाच्या संकीर्तनातच त्यांनी पांडुरंगचरणी देह ठेवला.



समाधी मंदिर अमळनेर

संत सखाराम महाराजांनंतर श्री गोविंदबुवा (इ.स. १८१८ ते १८५१), ३३ वर्षे या 'अमळनेरकर संस्थाना'च्या गादीवर होते. त्यांनी हे संस्थान नावारूपास आणले. त्यानंतर श्री बाळकृष्ण महाराज (१८५१ ते १८७५), श्री प्रल्हाद महाराज (१८७५ ते १८८५), श्री तुकाराम महाराज (१८८५ ते १८९६), श्रीकृष्ण महाराज (नऊ महिने), दुसरे बाळकृष्ण महाराज (१८९७ ते १९३१), वासुदेव महाराज (१९३१ ते १९५२), पुरुषोत्तम महाराज (१९५२ ते १९६४), ज्ञानेश्वर महाराज (१९६४ ते १९८०) आणि सध्या विद्यमान श्री प्रसाद महाराज यांनी संस्थानाची धार्मिक परंपरा मोठ्या निष्ठेने जोपासलेली आहे.

अमळनेरकर संस्थानामुळे रामानुजाचार्य यांची भक्तिधारा वारकरी संप्रदायात मिळालेली आहे. यांचा चार महिने पंढरपुरात मुक्काम असतो व बाकी आठ महिने महाराष्ट्रभर खेडोपाडी भक्तियात्रा चालू असतात. त्या भेटींची, गावांची नावे व तिथ्या, वेळा कायमस्वरूपी ठरलेल्या असतात. वर्षभराचा एवढा निश्चित व कोणत्या कारणाने न बदलणारा प्रवास क्वचितच अन्य कोणी करत असेल. ही गावोगावची संपर्कयात्रा म्हणजेच

अमळनेरकर संस्थानाचे धर्मजागरण कार्य होय आणि हे कार्य गेली २५० वर्षे अविरतपणे विस्तारत आहे.

पंढरपूरच्या मठात चतुर्मासात होणाऱ्या अनेक उत्सवांचे आयोजन व अमळनेर येथे वैशाखात होणारा रथोत्सव, हे या धार्मिक संस्थानाचे वैशिष्ट्य आहे.

– विद्याधर ताठे

**संदर्भ :**

१. *भावे, न.कृ.; 'संत सखाराम महाराज' (ओवीबद्ध चरित्र); वाडी संस्थान प्रकाशन; १९२४.*
२. *प्रा. पंडित, प्रभाकर; 'संत सखाराम महाराज (अमळनेरकर)', चरित्र; १९६७.*

## अवतार मेहेरबाबा

***इराणी, मेरवान शेरियार***

**अध्यात्मिक गुरू, सत्पुरुष**

**२५ फेब्रुवारी १८९४ – ३१ जानेवारी १९६९**



**अ**वतार मेहेरबाबा यांचे मूळ नाव मेरवान शेरियार इराणी. पुणे येथे एका पारशी कुटुंबात त्यांचा जन्म झाला. वडील शेरियार आणि आई शिरीन हे आध्यात्मिक वृत्तीचे होते. मेरवान यांचे शालेय शिक्षण पुण्यातील एका खेड्यात झाल्यानंतर महाविद्यालयीन शिक्षणासाठी ते डेक्कन महाविद्यालयात दाखल झाले. त्यांना त्यांच्या तरतरीत आणि उमद्या स्वभावामुळे त्यांचे मित्र 'बिजली' या नावाने संबोधत. त्यांनी बालवयातच 'कॉस्मोपोलिटन क्लब'ची स्थापना केली होती. या क्लबमार्फत निधी उभारून त्याचा विनियोग जागतिक आपद्स्थितीतील धर्मादायासाठी होत असे. मेरवान उत्तम कविता करीत, सुरेल गात. त्यांना अनेक भाषा अवगत होत्या. ते क्रिकेटही उत्तम खेळत. हाफिज, शेक्सपियर, शेली हे मेरवान यांचे आवडते साहित्यिक होते.

एकोणीस वर्षांचे असताना, त्यांच्या आयुष्याला एक आगळे वळण मिळाले. महाविद्यालयात दुसऱ्या वर्षात शिकत असताना त्यांना एक मुस्लीम साध्वी, हजरत बाबाजान भेटल्या. त्या साध्वीने मेरवान यांच्या कपाळाचे चुंबन घेतले आणि आशीर्वाद दिले. त्या क्षणापासून मेरवान यांना पुढील मार्गक्रमणेचे संकेत मिळाले. त्यांनी आपल्या ऐहिक जीवनाला रामराम ठोकला आणि साध्वी बाबाजान यांच्यासह अनेक तीर्थस्थानांना आणि आध्यात्मिक गुरूंना भेटी दिल्या. नागपूरचे हजरत ताजुद्दीनबाबा, केडगावचे नारायण महाराज, शिर्डीचे साईबाबा आणि साकोरीचे उपासनी महाराज यांच्या सान्निध्यात, त्यांच्या कृपाप्रसादाने आणि विचारांनी मेरवान यांच्याही व्यक्तिमत्त्वात आध्यात्मिक जागरण जोमाने सुरू झाले. उपासनी महाराजांकडे सात वर्षे साधना केल्यानंतर वयाच्या सत्ताविसाव्या वर्षी त्यांचेही अनुयायी तयार होऊ लागले. त्यांच्या अनुयायांनी त्यांना 'मेहेरबाबा' असे नामाभिधान दिले. १९२२ साली त्यांनी मुंबईत 'मंजिल-ए-मीम' या आश्रमाची स्थापना केली. तेथेच ते आपल्या अनुयायांना, ज्यांना मंडळी म्हणत, प्रवचने आणि उपदेश करीत. काही वर्षांतच त्यांच्या अनुयायांनी अहमदनगरजवळील खेड्यात मेहेरबाबांचा आणखी एक आश्रम उभा केला. पुढे त्या ठिकाणाचे नाव मेहेराबाद असे करण्यात आले. या मेहेराबाद गावात १९२४ साली त्यांनी 'प्रेम आश्रम' नावाची शाळा उभी केली. भारत आणि इराणमधील मुले या शाळेत शिकण्यास दाखल होऊ लागली.

केवळ भारतातच नव्हे, तर परदेशात, विशेषत: अमेरिका, इंग्लंड, हॉलंड, ऑस्ट्रेलिया अशा देशांत

त्यांचे अनुयायी तयार झाले. त्या काळी परदेशी आध्यात्मिक क्षेत्रात अमली पदार्थांचा वापर सढळपणे होत असे. मेहेरबाबांनी या प्रकारावर विरोध व्यक्त केला. ‘गॉड इन ए पिल?’ अशा मथळ्याचे परिपत्रक काढून ‘अमली पदार्थांच्या सेवनाला देवाची परवानगी असेल तर देवाचे मोठेपण ते कसले?’, असा प्रश्न विचारून त्यांनी पाश्चिमात्य राष्ट्रांत आपली छाप पाडली. त्यामुळेच अमेरिकेतील हॉलिवुड चित्रनगरीतील कलावंत, साहित्यिक, विचारवंत, राजकारणी त्यांच्या पुरोगामी विचारांनी प्रभावित झाले. त्यातूनच अमेरिकेतील मायट्रल बीच या साउथ कॅरोलिना भागात ‘मेहेर स्पिरिच्युअल सेंटर’, तसेच ऑस्ट्रेलियातील ब्रिस्बेन येथे ‘अवतार्स ॲबोर्ड’ हे आश्रम स्थापन करण्यात आले. १९३१ साली ‘राजपुताना’ या बोटीतून ते प्रथम इंग्लंडला रवाना झाले होते. याच बोटीतून महात्मा गांधीदेखील दुसऱ्या गोलमेज परिषदेसाठी निघाले होते. जगभरातील अनेक देशांत झपाटल्यागत हिंडून त्यांनी आध्यात्मिक प्रेरणा देण्याचे काम केले.

दगड, धातू, वनस्पती, जंतू, मासे, पक्षी, प्राणी आणि माणूस यांच्यात आत्म्याची रूपे असतात आणि आत्म्याची अंतिम पायरी माणसामध्ये असते असे ते मानीत. त्यांच्या मते, साधारणपणे दीड हजार वर्षांनंतर पृथ्वीवर देवाचे अवतार बदलत असतात. झरतुष्ट्र, राम, कृष्ण, बुद्ध, येशू आणि मुहम्मद हे अवतारच होते असे ते मानीत. दोनदा मोटार अपघात झाल्यामुळे मेहेरबाबांच्या हिंडण्याफिरण्याला मर्यादा आली. त्यांनी आपल्या पाश्चिमात्य अनुयायांना दर्शनासाठी भारतात बोलावले, ‘द इस्ट-वेस्ट गॅदरिंग’च्या निमित्ताने. या मेळाव्यात त्यांनी अमली पदार्थांच्या सेवन करण्यावर सडकून टीका केली.

१० फेब्रुवारी १९५४ रोजी त्यांनी स्वत:ला उत्तर प्रदेशातील मेहेरस्थान येथे ईश्वराचा अवतार म्हणून जाहीर केले आणि ते ‘अवतार मेहेरबाबा’ या नावाने ओळखले जाऊ लागले. तेव्हापासून ‘अवतार मेहेरबाबा की जय’ हे घोषवाक्यदेखील बनले.

१० जुलै १९२५ पासून मेहेरबाबा यांनी मौनव्रत स्वीकारले. अवतार मेहेरबाबा यांनी विपुल धर्मादाय केला. कुष्ठरोग्यांसाठी आश्रयस्थाने स्थापिली. गरीब आणि मानसिक संतुलन बिघडलेल्या व्यक्तींसाठी मदतकार्य केले. आयुष्याच्या अखेरच्या श्वासापर्यंत त्यांनी मौनव्रत सुरू ठेवले होते.

मेहेरबाबांनी लिहिलेल्या ‘ओ परवरदिगार’, ‘पश्चात्तापाची प्रार्थना’, ‘प्रिय परमेश्वरा’ या प्रार्थना आजही त्यांचे भक्तगण म्हणत असतात. दर महिन्याच्या १२ तारखेला मेहेराबाद, अहमदनगर येथे धुनी प्रज्वलित केली जाते आणि भक्तगण तेथे मनोकामनांसाठी प्रार्थना करीत असतात. पाश्चिमात्य प्रसिद्ध संगीतिकांमध्येही अवतार मेहेरबाबांच्या प्रार्थना, विचार प्रतिबिंबित झालेल्या आढळतात. ‘बाबा ओ रिली’, ‘हू कम फर्स्ट’ ही काही अल्बमची नावे, ज्यांत मेहेरबाबांचे गुणगान गायिले आहे. ‘देअर ईज अ हार्टेक फॉलोइंग मी’ हे गीत त्यांना फार आवडत असे. मेहेरबाबांनी जगभर दिलेल्या प्रवचनांचे लिखित स्वरूप ‘मेहेरबाबांची प्रवचने’ म्हणून पाच खंडांत उपलब्ध आहेत. ३१ जानेवारी १९६९ रोजी अवतार मेहेरबाबा यांनी मेहेराबाद, अहमदनगर येथेच जगाचा निरोप घेतला.

— संदीप राऊत

## आकोटकर, नरसिंगजी महाराज

**विठ्ठलभक्त**

**जन्मदिनांक अनुपलब्ध – १८ जानेवारी १८८८**

अकोटचे संत नरसिंगजी महाराज शेगावचे विख्यात संत गजानन महाराज यांचे संतसांगाती म्हणून प्रसिद्ध होते. ते गजानन महाराजांपेक्षा वयाने खूप मोठे होते व गजानन महाराज नेहमीच त्यांना वडिलांचा मान देत असत. नरसिंगजी महाराज यांचा जन्म अकोट जवळील जळगाव नहाटे या गावी झाला. त्यांची नेमकी जन्मतिथी उपलब्ध नाही. त्यांच्या वडिलांचे नाव पुंजाजी व आईचे नाव राजूबाई होते. त्यांना रमाबाई नावाची एक सावत्र आईसुद्धा होती. नरसिंगजींना परशुराम व मांजाई ही दोन



सख्खी आणि जानुजी, रघुनाथ अशी दोन सावत्र भावंडे होती. दगडाचे देव बनवून नरसिंगजी एकटेच खेळत असत. त्या काळी शिक्षणाच्या गावोगावी सोयी नव्हत्या व मातापित्यांना शिक्षणाचे फार महत्त्व वाटत नसे, त्यामुळे नरसिंगजींचे लौकिक शिक्षण झाले नव्हते. लग्नानंतर त्यांना तीन अपत्ये झाली. आता ते संसारात रमतील असे वाटत असतानाच नरसिंगजी ईश्वरओढीने व्याकूळ झाले आणि त्यांनी संसारसुख असार मानून ते घर सोडून निघून गेले.

काही काळानंतर नरसिंगजींची थोर अवलिया संत कोतशहा अली यांच्याशी भेट झाली. नरसिंगजींचा शिष्य म्हणून त्यांनी स्वीकार केला. नरसिंगजी गुरूजवळ राहून त्यांची सेवा करू लागले आणि एकवीस दिवस उपवास करीत त्यांनी कठोर साधना आरंभली. गुरूचा थेट सहवास, मार्गदर्शन आणि गुरुकृपा यांमुळे त्यांची साधना सिद्धीस गेली व गुरूंकडून त्यांना आत्मज्ञान प्राप्त झाले. नरसिंगजींनी घरी परत यावे या इच्छेने घरच्या लोकांनी 'तुझी आई देवाघरी गेली' असा खोटाच निरोप पाठविला. त्या निरोपाचाही नरसिंगजींवर परिणाम झाला नाही. मात्र गुरू कोतशहा यांनी घरी जाण्याची आज्ञा केली. कोणी ब्रह्मपदाला पोहोचला तरी त्याहून आईचे स्थान श्रेष्ठ आहे, असा गुरूंनी त्यांना उपदेश केला. त्यानंतर नरसिंगजी घरी परतले; पण आईच्या निधनाची वार्ता खोटी आहे हे घरी जाताच त्यांच्या लक्षात आले व आईची समजूत घालून ते पुनश्च गुरुसेवेसाठी परतले.

पुढे त्यांना वाचासिद्धी प्राप्त झाली व ते बोलतील तसे घडू लागले. त्यांच्या या साक्षात्कारी शक्तीची कीर्ती सर्वदूर पसरली व दूरदूरचे भाविक त्यांच्या दर्शनास येऊ लागले. वृद्धापकाळामुळे १८ जानेवारी १८८८, माघ शुद्ध पौर्णिमा रोजी नरसिंगजींनी सर्वांना सांगून समाधी घेतली. त्यांच्या या समाधी सोहळ्यास खुद्द शेगावचे गजानन महाराज जातीने उपस्थित होते. अकोट येथे नरसिंगजींची समाधी आहे.

पंढरपूरच्या विठ्ठलाचे ते निस्सीम भक्त होते. ते सगुण भक्तीच्या परमोच्च अवस्थेस पोहोचलेले होते. पंढरपूर मंदिरातील विठ्ठलमूर्तीला एक आततायी वेडा भक्त दगड मारतो व त्यामुळे मूर्तीच्या पायाला तडा जातो, ही घटना स्वप्नदृष्टान्ताने नरसिंगजींना कळली व ते मलमपट्टी करण्यास धावत पंढरपूरला गेले, अशी त्यांची विठ्ठल देवतेशी तादात्म्यता होती. विठ्ठलाच्या थोर भक्तांमध्ये अकोटच्या या अवलिया संताचा, नरसिंगजींचा भाविक भक्त अग्रक्रमाने समावेश करतात.

— विद्याधर ताठे

## आंबेडकर, बाबासाहेब

***डॉ. आंबेडकर, भीमराव रामजी***

**धर्मचिकित्सक आणि धम्मप्रवर्तक, भारतीय राज्यघटनेचे शिल्पकार**

**१४ एप्रिल १८९१ – ६ डिसेंबर १९५६**

☛ ***मुख्य चरित्रनोंद - समाजकारण खंड***

**भा**रतरत्न डॉ. भीमराव रामजी आंबेडकर हे डॉ. बाबासाहेब आंबेडकर या नावाने प्रसिद्ध असून त्यांचा जन्म मध्यप्रदेशातील महू या ठिकाणी झाला. त्यांचे मूळ गाव रत्नागिरी जिल्ह्यातील मंडणगडपासून पाच किलोमीटर अंतरावर असणारे आंबवडे हे होय. घराण्याचे कुलनाव सपकाळ होते. वडील रामजी सपकाळ हे सैन्यदलात सुभेदार होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा एका वाक्यात परिचय करून द्यायचा तर



असे म्हणता येईल, की ते आधुनिक युगाचे स्मृतिकार होते. त्यांनी तयार केलेल्या स्मृतिनुसार (संविधानानुसार) आपल्या देशाची राजकीय, सामाजिक प्रक्रिया चालू आहे. समाजशास्त्रज्ञ, विचारवंत, प्राध्यापक, अर्थशास्त्रज्ञ, पत्रकार, सामाजिक नेतृत्व अशा विविध पैलूंनी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या जीवनाचा अभ्यास करता येतो.

डॉ. आंबेडकर यांच्या नानाविध पैलूंपैकी एक महत्त्वाचा पैलू म्हणजे ते धर्मप्रवर्तक होते. सखोल चिंतन आणि प्रदीर्घ अभ्यास यांच्या माध्यमातून 'मानवाचा कल्याणकारी धम्म' असणाऱ्या बौद्ध धम्माचा स्वीकार डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी आपल्या लाखो अनुयायांसोबत १४ ऑक्टोबर १९५६ रोजी केला आणि शतकानुशतके जातिभेद, अस्पृश्यता यांच्यामुळे शोषित जीवन जगणाऱ्या समूहाला नवा मार्ग मिळाला. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना शालेय जीवनात गुरुवर्य केळुसकर यांनी गौतम बुद्धांचे चरित्र सप्रेम भेट दिले होते. त्या काळात बाबासाहेबांच्या मनावर तथागतांच्या विचारांचा प्रभाव निर्माण झाला असावा. पुढच्या काळात डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा संपूर्ण लढा हा समाजसुधारणेइतकाच धर्मसुधारणेचाही होता. कारण जातीव्यवस्था ही हिंदूधर्माची अविभाज्य घटक असल्यामुळे माणसा-माणसांमधील भेदांच्या पुरातन तटबंदीला सुरुंग लावणे आवश्यक होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी हिंदू धर्माचे वर्णन करताना म्हटले आहे की, 'तत्त्वज्ञानाच्या बाबतीत हिंदू धर्मासारखा दुसरा कोणताही धर्म उच्चकोटीचा नाही; पण व्यवहाराच्या बाबतीत हिंदू धर्मासारखा पशुवत दुसरा कोणताही धर्म नाही.' तत्त्वज्ञान आणि व्यवहार यांच्यातील हे अंतर कमी करण्याचा प्रयत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी चळवळीच्या माध्यमातून केला. महाड चवदार तळे सत्याग्रह प्रसंगी त्यांनी सांगितले की, ''ही सभा समतेची मुहूर्तमेढ रोवण्यासाठी बोलावली आहे.'' या सभेत त्यांनी हिंदुमात्रांच्या मुक्तीचा जाहीरनामा प्रकाशित केला. अस्पृश्यता, जातिभेद यांना अधिष्ठान देणारी, धार्मिक आधार देणारी मनुस्मृती दहन केली. सतत तीन वर्षे चाललेल्या काळाराम मंदिर प्रवेश आंदोलनातून समानतेचा हक्क मिळवण्याचा प्रयत्न केला.

हिंदुधर्मात काही सुधारणा होईल म्हणून अखंड चळवळ चालवणाऱ्या डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना तेव्हा विपरीत अनुभवांचा सामना करावा लागला. हिंदू धर्माचार्य आणि सामाजिक नेतृत्व यांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या आवाहनाला आणि प्रयत्नांना सकारात्मक प्रतिसाद दिला नाही आणि शेवटी येवला येथे १९३५ साली डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी घोषणा केली, ''मी हिंदू धर्मात जन्मलो; पण हिंदू धर्मात मरणार नाही.'' डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या या घोषणेनंतर ख्रिश्चन व शीख धर्मांकडून संपर्क करण्यात आला होता. पण डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी पुढे एकवीस वर्षे वाट पाहिली आणि तथागतांच्या तत्त्वज्ञानाचा अंगीकार केला. भारतात दुसऱ्यांदा धर्मचक्र प्रवर्तन झाले. १९३५ ते १९५६ या काळात डॉ. बाबासाहेब आंबेडकर बौद्ध तत्त्वज्ञानाचा सखोल अभ्यास करत होते. येवला परिषदेनंतर काही आठवड्यांतच पुण्यात एक परिषद आयोजित करण्यात आली होती. त्या परिषदेत नवा धर्म स्थापन करण्याचा कार्यकर्त्यांनी आग्रह केला. डॉ. आंबेडकरांनी त्यांना दाद दिली नाही. ३१ मे १९३६ रोजी मुंबईत दादर येथे धर्मांतर

परिषद झाली. या परिषदेत भाषणाचा शेवट करताना ते म्हणाले, ''बुद्धाला शरण जा.'' या काळात डॉ. आंबेडकर अनेक बौद्ध भिख्खूंना भेटले. ऑक्टोबर १९४८ मध्ये डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा 'शूद्र कोण होते' हा ग्रंथ प्रकाशित झाला. त्यात त्यांनी, 'बौद्धांनी बौद्धधर्माचा त्याग करण्याच्या ब्राह्मणांच्या आदेशाची अंमलबजावणी केली नाही, त्यांच्यावर ब्राह्मणांनी अस्पृश्यता लादली', असा सिद्धान्त मांडला. १९५० मध्ये बुद्धजयंती जाहीरपणे साजरी केली गेली. त्या वेळी भाषण करताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले होते, ''समाजाची धारणा करणारा, आधुनिक काळात मार्गदर्शन करू शकणारा, बुद्धिवादावर आधारित एकमेव धर्म म्हणजे बौद्ध धर्म होय.'' २५ जुलै १९५० रोजी वरळीच्या बौद्ध मंदिरात डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी भाषण केले तेव्हा त्यांनी घोषणा केली की, ''मी माझं उर्वरित आयुष्य बुद्धाच्या सेवेत आणि बौद्धाच्या प्रचाराच्या कामी व्यतीत करणार आहे.''



१९१० ते १९५५ या काळात बुद्धचरित्र आणि बौद्ध धर्मावर डॉ. आंबेडकरांनी अनेक लेख लिहिले आणि व्याख्याने दिली. डिसेंबर १९५४ मध्ये जागतिक बौद्ध परिषदेच्या रंगून येथील तिसऱ्या अधिवेशनात त्यांनी उत्साहाने भाग घेतला. जानेवारी १९५५ मध्ये त्यांनी देहू रोडला एका बुद्धविहाराचे उद्‌घाटन केले आणि बुद्धमूर्तीची प्रतिष्ठापना केली. मार्च १९५६ मध्ये त्यांनी 'बुद्ध आणि त्याचा धम्म' हा आपला ग्रंथ लिहून पुरा केला. मे महिन्यात डॉ. आंबेडकर यांनी बी.बी.सी.वर एक प्रकारचे बौद्ध प्रवचन दिले आणि अखेरीस १४ ऑक्टोबर १९५६ रोजी नागपूर येथे आपल्या लक्षावधी अनुयायांसह डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी बौद्धधम्मात प्रवेश केला. डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे नव्या युगाचे धर्म- प्रवर्तक ठरले. अडीच हजार वर्षांपूर्वी महाकारुणिक तथागताने सांगितलेले तत्त्वज्ञान आणि जीवनपद्धती डॉ. आंबेडकरांनी स्वीकारली.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी धर्मांतर केले असे म्हणता येणार नाही. कारण, त्यांनी इथल्या मातीत जन्मलेल्या आणि इथल्या संस्कृतीतून विकसित झालेला धम्म स्वीकारला. गोलमेज परिषदेच्या वेळी डॉ. आंबेडकरांनी दलितवर्गांना प्रोटेस्टंट हिंदू किंवा नॉन-कनकॉमिस्ट हिंदू म्हणा अशी मागणी केली होती. त्यांच्या मनात हिंदुधर्माविषयी अढी नव्हती, तर धर्म-तत्त्वज्ञान यात सुधारणेला प्रचंड वाव आहे, अशी त्यांची भूमिका होती. ते म्हणाले होते, ''जर माझ्या मनात द्वेषाची, सुडाची भावना असती, तर पाच वर्षांच्या आत या देशाचे वाटोळे केले असते.''

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी बौद्ध धम्म स्वीकारून हिंदू संस्कृती न सोडण्याची खबरदारी घेतली आहे. ते म्हणाले होते, ''जो धर्म या देशातील प्राचीन संस्कृतींना धोका देईल किंवा अस्पृश्यांना अराष्ट्रीय बनवील असा धर्म मी केव्हाही स्वीकारणार नाही. कारण, देशाच्या इतिहासात विध्वंसक म्हणून स्वतःच्या नावाची नोंद करून घेण्याची माझी इच्छा नाही.'' यावरूनच असे सिद्ध होते, की डॉ. आंबेडकरांनी स्वीकारलेला धम्म हा या देशातील संस्कृती, इतिहास आणि परंपरा यांच्याशी विसंगत नाही.

डॉ. आंबेडकरांचे काही टीकाकार म्हणतात, की आंबेडकरांनी उपदेशिलेला धर्म हा बौद्धधर्म नसून

आंबेडकरधर्म आहे. त्यांचा धर्म आवश्यक असेल तेव्हा हत्या करण्यास अनुज्ञा देतो. त्यांचा भारतीयांना अमर संदेश असा आहे की, त्यांनी या देशाच्या स्वातंत्र्यासाठी रक्ताचा शेवटचा थेंब असेपर्यंत लढले पाहिजे.

कुप्रथा, रूढी, अंधश्रद्धा, उच्चनीचता, जातिभेद यांना कंटाळून आणि या शोषणापासून मुक्त होण्यासाठी आंबेडकरांनी तथागताचा धम्म स्वीकारला. १४ ऑक्टोबर १९५६ रोजी धम्मदीक्षा घेतल्यावर संपूर्ण भारत बौद्धमय करण्याची त्यांनी प्रतिज्ञा केली होती; पण धम्मदीक्षेनंतर काही दिवसांतच ६ डिसेंबर १९५६ रोजी डॉ. आंबेडकरांचे महापरिनिर्वाण झाले.

– रवींद्र गोळे

## आनंद भारती स्वामी

***नाखवा, पांडू गुलाम***

**स्वामी समर्थभक्त, कीर्तनकार**

**१८३१ - १९०१**



**स्वा**मी आनंद भारती म्हणजेच पूर्वाश्रमीचे पांडू गुलाम नाखवा यांचा जन्म ठाणे चेंदणी कोळीवाड्यात झाला. महाराजांच्या घरची स्थिती गरिबीची होती. समुद्रसफरी करून मासेमारी करणे हा पिढीजात धंदा होता. पांडूने शिक्षण घेण्यापेक्षा धंद्यात लक्ष घालावे अशी वडिलांची इच्छा होती. त्यामुळे बालवयातच पांडू मच्छिमारी करू लागला. पांडूला बालवयात भगवंताच्या उपासनेत मोठी गोडी होती. नामसंकीर्तनात, ईश्वरभक्तीत तो सदैव लीन असे. 'भक्ति बिन कोई तर नहीं जावे' असे त्याचे मत होते. आपल्या मासेमारीच्या धंद्यानिमित्त होडीतून, पडावातून दर्यावर ये-जा करी, तरी त्यांची प्रात:काळी समुद्रस्नान, भजन, प्रार्थना कधीही चुकत नसे.

परमेश्वराची आराधना माणसाने सदासर्वदा केली पाहिजे अशा मताच्या पांडूच्या रूपाने दर्यावर मूर्तिमंत भगवंतच वावरत होता. शरीर धंद्यात गुंतले असले, तरी मन परमेश्वरसेवेत लीन झाले. ते हळूहळू जहाजाचे मुख्य अधिकारी म्हणजेच तांडेल झाले. विसाव्या वर्षी त्यांचा विवाह झाला; पण ते संसारात रमले नाहीत.

एकदा पांडू महाराज दूरवरच्या फत्तेमारीस निघाले. जहाज अतिशय खोल समुद्रात होते. अचानक प्रचंड वादळ झाले. प्रचंड लाटा उसळू लागल्या. बघताबघता जहाज बुडू लागले, समुद्रात जलसमाधी घेण्याची वेळ येऊन ठेपली. इतर खलाशांच्या जीवन-मरणाचा प्रश्न होता. त्यांच्या जीवनाची जबाबदारी महाराजांवर होती. अशा वेळी महाराज पद्मासन घालून ध्यानस्थ बसले. त्यांनी स्वामी समर्थांचा धावा केला. आपले पुढील आयुष्य त्यांनी समर्थांच्या सेवेसाठी अर्पण करण्याची शपथ घेतली. वादळ एकाएकी थांबले. फत्तेमारी सुखरूप पार पडून जहाज सुखरूप परत आले आणि लागलीच महाराजांनी अक्कलकोटला समर्थांच्या दर्शनासाठी प्रयाण केले.

*'जया सद्‌गुरू पावला । धन्य तोचि जगी झाला ।'*

या भावनेने महाराज अक्कलकोटला श्री स्वामी समर्थ मठामध्ये पोहोचले. त्या वेळी श्री स्वामी समर्थ इतर शिष्यांसमवेत नामसंकीर्तनात देहभान विसरून गुंग झाले होते. महाराज दरवाजात येताच श्री स्वामी समर्थ समाधीतून एकदम जागे झाले आणि उठून उभे राहिले. पांडू महाराजांनी धावत जाऊन स्वामींचे पाय धरले आणि सद्‌गदित होऊन म्हणाले, ''महाराज, मला आता संसार नको. आपली सेवा हाच माझा संसार, मला दुसरे काही

नको. आपण मला आशीर्वाद द्या.'' त्यांना स्वामी समर्थांनी पोटाशी धरले. सारे शिष्य हे मनोहर दृश्य विस्मयाने पाहू लागले. समर्थ म्हणाले, ''अरे कोळ्याच्या पोरा, साध्या सागराला एवढा घाबरतोस? तुला तर या दुनियेचा सागर तरून जायचे आहे.'' समर्थांनी असे म्हणून त्यांना अनुग्रह दिला.

समर्थांच्या आज्ञेनुसार ते ठाण्याला परत आले आणि त्यांनी आपले कार्य सुरू केले. महाराजांनाही इतर साधुसंतांप्रमाणे प्रथम निंदा, टवाळी, अपकीर्ती सहन करावी लागली; पण महाराज अत्यंत मृदू आणि कृपाळू होते. त्यांनी हे सारे निमूटपणे सहन केले; परंतु हळूहळू त्यांच्या सामर्थ्याची प्रचिती येऊन अनेक लोक त्यांच्या भजनी रंगू लागले. ठाण्याला औदुंबराखाली चालणाऱ्या भजन-कीर्तनात सारे रंगून जात. त्यांनी लोकांना अनेक दृष्टान्त दिले. स्वामी समर्थांची आठवण झाली की ते लगेच अक्कलकोटची वाट धरत. समर्थांची भेट घेऊन तृप्त होत आणि परत येऊन नव्या शक्तीनिशी कामाला लागत. त्यांच्याबरोबर त्यांचे ठाण्यातील शिष्यही अक्कलकोटला जाऊन यायचे. १८६६ साली सुमारे २,५०० रु. खर्च करून स्वामी समर्थांच्या पादुका ठाण्याला सध्याचे दत्तमंदिर आहे तेथे आणून पांडूबुवांनी मठ बांधला आणि त्याची प्राणप्रतिष्ठा केली. त्या वेळी स्वामींनी 'ये आनंद लेव व भारती हो जाव' असे उद्‌गार काढले व यापुढे भगवी वस्त्रे परिधान कर असे सांगितले. पुढे हळूहळू त्यांचे 'आनंद भारती' हे नाव रूढ झाले.

ते मठातच राहू लागले. पादुकांच्या रूपाने प्रत्यक्ष स्वामी समर्थच या ठिकाणी वास करतात, अशी त्यांची धारणा होती. महाराजांचा शिष्यपरिवारही खूप वाढला होता. भोळेभाबडे कोळी, ठाणकर, पाटील, हिराजी मेस्त्री, केरबा सहानी, मॅजिस्ट्रेट साहेब गोविंदराव गाडगीळ, बापूजी बदलापूरकर, तसेच त्यांचे पट्टशिष्य श्री गोपाळराव विद्वांस असा शिष्यपरिवार होता. विद्वांस हे मूळ कोकणातले; पण व्यवसायामुळे पुण्याला असत. त्यांनी 'गुरुलीलामृत' नावाने महाराजांचे चरित्र लिहिले आहे. समाजातील सर्व थरांतील म्हणजे कोळी, भंडारी, आगरी, ब्राह्मण, सुतार, तेली सर्व मंडळी महाराजांचे भाविक भक्त होते. महाराजांचे आपल्या भक्तांवर जिवापाड प्रेम होते.

श्री आनंद भारती महाराज मोक्षाय व जनहिताय तब्बल सत्तर वर्षांचे जीवन जगले. इ.स. १९०१ मध्ये मार्गशीर्ष शुद्ध पंचमीला, सोमवारी रात्री स्वामी समाधिस्थ झाले. कोळी समाज त्यांच्या पुण्यतिथीनिमित्त दर चंपाषष्ठीस मोठा उत्सव साजरा करतो. महाराजांच्या मार्गदर्शनाने जीवनदिशा मिळालेल्या ठाणे येथील कोळी समाजाने चेंदणी, कोळीवाडा येथे 'श्री आनंद भारती समाज' या नावाची भव्य इमारत बांधून त्यांचे दिव्य स्मारक उभारले आहे. महाराजांचे अखंड सेवेचे व्रत ही संस्था सध्याही चालवत असून आनंद भारती समाजातर्फे भजन, पुस्तकालय, व्यायामशाळा, क्रिकेट, पतपेढी, महिला विकास अशी कार्ये सतत चालू आहेत.

प्रतिवर्षी या समाजातर्फे दर चंपाषष्ठीस आनंद भारती महाराजांच्या पुण्यतिथीचा महोत्सव मोठ्या प्रमाणावर साजरा केला जातो. श्री आनंद भारती स्वामींची समाधी श्री लक्ष्मी नारायण मंदिर, नौपाडा, गावदेवी मंदिराजवळ आहे.

— संपादक मंडळ

## आनंदऋषी

***नेमीकुमार देवीचंदजी***

**जैन आचार्य**

**२६ जुलै १९०० — २८ मार्च १९९२**

**आ**नंदऋषीजी यांचा जन्म अहमदनगर जिल्ह्यातील चिंचोडी (शिराळ) या छोट्याशा गावात झाला. त्यांच्या आईचे नाव हुलसादेवी व वडिलांचे नाव देवीचंदजी असे होते. चिंचोडी गावातील एक प्रतिष्ठित व्यक्ती म्हणून देवीचंदजी यांना सर्व जण सन्मान देत होते. आनंदऋषींचे मूळ नाव नेमीकुमार असे होते. जैन धर्मातील पाच संप्रदायांनी आपसातील मतभेद मिटवून आनंदऋषींना 'आचार्य' म्हणून स्वीकारले. छोट्याशा नेमीकुमारला लहान वयातच पितृवियोगाचे दु:ख सोसावे लागले. आई



हुलसादेवी यांनी मोठ्या हिमतीने नेमीकुमारांचे संगोपन केले व त्यांच्यावर उत्तमोत्तम असे धार्मिक संस्कार केले. छोटा नेमीकुमार हा मातृभक्त होता. मुलांबरोबर खेळण्यास न जाता तो आईस घरकामात मदत करीत असे. आईने केलेल्या संस्कारांमुळेच नेमीकुमारचा स्वभाव व वृत्ती धर्मपरायण झालेली होती. चिंचोडीसारख्या छोट्या गावात जैन धर्मगुरू श्री रत्नऋषीजी महाराज आले असता त्यांच्या सेवेचा लाभ छोट्या नेमीकुमारला झाला व त्यांच्या सत्संगाने-सहवासाने नेमीकुमारच्या मनात जैन धर्मासाठी आपले जीवन व्यतीत करण्याचा संकल्प उदयमान झाला. नेमीकुमारची बुद्धी, सेवावृत्ती आणि धर्मनिष्ठा लक्षात घेऊन श्री रत्नऋषी महाराज यांनी त्यांच्या आईकडे नेमीकुमारची मागणी केली.

''या मुलाचा जन्म आपल्या धर्माचे नाव उज्ज्वल करण्यासाठी झाला आहे, त्याला तुम्ही केवळ तुमच्या कुटुंबाचा समजू नका, त्याचा जन्म समाजकार्यासाठी झालेला आहे,'' असे सांगून श्री रत्नऋषींनी माता हुलसादेवीची समजूत घातली आणि जैन धर्म प्रचारार्थ नेमीकुमारला आईने व चिंचोडी गावकऱ्यांनी आनंदाने व अभिमानाने निरोप दिला.




श्री रत्नऋषी महाराजांनी नेमीकुमारच्या शिक्षणाची व्यवस्था केली. कुशाग्र बुद्धीच्या या बालकाने अपेक्षेपेक्षा अल्पवेळेतच सर्व विद्या आत्मसात केल्या व शिक्षण पूर्ण केले. १९१३ साली एका रविवारी नगर जिल्ह्यातील 'मिरी' येथे श्री रत्नऋषींनी नेमीकुमारला जीन शासनाची सेवा करण्यासाठी समारंभपूर्वक दीक्षा दिली. दीक्षाविधीनंतर नेमीकुमारचे नाव 'आनंदऋषी' झाले.

आनंदऋषींचे जीवन म्हणजे विद्येसाठीची अविरत तपश्चर्या आहे. श्री रत्नऋषींची इच्छा होती, की आपल्या शिष्याने सर्व शास्त्रांचा, दर्शनांचा, संस्कृत वाङ्मय, प्राकृत ग्रंथांचा अभ्यास करून एक प्रकांडपंडित, प्रचंड व्यासंगी बहुमुखी विद्वान असा लौकिक मिळवावा. गुरूची ही इच्छा लक्षात घेऊन आनंदऋषी यांनी सकल शास्त्रांचा अभ्यास केला. त्यासाठी त्यांनी संस्कृतचे राष्ट्रीय पंडित कृष्णाजीशास्त्री, पंडित व्यंकटेश लेलेशास्त्री व पंडित सिद्धेश्वरशास्त्री अशा विद्वानांकडे जाऊन संस्कृतचा अभ्यास केला. बनारस विश्वविद्यालयातील पंडित राजधारी त्रिपाठी यांनीही आनंदऋषींना व्याकरण, दर्शन, साहित्याचे विशेष ज्ञान दिले. तसेच, आनंदऋषींनी जैनागमांचाही सूक्ष्म अभ्यास केला. काही वर्षांतच आनंदऋषींची एक कुशाग्र बुद्धीचा व्यासंगी विद्वान अशी सर्वत्र ख्याती झाली.

गुरू रत्नऋषीजींचे स्वप्न साकार झाले; पण शिष्याचे पुढील काळातील दिग्विजय पाहण्यास गुरू राहिले नाहीत. इ.स. १९२७ मध्ये गुरू रत्नऋषी महाराज यांचे निर्वाण झाले. गुरूंच्या वियोगाचे

आनंदऋषींना दु:ख वाटले; पण मृत्यू हे एक शाश्वत सत्य असल्याने त्याबद्दल शोक न करता गुरूंच्या आज्ञेनुसार ते नव्या जोमाने, नव्या जबाबदाऱ्या पेलण्यास सिद्ध झाले. ज्ञानप्रसाराचे महत्त्व लक्षात घेऊन आनंदऋषी यांनी 'त्रिलोक जैन ज्ञानप्रसारक मंडळा'ची स्थापना केली आणि जागोजागी शाळा, विद्यार्थी वसतिगृहे सुरू केली. त्याचबरोबर, जैन समाजात एकी होण्यासाठी वेगवेगळ्या नऊ संघांना त्यांनी एकाच आचार्यांच्या नेतृत्वाखाली एकत्र आणण्याचा प्रयत्न केला. नऊ संघांपैकी पाच संघ एकत्र होण्याची ऐतिहासिक घटना घडली व या पाच संघांनी आचार्य म्हणून खुद्द आनंदऋषी यांनाच नेतृत्व दिले.

१९४९ मध्ये ब्यावर (राजस्थान) येथे ही ऐतिहासिक घटना घडली. १९५२ मध्ये 'श्रीवर्धमान स्थानकवासी जैन श्रमण संघ' स्थापन करण्यात त्यांना यश आले. त्याचे प्रथम आचार्य श्री. आत्माराम यांना करण्यात आले. श्री. आत्माराम यांच्यानंतर 'आचार्य' हे सर्वोच्चपद आनंदऋषी यांच्याकडे चालून आले.

भगवान महावीरांचा संदेश घराघरांत पोहोचविण्यासाठी त्यांनी अखंड प्रवास व सत्संग, चतुर्मास सोहळे केले. शरीर थकले तरी ते अखंड कार्यरत होते. अखंड पायी विहार (पदयात्रा) आणि सतत बोलण्याचे, प्रवचनांचे कार्यक्रम याचा त्यांच्या तब्येतीवर परिणाम होत होता; पण महावीर संदेश प्रचार हेच आपले जीवनकार्य आहे म्हणून ते श्रमाची, कष्टाची पर्वा करत नव्हते. पुणे येथे १९७५ मध्ये आनंदऋषी यांच्या पंचाहत्तरीनिमित्त अमृतमहोत्सव सोहळा साजरा करण्यात आला व समाजसेवेसाठी 'आनंद फाउण्डेशन' नावाच्या संस्थेची स्थापना करण्यात आली. रक्तपेढी, नेत्रपेढी अशी अनेक प्रकारची समाजकार्ये सुरू करण्यात आली.

वयाच्या ब्याण्णवाव्या वर्षी अहमदनगर येथेच त्यांचे निर्वाण झाले.

— विद्याधर ताठे

**संदर्भ :**

१. *'आचार्य आनंदऋषी स्मृती गौरव ग्रंथ'.*

## आठवले, पांडुरंगशास्त्री वैजनाथशास्त्री

**स्वाध्याय परिवाराचे प्रणेते**

**१९ ऑक्टोबर १९२० - २५ ऑक्टोबर २००३**



**यो**गेश्वर कृषी, वृक्षमंदिर, मत्स्यगंधा, घरमंदिर अशा एकापेक्षा एक विलक्षण सामाजिक उपक्रमांचे यशस्वी शिल्पकार, स्वाध्याय परिवाराचे प्रणेते, तत्त्वज्ञान विद्यापीठाचे संस्थापक, थोर विचारवंत, तत्त्वचिंतक पांडुरंगशास्त्री वैजनाथशास्त्री आठवले यांचा जन्म कोकणातील रायगड जिल्ह्यातील 'रोहा' येथे वेदशास्त्रसंपन्न घराण्यात झाला. त्यांचे वडिल रोहे येथे सरस्वती संस्कृत पाठशाळा चालवीत होते. या पाठशाळेत पांडुरंगशास्त्री यांचे वडिलांपाशीच प्रारंभिक शिक्षण झाले. दादांच्या आईचे नाव पार्वता होते. आजी सरस्वतीबाईंचा छोट्या पांडुरंगवर विशेष जीव होता. आजीचे निधन झाल्यानंतर वैजनाथशास्त्री रोह्याहून मुंबईस स्थलांतरित झाले. त्यांनी मुंबईच्या गिरगाव भागात माधवबाग येथे पाठशाळा सुरू केली आणि याच पाठशाळेत दादांचा भारतीय दर्शनशास्त्रे, वेदान्तासह भारतीय व पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाचा अभ्यास झाला.

दादा एकपाठी होते. वाचनाची, अभ्यासाची उपजत आवड यामुळे अल्पकाळातच त्यांचा विद्याव्यासंग इतका दांडगा झाला, की अनेक थोर अभ्यासक थक्क होऊन जात. मराठी, संस्कृत, गुजराती, इंग्रजी, हिंदी अशा

अनेक भाषांवर त्यांनी प्रभुत्व संपादन केले होते. वयाच्या केवळ बाविसाव्या वर्षी, १९४२ मध्ये त्यांनी वडिलांच्या आज्ञेने भगवद्‌गीतेवर पहिले प्रवचन दिले आणि त्यांच्या वाग्यज्ञाचा श्रीगणेशा झाला. त्यांनी एका नव्या दृष्टिकोनातून, नव्या समाजाला सहज पटेल, आवडेल अशा शब्दांत आपले विचार मांडले. भक्तीला सामाजिक शक्तीचे रूप दिले.

दुसऱ्या महायुद्धानंतर जागतिक शांतता, सलोख्याच्या हेतूने १९५४ साली जपान येथे झालेल्या जागतिक तत्त्वचिंतक परिषदेसाठी पांडुरंगशास्त्री यांना विशेष निमंत्रित केले गेले. तेथे त्यांनी 'कृष्णम् वंदे जगद्‌गुरु' या विषयाद्वारे भारतीय अवतारकल्पनेवर आपले उदात्त, व्यापक विचार मांडून सर्वांना प्रभावित केले. त्यांची विद्वत्ता, मानवकल्याणाची उदात्त, व्यापक भूमिका आणि नवा दृष्टिकोन अमेरिकन तत्त्वचिंतकांना इतका भावला, की त्यांनी अमेरिकन नागरिकत्वाचा प्रस्ताव दादांपुढे ठेवला; पण दादांनी भारतभूमीत राहूनच कार्य करण्याचा आपला मनोदय ठामपणे व्यक्त केला.

१९५५ साली दादांनी 'स्वाध्याय परिवार' या कल्पनेला मूर्त रूप देण्याच्या दृष्टीने एकोणीस स्वाध्यायींना सौराष्ट्रात पाठविले आणि कार्यारंभ केला. 'भक्तिफेरी' असे या अभियानास नाव दिले गेले. आता या स्वाध्यायींची संख्या कित्येक लाख झालेली आहे. '''स्व'ला ओळखा, दुसऱ्यांच्या 'स्व'चा आदर करा, तेजाची पूजा करा, प्रेमभाव जपा, स्वत:ला दुर्बल, शूद्र समजू नका, आपल्या हृदयस्थ देवत्वाला ओळखून आत्मगौरव संपादन करा,'' असे सांगत स्वाध्याय परिवाराचे हे कार्य दादांनी मराठी एवढेच गुजराती बांधवांमध्ये, तेही आदिवासी, कोळी या समाजामध्ये मोठ्या आत्मीयतेने रुजविले. त्यांनी महिन्यातील एक दिवस देवासाठी, समाजासाठी समर्पितभावाने कार्य करण्यास स्वाध्यायींना शिकविले व भक्तीला पूजापाठापलीकडे नेऊन सामाजिक कार्याचा आशय प्राप्त करून दिला. यातून 'योगेश्वर कृषी', 'मत्स्यगंधा' अशा उपक्रमांचा प्रारंभ झाला व ते अपेक्षेपेक्षा अधिक यशस्वी झाले. स्वाध्याय परिवाराचे कार्य पाहून खुद्द विनोबा भावे यांच्यासारखे भूदान चळवळीचे प्रणेतेही चकित झाले व त्यांनी स्वत:हून पांडुरंगशास्त्रींची भेट घेऊन स्वाध्याय परिवाराच्या कार्याचे सूत्र समजून घेतले. '' 'स्व'चा आत्मगौरव करीत परस्पर भेद, द्वेष विसरून प्रेमाने माणूस माणसाजवळ आणण्याचा स्वाध्याय हा एक बुद्धिगम्य मार्ग आहे,'' असे दादांनी त्यांना सांगितले. या दरम्यान पांडुरंगशास्त्र्यांनी ठाणे येथे तत्त्वज्ञान विद्यापीठाची स्थापना केली. या विद्यापीठाचे वेगळेपण लक्षात घेऊन भारताचे राष्ट्रपती डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन यांनी ठाण्याला भेट देऊन तत्त्वज्ञान विद्यापीठाची पाहणी केली व दादांचे विशेष कौतुक केले. दादांनी या विद्यापीठातील अभ्यासक्रमाच्या विदेशांतही शाखा उघडल्या. हिंदू धर्मासह ख्रिश्चन, इस्लाम, हिब्रू अशा विविध धर्मांचा निकोप दृष्टीने अभ्यास करून मग तुलनात्मकदृष्ट्या हिंदुधर्मविचार किती श्रेष्ठ, उदात्त, व्यापक आहे हे विदेशांतील विद्यार्थ्यांना स्वत:च्याच अभ्यासाद्वारे त्यांनी जाणवून दिले.

गुजरात, राजस्थानच्या सतत अवर्षणग्रस्त भागांत स्वाध्यायींनी तेथील गावकऱ्यांना बरोबर घेऊन श्रमदानाने ३०० तळी खोदली व पाण्याचा बिकट प्रश्न सोडविण्यात आपले कृतिशील योगदान दिले, तसेच माधववृंद आदी उपक्रमांद्वारे दरवर्षी लाखो झाडे लावून ती चांगली जगविण्याची दक्षताही घेतली.

१९८६ साली दादांनी उत्तर प्रदेशातील गंगायमुनेच्या संगमस्थळी, प्रयाग येथे 'तीर्थ मिलन' महामेळावा घेतला. या मेळाव्यास तीन लाख स्वाध्यायी सहभागी झाले होते. या मेळाव्याच्या सर्व व्यवस्था स्वाध्यायींनी स्वत: श्रमदानाने निर्माण केल्या होत्या, तर २००१ साली दादांच्या सहस्रचंद्रदर्शनाच्या निमित्ताने गुजरातमध्ये पंधरा लाख स्वाध्यायींचा महामेळावा झाला होता.

दादांची ग्रंथसंपदाही भारतीय विचारांचे, चिंतनाचे उदात्त दर्शन आहे. 'संस्कृती पूजन', 'दशावतार', 'वाल्मीकी रामायण', 'श्रीकृष्ण जीवनदर्शन', 'श्राद्ध'

(भाग १-२), 'ऋषिस्मरण' इत्यादी अनेक विचारगर्भ पुस्तके लिहून दादांनी भारतीय ऋषिचिंतनाचे तेज व ओज दाखवून दिलेले आहे. दादांची वाङ्मयसंपदा हे मराठीचे अक्षरवैभव आहे.

दादांनी भारत सोडून अन्यत्र अमेरिका, इंग्लंड या देशांत जाऊन स्थायिक होण्याचे नाकारले, यात त्यांची राष्ट्रनिष्ठा दिसते. तरीपण, त्यांनी अनेक देशांमध्ये स्वाध्याय परिवाराचे कार्य DAY-'डे' (Divine Association of Yogeshwar) अशी संस्था स्थापन करून विस्तारलेले आहे. अनेक देशांत त्यांच्या 'भक्तिफेरी'ने चांगलीच जागृती केलेली आहे. दादांचे कार्य पुरस्कारासाठी नाही, तरी त्यांच्या कार्याचा विविध संस्था, संघटनांनी राष्ट्रीय पुरस्कार देऊन गौरव केलेला आहे. 'महात्मा गांधी सेवा' पुरस्कार, 'लोकमान्य टिळक' राष्ट्रीय पुरस्कार यांबरोबरच त्यांना 'रेमन मॅगसेसे' पुरस्कारही मिळालेला आहे. 'मनुष्य ही ईश्वराची सर्वोत्कृष्ट निर्मिती आहे, तिचा गौरव करा' या दादांच्या बोधामुळेच त्यांचा जन्मदिवस 'मनुष्य गौरव दिन' म्हणून स्वाध्यायी देशभर, विदेशांत साजरा करतात. २००३ मध्ये दिवाळीच्या प्रकाशोत्सवात लक्ष्मीपूजनाच्या दिनी दादांनी आपली इहलोकीची यात्रा संपविली. त्यांच्या कन्या सुश्री धनश्री तळवलकर या दादांचा वसा व वारसा पुढे चालवीत आहेत. स्वाध्याय परिवाराचे कार्य वर्धिष्णू होत आहे.

— विद्याधर ताठे

## आफळे, गोविंदस्वामी

**राष्ट्रीय कीर्तनकार, कीर्तन केसरी**

**१५ फेब्रुवारी १९१७ – १ नोव्हेंबर १९८८**



कृष्णा नदीच्या काठावर, साताऱ्याजवळील माहुली येथे गोविंदस्वामी आफळे यांचा जन्म झाला. मातु:श्री चिमुताई या रामशास्त्री प्रभुण्यांच्या घरातल्या असून त्या कर्तव्यनिष्ठ, कडक शिस्तीच्या आणि नीतिमान होत्या. श्रीसमर्थ रामदासस्वामींच्या समाधी मंदिरात दासनवमीच्या कीर्तनाचा मान आफळे घराण्याला लाभला होता. साडेतीनशे वर्षांची कीर्तनपरंपरा लाभलेल्या घराण्यात गोविंदस्वामींचा जन्म माघ वद्य नवमीला (दासनवमी) झाला.

गोविंदा लहान वयापासून अतिशय हुशार, तरतरीत आणि दांडगोबा होता. गावातच त्याचे प्राथमिक शिक्षण झाले. त्याच्या बालपणीच वडील निवर्तल्यामुळे त्यास शिक्षणासाठी सातारा, नंतर पुणे येथे जावे लागले. उपजीविकेसाठी त्याने विविध कामे केली. अपार कष्ट केले. माधुकरी मागितली, वार लावले, लोकांच्या घरी पडतील ती कामे केली. गाऊन-नाचून सण गाजवले, कुस्ती खेळले, नाटकांत कामे केली, पोवाडे रचून डफ-तुणतुण्यासह उत्सवात गायन केले.

प्रथम त्यांची शाहीर म्हणून प्रसिद्धी झाली. त्यांनी अकरा सिनेमांतूनही छोट्या-मोठ्या भूमिका केल्या. अतिशय परिश्रम करून शिक्षण घेत ते एम.ए., एल.एल.बी. झाले. मात्र, आईने त्यांच्या हातात चिपळी देऊन, ''कीर्तन कर,'' ही आज्ञा दिली. ''आई अगं, कीर्तनकाराची परिस्थिती फार वाईट असते. कोणी येत नाही हल्ली कीर्तनाला.''

या तक्रारीवर आईने सांगितले, ''आपल्या घराण्याला कीर्तनासाठी माहुली आणि आसपासच्या आठ गावांची जहागीर मिळाली आहे. सज्जनगडावर रामदासस्वामींच्या समाधीला नवस करून मी तुला

मागितला तो सिनेमात नाचायला नव्हे, तुला कीर्तनच करायला हवं, काही कमी पडणार नाही. नभी जैसी तारांगणे । तैसे लोक ॥ तुझ्या कीर्तनाला येतील.'' आईचा आशीर्वाद खरा ठरला.

गोविंदस्वामींचे कीर्तन केवळ श्रवणीयच नव्हे, तर बघण्यासारखे असे. त्यांचे कीर्तन म्हणजे एकपात्री अभिनयाचा उत्तम आविष्कार होता. पहाडी व्यक्तिमत्त्व, खणखणीत आवाज, नाट्यपूर्ण कथनशैली, भावमधुर गायन, राजकारणावर मार्मिक टीका-टिप्पणी, परखड सुस्पष्ट विचार, खळाळून हसवणारा विनोद, विविध विषयांचा परिपूर्ण अभ्यास, नितांत राष्ट्रप्रेम, क्रांतिकारकांवर अपार निष्ठा अशा असंख्य वैशिष्ट्यांनी त्यांचे कीर्तन गाजत असे. भारतीय इतिहासपुरुष, वीर स्त्रिया यांची आख्याने, आजकालच्या परिस्थितीपर्यंतचे सर्व विषय ते समर्थपणे हाताळीत.

पुण्याच्या हरिकीर्तनोत्तेजक सभेने आयोजित केलेल्या कीर्तन स्पर्धेत प्रथम क्रमांक पटकावणाऱ्या गोविंदस्वामींनी एकूण कीर्तन क्षेत्रातच प्रथम क्रमांकाची मान्यता मिळवली. ४० वर्षांत २५,०००हून जास्त कीर्तने त्यांनी गाजवली. स्वातंत्र्यवीर सावरकर हे तर त्यांचे जणू कुलदैवत होते. त्यांच्या राष्ट्रीय विचारांचा मोठ्या धडाडीने ते प्रसार करीत. स्वा. सावरकर आणि आचार्य अत्रे यांच्याकडे काही दिवस लेखनिक म्हणूनही काम केले होते. हिंदुस्थानभर सर्वत्र त्यांनी कीर्तने केली. त्याशिवाय त्यांनी अमेरिकेतही १९८३-८४च्या सुमारास तीन-तीन महिने दौरा केला. त्यांच्या स्वातंत्र्यनिष्ठा आणि हिंदुत्वनिष्ठा या गुणांमुळे आणि राजकारणातील अपप्रवृत्तींवर केलेल्या परखड, प्रखर टीकेमुळे अनेकदा कीर्तनावर बंदी घालण्यात आली व अटक, खटले यांनाही सामोरे जावे लागले. त्यांना प्रचंड लोकप्रियता लाभली. अनेक सत्कार, पुरस्कार लाभले. एकेका दिवशी दोन-दोन क्वचित पाच-सहा कीर्तनेही त्यांनी केलेली आहेत.

समाजकार्याची, धार्मिक कार्याची त्यांना मोठी आवड होती. त्यांनी जवळजवळ १०० गरीब विद्यार्थी सांभाळले, शिकवले, आपल्या पायांवर उभे राहू शकतील इतके शिक्षण दिले. त्यांनी त्यासाठी व्यास गुरुकुल आणि समर्थ गुरुकुल चालवले. त्यांनी जगातले पहिले नारद मंदिर पुण्यात सदाशिव पेठेत स्वत:च्या पाठीवरून मूर्ती वाहून आणून बांधले. त्यांनी सर्व वर्णांच्या मुलांच्या सार्वजनिक मुंजी ११,२१,५१,१०८ अशा प्रतिवर्षी अल्प खर्चात लावल्या. आपले सर्व सण, वार, उत्सव गुरुकुलातल्या मुलांना घरच्यापेक्षाही जास्त आनंद मिळावा, असे साजरे केले.

कीर्तन जुगलबंदी हा आजकाल लोकप्रिय असलेला कीर्तनप्रकार सर्वप्रथम गोविंदस्वामींनी रचला आणि आपली पत्नी डॉ. सुधा (पटवर्धन) आफळे आणि एक शिष्या सुधा धामणकर या दोघींकरवी १९७१-७२च्या सुमारास सादर केला. त्याला इतका उत्तम प्रतिसाद मिळाला, की त्याचे २५ प्रयोग अल्पावधीत झाले.

गोविंदस्वामी उत्तम कवी होते. कीर्तनात लागणारी काव्ये, आर्या, साकी, दिंडी, राजहंस, पोवाडे, पदे ते अनेकदा स्वत: रचत. त्यांनी जवळजवळ १४०० कीर्तनाची पदे रचली आहेत. शिवाय 'ओवाळणी', 'संसार तरंग' असे त्यांचे दोन स्फुट कवितासंग्रह प्रसिद्ध झाले आहेत. स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या चरित्रकार्यावर त्यांनी गीतरामायणाच्या धर्तीवरचे मोठे काव्य 'सावरकर गाथा' रचले आणि स्वत: त्या काव्याच्या गायनाचे १००-१२५ प्रयोग केले. त्यांनी अकरा नाटके लिहिली. त्यांपैकी काही 'नाट्यमंदार'ने तर काही 'चारुदत्त रंगभूमी' इत्यादींनी रंगमंचांवर आणली.

समर्थ रामदासस्वामी हे त्यांच्या घराण्याचे दैवत होते.

'करुणा कीर्तनाच्या लोटे । कथा करावी घडघडाटे ॥
श्रोत्यांची श्रवणपुटे । आनंदे भरावी ॥'

या समर्थवचनाप्रमाणेच त्यांचे कीर्तन आणि आचरण असे. आपले हे सांस्कृतिक राष्ट्रीय विचारधन पुढच्या पिढीपर्यंत पोहोचावे म्हणून त्यांनी १९७७ ते ८६ या काळात कीर्तन महाविद्यालय चालवले.

भारतीय संस्कृतीचा डिंडिम विश्वभर गाजवून अनेक क्षेत्रांत नेत्रदीपक कामगिरी करणारा हा कीर्तनसम्राट

वयाच्या बाहत्तराव्या वर्षी किरकोळ आजाराने स्वर्गवासी झाला. देहाने ते या जगातून गेले; पण आपले कार्य आणि विचारधन आपल्या असंख्य शिष्यांना आणि आजचे आघाडीचे राष्ट्रीय कीर्तनकार श्री. चारुदत्त आफळे आणि सौ. क्रांतिगीता महाबळ या आपल्या अपत्यांना देऊन गेले. त्यांचा व्यायामाचा वारसाही त्यांच्या दोन कन्या रेखा खडकीकर, प्राची मोडक चालवतात. तरुणांनी सशक्त बनावे, सुसंस्कारित व्हावे आणि आपल्या गुणांनी राष्ट्रपूजन करावे हेच त्यांचे जीवनध्येय होते.

- क्रांतिगीता महाबळ

## आरफळकर, हैबतबाबा

**वारकरी संप्रदाय, पालखी सोहळा प्रवर्तक**

**१७५० – १८३६**



**श्री**क्षेत्र आळंदीहून आषाढी महायात्रेसाठी श्रीक्षेत्र पंढरपूरकडे पायी जाणारा लाखो वारकऱ्यांचा 'संत ज्ञानेश्वर महाराज पालखी सोहळा' हा महाराष्ट्राच्या सांस्कृतिक विश्वातील एक अभूतपूर्व प्रबोधन भक्तिसोहळा आहे. या सोहळ्याचे प्रवर्तक म्हणून ह.भ.प. हैबतबाबा यांना 'मालक' या नावाने मान दिला जातो.

हैबतबाबा आरफळकर यांचे मूळ गाव सातारा जिल्ह्यातील कृष्णानदीकाठचे 'आरफळ'. त्यांचे आडनाव पवार; पण आरफळचे म्हणून त्यांचे 'आरफळकर' हेच आडनाव रूढ झाले. हैबतबाबांचा जन्म १७५० साली झाला. उमेदीच्या काळात ते ग्वाल्हेरच्या शिंदे सरकारांच्या दरबारी सेवेत दाखल झाले. दरबारी सेवेतून निवृत्ती घेऊन ते महाराष्ट्र मायभूमीकडे परत येतानाच सातपुडा पर्वतरांगेत दरोडेखोरांनी त्यांच्या लवाजम्यावर अचानकपणे सशस्त्र हल्ला केला, हैबतबाबांना कैद करून ठेवले व बाकीच्यांना ठार केले. हैबतबाबांची लहानपणापासून संत ज्ञानेश्वरांवर निष्ठा होती. त्यांनी ज्ञानेश्वर माउलींचा धावा केला आणि आश्चर्य म्हणजे दुसऱ्या दिवशी दरोडेखोरांच्या प्रमुखाला पुत्रप्राप्ती झाल्याच्या आनंदात त्याने हैबतबाबांना सोडून दिले. आपला हा पुनर्जन्म आहे व तो ज्ञानेश्वरमाउलींच्या कृपेनेच आपल्याला लाभला असा भाव त्यांच्या मनी दाटून आला व यापुढील सर्व आयुष्य आळंदीत राहून ज्ञानेश्वर माउलींच्या सेवेत समर्पित करण्याचा त्यांनी संकल्प केला.

हैबतबाबा आळंदीत आले व इंद्रायणी नदीतील सिद्धबेटावर राहून नामसाधना करू लागले. पुढे पुरामुळे त्यांना गावकऱ्यांनी ज्ञानदेव समाधी मंदिरातील एका ओवरीत राहण्यास भाग पाडले. रात्री शेजारतीनंतर पहाटेच्या काकड आरतीपर्यंत हैबतबाबा वीणा घेऊन ज्ञानदेव समाधीपुढे भजन करीत. त्यांची तल्लीनता व ईश्वरी अनुसंधान विलक्षण होते.

१८२३ दरम्यान त्यांनी आळंदी येथून आषाढी यात्रेसाठी पंढरपूरला पायी जाणारा श्री ज्ञानेश्वर पालखी सोहळा सुरू केला. लष्करी सैनिकी शिस्तीने सोहळ्याची आखणी केली. बेळगाव जिल्ह्यातील 'अंकली'चे सरदार शितोळे यांच्याकडून त्यांनी ज्ञानेश्वर पालखीसाठी घोडे, पालखी, अब्दागिरी असा लवाजमा मिळवला. वासकर महाराज, खंडोजीबाबा, आळंदीकर, शेडगे अशा अनेक वैष्णव भक्तांचे त्यांनी पालखी सोहळ्यास सहकार्य घेतले.

हा पालखी सोहळा गेली पावणेदोनशे वर्षे अव्याहत चालू आहे. या सोहळ्यात सुमारे लाख-दीड लाख

वारकरी आळंदी ते पंढरपूर, वीस दिवस भजन करीत ऊन-वारा-पाऊस यांची तमा न करता चालत जातात. पालखी सोहळा हे महाराष्ट्राचे सांस्कृतिक वैभव आहे.

पालखी सोहळा स्थिरस्थावर झाल्याचे पाहून हैबतबाबांना धन्यता वाटली व त्यांचे डोळे पैलतीरी लागले. वृद्धापकाळामुळे वयाच्या शाऐंशीव्या वर्षी, १८३६ साली, कार्तिक वद्य अष्टमीच्या दिनी त्यांनी इहलोकीचा निरोप घेतला. पंढरपूरला संत नामदेवांची समाधी जशी विठ्ठलमंदिराच्या महाद्वारातील पायरीवर आहे, तशी हैबतबाबा यांची समाधी आळंदीच्या ज्ञानेश्वर समाधी मंदिराच्या महाद्वारातील पायरीवर बांधण्यात आलेली आहे. 'हैबतबाबांची पायरी' व 'हैबतबाबांची ओवरी' या आजही त्यांच्या कार्याचे पुण्यस्मरण घडवीत आहेत.

– विद्याधर ताठे

## आर्वीकर, बाबा महाराज

***मोरेश्वर प्रभाकर जोशी***

**साक्षात्कारी संत, ग्रंथकार**

**१९२५ – २ डिसेंबर १९७१**



**थो**र चिंतक, साक्षात्कारी संत बाबा महाराज आर्वीकर हे मूळचे विदर्भातील आर्वी या गावचे म्हणून त्यांचे आडनाव 'आर्वीकर' पडले; पण त्यांचे कार्यक्षेत्र व मुख्यालय सोलापूर जिल्ह्यातील मंगळवेढा तालुक्यातील भीमानदीच्या काठी असलेले प्राचीन शिवक्षेत्र 'माचणूर' हे होते. नगर जिल्ह्यातील मढी येथे ते कानिफनाथांच्या दर्शनास आले होते, तेव्हा माचणूरला जाऊन ठाण मांडावे असा कानिफनाथांचा आदेश झाला आणि या ईश्वरी आदेशानुसार बाबा महाराज आर्वीकर हे माचणूरला जाऊन राहू लागले.

बाबा महाराजांचे पूर्ण नाव मोरेश्वर प्रभाकर जोशी (दुचक्के). त्यांचे वडील हे शिक्षक होते. ते दत्तोपासक होते. गुरुचरित्राचे पारायण, साधना हा त्यांचा आवडीचा विषय होता. मोरेश्वर हे प्रभाकरपंत व वेणूबाई यांचे तिसरे अपत्य. त्यांचा जन्म श्रावण शुद्ध चतुर्थीला (शके १८४७) झाला. आर्वीला त्यांच्या घरापुढेच शाळा होती. एके दिवशी शाळेत जाताना छोट्या मोरेश्वरला आत्महत्या केलेल्या एका महिलेचे प्रेत एका विहिरीत दिसले; त्या अत्यंत करुण प्रसंगाने त्याच्या बालमनावर परिणाम झाल्याने तो अबोल व अंतर्मुख बनला. माध्यमिक शाळेत असताना त्याला अनेक सत्पुरुषांचे दर्शन झाले. वडिलांबरोबर अनेक वेळा संत तुकडोजी महाराज यांच्या आश्रमात जाण्याचा योगही त्यास लाभला. मोरेश्वर याचा ओढा धार्मिक-चिंतनपर ग्रंथांकडे होता.

मोरेश्वर पंधरा वर्षांचा असताना त्याच्या वडिलांचे निधन झाले. मॅट्रिकपर्यंत शिक्षण पूर्ण झाल्यावर ते संत तुकडोजी महाराजांच्या भजनी मंडळात दाखल झाले व जनजागृती करीत गावोगावी हिंडले; पण गुरुदेव सेवा मंडळात मन न रमल्यामुळे ते आर्वीला परतले. त्यांनी आर्वी येथील दत्तमंदिरात नित्य उपासना सुरू केली व समवयस्क मुलांना एकत्र करून त्यांना योगासने-प्रार्थना शिकवणे सुरू केले. त्यांना युवकांमध्ये कार्य करण्याची आवड असून त्यांच्याकडे उत्तम संघटन- कौशल्य होते. त्यांनी काही काळ राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचेही कार्य केले. पण एके दिवशी हे सारे कार्य आणि आर्वी गाव सोडून एका वेगळ्या मन:स्थितीत ते थेट पंढरपूरला रवाना झाले. श्रीक्षेत्र पंढरपुरात त्यांनी विप्रदत्त मंदिराजवळ

वास्तव्य केले. त्यांनी अनेक संतांच्या गाठीभेटी घेतल्या. विठ्ठल मंदिरात जाऊन विठ्ठलाची मनोभावे भक्ती करताना या काळातील एका काव्यरचनेत ते म्हणतात : ‘नको करू पायापरता। आता मज पंढरीनाथा।।’ काही वर्षे पंढरीत राहिल्यानंतर विठ्ठलाच्या आदेशानेच त्यांनी नाशिकला जाऊन पंचवटीमध्ये अडीच-तीन वर्षे घोर तपःश्चर्या केली. नंतर विदेही अवस्थेतच ते थेट मध्य प्रदेशातील मंदिरात गेले असता महान यती महेश्वरानंद यांच्याशी त्यांची भेट झाली व त्यांनी मोरेश्वरांना उन्मनी अवस्थेचा अनुभव दिला. या यतीच्या आदेशाने त्यांनी वृंदावनला गमन केले. तेथे ‘शाम दाऊनि शांतवी देवा। वाजवी सोऽहं पावा।।’ अशा शब्दांत त्यांनी करुणा भाकली.

मोरेश्वरांना अनेक साधू, महंत, योगी, तपस्वी यांच्याकडून काही ना काही विद्या मिळत राहिली. नागा साधूंकडून त्यांना मंत्रविद्या मिळाली, बिहारी-बंगाली साधूंकडून तंत्रविद्या प्राप्त झाली. महात्मा गांधी, विनोबा भावे आणि तुकडोजी महाराज यांचाही सहवास त्यांना मिळाला. भटकतभटकत ते अहमदनगर जिल्ह्यातील मढी येथे कानिफनाथांच्या दर्शनास आल्यावर त्यांना ‘माचणूर’ या सिद्धक्षेत्री जाण्याचा आदेश झाला आणि त्यानुसार १९५५ पासून माचणूर हेच त्यांचे अखेरपर्यंतचे वास्तव्यस्थान बनले.

माचणूरला येताना ते अक्कलकोटला स्वामी समर्थ यांच्या दर्शनाला गेले. तेथे भोसले संस्थानिकांनी त्यांना चतुर्मास सप्ताह करण्याची विनंती केली. या सप्ताहात त्यांचे चिंतन, निरूपणशैली यांमुळे असंख्य भाविक आकर्षित झाले व त्यांनी ‘बाबा महाराज आर्वीकर’ असे म्हणून त्यांचा गौरव केला.

लोकांनी केवळ वृद्धापकाळात देव-देव करून पुण्यकर्म करावे, हा विचार आर्वीकरांना मान्य नव्हता. अंगात सळसळता उत्साह आणि जोम असणाऱ्या तरुणांनी आपल्या पौरुषाने भारताच्या सांस्कृतिक संचिताचे जतन व संवर्धन करावे असे त्यांचे चिंतन होते. त्यामुळे सनातन वैदिक विचार परिपुष्ट करण्यासाठी त्यांनी तरुण, उत्साही साधकांची जडणघडण करण्यावर भर दिला. त्यासाठी ते दरवर्षी मार्गशीर्ष शुद्ध पंचमी ते एकादशी (गीता जयंती) ‘साधना सप्ताह’ आयोजित करीत असत.

मोरेश्वर यांचे वाङ्मय हे आध्यात्मिक चिंतनाचे नवनीत आहे. ‘दिव्यामृतधारा’ (३ खंड), ‘ब्रह्मनिनाद’ (२ खंड), ‘प्रार्थना प्रभात’, ‘साधना संहिता’, ‘हरिपाठ’, ‘माचणूर हृद्‌गत’, ‘गुरुगीता’, ‘मानवगीता’ ही त्यांची पुस्तके साधकांना दीपस्तंभासारखी नित्य मार्गदर्शन करणारी आहेत. वयाच्या सेहेचाळिसाव्या वर्षी हिरडीला जखम झाल्याचे निमित्त होऊन मार्गशीर्ष पौर्णिमेच्या दिनी बाबा महाराज आर्वीकर यांचे निर्वाण झाले.

- विद्याधर ताठे

**संदर्भ :**

*१. बाबा महाराज आर्वीकरांची वाङ्मयसंपदा.*

## उपळेकर, काकामहाराज
***उपळेकर, गोविंद रामचंद्र***
**वारकरी संप्रदाय, साक्षात्कारी सत्पुरुष**
**१५ जानेवारी १८८८ - ८ ऑक्टोबर १९७४**



**सा**तारा जिल्ह्यातील फलटण गावात होऊन गेलेले संत काकामहाराज उपळेकर यांचे एकूण जीवन एखाद्या नाटक-चित्रपटासारखे थक्क करणारे आहे. अनेक वर्षे

युरोपमध्ये ब्रिटिश सेनादलात सर्जन म्हणून काम करणारा व आपल्या कार्याने ब्रिटिशांकडून अनेक सुवर्णपदके-गौरव प्राप्त करणारा एक उच्चशिक्षित डॉक्टर अचानक एके दिवशी सारे सोडून आध्यात्मिक क्षेत्राकडे वळतो आणि या क्षेत्रातील साक्षात्कारी सत्पुरुष होतो हे परिवर्तन थक्क करणारे आहे. काकामहाराज उपळेकर यांचे पूर्ण नाव गोविंद रामचंद्र उपळेकर असे असून त्यांचे वडील रामचंद्रपंत हे फलटण येथे वकिली करीत होते. त्यांच्या आईचे नाव अंबाई होते.

उपळेकर हे घराणे मूळचे सोलापूर जिल्ह्यातील बार्शी तालुक्यातील 'उपळाई' या गावचे. एक सत्शील-धर्मपरायण घराणे म्हणून उपळेकर घराची फलटणमध्ये ख्याती होती. अशा या धर्मपरायण कुटुंबात काकामहाराज ऊर्फ गोविंद यांचा जन्म झाला. काकामहाराजांना पाच भाऊ व दोन बहिणी होत्या.

छोटा गोविंद हा प्रखर बुद्धिमान होता. त्यांचे प्राथमिक शिक्षण फलटण येथेच मुधोजी विद्यालयात झाले. माध्यमिक शिक्षणासाठी वडिलांनी त्यांना पुण्याला पाठविले. पुण्यातील नूमवि या नामवंत विद्यालयात काकांचे माध्यमिक शिक्षण झाले. प्रत्येक परीक्षा ते गुणवत्तेसह प्रथमवर्गात उत्तीर्ण झाले.

आई-वडिलांची इच्छा गोविंदने डॉक्टर व्हावे अशी होती. त्यामुळे त्यांनी पुण्याच्या बी.जे. वैद्यकीय महाविद्यालयात प्रवेश घेतला. १९१० साली विशेष प्रावीण्यासह त्यांनी डॉक्टरची पदवी मिळवली. पुढे सैन्यदलात डॉक्टर म्हणून सेवा करावी असा सर्वानुमते निर्णय झाला आणि ब्रिटिश सेनादलात एक एतद्देशीय डॉक्टर भरती झाला. १९१३ साली काकांचे छ. शिवाजी महाराजांचे गुरू दादोजी कोंडदेव यांच्या घराण्यातील दुर्गाबाई यांच्याशी लग्न झाले.

काका डॉक्टर म्हणून सेनादलात गेल्यानंतर काही महिन्यांतच महायुद्धाचा वणवा पेटला. ब्रिटिश अधिकाऱ्यांनी डॉक्टर उपळेकरांची युरोपमध्ये प्रत्यक्ष रणभूमीवर बदली केली. युद्धातील जखमींवर तत्काळ उपचार करणे, गरजेनुसार शस्त्रक्रिया करणे हे काम डॉ. उपळेकरांकडे होते. या काळात एक कुशल सर्जन म्हणून काकांनी केलेल्या कार्याचे ब्रिटिश सेनाधिकाऱ्यांनी, त्यांना विशेष सेनापदके व सुवर्णपदके देऊन कौतुक केले. पुढे काकांची बदली युरोपातून आफ्रिकेत करण्यात आली. इथेही काकांनी आपल्या वैद्यकीय कुशलतेने सर्वांची वाहवा मिळविली.

यानंतर काकांच्या जीवनात अनपेक्षित परिवर्तन घडले. आफ्रिकेतील रणांगणावरील तंबूतून एका सकाळी काका बाहेर पडले आणि आकाशाकडे एकटक पाहत असताना त्यांची एकाएकी समाधी लागली. त्यांना एका साधूची तेजोवलयांकित दिगंबर मूर्ती दिसली. कानी एक मंत्र पडला, *'ब्रह्मारंध्रकृत उत्थाना प्रणशक्ति अथ असुरम!'* या अनपेक्षित अनुभवाने काका अंतर्मुख झाले व सतत चिंतनमग्न राहू लागले.

तो दिगंबर साधू काकांना पुन्हा पुन्हा दृष्टान्तात भेटून मार्गदर्शन करीत राहिला. एके दिवशी त्याने दृष्टान्त दिला आणि 'चल, आता लवकर नीघ,' असा आदेश दिला. पण या काळात इथून भारतात जायला रजा कशी मिळणार? असा काकांपुढे प्रश्न उभा राहिला. काकांना पुन्हा त्या साधूचा दृष्टान्त झाला, 'चल, मार्ग मोकळा झाला आहे.' काही अतर्क्य घटना घडून वरिष्ठ पातळीवर निर्णय झाला व काकांना भारतात येण्याची संधी मिळाली. काका फलटणला गेले व आपले मित्र रानडे यांना त्यांनी सर्व घटनाक्रम सांगितला. रानडे हे योगी हरिबाबांचे भक्त होते. ते काकांना घेऊन पुसेसावळी येथे गेले आणि तेथील नदीकाठच्या स्मशानभूमीजवळ राहणाऱ्या 'श्रीकृष्णदेव' यांना भेटले. श्रीकृष्णदेवांना पाहताच काकांना ओळख पटली. 'हाच तो दिगंबर साधू, जो मला वारंवार दर्शन देतो व मार्गदर्शन करतो.' काकांनी श्रीकृष्णदेवांना नमस्कार केला. तेव्हा काकांच्या डोक्यावर हात ठेवून, ''आता हा आलाय. मी सर्व त्याच्या स्वाधीन करून मोकळा होतो,'' असे ते म्हणाले आणि काका समाधी अवस्थेत गेले. काकांना श्रीकृष्णदेवांपाशी सोडून रानडे फलटणला परतले. यानंतर काका देहभावनाच न उरल्यामुळे विदेही

अवस्थेतच वावरू लागले. त्यांचे चाळे पाहून लोक त्यांना 'वेडा' म्हणू लागले. घरच्यांनीही डॉक्टरला दाखविले; पण त्यांनी, 'काका वेडे नाहीत' असा निर्वाळा दिला. काकांना तीर्थयात्रा करून काही काळ अज्ञातवासात राहण्यास गुरू श्रीकृष्णदेव यांनी सांगितले. तीर्थयात्रेनंतर काका एका वेगळ्या सिद्धावस्थेतच परतले. त्यांचे ज्ञानेश्वरी, हरिपाठ आदींवर प्रवचन, लेखन सुरू झाले. काकांच्या नावावर २२ ग्रंथ आहेत. ते ग्रंथ त्यांच्या आध्यात्मिक चिंतनाचे नवनीत आहे.

'ज्ञानेश्वरी सुबोधिनी', 'हरिपाठ सांगाती' हे ग्रंथ साधकाचे-उपासकाचे दीपस्तंभ आहेत. काकांच्या जीवनावर श्री भवानीशंकर मंजेश्वर यांनी लिहिलेले 'द महर्षी' (The Maharshi) पुस्तक काकांच्या आध्यात्मिक अधिकाराचे विराट दर्शन आहे.

काका सर्वांना ज्ञानदेवांचा हरिपाठ वाचण्यास आग्रहाने सांगत. 'पंचरत्नी हरिपाठ' हा काकांचा आवडता विषय होता. अखेरच्या काळात ते ''आता आवराआवर चालली आहे,'' एवढेच म्हणत निर्वाणाची सूचना देत होते. आपल्या निर्वाणाच्या तिथीला काकांनी दिवसभर मौन पाळले आणि सायंकाळी बैठकीवर एकाग्रचित्ताने समाधी लावून या नश्वर जगाचा निरोप घेतला. फलटण येथे त्यांचे समाधी मंदिर आहे.

- विद्याधर ताठे

**संदर्भ :**

१. *'संतचरित्र कोश'; काका उपळेकर चरित्र;* 'The Maharshi.'

## उपासनी महाराज

***उपासनी, काशीनाथ गोविंदशास्त्री***

**साईभक्त, कन्याकुमारी संघाचे संस्थापक**

**१५ मे १८७० – २४ डिसेंबर १९४१**

**ना**शिकजवळील सटाणा या गावातील गोविंदशास्त्री उपासनी यांना सहा मुले होती. त्यांतील दुसऱ्या क्रमांकाचा मुलगा काशीनाथ हाच पुढे श्री उपासनी महाराज म्हणून प्रसिद्ध झाला. काशीनाथाचे शालेय शिक्षण सटाणा या गावीच झाले. लहानपणापासून



त्याच्या मनात विरक्तीची भावना होती; पण त्या वेळच्या रीतिरिवाजाप्रमाणे लग्न, संसार म्हणजे काय? हे कळण्याआधीच त्याचे लग्न लावण्यात आले. संसार-तापाने दग्ध झालेला काशीनाथ एके दिवशी घरातील कोणालाही न सांगता घरदार सोडून नाशिकला आला व भिक्षा मागून पोट भरू लागला. इकडे काशीनाथ याची पत्नी अगदी किरकोळ आजाराचे निमित्त होऊन मरण पावली.

घरच्या लोकांना काशीनाथच्या भवितव्याची काळजी वाटू लागली. जर त्याला प्रपंचाच्या बेडीत अडकविले तरच त्याचे चित्त थाऱ्यावर येईल, या विचाराने त्याचा शोध घेऊन त्याला घरी आणला व त्याच्यासाठी स्थळाचा शोध सुरू झाला. जर आपण घरी राहिलो, तर पुन्हा प्रपंचाच्या बेडीत अडकू, पुन्हा सुटका होणार नाही, असा विचार मनात येऊन, विरक्तीने पछाडलेला काशीनाथ घरादाराचा त्याग करून पुण्यास निघाला व त्याने ओंकारेश्वराच्या मंदिरात मुक्काम ठोकला. भिक्षा मागून, तर कधी उपाशीपोटी राहून तपसाधना करू लागला.

पुढे पुणे सोडून तो कल्याणला आला. पण तेथेही त्याची उपासमार सुरूच राहिली. कारण, स्वत: उच्चवर्णीय ब्राह्मण असल्यामुळे ब्राह्मणाशिवाय इतर कोणाकडूनही तो भीक स्वीकारीत नसे. त्यामुळे त्याच्या

उपासमारीत आणखीनच भर पडली. काही वेळा पाणी पिऊन भूक भागविण्याशिवाय त्याला गत्यंतरच नव्हते. तपसाधनेच्या भुकेपुढे त्याला पोटाची भूक महत्त्वाची वाटत नव्हती.

कल्याणमध्येही काशीनाथ याला मानसिक शांती लाभली नाही. त्यामुळे काशीनाथ ऊन-पावसाची तमा न करता परत नाशिकला आला. नाशिकमधील एका डोंगरावर असलेल्या कपारीमध्ये त्याने मुक्काम ठोकला. पोटात अन्नाचा एकही कण नसल्यामुळे तो गलितगात्र झाला. त्याच अवस्थेत त्याने जेथे बैठक मारली, तिथेच तो समाधी अवस्थेचा आनंद अनुभवू लागला. पूर्वी भूकेमुळे मनात मरणाचे विचार येत होते. पण आता लागलेल्या भावसमाधीमुळे त्याची तहानभूक हरपली. त्याला एका अवर्णनीय व अलौकिक आनंदाचा सुखकारक अनुभव जाणवू लागला. समाधीतून बाहेर पडल्यावर त्याला वास्तवाची जाणीव झाली. काशीनाथ धडपडत खाली आला. त्याची विमनस्क अवस्था पाहून दोन गवळणींनी त्याला दूध व नाचणीची भाकरी दिली. त्याची भेदाभेदाची जाणीव नष्ट होऊन विशाल मानवतेची भावना निर्माण झाली. गवळणींनी दिलेल्या अन्नामुळे त्याला थोडी तरतरी व हुशारी आली. या गवळी लोकांचा काही दिवस पाहुणचार घेतल्यानंतर काशीनाथला आपल्या घरची आठवण झाली. तो सटाण्यास निघाला.

काशीनाथ घरी परतला त्या वेळी घरची परिस्थिती अत्यंत हलाखीची होती. वडिलांचे छत्र हरपले हाेते. आजोबा अर्धांगवायूमुळे अंथरुणाला खिळून होते. आता काशीनाथावरच घरची सर्व जबाबदारी येऊन पडली. चरितार्थासाठी काहीतरी कामधंदा करणे आवश्यक होते. तो सांगलीतील वेदशास्त्र पारंगत वैद्यक तज्ज्ञ व्यंकटरमणाचार्य यांच्या सेवेत रुजू झाला. मुळातच हुशार असलेला काशीनाथ आचार्यांच्या सुयोग्य मार्गदर्शनामुळे आयुर्वेदशास्त्रात प्रवीण झाला. या ज्ञानाद्वारे लोककार्य करावे असा विचार त्याच्या मनात आला. त्याने घरातल्याघरात काढे व अरिष्ट तयार करण्यास सुरुवात केली. श्रीमंत दादासाहेब खापर्डे यांच्या प्रोत्साहनाने त्याने 'भेषज रत्न' या नावाचे वैद्यकीय माहितीवर आधारित मासिकही सुरू केले.

काशीनाथामध्ये झालेला हा बदल पाहून घरच्या लोकांना अतिशय आनंद झाला व त्यांनी दुर्गाबाई नावाच्या मुलीशी त्याचा दुसरा विवाह लावून दिला. काशीनाथांनी धर्मार्थ औषधी देण्याचा व्यवसाय सुरू केला. पत्नी दुर्गाबाईंच्या मदतीने माफक आहार व काटकसर यांचा मेळ साधून दहा वर्षे संसार केला. लोकांना माफक दरात सेवा शुश्रूषा पुरविली. सर्व काही व्यवस्थित चालले असतानाही काशीनाथ यांचा जीव कुठेतरी तळमळत राही. काहीतरी अपूर्ण असल्याची जाणीव त्यांच्या मनाला बोचत होती. त्यातच निष्कारण एका खटल्यात काशीनाथ यांना गोवण्यात आले. विनाकारण मानहानी झाली. कारावास भोगावा लागला. कष्टाने उभारलेला व्यवसाय कोलमडला. पत्नीच्या सल्ल्याने गाव सोडून काशीनाथ हे उभयता ओंकारेश्वरास आले.

ओंकारेश्वर येथील शंकराच्या देवळात एकदा काशीनाथ यांना अचानक समाधी लागली. त्या निर्जन स्थळी पतीची ही अवस्था पाहून दुर्गाबाई घाबरल्या. लौकिक उपायांनी काशीनाथ यांची समाधी भंग पावली. तरीपण त्यांना प्रचंड त्रास होऊ लागला. त्यामुळे राहुरीस जाऊन काशीनाथ यांनी तेथील योगशिक्षक श्री. कुलकर्णी यांचा सल्ला घेतला. श्री. कुलकर्णी यांनी काशिनाथ उपासनी यांना शिर्डीच्या साईबाबांकडे जाण्याचा सल्ला दिला.

काशीनाथ व दुर्गाबाई शिर्डीला आले. साईबाबांच्या एका दृष्टिक्षेपातच काशीनाथांची व्याधी दूर झाली. साईबाबांनी त्यांना शिर्डीतच ठेवून घेतले. पुढील चार वर्षांत त्यांची अपुरी साधना पूर्ण करून घेतली. काशीनाथ यांना आत्मसाक्षात्कार झाला. त्याच सुमारास दुर्गाबाईंचे निधन झाले. काशीनाथ संसाराच्या बंधनातून मुक्त झाले. साईंसारखा सद्‌गुरू लाभताच त्यांचा आशीर्वाद व मार्गदर्शनामुळे काशीनाथांनी साधनेमध्ये

कमालीची प्रगती केली. ते साईंच्या सूचनेनुसार खंडोबाच्या देवळात राहू लागले; परंतु काशीनाथ यांची महती न कळलेल्या लोकांनी त्यांना खूपच त्रास दिला.

एक तरटे अंगाला गुंडाळून काशीनाथ देवळात राहत. साईंनी त्यांना सुगंधित करून सोडले. आपले स्वत्व त्यांच्यात ओतले. एकदा तर द्वारकामाईच्या दरबारात साई म्हणाले, ''अरे, त्याच्यासारखा आहेच कोण? सगळे एकीकडे व तो एकीकडे! तो माझा आहे. मी त्याला सुवर्णपट दिला आहे!'' या शब्दांत त्यांनी काशीनाथांचा गौरव केला. साईंच्याच सल्ल्यानुसार काशीनाथांनी शिर्डीपासून सात किलोमीटर अंतरावरील साकुरी या गावी मुक्काम हलवला. या ठिकाणी अंगावर तरटे गुंडाळलेल्या काशीनाथाला लोक 'उपासनीबाबा' म्हणू लागले. उपासनीबाबांनी स्त्रीतत्त्वाचा परमार्थ प्रचारासाठी उपयोग करून घेण्याचे ठरविले. त्यांनी 'कन्याकुमारी संघा'ची स्थापना केली.

स्त्रियांनी वेदविद्याग्रहण करावी, यज्ञकार्य करावे अशी मते मांडून त्यांनी २४ सुशिक्षित, घरंदाज मुलींना कन्याकुमारी व्रताची दीक्षा दिली. या सर्व मुलींना वेद, उपनिषदे, यज्ञविधींचे व इतर धार्मिक विधींचे रीतसर शिक्षण दिले. उपासनीबाबांच्या या बंडखोर वृत्तीचा धर्ममार्तंडांनी व तथाकथित समाजसुधारकांनी कडाडून विरोध केला. त्यांचा निषेध केला. उपासनी बाबांची निंदानालस्ती केली. त्यांच्यावर प्रखर टीकेची झोड उठविली. पण उपासनीबाबांनी त्यांना दाद दिली नाही. उलट, आपले कार्य जोमाने सुरूच ठेवले. वेदमूर्ती सातवळेकर व महात्मा गांधीजींनी उपासनी बाबांच्या या क्रांतिकारक कार्याचे कौतुक केले. 'श्री उपासनी वाक्‌सुधा' या त्यांच्या ग्रंथात त्यांच्या शिकवणीचा प्रत्यय येतो.

उपासनीबाबांनी साकुरी येथील मठाची व 'कन्याकुमारी' या संघाची जबाबदारी 'श्री गोदावरीमाता' या शिष्येच्या सुपूर्द करून साईबाबांच्या या थोर शिष्याने २४ डिसेंबर १९४१ रोजी महासमाधी घेतली.

– प्रा. नीलकंठ पालेकर

## ओशो रजनीश

***जैन, चंद्रमोहन बाबूलाल***

**अध्यात्मिक गुरू - डायनॅमिक मेडिटेशन**

**११ डिसेंबर १९३१ - १९ जानेवारी १९९०**



**भा**रतीय रहस्यवादी गुरू आणि आध्यात्मिक शिक्षक म्हणून आंतरराष्ट्रीय कीर्ती प्राप्त झालेले, आचार्य रजनीश किंवा भगवान रजनीश म्हणजेच 'ओशो' यांचा जन्म मध्यप्रदेशातील रायसेन जिल्ह्यातील कुचवाडा गावात आजोळी झाला. त्यांचे मूळ नाव चंद्रमोहन बाबूलाल जैन. वडील बाबूलाल कापडाचे व्यापारी होते. आईचे नाव सरस्वती. लहानपणी, सातव्या वर्षी आजोळी असताना त्यांनी आजोबांचा मृत्यू पाहिला, चुलतबहिणीचा विषमज्वराने झालेला मृत्यू पाहिला. या घटनांनी त्यांच्या बालमनावर ओरखडा पडला आणि ते मृत्यूविषयक चिंतन करू लागले. ते प्रतिदैववादी बनू लागले. संमोहनात त्यांना रस वाटू लागला.

गदरवारा येथील घरी परतल्यानंतर व तेथील शाळेत मॅट्रिकपर्यंत शिक्षण घेतल्यानंतर त्यांनी १९५५ मध्ये तत्त्वज्ञानात बी.ए. आणि १९५७ साली सागर विद्यापीठातून तत्त्वज्ञानातील एम.ए. झाले. रायपूर संस्कृत कॉलेजात त्यांना अध्यापकाची नोकरी मिळाली; परंतु त्यांच्या विचारांनी मुलांवर प्रतिकूल परिणाम होईल म्हणून त्यांची बदली करण्यात आली. पुढे १९५८ पासून

ते जबलपूर विद्यापीठात अधिव्याख्याता म्हणून काम करू लागले. विद्यापीठात शिकवतानाच त्यांनी समांतरपणे आपला विचार प्रसाराच्या दौऱ्याची आखणी सुरू केली आणि 'आचार्य रजनीश' या नावाने भारतभर, जगभर व्याख्याने देऊ लागले. समाजवादाने केवळ दारिद्र्याचेच समाजीकरण होईल आणि महात्मा गांधी हे दारिद्र्याची पूजा करणारे आत्मपीडक प्रतिक्रियावादी आहेत, अशी वादग्रस्त मते ते मांडू लागले. मागासलेपणातून बाहेर पडण्यासाठी भारताला भांडवलवाद, विज्ञान, आधुनिक तंत्रज्ञान आणि लोकसंख्या नियंत्रणाची गरज आहे असे ते म्हणत.

पारंपरिक भारतीय धर्म मृतवत आहेत, त्यांच्यात पोकळ धर्मकांडे आहेत, अशी जहरी टीका रजनीश ओशो करू लागले. त्यांच्या विचारांचा आणि तत्त्वज्ञानाचा पुरस्कार करणारे अनुयायी त्यांना जगभरातून मिळाले. यात सामान्य नागरिकांपासून कलावंत, साहित्यिक, उद्योगपती, राजकारणी असे सर्व थरांतील लोक होते.

'लैंगिक ऊर्जेच्या रूपांतरणातूनच प्रेम आणि ध्यान निर्माण होतात' या त्यांच्या निष्कर्षावर समाजमनातून संतप्त प्रतिक्रिया आल्या. त्यांना 'सेक्स गुरू' असेही म्हटले जाऊ लागले. 'संभोगातून समाधीकडे' या व्याख्यानमालेनंतर त्यांना ही उपाधी दिली गेली. त्यांनी १९७० मधील एका ध्यानशिबिरात 'डायनॅमिक मेडिटेशन' पद्धत प्रथम सुरू केली. त्याच वर्षी मुंबई सोडून जबलपूरला गेल्यानंतर २६ सप्टेंबर १९७० रोजी त्यांनी संन्याशांचा पहिला वर्ग स्थापन केला. ओशोंच्या सचिव म्हणून काम करणाऱ्या धनवान लक्ष्मी ठाकरसी कुरुवा त्यांच्या पहिल्या शिष्या होत. त्यांनी ओशोंना पुन्हा मुंबईत आणून वुडलॅण्ड्स अपार्टमेंटमध्ये निवासस्थान दिले. तिथे त्यांना पाश्चात्त्य अनुयायी मिळाले. तोवर ते आचार्य रजनीश हे नाव सोडून 'भगवान श्री रजनीश' म्हणून वावरू लागले.

मुंबईच्या हवामानामध्ये त्यांना मधुमेह, दमा या व्याधी जडल्या, म्हणून ते आपल्या शिष्या मां योग मुक्ता म्हणजे कॅथरीन बेनिझिलीस यांच्या मदतीने १९७४ मध्ये पुण्यातील कोरेगाव पार्कातील जागेत राहू लागले. पुढे १९८१ पर्यंत ते तेथे शिकवीत राहिले. पुढे याच जागेवर 'ओशो आंतरराष्ट्रीय ध्यानकेंद्र' उभे राहिले. तसेच ध्वनिचित्रण, मुद्रण, कपडे, दागिने, सौंदर्यप्रसाधने बनविण्याचे केंद्र आज त्या जागेत आहे. 'ह्युमन पोटेन्शिअल मूव्हमेंट'मधील आंतरराष्ट्रीय कीर्तीचे मानसोपचारतज्ज्ञ आणि ध्यानाच्या माध्यमातून उपचाराची सेवा देणारे केंद्र तिथे कार्यरत आहे.

ओशो १९८१ साली अमेरिकेत स्थलांतरित झाले, परंतु तेथेही ते वादग्रस्त ठरले. अमेरिकेतील ओरेगन येथे त्यांच्या अनुयायांनी स्थापन केलेला कम्यून त्यांच्या शिष्यांमध्ये 'रजनीशपुरम' म्हणून प्रसिद्ध पावला. या नावाला अधिकृत मान्यता नव्हती. पुढे अल्पावधीतच स्थानिक रहिवाशांशी मतभेद सुरू झाले. ते इतके विकोपाला गेले, की रजनीश यांना अमेरिका सोडावी लागली. त्याचबरोबर, २१ देशांनी त्यांना प्रवेश नाकारला, त्यामुळे ते पुन्हा पुण्यात आले. याच दरम्यान त्यांना पाठीच्या मणक्यांचाही आजार जडला. १९८७ साली पुण्यात आल्यानंतर त्यांनी आजारपण सांभाळून संध्याकाळची व्याख्याने सुरू केली. त्यांनी १९८८ पासून 'झेन' तत्त्वज्ञानावर अभ्यास सुरू केला. याच काळात त्यांनी आपणांस 'ओशो रजनीश' हे नाव लावून घेतले.

जैन, बौद्ध, हिंदू, ख्रिस्ती, हसिदी अशा धर्मांवर, परंपरांवर, पौर्वात्य आणि पाश्चिमात्य रहस्यवादांवर, तसेच उपनिषद, वेद, गुरुग्रंथसाहिब अशा धार्मिक, आध्यात्मिक विषयांवर रजनिशांनी प्रभावी आणि प्रसंगी वादग्रस्त, धाडसी भाष्य केले. ''प्रत्येक मनुष्य हा उद्बोधनाची क्षमता असणारा, बिनशर्त प्रेमाची क्षमता असणारा, आयुष्याला प्रतिक्रियेऐवजी प्रतिसाद देऊ शकणारा बुद्ध आहे. अहंकारामुळे मनुष्याची क्षमता प्रत्यक्षात उतरत नाही. सामाजिक बंधनांमुळे मनुष्य जखडलेला राहतो,'' हे रजनीश यांचे सांगणे होते. आपण धार्मिक शिक्षक नाही, असे ते म्हणत. रजनीश यांनी त्यांच्या साठ वर्षांच्या आयुष्यात जगभर हजारो

व्याख्याने दिली. लेखन केले. येशूच्या शिकवणीवर 'द मस्टर्ड सीड', 'कम, फॉलो टू यू'; ताओ विचारांवरील 'द एम्प्टी बोट', 'ताओ : द थ्री ट्रेझर्स'; गौतम बुद्धावर 'द धम्मपद', 'द हार्ट सूत्र', 'द डायमंड सूत्र'; झेन विचारांवरील 'नीदर दिस नॉर दॅट', 'नो वॉटर नो मून', 'द ग्रास ग्रोज बाय इटसेल्फ', 'द सर्च' इ., तसेच सूफींवरील 'अन्टिल यू डाय', 'जस्ट लाइक दॅट', 'उनियो मिस्टिका'; बाऊल फकिरांवरील 'द बिलव्हड', संत कबीरावरील 'द डिव्हाइन मेलडी', 'द पाथ ऑफ लव्ह' इ.; पतंजली योगावरील 'योगा : दी अल्फा ॲण्ड दी ओमेगा', तसेच ध्यानावरील 'द बुक ऑफ सिक्रेट्स', 'द रिबेल', तसेच तंत्रावरील 'तंत्र : द सुप्रीम अंडरस्टॅण्डिंग', 'द तंत्र व्हिजन' अशा विविध विषयांवरील शेकडो ग्रंथ लिहिले. आपल्या रहस्यवादी विचारसरणीतही त्यांनी ध्यान, जागृतता, प्रेम, उत्सव, धैर्य, सर्जनशीलता, तसेच विनोद या विषयांना महत्त्व दिले. हे बंडखोर विचारांचे आध्यात्मिक गुरू पुण्यातील आश्रमातच निधन पावले. तेथेच रजनीश ओशो यांची रक्षा जतन करून ठेवण्यात आली आहे.

– संदीप राऊत

***

# क

## कलावतीदेवी ‘आई’
**कृष्णभक्त, परमार्थ निकेतन आश्रम**
**१९०८ - ८ फेब्रुवारी १९७८**



हुबळीच्या सिद्धारूढस्वामींच्या परमशिष्या आई कलावतीदेवी यांनी महाराष्ट्रात शेकडो उपासना केंद्रे चालवून धर्मजागरणाचे महान कार्य केलेले आहे. त्यांच्या निर्वाणानंतरही त्यांच्या शिष्यवर्गातर्फे अनेक धार्मिक कार्ये सुरू आहेत.

कलावतीदेवी यांचा जन्म ऋषिपंचमीच्या मुहूर्तावर धर्मपरायण अशा कल्याणपूरकर घराण्यात, गोकर्ण, महाबळेश्वर येथे झाला. त्यांच्या वडिलांचे नाव बाबूराव व आईचे नाव सीताबाई होते. बाबूराव हे वनौषधी तज्ज्ञ होते व त्यांची कारवार व गोकर्ण येथे औषधांची दुकाने होती. कल्याणपूरकर घराण्यात परमहंस शिवरामस्वामी हे बालसंन्यासी होऊन गेलेले होते.

कलावतीच्या जन्मापूर्वी बाबूराव व सीताबाई यांनी अपत्यप्राप्तीसाठी गोकर्णाला लिंगार्चन पूजा केली आणि गोकर्णाचा प्रसाद म्हणून पुढील वर्षी कलावतीदेवीचा जन्म झाला. कलावती हे त्यांचे आध्यात्मिक साधक नाम आहे. ते त्यांचे गुरू सिद्धारूढस्वामी यांनी ठेवले. लहानपणी आई-वडिलांनी आपल्या मुलीचे नाव ‘रक्मा’ ठेवले व लाडाने ‘बाळ’ असेच नाव रूढ होते.

लहानपणीच त्यांच्या ठायी अलौकिकत्वाची लक्षणे दिसून येत होती. लहानपणी मुले प्रथम ‘आई-बाबा’ म्हणत बोलू लागतात, तशी रक्मा (कलावतीदेवी) लवकरच बोलू लागली व पहिला शब्द मुखातून बाहेर पडला तो ‘हरी’! इतर मुले जेव्हा पालथी पडू लागली, तेव्हा रक्मा चक्क चालू लागली! इतर मुले-मुली ज्या वयात भातुकलीचा, बाहुला-बाहुलीचा खेळ खेळत असत, त्या वयात रक्मा निरनिराळ्या देवांच्या मूर्ती घेऊन खेळत असे, भगवान श्रीकृष्ण व राधेचे रक्माला विलक्षण वेड असे. गोकर्णाच्या समुद्रकिनारी फिरावयास, खेळण्यास गेलेली मुले शंखशिंपले गोळा करीत, तर रक्मा वाळूची शंकराची पिंडी करून समुद्राच्या पाण्याने त्याला अर्घ्य देई. रक्माचे वडील बाबूराव हे श्रवणीय बासरीवादन करीत, त्या वेळी छोटी रक्मा त्या सुरावर भगवान श्रीकृष्णाचा ‘कालियामर्दन’ नाच करीत असे. भगवान श्रीकृष्णाची छोटीशी मूर्ती ती सदैव जवळ घेऊनच वावरत असे. झोपतानाही उशीजवळ कृष्णाची मूर्ती पाहिजे, उठताना प्रथम श्रीकृष्णाची मूर्ती दिसली पाहिजे, असा तिचा बालहट्ट असे.

वयाच्या पाचव्या वर्षी ती उत्तम भजने म्हणू लागली. मराठी मातृभाषेबरोबरच कानडी ही परिसर भाषा आणि एवढेच नव्हे, तर गुजराती-हिंदी या भाषांतील अनेक उत्तमोत्तम भजने ती म्हणत असे. एकदा दारावर आलेल्या बैराग्याकडून तिने ‘ॐ’चा नाद ऐकला व पुढे सतत

‘ओम्-ओम्’ असा उच्चार करण्याचा तिला नाद लागला. श्रीगुरू सिद्धारूढस्वामी यांनी अनुग्रह देईपर्यंत तिचा हा ओंकार चालू राहिला. तिला धार्मिक व्रतवैकल्यांची विशेष आवड होती. मोठ्या महिलांसमवेत कार्तिक महिन्यातील स्नानासाठी भल्या पहाटे उठून ती समुद्रस्नानास जाई. इतर महिलांना समुद्रस्नानानंतर थंडी वाजत असे; पण रक्माला प्रसन्न वाटत असे. ती ओल्या अंगानेच गोकर्णाला पाणी घालण्यास जाई.



**श्री सिद्धारूढ स्वामी**

वयाच्या पंधराव्या वर्षी आई-वडिलांनी योग्य स्थळ पाहून रक्माचे लग्न लावले. तिरकोईनूर या गावातील इन्स्पेक्टर असलेल्या एम. राजगोपाल यांच्याशी रक्माचे लग्न झाले. सासरचे सर्व वातावरणही धर्मपरायण होते. त्यामुळे धार्मिक वृत्तीच्या रक्माबाईस मोठी अनुकूलता लाभली. आनंदात संसार सुरू झाला. दोन वर्षांनी त्यांना पुत्ररत्न प्राप्त झाले, त्याचे नाव श्रीकृष्णाची आवड असणाऱ्या रक्माबाई यांनी ‘बाळकृष्ण’ असे ठेवले. पुढे दोन वर्षांनी त्यांना आणखी एक मुलगा झाला, तो ‘कमलाकर’. रक्मादेवीच्या नशिबात संसारसुख एवढेच होते. पुढे वर्षभरात पती एम. राजगोपाल यांचे अकाली निधन झाले. पुढे वडील व सासऱ्यांचेही निधन झाले. रक्मादेवी हा आघात सहन करू शकल्या नाहीत. त्यांनी आत्महत्येचा प्रयत्न केला. त्या प्रसंगी एका साधूने त्यांना परावृत्त केले व ‘‘हुबळीला सिद्धारूढस्वामींकडे जा, ते तुझी वाट पाहत आहेत,’’ असा उपदेश केला.

त्यानंतर दोन मुलांना घरी ठेवून रक्मादेवी गोकर्णहून चालत हुबळी येथे गेल्या. सिद्धारूढस्वामींच्या मठात प्रवेश करताच, त्यांना पाहताच स्वामी म्हणाले, ‘‘आलीस! ये, मी तुझीच वाट पाहत होतो !’’ १९२८ साली दसऱ्याच्या मुहूर्तावर सिद्धारूढस्वामींनी रक्मादेवीला अनुग्रह दिला. तिचे नाव ‘कलावतीदेवी’ असे ठेवले व त्यांना प्रवचन करण्यास सांगितले.

कलावतीचा साधनाकाळ पूर्ण होताच स्वामींनी कलावतीदेवींच्या मस्तकावर हात ठेवला आणि त्या आठ तास समाधिवस्थेतच राहिल्या. यानंतर त्यांना अनेक सिद्धी प्राप्त झाल्या. गुरुआज्ञेने व मदतीने बेळगावजवळ ‘अनगोळ’ येथे परमार्थ निकेतन हा त्यांचा आश्रम तयार झाला. तेथून त्यांचे कार्य सुरू झाले. गावोगावी उपासना केंद्रांची सुरुवात झाली. त्यांचा भक्तवर्ग वाढत गेला. आज हजारो उपासना केंद्रांद्वारे लाखो भक्तांच्या हृदयात त्या निवास करीत आहेत, मार्गदर्शन करीत आहेत. अशा कलावतीदेवींचे वयाच्या सत्तराव्या वर्षी वृद्धापकाळाने आजारी पडून, जसलोक हॉस्पिटलमध्ये नेत असतानाच देहावसान झाले.

- विद्याधर ताठे

**संदर्भ :**


१. *सिद्धारूढस्वामी मठाचे वाङ्मय.*
२. *कलावतीदेवी भक्तमंडळ पुस्तिका.*


## कवीश्वर, दत्त महाराज धुंडिराजशास्त्री

**धर्मसुधारक, ग्रंथकार**

**२ मार्च १९१० - १ मार्च १९९९**

दत्त महाराज कवीश्वर यांचा जन्म एका शास्त्री-पंडिताच्या घराण्यात माघ वद्य षष्ठी, शके १८३१ रोजी झाला. त्यांच्या आईचे नाव सरस्वती होते. दत्त महाराजांचा जन्म ‘वाडी’ येथे झाला म्हणून त्यांचे नाव ‘दत्त’ ठेवण्यात आले. श्री दत्त महाराजांचे शिक्षण वडील धुंडिराजशास्त्री यांच्या हाताखाली सुरू झाले. त्यांच्याकडे त्यांचे वेदाध्ययन झाले. वेदविद्येखेरीज



मंत्रविद्या, साहित्यशास्त्र, व्याकरण, न्याय, वेदान्त, मीमांसा इत्यादी विषयांचाही त्यांनी व्यासंग केला. ते अनेक गुरूंकडे शिकले. पं. शंकरशास्त्री जेरे, व्यंकटेशशास्त्री अभ्यंकर, नागेश्वरशास्त्री, सुब्बाशास्त्री, राजेश्वरशास्त्री द्रविड यांच्यासारख्या गुरुजनांचे दत्त महाराज यांनी शिष्यत्व पत्करले आणि त्यांची कृपा संपादन केली.

दत्त महाराजांचा विवाह लक्ष्मीबाई यांच्याशी १९३० साली झाला. विवाहाच्या वेळी दत्त महाराज वीस वर्षांचे आणि लक्ष्मीबाई केवळ बारा वर्षांच्या होत्या. त्यांनी आपल्या पतीला जन्मभर अप्रतिम साथ दिली.

श्री दत्त महाराजांची विद्वत्ता आणि नम्रता अतुलनीय होती. त्यांना अनेक शास्त्रांचे शाब्दिक ज्ञान प्राप्त झाले होते. कमी होती ती प्रत्यक्ष अनुभूतीची! त्यांना तेही भाग्य लाभले. ते गुळवणी महाराजांच्या सहवासात आले. थोड्याच दिवसांत एकमेकांचा स्नेह जुळला. गुळवणी महाराजांनी त्यांना शक्तिपातदीक्षा दिली. एवढेच नाही, तर त्यांना आपले उत्तराधिकारी नेमले.

श्री दत्त महाराज कवीश्वर यांनी ‘वेदान्त पारिजात सौरभ’ नावाचा ग्रंथ लिहिला आहे. आपल्या पत्नीचे निधन झाल्यानंतर महिन्या-दीड महिन्याने दत्त महाराजांनी वयाच्या नव्वदाव्या वर्षी आपला देह ठेवला. श्री दत्त महाराज कवीश्वर यांच्या व्यक्तिमत्त्वाचा परिचय डॉ. शरदचंद्र कोपर्डेकर यांनी अत्यंत समर्पक शब्दांत करून दिला आहे. ‘श्री दत्त महाराज हे सनातन परंपरेतून घडलेले अलौकिक प्रज्ञावंत होते आणि खुल्या मनाने मुक्तपणे चिंतन करणारे प्रतिभाशाली तत्त्वज्ञही होते. धर्मशास्त्रांवर प्रभुत्व असणारे प्रकांडपंडितही होते आणि ‘सर्वभूतहिते रत:’ या वृत्तीचे निखळ संतही होते. तर्ककठोर महाज्ञानीही होते आणि भावकोमल भक्तही होते. ते ब्रह्मविदही होते आणि धर्मसुधारकही होते. अनेक परस्परविरोधी, भिन्न गोष्टी त्यांच्या एकाच व्यक्तिमत्त्वात एकवटल्या होत्या. वैचारिक विसंगती दूर करणारा अलौकिक प्रज्ञेचा हा शान्त तत्त्वज्ञ आणि योगी सदैव वैश्विक पातळीवर बुद्धिवंताच्या रूपानेच जगाला दिसत राहिला. भविष्यकाळात भावी पिढ्यांना असा, इतक्या विविधांगी कर्तृत्वाचा अलौकिक प्रज्ञावान भारतात होऊन गेला यावर विश्वास ठेवणेही अवघड वाटेल, आणि तो प्रज्ञावंत पूर्णतया निरहंकारी आणि विनयशील असल्याने अमानित्वाच्या भूमिकेतून प्रसिद्धीपासून पूर्णतया दूर राहिला यावर विश्वास ठेवणे त्याहूनही अवघड वाटेल!’

– डॉ. वि.य. कुलकर्णी

**संदर्भ :**

*१. डॉ. कोपर्डेकर, शरदचंद्र; ‘श्री दत्त महाराजांचे विचारधन : भाग एक’.*

*२. ‘स्वामी महाराज’ दिवाळी अंक, २००८.*

## करंदीकर, नानासाहेब

***करंदीकर, मुकुंद महेश्वर***

**स्वामी समर्थभक्त, स्वामी भवन निर्माता**

**३ सप्टेंबर १९२३ – १६ जानेवारी १९८४**

**ना**नासाहेब, अर्थात मुकुंद महेश्वर करंदीकर यांचा जन्म ठाणे येथे जन्माष्टमीच्या दिवशी झाला. करंदीकरांच्या घरात देवभक्तीपेक्षा देशभक्तीचे वातावरण अधिक होते. त्यामुळे लहान वयातच नाना ठाण्यात राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या शाखेत जात असत. शाखेत त्यांना राष्ट्रभक्तीचे बाळकडू मिळाले. घरात

स्वातंत्र्यसैनिक वडिलांचे संस्कार होतेच. त्यांचे घराणे सधन होते. त्यामुळे देशसेवा, समाजसेवा करण्यासाठी पुरेसा वाव आणि मोकळीक होती. जोडीला दानतही होती. ठाण्यातच शालेय आणि महाविद्यालयातील शिक्षणानंतर मुकुंदरावांनी खाजगी कंपनीत व्यवस्थापन विभागात अधिकारपदाची नोकरी काही काळ केली. ते चांगल्या प्रकारे नोकरीत रुळलेही होते आणि एक दिवस, १९६४ सालात त्यांना अक्कलकोट निवासी श्रीस्वामी समर्थांनी स्वप्नात दर्शन दिले आणि 'लोकांमध्ये भक्तीचा प्रसार आणि प्रचार कर' म्हणून सुचविले.

या अनुभवातून नानांच्या मनात समर्थभक्तीची ज्योत प्रज्वलित झाली. इतकी, की त्यांनी मोठ्या आमदनीच्या नोकरीचा तडकाफडकी राजीनामा दिला. त्या वेळी त्यांचे वय होते अवघे ४१ वर्षांचे. त्यांचा विवाहही झाला होता; परंतु त्यांनी समर्थांच्या आदेशाप्रमाणे समर्थविचारांचे प्रसारकार्य सुरू केले.

दरम्यान, १९७६ सालात स्वामींनी नाना करंदीकर यांना पुन्हा एकदा दृष्टान्त दिला. तेव्हा नानांनी १९७६ साली ठाणे ते अक्कलकोट अशी पदयात्रा केली. त्यानंतर १९७९ सालातही त्यांनी ठाणे ते जगन्नाथपुरी ही दीर्घ पल्ल्याची पदयात्रा केली. ही पदयात्रा म्हणजे केवळ रस्त्यावरून पायी चालणे नव्हते, तर समर्थविचारांचा जागोजागी प्रसार करणे हा हेतुसंकल्प त्यात होता. या दोन दीर्घ पदयात्रांनंतर १९८० साली नानांना गंभीर आजाराने घेरले. त्यांना अनेक अडचणींना सामोरे जावे लागले. परंतु, ही स्वामींची परीक्षा होती. त्यातच पुन्हा एकदा समर्थांनी त्यांना स्वप्नात आदेश दिला. स्वामी समर्थांनी त्यांना मुंबईच्या आसपास एखादे देऊळ बांधायला सांगितले. त्यात वास्तव्य करण्याची इच्छाही स्वामींनी प्रदर्शित केली. त्यानुसार मग प्रकृतीस आराम पडू लागल्यानंतर नाना करंदीकर कामाला लागले.

लोणावळा येथे १९८१ साली जमीनखरेदीचे सर्व व्यवहार पूर्ण करून १९८२ साली मंदिर उभारणीस सुरुवात करण्यात आली. या वास्तूत येऊन भाविकांना चिंतन आदी ध्यानसाधना करता यावी, अशी नाना करंदीकरांची संकल्पना होती. यामुळे या इमारतीला 'स्वामी भवन' हे समर्पक नाव देण्याचे ठरले. या भवनाच्या उभारणीत पैशांची अडचण कधीच आली नाही. नानांनी पदयात्रेतून हजारो स्नेही, भाविक निर्माण केले होते. त्या साऱ्यांच्या योगदानातून पैसे, भांडी, वस्तू हा हा म्हणता गोळा झाल्या.

स्वामी भवनात साधक, भक्तांच्या ध्यानसाधनेत व्यत्यय येऊ नये म्हणून घंटा बसविलेली नाही. १०० किलो वजनाची शुद्ध तांब्यातील आजानुबाहू स्वामी समर्थांची जिवंत वाटणारी, सहा फुटांहून अधिक उंचीची मूर्ती, ६० X ९० चौरस फुटांच्या भव्य दालनात उभी केली आहे. श्याम सारंग हे या मूर्तीचे शिल्पकार आहेत. सारंग यांनी समर्थांच्या केवळ फोटोवरून मूर्ती घडवायचे ठरवले; परंतु ते समाधानी नव्हते. मूर्तीमध्ये परिपूर्णता येण्यासाठी स्वामींचे पाठमोरे दर्शन कसे होईल अशी तळमळ त्यांना लागली होती. तेव्हा स्वामी त्यांच्या स्वप्नात आले आणि त्यांनी स्वत:भोवती प्रदक्षिणा घालून सारंग यांना सर्वांगदर्शन दिले.

मंदिर पूर्ण झाल्यानंतर नाना करंदीकर यांनीच उद्‌घाटनासाठी १५ एप्रिल १९८४ हा हनुमानजयंतीचा दिवस सुनिश्चित केला. त्यापूर्वी नानांनी स्वत: ११ डिसेंबर १९८३ रोजी स्वामींच्या मूर्तीची पूजा केली. मंदिराची पुढे देखभाल आणि उपचार कसे असतील याची संहिताही नानांनी तयार करून ठेवली होती. मूर्तीवर पारंपरिक पद्धतीने अभिषेक न होता १०८ जपांनी व्हायला हवा. या प्रसंगी सोवळेओवळे, जाचक ठरणारे प्रकार बंद व्हावेत, तसेच भवनाचा मुख्य उत्सव स्वामी-जयंती म्हणजे चैत्र शुद्ध द्वितीया या समर्थांच्या जन्मदिनीच असेल, या काही मार्गदर्शक सूचना त्यांनी देऊन ठेवल्या होत्या.

'स्वामी भवन' जेव्हा सुरू झाले, त्या वेळी १३ कोटी जपांचा लेखनसंकल्प केला गेला होता. परंतु, स्वामिभक्तांना याची बातमी कळताच हा आकडा २४ कोटींवर गेला. स्वामिभवनाच्या तळघरात हे जपलेखन जपून ठेवले आहे. स्वामी मंदिराचे विधिवत उद्‌घाटन

होण्यापूर्वीच नानांनी या जगाचा निरोप घेतला. त्यांच्या पश्चात त्यांच्या पत्नीने नानांचे कार्य पुढे चालू ठेवले. नानांची स्मृती त्यांच्या भक्तांनी स्वामी भवनाशेजारी बांधलेल्या त्यांच्या समाधीतून जागृत ठेवली आहे. या समाधीसमोर 'सकलजनहिताय' हे स्वामी भवनाचे ब्रीदवाक्य कोरले असून नानांची तसबीर तेथे ठेवण्यात आली आहे.

— संदीप राऊत

## कर्वे, लीलाताई

**कृष्णभक्त, ईश्वरभक्ती प्रसारक**

**२९ मे १९३४ – १० फेब्रुवारी २००३**



**ली**लाताई कर्वे यांना भाविक भगवान श्रीकृष्णाचा अवतार समजत. लीलाताईंऐवजी 'लीलाकृष्ण' म्हणून त्यांचा आदराने उल्लेख करीत. अशा थोर अवस्थेला पोहोचलेल्या लीलाताई कर्वे यांचा जन्म गोव्यातील मंगेशी येथील रघुनाथ शेणवी यांच्या घरात झाला. त्यांची आई गरोदर असताना त्यांना नवदुर्गेचा दृष्टान्त झाला होता. 'देव तुझ्या पोटी जन्म घेणार आहे,' असे देवीने सांगितले होते. त्यांची मुले जगत नव्हती म्हणून ताईचा जन्म होताच आईने तिला शेजारी राहणाऱ्या मथुराबाई यांच्या ओटीत घातले. हा तोडगा त्या काळी गोव्यात प्रचलित होता. ताई दीड वर्षाच्या असताना त्यांच्या वडिलांचे निधन झाले. मग आई व ताई आत्याच्या सोबतीने राहू लागल्या. उदरनिर्वाहासाठी आपल्या घरातील दोन खोल्या मंगेशीच्या दर्शनास येणाऱ्या भाविकांना त्या भाड्याने देत असत.

मंगेशी येथेच लीलाताईंचे प्राथमिक शिक्षण झाले. त्यांचे पुढील शिक्षण बेळगाव येथे झाले. एस.टी.सी. पर्यंत शिकून त्या शिक्षिका झाल्या. त्यांनी बेळगाव येथे हेरेकर कुटुंबात, त्यांच्या घरातील सर्व घरकामे करून आपले शिक्षण पूर्ण केले. अशा प्रकारे 'कमवा व शिका' असा ध्येयवाद त्यांनी निष्ठेने जोपासला होता.

शिक्षिकेच्या नोकरीनिमित्त त्यांना बेळगाव, सौंदलगा, चिक्कोडी, खानापूर, गुंजी या गावी जाऊन राहावे लागले. या सर्वच ठिकाणी लीलाताईंनी कृष्णभक्तीचा प्रचार-प्रसार केला व मोठ्या संख्येने लोकांना भगवद्गीतेकडे आकर्षित केले. १९६३ साली त्यांचा कर्वे यांच्याशी विवाह झाला. हे कर्वे निष्ठावान कृष्णभक्त होते. त्यामुळे लग्नानंतरही लीलाताईंचे कृष्णभक्ती प्रचार-प्रसार कार्य अव्याहतपणे, अखंडपणे पुढे सुरू राहिले. यथावकाश त्यांना नंदा, वैभवी व संतोष अशी तीन मुले झाली.

प्रपंचातील सर्व जबाबदाऱ्या योग्य प्रकारे सांभाळून नोकरी करीत त्यांनी आपले कृष्णभक्तीचे कार्यही नेटाने व नेटकेपणाने केले. नामस्मरणाच्या बळावर त्यांचे भगवान श्रीकृष्णाशी नित्य अनुसंधान होते. श्रीकृष्णाच्या आदेशानुसार लीलाताईंनी २५ ऑगस्ट १९७८ रोजी ठाणे जिल्ह्यातील बदलापूर येथे 'कृष्णकुटीर' बांधले. ध्यानमंदिराबरोबरच ज्ञानमंदिर म्हणून ते अल्पावधीतच भाविकांमध्ये प्रसिद्ध झाले. त्यानंतर 'द्वारकाधीश मंदिर' आपटा पाटा (जि. रायगड), 'वृंदावन' (कर्वेनगर, पुणे), 'गोवर्धन मंदिर' (स. पिंपरी, नाशिक), 'गोकूळ मंदिर' (डाळिंबी, पुणे जिल्हा), 'योगेश्वर मंदिर' (गोवा) अशी पाच कृष्णमंदिरे निर्माण केली व कृष्णभक्तीचा-भगवद्गीतेच्या बोधाचा प्रभावी प्रचार केला. भारताच्या विविध प्रांतांत आणि परदेशांतही त्यांनी सुमारे ४०० कृष्णभक्ती केंद्रे सुरू केली.



अमेरिकेतील लॉस एंजेलिस येथील मंदिरातील दुर्गामाता मूर्ती

२८ मे १९८३ रोजी लीलाताईंच्या पतीचे निधन झाले. पण त्यांनी कठोर परिस्थितीतही आपले कृष्णभक्ती प्रचारकार्य चालू ठेवले. एके दिवशी त्यांना विश्वजननीची नऊ मंदिरे बांधण्याचा ईश्वरी संदेश प्राप्त झाला. लीलाताई या कृष्णकुटीर व मुलाबाळांच्या संसारापासून पूर्ण अलिप्त झाल्या व विश्वजननीची मंदिरे उभारणीच्या कार्याचा ध्यास घेऊन नव्या जोमाने कार्यरत झाल्या.

पुणे, जोगेश्वरी (मुंबई), रत्नागिरी, कुमठा, हळदीपूर, बदलापूर, रांची (छत्तीसगड), दोहा (कतार), लॉस एंजेलिस (अमेरिका) आणि दिल्ली अशा नऊ ठिकाणी त्यांनी विश्वजननीची नऊ मंदिरे उभी करून आपला संकल्प पूर्ण केला. अमेरिकेतील विश्वजननी मंदिराचे उद्‍घाटन ७ ऑक्टोबर २००१ रोजी करण्यात आले, तर दिल्ली येथील मंदिर २ फेब्रुवारी २००३ रोजी पूर्णत्वास गेले. वयाच्या एकोणसत्तराव्या वर्षी, १० फेब्रुवारी २००३ रोजी, म्हणजे दिल्लीतील अखेरचे विश्वजननी मंदिर बांधून पूर्ण होताच आठ दिवसांनी लीलाताई कृष्णध्यानाला बसल्या आणि ध्यानावस्थेतच त्यांनी भगवान श्रीकृष्णाच्या चरणी देह अर्पण केला.

त्यांच्या समाधीनंतर सर्व मंदिरांतील सर्व कार्यक्रम त्यांनी घालून दिलेल्या पद्धतीनुसार भाविक-भक्त पुढे चालवीत आहेत. बदलापूरची कृष्णकुटीर एक ऊर्जाकेंद्र म्हणून भक्तांना स्फूर्ती देत आहे.

– विद्याधर ताठे

## कावडीबाबा

*पिंपळगावकर, विठ्ठल अनंत*

**विठ्ठलभक्त, मातृपितृभक्त, ग्रंथकार**

**११ एप्रिल १७९७ - २४ मार्च १८६३**



**का**वडीबाबा म्हणजेच पूर्वाश्रमीचे विठ्ठल अनंत पिंपळगावकर यांचा जन्म शके १७१९ चैत्र शु. १५ रोजी झाला. त्यांचे घराणे मूळचे अहमदनगर जिल्ह्यातील पारनेर तालुक्यातील पिसा पिंपळगाव येथील होय. हे संतश्रेष्ठ विठ्ठलभक्त निंबराज महाराज यांचे नातू होत. निंबराजांचे ज्येष्ठ पुत्र नारायण हे कावडीबाबांचे आजोबा होत. विठ्ठल यांचे बालपण आईवडिलांच्या सान्निध्यात फार सुखात गेले. त्यांचे वयाच्या १२व्या वर्षी संपूर्ण संहिता, पदक्रम, जटा, घन आदी पाठ पूर्ण होऊन त्यांची वैदिकांत गणना होऊ लागली. कावडीबाबा यांनी पाणिनीचे सिद्धान्त, कौमुदी, पंचकाव्य, साहित्यमंजिरी यांचा अभ्यास केला. पुराणग्रंथाचा अभ्यास करून ते पुराणही सांगू लागले. पंधराव्या वर्षांपर्यंत व्याकरण,

न्याय, मिमांसा, साहित्य, काव्यालंकार, नाट्य, चंपू इत्यादी शास्त्राध्ययनही पूर्ण केले. खेड येथील थोर सत्पुरुष चंडिराम महाराज यांच्या कृपेने विठ्ठलाच्या ज्ञानात भर पडली, त्यांचा समाधियोगाचा अभ्यास वाढला.

कावडीबाबा यांचे सदाशिव वामन देशपांडे यांच्या लक्ष्मी नावाच्या कन्येशी १८१८ साली लग्न झाले. मात्र त्यांची भजनकीर्तनाची गोडी दिवसेंदिवस वाढतच गेली. आपल्या वृद्ध मातापित्यांची सेवा करण्यासाठी त्यांनी कुलकर्णीपणाच्या कामातून पूर्ण निवृत्ती घेतली. अशातच त्यांच्या पत्नीचेही निधन झाले. विठ्ठलपंतांची विरक्ती अधिकच वाढली.

कावडीबाबा यांच्या आईवडिलांच्या डोळ्यांना दिसेनासे झाले. तेव्हा त्यांना घेऊन काशीयात्रेस जाण्याचा विठ्ठलपंतांनी बेत ठरविला. आईवडिलांसाठी डोलीप्रमाणे कावड बनवून त्यांनी ती खांद्यावर घेऊन तीर्थयात्रा सुरू केली. पंढरपूर, गाणगापूर, कुंभकोण, रामेश्वर, कन्याकुमारी, मथुरा, वृंदावन, प्रयाग, गया इत्यादी अनेक तीर्थक्षेत्रांची त्यांनी यात्रा केली. त्यांना सर्व लोक कावडीबाबा या नावानेच ओळखू लागले. गयेस फल्गु नदीच्या काठी त्यांच्या मातोश्रीने प्राण सोडला. काशीला आल्यावर त्यांच्या वडिलांनी संन्यासाश्रम घेतला व अनंतानंद सरस्वती नाव धारण केले, वर्षभरात त्यांनीही समाधी घेतली. यानंतर कावडीबाबांनी रिकाम्या कावडीत विठ्ठल-रखुमाई यांच्या मूर्ती ठेवल्या व त्यांची यात्रा सुरूच राहिली. गालब क्षेत्रात आल्यावर दत्तजयंतीच्या दिवशी दत्तात्रेयांवर ग्रंथ लिहिण्याची त्यांना प्रेरणा झाली. नारदपुराणाचा आधार घेऊन कावडीबाबा यांनी 'श्रीदत्तप्रबोध' या ग्रंथाच्या रचनेस प्रारंभ केला. अवंती येथे असताना 'श्रीदत्तप्रबोध' या ग्रंथाचे चाळीस अध्याय पूर्ण झाले.

याच सुमारास त्यांच्याकडून करुणाशतक, अभंग, पदे, भजने यांची रचना झाली. नंतर यात्रा करीत द्वारकेवरून ते डाकोरला आले. डाकोरनाथांच्या आज्ञेवरून ते बडोद्याला येऊन स्थिरावले. त्यांच्या शिष्याने बडोद्याला त्यांना एक राममंदिर बांधून दिले. त्याच देवळात कावडीबाबांच्या कावडीतील विठ्ठल-रखुमाई यांच्या मूर्तीही विराजमान झाल्या. 'दत्तप्रबोध' या ग्रंथाचे उरलेले २१ अध्यायही येथे पूर्ण झाले. एकसष्ट अध्यायांच्या या ग्रंथाची ओवीसंख्या चौदा हजार दोनशे छत्तीस आहे. सुलभ भाषेत कर्म, ज्ञान, उपासना, योग, वेदान्त आदी विषयांचे अत्यंत मार्मिक विवेचन यात केलेले आहे. दत्तसंप्रदायावरील मोजक्या ग्रंथात याचा समावेश होतो. यानंतर तीनचार वर्षांतच एका नामसप्ताहात कावडीबाबा यांचे निर्वाण झाले.

- संपादक मंडळ

## कालगावकर, अण्णाबुवा

***खुपेरकर, शामाचार्य नरसिंहाचार्य***

**समर्थ संप्रदाय, संस्कृत पंडित, संपादक**

**१० जानेवारी १९०३ – ३ ऑक्टोबर १९९९**



**आ**युष्यभर ब्रह्मचर्यव्रताचे पालन करून प्रपंच आणि अध्यात्म यांची उचित सांगड घालून कृतार्थ जीवन व्यतीत केलेले अण्णाबुवा कालगावकर हे थोर समर्थभक्त साताऱ्यात होऊन गेले. त्यांचे पूर्ण नाव शामाचार्य नरसिंहाचार्य खुपेरकर असे होते. चाफळ मुक्कामी, मावशीच्या घरी (आजोळी) अण्णाबुवांचा जन्म झाला. त्यांना दत्तात्रेय हे वडीलबंधू होते.

अण्णाबुवांचे प्राथमिक शिक्षण चाफळ, ता. पाटण आणि कालगाव, ता. कराड येथे झाले. माध्यमिक शिक्षण औंध संस्थानात (तालुका खटाव) झाले. शालेय जीवनापासून अण्णाबुवांची ओढ अध्यात्माकडे होती. दासबोधादी अद्वैत ग्रंथाचे ते नियमित वाचन करीत. त्या काळात वडुजचे नारायण महाराज गोडसे मसूरकर हे कालगाव पंचक्रोशीत फिरत असत. त्यांची गाठ अण्णाबुवांशी पडली. नारायण महाराज हे आत्मज्ञानी, अभ्यासी, अधिकारी पुरुष होते. त्यांनी अण्णाबुवांना लहानपणीच गुरुमंत्र दीक्षा दिली. पू. नारायणबुवा हेसुद्धा ब्रह्मचारी होते. मसूर व सज्जनगड येथे आजही त्यांची मठी आहे.

शिक्षणानंतर अण्णाबुवा पंढरपूरच्या संस्कृत पाठशाळेत दाखल झाले. तेथे त्यांनी तीन वर्षे संस्कृत ग्रंथांचा अभ्यास केला. ते संस्कृत भाषेत प्रवीण असून संस्कृतात लेखन, भाषण करीत असत. घरामध्येही दिवसाचा काही काळ घरची मंडळी संस्कृतात बोलत असत. अण्णाबुवांचे वडील नरसिंहाचार्य हे संस्कृत पंडित होते. ते भागवत सांगणे, पुराण सांगणे इ. करीत. कालगाव हे त्या वेळी पंडितांचे गाव होते. कृष्णाकाठी असलेल्या अण्णाबुवांच्या कालगावात व पंचक्रोशीत अनेक पाठशाळा उत्तम चालत होत्या. हे गाव शाहू महाराजांनी आचार्यांना इनाम दिले व त्याबरोबर पंचक्रोशीतील ६० गावे इनाम दिली. खुपेरकर घराणे कोल्हापूर भागातून कालगाव येथे आले. आचार्यांचे मूळपुरुष ‘कृष्णाचार्य’ हे विद्वान शाहू महाराजांच्या दरबारात पंडितरत्न होते.

अण्णांच्या आई हरीबाई यांचे माहेर कालगावचे. अण्णांनी त्या काळात ठाण्याच्या पोस्टात सुमारे दोन वर्षे नोकरी केली; पण ते नोकरीत रमले नाहीत. मुंबईत त्यांचा काँग्रेसमधील अनेक नेत्यांशी संबंध आला. ते मुंबई शहर काँग्रेसचे सचिव होते. स्वातंत्र्य चळवळीत त्यांचा सहभाग होता. काकासाहेब कालेलकर हे त्यांचे सहकारी होते. काही काळानंतर अण्णाबुवा यांनी तपश्चर्येसाठी भ्रमण केले. नाशिकला जाऊन रामदर्शन घेतले. अंगापूरच्या डोहाजवळील ब्रह्मपुरीत तीन वर्षे अनुष्ठानपूर्वक तप केले. उपासनेत / तपश्चर्येत खंड पडू नये म्हणून ते झाडावर बसून तप करीत असत. अथणीशेजारी असलेल्या ऐनापूर येथे त्यांनी काही दिवस तपश्चर्या केली. त्यानंतर नृसिंहवाडी, औदुंबर इत्यादी ठिकाणीही त्यांनी तप केले. खुपेरकर - आचार्य ही मध्वसंप्रदायी मंडळी असल्याने अण्णांना त्याच संप्रदायाच्या माणसांकडून अन्न घ्यावे असा नियम होता. त्यांनी आयुष्यात कधीही कांदा-लसूण घेतला नाही. अण्णाबुवा कालगावकर यांनी तेरा कोटी गायत्री पुरश्चरण केले. दरवर्षी मसूरला गुरुमहाराजांच्या हनुमानजयंती उत्सवाला ते येत असत.

अण्णाबुवांनी जीवनात अध्यात्म आणि व्यवहार यांची उचित सांगड घातली. त्यांचे जीवन प्रपंच आणि परमार्थ या दोन्ही अंगांनी संपन्न होते. त्यांना इंग्रजी, मराठी, हिंदी, संस्कृत या भाषा चांगल्या अवगत होत्या. १९३९ साली अण्णाबुवांचे बंधू दत्तात्रेय स्वर्गवासी झाल्यामुळे अण्णांनी त्यांच्या प्रपंचाची पूर्ण जबाबदारी दीर्घकाळपर्यंत सांभाळली. कुटुंब मोठे होते. भावाची तीन मुले अत्यंत लहान वयाची होती. भाऊ गेल्यानंतर भाऊबंदांनी अण्णांच्या कुटुंबीयांविरुद्ध मालमत्तेच्या लोभापोटी दावे लावले व ते निस्तरताना अण्णांना प्रचंड कष्ट आणि मनस्ताप सहन करावा लागला; पण अण्णांनी सर्व संकटांना खंबीरपणे तोंड दिले. हे करीत असताना अण्णाबुवा वेळोवेळी सज्जनगडी जात असत. त्यांची श्रीसमर्थांशी बांधीलकी होती. त्याच काळात कुटुंबाचा उदरनिर्वाह उत्तम चालावा म्हणून शेतीचा व्यवसाय अण्णांनी उत्तमरीत्या केला. भाऊबंदांनी लावलेले सर्व दावे जिंकले.

श्रीधर स्वामी आणि अण्णाबुवा यांचे अत्यंत निकटचे संबंध होते. अण्णाबुवांच्या आग्रहावरून श्रीधर स्वामी दीड महिना कालगावी विठ्ठल मंदिरात वस्तीस होते. १९५० साली श्री समर्थ सेवा मंडळाची स्थापना झाली. यामध्ये श्रीधर स्वामींना बाबूराव वैद्य यांच्याबरोबरच अण्णाबुवांचा प्रथमपासूनच सहभाग होता. १९५२ मध्ये

'सज्जनगड मासिक पत्रिका' प्रकाशित होऊ लागली. आरंभी, कल्याण सेवक हे या पत्रिकेचे संपादन करीत होते. पुढे ते संकेश्वर मठाचे शंकराचार्य झाले. त्यानंतर सुमारे ४० वर्षे 'सज्जनगड मासिक पत्रिके'ची संपादकीय धुरा अण्णाबुवांनी अत्यंत कुशलतेने सांभाळली. त्यांनी विद्वत्ताप्रचुर, तसेच भक्तिपूर्ण, अध्यात्मसंपन्न असे लिखाण सातत्याने केले.

१९६३ च्या आसपास अण्णाबुवा श्रीसमर्थ सेवा मंडळाचे अध्यक्ष झाले. ही धुरा त्यांनी १९९७ पर्यंत सांभाळली. समर्थ सदन घेण्याची कल्पना अण्णाबुवांची! अण्णाबुवा हे उत्तम प्रवचनकार होते. ते अनेक वर्षे श्रीधर स्वामींच्या संपर्कात होते. श्रीधर स्वामींनी अण्णाबुवांना अनुग्रह देण्याचा अधिकार दिला. अण्णाबुवांनी बंधूंची मुले शिकवून मोठी केली. त्यांची लग्ने लावून प्रपंच थाटून दिले आणि १९८२ पासून अण्णांनी प्रपंचातील लक्ष काढून घेतले.

१९४८ साली गांधी खुनानंतरच्या दंगलीत कालगावातील खुपेरकरांचे घर जाळले गेले. त्या वेळी प्लेगची साथही होती. त्यामुळे खुपेरकर मंडळी इतरांबरोबर गावाबाहेर छप्पर बांधून राहत होती. ते छप्परही जमावाने जाळले. तरीही अण्णांनी खंबीरपणे या संकटाला तोंड दिले व बंधूंचा प्रपंच सावरला आणि सांभाळला. मध्यंतरी मद्रासमध्ये 'हिंदू' मासिकातर्फे सर्वधर्म परिषद आयोजित केली होती. त्या वेळी समर्थ संप्रदायाचे प्रतिनिधी म्हणून अण्णाबुवांनी त्या परिषदेत प्रवचने आणि व्याख्याने दिली. अण्णाबुवांची उपासना प्रखर होती. अध्यात्मात त्यांचा अधिकार गुरुस्थानाचा होता. त्यांचे चिंतन मूलगामी होते. 'सज्जनगड मासिक पत्रिके'त त्यांनी लिहिलेल्या निवडक संपादकीयांचे संकलन 'अध्यात्म ग्रंथ' या नावाने प्रसिद्ध झालेले आहे. अण्णाबुवांचा शिष्यवर्ग अफाट होता. नागपूरच्या एका महिला शिष्येने अण्णांचे ओवीबद्ध चरित्र लिहिले आहे. वयाच्या सत्त्याण्णवाव्या वर्षी, पुणे मुक्कामी अण्णाबुवांची प्राणज्योत मालवली.

— पद्माकर बोंडाळे

## किसनगिरी बाबा

**दत्तभक्त, सत्पुरुष**

**१३ सप्टेंबर १९०७ - ६ मार्च १९८३**



किसनगिरी बाबा यांचा जन्म गोधेगावातील रामभक्त शबरी समाजात झाला. त्यांच्या वडिलांचे नाव मारुती व आईचे नाव राहीबाई होते. लहान वयातच किसन गावातील पाटील मंडळींची गुरे आणि शेळ्यामेंढ्या राखण्याचे काम करू लागला. किसनचे वागणे लोकांना चमत्कारिक वाटत असे कारण तो आपल्या आईशिवाय अन्य कुणाच्या हातून रांधलेले अन्न खात नसे. पुढे तो आपला स्वयंपाक स्वतःच्या हातानेच करू लागला.

आपल्या भावांसोबत किसन नदीवर मासेमारीसाठी जात असे. तेव्हा भावांनी जाळ्यात धरलेले मासे तो पुनश्च नदीत सोडून देत असे. आठव्या वर्षापासून किसन यांना शिवभक्तीची आवड निर्माण झाली. दिवसभर शेतात राबल्यावर रात्री प्रवरेच्या काठावर वाळूंची पिंड करून तो शिवभक्तीत तल्लीन होत असे. पुढे अन्नाऐवजी एक महिना त्यांनी केवळ लिंबाच्या पानावर काढला. या तपाने त्याच्या अंगी मारुतीरायाप्रमाणे तेज दिसू लागले. त्याच्या हातून शेतीचे काम करून घेणे लोकांना पटले नाही व काम मिळेनासे झाल्यावर चारीधाम यात्रेला जाण्याची इच्छा किसन यांच्या मनात निर्माण झाली.

आपला संकल्प वडिलांना बोलून दाखविल्यावर त्यांनी किसनला आपल्याजवळ चार रुपये बळेच दिले व यात्रेला जाण्याची परवानगी दिली.

या घटनेला केवळ पंधरा दिवस लोटल्यानंतर किसन गावी परतले व आपण चारीधाम यात्रा करून आलो आहोत, असे गावातील सर्वांना सांगू लागले. लोकांनी त्यांना वेड्यात काढले. गावातील काही वृद्ध जाणकार मंडळींनी त्यांना प्रत्येक धामाच्या काही खाणाखुणा विचारल्या असता त्यांनी ती सर्व माहिती बरोबर सांगितली. एवढेच नव्हे तर सर्वांसमक्ष वडिलांनी दिलेले चार रुपये जसेच्या तसे परतही केले. हे पाहून सर्वांना आश्चर्याचा धक्का बसला. यानंतर लोक त्यांना आदराने किसनबाबा संबोधू लागले.

किसनबाबांची बारा वर्षे शिवभक्ती पूर्ण झाली आणि ते गावोगाव फिरून माधुकरी म्हणून चारा, भाकरी व पीठ मागू लागले. असा जमा झालेला चारा गावातील जनावरांपुढे टाकत आणि भाकरी कुत्रे, मासे व पक्षी यांना खाऊ घालत. त्यांना लोक भरभरून माधुकरी देऊ लागले. तेव्हा त्यांनी सप्ताह व भंडारे सुरू केले. बाबा गावात माधुकरी मागायला आल्यास आपल्या गावात शुभ घडते असा अनुभव गावकऱ्यांना आल्यामुळे ते बाबांना भरपूर माधुकरी देऊ लागले.

बाबा प्रवरेच्या तीरावरील औदुंबराच्या खाली बसून श्रीदत्तप्रभूंची भक्ती करीत. त्यांना ही जागा आवडली व या ठिकाणी दत्तप्रभूंचे मंदिर बांधण्याचा मानस त्यांनी भक्तमंडळींकडे बोलून दाखविला. याच काळात त्यांनी नेवासे बुद्रुक येथील संतपुरुष नाथबाबा यांचे शिष्यत्व पत्करले. नदीच्या काठावर उंचसखल जमीन होती. ती सपाट करून जानेवारी १९५७ च्या सुमारास बांधकाम सुरू झाले. बाबांनी माधुकरी मागताना मंदिराच्या बांधकामासाठी पैसे मागण्यास सुरुवात केली. बाबांना लिहितावाचता येत नसल्यामुळे ते हिशेब ठेवत नसत. कामगारांना कामाचे दिवस विचारून पैसे देऊन टाकत. हे बांधकाम बाबांनी कुणाही अभियंत्याच्या अथवा स्थापत्यविशारदाच्या मदतीवाचून साकारले.

संपूर्ण दगडी बांधकाम असलेले हे मंदिर म्हणजे महाराष्ट्रातील शिल्पकलेचा अत्यंत सुंदर नमुना आहे. बाबांना दृष्टान्त झाल्यानुसार त्यांनी या तीर्थस्थानी श्रीशनिमहाराज व मारुतीराय यांचीही स्थापना केली. याचबरोबर विविध देवदेवतांची स्थापना करून भाविकांचे त्रिविध ताप नष्ट होतील अशी उपाययोजना बाबांनी केली. देवगड परिसरात महाराष्ट्र शासनाने भव्य घाटही बांधलेला असून वनविभागाने येथे झाडे लावून येथील निसर्गसौंदर्यात भर टाकली आहे. किसनगिरी महाराजांनी भाविकांना मार्गदर्शन करून जनकल्याणाचे अविरत व्रत चालविले. बाबांचे निर्याण झाल्यानंतर त्यांच्या प्रथम पुण्यतिथीपर्यंत त्यांचे समाधिमंदिरही या ठिकाणी बांधण्यात आले. रंजल्यागांजल्या भाविकांचे हे एक मोठे श्रद्धास्थान बनले आहे.

- दीपक हनुमंत जेवणे

## केडगावकर, नारायण महाराज

**दत्तभक्त, केडगाव बेट दत्तसंस्थान**

**२० मे १८८५ – ३ सप्टेंबर १९४५**



**पु**णे जिल्ह्यातील, दौंड तालुक्यातील ‘केडगाव बेट दत्त देवस्थाना’ची निर्मिती ज्या सिद्धयोगी सत्पुरुषाच्या प्रेरणेतून झाली, त्या सद्गुरू नारायण महाराज केडगावकर यांचा जन्म कर्नाटक राज्यातील, विजापूर

क

जिल्ह्यातील सिंदगी येथे झाला. त्यांचे वडील भीमराव संती हे न्यायखात्यात नोकरी करत होते. त्यांच्या आईचे नाव लक्ष्मीबाई. त्या नरगुंदच्या दरेकर घराण्यातल्या एक धर्मपरायण साधक होत्या. कर्नाटकात होऊन गेलेले प्रसिद्ध दत्तभक्त स्वामी भीमाशंकर हे या 'संती' घराण्यातील एक थोर सत्पुरुष होते.



**श्री नारायण महाराज समाधी, बेंगलुरू, अंतर्भाग**

नारायण महाराज अवघ्या दोन वर्षांचे असताना त्यांच्या वडिलांचे अकाली निधन झाले व ते पाच वर्षांचे असताना त्यांच्या आईचेही निधन झाले. काकांनी त्यांना आजोळी, आजीकडे, नरगुंद येथे नेऊन सोडले. आजीला अन्य कोणी वारस नव्हता, त्यामुळे या नातवास दत्तक घेण्याचा तिचा विचार होता; पण काळाच्या उदरात वेगळेच लिहिलेले होते. नारायण महाराज बालसाधक होते. त्यांना साधना-भक्तीची उपजत आवड होती. ते नरगुंदच्या श्री व्यंकटेश मंदिरात जाऊन बसत. तेथील पूजन, भजन, प्रवचन, कीर्तन हीच त्यांची स्वाभाविक आवड होती. त्यांची साधना पाहून लोक त्यांना 'बालयोगी' मानत होते.

बालनारायण महाराजांवर घराशेजारी राहणाऱ्या श्रीधर भटजी घाटे यांचे विशेष प्रेम होते. त्यांनी आपल्या मुलीच्या लग्नाच्या वऱ्हाडात छोट्या नारायणला धारवाडला नेले व लग्नमंडपातच नारायणाची धर्ममुंज लावण्याचे पुण्यकर्म केले. या व्रतबंधामुळे धारवाडमधील प्रसिद्ध धर्मपंडित कृष्णशास्त्री उप्पिनबेट्टीगिरी यांचा अनुग्रह लाभला. गायत्री मंत्राच्या प्राप्तीने नारायणाची मूळची साधना तेजस्वीपणे प्रकट झाली. मुंजीच्या दिवशी सुरू केलेले प्रात:- सायंसंध्येचे, सूर्योपासनेचे व्रत महाराजांनी समाधीपर्यंत अव्याहतपणे, कटाक्षाने व निष्ठेने जपले. ज्या दिवशी संध्या होत नसे (आजारीपणात), तेव्हा नारायण महाराज अन्नग्रहण करीत नसत. या नित्य सूर्योपासनेचे महाराजांना मोठे पाठबळ होते.

उपनयन होताच नारायण महाराजांना खरेच नयन लाभले व एक नवी दृष्टी, नवा जन्म मिळाला. या काळातच त्यांना 'गुरुचरित्र' प्राप्त होते व भगवान दत्त हेच त्यांचे जीवन होते. केवळ नऊ वर्षांच्या बालकाचे तेज, साधना व नित्यनेमाचा व्रतस्थपणा पाहून सर्व जण थक्क होत. कोणी संतुष्ट होऊन काही दिले, तर त्याचा विनियोग करून नारायण महाराज 'श्री सत्यनारायण महापूजा' करीत. दत्तभक्ती व सत्यनारायण पूजा यांनी त्यांचे जीवन व्याप्त झालेले होते.

महाराजांना बालवयात शुद्ध तुपाची विशेष आवड होती. आजीने तूप वाढले तरी महाराज पुन्हा पुन्हा तूप मागत. त्यावर आजी चिडून रागाच्या भरात नको ते बोलून गेली. महाराज ताडकन ताटावरून उठले व कायमचा गृहत्याग करून निघून गेले. त्यांनी व्यंकटेशाच्या मंदिरात रात्र काढली. आता विश्व हेच माझे घर व 'व्यंकटेशा, तूच माझा पालनकर्ता,' अशी व्यंकटेशाला प्रार्थना करून त्यांनी गावाचा निरोप घेतला. सौंदत्ती, हुबळी असा प्रवास करीत ते पुण्यास आले. पुढे बोपगाव येथे काही दिवस राहून नारायण महाराज आर्वीला गेले.

त्र्यंबकराव अत्र्यांच्या पत्नी लक्ष्मीबाई यांना झालेली पिशाच्चबाधा नारायण महाराजांना पाहताच दूर झाली. महाराज लक्ष्मीबाईंना 'आई' म्हणून हाक मारत उराउरी भेटले. स्वप्नदृष्टान्त होताच महाराजांनी आर्वीहून

गाणगापुरी जाऊन अनुष्ठान केले. त्यांना दत्तदेवतेचा साक्षात्कार झाला. ‘जेथून आला तेथे परत जा,’ असा आदेश मिळाल्यामुळे नारायण महाराज आर्वीला परत आले. आर्वी ते सुपे या रस्त्यावर बढाणे गावचे शिवार, ज्याला ‘बेट’ म्हणतात, ते महाराजांना साधनेसाठी सुयोग्य स्थान वाटले. १९०६ साली महाराज या गावी आले. त्यांचे तेज पाहून त्यांचे दत्तावतार म्हणून संपूर्ण गावाने स्वागत केले. पुण्याचे कलेक्टर ब्रँडन, डेक्कन कॉलेजचे प्रोफेसर वुडहाउस असे अनेक थोर, मोठे लोक नारायण महाराजांकडे आकर्षित झाले. १९१० साली बेट येथील जागा कलेक्टरद्वारा महाराजांना ताब्यात मिळाली व पुढे हे बेट दत्तभक्तांचे, साधकांचे तीर्थक्षेत्र झाले. तेथील दत्तमंदिर व सारा परिसर दत्तभक्तिपीठ म्हणूनच जगभरातील दत्तभक्तांचे श्रद्धास्थान झालेले आहे.

१९३३ साली नारायण महाराजांनी येथे ११०८ सत्यनारायण महापूजा सोहळा साजरा केला. त्यानंतर १९३६ साली दर एक तासाला १०८ याप्रमाणे ७ दिवसांचा ‘सत्यनारायण महापूजा सप्ताह’ साजरा केला. देवभूमी, दत्तभूमी, तपोभूमी म्हणून ‘केडगाव बेट’चे नाव सर्वत्र झाले. हजारो भाविकांची ये-जा सुरू झाली. या भाविकांमध्ये डी.व्ही. पलुसकर, बालगंधर्व, योगी अरविंद घोषांचे योगगुरू लेले असे अनेक मान्यवर होते. या भागात महाराज येण्यापूर्वी ख्रिस्ती धर्मप्रचारक लोकांना फसवून बाटवत होते. नारायण महाराज आले व बाटवाबाटवी बंद झाली. गोवधबंदी व्हावी अशी त्यांची इच्छा होती व त्या लढ्यास त्यांचा पाठिंबा होता. महाराजांनी या ठिकाणी निर्माण केलेली गोशाळा आदर्श आहे. महाराज अत्यंत वैभवात, राजासारखे राहत. रेशमी वस्त्रे, जरीची टोपी परिधान करीत; पण त्यांची वृत्ती कमलदलासारखी, पूर्णपणे अलिप्त व विरक्त होती.

‘परमार्थासाठी संसार सोडून हिमालयात जाण्याची गरज नाही. उपासना करा. उपासनेने सर्वकाही साध्य होईल. ती निष्ठेने करा,’ असा महाराज सर्वांना उपदेश करीत. त्यांनी ना काही ग्रंथलेखन केले, ना प्रवचन-कीर्तन केले. त्यांचा निष्ठाभाव व दृढधर्माचार हीच त्यांची शिकवण होय. १९४५ साली नारायण महाराज यांची भक्तांनी एकसष्टी साजरी केली. त्यानंतर आपले जीवितकार्य संपत आले याची जाणीव होऊन महाराजांनी केडगाव दत्तस्थानाचा कायमचा निरोप घेतला व ते बंगलोरला (बंगळुरू) गेले. तेथील एक भक्त पापण्णांकडे त्यांचा मुक्काम होता. ३ सप्टेंबर १९४५ रोजी त्यांनी बंगलोरच्या मल्लिकार्जुन ग्रामदेवतेची १११ सोन्याची कमळे अर्पण करून पूजा केली, अन्नदान केले आणि बसल्या जागी नारायण महाराजांना इच्छामरण प्राप्त झाले. केडगाव बेट दत्त संस्थान ट्रस्ट करण्यात आला असून या ट्रस्टद्वारे नारायण महाराजांचे उपासना कार्य पुढे चालू आहे.

— विद्याधर ताठे

## केवलानंद सरस्वती

***मराठे, नारायण सदाशिव***

**संस्कृत पंडित, प्राज्ञपाठशाळा संस्थापक**

**८ डिसेंबर १८७७ – १ मार्च १९५५**



धर्म हा परिवर्तनशील आहे अशी भूमिका ठासून मांडणारे, एकोणिसाव्या व विसाव्या शतकातील प्रमुख संस्कृत पंडित, तेजस्वी गुरू आणि वाई येथील प्राज्ञमठ तथा प्राज्ञपाठशाळेचे संस्थापक, पूर्वाश्रमीचे नारायण सदाशिव मराठे यांचा जन्म कोकणातील आताच्या

सिंधुदुर्ग जिल्ह्यातील, देवगड या तालुक्यातील वाड्याजवळच्या पडेल येथे झाला. या मूळ गावातून सदाशिवराव कुलाबा जिल्ह्यात स्थायिक झाले. घराणे शेतकरी व पंचक्रोशीचे मुख्य उपाध्ये व धर्माधिकारी. सदाशिव व पत्नी लक्ष्मी दोघे सुशिक्षित व धर्माचरणी. नारायण हे त्यांचे शेवटचे अपत्य. त्यांनी घरीच आई-वडिलांकडून प्रारंभिक पठणाचे पाठ घेतले. पुढचे शिक्षण प्राचीन परंपरेनुरूप गुरुगृही झाले. नारायण यांस घरी 'नाना' म्हटले जाई. अलिबागच्या केशवशास्त्री देवांकडे संस्कृत अध्ययन, अलिबागचेच दामोदरशास्त्री लोंढे यांच्याकडे व्युत्पत्ती, सिद्धान्तकौमुदी व संगीताचे शिक्षण, इथेच कीर्तनाचीही तयारी झाली. पुढच्या शिक्षणासाठी १८९५ साली वाई जि. सातारा येथे त्यांचे आगमन झाले. तेथे विष्णुशास्त्री करंदीकर यांच्याकडे व्याकरण, मेणवलीकरांकडे षडंगासहित वेदाध्ययन, बाळभट तथा तात्या रानडे यांच्याकडे न्यायशास्त्र व गुरू प्रज्ञानंद सरस्वती यांच्याकडे प्रस्थानत्रयी व अध्यात्मविद्येतील अनेक विषयांचे ज्ञान घेऊन ते ऋग्वेद, व्याकरण, न्याय, वेदान्त, मीमांसा, नव्य-न्यास, शांकर अद्वैत वेदान्त इत्यादीमध्ये पारंगत होऊन नारायणशास्त्री मराठे म्हणून ख्यातकीर्त झाले.



प्राज्ञपाठशाळा

अनेक गुरूंजवळ शिक्षण झाले असले तरी प्रज्ञानंद सरस्वती यांचा त्यांच्यावर अधिक प्रभाव असल्याने नारायणशास्त्रींनी स्वतः १९०१ साली वाईत स्थापन केलेल्या पाठशाळेचे नामकरण आपल्या गुरूंच्या स्मृत्यर्थ सन १९१६मध्ये 'प्राज्ञपाठशाळा' असे केले. प्राज्ञमठ या नावानेदेखील ही संस्था विद्वज्जनांत ओळखली जाई; कारण पांडित्याबरोबरच अध्यात्मनिष्ठा सर्वश्रेष्ठ मानण्याची नारायणशास्त्रींची भूमिका होती.

प्राज्ञपाठशाळेत आध्यात्मिक शिक्षणाच्या जोडीला काही काळ माध्यमिक शिक्षणही दिले जात असे. तळेगाव (पुणे) येथील बंद झालेल्या राष्ट्रीय शाळेची छाप या पाठशाळेवर होती, त्यामुळे स्वातंत्र्यचळवळीचा परिणामही या शाळेवर पडून तेथून राष्ट्रभक्तीने प्रेरित झालेल्या अध्यापक व विद्यार्थ्यांची मोठी फळी देशाच्या विविध भागांत काम करू लागली होती. नारायणशास्त्रींचे सर्व शिक्षण जुन्या पठडीतून झाले असले, तरी तत्कालीन सामाजिक परिस्थितीचेही त्यांना यथार्थ भान होते आणि स्वामी विवेकानंद, लोकमान्य टिळक, महात्मा गांधी, स्वातंत्र्यवीर सावरकर यांच्या कार्य आणि विचारांकडेही आकृष्ट झाल्याने त्यांची दृष्टी व्यापक उदारीकरणाकडे वळली आणि त्यातूनच धर्मपरिवर्तनाची शास्त्रशुद्ध बैठक तयार झाली आणि त्यांच्या आध्यात्मिक प्रेरणेला परिवर्तन आणि प्रबोधनाची जोड मिळून त्यांचे विचार पुरोगामी बनले.

धर्मशास्त्र आणि धर्मग्रंथांचा अर्थ, इतिहास आणि वर्तमान यांच्या परिप्रेक्ष्यात जाणून घेतला पाहिजे यावर त्यांचा कटाक्ष होता. वेद अपौरुषेय नाहीत. शुद्धिकरणाच्या माध्यमातून धर्माच्या बाहेर गेलेल्यांना हिंदुधर्मात पुनर्प्रवेश द्यावा, परदेशी जाण्यास हरकत नाही, ब्राह्मणांतील पोटजाती एकच व्हाव्यात व त्यांच्यात बेटीव्यवहार सर्रास व्हावेत अशा प्रकारची त्यांची काळाला छेद देणारी प्रागतिक विचारसरणी होती. यातूनच १९३४ साली त्यांनी 'धर्मनिर्णय मंडळ' स्थापन केले. या मंडळाच्या माध्यमातून अनेक धर्मशास्त्रीय संकल्पनांचे नव्याने अर्थ लावण्यात आले. यासाठी म.म. पां.वा. काणे (पुढे 'भारतरत्न' प्राप्त), लोणावळ्याचे पं.

रघुनाथशास्त्री कोकजे, केशव लक्ष्मण दप्तरी, न्यायमूर्ती व समाजशास्त्राचे अभ्यासक ना.गो. चापेकर, म.म. श्रीधरशास्त्री पाठक इत्यादी तत्कालीन नामवंत विद्वानांनी त्यांना साहाय्य केले. यातूनच काही ब्राह्मण परिषदा झाल्या, त्यांपैकी १९२७ च्या अकोला परिषदेचे ते अध्यक्ष होते.

स्वातंत्र्योत्तर काळात केवलानंद सरस्वती यांचे मोठे कार्य म्हणजे ११ मे १९५१ रोजी सोरटी सोमनाथाच्या जीर्णोद्धारात तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या पौरोहित्याखाली झालेल्या सोमनाथ प्राणप्रतिष्ठापना महोत्सवात सुरुवातीपासून अखेरपर्यंत स्वतः उपस्थित राहून केलेले मौलिक मार्गदर्शन होय. १९५४ मध्ये नवी दिल्ली येथे झालेल्या अ.भा. मराठी साहित्यसंमेलनासही ते उपस्थित होते.

दरम्यान, संस्थेतील काही कार्यकर्त्यांशी झालेल्या मतभेदांतून त्यांनी अचानकपणे दि. २२ ऑक्टोबर, १९३१ रोजी संन्यासाश्रम स्वीकारून 'केवलानंद सरस्वती' असे नाव धारण करून बद्रीनाथ व अन्य क्षेत्रांच्या पदयात्रा केल्या. कालांतराने ते पुन्हा वाईत आले व अखेरपर्यंत तेथेच राहिले. स्वामीजींनी 'अद्वैतसिद्धी'चे मराठी भाषांतर केले. त्यांचे तेवढे वगळता अन्य सर्व लेखन संस्कृतातून झाले आहे. 'जैमिनीयमीमांसादर्शनम्', 'मीमांसाकोश' (४५४२ पृष्ठांचा सात भागांतील कोश), 'अद्वैतसिद्धि-आविष्कार' (दोन भाग), केवलानन्दीमीमांसासूत्रवृत्तिः', कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोशः' 'ऐतरेयब्राह्मणारण्यकविषयकोशः' हे त्यांनी लिहिलेले वा प्राधान्याने संपादित केलेले मुद्रित ग्रंथ असून 'तैत्तिरीय मन्त्रसूची', 'तैत्तिरीयशाखाविषयसूची', 'लघुमीमांसाकोशः' यांसारखे सात ग्रंथ व दोन लहानसे सूची ग्रंथ अप्रकाशित आहेत. या सर्व ग्रंथांत 'मीमांसाकोशा'चे त्यांचे काम हे अत्यंत मौलिक आहे. या कोशात मीमांसाशास्त्रातील विषयांचा संग्रह आहे.

१९२५ साली त्यांनी सुरू केलेला 'धर्मकोश' हा प्रकल्प अद्यापही चालू आहे. 'संस्कृतमधील वेद, स्मृती, पुराणे, भाष्यटीका व निबंधग्रंथ यांतील ज्ञानभांडाराचे कालक्रम व विषयवार संकलन करणे' हे धर्मकोशाचे उद्दिष्ट आहे. जून २०११ अखेरपर्यंत या कोशाचे व्यवहारकांड (३ भाग), उपासनाकांड (४ भाग), संस्कारकांड (६ भाग), राजनीती (६ भाग), वर्णाश्रमधर्म (४ भाग), असे एकूण २३ ग्रंथ प्रसिद्ध झाले असून वर्णाश्रमधर्मकांडाच्या पाचव्या भागाची मुद्रणप्रत तयार आहे.

आचार्य विनोबा भावे, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, इत्यादी पुढे नामवंत झालेल्या अनेक व्यक्ती केवलानंद सरस्वती यांचे शिष्य, कार्यकर्ते, सहकारी बनले. के.ल. दप्तरी यांनी केवलानंदांना 'स्वतंत्र भारताचे गुरू' असे म्हटले आहे, तर पं. महादेवशास्त्री दिवेकर यांनी त्यांचा उल्लेख 'बृहन्महाराष्ट्रातील सामाजिक क्रांतीचे अध्वर्यू' असा केला आहे.

२१ नोव्हेंबर १९५२ रोजी स्वामीजींचा अमृतमहोत्सव वाई येथे न्यायमूर्ती प्र.बा. गजेंद्रगडकर यांच्या अध्यक्षतेखाली भव्य प्रमाणात साजरा करण्यात आला. या वेळी बोलताना स्वामीजी म्हणाले होते, ''मी माझ्या आयुष्यात समाजातील आचार व व्यवहार व्यापक व /न्याय्य तत्त्वांच्या अधिष्ठानावर चालावे, त्यात उत्पन्न झालेले किंवा मुळापासून असलेले दोष काढून टाकावेत आणि आवश्यक असल्यास शास्त्रांचे शब्दप्रामाण्यसुद्धा कमी करून शास्त्रातील तात्त्विक धोरणांस अनुसरून परिवर्तन करावे अशा धोरणांचाच पुरस्कार केला आहे.'' या वेळी मोठा अभिनंदन ग्रंथ प्रसिद्ध झाला.

१९५५ सालच्या १ मार्च रोजी केवलानंद सरस्वती स्वामीजी वाई येथे ब्रह्मीभूत झाले. 'केवलानंद सरस्वती स्मारक मंदिर' या नावाने त्यांचे स्मारक वाई येथे असून तेथे शासकीय मराठी विश्वकोश व प्राज्ञपाठशाळेचा धर्मकोश या दोन महान कोशांचे कार्य चालू आहे. अपरिग्रहित आचार्यांनी स्वतःच्या आयुष्यासंबंधी काही टिपणे लिहून ठेवली आहेत.

— मधू नेने

**संदर्भ :**


*१. जोशी, लक्ष्मणशास्त्री (संपादक); 'श्रीगुरू स्वामी केवलानंद सरस्वती पंचाहत्तरावी वर्षपूर्ती अभिनंदन ग्रंथ'; प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई; १९५२.*

*२. 'प्राज्ञपाठशाळा मंडळ आणि तिची परंपरा'; प्रा.पा.शा.मं., वाई; १९९६.*

*३. 'प्रज्ञानंद', प्रा.पा.शा.मं. अमृतमहोत्सव स्मरणिका; १९९४.*

*४. संपादक : दोशी, वकील; 'दक्षिणयुग-रायगडची आध्यात्मिकता', दीपावली अंक, २००८; गोरेगाव, जि. रायगड.*


## केशवदत्त महाराज
### वारकरी संप्रदाय, 'ज्ञानेश्वर हृदय'
### १८८९ – १९५२



केशवदत्त महाराज म्हणजेच पूर्वाश्रमीचे केशव अत्रे. यांचा जन्म माणूर या गावी झाला. बाळपणीही त्यांची वृत्ती देव-धर्म विषयात रमणारी होती. त्यामुळे सन १९०९ मध्ये म्हणजे वयाच्या विसाव्या वर्षी त्यांनी 'नर्मदा परिक्रमा' पूर्ण केली. नर्मदा परिक्रमा केल्याने चित्तात वैराग्य व देहावर सतेजता आली होती. आळंदी येथे जाऊन त्यांनी माउलींसमोर प्रथम प्रवचन केले. त्या पहिल्या प्रवचनापासूनच त्यांची प्रवचनाची हातोटी व विषय प्रतिपादनाची शैली यांविषयी सर्वदूर वाच्यता होऊ लागली. आळंदीत ज्ञानेश्वरी माउलींची त्यांनी बराच काळ अखंड साधना केली व अक्षरश: 'ज्ञानेश्वर हृदय' ही उपाधी प्राप्त करून घेतली.

पुण्यात त्यांचा केशवराव देशमुख, भिंगारकरबुवा, साखरे महाराज यांच्याशी घनिष्ठ संबंध आला. पुण्यातही ज्ञानेश्वरीच्या प्रवचनांमुळे त्यांची कीर्ती सर्वत्र पसरली. धुळ्यात पाझरा नदीकाठी पद्मनाभ स्वामींच्या मठात त्यांची प्रवचने होत असत. धुळ्यात त्यांच्या कार्याला अधिष्ठान प्राप्त झाले. धुळ्याहून सोनगीरला आलेले केशवदत्त तेथे सद्‌गुरू गोविंद महाराजांचे शिष्य झाले. सोनगीरलाच त्यांनी आपली कर्मभूमी मानून गोविंद महाराजांची सेवा सुरू केली. सद्‌गुरूंच्या समाधीनंतर सोनगीरच्या कार्याचा भार त्यांच्यावर आला. त्याला त्यांनी सुंदर नियोजन करून व्यापक स्वरूप दिले आणि 'सार्वजनिक ट्रस्ट'ची स्थापना केली. त्याद्वारे अन्नदान, विद्यादान, तसेच मागासांची सेवाही सुरू केली. आदिवासी जनतेतील गोरगरिबांना वस्त्रदान करून, मोफत औषधोपचार करून, भक्तीला सामाजिक अधिष्ठान दिले. केशवदत्तांनी 'सर्व कार्य करीत नामस्मरण करा' या व्रताचा पुरस्कार केला. ते नेहमी उदाहरण देत : 'स्वे स्वे कर्मण्यथिरत: संसिद्धि लभते नर:। त्यांची भगवंताच्या या वचनावर प्रगाढ श्रद्धा होती.

केशवदत्त महाराज यांचे लेखनकौशल्यही उत्तम होते. त्यांच्या 'ज्ञानेश्वर वैभव', 'सगुण साक्षात्कार' व 'रुक्मिणी स्वयंवरावरील टीका' वाचनीय आहेत. केशवदत्तांच्या जीवनकाळात त्यांनी अनेक सभा घेतल्या, टेनन्सी बिलावरील सभा, निजाम राज्यातील हिंदूंवर जुलूम या विषयांवर भद्रकाली पटांगणातील सभा, धर्मवीर विश्वासराव डावरे यांच्यावरील व्याख्यान, धर्म प्रसारार्थ सर्व शंकराचार्यांची एकत्रित सभा, अशा अनेक सभांचे उल्लेख आहेत. केशवदत्त महाराजांची गुरुभक्तीही अत्यंत पराकोटीची होती. त्यांची भावनाच अशी होती की, 'मी स्मरण करतो ते गुरूंचेच करतो.' सर्व कार्यांत, सर्वकाळी सद्‌गुरुस्वरूप जाणून ते वावरत असत. त्यांची उक्ती होती : 'हम हैं तो गुरु नहीं। गुरु हैं तो हम नहीं।' केशवदत्त सद्‌गुरूंशी पूर्णपणे एकरूप

झाले होते. १९७१ साली त्यांच्या घशाला गाठ झाली व ती गाठ कर्करोगाची होती हे निष्पन्न झाले. अशा वेळी एक वर्ष ते दुखणे त्यांनी सहन केले. मध्यरात्री सर्वांना उठवून स्वत: आसनस्थ होऊन 'राधे-गोविंद' या नामस्मरणात प्रयत्नपूर्वक प्राणत्याग केला. त्यांचे निर्वाण धुळे येथील 'गणपुळे दत्तमंदिरा'त झाले. त्यानंतरचे सर्व विधी सोनगीर येथे केशवदत्त महाराज यांचे शिष्य, श्री सद्गुरू मधुसूदन महाराज यांच्याकरवी झाले.

— संपादक मंडळ

## केळकर, गोपाळ रामचंद्र
**स्वामी समर्थभक्त, लेखक, ग्रंथकार**
**१८४७ – १९१९**



**गो**पाळ रामचंद्र केळकर यांचे शिक्षण घरच्या गरिबीमुळे इंग्रजी तिसरीपर्यंतच झाले होते. त्यांना रेल्वेत स्टेशनमास्तर म्हणून नोकरी मिळाली. नागपुरात असताना त्यांना जलोदर होऊन ते फार त्रस्त झाले. वैद्य व डॉक्टरांची औषधे घेतली; परंतु पोटात सतत होणाऱ्या वेदनांमध्ये उतार पडेना. त्यांना अशक्तपणाही जाणवू लागला. जीवनाचा कंटाळा येऊन गोपाळरावांनी निर्वाणीची घोषणा केली, ''जो कोणी या जगाचा ईश्वर असेल त्याने हा माझा वायू जर आठ दिवसांच्या आत नाहीसा केला, तर एका भगवंतावाचून पुन्हा कोणाची चाकरी करणार नाही.'' गोपाळच्या आर्त प्रार्थनेला प्रतिसाद मिळाला.

आठ दिवसांत गुण आला. आता गोपाळबुवांना प्रतिज्ञापूर्तीची चिंता बोचू लागली. एक पैसा गाठी नसताना ते अक्कलकोटला पोहोचले. गोपाळ स्वामी समर्थांकडे आला तो ऐहिक इच्छापूर्तीसाठी नव्हे, परमार्थप्राप्ती व उपासनेसाठी. गोपाळबुवांनी गुरुपदेश घेण्याचा संकल्प करून चार महिने संपले. गुरुबोधाच्या आकांक्षेने ते अक्कलकोटला भिक्षा मागून निर्वाह करीत. बाकी सदा स्वामीदर्शनाचे सुख अनुभवीत. ते देशमुखांच्या वाड्यात निद्रिस्त असताना स्वप्नात स्वामी समर्थ आले, पोटावर हात फिरवून म्हणाले, ''तुझा रोग आम्ही नाहीसा करतो.'' बुवांना जाग येताच ते लघवीला गेले. जलोदर पूर्ण नाहीसा झाला.

पंधरा दिवसांनी रात्री पुन्हा स्वामी समर्थांनी दृष्टान्त दिला. स्वामी समर्थ गावी होते. बुवांनी पहाटे जाऊन त्यांचे पाय धरले व 'दीनावर अनुग्रह करावा', अशी विनवणी केली. स्वामींनी कृपा करून बुवांचे जीवन कृतार्थ केले. शारीरिक व्याधी व भवबाधा दूर झाली. गुरुबोधानंतरही बुवा काही काळ अक्कलकोटलाच स्वामींच्या सेवेत होते. स्वामी समर्थ म्हणजे गोपाळबुवांचे परब्रह्मच. श्रीस्वामींनी पतीपत्नीची भेट घडविली व बुवांना आदेश दिला, की 'पत्नीला बरोबर घेऊन चिपळूणच्या बाहेर मार्कंडी या स्थानाजवळ ब्रह्मचारीबुवांनी पादुका स्थापन केल्या आहेत, त्यांची पूजा करीत तेथे राहावे'.

गोपाळबुवा स्वामी समर्थांनी दिलेली झोळी घेऊन आठवड्यात एकदाच पाच घरी भिक्षा मागत व तेवढ्यावरच निर्वाह करीत. कधी उपासही पडत. इ.स. १८७८ मध्ये स्वामी समर्थांनी समाधी घेतली. ते वृत्त ऐकून गोपाळबुवांनी नैराश्य व दु:ख यांमुळे प्रायोपवेशन केले. तिसऱ्याच दिवशी स्वामींनी दर्शन देऊन सांगितले, 'मी अमर आहे, मला ज्या-ज्या वेळी बोलवाल, धावा कराल, त्या-त्या वेळी मी नित्य पाठीशी राहीन.''

गोपाळबुवांचे दुःख संपून त्यांना जाणीव झाली, की श्रीस्वामी सदैव या जगात, मठात आहेत. बुवा नवी स्फूर्ती घेऊन कामाला लागले. त्यांनी श्रीस्वामींच्या पादुकांची पूजा भक्तिभावाने केली. नंतर लोकांनी मठ बांधून दिला. मठापासून चार कि.मी. अंतरावरील डोंगरावर विठ्ठलाच्या मंदिरात जाऊन बुवा तुकारामांची गाथा, नाथांचे भागवत, ज्ञानेश्वरी, अमृतानुभव इ. धार्मिक ग्रंथांची पारायणे करीत. सायंकाळी मठात आरतीसाठी परत येत. हा क्रम २५-३० वर्षे चालला. वृद्धापकाळी डोंगर चढवेना, तेव्हा ते पहाटे तीनला उठून मानसपूजा, नामस्मरण, ध्यानधारणा करीत. बुवांनी श्रींच्या चमत्कारांची संपूर्ण बखर मोडी लिपीत लिहिली. त्यांनी 'अभंग ज्ञानेश्वरी', 'करुणास्तोत्र', 'साधनाविवेक सारामृत', 'संध्येचा अर्थ' वगैरे पुष्कळ पुस्तके लिहिली. या गावचे रहिवासी श्री. रामभाऊ वहाळकर यांनी ग्रंथ छापण्यासाठी हस्तलिखिते मागितल्यावर ती छापल्यामुळे मनात साधुत्वाचा अहंकार होईल या भीतीने गोपाळबुवांनी सर्व हस्तलिखिते जाळून टाकली. लोकांना मुखोद्‌गत असलेले केवळ तीन ग्रंथ छापले गेले. पुढे बुवा समाधी घेऊन परमानंदी लीन झाले.

— वि.ग. जोशी

**संदर्भ :**

*१. भट, नम्रता, संपादक; 'सकल संत चरित्रगाथा'.*

## कैकाडीबाबा

***जाधव, कैकाडी भागुजी***

**कीर्तनकार, समाजप्रबोधक तत्त्वज्ञ**

**पू**र्वाश्रमीचे कैकाडी भागुजी जाधव म्हणजेच संत कैकाडीबाबा यांचा जन्म कात्राबाद, मांडवगण, जिल्हा अहमदनगर येथे सुखी कुटुंबात झाला. त्यांच्या वाडवडिलांचा कंत्राटदारीचा धंदा होता. सच्चेपणामुळे धंदा उत्तम चालून जाधव कुटुंब सुखवस्तू झाले. कैकाडीबाबांना सहाव्या वर्षी शाळेत घातले; पण त्यांचे मन पाटीपुस्तकात रमेना. बालपणीच त्यांची ओढ ईश्वराकडे होती. त्यांना विठ्ठलनामात, पोथ्यापुराणे,



कथा, कीर्तने, प्रवचने ऐकण्यात रस होता.

वयाच्या पंचविसाव्या वर्षीच त्यांनी संन्यासदीक्षा घेतली. त्यांच्या आसपासच्या काळातली हकिकत अशी, की बाबा कीर्तन करीत होते. त्यांचे मोठे बंधू व बुवांची पत्नी आजारी मुलाला मांडीवर घेऊन कीर्तनास बसली. कीर्तन चालू असतानाच मूल दगावले व आईने हंबरडा फोडला. कैकाडींना झाला प्रकार समजला, तरी ते शांत, निर्विकार होते. ते म्हणाले, ''मनुष्य मर्त्य आहे. तो आज ना उद्या मरणारच. कालवश होणारच. क्षणैक जीवनासाठी रडण्यात काय अर्थ आहे? शाश्वत सुख परमेश्वराच्या नामस्मरणात, चिंतनात, भजनात असताना खंड कशाला?''

*ज्याचे होते त्याने नेले । त्यात तुझे काय गेले ।*
*ऐसे मेले कोट्यानूकोटी । काय रडू एकासाठी ?*

त्या काळी स्पृश्यास्पृश्य भेद तीव्र होते. देवळात कैकाडी समाजाच्या माणसाला प्रवेश नव्हता. त्याला हलके समजण्यात येई. बाबांनी देवळासमोरच अन्नसत्याग्रह केला. आठ दिवस तसेच उभेच्याउभे राहिले. ग्रामस्थांना त्यांचे म्हणणे पटू लागले. शेवटी कैकाडी बाबांचे मागणे मान्य झाले. बाबांनी समजावले की, ''ईश्वराने जन्म देताना भेदभाव केला नाही... ईश्वरसेवा केवळ उच्च जातीचा हक्क नाही. देवाचे दर्शन, भजन यांचा लाभ कोणालाही घेता यावा.'' शेतकऱ्यांना

त्यांनी कळकळीने समजावले, ''माझ्या शेतकरी बंधूंनो, जागे व्हा. डोळे उघडा. या सर्व धनिक लोकांचा विचार करा आणि त्यांच्या जुल्मी हक्कांची वाट लावा, तरच तुमची धडगत आहे.''

परमेश्वराच्या भक्तीला काही खर्च येत नाही. मनापासून केलेली सेवा परमेश्वराकडे रुजू होते. ते धनिक व विद्वानांना आवाहन करीत, की गरिबांना, दलितांना मागे ठेवू नका. 'शिवशील' हा शब्द गाडून टाका. दलितांना स्वच्छतेचे धडे द्या. मनुष्य मनुष्याला शिवला तर विटाळ कसला मानता? सगळ्यांचे देह सारखेच. देवानेच असे पंचमहाभूतात्मक देह निर्माण केले, मग भेद राहिला कोठे? बाबांच्या जीवनात सामुदायिक प्रार्थनेचा नियम अतिमहत्त्वाचा असे. तो त्यांनी शेवटपर्यंत पाळला. परमार्थसाधनेच्या दृष्टीने बाबांनी अनेक खडतर नियमांचे पालन केले. यांतील बहुतेक नियम वैयक्तिक आणि अवघडच होते. त्यांना वाटे, की आत्मोद्धारासाठी आपण साधना करीत आहोत; पण यापासून जनसामान्यांना कोणता लाभ होणार? सर्वांसाठी सुलभ प्रार्थनेचा नियम आहे.

बाबांना तीव्रतेने एकांताची जरुरी वाटू लागली. त्यांनी सरळ हिमालयाचा रस्ता धरला. एकांतात त्यांच्या मनात अनेक प्रश्न उभे राहत. आत्मशोधन, तत्त्वशोधन, मनुष्याचे जीवन कशाकरिता? मनुष्याचा खरा धर्म कोणता? अशा एकांतातही चार वर्षे व्यतीत झाली. समाधान गवसेना. बाबांनी झाडांचा पाला ओरबाडून खाणे सुरू केले. त्यांचे शरीर क्षीण, अशक्त व कृश झाले. याच प्रसंगी संत गाडगे महाराज भेटीला आले. गाडगे महाराज म्हणाले, ''पशूच्या शरीररचनेत आणि माणसाच्या शरीररचनेत परमेश्वराने भेद केला आहे. म्हणून त्यांचा आहार आणि माणसांचा आहार यांत फरक पडतो. मनुष्य अन्न खातो ते समाजकार्यास शक्ती लाभावी म्हणून खातो. पशूचे अन्न माणसाला कसे पचेल?'' गाडगे महाराजांच्या समजावण्याने कैकाडीबाबा अन्न सेवन करू लागले. ते गाडगे महाराजांचे शिष्य बनले. त्यांनी कीर्तनाचे दौरे काढले. जनसामान्यांना खऱ्या सुखाचा मार्ग दाखवून, भक्तीचा प्रसार केला. मानवतेची सेवा करण्याची प्रेरणा दिली. अन्नदान व वस्त्रदान केले. देह चंदनाप्रमाणे झिजवला. जनसेवा हीच ईश्वरसेवा समजून त्यात रममाण असणारा भगवंत जवळ केला. ठिकठिकाणच्या दौऱ्यांत असंख्य लोकांना व्यसनापासून व अनिष्ट चालीरीतींपासून मुक्त केले.

कैकाडीबाबा आत्मविश्वासाने जमावाला सांगत, ''मी सांगतो तसे वागाल, तर तुम्हांला स्वानंदाचे साम्राज्य मिळेल. मी सांगतो तसे ऐकून, वागूनही जर तुमचे अकल्याण झाले, तर तुमच्या कैकाडीबाबाला फाशी द्या.'' त्यांनी लिहिलेल्या 'एकडोई शंभर न्हावी' या पुस्तकमालेचा अर्थ काय? डोके एक व हजामत करणारे शेकडो. बिचारे एक डोके कोणा न्हाव्याचा चरितार्थ चालवील? तसा पिढ्यानूपिढ्या दरिद्री अवस्थेत सापडलेला कष्टाळू शेतकरी समाज एकटा व आम्ही तुमचे कल्याण करतो असे फक्त सांगत त्याच्याकडे दुर्लक्ष करून त्याला पिळून खाणारे जास्त, अशी परिस्थिती. कैकाडीबाबांनी श्रमजीवी व अज्ञानी बहुजन समाजाच्या हितासाठी आपले विचार परखडपणे मांडले.

– वि.ग. जोशी

**संदर्भ :**

*१. कैकाडीबाबा; 'एक डोई शंभर न्हावी'.*

*२. जाधव, रामदास कोंडीराम; 'नाम-महिमा-दर्शन'; आवृत्ती १९७०.*

***

# ख

## खुपेरकर शास्त्री, बाळाचार्य माधवाचार्य

**राष्ट्रीय पंडित, तत्त्वचिंतक, संस्कृत तज्ज्ञ**

**१२ सप्टेंबर १८८२ – १० फेब्रुवारी १९७८**



राष्ट्रीय पंडित बाळाचार्य माधवाचार्य खुपेरकर शास्त्री यांचा जन्म कोल्हापूर येथे झाला. त्यांचा विवाह रमा या बेळगावच्या खासबाग घराण्यातील कन्येबरोबर झाला. त्यांची मातृभाषा कानडी होती. त्यांना चार अपत्ये, तीन मुली व एक मुलगा होती.

खुपेरकर हे घराणे मूळ कर्नाटक अथणी तालुक्यात होते. थोर विद्वान पंडितांचे घर म्हणून ते प्रसिद्ध होते. या घरात वैभव व सात्त्विक आनंद होता. ज्ञानाच्या बळावर त्यांच्या पूर्वजांना कोल्हापूरच्या राजेसाहेबांनी सन्मानाने आश्रय दिला होता. अथणीची खुपेरकरांची एक शाखा कालगावला गेल्यामुळे त्या शाखेने कालगावकर हे आडनाव लावले होते. त्या शाखेतील विद्वान संस्कृत पंडित, समर्थ भक्त अण्णाबुवा कालगावकर हे होते. या घराण्यात प्रखर विद्वत्ता व कमालीचे शुचित्व असा सुंदर संगम होता. या घराण्यात श्रीप्रभू रामचंद्रांची उपासना, पारमार्थिक ग्रंथांचा अभ्यास, वेदाभिमानी अशा मंडळींमधूनच कुशाग्र बुद्धीला आदित्याचे तेज लाभले होते. असे थोर घराणे, त्याच घराण्यात श्यामाचार्य हे फार मोठे विद्वान होते, त्यांना महाभारत हा ग्रंथ मुखोद्‌गत होता.

श्री. बाळाचार्यांना सुरुवातीचे संस्कृतचे पाठ घरातून मिळाले होते. घरात सर्व जण संस्कृत बोलत असत. त्यानंतरचे संस्कृतचे अध्ययन हे आत्मारामशास्त्री पित्रे व बाळशास्त्री अध्यापकर यांच्या पाठशाळेत झाले. त्यापुढे त्यांनी पुण्यात वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांच्याकडे संस्कृत भाषा, वाङ्मय व तत्त्वज्ञान यांचा अभ्यास केला. त्यानंतर कुंभकोणम येथे त्यांनी 'पूर्व मीमांसे'ची परीक्षा दिली. अशा प्रकारे त्यांनी संस्कृत भाषेतील वाङ्मय, काव्य व व्याकरण यांचे समृद्ध शिक्षण घेतले व जीवनभर ज्ञानदानाचे कार्य केले. पुढे धुळे येथे गरुड हायस्कूलमध्ये बाळाचार्यांची शास्त्री म्हणून नियुक्ती झाली. तेथे त्यांनी २४ वर्षे संस्कृत अध्यापनाचे कार्य केले.

बाळाचार्यांच्या जीवनातील एक रहस्य असे होते, की त्यांनी ब्रिटिश सरकारविरुद्ध धोरण असताना सरकारी नोकरी केली. याचे कारण असे, की ब्रिटिश राजवटीत गव्हर्नरांनी संस्कृत शिक्षणाची केंद्रे देशातील प्रत्येक राज्यात काढावीत ही योजना आखली होती. तेव्हा यात महाराष्ट्राचाही समावेश होता. त्यांच्या मनात संस्कृतचे महाविद्यालय मुंबईत काढावे अशी योजना होती. त्यासाठी त्यांनी ही नोकरी केली. पुढे सातारा, पुण्यात डेक्कन कॉलेज, पुन्हा सातारा व मग ३० ऑगस्ट १९४१ रोजी सेवानिवृत्त होऊन ते कोल्हापूरला स्थायिक झाले. निवृत्तीच्या काळात संस्कृत व मराठी भाषेचा व्यासंग,

अध्ययन व अध्यापन पुन्हा विविधतेने नटले होते. त्यांचे विद्यार्थी विविध क्षेत्रांत कार्यरत आहेत. संस्कृत भाषेवर जरी त्यांचे प्रेम होते, तरी त्यातून त्यांनी मराठी वाङ्मय समृद्धच केले.

बाळाचार्य जुन्या-नव्या आचारधर्मांचे, विचारांचे समन्वयक होते. त्यांनी 'पूर्णप्रज्ञदर्शन', 'वात्स्यायन कामसूत्रे', 'सनत्सुजापर्व' या संस्कृत ग्रंथांचे भाषांतर केले होते. ते कामशास्त्राचे शिक्षण शिक्षणसंस्थेतून दिले पाहिजे या मताचे होते. त्याचप्रमाणे, त्यांनी कवी मोरोपंतांचे संस्कृत काव्य टिपा व विवरण, महाभारत, रामायण, कृष्णविजय, स्फुट कविता अशा एकूण दहा हजार काव्यपंक्तींवर टिपा, विवेचन व प्रस्तावना लेखन केले. त्यासाठी त्यांनी साहित्यशास्त्रांतर्गत छंदोपरचनेचा संपूर्ण व सखोल अभ्यास केला. त्याबरोबर 'कौटिल्याचे अर्थशास्त्र' (ले. करंदीकर), 'छंदोपरचना' (प्रा. मा.त्र्यं. पटवर्धन), 'सुश्लोकगोविंद', 'सुश्लोक मेध', 'सुश्लोककुमार' (डॉ. रा.चिं. श्रीखंडे) इ. ग्रंथांवर परीक्षणात्मक लेख लिहिले. 'भास' या संस्कृत कवीवर स्वतंत्र प्रबंध लिहिला. त्यात त्यांनी स्थलनिर्णय, कालनिर्णय व काव्यविवरण यांवर विविध संशोधनात्मक लेखन केले. महाराष्ट्र शासनाने ज्ञानेश्वरी ग्रंथाची संशोधनात्मक आवृत्ती काढण्याचे ठरविले, त्या वेळी त्या संपादक मंडळात बाळाचार्य होते. त्या कामात त्यांनी व्याकरण, साहित्य व तत्त्वज्ञानविषयक भागाचे काम पाहिले होते. पू. बाबामहाराज आर्वीकर यांच्या 'दिव्यामृतधारा' या ग्रंथाची योग्यता जाणून बाळाचार्यांनी त्यातील संस्कृतवचने तपासून दिली होती. त्या वेळी त्यांचे वय ८५ होते.

'भारतीय दर्शन विकास' व 'वेदान्त' यांवर त्यांनी शंभर व्याख्याने दिली. शिवाजी विद्यापीठ कोल्हापूरला झाल्यावर पहिले कुलगुरू डॉ. अप्पासाहेब पवार यांनी विद्यापीठाचे पहिले दोन ग्रंथ, वनमाली मिश्रांचे 'श्रुतिसिद्धान्तदीपिका व श्रुतिसिद्धान्तप्रकाश', यांचे बाळाचार्यांद्वारे संशोधन करून घेऊन ते अप्रकाशित ग्रंथ, प्रा. निपाणीकर यांच्या सहकार्याने प्रसिद्ध केले. बाळाचार्य म्हणजे मराठी सारस्वतातील अखंड झराच होता.

सन १९७० साली बाळाचार्यांचा 'राष्ट्रीय पंडित' म्हणून गौरव झाला होता. अनेक ठिकाणी विद्वान पंडित म्हणून त्यांना गौरविण्यात आले होते. धर्मशास्त्रीय शंका, समस्या, धर्मनिर्णय घेण्यात सबंध भारतातून लोक त्यांच्याकडे येत असत. त्यांचा प्रचंड लोकसंग्रह होता. त्यांचे अनेक मान्यवर विद्यार्थी होते. अशा प्रकारे जीवनभर संस्कृत भाषेची सेवा करताकरता बाळाचार्यांचे देहावसान झाले.

– डॉ. अजित कुलकर्णी

***

# ग



## गगनगिरी महाराज

***पाटणकर, श्रीपाद गणपत***

**नाथ संप्रदाय, बालयोगी**

**१९०३ – ४ फेब्रुवारी २००८**



**ग**गनगिरी महाराज म्हणजेच पूर्वाश्रमीचे श्रीपाद गणपतराव पाटणकर, यांचा जन्म सातारा जिल्ह्यातील पाटण तालुक्यातील मंदुरे या खेड्यात चालुक्य सम्राट पुलकेशी वंशातील क्षत्रिय सरदार पाटणकर यांच्या राजकुळात, श्रीमंत बाजीराव खळोजी यांच्या हुजूरवाड्यात झाला. त्यांचे पाळण्यातले नाव श्रीपती. श्रीपती तीन वर्षांचा असताना आई विठादेवी आणि पाच वर्षांचा असताना वडील गणपतराव यांचे निधन झाले.

मातृपितृछत्र हरपल्यानंतर श्रीपती घर सोडून सातव्या वर्षी नाथ संप्रदायाच्या बत्तीस शिराळा, सांगली येथील मठात निघून गेला. श्रीपतीच्या घरात आध्यात्मिक वातावरण होते. एकदा लहान वयातच श्रीपती सवंगड्यांसह खेळताना तलावाच्या खोल पाण्यात तीन तास बसून राहिले होते. त्यानंतर पुढेही त्यांनी बराच काळ पाण्यात बसून तपाचरण केले होते आणि जलयोगी ही उपाधी त्यांना मिळाली. सांगली येथील मठात त्यांनी अध्यात्म आणि संतविचारांचा अभ्यास केला आणि बालवयातच संन्यास घेऊन ते बालयोगी बनले. मठात त्यांचे नाव ‘श्रीपाद’ ठेवण्यात आले. ‘‘मला परमेश्वराला भेटायचे आहे,’’ असे सांगितल्यानंतर मठातील चित्रानंद स्वामींनी श्रीपादांचा निर्णय जाणून कठोर साधनेची जाणीव करून दिली व त्यांना अष्टांगयोग आणि नाथपंथाच्या अनेक साधना व क्रिया शिकविल्या.

नंतर श्रीपाद यांनी भारत परिक्रमा सुरू केली. योग, अध्यात्माच्या उच्च अध्ययनासाठी त्यांनी नेपाळ, भूतान मानसरोवर, बद्रिकेदार, पशुपतिनाथ, गौरीशंकर, गंगेचे खोरे, हिमाचल प्रदेश अशा अनेक डोंगराळ प्रदेशांतील एकांतात आपली साधना सुरू केली.

बद्रिकाश्रमातील एका गुहेत ते ध्यानस्थ बसले असताना एक साधू त्यांच्यासमोर आले आणि आपल्या कमंडलूतील जलाचे सिंचन त्यांच्या चेहऱ्यावर केले. नंतर साधूने त्यांना आपल्याकडील वनस्पती सेवन करण्यास दिली आणि ‘‘तुझ्याकडून मानवजातीचे कल्याण होईल, तुझ्या वाचेला दिव्य शक्ती लाभेल, तुला सर्वसिद्धी प्राप्त होतील, तू दक्षिणेकडे जा,’’ असे सांगितले. त्यानुसार बालयोगी श्रीपादांनी उत्तरेकडून दक्षिणेकडे मार्गक्रमणा सुरू केली.

दक्षिणेकडे वाटचाल करतानाच त्यांना भोपाळ येथे, करवीर संस्थानचे छत्रपती राजाराम महाराज एका तलावाच्या काठावर भेटले. मराठी बोलणारा साधू पाहून महाराजांनी त्यांना कोल्हापुरात येण्यास सांगितले. त्यानुसार, कोल्हापूर येथे श्रीमहालक्ष्मीच्या दर्शनार्थ

गेल्यानंतर देवीने त्यांना 'गगनबावडा येथील गगनगडावर राहा,' असा आदेश दिला. या आदेशानंतर बालयोगी श्रीपाद यांनी गगनबावडा परिसरातील निसर्गादी वन्यजीवनसंपन्न प्रदेशात आपला तळ ठोकला. तोवर या असामान्य बालयोग्याची कीर्ती परिसरात पसरली आणि बालयोगी श्रीपाद 'गगनगिरी महाराज' म्हणून लोकांत परिचित झाले.



**गगनगिरी आश्रम (गगनबावडा, कोल्हापूर)**

अनुयायांच्या मदतीने गगनगिरी महाराजांनी यथावकाश गडावर आश्रम स्थापित केला. आपल्याकडील योग, सिद्धी, विद्येच्या साधनेतून अनुयायांना आध्यात्मिक, तसेच आरोग्यादी समस्यांवरील मार्गदर्शन, उपाययोजना सुचविण्याचे काम सुरू केले. ''समयसूचकता आणि प्रसंगावधान राखा. कष्ट, जिद्द, तपश्चर्या आणि गुणग्राहक बुद्धीच्या जोरावर तुम्ही स्वावलंबी आणि बलशाली व्हा. लाचारीने जगू नका,'' हा उपदेश ते लोकांना करीत. 'जंगलातील वनस्पती मला जगवतात. जंगलातील काळाभोर दगड ही माझी माता, पर्वतावरील कुंडातील स्वच्छ पाणी हे माझे दूध, आणि सूर्यप्रकाश हेच माझे जीवनसत्त्व,' असे ते मानत. गगनगिरी महाराजांच्या साधनेमध्ये नाथप्रक्रियेमधील 'भस्यिका' ही जीभ बाहेर काढून सूर्याकडे नजर केंद्रित करण्याची, आत्मज्ञानप्राप्तीची क्रिया, लिंगदेहाला शुद्ध करण्याची 'नौली' म्हणजे 'विमलज्ञानप्राप्ती' क्रिया, जलयोग क्रिया, संपूर्ण अंगाला गाईचे शेण आणि गोमूत्र लावून नंतर शुद्ध पाण्याने शरीर स्वच्छ धुण्याची 'गोरक्षनाथी विद्या' ज्यामुळे अंगातील विष नष्ट होते, रक्त शुद्ध होते आणि कायाकल्प होतो; बेंबीतून खाली लहान आतड्याला दाब देऊन पाण्यात आसन लावून मल काढण्याची 'प्लीवा शक्ती' ही प्रक्रिया; शिवांबू प्राशन, संपूर्ण अंगाला विविध प्रकारचे लेप लावून करावयाची कायाकल्प ही गोरक्षनाथी विद्या, जालंदरनाथ योग, अष्टांगयोग, त्याचप्रमाणे रेवाती तप, रेवाखंडे, जंबुद्वीपे, भरतखंडे, रेवातीरे, अरण्यके, विशाल तपे, महायोगे, योगेंद्र नवनाथे, नागबाबा या तपांचा आणि आचरणांचा समावेश आहे.

गगनबावडा येथील गडावरील आश्रमातील वास्तव्य आणि लोक संबोधनानंतर गगनगिरी महाराजांनी खंडाळा घाटाजवळील खोपोली येथील जंगलात तपश्चर्येसाठी प्रस्थान ठेवले. तेथील औदुंबराखाली पाताळगंगा नदीच्या डोहात ते तपासाठी उभे राहत. श्रद्धेला धर्माच्या आणि देवदेवतांच्या मर्यादा नसतात.

एकदा एका पाश्चात्त्य भगिनींची महाराजांच्या विचारांशी श्रद्धा जडली. ती महाराजांच्या ठिकाणी ख्रिस्ताला पाहू लागली. त्यावर महाराजांनी फार मोलाचे भाष्य केले. ते म्हणाले की, ''ती स्त्री जरी पाश्चात्त्य असली, तरी तिने अनेक जन्मी श्रद्धायुक्त भक्ती करून ईश्वराशी नाते जोडले आहे. त्यामुळेच ती माझ्या ठिकाणी येशू ख्रिस्ताला पाहू शकते.''

गगनगिरी महाराजांनी आपल्या सिद्धसाधनेच्या जोरावर शारीरिक, मानसिक व्याधींनी रंजलेल्या, गांजलेल्या लोकांना उपदेशाने, वनौषधींनी आणि योगसिद्धिसामर्थ्याने व्याधिमुक्त केल्याचे लोक सांगतात. तरीही, त्यांचा उपदेश हा नेहमी, सत्कर्म, सत्संग आणि वस्तुनिष्ठ विचारांतून, अनुभवांतून सिद्धी प्राप्त करण्याबद्दलचा होता. गगनगिरी महाराजांचे महाराष्ट्रातील गगनबावडा, खोपोली, मुंबईतील मनोरी आदी ठिकाणांसह भारतातील अनेक प्रदेशांत सत्संग, तसेच आश्रम आज लोकांमध्ये आध्यात्मिक जागरणाचे काम करीत आहेत.

‘‘जगात माझं नावलौकिक झालेलं चांगलं, की प्रत्येक गोरगरिबाच्या पोटाला दोन वेळ अन्न मिळालेलं चांगलं?’’ हा विचार प्रसारित करणारे गगनगिरी महाराज सोळा ते वीस वयोगटातल्या युवकांनी या सेवाकार्यात सहभागी होण्याचे आवाहन करतात. प्रत्येक युवकाने आपल्या आयुष्यातील किमान पाच वर्षे आध्यात्मिक तपाचरणासाठी द्यावीत. त्यामुळे स्वत:सह राष्ट्राची आध्यात्मिक उंची गगनाला भिडेल, असे ते मानीत. माणुसकी ही परमेश्वराची सेवा करण्याची पहिली पायरी आहे, असे ते सांगत.

पौष कृ. १२, शके १९२९ म्हणजेच सोमवार दि. ४ फेब्रुवारी २००८ रोजी पहाटे २.१५ वाजता गगनगिरी महाराजांनी आपल्या सर्व नाड्यांची हालचाल बंद केली. श्‍वसनक्रिया पूर्ण थांबवली आणि स्वेच्छासमाधी प्राप्त करून घेतली.

– संदीप राऊत

## गजानन महाराज (शेगांव)
**साक्षात्कारी संत**
**२३ फेब्रुवारी १८७८ - ८ सप्टेंबर १९१०**



विदर्भातील बुलडाणा जिल्ह्यातील खामगाव तालुक्यात शेगाव येथे श्री गजानन महाराज (माघ वद्य ७, शके १८००) युवावस्थेतच प्रगट झाले. शेगावमधील देवीदास पातुरकर यांच्या घराबाहेर ऋतुशांती भोजन समारंभातील उष्ट्या पत्रावळी चाटताना सर्वप्रथम बंकटलाल अग्रवाल व दामोदरपंत कुलकर्णी यांना महाराजांचे दर्शन झाले. दिगंबर अवस्थेतील तेजस्वी अशा या व्यक्तीला ना कोणी पूर्वी पाहिले होते, ना कोणी ओळखत होते. त्यांनी आपले खरे नाव काय? कोठून आलो? आई-वडील कोण? यांबद्दल कोणालाच काही सांगितले नाही. लोकांनीच त्यांना ‘गजानन महाराज’ असे नाव ठेवले व त्याच नावाने त्यांची प्रसिद्धी झाली.

या गजानन महाराजांचा शेगावमधील अवतार-कार्याचा काळ केवळ ३२ वर्षांचा आहे. १८७८ साली महाराज प्रगट झाले व १९१० साली त्यांनी समाधी घेतली. गजानन महाराजांनी ना प्रवचन केले, ना कीर्तन केले, ना अभंग लिहिले. आपल्या सहज लीलांतूनच त्यांनी लोकांना उपदेश केला. ते अत्यंत मोजके व तुटक-तुटक बोलत. भिंतीकडे वा शून्यात नजर लावूनच ते सर्वांशी बोलत असत. त्यांच्या सहज लीला या त्यांच्या सिद्धावस्थेच्या दृश्यरूप होत्या. विज्ञानाला शक्य न वाटणाऱ्या, अतर्क्य अशा अनेक गोष्टी त्यांनी आपल्या योगसामर्थ्याने लोकांच्या समक्ष करून दाखविल्या. लोक अशा कार्यकारणभाव न समजणाऱ्या गोष्टींना चमत्कार म्हणू लागले; पण स्वत:च्या लौकिक प्रसिद्धीसाठी त्यांनी न चमत्कार केले, ना भाबड्या लोकांना नादी लावून लुबाडले. गजानन महाराजांना अनेक भक्त अक्कलकोटच्या स्वामी समर्थांचे शिष्य मानतात. गजानन महाराज काही वर्षे स्वामींच्या सहवासामध्ये अक्कलकोट येथे राहिले होते. त्यानंतर काही वर्षे ते बीड जिल्ह्यातील कपिलधार येथेही तपश्चर्येसाठी वास्तव्य करून होते. तपश्चर्येनंतर ते नाशिक येथे देवमामलेदार यांना भेटले व पूर्वेस पदयात्रा करीत निघाले. पूर्वेला ते जेथे प्रथम थांबले ते गाव म्हणजे शेगाव!

‘गण गण गणात बोते’ असे ते बोटांचा ताल धरून सारखे म्हणत असत. हाच त्यांचा जन्ममंत्र असावा. वारकरी संप्रदायात जसा ‘रामकृष्णहरी’ हा उघडा मंत्र जपला जातो, तसा गजानन महाराजांचे भक्त ‘गण गण



आनंद सागर, शेगाव

गणात बोते' हा जपमंत्र म्हणतात. गजानन महाराज कधी कधी 'चंदन चावल बेल की पतिया' अशीही एक ओळ सस्वर म्हणत असत. त्यांचा मंत्र, तुटकतुटक बोलणे, उच्चार आणि तेलुगू भाषेवरील प्रभुत्व ऐकून अनेक जण त्यांना तेलंगी ब्राह्मण समजतात, पण संतांना ना जात असते ना प्रांत-भाषेच्या सीमा.

त्यांचा राष्ट्रीय कार्यातील मदतीचा सहभाग व लोकमान्य टिळकांच्या सभेचे अध्यक्षस्थान भूषविण्याची घटना त्यांच्या ठायीचे 'देशप्रेम' दर्शवितात. संतकवी दासगणू महाराज यांनी 'गजानन विजय' पोथीमध्ये गजानन महाराजांच्या अवतारकार्याचा परिचय करून दिलेला आहे. त्यामध्ये लोकमान्य टिळक-गजानन महाराज भेटीच्या प्रसंगाचे वर्णन आहे. त्यांच्या सर्व लीलांमधून श्रद्धा, प्रेम, सचोटी, देशप्रेम, धर्मनिष्ठा, पशुप्रेम, अध्यात्म, निसर्ग, योग यांचाच बोध होतो. स्वामी समर्थ (अक्कलकोटकर) यांचे अवतारकार्य समाप्त होण्यापूर्वी केवळ २ महिने ७ दिवस आधी गजानन महाराज शेगावात प्रकट होणे यात एक सूत्र आहे, असे भाविक मानतात. (स्वामींनी समाधी घेतली ३० एप्रिल १८७८ रोजी व गजानन महाराज प्रकट झाले २३ फेब्रुवारी १८७८ रोजी. 'शिर्डीचे साईबाबा गजानन महाराजांना भाऊ मानत होते', असा स्पष्ट उल्लेख साईभक्त अण्णासाहेब दाभोळकर लिखित 'साईसच्चरित' पोथीत आहे.

गजानन महाराजांनी भक्तांना एका ठिकाणी उत्खनन करण्यास सांगितले. तेव्हा उत्खननात 'राम-लक्ष्मण-सीता' अशा सुंदर मूर्ती मिळाल्या. त्या मूर्तीसाठी महाराजांच्या सांगण्यावरून भव्य राममंदिर बांधले गेले. इ.स. १९०७ साली या राममंदिराचे बांधकाम सुरू झाले व सात वर्षांनी (१९१४) म्हणजे गजानन महाराज समाधिस्थ झाल्यानंतर चार वर्षांनी पूर्ण झाले. या मंदिराच्या शेजारी पूर्व दिशेला आपली समाधी बांधावी अशी आज्ञा करूनच गजानन महाराज यांनी भाद्रपद शुद्ध पंचमी, दिनांक ८ सप्टेंबर १९१० रोजी समाधी घेतली.

आज शेगावचे 'श्री गजानन महाराज संस्थान' महाराष्ट्रातील एक आदर्श असे धार्मिक संस्थान आहे. या संस्थानाने पंढरपूर, आळंदी येथे आपल्या कार्याचा विस्तार केला असून भाविकांमध्ये भक्तिजागरणाचे कार्य निष्ठेने पार पाडले जात आहे.

— विद्याधर ताठे

## गाडगे महाराज

***जानोरकर,* डेबू *झिंगराजी***

**समाजसुधारक संत, समाजप्रबोधक कीर्तनकार**

**१८७६ - २७ डिसेंबर १९५६**

**ग्रा**मस्वच्छता, व्यसनमुक्ती अशा सामाजिक कार्यांना आणि समाजप्रबोधनाला अग्रक्रम देणारे संत गाडगे महाराज यांचा जन्म विदर्भामध्ये अमरावती जिल्ह्यातील 'शेणगाव' येथे १८७६ साली झाला. त्यांच्या आईचे नाव सोनूबाई ऊर्फ सखूबाई होते. त्यांचे वडील अडाणी व व्यसनी होते. व्यसनामुळेच ते निधन पावले आणि छोटा डेबू लहानपणीच पितृसुखाला पारखा झाला. अन्य कोणाचा आधार नसल्याने आईला छोट्या



डेबूला घेऊन वडिलांकडे 'दापुरे' येथे जावे लागले. डेबूचा मामा दापुरे गावातील बऱ्यापैकी शेती असणारा शेतकरी होता. मामाच्या गोठ्यातील गुरे सांभाळण्याचे काम डेबू करू लागला. दिवसभर गाई-गुरे रानावनात चरावयास सोडून सर्व गुराखी मुले एकत्र खेळत, भाकरतुकडा खात व गाणी म्हणत. इथेच डेबूला संत तुकारामांच्या अभंगाची ओळख झाली व रोज रात्री गावातील मंदिरात होणाऱ्या भजनात डेबू रंगून गेला. थोडा मोठा होताच मामाने आपल्या शेतीच्या कामाची सर्व जबाबदारी डेबूवर सोपविली. आई व मामाने १९१२ साली डेबूचे लग्न केले. त्यांच्या पत्नीचे नाव कुंताबाई. त्यांना एक मुलगा व एक मुलगीही झाली. कर्जबाजारीपणामुळे खंगून मामाचे अकाली निधन झाले. डेबूच्या व त्याच्या आईच्या नशिबी एक नवे संकट आले. डेबूचे मन मुळातच संसारामध्ये रमणारे नव्हते. त्यांना पंढरीच्या नामभक्तीची विलक्षण ओढ लागली होती. अखेर एके दिवशी ते घर सोडून निघून गेले.

गृहत्याग केल्यानंतर त्यांनी सतत देशभर भटकंती केली. गरिबांची सुखदु:खे अगदी जवळून अनुभवली. समाजातील अडाणीपणा, शिक्षणाचा अभाव व अंधश्रद्धेचा प्रभाव या अनिष्ट गोष्टींच्या निर्मूलनार्थ कार्य करण्याचा मनोमन संकल्प करून कीर्तनाद्वारे समाज जागृतीचा श्रीगणेशा केला.

'कर्ज काढू नका, व्यसनांपासून दूर राहा, देवाच्या नावाने कोंबड्या-बकऱ्यांचे बळी देऊ नका, गाव स्वच्छ ठेवा, मुलांना शिक्षण द्या,' असा त्यांनी कीर्तनातून गावोगाव उपदेश केला. हातात झाडू घेऊन ते प्रथम सर्व गाव झाडून स्वच्छ करीत व मगच त्या गावात रात्री कीर्तन करीत. त्यांच्या अंगावर ठिगळाचा वेष असे आणि हातात मातीचे पसरट गाडगे असे. या गाडग्यातच ते भिक्षा घेत. या गाडग्यातच पाणी पित व रिकामे गाडगे डोक्यावर पालथे घालून हिंडत. म्हणूनच लोक त्यांना 'गाडगे महाराज' म्हणत होते. त्यांची कीर्तने म्हणजे केवळ संतवचनांची निरूपणे नव्हती, तर श्रोत्यांशी थेट संवाद साधणारी प्रबोधने होती.

कोणत्याही गावात गाडगे महाराज एक-दोन दिवसांपेक्षा अधिक राहत नव्हते. त्यांनी आळंदी, देहू, पंढरपूर, त्र्यंबकेश्वर येथे जमणाऱ्या लाखो गरीब भाविकांचे हाल पाहिले व त्या-त्या क्षेत्री एकेक धर्मशाळा बांधून वारकरी बांधवांची निवाऱ्याची सोय केली. त्यांनी अनेक धर्मशाळा बांधल्या, पण स्वत: मात्र बाहेर, उघड्यावरच राहिले. त्यांचा नि:स्पृहपणा, त्याग, वैराग्यवृत्ती, सारेच विलक्षण व आदर्श होते. कर्मवीर भाऊराव पाटील यांच्या शैक्षणिक कार्याबद्दल व डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या समाजकार्याबद्दल गाडगे महाराजांना विशेष आस्था होती. या दोघांनाही त्यांनी



**संत गाडगे महाराज आणि**
**राष्ट्रसंत तुकडोजी महाराज**



संत गाडगेबाबा यांचे डाक तिकीट

वेळोवेळी सहकार्य दिले. भाऊराव पाटील व आंबेडकर यांच्या मनात गाडगे महाराजांविषयी अपार श्रद्धाभाव होता. डॉ. आंबेडकरांनी दलित बांधवांसह बौद्धधर्माची दीक्षा घेण्यापूर्वी गाडगे महाराज यांच्याशी विचारविनिमय केला होता. या चर्चेमुळेच डॉ. आंबेडकर यांनी इस्लाम आदी अन्य धर्मांमध्ये प्रवेश न करता भारतीय भूमीत जन्मलेल्या बौद्धधर्मात प्रवेश केला. प्रबोधनकार ठाकरे यांच्याशीही गाडगे महाराजांचे निकटचे संबंध होते. १९४९ साली गाडगे महाराज आजारी पडले.

औषधोपचाराची टाळाटाळ व सततचा प्रवास, कीर्तने यांमुळे त्यांचा आजार बळावत गेला. ८ नोव्हेंबर १९५६ रोजी त्यांनी मुंबईतील वांद्रे येथे अखेरचे कीर्तन केले. १२ नोव्हेंबर १९५६ रोजी त्यांनी पंढरीची अखेरची भेट घेतली.

डॉ. आंबेडकरांच्या निधनाचे वृत्त ऐकून ते अस्वस्थ झाले. १९ डिसेंबरला ते चांदूर बाजार येथे आले व गंभीर आजारी पडले. तेथून त्यांना अमरावतीला नेण्यात येत असताना अमरावतीच्या जवळच त्यांचे निधन झाले. डॉ. आंबेडकरांच्या निधनानंतर तेराव्या दिवशी गाडगेबाबांचे निधन झाले. आज त्यांनी स्थापन केलेल्या धर्मशाळा व ट्रस्ट त्यांचा समाजसेवेचा वारसा पुढे चालवीत आहेत. गाडगेबाब यांनी ना कोणताही मठ स्थापला, ना गादी निर्माण केली, ना कोणी शिष्य केला. हेच गाडगे महाराज यांच्या समाजकार्याचे वेगळेपण होते.

— विद्याधर ताठे

## गुरुदेव रानडे

***रानडे, रामचंद्र दत्तात्रेय***

**तत्त्वज्ञ, तत्त्वचिंतक, लेखक**

**३ जुलै १८८६ – ६ जून १९५७**





**रा**मचंद्र दत्तात्रेय रानडे यांचा जन्म जमखंडी संस्थानात झाला. त्यांच्या आईचे नाव पार्वतीबाई होते. थोरली बहीण भागूअक्का ही पहिली शिक्षिका. रामभाऊंचे प्राथमिक शिक्षण १८९५ मध्ये संपले. ते १९०२ मध्ये जगन्नाथ शंकरशेठ शिष्यवृत्ती मिळवून मॅट्रिक झाले. त्यांनी पुणे येथे डेक्कन महाविद्यालयामधून बी.ए.ला डॉ. भाऊ दाजी पारितोषिक मिळवले व त्याच महाविद्यालयात दक्षिणा फेलो म्हणून काम करीत, तत्त्वज्ञान विषय घेऊन दोन सुवर्णपदके मिळवून ते एम.ए. झाले. परीक्षकांनी असा अभिप्राय नोंदवला होता, ‘परीक्षकांपेक्षा हा विद्यार्थी या विषयात अधिक जाणकार आहे.’ पुणे व सांगली येथील महाविद्यालयात त्यांना नोकरी मिळाली होती; पण तेथील हवा मानवेना.

रामभाऊंची अध्यापनाची पद्धत इतरांपेक्षा अगदी वेगळी होती. त्यांनी आपल्या जीवनात प्रा. बेन यांना बौद्धिक गुरू व श्री. भाऊसाहेब उमदीकर यांना आध्यात्मिक गुरू मानले.

गुरुदेवांची पहिली पत्नी १९१८ मध्ये वारली. मातेच्या आग्रहामुळे त्यांनी दुसरा विवाह केला. तो

ग



निंबाळ आश्रम (सोलापूर-विजापूर रोड)

इस्लामपूरच्या विष्णुपंत वैद्यांच्या मनुताई या कन्येशी झाला. रामभाऊ १९२४ मध्ये निंबाळला गेले. तेथे ते १९२७ पर्यंत होते. त्या काळात त्यांनी 'कन्स्ट्रक्टिव्ह सर्व्हे ऑफ उपनिषदिक फिलॉसफी' हा ग्रंथ पूर्ण केला. यामुळे त्यांची खूपच कीर्ती झाली.

पौर्वात्य व पाश्चात्त्य विद्वानांनी त्यांची प्रशंसा केली. अलाहाबाद विद्यापीठाचे कुलगुरू सर गंगानाथ झा यांनी हा ग्रंथ वाचून रानडे यांची तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक म्हणून नियुक्ती केली. तिथे त्यांनी तत्त्वज्ञान विभाग प्रमुख म्हणून २० वर्षे काम केले. ते वर्गात परतत्त्वशास्त्र, नीतिशास्त्र, मानसशास्त्र, धर्मशास्त्र इत्यादी विषय आलटूनपालटून शिकवीत. अखेरीस रानडे या विद्यापीठाचे कुलगुरूही झाले. निवृत्त झाल्यावर विद्यापीठाने 'डी.लिट.' पदवी देऊन गुरुदेवांचा सत्कार केला.

निवृत्तीनंतर त्यांनी 'अध्यात्म विद्या मंदिर' नावाची संस्था काढली. निंबाळ हे संस्थेचे मुख्य केंद्र व सांगली आणि अलाहाबाद येथे शाखा होत्या. गुरुदेवांच्या घराण्यात भगवद्भक्ती परंपरागत होती. त्यांच्या मातु:श्रींनी श्री भाऊसाहेब उमदीकरांकडून उपदेश घेतला होता. गुरुदेवांना १९१० मध्ये इंचगिरी येथे दोन महिने गुरुसहवास घडला होता. नंतर ते परमार्थात स्थिरावले. त्यांना गुरूंच्या परब्रह्मस्वरूपाचा अनुभव आला. परमार्थाची वाढ गुरुबंधू अंबूराव यांच्या सान्निध्यात झाली. उमदीकर महाराजांनंतर ते अंबूरावांना गुरू मानू लागले. गुरुदेव बुद्धिनिष्ठ संत होते. ही बुद्धिनिष्ठा प्रो. बेन व श्री भाऊसाहेब महाराज यांच्या सहवासात वाढली, दृढमूल झाली. गुरुदेवांनी बुद्धिनिष्ठ साक्षात्कारवादाचा जन्मभर पुरस्कार केला. आपल्या संप्रदायाला ते 'स्वरूप संप्रदाय' म्हणत. प्रवृत्ती आध्यात्मिक असूनही आधिभौतिक शास्त्रांची त्यांनी कधी अवहेलना केली नाही. त्यांच्या तत्त्वज्ञानाला 'मिस्टिसिझम' म्हणतात.

गुरुदेव रानडे म्हणतात, ''साक्षात्कार शास्त्राला 'गूढविद्या' म्हणतात; परंतु ती गूढविद्या नाही. ती प्रकट विद्या आहे.'' मिस्टिसिझम म्हणजे मौन. मुनीची स्थिती म्हणजे मौन, असे आपले शास्त्र सांगते. आपला अनुभव शब्दांनी व्यक्त करता येत नाही. म्हणून मुनी मौन स्वीकारतात. रानडे यांचे तत्त्वज्ञान आत्मप्रत्ययी आहे. नामस्मरण साधन आणि साक्षात्कार हे ध्येय. यालाच गुरुदेव ईश्वरप्राप्तीचा मार्ग असे म्हणतात व नामस्मरणाला 'नेम' असे म्हणतात. त्यांनी प्रतिपादन केलेली चतु:सूत्री अशी : प्रपंचाविषयी कमालीची अनासक्ती, देवाबद्दल नम्रता, अंत:करणात भेदभाव न ठेवणे, आणि शुद्ध अंत:करण. गुरुदेवांची मातृभाषा मराठी होती. त्यांचे कन्नडवर आणि इंग्रजीवर असामान्य प्रभुत्व होते. याविषयी श्री अरविंदबाबूंनी त्यांची वाखाणणी केली होती. बायबलची अनेक भाषांतरे त्यांनी अभ्यासली होती. ग्रीक व संस्कृतचा तौलनिक अभ्यास केला होता. फ्रेंच व जर्मन भाषांशी त्यांचा परिचय होता. स्वत:च्या ग्रंथरचनेपूर्वी त्यांनी अपार परिश्रम घेतले. त्यांची ग्रंथरचना कसदार आहे. उमदीकर महाराजांच्या आज्ञेवरून त्यांनी 'नेमावली' तयार केली.

तत्त्वज्ञानाच्या ज्ञानकोशाचे १६ खंड तयार करण्याची त्यांची आखणी होती; परंतु आवश्यक ते सहकार्य न मिळाल्याने त्याचे फक्त दोनच खंड प्रसिद्ध झाले. त्यांनी स्थापन केलेल्या 'अध्यात्म मंदिरा'तर्फे 'Pathway to God' आणि 'परमार्थ सोपान' हे ग्रंथ प्रकाशित झाले. १९०१ मध्ये श्री उमदीकर महाराजांकडून अनुग्रह

मिळाल्यापासून १९५७ पर्यंत त्यांनी गुरुसेवेचे अखेरपर्यंत व्रत अखंड व एकनिष्ठेने आचरिले. लौकिक व पारमार्थिक जीवनात सद्‌गुरूंचे पदोपदी मार्गदर्शन लाभावे अशा आशयाचे विचार त्यांनी १९०६ ते १९१३ या काळात लिहिलेल्या सर्व पत्रांत आढळतात. महाराजांशी संबद्ध प्रत्येक वस्तू त्यांना प्रिय होती. नोव्हेंबर १९५५ मध्ये प्रा. सोनोपंत दांडेकरांचे निंबाळ येथे प्रवचन झाले. ते गुरुदेवांना फार आवडले. 'प्रवचन चालू असताना देवाचे रूप माझ्यासमोर सतत होते,' असे ते नमूद करतात. गुरुदेवांची ग्रंथसंपदा इंग्रजी व मराठी अशा दोन्ही भाषांत आहे.

– डॉ. नरेंद्र कुंटे

**संदर्भ :**

१. *तुळपुळे, शं.गो.; 'प्रा. रा.द. रानडे. चरित्र आणि तत्त्वज्ञान'.*
२. *डॉ. कुंटे, नरेंद्र; 'गुरुदेव रानडे : चरित्र व साधन मार्ग'; संतकृपा प्रकाशन, पुणे-३०.*

## गुप्ते, गजानन मुरलीधर
***गुप्ते, गजानन महाराज***
**नाथ पंथ, योगी पुरूष**
**१५ ऑगस्ट १८९२ – २८ सप्टेंबर १९४६**

अमरावती भागातील नाथपंथी योगीपुरुष म्हणून संत गजानन महाराज गुप्ते अनेकांचे श्रद्धास्थान आहेत. मराठीतील सुप्रसिद्ध कविवर्य नारायणराव गुप्ते ऊर्फ 'बी' यांचे ते बंधू होत. गजानन महाराजांच्या वडिलांचे नाव मुरलीधर व आईचे नाव लक्ष्मीबाई होते. त्यांना चार भाऊ व तीन बहिणी होत्या.

गजानन महाराज यांना लहानपणीच देवीच्या आजाराने त्रस्त केले व त्यांचा चेहरा विद्रूप झाला. देवीचे व्रण पुढे अनेक वर्षे तसेच राहिले. या आजाराचे स्वरूप खूपच भयंकर होते. केवळ दैव बलवत्तर म्हणूनच ते वाचले. या आजारामुळे ते उजव्या पायाने कायमचे पांगळे झाले. आजारातून ते सावरतात तोच त्यांच्या माता-पित्याचे निधन झाले आणि पोरकेपणाचे दुःख त्यांच्या वाट्याला आले.



गजानन महाराज यांची लाडकी बाळूमावशी हिने पुढे त्यांचा सांभाळ केला. गजानन महाराज यांचे मोठे बंधू कविवर्य 'बी' यांनी कुटुंबाची सर्व जबाबदारी स्वीकारली. त्यांनी १९०३ साली तिन्ही बहिणींची लग्ने लावून दिली आणि छोट्या गजानन याची मुंजही केली.

सर्व भाऊबहिणींनी उत्तम रितीने शिक्षण पूर्ण केले; पण गजानन मात्र कसातरी चौथीपर्यंत शाळेत गेला व पुढे त्याने शाळेला कायमचा रामराम ठोकला. त्यांचे अन्य मोठे बंधू रामचंद्रपंत हे बुलडाणा जिल्ह्यात चिखली येथे स्थायिक झालेले होते. गजानन महाराज काही वर्षे त्यांच्याकडे राहण्यास गेले तेव्हा तेथे एक विलक्षण प्रसंग घडला व त्या प्रसंगानंतर गजाननाला सर्व जण योगी म्हणूनच ओळखू लागले.

चिखलीजवळ अंत्री या गावी जांबोरी येथे 'येलोबा' नावाच्या साधूची समाधी आहे. त्या समाधीखाली एक गुहा आहे. या गुहेत श्री नारायण सरस्वती हे योगी साधना करीत होते. या साधूच्या दर्शनाने गजाननामध्ये चांगला बदल होईल व तो सर्वसामान्य मुलांप्रमाणे वागू लागेल अशा इच्छेने बाळूमावशी गजाननाला या साधूच्या दर्शनाला घेऊन गेली. गजाननाला साधूच्या पायांवर घालून 'याला पदरात घ्या' अशी बाळूमावशीने प्रार्थना केली. त्यावर 'हे बालक पूर्वजन्मीचा योगीपुरुष आहे. लवकरच त्याला सिद्धावस्था प्राप्त होऊन हा मोठा

साधुपुरुष, योगीराज म्हणून मान्यता पावेल,’ असे योगी नारायण सरस्वती यांनी सांगितले आणि छोट्या गजाननाच्या डोक्यावर हात ठेवला. या स्पर्शातून गजाननाला एक शक्ती मिळाली आणि दुसऱ्या दिवशी पहाटे त्याला नवनाथांपैकी मच्छिंद्रनाथ यांचे दृष्टान्त दर्शन झाले व त्यांस सोहम् मंत्र मिळाला. ‘ॐ हंसः सोऽहं ब्रह्म’ असा मच्छिंद्रनाथांचा आदेश त्यांना प्राप्त झाला.

यानंतर गजाननामध्ये आंतर्बाह्य परिवर्तन घडून आले व त्याचे योगीराज गजानन महाराज असे नाव विख्यात झाले. काही काळ चिखलीत राहून ते अकोल्याला गेले. तेथे एका पडक्या वाड्यात त्यांनी आपली साधना आरंभली. त्यांचा एक निकटचा मित्र शिवराम गुप्ते त्यांना आग्रहाने आपल्या घरी घेऊन गेला व तो गजानन महाराजांचा पहिला शिष्य बनला.

गजानन महाराज गुप्ते यांना वाचनाची आवड नव्हती व शाब्दिक पांडित्याचा तिटकारा होता. ते कधीही प्रवचन करीत नसत वा उपदेशाचे डोसही पाजत नसत. भक्ताशी ते उत्तम संवाद करीत आणि त्याचे योग्य समाधान करीत असत. त्यामुळे त्यांना व्यक्तिगत भेटीसाठी येणाऱ्या भक्तांची संख्या फार मोठी असे.

गजानन महाराज गुप्ते यांना टापटीप राहण्याची आवड होती. त्यांचा स्वभाव विनोदी, खोडकर; पण निरागस होता. त्यांना थोर साधुसंतांच्या सत्संगाची भारी आवड होती, त्यामुळे शेगावचे गजानन महाराज, शिर्डीचे श्री साईबाबा, माधान अमरावतीचे गुलाब महाराज, कल्याणचे राममारुती महाराज, यवतमाळचे खटिया महाराज यांना ते जाऊन भेटले होते.

गजानन महाराज भावसमाधीमध्ये तल्लीन होत असत तेव्हा सर्वत्र वेगळाच सुगंध दरवळत असे. लहरीनुसार ते आठवड्यातून केवळ दोनदाच अन्नग्रहण करीत. गुरुनिष्ठा हीच सर्वांत मोठी साधना - भक्ती आहे असे ते सर्वांना उपदेश करीत. वयाच्या चौपन्नाव्या वर्षी श्रीक्षेत्र नाशिक येथे त्यांनी सोहम् साधनेतच समाधी घेतली.

— विद्याधर ताठे

## गुलाबराव महाराज

***मोहाडे, गुलाब गोंदूजी***

**मधुराभक्ती (प्रज्ञाचक्षु)**

**६ जुलै १८८१ – २२ सप्टेंबर १९१५**



विदर्भातील अमरावतीजवळच्या माधान गावात संत गुलाबराव महाराज यांचा जन्म झाला. त्यांच्या वडिलांचे नाव गोंदूजी व आईचे आलोका होते. जन्मानंतर नवव्या महिन्यातच गुलाबराव महाराज यांना देवी आल्या व त्यांना कायमचे अंधत्व आले. त्यांच्या वयाच्या चौथ्या वर्षी त्यांच्या आईचे निधन झाले. त्यांचे संगोपन आजोळच्या नातेवाइकांनी केले.

बालपणीच अंधत्व येऊनही गुलाबराव महाराजांनी प्रचंड ग्रंथलेखन करून सर्वांनाच आश्चर्याचा धक्का दिला आहे. म्हणून त्यांचा गौरव ‘प्रज्ञाचक्षू’ असा सार्थपणे केला गेला. त्यांची प्रतिभा, त्यांची प्रज्ञा, त्यांची भक्ती सारेच विलक्षण व थक्क करणारे आहे. त्यांनी लिहिलेले ‘अलौकिक व्याख्यानमाला’, ‘उपदेशामृत पत्रे’, ‘भागवत रहस्य खंड १ व २’, ‘संप्रदाय सुरतरू भाग १ व २’ हे ग्रंथ विद्वत्ता, शास्त्रावरील प्रभुत्वाचीच साक्ष आहेत. केवळ भारतीय आचार्यच नव्हे, तर पाश्चात्त्य देशांतील अनेक तत्त्वज्ञलेखकांविषयीही त्यांचा अभ्यास होता. आजोळच्या लोकांनी तत्कालीन प्रथेनुसार गुलाबराव महाराज यांचा बालपणी म्हणजे वयाच्या

बाराव्या वर्षी माधान येथील सीतारामजी भुयार यांची कन्या मनकर्णिका हिच्याशी विवाह केला. पुढे त्यांना एक कन्याही झाली. पण संसाराचे सुख त्यांच्या नशिबी नव्हते. विवाहानंतर केवळ बाराव्या वर्षी त्यांच्या पत्नीचे निधन झाले. मूळच्या विरक्त, पारमार्थिक स्वभावाला ती एक इष्टापत्तीच ठरली.

नेत्र नसले तरी त्यांची जिद्द व जिज्ञासा विलक्षण होती. घराशेजारीच राहणाऱ्या एका भटाकडून त्यांनी शिवलीलामृत, व्यंकटेशस्तोत्र आदी स्तोत्रवाङ्मय आत्मसात केले. ते एका मास्तरांकडून पाढे, हिशेब शिकले. संस्कृतचा अभ्यास करून पंडित झाले एवढेच नव्हे, तर ज्ञानाचे एक दालन म्हणून चक्क एका काझीकडून त्यांनी रीतसर कुराणाचाही सूक्ष्म अभ्यास केला आणि ज्ञानाला, अभ्यासाला कोणतेही क्षितिज नसते हेच दाखवून दिले. त्यांना कोणत्याही प्रकारचा भेदाभेद मान्य नव्हता. त्यांनी कै. ल.रा. पांगारकर यांना पाश्चात्त्य जगातील प्लेटो, सॉक्रेटीस, डिसकोटस, कान्ट, हेगेल, स्पेन्सर, मिल्ल यांच्या विचारांची ओळख करून दिली व त्या सर्वांपेक्षा भारतीय चिंतक-तत्त्वज्ञांचा विचार कसा व्यापक व प्रगल्भ आहे ते पटवून दिले. 'हे सर्व ज्ञान मला केवळ 'ज्ञानेश्वरी'मुळेच झाले,' असे गुलाबराव महाराज म्हणत. ते स्वत:ला संत ज्ञानेश्वरकन्या म्हणवून घेत. उत्तर भारतातील मधुराभक्तीचा त्यांच्यावर विशेष प्रभाव होता. त्यामुळे ते स्वत:ला भगवान श्रीकृष्णाची पत्नी मानून साडी नेसून स्त्री-शृंगार करीत असत.

त्यांचे कीर्तन-निरूपण हे एक वैशिष्ट्य होते. ते बसून कीर्तन करीत व प्रसंगानुरूप गद्य विवरणाऐवजी स्वत: रचलेल्या ओव्यांद्वारे कथन करीत. अशी त्यांना काव्यदेवता प्रसन्न होती. हजारो ओव्या ते सलग रचून म्हणत. अभंग, गोपींची गीते रचून गात. 'बालपणीच सर्वज्ञता' घेऊन त्यांचा जन्म झालेला होता.



मानसायुर्वेद

भविष्यकथनाची अशीच एक अतर्क्य शक्ती त्यांना प्राप्त होती. त्यांनी अनेक वर्षे आधी आपले आजोबा व आपले मामा यांच्या मृत्यूची सविस्तर वेळ, वार, तारखेसह कथन आपल्या आजीस केले होते. डोळे नव्हते, पण ध्वनिलहरींचे सूक्ष्म ज्ञान त्यांना अवगत होते. केवळ बांगड्यांच्या आवाजावरून परिवारातील, शेजारच्या, येणाऱ्या-जाणाऱ्या महिलांना ते ओळखत. एखाद्या पुरुषाच्या बोलण्याच्या आवाजावरून ते त्याची साद्यंत माहिती-स्वभाव-व्यसन, सवयी सांगत. त्यांनी त्र्यंबकेश्वर, नाशिक, जगन्नाथपुरी, आळंदी या यात्रा कधीच चुकविल्या नाहीत.

त्यांची अफाट ग्रंथसंपदा अभ्यासकांना, विचारवंतांना आव्हान ठरावी अशी आहे. लोक त्यांना चालताबोलता 'चमत्कार' म्हणत. वयाच्या पस्तिसाव्या वर्षी त्यांना क्षयरोग झाला. पुण्यामध्ये शंकरशेठ रस्त्यावरील बंगल्यात ठेवून महर्षी अण्णासाहेब पटवर्धन यांचे आयुर्वेद उपचार सुरू करण्यात आले. पण अखेर उपचारांना यश न येऊन ते ईश्वरचरणी लीन झाले.

– विद्याधर ताठे

## गुळवणी महाराज

***गुळवणी, वामनराव दत्तंभट***

**शक्तिपात योगीराज**

**२३ डिसेंबर १८८६ – १५ जानेवारी १९७४**

**भा**रतीय शक्तिपात विद्येचे दीक्षाधारक व थोर दत्तभक्त टेंब्येस्वामींचे शिष्य म्हणून विख्यात असलेले योगीराज वामनराव दत्तंभट गुळवणी यांचा जन्म कोल्हापूर जिल्ह्यातील कुडुत्री येथे झाला. त्यांच्या आईचे नाव लक्ष्मी होते. तारळे येथे वामनरावांचे प्राथमिक शिक्षण झाले. पंडित आत्मारामशास्त्री पित्रे यांच्याकडे त्यांचे संस्कृत ग्रंथाचे पारंपरिक पद्धतीने



शिक्षण झाले. त्यांना चित्रकलेची निसर्गदत्त उपजत देणगी लाभलेली होती. ड्रॉइंगच्या परीक्षा उत्तीर्ण करून मुंबईतील सुप्रसिद्ध अशा जे.जे. स्कूल ऑफ आर्ट्‌समध्ये त्यांनी प्रवेश मिळविलेला होता. १९१७ ते १९२६ अशी दहा वर्षे त्यांनी बार्शीच्या नगरपालिकेच्या शाळेत ड्रॉइंग शिक्षकाची नोकरी केली. त्यानंतर १९२७ ते १९४२ दरम्यान त्यांना पुण्यातील नूमवि या प्रसिद्ध प्रशालेत कलाशिक्षक म्हणून नोकरी करण्याची संधी मिळाली. हा झाला त्यांचा लौकिक जीवन प्रवास.

थोर दत्तभक्त वासुदेवानंद टेंब्ये यांच्याशी १९०७ साली, नरसोबाची वाडी येथे वामनराव गुळवणी यांचा प्रथम परिचय झाला. 'वाडीला टेंब्येस्वामींचे वास्तव्य असून तू दत्ताचे एक सुंदर चित्र काढ व मी पाठविलेला श्लोक हार स्वरूपात दत्ताच्या गळ्यात घालून ते चित्र घेऊन महाराजांच्या दर्शनास ये,' असा वामनरावांना त्यांच्या मोठ्या बंधूंचा वाडीहून निरोप आला, आणि या निरोपानुसार वामनराव कोल्हापूरहून दत्ताचे चित्र घेऊन वाडीला गेले. महाराजांना चित्र अर्पण करून वामनरावांनी साष्टांग नमस्कार केला. चित्र पाहून महाराज अत्यंत प्रसन्न झाले. त्यांनी प्रसाद म्हणून दंडाला बांधण्यास एक पेटी वामनराव यांना दिली. गुरु-शिष्यांची ही पहिली भेट.




**एकमुखी दत्त**

या दरम्यान वामनरावांना प्लेगच्या साथीच्या रोगाने गाठले. अशा आजारी अवस्थेतही त्यांनी गुरुचरित्र पारायणे केली. प्लेगची गाठ फुटून ते पुढे खडखडीत बरे झाले. दत्तप्रभूंवरची त्यांची भक्ती अधिक दृढ झाली व वाडीला राहून त्यांनी आणखी पारायणे केली. उपासनेच्या, पारायणाच्या रंगात ते पार देहभान हरवून गेले. वामनराव १९०९ साली पितृछायेला पारखे झाले. त्या वेळी टेंब्येस्वामींचे चातुर्मास्य अनुष्ठान पवनी येथे होते. वामनराव आपल्या आईस घेऊन स्वामींच्या दर्शनास गेले. अनंत चतुर्दशीच्या मुहूर्तावर स्वामींनी वामनरावांना अनुग्रह दिला.

मन दत्तभक्तीने रंगले होते तरी लौकिक जीवनाच्या दैनंदिन गरजा भागविण्यास नोकरी करण्याची गरज होती. बरेच प्रयत्न करूनही कोठे नोकरी मिळाली नाही. दरम्यान, चातुर्मास्य अनुष्ठानासाठी टेंब्येस्वामी कर्नाटकातील हवनूर येथे येणार असल्याचे त्यांना समजले व वामनराव हवनूरला गुरुसेवेत दाखल झाले. गाणगापूर येथील पारायण समाप्त करून वामनराव गुरुभेटीच्या ओढीने पायीच निघाले. गाणगापूर-विजापूर-धारवाड करून ते हवनूरला आले. तेथे त्यांची गुरुभेट झाली. इथे स्वामींनी त्यांना 'भगवद्‌गीता', 'विष्णुसहस्रनाम' यांची संथा दिली व आसन, प्राणायाम, जपध्यान यांविषयी सूक्ष्म मार्गदर्शन केले. गुळवणी महाराजांनी १९१२ साली औदुंबर येथे दत्तमाला मंत्राचे पुरश्चरण केले.

टेंब्येस्वामींची म्हणजे गुरुभेटीची आठवण होताच गुरू जेथे असतील त्या गावी वामनराव शोध घेत घेत पोहोचत असत. स्वामींचा मुक्काम

गुजरातमधील नर्मदानदीकाठच्या गरुडेश्वर येथे असताना गुरूंकडून वामनरावांना ब्रह्मसूत्रे, दत्तोपनिषदे समजून घेण्याचा योग लाभला. त्यांना योगविद्येचीही सूक्ष्म साधना गुरुसान्निध्यात करता आली. गुरूंच्या आज्ञेवरून वामनरावांनी एकमुखी दत्ताचे भव्य चित्र काढले. हे चित्र चितारताना वामनरावांना भगवान दत्तात्रेयांचे साक्षात दर्शन झाले. गुरू टेंब्येस्वामी यांनी १९१४ साली समाधी घेतली. त्यानंतर ते एकदा वामनरावांच्या स्वप्नात आले व होशिंगाबादच्या श्री लोकनाथतीर्थ यांच्याकडे जाण्याचा संकेत त्यांनी केला. लोकनाथतीर्थ यांनी वामनरावांना शक्तिपात दीक्षा दिली.

वामनराव 'योगिराज गुळवणी महाराज' म्हणून विख्यात झाले. गुळवणी महाराजांनी शक्तिपाताने अनुग्रह दिलेल्या दत्तभक्तांची संख्या खूप मोठी आहे. टेंब्येस्वामींच्या स्मरणार्थ पुण्यात 'वासुदेवनिवास' ही वास्तू उभी करून तेथे गुरूंच्या पादुका स्थापन करण्याचे कार्य गुळवणी महाराजांनी केले. गुरूंचे समग्र वाङ्मय त्यांनी बारा खंडांत प्रकाशित केले. पुण्यातील त्यांच्या भक्तांनी गुळवणी महाराजांचा सहस्रचंद्र दर्शन सोहळा साजरा केला व 'योगचुडामणी' पदवी देऊन गौरव केला. पुढे त्यांनी आपला देह दत्तचरणी अर्पण केला व त्यांच्यानंतर त्यांचे शिष्य दत्त महाराज कवीश्वर उत्तराधिकारी झाले.

— विद्याधर ताठे

## गोंदवलेकर महाराज
## 'ब्रह्मचैतन्य'

***घुगरदरे, गणपत रावजी***

**रामभक्ती प्रसारक**

**१८४४ - १९१३**



**ग**णपत रावजी घुगरदरे म्हणजेच श्री ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज यांचा जन्म माघ शु. द्वादशीला झाला. त्यांच्या आईचे नाव गीताबाई होते. सातारा जिल्ह्यातले गोंदवले गाव ही त्यांची जन्मभूमी. महाराजांचे आजोबा लिंगोपंत व आजीचे नाव राधाबाई होते. गोंदवले येथे कुलकर्णीपद मिळाले म्हणून त्यांचे नाव कुलकर्णी पडले. मूळ नाव घुगरदरे. या घराण्यात भगवद्भक्तीचा वारसा व पंढरीची वारी होत असे. मुलाचे पाय पाळण्यात दिसतात याचा प्रत्यय गणूने लहानपणीच आणून दिला.

आजोबांनी विचारले, ''तुला हंडाभर मोहरा दिल्या तर तू काय करशील?'' गणू तत्काळ उत्तरला, ''आंधळे, पांगळे, रोगी, गरीब व भिकारी यांना मी त्या सगळ्या वाटून टाकीन.'' नंतर आजोबांनी विचारले, ''तुला राजा केले तर काय करशील?'' गणू लगेच बोलला, ''माझ्या राज्यात भिकारी राहू देणार नाही. मी माझ्या दारात अन्नछत्र घालीन.''

गणू देखणा होता. लिंगोपंतांनी मुळाक्षरे, स्तोत्रे, श्लोक शिकवले. त्याची आठव्या वर्षी मुंज झाली. तो संध्या, पूजा, वैश्वदेव, पवमान रुद्र इ. ब्रह्मकर्म शिकला. गणू एकपाठी होता. शाळेत भजन किंवा दंगा करी. शाळा संपली की खेळ व गावभर भटकणे चाले. गावच्या मारुतीच्या पारावर साधू - बैरागी येत. एक रामदासीबुवा आले. गणूने त्यांना आपल्या शंका विचारल्या. त्यांचे वाक्य 'सद्‌गुरूशिवाय परमेश्वर भेटत नाही,' त्याच्या मनावर बिंबले. वयाच्या दहाव्या वर्षी गणू सदगुरूंच्या शोधात निघाला. तो कोल्हापूरला गेला. तेथे महालक्ष्मीचे दर्शन घेतले. वडील रावजी शोधत आले.

ग



श्री राममूर्ती, गोंदवले

मुलाला समजावून घरी नेले. रावजी व गीताबाईंनी गणूचे लग्न करून दिले. वधू होती खातवळ गावचे संभाजीपंत गोडसे यांची कन्या. नवीन जोडपे पंढरपूरला दर्शनाला जाऊन आले. त्यांच्या पहिल्या पत्नीला मुलगा झाला. तो एक वर्षाच्या आतच वारला. थोड्या दिवसांनी सरस्वतीचाही स्वर्गवास झाला. आईच्या आग्रहास्तव दुसरे लग्न केले ते आटपाटीचे सखाराम देशपांडे यांच्या आंधळ्या मुलीशी. त्यांनी या पत्नीचे नावही सरस्वतीच ठेवले. त्यांना तीन अपत्ये झाली; पण ती सर्व देवाघरी गेली. आजी-आजोबांचे निधन झाल्यानंतर गणूने आईची संमती घेऊन गुरूंच्या शोधात घर सोडले.

या प्रवासात अक्कलकोटचे स्वामी, माणिकप्रभू वगैरे सत्पुरुषांच्या भेटी झाल्या. अयोध्या, काशीची यात्रा झाली. अखेरीस श्री तुकाराम महाराज येहळीकर यांची गाठ पडली. गणूने त्यांचेच शिष्यत्व पत्करले. तुकामाई यांनी अनुग्रह देऊन त्यांचे ‘ब्रह्मचैतन्य’ नामकरण केले. यानंतर ते तप:साधनेसाठी हिमालयात निघून गेले.

महाराजांनी एकूण तीन वेळा भारताची यात्रा केली. रामदासी संप्रदायाचा व रामभक्तीचा जीव ओतून प्रचार केला. इ.स. १८७६ व १८९६ असे दोन मोठे दुष्काळ पडले व माणसांची, पशूंची उपासमार झाली. महाराजांनी दुष्काळी कामे काढली व अन्नदानही केले. प्रसिद्ध क्रांतिकारक वासुदेव बळवंत फडके यांना सांगितले की, ‘‘काळ अनुकूल नाही,’’ परंतु त्यांनी ऐकले नाही. १८७९ मध्ये फडक्यांना कैद झाली.

महाराजांनी लोकांना सन्मार्गाला लावले. गोशाळा काढल्या. गोंदवले, कर्नाटकात बेलधडी, यावगल, नरगुंद येथे राममंदिरे उभारली. महाराजांनी जपयज्ञ केले. रामनवमीचा उत्सव नियमितपणे, धुमधडाक्याने केला आणि अफाट लोकसंग्रह केला.

महाराजांनी एकही ग्रंथ लिहिला नाही; पण तत्त्वज्ञानाचा प्रसार केला. त्यांचे म्हणणे असे, की मनुष्यप्राणी सर्व प्राण्यांमध्ये श्रेष्ठ आहे. जीविताचे कोडे उकलण्याची शक्ती फक्त मनुष्यात आहे. अज्ञानातून भ्रम उत्पन्न होतो. जीवनतत्त्व सूक्ष्म आहे. जीवनतत्त्वाची उत्पत्ती परमात्म्यापासून आहे, म्हणून परमात्मस्वरूपाचे ज्ञान झाले, की जीविताचे कोडे सुटते. जीवन संपन्न, आनंदमय बनते. प्रपंच कोणालाही टाकणे शक्य नाही. संसार अशा रितीने करावा, की स्वत: ब्रह्मरूप बनण्याचे तो साधन बनेल. महाराज भजनास उभे राहिले, की तत्कालिक स्फूर्तीने अभंग रचीत असत. त्यांनी परमार्थपर अशी दहा स्फुट प्रकरणे लिहिली असून, ती ओवीबद्ध आहेत. त्यांची भाषा साधी व रचना सुलभ आहे.

– मंदाकिनी सोमण

**संदर्भ :**


१. के.वि. बेलसरे; *‘श्री ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज चरित्र आणि वाङ्मय’.*

२. *जोशी, महादेवशास्त्री; ‘सांस्कृतिक कोश’.*


## गोपालनाथ महाराज

***नाईक, गणेश गोविंदपंत***

**दत्तभक्त, सिद्धयोगी**

**१७०० – १७६६**

**पू**र्वाश्रमीचे गणेश गोविंदपंत नाईक म्हणजेच गोपालनाथ महाराज यांचा जन्म अहमदनगर जिल्ह्यातील सलाबतपूर गावात झाला. त्यांच्या मातु:श्रींचे नाव आनंदीबाई असे होते. त्यांचे घराणे शुक्ल यजुर्वेदी कौंडिल्यगोत्री ब्राह्मण असले तरी व्यवसाय सावकारीचा होता. खरे तर, त्यांचे मूळ आडनाव घोलप; परंतु सावकारीमुळे नाईक हे नाव मिळाले. सलाबतपुरात

मोगलांच्या धाडी पडत. एका धाडीत गोविंदपंतांचे सगळे वैभव लुटले गेले. त्यामुळे नाईक कुटुंब जवळच्या कोंढवळ गावी स्थलांतरित झाले. कोंढवळ गावात गेल्यावर लवकरच गोविंदपंतांनी देह ठेवल्यानंतर आणि ज्येष्ठ बंधूदेखील अज्ञातवासात निघून गेल्यानंतर गोपालनाथ आईसह सुरजी अंजनगावात राहू लागले. तेथे गोपालनाथांना अवघ्या चौदाव्या वर्षीच कमालीची विरक्ती आली आणि ते विदर्भातील पयोष्णी नदीच्या तीरावरील रामतीर्थ स्थानी तपाचरण करण्यास निघून गेले. येथे त्यांना श्रीदत्तांनीच गोपालनाथ हे नाव दिले असे मानतात. येथेच वेदशास्त्र, उपनिषदे आणि आध्यात्मिक विचारमौक्तिकांचा त्यांना लाभ झाला.

पुढे पुन्हा गुरुभेटीसाठी गोपालनाथ फिरू लागले. काशीयात्रेस जाऊन आले. तेथून ते मराठवाड्यातील सिऊर येथील अरण्यात, वैष्णवदेवीच्या मंदिरात राहू लागले. तेथे त्यांनी प्रापंचिकांचे अन्न वर्ज्य केले आणि केवळ गाईचे दूध सेवन करून राहू लागले. असे सांगतात, की ते साधनेने वांझ गाईंच्या आचळातूनही दूध काढीत असत. असेही म्हणतात, की श्रीगोपालनाथांना वैष्णवदेवीचा कृपाप्रसाद लाभला होता. तेथेच एकदा श्रीरंगनाथस्वामी नावाचे ज्येष्ठ गुरू श्रीगोपालनाथांना भेटण्यास आले. त्यांनी गोपालनाथांना शास्त्रातील एका वाक्याचा अर्थ विचारला. गोपालनाथांना तो सांगता आला नाही. त्यांनी वैष्णवदेवीला साकडे घातले. तेथे त्यांना श्रीरंगनाथस्वामीच आपले गुरू आहेत, तेच अर्थ सांगतील हा साक्षात्कार झाला. त्यानुसार ते आपल्या गुरूंसोबत काही काळ राहिले आणि नंतर गोपालनाथांनी बाभूळ मुक्कामी आपला मठ उभा केला.

या काळात गोपालनाथांनी अनेक सिद्धी प्राप्त करून घेतल्या. त्यांनी अनेकांच्या व्याधी चमत्कारासारख्या बऱ्या केल्या. कुणाचे कोड घालवले, अपंगांना बरे केले. एकदा तर एका यवनी किल्लेदाराने त्यांना विषमिश्रित मिठाई पाठविली होती. ती त्यांनी सेवन केली आणि आपल्या योगसामर्थ्याने तशीच तीन दिवसांनी पुन्हा वमन करून टाकली. या त्यांच्या साऱ्या लौकिकांमुळे त्यांचा भक्तसंप्रदाय वाढू लागला. गोपालनाथांनी लोकोपदेश आणि सेवाकार्यासाठी पुढे पैठण येथे श्रीनाथांच्या चरणी प्रस्थान ठेवले. तेथे काही काळ वास्तव्य करून ते पुन्हा साताऱ्याला आले. तेथे अनेक ठिकाणी त्यांनी अध्यासने, मठ, आश्रम स्थापून आपल्या शिष्यगणांचा विस्तार केला. साताऱ्याच्या जरंडेश्वराच्या डोंगरातील वृषभगुंफेत त्यांनी एकांतात काही काळ व्यतीत केला. साधनेसाठी किन्हईच्या यमाईच्या स्थानातील एका गुंफेत त्यांनी आपल्या शिष्यांसह सात महिने वास्तव्य केले.

अशी सारी मजल-दरमजल करीत, आपला शिष्यगण वाढवीत असतानाच त्यांचे शाहूमहाराज यांच्याशी काही मतभेद झाले. त्यामुळे गोपालनाथांनी तेथील निरा नदीच्या किनाऱ्यालगतच्या प्रदेशात वाटचाल सुरू केली. या वाटचालीत त्यांना जेऊर नावाच्या गावात खंडोबाच्या ओढ्यापाशी पाण्याचे दुर्भिक्ष असल्याचे आढळले. तेथे गोपालनाथांनी स्वत:च्या हातांनी खणण्यास सुरुवात केली, तेव्हा तेथे पाण्याचा झरा आढळला. गावकऱ्यांना मुबलक पाणी मिळू लागले. लोकांची विपन्नावस्था संपली. गावकऱ्यांनी मग तेथे महाराजांचा मठ बांधला. बागायती जोमाने सुरू झाली. धान्य पिकू लागले. त्यातून लोकांना नियमित भंडारा मिळू लागला.

श्री गोपालनाथांनी लोकभावनेचा मान ठेवून तेथील त्रिपुटी स्थानात कायमचे वास्तव्य करण्याचे ठरविले. कालांतराने शाहूमहाराजांचाही गैरसमज दूर झाला. त्यानंतर त्रिपुटी येथे राजाश्रयातून त्यांनी अनेक लोकोपयोगी कामे केली. त्रिपुटीत अध्यात्माचे विद्यापीठ सुरू झाले. तेथे भोसलेवाडी नावाची वसाहत उभी राहिली. अनेक विद्याव्यासंगी आणि प्रकांडपंडितांची उठबस सुरू झाली. धावडशीचे पेशव्यांचे गुरू ब्रह्मेंद्रस्वामी वेळोवेळी तेथे येत. तेथे परमहंस, गोपाळ माधवनाथ, सामराज, शेख दाजी, शेख सुलतान असे शिष्योत्तम तयार झाले. गुरू ब्रह्मेंद्रस्वामींनी पेशव्यांकडून एक लक्ष मूल्याचा मोठा तलाव त्रिपुटीस बांधून दिला. तोच आजचा गोपाळतलाव होय.

श्री गोपालनाथांनी आपले अध्यात्म 'वेदान्त शिरोमणी' या महाग्रंथात शब्दबद्ध करून ठेवले आहे. 'श्रीगुरुगीताटीका' हा आणखी एक तात्त्विक चर्चेचा ग्रंथ खूप मोलाचा आहे. त्यांच्या 'गोपालनाथ गाथे'त अनेक अभंग, ओव्या, आरत्या, रूपके, कुटे, भारुडे समाविष्ट आहेत. त्यांनी हिंदी भक्तिरचनाही केल्या आहेत. इसवी सन १७६६ सालात, श्रावण वद्य अमावास्या तिथीला शुक्रवारी, पद्मासन घालून, सर्वांना शुभआशीर्वाद देऊन त्यांनी त्रिपुटी येथे जिवंत समाधी घेतली. सध्या त्यांच्या घराण्यातील गुरुवर्य अण्णासाहेब महाराज घोलप श्री गोपालनाथ महाराजांची ही परंपरा पुढे चालवीत आहेत.

— संदीप राऊत

## गोयंका, सत्यनारायण

**विपश्यना आचार्य**

**३० जानेवारी १९२४ – २९ सप्टेंबर २०१३**



**स**त्यनारायण गोयंका यांचा जन्म ब्रह्मदेशातील (सध्याचे म्यानमार) एका मारवाडी आई-बापाच्या पोटी झाला. मारवाडी लोक व्यवसायासाठी प्रसिद्ध आहेत. गोयंका यांच्या अंगी ते गुण आनुवंशिकतेने आले. ते अत्यंत सनातनी अशा हिंदू परिवारामध्ये वाढले. व्यापारामध्ये त्यांनी पुष्कळ धन मिळविले. पैशांच्या मागे लागता लागता १९५५ साली, म्हणजे वयाच्या एकतिसाव्या वर्षी त्यांना मायग्रेन नामक डोकेदुखीने ग्रासले. अनेक वैद्यकीय उपचार करूनही गुण येईना. शेवटी एका मित्राच्या सूचनेनुसार ते विपश्यना ध्यान-साधनेचे सुप्रसिद्ध शिक्षक सायागयी यू. बा. खिन यांना भेटले. त्यांना आपला शिष्य म्हणून घ्यायची त्यांनी विनंती केली. सुरुवातीला बा. खिन यांनी प्रतिसाद दिला नाही. पण त्यांची चिकाटी पाहून त्यांनी गोयकांना शिष्य म्हणून स्वीकारले. त्यांना विपश्यना ध्यानसाधनेचे चौदा वर्षे प्रशिक्षण दिले. गोयंका विपश्यना ध्यानसाधनेमध्ये पारंगत झाले. गुरूंचा आशीर्वाद घेऊन व आपला व्यवसाय कुटुंबीयांच्या स्वाधीन करून ते १९६९ साली ब्रह्मदेशातून भारतात येऊन स्थायिक झाले.

भारतात आल्यानंतर सत्यनारायण गोयंका यांनी विपश्यना ध्यानसाधना म्हणजेच आत्मकेंद्रित ध्यानाच्या अध्यापनास सुरुवात केली. त्यांच्या या उपक्रमास चांगलाच प्रतिसाद मिळाला. १९७६ साली त्यांनी महाराष्ट्रातील नाशिकजवळील इगतपुरी येथे 'विपश्यना ध्यानसाधना आंतरराष्ट्रीय अकादमी' नावाचे पहिले ध्यान केंद्र सुरू केले. इगतपुरी येथील हे ध्यान केंद्र 'धम्म गिरी' या नावानेदेखील ओळखले जाते. गोयंका यांनी शिक्षकांना ध्यानाचे प्रशिक्षण देण्यास सुरुवात केल्यानंतर १९८२ सालापर्यंत त्यांनी विपश्यना केंद्राचे प्राचार्य म्हणून काम केले. पुढे त्यांनी १९८५ साली इगतपुरी येथे विपश्यना संशोधन संस्थेची स्थापना केली.

कालांतराने गोयंका यांनी इगतपुरी येथील केंद्रात दहा दिवसांची निवासी ध्यानशिबिरे सुरू केली. त्यांच्या या उपक्रमास भरघोस यश मिळाले. १९८८ सालापर्यंत त्यांनी असंख्य शिबिरार्थ्यांना ध्यानाचे प्रशिक्षण दिले. हजारो पाश्चिमात्य लोकांनी ध्यानाचे प्रशिक्षण घेतले.

सध्या जगातील ९४ देशांमध्ये त्यांची २२७ ध्यान केंद्रे कार्यरत आहेत. त्यांतील १२० ध्यान केंद्रे कायमस्वरूपी आहेत. ध्यान केंद्रे कार्यरत असलेल्या देशांमध्ये अमेरिका, कॅनडा, ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड, फ्रान्स, इंग्लंड, जपान, श्रीलंका, नेपाळ, म्यानमार आणि थायलंड या देशांचा समावेश आहे. या जागतिक २२७

ध्यान केंद्रांमध्ये भारतातील ५६ केंद्रांचा समावेश आहे.

सत्यनारायण गोयंका यांनी २००० साली मुंबई येथील गोराई बीचजवळ ३२५ फूट उंचीच्या जागतिक विपश्यना पागोडाची सुरुवात केली. २००९ साली ते सर्वांसाठी खुले करण्यात आले. त्यामध्ये बुद्धाची भव्य मूर्ती व ध्यानासाठी विशाल हॉल आहे. हा पागोडा त्यांनी आपल्या गुरूला अर्पण केला होता. ते या विपश्यना केंद्राला भेट देणार होते; पण पासपोर्ट न मिळाल्यामुळे ते येऊ शकले नाहीत.

सत्यनारायण गोयंका हे एक प्रभावी वक्ते होते. ते उत्तम लेखक व प्रतिभासंपन्न कवीदेखील होते. त्यांनी इंग्रजी आणि हिंदी या दोन्ही भाषांमध्ये साहित्यनिर्मिती केली आहे. त्यांनी जगातील अनेक देशांना भेटी देऊन तेथील श्रोत्यांसमोर आपले विचार अत्यंत प्रभावीपणे मांडले. विशेषत: त्यांनी दाओस येथील 'वर्ल्ड इकॉनॉमिक फोरम'मध्ये केलेले भाषण व ऑगस्ट २००० मध्ये युनायटेड नेशन्स येथे आयोजित केलेल्या 'मिलेनिअम वर्ल्ड पीस समिट'मधील केलेले भाषण, ही दोन्ही भाषणे अतिशय गाजली. २००२ साली त्यांनी नॉर्थ अमेरिकेमध्ये दौरा काढून चार महिन्यांच्या वास्तव्यात तेथील लोकांना ध्यानाचे महत्त्व पटवून दिले.

गोयंका यांची दहा दिवसांची विपश्यना ध्यान साधनेची शिबिरे जगभरात निरनिराळ्या ठिकाणी अत्यंत प्रभावी ठरली. शिबिरार्थी विद्यार्थ्यांनी मानसिक शांतता आणि कडक नैतिक मूल्यांचे पालन यांचे तंत्र आत्मसात केले. ०विपश्यना शिबिरात मनाची एकाग्रता भंग होऊ नये म्हणून विद्यार्थ्यांना बाहेरील लोकांशी संपर्क ठेवण्यास मनाई होती. परंतु एखाद्या तंत्राबद्दल प्रश्न उपस्थित झाला तर साहाय्यक शिक्षक किंवा विद्यार्थी व्यवस्थापकांमार्फत शंकानिरसन करून घ्यायची त्यांना मुभा होती. श्वास रोखून मनाची नैसर्गिक एकाग्रता साधण्याच्या क्रियेला 'अनापना' असे म्हणतात. मनाच्या एकाग्रतेमुळे साधकाच्या मनावर व शरीरावर नियंत्रण राहिल्यामुळे त्याला वर्तमानाचा विसर पडतो. या विपश्यना ध्यानसाधनेच्या अभ्यासामुळे साधकाच्या शरीराचे सूक्ष्म परीक्षण होऊन त्याच्यात आंतरबाह्य बदल घडून येतो. त्याच्या मनाची चंचलता दूर होऊन तो मनाने खंबीर बनतो. त्याची निर्णयक्षमता वाढते. योग्य निर्णय घेतल्यामुळे तो जीवनात यशस्वी होतो.

सत्यनारायण गोयंका यांनी सांगितले आहे की, ''विपश्यना ध्यानसाधनेचा अभ्यास हा धर्म व सत्य यांप्रती येणारा एकमेव राजमार्ग आहे. तो वैश्विक व सर्वमान्य मार्ग आहे. भगवान बुद्धाने सांगितलेला, ब्रह्मदेशामध्ये असताना माझे गुरू यू.बा. खिन यांनी मला शिकविलेला हा खात्रीलायक मार्ग मी गुरु-शिष्य परंपरेनुसार आपणांस सांगत आहे.''

सत्यनारायण गोयंका यांनी आपल्या शिबिरांमधून व भाषणांतून सांगितलेला विपश्यना ध्यानसाधनेचा मार्ग हा मनोविकारांच्या शास्त्रीय संशोधनातून निष्पन्न झालेला खात्रीलायक मार्ग आहे.

गोयंका विद्यार्थ्यांना आपल्या अध्यापनातील तात्त्विक मुद्दे विचारात घेण्याबाबत पाचारण करीत व त्यांतील दोष शोधण्याचा सल्ला देत. अमरत्व प्राप्त करणे हे या तंत्राचे ध्येय आहे, असे ते विद्यार्थ्यांना वारंवार सांगत. १९८३ साली प्रकाशित झालेल्या विपश्यना जर्नलच्या दुसऱ्या आवृत्तीतील पृष्ठ क्र. २९ वरील 'Let us talk sense' या लेखात बुद्धाचा संदर्भ देऊन ते म्हणतात, 'विश्वास गमावलेल्या व अमरत्वाकडे कानाडोळा करणाऱ्यांनो, अमरत्वप्राप्तीसाठी आपले दरवाजे उघडा.'

गोयंका विपश्यना ध्यानधारणा संस्थांना ऑनलाइनने मार्गदर्शन करीत व थेअरीबद्दल सांगत. त्याचप्रमाणे, विपश्यना तंत्राद्वारे आपण अमरत्वप्राप्ती या ध्येयाप्रत पोहोचू असे दाखवून देत. कामवासना ही जन्मोजन्मी तुम्हांला तीव्र संघर्ष करायला लावते. म्हणून जेव्हा तुमच्या मनात कामवासना निर्माण होते, तेव्हा वासना ही वासनाच राहू द्या, तिला आपल्या ध्येयावर मात करू देऊ नका. कारण कामवासना ही कायमस्वरूपी नसते. क्षणभंगुर असते. तिला तुमच्या मनावर मात करू देऊ नका; म्हणजे ती कमजोर होऊन, तिची तीव्रता कमी

होऊन ती निघून जाते. गोयंकांच्या मते, जन्म, मृत्यू व पुनर्जन्म ही जी साखळी आहे, तिच्यातून मुक्त होऊन अमरत्व प्राप्त करणे हे आपल्या विपश्यना ध्यानसाधना तंत्राचे ध्येय आहे. आचार्य सत्यनारायण गोयंका यांनी विपश्यना संस्थेच्या प्रसारित केलेल्या वेबसाइटवरील एका लेखात ते म्हणतात, 'कोणत्याही जाती, धर्म व वर्गाची व्यक्ती चारित्र्यसंवर्धन, मनोनिग्रह व अनुभवसिद्ध शहाणपण यांचा उपयोग करून धर्माचरण करीत असेल, तर त्या व्यक्तीने मुक्तीच्या चार अवस्था पार केल्यामुळे त्याला 'आर्य' म्हणून संबोधिले जाईल. त्याच्या या अवस्थेला 'सोतापन्ना' असे म्हणतात. त्याला जन्म - मृत्यूच्या फेऱ्यातून मुक्ती मिळते. विपश्यना ध्यानधारणेच्या सरावामुळे त्याच्यातील 'माझे मन', 'माझे शरीर', 'मी', 'माझे' हा अहंभाव नष्ट होऊन तो 'अरहत' या उच्चपदाला प्राप्त होईल. तो सुख-दुःख, जन्म - मृत्यू यांच्या फेऱ्यातून मुक्त होऊन मोक्षपदाला प्राप्त होईल.'

गोयंका यांनी साऱ्या जगात दहा दिवसांची विपश्यना ध्यानधारणा शिबिरे भरवून विपश्यना ध्यानसाधनेचा प्रसार केला. ध्यानसाधनेच्या 'धर्म' या वेबसाइटवर ऑनलाइन बुकिंग करण्याची सोय होती. कोर्सला येणाऱ्या विद्यार्थ्यांकडून फी, निवास व भोजनासाठी पैसे घेतले जात नव्हते. पुढील अभ्यासक्रमासाठी येणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी ऐच्छिक देणगी घेतली जाई.

या विपश्यना ध्यानसाधना केंद्रांतून शिक्षणार्थ्यांची संख्या दिवसेंदिवस वाढतच होती. गोयंका यांनी हे सर्व शिक्षण विशिष्ट धर्माकडे किंवा संप्रदायाकडे झुकणार नाही याची काळजी घेतली. त्यांनी लोककल्याणाला अधिक प्राधान्य दिले. दहा दिवसांच्या विपश्यना ध्यान-साधना शिबिरामुळे विद्यार्थ्यांना चांगले शिक्षण मिळावे म्हणून कडक शिस्तीचे पालन करून त्यांच्या शिक्षणाकडे गांभीर्याने लक्ष दिले.

मानसिक संतुलन बिघडलेले लोकही आपल्या मानसिक असंतुलनाचा त्रास कमी व्हावा म्हणून अधूनमधून विपश्यना ध्यानसाधनेच्या दहा दिवसांच्या शिबिरात दाखल होत. या लोकांची मदत संस्थेचे लोक व्यापारीवृत्तीने न करता सेवाभावनेने करीत. त्यांना योग्य ते मार्गदर्शन करीत. विपश्यना ध्यानसाधनेचा फायदा बऱ्याच लोकांना होई. परंतु, ती ध्यानसाधना वैद्यकीय इलाज किंवा मनोरुग्णांना पर्याय म्हणून नव्हती.

विपश्यना संशोधन संस्थेत विपश्यना ध्यानसाधनेवर संशोधन व त्याचा परिणाम यांबाबत साहित्य प्रकाशित होऊन थिअरी व प्रॅक्टिस यांनी हातात हात घालून काम केले पाहिजे, असा गोयंका यांचे मत होते. विपश्यना संशोधन संस्थेत पाली भाषेतील ग्रंथांचा अनुवाद करणे व त्यांचे प्रकाशन करणे, त्याबरोबरच रोजच्या जीवनात त्याचे आचरण करणे, या दोन गोष्टींवर भर होता.

गोयंका यांनी तुरुंगातील कैद्यांसाठी विपश्यना ध्यान-साधना सुरू केली. हा प्रयोग त्यांनी प्रथम भारतात व नंतर अन्य देशांत केला. संस्थेने सुरू केलेल्या दहा दिवसांच्या विपश्यना ध्यानसाधनेचा जवळजवळ १०,००० कैदी, अनेक पोलीस व मिलिटरीच्या लोकांनी लाभ घेतला. १९७३ साली दिल्लीच्या इन्स्पेक्टर जनरल ऑफ प्रिझन किरण बेदी यांनी प्रथम जेलच्या गार्ड्सना विपश्यना ध्यानसाधनेचे प्रशिक्षण दिले. त्यानंतर गोयंका यांनी १००० कैद्यांना प्रशिक्षण दिले.

२००७ साली बेसेमर येथील 'डोनाल्सन करेक्शनल फॅसिलिटी' या अलाबामा येथील विपश्यना ध्यान-साधनेवर आधारित 'धर्म-बंधू' ही डॉक्युमेंटरी फिल्म प्रकाशित केली. ही फिल्म चार खुनी कैद्यांवर आधारित होती. या फिल्ममध्ये तुरुंगातील गार्ड्स, ऑफिसर्स, कैदी आणि स्थानिक रहिवाशी यांच्या मुलाखती घेण्यात आल्या होत्या.

– प्रा. नीलकंठ पालेकर

***

# च



## चंदावरकर, नारायण गणेश

**प्रार्थना समाज, कायदेपंडित, समाजसुधारक**

**२ डिसेंबर १८५५ – १४ मे १९२३**



**ना**रायण गणेश चंदावरकर यांचा जन्म होनावर येथे, आजोळी झाला. मिशनरी शाळेत शिक्षण घेत असताना त्यांना बायबलचाही अभ्यास करावा लागला. त्यांचे मामा श्यामराव विठ्ठल व्यवसायासाठी मुंबईस आले. त्यांच्या नावाने निघालेली सहकारी बँक प्रसिद्धच आहे. श्यामराव नारायणला शिक्षणासाठी १८६९ साली मुंबईस घेऊन आले. मॅट्रिक झाल्यावर त्यांनी १८७२ मध्ये त्यांना एल्फिन्स्टन महाविद्यालयात दाखल केले.

बॅ. दादासाहेब खापर्डे हे त्यांचे सहाध्यायी व वसतिगृहातील खोलीबंधू होते. इंग्रजी विषय चंदावरकरांच्या आवडीचा होता. प्रोफेसर वर्ड्सवर्थ यांच्या इंग्रजी अध्यापनाचा त्यांना लाभ झाला. इतिहास, तत्त्वज्ञान व अर्थशास्त्र हे विषय अभ्यासून ते बी.ए.ला प्रथम वर्गात उत्तीर्ण झाले (१८७६). त्यांना महाविद्यालयात 'फेलो' म्हणून नेमण्यात आले. दोन वर्षांनी न्या. तेलंग यांच्या शिफारशीवरून 'इंदुप्रकाश' या द्वैभाषिक साप्ताहिकाच्या इंग्रजी विभागाचे ते संपादक झाले. त्यांनी अत्यंत आत्मीयतेने काम करत दहा वर्षांत त्या साप्ताहिकाची लोकप्रियता, तसेच त्याचा खप वाढविला. या काळात मथुरा सिरूर या युवतीशी त्यांचा विवाह झाला. 'इंदुप्रकाश' साप्ताहिकातून ते स्त्रियांना उच्च शिक्षण देण्याचा पुरस्कार करीत होते. स्त्रिया व मागासवर्गाला राजकीय हक्क पाहिजेत असे मत ते मांडीत. सार्वजनिक जीवनातील अनेक महत्त्वाच्या गोष्टींशी न्या. रानडे यांच्याप्रमाणेच न्या. चंदावरकरांचा संबंध होता. शासकीय बंधने पाळूनही लोकहित साधता येते, याचा एक आदर्श त्यांनी निर्माण केला. अस्पृश्यता निवारण कार्यात त्यांना रस होता. कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे यांनी स्थापन केलेल्या डिप्रेस्ड क्लास मिशनचे चंदावरकर अनेक वर्षे अध्यक्ष होते. या मिशनतर्फे ज्या परिषदा भरविल्या गेल्या, त्यांत चंदावरकरांचा वाटा असे.

''नीच मानलेल्या लोकांना वर आणण्याचा प्रयत्न करण्याने आम्ही स्वत:ला वर आणीत आहोत. हे पवित्र कार्य करीत असताना या लोकांचा आम्ही उद्धार करणार हा घमेंडीचा विचार आमच्या अंत:करणात न शिरो आणि आम्हां सर्वांना या घोर अन्यायामुळे जी अधोगती मिळाली आहे, ती टळून सर्वांचा सारखाच उद्धार होणार आहे, असा साधा आणि सात्त्विक भाव आम्हांमध्ये निरंतर जागृत राहो,'' अशी चंदावरकर यांची दलितोद्धाराबाबतची भूमिका होती. रानडे, तेलंग व चंदावरकर हे तिघेही मुंबईच्या एल्फिन्स्टन महाविद्यालयात शिकले.

सामाजिक, धार्मिक, राजकीय आणि आर्थिक चळवळी व प्रश्नांमध्ये तिघांचा सहभाग असे. रानडे अर्थात अग्रेसरच होते. तिघांनीही मुंबईच्या उच्च न्यायालयाचे न्यायाधीशपद भूषविले. त्या काळात कोणत्याही भारतीयाला मिळू न शकणारे ते सर्वोच्च अधिकारपद होते. या तिघांचाही 'इंदुप्रकाश'च्या संपादनाशी कमी-अधिक काळ संबंध होता. शिक्षण हा तिघांच्याही चिंतनाचा विषय होता. तिघेही प्रार्थना समाजाचे मुखपत्र, 'सुबोधपत्रिके'शी संबंधित होते.

न्या. रानडे व चंदावरकरांनी प्रार्थना समाजाच्या उपासनाही चालवल्या व धर्मपर व्याख्याने दिली. न्या. तेलंग मुंबई विद्यापीठाचे एक वर्ष कुलगुरू, तर न्या. चंदावरकर तीन वर्षे कुलगुरू होते. १८८५ मध्ये काँग्रेसची स्थापना करण्यात न्यायमूर्ती रानडे यांचा वाटा होता. चंदावरकर काँग्रेसचे आजीव सभासद होते. १८९६ पासूनच चंदावरकर प्रार्थना समाजाचे अध्यक्ष होते. मुंबईस जी विधान परिषद स्थापन झाली, तिचे ते बिनसरकारी अध्यक्ष झाले. त्यांनी रॉयल एशियाटिक सोसायटीचे (मुंबई शाखा) अध्यक्षपद भूषविले.

कायदेपंडित म्हणून ते नावाजलेले होते. तरी, सामाजिक जागृती, पत्रकारिता, अस्पृश्यता निवारण वगैरे क्षेत्रांतील त्यांचा सक्रिय सहभाग अत्यंत मोलाचा होता.

— वि.ग. जोशी

**संदर्भ :**

१. *मराठी 'विश्वकोश', खंड - ५.*

२. *चपळगावकर, नरेंद्र; 'तीन न्यायमूर्ती आणि त्यांचा काळ'.*

## चव्हाण, काशीबाई महाराज

***अंपडकर, काशी धोंडू***

**महायोगिनी, समाजसेवक**

**१९०१ - २५ सप्टेंबर १९७६**

काशीबाई धोंडू अंपडकर यांचा जन्म कोकणातील राजापूर तालुक्यातील भूतेखण येथे झाला. त्यांच्या आईचे नाव उमाबाई होते. धोंडू व उमाबाई यांना एकूण चार अपत्ये झाली. काशीबाईंच्या पणजोबांनी जंगलात



सापडलेल्या एका अनाथ मुलाचा सांभाळ केला म्हणजे अनाथाला आपंगिले म्हणून त्यांचे आडनाव आपंगकर पडले, पुढे ते अपभ्रंश होत 'अंपडकर' झाले. अशा परोपकारी घराण्यात एक योगिनी म्हणून काशीचा जन्म झाला. तिचे शिक्षण झाले नाही; पण बालपणापासूनच तिला नामस्मरणाची व लोकांची सेवा करण्याची आवड होती. गरिबीमुळे कष्टानेच या कुटुंबाला रोजीरोटी मिळवावी लागत होती.

आई जंगलात जाऊन लाकूडफाटा आणत असे. तेव्हा काशी तिच्याबरोबर जाऊन मदत करीत असे. आईबरोबरच्या बायका काम करताना देवाची गाणी, ओव्या म्हणायच्या, कहाण्या सांगायच्या, व्रतवैकल्य-पुराणकथांच्या गप्पागोष्टी व्हायच्या. या देवाधर्माच्या गप्पा काशीताईला खूप आवडत असत. या कथा ऐकायला मिळतात म्हणून ती हट्ट करून आईसमवेत लाकूडफाटा आणण्यास जंगलात जाई. काशी लहान असतानाच तिचे वडील धोंडू यांचे निधन झाले.

रोज जंगलात जाण्याने काशीची तेथे वस्ती करणाऱ्या लोकांशी जवळीक निर्माण झाली व त्यांच्याकडून अनेक दुर्मीळ वनौषधींची, झाडपाल्याची तिला माहिती झाली. काही उपजत दैवी गुण व हे झाडपाल्याचे ज्ञान या योगे ती गरिबांवर मोफत उपचार करू लागली. अल्पावधीतच तिच्या या विद्येची पंचक्रोशीत प्रसिद्धी झाली. असंख्य



**काशीबाईंचे गुरू रामकृष्ण महाराज**

गरीब, गरजू रुग्ण काशीकडे येऊन बरे होऊ लागले. दरम्यान, तिचा मोठा भाऊ, आई यांनी काशीचे लग्न करण्याचे ठरविले. नवऱ्याच्या घरी ती सुखाने दोन घास खाईल व आपलीही एक जबाबदारी कमी होईल, एवढाच त्यांचा हेतू होता. मुंबईतील उपनगरात काशीबाईंचा भाऊ हरी चाकरमानी होता. त्याच्या ओळखीने एका केशकर्तनालयातील हरिश्चंद्र चव्हाण याच्याशी काशीचे लग्न ठरले. फारशी चौकशी न करता घाईने लग्न उरकून टाकण्यात आले. काशीबाईंची सासू महा खाष्ट होती. ती काशीचा खूप छळ करून तिला दिवसदिवस उपाशी ठेवत असे. या त्रासातून सुटका व्हावी या इच्छेने तिचा भाऊ हरी याने काशीला श्री रामकृष्ण महाराज जांभेकर यांच्याकडे नेले. दोघांना प्रथम भेटीतच आपल्या पूर्वजन्माची ओळख पटली.

काशीचा नवरा तेव्हा खूप आजारी होता. नवऱ्याची प्रकृती बरी व्हावी यासाठी तिने जांभेकर महाराजांना प्रार्थना केली. महाराजांनी तिला २१ गुरुवारांची उपासना सांगितली. २१ गुरुवार संपतासंपता काशीबाईंच्या नवऱ्याचे निधन झाले. काही काळाने तिच्या मुलाचेही निधन झाले. हे दोन्ही आघात केवळ उपासनेमुळेच काशीबाई सोसू शकली. आता ना पती, ना मुलगा, ना संसार. त्यामुळे काशीबाई यांनी पूर्ण वेळ जांभेकरांच्या मठातच सेवेसाठी स्वत:ला समर्पित केले. अल्पावधीतच तिच्यावर जांभेकरांची गुरुकृपा झाली. गुरूच्या मठाची सर्व जबाबदारी काशीबाईंवर सोपविली गेली. नित्य नामस्मरण आणि समर्पित सेवा साधना हेच काशीबाईंचे जीवन होते. या साधनेने त्या 'महायोगिनी' पदाला पोहोचल्या. सर्व जण त्यांना 'काशीबाई महाराज' म्हणू लागले.

काशीबाई यांनी गुरू जांभेकरांच्या निर्वाणानंतर त्यांच्या समाधीची सेवा केली. गुरुबंधू नामदेव महाराज यांचीही गुरूप्रमाणे सेवा केली. त्यांनी काशीबाई महाराजांच्या मांडीवर डोके ठेवून प्राण सोडला. यानंतर मठाकडे आशेने व श्रद्धेने येणाऱ्या सर्व रंजल्यागांजल्या भक्तांचे काशीबाई आपल्या ठायीच्या सिद्धीने समाधान, कल्याण करू लागल्या. वयाच्या चौऱ्याहत्तराव्या वर्षी त्यांनी विरक्ती पत्करली व त्या एकांतवासात गेल्या.

मठात 'गुरुलीलामृत' पारायण सप्ताह होतो. नवरात्रात देवीची स्थापना केली जाते. आता माउली काशीबाई महाराज पूर्ववत सेवेत रुजू झाल्या असे वाटत असतानाच २५ सप्टेंबर १९७६ रोजी पहाटे काशीबाईंनी मठाचे प्रमुख अप्पा जगदाळे यांच्या हस्ते पाणी मागितले आणि गुरूंचे स्मरण करत त्या समाधिस्थ झाल्या. श्रीगुरू जांभेकर यांच्या समाधीजवळ काशीबाईंच्या स्मरणार्थ पादुका स्थापन करण्यात आल्या आहेत.

काशीबाई यांना वाचासिद्धी प्राप्त होती. सतत नामस्मरण आणि सेवा हीच साधना हे त्यांच्या जीवनाचे सार होते. अनेक सिद्धिप्राप्त सत्पुरुष त्या सिद्धी स्वत:चे दु:ख, व्याधी दूर करण्यास वापरत नाहीत, तर लोकांच्या कल्याणार्थ वापरतात व स्वत:चे दु:ख, व्याधी, व्यथा, देहभोग म्हणून साक्षीभावाने भोगतात. त्या अशाच कोटीतील संतपदाला पोहोचलेल्या होत्या.

— विद्याधर ताठे

**संदर्भ :**

१. *'संतमत', संतचरित्र विशेषांक, १९९०.*

## चिमड महाराज

***यरगट्टीकर, रामभाऊ अंताजी***

**दास पंथ**

**१८३३ – १८९१**





**चि**मड महाराज म्हणून ओळखले जाणारे साक्षात्कारी सत्पुरुष रामभाऊ अंताजी यरगट्टीकर यांचा जन्म 'यरगट्टी' गावी ज्येष्ठ शुद्ध दशमी, शके १७७५ मध्ये झाला. त्यांचे खरे आडनाव हुद्दार होते; पण पुढे यरगट्टीकर म्हणूनच रूढ झाले. त्यांच्या वडिलांचे नाव अंताजी त्र्यंबक हुद्दार आणि आईचे नाव कृष्णाई होते.

रामभाऊ यरगट्टीकर यांनी चिमड गावी आपले जीवन व्यतीत केले व तेथे चिमड संप्रदाय स्थापन केला, त्यामुळे त्यांचे नाव 'चिमड महाराज' म्हणूनच सर्वत्र प्रसिद्ध झाले. रामभाऊ बालपणापासून शिवोपासक होते. एकदा ते सज्जनगडाला गेले असता एका रामदासी साधकाने त्यांना 'दासबोध' ग्रंथ सांभाळण्यास दिला आणि नंतर तो अदृश्य झाला. हा 'दासबोध' ईश्वरी प्रसाद समजून रामभाऊ यांनी दासबोधाची अनेक पारायणे केली. रामभाऊंचे शिक्षण यरगट्टी येथेच झाले. त्या काळच्या पद्धतीप्रमाणे वयाच्या चौदाव्या वर्षीच (इ.स. १८४७) खानापूर-बलवडी (सांगली जिल्हा) येथील बचारामपंत यांची कन्या येसूबाई हिच्याशी रामभाऊंचा विवाह झाला. त्यांना १८५७ मध्ये सातारच्या न्यायालयात कारकून म्हणून सरकारी नोकरी मिळाली. पुढे विटे, जत येथे त्यांची बदली झाली. जत येथे त्यांचा संपर्क उमदीच्या श्री निंबरगीकर महाराजांशी झाला. त्यांच्या मनात आध्यात्मिक बीज अंकुरले. पुढे निंबरगीकर महाराजांचे शिष्य साधू महाराज यांचा रामभाऊंना अनुग्रह लाभला.

'प्रपंचात समाधानाने राहून परमार्थ सुख लुटावे' या गुरूंच्या शिकवणीनुसार रामभाऊ यांनी प्रपंचात राहून आध्यात्मिक साधना आरंभली.

अखंड साधना व अनुसंधानामुळे रामभाऊ अल्पावधीतच सिद्धावस्थेस पोहोचले. त्यांचा हा अधिकार पाहून खुद्द निंबरगीकर महाराज यांनी रामभाऊंना योग्य त्या पात्र भाविकांना दीक्षा-अनुग्रह देण्याचा अधिकार दिला. १९८० साली निंबरगीकर महाराज व गुरू साधू महाराज यांच्या आज्ञेने रामभाऊ नोकरीचा राजीनामा देऊन पत्नी व मुलीसह 'चिमड' गावी जाऊन स्थायिक झाले.

चिमड येथे स्मशानभूमीजवळ एक पर्णकुटी बांधून रामभाऊ यांनी संसार थाटला. तेथे त्यांनी श्रीगुरू साधू महाराज समाधी मंदिर बांधण्याचा संकल्प केला. पायाबांधणीसाठी जागेत खोदकाम सुरू असतानाच एक प्रचंड झरा लागला. त्या जलप्रवाहात विहिरीसारखी भिंत घालून त्या जलाशयावरच श्री साधू महाराज, श्री निंबरगीकर महाराज आणि श्री काडसिद्ध सद्‌गुरू अशा त्रयीचे मंदिर बांधले. तेथून 'चिमड' हे स्थान परमपावन तीर्थक्षेत्र म्हणून प्रसिद्धीस पावले. नित्य प्रवचन, पंचपदी आणि उपासना यांमुळे साधकांमध्ये 'चिमड' हे फार मोठे श्रद्धास्थान झालेले आहे. रामभाऊ यरगट्टीकर तथा चिमड महाराजांच्या भाविकांना आलेल्या अतर्क्य अनुभवांच्या अनंत कथा ऐकावयास मिळतात. भक्त संकटमोचक दुःखनिवारक अशा चिमड महाराजांच्या अनेक आठवणी सांगतात.

चिमड महाराजांच्या गुरूंचे गुरू श्री निंबरगीकर महाराज १८८५ साली चैत्र शुद्ध द्वादशीला शिवस्वरूपी लीन झाले. चिमड महाराज यांचा शिष्यपरिवारही मोठा

आहे. वामनकाका, गोपाळराव दीक्षित, अप्पाराव भावे, विनायक हरी साठे अशा अनेक साधकांना त्यांनी दीक्षा देऊन मार्गदर्शन केले. तात्यामहाराज कोटणीस हे त्यांचेच शिष्य होत. चिमड महाराज यांच्या पत्नी येसूबाई ऊर्फ सीताबाई यांचीही साधना सिद्धावस्थेस पोहोचलेली होती. भाविक साधक त्यांना माईसाहेब म्हणत. चिमड महाराज यांना एक कन्या व तीन पुत्र झाले. चिमड महाराज समाधिस्थ झाल्यावर या पुत्रांनीच चिमड संप्रदायाची परंपरा समर्थपणे पुढे चालविली.

दाजी महाराज (१८८१ ते १९००), नारायण महाराज (१८८५ ते १९६३), उद्धव महाराज (१८८९ ते १९३२) अशी ही परंपरा आहे. चिमड मठामध्ये चिमड महाराजांनंतर लक्ष्मीबाई अक्का या शिष्या सर्वांना अनुग्रह देत. अक्कांच्या निर्वाणानंतर हा अधिकार माईसाहेबांकडे आला. रामभाऊ यरगट्टीकर ऊर्फ चिमड महाराज यांचे पूर्व कथनानुसार, पूर्वज्ञात तिथीला इ.स. १८९१ मध्ये निर्वाण झाले. श्री निंबरगीकर महाराज यांनी रामभाऊंना 'हत्तीवर कधीही बसू नको; ज्या दिनी तू हत्तीवर बसशील, त्यानंतर तुझा मृत्यू होईल,' असे मृत्यूचे पूर्वज्ञान दिले होते. रबकवीच्या अतिआग्रहाने रामभाऊ मिरवणुकीत हत्तीवर बसले आणि कोणत्याही आजाराविना मार्गशीर्ष शुद्ध एकादशीला त्यांचे निर्वाण झाले. रामभाऊ गेले तेव्हा त्यांचा ज्येष्ठ मुलगा रघुनाथ ऊर्फ दाजी हा बरोबर दहा वर्षांचा होता. चिमड येथे श्रीगुरू साधू महाराज यांच्या समाधीजवळच रामभाऊ यांच्या स्मरणार्थ औदुंबराचे एक झाड लावण्यात आलेले आहे.

रामभाऊ यरगट्टीकर यांच्यानंतर चिमड संप्रदायाची गादी त्यांचे सुपुत्र दाजी महाराज यांच्याकडे आली. १८९७ साली ते मठाधिपती झाले. तेव्हा त्यांचे वय अवघे १७ वर्षांचे होते. ते अल्पायुषी होते. केवळ तीन वर्षांनी, १९०० मध्ये त्यांचे विसाव्या वर्षीच निर्वाण झाले. त्यानंतर चिमड मठाची जबाबदारी रामभाऊंचे द्वितीय पुत्र नारायण महाराज यांनी सांभाळली. ते स्वतःला मठाधिपती न मानता मठातील एक सेवेकरी समजत होते. त्यांचे १९६३ साली निर्वाण झाले. विशेष म्हणजे मामा महाराज केळकर हे त्यांच्या अनुग्रहित शिष्यांपैकी एक आहेत.

— विद्याधर ताठे

## चितारीबुवा

***ब्रह्मचारी अनंत महाराज***

**चित्रकार सत्पुरूष**

**१८३० - १८९८**



**आ**पल्या चित्रकलेच्या कलाकारीमुळे 'चितारीबुवा' हे नामाभिधान मिळालेले अनंत महाराज यांना 'ब्रह्मचारीबुवा', 'जटाधारीबुवा' यांही नावांनी ओळखले जाते. पैठण, औरंगाबाद, नाते, महाड, हरिहरेश्वर, निपाणी, सावंतवाडी इत्यादी भागांत त्यांचा भक्तगण, शिष्यपरिवार पसरला आहे. श्री अनंत महाराजांचा जन्म कर्नाटकातील कारवार जिल्ह्यात एका ब्राह्मण कुटुंबात झाला. त्यांच्या मातापित्यांबद्दल, अन्य कुटुंबकुळाबद्दल माहिती उपलब्ध नाही, त्यामुळे त्यांच्या जन्मतारखेबद्दलही अनभिज्ञताच आहे.

परंतु साधारणपणे १८३०च्या दशकात त्यांचा जन्म झाला असावा आणि १८५०च्या दशकात त्यांचे आध्यात्मिक कार्य बहरले. महाराजांनीदेखील प्रसिद्धिपराङ्मुख राहून स्वत:बद्दलची ओळख गूढ ठेवली

होती. मात्र, अनंत महाराज यांच्या आध्यात्मिक अधिकारामुळे त्यांचा भक्तसंप्रदाय हळूहळू वाढत गेला. त्यांच्या घरात परंपरेने नाथभक्ती मात्र होती. महाराज लहानपणापासूनच मितभाषी, त्यामुळे त्यांनी आपली अभिव्यक्ती आपल्या चित्रकलेतून आणि काव्यातून प्रामुख्याने प्रकट केली. अनंत महाराज नऊ वर्षांचे होते तेव्हा त्यांनी घर त्यागले. सोबत घरातील 'रुक्मिणी स्वयंवर' हा ग्रंथ घेतला आणि जवळच्या गोकर्ण गावातील ब्रह्मगिरीचा डोंगर गाठला.

च

ब्रह्मगिरीवर त्या काळी योगेश्वर हे साधुपुरुष वास्तव्य करून होते. त्यांना सिद्धी प्राप्त झाली होती, असे गावकरी म्हणत. त्यामुळेच श्री अनंत महाराज यांनी त्यांची सहा महिने अगदी मनोभावे सेवा केली. आध्यात्मिक आचरण, साधना, शिकून घेतल्या; पण सारे मूक अवलोकनातूनच. कारण, योगेश्वरगुरूंनी सहा महिन्यांत एका अक्षराचाही मौखिक संवाद श्री अनंत महाराज यांच्याशी केला नाही. खरे तर, ती श्री अनंत महाराज यांची सत्त्वपरीक्षाच घेतली होती गुरूंनी. कठोर कसोटीला उतरल्यानंतर योगेश्वरगुरूंनी त्यांना कृपाप्रसाद म्हणून 'रुक्मिणी स्वयंवर' उलगडून दाखवला. त्यातून अनंत महाराज यांना नवोन्मेषी दृष्टी प्राप्त झाली. त्यामुळे योगेश्वरगुरूंनी त्यांना आता पुढे वाटचाल करण्याच्या दृष्टीने महाराष्ट्रातील कोकण प्रांतातील एक ज्योतिर्लिंग श्रीहरिहरेश्वर येथे प्रस्थान ठेवण्यास आज्ञा केली. त्यानुसार कोकणातील श्री हरिहरेश्वर तीर्थक्षेत्रातील काळभैरव मंदिरात ते राहू लागले. काळ होता १८५० चे दशक. तेथे बारा वर्षांचे कठोर तपाचरण करून त्यांनी चार धाम यात्रा केली. एका ठिकाणी फार काळ राहून तेथे गुंतायचे नाही, हा त्यांचा विचार असे. त्यामुळे चार धामनंतर ते महाराष्ट्रात एकनाथ महाराज यांच्या पैठण क्षेत्री आले. तेथे घराण्याच्या परंपरेतील नाथभक्ती जोपासायचे ठरवले. पैठण मुक्कामी त्यांना कृष्णराव नावाचे एक सरकारी अधिकारी निष्ठावान शिष्य म्हणून लाभले. श्री अनंत महाराजांनी या काळात जटा वाढवल्या. त्यामुळे त्यांना जटाधारीबुवा म्हणूनही लोक संबोधू लागले. या काळात त्यांचा शिष्यगण वाढत होता. तेथे अमरावतीची एक जगन्नाथ बापट नावाची उच्चविद्याविभूषित श्रीमंत व्यक्ती पूर्णपणे निरिच्छ होऊन महाराजांच्या सेवेस लागली. असे कित्येक प्रापंचिक, चितारी महाराजांच्या आध्यात्मिक विचारांनी प्रेरित होऊन संपूर्ण प्रपंचाचाच त्याग करून अथवा प्रपंचात राहूनही नाथभक्तिमार्गाचा अवलंब करते झाले.

चितारी महाराजांच्या प्रबोधनाचा मुख्य भर चित्रमय शैलीतून संदेश देण्यावर असे. आपल्या शिष्यांना ते देवादिकांची चित्रे काढून देऊन त्यावरून संदेश देत. चितारी महाराजांनी १८८४ साली एक चित्र काढले होते. ते एका भव्य पुरुषाचे चित्र होते. त्या चित्रातील कलात्मकता तर चित्रकलेचा एक उत्कृष्ट नमुना ठरणारी आहेच; परंतु त्या चित्राचे वैशिष्ट्य असे, की त्या पुरुषाच्या देहावरील विविध अवयवांना त्यांनी मानवी भावभावनांनुसार, षडरिपूंनुसार विविध सांकेतिक नावे आणि वर्णन दिले आहे. त्या चित्रातील रंगसंगती आजही ताजी आणि अबाधित आहे. सध्या हे चित्र महाड येथील एका शिष्याकडे सुरक्षित आहे. रंगांसाठी ते बहुतेक करून नैसर्गिक वनस्पतींचा वापर करीत. महाराज जेथे - जेथे जात तेथे, तेथील मंदिर, मठात, आश्रमात ते चित्र चितारीत व तेथेच ठेवून देत. आजही नेवासे येथे श्रीमोहिनीराजाच्या मंदिरात चितारी महाराज यांची आशयसंपन्न चित्रे आढळतात. औरंगाबाद, नाते, मांजरी, महाड अशा अनेक मंदिरांत त्यांची चित्रे आजही पाहायला मिळतात.

आपल्या चित्रशिल्पाप्रमाणेच सुदृढ साहित्यमूल्ये असलेली काव्यप्रतिभाही श्री चितारीबुवांनी शिष्यगणांमध्ये, तसेच आध्यात्मिक विषयांच्या वाचकांपुढे सादर केली आहे. त्यांची प्रार्थनागीते, स्तोत्रे, अष्टके, अभंग, पदे, नवविधगोपी हे आध्यात्मिक रूपक, कविता, इत्यादी मिळून साठ हजारांच्या जवळपास रचना आहेत. शकुंतला आख्यान, सुदामा, दामाजी, ध्रुव अशा पौराणिक व्यक्तिमत्त्वांची चरित्रेही त्यांनी शब्दबद्ध केली आहेत. याशिवाय 'श्रीनाथलीला', 'श्रीनाथाष्टक',

'श्रीनाथस्तुती' या चरित्रग्रंथांतून श्रीनाथमहाराजांचे चरित्र उलगडले आहे. चितारीबुवा यांचे चरित्र त्यांचे शिष्य बळवंत संत यांनी लिहिले आहे.

— संदीप राऊत

## चिद्‌घन महाराज

***कवाडकर, सखाराम***

***केतकर, सखाराम हरिपंत***

**सिद्धयोगी**

**१८०१ — १८६७**

**ठा**णे जिल्ह्यातील भिवंडीजवळ असलेल्या 'कवाड' येथील श्री चिद्‌घन महाराज यांचे पूर्वाश्रमीचे नाव सखाराम हरिपंत केतकर असे होते. त्यांचा जन्म ज्येष्ठ शुद्ध अष्टमीस झाला. त्यांच्या आईचे नाव गोपिकाबाई होते. वडील हरिपंत ऊर्फ बच्चाजी गोविंद केतकर हे दशग्रंथी ब्राह्मण होते. सखारामचे त्याच्या वडिलांपाशीच सर्व शिक्षण झाले. वडिलांनी घरातच त्यास मोडी-हिशेब यांसह सर्व धार्मिक पाठांतराचे शिक्षण दिले.

लौकिकदृष्ट्या त्यांचे शिक्षण सातवीपर्यंत झालेले होते. त्यांचे अक्षर अत्यंत वळणदार व बुद्धी अत्यंत कुशाग्र होती. मुंजीनंतर त्यांनी वडिलांकडून संस्कृत ग्रंथाचे ज्ञान घेतले. 'विवेकसिंधू'सारख्या ग्रंथांचा अगदी लहानवयातच त्यांनी सखोल अभ्यास केला. आध्यात्मिक साधना हेच आपले जीवन असा त्यांचा निश्चय होता. केवळ मातापित्याच्या आग्रहासाठी त्यांना मनाविरुद्ध विवाह करावा लागला. त्यांच्या पत्नीचे लग्नानंतर अल्पकाळात निधन झाले. सखारामपंतांनी त्यानंतर आजन्म ब्रह्मचर्य पालन केले.

तरुण वयातच सखारामपंत यांना योगसिद्धी प्राप्त झालेल्या होत्या. वशिष्टी नदीत वादळात अडकलेली नौका त्यांनी सुखरूप बाहेर आणली. या घटनेने त्यांचे नाव सिद्धयोगी म्हणून पंचक्रोशीत झाले. पण या नसत्या प्रसिद्धीचा त्रास नको म्हणून त्यांनी गुरूंच्या शोधार्थ गाव सोडले. तारापूर येथे श्री आठलेशास्त्री यांनी सखारामास शिवषडाक्षरी मंत्राची दीक्षा दिली. जप, ध्यानधारणा, सूर्योपासना असा नित्यनेम सुरू असला तरी त्यांच्या अंतरातील गुरुभेटीची ओढ कमी होत नव्हती. अखेर नाशिक येथे त्यांना त्यांच्या इष्टगुरूंची प्राप्ती झाली. इ.स. १८१९ मध्ये माघ शुद्ध दशमी या दिवशी त्यांना नाशिकचे रघुनाथ भट्टजी मोघे यांचा दृष्टान्तरूपाने अनुग्रह लाभला. आध्यात्मिक शिक्षणाची आवड त्यांना अलिबागला घेऊन आली. येथे श्री त्र्यंबकशास्त्री शाळिग्राम यांच्याकडे शिक्षण सुरू असताना शास्त्री आजारी पडले. शास्त्रींना उपचारासाठी पुण्यात हलविण्यात आले. तेव्हा गुरुजींच्या सेवेत सखारामही पुण्यात आले. पुण्यात विश्रामबाग पाठशाळेत त्यांचे पुढील अध्ययन होत होते.

पुण्यात सखाराम यांच्या विद्वत्तेचा चांगलाच बोलबाला झाला. यामुळे आपण खऱ्या ब्रह्मविद्येच्या साधनेपासून दूर जात आहोत हे वेळीच लक्षात आल्यामुळे त्यांनी पुण्याचा निरोप घेतला. एकांतात राहण्यासाठी त्यांनी १९२४ साली भिवंडीजवळच्या 'कवाड' या निसर्गरम्य, शांत अशा गावाची निवड केली. त्यांना गदाधरभट दाजी घारगुंडे यांच्या घराच्या पडवीत जागा मिळाली. पुढे या पडवीतच त्यांनी ४३ वर्षे ज्ञानसाधना व ब्रह्मविद्याचिंतनात घालविली.

इथे आले तेव्हा त्यांचे वय अवघे २३ होते. पण त्यांचा आध्यात्मिक अधिकार खूपच मोठा होता. त्यांना सर्व जण 'सखारामबुवा' म्हणूनच ओळखत. केवळ पाच घरे माधुकरी मागण्यापुरते ते पडवीतून बाहेर पडत. अन्य सर्व वेळ ईश्वरचिंतनात लीन राहत. अशी २४ वर्षे-दोन तपे त्यांनी 'कवाड' येथे तपश्चर्या केली. त्यांची सिद्धावस्था, त्यांचे ज्ञान, व्यासंग ऐकून अनेक साधक मार्गदर्शनाच्या इच्छेने त्यांच्याकडे येत. त्यांना त्रिकालज्ञान प्राप्त होते. कवाड गावाचे लोक त्यांना देवाचा अवतार समजत होते. त्यांना लाभलेली शिष्य-परंपराही मोठी आहे. शिष्याची योग्यता पाहून ते दीक्षा देत. ते प्रत्येकाला झेपेल अशीच साधना सांगत. समस्त समाज सन्मार्गाला लागावा अशी त्यांची इच्छा होती.

प्रापंचिक-ऐहिक प्रश्न घेऊन येणाऱ्यास ते उपदेशाद्वारे अध्यात्माकडे, परमार्थाकडे वळवीत. सदुसष्टाव्या वर्षी त्यांची प्रकृती बिघडली. हा देहाचा आजार आहे असे म्हणत त्यांनी आपली तपश्चर्या चालूच ठेवली. अखेर आजार बळावून नित्यकर्महीं करणे मुश्कील झाले. त्यांनी भारतीय आश्रम व्यवस्थेतील चौथा आश्रम, 'संन्यास' स्वीकारण्याचे ठरवले आणि भाद्रपद वद्य षष्ठीला संन्यास घेतल्यानंतर सर्व शिष्यांसमोर उत्तराभिमुख स्वस्तिकासन घालून ते समाधिस्थ झाले. चिद्घन महाराजांचे शिष्य ह.भ.प. माटे महाराज आर्दीनी पुढाकार घेऊन त्यांचे समाधिमंदिर बांधले आहे.

– विद्याधर ताठे

## चिले महाराज

**दत्तभक्त, दत्तावतारी अवलिया**

**१९२२ - १९८६**



**श्री** चिले महाराज यांचा जन्म कोल्हापूर जिल्ह्यातील पन्हाळा तालुक्यातील जिऊर या गावी झाला. त्यांचे शालेय शिक्षण कोल्हापुरातील नागोजीराव पाटणकर विद्यालयात, मॅट्रिकपर्यंत झाले. त्यांचे बोलणे बालपणापासूनच असंबद्ध वाटावे इतके वेडसरपणाकडे झुकलेले असायचे; परंतु त्या असंबद्ध वक्तव्यात खोल अर्थ दडलेला असायचा, हे त्यांच्या पुढील आयुष्यातील वाटचालीवरून आणि त्यांनी प्राप्त केलेल्या सिद्धींवरून लोकांना कळून चुकले. तारुण्याच्या उंबरठ्यावर असताना कोल्हापुरातच चिखली येथील श्रीदत्ताच्या मंदिरात दर्शनार्थ गेल्यानंतर त्यांना साक्षात्कार झाला आणि, 'माझे मन, तुझे मन, काय सांगू जनांस?', असे काहीतरी नित्याप्रमाणेच बडबडत ते बाहेर हिंडू लागले.

फार थोड्या लोकांना त्यांच्या बोलण्यातील गर्भितार्थ महत्प्रयासाने उकलायचा. त्यांचे बोलणे सर्वसामान्यांना कळत नसले तरी ते वेडे नव्हते, हे खास. कारण एरव्ही त्यांचे वागणे अतिशय साधे, मृदुभाषी, चेहरा प्रसन्न आणि स्नेहार्द्र दृष्टी असायची. त्यांचा पेहराव सफेद पँट किंवा लेंगा, पांढरा शर्ट किंवा कुडता आणि डोक्यावर काळी टोपी असा असे.

एका जागी ते फार काळ केव्हाच थांबले नाहीत. खाण्यापिण्याच्याही ते कधी मोहात पडले नाहीत. कसल्या गोष्टींचा संचय तर दूरच, दत्तभक्तीचा संचय मात्र त्यांनी अगणित केला, तसा तो लोकांमध्ये वितरितही केला. कुणाही भक्ताच्या घरी ते केव्हाही प्रविष्ट होत, मिळेल ते खात. आहार सात्त्विकच घेत. त्यात मिष्टान्नही कधीतरी असे. कधी चक्क उपवासही घडे. तोही ते गोड मानून घेत.

श्री चिले महाराजांचा लौकिकार्थाने कुठे मठ, आश्रम अशी ओळख नव्हती. ते स्वत:च चालताबोलता मठ होते. चिले महाराजांना लोक दत्तावतारी अवलिया मानीत. त्यांनी मैलोन्मैल पायपीट केली. संतमहात्म्यांच्या तीर्थस्थानांना, समाधिस्थानांना, उगमस्थानांना भेटी दिल्या. तेथील स्थानांचे महत्त्व जाणून घेतले. जागोजागी लोकांना सदुपदेश केला. हे केवळ महाराष्ट्रातच नव्हे तर गुजरात, कर्नाटक, मध्यप्रदेश येथेही त्यांनी आपला असंख्य भक्तसंप्रदाय तयार केला.

महाराष्ट्रात पुणे, नाशिक, कोल्हापूर, सोलापूर या प्रदेशांत त्यांचे विशेषत्वाने भक्तगण पसरलेले आहेत. परदेशांतही श्री चिले महाराजांचा कृपाप्रसाद लाभलेले भक्तगण मोठ्या प्रमाणात आहेत आणि परदेशांतही महाराजांचे उत्सव आजही भक्तिभावाने साजरे होतात. श्री

चिले महाराज लोकांना त्यांच्या अडीअडचणी, समस्यांमधून मार्ग काढण्यासाठी उपाय सुचवीत असत. त्यांचे उपाय आणि समस्यांमधून सोडवणुकीची पद्धत, लोकांना चमत्कार वाटावा इतपत अद्‌भुत प्रकारची असे. परंतु, लोकांच्या आकलनापलीकडचे उपाय सहज म्हणून श्री चिले महाराज सांगत. हे सारे त्यांना श्रीदत्तांकडून प्राप्त झालेल्या सिद्धींमुळे घडते, असे लोक मानीत. महाराजांच्या केवळ स्पर्शाने समस्या सुटतात, असा लोकांचा दृढ विश्वास होता.

'सुखात असताना आवर्जून दु:खाला आठवावं, दु:ख आलं तर त्याला हसत सामोरं जावं, तर दु:खाची तीव्रता कमी होते!' हे त्यांचे साधे तत्त्वज्ञान होते. भगवा झेंडा, अर्थात भागवतधर्म सदा उन्नत, उदात्त ठेवावा असा त्यांचा नेहमीच उपदेश असे. 'रघुपती राघव राजाराम, पतित पावन सीताराम' हे भजन त्यांच्या मुखात नेहमी असे. पूज्य चिले महाराजांचे महानिर्वाण १९८६ साली, वयाच्या चौसष्टाव्या वर्षी करवीरनगरातच झाले. कोल्हापूर शहरापासून वीस कि.मी.वर असलेल्या पैंजारवाडी येथे त्यांची समाधी त्यांच्या भक्तगणांनी बांधली आहे. श्रीदत्तमंदिराची स्थापनादेखील त्यानंतर करून चिले महाराजांच्या कार्याची आठवण, 'परमपूज्य श्री चिले महाराज समाधी मंदिर ट्रस्ट'च्या रूपात जागृत ठेवली आहे. ट्रस्टमार्फत श्रद्धावान आणि नागरिकांसाठी नैमित्तिक कार्यक्रमांसह समाजोपयोगी उपक्रमही राबविले जात असतात.

— संदीप राऊत

## चौंडे महाराज 'गोजीवन'

***चौंडे, बाळकृष्ण मार्तंड***

**कीर्तनकार, गोरक्षक**

**१८७६ - १९६७**

बाळकृष्ण मार्तंड चौंडे म्हणजेच गोजीवन महाराजांच्या वडिलांचे नाव मार्तंडाचार्य व आईचे जानकीबाई होते. त्यांचे मूळचे घराणे कर्नाटकातील होते. पूर्वजांनी देवी चौंडा हिला नवस केला होता. त्या नवसाने



पुत्रप्राप्ती झाली म्हणून हे घराणे 'चौंडे' आडनाव लावू लागले. मार्तंडाचार्य व जानकीबाई यांना माघ कृष्ण तृतीयेस (शके १७९८) पुत्रप्राप्ती झाली व त्या बालकाचे नाव 'केशव' ठेवले गेले. वाई येथेच केशव याचे प्राथमिक शिक्षण झाले.

वडिलांनी छोट्या केशवाला दहाव्या वर्षीच सज्जनगडावर नेले. समर्थांच्या बंधूंची सातवी पिढी चालू होती. त्या वेळी तेथे महारुद्रबाबा होते. त्यांच्या पत्नीचे नाव यशोदा. यशोदामातेने हात धरून स्वप्नातच छोट्या बाळाला मंदिरात नेले. चाफळ येथे अनुग्रह दिला. हा अनुग्रह मार्गशीर्ष शुद्ध १५, शके १८१९ (इ.स. १८९७) रोजी मिळाला. श्री चौंडे महाराज लहानपणीच सुंदर कीर्तन करू लागले. त्यांचे वडीलही त्यांच्याबरोबर असत. चौंडे महाराजांचा विवाह कानडे घराण्यातील कमलाबाई यांच्याशी झाला (शके १८१४ म्हणजे इ.स. १८९२). दौंड, खांडवा, देवास, उज्जैन, इंदूर अशी कीर्तने करीत ते काशी येथे गेले. काशी क्षेत्रीच त्यांच्या वडिलांनी देह ठेवला (इ.स. १९०२).

चौंडे महाराज यांनी आपल्या डोळ्यांसमोर एकदा गोहत्या होताना पाहिली आणि त्यातील क्रौर्य व हिंसेने कळवळून गोरक्षणाचे कार्य हाती घेतले. महाराजांनी आजन्म केलेले गोरक्षणाचे कार्य अखिल भारतात प्रसिद्ध आहे. चौंडे महाराजांचे सारे आयुष्य 'गोजीवन'च होते.

त्यांची कीर्तने अतिशय प्रभावी आणि हृदयस्पर्शी होत. त्यामुळे अनेकांना 'गो-रक्षणा'ची स्फूर्ती मिळाली. भागोजी शेटजी, मुंबई यांनी ५०,००० रुपयांची देणगी आणि 'गोशाळा' बांधून दिली. या भागेश्वर गोशाळेत भगवान श्रीकृष्णाच्या सुंदर मूर्तीची स्थापना झाली होती.

च

कोल्हापूरच्या छत्रपतींनी रुकडी येथे दोन हजार गाईंच्या कुरणासाठी ३०० एकर भूमी दान दिली. गो-रक्षणाचे कार्य म्हणजे भगवान श्रीकृष्णाची खरी पूजा! या कार्याला भगवंताचे अधिष्ठान लाभणारच! दूध, दही, लोणी, तूप, शेती, नैसर्गिक खते, गोबर (शेण) वायू, धान्योत्पादन आणि दुधा-तूपातून निर्माण होणारे अन्नाचे शेकडो प्रकार गोपालनावर अवलंबून आहेत. चौंडे महाराजांची कीर्तने एवढी प्रभावी होत, की महार, मांग इत्यादी हरिजनांनीही गो-रक्षणाचे व्रत घेतले. गोजीवन चौंडे महाराजांच्या कार्याने भारतात अनेक नगरांत गोशाळा स्थापन झाल्या.

महाराजांच्या व्रतस्थ जीवनाचे व कार्याचे संत महात्मे, क्रांतिकारक, राजकारणी नेते, सामाजिक कार्यकर्ते, कलावंत, कीर्तनकार अशा विविध क्षेत्रांतील अनेक महापुरुषांनी मनापासून कौतुक केले. चौंडे महाराज यांना ९१ वर्षांचे आयुर्मान लाभले. त्यांनी अनेकांना प्रेरणा दिली. गोवर्धनकार्याला गती दिली. गोजीवन चौंडे महाराज यांनी जीवनाला एक दृष्टी दिली आहे.

– डॉ. वि.य. कुलकर्णी

**संदर्भ :**

१. *'गोजीवन' - चरित्रावरील पाच कीर्तने; धेनुदास डोळे, शं.सं.; १४ जानेवारी १९६७.*

***

# ज



## जंगली महाराज
**समाजसुधारक, साक्षात्कारी संत**
**१८१० – ४ एप्रिल १८९०**



सद्‌गुरू श्री जंगली महाराज यांचा जन्म साधारणपणे १८१० सालचा मानला जातो. ते बालपणापासून एकपाठी आणि अत्यंत कुशाग्र बुद्धीचे होते. पुढील काळात त्यांनी पर्शियन, उर्दू, कानडी, संस्कृत, मराठी या भाषा आणि सर्व धर्मांतल्या ग्रंथांचा अभ्यास केला. विविध गुरूंचे मार्गदर्शन घेऊन मल्लविद्या, मंत्रशास्त्र, नाथपंथीय साधना, हठयोग, राजयोग यांतही ते प्रवीण झाले. यामुळे समोर कोणत्याही जाती, धर्म, पंथाचा माणूस आला, तरी ते त्याच्या धर्मग्रंथातील वचनांचा आधार देऊन त्याला सन्मार्गाचा उपदेश करीत, उपासना सांगत व संकटमुक्तही करीत. सिद्धीच्या बळावर त्यांनी अनेक चमत्कारही करून दाखवले. पुढे सर्वसंगपरित्याग करून महाराज जनकल्याणार्थ बाहेर पडले. भिक्षाटन करताना महाराजांनी सर्व धर्मांच्या लोकांना सन्मार्गाचा उपदेश, दु:खनिवारण, तेथील मंदिरे, मशिदी वा देवस्थाने यांचा जीर्णोद्धार करणे ही कार्ये सुरू केली. यामुळे त्यांची कीर्ती महाराष्ट्रभर पसरली. दक्षिणेच्या रूपात समोर आलेल्या सर्व गोष्टी ते गरजूंना वाटून, मोठा भंडारा घालून पुढील गावी जात. या फिरस्तीत महाराजांनी जमखिंडीजवळील कुडची या गावच्या माँसाहेब दर्ग्याच्या परिसरातील सर्व देवळे, समाध्या, वृंदावने यांचा कायापालट केला. दर्शनास आलेल्या जमखिंडी व मिरज येथील संस्थानिकांस कृपांकित करून महाराजांनी शिष्यपरिवारासह नरसोबाच्या वाडीस प्रयाण केले. नंतर त्यांनी आपला मुक्काम हुपरीजवळच्या कारदगा या गावी हलवला. महाराजांच्या वास्तव्याच्या ४-५ वर्षांच्या काळात 'बंगालीबाबा' समाधीचे नूतनीकरण, दूधगंगा नदीवरील प्रशस्त घाट व मठाचे बांधकाम यांबरोबरच जवळपासच्या छोट्यामोठ्या देवस्थानांचा जीर्णोद्धारही केला गेला.

इकडे कराड जवळील नेर्ले व रेठरे हरणाक्ष या गावी जाताना महाराज प्रथम नरसोबावाडीस गेले. तेथे रखमाबाई गाडगीळ आपला मुलगा धोंडो याला घेऊन दर्शनास आल्या. त्या वेळी सर्वांसमक्ष धोंडोला कुरुंदवाडच्या राजेसाहेबांच्या हाती सोपवून महाराजांकडून अनुग्रह घेऊन रखमाबाई शिष्यपरिवारात (१८६१) सामील झाल्या व महाराजांच्या समाधीपर्यंत त्यांच्या सेवेत राहिल्या. यांना भक्तमंडळी आदराने 'आईसाहेब' असे म्हणत. धोंडो श्रींचे आशीर्वादाने कुरुंदवाड संस्थानाचे पोलीसप्रमुख झाले.

रेठरे व नेर्ले या गावी श्रीमहाराजांनी मठ स्थापना, भक्तिमार्गाच्या प्रसाराबरोबर अनेक पैलवान व भजनीमंडळी तयार केली. कुस्त्यांचे फडही भरविण्यास




**जंगली महाराज मंदिर, पुणे**

ज

सुरुवात केली. याच रेठऱ्याचेच लावणीसम्राट श्रीधरपंत कुलकर्णी ऊर्फ पठ्ठे बापूराव श्रीमहाराजांस शरण आले. श्रीमहाराजांचे अनुग्रहित झाल्यावर (१८६५) पठ्ठे बापूरावांचे काव्य शृंगाराकडून भक्तिमार्गाकडे वळले. रेठऱ्याहून श्रीमहाराजांनी पुण्यास प्रस्थान केले. सुरुवातीस श्रीमहाराजांनी देहूस राहून धर्मशाळा, पुंडलिकाचे मंदिर व तुकोबांच्या घरापासून वैकुंठगमन स्थानापर्यंतचा रस्ता स्वत: पुढाकार घेऊन बांधला. पुण्यास महाराज १८६८ साली आले.

या ठिकाणी घारे, शिरोळे, बहिरट, दुर्गे या घराण्यांतील अनेक पुरुष महाराजांचे कृपांकित झाले. त्यांचे वंशज आजही महाराजांनी घालून दिलेल्या प्रथेप्रमाणे श्रींची सेवा करीत आहेत. पुण्यात श्रीमहाराजांनी भांबुर्डा (आजचे शिवाजीनगर) भागातील श्री रोकडोबा मंदिरात वास्तव्य केले. श्रीमहाराज येण्याअगोदर तिथे अंधश्रद्धेचा पगडा असून नवसपूर्तीसाठी पशुबळी, बगाड (पाठीत एक हुक खोचून स्वत:ला टांगून घेणे) असे अघोरी प्रकार, रेड्यांच्या झुंजी, अश्लील तमाशा इ. चालत.

महाराजांनी देवास शाकाहारी नैवेद्य, वीणा घेऊन अखंड हरिनाम घेणे, कुस्त्यांचे फड आणि प्रासादिक भजनी मंडळ हे पर्याय सुरू करून सर्व अनिष्ट प्रथा बंद केल्या. हे भजनी मंडळ आता सद्‌गुरू श्री जंगली महाराज भजनीमंडळ म्हणून ओळखले जाते. आईसाहेबांची रामावर भक्ती असल्याने पुढे त्यांनी भिक्षाटनातील पैशांतून रोकडोबा मंदिरासमोर श्रीरामपंचायतन मंदिरही बांधले. आईसाहेबांच्या भक्तीखातर श्रीमहाराज प्रत्येक वर्षी त्यांना घेऊन शिष्यपरिवारासह सज्जनगडावर जात.

किर्लोस्कर नाटकमंडळींचे दुय्यम नट मोरोबा वाघोलीकर यांना तयारी नसताना ३१ ऑक्टोबर १८८० रोजी कारणवशात 'शाकुंतल' नाटकातील दुष्यंताची प्रमुख भूमिका करण्याचा प्रसंग आला. महाराजांनी त्यांना मूठभर धूप देऊन नाट्यप्रयोगापूर्वी जाळण्यास सांगितले. मोरोबांनी तसे करताच त्यांचे काम दृष्ट लागण्याइतके उत्तम वठले. तेव्हापासून नाट्यप्रयोगाअगोदर धूप जाळण्याची प्रथा महाराष्ट्रात सुरू झाली.

पुण्यातील वास्तव्यात आळंदीचे नृसिंहसरस्वती, पुण्यातले बीडकर महाराज, जोग महाराज, लोकमान्य टिळकादी मान्यवरांबरोबर महाराजांचा सत्संग होत असे. चतुर्थ दत्तावतार श्री माणिकप्रभू तीर्थयात्रा करीत पुण्यास आले असता, महाराजांनी त्यांस काही दिवस आग्रहाने ठेवून घेतले. जगदोद्धाराचे उदंड कार्य करून चैत्र शुद्ध चतुर्दशी, ४ एप्रिल १८९० या दिवशी पुणे येथे सायंकाळी ५.३०च्या सुमारास महाराजांनी देह ठेवला. सर्व धर्मियांनी एकत्र येऊन महाराजांस समाधी दिली. पुण्यातील समाधी मंदिरासमोरील रस्त्याला श्री जंगली महाराज रोड असे नाव दिले गेले.

जंगली महाराज यांचे मठ, धर्मशाळा व देवस्थाने महाराष्ट्र व इतरत्रही कार्यरत आहेत. पुण्यातील

समाधिस्थानी रोज त्रिकाळ आरती, पंचपदी व प्रत्येक गुरुवार व चतुर्मासातील एकादशीस रात्री भजनाचा कार्यक्रम महाराज यांच्या काळापासून आजतागायत चालू आहे. चैत्र पाडव्यापासून चतुर्दशीपर्यंत (समाधिदिन) मोठ्या प्रमाणात उत्सव होतो. या उत्सवात महाराष्ट्रातील अनेक नामवंत प्रवचनकार, गायक, वादक, कलाकार विविध प्रकारे आपली सेवा श्रीचरणी रुजू करतात.

– अविनाश हळबे

**संदर्भ :**


१. *गोरे, जानकीबाई; 'श्री जंगली महाराज चरित्र'.*

२. *रेगे, डी.डी.; 'श्री सद्गुरू जंगली महाराज'.*

३. *'सद्गुरू जंगली महाराज यांची जीवनगाथा' ; प्रकाशक : विश्वस्त, सद्गुरू जंगली महाराज मंदिर.*


## जालवणकर, नारायण महाराज

***पुराणिक, नारायण तात्या***

**दत्तसंप्रदाय सिद्ध पुरूष, ग्रंथलेखक**

**१८०७ – १८६७**

**ना**रायण महाराज जालवणकर यांचे घराणे झाशी, मध्यप्रदेश येथील जालवण या गावचे होते. त्यांचे वडील तात्या पुराणिक यांना जालवणच्या राजाकडून पुराण वाचण्याबद्दल वर्षाला आठशे रुपये वेतन मिळे. तात्या पुराणिकांना नवसासायासाने गुरुवार, आषाढ वद्य पंचमी रोजी पुत्ररत्न प्राप्त झाले. त्यांनी त्याचे नाव नारायण ठेवले. नारायण वर्षाचा व्हायच्या आधीच त्याच्या मातु:श्री देवाघरी परतल्या. त्यानंतर नारायणाचा सांभाळ त्यांच्या आजीने केला.

लहानपणी नारायण कुठेही अडगळीत लपून राही. ''काय करतोस?'', असे विचारल्यावर, ''आज्जी गं, देव शोधतो,'' असे म्हणे. पुढे आठ वर्षांच्या नारायणाची मुंज झाल्यानंतर आणखी दोन वर्षांतच त्याला त्याच्या इच्छेविरुद्ध विवाहबंधनात अडकवण्यात आले. असे म्हणतात, की मागच्या जन्मात हिरण्यगर्भाचार्य नाव असलेल्या नारायणाला एका स्त्रीने लग्नाची मागणी घातली होती. तेव्हा नारायणाने तिला पुढच्या जन्मात सहधर्मचारिणी म्हणून स्वीकारण्याचे वचन दिले होते. म्हणून ही वचनपूर्ती होती. परंतु थोड्याच दिवसांत नारायणाला विरक्ती आली आणि तो घर सोडून मथुरेला सद्गुरूंच्या शोधात निघून गेला. तेथे त्याची भेट खूप वयस्कर, ३५० वर्षांचे ज्ञानवृद्ध हठयोगी गोवर्धनबाबा यांच्याशी झाली. बाबांनी त्यास ध्यान, मंत्र, उपासना शिकवली; आणि त्यास पुन्हा घरी परतून प्रपंच करण्यासाठी सुचविले.

गोवर्धनबाबांनी नारायणाला सांगितले, ''तुला दत्तदर्शन होईल, शांत राहा, संसार कर.'' नारायण घरी परतून संसार करू लागला. त्यांना पुत्ररत्नाचा लाभ झाला खरा; परंतु आठच दिवसांत त्यांची पत्नी आणि पुत्र, दोघेही निवर्तले. या वेळी मात्र नारायणांनी घर त्यागण्याचा निर्णय घेतला. ते दत्तदर्शनार्थ जुनागढला गिरनार पर्वतावर गेले. दत्त भेटत नाहीत म्हणून निराश मनाने पर्वतावरून देहत्याग करणार, इतक्यात एका फकिराने त्यांना आपल्या सोबत पर्वताच्या पायथ्याकडील गुंफेत नेले. तेथे नारायणांना दत्तदर्शनाचा साक्षात्कार झाला. त्यांना ब्रह्मविद्येचा बोध झाला. नारायणांचे वय त्या वेळी वीस वर्षांचे होते.

श्रीदत्तांनी त्यांना जगदुद्धारासाठी ज्ञानदान करण्यासाठी भारतभर परिक्रमा करण्याची आज्ञा केली. त्यानुसार नारायण महाराज हे नाव धारण करून त्यांनी रामेश्वर, काशी, जगन्नाथपुरी, मुंबई असे फिरून कानपूर येथील ब्रह्मावर्तात परिक्रमेची सांगता केली. ब्रह्मावर्तात नारायण महाराजांनी आपली हजारांहून अधिक शिष्यमंडळी तयार केली. परंतु यांपैकी दोघेच शिष्य पूर्णावस्थेला पोहोचले. एक महाराजांचेच नाव धारण केलेले रत्नागिरीचे देवरुखे ब्राह्मण सद्गृहस्थ नारायणबाबा आणि दुसरे ठाणे जिल्ह्यातील कल्याण येथे राहणारे सखारामबाबा.

मुंबईतही राधाकृष्ण राघोबा तोरणे हे गौड सारस्वत ब्राह्मण सिद्धदिशेला पोहोचलेले शिष्य होते. याशिवाय विष्णूबाबा ब्रह्मचारी, दिवाण बापूजी रघुनाथ दिघे यांच्या

पत्नी नानी बया, अशा अनेक शिष्यांनी महाराजांच्या शिकवणीचा प्रसार केला. या शिष्यमंडळींनी पुढे ब्रह्मविद्येचा प्रसार भारतभर केला.

याच शिष्यमंडळीत एक शिष्य महाराजांबद्दल असूया बाळगून होता. त्याला सुधारावे या उद्देशाने त्याची वाचा त्यांनी आपल्या साधनेने बंद पाडली. नंतर त्याला चार घरी जाऊन 'भिक्षान्नं देहि' असे बोलण्यास सांगितल्यावर त्या शिष्याची वाचा पुन्हा पूर्ववत झाली. आपली साधना महाराज अशा प्रकारे उन्मत्त माणसाला मार्गावर आणण्यास वापरीत. प्रसिद्धी आणि स्वत:च्या लाभासाठी त्यांनी आपली साधना कदापिही वापरली नाही. नारायण महाराज भगवे वस्त्र आणि हातात चिमटी अशा वेषात वावरत असत, म्हणून ते उत्तर भारतात 'चिमटेबाबा' म्हणूनही प्रसिद्ध होते.

महाराज जेव्हा पुराण सांगत तेव्हा चुकार श्रोत्यांनी चुळबुळ केल्यास ते भिंतीकडे वळून पुराण वाचीत. भिंती जास्त शांतपणे पुराण ऐकतात असे सांगितल्यावर चुकार श्रोते वठणीवर येत.

प्रापंचिकांसाठी नारायण महाराजांनी विपुल ज्ञानसागर दिला. 'सत्यसागर' ही १७,६७२ ओव्यांची त्यांची प्रतिभा माणसाच्या अध्यात्मशक्तीला बलवर्धक ठरेल असे जीवनसत्त्व आहे.

महाराजांनी आपला सारा अनुभव त्यात चितारला आहे. या महाग्रंथात बोध, करुणा, शांती, विज्ञान, ज्ञान, आनंद, कैवल्य या विषयांवर सुबोध भाषेमध्ये विवेचन केले आहे. याव्यतिरिक्त त्यांचे स्फुटलेखनही विपुल आहे. 'निर्वाणपंचक', 'सिद्धयोगाष्टक', 'गुरुपादुकाष्टक', 'बोधाष्टक', 'चिद्रत्नमाला', 'धावे' आणि अनेक पदांची त्यांनी निर्मिती केली आहे. 'वनवास विलास' हे त्यांचे मनाचे मनोगत फार साक्षेपाने रेखाटलेले शब्दचित्र आहे.

नारायण महाराज जालवणकर आषाढ वद्य पंचमीला साठाव्या वर्षीच, गुरुवारीच पूर्णानंदांच्या मठात समाधिस्थ झाले.

— संदीप राऊत

## जोग, विष्णुबुवा नरसोपंत

**वारकरी शिक्षण संस्था-संस्थापक, कीर्तनकार**

**१४ नोव्हेंबर १८६७ – ५ फेब्रुवारी १९२०**



विष्णुबुवा नरसोपंत जोग यांचा जन्म पुण्यात झाला. त्यांच्या मातु:श्रींचे नाव सरस्वती होते. त्यांना भगवंत (पिलोबा), गोपाळ (गुण्याबोवा), पांडोबा, विष्णुबुवा आणि यमुना ही पाच अपत्ये होती. पांडोबा हे मल्ल असल्यामुळे विष्णुबुवांनाही मल्लविद्येचा छंद होता. पुण्यात कोणतीही मोठ्या जोडीची कुस्ती ठरली की तिचे पंच म्हणून बुवांची नेमणूक लोक आग्रहाने करत असत.

बुवांचे शालेय शिक्षण जेमतेम चौथ्या इयत्तेपर्यंतच झाले होते. त्यांना इंग्रजी फारसे येत नव्हते. पांडोबामहाराज बुवांना नेहमी आळंदीला आणत असल्यामुळे तेथे येऊन ज्ञानेश्वरमाउलींच्या पायांवर डोके ठेवण्याचा त्यांना छंद लागला. त्यांनी माउलींच्या समाधीवर तुळशीमाळ ठेवून आपल्या गळ्यात घातली होती. यापरता दुसरा गुरू त्यांनी केला नाही. बुवांनी अजानवृक्षाखाली ज्ञानेश्वरीची पारायणे केली. त्यानंतर भंडारा डोंगरावर जाऊन तुकारामगाथेची पारायणे केली . त्यांना संतवाङ्मयाची आवड होती आणि त्यांनी संत-साहित्याचा चांगला अभ्यासही केला. ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, तुकारामगाथा इत्यादी ग्रंथांवर त्यांनी प्रभुत्व संपादन केले. नाना महाराज साखरे यांच्याकडे त्यांनी




**विष्णुबुवा जोग समाधी (आळंदी)**

सांप्रदायिक पद्धतीने ज्ञानेश्वरीचा अभ्यास केला, तसेच श्री. केशवानंद उदासी यांच्याकडून शंकराचार्यांचे शरीरभाष्य समजावून घेतले.

विष्णुबुवांचा स्वभाव अत्यंत तापट होता. ते स्वतःच आपणांला नरसिंहाचा अवतार म्हणत. त्यांच्या या कडक स्वभावामुळे त्यांचा शिष्यवर्ग त्यांना फार भीत असे.

बुवा जसे तापट होते, तसेच ते निःस्पृह व निर्भीडही होते. कोणापुढे याचना करायची नाही व कोणी काही आणून दिले तरी ते घ्यायचे नाही, असा त्यांचा बाणा होता. बुवांचे कीर्तन अतिशय वैशिष्ट्यपूर्ण असायचे. ते कीर्तनाला उभे राहिले म्हणजे त्यांच्यामागे शे-दीडशे टाळकरी उभे राहत. खेडेगावांतून दहादहा कोसांवरून मुलाबायांसहित गावकरी गाड्या भरभरून येत असत. त्यांच्या कीर्तनाचा परिणाम तात्कालिक नसे. श्रोत्यांच्या मनांवर कायमचा ठसा उमटून त्यांची वृत्ती परमार्थाकडे वळत असे. ज्ञानेश्वरीचे उत्कृष्ट प्रवचनकार आणि वारकरी पद्धतीचे श्रेष्ठ कीर्तनकार अशी त्यांची ओळख होती.

तुकारामगाथेत सर्वच अभंगांची सरमिसळ असल्यामुळे कोणता अभंग कशासंबंधी याचा मागोवा घेणे अशक्य झाले होते. ही कोंडी फोडण्यासाठी विष्णुबुवांनी तुकारामगाथेचे वर्गीकरण करून १९०१ साली त्र्यंबकराव आवटे यांच्याकरवी ती गाथा प्रकाशित केली. तुकाराम महाराजांचे अभंग दिसायला सोपे, पण अर्थ लावायला तितकेच कठीण आहेत. तेव्हा बुवांनी १९०९ साली तुकाराम महाराजांच्या अभंगांची सार्थ गाथा प्रकाशित केली. याशिवाय बुवांनी सार्थ अमृतानुभव (१९०५), निळोबांचा व ज्ञानेश्वरमहाराजांची वर्गीकृत गाथा (१९०७), सार्थ हरिपाठ-चांगदेवपासष्टी, एकनाथी भागवतादि सहा ग्रंथ (१९११), वेदान्तविचार (१९१५), महिपतिकृत ज्ञानेश्वरीतील वेचे (सार्थ) (१९१७) इत्यादी ग्रंथ प्रकाशित केले. ग्रंथसंपादनासाठी त्यांनी एक कवडीसुद्धा घेतली नाही. हे सर्व कार्य त्यांनी बहुजनहिताय दृष्टीनेच केले.

वारकरी संप्रदायाचे कार्य पद्धतशीर चालावे आणि त्यासाठी कार्यकर्ते तयार करावेत, या हेतूने बुवांनी १९१७ मध्ये आळंदी येथे वारकरी शिक्षण संस्था स्थापन केली. आज त्या इवल्याशा रोपाचा विस्तार महाराष्ट्रभर झाला आहे.

पुढे १९२० साली कार्तिक महिन्यानंतर त्यांची तब्येत बरी राहत नसे. त्यांना रात्र-रात्र खोकल्यामुळे झोप येत नसे. त्यांची औषधांवर फारशी भिस्त नसल्यामुळे ते औषधे घेत नसत. माघ शुद्ध दशमी जवळ आल्यावर बुवा आळंदीला जाण्याबाबत बोलू लागले. घरच्यांचा विरोध पत्करून माघ शुद्ध पौर्णिमेच्या रात्रीच सोनोपंत दांडेकरांना त्यांनी आपल्याला आळंदीस नेण्यास सांगितले. विष्णुबुवा बैलगाडीतून आळंदीस पोहोचल्यानंतर त्यांनी गुरुप्रतिपदेला आपला देह ठेवला. त्यांची समाधी इंद्रायणीकाठी आहे.

त्यांनी आपल्या शिष्यांना विचारले होते की, ''माझी ही ब्रह्मचाऱ्याची तुळशीची माळ मी कोणाच्या गळ्यात घालू?'' त्या वेळी सोनोपंत दांडेकर यांनी ती माळ स्वीकारली व तेही आजन्म ब्रह्मचारी राहिले.

- डॉ. वि.य. कुलकर्णी / दीपक हनुमंत जेवणे

**संदर्भ :**


१. *'पुरुषार्थ - साधनांक'; १९६१.*
२. *नेऊरगावकर, स.के.; 'सकाळ', १५ फेब्रुवारी १९६५.*
३. *जोशी, महादेवशास्त्री; 'भारतीय संस्कृती कोश', खंड तिसरा, पृष्ठे: ६७३-७४.*
४. *दांडेकर, शं.वा.; 'श्री जोगमहाराज चरित्र'; वारकरी प्रकाशन मंडळ, नागपूर.*


## जोगन विठामाई

***पुराणिक, विठाबाई श्रीधर***

**नाथपंथी**

**जन्मदिनांक अनुपलब्ध - ३१ डिसेंबर १९४१**



**को**परगावाजवळ (अहमदनगर) असलेल्या 'कोऱ्हाळे' या गावी श्रीधरबुवा पुराणिकांच्या घरी विठाबाई यांचा जन्म झाला. पुराणिकांचे घर असल्याने नित्य भजनपूजन-प्रवचन-कीर्तन अशा धार्मिक वातावरणातच विठाबाईचे लहानपण गेले. या वातावरणामुळे बालपणापासूनच त्यांची वृत्ती धार्मिक बनली. कृष्णाची बालमूर्ती घेऊन त्या खेळ खेळत बसत. त्या काळच्या रीतिरिवाजानुसार विठाबाई यांचे वयाच्या पाचव्या वर्षीच लग्न करण्यात आले. तिचा नवरा मात्र ४० वर्षांचा होता. यथावकाश त्यांना एक पुत्रही झाला. नवऱ्याच्या भिक्षुकीवर प्रपंच चालविणे अवघड झाल्याने विठाबाईंनी महिलांना लागणाऱ्या सुया, दोरे, कवड्या, माळा, तसेच मीठ, मिरच्या अशा वस्तूंचा घरगुती स्वरूपाचा व्यवसाय सुरू केला व नीटनेटका प्रपंच केला.

जवळच असलेल्या 'वावी' गावी दर मंगळवारी आठवड्याचा गावबाजार भरत असे. विठाबाई सर्व वस्तू विकण्यासाठी या बाजारात जात. वेळप्रसंगानुसार स्वतः माल गाडीत भरत व स्वतः बैलगाडी चालवून ने-आण करीत. गरजेनुसार त्या घोड्यावरूनही प्रवास करीत असत. सर्व काम करताना त्यांचे भजन-नामस्मरण अखंड चालू असे. सायंकाळ होताच त्या जेथे असतील, तेथे आरती करीत. रस्त्यावर, ओढ्याकाठी, झाडाखाली बसून अशा भजन-आरती करताना पाहून विठाबाईंबद्दल लोकांच्या मनात आदराची भावना होती. पुढे पतिनिधन होऊन त्यांना वैधव्य आले तरी न डगमगता मोठ्या धैर्याने ईश्वरनामस्मरण - व्यापारव्यवहार करीत त्यांनी आपले जीवन पूर्ववत चालू ठेवले.

एकदा मंगळवारचा बाजार करून घरी परतताना विठाबाई यांचा घोडा ओढ्याजवळील स्मशानभूमीपाशी अडला. त्यांनी मोठ्या हिमतीने ''कोण आहे? माझा घोडा का अडवला आहे?'' असा प्रश्न विचारला आणि त्यांची भेट नाथपंथी गोरक्षनाथ यांच्याशी झाली. गोरक्षनाथ विठाबाईंच्या डोळ्यांना दिसले नाहीत; पण आवाज व हस्तस्पर्श यांमुळे त्यांची ओळख पटली. गोरक्षनाथांची पूर्णकृपा विठाबाईंना प्राप्त झाली. पुढे गुरू गोरक्षनाथ यांनी विठाबाईंची कसून परीक्षा घेतली. त्या सर्व बिकट परीक्षांमध्ये विठाबाई यशस्वी झाल्यानंतर विठाबाईंना नाथपंथीय जोगन दीक्षा देऊन गोरक्षनाथ अनुग्रह करते झाले आणि तेव्हापासून विठाबाईंचे नाव 'जोगन विठाबाई' म्हणून सर्वत्र प्रसिद्ध झाले. पांढरे वस्त्र, रुद्राक्ष धारण करून त्यांनी कठोर साधना केली . या सर्व

परीक्षाकाळात विठाबाईंना त्यांची जिवाभावाची शेजारीण बयाबाई यांनी फार मोठी साथ दिली. बयाबाईने मरताना विठाबाईच्या सेवेची जबाबदारी आपल्या जाऊकडे सोपवली.

नाथपंथीय साधना, तपाचरण आणि गोरक्षनाथांची कृपा यांमुळे विठाबाई यांना अनेक सिद्धी प्राप्त झालेल्या होत्या. पण यांपैकी कोणत्याही सिद्धीचा उपयोग त्यांनी कधीच केला नाही. यामुळे सकाम भक्ती करणाऱ्या अनेक भाविकांच्या टीकेला, रोषाला व तिरस्काराला विठाबाईंना सामोरे जावे लागले.

वृद्धापकाळी आजार झाला असतानाही त्यांची साधना व नामस्मरण कधीच सुटले नाही. आता यापुढे कोठे प्रवासाला जायचे नाही असे ठरवून त्या गाणगापूर यात्रेस जाऊन आल्या, तसेच बहिणीकडे, 'मुखेड' येथे जाऊन आल्या. हीच त्यांची अखेरची गाणगापूर यात्रा ठरली. पौष शुद्ध एकादशीला भजन-पूजन-कीर्तन करून मध्यरात्री नामजप करीत त्यांनी देहत्याग केला.

– विद्याधर ताठे

## जैतुनबी

***जयदास महाराज***

**वारकरी कीर्तनकार**

**१९३० - ७ जुलै २०१०**



**ज**यदास महाराज ऊर्फ जैतुनबी यांचा जन्म माळेगाव येथील मकबूलभाई सय्यद या गवंडीकाम करणाऱ्या सत्शील माणसाच्या घरात झाला. वडिलांचे गवंडी व्यवसायातील मित्र गोविंदभाऊ हे पंढरीचे निष्ठावान वारकरी होते व ते गावोगावी उत्सवात कीर्तने करीत. दोघा मित्रांची कुटुंबे एकमेकांच्या सुखदु:खात साथ देणारी होती. कीर्तनकार गोविंदभाऊ यांना सर्व लोक गुण्याबुवा म्हणत. ते काम करताना सदैव 'जय जय रामकृष्णहरी' हा जयघोष करीत. त्यांच्या सोबत काम करणाऱ्यांनाही त्यांनी 'रामकृष्णहरी'चा छंद लावला. अशा वातावरणात छोट्या जैतुनबीवर वारकरी संस्कार झाले आणि आवड म्हणून ती गुण्याबुवासमवेत वारकरी भजन-कीर्तनात रंगून गेली. दरम्यान तिची भेट संत हनुमानदास यांच्याशी झाली. त्यांना गुरू मानून तिने वारकरी विचारांची-मानवधर्माची पताका खांद्यावर घेतली.

जैतुनबीच्या या कृतीचा मुल्लामौलवींनी विरोध केला व त्यांच्या कुटुंबावर बहिष्कार टाकण्याची धमकी दिली, तसेच काही कर्मठ परंपरावादी हिंदूंनीही जैतुनबीला विनाकारण त्रास दिला; पण या त्रासाला न जुमानता जैतुनबी आपल्या अंतरआत्म्याच्या प्रकाशात 'ईश्वर-अल्ला एक आहे' या बोधाने पंढरीची वारी दरवर्षी न चुकता करीत राहिल्या.

संत ज्ञानेश्वर महाराज पालखी सोहळ्यासमवेत जैतुनबी यांनी सलग ६२ वर्षे पंढरीची वारी केली. वाटेत त्या जागोजागी कीर्तन करीत. त्यांच्या कीर्तनाला भाविकांची मोठी गर्दी जमत असे. आळंदी-पंढरपूरला जाणाऱ्या त्यांच्या दिंडीत २५० ते ५०० वारकरी भाविक असत. जैतुनबी यांनी पंढरपूर व आळंदी येथे मठ बांधलेले आहेत. त्या मठातच वारीमध्ये जैतुनबीची कीर्तने होत असत.

जैतुनबी यांनी लग्न केले नव्हते, ब्रह्मचर्याचे व्रत स्वीकारले होते व पंढरीची वारी, वारकरी मानवतावादी विचारधारेचा प्रसार-प्रचार हाच त्यांनी प्रपंच मांडला होता. त्यांचे शिक्षण केवळ पाचवीपर्यंत झाले होते.

त्यांनी १९४२ च्या 'चले जाव' आंदोलनातही भाग घेतला होता. प्रभातफेऱ्यांत देशभक्तिपर गीते म्हणण्यात बाल स्वातंत्र्यसैनिक म्हणून त्या पुढे असत. उरळीकांचन येथील निसर्गोपचार केंद्रात महात्मा गांधींचा मुक्काम असताना त्यांना जैतुनबी यांनी काही पोवाडेही ऐकवले होते. एवढेच नव्हे, तर भाई बागलसुद्धा आपल्या सभेतही जैतुनबीचा पोवाडा ऐकून ते खूष झाले. त्यांनी जैतुनबीला 'प्रतिसरकार'चे प्रमुख क्रांतिसिंह नाना पाटील यांच्याकडे पाठविले.

नाना पाटलांच्याही अनेक सभांमध्ये जैतुनबी यांना पोवाडे गाण्याचे भाग्य लाभले. जैतुनबींचे कीर्तन हा मानवधर्माचा प्रचार असे. सत्य, प्रामाणिकपणा, परस्पर सौहार्द, सामाजिक एकता, सामाजिक सलोखा या विषयांवर त्या संतवचनांच्या आधारे खूप सोप्या शब्दांत उपदेश करीत. कीर्तनाच्या बिदागीतून मिळालेल्या पैशांतूनच त्यांनी आळंदी-पंढरपुरात मठ बांधण्याबरोबरच अनेक सामाजिक कार्ये केली. जैतुनबींना श्वासोच्छवास घेताना त्रास होऊ लागल्यामुळे रुग्णालयात दाखल करण्यात आले व उपचार सुरू असतानाच प्रात:काळी त्यांची प्राणज्योत अनंतात विलीन झाली.

– विद्याधर ताठे

***

# झ



## झुरळे महाराज

***झुरळे, व.न.***

**दत्तसंप्रदाय, ग्रंथ प्रकाशक, समाजप्रबोधक**

**५ डिसेंबर १९२२**



दत्तसंप्रदायाचे प्रचारक अशी ख्याती असलेले व.न. झुरळे तथा झुरळे महाराज यांचा जन्म त्यांच्या आजोळी, नृसिंहवाडी येथे झाला. त्यांचे घर कोल्हापुरात होते. ऋग्वेदी ब्राह्मण घराण्यात जन्मलेल्या झुरळे महाराजांना अध्यात्माचा वारसा त्यांच्या आजोळहून मिळाला. आजोळी दत्तभक्ती होती. परंपरेने चालत आलेली कऱ्हाडची रेणुकादेवी, करवीरनगरीची अंबाबाई आणि आजोळची नृसिंह ही कुलदैवते त्यांच्या घरात पुजली जात होती. कोल्हापुरात मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण घेतल्यानंतर पुढील शिक्षणाच्या मिषाने ते मुंबईला आले खरे; परंतु प्रतिकूल परिस्थितीमुळे त्यांना शिक्षण अर्धवट सोडावे लागले. तरीही त्यांनी जिद्दीने बाहेरून अभ्यास करून 'साहित्य विशारद' आणि 'वाङ्मय विशारद' या प्रमाणपत्र परीक्षा उत्तीर्ण केल्या. उदरनिर्वाहासाठी त्यांनी मुंबईत आयकर विभागात नोकरी पत्करली. त्यांनी ३९ वर्षे आयकर विभागात सेवा केली.

आपल्या सरकारी सेवेला उत्तम न्याय देत त्यांनी दत्तसंप्रदायाचा प्रचार अधिक जोमाने केला. त्यांच्या तेथील प्रबोधनाने त्यांचा शिष्यगण तयार झाला आणि सरकारी कामातील सत्शील प्रतिमा बऱ्याच जणांच्या वर्तनातून दिसू लागली. झुरळे महाराजांची ओळख एक संतसज्जन म्हणून होऊ लागली. यासाठी त्यांना कोणताही चमत्कार करण्याची गरज भासली नाही. नामस्मरण आणि शुद्ध चित्तवृत्ती यांच्या जोपासनेतून एक सुदृढ, आध्यात्मिक आदर्श माणूस घडू शकतो ही सहजसोपी शिकवण त्यांनी शिष्यांना दिली. त्यासाठी दत्तसंप्रदाय हे माध्यम वापरले. दत्तसंप्रदायाच्या विस्तृत आणि प्रभावी प्रचारासाठी त्यांनी संप्रदायाचा अधिक सखोलपणे अभ्यास केला. त्यासाठी त्यांनी दत्तवाङ्मयाचे वाचन, मनन, चिंतन, विविध ग्रंथांचे वाचन केले. त्यांनी 'श्रीनृसिंह सरस्वती सेवा मंडळ' ही आध्यात्मिक संस्था स्थापन केली. त्याचबरोबर, आध्यात्मिक विचार प्रसृतीसाठी त्यांनी १९५७ साली स्वत:ची प्रकाशनसंस्थाही स्थापन केली. त्यातून दत्तसंप्रदाय, तसेच तदनुषंगिक विषयांवरील पुस्तके प्रकाशित केली.

'श्री सप्तशती गुरुचरित्रसार', 'श्री सुधारस', 'वासुदेव सप्तर्षी', 'श्री सत्यदत्तात्रेय सार्थ पूजा', 'श्री गुरुलीलामृत', 'श्री दत्तप्रबोध', 'श्री दत्तमाहात्म्य', 'श्री दत्तपुराण', 'श्री गुरुचरित्र' ग्रंथ, अनेक स्तोत्रे, अष्टके, पदे, त्याचप्रमाणे 'श्री वासुदेव चरितामृत', 'भगवान तिरुपती व्यंकटेश लीलाचरित्र', अशा अनेक भक्तिरसपूर्ण ग्रंथांचे प्रकाशन संस्थेअंतर्गत केले आणि




**सुबोध दत्तमहात्म्य**

विशेष म्हणजे ही पुस्तके त्यांनी भक्तगणांमध्ये विनामूल्य वितरित केली. त्यांना १९७१ सालात श्रीनृसिंह सरस्वती यांचा आदेश मिळाला, की त्यांनी ध्यान आणि दत्तनामाचा प्रसार करावा. त्यानुसार महाराजांनी दर गुरुवारी भाविकांना सोबत घेऊन ध्यानधारणेचा उपक्रम सुरू केला.

पुढे या सत्संगाला उदंड प्रतिसाद मिळत गेला आणि रविवारीदेखील हे ध्यानवर्ग सुरू करण्यात आले. या ध्यानवर्गातील साधकांची अशी स्थिती होई, की महाराजांना ध्यानमग्न साधकांच्या मस्तकावर हात ठेवून त्यांना भानावर आणावे लागे. महाराजांनी १९८१ सालापासून सातत्याने श्रीदत्तयाग, श्रीशतचंडी, श्री सहस्रचंडी, संहिता स्वाहाकार अशा प्रकारचे याग, नृसिंहवाडी आणि कोल्हापूर या तीर्थक्षेत्री केले. त्यांच्या डोंबिवली येथील निवासस्थानी श्रीगुरुपौर्णिमा, श्रीदत्तजयंती, श्रीरामनवमी, श्रीनृसिंहजयंती, श्रीगुरुप्रतिपदा असे उत्सव त्यांचे शिष्य आणि श्रीदत्तभक्त मोठ्या उत्साहाने आणि भक्तिभावाने साजरे करतात. याच ठिकाणी महाराज लोकांना त्यांच्या अडचणींवर मात करण्यासाठी आध्यात्मिक उपाय, ध्यानधारणा, मंत्रघोष असे मार्गदर्शन करतात. त्यांनी आजवर अनेकांना समस्यांमधून बाहेर काढून भक्तिमार्गाने जगायला लावले आहे. नेटका, किंबहुना उच्च दर्जाचा प्रपंच झुरळे महाराजांनी केला आणि प्रपंचात राहूनही उच्च कोटीची आध्यात्मिक पातळी गाठता येते हे त्यांनी दाखवून दिले.

झुरळे महाराज यांना या अध्यात्मकार्यात त्यांच्या खऱ्या अर्थाने सहधर्मचारिणी ठरलेल्या लक्ष्मीबाई, तसेच श्री. अविनाश आणि श्री. देवदत्त यांचे सहकार्य लाभले. जनसामान्यांपेक्षा खूपच भिन्न जीवनशैली आणि आचारविचार, 'आधी आचरले, नंतर सांगितले' या नियमानुसार ते जगले.

ऐहिक गोष्टींची उपलब्धी, इंद्रियसुख, सृष्टीतील साधनांमधून मिळविणे सहजसोपे असते. ते कुणीही मिळवू शकते, अगदी प्राणी, जनावरेसुद्धा. परंतु, या ज्ञानाच्या मायावी मुखवट्याआडचे अलौकिक जग व ज्ञान मिळविण्यासाठी जर तुम्हांला ते नेत्र हवे असतील, तर अध्यात्माचा अंगीकार तुमच्या रोमारोमांत झाला पाहिजे, जगण्याचे सार्थक त्यातच आहे आणि त्यासाठी म्हणूनच ध्यान, नामसाधना हे मनोभावे केले पाहिजे हे झुरळे महाराजांचे सांगणे होय.

— संदीप राऊत

***

# ट



## टेंब्येस्वामी, वासुदेवानंद सरस्वती

***टेंब्ये, वासुदेव गणेश***

**दत्तसंप्रदाय**

**१८५४ – १९१४**



**को**कणातील सावंतवाडीजवळ असलेल्या माणगावी, श्रावण वद्य पंचमी, शके १७७६, रविवारी (इ.स.१८५४) वासुदेवानंद सरस्वती यांचा जन्म झाला. त्यांच्या आईचे नाव रमाबाई टेंब्ये होते.

आठव्या वर्षी वासुदेवाचा व्रतबंध संस्कार झाला खरा; परंतु पाचव्या वर्षापासूनच या तल्लख बुद्धीच्या बालमूर्तीचे पाठांतर सुरू झाले होते.

ब्रह्मचर्याश्रमामध्ये त्रिकाल स्नान व संध्या, गायत्री मंत्र पुरश्चरण, वेदविद्या अध्ययन, मंत्रशास्त्र अध्ययन व ज्योतिषशास्त्राचा अभ्यास होत असे. त्यासाठी त्यांना वे.शा.सं. विष्णुशास्त्री उकिडवे, वे.शा.सं. शंभुशास्त्री साधले, ज्योतिषशास्त्रतज्ज्ञ विष्णुपंत अळवणी आणि वे.शा.सं. नीलंभट पद्ये यांचे मार्गदर्शन लाभले.

या किशोरवयातच रानावनांत फिरून सर्व वनस्पती निरीक्षण आणि आयुर्वेदाचा अभ्यासही ते करत होते. त्यामुळे ते मानवी तन आणि मनाचे धन्वंतरी झाले.

वयाच्या एकविसाव्या वर्षी श्री. गोडे यांच्या ‘बायो’ या सुकन्येशी त्यांचा विवाह झाला. लग्नानंतर तिचे नाव ‘अन्नपूर्णा’ असे ठेवण्यात आले. या गृहस्थाश्रमातही त्यांची आध्यात्मिक-पारमार्थिक दिनचर्या अधिक काटेकोर, व्यापक आणि सखोल बनली. माणगावी, दत्तमंदिरात स्थापन करण्यासाठी ‘कागल’ गावी त्यांना सगुण, सुंदर दत्तमूर्ती लाभली होती. हळूहळू त्यांची साधकावस्था प्रगत झाली.

शके १७९९ मध्ये त्यांना पितृवियोग झाला. अर्थात, कुटुंबातील कर्ता मुलगा म्हणून मातृसेवेबरोबर श्रीदत्तपूजा त्यांनी कटाक्षाने आरंभिली. दत्तमंदिरासाठी मिळालेले तीन खंडीचे शेत, विहीर यांची मशागत, व्यवस्था, श्रीदत्तपूजेसह आरती, धुपारती, भजन, कीर्तन, योगध्यानसाधना, अनुष्ठान, दर शनिवारी-रविवारी दत्तप्रभूंची पालखी, मंदिरातील मूर्ती, औदुंबर तळी स्थापिलेल्या पादुका, पालखीतील उत्सवमूर्ती व पादुका आणि प्रवासातील श्रीदत्तप्रभूंची मूर्ती या सेवांमध्ये ते कोणतीही कसूर ठेवत नसत.

त्यांच्या गृहस्थाश्रमाची समाप्ती करणाऱ्या दोन घटना घडल्या होत्या. शके १८११ च्या सुमारास त्यांना पुत्रप्राप्ती आणि नंतर पुत्र वियोग, शके १८१३ मध्ये सौ. अन्नपूर्णाबाईंचे देहावसान झाले. गृहस्थाश्रमातील सुखदुःखांच्या अनुभवांनी समृद्ध आणि पूर्ण विरक्त होऊन श्रीदत्तगुरूंच्या आज्ञेस अनुसरून त्यांनी शके १८१३ मध्ये संन्यास ग्रहण केला. प.पू. गोविंदस्वामी ऊर्फ ब्रह्मय्या स्वामींकडून संन्यास दीक्षा ग्रहण करून ते श्रीमत्



श्री क्षेत्र माणगाव



वासुदेवानंद सरस्वती टेंब्येस्वामी झाले व प.पू. नारायणस्वामींकडून दण्डदीक्षा घेऊन ते पूर्ण संन्यस्त बनले. उज्जयनी येथे त्यांचा प्रथम चतुर्मास झाला.

श्रीमत् वासुदेवानंद सरस्वतींची साधकावस्था आता सिद्धावस्थेत परिणत झाली. परिपक्व सिद्धयोगी परिव्राजक होऊन त्यांनी आसेतुहिमाचल पदभ्रमण, तेही अनवाणी व मस्तकावर छत्र न धरता केले. उण्यापुऱ्या १५६ गावांना-देवस्थानांना भेटी; माणगावच्या निर्मला नदीपासून ते थेट कृष्णा, पंचगंगा, गोदावरी, नर्मदा, कावेरी, घटप्रभा, मलप्रभा, वैनगंगा, मंदाकिनी, अलकनंदा, गंगा या सर्व नद्यांचे पूजन करताना या लोकमाता सरितांना श्रीमत् वासुदेवानंदांच्या विचारधारेत विशेष स्थान आहे. कृष्णा आणि नर्मदा या दोन नद्यांशी त्यांचे विशेष सख्य होते. 'कृष्णालहरी', 'नर्मदाअष्टक' त्या सख्यभक्तीतून निर्माण झाले होते.

संन्यासग्रहणानंतर पहिला चतुर्मास उज्जयनी येथे करून तेविसावा चतुर्मास त्यांनी गरुडेश्वरी पूर्ण केला आणि शके १८३६, आनंद नाम संवत्सर, आषाढ शुद्ध प्रतिपदेस रात्री अकरा वाजता आपले शिष्य रामचंद्र प्रकाशकर यांच्या सान्निध्यात त्यांनी आपली देहयात्रा पूर्ण केली. श्रीमत् वासुदेवानंद सरस्वती टेंब्येस्वामी यांनी श्री वामनराव गुळवणी महाराज, करवीर संकेश्वर पीठाचे शंकराचार्य शिरोळकर शास्त्री यांच्यासारखी शिष्यमंडळी निर्माण केली.

द्विसाहस्त्री गुरुचरित्र (संस्कृत, शके १८०६), द्विसाहस्त्री टीका, शिक्षात्रयम् (संस्कृत व प्राकृत), श्रीदत्तचंपू, श्रीदत्तभावसुधारसस्तोत्र (संस्कृत), श्रीकृष्णालहरी (संस्कृत), प्रश्नावली, श्रीसप्तशती गुरुचरित्रसार, नित्यउपासनाक्रम, श्रीदत्तात्रेय कवच, अपराधक्षमापन स्तुतिस्तोत्र, श्रीदत्तस्तोत्र- (मनःशांतीसाठी), षट्पंचाशिकास्तोत्र, श्रीवेदपादस्तुती, श्रीपादश्रीवल्लभस्तोत्र, श्रीगुरुचरित्र त्रिशतीदत्तकाव्य, श्रीदत्तलीलामृताब्धिसार, मंत्रात्मक श्लोक, जयलाभदायक, यशदायक श्रीदत्तात्रेय स्तोत्र, श्रीसत्यदत्तव्रतपूजा कथा, श्रीदत्तपुराण (संस्कृत), श्रीदत्तमाहात्म्य (मराठी) आदी श्रीमत् वासुदेवानंद सरस्वती टेंब्येस्वामींचे साहित्य प्रसिद्ध आहे.

– मराठे

## टेंब्ये महाराज (शिवानंद)

***श्रीस्वामी शिवानंद तथा टेंब्ये, कृष्णाजी सखाराम***
**दत्तसंप्रदाय**
**१९ एप्रिल १८८७ – १७ जून १९७०**



**को**कणातील राजापूर जवळील 'पांगरे' येथील कृष्णाजी सखाराम ऊर्फ स्वामी शिवानंद टेंब्ये महाराज हे वाचासिद्धी प्राप्त सिद्धावस्थेत पोहोचलेले त्रिकालज्ञानी महापुरुष होते. दत्तावतार वासुदेवानंद टेंब्येस्वामी यांनी

स्वत: कृष्णाभाऊंना अनुग्रह दिला व हुबळीच्या सिद्धारूढ स्वामींकडे पाठविले. सिद्धारूढ स्वामी, हुमणाबादचे माणिकप्रभू अशांच्या कृपाप्रसादाने कृष्णाभाऊ यांची साधना पूर्णावस्थेस पोहोचली होती. कृष्णाभाऊंना ज्योतिषज्ञान तर होतेच; पण वाचासिद्धीमुळे ते बोलतील ते सत्य होत असे.

बॅरिस्टर जयकर, बॅरिस्टर बॅनर्जीसह अनेकांना अनुभव आला होता. कृष्णाभाऊ यांचा जन्म चैत्र वद्य एकादशी रोजी खोत घराण्यात झाला. लहानपणापासूनच त्यांच्या वागण्यात, बोलण्यात ज्ञानी पुरुषाची उपजत लक्षणे दिसत होती. वयाच्या सहाव्या वर्षी रात्री सर्वांना उठवून त्यांनी ''गोठ्यात बैलाला फास लागलेला आहे, त्याला त्वरित सोडवा अन्यथा तो मरेल,'' असे सांगितले. घरापासून थोड्या दूरवर असलेल्या गोठ्याकडे जाण्याचा कंटाळा करून नोकर म्हणाले, ''आम्ही आताच तिकडून वैरण टाकून आलो आहोत. बैल मजेत खात आहेत.'' कृष्णाभाऊ मुळीच मानायला तयार नसल्याने अखेर आईने गड्यांना गोठ्यात पाठविले आणि गड्यांनी गोठ्यात जाऊन पाहिले, तर कृष्णाभाऊ खरे असल्याचे त्यांना दिसले. बैलाला दावे तोडून त्यांनी वाचविले.

वयाच्या आठव्या वर्षी कृष्णाभाऊंची मुंज झाली. घरीच वडिलांपाशी त्यांचे शिक्षण झाले. पंधराव्या वर्षी कृष्णाभाऊ नोकरीसाठी मुंबईला गेले. ते गिरगावच्या झावबाच्या वाडीत चुलत्याकडे राहत. वारद यांच्या पेढीवर जमाखर्च ठेवण्याची त्यांना नोकरी मिळाली; पण ती टिकली नाही. नंतर ठाकूरद्वारजवळ एका वखारीत त्यांनी काही महिने नोकरी केली. मग भेंडीबाजारात संसारे यांच्या वखारीत त्यांना नोकरी मिळाली. आई आजारी असल्याची बातमी ऐकून कृष्णाभाऊ मुंबईला रामराम करून घरी परतले. आईची तब्येत बिघडत गेली आणि १९०५ साली तिचे निधन झाले.

कृष्णाभाऊंचे वडील सखारामपंत हे दत्तावतार वासुदेवानंद सरस्वती टेंब्येस्वामी यांचे अनुग्रहित होते. वासुदेवानंद सरस्वती नृसिंहवाडीला आले आहेत असे कळताच, सखारामपंतांनी कृष्णाभाऊंना त्यांच्या दर्शनाला नेले. कृष्णाभाऊंची जन्मकुंडली पाहून वासुदेवानंद सरस्वती यांनी सांगितले, ''याला अध्यात्माचे उच्च कोटीचे ज्ञान प्राप्त होईल, गुरुकृपा उत्तम लाभेल, प्रासादिक गोष्टींचा लाभ होईल; पण संसारसुख मिळणार नाही. जीवन आत्मानंदाने कृतार्थ होईल.'' कृष्णाभाऊंनी आपणांस अनुग्रह मिळावा, अशी वासुदेवानंद सरस्वतींकडे प्रार्थना केली. त्यांनी ती मान्य केली. अशा प्रकारे पिता व पुत्र दोघेही वासुदेवानंद सरस्वतींचे अनुग्रहित झाले. स्वामींनी कृष्णाभाऊंना मंत्र उपासनेबरोबरच पूजेसाठी एक शाळिग्राम, तसेच दोन छाट्या दिल्या. ''दत्तउपासनेत राहा. ही छाटी कामधेनू आहे,'' असा त्यांनी उपदेश केला.

पुढे वर्षभरात कृष्णाभाऊंच्या वडिलांचे निधन झाले. त्यानंतर केवळ साधना, तपश्चर्या हाच कृष्णाभाऊंचा नित्यनेम झाला. त्यांनी दिवाणजी गोविंद पळसुले यांच्या मदतीने खोतींचा व्यवहार सांभाळला. गावातील एका सहकारी संस्थेचे ते चेअरमनही होते. त्यांना अनेक वर्षे कोर्टकचेऱ्याही कराव्या लागल्या. या काळात त्यांनी माणिकप्रभूंना पत्र पाठवून मार्गदर्शनाची अपेक्षा केली. तेव्हा माणिकप्रभू यांनी टपालाने ज्ञानेश्वरी, दासबोध व एक रुद्राक्षमाळ प्रसाद म्हणून पाठविली.

सद्गुरू श्री वासुदेवानंद टेंब्येस्वामींनी सांगितल्यामुळे कृष्णाभाऊ हुबळीला सिद्धारूढ स्वामींच्या दर्शनास निघाले. कृष्णाभाऊंच्या पेटीत लोकमान्य टिळकांचे चित्र व 'केसरी'चा अंक होता. त्यामुळे गोव्यामध्ये पोर्तुगीज पोलिसांनी त्यांना अटक केली. त्यांना दोन दिवस तुरुंगात राहावे लागले.

आपल्याला येथून कोण सोडविणार अशी चिंता टेंब्ये यांच्या मनात निर्माण झाली. त्या वेळी एका अनोळखी माणसाने पोलिसांकडे टेंब्ये यांची चौकशी केली व जामीन देऊन सुटकाही केली. तो माणूस तातडीने निघून गेल्यामुळे टेंब्ये त्याच्याविषयी विचार करीत सिद्धारूढ स्वामींच्या दर्शनाला गेले. या पहिल्याच भेटीत सिद्धारूढ स्वामींनी टेंब्यांकडे त्या जामीनाबाबत आपणहून चौकशी

ट

केल्यामुळे टेंब्ये थक्क झाले. ही गोष्ट स्वामींना अंतर्ज्ञानानेच कळली हे जाणून ते स्वामींना शरण गेले व स्वामींनी त्यांच्यावर आपली पूर्ण कृपा केली. त्यांचा स्वामींशी झालेला पत्रव्यवहार पाहण्यासारखा आहे. लोकमान्य टिळकांना स्वामींकडून कृष्णाभाऊंबाबत समजले होते आणि त्यांचा कृष्णाभाऊंशी पत्रव्यवहारही झाला होता.

पांगरे येथील शिवानंद यांचे निवासस्थान (आश्रम) अत्यंत निसर्गरम्य व साधनानुकूल असे एक परमपावन स्थान आहे. हरिहरेश्वराचे मंदिर हा त्यातीलच एक भाग आहे. वयाच्या चौऱ्याऐंशीव्या वर्षी स्वामी शिवानंद टेंब्ये महाराज यांचे महानिर्वाण झाले. घरापुढे अंगणात असलेले त्यांचे समाधिस्थान असंख्य साधकांचे प्रेरणास्थान आहे.

– विद्याधर ताठे

**संदर्भ :**

*शिवानंद आश्रमाची प्रकाशने :*

१. *आगाशे, श्रीधर; 'स्वामी शिवानंद चरित्र'.*

२. *'कृष्णचरित्रामृत' (ओवीबद्ध चरित्र).*

३. *'स्मृतिगंध' (पत्रव्यवहार).*

***

# ड

## डोंगरे महाराज

***डोंगरे, रामचंद्र केशवदेव***

**प्रवचनकार**

**१५ फेब्रुवारी १९२६ – ८ नोव्हेंबर १९९०**



रामचंद्र केशवदेव डोंगरे यांचे घराणे मूळचे कर्नाटकातील कोकणस्थ ब्राह्मण! डोंगरे कुटुंबात तीन पिढ्या संस्कृत साहित्याची आणि धर्मग्रंथांची उपासना झाली होती. त्यांचे आजोबा हरिभक्त परायण श्री गणेशजी अग्निहोत्री होते. कर्नाटकातून ते गुजरात राज्यात बडोदा येथे गेले. तेथे ते भागवतावर प्रवचने करू लागले. हा नावलौकिक ऐकून बडोदा संस्थानाच्या महाराजांनी त्यांना राजमान्यता दिली व त्यांना वर्षासन मिळू लागले. पण पुढे ते बंद झाल्यानंतर अयाचित वृत्तीवर राहून त्यांनी उपजीविका केली.

श्री. गणेश यांचे चिरंजीव केशवदेव यांच्यावर घरातील धार्मिक व पवित्र संस्कार झाले. त्यांनीही श्रीमद्भागवत, महाभारत, रामायण वगैरे ग्रंथांवर प्रभुत्व मिळवले होते. त्यांचाही उत्तम प्रवचनकार म्हणून लौकिक होता. त्यांचे चिरंजीव हे रामचंद्र. त्यांचा जन्म फाल्गुन शुद्ध तृतीयेला झाला.

आई-वडिलांच्या तोंडून स्तोत्र, श्लोक व अभंग यांचे पुष्कळ श्रवण झाले. लहानपणीच घरातील धर्मग्रंथ हीच त्यांना संपत्ती वाटू लागली. त्यांचे मन खेळणे, बागडणे यांत कधीच रमले नाही.

श्री रामचंद्रजींची मुंज आठव्या वर्षी झाली. पुढील शिक्षणासाठी ते पंढरपूरला नारदवेदपाठशाळा (आज अस्तित्वात नाही) येथे गेले. पहाटे चंद्रभागास्नान, व्यायाम, पांडुरंगाची पूजा, अध्ययन, पाठांतर हे चाले. तेथे वेदान्ताचा व पुराणांचा अभ्यास झाला. ते श्रीमद्भागवत व श्रीरामायण यांत रमून गेले. तेथे सात वर्षे राहून ते काशी क्षेत्री गेले. तेथे उपनिषद वगैरेचा सखोल अभ्यास झाला. याबरोबर ज्ञानेश्वरी, संत तुकोबांचे अभंग, नामदेव, समर्थांचा दासबोध यांचे सखोल चिंतन झाले. ते आळंदी-देहू-सज्जनगड येथे जाऊ लागले. त्यांचे श्रीमद्भागवतावरचे पहिले प्रवचन पुण्यात झाले. त्यानंतर त्यांची हजारो प्रवचने व सप्ताह संपूर्ण भारतभर झाले.

आई-वडिलांच्या आग्रहास्तव त्यांनी, 'जी मुलगी माझ्याशी विवाह केल्यावर ब्रह्मचर्यवृत्ती पाळण्यास तयार होईल, तिच्याशीच विवाह करीन' या अटीवर विवाह केला. त्याप्रमाणे शालिनीदेवी या ब्राह्मण साधक उपवर कन्येशी त्यांचा विवाह झाला व तिचे नाव 'सीतादेवी' ठेवण्यात आले. पुढील काळात त्यांनी अबू पहाडावर साधना केली. पू. डोंगरे महाराज तेथे त्यांना भेटावयास जात असत. ते हिंदी, गुजराती व मराठीत प्रवचन करीत असत. सप्ताह व प्रवचनमाला होत असे. त्याचे

मिळालेले उत्पन्न ते संस्थांना वाटत असत. खेडोपाडी लहान मंडळे असतील तर ते त्यांना काही रकमा देऊन व्याजात समाजकार्य, धर्मकार्य करावयास सांगत. त्यांनी कोणाकडून सत्कार, मानपत्र वगैरे काहीही स्वीकारले नाही. थोर अमानित्व, शांत, निर्मोही, निरामय व दैवी गुणसंपन्न असे त्यांचे व्यक्तिमत्त्व होते.

भगवान श्रीकृष्ण-श्रीरामावर त्यांची अचल प्रेम व निष्ठा होती. त्यांच्या प्रवचनाची, भागवताची पुस्तके प्रसिद्ध आहेत. सन १९८०-८१ मध्ये त्यांच्या पत्नीचे देहावसान झाले आणि त्यानंतर दहा वर्षांच्या कालांतराने ईश्वरभक्तीच्या दिव्य प्रेमानंदात रंगले असताना पू. डोंगरे महाराजांचे देहावसान झाले.

**– डॉ. अजित कुलकर्णी**

**संदर्भ :**

१. *खोले, गजानन; ‘श्री स्वामी महाराज’; वार्षिक ‘दीपावली’ अंक; १९८४.*

***

ड

# त

## तनपुरे महाराज
***तनपुरे, कुशाबा बाळोबा***
**वारकरी संप्रदाय, कीर्तनकार समाजसुधारक**
**१९०५ - १९८५**



**त**नपुरे महाराज या नावाने विख्यात झालेल्या पूर्वाश्रमीच्या कुशाबा बाळोबा तनपुरे यांचा जन्म नगर जिल्ह्यातील पाथर्डी तालुक्यातील दगडवाडी या गावात, मार्गशीर्ष महिन्याच्या शुद्ध दशमीला झाला. त्यांच्या आईचे नाव भागीरथी होते. मातापित्यांनी त्यांना आगड गावी, मावशीकडे काम करण्यासाठी पाठवले. त्यांना महिना तीन रुपये मिळत. कुशाबाने दोन वर्षे ते काम केले. पण त्यांचे लक्ष भजन, पूजन, कीर्तनात रमे. पुढे त्यांना भिंगार येथे बागबगिच्यात कामाला ठेवले. तिथेही त्यांचे कामात लक्ष नसे म्हणून त्यांना कामावरून काढून टाकण्यात आले.

ते सुतारकाम शिकण्यास जाऊ लागले. पुढे आई-वडिलांनी कुशाबाचे लग्न लावून दिले. काही दिवस संसार ठीक चालला. एके दिवशी नोकरीच्या ठिकाणी वाद निर्माण झाला. कुशाबा रागाने काम सोडून घरी आला. आईदेखील त्यांच्यावर रागावली. कुशाबा उपाशीपोटी घरातून बाहेर गेला. तिथे त्यांना काही मित्र भेटले. ते त्यांना तमाशाला घेऊन जाऊ लागले. रस्त्याने जाताना अखंड हरिनाम सप्ताहातील हरिनाम त्यांच्या कानी आले. तमाशाला जाण्याचा विचार सोडून ते घोंगडे महाराजांच्या सप्ताहाच्या समाप्तीला गेले. तेथे गाडगेबाबांचे कीर्तन चालू होते. या कीर्तनातून त्यांनी शिकवण घेतली, की परोपकार करून दीनदुबळ्यांचा दुवा घ्यावा. त्यामुळे जन्माचे सार्थक होईल.

कुशाबाने गाडगेबाबांना गुरू मानले व त्यांच्याकडे कीर्तनाचा अभ्यास सुरू केला. कामात असतानासुद्धा मन रामध्यानात, भक्तिभावात असे. रात्री भजनाचा नित्यक्रम सुरू झाला. हळूहळू कुशाबा तनपुरे स्वत: कीर्तन करू लागले. घोंगडेबाबांच्या सप्ताहाप्रमाणे तनपुरे यांच्या सप्ताहाला गर्दी होऊ लागली. कडक वैराग्य, त्यागी वृत्तीने तनपुरे महाराजांचे चौदा नामसप्ताह यशस्वीरीत्या पार पडले. सप्ताहाच्या वेळी हजारो लोकांना अन्नप्रसादाचा लाभ होई. लोकांना तनपुरे महाराजांच्यात देवत्वाची प्रचिती आली.

सर्वसामान्य जनतेतले अज्ञान, अंधश्रद्धा यांच्याविरुद्ध तनपुरे महाराजांनी बंड पुकारले. देवापुढे कोंबडा, बकरा वगैरे बळी देण्याची अनिष्ट रूढी महाराजांनी बंद केली. कीर्तनाद्वारे समाजात जागृती करून दारू, गांजासारख्या व्यसनांतून हजारो लोकांना सन्मार्गाकडे वळविले. १९४० पासून अंध, अपंग, महारोगी यांच्यासाठी महाराजांनी अन्नछत्रे चालविली. शेकडो लोक तृप्त होऊन महाराजांना दुवा देऊ लागले. महाराजांचे भक्त

असलेले धनिक लोक अन्नछत्रांतून अनाथ, अपंगांना मिष्टान्न देत. महाराज संत श्री गाडगेबाबांचे परमभक्त होते. तसेच कैकाडीबाबा, तुकडोजी महाराज यांच्या पठडीतले लोककल्याणार्थ तन, मन झिजवणारे महान कीर्तनकार होते. महाराजांनी चारधाम यात्रा पायी केली.

भक्तांकडून मिळालेल्या संपत्तीची आस धरली नाही. त्यांचे जीवन म्हणजे खडतर व योग्याचे होते. धर्मजागृतीबरोबर त्यांनी अस्पृश्यता निवारणाचा आटोकाट प्रयत्न केला. केदारनाथच्या यात्रेत महाराजांना वाचासिद्धी प्राप्त झाली. सर्वत्र त्यांचा शिष्यवर्ग तयार झाला. महाराज पंढरपुरी वास्तव्याला असत. चारधाम यात्रेच्या वेळी महाराजांनी बारा ज्योतिर्लिंगांच्या मूर्ती पंढरपुरास आणून दर्शनासाठी ठेवल्या होत्या.

— वि.ग. जोशी

**संदर्भ :**

*१. उत्तमराव महाराज, साळशिंगी (ता. भुसावळ) यांच्या लेखावरून.*

## ताजुद्दिन बाबा अवलिया

### सुफी संत, सत्पुरुष

### २१ जानेवारी १८६१ — १७ ऑगस्ट १९२५

हुजूर पुरनूर सैयदना हजरत बाबा ताजुद्दिन अवलिया या सूफी आध्यात्मिक गुरूंचा जन्म मुस्लीम हिजरी सनावळीनुसार ५, रजुब्बूल १२७९ रोजी नागपूर शहराजवळील कामठी या गावात झाला. त्यांचे वडील सैयद बद्रूद्दिन इंग्रज फौजेमध्ये सुभेदार होते. ताजुद्दिन यांची आई मरियमबी यादेखील सुभेदार मेजर शेख मीरासाहेब यांच्या कन्या होत्या. कामठी याच गावात इंग्रजांच्या फौजेची छावणी होती.

बाबा ताजुद्दिन न रडता जन्माला आले. त्यांची आईदेखील न रडताच जन्मली होती. ताजुद्दिन एक वर्षांचे असताना त्यांच्या वडिलांचे आणि नऊ वर्षांचे असताना त्यांच्या आईचे निधन झाले. त्यामुळे ताजुद्दिन यांना कामठी परिसरातच असलेल्या आपल्या आजोळी राहावे लागले. तेथील शाळेत त्यांनी अरबी, फारसी, उर्दू, इंग्रजी भाषाज्ञान प्राप्त केले. त्यांना एकदा शाळेत



नागपुरातील मुस्लीम आध्यात्मिक गुरू हजरत अब्दुला शाहसाहेब भेटले. शाहसाहेबांनी ताजुद्दिनना पाहिल्यानंतर, ''हा मुलगा पूर्वजन्मातूनच शिकून आला आहे,'' असे त्याच्या शिक्षकांना सांगितले. त्यांनी आपल्या झोळीतून एक खुरमा (फळ) काढला आणि तो अर्धा खाऊन उरलेला प्रसाद म्हणून त्यांना खायला दिला आणि सांगितले की, ''कमी खा, कमी झोप आणि कमी बोल'' आणि कुराण-ए-शरीफ असे ग्रहण कर, की कुराणचा अर्थ आणि संदेश साऱ्या मानवजातीच्या उद्धारासाठी कारणी लागेल.'' या वेळी त्यांचे नामकरण 'चिरागुद्दिन' असेही करण्यात आले. फळाचा प्रसाद भक्षण केल्यानंतर त्यांच्या डोळ्यांतून बेसुमार अश्रुधारा बरसू लागल्या. तीन दिवस पराकोटीच्या भावावस्थेत काढल्यानंतर त्यांचा जीवनक्रम एकदम बदलला.

ताजुद्दिन एकांतात बसून चिंतनात मग्न राहू लागले. 'किसी मनुष्य के दिल को रंज मत पहुंचा' या फारसी उद्‌बोधनातील आशय ते पूर्ण जगू लागले. पुढे त्यांच्या दरबारात हिंदू, मुस्लीम, शिख, ख्रिस्ती, पारसी, बौद्ध असे साऱ्याच धर्माचे लोक एकत्र येऊ लागले. ताजुद्दिन यांना शालेय शिक्षणानंतर त्यांच्या मामांनी विसाव्या वर्षी १८८१ मध्ये इंग्रजी फौजेत दाखल केले. 'नागपूर रेजिमेंट १३'मध्ये जवान म्हणून भरती झाल्यानंतर त्यांनी तेथील इंग्रज अधिकाऱ्यांना कुराण-ए-शरीफ, तसेच अन्य

प्रार्थनांची शिकवण देण्यास सुरुवात केली. त्यांना देशविदेशांत पलटणीसह फिरावे लागले.

१८८४ मध्ये 'रेजिमेंट सागर'मध्ये बदली झाल्यानंतर एका तळावर त्यांना हजरत दाऊदसाहेब हुसैनी या सूफी गुरूंचा सहवास लाभला आणि त्यांनी अध्यात्ममार्गाला पूर्ण झोकून देण्याचे ठरविले. याच मानसिक अवस्थेत त्यांनी एके दिवशी फौजेच्या नोकरीला अलविदा केला आणि ते रानोमाळ, मुक्तपणे फिरू लागले. तो वेडा झाला आहे असे वाटून त्यांच्या आजीने वैदू, गंडेदोरे वगैरे इलाज केले; परंतु ताजूबाबांची अवस्था 'हम क्या करें इलाज उस लाइलाज का, जो खुद दवा था, खुद लुकमान था' अशी झाली होती. त्यांना वेडा ठरवून पोलिसांनी वेड्यांच्या इस्पितळात टाकले आणि त्यांना मारहाण केली. तेथेही त्यांची अवलियागिरी चालूच राहिली. तेथील एक वेडा पळून गेला. डॉक्टरांसह सारेच हैराण झाले. 'तो उद्या सकाळी नक्कीच परतेल' असे ताजुद्दिन यांनी सांगितले, आणि तो परत आलाही. अशा प्रचितींमुळे ताजुद्दिन यांच्याकडे गूढ शक्ती असल्याची श्रद्धा भाविकांमध्ये निर्माण झाली.

ताजुद्दिनबाबांची कीर्ती नागपूर क्षेत्र ओलांडून भारतात सर्वदूर पसरली. त्यांच्या दरबारात सर्वधर्मीय भक्तगण प्रविष्ट होत असत. दरबारातील आरतीदेखील 'ॐ जय ताजुद्दिन स्वामी, प्रभू ताजनाथ स्वामी, विघ्नविनाशक सद्‌गुरू, कृपासिंधू तुम सद्‌गुरू शरण सकल प्राणी, जय ताजुद्दिन स्वामी' अशा प्रकारची होती.

'अद्वैत वेदान्त' या आध्यात्मिक विचारसरणीवर बाबांची श्रद्धा होती. ऐहिकवादापासून मानवजातीने दूर रहिले पाहिजे ही त्यांची शिकवण होती. भारतीय संस्कृतीतील विविधरंगी धार्मिक विचारधारांना समांतर पातळीवर आणून त्यांनी सर्वधर्मियांना सर्वसमावेशक लोकोपदेश करण्याचे महत्त्वाचे कार्य केले. गायक डॉ. वसंतराव देशपांडे, न्यायमूर्ती हिदायतुल्ला, क्रिकेटवीर कंकय्या नायडू, त्याचप्रमाणे देवाजी राव, मथुराप्रसाद गुप्ता, गंगाधरराव चिटणीस अशा भारतभरातील अनेक कलावंत, उद्योगपती, राजकीय प्रसिद्ध व्यक्तींना बाबा



**तानुद्दिन बाबा दर्गा, नागपूर**

ताजुद्दिन यांचा अनुग्रह प्राप्त झाला. बाबा ताजुद्दिन यांनी, आपल्या भक्तगणांनी अर्पण केलेल्या साऱ्या धनधान्यादी मौल्यवान चिजा लोकार्पण करून विशेषत: वंचित गरजूंना वाटून टाकल्या.

महाराष्ट्रात ठिकठिकाणी बाबा ताजुद्दिन अवलियांची स्मारके बांधण्यात आली आहेत. नागपुरातील शक्करदरा येथील स्मृतिमंदिर, सावनेर येथील श्री बाबा ताजुद्दिन दर्गा, पागलखाना दरबार, शक्करदरा दरबार या ठिकाणी बाबांची स्मृतिमंदिरे बांधण्यात आली. बाबा ताजुद्दिन यांचे समकालीन अवतार मेहेरबाबा यांनी त्यांचे वर्णन 'कुतुब' म्हणजे अस्सल गुरू असे केले आहे. या अवलिया सूफी साधूचे देहावसान नागपुरातच झाले. ताजाबाद शरीफ, नागपूर येथे त्यांची मझार म्हणजेच 'शरीफ-ए-दरगाह' भाविकांचे श्रद्धास्थान बनली आहे.

— संदीप राऊत

## तुकडोजी महाराज

***इंगळे ठाकूर, माणिकदेव बंडोजी***

**राष्ट्रसंत, खंजिरी कीर्तनकार**

**३० एप्रिल १९०९ – ११ ऑक्टोबर १९६८**

**तु**कडोजी महाराजांचे मूळ नाव माणिकदेव बंडोजी इंगळे ठाकूर हे होय. त्यांचा जन्म विदर्भातील अमरावती जिल्ह्यातील 'माणिक' या गावी झाला. त्यांचे वडील बंडोजी नामदेव इंगळे हे उदरनिर्वाहासाठी शिवणकामाचा





व्यवसाय करीत. त्यांचे मूळ गाव 'यावली'. तुकडोजी यांची आई मंजूळाबाई या धर्मपरायण व माहूरगडच्या देवीच्या उपासक होत्या. तुकडोजी महाराजांचे घराणेच पंढरीचे वारकरी होते. वडिलांकडून त्यांना पंढरीच्या वारीचा वारसा मिळाला. प्रज्ञाचक्षू गुलाबमहाराज व संत हरिबाबा तुकडोजींच्या नामकरणास उपस्थित होते व त्यांनी बाळाचे नाव 'माणिकदेव' असे ठेवले होते.

थोर संत आडकोजी यांच्या सेवेत तुकडोजी महाराजांचे मामा होते. त्यामुळे लहानपणीच तुकडोजी महाराजांना आडकोजी यांचा संतसंग व आशीर्वाद प्राप्त झालेला होता. संत आडकोजी १९२१ साली समाधिस्थ झाले व त्यामुळे तुकडोजी उदास-विरक्त झाले व मन:शांतीसाठी थेट पंढरीस गेले. तेथे भक्त पुंडलिकाच्या मातृपितृभक्तीच्या कथा ऐकून पुनश्च घरी परतले व वडिलांचा शिवणकामाचा व्यवसाय करू लागले. पण त्यांचे मन संसारात रमत नव्हते. अखेर, एके दिवशी ते गृहत्याग करून ईश्वरदर्शनाच्या ओढीने रामटेकच्या अरण्यात तपश्चर्या करू लागले. तेथे त्यांची एका फकिराशी भेट झाली. बालपणापासूनच असलेली भजनाची आवड वृद्धिंगत होऊन, हृदयाचा ठाव घेणारा भजनगायक - खंजिरीवादक म्हणून त्यांचे सर्वत्र नाव झाले. त्यांनी १९२४ मध्ये भारतभ्रमण करीत सर्व देश पालथा घातला.

ग्रामांची स्थिती, ग्रामीण लोकजीवनातील अनंत व्यथा त्यांनी जवळून पाहिल्या व ग्रामसुधारणेच्या कार्याचा मनोमन संकल्प केला. १९४२ च्या चळवळीत त्यांनी भाग घेतला. मोझरी येथे त्यांनी 'गुरुदेव धर्मसेवा आश्रम' स्थापन केला. १९४३ साली त्यांनी 'गुरुदेव' नावाचे मासिक सुरू केले. म. गांधी, विनोबा भावे यांचा ग्रामविकासाचा विचार त्यांनी खेडोपाडी आपल्या प्रभावी भजनांद्वारे मांडला. स्वावलंबन, स्वच्छता, साक्षरता, राष्ट्रीय एकात्मता या विषयांना केंद्रस्थानी ठेवून गावोगावी सप्ताह साजरे केले.

ते १९५३ साली पंढरीच्या वारीला गेले असता, चंद्रभागेच्या वाळवंटात आषाढी एकादशीच्या दिवशी त्यांना 'ग्रामगीता' लिहिण्याची प्रेरणा मिळाली. खेडी सुधारली तरच देश सुधारेल, असा विचार करून त्यांनी 'ग्रामगीता' लिहिली. १९५४ साली, मे महिन्यामध्ये ४१ अध्यायांच्या ग्रामगीतेचे लेखन पूर्ण होऊन देशभर १००० कार्यक्रमांत एकाच वेळी गीताजयंतीच्या मुहूर्तावर तिचे प्रकाशन करण्यात आले.

'ग्रामगीते'मध्ये तुकडोजी महाराज आपले मनोगत व्यक्त करताना म्हणतात : *'ग्रामगीता माझे हृदय । त्यात बसले सद्‌गुरुराय । बोध त्यांचा प्रकाशमय । दिपवोनि सोडील ग्रामासि ॥'* ही ग्रामगीता गावोगावी सामुदायिकरीत्या वाचन केली जात असे, अशी लोकप्रियता या रचनेस लाभली.




**श्री तुकडोजी महाराज डाक तिकीट**



**राष्ट्रसंत तुकडोजी महाराज पुतळा, नागपूर**

१) सद्‌धर्ममंथन, २) लोकवशीकरण, ३) ग्रामनिर्माण, ४) दृष्टिपरिवर्तन, ५) संस्कारशोधन, ६) प्रेमधर्मस्थापना, ७) देवत्वसाधना व ८) आदर्श जीवन अशी एकूण आठ पंचके ग्रामगीतेत आहेत. या ग्रंथाचा देशातील सर्व मान्यवरांनी गौरव केलेला आहे.

तुकडोजींची या ग्रंथातून व्यक्त होणारी ग्रामविकासाची तळमळ राष्ट्रपती राजेंद्रप्रसाद, विनोबा भावे, गाडगे महाराज, पंडित सातवळेकर, वि.स. खांडेकर, शंकरदयाळ शर्मा आदींनी विशेषत्वाने अधोरेखित केलेली आहे. भारताचे राष्ट्रपती डॉ. राजेंद्रप्रसाद यांनी तुकडोजी महाराज यांना 'राष्ट्रसंत' ही पदवी देऊन गौरव केला.

ग्रामगीता लिहिण्यापूर्वीच तुकडोजींच्या भजनावलीचे प्रकाशन झालेले होते. केवळ धार्मिक-पारमार्थिक नव्हे, तर त्यांच्या देशभक्तिपर स्फूर्तिगीतांनी अनेकांना वेड लावले होते. ही गीते गात त्या काळात बालतरुण प्रभातफेऱ्या काढीत.

स्वातंत्र्यप्राप्तीसाठी व नंतर स्वराज्याचे सुराज्य करण्यासाठी तुकडोजी महाराजांनी आपले सारे जीवन वाहिले. चीन-भारत युद्धावेळी त्यांनी थेट सीमेवर जाऊन भारतीय सैन्याचे मनोबल वाढविले, तसेच त्यांच्यासाठी संरक्षणनिधी गोळा केला.

विनोबांच्या भूदान चळवळीतही त्यांचे मोठे योगदान आहे. सततचा प्रवास व आरोग्याची हेळसांड यांमुळे तुकडोजी महाराजांना पुढे कर्करोग झाला व तो बळावून त्यांचे देहावसान झाले. त्यांनी स्थापन केलेला 'गुरुदेव आश्रम' तुकडोजींचे कार्य पुढे चालवीत आहे.

– विद्याधर ताठे

त

## तराणेकर, नाना महाराज

***धर्माधिकारी, मार्तंड शंकरशास्त्री***

**चैतन्यानंद सरस्वती**

**१३ ऑगस्ट १८९६ – १६ एप्रिल १९९३**

**ना**नामहाराज तराणेकर यांचा जन्म होळकरांच्या राज्यातील तराणे या गावी झाला. त्यांच्या आईचे नाव लक्ष्मीबाई होते. वडील शंकरशास्त्री जोशीपण करीत असून पू. वासुदेवानंद सरस्वतींचे शिष्य होते.

आठव्या वर्षी नानांचे मौजीबंधन झाले आणि त्यांचा ब्रह्मचर्याश्रम सुरू झाला. शास्त्रीबुवांच्या देखरेखीखाली त्रिकालसंध्या, जप अनुष्ठान आणि वेदशाळेतले अध्ययन सुरू झाले. अमरकोश, कौमुदी, व्याकरण इत्यादींचे अध्ययन घरीच झाले. चौथीपर्यंत शिकल्यानंतर शास्त्रीबुवांनी नानांना इंदूरच्या नरहरशास्त्र्यांकडे वेदाभ्यासासाठी पाठवले. तिथे त्यांनी 'महाकाव्यसंहितापठण' आदी गोष्टी आत्मसात केल्या.

मूळरूपाची ओळख करून देणारे, अध्यात्ममार्गावर मार्गदर्शक असे सद्‌गुरू भेटावे ही तळमळ त्यांच्या उरी होती. त्यासाठी वडिलांनी गुरुचरित्र पारायणाचे अनुष्ठान करण्यास सांगितले. सात सप्ताहांच्या कठोर उपासनेनंतर प.पू. वासुदेवानंद सरस्वती यांचे दर्शन घडले. स्वामींनी



त

त्यांच्या कार्याची दिशा दाखवली. ''अहो, तुम्हां कार्य करणे बहुत । प्रगटायाचे या प्रांतात । समाधीत ना रमणे तुम्ही ।। दत्त नाम गर्जत गर्जत । जागवावे सुप्त भक्तमानस । भक्ती, ज्ञान, कर्मयोगास । आचरोनिया असावे जी ।।'' आशीर्वाद देऊन स्वामी अंतर्धान पावले.

गुरुपदेश प्राप्त झाल्यावर त्यांनी तपाची सांगता केली. लौकिक व्यवहारात आवश्यक तेवढेच लक्ष घालून त्यांचे अखंड अनुसंधान सुरू असे.

विविध देवतांच्या शास्त्रशुद्ध उपासना करून त्यांच्या दर्शनाचा लाभ नानांनी या काळात घेतला. सतत तीन वर्षांपर्यंत श्रीगणेश, श्रीराम, श्रीकृष्ण आदी देवतांच्या आराधनेचे व्रत अखंड सुरू होते. नाना अठरा वर्षांचे झाल्यावर इंदूरचे शंकरराव डाकवाले यांची कन्या भीमाबाई हिच्याशी शके १८३६ मध्ये नानांचा विवाह झाला. सासरी भीमाबाईचे नाव बदलून म्हाळसाबाई असे ठेवले गेले. पुढे मातृपितृछत्र हरपल्यावर प्रपंचाची पूर्ण जबाबदारी नानांवर आली. कारण, वडीलबंधू गंगाधरपंत यांचे घरात फारसे लक्ष नसे. ते यात्रा करीत बाहेरच असत.

म्हाळसाबाई यांनी पतिअनुकूल राहून प्रपंचाची जबाबदारी सांभाळली. त्यांनी एका मुलाला जन्म दिला. आजोबांचे 'शंकर' हेच नाव बाळाचे ठेवले होते. व्यवहारात हे पुढे 'भैयासाहेब' म्हणून ओळख पावले. बाळ दोन वर्षांचा असतानाच म्हाळसाबाई देवाघरी गेल्या. आप्तांच्या इच्छेला मान देऊन नानांनी सन १९२४ मध्ये तराण्याच्या श्री. भाले यांच्या कन्येशी नानांनी विवाह केला. प्रथम पत्नीच्या स्मृतीस मान द्यायचा म्हणून तिचेही नाव म्हाळसाच ठेवले. कुसुम नावाच्या मुलीला जन्म देऊन तीन वर्षांत त्याही स्वर्गवासी झाल्या.

साधकावस्थेच्या या काळात स्वत: अतिशय कर्मठपणे सोवळ्यात पूजा, स्वहस्ते स्वयंपाक, नैवेद्य, अतिथी अभ्यागत यांत कष्ट खूप होत; पण विनातक्रार दिनक्रम सुरू असे. त्यातच एकदा सद्‌गुरूंनी वामनबुवा ब्रह्मचाऱ्याच्या रूपात येऊन व पंधरा दिवस मंदिरात वास्तव्य करून नानांना योग शिकवला व नानांनी विनंती केल्यामुळे त्यातील प्रयोगही करवून घेतले. सद्‌गुरूंचा स्वप्नदृष्टान्त आणि प्रत्यक्ष मार्गदर्शनासोबतच स्वकष्टाने सतत प्रयत्नरत राहून नानांनी या मार्गात खूप प्रगती केली. नाना साधकावस्थेत असतानाच तीर्थयात्रा करण्याची सद्‌गुरूंची आज्ञा झाली. दोन्ही लहान मुले कोंडूताईंच्या स्वाधीन करून नाना यात्रेला गेले.

गुरुचरित्रात वर्णन केलेल्या पद्धतीने काशीयात्रा केल्यावर आनंदवनात जाण्याचे कुणीसे सुचविले. तिथे त्यांना प्रत्यक्ष विश्वनाथदर्शन झाले.

मथुरायात्रेत वृंदावनी, यमुनाकाठी श्रीबालमुकुंदाचे गोपबालांसह प्रत्यक्ष दर्शन घडले. गंगोत्री-जमनोत्री यात्रेत सद्‌गुरूंच्या कृपेमुळे श्रीसच्चिदानंदस्वरूपाच्या प्रवचनाचा अविस्मरणीय लाभ झाला. अत्यंत कठीण नियम असलेली 'जलेरी' प्रकारची नर्मदा परिक्रमा करीत असता प्रत्यक्ष नर्मदेचे दर्शन घडले. याच यात्रेत चिदानंदस्वामींची भेटही झाली.

संतदर्शनाला आवर्जून जाण्याचा नानांचा रिवाजही असे. त्यांना धुनीवाले दादाजी केशवानंद, मौनीबाबा, गुळवणी महाराज, खातखेडकर महाराज, धुंडा महाराज देगलूरकर आदींचा सहवास लाभला. नानांनी साधारणपणे बत्तीस यज्ञांत आचार्यपद भूषवले. वयाच्या साठीनंतर नानांनी आचार्यपदाची जबाबदारी घेणे

थांबवले, तरीही त्यांच्या देखरेखीखाली गावोगावी शिष्यपरिवाराच्या सहभागातून अनेकविध यज्ञ करविले. नानांच्या घरीही, नानांच्या देखरेखीखाली महामृत्युंजय यज्ञ, दत्तयाग व गणेशयाग असे काही यज्ञ संपन्न झाले.

कर्म, भक्ती व ज्ञानयोगाचे आचरण करून सुप्त भक्तमानस जागवण्याचे व दत्तप्रेमाने भारण्याचे कार्य त्यांनी अव्याहतपणे, आयुष्यभर केले. जात, धर्म किंवा गरीब-श्रीमंत असे कुठलेही भेद न मानता त्यांनी सर्वच लोकांचा शिष्य म्हणून स्वीकार केला. त्यामुळेच तर भक्ताला ज्या मार्गाची आवड असेल, त्याला अनुरूप असा मार्ग, त्याच्या आवडीच्या दैवताची उपासना नाना सांगत म्हणून – *योगप्रेमी को योगी दिखते । ज्ञानप्रेमी को ज्ञानी दिखते । भक्तिप्रेमी को दिखते भक्त । लीला आपकी यह अद्‌भुत ॥* जैन, मुस्लीम धर्मियांनीदेखील नानांचा उपदेश घेतला. त्यांना नाना जैनमंत्र किंवा कुराणाधिष्ठित उपासना सांगत. नानांना सर्व धर्मांचे मुळातून ज्ञान असल्याने हे शक्य होई आणि भक्तांचे पूर्ण समाधान होत असे. अनुग्रहातून मंत्र देऊन, उपासना देऊन शिष्याला आध्यात्मिक प्रगतीविषयक मार्गदर्शन करीत असताना व्यावहारिक गोष्टीही त्याला सांभाळता याव्यात म्हणून सहवासातील शिष्यांना मुख्यत्वे स्वत:च्या आचरणातून आणि क्वचित सहज संभाषणात्मक उपदेशातून ते वेळोवेळी मार्गदर्शन करीत.

नानांची महती जाणून इतर क्षेत्रांतील थोर व्यक्ती त्यांच्या विषयांतील नानांचे ज्ञान पाहून नानांपुढे नतमस्तक होत. श्री. सुरेंद्र राव हे प्रथितयश गायक एकदा नानांसमोर थत्ते यांच्या घरी बैठकीला आले. पण भोवतीच्या मंडळींत कुणी संगीताचे जाणकार नसल्याचे लक्षात आल्यावर नाराज झाले. सुरेंद्र राव म्हणाले, ‘‘महाराज, आता आपल्याला काय ऐकवू?’’ असे विचारले असता नाना शांतपणे म्हणाले, ‘‘आम्हांला सरस्वती राग ऐकण्याची इच्छा आहे. तो ऐकवलात तर आम्हांला खूप आनंद होईल.’’ हे वाक्य ऐकून नानांच्या संगीतातील ज्ञानाविषयी त्यांना अचंबा वाटला.

पंडित कुमार गंधर्व यांनी नानांचे शिष्यत्व पत्करले. संगीतातील गुरूखेरीज दुसरे गुरू करणार नाही हे विचार असलेले पंडितजी शिष्यत्व पत्करल्यावर दर भाऊबीजेच्या रात्री नानांसाठीच बैठक करू लागले. याचप्रमाणे दाजी भाटवडेकर, थिरकवा साहेब, पं. सी.आर. व्यास, श्रीकांत जिचकार आदींनी नानांचे शिष्यत्व पत्करले. भक्तांच्या हाकेला धावून जाण्याचा गुरुमाउलीचा स्वभावच असतो. *श्रवणमात्रे (स्मरणमात्रे) धावसी अन् पावसी शरणागता ।* असा अनुभव नानाभक्तांना नित्यच येत असतो. ‘मार्तंड महिमा’मध्ये असे अनुभव ग्रंथित केले आहेत. अत्यंत शांत, प्रसन्न, हसरी, बालसुलभ निरागस भाव ल्यालेली, शुचिर्भूत आणि सोज्ज्वळ, शुभ्र वस्त्र परिधान केलेल्या, निजानंदात निमग्न असलेल्या नानामूर्तीचे दर्शन घडताच भक्त आश्वस्त होत असत.

नाना १६ एप्रिल १९९३ रोजी, चैत्र वद्य दशमीला, शिवाजीनगर, नागपूर मुक्कामी सद्‌गुरुस्वरूपी विलीन झाले. त्यांच्या स्मृत्यर्थ त्या ठिकाणी आता ‘चैतन्यपीठ’ स्थापन झाले आहे.

– प्रा. नीलिमा रानवडकर

**संदर्भ :**

१. प्रा. पागे, वि.म.; ‘मार्तंड महिमा’; सद्‌भक्ती प्रकाशन, इंदूर; १९७०.

२. डॉ. तराणेकर, प्रदीप शंकर; ‘कवडसा’, शब्दांकन : तराणेकर, जयश्री; क्रिएटिव्ह पब्लिशर्स ॲण्ड डिस्ट्रिब्यूटर्स, इंदूर-४५२ ००३.

त

***

# द

## दत्ता बाळ
**तत्त्वचिंतक, ग्रंथकार**
**३ एप्रिल १९४१ - ३ सप्टेंबर १९८२**



दत्ता बाळ यांचा जन्म कोल्हापूर येथे झाला. शिक्षणमहर्षी मल्हारराव देसाई यांचे हे द्वितीय चिरंजीव.

वयाच्या अवघ्या एकोणिसाव्या वर्षी दत्ता बाळ यांनी कोल्हापूर येथे विजयादशमीच्या सुमुहूर्तावर (१९ ऑक्टोबर १९६१) 'दत्ता बाळ मिशन डिव्हाइन' या नावाची संस्था स्थापन केली. त्यांनी भारतभर प्रवास केला. अनेक थोर आध्यात्मिक विभूतींच्या भेटी घेतल्या. त्यांत श्री अरविंदाश्रमाच्या माताजी, श्री आनन्दमयी माँ, काननगडचे श्री रामदास, हृषिकेशचे स्वामी शिवानंद, दिलीपकुमार रॉय, जे. कृष्णमूर्ती, स्वामी स्वरूपानंद यांचा समावेश आहे.

दत्ता बाळ यांचे द्रष्टेपण, क्रांतिकारक विचारसरणी व विज्ञानाधिष्ठित तत्त्वचिंतन पाहून मोठमोठे विचारवंत म्हणाले, ''दत्ता बाळ हे आत्मदर्शी तत्त्वज्ञ व क्रांतिकारी संत आहेत. दिव्य प्रेमाचे ते प्रेषितच आहेत!'' जपानच्या जागतिक धर्मपरिषदेत त्यांनी भाग घेतला होता. (१६ ते २२ ऑक्टोबर १९७०) या परिषदेत हिंदू धर्माला अस्पृश्यता मान्य असल्याची टीका करण्यात आली तेव्हा दत्ता बाळांनी त्यांना उत्तर दिले होते, ''जड-चेतनात्मक विश्वाची एकात्मता मानणाऱ्या धर्माला अस्पृश्यता कशी मान्य होईल? खरा धर्म व रूढी यांतील अंतर ध्यानात घ्यायला हवे. धर्माच्या वृक्षावरील बांडगुळे म्हणजे रूढी होत!''

त्यांनी या धर्मपरिषदेत अत्यंत मौलिक चिंतन दिले. ते म्हणाले, ''प्रत्येक व्यक्तीला 'विश्वाच्या एकात्मतेची जाणीव' होईल असे शिक्षण द्यायला हवे. तशी जाणीव झाली तर त्याच्या ध्यानात येईल, की एकात्मतेच्या चिन्मय सागरावरील आपण एक लहानशी लाटमात्र आहोत! ही जाणीव जीवनाच्या सर्व अंगोपांगांतून प्रकट व्हावी. याचा अर्थ, या जाणिवेतून जीवनाचे मानसशास्त्र, समाजशास्त्र, अर्थशास्त्र, राजकारण ही सर्व अंगे अभिव्यक्त व्हावीत!''

जपानबरोबर बॅन्कॉक, इंग्लंड, अमेरिका या ठिकाणीही त्यांची प्रभावी व्याख्याने झाली. जपानच्या जागतिक धर्मपरिषदेकडून परतल्यावर दत्ता बाळ यांचे महाराष्ट्रात अभूतपूर्व स्वागत झाले. स्वामी विवेकानंदांना जपानचे निमंत्रण आले होते; पण प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे ते जपानला जाऊ शकले नाहीत. ते अपुरे कार्य दत्ता बाळांनी जणू पूर्ण केले. धर्मपरिषदेच्या काळात जपानी प्रमुख वृत्तपत्रांत पहिल्याच पानांवर त्यांची दोन छायाचित्रे झळकली होती! या अविस्मरणीय कार्यानेच त्यांना 'महाराष्ट्राचे विवेकानंद' म्हणूनच लोक ओळखू लागले. आजचे निसर्ग-अभ्यासक वृक्षसंगोपनाबद्दल जे

कार्य करीत आहेत, ते विचार दत्ता बाळ लहानपणासून सांगत आले. त्यांचे 'वृक्ष माझा सांगाती' हे पुस्तक म्हणजे 'वृक्षोपनिषद' व्हावे, इतके सुंदर आहे. ती त्यांची अनुभूतीच आहे. याबाबत दत्ता बाळ म्हणतात, ''त्यांना सूर्यप्रकाश, खतपाणी यांप्रमाणे जिवंत भावनांचीही जरुरी आहे. जर सूर्यप्रकाश त्यांचे अन्न असेल, तर आपल्या भावना त्यांचे अमृत आहे.''

विश्व हिंदू परिषदेच्या स्थापनेमध्ये श्रीगुरुजी, स्वामी चिन्मयानंद यांच्या समवेत दत्ता बाळ यांचाही समावेश होता. पंढरपूर येथे संपन्न झालेले पहिले विश्व हिंदू परिषद संमेलन दत्ता बाळ यांच्या प्रखर हिंदुत्व विचारांनी खूपच गाजले. दत्ता बाळ यांच्यामध्ये खलील जिब्रानच्या तत्त्वचिंतनाची गंभीरता, रवींद्रनाथांची उत्स्फूर्त सौंदर्यदृष्टी आणि स्वामी विवेकानंदांचे द्रष्टेपण यांचे एक अद्‌भुत रसायन तयार झाले होते. दत्ता बाळ यांचे विचार श्रद्धेतून आणि सखोल आत्मानुभूतीतून प्रकट होत. त्यांचे विचार ऋतंभरा प्रज्ञेतून आणि उत्स्फूर्त प्रतिभेतून काव्यात्म रूप घेऊनच अवतरत. त्यांचे काही विचार उद्याच्या जगताला आकार देणारे, द्रष्टेपणाचे आहेत.

दत्ता बाळ यांनी महाराष्ट्राच्याच नव्हे, तर भारताच्या वैचारि जगतात विज्ञानाधिष्ठित अध्यात्माचे नवे दालन उघडले. समग्र सृष्टीशी संवादमयता, विश्वात्मक संवेदनशीलता आणि प्रेमप्रक्षेपणक्षमता हे त्यांच्या जीवनदर्शनाचे हृदयधर्म आहेत. असा दत्ता बाळ हा बुलंद आवाज अवघ्या ४१ वर्षांच्या वयात अनंतात विलीन झाला.

— डॉ. वि.य. कुलकर्णी, रवींद्र पाटसकर

**संदर्भ :**


१. *प्रा. कुलकर्णी, म.अ.; 'पू. दत्ता बाळ - एक दर्शन'.*

२. *Desai, M.N.; 'The Messenger of Divine Love'.*

३. *देसाई, सुभाष; संपादक : 'श्री दत्ता बाळ - वाङ्मय आणि तत्त्वज्ञान', खंड पहिला.*

४. *देसाई, सुभाष; संपादक : 'श्री दत्ता बाळांची व्याख्याने', खंड दुसरा.*

५. *देसाई, सुभाष; 'प्रेम प्रक्षेपण'.*


## दांडेकर, मामासाहेब

***दांडेकर, शंकर वामन; दांडेकर, सोनोपंत***

**प्रवचनकार, कीर्तनकार, प्राचार्य**

**२४ एप्रिल १८९६ - ९ जुलै १९६८**



शंकर वामन दांडेकर यांना सर्व जण 'सोनूमामा' म्हणून ओळखत. गुरुवर्य जोग महाराजांचे लाडके शिष्य अशीही त्यांची ओळख होती. त्यांच्या आईचे नाव लक्ष्मीबाई होते. सोनोपंतांना चार मोठ्या बहिणी व एक मोठा भाऊ होता. सोनोपंत अवघे दीड वर्षाचे असतानाच त्यांना मातृवियोग झाला. त्यामुळे त्यांचा सांभाळ त्यांच्या मोठ्या भगिनी काशीबाई कर्वे यांनी केला. काशीबाई या विधवा होत्या. त्यांनी सोनोपंतांचा आईसारखा सांभाळ केला व त्यांच्या शिक्षणासाठी त्या पुण्यात येऊन बिऱ्हाड करून राहिल्या. या बहिणीची मुले सोनोपंतांना 'सोनूमामा' म्हणत होती. पुढे तेच नाव सर्वत्र रूढ झाले. सोनूमामांचे मूळ घराणे कोकणातील वायंगणीचे. पुढे ते केळवे-माहीमला स्थलांतरित झाले आणि नंतर ठाणे जिल्ह्यातील पालघर येथे दांडेकर परिवार कायमचा स्थायिक झाला. सोनूमामाची बहीण काशीबाई ऊर्फ जिजी या स्वत: अत्यंत धार्मिक होत्या. त्या निष्ठावंत वारकरी होत्या. वारकरी संप्रदायातील थोर निरूपणकार विष्णुपंत जोग महाराज यांच्या प्रवचन-कीर्तनास त्या नित्यनेमाने जात होत्या. त्यांनी सोनूमामांना

प्रथम जोग महाराजांकडे नेले व त्यांचा परिचय करून दिला. विष्णुपंत जोग हे पुण्यातील नामवंत पैलवान होते. ते एका तालमीचे उस्ताद होते. तद्वतच त्यांचा ज्ञानेश्वरी, तुकाराम गाथा हा जीवननिष्ठेचा विषय होता. हळूहळू सोनूमामांचा विष्णुपंतांकडे ओढा वाढत गेला. वयाच्या अवघ्या बाराव्या वर्षी, १९०८ साली सोनूमामांना गुरुवर्य विष्णुपंतांचा अनुग्रह लाभला व सोनूमामा तुळशीची माळ धारण करून वारकरी झाले.

मामा सोळा वर्षांचे असताना त्यांचे वडील निधन पावले. ते १९१७ साली पदवीधर झाले. फर्गसन महाविद्यालयात त्यांना थोर चिंतक, तत्त्वज्ञ गुरुदेव रानडे यांचा अध्यापक म्हणून सहवास लाभला.



गुरुदेवांच्या देशी व पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाचा गाढा अभ्यास व व्यासंग होता. त्यामुळे सोनूमामांना तत्त्वज्ञानाची आवड निर्माण झाली. गुरुदेवांच्या मार्गदर्शनाखाली मामांनी पाश्चात्त्य तत्त्वज्ञानांचा अभ्यास केला आणि एम.ए.ची पदवी प्राप्त केली.

शिक्षण पूर्ण होताच शिक्षण प्रसारक मंडळ संस्थेत ते प्राध्यापक म्हणून नोकरीस लागले. नोकरीच्या अध्यापनाचा वेळ सोडून राहिलेला सर्व वेळ त्यांनी ज्ञानेश्वरी, तुकाराम गाथा अशा संत वाङ्मयाच्या प्रचारार्थ वेचला. वारकरी संप्रदायाच्या कार्यासाठी समर्पित भावाने खर्च केले. शनिवार, रविवार व सुटीच्या दिवशी ते खेडोपाडी कीर्तन-प्रवचनासाठी जात. त्यांचे विचार, त्यांचा आचार, त्यांचे दर्शन पाहणाऱ्या-ऐकणाऱ्यास प्रसन्न करणारे होते. नि:स्पृहता, सेवाभाव, निष्ठा यांचा त्रिवेणी संगम त्यांच्या व्यक्तिमत्त्वात झालेला होता.

अत्यंत साधे, स्वच्छ, टापटीप राहणे हीच त्यांची खरी ओळख होती. प्राचार्य म्हणून कार्यरत असतानाही त्यांची साधुवृत्ती सदैव जागृत होती. अनेक गरीब विद्यार्थ्यांची फी आपल्या पगारातून भरणारे ते एक साधुतुल्य प्राचार्य होते. संत ज्ञानेश्वरांनी तेराव्या शतकात लिहिलेल्या ज्ञानेश्वरीचा मामांनी ओवीश: सुलभ गद्य भावानुवाद केला व ज्ञानेश्वरी खेडोपाडी, घराघरांत नेली. 'सार्थ ज्ञानेश्वरी' हे मामांचे वारकरी समाजावर फार मोठे




**वारकरी शिक्षण संस्था**

अक्षय ऋण आहे. संत ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरी लिहिली असली तरी, 'मामा दांडेकरांची ज्ञानेश्वरी' म्हणून 'सार्थ ज्ञानेश्वरी' प्रत समस्त वारकरी संप्रदायात व अभ्यासकांमध्ये अधिक लोकप्रिय आहे. त्याशिवाय 'ईश्वरवाद', 'प्लेटो आणि ज्ञानेश्वरी', 'वारकरी संप्रदायाचा इतिहास' असे मोजकेच पुस्तक लेखन त्यांच्या हातून घडलेले आहे. 'प्रसाद' या मासिकात त्यांनी खूप लेखन केले. गुरुवर्य जोग महाराज यांच्यावर मामांची अढळ निष्ठा होती. जोग महाराजांनी आळंदी येथे सुरू केलेली 'वारकरी शिक्षण संस्था' पुढे अनेक वर्षे सोनूमामांनी सेवाभावाने चालविली. तेथे ते वारकरी विद्यार्थ्यांना शिकवत असत.

मामासाहेब दांडेकर व धुंडा महाराज देगलूरकर यांना वारकरी संप्रदायातील राम-लक्ष्मणाची जोडी म्हटले जात. त्या दोघांनी बैलगाडीतून हजारो गावांचे दौरे केले. कीर्तन-प्रवचनांनी अवघा महाराष्ट्र ढवळून काढला. नेवासा येथे बांधण्यात आलेल्या ज्ञानेश्वरी मंदिराच्या शिखरावर कळस बसवण्याचा मान सर्व संतांनी एकमुखाने मामांना दिला होता. त्यांनी कीर्तन-प्रवचन या सेवेबद्दल कधीही मानधन, बिदागी घेतली नाही. त्यांच्या निधनानंतर पुण्यातून त्यांची अंत्ययात्रा आळंदीस नेण्यात आली. इंद्रायणीकाठी अंत्यसंस्कार करून तेथेच त्यांची समाधी बांधण्यात आली.

– विद्याधर ताठे

## दासगणू महाराज
***सहस्रबुद्धे, गणेश दत्तात्रेय***
**संतकवी, संतचरित्रकार, कीर्तनकार**
**१८६७ – २५ नोव्हेंबर १९६२**



**आ**धुनिक महिपती म्हणून मराठी सारस्वतामध्ये ज्यांचा मोठ्या आदराने उल्लेख केला जातो, त्या संतकवी दासगणू महाराज यांचा जन्म अहमदनगर जिल्ह्यातील अकोळनेर गावी आजोळी, दाभोळकर यांच्या घरात, पौष शुद्ध एकादशीच्या दिवशी सकाळी सूर्योदयासमयी झाला. त्यांचे 'नारायण' नाव ठेवून बारसे करण्यात आले; पण आजोबांनी त्यांचे नाव 'गणेश' ठेवले व पुढे तेच नाव सर्वत्र झाले.

गणेश दत्तात्रेय सहस्रबुद्धे तथा दासगणू महाराजांच्या आईचे नाव सई ऊर्फ सावित्री होते. दासगणूंची बुद्धी लहानपणापासूनच तल्लख होती; पण त्यांना शालेय शिक्षणाची गोडी वाटत नव्हती. वयाच्या सोळाव्या वर्षी ते इंग्रजी इयत्ता तिसरीतच होते. अखेर वयाच्या विसाव्या वर्षी इंग्रजी चौथी पूर्ण करून त्यांनी शिक्षणास रामराम केला. वडीलधाऱ्यांनी त्यांना नोकरीसाठी बडोद्यास मावशीकडे (श्री. बळवंत गोडबोले) पाठविले; पण केवळ नऊ महिन्यांतच ते नोकरीला कंटाळले व नोकरी सोडून नगरला (कोडत गल्लीत सहस्रबुद्धे वाडा होता) परत आले. दासगणू यांचे १८९१ साली बोरले आष्ट्याचे जहागीरदार नारायणराव रानडे यांच्या कन्येशी लग्न झाले. हा लग्नसोहळा पुण्यात जहागिरदारी थाटाने पार पडला. दासगणूंचे समाजाच्या तळागाळातील, तमाशाची आवड असणारे मित्र, नोकरी न करता दिवसरात्र भटकंती यांमुळे घरातील वडीलधाऱ्यांशी तीव्र मतभेद झाले व दासगणूंनी घराचा त्याग केला.

चुलते मामलेदार असल्यामुळे दासगणूंना कोठेही उत्तम नोकरी मिळणे शक्य होते; पण 'यापुढे मी कोणाचेही नाव न सांगता स्वत:च्या हिमतीवरच जगेन व नाव कमवून दाखवेन' या निर्धारानेच त्यांनी घर सोडले.

पुढे नगरचे पोलीस अधिकारी श्री. एम. केनेडी यांची दासगणूंशी भेट झाली व त्यांनी दासगणूंना पोलीस खात्यात भरती करून घेतले. त्या काळी ब्रिटिश लोक उच्चवर्णीय प्रतिष्ठितांना नोकरीत थेट भरती करून घेत होते. दासगणूंना पोलिसांचे ७२७ क्रमांकाचे बक्कल मिळाले. दासगणूंनी एकूण अकरा वर्षे पोलीस हवालदार म्हणून नोकरी केली व थोर संत, शिर्डीचे साईबाबा यांच्या सांगण्यावरून त्यांनी ब्रिटिश चाकरीचा राजीनामा दिला. नोकरीच्या काळातील कान्ह्या भिल्लाचे प्रकरण हे दासगणूंच्या मूळच्या आध्यात्मिक प्रवृत्तीला वेगळे वळण देणारे ठरले. पोलीस खात्यात नोकरीस असतानाच त्यांची भेट वामनशास्त्री इस्लामपूरकर या विद्वान अधिकारी, सत्पुरुषाशी झाली. या शास्त्रीजींकडून त्यांनी अनुग्रह घेतला व पूर्वाश्रमीच्या गणेश सहस्रबुद्धे यांचे नाव 'दासगणू' झाले. 'दासगणू' किंवा 'गणूदास' अशा प्रकारे हे नाव त्यांच्या सर्व काव्यांत-लेखनांत दिसून येते. वामनशास्त्री हे स्वत: रामदासी असूनही त्यांनी शिष्य दासगणूला पंढरीची वारी नित्यनेमाने करण्यास सांगितली. दासगणू मूळचे कट्टर शिवभक्त; पण गुरु-आज्ञेमुळे ते पंढरीची वारी करू लागले व कालांतराने त्यांना 'हरिहरा नाही भेद' अशी प्रचिती आली.

गुरू वामनशास्त्र्यांनी काशीला जाऊन उर्वरित काळ गंगातीरी घालवण्याचे ठरविले तेव्हा शिष्य दासगणूला ''शिर्डीचे साईबाबा व मी एकच आहोत, आता यापुढे तेच तुझे कल्याण करतील,'' असे सांगून शिर्डीला

द

जाण्यास सांगितले. नगरच्या कलेक्टरचे चिटणीस नानासाहेब चांदोरकर हे दासगणूंना शिर्डीच्या साईबाबांकडे घेऊन गेले आणि अशा प्रकारे पुढे दासगणू साईबाबांच्या प्रमुख शिष्यांपैकी मुख्य शिष्य बनले. साईबाबांच्या निर्वाणानंतर म्हणजे १९१८ ते १९३६-३७ पर्यंत दासगणू महाराज हेच शिर्डीच्या साईबाबा संस्थानाचे अध्यक्ष होते. या काळात होणाऱ्या उत्सवांना थोडेच साईभक्त असत व उत्सवाचा खर्च भागविण्यासाठी दासगणू उसने पैसे आणून नंतर आपल्या कीर्तन सेवेच्या बिदागीतून फेडत असत हा इतिहास आहे. आज शिर्डीच्या साईबाबांची जी भक्ती पसरलेली दिसते, त्यामागे दासगणू महाराजांच्या प्रभावी कीर्तनाचे फार मोठे योगदान आहे. तसा स्पष्ट उल्लेख 'श्री साईसच्चरिता'तही करण्यात आलेला आहे.

द

श्री दासगणू यांना ९२ वर्षांचे प्रदीर्घ आयुष्य लाभले होते. त्यांनी अखेरपर्यंत पारमार्थिक लेखन केले. त्यांच्या या प्रचंड लेखनामुळे व संतचरित्रांमुळे त्यांचा 'आधुनिक महिपती' या नावाने गौरव केला जातो. या सर्व लेखनामागे श्री साईबाबांची प्रेरणा आहे, असे त्यांनी वेळोवेळी काव्यात नमूद केलेले आहे. *'शिर्डी माझे पंढरपूर । साईबाबा रमावर ॥'* ही शिर्डीत सतत गायली जाणारी साईबाबांची आरती दासगणू यांनीच लिहिलेली आहे. दासगणू यांच्या साहित्याचे दहा खंड प्रकाशित झालेले आहेत. त्यांमध्ये अनेक अज्ञात, अपरिचित संतांची चरित्रे, आख्यान काव्ये, अनेक ग्रंथांवरच्या टीका अशी विविधता आहे. 'संतकथामृत', 'भक्तिलीलामृत', 'भक्तिरसामृत', 'गजानन विजय' हे त्यांचे ग्रंथ भाविकवर्गात विशेष लोकप्रिय आहेत.

दासगणूंच्या कीर्तनाचा प्रभाव एवढा होता, की ३०-४० हजार लोक जवळपासच्या गावांतून बैलगाड्या घेऊन येत असत. महामहोपाध्याय द.वा. पोतदार, थोर विचारवंत शि.म. परांजपे यांनी 'असा प्रभावी कीर्तनकार आम्ही दुसरा पाहिलेला नाही,' अशा शब्दांत दासगणूंच्या कीर्तनाचा गौरव केलेला आहे. महाराष्ट्रातील थोर विचारवंत प्राचार्य अनंतराव आठवले यांनी दासगणूंचे समग्र वाङ्मय अनेक खंडांत प्रकाशित केलेले आहे. स्वामी रामकृष्ण-विवेकानंद, संत निवृत्तिनाथ-ज्ञानेश्वर यांच्याप्रमाणेच 'दासगणू व प्राचार्य अ.दा. आठवले' या गुरुशिष्याची जोडी असून शिष्याच्या कार्यकर्तृत्वाने गुरूचा महिमा वाढविणारे शिष्य व उत्तराधिकारी प्राचार्य अ.दा. आठवले यांच्या रूपाने दासगणूंना लाभले. कार्तिक वद्य १३, १९६२ साली संत ज्ञानदेव पुण्यतिथीच्या दिवशी श्रीक्षेत्र पंढरपूर येथे संतकवी दासगणूंनी आपला देह ठेवला. पंढरपूर येथे त्यांचा 'दामोदर आश्रम' असून नांदेड जिल्ह्यातील गोरटे येथे त्यांचे स्मृती मंदिर व 'दासगणू प्रतिष्ठान' नावाची संस्था कार्यरत आहे.

— विद्याधर ताठे

**संदर्भ :**


१. *प्रा. आठवले अ.दा.; 'दासगणू चरित्र व काव्य विवेचन'.*

२. *जोशी, म.द.; संपादक : 'दासगणू दर्शन'.*

३. *जोशी, प्र.न.; 'मराठी वाङ्मयाचा इतिहास'.*

४. *दाभोळकर; 'श्रीसाईसच्चरित'.*


## दिगंबरदास महाराज

***जोशी, विठ्ठल गणेश***

**दत्तसंप्रदाय, शिवसृष्टी निर्माता**

**१७ ऑक्टोबर १९१२ - १९८९**

अक्कलकोटस्वामींचे प्रत्यक्ष 'अवतार' असलेल्या रावसाहेब तथा बाबामहाराज सहस्रबुद्धे यांच्या समर्थ शिष्यवर्गातील एक अग्रणी शिष्योत्तम म्हणजे विठ्ठल गणेश जोशी ऊर्फ 'दिगंबरदास महाराज' होत. विठ्ठल जोशी यांचे घराणे वैदिकनिष्ठ व धर्मपरायण असून त्यांचे मूळ गाव गणपतिपुळे जवळील 'वरवडे' होते. हे घराणे पुढे पोमेंडी येथे स्थलांतरित झाले. या पोमेंडी गावातच अश्विन शुद्ध अष्टमीच्या दिवशी विठ्ठल यांचा जन्म झाला. त्यांच्या आईचे नाव जानकी होते. त्यांना कृष्णाबाई नावाची सावत्र आई होती.

विठ्ठल जोशी यांचे प्राथमिक शिक्षण पोमेंडीत, तर माध्यमिक शिक्षण रत्नागिरीत झाले. त्यांना शिक्षणाची



फारशी आवड नव्हती. लहान वयातच त्यांना जलोदराचा आजार झाला व केवळ देवकृपेनेच त्यांचा पुनर्जन्म झाला. या काळात त्यांच्या आजीने नातवासाठी दिवसरात्र जागून घराण्यातील उपास्य दैवत मारुतीची उपासना केली. ही घराण्याची मारुती उपासना पुढे विठ्ठल जोशी यांना लाभली. लहानपणापासूनच त्यांना श्रीराम, मारुती, विठ्ठल अशी देवदेवतांच्या पूजेची आवड होती. त्यांना व्यायामाचीही भारी आवड होती.

पुढे त्यांच्या जीवनात दत्तोपासनेचा उदय झाला व ते एकनिष्ठ दत्तभक्त झाले. शालेय जीवनातच त्यांच्यावर राष्ट्रभक्तीचे संस्कार झाले. रत्नागिरीत वीर सावरकरांची त्यांनी दर्शनभेट घेतली व त्यांच्या मनातील राष्ट्रभक्ती अधिक जाज्वल्य, प्रखर झाली. शालेय शिक्षणाच्या काळातच विठ्ठल जोशी गुरूच्या शोधार्थ घरातून पळून गेले. भटकत भटकत ते नाशिकला श्री बीडकर महाराजांच्या मठात गेले. तेथे बीडकर महाराजांचे परमशिष्य रावसाहेब तथा बाबा सहस्रबुद्धे यांनी छोट्या विठ्ठलाला पाहून त्यांनी विचारले, ''काय विठ्ठला, घरी न सांगताच पळून आला का?'' एका अपरिचित व्यक्तीने आपणांला नावासह हाक मारली व काहीही माहिती नसताना घरातून न सांगता पळून आल्याचे ओळखल्याचे छोट्या विठ्ठलाला खूप आश्चर्य वाटते. दोघांची दृष्टादृष्ट झाली आणि हेच आपले गुरू, आपण यांचाच शोध घेण्यासाठी बाहेर पडलो होतो याची जाणीव छोट्या विठ्ठलला झाली. त्याने मनोमन रावसाहेबांना गुरुस्थानी मानले. त्यांच्या उपदेशानुसार विठ्ठल पुनश्च रत्नागिरीला तृप्त मनाने परतला. त्याने जमेल तेव्हढे शिक्षण पूर्ण केले. नोकरीसाठी ते कल्याणला मावशीकडे गेले. तेथे डॉ. बोस यांच्या औषधनिर्मिती व विक्री कंपनीत विठ्ठलरावांना औषध विक्रेता (एम.आर.) म्हणून नोकरी मिळाली. त्यांनी १९३७ ते १९४६ अशी दहा वर्षे उत्तम प्रकारे नोकरी केली. पण १९४६ साली अचानक नोकरी सोडून ते पुनश्च रत्नागिरीला परतले.

दरम्यान, १९४२ मध्ये विठ्ठलराव यांची थोर सत्पुरुष रामचंद्र नरसिंह वहाळकर ऊर्फ दिगंबरदादा यांच्याशी भेट झाली. पुढे ४-५ वर्षे त्यांचा सहवासही लाभला. विठ्ठलरावांच्या अंतरंगात परमार्थाची - साधनेची ज्योत अधिक प्रखर झाली. १९४९ मध्ये पावस येथे त्यांची भेट स्वामी स्वरूपानंदांशी झाली. स्वामींची 'अभंग ज्ञानेश्वरी' पाहून ती ग्रंथरूपाने प्रकाशित करण्याची जबाबदारी विठ्ठलराव यांनी घेतली. लोकवर्गणीतून ग्रंथाचे प्रकाशन करण्यात आले. या ग्रंथास विठ्ठलरावांची 'सुमनांजली' नावाची प्रस्तावना आहे. पुढे काही मुद्द्यांवर विठ्ठलरावांचे तेथे मतभेद झाले व ते पावसला रामराम करून पुनश्च रत्नागिरीला परतले.

२४ जुलै १९५३ हा दिवस विठ्ठलरावांच्या जीवनातील धन्यतेचा, कृतार्थतेचा दिवस म्हणून उगवला. या दिवशी पुणे येथे त्यांचे सद्गुरू रावसाहेब सहस्रबुद्धे यांनी आपली सर्पमुखी अंगठी व एक वळे आपल्या बोटातून काढून विठ्ठलरावांच्या बोटात घातली. जणू आपली शक्ती, आपला आशीर्वादच अंगठीच्या रूपाने विठ्ठलरावांना प्रदान केला. रावसाहेबांच्या आज्ञेने ते पुनश्च रत्नागिरीला परतले.

त्यानंतर १८ ऑगस्ट १९५४ रोजी सद्गुरू रावसाहेब सहस्रबुद्धे यांचे पुण्यात निर्वाण झाले. रावसाहेबांची कन्या निर्मला खरे (वर्धा) हिच्या नावावरील फर्गसन रस्त्यावरील ज्ञानेश्वर पादुका चौकाजवळील एक प्लॉट विठ्ठलरावांनी भाडेपट्ट्याने घेतला व त्या प्लॉटवर सद्गुरू

द

रावसाहेबांचे समाधी मंदिर बांधले. सध्या या मंदिराशेजारीच विठ्ठलराव जोशी तथा दिगंबरदास यांचे समाधी मंदिर आहे.

हिंदुधर्मनिष्ठेप्रमाणेच जाज्वल्य राष्ट्रनिष्ठा हे विठ्ठलरावांचे वैशिष्ट्य होते. त्यामुळे त्यांनी चिपळूणजवळ डेरवण येथे छत्रपती शिवाजी महाराजांच्या पराक्रमी जीवनाचे दर्शन घडविणारी शिवसृष्टी उभी केली. इतर धार्मिक उत्सव व हिंदूंचे सण सर्व महाराजमंडळी साजरी करतात.

छत्रपती शिवाजी जयंती उत्सव साजरा करण्याची पद्धत विठ्ठलरावांनी सुरू केली. आजही पुणे व डेरवण या दोन्ही ठिकाणी शिवजयंती उत्सव मोठ्या भव्यदिव्य प्रकारे साजरा केला जातो. सनातन वैदिक धर्मरक्षण, विश्वशांतियज्ञ, अनुष्ठाने यांप्रकारे त्यांनी प्रचंड राष्ट्रीय, धार्मिक व सामाजिक कार्य उभे केलेले आहे. त्यांनी डेरवण परिसराचा सर्वांगीण विकास उपक्रम हाती घेतला व विहिरी, शाळा, मोफत दवाखाना, शेतीचे प्रशिक्षण, जोडधंद्याची माहिती व आर्थिक मदत अशी अनेक प्रकारची कार्ये केली. त्यांच्या नावावर विपुल ग्रंथसंपदा आहे. त्यांच्यासंबंधीचा 'तूचि बाप धनी' हा ग्रंथ त्यांच्या समग्र जीवनाचे व कार्याचे शब्ददर्शन आहे. आपल्या कार्याची धुरा उत्तराधिकारी म्हणून मानसपुत्र अशोकराव ऊर्फ काकामहाराज यांच्यावर सोपवून विठ्ठलराव ऊर्फ दिगंबरदास महाराजांनी या जगाचा निरोप घेतला.

- विद्याधर ताठे

**संदर्भ :**

*१ 'तूचि बाप धनी'. २. संतचरित्र : नरहरी प्रभू.*

## देगलूरकर, धुंडामहाराज

***देगलूरकर, धुंडीराज रामचंद्र***

**वारकरी संप्रदाय, कीर्तनकार, प्रवचनकार**

**१९०४ – १९९१**



**वा**रकरी संप्रदायातील अग्रणी घराण्यांपैकी देगलूरकर घराणे हे एक आहे. गेली २५० वर्षे हे घराणे वारकरी भक्तिसंप्रदायाचा वसा व वारसा निष्ठेने, समर्पित भावाने जतन-संवर्धन करीत आहे. या घराण्याची भक्तिपताका गुंडामहाराज, महिपती महाराज, धुंडामहाराज, बंडामहाराज, गुंडामहाराज (तृतीय), भानुदास महाराज, एकनाथ महाराज, चंद्रशेखर महाराज, चैतन्य महाराज अशा एकापेक्षा एक विद्वान निरूपणकार भगवद्भक्तांनी फडकत ठेवलेली आहे.

धुंडामहाराज यांचा जन्म ह.भ.प. गुंडामहाराज देगलूरकर यांच्या संत घराण्यात इ.स. १९०४ (वैशाख शु. ३, शके १८२६) मध्ये झाला. त्यांचे जन्मनाव 'धुंडीराज' असे ठेवण्यात आले. त्यांच्या वडिलांचे नाव रामचंद्र व आईचे मनूबाई होते. त्यांचे प्राथमिक शिक्षण देगलूर येथे झाले. श्री. रघुनाथ कोरडे मास्तर (कायगावकर) यांनी घरी येऊन धुंडामहाराज व त्यांच्या भावंडांना संस्कृत, मराठी व उर्दू शिकवले. तसेच, धुंडीराजाच्या गानशिक्षणासाठी हैद्राबादचे नामवंत गवई पं. विनायकबुवा यांना देगलूरच्या वाड्यात ठेवून घेण्यात आले होते.

पुढे कोरडे मास्तरांची औरंगाबादला बदली झाली तेव्हा मास्तरांसमवेतच धुंडामहाराज यांना माध्यमिक शिक्षणासाठी औरंगाबादला पाठविण्यात आले. धुंडामहाराज लहान असतानाच त्यांच्या वडिलांचे निधन झाले. त्यानंतर काही वर्षांतच आईचेही निधन झाले. मातापित्यांचे छत्र हरपल्यावर त्यांचे काका, थोर संत

ह.भ.प. महिपती महाराज यांनी धुंडामहाराज यांचे पंढरपूर येथे पुत्रवत संगोपन केले. धुंडामहाराजांच्या मातुःश्री मनूबाई यांची इच्छा धुंडामहाराजांनी आधुनिक शिक्षण घेऊन वकील व्हावे अशी होती; पण पंढरपूरच्या मठात महिपती महाराज देगलूरकर यांना भेटण्यास ह.भ.प. विष्णुपंत जोग महाराज आले असता छोट्याशा धुंडीराजची हुशारी पाहून ''याला इंग्रजी शिक्षण न देता वारकरी सांप्रदायिक शिक्षणाचे, संस्कृत, मराठी संतसाहित्याचे धडे द्या,'' असे सुचवून गेले. यानंतर पालक महिपती महाराज यांनी खुद्द धुंडीराजलाच, ''तुला काय शिकायचे आहे?'', असे विचारून वारकरी सांप्रदायिक शिक्षणाची पंढरपुरातच सोय केली. पंडितप्राण भगवानशास्त्री धारुरकर, वेदशास्त्रसंपन्न गोपाळशास्त्री गोरे यांच्यासारख्या उच्च कोटीतील विद्वानांकडे धुंडामहाराजांचे संस्कृत तत्त्वग्रंथांचे, शास्त्रांचे गुरुकुल पद्धतीने शिक्षण झाले. अहोरात्र संतसाहित्याचे अध्ययन, चिंतन आणि संस्कृत ग्रंथांचे परिशीलन, तसेच पारंपरिक भजन यांचा ध्यास घेतलेली काही वर्षे गेली आणि वयाच्या विसाव्या वर्षी धुंडामहाराजांनी ज्ञानेश्वरीवर पहिले प्रवचन करून आपल्या ज्ञानेश्वरीसेवेचा श्रीगणेशा केला. आषाढ, शके १८४६ (इ.स. १९२४) मध्ये प्रारंभ झालेला हा ज्ञानेश्वरीसेवेचा वाग्यज्ञ पुढे अखंड, धुंडामहाराजांच्या निर्वाणापर्यंत शके १९१३ (इ.स. १९९१) पर्यंत सलग ६५ वर्षे सुरू होता.

धुंडामहाराजांचे जीवन म्हणजे पाच तपे, सहा दशकांपैकी अधिक प्रदीर्घ ६०-६५ वर्षांचा जनप्रबोधनाचा धर्मकीर्तन सोहळा आहे. वर्षातील ४ महिने चतुर्मासानिमित्त पंढरपूरमध्ये राहणे व उर्वरित ८ महिने उभ्या महाराष्ट्रातीलच नव्हे, तर आंध्र-कर्नाटकमधील हजारो खेड्यांमध्ये विविध नामसोहळ्यांत कीर्तन आणि प्रवचन करणे हेच त्यांचे अंगीकृत प्रबोधन कार्य होते. वृद्धापकाळी ते हृदयविकाराच्या आजाराने अस्वस्थ होते तेव्हा डॉक्टर म्हणाले, ''थोडा काळ प्रवचन करणे बंद करा, आराम घ्या.'' यावर धुंडामहाराज म्हणाले, ''ज्ञानेश्वरीवर बोलायचेच नाही, तर मग मी जगायचे कशाला? ज्ञानेश्वरीसेवा करीतकरीतच माझ्या जीवनाची सांगता होऊ दे.'' आणि ईश्वरीकृपेने त्यांना अखेरपर्यंत प्रवचनसेवा करता आली.

धुंडामहाराजांचे कीर्तन हा 'भक्ति-ज्ञानाचा संगम आहे', अशी महाराष्ट्रातीलच विद्वानांनी नव्हे, तर काशीच्या द्रविडशास्त्रींनीही प्रशस्ती केलेली आहे. धुंडामहाराज जसे उत्तम प्रवचनकार, कीर्तनकार होते, तसेच ते उत्तम लेखकही होते. त्यांची ग्रंथसंपदा त्यांच्या प्रज्ञा-प्रतिभेची धवल पताकाच आहे. 'संत ज्ञानदेव हरिपाठ विवरण', 'संत एकनाथ हरिपाठ विवरण', 'नारदभक्तिसूत्र विवरण', 'संतवचनामृत', 'ज्ञानदेवांचे पसायदान' हे ग्रंथ वारकऱ्यांमध्ये, अभ्यासकांमध्ये विशेष वाचकप्रिय ठरलेले व संदर्भ ग्रंथांचे स्थान लाभलेले ग्रंथ आहेत. धुंडामहाराजांची विद्वत्ता, व्यासंग, प्रभावी वक्तृत्व, विचारगर्भ चिंतनात्मक लेखन आणि भक्तिरसपरिपूर्ण कीर्तन यांमुळे त्यांच्याकडे 'पेशवे' पुरस्कार, पुणे विद्यापीठाचा 'ज्ञानदेव' पुरस्कार, असे अनेक पुरस्कार चालून आले. त्याचप्रमाणे अ.भा. कीर्तनकार संमेलन, नाशिकचे अध्यक्षपद, गोव्यातील कीर्तन परिषदेचे अध्यक्षपद, विश्व हिंदू परिषदेच्या आळंदी येथील हिंदू संमेलनाचे अध्यक्षपद, अशा अनेक संमेलनांची अध्यक्षपदेही त्यांनी भूषविलेली आहेत.

धुंडामहाराजांनी संत एकनाथांसारखा गृहस्थाश्रम धन्य केला. त्यांची चारी मुले उच्चविद्याविभूषित असून त्यांपैकी ह.भ.प. भानुदास महाराज यांनी धुंडामहाराज यांचा उत्तराधिकारी म्हणून वारकरी सांप्रदायिक वारसा पुढे चालविला आहे. सध्या भानुदास महाराजांचे सुपुत्र ह.भ.प. चैतन्य महाराज हे धुंडामहाराजांप्रमाणे, वारकरी संप्रदायात देगलूरकर घराण्याच्या नामभक्तीचा, ज्ञानेश्वरी प्रवचनसेवेचा नावलौकिक वाढवीत आहेत. पंढरपूर येथेच पौष वद्य पंचमी, शके १९१३ रोजी धुंडामहाराज यांचे निधन झाले आणि ती वार्ता ऐकून त्याच दिवशी पत्नी कृष्णाबाई यांचीही प्राणज्योत मालवली. दोघांची एकत्रित निर्वाणयात्रा काढण्यात आली होती.

- विद्याधर ताठे

द

## देवधर, बापूसाहेब

***देवधर, सखाराम कृष्ण***

**गायत्रीमंत्राचे उपासक, ज्ञानेश्वरीचे अभ्यासक**

**१० मार्च १९२६ – ४ जानेवारी १९९७**



गायत्रीचे थोर साक्षात्कारी उपासक आणि ज्ञानेश्वरीचे व्यासंगी अधिकारी, वेदमूर्ती सखाराम कृष्ण तथा बापूसाहेब देवधर यांचा जन्म फाल्गुन वद्य एकादशी (पापमोचनी एकादशी) च्या दिनी, किर्लोस्करवाडी येथे झाला. त्यांच्या आईचे नाव सरस्वतीबाई होते. हे अद्‍भुत बालक जन्मण्यापूर्वी सरस्वतीबाईंना पहाटे स्वप्नात एक साधुपुरुष दिसला आणि 'मी तुझ्या पोटी जन्माला येतोय' असे सांगून अदृश्य झाला होता. बारशाच्या दिवशी पहाटे तो सत्पुरुष पुन्हा स्वप्नात येऊन त्यांना म्हणाला, ''सरस्वती! मला ओळखले का? मी सखाराम, बारसे करताना माझे नाव बदलू नको हं!'' या स्वप्नदृष्टान्ताप्रमाणेच बालकाचे नाव 'सखाराम' ठेवण्यात आले.

देवधर घराणे मूळचे कोकणातील पालगडचे. नोकरीनिमित्त कृष्णराव देवधर पालगड-कोल्हापूर असे स्थलांतर करीत पुण्यात आले. पुण्यात देवधर कुटुंब मंडईतील ज्या वाड्यात भाड्याने राहत होते, त्याच्या शेजारीच ज्ञानेश्वरीचे अंतरंग उपासक व अधिकारी दादा म्हाळगी राहत असत. सखाराम यांची एकदा दादा म्हाळगींशी नजरानजर झाली आणि दोघांना एकमेकांची ओळख पटली. अवघ्या चौदाव्या वर्षी सखारामला दादा म्हाळगी यांनी अनुग्रह दिला व ज्ञानेश्वरीचा प्रसाद दिला.

मौजीबंधनात वडिलांकडून मिळालेला 'गायत्री मंत्र' आणि सद्‍गुरू दादा म्हाळगी यांच्याकडून मिळालेली 'ज्ञानेश्वरी' हेच बापूसाहेबांचे श्वास-उच्छवास झाले. पुढे त्यांनी २४ लक्ष जपाची अनेक गायत्री पुरश्चरणे केली. गायत्रीदेवीचे प्रत्यक्ष दर्शन झालेल्या साक्षात्कारी पुरुषांमध्ये त्यांची गणना होते. 'गायत्री मंत्र आणि उपासना', 'ओंकार किमया' हे त्यांचे ग्रंथ गायत्री उपासकांचे गीता-भागवत समजले जातात.

ज्ञानेश्वरीबरोबरच सकल संतवाङ्मयाचा त्यांचा सूक्ष्म अभ्यास होता. तसेच वेद आणि उपनिषदे, वैदिक वाङ्मय, संस्कृत वाङ्मय, पुराणे हे त्यांच्या विशेष व्यासंगाचे विषय होते. प्रसाद प्रकाशनाच्या 'आपले वेद आपली पुराणे' या ग्रंथमालिकेचे ते एक मुख्य लेखक होते. गायत्री व ओंकाराची त्यांची उपासना सिद्धीस गेलेली होती. त्यांना १९५४ साली एका हिमालयनिवासी साधूने ओंकार रहस्य समजावून सांगितले आणि विशेष ओंकार विद्या प्रदान केली. त्यांनी मुलांप्रमाणे मुलींच्या मुंजी करून त्यांना गायत्री उपासनेचा अधिकार दिला होता. त्यांनी अनेक ठिकाणी मुलींच्या मुंजींचे सामूहिक सोहळे घेतले होते.

बापूसाहेब देवधरांना ज्ञानेश्वरीच्या ९००० ओव्या तोंडपाठ होत्या. वेद-उपनिषद ग्रंथांपेक्षाही 'ज्ञानेश्वरी'वर त्यांची दांडगी श्रद्धा व निष्ठा होती. 'कथा ज्ञानेश्वरी', 'ज्ञानदेवीची गौरवगाथा' या ग्रंथांशिवाय ज्ञानेश्वरीवर त्यांनी विपुल लिखाण केलेले आहे.

मध्यमवर्गीय नोकरदार कुटुंबात जन्म झाल्याने लहानपणापासूनच बापूंनी अनेक प्रकारची अंगमेहनतीची कामे करीत 'कमवा-शिका' असे आपले शिक्षण पूर्ण केले. प्राचार्य सोनोपंत दांडेकरांनी बापूंची महाविद्यालयीन परीक्षा फी भरली होती.

बापूसाहेब देवधरांनी सिनेमा ऑपरेटर, कन्याशाळेत शिक्षक आणि अखेरीस महाराष्ट्र शासनाच्या सहकार

खात्यात लेखनिक अशा अनेक नोकऱ्या केल्या. सहकार खात्यात बढती मिळवत ते उपनिबंधक झाले व एक गॅझेटेड ऑफिसर म्हणून निवृत्त झाले. नोकरीच्या काळात त्यांच्या अनेक ठिकाणी बदल्या झाल्या व त्या त्यांनी आनंदाने स्वीकारल्या आणि सर्व ठिकाणी ईश्वरनिष्ठांची मांदियाळी जमवत आपली उपासना- आध्यात्मिक साधना सतत वृद्धिंगत केली.

त्यांनी आपला वेगळा संप्रदाय स्थापन केला नाही अथवा गादी किंवा मठही निर्माण केला नाही. अशा उपाधीपासून दूर राहण्याचा त्यांचा स्वभाव होता. त्यांची ग्रंथसंपदा आध्यात्मिक वाङ्मयातील एक समृद्ध दालन आहे. 'स्वामी रामतीर्थ', 'चांगदेव', 'वीरमंगल', 'विसोबा खेचर', 'हैबतबाबा पवार', 'स्तोत्र परिमल', 'श्रीसूक्त', 'पुरुषसूक्त', 'रुद्रोपासना', 'श्री शिवपूजाविधान', 'सौरसूक्त', 'अंजनेय', 'आचार्यांचे गीताभाष्य', 'संत प्रल्हादमहाराज बडवे चरित्र', 'सौभाग्यव्रते', 'उमज', 'संस्कार महिमा' या त्यांच्या पुस्तकांच्या अनेक आवृत्त्या वाचकप्रिय ठरलेल्या आहेत. बापूसाहेब देवधर हे ४ जानेवारी १९९७ रोजी गोंदवलेकर महाराज पुण्यतिथी दिवशी बेळगावहून पुण्यास एसटीने येण्यास निघाले होते; पण दुर्दैवाने कोल्हापूर बस स्थानकात बसमध्येच त्यांचे आकस्मिक निधन झाले. त्यांच्या शिष्यपरिवारातर्फे गायत्री हवनाचे सामूहिक सोहळे आजही साजरे होतात.

- विद्याधर ताठे

## देवमामलेदार

***यशवंत महाराज***

***देशपांडे, यशवंत वेणीमहादेव***

**समर्थशिष्य, सिद्ध पुरुष**

**१३ सप्टेंबर १८१५ – १० डिसेंबर १८८७**

यशवंत महाराज यांचा जन्म सोलापूर जिल्ह्यातील व श्रीक्षेत्र पंढरपूर तालुक्यातील 'भोसे' या गावच्या वतनदार देशपांडे घराण्यात वेणी महादेव व हीराबाई यांच्या पोटी पुणे येथे झाला. बालपणापासूनच त्यांना देवपूजेची,



भजनाची विशेष आवड होती. देवाच्या मूर्ती घेऊनच ते खेळत. हा कोणी थोर योगभ्रष्ट पुण्यात्माच जन्मला असावा, अशा त्यांच्या बाललीला होत्या. लहानपणीच त्यांनी वेदाध्ययन केले. शालेय शिक्षण पूर्ण करीत कुलकर्णीपणाचे कार्यही शिकून घेतले. यशवंत महाराजांचा १८२७ साली टेंभूर्णी (सोलापूर जिल्हा) येथील जिवाजी देशपांडे यांच्या 'सुंदरा' नावाच्या मुलीशी विवाह झाला. त्यांना १८२९ साली सरकारी खात्यात बदली कारकून म्हणून नोकरी मिळाली. आपली निष्ठा, शिस्त, वक्तशीरपणा या गुणांमुळे बढती घेत ते मामलेदार पदापर्यंत पोहोचले व नोकरीबरोबरच त्यांची आध्यात्मिक साधना सुरू होती. त्यांचा नित्यनेम कधीही चुकत नसे. नोकरीच्या जबाबदाऱ्या, कटकटीची कामे करीत त्यांनी ज्ञाननिष्ठा-वैराग्याची कटाक्षाने जोपासना केली. कोणत्याही मोहाला ते बळी पडले नाहीत. पदाचा, सत्तेचा, अधिकाराचा अहंकार त्यांना कधीच शिवला नाही. आपले माता-पिता हेच त्यांचे खरे देव होते. त्यांचा मातृपितृ- भक्तिभाव आदर्श व श्रेष्ठ दर्जाचा होता.

नामस्मरणांची अखंड साधना अनेक वर्षे चालू असताना त्यांच्या अंतर्मनाला मात्र सतत गुरुभेटीची ओढ लागलेली होती. अखेर सोलापूर जिल्ह्यातील संत दामाजींच्या 'मंगळवेढा' येथे त्यांना अक्कलकोटस्वामी

भेटले. स्वामींनी त्यांच्यावर अनुग्रह केला. या गुरुभेटीने व कृपेने पूर्वपुण्याई फळाला आली, सरकारी नोकरीमुळे त्यांच्या वारंवार बदल्या होत असत; पण प्रत्येक ठिकाणी नोकरी ही जनताजनार्दनाची पूजाच आहे अशा श्रद्धेने ते करीत. त्यांना १८५३ साली जळगाव जिल्ह्यातील चाळीसगाव येथे मामलेदार म्हणून पदोन्नती मिळाली.

त्यांना तीन मुलगे व एक मुलगी झाली; पण ही सर्व अपत्ये बालपणीच निधन पावली. त्यांनी दुःखी पत्नीला सर्व जनताच आपली मुले आहेत असा उपदेश केला व त्यानंतर त्यांच्या पत्नीने कधीही अपत्यहीनतेचे दुःख केले नाही. मामलेदारपदाचा उपयोग ते लोकसेवेसाठी करीत त्यामुळे त्यांच्या पगारापेक्षा त्यांचा खर्च अधिक होऊन ते कर्जबाजारी झाले. काही स्वार्थी लोकांनी त्यांच्यावर काही खोटेनाटे आरोपही केले; पण हाही आपल्या परीक्षेचाच काळ आहे अशा भावनेने ते शांत राहिले. एकदा तर सरकारी चौकश्यांना कंटाळून त्यांनी राजीनामा दिला होता; पण हा पळपुटेपणा आहे, आपली नोकरी ही सेवा आहे, तर मग त्यापासून पळ काढणे योग्य नाही असा त्यांना दृष्टान्त झाला व पुनश्च ते मामलेदार झाले.

मामलेदार पदावर असताना त्यांनी केलेल्या परोपकारी कार्यामुळे व त्यांच्या वागण्याबोलण्यातील संतत्वामुळे सर्व लोक त्यांना ‘देवमामलेदार’ म्हणत. त्यांना अनेक सिद्धी प्राप्त होत्या. त्यामुळे लोकांना अतर्क्य वाटणाऱ्या, चमत्कार वाटाव्यात अशा घटना त्यांच्या जीवनात घडल्या. सरकारने १८७३ साली त्यांना ‘देववेडा’ ठरवून सक्तीने निवृत्त केले.

निवृत्तीनंतरचे उर्वरित आयुष्य त्यांनी गावोगावी जाऊन परमार्थ प्रचार केला. असंख्य लोकांना खऱ्या परमार्थाचा अर्थ सांगितला. नाशिक येथे त्यांना भेटण्यासाठी खुद्द शेगावचे गजानन महाराज आले होते, अशी त्यांची थोरवी होती. नाशिक येथे आजारपणाचे निमित्त होऊन देवमामलेदार यांचे बाहत्तराव्या वर्षी निधन झाले. त्यांच्या निधनानंतर दोन महिन्यांनी त्यांच्या पत्नी सुंदराबाई यांचेही निधन झाले.

- विद्याधर ताठे

द

## देव, शंकर श्रीकृष्ण

***नानासाहेब देव***

**समर्थ संप्रदाय, संतसाहित्य संशोधक**

**१० ऑक्टोबर १८७१ – २३ एप्रिल १९५८**



शंकर श्रीकृष्ण देव यांचा जन्म धुळे येथे झाला. ते शिक्षणासाठी पुण्यात राहायला गेले आणि बी.ए., एलएल.बी. झाले व धुळ्याला वकिली करू लागले. विद्यार्थिदशेत पुणे येथे राहिल्यामुळे त्यांच्यावर चिपळूणकर, टिळक, आगरकर, गोखले यांचा खूप प्रभाव पडला. ते देशभक्तीने भारून गेले. शं.श्री. देव ही महाराष्ट्राच्या जीवनातील लोकमान्यांच्या युगाची व कर्मयोगाची अनमोल देणगी होय. देव यांचे महाविद्यालयीन जीवन पुण्यात लोकमान्यांच्या सावलीत विकसित झाले. त्यांच्या रामदासी व्यासंगाला लोकमान्यांनी अधिकृत मान्यता दिली. युवादशेत अनेक मित्रांना बरोबर घेऊन देवांनी शिवजन्मोत्सव, सार्वजनिक गणेशोत्सव साजरे केले. राष्ट्रीय सभेच्या कार्यात व अधिवेशनात ही तरुण मंडळी झटून कामे करीत. लोकमान्यांच्या चळवळीला उत्तर महाराष्ट्रात पसरविण्याचे श्रेय देवांना आहे. देवांची समर्थभक्ती त्यांच्या कट्टर राष्ट्रधर्म निष्ठेतून निर्माण झाली. रामदासी संप्रदायात, श्रीसमर्थ वाङ्मयात देवांचे लेखन म्हणजे ‘शेवटचा शब्द’ मानले जाते.

रामदासांचे जीवन व साहित्य यासंबंधीच्या संशोधनाला, प्रकाशनाला वाहून घेतलेल्या देवांनी अक्षरश: आपल्या जिवाचे रान केले. अनेकदा महिनेमहिने पायी, खडतर प्रवास केला. समर्थांच्या आणि संप्रदायाच्या विद्यापीठाला शोभेल अशा अनेक मठांतून कालौघात नष्टप्राय होत उरलेल्या हस्तलिखित ग्रंथांचे आणि कागदपत्रांचे त्यांनी चिकाटीने, व्यासंगाने, प्रदीर्घ काळ संशोधन केले. समर्थांच्या वास्तव्याने पुनीत झालेल्या चाफळ, सज्जनगड, शिवथरघळ, जांब आदी स्थानांना देवांनी स्वप्रयासाने सजीव केले.

देवांनी धुळे येथे १८९३ साली ‘सत्कार्योत्तेजक सभा’ या संस्थेची स्थापना केली. देवांनी सखोल अभ्यासानंतर दासबोधाची प्रस्तावना लिहिली. ती ताजी, अवीट गोडीची व प्रेरक वाटते. १९०३ पासून अथक प्रयासाने त्यांनी समर्थांचे साहित्य शोधून काढले. ऐतिहासिक कागदपत्रे व बाडे एकत्र करून, त्याचा चिकित्सकपणे अभ्यास केला, जनतेपर्यंत ते साहित्य पोहोचवून जनमानसात श्रीसमर्थांविषयी चैतन्य प्रज्वलित केले. ‘यत्न तो देव जाणावा’, ‘केल्याने होत आहे रे, आधी केलेच पाहिजे’ या समर्थ उक्तींचे देव म्हणजे साक्षात मूर्तिमंत उदाहरण होते.

देवांनी यत्नपूर्वक अनेक रामदासी वास्तूंचा, मठांचा जीर्णोद्धार केला. समर्थांचे जन्मगाव जांब येथे सुंदर मंदिर उभारून तेथे वार्षिक उत्सव सुरू केले. धुळे येथे ‘श्रीसमर्थ वाग्देवता मंदिर’ उभारून तेथे बाडे व ऐतिहासिक कागदपत्रे सुरक्षित ठेवण्याची व्यवस्था केली. ‘‘श्रीसमर्थांचे त्रिखंडात्मक चरित्र म्हणजे देवांच्या कार्यसिद्धीचा कळसाध्याय होय,’’ असे श्री.म. माटे यांनी म्हटले आहे. देवांनी ‘समर्थ हृदय’ ग्रंथ १९४२ मध्ये, ‘श्रीसमर्थ संप्रदाय’ १९४५ मध्ये व ‘श्री समर्थावतार’ १९४९ मध्ये प्रसिद्ध केले.

स्वभावाने भावनाप्रधान व तितकेच चिकित्सक असलेल्या देवांनी सातत्याने खपून, संशोधन करून एकंदर २६ हजार पृष्ठे छापून प्रकाशित केली. असे उदाहरण भारतात विरळाच असेल.

‘दासबोधाचे कार्यकर्ते श्री समर्थ नव्हेत’ या भय्याशास्त्री जामखेडकरांच्या म्हणण्याचा देवांनी ‘दासबोधाचे कर्ते दुसरे कोण असणार?’ या प्रदीर्घ निबंधाद्वारे इतका बिनतोड प्रतिवाद केला, की शास्त्रीबुवांनी पुन्हा डोके वर काढले नाही. शिव-समर्थ भेटीविषयी वाद होऊन वातावरण गढूळ होत चालले होते. देवांनी ठिकठिकाणी भाषणे करून प्रा. न.र. फाटकांसारख्यांचा खरपूस समाचार घेतला. फाटक पक्षाची गाळण उडाली. देवांचा नुसता भावावेश नसून सोबत अभ्यास, संशोधन व साधना होती. प्रत्येक कृतीला ठाम आधार होता. पांगारकर, आळतेकर, करंदीकर, माटे, पेंडसे आदी मोठे वाङ्मयकार देवांच्या बाजूने होते. रामदासी बाण्याची दीक्षा घेतलेले समर्थ सेवक कार्यकर्ते जागोजागी निर्माण व्हावेत म्हणून देवांनी ‘समर्थ संघ’ स्थापन केला.

भारताच्या संसदेचे पहिले सभापती ग.वा. मावळंकर या संघाचे पहिले अध्यक्ष होते. ५७ वर्षे सत्कार्योत्तेजक सभेची स्वत:च्या मालकीची वास्तू नव्हती. देवांनी जनतेचे साह्य मिळवून सभेसाठी सभागृह उभारले. आपल्या हजारो निवडक दुर्मीळ ग्रंथांचा संग्रह सभेला अर्पण केला. १९३४ ते १९५० दरम्यान ‘रामदासी’चे संपादन केले. रामदासी ग्रंथमाला प्रकाशित केली. टापटीप व दक्षता त्यांच्या हस्ताक्षरावरून कळून येते. देव अतिशय प्रसिद्धिपराङ्मुख होते. ‘रामदासी’ मासिकावर ‘संपादक’ म्हणून त्यांचे नावही छापलेले नसे. स्वत: केलेल्या सर्व गोष्टींचे श्रेय ते सत्कार्योत्तेजक सभेला देत असत. राष्ट्रगुरू समर्थांवर त्यांची प्राणापलीकडे निष्ठा होती. अनन्य भक्ती व ती जीवनात उतरविणे याचे साक्षात उदाहरण म्हणजे शं.श्री. देव. ‘आपुले सर्व हरावे। गुरूंचे सर्व राहावे।’ ही त्यांची भूमिका होती.

‘श्री शिवसमर्थांचे स्मरण हेच राष्ट्राचे जीवन आणि त्यांचे विस्मरण हे राष्ट्राचे मरणच!’ हा त्यांचा तेजस्वी संदेश प्रत्येकाने हृदयी स्मरून आचरण केला पाहिजे. देवांनी जो भक्कम पाया रचला आहे, त्याचा गौरव अनंतदासजी, धेनुदासजी, श्रीधरस्वामी, ब्रह्मचारी

द

विनायक महाराज मसुरकर, गोजीवन चौंडे महाराज, नारायणबुवा गोडसे आदींनी केला. अशा प्रकारे देव सामाजिक, राजकीय कार्यकर्ते व नामांकित लोकप्रिय वकीलही होते. धुळे नगरपालिकेचे सदस्य व धुळे स्कूल बोर्डाचे ते अध्यक्ष होते. महाराष्ट्राच्या इतिहास संशोधनाचे केंद्र पुणे येथून धुळे येथे आणले गेले ते देव यांच्या कर्तृत्वानेच.

धुळे साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षपदाचा वाद वाढू लागताच देव यांनी स्वागताध्यक्षपदाचा राजीनामा दिला. तेव्हा आचार्य अत्रे म्हणाले होते, ‘‘नानासाहेब नसतील तर धुळ्यात काय उरेल? नुसते दगड अन् माती!’’ १९७१ मध्ये त्यांची जन्मशताब्दी पुणे येथे साजरी झाली, तेव्हा ‘देवस्मृतिग्रंथ’ प्रकाशित करण्यात आला. अप्पा पेंडसे यांचा अभिप्राय पुढीलप्रमाणे आहे : ‘‘ओज आणि आर्जव, सौजन्य आणि शालीनता, कळकळ आणि आवेश, भाषेची प्रतिष्ठा आणि विचारांची ऋजुता, लाघव आणि करारीपणा, वा! वा! काय वर्णन करावे त्या भाषणांचे! सभामंडप त्यांनी मंत्रमुग्ध करून टाकला. आपादमस्तक पांढऱ्याशुभ्र पोशाखात गोरापान, तेजस्वी, उंचीला भरपूर असा हा समर्थभक्त जेव्हा नादमधुर आणि लयबद्ध वाक्ये उच्चारू लागला, तेव्हा त्याने बोलता बोलता सभा जिंकली.’’ देवांच्या या व्यक्तिमत्त्वामध्ये मोकळेपणा, प्रांजलपणा, सोज्ज्वळपणा, नेमकेपणा, प्रेरकपणा या साऱ्यांचा मनोज्ञ संगम प्रत्ययाला येतो.

– संपादक मंडळ

**संदर्भ :**

*१. समर्थ चरित्राचे तीन खंड.*

## देशमुख, केशवमहाराज

***देशमुख, केशव रघुनाथ***

**वारकरी संप्रदाय, प्रवचनकार**

**१८७७ - २७ एप्रिल १९४२**

**ना**मवंत समाजसेवक लोकहितवादी तथा गोपाळ हरी देशमुख यांचे नातू केशव रघुनाथ देशमुख यांचे वारकरी संप्रदायामध्ये विशेष स्थान व विशेष योगदान



आहे. देशमुख घराण्याला उच्चशिक्षणाचे व समाजसेवेचे वरदानच लाभलेले होते. केशवराव हे या परंपरेप्रमाणेच एलएल.बी. व नंतर एम.ए. झाले होते. ब्रिटिश काळात एवढे शिक्षण उच्चपदस्थ अधिकाऱ्याची नोकरी मिळवण्यास पुरेसे होते; पण ब्रिटिश सरकारची नोकरी न करता त्यांनी पारमार्थिक क्षेत्राला प्राधान्य दिले.

केशवरावांचे शिक्षण मुंबईत झाले. ते एलएल.बी. करीत असताना त्यांच्या वडिलांचे निधन झाले व त्यांना कायद्याचे शिक्षण अर्धवट सोडावे लागले. त्यानंतर केशवराव यांनी ‘ज्ञानेश्वरी’ विषय घेऊन एम.ए. पूर्ण केले. ज्ञानेश्वरीतील ज्ञान, भक्ती व काव्याने ते प्रभावित होऊन ते ज्ञानेश्वरीमयच होऊन गेले. पुण्यात त्यांचा संपर्क थोर सत्पुरुष विष्णुपंत जोग यांच्याशी आला. जोग यांच्या प्रभावाने ते नगरकर तालमीतही जाऊ लागले. ज्ञानेश्वरीवरील जोग यांचा अधिकार केशवरावांना नव्या नव्या प्रेरणा देणारा ठरला. जोग महाराजांची कीर्तने व प्रवचने आवडीने ऐकून ते बहुश्रुत झाले.

केशवरावांचा धर्मपरायण, सोज्ज्वळ स्वभाव पाहून आळंदीच्या राममंदिराच्या व्यवस्थापकाची कन्या सांगून आली, या विवाहाचे सुख फार काळ त्यांच्या नशिबी नसल्यामुळे अल्पकाळातच त्यांच्या पत्नीचे निधन झाले. केशवरावांनी पत्नीवियोगाचे दु:ख करत बसण्याऐवजी इष्टापत्तीच मानून परमार्थ जवळ केला; पण त्यांच्या

परिवाराच्या आग्रहाने केशवरावांना दुसरे लग्न करावे लागले. नाशिकचे मामलेदार वाघ यांची कन्या रुक्मिणीसमवेत केशवरावांचा दुसरा विवाह झाला. अत्यंत धर्मपरायण व सेवाभावी वृत्तीच्या रुक्मिणीबाईंना केशवरावांकडे ज्ञानेश्वरी ऐकण्यास येणारे भाविक लोक 'आईसाहेब' म्हणूनच मान देऊ लागले.

संतसंग हा केशवरावांच्या भाग्ययोगातच होता. ह.भ.प. विष्णुपंत जोग यांच्याप्रमाणेच केशवरावांना ह.भ.प. नानामहाराज साखरे यांचाही संतसंग लाभला. यामुळे त्यांचा ज्ञानेश्वरीचा अभ्यास अधिकच सखोल व चतुरस्र झाला. ज्ञानेश्वरी चिंतन हेच त्यांचे जीवन होते. त्यांच्या अवस्थेमुळे भाविक लोक त्यांना 'ज्ञानेश्वरसुत' म्हणू लागले.

केशवरावांना पंढरीच्या वारीची आवड निर्माण झाली. त्या काळी आळंदी-पंढरपूर जाणाऱ्या पालखी सोहळ्यात उच्चशिक्षित, शहरी भाविकांचा-वारकऱ्यांचा फारसा सहभाग नव्हता. केशवराव यांनी पुढाकार घेऊन स्वत:च एक दिंडी तयार केली.

संत ज्ञानेश्वर पालखी सोहळ्यात रथापुढे चालणाऱ्या 'शेडगे पंच मंडळ' दिंडीबरोबर ते आपली दिंडी घेऊन आळंदी-पंढरपूर वारी करू लागले. त्यांच्या दिंडीचा पंढरपुरात श्रीमंत खासगीवाले यांच्या वाड्यात मुक्काम असे. ह.भ.प. खंडूजीबाबा यांना केशवराव देशमुख यांनी आपले गुरू मानले होते. पुण्याच्या लकडी पुलाजवळील खंडूजीबाबा चौकात नदीकाठी त्यांचे समाधी मंदिर आहे. त्या समाधीचे दर्शन घेतल्याशिवाय केशवराव अन्नग्रहण करीत नसत. हा त्यांचा नित्यनेम अखेरपर्यंत चालू होता. प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराजांसमवेत केशवराव यांनी पंढरीच्या अनेक वाऱ्या केल्या. गुलाबरावांचे केशवरावांच्या जीवनात एक विषेश स्थान होते. त्यांनी केशवरावांना 'नारद भक्तिसूत्र' ग्रंथ भेट दिला होता व त्यावर सुंदर मराठी विवरण लिहून तो ग्रंथ केशवरावांनी गुलाब महाराजांना अर्पण केलेला होता.

खरे तर, घराण्याची थोरवी, उच्चशिक्षण यांवर केशवराव मोठे सरकारी अधिकारी होऊन सुखासीन आयुष्य जगू शकले असते; पण त्यांनी कीर्तनकार, प्रवचनकार होण्याचा, जनप्रबोधनाचा व आत्मकल्याणाचा मार्ग निवडला.

प्रेय आणि श्रेय यांचा विवेक प्रारंभापासूनच केशवरावांच्या ठायी होता. भक्तिप्रबोधनाचा मार्ग स्वीकारल्यामुळे त्यांना उदरनिर्वाहासाठी अनेक छोटेमोठे उद्योग-व्यवसाय करावे लागले; पण ते कष्ट त्यांनी आनंदाने उपसले. 'स्वकष्टार्जित मिळवावा ग्रासु आपुला' ही त्यांची वृत्ती होती.

केशवरावांनी स्वदेशी चाकू, कात्र्या, बटणे निर्माण करण्याचा व विक्रीचा व्यवसाय केला. एक पिठाची गिरणीही चालविली. खाली गिरणी आणि माडीवर केशवरावांचे ज्ञानेश्वरी चिंतन-निरूपण चाले.

१९२० मध्ये थोर निरूपणकार विष्णुपंत जोग यांचे निर्वाण झाल्यावर केशवरावांनी नित्यप्रवचन सेवेचे व्रत, त्याच ठिकाणी नित्य प्रवचन करीत सुमारे २२ वर्षे निष्ठेने चालविले. १९४२ साली श्रीगुरू ह.भ.प. खंडूजीबाबा समाधी मंदिरात रामनवमीनिमित्त केशवरावांचे शेवटचे कीर्तन झाले. त्यानंतर केशवरावांची प्रकृती ढासळली आणि ते ज्ञानेश्वरचरणी लीन झाले. पुण्यात ओंकारेश्वर जवळील श्री काळेबुवा समाधीशेजारीच केशवरावांची समाधी आहे.

— विद्याधर ताठे

## देशपांडे, श्रीपाद दत्तात्रेय

***मामा देशपांडे***

**शक्तिपात योग**

**२५ जून १९१४ – १९९४**

**श**क्तिपात परंपरेतील दीक्षागुरू श्रीपाद दत्तात्रेय देशपांडे यांचा जन्म पुनर्वसू नक्षत्रावर गुरुवारी, आनंदनाम संवत्सरी, पुणे येथे झाला. त्यांच्या आई-वडिलांची शिस्त अत्यंत कडक होती.

आठव्या वर्षी श्रीपादची मुंज झाल्यावर वडिलांनी संध्या, सूर्यनमस्कार, सौर्यसूक्त, विष्णुसहस्रनाम, उपनिषद, गीता, ब्रह्मयज्ञ ही दैनंदिन उपासनेची दीक्षा



दिली. पित्यासोबतच श्रीपादने हिमालयात व नंतर चार वर्षांनी नर्मदा परिक्रमा केली. श्रीपादचे शिक्षण चालू असतानाच वडील स्वर्गवासी झाले. त्यामुळे चौदा वर्षीय श्रीपाद व पाच वर्षीय यशवंत (धाकटा भाऊ) या दोघांना घेऊन मातु:श्री पार्वती पुणे येथे आल्या.

आई भक्तिरसात मग्न राही, त्याच वातावरणात श्रीपाद वाढत होता. चरितार्थासाठी तो शिकवण्या करी; पण त्याचे शालेय शिक्षण सुटले. श्रीपाद यांनी कंपोझिंग शिकून एका वृत्तपत्रात नोकरी धरली. फावल्या वेळात तो घरोघरी हिंडून साबणविक्री करी. आई पार्वतीबाई हीच त्याची ऐहिक मार्गदर्शक व अध्यात्मगुरू होती.

१९४८ मध्ये श्रीपाद राजकोटला गेले. तीन विवाह होऊनसुद्धा १९४० ते १९४८ या अवधीत मामांचा संसार आटोपला. त्यांच्या पदरात एक पुत्ररत्न होते.

वयाच्या चौतिसाव्या वर्षी मामा साधनायात्रेला मुक्त झाले. २६ नोव्हेंबर १९४१ रोजी मातु:श्री पार्वतीबाईंनी इहलोकीची यात्रा संपविली. यानंतर श्री गुरुदेवदत्त हेच मामांचे माता, पिता, बंधू व सखा होते. प्रयत्नवादी असल्याने मामांनी 'यत्न तो देव जाणावा' हे सूत्र अखंडपणे आचरणात आणले. १९३६ पासून मामा देशपांडे दरवर्षी पंढरपूरची वारी करू लागले. १९५४ साली सोलापूर येथे मामांना श्री वामनराव गुळवणी महाराजांचे दर्शन झाले. मामांनी १९७१ मध्ये गुळवणी महाराजांबरोबर त्रिस्थळी यात्रा केली. प्रभुकृपेने मामांना लंडनच्या भेटीचा योग आला. मामांची साधी राहणी, खाणे-पिणे, साधना व आचरण बघून तिथले लोक मामांना 'छोटे गांधी' म्हणू लागले. मामांना लहानपणापासूनच दत्तभक्तीचा छंद होता. वडिलांबरोबर हिमालय यात्रा करीत असताना मामांना श्री गजानन महाराज गुप्ते, नारायण महाराज केडगावकर या संतपुरुषांचे सान्निध्य लाभले. मामांना ज्योतिषविषयक ज्ञान उत्तम होते. शक्तिपात परंपरेतील अनेकांचे दीक्षागुरू मामा हेच होते. पू. श्री गुळवणी महाराजांनी मामांना विधिपूर्वक जो मंत्र दिला, तो त्यांना पूज्य वासुदेवानंद सरस्वती यांच्याकडून परंपरेने लाभला होता. दत्तसंप्रदाय, नाथपरंपरा, वारकरी संप्रदाय या सर्व पंथांत श्री दत्तांचीच शिष्यपरंपरा सांगितली जाते.

– वि.ग. जोशी

**संदर्भ :**

*१. महादेवकर, सुमन; मुलाखत : 'संतकृपा' मासिक.*

## देहूकर, भाऊसाहेब

**वारकरी संप्रदाय, कीर्तनकार, सत्पुरूष**

**जन्मदिनांक अनुपलब्ध – १९१३**

**भा**ऊसाहेब देहूकर हे संतश्रेष्ठ तुकाराम महाराजांच्या वंशातील सत्पुरुष होत. महाराजांच्या पुत्रांपैकी केवळ नारायणबाबा देहूत राहिले, महादेव व विठोबा या दोन पुत्रांच्या वंशशाखा देहू सोडून पंढरपूर येथे जाऊन स्थायिक झाल्या. पंढरपुरातील वासुदेव महाराज देहूकर यांनी नव्या फडाची स्थापना केली.

वासुदेव महाराज हे मल्लाप्पा वासकर (१७०७ ते १७९९) यांचे समकालीन होते. याच वासुदेव महाराजांचे नातू रामचंद्र ऊर्फ भाऊसाहेब महाराज हे थोर साक्षात्कारी सत्पुरुष म्हणून प्रसिद्ध झाले. ते थोर कीर्तनकार म्हणूनही वारकऱ्यांमध्ये प्रसिद्ध होते. भाऊसाहेब यांचे वारकरी संप्रदायातील योगदान मोठे आहे. जाज्वल्य निष्ठा म्हणजे रामभाऊ. ते रोज पहाटे काकड आरतीस विठ्ठल मंदिरात जात होते. काकड आरती चुकली, तर त्या दिवशी

भाऊसाहेब स्वत:स शिक्षा म्हणून अन्न-पाणी घेत नसत. त्यांची ही निष्ठा पाहून बडवे काकड आरतीस त्यांची आतुरतेने वाट पाहत असत.

रामभाऊ अखेरची काही वर्षे पंढरपूर सोडून गेले नाहीत. आपणांला पंढरीतच मरण यावे अशी त्यांची तीव्र इच्छा होती; पण वऱ्हाडातील वारकऱ्यांच्या आग्रहाखातर त्यांना पंढरपूर सोडून वऱ्हाडात जाणे भाग पडले आणि तेथील कार्यक्रम होताच भाऊसाहेबांचे निधन झाले. सोबत पत्नी होती. ''आता मी पंढरीला जाऊन काय सांगू? कसे सांगू?'' म्हणत भाऊसाहेबांच्या देहाजवळ पत्नीने करुणा भाकली आणि आश्चर्य म्हणजे भाऊसाहेब झोपल्यासारखे डोळे उघडून, ''चल, पंढरपूरला जायचे ना!'' म्हणत उठले. अशा प्रकारे स्वत:चा मृत्यूही त्यांच्या अधीन होता. अशा अनेक चमत्कार कथा भाऊसाहेब महाराजांच्या चरित्रात आहेत. पंढरपुरात प्लेगची साथ आल्यावर ब्रिटिश सैनिक, पोलिसांनी सर्वांनाच गावाबाहेर काढले; पण भाऊसाहेब महाराज 'देह जावो अथवा राहो । पांडुरंगी दृढ भावो ॥' या अभंग उक्तीप्रमाणे पंढरीतच राहिले.

भाऊसाहेब महाराजांनी अंमळनेरकर, बेलापूरकर यांच्याशी जिव्हाळ्याचे संबंध वृद्धिंगत केले. श्रावण वद्य द्वितीया, शके १८३५ रोजी भाऊसाहेब महाराजांचे निर्वाण झाले. त्यांचे समाधी मंदिर पंढरपुरात चंद्रभागेच्या वाळवंटात आहे. देहूकरांच्या फडावर श्रावण शु १३ ते श्रावण वद्य २ पर्यंत भाऊसाहेब महाराजांचा पुण्यतिथी उत्सव पारंपरिक पद्धतीने साजरा होतो.

भाऊसाहेब महाराज यांच्यावर विनायक महाराज शाळिग्राम यांनी 'नूतन संतचरित्रे' या ग्रंथात सुंदर आख्यान काव्य लिहिलेले आहे. अर्थात, ते चमत्काराच्या अंगाने लिहिलेले आहे. त्यात शाळिग्राम म्हणतात,

*जे जे आले पंढरीस । त्यांचे पिढीचा पुण्यपुरुष ।*
*रामभाऊ नाम ज्यास । भाऊसाहेब म्हणती तया ॥२१॥*

भाऊसाहेबांचे निर्वाण झाल्यावर देहूकर फडाची परंपरा त्यांचे पुत्र नामदेव महाराज यांनी पुढे चालविली; पण केवळ तीन वर्षेच त्यांना सेवेचा योग लाभला. त्यांचे १९१६ मध्ये निधन झाले व फडाची सर्व जबाबदारी सोपानकाका देहूकर यांच्याकडे आली.

सोपानकाकांना विठ्ठलकृपेने प्रदीर्घ आयुष्य लाभले. त्यांना वारकरी संप्रदायाचे भीष्माचार्य म्हणून ओळखले जाते. त्यांचे कार्तिक महिन्यातील वद्य पक्षात, आळंदी वारीत ज्ञानेश्वर महाराजांच्या समाधीपुढे, वद्य त्रयोदशीला कीर्तन होत असे. ते तुकारामबीजेचा उत्सव पंढरपुरात फडामध्ये साजरा करीत. तो झाल्यावर फाल्गुन वद्य षष्ठीच्या संत एकनाथ महाराज पुण्यतिथी उत्सवासाठी ते पैठणला जात. माघ वारीसाठी ते दिंडी घेऊन त्र्यंबकेश्वरला जात.

आषाढ वद्यात संत सावता माळी पुण्यतिथी उत्सवात त्यांचे काल्याचे कीर्तन असे. महाशिवरात्रीला करमाळ्याजवळील संगमेश्वराला ते दिंडी घेऊन जात. ही देहूकर फडाची परंपरा ह.भ.प. सोपानकाकांनी अनेक वर्षे निष्ठेने जोपासली. त्यानंतर त्यांचे पुत्र ज्ञानोबा माउली, नातू बापूसाहेब, बाळासाहेब ही परंपरा पुढे चालवीत आहेत. जयरामबुवा देहूकर यांचाही पंढरीत एक स्वतंत्र फड आहे.

देहूकरांचा पैठण, तेर, अरण, त्र्यंबकेश्वर, आदिनाथ येथे विशेष मान आहे. पंढरपूरप्रमाणेच देहूकरांच्या देहू येथे जी फड-परंपरा चालत आहे, त्यामध्ये देवरामबुवा, मुरलीधरबुवा असे अधिकारी सत्पुरुष होऊन गेले. अलीकडच्या काळात श्रीधरबुवा देहूकर हे तर चालतेबोलते कोश होते.

– विद्याधर ताठे

***

ध

## धर्माधिकारी, नानासाहेब विष्णुपंत
**समर्थभक्त, समाजप्रबोधन, व्यसनमुक्ती**
**१ मार्च १९२२ – ८ जुलै २००८**



आयुष्यभर अध्यात्म, शिक्षण, आरोग्य, समाजप्रबोधन आणि व्यसनमुक्तीच्या कार्याला वाहून घेणाऱ्या नानासाहेब धर्माधिकारी यांचा जन्म कोकणभूमीतील रेवदंडा येथे झाला. त्यांच्या घराण्याचे मूळ आडनाव शेंडे होते. त्यांच्या भूतकाळातील आठव्या पिढीतील पूर्वज गोविंद चिंतामणी शांडिल्य ऊर्फ शेंडे हे धर्मजागृतीचे काम स्वेच्छेने करीत. त्या काळचे दर्यासारंग कान्होजी आंग्रे यांनी त्यांना सन्मानाने ‘धर्माधिकारी’ ही पदवी दिली. तेव्हापासून हे घराणे धर्माधिकारी हे आडनाव लावू लागले आणि या नावाला समर्पक असे धर्मजागृतीचे काम करीत आले. या कामाला चारशे वर्षांची परंपरा आहे.

नानासाहेबांचे वडील विष्णुपंत हेच नानांचे आध्यात्मिक गुरू आणि प्रेरणास्थान होते. नानासाहेबांनी १९४५ साली, वयाच्या तेविसाव्या वर्षी वडिलांच्या प्रेरणेने ‘श्री समर्थ प्रासादिक आध्यात्मिक सेवा समिती’ची रेवदंडा येथे विजयादशमीच्या मुहूर्तावर स्थापना केली आणि आपल्या कार्याचा शुभारंभ केला. केवळ सात श्रीसदस्यांनी प्रारंभ झालेल्या या कार्याची व्याप्ती आता लाखो श्रीसदस्यांपर्यंत पोहोचली आहे.

धर्माचरणाविषयी ते प्रामुख्याने अज्ञान, अंधश्रद्धा, भेदाभेद, व्यसनासक्ती, स्त्रियांवरील अत्याचार, दुष्ट प्रवृत्तींचे उच्चाटन या विषयांवर बोलत. आधुनिक काळाच्या संदर्भात दासबोधाच्या कमालीच्या सोप्या निरूपणातून विकारी मनांची मशागत करताना निर्व्यसनी समर्थ समाजाचे स्वप्न सत्यात उतरविण्यासाठी त्यांनी आयुष्य वेचले. अध्यात्माचे धडे देतानाच नानांनी शेकडो खेडी, आदिवासी पाडे यांची भ्रमंती केली आणि लोकांना व्यसनमुक्तीचे महत्त्व पटवून दिले. त्यामुळे हजारो लोक व्यसनमुक्त होऊन परमार्थाकडे वळले. नानांच्या प्रेरणेने आता गावोगावी वाड्या-रस्त्यांवर ‘बैठका’ होत आहेत. या बैठकांची संख्या काही हजारांच्या घरात पोहोचली. बैठक म्हणजे तीन तासांचा शिस्तबद्ध सत्संग. या एका बैठकीत सुमारे २०० नामसाधक सहभागी होतात. मनाचे श्लोक, दासबोधाचा, मंगलाचरणाचा एक समास आणि त्यानंतर गेल्या बैठकीत झालेल्या समासाच्या पुढील समास व निरूपण असा त्या बैठकीतील सत्संगाचा एक क्रम असतो. आळीपाळीने, क्रमाक्रमाने एकेका साधकाने दासबोधातील एकेक समास वाचन करायचे, असे या बैठकीचे स्वरूप सामूहिक सहभागाचे आहे. या बैठकीत सामाजिक एकता व समरसता आपोआप निर्माण होते. जातपात, उच्चनीच, श्रीमंत-गरीब असे सारे भेद



**महाराष्ट्रभूषण पुरस्कार स्वीकारताना अप्पासाहेब**

नामभक्तीच्या भावावस्थेतच विरून जातात. 'कोणाही जिवाचा न घडो मत्सर । वर्म सर्वेश्वरपूजनाचे॥' या उदात्त व्यापक विचारांचा संस्कार रुजविला जातो.

नानांनी साधकांना अंधश्रद्धाळू, कर्मकांडी वा पलायनवादी बनवलेले नाही, तर प्राप्त कर्म ईशकर्म समजून करण्याचा श्रद्धाभाव जागवला आहे. आजसुद्धा मराठीबरोबरच हिंदी, उडिया, तामीळ, बंगाली या भाषांतून निरूपण केले जाते. सुरुवातीला महिला व पुरुषांच्याच बैठका होत असत. मात्र, बालवयापासूनच संस्कार व्हावेत या दृष्टिकोनातून बालोपासना सुरू करण्यात आली.

नानांचे सर्वांत मोठे वैशिष्ट्य म्हणजे ते एवढे लाखो साधक, अनुयायी मिळाल्यावरही 'बाबा', 'महंत', 'महाराज', 'बुवा' न होता नानाच राहिले; त्यांनी मठ स्थापून मालमत्ता कधीच जमा केली नाही. नानांनी गेली चौसष्ट वर्षे अव्याहतपणे चालवलेल्या अशा या डोळस भक्तिकार्यामुळेच महाराष्ट्र सरकारने त्यांना 'महाराष्ट्र भूषण' गौरव घोषित केला; पण तो स्वीकारण्यापूर्वीच नानासाहेब अनंतात विलीन झाले. त्यांचे चिरंजीव दत्तात्रेय ऊर्फ अप्पासाहेब आणि नातू सचिन यांनी त्यांच्या समाजप्रबोधनाच्या कार्याची धुरा तेव्हढ्याच निष्ठेने, तळमळीने व जोमाने पुढे चालवीत आहेत.

नानासाहेबांना १९९३ मध्ये जिल्हा परिषदेतर्फे 'रायगडमित्र' पुरस्कार, १९९९ मध्ये पुण्यातील समर्थ व्यासपीठातर्फे 'शिवसमर्थ' आणि 'समर्थ रामदासस्वामी भूषण' पुरस्कार, १९९७ मध्ये 'महाराष्ट्र राज्य सांस्कृतिक' पुरस्कार, २००३ मध्ये 'शिवराज प्रतिष्ठान' पुरस्कार, तसेच २००५ साली त्यांना टिळक महाराष्ट्र विद्यापीठातर्फे 'डी.लिट.' ही पदवी प्रदान करण्यात आली. २००२ मध्ये हिरवळ प्रतिष्ठानचा 'समाजभूषण' पुरस्कार मिळाला. २००८ साली जाहीर झालेला 'महाराष्ट्र भूषण' पुरस्कार स्वीकारण्यास नानासाहेब हयात नव्हते, त्यामुळे हा पुरस्कार त्यांचे चिरंजीव अप्पासाहेबांनी स्वीकारला. या सोहळ्याला ४० लाखांहून अधिक लोक जमा झाले. या गर्दीच्या उच्चांकाची नोंद 'लिम्का बुक ऑफ रेकॉर्ड्स'मध्ये घेण्यात आली.

– विद्याधर ताठे

## धनेश्वर, नागेश रामचंद्र

***अप्पा धनेश्वर***

**सिद्धयोगी, समाजसेवक**

**८ नोव्हेंबर १८९९ – १३ जानेवारी १९८०**



**पु**णे जिल्ह्यातील धनकवडीचे महान योगी शंकरमहाराज यांचे अंतरंग शिष्य म्हणून डॉ. नागेश रामचंद्र तथा अप्पा धनेश्वर ओळखले जातात. ''डॉक्टरी हा धंदा नाही, तर जनताजनार्दनाची सेवा आहे. गरीब-श्रीमंत भेद न करता सर्वांची सेवा कर. द्रव्याचा लोभ ठेवू नको. परिग्रहवृत्ती ठेवू नको,'' असा श्रीगुरू

शंकरमहाराज यांनी डॉ. धनेश्वरांना उपदेश केला होता आणि डॉ. धनेश्वरांनी हा गुरुउपदेश आदेश मानून आयुष्यभर सेवा म्हणूनच वैद्यकीय व्यवसाय केला. अत्यंत साधेपणाने आध्यात्मिक आनंद अनुभवला. त्यांना गुरुकृपेने अष्टसिद्धी प्राप्त झाल्या होत्या; पण त्यांनी कोणत्याही सिद्धीचा वापर केला नाही. त्यांच्या मुलाचा अकाली मृत्यू झाला. तेव्हासुद्धा, परमेश्वर नियंत्रित जीवनमृत्यूच्या कार्यात सिद्धीचा वापर हा हस्तक्षेप ठरेल, या भावनेने त्यांनी सिद्धीचा उपयोग केला नाही.




नागेश रामचंद्र धनेश्वर या थोर सिद्धपुरुषाचा जन्म अहमदनगर जिल्ह्यातील पारनेर येथे झाला. त्यांच्या आईचे नाव जानकीबाई होते. धनेश्वर हे घराणे मूळचे बीड जिल्ह्यातील दोंदगावचे. नागेश धनेश्वर वयाच्या दहाव्या वर्षीच मातृसौख्याला पारखे झाले. पुढे चुलतभाऊ गोपाळराव धनेश्वर यांनी नागेश व त्यांच्या दोन भावंडांचा संभाळ केला. अगदी जन्मतःच त्यांना नाथपंथीय योगिपुरुषाची कृपा लाभलेली होती, अशी अनेक लक्षणे त्यांच्या बाललीलांत दिसत होती. एका नागाने फणा काढून त्यांच्यावर सावली धरली होती म्हणून त्यांचे नावही नागनाथ, नागेश्वर, नागेश असे ठेवण्यात आले, अशी एक कथा त्यांचे चरित्रकार सांगतात.

नागेशराव १९१८ साली मॅट्रिकची परीक्षा विशेष प्रावीण्यासह उत्तीर्ण झाले. घराशेजारीच एक आयुर्वेदतज्ज्ञ वैद्य राहत होते, त्यामुळे आपणही वैद्य व्हावे असे नागेशरावांना वाटत होते. पण खुद्द त्या वैद्यराजांनीच त्यांना 'एम.बी.बी.एस.' होण्यास सांगितले. त्यानुसार नागेशराव विशेष गुणांसह एम.बी.बी.एस. झाले. आता ते एम.डी. होतील असे अनेकांना वाटले. पण गावच्या गरीब, मध्यमवर्गीय लोकांना एम.डी.च्या स्पेशालिस्टची नव्हे, तर सर्व रोग, व्याधींवर उपचार करणाऱ्या जनरल फिजिशिअनची गरज आहे हे लक्षात घेऊन, नागेशरावांनी पुढील उच्च शिक्षण न घेता गावी जाऊन एक दवाखाना सुरू केला व गुरू शंकरमहाराजांच्या आदेशानुरूप रुग्णसेवेस प्रारंभ केला. अगदी माफक दरात, तसेच गरिबांवर विनामूल्य औषधोपचार केले.

नागेश शालेय शिक्षण घेत होते तेव्हा श्रीगुरू शंकरमहाराज सर्वप्रथम एका फकिराच्या वेषात त्यांना भेटले व 'रामकाठी' नावाची सिद्धविद्या त्यांना प्रदान केली. त्यानंतर डॉक्टर होऊन अहमदनगरला रेल्वेने परत येत असताना नागेशराव ऊर्फ अप्पा स्टेशन मास्तराच्या घरी गेले असताना तेथे शंकरमहाराजांशी त्यांची पुन्हा भेट झाली. हाच तो शालेय जीवनात भेटलेला फकीर म्हणून अप्पांना शंकरमहाराजांची खूण पटली.

दौंडहून निघून अप्पा नगरला घरी पोहोचले, तर घरात वडिलांशी बोलत बसलेल्या शंकरमहाराजांना पाहून त्यांना शंकरमहाराजांच्या नेमक्या स्वरूपाची ओळख पटली. पुढे शंकरमहाराजांनी अखेरपर्यंत डॉ. धनेश्वरांची साथ केली. त्यांना आपले सर्वस्व दिले व अंतरंग शिष्य बनविले.

डॉ. धनेश्वर शंकरमहाराजांच्या इतके निकटवर्ती झाले, की १९३० साली शंकरमहाराजांनी समाधी घेण्याचा निर्णय केवळ डॉ. धनेश्वरांमुळे सतरा वर्षे पुढे ढकलला. डॉक्टर म्हणून डॉ. धनेश्वरांकडे जेवढे रुग्ण येत, तेवढेच लोक आध्यात्मिक प्रश्न व प्रापंचिक अडचणी घेऊन येत होते. स्वतःच्या, आपल्या अधिकाराचा कोठेही फारसा उच्चार न करता डॉ. धनेश्वर

वागत असत. खरं तर, ते सिद्धयोगी होते; पण ते स्वतःस शंकरमहाराजांचा सामान्य शिष्य मानत असत.

ते सर्व वाद्ये वाजवीत असत. संगीत-चित्रकला याची त्यांना विशेष आवड होती. या कलांमध्ये त्यांना ईश्वरदर्शन घडत असे. परमार्थासाठी कोणत्याही गोष्टीचा अव्हेर न करता समग्रपणे जीवन हे परमेश्वराचीच लीला म्हणून स्वीकारावे, असा त्यांचा विचार होता. अशा समग्र जगण्याला ते 'जीवनयोग' म्हणत. १९७९ मध्ये वयाच्या एक्याऐंशीव्या वर्षी त्यांना किडनीचा विकार झाला. डॉ. धनेश्वरांनी पूर्वसूचनेनुसार १३ जानेवारी १९८० रोजी पहाटे देहत्याग केला.

– विद्याधर ताठे

## धुंडीराजशास्त्री विनोद

**तत्त्वज्ञ, समीक्षक, लेखक**

**१२ जानेवारी १९०२ – १३ जुलै १९६९**



**म**हर्षी विनोद धुंडीराजशास्त्री यांचा जन्म अलिबाग तालुक्यातील एका लहानशा गावात झाला. इयत्ता चौथीपर्यंतचे त्यांचे शिक्षण गावातील एका शाळेत झाले. आपला मुलगा कुशाग्र बुद्धीचा आहे याची जाणीव त्याच्या घरच्या लोकांना झाली. त्याला चांगले शिक्षण मिळावे म्हणून इयत्ता पाचवीच्या वर्गात त्याचे नाव मुंबईच्या आर्यन एज्युकेशन सोसायटी या त्या वेळच्या सुप्रसिद्ध शाळेत घालण्यात आले. शालेय अभ्यासक्रमाबरोबरच विनोद यांनी इंग्रजी व संस्कृत साहित्याचा अभ्यास सुरू केला. लहान वयातच त्यांनी इंग्रजी व संस्कृत या भाषांवर प्रभुत्व संपादन केले. उच्च शिक्षणासाठी त्यांनी मुंबईच्या प्रसिद्ध एल्फिन्स्टन महाविद्यालयामध्ये प्रवेश घेतला. महाविद्यालयामध्ये शिकत असतानाच त्यांच्या साहित्यसेवेला बहर आला. इंग्रजी भाषेतील बेकन, शेक्सपीअर, स्टिव्हन्सन, ब्राउनी, शेली, कीट्स वगैरे साहित्यिकांचा सखोल अभ्यास केला. इंग्रजी भाषा व साहित्यावर त्यांनी प्रभुत्व मिळविले. त्याचप्रमाणे, संस्कृत भाषेतील कालीदास, भवभूती, भास वगैरे कवी व नाटककारांच्या साहित्यकृतींचा अभ्यास केला. मराठी भाषेतील ज्ञानेश्वर, तुकाराम, एकनाथ, रामदास अशा संतांच्या ग्रंथांचा व आधुनिक काळातील कवी व साहित्यिकांच्या ग्रंथांचा अभ्यास केला. या तीनही भाषांतील साहित्यकृतींचे ते सुंदर रसग्रहणही करीत.

१९२५ साली ते चांगल्या गुणांनी बी.ए. उत्तीर्ण झाले व त्याच महाविद्यालयामध्ये त्यांनी एम.ए.चा अभ्यास सुरू केला. याच काळात हस्तसामुद्रिक, मुद्रासामुद्रिक व ज्योतिषशास्त्राचा त्यांच्या ठायी असलेला व्यासंग वाढला. ज्योतिषशास्त्राच्या तीनही प्रकारांवर त्यांनी प्रावीण्य मिळविले. १९२७ साली उच्च श्रेणीत एम.ए. ही पदवी संपादन केल्यानंतर विनोद अंमळनेर येथील श्रीमंत प्रतापशेठ यांच्या तत्त्वज्ञान मंदिरात 'रिसर्च लेक्चरर' म्हणून रुजू झाले. संशोधनकार्यात मग्न असतानाच त्यांनी पौर्वात्य व पाश्चात्त्य दर्शन ग्रंथांचा तुलनात्मक, सखोल अभ्यास केला. त्याचप्रमाणे, त्यांनी मधुसूदन सरस्वती यांचा अद्वैत सिद्धान्त आत्मसात केला.

आद्य शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाचा व सिद्धान्तांचा त्यांच्यावर चांगलाच प्रभाव होता. शंकराचार्यांचे 'शारीरभाष्य' हा त्यांचा अखंड चिंतनाचा विषय होता. एवढ्यावरच त्यांच्या बुद्धीची भूक भागली नाही, म्हणून त्यांनी पातंजल योगसूत्रेही आत्मसात केली. महर्षी विनोद यांना बालपणापासूनच अध्यात्माची आवड होती.

ध

इंग्रजी, संस्कृत व मराठी साहित्याचा अभ्यास आणि ज्योतिषशास्त्राचा व्यासंग यांमुळे विश्वाचा कारभार हाकणाऱ्या अतींद्रिय शक्तीचा शोध घेण्याची इच्छा त्यांच्या मनात निर्माण झाली. पण या क्षेत्रातील गुरुशिवाय ते साध्य होणे शक्य नव्हते.

गुरूचा व अज्ञाताचा शोध घेण्यासाठी त्यांनी १९२८ सालापासून हिमालयामध्ये अनेक वेळा भ्रमण केले. त्यांनी गंगोत्री, जमनोत्री, केदारनाथ, बद्रिनाथ, वसुंधरा, संतोपथ इथपर्यंत प्रवास केला. या संचाराच्या दरम्यान त्यांना सिद्ध सद्‌गुरूंचा अनुग्रह झाला. त्यांनी सिद्धपुरुषांच्या भेटी घेतल्या, दुर्गम गुहांमध्ये वास्तव्य करणाऱ्या तपस्व्यांची दर्शने घेतली. त्यांना श्रीबीजाक्षरविद्या प्राप्त झाली.

ओंकारमान्धाता येथील मायानंद चैतन्य यांच्या आश्रमात ते काही दिवस राहिले. केदार तुंगनाथ विद्यापीठातर्फे तेथील आचार्य महिमानंद यांनी विनोदांना ‘दर्शनालंकार’ ही पदवी दिली. चार वर्षे भूमिगत राहून, हिमालय, तिबेट वगैरे दूरच्या ठिकाणी जाऊन त्यांनी सद्‌गुरूंचा शोध घेतला. नाथपंथातील थोर सिद्धपुरुषांचे दर्शन घेऊन त्यांच्याकडून ज्ञान संपादन केले. मद्रासचे प्रसिद्ध वकील दोरायस्वामी यांच्याबरोबर पाँडिचेरीला जाऊन विनोद यांनी श्री. अरविंद घोष यांची भेट घेतली. विनोदांच्या व्यक्तिमत्त्वाने प्रभावित होऊन अरविंदांनी त्यांना ‘Life Divine’चे दोन ग्रंथ प्रेमाने भेट दिले.

कुलाबा जिल्ह्यातील काँग्रेसचे ज्येष्ठ कार्यकर्ते श्री. बाळासाहेब ठोसर हे महर्षी विनोदांचे वर्गमित्र होते. ‘कसेल त्याची जमीन’ या कुलाबा जिल्ह्यातील शेतकऱ्यांच्या आंदोलनात विनोदांनी ठोसर यांच्या समवेत सक्रिय सहभाग घेतला होता. त्याचप्रमाणे, १९३१ ते १९३८ या कालावधीत मुंबईतील बहुतेक सर्व संस्थांशी महर्षी विनोदांचा संबंध होता.

गोवर्धन संस्था, संस्कृत पाठशाळा, ब्राह्मणसभा, गीता पाठशाळा, गीता धर्म मंडळ अशा अनेक संस्थांशी त्यांचा संबंध होता. १९३७ नंतर गो-वध बंदीच्या चळवळीत त्यांनी सक्रिय भाग घेतला होता इतकेच नव्हे, तर श्री चौंडे महाराज आणि विनोद यांनी लॉर्ड लिनालिथगो, महात्मा गांधी, पंडित मालवीयजी, बापूजी अणे इत्यादी नेत्यांच्या भेटी घेऊन लाहोर येथे नव्याने होऊ घातलेल्या कत्तलखान्याचे काम बंद पाडले. याच काळात धर्म, तत्त्वज्ञान यांची चर्चा करण्यासाठी विनोदांच्या महात्मा गांधीजींशी अनेक वेळा भेटी होत. अस्पृश्यता, सामाजिक विषमता, अन्याय व स्त्रियांचे प्रश्न यांबाबत विधायक दृष्टीने सुधारणा कशी करता येईल या संदर्भात महात्मा गांधीजी विनोदांचा सल्ला घेत व विचारविनिमय करीत.

देशोदेशींच्या विद्वत्‌सभांमध्ये सक्रिय भाग घेऊन महर्षी विनोद यांनी आपल्या ज्ञानाने व अमोघ वक्तृत्वाने विद्वान मंडळींची मने जिंकली. त्यांनी तीन वर्षे जगातील प्रत्येक देशात जाऊन विश्वशांतीचा संदेश दिला. जपानमधील टोकियो या शहरात त्यांना ‘विश्वशांती सचिव’ या उपाधीने गौरवण्यात आले. त्यांनी न्यूयॉर्कमधील आपल्या आधुनिक व अभिनव प्रयोगशाळेत डॉ. फायफर यांना स्वतःच्या अतींद्रिय शक्तीवर संशोधन करू दिले. नोबेल पुरस्कार विजेते डॉ. आइन्स्टाइन यांच्याशी गणित विषयावर चर्चा केली. एवढेच नव्हे, तर जागतिक कीर्तीच्या डॉ. फ्रॉइड यांच्या संस्थेत सायकोॲनॅलिसिस या विषयात पीएच.डी. ही सन्माननीय पदवी संपादन केली. सारे जग त्यांना एक महान सायकोथेरपिस्ट म्हणून ओळखू लागले.

१९३५ साली करवीर पीठाचे शंकराचार्य डॉ. कूर्तकोटी यांनी विनोदांना उच्च तर्कशास्त्रातील म्हणजे भारतीय न्यायदर्शनातील विद्वत्तेबद्दल ‘न्यायरत्न’ ही पदवी देऊन त्यांचा गौरव केला.

एवढेच नव्हे, तर आपल्या पीठाचे भावी उत्तराधिकारी म्हणून त्यांचे नाव जाहीर केले. केदार तुंगनाथ विद्यापीठातर्फे तेथील आचार्य महिमानंद यांनी विनोदांना ‘दर्शनालंकार’ ही पदवी देऊन त्यांचा सन्मान केला. १९५८ मध्ये पुणे नगरपालिकेच्या शतसांवत्सरिक उत्सवाच्या प्रसंगी डॉ. चिंतामणराव देशमुख यांच्या हस्ते विनोदांना ‘न्यायरत्नांचा अध्यात्म महर्षी’ म्हणून सत्कार

करण्यात आला. इंग्लंडमध्ये तत्त्वज्ञ सी.इ.एम. जोड, बर्ट्रान्ड रसेल आणि डॉ. युंग यांच्याशी विनोदांचा चांगला परिचय झाला. 'Fellow of the Royal Society of Arts' या नामांकित संस्थेचे सदस्यत्व विनोदांना देण्यात आले होते. त्यांनी इंग्रजी भाषेत हृदयस्पर्शी कविता केल्या. ते 'माउली' या संतवाङ्मयास वाहिलेल्या मासिकात सातत्याने लिहीत.

मुंबईच्या 'ज्ञानदूत' या वार्षिकांकाच्या प्रत्येक अंकात विनोदांचा पहिला लेख असे. पाश्चात्त्य विचारवंतांच्या सिद्धान्तांचा परामर्ष व भारतीय तत्त्वज्ञान आणि जीवनपद्धती यांच्या तौलनिक अभ्यासाच्या दृष्टीने 'ज्ञानेश्वर व आधुनिक पाश्चात्त्य विचार' हा त्यांचा लेख उच्च कोटीचा आहे. १९६०च्या सुमारास त्यांनी 'धवलगिरी' हा प्रसिद्ध आध्यात्मिक ग्रंथ लिहिला. १९२५ ते १९३० या कालावधीत महर्षी विनोदांनी मानवी मनाचा आणि निसर्गाचा संबंध, प्रेम की द्वेष, विभूती, पूजेची प्रवृत्ती, जड आणि चेतन, स्थल-काल यांचे स्वरूप, कलेचे स्वरूप वगैरे विषयांवर मूलगामी चर्चा असलेल्या तात्त्विक संवाद लेखमालेला त्यांनी 'आधुनिक आरण्यके' असे नाव दिले. हे लेख प्रथम 'विविध ज्ञान विस्तार'मध्ये प्रसिद्ध झाले. यांतील काही निवडक लेख प्रोफेसर प्र.रा. दामले यांनी १९८० साली 'आधुनिक आरण्यके व एका मूर्तिभंजकाचे तत्त्वविचार' या नावाने प्रसिद्ध केले.

याखेरीज, महर्षी विनोदांनी योगविद्येविषयी मार्गदर्शनपर अनेक लेख लिहिले. आध्यात्मिक विषयांवर अभंग लिहिले. रोगमुक्तीसाठी व आयुर्वेदासंबंधी आपले मूलभूत विचार प्रकट केले.

— प्रा. नीलकंठ पालेकर



***

# न

## नरहरिप्रभू
***काळे महाराज***
***काळे, नरहरि भानुदास***
**दत्तसंप्रदाय**
**२२ मे १९१० – ७ जानेवारी १९९१**



दत्तसंप्रदायी संतांमध्ये श्री रावसाहेब तथा बाबा सहस्रबुद्धे यांचे शिष्य नरहरिप्रभू तथा नरहरी भानुदास काळे महाराज यांचे एक विशेष स्थान आहे. नरहरिप्रभू यांचा जन्म नृसिंहजयंतीच्या शुभदिनी, अहमदनगर जिल्ह्यातील बेलापूर येथे झाला. त्यांचे वडील भानुदास हे दशग्रंथी ब्राह्मण होते; भिक्षुकीबरोबरच पुराणिक म्हणून ते गावोगावी भागवतावर प्रवचने करीत. नरहरिप्रभू यांच्या आईचे नाव कृष्णाबाई होते. आपली कौटुंबिक माहिती देणारा नरहरिप्रभूंचा अभंग आहे :

कृष्णा माझी माता । भानुदास पिता ।
रमाकांत चुलता । विद्वानची ॥
पवित्र ती भूमी । गाव बेलापूर ।
पवित्र ते तीर । प्रवरेचे ॥
नरहरी म्हणे । काळे कुळी जन्म । तुझ्या कृपे ॥

या अभंगावरून त्यांच्या व्यक्तिगत जीवनाचा तपशील मिळतो, तसाच त्यांच्या ठायीच्या काव्यस्फुरणाचा परिचय होतो, *‘नरहरी म्हणे माझा मी एकटा । सर्वांत धाकटा भावांमाजी ॥’* अशी अधिक माहितीही ते देतात. या दृष्टीने त्यांची अभंगगाथा वाचण्यासारखी आहे.

नरहरिप्रभू यांना सर्व ‘अण्णा’ म्हणत. अण्णांचे प्राथमिक शिक्षण बेलापूर धांदरफळे येथे झाले. संगमनेरच्या पेटिट हायस्कूलमध्ये अण्णांना गीता तोंडपाठ नसल्याने प्रवेश मिळाला नाही, मग ते पुण्यात आले व अनाथ विद्यार्थी गृहात कमवा-शिका तत्त्वावर त्यांनी मॅट्रिकपर्यंत शिक्षण केले; पण मॅट्रिकला ते अनुत्तीर्ण झाले व नाशिकहून पुढील वर्षी (१९३२) परीक्षा देऊन ते मॅट्रिक झाले. विद्यार्थिदशेतच त्यांना अभ्यासापेक्षा अध्यात्माची ओढ अधिक होती. मॅट्रिक होईपर्यंत त्यांनी श्रीगुरुचरित्राची १०८ पारायणे केलेली होती.

१९३४ मध्ये अण्णांच्या वडिलांचे निधन झाले. अण्णा १९३६ साली बेलापूरहून नोकरीच्या शोधात पुण्यात आले. जोशी-लोखंडे छापखान्यात त्यांना नोकरी मिळाली. याच दरम्यान त्यांची भेट सद्गुरू रावसाहेब ऊर्फ बाबामहाराज सहस्रबुद्धे यांच्याशी झाली आणि पहिल्या भेटीतच अण्णांना आपणांला जे सद्गुरू पाहिजेत, ते मिळाले अशी खात्री झाली. सद्गुरूंचा शोध संपला. बाबामहाराजांच्या मार्गदर्शनानुसार साधनेला सुरुवात झाली. जोशी-लोखंडे छापखान्यातील नोकरी सुटल्यानंतर अण्णा पुन्हा नोकरी शोधू लागले. त्यांना

'टीचर्स प्रिन्टिंग प्रेस'मध्ये नोकरी मिळाली; पण तीही फार काळ टिकली नाही. अखेर सद्‌गुरुकृपेने १९४६ साली अण्णांना मुद्रितशोधक म्हणून दैनिक 'केसरी'मध्ये नोकरी मिळाली व ती निवृत्तीपर्यंत (१९६८) टिकली.

१९४६ साली केसरीत नोकरी लागण्यापूर्वीच्या विवंचनेच्या काळातच अण्णांच्या आई कृष्णाबाई यांचे निधन झाले. हातात एक पै नाही आता आईचे अंत्यसंस्कार कसे करायचे हा यक्षप्रश्न उभा राहिला. एवढ्यात एक अनोळखी माणूस येऊन अण्णांना भेटला व आपल्याला रु.३६/- द्यावेत असा मला आज पहाटे दृष्टान्त झाला आहे एवढेच सांगून त्याने अण्णांना पैसे दिले. त्या ३६ रुपयांमध्ये अण्णांनी आईचा अंत्यविधी पार पाडला. सद्‌गुरुकृपेमुळेच हे सर्व घडून आले आहे, अशी अण्णांची दृढ श्रद्धा बनली. त्यांनी लग्न-संसार न करता गुरुसेवा, साधना, ईश्वरीचिंतनातच आयुष्य घालवायचे असा ठाम निर्धार केला व तो अखेरपर्यंत निष्ठेने पाळला. अण्णा केसरीत साधे मुद्रितशोधक होते; पण त्यांची साधना उच्चकोटीला पोहोचलेली होती. खुद्द सद्‌गुरू बाबा सहस्रबुद्धे अनेकांना अण्णांच्या दर्शनाला केसरीत पाठवीत. एवढेच नव्हे, तर अण्णांच्या रूपात खुद्द अक्कलकोट स्वामी समर्थच केसरीत काम करतात, असे स्वतः सहस्रबुद्धे महाराजच म्हणत. गुरूंच्या या वाक्यातून अण्णांचा अधिकार केव्हढा होता तेच स्पष्ट होते. रावसाहेब सहस्रबुद्धे यांच्या शिष्यांमध्ये अण्णा हे त्यांचे मानसपुत्रवत शिष्य होते.

१९५४ साली सद्‌गुरू रावसाहेब सहस्रबुद्धे यांचे निर्वाण झाल्यानंतर अण्णांना मायबापांच्या निधनाहूनही भयंकर दुःख झाले. ४-५ वर्षांचा काळ अगदी उदास-विमनस्क मन:स्थितीतच कंठल्यानंतर १९६१ साली अण्णा पूर्ववत सावरले व त्यांनी वाल्हे या गंधेमामा महाराजांच्या गावी 'दत्तयाग' केला. येथून त्यांच्या कार्याची जोमाने सुरुवात झाली. अण्णांनी शेवटचा दत्तयाग 'गाणगापूर' येथे करून आपला १०८ दत्तयागांचा संकल्प पूर्ण केला. एक दत्तयाग ७ दिवस चालतो. यज्ञ, स्वाहाकार, गुरुचरित्रपारायण, भजन, प्रवचन, अन्नदान, महाप्रसाद असा तो एक सोहळाच असतो. एक दत्तयाग करताना भल्याभल्यांची तारांबळ होते. अण्णांनी १०८ दत्तयाग केले ते केवळ गुरुकृपेच्या पुण्याईवर. अण्णांनी साधना, याग, पारायणे यांबरोबर प्रासादिक अभंगरचनाही केलेली आहे. 'नरहरी म्हणे' ही अभंगगाथा अण्णांच्या प्रसादयुक्त वाणीचे मूर्तरूप आहे. १० ऑगस्ट १९९० रोजी या अभंगगाथेचे मा. दत्तोपंत ठेंगडी यांच्या हस्ते प्रकाशन झाले.

१९९१ साली, वयाच्या एक्याऐंशीव्या वर्षी नरहरिप्रभू यांना आपले इहलोकीचे कार्य संपल्याची वारंवार जाणीव होऊ लागली. भक्तांनी ट्रस्ट स्थापन करून वाघोली (पुणे) येथे नदीकाठी त्यांचे स्मृतिमंदिर बांधण्याचे कार्य सुरू केलेले आहे. पुण्यात ८८८, सदाशिव पेठ येथे अण्णांचे वास्तव्य होते. ती जागा स्मृतिस्थळ म्हणून मंदिरासारखी जतन केलेली आहे.

— विद्याधर ताठे

**संदर्भ:**

१. *'नरहरिप्रभुचरित्र'; सेवा प्रतिष्ठान प्रकाशन.*

न

## नित्यानंद बाबा
### साक्षात्कारी संत
### १८४५ – ८ ऑगस्ट १९६१

**पू**र्वाश्रमीचे रामन म्हणजेच नित्यानंद बाबा यांचा जन्म १८४५ साली झाला असे मानतात; कारण याच साली ते त्यांच्या दत्तक आई-वडिलांना एका शेतात सापडले होते. केरळ राज्यातील कोजिकोड जिल्ह्यात तुनेरी गावातील चातू नायर आणि उन्नी यांच्या शेतात त्यांनी एका पहाटेस हे अर्भक पाहिले. तेज:पुंज कांती असलेल्या त्या मुलाच्या डोक्यावर एक नागराज आपल्या फण्याची सावली धरून बसला होता. गावातील प्रतिष्ठित वकील ईश्वर अय्यंगार यांनी त्या दाम्पत्याला ते मूल वाढवण्यासाठी सुचवले. चातू आणि उन्नीला आधीच पाच मुले होती, त्यात आणखी एकाची भर पडली. त्यांनी त्याचे नाव ठेवले रामन. बाळ रामनच्या लीला आश्चर्यमुग्ध करणाऱ्या होत्या. त्यातच चातू, उन्नीला त्या



मुलाच्या दैवीपणाबद्दल स्वप्नात वारंवार दृष्टान्त येऊ लागले. त्यामुळे या असामान्य मुलाला दोघांनी जिवापाड जपले.

उन्नीअम्माकडे असताना रामनला सुखंडी नावाचा पोटदुखीचा आजार जडला होता. हा रोग इतका त्रासदायक होता, की लहानग्या रामनच्या तीव्र वेदनांनी ओरडण्याचा शेजाऱ्यांना त्रास होऊ लागला आणि त्यांनी रामनला चक्क नदीत फेकून देण्याचे ठरवले. कुणीतरी रामनला कावळा खायला देण्याविषयी सांगितले. कावळा खाल्ल्यानंतर रामन खडखडीत बरा झाला.

रामन तीन वर्षांचा झाला आणि दुष्काळाने थैमान घातले. गरिबीच्या झळांनी प्रथम चातू आणि नंतर उन्नीनेही देह ठेवला. ईश्वर अय्यंगार यांनी रामनला आपल्या ताब्यात घेतले. ईश्वर अय्यंगारांनी रामनला स्वतःच्या मुलाहूनही अधिक प्रेमाने वाढवले. रामन शाळेत जायला कंटाळा करायचा, तेव्हा अय्यंगारांनी त्याला घरीच शिकवले. रामन ते सारे शिकवलेले चटकन समजून घेई. अय्यंगार यांच्या सोबतीने रामन भारतभर फिरला. विशेषतः, उत्तर भारतातील काशी, गया, प्रयाग; तेथील हनुमान घाट, मनकर्णिका घाटावर रामन तासन्तास बसत असे. पुढे रामन स्वतःच हिमालयाच्या दऱ्याखोऱ्यांत एकटेच फिरू लागले. तेथे ध्यानधारणा, तपाचरण करू लागले. एवढेच नव्हे, तर हिमालय यात्रा पूर्ण करून ते पहिल्या महायुद्धाच्या काळात बर्मा, लंका, मलाया इत्यादी देशांतही भ्रमंती करून आले. कोळशाची पोती वाहणारा हमाल बनून त्यांनी प्रसंगी बोटीतील प्रवास केला. या भ्रमंतीदरम्यान, ईश्वर अय्यंगारांच्या इतर मुलांची विवाहादी कार्ये पार पडली. परंतु, रामनला मात्र वेगळ्याच सच्चिदानंदाचे वेड लागले होते.

ईश्वर अय्यंगार जेव्हा मरणघटका मोजीत होते, त्या वेळी त्यांनी इच्छा व्यक्त केल्यानुसार रामन घरी आले. अय्यंगारांनी ''मला सूर्य दाखव,'' म्हटल्यावर रामन यांनी दिव्यशक्तीने अय्यंगारांना प्रत्यक्ष सूर्यदर्शन घडविले. त्यावर ईश्वर यांनी ''तू माझा 'नित्यानंद' आहेस,'' असे बोलून कृतज्ञता व्यक्त केली आणि आपले प्राण सोडले. तेव्हापासून रामन, 'नित्यानंद' म्हणून ओळखले जाऊ लागले. एरव्ही लोक त्यांना ऋषी, साधू, महात्मा म्हणून संबोधत असत. शहरातील उच्चपदस्थ, अधिकारी, धनवान त्यांच्या चरणी लीन होऊ लागले.

बाबा या लोकांच्या माध्यमातून गरजूंना अन्नदान, वस्तुदान करीत. लोकांची दुखणीखुपणी आपल्या ध्यानसामर्थ्याने बरी करून देत. बाबा कधी उंच झाडांवर चढत. तेथून व्याधिग्रस्तांना त्या विशिष्ट झाडाचे पान खायला देत. मंगळुरातच एकदा तत्कालीन योगी परमहंस शिवानंद यांच्याशी नित्यानंदांची भेट झाली होती.

दक्षिणेतील काननगड सोडून १९४५ च्या आसपास बाबा मुंबईत कुर्ला येथे आले. रात्री ते पानवाल्याच्या बंदिस्त टपरीत झोपत. सकाळी उठून एका भक्ताच्या घरी जाऊन त्याची कामे करीत. भक्ताकडून सेवा घेण्यापेक्षा भक्ताचीच सेवा करायला हवी हा बाबांचा दंडक होता. बाबा असे विचित्र वागत. कधीतरीच अंगावर संपूर्ण कपडे घालत. अन्यथा केवळ कमरेला एकच वस्त्र गुंडाळून गावभर भटकत असत.

एकदा चौपाटीवर काँग्रेसची मीटिंग होती. तेथे हा अवलिया खादीची गांधी टोपी व पँट-शर्ट घालून वावरला होता. याच दरम्यान काही काळ पुन्हा दक्षिणेत काननगड येथे घालवल्यानंतर बाबा पुन्हा मुंबईजवळील बोरिवली येथील कान्हेरी गुंफांमध्ये राहू लागले.

त्यानंतर मात्र १९४७-४८ च्या दरम्यान ते भिवंडी तालुक्यातील गणेशपुरी येथील अकलोली येथे कायम वास्तव्यासाठी आले. गणेशपुरीतील त्यांच्या एक तपाहून अधिक काळात त्यांनी आध्यात्मिक क्षेत्रात उत्तुंग लोकप्रियता मिळविली. तिथल्या आदिवासीबहुल भागात सामाजिक कार्यदेखील केले. अकलोली येथील औषधी गुण असलेल्या गरम पाण्याच्या नैसर्गिक झऱ्यांभोवती बांधकाम करून नागरिकांना स्नानादी स्वच्छतेच्या दृष्टीने खुले करून दिले, विहिरी बांधल्या. तेथील शिवमंदिराजवळ वैकुंठ आश्रम, धर्मशाळा बांधली. तेथील आदिवासी आणि गरीब मुलांसाठी शाळा बांधली व ती जिल्हाधिकाऱ्यांकडे सुपूर्द केली.

जवळच्या वसई तालुक्यातील राजगोपाल भट, वकील पी.के. नायर, मोनप्पण्णा, तसेच तत्कालीन प्रसिद्ध अभिजन तेथे जाऊन आपले योगदान देत. बाबांनी अनेकांना वज्रेश्वरी, तुंगारेश्वर परिसरातील औषधी वनस्पतियुक्त जंगलात नेऊन त्यांना त्रिफळाचूर्ण, ब्राह्मीतेल आदी औषधी वस्तू बनविण्यास शिकविले. थोडक्यात, त्यांना रोजगार उपलब्ध करून दिला. गणेशपुरी परिसरात भद्रकाली देवीचे मंदिर बांधले, अनुष्ठान करण्यासाठी प्रसिद्ध असलेल्या अनसूया मंदिराचा जीर्णोद्धार केला. अन्नछत्रे सुरू केली. आदिवासींसाठी आरोग्यादी सुविधा उपलब्ध करून दिल्या. गणेशपुरीत डीझेलवर चालणारे पॉवरहाउस त्या काळी बांधले. वसईकडे जाणारा रस्ता गणेशपुरीपर्यंत वाढवून घेतला व भाविकांची सोय केली.

पुढे बाबांच्या निर्वाणानंतर हरी गोविंदराव म्हणजे भाऊसाहेब वर्तक यांच्या अध्यक्षतेखाली 'श्री भीमेश्वर सद्गुरू नित्यानंद संस्था' स्थापन करण्यात आली. या संस्थेतर्फे आज शाळा, बालभोजनगृह चालविले जाते.

बाबांचा भक्तगण दिवसेंदिवस वाढत होता. पुरीचे श्री शंकराचार्य, श्रीमत् विश्वेश्वरतीर्थ, स्वामी चिन्मयानंद असे आध्यात्मिक क्षेत्रातील महानुभाव, तसेच निजलिंगप्पा, कन्नमवार, जत्तींसारखे राजकीय धुरीण, पं. मदनमोहन मालवियांचे जामात डॉ. ऋषी असे दिग्गज गणेशपुरीत प्रस्थान ठेवत असत. बाबांच्या भक्तगणांची फार मोठी संख्या परदेशात आहे. बाबांचे शिष्य चाळीसगावचे स्वामी मुक्तानंद यांनी कार्य पुढे चालविले. 'गुरुदेव सिद्धपीठ आश्रमा'चे कामकाज पाहण्यास सुरुवात केली. बाबांनी सुरुवातीला बांधलेल्या दोन खोल्यांच्या धर्मशाळेचे 'गुरुदेव सिद्धपीठ आश्रम' या अत्याधुनिक ध्यानधारणा वास्तूत रूपांतर झाले. या वास्तूत महाराष्ट्र शासनाने दिलेल्या दहा एकर भूखंडामध्ये सध्या विस्तृत म्यूझियम उभे आहे. बाबांनी स्वामी मुक्तानंदांना आपल्या पादुकांच्या रूपात वारसा बहाल केला. स्वामी मुक्तानंदांनी ही आध्यात्मिक परंपरा पुढे चालू ठेवली.

समाधी घेण्यापूर्वी बाबांनी त्यांच्या एका भक्ताने बांधून दिलेल्या 'बेंगलूरवाला' इमारतीत वास्तव्य केले. याच काळात प्रकृती अस्वास्थ्यामुळे बाबांनी प्रायोपवेशन करून आपले प्राण त्यागले. 'स्वामी झाला, ऋषी-महात्मा झाला, देव झाला; आता स्थिर समाधी' हे बाबांनी उच्चारलेले शेवटचे वाक्य आहे.

— संदीप राऊत

## निरंजन रघुनाथ
***अवधूत, श्रीधरपंत निरंजन***
**दत्त संप्रदाय, लेखक, ग्रंथकार**
**१८६० - १९३३**

**धा**रूर तालुक्यातील कळंब गावी निरंजन रघुनाथ यांचा जन्म झाला. कळंब हे वंजरा नदीच्या तीरावर आहे. त्यांच्या आईचे नाव लक्ष्मी होते. यांच्या घराण्यात गावचे कुलकर्णीपण होते. पण घरची गरिबी असल्यामुळे निरंजन पुणे येथे नष्टे नावाच्या हुंडेकऱ्यांकडे कारभारी म्हणून नोकरीस लागले. ते एकदा पुण्यातल्या विष्णुमंदिरात ठाकुरदासबाबांच्या कीर्तनाला गेले. त्या कीर्तनाचा प्रभाव पडून त्यांची वृत्ती पालटली. मन विरक्तीकडे झुकले. देहूला तुकोबारायांच्या स्मरणाने विरक्ती तीव्र होऊन इंद्रायणीचे पाणी हातात घेऊन, सूर्याकडे पाहून त्यांनी प्रतिज्ञा केली की, ''आजपासून एक वर्ष सात दिवसांत सगुण साक्षात्कार झाला नाही, तर

प्राणत्याग करीन.'' तिथून ते अकोल्याला व पुढे नाशिकला आले. नाशिक येथे त्यांची रघुनाथ भटजी या सत्पुरुषाशी गाठ पडली. त्यांना कवित्वाची स्फूर्ती झाली.

पाच अभंग रचून त्यांनी ते सद्‌गुरू रघुनाथ भटजींना अर्पण केले. 'दयाळा कृपाळा स्वामी दिगंबरा । कृपेच्या दातारा दीनबंधू ॥ संसाराचे संगे बहु कष्टी झालो । त्रितापे तापलो देहसंगे ॥' या पंक्ती त्यांच्या मनातील बेचैनी व अस्वस्थता दर्शवतात. पुढे त्यांची साधना सुरू झाली. मुखी दत्तनाम घेत अन्नपाण्यावाचून ते तीन दिवस भटकत घोडनगरीला आले व भिकोबा नावाच्या सत्पुरुषाकडे राहिले. त्यांनी दिलेली गोधडी व नरोटी घेऊन ते ब्राह्मणवाड्यास आले. तेथे संस्कृत विद्वान व सत्पुरुष श्री चंडीरामबोवा यांच्याकडे राहिले. निरंजन यांची दत्तदर्शनाची ओढ तीव्र झाली. शेवटी त्यांना स्वप्नसाक्षात्कार झाला.

न

नाशिक येथे त्यांना गुरुलाभ झाला. रघुनाथस्वामींनी त्यांना बोध केला. सद्‌गुरूंनी योगातील अनेक रहस्ये, परमार्थातील अनुभव यांचा प्रत्यय आणून दिला. सद्‌गुरूंचा आशीर्वाद घेऊन त्यांनी ब्रह्मगिरीची प्रदक्षिणा केली. हालअपेष्टा सोसत, पायपीट करीत निरंजन गुजरातला आले. धर्मपूर या राजधानीत त्यांनी सात दिवस मुक्काम केला. बरीच काव्यरचनाही केली. गुरुदेवांना एक भावनामय पत्र देऊन ते गिरनारच्या परिसरात आले. गुरूने उपदेशिलेल्या सगुण ध्यानाचा क्रम तीन महिने चालला होता. गिरनारवर सर्व पवित्र स्थानांचे दर्शन घेऊन त्यांनी गिरिप्रदक्षिणा केली. उतावीळ मनाला स्वप्नातले ध्यान गोचर होईना. द्वारकेचे दर्शन घेऊन ते पुन्हा गिरनारवर पोहोचले. दत्तात्रेयांच्या पादुकांजवळ त्यांनी अन्नपाण्यावाचून तीन दिवस धरणे धरले, तरी दत्तदर्शन होईना. संकल्पाची मुदत संपत येत चालली. शेवटी एक मोठा पाषाण पादुकांजवळ ठेवून त्यावर डोके आपटून घेतल्यामुळे ते बेशुद्ध पडले. कोणीतरी उदक तोंडात घातल्याचा भास झाला व सावध होताच समोर दत्तमहाराज सगुणरूपाने उभे दिसले. श्रींनी त्यांच्या मस्तकावर प्रेमाने हात फिरवला. श्रींनी स्वामींच्या अनुग्रहाचे मनन करण्यास सांगून निरोप घेतला. कपाळावर राहिलेली जखमेची खूण त्यांना सगुण साक्षात्काराची आठवण देई. तेथून निरंजन सोमनाथाचे दर्शन घेऊन नाशिकास गुरुचरणांजवळ येऊन पोहोचले. त्यांनी आत्मचरित्राचा उत्तरार्ध गोदातीरी, शके १८१२ मध्ये पूर्ण केला. 'स्वात्मप्रचिती', 'साक्षात्कार' ही दोन प्रकरणे लिहून त्यांनी ती सद्‌गुरूंना अर्पण केली. नंतर एका संक्रांतीस ब्राह्मण सुवासिनींकडून आपले घर लुटविले आणि पत्नी भगवतीबाई व मुलासहित ते तळवडे गावी राहिले.

मिरज संस्थानाचे अधिपती श्रीमंत गंगाधरराव पटवर्धन यांनी सन्मानाने बोलावून त्यांचा अनुग्रह घेतला आणि त्यांचे चिरंजीव योगिराज यांना मठ बांधून दिला. तसेच, इनाम जमिनीची सनद करून दिली. १९३७ साली 'निरंजन रघुनाथांचे ग्रंथ' या नावाने गद्य-पद्य लेखन प्रसिद्ध झाले, त्यावरून त्यांच्या प्रतिभेची झेप दिसून येते. निरंजन रघुनाथ यांनी वेदान्तशास्त्राचे गंभीर अध्ययन करून आख्याने, पदे, अभंग, आरत्या, गोंधळी, कटिबंध वगैरेंचे लेखन केले. स्वामींचे नातू वामन रामकृष्ण यांच्या हातची जून १९०२ ची एक यादी श्री. यशवंत कोल्हटकर (सांगली) यांना मिळाली ती अशी : १) ज्ञानेश्वरीवर टीका (गद्य), २) अमृतानुभवावर टीका (गद्य), ३) स्फुटपदे, साक्षात्कार व आत्मप्रचिती ही दोन प्रकरणे (पद्य), ४) गीतेवरील शांकरभाष्याची टीका (पद्य), ५) केनोपनिषद टीका (गद्य), ६) मांडुक्योपनिषद टीका (गद्य).

शके १८५५ च्या प्रारंभी निरंजन स्वामींनी संन्यास घेतला व त्याच सालच्या भाद्रपद शु. एकादशीस त्यांनी जलसमाधी घेतली. मिरजेचे श्रीमंत गंगाधरराव पटवर्धन, रामचंद्र तात्या गोखले व गोविंदराज नाना पटवर्धन शास्त्री हे त्यांचे शिष्य होते.

– वि.ग. जोशी

**संदर्भ :**

१. *कोल्हटकर, यशवंत; 'निरंजन रघुनाथांचे ग्रंथ'; सांगली; १९३५, प्रथमावृत्ती.*

## निसर्गदत्त महाराज

***कांबळी, मारुती शिवरामपंत***

**अद्वैत तत्त्वज्ञ, प्रवचनकार**

**१७ एप्रिल १८९७ – ८ सप्टेंबर १९८१**



**नि**सर्गदत्त महाराज म्हणजेच पूर्वाश्रमीचे मारुती शिवरामपंत कांबळी यांचा जन्म चैत्र शुद्ध पौर्णिमेला मुंबई येथे झाला. या दिवशी हनुमान जयंती असल्यामुळे त्यांचे नाव 'मारुती' ठेवण्यात आले. रत्नागिरीमधील कांदळगाव या छोट्या गावी त्यांचे बालपण गेले. त्यांना दोन भाऊ आणि चार बहिणी होत्या. त्यांच्या आईचे नाव पार्वतीबाई. वडिलांच्या मृत्यूनंतर मारुती त्यांनी उदरभरणासाठी मुंबईला आला व छोट्याशा नोकरीनंतर १९१५ साली त्याने विडीतंबाखू विकण्याचे छोटे दुकान सुरू केले. मारुतीचे १९२४ साली सुमतीबाई हिच्याशी लग्न झाले व त्यांना चार मुली व एक मुलगाही झाला.

मारुती यांचा मुळातच परमार्थाकडे अधिक ओढा होता व त्यांचा स्वभाव सत्शील व मनमिळाऊ होता. कीर्तने–प्रवचने ऐकण्याची त्यांना अतिशय गोडी होती. मारुतीचा १९३३ साली नवनाथ संप्रदायाच्या इंचगिरी येथील शाखेचे सिद्धरामेश्वर महाराज यांच्याशी परिचय झाला. त्यांची प्रवचने मारुती कधीच चुकवीत नसे. सिद्धरामेश्वर महाराजांनी मारुतीला कसोटीवर पारखून आपला शिष्य बनविले. कालांतराने मारुतीला 'निसर्गदत्त महाराज' असे नामाभिधान लाभले. सद्गुरूंच्या स्वर्गवासानंतर ते इंचगिरी मठाचे मुख्यही झाले. महाराजांनी प्रपंचात राहूनही उत्तम परमार्थ साधला. १९३७ साली महाराज मुंबई सोडून देशाटनासाठी बाहेर पडले आणि १९३८ साली मुंबईत पुन्हा परत आले. तंबाखूचा व्यापारी ही ओळख मागे पडून निसर्गदत्त महाराज या नावाने त्यांना सर्व ओळखू लागले.

१९४२ ते १९४८ या काळात त्यांना पत्नी आणि कन्येच्या वियोगाचे दुःख सोसावे लागले. निसर्गदत्त महाराजांचा शिष्यसंप्रदाय १९५१ पासून वाढू लागला. त्यांनी १९६६ साली आपला व्यवसाय बंद केला आणि ते लोककल्याणार्थ प्रवचने करू लागले. त्यांची ख्याती महाराष्ट्रासह मुंबईतील परदेशी साधकांपर्यंत पोहोचली होती. मुंबईत त्या काळी परदेशी भाविक शांती आणि वेद-उपनिषदांच्या आकर्षणाने भारतात येत असत. त्यांनाही निसर्गदत्त महाराजांच्या लौकिकाची वार्ता कळली. त्यामधून अनेक देशांतील त्यांचे भक्तगण तयार झाले. मोरीस फ्रिडमन या शिष्याने 'I am That' हे निसर्गदत्त महाराजांचे चरित्र लिहून महाराजांची कीर्ती परदेशात पसरविली. पुढे या पुस्तकाचा अनुवाद अनेक परकीय भाषांमध्ये झाला. 'आपला परमार्थ आपल्यापाशीच असतो. प्रथम स्वतःचा शोध घ्या', हे निसर्गदत्तमहाराजांचे तत्त्व त्या ग्रंथात विशद केले आहे. निसर्गदत्त महाराजांनी आपला पिढीजात व्यवसाय सांभाळला. प्रपंचदेखील नेटका केला. कित्येकांना भगवद्भक्तीचा मार्ग दाखवून निसर्गदत्त महाराज ८ सप्टेंबर १९८१ रोजी स्वर्गस्थ झाले.

– संदीप राऊत, दीपक जेवणे

## नृसिंहसरस्वती महाराज

**दत्तसंप्रदाय, प्रवचनकार, लेखक**

**जन्मदिनांक अनुपलब्ध – १८८६**

**नृ**सिंहसरस्वती महाराज यांना भाविक दत्तावतारी संत मानतात. अनेक वर्षे भारतभ्रमण करून अखेरीस ते १८७३ साली आळंदीस आले व पुढे कायमचेच



आळंदीकर बनून राहिले. आळंदी येथे येण्यापूर्वी ते अनेक वर्षे पंढरपूरमध्येही वास्तव्य करून होते. नृसिंहसरस्वती महाराज म्हणजे विद्वत्ता, योगसामर्थ्य आणि रसाळ भजन यांचा सुरेख संगम होता. आळंदीला येताच त्यांनी सर्वांना आपल्या भजनप्रेमाने वेडे करून टाकले. भजनाच्या जोडीला ते ज्ञानेश्वरी, नाथभागवत या ग्रंथांवर प्रवचन करीत. त्यांची निरूपणपद्धती सहज, सोपी व आकर्षक होती. त्यांच्या नित्य प्रवचनाला आळंदीकर भाविक मोठ्या संख्येने गर्दी करत होते. आळंदीत त्यांनी नवचैतन्य निर्माण केले. शांकरभाष्य, उपनिषदे यांचाही त्यांचा दांडगा अभ्यास होता. त्यांच्याकडे दर्शनास येणाऱ्या भाविकांना ते संत ज्ञानेश्वर समाधीच्या दर्शनास पाठवीत, अशी त्यांची संत ज्ञानदेवांवर अपार श्रद्धा होती.

त्यांनी इंद्रायणीला सुंदर घाट बांधला, तसेच गोपाळपूर भागात श्री विठ्ठलरुक्मिणी मंदिर बांधले. संत ज्ञानदेव समाधी मंदिरात संत मुक्ताबाई यांचे मंदिर बांधले. १८८१ मध्ये त्यांनी मुक्ताई मंदिराचे काम पूर्ण केले. या मंदिराचा तुळशीवृंदावनाजवळचा एक खांब त्यांनी स्वत:च्या श्रमदानाने बांधला. त्यांनी इंद्रायणी नदीकिनारी एका ओळीत चौदा वृक्षांचे रोपण केले. नृसिंहसरस्वती महाराजांनी १८८१ मध्ये संत ज्ञानेश्वर रथोत्सव सुरू केला. त्यासाठी त्यांनी सुंदर रथ तयार करून घेतला. फुलगाव येथे त्यांच्या प्रयत्नांनी व प्रेरणेने माध्यमिक शाळा सुरू करण्यात आली. या कार्यात महाराजांचे भक्त श्री धोत्रे यांनी पुढाकार घेतला होता.

महाराजांनी अनेक प्रकारची काव्यरचना केलेली आहे. त्यांनी रचलेले 'श्रीज्ञानेश्वराष्टकस्तोत्रम्' अत्यंत प्रसिद्ध आहे, तसेच त्यांचे 'ऋणमोचनस्तोत्र' भाविकांमध्ये विशेष लोकप्रिय ठरलेले आहे. माणूस जन्माला येतो ते आई-वडिलांचे व भूमीचे ऋण घेऊनच. अशा अनेक ऋणांतून मुक्त होण्याचा प्रयत्न हे त्याचे आद्य कर्तव्य आहे अशी महाराजांची शिकवण होती. त्यासाठी त्यांनी 'ऋणमोचनस्तोत्र' लिहिले.

भाविकांमध्ये जनजागृती केली; तसेच महाराजांनी रचलले 'गोविंदाष्टकम्', 'गुरुपरंपरास्तोत्र'सुद्धा भाविकांमध्ये विशेष प्रसिद्ध असून आळंदीमध्ये संत ज्ञानेश्वरांच्या समाधीपुढे ही स्तोत्रे नित्यनेमाने म्हटली जातात. नृसिंहसरस्वती महाराजांचा शिष्यवर्ग खूप मोठा असून तो देशभर पसरलेला आहे. संत अण्णासाहेब पटवर्धन, संत देव मामलेदार, श्री राधाकृष्ण स्वामी, श्री विष्णुमहाराज रहिमतपूर, श्री सच्चिदाश्रम स्वामी-लोणार, श्री आपदेव महाराज-नागपूर हे महाराष्ट्राच्या संत मंडळीतील मान्यवर संत नृसिंहसरस्वती महाराजांचे शिष्य होत. महाराजांना अक्कलकोट स्वामी समर्थांची पूर्ण कृपा प्राप्त झाली होती. सिद्धींचा त्याग करून भाविकांना आत्मज्ञान देण्याचा संदेश स्वामींनी महाराजांना दिला. १८६२ ते १८७४ अशी बारा वर्षे महाराजांचे वास्तव्य पंढरीत होते. तेथे त्यांना आळंदीस जाऊन ज्ञानदेवांच्या क्षेत्रात राहण्याचा विठ्ठलाचा दृष्टान्त झाला व पुढे १८७४ ते १८८६ पर्यंत महाराजांनी आळंदीत वास्तव्य केले. आळंदीतही अनेक प्रकारची समाजोपयोगी कार्ये करून त्यांनी १८८६ मध्ये इंद्रायणी काठी योगसमाधी घेतली.

— विद्याधर ताठे

***

# प

## पंडित, बाबाजी महाराज

***पंडित, नारायण पैकाजी***

**मधुराद्वैत संप्रदाय, प्रवचनकार, ग्रंथकार**

**१२ जानेवारी १८८६ – १ फेब्रुवारी १९६४**



आर्यधर्माचे श्रेष्ठत्व तर्कशुद्धरीत्या पटवून देण्याचे गुरूने स्वीकारलेले अधिसार व्रत तेवढ्याच समर्थपणे चालविणारे आधुनिक संतश्रेष्ठ बाबाजी महाराज म्हणजेच नारायण पैकाजी पंडित यांचा जन्म पौष शुद्ध सप्तमी शके १८०७ रोजी झाला. त्यांच्या आईचे नाव जानकीबाई होते. पंडित घराणे हे मूळचे झाशी या गावचे होते. यांचे पूर्वज झाशी येथे सरदार होते.

१८५७ च्या बंडानंतर हे घराणे विखुरले व बाबाजी महाराज विदर्भातील चंद्रपूर येथे स्थिरावले. बाबाजी महाराजांचे प्राथमिक व शालेय शिक्षण चंद्रपूर येथे झाले, तसेच महाविद्यालयीन शिक्षण नागपूरला हिस्लॉप महाविद्यालय येथे झाले. महाराजांचे वडीलबंधू दत्तात्रेय पंडित हे नागपूरला होते. आपल्या अल्पशा वेतनातून त्यांनी भावाचे शिक्षण केले. घरच्या आध्यात्मिक वातावरणामुळे ते दत्तात्रेयाची उपासना करीत व गुरुचरित्राची पोथी नित्यनेमाने वाचीत.

एकदा प्रज्ञाचक्षू श्री गुलाबराव महाराज नागपूर येथे आले असता बाबाजी महाराज त्यांचे मित्र दत्तात्रेय खापरे यांच्या सोबत त्यांच्या दर्शनाला गेले. प्रथम भेटीतच गुलाबराव महाराजांनी या आपल्या शिष्याला ओळखले. सात-आठ तासांच्या प्रतीक्षेनंतर महाराजांची भेट घडली. ज्या गुरूंच्या शोधात आपण फिरतो आहोत, ते हेच गुरू याचा साक्षात्कार बाबाजी महाराज यांना झाला. 'ये हृदयीचे ते हृदयी' या उक्तीनुसार गुरु-शिष्याचे नाते जुळून आले. गुलाबराव महाराजांची ही भेट बाबाजी यांच्या जीवनाला कलाटणी देणारी ठरली.

एकदा कात्यायनी व्रताच्या ठिकाणी बाबाजी गेले व व्रतोपासना संपल्यावर गुलाबराव महाराजांचा निरोप घेण्यास गेले. त्या वेळी गुलाबराव महाराज त्यांच्यावर रागावले व म्हणाले, ''मी तुला बोलावलेच कधी होते रे? जातोस तर जा.'' कोवळ्या वयाच्या बाबाजी महाराजांना ते शब्द लागले. ही अवस्था त्यांनी आपल्या अभंगगाथेत वर्णिली आहे:

''पाहोनी मातेचे सरोष वदन। आला तै दाटून कंठ दु:खे॥
वाचा पांगुळली करवेना गोठ। कापू लागे ओठ थरथरा॥
धरवेना धीर कोसळले रडे। लज्जेचे बिरडे सुटोनिया॥
ज्ञानेश्वर कन्या स्तनी फुटे पान्हा। पाहोनिया तान्हा ओसंगा घे॥'' अशा प्रकारे गुरूने शिष्याला पोटाशी धरले व हे बंधन दृढ झाले.

बाबाजी महाराजांचे लग्न रामचंद्र पुसदकर यांची कन्या मीरा हिच्याशी झाले. लग्नानंतर तिचे 'गिरिजा' असे नाव ठेवण्यात आले. बाबाजी महाराजांचे मन मात्र

गुलाबराव महाराजांकडे लागले होते. नोकरीतून मिळणारा संपूर्ण पगार महाराजांसाठी खर्च होत असे. एकदा कात्यायनी व्रतासाठी एक महिन्याची रजा नोकरीतून मिळेना म्हणून बाबाजींनी राजीनामा दिला आणि सत्संगाला वाहून घेतले.

वयाच्या चोविसाव्या वर्षी त्यांनी गुरूंच्या सेवेला, भक्तीला प्रारंभ केला. त्यांचे कपडे धुणे, पूजेची तयारी करणे, स्नानास पाणी देणे, स्वयंपाक करणे इत्यादी कामे ते करीत असत. नुसती गुरूचीच नाही, तर गुरुबंधूची सेवाही करीत.

बाबाजी गुलाबराव महाराजांना अनेक ग्रंथ वाचून दाखवीत. त्यांच्या प्रवचनांची टिपणे काढीत व ती सुवाच्य अक्षरात लिहून ठेवत. गुलाबराव महाराजांनी एकदा या शिष्याची परीक्षा घ्यायचे ठरवले व पैसा, प्रसिद्धी, प्रतिष्ठा यांपैकी तुला काय पाहिजे असे विचारले. यावर बाबाजी महाराजांनी, ''सद्‌गुरुचरणाशिवाय काहीही नको,'' असे उत्तर दिले.

प

वयाच्या अवघ्या चौतिसाव्या वर्षी गुलाबराव महाराजांचे निधन झाले. बाबाजी महाराज त्यांच्या अस्थी घेऊन प्रयागला गेले. त्या वेळी रात्री महाराजांनी स्वप्नात दर्शन दिले व अंगाऱ्याची पुडी प्रसाद म्हणून दिली. सकाळी उठल्यावर अंथरुणात खरोखरच एक पुडी मिळाली. खरे तर, गुलाबराव महाराजांनी मधुराद्वैत संप्रदायाचे अधिकारी म्हणून बाबाजी महाराजांनाच नियुक्त केले होते. आपल्या पंचशिष्यांमधील मुख्य स्थान बाबाजी महाराजांना दिले. 'ऱ्हीं नारायण नम: ऱ्हीं' या बीजाक्षर मंत्राने गुलाबराव महाराजांनी बाबाजी महाराजांना वंदन केले आहे.

श्री गुलाबराव महाराजांचे उत्तराधिकारी म्हणून बाबाजी महाराजांची नियुक्ती झाली. त्यांनी विद्वज्जड अशा अनेक ग्रंथांवर निरूपणे सांगितली, ही एक प्रकारे त्यांची परीक्षाच होती. शंकराचार्यांकडून त्यांच्या अभ्यासासाठी, लेखनासाठी बाबाजींना 'वेदान्त केसरी' या उपाधीने गौरविण्यात आले. धर्मग्रंथांचा, तत्कालीन विद्वानांच्या मतांचा अभ्यास, पौर्वात्य व पाश्चिमात्य विचारांचा सखोल अभ्यास असे त्यांचे अभ्यासू जीवन होते. अमरावतीच्या ज्ञानेश्वर ग्रंथालयाच्या तळघरात बाबाजी महाराज तासन्‌तास अभ्यास करीत. बाबाजी महाराज यांनी काढलेली टिपणे, आजही उपलब्ध आहेत. 'अभ्यासोनि प्रकटावे' या उक्तीनुसार ते साधार शास्त्रचर्चा करीत.

उत्सव व व्रतांमध्ये भजन, भूपाळ्या हे तालासुरात व्हावे यासाठी अमरावतीच्या नामदेवबुवा या गायकाकडे ते गायन शिकले. स्वत: रचलेला एक अभंग ते रोज गात असत. त्यांनी काही काळ आयुर्वेदाच्या ग्रंथांचा अभ्यास केला व समाजोपयोगी आयुर्वेदिक औषधांचा विनामूल्य सदुपयोग करून अनेकांना रोगमुक्त केले. त्यांनी अभ्यासासोबतच भामती, अद्वैतसिद्धी, बृहदारण्यवार्तिक अशा विद्वज्जड विषयांचे अध्यापन केले.

'भगवद्‌भक्ती सौरभ', 'नारदभक्तिसूत्र', 'प्रीतिनर्तन', 'चांगदेव पासष्टी' अशा अनेक ग्रंथांवर सोपी निरूपणे शिष्यांना ऐकवली. वेदान्तातील जटिल प्रमेये, अभंग, ओव्या यांवर त्यांचे प्रभुत्व होते. अलंकारिक भाषा न वापरता ते पारदर्शक शास्त्रीय मांडणी करीत. त्यांच्या ग्रंथलेखनामध्ये 'आर्यधर्मोपपत्ती' (१९२६), 'हरिपाठरहस्य' (१९५४), 'अमृतानुभव कौमुदी' (१९५६), 'श्री ज्ञानेश्वरी गूढार्थदीपिका' : खंड १ ते ५ (१९६२), विविध लेखसंग्रह, प्रथम व द्वितीय खंड (१९६५), 'अभंगगाथा' (१९७०), 'भागवतावरील प्रवचने' (१९८८), 'पंचदशीवरील प्रवचने' (१९८८) अशी अभ्यासपूर्ण ग्रंथसंपदा प्रकाशित झाली आहे. त्यांनी श्री गुलाबराव महाराजांचे व ज्ञानदेवांचे वाङ्‌मय नव्या आंग्लविद्याविभूषित पिढीला समजावे अशा रितीने सोप्या, सुलभ भाषेत मांडले.

गूढार्थदीपिका हे ज्ञानेश्वरीवरील भाष्य आहे. अभ्यासक, वाचकांना ज्ञानेश्वरीच्या अर्थासोबतच ज्ञानेश्वरीतून व्यक्त होणारा गूढार्थ कळावा हा या ग्रंथापाठीमागचा उद्देश आहे. बाबाजी महाराज प्रत्येक श्लोकामध्ये दडलेला गूढ अर्थ विशद करतात. सोपी, रसाळ व प्रासादिक भाषा या भाषिक वैशिष्ट्यांसह

भक्तिमार्गावरील शास्त्रीय अधिष्ठानासह तो ग्रंथ प्रसिद्ध आहे. सुबोध शैलीतील चेतोहर विवेचन म्हणजेच बाबाजी महाराजांचा 'हरिपाठरहस्य' हा ग्रंथ होय. हरिपाठाच्या अठ्ठावीस अभंगांत वेदान्ताची अनेक प्रमेये ठासून भरली आहेत. या प्रमेयांवरील विवरण बाबाजी महाराजांनी हरिपाठरहस्यात केले आहे.

'अमृतानुभव' या ज्ञानेश्वर महाराजांच्या ग्रंथावरील अजोड समीक्षा म्हणजेच 'अमृतानुभव कौमुदी' हा ग्रंथ होय. श्री शंकराचार्यांचा वेदान्तविचार, ज्ञानेश्वरीतील वेदान्तविचार हे एकरूप आहेत हे अभ्यासकांच्या निदर्शनास आणून देणे हे कौमुदी लेखनापाठीमागचे उद्दिष्ट होते. वारकरी संप्रदायाची बहरलेली शाखा म्हणजेच मधुरा संप्रदाय होय. गुलाबराव महाराजांनी याची स्थापना केली व त्याची धुरा बाबाजी महाराजांनी वाहिली. जन्माष्टमी, कात्यायनी व शिवरात्र असे तीन मोठे उत्सव आजही साजरे केले जातात. अनुग्रहींना आणि भक्तांना याचा लाभ होतो. श्रीकृष्णमूर्ती व श्रीज्ञानेश्वरपादुका एवढेच भांडवल ठेवून गुरूची आज्ञापालन करीत, बाबाजींनी तन-मन व वाणीद्वारे संप्रदायाची पताका फडकवीत ठेवली.

बाबाजी महाराजांचे पुत्र वामन नारायण पंडित हेसुद्धा वेदशास्त्रसंपन्न व भाषाशास्त्रज्ञ आणि कोशकार होते; परंतु बाबाजी महाराजांना घराण्यातील वारस मान्य नव्हता.

आज बाबाजी महाराजांचे पुतणे पुरुषोत्तम दत्तात्रेय पंडित यांनी 'भागवत धर्माची तत्त्वमीमांसा' या विषयावर प्रबंधलेखन केले आहे व हा अभ्यासवारसा पुढे चालवला आहे. महाशिवरात्रीच्या, नवरात्राच्या पहिल्या दिवशी पार्थिव पूजा करून 'महादेवाय नम: विसर्जनम्' असे म्हणून महाराजांनी इहलोकीची यात्रा संपवली.

— सुपर्णा कुलकर्णी

**संदर्भ :**

१. *डॉ. खरे, अंजली अनिल; 'वेदान्त केसरी श्री बाबाजी महाराज पंडित यांची विचारसंपदा'; श्री मंगेश प्रकाशन, नागपूर; २०००.*
२. *डॉ. पंडित, राम; 'वेदान्त केसरी बाबाजी महाराज पंडित वाङ्मय दर्शन'; स्कंददास स्मारक ग्रंथ न्यास, कुर्ला, मुंबई.*

## पट्टेकर, गजानन महाराज

***पट्टेकर (गुप्ते), गजानन केशव***

**दत्तसंप्रदाय**

**३० ऑक्टोबर १९१० – १ नोव्हेंबर १९९१**



गजानन केशव पट्टेकर हे ठाणे येथील संत गजानन महाराज पट्टेकर किंवा अण्णासाहेब पट्टेकर या नावाने ओळखले जातात.

पट्टेकर यांचे मूळ आडनाव गुप्ते. छत्रपती शिवरायांच्या काळात नाशिक, नगर आणि ठाणे या जिल्ह्यांच्या सरहद्दीवर पट्टा या नावाचा किल्ला होता. किल्ला आणि आजूबाजूचा परिसर औंढा पट्टा या नावाने ओळखला जात असे. गुप्ते घराणे या औंढा पट्ट्याचे सरकारी अंमलदार होते.

इंग्रजी राज्य आल्यावर किल्ल्यांचे महत्त्व संपले. तेव्हा गुप्ते मंडळींनी पट्ट्याहून ठाणे जिल्ह्यातील शहापूर येथे स्थलांतर केले. हे शहापूर मुंबई-नाशिक महामार्गावर आहे.

अण्णासाहेबांचे वडील केशवराव हे मामलेदार व मॅजिस्ट्रेट होते. अण्णासाहेबांच्या आई सत्यभामाबाई या शिवभक्त होत्या. त्यांनी सोळा सोमवार व्रत ओळीने पाच वर्षे केले होते. एकंदर पट्टेकर मंडळी वणीची सप्तशृंगीदेवी आणि श्री त्र्यंबकेश्वर यांची भक्ती करीत असत. केशवराव पट्टेकरांचे बंधू आत्मारामपंत पट्टेकर हे

प

शहापुरात साधू म्हणूनच प्रसिद्ध होते. अशा भगवद्‌भक्त घराण्यात, श्रीगजाननाच्या कृपेने, धनत्रयोदशीच्या मुहूर्तावर गजानन महाराज ऊर्फ अण्णासाहेब यांचा जन्म झाला. तत्कालीन रत्नागिरी जिल्ह्यातल्या देवगड तालुक्यातल्या विजयदुर्गपासून साधारण दहा कि.मी. अंतरावरील पाटगाव या छोट्याशा खेड्यात बाळकृष्ण केशव गोळपकर वैद्य हे राहत असत.

लोक त्यांना दत्तसंप्रदायातील सत्पुरुष परमपूज्य दादामहाराज पाटगावकर या नावाने ओळखत असत. हे दादामहाराज अण्णासाहेब पट्टेकरांचे गुरू होत. गुरूंच्या आदेशानुसार अण्णासाहेबांनी लष्करात नोकरी धरली. तो दुसऱ्या महायुद्धाचा काळ होता.

पुढे सैन्याशीच संबंधित, पण नागरी क्षेत्रात अण्णासाहेबांना बढती मिळाली. त्यांच्या अधिकारपदाला ‘गॅझेटेड सिव्हिलियन सिक्युरिटी ऑफिसर’ अशी संज्ञा होती. आपल्या नोकरीच्या कालखंडात अण्णासाहेबांनी सगळ्याच वरिष्ठ अधिकाऱ्यांकडून शाबासकी मिळविली. त्यांपैकी महत्त्वाचे नाव म्हणजे जनरल राजेंद्रसिंहजी. हे राजेंद्रसिंहजी पुढे भारताचे सरसेनापती झाले.

अण्णासाहेबांना एकूण सहा भाऊ आणि तीन बहिणी. कौटुंबिक जबाबदाऱ्यांमधून मोकळे झाल्यावर १९५२ साली अण्णासाहेबांनी नोकरीचा राजीनामा दिला. लग्नाच्या बंधनात अडकायचे नाही, हे त्यांनी अगोदरच ठरवले होते. नोकरीतून मुक्त झाल्यावर त्यांनी देशभर उदंड तीर्थयात्रा केल्या. या सगळ्या कालखंडात त्यांची आध्यात्मिक साधना दिवसेंदिवस अधिकाधिक वाढत गेली.

ठाण्याला टेंभी नाक्याजवळ पट्टेकर कुटुंबीयांचे घर होते. जवळच अण्णासाहेबांचे बालमित्र भगवान तेली व जगन्नाथ तेली यांचे घर होते.

अण्णासाहेब दुपारी साडेतीन ते संध्याकाळी साडेपाच या काळात तेलींच्या घरी जात असत. तेली बंधूंच्या भगिनी मथुराबाई यांनी एकदा त्यांच्यावर ओढवलेल्या आकस्मिक संकटाबद्दल अण्णासाहेबांना उपाय विचारला. त्यांनी तो सांगितला आणि मथुराबाईंना त्याचा गुण आला.

ही वार्ता तोंडातोंडी पसरत गेली. हळूहळू अण्णासाहेबांना उपाय विचारण्यासाठी येणारे लोक वाढू लागले. अण्णासाहेब लोकांना प्रथम ‘नाम’ घेण्यास सांगत आणि मग अगदी साधा, सोपा असा एखादा उपाय सुचवत. लोकांना गुण येत असे. यातूनच हळूहळू लोक अण्णासाहेबांना ‘गजानन महाराज’ म्हणू लागले.

अडल्यानडलेल्यांच्या समस्या सोडवीत असताना त्यांचा प्रवासही सारखा चालू असे. ठाणे आणि मुंबई व आसपासच्या अनेक ठिकाणी, अनेक भक्तांच्या घरी ते केव्हाही जात आणि राहत असत.

महाराज स्वत: अनेक संत-सत्पुरुषांच्या भेटी आवर्जून घेत असत. तसेच, कित्येक संत स्वत: होऊन त्यांना भेटायला येत असत. यांतली काही ठळक नावे म्हणजे, धामणगावचे प.पू. मुंगसाजी महाराज, गगनगिरी महाराज, वज्रेश्वरीचे स्वामी नित्यानंद आणि स्वामी मुक्तानंद, संत गाडगे महाराज, बेळगावच्या प.पू. श्री कलावतीदेवी, रा.स्व. संघाचे द्वितीय सरसंघचालक प.पू. श्री गोळवलकर गुरुजी, इत्यादी.

पट्टेकर महाराज जेव्हा तीर्थयात्रा करीत वेगवेगळ्या देवस्थानांमध्ये जात असत, तेव्हा त्यांच्या बरोबरच्या भक्तमंडळींना त्या-त्या स्थानातल्या देवदैवतांची दिव्य दर्शने प्रत्यक्ष घडत असत, असा अनेकांचा अनुभव आहे.

रंजल्यागांजल्या गोरगरीब जनतेप्रमाणेच समाजातील प्रतिष्ठित लोक, मोठे अधिकारी, राजकीय नेते, सामाजिक कार्यकर्ते, खेळाडू अशी मंडळीही महाराजांकडे येत असत. त्यांपैकी काही ठळक नावे म्हणजे सुनील गावस्कर, दिलीप वेंगसरकर, प्रख्यात वकील आणि काँग्रेस नेते प्रभाकर हेगडे, शिवसेना नेते आनंद दिघे, शिवसेनाप्रमुख बाळासाहेब ठाकरे इत्यादी.

गजानन महाराज पट्टेकर यांचे वयाच्या एक्याऐंशीव्या वर्षी महानिर्वाण झाले.

– मल्हार कृष्ण गोखले

## पटवर्धन, अण्णासाहेब

***पटवर्धन, विनायक भाऊसाहेब***

**सत्पुरुष, महर्षी, वैद्यक सेवा**

**४ मे १८४७ – १९१७**



**म**हर्षी अण्णासाहेबांचे घराणे मूळचे सरदारी बाण्याचे होते. कोकणात पेशव्यांच्या आरमाराचे अधिपती धुळप म्हणून होते. त्यांच्या पदरी अण्णासाहेबांचे पूर्वज फडणिशीचे काम करीत असत. त्यानंतर त्यांचे पिताश्री यांनी वकिलीची परीक्षा देऊन मुंबईत वकिली केली. तथापि, तेथील हवा न सोसल्याने त्यांनी पुण्यात शनिवारवाड्याजवळ घर बांधून तेथे हे कुटुंब राहावयास आले. त्यांचे वडील भाऊसाहेब हे एक रुबाबदार व्यक्तिमत्त्वाचे विलासी स्वभावाचे होते. त्यांची पत्नी साध्वी जानकीबाई होत्या. यापण करारी आणि स्वाभिमानी होत्या, तसेच त्या तपस्वी व अत्यंत श्रद्धाळू होत्या. पटवर्धनांचे कुलदैवत गजानन होते.

त्या रोज ओंकारेश्वर, गुंडाचा गणपती व भिकारदास मारुतीच्या दर्शनाला जात असत. त्यांना मुली झाल्या; पण पुत्रसंतान झाले नव्हते, म्हणून जानकीबाईंनी गुंडाच्या गणपतीला प्रदक्षिणा घातल्या. कठोर तपाचरण केले. त्याचे फळ म्हणजे वैशाख वद्य चतुर्थीला, शके १७६९ रोजी त्यांना पुत्ररत्न लाभले. त्याचे नाव 'विनायक' असे ठेवले, ते हे महर्षी अण्णासाहेब होत. त्यांच्या पाठीवर २–३ वर्षांनी त्यांना एक भाऊ झाला. त्याचे नाव नारायण होते. आईचा देवदर्शनाचा नेम ते अत्यंत श्रद्धेने करीत असत. अण्णासाहेबांचा विवाह दामल्यांच्या रमाबाई यांच्याबरोबर झाला. त्यांना एक मुलगा व एक मुलगी झाली.

अण्णासाहेब हे तैलबुद्धीचे होते आणि त्यांची अफाट स्मरणशक्ती होती. त्यांचे राहणीमान श्रीमंती थाटाचे व ऐटबाज होते. पुण्यात डेक्कन कॉलेजमध्ये बी.ए. पदवी संपादन केल्यावर पुढे सन १८६८ ते १८८० पर्यंत ते मुंबईस होते. तेव्हा त्यांनी एलएल.बी. व एल.एम. ॲण्ड एस. या लॉ व वैद्यकीय शिक्षणाच्या पदव्या संपादन केल्या. त्याबरोबर आयुर्वेदाचाही अभ्यास केला .

पुण्यात आल्यावर त्यांनी वैद्य महादेवशास्त्री लागवणकर यांच्याकडे आयुर्वेदाचे शिक्षण घेतले. वडिलांच्या सांगण्याप्रमाणे विनायकरावांनी प्रथम वकिलीचा व्यवसाय पुणे येथे राहून उत्तम प्रकारे केला. विद्यार्थिदशेत त्यांनी सामाजिक चळवळीत भाग घेतला होता. पुढे त्यांनी म.गो. रानडे, विष्णुशास्त्री पंडित, लोकमान्य टिळक यांच्याबरोबर सामाजिक व राष्ट्रीय कार्यात पुष्कळ सहभाग घेऊन कार्य केले. तथापि, सुधारकांची अभिमानशून्यता, आर्य संस्कृतीचे अज्ञान, त्याबद्दलची उदासीनता पाहून त्यांनी या लोकांना रामराम ठोकला. त्यानंतर त्यांनी त्या वेळच्या म्युनिसिपालिटीच्या निवडणुका लढविल्या व त्यांत ते निवडून येत असत. त्या वेळी त्यांनी समाजहिताची पुष्कळ कामे केली. संस्थानी चळवळीत त्यांनी सहभाग घेतला. त्यांची प्रकरणे कोर्टात चालविली.

पुण्यात अण्णासाहेबांनी माधवराव नामजोशी यांच्या मदतीने 'किरण' नावाचे मराठी आणि 'डेक्कन स्टार' नावाचे इंग्रजी पत्रक सुरू केले. पुढे नामजोशींना ते काम जमेना म्हणून ते बंद झाले. पुढे 'केसरी' व 'मराठा' ही पत्रके सुरू झाली. ते मोठ्या अभिमानाने म्हणत असत की, ''या दोन्ही वर्तमानपत्रांचे डिक्लरेशन माझ्या हातचे आहे.'' ते मद्रासला एका प्रकरणाच्या कामानिमित्ताने सुमारे ३–४ वर्षे होते. मद्रासच्या वास्तव्यात त्यांची भेट

रामचंद्र अय्यास्वामींशी पडली. त्यांच्यामुळे कांचीपीठाशी त्यांचा संपर्क झाला होता. त्या वेळी त्यांना अनेक प्रकारच्या मंत्रशास्त्राची माहिती झाली होती. त्याच वास्तव्यात त्यांना घटसर्पाच्या आजारातून अंतकाळचा देखावा दिसला. त्यातून ते बरे झाले; पण त्यांच्यात फार मोठे परिवर्तन झाले. ते केवळ पंचा–उपरण्यावर राहू लागले. डोक्यास मुंडासे बांधत असत. मुलांच्या मुंजीनिमित्ताने ते पुण्यास आले; परंतु तेथून परत कोठेही गेले नाहीत. (फक्त आळंदीस गुरुस्थान म्हणून जात असत.)

कांचीच्या महाराजांनी अण्णासाहेबांचा गौरव अशा शब्दांत केला होता की, ''हा कोहिनूर हिरा आहे. हा साक्षात दक्षिणेकडचा अगस्ती आहे.''

सरदार रायरीकर यांच्यामुळे आळंदीच्या नृसिंह सरस्वती स्वामींची भेट झाली होती. हेच अण्णासाहेबांचे गुरू होते. त्यांच्याकडे येणे–जाणे वाढले होते. योगमार्गाचा अभ्यास झाला होता. एकदा स्वामींनी त्यांना सांगितले, वकिली बंद करून वैद्यकीय व्यवसाय सुरू करावा. त्याप्रमाणे ते रुग्णांना आयुर्वेदाप्रमाणे चिकित्सा आणि औषधे देऊ लागले. आता त्यांच्यातील दैवी शक्तीचा अनुभव सर्वांना येऊ लागला.

अण्णासाहेब यांच्याकडे गरीब, श्रीमंत, सर्व जाती-धर्मांचे लोक येत असत. ते सर्वांना समान वागणूक देत असत. त्यांनी अनेकांना फार मोठ्या असाध्य रोगांतूनही बाहेर काढले होते. एकूणच दैवी योजनेचे काम सुरू होते. त्यांना नाडीपरीक्षेचे दर्शन, स्पर्शन व प्रश्न यांचे जबरदस्त ज्ञान होते. अशा प्रकारे वैद्यकीय सेवाकार्य सुरू होते.

मद्रासहून पुण्यात परतल्यावर त्यांचा सर्वप्रकारे सर्वसंगपरित्याग झाला होता. पारमार्थिक गुणांचा आविष्कार प्रकट होत होता. जरी पेहराव व रूप बदलले असले, तरी त्यांची तेजस्विता कमी झाली नव्हती. नेहमी प्रसन्न मुद्रा असे. ते हास्यविनोद करीत असत. बराच काळ ते रुग्ण तपासत असत. इतर वेळी ते साधनेत असत. त्यांची झोप अत्यल्प होती. आहारही अत्यंत अल्प झाला होता. अण्णासाहेब संध्यावंदन, श्रीगुरुचरित्र ग्रंथवाचन, विष्णुसहस्रनामाचा पाठ करीत असत; तसेच त्यांचा योगाभ्यासही होता. ते रोज ओंकारेश्वर मंदिर, गुंडाचा गणपती यांचे दर्शन घेत असत.

ते लोकमान्य टिळकांसह अनेकांचे गुरू होते. ते एक श्रद्धास्थान होते. याशिवाय महात्मा गांधी, अरविंद घोष, दादासाहेब खापर्डे, काळकर्ते परांजपे, डॉ. नानासाहेब देशमुख, या सर्वांच्या त्यांच्याशी गाठीभेटी झाल्या होत्या. काहींचे सातत्याने येणे-जाणे होते. असे हे धैर्यशील, साहसी, नि:स्वार्थी, त्यागी, अष्टपैलू व्यक्तिमत्त्वाचे नि:संगता, परोपकार बुद्धीचे थोर दैवी गुणसंपत्तीचे अण्णासाहेब होते.

एकूणच मद्रासहून १८८४ साली पुण्याला परत आल्यावर १९१७ पर्यंत म्हणजे ३३ वर्षे ते अशा उन्मनी स्थितीत होते. १९०२ साली त्यांच्या पत्नी निवर्तल्या. त्यानंतर शके १८३९ माघ शुद्ध एकादशीस, १९१७ साली त्यांनी देह सोडला. पुण्यात ओंकारेश्वराजवळच्या नदीपात्रात त्यांच्यावर अग्निसंस्कार झाला. पुणे येथे लोकांनी त्यांची समाधी बांधली आहे. तेथे आजही त्यांचा उत्सव संपन्न होत असतो.

– डॉ. अजित कुलकर्णी

## पाचलेगावकर महाराज

***पाचलेगावकर, नरसिंह राजाराम***

**राष्ट्रसंत, समाजसुधारक**

**८ नोव्हेंबर १९१२ – १६ ऑगस्ट १९८६**

**न**रसिंह राजाराम पाचलेगावकर यांचा जन्म परभणी जिल्ह्यातील जिंतूर तालुक्यातील पाचलेगाव येथे झाला. एकदा परमहंस परिव्राजकाचार्य श्री माधवाश्रम सरस्वती स्वामी कुलकर्णी यांच्या घरी आले व त्यांनी नरसिंहाचा ऋणानुबंध कथन करून आपला संप्रदाय आणि मुलाचा कार्यभाग लक्षात घेऊन त्याचे नाव 'संचारेश्वर' ठेवले व ते आपल्या ठायी निघून गेले. बाल नरसिंह चंचल, चपळ व खोडकरही होता. वयाच्या पाचव्या वर्षी त्याची मुंज झाली. सवंगड्यांना जमवून भजन-पूजन करण्यात व खेळ खेळण्यात तो दंग असे. निसर्गाशी तल्लीन होणे,



भावसमाधी लावून बसणे हा त्याचा छंद होता. नरसिंह बाराखड्या आणि पंधरावा पाढा शिकला आणि मग त्याने शाळेला रामराम केला.

नरसिंह निर्भय, तसाच धाडसी होता. दुर्गुणांची चीड असल्याने त्याने गावठी दारू विकणाऱ्याच्या दारूत एकदा माती कालवली व दोन दिवस गावात कडक दारूबंदी घडवून आणली. नवव्या वर्षी त्याने नागपंचमीला आईसमोर खरा नाग आणून ठेवला. आई घाबरली, तेव्हा नरसिंहाने स्वत: त्याची पूजा केली.

औंढे नागनाथचे ज्योतिर्लिंग व नर्मदातीरीच्या ओंकारेश्वराच्या पूजेच्या वेळी त्याने गळ्यात जिवंत नाग घातले. त्यामुळे भाविक व चिकित्सक त्याच्यापुढे नतमस्तक होत. या बालकामध्ये काही अलौकिक, विलक्षण सामर्थ्य आहे, असे लोकांना वाटे. प्रबळ मानसिक शक्तीच्या साहाय्याने नरसिंहाने अनेक सर्पदंशग्रस्तांना जीवदान दिले.

गावच्या शंकर मंदिरासमोर रसरशीत निखाऱ्यावर चालण्याचे प्रयोग होत. अस्पृश्यता निवारण आणि अन्य प्रसंगी या बालमहाराजांनी हे प्रयोग केले. १९२८ साली पुण्याच्या डेक्कन मैदानावर साहित्यसम्राट न.चिं. केळकर यांच्या उपस्थितीत, हजारो लोकांसमोर या बालमहाराजांसमवेत शेकडो लोक धगधगत्या अग्नीवरून चालत गेले होते; परंतु कुणालाही इजा झाली नाही. बालमहाराजांच्या सामर्थ्यामुळे निखाऱ्यांची दाहकता बाधत नसे. अनेक व्याधिग्रस्त जनांच्या जीवनात त्यांनी सशास्त्र उपचाराने आनंद निर्मिण्याचे कार्य केले. ही सेवा ते विनामूल्य करीत.

याच दरम्यान नरसिंहावर द्वितीय दत्तावतार श्री नरसिंह सरस्वतींचा अनुग्रह झाला. सर्वसंगपरित्यागासह ईश्वरचिंतनी राहण्याचा विचार नरसिंह यांच्या मनात तीव्र बनला.

धाकट्या भावाची मुंज झाली तेव्हाच आपल्या मामांना त्यांनी अविवाहित राहण्याचा निश्चय बोलून दाखविला होता. 'निर्वैर: सर्वभूतेषु' हाच त्यांचा आचार व सर्वात्मभाव ही जीवननिष्ठा होती. आपले तन, मन, धन ईश्वरार्पण करून मानवमात्राचे कल्याण करणे ही त्यांची प्रेरक शक्ती ठरली. पाचलेगावी रुद्र स्वाहाकाराचा संकल्प बोलून दाखवताच शेकडो लोक मदतीस आले. पाच दिवसांच्या यज्ञात कीर्तनकार, कथाकार, पुराणिक एकत्र जमले व पाचलेगावकर महाराजांनी धर्मप्रचार इच्छेनुसार साधला. त्यामुळे न्याय, नीती, समाज, राष्ट्र व धर्मासाठी जगण्याचे नवे विचार लोकांमध्ये पसरले. या प्रसंगी बाळ महाराजांचे वय अवघे तेरा वर्षे होते.

निजामाचे सरदार श्री. शिवराजबहादूर यांच्याकडून महाराजांना जी रोकड व जो नजराणा आला, ती सारी संपत्ती महाराजांनी गोरगरिबांना वाटली. निजामाने त्यांच्यासाठी अनेक सनदा दिल्या. पर्यटनात महाराजांनी श्री मुक्तेश्वराची पालखी काढली. ती पालखी सखाराम महाराजांच्या लोणीस (विदर्भ) पोहोचून परत येई. लोक या कार्यक्रमास अनेक गावांतून व शहरांतून येत.

समाजातील आर्थिक व सामाजिक विषमता, ब्रिटिशांचे अत्याचार, निजामाने षडयंत्र रचून हिंदूंना बाटवून मुसलमान करण्याचे कारस्थान हे सर्व पाहून महाराज व्यथित होत. जनता अन्यायाचा प्रतिकार करत नाही आणि भोळसट कल्पनांनी उदास, निराश व हताश झालेली पाहून महाराजांना क्लेश होत. त्यांनी परभणी जिल्ह्यात कळमनुरी येथे डिसेंबर १९२६ मध्ये विराट (संहिता स्वाहाकार) धर्मस्थळ महायज्ञ केला. त्या

प

सोहळ्यात शेतकरी, कामकरी व अन्य जनसामान्य लोकांसह संत गाडगेबाबा, करवीरपीठस्थ जगद्‍गुरू शंकराचार्य स्वामी विद्याशंकर भारती (डॉ. कुर्तकोटी) हजर होते. पाचलेगावकरांच्या प्रभावाने असा सुंदर सोहळा संपन्न झाला म्हणून डॉ. कुर्तकोटींनी पाचलेगावकर महाराज (वय चौदा वर्षे) यांचा गौरव केला. यज्ञाच्या पूर्णाहुती प्रसंगीच महाराजांना असे वृत्त समजले, की स्वामी श्रद्धानंदांचा भारताच्या राजधानीत अब्दुल रशीद या मुसलमानाने खून केला.

महाराजांनी खूप विचार करून लोकांच्या लक्षात आणून दिले, की 'कुर्रान-ए-शरीफ'मधील आयत २,३,४,८,९ इत्यादी ठिकाणचा काही विशिष्ट भाग मुसलमान समाजात ही मनोवृत्ती निर्माण करण्यास कारणीभूत आहे. अन्यधर्मीय मूर्तिपूजक 'काफर' असून त्यांचा छळ करून त्यांना मुसलमान बनण्यास भाग पाडले, तर ते मोठे पुण्यकर्म, धर्मकार्य होय. त्यामुळे 'जन्नत' (स्वर्ग) मिळतो. कुराणाची ही शिकवण यास कारणीभूत आहे.

महाराजांनी भारत समर्थ व ऐश्वर्यसंपन्न करण्यासाठी विषमता नष्ट करून समर्थ रामदास व शिवछत्रपती यांचा आदर्श समोर ठेवायला हवा असे प्रतिपादन केले. त्यांनी युवकदले व व्यायामशाळा स्थापन केल्या.

जून १९२८ मध्ये महाराजांनी डॉ. मुंजे यांच्या अध्यक्षतेखाली विराट धर्मपरिषदेचे आयोजन केले, म्हणून निजामाने महाराजांना वीस वर्षांसाठी निजाम स्टेटमधून हद्दपार केले. महाराजांनी बॅ. सावरकरांची भेट घेतली. नागपूर ते कुरुंदवाड आणि मुंबई ते हैदराबाद असे दौरे काढले. महाराजांच्या लोकजागृतीच्या कार्याची प्रशंसा तत्कालीन राष्ट्रपती डॉ. राधाकृष्णन यांनी केली. १९३०-३२ च्या कायदेभंग चळवळीत महाराजांनी अज्ञातवासात राहून झंझावाती प्रचार केला. मोतीलाल नेहरू, डॉ. हेडगेवार, महात्मा गांधी, जिवाजीराव महाराज शिंदे, काकासाहेब राणे वगैरेंशी त्यांचा जवळचा संबंध होता. १९४६ मध्ये खामगाव येथे त्यांची पू. माधवाश्रम स्वामींशी भेट झाली. त्या वेळी माधवाश्रम स्वामी १२५ वर्षांचे होते. त्यांनी निर्वाणीची भाषा सुरू करून आपली सर्व संपदा महाराजांच्या हवाली केली. पाचलेगावकर महाराजांचे हिंदी व मराठी भाषेवर प्रभुत्व होते. नाशिक जिल्ह्याच्या दौऱ्यावर असताना त्यांची प्रकृती बिघडली. त्यांना मुंबईला उपचारांसाठी नेले. परंतु, १६ ऑगस्ट १९८६ रोजी, वयाच्या चौऱ्याहत्तराव्या वर्षी श्रीसंत पाचलेगावकर हे धगधगते अग्निकुंड शांत झाले.

– वि.ग. जोशी

**संदर्भ :**

१. *देशपांडे, दत्तात्रेय; मासिक 'संतकृपा' (पृष्ठे : ८ ते १४); सप्टेंबर २०१०.*

## पारनेरकर महाराज

***पारनेरकर, रामचंद्र प्रल्हाद***

**गणेशभक्त, पूर्णवाद तत्त्वज्ञ**

**१६ जुलै १९१६ - २८ एप्रिल १९८०**



**रा**मचंद्र प्रल्हादपंत पारनेरकर या साक्षात्कारी महापुरुषाचा जन्म मातु:श्री यमुनाबाई यांच्या पोटी झाला. त्यांचे आडनाव 'गुरू' असे होते. यांचे घराणे मूळचे पारनेरचे! रामचंद्राचे नाव शाळेत घालताना गुरू आडनावाऐवजी 'पारनेरकर' असे लावले गेले आणि तेच रूढ झाले.

रामचंद्र महाराजांना इंदुरी पद्धतीने 'रामूभय्या' म्हणत. त्यांचे बहुतेक जीवन इंदूर येथेच गेले. एक दिवस रामूभय्या नेहमीप्रमाणे एकटेच फिरायला गेले. सायंकाळचे नीरव व निर्जन असे शांत वातावरण होते. त्या वेळी त्यांना सुस्पष्ट अनाहत ध्वनी ऐकू आला : 'ॐ गं गणपतये नम:॥' हा अनाहत जप पुन:पुन: ऐकू येत होता. या ध्वनीने त्यांना आपली उपास्य देवता आणि देवतामंत्र कळला.

रामूभय्याने शालेय जीवनातच अनेक विषयांचा व्यासंग केला. शेकडो ग्रंथ वाचले. त्यांची धारणाशक्तीही जबर होती. प्राचीन आणि अर्वाचीन शास्त्रांचा त्याने व्यासंग केला.

विज्ञान, अर्थशास्त्र इत्यादी विषयही समजावून घेतले. त्यांच्या एका वर्गमित्राची सराफी पेढी होती. मित्राचे वडील त्यांच्या मुलाला रत्नपरीक्षा शिकवीत! ते ऐकूनऐकून रामूभय्या रत्नपारखी झाला. त्यातही तो कुशल झाला. पुढेपुढे तर सराफ बाजारात त्याच्या मताला किंमत आली. अशा आधुनिक विद्याशाखांचा त्याने उत्कृष्ट परिचय करून घेतला होता.

श्रीगणेशाच्या उपासनेबरोबर त्यांची योगसाधनाही चालू होती. याच सुमारास, १९३८ साली त्यांनी अमळनेरच्या वासुदेवराव धर्माधिकारी यांची कन्या मनकर्णिका हिच्याशी विवाह केला. त्यांची योगसाधनेतही उत्कृष्ट प्रगती झाली. इतकी की, त्यांना 'ॐ गं गणपतये नम:' हा मंत्र दिसू लागला. म्हणजे 'पश्यन्ति' वाणीवर जप होऊ लागला. 'ऋषिर्दर्शनात्' असे सूत्र आहे. ज्याला (मंत्र) दर्शन होते, तो ऋषी! म्हणजे पारनेरकर ऋषी झाले.

यानंतर रामचंद्र पारनेरकर यांना तेजस्वी, पण शीतल अशा प्रकाशाचे अनुभव येऊ लागले. विशेष असे, की या प्रकाशाला स्पर्श, सुगंध आणि स्वादही होता. त्यांची सहज समाधी लागू लागली. काही काळानंतर रामचंद्र पारनेरकर यांना श्रीगणेशाचे सगुण, साकार दर्शनही झाले. प्रकाशदर्शन हा निर्गुण साक्षात्कार होता. म्हणजेच सगुण आणि निर्गुण असे दोन्ही साक्षात्कार झाले. एवढेच नव्हे, तर अनेक देवदेवतांची आणि संत-महात्म्यांची दर्शने झाली.

पारनेरकर महाराज म्हणत, जीवन हे कोडे नाही. ती कला आहे. ते म्हणत, ''विश्वातीत ते शिवतत्त्व, विश्वात भरून राहिलेले ते ईश्वररूप विष्णुतत्त्व आणि विविध जडचेतनात्मक रूपे हे ब्रह्मतत्त्व. या तीनही तत्त्वांत स्वरूपसंबंध आहे. ही तीन भिन्न तत्त्वे नाहीत!'' या 'पूर्णवादा'च्या चिंतनात 'मायावादा'ला स्थान नाही. मायावाद, जीवन आणि कर्मे ही अज्ञानजन्य व म्हणूनच त्याज्य ठरवितो. डॉ. पारनेरकरांचे तत्त्वज्ञान वेद आणि विज्ञान या दोहोंना स्पर्श करते. ते जीवनाच्या अंगोपांगांना स्पर्श करते. त्यांचा बौद्धिक, विज्ञानसिद्ध, अर्थशास्त्रीय, सुखाचा संसार करीत आध्यात्मिक उन्नती साधणारा असा दृष्टिकोन अनेकांना आकर्षित करणारा ठरला. त्यांचे 'परिचय', 'परिसरात', 'संघर्ष' आणि 'अभिनव अभंग' असे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

त्यांच्या शिष्यवर्गामध्ये किंवा चहात्यांमध्ये ग.त्र्यं माडखोलकर, महामहोपाध्याय पांडुरंग गोस्वामी, बनारस हिंदू विद्यापीठाचे श्री. गोडे, लोकनायक अणे, श्री.के. क्षीरसागर, नरहर कुरुंदकर, रामभाऊ दाते, सेनापती बापट अशी नामांकित मंडळी होती.

५ डिसेंबर १९४८ रोजी त्यांना पीएच.डी. ही उपाधी प्राप्त झाली. अशा रितीने भौतिक विद्वत्ता, वैज्ञानिक दृष्टिकोन आणि योगशास्त्रीय आध्यात्मिक अनुभूती यांचा स्पर्श झालेली ही विभूती होती. ''पारनेरकर यांचा 'पूर्णवाद' हा मराठीत भारतीय तत्त्वज्ञानाचा उत्कृष्ट असा शास्त्रीय ग्रंथ झालेला आहे. प्रत्येक प्रकरणातून आलेल्या शास्त्रीय विषयाचे विवेचन यथार्थ असून, ग्रंथकाराने मांडलेला पूर्णवाद हा तत्त्वज्ञानात अगदी नवा असा शास्त्रीय वाद असून तो श्रुतिप्रमाण आहे, असे माझे या ग्रंथासंबंधी मत झाले आहे.'' (न्यायरत्न नारायणशास्त्री वाडीकर ; २ नोव्हेंबर १९४७)

'विद्वद्रत्न रामचंद्र प्रल्हाद पारनेरकर', इंदूर :

''शिव, विष्णू आणि विश्व या तत्त्वांचा पूर्णपुरुषाशी स्वरूपसंबंध आपण प्रतिपादिला आणि ज्ञान-कर्म-

प

उपासना या साधनत्रयींपैकी कोणतेही एक साधन करून भागणारे नाही; साधनत्रयींवर सारखाच भर द्यावयास हवा हे या सिद्धान्ताने पटवून दिले. याबद्दल व्यास-आश्रमातील आबालवृद्ध ऋणी आहेत.'' (शंकरराव व्यास, व्यास आश्रम, इंदूर ; १८ नोव्हेंबर १९४७)

— डॉ. वि.य. कुलकर्णी

**संदर्भ :**

१. *जोशी, ना.वा.; 'डॉ. रामचंद्र महाराज पारनेरकर'; संतकृपा प्रकाशन, पुनर्मुद्रण १९९९ ; मूल्य : २० रु.*

२. *'पूर्णवाद'.*

## पै, वामनराव
**जीवनविद्येचे शिल्पकार**
**२१ ऑक्टोबर १९२३ – २९ मे २०१२**



**ज**गातील अनेक विचारवंतांनी माणसाच्या जीवनाचा सर्वांगीण विचार करून आपापल्या परीने जीवनभाष्ये लिहिली. परंतु जीवन म्हणजे निश्चित काय? त्याचे कोडे कोणीच सोडवू शकले नाही. जीवनाचे खरे स्वरूप व समस्या न समजल्यामुळे सारी मानवजात अशांतीच्या व अतृप्तीच्या अंधारात चाचपडत आहे. विचारवंतांना मानवी जीवनाचे कोडे सोडवता आले नाही. जीवनाचा खरा अर्थ सांगता आला नाही. परंतु सद्गुरू वामनराव पै यांनी आपल्या ग्रंथांतून, भाषणांतून व प्रवचनांतून जीवनाचे कोडे सहज उलगडून दाखवले. तेही सर्वसामान्य लोकांना समजेल अशा साध्या व सोप्या भाषेतून!

सद्गुरू वामनराव पै यांचा जन्म मुंबई येथील एका मध्यमवर्गीय कुटुंबात झाला. वामनराव पै हे सुशिक्षित व सुसंस्कृत होते. १९४४ साली त्यांनी अर्थशास्त्र हा विषय घेऊन मुंबई विद्यापीठाची पदवी संपादन केली. त्यानंतर त्यांनी महाराष्ट्र शासनाच्या अर्थ विभागात काम केले. इमानेइतबारे नोकरी केल्यानंतर १९८१ साली ते डेप्युटी सेक्रेटरी या पदावरून निवृत्त झाले. त्यांना एक मुलगा व एक मुलगी अशी दोन अपत्ये आहेत. त्यांना लहानपणापासून अध्यात्माची ओढ होती. वयाच्या पंचविसाव्या वर्षापासून ते नाना- महाराज शिरगावकर या सत्पुरुषाचे अनुयायी झाले. अध्यात्माची तीव्र ओढ, आत्मसंशोधनाचे (Self Realization) महत्त्व, प्रयत्न व चिकाटी यांच्या जोरावर त्यांनी अध्यात्म क्षेत्रात उच्च स्थान प्राप्त केले.

आत्मज्ञान व अध्यात्मातील आपली बैठक पक्की झाल्यानंतर वामनराव पै यांनी निरनिराळ्या आध्यात्मिक केंद्रांतून व मुंबई येथील विवेकानंद केंद्रातून प्रवचने द्यावयास सुरुवात केली. त्यांची प्रवचने ही अत्यंत विद्वत्ताप्रचुर होती. पाश्चिमात्य व पौर्वात्य विचारवंतांची उद्धरणे जनमानसांना समजेल अशा साध्या व सोप्या भाषेत त्यांनी जीवनाचा खरा अर्थ समजावून देऊन मानवी जीवनाचे क्लिष्ट कोडे सोडविले. त्यांच्या प्रवचनांनी व विचारांनी प्रभावित होऊन अनेकांनी त्यांचे शिष्यत्व पत्करले. दिवसेंदिवस शिष्यांची संख्या वाढू लागली. १९५५ साली त्यांच्या शिष्यांनी सद्गुरूंच्या जीवनविषयक आध्यात्मिक विचारांचा प्रचार करण्यासाठी एक ट्रस्ट स्थापन केला. त्याचे नाव होते, 'संप्रदाय मंडळ'. पुढे हे संप्रदाय मंडळ 'जीवनविद्या' या नावाने ओळखले जाऊ लागले. सद्गुरूंचे शिष्य 'नामधारक' या नावाने ओळखले जातात. हे नामधारक आपल्या 'जीवनविद्या' संस्थेत सेवाभावी वृत्तीने व निरलसपणे काम करतात.

सद्‌गुरूंनी महाराष्ट्र, कर्नाटक, गोवा या प्रांतांत व अमेरिका वगैरे परदेशांत दहा हजारांहून अधिक प्रवचने दिली, तीही विनामूल्य, कोणत्याही प्रकारचा मोबदला न घेता. सद्‌गुरूंनी मराठी, हिंदी व इंग्रजी भाषेत जवळजवळ ४० ग्रंथ लिहिले असून या अनमोल ग्रंथांद्वारे शिष्य व सर्वसामान्य जनतेला बहुमोल मार्गदर्शन झालेले आहे. सद्‌गुरूंचे तत्त्वज्ञान हे प्रेरणादायक व जीवनास मार्गदर्शन करणारे आहे. त्यांची शिकवण प्रेरणादायी आहे. त्यांच्या या उदात्त शिकवणीमुळे भक्तांच्या मनांत सद्‌गुरूंविषयी नितांत आदर, श्रद्धा व समर्पणाची भावना निर्माण झाली आहे.

आजचे युग हे विज्ञान युग आहे. अनेक शास्त्रीय शोधांमुळे मानवाला अनेक सुखसुविधा मिळाल्या असून तो ऐहिक सुखामध्ये गुरफटला आहे. त्यातून तो बाहेर पडणे अशक्य आहे. त्यातच चंचल राजकारण व जीवघेणी सत्तास्पर्धा या गोष्टींमुळे त्याचा जीवनावरचा विश्वास उडत चालला आहे. प्राप्त परिस्थितीशी चार हात करून प्रश्न सोडविण्याऐवजी तो दैववादी व देववादी बनत चालला आहे. ‘आले देवाजीच्या मना, तेथे कोणाचे चालेना’ असे निराशाजनक उद्‌गार त्याच्या तोंडून बाहेर पडत आहेत.

सामान्य लोकांचा जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोन दैववादी, प्रारब्धवादी आणि नशीबवादी बनत चालला आहे. ‘आपल्या आयुष्यात जे काही घडणार आहे, ते सर्व आधीच ठरून गेलेले आहे. आपण केवळ कळसूत्री बाहुल्या असून त्या सर्व बाहुल्यांना नाचविणारा सूत्रधार कोणीतरी देव म्हणून वेगळा आहे. तो आकाशाच्या पलीकडे कोठेतरी राहतो. त्याच्या इच्छेनुसार सर्वकाही घडणार, त्यामुळे आपल्या हातात काहीही नाही, अशा तऱ्हेचे विचार त्याच्या डोक्यात येऊन तो क्रियाहीन व किंकर्तव्यमूढ बनतो. त्याच्या या भांबावलेल्या परिस्थितीचा गैरफायदा समाजातील धूर्त लोक घेतात. त्याचे आर्थिक, मानसिक व शारीरिक शोषणही करतात. असे भांबावलेले सर्वसामान्य लोक बुवा, भगत, फकीर आणि अंगात येऊन घुमणारे यांचा आश्रय घेतात. बुवाबाजीला बळी पडणाऱ्या लोकांचा आपल्या समाजात मुळीच तोटा नाही. सुशिक्षित माणसेसुद्धा भूतबाधा, पिशाच्चबाधा, करणी, मूठ मारण्याचा प्रकार अशा गोष्टींवर विश्वास ठेवताना दिसतात. म्हणून माणूस आर्थिक दारिद्र्याने पिडलेला नसून तो वैचारिक दारिद्र्याने पछाडलेला आहे, तो सुसंस्कारांच्या दारिद्र्याने पछाडलेला आहे, असे म्हणणेच योग्य ठरेल!

सद्‌गुरू वामनराव पै यांना अशा दुर्बल मनाच्या व अंधश्रद्धेच्या नादी लागलेल्या लोकांची कीव येते. देव प्रसन्न होतो तो एकाच गोष्टीने, ती म्हणजे भक्ताने आपले मन-सुमन देवाच्या चरणी अर्पण केल्याने. ‘‘भोळसट व बावळट भक्त असण्यापेक्षा बुद्धिमान व हुशार नास्तिक बरा,’’ असे सद्‌गुरू वामनराव पै म्हणतात. सद्‌गुरू वामनराव पै यांनी असमाधानाकडून समाधानाकडे, दुःखाकडून सुखाकडे, अतृप्तीकडून तृप्तीकडे नेणाऱ्या विद्येलाच ‘जीवनविद्या’ असे म्हटले आहे.

मानवाचे जीवन हे देवावर किंवा दैवावर अवलंबून नाही, तर ते प्रत्येकाच्या हातातच आहे. विचाराचे तंत्र व मंत्र समजावून घेऊन सुयोग्य संस्कार आपणच आपल्यावर करवून घेऊन स्वत:चे जीवन सुखाचे केले पाहिजे. ‘आपणच आपल्या जीवनाचे शिल्पकार आहोत’, हा विचारच मानवाने उराशी बाळगून जीवनात प्रगती केली पाहिजे. मानवाचे जीवन सुखी व समृद्ध होण्यासाठी सद्‌गुरू महाराजांनी अनेक महामंत्र सुचविले आहेत.

सद्‌गुरू वामनराव पै असे म्हणतात, ‘‘संगीतात एकंदर ‘सा रे ग म प ध नी’ असे सात स्वर आहेत. हे सात स्वर जो सुरेखपणे व कौशल्याने हाताळतो, तो सुरेल व मधुर असे संगीत साकारतो. अगदी त्याचप्रमाणे जीवनात, ‘जग, कुटुंब, शरीर, इंद्रिये, बहिर्मन, अंतर्मन व परमात्मा’ असे सप्तसूर आहेत. हे सातही सूर आपापल्यापरीने महत्त्वाचे असून त्या प्रत्येक सुराला मनुष्याच्या जीवनात अनन्यसाधारण असे महत्त्वाचे स्थान आहे.’’

— प्रा. नीलकंठ पालेकर

प

## प्रज्ञानंद सरस्वती

***परांजपे, कृष्णशास्त्री गौरीशंकर***

**प्रवचनकार, तत्त्वज्ञ**

**१८५६ - १९०४**

मूळचे वाईचे असलेले प्रज्ञानंद सरस्वती म्हणजेच पूर्वाश्रमीचे कृष्णशास्त्री गौरीशंकर परांजपे हे विष्णुवृद्ध गोत्राचे, आश्वलायन शाखेचे, चित्पावन ब्राह्मण असल्यामुळे घराण्यात पूर्वापार वेद, श्रौत, याज्ञिक, शास्त्र आणि अग्निहोत्राची परंपरा होती. त्यांचे शिक्षण वेदशाखा, श्रोतयाज्ञिकी, ज्योतिष्टोमाचे सामगायन व संस्कृत व्युत्पत्ती इतके झाले होते.

भूमानंद व रामानंद या वाईच्या तत्कालीन प्रसिद्ध विद्वतरत्नांकडून प्रस्थानत्रयीचे भाष्य ऐकल्यावर त्यांनी स्वत: प्रवचने करण्यास सुरुवात केली. वाईतील द्वारका मंदिरात ते रोज प्रवचने करीत. त्यांनी विवाह केला; पण त्यांची पत्नी लवकर वारली. त्यांनी पुन्हा लग्न केले नाही. वयाच्या पस्तिसाव्या वर्षी (१८९१) कृष्णशास्त्री यांनी संन्यासदीक्षा घेऊन ‘प्रज्ञानंद’ असे नाव धारण केले व ते प्रथम वाईतच मुरलीधर मठात व नंतर दातार मठात राहू लागले. वाईत त्यांची नित्यप्रवचने चालत. दूरदूरच्या ठिकाणची मंडळी येऊन श्रवणाचा लाभ घेत असत.

त्यांचे शिष्य, जे पुढे केवलानंद सरस्वती या नावाने प्रसिद्ध झालेले पूर्वाश्रमीचे नारायणशास्त्री मराठे यांनी आपल्या टिपणीत त्यांच्या प्रवचनाबद्दल लिहून ठेवले आहे, ‘स्वामीजींच्या शारीरिक भाष्य-प्रवचनाची ख्याती रामेश्वरापर्यंत झाली होती. वाईत आलेला बाहेरचा विद्वान एक-दोनदा तरी श्रवणाला व दर्शनाला येऊन जात असे. कधीकधी रात्री निवांत वेळी ते साम (सामवेदातील ऋचा) गुणगुणत असत. ‘विठ्ठल विठ्ठल जय जय विठ्ठल’चे भजनही चालत असे.

पुढे ज्यांची वेदविद्येत ख्याती झाली असे विष्णुशास्त्री बापट, विनायकबुवा पेंडसे, नारायणबुवा द्रविड, पारकरशास्त्री, पावगीशास्त्री, भाऊशास्त्री लेले इत्यादी मंडळी प्रज्ञानंद सरस्वती स्वामींच्या शिष्यवर्गात होती. अपरिग्रहवृत्ती, तप, ध्यान व तत्त्वचिंतन ही त्यांची वैशिष्ट्ये होती. त्यांचे शिष्य केवलानंद सरस्वती यांनी आपल्या गुरूंच्या स्मृत्यर्थ त्यांच्या पाठशाळेत प्रथम प्राज्ञमठ व पुढे प्राज्ञपाठशाळा आणि नंतर प्राज्ञपाठशाळा मंडळ अशी नावे देत प्रज्ञानंद सरस्वती यांची स्मृती कायम जपली. आजही प्राज्ञपाठशाळा मंडळ ही संस्था अस्तित्वात आहे.

– मधू नेने

**संदर्भ :**

१. *‘प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा’; प्रकाशक : प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई; ऑगस्ट १९९६.*

## प्रज्ञानानंद सरस्वती

***कर्वे, दत्तात्रेय नारायण***

**प्रवचनकार, ग्रंथकार**

**१५ मे १८९३ - २३ मार्च १९६८**



प्रज्ञानानंद सरस्वती म्हणजेच पूर्वाश्रमीचे दत्तात्रेय नारायण कर्वे यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यात गिम्हवणे येथे गार्ग्य गोत्री, कोकणस्थ ब्राह्मण कुटुंबात झाला. त्यांच्या आईचे नाव गंगा होते. दत्तात्रेयाचे लाडके नाव दत्तू असून तो आपल्या वडिलांच्या कीर्तनात टाळ घेऊन साथ करीत असे. त्याचे वडील शिक्षक होते. मुरुड-जंजिरा येथील माध्यमिक शाळेतून ऑक्टोबर १९१३ मध्ये मॅट्रिक उत्तीर्ण होऊन दत्तू बडोदा येथे

महाविद्यालयीन शिक्षणासाठी गेला आणि संस्कृत मुख्य विषय घेऊन १९१८ मध्ये बी.ए. झाला. पुढे सहा वर्षांनी एस.टी.सी. झाला.

त्यांच्या मनावर रामदास स्वामी आणि लोकमान्य टिळक यांचा विशेष प्रभाव होता. सरकारी नोकरी करायची नाही या निश्चयामुळे त्यांनी काही काळ मिशन स्कूल, तसेच काही काळ वसईच्या शाळेत शिक्षकाची नोकरी केली व नंतर कांजी धरमसी हायस्कूल, चिंचणी (तारापूर) या शाळेत सोळा वर्षे अध्यापकी केली. ते संस्कृत, गणित व इंग्रजी शिकवीत असत आणि घरीसुद्धा शिकवण्या करीत.

नातेवाइकांच्या आग्रहाखातर त्यांनी १९१५ साली श्रीधर रामचंद्र जोशी यांची कन्या द्वारका हिच्याशी विवाह केला. त्यांनी १९१५ ते १९२९ दरम्यान गृहस्थधर्माचे आदर्श पालन केले. त्यांना दोन अपत्ये झाली; पण दुर्दैवाने दोन्ही जगली नाहीत. अध्यापनकार्य करीत असतानाच कर्वे यांनी पारमार्थिक वाङ्मयाचे विपुल वाचन, मनन केले होते. त्यांची मूळ वृत्ती वैराग्याची होती. वाचन, मननाने ती तीव्र होत गेली. कर्वे यांची १९२९ साली श्रीधरस्वामी बिडवाडीकर ऊर्फ रावजीबुवा यांच्याशी गाठ पडली. बुवांच्या दर्शनाने कर्वे प्रभावित झाले व त्यांनी बुवांकडून तेरा अक्षरी गुरुमंत्र मिळविला. भक्तिज्ञानाची तळमळ तीव्रतर झाल्याने अधिक मार्गदर्शन मिळावे म्हणून ते पुन्हा रावजीबुवांकडे पोहोचले. ''साडेतीन कोटी जप करून ये, मग पुढचा मार्ग सांगेन,'' अशी बुवांची आज्ञा झाली. कर्वे यांनी शाळेच्या मधल्या सुट्टीचाही उपयोग करून साडेचार कोटी जप सिद्ध केला व ते पुन्हा बुवांकडे गेले. पुढील मार्गदर्शनाचा आग्रह करताच बुवांनी उत्तर दिले, ''राम तुला सर्व सांगेल.'' हा आशीर्वाद समजून कर्वे यांनी साधना खडतरपणे, तीव्रपणे चालू ठेवली. १९३१ च्या सुमारास त्यांची पहिली भेट तारापूरच्या श्री गंगादासबाबांशी झाली. हे बाबा संत तुलसीदासांचे परमभक्त होते. बाबांच्या सात-आठ वर्षांच्या सान्निध्यामुळे कर्वे यांना तुलसीदासरचित 'रामचरितमानस' याचे जणू वेडच लागले. बाबा गंगादासांनी एका मध्यरात्री शिवपूजेतून निवृत्त होऊन प्रसन्नपणे कर्वे यांना सांगितले, ''अब ज्ञान का रहस्य एक ही बात में कहूँगा... जैसे है वैसा रहना, कुछ बनना नहीं।'' अशा तऱ्हेने श्री रावजीबुवा व बाबा गंगादास हे दोघे जण कर्वे यांचे सद्‌गुरू होत!

पोटेस्वामींनी १८ जानेवारी १९४३ रोजी कर्वे यांचे विधिवत 'प्रज्ञानानंद सरस्वती' असे नामकरण केले. अशा रितीने दत्तात्रेय नारायण कर्वे 'प्रज्ञानानंद' बनले व त्यांचा उच्च आध्यात्मिक प्रवास सुरू झाला. प्रज्ञानानंदांनी पहिली शिष्या म्हणून आपल्या पत्नीलाच दीक्षा दिली. त्यानंतर दीड वर्षानेच तिचा अचानक मृत्यू झाला. १९४६ च्या रझाकारांच्या जुलमातून व छळातून गरीब जनतेची सुटका व्हावी म्हणून संन्यासी प्रज्ञानानंदांनी 'हिंदूंनो संघसंपन्न व्हा', या अर्थाचे समाजजागृतीचे काव्य केले आणि केसरीने ते प्रसिद्ध केले. आपल्या आयुष्यातील शेवटची उणीपुरी २५ वर्षे त्यांनी रामध्यान, राममंत्र, रामायणावर प्रवचने व आध्यात्मिक लेखनात व्यतीत केली. त्यांनी विपुल ग्रंथरचना केली.

'संगीत समश्लोकी गीता' व 'श्री गीता कीर्तन तरंगिणी' हे गीताविषयक ग्रंथ; 'अभिनव रामायण' आणि 'वेदान्तसार अभंग रामायण' हे रामायणविषयक ग्रंथ; 'ब्रह्मस्तुती' व 'वेदस्तुतिभास्कर' हे श्रीमद्‌भागवतातील तत्त्वविवेचक अंगावरील ग्रंथ; 'श्री परमामृत प्रकाश' व 'श्री गुरुगीता प्रबोधिनी' हे अद्वैत वेदान्तनिष्ठ साधकांना मार्गदर्शक ठरणारे ग्रंथ आणि या सर्वांवर कळस म्हणजे रामचरितमानसवरील प्रचंड हिंदी-मराठी ग्रंथ ही त्यांची प्रचंड ग्रंथसंपदा विस्मयचकित करणारी आहे.

'रामचरितमानस'विषयीचे प्रज्ञानानंदांचे कार्य पाहून वाटते, की विसाव्या शतकात महाराष्ट्रात संत तुलसीदासच अवतीर्ण झाले असावेत. ज्योतिष, मंत्र, तंत्र, वैद्यक या शास्त्रांचा त्यांचा सखोल अभ्यास होता. त्यामुळे इंजिनिअर, डॉक्टर, वकील, शेतकरी, सुतार,

गवंडी, माळी अशी कुणीही व्यक्ती त्यांच्यापाशी आली, की ते त्यांच्या धंद्यातील समर्पक दृष्टान्त देऊन अध्यात्म पटवून देत.

प्रज्ञानंद सरस्वती यांची लोकप्रियता एवढी, की रामायणावर हिंदीतून प्रवचने करण्यासाठी त्यांना उत्तर भारतातून आमंत्रणे येत. प्रवासात जेथे-जेथे मुक्काम पडे, तेथे-तेथे ते प्रवचन करीत. अयोध्या, गया, काशी, प्रयाग यात्रांच्या वेळी (१९३७-३८) एकांतात राहून त्यांनी दीर्घकाळ उपासना केली होती, तसेच नर्मदाकाठीच्या निबिड अरण्यात, कोटेश्वर मंदिरात अनुष्ठान केले होते. उस्मानाबाद जिल्ह्यात परांडे येथे त्यांचे अखेरचे वास्तव्य झाले. आयुष्यात कसल्याच कामासाठी पैसा जमा न करणाऱ्या प्रज्ञानानंदांनी समाधी घेण्यापूर्वी गुरुदक्षिणा व स्वत: लिहिलेल्या ग्रंथविक्रीच्या पैशांतून बाबा गंगादास धर्मशाळा व श्री वासुदेव कूप बांधून या आपल्या दोन्ही गुरूंचे स्मारक निर्माण केले. त्यांच्या हस्ताक्षरातील दुर्मीळ मुद्रणप्रती परांडे येथे सुरक्षित ठेवल्या असून अभ्यासकांना अवलोकनार्थ उपलब्ध करून देण्याची व्यवस्था करण्यात आली आहे.

– रेखा पटवर्धन

**संदर्भ :**

१. *भट, नम्रता; लेखिका, संपादिका, प्रकाशिका : ‘सकल संत चरित्र गाथा’, भांडूप (पूर्व), मुंबई - ४०० ०४२.*

***

प

## फ

### फुले, जोतिबा गोविंदराव

**सत्यशोधक समाजाचे संस्थापक, समाजसुधारक**
**११ एप्रिल १८२७ – २८ नोव्हेंबर १८८९**
☛ ***मुख्य चरित्रनोंद - समाजकारण खंड***



**म**हात्मा जोतिबा गोविंदराव फुले यांनी महाराष्ट्राच्या सामाजिक, धार्मिक, शैक्षणिक क्षेत्रात महत्त्वाचे कार्य केले असून १९४८ साली पुण्यात मुलींची पहिली शाळा सुरू करण्याचा मान महात्मा फुले यांच्याकडे जातो. सामाजिक क्षेत्रात काम करत असताना अनेक समस्यांचे मूळ हे धर्मसंकल्पनेत आहे हे त्यांच्या लक्षात आले. अनेक अनिष्ट रूढींना धर्माचे अधिष्ठान आहे.

धर्माच्या आधाराने समाजात जातीभेद व अस्पृश्यता यांचा शिरकाव झाला आहे इत्यादी गोष्टी त्यांच्या लक्षात आल्या. तत्कालीन समाजव्यवस्थेवर जोतिबा फुल्यांनी कोरडे ओढले. खुळचट धर्मकल्पना, अंधरूढी यांवर परखड टीका केली. या साऱ्या समाज वास्तवाला महात्मा जोतिबा फुले यांनी ‘सार्वजनिक सत्यधर्म’ सुरू करून पर्याय उभा केला. नव्या जीवनमार्गाला त्यांनी धर्माचा अर्थ प्राप्त करून दिला. महात्मा फुले हे प्रखर बुद्धिवादी होते. बुद्धीच्या साहाय्याने ईश्वराचे अस्तित्व सिद्ध करता येत नाही, तरीही त्यांच्या लिखाणात ईश्वराचे उल्लेख पुन:पुन्हा आढळतात. त्यांचा उल्लेख ते कधी देव, कधी कर्ता, कधी परमेश्वर असा करतात. पण निर्मिक ही संज्ञा ते अधिक वापरतात. निर्मिक म्हणजे निर्माता. ईश्वर हा सबंध सृष्टीचा निर्माता ही गोष्ट महात्मा फुले अमान्य करत नाहीत.

‘सार्वजनिक सत्यधर्म पुस्तक’ या आपल्या छोटेखानी ग्रंथाच्या प्रस्तावनेत ते म्हणतात, ‘‘या आपल्या विस्तीर्ण पोकळीमध्ये निर्मिकाने अनंत सूर्यमंडळांसह, त्यांच्या ग्रहोपग्रहांसहित तत्संबंधी एकंदर सर्व प्राणिमात्रांस उत्पन्न केले आहे. सर्वांचा निर्माता निर्मिक आहे. महात्मा फुल्यांचा निर्मिक महापवित्र, देदीप्यमान व तेजोमय आहे. त्याचे पोकळ नामस्मरण करण्यास महात्मा फुले कडाडून विरोध करतात. त्याचप्रमाणे स्वर्ग, परलोक व दैव या कल्पनाही महात्मा फुले नाकारतात.

महात्मा फुले चातुर्वर्ण्य, जातीव्यवस्था, आत्मा, स्वर्ग, नरक, वेदाची ईश्वरी निर्मिती इत्यादी गोष्टी नाकारतात. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या मते, फुले यांचा ईश्वर म्हणजे मानवी मूल्यांचा अधिष्ठाता असून मानवांची सेवा किंवा मानवी समतेचे व स्वातंत्र्याचे रक्षण ही खरी ईश्वराची पूजा होय. महात्मा फुल्यांचा परमेश्वरविषयक दृष्टिकोन पारमार्थिक किंवा चैतन्यवादी नसून त्यांचे अधिष्ठान ठामपणे इहवादी व मानवनिष्ठ क्रांतिवादी आहे.

२३ सप्टेंबर १८७३ रोजी महात्मा फुल्यांनी ‘सत्यशोधक समाजा’ची स्थापना केली. त्या वेळी

न्यायमूर्ती रानडे, लोकहितवादी, डॉ. भांडारकर, गोवंडे असे अनेक मान्यवर त्यांचे साथीदार होते. त्यामुळे ब्राह्मणांना वगळून काढलेला किंवा ब्राह्मण जातीवर हल्ला करून त्यांचे नाक खाली करण्यासाठी हा समाज स्थापन केला होता, असे म्हणता येणार नाही. महात्मा फुले यांच्या सत्यधर्माचे स्वरूप खालीलप्रमाणे आहे :

*धर्म राज्य भेद मानवा नसावे ।*
*सत्याने वागावे ईशासाठी ॥*
*ख्रिस्त, महंमद, मांग, ब्राह्मणासी ।*
*धरावे पोटाशी, बंधू परी ॥*
*निर्मिकाचा धर्म सत्य आहे एक ।*
*भांडणे अनेक कशासाठी ॥*

सत्यशोधक समाजाची त्रिसूत्री पुढीलप्रमाणे होती : १) देव व भक्त यांमध्ये मध्यस्थांची गरज नाही. अंधश्रद्ध लोकांची धार्मिक गुलामगिरीतून मुक्तता करणे, भटभिक्षुक धर्माचा धाक घालून अडाणी जनतेची जी अधर्माने पिळवणूक करतात, त्या अन्यायापासून त्यांची सुटका करणे. २) जमीनदार व सावकार यांच्या मगरमिठीतून शेतकऱ्यांची सुटका करणे. ३) सर्वांना शिक्षण सहजशक्य व्हावे व सर्वांनी शिक्षण घ्यावे म्हणून प्रयत्न करणे. महात्मा फुल्यांनी सत्यशोधक समाजाच्या माध्यमातून कर्मकांडांना फाटा देऊन बुद्धिनिष्ठ पातळीवरचे आचरणमार्ग सांगितले. जन्मापासून मरणापर्यंतचे विधी आणि त्यात असणारे भटभिक्षुकांचे स्वार्थ लक्षात घेऊन या व्यवस्थेला पर्याय दिला. महात्मा फुले यांचा ‘सार्वजनिक सत्यधर्म’ इतर कोणत्याही रूढ धर्मासारखा नाही. तसेच असते, तर अन्य रूढ धर्माप्रमाणे याचाही विकास झाला असता. त्याचा मुख्य पाया नीतितत्त्वात्मक आहे. त्याचा संबंध ईश्वरप्राप्तीशी नसून ऐहिक हक्कप्राप्तीशी आहे. स्वर्ग, मोक्ष व निर्वाण या सगळ्या गोष्टी जोतिरावांना भ्रामक वाटतात. सुखाची सांगड ते सत्यवर्तनाशी घालतात. ‘सत्यवर्तन केल्याशिवाय मानवप्राणी जगात सुखी होणार नाही,’ असा निर्वाळा महात्मा फुले देतात.

सत्यवर्तन म्हणजे, ‘आम्ही सर्वांनी निर्मिकाच्या सत्यमय राज्याचा उपभोग घेऊ लागावे.’ याचाच अर्थ असा, की हा धर्म सर्वजनांचा वैश्विक धर्म असून त्यांचा आधार ‘समता’ हा आहे. ‘सार्वजनिक सत्यधर्म’ हा रूढ अर्थाने धर्म नसून तो महात्मा फुले यांनी आयुष्यभर चालवलेल्या समता लढ्यांच्या मार्गदर्शक तत्त्वांचा साररूपी जाहीरनामा होता. महात्मा फुले यांनी आपल्या मृत्यूपूर्वी ‘सार्वजनिक सत्यधर्म पुस्तक’ नावाचा ग्रंथ लिहिला. या ग्रंथातून निर्मिकाच्या स्तुतीपासून ते जन्म-विवाहविधीपर्यंतचे सत्यशोधक पद्धतीचे विधी सांगितले आहेत. त्याचप्रमाणे, सत्य, अहिंसा, नीती, शिक्षण, सदाचार अशा सद्‌गुणांवरही महात्मा फुले यांनी काव्यरचना केली आहे.

— रवींद्र गोळे

फ

***

# ब

## बंकटस्वामी महाराज

**वारकरी संप्रदाय, प्रवचनकार, कीर्तनकार**

**१८७७ – ९ मे १९४४**



बंकटस्वामी महाराज यांचा जन्म मराठवाड्यातील बीड जिल्ह्यातील निनगूर येथील निहालसिंग व रत्नाबाई या रजपूत दाम्पत्याच्या पोटी शके १७९९ मध्ये झाला. त्यांचे मूळ नाव व्यंकटेश होते. त्याचे व्यंकट व पुढे बंकट झाले. लहानपणापासून त्यांना भजनाची विशेष आवड होती. त्यांचे प्राथमिक शिक्षण झाले होते.

अत्यंत गरिबीमुळे व्यंकटेश यांना पुढे शिक्षण घेता आले नाही. शिक्षण अर्धवट सोडून शेळ्या-मेंढ्यांची, गाई-म्हशींची राखण करण्याचे काम त्यांना करावे लागले. या कामातही त्यांचे मन मात्र सदैव हरिभजनात रंगलेले असायचे. पुढे त्यांनी स्वत:च मृदंगवादन व संगीताचा एकलव्याप्रमाणे अभ्यास केला आणि काही साथीदार निवडून भजनी मंडळ सुरू केले. नोकरीनिमित्त त्यांना निनगूर गाव सोडून नाशिक जिल्ह्यातील इगतपुरी येथे जावे लागले. तेथेही त्यांनी आपल्या भजनाच्या आवडीने एक भजनी मंडळ सुरू केले. गावोगावी त्यांच्या भजनांचे सुश्राव्य कार्यक्रम होऊ लागले. इथेच त्यांची भेट लक्ष्मणबुवा इगतपुरीकर या वारकरी संप्रदायातील मुमुक्षू तरुणाशी झाली. वारकरी संप्रदायाचे अध्वर्यू गुरुवर्य विष्णुपंत जोग महाराज हे एकदा इगतपुरीला आले असताना तरुण उत्साही बंकटला त्यांचा संतसंग लाभला आणि बंकटच्या जीवनाला एक नवी दिशा मिळाली.

गुरुवर्य जोग महाराज बंकटला पुण्यास घेऊन आले. देहूच्या भंडारा डोंगरावर तीन वर्षे राहून बंकटने गाथा, नाथभागवत, ज्ञानेश्वरी या ग्रंथांच्या अध्ययनाची तपश्चर्या केली. नंतर काही वर्षे ते आळंदी येथे राहिले. आळंदी येथे जोग महाराजांनी नुकतीच ‘वारकरी शिक्षण संस्था’ सुरू केली होती. त्या संस्थेत बंकट दाखल झाले व हळूहळू एकेक जबाबदाऱ्या घेत गेले. इथे त्यांचा परिचय शं.वा. तथा सोनोपंत दांडेकर आदींशी झाला. या काळात बंकटसिंग यांनी संतसाहित्याचे अहोरात्र अध्ययन केले. अजानवृक्षाखाली बसून ज्ञानेश्वरीची १०८ पारायणे केली. इथेच त्यांना ईश्वरदर्शनाचा अनुपम साक्षात्कार झाला. १९२० साली गुरुवर्य जोग यांचे निधन झाले. त्यानंतर बंकटस्वामी यांनी सोनोपंतांसमवेत आळंदीतील वारकरी शिक्षण संस्थेची जबाबदारी सांभाळली. मारुतीबुवा गुरव, लक्ष्मणबुवा इगतपुरीकर हे या वेळी त्यांचे सहकारी होते.

श्री बंकटस्वामींना मानणारा अफाट भाविकवर्ग अवघा महाराष्ट्रभर होता. त्यांनी प्रवचने, कीर्तने, भजनांचे अनेक सोहळे गावोगावी साजरे केले. ज्ञानेश्वरी पारायणांचे सामूहिक सोहळे भरवून संतबोधाचा संदेश

ब

तळागाळातील समाजात पोहोचविला. सर्वांना सहजपणे ज्ञानेश्वरी समजावी म्हणून त्यांनी सार्थ ज्ञानेश्वरी तयार केली. पंढरपूर येथे येणाऱ्या वारकरी बांधवांच्या निवासाची गैरसोय लक्षात घेऊन त्यांनी लोकसहभागातून प्रचंड मोठी धर्मशाळा बांधली व एका ट्रस्टच्या ताब्यात दिली. ते स्वत: वाळवंटात राहत होते. हा कल्पनातीत नि:स्पृहपणा व सेवाभाव हीच बंकटस्वामींची ओळख होय.

संत मुक्ताबाईंच्या समाधिस्थानी 'मेहूण' की 'एदलाबाद' या वादावर त्यांनी संत नामदेवांच्या अभंगांचा सूक्ष्म अभ्यास करून त्या स्थानावर मुक्ताबाईंची सुंदर मूर्ती स्थापन केली व ते स्थान वारकऱ्यांमध्ये प्रिय केले. वारकरी संप्रदायामध्ये बंकटस्वामींचे योगदान फार मोठे आहे. अशा या भागवत-भक्ताचे वैशाख वद्य प्रतिपदेला वृद्धापकाळाने ईश्वरचिंतन करीत असताना त्यांच्या निनगूर या जन्मगावीच निधन झाले.

– विद्याधर ताठे

ब

## बाळ, मालतीदेवी गणेश

**साक्षात्कारी संत, योगिनी**

**२० सप्टेंबर १९२३ –**

महाराष्ट्रातील मिरज या गावी योगिनी मालतीदेवी गणेश बाळ यांचा जन्म झाला. अध्यात्मविद्येची अथवा परमार्थाची पार्श्वभूमी नसतानाही साधनेच्या बळावर परमार्थात प्रगती साधता येते, हे मालतीदेवी यांनी आपल्या उदाहरणातून सिद्ध केले. त्यांचे वडील पांडुरंग रामचंद्र करमरकर हे वैद्य होते. मालतीदेवींचे शिक्षण मिरजेतच चौथ्या इयत्तेपर्यंत झाले. परंतु, त्याच वेळी त्यांची आई अकालीच देवाघरी गेली आणि मालतीदेवींची आबाळ होऊ लागली. त्यामुळे पांडुरंगशास्त्र्यांनी आपल्या मुलीचा विवाह, मिरजेतीलच गणेश हरी बाळ यांच्याशी बाराव्या वर्षीच करून दिला.

गणेश म्हणजेच अण्णासाहेब बाळ यांनी आपले शिक्षण पूर्ण करून काही काळ स्वतंत्र व्यवसाय केला. ते



दिवस दुसऱ्या महायुद्धाचे होते. त्यामुळे त्यांनी सैन्यातील नोकरी पत्करली. मालतीदेवींसह त्यांचा मुक्काम पुण्याच्या छावणीत हलवावा लागला. महायुद्ध संपल्यानंतर त्यांची नोकरी गेली; परंतु पुन्हा लष्करातून त्यांना बोलावणे आले आणि या वेळी त्यांना दिल्ली तळावर नियुक्त व्हावे लागले.

दिल्लीत १९५५ साली आल्यानंतर देवाधर्माकडे ओढा असलेल्या मालतीदेवी एकदा हिमालयात हृषिकेश येथे तीर्थयात्रेला गेल्या, आणि तेथेच त्यांच्या आध्यात्मिक आयुष्याला सुंदर वळण मिळाले. हृषिकेश येथे त्यांना तत्कालीन प्रसिद्ध योगाचार्य स्वामी शिवानंद यांचे दर्शन झाले. स्वामींच्या एकूणच विचार आणि साधनेने त्या भारावून गेल्या आणि त्या हळूहळू अध्यात्माकडे झुकू लागल्या. स्वामी शिवानंदांनी त्यांना 'शिवानंद योगमयी' हा ग्रंथ वाचावयास दिला.

'शिवानंद योगमयी' या ग्रंथाचा मोठा प्रभाव मालतीदेवींवर पडला आणि त्या 'ध्यान' या विषयाकडे आकृष्ट झाल्या. त्या तासन्तास ध्यानस्थ बसू लागल्या. एकदा ध्यानमग्न असलेल्या त्यांच्या चक्षूंसमोर एक कमंडलू आले आणि त्यातून मानवी हाताच्या बोटाने त्यांना काही संकेत दिला. या साऱ्या प्रकाराने मालतीदेवी भयभीत झाल्या. परंतु, त्यांच्या असामान्य आध्यात्मिक प्रवासासाठीचा तो साक्षात्कार होता, हे त्यांनी जाणले.

१९५८ साली जेव्हा सूर्यग्रहण होणार होते, त्या वेळी त्यांना हृषिकेश येथे जाऊन गंगास्नान करण्याची तीव्र इच्छा झाली. त्यांच्या समजूतदार व प्रेमळ पतींनी त्यांना हृषिकेश येथे पाठविले. हृषिकेशच्या प्रवासात त्यांची एकमेव ठेवणीतील साडी हरवली. त्या वेळी त्यांच्या एका सहप्रवासी स्त्रीने त्यांना स्वत:ची शुभ्र साडी दिली आणि म्हटले, ''सारंच परमेश्वराचं आहे, तुम्ही ही साडी घ्या.'' परिधान केलेल्या त्या शुभ्र साडीत मालतीबाईंना एक वेगळीच अनुभूती प्राप्त झाली. स्वत:मधील दिव्यत्वाची जाणीव होऊ लागली.

ध्यानावस्थेत असताना त्यांना अनेक संतसज्जन मंडळी दर्शन देऊन गेली. त्यांचे परमपूज्य स्वामी शिवानंद यांच्याबरोबरच कलकत्त्याची कालीमाता, कोल्हापूरची महालक्ष्मी, अष्टभूजा, व्याघ्रांबरी, भिल्लिणीच्या रूपातील पार्वती आणि भोलेशंकर अशा देवदेवतांसह संत ज्ञानेश्वर, समर्थ रामदास, पंतमहाराज बाळेकुंद्री, नारायणमहाराज केडगावकर अशा कित्येकांचा त्यांत समावेश आहे, असे म्हणतात. या संतांच्या दिव्यदर्शनाने त्या काही वर्षांतच परमहंस स्थितीत पोहोचल्या. मालतीदेवींचे सद्‍गुरू श्री स्वामी शिवानंद यांच्याशी त्यांची चार वेळा प्रत्यक्ष भेट झाली होती. स्वामींनी त्यांना प्रपंचात राहूनही एखादी स्त्री आध्यात्मिक क्षेत्रात आत्मोद्धार आणि जगदोद्धार करू शकते अशी प्रेरणा दिली. मालतीदेवींना त्यांच्या योगसाधनेमुळे अनेक सिद्धी प्राप्त झाल्या होत्या. अनेक भाविकांना त्यांची प्रचिती आली. देवींनी अनेकांना त्यांना आलेल्या अडचणींवर उपाय सुचविले आणि समस्यामुक्त केले.

अनेक संतपुरुषांप्रमाणे मालतीदेवी यांच्याही चमत्कारांचे भक्तांना अनुभव आले आहेत. साधनेच्या शिखरावर पोहोचलेल्या साधकांच्या बाबतीत असे चमत्कार घडून येत असतात. त्यामागचा कार्यकारणभाव लक्षात न आल्यामुळे अनेक जण या गूढ गोष्टी मानतात व त्यावर विश्वास ठेवत नाहीत. पण सूक्ष्मदेहाने मालतीदेवी वावरत असतात, असा त्यांच्या भक्तमंडळींचा अनुभव आहे. मालतीदेवींच्या या व्यस्त दिनक्रमामुळे त्यांचे गुरू स्वामी शिवानंद यांच्या विचारांचा प्रचार करण्याचे काम खंडित होऊ लागले. त्यामुळे पुढील काळात त्यांनी ध्यानयोग शिक्षण वर्ग, तसेच स्वामीजींच्या विचारांचा प्रचार सुरू केला. त्यांचे शिष्यगण आणि भाविक भारतभर पसरले आहेत. सांगली, मिरज, जळगाव, पुणे, दिल्ली येथील केंद्रांतून आज सर्वधर्मियांसाठी विनामूल्य ध्यानवर्गाचे आयोजन केले जाते. १९८३ साली त्या हृषिकेश येथे गेल्या असताना तेथील माधवानंद स्वामींनी त्यांना साधक, शिष्यांना मंत्रदीक्षा देण्याचे काम करण्यास सांगितले. त्यानुसार त्यांनी मंत्रदीक्षेचे कार्य सुरू केले, अर्थात शिष्य, भक्तगण साधनेतून तावूनसुलाखून निघाल्यानंतरच.

'स्वत:च्या अंतर्मनात डोकावून तेथील परिस्थिती अवलोकूनच पुढे वाटचाल करा. आत्मिक बळ वाढवा. अंतर्मनातील अमृतमय स्रोताचा आस्वाद घ्या,' असे सांगणाऱ्या मालतीदेवींनी काव्यही विपुल लिहिले आहे. या कवितांमधून अद्वैत भाव, मानवप्रेम, धर्म, ईश्वरभक्तीचे रसाळ वर्णन केले आहे. देवींनी आपल्या अनुभवांचे वर्णन व लेखन 'संतकृपा' मासिकातून दीर्घकाळ केले आहे. 'कोण्या एका साधकाची साधनगाथा' हा त्यांचा ग्रंथ प्रसिद्ध आहे.

— संदीप राऊत



## बाळेकुंद्री, पंतमहाराज

**अवधूत संप्रदाय अध्वर्यू, 'अवधूतसूर्य'**

**३ सप्टेंबर १८५५ — १६ ऑक्टोबर १९०५**

बाळेकुंद्री पंतमहाराज यांचा जन्म त्यांच्या मातुलगृही, बेळगाव जिल्ह्यातील दड्डी ऊर्फ अजापूर येथे श्रावण वद्य अष्टमी म्हणजे गोकुळाष्टमीला झाला. त्यामुळे वडिलांनी याचे नाव 'श्रीकृष्ण' ऊर्फ 'बाळकृष्ण' असे ठेवले. पण या घराण्यात परंपरागत दत्तोपासना चालत आली होती. त्यामुळे सर्व जण यास 'दत्तू' या नावानेच संबोधू लागले.



पंतमहाराजांचे मूळ घराणे मराठवाड्यातील देऊळगावराजा येथील वतनदार घराणे होते. गुराप्पा कुलकर्णी हा त्यांचा मूळ पुरुष. या घराण्यातील नरसिंह नावाच्या गृहस्थाने गाणगापुरी गुरुचरित्राचे तप केले व त्याला भगवान दत्तात्रेय प्रसन्न झाले. ‘तुझ्या घराण्यात सातव्या पिढीत मी जन्म घेईन,’ असा त्यांना दृष्टान्त झाला. हे सातव्या पिढीतील दत्तावतारी बालक म्हणजे बाळकृष्ण उर्फ दत्तू होय. दत्तूच्या वडिलांचे नाव रामचंद्रपंत आणि आईचे नाव सीता ऊर्फ गोदाक्का असे होते. बाळकृष्णाच्या आईचे वडील श्री नृसिंहपंत कुलकर्णी हे दड्डीचे वतनदार होते. ‘राजर्षी’ म्हणून या घराण्यास बेळगाव परिसरात खूप मान होता.

बाळेकुंद्री येथे शाळा नसल्याने बाळकृष्णाचे सर्व शिक्षण मामा श्रीपादपंत यांच्याकडे दड्डी येथे झाले. मामाच्या घरात मराठी बोलली जात होती व बाहेर, शाळेत सर्वत्र कन्नड, त्यामुळे बाळकृष्णाला मराठी-कन्नड या दोन्ही भाषा बालपणापासूनच उत्तम अवगत झाल्या. मामाच्या घरामध्येच त्यांना महाभारत, हरिविजय, भक्तिविजय, पांडवप्रताप, रामविजय हे ग्रंथ वाचण्यास मिळाले. या काळातच गुरुचरित्राची पोथी त्याच्या पाहण्यात व पुढे वाचनात येऊन तो दत्तभक्तीकडे ओढला गेला. श्रीपादवल्लभ व नृसिंहसरस्वती यांच्यावर त्याची श्रद्धा जडली.

बेळगाव येथील लंडन मिशन स्कूलमध्ये दत्तूचे माध्यमिक शिक्षण झाले. येथेच दत्तूची भेट ‘बालावधूत’ या योगिपुरुषाशी झाली आणि त्यांच्या कृपेने दत्तूची आध्यात्मिक प्रगती झाली. हे बालावधूत बेळगाव जिल्ह्यातील मलप्रभा नदीतीरावरील पारखपूर (पार्शवाड) येथील सिद्धयोगी होते.

लोक त्यांना बाळप्पा व बालमुकुंद असे म्हणत होते. या बालावधूत स्वामींनी दत्तूला आपले निजतत्त्व देऊन कृपा केली, तेव्हापासून दत्तू परिपूर्ण सिद्ध-साधक झाला. बालावधूत यांनी अवधूत संप्रदायाची सर्व सूत्रे सोपवून दत्तूला आपल्या परंपरेचे उत्तराधिकारी केले. पुढे दत्तू ‘श्री पंत महाराज बाळेकुंद्री’ या नावाने प्रसिद्ध झाले.

१८५६ च्या दुष्काळात वडील रामचंद्रपंत यांनी कोठारातील सर्व धान्य लोकांना, गरिबांना वाटून टाकले आणि १८७७-७८ साली पावसाअभावी शेतात फार पिकले नाही. त्यामुळे बाळेकुंद्री घराणेही गरीब झाले. १८७९ पासून अवधूत संप्रदायाची धुरा खऱ्या अर्थाने श्री पंतमहाराज यांनी स्वीकारून प्रबोधनकार्यास प्रारंभ केला; शिष्यांना उपदेश देऊन संप्रदायाचा विस्तार केला. घरची स्थिती बिकट झाल्याने संसार चालविण्यास त्यांना नोकरी करणेच भाग पडले. लंडन मिशन स्कूलमध्ये दरमहा ८ रुपये पगारावर त्यांनी शिक्षकाची नोकरी पत्करली व ते घरीही शिकवण्या घेऊ लागले.

पंतमहाराज १८८० साली मॅट्रिक उत्तीर्ण झाले. त्यांचा १८८२ मध्ये रायबाग येथे यमनाक्कांशी विवाह झाला आणि गृहलक्ष्मीच्या आगमनाने त्यांची आर्थिक स्थितीही सुधारत गेली. उत्तम प्रपंच करीतच उत्तम परमार्थ कसा करता येतो, याचा आदर्श पंतमहाराजांनी सर्वांना स्वत:च्या उदाहरणाने दाखवून दिला व प्रपंचात राहून परमार्थ करण्याचा सर्वांना उपदेश केला.

कोणतीही विशेष साधना न करता केवळ गुरुकृपेने पंतमहाराजांना अनेक गोष्टी प्राप्त झालेल्या होत्या. राजयोग, तारकयोग यात ते निपुण होते. सांख्ययोगापेक्षा मोक्षप्राप्तीसाठी तारकयोग सोपा व महान आहे असे पंतमहाराजांचे मत होते व ते तारकयोगाचा प्रचार करीत



**पंतमहाराज मंदिर, बाळेकुंद्री**

होते. त्यांनी अनेक अनाथ मुलांचे शिक्षण केले. त्यांचे घर एक ‘गुरुकुल’ होते.

त्यांना कुटुंबातील अनेकांचे वियोग सहन करावे लागले. त्यांच्या मुलाचा अकाली मृत्यू झाला. त्यानंतर प्लेगच्या साथीत १८९७-९८ या एका वर्षात घरातील चुलते, मावसभाऊ, आजी अशी माणसे मृत्युमुखी पडली. १९०४ मध्ये त्यांची पत्नीही निधन पावली.

पंतमहाराजांचे ‘बालबोधामृतसार’ प्रसिद्ध आहे. त्याशिवाय ३००० भक्तिरचना त्यांच्या नावावर आहेत. ‘श्रीदत्त प्रेमलहरी’ ही त्यांची रचना दत्तभक्तांची गीताच आहे. त्यांच्या बहुसंख्य रचना मराठीत आहेत. त्यांनी कन्नड व हिंदीमध्येही काही रचना केलेल्या आहेत. १९०३ मध्ये पंतमहाराजांची प्रकृती बिघडली व बिघडतच गेली. या साडेतीन महिन्यांत त्यांनी १७५ पदे-भक्तिगीते लिहिली. अखेर ‘ॐ नम: शिवाय’चा जप ऐकत त्यांनी देह ठेवला. बाळेकुंद्री येथे त्यांची समाधी आहे.

– विद्याधर ताठे

**संदर्भ :**

१. *भट, नम्रता, संपादक; ‘सकल संत चरित्रगाथा’.*
२. *किल्लेदार ना.रा.; चरित्र; संतकृपा प्रकाशन, पुणे.*
३. *‘आधुनिक संत चरित्रे’.*
४. *डॉ. जोशी, प्र.न.; ‘गगनमठीचा योगी’.*

## बाळूमामा धनगर

***धनगर, बाळाप्पा मायाप्पा***

**वारकरी संप्रदाय, सिद्धयोगी**

**३ ऑक्टोबर १८९२ - ४ सप्टेंबर १९६६**



कोल्हापूर-बेळगाव परिसरात ‘शेषाचे अवतार’ म्हणून प्रसिद्ध असलेल्या संत बाळूमामा धनगर यांचा जन्म मेंढ्यापालन करणाऱ्या कष्टकरी कुटुंबात झाला. बेळगाव जिल्ह्यातील चिकोडी तालुक्यातील ‘अक्कोळ’ या छोट्याशा गावात त्यांचा जन्म झाला. त्यांचे मूळ नाव ‘बाळाप्पा’ होते. त्यांच्या आईचे नाव ‘सत्यव्वा’ व वडिलांचे नाव ‘मायाप्पा’ होते. बाळाप्पाच्या आई-वडिलांना लग्नानंतर अनेक वर्षे मूलबाळ नव्हते म्हणून ते चिंतेत होते. आई हलसिद्धनाथाची उपासक होती, तर वडील पंढरीचे वारकरी, एकादशीचे व्रत करणारे भाविक होते. त्यामुळे आपल्या उपासनेचे, भक्तीचे पुत्रप्राप्ती हेच फळ आहे अशी दोघांची श्रद्धा होती.

बाळाप्पा लहानपणापासूनच एकांतप्रिय होते. लहान मुलांसारखे खेळणे, बागडणे, हुंदडणे हा त्यांचा स्वभाव नव्हता. मेंढपाळ मुलांसमवेत ते रानावनात मेंढ्या चरावयास घेऊन जात; पण ते इतर मुलांमध्ये फारसे न मिसळता एकटेच एकटक नजर लावून एखाद्या जागी बसून राहत. या त्यांच्या वर्तनातून ते वेगळेच आहेत हे सर्वांच्याच लक्षात आले होते. बरोबर नेलेली भाकरी-

चटणी ते स्वत: न खाता रानातील पशुपक्ष्यांना खाऊ घालत व स्वत:चे पोट भरल्याचा त्यांना आनंद वाटत असे. त्यांच्या या वागण्याची आई-वडिलांना मात्र चिंता वाटत होती. त्यांना मेंढ्या राखण्याच्या कामात गोडी दिसत नाही असे वाटून वडिलांनी बाळाप्पांना एका श्रीमंत सावकाराकडे नोकरी लावून दिली. काही वर्षे बाळाप्पांनी नोकरी व्यवस्थित केली; पण एके दिवशी सावकाराच्या अमानवी वागण्यामुळे उद्विग्न होऊन ते नोकरी सोडून घरी आले. आई-वडिलांची चिंता कमी करावी या इच्छेने बाळाप्पांना त्यांची विवाहित बहीण आपल्या गावी घेऊन गेली व त्यांना शेतीच्या कामात गुंतवले. बहिणीची मुले बाळाप्पांना 'बाळूमामा' म्हणू लागली व त्याच नावाने ते पुढे सर्वत्र ओळखले गेले.

बाळूमामाच्या कष्टाने बहिणीची शेती व धंदे चांगलेच चालू लागले. हा भाऊ आपले घर सोडून जाऊ नये या हेतूने बहिणीने त्याचे लग्न आपल्याच मुलीशी लावून दिले. बाळूमामांचे मन परमार्थाच्या, पंढरीनाथाच्या भक्तीने रंगलेले होते. त्यांना संसार करण्याची इच्छा नव्हती; पण ते नाइलाजाने बोहल्यावर चढले. लग्न होताच बाळूमामाच्या सासऱ्याचे (बहिणीचा नवरा) निधन झाले व बहिणीच्या सर्व परिवाराची जबाबदारी बाळूमामांवर पडली. घरजावई म्हणून ते साऱ्या जबाबदाऱ्या पार पाडू लागले. 'हीच ईश्वर इच्छा दिसते' असे म्हणत वर्तमानाला सामोरे गेले.

कोल्हापूर परिसरातील गारगोटी येथील मुळे महाराज यांचा बाळूमामांना अनुग्रह लाभला व गुरूंच्या मार्गदर्शनाखाली त्यांची पारमार्थिक प्रगती वेगाने होऊ लागली. खरे तर, ते पूर्वपुण्याईने साधनेचे बळ घेऊनच जन्माला आलेले होते. गुरुकृपेने त्यांना अनेक सिद्धी प्राप्त झाल्या. स्वप्नदृष्टान्तात बाळूमामांना एक देवदूत भेटला व बाळूमामांना वाचासिद्धी प्राप्त झाली.

अल्पकाळातच त्यांच्या आध्यात्मिक अधिकाराचा सुगंध सर्वत्र दरवळला व अनेक लोक त्यांच्या दर्शनाला येऊ लागले. ते त्यांना आपापल्या प्रापंचिक अडचणी सांगत. बाळूमामा त्या सोडविण्यासाठी त्यांना उचित मार्गदर्शन करीत. बाळूमामा हे पंढरीचे निष्ठावान वारकरी होते. त्यांची ७-८ जणांची वारकरी दिंडीच होती. बाळूमामा एकदा पंढरीस वारीला गेले असता तेथील उत्पातच 'श्रीकृष्ण' म्हणून त्यांच्या पाया पडले. असे अनेकांनी त्यांना कृष्णरूपात पाहिले. बाळूमामा मात्र 'भाव तोचि देव' म्हणत लोकांकडे दुर्लक्ष करीत. पंढरीच्या विठ्ठलाप्रमाणेच बाळूमामांची पट्टणकुडीचा विठ्ठलबिरदेव, ज्योतिबा, हलसिद्धनाथ, कोल्हापूरची अंबाबाई ही श्रद्धास्थाने होती. या सर्व ठिकाणी ते वर्षातून एकदा, दोनदा न चुकता जात. इतरांना बरोबर नेत.

बाळूमामा सश्रद्ध होते; पण अंधश्रद्धा त्यांना मान्य नव्हती. क्षेत्र अप्पाचीवाडी येथे देवापुढे बकऱ्यांचा बळी देऊन भक्त नवस फेडत असत. ही पद्धत बाळूमामांनी बंद केली. आज तेथे पुरणाचा नैवेद्य दाखविला जातो. बाळूमामांच्या हातून अनेक अशक्य, अतर्क्य अशा घटना, ज्याला चमत्कार म्हणता येतील अशा, घडल्या आहेत; पण ते कधीही आपल्या सिद्धीचे प्रदर्शन करीत नव्हते. ती त्यांची सहजस्थिती होती. अशा संत बाळूमामांनी वयाच्या चौऱ्याहत्तराव्या वर्षी इहलोकीची यात्रा संपविली. आदमापूर (जि. कोल्हापूर) येथे त्यांची समाधी आहे. तेथे बाळूमामा देवस्थान ट्रस्ट स्थापन झालेला आहे. दरमहिन्याच्या अमावास्येला आदमापूर येथे यात्रा भरते. फाल्गुन वद्य एकादशीला महाराष्ट्र, कर्नाटकातील समस्त धनगर समाज आदमापूर यात्रेनिमित्त एकत्र येतो.

— विद्याधर ताठे

## बीडकर, रामानंद बळवंतराव

***बीडकर महाराज***

**मारुती उपासक, परमार्थ क्षेत्रातील थोर दाता**

**२२ जानेवारी १८३८ – १ एप्रिल १९१३**

**रा**मानंद बीडकर महाराज यांचा जन्म पुण्यातील सरदार घराण्यात, माघ शुद्ध अष्टमीला, शके १७६० मध्ये झाला. त्यांचे वडील बळवंतराव हे पुण्याजवळील नांदुर्की किल्ल्यावर अधिकारी होते. त्यांचे पूर्वज अकबर



बादशहाच्या दरबारात दिवाण होते. अक्कलकोट स्वामींच्या शिष्यपरंपरेतील एक थोर संत म्हणून रामानंद बीडकर महाराज यांचे नाव घेतले जाते. श्री रावसाहेब तथा बाबा सहस्रबुद्धे यांचे गुरू म्हणूनही बीडकर महाराजांना अनेक जण ओळखतात. बळवंतराव यांना प्रथम पत्नीपासून अपत्यप्राप्ती न झाल्याने त्यांचे दुसरे लग्न बार्शी तालुक्यातील व्यंकटराव कुलकर्णी यांची कन्या गंगूबाई हिच्याशी करण्यात आले. गंगूबाईंना दोन मुले व चार मुली झाल्या. यांपैकी 'शेंडेफळ' म्हणजे रामानंद. छोट्या रामानंदाला लहानपणापासूनच ईश्वराचे वेड होते. पुण्यातून पंढरीकडे जाणाऱ्या वारकऱ्यांच्या पालखी सोहळ्यात ते आपल्या मित्रांना जमवून भाग घेत. असेच एकदा ते थेट पंढरपूरलाच गेले. त्यांना विठ्ठलाचे साक्षात्कारी दर्शन झाले. शालेय शिक्षणाचा योग मात्र त्यांच्या नशिबी नव्हता. पुण्यात शिक्षण झाले नाही म्हणून ते धुळ्याला गेले; पण तेथेही यश मिळाले नाही. धुळ्याहून ते नाशिक जवळील सप्तशृंगी देवीच्या दर्शनाला गेले. तेथेही त्यांना देवीचे प्रत्यक्ष दर्शन झाले व तांबुलाचा प्रसाद म्हणून लाभ झाला.

सरदार घराणे, घरची श्रीमंती यांमुळे प्रारंभापासूनच अत्यंत विलासी, चैनी जीवन जगण्याची त्यांना सवय जडलेली होती. वडिलांचे निधन व वडीलबंधू घर सोडून गेल्याने रामानंदावर सर्व संसाराची जबाबदारी पडली. नगर जिल्ह्यातील देवीचे केडगावच्या रंगूबाई हिच्याशी रामानंदांचे लग्न झाले. वडिलोपार्जित संपत्ती संपल्याने रामानंद आर्थिक अडचणीत आले व सुगंधी वस्तूंच्या व्यापारात त्यांनी लक्ष घातले.

ग्वाल्हेर, जयपूर, बडोदा, सातारा अशा राजघराण्यांशी त्यांचे व्यापारी संबंध आले व या व्यापारातून त्यांनी खूप पैसा मिळविला; परंतु सवयीप्रमाणे विलासीवृत्तीने तो सर्व उडविला. रत्नाची त्यांस उत्तम पारख असल्यामुळे त्या जोरावर त्यांनी सराफीचा व्यवसायही केला. एका साधूकडून त्यांनी किमयेची विद्याही मिळविली. सारी सुखे, सारे उपभोग घेऊन अखेर त्यांचे मन परमार्थाकडे ओढ घेऊ लागले. आपली इष्ट देवता मारुतीची कठोर उपासना केल्यानंतर मारुतीच्या दृष्टान्तानुसार त्यांना अक्कलकोटला जाण्याचा संकेत मिळाला. दृष्टान्तानुसार रामानंद अक्कलकोटला येऊन स्वामींना भेटले आणि पहिल्या भेटीतच त्यांना स्वामींची गुरुकृपा लाभली. तिसऱ्या भेटीत स्वामींनी रामानंदांना एक थप्पड लगावली आणि त्यासरशी रामानंदांची समाधी लागली. त्यानंतर स्वामींनी रामानंदांना नर्मदा परिक्रमा करण्याची आज्ञा केली, तसेच आता पुन्हा अक्कलकोटला येण्याची गरज नाही असे बजावले. गुरुआज्ञेनुसार रामानंदांनी निष्ठेने नर्मदा परिक्रमा केली. त्यांना नर्मदेचे साक्षात दर्शन घडून त्यांचा अंतरबाह्य पालट झाला. रामानंद महाराजांनी पुढे अनेक शिष्यांना अनुग्रह दिला. पुढे पुण्यात मेहेंदळे मारुतीजवळ शनिवार पेठेतच महाराजांनी अखेरपर्यंत वास्तव्य केले.

नर्मदा परिक्रमेहून पुण्यात आल्यानंतर त्यांनी पत्नीला घेऊन काशी, प्रयाग, गया अशी त्रिस्थळी यात्रा केली. त्यानंतर पुण्यात येऊन पुनश्च औदुंबर, नृसिंहवाडी, कोल्हापूर, ज्योतिबा, पंढरपूर, आळंदी, देहू, चिंचवड अशी प्रदीर्घ तीर्थयात्रा केली. प्रत्येक ठिकाणी त्या-त्या देवदेवतांचा त्यांना साक्षात्कार प्राप्त झाला. त्यांच्यासारखा परमार्थ क्षेत्रात दुसरा दाता नाही असे रामानंद बीडकरांचे सार्थ वर्णन करतात. त्यांचा शिष्यपरिवार मोठा होता. श्री रावसाहेब तथा बाबा

ब

सहस्रबुद्धे आणि दिगंबरमहाराज हे त्यांचे अग्रणी शिष्य होते. त्याशिवाय वासुअण्णा भागवत, अण्णासाहेब गुप्ते, मुकुंदराव मोघे, श्रीधरपंत लिमये, लक्ष्मणराव बापट हेही रामानंदांच्या अधिकारी शिष्यवर्गातील प्रमुख शिष्य होते.

सिद्धावस्थेला पोहोचल्यावर सुमारे २५ वर्षे पुण्यात रामानंद महाराजांचे वास्तव्य होते; पण ते कटाक्षाने प्रसिद्धीपासून दूर राहिले. त्यांच्या उपदेशात गुरुनिष्ठेवर विशेष भर असे. निष्ठेमुळेच गुरुकृपेचा लाभ होतो व त्या योगे ज्ञान मिळते, धैर्य निर्माण होते आणि स्वार्थ-परमार्थ दोन्ही क्षेत्रांत हात घालाल तेथे फत्तेच होते. फत्ते झाली की पुन्हा दुप्पट वेगाने गुरुनिष्ठा वाढते, असे ते सदैव सांगत. पत्नी जानकीबाई (रंगूबाई) यांचे १९११ मध्ये निधन झाले आणि त्यानंतर त्यांची विरक्ती अधिकच वाढली. 'आता आपले काही खरे नाही, आता आमचाही काही नेम नाही,' अशी निर्वाणीची भाषा ते शिष्यांशी बोलताना वारंवार वापरू लागले. पत्नीच्या निधनानंतर कशीबशी दोनच वर्षे गेल्यावर अखेर फाल्गुन वद्य दशमीला, शके १८३४ मध्ये दोन प्रहरी रामानंद महाराज निजानंदी लीन झाले. पुण्याच्या शनिवार पेठेतील त्यांचे निवासस्थान हाच त्यांचा मठ आहे.

- विद्याधर ताठे

**संदर्भ -**

१. *'भक्तिकोश'; आदित्य प्रतिष्ठान.*
२. *बापट, ल.ग.; 'बीडकर महाराज चरित्र'.*
३. *'नरहरप्रभू चरित्र'.*

## बेलसरे, केशव विष्णू

***बाबा बेलसरे***

**नामसाधना भक्ती, प्रवचनकार, तत्त्ववेत्ता**

**८ फेब्रुवारी १९०९ – ३ जानेवारी १९९८**

**बा**बा बेलसरे म्हणजेच केशव विष्णू बेलसरे हे 'संतश्रेष्ठ श्री ब्रह्मचैतन्य महाराज' यांच्या अंतरंगातील अत्यंत प्रिय शिष्य होते. त्यांचा जन्म सिकंदराबाद येथे एका मध्यमवर्गीय कुटुंबात झाला. त्यांचे वडील न्यायाधीश होते. त्यांना एक भाऊ व पाच बहिणी होत्या.



बाबांच्या घरातील वातावरण फार सनातनी होते. जीवनाची सर्व धार्मिक अंगे अति कडकपणे पाळली जात. त्यामुळे घरातील वातावरण कडक शिस्तीचे होते. घरातील पुस्तकांचे कपाट काव्य, निबंध, नाट्य व तत्त्वज्ञान यांवरील मराठी, हिंदी, संस्कृत व इंग्रजी पुस्तकांनी भरलेले होते. त्यामुळे लहानपणीच बाबांचे चतुरस्र वाचन झाले. अगदी लहानपणापासून त्यांना तीव्र स्मृतीचे वरदान होते. लहानपणीच त्यांनी एका आठवड्यात गीतेचे सातशे श्लोक पाठ केले होते. तसेच, शाळेत असतानाच एका मित्राकडून ज्ञानेश्वरी आणून त्यांनी ती वाचून काढली. बाबांचे शालेय शिक्षण हैद्राबाद येथे झाले. बाबांचा स्वभाव मूळचाच कल्पनाप्रधान होता. तारुण्यात पदार्पण केल्यावर त्यांच्या बुद्धीला एक नवे तेज चढले. धर्म, ईश्वर, वेदान्त, मृत्यू, जीवन यांच्याबद्दल अनेक शंका त्यांना भंडावून सोडायच्या. याच काळात चांगल्या मित्रांच्या संगतीने त्यांना काव्य, संगीत, विनोद व चित्रकला यांमध्ये अतीव गोडी निर्माण झाली. खरी रसिकता जागी होऊन तिच्या पायी संस्कृत व मराठी अभिजात काव्य आणि नाटके यांचा त्यांनी अगदी मनापासून अभ्यास केला. महाविद्यालयामध्ये असताना ते महाविद्यालयाच्या मागे असलेल्या डोंगरावर जाऊन एकटे नामस्मरण करीत तासन्‌तास बसून राहत. वडिलांच्या इच्छेप्रमाणे बाबांनी

ब

सायन्सला प्रवेश घेतला होता. परंतु, या विषयात त्यांना गोडी नव्हती. या विवंचनेत असताना एका शनिवारी बाबा मारुतिरायाच्या दर्शनास गेले व नामस्मरण करीत बसले. तेवढ्यात 'तत्त्वज्ञानाचा अभ्यास करावा' अशी मोठ्या जोराने आतून प्रेरणा झाली. तिचा प्रभाव इतका जबरदस्त व विलक्षण होता, की घरातील वडीलधाऱ्या मंडळींचा विरोध न जुमानता ते स्वेच्छेने मुंबईस आले व एल्फिन्स्टन कॉलेजात महाविद्यालयात होऊन त्यांनी तत्त्वज्ञानाचा रीतसर अभ्यास सुरू केला. एम.ए. करण्यासाठी त्यांनी प्रबंध लिहिला. त्यामुळे संशोधन करण्यासाठी जी पद्धत (Research Method) आत्मसात करावी लागते, ती त्यांना उत्तम अवगत होती.

आपल्या साधनेला व अभ्यासाला मोकळा वेळ मिळावा व उत्तम ग्रंथ हाताशी असावेत म्हणून त्यांनी अनुक्रमे शाळा व महाविद्यालयामध्ये नोकरी केली. आठ वर्षे मॅट्रिकच्या वर्गाला इंग्रजी शिकवल्याने त्यांचा पायाभूत इंग्लिशचा उत्तम अभ्यास झाला व सोपी इंग्रजी भाषा त्यांना बोलता येऊ लागली. ते प्रथम खालसा महाविद्यालयामध्ये शिकवीत व नंतर सदतिसाव्या वर्षी सिद्धार्थ महाविद्यालयात तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक म्हणून बाबांची नेमणूक झाली. त्यांनी आपल्या सेवेच्या काळात प्रामुख्याने तर्कशास्त्र (Logic), तत्त्वज्ञान (Philosophy), आणि मानसशास्त्र (Psychology), हे विषय शिकविले. ते एम.ए.च्या वर्गाला शंकराचार्यांचे तत्त्वज्ञान व रामानुजांचे तत्त्वज्ञान शिकवीत असत. पूर्ण तयारी करून, अत्यंत मनापासून शिकवल्याने त्यांची व्याख्याने (lectures) फार परिणामकारक होत असत. विषय कितीही कठीण असला तरी तो वर्गातील सामान्य बुद्धीच्या विद्यार्थ्यापासून अगदी हुशार विद्यार्थ्यापर्यंत प्रत्येकाला समजला पाहिजे असा त्यांचा कटाक्ष असे. त्यामुळे त्यांचे वर्ग विद्यार्थ्यांनी ओसंडून वाहत असत. सन १९७३ साली बाबा महाविद्यालयामधून निवृत्त झाले. सनातन तत्त्वज्ञानाचा अभ्यास करताना भारतीय व युरोपियन तत्त्वज्ञान या दोन्हींचा त्यांनी प्रचंड अभ्यास केला होता. त्यांनी अभ्यासलेल्या अनेक पुस्तकांपैकी १) स्टेबिंगचे नवीन तर्कशास्त्र, २) रसेलचे 'सायंटिफिक मेथड' व ३) व्हाइटहेडचे 'सायन्स ॲण्ड दि मॉडर्न वर्ल्ड' हे तीन ग्रंथ त्यांच्या विशेष आवडीचे होते. तत्त्वज्ञानाच्या अभ्यासात थोर जर्मन तत्त्वचिंतक 'लायबनिज' यांच्या ग्रंथात 'फिलॉसॉफिया पेरिनीज' म्हणजे सनातन तत्त्वज्ञान हा शब्द सापडल्याक्षणी त्यांना इतका आनंद झाला, की त्याच्या उन्मादाने त्यांना रात्रभर झोप लागली नाही. याच तत्त्वज्ञानाला वेदान्त किंवा परमार्थ म्हणतात.

बाबांना माणसांच्या जीवनात घडणाऱ्या सत्य घटना वाचण्यास फार आवडत असत. 'तुम्ही जीवन नीट पाहा. तत्त्वज्ञान हे आपल्या जीवनातून निर्माण झाले पाहिजे व ते आपल्या आचरणात आले पाहिजे,' असा त्यांचा आग्रह होता. 'अथातो जीवन जिज्ञासा' असे बाबांच्या 'आनंद साधनेचे' प्रथम सूत्र होते. बाबांचे तरुणपण निजामाच्या हैद्राबादमध्ये गेल्यामुळे त्यांना उर्दू स्वाभाविकच उत्तम येत असे. ते उर्दू शायरी वाचीत असत. त्यांत त्यांना मिर्झा गालिब, मीर व जौक हे कवी अधिक आवडत असत.

ग्रीक तत्त्वज्ञ सॉक्रेटिस बाजारातून मित्राबरोबर फिरत असताना त्याला म्हणाला, ''मित्रा, मला या बाजारातली एकही वस्तू हवीशी वाटत नाही.'' बाबांची अशीच संन्यस्त वृत्ती होती. त्यांचे सर्व लक्ष साधना, ग्रंथ अभ्यास यांवर केंद्रित झालेले होते. आयुष्यात मोठे ध्येय मिळविण्यासाठी सर्व प्रलोभने सोडून संन्यस्त वृत्तीच अंगी बाणवावी लागेल, असे ते म्हणत. त्यांच्या पत्नी इंदिराबाई या सात्त्विक व सुशील असून त्यांनी बाबांना लिखाणामध्ये मोलाची मदत केली. ऐहिक व पारमार्थिक जीवनातही त्या सदैव बाबांच्या बरोबर राहिल्या. बाबांना दोन मुलगे होते. मोठे चिरंजीव लहानपणीच वारले. धाकटे चिरंजीव प्रा. श्रीपाद केशव बेलसरे यांनी बाबांची आज्ञा जन्मभर पाळली व प्राणापलीकडे आई-वडिलांना सांभाळले. बाबांना तीन नाती आहेत. सगळ्या नाती उच्चविद्याविभूषित आहेत. साधी व स्वच्छ राहणी, निर्मळ व शुद्ध मन, तर्कशुद्ध विचार आणि वैराग्यपूर्ण

विवेक असे बाबांचे व्यक्तिमत्त्व होते. Accuracy and Perfection या गोष्टी त्यांना फार आवडत असत. बाबांच्या जीवनातील अत्यंत महत्त्वाचा कलाटणी देणारा भाग म्हणजे श्री ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज, ज्यांच्यामुळे त्यांचे जीवन आमूलाग्र बदलून गेले. बाबांची व श्री महाराजांची पहिली भेट १९३१ मध्ये झाली. मुंबईतील बाबांचे चुलत काका यांनी बाबांना प्रथम श्री महाराजांकडे नेले. पहिल्या भेटीतच श्री महाराजांनी बाबांना ‘सध्या काय वाचन चालू आहे’ असे विचारले. बाबा त्या वेळी ज्ञानेश्वरी वाचत होते. श्री महाराजांनी त्यांना ज्ञानेश्वरीवर प्रवचन करण्यास सांगितले व नेहमी येत जावे असे ते म्हणाले. त्या दिवसापासून आयुष्याच्या शेवटच्या श्वासापर्यंत बाबांनी निरूपणे केली. श्री महाराज व बाबा यांचा संबंध घनिष्ठ होत गेला. त्याचे सद्‌गुरू व सत्‌शिष्य असे प्रेमात रूपांतर झाले. श्री महाराजांनी बाबांच्या जीवनाची सूत्रे कायमची हातात घेतली.

श्री महाराजांनी परमार्थातील अनेक गुह्य गोष्टी त्यांना समजावून सांगितल्या. परमार्थातील अनेक अभ्यास (अमानित्व, अदंभित्व वगैरे) श्री महाराजांनी बाबांकडून करून घेतले. बाबांच्या स्वभावातील दोषांचे श्री महाराजांनी गुणांत रूपांतर केले. त्यांचा मूळ स्वभाव पूर्णपणे बदलून टाकला. याला 'Metamorphosis' असे म्हणतात. हा आमूलाग्र बदल असतो.

श्री महाराजांच्या सर्व आज्ञा बाबांनी तंतोतंत पाळल्या. ‘गुरुआज्ञा प्रमाण’ हा तर त्यांच्या साधनेचा प्राण होता. श्री महाराजांनी त्यांना ‘नामस्मरणाचा’ मार्ग सांगून प्रवचने करण्याची आज्ञा दिली. सुमारे ६४ वर्षे ते सतत प्रवचने करीत होते. त्यांच्या प्रवचनांमध्ये कायम ताजेपणा होता. श्रोते प्रवचनांमध्ये तल्लीन होऊन जात. अगदी अडाणी माणसांपासून विद्वान माणसांपर्यंत सर्वांना त्यांचे निरूपण समजत असे. विषय सोपा करून सांगण्याची त्यांची हातोटी वादातीत होती. तत्त्वज्ञान सोपे करून सांगताना त्यांच्या वाणीला बहर येई. ऐकणाऱ्यांच्या अंगांवर रोमांच उभे राहत असे.

बाबांनी फार मोठी ग्रंथसंपदा निर्माण केली; पण त्याअगोदर शारदेला वंदन म्हणून त्यांनी प्रथम ‘श्री सद्‌गुरूंचे’ सविस्तर चरित्र लिहिले. ग्रंथ लिहिताना आपले सर्वस्व त्यात ते ओतीत असत. ते लिखाण पुन्हा पुन्हा तपाशीत असत. अनेक पुस्तके त्यांनी दहा-दहा वेळा लिहिलेली आहेत. श्री महाराजांच्या आज्ञेप्रमाणे आपला प्रपंच बाबांनी खऱ्या अर्थाने श्री महाराजांवर सोपविला. श्री महाराजांची बाबांना शेवटची आज्ञा होती : ‘‘येणारा काळ कठीण आहे. तुम्ही लोकांना नामाला लावा आणि धीर द्या.’’ श्रींच्या आज्ञेप्रमाणे बाबा स्वत: रोज पहाटे अत्यंत तीव्रतेने व एकाग्रतेने नामस्मरण करीत. साधना करत असताना साधनेच्या आड जे-जे काही आले, ते-ते सर्व त्यांनी अत्यंत कठोरपणे बाजूला सारले. दिवसेंदिवस ते खूप अंतर्मुख होत गेले. त्यांना श्री महाराजांचे प्रत्यक्ष मार्गदर्शन असे व त्यांचे श्रींशी संभाषणही होत असे. ‘मी पांढऱ्या कपड्यांतला संन्यासी आहे,’ असे ते म्हणत असत. सर्व वेळ ते नामस्मरणात घालवीत असत. हजारो लोकांना ईश्वरसन्मुख करून नामाला लावले. प्रवचनांद्वारे श्री महाराजांचा निरोप लोकांपर्यंत पोहोचवण्याचे फार मोठे काम त्यांनी केले. बाबांवर लोकांनी प्रेमाचा वर्षाव केला. बाबांना कधी अहंकाराचा स्पर्श झाला नाही. आपली श्री महाराजांशी असलेली शरणागती त्यांनी कधी सोडली नाही. आपल्यामधील आध्यात्मिक अधिकार त्यांनी झाकून ठेवला. ‘‘मी तुमच्यातलाच एक आहे,’’ असे ते सर्वांना म्हणत. श्री महाराज म्हणायचे : ‘‘माणसाची खरी परीक्षा दारिद्र्य आणि देहदु:खात होते. आपल्या शेवटच्या आजारात बाबांनी देहदु:खाची खरी परीक्षा अत्यंत शांतपणे व प्रसन्नतेने देत बाबा श्री महाराजांच्या चरणी विलीन झाले.

— शोभना बेलसरे

***

# भ

## भक्तिवेदान्त स्वामी प्रभुपाद

***डे, अभयचरण गौरमोहन***

**धर्मप्रसारक, इस्कॉन संस्थापक**

**१ सप्टेंबर १८९६ – १४ नोव्हेंबर १९७७**



**श्री**ल भक्तिवेदान्त स्वामी प्रभुपाद यांचे मूळ नाव अभयचरण डे असून त्यांच्या पिताश्रींचे नाव गौरमोहन डे होते. ते कापडाचे व्यापारी होते, तसेच त्यांचा पिढीजात व्यवसाय सोने व मीठ या वस्तूंचा होता. गौतमऋषींचे कूळ हे यांचे मूळ होते; परंतु मोगलांच्या आमदनीत मुसलमान शासकाने त्यांना मलिक ही पदवी दिली. अभयच्या मातेचे नाव रजनी होते. गौरमोहन डे यांनी ज्या ज्योतिषाला बोलावले होते, त्याने अभयचे भविष्य वर्तविले होते, की हे बालक वयाच्या सत्तर वर्षांनंतर समुद्रपार जाईल, धर्मोद्धारक होईल आणि १०८ मंदिरे स्थापन करील. डे यांचे घर उत्तर कलकत्त्यात, हॅरिसन रोडवर होते. त्यांच्या रस्त्याच्या पलीकडेच राधागोविंद मंदिर होते व त्यांच्या घरातील सर्व जण राधाकृष्ण हे कुलदैवत मानीत. त्या देवळात पूजाअर्चा करून सर्वांना प्रसाद वाटीत असत. मलिक यांची इस्टेट खूपच मोठी होती. मलिक परिवार रोज सकाळी मंदिरात दर्शनाला नियमाने जात. राधाकृष्ण हे त्यांचे परमश्रद्धेचे स्थान होते.

अभयचरणला बालपणापासूनच शुद्ध कृष्णभक्तीचे बाळकडू मिळाले. त्याला वडिलांनी मृदंगवादनही शिकवले. अभयचरण मातापित्यांबरोबर अथवा नोकरांसोबत मंदिरात जाई. गौरमोहन वैष्णव होते. त्यांनी कधीही मासे, मांस, अंडी, चहा-कॉफीला स्पर्शही केला नाही. दुकानातून रात्री घरी आल्यावर ते चैतन्यचरितामृत व श्रीमद्‌भागवताचे वाचन करीत. जपजाप्य होतेच. वडिलांनी अभयचरणला कृष्णभक्तीचा लळा लावला. ते मुलावर कधीही रागावत नसत. त्यांचा स्वभाव कोमल होता. भक्तिसिद्धान्त सरस्वती ठाकूर हे प्रसिद्ध धार्मिक विद्वान होते. त्यांची व अभयचरण यांची गाठ कलकत्त्यात १९२२ मध्ये पडली. भक्तिसिद्धान्तांनी गौडीय मठ संस्था स्थापन केली होती. ही संस्था वैदिक ज्ञानाचा प्रसार करी. या संस्थेची भारतात ६४ केंद्रे होती. भक्तिसिद्धान्त हे त्या जमान्यातले अग्रगण्य पंडित होते. त्यांना अभयचरण डे (श्रील) हा तरुण आवडला. त्यांनी या उमद्या तरुणाला पटवून दिले, की वेदविद्येचे शिक्षण देण्यात त्याने आपले आयुष्य खर्च करावे. त्यानंतर बारा वर्षांनी (१९३३) या पंडितांनी अभयचरणला अलाहाबाद-प्रयाग येथे दीक्षा दिली. त्याचे नामकरण ‘भक्तिवेदान्त स्वामी’ झाले.

त्यांच्या आध्यात्मिक ज्ञानाची व कृष्णभक्तीची गंभीरता पाहून, गौडीय वैष्णव सोसायटीने १९४७ साली त्यांना ‘भक्तिवेदान्त’ हा किताब दिला. १९५० साली त्यांनी वयाच्या चौपन्नाव्या वर्षी गृहस्थाश्रमाचा त्याग



हरे राम हरे कृष्ण कीर्तन

करून अध्ययनासाठी व लेखनासाठी वेळ मिळावा म्हणून वानप्रस्थाश्रम स्वीकारला. भक्तिवेदान्त श्रीधाम वृंदावनला गेले. तेथे प्रसिद्ध ऐतिहासिक श्रीराधादामोदर मंदिरात निवास करू लागले. त्यांचा स्वभाव अतिशय नम्र व राहणी साधी होती. याच मंदिरातील खोलीत त्यांनी एकाग्र चित्ताने आपल्या जीवनातील महत्त्वाचे कार्य : श्रीमद्‌भागवतासारख्या अठरा हजार श्लोकांच्या विशाल ग्रंथाचे टीकेसहित भाषांतर करायला सुरुवात करून 'ईझी जर्नी टू अदर प्लॅनेट्स' हे पुस्तकही लिहिले.

श्रीमद्‌भागवताचे प्रथम तीन स्कंद प्रकाशित झाल्यावर १९६५ साली श्रील प्रभुपाद आपल्या सद्‌गुरुमहाराजांची इच्छा पूर्ण करण्यासाठी अमेरिकेला निघाले. त्यांच्याकडे फक्त एक सूटकेस होती. गरम कपडे नव्हते. भक्तिपादांचे वय व तब्येत बघून बोटीचे तिकीट देण्यास कंपनीचे अधिकारी तयार नव्हते, म्हणून तिकिटासाठी ते सिंधिया स्टीम नॅव्हिगेशन कंपनीच्या मालकीण सुमती मोरारजींना भेटले. त्यांनी प्रभुपादांची प्रवासाची व्यवस्था केली. 'जलदूत' नावाची बोट १९ सप्टेंबर १९६५ रोजी न्यूयॉर्कला पोहोचली. प्रभुपाद विचार करू लागले, 'माझ्याकडे पुस्तकांच्या पेट्यांशिवाय काय आहे? इथली संस्कृती वेगळी, सर्वथा अपरिचित. येथे साधूंची परंपरा नाही, देवळे नाहीत. मोफत आश्रम नाहीत. भारताची गोष्ट वेगळी होती. माझ्याकडे अध्यात्माचा, अलौकिक ज्ञानाचा साठा आहे, 'श्रीमद्‌भागवतम्' हा सद्‌भावना व शांततेचा संदेश आहे. तुळशीमाळा आहे.'

निष्कांचन स्थितीत १९६५ मध्ये अमेरिकेत उतरल्यावर एक वर्ष कठीण परिश्रम करून १९६६ साली त्यांनी 'आंतरराष्ट्रीय श्रीकृष्णभावनामृत संघा'ची (इस्कॉन) स्थापना केली. या संस्थेची पुढे जगभर भरभराट होऊन शेकडो मंदिरे, गुरुकुले, शैक्षणिक केंद्रे, कृषिसमाज उदयाला आले. प्रभुपादांनी साधी राहणी, गोरक्षण अशा मूल्यांवर भर देणारा व श्रीकृष्णाच्या निसर्गदत्त उदार देणग्यांवर स्वावलंबनाने गुजराण करणारा पहिला कृषिसमाज अमेरिकेत स्थापन केला. यातून प्रेरणा घेऊन त्यांच्या भक्तगणाने आजपावेतो अमेरिकेत व इतरत्र अनेक कृषिसमाजांची स्थापना केली आहे.

भारतामध्ये अनेक ठिकाणी आंतरराष्ट्रीय सांस्कृतिक केंद्रे उभारण्याचे आदेश प्रभुपाद स्वामींनी अनुयायांना दिले. त्यांपैकी श्रीधाम मायापूर हे केंद्र नियोजित आध्यात्मिक नगराच्या उभारणीचे एक स्थान आहे. ही एक फार महत्त्वाकांक्षी योजना असून ती पूर्ण होण्यास दहा वर्षे तरी लागतील. श्रीधाम वृंदावन येथे संस्थेचे भव्य श्रीकृष्ण-बलराम मंदिर प्रसिद्ध असून एक भव्य आंतरराष्ट्रीय अतिथिगृहदेखील आहे. त्याप्रमाणे मुंबईतही जुहू येथे विशाल मंदिर व सांस्कृतिक शिक्षण केंद्र आहे. भारतात अनेक ठिकाणी अशा योजनांच्या उभारणीचे काम संस्थेने हाती घेतले आहे.

''स्वामी भक्तिवेदान्त यांनी आपल्या इंग्रजी भाषांतरांच्या व भाष्यांच्या द्वारा परमेश्वराच्या भक्तांना एक कल्याणकारक सेवेचे साधन देऊ केले आहे...''

– डॉ. ज्युडिथ एम. टायबर्ग, लॉस एंजेलिस

''चैतन्य महाप्रभूंच्या सरळ परंपरेतले वारस म्हणून भारतीय रितीला अनुसरून कृष्णकृपा श्रीमूर्ती भक्तिवेदान्त स्वामी प्रभुपाद ही पदवी ज्यांना मिळाली आहे, त्या श्रील ए.सी. भक्तिवेदान्त स्वामी प्रभुपादांचे संस्कृत भाषेवर संपूर्ण प्रभुत्व आहे. त्यांनी भगवद्‌गीतेचे अध्ययन केले. त्याला अनुसरून आपल्यालाही गोडी वाटू लागली व त्यामुळे म्हणजे चैतन्य महाप्रभूंच्या परंपरेच्या तत्त्वानुसार

भ

केलेल्या अशा या अध्ययनाच्या योगाने गीतेचा अधिकृत अर्थ लावता आला आहे.''

– ऑलिव्हर लोकोंबे, पॅरिस युनिव्हर्सिटी

लेखक व कृष्णभक्ती प्रचारक या नात्याने त्यांचे काम अपूर्व आहे. त्यांनी वैदिक ज्ञान प्रसारासोबत श्रीमद्‌भगवद्‌गीतेवर टीका लिहिली. गौडीय मठ संस्थेच्या कार्याला हातभार लावला आणि १९४४ मध्ये कोणत्याही प्रकारच्या मदतीशिवाय एक इंग्रजी पाक्षिक सुरू केले. त्याचे लेखन, संपादन स्वत: केले. प्रकाशन अखंड चालावे यासाठी अथक परिश्रम घेतले. हेच पत्रक सध्या मराठीत 'जाऊ देवाचिया गावा' या नावाने प्रकाशित केले जात आहे.

स्वामी प्रभुपादांची मोठी देणगी म्हणजे त्यांची ग्रंथसंपदा व 'हरे राम हरे कृष्ण' मंदिरे. मुंबईशिवाय भारतातील सर्व मोठ्या शहरांतून हरेकृष्ण मंदिर, आश्रम किंवा कृष्ण-बलराम मंदिर आहे. त्यांनी कृष्णभक्ती जगभर प्रसारित केली, तीसुद्धा अल्पकाळात. त्यांचे ग्रंथ अधिकृत असून, स्पष्टतेमुळे विद्वान, बुद्धिमान वर्गाद्वारे समाहृत झाले आहेत.

अनेक विद्यापीठांतून शिक्षणक्रमासाठी क्रमिक पुस्तके म्हणून त्यांचा वापर केला जात आहे. त्यांचे साहित्य जगातील सुमारे ९० भाषांत भाषांतरित झाले आहे. 'भक्तिवेदान्त बुक ट्रस्ट' ही प्रकाशन संस्था आज भारतीय धार्मिक तत्त्वज्ञान विषयावरील पुस्तके प्रकाशित करणारी जगातील सर्वांत मोठी संस्था आहे. श्री स्वामी भक्तिवेदान्त प्रभुपाद १४ नोव्हेंबर १९७७ रोजी श्रीधाम वृंदावनात समाधिस्थ झाले. त्यांच्या वाणीद्वारा आपण अखंडपणे त्यांच्या संगतीत राहू शकतो. ए.सी. भक्तिवेदान्त प्रभुपाद वैराग्यात पूर्णपणे स्थिर झालेले असल्याने कृष्णभावनाभावित असे कृतार्थ जीवन जगले.

प्रभुपाद स्वामींची ग्रंथसंपदा अशी आहे :

'भगवद्‌गीता जशी आहे तशी', 'जीवनशक्तीचा उगम : अंधश्रद्धा निर्मूलन', 'श्रीमद्‌भागवत' : पहिला, दुसरा, तिसरा स्कंध, 'श्री चैतन्य शिक्षामृत', 'उपदेशामृत', 'अन्य लोकांप्रत सुगम यात्रा', 'पूर्ण पुरुषोत्तम भगवान श्रीकृष्ण', 'सर्वोत्तम योग', 'आत्मसाक्षात्काराचे विज्ञान', 'पूर्ण प्रश्न पूर्ण उत्तर', 'योगाची पूर्णता', 'जन्ममृत्यूच्या पलीकडे', 'कृष्णभक्ती : अनुपम भेट', 'पुनरागमन : 'पुनर्जन्माचे गूढ', 'राजविद्या', 'गीतासार', 'प्रकृतीचे नियम : एक अचूक न्याय', 'हरेकृष्ण आव्हान', 'रसराज श्रीकृष्ण', 'प्रल्हाद महाराजांची दिव्य शिकवण', 'भागवताचा प्रकाश', 'कृष्णभावनेचा सुबोध भानू', 'अध्यात्म आणि एकविसावे शतक', 'सनातन धर्म', 'हरेकृष्ण मंत्र : शक्ती आणि किमया', 'प्रेमसागर कृष्ण', 'जाऊ देवाचिया गावा' (द्वैमासिक) '...आणि ओशाळला मृत्यू', 'मृत्युपंथावरील अनुभव' इत्यादी.

– वि.ग. जोशी

**संदर्भ :**

१. *'आत्मसाक्षात्काराचे विज्ञान'; भक्तिवेदान्त बुक ट्रस्ट, मुंबई.*

## भावे, विनोबा नरहर

***आचार्य विनोबा भावे***

**समाजसुधारक, विचारवंत, लेखक**

**११ सप्टेंबर १८९५ – १५ नोव्हेंबर १९८२**

**☛ मुख्य चरित्रनोंद-समाजकारण खंड**

आचार्य विनोबा भावे यांचे पूर्ण नाव विनायक नरहर भावे. महाराष्ट्राच्या कोकण विभागातील रायगड जिल्ह्यात गागोदे नावाचे छोटेसे खेडेगाव आहे. त्या गावातील एका चित्पावन ब्राह्मण कुटुंबात गणेश चतुर्थीच्या दिवशी त्यांचा जन्म झाला. वडिलांचे नाव नरहर शंभुराव भावे आणि आईचे नाव रुक्मिणी. विनोबांचे आजोबा शंभुराव भावे अत्यंत धर्मशील, नित्य पूजाअर्चा आणि विविध व्रते आचरणारे होते. त्यांची आई प्रेमळ, परोपकारी आणि संस्कारसंपन्न होती. विनोबांवर लहानपणी त्यांची आई आणि आजोबा यांचे उत्तम संस्कार झाले.

इंटरमिजिएटपर्यंत शिक्षण घेतल्यानंतर त्यांची महात्मा गांधी यांच्याशी भेट झाली व ते साबरमती आश्रमात राहून तेथील सेवाकार्यात रमले. १९१७मध्ये गांधीजींची अनुमती घेऊन विनोबा एका वर्षासाठी आश्रमाबाहेर पडले. सातारा



चिल्ह्यातील वाई येथे श्री नारायण शास्त्री मराठे यांच्याकडे त्यांनी उपनिषदे, ब्रह्मसूत्र शांकरभाष्य, मनुस्मृती, पातंजल योगदर्शन, याशिवाय प्राज्ञ पाठशाळेत न्याय, वैशेषिक, याज्ञवल्क्यस्मृती इत्यादी अभ्यास केला. हे करीत असतानाच गीता व ज्ञानेश्वरी यांचे वर्ग चालविले, विद्यार्थी मंडळ स्थापन करून एक वाचनालयही काढले. यानंतर महाराष्ट्राच्या चार–पाच जिल्ह्यांत ४०० मैलांची पदयात्रा केली. ठिकठिकाणी गीतेवर प्रवचने केली आणि वर्ष संपताच ते साबरमती आश्रमात परतले.

वर्धा येथे महिलाश्रमात काही काळ निवासाला असताना विनोबांनी त्यांच्या आईच्या इच्छेनुसार, 'गीतेचे सुबोध, सर्वांना समजेल असे मराठी पुस्तक' म्हणजेच 'गीताई' याचे लेखन केले. त्याचे प्रकाशन जून १९३२मध्ये झाले. पुढे १९३२ मध्येच धुळे येथील कारागृहात असताना जमनालाल बजाज यांच्या इच्छेनुसार विनोबांनी २१ फेब्रुवारी १९३२ ते ११ जून १९३२ या काळात गीतेवर प्रवचने दिली. ती सर्व प्रवचने साने गुरुजींनी लिहून काढली. त्यांचे 'गीता–प्रवचने' हे पुस्तक निघाले. या देशातील अनेक भाषांत पुस्तकाच्या भाषांतरित आवृत्त्या निघाल्या. 'गीता – प्रवचने'च्या सर्व भाषांतील आवृत्त्यांचा खप १५ लाखांच्यावर असून 'गीताई'चा खूप १० लाखाच्या जवळपास आहे. 'गीता–प्रवचने' तर २१–२२ भाषांतून प्रसिद्ध झाले आहे. १९३८ मध्ये विनोबा वर्ध्यापासून १० किलोमीटर अंतरावरील पवनार गावाजवळून वाहणाऱ्या धाम नदीच्या काठावरील जमनालालजींच्या लाल बंगल्यात हवा पालटासाठी आले आणि तेथेच त्यांनी 'परंधाम' आश्रमाची स्थापना केली.

१९४०मध्ये गांधीजींनी व्यक्तिगत सत्याग्रहातील पहिला सत्याग्रही म्हणून विनोबांची निवड केली. त्यानुसार विनोबांनी सत्याग्रह केला.

विनोबांनी आध्यात्मिक, रचनात्मक आणि शैक्षणिक या क्षेत्रांत सतत नवविचार आणि नवनवीन कर्मक्षेत्रे यांची पेरणी केली. त्यांच्या १३ वर्षांच्या पदयात्रेत त्यांनी देशात ७ ठिकाणी नवीन आश्रमांची स्थापना केली. १) समन्वय आश्रम, बोधगया २) ब्रह्मविद्या मंदिर, पवनार ३) प्रस्थान आश्रम, पठाणकोट ४) विश्वनीड आश्रम, बंगलोर ५) विर्सजन आश्रम, इंदूर ६) मैत्री आश्रम, उत्तर लखीमपूर ७) वल्लभ निकेतन, बंगलोर.

समाजातील शिक्षक आणि अन्य विचारवंत यांच्या ज्ञाननिष्ठा, विद्यार्थिनिष्ठा आणि समाजनिष्ठा वृद्धिंगत होऊन देशात धनशक्ती आणि शस्त्रशक्ती यांपेक्षा विचारशक्तीचा प्रभाव अधिक असावा, यासाठी त्यांनी आचार्यकुल ही संस्था काढली. पण तिला फारसा प्रतिसाद लाभला नाही.

विनोबांची ग्रंथसंपदा विपुल आहे. त्यातील काही प्रमुख आणि जास्तीत जास्त वाचक लाभलेले ग्रंथ असे सांगता येतील – गीताई, गीता–प्रवचने, उपनिषदांचा अभ्यास, ईशावास्यवृत्ती, मधुकर, अहिंसा की तलाश, तिसरी शक्ती, सर्वोदय विचार आणि स्वराज्य शास्त्र, नामदेवांची भजने, आत्मज्ञान आणि विज्ञान, स्थितप्रज्ञदर्शन, संतांचा प्रसाद, विष्णुसहस्रनाम, अध्यात्म तत्त्वसुधा, महाराष्ट्रीयांशी हितगुज, ज्ञानदेवांची भजने, तुकारामांची भजने, रामदासांची भजने, पांडुरंगाच्या चरणी, जपुजी, कुराणसार, सप्तशक्ती, साम्यसूत्रे, जीवनदृष्टी, सर्वोदयाचे आधार इत्यादी ग्रंथ आणि त्यांच्या प्रवचनांचे १३ खंड, 'विनोबा सन्निधी'चे खंड. असे त्यांचे विपुल विचारधन आहे.

**–दि.भा. घुमरे**

***

म

## मंगळवेढेकर, सीताराम महाराज

***योगी सीताराम महाराज मंगळवेढेकर***

**अक्कलकोट स्वामींचे शिष्य, शक्तिपात योगी**

**१८५२ – १९०३**



अक्कलकोट स्वामींच्या शिष्यांपैकी एक सीताराम महाराज मंगळवेढेकर यांचा जन्म सातारा शहरामध्ये शके १७७४ मध्ये रामनवमीच्या पावनदिनी झाला. बालपणीच त्यांचे मातृछत्र हरपले आणि या पोरकेपणात सावत्रआईचा छळ त्यांच्या नशिबी आला. त्यांच्या वडिलांचे नाव विनायक ऊर्फ बापू होते, तर सावत्रआईचे नाव होते रंगूबाई. सावत्रआईच्या जाचाबद्दल छोट्या सीतारामाने वडिलांकडे मन मोकळे केले. तेव्हा त्यास ‘आईशी पटत नसेल तर घर सोडून जा,’ अशी पितृआज्ञा झाली. अखेर घर सोडून सीताराम भटकत भटकत पंढरपुरास आला व विठ्ठलाला साकडे घालून, धरणे धरून बसला. काही दिवसांतच सीतारामाला विठ्ठलाचा दृष्टान्त झाला व अक्कलकोटला जाण्याचा संकेत मिळाला. श्रीविठ्ठलाच्या दृष्टान्तानंतर सीताराम अक्कलकोटला येऊन स्वामी समर्थांना भेटला. स्वामींनी सीतारामाला ‘श्रीराम जय राम जयजय राम’ असा नामजप करण्यास सांगितले.

छोट्या सीतारामाला त्यांनी ‘सीताराम महाराज’ संबोधल्यामुळे हेच नाव पुढे सर्वत्र प्रचलित झाले. काही काळ अक्कलकोटमध्ये स्वामी समर्थांच्या सहवासात राहून पुढे सीताराम महाराज स्वामींची आज्ञा घेऊन भ्रमण करीत संत दामाजीपंतांच्या मंगळवेढे गावी आले. मंगळवेढे येथील वास्तव्यात त्यांच्या योगशक्तीच्या कथा सर्वदूर पसरल्या, भक्तमंडळींचा ओघ वाढत गेला. त्यांना ‘सीताराम महाराज मंगळवेढेकर’ अशा नावाने लोक ओळखू लागले. पण या उपाधीपासून सुटका करून घेण्यासाठी ते एके दिवशी कोणालाही न सांगता, अचानक मंगळवेढे सोडून निघून गेले.

पंढरपूरच्या श्रीविठ्ठलाचे सेवाधारी बाळकोबा परिचारक यांच्या घरी सीताराम महाराज मंगळवेढेकर वसतीला राहिले. आपल्या योगीपणाची-सिद्धीची-फारशी वाच्यता होऊ नये म्हणून ते सदैव वेडे चाळे करीत, विदेही अवस्थेतच एका कोपऱ्यात पडून राहत. स्वत:शीच तासन्‌तास बोलत, ‘वेडा सीत्या, वेडा सीत्या’ म्हणून स्वत:लाच संबोधत. बाळकोबांच्या घरी चारीठाव स्वयंपाक होत असतानासुद्धा सीताराम महाराज फक्त पिठले-भाकरीच खात असत.

त्यांना वाचासिद्धी प्राप्त होती. ते शक्तिपाताने अनेकांची दुखणी दूर करीत असत, पण लहरीनुसार. लोक त्यांच्या दर्शनार्थ परिचारक वाड्यात गर्दी करून त्यांच्या दर्शनाची संधी घेत. विठ्ठलाच्या पहाटेच्या पूजेला वेळेवर उठवले नाही म्हणून संतापून एका

मामलेदारांनी बायकोच्या थोबाडीत मारली आणि देवदर्शन उरकून, सीताराम महाराजांचे दर्शन घेण्यास ते आले होते. सीताराम महाराजांनी मामलेदाराच्या थोबाडीत मारली आणि ते 'बायकोला मारताय व देवदेव करताय' म्हणत तेथून निघून गेले. ब्रिटिश काळातील या घटनेने सर्व जण हादरून गेले. पण मामलेदारांना महाराजांच्या त्रिकालज्ञानित्वाचे दर्शन घडले. महाराजांनी दिलेला मार त्यांनी कृपाप्रसादच मानला. ब्रिटिशकाळात पुण्याप्रमाणेच पंढरपुरातही प्लेगची साथ आली व त्या काळात गाव खाली करण्यास ब्रिटिश सैनिकांनी सर्वांना भाग पाडले. बाळकोबा परिचारक परिवार घेऊन पंढरपुराहून १०-१२ किलोमीटरवर असलेल्या खर्डी गावातील आपल्या शेतात गेले. तेव्हा सीताराम महाराजही त्यांच्या परिवारासमवेत खर्डीला गेले आणि मग अखेरपर्यंत खर्डीतच राहिले.

सीताराम महाराजांनी कार्तिक वद्य त्रयोदशी शके १८२५ (इ.स. १९०३) रोजी खर्डी येथेच योगसमाधी घेतली. दरवर्षी कार्तिक वद्य त्रयोदशीला खर्डीत पुण्यतिथी उत्सव होतो व मोठी यात्रा भरते.

- विद्याधर ताठे

**संदर्भ :**

*१. दासगणू विरचित आख्यान.*

*२. दाणाईत; 'सीतारामहाराज चरित्र'.*

म

## मणेरीकर, दत्तात्रेय गणेश

***दत्तदास मणेरीकरबुवा***

**कीर्तनकार, समाजप्रबोधन**

**८ डिसेंबर १९२३**



दत्तात्रेय गणेश मणेरीकरांचे कऱ्हाडे ब्राह्मण घराणे गोव्याहून महाराष्ट्रात सावंतवाडीच्या महाराजांचा राजाश्रय मिळाल्याने कोकणात स्थायिक झाले होते. सिंधुदुर्गात कुडाळ तालुक्यातील बांबुळी या गावात मणेरीकरबुवांचा जन्म झाला. त्यांच्या आईचे नाव सत्यभामा होते. मणेरीकर बुवांचे आजोळकडचे आणि वडिलांकडचे घराणे उच्चविद्याविभूषित होते. चेंदवण हे त्यांचे आजोळ. आजोळी संगीताबरोबर वैद्यकीय व्यवसायाची परंपरा, तर वडिलांकडून संगीत आदी क्षेत्रांतील मातब्बरी. वडील सावंतवाडी संस्थानात प्राथमिक शाळेत संगीतशिक्षक होते. तबलावादनातही ते प्रवीण होते. दत्तात्रेय मणेरीकर यांनी आपले शालेय शिक्षण बांबुळी येथे घेऊन मॅट्रिकची परीक्षा त्यांनी कुडाळ हायस्कूलमधून उत्तीर्ण केली.

मॅट्रिकनंतर त्यांनी काही काळ मुंबईत वास्तव्य केले. मुंबईत त्यांनी हिशेब तपासनिसाचे काम केले. खाजगी शिकवण्याही घेतल्या. पुढे १९४९ साली त्यांचा विवाह उषा या शिक्षिकेशी झाला आणि ते पुन्हा कोकणातच स्थायिक झाले. मणेरीकरबुवांची वाणी अस्खलित, स्वच्छ आणि विद्वत्ताप्रचुर होती. त्यामुळे त्यांनी आपल्यातील कीर्तनकार अचूक हेरला आणि कीर्तनक्षेत्रात व्यवसाय आणि लोकशिक्षणाचा सूर शोधण्याचा यशस्वी निर्णय घेतला.

कीर्तनाचा वापर केवळ चार घटका लोकरंजन करण्याचा नसून त्यातून लोकजागरण, विधायक विचार, कार्याची पेरणी, आध्यात्मिक जीवनशैली साकारण्याचे, मानवी जीवनाला पोषक वातावरण बनविण्याचे हे माध्यम आहे, हाच विचार करून त्यांनी कीर्तन हे क्षेत्र निवडले. त्यासाठी त्यांनी प्रथम तत्कालीन बुजुर्ग कीर्तनकारांची शेकडो कीर्तने पाहिली, ऐकली.

कीर्तनकारांशी चर्चा, संवाद केला. सादरीकरणाच्या अनेक छटा शिकून घेतल्या.

कीर्तनकारामधील लेखक, कवी, नट, नर्तक, नकलाकार, तत्त्ववेत्ता या साऱ्या भूमिकांचा सखोल अभ्यास केला. त्यासाठी दैनंदिन जीवनातील सामाजिक, राष्ट्रीय, आंतरराष्ट्रीय घटना, संदर्भांचा साकल्याने अभ्यास आणि विवेचन करून ते आपल्या कीर्तन सादरीकरणातून समाजापुढे मांडले आणि सकारात्मक, विधायक दृष्टिकोनाची समज श्रोत्यांपुढे उभी केली. त्यामुळेच १९५२ साली त्यांनी नेरूरच्या कलेश्वर मंदिरात सादर केलेले आपले पहिले कीर्तन, पाच दशकांमध्ये चार हजारांवरचा पल्ला गाठून आहे.

त्यांच्या लोकजागरणाची दखल महाराष्ट्र शासनानेही घेतली आणि कीर्तन या कलाप्रकाराचा उपयोग उत्तम लोकसमजवणुकीसाठी होऊ शकतो हे हेरून, त्यांच्या कीर्तनातून साक्षरता उपक्रम, कृषी, विज्ञान, कुटुंबनियोजन, भ्रष्टाचारमुक्ती, व्यसनमुक्ती आदी विषयांचा ऊहापोह आणि लोकशिक्षण साधून कीर्तन या लोककलेला समाजात रुजविले.

दत्तदास मणेरीकरबुवांना, औंधचे प्रख्यात कीर्तनकार ह.भ.प. चिंतोपंत गोखले, तसेच ह.भ.प. रामभाऊ कऱ्हाडकरबुवा, ह.भ.प. डॉ. मेहेंदळे, श्री. घागबुवा, ह.भ.प. आफळेबुवा, ह.भ.प. धुंडामहाराज देगलूरकरबुवा, ह.भ.प. ढोलेबुवा अशा दिग्गज कीर्तनकारांचे मार्गदर्शन लाभले.

आपल्या कीर्तनाविष्काराने महाराष्ट्र, गोवा, मध्यप्रदेश अशा ठिकाणची राउळे त्यांनी श्रोत्यांना आणि प्रेक्षकांना भक्ती, वृत्ती, कर्मयोगाच्या नवोन्मेषांमध्ये न्हाऊन दुमदुमविली आहेत.

ह.भ.प. धुंडामहाराज देगलूरकरबुवांच्या हस्ते, १९७६ साली त्यांचा महासन्मान होऊन त्यांना कीर्तनक्षेत्रातील अत्यंत प्रतिष्ठेचा 'कीर्तनभूषण' पुरस्कार गोवा येथील कवळे या गावी, अखिल भारतीय कीर्तनकार संमेलनात देऊन त्यांचा सन्मान करण्यात आला. त्याचप्रमाणे, १९९१ साली कोल्हापूर येथील कीर्तनकार संमेलनात, आणि १९९२ साली सांगली येथेही कीर्तनकार महासंमेलनात मानपत्र देऊन त्यांना सन्मानित करण्यात आले. आपल्या कीर्तनकलेतून केवळ लोकरंजन न होता लोकप्रबोधन व्हावे, हीच त्यांची अपेक्षा आहे.

भारतीय कीर्तनकला या प्राचीन कलाप्रकाराला आपल्या आचार, विचार, अभिव्यक्तीतून उचित न्याय देणारे आणि हा कलाप्रकार समर्थपणे पुढच्या पिढीपर्यंत पोहोचवणारे मणेरीकर बुवा यांचा रामायण, महाभारत, वेद, उपनिषदे, पुराणे यांचा व्यासंग वाखाणण्याजोगा आहे. चार चिरंजीव, तीन कन्या, सुना, नातवंडे, जावई यांचा देखणा प्रपंच करीत असतानाच त्यांनी कीर्तनकाराची तुळशीमाळ आपल्या पुढच्या दोन पिढ्यांपर्यंत पोहोचवली आहे. त्यांची स्नुषा आणि नातही कीर्तनप्रकाराचा अभ्यास करून आज उत्तम कीर्तनकार म्हणून प्रसिद्ध आहेत.

- संदीप राऊत

## मसुरकर महाराज

***मसुरकर, विनायक***

**शुद्धीकरण मोहिमेचे प्रणेते, बलोपासक**

**१८८८ - १९५५**

कृतिशील, अत्यंत जागरूक व प्रखर हिंदुधर्माभिमानी कार्यकर्ते असणाऱ्या विनायक महाराजांच्या मसुराश्रमाचे शुद्धीकरण कार्य ऐतिहासिक स्वरूपाचे आहे. विनायक महाराज यांचा जन्म सातारा जिल्ह्यातील मसुर या छोट्याशा गावात झाला. बालपणापासून त्यांच्यावर वैदिक धर्मसंस्कार झाले. त्यांनी देव, देश आणि धर्मासाठीच आपले जीवन सत्कारणी लावण्याचा संकल्प घेतला. या कार्यात कोणताही भावबंध, नाते यांचे पाश आडवे येऊ नयेत अशा विचारांनी त्यांनी लग्नमंडपातूनच पलायन केले. त्यांनी कन्याकुमारी ते केदारनाथ-काश्मीर असा उभा देश अनेक वर्षे भ्रमंती करून पाहिला. परधर्माच्या प्रचाराला बळी पडणारा गरीब, अज्ञानी हिंदू समाज त्यांनी जवळून

म



अवलोकन केला. हिंदू समाजातील जातिभेद व अन्य दोष दूर करण्यासाठी त्यांनी शुद्धीकरणाची व्यापक मोहीम हाती घेण्याचा निर्धार केला. त्यांनी १९२० साली हिंदू धर्म रक्षणार्थ 'मसुराश्रम' नावाची संस्था स्थापन केली. शेकडो तरुण कार्यकर्त्यांना या आश्रमकार्याची दीक्षा देऊन मसूरकर महाराज यांनी तरुण कार्यकर्त्यांचे मोहोळ निर्माण केले.

हिंदू धर्म व संस्कृतीसाठी आजीवन कार्य करणाऱ्या कार्यकर्त्यांना त्यांनी विशेष प्रकारचे शिक्षण-प्रशिक्षण दिले. धर्मांतर रोखण्यासाठी व परधर्मात गेलेल्यांना शुद्धीकरण करून स्वधर्मात परत घेण्यासाठी ब्रिटिश काळात विनायक महाराजांनी केलेले कार्य अपूर्व आहे. त्यांनी १९२८-२९ मध्ये पोर्तुगिजांच्या ताब्यातील गोव्यामध्ये धर्मांतरित हजारो हिंदू बांधवांना शुद्धीकरण करून स्वधर्मात परत आणले. याबद्दल त्यांना व त्यांच्या कार्यकर्त्यांना पोर्तुगीज सरकारच्या अनेक प्रकारच्या जाचाला सामोरे जावे लागले. हालअपेष्टा सहन कराव्या लागल्या. पण, हिंदू धर्मासाठीच आपला जन्म समर्पित आहे, या भावनेने त्यांनी हा सरकारी छळ निर्भयपणे सोसला. या घटनेमुळे देशभर हिंदू समाजात नवी चेतना निर्माण झाली. अनेक ठिकाणी, अनेक राज्यांत तरुणांनी पुढाकार घेऊन शुद्धीकरणाची मोहीम चालवली. शुद्धीकरण मोहिमेचा प्रेरणादाता म्हणून मसुरकर महाराज सर्वत्र प्रसिद्ध झाले. विनायक महाराजांचा भगवद्गीतेचा विशेष अभ्यास होता. त्यांची गीतेवरील प्रवचने देश व हिंदू संस्कृतीच्या गौरवाने भारलेली ओजस्वी व्याख्यानेच असत.

हिंदू समाजातील गिरिजन, वनवासी समाजाला ख्रिश्चन धर्मप्रसारक पैसा व प्रलोभने दाखवून, त्यांच्या अज्ञानाचा फायदा घेत धर्मांतरण करतात हे लक्षात घेऊन वसई, दमण-दीव, नगरहवेली, सातपुडा, डांग या परिसरातील वनवासी समाजांकडे मसुराश्रमाच्या कार्यकर्त्यांनी विशेष दक्षतेने लक्ष दिले. कार्यकर्ते घडविण्यासाठी त्यांनी जागोजागी व्यायामशाळा सुरू केल्या. 'श्रीकृष्णाचा संदेश', 'श्रीरामचंद्रांचा संदेश', 'छत्रपती शिवरायांचा बोध' अशा कार्यशाळा घेऊन एकाच वेळी हिंदू तरुणांची तने व मने सुदृढ करण्याचा त्यांनी जोरदार प्रयत्न केला. यासाठी 'दासबोध' व अन्य प्रेरक साहित्याच्या लाखो प्रती छापून त्यांनी गावागावांत, वाड्या, वस्त्यांवर मोफत वाटल्या. श्रीराम, श्रीकृष्ण, हनुमान, शिवाजी महाराज, समर्थ रामदास अशा प्रेरणापुरुषांची, देवतांची लाखो चित्रे छापून घेऊन त्यांनी शाळाशाळांतून विद्यार्थ्यांना वाटली.

समाज प्रबोधनासाठी नियतकालिकाची गरज लक्षात घेऊन विनायक महाराजांनी 'दासबोध' नावाचे मासिक आणि 'विश्वबोध' नावाचे साप्ताहिक सुरू केले.

हिंदू धर्मातील वर्ण व जातिभेद मिटवून समाज एकसंघ, एकजूट करणे ही काळाची गरज आहे हे ओळखून त्यांनी ब्राह्मणेतर समाजातील मुलांच्या समंत्र सामुदायिक मुंजी लावल्या. एवढेच नव्हे, तर परधर्मियांनी बाटवलेल्या हिंदू अबला स्त्रियांना त्यांनी स्वधर्मात परत आणले. त्यासाठी त्यांना प्रतिगामी विचारांच्या स्वकीय लोकांशीच जोरदार वैचारिक संघर्ष करावा लागला. मसुराश्रमाच्या हिंदूविषयक कार्यामुळे एकाच वेळी आश्रमाला ब्रिटिशांचा, पोर्तुगिजांचा, ख्रिश्चनांचा व मुसलमानांचा सतत विरोध सोसावा लागला. अनेक संकटे येऊनही अखेरपर्यंत विनायक महाराजांनी मसुराश्रमाचे कार्य जोराने सुरू ठेवले.

१९५५ साली, वयाच्या सदुसष्टाव्या वर्षी त्यांनी देह ठेवला. दरवर्षी मुंबईत गोरेगाव येथे रामनवमी ते हनुमान जयंती असा सात दिवस त्यांचा स्मरण सोहळा साजरा होतो.

– विद्याधर ताठे

**माणिकप्रभू**
***नाईक, माणिक मनोहर***
**सकलमत संप्रदायाचे संस्थापक-प्रचारक**
**२२ डिसेंबर १८१७ – १८६५**



संत माणिकप्रभू यांना भाविक भगवान दत्तात्रेयाचा चौथा अवतार मानतात. सर्व धर्मांतील उत्तमोत्तम तत्त्वांचा समन्वय करीत माणिकप्रभू यांनी 'सकलमत संप्रदाय' स्थापन केला. या संप्रदायाचे उपास्य दैवत म्हणजे प्रत्येक प्राणिमात्राच्या अंत:करणातील चैतन्य. मधुमती नामक शक्तिदेवतेसह भगवान दत्तप्रभूंची मूर्ती या संप्रदायात पूजनीय मानली जाते; पण आग्रह कोणताच नाही. कोणत्याही विशिष्ट देव-देवतेचा मंत्र संप्रदायात आग्रहाने दिला जात नाही. 'अद्वैती विचारधारा' हेच या सकलमत संप्रदायाचे अधिष्ठान मानले जाते.

माणिकप्रभू यांचा जन्म सध्याच्या कर्नाटक राज्यातील ऐतिहासिक बसवकल्याण जवळील 'लाडवंती' येथे मंगळवारी झाला. त्यांच्या वडिलांचे नाव मनोहर नाईक-हरकुडे होते, तर आईचे नाव बयाम्मा होते. पूर्वी हे नाईक घराणे 'हरकुडे' येथे खूप काळ वास्तव्य करून होते, त्यामुळे त्यांच्या नाईक आडनावापुढे हरकुडे हे उपनाव जोडले गेले. देशस्थ ऋग्वेदी वत्स गोत्री असलेले हरकुडे घराणे हे पिढ्यान्‌पिढ्या एक धर्मपरायण घराणे म्हणूनच ओळखले जात होते. केशव नाईक हे या घराण्याचे ज्ञात मूळपुरुष. ते बिदर जवळच्या 'झरणी नृसिंह'चे परमभक्त होते. तसेच, या घराण्यात प्रभू रामचंद्र व हनुमंताची उपासनाही परंपरेने चालत आलेली होती. हाच वारसा माणिकप्रभूंना लाभलेला होता. माणिक हे मनोहर नाईक यांचे द्वितीय सुपुत्र. वडील मनोहरपंत यांचे अकाली निधन झाले व आई बयाम्मांनी कल्याणमध्ये राहून तिन्ही मुलांचे मोठ्या कष्टाने संगोपन केले. अशा प्रकारे छोट्या माणिकप्रभूंना वडिलांचे छत्र फार काळ लाभले नाही. आई व मामा हेच त्यांचे पालक बनले.

माणिकप्रभूंच्या नशिबी शालेय शिक्षण नव्हते. मामा भालचंद्र दीक्षित यांनी त्याला आपल्या हळ्ळीखेडी गावी शिक्षणास नेले. पण छोटा माणिक तेथे रमला नाही. तो कल्याणला परत आला; पण मामाच्या भीतीने घरी गेला नाही. लौकिक शिक्षण काही झाले नाही तरी त्याच्या सर्व लीला त्याच्या ठायी असलेल्या अवतारीशक्ती दर्शविणाऱ्या होत्या.

लोकांना चमत्कार वाटाव्यात अशा अनेक गोष्टी माणिक सहजी करीत असे. त्यामुळे प्रथमपासूनच सर्व लोक त्याला मान देत होते. कानडी, मराठी या दोन मातृभाषांशिवाय संस्कृत, उर्दू, फारशी या भाषांवर माणिकचे विलक्षण प्रभुत्व होते. त्यांना ईश्वरदत्त दैवी शक्ती लाभली होती, तसेच कवित्वही लाभले होते. ते मराठीत, कानडीमध्ये उत्तमोत्तम पदे रचत असत आणि उत्तम प्रकारे गात असत. त्यांना उपजत गायनकलाही प्राप्त होती. श्रीमंत-गरीब, हिंदू-मुसलमान असा कोणताही भेदभाव माणिकप्रभूंना मान्य नव्हता. त्यामुळे सर्व धर्म-पंथांचे लोक त्यांच्या दैवी शक्तीने त्यांच्याकडे आकर्षित झालेले होते.

म

१९४५ साली ते कर्नाटकातील 'हुमणाबाद' येथे येऊन स्थायिक झाले. त्यालाच पुढे माणिकप्रभूंमुळे 'माणिकनगर' असे नाव देण्यात आले. सिद्ध राजयोगी, प्रासादिक कवी म्हणून त्यांच्याकडे हजारो लोक श्रद्धेने येऊन त्यांचे अनुयायी झाले. मराठीप्रमाणे हिंदीतही त्यांची दत्त व श्रीकृष्णपर अनेक पदे प्रसिद्ध आहेत. त्यांना संगीताची उत्तम जाण व आवड होती. त्यामुळे त्यांच्या दरबारात गायनाच्या मैफली सतत होत असत. लिंगायत जंगमाचा संक्रांत उत्सव, मुसलमानांचा मोहरम आणि हिंदूंची दत्तजयंती हे तीन उत्सव त्यांच्या दरबारात थाटामाटाने व धार्मिक पद्धतीने साजरे होत. सकलमत संप्रदाय हा त्यांचा विचार नव्हे, तर प्रत्यक्ष व्यवहार होता. त्यामुळे धर्मपंथांचा भेदाभेद न करता सर्व धर्मांचे भाविक माणिकप्रभूंच्या दरबारात मुक्तपणे येत होते.

*श्रुतिधर्म रक्षुनी सकलमताने वंदा ।*
*सर्वांतरी आत्मा नको कुणाची निंदा ॥*

ही त्यांच्या सकलमत संप्रदायाची मुख्य शिकवण होती. सर्व धर्मांचे मूलतत्त्व एकच आहे. देशकालपरिस्थितिनुरूप जो भेद दिसतो, तो जाणून दूर करा व ईश्वर एक आहे हे तत्त्व अनुभवा, आचरणात आणा. माणिकप्रभूंची कीर्ती ऐकून हैद्राबादचे निजाम 'नासिरुद्दौला' याने साठ हजाराची जहागिरीची सनद देऊन खास माणूस पाठविला तेव्हा, "आम्ही फकीर, आम्हांस या जहागिरीचा उपयोग काय?" असे म्हणत माणिकप्रभूंनी ती सनद परत पाठविली. तरीपण माणिकप्रभूंचे वैभव राजयोग्याचे वैभव होते. स्वत: माणिकप्रभू एखाद्या महाराजासारखे ऐश्वर्यात राहत होते. उंची वस्त्रे, दागिने घालत, पण त्यांचे मन पूर्ण विरक्त होते.

आपली निर्वाणतिथी त्यांनी सहा महिने आधीच सर्वांना सांगून ठेवली होती. त्यानुसार त्यांनी विधिपूर्वक संन्यास घेतला आणि मार्गशीर्ष शुद्ध एकादशीला (इ.स.१८६५) त्यांनी समाधी घेतली. पण त्यांच्या आदेशानुसार एकादशी ते पौर्णिमा ही वार्ता कोणा भक्तास कळू न देता पौर्णिमेला दत्तजयंती उत्सव पार पडल्यावर माणिकप्रभूंच्या समाधीचे वृत्त सर्वांना सांगण्यात आले. केवळ ४८ वर्षांच्या आयुष्यात माणिकप्रभूंनी महान कार्य केले. त्यांचे संस्थान, त्यांचे सकलमत संप्रदायाचे कार्य पुढे चालवीत आहे.

– विद्याधर ताठे

## माहूरकर, विष्णुदास
***धांदरफळे, कृष्णा रावजी***
**कवी संप्रदाय**
**१८४४ – १९१६**



मराठवाड्यातील माहुरगड येथील रेणुकामातेचे भक्त व थोर दत्त उपासक, प्रसिद्ध कविश्रेष्ठ संत विष्णुदास माहूरकर यांचा जन्म सातारा येथे झाला. त्यांच्या वडिलांचे नाव रावजी होते. त्यांचे मूळ गाव अहमदनगर जिल्ह्यातील 'धांदरफळ' म्हणून त्यांचे आडनाव धांदरफळे झाले. मूळपुरुष चिंतामणीबुवा ऊर्फ श्रीधर हे धर्मपरायण होते. पुढे हे घराणे भ्रमण करीत सातारा येथे स्थायिक झाले.

विष्णुदास यांचे परिवारातील नाव कृष्णा होते; परंतु विष्णुदास हेच नाव सर्वत्र प्रसिद्ध झाले. त्यांना विष्णू, अनंत, गणपती असे तीन भाऊ व दोन बहिणी होत्या. आपले ज्येष्ठ बंधू विष्णू याविषयीच्या आदरापोटी कृष्णाने कवी म्हणून 'विष्णुदास' असे नाव धारण केले

असावे, असे काही अभ्यासकांचे मत आहे. सातारा येथेच विष्णुदास यांचे प्राथमिक शिक्षण झाले. लहानपणापासूनच त्यांस भटकंतीची आणि देवाधर्माची विशेष आवड होती. साताऱ्याजवळील माहुली, जरंडेश्वर, खिंडीतील गणपती, औंधची देवी ही ठिकाणे विष्णुदासांची आवडीची ठिकाणे होती. या स्थळांना वारंवार भेटी देण्याचा त्यांस छंदच जडला होता. लहानपणीच ते प्रवचन, कीर्तन शिकले होते. तसेच, उत्स्फूर्त कविता, विशेषत: भक्तिगीते रचण्याचा त्यांना नाद होता.

सातारा-औंध रस्त्यावरील रहिमतपूर येथील हरिभक्तिपरायण सातपुते यांचा धांदरफळे कुटुंबाशी निकटचा स्नेहसंबंध होता. या सातपुते यांची कन्या रुक्मिणी हिच्याशी विष्णुदास यांचा १८५६ साली विवाह झाला. अध्यात्मरंगी विष्णुदासांना परमार्थात प्रपंचाची अडचण नको होती; पण अखेर आई-वडिलांच्या आग्रहापुढे त्यांना नमते घेऊन लग्न करणे भाग पडले. लग्न झाले तरी विष्णुदास संसारात रमले नाहीत.

साताऱ्याजवळील त्रिपुटी येथील साधक-अधिकारी पांडुरंगबुवा दगडे यांच्याशी पारमार्थिक चर्चा करण्यात, साधना करण्यात विष्णुदास यांचा वेळ जात असे. दगडेबुवा यांच्या समवेत विष्णुदासांनी पंढरपूर, तुळजापूर, देहू, आळंदी अशा तीर्थक्षेत्रांच्या यात्राही केल्या होत्या. परमेश्वराची ओढ, ईश्वराचा शोध त्यांना घरात स्वस्थ बसू देत नव्हता. पण प्रपंच-पत्नी सोडून कसे जायचे?, हा प्रश्न त्यांना पडला होता. पत्नीची परवानगी घेऊन घर सोडून जावे या प्रामाणिक हेतूने त्यांनी पत्नीला आपला मनोदय सांगितला आणि एके दिवशी ते घर सोडून निघून गेले.

गृहत्याग करून, ठिकठिकाणी हिंडून ते पंढरपूरला आले व तेथून तुळजापूर, विजापूर करीत हंपीच्या विरूपाक्षाच्या दर्शनाला गेले. असेच भटकत भटकत ते एके दिवशी नांदेड जिल्ह्यातील माहूर येथे आले. रेणुकामातेचे दर्शन करताच त्यांना एक प्रकारची मन:शांती, समाधान लाभले आणि ईश्वरभेटीची त्यांची तळमळ संपुष्टात आली. रेणुकामातेच्या भक्तीने त्यांच्या काव्याला नवा बहर आला व नव्यानव्या रचना होत राहिल्या. माहूर येथील श्री. रेणुराव देशमुखांकडे त्यांना आश्रय मिळाला. भल्या पहाटे उठून मातृतीर्थावर स्नान करून, संध्या आटोपून विष्णुदास गडावर रेणुकामातेच्या दर्शनास जात. तेथून समोरच्या डोंगरावरील दत्तदर्शनास व अनसूयादर्शनास जात व परत येताना गडावरील कालीमातेचे दर्शन करून येत. हा त्यांचा नित्यनेम होता. ऊन, वारा, पाऊस यांची तमा न बाळगता एक कठोर व्रत म्हणूनच ते हा नित्यनेम पार पाडत असत. गावात पाच घरे भिक्षा मागून ते आपली भूक भागवत व उरलेला सर्व वेळ रेणुकामातेशी संवादात, अनुसंधानात घालवत. विष्णुदास यांना साक्षात रेणुकेचे व दत्तप्रभूंचे दर्शन घडलेले होते.

संत विष्णुदास यांचे चरित्र व काव्य तीन खंडांमध्ये प्रसिद्ध झालेले आहे. या खंडांमध्ये त्यांनी रचलेल्या भक्तिरचना, आरत्या, कविता, पदे, अष्टके आणि अभंग अशी वैविध्यपूर्ण व विपुल काव्यरचना आहे. एवढेच नव्हे, तर त्यांच्या काही लावण्या, प्रेमगीते, विरहगीतेसुद्धा प्रसिद्ध आहेत. रेणुका व दत्तभक्तांमध्ये यांच्या भक्तिरचना फार लोकप्रिय आहेत.

साताराकडचे एक देवीभक्त सदोबा काळे माहूरला दर्शनास आले असता त्यांना विष्णुदास दृष्टीस पडले. ही वार्ता साताऱ्याला जाऊन त्यांनी विष्णुदास यांच्या पत्नीला सांगितली. विष्णुदासांची सोळा वर्षांनी पत्नीशी माहूर येथे भेट झाली. त्यांचा नव्याने संसार सुरू झाला; पण काही वर्षांतच त्यांच्या पत्नीचे निधन झाले. ५०-५५ वर्षे माहूर येथेच वास्तव्य केल्यामुळे विष्णुदासांना ‘माहूरकर’ म्हणूनच ओळखले जाते. थोर दत्तभक्त टेंब्येस्वामींसह अनेक साधुसंत विष्णुदासांना भेटण्यास आले होते.

सत्तरी ओलांडल्यानंतर विष्णुदासांची प्रकृती वृद्धापकाळाने क्षीण होत गेली. मठाची जबाबदारी शिष्य खंडेराव यांच्यावर सोपवून ते मुक्त झाले. पौष शुद्ध सप्तमीला, (इ.स. १९१६) ते रात्री सिद्धासन घालून

म

ओंकार जप करीत बसले व पहाटे समाधिस्थ झाले. तेथे त्यांचे समाधी मंदिर बांधण्यात आले आहे.

– विद्याधर ताठे

**संदर्भ :**


१. *भट, नम्रता, संपादक; 'सकल संत चरित्रगाथा'.*

२. *आधुनिक संतचरित्रे, मुमुक्षातील लेख.*

३. *'विष्णुदासाची कविता'; तीन खंड.*

४. *खरशीकर, जोशी; 'विष्णुदास चरित्र'.*


## मुक्तानंद स्वामी
**साक्षात्कारी संत, शक्तिपात योगी**
**१६ मे १९०८ – २ ऑक्टोबर १९८२**



'गुरुदेव सिद्धपीठ' या गणेशपुरीतील स्वामी नित्यानंदबाबा यांचे उत्तराधिकारी म्हणून पुढे प्रसिद्धी पावलेल्या श्री मुक्तानंदस्वामींचा जन्म कर्नाटक राज्यातील नेत्रावती नदीकाठच्या एका निसर्गरम्य खेड्यात, कुसुमेश्वरी मातेच्या पोटी झाला.

कर्नाटक राज्यातील धर्मस्थळ येथील तीर्थक्षेत्रातील श्रीमंजुनाथाला तिने पुत्रासाठी साकडे घातले होते. बुद्धजयंतीच्या दिवशी मुक्तानंद यांचा जन्म झाला. त्यांचे मूळ नाव कृष्ण. कृष्ण शाळेत खूप हुशार होते; परंतु त्यांचे मन नेहमी वेगळ्याच विश्वात विहार करीत असे. घरातील गडगंज श्रीमंतीचेही त्यांना अप्रूप नव्हते. एकदा त्यांच्या आईने त्यांना गावाजवळील एका पर्वतावर एका मुस्लीम मौलवीच्या उत्सवासाठी नेले. तेथे कृष्णाला अचानक नित्यानंदबाबांनी दर्शन दिले, असे म्हणतात. नित्यानंदबाबांना लहान मुले प्रिय होती. त्यांनी कृष्णाला सोबत घेतले. या विलक्षण अनुभूतीने कृष्ण भारावून गेला. त्याच्या अंतर्मनात अद्‌भुत चैतन्याची लहर उमटली. तेव्हापासून त्याचे लक्ष शाळा, घर, खेळ, खाण्यापिण्याची मौज या ऐहिक गोष्टींपासून उडू लागले.

आपण कोणीतरी साधू, योगी बनावे हा विचार त्याच्या मनात बळावला. एकट्यानेच जंगलात, देवळात राहणे, जे मिळेल ते खाणे या गोष्टींची तयारी ठेवून कृष्णा एक दिवस घराबाहेर पडला. वय होते आठ-नऊ वर्षांचे. त्याने प्रथम जंगलात वणवण केली. तेथून बाहेर पडल्यावर ट्रकवाल्याने त्याला म्हैसूरला आणून सोडले.

म्हैसूरला कित्येक दिवसांच्या भटकंतीनंतर त्याला कुणीतरी तेथील सिद्धारूढ स्वामींच्या मठात आणून सोडले. इथेच कृष्णाच्या आयुष्याला प्रयोजन सापडले. सिद्धारूढ स्वामींकडे प्रथम बुद्धिवान कृष्णाला संस्कृत शिकवले गेले. त्यानंतर सात वर्षे कृष्णाने वेद, योग, उपनिषद यांचा अभ्यास केला. वेदाभ्यास, योग आणि संपूर्ण नि:संग, त्यागी झाल्याची खात्री पटल्यानंतर सिद्धारूढ स्वामींनी कृष्णाला संन्याशाची दीक्षा दिली आणि नामाभिधानही केले, 'मुक्तानंद'. त्या वेळी कृष्णाचे वय अठरा-एकोणीस असेल. संन्यासदीक्षा प्राप्त केल्यानंतर मुक्तानंदांनी सिद्धारूढ स्वामींचा मठ स्वामींच्या परवानगीने सोडला. तेथून त्यांनी कर्नाटकातच श्री मुप्पीन आर्यस्वामींच्या मठात चार वर्षे राहून आर्यस्वामींच्या मार्गदर्शनाखाली अभ्यास केला. तो पूर्ण झाल्यावर पुन्हा तो आश्रम सोडून त्यांनी पायी भटकणे सुरू केले. या भ्रमणात त्यांनी कर्नाटकातील अनेक जंगले, डोंगर तुडवले. तेथील अपरिचित वनस्पतींचा अभ्यास केला. औषधी गुण हेरले. हा अनुभव घेऊन ते मराठवाड्यात म्हणजे महाराष्ट्रात प्रवेश करते झाले.

मुक्तानंद मजल-दरमजल करीत चाळीसगाव येथे पोहोचले. तेथे एक पडका वाडा होता. लोक त्या

म



**बाबा नित्यानंद यांच्यासोबत मुक्तानंदजी**

वाड्यात जायला भीत असत. तेथे मुक्तानंदांनी वास्तव्य करून आश्रम उभा केला. त्या आश्रमात एकदा त्याच परिसरातील एक सिद्धयोगी लिंगानंद स्वामी मुक्तानंदांच्या भेटीला आले. त्या दिवशी लिंगानंदांनी परिसरातील कुष्ठरोग्यांसाठी भंडाऱ्याचे आयोजन केले. त्या वेळी त्यांनी मुक्तानंदांना एका कुष्ठरोग्यास अन्न भरविण्यास सांगितले. मुक्तानंदांनी मुश्किलीने त्या जखमा, दुर्गंधीने लिप्त झालेल्या रोग्याला भरवले. लिंगानंदांनी मग भरवताना खाली पडलेले अन्न मुक्तानंदांना खायला सांगितले. मुक्तानंदांना ते शक्य झाले नाही, तेव्हा लिंगानंदांनी ते उष्टे अन्न खाऊन टाकले आणि ते मुक्तानंदांना म्हणाले, ''तो कुष्ठरोगी नव्हता. साक्षात विश्वकार्याने तुला दर्शन दिले आहे.'' हे ऐकून मुक्तानंद लिंगानंदांच्या चरणी लीन झाले.

चाळीसगावातील आश्रमातून काही काळाने बाहेर पडून मुक्तानंद भटकत भटकत ठाणे जिल्ह्यातील भिवंडी तालुक्यात आले. तेथील वज्रेश्वरी येथील वज्रगडावरच्या वज्रेश्वरी मातेचे दर्शन घेऊन ते जवळच्याच गणेशपुरी येथे स्वामी नित्यानंदांच्या आश्रमात गेले. ते वर्ष होते १९४७. तेथे स्वामी नित्यानंदबाबा त्यांची वाटच पाहत होते. मुक्तानंदांनाही लहानपणीची घटना आठवली. नित्यानंदांनी मुक्तानंदांना शक्तिपाताची दीक्षा दिली. त्यानंतर पुन्हा तपभर मुक्तानंदांनी अभ्यास केला. जवळच्या तुंगारेश्वर जंगलात जाऊन तेथील वनस्पतींचा अभ्यास केला. १९६१ साली स्वामी नित्यानंदबाबांनी समाधी घेतल्यानंतर गुरुदेव आश्रमाची जबाबदारी स्वामी मुक्तानंदांवर आली. अर्थात, ती योजना नित्यानंदबाबांचीच होती. त्यानुसार मुक्तानंद यांनी गणेशपुरी हेच आपले कायम वास्तव्यस्थान निश्चित केले आणि तेथूनच सिंगापूर, ऑस्ट्रेलिया, अमेरिका, जर्मनी, इटली, इंग्लंड, फ्रान्स येथे विदेशवाऱ्या केल्या, त्या गुरुकृपा आणि शक्तिपात दीक्षा परदेशी साधकांना देण्यासाठी. ऐंशीच्या दशकात मुक्तानंद यांनी श्री गुरुदेव आश्रमाचा विस्तार भोवतालची जमीन खरेदी करून केला. गणेशपुरीच्या आसपासच्या आदिवासीबहुल खेड्यातील लोकांना घरे, मुलांना दूध, शाळा, वैद्यकीय सेवा, अन्नछत्रे, कपडे वितरण आदी सेवा मुक्तानंद यांनी सुरू केल्या.

आसपासच्या मंदिरांचा जीर्णोद्धार केला. तेथील अकलोली, वज्रेश्वरी, गणेशपुरी येथील औषधी गरम पाण्याच्या कुंडांची पुनर्बांधणी करून लोकांना सुविधा पुरविल्या, रस्ते बांधले. मुक्तानंदस्वामींनी अध्यात्माद्वारे 'धर्म' समजावून दिला. त्यांच्या आश्रमात धर्म, जात, पंथ हे भेद नव्हते. मुक्तानंदांनी पुढे श्रीगुरुदेव आश्रमात श्रीनित्यानंदबाबांची पंचधातूची मूर्ती व पादुका प्रतिष्ठापित केल्या आणि ध्यानसभागृह बांधले. या आश्रमाचे 'गुरुदेव सिद्धपीठ' असे नामकरण झाले. आज जगभरातील अनेक शहरांत नित्यानंदांची मंदिरे व सिद्धपीठे आहेत. गुरुमाई चिद्‌विलासानंदजींच्या हाती सिद्धपीठाचा कारभार सोपवून, मुक्तानंदस्वामी अनंतात विलीन झाले.

— संदीप राऊत

म

## मुंगसाजी देव
***पाटील, तुळजाजी विक्रम***
**साक्षात्कारी संत**
**५ सप्टेंबर १८६३ – २६ फेब्रुवारी १९५८**



मुंगसाजी देव म्हणजेच तुळजाजी विक्रम पाटील यांचा जन्म यवतमाळ जिल्ह्यातील दारव्हा तालुक्यातल्या धामणगावी झाला. त्यांच्या आईचे नाव ममाईमाता होते. ते आईला अनेक शंका विचारून तिच्याकडून समाधान करून घेत. ते अतिशय मातृभक्त होते. ते गाईगुरे चारायला नेत. आईच्या शिकवणुकीने ते निर्भय, नि:शंक बनले. मुंगसाजींच्या तरुणपणी त्यांचे वडील निवर्तले. त्यांची आई कष्टाची कामे करी.

मुंगसाजींचा विवाह वरोली गावच्या झामराबाई यांच्याशी झाला. गरिबीमुळे गावात हेटाळणी, निंदा होऊ लागली. मुंगसाजी विरक्त बनू लागले, भटकू लागले. अंगावर कपड्यांचे भान नाही, दिगंबरावस्थेत फिरत नऊ महिन्यांनी गावी परतले. ते रात्री-अपरात्री लोकांकडे जात व म्हणत, ''मानवी आयुष्य झोपेत घालवू नका.'' त्यांचे म्हणणे व त्याचा अर्थ लोकांना न कळल्याने ते त्रागा करीत. आईने त्यांना समजावले. मुंगसाजी आपल्या मालकीच्या गढीत बारा वर्षे एकाच अवस्थेत बसले. त्यामुळे मांडी व पोटरी एकत्र जोडली गेली. त्यांना साक्षात्कार झाला.

त्यांच्या साधुवृत्तीमुळे साप व मुंगूस वैरभाव विसरून त्यांच्या मांडीवर खेळत. हे दृश्य पाहून लोक चकित झाले व त्यामुळे त्यांचे नाव 'मुंगसाजी देव' पडले. अनेक साधक, संत त्यांच्या दर्शनाला येऊ लागले. त्यांचा आप्त शिवाजी याने त्यांना जाळून व विषप्रयोग करून मारण्याचा प्रयत्न केला मात्र; मुंगसाजी यांना काहीच झाले नाही. त्यांनी मारेकऱ्याचा द्वेष केला नाही.

सांभा महाराजांना पंढरपूर दर्शनाची ओढ लागली. तेव्हा मुंगसाजींनी त्यांना आपले 'विठोबा' रूप अनुभवास आणून दिले. उल्लेखनीय म्हणजे संत तुकडोजी महाराजांनी सालवडी येथे विश्वशांती यज्ञ केला, त्यात अग्रपूजेचा मान मुंगसाजी देव यांनाच दिला. मुंगसाजी यांच्या परंपरेत खालील संतांचे नाव घेतले जाते : मूर्तिजापूरचे परमहंस श्री पुंडलिकबाबा, परमहंस श्री मारुतीबाबा, श्री घोगलेबाबा, श्री परशुरामबाबा इत्यादी.

– वि.ग. जोशी

**संदर्भ :**

१. *भट, नम्रता, संपादक; 'सकल संत चरित्रगाथा'.*

## मुळे, महाराज स्वयंज्योती
**समर्थ संप्रदाय, भक्तिमंदिर संस्थापक**
**९ ऑक्टोबर १८९३ – १८ जुलै १९७३**

समर्थ रामदासांचे विचार, कार्य पुढे चालविणारे संतसज्जन स्वयंज्योती मुळे यांचा जन्म सातारा जिल्ह्यात झाला. घराण्याचा पिढीजात वस्त्रनिर्मितीचा व्यवसाय त्यांच्या वडिलांपर्यंत चांगला चालवला गेला होता. श्री स्वयंज्योतींनीही आपल्या कौटुंबिक व्यवसायात काही वर्षे छान रस दाखविला. व्यवसाय वाढवण्यास वडिलांना मदत केली. परंतु, पौगंडावस्थेत त्यांना ईश्वरभक्तीची, त्यातून समर्थ विचारांची ओढ लागू लागली होती. त्यांचे लग्न झाले होते, तरी त्यांनी दोनच वर्षांत घराला रामराम ठोकला व ते तपाचरणासाठी निघून गेले. गुलाब महाराज, सीताराम महाराज यांच्या सान्निध्यात त्यांना मिळालेल्या मार्गदर्शनातून त्यांची घर सोडण्याची मानसिक तयारी झाली. धर्मभूषण चौंढे महाराज यांनी



दीक्षा दिल्यानंतर त्यांनी समर्थसेवेला वाहून घेण्याचा संकल्प दृढ केला आणि घर सोडले. भूगर्भशास्त्राच्या अभ्यासातून कोणत्या भागात पाणी लागेल त्यानुसार ते शेतकऱ्यांना विहिरी खणण्यास सुचवत. जमिनीचा कस कसा ओळखावा याचे ते शेतकऱ्यांना मार्गदर्शन करीत. जंगलातील औषधी वनस्पती वापरून ते मनुष्य आणि जनावरांवरही उपचार करीत असत.

घर सोडल्यानंतर त्यांनी प्रथम अंजनगिरी, गौतम या नाशिक येथील पर्वतांवर पाच वर्षे साधना केली. तेथील औषधी वनस्पतींचा अभ्यास, हवामान, भूगर्भशास्त्र, विज्ञान, तसेच आध्यात्मिक अभ्यास केला. स्वामीसमर्थ रामदासांच्या विचारांचा अभ्यास केला. समर्थ रामदासांचे विचार, कार्य आणि लेखन जनसामान्यांपर्यंत पोहोचवायचे हाच ध्यास घेऊन त्यांनी आयुष्यभर अनेक ठिकाणी भक्तिमंदिरांची स्थापना केली. १९३७ साली सातारा जिल्ह्यात पहिले भक्तिमंदिर उभे राहिले. या मंदिरात श्रीसमर्थ रामदास, हनुमान, श्रीपाद श्रीवल्लभ, त्रिपुरासुंदरी यांच्या मूर्ती आहेत. मंदिरातील तळघरात नवग्रहांचे अधिष्ठान आहे.

१९३८ साली बांधलेले आंध्रप्रदेशातील अनंतपूरचे ‘निर्गुण मंदिर’ तर ‘श्री मुळे महाराज विठोबा मंदिर’ याच नावाने प्रसिद्ध आहे. श्री स्वयंज्योतींनी सहा वेळा भारत परिक्रमा केल्या. पाँडेचेरी (पुदुच्चेरी) स्थित योगी अरविंद यांच्यासह भारतवर्षातील अनेक ठिकाणच्या साधुसंत पुरुषांशी महाराजांचे मैत्र जुळले होते. त्यातूनच त्यांचे हजारो अनुयायी शिष्य तयार झाले, ज्यांनी मुळे महाराजांचे कार्य पुढे नेले. महाराजांनी दीक्षा दिलेले त्यांचे अनेक शिष्य महंत या उच्चपदापर्यंत पोहोचले आहेत. या महंतशिष्यगणांमध्ये काही भगिनींचादेखील समावेश आहे. महंतपदापर्यंत पोहोचलेल्या इंदूताई शेजवलकर यांनी महाराजांच्या अनंतपूरच्या आश्रमाची जबाबदारी व प्रसारकार्य आठ-नऊ वर्षे केले. त्यांच्याच मार्गाने अनेक भगिनी या सेवाकार्यात मग्न आहेत.

— संदीप राऊत

## मोरेदादा

***मोरे, खंडेराव अप्पाजी***

**वारकरी संप्रदाय**

**२१ मे १९२२ – २८ एप्रिल १९८८**



दिंडोरी, नाशिक येथील अप्पाजी मोरे यांची पिढी त्यांच्या घराण्यातील शंकरराव मोरे यांची समाजसेवेची परंपरा पुढे चालवीत होती. याच अप्पाजी आणि सौ. चंद्रभागाबाई यांच्या पोटी खंडेराव म्हणजेच पुढे प्रसिद्ध पावलेले श्री मोरेदादा यांचा जन्म झाला. ते जन्मल्यानंतर काही महिन्यांतच त्यांचे वडील अप्पाजी यांचा मृत्यू झाला आणि लहानग्या खंडेरावांची जबाबदारी त्यांच्या

आईवर पडली. शाळेत शिकताशिकताच त्यांना त्यांच्या गावात नेहमी येणारे रामदासांचे भक्त रामदासी गुरुजी यांच्या विचारांची आवड निर्माण झाली. त्यामुळे वयाच्या आठव्या वर्षीच श्रीरामरक्षा, श्रीमद्‌भगवत्‌गीता, विष्णुसहस्रनाम, दासबोध, हरिविजय, पांडवप्रताप असे ग्रंथ त्यांना मुखोद्‌गत झाले. खंडेराव यांच्या या आकलनाने कामकोटीचे श्रीशंकराचार्यदेखील संतोष पावले होते व त्यांनी लहान खंडेरावांची प्रशंसा केली होती. शाळेतील अभ्यास करताकरताच खंडेरावाने धार्मिक ग्रंथांबरोबरच इतिहास, कृषी, विज्ञान या विषयांचाही अभ्यास केला. विशेषत: शेतीसंबंधीची माहिती बारकाईने करून घेतली. शेती करताकरताच शेतीत नवनवीन प्रयोग केले.

१९४२ साली भारतीय स्वातंत्र्यसंग्राम निर्णायक वळणावर आला होता. त्याच वर्षी खंडेरावांचा विवाहही झाला होता. परंतु, उण्यापुऱ्या वीस वर्षांच्या खंडेरावाने त्या स्वातंत्र्यसंग्रामात उडी घेतली. खऱ्या अर्थाने ते स्वातंत्र्यसैनिक होते. तरीही पुढे स्वातंत्र्यप्राप्तीनंतर त्यांनी स्वातंत्र्यसैनिकांसाठीच्या म्हणून सरकारी सवलती, फायदे मात्र स्वीकारले नाहीत. आपले हे कर्तव्यच होते असे ते मानीत. भारतीय स्वातंत्र्यानंतर जेव्हा देशाने लोकशाही राज्यपद्धत स्वीकारली, त्या वेळी १९५२ ते १९६२ या दहा वर्षांच्या काळात ते दिंडोरी ग्रामपंचायतीचे सरपंच होते. त्यांच्या कार्यकाळात त्यांनी अनेक ग्रामसुधारणाही केल्या आणि राष्ट्रसंत तुकडोजी महाराजांच्या ग्रामगीतेला मूर्त स्वरूप दिले. तो आदर्श अन्य गावांना घालून दिला. त्यांच्या कार्यकाळात महाराष्ट्रात भीषण दुष्काळ पडला होता. त्या वेळी त्यांनी आपली विहीर सर्वांसाठी खुली केली होती. पुढे त्यांनी शासकीय सेवेतही काम केले. होमगार्ड कमांडर या पदापर्यंत ते पोहोचले. शासकीय सेवेतील या पदावर असताना त्यांनी जिल्ह्यातील हजारभर तरुण-तरुणींना नेमबाजीत प्रवीण केले.

याच काळात खंडेराव अप्पाजी मोरे हे ‘मोरेदादा’ या नामाभिधानानेही लोकप्रिय झाले आणि ओळखले जाऊ लागले होते. त्यांना घरात मात्र ‘भाऊ’ म्हणत. दैनंदिन जगरहाटीमध्ये आधुनिक जगाशी जुळवून घेताना त्यांनी अनेक समाजोपयोगी उपक्रम राबविले; परंतु त्यांचे मन मात्र अध्यात्म आणि समर्थ विचारांकडे झुकलेले होते. त्यासाठी ते जाणीवपूर्वक गुरूच्या शोधात होते. या प्रयत्नांत असतानाच त्यांना एका गावकऱ्याने नाशिकमधील एक योगी पिठले महाराज यांच्याबद्दल सांगितले व त्यांचा आशीर्वाद घेण्यासाठी जाण्यासही सुचविले. पिठले महाराज हे सिद्धपुरुष होते. त्यांनी आपल्या साधनेने मोरेदादा त्यांना भेटावयास येणार हे ओळखले होते. त्यानुसार त्यांनी ओळखदेख नसतानाही अचानक आलेल्या मोरेदादांचे स्वागत त्यांचे नाव घेऊन केले. समर्थविचारांनी भारलेल्या मोरेदादांच्या भक्ती आणि निष्ठेवर समाधान पावून पिठले महाराजांनी त्यांना लवकरच दत्तजयंतीच्या दिवशी गुरुदीक्षा दिली.

प्रपंच, सामाजिक कार्य करताकरताच मोरेदादांनी पिठले महाराजांच्या सहवासात सव्वीस वर्षे कार्य केले. या कार्यकाळात पिठले महाराजांच्या मार्गदर्शनाखाली दादांनी महाराष्ट्रभर समर्थविचारांचा प्रसार केला. या काळात नाशिक येथील पिठले महाराजांच्या मठात मोरेदादांचे स्थान अग्रक्रमाचे झाले होते. त्यांनी शेकडो प्रचारक तयार केले. सव्वीस वर्षे या मठात म्हणजे दरबारात सेवा केल्यानंतर दादांनी दरबार १९७४ साली दिंडोरी म्हणजे आपल्या गावाशेजारीच हलवला. दिंडोरी येथे प्रशिक्षण केंद्राची स्थापना केली.

‘मानवी जीवनातील दु:खांचा शोध व त्यावरून बोध घेण्यासाठी मानवाकडे पुरेसे बळ असावे लागते. माणसाची आध्यात्मिक पातळी तिथवर पोहोचली पाहिजे,’ असे दादांचे म्हणणे होते. म्हणूनच त्यांनी एकूणच ‘मानवी जीवन’ या विषयावर संशोधन केले, चिंतन केले व त्यानुसार समाजप्रबोधन केले. आत्मकेंद्रित होत चाललेल्या नवीन पिढ्यांना विवेकपूर्ण विचार करण्यासाठी प्रवृत्त करतानाच त्यासाठी सामुदायिक प्रार्थना, सप्ताह, प्रवचने आदी कार्यक्रमांचे आयोजन केले. त्यांनी दिंडोरीप्रमाणेच महाराष्ट्रात अनेक ठिकाणी प्रशिक्षण केंद्रांची स्थापना केली. बालके आणि

विद्यार्थ्यांसाठी स्तोत्र, मंत्रपठण ज्या योगे त्यांची वाणी शुद्ध होईल, त्याचप्रमाणे त्यांनी माता, पिता, गुरू, बुजुर्गांबद्दलचा आदरभाव जोपासण्यासाठी संस्कार शिबिरांचे आयोजन केले.

दादांनी साहित्यलेखनही विपुल केले आहे. श्रीगुरुचरित्र, दुर्गासप्तशती, मराठी संस्कृती, नित्य व्यवहारातील ज्योतिष, क्षात्रधर्म, नित्यसेवा स्तोत्र, हिंदुधर्म अशा कृतींनी आपले मौलिक विचार व्यक्त केले आहेत. त्यांच्या कार्याचा वारसा त्यांच्या कुटुंबीयांनी आता पुढे चालता ठेवला आहे.

— संदीप राऊत

## मौनगिरी महाराज

***जनार्दनस्वामी***

**वारकरी संप्रदाय, समाजसेवक**

**२४ सप्टेंबर १९१४ – १० डिसेंबर १९८९**



जनार्दनस्वामी यांचा जन्म ललितापंचमीच्या दिवशी आजोळी, औरंगाबाद जिल्ह्यातील कन्नड तालुक्यात टापरगाव येथे झाला. आजोळचे वातावरण भगवद्भक्तीला पोषक होते; पण दहेगावला घरी परतल्यानंतर त्यांना अगदी प्रतिकूल वातावरण मिळाले. पारंपरिक पाटीलकीमुळे गडगंज श्रीमंती होती; पण आध्यात्मिक वातावरण नव्हते. ईश्वरभक्तीचे वेड लागलेला जनार्दन गळ्यात वीणा घालून अभंग गात गावभर फिरू लागला; उपासतापास, व्रतवैकल्ये करू लागला. घरंदाज कुटुंबातील युवकाने असे वागावे हे नातेवाइकांना नामुष्कीचे वाटू लागले. त्यांचा विरोध इतका टोकाला गेला, की जनार्दनला जिवंत ठेवायचे नाही असा सर्वांनी निश्चय केला.

हिरण्यकशिपूने जसा प्रल्हादाचा छळ केला, अगदी तशाच प्रकारे घरच्यांनी जनार्दनचा सतत छळ केला. मात्र, भगवंताच्या कृपेने तो सर्व अग्निदिव्यातून सुखरूप बाहेर पडला. शकुंतलाबाई नावाच्या एका ब्राह्मण स्त्रीने त्याला भाऊ मानून आपल्या घरी आश्रय दिला.

जनार्दनस्वामी नित्यनेमाने पंढरपूरची वारी करू लागले. त्यांना ह.भ.प. लक्ष्मणबुवा वाघोलीकर यांचे मार्गदर्शन मिळू लागले. त्यांच्या वारकरी संप्रदायाच्या अभ्यासाचे ते गुरू होते. दहेगावाजवळच असलेल्या गौळवाडीतील एक स्त्री जनार्दनस्वामींची भक्ती करीत असे. तिने स्वामींना आपल्या अंदरसुल गावातील एका ठिकाणी ध्यानधारणेसाठी जागा उपलब्ध करून दिली. तेथे जनार्दनस्वामी तासन्तास ध्यानधारणा करू लागले. एव्हांना परिसरातील लोकांना त्यांच्यातील आध्यात्मिक शक्तीची कल्पना येऊ लागली. सामान्य लोकांप्रमाणेच तत्कालीन संतसज्जन त्यांच्या भेटीस येऊ लागले. त्या काळी प्रसिद्ध असलेले नागबाबा म्हणजेच शिवरामगिरी यांनी त्यांची भेट घेतली. त्यांनी जनार्दनस्वामींना १९६२ साली गुरुमंत्र दिला आणि मौनगिरी हे नाव दिले. त्यांना बिसायंत्राचे गूढ सांगितले. यंत्रसिद्धीचा मंत्र दिला. गोदावरीच्या संगमात बसून सव्वालाख वेळा मंत्राचा उच्चार करण्यास सांगितले. त्यानंतर यंत्र जळात सोडून अन्नग्रहण करण्याची सूचना केली. हे अनुष्ठान त्यांनी पूर्ण केले.

मौनगिरी महाराजांनी शिवरामगिरी महाराजांच्या सांगण्यावरून भगवद्गीता, सामवेद, कथाकल्पतरू, रामायण, महाभारताचा समग्र अभ्यास केला. त्यानंतर मौनगिरी महाराजांना एकदा दृष्टान्त झाला. चक्षूंसमोर डोंगर दिसू लागला. जीर्णोद्धार, पिनाकेश्वर, जातेगाव

म

असे शब्द कानांवर आदळू लागले. त्यांच्या दिव्यशक्तीने स्वामी समजून गेले. त्यांनी जातेगाव येथील दुर्गम डोंगरावरील पिनाकेश्वर मंदिराचा जीर्णोद्धार लोकांना हाताशी घेऊन श्रमदानाने केला. जुन्या मंदिरात काशीहून मागविलेले शिवलिंग अधिष्ठित केले. जयपूर येथून शिवाची मूर्ती आणवली. सप्तनद्यांचे तीर्थ आणले आणि अनेक ब्राह्मणांकरवी प्रतिष्ठापना केली. त्र्यंबक येथील शिखरे गुरुजींची गुरव म्हणून नेमणूक केली.

मौनगिरी महाराज यांनी सामाजिक कार्यही लक्षणीय केले. विविध देवतांच्या मंदिरांचा जीर्णोद्धार त्यांनी त्या-त्या गावातील लोकांना भारतीय संस्कृतीचे आणि आपल्या अनमोल ठेव्यांचे महत्त्व समजावून सांगून केला. यामध्ये त्र्यंबक येथील सिद्धेश्वर मंदिर, वैजापूरचे परिश्वर मंदिर, पंचवटीतील शर्वायेश्वर शिवमंदिर, साकूरचे मौनेश्वर मंदिर, कोपरगाव येथील काशी विश्वेश्वर शिवमंदिर अशा कित्येक मंदिरांचा समावेश आहे. कित्येक नापीक ठिकाणच्या भूमीचा उपयोग मौनगिरी महाराज यांनी आश्रमशाळा, मंदिरे, शेती, फळ-फुलबागा, त्याचप्रमाणे गोशाळा उभ्या करून केला. अहमदनगर, नाशिक, जालना, औरंगाबाद, धमाने, वेरूळ, टुणकी, पुणे इत्यादी ठिकाणी त्यांनी प्रवचनांतून, तसेच विधायक कामांमधून लोकसेवा केली व अन्यांस प्रोत्साहित केले.

मौनगिरी महाराजांच्या ठिकठिकाणच्या मंदिरे, आश्रमांमधून अक्षयतृतीया, दत्तजयंती, नागपंचमी अशा दिवसांत जप, अनुष्ठाने होतात. त्यांत हजारो शिष्य, भाविक सहभागी होतात. मार्गशीर्ष शुद्ध प्रदोष या गीताजयंतीच्या दिवशी त्यांचे नाशिक येथे देहपर्यवसान झाले. कोपरगाव येथे बेट या पवित्रस्थानी त्यांच्या पार्थिवाला समाधिस्थ करण्यात आले. याच परिसरात त्यांचे समाधिमंदिरही त्यांच्या शिष्यगणांनी बांधले आहे.

— संदीप राऊत

***

म

# र

## रंगावधूत महाराज

**दत्त संप्रदाय, स्वातंत्र्यसैनिक, संस्कृतज्ञ**

**२१ नोव्हेंबर १८९८ – १९ नोव्हेंबर १९६८**



**थो**र संत रंगावधूत या दत्तसंप्रदायी भक्ताने भगवत्‌भक्तीचा प्रचार तर केलाच, त्याबरोबर महात्मा गांधीजींच्या नेतृत्वाखाली भारतीय स्वातंत्र्याच्या लढ्यात सक्रिय भाग घेतला. गुजरात प्रांतातील गोधरा या गावातील एका सुशिक्षित, स्वावलंबी व सुसंस्कृत कुटुंबात त्यांचा जन्म झाला. त्यांच्या वडिलांचे नाव विठ्ठलपंत व आईचे नाव रुक्मिणी असे होते. आई-वडील विठ्ठलभक्त होते. त्यांनी बाळाचे नाव पांडुरंग असे ठेवले. त्याला नारायण नावाचा एक भाऊही होता. पांडुरंग जात्याच अत्यंत हुशार होता. पांडुरंग याने अभ्यासात पहिला क्रमांक कधीही सोडला नाही. त्याने आपले प्राथमिक शिक्षण गोधरा या गावातील शाळेतच पूर्ण केले. पांडुरंगाची हुशारी व चांगल्या गुणांमुळे तो शिक्षकांचा अत्यंत आवडता विद्यार्थी होता.

लहानपणापासूनच पांडुरंग प्रभू रामचंद्रांचा निस्सीम भक्त होता. मुंज झाल्यानंतर काही दिवसांनी त्याची थोर दत्तभक्त व दत्तसंप्रदायातील गुरू, परमपूज्य श्री वासुदेवानंद सरस्वती यांच्याशी भेट झाली. वासुदेवानंद सरस्वतीस्वामींची विद्वत्ता पाहून पांडुरंग अतिशय प्रभावित झाले व त्यांनी स्वामींना गुरुस्थानी मानून त्यांचे शिष्यत्व पत्करले. गुरूंच्या आशीर्वादामुळे पांडुरंगांच्या हृदयातील अध्यात्मज्योत प्रज्वलित झाली व ते भक्तिमार्गाला लागले. तो काळ भारतीय स्वातंत्र्याच्या भरतीचा काळ होता. राष्ट्रपिता महात्मा गांधीजींच्या असहकार आंदोलनामुळे हजारो तरुण आपले शिक्षण सोडून स्वातंत्र्यलढ्यात सहभागी होत होते.

पांडुरंगाचेदेखील आपल्या देशावर अतिशय प्रेम होते. तो महाविद्यालयामध्ये शिकत असतानाच महात्मा गांधीजींच्या असहकाराच्या आंदोलनामुळे त्याच्या हृदयातील देशप्रेमाची ज्योत प्रज्वलित झाली. त्याने गांधीजींच्या स्वातंत्र्यलढ्यात सक्रिय भाग घेतला. पांडुरंग गांधीजींना अनेक वेळा भेटले व त्यांचे मार्गदर्शन घेतले. या दरम्यानच्या काळात त्यांनी एम.ए.ची पदवी चांगल्या मार्कांनी संपादन केली. देशप्रेमामुळे सरकारी नोकरीच्या मागे न लागता त्यांनी राष्ट्रीय शाळेत अध्यापनाचे कार्य सुरू केले. विषयाचे सखोल ज्ञान, अध्यापनाची आवड व विद्यार्थिप्रेम यांमुळे ते विद्यार्थिवर्गामध्ये अतिशय प्रिय झाले. संस्कृत हा त्यांचा आवडता विषय असल्यामुळे त्यांनी संस्कृत व्याकरणावर दोन बहुमोल ग्रंथ लिहिले. त्यामुळे संस्कृतचे थोर अभ्यासक म्हणून त्यांची सर्वत्र ख्याती झाली.

पांडुरंगाचा पिंड अध्यात्माचा होता. अध्यात्माची प्रगती करायची असेल तर एकांतवास हवा. म्हणून ते

र

योग्य अशा जागेचा शोध घेऊ लागले. सुदैवाने त्यांना नर्मदा नदीच्या तीरावरील एका घनदाट जंगलातील नारेश्वर या लहानशा गावाचा शोध लागला.

४ डिसेंबर १९२५ रोजी, अंधाऱ्या रात्री, बोचऱ्या थंडीत नारेश्वर येथील एका लहानशा झोपडीत ते राहावयास आले. नारेश्वर हे गाव आजूबाजूच्या सात गावांच्या स्मशानभूमींनी वेढलेले घनदाट जंगलातील गाव आहे. या जंगलात विषारी साप, विंचू व श्वापदे यांचे वास्तव्य आहे. नारेश्वर येथे येण्यापूर्वी पांडुरंग यांनी अनेक संतांची भेट घेतली व त्या संतांनी सांगितलेली शिकवण नारेश्वर येथील वास्तव्यात आणण्याचा प्रयत्न केला.

पांडुरंगशास्त्री भल्या पहाटे, सूर्योदयापूर्वी उठत. नर्मदेच्या पाण्यात स्नान करीत. त्यांच्या दैनंदिन जीवनात ध्यान, वाचन, सूर्योपासना या गोष्टी प्रामुख्याने चालत. हळूहळू आजूबाजूचे लोक त्यांचे शुद्ध आचरण व भक्तीमुळे त्यांच्या आश्रमाकडे येऊ लागले. लोक त्यांना 'रंगावधूत महाराज' व 'पूज्य बापजी' या नावाने संबोधू लागले. प.पू. वासुदेवानंद स्वामींच्या सूचनेनुसार पूज्य बापजींनी 'श्रीगुरुलीलामृत' हा ग्रंथ लिहिला.

त्यानंतर त्यांनी 'दत्ताबावनी' या ग्रंथाचेही लिखाण केले. 'दत्ताबावनी' हा बावन्न श्लोकी ग्रंथ असून आजूबाजूच्या कुटुंबांतील लोक याचे अत्यंत भक्तिभावाने गायन करतात. नारेश्वर येथील वास्तव्यात बापजी नीमवृक्षाखाली बसून भक्तांबरोबर आध्यात्मिक, धार्मिक व अन्य गोष्टींबाबत चर्चा करीत. नीमवृक्षाची पाने कडू असतात; परंतु परमपूज्य बापजी यांच्या वास्तव्याने व सहवासाने या नीमवृक्षाची पाने गोड झालेली आहेत.

रंगावधूत महाराजांनी नारेश्वर येथे आपल्या आईचे एक भव्य स्मारक उभारले. ते बांधल्यानंतर त्यांनी हरिद्वारास प्रयाण केले. त्यानंतर ते कधीही नारेश्वराला परतले नाहीत. आपल्या जीवनाच्या शेवटच्या क्षणी रंगावधूत महाराजांनी तीन वेळा ॐ (ओम्) चा उच्चार केला व विक्रम संवत २०२५ च्या कार्तिक अमावास्येच्या दिवशी इहलोकीचा निरोप घेतला. २१ नोव्हेंबर १९६८ च्या मध्यरात्री त्या देहास नारेश्वर येथे मंत्राग्नी देण्यात आला. योगायोगाने हाच दिवस त्यांचा जन्मदिवस होता.

— प्रा. नीलकंठ पालेकर

**राऊळ महाराज**
***राऊळ, श्रीकृष्ण गोपाळ***
**साक्षात्कारी संत**
**१६ ऑक्टोबर १९०५ – ३१ जानेवारी १९८५**



**रा**ऊळ महाराज, अर्थात श्रीकृष्ण गोपाळ राऊळ यांची जन्मभूमी व कर्मभूमी सिंधुदुर्ग जिल्ह्यातल्या निसर्गरम्य कुडाळजवळचे पिंगुळी गाव होय. या गावाला राऊळ महाराजांचे समाधी मंदिर असून येथे भक्तांची दर्शनासाठी रीघ लागते. राऊळ महाराजांचे वडील गोपाळराव सधन शेतकरी होते. त्यांना तीन अपत्ये झाली, त्यांतले श्रीकृष्ण हे मोठे. त्यांना बालपणापासूनच शिक्षणात गोडी नव्हती. ते मराठी तिसरीपर्यंत शिकले. त्यांची प्रवृत्ती भजन, पूजन व संतांचे अभंग गाण्याची असल्याने, ते आत्मरंगी रंगलेले असत.

बांध्याने तगडे, उंच असल्याने वडिलांनी नोकरीधंद्यासाठी श्रीकृष्णाला मुंबईला पाठवले. त्या वातावरणात ते टापटीप शिकले. त्यांच्या ऐटबाज राहणीमुळे मित्रांचे मोहोळ जमले. त्यांना चिराबाजारात

र

हातमोजे व टोप्या बनवण्याच्या कारखान्यात नोकरी लागली; परंतु काम करताना अभंगगायन सुरू राहिले. नोकऱ्या बदलत राहिल्या; पण भजनगायन तसेच राहिले. पुढे ‘टाइम्स ऑफ इंडिया’च्या छापखान्यात नोकरी लागली. श्रीकृष्ण हुशार, चतुर व तरतरीत असल्याने कामात लवकरच प्रवीण झाला. पण भजनाच्या नादामुळे वरिष्ठ नाराज होऊन म्हणाले, ‘‘उद्या कामावर येऊ नकोस.’’ राऊळ उत्तरले, ‘‘माझे भजन बंद केलेत? तुमचा लाडका कुत्रा मरेल.’’ आणि सहा तासांतच वरिष्ठांचा प्रिय कुत्रा मेला. तेव्हापासून तो या भजनी अवलियाचा दास झाला. त्यांचे शिक्षण कमी असले, तरी मराठी व हिंदीवर प्रभुत्व होते.

जुने मराठी संतकाव्य राऊळ महाराज यांना मुखोद्गत होते. खोलीत रोज रात्री उभे राहून या अवलियाचे भजन-गायन बारा वाजेपर्यंत चाले. त्यामुळे लोकांनी कंटाळून व रागावून त्यांना ‘खुळे आबा’ असे नाव ठेवले. आबा अंतर्ज्ञानी आहे, द्रष्टा आहे असे लोकांना वाटे. त्यांच्या दृष्टीत व वागण्यात कोणताही भेदभाव नसे. ते मालवणी ही मायबोली बोलायचे. मुंबईतील माधवबागेत बाळकृष्ण महाराजांची कीर्तने होत. खुळे आबांना या कीर्तनाची ओढ असे. त्यांची आध्यात्मिक प्रगती होऊ लागली. कीर्तने ऐकून आबांनी बुवांची मर्जी संपादन केली. बाळकृष्ण महाराज यांनी या शिष्याला ‘सोलापूरला मठ उभारण्याचा संकल्प’ बोलून दाखवला होता.

आबा संन्यास घेऊन लगेच मठात जायला तयार झाले. ही वार्ता आबांच्या आईला समजताच ती गुरू महाराजांना भेटली व ‘‘याचा संन्यास मला मान्य नाही,’’ असे सांगून तिने स्पष्ट विरोध केला.

गुरू महाराजांनी आबांना परतवले. तरी भजनगायनाचा छंद चालूच राहिला. वडिलांनी या अवलियाचे लग्न लावून दिले होते. या साध्वीचे नाव राधाबाई. तिने खरोखर निष्ठेने संसार केला. खडतर जीवन जगली. त्यांना आठ अपत्ये झाली; पण फक्त ‘दाजी’ हा एकच मुलगा जगला. भजनाच्या अतिरेकामुळे, नादिष्टपणामुळे त्यांना अनेक नोकऱ्या लागूनही सुटत गेल्या. वडील गोपाळरावांच्या मृत्यूची वार्ता ऐकून या आबांनी ‘पुंडलीक वरदा हरि विठ्ठल’ ही आरोळी दिली आणि रात्र भजनात घालवून त्यांनी दुसऱ्या दिवसापासून चार दिवस मौनव्रत धारण केले.

खोलीत स्वत:ला बंद करून घेतले. शेवटी दरवाजा फोडावा लागला. पाहतात तो काय, आबा ध्यानस्थ. आबांनी गोदामाईच्या तीरावर पिताजींचे तर्पण केले. परत येताना वाटेत त्यांना दहा रुपयांची नोट मिळाली. त्यातून त्यांनी मृदंग विकत घेतला. भजनाला जोर चढला. वैराग्याकडे वाटचाल तीव्र होऊ लागली. त्यांनी नोकरीचा राजीनामा दिला. जो पगार फंड मिळाला, तो कामगारांनी आयोजित केलेल्या सत्कार समारंभात वाटून ते मोकळे झाले. दिवसेंदिवस विक्षिप्तपणा, खुळेपणा वाढू लागला. आता ते भजनासाठी खेडोपाडी जाऊ लागले. आठ-आठ दिवस तिकडे मित्रांकडे राहू लागले. भजन व शिव्यांचा उच्चार हाच जीवनधर्म झाला. त्यांच्या चमत्काराच्या अनेक कथा आहेत.

पत्नी व एकुलत्या एका मुलाच्या मृत्यूच्या वेळी ते स्मशानातही भजन विसरले नाहीत. एका भक्ताकडे रक्कम मागून ती दुसऱ्या गरजूला देत. त्यांचे वागणे विचित्र असे. कधी एकाच वेळी ते चार-पाच जणांचे अन्न फस्त करीत, तर प्रसंगी आठवडाभर उपाशी राहत. त्यांच्या आज्ञेने एका भक्ताने पिंगुळी येथे सुंदर इमारत बांधली : ‘प.पू. राऊळ महाराज मंदिर’. बांदिवडेकर-परब-कशाळकर या तिघांनी मिळून पिंगुळीला दोन वास्तू बांधून आबांना अर्पण केल्या.

१९४८ ते १९७२ या काळात ते सहा महिने भटकंती व सहा महिने ध्यान करीत. आबा राऊळ यांना सिद्धी प्राप्त होती. एका अपघातात ते पंगू झाले आणि नंतर त्यांनी समाधी घेतली. पिंगुळीला शिर्डी संस्थानासारखे महत्त्व प्राप्त झाले आहे.

– वि.ग. जोशी

**संदर्भ :**

*१. भट, नम्रता, संपादक; ‘सकल संत चरित्रगाथा’.*

र

## रुकडीकर, विश्वनाथ महाराज
**नाथसंप्रदाय**
**१८४३ - १९१८**



**वि**श्वनाथ महाराज रुकडीकर हे नाथसंप्रदाय परंपरेतील सिद्धपुरुष म्हणूनच जणू जन्माला आले होते. त्यांचा जन्म कोल्हापूर जवळील वडगाव येथे झाला. बालवयातच बंधूंच्या औषधोपचारासाठी पंढरपुरास येऊन राहावे लागल्याने विश्वनाथ महाराजांना पांडुरंगाचे नित्यदर्शन व संतसहवास लाभला. त्यांचा विवाह झाला; परंतु मुलगा तीन वर्षांचा असतानाच वारला आणि त्यानंतर थोड्याच दिवसांत पत्नीनेही स्वर्गारोहण केले. 'दैवानेच आपणांस परमार्थाकरिता मोकळे केले', असे वाटून ते घराबाहेर पडले. तारुण्यातच त्यांना रामचंद्र महाराज तिकोटेकर यांचा अनुग्रह प्राप्त झाला. हे महाराज 'तिकोटे' गावी बराच काळ राहिले म्हणून त्यांना 'तिकोटेकर' म्हणू लागले. वास्तविक, त्यांचे आडनाव 'पागे'! हे ज्ञानेश्वर महाराजांच्या परंपरेतील सहावे अधिकारी पुरुष होते. अशा अधिकारी पुरुषाचा अनुग्रह श्री विश्वनाथ महाराजांना प्राप्त झाला. ते नित्य स्व-स्वरूपानंदानुसंधानात निमग्न असत.

विश्वनाथ महाराजांचे अनुग्रहित नारो अनंत कुलकर्णी हे 'रुकडी' येथे राहत. महाराज त्यांच्याकडे जाऊन राहिले. कुलकर्णी मोठे जमीनदार होते. त्यांनी विश्वनाथ महाराजांना स्वतंत्र खोली दिली. येथे त्यांचे त्रिकाल स्नान, ज्ञानेश्वरी वाचन आणि सोऽहं साधना हे अखंड चालू असे. ते चाळीस वर्षे रुकडीतच राहिले होते म्हणून त्यांना रुकडीकर म्हणू लागले. श्री रामचंद्र महाराज तिकोटेकर वर्षातून एकदा रुकडीस येत. त्या वेळी ज्ञानेश्वरी, सप्तशती यांची पारायणे होत. श्रीसूक्त, पवमान, रुद्र यांचे अभिषेक होत. हा ज्ञानेश्वरी सप्ताह मोठ्या प्रमाणात होत असे. श्री रामचंद्र महाराजांनीच विश्वनाथ महाराजांना रुकडीस नारोपंतांच्या घरी राहायला सांगितले होते. त्या काळात विश्वनाथ महाराज भावावस्थेत जात. 'बाल, उन्मत्त, रामकृष्ण परमहंस, गौरांग प्रभू' अशासारख्यांच्या अवस्थेत महाराज जात. पायांत घुंगरू बांधून नाचत असत. स्वामी स्वरूपानंद यांचे गुरू श्री गणेशनाथ वैद्य हे श्री विश्वनाथ महाराजांचे पट्टशिष्य! त्यांना अनुग्रह देण्याचा अधिकार मिळाला होता. त्यांना बाबा वैद्य असेही म्हणत. ते सांगत, ''पिंड आणि ब्रह्माण्ड यांच्या ऐक्याची अनुभूती हा रसकल्लोळ आहे. श्री गुरुकृपेने मला हा रसभाव प्राप्त झाला. पूर्णातून पूर्णत्वाचा स्पर्श अशी ही मोठी आनंदाची अनुभूती आहे.''

बाबा वैद्य यांच्या आग्रहावरून विश्वनाथ महाराज १९१७ साली पुण्यास आले. विश्वनाथ महाराजांची अनेक शिष्यमंडळी होती. ज्ञानेश्वरी सप्ताह साजरा झाल्यानंतर महाराज आजारी पडले. ते माघ शुद्ध तृतीया, शके १८४० या दिवशी समाधिस्थ झाले. कोल्हापुरास पंचगंगेच्या तीरावर त्यांनी पूर्वीच आपल्या समाधीची जागा दाखवली होती, तेथेच समाधी बांधण्यात आली.

– डॉ. वि.य. कुलकर्णी

**संदर्भ :**


१. *योगी ज्ञाननाथजी; 'श्री विश्वनाथ महाराज रुकडीकर'; 'संत चरित्रदाता'; संत कृपा प्रकाशन, पुणे (शब्दांकन : कुलकर्णी, मधुकर कृष्ण ); पुनर्मुद्रण : जून १९९९; मूल्य रु.२०.*

२. *डॉ. परांजपे, रा.य.; 'स्वामी स्वरूपानंद : जीवन : चरित्र : तत्त्वज्ञान'; तृतीय आवृत्ती, इ.स. १९८४; प्रकाशक : स्वामी स्वरूपानंद सेवा मंडळ, पावस, रत्नागिरी; मूल्य : रु. १२.*


र

**राममारुती महाराज**
***देशपांडे, शंकर राजाराम***
**सत्पुरुष, समाजसेवक**
**जन्मदिनांक अनुपलब्ध – २८ सप्टेंबर १९१८**



**रा**ममारुतीच्या माउलीने या बालकाला ईश्वरभक्तीची आवड आहे असे पाहून बालमुकुंद स्वामींच्या चरणी अर्पण केले. शालेय शिक्षणाऐवजी मुलगा देवदर्शन, कथा, कीर्तन यांत रमे. बालमुकुंद स्वामींनीच त्याचे मूळचे 'शंकर' हे नाव बदलून 'राममारुती' असे नामाभिधान करून त्याला आपले शिष्यत्व दिले. स्वामी त्याला हिमालयावर घेऊन गेले. तेथे त्याच्याकडून योगाभ्यास करून घेतला आणि आपल्या सर्व शक्ती त्याच्या ठायी रुजविल्या.

राममारुती महाराजांना योगविद्येचे अकारण प्रदर्शन करणे रुचत नसे. शिर्डीच्या साईबाबांना ते गुरुस्थानी मानीत. त्यांनी स्वत:ची ईश्वरनामभाषा तयार केली. श्रीराम जयराम, जय पांडुरंग, गोविंद, गोपाळ इ. नामांना विशेष अर्थ असे आणि त्यांच्या सहवासात आल्यावर तो नीट समजे. योगाभ्यास व अध्यात्माची सिद्धी प्राप्त झाल्यावर दहा-बारा वर्षांनी महाराज स्वगृही परतले. सद्गुरूंच्या निर्वाणानंतर पुन्हा महाराज १०-१२ वर्षे हिमालयात ईशचिंतनात मग्न होते.

राममारुतींनी नानामहाराज श्रीगोंदेकर यांना समाजकार्यास प्रवृत्त करून मुंबईस एक शिक्षणसंस्था काढली. याशिवाय, मातृवत्सल मंडळ व कृष्णनंदराममारुती विद्यालयाची स्थापना केली. स्वत: निरक्षर असूनही त्यांनी शैक्षणिक संस्था काढून हजारो विद्यार्थ्यांसाठी ज्ञानगंगा खुली केली. सुमारे २५ वर्षे त्यांनी महाराष्ट्र व गुजरात प्रांतात समाजकार्य केले.

राममारुतींची देहयष्टी मजबूत व पीळदार होती. त्यांना मुलांच्या शिक्षणाची फार तळमळ होती. त्यांचे महानिर्वाण कल्याण येथे दळवी वाड्यात, भाद्रपद वद्य नवमीला झाले.

श्री गजानन महाराज पट्टेकर यांनी राममारुती महाराज यांच्या समाधीच्या जीर्णोद्धार व मंदिर रचनेत सक्रिय भाग घेतला. श्री पट्टेकर हे राममारुती महाराजांना गुरुस्थानी मानीत. महाराजांचे भिवंडी येथील श्री. शांतारामभाऊ जयवंत व श्री. भाऊसाहेब धनवटकर यांच्याशी घनिष्ठ संबंध होते. कल्याण येथील श्रीसंत राममारुती महाराजांच्या समाधीच्या दर्शनाला अनेक भाविक येतात. ही समाधी जागृत आहे असे भाविकांचे प्रतिपादन आहे. श्री. अनंत यशवंत गडकरी यांनी श्री राममारुती महाराजांचे ओवीबद्ध चरित्र लिहिले असून त्याच्या दोन आवृत्त्या प्रकाशित झाल्या आहेत.

– वि.ग. जोशी

**संदर्भ :**

१. *गडकरी, अ.य.; ओवीबद्ध चरित्र.*
२. *भट, नम्रता, संपादक; 'सकल संत चरित्रगाथा'.*

***

र

# व

## वासकर, तुकोबादादा अंदाभाऊ

**वारकरी संप्रदाय, कीर्तनकार**

**जन्मदिनांक अनुपलब्ध – १८१७**

वारकरी संप्रदायातील थोर, साक्षात्कारी संत मल्लाप्पा वासकर यांचे नातू व उत्तराधिकारी म्हणून ह.भ.प. तुकोबादादा यांनी संप्रदायाच्या बांधणीत व विस्तारात लोकोत्तर कार्य केले आहे. पेशवेकालीन ऐतिहासिक दफ्तरामध्ये तुकोबादादा यांच्या व वासकर फडाच्या कार्याची अनेक ठिकाणी नोंद आढळते.

तुकोबादादा ही मल्लाप्पा वासकरांची तिसरी पिढी. मल्लाप्पा (१७०७ ते १७९९) यांनी स्थापन केलेल्या वासकर फडाचे कार्य तुकोबादादांनी दूरवर कर्नाटकापर्यंत पसरविले व कर्नाटकाच्या उत्तर भागात विठ्ठलभक्तीचा, वारकरी संप्रदायाचा झेंडा, नामसंदेश पोहोचविला. मल्लाप्पा यांना अंदाभाऊ व सयाजी अशी दोन मुले होती; पण दोन्ही मुले अल्पायुषी ठरली आणि अंदाभाऊ यांचा मुलगा तुकोबादादा यांनी आजोबांच्या कार्याचा वसा व वारसा पुढे समर्थपणे चालविला.

मल्लाप्पा यांच्या अंगाखांद्यावरच तुकोबादादा वाढले व आजोबांकडूनच त्यांना विठ्ठलभक्तीचा संस्कार बाळकडू म्हणून लाभला. मल्लाप्पांचे गुरू शंकरस्वामी शिऊरकर आणि शंकरस्वामींचे गुरू संत निळोबाराय पिंपळनेरकर या दोघांच्याही सहवासाचा व आशीर्वादाचा लाभ तुकोबादादा यांना मिळाला. तुकोबादादांना आजोबांकडूनच वारकरी कीर्तनाची दीक्षा मिळाली होती व वारकरी संप्रदायातील एक थोर कीर्तनकार, असा त्यांचा नावलौकिक होता.

काही प्रसंगांमुळे तुकोबादादांनीच, वासकर फडाच्या मालकांनी स्वत: कीर्तन न करण्याचा दंडक घातला व



अप्पा वासकर



एकनाथ वासकर

त्यामुळे वासकर फडावरील शिष्यांमध्ये एकापेक्षा एक थोर कीर्तनकार निर्माण झाले. उभ्या महाराष्ट्रात परिचित असे विद्वान प्रवचनकार, कीर्तनकार ह.भ.प. भाऊसाहेब काटकर हे त्या अनेकांपैकी एक प्रमुख कीर्तनकार होते. खुद्द वासकर फड प्रमुखांनी कीर्तन न करण्याचा तुकोबादादांनी घातलेला दंडक आजही, गेली २०० वर्षे त्या फडावर पाळला जातो (अपवाद : तात्यासाहेब वासकर व त्यांची परंपरा).

तुकोबादादांच्या जीवनातील अनेक अतर्क्य घटना आख्यायिका झालेल्या आहेत व त्या आख्यायिकांतून तुकोबादादांच्या पारमार्थिक अधिकाराचे दर्शन घडते. तुकोबादादांनंतर त्यांचे पुत्र विठ्ठलआबा (इ.स.१८१७ ते १८५५) यांनी तितक्याच समर्थपणे (वारकरी भक्ती संप्रदायाचे) वासकर फडाचे भक्तिसेवेचे कार्य केले. त्यानंतर ही परंपरा ह.भ.प. ज्ञानोबाअण्णा, ह.भ.प. एकनाथअप्पा, ह.भ.प. भानुदासदादा, ह.भ.प. ज्ञानेश्वर ऊर्फ अप्पासाहेब महाराज यांनी पुढे चालविली. सध्या ह.भ.प. विवेकानंद महाराज वासकर ही परंपरा चालवीत

आहेत. आळंदी ते पंढरपूर संत ज्ञानदेवांचा पायी वारीचा पालखी सोहळा ज्या हैबतबाबा अरफळकर यांनी सुरू केला, त्यामध्ये ह.भ.प. तुकोबादादा वासकर व विठ्ठलआबा यांचे फार मोठे योगदान आहे.

आजही पालखी सोहळ्यात अरफळकर, शितोळे यांच्याबरोबरच वासकर यांचा मान प्रमुख आहे. वारकरी संप्रदायातील मुख्य फडामध्ये 'वासकर फड' हा प्रमुख फड असून या फडातूनच आजरेकर फड, साखरे फड, शिरवळकर फड अशा नव्या फडांची शिष्यांनी वाढ केली आहे. या वारकरी फड परंपरेची संघटनात्मकदृष्ट्या सुदृढ बांधणी करण्यात मल्लाप्पांनंतर ह.भ.प. तुकोबादादांचे कार्य ऐतिहासिक स्वरूपाचे आहे. श्री तुकोबादादा यांना आजोबांकडून विठ्ठलभक्तीचा वारसा मिळाला होता, तरी त्यांना हनुमंताच्या भक्तीची-उपासनेची विशेष उपजत आवड होती.

वारकरी संप्रदायात भक्तिक्षेत्रातील आचार्य म्हणून हनुमंत-मारुती उपासना दिसून येते. स्वत: संतश्रेष्ठ तुकाराम महाराजांचे 'शरण शरण हनुमंता । काय भक्तीच्या त्या वाटा । मज दावाव्या सुभटा ॥' अशा अभंगरचना प्रसिद्ध आहेत. या हनुमंतपर अभंगरचना ह.भ.प. तुकोबादादा यांना विशेषत्वाने आवडत होत्या.

हनुमान जयंतीच्या वेळेस होणाऱ्या कीर्तन-निरूपणास तुकोबादादांना हनुमंतावरील अभंगावर निरूपण करण्याचा भक्तभाविक श्रोते आग्रह करीत. हनुमंताचा श्री तुकोबादादा यांना विशेष कृपाप्रसाद लाभलेला होता. ही हनुमंतभक्ती आजही वासकर फडावर विठ्ठलभक्तीबरोबरच प्रवाहित झालेली दिसते. फडाचे विद्यमान उत्तराधिकारी ह.भ.प. विवेकानंद वासकर हे हनुमंताचे उपासक असून संत तुलसीदास कृत 'हनुमानचालिसा' त्यांच्या नित्य उपासनेचा भाग आहे. हेच वारकरी संप्रदायाचे महासमन्वयात्मक वैशिष्ट्य आहे. तुकोबादादा करमाळामार्गे पंढरपूरवारीला येत. एकदा त्यांचा मुक्काम करमाळ्यापासून जवळच असलेल्या, सीना नदीकाठच्या बाळेवाडी येथे होता. त्यांना रात्री 'मी आदिनाथ आहे, मला बाहेर काढ,' असा दृष्टान्त झाला. असा २-३ मुक्कामांत प्रत्येक वेळी झालेला दृष्टान्त लक्षात घेऊन त्यांनी सीना नदीवरील किनाऱ्यावर असलेल्या २-३ एकर निवडुंगाच्या बनात शोध घेतला तेव्हा त्यांना जमिनीत गाडलेले भव्य मंदिर व आदिनाथाची भव्य मूर्ती आढळली.

आजही तेथे दर शिवरात्रीला यात्रा भरते. त्यासाठी पंढरपुराहून वारकरी तेथे पायी दिंडी घेऊन जातात. कीर्तन, रात्रजागराने आपली सेवा बजावतात. अशा प्रकारे गुप्त आदिनाथाचा शोध तुकोबादादांमुळेच लागला म्हणून भाविक त्यांना साक्षात्कारी संत मानतात.

तुकोबादादांना विठोबा व गंगाराम असे दोन मुलगे व एक मुलगी अशी तीन अपत्ये होती. पैकी मोठा मुलगा विठ्ठलआबा यांनी त्यांची परंपरा पुढे चालविली. तुकोबादादांच्या पत्नीचे बाळंतपण स्वत: पांडुरंगाने तुकोबादादांच्या बहिणीचे रूप घेऊन केले अशीही आख्यायिका आहे. १८१७ साली तुकोबादादांचे वासी (जि. उस्मानाबाद) येथे वैकुंठगमन झाले.

— विद्याधर ताठे

**संदर्भ :**


१. *वासकर फडाची 'भजनमालिका'; 'भक्तिसेवेची अक्षरगाथा'.*

२. *'कन्नड ज्ञानेश्वरी', प्रस्तावना; निर्मिती : वासकर फड.*

३. *डॉ. बहिरट, भा.पं.; 'वारकरी संप्रदाय, उदय व विकास'.*

४. *नानामहाराज साखरे; संपादक: 'ज्ञानेश्वरी', प्रस्तावना.*




## वालावलकर, सीताराम बुवा
**स्वामी समर्थ परंपरा, साक्षात्कारी संत**
**१८९१ – १८ जानेवारी १९६९**

**वा**लावलकर सीतारामबुवा यांचा जन्म तेरसे बांबडे गावी (सावंतवाडी संस्थान), एका सामान्य कुटुंबात झाला. त्यांना एका खासगी शाळेत फार थोडे शिक्षण मिळाले. त्यांनी गिरणीत, कापड दुकानात, पोलीस खात्यात व इतर अशा नोकऱ्या ८-९ वर्षे केल्या. त्यांचे मन नोकरीत रमत नसे; कारण बालवयापासून मित्रांबरोबर ईश्वरनामाचा गजर करण्याचा त्यांना छंद होता. ते लोकांच्या मदतीला तत्परतेने जात. त्यांनी आपला पगार



भिकारी व गरजूंना वाटला. लंगोटी व कफनी परिधान करून ते मुंबईहून कोकणात दाभोळला हजर झाले. दाढीमिशा वाढलेल्या व अंगाला राख फासलेली. शिवनामाचा गजर करीत, मित्राच्या साहाय्याने ते चिपळूणनजीक कोडमळा इथल्या मारुतीच्या देवळात आले. तिथल्या काही नागरिकांनी त्यांना सावर्डे येथील दत्तमंदिरात श्री. रामचंद्र वहाळकरबुवा यांच्याकडे आणले. या वहाळकरबुवांवर श्री गोपाळबुवा केळकर यांचा अनुग्रह होता. सीतारामबुवा देवळाची झाडलोट करीत, भिक्षा मागत व देवळातच राहत.

गुरूंची आज्ञा मानून सीतारामबुवांनी भारतभर तीर्थयात्रा केल्या. त्यांना तीर्थयात्रेत श्रीस्वामीसमर्थांचा साक्षात्कार झाला व अनेक सिद्ध पुरुषांची ओळख झाली. सद्‌गुरू वहाळकरबुवांचे निर्वाण १९५१ मध्ये झाल्यावर शिष्य सीतारामबुवांनी कश्यपी तीरावर सावर्डे येथे त्यांची समाधी बांधून मठ स्थापना केली.



सीतारामबुवा सहा फूट उंच होते, सुदृढ होते व अफाट शारीरिक कष्टही करणारे होते. ते शेती, दगडफोड, बांध घालणे वगैरे अंगमेहनतीची कामे करीत. श्री गुरुचरित्र व श्री शिवलीलामृत या ग्रंथांची त्यांनी शेकडो पारायणे केली. सेवाभावी वृत्ती, दीनांविषयी कणव, मनमिळाऊ स्वभाव, निरीच्छ आचरण यांमुळे ते डेरवण–सावर्डे परिसरात लोकप्रिय होते. गुरुसेवा, परमार्थ चिंतन यांत त्यांचा खूप वेळ जाई. मंत्रसाधना करून त्याचा उपयोग त्यांनी गोरगरिबांच्या सेवेसाठी केला.

१८ जानेवारी १९६९ रोजी सीतारामबुवा वालावलकर समाधिस्थ झाले. त्यांना श्री अक्कलकोट स्वामीसमर्थांच्या परंपरेतील एक थोर संत अशी मान्यता लाभली. त्यांनी चंदनासारखा देह झिजवून आपल्या जन्माचे सार्थक केले. पुढील पिढ्यांना त्यांनी लोकसेवा, प्रेम व भक्ती आणि शारीरिक कष्टांची प्रेरणा दिली. सीतारामबुवांनी नि:स्वार्थपणे समाजसेवेचा आदर्श दिला. डेरवणला संत वहाळकर, संत वालावलकर यांची पुण्यतिथी, दासनवमी (माघ वद्य नवमी), शिवछत्रपती जयंती वगैरे उत्सव साजरे होतात.

– वि.ग. जोशी

**संदर्भ :**

*१. प्रा. भट, नम्रता; संपादक : 'सकल संत चरित्रगाथा'.*

## विज्ञानानंद स्वामी

**मानसशास्त्रज्ञ, स्वातंत्र्यसैनिक, विज्ञानाधिष्ठित विचारवंत**

**जन्म-मृत्युदिनांक अनुपलब्ध**

**स्वा**मी विज्ञानानंद यांनी १९४२ च्या लढ्यात दोन वेळा तुरुंगवास भोगला. वृत्तपत्रात लेखन, संपादन, त्याचप्रमाणे साहित्यक्षेत्रातही त्यांचा वावर होता. चित्रपट, नाटक, संगीत क्षेत्रातील अनेक दिग्गजांशी त्यांचा परिचय होता. त्या काळात ते भिडे या नावाने परिचित होते. क्रीडा क्षेत्रात कबड्डी, क्रिकेट यांत ते पारंगत होते. पुढे त्यांच्यामध्ये अध्यात्म, विज्ञान या विषयांची गोडी निर्माण झाली. त्यांच्यामध्ये विलक्षण आत्मशोध आणि अतींद्रिय शक्तीची प्रतिभा होती. त्यामुळेच त्यांना समोरच्या व्यक्तीच्या मेंदूलहरी कळत, दिसत. त्यांचे भविष्यकथन अचूक असे.

हस्तसामुद्रिक विषयाचाही त्यांचा दांडगा अभ्यास होता. ग्रह- ताऱ्यांचा मानवी जीवनावर प्रभाव पडतो हे त्यांना पटत नव्हते. भविष्य हे आपल्या कर्माने बदलता

येते हा त्यांचा निष्कर्ष होता. त्यांचे राजकीय भविष्यकथन खोटे ठरले नाही. संन्यास घेण्याच्या आधी त्यांना अनेक अडचणी, दु:खांचा सामना करावा लागला होता. त्यातूनच त्यांनी आपला जीवनमार्ग बदलला. १९५७ साली त्यांना दैवी साक्षात्कार झाला व आत्मशोध लागला. विज्ञानाच्या मार्गाने लोकांना ज्ञानी करावे हा संकेत मिळाला.

'स्वामी विज्ञानानंद' हे नाव धारण करून त्यांनी भारतभर भ्रमण करून भारत जाणून घेतला. परिस्थितीचे जाणिवेने अवलोकन करून त्यांनी त्या अभ्यासाचे ज्ञानात रूपांतर केले. वैज्ञानिक अधिष्ठान असलेल्या अध्यात्माचा पुरस्कार केला. लोकसेवेसाठी माध्यम म्हणून त्यांनी चार विश्वस्त संस्थांची स्थापना केली.

एकविसाव्या शतकातील विज्ञान कसे असावे याची त्यांनी आखणी केली. 'व्हॉट इज माइंड' या ग्रंथात त्यांनी मनाचे सखोल विश्लेषण केले आहे. रशियातील परामानसशास्त्रज्ञ डॉ. ब्रॉदॉव्ह यांनीदेखील विज्ञानानंदांचे विश्लेषण आणि व्याख्या मान्य केली.

रोगमुक्तीसाठी शास्त्रीय संकेत, जप, मंत्र, प्रार्थना, वनस्पती या माध्यमांचा परिणामकारकपणे उपयोग करता येऊ शकतो यासाठी विज्ञानानंदांनी प्रख्यात 'आरसीएफ' संस्थेमार्फत संशोधन केले. मानवी मनाचा अभ्यास त्यांच्या 'न्यू वे फिलॉसॉफी' या ग्रंथांच्या मालिकेतून लिखित स्वरूपात प्रसिद्ध झाला आहे. मनाचे शरीरावरील परिणाम, यश, अपयश, सुखदु:ख, रोगमुक्ती, मंत्र अशा विविध विषयांवर त्यांनी २९ वृत्तपत्रांतून लेखमाला चालविल्या.

विज्ञान सोप्या शब्दांत समजावून देण्याची स्वामी विज्ञानानंद यांची शैली होती. शिक्षणशास्त्र, मेंदूशास्त्र, शरीरशास्त्र, मंत्रशास्त्र, औषधशास्त्र, न्यायशास्त्र, पदार्थविज्ञान, सूक्ष्मविज्ञान अशा कित्येक शास्त्रांचा त्यांनी सखोल अभ्यास केला होता.

जनसामान्यांच्या विविध प्रश्नांची उकल त्यांनी त्या-त्या विषयांचे अभ्यासवर्ग आयोजित करून केली. यासाठी लोणावळा येथील 'मनशक्ती' केंद्रात त्यांनी जन्ममृत्युविज्ञान रहस्य, देवदर्शनानुभव वर्ग, बालसमस्या, कुटुंबसुखवर्धन, योगशक्ति-ध्यान, जीर्ण रोगमुक्ती, शुभभविष्य ज्ञान, बुद्धिवर्धन शिबिरे, गर्भसामर्थ्य, इच्छापूर्ती, मंत्रविज्ञान, वंशजकल्याण, मत्सरघातशुद्धी, मेंदूक्रांती वर्ग, यौवनक्रांतिदर्श अशा विविध विषयांचे अभ्यासवर्ग त्या-त्या वयोगटांतील व्यक्तींसाठी सुरू केले. त्याला मोठा प्रतिसाद लाभला. दीर्घ मुदतीचा अभ्यासक्रम जसा चौवार्षिक वर्ग, तसेच एका दिवसाचा 'एज्युकेशन ऑफ हॅपिनेस', 'सक्सेस विदाउट टेंशन' असे माध्यमिक शाळांतील विद्यार्थ्यांसाठीचे वर्ग घेतले.

स्वामी विज्ञानानंद यांनी आपल्या वैधानिक अभ्यासांती काही सैद्धान्तिक ग्रंथ समाजासाठी खुले केले आहेत. जसे मनबदलाने शरीरबदल, परिस्थितीबदल व भविष्यबदल शक्य आहे, मुलांचा बुद्ध्यांकवृद्धी शक्य, विचार, भावभावनांचे मेंदूलहरींच्या स्वरूपात होणारे वातावरणातील धक्के, मन हे जडापेक्षा वेगळे असते, जडत्वाचे नियम जीवनाला लागू पडणे, श्रीमंत, सत्ताधारी, अधिकारी यांना दु:खे जास्त असतात, मरणोत्तर आयुष्य, रोग आणि रोगमुक्ती, सुखदु:खाचे वैज्ञानिक विश्लेषण, देहान्तरितांशी संपर्क, सूक्ष्मशक्ती, मनाचा रेझोनन्स, शक्ती मिळविण्यासाठी प्रकाशावर करावयाची एकाग्रता या त्यांच्या सिद्धान्तांवरील ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

असामान्य बुद्धिमत्ता प्राप्त झालेल्या स्वामी विज्ञानानंद यांनी 'माणूस' या भूमिकेत कायम राहून सर्व स्तर, धर्म, पंथ, जातींतील याचकांना जास्तीतजास्त मदत करण्याचा प्रयत्न केला.

स्वामी विज्ञानानंद हे दयार्द्र, त्यागी, प्रेमळ, हजरजबाबी, सहिष्णू, मिस्कील होते, त्याचप्रमाणे ते दृढनिश्चयी, स्पष्टवक्ते, नीतिमान, काटकसरीही होते. पैशांच्या बाबतीत अतिशय दक्ष व काटेकोर असलेले स्वामी भ्रष्टाचाऱ्याची कधीही गय करीत नसत. बुद्धी, मत्ता, सत्ता, कीर्ती उदंड लाभूनही त्यांनी जमिनीशी नाते सोडले नाही. स्वामीजींनी विज्ञानाधिष्ठित अनुष्ठानेही



मन:शक्ती केंद्र

आयोजित केली. त्यांनी १९८१ साली मुंबईत केलेला 'महागायत्री यज्ञ' खूप गाजला. त्यांच्यावर त्या काळात टीकाही खूप झाली. त्या टीकांना शालीनपणे उत्तरे देऊन त्यांनी परतविले. 'निषेध मोर्चातील प्रश्नोत्तरे' या नावाने हा संवाद शब्दबद्ध झाला आहे. 'शक्तिसंच' या ग्रंथात त्यांनी 'अंधश्रद्धा निर्मूलन समिती'चा विरोध सभ्य आणि ज्ञानी चर्चेने मावळायला लावला. 'न्यू वे प्रकाशन' या केंद्राच्या प्रकाशनांतर्गत हे सारे ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. 'मनशक्ती' हे मासिक स्वामीजींच्या विचारांचा प्रसार आजही हजारो वाचक, साधकांकडे करीत आहे, साधकांची संख्या वाढवीत आहे. 'मृत्यूचे मोल ओळखूनच त्याला मिळवावे लागते आणि जीवन जिंकावे लागते' असे त्यांचे सांगणे होते.

विलक्षण कर्मयोगाने आणि प्रसंगी अघोरी वाटणाऱ्या प्रयोगांनी त्यांनी स्वत:चे जीवन आचरले. 'नि:स्वार्थ म्हणजेच स्वार्थ माना, दु:खाचा स्वीकार करा' असे केवळ दुसऱ्यांना सांगून ते थांबले नाहीत, तर स्वत: आत्मक्लेश केले. ते बऱ्याचदा तळहातावर निखारे ठेवत, दीनदलितांच्या दु:खांत सहभागी होण्यासाठी, त्यांची दु:खे स्वत: अनुभवण्यासाठी त्यांनी तपाहून अधिक काळ तरटाचे जाडेभरडे, टोचणारे वस्त्र परिधान केले. आपल्या पायांवरील त्वचा सोलून काढली. पावणेदोन वर्षे बंद खोलीत बसून तपाचरण केले. त्याशिवाय रोग्यांची सेवा, मंदिरे, रस्त्यांची सफाई, अनाथाश्रमात सेवा स्वत: जाऊन केली. स्वामी विज्ञानानंदांचे ४००० साधक आज आपापल्या भागांत स्वामींचे सेवाकार्य करीत आहेत. दिवसातील एक तास समाजाला देण्याचा संकल्प ते करून आहेत. त्यांच्या सव्वाशे शिष्यांनी संपूर्ण जीवन समाजसेवेसाठी वाहायचे ठरवले आहे. 'ज्ञान, सेवा, पुण्य यांचा गुणाकार म्हणजेच आपल्या जीवनातील सत्कृत्य बँक' असा स्वामी विज्ञानानंदांनी संदेश दिला आहे.

— संदीप राऊत

## विष्णुबाबा ब्रह्मचारी

***गोखले, विष्णू भिकाजी***

**विचारवंत व धर्मसुधारक**

**१८२५ - १८ फेब्रुवारी १८७१**

☛ ***मुख्य चरित्रनोंद - समाजकारण खंड***



पूर्वाश्रमीचे विष्णू भिकाजी गोखले म्हणजेच विष्णुबाबा ब्रह्मचारी रायगड जिल्ह्यातील शिरवली या गावचे होते. विष्णू लहान असतानाच त्यांचे वडील वारले. मौंजीबंधन व थोडे वेदाध्ययन झाल्यावर त्यांनी आईच्या सांगण्यावरून शेती केली, गुरे राखली. नंतर ते महाडला आले. नंतर संगमेश्वर येथे त्यांनी काही काळ कस्टम खात्यात नोकरीही केली. नंतर तीही नोकरी

सोडली व साधुसंतांबरोबर खूप भटकले. त्यांनी कथा, कीर्तने ऐकली. वयाच्या तेविसाव्या वर्षीच त्यांनी सर्वसंगपरित्याग केला. त्यांनी विवेकसिंधू, ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, दासबोध, बोधसागर इत्यादी ग्रंथांचे वाचन व सखोल चिंतन केले. नंतर ते सप्तशृंगी गडावर जाऊन राहिले. त्यांनी कंदमुळे खाऊन तपस्या केली. पुढे त्यांना आत्मज्ञान झाले. विष्णूबाबांचा प्रथमत: भर व्याख्यानांवर होता. नंतर त्यांनी ग्रंथलेखन केले. 'वेदोक्त धर्मप्रकाश', 'भावार्थसिंधू', चतु:श्लोकी भागवताचा मराठीत अनुवाद, सुखदायक राज्य प्रकरणी निबंध, 'बोधसागर' असे पाच ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

तो ब्रिटिश राज्याचा काळ होता. भारतात आलेल्या मिशनऱ्यांनी येथे शाळा आणि रुग्णालये सुरू केली. आम्ही सेवाभावाने कार्य करतो असे ते सांगत असले तरी त्यामागे येथील जनतेचे धर्मांतर घडवून आणण्याचा खरा हेतू होता. ख्रिश्चन मिशनरी अनेक प्रकारे हिंदुधर्मावर टीका करीत. विष्णूबाबांनी त्यांच्याच पद्धतीने हा वार परतविण्याचे प्रयत्न केले. त्यांनी ख्रिश्चन धर्मातील वैगुण्यांवर व्याख्यानांची झोड उठविली. त्यांचे खंडन-मंडन आवेशपूर्ण असे. त्यांच्या सभा मुंबईस चौपाटीवर होत; त्यांच्या भाषणांना अलोट गर्दी होत असे.

विष्णूबाबा यांनी हिंदू धर्मबांधवांना अत्यंत क्रांतिकारक विचार सांगितले. त्यांनी स्त्री-शिक्षणाचा हिरिरीने पुरस्कार केला. त्यासाठी ते इतिहास, पुराणातील दाखले देत. विष्णूबाबांची विवाहविषयक मतेही पुरोगामी होती. त्यांना जरठ-कुमारी विवाह मुळीच मान्य नव्हता.

वधू-वरांच्या वयातील अंतर सहा ते आठ वर्षांचे असावे, असे ते सांगत. त्यांना स्वयंवरपद्धती मान्य होती. त्यांना विधवाविवाह मान्य होता. बालविधवा ही कुमारिकाच मानावी, विधुराने विधवेशीच विवाह करायला हवा असे ते सांगत. विष्णूबाबा यांना सतीची चाल मान्य नव्हती व पती जर व्यसनी, व्यभिचारी किंवा रोगग्रस्त असेल, तर स्त्रीला घटस्फोट मिळायला हवा, असे त्यांचे मत होते. जातिभेदाबद्दलही त्यांची मते विलक्षण क्रांतिकारक होती. जाती कार्यावरून ठरतील आणि वर्ण गुणधर्मावरून ठरेल. एकाच पित्याची चार मुले चार वर्णांची असू शकतील! कारण वर्ण गुणावरूनच ठरतो.

जो सत्त्वगुणयुक्त आहे व धर्ममार्ग दाखविण्यास समर्थ आहे, त्यास ब्राह्मण म्हणावे. अशा ब्राह्मणांनी आदिवासींना ज्ञान द्यावे व उन्नत करावे हे त्यांचे कार्य आहे. इंग्रजी राज्यामुळे कारखानदारी सुरू झाली. यंत्रयुग सुरू झाले. त्यामुळे नवाच कामगारवर्ग निर्माण झाला.

विष्णूबाबा ब्रह्मचारी यांनी 'सुखदायक राज्य प्रकरणी निबंध' लिहून कार्ल मार्क्सच्या कितीतरी वर्षे आधी समाजवादी समाजरचनेबद्दलचे विचार मांडले होते. ते म्हणतात, 'खाजगी संपत्ती हेच सर्व दु:खांचे व गुन्ह्यांचे उत्पत्तिस्थान आहे. म्हणून सर्व प्रजा एक कुटुंब मानावी. गावाची सर्व जमीन सर्वांची मानावी. सर्वांनी कष्ट करावेत. गावाची कोठारे असतील, त्यातून गरजेप्रमाणे धान्य, कापड इत्यादी न्यावे.' विष्णूबाबांनी 'सेतुबंधिनी' नावाची गीतेवर टीका लिहिली आहे. ही टीका गीता अध्याय १८, श्लोक १७ पर्यंत लिहिली गेली. पुढील टीका विष्णूबाबा ब्रह्मचारी यांच्या एका शिष्याने पूर्ण केली. ही टीका १८७० च्या सुमारास लिहिली; पण १८९० मध्ये प्रकाशित झाली. या टीकेचे वैशिष्ट्य म्हणजे ती गद्य स्वरूपात व तत्कालीन ज्ञात वैज्ञानिक परिभाषेत लिहिली आहे.

वैज्ञानिक परिभाषेत लिहिलेली ही पहिलीच टीका मानावी लागेल. या टीकेतही इंग्रजी राज्य व ख्रिश्चन धर्म यांवर परखड मते मांडली आहेत. विष्णूबाबा ब्रह्मचारी यांनी मुंबई मुक्कामी आपला देह ठेवला.

— डॉ. वि.य. कुलकर्णी

व

**संदर्भ :**


१. *पं. जोशी, महादेवशास्त्री; 'भारतीय संस्कृतिकोश' (खंड आठवा), पृष्ठे: ७८३ ते ७८६.*

२. *डॉ. ढेरे, रा.चिं.; 'सेतुबंधिनी', 'केसरी'; २० व २७ जुलै १९६९.*

३. *माटे, श्री.म.; 'विवेकमंडन'; १९५६.*


***

# श

## शंकर महाराज
**दत्तावतारी सिद्धपुरुष, साक्षात्कारी संत**
**जन्मदिनांक अनुपलब्ध – १९४७**



**म**हाराष्ट्राच्या नाशिक जिल्ह्यातील, सटाणा तालुक्यातील अंतापूर या गावात चिमणाजी नावाच्या निपुत्रिक शिवभक्ताला दीड तपाच्या पुत्रप्राप्तीच्या अनुष्ठानाचे जणूकाही फळ म्हणून, दृष्टान्ताप्रमाणे एका झाडाखाली दोन वर्षांचे एक अजानुबाहू तेजस्वी बालक सापडले. पतिपत्नींनी या बाळास घरी आणून त्याचे शंकर हे नाव ठेवले व अत्यंत प्रेमाने त्याचा प्रतिपाळ केला. शंकर जन्मतः सिद्धावस्थेत होता, त्यामुळे त्याच्या बाललीलांतून त्याचे दिव्यत्व लक्षात येऊ लागले. चिमणाजी सहकुटुंब पंढरपूरला जात असताना, वाटेत शंकरला प्लेगने गाठले. शंकरने आपले गुरू अक्कलकोटच्या स्वामीसमर्थांचा धावा केल्यावर, स्वामींनी प्रगट होऊन प्लेगच्या गाठी कापून काढल्या. शंकर प्लेगमधून बरा झाला; पण गाठी कापल्यामुळे शरीर मात्र अष्टावक्र झाले. शंकरने घर सोडून विश्वसंचारासाठी निघण्यापूर्वी मातापित्यांना आपला वियोग जाणवू नये म्हणून पुत्रप्राप्तीचा आशीर्वाद दिला.

शंकरच्या आशीर्वादाने चिमणाजी दाम्पत्याला दोन जुळे मुलगे झाले. त्यानंतर मात्र शंकरने घर सोडले व हिमालयातील केदारेश्वर, प्रयाग, सातपुड्याच्या डोंगरात काही काळ भ्रमंती करून सोलापुरातील शुभराय मठात येता झाला. तेथील दत्तभक्त महंत जनार्दनस्वामींसमोर उभे राहून ‘अल्लख’ हा पुकारा करताच शंकरच्या जागी श्रीदत्तात्रेयांचे दर्शन झाले. स्वामींनी शंकरसमोर लोटांगण घालून त्यास प्रेमाने मठात ठेवून घेतले. पुढे अक्कलकोट-त्र्यंबकेश्वरमार्गे शंकरचे पुण्यात आगमन झाले.

पुण्यातील संत हजरत बाबाजान यांनी शंकरचा पुत्राप्रमाणे प्रतिपाळ केला. इथून पुढे बहुतांशी शंकरचे वास्तव्य पुण्यातच होऊन त्याचे दिव्यत्व लक्षात आल्यामुळे भक्तगण त्यांना ‘शंकर महाराज’ म्हणून संबोधू लागले. भक्तकार्यार्थ महाराजांचा महाराष्ट्रभर संचार होत असे. श्रीमहाराजांची उंची पाच फुटांच्या आसपास असून ते कायम ‘अवधूतावस्थे’त असत. कधी केस व दाढी अस्ताव्यस्त वाढलेली असे, तर कधी तुळतुळीत गोटा. अंगावर लंगोटीपासून साहेबी थाटाच्या सुटापर्यंत, कोणतेही आणि कोणाचेही कपडे असत. स्मितहास्यापासून सातमजली हास्यापर्यंत सर्व प्रकार दिसून येत, त्यातून शरीर अष्टावक्र! या विक्षिप्त प्रकारामुळे प्रथमदर्शनी सर्वांना ते वेडेच वाटत. स्वार्थी व पाखंडी लोक त्यांच्यापासून लांब राहत व खरे भक्तच टिकत.

महाराजांनी अनेकांना व्यसनमुक्त केले. महाराजांस अठरा सिद्धी वश असून त्यांचा वापर ते भक्तास प्रबोधन, भक्तसंकटनिवारण यांसाठीच करीत. लायक व्यक्तींस

महाराज स्वतः शोधून त्यांना पारमार्थिक मार्गदर्शन करीत. त्यांना योग्य अवस्थेत नेऊन ठेवत असत, मग ती व्यक्ती आपली भक्त असो वा नसो.

'अधिकार तैसा करू उपदेश' या चरणाप्रमाणे महाराजांची बोध करण्याची रीत असे. ते स्वतः फारच कमी बोलत. बोलले तर मुखातून त्यांचे शब्द बोबडे येत. एखाद्या अंतरंगी भक्तास बोध करावयाचा झाला, तर ते ज्ञानेश्वरीसारखा ग्रंथ आणवून, त्यातील अनुरूप ओव्या त्यास दाखवत अथवा, ताईसाहेब मेहेंदळ्यांसारख्या अधिकारी व्यक्तीस स्पर्शाने प्रेरित करून त्यांकरवी बोलत. महाराजांनी सर चुनिलाल मेहता, न्यायरत्न विनोद, ताईसाहेब मेहेंदळे यांसारख्या भक्तांस नुसत्या स्पर्श वा दृष्टिक्षेपाने परमार्थाच्या उच्च अवस्थेत नेऊन ठेवले होते. महाराज दत्तावतारी असले तरी भक्तांच्या बोधासाठी ज्ञानेश्वरीचा वापर करीत. डॉ. धनेश्वरांसारख्या अधिकारी भक्ताला मार्गदर्शन करताना त्यांच्याकडून त्यांनी ज्ञानेश्वरीची ओवीन् ओवी पिंजून घेतली होती. ज्ञानेश्वरमाउलींवर महाराजांचे अफाट प्रेम होते. इतके, की कोणी 'ज्ञानेश्वरमाउली' असा शब्द जरी उच्चारला, तरी तो ऐकताच ते भावावस्थेत जाऊन त्यातून मूळपदावर येण्यास त्यांना खूप वेळ लागे. या कारणामुळे त्यांचा सत्संग मिळविण्यासाठी आलेले अंतरंगी भक्त चुकूनसुद्धा तोंडाने ज्ञानेश्वरमाउली हा शब्द उच्चारत नसत!

महाराज भक्ताला त्याच्या धर्मग्रंथांतील वचने म्हणून दाखवून बोध देत. मग ती भाषा मराठी असो इंग्लिश वा पर्शियन! उपासनेची सुरुवात महाराज आई-वडील व कुलदेवता इथून करावयास सांगत. त्यांच्याकडे दुर्लक्ष करून परमार्थ करू पाहणाऱ्यांची ते निर्भर्त्सना करीत.

ज्याचा भाव शुद्ध, त्याच्याकडे महाराज आपणहून येत व प्रसंगी मुक्कामही करीत; मग तो सरदार मेहेंदळ्यांचा आलिशान महाल असो वा मामा ढेकणे यांचे जमीन उखडलेले घर असो. सर्व ठिकाणी महाराज सारख्याच आनंदाने राहत. प्रसंगी, महाराज एखाद्या देवस्थानात मुक्काम करून तेथील मंडळींस देवाचा उत्सव, हरिनाम सप्ताह, निरनिराळे याग, ज्ञानेश्वरी-गुरुचरित्र-दासबोध पारायण करावयास सांगून शेवटी मोठा भंडारा घालण्यास उद्युक्त करीत, जेणेकरून आसपासच्या प्रदेशातील मंडळींस परमार्थाची गोडी लागे. अवतार मेहेरबाबा, जे. कृष्णमूर्ती, फकीरबाबा, गोविंदस्वामी उपळेकर यांसारख्या विभूतींना महाराज स्वतः जाऊन भेटत व आपल्या भक्तांसही त्यांचे दर्शन करवीत. महाराजांच्या भक्तांत सर्व थरांतले भक्त असत. 'देवाला प्रसन्न करून घेण्यापेक्षा माणसाने आपल्यातले सर्व विकार, दोष घालवून स्वतःतले दिव्यत्व प्रगट करावे, मग देवास बाहेर शोधण्याची आवश्यकता नाही,' असे महाराजांचे सांगणे असे. शंकर महाराजांनी पूर्वकल्पना देऊन, सांगून वैशाख शु. अष्टमी, शके १८६९ (इ.स. १९४७) या दिवशी पुणे येथे देह ठेवला. त्यांची समाधी पुणे-सातारा रोडवर स्वारगेटपासून साधारणपणे ४ कि.मी.वर आहे. येथे त्रिकाळ आरती, दर दुर्गाष्टमीला भजनासह पालखी व वैशाख शु. प्रतिपदा ते अष्टमी असा उत्सव भव्य प्रमाणात साजरा होतो.

— अविनाश हळबे

**संदर्भ :**

१. *तांदळे, ज्ञानेश्वर; 'श्री शंकर महाराज'.*
२. *योगी ज्ञाननाथजी; 'श्री शंकर महाराज'.*

## शंकराचार्य विद्याशंकर भारती

***कुलकर्णी, रामचंद्र नरहर***

**दत्तसंप्रदाय, हिंदू धर्म प्रसारक**

**२१ मे १९२३ – ७ फेब्रुवारी २०११**



करवीरपीठ (कोल्हापूर) अधिपती पू. जगद्गुरू शंकराचार्य विद्याशंकर भारती म्हणजेच पूर्वाश्रमीचे रामचंद्र नरहर कुलकर्णी (कऱ्हाडकर) यांचा जन्म कोळे - नरसिंहपूर, जि. सांगली येथे झाला. रामचंद्रबुवांचे वडील नरसिंहपूर येथे नरसिंहाची पूजा आणि शेती करून राहत होते. नरहरबुवा स्वरभास्कर बखलेबुवा यांचे शिष्य व बालगंधर्व व मा. कृष्णराव यांचे संगीत शिक्षणातील सहाध्यायी होते. बुवांच्यामुळे घरातील धार्मिक संस्कार, संगीताचा व कीर्तनाचा वस्तुपाठ त्यांच्यावर झाला होता.



मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण झाल्यावर पुढे त्यांचा विवाह होऊन त्यांना पाच मुलगे व दोन मुली अशी अपत्ये झाली.

नरहरबुवा यांनी आपली स्वरवाणी संपूर्ण जीवनभर कीर्तनसेवेसाठी खर्ची घातली. लहान वयातच रामचंद्रबुवांचे मातृछत्र हरपल्यामुळे नरहरबुवांनी माता-पिता व गुरू या भूमिकेतून रामचंद्रबुवांना स्थिरता प्राप्त करून दिली. पुढे रामचंद्रबुवांचा विवाह झाला. त्यानंतर १९४२ च्या 'भारत छोडो' या आंदोलनात क्रांतिवीर नाना पाटील यांच्याबरोबर ते चळवळीत सहभागी झाले. पाटलांच्या सहवासात त्यांनी स्वातंत्र्य सैनिकाचे कार्य केले. तथापि, वडिलांचा वारसा पुढे सुरू ठेवण्याच्या दृष्टीने त्यांनी 'कऱ्हाडकर कीर्तन पठडी' सुरू ठेवली. सन १९४३ ते १९५३ दरम्यान त्यांनी वडिलांबरोबर पेटी वाजवून साथ दिली. सन १९५३ ते १९५६ दरम्यान सलग चार वर्षे श्री चंद्रेश्वर मंदिर, ऑपेरा हाउस, मुंबई येथे चतुर्मास केल्याबद्दल त्या मंदिराच्या वतीने गोविंद आफळे यांच्या हस्ते व रामचंद्र शिरवळकर यांच्या उपस्थितीत 'सुवर्णपदक' देऊन त्यांचा गौरव करण्यात आला. १९६७ साली नरहरबुवा निवर्तले. पुढे संपूर्ण जबाबदारी रामचंद्रबुवांवर आली. आता त्यांनी कीर्तनाच्या निमित्ताने गावोगावी कीर्तनसुगंध पसरविला. महाराष्ट्र, गुजरात, मध्यप्रदेशात सर्वत्र त्यांनी कीर्तन सेवा केली. यातूनच ते विरागी बनू लागले.

यातूनच पुढे त्यांची भेट उगारचे यती महाराज यांच्याशी झाली. आध्यात्मिक विचार अंतर्मुख झाले. त्यांनी दोन वेळा गायत्री पुरश्चरण केले. रोज श्रीगुरुचरित्र वाचन, दत्तोपासना सुरू होती, ती दृढ झाली. त्याबरोबर गणेश उपासनाही सुरू होती. ते काही काळ कऱ्हाडला राहिले म्हणून त्यांना 'कऱ्हाडकर बुवा' म्हणून ओळखू लागले. समाजात ते एक प्रतिष्ठित नाव झाले. समाजावर त्यांचा प्रभाव होता. एक अत्यंत मार्मिक, हजरजबाबी, विनोदी म्हणून त्यांचा सर्वत्र लौकिक होता. प्रपंचाबरोबर त्यांनी धर्मकार्य केले, समाजकार्यही केले. त्यांनी कीर्तन क्षेत्रात अनेक विद्यार्थी तयार केले, उदा. दत्ताबुवा घाग, जोगळेकर, गोखले असे अनेक नामांकित कीर्तनकार आहेत. एकूण विरक्त वृत्तीला यतिमहाराज उगार यांचे मार्गदर्शन मिळून दि. १२ मार्च १९८३ रोजी त्यांनी संन्यासाश्रम स्वीकारला व त्यांचे नाव विद्याशंकर भारती हे झाले. त्यांनी करवीरपीठाची प्रतिष्ठा स्वप्रयत्न व त्यागी वृत्तीने वाढविली. त्यांना चिलये महाराज व बेळगावचे हरिकाका यांचेही कृपाशीर्वाद लाभले. पीठाधीश या नात्याने त्यांनी आवश्यक असणारे ज्ञान यतिमहाराजांकडून घेतले. शास्त्रधर्माचेही ज्ञान घेतले.

विद्याशंकर भारती यांनी करवीरपीठ मठाचा जीर्णोद्धार केला. या काळात यशवंत काशिनाथ कुलकर्णी (अप्पा कुलकर्णी) शिरटीकर हे मठात आचार्यांबरोबर सेवा साहाय्यक होते. (तेच विद्यमान श्री शंकराचार्य विद्यानृसिंह भारती होत.) त्यांनी आचार्यांबरोबर राहून सर्वत्र संचारही केला.

श्री शंकराचार्य विद्याशंकर भारतींनी आद्य जगद्‌गुरू शंकराचार्यांचे कार्य केले. विश्व हिंदू परिषदेबरोबर राहून हिंदू धर्माच्या जागरणाचे कार्य केले. त्यांनी हिंदू समाजातील समष्टी जीवनात समतोल ठेवून तो तेजस्वी आणि धर्मशील बनविण्याचे कार्य केले. सुमारे वीस वर्षे सतत संचार करून करवीरपीठास देशात एक श्रेष्ठ व जागृत धर्मपीठ म्हणून नावलौकिक प्राप्त करून दिला. आचार्यांनी कारगिल युद्धाच्या वेळी, लातूर भूकंपाच्या वेळी सर्वप्रथम तेथे पोहोचून मठाच्या वतीने मदत केली.

रामजन्मभूमीच्या वेळी अनेक साधू- संतांना एकत्र केले. नवनवीन उपक्रम राबविले. धर्मांतरे रोखली. ज्यांची धर्मांतरे झाली होती, त्यांना परत हिंदू धर्मात आणले. आचार्य हे लोकमान्य शंकराचार्य होते. त्यांनी समाजात सक्रिय सहभाग घेतला. आचार्य पदावर असूनही एक सुजाण नागरिक म्हणून त्यांनी कोल्हापूरच्या समाजकारणात भाग घेतला होता.

वंदनीय आचार्यांनी हिंदू धर्मात समाज जागृती करून संघटन केले. जीवनात एक आदर्श, धैर्य, सहानुभूती, सहिष्णुता या दैवी गुणांनी समाजात वस्तुपाठ निर्माण केला. कोणत्याही संकटाला न घाबरता तेजस्वी व विजिगीषूवृत्तीने जगात 'जगद्गुरू' हे नाव सार्थकी ठरविले. अशा विचारांचा प्रभाव व प्रत्यक्ष कृतीवर आचार्यांचा विशेष कटाक्ष होता.

आचार्यांनी श्री विद्यानृसिंह भारती यांच्याकडे २००५ साली पुढील कार्यासाठी सूत्रे दिली व 'क्षेत्रसंन्यासी' म्हणून पुढे ते करवीरपीठात राहिले आणि करवीर क्षेत्रातच देह सोडला.

– डॉ. अजित कुलकर्णी

## श्रीधरस्वामी

***पतकी, श्रीधर नारायण***

**समर्थ संप्रदाय**

**७ डिसेंबर १९०८ – १९ एप्रिल १९७३**

**मा**र्गशीर्ष पौर्णिमेला लाडचिंचोळी या गावी श्रीधरस्वामी यांचा जन्म झाला. नारायणराव व कमळाबाई यांचे हे सुपुत्र, ते मूळचे महाराष्ट्रातील देगलूर या गावचे होते. त्यांचे कुटुंब देशस्थ ऋग्वेदी, वैदिक कुलपरंपरेतील होते. त्यांचे पूर्ण नाव श्रीधर नारायण पतकी होते. असे सांगतात, की पतकी घराण्याला त्यांची सातवी पिढी निर्वंश होईल हा शाप होता. परंतु एक विश्वउद्धारक पुत्र त्यांच्या कुळात जन्माला येणार होता. कमळाबाईंना रेणुका ही एक सावत्र कन्या आणि त्र्यंबक, गोविंद व गोदावरी ही अपत्ये होती. शापाचा वृत्तान्त कुलपुरोहित ज्योतिषी यांच्याकडून समजल्यावर



नारायणरावांनी गाणगापूर येथे अनुष्ठान केले. भगवान दत्तप्रभूंच्या कृपाशीर्वादाने ते स्वत: या दांपत्याच्या उदरी जन्माला आले. दुर्दैवाने श्रीधरांच्या तिसऱ्या वर्षीच वडील निधन पावले. वडील गेल्यावर मातु:श्रींनी हैद्राबाद येथे बिऱ्हाड ठेवले. तेथे कमळाबाईंना नारायण महाराज रामदासी यांच्या मठात सेवेचा संस्कार झाला. रामजप आणि श्रीदासबोध पारायण यांचा परिपाठ घडला. बाल श्रीधरांच्या मनावरही हा संस्कार घडला. लहानपणी श्रीधर हे खोडकर होते; परंतु मुंज संस्कारानंतर संध्यादिवंदन, स्तोत्र पाठांतर, रुद्र, वैश्वदेव, त्रिसुपर्ण इ.चे संस्कार घडले.

लौकिक दृष्टीने त्यांचे शिक्षण हे विवेकवर्धिनी हायस्कूल, हैद्राबाद येथे झाले. श्रीधरांच्या बाराव्या वर्षीच मातु:श्री गेल्या. सावत्र भगिनीचे लग्न झाले आणि एकामागे एक करीत सर्व भावंडे देवाघरी गेली. नातेहितसंबंधी पाश संपल्यावर श्रीधर गुलबर्ग्याला मावशीकडे आले. त्यांचे लहानपण अत्यंत कष्टप्रद गेले. मात्र, उपासना व अभ्यास सुरू होता.

हा काळ स्वातंत्र्यचळवळीचा होता. गुलबर्ग्यात अनेक स्वातंत्र्यसैनिक येत असत. समाजात, तसेच तेथील शाळेत राजकीय, सामाजिक, धार्मिक इ. क्षेत्रांतील मंडळी येत असत. त्या समारंभात श्रीधर स्वयंसेवकाचे काम करीत असत. येणाऱ्या लोकांच्या

श

मनांत श्रीधरबद्दल प्रेम व जिव्हाळा निर्माण झाला. श्री. वि.गं. केतकर यांच्या सहकार्याने १९२४ साली पुण्यातील पुणे विद्यार्थी गृह (त्या वेळचे अनाथ विद्यार्थी गृह) येथे त्यांचे हायस्कूल शिक्षण पूर्ण झाले. या शाळेतील पळणीटकर गुरुजी यांच्या मार्गदर्शनाने १९२७ साली दसऱ्याच्या दिवशी ते पुणे सोडून सज्जनगड परळी-सातारा येथे गेले. तेथे त्यांनी काया-वाचा-मनाने कठोर साधना केली. १९३० साली त्यांना समर्थ रामदासांचे दर्शन झाले. त्यांनी श्रीधरांस दक्षिणेकडे जाण्याची आज्ञा केली. श्रीधर गड सोडून चालत गोकर्णाकडे गेले. कर्नाटकात शिवानंदस्वामींच्या आश्रमात, कोडसाद्री वनवासी सोरबा भागात त्यांनी साधना केली.

त्यांनी १९४२ मध्ये विजयादशमीला संन्यास घेतला. श्रीधरस्वामींच्या आचार-विचारांत प्राचीन ऋषिमंडळींचा आदर्श दिसत होता. ध्येयनिष्ठा, प्रखर प्रज्ञा, प्रतिभा-संपन्नता, मृदुभाषी अशा सर्वांनी त्यांचे समाजात आदरस्थान निर्माण झाले. श्रीधर स्वामींनी संपूर्ण भारतभर भ्रमण करून लोकजागृती व धर्मजागृती केली. वेदांची पारायणे, यज्ञयागादी अनुष्ठाने, देवत्वाचा जीर्णोद्धार केला. कायमस्वरूपी समर्थसेवेसाठी १९५० साली त्यांनी श्री समर्थ सेवा मंडळाची स्थापना करून, समर्थ प्रचार दौऱ्याची सुरुवात करून समाजात जागृती केली आणि समर्थकार्याची प्रसारसेवा केली. १९५३ साली श्रीक्षेत्र वरदपूर येथे अगस्ती ऋषींच्या तपोभूमीत त्यांनी ‘श्रीधराश्रम’ स्थापन केला. कर्नाटकातील सागर जिल्ह्यात हे गाव आहे. या भागात श्रीधरस्वामींनी विपुल धर्मकार्य व सामाजिक कार्य केले. आपल्या जीवनात तेरा वेळा एकांतात तपसाधना करून, त्या तपोबलावर त्यांनी लोकांचे जीवन सुखी केले. राष्ट्र- कार्यातही तपसाधनांचा उपयोग केला. श्रीधरस्वामींनी अनेक स्तोत्रे, संस्कृत, कानडी, मराठी, इंग्रजी भाषेत करून तीसएक ग्रंथांची निर्मिती केली.

श्रीधरस्वामी १९६७ साली वरदपूर येथे दीर्घकाळ एकांतासाठी राहिले; परंतु चैत्र वद्य द्वितीया, १९ एप्रिल १९७३ रोजी त्यांनी आपली जीवनज्योत अनंतात विलीन केली. तेथेच त्यांची समाधी आहे. एकूण साधना, उपासना व सिद्धावस्था यांच्या आचारविचारांचे प्रबोधनात्मक वस्तुपाठ श्रीधरस्वामींनी समाजात मांडले हेच त्यांच्या अवतारकार्याचे वैशिष्ट्य होय.

— डॉ. अजित कुलकर्णी

**संदर्भ :**

१. *डॉ. कुलकर्णी अजित; ‘प.पू. श्रीधरस्वामींचे संक्षिप्त चरित्र’.*
२. *मारुतीबुवा रामदासी; ‘भगवान श्रीधरस्वामींचे चरित्र’.*
३. *दत्ताबुवा रामदासी; ‘श्रीधरस्वामींचे चरित्र’.*

***

# श

## शंकर महाराज
**दत्तावतारी सिद्धपुरुष, साक्षात्कारी संत**
**जन्मदिनांक अनुपलब्ध – १९४७**



महाराष्ट्राच्या नाशिक जिल्ह्यातील, सटाणा तालुक्यातील अंतापूर या गावात चिमणाजी नावाच्या निपुत्रिक शिवभक्ताला दीड तपाच्या पुत्रप्राप्तीच्या अनुष्ठानाचे जणूकाही फळ म्हणून, दृष्टान्ताप्रमाणे एका झाडाखाली दोन वर्षांचे एक अजानुबाहू तेजस्वी बालक सापडले. पतिपत्नींनी या बाळास घरी आणून त्याचे शंकर हे नाव ठेवले व अत्यंत प्रेमाने त्याचा प्रतिपाळ केला. शंकर जन्मतः सिद्धावस्थेत होता, त्यामुळे त्याच्या बाललीलांतून त्याचे दिव्यत्व लक्षात येऊ लागले. चिमणाजी सहकुटुंब पंढरपूरला जात असताना, वाटेत शंकरला प्लेगने गाठले. शंकरने आपले गुरू अक्कलकोटच्या स्वामीसमर्थांचा धावा केल्यावर, स्वामींनी प्रगट होऊन प्लेगच्या गाठी कापून काढल्या. शंकर प्लेगमधून बरा झाला; पण गाठी कापल्यामुळे शरीर मात्र अष्टावक्र झाले. शंकरने घर सोडून विश्वसंचारासाठी निघण्यापूर्वी मातापित्यांना आपला वियोग जाणवू नये म्हणून पुत्रप्राप्तीचा आशीर्वाद दिला.

शंकरच्या आशीर्वादाने चिमणाजी दाम्पत्याला दोन जुळे मुलगे झाले. त्यानंतर मात्र शंकरने घर सोडले व हिमालयातील केदारेश्वर, प्रयाग, सातपुड्याच्या डोंगरात काही काळ भ्रमंती करून सोलापुरातील शुभराय मठात येता झाला. तेथील दत्तभक्त महंत जनार्दनस्वामींसमोर उभे राहून ‘अल्लख’ हा पुकारा करताच शंकरच्या जागी श्रीदत्तात्रेयांचे दर्शन झाले. स्वामींनी शंकरसमोर लोटांगण घालून त्यास प्रेमाने मठात ठेवून घेतले. पुढे अक्कलकोट-त्र्यंबकेश्वरमार्गे शंकरचे पुण्यात आगमन झाले.

पुण्यातील संत हजरत बाबाजान यांनी शंकरचा पुत्राप्रमाणे प्रतिपाळ केला. इथून पुढे बहुतांशी शंकरचे वास्तव्य पुण्यातच होऊन त्याचे दिव्यत्व लक्षात आल्यामुळे भक्तगण त्यांना ‘शंकर महाराज’ म्हणून संबोधू लागले. भक्तकार्यार्थ महाराजांचा महाराष्ट्रभर संचार होत असे. श्रीमहाराजांची उंची पाच फुटांच्या आसपास असून ते कायम ‘अवधूतावस्थे’त असत. कधी केस व दाढी अस्ताव्यस्त वाढलेली असे, तर कधी तुळतुळीत गोटा. अंगावर लंगोटीपासून साहेबी थाटाच्या सुटापर्यंत, कोणतेही आणि कोणाचेही कपडे असत. स्मितहास्यापासून सातमजली हास्यापर्यंत सर्व प्रकार दिसून येत, त्यातून शरीर अष्टावक्र! या विक्षिप्त प्रकारामुळे प्रथमदर्शनी सर्वांना ते वेडेच वाटत. स्वार्थी व पाखंडी लोक त्यांच्यापासून लांब राहत व खरे भक्तच टिकत.

महाराजांनी अनेकांना व्यसनमुक्त केले. महाराजांस अठरा सिद्धी वश असून त्यांचा वापर ते भक्तास प्रबोधन, भक्तसंकटनिवारण यांसाठीच करीत. लायक व्यक्तींस

महाराज स्वतः शोधून त्यांना पारमार्थिक मार्गदर्शन करीत. त्यांना योग्य अवस्थेत नेऊन ठेवत असत, मग ती व्यक्ती आपली भक्त असो वा नसो.

'अधिकार तैसा करू उपदेश' या चरणाप्रमाणे महाराजांची बोध करण्याची रीत असे. ते स्वतः फारच कमी बोलत. बोलले तर मुखातून त्यांचे शब्द बोबडे येत. एखाद्या अंतरंगी भक्तास बोध करावयाचा झाला, तर ते ज्ञानेश्वरीसारखा ग्रंथ आणवून, त्यातील अनुरूप ओव्या त्यास दाखवत अथवा, ताईसाहेब मेहेंदळ्यांसारख्या अधिकारी व्यक्तीस स्पर्शाने प्रेरित करून त्यांकरवी बोलत. महाराजांनी सर चुनिलाल मेहता, न्यायरत्न विनोद, ताईसाहेब मेहेंदळे यांसारख्या भक्तांस नुसत्या स्पर्श वा दृष्टिक्षेपाने परमार्थाच्या उच्च अवस्थेत नेऊन ठेवले होते. महाराज दत्तावतारी असले तरी भक्तांच्या बोधासाठी ज्ञानेश्वरीचा वापर करीत. डॉ. धनेश्वरांसारख्या अधिकारी भक्ताला मार्गदर्शन करताना त्यांच्याकडून त्यांनी ज्ञानेश्वरीची ओवीन् ओवी पिंजून घेतली होती. ज्ञानेश्वरमाउलींवर महाराजांचे अफाट प्रेम होते. इतके, की कोणी 'ज्ञानेश्वरमाउली' असा शब्द जरी उच्चारला, तरी तो ऐकताच ते भावावस्थेत जाऊन त्यातून मूळपदावर येण्यास त्यांना खूप वेळ लागे. या कारणामुळे त्यांचा सत्संग मिळविण्यासाठी आलेले अंतरंगी भक्त चुकूनसुद्धा तोंडाने ज्ञानेश्वरमाउली हा शब्द उच्चारत नसत!

महाराज भक्ताला त्याच्या धर्मग्रंथांतील वचने म्हणून दाखवून बोध देत. मग ती भाषा मराठी असो इंग्लिश वा पर्शियन! उपासनेची सुरुवात महाराज आई-वडील व कुलदेवता इथून करावयास सांगत. त्यांच्याकडे दुर्लक्ष करून परमार्थ करू पाहणाऱ्यांची ते निर्भर्त्सना करीत.

ज्याचा भाव शुद्ध, त्याच्याकडे महाराज आपणहून येत व प्रसंगी मुक्कामही करीत; मग तो सरदार मेहेंदळ्यांचा आलिशान महाल असो वा मामा ढेकणे यांचे जमीन उखडलेले घर असो. सर्व ठिकाणी महाराज सारख्याच आनंदाने राहत. प्रसंगी, महाराज एखाद्या देवस्थानात मुक्काम करून तेथील मंडळींस देवाचा उत्सव, हरिनाम सप्ताह, निरनिराळे याग, ज्ञानेश्वरी-गुरुचरित्र-दासबोध पारायण करावयास सांगून शेवटी मोठा भंडारा घालण्यास उद्युक्त करीत, जेणेकरून आसपासच्या प्रदेशातील मंडळींस परमार्थाची गोडी लागे. अवतार मेहेरबाबा, जे. कृष्णमूर्ती, फकीरबाबा, गोविंदस्वामी उपळेकर यांसारख्या विभूतींना महाराज स्वतः जाऊन भेटत व आपल्या भक्तांसही त्यांचे दर्शन करवीत. महाराजांच्या भक्तांत सर्व थरांतले भक्त असत. 'देवाला प्रसन्न करून घेण्यापेक्षा माणसाने आपल्यातले सर्व विकार, दोष घालवून स्वतःतले दिव्यत्व प्रगट करावे, मग देवास बाहेर शोधण्याची आवश्यकता नाही,' असे महाराजांचे सांगणे असे. शंकर महाराजांनी पूर्वकल्पना देऊन, सांगून वैशाख शु. अष्टमी, शके १८६९ (इ.स. १९४७) या दिवशी पुणे येथे देह ठेवला. त्यांची समाधी पुणे-सातारा रोडवर स्वारगेटपासून साधारणपणे ४ कि.मी.वर आहे. येथे त्रिकाळ आरती, दर दुर्गाष्टमीला भजनासह पालखी व वैशाख शु. प्रतिपदा ते अष्टमी असा उत्सव भव्य प्रमाणात साजरा होतो.

— अविनाश हळबे

**संदर्भ :**

१. *तांदळे, ज्ञानेश्वर; 'श्री शंकर महाराज'.*
२. *योगी ज्ञाननाथजी; 'श्री शंकर महाराज'.*

## शंकराचार्य विद्याशंकर भारती

***कुलकर्णी, रामचंद्र नरहर***

**दत्तसंप्रदाय, हिंदू धर्म प्रसारक**

**२१ मे १९२३ – ७ फेब्रुवारी २०११**

करवीरपीठ (कोल्हापूर) अधिपती पू. जगद्गुरू शंकराचार्य विद्याशंकर भारती म्हणजेच पूर्वाश्रमीचे रामचंद्र नरहर कुलकर्णी (कऱ्हाडकर) यांचा जन्म कोळे - नरसिंहपूर, जि. सांगली येथे झाला. रामचंद्रबुवांचे वडील नरसिंहपूर येथे नरसिंहाची पूजा आणि शेती करून राहत होते. नरहरबुवा स्वरभास्कर बखलेबुवा यांचे शिष्य व बालगंधर्व व मा. कृष्णराव यांचे संगीत शिक्षणातील सहाध्यायी होते. बुवांच्यामुळे घरातील धार्मिक संस्कार, संगीताचा व कीर्तनाचा वस्तुपाठ त्यांच्यावर झाला होता.



मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण झाल्यावर पुढे त्यांचा विवाह होऊन त्यांना पाच मुलगे व दोन मुली अशी अपत्ये झाली.

नरहरबुवा यांनी आपली स्वरवाणी संपूर्ण जीवनभर कीर्तनसेवेसाठी खर्ची घातली. लहान वयातच रामचंद्रबुवांचे मातृछत्र हरपल्यामुळे नरहरबुवांनी माता-पिता व गुरू या भूमिकेतून रामचंद्रबुवांना स्थिरता प्राप्त करून दिली. पुढे रामचंद्रबुवांचा विवाह झाला. त्यानंतर १९४२ च्या 'भारत छोडो' या आंदोलनात क्रांतिवीर नाना पाटील यांच्याबरोबर ते चळवळीत सहभागी झाले. पाटलांच्या सहवासात त्यांनी स्वातंत्र्य सैनिकाचे कार्य केले. तथापि, वडिलांचा वारसा पुढे सुरू ठेवण्याच्या दृष्टीने त्यांनी 'कऱ्हाडकर कीर्तन पठडी' सुरू ठेवली. सन १९४३ ते १९५३ दरम्यान त्यांनी वडिलांबरोबर पेटी वाजवून साथ दिली. सन १९५३ ते १९५६ दरम्यान सलग चार वर्षे श्री चंद्रेश्वर मंदिर, ऑपेरा हाउस, मुंबई येथे चतुर्मास केल्याबद्दल त्या मंदिराच्या वतीने गोविंद आफळे यांच्या हस्ते व रामचंद्र शिरवळकर यांच्या उपस्थितीत 'सुवर्णपदक' देऊन त्यांचा गौरव करण्यात आला. १९६७ साली नरहरबुवा निवर्तले. पुढे संपूर्ण जबाबदारी रामचंद्रबुवांवर आली. आता त्यांनी कीर्तनाच्या निमित्ताने गावोगावी कीर्तनसुगंध पसरविला. महाराष्ट्र, गुजरात, मध्यप्रदेशात सर्वत्र त्यांनी कीर्तन सेवा केली. यातूनच ते विरागी बनू लागले.

यातूनच पुढे त्यांची भेट उगारचे यती महाराज यांच्याशी झाली. आध्यात्मिक विचार अंतर्मुख झाले. त्यांनी दोन वेळा गायत्री पुरश्चरण केले. रोज श्रीगुरुचरित्र वाचन, दत्तोपासना सुरू होती, ती दृढ झाली. त्याबरोबर गणेश उपासनाही सुरू होती. ते काही काळ कऱ्हाडला राहिले म्हणून त्यांना 'कऱ्हाडकर बुवा' म्हणून ओळखू लागले. समाजात ते एक प्रतिष्ठित नाव झाले. समाजावर त्यांचा प्रभाव होता. एक अत्यंत मार्मिक, हजरजबाबी, विनोदी म्हणून त्यांचा सर्वत्र लौकिक होता. प्रपंचाबरोबर त्यांनी धर्मकार्य केले, समाजकार्यही केले. त्यांनी कीर्तन क्षेत्रात अनेक विद्यार्थी तयार केले, उदा. दत्ताबुवा घाग, जोगळेकर, गोखले असे अनेक नामांकित कीर्तनकार आहेत. एकूण विरक्त वृत्तीला यतिमहाराज उगार यांचे मार्गदर्शन मिळून दि. १२ मार्च १९८३ रोजी त्यांनी संन्यासाश्रम स्वीकारला व त्यांचे नाव विद्याशंकर भारती हे झाले. त्यांनी करवीरपीठाची प्रतिष्ठा स्वप्रयत्न व त्यागी वृत्तीने वाढविली. त्यांना चिलये महाराज व बेळगावचे हरिकाका यांचेही कृपाशीर्वाद लाभले. पीठाधीश या नात्याने त्यांनी आवश्यक असणारे ज्ञान यतिमहाराजांकडून घेतले. शास्त्रधर्माचेही ज्ञान घेतले.

विद्याशंकर भारती यांनी करवीरपीठ मठाचा जीर्णोद्धार केला. या काळात यशवंत काशिनाथ कुलकर्णी (अप्पा कुलकर्णी) शिरटीकर हे मठात आचार्यांबरोबर सेवा साहाय्यक होते. (तेच विद्यमान श्री शंकराचार्य विद्यानृसिंह भारती होत.) त्यांनी आचार्यांबरोबर राहून सर्वत्र संचारही केला.

श्री शंकराचार्य विद्याशंकर भारतींनी आद्य जगद्गुरू शंकराचार्यांचे कार्य केले. विश्व हिंदू परिषदेबरोबर राहून हिंदू धर्माच्या जागरणाचे कार्य केले. त्यांनी हिंदू समाजातील समष्टी जीवनात समतोल ठेवून तो तेजस्वी आणि धर्मशील बनविण्याचे कार्य केले. सुमारे वीस वर्षे सतत संचार करून करवीरपीठास देशात एक श्रेष्ठ व जागृत धर्मपीठ म्हणून नावलौकिक प्राप्त करून दिला. आचार्यांनी कारगिल युद्धाच्या वेळी, लातूर भूकंपाच्या वेळी सर्वप्रथम तेथे पोहोचून मठाच्या वतीने मदत केली.

रामजन्मभूमीच्या वेळी अनेक साधू- संतांना एकत्र केले. नवनवीन उपक्रम राबविले. धर्मांतरे रोखली. ज्यांची धर्मांतरे झाली होती, त्यांना परत हिंदू धर्मात आणले. आचार्य हे लोकमान्य शंकराचार्य होते. त्यांनी समाजात सक्रिय सहभाग घेतला. आचार्य पदावर असूनही एक सुजाण नागरिक म्हणून त्यांनी कोल्हापूरच्या समाजकारणात भाग घेतला होता.

वंदनीय आचार्यांनी हिंदू धर्मात समाज जागृती करून संघटन केले. जीवनात एक आदर्श, धैर्य, सहानुभूती, सहिष्णुता या दैवी गुणांनी समाजात वस्तुपाठ निर्माण केला. कोणत्याही संकटाला न घाबरता तेजस्वी व विजिगीषूवृत्तीने जगात 'जगद्गुरू' हे नाव सार्थकी ठरविले. अशा विचारांचा प्रभाव व प्रत्यक्ष कृतीवर आचार्यांचा विशेष कटाक्ष होता.

आचार्यांनी श्री विद्यानृसिंह भारती यांच्याकडे २००५ साली पुढील कार्यासाठी सूत्रे दिली व 'क्षेत्रसंन्यासी' म्हणून पुढे ते करवीरपीठात राहिले आणि करवीर क्षेत्रातच देह सोडला.

– डॉ. अजित कुलकर्णी

## श्रीधरस्वामी

***पतकी, श्रीधर नारायण***

**समर्थ संप्रदाय**

**७ डिसेंबर १९०८ – १९ एप्रिल १९७३**



**मा**र्गशीर्ष पौर्णिमेला लाडचिंचोळी या गावी श्रीधरस्वामी यांचा जन्म झाला. नारायणराव व कमळाबाई यांचे हे सुपुत्र, ते मूळचे महाराष्ट्रातील देगलूर या गावचे होते. त्यांचे कुटुंब देशस्थ ऋग्वेदी, वैदिक कुलपरंपरेतील होते. त्यांचे पूर्ण नाव श्रीधर नारायण पतकी होते. असे सांगतात, की पतकी घराण्याला त्यांची सातवी पिढी निर्वंश होईल हा शाप होता. परंतु एक विश्वउद्धारक पुत्र त्यांच्या कुळात जन्माला येणार होता. कमळाबाईंना रेणुका ही एक सावत्र कन्या आणि त्र्यंबक, गोविंद व गोदावरी ही अपत्ये होती. शापाचा वृत्तान्त कुलपुरोहित ज्योतिषी यांच्याकडून समजल्यावर नारायणरावांनी गाणगापूर येथे अनुष्ठान केले. भगवान दत्तप्रभूंच्या कृपाशीर्वादाने ते स्वत: या दांपत्याच्या उदरी जन्माला आले. दुर्दैवाने श्रीधरांच्या तिसऱ्या वर्षीच वडील निधन पावले. वडील गेल्यावर मातु:श्रींनी हैद्राबाद येथे बिऱ्हाड ठेवले. तेथे कमळाबाईंना नारायण महाराज रामदासी यांच्या मठात सेवेचा संस्कार झाला. रामजप आणि श्रीदासबोध पारायण यांचा परिपाठ घडला. बाल श्रीधरांच्या मनावरही हा संस्कार घडला. लहानपणी श्रीधर हे खोडकर होते; परंतु मुंज संस्कारानंतर संध्यादिवंदन, स्तोत्र पाठांतर, रुद्र, वैश्वदेव, त्रिसुपर्ण इ.चे संस्कार घडले.

लौकिक दृष्टीने त्यांचे शिक्षण हे विवेकवर्धिनी हायस्कूल, हैद्राबाद येथे झाले. श्रीधरांच्या बाराव्या वर्षीच मातु:श्री गेल्या. सावत्र भगिनीचे लग्न झाले आणि एकामागे एक करीत सर्व भावंडे देवाघरी गेली. नातेहितसंबंधी पाश संपल्यावर श्रीधर गुलबर्ग्याला मावशीकडे आले. त्यांचे लहानपण अत्यंत कष्टप्रद गेले. मात्र, उपासना व अभ्यास सुरू होता.

श

हा काळ स्वातंत्र्यचळवळीचा होता. गुलबर्ग्यात अनेक स्वातंत्र्यसैनिक येत असत. समाजात, तसेच तेथील शाळेत राजकीय, सामाजिक, धार्मिक इ. क्षेत्रांतील मंडळी येत असत. त्या समारंभात श्रीधर स्वयंसेवकाचे काम करीत असत. येणाऱ्या लोकांच्या

मनांत श्रीधरबद्दल प्रेम व जिव्हाळा निर्माण झाला. श्री. वि.गं. केतकर यांच्या सहकार्याने १९२४ साली पुण्यातील पुणे विद्यार्थी गृह (त्या वेळचे अनाथ विद्यार्थी गृह) येथे त्यांचे हायस्कूल शिक्षण पूर्ण झाले. या शाळेतील पळणीटकर गुरुजी यांच्या मार्गदर्शनाने १९२७ साली दसऱ्याच्या दिवशी ते पुणे सोडून सज्जनगड परळी-सातारा येथे गेले. तेथे त्यांनी काया-वाचा-मनाने कठोर साधना केली. १९३० साली त्यांना समर्थ रामदासांचे दर्शन झाले. त्यांनी श्रीधरांस दक्षिणेकडे जाण्याची आज्ञा केली. श्रीधर गड सोडून चालत गोकर्णाकडे गेले. कर्नाटकात शिवानंदस्वामींच्या आश्रमात, कोडसाद्री वनवासी सोरबा भागात त्यांनी साधना केली.

त्यांनी १९४२ मध्ये विजयादशमीला संन्यास घेतला. श्रीधरस्वामींच्या आचार-विचारांत प्राचीन ऋषिमंडळींचा आदर्श दिसत होता. ध्येयनिष्ठा, प्रखर प्रज्ञा, प्रतिभा-संपन्नता, मृदुभाषी अशा सर्वांनी त्यांचे समाजात आदरस्थान निर्माण झाले. श्रीधर स्वामींनी संपूर्ण भारतभर भ्रमण करून लोकजागृती व धर्मजागृती केली. वेदांची पारायणे, यज्ञयागादी अनुष्ठाने, देवत्वाचा जीर्णोद्धार केला. कायमस्वरूपी समर्थसेवेसाठी १९५० साली त्यांनी श्री समर्थ सेवा मंडळाची स्थापना करून, समर्थ प्रचार दौऱ्याची सुरुवात करून समाजात जागृती केली आणि समर्थकार्याची प्रसारसेवा केली. १९५३ साली श्रीक्षेत्र वरदपूर येथे अगस्ती ऋषींच्या तपोभूमीत त्यांनी ‘श्रीधराश्रम’ स्थापन केला. कर्नाटकातील सागर जिल्ह्यात हे गाव आहे. या भागात श्रीधरस्वामींनी विपुल धर्मकार्य व सामाजिक कार्य केले. आपल्या जीवनात तेरा वेळा एकांतात तपसाधना करून, त्या तपोबलावर त्यांनी लोकांचे जीवन सुखी केले. राष्ट्र- कार्यातही तपसाधनांचा उपयोग केला. श्रीधरस्वामींनी अनेक स्तोत्रे, संस्कृत, कानडी, मराठी, इंग्रजी भाषेत करून तीसएक ग्रंथांची निर्मिती केली.

श्रीधरस्वामी १९६७ साली वरदपूर येथे दीर्घकाळ एकांतासाठी राहिले; परंतु चैत्र वद्य द्वितीया, १९ एप्रिल १९७३ रोजी त्यांनी आपली जीवनज्योत अनंतात विलीन केली. तेथेच त्यांची समाधी आहे. एकूण साधना, उपासना व सिद्धावस्था यांच्या आचारविचारांचे प्रबोधनात्मक वस्तुपाठ श्रीधरस्वामींनी समाजात मांडले हेच त्यांच्या अवतारकार्याचे वैशिष्ट्य होय.

– डॉ. अजित कुलकर्णी

**संदर्भ :**

१. *डॉ. कुलकर्णी अजित; ‘प.पू. श्रीधरस्वामींचे संक्षिप्त चरित्र’.*
२. *मारुतीबुवा रामदासी; ‘भगवान श्रीधरस्वामींचे चरित्र’.*
३. *दत्ताबुवा रामदासी; ‘श्रीधरस्वामींचे चरित्र’.*

***

श

# स

## सहस्रबुद्धे, रावसाहेब
***सहस्रबुद्धे बाबा***
**स्वरूप संप्रदाय**
**१४ नोव्हेंबर १८८३ – १७ ऑगस्ट १९५४**



**स**द्‌गुरू रामानंद बीडकर यांच्या स्वरूप संप्रदायाचा विस्तार करण्यासाठी स्वत: अक्कलकोट स्वामींनीच रावसाहेब सहस्रबुद्धे यांच्या रूपाने पुन्हा अवतार घेतला असे दत्त संप्रदायामध्ये विशेष आदराने मानले जाते. रावसाहेब तथा बाबामहाराज सहस्रबुद्धे यांचा जन्म हुबळी येथे त्रिपुरारी पौर्णिमेच्या परमपावन दिनी झाला. त्यांचे वडील विठ्ठलपंत हे अभियांत्रिकी खात्यात ओव्हरसियर होते. नोकरीनिमित्त ते कोकणातून हुबळीस आलेले होते. त्यांच्या घराण्याचे मूळ गाव कोकणातील रत्नागिरी जिल्ह्यातील 'कोतवडे' हे होय. संतकवी दासगणू यांचेही मूळ गाव कोतवडेच होते.

रावसाहेब यांचे शिक्षण हुबळी, कुरुंदवाड आणि पुणे येथे झाले. ते १८९८ साली मॅट्रिक झाले आणि १९०४ साली 'एल.सी.ई.' पदवी घेऊन अभियंता झाले. त्यांनी सार्वजनिक बांधकाम खात्यात नोकरी केली. ते १९२८ साली निवृत्त झाले व पुण्यात बीडकर महाराजांच्या मठाशेजारीच भिडेवाड्यात त्यांचे अखेरपर्यंत वास्तव्य होते. इ.स. १९०२ मध्ये रावसाहेबांच्या वडिलांचे निधन झाले. ठाण्याला त्यांचे मोठे बंधू नोकरी करीत होते, त्यांनी रावसाहेबांचे शिक्षण पूर्ण केले.

१९०४ साली रावसाहेबांचे मातृछत्र हरपले आणि ते अशा उदास अवस्थेत संत रामानंद बीडकर यांच्याकडे विशेष आकर्षित झाले. अहमदाबाद येथील हंगामी नोकरीचा राजीनामा देऊन रावसाहेब १९०९ मध्ये पुण्यात आले. रावसाहेबांनी लग्न करावे म्हणून घरच्या मंडळींनी बीडकर महाराजांकडे आग्रह धरला. अखेर गुरुआज्ञा म्हणून १९१० साली रावसाहेबांचे पुण्याजवळील जुन्नरचे बोडस यांची कन्या दुर्गाबाई यांच्याशी लग्न झाले. लग्नानंतर पत्नीचे नाव सीता असे ठेवण्यात आले.

बीडकर महाराजांच्या कृपेनेच रावसाहेबांचा संसारही सफल-सुफल झाला. त्यांना एक कन्यारत्न होते. साधनाकाळातच एके दिवशी बीडकर महाराज रावसाहेबांच्या डोक्यावर हात ठेवून 'मी तुला पर्मनंट केले आहे,' असे म्हणाले आणि रावसाहेब देहभान हरपून समाधिअवस्थेतच गेले. येथून पुढे रावसाहेब बीडकर महाराजांच्या शिष्यांपैकी प्रमुख शिष्य बनले. 'रावसाहेब माझा मोतीदाणा आहे,' असे बीडकर महाराज त्यांचे कौतुक करीत असत. साधनाकाळात काही वर्षे त्यांची अवस्था पाहून लोक त्यांना वेडे समजले आणि त्यांना चक्क वेड्यांच्या इस्पितळात दाखल केले. त्यांनी सुमारे एक वर्षभर इस्पितळात काळ कंठल्यानंतर २३ मार्च १९२७ रोजी त्यांना घरी आणले गेले. आपल्या विदेही

अवस्थेतील पतीची सीताबाईंनी ईश्वरनिष्ठेने सेवा करून व त्यांना सांभाळून संसाराच्या सर्व जबाबदाऱ्या स्वत: पुढाकार घेऊन पार पाडल्या. मुलगी चिमाताईचे लग्न त्यांनीच सर्वांच्या सहयोगाने करून दिले. दुर्गाताई यांचे १९४५ साली निधन झाले व रावसाहेबांचा प्रपंच येथेच संपला. रावसाहेब खूप अबोल होते. त्यांना चर्चा-उपदेशपर भाषण याची आवड नव्हती. सहज संवाद हाच त्यांचा उपदेश असे. त्यांचा शिष्यपरिवारही मोठा आहे. डेरवण शिवसृष्टिकर्ते विठ्ठलराव जोशी तथा दिगंबरदास, नरहरीप्रभू काळे महाराज, भाऊसाहेब आंबेकर, रामभाऊ जोगळेकर हे त्यांचे प्रमुख शिष्य होत.

रावसाहेबांना तीर्थयात्रा करण्याची भारी आवड होती. आपले शिष्य आणि पत्नी दुर्गाताईसमवेत त्यांनी अनेक तीर्थयात्रा केल्या. अयोध्येमध्ये शरयू नदीत जलसमाधी घेण्याची त्यांची इच्छा होती. त्यासाठी शिष्यांना घेऊन ते अयोध्येस गेले; पण शरयू नदीत सर्वत्र केवळ गुडघाभर पाणी पाहून म्हणाले, ‘‘आपणांला इथे स्थान दिसत नाही, चला पुण्यालाच परत जाऊ.’’ पुण्यात परतल्यावर सुमारे वर्षभरानंतर श्रावण वद्य चतुर्थीला रावसाहेबांनी आपला देह गुरुस्मरण करीत ईश्वरचरणी अर्पण केला. पुण्यातील फर्गसन रस्त्यावर श्री ज्ञानेश्वर पादुका चौकाजवळ त्यांचे समाधी मंदिर आहे. अक्कलकोट स्वामिरूपात सर्वांना दर्शन देणारे साक्षात्कारी संत म्हणून रावसाहेबांचे स्मरण केले जाते.

— विद्याधर ताठे

**संदर्भ :**


१. *देशपांडे, श्री.रा.; ‘रावसाहेब सहस्रबुद्धे चरित्र’.*

२. *‘नरहरिप्रभूचरित्र’.*

३. *दत्त संप्रदाय साहित्य.*


स

## साईबाबा

**सत्पुरुष, साक्षात्कारी संत**

**जन्मदिनांक अनुपलब्ध – १९१८**

**आ**धुनिक काळातील संत शिर्डीचे साईबाबा हे देश-विदेशांतील भक्तांचे दैवत बनले आहेत.



साईबाबांचे संपूर्ण नाव काय? त्यांचे आईवडील कोण? त्यांचे मूळ गाव कोणते? त्यांचे गुरू कोण? हे सर्व प्रश्न अनुत्तरित आहेत. स्वत: साईबाबांनी याविषयी कोणाला काहीही सांगितलेले नाही. परंतु, काही लोकांच्या मते, त्यांचे मूळ गाव सेलू-मानवत जवळील पाथरी असून त्यांचे आडनाव भुसारी होते. व्यंकूशा हे त्यांचे गुरू होत. पण या गोष्टीस कोणताही सबळ पुरावा नाही.

साधारणत: १८५७ च्या दरम्यान औरंगाबाद जवळील धूपखेडे येथील एका मुसलमानाच्या वरातीसोबत वऱ्हाडी म्हणून साईबाबा शिर्डीस आले. शिर्डी येथे खंडोबा मंदिराच्या पटांगणात वऱ्हाडाच्या बैलगाड्या सोडण्यात आल्या, तेव्हा बाबा खंडोबा मंदिराकडे गेले. तेथील पुजारी म्हाळसापती याने बाबांच्या चेहऱ्यावरील तेज व त्यांचा पेहराव पाहून ‘आवो साई’ म्हणून त्यांचे स्वागत केले. पुढे हेच ‘साईबाबा’ नाव सर्वत्र रूढ झाले. मूळ नाव त्यांनी कोणालाच सांगितले नाही. एका सरकारी चौकशी आयोगापुढे त्यांची एकदा साक्ष झाली. त्या वेळीही त्यांना नाव विचारले गेले, तेव्हा त्यांनी, ‘‘मला लोक ‘साईबाबा’ म्हणतात,’’ एवढेच उत्तर दिले.

साईबाबा शिर्डीत प्रारंभी आले तेव्हा ते पाच घरे भिक्षा मागून खात होते व गावातील जुन्या पडक्या मशिदीत राहत होते. या मशिदीचा पुढे भक्तांनी

जीर्णोद्धार केला व बाबांनी या मशिदीस 'द्वारकामाई' असे नाव दिले आणि तिथे कायमची धुनी पेटती ठेवली. अंगणात तुळशी वृंदावन उभे केले.

द्वारकामाई मशीद हा साईबाबांचा सर्वांना सदैव खुला असा साईदरबार होता. इथे हिंदू व मुसलमान, दोघांनाही मुक्त प्रवेश होता. तसेच सर्व जाती-वर्णांना खुला प्रवेश होता. कोणताही धर्म, जाती, वर्ग, उपासनापद्धतीचा भेद साईबाबांना मान्य नव्हता. साईबाबांना काही भक्त दत्ताचा अवतार मानत होते, काही जण त्यांना प्रभू रामचंद्राचा, तर अनेक जण भगवान श्रीकृष्णाचा अवतार मानत होते. पण स्वत: साईबाबा आपणांस 'अल्लाचा बंदा' मानत होते. आपण ईश्वराचे अवतार आहोत असा त्यांनी कधीही दावा केला नाही.

साईबाबा हे सर्वधर्मसमभावाचे-मानवधर्माचे प्रचारक होते. भक्ताला सन्मार्गाला व खऱ्या भक्तिमार्गाला लावणे एवढाच त्यांचा उद्देश होता. साईबाबांनी ना कधी प्रवचन केले, ना कीर्तन केले, ना कोणता ग्रंथ लिहिला, ना कोण्या देवतापर स्तुति-स्तोत्रे-माहात्म्य रचले. भक्ताच्या मनात जसा भाव असेल, तसा ते त्याला उपदेश करीत. *'जया मनी जैसा भाव, तया तैसा अनुभव।'* अशीच त्यांची सर्व भक्तांना प्रचिती होती. भक्ताच्या इच्छेनुसार कोणास 'गीता', कोणाला 'भागवत', कोणाला 'भावार्थ रामायण', कोणाला 'विष्णुसहस्रनाम' यांचे वाचन / पारायण करण्यास ते सांगत होते. शिर्डी येथे त्यांनी रामनवमी उत्सवाचा प्रारंभ केला. ते १८५७ मध्ये शिर्डीत आले त्यानंतर समाधीपर्यंत म्हणजे १९१८ पर्यंत ते शिर्डी सोडून कोठेही गेले नाहीत. शिर्डीच्या जवळच असलेल्या 'राहता' व 'निमगाव' या गावी खुशालचंद्र व डेंगळे यांच्या घरी ते जात असत. मात्र, त्यांनी आपणांस दर्शन दिल्याचे अनेक ठिकाणचे अनेक भक्त सांगत. याद्वारे त्यांच्या सर्वव्यापित्वाचे दर्शन घडते.

मराठी वाङ्मयात प्रचंड साहित्याचे योगदान असलेले संतकवी दासगणू, लोकमान्य टिळकांचे सहकारी, काँग्रेसचे नेते बॅरिस्टर दादासाहेब खापर्डे, रेसिडंट मॅजिस्ट्रेट अण्णासाहेब दाभोळकर यांसह ब्रिटिश काळातील अनेक मामलेदार, अधिकारी असा उच्चशिक्षित वर्ग साईबाबांच्या शिष्यपरिवारात होता.

साईबाबा प्रारंभी शिर्डीत रुग्णांना औषध देत असत. पुढे रुग्णांची गर्दी खूप वाढल्यावर त्यांनी औषध देणे बंद केले. केवळ 'उदी' कपाळाला लावून अनेक रुग्णांना त्यांनी रोगमुक्त केले. त्यांना वाचासिद्धीसह अनेक सिद्धी प्राप्त होत्या. भक्तांना ते स्वत: रांधून प्रसाद वाटत. अन्नदानावर त्यांचा विशेष भर होता. दीनदुबळ्यांची सेवा हाच त्यांचा धर्म होता. १९१८ साली दसऱ्याच्या दिवशी मध्यान्ही त्यांनी समाधी घेतली. त्यांचे समाधी मंदिर, त्यांची द्वारकामाई मशीद आणि ते एक दिवसाआड झोपण्यास जात ती 'चावडी', अशी तीन ठिकाणे सध्या शिर्डीत साईबाबांची पवित्र स्थाने म्हणून प्रसिद्ध आहेत. दरवर्षी रामनवमी, गुरुपौर्णिमा व दसऱ्याच्या वेळी समाधी सोहळा असे तीन मोठे उत्सव शिर्डीत साजरे होतात. त्यासाठी लाखो भाविक शिर्डीत जमतात. साईबाबांच्या प्रेरणेने देशातच नव्हे, तर विदेशांतही प्रचंड संख्येत सामाजिक सेवा प्रकल्प सुरू आहेत. पुट्टपूर्तीच्या सत्यसाईबाबांच्या सेवाकार्याचे प्रेरणास्थानही शिर्डीचे साईबाबाच आहेत. सध्या सरकारनियुक्त विश्वस्त मंडळ संस्थानाचे कार्य पाहत आहे.

– विद्याधर ताठे

## साखरे, नानामहाराज

***जोशी, नारायण हरिपंत***

**वारकरी संप्रदाय, ज्ञानेश्वरी भाष्यकार**

**१७५० – १८२५**

**ज्ञा**नेश्वरी, भागवतगाथा या ग्रंथांतील वचनांचे अखंड व्यासंगी श्री नानासाहेब साखरे हे थोर सत्पुरुष होत. साखरे महाराजांच्या ज्ञानेश्वरी पाठास पुष्कळ श्रीमंत व विद्वान लोक येत असत. वारकरी मंडळी, वासकरांच्या फडातील भाऊ काटकर, गंगूकाका, नाना चितळे, सातारकर, भावे, कोल्हापूरकर, कृष्णबोवा श्रीगोंदेकर, सखाराम मास्तर, अप्पाराव वैद्य, तात्यासाहेब



खासगीवाले, वासुदेवबुवा गोसावी, कृष्णाजीपंत भिडे, गणपतबोवा भिंगारकर, विष्णूबुवा जोग इत्यादी हरिभक्तपरायण मंडळी, प्रसंगोत्पात श्री नाना-महाराजांच्या ज्ञानेश्वरीच्या पाठास श्रद्धापूर्वक येत. त्यांच्या व्याख्यानाचा मोठ्या कौतुकाने गौरव करीत असत. यावरून नानामहाराजांच्या मुखातून निघालेल्या ज्ञानेश्वरीच्या अर्थाचे किती महत्त्व होते ते कळून येते.

ब्रह्मीभूत नानामहाराज साखरे प्रणीत 'श्रीसंतग्रंथरत्नमाला', अर्थात 'सार्थ ज्ञानेश्वरी', 'अमृतानुभव', 'चांगदेव पासष्टी', 'गाथापंचक' इत्यादी ग्रंथांचे प्रकाशन शके १८२३ पासून सलग २५ वर्षे व पुढेही चालू राहिले. नानामहाराज साखरे कृत सार्थ ज्ञानेश्वरीच्या कितीतरी आवृत्त्या निघाल्या. सदाशिव पेठेतील श्री. आवटे हे संतग्रंथ प्रकाशक होते. ते परमश्रद्धेने हे प्रकाशन करीत.

नानामहाराजांच्या वंशजांना 'साखरे' नाव का व कसे पडले हे जाणून घेणे उद्बोधक असून महत्त्वाचेही आहे. चिमाजीअप्पांचे खासगी कारभारी रामचंद्रपंत जोशी होते. ते एके रात्री घोड्यावरून जात असताना बुधवार पेठेत, पासोड्या मारुतीच्या देवळात चालू असलेले अच्युतराव महाराजांचे कीर्तन ऐकत क्षणभर उभे राहिले. ज्ञान-भक्ती-वैराग्ययुक्त अप्रतिम वक्तृत्व ऐकून रामचंद्रपंतांना उपरती झाली. त्यांना संतती नव्हती. दुसऱ्या दिवशी अच्युतमहाराजांकडे जाऊन त्यांनी अनुग्रह मागितला. तेव्हा अच्युतराव म्हणाले, ''बाबा, आम्ही गरीब आहो... परमार्थाला द्रव्य फार प्रतिबंधक आहे.'' लगेचच रामचंद्रपंत जोश्यांनी २१ लाख रुपयांवर उदक सोडले व हौदातले पाणी भरून आणले. अच्युतराव महाराजांनी उपदेश देऊन ज्ञानेश्वरी ग्रंथाचे त्यांच्याकडून अध्ययन करविले आणि २१ लाख रुपये ब्राह्मण भोजनात खर्च कर म्हणून सांगितले. पुणे व आळंदी येथे ब्राह्मण भोजनाचे कार्यक्रम पार पडल्याने तिथल्या व्यापाऱ्यांच्या दुकानात तूप व साखर मिळेनाशी झाली. तेव्हापासून जोशींचे नाव 'साखरेबोवा' पडले.

साखरेबोवा शनिवार मारुतीसमोर आंग्रेवाड्यात राहत. त्यांच्या भाऊबंदांपैकी गोविंदपंत जोश्यांचे चारी मुलगे त्यांचे शिष्य झाले. साखरेबोवांविषयी गुरुभक्ती अप्रतिम होती. साखरेबोवा, अर्थात रामचंद्रपंतांनी संन्यास घेतला व आपले संस्थान बाराशे शिष्यांपैकी हरिपंत व पंढरी या जोशी बंधूंस दिले. तेव्हापासून या जोश्यांच्या घराण्यास साखरे नाव पडले. रामचंद्रपंत पुढे समाधिस्थ झाले तेव्हा त्यांच्या या पट्टशिष्यांनी त्यांच्या इच्छेनुरूप त्यांची समाधी आळंदीस, सिद्धबेटात नेऊन दिली. रामचंद्रपंतांच्या संस्थान (देवस्थान) चा उत्सव श्री नानामहाराज साखरे-जोशी यांच्या वंशाकडे चालू आहे.

हरिपंतांचे संसाराकडे अजिबात लक्ष नसे. त्यांच्या मुलांना वळण लावण्याचे, त्यांच्या उदरनिर्वाहाची व्यवस्था करण्याचे काम हरिपंतांचे बंधू पंढरी यांनी उत्तम प्रकारे केले. पंढरी अविवाहित होते. त्यांनी नानामहाराजांकडून ज्ञानेश्वरी सांगण्या-वाचण्याचे काम करविले. १२-१५ वर्षे असा अभ्यास झाल्यामुळे तो ग्रंथ नानामहाराजांना मुखोद्गत झाला. स्वप्नातही नाना ज्ञानेश्वरीचा अर्थच बरळत असत. गुरुकृपेने त्यांच्या वक्तृत्वास मोहकपणा, माधुर्य आले.

नानामहाराजांनी सारे आयुष्य ज्ञानेश्वरीच्या अध्ययन-अध्यापनात घालविले. नानामहाराजांचे पूर्ण नाव (नारायण हरिपंत साखरे-जोशी) होते. त्यांच्या चिरंजीवांनी (विनायक नारायण जोशी-साखरे)

नानामहाराजांचे कार्य पुढे चालविले. १९६९ साली नानामहाराज प्रणीत ज्ञानेश्वरीची तेरावी आवृत्ती प्रसिद्ध झाली. यावरून या ग्रंथाची लोकप्रियता किती अपार होती हे समजून येते. त्यांनी 'सार्थ ज्ञानेश्वरी'बरोबरच 'अमृतानुभव', 'चांगदेवपासष्टी', 'गाथापंचक' इ. ग्रंथांचे संपादन केले. 'एकनाथी भागवतार्थ' व 'पारायणीय तुकारामगाथा' प्रसिद्ध करून त्यांनी भक्तगणांची मोठीच सोय केली.

— वि.ग. जोशी

**संदर्भ :**

*१. प्रस्तावना, 'सार्थ ज्ञानेश्वरी'; आवृत्ती तेरावी,१९६९.*

## साटम महाराज

***साटम, शंकर नारायण***

**तपस्वी, साक्षात्कारी सत्पुरुष**

**जन्मदिनांक अनुपलब्ध – १९३७**



मुंबईच्या कामाठीपुरासारख्या वस्तीत वावरणारा, दादागिरी-गुंडगिरी करीत, स्वच्छंदी जीवन जगणारा एक तरुण पुढे महान तपस्वी- संत होईल असे कोणी सांगितले असते, तर कोणाचा विश्वासच बसला नसता. पण कधीकधी वास्तव कल्पनेपेक्षा विलक्षण असते. साटम महाराज यांची जीवनगाथा अशीच विलक्षण आहे. शंकर नारायण साटम यांचे मूळ घराणे मालवण तालुक्यातील कोहीळ येथील होते. या गावीच शंकर साटम यांचा जन्म झाला; पण त्यांची नेमकी जन्मतिथी मात्र कोणास ज्ञात नाही. अहमदनगर जिल्ह्यात संगमनेर येथेही एक 'साटम महाराज' प्रसिद्ध आहेत. त्यांचे मूळ नाव रामचंद्र जगन्नाथ टिळक असून ते शंकर महाराज साटम यांचे शिष्य आहेत व गुरूचे नावच त्यांनी लावले म्हणून लोक त्यांनाही टिळकऐवजी 'साटम महाराज' म्हणू लागले. शंकर साटम यांचे वडील कोहीळ येथून पोटापाण्याच्या धंद्यासाठी चार वर्षांच्या शंकरला घेऊन मुंबईस स्थलांतरित झाले. त्यांना कामाठीपुऱ्यासारख्या वस्तीत राहणे भाग पडले. येथे छोट्या शंकरचे बालपण गेले. इथेच तो लहानाचा मोठा झाला. त्याने काही काळ छोट्या-मोठ्या नोकऱ्या केल्या व काही वर्षे नरसू कापड गिरणीतही नोकरी केली. पण त्याच्या नशिबात वेगळेच लिहिलेले होते. कुसंगती व धरसोडवृत्ती यांमुळे नोकऱ्या टिकल्या नाहीत. त्याने काही काळ एका पारश्याच्या दारू गुत्त्यावरही नोकरी केली.

१९१० साली मुंबईत प्लेगची मोठी साथ आली. शंकरच्या घरातील अनेक जण या रोगाने दगावले. सासू-सासऱ्यांचे निधन झाल्यानंतर शंकरची पत्नीही संसार अर्धवट टाकून कायमची माहेरी गेली. या घटनेने शंकरला मानसिक धक्का बसला व तो अंतर्मुख झाला. अशाच उदास मन:स्थितीत तो चर्चगेटजवळील पारश्यांच्या पवित्र विहिरीजवळ जाऊन बसत असे. तेथे त्याला अनेक साधू-फकीर भेटले व शंकरच्या वृत्तीत हळूहळू बदल होत गेला. इथेच बाबा अब्दुल रहमान या अवलिया फकिराची भेट झाली व शंकरचा 'शंकरदादा', 'साटम महाराज', 'सद्‌गुरू साटम महाराज' असा नावलौकिक झाला. अवलियाच्या कृपेने शंकरला अनेक सिद्धी प्राप्त झाल्या आणि एके दिवशी मोठेपणा-प्रसिद्धीचा वीट येऊन तो मुंबई सोडून सावंतवाडीमध्ये दाणोली येथे निघून गेला.

सावंतवाडीचा गाडीतळ, दाणोली, अंबोली घाट अशा कोणत्याही स्थळी, कोणत्याही अवस्थेत साटम महाराज लोकांना दिसत. अनेक लोक त्यांचा लहरीपणा

स

व एकूण चाळे पाहून त्यांना वेडेच समजत असत. पण अनेकांना त्यांच्या वाचासिद्धीचा, त्रिकालदर्शी ज्ञानाचा अनुभवही आलेला होता.

एकदा सावंतवाडीचे राजेसाहेब श्रीमंत बापूसाहेब भोसले यांना साटम महाराजांच्या वाचासिद्धीचा अनुभव आला व ते राजघराणे महाराजांचे भक्त बनले आणि पुढे अशीच भक्तांची संख्या वाढत गेली. पुढे साटम महाराजांचे एवढे नाव झाले, की महात्मा गांधीसुद्धा त्यांच्या दर्शनाला आले होते. अनेकांच्या दुर्धर व्याधी महाराजांनी बऱ्या केल्या.

१९२५ साली गणेश वडेर हे भाविक त्यांच्या दर्शनाला आले व ते निष्ठावान भक्त झाले. त्यांना महाराजांनीच दंतमंजनाचा व्यवसाय करण्यास सांगितले आणि वडेर दंतमंजन व्यवसायात कोट्यधीश झाले. हे गणेश वडेर म्हणजे 'नोगी', 'माकडछाप' दंतमंजनाचे निर्माते. त्यांनी पुढे श्रद्धेने माटुंगा येथे महाराजांच्या कृपेने दत्तमंदिर बांधले व विपुल भक्तिकाव्यरचना केली. खरे तर, या वडेरांचे लौकिक शिक्षण झालेले नव्हते. त्यांना लिहिण्या-वाचण्यास येत नव्हते. तरीपण त्यांच्या हातून विपुल पद्यरचना झाली, ही साटम महाराजांची कृपा होय.

साटम महाराजांच्या कृपेने अप्पा सावंत मोठे साधक झाले व पुढे 'परमहंस सदानंद सरस्वती' म्हणून प्रसिद्ध झाले. कुडाळजवळच्या मधू पेडणेकरांनाही त्यांनी साक्षात्कार घडविला व तेही पुढे मधुकर महाराज पेडणेकर (अलिबाग, सासवने) म्हणून लौकिकास प्राप्त झाले. राजे बापूसाहेब खेमसावंत, सखाराम केसकर, केशव अनंत राजाध्यक्ष (वेंगुर्ले, उभादांडा) असे अनेक नामवंत साटम महाराजांच्या शिष्यवर्गात होते.

स

१९३७ साली साटम महाराजांना आपल्या जीवनाची सांगता जवळ आल्याचे जाणवले व ते 'माझी बोट इली हा!', 'माझा बापूस बोलवता हा!', असे सर्वांना सांगत होते. त्यांनी अन्नपाणी वर्ज्य केले. हळूहळू त्यांची तब्येत ढासळत गेली; पण उपचार करण्यास डॉक्टर मंडळी येताच त्यांना ते गोंधळात टाकत. श्वास-नाडी-हृदयाचे ठोके बंद पडले म्हणून डॉक्टर त्यांना 'मृत' म्हणत, एवढ्यात ते त्यांच्याशी बोलत असत. त्यांच्या महानिर्वाणानंतर दाणोलीतील समर्थ सदनाजवळच त्यांची समाधी बांधण्यात आली आहे. समाधी मंदिराची व्यवस्था ट्रस्टच्या देखरेखीखाली आहे.

— विद्याधर ताठे

## साठेबाबा

***साठे, विनायक वासुदेव***

**दत्तसंप्रदाय, ग्रंथकार**

**२६ ऑगस्ट १८८१ - ३० मे १९५४**



विनायक वासुदेव साठे यांचा जन्म रत्नागिरी जवळील केळ्ये गावी झाला. वैभवास उतरती कळा लागल्याने त्यांचे वडील वासुदेवराव केळ्ये सोडून मुंबईला आले. तेथे त्यांनी इंग्रजी शाळा काढली. ते इंग्रजांना मराठी शिकवीत. विनायकांचे आजोबा हरिभाऊ, वडील वासुदेवराव व आई राधाबाई असे तिघे जण, आप्तमंडळी १८८८ ते १८९० या दोन-तीन वर्षांत निवर्तल्याने विनायक निराधार झाला. मातुलगृही संगोपन व शिक्षण चालू असताना तो देवळात जाऊन एकांतात देवाची आळवणी करीत बसे. त्याच्या हुशारीवर व प्रामाणिकपणावर त्याचे मास्तर अगदी खूश असत. तो वर्गाचा मॉनिटर असे. विनायक १८९८ मध्ये स्कूल फायनल उत्तीर्ण होऊन न्यायालयात नकला उतारण्याच्या

नोकरीवर लागला. त्याला ३ एप्रिल १९०२ रोजी कारकुनाची जागा मिळाली. विनायक कामात चोख, नि:स्पृह व प्रामाणिक असल्याने वरिष्ठ नेहमी त्याच्यावर खूश असत.

आजोबांनी १८९४ मध्ये केशवराव वैशंपायन यांच्या मुलीशी त्याचा विवाह लावून दिला. पुढे विनायकाला १९०१ मध्ये पुत्र (रामचंद्र) व १९०८ मध्ये कन्यारत्न झाले; परंतु दुर्दैवाने ५ ऑक्टोबर १९०९ रोजी सौ. शारदाबाईंचे जलोदराने निधन होऊन मुले पोरकी झाली. विनायकरावांनी मुलांना त्यांच्या आजोळी, दापोलीस ठेवले. त्यांचे सांसारिक जीवन संपले. विनायकरावांना नोकरीच्या कामासाठी नेहमी तालुक्याची वारी करावी लागे. यापैकी १९०६ ते १९२०, चिपळूण व १९२२ ते १९२८, दापोली हे कालखंड विशेष महत्त्वाचे आहेत. ते १९३९ साली रेकॉर्डकीपर या पदावर असताना रत्नागिरीहून सेवानिवृत्त झाले. ''नोकरी हासुद्धा माझ्या उपासनेचाच एक भाग आहे,'' असे ते म्हणत.

साठेबाबांनी फक्त दत्तोपासना सुरू ठेवली. त्यांनी टेंब्येस्वामींकडे अनुग्रह याचना केली. स्वामींनी २८ मे १९१४ रोजी अंगारा पाठविला, आणि बाबांना तीन संकल्प आचरण्यास सांगितले : १) मठस्थापना, २) धर्मजागृती व ३) लोकसंग्रह. बाबांनी योजनाबद्ध आखणी करून स्वामींनी सोपविलेले कार्य केले. आयनी येथे मठस्थापना झाली. धर्मजागृतीविषयी बाबा आपल्या 'दत्तभजन गाथे'त म्हणतात, 'धर्म सोडू नये, धर्मचि वर्तावा । धर्माचा करावा जयजयकार...''

बाबांनी आपले सुपुत्र रामचंद्र ऊर्फ बाबूराव याचे लग्न १९२६ मध्ये लावून दिले. बाबांनी १९३४ ते १९४४ या काळात 'श्रीकृष्ण निमंत्रण', 'कार्तवीर्य', 'विश्वामित्राचा अनुग्रह', 'गुरुपदेश' आदी तेरा नाटके लिहिली. ही नाटके म्हणजे साभिनय कीर्तने होती. त्यांची स्मरणशक्ती विलक्षण होती. त्यांचा व्यासंग दांडगा होता. २००० पुस्तकांच्या संग्रहापैकी त्यांचे विषय साठेबाबा बिनचूक सांगत. त्या पुस्तकातील अमुक विषय अमुक बाजूला छापलेला आहे हे नेमके दाखवून देत. त्यांना वाचासिद्धीसह इतरही सिद्धी प्राप्त होत्या. घडणाऱ्या गोष्टींची त्यांना पूर्वसूचना मिळत असे. ते म्हणत, ''दैवी रहस्ये बोलावयाची आम्हांला परवानगीच नसते. दैवी घटनांत आम्हांला ढवळाढवळ करता येत नाही.'' त्यांच्याकडे येणाऱ्यांना ते सांगत, ''नेहमीच्या बोलण्यातही देवाकडेच कर्तृत्व द्यावे. 'मी भजन केले अशी भाषा न वापरता देवाने माझ्याकडून करविले,' असे म्हणावे. कर्तृत्व देवाकडे दिल्यानंतर कर्मफल बाधत नाही.'' बाबांची दिनचर्या म्हणजे पहाटे उठून ध्यानस्थ बसणे, नंतर मुलाकडे कामाच्या, व्यवहाराच्या गोष्टी बोलणे, कडकडीत पाण्याने स्नान करणे, स्नानानंतर चहा घेणे, दुपारी देवळामध्ये ध्यान व रात्रीपण ध्यान.

१९४० पर्यंत न्यायालयात जायचे असल्याने ते सकाळचे आन्हिक लवकर उरकून, जेवून न्यायालयात जात. निवृत्त झाल्यावर १९५२ पर्यंत त्यांनी कीर्तने रचणे यालाच वाहून घेतले. त्यांना ९ जून १९२२ रोजी श्रीधर पु. आचरेकर यांनी श्रीदत्ताची तसबीर दिली होती, ती ते कायम कोटाच्या खिशात बाळगीत व वारंवार तिचे दर्शन घेत. ''आपल्यास जे प्रिय ते देवास समर्पण करावे,'' असे ते सांगत. बाबा हे स्वभावाने कर्मठ, तसेच तापट असले तरी अंतस्थ अतिशय मायाळू स्वभावाचे होते. दैनंदिन कार्यक्रमात स्थानावर येणाऱ्या लोकांच्या गाठीभेटी यामध्ये पुष्कळ वेळ जायचा. आधीच्या काळात ज्योतिषासाठी पुष्कळ लोक यायचे; पण नंतर त्यांनी दत्तोपंत ढवळे, पद्मनाभ वरेरकर व वामनराव पराडकर यांना शिकवून तयार केले.

बाबांनी एकंदर २९६ आख्याने व १२१२ पूर्वरंग रचले. बाबांचा व्यासंग अफाट होता. बाबांच्या प्रकाशित ग्रंथसंपदेपैकी 'श्री दत्तसेवा' (आवृत्ती ३), 'श्रीदत्तभजन-गाथा' भाग पहिला, मांगलिक पदे, प्रार्थना पदे, 'बाल-दत्त लीला' वगैरे आहेत. माजी खासदार व 'बलवंत'चे माजी संपादक मो.दि. जोशी यांच्या म्हणण्याप्रमाणे, ''सत्यशोधन व सन्मार्गाचे अनुकरण हे कार्य सोपे नाही. साठे महाराजांसारखे साधुसंत हे या कठीण मार्गावरील दर्शक दीप होत.'' दि. ८ सप्टेंबर १९३३ च्या

'केसरी'त, दि. ११ ऑगस्ट १९३३ च्या 'ज्ञानप्रकाशा'त व ३० नोव्हेंबर १९३६ च्या 'लोकमान्य' दैनिकात प्रकाशित अभिप्राय साठेबाबांच्या भाषेच्या गुणवत्तेची व ग्रंथकर्तृत्वाची साक्ष देतात.

– वि.ग. जोशी

**संदर्भ :**

१. *'श्री दत्तस्वरूप साठे बाबा'; प्रकाशक : साठे ग्रंथ प्रकाशक मंडळी, रत्नागिरी; प्रथमावृत्ती मे १९८१.*

## सातवळेकर महाराज

☛ *मुख्य चरित्रनोंद – प्राच्यविद्या खंड*

## सातारकर, दादामहाराज

***गोरे, धोंडिबा बहिर्जी***

**प्रवचनकार, कीर्तनकार**

**१८७५ – ५ डिसेंबर १९४६**



**दा**दामहाराज सातारकर यांचा जन्म सातारा येथे ऋषिपंचमीच्या मुहूर्तावर, शके १७९७ मध्ये झाला. त्यांच्या वडिलांचे नाव बहिर्जी रामजी गोरे व आईचे नाव कृष्णाबाई होते. गोरे दाम्पत्याची पहिली चार अपत्ये लवकर गेली. दादामहाराज ऊर्फ धोंडिबा हे त्यांचे पाचवे अपत्य. साताऱ्याजवळील जरंडेश्वर मारुतीचा धोंडिबा हा कृपाप्रसाद होता. त्यामुळे स्वाभाविकपणेच ते आई-वडिलांचे विशेष लाडके होते. दादामहाराज १३-१४ वर्षांचे असतानाच त्यांच्या वडिलांचे निधन झाले व प्रपंचाचा सारा भार दादामहाराजांवर येऊन पडला. वडिलांनी लहानपणीच व्यायामाची उत्तम आवड लावल्यामुळे दादामहाराजांची प्रकृती एकदम धष्टपुष्ट होती, तर मातु:श्री कृष्णाबाई यांनी त्यांच्या बालपणापासूनच धार्मिक संस्कार केलेले होते. जरंडेश्वर मारुतीच्या कृपाप्रसादाने लाभलेला जन्म आणि आई-वडिलांचे उत्तम संस्कार यांमुळे प्रारंभापासूनच दादामहाराज इतरांपेक्षा वेगळे होते. पोरकेपणाच्या काळात मारुतीरायाच्या भक्तीने दादामहाराजांना आंतरिक बळ प्राप्त झाले. नामभक्तीच्या वाटेने त्यांचा प्रवास सुरू झाला. याच काळात त्यांची हिंदू तत्त्वज्ञानाचे थोर व्यासंगी अभ्यासक तात्या सप्रे यांच्याशी भेट झाली. दादामहाराजांच्या मनातील अनंत शंका, प्रश्न यांची सप्रे यांनी अत्यंत समर्पक उत्तरे देऊन दादामहाराजांच्या मनाचे समाधान केले.

प्रारंभीच्या काळात उपेक्षेचे-अपमानाचे अनेक प्रसंग दादामहाराजांच्या जीवनात आले; पण त्यांची दृष्टी असल्या क्षुल्लक, क्षुद्र गोष्टींनी उदास व दु:खी होणारी नव्हती, तर व्यापक व उदात्त होती, म्हणूनच त्यांनी आध्यात्मिक क्षेत्रात मोठी प्रगती साधली. त्यांच्या गल्लीत पंढरीची नियमितपणे वारी करणारे, काका वाणी नावाचे निष्ठावान वारकरी राहत होते. अदृष्टातील योजनेप्रमाणे दादामहाराजांचे काका वाणी यांच्याशी जवळिकीचे नाते निर्माण झाले. या काका वाणी यांच्यासमवेत दादांनी पहिल्यांदाच पंढरीची वारी केली. तेव्हा त्यांचे वय अवघे एकोणीस वर्षांचे होते. ही गोष्टच दादांच्या जीवनाला एक नवे वळण, नवे ध्येय व नवे क्षेत्र देणारी ठरली. पंढरपूरला तेथील थोर फडकरी ह.भ.प. वासकर महाराज यांच्याकडून दादामहाराजांनी तुळशीची माळ घातली व वारकरी संप्रदायाच्या भक्तिप्रेमाचा अनुग्रह प्राप्त करून घेतला. 'रामकृष्णहरी' मंत्राचा जप करीत दादामहाराज विठ्ठलभक्तीने रंगून गेले. आळंदी येथे संत ज्ञानेश्वरांच्या समाधीच्या दर्शनाला ते गेले आणि

स

त्यांना दृष्टान्त झाला. ज्ञानेश्वरी उपासनेची आज्ञा झाली. येथून त्यांच्या ज्ञानेश्वरी, हरिपाठ, ज्ञानदेवांची गाथा, तुकोबांची गाथा, एकनाथ महाराजांचे भागवत असा अखंड स्वाध्याय यज्ञ सुरू झाला. त्यांना ईश्वरी देणगीच प्राप्त असल्याने अल्पकाळातच त्यांचे या संतवाङ्मयावर विलक्षण प्रभुत्व निर्माण झाले. या व्यासंगालाच अंतरंग अनुभवाची व स्वतंत्र चिंतनाची बैठक मिळाली आणि दादामहाराज अल्पावधीतच महाराष्ट्रातील एक थोर निरूपणकार म्हणून प्रसिद्ध झाले. लहानपणी सर्व जण धोंडिबा म्हणत; पण तात्या सप्रे यांनी त्यांना 'दादा' असे नाव ठेवले. 'दादा' ते 'दादामहाराज' हा त्यांचा प्रवास खरोखरीच थक्क करणारा आहे. ईश्वरीकृपेची ती एक लीलाच होती. त्यांचे कीर्तन म्हणजे भक्तिरसाची मेजवानीच असे. लोक देहभान विसरून हरिरूप होत. विठ्ठलाच्या-माउलीच्या प्रेमबोधाचे ते असे अमृतपान घडवीत, की श्रोते धन्य होत. दादामहाराजांना आणखी एका थोर सत्पुरुषाचा सहवास व कृपाप्रसाद लाभला, ते म्हणजे कृष्णा महाराज गारवडेकर यांचा. कृष्णा महाराजांनीच दादामहाराजांचा उल्लेख, त्यांचा नेमका अधिकार लक्षात घेऊन 'सद्‌गुरू दादामहाराज' असा केला.

पुढे दादामहाराज हजारो वारकऱ्यांचे, अनुयायांचे सद्‌गुरू झाले. त्यांनी डॉ. भा.प. बहिरट व गो.शं. राहिरकर यांच्यासारख्या अभ्यासू, व्यासंगी लोकांना वारकरी संप्रदायाची दीक्षा दिली व त्यांच्या सहकार्याने 'प्रेमबोध' नावाचे मासिक चालविले. संतांच्या प्रेमबोधाचा सर्वदूर प्रचार, प्रसार केला.

मुंबईतील सुशिक्षित समाजाला दादामहाराजांनी वारीची गोडी लावली. प्रारंभी, काही काळ उच्चवर्णाभिमानी तथाकथित विद्वानांचा दादामहाराजांच्या प्रवचन-कीर्तनास उच्च-नीचतेच्या क्षुद्र भेदापोटी विरोध होता. त्या काळात दादांना खूप मनस्तापही झाला. पण खुद्द शंकराचार्यांनीच दादामहाराज यांना प्रशस्ती दिली आणि दादामहाराजांच्या ठायी वसलेल्या निस्सीम भक्तीचा विजय झाला. शंकराचार्यांची प्रशस्ती म्हणजे सर्वोच्च पीठाची राजमान्यताच. यानंतर दादामहाराजांच्या कार्याने कर्तृत्वाचे शिखर गाठले. त्यांनी १९१५ पासून स्वतंत्र दिंडी पंढरपूरला नेण्यास प्रारंभ केला. त्यांनी १९२७ साली पंढरपूर येथे संतश्रेष्ठ तुकाराम महाराज यांचे मंदिर बांधले.

दादामहाराजांच्या पायाला १९४६ साली जखम झाली. मधुमेहाचा आजार असल्याने ती जखम चिघळत जाऊन मोठे दुखणे निर्माण झाले. अशा अवस्थेतही त्यांनी पांडुरंगी दृढभाव ठेवून पंढरीची वारी केली, आळंदीची वारी केली आणि अखेर ऋषिपंचमीला जन्मास आलेला देह त्यांनी गीताजयंतीच्या दिवशी मुंबईत ईश्वरचरणी अर्पण केला. दुसऱ्या दिवशी, ६ डिसेंबर १९४६ रोजी श्रीक्षेत्र आळंदी येथे नियोजित जागी, गोपाळपूर भागात सध्या समाधी मंदिर असलेल्या जागी त्यांच्यावर अंतिम संस्कार करण्यात आले.

दादामहाराज यांचा गृहस्थाश्रम हा धन्य होता. त्यांना चार मुले व एक मुलगी होती. उभ्या महाराष्ट्राला सुपरिचित असलेले ह.भ.प. बाबामहाराज सातारकर हे दादामहाराजांचे नातू आहेत.

— विद्याधर ताठे

## साधू वासवानी

***वासवानी, थांवर लीलाराम***

**सत्पुरुष, समाजसुधारक**

**२५ नोव्हेंबर १८७९ — १९६६**

**सा**धू थांवर लीलाराम वासवानींचा जन्म हैद्राबादच्या (पाकिस्तानातील) सिंध प्रांतात, कार्तिकी एकादशीच्या शुभदिनी झाला. अनेकांशी भ्रातृभावाने नाते जोडणाऱ्या या मानवतावादी व्यक्तीला सारे 'दादा' या नावानेच ओळखत. त्यांच्या मनातल्या विश्वबंधुत्वाच्या भावनेपासून कोणतीही जात, पंथ, धर्म, व्यक्ती इतकेच काय, पण पशू, पक्षी, निसर्गाचे कोणतेही रूप वंचित राहिले नव्हते. त्यांचे नाव 'थांवर' ठेवले गेले. 'थांवर' या सिंधी शब्दाचा अर्थ आहे, 'स्थिर.' आई-वडिलांचे हे दुसरे अपत्य. त्यांच्या आईचे नाव वरणदेवी

स



आणि वडिलांचे लीलाराम होते. वडील कालीमातेचे भक्त होते, तर आईची श्रद्धा गुरू नानकांवर होती. तिच्या तोंडी सदैव ‘वाहे गुरू’चा जप असे. वासवानींच्या वडिलांचे लहानपणीच निधन झाले. आईनेच पुढे त्यांचा सांभाळ केला. साधू वासवानी लहानपणापासूनच एकांतप्रिय होते. लहानपणीच कालीमातेच्या मंदिरात मिळालेल्या प्रसादाचा त्यांनी त्याग केला होता, कारण तो प्रसाद मांसाहारी होता. सर्व प्राणिमात्र आपले बांधव आहेत, या मुक्या प्राण्यांचा घास आपल्या आनंदासाठी घेणे ही गोष्ट त्यांच्या मनाला कदापि रुचणारी नव्हती. म्हणूनच आजन्म शाकाहारी राहण्याची त्यांनी प्रतिज्ञा केली. सर्वांठायी एकच ईश्वरी तत्त्व आहे अशी त्यांची धारणा होती, म्हणूनच सर्व प्राणिमात्रांवर त्यांनी आयुष्यभर निस्सीम प्रेमच केले. साधू वासवानी यांचा जन्मदिवस जगभरात ‘शाकाहारी दिन’ (मीटलेस डे) म्हणून पाळण्यात येतो.

स

एका चांदण्या रात्री, वयाच्या आठव्या वर्षीच आपल्या घराच्या गच्चीवर एकांतात ध्यानस्थ बसलेल्या थांवरला साक्षात्कार झाला. आत्मज्ञानाची प्राप्ती झाली, आणि जगाला शांती आणि प्रेमाचा संदेश देण्याची प्रेरणा मिळाली. थांवर शाळेत जाऊ लागला. त्या काळी पंतोजी मुलांना छडीचा मार देऊन शिकवत असत. थांवरला ते मुळीच रुचले नाही. थांवरने असे ठरवून टाकले, की मोठे झाल्यावर आपण नव्या शिक्षणप्रणालीने शिक्षण देणारी शाळा काढायची; जिथे मास्तर हातातल्या छडीचा नाही, तर प्रेममय वृत्तीचा उपयोग शिक्षण देण्यासाठी करतील. त्यांचे हे स्वप्न ‘सेंट मीराज विद्यालया’च्या रूपाने साकार झाले. ते सिंधमधील ‘अकॅडमी’ नावाच्या शाळेचे विद्यार्थी होते. या शाळेचे मुख्याध्यापक होते, संत साधू हिरानंद. साधू हिरानंद थोर समाजसुधारकही होते. त्यांनी व्यसनमुक्तीसाठी शाळेतल्या विद्यार्थ्यांची संघटना बांधली होती, जिचे नाव होते ‘बॅण्ड ऑफ होप.’ साधू वासवानी या संघटनेचे सक्रिय सदस्य होते. सुसंस्कारित जीवनाचा ‘श्रीगणेशा’ अशा प्रकारे त्यांनी शाळेतच गिरवला.

शाळेत शिकत असतानाच ते ‘ब्रह्मबांधव’ नावाच्या एका ज्ञानी बंगाली व्यक्तीच्या सान्निध्यात आले. ब्रह्मबांधव यांच्या प्रभावामुळे त्यांना भारतीय तत्त्वज्ञान आणि उपनिषदांच्या अभ्यासाची ओढ निर्माण झाली. त्यांनी आपले सुरुवातीचे एक पुस्तक ‘विटनेस ऑफ दी एन्शंट’ ब्रह्मबांधवांनाच समर्पित केलेले आहे. ‘डॉ. ॲनी बेझंट’ यांच्या वक्तृत्वाने त्यांच्यावर असाच प्रभाव टाकला होता. साधू वासवानी एक प्रज्ञावंत विद्यार्थी होते. त्यांनी बी.ए.ची परीक्षा उत्तम रितीने दिली. त्यांना मुंबई विद्यापीठाची ‘एलिस शिष्यवृत्ती’ प्राप्त झाली होती. ते कराची येथील डी.जे. सिंध महाविद्यालयाचे ‘दक्षिणा फेलो’ही होते, तसेच त्यांनी १९०२ साली एम.ए.ची पदवीही प्राप्त केली. त्यांनी ‘आजन्म ब्रह्मचारी’ राहून मानवांची सेवा करण्याचे विशाल स्वप्न पाहिले होते. त्यासाठी फकीर बनण्याची विलक्षण ओढ त्यांच्या मनाला लागली होती. आपल्या प्रेमळ आईला ही आपली इच्छा कशी बोलून दाखवावी हा विचार त्यांच्या मनाला त्रस्त करणारा असाच होता. पण जेव्हा त्यांनी आईसमोर आपली इच्छा प्रकट केली तेव्हा आईने त्यांना मोठ्या मनाने आशीर्वाद दिला.

साधू वासवानींना कलकत्त्याच्या प्रसिद्ध मेट्रोपॉलिटन महाविद्यालयाकडून प्राध्यापकाच्या सन्माननीय हुद्द्यावर

बोलावणे आले. कलकत्त्याला आल्यावर त्यांनी श्रद्धेय अंत:करणाने स्वामी रामकृष्ण परमहंसांच्या पुनीत वास्तव्य असलेल्या वास्तूचे दर्शन घेतले. कलकत्त्याला असताना एकदा रस्त्यावरून जात असताना शेजारच्या लहानशा घरातून त्यांना चैतन्य महाप्रभूंचा महामंत्र 'हरि बोल, हरि हरि बोल' या मंत्राचे गायन ऐकू आले. तेव्हा ते मंत्रमुग्ध होऊन त्या घरात शिरले, आणि तिथेच त्यांना आपल्या गुरूंच्या प्रथम दर्शनाचा लाभ झाला. हे गुरू होते महात्मा केशवचंद्र यांचे पुतणे व ब्राह्मो समाजाचे संस्थापक प्रमोथोलाल सेन. 'स्वदेशी'च्या चळवळीचे ते दिवस होते. याच सुमारास टिळक कलकत्त्याला आले आणि त्यांच्यावर टिळकांच्या व्यक्तिमत्त्वाचा खोल ठसा पडला. कलकत्त्यालाच त्यांना रवींद्रनाथ टागोरांच्या सहवासाचाही लाभ मिळाला होता.

ते १९१० साली बर्लिनला 'विश्वधर्म' परिषदेस उपस्थित राहिले. त्यांची १९१४ साली लाहोर येथे 'दयालसिंह' महाविद्यालयाचे प्राचार्य म्हणून नेमणूक झाली. त्यांनी त्यानंतर कुचबिहार येथील व्हिक्टोरिआ महाविद्यालय आणि पतियाळा येथील महाविद्यालयाचे प्राचार्यपद भूषविले.

१९१९ साली त्यांच्या मातु:श्रींचे निधन झाले. भारतमातेच्या मुक्तीसाठीही त्यांनी हिरिरीने स्वातंत्र्यसंग्रामात उडी घेतली. डॉ. शास्त्रींच्या सहयोगाने त्यांनी 'शक्ती आश्रमा'ची स्थापना केली. १९२९ साली कराचीला त्यांच्या मोठ्या भावाचे निधन झाले आणि साधू वासवानी कराचीला कायमचे वास्तव्य करण्याच्या इराद्याने परत आले. आपल्या समाजातल्या महिलांच्या सक्षमीकरणासाठी आणि सबलीकरणासाठी त्यांनी तिथे 'सखी-सत्संग' सुरू केला. 'सखी-सत्संगा'तर्फे प्रभातफेरी निघत असे. या प्रभात फेरीला त्यांनी 'हरिसेना' असे नाव ठेवले.

३ जून १९३३ या दिवशी त्यांनी लहान मुलांच्या शिक्षणाचे स्वप्न पाहिले. ४ जून १९३३ रोजी ताबडतोब वैदिक मंत्रोच्चाराच्या घोषात, पवित्र हवन करून अग्नीच्या साक्षीने त्यांनी 'संत मीरा विद्यालया'ची (सेंट मीराज स्कूल) या मुलींसाठीच्या शाळेची घोषणा केली. संत मीराबाईंचा आदर्श या मुलींसमोर सतत राहावा म्हणून त्यांच्या नावाने 'मीरा मूव्हमेंट' ही शैक्षणिक चळवळ सुरू केली. ज्ञानाची परिणती सेवाभावामध्ये व्हावी अशीही त्यांची अपेक्षा होती. 'मानवतेची सेवा हीच ईश्वरसेवा आहे', अशी त्यांची शिकवण होती.

१९३३ साली साधू वासवानींनी पंजाबमध्ये परिभ्रमण केले. या परिभ्रमणानंतर मनन-चिंतनासाठी ते 'झिरकन' या शांत स्थळी एकांतवासात राहिले होते. तेथेच 'नूरी' हे टोपण नाव घेऊन त्यांनी काही सिंधी काव्यरचना केली. त्यांनी चितोड येथील मीरेच्या मंदिराचा जीर्णोद्धारही केला. स्त्रियांमधील चेतनेला स्फुल्लिंगित करून चेतवण्याचे महान कार्य त्यांनी आरंभिले होते, त्याची प्रमुख प्रेरणा 'संत मीराबाई'ची होती.

फाळणीनंतर साधू वासवानी १३ फेब्रुवारी १९४९ रोजी पुण्याला आले आणि तिथपासूनच 'पुणे' ही त्यांनी आरंभलेल्या महान कार्याची कर्मभूमी झाली. आज पुणे स्थित 'साधू वासवानी मिशन' जगाच्या पाठीवर एक महनीय कार्य करणारी मानवतावादी सामाजिक संस्था म्हणून गणली जाते. साधू टी.एल. वासवानी आणि दादा जे.पी. वासवानी यांच्या आदर्शांना अनुसरून संस्था अनेक समाजोपयोगी कार्ये करते. साधू टी.एल. वासवानी यांच्या निधनानंतर साधू जे.पी. ऊर्फ दादा वासवानी सध्या त्यांचे कार्य पुढे चालवीत आहेत.

— डॉ. माधवी वैद्य

## सावळापूरकर, गजानन महाराज

***सावळापूरकर, गजानन शिवानंद***

**वेदधर्म प्रसारक, समाजप्रबोधक**

**१७ मे १९१८ – ६ डिसेंबर १९८७**

**प**श्चिम बंगालमधील कोलकात्याजवळच्या खड्गपूर गावात माता मंगला भगवती सोनामाता व पिता शिवानंद स्वामी यांच्या पोटी गजानन सावळापूरकर यांचा जन्म झाला. त्यांचे मूळ नाव लक्ष्मण. घरातील वातावरण शिवभक्तीचे होते. त्यांच्या आजोळीदेखील आध्यात्मिक

वातावरण होते. महाराजांचे मूळ घराणे विदर्भातील सावळापूर येथील असल्यामुळे ते सावळापूरकर हे आडनाव लावू लागले. श्री गजानन महाराजांच्या मातु:श्री सोनामाता यांचे काका श्री गंगाधर महाराज अक्कलकोट येथे श्री स्वामी- समर्थ यांचे शिष्य बाळप्पा महाराज यांनी स्थापन केलेल्या पीठावर प्रमुख होते. त्यांना खड्गपूर येथे एक विलक्षण तेजस्वी मूल जन्माला आले आहे, असा दृष्टान्त झाला.

श्री गजानन महाराज हेच ते तेजस्वी मूल असे जाणून श्री गंगाधर स्वामींनी त्यांना खामगाव येथे आणले. अक्कलकोट, खामगाव येथे त्यांचे मॅट्रिकपर्यंत शिक्षण झाले. हिंदी, संस्कृत, मराठी, इंग्रजी आणि बंगाली भाषांवर त्यांचे प्रभुत्व होते. शाळेत त्यांची ओळख ‘कवी गजानन’ अशीच होती. विद्या संपादन करून पोटार्थी बनावे, अशी गजानन यांची मुळीच धारणा नव्हती. अद्‌भुत स्मरणशक्ती प्राप्त झालेल्या गजाननांनी अल्पावधीतच, म्हणजे विसाव्या वर्षातच वेद, उपनिषदे, आयुर्वेद, मनु:स्मृती यांचे सर्वंकष अध्ययन केले. त्याचबरोबर त्यांनी आधुनिक विज्ञानही अवगत करून घेतले. त्यामुळे १९३८ सालीच त्यांना अक्कलकोट स्वामी पीठाचे अधिकारी म्हणून नियुक्त करण्यात आले. माघ शुद्ध दशमीला (इ.स. १९३८) त्यांना गुप्तरूपाने कृष्णशक्तिमंत्राची दीक्षा मिळाली. अक्कलकोटचे समर्थपीठ म्हणजे गुरुमंदिर. हे पुढे ४६ वर्षे श्री गजानन महाराजांची कर्मभूमी झाली. या गुरुमंदिरात महाराजांनी चार वर्षे कृष्णशक्तिमंत्राची साधना केली.

स

१९४२ मध्ये या साधनेची पूर्तता झाल्यानंतर त्यांना श्रीपरशुरामांनी महात्रिपुरीमंत्राची आणखी दीक्षा देऊन पूर्णाभिषेक केला. ‘मी श्रुतींचे पुनरुज्जीवन करीन’ अशी प्रतिज्ञा श्री गजानन महाराजांनी केली. महाराजांच्या जीवनात वेदधर्माला त्यांनी नेहमीच प्रमुख स्थान दिले. सर्व जगामध्ये वेदधर्माचा प्रसार व्हावा ही त्यांची मनीषा होती. आज त्यांचे जगभरात अनुयायी आहेत.

अग्नी हे सकल विश्वाचेच आद्यदैवत आहे असे ते मानत असल्यामुळे त्यांनी अग्निउपासनेलाही नेहमीच प्राधान्य दिले होते. १९३८ ते १९५० या तपभराच्या काळात श्रीपरशुरामांसोबत त्यांनी सहा तीर्थयात्रा केल्या. हिमालयातील यात्रेत त्यांनी चिरंजीव व्यासदर्शन घेतले, त्याचप्रमाणे गंधमादन पर्वत आणि कैलासपर्वताचे दर्शनही त्यांनी घेतले.

चिपळूण येथील श्रीपरशुरामक्षेत्र, पंढरपूर आणि श्रीशैल्य या पवित्र स्थळांचेही त्यांनी दर्शन घेतले. महाराज स्वत:च्या हाताने स्वयंपाक करीत असत; पण एकदा चहा करताना अचानक अग्नी प्रज्वलित झाला. महाराजांना त्यातून संकेत मिळाला. तेव्हापासून त्यांनी स्वत: स्वयंपाक करणे बंद केले.

द्रव्याला स्पर्श न करणे, अग्नी प्रज्वलित न करणे, सोन्याला हात न लावणे, वहाणा न घालणे, शिवलेले वस्त्र न परिधान करणे, अशी बंधने महाराज कटाक्षाने पाळत असत. गोब्राह्मण प्रतिपालन या संकल्पनेचा पुरस्कार श्रीमहाराजांनी प्रकर्षाने केला. गोब्राह्मणांची काळजी घेणे म्हणजे यज्ञसंस्थेचे रक्षण आणि तिची जोपासना करणे होय. ‘गवामंगेषु तिष्ठान्ति भुवनानिचतुर्दशा । यस्मात् तस्मात् शिवमेस्यात् इहलोके परचय ॥’ गाईमुळेच इह आणि परलोकांमध्ये कल्याण होते आणि शिवाप्रत जाता येते, असे ते सांगत.

श्री गजानन महाराजांनी प्रपंचही व्यवस्थित केला. त्यांच्या अर्धांगिनी शारदामाता शालीन आणि ममताळू होत्या. त्यांनीच अक्कलकोट आणि पुढे शिवपुरीला असंख्य भक्तगणांना आपल्या मायेने जोपासले. वेदधर्ममय जीवन व्यतीत केलेल्या श्री गजानन महाराजांचे कार्य त्यांनी बरोबर ओळखले होते. महाराजांच्या जाण्याने तर त्यांनी अन्नत्याग करून दहा दिवसांतच या जगाचा निरोप घेतला.

महाराजांनी वेदधर्म, सत्शील धर्माचरणाचा उद्‌बोध करून कित्येकांना या जगाच्या वहिवाटीमध्ये आदर्श पुरुष, आदर्श स्त्री म्हणून संस्कारित केले आहे. गजानन महाराजांचा स्नेहबंध सोनगडच्या शीख धर्मसंस्थेशीही दृढ झाला होता. त्यांना गुरुग्रंथसाहेबाच्या शेजारीच बसायला आसन देऊन त्यांचा मोठाच बहुमान केला

होता. श्री गजानन महाराजांनी मार्गशीर्ष वद्य द्वितीया या दिवशी पृथ्वीतलावरचे आपले कार्य आटोपते घेतले. शिवपुरी, उत्तर भारत येथे महाराजांचे सुपुत्र श्री श्रीकांतजी वेदविज्ञानाचा अभ्यासक्रम तेथील अभ्यासकांकडून करवून घेत आहेत.

– संदीप राऊत

**सावळाराम महाराज**
**कीर्तनकार, समाजप्रबोधक**
**१९२७ – १८ फेब्रुवारी १९९२**



**सा**वळाराम महाराजांचा जन्म ठाणे जिल्ह्यातील डोंबिवली परिसरात कोपर येथे, एका सामान्य गरीब कुटुंबात झाला. गरिबीमुळे शिक्षण होऊ शकले नाही. लहानपणी त्यांना गुराख्याचे काम करावे लागले. नंतर चरितार्थासाठी शिधावाटप दुकानात कष्टाची नोकरी करावी लागली. मिळकत अपुरी पडे म्हणून त्यांनी दुधाचा जोडधंदा केला. त्यांच्या पत्नीचे नाव सतुलाबाई. त्यांनी पतीला प्रपंच चालवण्यात चांगली साथ दिली.

सावळाराम यांची ओढ भगवद्‌भक्तीकडे होती. ते १९६४ पासून आळंदी-पंढरीची वारी करू लागले. वारकऱ्यांचे प्रिय ग्रंथ म्हणजे गीता, ज्ञानेश्वरी, भागवत व गाथा. सावळारामांनी त्यांचे पठण केले. मौनव्रत धरून एकाग्र चित्ताने भंडारा डोंगरावर साधना केली. नामस्मरण केल्यावरही त्यांच्या मनाचे समाधान होईना. शेवटी ते पनवेल तालुक्यात तळोजे निवासी सद्‌गुरू वामनबाबा महाराजांकडे गेले. त्यांच्या कृपेने त्यांना अनुग्रह मिळाला. श्रीगुरूंच्या आज्ञेने व मार्गदर्शनाने कीर्तनसेवेचा आरंभ झाला. अज्ञानी, मागासलेल्या, अंधश्रद्धेत चाचपडणाऱ्या समाजाला ज्ञानाचे अंजन घालून जागे केले. अनाचार, दुष्टरूढी, व्यसनाधीनता, कलहप्रियता यांवर त्यांनी कोरडे ओढले. कीर्तनातून अत्यंत समर्पक दृष्टान्त देऊन परिणाम घडवला.

सावळारामबुवांची गावोगावी सुश्राव्य कीर्तने होत. ते गावातील भांडणे, भाऊबंदकी मिटवीत. गावकऱ्यांना भक्तिमार्गाचा सुलभ रस्ता दाखवीत. सावळाराम महाराजांनी धनिकांकडून मोठ्या देणग्या मिळवून आळंदी-पंढरीच्या वारकऱ्यांसाठी, विशेषत: आगरी समाजासाठी धर्मशाळा बांधल्या. काही ठिकाणी शिक्षणाची सोय नव्हती, तेथे शाळा काढल्या.

बुवांनी कीर्तनाद्वारे सामाजिक, शैक्षणिक, सांस्कृतिक प्रगती साधली. आगरी समाजाला मानाचे स्थान मिळवून देण्याचे श्रेय बुवांना आहे. लोकांनी बुवांच्या कार्याची पावती म्हणून रामनगर, डोंबिवली येथे भव्य-दिव्य मंदिर उभारले. सद्‌गुरू वामनबाबांच्या १९५८ मधील निर्वाणानंतर सावळारामबुवांची जबाबदारी वाढली.

सप्ताह, पारायणे, अनुष्ठाने यांद्वारे जनसंपर्क व प्रबोधन सुरूच होते. आता त्यांनी बरेच कीर्तनकार तयार केले. त्यांच्या शिष्यांमध्ये ब्राह्मण, मराठा, आगरी, कोळी आहेत. त्यांचा शिष्यवर्ग विशेषकरून पनवेल तालुक्यात, नाशिकमध्ये इगतपुरी भागात, मुंबईत खार, वांद्रे या ठिकाणी आहे. त्यांच्या कार्याचा केंद्रबिंदू डोंबिवली येथे आहे. महाराजांनी ह.भ.प. विष्णू धोंडू म्हात्रे, गंगाराम राधा ठाकूर, चरू बामा म्हात्रे, सुपुत्र ह.भ.प. वासुदेव महाराज यांच्यावर सर्व जबाबदारी सोपवून वयाच्या पासष्टाव्या वर्षी वैकुंठगमन केले.

– वि.ग. जोशी

**संदर्भ :**

१. *'भक्तिसंगम' मासिक, मे १९९३.*

स

## सिद्धारूढ स्वामी
**शिव संप्रदाय, सिद्धयोगी, सत्पुरुष**
**२६ मार्च १८३६ – २१ ऑगस्ट १९२९**



सिद्धप्पा म्हणजेच सिद्धारूढ स्वामी यांचा जन्म कर्नाटक राज्यातील चालकपुरा येथे रामनवमीच्या शुभदिनी झाला. त्यांचे वडील शांतप्पा यांना मुलाच्या जन्माआधी भगवान शंकरांनी स्वप्नात दृष्टान्त दिला होता. सिद्धप्पा यांच्या आईचे नाव देव मल्लम्मा असे होते. त्यांच्या घरातील वातावरण धार्मिक होते. शांतप्पा लिंगायत समाजातील असून त्यांनी वीरभद्रय्या यांच्याकडून दीक्षा घेतली होती.

लहानपणापासून सिद्धप्पांबद्दल एक चमत्कारी बालक अशी ख्याती सर्वत्र पसरली. थोडेसे तीळ अनेक जणांना वाटूनही शिल्लक उरणे, मेलेल्या म्हशीला जिवंत करणे, असे चमत्कार त्यांच्याबद्दल सांगितले जातात. सिद्धप्पाला शाळेत घालण्याचा विचार सुरू झाला तेव्हा त्याने आईवडिलांना नकार देऊन, ‘त्या मायावी जगात मला पाठवू नका. मला जगाच्या शाळेत शिकायचे आहे आणि जनताजनार्दनाला स्नेहबंधाचे महत्त्व सांगायचे आहे,’ अशी विनवणी केली. यावर आई-वडिलांनीही त्यांना शाळेत घालण्याचा विचार सोडून दिला.

सिद्धप्पाला बालपणातच सद्‌गुरुशोधाचा ध्यास लागला होता. त्यासाठी त्याने दिवसेंदिवस अथक वणवण केली. तो कर्नाटकातील मल्लिकार्जुन तीर्थाच्या गजदंडस्वामींच्या मठात जाऊन पोहोचला. गजदंडस्वामींनी सिद्धप्पाचे तेज जाणले. त्याला मठात ठेवून घेतले. गजदंडस्वामींचे प्रवचन सिद्धप्पा तासन्‌तास उभ्यानेच ऐके. एव्हांना सिद्धप्पा वादविवादात प्रवीण बनला. त्याने मठातील महापंडित सुबय्या शास्त्रींनाही एके दिवशी वादविवादात हरवले. त्यामुळे प्रसन्न होऊन गजदंडस्वामींनी त्यास ‘सिद्धारूढ’ हे नाव दिले आणि अनुभवसंपन्न होण्यासाठी देशाटन करण्याची आज्ञा केली. त्यानुसार सिद्धारूढ स्वामी देशाटनास निघाले. वाटेतील लोकांना ज्ञानदान करताकरताच किष्किंधास्थळी जाऊन त्यांनी विरूपाक्ष देवाचे आशीर्वाद घेतले. हेमकूट पर्वतावर जाऊन अवघड समाधियोग पूर्ण केला. नंतर ते तिरुपतीला गेले.

दशकभर भ्रमंती करून, आत्मज्ञान मिळवून, लोकांना बोधामृत पाजून ते हुबळीला आले. तेथील जनसागराने त्यांचे उत्स्फूर्त स्वागत केले. यथावकाश तेथे सिद्धारूढ स्वामींसाठी आश्रम बांधला गेला व तेथे रोज निरूपणे होऊ लागली. हुबळीलाच एकदा कर्नाटकातील एक कृष्णभक्त कलावतीदेवी व त्यांचे यजमान स्वामींना भेटावयास गेले. तेव्हा स्वामींनी त्यांच्या मस्तकावर हात ठेवला आणि ‘ॐ नम: शिवाय’ मंत्र जपण्यास सांगितले. तेव्हापासून कलावतीदेवींचे जीवन बदलून गेले.

प्रपंच करूनही त्या पुढे अनेकांच्या आध्यात्मिक क्षेत्रात माता कलावतीदेवी म्हणून विख्यात झाल्या. महाराष्ट्रातील गोंदवलेकर महाराजांशी सिद्धारूढ स्वामींचा विशेष स्नेह होता. महाराष्ट्रातील नाशिक, सातारा, यवतमाळ, कोल्हापूर, नांदेड अशा जिल्ह्यांत सिद्धारूढ स्वामींचे लाखो भाविक भक्त आहेत. सिद्धारूढ स्वामी आपल्या सिद्धीने अनेकांच्या व्याधी, समस्या बऱ्या करीत. अनेकांना त्यांनी मरणासन्न स्थितीतून बाहेर काढले.

महाशिवरात्रीच्या दिवसांत हुबळी येथे मोठा उत्सव साजरा करण्यात येतो. एके वर्षी भीषण दुष्काळ पडला. स्वामींनी त्या वर्षी पाण्याअभावी उत्सव साजरा न

करण्याचे ठरविले. पण भक्तांनी, 'आम्ही दूरवरून पाणी आणू' असे म्हटल्यावर स्वामींनी एक भांडे घेतले व आकाशाखाली धरले. काही काळातच पाऊस बरसू लागला. सिद्धारूढ स्वामींनी आपल्या ९३ वर्षांच्या हयातीत अगणित जणांना सन्मार्गाचा मार्ग दाखवला. स्वामींनी नामस्मरण, जप यांचे माणसाच्या जीवनातील महत्त्व जाणले होते. जो कुणी पूर्ण श्रद्धेने हा नामजप करील त्याच्या वाट्याला विपदा केव्हाच येणार नाहीत, हे ते निक्षून सांगत. 'ॐ नम: शिवाय' या शिवमंत्रावर त्यांची प्रगाढ श्रद्धा आणि निष्ठा होती. सिद्धारूढ स्वामींनी कधीच लिखित स्वरूपात काही लिहून ठेवले नाही. श्रावण वद्य प्रतिपदा, शके १८५१ रोजी हुबळी येथील मठातच त्यांनी समाधी घेतली. हुबळी येथील त्यांच्या मठाद्वारे स्वामींचे कार्य त्यांचे अनुयायी व भक्त निष्ठेने पुढे नेत आहेत.

— संदीप राऊत

## सुबंध, प्रल्हादबुवा सीताराम

**वारकरी संप्रदाय, कीर्तनकार, प्रवचनकार, लेखक**
**१८९५ – २६ जानेवारी १९६५**



प्रल्हादबुवा सीताराम सुबंध यांची प्रमुख ओळख म्हणजे ते जोग महाराजांचे प्रिय शिष्य तर होतेच; परंतु आदर्श कीर्तनकार, प्रवचनकार व व्यासंगी, साक्षेपी लेखक होते. त्यांनी महाराष्ट्रभर फिरून समाजोपयोगी व राष्ट्रीय कार्य केले. बुवा आळंदीला राहिले आणि त्यांनी जोग महाराजांकडून वारकरी पंथाची दीक्षा घेतली. संतसाहित्याच्या अभ्यासातही त्यांनी जोग महाराजांचे मार्गदर्शन घेतले. संतवाङ्मयाच्या अभ्यासकांना बुवांनी कायमस्वरूपी उपकृत करून ठेवले आहे. ते योगाभ्यास नियमाने करीत, त्यामुळे त्यांना उत्तम आरोग्य लाभले व त्याचा उपयोग बुवांच्या गावोगावी कीर्तने, प्रवचने, व्याख्याने करण्यासाठी झाला.

महाराष्ट्रभर त्यांचे चहाते होते. पुण्यात राहून प्रल्हादबुवांनी वेदविद्येचे सखोल अध्ययन केले. वारकरी संप्रदायात त्यांची 'थोर संत' म्हणून गणना होते. ते परिश्रमी, अभ्यासू व चिकाटीचे लेखक होते. बहुजनसमाजाला शिक्षणाचे महत्त्व पटविण्याचे त्यांचे कार्य उल्लेखनीय आहे. त्यांना स्वत:ला कमी ऐकू येई; पण त्यांचे संभाषण, निरूपण स्नेहल, प्रासादिक व अभ्यासपूर्ण असे. त्यांच्यात साधकाची, उपासकाची प्रवृत्ती होती. त्यांना प्रवासाची आवड होती, तसेच मित्र जोडण्याची कलाही अवगत होती. या अभ्यासू लेखकाला द्रव्यलाभ नव्हता. त्यामुळे पुस्तकांच्या मुद्रणासाठी व प्रकाशनासाठी त्यांना खूप कष्ट पडले.

अनेक वेदान्त ग्रंथांचे अनुवाद करण्यासोबत त्यांनी संत ज्ञानेश्वर व नामदेव यांच्या रचनांच्या सार्थ प्रती प्रकाशित केल्या. श्रेष्ठ कीर्तनकारांकडून समाज-प्रबोधनाच्या ज्या अपेक्षा असतात, त्या त्यांनी पूर्ण केल्या. वारकरी वर्गाचा त्यांनी मार्मिक अभ्यास केला व म्हटले, ''या संप्रदायामध्ये श्रमजीवी आणि अज्ञ वर्ग विशेष आहे खरा; परंतु तो भावनाप्रधान आहे. त्यांच्या श्रद्धेचा विनियोग त्यांच्या उद्धाराकरिता झाला पाहिजे.'' बुवांनी कृतज्ञतापूर्वक आपल्या प्रत्येक ग्रंथात आश्रयदात्यांची यादी दिली आहे.

अकोला येथे श्री शंकराचार्यांकडून त्यांना 'संत-वाङ्मय विशारद' अशी सन्मान्य पदवी देऊन गौरविण्यात आले. वयाच्या सत्तराव्या वर्षी पुणे येथे त्यांचे देहावसान झाले. प्रल्हादबुवा सुबंध यांच्या व्यासंगी लेखनाचे

सातत्य त्यांच्या श्रेष्ठ ग्रंथसंपदेवरून सहज नजरेत भरण्याजोगे आहे : 'वेदान्तयुक्तिप्रकाश दर्शन', (१९२९), 'अनुभवामृत दीपिका' खंड १ (१९३०), 'अनुभवामृत दीपिका' खंड २ (१९३३), 'विचारचंद्रोदयदर्शन' (१९३६), 'पासष्टी प्रदीप' (१९३६) मराठी, 'ओम्' (१९३७), 'वृत्ति प्रभाकर' (१९४०), 'हरिपाठदीपिका' (१९४२), 'पासष्टी प्रदीप' (१९४२) हिंदी, 'सार्थ नामदेवगाथा' खंड १ (१९४९), 'सार्थ नामदेवगाथा' खंड २ (१९५१), 'सार्थ नामदेवगाथा' खंड ३ (१९५४), 'सार्थ नामदेवगाथा' खंड ४ (१९५६), 'अनुभवामृतदीपिका' भाग १ व २, द्वितीय आवृत्ती (१९५६), 'सार्थ नामदेवगाथा' खंड ५ (१९५८), 'सार्थ नामदेवगाथा' खंड ६ (१९६०).

— वि.ग. जोशी

**संदर्भ :**

१. *'प्रल्हादबुवा सीताराम सुबंध गौरव ग्रंथ'; १९९२.*

## स्वामी चिन्मयानंद सरस्वती

***मेनन, बालकृष्ण***

**चिन्मय मिशनचे संस्थापक**

**८ मे १९१६ -**



**स्वा**मी चिन्मयानंद यांचा जन्म केरळ राज्यातील एर्नाकुलम या गावात झाला. त्यांचे नाव बालकृष्ण मेनन. त्यांना बालन म्हणत. एकदा ज्योतिषाने त्यांच्या जीवनात राजयोग आहे असे सांगितले, तेव्हा त्यांच्या कुटुंबीयांना वाटले, की हा निश्चितच भौतिक धनसंपदेने समृद्ध असा खूप मोठा माणूस होईल. त्यामुळे घरात बालनचे खूप लाड होऊ लागले. मात्र, घरातील कर्मकांडे व पूजाअर्चा यांमध्ये बालन कधीच रमत नसे.

दुर्दैवाने, बालन चार वर्षांचा असताना त्याची आई देवाघरी गेली. त्यामुळे त्याच्या चार मावश्यांनी त्याचा अन्य भावंडांसह सांभाळ केला. लहानपणी, लाडाकोडात वाढलेला बालन खूप धडपड्या होता. एर्नाकुलमच्या शाळेत शिक्षण घेतल्यानंतर त्याला लखनौच्या महाविद्यालयात पुढील शिक्षणासाठी धाडले. तेथे बालनच्या स्वतंत्र विचारांना मोकळे आकाश मिळू लागले. अहंकार जोपासलेल्या बालकृष्णमधील बुद्धिमान, बिनधास्त तरुण अधिकच उद्दाम बनला. 'माणसांमुळेच देव मोठा झाला, मग त्याची पूजा का करायची?' असा प्रश्न तो विचारत असे.

बालकृष्णचे इंग्रजी उत्तम होते. पण कायद्याच्या अभ्यासातही त्याला रस वाटेनासा झाला. वर्गात गैरहजर राहूनही, पापभीरू शिक्षकांना गोंधळात टाकून तो परीक्षेस बसू लागला. स्वातंत्र्यसंग्राम अगदी शिगेला पोहोचला होता. १९४२ ची चळवळ ऐन भरात होती. बालकृष्ण मेननही या रणधुमाळीत सामील झाले. अटकेचे फर्मान निघताच ते भूमिगत झाले. एबोटाबाद, (सध्या पाकिस्तानात असलेले) येथे भूमिगत राहिल्यानंतर, तेथेच इंग्रजांच्या छावणीत वेगळ्या ओळखीने त्यांनी नोकरीही केली.

काही काळ नोकरी केल्यानंतर बालकृष्ण पंजाबात आले आणि पुन्हा स्वातंत्र्यलढ्यात उतरले. या वेळी त्यांना अटक होऊन त्यांची तुरुंगात रवानगी झाली. परंतु तुरुंगात ते तेथील अस्वच्छ वातावरणामुळे आजारी पडले, तेव्हा त्यांना आजारी अवस्थेत रस्त्यावर फेकण्यात आले. एका ख्रिस्ती स्त्रीने त्यांना घरी नेऊन त्यांच्यावर औषधोपचार केले. बरे झाल्यानंतर मात्र बालकृष्ण बडोद्याला, आपल्या भावाकडे आले.

स

बडोद्याच्या वास्तव्यात बालकृष्णांच्या आयुष्याला वळण मिळाले आणि जगण्याचे प्रयोजनही सापडले. पत्रकारितेचा अभ्यास पूर्ण केल्यानंतर त्यांनी सामान्यातिसामान्यांचे प्रश्न, परिस्थिती जगासमोर आणण्याच्या उद्देशाने ‘मोर्चा’ नावाचे पत्रक सुरू केले. तत्कालीन ‘माय मॅगझीन’ या नियतकालिकातून त्यांना स्वामी शिवानंद यांची माहिती मिळाली. बालकृष्णांनी स्वामी शिवानंदांची भेट घेतली.

बालकृष्णांच्या ईप्सित ध्येयासाठी या भेटीतून दृष्टी आणि दिशा मिळाली. त्यांनी ‘फ्रीप्रेस’ नावाचे वृत्तपत्र सुरू केले. पुढे त्यांनी ‘नॅशनल हेराल्ड’च्या सहसंपादकपदाचीही जबाबदारी पेलली. याच काळात बालकृष्ण यांनी, माणसाच्या जीवनव्यवहारात त्याला जगण्यासाठी करावी लागणारी कृत्रिम धडपड पाहून तत्त्वज्ञानाचा अभ्यास सुरू केला. त्यांनी जगभरातल्या बहुतांश तत्त्वज्ञानांचा, संस्कृतींचा धांडोळा घेतला आणि त्यांना जाणवले की, परमेश्वरप्राप्तीवाचून आयुष्य कुचकामी असते.

१९४७ साली वैशाखात, बालकृष्ण हृषिकेश येथे स्वामी शिवानंदांच्या आश्रमात गेले. दोन वर्षांनंतरच्या कठोर कसोट्यांनंतर स्वामींनी बालकृष्णांना दीक्षा दिली, आणि त्यांचे ‘चिन्मयानंद सरस्वती’ असे नामकरण केले. याच काळात स्वामी शिवानंदांच्या आज्ञेवरून चिन्मयानंदांनी तेथीलच स्वामी तपोवन महाराजांकडेही अभ्यास करून गहन तत्त्वज्ञान आत्मसात केले. चिन्मयानंद १९५० साली पुणे मुक्कामी दाखल झाले व २३ डिसेंबर १९५१ रोजी त्यांनी ‘चला हिंदू होऊ या’ या विषयावर पहिल्यांदाच प्रवचन दिले. पुढे ‘ज्ञानयज्ञ’ या नावाने प्रवचनांची ही मालिका सुरू झाली. त्यांना प्रवचनांसाठी ठिकठिकाणची निमंत्रणे येऊ लागली. त्यातूनच त्यांचा एक अनुयायिवर्ग तयार झाला. त्यांच्या मद्रास येथील अनुयायांकडून ‘चिन्मय मिशन’ या संस्थेचा प्रस्ताव आला.

चिन्मयानंदांनी त्यांच्या उद्देशांना, हेतूंना नीट पारखून संकल्पित ‘चिन्मय मिशन’ची स्थापना करण्यास परवानगी दिली. ‘चिन्मय युवा केंद्रा’ची स्थापना करून त्यांनी केंद्रामार्फत तरुणांसाठी व्याख्यानमाला, शिबिरे, सहली आयोजित केल्या. त्यांनी युवाशक्तीला प्रोत्साहन देऊन, तिचा उचित उपयोग करून घेण्याच्या उद्देशाने ‘सांदिपनी साधनालय’ सुरू केले. तेथे त्यांनी अडीच वर्षांच्या वेदान्ताच्या अभ्यासक्रमाची बांधणी केली.

‘आजचा तरुण निरुपयोगी नाही. त्याचा योग्य उपयोग केला जात नाही. तो निष्काळजीपणे वागत नाही. खरे तर, त्याची काळजी आपणच घेत नाही’, ही त्यांची आजच्या तरुणांप्रती समाजाच्या असलेल्या दृष्टिकोनाबद्दलची समीक्षा होती.

चिन्मय मिशनच्या कार्याचा प्रसार आता भारतभर झाला आहे. ‘सेंट्रल चिन्मय मिशन ट्रस्ट, चिन्मय तपोवन ट्रस्ट, सिद्ध बारी, हिमाचल प्रदेश, तारा कल्चरल ट्रस्ट, सेंट्रल तपोवन ट्रस्ट अशा संस्थांमधून वेदान्त प्रसाराचे कार्य होत असते. या संस्थांना भारतभरासह परदेशाहूनही अभ्यासक येत असतात.

आध्यात्मिक सेवा, प्रसाराबरोबरच वैद्यकीय क्षेत्रातही चिन्मय मिशन अग्रेसर आहे. बेंगळुरू येथील चिन्मय हॉस्पिटल गरजूंसाठी वरदान ठरले आहे. आंध्रप्रदेशातील ‘चिन्मयारण्यम’ हा आश्रम, तसेच कोईंबतूर येथील सिरुवाणी येथेही वेदान्त प्रसाराचे कार्य चालते.

वृद्ध व्यक्तींसाठी कानपूर, चेन्नई, रेवा इत्यादी ठिकाणी ‘पितामह सदने’ बांधण्यात आली आहेत. स्वामी चिन्मयानंद सरस्वतींच्या इंग्रजी व्याख्यानांचा, प्रवचनांचा अनुवाद सात-आठ भाषांमधून झाला आहे आणि ती ग्रंथ आणि सीडीच्या स्वरूपात उपलब्ध आहेत. चिन्मय मिशनतर्फे ‘बालविहार’ हे मासिक प्रसिद्ध होत असते. आपल्या देशात स्वामी विवेकानंदांसारखे सत्‌शील युवक तयार करणे हेच चिन्मय मिशनचे ध्येय आहे. त्यासाठी ‘चिन्मय युवा केंद्र’ही स्थापन करण्यात आले आहे. स्वामी चिन्मयानंद यांनी वेदान्त अभ्यासक्रमाचा हा अनमोल ठेवा पुढील पिढ्यांकडे सोपवून जगाचा निरोप घेतला.

— संदीप राऊत

## स्वामी दासतीर्थ

**योगसाधक, लोकजागृती**

**१२ ऑक्टोबर १८९३ – मृत्युदिनांक अनुपलब्ध**



**स्वा**मी दासतीर्थ यांचा जन्म वर्धा जिल्ह्यातील आष्टी तालुक्यातील साहूर गावी झाला. तेथेच त्यांचे शालेय शिक्षण झाले. या गावी 'विदेहमूर्ती धूतकार बुवा' नावाचे एक महात्मा होते. त्यांच्याकडून विधायक कामे करण्याची प्रेरणा दासतीर्थ यांना बालपणीच मिळाली. त्यांनी राष्ट्रसंत तुकडोजी महाराज यांच्या कार्यास वाहून घेतले. युवकांना हाताशी धरून आरती मंडळे स्थापन केली. तीच मंडळे पुढे 'गुरुदेव सेवा मंडळ' या नावाने प्रसिद्ध झाली. गांधीजींच्या सेवाग्राममध्ये आणि विनोबाजींच्या पवनार आश्रमात दासतीर्थ राहिले व तेथे काम केले. या महापुरुषांच्या प्रेरणेने दासतीर्थांनी खांद्यावर तिरंगा घेऊन आजूबाजूच्या खेड्यांतून पदे म्हणत स्वराज्यप्राप्तीसाठी पदयात्रा काढल्या व लोकमानस चेतविले.

''हासत जाईन समरी, भीती न मजला काळाची,<br>
तोडीन बेडी पारतंत्र्याची, शपथ गांधींच्या चरणाची।<br>
बॉम्बही टाका अथवा घाला गोळी,<br>
मजवर बंदुकीची अथवा टांगा फासावरती,<br>
शपथ गांधींच्या चरणाची ॥''

अशी दासतीर्थ यांची पदे होती.

त्यांनी १९४३ मध्ये संत गाडगेबाबा मराठा धर्मशाळा, पंढरपूर येथून भूमिगत कार्य केले. राष्ट्रप्रेम व लोकजागृतीसाठी विधायक कार्यात झोकून देणारे कळकळीचे कार्यकर्ते स्वामी दासतीर्थ, स्वातंत्र्यप्राप्तीनंतर मात्र कोणतीही सरकारी सवलत न घेता समाजापासून दूर राहून योगसाधनेत रममाण झाले. त्यांनी मोर्शी तालुक्यात लोणी गावी, सातोरे यांच्या शेतात कुटी बांधून तिचे 'साधकाश्रम' असे नाव ठेवले. काही दिवस सावनेर तालुक्यात मुक्काम केला व नंतर देवलाबाद, तालुका रामटेक येथे कुटी बांधली व तिचे 'विवेकाश्रम' असे नामकरण केले. त्यांनी गरझदरी येथे अंजनगावापासून सुमारे १२ किलोमीटर अंतरावर 'शांकरी योग विद्या मंदिर' स्थापन केले.

'योगसाधनेमधूनच जीवनाचे सार्थक होते असे मानून ते योगसाधना, कीर्तन, प्रवचन, भागवत सप्ताह यांद्वारे समाजप्रबोधन करत असत.

– वि.ग. जोशी

**संदर्भ :**

१. *भट, नम्रता, संपादक; 'सकल संत चरित्रगाथा'.*

## स्वामी माधवनाथ

***वाकडे, महादेव विष्णू***

**नाथ संप्रदाय, प्रवचनकार**

**१ ऑक्टोबर १९१७ – ३० जुलै १९९६**

**म**हादेव ऊर्फ बाळासाहेब विष्णू वाकडे उपाख्य स्वामी माधवनाथ यांचे वडील विष्णुपंत व माता राधाबाई हे अत्यंत सश्रद्ध धार्मिक होते. हे कुटुंब कोकणातील 'कोकबन' या गावातील होते.

बाळासाहेबांचे चौथीपर्यंतचे शिक्षण गावात व पुढील शिक्षण मुरुड–जंजिरा, कल्याण येथे झाले. मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण झाल्यावर ते गावी परतले. पुढील शिक्षणाचा विचार सुरू असताना पितृछत्र हरपले. तेथून कुटुंबाची वणवण सुरू झाली. उदरनिर्वाहासाठी बाळासाहेब पुण्यात येऊन स्थायिक झाले. पुण्यात येऊन टेलरिंगचा कोर्स करून त्यांनी शिवणकाम करून कुटुंबाची

स



उपजीविका केली. प्रथम ते सोमवार पेठेत राहत होते. पुढे ते भागेश्वरी निवास, सदाशिव पेठ येथे राहण्यास आले. ‘कोकबन’ येथे बाळासाहेबांच्या घरासमोर सरदार तेंडुलकरांचे घर होते. त्यांची कन्या सरोजिनी तेंडुलकर व महादेव यांची लहानपणापासून मैत्री होती. या मैत्रीचे रूपांतर पुढे पती–पत्नीच्या नात्यात झाले. सरोजिनीचे वडील लवकरच निवर्तल्यामुळे आजोबा व काका यांच्या संस्कारात ही कन्या वाढली होती. विवाहानंतर सरोजिनीचे सौ. सरल हे नाव झाले. सरलने बाळासाहेबांना अखेरपर्यंत साथ दिली. या घरातील सर्वांचा परिचय असल्याने त्यांना या घरात जड गेले नाही. या संसारवेलीवर चार अपत्ये झाली.

त्यांनी शिवणकामावर उपजीविका करता करता ‘ब्यूटी क्लॉथ सेंटर’ हे दुकान सदाशिव पेठेत सुरू केले. त्याचाही उत्तम जम बसला. बाळासाहेब कडक शिस्तीचे होते. वेळ पाळण्याचीही त्यांची शिस्त होती. ते व्यवहारही दक्षतेने करीत असत. हे सर्व करताकरता अध्यात्माची आवड असल्याने तीही साधना सुरू होती. त्यांचे वाचन दांडगे होते. ‘जोडोनिया धन उत्तम व्यवहारे’प्रमाणे त्यांनी धन मिळवले. त्यांचा स्वभाव मनमिळाऊ आणि अचूक निर्णयक्षमतेचा होता. बाळासाहेबांनी गृहस्थाश्रम केला; पण प्रपंच हा परमार्थोन्मुख केला. प्रारंभीच्या काळात ते घरातील लोकांना धर्मग्रंथ वाचून दाखवीत असत. त्यांत ज्ञानेश्वरी, दासबोध, एकनाथी भागवत या धर्मग्रंथांचे ते वाचन करीत असत. त्यातून त्यांनी श्रीज्ञानेश्वरीचा प्रसार केला आणि पुढे श्रीस्वामी स्वरूपानंद मंडळ निर्माण करून अध्यात्मज्ञानाचा प्रसार केला.

माधवनाथ महाराजांनी रोजच्या प्रवचनसेवेने शुद्ध परमार्थाचे ज्ञान समाजाला दिले. ‘मार्गाधारे वर्तावे । विश्व हे मोहरे लावावे ॥’ या ज्ञानदेवांच्या उक्तीप्रमाणे त्यांनी समाजाला ज्ञानामृताचा बोध प्रदान केला. या माध्यमातून १९–२० ग्रंथांची निर्मिती झाली आहे. या अक्षरवाङ्मयातून आत्मप्रचितीचा अनुभव घडत आहे.

कर्मकांडाच्या कसरती करण्यापेक्षा भावपूर्ण अंत:करणाने भगवंताला जरी हाक मारली, तरी सेवा भगवद्चरणी रुजू होते, यावर भर देत त्यांनी समाजात साधकांना प्रेरणा दिली. पुढे अनेक संतांच्या भेटी झाल्या; पण मग सन १९६८ साली नाथ संप्रदायाच्या स्वामी स्वरूपानंदांनी त्यांना अनुग्रह दिला व प्रथमशिष्य केले. पू. स्वरूपानंदांनी १५ ऑगस्ट १९७४ रोजी देह सोडला. स्वामी स्वरूपानंदांनी त्यांना ‘स्वामी माधवनाथ’ हे नाव दिले व त्यानंतर नाथ संप्रदायाची सर्व सूत्रे बाळासाहेब म्हणजेच स्वामी माधवनाथांच्या हाती दिली. त्यांनी ती आयुष्यभर सांभाळली.

– डॉ. अजित कुलकर्णी

## स्वामी रामानंद तीर्थ
## खेडगीकर, व्यंकटराव भगवानराव

☛ ***मुख्य चरित्रनोंद – समाजकारण खंड***

## स्वामी वरदानंद भारती

***आठवले, अनंत दामोदर***

**तत्त्वज्ञ, कीर्तनकार, ग्रंथकार**

**२७ सप्टेंबर १९२० – ५ सप्टेंबर २००२**

☛ ***मुख्य चरित्रनोंद – प्राच्यविद्या खंड***

**दा**सगणू महाराज यांचे उत्तराधिकारी प्राचार्य अनंत दामोदर आठवले हे थोर चिंतक, तत्त्वज्ञ, निरूपणकार

स



आणि विद्वान लेखक म्हणून महाराष्ट्राला आणि संन्यास घेतल्यानंतर 'परमहंस स्वामी वरदानंद' या नावाने संपूर्ण उत्तर हिंदुस्थानाला परिचित आहेत.

अनंत दामोदर आठवले यांचा जन्म अनंतचतुर्दशीच्या दिवशी झाला. त्यांचे वडील दामोदरपंत हे दासगणूंचे शिष्य होते. अनंत ४-५ वर्षांचा असतानाच त्याच्या वडिलांचे निधन झाले. पुढे आई राधाबाई आणि संत दासगणू यांनी अनंतरावांचे संगोपन केले. दासगणूंना मूलबाळ नव्हते, त्यामुळे त्यांनी अनंतरावांचा पुत्रवत प्रेमाने सांभाळ केला. अनंताची नाजूक, अशक्त प्रकृती पाहून काळजीपोटी दासगणूंनी त्याला शाळेत न घालता घरीच, खाडिलकर मास्तरांची नियुक्ती केली. प्राथमिक शिक्षण घरीच झाल्यानंतर दासगणूंनी अनंताला माध्यमिक शिक्षणासाठी पंढरपूरच्या आपटे प्रशालेत घातले. हे विद्यालय दासगणूंच्या वाड्याशेजारीच होते.

अनंतरावांना बालपणापासूनच कुशाग्र बुद्धिमत्ता लाभलेली होती. आपण परीक्षेत गुण मिळविण्यासाठी शिकत नसून ज्ञानासाठी शिकतोय अशी जाणीव त्यांच्या ठायी या वयात होती. त्यांचा व्यासंग व संस्कृत पाठांतर दांडगे होते. संस्कृत भाषेवर त्यांनी चांगलेच प्रभुत्व संपादन करून मॅट्रिकला असतानाच 'शककर्ता शालिवाहन' नावाचे संस्कृत महाकाव्य लिहिले होते. १९४० साली ते मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले. ते १९४० साली पुढील शिक्षणासाठी पुण्यात आले. त्यांना तत्त्वज्ञान या विषयात पदवी संपादन करण्याची इच्छा होती. पण दासगणूंच्या इच्छेनुसार त्यांनी आयुर्वेद महाविद्यालयात प्रवेश घेतला. दासगणूंनी १९४१ साली लिमये यांची कन्या इंदिरा हिच्याशी अनंतरावांचे लग्न लावून दिले. अनंतराव १९४४ साली आयुर्वेद पदवीधर झाले आणि त्याच महाविद्यालयात त्यांना अध्यापक म्हणून सेवेची संधी मिळाली. १९५० साली त्यांनी आयुर्वेदातील पदव्युत्तर पदवी (मास्टर डिग्री) प्राप्त केली. त्यांनी १९६४ ते ६७ अशी ४ वर्षे प्राचार्यपद भूषविले. अध्यापन काळात त्यांनी आयुर्वेदावर विपुल लेखन केले. त्यांचे 'व्याधी विनिश्चय', 'शल्यशालाक्य तंत्र' आणि 'कौमारभृत्य तंत्र' हे ग्रंथ आजही आयुर्वेद शिक्षणक्रमात महत्त्वाचे मानले जातात. दासगणूंची इच्छा आणि वृद्धावस्था लक्षात घेऊन ते हरिकीर्तनार्थ प्राचार्यपदाचा राजीनामा देऊन सेवेतून मुक्त झाले.

अनंतरावांनी १९३६ साली, वयाच्या सोळाव्या वर्षी दासगणूंच्या इच्छेखातर वारकरी संप्रदायातील थोर महाराज ह.भ.प. केशवबुवा देशमुख यांच्यासमोर कीर्तन केले होते. त्यानंतर त्यांनी १९५० साली पुण्यातील गायआळीतील राममंदिरात 'अधिकमास नाम सोहळा' केला. या सोहळ्यापासून दासगणूंनी आपल्या सर्व कीर्तनप्रवचनादी जबाबदाऱ्या पूर्णपणे अनंतरावांवर सोपविल्या. सर्व जण अनंतरावांना महाराज न म्हणता 'अप्पा' म्हणत. त्यांचे कीर्तन म्हणजे पारंपरिक संत बोधासमवेतच आधुनिक ज्ञान-विज्ञानाची चतुरस्र मेजवानीच असे. देशाबद्दल जाज्वल्य निष्ठा त्यातून प्रगटत असे. त्यांनी कीर्तन सोहळे करून पुणे विद्यापीठातील संत ज्ञानदेव अध्यासनाच्या उभारणीसाठी प्रारंभिक काही लाखांचा निधी जमवून दिला. केवळ ईश्वराच्या भजन-पूजनातच दंग न राहता समाजसन्मुख वृत्तीने राष्ट्रीय कार्यासाठी पुढाकार घेऊन कार्य करण्याचा अनंतरावांचा स्वभावच होता. त्यांची प्रचंड ग्रंथसंपदा मराठी टीकावाङ्मयात व वैचारिक वाङ्मयात अढळ

स

स्वरूपाची व वैशिष्ट्यपूर्ण आहे. भगवद्‌गीता, उपनिषदे, ब्रह्मसूत्रे अशा प्रस्थानत्रयींवरील त्यांचे ग्रंथ, त्यांच्या उत्तुंग विद्वत्तेची व चिंतनाची साक्ष आहेत. संतकवी दासगणूंचे समग्र वाङ्मय त्यांनी दहा खंडांमध्ये प्रकाशित केले असून 'दासगणू चरित्र व काव्य विवेचन' या ग्रंथाद्वारे त्यांनी दासगणूंच्या वाङ्मयाचे मराठी साहित्यातील अनन्यसाधारण स्थान अधोरेखित केलेले आहे.

इरावती कर्वे, आनंद साधले, शिवाजी सावंत, कुसुमाग्रज यांनी आपल्या प्रतिभाविलासातून महाभारतातील व्यक्तिरेखांवर लेखन करताना केलेल्या विपर्यस्त व्यक्तिचित्रणाचा सडेतोडपणे समाचार घेण्यासाठी अनंतरावांनी 'महाभारताचे वास्तव दर्शन' हे पुस्तक लिहिले होते. एवढेच नव्हे, तर जाहीर प्रतिवादाचेही आव्हान दिले होते. त्यांनी 'ज्ञानेश्वरी', 'मनाचे श्लोक', 'रुक्मिणीस्वयंवर', 'शिवमहिम्न', 'विष्णुसहस्रनाम' या विषयांवरही ग्रंथलेखन केलेले आहे. भारतीय जीवनपद्धतीतील चार आश्रम व्यवस्थेचा (वर्णाश्रमधर्म) अनंतरावांना अभिमान होता. दासगणू यांना चतुर्थाश्रम म्हणजे संन्यास घेण्याची इच्छा होती; पण ती पूर्ण होऊ शकली नाही. गुरूची इच्छा अनंतरावांनी आपल्या कृतीतून पूर्ण करण्याचे ठरविले व ८ एप्रिल १९९१ रोजी उत्तरकाशी येथे महामंडलेश्वर विद्यानंद भारती यांच्याकडून संन्यास दीक्षा घेतली. उत्तरकाशी येथे त्यांनी 'मनुस्मृती'वर ११०० पानांचा ग्रंथ लिहिला आणि दि. ५ सप्टेंबर २००२ रोजी, श्रावण वद्य एकादशी दिनी शिष्यांसाठी-भक्तांसाठी एक संदेशकाव्य लिहून त्यांनी योगसाधनेद्वारा समाधी घेतली. त्यांच्या अंतिम निरोपाच्या संदेशकाव्यात ते म्हणतात :

मी म्हणजे ना शरीर । मी मद ग्रंथाचा संभार ॥
त्याचे वाचन चिंतन । यथाशक्ती आचरण ॥
हीच गुरुपूजा खरी । नीट धरावे अंतरी ॥

वद्य त्रयोदशीला त्यांचे पार्थिव विधिपूर्वक गंगार्पण करण्यात आले.

— विद्याधर ताठे

## श्री स्वामी समर्थ
**अवतारी सत्पुरुष, दत्त संप्रदाय**
**शके १७६० – १८००**



महाराष्ट्रातील पाच संप्रदायांपैकी दत्त संप्रदाय हा एक असून त्या संप्रदायातील चौथा अवतार म्हणून गणले गेलेले अक्कलकोटचे श्री स्वामी समर्थ महाराज यांचा आध्यात्मिकदृष्ट्या कार्यकाल पुष्कळ असला, तरी त्यांच्या ऐतिहासिकदृष्ट्या प्रकट असलेल्या कार्यकालाचा अवधी शके १७६० पासून असून त्यांनी शके १८०० मध्ये आपला देह निजानंदी विलीन केला. 'भिऊ नकोस, मी तुझ्या पाठीशी आहे' या त्यांच्या सुप्रसिद्ध अभिवचनामुळे सत्कार्यास भय नसण्याची आधारशक्ती त्यांच्या उपासकांना लाभली.

'आम्ही समाधिस्थानी राहून अधिकारपरत्वे भक्तांना दर्शन देऊ, त्यांच्या मनोकामना पूर्ण करू,' अशी ग्वाही त्यांनी दिली असल्याने महाराष्ट्र व महाराष्ट्राबाहेर आणि आता विदेशांतही त्यांचे भक्तगण विपुल संख्येने असून ठिकठिकाणी त्यांची मठ-मंदिरांच्या स्वरूपात उपासना केंद्रे आहेत. दत्त संप्रदायाची आध्यात्मिकदृष्ट्या अवतारपरंपरा सांगितली जाते ती अशी : वेद-पुराणातील अत्रिऋषी आणि अनसूया यांचा पुत्र श्रीदत्तात्रेय हा पहिला अवतार, त्यानंतर श्रीपाद श्रीवल्लभ, श्रीनृसिंह सरस्वती, श्रीस्वामीसमर्थ हे अनुक्रमे दुसरा, तिसरा,

आणि चौथा अवतार मानले जातात. ऐतिहासिकदृष्ट्या पाहिले, तर दत्तपरंपरेतील पहिला अवतार हा श्रीपाद श्रीवल्लभ यांचा होय. पूर्वेकडील प्रांतात (आंध्र) पीठापूर येथे चौदाव्या शतकात त्यांचा जन्म झाला.

कुरवपूर येथे त्यांचे वास्तव्य होते. तेथेच त्यांनी पुरश्चरण केले. 'पुन्हा भेटेन' असे अभिवचन त्यांनी अवतार संपविताना दिले. तेच पुढे श्रीनृसिंह सरस्वती म्हणून वऱ्हाडप्रांती, कारंजानगर येथे जन्मास आले. त्यांचा कार्यकाल शके १४०८ ते १४५८ असा असून शके १४५७ च्या अखेरीस ते श्रीशैल यात्रेस गेले व तेथील कर्दळी वनात गुप्त झाले. त्यानंतर सुमारे तीनशे वर्षांनी त्याच कर्दळी वनातून श्रीस्वामीसमर्थ हे एका वारुळातून प्रकट झाले. मात्र, अक्कलकोटला येण्यापूर्वी सोलापूर जिल्ह्यातील त्यांचा प्रकटकाल शके १७६० ते १८०० असा ४० वर्षांचा आहे. ते शके १७६० मध्ये मंगळवेढा येथे प्रकटले. तेथून मोहोळ, सोलापूरमार्गे ते शके १७७९ मध्ये अक्कलकोटला आले. तेथे त्यांनी २१ वर्षे वास्तव्य केले. शके १८०० मध्ये त्यांनी अवतारसमाप्ती केली. त्यांची समाधी अक्कलकोट येथील बुधवार पेठेतील मठात आहे. त्यांनी जिथे देह निजानंदी निमग्न केला व सतत जिथे त्यांचे वास्तव्य असे, त्या वटवृक्षाची साक्ष देत असलेला श्रीवटवृक्षस्वामी महाराज मठही विख्यात आहे.

चोळप्पा व बाळप्पा हे त्यांचे प्रमुख शिष्य होते. बाळप्पांच्या मठात त्यांचा दंड, रुद्राक्षमाळ व पादुका असून तो मठ गुरुमंदिर म्हणून प्रसिद्ध आहे. चोळप्पांच्या घराजवळच त्यांचे समाधिस्थान असल्याने बुधवार पेठेत तो समाधिमठ म्हणून प्रसिद्ध आहे. 'द्या' म्हणून प्रार्थना केल्यास जे दिले जाते, त्याला 'दत्तकृपा' असे म्हणतात. दत्तांची परंपरा व त्यांचे अवतारित्व यांविषयीचा उल्लेख त्यांच्या 'श्रीगुरुचरित्र' व 'श्रीगुरुलीलामृत' या दोन प्रमाणग्रंथांत पाहावयास मिळतो.

श्रीस्वामींची स्वरूपस्थिती व त्यांचे अवतारित्व यांविषयीचा एक उल्लेख 'श्रीस्वामीलीलामृत' या पंचाध्यायी पोथीत (नानात्मज गजानन सुत विरचित) पाहावयास मिळतो, तो असा : 'दत्तनगर मूळ पुरुष । वडाचे झाड विशेष । सत्य तेथ आमुचा वास । मनी संशयास न आणावे । आम्ही यजुर्वेदी ब्राह्मण । आमुचे नांव नृसिंहभान । आम्ही काश्यपगोत्रोत्पन्न । राशी मीन जाणावी ॥ जे सत्चित्सुखाचे कोंब । कलियुगी श्रीपाद श्रीवल्लभ । जगताकारणे स्वयंभु । सत्चित्प्रभू प्रकटले ॥ तैसा हा अवतार चवथा । त्याची ऐकावी कथा । वय सारे जाते वृथा । म्हणूनि सत्पथा धरावे । आयुष्य हे चंचलजीवा । या कारणे नित्य सेवा । सत्चित्सुखाचा देतील ठेवा । यात न मानावा संशय ॥'

त्यांच्या वचनबोधातून पाहावयास मिळणारी शिकवण अशी : *ही शिकवण कधी श्रीस्वामींच्या मुखातून प्रत्यक्षपणे प्रकट वेळी वा चरित्रकाराकडून सांगितली अशा स्वरूपात आहे :* सज्जनांच्या रक्षणासाठी आणि दुष्टांच्या निर्दालनासाठीच आपण अवतार घेतला असून इच्छापूर्ती व ज्ञानप्राप्ती हे भक्तांचे दोन्ही हेतू आपण पूर्ण करतो, अशी ग्वाही त्यांनी दिली आहे. इच्छापूर्ती झाल्यानंतर तरी भक्तिमार्गी होण्यासाठी नामस्मरणात्मक साधना करावी. त्यासाठी गुरुबोधाची आवश्यकता आहे. 'गुरुविण ज्ञान व्यर्थचि असे' असे सांगून साधकाने प्रयत्नवादी असावे, असे ते सांगतात. 'प्रयत्ने देवे होय सारथी' असे त्यांचे वचन आहे. 'द्यावे तैसेचि घ्यावे', 'पेरावे ते उगवते', 'शेत पिकवावे, शेत राखावे, शेत नित्य खावे', म्हणजेच नामाने देहरूपी शेतात बीज पेरून साधनमार्गाने ईश्वरदर्शनाचे फळ सदैव खावे, असे ते सांगतात.

'मैं गया नहीं । जिंदा हूँ । मैं तो अक्कलकोट में हूँ ।' असे स्वामी म्हणाले. त्याचा अर्थ चरित्रकारांनी फार सुंदर सांगितला आहे. ''अक्कल' म्हणजे ज्ञान, त्या ज्ञानस्वरूप आत्म्याभोवती इंद्रियांची तटबंदी आहे. ती तटबंदी म्हणजेच 'कोट' होय. एरव्ही ही इंद्रिये बहिर्मुख असतात. पण त्यांना नामसाधनबळे अंतर्मुख करावे, म्हणजे ती ज्ञानस्वरूप आत्म्यास ओळखतील. तसा मी अंतर्यामी सदैव असतोच. इंद्रियांना परमार्थानुकूल करून तुम्ही मला पाहावे.' 'ध्यानासी मूलाधार' गुरूची मूर्ती ।

पूजेसी मूल गुरुचरण असती। गुरुवाक्य हेचि मूलमंत्रबीज शंकर वदती। मोक्षासी मूल गुरुकृपा पाहिजे ॥' या ओवीत पूर्णत्वाने भक्तिमार्गाचे विवेचन येऊन गेलेले आहे. 'नवस केला, तर तो फेडावा', तसेच 'निंदा, द्वेष, अहंकार नसावा', सद्गुरूकडे जाताना विनम्रपणाने जावे हे सुचविताना त्यांनी सत्ता आणि धन यांचा दिमाख असलेल्या अधिकाऱ्यास 'लहान घोडे घेऊन ये' असे म्हटले, तर सेवेत स्वार्थ शिरू देऊ नये अन्यथा पुण्यसंचयास ओहोटी लागेल, हे सुचविताना 'गौ दाल खा गई' असे म्हटले आहे.

'नित्य कर्मे करावीत' असे सांगताना कर्मयोग व ध्यानयोग यांची सांगड घालावी, असे उपदेशिले आहे. 'अधिकारपरत्वे दर्शन देऊ' असे म्हणण्यात अधिकार म्हणजे 'उपासनाबळ', असे त्यांना अभिप्रेत आहे. आजकाल आणि फार वर्षांपूर्वीपासूनही दत्त संप्रदायातील अवतारित्वांची उपासना करणाऱ्यांची संख्या पुष्कळच आहे आणि ती आणखी वाढतच आहे. त्यामुळे आध्यात्मिक दृष्टीने तर अशा अवतारी सत्पुरुषांची उपासना करणे ही गोष्ट तर महत्त्वाची आहेच; पण सामाजिक दृष्टीने अशा सत्पुरुषांचे कार्य कोणते? तसेच, त्यांच्या उपासनेची फलश्रुती कोणती?, हा प्रश्न सर्वांच्याच मनात येऊन जातो. त्याची प्रधान तीन कारणे आहेत. पहिले म्हणजे : दर्शनसुखाने त्यांची कृपादृष्टी प्राप्त करून घेऊन त्यांच्या स्मरणाने संकल्प करून तो सिद्धीस जावा यासाठी पूजा-अभिषेक, पालखी-प्रदक्षिणा, भजन-निरूपण, नित्य स्वरूपात जप करणे आणि चरित्रग्रंथांचे पारायण करणे हा सोपा, सुलभ मार्ग उपलब्ध आहे. दुसरी गोष्ट म्हणजे : कडक सोवळे-ओवळे आणि आचरण वा उपासना खंडित झाली तर त्याची शिक्षा घडते या श्रद्धा वा समजुतीने नामसाधना व सदाचरणाचे पालन करण्याची काळजी घेतली जाते.

तिसरे कारण म्हणजे : सार्वजनिक क्षेत्रातील प्रतिकूलता आणि व्यक्तिगत जीवनातील दु:ख-संकटे एवढी वाढली आहेत, की अशासारख्या दैवताची उपासना करून मनोबल वाढवण्यासाठी आधारशक्ती प्राप्त करून घेणे, ही गरज निर्माण झाली आहे. या तीनही कारणांचा व्यापक हित-कल्याणाच्या दृष्टीने विचार केला तर सर्व समाज नव्हे; पण किमानपक्षी श्रद्धा-उपासना मार्गाने जाणाऱ्या उपासकांकडून अंशत: का होईना, पण नैतिकतेचे सामर्थ्य वाढविणे आणि सामाजिक शुद्धीसाठी सन्मार्ग दाखविणे हे कार्य प्रत्यक्ष घडून येत आहे, असे निश्चितपणाने म्हणता येईल.

— नरेंद्र कुंटे

**संदर्भ :**


१. कुळकर्णी, श्री.अ.; संपादन व भावानुवाद : श्रीसरस्वती गंगाधर कृत 'श्रीगुरुचरित्र'; ओवीबद्ध चरित्रग्रंथ; प्रकाशक : पू.श्री. वि.य. तथा नाना गद्रे परिवार, पुणे, द्वारा : दुर्वे, केशव अनंत, पुणे-५१.

२. श्रीब्रह्मनिष्ठ वैद्य, वामनबुवा; 'श्रीगुरुलीलामृत'; ओवीबद्ध चरित्रग्रंथ; प्रकाशक : केशव भिकाजी ढवळे, मुंबई-४.

३. प्रा. डॉ. कुंटे, नरेंद्र सदाशिव; संपादन व प्रस्तावना : 'नित्यक्रम आणि उपासना'; प्रकाशक : श्रीवटवृक्षस्वामी महाराज देवस्थान, अक्कलकोट.

४. कुलकर्णी, भाऊ तथा श्री.अ.; संपादन व विवेचन : 'अमृताच्या ओंजळी'; प्रकाशक : पू.श्री. वि.य. तथा नाना गद्रे परिवार, पुणे, द्वारा : दुर्वे, केशव अनंत ; पुणे- ५१.


## स्वामी स्वरूपानंद

***गोडबोले, रामचंद्र विष्णुपंत***

**नाथपंथ, गीतेचे भाष्यकार**

**१५ डिसेंबर १९०३ – १५ ऑगस्ट १९७४**

**स्वा**मी स्वरूपानंद हे आधुनिक काळातील साक्षात्कारी महापुरुष होत. स्वामी स्वरूपानंदांचे मूळ नाव रामचंद्र विष्णुपंत गोडबोले होते. त्यांच्या आईचे नाव रखुमाबाई हे होते. स्वरूपानंदांचा जन्म पावस (जि. रत्नागिरी) येथे (मार्गशीर्ष वद्य द्वादशी) रोजी झाला. पावस येथेच त्यांचे प्राथमिक शिक्षण झाले. नंतर ते रत्नागिरीस व तेथून पुढे मुंबईस माध्यमिक शिक्षणासाठी गेले. मुंबईस 'आर्यन एज्युकेशन सोसायटी'च्या विद्यालयात त्यांना श्री. घारपुरे या नावाचे तपोवृद्ध शिक्षक लाभले. त्यांच्यामुळे स्वरूपानंदांना शालेय



जीवनातच गीता, ज्ञानेश्वरी, गीतारहस्य इत्यादी ग्रंथांची गोडी लागली. स्वामी स्वरूपानंदांना लोकमान्य टिळकांबद्दल नितांत प्रेम होते. 'केसरी'च्या वाचनाने त्यांनीही राष्ट्रकार्यार्थ जीवन-समर्पण करण्याचा निश्चय केला. टिळकांनंतर महात्मा गांधी यांच्या पावलांवर पाऊल ठेवून त्यांनी कार्य सुरू केले.

राष्ट्रीय-मेळे, चरखा, स्वावलंबन, राष्ट्रीय-शिक्षण इत्यादी मार्ग त्यांनीही अवलंबिले. १९३० साली त्यांनी सत्याग्रहातही भाग घेतला. त्यांना येरवडा येथील कारावासात ठेवण्यात आले. या प्रसंगाच्या आधीच स्वामीजींना श्री गणेशनाथ तथा बाबामहाराज वैद्य यांच्याकडून सांप्रदायिक गुरूपदेश मिळाला होता. त्या वेळी स्वामीजी केवळ वीस वर्षांचे होते. बाबामहाराजांनी म्हटले होते, ''विरजण लावले आहे, दूध आता दूध राहिले नाही; पण दही व्हायला वेळ लागणारच!'' 'दही होण्याची', 'मंथन होण्याची' नि 'नवनीत येण्याची' साधना दीर्घकाळ करावी लागते.

स्वामीजी कारावासातही आध्यात्मिक साधना करीत. स्वामीजींची सद्‌गुरूंवर नितांत निष्ठा होती. बाबामहाराज नित्य ज्ञानेश्वरी वाचत. त्यांची पोथी जीर्ण झाली होती. १९२८ सालच्या सुमारास स्वामीजींनी उत्कृष्ट हस्ताक्षरात आणि पूर्ण निर्दोष अशी समग्र ज्ञानेश्वरी लिहून 'श्रीं'ना अर्पण केली. स्वामींनी आपल्या सद्‌गुरूंना 'नवरत्नहार'– अनुभूतिपर नऊ ओव्या – अर्पण केल्या. तेव्हा गुरुदेवांनीच त्यांना 'स्वरूपानंद' या नावाने संबोधिले. यानंतर स्वामीजी पावस येथे आले आणि आजारी पडले. ते सहा महिने अंथरुणावर खिळून होते. या आजारात त्यांनी 'अमृतधारा' नावाचे काव्य लिहिले. त्यात त्यांनी लिहिले आहे :

शुक्ल पक्ष भृगु-वासर रात्रौ आषाढीची नवमी ।
अठराशे छप्पन्न शकाब्दीं मृत्यु पावलो आम्ही ॥

(आषाढ शुद्ध नवमी, शुक्रवारी रात्री आम्ही मृत्यू पावलो; शके १८५६.) म्हणजे इ.स. १९३४ ची ही घटना आहे. त्या वेळी 'अहंकाराचे पूर्ण निर्वाण' झाले! त्यांची आध्यात्मिक 'सोऽहं साधना' आणि अनुभूती पराकोटीला पोहोचली. त्यानंतर ते 'पावस' येथेच राहिले. हळूहळू त्यांचा कीर्ति-सुगंध पसरू लागला. ते सांप्रदायिक दीक्षा देऊ लागले. त्यांचा शिष्य परिवार खूप मोठा आहे. त्यात स्वामी अमलानंद, स्वामी सत्यदेवानंद, स्वामी माधवनाथ ही प्रसिद्ध मंडळी होती. त्यांनी हा संप्रदाय पुढे चालवला.

स्वामी स्वरूपानंदांनी 'अभंग ज्ञानेश्वरी' (पूर्वार्ध व उत्तरार्ध), 'अभंग अमृतानुभव', 'भावार्थ गीता', 'चांगदेव पासष्टी' असे काही अनुवादात्मक ग्रंथ लिहिले. 'भावार्थगीता' हे गीतेवरील ज्ञानेश्वरीला धरून भाष्यच आहे. स्वरूपानंदांची भाषा अत्यंत ओघवती आणि प्रासादिक आहे. त्यांनी 'ज्ञानेश्वरी-नित्यपाठ' हा ज्ञानेश्वरीतील निवडक १०८ ओव्यांचा 'पाठ' सिद्ध केला आहे. हे संपादन वैशिष्ट्यपूर्ण आहे. ज्ञानेश्वरीची समग्र आध्यात्मिक शिकवण ध्यानी यावी या पद्धतीने ओव्यांची निवड व रचना केली आहे. साधकांसाठी तो एक स्वतंत्र चिंतनशील ग्रंथ आहे. ती केवळ मांडणी नाही, केवळ निवड नाही, तर ती एक आध्यात्मिक पाठांची अनुक्रमणिका आहे. याखेरीज स्वामी स्वरूपानंदांनी स्वतंत्र अभंग रचना केली आहे, ती 'संजीवनी गाथा' म्हणून प्रसिद्ध आहे. संजीवनी गाथेत दोनशेएकसष्ट (२६१) अभंग आहेत. 'अमृतधारा' या साकीबद्ध ग्रंथात त्यांच्या आजारपणात आलेले आध्यात्मिक अनुभव

ग्रथित आहेत. त्यांची 'तीन प्रवचने'ही प्रसिद्ध आहेत. याखेरीज स्वामीजींनी आपल्या शिष्यपरिवाराला वेळोवेळी जी पत्रे लिहिली, ती 'स्वरूप-पत्र-मंजूषा' या नावाने संग्रहित व विषयानुसार संपादित केलेली आहेत. (संपादक : स्वामी सत्यदेवानंद)

श्री स्वामी स्वरूपानंदांनी १५ ऑगस्ट १९७४ या दिवशी समाधी घेतली. त्यांची समाधी 'पावस' (जि. रत्नागिरी) येथे आहे. स्वामी स्वरूपानंदांची गुरुपरंपरा अशी : आदिनाथ-मत्स्येंद्र-गोरक्ष-गहिनी-निवृत्ती-ज्ञानदेव-देव-चुडामणी-गुंडाख्य-रामचंद्र-महादेव-रामचंद्र-विश्वनाथ-गणेश-स्वामी स्वरूपानंद.

– डॉ. वि.य. कुलकर्णी

**संदर्भ :**


१. *परांजपे, रा.य.; 'स्वामी स्वरूपानंद : जीवन, चरित्र आणि तत्त्वज्ञान'.*
२. *स्वामी स्वरूपानंद; 'अभंग-ज्ञानेश्वरी' : पूर्वार्ध-उत्तरार्ध.*
३. *स्वामी स्वरूपानंद; 'अमृतधारा'.*
४. *स्वामी स्वरूपानंद; 'संजीवनी गाथा'.*
५. *स्वामी स्वरूपानंद; 'ज्ञानेश्वरी-नित्यपाठ'.*
६. *स्वामी सत्यदेवानंद; 'स्वरूप-पत्र-मंजूषा'.*
७. *डॉ. कामत, अशोक; प्रा. कुलकर्णी, म.अ.; 'स्वामी स्वरूपानंद : जीवन-साहित्यदर्शन'.*
८. *मांडवगणे, पा.वा.; 'अचिंत्याचे चिंतन'.*


## स्वामी स्वानंदगिरी

***सावंत, बापू दौलत***

**वारकरी संप्रदाय, प्रवचनकार, गीताप्रसारक**

**जन्मदिनांक अनुपलब्ध – १९५४**

**स्वा**मी स्वानंदगिरी या नावाने प्रसिद्धी पावलेले बापू दौलत सावंत यांचा जन्म कोकणातील रत्नागिरी जिल्ह्यातील नांदिवडे या गावी झाला. शाळेत थोडेफार शिकून ते अन्य चाकरमान्यांप्रमाणेच मुंबईत आले. मुंबईत ते पिकेट रोडवरील एका तंबाखूच्या दुकानात विड्या वळण्याचे काम करत. त्यांच्यासह राहणारे नारायण संसारे नावाचे कामगार रोज स्नान केल्यानंतर धर्मग्रंथाचे पठण करीत. बापूंनाही ते आवडू लागले. तेही रोज स्तोत्रे वाचू लागले. हरिविजय, शिवलीलामृत असे ग्रंथ त्यांनी वाचून काढले. कीर्तने, भजने, प्रवचने ऐकताऐकताच एके दिवशी पंढरपुरात प्रस्थान ठेवते झाले आणि तेथे त्यांनी ह.भ.प. वासकरमहाराजांकडून माळ घेतली व ते वारकरी झाले.

पंढरपुरात गोविंदपुरा, तसेच आळंदीला गोपाळपुरात त्यांचे वास्तव्य होऊ लागले. मुंबईत पिकेट रोडवरच्या गीता पाठशाळेत त्यांनी वेदशास्त्रसंपन्न गुरुजी नरहरशास्त्री गोडसे यांच्या मार्गदर्शनाखाली भगवत्‌गीतेचा अभ्यास केला. श्रीक्षेत्र काशी येथे सारस्वत मठात जाऊन त्यांनी वेद, उपनिषदांचा अभ्यास केला. त्यांना मुंबईतील त्यांचे स्नेही बाबाजीराव शिंदे, तसेच ह.भ.प. गणपतमहाराज सावंत यांनी एकदा प्रवचन देण्याची संधी दिली.

त्यानंतर त्यांनी लोकाग्रहास्तव भगवद्‌गीतेवर प्रवचने देणे सुरू केले. याच काळात त्यांना करी रोड, मुंबई येथील दत्तमंदिरात पद्मनाथ स्वामींनी 'स्वामी स्वानंदगिरी' हे नाव दिले. १९२६ साली मुंबईत नारायण माधव कदम म्हणजेच बाळामास्तर यांच्या पुढाकाराने जागा संपादन केल्यानंतर 'भगवद्‌गीता स्वाध्याय मंडळा'ची स्थापना झाली. तेथे स्वानंदगिरींनी गीता आणि अन्य धर्मग्रंथांवर प्रवचने सुरू केली. त्यानंतर त्यांनी भायखळ्याच्या शिवमंदिरात प्रवचनांचा परिपाठ सुरू केला. नारळीपौर्णिमेला श्रावणी उत्सवाचे नियमित आयोजन केले. या आयोजनातून त्यांनी कित्येक मुलांना विधियुक्त यज्ञोपवित व्रतबंध संस्कार दिले. यातूनच त्यांचे हजारो शिष्य निर्माण झाले. त्यांना वेदादी धर्मविषयांत प्रवीण केले. स्वामींनी अनेक व्यसनी, अनीतिमान लोकांना सन्मार्गावर आणले. भगवद्‌गीतेचे सखोल अध्ययन आणि सूक्ष्म अभ्यासातूनच, तसेच धर्मग्रंथांच्या गर्भित अर्थांमधूनच माणसाची आध्यात्मिक उंची उन्नत होते, असे ते सांगत.

स्वामी स्वानंदगिरी यांनी उच्चभ्रू समाजाबरोबरच तळागाळातील लोकांचाही प्रकर्षाने विचार केला. भारतीय सर्वोच्च संस्कृतीतील वैदिक धर्म, ऋषिसंस्कृती

सामान्यातिसामान्यांच्या घरांपर्यंत, गावांपर्यंत पोहोचली पाहिजे असा त्यांचा आग्रह होता. संपूर्ण कोकणात त्यांनी झपाटल्यागत फिरून गीता स्वाध्यायाचा प्रसार केला. गोठणे, जांभवडे, झाडगाव नाका, तोंडली, सोनगाव अशा रत्नागिरी-सिंधुदुर्गातील कित्येक गावांत आणि पंढरपूर, पुणे, नाशिक, आळंदी अशा अनेक गावां-शहरांतून त्यांनी भगवत्‌भक्तीची ज्योत जनसामान्यांमध्ये प्रज्वलित केली. अनेक गावांत विठ्ठल मंदिरे बांधून तेथे महिला, मुले आणि तरुण, प्रौढांना गीता शिकवली. त्यांनी अध्यात्माचा प्रकांड अभ्यास केला. त्यातूनच ‘नित्यपाठ’, ‘सत्‌शास्त्र’, ‘पूर्णबोध’, ‘ईश्वरोपासना’, ‘सार्थ लघू ज्ञानेश्वरी’ या ग्रंथांची लिखित मौक्तिके त्यांनी लोकार्पण केली. या ग्रंथांच्या अनेक आवृत्त्याही निघाल्या. पौष शुद्ध सप्तमी म्हणजेच १९५४ साली त्यांना देवाज्ञा झाली. त्यांच्या पश्चात त्यांच्या शिष्यगणांनी चिपळूण येथे त्यांचे स्मारक ‘स्वानंदाश्रम’ या नावाने उभे केले आहे.

— संदीप राऊत

## स्वामी राम

***धिरणीकर, राम व्यंकटेश***

**योगविद्याप्रसारक**

***८ जून १९०३ — २४ सप्टेंबर १९७२***



आपल्या ‘रामतरंग माता’, ‘स्मृती कुंज’, ‘Experiments with Faith,’ ‘दृष्टियोग’, ‘गीताशक्ती’, ‘कल्पवृक्ष’ अशा आध्यात्मिक, योगिक अतींद्रिय अनुभवांवरील ग्रंथांमुळे भारतातच नव्हे, तर अमेरिका-युरोपमध्ये विख्यात असलेले संत श्री स्वामी राम यांचा जन्म विदर्भातील तेल्हारा या गावी ज्येष्ठ शुद्ध दशमी या तिथीला, पहाटे ४ वाजता झाला. त्यांच्या आईचे नाव लक्ष्मीबाई होते. घरातील वातावरण धार्मिक असल्याने लहानपणापासूनच रामला भक्ती, अध्यात्म, साधना यांचे वेड होते. ‘ध्रुव आख्यान’, ‘व्यंकटेश स्तोत्र’ या पोथ्यांचे नित्यनेमाने वाचन, गुरुचरित्राचे पारायण आणि रामनामाचा जप हा त्याचा आवडता छंद होता. त्यांचे अकोला येथे शिक्षण झाले. ते १९२० साली मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले. अकोला, कानपूर, मुंबई येथील कापडगिरण्यांमध्ये त्यांनी काही वर्षे नोकरी केली; पण ईश्वराच्या ओढीमुळे त्यांना नोकरीत फारसा रस वाटत नव्हता. धरसोड सुरू होती. ते असेच एकदा नोकरीच्या शोधार्थ ग्वाल्हेरला गेले. तेथे त्यांनी तीन दिवसांत गुरुचरित्राचे पारायण केले. पारायणानंतर ब्राह्मण-फकीर यांना भोजन देता आले नाही अशा चिंताग्रस्त अवस्थेत ते जयाजी पार्कमध्ये बसले असता, एक दाढीवाला, तेजस्वी साधू येऊन त्यांना भेटला. त्याला द्यायला जवळ काहीच नसल्याने त्यांनी अंगावरचा कोट काढून दिला व हा नवा कोट विकून आपण भोजन करावे अशी प्रार्थना केली. “तू पुढे साधनेने इडा-पिंगला नाड्यांवर प्रभुत्व मिळवशील व आध्यात्मिक वैभवात राहशील,” असा आशीर्वाद देऊन साधू निघून गेला. ही घटना रामच्या जीवनाला नवे वळण देणारी ठरली. त्यांना एक नवी दिशा, एक नवा जोम प्राप्त झाला. त्यांनी अत्यंत गंभीरपणे साधनेला प्रारंभ केला. दिल्लीहून हरिद्वार पायी भ्रमंती करीत, गंगापार करून चामुंडा जंगलात त्यांनी एकांतवासात तपश्चर्या केली.

पुढे गढमुक्तेश्वर इथे गायत्री पुरश्चरण करून ते अनुप शहराजवळील मांडण्याश्रमातले हटयोगी स्वामी योगानंद यांना भेटले. तेथे योगासनाचा सूक्ष्म अभ्यास करून

स

१९३० मध्ये त्यांनी ‘सचित्र योगासन’ हे पुस्तक प्रकाशित केले. आता त्यांना ओंकारसाधना अधिक आवडू लागली व त्यांनी सहा आठवडे सकाळी, उगवत्या सूर्याकडे पाहत त्राटक साधना केली. इथे त्यांना लोकमान्य टिळकांचे ‘गीतारहस्य’ वाचण्यास मिळाले व गीतेचा सूक्ष्म अभ्यास करून त्यांनी ‘गीतापाठ’ पुस्तक लिहिले. अयोध्येत त्यांनी मणिपर्वतावर मोठ्या आवाजात ओंकार जप केला. इथे त्यांना गायत्रीचे दिव्यदर्शन झाले. पुढे सिमला, श्रीनगर अशी साधनेची, तपश्चर्येची नवी ठिकाणे शोधून त्यांनी एकांतसाधना केली. १९३३-३४ मध्ये त्यांना स्वत:चा आश्रम स्थापन करण्याची इच्छा झाली व काश्मीरमध्ये निशांत बाग येथे त्यांनी ‘गोपीतीर्थ’ नावाचा पहिला आश्रम स्थापन केला.

हिमालयात बर्फ पडण्यास प्रारंभ झाल्यावर हिवाळ्यात त्यांनी आश्रम सोडून पुणे, मुंबई, नागपूर, जबलपूर, बेळगाव, धारवाड याप्रमाणे दक्षिण भारतात भ्रमंती करीत व योगप्रचार करीत पुढे गंगानदीचा विरह होऊ नये म्हणून त्यांनी गंगेकाठी ‘रामकुंज’ आश्रम बांधला. त्यांच्या आर्थर नावाच्या शिष्याने हा आश्रम त्यांना बांधून दिला. या आश्रमात ते १९६२ ते १९७२ अशी दहा वर्षे राहिले.

या दरम्यान अमेरिका-युरोपात त्यांचा शिष्यवर्ग खूप वाढला व त्यांच्या आग्रहाने स्वामी रामांचे वरचेवर विदेश दौरे, व्याख्याने, ध्यानशिबिरे सुरू झाली. १९६४ ते १९७२ दरम्यान ते सहा वेळा अमेरिकेत जाऊन आले होते. या देशात त्यांना अनेक शिष्य मिळाले. उच्चविद्याविभूषित ‘ट्रेडवेल’ नावाची महिला त्यांपैकी प्रमुख होती. ती स्वामींबरोबर भारतात आली आणि योगविद्येत पारंगत झाली. १८ एप्रिल १९७२ रोजी ते ट्रेडवेलसमवेत अमेरिकेला गेले असता, त्या दौऱ्यातील प्रचंड व्यस्ततेमुळे व तब्येतीकडे दुर्लक्ष केल्यामुळे त्यांना खोकल्याची व्याधी झाली. छातीत दुखायला लागले. डॉक्टरांनी तपासून औषध दिले; पण हीच आपल्या जीवनाची सांगता आहे हे लक्षात घेऊन स्वामी राम यांनी ट्रेडवेल व शिष्यांसमोर योगक्रियेने समाधी घेतली. त्यांचे पार्थिव अमेरिकेतून हरिद्वारला आणून त्यावर गंगेकाठी अंतिम संस्कार केले गेले.

– विद्याधर ताठे

***

स

# ह

## हराळकर, नामदेवतात्या शिवराम

**वारकरी संप्रदाय**

**१८८५ – १९६७**

अस्पृश्य समाजाच्या उद्धाराचा ध्यास घेऊन आयुष्यभर कार्य करणारे संत नामदेवतात्या हराळकर यांचा जन्म तुगाव येथे कार्तिक महिन्यात झाला. त्यांच्या वडिलांचे नाव शिवराम व आईचे नाव गीताबाई होते. नामदेवतात्यांना एक बहीण व सहा भाऊ होते. त्यांच्या घराण्यात पंढरीची वारी परंपरेनेच चालत आली होती. अगदी बालवयापासून नामदेवतात्यांनी वडिलांचे बोट धरून, त्यांच्या खांद्यावर बसून पंढरीची वारी केली आणि विठ्ठलभक्तीचे व्रत अंगीकारले.

त्यांचे लौकिक शिक्षण फार झाले नाही; पण त्यांची दृष्टी, त्यांची वृत्ती, त्यांची धारणा अत्यंत व्यापक व माणुसकीची होती. प्रत्येकाच्या मदतीला धावून जाणे हा त्यांचा स्वभाव होता. लहानपणीच पंढरीच्या वारीबरोबरच त्यांना शेतीची आवड प्राप्त झालेली होती. सतराव्या वर्षी त्यांचे लग्न झाले. त्यांचे मन विठ्ठलभक्तीत रमलेले होते. आठ-दहा वर्षे संसार करून नामदेवतात्या पूर्णपणे विरक्त झाले.

संसाराच्या आसक्तीचा त्यांना कधीही अडसर झाला नाही. त्यांना दोन मुलगे व एक मुलगी झाली. एका मुलाचे अकाली निधन झाले व तात्यांना संसाराच्या क्षणभंगुरतेची प्रचिती आली व त्यांचे मन नामभक्तीच्या शाश्वत सुखाकडे अधिक वेगाने आकर्षित झाले.

ज्ञानेश्वरी हा त्यांचा आवडीचा व विश्रांतीचा विषय होता. वेळ मिळेल तेव्हा ते ज्ञानेश्वरी वाचण्यात मग्न होत. थोर संत व ज्ञानेश्वरीचे गाढे अधिकारी विष्णुपंत जोग यांचे नामदेवतात्यांना मार्गदर्शन लाभले होते.

‘ग्रामगीता’कार संत तुकडोजी महाराज, महात्मा गांधी, लोकमान्य टिळक यांचाही नामदेवतात्यांवर व त्यांच्या एकूण सामाजिक कार्यावर ठसा होता. टिळकांमुळे राष्ट्रसेवेच्या, महात्मा गांधींमुळे हरिजन उद्धाराच्या, तर संत तुकडोजी महाराजांकडून ग्राम सुधारणेच्या कार्याची प्रेरणा नामदेवतात्यांनी घेतली. ‘तुगाव’मध्ये तात्यांनी ज्या सामाजिक सुधारणा केल्या, त्यांमुळे लोक त्यांना ‘कर्मयोगी’ म्हणत. त्यांनी महिलांची पडदा पद्धत बंद केली, स्त्री-पुरुषांसाठी गावात स्वतंत्र शौचालये बांधली, मुलींना पोहण्यास शिकवले, तरुणांमध्ये व्यायामाची आवड रुजवली. शेतीत आधुनिक पद्धती अवलंबल्या. भूदान चळवळीत भाग घेऊन २२ एकर जमीन प्राप्त केली व हरिजन कुटुंबांना वाटून टाकली.

गाव तंटामुक्त करण्याचे पहिले कार्य तात्यांनी तुगावमध्ये केले. भेदाभेद दूर करून सर्व समाज एक केला. रोज रात्री सर्व समाजातील लोकांना त्यांनी भजनाद्वारे माणुसकीचे, प्रेमाचे, गुण्यागोविंदाने नांदण्याचे धडे दिले. फाळणीनंतर १९४७ साली बंडखोर रझाकारांच्या हल्ल्यामुळे हराळकर परिवारासह अनेकांना आपली गावे सोडून पलायन करावे लागले. हराळकर कुटुंबाला तुगाव सोडून सोलापूर येथे आश्रय घ्यावा लागला. अस्पृश्य समाजातील महार व मांग समाजांत तात्यांनी फार मोठी जागृती केली. ते रोज महारवाड्यात-मांगवाड्यात जात. ‘भीक मागू नका, कोणाचे उष्टे खाऊ नका, बकऱ्या-कोंबड्यांचे बळी देऊ नका, शिका व स्वच्छ राहा, मांसाहार-दारू यांपासून दूर राहा’ अशी शिकवण तात्या लोकांना अत्यंत प्रेमाने देत असत. तात्यांनी १९३८ साली गावातील मंदिर हरिजनांना खुले

करून दिले, तेही कोणताही तंटाबखेडा-संघर्ष न करता, केवळ सामोपचाराने. ही एक त्या काळातील अभूतपूर्व घटना होती. पंढरपूरचे विठ्ठल मंदिर १९५२ साली हरिजनांसाठी खुले झाले ही गोष्ट लक्षात घेतली, की तात्यांनी १९३८ साली घडविलेल्या घटनेचे नेमके महत्त्व कळते. तात्यांचे हे कार्य ऐकून खुद्द संत गाडगे महाराज तुगावला तात्यांना भेटण्यास आले होते.

१९६७ साली, चैत्र वद्य सप्तमी रोजी वयाच्या चौऱ्याऐंशीव्या वर्षी नामदेवतात्यांनी आपला देह विठ्ठलाचरणी अर्पण केला. त्यांचे सुपुत्र विश्वंभर यांनी पुढे तात्यांच्या कार्याची धुरा सांभाळली. त्यांनी तात्यांसारखेच पारमार्थिक व सामाजिक कार्य केले.

— विद्याधर ताठे

## हंसराज स्वामी

**वेदान्तवेत्ते, धर्मचिंतक, ग्रंथकार**

**१८०५ — १८५५**



यवनांची राजवट असलेल्या तत्कालीन परभणी नगरात वडील गंगाधरपंत आणि आई रेणुकाबाई यांच्या पोटी श्री हंसराज स्वामी यांचा जन्म झाला. अश्वलायन शाखेचे देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण घराणे; परंतु त्यांची परिस्थिती फारच ओढगस्तीची होती. त्यामुळे त्यांच्या आई-वडिलांना जगण्यासाठी गावोगावी फिरावे लागले. हंसराज स्वामींचे मूळ नाव नारायण. नारायणाचे शिक्षण होत नाही म्हणून आई-वडिलांचा जीव तीळतीळ तुटायचा. नारायण अतिशय देखणा व तेजस्वी होता. बुद्धिमान होता. आणि म्हणूनच रीतसर शिक्षण झाले नसले तरी आकलनशक्ती तेज असलेल्या एकपाठी नारायणाने धूळपाटीवर अक्षरओळख करून घेतली आणि त्यांनी ज्ञानेश्वरी, दासबोध, दीपरत्नाकर अशी विपुल ग्रंथसंपदा प्रथम वाचून काढली. या बोधामृतानेही त्यांचे समाधान होत नव्हते. आत्मज्ञान होणे महत्त्वाचे आहे असे त्यांना वाटे. गुरूंनी ‘तत्त्वमसि’ची ओळख द्यायला पाहिजे ही त्यांची इच्छा होती. त्यामुळे ते अस्वस्थ असत. भौतिक सुखे त्यांना निरस वाटू लागली. त्यांची अन्नपाण्यावरची वासनाही उडाली.

परंतु आई-वडिलांनी यथावकाश, नारायणाला विवाहबंधनात जखडवलेच. लक्ष्मीबाई नावाच्या सुशील मुलीशी त्यांचा विवाह झाला. अपत्यप्राप्तीही झाली; परंतु बाळंतपणातच अपत्यासह लक्ष्मीबाई मृत्युमुखी पडल्या. या प्रकाराने नारायणाला पराकोटीच्या नैराश्याने ग्रासले. त्यामुळे वसमत गावातील ब्रह्मसाक्षात्कार झालेले महानुभाव सद्गुरू लक्ष्मणपंत यांच्यापाशी ते गेले. लक्ष्मणपंतांनी नारायणाच्या अंतर्मनातील नैराश्याचे मळभ त्यांना परमार्थ समजावून देऊन दूर केले. त्यानंतर मात्र नारायण शांत झाले. अध्यात्माचा वापर लोकाभिमुख कामांसाठी व्हायला हवा हा आपले गुरू लक्ष्मणपंत यांचा सल्ला आणि उपदेश घेऊन त्यांनी आपले मार्गक्रमण सुरू केले. त्यांनी घरदार जवळजवळ त्यागलेच. आपल्या गुरूंचे आशीर्वाद घेऊन त्यांनी प्रथम माहूर येथे प्रस्थान ठेवले. त्यानंतर पंढरपूर क्षेत्री जाऊन विधिवत संन्यास स्वीकारला.

याआधी नारायणाच्या वडिलांनी त्याचा खूप शोध केला. नारायण पंढरपुरात सापडल्यानंतर त्यांनी सद्गुरू लक्ष्मणपंतांना मध्ये घालून नारायणास घरी चलण्याची विनवणी केली. परंतु काही दिवस गुरूंसोबत राहून ते देशाटनास निघाले. त्यांनी प्रथम मातापूर येथे श्रीदत्तांच्या तीर्थक्षेत्री वास्तव्य केले. त्यानंतर पुन्हा शेवाळ्यास येऊन

ह

आपल्या गुरूंची सेवा केली. सद्गुरू लक्ष्मणपंतांनी आपल्या शिष्याची पारमार्थिक उंची पाहून आश्चर्य आणि समाधान व्यक्त केले आणि त्यांना 'तू गुरूंचा गुरू आहेस' असे म्हणून गौरविले. त्यानंतर नारायणांनी विधिवत संन्यासाश्रमात प्रवेश केला तो पंढरपूरक्षेत्री जाऊन. आता त्यांचे नारायण हे नाव गळून पडले आणि ते श्री हंसराज स्वामी म्हणून ओळखले जाऊ लागले.

लोककल्याणार्थ फिरताफिरताच त्यांची भेट सखारामबुवा डोमगावकर या रामदासस्वामींच्या भक्ताशी झाली. त्यांनी श्री हंसराजांस डोमगाव मुक्कामी येण्याचे निमंत्रण दिले. तेथे काही दिवस वास्तव्य केल्यानंतर श्री हंसराज स्वामींनी परांडे येथील अरण्य आपल्या मुक्कामासाठी निवडले आणि अखेरपर्यंत ते परांडेवासी झाले. त्यांनी त्यानंतर परांडे येथे मठ बांधला आणि लोकसेवेचे, लोकजागरणाचे काम सुरू केले.

वेदान्त संत म्हणून लौकिक मिळविलेल्या श्री हंसराज स्वामींनी ग्रंथलेखनाचे व त्या योगे लोकजागरणाचे महत्त्वाचे काम हाती घेतले. आपल्या भागवतधर्मात जुन्या वेदान्ताकडे, तसेच उपनिषदे आणि श्री शंकराचार्यांच्या विचारांकडे आणि तत्त्वज्ञानाकडे थोडे दुर्लक्ष झाल्याचे, त्यांना लोकाभिसरणापासून वंचित ठेवले गेल्याचे स्वामींच्या लक्षात आले. त्यामुळे त्यांनी अशा उपेक्षित राहिलेल्या वेदविचारांचे पुनरुत्थान करण्याचा प्रकल्प उभा केला. त्यांनी 'वेदेश्वरी' या ग्रंथाचे लेखन केले. त्यामुळे ते एकोणिसाव्या शतकातील पहिले वेदान्तवेत्ते कवी ठरले. रामदासी परंपरेतील श्री हंसराज स्वामी हे श्रीसमर्थ शिष्य श्री उद्धव स्वामी यांच्या परंपरेतील सहावे स्वामी होत. सज्जनगडावर समर्थसमाधीच्या दर्शनार्थ ते गेले असता, त्यांना गर्दीमुळे समाधिदर्शन मिळाले नाही; तेव्हा समर्थांनी त्यांना दिव्यदर्शन दिले होते असे म्हणतात.

श्री हंसराज स्वामींच्या ग्रंथसंभारात त्यांनी शेवाळे मुक्कामी त्यांचे गुरू श्री लक्ष्मणपंत यांच्या सांगण्यावरून लिहिलेला 'गुरुभक्तिसार', त्याचप्रमाणे डोमगाव येथील वास्तव्यात त्यांच्याकडून 'संकेतकुबडी', 'आगमसार', 'पूर्वारंभगाथा', 'स्वात्मदर्शन', 'सदाचार' हे ग्रंथराज, तसेच परांडे येथील मठात 'कथाकल्पलता', 'गद्यरूप तत्त्वज्ञान', 'हंसपद्धती', 'वेदेश्वरी', 'भक्तिज्ञान वैराग्यपर अभंग', 'वाक्यवृत्ती', 'वेदाज्ञा', 'चुडालाख्यान' आदी मौलिक लेखनकार्य झाले. यांतील बरेच ग्रंथ हे तीन ते सहा हजार ओव्यांनी मंडित आहेत. ही सारी ग्रंथसंपदा परांडे येथे सध्या 'श्री हंसमंडळ ट्रस्ट'च्या अखत्यारीत सुरक्षित आहे. श्री हंसराज स्वामी यांनी वैशाख शुद्ध अष्टमी, म्हणजेच १८५५ साली, ते पन्नास वर्षांचे होते तेव्हा परांडे येथे समाधी घेतली.

— संदीप राऊत

***

ह

# क्ष

## क्षात्रजगद्‌गुरू
***पाटील-बेनाडीकर, सदाशिवराव लक्ष्मणराव***
**१८९५ – ५ जुलै १९८२**



आद्य शंकराचार्यांनी भारताच्या पूर्व आणि पश्चिम भागांत अनुक्रमे जगन्नाथपुरी व द्वारका, तर दक्षिण आणि उत्तर भागांत शृंगेरी व बद्रीनारायण अशा चार मठांची स्थापना केली होती. महाराष्ट्राचा प्रदेश द्वारकेच्या शारदा मठाच्या कक्षेत येतो. शृंगेरी मठाचे पदच्युत स्वामी शंकरानंद यांनी बेळगाव जिल्ह्यातील चिकोडी तालुक्यातील संकेश्वर मठाची स्थापना केली होती. करवीरपीठाची स्थापना प्राचीन काळात कोल्हापूरच्या राजाने केली होती. शंकराचार्यांचे करवीरपीठात संकेश्वर व करवीर असे दोन मठ अस्तित्वात असल्याचे मानले जाते. करवीरपीठाच्या शंकराचार्यांनी आपला वारसा निवडताना कोल्हापूरच्या छत्रपतींशी विचारविनिमय करून तो वारसा निवडायचा होता. इतकेच नव्हे, तर त्याची निवड झाल्यावर कोल्हापूरच्या छत्रपतींनी त्याला मान्यता देणे आवश्यक होते. कोल्हापुरात जेव्हा वेदोक्त प्रकरण घडले, त्या वेळी विद्याशंकरभारती ऊर्फ गुरुस्वामी करवीरपीठाचे शंकराचार्य होते. त्यांनी आपला वारस म्हणून काशीनाथ गोविंद ब्रह्मनाळकर यांची निवड केली होती. तेच पुढे विद्यानृसिंहभारती ऊर्फ शिष्यस्वामी म्हणून ओळखले जात होते. हा वारस निवडताना विद्याशंकरभारती यांनी शाहू छत्रपतींशी सल्लामसलत न करता सांगलीकर पटवर्धन यांच्याशी विचारविनिमय केला. त्यामुळे शाहू छत्रपतींनी कोल्हापूर संस्थानच्या हद्दीतील मठाची मालमत्ता जप्त केली होती.

शाहू छत्रपतींनी दि. १० जून १९१७ रोजी डॉ. कूर्तकोटी यांची करवीरपीठाचे शंकराचार्य म्हणून नेमणूक केली. डॉ. कूर्तकोटी हे संस्कृतचे गाढे पंडित होते. पीठासनावर आरूढ होताच या नव्या स्वामींनी आपल्या भाषणांतून अनेक सुधारणांचा जोरदार पुरस्कार केला. अस्पृश्यतेचा जाहीर निषेध केला. पण, वर्षभराच्या आतच त्यांनी आपले प्रतिगामी स्वरूप प्रकट केले. शाहू महाराजांनी कुलकर्ण्यांचे वतन बंद केले. त्या प्रकरणात कूर्तकोटी यांनी कुलकर्ण्यांची बाजू घेऊन छत्रपतींना विरोध केला. त्यांच्यावर टीका सुरू केली. त्यामुळे छत्रपतींनी एक ठराव करून डॉ. कूर्तकोटी यांची करवीरपीठाच्या शंकराचार्य पदावरून हकालपट्टी केली.

वेदोक्त प्रकरण संपले, तरी ब्राह्मणशाहीचे चटके येथून पुढेही महाराजांना बसतच राहिले. त्यामुळे अहंकारी आणि ऐषारामी ब्राह्मण पुरोहितांच्या विळख्यातून आपल्या जातीस सोडविण्याचे विचार त्यांच्या मनात उत्पन्न झाले. दैवज्ञ सोनार, शेणवी, लिंगायत जैन या जातींच्या लोकांनी ज्याप्रमाणे ब्राह्मणी पुरोहितशाहीचे जोखड फेकून देऊन स्वत:चे धर्मगुरू निर्माण केले, तसे

क्ष

मराठ्यांनी का करू नये, असा एक विचार त्यांनी १९०४ सालीच एका पत्रात व्यक्त केला होता.

महाराजांनी कोल्हापुरात जुलै १९२० मध्ये मराठा पुरोहित तयार करण्यासाठी ‘श्री शिवाजी वैदिक विद्यालय’ स्थापन केले. शाहू छत्रपतींनी सुरू केलेले हे ‘शिवाजी वैदिक स्कूल’ही क्षात्रजगद्‌गुरुपीठाच्या निर्मितीची पार्श्वभूमी होती. क्षात्रजगद्‌गुरूंच्या नेमणुकीचे उचललेले ते पहिले दमदार पाऊल होते.

देव आणि मानव यांच्यामध्ये दलाली करणारा पुरोहितवर्ग एकदम नष्ट करणे शक्य नाही, याची पूर्ण जाणीव महात्मा फुले यांना होती. म्हणूनच ते आपल्या व्याख्यानातून शूद्र लोकांनी आपल्या जातीचे उपाध्ये निर्माण करावेत, असा स्पष्ट उपदेश करीत. महात्मा फुले यांचा पुरोहितवर्गाच्या वर्चस्वाविरुद्धचा लढा शाहू छत्रपती निश्चितच पुढे चालवीत होते.

शाहू महाराजांनी १२ ऑक्टोबर १९२० रोजी क्षात्रजगद्‌गुरू पदासंबंधीचा जाहीरनामा प्रसिद्ध केला. त्यामध्ये त्यांनी आपल्या निर्णयामागची तात्त्विक भूमिका स्पष्ट केली, ती अशी : ‘हिंदू समाजात ब्राह्मण व ब्राह्मणेतर असे दोन पक्ष निर्माण होऊन, त्या दोहोंमधील वाद विकोपास गेला आहे. ही स्थिती देशहितास योग्य नाही. मूळच्या वैदिक धर्माचा लोप ब्राह्मणांनी केला असून ब्राह्मणवर्गाकडून ब्राह्मणेतरांना खऱ्या धर्माचा लाभ होणार नाही. यासाठी क्षत्रिय मराठ्यांनी आपला स्वतंत्र मार्ग अनुसरण्याचे ठरविले आहे.

‘करवीर राज्यात क्षत्रिय मराठ्यांचे खरे जगद्‌गुरुस्थान फार प्राचीन आहे. पण आम्हां क्षत्रिय मराठ्यांत आजवर त्याची विस्मृती पडली होती. ते गुरुस्थान पाटगाव मौनी महाराजांचे होय. याच मौनी महाराजांनी क्षत्रियांतील देवअवतार, जे श्री शिवछत्रपती यांना उपदेश केला होता, हे इतिहासप्रसिद्ध आहे.

श्री शिवछत्रपती हे कोणत्याही संकटकाळी मौनी महाराजांकडे जाऊन त्यांचा आशीर्वाद घेत असत. श्री शिवाजी महाराजांनंतर कोल्हापूरची गादी स्वतंत्र स्थापन झाल्याने नंतर कोल्हापूरचे महाराजही त्यांना जगद्‌गुरू मानत असत. त्या संस्थानाचा परामर्श व उत्कर्ष व्हावा या हेतूने त्यांनी इनाम गावेही पाटगाव संस्थानास दिली आहेत. यावरून कोल्हापूरच्या महाराजांना हे संस्थान अत्यंत पूज्य होते, हेही निर्विवाद शाबीत होते. ही गादी निव्वळ क्षत्रिय मराठ्यांची असून शिष्यपरंपरेने आजवर चालत आलेली आहे. म्हणून मी या पाटगावच्या क्षात्रजगद्‌गुरुपीठाची पुन्हा प्रतिष्ठापना करण्याचे निश्चित केले आहे.’

शाहू महाराजांनी क्षात्रजगद्‌गुरूंची नियुक्ती करण्याचे निश्चित केल्यानंतर योग्य व्यक्तीचा शोध सुरू झाला. बहुजन समाजातील कर्तबगार व गुणवान, सुशिक्षित तरुणांवर शाहू महाराजांची बारीक नजर असे. कोल्हापूरनजीक असणाऱ्या बेनाडी गावातील एक तरुण टोपणनावाने वृत्तपत्रांत वैचारिक लेख लिहीत असे. शाहू महाराजांनी त्याचे समाजसुधारणेसंबंधी पुरोगामी विचारांचे लेख वाचले. हा तरुण म्हणजेच सदाशिवराव बेनाडीकर यांचा जन्म बेनाडीगावच्या वतनदार पाटील घराण्यात झाला. बेनाडीकर यांचे माध्यमिक शिक्षण कोल्हापुरात झाले. ते व्हिक्टोरिया मराठा बोर्डिंगचे विद्यार्थी होते. नंतर त्यांचे महाविद्यालयीन शिक्षण पुणे येथील फर्गसन कॉलेजमध्ये झाले. संस्कृत व तत्त्वज्ञान या विषयांत ते पारंगत होते. शाहू महाराजांनी त्यांचे लेख वाचले, ते प्रभावित झाले. त्यांनी हेतुपूर्वक सदाशिवरावांना काही दिवस आपल्या सान्निध्यात ठेवून घेतले. त्या वेळी शाहू महाराजांनी सदाशिवरावांचे धर्मसुधारणेविषयीचे विचार मन:पूर्वक ऐकले. त्यांचे वर्तन लक्षात घेऊन त्यांची नेमणूक पाटगावच्या क्षात्रजगद्‌गुरुपीठावर करण्याचा शाहू छत्रपतींनी निश्चय केला. पाटगावच्या धर्मपीठावर कार्यरत असलेले जगद्‌गुरु रामगिरी यांचे नुकतेच निधन झाले होते. त्यांना शिष्य नसल्याने ते धर्मपीठ रिक्तच होते. म्हणून त्या क्षात्रजगद्‌गुरुपीठावर शाहू महाराज यांनी सदाशिवराव लक्ष्मणराव पाटील-बेनाडीकर यांची नेमणूक केली. १५ नोव्हेंबर १९२० रोजी क्षात्रजगद्‌गुरू नेमणुकीचा हुकूम जारी करण्यात आला.

या क्षात्रजगद्गुरूंसाठी शाहू छत्रपतींनी अत्यंत विचारपूर्वक पुढील काही नियम घालून दिले :

१) धार्मिक बाबींच्या विचारांकरिता एक धर्माधिकारी असावा आणि धर्मनिर्णयासाठी एक पंचायत कोर्ट असावे. २) वैदिक धर्मशिक्षण देण्याचे एक विद्यालय असावे. ३) पाटगाव संस्थानात आजपर्यंत अविवाहित शिष्यपरंपरा घेण्याची वहिवाट चालू आहे; परंतु त्यापासून मठाची पवित्रता मुळीच सांभाळली जात नाही, असे अनुभवांती लक्षात आले आहे. म्हणून धर्मपीठावर रूढ-आरूढ झालेल्या गुरूंना विवाह करण्याची इच्छा असेल, तर त्यांनी तो खुशाल करावा. ४) गादीवरील पुरुष गृहस्थाश्रमी अगर ब्रह्मचारी असला तरी चालेल; परंतु यांपैकी कोणाच्याही पूर्व घराण्यातील इसमाचा या संस्थानावर वारसा सांगण्याचा हक्क नाही. गादी शिष्य-परंपरेतच चालली पाहिजे. ५) गादीवर स्थापन झालेल्या जगद्गुरूंच्या सान्निध्यात दोन होतकरू, बुद्धिमान व सत्त्वशील असे शिष्य ठेवावेत. यांपैकी, अगर गादीवर स्थापन झालेल्या जगद्गुरूंच्या औरस मुलांपैकी कोणीही योग्य असेल, तर त्यासही शिष्य करण्यास अगर वरील दोघांपैकी कोणीही योग्य असेल, तर हुजूरमंजुरीने शिष्य करून घेण्यास हरकत नाही. ६) या गादीस दोन मोर्चेलांचा व सूर्यपानाचा अधिकार हुजुरून देण्यात येत आहे. ७) जगद्गुरूंनी मानवी प्राण्यास पशूप्रमाणे वागवून त्याच्या खांद्यावर पालखी वगैरे वाहन देऊन, त्यात बसून जाण्याचे वर्ज्य करण्याचे आहे. त्यांच्या प्रवासाकरिता त्यांना चार घोडी व मठाच्या शोभेकरिता असलेल्या जनावरांचा उपयोग त्यांनी करावा. ८) क्षात्रजगद्गुरूंनी भिक्षा मागायची नाही. त्याचप्रमाणे, त्यांनी पाद्यपूजाही करून घ्यावयाची नाही. क्षात्रजगद्गुरूंना दुसऱ्यापुढे मदतीसाठी हात पसरावे लागू नयेत व त्या पदाची प्रतिष्ठा राहावी म्हणून शाहू महाराजांनी क्षात्रजगद्गुरूंना राहण्यासाठी एक एकर जागा अवतीभोवती असणारा बंगला बहाल केला. मठाला खास जमिनी नेमून दिल्या. तसेच, मंगळवार पेठेतील आनंदीबाई राणीसाहेब यांचा वाडा आणि पद्माळे तलावाच्या पश्चिम बाजूचा बंगला व सभोवतालची बाग मठाच्या देणगीस जोडून दिली. क्षात्रजगद्गुरू हा शंकराचार्यांसारखा असता कामा नये, अशी महाराजांची अपेक्षा होती. ब्राह्मण जगद्गुरूंप्रमाणे म्हणजे शंकराचार्यांप्रमाणे भक्तांकडून भिक्षा म्हणून द्रव्य संपादन करणे, पाद्यपूजा करवून घेणे, भक्तांनी खांद्यावर घेतलेल्या पालखीतून मिरवणे या अनिष्ट प्रथांपासून महाराजांचे जगद्गुरू दूर राहणार होते. १९२१च्या सुरुवातीस त्यांना लिहिलेले एक पत्र उपलब्ध आहे, त्यात ते लिहितात : ‘स्वामींनी आपल्या कार्यास लवकर आरंभ करावा. फिलॉसॉफीचा अभ्यास सुरू करावा. आपण आपले ध्येय देवासंबंधी दलाल असू नये, असे ठेवावे. तसेच, इतर स्वामींप्रमाणे आपले ध्येय असू नये. देशसेवा, लोकसेवा असेच ध्येय ठेवावे.’

११ नोव्हेंबर १९२१ रोजी पाटगावच्या मौनी महाराजांच्या मठात सदाशिवरावांना सशास्त्र पट्टाभिषेक होऊन वैदिक मंत्रांच्या घोषात क्षात्रजगद्गुरुपदी स्थापन करण्यात आले. या निमित्ताने भरवलेल्या खास दरबारात खुद्द शाहू महाराजांनी नूतन क्षात्रजगद्गुरूंना वाकून मुजरा केला. त्यांचे अनुकरण दरबारातील सर्व सरदार, मानकऱ्यांनी आणि अधिकाऱ्यांनी केले.

— प्रा. नीलकंठ पालेकर

## क्षीरसागर महाराज

***क्षीरसागर, रामकृष्ण कृष्णाजी***

**वेदविद्या प्रसारक**

**१८५५ - मृत्युदिनांक अनुपलब्ध**

**प्रा**चीन भारतीय तत्त्वज्ञान, वेद, उपनिषदे आदी संचितांचे संवर्धन करणारे श्री रामकृष्ण कृष्णाजी क्षीरसागर महाराज यांचा जन्म फाल्गुन शुक्ल तृतीया शके १८५५ रोजी राहुरी येथील पारनेरमधील रायतल गावी झाला. त्यांच्या आईचे नाव राधा होते. वडील शिक्षक होते आणि घरचे वातावरणही धार्मिक होते; परंतु अचानक वडिलांचा मृत्यू झाल्यामुळे चार मुलांची जबाबदारी आईवर येऊन पडली. आईने सर्व कुटुंब जवळच्या नगरपट्टण येथे हलवले. हलाखीच्या



परिस्थितीत कुटुंबाची गुजराण चालू होती. आईने चौदाव्या वर्षी श्रीराम यांची मुंज केली आणि तेव्हापासूनच त्यांची प्रकृती बिघडू लागली.

वयाच्या सातव्या वर्षापासून त्यांना काही संकेत श्रीदत्तांच्या दृष्टान्तामार्फत मिळत होते. आजारपणात त्यांच्यासमोर एक स्त्री उभी राहून काही सांगत आहे, असे त्यांना वारंवार भास होत. 'मी तुमचे कुलदैवत अंबामाता आहे. केडगावला माझे स्थान आहे. तेथून मला हलवा' असे एका मांत्रिकाने श्रीरामांच्या तोंडून वदवले. त्यानुसार केडगावहून अंबामातेच्या मूर्तीला घरी आणले आणि त्यानंतर त्यांची तब्येत सुधारू लागली. त्या घटनेपासून श्रीराम अंबामातेच्या सेवेत राहू लागले.

त्यानंतर एकदा एका योग्याच्या रूपात श्रीदत्तगुरूंनी त्यांना दृष्टान्त दिला आणि क्षीरसागरांच्या घरात श्रीदत्तांसह नवनाथ, शनी, शिव, तसेच तुळजाभवानी, रेणुका, कालिका, मरीमाता, महालक्ष्मी, सप्तशृंगी, चतु:शृंगी या सात देवीही प्रविष्ट झाल्या; म्हणजेच त्यांची पूजा यथासांग सुरू झाली.

क्षीरसागर महाराजांना एकदा सर्पदंश झाला होता. त्यातून त्यांना जणू पुनर्जन्मच मिळाला. परंतु त्यानंतर त्यांना अनेक व्याधिग्रस्तांच्या व्याधी, समस्या निराकरणाची जणू सिद्धीच प्राप्त झाली. कित्येकांच्या प्रपंचात, जीवनात महाराजांनी आशांचे दीप प्रज्वलित केले. ''माणसाचा प्रपंच त्याच्या नशिबाने सिद्ध होतो; परंतु माणसाचा आध्यात्मिक विकास आणि ऐश्वर्य त्याला त्याच्या कर्मामधूनच प्राप्त होत असते,'' असे महाराज म्हणत. क्षीरसागर महाराज यांनी त्यानंतर अनेक व्याधिग्रस्त आणि समस्याग्रस्त प्रापंचिकांना समस्या, व्याधिमुक्त होण्यासाठी मार्गदर्शन केले आणि उपाय सुचविले. आपले धार्मिक, आध्यात्मिक, वेद, उपनिषदे इत्यादींचे संवर्धन करणे यावर श्री रामकृष्ण क्षीरसागर महाराज यांचा जास्त भर होता. हजारो वर्षांचा इतिहास आणि परंपरा असलेले आपले वेद आपल्या जगण्याची चेतना आहेत. ही चेतना, संजीवनी आता लुप्त होतेय की काय, ही भीती क्षीरसागर महाराजांनी व्यक्त केली. तस्मात् अहमदनगरच्या अंबिकानगर येथे महाराजांच्या भक्तांनी 'श्रीदत्त देवस्थान विश्वस्त मंडळ' स्थापले आणि त्या अंतर्गत 'वेदान्त विद्यापीठा'ची स्थापना केली. तो दिवस होता पौष शुद्ध २, शके १९१० म्हणजेच ११ मार्च १९७४. विद्यापीठाच्या वेदान्त भवनात आज वसतिगृहासह अभ्यासिका, यज्ञमंडप, ग्रंथालय, गोशाला, त्याचप्रमाणे योगाभ्यासासाठी सोय उपलब्ध आहे. गुरुकुल शिक्षणपद्धतीच्या या विद्यापीठात वेदाभ्यास पूर्ण करण्यास किमान सोळा वर्षे लागतात. येथे उच्चारशास्त्र, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद, ज्योतिष या वेदांगांचा अभ्यास होतो.

श्री रामकृष्ण क्षीरसागर महाराजांचे अनेक भक्तगण देशात व परदेशांतही पसरले आहेत. अमेरिका, इंग्लंड, दुबई, सिंगापूर, कॅनडा, दक्षिण आफ्रिका इत्यादी देशांत त्यांच्या शिष्य-भक्तगणांनी महाराजांच्या बोधामृतामधून भारतीय वेदान्त, अध्यात्माचा प्रसार केला आहे. महाराजांच्या आश्रमाच्या कार्याची माहिती प्रापंचिक भक्तगणांना व्हावी या उद्देशातूनच अहमदनगरसह, मुंबई, ठाणे, राहुरी, सांगली, औरंगाबाद, पुणे, वाशी, उरण इत्यादी ठिकाणची त्यांची सत्संग मंडळे कार्यरत आहेत.

— संदीप राऊत

***

# परिशिष्ट - अ ते आ

## आनंदगडकर, भगवान महाराज
**वारकरी संप्रदाय**
**१९५०**



**वा**रकरी संप्रदायाच्या बंधुभाव प्रस्थापनेच्या कार्यात गेल्या ५० वर्षांपासून अखंड योगदान देणारे आणि उपेक्षित-पीडित-दु:खितांविषयी ममतायुक्त कळकळ, -शाश्वत सत्याचा सहजसोपा सामान्यांतील सामान्य माणसाला उमजेल-समजेल-रुचेल असा अन्वयार्थ सांगणारा, भक्तास त्या मार्गावर चालण्यास सहज उद्युक्त करणारा कर्मयोगी संत म्हणजे ह.भ.प. श्री भगवान महाराज आनंदगडकर! बाबांचा जन्म मार्गशीर्ष वद्य एकादशीस, जालना जिल्ह्यातील पीर पिंपळगाव येथे झाला. भगवानबाबांचे कार्य हे सुमारे १९६५ साली सुरू झाले. शालेय वयापासूनच बाबांनी प्रवचन, कीर्तन करायला सुरुवात केली होती.

शिक्षण झाल्यानंतर जंगल खात्यात नोकरी केली, जालन्यात सेवादलात नोकरी केली. तलाठी पदासाठी आणि सैन्यामध्ये रुजू होण्याचे पत्र मिळाले असतानाही ती नोकरी स्वीकारली नाही. घरात लग्नाचा विषय निघाल्यानंतर संसारी मायाजाळात न अडकता गृहत्याग करून रामटेक व नंतर पैठणला जाणे केले.

पैठणच्या नाथमंदिरात त्यांनी सलग तीन दिवस एकनाथी भागवताचे पारायण केले. त्यांची ह.भ.प. श्री भारदे महाराजांशी भेट झाली. विदर्भात श्री बाबा आमटे यांच्या सोबतही त्यांनी काम केले. श्रीक्षेत्र आळंदीस श्रीकिशन साखरे महाराज यांच्याकडे जाऊन दीक्षेसाठी विनंती केली. त्यांनी पंढरपूर येथील ह.भ.प. श्री धारूरकर शास्त्री यांच्याकडे पाठवल्यावर त्यांच्याकडून बाबांनी वारकरी संप्रदायाची दीक्षा घेतली. श्रीगुरूंच्या प्रेरणेने तिथेच अभ्यास केला. जालना जिल्ह्यातील न्हावाशेवा येथील मठ ह.भ.प. श्री रंगनाथ महाराज परभणीकर यांनी स्थापन केला आहे. भगवानबाबा या मठाचे मठाधिपती झाले. या संस्थानाच्या भौतिक कार्यकलापात शुद्ध वारकरी परंपरेला शोभणार नाहीत असे काही घटना-प्रसंग झाले. भगवानबाबा आनंदगडकरांनी 'सोने रुपे आम्हां मृत्तिकेसमान' या संतवचनाप्रमाणे न्हावाशेवा संस्थान तत्काळ सोडले. जालना शहरापासून दहा कि.मी. अंतरावर असलेल्या जांबवाडी गावाजवळ माळरानात, देऊळगाव राजा रोडवर बाबांनी वस्ती केली.

सर्वत्र आनंदाचे तरंग पसरविणारी जगन्माता भवानी श्री आनंदेश्वरी मातेचे मंदिर या माळरानावर त्यांनी १३ एप्रिल १९९५ रोजी निर्माण केले. गोंदेगाव शिवार हा माळ तसा पूर्वी दरोडे आणि लूटमारीसाठी कुप्रसिद्ध! अशा 'रुखल्यासुखल्या भूमीवरती, सद्‌भावाने करुनी वस्ती, संस्काराचे जल शिम्पूनिया सोन मळे पिकवीन' या

उक्तीप्रमाणे बाबांनी आपल्या पुण्यपावन वास्तव्याने या ओसाड माळरानावर आनंददायी वारकरी परंपरेला पुष्ट करणारा आनंदगड वसवला आहे. आनंदाचा सोनमळा पिकविला आहे. याच वडार वस्तीतील बांधव त्यांच्या पूर्वसुकृत पुण्याईमुळे श्री भगवानबाबांचे भक्त झाले. माळकरी, टाळकरी, वारकरी झाले. चोऱ्या सुटल्या, दारू सुटली, दरोडे-खून सुटले. ह.भ.प. श्री भगवानबाबांनी आनंदगडाच्या पायऱ्यांचे दगड या वडार बांधवांसोबत त्यांच्याच फडक्यात बांधून आणलेली मीठभाकर खाऊन घडवले, घाम गाळला. भगवानबाबांना वडार भाषा उत्तम येते. या भक्तमंडळींमध्ये श्री तुळशीराम अण्णा आहेत. त्यांनी बाबांच्या प्रेरणेने वडार (तेलुगू) भाषेत अभंग रचलेले आहेत. त्यांना ते पाठ आहेत. ते त्या अभंगांचे मराठीत निरूपणही करतात. कुठलेही लौकिक शिक्षण त्यांनी घेतलेले नाही हे इथे उल्लेखनीय होय.

एकदा काही संतमंडळी गडावर वस्तीला होती. त्यांत काही जण उत्तर भारतीय होते. जेवणाची वेळ झाली. दुरड्या टोपल्यांत जेवण घेऊन या वडार माता गडावर आल्या. त्यांतील काही जणांनी हे जेवण घेणार नाही अशी भूमिका घेतली. बाबांनी त्यांना समजावले. ते म्हणाले, ''महाराज जी, रोटी आपको जवार या बाजरा की ग्रहण करनी है, रोटी वडार की नहीं बनती जो खा नहीं रहे हो!'' तेव्हा चूक त्यांच्या लक्षात आली.

आनंदगडावर श्री आनंदेश्वरी माता, श्रीगणेश, श्रीमहादेव, श्रीहनुमान, श्रीशबरी माता यांची मंदिरे आहेत. भक्तजनांचा अखंड प्रवाह या गडावर अखंडपणे वाहत असतो. भक्तिमार्गाला कर्ममार्गाची जोड देऊन धर्म पुनर्स्थापनेचा मार्ग म्हणजे वारकरी संप्रदाय. भगवान महाराजांनी हा प्रवाह पुष्ट करण्याचा, समृद्ध करण्याचा उत्तम आदर्श प्रस्तुत केला आहे. हा कर्मयोगी भक्तिमार्ग पुष्ट होण्यासाठी काही महत्त्वाचे उपक्रम झालेले आहेत.

बाबांनी बारा गावांच्या एकादशी मंडळांचे संघटन घडवून आणले. जालना परिसरात बारा महादेव मंदिरांची स्थापना करण्यात आली. ह.भ.प. श्री भगवान महाराज भक्त मित्र मंडळाद्वारे 'समता-ममता-समरसता मेळावा' १७ सप्टेंबर १९९६ रोजी भरविण्यात आला.

'ज्ञानामृत मिशन' हे (जय हरी रुग्णालय, जालना) अन्य विविध सेवाकार्ये व विविध उपक्रम चालविण्यासाठी निर्मिलेले एक व्यासपीठ आहे. त्याचप्रमाणे, 'संतानुग्रह' हे मासिक, चैतन्य साधना शिबिर (अखंड मौन आणि आत्मचिंतनयुक्त ईश्वर सान्निध्य साधना), अखंड हरिनाम सप्ताह व या सप्ताहादरम्यान भव्य रोगनिदान शिबिर, महिला उद्योजिका प्रशिक्षण शिबिर आदी उपक्रमही आहेत.

रंगपंचमीस श्री क्षेत्र आनंदगड जालना येथे उर्दू मुशायरा आणि हिंदी कवी संमेलन आयोजित केले जाते. संत श्रेष्ठ श्री निवृत्ती महाराज पुण्यतिथिदिनी श्री क्षेत्र त्र्यंबकेश्वराला पोहोचणारी समरसतेची वारी आनंदगडावरून प्रस्थान करून श्री क्षेत्र संतश्रेष्ठ श्री निवृत्तिनाथांच्या समाधी स्थळी, पौष वद्य एकादशीस पोहोचते. आषाढी एकादशीनिमित्त पंढरपूर वारी/दिंडी निघते. कार्तिक अमावास्येस जालन्यापासून निघून लोणी ता. जि. वाशीम येथे पोहोचणारी ह.भ.प. श्री सखाराम महाराज लोणीकर दिंडी आहे.

पंढरपूर येथे टेंभूर्णी रस्त्यावर चंद्रभागेतिरी श्री दत्तधाम मंदिराची स्थापना २०१३ साली करण्यात आली. १५ ऑगस्ट रोजी आनंदगडावर गुरुपौर्णिमा उत्सव असतो. देऊळगावराजा येथील ह.भ.प. श्री भगवानबाबांचे भक्त श्री मालोजीराव यांच्या नेतृत्वात दरवर्षी रंगपंचमीच्या दिवशी वारी निघते. हा दिवस म्हणजे शक्य असेल तेवढा अश्लीलतेचा उच्चार आणि बेधुंद वागण्याचा जणू परवानाच घेऊन आलेला असतो. अशा दिवशी मुखात अखंड हरिनाम, पवित्र वीणा, टाळ - मृदंगाच्या गजरात श्री आनंदेश्वरी मातेचा आणि भगवानबाबांचा जयजयकार करीत ही भक्तमंडळी देऊळगावातून पायी आनंदगडावर पोहोचतात. गावातील मातंग बांधव आणि अन्य भक्तमंडळी मोठ्या संख्येने सहभागी होतात. गडावर प्रबोधनात्मक प्रवचन, भाषणे व भगवानबाबांचे आशीर्वादपर बोलणे होते. मातंग शौर्य परंपरा, या

समाजाचे मोठे सामाजिक योगदान या सर्वांवर प्रकाश टाकला जातो.

आपल्याच हाडामांसाचे, परमेश्वराचा अंशच नव्हे, तर प्रत्यक्ष भगवंतच असलेले हे समाजबांधव आहेत, त्यांना प्रेम, बंधुभावाची वागणूक दिली पाहिजे हे भगवानबाबांचे उद्‌गार उराशी कवटाळत हे मातंग बांधव ही रंगपंचमी खऱ्या अर्थाने परमेश्वर सान्निध्यात साजरी करतात. आपलेच सहोदर प्रेमापासून वंचित राहिल्यामुळे अन्य धर्मांकडे वळतात. त्यांचे रक्षण, त्यांना प्रेम, आपुलकी देणे, सन्मान देणे याचा वस्तुपाठ आनंदगड सातत्याने देत असतो. भटक्या-विमुक्त समाजाचा मेळावा, संत संमेलन, धर्माचार्य सभा, एक ना अनेक उपक्रम श्री आनंदगडावर सातत्याने सुरू असतात. विश्व हिंदू परिषदेच्या केंद्रीय मार्गदर्शक मंडळाचे ह.भ.प. श्री भगवानबाबा सदस्य आहेत.

– डॉ. दिवाकर कुलकर्णी

**संदर्भ** :


१. *डॉ. चौधरी, श्रीराम; 'समता, ममता, समरसता'.*

२. *'संतानुग्रह' मासिक.*


## आठवले, जयंत बाळाजी

**सनातन संस्थेचे संस्थापक**

**६ मे १९४२**

**ए**कोणिसाव्या शतकात इंग्रजांनी या देशावर आपले राज्य स्थापन करून ख्रिस्ती धर्माचा व इंग्रजी भाषेचा प्रसार केला. भोगवादी पाश्चिमात्य संस्कृतीचा पगडा भारतीयांवर पडून भारतीय संस्कृती व हिंदू धर्मावर काळे मेघ दाटले. सत्ता व खुर्चीच्या लोभापायी राज्यकर्ते आपली थोर भारतीय संस्कृती व हिंदू धर्माप्रती आपले मूलभूत कर्तव्य विसरले. अशा कठीण प्रसंगी काही त्यागी हिंदू विद्वानांनी भारतीय संस्कृती व हिंदू धर्म यांचे रक्षण करण्याचा विडा उचलला. या त्यागी विद्वानांमध्ये डॉ. जयंत बाळाजी आठवले यांचे नाव प्रामुख्याने घ्यावे लागेल. जयंत आठवले यांचा जन्म त्यांच्या आजोळी, रायगड जिल्ह्यातील नागोठणे या गावी झाला. त्यांना तीन



भाऊ होते. जयंताचे वडील शाळेत शिक्षक होते. विद्यार्थ्यांना ते मन लावून शिकवीत, त्यामुळे ते विद्यार्थ्यांमध्ये अतिशय प्रिय होते. जयंता लहानपणापासूनच अतिशय हुशार. वडिलांच्या सुयोग्य मार्गदर्शनामुळे त्याने वर्गातील पहिला क्रमांक कधी सोडला नाही. अभ्यासाशिवाय अन्य उपक्रमांमध्येही त्याने भाग घेऊन आपल्या बुद्धीची चमक दाखविली.

ड्रॉइंगच्या 'एलिमेंटरी' व 'इंटरमीडिएट' या परीक्षा व हिंदीच्या 'कोविद' या परीक्षेत त्याने पहिला क्रमांक सोडला नाही. त्याने अनेक छंद जोपासले होते. मर्फी रेडिओद्वारे आयोजित निबंध स्पर्धेत त्याने मराठी विभागात ५० रुपयांचे बक्षीस पटकावले. जयंतने इयत्ता सातवीच्या स्कॉलरशिप परीक्षेत घवघवीत यश मिळविले. विद्यालयाच्या 'आर्य' या नियतकालिकासाठी त्याने अनेक लेख लिहिले व दोन वर्षे सहसंपादक म्हणूनही काम पाहिले.

स्कूल पार्लमेंटमध्ये मुलांनी त्याला मंत्री म्हणून निवडून दिले. जयंत बुलबुलतरंग, हार्मोनिअम आणि माउथ ऑर्गन ही वाद्येही सहजतेने वाजवी. फोटोग्राफी व पोहणे यांचीही त्याला आवड होती. त्याचे शालेय शिक्षण मुंबईच्या गिरगाव येथील आर्यन एज्युकेशन सोसायटीच्या विद्यालयात झाले. विल्सन महाविद्यालयातून प्रथम वर्ष व जयहिंद महाविद्यालयातून

द्वितीय वर्ष उत्तम रितीने उत्तीर्ण केल्यानंतर जयंतरावांनी १९६१ साली ग्रँट वैद्यकीय महाविद्यालयामध्ये प्रवेश घेतला व १९६४ साली ते एम.बी.बी.एस. उत्तीर्ण झाले. १९६४-६५ या सालात नियमानुसार इंटर्नशिप पूर्ण केल्यानंतर त्यांना वैद्यकीय प्रमाणपत्र मिळाले.

एम.बी.बी.एस. उत्तीर्ण झाल्यानंतर चार वर्षांनी डॉ. जयंत आठवले इंग्लंडला रवाना झाले. त्या वेळी विदेशी चलनाची स्थिती फारच गंभीर होती. त्यामुळे त्यांना अत्यंत काटकसरीने दिवस कंठावे लागले. कधी पाव, पिझ्झा, बिस्किटे व केक खाऊन, दूध पिऊन त्यांना झोपावे लागे. कारण, मिळणारा पगार अत्यंत कमी व आठवड्यातून एकदा मिळत असे. १९७८ साली डॉ. जयंत इंग्लंडहून भारतात परतले.

डॉ. जयंत आठवले यांच्या अभ्यासाचा प्रवास : १९६५ ते १९६७, स्थूलदेहाशी संबंधित अभ्यास (एम.डी. मेडिसिन); १९६८ ते १९७०, मनोदेहाशी संबंधित अभ्यास (मनोविकार); १९७१ ते १९८६, चित्ताशी संबंधित अभ्यास (संमोहनशास्त्र), १९८७ पासून आत्म्याशी संबंधित अभ्यास: गुरुप्राप्तीनंतरची साधना असा प्रवास झाला.

मानसशास्त्राप्रमाणेच बरेचसे रुग्ण संमोहनशास्त्रानेही बरे होत नाहीत असे आढळून आल्यानंतर डॉ. आठवले अध्यात्माकडे वळले. त्यांनी अध्यात्माचा अभ्यास केला. प.पू. मलंगबाबा, प.पू. विद्यानंद, प.पू. करंदीकर, प.पू. भक्तराज महाराज या महाराजांकडे जाऊन त्यांनी अध्यात्माचे बरेच ज्ञान प्राप्त केले. १९९५ साली डॉ. जयंत आठवले भक्तराज महाराजांच्या अमृत महोत्सवानिमित्त पंधरा दिवस इंदूरला राहिले. त्या वेळी महाराजांनी त्यांना कृष्ण-अर्जुनाचे महत्त्व व मोठेपण सांगितले व त्यांच्या हातात कृष्णार्जुन असलेला चांदीचा रथ दिला व म्हणाले, ‘‘गोव्याला आपले कार्यालय होईल, तिकडे ठेवा.’’

प.पू. भक्तराज महाराजांसारखे गुरू मिळाल्यावर डॉ. आठवले नामस्मरण, साधना, बाबांच्या तत्त्वांचे आचरण व बाबांचे कार्य करू लागले. त्यातच त्यांना आनंद मिळू लागला. बाबांचा अध्यात्मप्रसार करणे त्यांना आवडू लागले. डॉ. आठवले यांनी ‘गुरुकृपायोग’ हा सर्वांत सोपा, सहज व जलदगतीने आध्यात्मिक प्रगती करणारा योग सांगितला. स्वत: या साधनामार्गाचा अवलंब करून नंतर इतरांकडून तो करवून घेतला. गुरुकृपायोगानुसार साधना केल्याने अंदाजे ३३ साधक अल्पावधीतच संतपदाला पोहोचले. प.पू. भक्तराज महाराज यांचा आशीर्वाद घेऊन डॉ. जयंत आठवले यांनी १९९० साली ‘सनातन संस्थेची’ स्थापना केली. ‘नित्य नूतन: सनातन: ।’ म्हणजे जे नित्यनूतन आहे, चैतन्य आहे, कधी जुने-पुराणे होत नाही, त्याला ‘सनातन’ म्हणतात. सनातन संस्था म्हणजे जगभरातील सर्व धर्म व पंथांतील साधकांच्या आध्यात्मिक उन्नतीसाठी कार्यरत असलेली चैतन्यमय संस्था!

सनातन संस्थेच्या कार्याचे उद्देश :

१) जिज्ञासूंना साधना सांगणे,

२) साधकांच्या आध्यात्मिक प्रगतीसाठी वैयक्तिक मार्गदर्शन करणे.

३) जगभर हिंदू धर्म आणि अध्यात्मशास्त्र यांचा वैज्ञानिक परिभाषेत प्रसार करणे.

४) हिंदू समाज, राष्ट्र आणि धर्म यांच्या जागृतीचे सेवाभावी कार्य करणे.

५) भारतात साधना करण्यास पोषक असे ‘ईश्वरी राज्य’ म्हणजे धर्माधिष्ठित ‘हिंदू राष्ट्र’ स्थापन करणे.

डॉ. जयंत आठवले यांच्या मार्गदर्शनाखाली १५,००० साधक तन-मन-धनपूर्वक साधना करीत आहेत. तसेच ते समष्टी साधना म्हणून हिंदू समाज, राष्ट्र आणि धर्म यांच्या हिताचे कार्य करीत आहेत.

डॉ. जयंत आठवले यांनी जीवनाच्या सर्वांगांना स्पर्श करणाऱ्या अलौकिक ग्रंथसंपदेची निर्मिती केली आहे. अध्यात्मशास्त्री, देवतांची उपासना, साधना, आचरपालन, बालसंस्कार, राष्ट्ररक्षण, धर्मजागृती, ईश्वरप्राप्तीसाठी कला इत्यादी विविध विषयांवरील सनातननिर्मित २११ ग्रंथांच्या ११ भाषांमध्ये ५६ लाख प्रती प्रकाशित झाल्या आहेत.

समाजाला धर्मशिक्षण मिळावे यासाठी सनातन संस्था 'सत्संग', 'अध्यात्मविषयक प्रवचने', 'बालसंस्कार वर्ग' इत्यादी माध्यमांतून अध्यात्मप्रसाराचे कार्य करीत आहे. सनातन संस्थेच्या माध्यमातून शाळांमधून 'नैतिक मूल्यांचे संवर्धन', 'आध्यात्मिक प्रश्नमंजूषा' इत्यादी उपक्रम राबविले जात आहेत. हिंदूंना धर्मशिक्षण मिळावे म्हणून देवळांमध्ये सनातन संस्थेने नि:शुल्क धर्मशिक्षण फलक लावले आहेत. गणेशोत्सव, नवरात्रौत्सव, होळी इत्यादी सार्वजनिक उत्सवांतील गैरप्रकार रोखणे, देवतांचे विडंबन रोखणे, धर्मांतर रोखणे इत्यादी महत्त्वाच्या धर्मरक्षणाच्या कार्यांत सनातन संस्थेचे साधक भाग घेतात. 'इलेक्ट्रोसोमॅटोग्राफिक स्कॅनिंग' या तंत्रज्ञानाच्या आधारे मांसाहार सेवन व शाकाहार सेवन, मद्यपान, पाश्चात्त्य संगीत आणि भारतीय संगीत ऐकणे इत्यादींचा, व्यक्तींच्या शरीरातील षट्चक्रावर काय परिणाम होतो, याचा सनातनने विविध प्रयोगांद्वारे अभ्यास केला. या प्रयोगांद्वारे साधना करण्याचे महत्त्व, तसेच हिंदू आचार, हिंदू संगीत, हिंदू संस्कृती आदींचे महत्त्व सिद्ध झाले आहे.

'पॉलिकॉन्ट्रॉस्ट इंटरफिअरन्स फोटोग्राफी' या तंत्रज्ञानाद्वारे सनातनने हिंदू धर्मशास्त्रानुसार बनविलेली देवतांची चित्रे आणि गणेशमूर्ती यामध्ये अधिक सात्त्विकता असल्याचे सिद्ध झाले. तसेच, या तंत्रज्ञानाद्वारे संतांची छायाचित्रे, त्यांच्या वापरातील वस्तू आणि खोली, तसेच यज्ञकुंड, साधना करणारी व्यक्ती इत्यादींतील सात्त्विकता सप्रमाण सिद्ध झाली आहे.

'इलेक्ट्रो स्कॅनिंग मेथड', 'गॅस डिस्चार्ज्ड व्हिज्युअलायझेशन' आणि 'रेझोनन्ट फिल्ड इमेजिंग' या वैज्ञानिक उपकरणांद्वारे वाईट शक्तींचे त्रास, संतांच्या सात्त्विकतेचा वस्तूंवर होणारा परिणाम यांसारखे अध्यात्मशास्त्राचे महत्त्व सिद्ध करणारे संशोधन सनातनने केले आहे. 'सनातन संस्थे'ने केलेले आध्यात्मिक संशोधन ऑस्ट्रेलियातील 'स्पिरिच्युअल सायन्स रिसर्च फाउण्डेशन डॉट कॉम' या संकेत स्थळाने उपलब्ध केले आहे. यामुळे हजारो परदेशी नागरिक हिंदू धर्मानुसार साधना करू लागले आहेत.

सात्त्विक रांगोळी, सात्त्विक मेंदी, सात्त्विक अक्षरे इत्यादी विषयांतही सनातनने संशोधन केले आहे. 'सात्त्विक रांगोळी' आणि 'सात्त्विक मेंदी' हे ग्रंथही सनातनने प्रकाशित केले आहेत. धार्मिक विधींचा आध्यात्मिक लाभ होण्यासाठी पुरोहित हे सात्त्विक, तसेच प्रत्येक विधी साधना म्हणून करणारे असणे आवश्यक असते. असे साधक-पुरोहित हिंदू समाजाला देण्यासाठी सनातन ही पाठशाळा चालवते. हे पुरोहित केवळ विधी करीत नाहीत, तर यजमानाला त्या विधीच्या संदर्भातील धर्मशिक्षणही देतात.

प्राचीन 'गुरु-शिष्य' परंपरेचे जतन करण्यासाठी 'सनातन संस्थे'कडून भारतात दरवर्षी अंदाजे १५० गुरुपौर्णिमा महोत्सवांचे आयोजन केले जाते. प.पू. डॉ. जयंत आठवले यांनी हिंदुसंघटन, राष्ट्ररक्षण आणि धर्मजागृती या तीन कार्यांना वाहून घेतले. हिंदूधर्म, देवता, धर्मग्रंथ, संत आणि राष्ट्रपुरुष या हिंदू समाजाच्या श्रद्धास्थानांच्या हेटाळणीच्या विरोधात आवाज उठविण्याचे स्फुल्लिंग त्यांनी समाजात चेतविले.

समाजाला राष्ट्ररक्षण आणि धर्मजागृती करायला शिकवायची, तर समाजमनावरील निष्क्रियतेची काजळी सातत्याने पुसून वैचारिक क्रांतीचा वन्ही पेटविण्याचे माध्यम हवे, म्हणून त्यांनी 'सनातन प्रभात' नियतकालिक समूह स्थापन केला. या माध्यमातून सध्या मराठी भाषेतील दैनिकाच्या चार आवृत्त्या, मराठी व कन्नड भाषांतील साप्ताहिक, तसेच हिंदी, इंग्रजी आणि गुजराती भाषांतील मासिके चालू आहेत.

— प्रा. नीलकंठ पालेकर

***

# परिशिष्ट - भ

## भोसले, मारुतीबुवा गणपती

**समर्थ परंपरा, प्रवचनकार, तत्त्वचिंतक, लेखक**
**१९३६**



**मा**रुतीबुवा भोसले म्हणजे समर्थांचा साक्षात महंत होय. त्यांचा जन्म हनुमानजयंतीला कोल्हापूर जिल्ह्यातील बुवाचे वाठार येथे झाला. प्राथमिक शिक्षण घेत असतानाच त्याने घरदार सोडून औदुंबर, नरसोबावाडी अशा ठिकाणी साधना केली आणि स्वरूपाचा शोध सुरू केला. गाणगापूर येथे दोन वर्षे राहून, भिक्षा मागून प्रखर दत्तोपासना केली. योगायोगाने समर्थ सेवा मंडळाचे ज्येष्ठ रामदासी वेंकटरमण अय्या तथा अय्याबुवा यांची मारुतीबुवांशी गाणगापूर येथे भेट झाली. त्यांनी मारुतीबुवांची जिज्ञासू वृत्ती, चिकाटी, उपासना पाहून त्यांना सज्जनगडावर पाचारण केले. श्रीधरस्वामींचा 'गुरुपदेश' घेण्याचा मार्ग दाखविला. श्रीधरस्वामींची बुवांनी अत्यंत श्रद्धेने गुरुसेवा केली. या सत्पुरुषांच्या साक्षीने आणि मार्गदर्शनाखाली मारुतीबुवांनी कठोर साधना केली. त्यांचा सेवाभाव, अभ्यास आणि साधना पाहून स्वामी संतोष पावत. हळूहळू मारुतीबुवा अधिकारी शिष्यत्वास पात्र झाले, म्हणून श्रीधरस्वामींनी २८ मे १९५८ रोजी स.भ. कुलकर्णीबुवा यांच्या सांगण्यावरून मारुतीबुवांना चाफळच्या दासमारुती मंदिरात अनुग्रह दिला. १९५७-५८ पासून सज्जनगडावरील मठाची, मंदिराची जीर्णावस्था दूर करण्यासाठी गडावर अनेक भक्त खटपट करीत होते. त्यांमध्ये बाबूराव वैद्य, कुलकर्णीबुवा, अय्याबुवा, दिनकरबुवा आदी मंडळींमध्ये मारुतीबुवा अग्रेसर होते. भिक्षाप्रचार दौऱ्यात मारुतीबुवांचा पुढाकार अहर्निश राहिला. कालांतराने गडाचे रूप पालटले.

आज गडावर भक्तांना सर्व प्रकारच्या सुविधा लाभल्या आहेत. मंदिरातील पूजा यथासांग होत आहेत. उपासना चालू आहे. उत्कृष्ट प्रवचनकार, समर्थ वाङ्मयाचे गाढे अभ्यासक, तत्त्वचिंतक, अद्वैत ग्रंथाचे भाष्यकार, भक्तीचा मुकुटमणी असे मारुतीबुवा दास्यभक्ती कशी असावी, याचे मूर्तिमंत उदाहरण आहेत. भिक्षा दौऱ्यात ते सिंगापूर, मलेशिया इ. ठिकाणी जाऊन समर्थ गाथा गाऊन आले. 'महंते महंत करावे' हा उपदेश त्यांनी आचरणात आणून दाखविला. समर्थ संप्रदायाची वृद्धी केली. दासबोधावर, आत्मारामावर व समर्थांच्या अन्य वाङ्मयावर मारुतीबुवांनी चिंतनात्मक असे विपुल लिखाण केले आहे.

— प.अ. बोंडाळे

**संदर्भ :**

*१. गोडबोले अरुण : सज्जनगड मासिक पत्रिका, मे २०१०.*

***

# परिशिष्ट - स

**स्वामी गोविंदगिरीजी**
**व्यास, किशोरजी मदनगोपाल**
**प्रवचनकार, भागवतकार**
**२५ जानेवारी १९४९**



**म**हाराष्ट्रात भागवतधर्माची ध्वजा गेल्या आठ पिढ्या निष्ठेने फडकवत ठेवून, प्रवचन, व्याख्यानादी माध्यमातून भारतीय तत्त्वज्ञान जनमानसात पोहोचवणारे महाराष्ट्रातील अहमदनगर येथील व्यास घराणे आजही ही परंपरा टिकवून आहे. किशोरजी व्यास यांनी आपले वडील कै. पं. मदनगोपाल व्यास या पुराण, वेद, ज्योतिष या विषयांतील प्रकांडपंडितांकडून हा भक्तिरसाचा अमृतकुंभ समर्थपणे पेलला आहे. किशोरजींच्या आजोळी म्हणजे मातु:श्री गुलाबदेवींच्या माहेरी, राजस्थानात मिश्रा घराण्यातही श्रीभागवत ग्रंथाची उपासना आणि पारायणे नियमितपणे होत असत. अशा परिपूर्ण आध्यात्मिक परंपरेचा आणि आचरणाचा संचार असलेल्या घरांमध्ये किशोरचे बालपण उन्नत होत गेले. १९४९ साली अहमदनगर जिल्ह्यातील बेलापूर गावात किशोर व्यासांचा जन्म झाला. शाळेत, तिसऱ्या इयत्तेत असतानाच त्यांनी खणखणीत वाणीने आणि अभ्यासपूर्ण आकलनातून तयार केलेले धार्मिक विषयावरील भाषण खूप प्रशंसिले गेले. सात-आठ वर्षांचे असतानाच त्यांनी गावात सार्वजनिक गणेशोत्सव सुरू करून मुलांचा एक संघ स्थापन केला. पौगंडावस्थेत असतानाच त्यांचे मन अध्यात्म आणि भागवतविचारांनी नेहमी उचंबळून येत असे. त्यांनी बालवयातच वेद, उपनिषदे, पुराणे आदी वैचारिक, धार्मिक वाचन, तसेच सात्त्विक जीवन आचरणाला पोषक असलेल्या वाङ्मयाचा झपाटल्यागत अभ्यास सुरू केला.

सतराव्या वर्षीच किशोरजींनी वडिलांच्या सांगण्यावरून भागवतकथा प्रवचनाचे शिवधनुष्य लीलया पेलले. प्रगाढपंडित आणि अधिकारी श्रोत्यांसमोर न डगमगता केलेल्या प्रवचनामुळे आपला मुलगा भविष्यात निश्चितच घराण्याचा वारसा पुढे चालवील याची खात्री आणि समाधान पंडित मदनगोपालजी व्यास यांना वाटले. अहमदनगरच्या शाळेत त्यांनी माध्यमिकपर्यंत शिक्षण घेतले आणि उच्च-शिक्षण म्हणजे विशेषत: तत्त्वज्ञानाच्या शिक्षणासाठी ते पांडुरंगशास्त्री आठवले यांच्या स्वाध्याय परिवाराच्या ‘तत्त्वज्ञान विद्यापीठ’, ठाणे येथे दाखल झाले.

तत्त्वज्ञान विद्यापीठात विविध प्रकारच्या विषयांचा तात्त्विक कसोट्यांवर पारखून अभ्यास केल्यानंतर महाराष्ट्राची वेस ओलांडून ते भारतीय आणि पाश्चिमात्य विचार, तत्त्वज्ञानाचा अभ्यास जाणीवपूर्वक करून घेण्यासाठी काशी विद्यापीठात प्रवेश करते झाले. काशी येथील गोयंका महाविद्यालयातून त्यांनी प्रसिद्ध

वेदअभ्यासक पं. विश्वनाथजी देव यांच्याकडून सखोल शास्त्राभ्यास करून तेथील संस्कृत विद्यापीठाची 'आचार्य' ही पदवी प्राप्त केली.

किशोरजी व्यास यांचा ओढा तत्त्वज्ञान विद्यापीठातील त्यांच्या अभ्यासापासूनच दादा म्हणजेच 'स्वाध्याय'चे प्रणेते पांडुरंगशास्त्री आठवले यांच्या विचार आणि आचारांकडेच होता. त्यानुसार त्यांनी महाराष्ट्र, गुजरातच्या गावोगावी श्रीभागवतकथा ज्ञानयज्ञाची शेकडो व्याख्याने, प्रवचने आजवर सिद्ध केली आहेत. केवळ भागवत नव्हे, तर हिंदू मान्यतेनुसार महाभारत, रामायण, वेद, उपनिषदे, ज्ञानेश्वरी, दासबोध, योगवसिष्ठ या ग्रंथांतील सद्विचार आणि स्वामी विवेकानंद, योगी अरविंद, जे. कृष्णमूर्ती यांच्या अक्षरकृतींचा प्रसार त्यांनी कित्येक गावाशहरांत केला. 'संत ज्ञानेश्वर आणि जिद्दू कृष्णमूर्ती यांचे तौलनिक दर्शन' या विषयावरील त्यांचे व्याख्यान खूप गाजले. किशोरजींनी दिलेल्या महाभारतावरील व्याख्यानमालेवर काशी हिंदू विद्यापीठातील संस्कृतमधील महाकवी पं. रेवाप्रसाद द्विवेदी खूपच प्रभावित झाले. रेवाप्रसादजींची प्रशंसा म्हणजे पदवीच मानली जात असे.

ऐंशीच्या दशकात किशोरजी व्यास यांनी 'महर्षी वेदव्यास प्रतिष्ठान' ही संस्था स्थापन केली. या प्रतिष्ठानामार्फत इच्छुक विद्यार्थ्यांना, तरुणांना वेद, उपनिषदे, धर्मग्रंथांचा परिचय आणि त्यात उच्च विद्याविभूषित करून देणे, त्यासाठी शिष्यवृत्ती, वसतिगृह उपलब्ध करून देणे इत्यादी सेवा विनामूल्य दिल्या जातात. याबरोबरच प्रतिष्ठानातर्फे बुजुर्ग आणि अधिकारी साधक आणि अभ्यासकांना त्यांच्या आध्यात्मिक योगदानाची दखल घेऊन दरवर्षी 'महर्षी वेदव्यास' पुरस्कार, तसेच 'संतश्री ज्ञानेश्वर' पुरस्कार देऊन गौरविण्यात येते. आजवर या पुरस्कारांनी पं. दत्तमहाराज कविश्वर, डॉ. ब.स. येरगुंटवार, पं. यज्ञेश्वरशास्त्री कस्तुरे यांना 'महर्षी वेदव्यास' पुरस्काराने, तर 'संतश्री ज्ञानेश्वर' पुरस्काराने ह.भ.प. धुंडामहाराज देगलूरकर यांना गौरविले गेले आहे.

मृदुभाषी आणि सकलजनांच्या जीवनात मांगल्याची ज्योत प्रज्वलित राहावी, हा ध्यास घेतलेल्या आचार्य किशोर महाराजांनी त्यांना प्राप्त झालेल्या मिळकतीमधून अनेक लोकोपयोगी कामे केली आहेत. आचार्यांच्या कार्याची दखल श्री कांची पीठाचे शंकराचार्य श्री चंद्रशेखर सरस्वती यांनी आपली कृपादृष्टी ठेवून घेतली आहे. श्री कांची पीठाचे नंतरचे शंकराचार्य श्री शंकर विजयेंद्र सरस्वती यांच्याशीदेखील किशोरजींचा स्नेहार्द्र परिचय आहे. याशिवाय राजस्थानचे श्री निंबार्कातीर्थाचे अधिपती जगद्गुरू निंबार्काचार्य, भारतमाता मंदिराचे श्री सत्यमित्रानंदगिरी स्वामीजी, डीडवाला मठाचे श्रीरामकिशोरजी महाराज अशा अनेकांचा सहवास आणि आशीर्वाद त्यांना लाभला आहे. स्वामी श्री चंद्रशेखर सरस्वती यांनी किशोरजींना 'तुम्ही ब्रह्मीभूत डोंगरेमहाराजांचे वारसदार व्हाल' असा शुभाशीर्वाद दिला आहे. किशोर व्यासांनी स्वामी सत्यमित्रानंदजी गिरी यांच्याकडून संन्यासदीक्षा घेऊन 'गोविंदगिरी' हे नाव धारण केले आहे.

– संदीप राऊत

***

# परिशिष्ट - २ कालानुक्रमे संत यादी

| अनु. | चरित्रनायकाचे नाव | जन्मवर्ष |
|---|---|---|
| १ | गोपाळनाथ महाराज (त्रिकुटी) | १७०० |
| २ | आरफळकर हैबतबाबा | १७५० |
| ३ | साखरे नानामहाराज | १७५० |
| ४ | स्वामी समर्थ | १७६० |
| ५ | कावडीबाबा | १७९७ |
| ६ | चिद्‌घन महाराज | १८०१ |
| ७ | हंसराज स्वामी | १८०५ |
| ८ | जालवणकर नारायण महाराज | १८०७ |
| ९ | जंगली महाराज | १८१० |
| १० | देव मामलेदार | १८१५ |
| ११ | माणिकप्रभू | १८१७ |
| १२ | वासकर तुकोबादादा अंदाभाऊ | १८१७ |
| १३ | विष्णुबुवा ब्रह्मचारी | १८२५ |
| १४ | फुले जोतीराव गोविंदराव | १८२७ |
| १५ | चितारीबुवा | १८३० |
| १६ | आनंद भारती | १८३१ |
| १७ | चिमड महाराज | १८३३ |
| १८ | सिद्धारूढ स्वामी | १८३६ |
| १९ | बीडकर रामानंद बळवंतराव | १८३८ |
| २० | रुकडीकर विश्व नाथ महाराज | १८४३ |
| २१ | गोंदवलेकर महाराज | १८४४ |
| २२ | माहुरकर विष्णुदास महाराज | १८४४ |
| २३ | नित्यानंद बाबा | १८४५ |
| २४ | केळकर गोपाळबुवा | १८४७ |
| २५ | पटवर्धन अण्णासाहेब (महर्षी) | १८४७ |
| २६ | मंगळवेढेकर सीताराम महाराज | १८५२ |
| २७ | टेंबे वासुदेवानंद सरस्वती | १८५४ |

| अनु. | चरित्रनायकाचे नाव | जन्मवर्ष |
|---|---|---|
| २८ | चंदावरकर (प्रार्थना समाज) | १८५५ |
| २९ | बाळेकुंद्री पंत महाराज | १८५५ |
| ३० | क्षीरसागर रामकृष्ण कृष्णाजी | १८५५ |
| ३१ | प्रज्ञानंद सरस्वती | १८५६ |
| ३२ | निरंजन रघुनाथ | १८६० |
| ३३ | ताजुद्दिन बाबा | १८६१ |
| ३४ | मुंगसाजी देव | १८६३ |
| ३५ | जोग विष्णुबुवा | १८६७ |
| ३६ | दासगणू महाराज | १८६७ |
| ३७ | उपासनी महाराज (अमरावती) | १८७० |
| ३८ | देव शंकर श्रीकृष्ण | १८७१ |
| ३९ | सातारकर दादा महाराज | १८७५ |
| ४० | गाडगे महाराज | १८७६ |
| ४१ | चौंडे गोजीवन महाराज | १८७६ |
| ४२ | देशमुख केशव महाराज | १८७७ |
| ४३ | बंकटस्वामी | १८७७ |
| ४४ | गजानन महाराज (शेगांव) | १८७८ |
| ४५ | साधू वासवानी | १८७९ |
| ४६ | गुलाबराव महाराज (प्रज्ञाचक्षु) | १८८१ |
| ४७ | साठेबाबा | १८८१ |
| ४८ | खुपेरकर बाळाचार्य | १८८२ |
| ४९ | सहस्रबुद्धे रावसाहेब | १८८३ |
| ५० | अनंतदास रामदासी | १८८५ |
| ५१ | केडगावकर नारायणमहाराज | १८८५ |
| ५२ | हराळकर नामदेवतात्या शिवराम | १८८५ |
| ५३ | गुरुदेव रानडे | १८८६ |
| ५४ | गुळवणी महाराज | १८८६ |
| ५५ | पंडित बाबाजी महाराज | १८८६ |
| ५६ | केवलानंद सरस्वती | १८८७ |
| ५७ | टेंब्ये शिवानंद स्वामी महाराज | १८८७ |
| ५८ | उपळेकर गोविंदमहाराज | १८८८ |
| ५९ | मसुरकर विनायक महाराज | १८८८ |
| ६० | केशवदत्त महाराज | १८८९ |

| अनु. | चरित्रनायकाचे नाव | जन्मवर्ष |
|---|---|---|
| ६१ | आंबेडकर भीमराव रामजी | १८९१ |
| ६२ | वालावलकर सीताराम | १८९१ |
| ६३ | गुप्ते गजानन महाराज (अक्कलकोट) | १८९२ |
| ६४ | बाळूमामा धनगर | १८९२ |
| ६५ | प्रज्ञानानंद सरस्वती | १८९३ |
| ६६ | मुळे स्वयंजोती महाराज | १८९३ |
| ६७ | स्वामी दासतीर्थ | १८९३ |
| ६८ | अवतार मेहेरबाबा | १८९४ |
| ६९ | सुबंध प्रल्हादबुवा सीताराम | १८९५ |
| ७० | क्षात्रजगद्‌गुरू | १८९५ |
| ७१ | तराणेकर नाना महाराज | १८९६ |
| ७२ | दांडेकर मामासाहेब | १८९६ |
| ७३ | भक्तिवेदांत स्वामी प्रभुपाद | १८९६ |
| ७४ | निसर्गदत्त महाराज | १८९७ |
| ७५ | रंगावधूत महाराज | १८९८ |
| ७६ | धनेश्वधर नागेश रामचंद्र | १८९९ |
| ७७ | आनंदऋषीजी | १९०० |
| ७८ | चव्हाण काशीबाई | १९०१ |
| ७९ | धुंडीराजशास्त्री विनोद | १९०२ |
| ८० | कालगावकर आण्णाबुवा | १९०३ |
| ८१ | गगनगिरी महाराज | १९०३ |
| ८२ | स्वामी स्वरुपानंद | १९०३ |
| ८३ | स्वामी राम | १९०३ |
| ८४ | देगलूरकर धुंडामहाराज | १९०४ |
| ८५ | तनपुरे महाराज | १९०५ |
| ८६ | राऊळ महाराज | १९०५ |
| ८७ | किसनगिरी महाराज | १९०७ |
| ८८ | कलावती आई | १९०८ |
| ८९ | मुक्तानंद (गुरुदेव सिद्धपीठ) | १९०८ |
| ९० | श्रीधरस्वामी (सज्जनगड) | १९०८ |
| ९१ | तुकडोजी महाराज | १९०९ |
| ९२ | बेलसरे केशव विष्णू | १९०९ |
| ९३ | कवीश्वर दत्तमहाराज | १९१० |

| अनु. | चरित्रनायकाचे नाव | जन्मवर्ष |
|---|---|---|
| ९४ | नरहरी प्रभु | १९१० |
| ९५ | पट्टेकर गजानन महाराज | १९१० |
| ९६ | दिगंबरदास महाराज | १९१२ |
| ९७ | पाचलेगावकर महाराज | १९१२ |
| ९८ | देशपांडे मामा | १९१४ |
| ९९ | मौनगिरी महाराज | १९१४ |
| १०० | पारनेरकर महाराज | १९१६ |
| १०१ | स्वामी चिन्मयानंद सरस्वती | १९१६ |
| १०२ | आफळे गोविंदस्वामी | १९१७ |
| १०३ | स्वामी माधवनाथ | १९१७ |
| १०४ | महर्षी महेश योगी | १९१८ |
| १०५ | राममारुती महाराज | १९१८ |
| १०६ | सावळापूरकर गजानन महाराज (अक्कलकोट) | १९१८ |
| १०७ | आठवले पांडुरंगशास्त्री वैजनाथशास्त्री | १९२० |
| १०८ | स्वामी वरदानंद भारती | १९२० |
| १०९ | चिले महाराज | १९२२ |
| ११० | झुरळे महाराज | १९२२ |
| १११ | धर्माधिकारी नानासाहेब | १९२२ |
| ११२ | मोरेदादा | १९२२ |
| ११३ | करंदीकर नानासाहेब | १९२३ |
| ११४ | पै वामनराव | १९२३ |
| ११५ | बाळ मालतीदेवी गणेश | १९२३ |
| ११६ | मणेरीकर दत्तात्रय गणेश | १९२३ |
| ११७ | शंकराचार्य विद्याशंकर भारती (करवीर) | १९२३ |
| ११८ | गोयंका सत्यनारायण | १९२४ |
| ११९ | आर्वीकर बाबा महाराज | १९२५ |
| १२० | डोंगरे रामचंद्र महाराज | १९२६ |
| १२१ | देगलूरकर श्रीधरस्वामी | १९२६ |
| १२२ | सावळाराम महाराज | १९२७ |
| १२३ | जैतुन बी | १९३० |
| १२४ | ओशो रजनीश | १९३१ |
| १२५ | कर्वे लीलाताई | १९३४ |
| १२६ | भोसले मारुतीबुवा | १९३६ |

| अनु. | चरित्रनायकाचे नाव | जन्मवर्ष |
|---|---|---|
| १२७ | साटम शंकर महाराज | १९३७ |
| १२८ | दत्ताबाळ | १९४१ |
| १२९ | स्वामी स्वानंदगिरी | १९५४ |

## खालील चरित्रनायकांची निश्चित जन्मतिथी उपलब्ध नाहीत.

| अनु. | पृष्ठ क्र. | चरित्रनायकाचे नाव |
|---|---|---|
| १. | ४ | अमळनेरकर सखाराममहाराज |
| २. | ६ | आकोटकर नरसिंगजीमहाराज |
| ३. | ३० | कैकाडीबाबा |
| ४. | ५४ | जोगन विठाबाई |
| ५. | ८९ | नृसिंहसरस्वतीमहाराज (आळंदी) |
| ६. | १३० | विज्ञानानंद (लोणावळा) |
| ७. | १३३ | शंकरमहाराज |
| ८. | १३८ | साईबाबा |

# संपादक परिचय

## विद्याधर माधव ताठे (पाटील)

संपादक, एकता मासिक, पुणे. माजी कार्यकारी संपादक, साईलीला, मुंबई (श्री. साईबाबा संस्थान शिर्डीचे अधिकृत नियतकालिक).

**शिक्षण** : एम.ए. (मराठी) (प्रथम वर्ग) पुणे विद्यापीठ, बॅचलर ऑफ जर्नालिझम (प्रथम वर्ग), बी.कॉम.

दैनिक 'तरुण भारत', पुणे चे १० वर्षे मुख्य उपसंपादक. मुंबईच्या सा. विवेकचे माजी सहाय्यक संपादक (२ वर्षे). 'विवेक' वारकरी विशेषांकाचे विशेष अतिथी संपादक. हिन्दुस्थान समाचार या हिंदी वृत्तसंस्थेचे आसाम परिसरात काही वर्षे वार्ताहर. म. बसवेश्वर पुतळा समिती, पुणे चे सदस्य. पुणे श्रमिक पत्रकार संघ, उपाध्यक्ष (३ वर्षे). सरचिटणीस, पुणे प्रेस क्लब.

**विशेष पुरस्कार** : डहाणूकर पत्रकारिता उत्कृष्ट विशेष लेखाचा राज्य पुरस्कार

लोकहितवादी पुरस्कार (१९८५)

सर्वोत्कृष्ट बातमीचा विक्रम पुरस्कार (१९८६)

पुणे मनपाचा विशेष सन्मान पुरस्कार (१९९८)

ग्रहांकितचा सरस्वती सन्मान (२००१)

महर्षी व्यास पत्रकारिता पुरस्कार (२००१)

**सामाजिक योगदान** : आसाम, नागालँड, मणिपूर भागातील वनवासी विकासार्थ कार्यरत अ.भा. वनवासी कल्याण आश्रम या सेवाभावी संस्थेत पाच वर्षे कार्य (१९७८-८२). नासिक जिल्हा वनवासी कल्याण आश्रम संघटन मंत्री (२ वर्षे). कल्याण आश्रमाचे नागालँड मणिपूर प्रांताचे संघटन मंत्री म्हणून कार्य. अध्यक्ष, श्री काशीविश्वेश्वरनाथ शिक्षण संस्था, पुणे.

**प्रमुख संपादित ग्रंथ** : एक तरी ओवी अनुभवावी (ज्ञानेश्वरी अभ्यासाचा लेखसंग्रह) (संपादन सहयोगी). मना सज्जना (समर्थ साहित्यपर लेखसंग्रह) (संपादन सहयोगी). अर्थ गौरव (विश्वेश्वर बँक रौप्यमहोत्सव ग्रंथ). ऋणानुबंध (जनता बँक पुणे, सुवर्णमहोत्सव गौरवग्रंथ). स्मृती सौरभ (कै. मुनोत स्मृती ग्रंथ). देवमाणूस (कै. शाहू मोडक स्मृती गौरवग्रंथ). देवदूत (कै. स.कृ. देवधर स्मृती गौरवग्रंथ). वाहे जीवन सदैव खळखळ (सहकार तपस्वी पुजारी अमृतमहोत्सवी गौरव ग्रंथ). बसव गाथा (महात्मा बसवेश्वर पुतळा समितीकृत लेखसंग्रह). सार्थ ज्ञानेश्वरी (विठ्ठल रूक्मिणी देवस्थान समिती, पंढरपूर, कार्य. संपादक). संस्कार संपदा (मुलांच्या नित्य पाठासाठी साहित्य संकलन ग्रंथ). रूक्मिणी स्वयंवर (संत एकनाथ महाराज कृत). हरिपाठ (संत ज्ञानेश्वर महाराज कृत). पतसंस्था समृद्धीच्या दिशा (राज्य पतसंस्था महाअधिवेशन ग्रंथ). दैनिक साईबोध (श्री साईबाबा संस्थान, शिर्डी). श्री साईचे सत्य चरित्र (श्री साईबाबा संस्थान, शिर्डी). पाऊलखुणा (भारत विकास परिषद, पुणे, दशकपूर्ती स्मरणिका २००२). मकरंद (स्वातंत्र्य सैनिक भा.वि. धर्माधिकारी गौरवग्रंथ). अक्षरगाथा (गुरुवर्य वासकर फडाची ३०० वर्षांची वाटचाल). स्नेहांजली (सौ. अंजली र. घाटपांडे स्मृती ग्रंथ). चैतन्य (भारत विकास परिषदेचा वाई पाचगणी संमेलनानिमित्त २०१०). शतार्थश्री (शताब्दी ग्रंथ, पंढरपूर अर्बन को. ऑप. बँक, पंढरपूर, २०१३) - राष्ट्रपती प्रणव मुखर्जी यांचे हस्ते पंढरपूरात प्रकाशन.

***

# लेखक परिचय



**डॉ. नरेंद्र कुंटे,** एम.ए., पीएच.डी. अक्कलकोट महाविद्यालय व दयानंद महाविद्यालय येथे अध्यापन. काही वर्षे पत्रकारिता. आतापर्यंत २७ पुस्तके प्रकाशित. विविध आठ पुरस्कारांनी सन्मानित.



**डॉ. अजित कुलकर्णी,** बीएमसीसी महाविद्यालयातून सेवानिवृत्त. प्रवचनकार, कीर्तनकार, लेखक. विविध पुस्तके प्रकाशित. सरपंच, संत ज्ञानदेव देवस्थान समिती, श्रीक्षेत्र आळंदी. विविध विषयांवर लेखन.



**डॉ. दिवाकर माणिकराव कुलकर्णी,** वैद्यकीय व्यवसायीक आणि सामाजिक कार्यकर्ते. डॉ. हेडगेवार हॉस्पीटल, औरंगाबाद येथे कार्यरत.

**डॉ. वि. य. कुलकर्णी,** लेखक. विविध विषयांवर साक्षेपी लेखन.



**सुपर्णा कुलकर्णी,** बी.एस्सी.बी.एड. नागपूर येथून तर एम.ए. मराठी मुंबई विद्यापीठातून केले. शिल्पकार चरित्रकोशाच्या 'साहित्य' व चित्रकला खंडांचे अनुक्रमे कार्यकारी व सहसंपादक. 'अशा बरसल्या धारा' हा काव्यसंग्रह, 'काही ओळी अनुभवाव्या' ही दोन पुस्तके प्रकाशित. साप्ताहिक विवेक. विविध वृत्तपत्रे, दिवाळी अंकांमधून सातत्याने लेखन.



**मल्हार कृष्ण गोखले,** विविध वृत्तपत्रे व नियतकालिके यांतून विविध विषयांवर अभ्यासपूर्ण लेखन. 'हेरगिरीचा भुलभुलैया' हे पुस्तक प्रकाशित.



**रवींद्र विष्णू गोळे,** एम.ए. (समाजशास्त्र), सहकार्यकारी संपादक-साप्ताहिक विवेक. कार्यकारी संपादक त्रैमासिक वैद्यराज व ज्येष्ठपर्व. ग्रंथसंपदा : कृतार्थ, आयाबाया, दीपस्तंभ, पथिक, झंझावात, अष्टपदी. ध्यासपथ: भटके-विमुक्त विकास परिषद गौरवग्रंथ (संपादन). महाराष्ट्र- राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, सदस्य. समरसता साहित्य परिषद, कार्यवाह.

**डॉ. वि. आ. चितळे,** लेखक. विविध विषयांवर साक्षेपी लेखन.



**दीपक हनुमंत जेवणे,** बी.कॉम., एलएल.बी., द्वितीय वर्ष. शिल्पकार चरित्रकोश - प्रकल्प कार्यकारी संपादक. अ.भा. कीर्तन संस्थेतून कीर्तनाचे प्रशिक्षण. संमोहन शास्त्राचे प्रशिक्षण. 'मराठी, हिंदी व इंग्रजी भाषांत एकूण २५ पुस्तके प्रकाशित. महाराष्ट्र- राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, सदस्य. समरसता अध्ययन केद्र, समन्वयक.



**वि. ग. जोशी,** पश्चिम रेल्वेमधून सहाय्यक राजभाषा अधिकारी म्हणून निवृत्त. शालेय शिक्षण मंडळ, माजी कार्यकारिणी सदस्य. राष्ट-भाषा सभा मुंबई विभागीय सदस्य, माजी सदस्य. विविध विषयांवर लेखन. शिल्पकार चरित्रकोशात विविध नोंदींचे लेखन आणि अनुवादकार्य.



**विद्याधर ताठे,** एम.ए./बी. जर्नालिझम, संतवाङ्गमयाचे अभ्यासक आणि लेखक. दै. तरुण भारत, (पुणे) मुख्य उपसंपादक अनेक वर्षे शिर्डी संस्थानतर्फे प्रकाशित होणाऱ्या 'साईलीला' मासिकाचे संपादक. गुली १३ वर्षे पुण्यातील 'एकता' मासिकाचे संपादक. १०० ग्रंथांचे संपादन, प्रस्तुत चरित्रकोशाचे संपादक.



**मधू नेने,** नामवंत साहित्यिक व सज्जनगड मासिक पत्रिकेचे संपादक.



**रेखा नीळकंठ पटवर्धन,** एम.ए. संस्कृत. संतवाडमयावर लेखन. उपाध्यक्ष, 'श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळ'. मानसमोती, वेदांतसार, अभंग रामायण ही पुस्तके प्रकाशित.

**रवींद्र पाटसकर,** लेखक. विविध विषयांवर साक्षेपी लेखन.



**प्रा. नीलकंठ पालेकर,** प्राध्यापक आणि लेखक. 'ज्ञानसूर्य-डॉ. डी. वाय. पाटील' या पुस्तकाला महाराष्ट्र- शासनाचा न.चिं. केळकर पुरस्कार प्राप्त. तुम्ही संत मायबाप हे १४ संतांची माहिती देणारे पुस्तक प्रकाशित.



**शोभना श्रीपाद बेलसरे,** लेखक. विविध विषयांवर साक्षेपी लेखन.

**पद्माकर बोंडाळे,** युनायटेड वेस्टर्न/आयडीबीआय बँकेतून सेवानिवृत्त. समर्थ संप्रदाय अभ्यासक. गोंदवलेकर महाराजांच्या नाम संप्रदायातील अनुग्रहित साधक.



**क्रांतिगीता महाबळ,** बी.एस्सी. (रसायनशास्त्र), संगीत विशारद. कीर्तन, प्रवचन, पुराणकथन आदी २५०० हून अधिक कार्यक्रम आकाशवाणी व दूरचित्रवाणीवर चर्चात्मक कार्यक्रमात सहभाग. ज्ञानवंदना, संस्कारदीपिका, वैनतेयाची गगनभरारी ही तीन पुस्तके प्रकाशित. हिन्दुधर्म प्रसारक मंडळ व वैनायकम् - अध्यक्ष, स्वातंत्र्यवीर सावरकर राष्ट्रीय स्मारक, मुंबई - विश्वस्त.



**संदीप राऊत,** वृत्तपत्र स्तंभलेखक, विविध मासिके व नियतकालिकांतून सातत्याने लेखन. त्रैमासिक 'नंदादीप'चे कार्यकारी संपादक. 'जनसंवाद' मासिकाचे संपादक.

**नीलिमा रानवडकर** लेखक, विविध विषयावर साक्षेपी लेखन.



**माधवी वैद्य,** एम.ए., पीएच.डी. नामवंत साहित्यिक. चिं. त्र्य. खानोलकरांच्या समग्र वाङ्मयाचा इतिहास या प्रबंधाला डॉ. वि. रा. करंदीकर पारितोषिक. अ.भा. मराठी साहित्य महामंडळाच्या अध्यक्षा. सहा माहितीपटांना राष्ट्-ीय व तीन माहितीपटांना आंतरराष्ट्-ीय पुरस्कार. विविध पुस्तके प्रकाशित.

**मंदाकिनी भा. सोमण,** लेखक. विविध विषयांवर साक्षेपी लेखन.



**अविनाश हळबे,** डीएमई, एमडीबीए. गीताधर्म मंडळ, पुणे तर्फे उत्कृष्ट प्रवचनकार पुरस्कार. 'त्वमेव केवलं कर्ताऽसि' कथासंग्रहातील लघुकथेस महाराष्ट- साहित्य परिषद, पुणेचे सर्वोत्कृष्ठ कथालेखनाचे पारितोषिक. नारायणि नमोस्तुते, परिकथेतील राजकुमारा हे कथासंग्रह प्रकाशित. भारुडसम्राट.

***



"मानवी संस्कृतीच्या प्रगतीचे प्रत्येक पाऊल हे कुणीतरी एखाद्या व्यक्तीने उचलेले असते.
अशी व्यक्ती हीच प्रेरक व पथदर्शक राहते. मानवी संस्कृतीचा विकास हा अशा व्यक्तींच्या
परिश्रमांची अंतिम परिणतीच आहे. कारण व्यक्तीमध्येच नवोन्मेषी प्रतिभा
व ती साकार करण्याची ऊर्जा आणि प्रत्यक्षात आणण्यासाठी
आवश्यक ती कार्यपद्धती विकसित करण्याची क्षमता असते." - योगी अरविंद


**खंड निर्मिती**

भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिर,
पुणे

**खंड सहयोग**

- तुमची हक्काची बँक

सारस्वत बँक

दि सारस्वत को-ऑपरेटिव्ह बँक लि. (शेडयुल्ड बँक)

978-81-908962-7-6



साप्ताहिक विवेक

१२, कामत औद्योगिक वसाहत, ३९६, स्वातंत्र्यवीर सावरकर मार्ग, प्रभादेवी, मुंबई - ४०० ०२५.
दूरध्वनी: (९१-२२) २४२२ ९४५१ / १४४०, फॅक्स : (९१-२२) २४३६ ३७५६
Email: charitrakosh@gmail.com Website: www.maharashtranayak.com